द्गृहस्थभिन्नेनपापक्षयकामेनकार्यः काम्योनतुनित्यः सर्वसंक्रांतिषुपिंडरहितंश्राद्धंकार्यम् अय नद्वयेतुनित्यम् यथातत्तत्संक्रांतिषुदानादिकंकर्तव्यं तथैवताभ्यःपूर्वमयनांशप्रवृत्तौतत्तत्सं क्रांत्युचितस्नानदानादिकंकर्तव्यं अयनांशाज्योतिःशास्त्रेप्रसिद्धाः तेचेदानींद्वादशाधिकस प्तदशशतसंख्याकेशालिवाहनशकेएकविंशतिरयनांशाइत्येकविंशतितमेदिनेपूर्वमयनांशपर्व कालइतिपर्यवसन्नोर्थः एवंन्यूनाधिकशकेऊह्यम् वृषसिंहवृश्चिककुंभेषुसंक्रांतिर्विष्णुपदसंज्ञा मिथुनकन्याधनुर्मीनेषुसंक्रांतिःषडशीतिसंज्ञा मेषतुलयोर्विषुवसंज्ञा कर्कमकरयोरयनसंज्ञा एतासुचतुर्विधासुउत्तरोत्तरंपुण्याधिक्यं मंगलकृत्येषुसर्वसंक्रांतिष्वविशेषेणपूर्वतःपरतश्च षोडशषोडशघटिकास्त्याज्याः चंद्रादिसंक्रांतिषुतुपूर्वत्रपरत्रचमिलित्वाक्रमेणद्वेनवद्वेचतुर शीतिःषट्साधेशतंचघटिकास्त्याज्याःरात्रौसंक्रमणेग्रहणवद्रात्रावेवस्नानदानादिकंकर्तव्यमि तिकेचित् रात्रौसंक्रमणेपिदिवैवस्नानादिकंनतुरात्राविवितितुसर्वसंमतंबहुदेशाचारश्चैवम् . य स्यजन्मर्क्षेरविसंक्रमस्तस्यधनक्षयादिपीडा तत्परिहारार्थंपद्मपत्रादियुक्तजलेनस्नानम् विषु वायनयोरन्हिसंक्रमेपूर्वापररात्रौतदन्हिचाध्यापनाध्ययनेवर्जयेत् रात्रिसंक्रमेपूर्वापरदिनयो स्तद्रात्रौवर्जयेत्एवंपक्षिणीसंक्रांतिः द्वादशप्रहरपर्यंतमनध्यायादिकमितितात्पर्यम् अन्योपि विशेषोऽयनसंक्रांतौवक्ष्यते इतिसंक्रांत्युद्देशोद्वितीयः ॥ २ ॥

## आतां बारा संक्रांतींचीं दानें सांगतों.

मेष संक्रांतीला मेषदान; वृषभ संक्रांतीला गोप्रदान; मिथुन संक्रांतीला वस्त्रदान, अन्नादि- दान; कर्क संक्रांतीला घृतधेनुदान[१]; सिंह संक्रांतीला छत्र व सुवर्णदान; कन्या संक्रांतीला गृह आणि वस्त्रदान; तुला संक्रांतीला तिलदान व गोरसदान; वृश्चिक संक्रांतीला दीपदान; धनुःसंक्रांतीला वस्त्रदान व वाहनदान; मकर संक्रांतीला काष्ठदान, व अग्निदान; कुंभ संक्रां- तीला गाई, उदक, तृण यांचीं दानें; मीन संक्रांतीला भूमि, पुष्पमाला यांचीं दानें; याप्रकारें दुसरींहि दानें ( अन्यग्रंथीं ) पाहावीं. मकर, कर्क, तुला, मेष, ह्या संक्रांतींचे दिवसीं पूर्वी तीन दिवस अथवा एक दिवस उपोषण करून स्नानदानादिक करावें. शेवटचें उपोषण संक्रांतियुक्त अहोरात्रीं, किंवा पुण्यकाल्युक्त अहोरात्रीं होईल असें करावें. हें उपोषण, पुत्र- वान् गृहस्थाश्रमी यानें करूं नये. तद्भिन्नपापक्षयेच्छूनें करावें. व हें उपोषण कामनिक आहे, नित्य नाहीं. सर्व संक्रांतींचे दिवसीं अपिंडक श्राद्ध करावें. मकर व कर्क ह्या संक्रांतींचे ठायीं श्राद्ध नित्य आहे. मेषादिक संक्रांतींला जशीं कर्तव्यदानें सांगितलीं तसींच त्या संक्रांतींच्या पूर्वी अयनांशकालीं जीं जीं संक्रांतींला उचित स्नानदानादिक तीं तीं करावीं. अयनांश ज्योतिःशास्त्रांत प्रसिद्ध आहेत. ते अयनांश सांप्रत शालिवाहन शक १७१२ या वर्षी २१ आहेत, यास्तव संक्रांतीच्या पूर्वी एकविसाव्या दिवसीं अयनांशपर्वकाल होतो असा शेवटचा अर्थ झाला. याप्रमाणें न्यूनाधिक शक असतां जाणावें. संक्रांतींच्या विशेष संज्ञा— वृषभ, सिंह, वृश्चिक, कुंभ ह्या संक्रांति विष्णुपद संज्ञक. मिथुन, कन्या, धनु, मीन ह्या संक्रांति षडशीति संज्ञक. मेष, तुला ह्यांस विषुव अशी संज्ञा आहे. कर्क

१ घृतधेनूचा प्रकार दानचंद्रिका ग्रंथीं पहावा.

आणि मकर ह्यांला अयन अशी संज्ञा आहे. ह्या चतुर्विध संक्रांतींचे ठायीं उत्तरोत्तर[1] पुण्य अधिक आहे. विवाहादि मंगल कार्यांचे ठायीं साधारण पक्षानें सर्व संक्रांतींच्या पूर्वींच्या व पुढच्या सोळा सोळा घटिका टाकाव्या. चंद्रादिक सहा ग्रहांचे संक्रांतींच्या पूर्वींच्यां व पुढच्या मिळून क्रमानें २।९।२।८४।६।१९० घटिका टाकाव्या. रात्रौ संक्रांत झाली असतां ग्रहणाप्रमाणें रात्रींच स्नानदानादिक करावें, असें कोणी ह्मणतात. रात्रीं संक्रांत झाली असेल तथापि दिवसासच स्नानदान करावें, रात्रीं करूं नये असें सर्वमान्य मत आहे व देशाचारहि असांच आहे. ज्याच्या जन्मराशीला सूर्यसंक्रांत होईल त्याला द्रव्यक्षयादि पीडा होते, त्याच्या परिहाराकरितां कमलपत्रयुक्त जलानें स्नान करावें. विषुव आणि अयन ह्या संक्रांति दिवसास झाल्या असतां पूर्वरात्र, पुढची रात्र, आणि तो संक्रांतिदिवस यांचे ठायीं अध्यापन, अध्ययन हीं करूं नयेत. रात्रौ संक्रांत झाली असतां पूर्व दिवस, पुढचा दिवस, आणि ती रात्र यांचे ठायीं पूर्वोक्त अध्यापनादिक वर्ज्य करावें. याप्रमाणें ज्या वेळीं संक्रांत प्राप्त होते ते चार प्रहर, पूर्वींचे चार प्रहर, आणि पुढचे चार प्रहर मिळून बारा प्रहरांपर्यंत अनध्याय, असें तात्पर्य जाणावें. दुसरा कांहीं विशेष निर्णय आहे तो अयनसंक्रांति ( कर्क, मकर ) प्रकरणीं सांगूं. इति संक्रांत्युद्देशो द्वितीयः ॥ २ ॥

---

**अथ मलमासः सद्विविधः अधिमासः क्षयमासश्च संक्रांतिरहितोमासोधिमासः संक्रांतिद्वययुक्तोमासः क्षयमासःपूर्वाधिमासादुत्तरोधिमासस्त्रिंशत्तममासमारभ्याष्टसुनवसुवा मासेष्वन्यतमोभवति क्षयमासस्तुएकचत्वारिंशदधिकशतसंख्यैर्वर्षैरेकोनविंशतिसंख्यैर्वा वर्षैर्भवतिनत्वधिकमासवदल्पकालेन क्षयमासःकार्तिकमार्गशीर्षपौषेष्वन्यतमो भवतिनेतरः यस्मिन्वर्षेक्षयमासस्तस्मिन्वर्षेऽधिकमासद्वयम् क्षयमासात्पूर्वमेकोधिमासः क्षयमासानंतरमेकोधिमासइति ॥**

## आतां मलमासाचा निर्णय सांगतों.

मलमास दोन प्रकारचा, एक अधिकमास आणि दुसरा क्षयमास. ज्या महिन्यांत सूर्यसंक्रांत नाहीं तो अधिकमास, आणि दोन संक्रांतींनीं युक्त जो मास तो क्षयमास. पूर्वींच्या अधिक मासापासून पुढचा अधिक मास होणें तो, तिसाव्या महिन्यापासून आठ महिन्यांमध्यें किंवा नऊ महिन्यांमध्यें कोणता तरी होतो. एकशें एकेचाळीस वर्षांनीं किंवा एकुणीस वर्षांनीं क्षयमास होतो, अधिकमासाप्रमाणें अल्पकाळानें होत नाहीं. क्षयमास होणें तो कार्तिक, मार्गशीर्ष, पौष या महिन्यांतून कोणता तरी होतो, दुसरा होत नाहीं. ज्या वर्षीं क्षयमास होतो त्या वर्षीं क्षयमासाच्या पूर्वी एक, आणि क्षयमासानंतर एक असे दोन अधिक मास होतात.

---

१ उत्तरोत्तर ह्मणजे विष्णुपद संक्रांतीहून षडशीति संज्ञक विशेष पुण्यकारक, त्याहून विषुव संज्ञक विशेष, त्याहून अयन संज्ञक विशेष पुण्यकारक असें जाणावें.

**अधिकमासोदाहरणं चैत्रामावास्यायांमेषसंक्रांतिः ततःशुक्लप्रतिपदमारभ्यामावास्यापर्यंतंसंक्रांतिर्नास्ति ततःशुक्लप्रतिपदिवृषभसंक्रांतिरिति पूर्वःसंक्रांतिरहितोमासोधिकवैशाखसंज्ञःवृषभसंक्रांतियुतस्तुशुद्धवैशाखसंज्ञः ॥**

**अधिक मासाचें उदाहरण.**—चैत्र अमावास्येला मेष संक्रांत झाली. नंतर शुद्ध प्रतिपदेस आरंभ करून अमावास्येपर्यंत ( वैशाखमासीं ) संक्रांत नाहीं. त्यानंतर शुद्ध प्रतिपदेला वृषभ संक्रांत झाली, पूर्वीचा संक्रांतिरहित जो मास तो अधिक वैशाखमास. वृषभसंक्रांतियुक्त जो तो शुद्ध वैशाख.

---

**अथक्षयमासोदाहरणम् भाद्रपदकृष्णामावास्यायांकन्यासंक्रांतिःततआश्विनोधिमासः** शुद्धाश्विनप्रतिपदितुलासंक्रांतिःकार्तिकशुक्लप्रतिपदिवृश्चिकसंक्रांतिः ततोमार्गशीर्षशुद्धप्रतिपदिधनुःसंक्रांतिःतस्मिन्नेवमासेअमावास्यायांमकरसंक्रांतिरितिधनुर्मकरसंक्रांतिद्वययुक्तएकोमासःक्षयमाससंज्ञकः सचमार्गशीर्षपौषाख्यमासद्वयात्मकएकोमासोज्ञेयः तस्यप्रतिपदादितिथीनांपूर्वार्धेमार्गशीर्षउत्तरार्धेपौषइत्येवंसर्वतिथीनांमासद्वयात्मकत्वात् अत्रतिथिपूर्वार्धेमृतस्यमार्गशीर्षेप्रत्यब्दश्राद्धमुत्तरार्द्धेमृतस्यतुपौषे एवंजननेवर्धापनादिविधिरपि ततऊर्ध्वंमाघामावास्यायांकुंभसंक्रांतिः ततःफाल्गुनोधिमासः शुद्धफाल्गुनशुक्लप्रतिपदिमीनसंक्रांतिः एवंपूर्वापराधिमासद्वययुक्तः क्षयमासोयस्मिन्वर्षेतत्रत्रयोदशमासात्मकंकिंचिदूननवत्यधिकशतत्रयदिनैर्वर्षम् तत्रक्षयमासात्पूर्वोधिमासःसंसर्पसंज्ञः सर्वकर्मार्हः शुभकर्मणिनत्याज्यः **अंहस्पतिसंज्ञः क्षयमासस्तदुत्तरभाव्यधिकमासश्चसर्वकर्मसुवर्ज्यः एवंत्रिवत्सरांतरस्थःकेवलोधिकमासोपिवर्ज्यः ॥**

**क्षयमासाचें उदाहरण.**—भाद्रपद कृष्ण अमावास्येला कन्या संक्रांत, नंतर आश्विन अधिकमास, शुद्ध आश्विन प्रतिपदेला तुला संक्रांत, आणि कार्तिक शुद्ध प्रतिपदेला वृश्चिक संक्रांत, त्यानंतर मार्गशीर्षशुद्ध प्रतिपदेला धनुःसंक्रांत, त्याच ( मार्गशीर्ष ) महिन्यांत अमावास्येला मकर संक्रांत, याप्रमाणें संक्रांति होतात; तेव्हां धनुःसंक्रांत आणि मकरसंक्रांत ह्या दोन संक्रांतींनीं युक्त जो मास त्याला क्षय मास ह्मणतात. तो मार्गशीर्ष व पौष हे दोन मास मिळून एक मास होतो. त्याच्या प्रतिपदादिक ज्या तिथि त्यांचें पूर्वार्ध मार्गशीर्ष, आणि उत्तरार्ध पौषमास, याप्रमाणें त्या सर्व तिथि दोन मासांच्या आहेत, यास्तव या महिन्यांत तिथींच्या पूर्वार्धीं मृत झाला असेल तर त्याचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध मार्गशीर्षांत, आणि तिथींच्या उत्तरार्धीं मृत झाला असेल तर त्याचें श्राद्ध पौषांत करावें. याप्रमाणें जन्म झालें असतां वाढदिवस इत्यादि विधीहि करावा. त्यानंतर माघ अमावास्येला कुंभ संक्रांत, नंतर फाल्गुन अधिक मास, शुद्ध फाल्गुन शुक्लप्रतिपदेला मीन संक्रांत झाली, याप्रमाणें पूर्वींच्या व पुढच्या दोन अधिक मासांनीं युक्त क्षयमास ज्या वर्षांत होतो तें वर्ष तेरा महिन्यांचें असून त्याचे तीनशें नव्वदांत कांहीं कमी इतके दिवस होतात. क्षयमासाच्या पूर्वील जो अधिक मास त्याला संसर्प असें नांव आहे, व तो सर्व कर्मांस योग्य आहे; यास्तव शुभकार्याविषयीं टाकूं नये.

बृहस्पति संज्ञक क्षयमास, व त्याच्या पुढील होणारा अधिक मास हे दोनहि सर्व कर्मांचे ठिकाणीं वर्ज्य करावे. याप्रमाणें तीन वर्षांतला अधिक मासहि शुभकार्याविषयीं वर्ज्य करावा.

---

तत्रवर्ज्यावर्ज्यनिर्णयः अनन्यगतिकंनित्यंनैमित्तिकंकाम्यंचअधिकमासक्षयमासयोः कर्तव्यम् सगतिकंनित्यंनैमित्तिकंकाम्यंचवर्ज्यं तथाहि संध्याग्निहोत्रादिनित्यं ग्रहणस्नानादिनैमित्तिकं कारीर्यादिकंरक्षोगृहीतजीवनार्थराक्षोघ्नेष्ट्यादिकंचकाम्यं मलमासेऽपिकार्यम् ज्योतिष्टोमादिनित्यंजातेष्ट्यादिनैमित्तिकंपुत्रकामेष्ट्यादिकाम्यंचमलमासोत्तरंशुद्धमास्येवकर्तव्यम् आरब्धकाम्यस्यमलमासेप्यनुष्ठानम् नूतनारंभःसमाप्तिश्चनकर्तव्यातथा पूजालोपादिनिमित्तकपुनर्मूर्तिप्रतिष्ठांगर्भाधानाद्यन्नप्राशनांतसंस्कारान्प्राप्तकालाननन्यगतिकान्ज्वरादिरोगशांतिमलभ्ययोगेश्राद्धव्रतादिकंनैमित्तिकप्रायश्चित्तं नित्यश्राद्धमूनमासिकादिश्राद्धानिदर्शश्राद्धंचमलेऽपिकुर्यात् चैत्रादौमलमासेमृतानांकदाचिद्बहुकालेनतस्मिन्नेवचैत्रादौमलमासेप्राप्तेमलमासएवप्रतिसांवत्सरिकंश्राद्धंकर्तव्यं चैत्रादौशुद्धमासेमृतानांतुप्रत्याब्दिकंश्राद्धंमलमासेनकर्तव्यंशुद्धेएवचैत्रादौकर्तव्यं शुद्धमासेमृतानांतुप्रथमाब्दिकंमलमासएवकार्यंनशुद्धे द्वितीयाब्दिकंतुशुद्धेएव एकादशाहांतकर्मसपिंडीकर्मचमलेऽपिकार्यं द्वितीयमासिकादिश्राद्धंतुमलेशुद्धेचावृत्त्याद्विवारंकर्तव्यं एवंचयत्रद्वादशमासिकं अधिकमासेप्राप्तंतस्यमलेशुद्धेचद्विरावृत्तिंकृत्वाऊनाब्दकालेऊनाब्दिकंचकृत्वाचतुर्दशेमासेप्रथमाब्दिकंकार्यं यस्मिन्वर्षेक्षयमासाव्यवहितोऽधिकमासःयथा कार्तिकोऽधिमासस्तदुत्तरोमासोवृश्चिकधनुःसंक्रांतियुक्तत्वात्क्षयसंज्ञकस्तत्रकार्तिकमासस्थंप्रत्याब्दिकंपूर्वेधिमासे उत्तरेक्षयमासेचकार्यं यत्रापिक्षयाद्व्यवहितपूर्वोऽधिमासो यथाश्विनोऽधिमासोमार्गशीर्षःक्षयमासस्तत्रापिआश्विनमासगतंश्राद्धमधिकेशुद्धेचआश्विनेकार्यं द्वयोरपिकर्मार्हत्वादितिभाति व्यवहितक्षयमासगतंत्वाब्दिकंक्षयमासएवकार्यंतथाचपूर्वोक्तेमार्गशीर्षक्षयोदाहरणे मार्गशीर्षगतंपौषगतंचाब्दिकमेकस्मिन्नेवमासेतिथिपूर्वार्धादिविभागंविनैवकार्यमितिफलितं ॥

## आतां अधिकमास व क्षयमास यांत वर्ज्यावर्ज्य कर्में कोणतीं तीं सांगतों.

अनन्यगतिक ( जेव्हांचे तेव्हांच करावयाचीं ) असीं नित्य, नैमित्तिक आणि काम्य हीं कर्में अधिक मास व क्षय मास यांमध्यें करावीं. सगतिक ( पुढें करण्यास काळ आहे ) असीं नित्य, नैमित्तिक आणि काम्य कर्में तीं करूं नयेत. तीं कर्में असीं—संध्या, अग्निहोत्र इत्यादि नित्य कर्में, ग्रहणस्नान इत्यादिक नैमित्तिक कर्में, पर्जन्याकरितां कारीर्यादि इष्टि व ब्रह्मराक्षससंबंधी पीडापरिहारार्थ राक्षोघ्नेष्टि इत्यादिक काम्य कर्में, हीं सर्व अधिकमासांतहि करावीं. ज्योतिष्टोम इत्यादिक नित्य कर्में, जातेष्टि इत्यादिक नैमित्तिक कर्में, पुत्रकामेष्टि इत्यादिक काम्य कर्में; हीं अधिक मासानंतर शुद्ध मासांतच करावीं. पूर्वी आरंभलेलें असें काम्य कर्म अधिक मासांतहि करावें. नवीन आरंभ व समाप्ति करूं नये; तसींच पूजेचा लोप झाला इत्यादिक निमित्तानें प्राप्त झालेली पुनर्मूर्तिप्रतिष्ठा, कालप्राप्त व जेव्हांचे तेव्हां करावयाचें असें गर्भा-

धानापासून अन्नप्राशनपर्यंत आठ संस्कार, ज्वरादि रोगांची शांति, अलभ्य योगाचे ठिकाणीं कर्तव्य असें श्राद्ध, व्रतादिक, नैमित्तिक प्रायश्चित्त, नित्यश्राद्ध, ऊनमासिकादिक श्राद्धें, आणि दर्शश्राद्ध हीं अधिकमासांतहि करावीं. चैत्रादिक अधिक मासांत मृत झाले असून कदाचित् पुष्कळ दिवसांनीं तोच चैत्रादिक अधिक मास प्राप्त झाला असतां अधिक मासांतच त्यांचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करावें. चैत्रादिक शुद्ध मासांत मृत झालेल्यांचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध अधिक मासांत करूं नये, शुद्धमासांतच करावें. शुद्धमासांत मृत झाले त्यांचें प्रथमाब्दिक श्राद्ध अधिकमासांतच करावें, शुद्धमासांत करूं नये. दुसऱ्या वर्षांतील श्राद्ध शुद्धमासांतच करावें. प्रथमदिवसापासून अकराव्या दिवसपर्यंतचें कर्म, व सपिंडीकर्म हीं अधिक मासांतहि करावीं. द्वितीय मासिकादिक श्राद्ध, अधिकमास व शुद्ध मास यांत द्विरावृत्तीनें करावें. याप्रमाणें जर बारावें मासिक, अधिक मासांत प्राप्त होईल तर अधिक व शुद्धमासांत त्याची द्विरावृत्ति करून, ऊनाब्दकालीं ऊनाब्दिक करून चवदावे मासांत प्रथमाब्दिक करावें. ज्या वर्षीं क्षयमासाच्या जवळ अधिकमास होतो ( जसा—कार्तिक अधिकमास, त्याच्या पुढील मासांत, वृश्चिक, धन ह्या दोन संक्रांति आहेत यास्तव तो क्षयमास ) तेव्हां कार्तिकमासांतील प्रतिसांवत्सरिक श्राद्ध पूर्वींच्या अधिक मासांत करून पुढच्या क्षयमासांतहि करावें. क्षयमासापासून दूर असा पूर्वीं अधिक मास होतो (जसा—आश्विन अधिक मास, मार्गशीर्ष क्षयमास,) तेथेंहि दोनहि मास श्राद्धाला योग्य आहेत यांकरितां आश्विन मासांतील श्राद्ध अधिकांत करून शुद्ध आश्विन मासांतहि करावें, असें मला वाटतें. दूरस्थ क्षयमासांतीं प्रतिसांवत्सरिक श्राद्ध क्षयमासांतच करावें. तसेंच पूर्वीं सांगितलेलें जें मार्गशीर्ष क्षयमासाचें उदाहरण त्यांत, मार्गशीर्षांतील व पौषांतील आब्दिक श्राद्ध करणें तें एकाच मासांत, तिथींचे पूर्वार्धादि विभागावांचूनच करावें, असें तात्पर्य आहे.

---

अथमलमासेवर्ज्यानि उपाकर्मोत्सर्जनेअष्टकाश्राद्धानिअधिकेवर्ज्यानि चूडामौंजीबंधविवाहास्तीर्थादियात्रावास्तुकर्मगृहप्रवेशदेवप्रतिष्ठाकूपारामाद्युत्सर्गोनूतनवस्त्रालंकारधारणंतुलापुरुषादिमहादानानियज्ञकर्माधानमपूर्वतीर्थदेवदर्शनंसंन्यासः काम्यवृषोत्सर्गोराजाभिषेको व्रतानिसगतिकमन्नप्राशनंसमावर्तनमतिक्रांतनामकर्मादिसंस्कारःपवित्रारोपणदमनार्पणेश्रवणकर्मसर्पबल्यादिपाकसंस्थाः शयनपरिवर्तनाद्युत्सवःशपथदिव्यादिकर्म एतानिमलमासेवर्ज्यानि नैमित्तिकानिरजोदोषशांतिविच्छिन्नाधानपुनःप्रतिष्ठादीनि यदिनिमित्तानंतरमेवक्रियंतेतदानमलमासादिदोषःकालातिपत्तौतुशुद्धेएवकर्तव्यानि आग्रयणंदुर्भिक्षसंकटेमलमासेकार्यमन्यथाशुद्धेएव युगादिमन्वादिश्राद्धानांमासद्वयेप्यावृत्तिः क्षयात्पूर्वोधिमासः संसर्पसंज्ञकःपूर्वमुक्तः तत्रचूडाकर्मव्रतबंधविवाहाग्न्याधानयज्ञोत्सवमहालयराजाभिषेकाएववर्ज्याः नान्यानिकर्माणि अपूर्वव्रतारंभोव्रतसमाप्तिश्चमलमासेनभवति सपूर्वमाघस्नानादेः क्षयमासेप्यारंभसमाप्तीइति मकरसंक्रांतियुक्तक्षयमासगतपौर्णमास्यांमाघस्नानमारभ्यकुंभसंक्रांतियुतमाघपौर्णमास्यांसमापनीयम् एवंकार्तिकेप्यूह्यम् यत्रवैशाखादिरधिकस्त

**अवैशाखस्नानादिमासव्रतानांचैत्रपौर्णमास्यामारब्धानांशुद्धवैशाखपौर्णमास्यांसमाप्तिरितिते षांमासद्वयमनुष्ठानं यन्मलमासेवर्ज्यमुक्तंतद्गुरुशुक्रास्तबाल्यवार्धकेष्वपिज्ञेयम् तत्रास्तात्प्राक् सप्ताहंवार्धकमुदयानंतरंसप्ताहंबाल्यमितिमध्यमःपक्षः पंचदशाहपंचाहत्र्यहादिपक्षाआपद नापदादिविषयतयादेशविशेषपरतयाचयोज्याः अयंवर्ज्यावर्ज्यनिर्णयः सिंहस्थेगुरावपिज्ञेयः ॥**

## आतां मलमासांत वर्ज्य कर्में कोणतीं तीं सांगतों.

उपाकर्म, उत्सर्जन, अष्टकाश्राद्धें हीं अधिकांत करूं नयेत. चौल; मुंज; विवाह; तीर्थादियात्रा; देवयात्रा; गृहारंभ; गृहप्रवेश; देवाची अर्चा; विहीर, तलाव, बाग यांचा उत्सर्ग; नवें वस्त्र व अलंकार यांचें धारण; तुलापुरुषादि महादानें; यज्ञकर्म; अग्निस्थापन; पूर्वी न केलेलें असें देव व तीर्थें यांचें दर्शन; संन्यास; काम्यवृषोत्सर्ग; राजाभिषेक; व्रतें; पुढें ज्यांला काळ आहे असे अन्नप्राशन व सोडमुंज हे संस्कार; पूर्वी होणें राहिलेला नामकर्मादिक संस्कार; पोवतीं वाहणें; दवणा वाहणें; श्रवणाकर्म, सर्पबलि इत्यादि पाकसंस्था; विष्णूचें शयन, परिवर्तन ( ह्या कुशीचा त्या कुशीस वळणें ) इत्यादिक उत्सव; शपथ घेणें; दिव्य करणें; हीं सर्व मलमासांत वर्ज्य करावीं. भुवनेश्वरीची शांति, विच्छिन्नाग्नीचें पुनःसंधान, पुनःप्रतिष्ठा, इत्यादि **नैमित्तिक** कर्में, जर निमित्त होतांच कर्तव्य असतील तर अधिक मासाचा दोष नाहीं. विहित काल टळून गेला असतां शुद्ध मासांतच करावीं. दुष्काळ इत्यादि संकट असतां **आग्रयण** अधिक मासांत करावें, संकट नसेल तर शुद्धांत करावें. युगादि श्राद्धें आणि मन्वादि श्राद्धें दोनहि मासांत आवृत्तीनें करावीं. क्षयमासाच्या पूर्वील **संसर्प** नामक असा पूर्वी सांगितलेला जो अधिकमास त्याचे ठिकाणीं चौल, मुंज, विवाह, अग्निस्थापन, यज्ञोत्सव, महालय, राजाभिषेक इतकींच वर्ज्य करावीं, इतर कर्में वर्ज्य करूं नयेत. नूतन व्रताचा आरंभ व समाप्ति अधिक मासांत होत नाहीं. पूर्वी केलेलें असें जें माघस्नानादिक त्याचा आरंभ व समाप्ति हीं दुसरे वेळेस क्षयमासांत होतात. मकरसंक्रांतियुक्त जो क्षयमास त्याच्या पौर्णिमेला माघस्नानाचा आरंभ करून कुंभसंक्रांतियुक्त जी माघपौर्णिमा तिचे ठिकाणीं तें समाप्त करावें. याप्रमाणें कार्तिकाचे ठिकाणींहि जाणावें. ज्या वर्षी वैशाखादिक अधिकमास येतो त्या वर्षी वैशाखस्नानादिक जीं मासव्रतें त्यांचा आरंभ चैत्रपौर्णिमेला करून शुद्ध वैशाख पौर्णिमेचे दिवशीं समाप्ति करावी. त्या ( वैशाख स्नानादिक ) व्रतांचें दोन महिनेपर्यंत अनुष्ठान जाणावें. जीं जीं कर्में मलमासांत वर्ज्य सांगितलीं तीं, बृहस्पति व शुक्र यांच्या अस्त, बाल्य, वार्धक्य यांचें ठिकाणीं वर्ज्य जाणावीं. अस्ताच्या पूर्वी सात दिवस वार्धक्य व उदयानंतर सात दिवस बाल्य, हा मध्यम पक्ष होय. पंधरा दिवस, पांच दिवस, तीन दिवस इत्यादिक जे पक्ष सांगितले ते आपत्तिकाल व अनापत्तिकाल इत्यादिक व्यवस्थेनें, आणि देशाचारव्यवस्थेनें योजावे. हा वर्ज्यावर्ज्य निर्णय सिंहस्थ गुरु असतांहि जाणावा.

---

**तत्रविशेषउच्यते कर्णवेधचौलमौंजीबंधविवाहदेवयात्राव्रतवास्तुकर्मदेवप्रतिष्ठासंन्यासाविशेषतोवर्ज्याइति ॥**

## आता सिंहस्थ गुरु असतां विशेषेंकरून वर्ज्य कर्में कोणतीं तीं सांगतों.

कान टोंचणें, चौल, मुंज, विवाह, देवयात्रा, व्रतें, घर बांधणें, अर्चा, संन्यास हीं अवश्य वर्ज्य करावीं.

---

अथसिंहस्थापवादः मघानक्षत्रगतेसिंहांशगतेचगुरौसर्वदेशेषुसर्वमांगलिककर्मणांनिषेधः सिंहांशोत्तरंगोदादक्षिणेभागीरथ्युत्तरेसिंहस्थदोषोनास्ति गंगागोदामध्यदेशेतुसर्वसिंहस्थेविवाहव्रतबंधयोर्दोषः अन्यकर्माणिसिंहांशोत्तरंसर्वदेशेषुकर्तव्यानि मेषस्थेसूर्येसर्वदेशेषुसर्वमांगलिककर्मणांसर्वसिंहस्थेनदोषः क्वचिद्वृषस्थितेऽर्केपिदोषाभावउक्तः अत्रसिंहस्थेगुरौगोदावरीस्नानं कन्यागतेकृष्णास्नानंमहापुण्यम् गोदावर्यांयात्रिकाणांमुंडनोपवासावावश्यकौनतुतत्तीरवासिनाम् गर्भिण्यामपिभार्यायांविवाहादिमंगलोत्तरमपिगोदावर्यांमुंडनेदोषोनास्तिगयागोदावरीयात्रायांमलमासगुरुशुक्रास्तादिदोषोनास्तिमलमासेव्रतविशेषोऽन्यत्रज्ञेयः इतिमलमासगुरुशुक्रास्तसिंहस्थगुरुवर्ज्यावर्ज्यनिर्णयस्तृतीयउद्देशः ॥

## आतां सिंहस्थ गुरूचा अपवाद सांगतों.

मघानक्षत्रीं किंवा सिंहांशीं गुरु असतां विवाहादि मंगलकार्यें कोणत्याहि देशाचे ठिकाणीं करूं नयेत. सिंहांशानंतर गोदावरीच्या दक्षिण प्रदेशीं व भागीरथीच्या उत्तर प्रदेशीं सिंहस्थाचा दोष नाहीं. गंगा, आणि गोदावरी यांच्या मध्यवर्ती जो देश तेथें तर, सर्व सिंहस्थांत विवाह, मुंज हीं मात्र वर्ज्य करावीं. सिंहांशानंतर इतर कर्में सर्व देशीं करावीं. मेषींचा सूर्य असेल तर सर्व देशीं सर्व मांगलिक कर्में करावीं, त्याविषयीं सिंहस्थदोष नाहीं. वृषभ राशीचा सूर्य असेल तर सिंहस्थदोष नाहीं असेंहि क्वचित् आहे. सिंहस्थ गुरु असतां गोदावरीचें स्नान, आणि कन्यागत गुरु असतां कृष्णेचें स्नान, महापुण्यकारक आहेत. गोदावरीच्या यात्रेला जे जातात त्यांनीं क्षौर, उपोषण हीं अवश्य करावीं, तेथें राहणाऱ्यांस अवश्य कर्तव्य नाहींत. स्त्री गर्भिणी असेल, अथवा विवाहादि मंगल कार्य झालें असेल तथापि गोदावरीचे ठिकाणीं मुंडन करण्याविषयीं दोष नाहीं. गया व गोदावरी यांचे यात्रेविषयीं अधिकमासदोष व गुरुशुक्रास्तादिदोष नाहीं. अधिकमासव्रताचा विशेष प्रकार ग्रंथांतरीं पहावा. इति धर्मसिंधुसारे तृतीयउद्देशः ॥ ३ ॥

---

अथतिथिनिर्णयेसामान्यपरिभाषा तिथिर्द्विविधा पूर्णासखंडाच सूर्योदयमारभ्यषष्टिनाडिकाव्याप्तापूर्णा एतदन्यासखंडा सखंडापिद्विविधा शुद्धाविद्धाच सूर्योदयमारभ्यअस्तमयपर्यंतंविद्यमानाशिवरात्र्यादौनिशीथपर्यंतंविद्यमानाचशुद्धा तदन्याविद्धा वेधोपिद्विविधः प्रातर्वेधःसायंवेधश्च सूर्योदयोत्तरंषट्घटिकापरिमिततिथ्यंतरस्पर्शात्मकःप्रातर्वेधःसूर्यास्तात्प्राक्षट्घटीमिततिथ्यंतरस्पर्शःसायंवेधः एकादशीव्रतविषयेतुवेधोवक्ष्यते क्वचित्तिथिविशेषेवेधाधिक्यम् पंचमीद्वादशनाडीभिःषष्ठींविद्धांकरोति दशमीपंचदशभिरेकादशीवेधकृत्

चतुर्दशीअष्टादशनाडीभिःपंचदशींविध्यति विद्धाश्चतिथयःक्वचित्कर्मणिग्राह्याःकुत्रचित्त्या ज्याश्चभवंति तत्रसंपूर्णाशुद्धाचतिथिःप्रायेणनिर्णयंनापेक्षते संदेहाभावात् निषेधविषयेसखं डापिननिर्णयार्हा निषेधस्तुनिवृत्त्यात्माकालमात्रमपेक्षतेइतिवचनेनअष्टम्यादिषुनारिकेलादि भक्षणनिषेधादेस्तत्कालमात्रव्याप्ततिथ्यपेक्षणात् ॥

## आतां तिथींच्या निर्णयाविषयीं सामान्य परिभाषा सांगतों.

तिथि दोन प्रकारची, एक पूर्णतिथि आणि दुसरी सखंडातिथि. सूर्याच्या उदयापासून आरंभ करून साठ घटिका जी तिथि ती पूर्णतिथि. याहून जी भिन्न ती सखंडा. ती सखंडा तिथिहि शुद्धा व विद्धा या भेदें करून दोन प्रकारची आहे. सूर्योदयापासून अस्तमानपर्यंत राहणारी, व शिवरात्र्यादिक व्रतांचे ठिकाणीं मध्यरात्रीपर्यंत राहणारी जी, ती शुद्धतिथि, त्याहून जी भिन्न ती विद्धतिथि जाणावी. वेध दोन प्रकारचा, एक प्रातःकालीन वेध, आणि दुसरा सायंकालीन वेध. सूर्योदयानंतर सहा घटिकांनीं पूर्व तिथीचा दुसऱ्या तिथीला स्पर्श होतो तो प्रातःकालीन वेध. सूर्यास्ताच्या पूर्वी सहा घटिकांनीं दुसऱ्या तिथीला स्पर्श होतो तो सायंकालीन वेध. एकादशीव्रताविषयीं वेध सांगणें तो त्या प्रकरणीं सागूं. कितीएक तिथींविषयीं वेध याहून जास्त सांगितला आहे, तो असा;– पंचमी बारा घटिकांनीं षष्ठीला विद्ध करित्ये. दशमी पंधरा घटिकांनीं एकादशीला विद्ध करित्ये. चतुर्दशी अठरा घटिकांनीं पौर्णिमेला विद्ध करित्ये, यास्तव विद्धतिथि, ह्या कितीएक कर्मांविषयीं टाकाव्या व कितीएक कर्मांविषयीं घ्याव्या. संपूर्ण तिथि व शुद्ध तिथि यांविषयीं संशय नाहीं याकरितां त्यांचा निर्णय सांगण्याची गरज नाहीं. ज्यापेक्षां खंडतिथीचाहि निषेध सांगितला आहे व "निषेध तर निवृत्तिरूप होत्साता केवल कालमात्राचीच अपेक्षा करितो," असें जें वचन तेणेंकरून अष्टम्यादिक तिथींचे ठिकाणीं नारिकेलादिकांचे भक्षणाचा जो निषेध आहे त्याला तत्कालमात्रव्याप्तितिथीची अपेक्षा आहे तेव्हां तिचा निर्णय सांगण्याची गरज आहे.

---

विहितव्रतादिविषयेतुनिर्णयउच्यते तत्रकर्मणोयस्ययःकालस्तत्कालव्यापिनीतिथिर्ग्राह्या यथाविनायकादिव्रतेमध्यान्हादौपूजनादिविधानात्मध्यान्हादिव्यापिनी दिनद्वयेकर्मकाले व्याप्तावव्याप्तौतदेकदेशव्याप्तौवायुग्मवाक्यादिनापूर्वविद्धायाः परविद्धायावातिथेर्ग्राह्यत्वं युग्मवाक्यंतु युग्माग्नियुगभूतानांषण्मुन्योर्वसुरंध्रयोः रुद्रेणद्वादशीयुक्ताचतुर्दश्याचपूर्णिमा प्रतिपद्यप्यमावास्यातिथ्योर्युग्मंमहाफलमिति युग्मंद्वितीयाअग्निस्तृतीयाद्वितीयातृतीयाविद्धा ग्राह्या तृतीयाद्वितीयाविद्धाग्राह्येत्येवंद्वितीयातृतीययोर्युग्मं चतुर्थीपंचम्योर्युग्मंषष्ठीसप्तम्यो र्युग्मं अष्टमीनवम्योर्युग्मं एकादशीद्वादश्योर्युग्मं चतुर्दशीपौर्णमास्योर्युग्मं अमावास्या प्रतिपदोर्युग्ममित्यर्थः क्वचिच्चतुर्थीगणनाथस्यमातृविद्धाप्रशस्यतइत्यादिविशेषवाक्यैर्ग्राह्यत्वनिर्णयःवचनवशेनग्राह्यायास्तिथेः कर्मकालेसत्त्वाभावेसाकल्यवचनैःसत्त्वंभावनीयम् तानिच यांतिथिंसमनुप्राप्यउदयंयातिभास्करः सातिथिःसकलाज्ञेयास्नानदानजपादिष्वित्या दीनि ॥ इति सामान्यनिर्णयश्चतुर्थ उद्देशः ॥

## आतां कोणत्या व्रताला कशी तिथि असावी त्याचा निर्णय सांगतों.

कित्येक कर्माला निरनिराळा काल सांगितला आहे, यास्तव ज्या कर्माचा जो काल असेल तत्कालव्यापिनी तिथि असेल ती घ्यावी. उदाहरण—विनायकादि व्रतांचे ठिकाणीं मध्यान्हादि कालीं पूजा करण्याविषयीं सांगितली यास्तव मध्यान्हादिकालव्यापिनी तिथि घ्यावी. दोनहि दिवसीं, कर्मकालव्यापिनी तिथि असेल किंवा नसेल तरं युग्मवाक्यादिकेंकरून पूर्वविद्धा अथवा परविद्धा तिथि घ्यावी. युग्मवाक्य— "युग्माग्नियुगभूतानां षण्मुन्योर्वसुरंध्रयोः ॥ रुद्रेणद्वादशीयुक्ता चतुर्दश्याच पूर्णिमा ॥ प्रतिपद्यप्यमावास्या तिथ्योर्युग्मं महाफलं, " द्वितीया तृतीया विद्धा घ्यावी, तृतीया द्वितीयाविद्धा घ्यावी, याप्रमाणें द्वितीया व तृतीया यांचें युग्म, चतुर्थी पंचमींचें युग्म, षष्ठी सप्तमींचें युग्म, अष्टमी नवमींचें युग्म, एकादशी द्वादशींचें युग्म, चतुर्दशी पौर्णिमेंचें युग्म, अमावास्या प्रतिपदेंचें युग्म, याप्रमाणें दोन तिथि मिळून एक युग्म इत्यादि तिथींचीं युग्में होतात. "गणपतीच्या व्रताविषयीं चतुर्थी तिथि तृतीयाविद्धा घ्यावी, " असीं विशेष वचनें आहेत याकरितां त्या त्या स्थलीं तशा विशेषवचनांनीं ग्राह्य तिथीचा निर्णय होतो. वचनेंकरून कदाचित् कर्मकालव्यापिनी तिथि नसेल तथापि साकल्यबोधक वचनेंकरून कर्मकालतिथि मानावी. तीं वचनें—"ज्या तिथीला घेऊन सूर्य उदय पावतो ती तिथि स्नान, दान, जप, इत्यादि कर्माविषयीं संपूर्ण जाणावी, " इत्यादिक. इति सामान्यनिर्णयश्चतुर्थ उद्देशः ॥ ४ ॥

---

कर्मविशेषेनिर्णयः ॥ कर्माणिद्विविधानि दैवानिपित्र्याणिच दैवानिषड्विधानि एकभक्तनक्तायाचितोपवासव्रतदानाख्यानि मध्यान्हेएकवारमेकान्नभोजनमेकभक्तम् रात्रावेवप्रदोषकालेभोजनंनक्तम् याचनांविनातद्दिनेलब्धस्यान्नादेर्भोजनमयाचितम् दिनांतरलब्धस्यापिपाचकंस्त्रीपुत्रादिकंप्रतियाचनमंतरेणभोजनमयाचितमितिकेचित् अहोरात्रभोजनाभाव उपवासः पूजाद्यात्मकःकर्मविशेषोव्रतम् स्वत्वनिवृत्तिपूर्वकंपरस्वत्वापादनंदानम् तानिचैकभक्तादीनिक्वचिद्व्रताद्यंगतयाविहितानि क्वचिदेकादश्याद्युपवासप्रतिनिधितयाविहितानि क्वचित्स्वतंत्राणीतित्रिविधानि तत्रान्यांगानांप्रतिनिधिभूतानांचतत्तत्प्रधानवशेननिर्णयः ॥

## आतां कर्मांच्या विशेषेंकरून निर्णय सांगतों.

कर्मे दोन प्रकारचीं,—दैवकर्मे व पित्र्यकर्मे. देवसंबंधी कर्मे सहा प्रकारचीं, एकभुक्त, नक्त, अयाचित, उपोषण, व्रत, दान, इत्यादिक. माध्यान्हीं एकवेळ एकाच अन्नाचें भक्षण करणें तें एकभक्त; रात्रीचे ठिकाणीं प्रदोषकालीं भोजन करणें तें नक्त; कोणाजवळ याचना केल्यावांचून त्या दिवसीं अकस्मात् मिळालेल्या अन्नादिकांचें भोजन करणें तें अयाचित; स्त्री, पुत्र इत्यादिकांजवळ याचना केल्यावांचून इतर दिवसीं मिळालेल्या अन्नाचें भोजन करणें तें अयाचित, असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. अहोरात्रीं भोजन न करणें तें उपोषण. पूजा

इत्यादिक जें विशेष कर्म करणें तें व्रत; पदार्थावरील आपली सत्ता दूर करून दुसऱ्याची सत्ता स्थापित करून देणें तें दान. तीं पूर्वीं सांगितलेलीं एकभक्तादिक कर्में क्वचित् व्रतादिकांच्या अंगत्वेंकरून सांगितलीं, व कोठें एकादश्यादिक उपोषणांचे ठिकाणीं प्रतिनिधिरूपानें सांगितलीं, आणि कोठें कोठें स्वतंत्र सांगितलीं, असीं तीं तीन प्रकारचीं, त्यांमध्यें अंगरूप व्रतांचा, आणि प्रतिनिधिरूप व्रतांचा निर्णय, प्रधानव्रताच्या निर्णयाप्रमाणें जाणावा.

---

स्वतंत्राणांनिर्णयउच्यते तत्रदिनंपंचधाविभज्यप्रथमभागःप्रातःकालोज्ञेयः द्वितीयःसंगवः तृतीयोमाध्यान्हः चतुर्थोभागोऽपराण्हः पंचमःसायान्हः सूर्यास्तोत्तरंत्रिमुहूर्तःप्रदोषः तत्रैकभक्तेमध्यान्हव्यापिनीतिथिर्ग्राह्यातत्रापिदिनार्धसमयेऽतीते त्रिंशत्घटिकात्मकमध्यमदिनमानेनषोडशाद्विघटीत्रयंमुख्योभोजनकालःततऊर्ध्वमासायंगौणकालः अत्रपूर्वेद्युरेवमुख्यकालेव्याप्तिःपरेद्युरेवव्याप्तिरुभयेद्युर्व्याप्तिरुभयत्रापिव्याप्त्यभावः उभयत्रसाम्येनैकदेशव्याप्तिर्वैषम्येणैकदेशव्याप्तिरितिषट्पक्षाभवंति तत्रपूर्वेद्युरेवमुख्यकालेग्राह्यतिथिसत्त्वेपूर्वैवपरत्रैवसत्त्वेपरैवेत्यसंदेहःउभयत्रापिपूर्णव्याप्तित्वेयुग्मवाक्यान्निर्णयः उभयत्रव्याप्त्यभावेपूर्वैवगौणकालव्याप्तिसत्त्वात्साम्येनैकदेशव्याप्तौपूर्वा वैषम्येणैकदेशव्याप्तौदिनद्वयेपिकर्मपर्याप्ततिथिलाभेयुग्मवाक्यान्निर्णयःकर्मपर्याप्ततिथ्यलाभेपूर्वैवेति ॥ इतिएकभक्तं ॥

## आतां स्वतंत्रकर्मांचा निर्णय सांगतों.

दिवसाचे पांच भाग करून त्या भागांला निरनिराळीं नांवें दिलीं आहेत तीं असीं;—प्रथम भाग तो प्रातःकाल; दुसरा भाग तो संगवकाल; तिसरा भाग तो माध्यान्हकाल; चवथा भाग तो अपराण्हकाल; पांचवा भाग तो सायान्हकाल. सूर्यास्तानंतर सहा घटिकांपर्यंत प्रदोषकाल. त्यामध्यें एकभक्त व्रताचे ठिकाणीं तिथि मध्यान्हकालव्यापिनी घ्यावी. त्यामध्येंहि दिवसाचा अर्धभाग गेला असतां तीस घटिकांचे मध्यम दिनमानेंकरून सोळा घटिकांपासून अठरा घटिकांपर्यंत ( तीन घटिका ) भोजनकाल मुख्य जाणावा. त्यानंतर सायंकालपर्यंत गौणकाल जाणावा. तिथीच्या व्याप्तीविषयीं निर्णयाचे सहा पक्ष आहेत. ते असे;— १ पूर्वदिवसींच मुख्य कालीं व्याप्ती, २ दुसऱ्या दिवसींच व्याप्ति, ३ दोनहि दिवसीं व्याप्ति, ४ दोनहि दिवसीं व्याप्ति नसणें, ५ दोनहि दिवसीं सारखी एकदेशव्याप्ति, ६ विषम मानेंकरून एकदेशव्याप्ति, याप्रमाणें सहा पक्ष होतात. त्यामध्यें पूर्व दिवसींच मुख्य कालीं ग्राह्य तिथि असतां पूर्वींचीच घ्यावी. दुसऱ्या दिवसींच ग्राह्य तिथि असतां पुढचीच घ्यावी, त्याविषयीं संशय नाहीं. दोनहि दिवसीं संपूर्णव्यापिनी असेल तर युग्मवाक्येंकरून निर्णय करावा. गौणकालीं व्याप्ति आहे यास्तव, दोन दिवसीं व्याप्ति नसेल तर पूर्वींचीच घ्यावी. सारखी एकदेशव्याप्ति असेल तर पूर्वींची घ्यावी. वैषम्येंकरून एकदेशव्यांप्ति असून दोनहि दिवसीं कर्माची समाप्ति होई इतकी तिथि मिळत असेल तर युग्मवाक्येंकरून निर्णय जाणावा. कर्माची समाप्ति होई इतकी तिथि न मिळेल तर पूर्वींचीच घ्यावी. याप्रमाणें एकभक्ताचा निर्णय सांगितला.

अथनक्तं ॥ तत्रसूर्यास्तोत्तरत्रिमुहूर्तात्मकप्रदोषव्यापिनीतिथिर्नक्तेग्राह्या अन्यतरदिने तद्व्याप्तौतदेकदेशस्पर्शेवासैवग्राह्या ॥

भोजनंतुअस्तोत्तरंघटिकात्रयसंध्याकालंत्यक्त्वाकार्यं संध्याकालेभोजननिद्रामैथुनाध्ययनवर्जनात् यतिभिरपुत्रविधुरैर्विधवाभिश्चनक्तंसायान्हव्यापिन्यादिनाष्टमभागेकार्यं रात्रौ तेषांभोजननिषेधात् एवंसौरनक्तमपिसायान्हव्यापिन्यांदिवैवकार्यंदिनद्वयेप्रदोषव्याप्तौपरा. दिनद्वयेप्रदोषव्याप्त्यभावेपरत्रैवसायान्हेदिनाष्टमभागेनक्तंकार्यंनतुरात्रौ साम्येनैकदेशव्याप्तौपरैव वैषम्येणप्रदोषैकदेशव्याप्तौतदाधिक्यवतीपूर्वापिग्राह्या यदिपूजाभोजनपर्याप्तंतदाधिक्यंलभ्यते नोचेत्साम्यपक्षवदुत्तरैवनत्वाधिक्यवशात्पूर्वेति नक्तव्रतभोजनंवैधत्वाद्रविवासरसंक्रांत्यादावपिरात्रावेवकार्यं रविवारादौरात्रिभोजननिषेधस्य रागप्राप्तभोजनपरत्वात् एकादश्याद्युपवासप्रत्याम्नायभूतंनक्तंतूपवासनिर्णीतदिनेएवेति अयाचितस्यत्वहोरात्रसाध्यत्वादुपवासवन्निर्णयःपित्र्याणामपराण्हादिव्यापित्वेननिर्णयस्तत्तत्प्रकरणेवक्ष्यते एकभक्तनक्तायाचितोपवासानांपूर्वेतिथावनुष्ठितानांपरेद्युस्तिथ्यंतेपारणं यामत्रयोर्ध्वगामिन्यांतिथौ प्रातःपारणमितिसर्वत्रज्ञेयमितिमाधवः ॥ इति एकभक्तादिनिर्णयःपंचमउद्देशः ॥

## आतां नक्तव्रताचा निर्णय सांगतों.

नक्तव्रताविषयीं तिथि घेणें ती सूर्यास्तानंतर सहा घटिका प्रदोषकालव्यापिनी असेल ती घ्यावी. दोन दिवसांतून कोणत्याहि एका दिवसीं पूर्वोक्त व्याप्ति असेल, अथवा त्या प्रदोषकालीं एकदेशव्याप्ति असेल तर तीच ( प्रदोषकालव्यापिनी ) घ्यावी.

भोजन, निद्रा, मैथुन, अध्ययन यांचा संध्याकालीं निषेध आहे यास्तव अस्तानंतर तीन घटिका संध्याकाल टाकून भोजन करावें. संन्यासी, पुत्र न झाला असे, मृतपत्नीक आणि विधवा यांनीं 'रात्रीं भोजन करूं नये' असा निषेध आहे यास्तव सायान्हकालव्यापिनी तिथि असतां दिवसाचे आठव्या भागीं नक्त करावें. याप्रमाणें सूर्यसंबंधी नक्त करणें तेंहि सायंकालव्यापिनी तिथि असतां दिवसाच करावें. दोन दिवसीं प्रदोषव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोन दिवसीं प्रदोषव्याप्ति नसेल तर दुसऱ्या दिवसींच सायंकालीं दिवसाच्या आठव्या भागीं नक्त करावें, रात्रीं करूं नये. दोन दिवसीं सारखी एकदेशव्याप्ति असतां दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. विषममानेंकरून दोन दिवसीं प्रदोषकालीं एकदेशव्याप्ति असून त्यामध्यें पूजा, भोजन होई इतकी न मिळेल तर साम्यपक्षाप्रमाणें पुढचीच घ्यावी, थोडी अधिक व्याप्ति आहे ह्मणून पूर्वीचीच घ्यावी असें नाहीं. नक्तव्रतसंबंधी भोजनविधि प्राप्त आहे यास्तव रविवार, संक्रांति इत्यादिक दिवसींहि भोजन रात्रींच करावें. रविवार इत्यादि दिवसीं रात्रिभोजनाचा जो निषेध आहे तो रागप्राप्त ( प्रीतिप्राप्त ) भोजनविषयक आहे, विधिप्राप्त भोजनाविषयीं नाहीं. एकादशी इत्यादिक जे उपवास त्यांच्या ऐवजीं कर्तव्य जें नक्त तें उपवासाच्या निर्णीत दिवसींच करावें. अयाचित व्रत अहोरात्रेंकरून साध्य आहे यास्तव त्याचा निर्णय उपोषणाप्रमाणें जाणावा. पित्र्य कर्मांचा निर्णय, अपराण्हादि कालव्यापिनी तिथि घ्यावी अशा स्वरूपानें त्या त्या प्रकरणीं सांगेन. एकभुक्त, नक्त, अयाचित, आणि उपोषण

हीं पूर्व तिथीचे ठिकाणीं केलीं त्यांची दुसऱ्या दिवसीं त्या तिथीच्या अंतीं पारणा करावी. तीन प्रहरांहून अधिक तिथि असतां प्रातःकालीं पारणा असें सर्वत्र जाणावें, याप्रमाणें माधव ह्मणतात. इतिएकभुक्तादिनिर्णयःपंचमउद्देशः ॥ ५ ॥

---

अथ व्रतपरिभाषा ॥ तत्रस्त्रीशूद्राणांद्विरात्राधिकोपवासेनाधिकारः स्त्रीणामपिभर्त्रनुज्ञांविनाव्रतोपवासादौनाधिकारः उपवासदिनेश्राद्धदिनेचकाष्ठेनदंतधावनंनकार्यं पर्णादिनाद्वादशगंडूषैर्वाकार्यंजलपूर्णताम्रपात्रंगृहीत्वोदङ्मुखःप्रातरुपवासादिव्रतंसंकल्पयेत् अपूर्वव्रतारंभोव्रतोद्यापनंचमलमासेगुर्वाद्यस्ते वैधृतिव्यतीपातादिदुर्योगेविष्टौक्रूरवारनिषिद्धेदर्शादितिथौनभवति एवंखंडतिथावपिनभवति उदयस्थातिथिर्याहिनभवेद्दिनमध्यभाक् साखंडानव्रतानांस्यादारंभश्चसमापनमितिसत्यव्रतोक्तेः क्षमासत्यंदयादानंशौचमिंद्रियनिग्रहः देवपूजाचहवनंसंतोषःस्तेयवर्जनं सर्वव्रतेष्वयंधर्मःअत्रहोमोव्याहृतिभिःकाम्यव्रतविशेषोज्ञेयः यद्देवतायाउपोषणव्रतंतद्देवताजपस्तद्ध्यानंतत्कथाश्रवणं तदर्चनंतन्नामश्रवणकीर्तनादिकंकार्यं उपवासेऽनावलोकनगंधादिकमभ्यंगंतांबूलमनुलेपनंचत्यजेत् सभर्तृकस्त्रीणां सौभाग्यव्रतेऽभ्यंगतांबूलादिनवर्ज्यं अष्टैतान्यव्रतघ्नानिआपोमूलंफलंपयः हविर्ब्राह्मणकाम्याचगुरोर्वचनमौषधं प्रमादादिनाव्रतभंगेदिनत्रयमुपोष्यक्षौरंकृत्वापुनर्व्रतंकुर्यात् अशक्तस्योपवासप्रतिनिधिरेकब्राह्मणभोजनंतावद्धनादिदानंवासहस्रगायत्रीजपोवाद्वादशप्राणायामावाप्रायश्चित्तम् स्वीकृतंव्रतंकर्तुमशक्तः प्रतिनिधिनाकारयेत् पुत्रः पत्नीभर्ताभ्रातापुरोहितः सखाचेतिप्रतिनिधयःपुत्रादिः पित्राद्युद्देशेनव्रतंकुर्वन्स्वयमपिव्रतफलंलभते असकृज्जलपानाच्चसकृत्तांबूलचर्वणात् उपवासःप्रणश्येतदिवास्वापाच्चमैथुनात् स्मरणंकीर्तनंकेलिःप्रेक्षणं गुह्यभाषणम् संकल्पोध्यवसायश्चक्रियानिर्वृत्तिरेवचेत्यष्टविधंमैथुनम् प्राणसंकटेष्वसकृज्जलपानेदोषोनास्ति चर्मस्थंजलंगोभिन्नक्षीरंमसूरंजंबीरफलंशुक्तिचूर्णमित्यामिषगणोव्रते वर्ज्यः अश्रुपातक्रोधादिनासद्योव्रतनाशः परान्नभोजनेचापियस्यान्नंतस्यतत्फलम् तिलमुद्गभिन्नचणकादिकोशीधान्यंमाषादिकंमूलकंचेत्येवमादिक्षारगणं लवणमधुमांसादिकंचवर्जयेत् श्यामाकाश्चैवनीवारागोधूमाश्चव्रतेहिताः व्रीहिमुद्गयवतिलकंगुकलापादिधान्यंरक्तेतरमूलकंसूरणादिकंदः सैंधवसामुद्रलवणेगव्यदधिसर्पिर्दुग्धानिपनसफलमाम्रफलंनारीकेलंहरीतकीपिप्पली जीरकंशुंठीतिंतिणीकदलीलवलीधात्रीफलानिगुडेतरेक्षुविकारइत्येतानि अतैलपक्वानिहविष्याणि गव्यंतक्रंमाहिषंघृतमपिक्वचित् अनुक्तव्रतविधिस्थलेमाषादिपरिमितसुवर्णरजतादिप्रतिमापूज्या द्रव्यानुक्तावाज्यहोमःदेवतानुक्तौप्रजापतिः मंत्रानुक्तौसमस्तव्याहृतिः संख्यानुक्तावष्टोत्तरशतमष्टाविंशतिरष्टौवा होमसंख्या उपवासेकृतेब्राह्मणभोजनंतत्सांगतार्थम् उद्यापनानुक्तौगांसुवर्णंवादद्यात् विप्रवचनाद्व्रतसांगताविप्रवचनंचदक्षिणांदत्वैवग्राह्यंसर्वत्रगृहीतव्रतत्यागेचांडालतुल्यत्वम् विधवाभिर्व्रतादौचित्ररक्तादिवस्त्रंनधार्यंश्वेतमेवधार्यम् सूतकादौस्त्रीणांरजोदोषादौज्वरादौचगृहीतव्रतादौशारीरनियमान् स्वयंकुर्यात्पूजादिकमन्यद्वाराकारयेत् अपूर्वारंभस्तुसूतकादौनभवति काम्येप्रतिनिधिर्नो

स्तिनित्येनैमित्तिके चसः काम्येप्युपक्रमादूर्ध्वंकेचित्प्रतिनिधिंविदुः नस्यात्प्रतिनिधिर्मंत्रस्वामिदेवाग्निकर्मसु नापिप्रतिनिधातव्यंनिषिद्धंवस्तुकुत्रचित् व्रतादिसन्निपातेदानहोमाद्यविरुद्धंक्रमेणकार्यम् विरुद्धेतुनक्तभोजनोपवासादावेकंस्वयंकृत्वान्यत्पुत्रभार्यादिनाकारयेत् यत्रचतुर्दश्यष्टम्यादौदिवाभोजननिषेधोव्रतांतरपारणाचप्राप्तातत्रभोजनमेवकार्यम् पारणायाविधिप्राप्तत्वात् निषेधस्तुरागप्राप्तभोजनपरः एवंरविवारादौसंकटचतुर्थ्यादिव्रतेरात्रिभोजनमेवकार्यम् ॥

## आतां यानंतर व्रताची परिभाषा सांगतों.

स्त्रिया व शूद्र यांला दोन दिवसांपेक्षां अधिक उपोषण करण्याला अधिकार नाहीं. स्त्रियांलाहि भर्त्याच्या आज्ञेवांचून व्रतें व उपोषणें इत्यादिक करण्याला अधिकार नाहीं. उपोषणाचे दिवसीं, आणि श्राद्धदिवसीं काष्ठानें दांत घांसूं नयेत, पानादिकानें किंवा बारा चुळांनीं दांतधुणें करावें. उदकानें भरलेलें असें तांब्याचें भांडें हातांत घेऊन उत्तरदिशेच्या सम्मुख होत्साता प्रातःकाळीं उपोषणादिक व्रताचा संकल्प करावा. नव्या व्रताचा आरंभ, व उद्यापन ( समाप्ति ) हीं, मलमास; गुरुशुक्रांचें अस्त; वैधृति, व्यतीपात इत्यादिक दुष्टयोग; कल्याणी; पापवार ( मंगळ, शनि इ० ); निषिद्ध अशी अमावास्या इत्यादि तिथि यांचे ठिकाणीं होत नाहींत. “सूर्योदयकालीं तिथि असून दोनप्रहरपर्यंत नसेल तर ती खंड तिथि, त्या तिथीचे ठिकाणीं व्रताचा आरंभ व समाप्ति करूं नयेत,” असें सत्यव्रताचें वचन आहे. याकरितां खंडतिथीलाही व्रताचा आरंभ व समाप्ति करूं नयेत. “क्षमा, सत्यभाषण, दया, दान, स्वच्छत्व, इंद्रियनिग्रह, देवपूजा, होम, संतोष, चोरी न करणें,” हे धर्म सर्व व्रतांचे ठिकाणीं सामान्येंकरून जाणावे. एथें होम व्याहृतिमंत्रेंकरून करावा, इतका काम्यव्रताचा विशेष जाणावा. ज्या देवतेचें उपोषणव्रत असेल त्या देवतेचीं जप, ध्यान, कथाश्रवण, पूजा, तन्नामाचें श्रवणकीर्तन, इत्यादिक करावीं. उपोषणाचे दिवशीं अन्न पहाणें, अन्नाचा वास घेणें, तैलाभ्यंग, तांबूल, अंगाला उटी देणें, हीं वर्ज्य करावीं. सौभाग्यवती स्त्रियांला सौभाग्यव्रताचे ठिकाणीं तैलाभ्यंग, तांबूल, इत्यादिक वर्ज्य नाहींत. “उदक, मूल, फल, दूध, हविष्य, ब्राह्मणाची इच्छा, गुरूचें वचन, औषध, हीं आठ व्रतघ्न नाहींत;” ह्मणजे यांतून कोणतेंहि सेवन केलें असतां व्रतभंग होत नाहीं. विस्मरणादिकानें व्रतभंग झाला असतां तीन दिवस उपोषण व क्षौर करून पुनः व्रत करावें. उपवासाविषयीं अशक्त असेल तर त्याच्या बद्दल एक ब्राह्मणास भोजन, अथवा तितकें द्रव्यदान, सहस्रगायत्रीजप, किंवा बारा प्राणायाम हें प्रायश्चित्त करावें. पूर्वी घेतलेलें व्रत करण्याविषयीं अशक्त असेल तर प्रतिनिधिद्वारा करावें. पुत्र, स्त्री, भर्ता, उपाध्याय, मित्र हे प्रतिनिधि[1] जाणावे. पुत्रादिक, पिता इत्यादिकांच्या उद्देशेंकरून व्रत करील तर ज्याचें व्रत त्याला फळ मिळून कर्त्यालाहि मिळतें. “वारंवार उदक पिणें, एकवार तांबूल भक्षण करणें, दिवसा निद्रा व मैथुन करणें, यांहींकरून उपोषणाचा नाश होतो.”

---

१ मुख्य पदार्थाचे ठिकाणीं त्यासारखा दुसरा पदार्थ घेणें तो पदार्थ. जसें,—पित्याचे स्थानीं पुत्र इत्यादिक.

स्त्रियेचें स्मरण करणें, विषयाच्या गोष्टी सांगणें, क्रीडा करणें, कटाक्षानें पाहणें, एकांतस्थानीं गुप्त गोष्टी करणें, याप्रकारें मी विषयोपभोग करीन असा संकल्प करणें, या विषयाचा मी उपभोग करीन असा निश्चय करणें, प्रत्यक्ष मैथुन करणें, याप्रमाणें आठ प्रकारचे मैथुनांतून कोणतेंहि आचरण करूं नये. प्राणसंकटकालीं वारंवार उदक प्यालें असतां दोष नाहीं. चर्मपात्रांतील ( पखाल इत्यादिकांतलें ) उदक, गायीवांचून दुसरें दूध, मसुरा, ईडनिंबू, शिंपीचा चुना, यांला आमिषगण असें ह्मणतात; हा व्रताच्या ठिकाणीं वर्ज्य करावा. अश्रु पडणें, क्रोध, इत्यादिकेंकरून व्रताचा तत्काळ नाश होतो. " व्रत करून दुसऱ्याचे घरीं भोजन केलें तर ज्याचें अन्न असेल त्याला त्या व्रताचें फळ जातें. " तिळ, मूग ह्यांवांचून शेंगेंत उत्पन्न होणारीं हरभरे इत्यादि धान्यें, उडीद इत्यादिक, मुळा इत्यादिक हा क्षारगण, व लवण, मध, मांसादिक, हीं व्रतदिवसीं वर्ज्य करावीं. " सांवे, देवभात, गहूं हे व्रताला शुद्ध आहेत. " साळीचे तांदूळ, जव, मूग, तिळ, राळे, वाटाणे, इत्यादिक धान्यें; पांढरा मुळा; सुरण इत्यादि कंद; सैंधव व समुद्रोत्पन्न असीं लवणें; गायीचीं असीं दहीं, दूध, आणि तूप; फणस; आंबा; नारळ; हरीतकी; पिंपळी; जिरें; सुंठ; चिंच; केळें; रायआंवळे; आंवळे; साखर; हीं सर्व अतैलपक्क हविष्यें जाणावीं. गायीचें ताक, व ह्मशीचें तूप हीं हविष्यें होत, असेंहि कोणी ह्मणतात. जेथें व्रताचा विधि सांगितला नाहीं तेथें पांच गुंजा सोन्याची किंवा रुप्याची प्रतिमा करून पूजा करावी. द्रव्य सांगितलें नसेल तर तुपाचा होम करावा. देवता सांगितली नसेल तर प्रजापति देवता घ्यावी. जेथें मंत्र सांगितला नसेल तेथें व्याहृतिमंत्र योजावा. ज्या स्थलीं होमाची संख्या सांगितली नसेल त्या स्थलीं एकशें आठ, अठ्ठावीस, किंवा आठ यांतून कोणतीहि एक संख्या घ्यावी. उपोषण केलें असतां व्रताच्या सांगतेकरितां ब्राह्मणभोजन करावें. ज्या व्रताला उद्यापन सांगितलें नाहीं तेथें गोप्रदान किंवा सुवर्णदान करावें. अथवा ब्राह्मणाच्या वचनानें व्रताची सांगता होते; परंतु सर्वत्र ठिकाणीं ब्राह्मणाचें वचन त्याला दक्षिणा देऊन घ्यावें. ग्रहण केलेल्या व्रताचा त्याग केला असतां चांडालाप्रमाणें दोषी होतो. विधवा स्त्रियांनीं व्रतादिकांचे दिवशीं तरतऱ्हेच्या रंगांचीं व तांबडीं वस्त्रें धारण करूं नयेत, पांढरीं वस्त्रेंच धारण करावीं. सुतक, स्त्रियांला रजस्वलादोष, ज्वरादिक रोग इत्यादिक प्राप्त झाले असतां उपोषण इत्यादिक शरीरसंबंधी नियम आपण करावे, आणि पूजा इत्यादिक करणें तें दुसऱ्याकडून करवावें. पूर्वी आरंभलेलें नाहीं असें व्रत सुतकादिकांत करूं नये. " काम्य कर्माचे ठिकाणीं प्रतिनिधि होत नाहीं. नित्यकर्म, आणि नैमित्तिक कर्म यांचे ठिकाणीं प्रतिनिधि होतो. काम्य कर्माचे ठिकाणींहि, आरंभ झाल्यानंतर प्रतिनिधि होतो असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. मंत्र, यजमान, देवता, अग्निकार्य, यांचे ठिकाणीं प्रतिनिधि होत नाहीं. कोणत्याहि ठिकाणीं निषिद्ध पदार्थ प्रतिनिधिस्थानीं योजूं नये. " एककालीं एक, दोन, तीन असीं अनेक व्रतें किंवा उपोषणें प्राप्त झालीं असतां दान, होम इत्यादिक जें विरुद्ध नसेल तें क्रमानें करावें. परस्पर विरुद्ध असीं नक्तभोजन, उपोषण इत्यादिक असतील तर त्यांतून एक आपण करून दुसरें पुत्र, स्त्री इत्यादिकांकडून करवावें. जेथें चतुर्दशी, अष्टमी इत्यादिक दिवसीं दिवसा भोजन करण्याचा निषेध प्राप्त झाला, आणि त्याचे दिवशीं दुसऱ्या व्रताची पारणा प्राप्त झाली, तेथें पारणा विधिप्राप्त आहे यास्तव भोज-

नच करावें. चतुर्दशी, अष्टमी इत्यादिक स्थलीं दिवसा भोजनाचा निषेध सांगितला तो प्रीतिप्राप्त भोजनाविषयीं आहे. याप्रमाणें रविवारादिक दिवसीं संकष्टचतुर्थ्यादि व्रत प्राप्त झालें असतां रात्रींच भोजन करावें.

---

यत्राष्टम्यादौदिवाभोजननिषेधोरात्रौतुरविवारादिप्रयुक्तभोजननिषेधस्तत्रार्थप्राप्तउपवासः ॥ यत्रतु पुत्रवद्गृहस्थस्य संक्रांत्यादावुपवासोपिनिषिद्धोभोजनस्याप्यष्टम्यादिप्रयुक्तनिषेधस्तत्रकिंचिद्भक्ष्यंप्रकल्प्योपवासएवकार्यः चांद्रायणमध्येएकादश्यादिप्राप्तौग्राससंख्यानियमेनभोजनमेवकार्यम् एवंकृच्छ्रादिव्रतेपि एवमेकादश्यामेकांतरोपवासादिप्रयुक्तपारणायांप्राप्तायांजलपारणंकृत्वोपवसेत् एवंद्वादश्यांमासोपवासश्राद्धप्रदोषादिप्रयुक्तपारणप्रतिबंधेजलपारणंकार्यम् एकादश्यादौसंक्रमेपुत्रवद्गृहस्थस्योपवासनिषेधएकादश्युपवासश्चप्राप्तस्तत्रापिकिंचिदापोमूलंफलंपयोवाभक्ष्यंकल्प्यं द्वयोरुपवासयोर्नक्तयोरेकभक्तयोर्वैकस्मिन्दिनेप्राप्तौ अमुकोपवासममुकोपवासंचोभयंतंत्रेणकरिष्यइत्यादिसंकल्प्यसहैववोपवासपूजाहोमानामनुष्ठानम् यत्रोपवासैकभक्तयोरेकदिनेप्राप्तिस्तत्रतिथिद्वैधेगौणकालव्याप्तिमाश्रित्यएकंपूर्वतिथौद्वितीयंशेषतिथौकार्यम् अखंडतिथावेकंपुत्रादिनाकारयेदित्युक्तम् एवंकाम्यंनित्यस्यबाधकमित्यादिवाक्यैःकाम्यनित्यादिबलाबलबाधाबाधसंभवासंभवादिविचार्यानुष्ठानमूह्यम् ॥ इतिसामान्यव्रतपरिभाषोद्देशःषष्ठउद्देशः ॥

जेथें अष्टमी इत्यादिस्थलीं दिवसा भोजनाचा निषेध, आणि रात्रीं रविवारप्रयुक्त भोजनाचा निषेध सांगितला तेथें अर्थप्राप्त उपोषण उक्त आहे याकरितां तेंच करावें. जेथें संक्रांति इत्यादिक दिवसीं पुत्रवान् अशा गृहस्थाश्रमी याला उपवासाचाहि निषेध सांगितला, आणि त्या दिवसीं चतुर्दशीनिमित्तक किंवा अष्टमीनिमित्तक दिवसाभोजनाचा निषेध प्राप्त झाला तेथें कांहीं अल्प उपहार करून उपवासच करावा. चांद्रायण व्रतामध्यें एकादश्यादि उपोषणव्रत प्राप्त झालें असतां ग्राससंख्येच्या नियमानें भोजनच करावें. याप्रमाणें कृच्छ्रादि व्रतांविषयींहि जाणावें. असें एकादशीचे दिवसीं एकांतरोपवासादि[1] व्रतांची पारणा आली असेल तर उदकानें पारणा करून उपोषण करावें. याप्रमाणें द्वादशीचे दिवसीं मासोपवासव्रत (एक महिन्यापर्यंत सतत उपवास करणें तें), श्राद्ध, आणि प्रदोषव्रतसंबंधी पारणा असीं प्राप्त होतील तर उदकानें पारणा करून उपोषण करावें. एकादशी इत्यादिक दिवसीं संक्रांत झाली असतां पुत्रवान् गृहस्थाश्रमी यांनीं उपोषण न करितां त्यांनीं उदक, मूल, फळें, दूध यांतून कांहीं भक्षण करावें. एक दिवसीं दोन उपोषणें, दोन नक्तें, अथवा दोन एकभुक्तें, असीं प्राप्त होतील तर "अमुकोपवास अमुकोपवास असीं दोन एकतंत्रानें करितों" इत्यादि संकल्प करून एकतंत्रानें उपवास, पूजा, होम यांचें आचरण करावें. एक दिवसीं उपवास, व एकभुक्त असीं दोन व्रतें प्राप्त होतील आणि त्या दिवसीं द्विधा तिथि ( पूर्व दिवसीं उपोषणाची तिथि व एकभुक्ताची तिथि

---

[1] एक दिवस उपोषण आणि दुसऱ्या दिवसीं भोजन, असें कांहीं दिवस व्रत करणें त्याला एकांतरोपवासव्रत ह्मणतात. जसें, धारणा, पारणा इत्यादि.

अशा दोन्ही तिथि असून दुसऱ्या दिवशीं एकभुक्ताची तिथि ) असी येईल तर गौणकाल-व्याप्ति घेऊन एक पूर्वीच्या तिथीला व दुसरें बाकी राहिलेल्या तिथीला असीं करावीं. अखंड तिथीचे ठिकाणीं एक, पुत्रादिकाकडून करवावें असें सांगितलें. याप्रमाणें काम्यकर्म नित्यकर्माचें बाधक होतें इत्यादिक जीं वचनें त्यांहींकरून काम्य, नित्य, प्रबल, दुर्बल, बाध, अबाध, संभव, असंभव इत्यादिक विचार करून आचरण करणें तें करावें. इति सामान्यव्रतपरिभाषोद्देशः षष्ठः ॥ ६ ॥

---

**अथप्रतिपदादिनिर्णयः शुक्लप्रतिपत्पूजाव्रतादावपराण्हव्याप्तिसत्त्वेपूर्वविद्धाग्राह्यासाया न्हव्याप्तित्वेपिपूर्वैवेतिमाधवाचार्यः अन्यथाद्वितीयायुताग्राह्या कृष्णप्रतिपत्सर्वापिद्वितीया युतैवग्राह्या उपवासेतुपक्षद्वयेपिप्रतिपत्पूर्वविद्धैवग्राह्या अपराण्हव्यापिन्यांप्रतिपदिकरणीय स्योपवासादेःसंकल्पंप्रातरेवकुर्यात् संकल्पकालेप्रतिपदादितिथ्यभावेपिसंकल्पेप्रतिपदादिरे ववक्तव्यानत्वमावास्यादिः एवमुपोष्याद्वादशीशुद्धेत्यादिस्थलेएकादशीव्रतप्रयुक्तसंकल्पपू जादावेकादश्येवकीर्तनीयानतुद्वादशी संध्याग्निहोत्रादिकर्मांतरेषुतत्तत्कालव्यापिनीद्वाद श्यादिरेवेतिममप्रतिभाति संकल्पश्चसूर्योदयात्प्रागुषःकालेसूर्योदयोत्तरंप्रातःकालाख्यत्रिमुहू र्तस्याद्यमूहूर्तद्वयेप्रशस्तः ॥ तृतीयोमुहूर्तस्तुनिषिद्धः ॥ इतिप्रतिपन्निर्णयःसप्तमउद्देशः ॥**

## आतां प्रतिपदादिक तिथींचा निर्णय सांगतों.

**प्रतिपदानिर्णय.**—शुक्लपक्षांतील प्रतिपदा पूजाव्रतादिकांचे ठिकाणीं घेणें ती अपराण्हकालव्याप्ति असतां पूर्व तिथीनें विद्ध असेल ती घ्यावी. सायान्हकालव्याप्ति असतांहि पूर्वींचीच घ्यावी, असें माधवाचार्य ह्मणतात. तसी ( अपराण्हकालव्याप्ति ) नसेल तर द्वितीयेनें युक्त असेल ती घ्यावी. कृष्ण पक्षांतील कोणतीहि प्रतिपदा द्वितीयायुक्तच घ्यावी. उपवासाविषयीं घेणें असेल तर शुक्ल कृष्ण दोनहि पक्षांचे ठिकाणीं प्रतिपदा पूर्वतिथीनें विद्ध असेल तीच घ्यावी. अपराण्हकालव्यापिनी प्रतिपदेचे ठिकाणीं करावयाचें जें उपवासादिव्रत त्याचा संकल्प प्रातःकालींच करावा. संकल्पकालीं प्रतिपदादिक तिथि नसली तथापि संकल्पाचे ठिकाणीं प्रतिपदादिक तिथींचाच उच्चार करावा. अमावास्यादिक तिथींचा करूं नये. याप्रमाणें "शुद्धद्वादशी उपोषणास योग्य," इत्यादिक स्थलीं एकादशीव्रतसंबंधी संकल्प, पूजा इत्यादिक जें करणें त्या स्थलीं एकादशीचाच उच्चार करावा. द्वादशीचा करूं नये. संध्या, अग्निहोत्र इत्यादिक जीं दुसरीं कर्में त्यांच्या संकल्पकालीं त्या त्या काळाला व्यापणारी असी द्वादशी इत्यादिकच उच्चारावी, असें मला वाटतें. संकल्प करणें तो सूर्योदयाच्या पूर्वीं उषःकालीं करावा. अथवा सूर्योदयानंतर दोन मुहूर्तांत ( चार घटिकांच्या आंत ) करावा. कारण, तिसरा मुहूर्त निषिद्ध आहे. इति प्रतिपन्निर्णयः सप्तमोद्देशः ॥ ७ ॥

---

द्वितीयाशुक्लपक्षेपरविद्धाग्राह्या कृष्णपक्षेद्वेधाविभक्तदिनपूर्वभागात्मकपूर्वाण्हप्रविष्टा चेत्पूर्वाग्राह्या अन्यथातुकृष्णपक्षेपिद्वितीयापरविद्धैव ॥ इति द्वितीयानिर्णयोऽष्टमउद्देशः ॥

## आतां द्वितीयेचा निर्णय सांगतों.

शुक्लपक्षांतील द्वितीया घेणें ती परविद्धा घ्यावी. कृष्णपक्षांतील द्वितीया घेणें ती, दिवसाचे दोन भाग करून पूर्व भागांत द्वितीया प्रविष्ट असेल तर पूर्वीची घ्यावी. तसी (पूर्व भागांत प्रविष्ट झालेली) नसेल तर कृष्णपक्षींहि द्वितीया परविद्धाच घ्यावी. इति द्वितीयानिर्णयोऽष्टम उद्देशः ॥८॥

---

तृतीयारंभाव्रतेपूर्वविद्धाग्राह्या रंभाव्यतिरिक्तव्रतेषुत्रिमुहूर्तद्वितीयाविद्धांपूर्वांत्यक्त्वापर दिनेत्रिमुहूर्तव्यापिनीग्राह्या पूर्वदिनेत्रिमुहूर्तन्यूनद्वितीयावेधेपरदिनेत्रिमुहूर्तव्याप्त्यभावेपूर्वा ग्राह्या पूर्वदिनेत्रिमुहूर्तद्वितीयावेधेपरदिनेत्रिमुहूर्तन्यूनापिग्राह्या गौरीव्रतेतुकलाकाष्ठादिपरि मितस्वल्पद्वितीयायुक्तापिनिषिद्धा परदिनेकलाकाष्ठादिपरिमितास्वल्पापितृतीयापरिग्राह्या यदातुदिनक्षयवशात्परदिनेस्वल्पापिचतुर्थीयुतातृतीयानलभ्यते पूर्वदिनेचद्वितीयाविद्धात दाद्वितीयाविद्धैवग्राह्या यदाचदिनवृद्धिवशात्पूर्वदिनेषष्टिघटिकातृतीयापरदिनेचघटिका दिशेषवतीतदापूर्वांशुद्धांषष्टिघटिकामपित्यक्त्वाचतुर्थीयुतैवगौरीव्रतेग्राह्या ॥ इति तृती यानिर्णयो नवमउद्देशः ॥

## आतां तृतीयेचा निर्णय सांगतों.

रंभाव्रत ह्मणजे कदलीव्रत त्याविषयीं तृतीया घेणें ती, पूर्व तिथीनें विद्ध असेल ती घ्यावी. रंभाव्रतावांचून अन्य व्रतांचे ठिकाणीं घेणें असेल तर सहा घटिका द्वितीयेनें विद्ध झालेली असी पूर्वीची टाकून दुसऱ्या दिवसीं त्रिमुहूर्त ( सहा घटिका ) व्यापिनी असेल ती घ्यावी. पूर्व दिवसीं द्वितीयेचा वेध सहा घटिकांहून कमी असेल आणि दुसऱ्या दिवसीं सहा घटि- कांहून कमी व्याप्ति असेल तर पूर्वीची घ्यावी. पूर्व दिवसीं सहा घटिका द्वितीयेचा वेध अ- सून दुसऱ्या दिवसीं सहा घटिकांहून कमी असली तथापि कमी तीहि घ्यावी. गौरीव्रतावि- षयीं घेणें ती कला, घटिका इत्यादि परिमित अल्पद्वितीयायुक्ताहि घेऊं नये. दुसऱ्या दिवसीं कला, घटिका इत्यादि परिमित अत्यंत अल्प असली तरी तीच घ्यावी. ज्या कालीं दिनक्ष- यानें दुसऱ्या दिवसीं चतुर्थीनें युक्त असी अल्पहि तृतीया नसेल आणि पूर्व दिवसीं द्वितीयेनें विद्ध असेल त्या कालीं द्वितीयेनें विद्ध असली तरी तीच घ्यावी. ज्या कालीं दिनवृद्धीनें पूर्व दिवसीं साठ घटिका तृतीया असेल आणि दुसऱ्या दिवसीं शेष उरलेली एक दोन घटिका असेल त्या कालीं पूर्वीची शुद्ध अशी साठ घटिका तृतीया टाकून चतुर्थीयुक्त असेल तीच गौरीव्रताविषयीं घ्यावी. इति तृतीयानिर्णयो नवमोद्देशः ॥ ९ ॥

---

चतुर्थीगणेशव्रतातिरिक्तोपवासकार्येपंचमीयुताग्राह्या गौरीविनायकव्रतयोस्तुमध्यान्ह व्यापिनीग्राह्या परदिनएवमध्यान्हव्यापिनीचेत्परैव दिनद्वयेमध्यान्हव्यापित्वेदिनद्वयेमध्या न्हव्याप्त्यभावेसाम्येनवैषम्येणवैकदेशेव्याप्तौचपूर्वैव तृतीयायोगप्राशस्त्यात् नागव्रतेतुपूर्वे

दिनएवमध्यान्हव्यापिनीचेत्पूर्वैव उभयदिनमध्यान्हव्याप्त्यादिपक्षचतुष्टयेपंचमीयुतैवग्राह्या संकष्टचतुर्थीतुचंद्रोदयव्यापिनीग्राह्या परदिनेएवचंद्रोदयव्याप्तौपरैव उभयदिनेचंद्रोदयव्याप्तित्वेतृतीयायुतैवग्राह्या दिनद्वयेचंद्रोदयव्याप्त्यभावेपरैव इतिचतुर्थीनिर्णयोदशमउद्देशः ॥

## आतां चतुर्थीचा निर्णय सांगतों.

गणेशव्रताखेरीज अन्य उपवासकार्याचे ठिकाणीं चतुर्थी पंचमीयुक्त घ्यावी. गौरीव्रत, आणि विनायकव्रत यांविषयीं मध्यान्हकालव्यापिनी घ्यावी. दुसऱ्या दिवसींच मध्यान्हकालव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. दोन दिवसीं मध्यान्हकालव्यापिनी असेल, अथवा दोनहि दिवसीं मध्यान्हकालव्यापिनी नसेल, किंवा दोनहि दिवसीं सारखी अथवा कमी ज्यास्ती एकदेशव्याप्ति असेल तर पूर्व दिवसीं तृतीयायोग आहे व तो प्रशस्त आहे यास्तव पूर्वीचीच घ्यावी. नागव्रताचे ठिकाणीं घेणें ती पूर्वदिवसींच मध्यान्हकालव्यापिनी असेल तर पूर्वीचीच घ्यावी. दोन दिवसीं मध्यान्हकालव्यापिनी असेल, अथवा दोनहि दिवसीं मध्यान्हकालव्यापिनी नसेल, किंवा दोनहि दिवसीं सारखी अथवा कमी ज्यास्ती एकदेशव्याप्ति असेल तर पंचमीयुक्तच घ्यावी. संकष्टचतुर्थी घेणें ती चंद्रोदयव्यापिनी घ्यावी. दुसऱ्या दिवसींच चंद्रोदयकाळीं व्याप्ति असेल तर दुसऱ्या दिवसाचीच करावी. दोन दिवसीं चंद्रोदयाला व्याप्ति असेल तर तृतीयायुक्तच घ्यावी. दोन दिवसीं चंद्रोदयकाळीं व्याप्ति नसेल तर दुसऱ्या दिवसाचीच करावी. इति चतुर्थीनिर्णयो दशम उद्देशः ॥ १० ॥

---

पंचमीशुक्लपक्षेकृष्णपक्षेचकर्ममात्रेपिचतुर्थीविद्धाग्राह्या स्कंदोपवासेतुषष्ठीयुताग्राह्या नागव्रतेपंचमीपरविद्धाग्राह्या परेद्युस्त्रिमुहूर्तन्यूनापंचमीपूर्वेद्युस्त्रिमुहूर्तन्यूनचतुर्थ्याविद्धा तदापूर्वैव त्रिमुहूर्ताधिकचतुर्थीवेधेद्विमुहूर्तापिपरैव ॥ इति पंचमीनिर्णयएकादशउद्देशः ॥

## आतां पंचमीचा निर्णय सांगतों.

शुक्लपक्ष व कृष्णपक्ष ह्या दोनहि पक्षांतील पंचमी कोणत्याहि कर्माविषयीं घेणें ती, चतुर्थीनें विद्ध असेल ती घ्यावी. स्कंदव्रताविषयीं मात्र पंचमी षष्ठीयुक्त घ्यावी. नागव्रताचे ठिकाणीं पंचमी, षष्ठीनें विद्ध असेल ती घ्यावी. दुसऱ्या दिवसीं सहा घटिकांपेक्षां कमी पंचमी असून पूर्व दिवसीं सहा घटिकांहून कमी अशा चतुर्थीनें विद्ध असेल तर चतुर्थीविद्ध घ्यावी. चतुर्थीचा वेध सहा घटिकांपेक्षां अधिक असेल, आणि दुसऱ्या दिवसीं चार घटिका पंचमी असेल तथापि दुसऱ्या दिवसाचीच करावी. इति पंचमीनिर्णय एकादशोद्देशः ॥ ११ ॥

---

षष्ठीस्कंदव्रतेपूर्वविद्धा ग्राह्या अन्यव्रतेषुपरविद्धैव पूर्वेद्युःषण्मुहूर्तन्यूनपंचम्यावेधेपूर्वापिषष्ठीसप्तम्योरविवासरयोगेपद्मकयोगः ॥ इति षष्ठीनिर्णयोद्वादशउद्देशः ॥

## आतां षष्ठीचा निर्णय सांगतों.

स्कंदव्रताविषयीं षष्ठी पूर्वविद्धा असेल ती घ्यावी. दुसऱ्या व्रतांविषयीं परविद्धा असेल ती घ्यावी. पूर्व दिवसीं बारा घटिकांहून कमी पंचमीचा वेध असतां पूर्व दिवसाचीहि घ्यावी.

षष्ठी आणि सप्तमी या दिवसीं रविवारयोग आला असतां त्याला पद्मकयोग असें ह्मणतात. इति षष्ठीनिर्णयो द्वादश उद्देशः ॥ १२ ॥

---

सप्तमीकर्ममात्रेषष्ठीयुतैवग्राह्या यदापूर्वेद्युरस्तमयपर्यंताषष्ठीतिदिवाषष्ठीविद्धानलभ्यतेप रेद्युश्चाष्टमीविद्धातदाचागत्यापरैव एवंतिथ्यंतरनिर्णयेष्वप्यूह्यम् ॥ इति सप्तमीनिर्णयस्त्र योदशउद्देशः ॥

## आतां सप्तमीचा निर्णय सांगतों.

कोणत्याहि कर्माविषयीं सप्तमी घेणें ती षष्ठीयुक्तच घ्यावी. ज्या कालीं पूर्व दिवसीं सूर्यास्तपर्यंत षष्ठी आहे आणि दिवसास षष्ठीनें विद्ध असी सप्तमी मिळत नसेल व दुसऱ्या दिवसीं सप्तमी अष्टमीनें विद्ध असेल त्या कालीं गति नाहीं तर अष्टमीविद्धच घ्यावी. याप्रमाणें इतर तिथींच्या निर्णयांविषयींहि जाणावें. इति सप्तमीनिर्णयस्त्रयोदशउद्देशः ॥ १३ ॥

---

व्रतमात्रेष्टमीशुक्लपक्षेपरा कृष्णपक्षेपूर्वा मिलितशिवशक्त्योरुत्सवेकृष्णापिपरा बुधाष्टमीशुक्लपक्षे प्रातःकालमारभ्यापराण्हपर्यंतंयद्दिनेमुहूर्तमात्रोपिबुधवासरयोगःसाग्राह्या सायान्हकालेचैत्रमासेश्रावणादिमासचतुष्टयेकृष्णपक्षेचनग्राह्या सर्वकृष्णाष्टमीषुकालभैरवोद्देशेनकेचिदुपवसंति तत्रमार्गशीर्षकृष्णाष्टम्यांभैरवजयंतीत्वात्तद्वन्निर्णयौचित्येनमध्यान्हव्यापिनीग्राह्या दिनद्वयेमध्यान्हव्याप्तौपूर्वैव प्रदोषव्यापिनीतिकौस्तुभे अतउभयदिनेप्रदोषव्याप्तौद्विविधवाक्याविरोधात्परैव पूर्वत्रप्रदोषव्याप्तिरेवपरत्रमध्यान्हेएवतदाबहुशिष्टाचारानुरोधात्प्रदोषगापूर्वैव यत्तुअर्कपर्वद्वयेरात्रौचतुर्दश्यष्टमीदिवेतिवचनाद्दिवाभोजननिषेधमात्रपरिपालनंनतुर्किंचिद्व्रतं तत्रनिषेधस्तुनिवृत्त्यात्माकालमात्रमपेक्षतइतिवचनाद्भोजनकालव्यापिनीमष्टमींत्यक्त्वानवम्यांसप्तम्यांवाभोक्तव्यं इतिभाति युक्तमयुक्तंवासद्भिर्विचारणीयं ॥ इत्यष्टमीनिर्णयश्चतुर्दशउद्देशः ॥

## आतां अष्टमीचा निर्णय सांगतों.

शुक्लपक्षांतील अष्टमी सर्व व्रतांविषयीं दुसऱ्या दिवसाची असेल ती घ्यावी. कृष्णपक्षांतील असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी. मिश्रित शिवशक्तींच्या उत्सवाविषयीं कृष्णपक्षांतील असली तथापि दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. शुक्लपक्षीं बुधाष्टमी प्रातःकालापासून अपराण्हकालापर्यंत ज्या दिवसीं दोन घटिकाहि बुधवारयोग येईल ती घ्यावी. सायान्हकालीं, चैत्रमासीं, श्रावणापासून चार महिन्यांमध्यें आणि कृष्णपक्षीं अशी (बुधाष्टमी) असेल ती घेऊं नये. कितीएक लोक कृष्णपक्षांतील सर्व अष्टमींचे दिवसीं कालभैरवाच्या उद्देशेंकरून उपवास करितात, त्या उपवासाविषयीं अष्टमी, (मार्गशीर्ष कृष्णपक्षांतील अष्टमी ही कालभैरवजयंती आहे याकरितां तिच्या निर्णयानुरूप) मध्यान्हकालव्यापिनी घ्यावी. दोन दिवसीं मध्यान्हकालव्यापिनी असेल तर पूर्वीचीच घ्यावी. कौस्तुभांत प्रदोषकालव्यापिनी घ्यावी असें सांगितलें आहे, यास्तव दोन दिवसीं प्रदोषकालव्यापिनी असेल तर, दोन प्रकारचे वाक्यांचा परस्पर विरोध

नाहीं याकरितां दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. पूर्व दिवसींच प्रदोषकालव्याप्ति असेल आणि दुसऱ्या दिवसीं मध्यान्हकालींच व्याप्ति असी असेल तेव्हां बहुशिष्टाचाराच्या अनुरोधेंकरून प्रदोषकालव्यापिनी पूर्वींचीच घ्यावी. " रविवार, अमावास्या, आणि पौर्णिमा यांचे ठिकाणीं रात्रिभोजनाचा निषेध; चतुर्दशी, अष्टमी या दिवसीं दिवसा भोजनाचा निषेध, " अशा वचनेंकरून दिवसा भोजनाचा निषेध मात्र पाळण्याविषयीं सांगितलें, व्रत सांगितलें नाहीं. तेथें " निषेध तर निवृत्तिरूप होत्साता कालमात्राची अपेक्षा करितो, " असें वचन आहे याकरितां भोजनकालव्यापिनी अष्टमी टाकून नवमींत किंवा सप्तमींत भोजन करावें असें मला वाटतें, याविषयीं योग्यायोग्यविचार विद्वानांनीं करावा. इति अष्टमीनिर्णयश्चतुर्दशउद्देशः ॥ १४ ॥

---

**नवमीसर्वत्राष्टमीविद्धैवग्राह्या ॥ इति नवमीनिर्णयःपंचदशउद्देशः ॥**

## आतां नवमीचा निर्णय सांगतों.

नवमी सर्व ठिकाणीं अष्टमीनें विद्ध असेल तीच घ्यावी. इति नवमीनिर्णयः पंचदशउद्देशः ॥ १५ ॥

---

**दशमीतूपवासादौनवमीयुतैवग्राह्या पूर्वविद्धायाअलाभेउत्तरविद्धाग्राह्या ॥ इति दशमीनिर्णयः षोडशउद्देशः ॥**

## आतां दशमीचा निर्णय सांगतों.

उपोषण इत्यादिकांविषयीं दशमी नवमीयुक्त असेल तीच घ्यावी. नवमीयुक्त न मिळेल तर उत्तरविद्धा ( एकादशीविद्धा ) घ्यावी. इति दशमीनिर्णयः षोडशउद्देशः ॥ १६ ॥

---

**अथैकादशीनिर्णयः तत्रैकादश्युपवासोद्वेधा भोजननिषेधपरिपालनात्मकोव्रतात्मकश्च आद्येपुत्रवद्गृहस्थादीनांकृष्णपक्षेप्यधिकारः व्रतात्मकोपवासस्तुअपत्ययुक्तैर्गृहस्थैश्चकृष्णपक्षेनकार्यः किंतुसमंत्रकंव्रतसंकल्पमकृत्वायथाशक्तिनियमयुतंभोजनवर्जनमेवकार्यं एवंतिथिक्षयेशुक्लैकादश्यामपिज्ञेयम् शयनीबोधिनीमध्यवर्तिकृष्णैकादशीषुसापत्यगृहस्थादीनां सर्वेषामधिकारः विष्णुसायुज्यकामैरायुःपुत्रकामैश्चकाम्यव्रतं पक्षद्वयेपिकार्यंतत्रनकोपिनिषेधःवैष्णवगृहिणांकृष्णैकादश्यपिनित्योपोष्या इदमेकादशीव्रतंशैववैष्णवसौरादीनांसर्वेषां नित्यं अकरणेप्रत्यवायश्रवणात् संपत्त्यादिफलश्रवणात्काम्यंचभवतिकेचिन्मुहूर्तादिमितदशमीसत्त्वेदशम्यामेवभोजनंकर्तव्यं सूर्योदयात्पूर्वमेवप्रवृत्तायांशुद्धाधिकाधिकद्वादशिकायांतु नैरंतर्येणोपवासद्वयंकार्यमितितिथिपालनमपिवदंति तत्रयुक्तंअष्टमवर्षादूर्ध्वमशीतितमवर्षपर्यंतमेकादशीव्रताधिकारः शक्तस्यतुअशीतेरूर्ध्वमप्यधिकारः सभर्तृकाणांस्त्रीणांभर्त्रनुज्ञांपित्राद्यनुज्ञांवाविनोपवासव्रताद्याचरणेव्रतवैफल्यंभर्त्रायुःक्षयोनरकश्च अशक्तानांतु नक्तंहविष्यान्नमनौदनंवाफलंतिलाःक्षीरमथांबुचाज्यं यत्पंचगव्यंयदिवापिवायुःप्रशस्तमत्रोत्तरमुत्तरं**

येतिपक्षेषुशक्तितारतम्येनैकपक्षाश्रयणं नत्वेकादशीत्यागः प्रमादादिनैकादश्यामुपोषणाकरणेद्वादश्यामपिव्रतंकार्यं द्वादश्यामप्यकरणेयवमध्यचांद्रायणंप्रायश्चित्तं नास्तिक्यादकरणेपिपीलिकामध्यचांद्रायणं अशक्तपतिपित्राद्युद्देशेनस्त्रीपुत्रभगिनीभ्रात्रादिभिरेकादशीव्रताचरणेक्रतुशतजंपुण्यं ॥

## आतां एकादशीचा निर्णय सांगतों.

एक नुस्तें उपोषण व दुसरें व्रतयुक्त उपोषण असें एकादशीचें उपोषण दोन प्रकारचें आहे. केवल उपोषणाविषयीं पुत्रवान् गृहस्थाश्रमी इत्यादिकांला कृष्णपक्षींहि अधिकार आहे. कृष्णपक्षांतील व्रतयुक्त उपोषण पुत्रवान् गृहस्थाश्रमी यानीं करूं नये, तर समंत्रक व्रतसंकल्प न करितां यथाशक्ति नियम धारण करून भोजन मात्र वर्ज्य करावें. याप्रमाणें तिथीचा क्षय असतां शुक्ल एकादशीचे ठिकाणींहि जाणावें. शयनी आणि बोधिनी ह्यांच्या मधील कृष्णपक्षसंबंधी एकादशीचे व्रताविषयीं पुत्रवान् गृहस्थाश्रमी यांलाहि अधिकार आहे. विष्णूची सायुज्यमुक्ति इच्छिणारे, आणि आयुष्य व पुत्र यांतें इच्छिणारे यांनीं कामनिक व्रत दोनहि पक्षांमध्यें करावें, त्याविषयीं कोणताहि निषेध नाहीं. वैष्णव व गृहस्थाश्रमी यांनीं कृष्णैकादशीचेंहि नित्य उपोषण करावें. हें एकादशीव्रत शैव, वैष्णव, आणि सूर्योपासक इत्यादिक सर्वांला, न केलें असतां दोष सांगितला यास्तव नित्य आहे, आणि संपत्ति इत्यादि फल प्राप्त होतें असें सांगितलें आहे. ह्मणून काम्यहि आहे. कितीएक ग्रंथकार असें ह्मणतात कीं, दोन घटिकादिपरिमित दशमी असतां दशमींतच भोजन करावें, आणि सूर्योदयाच्या पूर्वींच प्राप्त झालेली असी जी शुद्धाधिकाधिकद्वादशिका तिचे ठायीं तर सारखीं दोन उपोषणें करावीं, याप्रमाणें तिथिपालनहि सांगतात, परंतु तें युक्त नाहीं. आठ वर्षानंतर ऐंशीं वर्षांपर्यंत एकादशीव्रताचा अधिकार आहे. सशक्त असेल तर ऐंशीं वर्षांनंतरहि अधिकार आहे. सौभाग्यवती स्त्रियांनीं भर्त्याच्या किंवा पिता इत्यादिकांच्या आज्ञेवांचून उपवास, व्रतादिक आचरण केलें असतां व्रत व्यर्थ होऊन भर्त्याच्या आयुष्याचा क्षय व नरकप्राप्ति हीं होतात. अशक्तांनीं तर "नक्त, हविष्यान्न, अनोदन,[1] फल, तिल, दूध, उदक, तूप, पंचगव्य, वायु, हीं एकाहून दुसरें श्रेष्ठ याप्रमाणें उत्तरोत्तर प्रशस्त आहेत," याप्रमाणें आपलें शक्तितारतम्य जाणून सांगितलेल्या पक्षांतून कोणत्याहि एका पक्षाचा स्वीकार करावा, एकादशीचा त्याग करूं नये. विस्मृतीनें एकादशीचे दिवसीं उपोषण न केलें असतां द्वादशीचे दिवसींहि व्रत करावें. द्वादशीचे दिवसींहि न केलें असेल तर यवमध्यचांद्रायण[2] प्रायश्चित्त करावें. नास्तिकपणानें न करील तर पिपीलिकामध्य[3]

---

१ केवळ भात न जेवतां लवणावांचून तांदळांची भाकर, गव्हांची चपाती इत्यादिक भक्षण करणें त्याचें नांव अनोदन. २ यवमध्यचांद्रायण—शुद्ध प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत एक मास करावें. तें असें—प्रतिपदेचे दिवसीं एक ग्रास, द्वितीयेचे दिवसीं दोन, याप्रमाणें पूर्णिमेपर्यंत ग्रासवृद्धि करावी आणि कृष्ण प्रतिपदेचे दिवसीं चवदा ग्रास, द्वितीयेचे दिवसीं तेरा, या प्रमाणें एकेक कमी करावा व अमावास्येला उपोषण करावें, नंतर गोप्रदान करावें, व दररोज त्रिकाल स्नान करावें. ग्रास मोराच्या अंड्याएवढा घ्यावा. ३ पिपीलिकामध्य चांद्रायण, यवमध्यचांद्रायणाप्रमाणेंच आहे; परंतु भेद इतकाच कीं, कृष्ण प्रतिपदेला चवदा ग्रास, पुढें तेरा, बारा, असा एक एक कमी करित चतुर्दशीस एक ग्रास भक्षण करावा आणि अमावास्येला उपोषण करून शुक्ल प्रतिपदेपासून एकेक ग्रासाची वृद्धि करावी.

चांद्रायण प्रायश्चित्त करावें. पति, पिता इत्यादिक व्रताविषयीं अशक्त असतील तर त्यांच्या उद्देशेंकरून स्त्री, पुत्र, भगिनी, भ्राता इत्यादिकांनीं एकादशीव्रत आचरण केलें असतां शंभर यज्ञांचें पुण्य प्राप्त होतें.

---

अथव्रतदिननिर्णयः तत्रव्रताधिकारिणोद्विविधावैष्णवाःस्मार्ताश्च तत्रयद्यपियस्यदीक्षास्ति वैष्णवीत्यादिलक्षणयुक्तावैष्णवास्तद्भिन्नाःस्मार्ताइतिमहानिबंधेषूक्तंतथापिस्वपारंपर्यप्रसिद्धमेववैष्णवत्वंस्मार्तत्वंचवृद्धामन्यंतइतिसिंधूक्तमेवसर्वदेशेसर्वशिष्टपरिगृहीतंप्रचरति वेधोपि द्विविधः अरुणोदयेदशमीवेधः सूर्योदयेतद्वेधश्च सूर्योदयात्प्राक्चतुर्घटिकात्मकोऽरुणोदयः सूर्योदयस्तुस्पष्टः तेनषट्पंचाशद्घटिकानंतरंपलादिमात्रदशमीप्रवेशेऽरुणोदयवेधोवैष्णवविषयः षष्टिघटिकात्मकसूर्योदयोत्तरंपलादिमात्रदशमीसत्त्वेसूर्योदयवेधःस्मार्तविषयः ज्योतिर्विदादिवादेनवेधादिसंदेहेतु बहुवाक्यविरोधेनब्राह्मणेषुविवादिषु एकादशींपरित्यज्यद्वादशींसमुपोषयेत् ॥

## आतां व्रतदिवसाचा निर्णय सांगतों.

वैष्णव आणि स्मार्त असे एकादशीव्रताचे अधिकारी दोन प्रकारचे आहेत. वैष्णवस्मार्ताविषयीं असें आहे कीं, "ज्याला वैष्णवी दीक्षा आहे तो वैष्णव" आणि वैष्णवांहून जे भिन्न ते स्मार्त, असें जरी मोठ्या ग्रंथांत सांगितलें आहे; तथापि वैष्णवपणा, व स्मार्तपणा हे दोन प्रकार, प्रसिद्ध परंपरागत चालत आलेले जे धर्म त्यांवरूनच वृद्ध मानितात, असें निर्णयसिंधूंत सांगितल्याप्रमाणेंच सर्व देशांत सर्व शिष्टांनीं ग्रहण केलेला आचार चालतो. वेधहि दोन प्रकारचा—अरुणोदयकालीं दशमीवेध, आणि सूर्योदयीं दशमीवेध. सूर्योदयाच्या पूर्वी चार घटिका तो अरुणोदय, सूर्योदय तर स्पष्ट आहे. तेव्हां छप्पन्न घटिकांनंतर एक पळमात्र दशमीचा प्रवेश झाला असेल तर तो अरुणोदयवेध वैष्णवांचे निर्णयाविषयीं घ्यावा. साठ घटिकांचा सूर्योदय झाल्यानंतर एक पळमात्र दशमी असेल तर तो सूर्योदयवेध स्मार्ताविषयीं घ्यावा. ज्योतिषी इत्यादिकांच्या वादविषयेंकरून वेधादिकाचा संशय येईल आणि अनेक वाक्यांच्या विरोधेंकरून पंडित वाद करतील तर "एकादशी टाकून द्वादशीचे दिवसीं उपोषण करावें"

---

तथाचैकादशीद्विविधा विद्धाशुद्धाच अरुणोदयवेधवतीविद्धातांत्यक्त्वावैष्णवैर्द्वादश्येवोपोष्या अरुणोदयवेधरहिताशुद्धासाचचतुर्विधा एकादशीमात्राधिक्यवती द्वादशीमात्राधिक्यवती उभयाधिक्यवती अनुभयाधिक्यवतीचेति अत्राधिक्यंसूर्योदयोत्तरंसत्वं तत्रोदाहरणं दशमीनाड्यः ५५ एकादशी ६०।१ द्वादश्याःक्षयः ५८ इयमेकादशीमात्राधिक्यवती शुद्धावैष्णवैःपरोपोष्या स्मार्तगृहस्थैःपूर्वा अथदशमी ५५ एकादशी ५८ द्वादशी ६०।१ इयंशुद्धाद्वादशीमात्राधिक्यवती अत्रवैष्णवानांद्वादश्यामुपोषणं स्मार्तानांपूर्वा अथ दशमी ५५ एकादशी ६०।१ द्वादशी ५ इयंशुद्धाउभयाधिक्यवती अत्रसर्वैर्वैष्णवैःस्मार्तैश्च परैवोपोष्या अथ दशमी ५५ एकादशी ५७ द्वादशी ५८ इयमनुभयाधिक्यवतीशुद्धा वैष्णवैःस्मार्तैश्चपूर्वैवोपोष्या ॥ इति संक्षेपतोवैष्णवनिर्णयः ॥

## आतां एकादशीचे भेद सांगतों.

एकादशी दोन प्रकारची, विद्धा आणि शुद्धां—अरुणोदयवेधानें युक्त जी ती विद्धा. वैष्णवांनीं विद्धा टाकून द्वादशीचे दिवसीं उपोषण करावें. अरुणोदयवेधेंकरून रहित जी ती शुद्धा. ती (शुद्धा) चार प्रकारची आहे. ती असी,—एकादशीमात्राधिक्यवती, द्वादशीमात्राधिक्यवती, उभयाधिक्यवती, अनुभयाधिक्यवती, एथें आधिक्य ह्मणजे उत्तरदिवसीं सूर्योदयानंतर तिथि असली पाहिजे चार प्रकारच्या शुद्धा एकादशीचीं क्रमेंकरून उदाहरणें देतों—दशमी घटिका ५९, एकादशी ६०।१, द्वादशीचा क्षय ५८, ही एकादशीमात्राधिक्यवती शुद्धा आहे, या उदाहरणीं वैष्णवांनीं दुसऱ्या दिवसाची ध्यावी. स्मार्तगृहस्थांनीं पूर्वदिवसाची ध्यावी.—दशमी ५९, एकादशी ५८, द्वादशी ६०।१, ही शुद्धा द्वादशीमात्राधिक्यवती, या उदाहरणीं वैष्णवांनीं द्वादशीचे ठायीं उपोषण करावें. स्मार्तांनीं पूर्वदिवसाची ध्यावी. दशमी ५५, एकादशी ६०।१, द्वादशी १, ही शुद्धा उभयाधिक्यवती, या उदाहरणीं सर्व वैष्णवांनीं आणि स्मार्तांनीं पुढचीच उपोषणाला ध्यावी. दशमी ५९, एकादशी ५७, द्वादशी ५८, ही अनुभयाधिक्यवती शुद्धा, वैष्णव व स्मार्त या उभयतांनीं पूर्वच उपोषणाला ध्यावी. याप्रमाणें संक्षेपानें वैष्णवांचा निर्णय सांगितला.

---

**अथ स्मार्तनिर्णयः** तत्रसूर्योदयवेधवतीविद्धातद्रहिताशुद्धाचेतिद्विविधापिप्रत्येकं चतुर्धा एकादशीमात्राधिक्यवती उभयाधिक्यवती द्वादशीमात्राधिक्यवती अनुभयाधिक्यवतीत्येवं अष्टभेदाभवंति अत्रोदाहरणानि दशमी ५८ एकादशी ६०।१ द्वादश्याःक्षयः ५८ इयं शुद्धाएकादशीमात्राधिक्यवती दशमी ४ एकादशी २ द्वादश्याःक्षयः ५८ एवंविद्धाएकादशीमात्राधिक्यवती अत्रोभयत्रापिस्मार्तानांगृहिणांपूर्वोपोष्या यतिभिर्निष्कामगृहिभिर्वनस्थैर्विधवाभिर्वैष्णवैश्चपरैवोपोष्या विष्णुप्रीतिकामैः स्मार्तैरुपवासद्वयंकार्यमितिकेचित् उभयाधिक्यवतीशुद्धायथा दशमी ५८ एकादशी ६०।१ द्वादशी ४ उभयाधिक्यवतीविद्धायथा दशमी २ एकादशी ३ द्वादशी ४ अत्रोभयत्रापिसर्वैःस्मार्तैर्वैष्णवैश्चावशिष्टापरैवैकादशीउपोष्या द्वादशीमात्राधिक्यवतीशुद्धायथा दशमी ५८ एकादशी ५९ द्वादशी ६०।१ अत्रशुद्धत्वात्स्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यामितिमाधवमतं हेमाद्रिमतेतुसर्वैः पराद्वादश्येवोपोष्या केचित्तुमुमुक्षुभिः स्मार्तैः परोपोष्येत्याहुः द्वादशीमात्राधिकाविद्धायथा दशमी १ एकादशीक्षयगामिनी ५८ द्वादश्यावृद्धिः ६०।१ अत्रैकादश्याविद्धत्वात् द्वादश्यामेवस्मार्तानामप्युपवासः एवंचोभयाधिक्येद्वादशीमात्राधिक्येचस्मार्तानांविद्धायास्त्यागोनान्यत्र वैष्णवानांतुषड्विधामप्याधिक्यवतींत्यक्त्वाद्वादश्युपो अनुभयाधिक्यवतीशुद्धायथा दशमी ५७ एकादशी ५८ द्वादशी ५९ स्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यां वैष्णवानांतुविद्धत्वाद्द्वादश्यामेवोपवासः अनुभयाधिक्यवतीविद्धायथादशमी २ एकादश्याःक्षयः ५६ द्वादशी ५५ अत्रापिस्मार्तानामेकादश्यामुपवासः वैष्णवानांद्वादश्यामुपवासः अस्मिन्ननुभयाधिक्यवतीविद्धाचरमेभेदेप्रथमभेदद्वयेइवयतिभिर्मुमुक्षुभिर्विधवाभिःपरो

पोष्या विष्णुप्रीतिकामैरुपवासद्वयंकार्यमितितुल्ययुक्त्याप्रतिभाति इदानींशिष्टास्तुहेमाद्रिम तंनिष्कामत्वादिकंचानादृत्यमाधवमतेनैवसर्वस्मार्तनिर्णयमविशेषेणवदंतिनतुक्वचिदुपवासद्व यं शुद्धाधिकद्वादशिकायांसर्वेषामेकं परोपवासंवावदंतिइतिसर्वत्रदेशेषुप्रायोमाधवोक्तानु सारएवप्रचारइतिबोध्यं एतेनवैष्णवाष्टादशभेदानांस्मार्ताष्टादशभेदानांचनिर्णयःसर्वोपिग तार्थोभवतीतिविभावनीयं विस्तरस्तुमहाग्रंथेष्वनुसंधेयः अत्राष्टादशभेदानांपृथक्पृथगुदाह रणकथनेतन्निर्णयकथनेचबालानांव्यामोहमात्रंस्यादितिसनिर्णयः पृथगेवपट्टेलिखित्वास्थापि तोऽनुसंधेयः ॥

## आतां स्मार्तांचा निर्णय सांगतों.

पूर्वी सांगितलेला जो सूर्योदयवेध तेणेंकरून रहित जी ती शुद्धा, सूर्योदयवेधयुक्त जी ती विद्धा, याप्रमाणें दोन प्रकारची, त्या प्रत्येकीचे चार चार भेद होतात. ते असे—एकादशीमात्राधिक्यवती, उभयाधिक्यवती, द्वादशीमात्राधिक्यवती, अनुभयाधिक्यवती, याप्रमाणें आठ भेद होतात. यांचीं क्रमेंकरून उदाहरणें देतों;—दशमी ५८, एकादशी ६०।१, द्वादशीचा क्षय ५८, ही शुद्धा एकादशीमात्राधिक्यवती; दशमी ४, एकादशी २, द्वादशीचा क्षय ५८, याप्रमाणें विद्धा एकादशीमात्राधिक्यवती; या दोनहि उदाहरणीं स्मार्त गृहस्थाश्रमी यांनीं पूर्वीचीच उपोषणाला घ्यावी. संन्यासी, निष्काम असे गृहस्थाश्रमी, वानप्रस्थाश्रमी, विधवा, आणि वैष्णव या सर्वांनीं पुढचीच उपोषणाला घ्यावी. विष्णूची प्रीति इच्छिणारे स्मार्त असतील त्यांनीं दोन उपोषणें करावीं, असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. उभयाधिक्यवती शुद्धा; तिचें उदाहरण;— दशमी ५८, एकादशी ६०।१, द्वादशी ४, उभयाधिक्यवती विद्धा—उदाहरण;—दशमी २, एकादशी ३, द्वादशी ४, या दोनहि उदाहरणीं सर्व स्मार्तांनीं व वैष्णवांनीं अवशिष्ट राहिलेली असी दुसऱ्या दिवसाचीच उपोषणाला घ्यावी. द्वादशीमात्राधिक्यवती शुद्धा—उदाहरण;—दशमी ५८, एकादशी ५९, द्वादशी ६०।१, ही शुद्धा आहे याकरितां स्मार्तांनीं एकादशीचे दिवसींच उपोषण करावें, द्वादशीचे दिवसीं करूं नये असें माधवाचार्यांचें मत.आहे. हेमाद्रीच्या मतें सर्वांनीं पुढची द्वादशीच उपोषणाला घ्यावी. मुमुक्षु स्मार्तांनीं पुढचीच उपोषणाला घ्यावी, असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. द्वादशीमात्राधिक्यवती विद्धा—उदाहरण;—दशमी १, एकादशीं क्षयाला पोंचणारी ५८, द्वादशीची वृद्धि ६०।१, या उदाहरणीं विद्धा एकादशी आहे याकरितां स्मार्तांनीं द्वादशीचे दिवसींच उपोषण करावें. याप्रमाणेंच उभयाधिक्यवती व द्वादशीमात्राधिक्यवती यांचे ठायीं स्मार्तांनीं विद्धेचा त्याग करावा, इतर ठिकाणीं करूं नये. वैष्णवांनीं साहाहि प्रकारची आधिक्यवती टाकून द्वादशीच उपोषणाला घ्यावी. अनुभयाधिक्यवती शुद्धा,—उदाहरण,—दशमी ५७, एकादशी ५८, द्वादशी ५९, एथें स्मार्तांनीं एकादशीचे दिवसींच उपवास करावा, द्वादशीचे दिवसीं करूं नये. ही एकादशी विद्धा आहे याकरितां वैष्णवांनीं द्वादशीचे दिवसीं उपोषण करावें. अनुभयाधिक्यवती विद्धा—उदाहरण;—दशमी २ एकादशीचा क्षय ५६, द्वादशी ५५, या उदाहरणींहि स्मार्तांनीं एकादशीचे दिवसीं उपोषण

करावें. वैष्णवांनीं द्वादशीचे दिवसीं उपोषण करावें. एथें अनुभयाधिक्यवती विद्धा जी तिच्या शेवटच्या भेदीं, पहिले दोन भेद यांच्या प्रमाणें संन्यासी, मुमुक्षु, आणि विधवा यांनीं पुढचीच उपोषणाला घ्यावी. विष्णुप्रीति इच्छिणारांनीं दोन उपोषणें करावीं असें तुल्ययुक्तीनें मला वाटतें. हल्लीं सर्व शिष्टजन निष्कामव्रतादि व हेमाद्रिमत यांचा अनादर करून माधवमतानेंच सर्व स्मार्तनिर्णय साधारणपणानें सांगतात. दोन उपोषणें करावीं, किंवा शुद्धाधिकद्वादशीचे दिवसीं सर्वांनीं पुढचें एक उपोषण करावें असें कोठें सांगत नाहींत. याप्रमाणें सर्व देशांचे ठायीं बहुधा माधवांनीं सांगितल्याप्रमाणेंच प्रचार चालत आहे, असें जाणावें. याप्रमाणें वैष्णवांचे अठरा भेद, आणि स्मार्तांचे अठरा भेद या सर्वांचा निर्णय या उदाहरणांनीं गतार्थ झाला, याहून विशेष विस्तार पाहिजे असल्यास मोठ्या ग्रंथांतून पाहावा. याविषयीं अठरा भेदांचीं निरनिराळीं उदाहरणें सांगावीं व त्यांचा निर्णय पृथक् पृथक् सांगावा तर अज्ञांला केवळ भ्रांतिमात्र उत्पन्न होईल, यास्तव त्या निर्णयाचा निराळा पैट लिहून ठेविला आहे तो पाहावा ह्मणजे त्यावरून यथार्थ बोध होईल.

---

अत्रार्धरात्रोत्तरंदशमीसत्त्वे कपालवेधोद्विपंचाशद्घटिकादशमीसत्त्वेछायावेधस्त्रिपंचाशद्घटीत्वेदशम्याग्रस्ताख्योवेधश्चतुःपंचाशत्त्वेसंपूर्णाख्यःपंचपंचाशत्त्वेऽतिवेधःषट्पंचाशत्त्वेमहावेधःसप्तपंचाशत्त्वेप्रलयाख्योष्टपंचाशत्त्वे महाप्रलयएकोनषष्टित्वेघोराख्यःषष्टिघटीत्वेराक्षसाख्यइतिवेधभेदानारदेनोक्तामध्वादिमतानुसारिभिः कैश्चिदेवकेचिदेवानुसृताः माधवाचार्यादिसर्वसंमतस्तुषट्पंचाशद्घटीवेधएवेतिज्ञेयं दशमीपंचदशघटीभिरेकादशीदूषिकेतितूपवासातिरिक्तव्रते ॥ व्रतांगेसंकल्पार्चनादौतत्रापितद्दोषेणनसर्वथात्यागःकिंतु प्रातःकर्तव्यंसंकल्पार्चनादिमध्यान्होत्तरंकार्यमितिध्येयं ॥

## आतां एकादशीव्रताचा वेध सांगतों.

याविषयीं नारदानें दशमीतिथीच्या घटिका अनुलक्षून दहा प्रकारचा वेध सांगितला आहे, तो असा—मध्यरात्रीनंतर दशमी असेल तर कपालवेध, ५२ घटिका दशमी असेल तर छायावेध, ५३ घटिका दशमी असेल तर ग्रस्तवेध, ५४ घटिका दशमी असेल तर संपूर्ण वेध, ५५ घटिका दशमी असेल तर अतिवेध, ५६ घ० असेल तर महावेध, ५७ घ० असेल तर प्रलयवेध, ५८ घ० असेल तर महाप्रलयवेध, ५९ घ० असेल तर घोरवेध, ६० घ० असेल तर राक्षसवेध, असे वेधांचे भेद आहेत यांला मध्वादिमतास अनुसरणाऱ्यांप्रमाणें कित्येक अनुसरतात. माधवाचार्य व इतर ग्रंथकार या सर्वांला मान्य असा ५६ घटिकाप्रयुक्त महावेधच, आहे, असें जाणावें. दशमी पंधरा घटिकांनीं एकादशीला दूषित करिते, असें जें सांगितलें तें उपवासरहित व्रताविषयीं आहे. व्रताचीं अंगभूत जीं संकल्प, पूजादिक त्यांविषयीं दूषित एकादशी असेल तथापि सर्वथा त्यांचा त्याग करूं नये, तर प्रातःकालीं करावयाचीं जीं संकल्प, पूजादिक तीं मध्यान्हानंतर करावीं असें जाणावें.

---

१ हा पट ग्रंथाच्या शेवटीं छापला आहे तो पाहावा.

अथ व्रतप्रयोगः उपवासात्पूर्वदिनेप्रातःकृतनित्यक्रियः दशमीदिनमारभ्यकरिष्येहंव्रतं तव त्रिदिनंदेवदेवेशनिर्विघ्नंकुरुकेशवेतिसंकल्प्यमध्यान्हेएकभक्तंकुर्यात् तत्रनियमाःकांस्य मांसमसूरदिवास्वापातिभोजनात्यंबुपानपुनर्भोजनमैथुनक्षौद्रानृतभाषणचणककोद्रवशाकप रान्नद्यूततैलतिलपिष्टतांबूलवर्जनादयः एकभक्तांतरेकाष्ठेनदंतधावनंकुर्यात् निशिभूतलेशयि त्वा प्रातरेकादश्यांपर्णादिनादंतधावनंकार्यंनतुकाष्ठेन स्नानादिनित्यक्रियांतेपवित्रपाणिरुद ङ्मुखः वारिपूर्णताम्रपात्रमादायसंकल्पंकुर्यात् एकादश्यांनिराहारोभूत्वाहमपरेहनि भोक्ष्या मिपुंडरीकाक्षशरणंमेभवाच्युतेति अनेनमंत्रेण पुष्पांजलिंवाहरौदद्यात् अशक्तस्यतुएकाद श्यांजलाहारएकादश्यांक्षीरभक्षएकादश्यांफलाहारएकादश्यांनक्तभोजीत्यादयूहेन शक्त्यनु सारेणसंकल्पः शैवानांरुद्रगायत्र्यासंकल्पः सौराणांनित्यगायत्र्यानाम्नावासंकल्पः अयंसं कल्पः सूर्योदयोत्तरंदशमीसत्त्वेस्मार्तैरेकादश्यांरात्रौकार्यः अर्धरात्रादुपरिदशम्यनुवृत्तौस र्वैरेवैकादश्यांमध्यान्होत्तरंकार्यः संकल्पोत्तरमष्टाक्षरमंत्रेणत्रिरभिमंत्रिततज्जलंपिबेत् ततःपुष्पमंडपंकृत्वा तत्रपुष्पैर्गंधैस्तथाधूपैर्दीपैर्नैवेद्यकैःपरैः स्तोत्रैर्नानाविधैर्दिव्यैर्गीतवाद्यैर्मनो हरैः दंडवत्प्रणिपातैश्चजयशब्दैस्तथोत्तमैः हरिंसंपूज्यविधिवद्रात्रौकुर्यात्प्रजागरम् ॥

## आतां व्रताचा प्रयोग सांगतों.

उपोषणाच्या पूर्वदिवसीं प्रातःकालीं नित्यकर्म केल्यानंतर " दशमीपासून तीन दिवसपर्यंत मी व्रत करितों, हे देव, देवेश, केशवा, तें व्रत निर्विघ्न कर, " असा संकल्प करून दोनप्रहरीं एकभक्त करावें. त्या एकभक्ताचे नियम–कांस्यपात्रांत भोजन, मांस, मसुरा, दिवसा निद्रा, अतिभोजन, अतिउदकपान, पुनः भोजन, मैथुन, मध, अनृतभाषण, चणे, कोद्रु, शाका, परान्न, द्यूत, तिलपिष्ट, तांबूल इत्यादिक पदार्थ वर्ज्य करावे. एकभक्तव्रतामध्यें काष्ठानें दांत घांसावे. रात्रीं भूमिशयन करून प्रातःकालीं एकादशीचे दिवसीं वृक्षाच्या पानादिकानें दंतधावन करावें, काष्ठानें करूं नये. स्नान इत्यादिक नित्यकर्म केल्यानंतर हातांत दर्भपवित्रक धारण करून उत्तर दिशेला सम्मुख होऊन उदकानें भरलेलें ताम्रपात्र हातांत घेऊन संकल्प करावा. **" एकादश्यांनिराहारो भूत्वांऽहमपरेऽहनि ॥ भोक्ष्यामि पुंडरीकाक्ष शरणंमे भवाच्युत "–अर्थ–**एकादशीचे दिवसीं निराहार होत्साता मी उदईक भोजन करीन, हे पुंडरीकाक्ष, हे अच्युत, माझें रक्षण कर. " अथवा या मंत्रेंकरून पुष्पांजलि विष्णूला समर्पण करावी. अशक्त असेल तर **" एकादश्यां जलाहारो, एकादश्यां क्षीरभक्षो, एकादश्यां फलाहारो, एकादश्यां नक्तभोजी, "**इत्यादिक यथाशक्ति ऊह करून संकल्प करावा. शैवांनीं रुद्रगायत्रीनें संकल्प करावा. सूर्योपासकांनीं नित्यगायत्रीनें, अथवा नाममंत्रानें संकल्प करावा. हा संकल्प सूर्योदयानंतर दशमी असतां स्मार्तांनीं एकादशीचे ठायीं रात्रीं करावा. मध्यरात्रीनंतर दशमी असेल तर सर्वांनीं एकादसीचे दिवसीं माध्यान्हकालानंतर करावा. संकल्पानंतर अष्टाक्षरमंत्रानें उदक तीन वेळ मंत्रून तें प्राशन करावें. तदनंतर पुष्पांचा मंडप करून त्या मंडपांत " पुष्पें, गंध, धूप, दीप, उत्तम नैवेद्य, उत्तम अशीं नानाप्रकारचीं स्तोत्रें,

सुस्वर गीतें, वाद्यें, साष्टांगनमस्कार, उत्तम जयशब्द, यांहींकरून यथाविधि विष्णूची पूजा करून रात्रीं जागरण करावें."

---

एकादश्यांनियमाः पाखंडिसंभाषणस्पर्शदर्शनवर्जनं ब्रह्मचर्यसत्यभाषणदिवास्वापवर्जनादयःपरिभाषोक्ताश्चज्ञेयाः पाखंडिदर्शनादौतुसूर्यंपश्येत्ततःशुचिः ॥ संस्पर्शेतुबुधःस्नायाच्छुचिरादित्यदर्शनात् । संभाष्यतान्शुचिषदंचिंतयेदच्युतंबुध इत्यादिप्रायश्चित्तं उपवासदिने श्राद्धप्राप्तौ श्राद्धशेषसर्वान्नेनैकंपात्रंपरिविष्य तत्सर्वान्नावघ्राणंकृत्वा पात्रंगवादिभ्योदेयं कंदमूलफलाहाराद्यनुकल्पेनोपवासकर्त्रातु स्वभक्षस्यैवफलादेः पितृब्राह्मणपात्रेषुपरिवेषणपूर्वकंतच्छेषभक्षणंकार्यं एकादश्यांयदाभूपमृताहःस्यात्कदाचन तद्दिनंतुपरित्यज्यद्वादश्यामेवकारयेदित्यादिवचनानियथाचारंवैष्णवपराणि वैष्णवैःषोडशमहालयकरणपक्षे एकादश्यधिकरणकंद्वादश्यधिकरणकंच महालयंतंत्रेणकरिष्ये इतिसंकल्प्य महालयद्वयंद्वादश्यांकार्यं काम्योपवासेसूतकप्राप्तौ शारीरनियमान्स्वयंकृत्वासूतकांतेपूजादानब्राह्मणभोजनादिकंकार्यं नित्योपवासेसूतकादिप्राप्तौस्नात्वाहरिंप्रणम्यनिराहारादिकंस्वयंकृत्वा पूजादिकंब्राह्मणद्वाराकार्यं दानादेर्लोपोनसूतकांतेऽनुष्ठानावश्यकत्वं एवंरजस्वलादिदोषेपि द्वादश्यांप्रातर्नित्यपूजांविधायभगवतेव्रतमर्पयेत् अज्ञानतिमिरांधस्यव्रतेनानेनकेशव प्रसीदसुमुखोनाथज्ञानदृष्टिप्रदोभवेति तत्रमंत्रः दशम्यादिषूक्तानां नियमानांभंगेदिवास्वापेबहुशोजलपानेमिथ्याभाषणेवातत्तन्नियमभंगानुद्दिश्यनारायणाष्टाक्षरमंत्रजपमष्टोत्तरशतसंख्ययाकुर्यात् अल्पदोषेनामशतत्रयजपःरजस्वलाचंडालरजकसूतिकादिशब्दस्यव्रतमध्येश्रवणेष्टोत्तरसहस्रगायत्रीजपः ततोनैवेद्यतुलसीमिश्रितान्नेनपारणंकार्यं आमलकीफलस्य पारणायांभक्षणेऽसंभाष्यभाषणादिदोषनाशः पारणंचद्वादश्युल्लंघनेमहादोषात्द्वादशीमध्येएवकार्यं स्वल्पद्वादशीसत्वेरात्रिशेषेआमाध्यान्हांताःक्रियाः सर्वाअपकृष्यकार्याः अग्निहोत्रहोमस्यनापकर्षइतिकेचित् एवंश्राद्धस्यापिनापकर्षोरात्रौश्राद्धनिषेधात् अतिसंकटेश्राद्धेचप्रदोषादिव्रतेचतीर्थजलेनपारणंकार्यं द्वादशीभूयस्त्वेद्वादशीप्रथमपादंहरिवासरसंज्ञकमुल्लंघ्यपारणंकार्यं कलामात्रायाअपिद्वादश्याअभावेत्रयोदश्यांपारणं द्वादश्यामध्यान्होर्ध्वसत्त्वेप्रातर्मुहूर्तत्रयमध्येएवपारणं नमध्यान्हादौइतिबहवः बहूनांकर्मकालानांबाधापत्तेरपराण्हएवेतिकेचित् द्वादश्यांसर्वमासेषुशुक्लायांकृष्णायांवाश्रवणयोगेशक्तेनैकादशीद्वादश्योर्द्वयोरप्युपवासः कार्यः अशक्तेनैकादश्यांफलाहाराद्यनुकल्पंकृत्वाश्रवणद्वादश्यामुपवासःकार्यः विष्णुशृंखलयोगसत्त्वेतुएकादश्यामेवश्रवणद्वादशीप्रयुक्तमप्युपवासंकृत्वाद्वादश्यांश्रवणयोगरहितायांपारणंकार्यं द्वादश्याःश्रवणतोन्यूनत्वेश्रवणयुक्तायामपिद्वादश्यामेवपारणं द्वादश्युल्लंघनेदोषात् विष्णुशृंखलयोगादिनिर्णयोभाद्रपदमासगतश्रवणद्वादशीप्रकरणेवक्ष्यते दिवानिद्रांपरान्नंचपुनर्भोजनमैथुने क्षौद्रंकांस्यामिषंतैलंद्वादश्यामष्टवर्जयेत् द्यूतक्रोधचणककोद्रवमाषतिलपिष्टमसूरनेत्रांजनमिथ्याभाषणलोभायासप्रवासभारवाहनाध्ययनतांबूलादीनिवर्जयेत् एतेच नियमाःकाम्यव्रतेआवश्यकाः नित्यव्रतेतु शक्तिमांस्तुपुमान्कुर्यान्नियमंसविशेषणं विशेषनियमाशक्तोऽहोरात्रंभुजिवर्जितः निगृहीतेंद्रियःश्रद्धासहायोविष्णुतत्परः उपोष्यैकादशींपा

पान्मुच्यतेनात्रसंशयः अन्यंभुंक्ष्वेतियोब्रूयाद्भुंक्तेवायःसनारकी एकादशीव्रताद्विष्णुसायु ज्यंलभतेश्रियं इत्येकादशीव्रतनिर्णयः ॥ कार्यांतरेष्वेकादशीद्वादशीयुतैवग्राह्या ॥ इत्येका दशीनिर्णयउद्देशःसप्तदशः ॥

## एकादशीव्रतसंबंधी नियम.

पाखंड्याबरोबर संभाषण, स्पर्श, दर्शन हीं वर्ज्य करावीं. ब्रह्मचर्य; सत्यभाषाण; दिवसा निद्रा न करणें; हे सर्व नियम आणि पूर्वी व्रतपरिभाषेंत सांगितले तेहि पाळावे. पाखंडी, चांडाल, रजस्वला इत्यादिकांचें दर्शनादिक झालें असतां "सूर्याचें दर्शन घेतल्यानंतर शुद्ध होतो. स्पर्श झाला असतां स्नान करून सूर्याचें दर्शन घेतल्यानें शुद्ध होतो. त्यांच्याशीं भाषणप्रसंग होईल तर सूर्यमंडलांतवर्ति अच्युता ( नारायणा ) चें चिंतन करावें, इत्यादि प्रायश्चित्त जाणावें. उपोषणांचे दिवसीं श्राद्ध प्राप्त झालें असतां श्राद्ध करून शेष राहिलेलें सर्व अन्न एका पात्रावर वाढवून तें सर्व अन्न अवघ्राण करून तें पात्र गाई इत्यादिकांला द्यावें. कंद, मूल, फलें इत्यादिक कांहीं भक्षण करून गौण पक्षानें उपोषण करणारा असेल तर तीं कंद, मूल, फलें पितृस्थानीं बसलेल्या ब्राह्मणांच्या पात्रांवर वाढून त्यांतून शेष राहतील तीं भक्षण करावीं. "हे राजा, ज्या कालीं एकादशीचे दिवसीं श्राद्धदिवस येईल त्या कालीं तो दिवस टाकून द्वादशीचे दिवसीं श्राद्ध करावें," इत्यादि वचनें जसा आचार असेल तदनुसार वैष्णवपर समजावीं. वैष्णवांना सोळा महालय करणें असतील तर, त्यांनीं "एकादश्यधिकरणकं द्वादश्यधिकरणकंच महालयं तंत्रेण करिष्ये," असा संकल्प करून दोन महालय द्वादशीचे दिवसीं करावे. काम्य उपोषणाचे दिवसीं सूतक प्राप्त झालें असतां शारीर ( उपवासादिक ) नियम आपण करून सूतकाची निवृत्ति झाल्यानंतर पूजा, दान, ब्राह्मणभोजन इत्यादि करावें. नित्योपवासाचे दिवसीं सूतक प्राप्त होईल तर स्नान करून विष्णूला नमस्कार करावा व निराहारादिक नियम आपण करून पूजा इत्यादिक ब्राह्मणद्वारा करावीं. दानादिकाचा लोप करावा. सूतकसमाप्तीनंतर पुनः तें करण्याची आवश्यकता नाहीं. याप्रमाणें रजस्वलादि दोष असतांहि जाणावें. द्वादशीचे ठायीं प्रातःकालीं नित्यपूजा करून भगवंताला व्रत समर्पण करावें. त्याचा मंत्र;–"अज्ञानतिमिरांधस्य व्रतेनानेन केशव ॥ प्रसीद सुमुखो नाथ ज्ञानदृष्टिप्रदो भव." दशमी इत्यादिक तीन दिवसांत सांगितलेल्या नियमांचा भंग होईल, किंवा दिवसा निद्रा, अति उदकपान किंवा मिथ्या भाषण, यांतून जें घडेल तेणेंकरून जो जो नियमभंग होईल त्याचा उद्देश करून नारायणाचे अष्टाक्षरमंत्राचा अष्टोत्तर शत ( १०८ ) जप करावा. अल्प दोष असेल तर नाममंत्राचा तीनशें जप करावा. रजस्वला, चांडाल, रजक, बाळंतीण इत्यादिकांचे शब्द व्रतामध्यें श्रुत होतील तर १००८ गायत्री जप करावा. नंतर नैवेद्य आणि तुलसी यांहीं मिश्रित अशा अन्नानें परणा करावी. पारणेचे भोजनांत आंवळे भक्षण केले तर चांडालादिकांशीं संभाषणादिक केल्याचा दोष दूर होतो. द्वादशीचें उल्लंघन झालें असतां मोठा दोष आहे याकरितां पारणा द्वादशीमध्येंच करावी.

द्वादशी अल्प असेल तर सूर्योदयापासून माध्यान्हकालपर्यंतचीं सर्व कर्में शेष रात्रीमध्यें अपकर्षानें ( पुढचीं कर्में आदींच करणें ) करावीं. अग्निहोत्रहोमाचा अपकर्ष करूं नये, असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. " रात्रीं श्राद्ध करूं नये, " असा निषेध आहे याकरितां श्राद्धाचाहि अपकर्ष करूं नये. अतिसंकट, श्राद्ध, प्रदोषादिक व्रत अशा समयीं तीर्थ घेऊन पारणा करावी. द्वादशी पुष्कळ असेल तर **हरिवासर** संज्ञक असा द्वादशीचा प्रथम पाद टाकून पारणा करावी. कलामात्र ( तीस काष्ठा ) सुद्धां द्वादशी नसेल तर त्रयोदशींत पारणा करावी. माध्यान्हकालानंतर द्वादशी असेल तर प्रातःकालापासून सहा घटिकांमध्येंच पारणा करावी, माध्यान्हादि कालीं करूं नये, असें पुष्कळ ग्रंथकार ह्मणतात. निरनिराळ्या कर्मांचे निरनिराळे काल आहेत यास्तव अपराण्हकालींच पारणा करावी, असेंहि कोणी ह्मणतात. सर्व मासांचे ठिकाणीं शुक्लपक्ष किंवा कृष्णपक्षांतील द्वादशीचे दिवसीं श्रवण नक्षत्राचा योग असेल तर सशक्तानें एकादशी व द्वादशी या दोन दिवसीं उपोषण करावें. अशक्तानें एकादशीचे दिवसीं फलाहार इत्यादिक गौण पक्ष स्वीकारून श्रवणद्वादशीला उपोषण करावें. **विष्णुशृंखल** योग असेल तर एकादशीचे दिवसींच श्रवणद्वादशीचा उपवास करून श्रवणयोगाविरहित अशा द्वादशीचे दिवसीं पारणा करावी. द्वादशी श्रवणापेक्षां कमी असेल तर, द्वादशीचें उल्लंघन झालें असतां महादोष आहे यास्तव श्रवणयुक्त द्वादशीमध्येंच पारणा करावी. विष्णुशृंखलयोगादिकांचा निर्णय भाद्रपद मासांतील श्रवणद्वादशीप्रकरणीं सांगूं. " दिवसा निद्रा, परान्नभोजन, दुसऱ्यानें भोजन, मैथुन, मध, कांस्यपात्रभोजन, आमिष, तैल हे आठ प्रकार द्वादशीचे दिवसीं वर्ज्य करावे. द्यूत, क्रोध, चणे, कोद्रु, उडीद, तिलपिष्ट, मसुरा, नेत्रांत अंजन घालणें, मिथ्याभाषण, लोभ, आयास, प्रयाण, भार वाहणें, अध्ययन, तांबूल इत्यादिक वर्ज्य करावीं. हे सर्व नियम काम्यव्रताविषयीं अवश्य पाळावे. नित्य व्रताविषयीं तर, " सशक्त पुरुषानें विशेषेंकरून नियम पाळावे. " मुख्य नियमांविषयीं जर अशक्त असेल तर अहोरात्र उपोषण करावें. इंद्रियनिग्रह करीत होत्साता, श्रद्धायुक्त, विष्णुतत्पर असा, एकादशीचे दिवसीं उपोषण केल्यानें पापापासून मुक्त होतो, यांत संशय नाहीं. दुसऱ्याला, ' भोजन कर, ' असें जो सांगतो अथवा भोजन करितो ते दोघेहि नरकांत जाणारे होतात. एकादशीव्रतेंकरून " संपत्ति, विष्णुसायुज्य हीं प्राप्त होतात." याप्रमाणें एकादशीव्रताचा निर्णय सांगितला. अन्यकर्माला एकादशी घेणें ती द्वादशीयुक्तच घ्यावी. इति **एकादशीनिर्णय उद्देशः सप्तदशः ॥ १७ ॥**

---

**द्वादशीत्वेकादशीविद्धाग्राह्या अथअष्टौमहाद्वादश्यः शुद्धाधिकैकादशीयुक्ताद्वादशीउन्मीलनीसंज्ञा द्वादश्येवशुद्धाधिकावर्धतेसावंजुली सूर्योदयेएकादशीततःक्षयगामिनीद्वादशी द्वितीयसूर्योदयेत्रयोदशीएवमेकाहोरात्रेतिथित्रयस्पर्शात्रिस्पर्शासंज्ञाद्वादशी दर्शस्यपौर्णमास्यावायदादिनवृद्धिस्तदापक्षवर्धिनीसंज्ञा पुष्यर्क्षयुताजया श्रवणयुताविजयापुनर्वसुयुताजयंती रोहिणीयुतापापनाशिनी एताःपापक्षययुक्तिकामउपवसेत् श्रवणयुतातुएकादशीवभिन्या एतास्वष्टसुएकादशीद्वादश्योरेकत्वेतंत्रेणोपवासः पार्थक्येशक्तस्योपवासद्वयं यस्त्वारब्धव्रतद्वयं**

उपवासद्वयाशक्तश्चेत्तस्यद्वादशीसमुपोषणात्व्रतद्वयपुण्यलाभः तत्रश्रवणर्क्षयोगोमुहूर्तमात्रोऽपिग्राह्यः पुष्यादियोगःसूर्योदयमारभ्यास्तमयपर्यंतश्चेदुपवासःपारणंतुतिथिनक्षत्रसंयोगोपोषणेउभयांतेन्यतरांतेवेतिसर्वसामान्यनिर्णयः ॥ इति द्वादशीनिर्णयउद्देशः अष्टादशः ॥१८॥

## आतां द्वादशीचा निर्णय सांगतों.

द्वादशी, एकादशीनें विद्ध असेल ती घ्यावी. आठ **महाद्वादशी**—१ शुद्धाधिक एकादशीनें युक्त जी द्वादशी तिला **उन्मीलनी** असें नांव आहे. २ शुद्धाधिक द्वादशीच वाढते ती **वंजुली**. ३ सूर्योदयीं एकादशी, त्यानंतर क्षयाला पोंचणारी द्वादशी, आणि दुसऱ्या सूर्योदयीं त्रयोदशी, याप्रमाणें एका अहोरात्राला तीन तिथींचा स्पर्श होतो यास्तव ती द्वादशी **त्रिस्पर्श** संज्ञक. ४ अमावास्येची, किंवा पौर्णिमेची ज्या कालीं दिनवृद्धि होते तेव्हां **पक्षवर्द्धिनी** द्वादशी. ५ पुष्य नक्षत्रानें युक्त ती **जया**. ६ श्रवणयुक्त ती **विजया**. ७ पुनर्वसूनें युक्त ती **जयंती**. ८ रोहिणीयुक्त ती **पापनाशिनी**. पापक्षय आणि मुक्ति यांची इच्छा करणारा असेल त्यानें ह्या आठ द्वादशींला उपोषण करावें. श्रवण नक्षत्रानें युक्त जी द्वादशी ती एकादशीप्रमाणें नित्य आहे. या आठ द्वादशींतून द्वादशी व एकादशी ह्या दोन एक दिवसीं प्राप्त असतां एकतंत्रानें उपवास करावा. निरनिराळ्या दोन दिवसीं असतील तर सशक्तानें दोन उपोषणें करावीं जर दोन व्रतें पूर्वीं आरंभिलेलीं आहेत आणि दोन उपोषणें करण्यास शक्ति नसेल तर द्वादशीचें उपोषण केल्यानें दोन व्रतांचें पुण्य प्राप्त होतें, त्या उपोषणाविषयीं श्रवणनक्षत्रयोग दोन घटिका असेल तोहि घ्यावा. सूर्योदयापासून अस्तमानपर्यंत जर पुष्य, पुनर्वसु, रोहिणी या नक्षत्रांचा योग असेल तर उपवास करावा. पारणा करणें ती तिथी व नक्षत्र यांच्या संयोगीं उपोषण असेल तर दोहोंच्या ( तिथिनक्षत्रांच्या ) अंतीं किंवा दोहोंतून एकाच्या अंतीं करावी, असा सर्वसामान्य निर्णय जाणावा. **इति द्वादशीनिर्णय उद्देश अष्टादशः ॥ १८ ॥**

---

**त्रयोदशीशुक्लापूर्वाकृष्णोत्तरा शनिवारादियुक्तांकांचिच्छुक्लत्रयोदशीमारभ्यसंवत्सरपर्यंतं** प्रतिपक्षंत्रयोदशीषुशनिवारयुक्तास्वेवचतुर्विंशतिशुक्लत्रयोदशीषुवाकर्तव्यंयत्प्रदोषसमये शिवपूजानक्तभोजनात्मकंप्रदोषव्रतंतत्रसूर्यास्तमयोत्तरत्रिमुहूर्तात्मकप्रदोषव्यापिनी त्रयोदशी **ग्राह्या दिनद्वयेप्रदोषव्याप्तौसाम्येनतदेकदेशस्पर्शेवाउत्तरा वैषम्येणैकदेशस्पर्शेतदाधिक्यवतीपूर्वापिग्राह्या यदिदेवपूजाभोजनपर्याप्तंतदाधिक्यंलभ्येत नोचेत्साम्यपक्षवदुत्तरैव उभयत्रसर्वथाव्याप्त्यभावेऽपिपरैव ॥ इति त्रयोदशीनिर्णयउद्देशएकोनविंशतितमः ॥ १९ ॥**

## आतां त्रयोदशीचा निर्णय सांगतों.

शुक्लपक्षांतील त्रयोदशी पूर्वदिवसाची घ्यावी. कृष्णपक्षांतील त्रयोदशी दुसऱ्यां दिवसाची घ्यावी. शनिवारानें युक्त अशा कोणते एका त्रयोदशीस आरंभ करून एक वर्षपर्यंत

प्रत्येक पक्षाचे ठिकाणीं किंवा शनिवारयुक्त चोवीस शुक्ल त्रयोदशींचे ठिकाणीं आचरण क-रणें असें जें प्रदोषकालीं शिवपूजा, नक्तभोजनात्मक व्रत त्या व्रताविषयीं सूर्यास्तानंतर सहा घटिका जो प्रदोषकाल तत्कालव्यापिनी त्रयोदशी घ्यावी. दोन दिवसीं प्रदोषकालव्याप्ति अ-सेल, किंवा दोन दिवसीं सारखी प्रदोषकालीं एकदेशव्याप्ति असेल तर पुढची घ्यावी. दोन दिवशीं विषम मानानें एकदेशव्याप्ति असेल, आणि देवपूजा, भोजन हीं त्या एकदेशव्याप्तींत होत इतकी अधिक मिळेल तर पूर्वीचीहि घ्यावी, तसी नसेल तर साम्यपक्षाप्रमाणें पुढचीच घ्यावी. दोनाहि दिवसीं सर्वथा व्याप्ति नसेल तथापि पुढचीच घ्यावी. इति त्रयोदशीनिर्णय उद्देश एकोनविंशतितमः ॥ १९ ॥

---

चतुर्दशीतुशुक्लापराकृष्णापूर्वा यत्तुप्रतिमासंकृष्णचतुर्दश्यांशिवरात्रिव्रतंकाम्यमनुष्ठीयते तत्रमहाशिवरात्रिवन्निशीथव्यापिन्येवग्राह्या उभयत्रनिशीथव्याप्तौपरा प्रदोषव्याप्तेराधिक्या त्कैश्चित्प्रदोषमात्रव्यापिनीगृह्यते तत्रमूलंचिंत्यं यत्तुचतुर्दश्यांदिवाभोजननिषेधएवनित्यत्वा त्यत्येतत्रभोजनकालव्यापिनींचतुर्दशींत्यक्त्वात्रयोदश्यांपंचदश्यांवाभोक्तव्यं ॥ शिवरा त्रिव्रतिभिस्तुचतुर्दश्यामेवपारणाकर्तव्या नतत्रचतुर्दश्यष्टमीदिवेतिभोजननिषेधप्राप्तिः वि धिप्राप्तेनिषेधाप्रवेशात् ॥ इति चतुर्दशीनिर्णयउद्देशोविंशतितमः ॥ २० ॥

## आतां चतुर्दशीचा निर्णय सांगतों.

शुक्लपक्षांतील चतुर्दशी दुसऱ्या दिवसाची घ्यावी. कृष्णपक्षांतील पूर्वदिवसाची घ्यावी. दरएक महिन्याला कृष्ण चतुर्दशीचे दिवसीं कामनिक असें जें शिवरात्रिव्रत करितात त्यावि-षयीं महाशिवरात्रीप्रमाणें निशीथ ( मध्यरात्र ) व्यापिनीच घ्यावी. दोन दिवसीं निशीथ-व्याप्ति असेल तर प्रदोषव्याप्ति अधिक आहे याकरितां दुसऱ्या दिवसाची घ्यावी. कितीएक ( कौस्तुभादिक ) प्रदोषमात्रव्यापिनी ग्रहण करितात; परंतु त्याविषयीं मूळ विचार करावा. जेथें, चतुर्दशीचे दिवसीं दिवसा भोजनाचा निषेध नित्य सांगितला यास्तव पाळला जातो तेथें भोजनकालव्यापिनी चतुर्दशी टाकून त्रयोदशींत किंवा पौर्णिमेंत भोजन करावें. शिवरात्रिव्रत ज्यांना आहे त्यांनीं तर चतुर्दशींतच पारणा करावी. विधीनें जें प्राप्त त्याविषयीं निषेध प्रवृत्त होत नाहीं, यास्तव “ चतुर्दशी, अष्टमी यांचे दिवसीं दिवाभोजननिषेध, ” असा जो दिवसा भोजनाचा निषेध तो या पारणेविषयीं नाहीं. इति चतुर्दशीनिर्णयो विंशतितमउद्देशः २०

---

पूर्णमास्यमावास्येतुसावित्रीव्रतंविनापरेग्राह्ये यत्तुकैश्चिच्छ्रावणीहुताशनीपूर्णिमास्योः कुल धर्मादौपूर्वविद्धयोर्ग्राह्यत्वोक्तेःसर्वापौर्णमासीकुलधर्मादौपूर्वागृह्यतेतत्रमूलंमृग्यं अष्टादशना डिकातोन्यूनचतुर्दशीसत्त्वेतादृशचतुर्दशीवेधस्य भूतोष्टादशनाडीभिरितिवचनात्अदूषकत्व प्रतीतिरस्तुवातादृशस्थलेकुलधर्मेपूर्वत्रग्राह्यत्वं अष्टादशनाडिकाधिकचतुर्दशीवेधेतुपूर्वविद्धा पौर्णमासीनग्राह्येतिमेप्रतिभाति अमावास्याभौमसोमवारयुतास्नानदानादौमहापुण्या . एवंभा नुयुतासप्तमी भौमयुताचतुर्थी यत्तुसोमयुतामावस्यायामश्वत्थपूजाद्यात्मकंसोमवतीव्रतमनुष्ठीय

**तेतत्र अपराण्हपर्यंतंमुहूर्तमात्रयोगेऽपिव्रतंकार्यं दिनांतेषट्घटिकात्मकसायान्हेयोगेरात्रियोगेचनकार्यमितिशिष्टाचारः यतीनांक्षौरादौउदयेत्रिमुहूर्तव्यापिनीपौर्णमासीग्राह्या तृतीयमुहूर्तस्पर्शाभावेचतुर्दशीयुता ॥ इति पंचदशीनिर्णयउद्देशएकविंशः ॥ २१ ॥**

## आतां पौर्णिमा आणि अमावास्या यांचा निर्णय सांगतों.

सावित्रीव्रताखेरीज पौर्णिमा व अमावास्या दुसऱ्या दिवसीं असतील त्या घ्याव्या. श्रावणी पूर्णिमा, व फाल्गुनी पूर्णिमा ह्या कुलधर्म इत्यादिक कर्मांविषयीं पूर्वविद्ध घेण्याविषयीं सांगितलें यास्तव कितीएक ग्रंथकार सर्व पूर्णिमा कुलधर्मादिकांविषयीं पूर्वींची घेतात, परंतु त्याविषयीं मूळ शोध करावा. चतुर्दशी अठरा घटिकांहून कमी असेल आणि ( "चतुर्दशी अठरा घटिकांनीं पौर्णिमेला दूषित करिल्ये " असें वचन आहे यास्तव ) तसा चतुर्दशीच्या वेधाचा दोष नाहीं असें आहे त्यापक्षीं तशा स्थलीं कुलधर्मांविषयीं पूर्वदिवसाची घ्यावी, परंतु अठरा घटिकांपेक्षां अधिक चतुर्दशीवेध असेल तर पूर्वींचे तिथीनें विद्ध असी पौर्णिमा घेऊं नये, असें मला वाटतें. अमावास्येचे दिवसीं भौमवार किंवा सोमवार असा योग असेल तर स्नानदानादिकांविषयीं महापुण्यकारक आहे. असीच भानुसप्तमी, भौमयुक्त चतुर्थी जाणावी. सोमवारानें युक्त अशा अमावास्येचे दिवसीं अश्वत्थपूजादिरूप जें सोमवतीव्रत करितात त्याविषयीं अपराण्हकालपर्यंत दोन घटिका जरी अमावास्यायोग असेल तथापि व्रत करावें दिवसाच्या शेवटच्या सहा घटिका अशा सायान्हकालीं, आणि रात्रीं योग असेल तर न करावें, असा शिष्टाचार आहे. संन्यासी यांनीं क्षौरादिक कर्मांविषयीं सूर्योदयकालीं त्रिमुहूर्त ( ६ घटिका ) व्यापिनी पौर्णिमा घ्यावी. तिसऱ्या मुहूर्ताला स्पर्श नसेल तर चतुर्दशीयुक्त घ्यावी. इति पौर्णिमानिर्णयो उद्देश एकविंशतितमः ॥ २१ ॥

---

**अथेष्टिकालः पक्षांताउपवस्तव्याः पक्षाद्यायष्टव्याः उपवासोऽन्वाधानाख्यंकर्म पर्वणोयश्चतुर्थांशआद्याः प्रतिपदस्त्रयः ॥ यागकालः सविज्ञेयः प्रातरुक्तोमनीषिभिः ॥ प्रतिपत्तुर्येचरणेनयष्टव्यमितिस्थितिः ॥** तत्रपर्वप्रतिपदोः पूर्णत्वेसंदेहाभावः पर्वण्यन्वाधानस्योत्तर**दिनेयागस्ययथोक्तकाललाभात्** पर्वणःखंडत्वेतुपर्वापेक्षायाप्रतिपदोऱ्हासवृद्धिघटिकागणयि**त्वातदर्धऱ्हासेपर्वणिवियोज्यवृद्धौसंयोज्यसंधिकालंज्ञात्वान्वाधानादिकालोनिर्णेतव्यः यत्रऱ्हासवृद्धीनस्तस्तत्रयथास्थितःस्पष्टएवसंधिःतत्रसंधिश्चतुर्विधः पूर्वाण्हसंधिर्मध्यान्हसंधिरपराण्हसंधीरात्रिसंधिश्चेति द्वेधाविभक्तदिनस्यपूर्वार्धपूर्वाण्हःअपरार्धअपराण्हः पूर्वाण्हापराण्हसंधिभूतोघटिकाद्वयात्मकोमुहूर्तोमध्यान्हआवर्तनापरपर्यायइतिकौस्तुभे उभयसंधिरेकपलात्मकएवमध्यान्होनतुघटिकाद्वयात्मक इतिप्रायेणेदानींशिष्टाचारः तत्रोक्तरीत्याऱ्हासवृद्ध्यर्थवियोजनसंयोजनेननिर्णीतः पर्वप्रतिपदोःसंधिर्यदिपूर्वाण्हेमध्यान्हेवाभवति तदासंधिदिनात्पूर्वदिनेन्वाधानंसंधिदिनेयागः यद्यपराण्हेरात्रौवासंधिस्तदासंधिदिनेन्वाधानंतत्परदिनेयागः अथोदाहरणं पर्वसप्तदशघटीमितंप्रतिपदेकादशघटीमिताततत्रषट्घटीमितःप्रतिपत्क्षयस्तदर्धघटीत्रयंपर्वणिवियोजितंजातःसंधिश्चतुर्दशघटीमितः अयंत्रिंशद्घ**

टीमितेदिनमानेपूर्वाण्हसंधिः ॥ अष्टाविंशतिघटीमितेतुदिनमानेऽयमेवमध्यान्हसंधिःअत्र संधिदिनेयागः पूर्वदिनेऽन्वाधानं पर्व १४ प्रतिपत् १९ अत्रपंचघटिकावृद्धिः तदर्धंसार्ध घटीद्वयंपर्वणिसंयोजितंजातःसंधिःसार्धषोडशघटीमितः अयं अपराण्हसंधिः अत्रसंधि दिनेऽन्वाधानंपरेद्युर्यागः ॥

## आतां इष्टिकालाचा निर्णय सांगतों.

पक्षाचे शेवटचे काल उपवासकाल, आणि पक्षाचे आद्यकाल यजनकाल. **अन्वाधान** नामक जें कर्म त्याचें नांव उपवास. पर्वाचा चवथा अंश, आणि प्रतिपदेचे पहिले तीन अंश मिळून जो काल तो यागकाल जाणावा, तो प्रातःकाल पंडितांनीं सांगितला. प्रतिपदेच्या चतुर्थचरणीं याग करूं नये असा नियम आहे." पर्वाचे दिवसीं अन्वाधान करावें आणि दुसऱ्या दिवसीं याग करावा अशा उक्त कालाची सहज प्राप्ति होते यास्तव पर्व व प्रतिपदा संपूर्ण असतील तर त्याविषयीं संशय नाहीं. पर्व खंडित असेल तर पर्वापेक्षां प्रतिपदेच्या क्षय-वृद्धीच्या घटिका मोजून निमे घटिका, क्षय असतां पर्वांत कमी कराव्या, आणि वृद्धि असतां पर्वांत मिळवाव्या व त्यावरून संधिकाल जाणून त्यापासून अन्वाधानादि कालाचा निर्णय करावा. जेथें क्षयवृद्धि होत नाहींत तेथें जो आहे तो संधि स्पष्टच आहे. संधि चार प्रकारचा—**पूर्वाण्हसंधि, मध्यान्हसंधि, अपराण्हसंधि**, आणि **रात्रिसंधि** असे संधि आहेत. दिवसाचे दोन भाग करावे व सूर्योदयापासून दोनप्रहरपर्यंत जो काळ तो पूर्वाण्हकाळ, आणि दिवसाचा पुढचा अर्धभाग तो अपराण्हकाळ. पूर्वाण्हाची शेवटची एक घटिका व अपराण्हाची प्रथम एक घटिका मिळून संधिभूत ज्या दोन घटिका ( एक मुहूर्त ) तो माध्यान्हसंधि, त्यालाच **आवर्तन** असें दुसरें नांव कौस्तुभांत आहे. एक पलमात्र असा जो दोहोंकडील संधि तोच माध्यान्हसंधि, दोन घटिकांचा तो माध्यान्हसंधि नाहीं, असा बहुधा हल्लीं शिष्टाचार आहे, त्याकरितां पूर्वी सांगितल्या रीतीनें क्षय किंवा वृद्धि जसें प्रयोजन असेल त्याप्रमाणें घटिका कमी कराव्या किंवा मिळवाव्या आणि संधीचा निर्णय करावा. मग पर्व व प्रतिपदा यांचा तो संधि जर पूर्वाण्हीं किंवा मध्यान्हीं होईल तर संधिदिवसाच्या पूर्व दिवसीं अन्वाधान करावें आणि संधिदिवसीं याग करावा. अपराण्हकालीं किंवा रात्रीं जर संधि असेल तर संधिदिवसीं अन्वाधान आणि त्याच्या दुसऱ्या दिवसीं याग करावा. याविषयीं उदाहरण;— पर्व १७ घटिका, प्रतिपदा ११ घटिका, प्रतिपदेचा क्षय ६ घटिका, त्या क्षयाचें अर्ध ३ घटिका पर्वांत कमी केल्या तेव्हां चवदा घटिकाप्रमाण संधि झाला, व हा तीस घटिकांच्या दिनमानानें पूर्वाण्हसंधि होतो. अठ्ठावीस घटिका दिनमान असेल तर मध्यान्हसंधि होतो. या उदाहरणीं संधिदिवसीं याग आणि त्याच्या पूर्वदिवसीं अन्वाधान, याप्रमाणें करावीं. दुसरें उदाहरण;—पर्व १४ घ०, प्रतिपदा १९ घ०, एथें वृद्धि ५ घ०, त्या वृद्धीचें अर्ध अडीच घटिका त्या पर्वांत मिळविल्या तेव्हां साडेसोळ घटिकाप्रमाण संधि झाला व हा तीस घटिकांच्या दिनमानानें अपराण्हसंधि होतो, या उदाहरणीं संधिदिवसीं अन्वाधान, व दुसऱ्या दिवसीं याग असें समजावें.

---

अथात्रबालबोधार्थप्रकारांतरं सूर्योदयोत्तरंविद्यमानाः पर्वनाडिकाःप्रतिपन्नाडिकाश्चैकीकृताःसत्योयदिदिनमानतोन्यूनास्तदापूर्वाण्हसंधिः यदिदिनमानसमानास्तदामध्यान्हसंधिः यदिदिनमानादधिकास्तदापराण्हसंधिरिति इत्थंसूर्योदयोत्तरमनुवर्तमानपर्वप्रतिपदोःक्षयवृद्धिभ्यामेवसंध्यवलोकनमिदानींसर्वत्रशिष्टाचारेषुप्रसिद्धं कौस्तुभादौतुचर्दशीदिनस्थाउदयात्पूर्वंपर्वणोगतघटिकाउदयादेष्यघटिकाश्चैकीकृत्यैवंप्रतिपदः पूर्वदिनस्थाउत्तरदिनस्थाश्चघटिकाएकीकृत्यपर्वापेक्षयाप्रतिपदोवृद्धिक्षयौज्ञेयौ तद्यथा चतुर्दशी २२ पर्व १७ चतुर्दशीदिनस्थाःपर्वनाडिकाः ३८ उत्तरदिनस्थाः १७ एकीकृत्यजाताः ५५ पर्वदिनस्थाःप्रतिपन्नाड्यः ४३ उत्तरदिनस्थाः ११ एकीकृत्यजाताः ५४ अत्रैकाघटीप्रतिपत्क्षयस्तदर्धमर्धघटीपर्वणिवियोजिताजातःसंधिःसार्धषोडशनाड्यः अयमपराण्हसंधिः प्रथममतेत्वत्रपूर्वाण्हसंधिःस्थितः तथाचतुर्दशी २४ पर्व १७ पूर्वगतनाड्यः ३६ एष्ययोगेजाताः ५३ प्रतिपत् ११ गतैष्ययोगेजाताः ५४ अत्रपूर्वोक्तरीत्याक्षयोदाहरणेएवैकाघटीवृद्धिस्तदर्धसंयोजनेसार्धसप्तदशनाडीमितोऽपराण्हसंधिः एवंचपूर्वमतैतन्मतयोरत्यंतंविरोधः वृद्धिक्षयादिसर्वैवैपरीत्यात् अत्रमतेघटीद्वयाधिकावृद्धिःक्षयोवानसंभवतीतिपरेऽन्हिघटिकान्यूनास्तथैवाभ्यधिकाश्चयाइतिबहुवचनमसंगतमितिदूषणंपुरुषार्थचिंतामणौद्रष्टव्यं ॥

## यानंतर याविषयीं बालांनां बोध व्हावा याकरिता आणखी दुसरा प्रकार सांगतों.

सूर्योदयानंतर पर्वाच्या ज्या घटिका शेष असतील त्या, आणि प्रतिपदेच्या घटिका ह्या सर्व एकत्र मिळवाव्या. नंतर त्या एकत्र केलेल्या सर्व घटिका दिनमानाहून कमी असतील तर पूर्वाण्हसंधि, दिनमानाशीं समान असतील तर मध्यान्हसंधि, आणि दिनमानाहून अधिक होतील तर अपराण्हसंधि, असे संधि समजावे. याप्रमाणें सूर्योदयानंतर येणाऱ्या अशा पर्व आणि प्रतिपदा यांच्या क्षयवृद्धींवरूनच संधि पाहतात व हाच आचार हल्लीं सर्वत्र शिष्टाचाराचे ठिकाणीं प्रसिद्ध आहे. कौस्तुभादि ग्रंथांमध्यें तर चतुर्दशीदिवसांतल्या उदयाच्या पूर्वीं पर्वाच्या गत घटिका, आणि उदयानंतर पुढच्या येणाऱ्या घटिका ह्या एकत्र मिळवाव्या, याप्रमाणें प्रतिपदेच्या पूर्वदिवसाच्या घटिका, व दुसऱ्या दिवसाच्या घटिका ह्या सर्व एकत्र मिळवाव्या, व पर्वाच्या अपेक्षेनें प्रतिपदेची वृद्धि किंवा क्षय हीं जाणावीं. उदाहरण;—चतुर्दशी २२ घ०, पर्व १७ घ ०, चतुर्दशी दिवसांतल्या पर्वघटिका ३८, पुढच्या दिवसांतल्या पर्व घ० १७ ह्या सर्व एकत्र मिळवून ५५ झाल्या. पर्व दिवसांतल्या प्रतिपदेच्या घटिका ४३, पुढच्या दिवसांतल्या प्रतिपदेच्या घटिका ११ ह्या सर्व एकत्र मिळवून ५४घ० झाल्या. या उदाहरणीं प्रतिपदेचा क्षय एक घटिका, त्याचें अर्ध अर्धघटिका ती पर्वांत कमी केली, तेव्हां साडेसोळा घटिकाप्रमाण संधि झाला ह्मणून हा अपराण्हसंधि होतो. पूर्वींच्या मतानें तर या उदाहरणीं पूर्वाण्हसंधि होतो. दुसरें उदाहरण;—चतुर्दशी २४ घ०, पर्व १७ घ०, गत घटिका ३६, येणाऱ्या घटिका मिळविल्या तेव्हां ५३ घ० झाल्या. प्रतिपदा ११ घ०,

गत, आणि एष्य ( येणाऱ्या ) यांची मिळवणी केली तेव्हां ९४ झाल्या. या उदाहरणीं पूर्वी सांगितल्या रीतीनें क्षयाच्या उदाहरणांत एक घटिका वृद्धि तिचें अर्ध अर्ध घटिका ती मिळविली तेव्हां साडेसतरा घटिकाप्रमाण असा अपराण्हसंधि झाला. असा हा पूर्वीच्या मताचा आणि ह्या मताचा वृद्धि, क्षय इत्यादि सर्वच विपरीत आहे यास्तव परस्पर अत्यंत विरोध आला. ह्या मतीं दोन घटिकांहून अधिक वृद्धि किंवा क्षय संभवत नाहीं. "दुसऱ्या दिवसीं ज्या घटिका कमी किंवा अधिक," असें जें वचनांत बहुवचन आहे तें संगतिवार नाहीं असें दूषण पुरुषार्थचिंतामणींत पाहावें.

---

अथपौर्णमास्यांविशेषः संगवकालादूर्ध्वंत्रयोदशादिघटीमारभ्यार्धान्हात्पूर्वंसंधौसद्यस्कालापौर्णमासीतस्यांसंधिदिनेएवान्वाधानं यागश्चसद्योऽनुष्ठेयः इदंपौर्णमास्यांसद्यस्कालत्वंवैकल्पिकमितिकेचित् अमावास्यायांसर्वत्रद्वयहकालतैवनकदाचिदपिसद्यस्कालतापूर्णमास्यममायांचापराण्हसंधौप्रतिपच्चतुर्थपादेयागोनदोषाय अमावास्यायामपराण्हसंधावपिप्रतिपदित्रिमुहूर्ताधिकद्वितीयाप्रवेशेचंद्रदर्शनसंभवेनचंद्रदर्शनेयागनिषेधादमवास्यामेवेष्टिश्चतुर्दश्यामन्वाधानंबौधायनादीनां अमावास्यायांसप्तघटीमितप्रतिपदभावेचंद्रदर्शनेऽपिप्रतिपद्येवबौधायनैरिष्टिःकार्याआश्वलायनापस्तंबादीनांतुचंद्रदर्शननिषेधे.नास्तीतिप्रतिपद्येवेष्टिः यत्रसंधिदिनेइष्टिस्तत्रसाप्रतिपद्येवसमापनीयानतुपर्वणि पर्वणियागसमाप्तौपुनर्यागःकर्तव्यः एवमेवस्मार्तेपार्वणस्थालीपाकनिर्णयः केचित्तुस्मार्तेस्थालीपाकःप्रतिपद्येवसमापनीयइतिनियमोनास्ति पूर्वाण्हएवस्थालीपाकंसमाप्यसंधेरूर्ध्वंप्रतिपदिब्राह्मणभोजनमात्रंकार्यं जयंतोपिसंधिसन्निकृष्टे प्रातःकालेएवस्थालीपाकमाहेतिविशेषमाहुः श्रौतेपिब्राह्मणभोजनमात्रंप्रतिपदिकार्यं अन्यत्तंत्रंपूर्वाण्हएवसमापनीयंनप्रतिपदपेक्षेतिपुरुषार्थचिंतामणावुक्तं कात्यायनानांपौर्णमासेष्टिनिर्णयः पूर्वोक्तःसर्वसाधारणएवनतत्रकश्चिद्विशेषः इति सिंध्वादिबहुग्रंथसंमतंमतं अन्येतुपूर्वाण्हसंधौसंधिदिनेऽन्वाधानंपरेन्हियागइतिपूर्णमासीविषयेकातीयानांविशेषमाहुः ॥

## आतां पौर्णिमेचा विशेष निर्णय सांगतों.

संगवकालानंतर तेराव्या घटिकेला आरंभ करून अर्ध्या दिवसाच्या पूर्वी संधि असेल तर सद्यस्काला पौर्णमासी होते. त्या पौर्णिमेंत संधिदिवसींच अन्वाधान करून त्याचवेळीं याग करावा. पौर्णिमेचे दिवसीं अन्वाधान व याग करण्याविषयीं जें सांगितलें तो विकल्प आहे असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. अमावास्येमध्यें सर्वत्र दोन निरनिराळे काळ असतात, दोनहि कर्मे एककालीं येत नाहींत. पौर्णिमेमध्यें व अमावास्येमध्यें अपराण्हसंधि असेल तर प्रतिपदेचे चतुर्थचरणीं याग केला असतां दोष नाहीं. अमावास्येंत अपराण्हसंधि असतांहि प्रतिपदेंत सहा घटिकांहून अधिक इतकी द्वितीया प्रविष्ट असेल तर त्या दिवसीं चंद्रदर्शनाचा संभव आहे, व चंद्रदर्शनदिवसीं याग करण्याविषयीं निषेध आहे यास्तव बौधायन इत्यादिकांनीं चतुर्दशींत अन्वाधान करून अमावास्येंतच इष्टि करावी. अमावास्येचे दिवसीं सात

घटिका प्रतिपदा नसेल तर चंद्रदर्शन असलें तथापि बौधायनांनीं प्रतिपदेंतच इष्टि करावी. आश्वलायन, आपस्तंब इत्यादिकांला तर चंद्रदर्शनाचा निषेध नाहीं यास्तव त्यांनीं प्रतिपदेंतच इष्टि करावी. जेथें संधिदिवसीं इष्टि प्राप्त होईल तेथें ती इष्टि प्रतिपदेंतच समाप्त करावी, पर्वांत समाप्त करूं नये. कारण पर्वणींत यागाची समाप्ति झाली असतां पुनः याग केला पाहिजे. असाच स्मार्ताग्निसंबंधी पार्वणस्थालीपाकाचा निर्णय जाणावा. कितीएक ग्रंथकार तर, स्मार्ताग्निसंबंधी स्थालीपाक प्रतिपदेंतच समाप्त करावा असा नियम नाहीं, तर पूर्वाण्हकालींच स्थालीपाक समाप्त करून संधीच्या नंतर प्रतिपदेंत ब्राह्मणभोजन मात्र करावें, जयंत ग्रंथकारहि संधीच्या जवळचा जो प्रातःकाल त्यांतच स्थालीपाक करावा असें सांगतो, असा विशेष सांगतात. श्रौतकर्मामध्येंहि प्रतिपदेंत ब्राह्मणभोजन मात्र करावें, इतर सर्व कर्म पूर्वाण्हसंधींतच समाप्त करावें, त्याविषयीं प्रतिपदेची गरज नाहीं असें पुरुषार्थचिंतामणींत सांगितलें आहे. कात्यायनांचा पौर्णिमेच्या इष्टीविषयींचा निर्णय; पूर्वी सर्वांला साधारणपणानें सांगितला तोच जाणावा, त्याविषयीं निराळा विशेष निर्णय नाहीं असें निर्णयसिंधु आदिकरून पुष्कळ ग्रंथांचें मत आहे. इतर ग्रंथकार तर, पूर्वाण्हसंधीमध्यें संधीच्या दिवसीं अन्वाधान करावें आणि दुसऱ्या दिवसीं याग करावा असा पौर्णिमेविषयीं कात्यायनांला विशेष निर्णय सांगतात.

---

अथामावास्यायांकातीयानांविशेषःअमाविषयेत्रेधाविभक्तदिनस्यप्रथमोभागःपूर्वाण्हः द्वितीयोभागोमध्यान्हः तृतीयोभागोपराण्हः तत्ररात्रिसंधौप्रतिपद्दिनेचंद्रदर्शनेसत्यपिपरेषामिव कातीयानामपिसंधिदिनेपिंडपितृयज्ञोऽन्वाधानंचपरदिनेचेष्टिरितिनिर्विवादं पूर्वाण्हेदिनद्वितीयभागाख्यमध्यान्हेचसंधौसंधिपूर्वदिनेऽन्वाधानपिंडपितृयज्ञौसंधिदिनेचेष्टिः तदाचतुर्दशीदिनेऽमावास्यायादिनतृतीयभागाख्यापराण्हेयदिपूर्णव्याप्तिस्तर्हिअमायुक्तेपराण्हेपिंडपितृयज्ञइतिनसंदेहः इतितृतीयभागाख्यापराण्हांत्यभागेऽपराण्हैकदेशेमावास्याव्याप्तिस्तर्ह्यमावास्यायांप्राप्तायांपिंडपितृयज्ञोनचतुर्दश्यामित्येकःपक्षः चतुर्दश्यंतेभागेपिंडपितृयज्ञश्चंद्रस्यपरमक्षीणत्वादित्यपरःपक्षः अथापराण्हसंधौचत्वारःपक्षाः संधिदिनेएवदिनतृतीयभागाख्यापराण्हेमायाःपूर्णव्याप्तिरितिप्रथमःपक्षः यथा चतुर्दशी २९ अमा ३० प्रतिपत् २९ दिनमानंचत्रिंशत् ३० अत्रसंधिदिनेऽन्वाधानपिंडपितृयज्ञौपरदिनेयागःसंधिपूर्वदिनेएवोक्तापराण्हेमायाःपूर्णव्याप्तिरितिद्वितीयःपक्षःयथाचतुर्दशी २०अमा २२प्रतिपत् २४ दिनमानं ३० अत्रसंधिदिनात्परदिनेमुहूर्तत्रयात्मकप्रातःकालेप्रतिपत्पादत्रयावच्छिन्नयागकाललाभात्संधिदिनेऽन्वाधानपितृयागौप्रतिपदिचेष्टिरितिकौस्तुभमतंत्रिमुहूर्ताद्वितीयाचेत्प्रतिपद्यापराण्हिकी अन्वाधानंचतुर्दश्यांपरतः सोमदर्शनादितिवचनाच्चतुर्दश्यांपिंडपितृयज्ञोपवासौसंधिदिनेचेष्टिरितिपरमतं अथापरंद्वितीयपक्षोदाहरणं चतुर्दशी १८ अमा १८ प्रतिपत् १९ दिनमानं २७ अत्रप्रतिपद्दिनेप्रातःपादत्रयावच्छिन्नयागकालाभावात्संधिदिनेएवसर्वमतेकात्यायनानामिष्टिः पूर्वदिनेपिंडपितृयज्ञोपवासौ अथदिनद्वयेसाम्येनवैषम्येणवैकदेशव्याप्तिरितितृतीयःपक्षःयथाचतुर्दशी २५ अमा २५ प्रतिपत् २४ दिनमानं ३० इयंसाम्येनापराण्हव्या

प्तिः अत्रकौस्तुभमतपरमतोक्तरीत्याद्वेधानिर्णयः यथावाचतुर्दशी २५ अमा २० प्रतिपत् १७ दिनमानं २७ इयमपिसाम्येनैकदेशव्याप्तिः अत्रसर्वमतेसंधिदिनेएवकातीयेष्टिःपूर्वे दिनेचपिंडपितृयज्ञोपवासौ अथवैषम्येणैकदेशव्याप्तिः चतुर्दशी२५ अमा २३ प्रतिपत् २३दिनमानं३० अत्रापिपूर्वोक्तमतद्वयेनद्वेधानिर्णयोज्ञेयः यथावाचतुर्दशी २५अमा २२ प्रतिपत् १८ दिनमानं ३० इयमपिवैषम्येणैकदेशव्याप्तिः अत्रापिसर्वमतेसंधिदिनेकातीयेष्टिश्चतुर्दश्यामुपवासपिंडपितृयज्ञौ यथावाचतुर्दशी २५ अमा २७ प्रतिपत् २९ दिनमानं ३० अत्रसंधिदिनेन्वाधानयागौप्रतिपदीष्टिः संधिदिनेएवैकदेशव्याप्तिरितिचतुर्थःपक्षः यथाचतुर्दशी ३१ अमा २६ प्रतिपत् २३ दिनमानं ३० यथावाचतुर्दशी २८ अमा२२ प्रतिपत्१७दिनमानं २७अत्रोभयत्रापिसंधिदिनेएवपिंडपितृयज्ञान्वाधानेयागस्तुपरेन्हिप्रतिपदि एवंचकात्यायनमतेपिसर्वत्रोदाहरणेचंद्रदर्शननिषेधप्रतिपालनंनसंभवति किंतुकुत्रचिन्निषेधादरात्पूर्वत्रयागादिकंक्वचित्तुचंद्रदर्शनवत्येवदिने एवंपिंडपितृयज्ञोऽपीतिध्येयं दर्शश्राद्धार्थममावास्यानिर्णयःसर्वसाधारणोऽग्रेपृथगेववक्ष्यते ॥

## आतां कात्यायनांचा अमावास्येविषयीं विशेष निर्णय सांगतों.

अमावास्येविषयीं दिवसाचे तीन भाग करावे. पहिला भाग तो पूर्वाण्ह, दुसरा भाग तो मध्यान्ह, तिसरा भाग तो अपराण्ह, याप्रमाणें भाग समजावे. त्यांमध्यें रात्रिसंधीचे ठिकाणीं प्रतिपदेच्या दिवसीं चंद्रदर्शन असलें तथापि इतरांप्रमाणेंच कात्यायन यांनींहि संधिदिवसीं पिंडपितृयज्ञ, व अन्वाधान हीं करून दुसऱ्या दिवसीं इष्टि करावी असा निर्विवाद निर्णय आहे. पूर्वाण्हकाल आणि दिवसाचा दुसरा भाग मध्यान्हकाल यांचे ठिकाणीं संधि असेल तर संधीच्या पूर्वदिवसीं अन्वाधान व पिंडपितृयज्ञ करून संधिदिवसीं इष्टि करावी. आणि त्या कालीं चतुर्दशीचे दिवसीं अमावास्या दिवसाचा तिसरा भाग जो अपराण्हकाल त्याचे ठिकाणीं अमावास्येची पूर्ण व्याप्ति असेल तर अमावास्यायुक्त अशा अपराण्हकालीं पिंडपितृयज्ञ करावा, त्याविषयीं संशय नाहीं. यास्तव तिसरा भाग जो अपराण्हकाल त्याचा शेवटचा भाग असा अपराण्हकालाचा एकदेश त्याचे ठिकाणीं अमावास्येची व्याप्ति असेल तर प्राप्त अमावास्येंत पिंडपितृयज्ञ करावा, चतुर्दशींत करूं नये असा एकपक्ष, त्या कालीं चंद्र अत्यंत क्षीण असतो याकरितां चतुर्दशीच्या शेवटच्या भागांत पिंडपितृयज्ञ करावा, हा दुसरा पक्ष, नंतर अपराण्हसंधीचे ठिकाणीं चार पक्ष; संधिदिवसींच दिवसाचा तिसरा भाग जो अपराण्हकाल त्याचे ठिकाणीं अमावास्येची संपूर्ण व्याप्ति असणें असा पहिला पक्ष—उदाहरण;—चतुर्दशी २९ घ०, अमावास्या ३० घ०, प्रतिपदा २९ घ०, दिनमान ३० घ०, या उदाहरणीं संधिदिवसीं अन्वाधान व पिंडपितृयज्ञ करावे, आणि दुसऱ्या दिवसीं याग करावा. संधीच्या पूर्वदिवसींच अपराण्हकालीं अमावास्येची पूर्ण व्याप्ति असणें हा दुसरा पक्ष—उदाहरण;—चतुर्दशी २० घ०, अमावास्या २२ घ०, प्रतिपदा २४ घ०, दिनमान ३० घ०,

या उदाहरणीं संधिदिवसाच्या दुसऱ्या दिवसीं सहा घटिकापरिमित जो प्रातःकाल त्याचे ठिकाणीं प्रतिपदेचे तीन चरणांपर्यंत यज्ञकाल मिळतो याकरितां संधिदिवसीं अन्वाधान व पिंडपितृयज्ञ करावे, आणि प्रतिपदेचे दिवसीं इष्टि करावी असें कौस्तुभाचें मत आहे. "प्रतिपदेचे दिवसीं अपराण्हकालीं सहा घटिका द्वितीया असेल तर, दुसऱ्या दिवसीं चंद्रदर्शन होईल यास्तव चतुर्दशीचे ठिकाणीं अन्वाधान करावें," असें वचन आहे याकरितां चतुर्दशीचे दिवसीं पिंडपितृयज्ञ, व अन्वाधान हीं करावीं, आणि संधिदिवसीं इष्टि करावी असें दुसऱ्या ग्रंथकारांचें मत आहे. यानंतर आणखी दुसऱ्या पक्षाचें उदाहरण देतों–उदाहरण;– चतुर्दशी १८ घ०, अमावास्या १८ घ०, प्रतिपदा १९ घ०, दिनमान २७ घ०, या उदाहरणीं प्रतिपदेच्या दिवसीं प्रातःकालीं प्रतिपदेचे प्रथमचे तीन चरण जो यज्ञकाल तो एथें नाहीं याकरितां सर्वांच्या मतें संधिदिवसींच कात्यायन यांनीं इष्टि करावी, आणि पूर्व दिवसीं पिंडपितृयज्ञ व अन्वाधान करावें. यानंतर दोन दिवसीं सारखी किंवा कमजास्ती एकदेशव्याप्ति असणें हा तिसरा पक्ष–उदाहरण;–चतुर्दशी २९ घ०, अमावास्या २९ घ०, प्रतिपदा २४ घ०, दिनमान ३० घ०, ही सारखी अपराण्हव्याप्ति येते, या उदाहरणीं कौस्तुभाचें मत, आणि इतरांचें मत यांचा पूर्वीं सांगितल्या रीतीनें दोन प्रकारचा निर्णय होतो– दुसरें उदाहरण;–चतुर्दशी २९ घ०, अमावास्या २० घ०, प्रतिपदा १७ घ०, दिनमान २७ घ०, हीहि सारखी एकदेशव्याप्ति येते, या उदाहरणीं सर्वांच्या मतें संधिदिवसींच कात्यायनांनीं इष्टि करावी, आणि पूर्व दिवसीं पिंडपितृयज्ञ, व अन्वाधान हीं करावीं. विषममानेंकरून दोन दिवसीं एकदेशव्याप्ति असणें–उदाहरण;–चतुर्दशी २९ घ०, अमावास्या २३ घ०, प्रतिपदा २३ घ०, दिनमान ३० घ०, या उदाहरणींहि पूर्वीं सांगितलेल्या दोन मतांनीं दोन प्रकारचा निर्णय जाणावा. उदाहरण;–चतुर्दशी २९ घ०, अमावास्या २२ घ०, प्रतिपदा १८ घ०, दिनमान ३० घ०, हीहि विषममानेंकरून एकदेशव्याप्ति आहे. एथेंहि सर्वांच्या मतें संधिदिवसीं कात्यायनांनीं इष्टि करावी, आणि चतुर्दशीचे दिवसीं अन्वाधान व पिंडपितृयज्ञ करावा.–उदाहरण;–चतुर्दशी २९ घ०, अमावास्या २७ घ०, प्रतिपदा २९ घ०, दिनमान ३० घ०, या उदाहरणीं संधिदिवसीं अन्वाधान व याग करून प्रतिपदेचे दिवसीं इष्टि करावी. संधिदिवसींच एकदेशव्याप्ति असणें हा चवथा पक्ष–उदाहरण;–चतुर्दशी ३१ घ०, अमावास्या २६ घ०, प्रतिपदा २३ घ०, दिनमान ३० घ०–अथवा दुसरें उदाहरण;–चतुर्दशी २८ घ०, अमावास्या २२ घ०, प्रतिपदा १७ घ०, दिनमान २७ घ०, या दोनहि उदाहरणीं संधिदिवसींच पिंडपितृयज्ञ व अन्वाधान करावीं, आणि याग दुसऱ्या दिवसीं प्रतिपदेचे ठिकाणीं करावा. याप्रमाणें कात्यायनमताचे ठिकाणीं सर्व उदाहरणीं चंद्रदर्शनाचा निषेध पाळणें संभवत नाहीं, तर कितीएक स्थलीं चंद्रदर्शनाचा निषेध मानून पूर्वदिवसीं यागादिक करण्यास सांगितलें, व क्वचित् स्थलीं चंद्रदर्शनयुक्त दिवसींच यागादिक करण्यास सांगितलें. असेंच पिंडपितृयज्ञांविषयींहि जाणावें. दर्शश्राद्धाविषयीं अमावास्येचा सर्वसाधारण निर्णय पुढें निराळा सांगूं.

**अथसामगानामिष्टेर्निर्णयःतत्रपौर्णमासीसर्वसाधारणापूर्वोक्तैवअमावास्यायांतुरात्रिसंधौ प्रतिपद्येवचंद्रदर्शनेपियागः अपराण्हसंधौतुप्रातः षट्घटिकात्मकप्रतिपदाद्यपादत्रयरूपयाग काललाभे प्रतिपदिचंद्रदर्शनेपीष्टिः संधिदिनेचोपवासपितृयज्ञौ उक्तयागकालालाभेसंधिदिने यागःपूर्वदिनेचतुर्दश्यांपितृयज्ञोपवासौ एवंचसामगैरपिचंद्रदर्शननिषेधःकात्यायनवदेवयथा संभवंपालनीयः ॥ इति सामगनिर्णयः ॥ इति यागकालनिर्णयउद्देशोद्वाविंशः ॥ २२ ॥**

## यानंतर सामवेदी यांच्या इष्टींचा निर्णय सांगतों.

सामवेदी यांच्या इष्टीविषयीं पौर्णिमा सर्वसाधारणपक्षानें पूर्वी सांगितल्याप्रमाणेंच घ्यावी. अमावास्येचे दिवसीं तर रात्रिसंधि असतां चंद्रदर्शन असेल तथापि प्रतिपदेचे दिवसींच याग करावा. अपराण्हसंधि असेल तर प्रातःकाळीं सहा घटिकापरिमित असा प्रतिपदेच्या पहिल्या तीन पादांपैकीं यज्ञकालाचा अलाभ असेल तर चंद्रदर्शन असलें तथापि प्रतिपदेचे दिवसीं इष्टि करावी, आणि संधिदिवसीं अन्वाधान व पिंडपितृयज्ञ करावे. पूर्वी सांगितलेला याग-काल न मिळेल तर संधिदिवसीं याग करावा, व त्याच्या पूर्वदिवसीं चतुर्दशीचे ठिकाणीं पिं-डपितृयज्ञ व अन्वाधान हीं करावीं. याप्रमाणें सामवेदी यांनींहि चंद्रदर्शनाचा निषेध कात्याय-नांप्रमाणें जसा संभवेल तसा पाळावा. असा सामवेदी यांचा निर्णय सांगितला. **इति याग-निर्णय उद्देशो द्वाविंशतितमः ॥ २२ ॥**

---

**अथपिंडपितृयज्ञकालः तत्राश्वलायनानांयस्मिन्नहोरात्रेअमावास्याप्रतिपदोःसंधिस्तद्दिना पराण्हेपंचधाविभक्तदिनचतुर्थभागरूपेपिंडपितृयज्ञः सचापराण्हसंधावन्वाधानदिनेभवति मध्यान्हेपूर्वाण्हेवासंधौयागदिनेयागोत्तरमपराण्हेभवति यदाहोरात्रसंधौतिथिसंधिस्तदा न्वाधानदिनेएवपिंडपितृयज्ञः एवमापस्तंबहिरण्यकेशिमतानुसारिणामपिसंधिदिनेएवपितृ यज्ञः सचापराण्हेऽधिवृक्षसूर्येवाकार्यः अपराण्हश्चपंचधाविभक्तदिनचतुर्थभागोनवधाविभ क्तदिनसप्तमभागोवा सांख्यायनकात्यायनसामगानामन्वाधानदिनेएवपिंडपितृयज्ञः पूर्वमे वोक्तः सचत्रेधाविभक्तदिनतृतीयभागरूपेऽपराण्हेकार्यः गृह्याग्निमतांबव्हृचानांदर्शश्राद्ध पिंडपितृयज्ञयोरेकस्मिन्दिनेप्राप्तौव्यतिषंगेणानुष्ठानं व्यतिषंगोनामोभयोःसहप्रयोगः खंडप र्वणितुपूर्वेद्युःकेवलदर्शश्राद्धमुत्तरेऽन्हिकेवलःपिंडपितृयज्ञः श्रौताग्निमतांतुकेवलपिंडपितृ यज्ञएवदक्षिणाग्नौकार्योनव्यतिषंगेण श्रौताग्निमतांसंपूर्णेदर्शेइत्थंक्रमः आदावन्वाधानंततो वैश्वदेवस्ततःपिंडपितृयज्ञस्ततोदर्शश्राद्धमिति अस्मिन्नेवकालेजीवत्पितृकेणसाग्निकेनहोमां तेवापितुःपित्रादित्रयोद्देशेनपिंडसहितोवा पिंडपितृयज्ञःकार्यः ॥ यद्वापिंडपितृयज्ञोनैवार ब्धव्यः इष्टिलोपेपादकृच्छ्रंप्रायश्चित्तं इष्टिद्वयलोपेऽर्धकृच्छ्रं इष्टित्रयलोपेअग्निनाशात्पुनरा धानं पिंडपितृयज्ञलोपेवैश्वानरेष्टिःप्रायश्चित्तं इष्टिस्थानेसप्तहोतारंहोष्यामीतिसंकल्प्यतन्मं त्रेणचतुर्गृहीताज्येनपूर्णाहुतिर्वाकार्या ॥ इति पिंडपितृयज्ञनिर्णयउद्देशस्त्रयोविंशः ॥२३॥**

# आतां पिंडपितृयज्ञाच्या कालाचा निर्णय सांगतों.

ज्या अहोरात्रांत अमावास्या व प्रतिपदा यांचा संधि येईल त्या दिवसाचे पांच भाग करून चवथा भाग जो अपराण्हकाल त्यामध्यें आश्वलायनांनीं पिंडपितृयज्ञ करावा. तो पिंडपितृयज्ञ, अपराण्हसंधि असला तर अन्वाधानाचे दिवसीं होतो. मध्यान्हसंधि किवा पूर्वाण्हसंधि असेल तर यागाच्या दिवसीं यागानंतर अपराण्हकालीं होतो. ज्या कालीं दिवस आणि रात्र यांच्या संधीचे ठिकाणीं तिथिसंधि येईल त्याकालीं अन्वाधानाच्या दिवसींच पिंडपितृयज्ञ करावा. याप्रमाणें आपस्तंब, हिरण्यकेशी यांच्या मतानुरूप चालणारे त्यांनींहि संधिदिवसींच पिंडपितृयज्ञ करावा, व तो अपराण्हकालीं किंवा शेषदिवस अति अल्प असतां करावा. दिवसाचे पांच भाग करून चवथा भाग तो अपराण्हकाळ, किंवा दिवसाचे नऊ भाग करून सातवा भाग तो अपराण्हकाळ समजावा. सांख्यायन, कात्यायन, आणि सामवेदि यांनीं अन्वाधानदिवसींच पिंडपितृयज्ञ करावा असें पूर्वींच सागितलें आहे. तो, दिवसाचे तीन भाग करून तिसरा भाग जो अपराण्हकाळ त्या कालीं करावा. दर्शश्राद्ध व पिंडपितृयज्ञ हीं एक दिवसीं प्राप्त होतील तर गृह्याग्नि धारण करणारे असे ऋग्वेदी यांनीं व्यतिषंगानें करावीं. व्यतिषंग ह्मणजे दोन्ही बरोबरच करावीं. पर्व खंड असेल तर पूर्वदिवसीं नुस्तें दर्शश्राद्ध करून दुसऱ्या दिवसीं पिंडपितृयज्ञ करावा. श्रौताग्निमान ( अग्निहोत्री ) असतील त्यांनीं पिंडपितृयज्ञ मात्र दक्षिणाग्नीचे ठिकाणीं करावा, दर्शश्राद्धाबरोबर करूं नये. संपूर्ण अमावास्या असेल तर श्रौताग्निमानांनीं पुढें सांगतों याप्रमाणें क्रमेंकरून करावें–प्रथम अन्वाधान, नंतर वैश्वदेव, आणि त्यानंतर पिंडपितृयज्ञ, व दर्शश्राद्ध असीं करावीं. साग्निक ( अग्निहोत्री ) अशा जीवत्पितृकानें ह्याचकालीं किंवा होमाच्या नंतर पित्याची जी पिता इत्यादिक त्रयी तिच्या उद्देशेंकरून पिंडसहित किंवा अपिंडक असा पिंडपितृयज्ञ करावा. अथवा पिंडपितृयज्ञाला आरंभच करूं नये. इष्टीचा लोप झाला असतां पादकृच्छ्र[1] प्रायश्चित्त करावें. दोन इष्टींचा लोप झाला असेल तर अर्धकृच्छ्र. तीन इष्टींचा लोप झाल्यानें अग्निनाश होतो, यास्तव पुनः आधान ( अग्निस्थापन ) करावें. पिंडपितृयज्ञाचा लोप होईल तर वैश्वानरेष्टिरूप प्रायश्चित्त करावें. अथवा इष्टिस्थानीं " **सप्तहोतारं होष्यामि** " असा संकल्प करून त्याच्या मंत्रानें, चार वेळ घेतलेलें अशा घृतानें पूर्णाहुति करावी. **इति पिंडपितृयज्ञनिर्णयउद्देशस्त्रयोविंशः ॥ २३ ॥**

---

अथश्राद्धेऽमावास्यानिर्णीयते पंचधाविभक्तदिनचतुर्थभागाख्यापराण्हव्यापिन्यमावास्या दर्शश्राद्धेग्राह्या पूर्वेद्युरेवपरेद्युरेववापराण्हेकात्स्न्र्येनैकदेशेनवाव्यापित्वेसैवग्राह्या उभयदिनेऽप्यपराण्हेवैषम्येणैकदेशव्यापित्वेयाधिकव्यापिनीसाग्राह्या दिनद्वयेसाम्येनैकदेशव्याप्तौतिथिक्षयेपूर्वातिथिवृद्धौतिथिसाम्येचपरा तत्रसमव्याप्तौतिथिवृद्धिक्षयसाम्योदाहरणानि चतुर्दशी१९ अमा २३ दिनमानं ३० अत्रदिनद्वयेऽपिसमापंचघटिकैकदेशव्याप्तिश्चतुर्दश्यपेक्षया चतुर्घटिकाभिरमायावृद्धिसत्त्वादुत्तराग्राह्या तथाचतुर्दशी २३ अमा १९ अत्रैकाघटिका

---

१ पादकृच्छ्र इत्यादिक कृच्छ्रांचीं लक्षणें पुढें तृतीय परिच्छेदांत सांगितलीं आहेत.

समाव्याप्तिर्घटिकाचतुष्टयेन तिथिक्षयात्पूर्वाग्राह्या अथ चतुर्दशी २१ अमा २१ अत्रघटीत्रये णदिनद्वयेंशतःसमाव्याप्तिस्तिथेस्तुवृद्धिक्षयाभावेनसमत्वात्पराग्राह्या दिनद्वयेपूर्णापराण्हव्या प्तौतिथिवृद्धित्वात्पराग्राह्या यदादिनद्वयेप्यपराण्हस्पर्शाभावस्तदागृह्याग्निमद्भिःश्रौताग्निमद्भि श्चसिनीवालीसंज्ञिकाचतुर्दशीमिश्रापूर्वाग्राह्या निरग्निकैःस्त्रीशूद्रादिभिश्चकुहूसंज्ञिकाप्रतिप न्मिश्रापराग्राह्येतिमाधवाचार्यसंमतोदर्शनिर्णयःप्रायःसर्वत्रशिष्टैराद्रियते पुरुषार्थचिंताम णौतुबव्हृचैस्तैत्तिरीयैश्चसाग्निकैरपराण्हव्याप्त्यसत्त्वेपिइष्टिदिनात्पूर्वदिनेएवदर्शश्राद्धंकार्यंत थाचदिनद्वयेकात्स्न्येनापराण्हव्याप्तौपरत्रैवदर्शः एकदेशेनापराण्हद्वयव्याप्तौप्रतिपद्वृद्ध्याप्र तिपदीष्टावुत्तरत्रैवदर्शः द्वितीयदिनेएवापराण्हव्याप्तौतुयदिप्रतिपत्क्षयवशाद्दर्शदिनएवइष्टि प्राप्तिस्तदाबव्हृचानांसिनीवालीतैत्तिरीयाणांकुहूर्ग्राह्या सामगानांविकल्पेनद्वयं यदापूर्वदि नेऽपराण्हेऽधिकाव्याप्तिः परदिनेऽल्पातदासामगानांपूर्वातैत्तिरीयाणांउत्तराउभयत्रापराण्ह स्पर्शाभावेऽपिसामगानांपूर्वातैत्तिरीयाणांपरेत्याद्युक्तं दर्शेदर्शश्राद्धवर्षश्राद्धयोर्दर्शमासिकयो र्दर्शश्राद्धोदकुंभश्राद्धयोश्चसंपातेदेवताभेदाच्छ्राद्धद्वयंकार्यं तत्रादौमासिकाब्दिकादिश्राद्धंकृ त्वापाकांतरेणदर्शश्राद्धंकार्यं वैश्वदेवआब्दिकादिश्राद्धशेषेणपृथक्पाकेनवादर्शश्राद्धात्प्राक् भवति आहिताग्निस्तुवैश्वदेवंपिंडपितृयज्ञंचकृत्वाब्दिकंकुर्यात् दर्शश्राद्धमनुपनीतविधुरप्र वासस्थैरपिकार्यं अमाश्राद्धातिक्रमेन्यूषुवाचमितिऋचंशतवारंजपेत् ॥ इतिदर्शनिर्णय उद्देशश्चतुर्विंशः ॥ २४ ॥

## आतां श्राद्धाविषयीं अमावास्येचा निर्णय सांगतों.

दिवसाचे पांच भाग करून चवथा भाग जो अपराण्हकाळ, तत्कालव्यापिनी अमावास्या दर्शश्राद्धाविषयीं घ्यावी. पूर्व दिवसींच किंवा दुसऱ्या दिवसींच अपराण्हकालीं संपूर्णव्याप्ति किंवा एकदेशव्याप्ति असेल तर तीच घ्यावी. दोनहि दिवसीं अपराण्हकालीं कमजास्ती मानानें एकदेशव्याप्ति असेल तर ज्या दिवसीं अधिक व्याप्ति असेल ती घ्यावी. दोन दिवसीं सारखी एकदेशव्याप्ति असेल व तिथिक्षय असेल तर पूर्वींची घ्यावी, तिथीची वृद्धि असेल किंवा सारखी तिथि असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोनदिवसीं समव्याप्ति असेल तर वृद्धि, क्षय, समतिथि यांचीं क्रमानें उदाहरणें;–चतुर्दशी १९ घ०, अमावास्या २३ घ०, दिनमान ३० घ०, या उदाहरणीं दोनहि दिवसीं सारखी पांच घटिका एकदेशव्याप्ति आहे व चतुर्दशीहून चार घटिकांनीं अमावास्येची वृद्धि आहे यास्तव दुसऱ्या दिवसाची घ्यावी. उदाहरण;–चतुर्दशी २३ घ०, अमावास्या १९ घ०, या उदाहरणीं एक घटिका सारखी व्याप्ति आहे व चार घटिकांनीं तिथीचा क्षय आहे यास्तव पूर्वींची घ्यावी. उदाहरण;–चतुर्दशी २१ घ०, अमावास्या २१ घ०, या उदाहरणीं दोन दिवसीं तीन तीन घटिका सारखी व्याप्ति आहे व तिथीची वृद्धि किंवा क्षय कांहींच नाहींत आणि तिथि सम आहे याकरितां दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोन दिवसीं पूर्ण असी अपराण्हकालव्याप्ति असेल तर तिथीची वृद्धि आहे यास्तव दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोनहि दिवसीं अपराण्हकालीं नसेल तर गृह्याग्निमानांनीं व श्रौताग्निमानांनीं सिनीवाली संज्ञक, असी चतुर्दशीयुक्त पूर्वींची घ्यावी. अग्निविरहित अस-

तील त्यांनीं, व स्त्रीशूद्रादिकांनीं कुहू संज्ञक व प्रतिपदेनें युक्त असी दुसऱ्या दिवसाची घ्यावी, असा माधवाचार्याला मान्य दर्शनिर्णय बहुधा सर्वत्र शिष्टांनीं स्वीकारलेला आहे. पुरुषार्थचिंतामणीमध्यें तर, साग्निक असे ऋग्वेदी व तैत्तिरीयशाखी यांनीं अपराण्हव्याप्ति नसली तथापि इष्टिदिवसाच्या पूर्वदिवसींच दर्शश्राद्ध करावें. दोन दिवसीं संपूर्ण अपराण्हकालव्याप्ति असेल तर दुसऱ्या दिवसींच दर्शश्राद्ध करावें. दोन दिवसीं अपराण्हकालीं एकदेशव्याप्ति असेल तर प्रतिपदेच्या वृद्धीनें प्रतिपदेचे दिवसीं इष्टि झाली असतां दुसऱ्या अमावास्येचे दिवसींच दर्शश्राद्ध करावें. दुसऱ्या दिवसींच अपराण्हव्याप्ति असेल आणि प्रतिपदेचा क्षय झाला आहे यास्तव दर्शाच्या दिवसींच इष्टि प्राप्त होईल तर ऋग्वेदी यांनीं सिनीवाली व तैत्तिरीयशाखी यांनीं कुहू याप्रमाणें घ्यावी. सामवेदी यांनीं विकल्पेंकरून दोनहि घ्याव्या. जेव्हां पूर्वदिवसीं अपराण्हकालीं अधिक व्याप्ति व दुसऱ्या दिवसीं अल्प व्याप्ति असेल तेव्हां सामवेदी यांनीं पूर्वींची घ्यावी, आणि तैत्तिरीयशाखी यांनीं दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोनहि दिवसीं अपराण्हकालीं नसेल तर सामवेदी यांनीं पूर्वींची घ्यावी, व तैत्तिरीयशाखी यांनीं दुसऱ्या दिवसाची घ्यावी, ईत्यादिक सांगितलें. अमावास्येचे दिवसीं दर्शश्राद्ध व वर्षश्राद्ध असीं दोन आलीं, किंवा दर्श व मासिकश्राद्ध असीं दोन आलीं, अथवा दर्शश्राद्ध व उदकुंभश्राद्ध असीं दोन दोन आलीं तर देवताभेदेंकरून दोन श्राद्धें करावीं. तीं असीं;—प्रथम मासिक किंवा वर्षश्राद्ध जें प्राप्त असेल तें करून नंतर दुसऱ्या पाकानें दर्शश्राद्ध करावें. वैश्वदेव करणें तो, वर्षश्राद्धादिक करून जें श्राद्धशेष अन्न असेल त्याणें अथवा निराळा पाक (भात) करून त्याणें दर्शश्राद्धाच्या पूर्वीं करावा. अग्निहोत्र्यानें वैश्वदेव, पिंडपितृयज्ञ हीं[1] करून नंतर वर्षश्राद्धादिक करावें. मौंजी न झालेला, मृतपत्नीक, प्रवासी यांनींहि दर्शश्राद्ध करावें. विस्मरणादिकानें दर्शश्राद्धाचें उल्लंघन होईल तर " न्यू ३ षुवाचं " या ऋचेचा शंभर वेळ जप करावा. इतिदर्शनिर्णयउद्देशश्चतुर्विंशः ॥ २४ ॥

---

इष्टिस्थालीपाकौपौर्णमास्यामारब्धव्यौनतुदर्शे आधानंगृहप्रवेशनीयहोमानंतरमेवपौर्णमास्यांयदिदर्शपौर्णमासारंभःक्रियतेतदामलमासपौषमासगुरुशुक्रास्तादिदोषोनास्ति तत्रातिक्रमेतुशुद्धमासादिप्रतीक्षेत्येके सर्वथाशुद्धकालेएवारंभइत्यपरे ॥ इति इष्ट्यादिप्रारंभनिर्णयउद्देशःपंचविंशः ॥ २५ ॥

## आतां इष्टि आणि स्थालीपाक यांच्या आरंभाचा निर्णय सांगतों.

इष्टि आणि स्थालीपाक यांचा आरंभ पौर्णिमेच्या दिवसीं करावा, अमावास्येच्या दिवसीं करू नये. आधान (अग्निस्थापन) करणें तें गृहप्रवेशनीय होम झाल्यानंतरच करावें. दर्शपौर्णमासस्थालीपाकाचा आरंभ जर अव्यवहित (जवळचे) पौर्णिमेचे ठिकाणीं कर्तव्य असेल तर त्याविषयीं मलमास, पौषमास, गरुशुक्रांचीं अस्तादिक यांचा दोष नाहीं. पौर्णिमेचे दिवसीं

---

[1] कात्यायनांनीं पिंडपितृयज्ञाच्या दिवसींच दर्शश्राद्ध करावें असें सांगेल.

आरंभ होण्याचा राहील तर शुद्ध मासादिकांची प्रतीक्षा करावी असें कितीएक ग्रंथकार सांगतात. सर्वदा शुद्ध कालींच आरंभ करावा असें दुसरे ग्रंथकार सांगतात. इति इष्ट्यादिप्रारंभनिर्णयउद्देशः पंचविंशः ॥ २५ ॥

---

अथविकृतिकालः तास्त्रिविधाः नित्याआग्रयणचातुर्मास्याद्याः नैमित्तिकाजातेष्ट्यादयः काम्याः सौर्यादयः एताःपुरुषार्थाः एवंक्रत्वंगभूताअपिद्विविधाः नित्यानैमित्तिकाश्च अत्र विकृतिषुसद्यस्कालत्वद्व्यहकालत्वयोर्विकल्पः एवंपर्वणिशुक्लपक्षगतदेवनक्षत्रेषुवा कर्तव्या इतिविकल्पः तत्रपर्वणिकरणपक्षे अपराण्हादिसंधौसंधिदिनेसद्यस्कालांद्व्यहकालांवाविकृतिंकृत्वाप्रकृतेरन्वाधानं मध्यान्हेपूर्वाण्हेवासंधौसंधिदिनेप्रकृतिसमाप्यसद्यस्कालैवविकृतिः कार्या कृत्तिकादीनिविशाखांतानिचतुर्दशनक्षत्राणिदेवनक्षत्राणीत्युच्यंते आग्रयणेविशेषो द्वितीयपरिच्छेदेवक्ष्यते अन्वारंभणीयेष्टिश्चतुर्दश्यांकार्या ॥ इति विकृतिसामान्यनिर्णय उद्देशः षड्विंशः ॥ २६ ॥

## आतां विकृतींचा काल सांगतों.

विकृति तीन प्रकारच्या–नित्य, नैमित्तिक, आणि काम्य. आग्रयण, चातुर्मास्यें इत्यादिक ज्या विकृति त्या नित्य होत. जातेष्टि इत्यादिक त्या नैमित्तिक. सौरी इत्यादिक त्या काम्य. ह्या तीन प्रकारच्या विकृति पुरुषार्थाची कृत्यें होत. याप्रमाणें यज्ञाच्या अंगभूत ज्या विकृति त्याहि दोन प्रकारच्या–नित्य विकृति, आणि नैमित्तिक विकृति. ह्या विकृति तत्काळीं कराव्या, किंवा दोन दिवस कराव्या याविषयीं विकल्प आहे. याप्रमाणें पर्वदिवसीं अथवा शुक्लपक्षांतील जीं देवनक्षत्रें त्यांचे ठिकाणीं कराव्या, असा विकल्प आहे, त्यामध्यें पर्वदिवसीं कर्तव्य असून अपराण्हादिसंधि असेल तर संधिदिवसीं सद्यस्काला किंवा द्व्यहकाला ( दोन दिवसांचा काल आहे जीस ) असी विकृति करून प्रकृतीचें अन्वाधान करावें. मध्यान्हसंधि अथवा पूर्वाण्हसंधि असेल तर संधिदिवसीं प्रकृति समाप्त करून सद्यस्काला अशीच विकृति करावी. कृत्तिकांपासून विशाखांपर्यंत जीं चवदा नक्षत्रें तीं देवनक्षत्रें होत. आग्रयणाचा विशेष निर्णय द्वितीयपरिच्छेदामध्यें सांगेन. अन्वारंभणीया इष्टि चतुर्दशीचे दिवसीं करावी. इति विकृतिसामान्यनिर्णयउद्देशः षड्विंशः॥ २६ ॥

---

पशुयागस्तुवर्षर्तौश्रावण्यादिचतुर्णांपर्वणामन्यतमेपर्वणि दक्षिणायनदिनेउत्तरायणदिने वाकार्यः तत्रखंडपर्वणिविकृतिसामान्योक्तपर्वनिर्णयः ॥ इति पशुयागनिर्णयउद्देशःसप्तविंशः ॥ २७ ॥

## आतां पशुयागाचा काल सांगतों.

पशुयाग वर्षाऋतूमध्यें श्रावणी इत्यादिक जीं चार पर्वें त्यांतून कोणत्या एका पर्वदिवसीं, दक्षिणायन दिवसीं किंवा उत्तरायण दिवसीं करावा. त्याविषयीं खंडित पर्व असेल तर विकृतीविषयीं सामान्य सांगितला जो पर्वनिर्णय तोच एथें समजावा. इति पशुयागनिर्णयउद्देशः सप्तविंशः ॥ २७ ॥

**अथ** चातुर्मास्यकाल:तत्प्रयोगेचत्वार:पक्षा:फाल्गुन्यांचैत्र्यांवापौर्णमास्यांवैश्वदेवपर्वकृत्वाचतुर्षुचतुर्षुमासेष्वाषाढ्यादिष्वेकैकंपर्वेत्येवंयावज्जीवमनुष्ठानमितियावज्जीवपक्ष: उक्तरीत्यासंवत्सरपर्यंतमनुष्ठायसवनेष्ट्यापशुयागेनवासोमयागेनवासमापनंसांवत्सरपक्ष: प्रथमेहनिवैश्वदेवपर्व चतुर्थेवरुणप्रघासपर्व अष्टमनवमयो:साकमेधपर्व द्वादशेशुनासीरीयपर्वेतिद्वादशाहपक्ष: पंचभिर्दिनै:समाप्तौयथाप्रयोगपक्ष: द्वादशाहयथाप्रयोगपक्षयोरुदगयनेशुक्लपक्षेदेवनक्षत्रेष्वारभ्यशुक्लपक्षएवसमाप्तिरितिबहव: कृष्णपक्षेवासमाप्तिरितिकेचित् द्वादशाहपंचाहपक्षयोरपिसवनेष्ट्यादिनासमापनेकृतेसकृत्करणं तदभावेप्रतिवत्सरमनुष्ठानम् क्वचिदैकाहिकप्रयोगपक्षोप्युक्त: सचचैत्र्यादिषुचतसृषुपौर्णमासीष्वेकस्यांकस्यांचिद्भवति क्वचित्तुसप्ताहपक्ष:सयथाद्व्यहेवैश्वदेवपर्व तृतीयदिनेवरुणप्रघास: चतुर्थेग्रहमेधीया पंचमेमहाहवींषि षष्ठेपितृयज्ञादिसाकमेधपर्वशेष: सप्तमेशुनासीरीयपर्वेतिअत्रशुक्लपक्षादि: पंचाहपक्षोक्त: काल: ॥ इति चातुर्मास्यकालनिर्णय उद्देशअष्टाविंश: ॥ २८ ॥

## आतां चातुर्मास्याचा काल सांगतों.

चातुर्मास्याच्या प्रयोगाचे चार पक्ष आहेत. ते असे;–**प्रथमपक्ष**–फाल्गुनी पौर्णिमा, किंवा चैत्री पौर्णिमा यांतून कोणत्याहि पौर्णिमेचे दिवसीं वैश्वदेव पर्व करून आषाढी इत्यादिक पौर्णिमेचे दिवसीं पर्वाला आरंभ करून चार चार महिन्यांनीं पौर्णिमेचे दिवसीं एकेक पर्व करावें असें यावज्जीव आचरण करणें तो **यावज्जीवपक्ष. दुसरा पक्ष**–पूर्वीं सांगितल्या रीति प्रमाणें एक वर्षपर्यंत करून नंतर सवनेष्टि, पशुयाग, यांनीं किंवा सवनेष्टि व सोमयाग यांनीं समाप्ति करणें तो **सांवत्सरपक्ष. तिसरा पक्ष**–प्रथम दिवसीं वैश्वदेव पर्व, चवथ्या दिवसीं वरुणप्रघास पर्व, आठवा व नववा ह्या दिवसीं साकमेध पर्व, बाराव्या दिवसीं शुनासीरीय पर्व, असा बारा दिवसांचा पक्ष. **चवथा पक्ष**–पांच दिवसपर्यंत करून पांचव्या दिवसीं समाप्ति करणें तो **यथाप्रयोगपक्ष.** बारा दिवसांचा पक्ष आणि यथाप्रयोग पक्ष यांचा आरंभ उत्तरायणांत शुक्लपक्षीं व देवनक्षत्रीं करून शुक्लपक्षांतच समाप्ति करावी असें पुष्कळ ग्रंथकार ह्मणतात. अथवा कृष्णपक्षांत समाप्ति करावी असेंहि कितीएक ह्मणतात. बारा दिवसांचा पक्ष व पांच दिवसांचा पक्ष ह्या दोन पक्षांची समाप्ति वसनेष्टि इत्यादिकांनीं एकानें केली तर ते दोन पक्ष एकवेळ करावे. तसी समाप्ति न केली तर दरएक वर्षी करावे. क्वचिद्ग्रंथांत एक दिवसाच्या पक्षाचाहि प्रयोग सांगितला आहे, तो प्रयोग चैत्री इत्यादिक चार पौर्णिमेंतून कोणत्या एका पौर्णिमेचे दिवसीं होतो. क्वचित् ग्रंथांत सात दिवसांचाहि पक्ष सांगितला आहे. तो असा;–दोन दिवस वैश्वदेव पर्व, तिसऱ्या दिवसीं वरुणप्रघास पर्व, चवथ्या दिवसीं गृहमेधीया, पांचव्या दिवसीं महाहवींषि, साहाव्या दिवसीं पितृयज्ञादिक साकमेधपर्वाचा शेष, सातव्या दिवसीं शुनासीरीय पर्व, या सात दिवसांच्या पक्षाविषयीं पांच दिवसांच्या पक्षाला सांगितलेला शुक्लपक्षादिक काळ घ्यावा. **इति चातुर्मास्यकालनिर्णयउद्देश अष्टाविंश: ॥२८॥**

काम्येष्टीनांविकृतिसामान्यनिर्णयानुसारेणपर्वण्यनुष्ठानम् शुक्लपक्षस्थदेवनक्षत्रेवा जातेष्टिस्तुपत्न्याविंशतिरात्र्यात्मककर्मानधिकाराख्यजननाशौचनिवृत्तौ सत्यांपर्वणिकार्यागृहदाहेष्ट्यादिनैमित्तिकेष्टीनांनिमित्तानंतरमनुष्ठानेपर्वाद्यपेक्षानास्ति तदसंभवेपर्वापेक्षाक्रत्वर्थानांनित्यानांक्रतुनासहैवानुष्ठानम् नतत्रपृथक्कालापेक्षा हविर्दोषोद्देशादिनैमित्तिकक्रत्वर्थेष्टयस्तुस्विष्टकृदुत्तरंसमिष्टयजुषःप्राक्निमित्तस्मरणेतदानीमेवतदीयतंत्रोपजीवनेननिर्वापप्रभृतिकार्याः तदनंतरंस्मरणेतत्प्रयोगंसमाप्यपुनरन्वाधानादिविधिनाकार्याः इति काम्यनैमित्तिकादीष्टीनांनिर्णयउद्देशएकोनत्रिंशः ॥ २९ ॥

## आतां काम्येष्टींचा काल सांगतों.

काम्येष्टि करावयाच्या त्या विकृतीला जो सामान्य निर्णय सांगितला त्याप्रमाणें पर्वदिवसीं कराव्या, अथवा शुक्लपक्षांतील देवनक्षत्रीं कराव्या. स्त्री प्रसूत झाली असतां जातेष्टि करावी; परंतु वीस दिवसपर्यंत कर्माचा प्रतिबंध करणारें जें जननाशौच तें गेल्यानंतर पर्वदिवसीं करावी. घर दग्ध होईल तर गृहदाहेष्टि करावी असें सांगितलें आहे, यास्तव तसें निमित्त प्राप्त झाल्यानंतर गृहदाहेष्टि इत्यादिक नैमित्तिक इष्टींच्या अनुष्ठानाविषयीं पर्वादिकांची गरज नाहीं. त्याकालीं असंभव असेल तर पर्वदिवसीं कराव्या. यज्ञाच्या अंगभूत ज्या नित्य इष्टि त्या यज्ञाबरोबरच कराव्या, त्यांविषयीं निराळ्या कालाची गरज नाहीं. ‘होम करण्याचीं द्रव्यें दोषयुक्त झालीं’ इत्यादि दोषांच्या निमित्तानें प्राप्त झालेल्या ज्या यज्ञाच्या प्रायश्चित्तेष्टि त्या स्विष्टकृत्कर्माच्या नंतर व समष्टियजु संज्ञक होमाच्या पूर्वी दोषस्मरण झालें असतां त्या वेळींच त्याच तंत्रोपजीवनानें निर्वापादिक कराव्या. प्रायश्चित्ताच्या आहुतीनंतर दोषस्मरण होईल तर तो सर्व प्रयोग समाप्त करून पुनः अन्वाधानादिक विधीनें कराव्या. इति काम्यनैमित्तिकादीष्टीनां निर्णयउद्देशएकोनत्रिंशत्तमः ॥ २९ ॥

---

आधानंतुपर्वणिनक्षत्रेचोक्तं तत्रसंकल्पप्रभृतिपूर्णाहुतिपर्यंतप्रयोगपर्याप्तंपर्वग्राह्यम् तदसंभवेगार्हपत्याधानाद्याहवनीयाधानपर्यंतंविद्यमानंग्राह्यं एवंनक्षत्रस्यापिनिर्णयः दिनद्वयेकर्मकालव्याप्तपर्वसत्त्वेयत्रोक्तनक्षत्रयोगस्तद्ग्राह्यं वसंतऋतुपर्वोक्तनक्षत्रेत्येतद्त्रितयसन्निपाते प्रशस्ततमं ऋत्वभावेमध्यमं केवलेपर्वणिनक्षत्रेवाधमं नक्षत्राणितुकृत्तिकारोहिणीविशाखापूर्वाफल्गुनीउत्तराफल्गुनीमृगोत्तराभाद्रपदेतिसप्ताश्वलायनसूत्रोक्तानि कृत्तिकारोहिण्युत्तरामृगपुनर्वसुपुष्यपूर्वाफल्गुनीपूर्वाषाढाहस्तचित्राविशाखानुराधाश्रवणज्येष्ठारेवतीति सूत्रांतरोक्तानिसोमपूर्वाधानेतुनर्तुंपृच्छेन्ननक्षत्रमितिवचनात्सोमकालानुरोधेनैवाधानं नतत्रपृथक्कालविचारः ॥ इत्याधानकालनिर्णयउद्देशस्त्रिंशत्तमः॥ ३० ॥

## आतां आधानाचा काल सांगतों.

आधान पर्वदिवसीं आणि उक्त नक्षत्रीं करावें. त्याविषयीं पर्व घेणें तें संकल्पापासून पूर्णाहुतीपर्यंत सर्व प्रयोग त्या कालांत होई इतकें घ्यावें. तितकें घेण्यासारखें नसेल तर गार्हपत्याधानापासून आहवनीयाधानापर्यंत पुरेल इतकें विद्यमान असेल तें घ्यावें. याप्रमाणें नक्ष-

त्राचाहि निर्णय जाणावा. संकल्पादिक संपूर्ण कर्म होईल इतकें पर्व दोन दिवसीं असेल तर ज्या दिवसीं सांगितलेल्या नक्षत्राचा योग असेल तें ग्रहण करावें. वसंतऋतु, पर्व, आणि सांगितलेलीं नक्षत्रें या तिहींचा एककालीं योग येईल तर अतिउत्तम. पर्व व नक्षत्र हीं असून ऋतु नसेल तर मध्यम. नुस्तें नक्षत्र किंवा नुस्तें पर्व हें अधम होय. नक्षत्रें—कृत्तिका, रोहिणी, विशाखा, पूर्वाफल्गुनी, उत्तराफल्गुनी, मृग, उत्तराभाद्रपदा असीं सात नक्षत्रें आश्वलायनसूत्रांत सांगितलीं आहेत. कृत्तिका, रोहिणी, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, मृग, पुनर्वसु, पुष्य, पूर्वाफल्गुनी, पूर्वाषाढा, हस्त, चित्रा, विशाखा, अनुराधा, श्रवण, ज्येष्ठा, रेवती, असीं सतरा नक्षत्रें दुसऱ्या सूत्रांत सांगितलीं आहेत. सोमपूर्वक आधान असेल तर, " ऋतु, नक्षत्रें यांचा विचार करूं नये " असें वचन आहे यास्तव सोमकालाच्याच अनुरोधानें आधान केल्यास तेथें निराळ्या कालाचा विचार करण्याची गरज नाहीं. इति आधानकालनिर्णयउद्देशस्त्रिंशत्तमः ॥ ३० ॥

---

अथग्रहणनिर्णयः चंद्रसूर्यग्रहणंयावच्चाक्षुषदर्शनयोग्यंतावान्पुण्यकालः अतोग्रस्तास्तस्थलेऽस्तोत्तरंद्वीपांतरेग्रहणसत्त्वेपिदर्शनयोग्यत्वाभावान्नपुण्यकालः एवंग्रस्तोदयेउदयात्पूर्वंन पुण्यकालः मेघादिप्रतिबंधेनचाक्षुषदर्शनासंभवेशास्त्रादिनास्पर्शमोक्षकालौज्ञात्वास्नानदानाद्याचरेत् रविवारेसूर्यग्रहश्चंद्रवारेचंद्रग्रहश्चूडामणिसंज्ञस्तत्रदानादिकमनंतफलं ग्रहस्पर्शकालेस्नानंमध्येहोमःसुरार्चनंश्राद्धंचमुच्यमानेदानंमुक्तेस्नानमितिक्रमः तत्रस्नानजलेषुतारतम्यं शीतमुष्णोदकात्पुण्यमपारक्यंपरोदकात् भूमिष्ठमुद्धृतात्पुण्यंततःप्रस्रवणोदकं ततोपि सारसंपुण्यंततःपुण्यंनदीजलं ततस्तीर्थनदीगंगापुण्यापुण्यस्ततोंबुधिरिति ग्रहणेस्नानंच सचैलंकार्यं सचैलत्वंमुक्तिस्नानपरमितिकेचित् मुक्तिस्नानाभावेसूतकित्वानपगमः ग्रहणे स्नानममंत्रकं सुवासिनीभिःस्त्रीभिरशिरःस्नानंकार्यं शिष्टस्त्रियस्तुग्रहणेषुशिरःस्नानंकुर्वंति जाताशौचेमृताशौचेचग्रहणनिमित्तंस्नानदानश्राद्धादिकंकार्यमेव स्नानेनैमित्तिकेप्राप्तेनारीयदि रजस्वला पात्रांतरिततोयेनस्नानंकृत्वाव्रतंचरेत् नवस्त्रपीडनंकुर्यान्नान्यद्वासश्चधारयेत् त्रिरात्रमेकरात्रंवासमुपोष्यग्रहणेस्नानदानाद्यनुष्ठानेमहाफलं एकरात्रपक्षेग्रहणदिनात्पूर्वदिनेउपवासइतिकेचित् ग्रहणसंबंधाहोरात्रउपवासइत्यपरे पुत्रवद्गृहिणोग्रहणसंक्रांत्यादौनोपवासः पुत्रवत्पदेनकन्यावानपिग्राह्यइतिकेचित् ग्रहणेदेवपितृतर्पणंकार्यमितिकेचित् सर्वेषामेववर्णानांसूतकंराहुदर्शने तेनग्रहणकालेस्पृष्टवस्त्रादेःक्षालनादिनाशुद्धिःकार्या अत्रगोभूहिरण्यधान्यादिदानंमहाफलं तपोविद्योभययुक्तंमुख्यंदानपात्रं सत्पात्रेदानात्पुण्यातिशयः सर्वंगंगासमंतोयंसर्वेव्याससमाद्विजाः सर्वभूमिसमंदानंग्रहणेचंद्रसूर्ययोरित्युक्तिः पुण्यसामान्याभिप्राया अतएव सममब्राह्मणेदानंद्विगुणंब्राह्मणब्रुवे श्रोत्रियेशतसाहस्रंपात्रेत्वानंत्यमश्नुते इतितारतम्यमुक्तम् अब्राह्मणेसंस्कारादिरहितेजातिमात्रेब्राह्मणेदानंयथोक्तफलं गर्भाधानादिसंस्कारयुतोवेदाध्ययनाध्यापनरहितोब्राह्मणब्रुवस्तत्रदानमुक्तंद्विगुणफलं वेदाध्ययनादियुते श्रोत्रियेसहस्रफलं विद्यासदाचरणादियुतेपात्रेऽनंतफलमित्येतद्वाक्यार्थः ग्रहणेश्राद्धमामेनहेम्नावाकार्यं संपन्नश्चेत्पक्वान्नेनकुर्यात् सूर्यग्रहणेतीर्थयात्रांगश्राद्धवत्घृतप्रधानान्नेनश्राद्धंका

र्यं ग्रहणेश्राद्धभोक्तुर्महादोषः ग्रहणेतुलादानादिकंसंपन्नेनकार्यं चंद्रसूर्यग्रहेतीर्थेमहापर्वादिके तथा मंत्रदीक्षांप्रकुर्वाणोमासर्क्षादीन्नशोधयेत् मंत्रदीक्षाप्रकारस्तंत्रेद्रष्टव्यः दीक्षाग्रहणमुपदेशस्याप्युपलक्षणंयुगेयुगेतुदीक्षासीदुपदेशः कलौयुगेचंद्रसूर्यग्रहेतीर्थेसिद्धक्षेत्रेशिवालये मंत्रमात्रप्रकथनमुपदेशःसउच्यते मंत्रग्रहणेसूर्यग्रहणमेवमुख्यं चंद्रग्रहणेदारिद्र्यादिदोषोक्तेरितिकेचित्चंद्रसूर्योपरागेचस्नात्वापूर्वमुपोषितः स्पर्शादिमोक्षपर्यंतंजपेन्मंत्रंसमाहितः जपाद्दशांशतोहोमस्तथाहोमात्तर्पणं होमाशक्तौजपंकुर्याद्धोमसंख्याचतुर्गुणं मूलमंत्रमुच्चार्यतदंते द्वितीयांतंमंत्रदेवतानामोच्चार्य अमुकांदेवतामहंतर्पयामिनमइतियवादियुक्तजलांजलिभिस्तर्पणंहोमदशांशेनकार्यं एवंनमोंतंमूलमंत्रमुक्त्वाअमुकांदेवतामहमभिषिंचाम्यनेनेत्युच्चार्यजलेनस्वमूर्ध्निअभिषिंचेदितिमार्जनंतर्पणदशांशेनकार्यं मार्जनदशांशेनब्राह्मणभोजनंएवंजपहोमतर्पणमार्जनविप्रभोजनात्मकपंचप्रकारंपुरश्चरणं तर्पणाद्यसंभवेतत्तत्संख्याचतुर्गुणोजपएवकार्यः अयंचग्रहणेपुरश्चरणप्रकारोग्रस्तोदयेग्रस्तास्तेचनसंभवति पुरश्चरणांगोपवासःपुत्रवत्गृहिणापिकार्यः पुरश्चरणकर्तुःस्नानदानादिनैमित्तिककर्मलोपेप्रत्यवायप्रसंगान्नैमित्तिकंस्नानदानादिकंभार्यापुत्रादिप्रतिनिधिद्वाराकार्यं ॥

## आतां ग्रहणाचा निर्णय सांगतों.

चंद्र, किंवा सूर्य यांचें ग्रहण तें डोळ्यांनीं दिसत असेल तेथपर्यंत पुण्यकाल, याकरितां ग्रहण लागून ग्रस्त झाल्यानें अस्तोत्तर व अन्यद्वीपीं ग्रहण असेल तथापि दिसण्यास योग्य नाहीं याकरितां पुण्यकाल नाहीं. असेंच ग्रस्तसहित उदय होईल तर उदयाच्या पूर्वी पुण्यकाल नाहीं. अभ्र, इत्यादि अडचणींमुळें दिसण्याचा असंभव असेल तर शास्त्रादिकांपासून स्पर्शकाल व मोक्षकाल हे जाणून स्नान, दान, इत्यादिक करावें. रविवारीं सूर्यग्रहण व सोमवारीं चंद्रग्रहण असें ग्रहण असेल तर तें चूडामणि ग्रहण, त्याचे ठिकाणीं दानादिक केलें असतां अनंत फल होतें. ग्रहणाच्या स्पर्शकालीं स्नान; मध्यें होम, देवपूजा, श्राद्ध; सुटण्यास आरंभ झाल्यावर दान; निःशेष सुटल्यानंतर स्नान, याप्रमाणें क्रम जाणावा. स्नानाच्या उदकाविषयीं तारतम्य–" उष्णोदकाहून शीतोदक पुण्यकारक, दुसऱ्यानें दिलेल्या उदकाहून स्वतांचें उदक पुण्यकारक, वर काढून स्नान करणें त्याहून भूमिस्थ उदकाचें स्नान करणें पुण्यकारक, त्याहून वाहतें उदक पुण्यकारक, वाहत्याहून सरोवराचें जल पुण्यकारक, त्याहून नदीचें जल पुण्यकारक, याप्रमाणें तीर्थें, नदी, गंगा, समुद्र यांचें स्नान उत्तरोत्तर पुण्यकारक आहे." ग्रहणांत वस्त्रासह स्नान करावें. वस्त्रासह स्नान करणें तें मुक्तिस्नानपर असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. मुक्तिस्नान न केलें असतां सुतकीपणा जात नाहीं. ग्रहणाचें स्नान अमंत्रक करावें. सुवासिनी स्त्रियांनीं गळ्याखालीं स्नान करावें. शिष्टांच्या स्त्रिया ग्रहणांत डोकीवरून स्नान करितात. सुव्हेर आणि सुतक यांमध्यें ग्रहणसंबंधी स्नान, दान, श्राद्धादिक अवश्य करावें. " स्त्री रजस्वला असेल आणि कांहीं नैमित्तिक स्नान, प्राप्त होईल तर, भांड्यांत उदक घेऊन त्याणें स्नान करून व्रत करावें. वस्त्र पिळूं नये, व दुसरें वस्त्र नेसूं नये."

तीन दिवस किंवा एक दिवस उपोषण करून ग्रहणाचें स्नान, दान इत्यादिक केलें असतां मोठें फल प्राप्त होतें. एक दिवस उपोषण करणें असेल तर ग्रहणदिवसाच्या पूर्वदिवसीं उपोषण करावें, असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. ग्रहणसंबंधी अहोरात्रीं उपोषण करावें, असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात. पुत्रवान् गृहस्थाश्रमी यांनीं ग्रहण, संक्रांति इत्यादिक दिवसीं उपोषण करूं नये. पुत्रवान् अशा शब्देंकरून कन्यावान् असतील त्यांनींहि उपोषण करूं नये. ग्रहणाचे ठिकाणीं देव, पितर यांचें तर्पण करावें, असें कोणी ह्मणतात. "सर्व वर्णांला ग्रहणाचें सुतक आहे," याकरितां ग्रहणकालीं स्पर्श केलेलीं अशीं जीं वस्त्रादिक त्यांची शुद्धि उदकानें धुवून करावी. धुण्यासारखीं नसतील तर दर्भादिकानें उदकाचें प्रोक्षण करून शुद्धि करावी. ग्रहणांत गाई, भूमि, सुवर्ण, धान्य इत्यादिकांचें दान केलें असतां मोठें फल आहे. तपश्चर्या, व विद्या या दोहोंनीं संपन्न जो ब्राह्मण तो मुख्य दानपात्र, सत्पात्रीं दान केल्यानें मोठें पुण्य आहे. "चंद्रसूर्याच्या ग्रहणकालीं सर्व उदक गंगेच्या समान, सर्व ब्राह्मण व्यासाच्या समान, सर्व दान भूमिदानाच्या समान" असें जें वचन तें सामान्य पुण्याच्या अभिप्रायाचें आहे. यास्तव "अब्राह्मणाचे ठिकाणीं दान समफल, ब्राह्मणब्रुवाचे ठिकाणीं द्विगुणफल, श्रोत्रियाचे ठिकाणीं शंभर सहस्रपट, सत्पात्राचे ठिकाणीं अनंतफल," असें तारतम्य सांगितलें.—संस्कारादिकानें रहित असा जातीनें मात्र ब्राह्मण तो अब्राह्मण, त्याला दान केलें तर सांगितलें तितकेंच फल मिळतें. गर्भाधानादि संस्कार झालेला, व वेद पाठ करणें, दुसऱ्यास शिकविणें यांहीं जो हीन तो ब्राह्मणब्रुव, त्याला दान केलें तर दुप्पट फल मिळतें. वेद स्वतां पाठ करणें व दुसऱ्यास शिकविणें यांहींकरून युक्त तो श्रोत्रिय, त्याला दाम केलें तर सहस्रपट फल मिळतें. विद्या, उत्तम आचार इत्यादिकांनीं युक्त तो सत्पात्र, त्याला दान केलें तर अनंतफल; याप्रमाणें वाक्याचा अर्थ जाणावा. ग्रहणांत श्राद्ध करणें तें आमान्नेंकरून करावें, किंवा हिरण्यश्राद्ध करावें. संपत्तिमान् असेल तर पक्कान्नेंकरून करावें. सूर्यग्रहणीं श्राद्ध, तीर्थयात्रांगश्राद्धाप्रमाणें घृतप्रधान अशा अन्नानें करावें. ग्रहणांत श्राद्धभोजन करणारा महादोषी होतो. संपत्तिमान् असेल त्यानें ग्रहणांत तुलादानादिक करावें. "चंद्र आणि सूर्य यांच्या ग्रहणीं, तीर्थाचे ठिकाणीं, महापर्व (कपिलाषष्ठी) इत्यादिकालीं मंत्राची दीक्षा (उपदेश) घेणें असेल तर महिना, नक्षत्र इत्यादि शुद्धीची गरज नाहीं. मंत्रदीक्षा घेण्याचा प्रकार तंत्रग्रंथीं पाहावा. दीक्षाशब्दाचें ग्रहण उपदेशाचें उपलक्षण करितें. "युगायुगाचे ठिकाणीं दीक्षा होते आणि कलियुगीं उपदेश होतो. चंद्रसूर्यग्रहण, सिद्धक्षेत्र (हरिद्वारादि), शिवालय इत्यादि स्थानीं नुस्ता मंत्र मात्र सांगणें तो उपदेश होय. मंत्र घेण्याविषयीं सूर्यग्रहणच मुख्य आहे. चंद्रग्रहणीं मंत्रग्रहण केलें असतां दरिद्र इत्यादिक दोष प्राप्त होतो असें कितीएक ह्मणतात. "चंद्रसूर्याच्या ग्रहणीं उपोषणपूर्वक स्नान करून स्पर्शकालापासून सुटेपर्यंत एकाग्रमनानें मंत्राचा जप करावा. जपाचा दशांश होम करावा, होमाचा दशांश तर्पण करावें. होमाविषयीं शक्ति नसेल तर होमसंख्येच्या चौपट जप करावा." मूल मंत्राचा उच्चार करून त्याच्या शेवटीं द्वितीया विभक्त्यंत असा, मंत्रदेवतेच्या नामाचा उच्चार करून अमुक देवतेला मी तर्पण करितों असा उच्चार करून यवादि घातलेले अशा उदकाच्या अंजलींनीं तर्पण, होमाच्या दशांशेंकरून करावें. असा नमोंत मूलमंत्र उच्चार करून अमुक

देवतेला मी अभिषेक करितों, असें उच्चारून तर्पणाच्या उदकानें आपल्या मस्तकीं अभिषेक करावा. याप्रमाणें मार्जन, तर्पणाच्या दशांश करावें. मार्जनाच्या दशांशेंकरून ब्राह्मणभोजन करावें. याप्रकारेंकरून जप, होम, तर्पण, मार्जन, आणि ब्राह्मणभोजन हें पांच प्रकाररूप पुरश्चरण होय. तर्पणादि करण्यास सामर्थ्य नसेल तर त्या त्या संख्येच्या चौपट जपच करावा. मंत्राचें पुरश्चरण करणें तें ग्रस्तोदय ( स्पर्श होऊन उदय पावलेलें ), आणि ग्रस्तास्त ( सुटल्यावांचून अस्त झालेलें ) अशा ग्रहणीं होत नाहीं. पुरश्चरणसंबंधी उपवास पुत्रवान्गृहस्थाश्रमी यांनींहि करावा. पुरश्चरण करील आणि त्याचे स्नानदानादि नैमित्तिक कर्माचा लोप होईल तर दोषप्रसंग प्राप्त होतो यास्तव नैमित्तिक जें स्नानदानादिक तें स्त्री, पुत्र इत्यादि प्रतिनिधींकडून करावें.

---

अत्रेत्थमितिकर्तव्यता स्पर्शकालात्पूर्वंस्नात्वाअमुकगोत्रोमुकशर्माहं राहुग्रस्तेदिवाकरेनिशाकरेवा अमुकदेवतायाअमुकमंत्रसिद्धिकामोग्रासादिमुक्तिपर्यंतममुकमंत्रस्यजपरूपंपुरश्चरणंकरिष्ये. इतिसंकल्पंचकृत्वासनबंधन्यासादिकंचस्पर्शात्पूर्वमेवविधायस्पर्शादिमोक्षपर्यंतं मूलमंत्रजपंकुर्यात् ततःपरदिनेस्नानादिनित्यकृत्यंविधायअमुकमंत्रस्यकृतैतद्ग्रहणकालिकामुकसंख्याकपुरश्चरणजपसांगतार्थं तद्दशांशहोमतद्दशांशतर्पणतद्दशांशमार्जनतद्दशांशब्राह्मणभोजनानिकरिष्येइतिसंकल्प्य होमादिकंतत्तच्चतुर्गुणद्विगुणान्यतरजपंवाकुर्यात् ग्रहणकाले चतत्प्रेरितः पुत्रादिरमुकशर्मणोमुकगोत्रस्यामुकग्रहणस्पर्शस्नानजनितश्रेयःप्राप्त्यर्थं स्पर्शस्नानंकरिष्येइत्यादिसंकल्पपूर्वकंतदीयस्नानदानादिककुर्यात् पुरश्चरणमकुर्वद्भिरपिगुरूपदिष्टः स्वस्वेष्टदेवतामंत्रजपोगायत्रीजपश्चावश्यंग्रहणेकार्योन्यथामंत्रमालिन्यं ग्रहणकालेशयनेकृते रोगोमूत्रेदारिद्र्यंपुरीषेकृमिर्मैथुनेग्रामसूकरोभ्यंगेकुष्टीभोजनेनरकइति पूर्वपक्वमन्नंग्रहणोत्तरं त्याज्यं एवंग्रहणकालस्थितजलपानेपादकृच्छ्राभिधानाज्जलमपित्याज्यं कांजिकंतक्रंघृततैलपाचितमन्नंक्षीरंचपूर्वसिद्धंग्रहणोत्तरंग्राह्यं घृतेसंधितेगोरसेषुग्रहणकालेकुशांतरायंकुर्यात् ॥

याविषयीं पुढें सांगतों असा पुरश्चरणाचा विधि करावा.—स्पर्शकालाच्या पूर्वी स्नान करून "अमुकगोत्रोऽमुकशर्माहं राहुग्रस्ते दिवाकरे निशाकरेवा अमुकदेवताया अमुकमंत्रसिद्धिकामो ग्रासादिमुक्तिपर्यंतं अमुकमंत्रस्य जपरूपं पुरश्चरणं करिष्ये," असा संकल्प करून आसनविधि, न्यास इत्यादिक स्पर्शाच्या पूर्वींच करून ग्रहण लागल्यापासून सुटेपर्यंत मूलमंत्राचा जप करावा. नंतर दुसऱ्या दिवशीं स्नानादिक नित्यकर्म करून, "अमुकमंत्रस्य कृतैतद्ग्रहणकालिकामुकसंख्याकपुरश्चरणजपसांगतार्थं तद्दशांशहोम, तद्दशांशतर्पण, तद्दशांशमार्जन, तद्दशांशब्राह्मणभोजनादि करिष्ये," असा संकल्प करून होमादिक किंवा त्याच्या त्याच्या चौपट, अथवा दुप्पट यांतून कोणत्या एका संख्येनें जप करावा. ग्रहणकालीं पुरश्चरणकर्त्यानें आपल्या पुत्रादिकांला आपलें स्नानादिक करण्याविषयीं आज्ञा केल्यानंतर पुत्रादिकानें, "अमुकशर्मणोऽमुकगोत्रस्यामुकग्रहणस्पर्शस्नानजनितश्रेयःप्राप्त्यर्थं स्पर्शस्नानं करिष्ये," असा संकल्प करून त्याचीं स्नान, दान इत्यादिक करावीं. पुरश्चरण न करणारे अशांनींहि गुरूनें सांगितलेल्या अशा मंत्राचा आणि आपापल्या इष्टदेवतेच्या मंत्राचा

जप आणि गायत्रीचा जप ग्रहणांत अवश्य करावा. न करतील तर मंत्राला मळीनपणा येतो. ग्रहणाच्या समयीं निद्रा केली तर रोग, मूत्रोत्सर्ग केला तर दरिद्र, शौचाला गेलें तर कृमि होतो, मैथुन केलें तर गांवडुक्कर, तैलाभ्यंग केला तर कुष्ठरोग, भोजन केलें तर नरक इत्यादि दुष्ट फलें होतात. पूर्वी शिजवलेले अन्नावरून ग्रहण गेलें असतां तें टाकावें. याप्रमाणें ग्रहणांतील उदक प्राशन केलें असतां पादकृच्छ्र प्रायश्चित्त करण्यास सांगितलें आहे यास्तव ग्रहणसंबंधी उदकहि टाकावें. कांजी, ताक, तूप व तेल यांत तळलेले ( वडे इत्यादिक ), हे पूर्वी सिद्ध केलेले पदार्थ, आणि दूध ग्रहणानंतर घ्यावे. घृत, लोणचीं, गोरस यांचे ठिकाणीं दर्भ घालावे.

---

अथवेधविचारः सूर्यग्रहेग्रहणप्रहरादर्वाक्यामचतुष्टयंवेधः चंद्रग्रहेतुप्रहरत्रयं तथाचदिनप्रथमप्रहरेसूर्यग्रहेपूर्वरात्रिप्रहरचतुष्टयेनभोक्तव्यं द्वितीयेयामेग्रहणेरात्रिद्वितीययामादौनभोक्तव्यं एवंरात्रिप्रथमप्रहरेचंद्रग्रहेदिनद्वितीययामादौनभुंजीत रात्रिद्वितीययामादौग्रहणेदिनतृतीययामादौनभुंजीत बालवृद्धातुरविषयेतुसार्द्धप्रहरात्मकोमुहूर्तत्रयात्मकोवावेधः शक्तस्यवेधकालेभोजनेत्रिदिनमुपोषणंप्रायश्चित्तं ग्रहणकालेभोजनेप्राजापत्यंप्रायश्चित्तं चंद्रस्यग्रस्तोदयेतुयामचतुष्टयवेधात्तत्पूर्वंदिवानभुंजीत केचित्तुचंद्रपूर्णमंडलग्रासेयामचतुष्टयंवेधएकदेशग्रासेयामत्रयमित्याहुः ग्रस्तास्तेतु ग्रस्तावेवास्तमानंतुरवींदूप्राप्नुतोयदि परेद्युरुदयेस्नात्वाशुद्धोभ्यवहरेन्नरः अत्रस्नात्वाशुद्धइत्युक्त्याशुद्धमंडलदर्शनकालिकस्नानात्पूर्वमशुद्धिप्रतिपादनाज्जलाहरणपाकादिकं शुद्धबिंबोदयकालिकस्नानात्पूर्वंनकार्यमितिभाति सूर्यग्रस्तास्तादौपुत्रवद्गृहिणउपवासनिषेधात्तेनषण्मुहूर्तात्मकंवेधंत्यक्त्वाग्रहणात्पूर्वंभोक्तव्यमितिकेचित् पुत्रवद्गृहिणामपितत्रोपवासएवकार्यइतिमाधवमतमेवतुशिष्टाचारानुसृतंयुक्तं सूर्यग्रस्तास्तेचंद्रग्रस्तोदयेचाहिताग्निनान्वाधानंविधायजलेनव्रतंकार्यंनतुभोजनं चंद्रग्रस्तास्तेउत्तरदिनेसंध्याहोमादौनदोषःतत्राल्पकालेनशास्त्रतोमुक्तिनिश्चयेमुक्त्यनंतरंस्नात्वाहोमादिकंकर्तव्यं चिरकालेनमुक्तौहोमकालातिक्रमप्रसंगात्ग्रस्तोदयइवग्रहणमध्येएवसंध्यांहोमंचकृत्वा शास्त्रतोमुक्तिकालेस्नात्वाब्रह्मयज्ञादिनित्यकर्मकर्तव्यमितिभाति दर्शेग्रहणनिमित्तकश्राद्धेनैवदर्शश्राद्धसंक्रांतिश्राद्धानांप्रसंगसिद्धिर्भवति ग्रहणदिनेपित्रादेर्वार्षिकश्राद्धप्राप्तौसतिसंभवेऽन्नेनकार्यं ब्राह्मणाद्यलाभेनासंभवेतुआमेनहेम्नावाकार्यं ॥

## आतां ग्रहणाच्या वेधाचा निर्णय सांगतों.

सूर्यग्रहणीं ग्रहणप्रहराच्या पूर्वी चार प्रहर वेध. चंद्रग्रहणीं ग्रहणप्रहराच्या पूर्वी तीन प्रहर वेध. तसेंच, दिवसाच्या पहिल्या प्रहरीं सूर्यग्रहण होईल तर पूर्वरात्रीच्या चार प्रहरांत भोजन करूं नये. दुसऱ्या प्रहरीं ग्रहण होईल तर पूर्वरात्रीच्या दुसऱ्या प्रहरापासून भोजन करूं नये असेंच पहिल्या प्रहरीं चंद्रग्रहण होईल तर दिवसाच्या दुसऱ्या प्रहरापासून भोजन करूं नये. रात्रीच्या दुसऱ्या प्रहरीं ग्रहण होईल तर दिवसाच्या तिसऱ्या प्रहरापासून भोजन करूं नये. बाल, वृद्ध, रोगी यांविषयीं दीडप्रहर किंवा सहा

घटिका वेध. सशक्तानें वेधकालीं भोजन केलें असतां तीन दिवस उपोषण करावें, हें प्रायश्चित्त. ग्रहणकालीं भोजन केलें असतां प्राजापत्य प्रायश्चित्त करावें. ग्रहण लागून चंद्राचा उदय होईल तर चार प्रहर वेध, याकरितां दिवसा भोजन करूं नये. कोणी ग्रंथकार चंद्राचा पूर्ण ग्रास असेल तर चार प्रहर वेध, आणि एकदेशग्रास असेल तर तीन प्रहर वेध असें ह्मणतात. ग्रहण असून अस्त होईल तर "ग्रहण असून चंद्र सूर्य अस्त पावतील तर दुसऱ्या दिवसीं उदयकालीं स्नान करून मनुष्य शुद्ध होतो." एथें स्नान करून शुद्ध अशा वचनानें, शुद्ध मंडलाचे दर्शनकालीं जें स्नान त्याच्या पूर्वी शुद्धि नाहीं असें सांगितलें, यास्तव उदक आणणें, स्वयंपाक करणें इत्यादिक, शुद्ध बिंबाचा उदय होऊन तत्कालीं स्नान केल्याच्या पूर्वी करूं नये असें वाटतें. सूर्यग्रहण ग्रस्तास्त किंवा ग्रस्तोदय असेल तर पुत्रवान् अशा गृहस्थाश्रमीला उपोषणाचा निषेध सांगितला आहे यास्तव त्यानें बारा घटिका वेध टाकून ग्रहणाच्या पूर्वी भोजन करावें असें कोणी ह्मणतात. पुत्रवान् अशा गृहस्थाश्रमींनींहि तशा ग्रहणीं उपोषणच करावें, असें माधवाचेंच मत शिष्टाचाराला मिळतें असें योग्य आहे. सूर्यग्रहण ग्रस्तास्त असेल आणि चंद्रग्रहण ग्रस्तोदय असेल तर अग्निहोत्र्यानें अन्वाधान करून जलानें व्रत करावें, भोजन करूं नये. चंद्रग्रहण ग्रस्तास्त असेल तर दुसऱ्या दिवसीं संध्या, होम इत्यादि करण्याविषयीं दोष नाहीं. अल्पवेळानें ग्रहण सुटेल असा शास्त्रेंकरून सुटण्याचा निश्चय होईल तर सुटण्याच्या वेळेनंतर स्नान करून होमादिक कर्म करावें. फार वेळानें सुटणारें असें असेल तर होमकालाचें उल्लंघन होतें याकरितां ग्रस्तोदयासारखें ग्रहणामध्येंच संध्या, होम करून शास्त्रेंकरून सुटण्याचा जो काळ असेल त्या कालीं स्नान करून ब्रह्मयज्ञ इत्यादिक नित्य कर्म करावें, असें वाटतें. अमावास्येचे दिवसीं ग्रहणसंबंधीं श्राद्ध केल्यानेंच दर्शश्राद्ध, आणि संक्रांतिश्राद्धें यांची सिद्धि होत्ये. ग्रहणाच्या दिवसीं पिता इत्यादिकांचें वार्षिक श्राद्ध आलें असतां संभव असेल तर अन्नानें करावें. ब्राह्मणादिक न मिळाल्यामुळें असंभव असेल तर आमान्नेंकरून किंवा हिरण्येंकरून करावें.

---

स्वजन्मराशेस्तृतीयषष्ठैकादशदशमराशिस्थितंग्रहणंशुभप्रदं द्वितीयसप्तमनवमपंचमस्थानेषु मध्यमं जन्मचतुर्थाष्टमद्वादशराशिस्थितमनिष्टप्रदं यस्य जन्मराशौजन्मनक्षत्रेवा ग्रहणंतस्य विशेषतोऽनिष्टप्रदं तेनगर्गाद्युक्ताशांतिः कार्या अथवाबिंबदानं कार्यं तद्यथा चंद्रग्रहेरजतमयंचंद्रबिंबं सुवर्णमयं नागबिंबंचकृत्वासूर्यग्रहेसौवर्णसूर्यबिंबंनागबिंबंचकृत्वाघृतपूर्णेताम्रपात्रे कांस्यपात्रेवानिधाय तिलवस्त्रदक्षिणासाहित्यंसंपाद्यमम जन्मराशिजन्मनक्षत्रस्थितामुकग्रहणसूचितसर्वानिष्टप्रशांतिपूर्वकं एकादशस्थानस्थितग्रहणसूचितशुभफलावाप्तयेबिंबदानंकरिष्येइतिसंकल्प्य सूर्यचंद्रंराहुंचध्यात्वानमस्कृत्य तमोमयमहाभीमसोमसूर्यविमर्दन हेमतारप्रदानेनममशांतिप्रदोभव विधुंतुदनमस्तुभ्यंसिंहिकानंदनाच्युत दानेनानेननागस्यरक्षमांवेधजाद्भयादितिमंत्रमुच्चार्य इदंसौवर्णराहुबिंबंनागंसौवर्णरविबिंबंराजतंचंद्रबिंबंवाघृतपूर्णकांस्यपात्रनिहितंयथाशक्तितिलवस्त्रदक्षिणासहितं ग्रहणसूचितारिष्टविनाशार्थंशुभफलप्राप्त्यर्थंचतुभ्यमहंसंप्रददे इतिदानवाक्येनपूजितब्राह्मणायदद्यात् एवंचतुर्थाद्य

**निष्टस्थानेष्वपिदानंकार्यमितिभाति** यस्यजन्मराश्यादिग्रहणंतेनराहुग्रस्तरवींदुबिंबंनावलोक **नीयं इतरजनैरपिपटजलादिव्यवधाने**नैवग्रस्तबिंबंद्रष्टव्यंनसाक्षात् मंगलकार्येषुपूर्णग्रासेचं **द्रग्रहेद्वादश्यादितृतीयांतंदिनसप्तकंव**र्ज्यं सूर्यपूर्णग्रासेएकादश्यादिचतुर्थ्यंतदिनानिवर्ज्यानि **खंडग्रहणेचतुर्दश्यादिदिनत्रयंवर्ज्यं** ज्योतिर्निबंधेषुग्रासपादतारतम्येनदिनाधिक्योनत्वं ता **रतम्येनयोजितं ग्रस्तास्तेपूर्वदिनत्रयं**वर्ज्यं ग्रस्तोदयेपरंदिनत्रयंवर्ज्यं ग्रहणनक्षत्रंषण्मासंपूर्ण **ग्रासेवर्ज्यं पादादिग्रासेसार्धमासादि**तारतम्येनयोज्यं पूर्वसंकल्पितस्यद्रव्यस्यग्रहणोत्तरंदाने **तद्द्विगुणंदेयंभवति ॥ इति ग्रहणनिर्णयउद्देश एकत्रिंशः ॥ ३१ ॥**

## आतां ग्रहणाचा शुभाशुभ निर्णय सांगतों.

आपल्या जन्मराशीपासून तृतीय, षष्ठ, एकादश, दशम, या राशींचे ठिकाणीं ग्रहण शुभ होय. द्वितीय, सप्तम, नवम, पंचम या स्थानीं मध्यम होय. आद्य, चतुर्थ, अष्टम, द्वादश या राशींचे ठिकाणीं अशुभ होय. ज्याच्या जन्मराशीं किंवा जन्मनक्षत्रीं ग्रहण होतें त्यास विशेष अनिष्ट-कारक होतें याकरितां त्यानें गर्गादिकांनीं सांगितलेली शांति करावी. अथवा बिंबदान करावें. तें असें,—चंद्रग्रहणीं रुप्याचें चंद्रबिंब, आणि सुवर्णाचें नागबिंब करावें. सूर्यग्रहणीं सुवर्णाचें सूर्यबिंब, व नागबिंब करून तें, तुपानें भरलेलें असें तांब्याचें पात्र अथवा कांस्यपात्र यांत ठेवून तिल, वस्त्र, दक्षिणा इतकी सामग्री तयार करून " **ममजन्मराशिजन्मनक्षत्रस्थितामुक ग्रहणसूचितसर्वानिष्टप्रशांतिपूर्वकं एकादशस्थानस्थितग्रहणसूचितशुभफलावाप्तये बिंबदानं करिष्ये,** असा संकल्प करून चंद्र, सूर्य, राहू यांचें ध्यान आणि नमस्कार करून नंतर, " **तमोमयमहाभीम सोमसूर्यविमर्दन ॥ हेमतारप्रदानेन ममशांतिप्रदोभव ॥ विधुंतुदनम स्तुभ्यं सिंहिकानंदनाच्युत ॥ दानेनानेन नागस्य रक्षमांवेधजाद्भयात्,** " असा मंत्रोच्चार करून " **इदं सौवर्णं राहुबिंबं नागं सौवर्णं रविबिंबं राजतं चंद्रबिंबं वा घृतपूर्णकांस्य पात्रनिहितं यथाशक्ति तिलवस्त्रदक्षिणासहितं ग्रहणसूचितारिष्टविनाशार्थं शुभफलप्राप्त्यर्थंच तुभ्यमहं संप्रददे,** " या दानवाक्यानें , पूर्वीं पूजा केलेला अशा ब्राह्मणाला त्याचें दान करावें. असेंच चतुर्थ इत्यादि अनिष्ट स्थानीं ग्रहण असेल तर दान करावें, असें वाटतें. ज्याच्या जन्मराशि, जन्मनक्षत्र इत्यादिस्थानीं ग्रहण असेल त्यानें राहूनें ग्रस्त असें सूर्यचंद्राचें बिंब पाहूं नये. अन्यलोकांनींहि वस्त्र, उदक इत्यादि आड करून त्यांतून ग्रहण पाहावें; प्रत्यक्ष पाहूं नये. पूर्णग्रास असें चंद्रग्रहण असेल तर मंगलकार्याचे ठिकाणीं, द्वादशीपासून तृतीयेपर्यंत सात दिवस टाकावे. पूर्णग्रास असें सूर्यग्रहण असेल तर एकादशीपासून चतुर्थीपर्यंत नऊ दिवस टाकावे. खंडित ग्रहण असेल तर चतुर्दशीपासून तीन दिवस टाकावे. ग्रासाचे चरण जसे कमजास्ती होतील त्या मानानें दिवसाचेंहि कमजास्ती मान योजावें, असें ज्योतिष ग्रंथामध्यें सांगितलें आहे. ग्रस्तास्त असेल तर पूर्वींचे तीन दिवस टाकावे. ग्रस्तोदय असेल तर पुढचे तीन दिवस टाकावे. पूर्ण ग्रास असेल तर सहा महिनेपर्यंत ज्या नक्षत्रीं ग्रहण असेल तें नक्षत्र वर्ज्य करावें. पादादिग्रास जसा जसा होईल त्या त्या मानानें दीड महिना इत्यादि

वर्ज्य करावें. संकल्प करून वावयास काढलेलें द्रव्य ग्रहणानंतर दिलें असतां दुष्पट होतें. इति ग्रहणनिर्णयउद्देशएकत्रिंशत् ॥ ३१ ॥

---

समुद्रेपौर्णिमामावास्यादिपर्वसुस्नायात् भृगुभौमदिनेस्नानंवर्जयेत् अश्वत्थसागरौसेव्यौ नस्प्रष्टव्यौकदाचन अश्वत्थंमंदवारेचसागरंपर्वणिस्पृशेत् नकालनियमःसेतौसमुद्रस्नानकर्मणि समुद्रस्नानप्रयोगोन्यत्रज्ञेयः ॥ इतिधर्मसिंधुसारेसमुद्रस्नाननिर्णयउद्देशोद्वात्रिंशत्तमः ३२

## आतां समुद्रस्नानाचा निर्णय सांगतों.

पौर्णिमा, अमावास्या इत्यादि पर्वणींचे दिवसीं समुद्रस्नान करावें. शुक्रवार आणि मंगळवार या दिवसीं समुद्राचें स्नान करूं नये. "अश्वत्थ, सागर यांची सेवा करावी, त्यांना कधींहि स्पर्श करूं नये, शनिवारीं अश्वत्थाला स्पर्श करावा व पर्वणीचे दिवसीं समुद्राला स्पर्श करावा. सेतुबंधसंबंधी जें समुद्राचें स्नान त्याविषयीं कोणताहि निषेध नाहीं." समुद्रस्नानाचा प्रयोग दुसऱ्या ग्रंथीं पाहावा. इति धर्मसिंधुसारे समुद्रस्नाननिर्णयउद्देशोद्वात्रिंशत्तमः ॥ ३२ ॥

---

तिथिविशेषेनक्षत्रविशेषेवारादौचविधिनिषेधः सप्तम्यांनस्पृशेत्तैलंनीलवस्त्रंनधारयेत् नचाप्यामलकैःस्नानंनकुर्यात्कलहंनरः सप्तम्यांनैवकुर्वीतताम्रपात्रेणभोजनं नंदातिथिष्वभ्यंगोवर्ज्यः रिक्तासुक्षौरंवर्ज्यं जयासुमांसंशूद्राद्यैर्वर्ज्यं पूर्णासुस्त्रीवर्ज्या रविवारेभ्यंगोभौमवारेक्षौरंबुधेयोषिद्वर्ज्या चित्राहस्तश्रवणेषुतैलंवर्ज्यं विशाखाप्रतिपत्सुक्षौरंवर्ज्यं मघाकृत्तिकास्युत्तरासुस्त्रीनसेव्या तिलभक्षणंतिलतर्पणंचसप्तम्यांन नारीकेलमष्टम्यामलाबुनवम्यांपटोलंदशम्यांनिष्पावमेकादश्यांमसूरंद्वादश्यांवार्ताकंत्रयोदश्यांवर्ज्यं पूर्णिमादर्शसंक्रांतिचतुर्दश्यष्टमीषुच नरश्चंडालयोनौस्यात्तैलस्त्रीमांससेवनात् पूर्णिमादर्शसंक्रांतिद्वादशीषुश्राद्धदिनेचवस्त्रंनपीडयेत् रात्रौमृदंगोमयमुदकंचनाहरेत् गोमूत्रंप्रदोषकालेनगृण्हीयात् अमादिपर्वस्ववश्यंशांत्यर्थंतिलहोमीस्यात् आत्मरक्षणायदानादिकंचकुर्यात् पर्वसुनाधीयीत शौचाचमनब्रह्मचर्यादिसेवीस्यात् प्रतिपद्दर्शषष्ठीनवमीतिथिषुश्राद्धदिनेजन्मदिनेव्रतेचोपवासेचरविवारेमध्यान्हस्नानसमयेचकाष्ठेनदंतधावनंवर्ज्यं अलाभेदंतकाष्ठानांनिषिद्धेपिदिनेतथा अपांद्वादशगंडूषैःपत्रैर्वाशोधयेन्मुखं अत्रसर्वत्रनिषेधेषुतिथ्यादिकंतत्कालव्यापिग्राह्यं ॥ इति धर्मसिंधुसारेतिथ्यादौविधिनिषेधसंग्रहनिर्णयउद्देशस्त्रयस्त्रिंशत्तमः ॥३३॥

## आतां तिथि, नक्षत्रें आणि वार यांचे ठिकाणीं कोणकोणते पदार्थ वर्ज्य ते सांगतों.

तैलस्पर्श, काळें वस्त्र धारण करणें, आवळकठीच्या काढ्यानें स्नान, कलह, तांब्याचे भांड्यांत भोजन करणें, हीं सप्तमीचे दिवसीं वर्ज्य करावीं. प्रतिपदा, षष्ठी, एकादशी या दिवसीं तैलाभ्यंग वर्ज्य. चतुर्थी, नवमी, चतुर्दशी या दिवसीं क्षौर वर्ज्य. तृतीया, अष्टमी, त्रयोदशी,

या दिवसीं शूद्रादिकांनीं मांस वर्ज्य करावें. पंचमी, दशमी, पौर्णिमा, या दिवसीं स्त्री वर्ज्य. रविवार, मंगळवार, बुधवार या दिवसीं क्रमेंकरून तैलाभ्यंग, श्मश्रु, स्त्री हीं वर्ज्य. चित्रा, हस्त, श्रवण या नक्षत्रीं तैल वर्ज्य. विशाखा, प्रतिपदा या दिवसीं श्मश्रु वर्ज्य. मघा, कृत्तिका, तीन उत्तरा, या नक्षत्रीं स्त्री वर्ज्य. तिलभक्षण, तिलतर्पण हीं सप्तमीस वर्ज्य. अष्टमी, नवमी दशमी, एकादशी, द्वादशी, त्रयोदशी, या दिवसीं क्रमेंकरून नारळ, भोपळा, पडवळ, निष्पाव, ( पावटा, पांढरा पावटा, चवळी, काळेवाल, घेवडा ) मसुरा, वांगीं हीं वर्ज्य करावीं. "पूर्णिमा, अमावास्या, संक्रांति, चतुर्दशी, अष्टमी, या दिवसीं तैल, स्त्री, मांस हीं सेवन करील तर त्याला चांडालजन्म होतें." पूर्णिमा, अमावास्या, संक्रांति, द्वादशी, श्राद्धदिवस, या दिवसीं वस्त्र पिळूं नये. रात्रीं माती, गोमय ( शेण ) उदक हीं घेऊं नयेत. गोमूत्र प्रदोषकाळीं आणूं नये. अमावास्या इत्यादि पर्वणीचे दिवसीं शांतीकरितां अवश्य तिळांचा होम करावा. आपल्या रक्षणाकरितां दानादिक करावीं. पर्वणीचे दिवसीं अध्ययन करूं नये. शौच, आचमन, ब्रह्मचर्य हीं सेवन करावीं. प्रतिपदा, अमावास्या, षष्ठी, नवमी, श्राद्धदिवस, जन्मदिवस, व्रतदिवस, उपोषणदिवस, रविवार, माध्यान्हस्नानसमय, इतक्या कालीं काष्ठानें दांत घांसूं नये. "ज्या दिवसीं दंतकाष्ठें न मिळतील त्या दिवसीं आणि निषिद्ध दिवसीं उदकाचे बारा चूळ करून किंवा वृक्षाच्या पानांनीं मुखप्रक्षालन करावें." ह्या सर्व निषेधांविषयीं तिथि, नक्षत्रें इत्यादि घेणें तीं तत्कालव्यापी असतील तीं घ्यावीं. **इति धर्मसिंधुसारे तिथ्यादौ विधिनिषेधसंग्रहनिर्णयउद्देशस्त्रयस्त्रिंशत्तमः ॥ ३३ ॥**

---

**मीमांसाधर्मशास्त्रज्ञाःसुधियोऽनलसाबुधाः ॥ कृतकार्याःप्राक्निबंधैस्तदर्थंनायमुद्यमः ॥१॥**

## ग्रंथकार हा ग्रंथ करण्याचें प्रयोजन काय तें सांगतो.

मीमांसा, धर्मशास्त्र यांतें जाणणारे व बुद्धिमान्, आलस्यरहित असे जे पंडित ते महाविद्वानांनीं केलेले पूर्वींचे ग्रंथ पाहून त्यांवरून कृतकार्य होतात, ह्मणजे प्राप्त झालेलीं कार्यें करितात, याकरितां माझा हा ग्रंथ करण्याचा उद्योग त्यांच्याकरितां नाहीं.

---

**येपुनर्मंदमतयोलसाअज्ञाश्चनिर्णयं धर्मेवेदितुमिच्छंतिरचितस्तदपेक्षया ॥ २ ॥**
**निबंधोयंधर्मसिंधुसारनामासुबोधनः अमुनाप्रीयतांश्रीमद्विठ्ठलोभक्तवत्सलः ॥ ३ ॥**

तर जे मंदबुद्धि, आळसी, अविद्वान् असे असून धर्माविषयीं निर्णय जाणण्याची इच्छा करितात त्यांच्याकरितां **धर्मसिंधुसार** नांवाचा असा हा सुबोध ग्रंथ मी केला आहे. या ग्रंथेंकरून भक्तवत्सल असा श्रीमद्विठ्ठल संतुष्ट असो.

---

**सर्वत्रमूलवचनानीहज्ञेयानितद्विचारश्च कौस्तुभनिर्णयसिंधुश्रीमाधवकृतनिबंधेभ्यः ॥ ४ ॥**

या ग्रंथाविषयींचीं सर्व मूलवचनें व त्यांचे विचार पाहाणें असतील तर **कौस्तुभ, निर्णयसिंधु, श्रीमाधव** यांणीं केलेले जे निबंध त्यांत पाहावे.

---

प्रेम्णासद्भिर्ग्रंथःसेव्यःशब्दार्थतःसदोषोपि संशोध्यवापिहरिणासुदाममुनिसतुषपृथुकमुष्टिरिव ॥ ५ ॥ इतिश्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारेप्रथमपरिच्छेदः समाप्तः ॥ ॥ श्रीरामचंद्रार्पणमस्तु ॥ ॥ ॥ ॥

हा माझा ग्रंथ क्वचित् स्थलीं शब्दार्थानें जरी सदोष असेल तथापि विद्वानांनीं विचारपूर्वक शोधून ग्रहण करण्यास योग्य आहे. याला दृष्टांत सांगतात–सुदामा ब्राह्मणाचे पोहे कोंड्यानें युक्त असे जरी होते तथापि हरीनें त्यांतील कोंडा वगैरे टाकून चांगले शुद्ध करून ते जसे भक्षण केले तद्वत् विद्वानांनीं ह्या माझ्या ग्रंथाचा स्वीकार करावा. इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे प्रथमः परिच्छेदः समाप्तः ॥



॥ श्रीगणेशायनमः ॥

यत्कृपालेशमात्रेण मूकोपि धिषणायते ॥
तमहं परमात्मानं वंदे कामप्रदं प्रभुम् ॥ १ ॥

याप्रमाणें मंगल करून धर्मसिंधूच्या दुसऱ्या परिच्छेदाचें भाषांतर करण्याला आरंभ करितों.

श्रीपांडुरंगंविबुधांतरंगं नौमींदिरांमाधवमंदिरांच ॥
सतामनंतंहितमामनंतंगुरुंगरिष्ठंजननींवरिष्ठाम् ॥ १ ॥

ज्ञानी जे त्यांच्या अंतःकरणांत वास करणारा असा श्रीपांडुरंग, आणि माधव हेंच जिचें मंदिर असी लक्ष्मी, व साधूचें हित करणारा असा अनंतनामक श्रेष्ठ गुरु ह्मणजे पिता आणि श्रेष्ठ असी माता या सर्वांला मी नमस्कार करितों.

काशीनाथाभिधेनात्रानंतोपाध्यायसूनुना ॥
सामान्यंनिर्णयंप्रोच्यविशेषेणविनिर्णयः ॥ २ ॥

अनंतोपाध्यायांचा पुत्र असा मी काशिनाथ, प्रथम परिच्छेदांत तिथि इत्यादिकांचा सामान्य निर्णय सांगून आतां या दुसऱ्या परिच्छेदांत विशेष निर्णय सांगतों.

संगृह्यतेधर्मसिंधुसाराख्येकालगोचरे ॥
ग्रंथेप्रस्फुटबोधायपुनरुक्तिर्नदूषणम् ॥ ३ ॥

सर्वांला स्पष्ट बोध होण्याकरितां कालविषयक अशा ह्या धर्मसिंधुसारनामक ग्रंथामध्यें कोठें स्थलविशेषीं पुनरुक्ति येईल तर तो दोष असें मानूं नये.

प्रथमपरिच्छेदेमासविशेषानपेक्षंसामान्यतस्तिथ्यादिनिर्णयमभिधायास्मिन्द्वितीयपरिच्छेदेचैत्रादिमासविशेषोपादानेन प्रतिपदादितिथिषुविहितसंवत्सरकृत्यनिर्णयसारंसंगृण्हीमः॥

प्रथम परिच्छेदांत मासादिकांचा विशेष सांगितल्यावांचून सामान्येंकरून तिथि इत्यादिकांचा निर्णय सांगितला आहे, परंतु तितक्यानें निर्वाह होत नाहीं ह्मणून या दुसऱ्या परिच्छेदांत चैत्रादिक बारा महिन्यांत कोणत्या तिथीचा कसा निर्णय आणि कोणकोणत्या तिथीला कोणकोणतीं कृत्यें करावीं यांचा सर्व विशेष निर्णय व प्रतिपदादिक ज्या तिथी त्यांचे ठिकाणीं विहित वार्षिककृत्यें कोणकोणतीं करावीं, हें सांगतों.

अत्रशुक्लप्रतिपदादिरमांतएवमासःप्रायेणदाक्षिणात्यैराद्रियतेइतितमेवाश्रित्यनिर्णयउच्यते अत्रकिंचित्पूर्वपरिच्छेदोक्तमपिपुनर्विशेषोक्तिभिर्दृढीक्रियतेइतिपुनरुक्तिर्नदोषायतत्रमेषसंक्रांतौपूर्वाःपराश्चदशदशनाड्यःपुण्यकालः रात्रौत्वर्धरात्रात्प्राक्संक्रमेपूर्वदिनोत्तरार्धपुण्यम् अर्धरात्रात्परतःसंक्रमेउत्तरदिनस्यपूर्वार्धपुण्यम् अर्धरात्रेसंक्रमेदिनद्वयंपुण्यं ॥

दक्षिण देशांतील लोक बहुधा शुक्ल प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत महिना ग्रहण करितात यास्तव त्याच्याच आश्रयानें निर्णय सांगतों. या परिच्छेदांत क्वचित्स्थलीं प्रथम परिच्छेदांतील विषय आला आहे तो त्या त्या विशेषाच्या दृढीकरणार्थ लिहिला आहे यास्तव पुनरुक्तिरूप दोष असें लोकांनीं समजूं नये. मेषसंक्रांतीच्या पूर्वीच्या दहा व पुढच्या दहा, एकूण वीस घटिका पुण्यकाळ. संक्रांति, मध्यरात्रीच्या पूर्वी झाली असतां पूर्वदिवसाचें उत्तरार्ध पुण्यकाळ जाणावा. मध्यरात्रीनंतर संक्रांति होईल तर दुसऱ्या दिवसाचें पूर्वार्ध पुण्यकाळ. बरोबर मध्य-रात्रीं संक्राति होईल तर पूर्वदिवस आणि पुढचा दिवस असे दोन दिवस पुण्यकाळ.

**अथतिथिनिर्णयः तत्रचैत्रशुक्लप्रतिपदिवत्सरारंभः तत्रौदयिकीप्रतिपत्ग्राह्या दिनद्वयेउदय व्याप्तौअव्याप्तौवापूर्वा चैत्रस्यमलमासत्वेवत्सरारंभनिमित्तकंतैलाभ्यंगसंकल्पादौनूतनवत्स** रनामकीर्तनाद्यारंभंचमलमासप्रतिपद्येवकुर्यात् प्रतिगृहंध्वजारोपणंनिंबपत्राशनं**वत्सरादिफ** लश्रवणंनवरात्रारंभोनवरात्रोत्सवादिनिमित्ताभ्यंगादिश्चशुद्धमासप्रतिपदिकार्यः **वत्सरारंभ निमित्तकोपितैलाभ्यंगः शुद्धप्रतिपद्येवेतिमयूखेउक्तम् अस्यांतैलाभ्यंगोनित्यः अकरणेप्रत्यवा योक्तेः अस्यामेवप्रतिपदिदेवीनवरात्रारंभः अत्रपरयुतामुहूर्तमात्रापि प्रतिपत्ग्राह्या अत्रमुहू र्तपरिमाणं** मुहूर्तमन्होरात्रेश्चप्रोचुःपंचदशंलवमित्युक्तेःसर्वत्रज्ञेयम् पारणादिविशेषनिर्णयः **शारदनवरा**त्रवद्बोध्यः अत्रैवप्रपादानं तत्रमंत्रः प्रपेयंसर्वसामान्याभूतेभ्यःप्रतिपादिता **अ स्याःप्रदानात्पितरस्तृप्यंतुहिपितामहाः अनिवार्यततोदेयंजलंमासचतुष्टयम् प्रपांदातुमशक्ते नप्रत्यहमुदकुंभोद्विजगृहेदेयः तत्रमंत्रः एषधर्मघटोदत्तोब्रह्मविष्णुशिवात्मकः अस्यप्रदानात्स कलाममसंतुमनोरथाः इयमेवप्रतिपत्कल्पादिरपि एवंवैशाखशुक्लतृतीयाफाल्गुनकृष्णतृती याशुक्लाचैत्रपंचमीमाघेत्रयोदशी कार्तिकेसप्तमीमार्गशीर्षेनवमीइत्यपिकल्पादयोबोध्याः आ सुश्राद्धात्पितृतृप्तिः चैत्रशुक्लप्रतिपत्मत्स्यजयंतीत्येके चैत्रेदधिक्षीरघृतमधुवर्जनदंपतीपूज** नात्मकंगौरीव्रतंकार्यम् चैत्रशुक्लद्वितीयायांनिशामुखे बालेंदुपूजनाद्यात्मकंचंद्रव्रतं अस्यामे वदमनकेनगौरीशिवपूजनं चैत्रशुक्लतृतीयायांगौरींशिवयुतांसंपूज्यांदोलनव्रतंमासपर्यंतंकार्यं अत्रतृतीयामुहूर्तमात्रापिपराग्राह्या द्वितीयायुक्तानकार्या चतुर्थीयुतायांवैधृत्यादियोगेपिसैव कार्या द्वितीयायोगनिषेधस्यबलवत्त्वात् अस्यामेवतृतीयायांश्रीरामचंद्रस्यदोलोत्सवमारभ्य **मासपर्यंतंपूजापूर्वकमांदोलनंकार्यम् एवंदेवतांतराणामपि इयमेवतृतीयामन्वादिरपि अत्रैव सर्वमन्वादिनिर्णयउच्यते तत्रमन्वादयश्चैत्रशुक्लतृतीयापौर्णमासीच ज्येष्ठेपौर्णिमा आषाढ स्यशुक्लदशमीपौर्णमासीच श्रावणस्यकृष्णाष्टमी भाद्रपदस्यशुक्लतृतीया आश्विनस्यशुक्लन वमी कार्तिकस्यशुक्लद्वादशीपौर्णमासीचपौषेशुक्लैकादशी माघेशुक्लसप्तमी फाल्गुनस्यपौर्ण** मास्यमावास्याचेतिचतुर्दशज्ञेयाः एतास्तुमन्वादयःशुक्लपक्षस्थाःदैवेपित्र्येकर्मणिपूर्वाण्हव्या पिन्योग्राह्याः पूर्वाण्होऽत्रद्वेधाविभक्तदिनपूर्वोभागस्तत्रैवश्राद्धादिविधानात् दैवान्मानुषा द्वापराधात्पूर्वाण्हेश्राद्धाद्यनुष्ठानासंभवेऽपराण्हव्यापिन्योग्राह्याः दिनपूर्वार्धेऽपराण्हेवाश्रा द्धाद्यनुष्ठेयं नतुदिनोत्तरार्धगतमध्यान्हभागेइतितात्पर्यं कृष्णपक्षस्थास्तुदैवेपित्र्येचकर्मणि **पंचधाविभक्तदिनचतुर्थभागाख्यापराण्हव्यापिन्योग्राह्याः मन्वादिषुपिंडरहितंश्राद्धंकार्यं**

अत्रश्राद्धैर्द्विसहस्रवर्षपितृणांतृप्तिः मन्वादिश्राद्धंचनित्यम् एतदकरणेत्वंभुवःप्रतिमानमिति ऋङ्मंत्रस्यशतवारंजलेजपःप्रायश्चित्तंकार्यम् एवंषण्णवतिश्राद्धान्यपिनित्यानि तानिच अमा १२ युग ४ मनु १४ क्रांति १२ धृति १२ पात १२ महालयाः १५ ॥ अष्टका ५अन्वष्टका ५ पूर्वेद्युः ५ श्राद्धैर्नवतिश्चषट्इतिज्ञेयानि ॥

## आतां तिथिनिर्णय सांगतों.

चैत्रशुद्ध प्रतिपदेच्या दिवसीं संवत्सराचा आरंभ होतो, त्याविषयीं प्रतिपदा सूर्योदयकालीं असेल ती घ्यावी. दोन दिवसीं सूर्योदयकालीं व्याप्ति असेल किंवा दोन्ही दिवसीं सूर्योदयकालीं नसेल तर पूर्वदिवसाची घ्यावी. चैत्रमास हा अधिकमास आला असेल तर नूतन वर्षाला आरंभ झाला ह्मणून तैलाभ्यंग करणें, संकल्पादिकांत नव्या वर्षाचा नामोच्चार करणें हीं मलमास प्रतिपदेच्या दिवसींच करावीं. प्रत्येकानें आपापल्या गृहाचे ठिकाणीं ध्वजारोपण करणें, निंबपत्रांचें भक्षण, संवत्सरफलाचें श्रवण, नवरात्राचा आरंभ, आणि नवरात्रसंबंधी उत्सव इत्यादिकांच्या निमित्तानें तैलाभ्यंग करणें हीं सर्व शुद्धमासप्रतिपदेच्या दिवसींच करावीं. नवीन वर्षाला आरंभ होतो या निमित्तानें तैलाभ्यंग करणें तोहि शुद्धमासाच्या प्रतिपदेच्या दिवसींच करावा, असें मयूखांत सांगितलें आहे. ह्या चैत्रशुद्ध प्रतिपदेच्या दिवसीं तैलाभ्यंग करणें हें नित्य आहे, आणि तो न केला असतां दोष आहे. ह्याच प्रतिपदेच्या दिवसीं देवीच्या नवरात्राचा प्रारंभ करावा. ह्या नवरात्राविषयीं प्रतिपदा घेणें ती द्वितीयेनें युक्त असी मुहूर्तमात्र असेल तथापि ती घ्यावी. एथें मुहूर्ताचें परिमाण असें–"दिवसाचा किंवा रात्रीचा कोणताहि पंधरावा जो भाग त्याला मुहूर्त असें ह्मणतात." याप्रमाणें सर्व ठिकाणीं मुहूर्तपरिमाण जाणावें. ह्या देवीनवरात्राचा पारणादिक विशेष निर्णय शारद नवरात्राप्रमाणें समजावा. ह्याच दिवसीं प्रपादान करावें. त्याविषयीं मंत्र–"प्रपेयं सर्वसामान्या भूतेभ्यः प्रतिपादिता ॥ अस्याः प्रदानात् पितरस्तृप्यंतुहि पितामहाः" ॥ "या मंत्रेंकरून चार महिनेपर्यंत यथेच्छ प्राणिमात्रास प्रपा ( पाणपोई ) घालून जलदान करावें, तेणेंकरून त्याचे पितर तृप्त होतात." चार महिनेपर्यंत पाणपोई घालण्यास ज्याला शक्ति नसेल त्यानें दररोज ब्राह्मणाच्या गृहीं उदकुंभ द्यावा. त्याचा मंत्र–"एष धर्मघटो दत्तो ब्रह्मविष्णुशिवात्मकः ॥ अस्य प्रदानात् सकला मम संतु मनोरथाः" ॥ हीच प्रतिपदा कल्पादिहि आहे. याप्रमाणें वैशाखशुक्ल तृतीया, फाल्गुनकृष्ण तृतीया, चैत्रांतील शुद्ध पंचमी, माघशुद्ध त्रयोदशी, कार्तिकशुद्ध सप्तमी, आणि मार्गशीर्षशुद्ध नवमी ह्याहि तिथि कल्पादि आहेत असें जाणावें. ह्या कल्पादि तिथींचे दिवसीं श्राद्ध केलें असतां पितरांची तृप्ति होते. चैत्रशुद्ध प्रतिपदा ही मत्स्यजयंती असें कोणी ह्मणतात. चैत्रमासांत दहीं, दूध, तूप आणि मध यांचा त्याग करून दंपतीपूजनात्मक असें गौरीचें व्रत करावें. चैत्रशुद्ध द्वितीयेचे दिवसीं प्रदोषकालीं बालेंदूचें पूजन इत्यादिक चंद्रव्रत करावें. ह्याच द्वितीयेचे दिवसीं दवण्यानें गौरीशिवांची पूजा करावी. चैत्रशुद्ध तृतीयेचे दिवसीं शिवयुक्त गौरीचें पूजन करून आंदोलनव्रत एक महिनापर्यंत करावें. ह्या व्रताविषयीं तृतीया मुहूर्तमात्र असेल तथापि दुसऱ्या दिवसाची

घ्यावी, द्वितीयायुक्त घेऊं नये. चतुर्थीयुक्त असून वैधृति इत्यादिक योग असेल तथापि द्वितीयायुक्त घेण्याविषयीं मोठा निषेध आहे यास्तव तीच घ्यावी. ह्या तृतीयेचे दिवसीं रामचंद्राच्या दोलोत्सवाचा आरंभ करून एक महिनापर्यंत दररोज पूजा करून आंदोलन करावें. याप्रमाणें इतरदेवांचेहि आंदोलनोत्सव करावे. ही तृतीया मन्वादिहि आहे, याकरितां एथेंच मन्वादि तिथींचा निर्णय सांगतों. चैत्रशुद्ध तृतीया, चैत्री पौर्णिमा, ज्येष्ठी पौर्णिमा, आषाढशुद्ध दशमी व पौर्णिमा, श्रावणकृष्ण अष्टमी, भाद्रपदशुक्ल तृतीया, आश्विनशुक्ल नवमी, कार्तिकशुक्ल द्वादशी व पौर्णिमा, पौषशुद्ध एकादशी, माघशुद्ध सप्तमी, आणि फाल्गुनांतील पौर्णिमा व अमावास्या, याप्रमाणें चवदा तिथि मन्वादि जाणाव्या. ह्या मन्वादि तिथि शुक्लपक्षांतील असतील तर, दैवकर्म आणि पित्र्यकर्म यांविषयीं पूर्वाण्हकालव्यापिनी घ्याव्या. दिवसाचे दोन भाग करून पहिला भाग तो पूर्वाण्हकाल. श्राद्धादिक करणें तें पूर्वाण्हकालींच करावें. देवसंबंधी किंवा मनुष्यसंबंधी कांहीं अडचण येऊन पूर्वाण्हकालीं श्राद्धादिक करण्यास न सांपडेल तर अपराण्हव्यापिनी घ्याव्या. दिवसाच्या पूर्वार्धकालीं किंवा अपराण्हीं श्राद्धादिक करावें, दिवसाच्या उत्तरार्धाच्या मध्यान्हभागांत करूं नये असें तात्पर्य-कृष्णपक्षांतील मन्वादि तिथि दैव, आणि पित्र्यकर्म यांविषयीं घेणें त्या दिवसाचे पांच भाग करून चवथा भाग जो अपराण्हकाल तत्कालव्यापिनी घ्याव्या. मन्वादि तिथींचे ठिकाणीं अपिंडक श्राद्ध करावें. ह्या तिथींचे दिवसीं श्राद्धें केल्यानें दोन सहस्र वर्षेंपर्यंत पितरांची तृप्ति होते. मन्वादि तिथींचे ठिकाणीं श्राद्ध नित्य आहे. हें श्राद्ध न केलें असतां "त्वं भुवः प्रतिमानं०" ह्या ऋक् ऋचेचा शंभर वेळ जप उदकांत उभें राहून करावा, हें प्रायश्चित्त करावें. असींच षण्णवति (९६) श्राद्धेंहि नित्य आहेत. तीं षण्णवति श्राद्धें असीं,–अमावास्यांचीं १२, युगादि ४, मन्वादि १४, संक्रांतींचीं १२, वैधृति १२, व्यतीपात १२, प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत दररोज याप्रमाणें महालय १५, अष्टका ५, अन्वष्टका ५, पूर्वेद्यु ५, याप्रमाणें ९६ श्राद्धें जाणावीं.

---

अथदशावतारजयंत्यः चैत्रशुक्लतृतीयायामपराण्हेमत्स्योत्पत्तिः वैशाखपूर्णिमायांसायंकूर्मोत्पत्तिः भाद्रपदशुक्लतृतीयायामपराण्हेवराहोत्पत्तिः वैशाखशुक्लचतुर्दश्यांसायंनारसिंहावतारः भाद्रपदशुक्लद्वादश्यांमध्यान्हेवामनप्रादुर्भावः वैशाखशुक्लतृतीयायांमध्यान्हेपरशुरामोद्भवः प्रदोषेइतिबहवः चैत्रशुक्लनवम्यांमध्यान्हेदाशरथिरामव्यक्तिः श्रावणकृष्णाष्टम्यांनिशीथेश्रीकृष्णाविर्भावः आश्विनशुक्लदशम्यांसायंबुद्धोऽभूत् श्रावणशुक्लषष्ठ्यांसायंकल्किर्जातइतितत्तत्कालव्यापिन्योग्राह्याः अत्रमत्स्यकूर्मवराहबुद्धकल्किनामाषाढादिमासांतराणिएकादश्यादितिथ्यंतराणिप्रातरादिकालांतराणिचवचनांतरानुसारेणोक्तानि कल्पभेदेनव्यवस्थापनीयानि स्वस्वपरिगृहीतपक्षानुसारेणतत्तदुपासकैरुपोष्याणिश्रीरामकृष्णनृसिंहजयंत्यएवनित्याःसर्वैरुपोष्याः चैत्रशुक्लचतुर्थ्यांमध्यान्हव्यापिन्यांलड्डुकादिभिः श्रीगणेशमर्चयित्वादमनकारोपणंकुर्यात् विघ्ननाशंसर्वान्कामान्प्राप्नुयात् चैत्रशुक्लपंचम्यामनंतादिनागान्पूजयित्वाक्षीरसर्पिर्नैवेद्यंदद्यात् अस्यामेवपंचम्यांलक्ष्मीपूजनं

अत्रैवचोक्तैः श्रवादिपूजनात्मकंहयव्रतमुक्तं अत्रसर्वत्रपंचमीसामान्यनिर्णयानुसारेणग्राह्या एवमग्रेपि यत्रविशेषनिर्णयोनोच्यतेतत्रप्रथमपरिच्छेदोक्तएवनिर्णयोऽनुसंधेयः षष्ठ्यांस्कंद स्यदमनकारोपणं सप्तम्यांभास्करस्यदमनकपूजा नवम्यांदेव्याःसर्वदेवानांपूर्णमास्यामित्यन्य त्रविस्तरः चैत्रशुक्लाष्टम्यांभवान्याउत्पत्तिः तत्रनवमीयुताअष्टमीग्राह्या अत्रपुनर्वसुयुताष्ट म्यामष्टाशोककलिकाप्राशनं तत्रमंत्रः त्वामशोकनराभीष्टमधुमाससमुद्भव पिबामिशोकसं तप्तोमामशोकंसदाकुर्विति अत्रैवयोगविशेषेकृत्यं पुनर्वसुबुधोपेताचैत्रेमासिसिताष्टमी प्रात स्तुविधिवत्स्नात्वावाजपेयफलंलभेदिति चैत्रशुक्लनवमीरामनवमी चैत्रशुक्लनवम्यांपुनर्वसु युतायांमध्यान्हेकर्कलग्नेमेषस्थेसूर्येउच्चस्थेग्रहपंचकेश्रीरामजन्मश्रवणात् अस्यांमध्याह्नव्या पिन्यामुपोषणंकार्यम् पूर्वेद्युरेवमध्यान्हेसत्त्वेसैवग्राह्यादिनद्वयेमध्यान्हव्याप्तावव्याप्तौवाप रा अष्टमीविद्धायाःनिषेधात् अतःपूर्वेद्युः सकलमध्यान्हव्यापिनीमपित्यक्त्वामध्यान्हैकदे शव्यापिन्यपिपरैवग्राह्या केचित्त्वष्टमीविद्धांमध्यान्हव्यापिनींपुनर्वसुयुतामपित्यक्त्वापरेद्यु स्त्रिमुहूर्तापिनवमीसर्वैरप्युपोष्या यदितुदशम्यान्हासवशेनपारणादिनेस्मार्तानामेकादशीव्रत प्राप्तिस्तदास्मार्तैरष्टमीविद्धोपोष्या वैष्णवैर्मुहूर्तत्रययुतापरैवोपोष्या शुद्धायानवम्याअलाभे मुहूर्तत्रयन्यूनत्वेवासर्वैरपिअष्टमीविद्धैवोपोष्येत्याहुः इदंव्रतंनित्यंकाम्यंच ॥

## आतां दशावतारजयंत्या सांगतों.

ज्या तिथीचे दिवसीं जो अवतार झाला त्या जन्मतिथीला **जयंती** असें ह्मणतात. चैत्र-शुद्ध तृतीयेचे दिवसीं अपराण्हकालीं मत्स्यावतार झाला, याकरितां चैत्रशुद्ध तृतीया ही **मत्स्य-जयंती**, याप्रमाणें सर्वांच्या जयंत्या जाणाव्या. वैशाख पौर्णिमेच्या दिवसीं सायंकालीं कूर्माव-तार झाला. भाद्रपदशुद्ध तृतीयेचे दिवसीं अपराण्हकालीं वराहावतार झाला. वैशाखशुद्ध च-तुर्दशीचे दिवसीं सायंकालीं नारसिंहावतार झाला. भाद्रपदशुद्ध द्वादशीचे दिवसीं मध्यान्ह-कालीं वामनावतार झाला. वैशाखशुद्ध तृतीयेचे दिवसीं मध्यान्हकालीं परशुरामावतार झाला, प्रदोषकालीं झाला असें पुष्कळ ग्रंथकार ह्मणतात. चैत्रशुद्ध नवमीचे दिवसीं मध्यान्हीं दाश-रथि रामाचा अवतार झाला. श्रावणकृष्ण अष्टमीचे दिवसीं मध्यरात्रीस श्रीकृष्णावतार झाला. आश्विनशुद्ध दशमीचे दिवसीं सायंकालीं बौद्धावतार झाला. श्रावणशुक्ल षष्ठीचे दिवसीं सायं-कालीं कल्कीचा अवतार झाला. याप्रमाणें ज्या ज्या कालीं जो जो अवतार झाला असेल त्या त्या कालीं व्याप्ति पाहून जयंतीतिथींचा निर्णय करावा. ह्यांमध्यें मत्स्य, कूर्म, वराह, बुद्ध, आणि कल्की यांच्या अवतारांविषयीं आषाढादिक दुसरे मास, एकादशी इत्यादिक दु-सऱ्या तिथि, आणि प्रातःकालादिक दुसरे काल असे, दुसऱ्या वचनांच्या प्रमाणांवरून काल-भेद सांगितले आहेत, त्यापेक्षां कल्पभेदेंकरून त्यांची व्यवस्था करावी आणि ज्यांणीं जो पक्ष स्वीकारिला असेल तदनुसार त्या त्या भक्तांनीं त्या त्या दिवसीं उपोषणें करावीं. ह्या जयं-तींमध्यें श्रीरामजयंती, कृष्णजयंती आणि नृसिंहजयंती ह्या मात्र नित्य आहेत, याकरितां त्या दिवसीं सर्वांनीं उपोषण करावें. मध्यान्हकालव्यापिनी अशा चैत्रशुक्ल चतुर्थीचे दिवसीं लाडू इत्यादिकांनीं गणपतीची पूजा करून दवणा वाहावा, तेणेंकरून विघ्नांचा नाश होऊन सकल

मनोरथ सफल होतात. चैत्रशुद्ध पंचमीचे दिवसीं अनंतादिक नागांची पूजा करून दूधतुपाचा नैवेद्य समर्पण करावा. ह्याच पंचमीचे दिवसीं लक्ष्मीची पूजा करावी, ह्याच दिवसीं उच्चैःश्रवा इत्यादिकांचें पूजारूप हयव्रत करावें. ह्या सर्व व्रतांविषयीं पंचमी, सामान्य निर्णय सांगितला आहे त्याप्रमाणें घ्यावी व पुढेंहि असेंच समजावें. जेथें विशेष निर्णय सांगितला नाहीं तेथें प्रथम परिच्छेदांत सांगितलेला तोच निर्णय घ्यावा. षष्ठीचे दिवसीं षडाननाला दवणा वाहावा. सप्तमीचे दिवसीं सूर्याला, नवमीचे दिवसीं देवीला, पौर्णिमेचे दिवसीं सर्व देवांला दवणा वाहावा, असा ग्रंथांतरीं विस्तार सांगितला आहे. चैत्रशुद्ध अष्टमीचे दिवसीं भवानीदेवीचा अवतार झाला, त्याविषयीं अष्टमी, नवमीयुक्त असेल ती घ्यावी. ह्या अष्टमीचे दिवसीं पुनर्वसु नक्षत्र असेल तर अशोकवृक्षाच्या आठ कळ्या प्राशन कराव्या. कळ्या भक्षणाचा मंत्र– " त्वामशोक नराभीष्ट मधुमाससमुद्भव ॥ पिबामि शोकसंतप्तो मामशोकं सदा कुरु " ॥ ह्या दिवसीं योगविशेष असतां कृत्य " चैत्रमास, शुक्लपक्षांतील अष्टमी, पुनर्वसु नक्षत्र, बुधवार, असा योग असेल तर प्रातःकालीं यथाविधि स्नान केलें असतां वाजपेय यज्ञाचें फल मिळतें. " चैत्रशुद्ध नवमी हिला रामनवमी असें ह्मणतात. ह्या नवमीचे दिवसीं पुनर्वसु नक्षत्र, मध्यान्हसमय, कर्कलग्न, मेषींचा सूर्य, उच्चींचे पांच ग्रह असा योग असतां श्रीरामाचें जन्म ( अवतार ) झालें. उपोषण करणें तें मध्यान्हव्यापिनी नवमीचे दिवसीं करावें. पूर्वदिवसींच मध्यान्हव्याप्ति असेल तर तीच घ्यावी. दोन दिवसीं मध्यान्हव्याप्ति असेल अथवा दोन दिवसीं मध्यान्हव्याप्ति नसेल तर अष्टमीविद्ध घेऊं नये असा निषेध आहे याकरितां दुसऱ्या दिवसाची घ्यावी, जरी पूर्व दिवसीं संपूर्ण मध्यान्हकालव्याप्ति असेल तथापि ती टाकून दुसऱ्या दिवसीं मध्यान्हकालीं एकदेशव्याप्ति असेल ती घ्यावी. कोणी ग्रंथकार, अष्टमीनें विद्ध असून मध्यान्हकालव्यापिनी, आणि पुनर्वसु नक्षत्रेंकरून युक्त असी असेल तथापि ती टाकून दुसऱ्या दिवसीं सहा घटिका नवमी असेल तीच सर्वांनीं उपोषणाविषयीं घ्यावी, आणि जर दशमीचा क्षय होऊन पारणेच्या दिवसीं स्मार्तांचें एकादशीव्रत प्राप्त होईल तर स्मार्तांनीं अष्टमीविद्ध असी उपोषणाविषयीं घ्यावी. वैष्णवांनीं सहा घटिकांनीं युक्त असी दुसऱ्या दिवसाचीच उपोषणाला घ्यावी, शुद्धनवमी न मिळेल किंवा दुसऱ्या दिवसीं सहा घटिकांहून नवमी कमी असेल तर सर्वांनीं अष्टमीविद्ध असेल तीच उपोषणाविषयीं घ्यावी, असें ह्मणतात हें नवमीचें व्रत नित्य आणि काम्य असें दोन प्रकारचें आहे.

---

अथव्रतप्रयोगः अष्टम्यामाचार्यंसंपूज्य श्रीरामप्रतिमादानंकरिष्येऽहंद्विजोत्तम तत्राचार्योभवप्रीतःश्रीरामोसित्वमेवमे इतिप्रार्थ्य नवम्याअंगभूतेनएकभक्तेनराघव इक्ष्वाकुवंशतिलकप्रीतोभवभवप्रियेत्येकभक्तंसंकल्प्यसाचार्योहविष्यंभुंजीत पूजामंडपंतत्रवेदिंचकृत्वानवम्यां प्रातः उपोष्यनवमींत्वद्ययामेष्वष्टसुराघव तेनप्रीतोभवत्वंमेसंसारात्राहिमांहरेइत्युपोषणं संकल्प्य इमांस्वर्णमयींरामप्रतिमांत्वांप्रयत्नतः श्रीरामप्रीतयेदास्येरामभक्तायधीमतेइतिप्रतिमादानंसंकल्पयेत् श्रीरामनवमीव्रतांगभूतांषोडशोपचारैःश्रीरामपूजांकरिष्येइतिसंकल्प्य वेदिकायांसर्वतोभद्रेकलशंसंस्थाप्यतत्रपूर्णपात्रेसवस्त्रेग्न्युत्तारणादिविधिनाप्रतिमायांश्रीरामं

प्रतिष्ठाप्यपुरुषसूक्तेनषोडशोपचारैःसंपूज्यपुष्पपूजांते रामस्यजननीचासिरामात्मकमिदंजगत् अतस्त्वांपूजयिष्यामिलोकमातर्नमोस्तुते इतिकौसल्यांसंपूज्य ॐनमोदशरथायेतिदशरथंसंपूज्यसर्वपूजांसमाप्यमध्यान्हेफलपुष्पजलादिपूर्णेनशंखेनार्घ्यंदद्यात् तत्रमंत्रः दशाननवधार्थायधर्मसंस्थापनायच दानवानांविनाशाय दैत्यानांनिधनायच परित्राणायसाधूनांजातोरामः स्वयंहरिः गृहाणार्घ्यंमयादत्तंभ्रातृभिःसहितोनघेति रात्रौजागरणंकृत्वाप्रातर्नित्यपूजांविधायमूलमंत्रेणपायसाष्टोत्तरशताहुतीर्हुत्वापूजांविसृज्याचार्यायप्रतिमांदद्यात् इमांस्वर्णमयींरामप्रतिमांसमलंकृतां शुचिवस्त्रयुगच्छन्नांरामोऽहंराघवायते श्रीरामप्रीतयेदास्येतुष्टोभवतुराघवइतिमंत्रः तवप्रसादंस्वीकृत्यक्रियतेपारणामया व्रतेनानेनसंतुष्टःस्वामिन्भक्तिंप्रयच्छमेइति प्रार्थ्य नवम्यांतेपारणांकुर्यात् इदंव्रतंमलमासेऽनकार्यं एवंजन्माष्टम्यादिव्रतमपिनकार्यं अस्यामेवनवम्यांदेवीनवरात्रसमाप्तिःकार्या एतन्निर्णयआश्विननवरात्रनवमीवत् ॥

## आतां नवमीव्रताचा प्रयोग सांगतों.

अष्टमीचे दिवशीं उपाध्यायाची पूजा करावी आणि—"**श्रीरामप्रतिमादानं करिष्येऽहं द्विजोत्तम ॥ तत्राचार्यो भव प्रीतः श्रीरामोऽसि त्वमेव मे,**" या मंत्रेंकरून त्याची प्रार्थना करून नंतर, "**नवम्या अंगभूतेन एकभक्तेन राघव ॥ इक्ष्वाकुवंशतिलक प्रीतोभव भवप्रिय,**" या मंत्रेंकरून एकभुक्ताचा संकल्प करून उपाध्यायासह हविष्यान्न भोजन करावें. तेथें पूजेकरितां मंडप व वेदी करून नवमीचे दिवशीं प्रातःकालीं, "**उपोष्यनवमींत्वद्य यामेष्वष्टसु राघव ॥ तेन प्रीतो भव त्वं मे संसारात् त्राहि मां हरे,**" या मंत्रेंकरून उपोषणाचा संकल्प करून नंतर, "**इमां स्वर्णमयीं रामप्रतिमां त्वांप्रयत्नतः ॥ श्रीरामप्रीतये दास्ये रामभक्ताय धीमते,**" ह्या मंत्रेंकरून प्रतिमादानाचा संकल्प करावा. मग, "**श्रीरामनवमीव्रतांगभूतां, षोडशोपचारैः श्रीरामपूजां करिष्ये,**" असा संकल्प करून वेदीवर सर्वतोभद्रमंडल घालून त्या मंडलावर कलशाची स्थापना करून मग त्या कलशावर पूर्णपात्र ठेवून त्याच्या सभोंवार वस्त्राचें वेष्टन करावें. नंतर पूर्णपात्रामध्यें, अग्न्युत्तारणविधीनें प्रतिमेचे ठिकाणीं श्रीरामाची स्थापना करून पुरुषसूक्ताच्या सोळा ऋचांनीं पूजा करून पुष्पपूजा झाल्यानंतर, "**रामस्य जननी चासि रामात्मकमिदं जगत् ॥ अतस्त्वां पूजयिष्यामि लोकमातर्नमोऽस्तु ते,**" ह्या मंत्रानें कौसल्येचें पूजन करून "**ॐनमो दशरथाय**" या मंत्रेंकरून दशरथाची पूजा करावी. सर्व पूजा समाप्त झाल्यावर मध्यान्हकालीं फल, पुष्प, गंध, इत्यादि उदकांत घालून तें उदक शंखांत घालून शंखानें अर्घ्य द्यावें. अर्घ्याचा मंत्र—"**दशाननवधार्थाय धर्मसंस्थापनायच ॥ दानवानांविनाशाय दैत्यानां निधनायच ॥ परित्राणाय साधूनां जातो रामः स्वयं हरिः ॥ गृहाणार्घ्यं मया दत्तं भ्रातृभिः सहितोऽनघ**"॥ याप्रमाणें अर्घ्य द्यावें. रात्रीं जागरण करून प्रातःकालीं नित्यपूजा करून मग मूलमंत्रानें पायसाच्या अष्टोत्तरशत (१०८) आहुति हवन करून पूजेचें विसर्जन करावें, आणि उपाध्यायाला प्रतिमेचें दान करावें. दानाचा मंत्र—"**इमां स्वर्णमयीं रामप्रतिमां समलंकृतां ॥ शुचिवस्त्रयुगच्छन्नां रामोऽहं राघवाय ते ॥ श्रीरामप्रीतये दास्ये तुष्टो भवतु राघवः**" ॥ असें

दान करून प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र–“ तव प्रसादं स्वीकृत्य क्रियते पारणा मया ॥ व्रतेनानेन संतुष्टः स्वामिन् भक्तिं प्रयच्छ मे ” ॥ याप्रमाणें प्रार्थना झाल्यानंतर नवमीच्या अंतीं पारणा करावी. हें व्रत मलमासांत करूं नये. याप्रमाणें जन्माष्टम्यादिक व्रतें सुद्धां मलमासांत करूं नयेत. याच नवमीचे दिवसीं देवीनवरात्राची समाप्ति करावी, व याच्या समाप्तीचा निर्णय आश्विन मासांतील नवरात्राच्या नवमीप्रमाणें जाणावा.

---

चैत्रशुक्लैकादश्यांश्रीकृष्णस्यांदोलनोत्सवः दोलारूढंप्रपश्यंतिकृष्णंकलिमलापहं अपराधसहस्रैस्तुमुक्तास्तेधूननेकृते तावत्तिष्ठंतिपापानिजन्मकोटिकृतान्यपि क्रीडंतेविष्णुनासार्धंवैकुंठेदेवपूजिताइत्यादिकस्तन्महिमा चैत्रशुक्लद्वादश्यांविष्णोर्दमनोत्सवः सचपारणाहे पारणाहेनलभ्येतद्वादशीघटिकापिचेत् तदात्रयोदशीग्राह्यापवित्रदमनार्पणेइत्युक्तेशिवस्यतुचतुर्दश्यांकार्यः ॥

चैत्रशुक्ल एकादशीचे दिवसीं श्रीकृष्णाचा आंदोलनोत्सव ( झोंपा देणें ) करावा. “ कलिसंबंधी पातकांचा नाश करणारा जो कृष्ण तो दोलारूढ झाला असें जे पाहातात ते सहस्रशः अपराधांपासून मुक्त होतात. आंदोलन केलें असतां कोटिशः जन्मार्चीं पातकें दूर होऊन वैकुंठाचे ठिकाणीं देवांला पूज्य होत्साते विष्णूसह क्रीडा करितात,” असा त्या आंदोलन उत्सवाचा महिमा आहे. चैत्रशुक्ल द्वादशीचे दिवसीं विष्णूचा दमनोत्सव करावा. “ पारणेच्या दिवसीं एक घटिकासुद्धां द्वादशी न मिळेल तर पवित्र, दमनोत्सव यांविषयीं त्रयोदशी घ्यावी,” असें वचन आहे यास्तव तो पारणेच्या दिवसीं करावा. शिवाचा दमनोत्सव चतुर्दशीचे दिवसीं करावा.

---

अथप्रयोगः उपवासदिनेनित्यपूजांकृत्वादमनकस्थानंगत्वाक्रयेणतमादायचंदनादिनासंपूज्यश्रीकृष्णपूजार्थंत्वांनेष्येइतिप्राथ्र्यप्रणमेत् अन्यदेवतासुयथादैवतमूहः ततोदमनकंगृहमानीयपंचगव्येनशुद्धोदकेनचप्रक्षाल्यदेवाग्रेस्थापयित्वातस्मिन्दमनकेअशोककालवसंतकामान्काममात्रंवागंधादिभिःपूजयेत् तत्रनमोस्तुपुष्पबाणायजगदाल्हादकारिणेमन्मथायजगन्नेत्रेरतिप्रीतिप्रियायतेइतिकामावाहनमंत्रः कामभस्मसमुद्भूतरतिबाष्पपरिप्लुत ऋषिगंधर्वदेवादिविमोहकनमोस्तुतेइतिदमनकमुपस्थाय ॐ कामायनमइतिमंत्रेणसपरिवारायकामरूपिणेदमनकायगंधाद्युपचारान्दद्यात् ततोरात्रौदेवंसंपूज्याधिवासनंकुर्यात् तदित्थं देवाग्रेसर्वतोभद्रंसंपाद्यतत्रकलशंसंस्थाप्यतत्रधौतवस्त्राच्छन्नंदमनकं वैणवपटलेस्थापितंनिधाय पूजार्थंदेवदेवस्यविष्णोर्लक्ष्मीपतेःप्रभो दमनत्वमिहागच्छसान्निध्यंकुरुतेनमइतिदमनकदेवतामावाह्यप्रागाद्यष्टदिक्षुक्लींकामदेवायनमोन्ह्रींरत्यैनमः १ क्लींभस्मशरीरायनमोन्ह्रींरत्यैनमः २ क्लींअनंगायनमोन्ह्रींरत्यै० ३ क्लींमन्मथायनमोन्ह्रींरत्यै० ४ क्लींवसंतसखायनमोन्ह्रींरत्यै० ५ क्लींस्मरायनमोन्ह्रींरत्यै० ६ क्लींइक्षुचापायनमोन्ह्रींरत्यै० ७ क्लींपुष्पबाणायनमोन्ह्रींरत्यै० ८ इतिपूजयेत् तत्पुरुषायविद्महेकामदेवायधीमहि तन्नोऽनंगःप्रचोदयात् इतिगायत्र्यादमनकमष्टोत्तरशतमभिमंत्र्यगंधादिभिःसंपूज्य न्ह्रींनमइतिपुष्पांजलिंदत्वानमोस्तुपुष्पबाणायेतिपूर्वो

त्त्वावाहनमंत्रेणनमेत् क्षीरोदधिमहानागशय्यावस्थितविग्रह प्रातस्त्वांपूजयिष्यामिसन्निधौभ वतेनमइतिदेवंप्रार्थ्यपुष्पांजलिंदत्वातस्यामेकादश्यांरात्रौजागरणंकुर्यात् प्रातर्नित्यपूजांकृत्वा पुनर्देवंसंपूज्यदूर्वागंधाक्षतयुतांदमनकमंजरीमादायमूलमंत्रंपठित्वा देवदेवजगन्नाथवांछितार्थ प्रदायक हृत्स्थान्पूरयमेविष्णोकामान्कामेश्वरीप्रिय इदंदमनकंदेवगृहाणमदनुग्रहात् इ मांसांवत्सरींपूजांभगवन्परिपूरय पुनर्मूलंजप्त्वादेवेदमनमर्पयेत् ततोयथाशोभंदत्वांगदेवता भ्योदत्वादेवंप्रार्थयेत् मणिविद्रुममालाभिर्मंदारकुसुमादिभिः इयंसांवत्सरीपूजातवास्तुगरुड ध्वज वनमालांयथादेवकौस्तुभंसंततंहृदि तद्वद्दामनकींमालांपूजांचहृदयेवह जानताजानता वापिनकृतंयत्तवार्चनं ॥ तत्सर्वंपूर्णतांयातुत्वत्प्रसादाद्रमापते जितंतेपुंडरीकाक्षनमस्तेविश्वभा वन हृषीकेशनमस्तेस्तुमहापुरुषपूर्वज मंत्रहीनंक्रियाहीनमित्यादिचसंप्रार्थ्यपंचोपचारैर्देवंसंपू ज्यनीराज्यब्राह्मणेभ्योदमनंदत्वास्वयंशेषंसंधार्यसुहृद्युतःपारणांकुर्यात् मंत्रदीक्षारहितैर्नाम्ना र्पणीयं अस्यगौणकालः श्रावणमासावधिः नेदंमलमासेभवति शुक्रास्तादौतुकर्तव्यं इतिदम नारोपणविधिः अस्यामेवभारतेअहोरात्रेणद्वादश्यांचैत्रेविष्णुरितिस्मरन् पुंडरीकमवाप्नोति देवलोकंचगच्छतीति ॥

## आतां दमनक उत्सवाचा प्रयोग सांगतों.

उपोषणाच्या दिवसीं नित्यपूजा करून जेथें दवणा मिळतो तेथें जाऊन दवणा विकत घ्यावा. नंतर गंध, पुष्प, धूप इत्यादिकानें पूजा करून श्रीकृष्णपूजेकरितां तुला नेतों असी प्रार्थना करून नमस्कार करावा. दुसऱ्या देवतांविषयीं जी देवता असेल तिचा ऊह करावा. नंतर दवणा घरीं आणून पंचगव्यानें आणि उदकानें प्रक्षालन करून देवाच्या पुढें ठेवावा. नंतर त्या दवण्याचे ठिकाणीं अशोक, काल, वसंत, काम ह्या देवतांची, किंवा कामाची गंधादिकानें पूजा करावी. " नमोस्तु पुष्पबाणाय जगदाल्हादकारिणे ॥ मन्मथाय जगन्नेत्र रतिप्रीतिप्रियाय ते, " ह्या मंत्रेंकरून कामाचें आवाहन करावें. नंतर " काम भस्मसमुद्भूत रतिबाष्पपरिप्लुत ॥ ऋषिगंधर्वदेवादिविमोहक नमोस्तु ते, " या मंत्रेंकरून दवण्याची प्रार्थना करावी. " क्लींकामाय नमः " ह्या मंत्रेंकरून परिवारयुक्त अशा कामरूपी दवण्याला गंधादिक उपचार अर्पण करावे. तदनंतर रात्रीं देवाची पूजा करून अधिवासन करावें. तें असें—देवाच्या अग्रभागीं सर्वतोभद्रमंडल घालून त्याच्यावर कलशस्थापना करून त्या कलशावर धौतवस्त्रानें आच्छादित असा दवणा वंशपात्रांत ठेवावा. नंतर " पूजार्थं देवदेवस्य विष्णोर्लक्ष्मीपतेः प्रभो ॥ दमन त्वमिहागच्छ सान्निध्यं कुरु ते नमः " ह्या मंत्रानें दमनकदेवतेचें आवाहन करून पूर्वादिक आठ दिशांचे ठिकाणीं पुढें सांगतों ह्या आठ मंत्रेंकरून पूजा करावी. " क्लीं कामदेवाय नमो ऱ्हीं रत्यै नमः १, क्लीं भस्मशरीराय नमो ऱ्हीं रत्यै नमः २, क्लीं अनंगाय नमो ऱ्हीं रत्यै नमः ३, क्लीं मन्मथाय नमो ऱ्हीं रत्यै नमः ४, क्लीं वसंतसखाय नमो ऱ्हीं रत्यै नमः ५, क्लीं स्मराय नमो ऱ्हीं रत्यै नमः ६, क्लीं इक्षुचापाय नमो ऱ्हीं रत्यै नमः ७, क्लीं पुष्पबाणास्त्राय नमो ऱ्हीं रत्यै नमः ८, " असी पूजा करून नंतर, " तत्पुरुषाय विद्महे कामदेवाय धीमहि ॥ तन्नोऽनंगः प्रचोदयात् "

दान करून प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र—" तव प्रसादं स्वीकृत्य क्रियते पारणा मया॥ व्रतेनानेन संतुष्टः स्वामिन् भक्तिं प्रयच्छ मे " ॥ याप्रमाणें प्रार्थना झाल्यानंतर नवमीच्या अंतीं पारणा करावी. हें व्रत मलमासांत करूं नये. याप्रमाणें जन्माष्टम्यादिक व्रतें सुद्धां मलमासांत करूं नयेत. याच नवमीचे दिवसीं देवीनवरात्राची समाप्ति करावी, व याच्या समाप्तीचा निर्णय आश्विन मासांतील नवरात्राच्या नवमीप्रमाणें जाणावा.

---

चैत्रशुक्लैकादश्यांश्रीकृष्णस्यांदोलनोत्सवः दोलारूढंप्रपश्यंतिकृष्णंकलिमलापहं अपराधसहस्रैस्तुमुक्तास्तेधूननेकृते तावत्तिष्ठंतिपापानिजन्मकोटिकृतान्यपि क्रीडंतेविष्णुनासार्धंवैकुंठेदेवपूजिताइत्यादिकस्तन्महिमा चैत्रशुक्लद्वादश्यांविष्णोर्दमनोत्सवः सचपारणाहे पारणाहेनलभ्येतद्वादशीघटिकापिचेत् तदात्रयोदशीग्राह्यापवित्रदमनार्पणेइत्युक्तेशिवस्यतुचतुर्दश्यांकार्यः ॥

चैत्रशुक्ल एकादशीचे दिवसीं श्रीकृष्णाचा आंदोलनोत्सव ( झोंपा देणें ) करावा. " कलिसंबंधी पातकांचा नाश करणारा जो कृष्ण तो दोलारूढ झाला असें जे पाहातात ते सहस्रशः अपराधांपासून मुक्त होतात. आंदोलन केलें असतां कोटिशः जन्माचीं पातकें दूर होऊन वैकुंठाचे ठिकाणीं देवांला पूज्य होत्साते विष्णूसह क्रीडा करितात," असा त्या आंदोलन उत्सवाचा महिमा आहे. चैत्रशुक्ल द्वादशीचे दिवसीं विष्णूचा दमनोत्सव करावा. " पारणेच्या दिवसीं एक घटिकासुद्धां द्वादशी न मिळेल तर पवित्र, दमनोत्सव यांविषयीं त्रयोदशी घ्यावी," असें वचन आहे यास्तव तो पारणेच्या दिवसीं करावा. शिवाचा दमनोत्सव चतुर्दशीचे दिवसीं करावा.

---

अथप्रयोगः उपवासदिनेनित्यपूजांकृत्वादमनकस्थानंगत्वाक्रयेणतमादायचंदनादिनासंपूज्यश्रीकृष्णपूजार्थंत्वांनेष्येइतिप्राथ्यंप्रणमेत् अन्यदेवतासुयथादैवतमूहः ततोदमनकंगृहमानीयपंचगव्येनशुद्धोदकेनचप्रक्षाल्यदेवाग्रेस्थापयित्वातस्मिन्दमनकेअशोककालवसंतकामान्काममात्रंवागंधादिभिःपूजयेत् तत्रनमोस्तुपुष्पबाणायजगदाल्हादकारिणेमन्मथायजगन्नेत्रेरतिप्रीतिप्रियायतेइतिकामावाहनमंत्रः कामभस्मसमुद्भूतरतिबाष्पपरिप्लुत ऋषिगंधर्वदेवादिविमोहकनमोस्तुतेइतिदमनकमुपस्थाय ॐ कामायनमइतिमंत्रेणसपरिवारायकामरूपिणेदमनकायगंधाद्युपचारान्दद्यात् ततोरात्रौदेवंसंपूज्याधिवासनंकुर्यात् तदित्थं देवाग्रेसर्वतोभद्रंसंपाद्यतत्रकलशंसंस्थाप्यतत्रधौतवस्त्राच्छन्नंदमनकं वैणवपटलेस्थापितंनिधाय पूजार्थंदेवदेवस्यविष्णोर्लक्ष्मीपतेःप्रभो दमनत्वमिहागच्छसान्निध्यंकुरुतेनमइतिदमनकदेवतामावाह्यप्रागाद्यष्टदिक्षुक्लींकामदेवायनमोऱ्हींरत्यैनमः १ क्लींभस्मशरीरायनमोऱ्हींरत्यैनमः २ क्लींअनंगायनमोऱ्हींरत्यै० ३ क्लींमन्मथायनमोऱ्हींरत्यै० ४ क्लींवसंतसखायनमोऱ्हींरत्यै० ५ क्लींस्मरायनमोऱ्हींरत्यै० ६ क्लींइक्षुचापायनमोऱ्हींरत्यै० ७ क्लींपुष्पबाणायनमोऱ्हींरत्यै० ८ इतिपूजयेत् तत्पुरुषायविद्महेकामदेवायधीमहि तन्नोऽनंगःप्रचोदयात् इतिगायत्र्यादमनकमष्टोत्तरशतमभिमंत्र्यगंधादिभिःसंपूज्य ऱ्हींनमइतिपुष्पांजलिंदत्वानमोस्तुपुष्पबाणायेतिपूर्वो

त्वावाहनमंत्रेणनयेत् क्षीरोदधिमहानागशय्यावस्थितविग्रह प्रातस्त्वांपूजयिष्यामिसंनिधौभ वतेनमइतिदेवंप्रार्थ्यपुष्पांजलिंदत्वातस्यामेकादश्यांरात्रौजागरणंकुर्यात् प्रातर्नित्यपूजांकृत्वा पुनर्देवंसंपूज्यदूर्वागंधाक्षतयुतांदमनकमंजरीमादायमूलमंत्रंपठित्वा देवदेवजगन्नाथवांछितार्थ प्रदायक हृत्स्थान्पूरयमेविष्णोकामान्कामेश्वरीप्रिय इदंदमनकंदेवगृहाणमदनुग्रहात् इ मांसांवत्सरींपूजांभगवन्परिपूरय पुनर्मूलंजप्त्वादेवेदमनमर्पयेत् ततोयथाशोभंदत्वांगदेवता भ्योदत्वादेवंप्रार्थयेत् मणिविद्रुममालाभिर्मंदारकुसुमादिभिः इयंसांवत्सरीपूजातवास्तुगरुड ध्वज वनमालांयथादेवकौस्तुभंसंततंहृदि तद्वद्दामनकींमालांपूजांचहृदयेवह जानताजानता वापिनकृतंयत्तवार्चनं ॥ तत्सर्वंपूर्णतांयातुत्वत्प्रसादाद्रमापते जितंतेपुंडरीकाक्षनमस्तेविश्वभा वन हृषीकेशनमस्तेस्तुमहापुरुषपूर्वज मंत्रहीनंक्रियाहीनमित्यादिचसंप्रार्थ्यपंचोपचारैर्देवंसंपू ज्यनीराज्यब्राह्मणेभ्योदमनंदत्वास्वयंशेषंसंधार्यसुहृद्युतःपारणांकुर्यात् मंत्रदीक्षारहितैर्नाम्ना र्पणीयं अस्यगौणकालः श्रावणमासावधिः नेदंमलमासेभवति शुक्रास्तादौतुकर्तव्यं इतिदम नारोपणविधिः अस्यामेवभारतेअहोरात्रेणद्वादश्यांचैत्रेविष्णुरितिस्मरन् पुंडरीकमवाप्नोति देवलोकंचगच्छतीति ॥

## आतां दमनक उत्सवाचा प्रयोग सांगतों.

उपोषणाच्या दिवशीं नित्यपूजा करून जेथें दवणा मिळतो तेथें जाऊन दवणा विकत घ्यावा. नंतर गंध, पुष्प, धूप इत्यादिकानें पूजा करून श्रीकृष्णपूजेकरितां तुला नेतों असी प्रार्थना करून नमस्कार करावा. दुसऱ्या देवतांविषयीं जी देवता असेल तिचा ऊह करावा. नंतर दवणा घरीं आणून पंचगव्यानें आणि उदकानें प्रक्षालन करून देवाच्या पुढें ठेवावा. नंतर त्या दवण्याचे ठिकाणीं अशोक, काल, वसंत, काम ह्या देवतांची, किंवा कामाची गंधादिकानें पूजा करावी. " नमोस्तु पुष्पबाणाय जगदाल्हादकारिणे ॥ मन्मथाय जगन्नेत्र रतिप्रीतिप्रियाय ते, " ह्या मंत्रेंकरून कामाचें आवाहन करावें. नंतर " काम भस्मसमुद्भूत रतिबाष्पपरिप्लुत ॥ ऋषिगंधर्वदेवादिविमोहक नमोस्तु ते, " या मंत्रेंकरून दवण्याची प्रार्थना करावी. " क्लींकामाय नमः " ह्या मंत्रेंकरून परिवारयुक्त अशा कामरूपी दवण्याला गंधादिक उपचार अर्पण करावे. तदनंतर रात्रीं देवाची पूजा करून अधिवासन करावें. तें असें—देवाच्या अग्रभागीं सर्वतोभद्रमंडल घालून त्याच्यावर कलशस्थापना करून त्या कलशावर धौतवस्त्रानें आच्छादित असा दवणा वंशपात्रांत ठेवावा. नंतर " पूजार्थं देवदेवस्य विष्णोर्लक्ष्मीपतेः प्रभो ॥ दमन त्वमिहागच्छ सान्निध्यं कुरु ते नमः " ह्या मंत्रानें दमनकदेवतेचें आवाहन करून पूर्वादिक आठ दिशांचे ठिकाणीं पुढें सांगतों ह्या आठ मंत्रेंकरून पूजा करावी. " क्लीं कामदेवाय नमो ऱ्हीं रत्यै नमः १, क्लीं भस्मशरीराय नमो ऱ्हीं रत्यै नमः २, क्लीं अनंगाय नमो ऱ्हीं रत्यै नमः ३, क्लीं मन्मथाय नमो ऱ्हीं रत्यै नमः ४, क्लीं वसंतसखाय नमो ऱ्हीं रत्यै नमः ५, क्लीं स्मराय नमो ऱ्हीं रत्यै नमः ६, क्लीं इक्षुचापाय नमो ऱ्हीं रत्यै नमः ७, क्लीं पुष्पबाणाय नमो ऱ्हीं रत्यै नमः ८, " असी पूजा करून नंतर, " तत्पुरुषाय विद्महे कामदेवाय धीमहि ॥ तन्नोऽनंगः प्रचोदयात् "

ह्या मंत्रानें दवण्याला अष्टोत्तरशत ( १०८ ) वेळां अभिमंत्रण करून गंधादिकांनीं पूजा करावी. नंतर "ऱ्हीं नमः" ह्या मंत्रेंकरून पुष्पांजलि अर्पण करून "नमोस्तु पुष्पबाणाय०" ह्या पूर्वी सांगितलेल्या मंत्रानें नमस्कार करावा. नंतर "क्षीरोदधिमहानागशय्यावस्थितविग्रह ॥ प्रातस्त्वां पूजयिष्यामि सन्निधौ भव ते नमः," ह्या मंत्रेंकरून देवाची प्रार्थना करून पुष्पांजलि द्यावी. आणि त्या एकादशीचे दिवसीं रात्रीं जागरण करावें. नंतर सकाळीं नित्यपूजा करून पुनः देवाची पूजा करून दूर्वा, गंध, अक्षता यांहीं युक्त असी दवण्याची मंजरी घेऊन मूलमंत्र पठण करून "देवदेव जगन्नाथ वांछितार्थप्रदायक ॥ हृत्स्थान् पूरय मे विष्णो कामान् कामेश्वरीप्रिय ॥ इदं दमनकं देव गृहाण मदनुग्रहात् ॥ इमां सांवत्सरीं पूजां भगवन्परिपूरय" ॥ असे हे मंत्र ह्मणून पुनः मूलमंत्राचा जप करून देवाला दवणा अर्पण करावा. मग सुशोभित दिसेल असा दवणा वाहावा. नंतर अंगदेवतांना दवणा वाहून प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र—"मणिविद्रुममालाभिर्मंदारकुसुमादिभिः ॥ इयं सांवत्सरी पूजा तवास्तु गरुडध्वज ॥ वनमालां यथा देव कौस्तुभं संततं हृदि ॥ तद्वद्दामनकीं मालां पूजां च हृदये वह ॥ जानताऽजानता वापि न कृतं यत्तवार्चनं ॥ तत्सर्वं पूर्णतां यातु त्वत्प्रसादाद्रमापते ॥ जितं ते पुंडरीकाक्ष नमस्ते विश्वभावन ॥ हृषीकेश नमस्तेस्तु महापुरुषपूर्वज ॥ मंत्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं सुरेश्वर ॥ यत्पूजितं मया देव परिपूर्णं तदस्तु मे" ॥ ह्या मंत्रांनीं प्रार्थना करून झाल्यानंतर गंधादि पंचोपचारांनीं देवाची पूजा करून आर्ती करावी. नंतर ब्राह्मणांला दवणा देऊन शेष आपण ग्रहण करून सुहृत् आप्तांसहवर्तमान पारणा करावी. मंत्रदीक्षा ज्यांना नसेल त्यांनीं नाममंत्रेंकरून दवणा देवाला वाहावा. ह्या दमनकउत्सवाचा गौण काल श्रावणमासापर्यंत आहे, व हा मलमासांत करूं नये. गुरुशुक्रांचें अस्तादिक असेल तथापि करावा. याप्रमाणें दमनारोपणाचा विधि सांगितला. ह्याच द्वादशीला उद्देशून भारतांतील वचन सांगतात. "चैत्रशुद्ध द्वादशीचे दिवसीं अहोरात्र विष्णूचें स्मरण केलें असतां पुंडरीक यज्ञाचें फल मिळून विष्णुलोकाला जातो."

---

चैत्रशुक्लत्रयोदश्यामनंगपूजनव्रतं तत्रत्रयोदशीपूर्वविद्धाग्राह्या अथचतुर्दश्यांनृसिंहस्य दोलोत्सवःअत्रैवश्रीशिवस्यैकवीरायाभैरवस्यचदमनकैःपूजनं अत्रचचतुर्दशीपूर्वविद्धापराण्हव्यापिनीग्राह्या अपराण्हव्याप्त्यभावेपराण्हस्पर्शिन्यपिपूर्वाग्राह्या तदभावेपराग्राह्याचैत्रपौर्णमासीसामान्यनिर्णयात्पराग्राह्या पूर्वोक्ततत्तत्तिथौदमनकपूजनाकरणेस्यामेवसर्वदेवानां दमनकपूजनं चैत्र्यांचित्रायुतायांचित्रवस्त्रदानंसौभाग्यदं रविगुरुमंदवारयुतचैत्र्यांस्नानश्राद्धादिभिरश्वमेधपुण्यंचैत्रस्यशुक्लैकादश्यांपौर्णमास्यांवामेषसंक्रांतिमारभ्यवा वैशाखस्नानारंभःतत्रमंत्रः वैशाखंसकलंमासंमेषसंक्रमणेरवेः प्रातःसनियमःस्नास्येप्रीयतांमधुसूदनः मधुहंतुःप्रसादेनब्राह्मणानामनुग्रहात् निर्विघ्नमस्तुमेपुण्यंवैशाखस्नानमन्वहं माधवेमेषगेभानौ मुरारेमधुसूदन प्रातःस्नानेनमेनाथफलदोभवपापहन्निति अत्रहविष्याशनब्रह्मचर्यादयोनियमाः एवंसंपूर्णस्नानाशक्तौत्रयोदश्यादिदिनत्रयमंतेस्नायात् इयंपौर्णमासीमन्वादिःपूर्वमुक्ता

चैत्रकृष्णत्रयोदशीशततारकानक्षत्रयुतावारुणीसंज्ञकास्नानादिनाग्रहणादिपर्वतुल्यफलदा शनिवारयुक्तामहावारुणीशुभयोगशनिवारशततारकायुक्तामहामहावारुणी वारुणीयोगेकृष्णादिःपौर्णमास्यंतोमासस्तेनामांतमासेफाल्गुनकृष्णत्रयोदशीग्राह्येतिबोध्यं चैत्रकृष्णचतुर्दश्यांशिवसन्निधौस्नानेनभौमवारयुतायांगंगायांस्नानेनपिशाचत्वाभावःफलं ॥ इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारेचैत्रमासकृत्यनिर्णयउद्देशःसमाप्तः ॥

चैत्रशुद्ध त्रयोदशीचे दिवसीं अनंगपूजनरूप व्रत करावें. त्या व्रताविषयीं त्रयोदशी द्वादशीनें विद्ध असेल ती घ्यावी. चैत्रशुद्ध चतुर्दशीचे दिवसीं नृसिंहाचा दोलोत्सव करावा. ह्याच चतुर्दशीचे दिवसीं शिव, एकवीरा देवी, आणि भैरव यांची दवण्यानें पूजा करावी. ह्या दमनकपूजनाविषयीं चतुर्दशी, पूर्वतिथीनें विद्ध असी अपराण्हकालव्यापिनी घ्यावी. संपूर्ण अपराण्हकालव्याप्ति नसेल तथापि अपराण्हाला स्पर्श करणारी असी पूर्वदिवसाची घ्यावी. सर्वथा अपराण्हकालीं स्पर्श सुद्धां नसेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. चैत्री पौर्णिमा सामान्य निर्णयेंकरून दुसऱ्या दिवसाची घ्यावी. पूर्वीं सांगितलेल्या त्या त्या तिथीचे दिवसीं दमनकपूजा न केली असतां ह्याच पौर्णिमेचे दिवसीं सर्व देवांची दवण्यानें पूजा करावी. चित्रा नक्षत्रानें युक्त अशा चैत्री पौर्णिमेचे दिवसीं चित्रवस्त्राचें दान सौभाग्यदायक आहे. रवि, बृहस्पति व शनिवार, यांहीं युक्त अशा चैत्री पौर्णिमेचे दिवसीं स्नान, श्राद्धादिक केलीं असतां अश्वमेधाचें पुण्य प्राप्त होतें. चैत्रशुद्ध एकादशी, पौर्णिमा, अथवा मेषसंक्रांति यांतून कोणत्याहि दिवसीं वैशाखस्नानाचा आरंभ करावा. त्याचे मंत्र—**वैशाखं सकलं मासं मेषसंक्रमणे रवेः ॥ प्रातः सनियमः स्नास्ये प्रीयतां मधुसूदनः ॥ मधुहंतुः प्रसादेन ब्राह्मणानामनुग्रहात् ॥ निर्विघ्नमस्तु मे पुण्यं वैशाखस्नानमन्वहं ॥ माधवे मेषगे भानौ मुरारे मधुसूदन ॥ प्रातः स्नानेन मे नाथ फलदो भव पापहन्.** " या मंत्रेंकरून स्नानाचा आरंभ करावा व हविष्यान्नभक्षण, ब्रह्मचर्य इत्यादि नियम पाळावे. संपूर्ण मासपर्यंत स्नान करण्यास शक्ति नसेल त्यानें शेवटीं त्रयोदशीपासून तीन दिवस स्नान करावें. ही पौर्णिमा मन्वादि आहे, हें पूर्वीं सांगितलें आहे. चैत्रकृष्णत्रयोदशी शततारका नक्षत्रानें युक्त असल्यास तिला वारुणी असें ह्मणतात. हिचे ठिकाणीं स्नान, दान केल्यानें ग्रहणादि पर्वणीप्रमाणें फल देणारी आहे. शनिवारयोग असेल तर महावारुणी. शुभयोग, शनिवार, शततारका नक्षत्र इतक्यांचा योग असेल तर महामहावारुणी. वारुणीयोगाविषयीं कृष्ण प्रतिपदेपासून पौर्णिमेपर्यंत पौर्णिमांत मास समजावा तेणेंकरून व अमांत मासीं फाल्गुन कृष्ण त्रयोदशी घ्यावी असें जाणावें. चैत्रकृष्ण चतुर्दशीचे दिवसीं भौमवारयोग असल्यास शिवसन्निध गंगेमध्यें स्नान केलें असतां पिशाचपीडा दूर होते. इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे चैत्रमासकृत्यनिर्णयउद्देशःसमाप्तः ॥

---

अथवैशाखमासः ॥ अत्रवृषसंक्रमेपूर्वाःषोडशनाडिकाःपुण्यकालः रात्रौचप्रागुक्तं अत्र प्रातःस्नानंतिलैःपितृतर्पणंधर्मघटदानंचकार्यं अत्रब्राह्मणानांगंधमाल्यपानककदलीफलादिभि

र्वसंतपूजाकार्या वैशाखेज्येष्ठेवायत्रमासेऊष्मबाहुल्यंतत्रप्रातर्नित्यपूजांकृत्वागंधोदकपूर्णेपात्रे विष्णुंसंस्थाप्यपंचोपचारैःसंपूज्यतत्रैवजलेसूर्यास्तपर्यंतमधिवास्यरात्रौस्वस्थानेस्थापयित्वापं चोपचारैः पूजयेत्तेनतीर्थोदकेनगृहदारादियुतमात्मानंपावयेत् एतच्चद्वादश्यांदिवानकार्यं रा त्रौकिंचित्कालंजलस्थंपूजयित्वास्वस्थानेस्थापयेत् अत्रमासेकृष्णगौराख्यतुलसीभिर्विष्णुंत्रि कालमर्चयेन्मुक्तिःफलं प्रातःस्नात्वाबहुतोयेनाश्वत्थमूलंसिंचेत्प्रदक्षिणाश्चकुर्यात्अनेककुल तारणंफलं एवंगवांकंडूयनेपिअत्रमासेएकभक्तंनक्तमयाचितंवासर्वेप्सितफलदं अत्रमासेप्र पादानंदेवेगलंतिकाबंधनंव्यजनच्छत्रोपानच्चंदनादिदानंमहाफलं यदावैशाखोमलमासोभव तितदा काम्यानांतत्रसमाप्तिनिषेधान्मासद्वयंवैशाखस्नानहविष्याशनादिनियमाअनुष्ठेयाः चांद्रायणादिकंतुमलेपिसमापनीयं वैशाखशुक्लतृतीयायांगंगास्नानंयवहोमोयवदानंयवाशनंच सर्वपापापहं यःकरोतितृतीयायांकृष्णंचंदनभूषितं वैशाखस्यसितेपक्षेसयात्यच्युतमंदिरं इयम क्षय्यतृतीयासंज्ञिका अस्यांयत्किंचिज्जपहोमपितृतर्पणदानादिक्रियतेतत्सर्वमक्षयं इयंरोहि णीबुधयोगेमहापुण्या अस्याःजपहोमादिकृत्येपिवक्ष्यमाणयुगादिवन्निर्णयः इयंकृतयुगस्या दिः अत्रयुगादिश्राद्धमपिंडकमनुष्ठेयं श्राद्धासंभवेतिलतर्पणमप्यत्रकार्यं अत्रशुक्लयुगादिकृ त्यंपूर्वाण्हेकार्यं तत्रासंभवेपराण्हेपि कृष्णयुगादिकार्यंत्वपराण्हेइत्यादिमन्वादिप्रकरणोक्तो निर्णयः द्वेधाविभक्तदिनपूर्वार्धैकदेशव्यापिनीदिनद्वयेचेत्त्रिमुहूर्ताधिकव्याप्तिसत्त्वेपरा त्रि मुहूर्तन्यूनत्वेपूर्वा मन्वादौचयुगादौचग्रहणेचंद्रसूर्ययोः व्यतीपातेवैधृतौचतत्कालव्यापिनी क्रियेतिवचनेन साकल्यव्याप्तिवाक्यानामपवादात्श्राद्धादिकंतृतीयामध्येएवकर्तव्यं पुरुषा र्थचिंतामणौतुसप्तमाष्टमनवममुहूर्तानांगांधर्वकुतुपरौहिणसंज्ञाकानांयुगादि श्राद्धकालत्वात् शुक्लेमध्यमदिनमानेत्रयोदश्यादिपंचदश्यंतघटीत्रयव्यापिन्यांश्राद्धं कृष्णेतुषोडशीमारभ्यघ टीत्रये उभयत्रतादृशघटीत्रयव्याप्तौसत्यामसत्यांवाशुक्लापरा यदातुपरेद्युस्त्रयोदशघटीतः पूर्वंसमाप्तापूर्वेद्युस्त्रयोदश्यादिघटीत्रयेतदेकदेशेवाविद्यतेतदाकर्मकालशास्त्रबाहुल्यात्पूर्वेवग्रा ह्येत्युक्तंइदमेवयुक्तमितिभातिअत्रदेवतोद्देशेनपित्रुद्देशेनचोदकुंभदानमुक्तं तत्रश्रीपरमेश्वर प्रीतिद्वाराउदकुंभदानकल्पोक्तफलावाप्त्यर्थंब्राह्मणायोदकुंभदानंकरिष्ये इतिसंकल्प्यसूत्रवे ष्टितंगंधफलयवाद्युपेतंकलशंपंचोपचारैर्ब्राह्मणंचसंपूज्यएषधर्मघटोदत्तोब्रह्मविष्णुशिवात्मकः अस्यप्रदानात्सकलाममसंतुमनोरथाइतिमंत्रेणदद्यात् पित्रुद्देशेतुपितृणामक्षय्यतृप्त्यर्थंउदकुंभ दानंकरिष्येइतिसंकल्प्यपूर्ववत्कुंभब्राह्मणौसंपूज्योदकुंभेगंधतिलफलादिनिक्षिप्य एषधर्म घटोदत्तोब्रह्मविष्णुशिवात्मकःअस्यप्रदानात्तृप्यंतुपितरोपिपितामहाः गंधोदकतिलैर्मिश्रंसा न्नंकुंभफलान्वितं पितृभ्यः संप्रदास्यामिह्यक्षय्यमुपतिष्ठत्वितिमंत्रेणदद्यात् युगादौसमुद्रस्ना नंमहाफलंवैशाखस्याधिमासत्वेयुगादिश्राद्धंमासद्वयेपिकार्यं युगादिषूपवासोमहाफलः युगादिमन्वादौरात्रिभोजनेअभिरत्वावृष्टिमितिमंत्रजपः युगादिश्राद्धलोपेयुगादिश्राद्धलोपजन्य प्रत्यवायपरिहारार्थमृग्विधानोक्तंप्रायश्चित्तंकरिष्येइतिसंकल्प्य नयस्यद्यावेतिऋचंशतवारंज पेत् अयंनिर्णयःसर्वयुगादौज्ञेयः इतिअक्षय्यतृतीयानिर्णयः ॥

## आतां वैशाख मासांतील कृत्यें सांगतों.

वैशाख मासांतील वृषभसंक्रांतीच्या पूर्वीच्या सोळा घटिका पुण्यकाळ. रात्रीं संक्रांति झाली असतां पुण्यकाळ पूर्वी सांगितल्याप्रमाणें जाणावा. या मासांत प्रातःस्नान, तिलयुक्त उदकानें पितृतर्पण, धर्मकुंभाचें दान इत्यादिक करावीं. या मासांत गंध, पुष्प, माळा, पन्हीं, केळीं इत्यादिकेंकरून ब्राह्मणांची वसंतपूजा करावी. वैशाख किंवा ज्येष्ठ यांतून ज्या मासांत ऊष्मा फार होतो त्या मासांत प्रातःकालीं नित्यपूजा करून गंधोदकानें पूर्ण अशा पात्राचे ठिकाणीं विष्णूची स्थापना करून पंचोपचारांनीं पूजा करावी. तेथेंच उदकांत सूर्यास्तपर्यंत मूर्ति ठेवून नंतर रात्रीं स्वस्थानीं स्थापना करून पंचोपचारांनीं पूजा करावी. मग त्या तीर्थोदकानें गृहांतील सर्व मनुष्यांवर व आपणावर प्रोक्षण करून पावन करावें. हें कृत्य द्वादशीचे दिवसीं दिवसास करूं नये. रात्रीं कांहीं वेळ उदकांत मूर्ति ठेवून तेथेंच पूजा करून नंतर स्वस्थानीं नेऊन ठेवावी. या मासांत कृष्णश्वेत तुलसींनीं त्रिकाल विष्णूची पूजा करावी, तेणेंकरून मुक्ति मिळते. सकाळीं स्नान करून अश्वत्थाला उदक घालावें व प्रदक्षिणा कराव्या, तेणेंकरून अनेक कुलांचें तारण होतें. गाईचें अंग खाजिवलें असतां याप्रमाणेंच फल जाणावें. या मासांत एकभुक्त, नक्त, अयाचित हीं व्रतें धारण केलीं असतां ईप्सित फल देणारीं होतात. या मासांत प्रपादान ( पाणपोई घालणें ), देवावर उदकाची गळती बांधणें, पंखा, छत्री, उपानह, चंदनादिक यांचें दान केलें असतां महाफल होतें. जेव्हां वैशाख हा अधिकमास होतो तेव्हां काम्यव्रताच्या समाप्तीचा निषेध सांगितला आहे यास्तव दोन महिनेपर्यंत वैशाखस्नान, हविष्यभोजन इत्यादि नियम जे असतील ते तसेच पाळावे. चांद्रायणादिकांची समाप्ति मलमासांतहि होते. वैशाखशुद्ध तृतीयेचे दिवसीं गंगास्नान, यवांचा होम, यवदान, यवभक्षण यांतून कोणतेंहि केलें असतां सर्व पापाचा नाश होतो. “ वैशाखमासांतील शुद्ध तृतीयेचे दिवसीं कृष्णाच्या अंगाला चंदन लावला असतां लावणारा अंतीं वैकुंठाला जातो. ” या तृतीयेला अक्षय्यतृतीया असी संज्ञा आहे. ह्या अक्षय्यतृतीयेचे दिवसीं जप, होम, पितृतर्पण, दान इत्यादिक जें कांहीं करावें तें सर्व अक्षय्य होतें. ही तृतीया रोहिणी नक्षत्र, बुधवार यांचा योग असेल तर महापुण्यकारक. ह्या तृतीयेचे दिवसीं जप, होम इत्यादिक कृत्य करणें असेल तर त्याचा निर्णय, पुढें सांगणें आहेत अशा ज्या युगादि तिथि त्यांचे निर्णयाप्रमाणें जाणावा. ही तृतीया कृतयुगाची आदि आहे. या दिवसीं युगादि श्राद्ध अपिंडक करावें. श्राद्ध न केलें तर तिलतर्पण तरी करावें. शुक्लपक्षांतील युगादितिथींचें कृत्य पूर्वाण्हकालीं करावें. पूर्वाण्हीं न झाल्यास अपराण्हकालींहि करावें. कृष्णपक्षांतील युगादितिथींचें कृत्य अपराण्हकालीं करावें, इत्यादिक मन्वादितिथिप्रकरणांत सांगितलेला निर्णय जाणावा. ही तृतीया, दिवसाचे दोन भाग करून त्यांतील पूर्वार्धाच्या एकदेशाला व्यापून राहणारी असी सहा घटिकांहून अधिक व्याप्ति दोन दिवसीं असेल तर दुसऱ्या दिवसींची घ्यावी. आणि सहा घटिकांहून कमी असेल तर पूर्वीची घ्यावी. “मन्वादि, युगादि, चंद्रसूर्याचें ग्रहण, व्यतीपात आणि वैधृति, यांसंबंधी जें कृत्य तें तत्कालव्यापिनी तिथींत करावें, ” ह्या वचनेंकरून साकल्यव्याप्तिवाक्यांचा अपवाद आहे यास्तव श्राद्धादिक करणें तें तृतीयेंतच करावें.

पुरुषार्थचिंतामणीमध्यें तर, सातवा, आठवा आणि नववा या मुहूर्तांला क्रमानें गांधर्व, कुतुप, आणि रौहिण अशा संज्ञा आहेत व हे मुहूर्त युगादि श्राद्धांचे काल आहेत याकरितां शुक्लपक्षीं मध्यम दिनमानानें तेराव्या घटिकेपासून पंधरावे घटिकेपर्यंत ज्या तीन घटिका त्यांमध्यें ज्या दिवसीं तृतीयेची व्याप्ति असेल त्या दिवसीं श्राद्ध करावें. कृष्णपक्षीं सोळाव्या घटिकेपासून तीन घटिकांमध्यें श्राद्ध करावें. दोन दिवसीं तसी तीन घटिकांची व्याप्ति असेल किंवा नसेल तर शुक्लपक्षीं दुसऱ्या दिवसाची करावी. जर दुसऱ्या दिवसीं तेरा घटिकांच्या पूर्वीं संपली आणि पूर्व दिवसीं तेराव्या घटिकेपासून तीन घटिकांमध्यें व्याप्ति असेल किंवा त्या तीन घटिकांत एकदेशव्याप्ति असेल तर कर्मकालाचीं शास्त्रें अनेक आहेत याकरितां पूर्वींचीच घ्यावी, असें सांगितलें, व हेंच मत योग्य आहे असें वाटतें. ह्या तृतीयेचे दिवसीं देवतांचे उद्देशानें आणि पितरांचे उद्देशानें उदकुंभदान करावें. उदकुंभदानाचा संकल्प— "**श्रीपरमेश्वरप्रीतिद्वारा उदकुंभदानकल्पोक्तफलावाप्त्यर्थं ब्राह्मणाय उदकुंभदानं करिष्ये,**" असा संकल्प करून सूत्राचें वेष्टन केलेला, व गंध, फल, यव, इत्यादिकांनीं युक्त अशा कलशाचें पंचोपचार पूजन करून नंतर ब्राह्मणाची पूजा करावी. नंतर "**एष धर्मघटो दत्तो ब्रह्मविष्णुशिवात्मकः ॥ अस्य प्रदानात्सकला मम संतु मनोरथाः**" ॥ या मंत्रेंकरून दान करावें. पितरांच्या उद्देशेंकरून देणें असेल तर, "**पितॄणामक्षय्यतृप्त्यर्थं कुंभदानं करिष्ये,**" असा संकल्प करून पूर्वींप्रमाणें कुंभ व ब्राह्मण यांची पूजा करून उदकुंभांत गंध, तिल, फलें इत्यादिक टाकून दान करावें. दानाचा मंत्र—"**एष धर्मघटो दत्तो ब्रह्मविष्णुशिवात्मकः ॥ अस्य प्रदानात् तृप्यंतु पितरोपि पितामहाः ॥ गंधोदकतिलैर्मिश्रं सान्नं कुंभं फलान्वितं ॥ पितृभ्यः संप्रदास्यामि ह्यक्षय्यमुपतिष्ठतु,**" असा मंत्र ह्मणून कुंभदान करावें. युगादितिर्थींचे दिवसीं समुद्रस्नान केलें असतां महाफल प्राप्त होतें. वैशाख हा अधिकमास असेल तर युगादिश्राद्ध, अधिक व शुद्ध या दोहोंतहि करावें. युगादि तिर्थींचे दिवसीं उपोषण केलें असतां मोठें फल प्राप्त होतें. युगादि आणि मन्वादि या दिवसीं रात्रीं भोजन केलें असतां "**अभिस्ववृष्टिं०**" या मंत्राचा जप करावा. युगादिश्राद्धाचा लोप झाला असतां, "**युगादिश्राद्धलोपजन्यप्रत्यवायपरिहारार्थं ऋग्विधानोक्तप्रायश्चित्तं करिष्ये,**" असा संकल्प करून "**नयस्यद्यावा०**" ह्या ऋचेचा शंभर वेळ जप करावा. हा निर्णय सर्व युगादि तिर्थींचे ठिकाणीं जाणावा. याप्रमाणें अक्षय्यतृतीयेचा निर्णय समाप्त झाला.

---

**इयमेवतृतीयापरशुरामजयंती इयंरात्रिप्रथमयामव्यापिनीग्राह्या पूर्वेद्युरेवप्रथमयामव्याप्तौ पूर्वा दिनद्वयेरात्रिप्रथमयामेसाम्येनवैषम्येणवैकदेशव्याप्तौपरा अत्रप्रदोषेपरशुरामंसंपूज्यार्घ्यंदद्यात् तत्रमंत्रः जमदग्निसुतोवीरक्षत्रियांतकरप्रभो गृहाणार्घ्यंमयादत्तंकृपयापरमेश्वरेति वैशाखशुक्लसप्तम्यांगंगोत्पत्तिस्तस्यांमध्यान्हव्यापिन्यांगंगापूजनंकार्यं दिनद्वयेतद्व्याप्तौपूर्वा वैशाखमासेद्वादश्यांपूजयेन्मधुसूदनं अग्निष्टोममवाप्नोतिसोमलोकंचगच्छति वैशाखशुक्लचतुर्दशीनृसिंहजयंती सासूर्यास्तमयकालव्यापिनीग्राह्या दिनद्वयेतद्व्याप्तौतदव्याप्तौवापरैव स्वातीनक्षत्रशनिवारादियोगेसातिप्रशस्ता ॥**

**हीच तृतीया परशुरामजयंती.** ही तृतीया रात्रीच्या प्रथम प्रहरीं व्यापिनी असेल ती घ्यावी. पूर्वदिवसींच प्रथम प्रहरीं व्याप्ति असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी. दोन दिवसीं रात्रीच्या प्रथम प्रहरीं सारखी एकदेशव्याप्ति किंवा कमज्यास्ती एकदेशव्याप्ति असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. या तृतीयेचे दिवसीं प्रदोषकालीं परशुरामाची पूजा करून अर्घ्य द्यावें. अर्घ्याचा मंत्र—"**जमदग्निसुतो वीर क्षत्रियांतकर प्रभो ॥ गृहाणार्घ्यं मया दत्तं कृपया परमेश्वर**" ॥ वैशाखशुद्ध सप्तमीचे दिवसीं गंगेचा अवतार होतो, याकरितां त्या दिवसीं गंगापूजन करावें; त्या गंगापूजनाविषयीं मध्यान्हकालव्यापिनी सप्तमी घ्यावी. दोन दिवसीं मध्यान्हकालव्याप्ति असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी. "वैशाखमासीं द्वादशीचे दिवसीं मधुसूदनाची पूजा करावी, तेणेंकरून अग्निष्टोमफल मिळतें व सोमलोकाची प्राप्ति होते." वैशाखशुद्ध चतुर्दशी ही **नृसिंहजयंती,** ती सूर्यास्तकालव्यापिनी घ्यावी. दोन दिवसीं सूर्यास्तकालव्यापिनी असेल किंवा नसेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. स्वातीनक्षत्र, शनिवार इत्यादिक योग असेल तर फार उत्तम जाणावी.

---

**अथव्रतप्रयोगः त्रयोदश्यांकृतैकभक्तश्चतुर्दश्यांमध्यान्हेतिलामलकैःस्नात्वा उपोष्येहं** नारसिंहभुक्तिमुक्तिफलप्रद शरणंत्वांप्रपन्नोस्मिभक्तिमेनृहरेदिशेतिमंत्रेणव्रतंसंकल्प्याचार्यंवृत्वासायंकालेधान्यस्थोदकुंभेपूर्णपात्रेसौवर्णप्रतिमायांषोडशोपचारैर्देवंसंपूज्यार्घ्यंदद्यात् तत्रमंत्रः परित्राणायसाधूनांजातोविष्णोनृकेसरी गृहाणार्घ्यंमयादत्तंसलक्ष्मीर्नृहरिःस्वयं रात्रौजागरणंकृत्वा प्रातर्देवंसंपूज्यविसृज्याचार्यायधेनुयुतांप्रतिमांदद्यात् तत्रमंत्रः नृसिंहा**च्युतगोविंदलक्ष्मीकांतजगत्पते अनेनार्चाप्रदानेनसफलाःस्युर्मनोरथाः अथप्रार्थना मद्वंशे येनराजातायेजनिष्यंतिचापरे तांस्त्वमुद्धरदेवेशदुःसहाद्भवसागरात् पातकार्णवमग्नस्यव्याधिदुःखांबुवारिधेः नीचैश्चपरिभूतस्यमहादुःखागतस्यमे करावलंबनंदेहिशेषशायिन्जग**त्पते श्रीनृसिंहरमाकांतभक्तानांभयनाशन क्षीरांबुधिनिवासत्वंचक्रपाणेजनार्दन व्रतेनानेनदेवेशभुक्तिमुक्तिप्रदोभवेति ततोब्राह्मणैःसहतिथ्यंतेपारणंकार्यं यामत्रयोर्ध्वगामिन्यांचतुर्दश्यांतुपूर्वाण्हेएवपारणं पौर्णमास्यांशृतान्नसहितोदकुंभदानेगोदानफलं स्वर्णतिलयुक्तद्वादशोदकुंभदानेब्रह्महत्यापापान्मुक्तिः अत्रयथाविधिकृष्णाजिनदानेपृथ्वीदानफलं स्वर्णमधुतिलसर्पिर्युतकृष्णाजिनदानेसर्वपापनाशः अत्रतिलस्नानंतिलहोमस्तिलपात्रदानंतिलतैलेनदीपदानं तिलैःपितृतर्पणंमधुयुक्ततिलदानंचमहाफलं तत्रतिलपात्रदानमंत्रः तिलावैसोमदैवत्याःसुरैःसृष्टास्तुगोसवे स्वर्गप्रदाःस्वतंत्राश्चतेमांरक्षंतुनित्यशः वैशाखशुक्लद्वादश्यांपौर्णमास्यांवावैशाखस्नानोद्यापनं एकादश्यांपौर्णमास्यांवोपोष्यकलशेसुवर्णप्रतिमायांसलक्ष्मीकंविष्णुंसंपूज्यरात्रौजागरणंकृत्वा प्रातर्ग्रहपूजनपूर्वकंपायसेनतिलाज्यैर्वायवैर्वाअष्टोत्तरशतंहोमःप्रतद्विष्णुरितिवाइदंविष्णुरितिवामंत्रेणकार्यः सांगतार्थंगोदानंपादुकोपानहछत्रव्यजनोदकुंभदानशय्यादिदानंचकार्यं अशक्तेनकृसराद्यन्नैर्दशब्राह्मणभोजनंकार्यं एतत्पौर्णमासीमारभ्यज्येष्ठशुक्लैकादशीपर्यंतंजलस्थविष्णुपूजोत्सवःकार्यः वैशाखामावा

**स्याभावुकाख्यदिनंतत्परंकरिसंज्ञकदिनंचशुभेषुवर्ज्यं इतिश्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारेवैशाखमासकृत्यनिर्णये उद्देशः समाप्तः ॥**

## आतां नृसिंहजयंतीव्रताचा प्रयोग सांगतों.

त्रयोदशीचे दिवसीं एकभुक्त होत्साता चतुर्दशीचे दिवसीं माध्यान्हकालीं तीळ आणि आवळे वाटून ते अंगास लावून स्नान करून "**उपोष्येऽहं नारसिंह भुक्तिमुक्तिफलप्रद ॥ शरणं त्वां प्रपन्नोऽस्मि भक्तिं मे नृहरे दिश,**" या मंत्रानें व्रताचा संकल्प करून उपाध्यायाला वरून सायंकालीं धान्यराशीवर उदकयुक्त कलश ठेवून त्याजवर पूर्णपात्र ठेवावें. नंतर त्यांत सुवर्ण प्रतिमा ठेवून तिचे ठिकाणीं देवाचें आवाहन करून षोडशोपचारांनीं देवाची पूजा करून अर्घ्य द्यावें—अर्घ्याचा मंत्र—"**परित्राणाय साधूनां जातो विष्णो नृकेसरी ॥ गृहाणार्घ्यं मया दत्तं सलक्ष्मीर्नृहरिः स्वयं.**" नंतर रात्रौ जागरण करून प्रातःकालीं देवाची पूजा करून विसर्जन करावें. नंतर ती प्रतिमा गोप्रदानपूर्वक उपाध्यायाला द्यावी. त्याचा मंत्र—"**नृसिंहाच्युत गोविंद लक्ष्मीकांत जगत्पते ॥ अनेनार्चाप्रदानेन सफलाः स्युर्मनोरथाः**" ॥ या मंत्रेंकरून प्रतिमेचें दान केल्यावर देवाची प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र—"**मद्वंशे ये नरा जाता ये जनिष्यंति चापरे ॥ तांस्त्वमुद्धर देवेश दुःसहाद्भवसागरात् ॥ पातकार्णवमग्नस्य व्याधिदुःखांबुवारिधेः ॥ नीचैश्च परिभूतस्य महादुःखागतस्य मे ॥ करावलंबनं देहि शेषशायिन् जगत्पते ॥ श्रीनृसिंह रमाकांत भक्तानां भयनाशन ॥ क्षीरांबुधिनिवास त्वं चक्रपाणे जनार्दन ॥ व्रतेनानेन देवेश भुक्तिमुक्तिप्रदो भव.**" नंतर ब्राह्मणासहवर्तमान तिथीच्या अंतीं पारणा करावी. तीन प्रहरांपेक्षां अधिक चतुर्दशी असेल तर पूर्वाण्हींच पारणा करावी. पौर्णिमेचे दिवसीं शिजलेल्या अन्नासह उदकुंभदान करावें, तेणेंकरून गोदानाचें फल मिळतें. सुवर्ण आणि तिल यांहीं युक्त अशा बारा उदकुंभांचें दान करावें, तेणेंकरून ब्रह्महत्यापातकापासून मुक्ति होते. ह्या पौर्णिमेचे दिवसीं विधियुक्त कृष्णाजिनाचें दान केलें असतां पृथ्वीदानाचें फल मिळतें. सुवर्ण, मध, तिळ, तूप यांहीं युक्त अशा कृष्णाजिनाच्या दानेंकरून सर्व पापाचा नाश होतो. ह्या पौर्णिमेचे दिवसीं तिलस्नान, तिलहोम, तिलपात्रदान, तिळांच्या तैलेंकरून दीपदान, तिळेंकरून पितृतर्पण, मधुयुक्त तिलदान हीं केलीं असतां महाफल मिळतें. तिळपात्राच्या दानाचा मंत्र—"**तिला वै सोमदैवत्याः सुरैः सृष्टास्तु गोसवे ॥ स्वर्गप्रदाः स्वतंत्राश्च तेमां रक्षंतु नित्यशः ॥**" वैशाख शुद्ध द्वादशी किंवा पौर्णिमा ह्या दिवसीं वैशाखस्नानाचें उद्यापन करावें. एकादशी किंवा पौर्णिमा या दिवसीं उपोषण करून कलशाचें स्थापन करावें. नंतर कलशाचे ठिकाणीं सुवर्णप्रतिमेवर लक्ष्मीसह विष्णूची पूजा करून रात्रौ जागरण करावें. मग प्रातःकालीं ग्रहांची पूजा करून पायस, किंवा तिळ, तूप यांहींकरून "प्रतद्विष्णु०" अथवा "**इदं विष्णु०**" या मंत्रेंकरून अष्टोत्तर शत ( १०८ ) होम करावा. कर्मसांगता व्हावी एतदर्थ गोप्रदान, पादुका, उपानह, छत्री, पंखा, उदकुंभ, शय्या इत्यादिकांचीं दानें करावीं. पूर्वीं सांगितलेलीं करण्यास सामर्थ्य नसेल तर कृसरान्नानें ( तिळमिश्रादि अन्नानें ) दहा ब्राह्मणांस भोजन द्यावें. ह्या पौर्णिमेपासून ज्येष्ठ शुक्ल एकादशीपर्यंत उदकांत विष्णुमूर्ति

ठेवून तिची पूजा इत्यादिक उत्सव करावा. वैशाखअमावास्येला भावुका असें नांव आहे, व त्याच्या पुढचा दिवस करिसंज्ञक आहे यास्तव हे दोन दिवस शुभकार्याविषयीं वर्ज्य करावे. इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारेवैशाखमासकृत्य निर्णयोद्देशः समाप्तः ॥

---

अथज्येष्ठकृत्यं ॥ मिथुनसंक्रांतौ पराःषोडशनाड्यःपुण्यकालः रात्रौतुप्रागुक्तं ज्येष्ठेमासेपिष्टेनब्रह्ममूर्त्तिंकृत्वावस्त्राद्यैःपूजयेत्सूर्यलोकप्राप्तिःअत्रमासेजलधेनुदानमुक्तंज्येष्ठशुक्लप्रतिपदिकरवीरव्रतमुक्तं ज्येष्ठशुक्लतृतीयायांरंभाव्रतंसापूर्वविद्धाग्राह्या यत्रपूर्वविद्धाग्राह्यतयोच्यतेतत्रास्तात्पूर्वंद्विमुहूर्ताधिकायाग्राह्यत्वंज्ञेयंनन्यूनायाःतत्रापियदिपरेद्युःसूर्यास्तमयपर्यंतंपूर्वविद्धायास्तिथेःसत्त्वंतदासत्यपिपूर्वविद्धाग्राह्यत्ववचनेपूर्वविद्धांत्यक्त्वा अखंडत्वाच्छुद्धत्वात्परैव ग्राह्या यदातुग्राह्यायाःपूर्वविद्धायाः पूर्वेद्युमुहूर्तद्वयान्न्यूनत्वंपरेद्युश्चास्तमयात्प्राक्समाप्तत्वंतदापिपरैवग्राह्या एवंसर्वत्रोह्यं रंभाव्रतेपंचाग्नितपनपरास्त्रीपुमान्वाभवानींस्वर्णप्रतिमायांसंपूज्य यथोक्तविधिहोमादिकृत्वासपत्नीकायगृहंसोपस्करंदद्यात् दांपत्यानिभोजयेत् विशेषविधिर्व्रतग्रंथेज्ञेयः चतुर्थ्यामुमावतारस्तत्रोमापूजनव्रतं अष्टम्यांशुक्लादेवीपूजा नवम्यामुपोष्य देवींपूजयेत्.

## आतां ज्येष्ठमासांतील कृत्यें सांगतों.

मिथुन संक्रांतीच्या पुढच्या सोळा घटिका पुण्यकाळ. रात्रीं मिथुनसंक्रांति झाली असतां पुण्यकाळ पूर्वीं सांगितल्याप्रमाणें जाणावा. ज्येष्ठमासांत ब्रह्मदेवाची पिष्टमय (पिठाची) मूर्त्ति करून वस्त्रादिक उपचारांनीं पूजा करावी, तेणेंकरून सूर्यलोकाची प्राप्ति होते. ह्या मासांत जलधेनूचें दान करावें. ज्येष्ठ शुक्लप्रतिपदेचे दिवसीं करवीरव्रत करावें. ज्येष्ठ शुक्ल तृतीयेचे दिवसीं रंभाव्रत करावें. त्या रंभाव्रताविषयीं तृतीया पूर्वतिथीनें विद्ध असेल ती घ्यावी, जेथें पूर्व तिथीनें विद्ध तिथि घेण्याविषयीं सांगितली असेल तेथें सूर्यास्ताच्या पूर्वीं चार घटिकांपेक्षां अधिक असेल ती घ्यावी, चार घटिकांहून कमी असेल ती घेऊं नये. त्यांमध्यें जर दुसऱ्या दिवसीं सूर्यास्तपर्यंत पूर्वतिथीनें विद्ध असी तिथि असेल तर, पूर्वविद्धा घेण्याविषयीं जरी प्रमाणवचन आहे तथापि पूर्वतिथीनें विद्ध असी असेल ती टाकून अखंड व शुद्ध आहे याकरितां दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. आणि जेव्हां ग्राह्य असी पूर्वविद्ध तिथि पूर्वदिवसीं चार घटिकांहून कमी असेल आणि दुसऱ्या दिवसीं अस्तमानाच्या पूर्वीं तिथि संपेल तेव्हांहि दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. याप्रमाणें सर्वत्र जाणावें. पंचाग्निसाधन करणारे पुरुष किंवा स्त्रिया यांनीं रंभाव्रताचे दिवसीं सुवर्णाची प्रतिमा करून तिचे ठिकाणीं भवानीदेवीची पूजा करून जसा होमाचा विधि सांगितला आहे त्याप्रमाणें होमादिक करून सपत्नीक अशा ब्राह्मणाला सर्व सामग्रीनें युक्त अशा गृहाचें दान करावें, व दंपतीला भोजन घालावें. याहून विशेष विधि आहे तो दुसऱ्या व्रतग्रंथांत पाहावा. ज्येष्ठ शुद्ध चतुर्थीचे दिवसीं उमादेवीचा अवतार झाला. त्या दिवसीं उमापूजनरूप व्रत करावें. ह्या शुक्ल अष्टमीचे दिवसीं शुक्लादेवीची पूजा करावी. नवमीचे दिवसीं उपोषण करून देवीची पूजा करावी.

---

**ज्येष्ठशुक्लदशम्यांगंगावतारः इयंदशहरासंज्ञिका अत्रदशयोगाउक्ताः ज्येष्ठमासि १ सितेपक्षे २ दशम्यां ३ बुध ४ हस्तयोः ५ ॥ व्यतीपाते ६ गरानंदे ७।८ कन्याचंद्रे ९ वृषेरवौ १० इति गराख्यंकरणं बुधवारहस्तयोगेआनंदाख्योयोगः अत्रदशमीव्यतीपातयो मुख्यत्वं तेनयस्मिन्दिनेकतिपययोगवतीदशमीपूर्वाण्हेलभ्यतेतत्रदशहराव्रतंकार्यं दिनद्वयेपूर्वाण्हेतत्सत्त्वेयत्रबहूनांयोगःसाग्राह्या ज्येष्ठेमलमासेसतितत्रैवदशहराकार्यानतुशुद्धे दशहरासुनोत्कर्षश्चतुर्ष्वपियुगादिष्वितिहेमाद्रौऋष्यशृंगोक्तेः अत्रकाशीवासिभिर्दशाश्वमेधतीर्थे स्नात्वागंगापूजनंकार्यं इतरदेशस्थैःस्वसन्निहितनद्यांस्नात्वागंगापूजनादिकंकार्यं**

ज्येष्ठ शुद्ध दशमीचे दिवशीं गंगेचा अवतार झाला, व या दशमीला दशहरा असें नांव आहे. ह्या दशमीविषयीं दहा योग सांगितले आहेत ते असे;—" ज्येष्ठमास, शुक्लपक्ष, दशमी तिथि, बुधवार, हस्तनक्षत्र, व्यतीपात, गरकरण, आनंदयोग, कन्याराशीचा चंद्र, वृषभींचा रवि, गर हें करण आहे. बुधवार व हस्तनक्षत्र यांचा योग तो आनंदयोग. ह्या दहा योगांमध्यें दशमी आणि व्यतीपात हे दोन योग मुख्य आहेत, याकरितां दहा योगांतून कितीएक योगांनीं युक्त असी दशमी ज्या दिवशीं पूर्वाण्हकालीं मिळेल त्या दिवशीं दशहराव्रत करावें. दोन दिवशीं पूर्वाण्हकालीं तसी दशमी असेल तर पूर्वी सांगितलेल्या योगांतून ज्या दिवशीं बहुत योग मिळतील ती घ्यावी. ज्येष्ठ हा अधिक मास असेल तर, " चारहि युगांमध्यें दशहरा तिर्थीचे ठिकाणीं उत्कर्ष ( मागचें कर्म पुढें नेणें ) नाहीं, " असें हेमाद्रीमध्यें ऋष्यशृंगाचें वचन आहे याकरितां अधिक मासांतच दशहराव्रत करावें, शुद्ध ज्येष्ठांत करूं नये. ह्या व्रताचे दिवशीं काशींत राहाणारे लोकांनीं दशाश्वमेध तीर्थांत स्नान करून गंगापूजन करावें. अन्य देशांत राहणारांनीं आपल्याजवळ जी नदी असेल तींत स्नान करून गंगापूजनादिक करावें.

---

**अथव्रतविधिः देशकालौसंकीर्त्यममैतज्जन्मजन्मांतरसमुद्भूतत्रिविधकायिकचतुर्विधवाचिकत्रिविधमानसेति स्कांदोक्तंदशविधपापनिरासत्रयस्त्रिंशच्छतपित्रुद्धारब्रह्मलोकावाप्त्यादिफलप्राप्त्यर्थं ज्येष्ठमाससितपक्षदशमीबुधवारहस्ततारकागरकरणव्यतीपातानंदयोगकन्यास्थचंद्रवृषस्थसूर्येतिदशयोगपर्वण्यस्यांमहानद्यांस्नानंतीर्थपूजनंप्रतिमायांजान्हवीपूजांतिलादिदानंमूलमंत्रजपमाज्यहोमंचयथाशक्तिकरिष्ये यथाविधिस्नानंदशवारंकृत्वाजलेस्थितोदशवारंसकृद्वावक्ष्यमाणंस्तोत्रंपठित्वावासः परिधानादिपितृतर्पणांतंनित्यंविधायतीर्थेपूजांविधायसर्पिर्मिश्रान्दशप्रसृतिकृष्णतिलान्तीर्थेजलिनाप्रक्षिप्यगुडमिश्रान्सक्तुपिंडान्दशप्रक्षिपेत् ततोगंगातटेताम्रेमृन्मयेवास्थापितेकलशेसौवर्णादिप्रतिमायांगंगामावाहयेत् तत्रमंत्रः नमोभगवत्यैदशपापहरायैगंगायैनारायण्यैरेवत्यैशिवायैदक्षायैअमृतायैविश्वरूपिण्यैनंदिन्यैते नमोनमः अयंस्त्र्यादिसाधारणः द्विजमात्रविषयोविंशत्यक्षरोयथा ॐनमःशिवायैनारायण्यैदशहरायैगंगायैस्वाहेति एवंगंगामावाह्य नारायणंरुद्रंब्रह्माणंसूर्यंभगीरथंहिमाचलंचनाममंत्रेणतत्रैवावाह्य उक्तमूलमंत्रमुच्चार्यश्रीगंगायैनारायणरुद्रब्रह्मसूर्यभगीरथहिमवत्सहितायैआसनंसमर्पयामीत्येवमासनाद्युपचारैःपूजयेत् दशविधैःपुष्पैःसंपूज्यदशांगंधूपंदत्वादशविध**

नैवेद्यांतेतांबूलंदक्षिणांदत्वादशफलान्यर्पयेत् दशदीपान्दत्वापूजांसमापयेत् दशविप्रेभ्यः प्रत्येकंषोडशषोडशमुष्टितिलान्सदक्षिणान्दद्यात् एवंयवानपि ततोदशगाएकांवागांद द्यात् मच्छकच्छपमंडूकान्सौवर्णान्राजतान्पिष्टमयान्वासंपूज्यतीर्थेक्षिपेत् एवंदीपान्प्र वाहयेत् जपहोमचिकीर्षायांपूर्वोक्तमूलमंत्रस्यपंचसहस्रसंख्याजपोदशांशेनहोमः यथा शक्तिवाजपहोमौ तत्रदशहरात्रतांगत्वेनहोमंकरिष्येइति संकल्प्यस्थंडिलेग्निंप्रतिष्ठाप्या न्वाधाने चक्षुषीआज्येनेत्यंतेश्रीगंगाममुकसंख्ययाज्येननारायणादिषड्देवताएकैकयाज्या हुत्वाशेषेणस्विष्टकृतमित्यादिप्रोक्षिण्यादिषट्पात्राण्यासाद्याज्यंसंस्कृत्ययथान्वाधानंजुहुयात् दशब्राह्मणान्सुवासिनीश्चभोजयेत् प्रतिपद्दिनमारभ्यस्नानादिपूजांतोविधिः कार्यइतिके चित् स्तोत्रंयथास्कांदे ब्रह्मोवाच नमःशिवायैगंगायै शिवदायैनमोनमः नमस्तेरुद्ररूपि ण्यैशांकर्यैतेनमोनमः नमस्तेविश्वरूपिण्यैब्रह्ममूर्त्यैनमोनमः सर्वदेवस्वरूपिण्यैनमोभेषजमू र्तये सर्वस्यसर्वव्याधीनांभिषक्श्रेष्ठ्यैनमोस्तुते स्थाणुजंगमसंभूतविषहंत्र्यैनमोनमः भो गोपभोगदायिन्यैभोगवत्यैनमोनमः मंदाकिन्यैनमस्तेस्तुस्वर्गदायैनमःसदा नमस्त्रैलोक्यभू षायैजगद्धात्र्यैनमोनमः नमस्त्रिशुक्लसंस्थायैतेजोमत्यैनमोनमः नंदायैलिंगधारिण्यैनारायण्यै नमोनमः नमस्तेविश्वमुख्यायैरेवत्यैतेनमोनमः बृहत्यैतेनमस्तेस्तुलोकधात्र्यैनमोनमः नमस्ते विश्वमित्रायैनंदिन्यैतेनमोनमः पृथ्व्यैशिवामृतायैचसुवृषायैनमोनमः शांतायैचवरिष्ठायै वरदायैनमोनमः उस्रायैसुखदोग्ध्र्यैचसंजीविन्यैनमोनमः ब्रह्मिष्ठायैब्रह्मदायैदुरितघ्न्यैनमो नमः प्रणतार्तिप्रभंजिन्यैजगन्मात्रेनमोस्तुते सर्वापत्प्रतिपक्षायैमंगलायैनमोनमः शरणाग तदीनार्तपरित्राणपरायणे सर्वस्यार्तिहरेदेविनारायणिनमोस्तुते निर्लेपायैदुर्गहंत्र्यैदक्षायैतेन मोनमः परात्परतरेतुभ्यंनमस्तेमोक्षदेसदा गंगेममाग्रतोभूयागंगेमेदेविपृष्ठतः गंगेमेपार्श्वयो रेहित्वयिगंगेस्तुमेस्थितिः आदौत्वमंतेमध्येचसर्वंत्वंगांगतेशिवे त्वमेवमूलप्रकृतिस्त्वंहिना रायणःपरः गंगेत्वंपरमात्माचशिवस्तुभ्यंनमःशिवे यइदंपठतिस्तोत्रंभक्त्यानित्यंनरोपियः शृणुयाच्छ्रद्धयायुक्तःकायवाक्चित्तसंभवैः दशधासंस्थितैर्दोषैःसर्वैरेवप्रमुच्यते सर्वान्कामा नवाप्नोतिप्रेत्यब्रह्मणिलीयते ज्येष्ठेमासिसितेपक्षेदशमीहस्तसंयुता तस्यांदशम्यामेतच्चस्तोत्रं गंगाजलेस्थितः यःपठेद्दशकृत्वस्तुदरिद्रोवापिचाक्षमः सोपितत्फलमाप्नोतिगंगांसंपूज्यय त्नतः अदत्तानामुपादानंहिंसाचैवाविधानतः परदारोपसेवाचकायिकंत्रिविधंस्मृतं पारुष्य मनृतंचैवपैशून्यंचापिसर्वशः असंबद्धप्रलापश्चवाङ्मयंस्याच्चतुर्विधं परद्रव्येष्वभिध्यानंमन सानिष्टचिंतनं वितथाभिनिवेशश्च मानसंत्रिविधंस्मृतं एतानिदशपापानिहरत्वंममजान्हवि दशपापहरायस्मात्तस्माद्दशहरास्मृता त्रयस्त्रिंशच्छतंपूर्वान्पितॄनथपितामहान् उद्धरत्येवसं सारान्मंत्रेणानेनपूजिता नमोभगवत्यैदशपापहरायैगंगायैनारायण्यैरेवत्यैशिवायैदक्षायैअ मृतायैविश्वरूपिण्यैनंदिन्यैतेनमोनमः सितमकरनिषण्णांशुभ्रवर्णांत्रिनेत्रांकरधृतकलशोद्य त्सोत्पलामत्यभीष्टां विधिहरिहररूपांसेंदुकोटीरजुष्टांकलितसितदुकूलांजान्हवींतांनमामि आदावादिपितामहस्यनिगमव्यापारपात्रेजलंपश्चात्पन्नगशायिनोभगवतःपादोदकंपावनं भू यःशंभुजटाविभूषणमणिर्जन्होर्महर्षेरियंदेवीकल्मषनाशिनीभगवतीभागीरथीदृश्यते गंगा

**गंगेतियोब्रूयाद्योजनानांशतैरपि मुच्यतेसर्वपापेभ्योविष्णुलोकंसगच्छति इतिस्तोत्रंमस्तु त्वाहोमांतेप्रतिमोत्तरपूजांकृत्वाविसृज्याचार्यायमूलमंत्रेणदद्यात् इति दशहराविधिः ॥**

## आतां दशहराव्रताचा विधि सांगतों.

देश, काल यांचा उच्चार केल्यावर, "**ममैतज्जन्मजन्मांतरसमुद्भूतत्रिविधकायिकचतुर्विधवाचिकत्रिविधमानसेति स्कांदोक्तं दशविधपापनिरासत्रयस्त्रिंशच्छतपितृुद्धारब्रह्मलोकावाप्त्यादिफलप्राप्त्यर्थं ज्येष्ठमाससितपक्षदशमीबुधवारहस्ततारकागरकरणव्यतीपातानंदयोगकन्यास्थचंद्रवृषस्थसूर्येति दशयोगपर्वण्यस्यां महानद्यां स्नानं तीर्थपूजनंप्रतिमायांजान्हवीपूजां तिलादिदानं मूलमंत्रजपमाज्यहोमंचयथाशक्ति करिष्ये,**" असा संकल्प करून जसा स्नानविधि सांगितला आहे त्याप्रमाणें दहा वेळ स्नान करून उदकांत स्थित होत्साता पुढें सांगावयाचें आहे तें स्तोत्र दहा वेळ किंवा एक वेळ पठण करून वस्त्रपरिधानापासून पितृतर्पणापर्यंत नित्य कर्म करून तीर्थाचे ठिकाणीं पूजा करून तुपानें युक्त असे दहा प्रसृति ( पसे ) काळे तीळ ओंजळीनें तीर्थांत टाकून गूळमिश्र असे दहा, पिठाचे पिंड तीर्थांत टाकावे. नंतर गंगेच्या तटाकीं तांब्याचा किंवा मातीचा कलश स्थापून त्याच्यावर सुवर्णादिकाची प्रतिमा ठेवून त्या प्रतिमेवर गंगेचें आवाहन करावें. त्याचा मंत्र–"**नमो भगवत्यै दशपापहरायै गंगायै नारायण्यै रेवत्यै शिवायै दक्षायै अमृतायै विष्णुरूपिण्यै नंदिन्यै ते नमोनमः,**" हा मंत्र स्त्रिया इत्यादिकांविषयीं सर्व साधारण आहे. द्विजमात्राविषयीं आवाहनाचा मंत्र वीस अक्षरांचा. तो असा,–"**ॐ नमः शिवायै नारायण्यै दशहरायै गंगायै स्वाहा,**" याप्रमाणें गंगेचें आवाहन करून नारायण, रुद्र, ब्रह्मा, सूर्य, भगीरथ, हिमाचल, यांचें नाममंत्रानें त्याच कलशावर आवाहन करून पूर्वोक्त मूलमंत्राचा उच्चार करून "**श्रीगंगायै नारायणरुद्रब्रह्मसूर्यभगीरथ हिमवत्सहितायै आसनं समर्पयामि,**" असें वाक्य ह्मणून आसनादिक उपचारेंकरून पूजा करावी. दहा प्रकारच्या पुष्पांनीं पूजा करून दशांग धूप देऊन दहा प्रकारचा नैवेद्य अर्पण केल्यानंतर तांबूल, दक्षिणा देऊन दहा फळें समर्पण करावीं. दहा दीप देऊन पूजा समाप्त करावी. दर एकास सोळा सोळा मुठी याप्रमाणें दहा ब्राह्मणांला दक्षिणेसह तिळांचें दान करावें. याप्रमाणें यवांचेंहि दान करावें. नंतर दहा किंवा एक गोप्रदान करावें. सुवर्णाचे किंवा रुप्याचे, अथवा पिठाचे मत्स्य, कच्छप, बेडूक करून त्यांची पूजा करून तीर्थांत टाकावे. याप्रमाणें दीप प्रवाहांत सोडावे. जप, होम करण्याची इच्छा असेल तर पूर्वोक्त मूळमंत्राचा पांच सहस्र जप, व त्याच्या दशांश (५००) होम करावा. अथवा जसें सामर्थ्य असेल त्याप्रमाणें जप, होम करावे. होमाचा संकल्प–"**दशहराव्रतांगत्वेन होमं करिष्ये,**" असा संकल्प करून स्थंडिलाचे ठिकाणीं अग्नीची स्थापना करून अन्वाधान करावें–तें असें–**चक्षुषी आज्येनेत्यंते श्रीगंगाममुकसंख्ययाज्येन नारायणादि षट्देवता एकैकयाज्याहुत्या शेषेण स्विष्टकृतं,**" याप्रमाणें अन्वाधान झाल्यावर प्रोक्षिणी इत्यादिक सहा पात्रें मांडून आज्यसंस्कार करून अन्वाधानाप्रमाणें होम करावा. दहा ब्राह्मण व दहा सुवासिनी यांला भोजन घालावें. प्रतिपदेपासून स्नानादिक

पुजेपर्यंत विधि करावा असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. गंगास्तोत्र, तें असें, "ब्रह्मोवाच ॥ नमः शिवायै गंगायै शिवदायै नमोनमः ॥ नमस्ते रुद्ररूपिण्यै शांकर्यै ते नमोनमः ॥ नमस्ते विश्वरूपिण्यै ब्रह्ममूर्त्यै नमोनमः ॥ सर्वदेवस्वरूपिण्यै नमो भेषजमूर्तये ॥ सर्वस्य सर्वव्याधीनां भिषक्श्रेष्ठ्यै नमोस्तु ते ॥ स्थाणुजंगमसंभूतविषहंत्र्यै नमोनमः ॥ भोगोपभोगदायिन्यै भोगवत्यै नमोनमः ॥ मंदाकिन्यै नमस्तेस्तु स्वर्गदायै नमोनमः ॥ नमस्त्रैलोक्यभूषायै जगद्धात्र्यै नमोनमः ॥ नमस्त्रिशुक्लसंस्थायै तेजोवत्यै नमोनमः ॥ नंदायै लिंगधारिण्यै नारायण्यै नमोनमः ॥ नमस्ते विश्वमुख्यायै रेवत्यै ते नमोनमः ॥ बृहत्यै ते नमस्तेस्तु लोकधात्र्यै नमोनमः ॥ नमस्ते विश्वमित्रायै नंदिन्यै ते नमोनमः ॥ पृथ्व्यै शिवामृतायैच सुवृषायै नमोनमः ॥ शांतायै च वरिष्ठायै वरदायै नमोनमः ॥ उस्रायै सुखदोग्ध्यै च संजीविन्यै नमोनमः ॥ ब्रह्मिष्ठायै ब्रह्मदायै दुरितघ्न्यै नमोनमः ॥ प्रणतार्तिप्रभंजिन्यै जगन्मात्रे नमोस्तु ते ॥ सर्वापत्प्रतिपक्षायै मंगलायै नमोनमः ॥ शरणागतदीनार्तपरित्राणपरायणे ॥ सर्वस्यार्तिहरेदेवि नारायणि नमोस्तु ते ॥ निर्लेपायै दुर्गहंत्र्यै दक्षायै ते नमोनमः ॥ परात्परतरे तुभ्यं नमस्ते मोक्षदे सदा ॥ गंगे ममाग्रतो भूया गंगे मे देवि पृष्ठतः ॥ गंगे मे पार्श्वयोरेहि त्वयि गंगेस्तु मे स्थितिः ॥ आदौ त्वमंते मध्ये च सर्वं त्वं गां गते शिवे ॥ त्वमेव मूलप्रकृतिस्त्वं हि नारायणः परः ॥ गंगे त्वं परमात्मा च शिवस्तुभ्यं नमः शिवे ॥ य इदं पठति स्तोत्रं भक्त्या नित्यं नरोपि यः ॥ शृणुयात् श्रद्धया युक्तःकायवाक्चित्तसंभवैः ॥ दशधासंस्थितैर्दोषैः सर्वैरेव प्रमुच्यते ॥ सर्वान्कामानवाप्नोति प्रेत्य ब्रह्मणि लीयते ॥ ज्येष्ठेमासि सिते पक्षे दशमी हस्तसंयुता ॥ तस्यां दशम्यामेतच्च स्तोत्रं गंगाजले स्थितः ॥ यः पठेद्दशकृत्वस्तु दरिद्रो वापि चाक्षमः ॥ सोपि तत्फलमाप्नोति गंगां संपूज्य यत्नतः ॥ अदत्तानामुपादानं हिंसा चैवाविधानतः ॥ परदारोपसेवा च कायिकं त्रिविधं स्मृतं ॥ पारुष्यमनृतं चैव पैशून्यं चापि सर्वशः ॥ असंबद्धप्रलापश्च वाङ्मयं स्याच्चतुर्विधं ॥ परद्रव्येष्वभिध्यानं मनसानिष्टचिंतनं ॥ वितथाभिनिवेशश्च मानसं त्रिविधं स्मृतं ॥ एतानि दश पापानि हर त्वं मम जान्हवि ॥ दशपापहरा यस्मात्तस्माद्दशहरा स्मृता ॥ त्रयस्त्रिंशच्छतं पूर्वान् पितॄनथ पितामहान् ॥ उद्धरत्येव संसारान्मंत्रेणानेन पूजिता ॥ नमो भगवत्यै दशपापहरायै गंगायै नारायण्यै रेवत्यै शिवायै दक्षायै अमृतायै विश्वरूपिण्यै नंदिन्यै ते नमोनमः ॥ सितमकरनिषण्णां शुभ्रवर्णां त्रिनेत्रां करधृतकलशोद्यत्सोत्पलामत्यभीष्टां ॥ विधिहरिहररूपांसेंदुकोटीरजुष्टां कलितसितदुकूलां जान्हवीं तां नमामि ॥ आदावादिपितामहस्य निगमव्यापारपात्रे जलं पश्चात्पन्नगशायिनो भगवतः पादोदकं पावनं ॥ भूयः शंभुजटाविभूषणमणिर्जन्होर्महर्षेरियं देवी कल्मषनाशिनी भगवती भागीरथी दृश्यते ॥ गंगागंगेति योब्रूयाद्योजनानां शतैरपि ॥ मुच्यते सर्व पापेभ्यो विष्णुलोकं स गच्छति ॥" ह्या स्तोत्रानें स्तुति करून होम झाल्यानंतर प्रतिमेची उत्तरपूजा करून प्रतिमेचें विसर्जन करावें. नंतर मूल मंत्रेंकरून आचार्याला प्रतिमेचें दान करावें. याप्रमाणें दशहराविधि समाप्त झाला.

---

ज्येष्ठशुक्लैकादशीनिर्जला अस्यांनित्याचमनादिव्यतिरिक्तजलपानवर्जनेनोपवासेकृते द्वादशैकादश्युपवासफलं द्वादश्यांचनिर्जलोपोषितैकादशीव्रतांगत्वेनसहिरण्यसशर्करोदकुंभदानंकरिष्येइतिसंकल्प्य देवदेवहृषीकेशसंसारार्णवतारक उदकुंभप्रदानेनयास्यामिपरमां गतिमितिमंत्रेणशर्करायुतंसहिरण्यमुदकुंभंदद्यात् ज्येष्ठमाससितद्वादश्यामहोरात्रंत्रिविक्रमपूजनाद्गवामयनाख्यक्रतुफलासिद्धिः ज्येष्ठपौर्णमास्यांतिलदानादश्वमेधफलं ज्येष्ठानक्षत्रयुतायांज्यैष्ठयांछत्रोपानहृदानान्नराधिपत्यप्राप्तिः ज्येष्ठपूर्णिमायांबिल्वत्रिरात्रिव्रतमुक्तं अत्र परविद्धाग्राह्या ॥

ज्येष्ठशुद्ध एकादशी, हिला निर्जला असें ह्मणतात. ह्या एकादशीला दररोजच्या आचमनादिकाचे उदकाखेरीज उदकपान वर्ज्य करून उपोषण केलें असतां बारा एकादशींच्या उपोषणाचें फल प्राप्त होतें. द्वादशीचे दिवसीं, " निर्जलोपोषितैकादशीव्रतांगत्वेन सहिरण्यसशर्करोदकुंभदानं करिष्ये," असा संकल्प करून, "देवदेवहृषीकेशसंसारार्णवतारक ॥ उदकुंभप्रदानेन यास्यामि परमां गतिं," ह्या मंत्रेंकरून शर्करायुक्त, सहिरण्य असा उदकुंभ द्यावा. ज्येष्ठशुक्ल द्वादशीचे दिवसीं अहोरात्र असी त्रिविक्रमाची पूजा केली असतां गवामयन नामक यज्ञाचें फल मिळतें. ज्येष्ठ पौर्णिमेचे दिवसीं तिलांचें दान केलें असतां अश्वमेधाचें फल मिळतें. ज्येष्ठानक्षत्रानें युक्त अशा ज्येष्ठी पौर्णिमेचे दिवसीं छत्र, उपानह यांचें दान केलें असतां नराधिपत्य प्राप्त होतें. ज्येष्ठ पूर्णिमेचे दिवसीं बिल्वत्रिरात्रिव्रत करावें. ह्या व्रताविषयीं पुढच्या तिथीनें विद्ध असेल ती पौर्णिमा घ्यावी.

---

अस्यामेववटसावित्रीव्रतं अत्रव्रतेयत्रोदश्यादिदिनत्रयमुपवासः अशक्तौतुत्रयोदश्यांनक्तंचतुर्दश्यामयाचितं पौर्णमास्यामुपोषणं अत्रपौर्णमासीनिर्णयानुसारेणयथात्रिरात्रंभवेत्तथात्रयोदश्यादिदिनत्रयंग्राह्यं तत्रपौर्णिमासूर्यास्तमयात्पूर्वंत्रिमुहूर्ताधिकव्यापिनीचतुर्दशीविद्धाग्राह्या त्रिमुहूर्तन्यूनत्वेपरैव भूतोष्टादशनाडीभिर्दूषयत्युत्तरांतिथिमितिवचनंसावित्रीव्रतातिरिक्तेज्ञेयं सावित्रीव्रतोपवासेष्टादशनाडीविद्धायाअपिग्राह्यत्वात् यत्तुकेवलंपूजनात्मकमुपवासरहितंसावित्रीव्रतंसर्वत्रस्त्रियोनुतिष्ठंति तत्रभूतोष्टादशेतिवेधोव्रतदानादिपरोनतूपवासपरइतिनिर्णयसिंधुलिखितमाधवाशयानुसारेणाष्टादशनाडीचतुर्दशीसत्त्वेपरैवपूजाव्रते ग्राह्या उपवासव्रतेतुपूर्वेतिममप्रतिभाति अत्रपारणंपूर्णिमांतेकर्तव्यं अत्ररजस्वलादिदोषेपूजादिब्राह्मणद्वाराकार्यं स्वयमुपवासादिकंकार्यमित्यादयः स्त्रीव्रतेविशेषाःप्रथमपरिच्छेदेज्ञेयाः अत्रपूजोद्यापनादिविधिर्व्रतग्रंथेप्रसिद्धः अत्रज्येष्ठपौर्णिमायांज्येष्ठानक्षत्रे बृहस्पतिश्चंद्रश्चरोहिणीनक्षत्रेतुसूर्यस्तदामहाज्येष्ठेतियोगस्तत्रस्नानदानादिकंकार्यं अस्याःपौर्णमास्यामन्वादित्वादत्रपिंडरहितंश्राद्धमुक्तं एतन्निर्णयश्चैत्रेउक्तः अत्रमासेविप्रेभ्यश्चंदनव्यजनोदकुंभादिकंत्रिविक्रमप्रीतयेदेयं ॥ इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे ज्येष्ठमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥

## आतां वटसावित्रीव्रत सांगतों.

ह्या वटसावित्रीव्रताचे ठिकाणीं त्रयोदशीपासून तीन दिवस उपोषण करावें. उपोषणावि-

षयीं अशक्त असेल तर त्रयोदशीस नक्त, चतुर्दशीस अयाचित, आणि पौर्णिमेस उपोषण याप्रमाणें करावें. ह्या व्रताविषयीं तीन दिवस घेणें ते पौर्णिमेच्या निर्णयानुसारेंकरून जसे तीन दिवस येतील तसे त्रयोदशीपासून तीन दिवस घ्यावे. ह्या व्रताविषयीं पौर्णिमा, सूर्यास्ताच्या पूर्वीं साहा घटिकांहून अधिकव्यापिनी असी चतुर्दशीनें विद्ध असेल ती घ्यावी. सूर्यास्ताच्या पूर्वीं साहा घटिकांहून कमी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. सावित्रीव्रताच्या उपोषणाविषयीं, चतुर्दशीच्या अठरा घटिकांनीं विद्ध जरी पौर्णिमा आहे तत्रापि ती घ्यावी असें सांगितलें आहे; यास्तव "चतुर्दशी अठरा घटिकांनीं पुढच्या तिथीला दूषित करित्ये," असें जें वचन तें सावित्रीव्रतावांचून अन्यव्रतांविषयीं जाणावें. उपोषणविरहित केवल पूजामात्र करणें, असें जें सावित्रीव्रत बहुधा सर्वत्र स्त्रिया करितात त्याच्या व्रतदानाविषयीं चतुर्दशीचा अठरा घटिका वेध आहे, उपोषणाविषयीं नाहीं असा निर्णयसिंधूमध्यें लिहिलेला जो माधवाचा अभिप्राय त्याच्या अनुरोधानें अठरा घटिका चतुर्दशी असेल तर दुसऱ्या दिवसाचीच पूजाव्रताविषयीं घ्यावी, उपोषणव्रताविषयीं घेणें ती पूर्वीची घ्यावी असें मला वाटतें. ह्या व्रताची पारणा करावयाची ती पूर्णिमेच्या अंतीं करावी. ह्या व्रताविषयीं रजस्वला इत्यादि दोष प्राप्त होईल तर पूजादिक ब्राह्मणाकडून करवावीं, उपोषण इत्यादिक आपण करावें, असे स्त्रीव्रताचे विशेष प्रथम परिच्छेदांत सांगितले आहेत ते जाणावे. ह्या व्रताचा पूजा, उद्यापन इत्यादिक विधि व्रतग्रंथीं प्रसिद्ध आहे तो पाहावा. ह्या ज्येष्ठ पौर्णिमेचे दिवसीं ज्येष्ठा नक्षत्रीं बृहस्पति व चंद्र, रोहिणी नक्षत्रीं रवि इतके एककालीं आले असतां तो महाज्येष्ठायोग होतो, त्या दिवसीं स्नानदानादि करावें. ही पौर्णिमा मन्वादि आहे याकरितां हिचे ठिकाणीं अपिंडक श्राद्ध करावें, ह्याचा निर्णय चैत्रमासांत सांगितला आहे. या मासांत ब्राह्मणांला चंदन, पंखा, उदकुंभ इत्यादिकांचीं दानें करावीं, तेणेंकरून त्रिविक्रमाचा संतोष होतो. इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे ज्येष्ठमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥

---

अथाषाढेदक्षिणायनसंज्ञाकर्कसंक्रांतिः कर्कसंक्रांतौपूर्वत्रिंशन्नाड्यःपुण्यकालः तत्रापिसंक्रांतिसन्निहितानाड्यःपुण्यतमाः रात्रावर्धरात्रात्प्राक्परतश्चसंक्रमेपिपूर्वदिनेपुण्यकालः तत्रापिमध्यान्हात्परतःपुण्यतमत्वं सूर्योदयोत्तरंघटीद्वयात्प्राक्संक्रमेपरतएवपुण्यं ज्योतिर्ग्रंथेतुसूर्योदयात्प्राक्घटीत्रयात्मकसंध्यासमयेपिकर्कसंक्रमेपरदिनेएवपुण्यमित्युक्तं अत्रदानोपवासादिप्रथमपरिच्छेदेउक्तं कर्ककन्याधनुःकुंभस्थेरवौकेशकर्तनादिकंनिषिद्धं आषाढेमासमेकभक्तव्रतेकृतेबहुधनधान्यपुत्रप्राप्तिः अत्रमासेउपानच्छत्रलवणामलकानिवामनप्रीत्यैदेयानि आषाढशुक्लद्वितीयायांपुष्यनक्षत्रयुतायांकेवलायांवाश्रीरामस्यरथोत्सवः आषाढशुक्लपक्षेदशमीपौर्णमासीचमन्वादिः तन्निर्णयस्तूक्तः ॥

## आतां आषाढ मासांतील कृत्यें सांगतों.

आषाढ मासीं जी कर्कसंक्रांति तिला दक्षिणायन असें नांव आहे, याकरितां ह्या संक्रांतीपासून दक्षिणायनाला आरंभ होतो. कर्कसंक्रांतीच्या पूर्वींच्या तीस घटिका पुण्यकाळ, त्यां-

मध्यें संक्रांतीचे जवळच्या घटिका अतिपुण्यकारक जाणाव्या. रात्रीं मध्यरात्रीच्या पूर्वी किंवा नंतर संक्रांति होईल तथापि पूर्व दिवसीं पुण्यकाल. त्यामध्येंहि मध्यान्हकालाच्या पुढें पुण्यतमकाळ. सूर्योदयानंतर दोन घटिकांच्या पूर्वी संक्रांति होईल तर दुसऱ्या दिवसींच पुण्यकाळ. ज्योतिषग्रंथामध्यें तर, सूर्योदयाच्या पूर्वी तीन घटिका जो संध्याकाळ त्या वेळीं कर्कसंक्रांति होईल तर दुसऱ्या दिवसींच पुण्यकाळ, असें सांगितलें. ह्या संक्रांतीचे दिवसीं दान, उपोषण इत्यादिक करणें तें प्रथम परिच्छेदांत सांगितल्याप्रमाणें करावें. कर्क, कन्या, धनु, कुंभ ह्या संक्रांतींचा रवि असतां केशच्छेद इत्यादि करूं नये. आषाढ मासांत एक मासपर्यंत एकभुक्त व्रत करावें, तेणेंकरून धन, धान्य, पुत्र यांची प्राप्ति होते. या मासांत उपानह, छत्री, लवण, आवळे यांचीं दानें करावीं, तेणेंकरून वामनाचा संतोष होतो. पुष्य नक्षत्रानें युक्त किंवा नुस्ती अशा आषाढशुक्ल द्वितीयेचे दिवसीं श्रीरामाचा रथोत्सव करावा. आषाढशुक्ल पक्षांतील दशमी, आणि पौर्णिमा ह्या मन्वादि आहेत, व त्यांचा निर्णय पूर्वी (चैत्रांत) सांगितला आहे.

---

**अथैकादश्यांविष्णुशयनोत्सवः तत्रसोपस्करेमंचकेसुप्तांश्रीविष्णुप्रतिमांशंखादिचतुरायुधांलक्ष्मीसंवाहितचरणांनानाविधोपचारैःसंपूजयेत् सुप्तेत्वयिजगन्नाथेजगत्सुप्तंभवेदिदं विबुद्धेत्वयिबुध्येततत्सर्वंसचराचरमितिप्रार्थ्यउपोष्यजागरंकृत्वाद्वादश्यांपुनःसंपूज्यत्रयोदश्यां गीतनृत्यवाद्यादिकंनिवेदयेत् एवमिदंत्रिदिनसाध्यंव्रतं तत्रस्मार्तैर्वैष्णवैश्चस्वस्वैकादशीव्रतदिनेशयनीव्रतमारब्धव्यं रात्रौशयनोत्सवः दिवाप्रबोधोत्सवः द्वादश्यांपारणाहेशयनप्रबोधोत्सवावितिकेचित् अत्रदेशाचाराद्व्यवस्था नेदंमलमासेकार्यं आषाढशुद्धद्वादश्यामनुराधायोगरहितायांपारणंकार्यं तत्रापिअनुराधाप्रथमपादयोगएववर्ज्यः यदातुद्वादशीस्वल्पावर्ज्यनक्षत्रभागोद्वादशीमतिक्रम्यविद्यतेतदानिषेधमनादृत्यद्वादश्यामेवपारणं कार्यमितिकौस्तुभेउक्तं संगवकालभागंत्यक्त्वाप्रातर्मध्यान्हभागेवाभोक्तव्यमितिपुरुषार्थचिंतामणौ ॥**

## आतां आषाढशुद्ध एकादशीचे दिवसीं विष्णूचा शयनोत्सव सांगतों.

एकादशीचे दिवसीं सर्व उपचारांनीं युक्त अशा मंचकावर, शंखादि चार आयुधांनीं संपन्न व लक्ष्मी ज्याचे चरण चुरीत आहे असी श्रीविष्णूची मूर्ति निजवून त्या मूर्तीची नानाविध उपचारांनीं पूजा करावी. नंतर "**सुप्ते त्वयि जगन्नाथे जगत्सुप्तं भवेदिदं ॥ विबुद्धेत्वयि बुद्ध्येततत्सर्वं सचराचरं ॥**" असा मंत्र ह्मणून प्रार्थना करावी. नंतर उपोषण करून जागरण करावें व द्वादशीचे दिवसीं पुनः पूजा करून त्रयोदशीचे दिवसीं गीत, नृत्य, वाद्यें, इत्यादिक अर्पण करावें. याप्रमाणें हें तीन दिवसांचें व्रत आहे. स्मार्त आणि वैष्णव यांनीं आपापल्या एकादशीच्या व्रतदिवसीं शयनीव्रताला आरंभ करावा; तो असा;—रात्रीं शयनोत्सव करावा व दिवसा प्रबोधोत्सव करावा. द्वादशीचे ठिकाणीं पारणेच्या दिवसीं शयनोत्सव व प्रबोधोत्सव करावे, असें कोणी ह्मणतात. याविषयीं जसा देशाचार असेल त्याप्रमाणें करावें. हा उत्सव मलमासांत करूं नये. अनुराधांचा योग नसेल अशा द्वादशींत पारणा करावी. त्यामध्यें

अनुराधानक्षत्राच्या प्रथम चरणाचाच योग वर्ज्य करावा. जेव्हां द्वादशी अल्प असेल आणि वर्ज्य नक्षत्राचा भाग द्वादशीचें उल्लंघन करून राहत असेल तेव्हां निषेध मानल्यावांचून द्वादशींतच पारणा करावी, असें कौस्तुभांत सांगितलें आहे. संगव कालाचा भाग टाकून प्रातःकालीं किंवा मध्यान्हकालीं भोजन करावें, असें पुरुषार्थचिंतामणीमध्यें सांगितलें आहे.

---

**द्वादश्यांपारणोत्तरंसायंपूजांकृत्वाचातुर्मास्यव्रतसंकल्पंकुर्यादितिकौस्तुभे एकादश्यामेवेतिनिर्णयसिंधुः चातुर्मास्यव्रतप्रथमारंभोगुरुशुक्रास्तादावाशौचादौचनभवति द्वितीयाद्यारंभस्तुअस्तादावाशौचादौचभवत्येव चातुर्मास्यव्रतंचशैवादिभिरपिकार्यम् ॥**

## चातुर्मास्यव्रताचा आरंभ सांगतों.

द्वादशीचे दिवसीं पारणा केल्यानंतर सायंकालीं पूजा करून चातुर्मास्यव्रताचा संकल्प करावा, असें कौस्तुभांत सांगितलें आहे. एकादशीचे दिवसींच चातुर्मास्यव्रताचा संकल्प करावा, असें निर्णयसिंधूंत आहे. चातुर्मास्यव्रताचा नवीन आरंभ, गुरुशुक्रांचें अस्तादिक, आशौच इत्यादिक निषिद्धकाल असतां करूं नये, दुसऱ्या वर्षाचा आरंभ असेल तर अस्तादिक व आशौचादिक असलीं तरी होतो. चातुर्मास्यव्रत शैव, सौर ( सूर्योपासक ) इत्यादिक यांनींहि करावें.

---

**व्रतग्रहणप्रकारस्तु भगवतोजातीपुष्पादिभिर्महापूजांकृत्वा सुप्तेत्वयिजगन्नाथेजगत्सुप्तंभवेदिदं विबुद्धेत्वयिबुध्येतप्रसन्नोमेभवाच्युतेतिप्रार्थ्यअग्रेकृतांजलिः चतुरोवार्षिकान्मासान्देवस्योत्थापनावधि श्रावणेवर्जयेशाकंदधिभाद्रपदेतथा दुग्धमाश्वयुजेमासिकार्तिकेद्विदलंतथा इमंकरिष्येनियमंनिर्विघ्नंकुरुमेच्युत इदंव्रतंमयादेवगृहीतंपुरतस्तव निर्विघ्नंसिद्धिमायातुप्रसादात्तेरमापते गृहीतेस्मिन्व्रतेदेवपंचत्वंयदिमेभवेत् तदाभवतुसंपूर्णंप्रसादात्तेजनार्दन इतिप्रार्थ्यदेवायशंखेनार्घ्यंनिवेदयेत् एतानिव्रतानिनित्यानि हविष्यभक्षणादिव्रतांतरचिकीर्षायांश्रावणेवर्जयेशाकमितिश्लोकस्थानेहविष्यान्नंभक्षयिष्येदेवाहंप्रीतयेतवेत्यूहःकार्यः शाकव्रतेव्रतांतरेचसमुच्चयेनकर्तव्येतंश्लोकंपठित्वाव्रतांतरमंत्रंवदेत् एवंगुडवर्जनादिधारणापारणादिव्रतेषु वर्जयिष्येगुडंदेवमधुरस्वरसिद्धये वर्जयिष्येतैलमहंसुंदरांगत्वसिद्धये योगाभ्यासीभविष्यामि प्राप्तुंब्रह्मपदंपरं मौनव्रतीभविष्यामिस्वाज्ञापालनसिद्धये एकांतरोपवासीचप्राप्तुंब्रह्मपुरंपरमित्यादिरीत्योहःकार्यः निषिद्धमात्रवर्जनेच्छायां वृंताकादिनिषिद्धानिहरेसर्वाणिवर्जयेइति संकल्पः ॥**

## चातुर्मास्यव्रत ग्रहण करण्याचा प्रकार सांगतों.

जाई, जुई इत्यादिक पुष्पांनीं भगवंताची पूजा करून नंतर, " सुप्ते त्वयि जगन्नाथे जगत्सुप्तं भवेदिदं ॥ विबुद्धे त्वयि बुद्ध्येत प्रसन्नो मे भवाच्युत " ॥ या मंत्रानें प्रार्थना करून पुढें उभें राहून हात जोडून, "चतुरो वार्षिकान् मासान् देवस्योत्थापनावधि ॥ श्रावणे वर्जये शाकं दधि भाद्रपदे तथा ॥ दुग्धमाश्वयुजे मासि कार्तिके द्विदलं तथा ॥ इमं करिष्ये

**नियमं निर्विघ्नं कुरुमेऽच्युत ॥ इदं व्रतं मयादेव गृहीतं पुरतस्तव ॥ निर्विघ्नं सिद्धिमायातु प्रसादात्ते रमापते ॥ गृहीतेस्मिन् व्रते देव पंचत्वं यदि मे भवेत् ॥ तदा भवतु संपूर्णं प्रसादात्ते रमापते "** ॥ या मंत्रांनीं प्रार्थना करावी, नंतर शंखानें देवाला अर्घ्य द्यावें. श्रावणांत शाका वर्ज्य करणें, भाद्रपदांत दहीं वर्ज्य करणें, आश्विनांत दूध, कार्तिकांत द्विदल धान्यें वर्ज्य, हीं व्रतें नित्य आहेत. हविष्यभक्षण इत्यादि दुसरीं व्रतें करण्याची इच्छा असेल तर, **" श्रावणे वर्जये शाकं "** ह्या श्लोकस्थानीं **" हविष्यान्नं भक्षयिष्ये देवाहं प्रीतये तव, "** असा उच्चार करावा. शाकव्रत आणि दुसरें व्रत असीं एकदम करणें असतील तर तो श्लोक ह्मणून दुसऱ्या व्रताचा मंत्र ह्मणावा. याप्रमाणें गूळ वर्ज्य करणें, धारणा पारणा करणें, इत्यादि व्रतांचे ठिकाणीं तसतसा ऊह करावा. तो असा,–**" वर्जयिष्ये गुडं देव मधुरस्वरसिद्धये ॥ वर्जयिष्ये तैलमहं सुंदरांगत्वसिद्धये ॥ योगाभ्यासी भविष्यामि प्राप्तुं ब्रह्मपदं परं ॥ मौनव्रती भविष्यामि स्वाज्ञापालनसिद्धये ॥ एकांतरोपवासी च प्राप्तुं ब्रह्म पुरं परं, "** याप्रमाणें ऊह करावा. निषिद्ध पदार्थ वर्ज्य करणें असतील तर **" वृंताकादि निषिद्धानि हरे सर्वाणि वर्जये, "** असा ऊह करावा.

---

**तानिच चातुर्मास्येनिषिद्धानि प्राण्यंगचूर्णंचर्मस्थोदकंजंबीरंबीजपूरंयज्ञशेषभिन्नंविष्णव निवेदितान्नंदग्धान्नंमसूरंमांसंचेत्यष्टविधमामिषंवर्जयेत् निष्पावराजमाषधान्ये लवणशाकं** वृंताकंकलिंगफलंअनेकबीजफलं निर्बीजंमूलकंरक्तमूलकंकूष्मांडंइक्षुदंडंनूतनबदरीधात्रीफलानिचिंचांमंचकादिशयनमनृतुकालेभार्यांपरान्नंमधुपटोलंमाषकुलित्थसितसर्षपांश्चवर्जयेत् वृंताकबिल्वोदुंबरकलिंगभिःसटास्तुवैष्णवैःसर्वमासेषुवर्ज्याः अन्यत्रतुगोछागीमहिष्यन्यदुग्धंपर्युषितान्नंद्विजेभ्यःक्रीतारसाभूमिलवणंताम्रपात्रस्थंगव्यंपल्वलजलंस्वार्थपक्कमन्नमित्यामिषगणउक्तः चतुर्ष्वपिहिमासेषुहविष्याशीनपापभाक् हविष्याणितुव्रीहिमुद्गयवतिलकंगुकलापश्यामाकगोधूमधान्यानिरक्तभिन्नमूलकंसूरणादिकंदः सैंधवसामुद्रलवणंगव्यानिदधिसर्पिर्दुग्धानिपनसाम्रनारीकेलफलानिहरीतकीपिप्पली जीरकंशुंठीचिंचाकदलीलवलीधात्रीफलानि **गुडेतरेक्षुविकारइत्येतानिअतैलपक्कानि गव्यंतक्रंमाहिषंघृतंक्कचित् ॥**

## आतां चातुर्मास्यांत निषिद्ध पदार्थ कोणते ते सांगतों.

शिंपीचा व इतर हाडांचा चुना; मोटेचें व पखालीचें उदक, ईडलिंबू; महाळुंग; वैश्वदेव न झालेला असें अन्न; विष्णूला अर्पण केलें नाहीं असें अन्न; करपलेलें अन्न; मसुरा; मांस; हें आठ प्रकारचें आमिष वर्ज्य करावें. पांढरे पावटे; काळा वाल; घेवडा; चवळी; लोणचीं; वांगीं; कलिंगण; पुष्कळ बीयांचें फळ; निर्बीज फळ ( केळें इ० ); तांबडा मुळा; पांढरा मुळा; कोहळा; ऊंस; नवीन असीं बोरें व आंवळे; चिंच; मंचकादिकावर शयन; ऋतुकालावांचून स्त्रीसेवन; परान्न; मध; पडवळ; उडीद; कुळीथ; पांढऱ्या मोहऱ्या; हीं वर्ज्य करावीं. वांगीं, बेलफळें, उंबराचीं फळें, कलिंगण, करपलेलें अन्न; हीं वैष्णवांनीं सर्व मासांत वर्ज्य करावीं. ग्रंथांतरीं गाई, महिषी, शेळी यांहून अन्य दूध; शिळें अन्न; ब्राह्मणापासून विकत घेतलेले रस; भूमिसंबंधी लवण, तांब्याचे भांड्यांतलें गाईचें दूध इत्यादि; सांचीव उदक;

केवळ आपणासाठीं परिपक्क केलेलें अन्न, इत्यादिक आमिषगण सांगितला आहे. चातुर्मास्यामध्यें हविष्यान्नभक्षण केलें असतां पापभागी होत नाहीं. **हविष्यें कोणतीं तीं सांगतों—** तांदूळ, मूग, यव, तिल, कांग, राळे, इत्यादि; वाटाणे; सांवे; गहूं; पांढरा मुळा; सुरण इत्यादि कंद; सैंधव व सामुद्र हीं लवणें; गाईचीं दहीं, दूध, तूप; फणस; आंबा; नारळ; हरीतकी; पिंपळी; जिरें; सुंठ; चिंच; केळीं; आंवळे; रायआंवळे; साखर; हीं सर्व तेलांत न तळलेलीं हविष्यें जाणावीं. गाईचें ताक, व म्हशीचें तूप हींहि क्वचित् हविष्यांत सांगितलीं आहेत.

---

**अथकाम्यव्रतानि गुडवर्जनान्मधुरस्वरता तैलवर्जनात्सुंदरांगता योगाभ्यासीब्रह्मपदमाप्नोति तांबूलत्यागाद्भोगीमधुरकंठश्च घृतत्यागीस्निग्धतनुः शाकत्यागीपक्वान्नभुक्पादाभ्यंगत्यागाद्वपुःसौगंध्यं दधिदुग्धतक्रत्यागाद्विष्णुलोकः स्थालीपाचितान्नत्यागाद्दीर्घसंततिः भूमौदर्भशायीविष्णुदासः भूमिभोजनान्नृपत्वं मधुमांसत्यागान्मुनिः एकांतरोपवासाद्ब्रह्मलोकः नखकेशधारणाद्दिनेदिनेगंगास्नानं मौनादस्खलिताज्ञा विष्णुवंदनाद्गोदानफलं विष्णुपादस्पर्शात्कृतकृत्यता हरेरालयेसंमार्जनादिनानृपत्वं शतप्रदक्षिणाकरणाद्विष्णुलोकः एकभक्ताशनादग्निहोत्रफलं अयाचितेनवापीकूपोत्सर्गादिपूर्तफलं षष्ठाह्नः कालभोजनाच्चिरस्वर्गः पर्णेषुभोजनात्कुरुक्षेत्रवासफलं शिलाभोजनात्प्रयागस्नानफलं एवंमासचतुष्टयसाध्यानांव्रतानांसंकल्पमेकादश्यांद्वादश्यांवाकृत्वाश्रावणमासव्रतविशेषसंकल्पइहैवकार्यः अहंशाकंवर्जयिष्येश्रावणेमासिमाधवेति अत्रशाकशब्देनलोकेप्रसिद्धाः फलमूलपुष्पपत्रांकुरकांडत्वगादिरूपावर्ज्याः नतुव्यंजनमात्रं शुंठीहरिद्राजीरकादिकमपिवावर्ज्यं तत्रतत्कालोद्भवानामातपादिशोषितकालांतरोद्भवानांचसर्वशाकानांवर्जनंकार्यं अथैषांचातुर्मास्यव्रतानांसमाप्तौकार्तिक्यांदानानितत्रैववक्ष्यंते ॥**

## आतां काम्यव्रतें सांगतों.

गूळ वर्ज्य केल्यानें स्वर मंजुळ होतो. तैल वर्ज्य केलें असतां शरीर सुंदर होतें. योगाभ्यास केला असतां ब्रह्मपद प्राप्त होतें. तांबूल वर्ज्य केलें असतां नानाविध भोग प्राप्त होतात व कंठ मंजुळ होतो. घृताचा त्याग केला असतां तनु मृदु होते. शाकांचा त्याग केला असतां पक्वान्नभोक्ता होतो. पादाभ्यंग वर्ज्य केला असतां शरीर सुगंधि होतें. दहीं, दूध, तूप यांचा त्याग केल्यानें विष्णुलोक प्राप्त होतो. थालीमध्यें पक्व केलेल्या अन्नाचा त्याग केल्यानें वंशवृद्धि होते. भूमीवर दर्भ हातरून त्यांवर निद्रा केल्यानें भगवद्भक्त होतो. भूमीवर भोजन केलें असतां राज्याधिकार मिळतो. मध मांस, यांचा त्याग केल्यानें मुनि ( मननशील ) होतो. एक दिवस उपोषण, आणि दुसऱ्या दिवशीं भोजन असें व्रत केल्यानें ब्रह्मलोकप्राप्ति. नखें, केश हे धारण केल्यानें प्रत्यहीं गंगास्नान फल. मौनव्रतेंकरून आज्ञा अस्खलित चालते. विष्णूला नमस्कार केल्यानें गोदानफल. विष्णूच्या चरणस्पर्शेंकरून कृतकृत्यता. देवाच्या देवळांत सडासंमार्जन केल्यानें राज्याधिकार मिळतो. विष्णूला शंभर प्रदक्षिणा केल्या असतां विष्णुलोक प्राप्त होतो. एकभुक्त केल्यानें अग्निहोत्रफल. अयाचितानें वापी, कूप, धर्मशाळा इत्यादिकांचे उत्सर्गाचें फल मिळतें. दिवसाच्या साहाव्या भागांत भोजन केल्यानें

चिरकाल स्वर्ग प्राप्त होतो. पानांवर भोजन केल्यानें कुरुक्षेत्रीं वास केल्याचें फल मिळतें. शिळेवर भोजन केल्यानें प्रयागीं स्नान केल्याचें फल मिळतें. याप्रमाणें चार महिन्यांनीं साध्य अशा व्रतांचा संकल्प एकादशी किंवा द्वादशी यांतून एका दिवसीं करून श्रावण मासांतील विशेष व्रताचा संकल्प ह्याच दिवसीं करावा. तो असा,—**"अहं शाकं वर्जयिष्ये श्रावणे मासि माधव."** एथें शाकशब्देंकरून लोकप्रसिद्ध फलें, मूलें, पुष्पें, पत्रें, अंकुर, कांड, साली इत्यादि स्वरूपाच्या शाका वर्ज्य कराव्या, केवळ कोशिंबिरी, इत्यादिक वर्ज्य कराव्या असें नाहीं. सुंठ, हळद, जिरें इत्यादिक पदार्थ सुद्धां वर्ज्य करावे. तसेंच त्या दिवसामध्यें उत्पन्न झालेल्या व पूर्वीं उत्पन्न झाल्या असून उन्हांत सुखवून ठेवलेल्या सर्व शाका वर्ज्य कराव्या. यानंतर पूर्वीं सांगितलेल्या चातुर्मास्यव्रतांच्या समाप्तीचे दिवसीं दानें करावयाचीं तीं कार्तिकी पौर्णिमेचे प्रकरणीं सविस्तर सांगूं.

---

**शयनीबोधिन्योस्तप्तमुद्राधारणमुक्तंरामार्चनचंद्रिकायां अत्रतप्तमुद्राधारणेविधायकानि प्रशंसावचनानिनिषेधकानिनिंदावचनानिचबहुतराण्युपलभ्यंते तेषांशिष्टाचाराद्व्यवस्था येषांकुलेपितृपितामहादिभिस्तप्तमुद्राधारणादिधर्मोनुष्ठितस्तैस्तथैवानुष्ठेयः येषांतुकुलेषुनकेनाप्यनुष्ठितस्तैर्नस्वमतिविलसितश्रद्धयातद्धर्मोनुष्ठेयोदोषश्रवणादितितात्पर्यं ॥**

शयनी आणि बोधिनी ह्या एकादशींचे दिवसीं तप्तमुद्रा धारण करण्याविषयीं रामार्चनचंद्रिकाग्रंथीं सांगितलें आहे. ज्यापेक्षां तप्तमुद्रा धारण करण्याविषयीं प्रशंसापर असीं विधिवाक्यें, आणि निषेधकारक असीं निंदावचनें बहुत मिळतात, त्यापेक्षां त्या सर्व वचनांची व्यवस्था शिष्टाचारानुरूप करावी. ज्यांच्या कुळामध्यें पिता, पितामह ( बाप, आजा ) इत्यादिकांनीं तप्तमुद्राधारणादिक धर्म आचरला असेल त्यांनीं त्याप्रमाणेंच आचरण करावा. आणि ज्यांच्या कुळामध्यें पूर्वीं कोणी कधींहि आचरण केला नसेल त्यांनीं शास्त्रांत दोष सांगितला आहे यास्तव केवळ आपल्याच बुद्धिकौशल्यानें तप्तमुद्राधारणादिक धर्म आचरण करूं नये, हें तात्पर्य जाणावें.

---

**आषाढशुक्लद्वादश्यांवामनपूजनेननरमेधफलं पूर्वाषाढायुतायांपौर्णमास्यामन्नपानादिदानादक्षय्यान्नादिप्राप्तिः अस्यामेवपौर्णमास्यांप्रदोषव्यापिन्यांश्रीशिवस्यशयनोत्सवः अस्यामेव कोकिलाव्रतं तत्र स्नानंकरिष्येनियताब्रह्मचर्येस्थितासती भोक्ष्यामिनक्तंभूशय्यांकरिष्येप्राणिनांदयामितिमासव्रतंसंकल्प्य कोकिलारूपिणींशिवांप्रत्यहंसंपूज्यनक्तभोजनं यस्मिन्वर्षेधिकाषाढस्तस्मिन्नेववर्षेशुद्धाषाढेव्रतंकार्यमित्याचारःसनिर्मूलः आषाढस्यश्रावणस्यवापौर्णमास्यांचतुर्दश्यामष्टम्यांवाशिवपवित्रारोपणमुक्तं अस्यांपौर्णमास्यांसंन्यासिनांचातुर्मास्यावाससंकल्पांगत्वेनक्षौरव्यासपूजादिकंविहितं अत्रकर्मणिऔदयिकीत्रिमुहूर्तापौर्णमासीग्राह्या चातुर्मास्यमध्येतुवपनंवर्जयेद्यतिः चातुर्मासंद्विमासंवासदैकत्रैवसंवसेत् ॥**

आषाढ शुक्ल द्वादशीचे दिवसीं वामनाची पूजा करावी, तेणेंकरून नरमेधयज्ञाचें फल मिळतें. पूर्वाषाढा नक्षत्रानें युक्त अशा पौर्णिमेच्या दिवसीं अन्न, पान इत्यादिकांचें दान केल्यानें अ-

क्षय्य असी अन्नादिकाची प्राप्ति होते. ह्याच पौर्णिमेच्या दिवसीं श्रीशिवाचा शयनोत्सव करावा व त्या उत्सवाविषयीं पौर्णिमा प्रदोषकालव्यापिनी घ्यावी. ह्याच पौर्णिमेच्या दिवसीं कोकिलाव्रत करावें त्या कोकिलाव्रताविषयीं, " स्नानं करिष्ये नियता ब्रह्मचर्ये स्थिता सती ॥ भोक्ष्यामि नक्तं भूशय्यां करिष्ये प्राणिनां दयां, " असा मासपर्यंत व्रताचा संकल्प करून कोकिलारूपिणी शिवा देवीचें दररोज पूजन करून नक्तभोजन करावें. ज्या वर्षी अधिकमास आषाढ होतो त्याच वर्षामध्यें शुद्ध आषाढमासांत व्रत करावें असा जो सर्वत्र आचार आहे तो निर्मूल आहे. आषाढ, किंवा श्रावण या मासांत पौर्णिमा, चतुर्दशी किंवा अष्टमी यांतून कोणत्याहि एक दिवसीं शिवाचें पवित्रारोपण करावें. ह्या पौर्णिमेचे दिवसीं यतींनीं क्षौर करून चार महिने एकत्र राहण्याचा संकल्प करून व्यासपूजा करावी, असें सांगितलें आहे. ह्या कृत्याविषयीं पौर्णिमा सूर्योदयापासून साहा घटिका असी असेल ती घ्यावी. "चातुर्मास्यामध्यें यतीनें क्षौर करूं नये, व चार महिने अथवा दोन महिने नेहमीं एकाच स्थलीं राहावें."

---

तत्रादौक्षौरंविधायद्वादशमृत्तिकास्नानानिप्राणायामादिविधिंचकृत्वाव्यासपूजांकुर्यात् अथसंक्षेपेणतद्विधिः देशकालौसंकीर्त्यचातुर्मास्यवाससंकल्पंकर्तुंश्रीकृष्णव्यासभाष्यकाराणांसपरिवाराणांपूजनंकरिष्येइतिसंकल्प्य मध्येश्रीकृष्णंतत्पूर्वतःप्रादक्षिण्येनवासुदेवसंकर्षणप्रद्युम्नानिरुद्धानावाह्य श्रीकृष्णपंचकदक्षिणभागेव्यासंतत्पूर्वतःप्रादक्षिण्येनसुमंतुजैमिनिवैशंपायनपैलानितिव्यासपंचकमावाह्यश्रीकृष्णादिवामेभाष्यकारंश्रीशंकरंतत्पूर्वतः प्रादक्षिण्येनपद्मपादविश्वरूपत्रोटकहस्तामलकाचार्यानावाह्यश्रीकृष्णपंचके श्रीकृष्णपार्श्वयोर्ब्रह्मरुद्रौपूर्वादिचतुर्दिक्षुसनकादीन् श्रीकृष्णपंचकात्पुरतःगुरुपरमगुरुपरमेष्ठिगुरून् ब्रह्मवसिष्ठशक्तिपराशरव्यासशुकगौडपादगोविंदपादशंकराचार्यान्ब्रह्मनिष्ठांश्चावाह्य पंचकत्रयस्याग्नेयेगणेशंईशान्येक्षेत्रपालंवायव्येदुर्गांनैर्ऋत्येसरस्वतींप्रागाद्यष्टदिक्षुइंद्रादिलोकपालांश्चावाह्यपूजयेत् तत्रनारायणाष्टाक्षरेणश्रीकृष्णपूजाअन्येषांप्रणवादिनमोतैस्तत्तन्नाममंत्रैःपूजाकार्या पूजांतेअसतिप्रतिबंधेचतुरोवार्षिकान्मासानिहवसामिइतिमनसासंकल्प्य अहंतावन्निवत्स्यामिसर्वभूतहितायवै प्रायेणप्रावृषिप्राणिसंकुलंवर्त्मदृश्यते अतस्तेषामहिंसार्थंपक्षान्वैश्रुतिसंश्रयान् स्थास्यामश्चतुरोमासानत्रैवासतिबाधके इतिवाचिकसंकल्पंकुर्यात् ततोगृहस्थाःप्रतिब्रूयुः निवसंतुसुखेनात्रगमिष्यामःकृतार्थतांयथाशक्तिचशुश्रूषांकरिष्यामोवयंमुदेति ततोवृद्धानुक्रमेणयतीन्गृहस्थाःयतयश्चान्योन्यंनमस्कुर्युः एतद्विधिःपौर्णमास्यामसंभवेद्वादश्यांकार्यः आषाढकृष्णद्वितीयायामशून्यशयनंव्रतं अत्रलक्ष्मीयुतंविष्णुंपर्यंकेसंपूज्य पत्नीभर्तुर्वियोगंचभर्ताभार्यासमुद्भवं नाप्नुवंतियथादुःखंदंपत्यानितथाकुर्वित्यादिभिर्दांपत्याभंगप्रार्थनार्थैर्मंत्रैःप्रार्थयेत् ततश्चंद्रायार्घ्यंदत्वानक्तभोजनंकार्यं एवंमासचतुष्टयेकृष्णद्वितीयासुसंपूज्यसपत्नीकायशय्यादानंकृत्वा

---

१ व्रतराजेवाराहे ॥ आषाढौ द्वौ यदा स्यातां कोकिलायास्तदार्चनं ॥ तथा या कुरुते नारी न सा वैधव्यमाप्नुयात् ॥ १ ॥ शृणु देवि प्रवक्ष्यामि मंत्रैः पौराणिकैर्युतं ॥ मलमासे त्वतिक्रांते शुद्धाषाढे समागते ॥२॥ आषाढ्यां पौर्णमास्यां तु संध्याकाले ह्युपस्थिते ॥ संकल्पयेन्मासमेकं श्रावणप्रभृति ह्यहं ॥ सौभाग्यधनधान्यादिप्राप्तये शिवतुष्टये ॥

तांप्रतिमांचसोपस्करांदद्यात् अस्मिन्व्रतेअक्षय्यंदांपत्यसुखंपुत्रधनाद्यवियोगोगार्हस्थ्याविद्यो ग:सप्तजन्मनिभवति अत्रव्रतेचंद्रोदयव्यापिनीतिथिर्ग्राह्या चंद्रोदयेपूजाद्युक्तेः दिनद्वयेसत्त्वेऽसत्त्वेवापरैव ॥ इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारेआषाढमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥

## संन्यासी यांनीं चातुर्मास्य एके ठिकाणीं राहावें त्याचा विधि.

यतींनीं प्रथम क्षौर करून बारा मृत्तिकास्नानें व प्राणायाम इत्यादिक विधि हे करून व्यासपूजा करावी. ती असी,—देशकालादिकांचा उच्चार करून "चातुर्मास्यवाससंकल्पं कर्तुं श्रीकृष्णव्यासभाष्यकाराणां सपरिवाराणां पूजनं करिष्ये," असा संकल्प करून मध्यभागीं श्रीकृष्णाचें आवाहन करून त्याचे पूर्वदिशेकडून प्रदक्षिणवृत्तानें वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न, अनिरुद्ध, यांचें आवाहन करून श्रीकृष्णादि पांच देवतांच्या दक्षिण प्रदेशीं व्यासाचें आवाहन करावें. नंतर त्याच्या पूर्वेकडून प्रदक्षिणवृत्तानें सुमंतु, जैमिनि, वैशंपायन, पैल यांचें आवाहन करावें; आणि श्रीकृष्णादि देवतांच्या डाव्या बाजूस भाष्यकार श्रीशंकराचार्यांचें आवाहन करावें. नंतर त्याच्या पूर्व दिशेपासून प्रदक्षिणवृत्तानें पद्मपाद, विश्वरूप, त्रोटक, हस्तामलक ह्या आचार्यांचें आवाहन करून नंतर श्रीकृष्णादि पांच देवतांमध्यें—श्रीकृष्णाच्या दोन बाजूंस ब्रह्मा, आणि रुद्र; पूर्वादिक चार दिशांचे ठिकाणीं सनक, सनंदन, सनातन, सनत्कुमार यांचें आवाहन करावें. श्रीकृष्णादि पांच देवतांच्या अग्रभागीं गुरु, परमगुरु, परमेष्ठिगुरु, ब्रह्मा, वसिष्ठ, शक्ति, पराशर, व्यास, शुक, गौडपाद, गोविंदपाद, शंकराचार्य, आणखी इतर ब्रह्मनिष्ठ या सर्वांचें आवाहन करून श्रीकृष्णादि देवतांच्या आग्नेयप्रदेशीं गणपति, ईशान्यप्रदेशीं क्षेत्रपाल, वायव्यप्रदेशीं दुर्गा, नैर्ऋत्यप्रदेशीं सरस्वती, आणि पूर्वेपासून आठ दिशांचे ठिकाणीं इंद्रादिक आठ लोकपाळ, याप्रमाणें ह्या सर्व देवतांचें आवाहन करून पूजा करावी. नंतर नारायणाच्या अष्टाक्षरमंत्रेंकरून श्रीकृष्णपूजा करावी. इतरांची ओंकारादि नमोंत अशा नाममंत्रांनीं पूजा करावी. पूजा झाल्यानंतर प्रतिबंध नसेल तर, "चतुरो वार्षिकान् मासान् इह वसामि," असा मनांत संकल्प करून, "अहंतावन्निवत्स्यामि सर्वभूतहिताय वै ॥ प्रायेण प्रावृषि प्राणिसंकुलं वर्त्म दृश्यते ॥ अतस्तेषामहिंसार्थं पक्षान् वै श्रुतिसंश्रयान् ॥ स्थास्यामश्चतुरो मासानत्रै वासति बाधके," असा वाचिक संकल्प करावा. तदनंतर यतींला गृहस्थांनीं प्रत्युत्तर द्यावें. "सुखेंकरून आपण एथें राहा, तेणेंकरून आह्मी धन्य होऊं, आणि आह्मी तुमची शुश्रूषा यथाशक्ति आनंदानें करूं." असें ह्मटल्यावर गृहस्थांनीं यतींला वृद्धानुक्रमानें व यतींनीं परस्परांस नमस्कार करावे. हा विधि पौर्णिमेचे दिवसीं न होईल तर द्वादशीचे दिवसीं करावा. आषाढकृष्ण द्वितीयेचे दिवसीं अशून्यशयन नामक व्रत करावें. ह्या व्रताचे ठिकाणीं लक्ष्मीयुक्त विष्णूची मंचकावर पूजा करून प्रार्थना करावी. "पत्नीभर्तुर्वियोगं च भर्ता भार्यासमुद्भवं ॥ नाप्नुवंति यथा दुःखं दं-

पत्यानि तथा कुरु," इत्यादिक दांपत्याच्या अभंग प्रार्थनार्थक मंत्रांनीं प्रार्थना करून नंतर चंद्राला अर्घ्य देऊन नक्तभोजन करावें. याप्रमाणें चार महिनेपर्यंत कृष्णद्वितीया तिथीचे दिवसीं पूजा करून सपत्नीक अशा ब्राह्मणाला शय्या दान करून ती प्रतिमा सर्व सामग्रीसह दान करावी. हें व्रत केलें असतां अक्षय असें दांपत्यसुख, पुत्र, धन, गृहस्थाश्रम, इत्यादिकांचा अवियोग, इत्यादि सप्तजन्मपर्यंत प्राप्त होतात. चंद्रोदयीं पूजा करावी असें सांगितलें आहे यास्तव ह्या व्रताविषयीं चंद्रोदयव्यापिनी तिथि घ्यावी. दोन दिवसीं चंद्रोदयव्यापिनी असेल अथवा नसेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे आषाढमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥

---

अथश्रावणमासः ॥ सिंहेपूर्वाःषोडशनाड्यःपुण्यकालःरात्रौतूक्तं अत्रमासेएकभक्तव्रतंनक्तव्रतंविष्णुशिवाद्यभिषेकश्चोक्तः सिंहराशिगतेसूर्येयस्यगौःप्रसूयतेतेनव्याहृतिभिर्घृताक्तायुतसंख्यसर्षपहोमंकृत्वासागौर्ब्राह्मणायदेया एवंनिशीथेगोःक्रंदनेपिमृत्युंजयमंत्रेणहोमादिरूपाशांतिःकार्या एवंश्रावणमासेदिवाश्विनीप्रसवोपिनिषिद्धः माघेबुधेचमहिषीश्रावणे वडवादिवा सिंहेगावःप्रसूयंतेस्वामिनोमृत्युदायकाइत्युक्तेरत्रापिशांतिःशांतिग्रंथतोज्ञेयासोमवारव्रतंकार्यंश्रावणेवैयथाविधि शक्तेनोपोषणंकार्यमथवानिशिभोजनं एवंश्रावणेभौमवारेगौरीपूजाप्युक्ता श्रावणशुक्लचतुर्थीमध्यान्हव्यापिनीपूर्वयुताग्राह्या श्रावणशुक्लपंचमीनागपंचमी इयमुदयेत्रिमुहूर्तव्यापिनीपरविद्धाग्राह्या परेद्युस्त्रिमुहूर्तन्यूनापंचमीपूर्वेद्युस्त्रिमुहूर्तन्यूनचतुर्थ्याविद्धातदापूर्वैव त्रिमुहूर्ताधिकचतुर्थीवेधेद्विमुहूर्तापिपरैव मुहूर्तमात्रातुनग्राह्येति ममप्रतिभाति अस्यांभित्त्यादिलिखिताः मृन्मयावायथाचारंनागाःपूज्याः श्रावणशुक्लद्वादश्यांमासंकृतस्यशाकवर्जनव्रतस्यसांगतार्थं ब्राह्मणायशाकदानंकरिष्यइतिसंकल्प्यब्राह्मणं संपूज्य उपायनमिदंदेवव्रतसंपूर्णहेतवे शाकंतुद्विजवर्यायसहिरण्यंददाम्यहं इत्यादिमंत्रेण पक्कमामंवाशाकंदद्यात् ततोदधिभाद्रपदेमासेवर्जयिष्येसदाहरेइतिदधिव्रतंसंकल्पयेत् अत्र दधिमात्रंवर्ज्यंतक्रादीनामनिषेधः अथपारणाहेद्वादश्यांविष्णोःपवित्रारोपणं पारणाहेद्वादश्यसत्त्वेत्रयोदश्यांपारणाहेतत्रासंभवेश्रवणर्क्षेपूर्णिमायांवाकार्यं शिवपवित्रंचतुर्दश्यामष्टम्यां वापौर्णमास्यांवाकार्यं एवंदेवीगणेशदुर्गादीनांचतुर्दशीचतुर्थीतृतीयानवम्यादयोयथाकुलाचारंतिथयः तत्तत्तिथिष्वसंभवेसर्वदेवानांश्रावणपौर्णमास्यांकार्यं तत्राप्यसंभवेकार्त्तिक्यवधि गौणकालः इदंनित्यं अकुर्वाणोव्रजत्यधः तस्यसांवत्सरीपूजानिष्फलेत्याद्युक्तेः गौणकालेप्यकरणेतदायुतंजपेन्मंत्रंस्तोत्रंवापिसमाहितइत्युक्तेरयुतसंख्याकतद्देवतामूलमंत्रजपःप्रायश्चित्तं तत्रपूर्वेद्युरधिवासनंपरेन्हिपवित्रारोपणं द्व्यहकालासंभवेसद्योधिवासनपूर्वकंतत्कार्यं ॥

## आतां श्रावणमासांतील कृत्यें सांगतों.

सिंह संक्रांतीच्या पूर्वींच्या सोळा घटिका पुण्यकाळ. रात्रीं संक्रांति होईल तर पूर्वीं सांगितल्याप्रमाणें पुण्यकाळ जाणावा. या मासांत एकभक्तव्रत, नक्तव्रत, आणि शिव व विष्णु इत्यादिकांवर अभिषेक हीं करावीं. सिंह राशीला सूर्य असतां ज्याची गाई विते त्यानें व्याहृति

मंत्रांनीं घृताक्त ( तुपांत भिजवलेल्या ) मोहऱ्यांचा दहासहस्र होम करून ती व्यालेली गाय ब्राह्मणाला द्यावी. याप्रमाणें मध्यरात्रीं गाई उंच स्वरानें ओरडली असतांहि मृत्युंजयमंत्रेंकरून होमादिरूप शांति करावी. याप्रमाणें श्रावण मासांत दिवसा अश्विनी ( घोडी ) प्रसवली असतां निषेध आहे, "माघमास, व बुधवार, या दिवसीं महिषी ( ह्मैस ); श्रावण मासांत दिवसा घोडी; आणि सिंहसंक्रांतींत गाई, ह्या प्रसूत होतील तर त्या आपल्या यजमानाला मृत्यु देणाऱ्या होतात," असें वचन आहे यास्तव याचे ठिकाणींहि शांति करावी. ती, शांतींचे ग्रंथ आहेत त्यांतून जाणावी. "श्रावण मासांत यथाविधि सोमवार व्रत करावें. सशक्त असेल त्यानें उपोषण करावें, अथवा रात्रीं भोजन करावें." याप्रमाणें श्रावण मासांत मंगळवारीं गौरीची पूजा करावी. श्रावणशुद्ध चतुर्थी मध्यान्हकालव्यापिनी असून पूर्व तिथीनें युक्त असी घ्यावी. श्रावणशुद्ध पंचमी हिला नागपंचमी असें ह्मणतात. ही पंचमी सूर्योदयकालीं साहा घटिका असून षष्ठीनें विद्ध असेल ती घ्यावी. दुसऱ्या दिवसीं पंचमी साहा घटिकांपेक्षां कमी असेल आणि पूर्व दिवसीं साहा घटिकांहून कमी अशा चतुर्थीनें विद्ध असेल तर पूर्व दिवसाचीच घ्यावी. पूर्वदिवसीं साहा घटिकांपेक्षां अधिक असा चतुर्थीचा वेध असेल तर चार घटिका असली तरी दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. दुसऱ्या दिवसीं दोन घटिका असेल तर ती घेऊं नये, असें मला वाटतें. ह्या पंचमीचे दिवसीं मृन्मय ( मातीचे ) नागांचें पूजन करावें. अथवा भिंतीवर काढून पूजा करावी, याप्रमाणें जसा आचार असेल तदनुसार करावें. श्रावणशुद्ध द्वादशीचे दिवसीं, "**मासंकृतस्य शाकवर्जनव्रतस्य सांगतार्थं ब्राह्मणाय शाकदानं करिष्ये,**" असा संकल्प करून ब्राह्मणाची पूजा करावी. नंतर "**उपायनमिदं देव व्रतसंपूर्णहेतवे ॥ शाकं तु द्विजवर्याय सहिरण्यं ददाम्यहं,**" इत्यादिक मंत्रेंकरून पक्व किंवा हिरवी असी शाक द्यावी. तदनंतर "**दधि भाद्रपदे मासे वर्जयिष्ये सदा हरे,**" असा दधिव्रताचा संकल्प करावा. ह्या व्रतामध्यें दहीं मात्र वर्ज्य करावें, ताक, तूप इत्यादिकांचा निषेध नाहीं. यानंतर पारणेच्या दिवसीं द्वादशीमध्यें विष्णूला पोवतें घालावें. पारणेच्या दिवशीं द्वादशी नसेल तर त्रयोदशीमध्यें पारणासमयीं, त्या वेळीं न होईल तर श्रवण नक्षत्र, किंवा पौर्णिमा या दिवसीं पोवतें घालावें. चतुर्दशी, अष्टमी किंवा पौर्णिमा यांतून कोणत्याहि दिवसीं शिवाचीं पोवतीं करावीं. याप्रमाणें देवी, गणपति, दुर्गा इत्यादिकांच्या पोवत्यांविषयीं चतुर्दशी, चतुर्थी, तृतीया, नवमी इत्यादिक तिथि जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें घ्याव्या. त्या त्या तिथीचे दिवसीं न होतील तर सर्व देवांचीं श्रावण पौर्णिमेचे दिवसीं पोवतीं करावीं. पौर्णिमेचे दिवसीं न होतील तर कार्तिक पौर्णिमेपर्यंत करावीं, हा गौणकाल जाणावा. "हीं पोवतीं न केलीं असतां वर्षपर्यंत केलेली पूजा व्यर्थ होऊन शेवटीं अधोयोनीला जातो," असें वचन आहे यास्तव हीं नित्य आहेत ह्मणून अवश्य करावीं. गौणकालींहि न केलीं असतां, "त्या कालीं सावधान होत्साता मंत्राचा दहासहस्र जप, आणि स्तोत्रपाठ करावा," असें वचन आहे याकरितां दहासहस्र त्या देवतेच्या मूलमंत्राचा जप करावा हें प्रायश्चित्त करावें. पूर्वदिवसीं अधिवासन करून दुसऱ्या दिवसीं पोवतें घालावें. दोन दिवसांचा संभव नसेल तर एकाच दिवसीं पूर्वी अधिवासन करून नंतर पोवतें घालावें.

---

अथसंक्षेपतःप्रयोगः कार्पाससूत्रस्यनवसूत्रींविधायअष्टोत्तरशतनवसूत्र्यादेवजानुपर्यंतं चतुर्विंशतिग्रंथिकमुत्तमपवित्रं चतुःपंचाशन्नवसूत्र्याऊरुलंबिद्वादशग्रंथिकं मध्यमं सप्तविंशतिनवसूत्र्याअष्टग्रंथिकं नाभिपर्यंतंकनिष्ठंपवित्रंचकृत्वा विंशत्युत्तरशतेनसप्तत्यावानवसूत्र्यापादलंबिनींवनमालामष्टोत्तरशतचतुर्विंशत्यन्यतरग्रंथिकां कृत्वा द्वादशनवसूत्र्याद्वादशग्रंथिकं गंधपवित्रंसप्तविंशतिनवसूत्र्यागुरुपवित्रंत्रिसूत्र्यांगदेवतापवित्राणिकुर्यात् शिवपवित्राणिलिंगविस्तारानुसारेणकुर्यात् सर्वाणिपवित्राणिपंचगव्येनप्रोक्ष्यप्रणवेनप्रक्षाल्यमूलेनाष्टोत्तरशतमभिमंत्र्य ग्रंथीन्कुंकुमेनरंजयित्वासर्वपवित्राणिवंशपात्रे संस्थाप्यवस्त्रेणपिधायदेवपुरतोन्यस्य क्रियालोपविधानार्थंयत्त्वयाविहितंप्रभो मयैतत्क्रियतेदेवतवतुष्ट्यैपवित्रकं नमेविघ्नोभवेद्देवकुरुनाथदयांमयि सर्वथासर्वदाविष्णोममत्वंपरमागतिरितिप्रार्थ्याधिवासनं कुर्यात् तत्र देशकालौसंकीर्त्य संवत्सरकृतपूजाफलावाप्त्यर्थं अमुकदेवताप्रीत्यर्थं अधिवासनविधिपूर्वकंपवित्रारोपणंकरिष्ये इतिसंकल्प्यदेवपुरतः सर्वतोभद्रेजलपूर्णं कुंभं संस्थाप्य कुंभेवंशपात्रंतत्रतानिपवित्राणिनिधायतेषु संवत्सरस्ययागस्यपवित्रीकरणायभोः विष्णुलोकात्पवित्राद्यआगच्छेहनमोस्तुते इतिमंत्रेणमूलमंत्रेणचावाह्यत्रिसूत्र्यांब्रह्मविष्णुरुद्रान्नवसूत्र्यांॐकारसोमवन्हिब्रह्मनागेशसूर्यशिवविश्वेदेवानुत्तममध्यमकनिष्ठपवित्रेषु ब्रह्मविष्णुरुद्रान्सत्वरजस्तमांस्यावाह्यवनमालायांप्रकृतिंचावाह्यमूलमंत्रेणश्रीपवित्राद्यावाहितदेवताभ्यो नमइत्यंतेनगंधाद्युपचारैःपूजयेत् ततःपूर्वसंपादितंवितस्तिमात्रंद्वादशग्रंथिकं गंधपवित्रमादाय विष्णुतेजोद्भवंरम्यंसर्वपातकनाशनं सर्वकामप्रदंदेवतवांगेधारयाम्यहमितिमंत्रेणमूलसंपुटितेनदेवपादयोःसमर्पयेत् देवस्यकरेबध्नीयादित्यन्ये ततोदेवंपंचोपचारैःसंपूज्यप्रार्थयेत् आमंत्रितोसिदेवेशपुराणपुरुषोत्तम प्रातस्त्वांपूजयिष्यामिसान्निध्यंकुरुकेशव क्षीरोदधिमहानागशय्यावस्थितविग्रह प्रातस्त्वांपूजयिष्यामिसन्निधौभवतेनमः ततःसाष्टांगंप्रणम्यपुष्पांजलिंदद्यात् इत्यधिवासनं अत्र सर्वत्रमूलमंत्रोगुरूपदिष्टस्तांत्रिकोवैदिकोवादेवगायत्रीरूपो वामाह्यः ॥

## आतां संक्षेपेंकरून पोवत्यांचा प्रयोग सांगतों.

कापसाचें सूत काढून त्याची नवसुती करून त्या नवसुतीचें एकशें आठ फेऱ्यांचें व मूर्तीच्या गुडघ्यापर्यंत पोंचे इतकें लांब, व चोवीस ग्रंथींनीं युक्त असें जें पोवतें तें उत्तम—चौपन्न फेऱ्यांचें असून मांड्यांपर्यंत व बारा ग्रंथींनीं युक्त तें मध्यम—सत्तावीस फेऱ्यांचें असून नाभीपर्यंत व आठ ग्रंथींनीं युक्त तें कनिष्ठ, याप्रमाणें पोवतें करून नंतर नवसुतीचे एकशें वीस फेरे, किंवा सत्तर फेरे असे घेऊन पायांपर्यंत लोंबणारी व एकशें आठ किंवा चौवीस अशा ग्रंथींनीं युक्त, याप्रमाणें वनमाला करावी. मग नवसुतीचे बारा फेऱ्यांचें व बारा ग्रंथींनीं युक्त असें गंधपवित्र करावें. नवसुतीचे सत्तावीस फेऱ्यांचें गुरुपवित्रक करावें, व तिसुतीनें अंगदेवतांचीं पोवतीं करावीं. शिवाचीं पोवतीं लिंगाचा विस्तार असेल तदनुसार करावीं. याप्रमाणें पोवतीं करून पंचगव्यानें त्यांवर प्रोक्षण करून ओंकारानें त्यांचें प्रक्षालन करावें व

मूलमंत्रानें एकशें आठ वेळ अभिमंत्रण करून त्या ग्रंथींला कुंकुमानें सुशोभित करून सर्व पोवतीं वंशपात्रांत ( बांबूच्या पात्रांत ) ठेवून त्यावर वस्त्र आच्छादन ( झांकण ) घालून देवाच्या पुढें ठेवावीं, आणि प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र–"**क्रियालोपविधानार्थं यत्त्वया विहितं प्रभो ॥ मयैतत्क्रियतेदेव तव तुष्ट्यै पवित्रकं ॥ नमे विघ्नो भवेद्देव कुरु नाथ दयां मयि ॥ सर्वथा सर्वदा विष्णो मम त्वं परमा गतिः,**" असी प्रार्थना करून अधिवासन करावें. तें असें,–देशकालांचा उच्चार झाल्यावर, "**संवत्सरपूजाफलावाप्त्यर्थं अमुकदेवताप्रीत्यर्थं अधिवासनविधिपूर्वकं पवित्रारोपणं करिष्ये,**" असा संकल्प करून देवाच्या पुढें सर्वतोभद्र मंडळावर उदकानें पूर्ण असा कलश ठेवून त्या कलशावर वंशपात्र ( बांबूचें पात्र ) ठेवून त्यांत तीं पोवतीं ठेवावीं. नंतर त्यांचे ठिकाणीं "**संवत्सरस्य यागस्य पवित्रीकरणाय भोः ॥ विष्णुलोकात् पवित्राद्य आगच्छेह नमोस्तुते,**" या मंत्रेंकरून आणि मूलमंत्रानें आवाहन करून तिसुतीचे ठिकाणीं ब्रह्मा, विष्णु, रुद्र यांचें व नवसुतीचे ठिकाणीं ओंकार, सोम, वन्हि, ब्रह्मा, नागेश, सूर्य, शिव, विश्वेदेव यांचें उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ अशा पोवत्यांचे ठिकाणीं ब्रह्मा, विष्णु, रुद्र, व सत्व, रज, तम यांचें आवाहन करून वनमालेवर प्रकृतीचें आवाहन करून मूलमंत्रानें गंधादिक उपचारांनीं पूजा करावी. नंतर पूर्वी तयार केलेलें, वितस्तिमात्र ( वीतभर ) बारा ग्रंथींनीं युक्त असें गंधपवित्र हातीं घेऊन, "**विष्णुतेजोद्भवं रम्यं सर्वपातकनाशनं ॥ सर्वकामप्रदं देव तवांगे धारयाम्यहं,**" ह्या मूलसंपुटित मंत्रेंकरून देवाच्या पायांवर अर्पण करावें. देवाच्या हाताला बांधावें असेंहि कोणी ह्मणतात. तदनंतर गंधादिपंचोपचारांनीं देवाची पूजा करून प्रार्थना करावी.–"**आमंत्रितोसि देवेश पुराणपुरुषोत्तम ॥ प्रातस्त्वां पूजयिष्यामि सान्निध्यं कुरु केशव ॥ क्षीरोदधिमहानागशय्यावस्थितविग्रह ॥ प्रातस्त्वां पूजयिष्यामि सन्निधौ भवते नमः**" ॥ याप्रमाणें प्रार्थना झाल्यावर साष्टांग नमस्कार करून पुष्पांजलि समर्पण करावी. याप्रमाणें अधिवासन समाप्त झालें. एथें सर्वत्र मूलमंत्र, गुरूनें उपदिष्ट असेल तो तांत्रिक, अथवा वैदिक, किंवा देवगायत्रीरूप घ्यावा.

---

**ततोरात्रिंसत्कथाजागरेणातिवाह्यप्रातःकालेसद्योधिवासनेगोदोहांतरितेवाकालेपवित्रारो**पणांगभूतंदेवपूजनंपवित्रपूजनंचकरिष्येइतिसंकल्प्यदेवंपवित्राणिचफलाद्युपनैवेद्यांतगंधाद्युपचारैःसंपूज्यगंधदूर्वाक्षतयुतंकनिष्ठंपवित्रमादाय देवदेवनमस्तुभ्यंगृहाणेदंपवित्रकं पवित्रीकरणार्थायवर्षपूजाफलप्रदं पवित्रकंकुरुष्वाद्ययन्मयादुष्कृतंकृतं शुद्धोभवाम्यहंदेवत्वत्प्रसादात्सुरेश्वरेतिमंत्रेणमूलसंपुटितेनदत्वा मध्यमोत्तमपवित्रेवनमालांचैवमेवैतन्मंत्रावृत्त्यादद्यात् अंगदेवताभ्योनाम्नासमर्प्यमहानैवेद्यंदत्वानीराज्यप्रार्थयेत् मणिविद्रुममालाभिर्मंदारकुसुमादिभिः इयंसांवत्सरीपूजातवास्तुगरुडध्वज वनमालांयथादेवकौस्तुभंसततंहृदि तद्वत्पवित्रतंतूंस्त्वंपूजांचहृदयेवह जानताऽजानतावापियत्कृतंनतवार्चनं केनचिद्विघ्नदोषेणपरिपूर्णंतदस्तुमे मंत्रहीनंक्रियाही**नंभक्तिहीनंसुरेश्वर यत्पूजितंमयादेवपरिपूर्णंतदस्तुमे अपराध** सहस्राणिक्रियंतेहर्निशंमया **दासोहमितिमांमत्वाक्षमस्वपरमेश्वरेति अत्रशिवादौगरुडध्व**

जेत्यादौवृषवाहनेत्यूहः वनमालामितिश्लोकस्यतुलोपः देव्यांतुदेवदेवसुरेश्वरेत्यादौदेविदेविसुरेश्वरीत्यादिस्त्रीप्रत्ययांतपदोहःकार्यः शेषंसमानंततोगुरुंसंपूज्यपवित्रंदत्वान्यब्राह्मणेभ्यःसुवासिनीभ्यश्चान्यानिदत्वा स्वयमपिसकुटुंबोधारयेत् ततोब्राह्मणैःसहभुक्त्वात्रिरात्रंब्रह्मचर्यादिनियमवान्देवेपवित्राणिधारयेत् देवस्यस्नानादिकोपचारान्पवित्राणिउत्तार्यकारयेत् त्रिरात्रांतेदेवंसंपूज्यपवित्राणिविसर्जयेत् अत्रशिवादिपवित्रारोपणेचतुर्दशीपूर्वविद्धाग्राह्या एवंपूर्णिमापित्रिमुहूर्तसायान्हव्यापिनीपूर्वविद्धैवग्राह्या अष्टम्यादितिथ्यंतराण्यपिपवित्रारोपणेप्रथमपरिच्छेदोक्तसामान्यतिथिनिर्णयानुसारेणग्राह्याणि ॥ इति पवित्रारोपणविधिः ॥

तदनंतर सत्कथायुक्त जागरणानें रात्र दवडून प्रातःकालीं, तत्काल अधिवासन करणें असेल तर गाईच्या दोहनकालीं, “ पवित्रारोपणांगभूतं देवपूजनं पवित्रपूजनं च करिष्ये,” असा संकल्प करून देवाची व पोवत्यांची फलादिक नैवेद्यापर्यंत गंधादिक उपचारांनीं पूजा करून गंध, दूर्वा, अक्षता, यांहीं युक्त असें कनिष्ठ पोवतें घेऊन, “ देवदेव नमस्तुभ्यं गृहाणेदं पवित्रकं ॥ पवित्रीकरणार्थाय वर्षपूजाफलप्रदं ॥ पवित्रकं कुरुष्वाद्ययन्मया दुष्कृतं कृतं ॥ शुद्धो भवाम्यहं देव त्वत्प्रसादात्सुरेश्वर” ॥ ह्या मूलसंपुटित मंत्रानें तें पोवतें समर्पण करून मध्यम, उत्तम पोवतीं आणि वनमाला हीं सर्व पूर्वोक्त मंत्रेंकरून समर्पण करावीं. अंगदेवतांला नाममंत्रेंकरून समर्पण करून महानैवेद्य अर्पण करून आरती करावी आणि प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र–“ मणिविद्रुममालाभिर्मंदारकुसुमादिभिः ॥ इयं सांवत्सरी पूजा तवास्तु गरुडध्वज ॥ वनमालां यथा देव कौस्तुभं सततं हृदि ॥ तद्वत्पवित्रतंतूंस्त्वं पूजां च हृदये वह ॥ जानताऽजानता वापि यत्कृतं न तवार्चनं ॥ केनचिद्विघ्नदोषेण परिपूर्णं तदस्तु मे ॥ मंत्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं सुरेश्वर ॥ यत्पूजितं मया देव परिपूर्णं तदस्तु मे ॥ अपराधसहस्राणि क्रियंतेऽहर्निशं मया ॥ दासोऽहमिति मां मत्वा क्षमस्व परमेश्वर. ” ॥ शिव, इत्यादिक देवांचीं पोवतीं असतील तर ‘ गरुडध्वज ’ इत्यादिकस्थानीं ‘ वृषवाहन ’ असा ऊह करावा. ‘ वनमालां ’ ह्या श्लोकाचा लोप जाणावा. देवीचीं पोवतीं असतील तर ‘ देवदेव सुरेश्वर ’ इत्यादिस्थानीं ‘ देविदेवि सुरेश्वरि ’ इत्यादिक स्त्रीप्रत्ययांत पदांचा ऊह करावा, व इतर सर्व समान जाणावें.–तदनंतर गुरूची पूजा करून पोवतें द्यावें व इतर ब्राह्मण, सुवासिनी यांना दुसरीं पोवतीं देऊन नंतर सर्व कुटुंबासह आपण पोवतीं धारण करावीं. त्यानंतर ब्राह्मणांसह भोजन करून त्रिरात्रपर्यंत ब्रह्मचर्यादि नियम धारण करीत होत्साता देवाला पोवतीं वाहावीं. मग देवावरचीं पोवतीं उतरून स्नानादिक उपचारांनीं पूजा करावी. याप्रमाणें तीन रात्रि गेल्यावर देवाची पूजा करून देवावरील पोवतीं काढावीं. शिव इत्यादिक देवतांचे पोवत्यांविषयीं चतुर्दशी पूर्व तिथीनें विद्ध असी घ्यावी. याप्रमाणें पौर्णिमा, साहा घटिका सायान्हकालव्यापिनी पूर्वविद्धाच घ्यावी. अष्टमी इत्यादिक दुसऱ्या तिथि पोवत्यांविषयीं घेणें त्या प्रथम परिच्छेदांत सामान्य तिथिनिर्णय सांगितला आहे त्याप्रमाणें घ्याव्या. याप्रमाणें पोवत्यांचा विधि संपूर्ण झाला.

---

मूलमंत्रानें एकशें आठ वेळ अभिमंत्रण करून त्या ग्रंथींला कुंकुमानें सुशोभित करून सर्व पोवतीं वंशपात्रांत ( बांबूच्या पात्रांत ) ठेवून त्यावर वस्त्र आच्छादन ( झांकण ) घालून देवाच्या पुढें ठेवावीं, आणि प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र—"क्रियालोपविधानार्थं यत्त्वया विहितं प्रभो ॥ मयैतत्क्रियतेदेव तव तुष्ट्यै पवित्रकं ॥ नमे विघ्नो भवेद्देव कुरु नाथ दयां मयि ॥ सर्वथा सर्वदा विष्णो मम त्वं परमा गतिः," असी प्रार्थना करून अधिवासन करावें. तें असें,—देशकालांचा उच्चार झाल्यावर, "संवत्सरपूजाफलावाप्त्यर्थं अमुकदेवताप्रीत्यर्थं अधिवासनविधिपूर्वकं पवित्रारोपणं करिष्ये," असा संकल्प करून देवाच्या पुढें सर्वतोभद्र मंडळावर उदकानें पूर्ण असा कलश ठेवून त्या कलशावर वंशपात्र ( बांबूचें पात्र ) ठेवून त्यांत तीं पोवतीं ठेवावीं. नंतर त्यांचे ठिकाणीं "संवत्सरस्य यागस्य पवित्रीकरणाय भोः ॥ विष्णुलोकात् पवित्राद्य आगच्छेह नमोस्तुते," या मंत्रेंकरून आणि मूलमंत्रानें आवाहन करून तिसुतीचे ठिकाणीं ब्रह्मा, विष्णु, रुद्र यांचें व नवसुतीचे ठिकाणीं ओंकार, सोम, वन्हि, ब्रह्मा, नागेश, सूर्य, शिव, विश्वेदेव यांचें उत्तम, मध्यम आणि कनिष्ठ अशा पोवत्यांचे ठिकाणीं ब्रह्मा, विष्णु, रुद्र, व सत्व, रज, तम यांचें आवाहन करून वनमालेवर प्रकृतीचें आवाहन करून मूलमंत्रानें गंधादिक उपचारांनीं पूजा करावी. नंतर पूर्वीं तयार केलेलें, वितस्तिमात्र ( वीतभर ) बारा ग्रंथींनीं युक्त असें गंधपवित्र हातीं घेऊन, "विष्णुतेजोद्भवं रम्यं सर्वपातकनाशनं ॥ सर्वकामप्रदं देव तवांगे धारयाम्यहं," ह्या मूलसंपुटित मंत्रेंकरून देवाच्या पायांवर अर्पण करावें. देवाच्या हाताला बांधावें असेंहि कोणी ह्मणतात. तदनंतर गंधादिपंचोपचारांनीं देवाची पूजा करून प्रार्थना करावी.—" आमंत्रितोसि देवेश पुराणपुरुषोत्तम ॥ प्रातस्त्वां पूजयिष्यामि सान्निध्यं कुरु केशव ॥ क्षीरोदधिमहानागशय्यावस्थितविग्रह ॥ प्रातस्त्वां पूजयिष्यामि सन्निधौ भवते नमः " ॥ याप्रमाणें प्रार्थना झाल्यावर साष्टांग नमस्कार करून पुष्पांजलि समर्पण करावी. याप्रमाणें अधिवासन समाप्त झालें. एथें सर्वत्र मूलमंत्र, गुरूनें उपदिष्ट असेल तो तांत्रिक, अथवा वैदिक, किंवा देवगायत्रीरूप घ्यावा.

---

ततोरात्रिंसत्कथाजागरेणातिवाह्यप्रातःकालेसद्योधिवासनेगोदोहांतरितेवाकालेपवित्रारोपणांगभूतंदेवपूजनंपवित्रपूजनंचकरिष्येइतिसंकल्प्यदेवंपवित्राणिचफलाद्युपनैवेद्यांतगंधाद्युपचारैःसंपूज्यगंधदूर्वाक्षतयुतंकनिष्ठंपवित्रमादाय देवदेवनमस्तुभ्यंगृहाणेदंपवित्रकं पवित्रीकरणार्थायवर्षपूजाफलप्रदं पवित्रकंकुरुष्वाद्ययन्मयादुष्कृतंकृतं शुद्धोभवाम्यहंदेवत्वत्प्रसादात्सुरेश्वरेतिमंत्रेणमूलसंपुटितेनदत्वा मध्यमोत्तमपवित्रेवनमालांचैवमेवैतन्मंत्रावृत्त्यादद्यात् अंगदेवताभ्योनाम्नासमर्प्यमहानैवेद्यंदत्वानीराज्यप्रार्थयेत् मणिविद्रुममालाभिर्मंदारकुसुमादिभिः इयंसांवत्सरीपूजातवास्तुगरुडध्वज वनमालांयथादेवकौस्तुभंसततंहृदि तद्वत्पवित्रतंतूंस्त्वंपूजांचहृदयेवह जानताऽजानतावापियत्कृतंनतवार्चनं केनचिद्विघ्नदोषेणपरिपूर्णंतदस्तुमे मंत्रहीनंक्रियाहीनंभक्तिहीनंसुरेश्वर यत्पूजितंमयादेवपरिपूर्णंतदस्तुमे अपराधसहस्राणिक्रियंतेहर्निशंमया दासोहमितिमांमत्वाक्षमस्वपरमेश्वरेति अत्रशिवादौगरुडध्व

जेत्यादौवृषवाहनेत्यूहः वनमालामितिश्लोकस्यतुलोपः देव्यांतुदेवदेवसुरेश्वरेत्यादौदेविदेविसुरेश्वरीत्यादिस्त्रीप्रत्ययांतपदोहःकार्यः शेषंसमानंततोगुरुंसंपूज्यपवित्रंदत्वान्यब्राह्मणेभ्यःसुवासिनीभ्यश्चान्यानिदत्वा स्वयमपिसकुटुंबोधारयेत् ततोब्राह्मणैःसहभुक्त्वात्रिरात्रंब्रह्मचर्यादिनियमवान्देवेपवित्राणिधारयेत् देवस्यस्नानादिकोपचारान्पवित्राणिउत्तार्यकारयेत् त्रिरात्रांतेदेवंसंपूज्यपवित्राणिविसर्जयेत् अत्रशिवादिपवित्रारोपणेचतुर्दशीपूर्वविद्धाग्राह्या एवंपूर्णिमापित्रिमुहूर्तसायान्हव्याप्तापूर्वविद्धैवग्राह्या अष्टम्यादितिथ्यंतराण्यपिपवित्रारोपणेप्रथमपरिच्छेदोक्तसामान्यतिथिनिर्णयानुसारेणग्राह्याणि ॥ इति पवित्रारोपणविधिः ॥

तदनंतर सत्कथायुक्त जागरणानें रात्र दवडून प्रातःकालीं, तत्काल अधिवासन करणें असेल तर गाईच्या दोहनकालीं, "पवित्रारोपणांगभूतं देवपूजनं पवित्रपूजनं च करिष्ये," असा संकल्प करून देवाची व पोवत्यांची फलादिक नैवेद्यापर्यंत गंधादिक उपचारांनीं पूजा करून गंध, दूर्वा, अक्षता, यांहीं युक्त असें कनिष्ठ पोवतें घेऊन, "देवदेव नमस्तुभ्यं गृहाणेदं पवित्रकं ॥ पवित्रीकरणार्थाय वर्षपूजाफलप्रदं ॥ पवित्रकं कुरुष्वाद्ययन्मया दुष्कृतं कृतं ॥ शुद्धो भवाम्यहं देव त्वत्प्रसादात्सुरेश्वर" ॥ ह्या मूलसंपुटित मंत्रानें तें पोवतें समर्पण करून मध्यम, उत्तम पोवतीं आणि वनमाला हीं सर्व पूर्वोक्त मंत्रेंकरून समर्पण करावीं. अंगदेवतांला नाममंत्रेंकरून समर्पण करून महानैवेद्य अर्पण करून आरती करावी आणि प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र–"मणिविद्रुममालाभिर्मंदारकुसुमादिभिः ॥ इयं सांवत्सरी पूजा तवास्तु गरुडध्वज ॥ वनमालां यथा देव कौस्तुभं सततं हृदि ॥ तद्वत्पवित्रतंतूंस्त्वं पूजां च हृदये वह ॥ जानताऽजानता वापि यत्कृतं न तवार्चनं ॥ केनचिद्विघ्नदोषेण परिपूर्णं तदस्तु मे ॥ मंत्रहीनं क्रियाहीनं भक्तिहीनं सुरेश्वर ॥ यत्पूजितं मया देव परिपूर्णं तदस्तु मे ॥ अपराधसहस्राणि क्रियंतेऽहर्निशं मया ॥ दासोऽहमिति मां मत्वा क्षमस्व परमेश्वर." ॥ शिव, इत्यादिक देवांचीं पोवतीं असतील तर 'गरुडध्वज' इत्यादिकस्थानीं 'वृषवाहन' असा ऊह करावा. 'वनमालां' ह्या श्लोकाचा लोप जाणावा. देवीचीं पोवतीं असतील तर 'देवदेव सुरेश्वर' इत्यादिस्थानीं 'देविदेवि सुरेश्वरि' इत्यादिक स्त्रीप्रत्ययांत पदांचा ऊह करावा, व इतर सर्व समान जाणावें.–तदनंतर गुरूची पूजा करून पोवतें द्यावें व इतर ब्राह्मण, सुवासिनी यांना दुसरीं पोवतीं देऊन नंतर सर्व कुटुंबासह आपण पोवतीं धारण करावीं. त्यानंतर ब्राह्मणांसह भोजन करून त्रिरात्रपर्यंत ब्रह्मचर्यादि नियम धारण करीत होत्साता देवाला पोवतीं वाहावीं. मग देवावरचीं पोवतीं उतरून स्नानादिक उपचारांनीं पूजा करावी. याप्रमाणें तीन रात्रि गेल्यावर देवाची पूजा करून देवावरील पोवतीं काढावीं. शिव इत्यादिक देवतांचे पोवत्यांविषयीं चतुर्दशी पूर्व तिथीनें विद्ध असी घ्यावी. याप्रमाणें पौर्णिमा, साहा घटिका सायान्हकालव्यापिनी पूर्वविद्धाच घ्यावी. अष्टमी इत्यादिक दुसऱ्या तिथि पोवत्यांविषयीं घेणें त्या प्रथम परिच्छेदांत सामान्य तिथिनिर्णय सांगितला आहे त्याप्रमाणें घ्याव्या. याप्रमाणें पोवत्यांचा विधि संपूर्ण झाला.

अथोपाकर्मकालः तत्रबहृचानांश्रावणशुक्लपक्षेश्रवणनक्षत्रंपंचमीहस्तइतिकालत्रयंतत्र श्रवणंमुख्यकालस्तदलाभेपंचम्यादिः तथाचकालतत्त्वविवेचनेसंग्रहकारिकायां पर्वणिश्रवणेकार्यंग्रहसंक्रांत्यदूषिते अध्वर्युभिर्बहृचैश्चकथंचित्तदसंभवे तत्रैवहस्तपंचम्यांतयोःकेवलयोरपि तत्रदिनद्वयेश्रवणसत्त्वेयदिपूर्वसूर्योदयमारभ्यप्रवृत्तंश्रवणंद्वितीयदिनेसूर्योदयोत्तरंत्रिमुहूर्तंवर्ततेतदापरदिनएवोपाकर्म धनिष्ठायोगप्राशस्त्यात् यदित्रिमुहूर्तन्यूनं तदापूर्वदिनएवसंपूर्णव्याप्तेः यदिपूर्वदिनेसूर्योदयेनास्तिपरदिनेसूर्योदयोत्तरंमुहूर्तद्वयंवर्ततेतदोत्तरदिनेएवउत्तराषाढावेधनिषेधात् यदिपरदिनेमुहूर्तद्वयंन्यूनंपूर्वदिनेचोत्तराषाढाविद्धंतदापंचम्यादिकालोग्राह्यः पंचमीहस्तइतिकालद्वयंतु औदयिकंमुहूर्तत्रयव्यापिमुख्यं तदलाभेपूर्वविद्धमपि एवंभाद्रपदशुक्लपक्षेपिश्रवणपंचमीहस्तकालत्रयनिर्णयोज्ञेयः एतद्बहृचैःपूर्वाण्हेकार्यं ॥

## आतां उपाकर्माचा काल सांगतों.

ऋग्वेदी यांना श्रावण शुद्ध पक्षांत उपाकर्माविषयीं श्रवणनक्षत्र, पंचमी आणि हस्तनक्षत्र असे तीन काल सांगितले; त्यांमध्यें श्रवण नक्षत्र हा मुख्य काळ आहे. श्रवण न मिळेल तर पंचमी, हस्त हे घ्यावे. तसेंच कालतत्त्वविवेचन ग्रंथांत संग्रहकारिकेमध्यें सांगतात—“ ग्रहण, संक्रांति यांहींकरून दूषित नव्हत असीं पौर्णिमा व श्रवण नक्षत्र यांचे ठिकाणीं क्रमें करून यजुर्वेदी, आणि ऋग्वेदी यांनीं उपाकर्म करावें. कदाचित् त्यांचा संभव नसेल तर त्याच शुक्लपक्षांत हस्तनक्षत्रयुक्त पंचमीचे दिवसीं, अथवा केवल हस्तनक्षत्रीं, किंवा केवल पंचमीचे दिवसीं उपाकर्म करावें. ” दोन दिवसीं श्रवणनक्षत्र असेल ह्मणजे पूर्व दिवसाच्या सूर्योदयापासून आरंभ करून दुसऱ्या दिवसीं सूर्योदयानंतर सहा घटिकांपर्यंत श्रवण आहे अशा समयीं धनिष्ठायोग प्रशस्त आहे यास्तव दुसऱ्या दिवसींच उपाकर्म करावें. जर सहा घटिकांहून कमी असेल तर संपूर्णव्याप्ति आहे याकरितां पूर्व दिवसींच करावें. जर पूर्व दिवसीं सूर्योदयकालीं श्रवण नसेल आणि दुसऱ्या दिवसीं सूर्योदयानंतर चार घटिका श्रवण असेल तर उत्तराषाढावेधाचा निषेध आहे यास्तव दुसऱ्या दिवसींच करावें.—जर दुसऱ्या दिवसीं श्रवण चार घटिकांहून कमी असेल व पूर्वदिवसीं उत्तराषाढांनीं श्रवण विद्ध असेल तेव्हां पंचमी इत्यादिक काल ग्रहण करावे. पंचमी, हस्त हे दोन काळ तर सूर्योदयापासून सहा घटिकांपर्यंत व्याप्ति असेल तो मुख्य होय. सूर्योदयापासून सहा घटिकांपर्यंत न मिळेल तर पूर्वविद्धसुद्धां घ्यावा. असाच भाद्रपदशुद्ध पक्षांतहि श्रवण, पंचमी,हस्तनक्षत्र ह्या तीन कालांचा निर्णय जाणावा. हें उपाकर्म ऋग्वेदी यांनीं पूर्वाण्हकालांत करावें.

---

अथयजुर्वेदिनिर्णयः तत्रबहृचानांश्रवणवत्सर्वयजुर्वेदिनांश्रावणपौर्णमासीमुख्यःकालः पौर्णमास्याःखंडत्वेयदापूर्णिमापूर्वदिनेमुहूर्तोद्यनंतरंप्रवृत्ताद्वितीयदिनेषण्मुहूर्तव्यापिनी तदा सर्वेयाजुषाणामुत्तरैव यदाशुद्धाधिकतयादिनद्वयेपिसूर्योदयव्यापिनीतदासर्वेयाजुषाणांपूर्वैव पर्वदिनेमुहूर्तोद्यनंतरंप्रवृत्ताद्वितीयदिनेमुहूर्तद्वयत्रयादिव्यापिनीषण्मुहूर्तन्यूना तदातैत्तिरीयै

रुत्तराग्राह्या तैत्तिरीयभिन्नयाजुषैः पूर्वाग्राह्या यदापूर्वदिनेमुहूर्तोध्वनंतरंप्रवृत्ताद्वितीयदिनेमुहूर्तद्वयन्यूनाभवतिक्षयवशान्नास्त्येववातदासर्वयाजुषाणांपूर्वैव हिरण्यकेशितैत्तिरीयाणांश्रावणीपूर्णमासीमुख्यःकालस्तदभावेश्रावणेहस्तः श्रावणशुक्लपंचमीतुतत्तत्सूत्रेऽनुक्तेर्नग्राह्या एतदेवभाद्रपदेपिकालद्वयमितिविशेषः खंडतिथित्वेनिर्णयःपूर्वोक्तएव हस्तनक्षत्रमपिऔदयिकंसंगवस्पर्शिग्राह्यमन्यथापूर्वविद्धमेव आपस्तंबानांश्रावणीपूर्णमासीमुख्यातदभावेभाद्रपदीतिविशेषः बौधायनानांश्रावणीपूर्णमासीमुख्यादोषसंभावनयातदभावेआषाढीतिविशेषः एतेषामपिखंडतिथित्वेपूर्वोक्तएवनिर्णयः ॥

## आतां यजुर्वेदी यांच्या उपाकर्माचा काल सांगतों.

ऋग्वेदी यांला जसा श्रवण मुख्य काल आहे त्याप्रमाणें सर्व यजुर्वेदी यांला श्रावण पौर्णिमा हा उपाकर्माविषयीं मुख्य काल आहे. पौर्णिमा ही जर खंडित असेल व जेव्हां पौर्णिमा पूर्व दिवसीं सूर्योदयापासून दोन घटिकांनंतर प्रवृत्त होईल आणि दुसऱ्या दिवसीं बारा घटिका व्याप्ति असेल तेव्हां सर्व यजुर्वेदी यांनीं दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. जेव्हां शुद्धाधिक्येंकरून दोनहि दिवसीं सूर्योदयव्यापिनी असेल तेव्हां सर्व यजुर्वेदी यांनीं पूर्व दिवसाचीच घ्यावी. जेव्हां पूर्व दिवसीं सूर्योदयापासून दोन घटिकांनंतर पौर्णिमा प्रवृत्त होईल आणि दुसऱ्या दिवसीं ४।६ घटिका किंवा याहून अधिक व्यापिनी असून बारा घटिकांहून कमी असेल तेव्हां तैत्तिरीयशाखी यांनीं दुसऱ्या दिवसाची घ्यावी. तैत्तिरीयशाखाव्यतिरिक्त यजुर्वेदी यांनीं पूर्व दिवसाची घ्यावी. जेव्हां पूर्व दिवसीं सूर्योदयापासून दोन घटिकांनंतर पौर्णिमा प्रवृत्त होईल आणि दुसऱ्या दिवसीं चार घटिकांहून कमी असेल किंवा क्षयाच्या योगानें सर्वथा नसेल तेव्हां सर्व यजुर्वेदी यांनीं पूर्व दिवसाचीच घ्यावी. हिरण्यकेशी तैत्तिरीयशाखी यांला श्रावणी पौर्णिमा हा मुख्य काल आहे, तो न मिळेल तर श्रावणांतील हस्त नक्षत्र घ्यावें. श्रावण शुद्ध पंचमी तर त्या त्या सूत्रामध्यें सांगितली नाहीं याकरितां हिरण्यकेशी तैत्तिरीयशाखी यांनीं ती घेऊं नये. हेच दोन काळ भाद्रपद मासांतहि त्यांला उक्त आहेत, हा विशेष. हे खंडित असतील तर पूर्वी सांगितल्याप्रमाणें निर्णय जाणावा. हस्तनक्षत्रहि सूर्योदयापासून संगवकालाला स्पर्श करणारें असें असेल तें घ्यावें. संगवकालाला स्पर्श करणारें नसेल तर पूर्वविद्ध असेल तेंच घ्यावें. आपस्तंबांला श्रावणी पौर्णिमा ही मुख्य आहे, ती न मिळेल तर भाद्रपद मासांतील पौर्णिमा घ्यावी, हा विशेष जाणावा. बौधायनांला श्रावणी पौर्णिमा ही मुख्य आहे, त्यापेक्षां कांहीं एक दोषानें ती न मिळेल तर आषाढी पौर्णिमा घ्यावी, हा विशेष जाणावा. हे पूर्वी सांगितलेले काळ खंडित असतील तर पूर्वी सांगितल्याप्रमाणेंच निर्णय जाणावा.

---

**अथकाण्वमाध्यंदिनादिकात्यायनानां श्रवणयुताश्रावणपूर्णिमाकेवलावाहस्तयुक्तापंचमी केवलावामुख्यःकालः अतःकेवलश्रवणेकेवलहस्तेचतैर्नकार्यं श्रावणमासेविघ्नदोषेभाद्रपदगतपूर्णिमापंचम्योःकार्यं तिथेःखंडत्वेषण्मुहूर्ताधिक्येउत्तरा षण्मुहूर्तन्यूनत्वेपूर्वाग्राह्येत्यादिःपूर्वोक्तएवनिर्णयः ॥**

काण्व, माध्यंदिन इत्यादिक जे कात्यायन त्यांला श्रवणयुक्त श्रावणी पौर्णिमा, अथवा केवल श्रावणी पौर्णिमा; हस्तयुक्त पंचमी, अथवा केवल पंचमी हे मुख्य काल होत, यास्तव त्यांनीं केवल श्रवण नक्षत्रीं, आणि केवल हस्तनक्षत्रीं उपाकर्म करूं नये. श्रावण मासामध्यें कांहीं विघ्न किंवा दोष असल्यास भाद्रपद मासांतील पौर्णिमा व पंचमी या दिवसीं करावें. खंडित तिथि असून बारा घटिकांहून अधिक असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. बारा घटिकांहून कमी असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी, इत्यादिक पूर्वीं सांगितलेला तोच निर्णय जाणावा.

---

अथसामवेदिनांभाद्रपदशुक्लेहस्तनक्षत्रंमुख्यःकालः संक्रांत्यादिदोषेणतत्रासंभवेश्रावणमासेहस्तोग्राह्यइतिनिर्णयसिंधुः अन्येतुभाद्रपदहस्तेदोषसंभवेश्रावणपौर्णमास्यामुपाकर्मकृत्वा भाद्रपदस्यहस्तपर्यंतंनपठनीयंततःपरंपठनीयमित्याहुःहस्तस्यखंडत्वेदिनद्वयेपराण्हपूर्णव्याप्तौ अपराण्हैकदेशस्पर्शेवापरदिनेएवोपाकर्म पूर्वदिनएवापराण्हपूर्णव्याप्तौपूर्वत्रैव सर्वत्रसामगानामपराण्हस्यैवोपाकर्मकालत्वेनोक्तेः पूर्वदिनएवापराण्हैकदेशस्पर्शेदिनद्वयेप्यपराण्हस्पर्शाभावेवापरत्रैव येषांसामवेदिनांप्रातःसंगवौकर्मकालत्वेनोक्तौतेषांपूर्वत्रापराण्हव्याप्तिंत्यक्त्वापरदिनेसंगवोर्ध्ववर्तमानहस्तग्रहणं सिंहस्थेसूर्येउपाकर्मविधानंतुयदिश्रावणेहस्तःपूर्णिमावासिंहस्थेसूर्येभवतितदातत्रोपाकर्म नकर्कस्थे इतिसामगानांश्रावणमासगतहस्तपर्वणोर्व्यवस्थापरं अन्यशाखिनांसिंहस्थरवेर्विधिर्निषेधोवानास्ति अथर्ववेदिनांतुश्रावण्यांभाद्रपदगतायांवापौर्णमास्यांउपाकर्म तिथिखंडेऔदयिकसंगवकालव्यापितिथिर्ग्राह्येति सर्वशाखिनांश्रावणभाद्रपदमासगतस्वस्वगृह्योक्तकालेषुग्रहणसंक्रांत्याशौचादिदोषसंभावनायांसर्वथाकर्मलोपप्राप्तौ शाखांतरोक्तकालानांग्राह्यत्वमावश्यकं तत्रापस्तंबबौधायनसामगादीनांश्रावणभाद्रपदगतपंचमीपूर्णिमादेरप्यविशेषेणग्राह्यत्वप्राप्तौनर्मदोत्तरदेशेसिंहगतेसूर्येपंचम्यादेर्ग्रहणं नर्मदादक्षिणभागेकर्कटस्थेसूर्येश्रावणपंचम्यादेर्ग्रहणमितिव्यवस्थेतिकौस्तुभेउक्तं तेनऋग्वेदिनामपिसर्वथाकर्मलोपप्रसक्तौपूर्णिमापिसिंहस्थकर्कस्थादिव्यवस्थयाग्राह्येतिममभाति सर्वशाखिभिःश्रावणमासेमुख्यकालेपर्जन्याभावेन व्रीह्याद्यौषधिप्रादुर्भावाभावेआशौचादौ वाभाद्रपदश्रवणादौ कार्यं औषधिप्रादुर्भावाभावेपिश्रावणमासेकार्यमितिकर्कादिमतं सर्वशाखिनां गृह्योक्तमुख्यकालत्वेननिर्णीतेदिने ग्रहणस्य संक्रांतेर्वासत्त्वे संक्रांतिरहिताः पंचम्यादयोग्राह्याः ग्रहणसंक्रांतियोगश्चोपाकर्मसंबंधिन्यहोरात्रे भविष्यन्मध्यरात्रात्पूर्वमतीतमध्यरात्राद्दूर्ध्वंचेति यामाष्टकेविद्यमानः श्रवणनक्षत्रपूर्णिमादितिथ्यस्पृष्टोप्युपाकर्मदूषकः केचित्तूक्तयामाष्टकादन्यत्रापिविद्यमानोग्राह्यश्रवणादिनक्षत्रपर्वादितिथिस्पर्शीचेत्सोपिदूषकइत्याहुः नूतनोपनीतानांप्रथमोपाकर्मगुरुशुक्रास्तादौमलमासादौसिंहस्थेगुरौचनकार्यं द्वितीयाद्युपाकर्मतुअस्तादावपिकार्यं मलमासेतुद्वितीयाद्यपिनकार्यं प्रथमोपाकर्मस्वस्तिवाचननांदीश्राद्धादिकृत्वाकार्यं नूतनोपनीतानांश्रावणमासगतपंचमीहस्तश्रवणादिकालेषुगुरुशुक्रास्तादिप्रतिबंधेनोपाकर्मारंभाभावेभाद्रपदमासगतपंचमीश्रवणादयोग्राह्याः मौंजींयज्ञोपवीतंचनवंदंडंचधारयेत् अजिनंकटिसूत्रंचनवंवस्त्रंतथैवचेतिब्रह्मचारिणोविशेषःप्रतिवर्षंज्ञेयः उपाकर्मोत्सर्जनेब्रह्मचारिस

माश्रृतगृहस्थवानप्रस्थैःसर्वैःकर्तव्ये उत्सर्जनकालस्तुनेहप्रपंच्यते उपाकर्मदिनेऽथवेतिवच नानुसारेण सर्वशिष्टानामिदानीमुपाकर्मदिनेएवोत्सर्जनकर्मानुष्ठानाचारेणैतन्निर्णयस्यानुप योगात् एतेउपाकर्मोत्सर्जनेयदिअन्यैःद्विजैःसहकरोतितदालौकिकाग्नौकुर्यात् यदैकःकरो तितदास्वगृह्याग्नौकुर्यात् कात्यायनैस्तुऔपवसथ्यअग्नावेवहोतव्यंनलौकिकाग्नौ बह्वृचादिः स्वयंचतुरवत्तीबहुभिश्चतुरवत्तिभिरुपाकर्मादिकंकुर्वन्नेकस्यापिजामदग्न्यादेः पंचावत्तिनःस त्वेतदनुरोधेनपंचावत्तमेवकुर्यात् चतुरवत्तिनामपिपंचावत्तित्वस्यवैकल्पिकत्वोक्त्यातेषाम पिकर्मवैगुण्याभावात् अकरणेदोषश्रवणेनप्रत्यब्दमेतत्कर्तव्यंक्वचित्पुस्तकेनिर्णयसिंधावेतद करणेप्राजापत्यकृच्छ्रमुपवासोवाप्रायश्चित्तंदृश्यतेनसर्वत्र उपाकर्मोत्सर्जनयोरुभयोरपिऋषि पूजनमुक्तं ऋष्यादितर्पणंतूत्सर्जनएव अत्रविवाहोत्तरंतिलतर्पणेनदोषः अत्रसंकल्पेअधी तानांछंदसामाप्यायनद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थमुपाकर्मदिनेअद्योत्सर्जनाख्यंकर्मकरिष्यइति उ पाकर्मणितुअधीतानामध्येष्यमाणानांचछंदसांयातयामतानिरासेनाप्यायनद्वारा श्रीपरमेश्व रप्रीत्यर्थइतिविशेषः अवशिष्टःसर्वोपिप्रयोगविशेषःस्वस्वगृह्यानुसारेणज्ञेयः अत्रनदीनांर जोदोषोन ब्रह्मादिदेवऋष्यादीनांजलेसान्निध्यंतेनस्नानात्सर्वदोषक्षयः ऋषिपूजनस्थानस्थित जलस्पर्शनपानाभ्यांसर्वकामावाप्तिः इतिसर्वशाखिसाधारणनिर्णयः ॥

सामवेदी यांचा, भाद्रपदशुक्लपक्षांतील हस्तनक्षत्र हा उपाकर्माचा मुख्य काल आहे. संक्रांति इत्यादिक दोषानें हस्तनक्षत्रीं तें न होईल तर श्रावणमासांतील हस्तनक्षत्र घ्यावें, असें निर्णयसिंधु सांगतो. दुसरे ग्रंथकार तर, भाद्रपद मासांतील हस्तनक्षत्रीं कांहीं दोष संभवेल तर श्रावणी पौर्णिमेचे ठिकाणीं उपाकर्म करून भाद्रपदांतील हस्तनक्षत्रापर्यंत अध्ययन करूं नये; त्यानंतर अध्ययन करावें, असें ह्मणतात. हस्तनक्षत्र खंडित असेल व दोन दिवसीं अपराण्हकालीं संपूर्णव्याप्ति असेल अथवा दोन दिवसीं अपराण्हीं एकदेशस्पर्श असेल तर दुसऱ्या दिवसींच उपाकर्म करावें. पूर्व दिवसींच अपराण्हकालीं संपूर्णव्याप्ति असेल तर, सर्वत्र ठिकाणीं सामवेदी यांना अपराण्हकाल हाच उपाकर्माचा काल, असें वचन आहे यास्तव त्यांनीं पूर्व दिवसींच उपाकर्म करावें. पूर्व दिवसींच अपराण्हीं एकदेशस्पर्श असेल, अथवा दोनहि दिवसीं अपराण्हीं स्पर्श नसेल तर, दुसऱ्या दिवसींच उपाकर्म करावें. ज्या सामवेदी यांना प्रातःकाल व संगवकाल हे उपाकर्माचे काल सांगितले त्यांनीं पूर्व दिवसीं अपराण्हकालीं व्याप्ति असेल ती टाकून दुसऱ्या दिवसीं संगवकालानंतर जें हस्तनक्षत्र असेल तें घ्यावें, असें जें तें, सिंहस्थ सूर्य असतां उपाकर्म करणें सांगितलें तें श्रावणमासांत सिंहस्थ सूर्य असून हस्त किंवा पौर्णिमा येतील तर त्या दिवसीं उपाकर्म करावें, कर्कस्थरवि असेल तर करूं नये, असी सामवेदी यांना श्रावणमासांतील हस्त व पौर्णिमा यांची व्यवस्था सांगितली त्याविषयीं जाणावें. अन्यशाखी जे त्यांना सिंहस्थरवीचा विधि किंवा निषेध नाहीं. अथर्वणवेदी यांनीं श्रावणी पौर्णिमेला अथवा भाद्रपदी पौर्णिमेला उपाकर्म करावें. खंडातिथि असेल तर उदयापासून संगवकालव्यापिनी तिथि असेल ती घ्यावी. श्रावण व भाद्रपद या मासांतील आपापल्या गृह्यसूत्रामध्यें जे जे काल सांगितले त्या त्या कालांचे ठिकाणीं ग्रहण, संक्रांति,

आशौच इत्यादिक दोष प्राप्त होतील आणि सर्वथा कर्माचा लोप होईल तर सर्वशाखी यांनीं दुसऱ्या शाखांमध्यें सांगितलेले काल अवश्य घ्यावे. त्यांमध्यें आपस्तंब, बौधायन आणि सामवेदी यांना श्रावण व भाद्रपद यांतील पंचमी, पौर्णिमा ह्याहि साधारण्येंकरून घेणें प्राप्त होतील तर नर्मदेच्या उत्तर प्रदेशीं सिंहस्थ सूर्य असतां पंचमी इत्यादिक काळ घ्यावे. कर्कीचा सूर्य असेल तर नर्मदेच्या दक्षिणभागीं श्रावणांतील पंचमी इत्यादिक काळ घ्यावे, असी व्यवस्था कौस्तुभांत सांगितली आहे, त्यापेक्षां सर्वथा कर्मलोप होत असेल तर 'सिंहींचा सूर्य,' 'कर्कीचा सूर्य,' इत्यादिक जी पूर्वी व्यवस्था सांगितली तीवरून ऋग्वेदी यांनींहि पौर्णिमासुद्धां घ्यावी, असें मला वाटतें. सर्वशाखी यांनीं मुख्य काल जो श्रावणमास त्याचे ठिकाणीं पर्जन्यवृष्टि न झाल्यामुळें व्रीहि ( भात ) इत्यादिक वनस्पति उत्पन्न न झाल्या असतील तर, किंवा आशौचादिक असेल तर भाद्रपदमासांतील श्रवणादिक जे काल त्यांचे ठिकाणीं उपाकर्म करावें; वनस्पति उत्पन्न झाल्या नसतील तथापि श्रावणमासांत करावें, असें कर्कादिकांचें मत आहे. सर्वशाखी यांच्या गृह्यसूत्रांमध्यें निर्णीत जो उपाकर्माचा मुख्य दिवस सांगितला त्या दिवसीं ग्रहण किंवा संक्रांति असेल तर संक्रांतिरहित असे पंचमी आदिकरून काल घ्यावे. ग्रहण व संक्रांति यांचा योग उपाकर्मसंबंधी जें अहोरात्र त्याचे ठिकाणीं असेल; ह्मणजे येणाऱ्या मध्यरात्रीच्या पूर्वी दोन प्रहर, गेलेल्या मध्यरात्रीनंतर दोन प्रहर, आणि दिवसाचे चार प्रहर ह्या आठ प्रहरांत असेल आणि श्रवण नक्षत्र, पौर्णिमा इत्यादिक तिथींला त्याचा स्पर्श नसेल तथापि उपाकर्माला दूषक होतो. कोणी ग्रंथकार पूर्वी सांगितलेल्या आठ प्रहरांहून अन्यकालींहि ग्रहणसंक्रांतींचा योग असून ग्राह्य असीं श्रवणादि नक्षत्रें, पौर्णिमादि तिथि यांना तो स्पर्श करणारा असेल तर तोहि उपाकर्मदूषक होतो, असें ह्मणतात. नूतन मौंजी झालेल्यांचें प्रथम उपाकर्म गुरुशुक्रांचें अस्तादिक, मलमासादिक आणि सिंहस्थ गुरु यांचे ठिकाणीं करूं नये. दुसरें, तिसरें हीं उपाकर्मे अस्तादिकांतहि करावीं. मलमासांत तर दुसरें, तिसरेंहि उपाकर्म करूं नये. प्रथम उपाकर्म करणें तें पुण्याहवाचन, नांदीश्राद्ध इत्यादि करून करावें. नवीन मौंजी झालेल्यांचें उपाकर्म करणें असून श्रावणमासांतील पंचमी, हस्त, श्रवण इत्यादिक कालीं गुरुशुक्रांच्या अस्तादिकांमुळें त्या कालीं न होईल तर भाद्रपद मासांतील पंचमी, श्रवण इत्यादिक काल घ्यावे. "मौंजी, यज्ञोपवीत, नूतन दंड, कृष्णाजिन, कटिसूत्र, आणि नूतन वस्त्र हीं, ब्रह्मचारी यानें धारण करावीं." याप्रमाणें ब्रह्मचाऱ्याविषयीं विशेष प्रतिवर्षी जाणावा. उपाकर्म व उत्सर्जन हीं कर्मे ब्रह्मचारी, सोडमुंज झालेले, गृहस्थ, वानप्रस्थ या सर्वांनीं करावीं. उत्सर्जनाचा काल येथें सांगत नाहीं. कारण, "अथवा उपाकर्माच्या दिवसीं करावें," या वचनाप्रमाणें सर्व शिष्टांचा आचार उपाकर्माच्या दिवसींच उत्सर्जनकर्म करण्याचा असल्यामुळें त्याच्या निर्णयाचा उपयोग नाहीं. जर उत्सर्जन व उपाकर्म हीं अन्य ब्राह्मणांसहवर्तमान करणें असतील तर लौकिकाग्नीचे ठिकाणीं करावीं. जेव्हां एकाकी करील तेव्हां आपल्या गृह्याग्नीवर करावीं. कात्यायनांनीं अन्वाहित ( अन्वाधान केलेला ) जो अग्नि त्याचे ठिकाणीं उपाकर्म करावें, लौकिकाग्नीवर करूं नये. ऋक्शाखी इत्यादिक आपण चतुरवत्ती असून बहुत चतुरवत्तींसहवर्तमान उपाकर्म करणारा असेल व

त्यांत एक जामदग्नि इत्यादिक पंचावत्ती असेल तर चतुरवत्ती जे त्यांनींहि पंचावत्त कर्म करण्याविषयीं वैकल्पिक (कृताकृत) वचन आहे व तसें (पंचावत्त) केलें असतां त्यांच्या कर्माला वैगुण्य येत नाहीं यास्तव पंचावत्तीच्या अनुरोधानें पंचावत्तच कर्म करावें. उत्सर्जन व उपाकर्म हीं कर्मे न केलीं असतां दोष आहे यास्तव प्रतिवर्षी करावीं. हीं उत्सर्जनोपाकर्मे न केलीं असतां प्राजापत्यकृच्छ्र, किंवा उपोषण करावें असें प्रायश्चित्त निर्णयसिंधूच्या एकाद्या पुस्तकांत मिळतें, सर्व पुस्तकांत मिळत नाहीं. उपाकर्म व उत्सर्जन ह्या दोहोंमध्येंहि ऋषिपूजन करावें. ऋषि इत्यादिकांचें तर्पण करणें तें उत्सर्जनांतच करावें. विवाह झाल्यानंतर उपाकर्माचे ठिकाणीं तिलतर्पणाविषयीं दोष नाहीं. उत्सर्जनाचे ठिकाणीं संकल्प करावयाचा त्याचा विशेष—"**अधीतानां छंदसां आप्यायनद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं उपाकर्मदिने अद्योत्सर्जनाख्यं कर्म करिष्ये.**" उपाकर्माचे ठिकाणीं तर, "**अधीतानां अध्येष्यमाणानां च छंदसां यातयामता निरासेनाप्यायनद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं,**" असा विशेष आहे. बाकीचा सर्व विशेषप्रयोग आपापल्या गृह्यसूत्राप्रमाणें जाणावा. ह्या उत्सर्जनोपाकर्माविषयीं नदींचा रजोदोष नाहीं. ब्रह्मादिक सर्व देव व ऋषि इत्यादिक यांचें जलाचे ठिकाणीं सान्निध्य आहे त्यापेक्षां नदीच्या उदकानें स्नान केलें असतां सर्व दोषांचा क्षय होतो. ऋषींचें पूजन ज्या स्थानीं केलें तेथील उदकानें स्नान व त्याचें प्राशन केलें असतां सर्व मनोरथ प्राप्त होतात. याप्रमाणें सर्व शाखींचा साधारण निर्णय समाप्त झाला.

---

**अथरक्षाबंधनमस्यामेवपूर्णिमायांभद्रारहितायांत्रिमुहूर्ताधिकोदयव्यापिन्यामपराण्हेप्रदोषेवाकार्यं उदयेत्रिमुहूर्तन्यूनत्वेपूर्वेद्युर्भद्रारहितेप्रदोषादिकालेकार्यं इदंग्रहणसंक्रांतिदिनेपि कर्तव्यं मंत्रस्तु येनबद्धोबलीराजादानवेंद्रोमहाबलः तेनत्वामभिबध्नामिरक्षेमाचलमाचलेति अत्रैवपूर्णिमायांहयग्रीवोत्पत्तिः श्रावणपूर्णिमाकुलधर्मादौत्रिमुहूर्तसायान्हव्याप्तापूर्वविद्धैव ग्राह्या त्रिमुहूर्तन्यूनत्वेपरा अस्यामेवपौर्णमास्यामाश्वलायनानांश्रवणाकर्मसर्पबलिश्चरात्रावुक्तः तैत्तिरीयाणांतुसर्पबलिरेवोक्तः कात्यायनानांसामगानांचश्रवणाकर्मसर्पबलीद्वावप्युक्तौ** श्रवणाकर्मसर्पबल्याश्वयुजीप्रत्यवरोहणादिपाकसंस्थानांस्वस्वकालेष्वकरणे प्राजापत्यंप्रायश्चित्तंकार्यंनतुकालांतरेतदनुष्ठानं श्रवणाकर्मादिसंस्थाःपत्न्यामृतुमत्यामपिकार्याःप्रथमारंभस्तुनभवति अत्रपौर्णमासीअस्तमयप्रभृतिप्रवृत्तकर्मपर्याप्तकालव्यापिनीपूर्वैवचेत्पूर्वैवग्राह्या **दिनद्वयेतत्संबंधस्यसत्त्वेअसत्त्वेवापरैव प्रयोगस्तुस्वस्वसूत्रेषुज्ञेयः श्रावणकृष्णचतुर्थ्यांप्रारभ्यकृष्णचतुर्थीषुयावज्जीवमेकविंशतिवर्षाणिवाएकवर्षंवासंकष्टचतुर्थीव्रतंकार्यं अशक्तौ** प्रतिवर्षंश्रावणचतुर्थ्यामेवकार्यं **अत्रचंद्रोदयव्याप्त्यातिथिनिर्णयःप्रथमपरिच्छेदेउक्तः सो**द्यापनव्रतप्रयोगःकौस्तुभादौज्ञेयः ॥

## आतां रक्षाबंधनाचा निर्णय सांगतों.

सूर्योदयापासून सहा घटिकांपेक्षां अधिकव्यापिनी व भद्रारहित अशा ह्या श्रावणी पौर्णिमेच्या दिवसीं अपराण्हीं अथवा प्रदोषकालीं रक्षाबंधन ( राखी बांधणें ) करावें. दुसऱ्या दिवसीं सूर्योदयकालीं पौर्णिमा सहा घटिकांहून कमी असेल तर पूर्व दिवसीं भद्रा ( कल्याणी ) रहित जो प्रदोषादिक काल त्याचे ठिकाणीं करावें. हें रक्षाबंधन ग्रहण व संक्रांति ह्या दिवसींहि करावें. त्याचा मंत्र—**"येन बद्धो बली राजा दानवेंद्रो महाबलः ॥ तेन त्वामभिबध्नामि रक्षे माचलमाचल,"** ह्या मंत्रानें रक्षाबंधन करावें. ह्याच पौर्णिमेचे दिवसीं हयग्रीवावतार झाला. श्रावणी पौर्णिमा कुलधर्मादि कृत्यांला साहा घटिका सायान्हकालव्यापिनी पूर्व तिथीनें विद्ध असी असेल तीच घ्यावी. पूर्व दिवसीं सायान्हकालीं सहा घटिकांहून कमी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. ह्याच पौर्णिमेचे दिवसीं रात्रीं आश्वलायनांनीं श्रवणाकर्म, व सर्पबलि हीं दोन कर्में करावीं. तैत्तिरीयशाखी यांनीं केवल सर्पबलिच करावा. कात्यायन आणि सामवेदी यांनीं श्रवणाकर्म, सर्पबलि हीं दोनहि करावीं. श्रवणाकर्म, सर्पबलि, आश्वयुजी कर्म, प्रत्यवरोहण इत्यादिक पाकसंस्था त्या त्या कालीं न केल्या असतां प्राजापत्य प्रायश्चित्त करावें, अन्य कालीं त्या करूं नयेत. श्रवणाकर्म इत्यादिक सात संस्था, स्त्री रजस्वला असली तथापि कराव्या. प्रथमारंभ असेल तर मात्र करूं नयेत. ह्या श्रवणाकर्माविषयीं पौर्णिमा घेणें ती सूर्यास्तापासून आरंभ करून सर्व कर्म पौर्णिमेंत होईल इतकी व्याप्ति पूर्व दिवसींच मिळेल तर पूर्व दिवसाचीच घ्यावी. दोन दिवसीं तसी व्याप्ति असेल किंवा नसेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. श्रवणाकर्माचा प्रयोग आपापल्या सूत्रग्रंथीं आहे तो पाहावा. श्रावणकृष्ण चतुर्थीला आरंभ करून प्रत्येक कृष्ण चतुर्थीचे दिवसीं यावज्जीवपर्यंत, अथवा एकवीस वर्षेंपर्यंत, किंवा एक वर्षपर्यंत असें संकष्टचतुर्थीचें व्रत करावें. अशक्त असेल तर प्रतिवर्षीं श्रावणकृष्ण चतुर्थीचे दिवसींच करावें. ह्या व्रताविषयीं चंद्रोदयव्याप्तीनें चतुर्थीचा निर्णय प्रथम परिच्छेदांत सांगितला आहे. ह्याचा उद्यापनासहवर्त्तमान व्रताचा प्रयोग कौस्तुभादि ग्रंथांत पाहावा.

---

**अथजन्माष्टमीव्रतं तत्राष्टमीद्विविधा शुद्धाविद्धाच दिवारात्रौवासप्तमीयोगरहिता यत्र दिनेयावतीतत्रतावतीशुद्धा दिवारात्रौवासप्तमीयोगवतीयस्मिन्नहोरात्रेयावतीतत्रतावती विद्धा सापुनर्द्विविधा रोहिणीयुतारोहिणीयोगरहिताचेति तत्ररोहिणीयोगरहितकेवलाष्टमी भेदाः सप्तमीनाड्यः ५९ पलानि ५९ अष्टमी ५८।५ अस्यांशुद्धायांसंदेहोनास्तिद्वितीय कोट्यभावात् सप्तमी २ अष्टमी ५५ अस्यांविद्धायामप्यसंदेहः दिनांतरेअभावेनद्वितीय कोट्यभावात् यदादिनद्वयेकेवलाष्टमीवर्ततेतदाचत्वारःपक्षाः पूर्वेद्युरेवनिशीथव्यापिनीपरे द्युरेवनिशीथव्यापिनीदिनद्वयेपिनिशीथव्यापिनी दिनद्वयेपिनिशीथव्याप्त्यभावइति रात्र्यर्ध निशीथपदार्थः स्थूलदृष्ट्वात्वष्टमोमुहूर्तोनिशीथः तत्रपूर्वेद्युरेवनिशीथव्यापिनी यथा सप्तमी ४० अष्टमी ४२ अत्रसप्तमीयुतापूर्वविद्धैवाष्टम्युपोष्या यथावाष्टमी ६०।४ इयंशु**

द्वाधिक्यापिपूर्वैव परेद्युरेवनिशीथे यथा सप्तमी ४७ अष्टमी ४६ अत्रपरैवाष्टम्युपोष्या उभयत्रनिशीथेयथा सप्तमी ४२ अष्टमी ४६ अत्रापिपरैवाष्टमीग्राह्या दिनद्वयेनिशीथव्याप्त्यभावोयथा सप्तमी ४७ अष्टमी ४२ अत्रापिपरैवाष्टमीग्राह्या अत्रसर्वत्रसप्तमीयुक्तायां रात्रिपूर्वार्धावसानेकलयाप्यष्टम्याःसत्त्वेएवनिशीथव्यापित्वंनवमीयुक्तायांरात्र्युत्तरार्धादिभागेसत्त्वएवोत्तरत्रनिशीथव्यापित्वं सप्तमीदिनेउत्तरभागेएवसत्त्वेनवमीयुतदिनेपूर्वभागएव सत्त्वेचनिशीथाव्यापित्वपक्षएवमंतव्यःएवंवक्ष्यमाणरोहिणीयुक्तभेदेष्वपिज्ञेयं रोहिणीयुताष्टम्यामपिपूर्वदिनेएवनिशीथेष्टमीरोहिण्योर्योगःपरदिनएवनिशीथेयोगः दिनद्वयेनिशीथेयोगइतिपक्षत्रयं पूर्वेद्युरेवनिशीथेयोगोयथा सप्तमी ४० तद्दिनेकृत्तिका ३५ अष्टमी ४६ तद्दिनेरोहिणी ३६ अत्रपूर्वविद्धैवाष्टम्युपोष्या परदिनेएवनिशीथयोगोयथा सप्तमी ४२ तद्दिनेकृत्तिका ५० अष्टमी ४७ रोहिणी ४६ अत्रपरैवाष्टमीग्राह्या दिनद्वयेनिशीथेष्टमीरोहिण्योर्योगोयथा सप्तमी ४२ कृत्तिका ४३ अष्टमी ४७ रोहिणी ४८ अत्रपरैवाष्टमीग्राह्या अथरोहिणीयुताष्टम्यामेवदिनद्वयेपिनिशीथेरोहिणीयोगाभावोबहुधासंभवति ॥

## आतां जन्माष्टमीव्रताचा निर्णय सांगतों.

अष्टमी दोन प्रकारची–एक शुद्धा आणि दुसरी विद्धा. दिवसा किंवा रात्रीं सप्तमीचे योगानें विरहित असी ज्या दिवसीं जितकी असेल त्या दिवसीं तितकी ती शुद्धा होय. दिवसा किंवा रात्रीं सप्तमीचे योगानें युक्त असी ज्या अहोरात्रांत जितकी असेल त्या दिवसीं तितकी ती विद्धा होय. ती पुनः दोन प्रकारची–एक रोहिणीनक्षत्रानें युक्त, आणि दुसरी रोहिणीनक्षत्रानें विरहित. त्यामध्यें रोहिणीयोगानें विरहित अशी जी नुस्ती अष्टमी तिचे भेद उदाहरणानें सांगतों–उदाहरण,–सप्तमी घटिका ५९, पळें ५९, अष्टमी ५८।५ ही शुद्ध आहे व एथें दुसऱ्या कोटीचा संभव नाहीं याकरितां हिच्याविषयींहि संशय नाहीं. उदाहरण,– सप्तमी घ० २, अष्टमी घ० ५५, ही विद्धा आहे त्यापेक्षां दुसऱ्या दिवसीं सर्वथा नसल्या कारणानें एथें दुसऱ्या कोटीचा संभव नाहीं याकरितां हिच्याविषयींहि संशय नाहीं. जेव्हां दोन दिवसीं नुस्ती अष्टमी असते तेव्हां चार पक्ष संभवतात. ते असे–१ पूर्वदिवसींच निशीथव्यापिनी; २ दुसऱ्या दिवसींच निशीथव्यापिनी; ३ दोनहि दिवसीं निशीथव्यापिनी; ४ दोनहि दिवसीं निशीथव्याप्ति नसणें. रात्रीचें जें अर्ध त्याला निशीथ असें ह्मणतात. स्थूलमानेंकरून तर आठवा मुहूर्त तो निशीथ काळ. पूर्वदिवसींच निशीथव्यापिनी आहे–उदाहरण;– सप्तमी घ० ४०, अष्टमी घ० ४२, ह्या पक्षीं सप्तमीनें युक्त असी पूर्वविद्धा तीच अष्टमी उपोषणाला घ्यावी. अथवा दुसरें उदाहरण,–अष्टमी घ० ६०।४ हीं शुद्धाधिक आहे तथापि पूर्वदिवसाचीच घ्यावी. दुसऱ्या दिवसींच निशीथव्यापिनी असणें–उदाहरण;–सप्तमी घ० ४७, अष्टमी घ० ४६, ह्या पक्षीं दुसऱ्या दिवसाचीच अष्टमी उपोषणाला घ्यावी. दोन दिवसीं निशीथकालीं व्याप्ति असणें–उदाहरण,–सप्तमी ४२, अष्टमी ४६, ह्या पक्षींहि दुसऱ्या दिवसाचीच अष्टमी घ्यावी. दोन दिवसीं निशीथव्याप्ति नसणें. उदाहरण;–सप्तमी ४७, अष्टमी ४२ ह्याहि पक्षीं दुसऱ्या दिवसाचीच अष्टमी घ्यावी. ह्या सर्व पक्षीं सप्तमीयुक्त असेल तर रात्रीच्या पूर्वार्धाच्या समाप्तिकालीं एक क-

लामात्र जरी अष्टमी असली तरच निशीथव्याप्ति मानावी. नवमीयुक्त असेल तर रात्रीच्या उत्तरार्धाचा जो प्रथम भाग त्या भागांत एक कलामात्र जरी अष्टमी असली तरच दुसऱ्या दिवसीं निशीथव्याप्ति मानावी. सप्तमीच्या दिवसीं उत्तर भागांतच अष्टमी असेल आणि नवमीयुक्त दिवसीं पहिल्या भागांतच अष्टमी असेल तर निशीथव्याप्ति नाहीं असें मानावें. याप्रमाणें पुढें सांगावयाचे जे रोहिणीयुक्त भेद त्यांचे ठिकाणींहि असेंच जाणावें. रोहिणीयुक्त अष्टमीचे ठिकाणींहि पूर्वदिवसींच निशीथकालीं अष्टमी व रोहिणी यांचा योग असावा, दुसऱ्या दिवसींच निशीथकालीं योग असणें, दोन दिवसीं निशीथकालीं योग असणें, याप्रमाणें तीन पक्ष होतात. पूर्वदिवसींच निशीथकालीं अष्टमी रोहिणीचा योग असणें—त्याचें उदाहरण;— सप्तमी ४० घ०, त्या दिवसीं कृत्तिका ३९, अष्टमी ४६, त्या दिवसीं रोहिणी ३६ या पक्षीं पूर्वविद्धाच अष्टमी उपोषणाला घ्यावी. दुसऱ्या दिवसींच निशीथकालीं रोहिणी अष्टमीचा योग असणें— उदाहरण;—सप्तमी ४२, त्या दिवसीं कृत्तिका ९०, अष्टमी ४७, रोहिणी ४६ या पक्षीं दुसऱ्या दिवसाचीच अष्टमी घ्यावी. दोन दिवसीं निशीथकालीं अष्टमीरोहिणीचा योग असणें—उदाहरण;—सप्तमी ४२ कृत्तिका ४३, अष्टमी ४७, रोहिणी ४८ या पक्षीं दुसऱ्या दिवसाचीच अष्टमी घ्यावी. यानंतर रोहिणीयुक्त अष्टमीचे ठिकाणींच दोनही दिवसीं निशीथकालीं रोहिणीयोग नाहीं असें बहुधा संभवतें.

---

परेद्युरेवनिशीथव्यापिनीअष्टमीपरेद्युरेवनिशीथादन्यत्ररोहिणीयुक्ताचेत्येकःपक्षः यथा सप्तमी ४७ अष्टमी ५० अष्टमीदिनेकृत्तिका ४६ अत्रपक्षेपरैवाष्टमीग्राह्या एतत्तुल्ययुक्तयापूर्वेद्युरेवनिशीथव्यापिनीपूर्वेद्युरेवनिशीथादन्यत्ररोहिणीयुतेतिपक्षेपिपूर्वैवग्राह्या दिनद्वयेपिनिशीथादन्यत्ररोहिणीयुतापरेद्युरेवनिशीथव्यापिनीतिद्वितीयःपक्षः यथा सप्तमी ४८ तद्दिनेकृत्तिका ३० अष्टमी ४८ रोहिणी २५ अत्रापिपरैवग्राह्या दिनद्वयेनिशीथादन्यत्र रोहिणीयुक्तापूर्वेद्युरेवनिशीथव्यापिनीति तृतीयोयथा सप्तमी २५ कृत्तिका ४८ अष्टमी २० रोहिणी ४३ अत्रापिपरैव रोहिणीयोगसाम्येपिपूर्वत्रसप्तमीविद्धत्वात् यथावाष्टमी ६०।४ कृत्तिका ५० अत्रपूर्वैवग्राह्या अहोरात्रद्वयेरोहिणीयोगसाम्येपिपूर्वस्याःशुद्धत्वात्पूर्णव्याप्तेश्च दिनद्वयेपिनिशीथव्यापिनीपरेद्युरेवनिशीथादन्यत्ररोहिणीयुतेतिचतुर्थो यथा सप्तमी ४३ अष्टमी ४१ कृत्तिका ४६ अत्रपरैवाष्टमी एवंदिनद्वयेपिनिशीथव्यापिनी पूर्वत्रैवनिशीथादन्यत्ररोहिणीयुतेतिपंचमोयथा सप्तमी ४१ तद्दिनेरोहिणी ४३ अष्टमी ४७ अत्रपूर्वैवाष्टम्युपोष्या दिनद्वयेपिनिशीथव्यापिनीदिनद्वयेनिशीथादन्यत्ररोहिणीयुतेतिषष्ठो यथा सप्तमी ४२ कृत्तिका ४८ अष्टमी ४९ रोहिणी ४२ अत्रपरैव दिनद्वयेपिनिशीथाव्यापिनीपूर्वेद्युरेवनिशीथादन्यत्ररोहिणीयुतेतिसप्तमोयथा सप्तमी ४८ तद्दिनेरोहिणी५८ अष्टमी ४२ अत्रपरैवाष्टमीग्राह्या अत्रैवपक्षेपरेद्युरेवउभयत्रवानिशीथादन्यत्ररोहिणीयोगेपिपरैवेतिकैमुत्येनसिद्धम् पूर्वेद्युरेवनिशीथव्यापिनीपरेद्युरेवनिशीथादन्यत्ररोहिणीयुतेतिचर

---

१ सप्तमी ४८ अष्टमी ४२ तद्दिने कृत्तिका १२॥२ सप्तमी ४८ कृत्तिका ४८ अष्टमी ४२ रोहिणी ४२॥

**मःपक्षः यथा सप्तमी ३० अष्टमी २५ तद्दिनेकृत्तिका ५ यथावाष्टमी ६०।४ अष्टमीशे षदिनेकृत्तिका १** अत्रोदाहरणद्वयेपिपरैवाष्टमीग्राह्या स्वल्पस्यापिरोहिणीयोगस्यप्राशस्त्येनमुहूर्तमात्रायाअपिपरस्या ग्राह्यतयापूर्वत्रविद्यमानायानिशीथव्याप्तेरनादरात्सर्वपक्षेषुयदिपरदिनेमुहूर्तन्यूनावर्ततेतदासानग्राह्या किंतुपूर्वैवेतितुपुरुषार्थचिंतामणावुक्तं परेद्युरेवनिशीथव्यापिनीपूर्वेद्युरेवनिशीथादन्यत्ररोहिणीयुता यथासप्तमी ४८ रोहिणी ५५ अष्टमी ४८ अत्र परैव विद्धायांनिशीथोत्तररोहिणीयोगस्याप्रयोजकत्वात् अत्रविस्तरेणोक्तानांबहुपक्षाणांसंक्षेपेणनिर्णयसंग्रहः पुरुषार्थचिंतामणौ शुद्धसमायांशुद्धन्यूनायांवाविद्धसमायांविद्धन्यूनायां वाकेवलाष्टम्यांसंदेहएवनास्ति शुद्धाधिकापिकेवलाष्टमीपूर्वैव विद्धाधिकातुपूर्वदिनएवनिशीथव्याप्तौपूर्वा दिनद्वयेनिशीथव्याप्तावव्याप्तौवापरैवेति ॥

दुसऱ्या दिवसींच निशीथकालव्यापिनी अष्टमी आणि दुसऱ्या दिवसींच निशीथकालाहून अन्यत्र कालीं रोहिणीयुक्त अष्टमी असा **एक पक्ष**–उदाहरण;—सप्तमी ४७, अष्टमी ५०, अष्टमीच्या दिवसीं कृत्तिका ४६ ह्या पक्षीं दुसऱ्या दिवसाचीच अष्टमी घ्यावी. ह्याच्या समानयुक्तीनें पूर्वदिवसींच निशीथकालव्यापिनी अष्टमी, आणि पूर्वदिवसींच निशीथकालाहून अन्यत्रकालीं रोहिणीयुक्त अष्टमी, अशा पक्षींहि पूर्वदिवसाचीच घ्यावी. दोनहि दिवसीं निशीथकालाहून अन्यत्रकालीं रोहिणीयुक्त अष्टमी, आणि दुसऱ्या दिवसींच निशीथकालव्यापिनी, असा हा **दुसरा पक्ष**–उदाहरण;–सप्तमी ४८, त्या दिवसीं कृत्तिका ३०, अष्टमी ४८, रोहिणी २५ ह्या पक्षींहि दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. दोन दिवसीं निशीथकालाहून अन्यत्र कालीं रोहिणीयुक्त अष्टमी, आणि पूर्वदिवसींच निशीथकालव्यापिनी, असा हा **तिसरा पक्ष**–उदाहरण;–सप्तमी २५, कृत्तिका ४८, अष्टमी २०, रोहिणी ४३, ह्या पक्षींहि दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. दोन दिवसीं सारखा रोहिणीयोग असेल तथापि पूर्व दिवसीं सप्तमीनें विद्ध आहे यास्तव पूर्वदिवसाचीच घ्यावी. उदाहरण;–अष्टमी ६०।४, कृत्तिका ५० ह्या पक्षीं दोन अहोरात्रांमध्यें रोहिणीयोग जरी सारखा आहे तथापि पूर्वदिवसाची शुद्ध असून पूर्णव्याप्ति आहे याकरितां पूर्वदिवसाचीच घ्यावी. दोनहि दिवसीं निशीथकालव्यापिनी अष्टमी आणि दुसऱ्या दिवसींच निशीथकालाहून अन्यत्र कालीं रोहिणीयुक्त अष्टमी, असा हा **चवथा पक्ष**–उदाहरण;–सप्तमी ४३, अष्टमी ४१, कृत्तिका ४६ ह्या पक्षीं दुसऱ्या दिवसाचीच अष्टमी घ्यावी. याप्रमाणें दोनाहि दिवसीं निशीथकालव्यापिनी अष्टमी आणि पूर्वदिवसींच निशीथकालाहून अन्यत्र कालीं रोहिणीयुक्त अष्टमी, असा हा **पांचवा पक्ष**–उदाहरण;–सप्तमी ४१, त्या दिवसीं रोहिणी ४३, अष्टमी ४७, ह्या पक्षीं पूर्वदिवसाचीच अष्टमी उपोषणाला घ्यावी. दोनाहि दिवसीं निशीथकालव्यापिनी अष्टमी, आणि दोन दिवसीं निशीथकालाहून अन्यत्र कालीं रोहिणीयुक्त अष्टमी, असा हा **साहावा पक्ष**–उदाहरण;–सप्तमी ४२, कृत्तिका ४८, अष्टमी ४९, रोहिणी ४२ ह्या पक्षीं दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. दोनहि दिवसीं निशीथकालीं व्यापिनी नाहीं, आणि पूर्वदिवसींच निशीथकालाहून अन्यत्र कालीं रोहिणीयुक्त अष्टमी, असा हा **सातवा पक्ष**–उदाहरण;–सप्तमी ४८, त्या दिवसी रोहिणी ५८, अष्टमी

४२ ह्या पक्षीं दुसऱ्या दिवसाचीच अष्टमी घ्यावी. ह्याच पक्षीं दुसऱ्या दिवसींच, किंवा दोने दिवसीं निशीथकालाहून अन्यत्र कालीं अष्टमीरोहिणींचा योग असला तथापि दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी, असें कैमुतिकन्यायेंकरून सिद्ध होतें. पूर्व दिवसींच निशीथकालव्यापिनी अष्टमी, आणि दुसऱ्या दिवसींच निशीथकालाहून अन्यत्र कालीं रोहिणीयुक्त अष्टमी, असा हा शेवटचा पक्ष—उदाहरण;—सप्तमी ३० अष्टमी २९, त्या दिवसीं कृत्तिका ९, अथवा अष्टमी ६०।४, अष्टमीच्या शेषदिवसीं कृत्तिका १, ह्या दोन उदाहरणांतहि अष्टमी दुसरीच घ्यावी. रोहिणीचा योग अल्प असेल तथापि तो प्रशस्त आहे, याकरितां दोन घटिका जरी दुसऱ्या दिवसीं असेल तथापि तीच घेण्यास योग्य असल्यामुळें पूर्वदिवसीं प्राप्त झालेली जी निशीथकालव्याप्ति तिचा घेण्याविषयीं आदर नाहीं. यास्तव ह्या दोनहि उदाहरणांमध्यें दुसऱ्या दिवसाचीच अष्टमी घ्यावी. पूर्वी सांगितलेल्या सर्व पक्षांचे ठिकाणीं जर दुसऱ्या दिवसीं दोन घटिकांहून कमी अष्टमी आहे तर ती ग्रहण करूं नये, तर पूर्व दिवसाचीच घ्यावी, असें पुरुषार्थचिंतामणींत सांगितलें आहे. दुसऱ्या दिवसींच निशीथकालव्यापिनी अष्टमी, आणि पूर्वदिवसींच निशीथकालाहून अन्यत्र कालीं रोहिणीयुक्त अष्टमी असणें—उदाहरण;—सप्तमी ४८, रोहिणी ९९, अष्टमी ४८, विद्धा अष्टमी असतां निशीथकालानंतर रोहिणीयोग निरुपयोग आहे यास्तव ह्या पक्षीं अष्टमी दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. एथें विस्तारेंकरून बहुत पक्ष जे सांगितले त्यांच्या निर्णयांचा संग्रह संक्षेपानें पुरुषार्थचिंतामणींत आहे. शुद्धसम, शुद्धन्यून, अथवा विद्धसम, विद्धन्यून आणि केवळ अष्टमी यांचे ठिकाणीं संशयच नाहीं. शुद्धाधिक असी केवळ अष्टमी पूर्वदिवसाचीच घ्यावी. विद्धाधिक असी पूर्वदिवसींच निशीथकालव्याप्ति असेल तर पूर्वदिवसाचीच घ्यावी. दोन दिवसीं निशीथकालव्याप्ति असेल किंवा नसेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी.

---

अथरोहिणीयोगेयदिशुद्धसमायांशुद्धन्यूनायांवाईषदपिरोहिणीयोगस्तदानसंदेहः शुद्धाधिकायांपूर्वदिनेदिनद्वयेपिवारोहिणीयोगेपूर्वैव शुद्धाधिकायामुत्तरदिनेएवरोहिणीयोगेमुहूर्तमात्राप्युत्तरैव विद्धाधिकायांपूर्वदिनएवनिशीथात्पूर्वंनिशीथेवारोहिणीयोगेपूर्वा दिनद्वयेपिपरत्रैववानिशीथेनिशीथंविहायवारोहिणीयोगेपरैवेतिसंक्षेपेणनिर्णयसंग्रहः एवंकौस्तुभादिनवीनग्रंथानुसृतमाधवमतानुसारेणजन्माष्टमीनिर्णीता अत्रकेचित्केवलाष्टमीजन्माष्टमीसैव रोहिणीयुताजयंतीसंज्ञकेतिजयंत्यष्टम्योर्व्रतैक्यमाहुः अन्येतुजन्माष्टमीव्रतंजयंतीव्रतंचभिन्नंरोहिणीयोगाभावेजयंतीव्रतलोपाज्जन्माष्टमीव्रतमेवकार्यं यस्मिन्वर्षेजयंत्याख्ययोगोजन्माष्टमीतदा अंतर्भूताजयंत्यांस्यादितिजयंतीदिनेनिशीथाख्यकर्मकालेष्टम्याद्यभावेपिसाकल्यवचनापादितकर्मकालव्याप्तिमादायव्रतद्वयमपिजयंतीदिनएवतंत्रेणानुष्ठेयं व्रतद्वयस्याप्यकरणेमहादोषश्रवणेनफलश्रवणेनचनित्यकाम्योभयरूपत्वात् नतुनिशीथव्याप्तायांपूर्वाष्ट

---

१ सप्तमी ४८, अष्टमी ४२, त्या दिवसीं कृत्तिका १२.

२ सप्तमी ४८, कृत्तिका ४८, अष्टमी ४२, रोहिणी ४२.

म्यांजन्माष्टमीव्रतंकृत्वाजयंतीदिनेपारणमनुष्ठेयं नित्यव्रतलोपेप्रत्यवायापातादित्याहुः निर्णयसिंधौतु उक्तरीत्यामाधवमतमुपपाद्यहेमाद्रिमतेनजन्माष्टमीव्रतमेवनित्यंजयंतीव्रतंतुनित्यमपिकलियुगेलुप्तमितिकेचिन्नानुतिष्ठंतिइत्युक्त्वा स्वमतेनयस्मिन्वर्षेपूर्वदिनेएवनिशीथेष्टमीपरदिनेएवनिशीथादन्यत्रजयंत्याख्ययोगस्तत्रोपोषणद्वयंकार्यं व्रतद्वयस्यापिनित्यत्वेनाकरणेदोषात् जयंत्यामष्टम्यंतर्भावोक्तिस्तुमूर्खप्रतारणामात्रमितिप्रतिपादितं ममतुकौस्तुभादिनवीनपरिगृहीतमाधवमतरीत्याजयंत्यंतर्भावेनाष्टमीव्रतानुष्ठानमेवयुक्तंप्रतिभाति अत्रव्रतेबुधसोमवारयोगःप्राशस्त्यविधायकोनतुरोहिणीवन्निर्णायकः ॥

यानंतर रोहिणी असतां, जर शुद्धसम अथवा शुद्धन्यून अष्टमी असून अल्प जरी रोहिणीयोग असेल तर संशय नाहीं. शुद्धाधिक अष्टमी असून पूर्व दिवसीं किंवा दोनहि दिवसीं रोहिणीयोग असेल तर पूर्व दिवसाचीच घ्यावी.—शुद्धाधिक अष्टमी असून दुसऱ्या दिवसींच रोहिणीयोग असेल तर दोन घटिका असली तथापि दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. विद्धाधिक अष्टमी असून पूर्व दिवसींच निशीथकालाच्या पूर्वी किंवा निशीथकालीं रोहिणीयोग असेल तर पूर्व दिवसाचीच घ्यावी. दोनहि दिवसीं, अथवा दुसऱ्या दिवसींच निशीथकालीं किंवा निशीथकाल सोडून रोहिणीयोग असेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी, असा संक्षेपेंकरून निर्णयाचा संग्रह सांगितला. याप्रमाणें कौस्तुभादिक जे नवीन ग्रंथ त्यांनीं ग्रहण केलेलें अशा माधवमताच्या अनुरोधानें जन्माष्टमीचा निर्णय सांगितला. एथें कोणी ग्रंथकार, केवल अष्टमी तीच जन्माष्टमी, व तीच जन्माष्टमी रोहिणीयुक्त झाली असतां तिचेंच नांव जयंती असें मानून जयंती आणि अष्टमी या उभयतांचें एक व्रत सांगतात. दुसरे ग्रंथकार तर, जन्माष्टमीव्रत व जयंतीव्रत हीं निरनिराळीं आहेत त्यापेक्षां रोहिणीयोग नसेल तर जयंतीव्रताचा लोप करून जन्माष्टमीचेंच व्रत करावें, "ज्या वर्षीं जयंतीनामक योग असेल तेव्हां जन्माष्टमी जयंतीचे ठिकाणीं अंतर्भूत होते," असें आहे, याकरितां जयंतीचे दिवसीं निशिथनामक जो कर्मकाल तत्कालीं जरी अष्टमी नसली तथापि साकल्य वचनांनीं प्राप्त झालेली असी कर्मकालाची व्याप्ति घेऊन दोनहि व्रतें जयंतीच्या दिवसींच तंत्रेंकरून करावीं, दोनहि व्रतें नित्य असून काम्य आहेत व न केलीं असतां महादोष असून केलीं असतां महाफल आहे यास्तव दोनहि करावीं, नित्यव्रताचा लोप होईल तर दोष प्राप्त आहे यास्तव निशीथकालव्यापिनी असी पूर्व दिवसाची जी अष्टमी तिचे ठिकाणीं जन्माष्टमीचें व्रत करून जयंतीचे दिवसीं पारणा करूं नये, असें ह्मणतात. निर्णयसिंधूमध्यें तर पूर्वी सांगितल्या रीतीनें माधवमताचें उपपादन करून हेमाद्रीच्या मतें जन्माष्टमीचें व्रत मात्र नित्य आहे व जयंतीचें व्रत नित्य असतांहि तें कलियुगांत लुप्त झालें ह्मणून कोणी करीत नाहींत, असें सांगून आपल्या मतें, ज्या वर्षीं पूर्व दिवसींच निशीथकालीं अष्टमी असून दुसऱ्या दिवसींच निशीथकालाहून अन्यत्र कालीं जयंतीनामक योग असतो तेव्हां दोनाहि व्रतें नित्य असल्यामुळें न केलीं असतां दोष आहे यास्तव त्या वर्षीं दोन उपोषणें करावीं. "जयंतीचे ठिकाणीं जन्माष्टमीचा अंतर्भाव होतो," असें जें वचन तें मूर्खाला फसविण्याकरितां आहे, असें प्रतिपादन केलें आहे. मला तर, कौस्तुभादिक नवीन ग्रंथांमध्यें ग्रहण केलेलें जें माधवमत त्याच्या रीतीनें

जयंतीचा अंतर्भाव करून जन्माष्टमीचेंच व्रत करावें, हेंच योग्य असें वाटतें. ह्या व्रताचे ठिकाणीं बुधवार व सोमवार यांचा योग येईल तर तो प्राशस्त्यबोधक आहे, रोहिणीयोगासारखा निर्णयाला योग्य नाहीं.

---

**अथद्वितीयदिनेभोजनरूपंपारणंव्रतांगंविहितंतत्कालोनिर्णीयते केवलतिथ्युपवासेतिथ्यं तेनक्षत्रयुक्ततिथ्युपवासेउभयांतेपारणंकार्यं यदितिथिनक्षत्रयोरेकतरांतोदिनेलभ्यतेउभयांतस्तुरात्रौतदादिवैवान्यतरांतेपारणं यदादिवानैकस्याप्यंतस्तदानिशीथादर्वागन्यतरांतेउभयांतेवापारणं यदातुनिशीथाव्यवहितपूर्वक्षणेएकतरांतउभयांतोवातदानिशीथेपिपारणंकार्यं भोजनासंभवेपारणासंपत्त्यर्थंफलाद्याहारोविधेयः केचित्तूक्तविषयेनिशीथेपारणंनकार्यंकिंतूपवासात्तृतीयेन्हिदिवाकार्यमित्याहुस्तन्नयुक्तं अशक्तस्तुएकतरांताभावेपिउत्सवांतेप्रातरेवदेवपूजाविसर्जनादिकृत्वापारणंकुर्यात् ॥**

यानंतर दुसऱ्या दिवसीं भोजनरूप जी पारणा करणें ती व्रताचें अंग ह्मणून सांगितली आहे यास्तव त्या पारणेच्या कालाचा निर्णय सांगतों;— केवल तिथीचें उपोषण असेल तर तिथीच्या अंतीं पारणा करावी नक्षत्रयुक्त तिथीचें उपोषण असेल तर नक्षत्र व तिथि या दोहोंच्या अंतीं पारणा करावी.—जर तिथि आणि नक्षत्र यांतून कोणत्याहि एकाचा अंत दिवसा मिळेल व दोहोंचा अंत रात्रीं मिळेल तेव्हां दिवसासच दोहोंतून एकाच्या अंतीं पारणा करावी. जेव्हां दोहोंतून एकाचाहि अंत दिवसास नसेल तेव्हां मध्यरात्रीच्या पूर्वीं दोहोंतून एकाच्या अंतीं, किंवा दोहोंच्या अंतीं पारणा करावी. जेव्हां मध्यरात्रीच्या जवळ पूर्वकालीं दोहोंतून एकाचा अंत होईल किंवा दोहोंचा अंत होईल तेव्हां मध्यरात्रीचे ठिकाणींहि पारणा करावी. भोजनाचा संभव नसेल तर पारणा होण्याकरितां फलादिक भक्षण करावीं. कोणी ग्रंथकार, पूर्वीं सांगितलेल्या निशीथकालीं पारणा करूं नये, तर उपोषणापासून तिसऱ्या दिवसीं दिवसा पारणा करावी, असें ह्मणतात, तें योग्य नाहीं. अशक्त असेल तर, त्यानें दोहोंतून एकाचाहि अंत नसला तथापि उत्सवाच्या अंतीं प्रातःकालींच देवपूजा, विसर्जन, इत्यादिक करून पारणा करावी.

---

**अथसंक्षेपेणव्रतविधिः प्रातःकृतनित्यक्रियःप्राङ्मुखोदेशादिसंकीर्त्यतत्तत्कालेसप्तम्यादिसत्त्वेपिप्रधानभूतामष्टमीमेवसंकीर्त्य श्रीकृष्णप्रीत्यर्थंजन्माष्टमीव्रतंकरिष्येजयंतीयोगसत्त्वेजन्माष्टमीव्रतंजयंतीव्रतंचतंत्रेणकरिष्येइतिसंकल्पयेत् ताम्रपात्रेजलंगृहीत्वा वासुदेवंसमुद्दिश्यसर्वपापप्रशांतये उपवासंकरिष्यामिकृष्णाष्टम्यांनभस्यहं अशक्तौ फलानिभक्षयिष्यामीत्याद्यूह्यः आजन्ममरणंयावद्यन्मयादुष्कृतंकृतं तत्प्रणाशयगोविंदप्रसीदपुरुषोत्तमेति पात्रस्थंजलंक्षिपेत् ततःसुवर्णरजतादिमय्योमृन्मय्योवाभित्तिलिखितावाप्रतिमायथाकुलाचारंकार्याः तायथा पर्यंकेप्रसुप्तदेवक्याःस्तनंपिबंतींश्रीकृष्णप्रतिमांनिधायजयंतसत्त्वेत्वन्यदेवक्याउत्संगेद्वितीयांश्रीकृष्णमूर्तिंनिधायपर्यंकस्थदेवकीचरणसंवाहनपरां लक्ष्मींनिधायभित्त्यादौखड्गधरंवसुदेवं नंदगोपीगोपान्लिखित्वाप्रदेशांतरेमंचकेप्रसूतकन्ययासहयशोदाप्रति**

मांपीठांतरे वसुदेवदेवकीनंदयशोदाश्रीकृष्णरामचंडिकाइतिसप्तप्रतिमाःस्थापयेत् एताव
त्प्रतिमाकरणाशक्तौवसुदेवादिचंडिकांताःसप्तवायथाचारंयथाशक्तिवाकृत्वा अन्याःसर्वाय
थायथंध्यायेदितिभाति निशीथासन्नप्राक्कालेस्नात्वाश्रीकृष्णप्रीत्यर्थंसपरिवारश्रीकृष्णपूजांक
रिष्यइतिसंकल्प्यन्यासान्शंखादिपूजांतंनित्यवत्कृत्वा पर्यंकस्थांकिन्नराद्यैर्युतांध्यायेत्सुदेवकीं
श्रीकृष्णंबालकंध्यायेत्पर्यंकेस्तनपायिनं श्रीवत्सवक्षसंशांतंनीलोत्पलदलच्छविं संवाहयंतीं
देवक्याःपादौध्यायेच्चतांश्रियं एवंध्यात्वादेवक्यैनमःइतिदेवकीमावाह्यमूलमंत्रेणपुरुषसू
क्तऋचावाश्रीकृष्णायनमः श्रीकृष्णमावाहयामीतिआवाह्य लक्ष्मींचावाह्यदेवक्यैवसुदेवाय
यशोदायैनंदायकृष्णायरामायचंडिकायैइतिनाम्नावाह्यलिखितादिदेवताः सकलपरिवारदेव
ताभ्योनमइत्यावाह्यमूलमंत्रेणसूक्तऋचावा अत्रावाहितदेवक्यादिपरिवारदेवतासहितश्रीकृ
ष्णाय नमइत्यासनपाद्यार्घ्याचमनीयाभ्यंगस्नानानिदत्वापंचामृतस्नानांतेचंदनेनानुलेपयेत् शु
द्धोदकाभिषेकांतेवस्त्रयज्ञोपवीतगंधपुष्पाणिधूपदीपौच विश्वेश्वरायविश्वायतथाविश्वोद्भवाय
च विश्वस्यपतयेतुभ्यंगोविंदायनमोनमः यज्ञेश्वरायदेवायतथायज्ञोद्भवायच यज्ञानांपतयेनाथ
गोविंदायनमोनमइतिमंत्राभ्यांमूलमंत्रादिसमुच्चिताभ्यांदद्यात् जगन्नाथनमस्तुभ्यंसंसारभय
नाशन जगदीश्वरायदेवायभूतानांपतयेनमइतिनैवेद्यं मूलमंत्रादिकंसर्वत्रयोज्यं तांबूलादिन
मस्कारप्रदक्षिणापुष्पांजल्यंतंकार्यं अथवोद्यापनप्रकरणोक्तविधिनापूजा सायथा उक्तप्रका
रेणध्यानावाहनेकृत्वा देवाब्रह्मादयोयेनस्वरूपंनविदुस्तव अतस्त्वांपूजयिष्यामिमातुरुत्संग
वासिनं पुरुषएवेदमासनं अवतारसहस्राणिकरोषिमधुसूदन नतेसंख्यावताराणांकश्चिज्जा
नातितत्त्वतः एतावानस्येतिपाद्यं जातःकंसवधार्थायभूभारोत्तारणायच देवानांचहितार्थाय
धर्मसंस्थापनायच कौरवाणांविनाशायपांडवानांहितायच गृहाणार्घ्यंमयादत्तंदेवक्यासहि
तोहरे त्रिपादू० अर्घ्यं सुरासुरनरेशायक्षीराब्धिशयनायच कृष्णायवासुदेवायददाम्याच
मनंशुभं तस्मा० आचमनीयं नारायणनमस्तेस्तुनरकार्णवतारक गंगोदकंसमानीतंस्नानार्थं
प्रतिगृह्यतां यत्पुरुषे० स्नानं पयोदधिघृतक्षौद्रशर्करास्नानमुत्तमं तृप्त्यर्थंदेवदेवेशगृह्यतांदे
वकीसुतेतिपंचामृतं शुद्धोदकस्नानमाचमनं क्षौमंचपट्टसूत्राढ्यंमयानीतांशुकंशुभं गृह्यतांदे
वदेवेशमयादत्तंसुरोत्तम तंयज्ञं० वस्त्रं नमःकृष्णायदेवायशंखचक्रधरायच ब्रह्मसूत्रंजगन्ना
थगृहाणपरमेश्वर तस्माद्यज्ञा० यज्ञोपवीतं नानागंधसमायुक्तंचंदनंचारुचर्चितं कुंकुमाक्ता
क्षतैर्युक्तंगृह्यतांपरमेश्वर तस्माद्यज्ञा० गंधं पुष्पाणियानिदिव्यानिपारिजातोद्भवानिच माल
तीकेसरादीनिपूजार्थंप्रतिगृह्यतां तस्माद० पुष्पाणि अथांगपूजा श्रीकृष्णायनमःपादौपूज
यामि संकर्षणायनमःगुल्फौ० कालात्मनेन० जानुनीपू० विश्वकर्मणेन० जंघेपू० विश्वने
त्राय० कटीपू० विश्वकर्त्रेन० मेढ्रंपू० पद्मनाभायनमः नाभिंपू० परमात्मनेन०हृदयंपू०
श्रीकंठायन० कंठंपू० सर्वास्त्रधारिणेन० बाहूपू० वाचस्पतयेन० मुखंपू० केशवायन०
ललाटंपू० सर्वात्मनेन० शिरःपू० विश्वरूपिणेनारायणायनमः सर्वांगंपूजयामि वनस्पति
रसो० यत्पुरुषं० धूपं त्वंज्योतिःसर्वदेवानांतेजस्त्वंतेजसांपरं आत्मज्योतिर्नमस्तुभ्यंदीपो
यंप्रतिगृह्यतां ब्राह्मणो० दीपं नानागंधसमायुक्तंभक्ष्यभोज्यंचतुर्विधं नैवेद्यार्थंमयादत्तंगृ

हाणपरमेश्वर चंद्र० नैवेद्यं आचमनंकरोद्वर्तनं तांबूलंचसकर्पूरंपूगीफलसमन्वितं मुखवा सकरंरम्यंप्रीतिदंप्रतिगृह्यतां सौवर्णराजतंताम्रंनानारत्नसमन्वितं कर्मसाद्गुण्यसिद्ध्यर्थंद क्षिणाप्रतिगृह्यतां रंभाफलंनारिकेलंतथैवाम्रफलानिच पूजितोसिसुरश्रेष्ठगृह्यतांकंससूदन नाभ्याआ० नीराजनं० यानिका० सप्तास्या०प्रदक्षिणां यज्ञेनेत्यादिवेदमंत्रैः पुष्पांजलिं नम स्कारान् अपराधस० पूजांनिवेदयेत् सर्वोपचारपूजनसमाप्तौद्वादशांगुलविस्तारंरौप्यमयं स्थंडिलादिलिखितंवारोहिणीयुतंचंद्रं सोमेश्वरायसोमायतथासोमोद्भवायच सोमस्यपतयेनि त्यंतुभ्यंसोमायवैनमइतिसंपूज्यसपुष्पकुशचंदनंतोयंशंखेनादाय क्षीरोदार्णवसंभूतअत्रिगो त्रसमुद्भव गृहाणार्घ्यंशशांकेशरोहिणसहितोमम ज्योत्स्नापतेनमस्तुभ्यंज्योतिषांपतयेनमः नमस्तेरोहिणीकांतअर्घ्यंनःप्रतिगृह्यतां इतिमंत्राभ्यांचंद्रायार्घ्यंदद्यात् ततःश्रीकृष्णायार्घ्यंद द्यात् तत्रमंत्रः जातःकंसवधार्थायभूभारोत्तारणायच पांडवानांहितार्थायधर्मसंस्थापनायच कौरवाणांविनाशायदैत्यानांनिधनायच गृहाणार्घ्यंमयादत्तंदेवक्यासहितोहरेइति ततःप्रार्थ येत् त्राहिमांसर्वलोकेशहरेसंसारसागरात् त्राहिमांसर्वपापघ्नदुःखशोकार्णवात्प्रभो सर्वलो केश्वरत्राहिपतितंमांभवार्णवे त्राहिमांसर्वदुःखघ्नरोगशोकार्णवाद्धरे दुर्गतांस्त्रायसेविष्णोये स्मरंतिसकृत्सकृत् त्राहिमांदेवदेवेशत्वत्तोनान्योस्तिरक्षिता यद्वाक्वचनकौमारेयौवनेयच्चवा र्धके तत्पुण्यंवृद्धिमायातुपापंदहहलायुधेति ॥

## आतां संक्षेपेंकरून व्रताचा विधि सांगतों.

प्रातःकालीं स्नानसंध्यादि नित्यकर्म करून पूर्व दिशेच्या संमुख होत्साता देश, काल इत्यादिक कथन करून त्या त्या कालीं सप्तमी इत्यादिक तिथि असली तथापि प्रधानभूत अशा अष्टमीचाच उच्चार करून, "श्रीकृष्णप्रीत्यर्थं जन्माष्टमीव्रतं करिष्ये," असा संकल्प करावा. जयंतीचा योग असेल तर, जन्माष्टमीव्रतं जयंतीव्रतं च तंत्रेण करिष्ये," असा दोहों व्रतांचा एक तंत्रानें संकल्प करावा. तांब्याच्या भांड्यांत उदक घेऊन, "वासुदेवं समुद्दिश्य सर्वपापप्रशांतये ॥ उपवासं करिष्यामि कृष्णाष्टम्यां नभस्यहं." अशक्त असेल तर, "उपवासं करिष्यामि," एथें "फलानि भक्षयिष्यामि" इत्यादिक ऊह करावा. "आजन्ममरणं यावद्यन्मया दुष्कृतं कृतं ॥ तत्प्रणाशय गोविंद प्रसीद पुरुषोत्तम," ह्या दोहों मंत्रांचा उच्चार करून पात्रांतलें उदक भूमीवर सोडावें. तदनंतर सुवर्णाच्या, रुप्याच्या किंवा मृत्तिकेच्या, अथवा भिंतीवर लिखित केलेल्या, याप्रमाणें जसा कुलाचार असेल तशा मूर्ति कराव्या. त्या अशा,— मंचकावर देवकीनें शयन केलेलें असून तिचें स्तनपान करीत आहे असी श्रीकृष्णाची मूर्ति करावी. जयंतीयोग असेल तर देवकीची दुसरी एक मूर्ति करावी व तिच्या मांडीवर स्थित असी दुसरी श्रीकृष्णमूर्ति ठेवून मंचकस्थ देवकीची चरणसेवा करीत आहे असी लक्ष्मीची मूर्ति ठेवावी. नंतर भिंत इत्यादिकांवर खड्गधारी वसुदेव, नंद, गोप, गोपी अशा मूर्ति लिहून दुसऱ्या ठिकाणीं मंचकावर प्रसूत कन्येसह यशोदेची मूर्ति स्थापावी. नंतर दुसऱ्या आसनावर वसुदेव, देवकी, नंद, यशोदा, श्रीकृष्ण, राम, चंडिका, अशा सात मूर्तींची स्थापना करावी. इतक्या मूर्ति करण्याविषयीं शक्ति नसेल तर वसुदेवा-

पासून चंडिकेपर्यंत सात, अथवा जसा आचार किंवा शक्ति असेल तशा करून बाकीच्या सर्वांचें जसें तसें ध्यान करावें, असें मला वाटतें. निशीथकालाच्या जवळच्या पूर्व कालीं स्नान करून, “ श्रीकृष्णप्रीत्यर्थं सपरिवारश्रीकृष्णपूजां करिष्ये, ” असा संकल्प करून न्यास, शंखपूजा इत्यादिक नित्याप्रमाणें करून देवताध्यान करावें. त्याचा मंत्र—“पर्यंकस्थां किन्नराद्यैर्युतां ध्यायेत्तु देवकीं ॥ श्रीकृष्णं बालकं ध्यायेत्पर्यंके स्तनपायिनं ॥ श्रीवत्सवक्षसं शांतं नीलोत्पलदलच्छविं ॥ संवाहयंतीं देवक्याः पादौ ध्यायेच्च तां श्रियं ॥ ” असें ध्यान करून “ देवक्यै नमः ” ह्या नाममंत्रानें देवकीचें आवाहन करून मूलमंत्रानें किंवा पुरुषसूक्ताच्या ऋचेनें “ श्रीकृष्णाय नमः श्रीकृष्णं आवाहयामि, ” असें आवाहन करून लक्ष्मीचें आवाहन करून “ देवक्यै वसुदेवाय यशोदायै नंदाय कृष्णाय रामाय चंडिकायै,” अशा नाममंत्रानें आवाहन करावें. नंतर लिखित देवतांचें “ सकलपरिवारदेवताभ्यो नमः” असें आवाहन करून मूलमंत्रानें किंवा पुरुषसूक्तऋचेनें “ अत्रावाहितदेवक्यादिपरिवारदेवतासहितश्रीकृष्णाय नमः ” असें ह्मणून आसन, पाद्य, अर्घ्य, आचमनीय, अभ्यंगस्नान हीं समर्पण करून पंचामृतस्नान झाल्यानंतर चंदनेंकरून अनुलेपन करावें. नंतर शुद्धोदकानें अभिषेक करून वस्त्र, यज्ञोपवीत, गंध, पुष्प, धूप, दीप इत्यादिक उपचार अर्पण करावे. त्यांचे मंत्र—“ विश्वेश्वराय विश्वाय तथा विश्वोद्भवाय च ॥ विश्वस्य पतये तुभ्यं गोविंदाय नमोनमः ॥ यज्ञेश्वराय देवाय तथा यज्ञोद्भवायच ॥ यज्ञानां पतये नाथ गोविंदाय नमोनमः ॥ ” मूलमंत्रयुक्त ह्या मंत्रांनीं वस्त्रादिक उपचार अर्पण करावे. “ जगन्नाथ नमस्तुभ्यं संसारभयनाशन ॥ जगदीश्वराय देवाय भूतानां पतये नमः ॥ ” ह्या मंत्रेंकरून नैवेद्य द्यावा. मूलमंत्रादिकाची सर्व ठिकाणीं योजना करावी. तांबूलापासून नमस्कार, प्रदक्षिणा, पुष्पांजलीपर्यंत पूजा करावी. अथवा उद्यापनप्रकरणीं सांगितलेल्या विधीकरून करावी. ती असी,—पूर्वी सांगितल्याप्रमाणें ध्यान, आवाहन, इत्यादिक करून पुढें सांगतों असी पूजा करावी. पूजा,—“ देवा ब्रह्मादयो येन स्वरूपं न विदुस्तव ॥ अतस्त्वां पूजयिष्यामि मातुरुत्संगवासिनं ॥ पुरुष एवेदमासनं ॥ अवतारसहस्राणि करोषि मधुसूदन ॥ न ते संख्यावताराणां कश्चिज्जानातितत्त्वतः ॥ एतावानस्येति पाद्यं ॥ जातः कंसवधार्थाय भूभारोत्तारणाय च ॥ देवानां च हितार्थाय धर्मसंस्थापनाय च ॥ कौरवाणां विनाशाय पांडवानां हिताय च ॥ गृहाणार्घ्यं मया दत्तं देवक्या सहितो हरे ॥ त्रिपाद० अर्घ्यं ॥ सुरासुरनरेशाय क्षीराब्धिशयनाय च ॥ कृष्णाय वासुदेवाय ददाम्याचमनं शुभं ॥ तस्मा० आचमनीयं ॥ नारायण नमस्तेस्तु नरकार्णवतारक ॥ गंगोदकं समानीतं स्नानार्थं प्रतिगृह्यतां ॥ यत्पुरुषे० स्नानं ॥ पयोदधिघृतक्षौद्रशर्करास्नानमुत्तमं ॥ तदर्थं देवदेवेश गृह्यतां देवकीसुत ॥ पंचामृतं ॥ शुद्धोदकस्नानमाचमनं ॥ क्षौमं च पट्टसूत्राढ्यं मयानीतांशुकं शुभं ॥ गृह्यतां देवदेवेश मया दत्तं सुरोत्तम ॥ तंयज्ञं० वस्त्रं ॥ नमः कृष्णाय देवाय शंखचक्रधराय च ॥ ब्रह्मसूत्रं जगन्नाथ गृहाण परमेश्वर ॥ तस्माद्य० यज्ञोपवीतं ॥ नानागंधसमायुक्तं चंदनं चारुचर्चितं ॥ कुंकुमाक्ताक्षतैर्युक्तं गृह्यतां परमेश्वर ॥ तस्माद्य० गंधं ॥ पुष्पाणि यानि दिव्यानि पारिजातोद्भवानि च ॥ मालतीकेसरादीनि पूजार्थं प्रतिगृह्यतां ॥ तस्माद० पुष्पाणि ॥ अथांगपूजा ॥ श्रीकृष्णाय नमः पादौ पूजयामि ॥ संकर्षणाय नमः

गुल्फौ० कालात्मनेन० जानुनीपू० विश्वकर्मणेन० जंघेपू० विश्वनेत्राय० कटीपू० विश्वकर्त्रे० मेढ्रंपू० पद्मनाभाय० नाभिंपू० परमात्मने० हृदयंपू० श्रीकंठायन० कंठंपू० सर्वास्त्रधारिणे० बाहूपू० वाचस्पतये० मुखंपू० केशवाय० ललाटंपू० सर्वात्मने० शिरःपू० विश्वरूपिणे नारायणाय० सर्वांगं पूजयामि ॥ वनस्पतिरसो० यत्पुरुषं० धूपं ॥ त्वं ज्योतिः सर्वदेवानां तेजस्त्वं तेजसां परं ॥ आत्मज्योतिर्नमस्तुभ्यं दीपोयं प्रतिगृह्यतां ॥ ब्राह्मणो० दीपं ॥ नानागंधसमायुक्तं भक्ष्यभोज्यं चतुर्विधं ॥ नैवेद्यार्थं मया दत्तं गृहाण परमेश्वर ॥ चंद्र० नैवेद्यं ॥ आचमनं ॥ करोद्वर्तनं ॥ तांबूलं च सकर्पूरं पूगीफललसमन्वितं ॥ मुखवासकरं रम्यं प्रीतिदं प्रतिगृह्यतां ॥ तांबूलं ॥ सौवर्णं राजतं ताम्रं नानारत्नसमन्वितं ॥ कर्म साद्गुण्यसिद्ध्यर्थं दक्षिणा प्रतिगृह्यतां ॥ दक्षिणां ॥ रंभाफलं नारिकेलं तथैवाम्रफलानि च ॥ पूजितोसि सुरश्रेष्ठ गृह्यतां कंससूदन ॥ फलानि ॥ नाभ्याआसी० नीराजनं ॥ यानि कानि० सप्तास्या० प्रदक्षिणां ॥ यज्ञेन० पुष्पांजलिं ॥ नमस्कारान् ॥ अपराधस० प्रार्थना ॥ " याप्रमाणें सर्व उपचारांनीं पूजा करून तिची समाप्ति झाल्यानंतर बारा अंगुळें विस्तृत, रुप्याचा, किंवा भूमि इत्यादिकांवर लिखित असा रोहिणीयुक्त चंद्र करून, " सोमेश्वराय सोमाय तथा सोमोद्भवाय च ॥ सोमस्य पतये नित्यं तुभ्यं सोमाय वै नमः " ह्या मंत्रानें पूजा करावी. नंतर पुष्प, कुश, चंदन, यांसह उदक शंखानें घेऊन, " क्षीरोदार्णवसंभूत अत्रिगोत्रसमुद्भव ॥ गृहाणार्घ्यं शशांकेश रोहिणीसहितो मम ॥ ज्योत्स्नापते नमस्तुभ्यं ज्योतिषां पतये नमः ॥ नमस्ते रोहिणीकांत अर्घ्यं नः प्रतिगृह्यतां," ह्या दोन मंत्रांनीं चंद्राला अर्घ्य द्यावें. तदनंतर श्रीकृष्णाला अर्घ्य द्यावें. त्याचा मंत्र—" जातः कंसवधार्थाय भूभारोत्तारणाय च ॥ पांडवानां हितार्थाय धर्मसंस्थापनाय च ॥ कौरवाणां विनाशाय दैत्यानां निधनाय च ॥ गृहाणार्घ्यं मया दत्तं देवक्या सहितो हरे," असें अर्घ्य देऊन प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र—"त्राहि मां सर्वलोकेश हरे संसारसागरात् ॥ त्राहि मां सर्वपापघ्न दुःखशोकार्णवात्प्रभो ॥ सर्वलोकेश्वर त्राहि पतितं मां भवार्णवे ॥ त्राहि मां सर्वदुःखघ्न रोगशोकार्णवाद्धरे ॥ दुर्गतांस्त्रायसे विष्णो ये स्मरंति सकृत् सकृत् ॥ त्राहि मां देवदेवेश त्वत्तो नान्योस्ति रक्षिता ॥ यद्वा क्वचन कौमारे यौवने यच्च वार्धके ॥ तत्पुण्यं वृद्धिमायातु पापं दह हलायुध ॥"

---

अथपूजानंतरंकृत्यंअग्निपुराणेइत्येवंपूजयित्वातुपुरुषसूक्तैःसवैष्णवैः ॥ स्तुत्वावादित्रनिर्घोषैर्गीतवादित्रमंगलैः ॥ सुकथाभिर्विचित्राभिस्तथाप्रेक्षणकैरपि ॥ पूर्वेतिहासैःपौराणैःक्षिपेत्तांशर्वरींनृपेति अत्रकथासुवैचित्र्यंदेशभाषाकाव्यकृतं सूक्तानांप्रागुक्तैःपुराणकथानामंतेभिधानात् प्रेक्षणकानिनृत्यादीनि तथाचवैदिकसूक्तकरणकस्तुतिविशिष्टःपौराणेतिहासमिश्रितोगीतनृत्ययुतदेशभाषाकाव्यप्रमुखकथाकरणकोजागरो विप्रादिवर्णत्रयस्यविधीयते शूद्रादीन्प्रतिएतादृशजागरस्यविधातुमयोग्यत्वात् वचनांतरेणतुसूक्तादिरहितगीतादिविशिष्टोवर्णचतुष्टयसाधारणोविधीयते गोकुलस्थजन्मलीलादिश्रवणोत्तरंवैष्णवैःपरस्परंदध्यादिभिःसेचनंकार्यं दधिक्षीरघृतांबुभिः आसिंचंतोविलिंपंतइत्यादिभागवतवचनेनतथाविधिक

ल्पनात् अयमुत्सवोधुनामहाराष्ट्रदेशेगोपालकालेतिव्यवह्रियतइतिमेभाति एतत्सर्वंकौस्तुभेश्रीमदनंतदेवैःस्पष्टीकृतमस्तीतिनमय्यसूयाकार्या एतादृशकथायुतोजागरोन्यत्ररामनवम्येकादश्याद्युत्सवेष्वप्यूह्यः पूजाजागरादिविशिष्टव्रतोत्सवसाम्यात् महाराष्ट्रीयेषुतथाचाराच्च भगवत्प्रेमादिभाग्यशालिनस्तुपर्वणिस्युरुतान्वहमितिन्यायेनप्रत्यहमेवोक्तविधिकथोत्सवं कुर्वंतीतिभाति ॥

आतां पूजा झाल्यानंतरचें कृत्य सांगतों;–अग्निपुराण– " याप्रमाणें पूजा करून पुरुषसूक्तांनीं व विष्णुसूक्तांनीं व नानाविध स्तोत्रांनीं स्तुति करावी आणि गीत, वाद्यें, उत्तम चित्रविचित्र कथा, भजन, नृत्य, प्राचीन असे पुराणसंबंधी इतिहास, व पाहणारे जन यांहींकरून असेल तथापि त्या देशभाषेंतील स्तुति इत्यादिकेंकरून जागर करावा. येथें पहिल्यानें सूक्त सांगून शेवटीं पुराणकथा सांगितल्या, यास्तव कथेच्या ठिकाणीं विचित्रपणा, देशभाषा व काव्य इत्यादिकांनीं केलेला जाणावा. वैदिकमंत्रयुक्त व स्तुतियुक्त असून पुराणसंबंधी इतिहासांनीं मिश्रित व गायन व नृत्य यांहीं युक्त आणि देशभाषासंबंधी कविता ( पदें, साक्या, अभंग इत्यादि ) ह्मणून कथा करून जागर करणें तो ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य या तीन वर्णांनीं करावा, असा पूर्वोक्त जागर शूद्रादिकांनीं करूं नये. दुसऱ्या प्रमाणवचनानें तर वैदिक मंत्र, पुराण, स्तुति यांहीं रहित, गायनादियुक्त असा साधारण जागर चारहि वर्णांनीं करावा. गोकुलांतील जन्मलीला इत्यादिक श्रवण केल्यानंतर " दहीं, दूध, घृत, उदक यांहींकरून गोपालांनीं परस्परांवर सिंचन व लेपन केलें, " अशा भागवताच्या वचनानें तसा विधि प्राप्त होतो यास्तव वैष्णवांनीं दहीं, दूध, ताक यांचें सिंचन परस्परांवर करावें. महाराष्ट्र देशामध्यें हल्लीं हा उत्सव ' गोपालकाला ' या नांवानें चालतो असें मला वाटतें. हें सर्व कौस्तुभग्रंथीं श्रीमान् अनंतदेव यांनीं स्पष्ट करून दाखविलें आहे, त्यापेक्षां मजवर दोषारोप करूं नये. पूजा, जागर इत्यादिकेंकरून युक्त असा व्रताचा उत्सव सर्वांला सारखा आहे यास्तव अशा प्रकारचा कथायुक्त जागर इतर रामनवमी, एकादशी इत्यादिक उत्सवांतहि करावा. कारण महाराष्ट्र देशांतील लोकांमध्यें आचारहि तसाच आहे, प्रेमळ असे जे भगवद्भक्त आहेत ते, "उत्सव पर्वणीचे दिवसीं करावे, किंवा दररोज करावे" अशा या न्यायाला अनुसरून पूर्वीं सांगितल्याप्रमाणें कथा, जागर, उत्सव हे दररोज करतात, असें मला वाटतें.

---

ततोनवम्यांब्राह्मणान्भोजनदक्षिणादिभिःसंतोष्योक्तपारणानिर्णीतकालेभोजनंकुर्यात् अस्यैवजयंतीव्रतस्यसंवत्सरसाध्यःप्रयोगः श्रावणकृष्णाष्टमीमारभ्यप्रतिमासंकृष्णाष्टम्यामुक्तविधिनापूजादिरूपःपुराणांतरेउक्तः अत्रोद्यापनविधिर्ग्रंथांतरेज्ञेयः ॥ इतिजन्माष्टमीनिर्णयः ॥

याप्रमाणें उत्सव करून नंतर नवमीचे दिवसीं भोजन, दक्षिणा इत्यादिकेंकरून ब्राह्मणांचा संतोष करून पूर्वीं सांगितलेला जो पारणेचा निर्णीत काल त्या कालीं भोजन करावें. एक वर्षपर्यंत करावयाचें असें हें जयंतीव्रत आहे व त्याचा आरंभ श्रावणकृष्ण अष्टमीचे दिवशीं करून दरएक मासाला कृष्णाष्टमीचे ठिकाणीं पूर्वीं सांगितलेल्या विधीनें पूजादिक क-

रावीं. अशा प्रकारचा वर्षसाध्य प्रयोग पुराणांतरीं सांगितला आहे. ह्या व्रताच्या उद्यापनाचा विधि, अन्य ग्रंथीं आहे तो पहावा. याप्रमाणें जन्माष्टमीचा निर्णय संपूर्ण झाला.

---

**नभोमासस्यदर्शेतुशुचिर्दर्भान्समाहरेत् अयातयामास्तेदर्भाविनियोज्याःपुनःपुनः केचि त्भाद्रामायांदर्भग्रहणमाहुः कुशाःकाशायवादूर्वाउशीराश्चसकुंदकाः गोधूमाव्रीहयोमौंजादश दर्भाःसबल्वजाः विरिंचिनासहोत्पन्नपरमेष्ठिनिसर्गज नुदसर्वाणिपापानिदर्भस्वस्तिकरोभव एवंमंत्रंसमुच्चार्यततःपूर्वोत्तरामुखः हुंफट्कारेणमंत्रेणसकृच्छित्वासमुद्धरेत् चतुर्भिर्दर्भैर्विप्र स्यपवित्रं क्षत्रियादेरेकैकन्यूनं सर्वेषांवाभवेत्द्वाभ्यांपवित्रंग्रंथितंनवा ॥ इतिश्रीमदनंतोपा ध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारे श्रावणमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥**

“ शुचिर्भूत होऊन श्रावण अमावास्येचे दिवसीं दर्भ आणावे. ते दर्भ ताजे रहातात, व ब्रह्मकर्माला पुनः पुनः तेच तेच दर्भ घ्यावे.” कोणीं ग्रंथकार भाद्रपद अमावास्येचे दिवसीं दर्भ आणावे असें ह्मणतात. कुश, काश ( लव्हा ), यव, दूर्वा, वाळा, कुंदक, (कुंदागवंत), गहूं, भात, मोळ, बल्वज हे दहा प्रकारचे दर्भ जाणावे. दर्भ तोडण्याचा मंत्र–“ **विरंचिना सहोत्पन्न परमेष्ठिनिसर्गज ॥ नुद सर्वाणि पापानि दर्भ स्वस्तिकरो भव** ” याप्रमाणें मंत्र ह्मणून पूर्वदिशा किंवा उत्तरदिशा हिच्या संमुख होत्साता “ **हुंफट्** ” असा मंत्र ह्मणून एकवार असे दर्भ तोडून आणावे. ब्राह्मणानें चार दर्भांचें, क्षत्रियानें तीन दर्भांचें, वैश्यानें दोन दर्भांचें याप्रमाणें पवित्रकें धारण करावीं. अथवा सर्वांनीं दोन दोन दर्भांचीं पवित्रकें धारण करावीं. पवित्रकाला ग्रंथि देणें तो वैकल्पिक आहे. **इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे श्रावणमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥**

---

**अथ भाद्रपदमासः ॥ तत्रकन्यासंक्रांतौपराःषोडशनाड्यःपुण्यकालः भाद्रपदमासेए काभाहारव्रताद्धनारोग्यादिफलं अत्रमासेहृषीकेशप्रीत्यर्थंपायसगुडौदनलवणादेर्दानंभाद्रपद शुक्लतृतीयायांहरितालिकाव्रतं तत्रमुहूर्तमात्रातत्तोन्यूनापिपराग्राह्या यदाक्षयवशात्परदिने नास्तितदाद्वितीयायुतापिग्राह्या यदाशुद्धाधिकातदापूर्वदिनेषष्टिघटीमितामपित्यक्त्वापरदिने स्वल्पापिचतुर्थीयुतैवग्राह्या गणयोगप्राशस्त्यात् अत्रव्रतेभवानीशिवयोः पूजनमुपवासश्चस्त्री णांनित्यः तत्र मंदारमालाकुलितालकायैकपालमालांकितशेखराय दिव्यांबरायैचदिगंबराय नमःशिवायैचनमःशिवायइत्यादयःपूजामंत्राज्ञेयाः ॥**

## आतां भाद्रपदमासांतील कृत्यें सांगतों.

कन्यासंक्रांतीच्या पुढच्या सोळा घटिका पुण्यकाळ. भाद्रपद मासाचे ठिकाणीं एक अन्न खाणें असें व्रत करावें, तेणेंकरून धन, आरोग्य इत्यादिक फल प्राप्त होतें. या मासाचे ठिकाणीं हृषीकेशाचा संतोष होण्याकरितां पायस, गुडमिश्रित भात, लवण इत्यादिकांचें दान करावें. भाद्रपदशुक्ल तृतीयेचे दिवसीं हरितालिका व्रत करावें. त्या हरितालिका व्रताविषयीं तृतीया दुसऱ्या दिवसीं दोन घटिका किंवा त्याहून कमी असली तत्रापि दुसऱ्या दिवसाची घ्यावी.

जेव्हां क्षयामुळें दुसऱ्या दिवशीं नसेल तेव्हां द्वितीयेनें युक्त असी पूर्व दिवसाचीहि घ्यावी. जेव्हां शुद्धाधिक ( वृद्धियुक्त ) अशी असेल तेव्हां पूर्वदिवशीं साठ घटिका असली तथापि ती टाकून दुसऱ्या दिवशीं अल्प असली तथापि चतुर्थीचा योग प्रशस्त आहे याकरितां चतुर्थीयुक्तच घ्यावी. या व्रताचे ठिकाणीं स्त्रियांनीं पार्वती आणि शिव यांची पूजा करून उपोषण करावें. हें (हरितालिकासंबंधी) उपोषण स्त्रियांला नित्य आहे. या व्रताचे ठिकाणीं, "मंदारमालाकुलितालकायै कपालमालांकितशेखराय ॥ दिव्यांबरायै च दिगंबराय नमःशिवायै च नमःशिवाय" ॥ इत्यादिक पूजामंत्र जाणावें.

---

**शुक्लचतुर्थ्यांसिद्धिविनायकव्रतं** सामध्यान्हव्यापिनीग्राह्या दिनद्वयेसाकल्येनमध्यान्हे व्याप्तावव्याप्तौवापूर्वा दिनद्वयेसाम्येनवैषम्येणवैकदेशव्याप्तावपिपूर्वैव वैषम्येणव्याप्तावधिकव्यापिनीचेत्परेतिकेचित् पूर्वदिनेसर्वथामध्यान्हस्पर्शोनास्त्येव परदिनेएवमध्यान्हस्पर्शिनी तदैवपरा पूर्वदिनेएकदेशेनमध्यान्हव्यापिनी परदिनेसंपूर्णमध्यान्हव्यापिनीतदापिपरैव एवंमासांतरेपिनिर्णयः इयंरविभौमवारयोगे प्रशस्ता ॥

भाद्रपद शुद्ध चतुर्थी हिला गणेशचतुर्थी असें ह्मणतात, हिचे ठिकाणीं सिद्धिविनायकाचें व्रत करावें. त्या व्रताविषयीं चतुर्थी मध्यान्हकालव्यापिनी घ्यावी. दोन दिवशीं संपूर्ण मध्यान्हकालीं व्याप्ति असेल किंवा दोनहि दिवशीं मध्यान्हकालीं व्याप्ति नसेल, तर पूर्व दिवसाची घ्यावी. दोन दिवशीं सारखी एकदेशव्याप्ति अथवा कमजास्ती एकदेशव्याप्ति अशी असेल तथापि पूर्वदिवसाचीच घ्यावी. कमी जास्त व्याप्तीचे ठिकाणीं अधिकव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी, असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. पूर्वदिवशीं सर्वथा मध्यान्हकालीं स्पर्श नाहींच आणि दुसऱ्या दिवशींच मध्यान्हकालीं स्पर्श करणारी असेल तरच दुसऱ्या दिवसाची घ्यावी. पूर्वदिवशीं एकदेश मध्यान्हव्यापिनी व दुसऱ्या दिवशीं संपूर्ण मध्यान्हव्यापिनी असी असेल तेव्हांहि दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. याप्रमाणें अन्य मासांमध्येंहि निर्णय जाणावा. ही चतुर्थी रविवार व भौमवार यांचा योग असतां प्रशस्त आहे.

---

**अत्रचतुर्थ्यांचंद्रदर्शनेमिथ्याभिदूषणदोषस्तेनचतुर्थ्यामुदितस्यपंचम्यांदर्शनंविनायकव्रत** दिनेपिनदोषायपूर्वदिनेसायान्हमारभ्यप्रवृत्तायांचतुर्थ्यांविनायकव्रताभावेपिपूर्वेद्युरेवचंद्रदर्शनेदोषइतिसिद्ध्यति चतुर्थ्यामुदितस्यनदर्शनमितिपक्षेतुअवशिष्टपंचषण्मुहूर्तमात्रचतुर्थीदिनेपिनिषेधापत्तिः इदानींलोकास्तुएकतरपक्षाश्रयेणविनायकव्रतदिनेएवचंद्रंनपश्यंतिनतूदयकालेदर्शनकालेवाचतुर्थीसत्त्वासत्त्वेनियमेनाश्रयंति दर्शनेजातेतद्दोषशांतये सिंहःप्रसेनमवधीत्सिंहोजांबवताहतः सुकुमारकमारोदीस्तवह्येषस्यमंतकः इतिश्लोकजपःकार्यःतत्रमृन्मयादिमूर्तौप्राणप्रतिष्ठापूर्वकंविनायकं षोडशोपचारैःसंपूज्यैकमोदकेननैवेद्यंदत्वासगंधाएकविंशतिदूर्वागृहीत्वा गणाधिपायोमापुत्रायाघनाशनायविनायकायेशपुत्रायसर्वसिद्धिदायैकदंतायेभवक्त्रायमूषकवाहनायकुमारगुरवेइति दशनामभिर्दूर्वेयोर्द्वेयंद्वयंसमर्प्यावशिष्टामेकांदूर्वां उक्तदशनामभिःसमर्पयेत् दशमोदकान्विप्रायदत्वादशस्वयंभुंजीतेतिसंक्षेपः ॥

ह्या चतुर्थीचे दिवसीं चंद्रदर्शन झालें असतां मिथ्या दोषारोप होतो, परंतु चतुर्थीमध्यें उदय पावलेल्या चंद्राचें दर्शन पंचमीमध्यें होईल व तो दिवस विनायकव्रताचा असेल तथापि दोष नाहीं. पूर्वदिवसीं सायान्हकालाला आरंभ करून राहणारी जी चतुर्थी तिचे ठिकाणीं विनायकव्रत नसेल तथापि पूर्वदिवसींच चंद्रदर्शनाविषयीं दोष असें सिद्ध होतें. चतुर्थीचे ठिकाणीं उदय पावलेल्या चंद्राचें दर्शन घेऊं नये, ह्या पक्षीं तर बाकी राहिलेली जी दाहा बारा घटिका चतुर्थी त्या दिवसींहि चंद्रदर्शनाचा निषेध येईल. हल्लीं लोक तर दोहोंतून एका पक्षाचा स्वीकार करून विनायकव्रताचे दिवसींच चंद्राला पहात नाहींत, परंतु उदयकालीं किंवा दर्शनकालीं चतुर्थी आहे किंवा नाहीं हें पाहून त्या नियमाप्रमाणें चालतात असें नाहीं. चंद्रदर्शन झालें तर त्याचा दोष जाण्याकरितां, " **सिंहः प्रसेनमवधीत्सिंहो जांबवता हतः॥ सुकुमारक मारोदीस्तव ह्येष स्यमंतकः ॥** " ह्या मंत्राचा जप करावा. विनायकव्रताचे ठिकाणीं मृत्तिका इत्यादिकांची मूर्ति करून प्राणप्रतिष्ठापूर्वक सोळा उपचारांनीं विनायकाची पूजा करावी, व एका मोदकाचा नैवेद्य दाखवून नंतर गंधासह एकवीस दूर्वा घेऊन मग, " **गणाधिपाय, उमापुत्राय, अघनाशनाय, विनायकाय, ईशपुत्राय, सर्वसिद्धिदाय, एकदंताय, इभवक्त्राय, मूषकवाहनाय, कुमारगुरवे,** " असीं दाहा नांवें त्यांतून एकेक नांवानें दोन दोन दूर्वा समर्पण करून बाकी राहिलेली एक दूर्वा दाहा नांवांचा उच्चार करून अर्पण करावी. दाहा मोदक ब्राह्मणास देऊन दाहा आपण भक्षण करावे, याप्रमाणें व्रताचा संक्षेप जाणावा.

---

**भाद्रशुक्लपंचमी ऋषिपंचमी सामध्यान्हव्यापिनी ग्राह्या दिनद्वये मध्यान्हव्याप्तौतदव्याप्तौचपूर्वैव** अत्रऋषीन्पूजयित्वाकर्षणरहितभूमिजन्यशाकाहारंकुर्यात् शुक्लेभाद्रपदे **षष्ठ्यांस्नानंभास्क**रपूजनं प्राशनंपंचगव्यस्यअश्वमेधफलाधिकं इयंसूर्यषष्ठीसप्तमीयुताग्राह्या **अस्यामेवस्वामिक**ार्तिकेयदर्शनाद्ब्रह्महत्यादिपापनाशः भाद्रपदशुक्लाष्टमीदूर्वाष्टमीसापूर्वाग्रा **ह्या इयंज्येष्ठामूल**र्क्षयुतात्याज्या अलाभेतद्युक्तापिग्राह्या इदंदूर्वापूजनव्रतंकन्यार्केऽगस्त्योदये **चवर्ज्यं इदंस्त्रीणांनित्यं अत्रज्येष्ठादेवीपूजनव्रतंकेवलाष्टमीप्राधान्येनकेवलज्येष्ठानक्षत्रप्राधान्येनचोक्तं तत्रदाक्षिणात्याः केवलज्येष्ठानक्षत्रएवकुर्वंति तत्रानुराधायामावाहनंज्येष्ठायांपूजनंमूलेविसर्जनमितित्रिदिनंज्ञेयं आवाहनविसर्जनदिनयोःपूजनदिनानुरोधेननिर्णयः तत्रयदापूर्वमध्यान्हमारभ्यप्रवृत्ताज्येष्ठाद्वितीयदिनेमध्यान्हेमध्यान्हात्पूर्वंवासमाप्यतेतदापूर्वदिनेएवपूजनं यदापूर्वदिनेमध्यान्होत्तरंप्रवृत्तापरदिनेमध्यान्हेसमाप्तातदाष्टमीयोगवशेन पूर्वापरावाग्राह्या उभयत्राष्टमीयोगेपूर्वैव यदापूर्वत्रमध्यान्हमारभ्यमध्यान्होत्तरंवाप्रवृत्तापरदिनेमध्यान्होत्तरमपराण्हंस्पृशतितदाष्टमीयोगाभावेपिपरैव ॥**

भाद्रपदशुक्ल पंचमी, हिला ऋषिपंचमी असें ह्मणतात. ही मध्यान्हकालव्यापिनी असेल ती घ्यावी. दोन दिवसीं मध्यान्हकालव्याप्ति असेल किंवा नसेल तर पूर्वदिवसाचीच घ्यावी.

---

१ मैत्रशाक्रमूलेषुज्येष्ठाह्वार्चाविसर्जनं ॥ नकालनियमस्तत्रनचपातादिलक्षणं ॥

ह्या ऋषिपंचमीचे दिवसीं ऋषींची पूजा करून नांगरलेली नाहीं अशा भूमींत उत्पन्न झालेल्या शाकांचा आहार करावा. " भाद्रपदशुक्लपक्षांतील षष्ठीचे दिवसीं प्रातःस्नान, सूर्यपूजा व पंचगव्याचें प्राशन हीं केलीं असतां अश्वमेधाच्या फलाहून अधिक फल मिळतें. ही सूर्यषष्ठी सप्तमीनें युक्त असेल ती घ्यावी. ह्याच षष्ठीचे दिवसीं कार्तिकस्वामीचें दर्शन घ्यावें, तेणें-करून ब्रह्महत्यादि पापांचा नाश होतो. भाद्रपदशुक्लपक्षांतील जी अष्टमी तिला दूर्वाष्टमी असें ह्मणतात. ही पूर्व दिवसाची असेल ती घ्यावी. ही अष्टमी ज्येष्ठा, मूळनक्षत्र यांहीं युक्त असेल ती घेऊं नये. ज्येष्ठामूळरहित न मिळेल तर तद्युक्तहि घ्यावी. हें दूर्वापूजनव्रत क-न्यागत रवि, अगस्त्योदय यांचे ठिकाणीं करूं नये, व हें स्त्रियांला नित्य आहे. ह्या अष्टमीचे दिवसीं ज्येष्ठा देवीचें पूजनरूप व्रत करावयाचें तें केवल अष्टमीचे दिवसीं किंवा केवल ज्येष्ठा नक्षत्रीं करावें, त्यामध्यें दक्षिण देशांतील लोक केवल ज्येष्ठानक्षत्राचे ठिकाणींच करितात. अनुराधानक्षत्रीं आवाहन, ज्येष्ठानक्षत्रीं पूजा, आणि मूळनक्षत्रीं विसर्जन असें हें व्रत तीन दि-वसांचें आहे. आवाहन व विसर्जन यांचे दिवसांचा निर्णय करणें तो पूजेच्या दिवसाचा नि-र्णय असेल त्या अनुरोधानें करावा. जेव्हां पूर्व दिवसीं मध्यान्हकालाला आरंभ करून रा-हणाऱ्या ज्येष्ठा दुसऱ्या दिवसीं मध्यान्हकालीं किंवा मध्यान्हकालाच्या पूर्वीं समाप्त होतील तेव्हां पूर्व दिवसींच पूजा करावी. जेव्हां पूर्व दिवसीं मध्यान्हकालानंतर ज्येष्ठांला आरंभ होऊन दुसऱ्या दिवसीं मध्यान्हकालीं समाप्त होतील तेव्हां अष्टमीच्या योगानें पूर्व दिवसाची किंवा दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोन दिवसीं अष्टमीचा योग असेल तर पूर्व दिवसाचीच घ्यावी. जेव्हां पूर्व दिवसीं मध्यान्हकालाला आरंभ करून किंवा मध्यान्हकालानंतर प्राप्त होणाऱ्या ज्येष्ठा, दुसऱ्या दिवसीं मध्यान्हकालानंतर अपराण्हकालाला स्पर्श करतील तेव्हां अष्टमीचा योग नस-ला तथापि दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी.

---

**भाद्रपदशुक्लैकादश्यांद्वादश्यांवापारणोत्तरंविष्णुपरिवर्तनोत्सवः तत्रश्रुतेश्चमध्येपरिवर्त मेतीतिवचनात्त्रेधाविभक्तश्रवणमध्यभागयोगस्यैकादश्यांसत्त्वेतत्रैव द्वादश्यांसत्त्वेद्वाद श्यामेवोभयत्रनक्षत्रयोगाभावे**द्वादश्यामेवेत्यादिव्यवस्थाज्ञेया तत्रसंध्यायांविष्णुंसंपूज्यवासु **देवजगन्नाथप्राप्तेयंद्वादशीतव** पार्श्वेनपरिवर्तस्वसुखंस्वपिहिमाधवेतिमंत्रेणप्रार्थयेत् ॥

भाद्रपदशुक्लपक्षांतील एकादशीचे दिवसीं किंवा द्वादशीचे दिवसीं पारणा झाल्यानंतर वि-ष्णूचा परिवर्तनोत्सव करावा. त्याविषयीं, " श्रवणाच्या मध्यभागाचे ठिकाणीं परिवर्ताला ( एका कुशीहून दुसऱ्या कुशीस होणें ) पावतो " असें वचन आहे. यास्तव श्रवणाचे तीन भाग करून मध्यम भागाचा योग एकादशीचे ठिकाणीं असेल तर एकादशीचे ठिकाणीं क-रावा. द्वादशीचे दिवसीं असेल तर द्वादशीचे दिवसीं करावा. दोनहि दिवसीं नक्षत्रयोग नसेल तर द्वादशीचे दिवसींच करावा, इत्यादिक व्यवस्था जाणावी. संध्याकालीं विष्णूची पूजा करून, **" वासुदेव जगन्नाथ प्राप्तेयं द्वादशी तव ॥ पार्श्वेन परिवर्तस्व सुखं स्वपिहि माधव, "** ह्या मंत्रेंकरून प्रार्थना करावी.

---

अथश्रवणद्वादशीव्रतं तत्रयत्रदिनेमुहूर्तमात्रादिःस्वल्पोपिद्वादश्याःश्रवणयोगस्तत्रोपोषणं उत्तराषाढाविद्धश्रवणनिषेधवाक्यानितुनिर्मूलानि यदापूर्वदिनेएकादशीविद्धाद्वादशी परदिनेनुवर्ततेदिनद्वयेपिचश्रवणयोगस्तदा पूर्वदिनेएकादशीद्वादशीश्रवणेतित्रितययोगरूपविष्णुशृंखलयोगात्पूर्वैवोपोष्या तत्रोदाहरणं एकादशी १८ उत्तराषाढा ६ द्वादशी २० श्रवण १२ यथावाएकादशी १८ उत्तराषाढा २५ द्वादशी २० श्रवण १८ अत्रद्वितीयोदाहरणेएकादश्याः श्रवणयोगाभावेपिश्रवणयुक्तद्वादशीस्पर्शमात्रेणविष्णुशृंखलयोगः द्विविधोप्ययंयोगोदिवैवग्राह्योनरात्रौइतिपुरुषार्थचिंतामणौ रात्रावपिनिशीथोत्तरमपियोगो ग्राह्यइतिनिर्णयसिंधुः रात्रेःप्रथमप्रहरपर्यंततिथ्योःश्रवणयोगोग्राह्योनद्वितीयप्रहरादावित्यपरे अत्रचरमपक्षएवयुक्तोभाति अत्रविष्णुशृंखलयोगेव्रतद्वयोपोषणंतंत्रेणैकादश्यामेवकृत्वाद्वादश्य।वक्ष्यमाणपारणानिर्णयानुसारेणपारणंकार्यं यदोक्तविष्णुशृंखलयोगोनास्तितदायदिशुद्धाधिकाद्वादशीदिनद्वयेपिश्रवणयोगःपूर्वदिनेचोदयेश्रवणाभावस्तदोत्तरैवग्राह्या यदोभयदिनेसूर्योदयेद्वादश्यांश्रवणयोगस्तदापूर्वैव विद्धाधिकायामपिपरत्रैवोदयेउदयोत्तरंवाश्रवणयोगेपरैवेतिनिर्विवादं उभयत्रश्रवणयोगेउक्तविधविष्णुशृंखलयोगेपूर्वाअन्यथापरैवेति विज्ञेयं एवंयत्रैकादशीश्रवणद्वादश्योर्नैरंतर्येणोपवासप्राप्तिस्तत्रशक्तेनोपवासद्वयंकार्यं व्रतद्वयस्यापिनित्यत्वात् व्रतद्वयस्यैकदैवतत्वान्नपारणलोपदोषः यस्तूपवासद्वयासमर्थएकादशीव्रतसंकल्पात्पूर्वंच निजासामर्थ्यंनिश्चिनोतितेनैकादश्यांफलाद्याहारंकृत्वाद्वादश्यांनिरशनंकार्यं नचैकादशीव्रतलोपः उपोष्यद्वादशींपुण्यांविष्णुऋक्षेणसंयुतां एकादश्युद्भवंपुण्यंनरः प्राप्नोत्यसंशयमितिनारदोक्तेः श्रवणेनयुताचेत्स्यात्द्वादशीसाहिवैष्णवैः स्मार्तैश्चोपोषणीयास्यात्यजेदेकादशींतदा इतिमाधवोक्तेश्चअत्रैकादशीत्यागपदेनफलाहारोबोध्यतेनतुभोजनं यस्तूपवासद्वयशक्तिभ्रमेणकृतैकादशीव्रतसंकल्पःसंकल्पोत्तरंचद्वितीयोपवासासामर्थ्यमनुभवतितदातेनैकादश्यामुपोष्यद्वादश्यांविष्णुपूजनंकृत्वापारणंकार्यं अत्रव्रतांगपूजनंकृत्वोपवासासमर्थउपवासप्रतिनिधिरूपंविष्णुपूजनंकरिष्यइतिसंकल्प्यपुनःपूजनंकुर्यात् अत्रद्वादश्यांश्रवणयोगाभावेएकादश्यांश्रवणयोगेतत्रैवश्रवणद्वादशीव्रतंकार्यं विद्धैकादश्यांश्रवणयोगेतुयेषांतत्रैकादशीव्रतप्राप्तिस्तेषांतंत्रेणोपवासद्वयसिद्धिः अन्येषांगृहीतश्रवणद्वादशीव्रतानामुपवासद्वयं तत्राशक्तानांतुपूर्वेन्हिफलाहारःपरेन्हिनिरशनमितिभाति ॥

## आतां श्रवणद्वादशीचें व्रत सांगतों.

ज्या दिवसीं दोन घटिका इत्यादिक अल्प, द्वादशीचा व श्रवणाचा योग असेल तथापि त्या दिवसीं उपोषण करावें. उत्तराषाढांनीं विद्ध अशा श्रवणाच्या निषेधाविषयीं जीं वाक्यें आहेत तीं निर्मूल जाणावीं. जेव्हां पूर्वदिवसीं एकादशी विद्ध असून दुसऱ्या दिवसीं द्वादशी शेष असेल व दोनहि दिवसीं श्रवणयोग असेल तेव्हां पूर्वदिवसीं एकादशी, द्वादशी आणि श्रवण असा जो तिघांचा योग त्यालाच विष्णुशृंखलयोग असें नाम आहे व तो योग आहे याकरितां पूर्वदिवसाचीच उपोषणाला घ्यावी.–त्याचें उदाहरण;– एकादशी १८, उत्तराषाढा

१ एकादशीश्रवणद्वादशीव्रतद्वयं ।

६, द्वादशी २०, श्रवण १२, अथवा उदाहरण;—एकादशी १८, उत्तराषाढा २९, द्वादशी २०, श्रवण १८, ह्या दुसऱ्या उदाहरणीं एकादशीला श्रवणाचा योग जरी नाहीं तथापि श्रवणयुक्त द्वादशीच्या स्पर्शमात्रानेंच विष्णुशृंखलयोग होतो. हा दोनहि प्रकारचा योग दिवसासच ग्रहण करावा, रात्रीं घेऊं नये, असें पुरुषार्थचिंतामणींत आहे. रात्रीमध्यें मध्यरात्रीनंतरहि योग ग्रहण करावा, असें निर्णयसिंधूंत आहे. रात्रीच्या पहिल्या प्रहरापर्यंत तिथींचे ठिकाणीं श्रवणयोग असेल तर घ्यावा, दुसऱ्या इत्यादिक प्रहरीं असल्यास घेऊं नये. एथें शेवटला पक्षच योग्य आहे असें मला वाटतें. एथें विष्णुशृंखलयोगाचे ठिकाणीं एकादशी व द्वादशी असीं दोन व्रतांचीं उपोषणें तंत्रेंकरून एकादशीचे दिवसींच करून द्वादशीचे ठिकाणीं, पुढें सांगावयाचा जो पारणानिर्णय त्याच्या अनुरोधानें पारणा करावी. जेव्हां पूर्वीं सांगितलेला विष्णुशृंखलयोग नसेल तेव्हां जर शुद्धाधिक द्वादशी असून दोनहि दिवसीं श्रवणयोग असेल व पूर्वदिवसीं उदयकालीं श्रवण नसेल तेव्हां दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. जेव्हां दोन दिवसीं सूर्योदयकालीं द्वादशीचे ठिकाणीं श्रवणयोग असेल तेव्हां पूर्वदिवसाचीच घ्यावी. विद्धाधिक द्वादशी असेल तथापि दुसऱ्या दिवसींच सूर्योदयकालीं किंवा सूर्योदयानंतर श्रवणयोग असेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी, हें निर्विवाद आहे. दोन दिवसीं श्रवणयोग असेल व विष्णुशृंखलयोग असेल तर पूर्वदिवसाची घ्यावी. तसें नसेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी, असें जाणावें. याप्रमाणें जेव्हां एकादशी आणि श्रवणद्वादशी या उभयतांचीं एकदाच उपोषणें प्राप्त होतील तेव्हां दोनहि व्रतें नित्य आहेत यास्तव सशक्तानें दोनहि उपोषणें करावीं.. दोनहि व्रतांची देवता एक आहे याकरितां पारणेचा लोप झाला असतां दोष नाहीं. दोन उपोषणें करण्याला जो अशक्त असेल त्यानें एकादशीव्रताचा संकल्प करण्याच्या पूर्वीं आपल्या सामर्थ्याचा निश्चय करून एकादशीचे दिवसीं फलादिकांचा आहार करून द्वादशीचे दिवसीं निरशन उपोषण करावें. "श्रवणनक्षत्रानें युक्त अशा द्वादशीचे दिवसीं जो मनुष्य उपोषण करितो त्याला एकादशीसंबंधी पुण्य प्राप्त होतें, यांत संशय नाहीं," असें नारदाचें वचन आहे यास्तव एकादशीव्रताचा लोप होत नाहीं. आणखी "जर श्रवणानें युक्त द्वादशी असेल तर त्या दिवसीं वैष्णव व स्मार्त या सर्वांनीं उपोषण करावें व एकादशीचा त्याग करावा," असें माधवाचेंहि वचन आहे. या माधवाच्या वचनांत 'एकादशीचा त्याग' असें पद आहे तें फलाहाराचा बोध करितें, भोजनाचा बोध करीत नाहीं. दोन उपोषणें करण्याची शक्ति आहे अशा भ्रमानें एकादशीव्रताचा संकल्प करील व संकल्पानंतर दुसरें उपोषण करण्याचें सामर्थ्य नाहीं असें निश्चित वाटेल तर त्यानें एकादशीचे दिवसीं उपोषण करून द्वादशीचे दिवसीं विष्णुपूजन करून पारणा करावी. एथें व्रताचें अंगभूत पूजन करून उपवासाविषयीं अशक्त असेल त्यानें, "उपवासप्रतिनिधिरूपं विष्णुपूजनं करिष्ये," असा संकल्प करून पुनः पूजा करावी. ह्या द्वादशीचे दिवसीं श्रवणाचा योग नसेल आणि एकादशीचे दिवसीं श्रवणाचा योग असेल तर एकादशीचे दिवसींच श्रवणद्वादशीचें व्रत करावें. विद्धैकादशीचे दिवसीं श्रवणयोग असेल तर ज्यांचें त्या दिवसीं एकादशीव्रत येईल त्यांची तंत्रेंकरून दोन उपोषणांची सिद्धि होते. श्रवणद्वादशीव्रत ग्रहण के-

लेले असे जे त्यांनीं दोन दिवस उपोषणें करावीं. दोन उपोषणांविषयीं अशक्त असतील त्यांनीं पूर्वदिवसीं फलाहार, व दुसऱ्या दिवसीं निरशन करावें, असें मला वाटतें.

---

अथपारणाउभयांतेपारणंमुख्यःपक्षःअन्यतरांतेगौणःपक्षः तत्रविष्णुशृंखलाभावेत्रयोदश्यामुभयांतेपारणं विष्णुशृंखलयोगेतुपूर्वदिनेतंत्रेणकृतोपवासद्वयस्यपरदिनेश्रवणर्क्षात्द्वादश्याधिक्येश्रवणमतिक्रम्य द्वादश्यांपारणंयदिचद्वादश्यपेक्षयाश्रवणाधिक्यंपारणादिनेभवतितदाएकादशीव्रतपारणायांद्वादश्युल्लंघनेदोषोक्तेर्द्वादश्यामेवपारणं नत्वन्यतरांतापेक्षा तत्र सतिसंभवे श्रवणमध्यभागंविंशत्यादिघटिकात्मकंत्यक्त्वापारणं यथैकादशी ३० उत्तराषाढा २९ द्वादशी २५ श्रवण २९ अत्रपूर्वेद्युस्तंत्रेणोपवासद्वयंकृत्वा परेन्हिश्रवणमध्यभागमवशिष्टंनवघटिकात्मकंत्यक्त्वा द्वादश्यांचरमेविंशतिघटिकारूपेश्रवणभागेपारणं एवमुक्तोदाहरणेएवएकादश्याःदशनाडिकात्वे द्वादश्याःअष्टनाडिकात्वे द्वादशीश्रवणयोःपंचदशचत्वारिंशन्नाडीत्वेवा श्रवणमध्यभागत्यागे द्वादश्युल्लंघनापत्तौ संगवकालंत्यक्त्वामुहूर्तत्रयपर्यंतं सप्तममुहूर्तादौवाऋक्षमध्यमागेएवभोक्तव्यं अयंमध्यभागत्यागोभाद्रपदगतश्रवणद्वादशीव्रतएव नतुमाघफाल्गुनमासकृष्णपक्षगतश्रवणद्वादशीव्रतपारणायां मासांतरगतश्रवणभागेविष्णुपरिवर्तनाभावात्येतुभाद्रेश्रवणमध्यवर्जनमात्रेणनिषेधचारितार्थ्यमन्यमानाविष्णुश्रृंखलयोगाभावेपिश्रवणमध्यमात्रंत्यक्त्वाभुंजंते तेनित्यश्रवणद्वादशीव्रतमाहात्म्यानभिज्ञाभ्रांताएव अयंसर्वोपिनिर्णयोमासांतरगतश्रवणद्वादशीव्रतेप्यूह्यः श्रवणद्वादशीव्रतेनदीसंगमेस्नात्वाकलशेस्वर्णमयंजनार्दननामानंविष्णुंसंपूज्य वस्त्रयज्ञोपवीतोपानच्छत्रादिसमर्प्योपोष्य पारणदिनेदध्योदनयुतंवस्त्रवेष्टितंजलपूर्णघटंछत्रादियुतांपूजितांसपरिवारांतांप्रतिमांचदद्यात् तत्रमंत्रः नमोनमस्तेगोविंदबुधश्रवणसंज्ञक अघौघसंक्षयंकृत्वासर्वसौख्यप्रदोभवेति ॥

## आतां श्रवणद्वादशीचे दिवशीं पारणाकाल सांगतों.

द्वादशी व श्रवण या दोहोंच्या अंतीं पारणा करावी, हा मुख्य पक्ष. दोहोंतून कोणत्याहि एकाच्या अंतीं पारणा करावी, हा गौण पक्ष. त्यामध्यें विष्णुशृंखल योग नसेल तर त्रयोदशीचे दिवसीं दोहोंच्या अंतीं पारणा करावी. विष्णुशृंखलयोग असेल तर पूर्व दिवसीं एकतंत्रानें ज्यानें दोन उपोषणें केलीं असतील, आणि दुसऱ्या दिवसीं श्रवणनक्षत्रापेक्षां द्वादशी अधिक असेल तर श्रवणाचें उल्लंघन करून द्वादशीचे ठिकाणीं पारणा करावी. जर द्वादशीपेक्षां पारणेच्या दिवसीं श्रवण अधिक असेल तर एकादशीव्रताच्या पारणेचे ठिकाणीं द्वादशीचें उल्लंघन झालें असतां दोष होय असें वचन आहे याकरितां द्वादशीमध्येंच पारणा करावी, दोहोंतून एकाचा अंत झाला पाहिजे असें नाहीं.—कदाचित् संभव असेल तर वीस घटिकांपासून चाळीस घटिकांपर्यंत जो श्रवणाचा मध्यभाग तो टाकून पारणा करावी. त्याविषयींचें उदाहरण;—एकादशी ३०, उत्तराषाढा २९, द्वादशी २५, श्रवण २९, या उदाहरणीं पूर्वदिवसीं तंत्रेंकरून दोन उपोषणें करून दुसऱ्या दिवसीं श्रवणाच्या मध्यभागांतील बाकी राहिलेल्या नऊ घटिका टाकून द्वादशीचे ठिकाणीं शेवटचा असा वीस घटिका जो श्रवणभाग त्याचे ठिकाणीं पारणा करावी. याप्रमाणें पूर्वी सांगितलेल्या उदाहरणींच एका-

दशी दहा घटिका, द्वादशी आठ घटिका, किंवा द्वादशी पंधरा घटिका, श्रवण चाळीस घटिका असें असेल तर श्रवणाचा मध्यभाग टाकला असतां द्वादशीचें उल्लंघन होतें, तेव्हां संगवकाल टाकून सहा घटिकांपर्यंत, किंवा सातवा मुहूर्त इत्यादिक कालीं श्रवणनक्षत्राच्या मध्यभागांतच भोजन करावें. ह्या मध्यम भागाचा त्याग करणें तो भाद्रपदांतील श्रवण द्वादशीव्रताविषयींच करावा. माघ, फाल्गुन मासांतील कृष्णपक्षसंबंधी जीं श्रवणद्वादशीव्रतें त्यांचे पारणेचे ठिकाणीं हा त्याग करूं नये. कारण, इतर मासांतील जें श्रवण नक्षत्र त्याच्या भागाचे ठिकाणीं विष्णूचें परिवर्तन ( एका कुशीहून दुसऱ्या कुशीस होणें ) नाहीं. जे श्रवणाचा मध्यभाग मात्र वर्ज्य केल्यानें निषेध पाळल्यासारिखें मानून विष्णुशृंखलयोग नसला तत्रापि श्रवणाचा मध्यभाग मात्र टाकून भोजन करितात ते, नित्य जें श्रवणद्वादशीव्रत त्याच्या माहात्म्याविषयीं अज्ञानी याकरितां भ्रांतच होत. हा सर्वहि निर्णय अन्यमासांतील ज्या श्रवणद्वादशी त्यांचे व्रताचे ठिकाणींहि जाणावा. श्रवणद्वादशीव्रताचे दिवसीं दोन नद्यांचा संगम असेल तेथें स्नान करून कलशावर सुवर्णमय जनार्दननामक विष्णूचें पूजन करून वस्त्र, यज्ञोपवीत, उपानह, छत्री इत्यादिक अर्पण करून उपोषण करावें. नंतर पारणेच्या दिवशीं दहिंभातानें युक्त, वस्त्रानें वेष्टित केलेला, आणि उदकानें पूर्ण अशा कलशाचें दान करावें. तसेंच परिवारासह पूजा केलेली असी जी विष्णुप्रतिमा तिचेंहि छत्री इत्यादिक उपचारांसहित दान करावें. दानाचा मंत्र—"**नमो नमस्ते गोविंद बुधश्रवणसंज्ञक ॥ अघौघसंक्षयं कृत्वा सर्वसौख्यप्रदो भव.**"

---

**अथवामनजयंती भाद्रपदशुक्लद्वादश्यांश्रवणयुतायांमध्यान्हेवामनोत्पत्तिः अतोमध्यान्हव्यापिनीद्वादशीमध्यान्हेततोन्यत्रकालेवाश्रवणयुताग्राह्या उभयदिनेश्रवणयोगेपूर्वैव सर्वथाद्वादश्याःश्रवणयोगाभावे एकादश्यामेवश्रवणसत्त्वेमध्यान्हव्यापिनीमपिद्वादशींविहायैकादश्यामेवव्रतंकार्यं शुद्धैकादश्यांश्रवणाभावेदशमीविद्धैकादश्यामपिश्रवणयुतायांव्रतंपूर्वदिनएवमध्यान्हव्यापिनीद्वादशीपरदिनेमध्यान्हादन्यत्रकालेश्रवणयुतातदापूर्वैव तिथिद्वयेपिश्रवणयोगाभावेद्वादश्यामेवमध्यान्हव्यापिन्यांव्रतं दिनद्वयेमध्यान्हव्याप्तौतदव्याप्तौचैकादशीयुक्तैवग्राह्या पारणातुपूर्वोक्तरीत्योभयांतेन्यतरांतेवाकार्या अत्रमध्यान्हेनदीसंगमेस्नात्वासौवर्णवामनंसंपूज्यार्घ्यंसौवर्णपात्रेणदद्यात् तत्रपूजामंत्रः देवेश्वरायदेवायदेवसंभूतिकारिणे प्रभवेसर्वदेवानां वामनायनमोनमः अथार्घ्यमंत्रः ॥ नमस्तेपद्मनाभायनमस्तेजलशायिने ॥ तुभ्यमर्घ्यंप्रयच्छामिबालवामनरूपिणे नमःशार्ङ्गधनुर्बाणपाणयेवामनायच यज्ञभुक्फलदात्रेचवामनायनमोनमः ततःपरदिनेसपरिवारंवामनंद्विजायदद्यात् वामनःप्रतिगृण्हाति वामनोहंददामिते वामनसर्वतोभद्रंद्विजायप्रतिपादये इतिदानमंत्रः अस्यामेवद्वादश्यांरात्रौदेवपूजांकृत्वातत्रासंभवेदिवैववादधिव्रतंनिवेद्यदधिदानंकृत्वादुग्धव्रतसंकल्पंकुर्यात् अत्रपयोव्रतेपयोविकारस्यपायसादेःदुग्धपाचितान्नस्यचवर्जनं दध्यादेःपयोविकारस्यापिनवर्जनं**

**एवंदधिव्रतेतक्रादेर्नवर्जनं यत्रप्रसूतायागोर्दशदिनेषुसंधिन्यादेश्चक्षीरनिषेधस्तत्रक्षीरविकारस्यदधितक्रादेःसर्वस्यैववर्जनं ॥**

## आतां वामनजयंतीचा निर्णय सांगतों.

भाद्रपदशुक्ल पक्षांतील श्रवणयुक्त द्वादशीचे दिवसीं मध्यान्हकालीं वामनाचा अवतार झाला, यास्तव मध्यान्हकालव्यापिनी असी द्वादशी मध्यान्हकालीं किंवा त्याहून दुसऱ्या कालीं श्रवणयुक्त असेल ती घ्यावी. दोन दिवसीं श्रवणाचा योग असेल तर पूर्वदिवसाचीच घ्यावी. सर्वथा द्वादशीचे दिवसीं श्रवणयोग नसेल आणि एकादशीचे दिवसीं श्रवणयोग असेल तर मध्यान्हकालव्यापिनी असी जरी द्वादशी आहे तथापि ती टाकून एकादशीचे ठिकाणींच व्रत करावें. शुद्धएकादशीचे ठिकाणीं श्रवणयोग नसेल तर दशमीनें विद्ध जी श्रवणयुक्त एकादशी तिचे ठिकाणीं करावें. जेव्हां पूर्वदिवसींच मध्यान्हकालव्यापिनी असी द्वादशी असेल व दुसऱ्या दिवसीं मध्यान्हकालाहून अन्यत्रकालीं श्रवणयुक्त असेल तेव्हां पूर्वादिवसाचीच घ्यावी. दोनहि तिथींचे ठिकाणीं श्रवणयोग नसेल तर मध्यान्हकालव्यापिनी द्वादशीचे ठिकाणींच व्रत करावें. दोन दिवसीं मध्यान्हकालव्याप्ति असेल किंवा दोनहि दिवसीं नसेल तर एकादशीनें युक्त असेल तीच घ्यावी. पारणा करणें ती पूर्वी सांगितल्या रीतीनें दोहोंच्या अंतीं किंवा दोहोंतून एकाच्या अंतीं करावी. ह्या व्रताचे ठिकाणीं मध्यान्हकालीं नदीचा संगम असेल तेथें स्नान करून सुवर्णमय वामनाचें पूजन करून सुवर्णपात्रानें अर्घ्य द्यावें. पूजेचा मंत्र–" **देवेश्वराय देवाय देवसंभूतिकारिणे ॥ प्रभवे सर्वदेवानां वामनाय नमोनमः** " ॥ यानंतर अर्घ्याचा मंत्र–" **नमस्ते पद्मनाभाय नमस्ते जलशायिने ॥ तुभ्यमर्घ्यं प्रयच्छामि बालवामनरूपिणे ॥ नमः शार्ङ्गधनुर्बाणपाणये वामनायच ॥ यज्ञभुक्फलदात्रे च वामनाय नमोनमः** " ॥ याप्रमाणें अर्घ्य देऊन नंतर दुसऱ्या दिवसीं ब्राह्मणाला परिवारासह वामनाचें दान करावें. दानाचा मंत्र–**वामनः प्रतिगृण्हाति वामनोऽहं ददामि ते ॥ वामनं सर्वतोभद्रं द्विजाय प्रतिपादये.**" याप्रमाणें दान केल्यावर ह्याच द्वादशीचे ठिकाणीं रात्रीं देवपूजा करावी. रात्रीं पूजेचा संभव नसेल तर दिवसासच करावी. पूजा झाल्यानंतर दधिव्रत निवेदन करून दधि दान करावें व दुग्धव्रताचा संकल्प करावा. ह्या पयोव्रताचे ठिकाणीं दुधापासून होणारे जे क्षीर इत्यादिक पदार्थ ते व दुधामध्यें शिजविलेलें अन्न हीं वर्ज्य करावीं. दुधापासून होणारें दहीं इत्यादिक वर्ज्य करूं नये. याप्रमाणें दधिव्रताचे ठिकाणीं ताक इत्यादिक वर्ज्य करूं नये. प्रसूत झालेल्या गाईचें दहा दिवसांमधील दूध, आणि संधिनी ( बैलानें मैथुनार्थ आक्रमिलेली ) इत्यादिक गाईचें दूध यांचा जेथें निषेध सांगितला तेथें दुधापासून होणारीं दहीं, ताक इत्यादिक सर्व वर्ज्य करावीं.

---

**अथभा**द्रपदशुक्लचतुर्दश्यामनंतव्रतं तत्रोदयेत्रिमुहूर्तव्यापिनीचतुर्दशीग्राह्येतिमुख्यःपक्षः **तदभावेद्वि**मुहूर्ताग्राह्येत्यनुकल्पः द्विमुहूर्तन्यूनातुपूर्वैवग्राह्या दिनद्वयेसूर्योदयव्यापित्वेसंपूर्ण**त्वात्पूर्वैव** अत्रपूर्वाण्होमुख्यःकर्मकालःतदभावेमध्यान्होपि अत्रव्रतेसुवर्णप्रतिमायांचतुर्द

शग्रंथियुतदोरकेवानंतपूजनादिविधिस्तदुद्यापनविधिश्चकौस्तुभादौज्ञेयः पूजितदोरकनाशेतु गुरुंवृत्वा तदनुज्ञयायथाशक्तिकृच्छ्रादिप्रायश्चित्तंविधायाष्टोत्तरशतमाज्येनद्वादशाक्षरवासुदेवमंत्रेणहुत्वा केशवादिचतुर्विंशतिनामभिःसकृत्सकृद्धुत्वाहोमशेषंसमाप्यनूतनदोरकेपूर्ववत्पूजनादिचरेत् ॥

## आतां भाद्रपदशुद्ध चतुर्दशीचे दिवसीं अनंतव्रत सांगतों.

भाद्रपदशुक्ल चतुर्दशीचे दिवसीं अनंतव्रत करावें. त्या व्रताविषयीं सूर्योदयकालीं सहा घटिकाव्यापिनी चतुर्दशी असेल ती घ्यावी, हा मुख्य पक्ष. सहा घटिका नसेल तर चार घटिका घ्यावी, हा गौण पक्ष. चार घटिकांहून कमी असेल तर पूर्वदिवसाचीच घ्यावी. दोन दिवसीं सूर्योदयव्याप्ति असेल तर पूर्वदिवसीं पूर्णव्याप्ति आहे याकरितां पूर्वदिवसाचीच घ्यावी. ह्या व्रताविषयीं पूर्वाण्हकाल हा मुख्य कर्मकाल होय. तो न मिळेल तर मध्यान्हकालहि घ्यावा. ह्या व्रताचे ठिकाणीं सुवर्णप्रतिमेचे ठिकाणीं, किंवा चवदा ग्रंथींनीं युक्त जो दोरक त्याचे ठिकाणीं अनंताची पूजा करणें इत्यादिक पूजाविधि, व त्याचा उद्यापनविधि हे कौस्तुभादि ग्रंथीं पहावे. पूजा केलेल्या दोरकाचा नाश होईल तर गुरूला वरून त्याचे आज्ञेनें यथाशक्ति कृच्छ्रादिक प्रायश्चित्त करून बारा अक्षरांचा जो वासुदेवमंत्र तेणेंकरून घृतानें १०८ आहुति हवन करून केशवादिक जे चोवीस नाममंत्र त्याहींकरून एकेकवेळ हवन करून होमशेष समाप्त करून नवीन दोरकाची पूर्वींप्रमाणें पूजादिक करावीं.

---

सूर्यस्यवृषभसंक्रमोत्तरंसप्तमदिनेऽगस्त्योस्तंप्रयाति सिंहसंक्रांत्युत्तरमेकविंशतितमेदिने उदयमेति तत्रकन्यासंक्रांतेःपूर्वसप्तदिनमध्येऽगस्त्यपूजनंतदर्घ्यादिकंकार्यं भाद्रपदपौर्णमास्यांप्रपितामहात्परान्पित्रादींस्त्रीन्सपत्नीकान्वसुरुद्रादित्यरूपान् मातामहादित्रयंचसपत्नीकमुद्दिश्यश्राद्धंकार्यं इदंपार्वणत्वादपराण्हेपुरूरवार्द्रवदेवयुक्तंसपिंडकंकार्यं केचित्तुप्रपितामहस्यपित्रादित्रयमात्रमुद्दिश्यनांदीश्राद्धधर्मेणसत्यवसुदेवयुक्तश्राद्धंकार्यं नात्रमातामहाद्युद्देशइत्याहुःइदंप्रोष्ठपदीश्राद्धंसकृन्महालयपक्षेसकलकृष्णपक्षव्यापिमहालयपक्षेचावश्यकं पंचम्यादिमहालयपक्षेषुकृताकृतं ॥

सूर्याची वृषभसंक्रांति झाल्यानंतर सातव्या दिवसीं अगस्त्य अस्ताला पावतो, व सिंहसंक्रांति झाल्यानंतर एकविसाव्या दिवसीं अगस्त्य उदय पावतो. कन्यासंक्रांतीच्या पूर्वीं सात दिवसांमध्यें अगस्त्याचें पूजन व त्याला अर्घ्यप्रदान इत्यादिक करावें. भाद्रपद पौर्णिमेचे दिवसीं प्रपितामहापासून पुढचे तीन (ह्म०प्रपितामह सोडून) जे पिता, पितामह, प्रपितामह, सपत्नीक व वसुरुद्रादित्यस्वरूप, तसेंच मातामह, मातुःपितामह, मातुःप्रपितामह असे सपत्नीक यांच्या उद्देशेंकरून श्राद्ध करावें. हें श्राद्ध पार्वणरूप आहे याकरितां अपराण्हकालीं पुरूरवार्द्रवदेवयुक्त असें सपिंडक करावें. कोणी ग्रंथकार तर प्रपितामहाची जी त्रयी तिच्याच उद्देशेंकरून नांदीश्राद्धविधीनें सत्यवसुदेवयुक्त श्राद्ध करावें, व ह्या श्राद्धाचे ठिकाणीं मातामहादिकांचा उद्देश (उच्चार) करूं नये, असें ह्मणतात. हें प्रोष्ठपदी श्राद्ध, सकृत् (पंधरा

दिवसांतून एक दिवस करणें ) महालयपक्षाचेठिकाणीं आणि सर्व कृष्णपक्षव्यापी महालय-पक्षाचे ठिकाणीं आवश्यक आहे. पंचमी इत्यादिक जे महालयपक्ष त्यांचे ठिकाणीं कृताकृत ( करावें न करावें ) असें आहे.

---

अथमहालयः तत्रशक्तेनभाद्रपदापरपक्षेप्रतिपदमारभ्यदर्शांतंतिथिवृद्धौषोडशमहालयाःकर्तव्याः वृद्धिक्षयाभावेपंचदशैवमहालयाः तिथिक्षयेचतुर्दशैव अशक्तेनतुपंचम्यादिषुषष्ठ्यादिष्वष्टम्यादिषुदशम्यादिष्वेकादश्यादिषुदर्शांततिथिषुकार्याः अत्राप्यशक्तेनानिषिद्धेकस्मिंश्चिदेकस्मिन्दिनेसकृन्महालयःकर्तव्यः प्रतिपदादिदर्शांतपक्षेचतुर्दशीनवर्ज्यापंचम्यादिदर्शांतादिपंचपक्षेषुचतुर्दशींवर्जयित्वान्यतिथिषुमहालयाः सकृन्महालयेपिचतुर्दशीवर्जनीया सकृन्महालयेप्रतिपदाषष्ठीएकादशीचतुर्दशीशुक्रवारोजन्मनक्षत्रंजन्मनक्षत्राद्दशममेकोनविंशंनक्षत्रंचरोहिणीमघारेवतीचेतिवर्ज्यानि क्वचित्त्रयोदशीसप्तमीरविवारोभौमवारोपिवर्ज्यउक्तः पितृमृततिथौसकृन्महालयकरणेनंदादिनिषेधोनास्ति अशक्तःपितृपक्षेतुकरोत्येकदिनेयतः निषिद्धेपिदिनेकुर्यात्पिंडदानंयथाविधिरित्यादिवचनात् मृततिथौश्राद्धासंभवेनिषिद्धतिथ्यादिदिनंवर्जयित्वामहालयः तत्रापिद्वादश्यमावास्याष्टमीभरणीव्यतीपातेषुमृततिथ्यभावेपिसकृन्महालयेकोपितिथ्यादिनिषेधोनास्ति संन्यासिनांमहालयस्तुअपराण्हव्यापिन्यांद्वादश्यामेवसपिंडकः कार्योनान्यतिथौ चतुर्दश्यांमृतस्यापिमहालयश्चतुर्दश्यांनभवति श्राद्धंशस्त्रहतस्यैवचतुर्दश्यांप्रकीर्तितमितिनियमेनसर्वतोबलिष्ठेनप्रतिवार्षिकश्राद्धातिरिक्तश्राद्धस्यचतुर्दश्यांनिषेधात् एवंपौर्णमासीमृतस्यापिमहालयःपौर्णमास्यांनकार्यः अपरपक्षत्वाभावेनतस्यांमहालयाप्राप्तेः तेनचतुर्दशीमृतस्यपौर्णमासीमृतस्यवामहालयोद्वादश्यमावास्यादितिथिषुकार्यः अत्रकन्यार्कःप्राशस्त्यसंपादको नतुनिमित्तं आदौमध्येवसानेवायत्रकन्यांव्रजेद्रविः सपक्षःसकलःपूज्यःश्राद्धषोडशकंप्रतीत्यादिस्मृतेः अमावास्यापर्यंततिथावसंभवेआश्विनशुक्लपंचमीपर्यंतंयस्मिन्कस्मिंश्चित्तिथौमहालयः तत्रासंभवेयावद्वृश्चिकदर्शनंव्यतीपातद्वादश्यादिपर्वणिकार्यः मृताहेमहालयेच श्राद्धंपक्वान्नेनैवकार्यंनत्वामान्नादिना महालयेगयाश्राद्धेमातापित्रोर्मृतेहनि कृतोद्वाहोपिकुर्वीतपिंडदानंयथाविधि ॥

## आतां महालयाचा निर्णय सांगतों.

द्रव्यादिकानें जो समर्थ असेल त्यानें भाद्रपदकृष्ण पक्षामध्यें प्रतिपदेला आरंभ करून अ-मावास्येपर्यंत, तिथीची वृद्धि असेल तर सोळा महालय करावे. वृद्धि व क्षय नसतील तर पंधराच महालय करावे. तिथीचा क्षय असेल तर चवदाच करावे. अशक्त असेल त्यानें तर पंचमीपासून अमावास्येपर्यंत, षष्ठीपासून अमावास्येपर्यंत, अष्टमीपासून, दशमीपासून, ए-कादशीपासून अमवास्येपर्यंत तिथीचे ठिकाणीं करावे. याहि पक्षांविषयीं असमर्थ असेल त्यानें निषिद्ध नाहीं अशा कोणत्याहि एक दिवसीं महालय करावा. प्रतिपदेपासून अमवास्येपर्यंत जो पक्ष ( १५ महालयांचा) सांगितला त्यामध्यें चतुर्दशी वर्ज्य करूं नये. पंचमीपासून अमावा-स्येपर्यंत इत्यादिक जे पांच पक्ष सांगितले त्यांमध्यें चतुर्दशी वर्ज्य करून अन्य तिथींचे ठिकाणीं

महालय करावे. एकवार जो महालय करणें त्यापक्षींहि चतुर्दशी वर्ज्य करावी. एकवार जो-महालय करणें त्याविषयीं प्रतिपदा, षष्ठी, एकादशी, चतुर्दशी, शुक्रवार, जन्मनक्षत्र, जन्मनक्षत्रापासून दहावें व एकुणिसावें नक्षत्र, रोहिणी, मघा, रेवती, याप्रमाणें वर्ज्य करावीं. क्कचित् ग्रंथीं त्रयोदशी, सप्तमी, रविवार, आणि भौमवार हेहि वर्ज्य सांगितले आहेत. "पंधरा दिवसपर्यंत महालय करण्याविषयीं जो अशक्त असेल त्यानें कोणत्या एका निषिद्ध दिवसींहि यथाविधि पिंडदान करावें," असें वचन आहे यास्तव पित्याचे मृततिथीचे दिवसीं एकवार महालय करणें असेल तर त्याविषयीं प्रतिपदा इत्यादिक निषेध नाहीं. मृततिथीचे दिवसीं श्राद्धाचा असंभव असेल तर निषिद्ध जे तिथि इत्यादिक दिवस ते वर्ज्य करून अन्य दिवसीं महालय करावा. त्यामध्येंहि द्वादशी, अमावास्या, अष्टमी, भरणी, व्यतीपात या दिवसीं मृततिथि नसली तथापि सकृत्महालयाचे ठिकाणीं कोणतीहि तिथि इत्यादिकांचा निषेध नाहीं. संन्यासी जे त्यांचा महालय अपराण्हकालव्यापिनी जी द्वादशी तिचे ठिकाणींच करावा, दुसऱ्या तिथीला करूं नये. जो चतुर्दशीचे दिवसीं मृत झाला त्याचाही महालय चतुर्दशीचे दिवशीं करूं नये. "कारण, शस्त्रानें जो मृत झाला त्याचेंच श्राद्ध चतुर्दशीचे दिवसीं करावें, "असा जो सर्वांशीं बलिष्ठ नियम तेणेंकरून प्रतिवार्षिक श्राद्धावांचून इतर श्राद्धांचा निषेध आहे. याप्रमाणें जो पौर्णिमेचे दिवसीं मृत झाला त्याचाहि महालय पौर्णिमेचे दिवसीं करूं नये. कारण, कृष्णपक्ष नाहीं या कारणानें पौर्णिमेचे ठिकाणीं महालयाची प्राप्ति नाहीं, व त्याकरितां चतुर्दशीचे दिवसीं मृत झालेला व पौर्णिमेचे दिवसीं मृत झालेला, यांचे महालय द्वादशी, अमावास्या इत्यादिक तिथींचे दिवसीं करावें. ह्या महालयाचे ठिकाणीं कन्यागत सूर्य हा प्राशस्त्यसंपादक आहे, निमित्तभूत नाहीं. कारण, "पूर्वीं, मध्यें, अथवा अंतीं असा ज्या कोणत्याहि दिवसीं कन्यागत सूर्य होईल तो सर्व पक्ष षोडश श्राद्धांला पूज्य होतो," इत्यादिक स्मृति आहे. अमावास्येपर्यंत तिथीचे ठिकाणीं असंभव असेल तर आश्विनशुक्ल पंचमीपर्यंत जी कोणती तिथि मिळेल त्या तिथीचे ठिकाणीं महालय करावा. जर आश्विनशुक्ल पंचमीपर्यंत केला नसेल तर ज्यावत्कालपर्यंत वृश्चिक संक्रांति होईल तावत्कालपर्यंत व्यतीपात, द्वादशी इत्यादिक पर्वणीचे दिवसीं करावा. मृत दिवसीं आणि महालयाचे दिवसीं श्राद्ध पक्वान्नेंकरूनच करावें, आमान्नानें करूं नये. "महालय, गयाश्राद्ध आणि मातापितरांचा मृतदिवस ह्यांचे ठिकाणीं, विवाह केला असेल तथापि त्यानें यथाविधि पिंडदान करावें.

---

पक्षश्राद्धे पित्रादिपार्वणत्रयपत्न्याद्येकोद्दिष्टपितृगणसहितसर्वपित्रुद्देशेनसपत्नीकपित्रादित्रयसपत्नीकमातामहादित्रयेतिषट्दैवतमात्रोद्देशेनवा षट्दैवतैकोद्दिष्टगणोद्देशेनवाप्रत्यहंमहालयइतिपक्षत्रयं एवंपंचम्यादिपक्षेष्वपि सकृन्महालयेतुसर्वपित्रुद्देशेनैव तत्रदेवतासंकल्पःपितृपितामहप्रपितामहानां मातृतत्सपत्नीपितामहीतत्सपत्नीप्रपितामहीतत्सपत्नीनां यद्वाऽस्मत्सापत्नमातुरितिपृथगुद्देशः मातामहमातृपितामहमातृप्रपितामहानां सपत्नीकानांयथानामगोत्राणांवस्वादिरूपाणांपार्वणविधिनापत्न्याःपुत्रस्यकन्यकायाः पितृव्यस्यमातुल

स्यभ्रातुः पितृष्वसुर्मातृष्वसुरात्मभगिन्याःपितृव्यपुत्रस्यजामातुर्भागिनेयस्यश्वशुरस्यश्वश्र्वा आचार्यस्योपाध्यायस्यगुरोः सख्युः शिष्यस्यएतेषांयथानामगोत्ररूपाणांपुरुषविषयेसपत्नी कानांस्त्रीविषये सभर्तृकसापत्यानामेकोद्दिष्टविधिनामहालयापरपक्षश्राद्धमथवासकृन्महाल यापरपक्षश्राद्धंसदैवं सद्यःकरिष्यइतिएतेषांमध्येयेकेचिज्जीवंतितान्विहायइतरेषामुद्देशःमा तामहादिषुपत्न्याजीवनेसपत्नीकेत्यस्यस्त्रीषुचभर्त्रादेरनुचारः महालयेगयाश्राद्धेवृद्धौचान्वष्ट कासुच नवदैवतमत्रेष्टंशेषंषाट्पौरुषंविदुःअन्वष्टकासुवृद्धौचप्रतिसंवत्सरेतथा महालयेग यायांचसपिंडीकरणात्पुरा मातुःश्राद्धंपृथक्कार्यमन्यत्रपतिनासह इत्यादिस्मृत्यनुसारात्पार्वणत्र यमेवोक्तं केचित्तुमातामह्यादित्रयंपृथगुक्त्वार्थद्वादशदेवताकंपार्वणचतुष्टयमाहुःएताएवदेवता गयायांतीर्थश्राद्धेनित्यतर्पणेचज्ञेयाःमहालयेधूरिलोचनसंज्ञकाविश्वेदेवाः अत्रसतिसंभवेदेवा र्थंद्वौविप्रौपार्वणत्रयार्थंप्रतिपार्वणंत्रीन्नित्येवंनवपत्न्याद्येकोद्दिष्टगणेप्रतिदैवतमेकैकमेवं विप्रा न्निमंत्रयेत् अशक्तौदेवार्थमेकंप्रतिपार्वणमेकमितिपार्वणत्रयेत्रीन्सर्वैकोद्दिष्टगणार्थमेकमिति निमंत्रयेत् देवार्थविप्रद्वयपक्षेप्रतिपार्वणेत्रयएवकार्याःनतुदेवार्थंद्वौप्रतिपार्वणमेकइतिवाप्रति पार्वणंत्रीन्देवार्थमेकइतिवावैषम्यंकार्यं एवंसर्वत्रअमावास्यादिश्राद्धेष्वपिज्ञेयंअत्यशक्तौपार्व णद्वयार्थमेकोपिकार्यः महालयेअंतेमहाविष्ण्वर्थंविप्रोऽवश्यंनिमंत्रितव्यइतिविशेषःकौस्तुभे जीवन्मातृकः सापत्नमातुरेकोद्दिष्टंकुर्यान्नपार्वणं अनेकाःसापत्नमातरोयस्यतेनसर्वमात्रुद्देशे नैकएवविप्रःपिंडश्चकार्योर्घ्यपात्रं पृथक्स्वजनन्यासहानेकमातृत्वेस्वजनन्यासहसर्वमात्रर्थमे कोविप्रःपिंडोर्घ्यश्चेतिपार्वणमेवनपृथक्सापत्नमातृणामेकोद्दिष्टमितिवा सर्वसापत्नमातृणांपृथ गेवैकोद्दिष्टमितिवापक्षः महालयेपार्वणार्थेअग्नौकरणमेकोद्दिष्टगणार्थंत्वग्नौकरणंकृताकृतंकर णपक्षेएकोद्दिष्टगणार्थमग्नौकरणान्नंपृथक्पात्रेग्राह्यं महालयेसर्वपार्वणार्थमेकोद्दिष्टार्थंचसकृ दाच्छिन्नंबर्हिरेकमेव दर्शादौतुप्रतिपार्वणंबर्हिर्भिन्नमेवअवशिष्टःश्राद्धप्रयोगोनेकमातृत्वेभ्यंज नादिमंत्रोहश्चश्राद्धसागरेस्वस्वशाखोक्तप्रयोगग्रंथेषुचज्ञेयः सकृन्महालयेश्राद्धांगतिलतर्पणंप रेहन्येवसर्वपित्रुद्देशेनप्रातःसंध्यायाः पूर्वमेवप्रातःसंध्योत्तरंवाब्रह्मयज्ञांगतर्पणाद्भिन्नमेवका र्यं प्रतिपदादिपंचम्यादिपक्षेषुविप्रविसर्जनांतेएवश्राद्धपूजितपित्रुद्देशेनतर्पणंकार्यं पत्न्यांरज स्वलायांसकृन्महालयोनकार्यः कालांतराणांसत्त्वात् अमायांरजोदोषेआश्विनशुक्लपंचमीपर्यंतं गौणकालेमहालयः प्रतिपदादिष्वन्येषुपक्षेषुप्रारंभदिनेपाकात्पूर्वंपत्नीरजस्वलाचेदुत्तरोत्तरप क्षस्वीकारः पाकारंभोत्तरंचेत्तांगृहांतरेऽपरुध्यमहालयःकर्तव्यः एवंविधवाकर्तृकश्राद्धेपिज्ञेयं अत्रापुत्राविधवाममभर्तृतत्पितृपितामहानांभर्तुर्मातृपितामहीप्रपितामहीनांममपितृपितामहप्र पितामहानांममातृपितामहीप्रपितामहीनांममातामहमातृपितामहमातृप्रपितामहानांममा तामहीमातृपितामहीमातृप्रपितामहीनांतृप्त्यर्थंसकृन्महालयापरपक्षश्राद्धंकरिष्ये इतिस्वयंसं कल्प्यब्राह्मणद्वाराअग्नौकरणादिसहितंसर्वमविकृतंप्रयोगंकारयेत् ब्राह्मणस्त्वमुकनाम्न्यायज

१ अत्रसूतकप्राप्तौतृतीयोत्तरार्धेनिर्णयः ।। भ्रात्रादिमहालयनिर्णयश्चतत्रैव ।।

**मानायाभर्तृततिपतृपितामेहत्याद्युच्चार्यप्रयोगंकुर्यात् अशक्तौभर्त्रादित्रयंस्वपित्रादित्रयंस्वमात्रादित्रयंस्वमातामहादित्रयंसपत्नीकमितिपार्वणचतुष्टयोद्देशेनमहालयः अत्यशक्तौस्वभर्त्रादित्रयंस्वपित्रादित्रयंचेतिपार्वणद्वयमेवकार्यं ॥**

प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत जो प्रत्यहीं महालय करावयाचा त्याचे ठिकाणीं पितृगण घ्यावयाचे ते,—पिता इत्यादिक तीन त्रयी (पितृत्रयी, मातृत्रयी, आणि मातामहत्रयी सपत्नीक), पत्नी इत्यादिक एकोद्दिष्ट पितृगण ( पत्नी, पुत्रादिक, पितृव्य, मातुल, भ्राता, हे सपत्नीक; पितृभगिनी, मातृभगिनी, आत्मभगिनी ह्या सभर्तृक, ससुत; श्वशुर; गुरु; ) यांसह सर्वपितरांच्या उद्देशेंकरून तो करावा. दुसरा पक्ष—सपत्नीक असी पितृत्रयी, आणि सपत्नीक असी मातामहत्रयी अशा सहा देवतांच्या मात्र उद्देशेंकरून करावा. अथवा तिसरा पक्ष—पितृत्रयी ( सपत्नीक ), आणि मातामहत्रयी ( सपत्नीक ) ह्या सहा देवता, आणि स्त्री इत्यादिक एकोद्दिष्टगण यांच्या उद्देशेंकरून प्रत्यहीं महालय करावा. याप्रमाणें तीन पक्ष सांगितले. याप्रमाणें पंचमी इत्यादिक जे पक्ष त्यांचे ठिकाणींहि पूर्वीप्रमाणेंच घ्यावे. एकवार महालय करणें असेल तर सर्व पितरांच्या उद्देशेंकरून महालय करावा. त्या महालयाचे ठिकाणीं देवतांचा संकल्प—“ **पितृपितामहप्रपितामहानां, मातृतत्सपत्नीपितामहीतत्सपत्नीप्रपितामहीतत्सपत्नीनां यद्वाऽस्मत्सापत्नमातुरितिपृथगुद्देशः ॥ मातामहमातृपितामहमातृप्रपितामहानां सपत्नीकानां यथानामगोत्राणां वस्वादिरूपाणां पार्वणविधिना पत्न्याःपुत्रस्य कन्यायाः पितृव्यस्य मातुलस्य भ्रातुः पितृष्वसुर्मातृष्वसुरात्मभगिन्याः पितृव्यपुत्रस्य जामातुर्भागिनेयस्य श्वशुरस्य श्वश्र्वा आचार्यस्योपाध्यायस्य गुरोः सख्युः शिष्यस्य एतेषां यथानामगोत्ररूपाणां पुरुषविषये सपत्नीकानां स्त्रीविषये सभर्तृकसापत्यानामेकोद्दिष्टविधिना महालयापरपक्षश्राद्धमथवा सकृन्महालयापरपक्षश्राद्धं सदैवं सद्यः करिष्ये.**” ह्या पूर्वी सांगितलेल्या पितरांमध्यें जे कोणी जिवंत असतील त्यांना सोडून इतरांचा उच्चार करावा. मातामहादिक जे त्यांच्या स्त्रिया जिवंत असतील तर “सपत्नीक” असा आणि पति जिवंत असतील तर स्त्रियांचे ठिकाणीं ‘सभर्तृक’ असा उच्चार करूं नये. “ महालय, गयाश्राद्ध, नांदीश्राद्ध आणि अन्वष्टकाश्राद्ध यांचे ठिकणीं नऊ देवतांचे ( पितृत्रयी, मातृत्रयी, आणि मातामहत्रयी सपत्नीक यांचे ) उद्देशेंकरून श्राद्ध करावें. इतर श्राद्धें सहा दैवतांच्या (पितृत्रयी सपत्नीक व मातामहत्रयी सपत्नीक यांच्या ) उद्देशेंकरून करावें, असें सांगतात. अन्वष्टका, नांदीश्राद्ध, प्रतिसांवत्सरिक श्राद्ध, महालय आणि गयाश्राद्ध इतक्यांचे ठिकाणीं, सपिंडीकरण्याच्या पूर्वी मातेचें श्राद्ध वेगळें करावें, अन्य ठिकाणीं पतीसहवर्तमान करावें, इत्यादिक स्मृतीच्या अनुरोधानें तीनच पार्वणें घेण्याविषयीं सांगितलें आहे. कोणी ग्रंथकार तर, मातामहीत्रयी ( आपल्या मातेची—माता, इत्यादिकत्रयी ) पृथक् उच्चारून द्वादश देवतात्मक चार पार्वणें सांगतात. ह्याच देवता ( पितृगण ) गयाश्राद्ध, तीर्थश्राद्ध, आणि नित्यतर्पण, यांचे ठिकाणीं घ्याव्या. महालयाचे ठिकाणीं धूरिलोचन संज्ञक विश्वेदेव घ्यावे. ह्या महालयाचे ठिकाणीं संभव असेल तर देवस्थानीं दोन, आणि प्रत्येक त्रयीचे ठिकाणीं तीन तीन मिळून तीन त्रयींचे ठिकाणीं नऊ, पत्न्यादिक जो एकोद्दिष्टगण त्याचे ठिकाणीं दरएक देवस्थानीं

एकेक, याप्रमाणें ब्राह्मण सांगावे. इतके सांगण्याला शक्ति नसेल तर देवस्थानीं एक, दरएक त्रयीचे ठिकाणीं एक, याप्रमाणें तीन त्रयींचे ठिकाणीं तीन, आणि सर्व एकोद्दिष्टगणस्थानीं एक, याप्रमाणें सांगावें. देवस्थानीं दोन ब्राह्मण सांगितले असतील तर दरएक त्रयीचे ठिकाणीं तीन तीन सांगावे. देवस्थानीं दोन, आणि दरएक त्रयीचे ठिकाणीं एक, अथवा दरएक त्रयीचे ठिकाणीं तीन तीन आणि देवस्थानीं एक, असें विषममान करूं नये. याप्रमाणें सर्वत्र अमावास्या इत्यादिक श्राद्धांचे ठिकाणींहि जाणावें. अति असामर्थ्य असेल तर दोन त्रयींचे ठिकाणीं एकहि ब्राह्मण योजावा. महालयाचे ठिकाणीं शेवटीं महाविष्णुस्थानीं अवश्य ब्राह्मण सांगावा, असा विशेष कौस्तुभांत सांगितला आहे. ज्याची माता जिवंत असेल त्यानें सापत्नमातेचें एकोद्दिष्ट श्राद्ध करावें, पार्वणश्राद्ध करूं नये. ज्याच्या सापत्नमाता बहुत असतील त्यानें सर्व मातांच्या उद्देशेंकरून ब्राह्मण एकच सांगावा व पिंडहि एकच द्यावा, अर्घ्यपात्रें मात्र पृथक् पृथक् करावीं. अथवा आपल्या जननीसहवर्तमान अनेक माता असतील तर आपल्या जननीसहवर्तमान सर्व मातांच्या उद्देशेंकरून एक ब्राह्मण, एक पिंड, एक अर्घ्य, याप्रमाणें पार्वणश्राद्धच करावें, सापत्न मातांचें पृथक् एकोद्दिष्ट करूं नये. अथवा सर्व सापत्न मातांचें पृथक्च एकोद्दिष्ट करावें, असा पक्ष. महाल्याचे ठिकाणीं त्रयीकरितां अग्नौकरण अवश्य आहे, एकोद्दिष्टगणाकरितां कृताकृत ( करावें न करावें ) असें आहे. करणपक्षीं एकोद्दिष्टगणाकरितां अग्नौकरणाचें अन्न निराळ्या पात्रावर घ्यावें. महालयाचे ठिकाणीं सर्व त्रयींकरितां, आणि एकोद्दिष्टाकरितां एक वेळ छिन्न केलेला असा दर्भ एकच घ्यावा. दर्शादिकाचे ठिकाणीं तर दरएक त्रयीला दर्भ निरनिराळाच घ्यावा. बाकीचा श्राद्धप्रयोग, आणि बहुत माता असतां अभ्यंजनादिकांविषयीं मंत्राचा ऊह श्राद्धसागरीं व आपापल्या शाखांचे सांगितलेल्या प्रयोगग्रंथीं जाणावा. सकृन्महालयाचे ठिकाणीं श्राद्धाचें अंगभूत जें तिलतर्पण तें दुसऱ्या दिवसींच सर्व पितरांच्या उद्देशेंकरून प्रातःसंध्येच्या पूर्वींच, किंवा प्रातःसंध्येच्या नंतर ब्रह्मयज्ञांगतर्पणाहून निराळेंच करावें. प्रतिपदादिक आणि पंचम्यादिक जे पूर्वीं सांगितले पक्ष त्यांचे ठिकाणीं ब्राह्मणांचें विसर्जन झाल्यानंतरच श्राद्धांमध्यें पूजा केलेल्या पितरांच्या उद्देशेंकरून तर्पण करावें. स्त्री रजस्वला असतां सकृन्महालय करूं नये. कारण, सकृन्महालयाला दुसरे काल आहेत. अमावास्येचे दिवसीं स्त्री रजस्वला झाली असेल तर आश्विनशुक्ल पंचमीपर्यंत गौणकालीं महालय करावा. प्रतिपदादिक जे इतर पक्ष त्यांचे ठिकाणीं प्रारंभदिवसीं पाकाला आरंभ होण्याच्या पूर्वीं स्त्री रजस्वला होईल तर एकाच्या पुढचा दुसरा अशा पक्षांचा स्वीकार करावा. पाकाला आरंभ झाल्यानंतर रजस्वला होईल तर तिला दुसऱ्या घरांत ठेवून महालय करावा. याप्रमाणें विधवेनें कर्तव्य जें श्राद्ध त्याविषयींहि जाणावें. ह्या महालयाचें ठिकाणीं अपुत्र असी विधवा श्राद्ध करणारी असेल तर तिणें, **"मम भर्तृतत्पितृपितामहानां, भर्तुर्मातृपितामहीप्रपितामहीनां, मम पितृपितामहप्रपितामहानां, मम मातृपितामहीप्रपितामहीनां मम मातामहमातृपितामहमातृप्रपितामहानां, मम मातामहीमातृपितामहीमातृप्रपितामहीनां तृप्त्यर्थं सकृन्महालयापरपक्षश्राद्धं करिष्ये,"** असा आपण संकल्प करून ब्राह्मणाकडून अग्नौकरणादिसहित सर्व अविच्छिन्न प्रयोग करावा. ब्राह्मणानें, **"अमुक नाम्न्या यजमानाया भर्तृ त-**

स्वपितृपितामह," इत्यादिक उच्चार करून प्रयोग करावा. सामर्थ्य नसेल तर भर्तृत्रयी, स्वपितृत्रयी, स्वमातृत्रयी, स्वमातामहत्रयी सपत्नीक, याप्रमाणें चार त्रयींच्या उद्देशेंकरून महालय करावा. अति सामर्थ्य नसेल तर स्वभर्तृत्रयी, स्वपितृत्रयी याप्रमाणें दोन त्रयींच्या उद्देशेंकरून करावा.

---

महालयःपितरिसंन्यस्ते पातित्यादियुतेवाजीवत्पितृकेणापिपुत्रेण पितुःपित्रादिसर्वपित्रुद्देशेन पिंडदानरहितः सांकल्पविधिना कार्यः वृद्धौतीर्थेचसंन्यस्तेतातेचपतितेसति येभ्यएवपितादद्यात्तेभ्योदद्यात्स्वयंसुतः मुंडनंपिंडदानंचप्रेतकर्मचसर्वशः नजीवत्पितृकःकुर्याद्गुर्विणीपतिरेवचेत्यादिवचनात् पिंडदानादिविस्तरंकर्तुमशक्तेनापि सांकल्पविधिःकार्यः सांकल्पिकविधावर्घ्यदानंसमंत्रकावाहनमग्नौकरणं पिंडदानंविकिरदानंस्वधांवाचयिष्ये ॐस्वधोच्यतामित्यादिस्वधावाचनप्रयोगंचवर्जयेत् अनेकब्राह्मणालाभे देवस्थाने शालग्रामादिदेवमूर्तिं संस्थाप्य श्राद्धं कार्यं सर्वथाविप्रालाभेदर्भबटुविधिनाश्राद्धं पित्रोर्मरणेप्रथमाब्देमहालयःकृताकृतः महालयोमलमासेनकार्यः अपरपक्षेप्रतिवार्षिकप्राप्तौमृततिथौवार्षिकंकृत्वातिथ्यंतरेसकृन्महालयःकार्यः प्रतिपदादिदर्शांतादिपक्षेषुमृततिथौवार्षिकंकृत्वापाकांतरेणमहालयः अमायांप्रतिवार्षिकसकृन्महालयप्राप्तौपूर्वंवार्षिकंततोमहालयःततोदर्शश्राद्धमितित्रयंपाकभेदेन महालयमात्रप्राप्तावपिपूर्वंमहालयःततोदर्शः मृततिथौसकृन्महालयपक्षेतत्तत्तिथेर्ग्राह्यत्वनिर्णयोपराण्हव्याप्त्यादर्शवदितिभाति अत्रापरपक्षेभरणीश्राद्धाद्गयाश्राद्धफलप्राप्तिः भरणीश्राद्धमपिंडकंषट्दैवतंसांकल्पविधिनाकार्यंदेवाधूरिलोचनौपुरूरवार्द्रवौवा भरणीश्राद्धं काम्यंगयाश्राद्धफलकामेनप्रतिवर्षंकार्यं केचित्पित्रादिमरणोत्तरंप्रथमवर्षेएवकुर्वंतिद्वितीयादिवर्षेनकुर्वंतितत्रमूलंचिंत्यं ममतुबदैवंनापिवापित्र्यंयावत्पूर्णोनवत्सरइत्यादिवचनेनसर्वस्यापिदर्शादिश्राद्धस्यप्रथमाब्देनिषेधाद्वर्षांते एवपितृत्वप्राप्तेश्चद्वितीयादिवर्षेएवकर्तुंयुक्तमितिभातियत्तुपितृभिन्नोपियोयोम्रियतेतस्यतस्यप्रथमाब्देभरणीश्राद्धंक्रियते तत्रापिमूलंनपश्यामःगयाश्राद्धफलार्थमाचारमनुसृत्यक्रियतेचेन्मृताद्येकमेवपार्वणमुद्दिश्यसदैवंकार्यं अत्रसपिंडत्वाचारोपिचिंत्यः ॥

" पिता संन्यासी, किंवा पतित असेल तर नांदीश्राद्ध आणि तीर्थश्राद्ध यांचे ठिकाणीं ज्या पितृदेवतांला पिता देतो त्या देवतांला पुत्रानें द्यावें. " " मुंडन, पिंडदान, मृताचें कर्म हीं सर्व जीवत्पितृक व गर्भिणीपति यांनीं न करावीं," इत्यादिक प्रमाणें आहेत, यास्तव पिता संन्यासी, किंवा पातित्यादिकानें युक्त असेल तर, जिवंत आहे पिता ज्याचा अशा पुत्रानेंहि पित्याचे जे पिता इत्यादिक सर्व पितर त्यांच्या उद्देशेंकरून महालय पिंडदानावांचून सांकल्पविधि करून करावा. जर पिंडदान इत्यादिक विस्तार करण्याला शक्ति नसेल तर त्यानेंहि सांकल्पविधि करावा. सांकल्पविधीचे ठिकाणीं अर्घ्यदान, समंत्रक आवाहन, अग्नौकरण, पिंडदान, विकिरदान, " स्वधां वाचयिष्ये ॐ स्वधोच्यतां," इत्यादि स्वधावाचनप्रयोग, इत-

कीं वर्ज्य करावीं. बहुत ब्राह्मण न मिळतील तर देवस्थानीं शालग्रामादिक देवमूर्तींची स्थापना करून श्राद्ध करावें. एकाहि ब्राह्मण न मिळेल तर दर्भाचा बटु करून श्राद्ध करावें. जर पिता व माता हीं मृत झालीं असतील तर प्रथम वर्षीं महालय करावा किंवा न करावा. मलमासाचे ठिकाणीं महालय करूं नये. अपरपक्षीं प्रतिसांवत्सरिक श्राद्ध प्राप्त झालें असेल तर मृततिथीचे ठिकाणीं प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करून दुसऱ्या तिथीचे ठिकाणीं सकृन्महालय करावा. प्रतिपदा इत्यादिक अमावास्येपर्यंत इत्यादिक जे पक्ष त्यांमध्यें मृततिथीचे ठिकाणीं प्रतिसांवत्सरिक करून दुसऱ्या पाकानें महालय करावा. जर अमावास्येच्या दिवसीं प्रतिसांवत्सरिक आणि सकृन्महालय अशीं दोन प्राप्त होतील तर पूर्वीं प्रतिसांवत्सरिक करून नंतर महालय करावा. व त्यानंतर दर्शश्राद्ध करावें, याप्रमाणें तीन पाकभेदेंकरून करावीं. केवल महालय प्राप्त होईल तर पूर्वीं महालय, नंतर दर्श करावा. मृततिथीचे दिवसीं जो सकृन्महालय करणें त्याविषयीं तिथिनिर्णय, अपराण्हकालीं जी व्याप्ति असेल तदनुसार दर्शाप्रमाणें घ्यावा असें वाटतें. ह्या अपरपक्षीं भरणीनक्षत्राचे दिवसीं श्राद्ध केल्यानें गयेचे ठिकाणीं श्राद्ध केल्याचें फल मिळतें. तें भरणीश्राद्ध पिंडरहित. षट्दैवत (पितृत्रयी सपत्नीक व मातामहत्रयी सपत्नीक) सांकल्पविधीनें करावें. त्या भरणीश्राद्धाला देव धूरिलोचन किंवा पुरूरवार्द्रव घ्यावे. भरणीश्राद्ध हें काम्य आहे याकरितां गयाश्राद्धाच्या फलाची इच्छा करणारा त्यानें प्रतिवर्षीं करावें. पिता इत्यादिकांचे मरणानंतर प्रथम वर्षींच कितीएक लोक भरणीश्राद्ध करितात, दुसऱ्या इत्यादिक वर्षीं करीत नाहींत, त्याविषयीं मूळविचार करावा. मला तर, "जावत्कालपर्यंत वर्ष पुरें होई तावत्कालपर्यंत दैवकर्म व पितृकर्म हीं करूं नये," इत्यादिक वचनेंकरून दर्शादिक सर्व श्राद्धांचा निषेध सांगितला यास्तव वर्ष पुरें झाल्यानंतरच पितृत्वप्राप्ति होते, याकरितां दुसऱ्या इत्यादिक वर्षींच करण्याला योग्य आहे असें वाटतें. पिता, माता यांवांचूनहि जो जो कोणी मृत होतो त्याचें त्याचें प्रथम वर्षीं जें भरणीश्राद्ध करितात, त्याविषयींहि कोठें मूळ दिसत नाहीं. गयाश्राद्धाचें फळ मिळण्याकरितां केवळ लोकाचाराला अनुसरून करणें असेल तर मृतादिक जी एक त्रयी तिच्याच उद्देशेंकरून देवांसहवर्तमान करावें. ह्याचे ठिकाणीं पिंडदान करण्याचा जो आचार आहे तोहि विचारणीय आहे.

---

अत्रापरपक्षे सप्तम्यादिदिनत्रये माघ्यावर्षश्राद्धं कर्तुं पूर्वेद्युः श्राद्धं करिष्ये माघ्यावर्षश्राद्धंकरिष्येऽन्वष्टक्यश्राद्धंकरिष्येइतिक्रमेण संकल्पंकृत्वा सर्वोप्यष्टकाविधिराश्वलायनैः कार्यः इदमाश्वलायनानामष्टकाविकृतिरूपमेकाष्टकाकरणपक्षेपि कार्यं इतरशाखिनांत्वष्टकारूपमेवेति पंचाष्टकाकरणपक्षेष्टकाश्राद्धं करिष्यइतिसंकल्प्य कार्यं एकाष्टकापक्षेतुनकार्यं नवम्यामन्वष्टक्यश्राद्धं नवदैवतं सर्वशाखिभिरष्टम्यामष्टकाश्राद्धाकरणेपि गृह्याग्नौ यथोक्तविधिना कार्यं अस्यामन्वष्टक्यस्यमुख्यत्वात् गृह्याग्निरहितस्तु येषांपूर्वमातामृता पश्चात्पितामृतस्तैर्मृतमातापितृकैः पाणिहोमादिविधिना नवदैवत्यंकार्यं जीवत्पितृकेण मृतमातृकेणानुपनीतेनापि मात्रादित्रितयमात्रोद्देशेनैकपार्वणकंपुरूरवार्द्रवदेवसहितंसपिंडकंश्रा

द्धंकार्यं स्वमातरिजीवंत्यांमृतसापत्नमात्रादित्रयोद्देशेनकार्यं स्वमातृसापत्नमात्रोर्मृतौद्विव चनप्रयोगेणसापत्नमात्रनेकत्वेचमात्रासहबहुवचनप्रयोगेणएकस्मिन्विप्रेएकएवक्षणोर्घ्यःपिं-डश्चैकएवदेयः पितामहीप्रपितामह्योर्द्वौविप्रौपिंडौचेत्येवंपार्वणमावश्यकं केचिन्मातृबहुत्वेवि प्रपिंडादिभेदमाहुः स्वमातृसापत्नमातृजीवने तुगृह्याग्निरहितेनमृतपितृकेणापिनकार्यं अ न्वष्टक्येमातृयजनस्यमुख्यत्वादतएवात्रकैश्चिन्मातृपार्वणस्यैवप्राथम्यमुक्तमितिभाति पूर्वंपि तृमृतौपश्चान्मातृमृतावपिगृह्याग्निमतामस्यांनवम्यामन्वष्टक्यमावश्यकंनित्यत्वात् अन्येषां पश्चान्मातृमृतौनावश्यकं केचिन्नवम्यांपूर्वमृतमातृश्राद्धं मृतेभर्तरिलुप्यतइतिवचनप्रामाण्य माश्रित्यपितृमरणोत्तरंनकुर्वंति भर्तुरग्रेसहदाहेनवामृतानांमातामहीभगिनीदुहितृमातृष्वसृ पितृष्वस्रादीनामपुत्राणांपितृमात्रादिकुलोत्पन्नानांसर्वासामेवसौभाग्यवतीनामस्यांनवम्यांश्रा द्धंकार्यंभर्तुरग्रेमृतानांतत्तद्भर्तृमरणोत्तरंचनकार्यं अतएवास्याअविधवानवमीत्वप्रसिद्धिःअतः पत्न्याअपिनवमीश्राद्धंकार्यं अस्याविधवानवमीश्राद्धस्यमहालयवद्यावद्वृश्चिकदर्शनंगौणका लः एवंदौहित्रप्रतिपच्छ्राद्धस्यापीतिकालतत्त्वविवेचने अत्राविधवानवमीश्राद्धेसुवासिनीनांप्र तिसांवत्सरिकश्राद्धादौचसुवासिनीभोजनमपिकार्यं भर्तुरग्रेमृतानारीसहदाहेनवामृता तस्या स्थानेनियुंजीतविप्रैःसहसुवासिनीमित्यादिमार्कंडेयवचनात् अस्यांनवम्यांपिंडदानंजीवत्पि तृकेणापिगर्भिणीपतिनाचापिकार्यं नवमीश्राद्धासंभवेममान्वष्टक्याकरणजनितप्रत्यवायपरि हारार्थंशतवारमेभिर्द्युभिःसुमनाइतिमंत्रजपंकरिष्येइतिसंकल्प्यतज्जपंकुर्यात् अन्वष्टक्येसा मवेदिभिःपितृपार्वणमेवकार्यंमातृमातामहपार्वणेनकार्येइतिसिंधुः ॥

ह्या अपरपक्षामध्यें सप्तमी, अष्टमी आणि नवमी या तीन दिवसीं, "माघ्यावर्षश्राद्धं कर्तुं पूर्वेद्युःश्राद्धं करिष्ये, माघ्यावर्षश्राद्धं करिष्ये, अन्वष्टक्यश्राद्धं करिष्ये," असा क्रमेंकरून संकल्प करून सर्व अष्टकाश्राद्धांचा विधि आश्वलायनांनीं करावा. हें अष्टकाविकृतिरूप श्राद्ध आश्वलायनांनीं एकाष्टकाकरण पक्षाचे ठिकाणींहि करावें. इतरशाखी जे त्यांनीं तर अष्टकारूपच करावें. पंचाष्टकाकरणपक्षीं, "अष्टकाश्राद्धं करिष्ये," असा संकल्प करून करावें. एकाष्टकापक्षीं तर करूं नये. नवमीचे दिवसीं अन्वष्टक्यश्राद्ध नवदैवत (पितृत्रयी, मातृत्रयी, मातामहत्रयी, सपत्नीक) सर्वशाखी जे त्यांनीं अष्टमीचे दिवसीं अष्टकाश्राद्ध न करण्यापक्षींहि गृह्याग्नीचे ठिकाणीं जसा विधि सांगितला आहे तदनुसार करावें; कारण, ह्या नवमीचे दिवसीं अन्वष्टक्यश्राद्ध हें मुख्य आहे. ज्यांचा गृह्याग्नि सिद्ध नसेल त्यांनीं तर, ज्यांची माता पूर्वी मृत झाली असेल व पिता पश्चात् मृत झाला असेल त्यांनीं ह्मणजे मृतमातापितृकांनीं पाणिहोमादिविधि करून नवदैवत्य श्राद्ध करावें. पिता जिवंत असून माता मृत झालेली असा व मौंजी न झालेला त्यानेंहि मातृत्रयीच्या मात्र उद्देशेंकरून एकपार्वणरूप पुरूरवार्द्रव देवांशीं सहित सपिंडक श्राद्ध करावें. आपली माता जिवंत असेल तर मृत जी सापत्न माता त्या त्रयीच्या उद्देशेंकरून करावें. स्वकीय माता व सापत्न माता ह्या दोघी मृत झाल्या असतील तर द्विवचनाच्या प्रयोगानें, आणि सापत्न माता बहुत असतां मातेसह बहुव-

चनाच्या प्रयोगानें एका ब्राह्मणाचे ठिकाणीं एकच क्षण व अर्घ्य, पिंड हेहि एकेकच द्यावे. पितामही व प्रपितामही ह्या दोहोंचे ठिकाणीं दोन ब्राह्मण व दोन पिंड, असें हें पार्वण आवश्यक आहे. कोणी ग्रंथकार, माता बहुत असतील तर ब्राह्मण, व पिंड इत्यादि निरनिराळे असावे, असा भेद सांगतात. स्वकीय माता व सापत्न माता ह्या जिवंत असतील तर गृह्याग्नीनें जो रहित त्यानें व ज्याचा पिता मृत झाला असेल त्यानेंहि करूं नये. कारण, अन्वष्टक्य श्राद्धाचे ठिकाणीं मातृयजन हेंच मुख्य आहे, यास्तव कितीएक ग्रंथकारांनीं ह्या अन्वष्टक्य श्राद्धाचे ठिकाणीं मातृपार्वणच प्रथम सांगितलें असें वाटतें. पूर्वी पिता मृत झाला असेल आणि नंतर माता मृत झाली असेल तथापि ज्यांनीं गृह्याग्नि धारण केला असेल त्यांनीं नित्य आहे यास्तव ह्या नवमीचे दिवसीं अन्वष्टक्य श्राद्ध अवश्य करावें. इतरांला, पश्चात् माता मृत झाली असतां आवश्यक नाहीं. कितीएक जन नवमीचे दिवसीं पूर्वी मृत झालेल्या मातेचें श्राद्ध, "पति मृत झाल्यावर लुप्त होतें," ह्या वचनाचे प्रमाणाचा आश्रय करून पिता मृत झाल्यानंतर करीत नाहींत. भर्त्याच्या पूर्वी किंवा भर्त्याबरोबर सती जाऊन मृत झालेल्या अशा मातामही ( मातेची माता ), भगिनी, कन्या, मावशी, आत, इत्यादिक पुत्ररहित अशा पिता, माता, इत्यादि कुळांमध्यें उत्पन्न झालेल्या ज्या सर्व सौभाग्यवती स्त्रिया त्यांचें ह्या नवमीचे दिवसीं श्राद्ध करावें. पतीच्या पूर्वी मृत झालेल्या त्यांचें श्राद्ध, त्यांचे पति मृत झाल्यानंतर करूं नये, यास्तवच या नवमीला अविधवा नवमी असें नाम आहे, व त्याकरितां पतीचेंहि नवमीचे दिवसीं श्राद्ध करावें. ह्या अविधवा नवमीश्राद्धाचा महालयाप्रमाणें जो वृश्चिकदर्शन होई तोंपर्यंत गौणकाल आहे. याप्रमाणें प्रतिपदेचे दिवसीं दौहित्रानें कर्तव्य जें मातामहश्राद्ध त्याचाहि काल वृश्चिकदर्शनपर्यंत आहे असें कालतत्त्वविवेचन ग्रंथांत आहे. या अविधवानवमीश्राद्धाचे दिवसीं आणि सुवासिनींच्या प्रतिसांवत्सरिक श्राद्धाचे दिवसीं सुवासिनीभोजन घालावें. कारण, "पतीच्या पूर्वी मृत झालेली, किंवा पतीसह सती जाऊन मृत झालेली अशांच्या स्थानीं ह्मणजे त्यांच्या श्राद्धाचे ठिकाणीं ब्राह्मणासहवर्तमान सुवासिनी सांगाव्या," इत्यादिक मार्कंडेयाचें वचन आहे. ह्या नवमीश्राद्धाचे ठिकाणीं पिंडदान, ज्याचा पिता जिवंत असेल तो, व गर्भिणीपति ह्यांनींहि करावें. नवमीश्राद्धाचा संभव नसेल तर, "ममान्वष्टक्याकरणजनितप्रत्यवायपरिहारार्थं शतवार 'एभिर्द्युभिःसुमना०' इति मंत्रजपं करिष्ये, "असा संकल्प करून त्या मंत्राचा जप करावा. अन्वष्टक्यश्राद्धाचे ठिकाणीं सामवेदी जे त्यांनीं पितृपार्वणच ( पितृत्रयी ) करावें, मातृपार्वण, व मातामहपार्वण हीं करूं नयेत, असें निर्णयसिंधु सांगतो.

---

अत्रद्वादश्यांसंन्यासिन.महालयः सचापराण्हव्यापिन्यामित्युक्तं तत्रवैष्णवाअपराण्हव्यापिन्याद्वादश्या एकादशीव्रतदिनसत्त्वेस्वल्पायामपिद्वादश्यांशुद्धत्रयोदश्यांवैकादशीपारणादिने एवसंन्यासिदैवत्यंश्राद्धंकुर्वंति ममत्वीदृशेविषयेवैष्णवैः संन्यासिमहालयोदर्शेकार्य इतिभाति ॥

ह्या अपरपक्षामध्यें अपराण्हकालीं व्यापणाऱ्या द्वादशीचे दिवसीं संन्यासी यांचा महालय करावा. त्यामध्यें वैष्णव, अपराण्हकालव्यापिनी अशी द्वादशी, एकादशीच्या व्रतदिवसीं असेल तर अल्प जरी द्वादशी आहे तथापि त्या दिवसीं किंवा शुद्ध त्रयोदशीचे दिवसीं एकादशीच्या पारणादिवसींच संन्यासिदैवत्य ( संन्यासी ज्याची देवता ) असें श्राद्ध करितात.—मला तर अशा प्रसंगीं वैष्णवांनीं संन्यासी यांचा महालय अमावास्येचे दिवसीं करावा, असें वाटतें.

---

अत्रत्रयोदश्यांमघायुतायांकेवलायांवाश्राद्धंनित्यंकेवलमघायामपिश्राद्धंकार्यं अत्रश्राद्ध विधौबहुग्रंथेषुबहवःपक्षाः अपुत्रेणपुत्रिणावागृहिणासपत्नीकपितृपार्वणमातामहपार्वणाभ्यांपितृव्यभ्रातृमातुलपितृष्वसृमातृष्वसृभगिनीश्वशुरादिपार्वणैश्चसहितं अपिंडकंसांकल्पविधिनाश्राद्धंकार्यं अथवापित्रादिपार्वणद्वयंमहालयवत्पितृव्याद्येकोद्दिष्टगणांश्चोद्दिश्यसांकल्पविधिनाश्राद्धंकार्यं यद्वादर्शवत्षट्दैवतंश्राद्धमपिंडकंकार्यं अथवानिष्कामेणपुत्रिणाश्राद्धविधिनाश्राद्धंनानुष्ठेयं किंतुपित्रादिपार्वणद्वयंकेवलंपितृव्यादिसहितंवोद्दिश्यैतेषांतृप्त्यर्थं ब्राह्मणभोजनंकरिष्यइतिसंकल्प्यपितृरूपिणेब्राह्मणायगंधंसमर्पयामीत्येवंपंचोपचारान्समर्प्य ब्रह्मार्पणमित्यादिपठित्वानेनब्राह्मणभोजनेनपित्रादिरूपीश्वरः प्रीयतामित्यन्नमुत्सृज्यपायसादिमधुरान्नेनविप्रान्भोजयित्वादक्षिणादिभिःसंतोष्यस्वयंभुंजीतेत्येतावदेवकर्तव्यं अपुत्रिणः सकामस्यचपिंडदानरहितश्राद्धविधिनाश्राद्धंनदोषायक्वचिदपुत्रिणःपिंडदानमप्युक्तं . एवमुक्तपक्षेष्वन्यतमपक्षेणमघात्रयोदशीश्राद्धमवश्यानुष्ठेयं अकरणेदोषोक्तेर्नित्यत्वात् हस्तनक्षत्रस्थेसूर्येमघायुतात्रयोदशीगजच्छायासंज्ञिता अस्यांश्राद्धेनफलभूयस्त्वं अत्रमहालयस्ययुगादेश्चप्राप्तौमघात्रयोदशीमहालययुगादिश्राद्धानितंत्रेणकरिष्यइतिसंकल्प्यतंत्रेणकुर्यात् ननु दर्शेननित्यश्राद्धस्यैवकस्यचित्प्रसंगसिद्धिः अत्रैवंभाति अंगानामैक्यंप्रधानमात्रभेदस्तंत्रं तेनविश्वेदेवपाकाद्यंगानामैक्यंविप्रार्घ्यपिंडादेर्भेदएव प्रसंगसिद्धिस्थलेतुप्रधानमपिनभिद्यत इति त्रयोदशीश्राद्धेऽपरपक्षत्वाद्धूरिलोचनाविश्वेदेवाः श्राद्धसागरेउक्ताः अविभक्तैरपिभ्रातृभिर्मघात्रयोदशीश्राद्धंपृथक्कार्यमितिसिंधुकौस्तुभादौ विभक्तैरपिसहैवेतिश्राद्धसागरे ॥

ह्या अपरपक्षांत मघायुक्त त्रयोदशी किंवा केवल त्रयोदशी ह्या दिवसीं श्राद्ध करावें, तें नित्य आहे. केवल मघानक्षत्रींहि श्राद्ध करावें. ह्या मघा श्राद्धाचे विधीविषयीं अनेक ग्रंथांचे ठिकाणीं पुष्कळ प्रकारचे पक्ष सांगितले आहेत. अपुत्रवान् अथवा पुत्रवान् असा गृहस्थाश्रमी यानें सपत्नीक असीं पितृपार्वण व मातामहपार्वण यांहींकरून युक्त आणि चुलता, भ्राता, मामा, आत, मावशी, भगिनी, श्वशुर इत्यादिक जीं पार्वणें यांहींकरून युक्त असे सांकल्पविधीकरून अपिंडक श्राद्ध करावें. अथवा पितृत्रयी व मातृत्रयी आणि महालयाप्रमाणें चुलता इत्यादिक एकोद्दिष्टगण या सर्वांच्या उद्देशेंकरून सांकल्पविधीनें श्राद्ध करावें. किंवा दर्शासारखें सहा दैवतांचे उद्देशेंकरून अपिंडक श्राद्ध करावें. अथवा निष्काम अशा पुत्रवंतानें श्राद्धविधि करून श्राद्ध करूं नये, तर केवल पितृत्रयी, मातृत्रयी यांच्या उद्देशानें, किंवा पितृत्रयी, मातृत्रयी आणि चुलता इत्यादिक एकोद्दिष्टगण यांच्या उद्देशानें, "एतेषां तृप्त्यर्थं ब्रा-

ह्मणभोजनं करिष्ये," असा संकल्प करून, "पितृरूपिणे ब्राह्मणाय गंधं समर्पयामि," असा उच्चार करून गंधादि पंचोपचार समर्पण करून "ब्रह्मार्पणं०" इत्यादि मंत्र पठन करून, "अनेन ब्राह्मणभोजनेन पित्रादिरूपी परमेश्वरः प्रीयतां," असें ह्मणून अन्नदानाचें उदक सोडावें. नंतर क्षीर इत्यादिक मधुर अन्नानें ब्राह्मणांला भोजन देऊन दक्षिणादिकांनीं संतोष करावा. आणि आपण भोजन करावें, इतकाच विधि करावा. अपुत्रवान् व सकाम यांनीं पिंडदानरहित अशा श्राद्ध विधीनें श्राद्ध केलें असतां दोष प्राप्त होत नाहीं.– क्वचित् ग्रंथीं अपुत्रवंतांनीं पिंडदानहि करावें असें आहे. याप्रमाणें सांगितलेल्या पक्षांतून कोणता एक पक्ष स्वीकारून मघात्रयोदशीचे दिवसीं श्राद्ध अवश्य करावें. कारण, न केलें असतां दोष सांगितला आहे यास्तव तें नित्य आहे. हस्तनक्षत्रीं सूर्य आला असतां मघायुक्त जी त्रयोदशी तिला गजच्छाया असें नांव आहे. तिचे ठिकाणीं श्राद्ध केलें असतां महाफल मिळतें. ह्या त्रयोदशीचे दिवसीं महालय व युगादि तिथि हीं येतील तर, "मघात्रयोदशीमहालययुगादिश्राद्धानि तंत्रेण करिष्ये," असा संकल्प करून तंत्रेंकरून श्राद्ध करावें. दर्शश्राद्धेंकरून नित्यश्राद्धासारखी कोणत्याहि श्राद्धाची प्रसंगसिद्धि होत नाहीं. याविषयीं असें वाटतें कीं, अंगरूप कर्में एक असून प्रधानकर्मांचा भेद असणें याला तंत्र असें ह्मणतात. त्यापेक्षां विश्वेदेव, पाक इत्यादिक जीं अंगें तीं सर्वांचीं एक असून ब्राह्मण, अर्घ्य, पिंड इत्यादिक प्रधान कर्में निराळींच करावीं. प्रसंगसिद्धिस्थळाचे ठिकाणीं तर प्रधानकर्म सुद्धां निराळें होत नाहीं. त्रयोदशीश्राद्ध हें अपरपक्षीयश्राद्ध आहे याकरितां एथें देव धूरिलोचनसंज्ञक घ्यावे असें श्राद्धसागरीं सांगितलें आहे. एकत्र रहाणारे असे भ्राते यांनींहि मघा त्रयोदशीश्राद्ध निरनिराळें करावें, असें निर्णयसिंधु, कौस्तुभ इत्यादि ग्रंथीं आहे. विभक्त असतील तथापि सर्वांनीं बरोबरच करावें, असें श्राद्धसागरांत सांगितलें आहे.

---

अथात्रचतुर्दश्यांपित्रादित्रयमध्येएकस्यापिशस्त्रविषाग्निजलादिशृंगिव्याघ्रसर्पादिनिमित्तेनदुर्मरणेनमृतस्यैकोद्दिष्टविधिनाश्राद्धंकार्यम् पित्रादिद्वयोःशस्त्रादिहतत्वेद्वेएकोद्दिष्टेकार्ये पित्रादीनांत्रयाणांशस्त्रादिहतत्वेपार्वणमेवकार्यं केचिदेकोद्दिष्टत्रयंकार्यमित्याहुः सहगमने प्रयागादौचविधिप्राप्तेग्निजलादिमरणेचतुर्दशीश्राद्धंनकार्यं युद्धप्रायोपवेशनयोर्वैधत्वेपीदंकार्यं अत्रशस्त्रादिहतपितृव्यभ्रात्रादेरप्यपुत्रस्यैकोद्दिष्टंकार्यंइदंधूरिलोचनसंज्ञकदेवसहितंकार्यंअत्रसंबंधगोत्रनामाद्युच्चार्यामुकनिमित्तेनमृतस्यचतुर्दशीनिमित्तमेकोद्दिष्टंश्राद्धंसदैवंसपिंडंकरिष्यइतिसंकल्प्यप्रत्येकोद्दिष्टमेकार्घ्यैकपवित्रैकपिंडयुतंश्राद्धंकार्यंपित्रादेर्भ्रात्रादेश्चशस्त्रहतत्वे पृथक्पाकादिनामहालयवत्सहतंत्रेणवैकोद्दिष्टद्वयादिएवंचतुर्दश्यामेकोद्दिष्टंकृत्वापित्रादिसर्वपितृगणोद्देशेनसकृन्महालयस्तिथ्यंतरेऽवश्यंकार्यः अस्यांचतुर्दश्यांयदिशस्त्रादिमृतयोर्मातापित्रोर्मृताहस्तदाचतुर्दशीनिमित्तमेकोद्दिष्टंकृत्वा पुनस्तदैवमृतादित्रयोद्देशेनसांवत्सरिकंपार्वणविधिनाकार्यमितिश्राद्धसागरे कौस्तुभादौतुसांवत्सरिकपार्वणेनैवचतुर्दशीश्राद्धसिद्धिर्नपृथक्कार्यमित्युक्तं दिनांतरेचसकृन्महालयःकार्यः अत्रचतुर्दशीश्राद्धस्यकथंचिद्विघ्ने

**तुअत्रैवपक्षेऽग्रिमपक्षेवादिनांतरेतत्पार्वणविधिनैवकार्यनत्वेकोद्दिष्टं अत्रैकोद्दिष्टेपराण्हव्या पिन्येवचतुर्दशीग्राह्यानत्वितरैकोद्दिष्टतिथिवत्मध्यान्हव्यापिनीतिकौस्तुभे ॥**

पिता, पितामह आणि प्रपितामह या तिघांतून कोणीहि शस्त्र, विष, अग्नि, उदक इत्यादिक, अथवा शृंगयुक्त ( गवादिक ), व्याघ्र, सर्प, इत्यादिक या निमित्तांनीं दुर्मरणेंकरून मृत झाला असतां त्यांचें श्राद्ध ह्या चतुर्दशीचे दिवसीं एकोद्दिष्टविधि करून करावें. पिता, पितामह हे शस्त्रादिकानें मृत होतील तर दोन एकोद्दिष्टें करावीं. पिता, पितामह आणि प्रपितामह हे तीनहि शस्त्रादिकानें मृत झाले असतील तर पार्वणच करावें. कोणी ग्रंथकार तीन एकोद्दिष्टें करावीं, असें ह्मणतात. सहगमनाचे ठिकाणीं विधिप्राप्त असें अग्नीमध्यें मरण झालें असतां, आणि प्रयागादिकीं विधिप्राप्त अशा जलसमाधीनें मरण झालें असतां चतुर्दशीचे दिवसीं श्राद्ध करूं नये. युद्ध व प्रायोपवेशन ( दर्भ हांतरून उपोषणें करून मरणें ) हीं जरी विधिप्राप्त आहेत तथापि यांहींकरून मृत झाला असतां चतुर्दशीश्राद्ध करावें. शस्त्रादिकानें मृत झालेले असून अपुत्रवान् असे चुलता, भ्राता इत्यादिक यांचेंहि ह्या चतुर्दशीचे दिवसीं एकोद्दिष्ट श्राद्ध करावें. हें श्राद्ध धूरिलोचनसंज्ञक जे देव तत्सहित करावें. ह्या श्राद्धाचे ठिकाणीं संबंध, गोत्र, नाम इत्यादिकांचा उच्चार करून, "**अमुकनिमित्तेन मृतस्य चतुर्दशीनिमित्तमेकोद्दिष्टं श्राद्धं सदैवं सपिंडं करिष्ये,**" असा संकल्प करून दरएक एकोद्दिष्ट एक अर्घ्य, एक पवित्रक आणि एक पिंड यांहींकरून युक्त असें करावें. पिता इत्यादिक, आणि भ्राता इत्यादिक हे शस्त्रानें मृत झाले असतील तर पाक इत्यादिक निराळा करून महाल्याप्रमाणें एकतंत्रानेंच दोन एकोद्दिष्टें करावीं. याप्रमाणेंच चतुर्दशीचे दिवसीं एकोद्दिष्ट करून पिता इत्यादिक जे सर्व पितृगण त्यांच्या उद्देशेंकरून सकृन्महालय दुसऱ्या तिथीचे ठिकाणीं अवश्य करावा. शस्त्रादिकानें मृत झालेले जे माता, पिता यांचा मृतदिवस जर ह्या चतुर्दशीचे दिवसीं येईल तर चतुर्दशीनिमित्त एकोद्दिष्ट श्राद्ध करून पुनः त्याच दिवसीं मृतादित्रयीच्या उद्देशेंकरून सांवत्सरिक श्राद्ध पार्वणविधीनें करावें, असें श्राद्धसागरग्रंथीं सांगितलें आहे. कौस्तुभादि ग्रंथीं तर, सांवत्सरिकाचा पार्वणविधि केल्यानेंच चतुर्दशीश्राद्धाची सिद्धि होते, निराळें करूं नये असें सांगितलें आहे. दुसऱ्या कोणत्याहि दिवसीं सकृन्महालय करावा. ह्या चतुर्दशीचे दिवसीं चतुर्दशीश्राद्धाला कांहीं एक विघ्न येईल तर ह्याच पक्षीं अथवा पुढच्या पक्षीं, दुसऱ्या कोणत्याहि दिवसीं तें चतुर्दशीश्राद्ध पार्वणविधि करूनच करावें, एकोद्दिष्ट करूं नये. ह्या एकोद्दिष्ट श्राद्धाला अपराण्हकालव्यापिनीच चतुर्दशी घ्यावी, इतर एकोद्दिष्ट तिथीसारखी मध्यान्हकालव्यापिनी घेऊं नये, असें कौस्तुभांत आहे.

---

**हस्तनक्षत्रेसूर्येसतिचांद्रहस्तनक्षत्रयुतामावास्यागजच्छाया तस्यांश्राद्धदानादिकार्यं इत्य माघांगजच्छाया आश्विनशुक्लप्रतिपदिदौहित्रेणानुपनीतेनापिसपत्नीकमातामहस्यपार्वणंमातु लेसत्यपिअवश्यंकार्यं मातामहीसत्त्वेकेवलमातामहपार्वणं इदंजीवत्पितृकेणैवकार्यं इदंसपिं डकमपिंडकंवा अत्रपुरूरवार्द्रवसंज्ञकाविश्वेदेवाः धूरिलोचनाइतिकेचित् इयंप्रतिपदपराण्ह**

व्यापिनीग्राह्येतिबहवः संगवव्यापिनीतिकेचित् अस्यश्राद्धस्ययावद्वृश्चिकदर्शनंगौणकालइतिकालतत्त्वविवेचने इतिमहालयादिनिर्णयोद्देशः समाप्तः ॥

हस्तनक्षत्रीं सूर्य असून अमावास्येचे दिवसीं चांद्र हस्तनक्षत्र असेल तर त्या अमावास्येला गजच्छाया असी संज्ञा आहे, याकरितां तिचे ठिकाणीं श्राद्ध, दान, इत्यादिक करावें. याप्रमाणें अमावास्येचे दिवसीं गजच्छायापर्वणी सांगितली. मुंज झालेली नाहीं अशा दौहित्रानें (कन्यापुत्रानें) सुद्धां आश्विन शुक्लप्रतिपदेचे दिवसीं सपत्नीक मातामहाचें (आईच्या बापाचें) मातुल असला तथापि पार्वणश्राद्ध अवश्य करावें. आजी असेल तर केवळ मातामहत्रयीनेंच करावें. हें मातामहश्राद्ध ज्याचा पिता जिवंत असेल त्यानेंच करावें. हें पिंडसहित किंवा पिंडरहित करावें. ह्या श्राद्धाला 'पुरूरवार्द्रवसंज्ञक' विश्वेदेव घ्यावे. 'धूरिलोचन' घ्यावे, असेंहि कोणी ह्मणतात. ही प्रतिपदा मातामहश्राद्धाला अपराण्हव्यापिनी घ्यावी असें बहुत ग्रंथकार ह्मणतात. संगवकालव्यापिनी घ्यावी असेंहि कोणी ह्मणतात. ह्या मातामहश्राद्धाला जोंपर्यंत वृश्चिकदर्शन होई तावत्पर्यंत गौणकाल आहे असें कालतत्त्वविवेचन ग्रंथीं सांगितलें आहे. याप्रमाणें महालय इत्यादिकांचा निर्णय समाप्त झाला.

---

भाद्रपदकृष्णपक्षेभौमवारव्यतीपातरोहिणीयुताषष्ठीकपिलाषष्ठी अत्रहस्तस्थेसूर्येफलातिशयः अयंयोगोदिवैवग्राह्योनतुरात्रौसूर्यपर्वत्वादितिभाति अस्यांहुतंचदत्तंचसर्वंकोटिगुणंभवेत् अत्रश्राद्धंकार्यमितिविशेषवचनंनोपलभ्यते तथापिअलभ्ययोगेश्राद्धविधानाद्दर्शवत्षट्दैवतंश्राद्धंकार्यं ॥

## आतां कपिलाषष्ठीचा निर्णय सांगतों.

भाद्रपदकृष्ण पक्षांतील षष्ठीचे दिवसीं मंगळवार, व्यतीपात, रोहिणी, ह्या सर्वांचा योग आला असतां त्या षष्ठीला कपिलाषष्ठी असें ह्मणतात. ह्या षष्ठीचे दिवसीं हस्तनक्षत्रींचा सूर्य असेल तर अतिमहाफल मिळतें. हा कपिलाषष्ठीचा योग सूर्यपर्व आहे याकरितां दिवसासच घ्यावा, रात्रीं घेऊं नये असें मला वाटतें. "ह्या कपिलाषष्ठीचे दिवसीं होम, दान इत्यादिक जें केलें तें सर्व कोटिगुण होतें." ह्या कपिलाषष्ठीचे दिवसीं श्राद्ध करावें असें विशेष वचन मिळत नाहीं, तथापि अलभ्य योगाचे ठिकाणीं श्राद्ध करण्याविषयीं विधि आहे याकरितां दर्शश्राद्धासारिखें षट्दैवत (पितृत्रयी सपत्नीक, मातामहत्रयी सपत्नीक) श्राद्ध करावें.

अथात्रसंक्षेपतोव्रतविधिः सूर्योद्देशेनोपवासंसंकल्प्य देवदारुशीरकुंकुमैलामनशिलापद्मकाष्ठतंडुलान्मधुगव्याभ्यांपेषयित्वाक्षीरालोडितेनकल्केनांगंविलिप्यस्नायात् तत्रमंत्रः आपस्त्वमसिदेवेशज्योतिषांपतिरेवच पापंनाशयमेदेववाङ्मनःकायकर्मजं ततःपंचगव्येनस्नात्वापंचपल्लवैर्मार्जयित्वामृत्तिकास्नानंकुर्यात् तर्पणादिनित्यविधिंकृत्वावरुणं पूजयित्वासर्वतोभद्रमध्येकलशोपरितंडुलादौपद्मंलिखित्वातस्याष्टसुपत्रेषुपूर्वादौसूर्यंतपनं स्वर्णरेतसंरविमा

दित्यंदिवाकरंप्रभाकरंसूर्यमित्यावाह्यमध्येसौवर्णरथेसूर्यमग्रेरुणंचावाह्यकरवीरार्कादिपुष्पैर्धू पादिभिःसंपूजयेत् दिक्पालादिदेवताःसंपूज्यद्वादशार्घ्यान्सूर्यायदद्यात् सविस्तरःपूजाविधि द्वादशार्घ्यमंत्राश्चकौस्तुभेज्ञेयाः सूर्याग्रे प्रभाकरनमस्तुभ्यंसंसारान्मांसमुद्धर भुक्तिमुक्ति प्रदोयस्मात्तस्माच्छांतिंप्रयच्छमे नमोनमस्तेवरदऋक्सामयजुषांपते नमोस्तुविश्वरूपायविश्व धात्रेनमोस्तुते इतिप्रार्थ्य उदुत्यमित्यादिसौरसूक्तानिजपित्वारात्रौजागरणंकृत्वाप्रातराकृष्णेने तिमंत्रेणार्कसमिच्चर्वाज्यतिलैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतंहुत्वाघंटादिसर्वालंकारयुतांकपिलांगां मंत्रैःसंपूज्यविप्रायदद्यात् गोपूजामंत्राः कौस्तुभे दानमंत्रस्तु नमस्तेकपिलेदेविसर्वपापप्र णाशिनि संसारार्णवमग्नंमांगोमातस्त्रातुमर्हसि वस्त्रयुगच्छन्नांसघंटामित्यादिविशेषणान्यु क्त्वाइमांगांतुभ्यमहंसंप्रददेइतिदत्वा सुवर्णदक्षिणांदद्यात् ततस्तस्मैविप्रायरथंसूर्यप्रतिमांच दद्यात् तत्रमंत्रः दिव्यमूर्तिर्जगच्चक्षुर्द्वादशात्मादिवाकरः कपिलासहितोदेवोममुक्तिंप्रयच्छ तु यथात्वंकपिलेपुण्यासर्वलोकस्यपावनी प्रदत्तासहसूर्येणममुक्तिप्रदाभवेत्यादि ततःकपि लाप्रार्थनादिविस्तारःकौस्तुभे अथवोपोषणजागरहोमादिविधिमकृत्वाषष्ठ्यामेवस्नानंरथादि पूजनकपिलादानादिकार्यं इतिसंक्षेपतःकपिलाषष्ठीव्रतविधिः इतिश्रीमदनंतोपाध्यायसूनु काशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारेभाद्रपदमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥

## आतां संक्षेपानें कपिलाषष्ठीचा व्रतविधि सांगतों.

सूर्याच्या उद्देशानें उपवासाचा संकल्प करून देवदारु, वाळा, केशर, वेलची, मनःशीळ, पद्मकाष्ठ, तंडुल इतके पदार्थ, मधु व गाईचें तूप यांत वाटून दुधामध्यें कुवळून त्याचा तो कल्क सर्व अंगाला लावून स्नान करावें. त्याविषयीं मंत्र–" **आपस्त्वमसि देवेश ज्योतिषांप तिरेवच ॥ पापं नाशय मे देव वाङ्मनःकायकर्मजं,**" या मंत्रानें स्नान करून नंतर पंचगव्यानें स्नान करावें. त्यानंतर पंच पल्लवांनीं ( अश्वत्थ, उंबर, वड, आंबा, पायरी ) मार्जन करून मृत्तिकास्नान करावें. मग तर्पण इत्यादिक नित्यविधि करून वरुणाची पूजा करावी. नंतर सर्वतोभद्र मंडल करून त्याचे मध्यभागीं कलश ठेवून त्याच्यावर तंडुलयुक्त पूर्णपात्र ठेवून तांदूळ इत्यादिकांचे ठिकाणीं कमल लिहून त्या कमलाच्या आठ पत्रांचे ठिकाणीं पूर्वादि दिशेपासून क्रमानें सूर्य, तपन, स्वर्णरेतसा, रवि, आदित्य, दिवाकर, प्रभाकर आणि सूर्य, या आठ देवतांचें आवाहन करून मध्यभागीं सुवर्णरथाचे ठिकाणीं सूर्याचें आवाहन करून त्याच्या पुढें अरुणाचें आवाहन करावें. नंतर कण्हेर, रुई इत्यादिक पुष्पानीं व धूपदीपादिकांनीं पूजा करावी. नंतर दिक्पाल इत्यादिक देवतांचें पूजन करून बारा अर्घ्यें सूर्याला द्यावीं. सविस्तर पूजेचा विधि, व बारा अर्घ्यांचे मंत्र कौस्तुभांत पाहावे. सूर्याच्या पुढें हात जोडून प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र–" **प्रभाकर नमस्तुभ्यं संसारान्मां समुद्धर ॥ भुक्तिमुक्ति प्रदो यस्मात् तस्मात् शांतिं प्रयच्छ मे ॥ नमोनमस्ते वरद ऋक्सामयजुषां पते ॥ नमोस्तु विश्वरूपाय विश्वधात्रे नमोस्तुते,**" असी प्रार्थना करून " **उदुत्यं०**" इत्यादिक सूर्यसूक्तांचा जप करून रात्रीं जागरण करावें. नंतर प्रातःकालीं " **आकृष्णेन०**" या मंत्रानें रुईच्या समिधा, चरु ( भात ), तूप, तिल, या द्रव्यांचा दर एकाचा एकशें आठ याप्रमाणें होम क-

रून घंटादिक सर्व अलंकारांनीं युक्त अशा कपिला गाईची मंत्रांनीं पूजा करून ती ब्राह्मणाला द्यावी. गाईच्या पूजेचे मंत्र कौस्तुभांत सांगितले आहेत. गाईच्या दानाचा मंत्र– "नमस्ते कपिले देवि सर्वपापप्रणाशिनि ॥ संसारार्णवमग्नं मांगोमातस्त्रातुमर्हसि" ॥ "वत्सयुगच्छन्नां," इत्यादिक विशेषणें ह्मणून, 'इमां गां तुभ्यमहं संप्रददे,' असें ह्मणून गाई द्यावी, नंतर सुवर्णदक्षिणा द्यावी. तदनंतर त्या ब्राह्मणाला रथ व सूर्यमूर्ति यांचें दान करावें. दानमंत्र–" दिव्यमूर्तिर्जगच्चक्षुर्द्वादशात्मादिवाकरः ॥ कपिलासहितो देवो मम मुक्तिं प्रयच्छतु ॥ यथा त्वं कपिले पुण्या सर्वलोकस्य पावनी ॥ प्रदत्ता सह सूर्येण मम मुक्ति प्रदा भव" ॥ त्यानंतर कपिलेची प्रार्थना, इत्यादिक विस्तार कौस्तुभांत सांगितला आहे. अथवा उपोषण, जागरण, होम, इत्यादिक विधि केल्यावांचून कपिलाषष्ठीचे दिवसींच स्नान, रथादिकांचें पूजन, कपिला गाईचें दान इत्यादिक करावें. याप्रमाणें संक्षेपेंकरून कपिलाषष्ठीव्रताचा विधि समाप्त झाला. इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे भाद्रपदमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः

---

तुलामेषसंक्रांतिर्विषुवसंज्ञा तस्याःपूर्वाःपराश्चपंचदशपंचदशनाड्यःपुण्यकालः विशेषः प्रागुक्तएव आश्विनशुक्लप्रतिपदिदेवीनवरात्रारंभः नवरात्रशब्दःआश्विनशुक्लप्रतिपदमारभ्य महानवमीपर्यंतंक्रियमाणकर्मनामधेयं तत्रकर्मणिपूजैवप्रधानं उपवासादिकंस्तोत्रंजपादिकं चांगं तथाचयथाकुलाचारमुपवासैकभक्तनक्तायाचितान्यतमव्रतयुक्तंयथाकुलाचारंसप्तशती लक्ष्मीहृदयादिस्तोत्रजपसहितंप्रतिपदादिनवम्यंतनवतिथ्यधिकरणकपूजाख्यंकर्मनवरात्रशब्दवाच्यं पूजाप्राधान्योक्तेरेव क्वचित्कुलेजपोपवासादिनियमस्यव्यतिरेकउपलभ्यते पूजायास्तुनक्वापिकुलेनवरात्रकर्मण्यभावोदृश्यते यत्कुलेनवरात्रमेवनानुष्ठीयतेतत्रनवरात्रपूजादेरप्यभावआस्तांनामसचनवरात्रारंभः सूर्योदयोत्तरंत्रिमुहूर्तव्यापिन्यांप्रतिपदिकार्यः तदभावेद्विमुहूर्तव्यापिन्यामपिक्वचिन्मुहूर्तमात्रव्यापिन्यामप्युक्तः सर्वथादर्शयुक्तप्रतिपदिनकार्यइतिबहुग्रंथसंमतं मुहूर्तन्यूनव्याप्तौसूर्योदयास्पर्शेवादर्शयुतापिग्राह्या प्रथमदिनेषष्टिघटिकाप्रतिपद्द्वितीयदिनेमुहूर्तद्वयादिपरिमितावर्धतेतदापूर्णत्वात्पूर्वैवग्राह्या द्वितीयावेधनिषेधोपिएतत्पक्षद्वये एवयोज्यः पुरुषार्थचिंतामणौतुपूर्वदिनेमुहूर्तचतुष्टयोत्तरंमुहूर्तपंचकोत्तरंवाप्रवृत्ताद्वितीयदिने मुहूर्तद्वयादिपरिमिताप्रतिपत्तदापरस्याःक्षयगामितयानिषिद्धत्वादमायुक्तापिपूर्वैवग्राह्येत्युक्तं तत्रसूर्योदयोत्तरंदशघटीमध्येतत्रासंभवेमध्यान्हेऽभिजिन्मुहूर्तेप्रारंभःकार्योनत्वपराण्हे एवं चप्रतिपदआद्यषोडशनाडीनिषेधश्चित्रावैधृतियोगनिषेधश्चोक्तकालानुरोधेनसतिसंभवे पालनीयोनतुनिषेधानुरोधेनपूर्वाण्हःप्रारंभकालःप्रतिपत्तिथिर्वातिक्रमणीयः ॥

## आतां आश्विनमासांतील कृत्यें सांगतों.

तुला संक्रांति आणि मेषसंक्रांति यांना विषुव अशी संज्ञा आहे. त्या विषुवसंक्रांतीच्या पूर्वींच्या १९ व पुढच्या १९ घटिका पुण्यकाल जाणावा. याहून विशेष निर्णय पूर्वी (प्रथम परिच्छेदांत ) सांगितला आहेच. आश्विनशुक्लपक्षांतील प्रतिपदेचे दिवसीं देवीच्या नवरात्राचा

आरंभ करावा. आश्विनशुद्ध प्रतिपदेला आरंभ करून महानवमीपर्यंत करावयाचें जें (पूजा इत्यादिक) कर्म त्याला नवरात्र असें ह्मणतात. त्या नवरात्र कर्माचे ठिकाणीं पूजा हेंच प्रधान कर्म आहे. उपोषण इत्यादिक व स्तोत्र, जपादिक हें अंग आहे. तसेंच जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें उपोषण, एकभुक्त, नक्त, अयाचित यांतून एकाद्या व्रतासहित, आणि जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें सप्तशती, लक्ष्मीहृदयादिक स्तोत्रें, जप, यांहींकरून युक्त असें प्रतिपदेपासून नवमीपर्यंत पूजानामक जें कर्म करणें त्याला, पूजाप्रधान असें वचन आहे याकरितांच नवरात्र असें ह्मणावें. कितीएक कुळांमध्यें जप, उपोषण इत्यादिक नियम मूळींच नसतात, परंतु कोणत्याहि कुलाचे ठिकाणीं नवरात्र कर्मांत पूजा नाहीं असें कोठेंहि दिसत नाहीं. ज्याच्या कुळामध्यें मुळीं नवरात्रच करण्याचा आचार नाहीं तेथें पूजा इत्यादिकांचाहि अभाव असेल तो असो. तो नवरात्राचा आरंभ सूर्योदयानंतर सहा घटिकाव्यापिनी अशा प्रतिपदेचे दिवसीं करावा. सूर्योदयानंतर सहा घटिकाव्यापिनी नसेल तर चार घटिका व्यापिनीमध्येंहि करावा. क्वचित् ग्रंथीं दोन घटिका व्यापिनीमध्येंहि करावा असें आहे, परंतु सर्वथा अमावास्येनें युक्त जी प्रतिपदा तिचे ठिकाणीं आरंभ करूं नये, असें बहुत ग्रंथांचें संमत आहे. सूर्योदयानंतर दोन घटिकांहून कमी असी व्याप्ति असेल अथवा सूर्योदयाला स्पर्श नसेल तर अमावास्यायुक्तहि घ्यावी. जर पूर्व दिवसीं साठ घटिका प्रतिपदा असून दुसऱ्या दिवसीं चार घटिका किंवा कांहीं अधिक असी वाढती असेल तर पूर्ण आहे याकरितां पूर्व दिवसाचीच घ्यावी. द्वितीयेच्या वेधाचा निषेध आहे तथापि तो ह्या दोन पक्षांचे ठिकाणींच योजावा. पुरुषार्थचिंतामणीमध्यें तर पूर्व दिवसीं आठ घटिकांनंतर अथवा दहा घटिकांनंतर प्रतिपदा लागेल व दुसऱ्या दिवसीं चार घटिका किंवा कांहींसी अधिक प्रतिपदा असेल तेव्हां दुसऱ्या दिवसाची क्षयगामी असल्याकारणानें ती निषिद्ध आहे यास्तव अमावास्येनें युक्त आहे तथापि पूर्व दिवसाचीच घ्यावी, असें सांगितलें. त्याविषयीं सूर्योदयानंतर दहा घटिकांमध्यें प्रारंभ करावा. दहा घटिकांमध्यें न झाला तर मध्यान्हकालीं अभिजिन्मुहूर्ताचे ठिकाणीं प्रारंभ करावा, अपराण्हांत करूं नये. याप्रमाणें प्रतिपदेच्या पहिल्या सोळा घटिकांचा निषेध, आणि चित्रा व वैधृतियोग यांचा निषेध हे दोनहि निषेध, पूर्वीं सांगितलेल्या कालाच्या अनुरोधानें संभव असेल तर पाळावे. केवल निषेध सांगितला इतक्यामुळें प्रारंभाचा काल जो पूर्वाण्हकाल, किंवा प्रतिपदा तिथि यांचें उलंघन करूं नये.

---

अत्रकर्मणिब्राह्मणादिचतुर्वर्णस्यम्लेच्छादेश्चाधिकारः तत्रविप्रेणजपहोमान्नबलिनैवेद्यैः सात्त्विकीपूजाकार्या नैवेद्यैश्चनिरामिषैः मद्यंदत्वाब्राह्मणस्तुब्राह्मण्यादेवहीयते मद्यमपेयमदेयमित्यादिनिषेधान्मांसमद्यादियुतराजसपूजायांब्राह्मणस्यनाधिकारः मद्यपानेमरणांतप्रायश्चित्तोक्तेःस्पर्शेतदंगच्छेदोक्तेश्चाल्पप्रायश्चित्तेनदोषानपगमेनपातित्यापातात् इत्थमेवसर्वेप्राचीनानवीनाश्चनिबंधकारानिर्बंधेनलिखंति नवीनतराभास्कररायप्रभृतयोपिसप्तशतीटीका

दौप्राचीनग्रंथाननुसृत्यैवमेवपरिष्कुर्वंति सभायांचैतन्मतमेवश्लाघंतेचआचरणंत्वन्यथाकुर्वंति तत्किंस्वयंदुर्दैववशेनब्राह्मण्यभ्रष्टोभूवमन्योप्येवंमाभूवन्निति भूतदययावास्वपातित्यगोपनायवान्येषांकलियुगस्थविप्राणामधिकाराभावालोचनयावेतिनवयंतत्त्वंजानीमः क्षत्रियवैश्ययोर्मांसादियुतजपहोमसहितराजसपूजायामप्यधिकारः सचकेवलंकाम्यएवनतुनित्यः निष्कामक्षत्रियादेःसात्त्विकपूजाकरणेमोक्षादिफलातिशयः एवंशूद्रादेरपि शूद्रादेर्मंत्रहीनाजपादिरहितामांसादिद्रव्यकातामसपूजापिविहिता शूद्रेणसप्तशत्यादिजपहोमसहितासात्त्विकीपूजाब्राह्मणद्वाराकार्या स्त्रीशूद्रादेःस्वतःपौराणमंत्रपाठेपिनाधिकारः अतएवशूद्रःसुखमवाप्नुयादित्यत्रभाष्येस्त्रीशूद्रयोःश्रवणादेवफलंनतुपाठादित्युक्तं एतेनस्त्रीशूद्रयोर्गीताविष्णुसहस्रनामपाठोदोषायैवेतिज्ञेयं क्वचित्पौराणमंत्रयुक्तपूजायांस्त्रीशूद्रयोःस्वतोप्यधिकारउक्तःजपहोमादौविप्रद्वारैव म्लेच्छादीनांतुब्राह्मणद्वारापिजपहोमेसमंत्रकपूजायांचनाधिकारः किंतुतैस्तत्तदुपचाराणांदेवीमुद्दिश्यमनसोत्सर्गमात्रंकर्तव्यं ॥

ह्या नवरात्रकर्माचे ठिकाणीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्या चारहि वर्णाला अधिकार आहे. तसेंच म्लेच्छादिक यांलाहि अधिकार आहे. त्यामध्यें ब्राह्मणानें जप, होम, अन्नाचा बलि, नैवेद्य यांहींकरून सात्विक पूजा करावी. कारण, " मांसरहित नैवेद्यांनीं, ब्राह्मणानें मद्य अर्पण केलें असतां ब्राह्मण्यापासूनच भ्रष्ट होतो, मद्य प्राशन करण्याला, देण्याला अयोग्य आहे, " इत्यादिक निषेध आहे यास्तव मांस, मद्य इत्यादिकेंकरून युक्त जी राजसपूजा तिचेविषयीं ब्राह्मणाला अधिकार नाहीं; कारण, मद्यपान केलें असतां मरणांत प्रायश्चित्त करण्यास सांगितलें आहे, व स्पर्श झाला असतां तो अवयव तोडावा असें वचन आहे यास्तव अल्प प्रायश्चित्तानें दोषाचा नाश होत नसून पातित्य प्राप्त होतें. याप्रमाणेंच सर्व प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकार निश्चयानें लिहितात. जे अत्यंत नवीन असे भास्कररायप्रभृति ग्रंथकार तेहि सप्तशतीटीका इत्यादिक ग्रंथीं प्राचीन ग्रंथांला अनुसरून असेंच प्रतिपादन करितात, आणि सभेमध्येंहि हेंच मत सांगतात व आचरण तर दुसऱ्या प्रकारचें करितात; तेव्हां आपण जसा दुर्दैवानें ब्राह्मण्यापासून भ्रष्ट झालों तसा दुसरा न होवो अशा भूतदयेंकरून, किंवा आपला भ्रष्टपणा आच्छादित व्हावा या हेतूनें, अथवा दुसरे जे कलियुगांतील ब्राह्मण त्यांला अधिकार नाहीं ह्या दृष्टीनें ते तसें करितात यांतील खरेपणा कोणता तो आह्मी जाणत नाहीं. क्षत्रिय व वैश्य यांला मांसादिकांनीं युक्त असी जपहोमसहित जी राजसपूजा तीविषयींहि अधिकार आहे, तोहि अधिकार केवल कामनिक आहे, नित्य नाहीं. निष्काम अशा क्षत्रियादिकांनीं सात्त्विक पूजा केली असतां अतिशयेंकरून मोक्षादि फल मिळतें. याप्रमाणें शूद्रादिकांलाहि मिळतें. शूद्रादिकांनीं मंत्रहीन, जपादिकानें रहित, मांसादिक द्रव्यांनीं युक्त असी तामसपूजाहि करावी. शूद्रानें सप्तशती इत्यादिकाचा पाठ, होम यांहींयुक्त असी सात्त्विक पूजा ब्राह्मणाकडून करवावी. स्त्रिया व शूद्र इत्यादिकांला स्वतः पुराणसंबंधी मंत्रांचा पाठ करण्याविषयींहि अधिकार नाहीं, याकरितांच, " शूद्र सुख पावेल, " ह्या वाक्याचे ठिकाणीं भाष्यामध्यें स्त्रिया व शूद्र यांला श्रवणेंकरूनच फल आहे, पाठानें नाहीं, असें सांगि-

तलें. यावरून स्त्रिया व शूद्र यांनीं गीता, विष्णुसहस्रनाम यांचा पाठ केला असतां दोष प्राप्त होतो असेंच जाणावें. कितीएक ग्रंथांमध्यें स्त्रिया व शूद्र यांनीं स्वताहि पुराणसंबंधी मंत्र ह्मणून पूजा करावी असें सांगितलें आहे. जप, होम इत्यादिक करणें तें ब्राह्मणाकडून करवावें. म्लेच्छ इत्यादिकांला तर ब्राह्मणाकडूनाहि जप, होम, मंत्रयुक्त पूजा करण्याला अधिकार नाहीं. तर त्या म्लेच्छांनीं ते ते उपचार देवीच्या उद्देशानें मनेंकरून समर्पण करावे.

---

**अथनवरात्रेनुकल्पाः तृतीयादिनवम्यंतंसप्तरात्रंवाकर्तव्यं पंचम्यादिपंचरात्रंवासप्तम्यादित्रिरात्रंवा अष्टम्यादिद्विरात्रंवा एकाहपक्षेकेवलाष्टम्यांकेवलनवम्यांवा एषांपक्षाणांस्वस्वकुलाचारानुसारेणप्रतिबंधादिनापूर्वपूर्वपक्षासंभवानुसारेणवाव्यवस्था तत्रतृतीयापंचम्योर्निर्णयःप्रतिपदादिवत् सप्तम्यादिस्तुनिर्णयोवक्ष्यते नवरात्रादिपक्षेषुक्षयवृद्धिवशेनदिनाधिक्यन्यूनत्वेपूजाद्यावृत्तिःकार्या केचित्तुदिनक्षयेष्टावेवपूजाश्चंडीपाठांश्चकुर्वंति इदंदेवीपूजनात्मकंनवरात्रकर्मनित्यंअकरणेदोषश्रवणात् फलश्रवणात्काम्यंच ॥**

## आतां नवरात्राचे गौणपक्ष सांगतों.

तृतीयेपासून नवमीपर्यंत सात रात्रीपर्यंत नवरात्र करावें. अथवा पंचमीपासून नवमीपर्यंत पांच रात्री नवरात्र करावें. किंवा सप्तमीपासून नवमीपर्यंत तीन रात्री करावें. अथवा अष्टमीपासून नवमीपर्यंत दोन रात्री करावें. एक दिवस करणें असेल तर केवल अष्टमीचे दिवसीं किंवा केवल नवमीचे दिवसीं करावें. ह्या सर्व पक्षांची व्यवस्था आपापल्या कुलाचा जसा आचार असेल त्याप्रमाणें किंवा कांहींएक प्रतिबंधादिकानें पाहिल्या पहिल्या पक्षाचा संभव नसेल त्याप्रमाणें जाणावी. त्यामध्यें तृतीया व पंचमी यांचा निर्णय प्रतिपदेप्रमाणें करावा. सप्तमी इत्यादिकांचा निर्णय सांगेन. नऊ रात्रि, सात रात्रि इत्यादिक जे पूर्वी पक्ष सांगितले त्यांचे ठिकाणीं दिनक्षय किंवा दिनवृद्धि यांच्या योगानें दिवसांमध्यें कमी ज्यास्ती दिवस झाले असतां पूजा इत्यादिकांची आवृत्ति करावी. कितीएक जन तर, दिनक्षय झाला असतां पूजा व चंडीपाठ हे आठ आठ करितात. हें देवीपूजनरूप नवरात्र कर्म, न केलें असतां दोष सांगितला आहे, व केलें असतां फल सांगितलें आहे यास्तव नित्य व कामनिक असें दोन प्रकारचें आहे.

---

**अत्रनवरात्रेघटस्थापनंप्रातर्मध्यान्हेप्रदोषकालेचेतित्रिकालंद्विकालमेककालंवास्वस्वकुलदेवतापूजनंसप्तशत्यादिजपोऽखंडदीपःआचारप्राप्तमालाबंधनंउपवासनक्तैकभक्तादिनियमःसुवासिनीभोजनंकुमारीभोजनपूजनादिअंतेसप्तशत्यादिस्तोत्रमंत्रहोमादितिइत्येतानिविहितानि एतेषांमध्येक्वचित्कुलेघटस्थापनादीनिद्वित्रादीन्येवानुष्ठीयंतेनसर्वाणि क्वचित् घटस्थापनादिरहितानिकानिचित्क्वचित्सर्वाण्येवेत्येतेषांसमुच्चयविकल्पौ कुलाचारानुसारेणव्यवस्थितौज्ञेयौ कुलपरंपराप्राप्तादधिकंशक्तिसत्त्वेपिनानुष्ठेयमितिशिष्टाचारः फलकामनयाप्रार्थितमुपवासादिकंकुलाचाराभावेपिकुर्वंति इदंकलशस्थापनंरात्रौनकार्यं तत्रकलशस्थापनार्थंशुद्धमृदावेदिकांकृत्वापंचपल्लवदूर्वाफलतांबूलकुंकुमधूपादिसंभारान्संपादयेत् ॥**

दौप्राचीनग्रंथाननुसृत्यैवमेवपरिष्कुर्वंति सभायांचैतन्मतमेवश्लाघंतेचआचरणंत्वन्यथाकुर्वं ति तत्किंस्वयंदुर्दैववशेनब्राह्मण्यभ्रष्टोभूवमन्योप्येवंमाभूवन्निति भूतदययावास्वपातित्यगोप नायवान्येषांकलियुगस्थविप्राणामधिकाराभावालोचनयावेतिनवयंतत्त्वंजानीमः क्षत्रियवैश्य योर्मांसादियुतजपहोमसहितराजसपूजायामप्यधिकारः सचकेवलंकाम्यएवनतुनित्यः नि ष्कामक्षत्रियादेःसात्त्विकपूजाकरणेमोक्षादिफलातिशयः एवंशूद्रादेरपि शूद्रादेर्मंत्रहीनाज पादिरहितामांसादिद्रव्यकातामसपूजापिविहिता शूद्रेणसप्तशत्यादिजपहोमसहितासात्त्वि कीपूजाब्राह्मणद्वाराकार्या स्त्रीशूद्रादेःस्वतःपौराणमंत्रपाठेपिनाधिकारः अतएवशूद्रःसुखमवा प्नुयादित्यत्रभाष्येस्त्रीशूद्रयोःश्रवणादेवफलंनतुपाठादित्युक्तं एतेनस्त्रीशूद्रयोर्गीताविष्णुसहस्र नामपाठोदोषायैवेतिज्ञेयं क्वचित्पौराणमंत्रयुक्तपूजायांस्त्रीशूद्रयोःस्वतोप्यधिकारउक्तःजपहो मादौविप्रद्वारैव म्लेच्छादीनांतुब्राह्मणद्वारापिजपहोमेसमंत्रकपूजायांचनाधिकारः किंतुतैस्त त्तदुपचाराणांदेवीमुद्दिश्यमनसोत्सर्गमात्रंकर्तव्यं ॥

ह्या नवरात्रकर्माचे ठिकाणीं ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्या चारहि वर्णांला अधिकार आहे. तसेंच म्लेच्छादिक यांलाहि अधिकार आहे. त्यामध्यें ब्राह्मणानें जप, होम, अन्नाचा बलि, नैवेद्य यांहींकरून सात्त्विक पूजा करावी. कारण, “ मांसरहित नैवेद्यांनीं, ब्राह्मणानें मद्य अर्पण केलें असतां ब्राह्मण्यापासूनच भ्रष्ट होतो, मद्य प्राशन करण्याला, देण्याला अयोग्य आहे, ” इत्यादिक निषेध आहे यास्तव मांस, मद्य इत्यादिकेंकरून युक्त जी राजसपूजा तिचेविषयीं ब्राह्मणाला अधिकार नाहीं; कारण, मद्यपान केलें असतां मरणांत प्रायश्चित्त करण्यास सांगितलें आहे, व स्पर्श झाला असतां तो अवयव तोडावा असें वचन आहे यास्तव अल्प प्रायश्चित्तानें दोषाचा नाश होत नसून पातित्य प्राप्त होतें. याप्रमाणेंच सर्व प्राचीन व अर्वाचीन ग्रंथकार निश्चयानें लिहितात. जे अत्यंत नवीन असे भास्कररायप्रभृति ग्रंथकार तेहि सप्तशतीटीका इत्यादिक ग्रंथीं प्राचीन ग्रंथांला अनुसरून असेंच प्रतिपादन करितात, आणि सभेमध्येंहि हेंच मत सांगतात व आचरण तर दुसऱ्या प्रकारचें करितात; तेव्हां आपण जसा दुर्दैवानें ब्राह्मण्यापासून भ्रष्ट झालों तसा दुसरा न होवो अशा भूतदयेंकरून, किंवा आपला भ्रष्टपणा आच्छादित व्हावा या हेतूनें, अथवा दुसरे जे कलियुगांतील ब्राह्मण त्यांला अधिकार नाहीं ह्या दृष्टीनें ते तसें करितात यांतील खरेपणा कोणता तो आह्मी जाणत नाहीं. क्षत्रिय व वैश्य यांला मांसादिकांनीं युक्त असी जपहोमसहित जी राजसपूजा तीविषयींहि अधिकार आहे, तोहि अधिकार केवल कामनिक आहे, नित्य नाहीं. निष्काम अशा क्षत्रियादिकांनीं सात्त्विक पूजा केली असतां अतिशयेंकरून मोक्षादि फल मिळतें. याप्रमाणें शूद्रादिकांलाहि मिळतें. शूद्रादिकांनीं मंत्रहीन, जपादिकानें रहित, मांसादिक द्रव्यांनीं युक्त असी तामसपूजाहि करावी. शूद्रानें सप्तशती इत्यादिकाचा पाठ, होम यांहींयुक्त असी सात्त्विक पूजा ब्राह्मणाकडून करवावी. स्त्रिया व शूद्र इत्यादिकांला स्वतः पुराणसंबंधी मंत्रांचा पाठ करण्याविषयींहि अधिकार नाहीं, याकरितांच, “ शूद्र सुख पावेल, ” ह्या वाक्याचे ठिकाणीं भाष्यामध्यें स्त्रिया व शूद्र यांला श्रवणेंकरूनच फल आहे, पाठानें नाहीं, असें सांगि-

तलें. यावरून स्त्रिया व शूद्र यांनीं गीता, विष्णुसहस्रनाम यांचा पाठ केला असतां दोष प्राप्त होतो असेंच जाणावें. कितीएक ग्रंथांमध्यें स्त्रिया व शूद्र यांनीं स्वताहि पुराणसंबंधी मंत्र ह्मणून पूजा करावी असें सांगितलें आहे. जप, होम इत्यादिक करणें तें ब्राह्मणाकडून करवावें. म्लेच्छ इत्यादिकांला तर ब्राह्मणाकडूनाहि जप, होम, मंत्रयुक्त पूजा करण्याला अधिकार नाहीं. तर त्या म्लेच्छांनीं ते ते उपचार देवीच्या उद्देशानें मनेंकरून समर्पण करावे.

---

अथनवरात्रेनुकल्पाः तृतीयादिनवम्यंतंसप्तरात्रंवाकर्तव्यं पंचम्यादिपंचरात्रंवासप्तम्यादित्रिरात्रंवा अष्टम्यादिद्विरात्रंवा एकाहपक्षेकेवलाष्टम्यांकेवलनवम्यांवा एषांपक्षाणांस्वस्वकुलाचारानुसारेणप्रतिबंधादिनापूर्वपूर्वपक्षासंभवानुसारेणवाव्यवस्था तत्रतृतीयापंचम्योर्निर्णयःप्रतिपदादिवत् सप्तम्यादिस्तुनिर्णयोवक्ष्यते नवरात्रादिपक्षेषुक्षयवृद्धिवशेनदिनाधिक्यन्यूनत्वेपूजाद्यावृत्तिःकार्या केचित्तुदिनक्षयेष्टावेवपूजाश्चंडीपाठांश्चकुर्वंति इदंदेवीपूजनात्मकंनवरात्रकर्मनित्यंअकरणेदोषश्रवणात् फलश्रवणात्काम्यंच ॥

## आतां नवरात्राचे गौणपक्ष सांगतों.

तृतीयेपासून नवमीपर्यंत सात रात्रीपर्यंत नवरात्र करावें. अथवा पंचमीपासून नवमीपर्यंत पांच रात्री नवरात्र करावें. किंवा सप्तमीपासून नवमीपर्यंत तीन रात्री करावें. अथवा अष्टमीपासून नवमीपर्यंत दोन रात्री करावें. एक दिवस करणें असेल तर केवल अष्टमीचे दिवसीं किंवा केवल नवमीचे दिवसीं करावें. ह्या सर्व पक्षांची व्यवस्था आपापल्या कुलाचा जसा आचार असेल त्याप्रमाणें किंवा कांहींएक प्रतिबंधादिकानें पहिल्या पहिल्या पक्षाचा संभव नसेल त्याप्रमाणें जाणावी. त्यामध्यें तृतीया व पंचमी यांचा निर्णय प्रतिपदेप्रमाणें करावा. सप्तमी इत्यादिकांचा निर्णय सांगेन. नऊ रात्रि, सात रात्रि इत्यादिक जे पूर्वीं पक्ष सांगितले त्यांचे ठिकाणीं दिनक्षय किंवा दिनवृद्धि यांच्या योगानें दिवसांमध्यें कमी ज्यास्ती दिवस झाले असतां पूजा इत्यादिकांची आवृत्ति करावी. कितीएक जन तर, दिनक्षय झाला असतां पूजा व चंडीपाठ हे आठ आठ करितात. हें देवीपूजनरूप नवरात्र कर्म, न केलें असतां दोष सांगितला आहे, व केलें असतां फल सांगितलें आहे यास्तव नित्य व कामनिक असें दोन प्रकारचें आहे.

---

अत्रनवरात्रेघटस्थापनंप्रातर्मध्यान्हेप्रदोषकालेचेतित्रिकालंद्विकालमेककालंवास्वस्वकुलदेवतापूजनंसप्तशत्यादिजपोऽखंडदीपःआचारप्राप्तमालाबंधनंउपवासनक्तैकभक्तादिनियमःसुवासिनीभोजनंकुमारीभोजनपूजनादिअंतेसप्तशत्यादिस्तोत्रमंत्रहोमादितिइत्येतानिविहितानि एतेषांमध्येक्वचित्कुलेघटस्थापनादीनिद्वित्रादीन्येवानुष्ठीयंतेनसर्वाणि क्वचित्घटस्थापनादिरहितानिकानिचित्क्वचित्सर्वाण्येवेत्येतेषांसमुच्चयविकल्पौ कुलाचारानुसारेणव्यवस्थितौज्ञेयौ कुलपरंपराप्राप्तादधिकंशक्तिसत्त्वेपिनानुष्ठेयमितिशिष्टाचारः फलकामनयाप्रार्थितमुपवासादिकंकुलाचाराभावेपिकुर्वंति इदंकलशस्थापनंरात्रौनकार्यं तत्रकलशस्थापनार्थंशुद्धमृदावेदिकांकृत्वापंचपल्लवदूर्वाफलतांबूलकुंकुमधूपादिसंभारान्संपादयेत् ॥

ह्या नवरात्रामध्यें घटस्थापना करणें; प्रातःकालीं, मध्यान्हकालीं आणि प्रदोषकालीं याप्रमाणें तीन वेळ दोन वेळ किंवा एक वेळ असें आपापल्या कुलदेवतेचें पूजन करणें; सप्तशती इत्यादिकांचा जप; अखंड दीप; आपल्या आचाराप्रमाणें माळा बांधणें; उपोषण, नक्त, एकभुक्त इत्यादिक नियम धारण करणें; सुवासिनीला भोजन देणें; कुमारीचें भोजन, पूजन इत्यादिक करणें; आणि शेवटच्या दिवसीं सप्तशती इत्यादिक स्तोत्राच्या मंत्राचा जप करून होम इत्यादिक करणें, याप्रमाणें हीं कृत्यें सांगितलीं आहेत. ह्यांमध्यें कितीएक कुलांचे ठिकाणीं घटस्थापनादिक दोन किंवा तीनच करितात, सर्व करीत नाहींत. क्वचित् ठिकाणीं घटस्थापनेवांचून कितीएक करितात. क्वचित् ठिकाणीं सर्वच करितात. याप्रमाणें हीं सर्व करावीं किंवा त्यांतून कितीएक करावीं, ह्याची व्यवस्था जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें जाणावी. कुलपरंपरेनें जें प्राप्त झालें असेल त्याहून अधिक, शक्ति असली तथापि करूं नये, असा शिष्टांचा आचार आहे. फलाच्या इच्छेनें नवसलेलें असें उपोषण इत्यादिक, कुलाचार नसला तथापि करतात. हें कलशस्थापन रात्रीचे ठिकाणीं करूं नये. कलशस्थापनाकरितां शुद्ध अशा मृत्तिकेनें वेदी करून पंचपल्लव, दूर्वा, फलें, तांबूल, कुंकुम, धूप दीप इत्यादिक साहित्य मिळवावें.

---

अथसंक्षेपतोनवरात्रारंभप्रयोगः प्रतिपदिप्रातःकृताभ्यंगस्नानःकुंकुमचंदनादिकृतपुंड्रो धृतपवित्रःसपत्नीकोदशघटिकामध्येऽभिजिन्मुहूर्तेवादेशकालौसंकीर्त्य ममसहकुटुंबस्यामुकदेवताप्रीतिद्वारासर्वापच्छांतिपूर्वकदीर्घायुर्धनपुत्रादिवृद्धिशत्रुजयकीर्तिलाभप्रमुखचतुर्विधपुरुषार्थसिद्ध्यर्थमद्यप्रभृति महानवमीपर्यंतंप्रत्यहंत्रिकालमेककालंवामुकदेवतापूजामुपवासनक्तैकभक्तान्यतमनियमसहितामखंडदीपप्रज्वालनंकुमारीपूजनं चंडीसप्तशतीपाठंसुवासिन्यादिभोजनमित्यादि यावत्कुलाचारप्राप्तमनूद्यएवमादिरूपंशारदनवरात्रोत्सवाख्यंकर्मकरिष्येदेवतापूजांगत्वेनघटस्थापनंचकरिष्ये तदादौनिर्विघ्नतासिद्ध्यर्थंगणपतिपूजनंपुण्याहवाचनं चंडीसप्तशतीजपाद्यर्थंब्राह्मणवरणंचकरिष्ये एतानिकृत्वा घटस्थापनसत्त्वेमहीद्यौरितिभूमिंस्पृष्ट्वातस्यांभुविअंकुरारोहणार्थं शुद्धमृदंप्रक्षिप्य ओषधयःसमितितस्यांमृदियवादीन्प्रक्षिप्य आकलशेष्वितिकुंभंनिधायइमंमेगंगेइतिजलेनापूर्यगंधद्वारामितिगंधं याओषधीरितिसर्वौषधीः कांडात्कांडादितिदूर्वाःअश्वत्थेवइतिपंचपल्लवान्स्योनापृथिवीतिमृदः याःफलिनीरितिफलं सहिरत्नानीतिहिरण्यरूपइतिरत्नहिरण्येप्रक्षिप्ययुवासुवासाइतिसूत्रेणावेष्ट्यपूर्णादर्वीतिपूर्णपात्रंनिधायतत्त्वायामीतिवरुणंसंपूज्यतत्कलशोपरिकुलदेवताप्रतिमांसंस्थाप्यपूजयेत् स्वस्थानेएववासंस्थाप्यपूजयेत् तद्यथा जयंतीमंगलाकालीभद्रकालीकपालिनी दुर्गाक्षमाशिवाधात्रीस्वाहास्वधानमोस्तुते आगच्छवरदेदेविदैत्यदर्पनिषूदनि पूजांगृहाणसुमुखिनमस्तेशंकरप्रिये अनेनपुरुषसूक्तश्रीसूक्तप्रथमऋग्भ्यांचावाह्यजयंतीमंगलाकालीतिमंत्रेणसूक्तऋग्भिश्चासनादिषोडशोपचारैःसंपूजयेत् सर्वमंगलमांगल्येइत्यादिभिःसंप्रार्थ्यप्रत्यहंबलिदानपक्षेमाषभक्तेनकूष्मांडेनवाबलिंदद्यात् अंतेएववाबलिदानंनवाबलिदानं ततःअखंडदीपकंदेव्याःप्रीतयेनवरात्रकं उज्ज्वालयेअहोरात्रमेकचित्तोधृतव्रतइत्यखंडदीपंप्रतिष्ठापयेत् ॥

# आतां संक्षेपानें नवरात्राच्या आरंभाचा प्रयोग सांगतों.

प्रतिपदेचे दिवसीं प्रातःकालीं अभ्यंग स्नान करून केशर, चंदन इत्यादिकानें टिळक लावून हातामध्यें पवित्रक धारण केलेला होत्साता स्त्रियेसहवर्तमान असा दहा घटिकापरिमित कालीं किंवा अभिजिन्मुहूर्ताचे ठिकाणीं देशकालांचें कीर्तन करून, "**मम सहकुटुंबस्यामुकदेवताप्रीतिद्वारा सर्वापच्छांतिपूर्वक दीर्घायुर्धनपुत्रादिवृद्धिशत्रुजयकीर्तिलाभप्रमुखचतुर्विध पुरुषार्थसिद्ध्यर्थं अद्यप्रभृति महानवमीपर्यंतं प्रत्यहं त्रिकालमेककालं वाऽमुकदेवतापूजामुपवासनक्तैकभक्तान्यतमनियमसहितामखंडदीपप्रज्वालनं कुमारीपूजनं चंडीसप्तशतीपाठं सुवासिन्यादिभोजनमित्यादि यावत्कुलाचारप्राप्तमनूद्य एवमादिरूपं शारदनवरात्रोत्सवाख्यं कर्म करिष्ये देवतापूजांगत्वेन घटस्थापनं च करिष्ये, तदादौ निर्विघ्नतासिद्ध्यर्थं गणपतिपूजनं पुण्याहवाचनं चंडीसप्तशतीजपाद्यर्थं ब्राह्मणवरणं च करिष्ये,**" याप्रमाणें संकल्प करून गणपतिपूजन, पुण्याहवाचन आणि चंडीसप्तशतीपाठाकरितां ब्राह्मणवरण हीं करावीं. घटस्थापन असेल तर "**महीद्यौः०**" या मंत्रानें भूमीला स्पर्श करून त्या भूमीचे ठिकाणीं अंकुर रुजण्याकरितां शुद्ध असी मृत्तिका घालावी, नंतर "**ओषधयःसं०**" या मंत्रानें त्या मृत्तिकेवर यव इत्यादिक पेरावे. नंतर "**आकलशेषु०**" या मंत्रानें कलश ठेवून "**इमंमेगंगे०**" या मंत्रानें उदकेंकरून कलश भरावा. मग "**गंधद्वारां०**" या मंत्रानें गंध कलशांत घालावें. "**याओषधीः०**" या मंत्रानें सर्वौषधी[1] कलशांत घालाव्या. "**कांडात्कांडात्०**" या मंत्रानें दूर्वा कलशांत घालाव्या. "**अश्वत्थेव०**" या मंत्रानें पंचपल्लव कलशांत घालावे. "**स्योनापृथिवि०**" या मंत्रानें सप्तमृत्तिका[2] कलशांत टाकाव्या. "**याःफलिनी०**" या मंत्रानें फल. "**सहिरत्नानि०**" या मंत्रानें पंचरत्नें[3] कलशांत टाकावीं, "**हिरण्यरूप०**" या मंत्रानें हिरण्य कलशांत टाकावें. "**युवासुवासाः०**" या मंत्रानें कलशाला सूत्राचें वेष्टन द्यावें. "**पूर्णादर्वि०**" या मंत्रानें कलशावर पूर्णपात्र ठेवून "**तत्त्वायामि०**" या मंत्रानें वरुणाची पूजा करून त्या कलशावर पूर्णपात्राचे ठिकाणीं कुलदेवतेच्या प्रतिमेची स्थापना करून पूजा करावी. अथवा जेथें जें देवीचें स्थान असेल तेथेंच स्थापना करून पूजा करावी. ती असी,—"**जयंती मंगला काली भद्रकाली कपालिनी ॥ दुर्गा क्षमा शिवा धात्री स्वाहा स्वधा नमोस्तु ते ॥ आगच्छ वरदे देवि दैत्यदर्पनिषूदनि ॥ पूजां गृहाण सुमुखि नमस्ते शंकरप्रिये ॥**" ह्या मंत्रांनीं व पुरुषसूक्त आणि श्रीसूक्त ह्यांच्या प्रथम ऋचांनीं आवाहन करून "**जयंती मंगला काली०**" या मंत्रानें आणि सूक्तांच्या ऋचांनीं आसनादिक सोळा उपचारांनीं पूजा करावी. नंतर "**सर्वमंगलमांगल्ये०**" इत्यादिक मंत्रांनीं प्रार्थना करून, दररोज बलिदान करणें असेल तर माष ( उडीद ) मिश्रित भाताचा किंवा कूष्मांडाचा बलि द्यावा. अथवा शेवटींच बलिदान क-

---

१ कुष्ट, मांसी, हळद, आंबेहळद, वेखंड, चंपक, चंदन, दगडफूल, नागरमोथा, मुरा. २ हत्ती, अश्व, राजद्वार, वारुळ, चवाठा, ऱ्हद, गोष्ठ या स्थानच्या मृत्तिका. ३ सुवर्ण, हिरा, पोंवळें, मौक्तिक, नील.

रावें किंवा करूं नये. नंतर " अखंडदीपकं देव्याः प्रीतये नवरात्रकं ॥ उज्ज्वालये अ-होरात्रमेकचित्तो धृतव्रतः " यां मंत्रानें अखंड दीप स्थापावा.

---

अथचंडीपाठप्रकारः यजमानेनवृतोहंचंडीसप्तशतीपाठंनारायणहृदयलक्ष्मीहृदयपाठं वाकरिष्येइत्यादिसंकल्प्यआसनादिविधायआधारेअन्यहस्तलिखितंपुस्तकं स्थापयित्वा ना. रायणंनमस्कृत्येतिवचनात् ॐनारायणायनमः नरायनरोत्तमायनमः देव्यैसरस्वत्यैनमः व्यासायनमः इतिनमस्कृत्यप्रणवमुच्चार्यसर्वेपाठांतेप्रणवंपठेत् पुस्तकवाचनेनियमाः हस्तेपुस्तकं नधारयेत् स्वयंब्राह्मणभिन्नेनचलिखितंविफलं अध्यायंप्राप्यविरमेन्नतुमध्येकदाचन कृतेविरामेमध्येतुआध्यायादिपठेत्पुनः ग्रंथार्थंबुध्यमानःस्पष्टाक्षरंनातिशीघ्रंनातिमंदंरसभावस्वरयुतंवाचयेत् त्रिवर्गफलकामेनचंडीपाठःसदैवकर्तव्यः तस्मान्ममैतन्माहात्म्यंपठितव्यंसमाहितैः श्रोतव्यंचसदाभक्त्येत्यादिवचनात् नैमित्तिकपाठोप्युक्तः शांतिकर्मणिसर्वत्रतथादुःस्वप्नदर्शने ग्रहपीडासुचोग्रासुमाहात्म्यंशृणुयान्ममेत्यादि तथा अरण्येप्रांतरेवापिदावाग्निपरिवारितः दस्युभिर्वावृतःशून्येगृहीतोवापिशत्रुभिरित्यादिसंकटान्युद्दिश्य सर्वबाधासुचोग्रासु वेदनाभ्यर्दितोपिवा स्मरन्ममैतन्माहात्म्यंनरोमुच्येतसंकटादित्युक्तं उपसर्गोपशांत्यर्थंत्रयः पाठाःकार्याः ग्रहपीडाशांतयेपंच महाभयेसप्त शांत्यर्थंवाजपेयफलार्थंचनव राजवश्यार्थमेकादश वैरनाशार्थंद्वादश स्त्रीपुंसवश्यतार्थंचतुर्दश सौख्यायलक्ष्म्यर्थंचपंचदश पुत्रपौत्रधनधान्यार्थंषोडश राजभयनाशायसप्तदश उच्चाटनायाष्टादशवनभयेविंशतिः बंधमोचनायपंचविंशतिः दुश्चिकित्स्यरोगकुलोच्छेदायुर्नाशवैरिवृद्धिव्याधिवृद्धित्रिविधोत्पातादिमहासंकटनाशोराज्यवृद्धिश्चशतावृत्तिभिः सहस्रावर्तनैःशताश्वमेधफलंसर्वमनोरथावाप्तिर्मोक्षश्चेतिवाराहीतंत्रेउक्तं सर्वत्रकाम्यपाठेआदौसंकल्पपूर्वकंपूजनमंतेबलिदानंचकार्यं अत्राचारादृग्वेदपारायणमपिकार्यं तद्विधिर्बौधायनोक्तःकौस्तुभेज्ञेयः ॥

## आतां चंडीपाठाचा विधि सांगतों.

ब्राह्मणानें आचमन, प्राणायाम करून " यजमानेन वृतोहं चंडीसप्तशतीपाठं नारायण-हृदयलक्ष्मीहृदयपाठं वा करिष्ये," असा संकल्प करून आसनादिक विधि करून पीठा-वर दुसऱ्याकडून लिहिवलेलें असें पुस्तक स्थापन करून "नारायणाला नमस्कार करून" असें वचन आहे याकरितां " ॐ नारायणाय नमः, नराय नरोत्तमाय नमः, देव्यै सरस्वत्यै नमः, व्यासाय नमः " याप्रमाणें नमस्कार करून ॐकाराचा उच्चार करून सर्व पाठ झाल्यानं-तर ॐकाराचा उच्चार करावा. पुस्तक वाचण्याचे नियम सांगतात.—हातांत पुस्तक धरूं नये. आपण स्वतां, किंवा ब्राह्मणावांचून अन्य जातीनें लिहिलेलें पुस्तक व्यर्थ. " अध्याय समाप्त झाल्यावर विराम करावा, मध्यें कदापि विराम करूं नये. मध्यें विराम केला असतां अध्याय इत्यादिक पुनः पठण करावा." ग्रंथाचा अर्थ जाणत होत्साता स्पष्टाक्षर, फार त्वरारहित व अति मांद्यरहित आणि रस, भाव, स्वर यांहीं युक्त असें पुस्तक वाचावें. धर्म, अर्थ, काम यांच्या फलाची इच्छा करणारा त्यानें सर्वकाळ पाठ करावा; कारण, " ज्यांचें मन स्थिर

अशा मनुष्यांनीं माझें हें माहात्म्य पठन करावें, व सर्वकाल भक्तीकरून श्रवणहि करावें, इत्यादिक वचन आहे. कांहीं निमित्त प्राप्त झालें असतांहि पाठ करावा. "सर्व शांतिकर्म तसेंच दुष्ट स्वप्न व उग्र अशा ग्रहपीडा हीं प्राप्त असतां माझें माहात्म्य श्रवण करावें. तसेंच, अरण्यांत किंवा शून्यस्थानीं वणव्यानें वेष्टित होईल, अथवा चोरांनीं शून्य स्थलीं ग्रस्त केला किंवा शत्रूंनीं धरला," इत्यादिक संकटांच्या उद्देशेंकरून, "उग्र अशा सर्व पीडांचे ठिकाणीं माझें माहात्म्य स्मरण करावें. अथवा वेदनेनें पीडित होत्साता मनुष्य माझें हें माहात्म्य स्मरण करील तर संकटापासून मुक्त होईल," असें सांगितलें आहे. अशुभसूचक उपद्रवाच्या नाशाकरितां तीन पाठ करावे. ग्रहपीडेच्या नाशार्थ पांच. महाभयनाशार्थ सात. शांतीकरितां व वाजपेय नामक यज्ञफलाची प्राप्ति होण्याकरितां नऊ. राजा वश होण्याकरितां अकरा. शत्रूचा नाश होण्याकरितां बारा. स्त्रीपुरुष वश होण्याकरितां चवदा. सुख, लक्ष्मी यांच्या प्राप्तीकरितां पंधरा. पुत्र, नातू, धन, धान्य यांच्या प्राप्तीकरितां सोळा. राजभयाच्या नाशार्थ सतरा. उच्चाटनाकरितां अठरा. वनसंबंधी भयाच्या नाशार्थ वीस. बंधनापासून सुटण्याकरितां पंचवीस. महारोग, कुलाचा उच्छेद, आयुर्नाश, शत्रुवृद्धि, व्याधिवृद्धि, तीन प्रकारचे उत्पात, इत्यादिक महासंकटाच्या नाशाकरितां व राज्याच्या वृद्धीकरितां शतचंडी करावी. एक सहस्र पाठ केले असतां शंभर अश्वमेधांचें फल, सर्व मनोरथप्राप्ति आणि मोक्ष हीं प्राप्त होतात, असें वाराहीतंत्रांत सांगितलें आहे. सर्वत्र कामनिक पाठाचे ठिकाणीं पूर्वी संकल्प करून पूजा व शेवटीं बलिदान हीं करावीं. ह्या नवरात्रकर्मामध्यें आचार असेल तर वेदपारायण सुद्धां करावें, त्या वेदपारायणाचा विधि बौधायनसूत्रांत सांगितलेला कौस्तुभांत सांगितला आहे.

---

अथकुमारीपूजा एकवर्षातुयाकन्यापूजार्थतांविवर्जयेत् द्विवर्षकन्यामारभ्यदशवर्षावधिकुमारीणांक्रमेणकुमारिकात्रिमूर्तिः कल्याणीरोहिणीकालीचंडिकाशांभवीदुर्गाभद्रेतिनामानि आसांकुमारीणांप्रत्येकंपूजामंत्राःफलविशेषाःलक्षणानिचान्यत्रज्ञेयानि ब्राह्मणेनब्राह्मणीत्येवंसवर्णाप्रशस्ता विजातीयापिक्वचित्कामनाविशेषेणोक्ता एकैकवृद्ध्याप्रत्यहमेकावाकुमारीपूज्या मंत्राक्षरमयींलक्ष्मींमातृणांरूपधारिणीं नवदुर्गात्मिकांसाक्षात्कन्यामावाहयाम्यहं जगत्पूज्येजगद्वंद्येसर्वशक्तिस्वरूपिणि पूजांगृहाणकौमारिजगन्मातर्नमोस्तुते इतिमंत्रेणपादक्षालनपूर्वकंवस्त्रकुंकुमगंधधूपदीपभोजनैःपूजयेदितिसंक्षेपः कुमारीपूजावद्देवीपूजाचंडीपाठश्चैकोत्तरवृद्ध्यापिविहितः भवानीसहस्रनामपाठोपिक्वचिदुक्तः अयंशारदनवरात्रोत्सवोमलमासेनिषिद्धः शुक्रास्तादौतुभवति प्रथमारंभस्तुनकार्यः शावाशौचजननाशौचयोस्तुसर्वोपिघटस्थापनादिविधिर्ब्राह्मणद्वाराकार्यः केचिदारंभोत्तरंमध्येआशौचपातेस्वयमेवारब्धंपूजादिकंकार्यमित्याहुः शिष्टास्त्वाशौचेपूजादेवतास्पर्शादेर्लोकविद्विष्टत्वादन्येनैवकारयंति अपरे तृतीयादिपंचम्यादिसप्तम्याद्यनुकल्पेननवरात्रविधीनांसत्त्वात्प्रतिपद्याशौचे तृतीयाद्यनुकल्पाश्रयणंकुर्वंति सर्वथालोपप्रसक्तावेवब्राह्मणद्वाराकुर्वंति उपवासादिशारीरनियमःस्वयंकार्यः

**एवंरजस्वलापिउपवासादिकंस्वयंकृत्वापूजादिकमन्येनकारयेत् अत्रसभर्तृकस्त्रीणांउपवासेगंधतांबूलादिग्रहणंनदोषायेत्याहुः ॥**

## आतां कुमारीपूजेचा विधि सांगतों.

"एक वर्षाच्या वयाची कन्या पूजेला वर्ज्य करावी." दोन वर्षांच्या वयाची कन्या तीपासून दहा वर्षांपर्यंत वयाच्या कुमारींचीं क्रमानें नामें सांगतात—दोन वर्षांची ती कुमारिका, तीन वर्षांची ती त्रिमूर्ति, चार वर्षांची ती कल्याणी, पांच वर्षांची रोहिणी, सहा वर्षांची काली, सात वर्षांची चंडिका, आठ वर्षांची शांभवी, नऊ वर्षांची दुर्गा, दहा वर्षांची भद्रा, याप्रमाणें नऊ कन्यांचीं नऊ नांवें जाणावीं. ह्या कुमारींचे निरनिराळे पूजामंत्र, फलांचे विशेष आणि त्या कुमारींचीं लक्षणें हीं सर्व दुसऱ्या ग्रंथांत पाहावीं. ब्राह्मणानें ब्राह्मणी कुमारी पूजावी, याप्रमाणें आपल्या वर्णांतील कुमारी प्रशस्त जाणावी. क्वचित् ग्रंथीं कामनेच्या भेदानें विजातीय सुद्धां सांगावी असें सांगितलें आहे. दररोज एकेक अधिक किंवा दररोज एक असी कुमारी पूजावी. कुमारीचे पूजेचा मंत्र—"**मंत्राक्षरमयीं लक्ष्मीं मातृणां रूपधारिणीं ॥ नवदुर्गात्मिकां साक्षात्कन्यामावाहयाम्यहं ॥ जगत्पूज्ये जगद्वंद्ये सर्वशक्तिस्वरूपिणि ॥ पूजां गृहाण कौमारि जगन्मातर्नमोस्तु ते,**" या मंत्रेंकरून पादप्रक्षालनपूर्वक वस्त्र, कुंकुम, गंध, धूप, दीप, भोजन यांहींकरून पूजा करावी, याप्रमाणें संक्षेप सांगितला. जसी कुमारीपूजा दररोज एकेक अधिक त्याप्रमाणें पूजा, चंडीपाठ हेहि दररोज एकेक अधिक असेहि करावे. क्वचित् ग्रंथीं भवानीसहस्रनामाचाहि पाठ करावा असें आहे. हा शरदृतुसंबंधी नवरात्राचा उत्सव मलमासाचे ठिकाणीं करूं नये. गुरुशुक्रांच्या अस्तादिकांचे ठिकाणीं तर होतो. नवीनच आरंभ असेल तर अस्तादिकांत करूं नये. मृताशौच व जननाशौच यांचे ठिकाणीं घटस्थापन इत्यादिक सर्व विधि ब्राह्मणाकडून करवावा. कोणी ग्रंथकार तर आरंभ झाल्यानंतर मध्यें आशौच प्राप्त झालें असतां आपण आरंभलेलें पूजा इत्यादिक कृत्य करावें, असें सांगतात. आशौचामध्यें पूजा, देवतेला स्पर्श इत्यादिक केलें असतां तें लोकांमध्यें निंदास्पद होतें याकरितां शिष्टजन तें दुसऱ्याकडूनच करवितात. दुसरे कोणी तर, गौणपक्षानें नवरात्राचे विधि तृतीयेपासून, पंचमीपासून आणि सप्तमीपासून इत्यादिक सांगितले आहेत; यास्तव प्रतिपदेचे दिवशीं आशौच आलें असतां तृतीया इत्यादिक गौणपक्षांचा आश्रय करितात, ह्मणजे तृतीया इत्यादिक दिवसांपासून नवरात्राला आरंभ करितात, आणि सर्वथा लोप होत असेल तरच ब्राह्मणाकडून करवितात. ह्या नवरात्राचे ठिकाणीं उपोषण इत्यादिक शरीरसंबंधी नियम आपण करावे. याप्रमाणें रजस्वला स्त्री असेल तिणें सुद्धां उपोषण इत्यादिक आपण करून पूजा इत्यादिक दुसऱ्याकडून करवावें. ह्या नवरात्रामध्यें सौभाग्यवती स्त्रियांनीं उपोषणाचे दिवशीं सुगंधद्रव्यें, तांबूल इत्यादिकांचा स्वीकार केला असतां दोष नाहीं, असें ह्मणतात.

---

**अथपंचम्यामुपांगललिताव्रतं अत्रपंचमीअपराण्हव्यापिनीग्राह्या अपराण्हस्यैवतत्पूजाकालत्वोपपत्तेः दिनद्वयेकात्स्न्र्येनापराण्हव्याप्तौसाम्येनवैषम्येणवापराण्हैकदेशव्याप्तौच**

पूर्वैव युग्मवाक्यात्परत्रैवापराण्हव्याप्तौपरैव केचित्तुरात्रिव्यापिनींगृण्हंति पूजादिकंच रात्रावेवकुर्वंतितत्रमूलंचिंत्यं अत्रपूजादिविधिर्ग्रंथांतरेप्रसिद्धइतिनलिख्यते ॥

## आतां उपांगललिताव्रताचा निर्णय सांगतों.

आश्विन शुद्ध पंचमीचे दिवसीं उपांगललिता देवीचें व्रत करावें. ह्या व्रताविषयीं पंचमी अपराण्हकालव्यापिनी घ्यावी. कारण, उपांगललितेची पूजा अपराण्हकालींच करावी असें सांगितलें आहे. जर दोन दिवसीं संपूर्ण अपराण्हकालव्याप्ति असेल, अथवा दोन दिवसीं सारखी किंवा कमी ज्यास्ती अपराण्हकालीं एकदेशव्याप्ति असेल तर युग्मवाक्य[1] आहे याकरितां पूर्व दिवसाचीच घ्यावी. दुसऱ्या दिवसींच अपराण्हकालीं व्याप्ति असेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. कोणी ग्रंथकार तर रात्रिव्यापिनी घेतात, व पूजा इत्यादिक रात्रीचे ठिकाणींच करितात त्याविषयीं मूळविचार करावा. ह्या उपांगललिताव्रताचा पूजा इत्यादिक विधि अन्यग्रंथीं प्रसिद्ध आहे; याकरितां एथें सांगत नाहीं.

---

आश्विनशुक्लपक्षेमूलनक्षत्रेपुस्तकेषुसरस्वतीमावाह्यपूजयेत् मूलेषुस्थापनंदेव्याःपूर्वाषाढासुपूजनं उत्तरासुबलिंदद्याच्छ्रवणेनविसर्जयेदितिवचनात् अत्रपूजयेत्प्रत्यहमितिरुद्रयामलवचनात् मूलेआवाहनंतदंगभूतंपूजनंचकरिष्येइत्यादिसंकल्प्यावाहनपूजनेकार्ये पूर्वाषाढासुपूजनंकरिष्यइतिसंकल्प्यावाहनरहितपूजैवकेवलं उत्तरासुबलिदानंतदंगभूतांपूजांचकरिष्येइत्येवंतेकार्ये श्रवणेविसर्जनंकर्तुंतदंगभूतांपूजांकरिष्यइतिसंकल्प्यसंपूज्यविसर्जयेदितिक्रमः तत्रमूलस्यप्रथमेपादेसूर्यास्तात्प्राक्त्रिमुहूर्तव्यापिनिसरस्वत्यावाहनं त्रिमुहूर्तन्यूनत्वेरात्रौवाप्रथमपादसत्त्वेतस्यविशेषवचनंविनाग्राह्यत्वाभावाद्वितीयादिपादेपरदिनएवावाहनं एवंपूर्वाषाढादिनक्षत्रंपूजादौदिनव्याप्त्येवग्राह्यं विसर्जनंतुश्रवणप्रथमपादेरात्रिभागगतेपिकार्यं विशेषवचनात् तत्ररात्रेःप्रथमप्रहरपर्यंतमेवेतिभाति ॥

आश्विनशुक्ल पक्षामध्यें मूळ नक्षत्रीं पुस्तकांचे ठिकाणीं सरस्वतीचें आवाहन करून पूजा करावी. कारण, "मूलाचे ठिकाणीं सरस्वतीचें आवाहन, पूर्वाषाढांचे ठिकाणीं पूजा, उत्तरा नक्षत्रीं बलिदान आणि श्रवण नक्षत्रीं विसर्जन, ह्याप्रमाणें करावीं असें वचन आहे. ह्याविषयीं, "दररोज पूजा करावी," असें रुद्रयामलांत वचन आहे यास्तव, मूल नक्षत्रीं "आवाहनं तदंगभूतं पूजनं च करिष्ये" इत्यादिक संकल्प करून आवाहन व पूजन हीं करावीं. पूर्वाषाढा नक्षत्रीं, "पूजनं करिष्ये," असा संकल्प करून आवाहनरहित नुस्ती पूजाच करावी. उत्तरा नक्षत्रीं "बलिदानं तदंगभूतां पूजां च करिष्ये," असा संकल्प करून बलिदान, पूजा हीं करावीं. श्रवणनक्षत्रीं, "विसर्जनं कर्तुं तदंगभूतां पूजां करिष्ये," असा संकल्प करून पूजा करावी, व त्यानंतर विसर्जन करावें, याप्रमाणें क्रम जाणावा. त्यामध्यें सरस्वतीचें आवाहन करावयाचें तें, सूर्यास्ताच्या पूर्वी सहा घटिका असा जो मूळाचा प्रथम चरण त्याचे ठिकाणीं करावें. सूर्यास्ताच्या पूर्वी सहा घटिकांहून कमी मूळाचा चरण असेल

---

[1] युग्मवाक्याचा निर्णय प्रथम परिच्छेदांत तिथिनिर्णयप्रसंगीं सांगितला आहे.

किंवा रात्रीं प्रथम चरण असेल तर रात्रींचा घेण्याविषयीं विशेष वचन नाहीं याकरितां दुसरा, तिसरा, इत्यादिक चरणीं दुसऱ्या दिवसींच आवाहन करावें. याप्रमाणें पूर्वाषाढादिक नक्षत्रें पूजा इत्यादिकांला दिवसव्यापिनी असतील तींच घ्यावीं. विसर्जन करणें तें तर, श्रवणाचा पहिला भाग रात्रीमध्यें गेला असला तत्रापि विशेष वचन आहे याकरितां त्याचे ठिकाणींच करावें. तें विसर्जन रात्रीच्या पहिल्या प्रहरापर्यंतच करावें असें वाटतें.

---

**अथसप्तम्यादिदिनत्रयेपत्रिकापूजनंविहितं तत्रसप्तम्यादितिथित्रयंसूर्योदयेमुहूर्तमात्रमपिग्राह्यं तत्राधिवासनादिप्रयोगविस्तारःकौस्तुभादौज्ञेयः यत्तुसप्तमीप्रभृतित्रिरात्रंनवरात्रकर्मकुर्वंतितत्रसप्तमीसूर्योदयोत्तरंमुहूर्ताधिकव्यापिनीग्राह्या मुहूर्तन्यूनत्वेपूर्वा ॥**

यानंतर सप्तमी, अष्टमी व नवमी ह्या तीन दिवसांचे ठिकाणीं पत्रिकापूजन करावें. पत्रिकापूजनाविषयीं सप्तमी इत्यादिक तीन तिथि, सूर्योदयीं दोन घटिका असल्या तरी त्या घ्याव्या. त्या पत्रिकापूजनाचे ठिकाणीं अधिवासन करणें इत्यादिक प्रयोगाचा विस्तार कौस्तुभादिक ग्रंथीं पाहावा. सप्तमीपासून तीन रात्रि असें जें नवरात्रकर्म करितात त्याविषयीं सप्तमी, सूर्योदयानंतर दोन घटिकांहून अधिकव्यापिनी असेल ती घ्यावी. सूर्योदयानंतर दोन घटिकांपेक्षां कमी असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी.

---

**अथमहाष्टमीघटिकामात्राप्यौदयिकीनवमीयुताग्राह्या सप्तमीस्वल्पयुतासर्वथात्याज्याय दातुपूर्वत्रसप्तमीयुतापरत्रोदयेनास्तिघटिकान्यूनावावर्ततेतदा पूर्वासप्तमीविद्धापिग्राह्याइयंभौमवारेतिप्रशस्ता यदाचपूर्वदिनेषष्टिघटिकाष्टमीपरदिनेमुहूर्तादिव्यापिनीतदानवमीयुतामप्युत्तरांत्यक्त्वासंपूर्णत्वात्पूर्वैवग्राह्या एवंनवम्याःक्षयवशेनदशमीदिनेसूर्योदयोत्तरमनुवृत्त्यभावेऽष्टमींनवमीयुतामौदयिकीमपित्यक्त्वासप्तमीयुतैवाष्टमीग्राह्या अष्टम्यांपुत्रवतोपवासोनकार्यःकुलाचारप्राप्तौकिंचिद्भक्ष्यंप्रकल्प्यकार्यः महानवमीतुबलिदानव्यतिरिक्तविषयेपूजोपोषणादावष्टमीविद्धाग्राह्या साचयदिअष्टमीदिनेसायंत्रिमुहूर्तास्यात्तदैवग्राह्यात्रिमुहूर्तन्यूनत्वेपरैवग्राह्या नवमीप्रयुक्तमहाबलिदानेतुदशमीविद्धायदाशुद्धाधिकानवमीतदाबलिदानमपिपूर्णत्वात्पूर्वत्रैवकार्यं अष्टमीनवम्योःसंधौपूजोक्तासाष्टमीनवम्योःपृथक्त्वेदिवारात्रौवाष्टम्यंतनाडीनवम्याद्यनाड्योःकार्या यदितुअष्टमीनवम्योर्मध्यान्हेऽपराण्हेवायोगस्तदाष्टमीनवमीपूजयोरप्येकदिनेएवप्राप्तेरष्टमीनवमीपूजांतत्संधिपूजांचतंत्रेणकरिष्ये इतिसंकल्प्यतंत्रेणपूजाकार्यायदिशुद्धाधिकाष्टमीतदापूर्वेद्युरष्टमीपूजापरेद्युःसंधिपूजानवमीपूजयोस्तंत्रं अत्रनवरात्रेस्वयंपूजादिकंकर्तुमशक्तावन्येनकारयेत् षोडशोपचारपूजाविस्तारंकर्तुमशक्तोगंधादिपंचोपचारपूजांकुर्यात् नवम्यांपूजांविधायहोमःकार्यः केचिदष्टम्यामेवहोमइत्याहुः अन्येतुअष्टम्यामुपक्रम्यनवम्यांहोमःसमापनीयः सचारुणोदयमारभ्यसायंकालपर्यंतमष्टमीनवम्योःसंधौसंभवति निशायांतत्संधौतुरात्रौहोमादेरयोग्यत्वान्नवम्यामेवहोमोपक्रमसमाप्तीकार्येइत्याहुः अत्रयथाकुलाचारंव्यवस्था सचहोमोनवार्णवमंत्रेणकार्यः अथवाजयंतीमंगलाकालीतिश्लोकेन अथवानमोदेव्यैमहादेव्यैइतिश्लोकेन अथवासप्तशतीश्लोकैः अथवासप्तशतीस्तोत्रस्य**

सप्तशतमंत्रैः कवचार्गलाकीलकरहस्यत्रयश्लोकसहितैर्होमः सप्तशतमंत्रविभागोन्यत्रज्ञेयः अत्रापिविकल्पेषुयथाकुलाचारंव्यवस्था होमद्रव्यंसर्पिर्मिश्रितंशुक्लतिलमिश्रंचपायसंकेवलतिलैर्वाहोमः क्वचित्किंशुकपुष्पदूर्वासर्षपलाजपूगयवश्रीफलरक्तचंदनखंडनानाविधफलानामपिपायसेमिश्रणंकार्यमित्युक्तं होमश्चजपदशांशेनकार्यःकुलाचारप्राप्तश्चेन्नृसिंहभैरवादिदैवत्यमंत्रहोमोपिकार्यः अत्रसविस्तरःसग्रहमखोहोमप्रयोगःकौस्तुभेज्ञेयः ॥

## आतां महाष्टमीचा निर्णय सांगतों.

आश्विनशुक्ल अष्टमी तिला महाअष्टमी असें ह्मणतात. ही अष्टमी सूर्योदयीं एक घटिका असली तथापि नवमीयुक्त घ्यावी. फार थोडी अशा सप्तमीनें युक्त असेल ती सर्वथा टाकावी. जेव्हां पूर्व दिवसीं सप्तमीनें युक्त असून दुसऱ्या दिवसीं सूर्योदयकालीं सर्वथा नसेल किंवा एका घटिकेपेक्षां कमी असेल तेव्हां पूर्व दिवसाची, सप्तमीनें विद्ध असली तथापि ती सप्तमी-युक्त घ्यावी. ही अष्टमी, मंगळवाराचा योग असेल तर अति प्रशस्त होय. जेव्हां पूर्व दि-वसीं साठ घटिका अष्टमी असून दुसऱ्या दिवसीं दोन तीन घटिका शेष अष्टमी असेल तेव्हां नवमीनें युक्त असली तत्रापि दुसऱ्या दिवसाची टाकून संपूर्ण तिथि आहे याकरितां पूर्व दि-वसाचीच घ्यावी. याप्रमाणें नवमीचा क्षय होऊन दशमीच्या दिवसीं सूर्योदयानंतर अल्पहि शेष नसेल तर नवमीनें युक्त असी सूर्योदयकालव्यापिनी अष्टमी टाकून सप्तमीनें युक्त असेल तीच अष्टमी घ्यावी. पुत्रवान् असतील त्यांनीं अष्टमीचे दिवसीं उपोषण करूं नये. उपोषण करण्याचा कुलाचार असेल तर कांहीं फलाहार करून उपोषण करावें. महानवमी तर बलि-दानावांचून इतर कृत्यें जीं पूजा, उपोषण इत्यादिक त्यांविषयीं अष्टमीनें विद्ध असेल ती घ्यावी. जर ती नवमी, अष्टमीच्या दिवसीं सायंकालीं सहा घटिका असेल तर त्या दिवसा-चीच घ्यावी. सहा घटिकांहून कमी असेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. नवमीचे दि-वसीं कर्तव्य जें महाबलिदान त्याविषयीं नवमी, दशमीनें विद्ध असेल ती घ्यावी. जेव्हां शु-द्धाधिक नवमी असेल तेव्हां संपूर्ण तिथि आहे याकरितां बलिदानसुद्धां पूर्व दिवसींच करावें. पूजा करणें ती अष्टमी व नवमी यांचे संधीचे ठिकाणीं करावी. अष्टमी व नवमी ह्या दोन तिथि निरनिराळ्या असतील तर, दिवसा किंवा रात्रीं अष्टमीची शेवटची घटिका एक, व नवमीची पहिली घटिका एक, ह्या दोन घटिकांमध्यें पूजा करावी. जेव्हां अष्टमी व नवमी यांचा योग मध्यान्हकालीं किंवा अपराण्हकालीं असेल तेव्हां अष्टमीची पूजा आणि नवमीची पूजा ह्या दोनहि एकाच दिवसीं प्राप्त होतात. यास्तव, "अष्टमीनवमीपूजा व त्यांच्या संधी-संबंधी पूजा ह्या एकतंत्रानें करितों," असा संकल्प करून तंत्रेंकरून पूजा करावी. जर शुद्धाधिक अष्टमी असेल तर पूर्व दिवसीं अष्टमीसंबंधी पूजा, दुसऱ्या दिवसीं संधिपूजा आणि एकतंत्रानें, नवमीसंबंधी पूजा याप्रमाणें पूजा करावी. ह्या नवरात्रामध्यें स्वतां पूजा करण्या-विषयीं अशक्त असेल तर दुसऱ्याकडून करवावी. सोळा उपचारांनीं विस्तृत असी पूजा क-रण्यास असमर्थ असेल तर गंधादिक पंचोपचारांनीं पूजा करावी. नवमीचे ठिकाणीं पूजा करून होम करावा. कोणी ग्रंथकार अष्टमीचे ठिकाणींच होम करावा असें ह्मणतात. दुसरे कोणी ग्रंथकार तर अष्टमीचे ठिकाणीं होमाचा आरंभ करून नवमीमध्यें होम समाप्त करावा.

तो होम अरुणोदयकालीं आरंभून सायंकालपर्यंत अष्टमी व नवमी यांचे संधीमध्यें करावा. अष्टमी व नवमी यांचा संधि रात्रीमध्यें असेल तर, रात्रीं होमादिक करणें अयोग्य आहे याकरितां नवमीचे ठिकाणींच होमाचा आरंभ व समाप्ति करावीं, असें ह्मणतात. याविषयीं जसा ज्याचा कुलाचार असेल त्याप्रमाणें व्यवस्था जाणावी. तो होम नवार्णवमंत्रानें करावा. अथवा, "जयंती मंगला काली०" या श्लोकमंत्रानें करावा. किंवा "नमो देव्यै महादेव्यै०" ह्या श्लोकेंकरून करावा. अथवा सप्तशतीच्या श्लोकांनीं, अथवा कवच, अर्गला आणि कीलक हीं तीन जीं रहस्यें त्यांचे श्लोकांनीं युक्त, असे सप्तशतीस्तोत्राचे जे सातशें मंत्र त्यांहींकरून करावा. सप्तशतीच्या मंत्रांचा विभाग ( कोठपासून किती मंत्र तो ) दुसऱ्या ग्रंथीं पाहावा. या होमाविषयींहि अनेक प्रकार आहेत त्यांची व्यवस्था जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें जाणावी. होमाचीं द्रव्यें—घृतयुक्त व पांढऱ्या तिळांनीं युक्त असें पायस घ्यावें. अथवा नुस्ते तिळांनींच होम करावा. क्वचित् अन्य ग्रंथीं पळसाचीं पुष्पें, दूर्वा, शिरस, भाताच्या लाह्या, सुपारी, यव, नारळ, रक्तचंदनाचे तुकडे, नाना प्रकारचीं फळें हे पदार्थ पायसांत मिश्रित करावे असें सांगितलें आहे. होम करणें तो जपाच्या दशांश करावा. नृसिंह, भैरव इत्यादिक देवतांच्या मंत्रांचा होम करण्याविषयीं कुलाचार असेल तर तोहि करावा. याविषयीं ग्रहमखासह विस्तारपूर्वक होमाचा प्रयोग कौस्तुभग्रंथीं सांगितला आहे तो पहावा.

---

अथबलिदानं ब्राह्मणेनमाषादिमिश्रान्नेनकूष्मांडेनवाकार्यं यद्वाघृतमयंयवपिष्टादिमयं वासिंहव्याघ्रनरमेषादिकंकृत्वाखड्गेनघातयेत् ब्राह्मणेनपशुमांसमद्यादिबलिदानेब्राह्मण्यभ्रष्टता सकामेनक्षत्रियादिनासिंहव्याघ्रनरमहिषच्छागसूकरमृगपक्षिमत्स्यनकुलगोधादिप्राणि स्वगात्ररुधिरादिमयोबलिर्देयः कृष्णसारमृगःक्षत्रियादिभिरपिनदेयःअत्रबलिदानमंत्रादि प्रकारःसिंधौज्ञेयःअत्रशतचंडीसहस्रचंडीप्रयोगःकौस्तुभादौज्ञेयः द्विविधाशौचेपिनवम्यांहोमघटादिदेवतोत्थापनंचब्राह्मणद्वाराकारयित्वा स्वयंपारणंकृत्वाशौचांतेब्राह्मणभोजनंदक्षिणादिदानंचकार्यं एवंरजस्वलापिपारणाकालेपारणंकृत्वाशुद्धौदानादिकंकुर्यात् विधवायास्तुरजोदोषेभोजननिषेधात्पारणापिशुद्ध्युत्तरमेव एवंव्रतांतरेप्यूह्यं प्रतिपदादियावदष्टमीलोहाभिसारिकंकर्मराज्ञांविहितं तत्रछत्रचामरादिराजचिन्हानांगजाश्वादीनांचापादिशस्त्राणांदुंदुभ्यादीनांचपूजाहोमादिकंकार्यं येहयान्पालयंतितेराजभिन्नाअपिस्वातीयुतामाश्विनप्रतिपदंद्वितीयांवारभ्यनवमीपर्यंतंवाजिनीराजनाख्यंकर्मकुर्युः तत्रोच्चैःश्रवःपूजारेवतपूजाचप्रतिमायांकार्या प्रत्यक्षंअश्वपूजानीराजनंचकार्यं कर्मद्वयेपितत्पूजामंत्राहोमादिमंत्राःसविस्तरप्रयोगश्चकौस्तुभे इदानीमश्ववंतः प्राकृतजनास्तुविजयादशम्यामश्वान्तोयेवगाह्यपुष्पमालाभिर्विभूष्याश्वशालायांप्रवेशयंति तत्रगंधर्वकुलजातस्त्वंमाभूयाःकुलदूषकःब्राह्मणःसत्यवाक्येनसोमस्यवरुणस्यच प्रभावाच्चहुताशस्यवर्धयत्वंतुरंगमान् रिपून्विजित्यसमरेसहभर्त्रासुखीभवेतिमंत्रेणकेवलाश्वपूजापिकर्तुमुचिता ॥

## आतां बलिदान सांगतों.

ब्राह्मणानें बलिदान करणें तें उडीद इत्यादिकांनीं मिश्रित अशा अन्नेंकरून करावें. अथवा कूष्मांडेंकरून करावें. किंवा तुपाचे अथवा यवांचें पीठ इत्यादिकांचे सिंह, व्याघ्र, मनुष्य, मेष इत्यादिक करून त्यांला खड्गानें मारावें. ब्राह्मणानें पशूच्या मांसाचें किंवा मद्यादिकाचें बलिदान केलें असतां तो ब्राह्मण्यापासून भ्रष्ट होतो. सकाम असे जे क्षत्रिय इत्यादिक त्यांनीं, सिंह, व्याघ्र, मनुष्य, मेंढा, डुकर, हरिण, पक्षी, मत्स्य, मुंगुस, घोरपड, इत्यादिक प्राण्यांचा व आपल्या शरीरांतील रुधिर इत्यादिकांचा बलि द्यावा, कृष्णसार मृगाचा बलि क्षत्रियादिकांनीं सुद्धां देऊं नये. या बलिदानाविषयीं मंत्र कोणते इत्यादिक प्रकार निर्णयसिंधूंत सांगितला आहे तो पाहावा. ह्या नवरात्राचे ठिकाणीं शतचंडी, सहस्रचंडी यांचा प्रयोग कौस्तुभ इत्यादि ग्रंथीं पाहावा. जननाशौच किंवा मृताशौच असेल तथापि नवमीचे दिवसीं होम व घट, देवता इत्यादिकांचें उत्थापन करणें तें ब्राह्मणाकडून करवून आपण पारणा करून आशौच गेल्यानंतर ब्राह्मणभोजन, दक्षिणा इत्यादिक करावें. याप्रमाणें रजस्वला जी तिणेंहि पारणाकालीं पारणा करून शुद्धि झाल्यानंतर दान इत्यादिक करावें. विधवेनें तर, रजोदोषकालीं भोजन करूं नये असा निषेध सांगितला आहे यास्तव पारणा करणें तीहि शुद्धि झाल्यानंतरच करावी. याप्रमाणें दुसऱ्या व्रतांविषयींहि जाणावें. राजांनीं प्रतिपदेपासून अष्टमीपर्यंत सर्व लोहादिक शस्त्रांची स्थापना करावी, व छत्र, चामर इत्यादिक राजचिन्हें; हत्ती, घोडे इत्यादिक; धनुष्य इत्यादिक शस्त्रें; नगारा, दुंदुभि इत्यादिक वाद्यें या सर्वांचें पूजन, होम इत्यादिक करावें. जे लोक घोडे पाळतात ते राजे नसले तथापि त्यांनीं स्वातीनक्षत्रानेंयुक्त अशा प्रतिपदेचे दिवसीं किंवा द्वितीयेचे दिवसीं आरंभ करून नवमीपर्यंत वाजिनीराजन कर्म (घोड्यांचें पूजन करून आरती करणें तें) करावें. त्यामध्यें उच्चैःश्रव्याची पूजा व रेवतपूजा प्रतिमेचे ठिकाणीं कराव्या. घोड्यांची प्रत्यक्ष पूजा व आरती करावी. ह्या दोनहि कर्मांचे ठिकाणीं त्यांच्या पूजेचे मंत्र व होम इत्यादिकांचे मंत्र, आणि यांचा विस्तारपूर्वक सर्व प्रयोग हें सर्व कौस्तुभांत सांगितलें आहे. हल्लीं घोडे पाळणारे प्राकृत जन तर विजयादशमीचे दिवसीं घोड्यांला स्नान घालून व पुष्पांच्या माळांनीं त्यांला शृंगारून अश्वशाळेमध्यें नेऊन बांधतात. त्याविषयीं, "गंधर्वकुलजातस्त्वं माभूयाः कुलदूषकः ॥ ब्रह्मणः सत्यवाक्येन सोमस्य वरुणस्य च ॥ प्रभावाच्च हुताशस्य वर्धय त्वं तुरंगमान् ॥ रिपून् विजित्य समरे सह भर्त्रा सुखी भव," या मंत्रांनीं केवल अश्वाची पूजा करण्याविषयींहि योग्य आहे.

---

अथपारणाविसर्जनयोःकालःतत्रविसर्जनंदशम्यांकार्यं दिनद्वयेदशमीसत्त्वेपूर्वदशम्यां श्रवणांत्यपादयोगेतत्रैवविसर्जनं तत्रतद्योगाभावेतुपरदशम्यामेव परत्रदशम्यभावेपूर्वनवम्यांनक्षत्रयोगेसत्यसतिवाकार्यं नक्षत्रयोगानुरोधेनक्रियमाणंविसर्जनमपराण्हेपिभवतिअन्यथाप्रातरेव तत्रमृदादिप्रतिमायाविसर्जनपूर्वकंजलादौत्यागः परंपरयापूजितायाधातुप्रतिमायास्तुघटादिस्थानादुत्तिष्ठेत्यादिमंत्रैरुत्थापनमात्रंकार्यं नतुविसर्जनं यद्दिनेविसर्जनंतत्रैव

नियमत्यागस्यौचित्यात् विसर्जनोत्तरंतद्दिनेएवपारणंकार्यं अन्येतुसत्यपिदशम्यांविसर्जनविधौनवम्यामेवपारणंकार्यं नवम्यांपारणंकुर्याद्दशम्यामभिषेकंचकृत्वामूर्तिविसर्जयेदित्यादिवचनादित्याहुः अत्रैवंव्यवस्था प्रथमदिनेस्वल्पाष्टम्यायुक्तानवमीद्वितीयदिनेपारणपर्याप्तनवम्यायुक्तादशमीतत्परदिनेश्रवणयुक्ताविसर्जनार्हादशमी तत्राष्टमीनवम्युपवासयोःप्रथमदिने सिद्धत्वादवशिष्टनवम्यांपारणमवशिष्टदशम्यांविसर्जनं यदातुअवशिष्टनवमीदिनेएवदशमी श्रवणयुक्ताविसर्जनार्हातदाविसर्जनोत्तरंपारणं यदापूर्वदिनेषष्टिदंडाष्टमीपरदिनेष्टमीशेषयुतानवमीतत्परदिनेनवमीशेषयुतादशमीतदा नवम्यायुक्तदशम्यामेवविसर्जनोत्तरंपारणा अथनवमीषष्टिदंडाद्वितीयदिनेनवमीशेषयुक्तादशमीतत्रापिनवम्यायुक्तदशम्यामेवविसर्जनपारणे यदातुअष्टमीनवमीदशम्यस्तिस्रोपितिथयःसूर्योदयमारभ्यास्तमयपर्यंतमखंडास्तत्तत्कृत्यपर्याप्तास्तदादाक्षिणात्यानांनवम्यामेवपारणाचाराान्नवम्यामेवपारणविसर्जने येषांदशम्यामेवाचारस्तेषांतदुभयंदशम्यामेव ॥

## आतां पारणा व देवतांचें विसर्जन यांचा काल सांगतों.

देवतांचें विसर्जन करणें तें दशमीचे दिवसीं करावें--जर दोन दिवसीं दशमी असेल तर पूर्व दिवसाची जी दशमी तिचे ठिकाणीं श्रवणनक्षत्राच्या शेवटच्या पादाचा योग असेल तर त्या कालींच विसर्जन करावें. पूर्वदिवसीं दशमीचे ठिकाणीं श्रवणाच्या अंत्य पादाचा योग नसेल तर दुसऱ्या दिवसाचे दशमीचे ठिकाणींच करावें. दुसऱ्या दिवसीं दशमी नसेल तर पूर्वदिवसाच्या दशमीचे दिवसीं नक्षत्रयोग असो किंवा नसो तथापि करावें. नक्षत्रयोगाच्या अनुरोधानें करावयाचें जें विसर्जन तें अपराण्हकालींहि होतें. नक्षत्रयोगाच्या अनुरोधानें प्रतिमा असेल तर प्रातःकालींच करावें. त्यामध्यें मृत्तिका इत्यादिकांची प्रतिमा असेल तर तिचें विसर्जन करून उदक इत्यादिकांत ती टाकावी. परंपरागत पूजलेली जी धातूची मूर्ति तिचें घटादिक स्थानापासून "उत्तिष्ठ०" इत्यादिक मंत्रांनीं उत्थापन मात्र करावें, विसर्जन करूं नये. ज्या दिवसीं देवतेचें विसर्जन झालें त्याच दिवसीं, पूर्वी धारण केलेले नियम सोडावे हें योग्य आहे, याकरितां विसर्जन झाल्यानंतर त्याच दिवसीं पारणा करावी. दुसरे ग्रंथकार तर दशमीचे ठिकाणीं विसर्जनाचा विधि युक्त आहे तथापि नवमीचे ठिकाणींच पारणा करावी; कारण, "नवमीचे ठिकाणीं पारणा करावी आणि दशमीचे दिवसीं अभिषेक करून मूर्तीचें विसर्जन करावें," इत्यादिक वचन आहे असें ह्मणतात. याविषयीं असी व्यवस्था,--पूर्व दिवसीं स्वल्प अष्टमीयुक्त नवमी, दुसऱ्या दिवसीं पारणा होईल इतकी नवमीयुक्त दशमी आणि तिसऱ्या दिवसीं श्रवणनक्षत्रयुक्त असी विसर्जनास योग्य दशमी, तेथें अष्टमीचें व नवमीचें असीं दोन उपोषणें प्रथम दिवसीं येतात यास्तव अवशिष्ट राहिलेल्या नवमीमध्यें पारणा करून शेष राहिलेल्या दशमीचे ठिकाणीं विसर्जन करावें. जेव्हां शेष राहिलेल्या नवमीचे दिवसींच श्रवणयुक्त असी विसर्जनास योग्य दशमी असेल तेव्हां विसर्जन करून नंतर पारणा करावी. जेव्हां पूर्व दिवसीं साठ घटिका अष्टमी, दुसऱ्या दिवसीं अष्टमी

शेषयुक्त असी नवमी, आणि तिसऱ्या दिवसीं नवमीशेषयुक्त दशमी असेल तेव्हां नवमीयुक्त अशा दशमीचे ठिकाणींच विसर्जन करून नंतर पारणा करावी. जेव्हां पूर्व दिवसीं साठ घटिका नवमी, दुसऱ्या दिवसीं नवमीशेषयुक्त असी दशमी असेल तेव्हांहि नवमीयुक्त दशमीचे ठिकाणींच विसर्जन व पारणा करावी. जेव्हां अष्टमी, नवमी आणि दशमी ह्या तीनहि तिथि सूर्योदयापासून अस्तमानपर्यंत अशा अखंड असून त्या त्या कृत्याला पर्याप्त असतील तेव्हां दक्षिण देशांतील लोकांचा आचार, नवमीचे ठिकाणींच पारणा करण्याचा आहे, यास्तव नवमीचे ठिकाणींच पारणा व विसर्जन हीं करावीं. दशमीचे ठिकाणींच पारणा करण्याचा ज्यांचा आचार असेल त्यांनीं पारणा व विसर्जन हीं दोनहि दशमीमध्येंच करावीं.

---

अथ विजयादशमी सा परदिनेएवापराण्हव्याप्तौपरा दिनद्वयेपराण्हव्याप्तौ दिनद्वयेपि श्रवणयोगेसत्यसतिवापूर्वा एवं दिनद्वयेऽपराण्हव्याप्त्यभावेपि श्रवणयोगसत्त्वासत्त्वयोः पूर्वैव दिनद्वयेपराण्हव्याप्त्यव्याप्त्योरेकतरदिनेश्रवणयोगे यद्दिनेश्रवणयोगःसैवग्राह्या एवमपराण्हैकदेशव्याप्तावूह्यं यदापूर्वदिनेएवापराण्हव्याप्तापरदिनेचश्रवणयोगाभावःतदापि पूर्वैव यदातुपूर्वदिनेएवापराण्हव्यापिनीपरदिनेचमुहूर्तत्रयादिव्यापिनीअपराण्हात्पूर्वमेवसमाप्ता परत्रैवश्रवणयोगवती तदापरैव अपराण्हेदशम्यभावेपि यांतिथिंसमनुप्राप्यउदयंयातिभास्करइत्यादिसाकल्यवचनैः श्रवणयुक्तायाग्राह्यायाऔदयिकस्वल्पदशम्याःकर्मकालेसत्त्वापादनात् सिंधौतुइदंपरदिनेपराण्हकालेश्रवणसत्त्वेएवश्रवणस्याप्यपराण्हात्पूर्वमेवसमाप्तौतु पूर्वैवेत्युक्तं युक्तंचैतत् यदापरदिनेएवापराण्हव्याप्तिःपूर्वदिनेएवापराण्हात्परत्रसायान्हादौश्रवणयोगस्तदातुपरैवग्राह्येतिममप्रतिभाति अत्रापराजितापूजनंसीमोल्लंघनंशमीपूजनंदेशांतरयात्रार्थिनांप्रस्थानंचविहितं तत्पूजाप्रकारस्तु अपराण्हेग्रामादीशान्यांदिशिगत्वाशुचिदेशेभुवमुपलिप्यचंदनादिनाष्टदलमालिख्यममसकुटुंबस्यक्षेमसिद्ध्यर्थं अपराजितापूजनंकरिष्येइतिसंकल्प्य मध्येअपराजितायैनमइत्यपराजितामावाह्यतद्दक्षिणेक्रियाशक्त्यैनमइतिजयांवामतःउमायैनमइतिविजयांचावाह्यअपराजितायैनमःजयायैनमःविजयायैनमःइतिनाममंत्रैःषोडशोपचारपूजांकृत्वाप्रार्थयेत् इमांपूजांमयादेवियथाशक्तिनिवेदितां रक्षार्थंतुसमादायव्रजस्वस्थानमुत्तममिति अथराज्ञःसंकल्पेयात्रायांविजयसिद्ध्यर्थमितिविशेषः पूजानमस्कारांते हारेणतुविचित्रेणभास्वत्कनकमेखला अपराजिताभद्ररताकरोतुविजयंममेत्यादिमंत्रैर्विजयंप्रार्थ्यपूर्ववद्विसृजेदितिसंक्षेपःततःसर्वेजनाःग्रामाद्बहिरीशानदिगवस्थितांशमींगत्वा पूजयेयुःसीमोल्लंघनंतुशमीपूजनात्पूर्वंपश्चाद्वाकार्यं राजातुअश्वमारुह्यसहपुरोहितःसामात्यःशमीमूलंगत्वावाहनादवरुह्य स्वस्तिवाचनपूर्वकंशमींसंपूज्यकार्येदिशानमात्यैःसहसंवदन्प्रदक्षिणांकुर्यात् पूजाप्रकारस्तुममदुष्कृतामंगलादिनिरासार्थंक्षेमार्थंयात्रायांविजयार्थंचशमीपूजांकरिष्ये शम्यलाभेअश्मंतकवृक्षपूजांकरिष्येइतिसंकल्पः राजातुशमीमूलेदिक्पालपूजांवास्तुदवेतापूजांचकुर्यात् अमंगलानांशमनींशमनींदुष्कृतस्यच दुःखप्रणाशिनींधन्यांप्रपद्येहंशमींशुभामितिपूजामंत्रः पूजांते शमीशमयतेपापंशमीलोहितकंटका धरित्र्यर्जुनबाणानांरामस्यप्रियवा

दिनी करिष्यमाणयात्रायांयथाकालंसुखंमया तत्रनिर्विघ्नकर्त्रीत्वंभवश्रीरामपूजितेइतिप्रार्थये त् अश्मंतकपूजने अश्मंतकमहावृक्षमहादोषनिवारण इष्टानांदर्शनंदेहिशत्रूणांचविनाश नमितिप्रार्थयेत् राजाशत्रोर्मूर्तिंकृत्वाशस्त्रेणविध्येत् प्राकृताःशमीशाखांछित्वाआनयंतितन्नि मूलं गृहीत्वासाक्षतामार्द्रांशमीमूलगतांमृदं गीतवादित्रनिर्घोषैरानयेत्स्वगृहंप्रति ततोभूषणव स्त्रादिधारयेत्स्वजनैःसह नीराज्यमानःपुण्याभिर्युवतीभिःसुमंगलमिति अत्रदेशांतरंजिगमिषु भिर्विजयमुहूर्तेचंद्राद्यानुकूल्याभावेपिप्रयाणंकार्यं तत्रविजयमुहूर्तोद्विविधः ईषत्संध्यामतिक्र म्यकिंचिदुद्भिन्नतारकः विजयोनामकालोयंसर्वकार्यार्थसाधकइत्येकः एकादशोमुहूर्तोपिवि जयःपरिकीर्तितः तस्मिन्सर्वैर्विधातव्यायात्राविजयकांक्षिभिरित्यपरः उक्तद्वयान्यतरमुहूर्ते दशमीयुक्तेप्रस्थानंकार्यंनत्वेकादशीयुक्ते आश्वयुक्शुक्लदशमीविजयाख्याखिलेशुभा प्रयाणेतु विशेषेणकिंपुनःश्रवणान्विता ज्योतिर्ग्रंथोक्तैरन्यान्यपिकर्माणिमासविशेषनिरपेक्षाण्यत्रचंद्रा द्यानुकूल्याभावेप्यनुष्ठेयानिमासविशेषविहितानितुचूडाकर्मविष्ण्वादिदेवताप्रतिष्ठादीनि नकु र्यात् राज्ञांपट्टाभिषेकेनवमीविद्धादशमीश्रवणयुतापिनग्राह्याकिंत्वौदयिक्येवग्राह्या ॥

## आतां विजयादशमीचा निर्णय सांगतों.

ती विजयादशमी दुसऱ्या दिवसींच अपराण्हकालव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाची-च घ्यावी; जर दोन दिवसीं अपराण्हकालव्याप्ति असेल व दोनहि दिवसीं श्रवणयोग असेल किंवा नसेल तत्रापि पूर्व दिवसाचीच घ्यावी. याप्रमाणें दोन दिवसीं अपराण्हकालव्याप्ति न-सेल तथापि व श्रवणयोग असेल किंवा नसेल तत्रापि पूर्व दिवसाचीच घ्यावी. दोन दिवसीं अपराण्हव्याप्ति असेल किंवा नसेल आणि दोन दिवसांतून कोणत्याहि एका दिवसीं श्रवण-योग असेल तर ज्या दिवसीं श्रवणयोग असेल तीच घ्यावी. दोन दिवसीं अपराण्हकालीं ए-कदेशव्याप्ति असतांहि याप्रमाणेंच निर्णय जाणावा. जेव्हां पूर्व दिवसींच अपराण्हकालव्याप्ति असेल व दुसऱ्या दिवसीं श्रवणयोग नसेल तेव्हांहि पूर्व दिवसाचीच घ्यावी. जेव्हां पूर्व दिवसींच अपराण्हकालव्यापिनी असेल व दुसऱ्या दिवसीं सहा घटिका किंवा कांहीं अधिक व्यापिनी असून अपराण्हकालाच्या पूर्वींच समाप्त होत असेल आणि दुसऱ्या दिवसींच श्रवणयोगयुक्त असेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. कारण, अपराण्हकालीं दशमी नसली तथापि, "ज्या तिथीला घेऊन सूर्य उदय पावतो ती तिथि संपूर्ण जाणावी," इत्यादिक साकल्यबोधक वच-नेंकरून उदयकालीं व्यापिनी असून श्रवणयुक्त असी अल्प दशमी असली तथापि ती कर्म-कालीं घेण्याविषयीं सांगितलें आहे. निर्णयसिंधूमध्यें तर दुसऱ्या दिवसीं अपराण्हकालीं श्रवण असेल तरच दुसऱ्या दिवसाची घ्यावी, अपराण्हाच्या पूर्वींच श्रवण संपेल तर पूर्व दिवसाचीच घ्यावी, असें सांगितलें आहे व हें योग्यहि आहे. जेव्हां दुसऱ्या दिवसींच अपराण्हकालव्या-प्ति असेल आणि पूर्व दिवसींच अपराण्हकालानंतर सायान्हकाल इत्यादिक कालीं श्रवणयोग असेल तेव्हां तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी, असें मला वाटतें. ह्या विजयादशमीचे दिवसीं

अपराजितापूजन, शमीपूजन, सीमोल्लंघन, देशांतरीं गमन करण्याचें प्रस्थान इत्यादिक कृत्यें करावीं. **अपराजिता देवीच्या पूजेचा प्रकार**—अपराण्हकालीं ग्रामापासून ईशान्यदिशेचे ठिकाणीं जाऊन स्वच्छस्थळीं भूमि सारवून चंदन इत्यादिकानें अष्टदल काढून, " **मम सकुटुंबस्य क्षेमसिद्ध्यर्थं अपराजितापूजनं करिष्ये,** " असा संकल्प करून अष्टदलाच्या मध्यभागीं " **अपराजितायै नमः** " या नाममंत्रानें अपराजितेचें आवाहन करून तिच्या दक्षिणप्रदेशीं " **क्रियाशक्त्यै नमः** " ह्या मंत्रानें जयादेवीचें आवाहन करावें. नंतर वामभागीं " **उमायै नमः** " या मंत्रानें विजयादेवीचें आवाहन करून, "**अपराजितायै नमः, जयायै नमः, विजयायै नमः** " ह्या नाममंत्रांनीं षोडशोपचारपूजा करून प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र—" **इमां पूजां मया देवि यथाशक्ति निवेदितां ॥ रक्षार्थं तु समादाय व्रज स्वस्थानमुत्तमं**" राजानें संकल्प करणें असेल तर " **यात्रायां विजयसिद्ध्यर्थं,** " असा विशेष जाणावा. पूजा, नमस्कार झाल्यानंतर, " **हारेण तु विचित्रेण भास्वत्कनकमेखला ॥ अपराजिता भद्ररता करोतु विजयं मम,** " इत्यादिक मंत्रांनीं विजयाची प्रार्थना करून पूर्वी सांगितल्याप्रमाणें विसर्जन करावें. याप्रमाणें संक्षेप सांगितला. तदनंतर सर्व जनांनीं ग्रामापासून बाहेर जाऊन ईशान्यादिशेचे ठिकाणीं राहणारा जो शमीवृक्ष त्याची पूजा करावी. सीमोल्लंघन करणें तें शमीपूजनाच्या पूर्वी किंवा नंतर करावें. राजा असेल तर त्यानें घोड्यावर बसून उपाध्याय, प्रधान यांसहवर्तमान शमीवृक्षाचे मूळाजवळ जाऊन घोड्यावरून खालीं उतरून पुण्याहवाचन करून शमीचें पूजन करावें. नंतर कार्याचे उद्देश प्रधानासह बोलत होत्साता प्रदक्षिणा करावी. **शमीपूजेचा प्रकार**—"**मम दुष्कृतामंगलादिनिरासार्थं क्षेमार्थं यात्रायां विजयार्थंच शमीपूजां करिष्ये,**" शमी न मिळेल तर, "**अश्मंतकवृक्षपूजां करिष्ये,**" असा संकल्प करावा. राजा असेल तर त्यानें शमीवृक्षाचे मूलाचे ठिकाणीं दिक्पाल व वास्तुदेवता यांची पूजा करावी. " **अमंगलानां शमनीं शमनीं दुष्कृतस्यच ॥ दुःस्वप्रणाशिनीं धन्यां प्रपद्येहं शमीं शुभां,**" या मंत्रेंकरून शमीची पूजा करावी. पूजा झाल्यानंतर, "**शमी शमयते पापं शमी लोहितकंटका ॥ धरिण्यर्जुनबाणानां रामस्य प्रियवादिनी ॥ करिष्यमाणयात्रायां यथाकालं सुखं मया ॥ तत्र निर्विघ्नकर्त्री त्वं भव श्रीरामपूजिते,** " ह्या मंत्रेंकरून शमीची प्रार्थना करावी. अश्मंतकाचें पूजन केलें असेल तर, " **अश्मंतक महावृक्ष महादोषनिवारण ॥ इष्टानां दर्शनं देहि शत्रूणां च विनाशनं,**" ह्या मंत्रेंकरून अश्मंतकाची प्रार्थना करावी. राजानें शत्रूची मूर्ति करून ती शस्त्रानें छेदावी. प्राकृत जन शमीवृक्षाच्या खांद्या तोडून आणतात तें निर्मूल आहे. " शमीवृक्षाच्या मूलांतील ओली मृत्तिका अक्षतांसह घेऊन ती वाजत गाजत आपल्या घरीं आणावी. सौभाग्यवती स्त्रियांनीं मंगळ आरती केली होत्सातां, नंतर आपण आपल्या इष्टमित्रांसहवर्तमान भूषण, वस्त्रें इत्यादिक धारण करावीं. " ह्या विजयादशमीचे दिवसीं अन्य देशीं जाणारे असतील त्यांनीं चंद्र इत्यादिक अनुकूल नसेल तथापि विजयमुहूर्ताचे ठिकाणीं प्रयाण करावें. त्या प्रयाणाविषयीं विजयमुहूर्त दोन प्रकारचा आहे. **पहिला प्रकार**—सायंकालीं किंचित् संधिकाल टाकून किंचित् नक्षत्रें दिसायाला लागतात असा जो काल तो विजयकाल. तो सर्व कार्यें व अर्थ सफल करणारा

आहे. दुसरा प्रकार—सूर्योदयापासून अकरावा जो मुहूर्त त्याला विजय असें ह्मणतात, त्या विजयकालीं आपल्या जयाची इच्छा करणारे अशा सर्वांनीं प्रयाण करावें. या दोहोंतून कोणत्या एका दशमीयुक्त मुहूर्तावर प्रस्थान करावें, एकादशीयुक्त मुहूर्तावर करूं नये. "आश्विन-शुक्ल दशमी, तिला विजया अशी संज्ञा असून ती सर्व शुभकार्याविषयीं शुभ आहे. प्रयाणाविषयीं तर विशेषेंकरून शुभ होय. श्रवणयुक्त असेल तर अतिप्रशस्त," असें ज्योतिष ग्रंथाचें वचन आहे, याकरितां विशेष मासांची अपेक्षा न करितां होणारीं असीं दुसरीं कृत्यें ह्या विजया दशमीचे दिवसीं चंद्र इत्यादिक अनुकूल नसेल तथापि करावीं.—विशेषमासामध्यें करावयाचीं असीं जीं चूडाकर्म, विष्णु इत्यादिक देवतांची प्रतिष्ठा इत्यादिक कृत्यें तीं करूं नयेत. राजांच्या पट्टाभिषेकाविषयीं नवमीनें विद्ध असी दशमी श्रवणयुक्त असेल तथापि घेऊं नये, तर दुसऱ्या दिवसीं सूर्योदयव्यापिनी असेल तीच घ्यावी.

---

आश्विनस्यशुक्लांदशमीमेकादशींपूर्णमासींवारभ्यमुहूर्तावशिष्टायांरात्रौ तीर्थादौगत्वाप्रत्यहंमासपर्यंतंकार्तिकस्नानंकार्यं तत्प्रकारः विष्णुंस्मृत्वादेशकालौसंकीर्त्य नमः कमलनाभायनमस्तेजलशायिने नमस्तेस्तुहृषीकेशगृहाणार्घ्यंनमोस्तुते इत्यर्घ्यंदत्वा कार्तिकेहंकरिष्यामिप्रातःस्नानंजनार्दन प्रीत्यर्थंतवदेवेशदामोदरमयासह ध्यात्वाहंत्वांचदेवेशजलेस्मिन्स्नातुमुद्यतः तवप्रसादात्पापंमेदामोदरविनश्यतुइति मंत्राभ्यांस्नात्वापुनरर्घ्यद्विदद्यात् तत्रमंत्रौ नित्येनैमित्तिकेकृष्णकार्तिकेपापनाशने गृहाणार्घ्यंमयादत्तंराधयासहितोहरे व्रतिनःकार्तिकेमासिस्नातस्यविधिवन्मम गृहाणार्घ्यंमयादत्तंराधयासहितोहरे कुरुक्षेत्रगंगापुष्करादितीर्थविशेषेणफलविशेषः अथान्योपिविशेषः कार्तिकंसकलंमासंनित्यस्नायीजितेंद्रियः जपन्हविष्यभुक्दांतःसर्वपापैःप्रमुच्यते स्मृत्वाभागीरथींविष्णुंशिवंसूर्यंजलेविशेत् नाभिमात्रेजलेतिष्ठन्व्रतीस्नायाद्यथाविधि इदंकार्तिकस्नानंप्रातःस्नानंप्रातःसंध्यांचकृत्वाकार्यं ताभ्यांविनेतरकर्मानधिकारात् यद्यपिप्रातःसंध्यायाः सूर्योदयेसमाप्तिस्तथाप्यत्रवचनबलादुदयात्पूर्वं संध्यांसमाप्यकार्तिकस्नानंकार्यमितिनिर्णयसिंधौउक्तं नैवंग्रंथांतरेदृश्यते एवंमासस्नानाशक्तौत्र्यहंस्नायात् अन्येषामपिकार्तिकमासव्रतानामत्रैवारंभःतानियथा तुलसीदललक्षेणकार्तिकेयोऽर्चयेद्धरिं पत्रेपत्रेमुनिश्रेष्ठमौक्तिकंलभतेफलं तुलसीमंजरीभिर्हरिहराचनेमुक्तिः फलंरोपणपालनस्पर्शैःपापक्षयःतुलसीछायायांश्राद्धात्पितृतृप्तिः तुलसीशोभितगृहेतीर्थरूपेयमकिंकरानायांतिइत्यादितुलसीमाहात्म्यं एवंधात्रीमाहात्म्यमपि कार्तिकेधात्रीवृक्षाधश्चित्रान्नैस्तोषयेद्धरिं ब्राह्मणान्भोजयेत्भक्त्यास्वयंभुंजीतबंधुभिः धात्रीछायासुश्राद्धंधात्रीपत्रैःफलैश्चहरिपूजनंचमहाफलं देवर्षिसर्वयज्ञतीर्थानांधात्रीवृक्षेनिवासोक्तेः अत्रैवहरिजागरविधिः जागरंकार्तिकेमासियःकुर्यादरुणोदये दामोदराग्रेसेनानीर्गोसहस्रफलंलभेत् शिवविष्णुगृहाभावेसर्वदेवालयेष्वपि कुर्यादश्वत्थमूलेषुतुलसीनांवनेष्वपि विष्णुनामप्रबंधानियोगायेद्विष्णुसन्निधौ गोसहस्रप्रदानस्यफलमाप्नोतिमानवः वाद्यकृत्पुरुषश्चापिवाजपेयफलंलभेत् सर्व

तीर्थावगाहोत्थनर्तकः फलमाप्नुयात् सर्वमेतल्लभेत्पुण्यंतेषांतुद्रव्यदःपुमान्अर्चनाद्दर्शनाद्वापि तत्षड्ंशमवाप्नुयादितिकौस्तुभे सर्वाभावेब्राह्मणानांविष्णुभक्तानांवाश्वत्थवटयोर्वासेवनंकु- र्यादितितत्रैव सरोरुहाणितुलसीमालतीमुनिपुष्पकं कार्तिकेविहितान्येवंदीपदानंचपंचमं कार्तिकेमासोपवासोवानप्रस्थयतिविधवाभिःकार्यः गृहस्थैर्नकार्यः कृच्छ्रंवाप्यतिकृच्छ्रंवाप्रा जापत्यमथापिवा एकरात्रंव्रतंकुर्यात्त्रिरात्रव्रतमेववा शाकाहारंपयोहारंफलाहारमथापिवा च रेयवान्नाहारंवासंप्राप्तेकार्तिकेव्रती ॥

## आतां कार्तिकस्नानाचा निर्णय सांगतों.

आश्विनशुद्ध दशमी, एकादशी किंवा पौर्णिमा यांतून कोणत्याहि दिवसीं कार्तिकस्नानाला आरंभ करावा. पाहांटे दोन घटिका रात्र शेष राहिल्यानंतर उठून तीर्थ इत्यादिकांचे ठि- काणीं जाऊन दररोज एक महिनापर्यंत कार्तिकस्नान करावें. त्याचा प्रकार–विष्णूचें स्मरण करून देशकालांचा उच्चार केल्यानंतर, "नमः कमलनाभाय नमस्ते जलशायिने ॥ नमस्तेस्तु हृषीकेश गृहाणार्घ्यं नमोस्तुते," या मंत्रेंकरून अर्घ्य देऊन, "कार्तिकेऽहं करिष्यामि प्रातःस्नानं जनार्दन ॥ प्रीत्यर्थं तव देवेश दामोदर मयासह ॥ ध्यात्वाऽहं त्वांच देवेश जलेस्मिन् स्नातुमुद्यतः ॥ तव प्रसादात्पापं मे दामोदर विनश्यतु," ह्या मंत्रांनीं स्नान करून पुनः दोन वेळ अर्घ्य द्यावें, त्याचा मंत्र–" नित्ये नैमित्तिके कृष्ण कार्तिके पापना- शने ॥ गृहाणार्घ्यं मया दत्तं राधया सहितो हरे ॥ व्रतिनः कार्तिके मासि स्नातस्य वि- धिवन्मम ॥ गृहाणार्घ्यं मया दत्तं राधया सहितो हरे." कुरुक्षेत्र, गंगा, पुष्कर इत्या- दिक विशेषतीर्थांचे ठिकाणीं विशेष फलें जाणावीं. यानंतर दुसराहि विशेष प्रकार सां- गतों.–" सर्व कार्तिक मासपर्यंत नित्य स्नान करणारा, जितेंद्रिय, जय करणारा, हविष्यान्न भोजन करणारा, दांत (कामक्रोधादिकांतें दमन करणारा), असा जो तो सर्व पापांपासून मुक्त होतो." "भागीरथी, विष्णु, शिव आणि सूर्य यांचें स्मरण करून जलांत प्रवेश क- रावा, व नाभिप्रमाण उदकांत उभा रहात होत्साता व्रती (व्रत धारण करणारा) त्यानें यथाविधि स्नान करावें. हें कार्तिकस्नान करणें तें, प्रातःस्नान व प्रातःसंध्या हीं करून नंतर करावें; कारण प्रातःस्नान व प्रातःसंध्या हीं केल्यावांचून इतर कर्म करण्याला अधिकार नाहीं. जरी प्रातःसंध्येची समाप्ति सूर्योदयकालीं होते असें आहे तत्रापि याविषयीं विशेष वचन आहे. यास्तव उदयाच्या पूर्वीं प्रातःसंध्या समाप्त करून कार्तिकस्नान करावें, असें निर्णयसिंधूंत सां- गितलें आहे. इतर ग्रंथांत याप्रमाणें आढळत नाहीं. एक महिन्यापर्यंत स्नान करण्याला सामर्थ्य नसेल तर तीन दिवस स्नान करावें. कार्तिकमाससंबंधी असीं इतर जीं व्रतें त्यां- चाहि प्रारंभ ह्याच दिवसीं करावा. तीं व्रतें असीं,–" जो कार्तिक मासांत लक्षसंख्याक तुल- सीपत्रांनीं हरीचें पूजन करितो त्याला हे मुनिश्रेष्ठा, दरएक पत्रापत्राचे ठिकाणीं मुक्ति फल मिळतें. तुलसींच्या मंजरींनीं हरि, हर यांचें पूजन केलें असतां मुक्तिफल मिळतें. तुलसींची लावणी, पालन, स्पर्श हीं केल्यानें पापांचा क्षय होतो. तुलसींच्या छायेमध्यें श्राद्ध केलें अ- सतां पितरांची तृप्ति होते. तुलसींनीं शोभायमान अशा तीर्थरूपी गृहाचे ठिकाणीं यमाचे दूत

येत नाहींत," इत्यादिक तुलसीचें माहात्म्य सांगितलें आहे. याप्रमाणें आंवळीचेंहि माहात्म्य सांगितलें आहे. "कार्तिक मासांत आंवळीच्या वृक्षाखालीं चित्रान्नांनीं हरीचा संतोष करावा; ह्मणजे चित्रान्नाचा नैवेद्य समर्पण करावा, व भक्तीनें ब्राह्मणाला भोजन देऊन स्वकीय बांधवांसहवर्तमान आपण भोजन करावें. आवळीच्या छायेचे ठिकाणीं श्राद्ध केलें असतां आणि आवळीच्या पत्रांनीं व फळांनीं हरीची पूजा केली असतां महाफल मिळतें. कारण आवळीचे ठिकाणीं देव, ऋषि, सर्व यज्ञ आणि सर्व तीर्थें हीं रहातात असें वचन आहे." ह्या कार्तिक मासामध्यें हरिजागराचा विधि करावा. "कार्तिक मासांत अरुणोदयकालीं जो दामोदराच्या पुढें जागरण ( कीर्तनादिकानें ) करितो त्याला हे षडानना, सहस्रगोदानाचें फल मिळतें. शिव, विष्णु यांचे देवालयांत जागर करावा. शिव, विष्णु यांचीं देवालयें नसतील तर इतर सर्व देवालयांचे ठिकाणींहि हरिजागर करावा. त्यांचा अभावतर अश्वत्थवृक्षाच्या मूलांचे ठिकाणीं अथवा तुलसींच्या वनांचे ठिकाणींहि जागर करावा. विष्णूच्या जवळ जो विष्णूच्या नामप्रबंध कथांचें गायन करितो त्याला सहस्रगोदान केल्याचें फळ मिळतें. वाद्यें वाजविणारा जो त्यालाहि वाजपेय यज्ञाचें फळ मिळतें. नृत्य करणारा ( हरिजागरांत ) त्याला सर्व तीर्थांमध्यें स्नान केल्याचें फळ मिळतें. हरिजागर करणारे त्यांला द्रव्य दिलें असतां सर्व पुण्य मिळतें. पूजा, दर्शन इत्यादिक केलें असतां हरिजागराचें षष्ठांश पुण्य मिळतें," असें कौस्तुभांत सांगितलें आहे. देवालयादिक नसेल तर ब्राह्मण, विष्णुभक्त, पिंपळ, किंवा वटवृक्ष यांची सेवा करावी असें कौस्तुभांतच सांगितलें आहे. कार्तिकमासांत कमलें, तुलसी, जाई, चमेली, अगस्तिपुष्पें हीं प्रशस्त आहेत; याकरितां या पुष्पांनीं विष्णूची पूजा करावी, व दीपदानहि करावें. कार्तिक मासांत एक महिन्यापर्यंत उपोषण, वानप्रस्थ ( तपाच्या उद्देशानें वनांत राहणारे ), संन्यासी आणि विधवा यांनीं करावें, गृहस्थाश्रमी जे त्यांनीं करूं नये. कार्तिक मास प्राप्त झाला असतां व्रत धारण करणारानें कृच्छ्र, अतिकृच्छ्र, अथवा प्राजापत्य, करावें. किंवा एकरात्र, त्रिरात्र असें करावें. अथवा शाकाहार, दुधाचा आहार, फलाहार यांतून कोणतेंहि करावें, अथवा यवांचे अन्नाचा आहार करावा.

---

अथकार्तिकेवर्ज्यानिपलांडुलशुनहिंगुछत्राकगृंजनमूलकालाबुशिग्रुवृंताककूष्मांडबृहतीफलकलिंगकपित्थतैललवणशाकद्विपाचितान्नपर्युषितान्नदग्धान्नानि माषमुद्गमसूरचणककुलित्थनिष्पावाढक्यादिद्विदलानिचवर्जयेत् सप्तम्यांधात्रीफलंतिलांश्चाष्टम्यांनालिकेरंरविवारे धात्रीफलंसर्वदावर्ज्यं ॥

## आतां कार्तिक मासांत वर्ज्य पदार्थ कोणते ते सांगतों.

कार्तिकमासामध्यें पलांडु ( कांदा ), लसूण, हिंग, भुईफोड ( आळंबें ), गाजरें, मुळा, पांढरा भोपळा, शेवग्याचा पाला आणि फुलें व शेंगा, शाकविशेष, कलिंगण, कंवठ, तेल, लोणचीं, दोन वेळ शिजवलेलें अन्न, शिळें अन्न, करपलेलें अन्न, हे पदार्थ वर्ज्य करावे. उडीद, मूग, मसुरा, हरभरे, कुळिथ, पावटा, पांढरा पावटा, चवळी, काळा वाल, घेवडा,

आणि तूर इत्यादिक द्विदल धान्यें वर्ज्य करावीं. सप्तमीचे दिवसीं आंवळे, तिल हे वर्ज्य करावे. अष्टमीचे दिवसीं नारळ, रविवारीं आंवळे हे पदार्थ सर्वदा वर्ज्य करावे.

---

कांस्यपात्रभोजनवर्जनव्रतेकांस्यपात्रंघृतपूर्णंदद्यात् मधुत्यागेघृतपायसशर्करादानंसमाप्तौ कार्यं तैलत्यागेतिलदानं कार्तिकेमौनभोजीसतिलांघंटांदद्यात् स्वर्णयुतानिमाषयुतानित्रिंशत्कूष्मांडान्यत्रमासेदद्यात् कार्तिकेकांस्यभोजीकृमिभुक् फलवर्जनेफलंरसत्यागेरसोधान्यत्यागेधान्यानिदेयानि सर्वत्रगोदानंवा एकतः सर्वदानानिदीपदानंतथैकतः कार्तिकेदीपदानस्यकलांनार्हंतिषोडशीं एतावद्व्रतासंभवेचातुर्मास्यव्रतासंभवेवाकार्तिकेकिंचिद्व्रतमवश्यंकार्यं अव्रतःकार्तिकोयेषांगतोमूढधियामिह तेषांपुण्यस्यलेशोपिनभवेत्सूकरात्मनामित्युक्तेः शालग्रामादिदेवताग्रेस्वस्तिकमंडलादिकंरंगवल्यादिनाकरोतिसास्वर्गादिफलंभुक्त्वासप्तजन्मसुवैधव्यंनाप्नोति कार्तिकेपुराणेतिहासश्रवणारंभसमाप्तीविहिते ॥

## आतां व्रतांच्या समाप्तीचे दिवसीं कोणतीं दानें करावीं तें सांगतों.

कांस्यपात्रांत भोजन वर्ज्य केलेल्या व्रताचे ठिकाणीं तुपानें भरलेलें कांस्यपात्र द्यावें. मधाचा त्याग केला असेल तर तूप, क्षीर, साखर, यांचें दान समाप्तीचे दिवसीं करावें. तेल सोडलें असल्यास तिळांचें दान करावें. कार्तिक मासांत भोजनकाळीं मौन धरणारा त्यानें तिळांसहवर्तमान घंटादान करावें. इतर मासांत भोजनकालीं मौन धारण केलें असेल तर सुवर्ण, उडीद यांहीं युक्त असे तीस कोहळे द्यावे. कार्तिकमासीं कांस्यपात्रांत भोजन केलें असतां कीटक भक्षण केले असें होतें. फलें वर्ज्य केलीं असतां जीं फलें वर्ज्य केलीं असतील त्यांचें दान करावें. रस वर्ज्य केले असल्यास त्या त्या रसाचें दान करावें. धान्यें वर्ज्य केलीं असल्यास तीं तीं धान्यें द्यावीं. अथवा सर्व व्रतांचे ठिकाणीं गोदान करावें. "सर्व दानें एकीकडे आणि दीपदान एकीकडे, ह्मणजे सर्व दानांमध्यें दीपदान उत्तम आहे, याकरितां कार्तिकमासांत दीपदानाच्या पुण्याचा सोळावा अंश सुद्धां इतर दानें पावत नाहींत." इतकीं (पूर्वी सांगितलेलीं) व्रतें होण्याचा संभव नसेल किंवा चातुर्मास्य व्रतांचा संभव नसेल तर कार्तिक मासांत कांहीं अल्प तरी अवश्य व्रत करावें. कारण ज्यांचा कार्तिक मास व्रतावांचून गेला त्यांना ह्या लोकीं लेश मात्र पुण्य मिळत नसून ते मूढबुद्धि व डुकरासारखे लेखावे, असें वचन आहे. जी स्त्री, शाळग्राम इत्यादिक देवांच्या पुढें रांगोळी इत्यादिक घालून स्वस्तिकें, सर्वतोभद्र इत्यादिक मंडळें घालते तिला स्वर्गादिक फळ मिळून सप्त जन्मपर्यंत वैधव्य प्राप्त होत नाहीं. कार्तिक मासामध्यें पुराण, इतिहास (भारत इत्यादिक) यांच्या श्रवणाचा आरंभ, व समाप्ति हीं करावीं.

---

तत्प्रकारः ब्राह्मणंवाचकंकुर्यान्नान्यवर्णजमादरात् श्रावयेच्चतुरोवर्णान्कृत्वाब्राह्मणमग्रतः विस्पष्टमद्रुतंशांतंस्पष्टाक्षरपदंतथाकलास्वरसमायुक्तंरसभावसमन्वितं ब्राह्मणादिषुसर्वेषुग्रंथार्थंचार्पयेन्नृपयएवंवाचयेद्राजन्सविप्रोव्यासउच्यते. समाप्तेषुपुराणेषुशास्त्यातंतर्पयेन्नृप वाचकः

**पूजितोयेनप्रसन्नास्तस्यदेवताः श्राद्धेयस्यद्विजोभुंक्तेवाचकःश्रद्धयान्वितःभवंतिपितरस्तस्यतृप्ता वर्षशतंनृपेति कार्तिकस्नानकालेऽभिलाषाष्टकंकाशीखंडोक्तंपुत्रकामेनपठितव्यं अत्रैवदुग्धव्रतंसमर्प्यदुग्धदानंकृत्वाद्विदलव्रतंसंकल्पयेत् अत्रोत्पत्तौयेषांदलद्वयंदृश्यतेतेवर्जनीयाइत्येके अन्येत्वेवंलक्षणायांवचनाभावात्स्वरूपतोयेषांद्विदलंदृश्यतेतेवर्ज्यानतुअन्येनापिपत्रपुष्पादिकमित्याहुःएवमन्यान्यपितांबूलकेशकर्तनादिवर्जनरूपाणिव्रतानिज्ञेयानि अत्राकाशदीपउक्तःसूर्यास्तेगृहाददूरेपुरुषप्रमाणयज्ञियकाष्ठंभूमौनिखन्यतस्यमूर्ध्निअष्टदलाद्याकृतिनिर्मितेदीपयंत्रेमध्येमुख्यदीपं समंततोष्टाविति संस्थाप्यनिवेदयेत् दामोदरायनभसितुलायांदोलयासह प्रदीपंतेप्रयच्छामिनमोनंतायवेधसइतिमंत्रः एवंमासमाकाशदीपदानान्महाश्रीप्राप्तिः ॥**

## आतां पुराणश्रवणाचा विधि सांगतों.

“ पुराण वाचणारा ब्राह्मण असावा. इतर वर्णाचा असूं नये. ब्राह्मण श्रोता पुढें बसवून ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र ह्या चार वर्णांला पुराणश्रवण करवावें. पुराण वाचणारानें श्लोक वाचणें व ग्रंथाचा अर्थ सांगणें तो, विशेषेंकरून स्पष्ट, सावकाश, शांतवृत्तीनें, असें वाचावें व अर्थ सांगावा. आणि ज्यामध्यें अक्षरें, पदें, कला, स्वर, रस, भाव हीं यथायोग्य असावीं. याप्रमाणें हे राजा, पुराण वाचणारानें ग्रंथाचा अर्थ ब्राह्मणादिक सर्व जातींला सांगावा. याप्रमाणें जो ब्राह्मण पुराण वाचतो त्याला व्यास असें ह्मणतात. असीं पुराणें समाप्त झाल्यानंतर वाचकाची यथाशक्ति वस्त्रें, अलंकार इत्यादिकेंकरून पूजा करावी. ज्यानें वाचकाची पूजा केली त्याला सर्व देव प्रसन्न होतात. हे राजा, ज्याच्या श्राद्धाचे ठिकाणीं भक्तिपुरःसर वाचक ब्राह्मण भोजन करितो, त्याचे पितर शंभर वर्षेंपर्यंत तृप्त होतात.” ज्याला पुत्रकामना असेल त्यानें कार्तिकस्नानकालीं, काशीखंडांत सांगितलेलें जें अभिलाषाष्टक स्तोत्र त्याचा पाठ करावा. ह्याच दिवसीं दुग्धव्रत समाप्त करून दुधाचें दान करावें, आणि द्विदल व्रताचा संकल्प करावा. ह्या द्विदल धान्यांमध्यें उत्पत्तिकालीं ज्यांचें द्विदल दिसतें तीं वर्ज्य करावीं, असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, अशा लक्षणेविषयीं ह्मणजे उत्पत्तिकालीं ज्यांचें द्विदल दिसतें तीं वर्ज्य करावीं याविषयीं प्रमाणभूत वचन नाहीं याकरितां स्वरूपेंकरून ज्यांचें द्विदल दिसतें तीं धान्यें वर्ज्य करावीं, दुसरीं वर्ज्य करूं नयेत, व पत्र, पुष्पें इत्यादिकहि वर्ज्य नाहींत असें ह्मणतात. याप्रमाणें इतर तांबूलभक्षण न करणें, श्मश्रु न करणें इत्यादिकहि व्रतें जाणावीं. ह्या कार्तिक मासामध्यें आकाशदिवा लावावा. त्याचा प्रकार—सूर्यास्तसमयीं आपल्या गृहापासून जवळ पुरुषप्रमाण ( साडेतीन हात ) यज्ञास योग्य असें काष्ठ भूमींत पुरून त्या काष्ठाचे शिरोभागीं अष्टदल इत्यादिक आकारानें केलेलें असें जें दीपांचें यंत्र त्याचे मध्यभागीं मुख्य दिवा लावून त्याच्या सभोंवार आठ दिशांला आठ दिवे लावावे, आणि देवाला अर्पण करावा. याचा मंत्र—“**दामोदराय नभसि तुलायां दोलया सह ॥ प्रदीपं ते प्रयच्छामि नमोऽनंताय वेधसे,**” ह्या मंत्रेंकरून दिवा लावावा. **याप्रमाणें मासपर्यंत आकाशदिवा लावला असतां महासंपत्ति प्राप्त होते.**

**आश्विनपौर्णमास्यांकोजागरव्रतं** सापूर्वत्रैवनिशीथव्याप्तौपूर्वा उत्तरदिनेएवदिनद्वयेपि **वानिशीथव्याप्तौदिनद्वयेनिशीथास्पर्शे**वाउत्तरैव केचित्पूर्वदिनेनिशीथव्याप्तिरेवपरदिनेप्रदो**षव्याप्तिरेवतदापरेत्याहुः अत्रलक्ष्मींद्रयोःपूजनंजागरणमक्षक्रीडाचविहितातत्रपद्मासनस्थां** लक्ष्मींध्यात्वाक्षतपुंजे ॐलक्ष्म्यैनमइत्यावाहनादिषोडशोपचारैःसंपूज्य नमस्तेसर्व**देवानांवर** दासिहरिप्रिये यागतिस्त्वत्प्रपन्नानांसामेभूयात्त्वदर्चनादितिपुष्पांजलिंदत्वानमेत् **चतुर्दंतसमारूढोवज्रपाणिःपुरंदरः शचीपतिश्चध्यातव्योनानाभरणभूषितइतिध्यात्वाक्षतपुंजादौइंद्राय नमइतिसंपूज्य विचित्रैरावतस्थायभास्वत्कुलिशपाणये पौलोम्यालिंगितांगायसहस्राक्षायते नमइतिपुष्पांजलिंदत्वानमेत् नालिकेरोदकंपीत्वाअक्षक्रीडांसमारभेत् निशीथेवरदालक्ष्मीः कोजागर्तीतिभाषिणी तस्मैवित्तंप्रयच्छामिअक्षैःक्रीडांकरोतियः नालिकेरान्पृथुकांश्चदेवपितृभ्यःसमर्प्यबंधुभिःसहस्वयंभक्षयेत् अस्यामेवाश्वयुजीकर्माश्वलायनैःकार्यं तत्रपर्वद्वैधेपूर्वाण्हेसंधौशेषपर्वणिप्रकृतीष्टिंकृत्वाकार्यं अपराण्हसंधौविकृतिमिमांकृत्वाप्रकृतेरन्वाधानं तत्प्रयोगोन्यत्रज्ञेयः ॥**

## आतां कोजागरव्रत सांगतों.

आश्विन पौर्णिमेचे दिवसीं कोजागरव्रत करावें. त्या व्रताविषयीं पौर्णिमा घेणें ती पूर्व दिवसींच निशीथव्यापिनी असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी. जर दुसऱ्या दिवसींच किंवा दोनहि दिवसीं निशीथव्यापिनी असेल, अथवा दोनहि दिवसीं निशीथकाळीं स्पर्श नसेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. कोणी ग्रंथकार, पूर्वदिवसींच निशीथव्याप्ति, व दुसऱ्या दिवसीं प्रदोषव्याप्तिच असी असेल तेव्हां दुसऱ्या दिवसाची घ्यावी, असें ह्मणतात. ह्या कोजागरव्रताचे ठिकाणीं लक्ष्मी व इंद्र यांची पूजा करून जागरण व द्यूत करावें. त्याविषयीं पद्मासनावर बसलेली असी जी लक्ष्मी, तिचें ध्यान करून अक्षतांच्या राशीचे ठिकाणीं "**ॐ लक्ष्म्यै नमः**" या मंत्रानें आवाहनादिक षोडशोपचारांनीं पूजा करावी, आणि "**नमस्ते सर्वदेवानां वरदासि हरिप्रिये ॥ या गतिस्त्वत्प्रपन्नानां सा मेभूयात्त्वदर्चनात्,**"या मंत्रेंकरून पुष्पांजलि देऊन नमस्कार करावा. नंतर, "**चतुर्दंतसमारूढो वज्रपाणिः पुरंदरः ॥ शचीपतिश्च ध्यातव्यो नानाभरणभूषितः**" या मंत्रेंकरून इंद्राचें ध्यान करून अक्षतांची राशि इत्यादिक ठिकाणीं "**इंद्राय नमः**" या मंत्रेंकरून पूजा करून, "**विचित्रैरावतस्थाय भास्वत्कुलिशपाणये ॥ पौलोम्यालिंगितांगाय सहस्राक्षाय ते नमः**" या मंत्रेंकरून पुष्पांजलि देऊन नमस्कार करावा. "नारळांतील उदक प्राशन करून द्यूत आरंभावें. वर देणारी असी लक्ष्मी मध्यरात्रीं गृहाचे ठिकाणीं येऊन पाहते व कोण जागरण करीत आहे, द्यूत करून जो जागरण करितो त्याला मी द्रव्य देईन असें भाषण करिते." नारळ, पोहे इत्यादिक पदार्थ देव, पितर यांला देऊन बांधवांसह आपण भक्षण करावे. ह्याच पौर्णिमेचे दिवसीं आश्वलायनशाखी यांनीं आश्वयुजी कर्म करावें. पर्व दोन प्रकारचें असेल तर पूर्वाण्हसंधीचे ठिकाणीं शेषपर्व असेल त्याचे ठिकाणीं पूर्वी प्रकृतिइष्टि करून नंतर आश्वयुजी कर्म करावें. अपराण्हसंधीचे ठिकाणींही विकृति करून प्रकृतिइष्टीचें अन्वाधान करावें. त्याचा प्रयोग इतर ठिकाणीं पाहावा.

---

अथाग्रयणकालः आश्विनकार्तिकयोःपूर्णमास्याममावास्यायांवाशुक्लपक्षगतकृत्तिकादिविशाखांतनक्षत्रेषुशुक्लपक्षस्थरेवत्यांवाव्रीह्याग्रयणं एवंश्रावणभाद्रपदयोरुक्तेषुपर्वसुनक्षत्रेषु वाश्यामाकाग्रयणं चैत्रवैशाखयोःपर्वादिषुयवाग्रयणं तत्रपूर्णमासीपर्वणिसंगवात्पूर्वसंधौपूर्वदिनेआग्रयणंकृत्वाप्रकृत्यन्वाधानं मध्यान्हात्परसंधौसंधिदिनेआग्रयणंकृत्वाप्रकृत्यन्वाधानं मध्यान्हेसंगवादूर्ध्वंमध्यान्हात्पूर्वेत्रवासंधौसंधिदिनेआग्रयणेष्टिंकृत्वा प्रकृतीष्टिःसद्यःकार्या दर्शेतुपूर्वाण्हेपराण्हेवासंधौयथाकालंदर्शेष्टिंकृत्वाप्रतिपन्मध्येआग्रयणेष्टिःकार्या एवंनक्षत्राग्रयणपक्षेपिपौर्णमासेष्टेःप्राक्दर्शेष्टेःपरंयथाभवेत्तथाग्रयणंकार्यं तथाचदीपिकादर्शेष्टयाःपरमुक्तमाग्रयणकंप्राक्पौर्णमासाच्चतदिति यद्यपिअथोपूर्वाण्हपर्वक्षयइत्युपक्रमात्पूर्वाण्हसंधावेवायंक्रमइतिहेमाद्रिसिद्धांतानुसारिदीपिकामतं तथापिसर्वावस्थेसंधावित्थमेवक्रमइतिकौस्तुभसिद्धांतानुसार्यत्रत्यसिद्धांतोज्ञेयः अत्रपक्षेअथोपदंचार्थेयोज्यं पूर्वाण्हेपर्वक्षयेचेत्यर्थः इत्थंच कृष्णपक्षेनभवतीतिसिद्धं. एतद्दीपिकाकारमतममावास्यापर्वण्याग्रयणविधानस्याखंडदर्शेवैयर्थ्यापत्त्या नयुक्तमितिगृह्याग्निसागरोक्तिर्नसमीचीनाप्रतिभाति विकृत्यंतराणांखंडपर्वणिप्रकृत्युत्तरंप्रतिपद्यनुष्ठानेपिपर्वानुग्रहसंमतिवदखंडदर्शेपिप्रतिपदिक्रियमाणाग्रयणस्यदर्शपर्वानुग्रहसंमतिसंभवात् खंडदर्शेदर्शपर्वविधानसार्थक्यसंभवाच्चेतिदिक् श्रावणादौश्यामाकाग्रयणंनकृतंचेच्छरदिव्रीह्याग्रयणेनसमानतंत्रंकार्यं तत्रस्मार्तेव्रीह्याग्रयणंश्यामाकाग्रयणंचतंत्रेणकरिष्ये इतिसंकल्प्यैंद्राग्निविश्वेदेवार्थाष्टौव्रीहिमुष्टीन्निरूप्यशूर्पांतरेश्यामाकान्सोमायनान्निरूप्यपुनःप्रथमशूर्पेद्यावापृथिव्यर्थंव्रीहिनिर्वापः एवंहोमेपिविश्वेदेवहोमात्परंसौम्यश्यामाकचरुंहुत्वाद्यावापृथिवीहोमः आश्विनपौर्णमास्यामपराण्हादिसंधावाग्रयणेक्रियमाणेआश्वयुजीकर्मणापिसमानतंत्रताकार्या तथाचजीर्णव्रीहिचरुर्नवव्रीहिचरुःनवश्यामाकचरुश्चेतिस्थालीत्रयेचरुत्रयं पूर्वाण्हादिसंधौतुसंधिदिनेप्रकृतियागोत्तरमाश्वयुजीपूर्वदिनेसंधिदिनेवाप्रकृतियागात्पूर्वमाग्रयणमितिकालैक्याभावान्नैकतंत्रता श्यामाकचर्वसंभवेश्यामाकतृणैः प्रस्तरंकृत्वास्रुवादुत्तरआस्तीर्यतत्रस्रुचोनिधानंतावतैवश्यामाकाग्रयणसिद्धिरितिवृत्तिकृन्नारायणः यवाग्रयणंतुकृताकृतं व्रीह्याग्रयणस्यवसंतपर्यंतंगौणकालः यवाग्रयणस्यवर्षर्तुपर्यंतं अनापदिगौणकालेकुर्वन्कालातिपत्तिप्रायश्चित्तपूर्वकमाग्रयणंकुर्यात् आपदिगौणकालेकुर्वन्प्रायश्चित्तंनकुर्यात् गौणकालेप्यतिक्रांतेवैश्वानरेष्टिप्रायश्चित्तंकृत्वातिक्रांताग्रयणंकुर्यात् स्मार्तेतुवैश्वानरदेवताकःस्थालीपाकोग्राह्यः यएवाहिताग्नेःपुरोडाशास्तएवौपासनाग्निमतश्चरवइत्युक्तेः प्रथमाग्रयणस्यशरदत्ययेविभ्रष्टेष्टिंतद्देवताकंस्थालीपाकंवाकृत्वा आगामिमुख्यकाले प्रथमाग्रयणंकार्यं गौणकालेप्रथमाग्रयणंनभवति अनारब्धानांदर्शपूर्णमासाग्रयणादीनांप्रायश्चित्तविकल्पाद्विभ्रष्टेष्टिरपिविकल्पिताज्ञेया आग्रयणमकृत्वाकिमपिनवोत्पन्नंसस्यंनभक्षणीयं अकृताग्रयणोश्नीयान्नवान्नंयदिवैनरः वैश्वानरायकर्तव्यश्चरुःपूर्णाहुतिस्तुवा यद्वासमिंद्ररायेतिशतवारंजपेन्मनुं ॥

## यानंतर आग्रयणाचा काल सांगतों.

आश्विन व कार्तिक या मासांत पौर्णिमा किंवा अमावास्या यांचे ठिकाणीं आग्रयण करावें.

अथवा पूर्वी सांगितलेल्या मासामध्यें शुक्लपक्षांतील कृत्तिकांपासून विशाखांपर्यंत जीं चवदा नक्षत्रें त्यांचे ठिकाणीं किंवा शुक्लपक्षांतील रेवती नक्षत्राचे ठिकाणीं व्रीह्याग्रयण करावें. याप्रमाणें श्रावण व भाद्रपद या मासांत पूर्वी सांगितलेल्या पर्वदिवसीं अथवा नक्षत्रांचे ठिकाणीं श्यामाक ( सांवे ) यांचें आग्रयण करावें. चैत्र व वैशाख या मासांमध्यें पर्वादिकांचे ठिकाणीं यवांचें आग्रयण करावें. आग्रयणाविषयीं पौर्णमासीपर्वाचे ठायीं संगवकालाहून पूर्वी पर्वप्रतिपदांचा संधि असतां पूर्व दिवसीं आग्रयण करून प्रकृतीष्टीचें अन्वाधान करावें. मध्यान्हकालाच्या पुढें संधि असेल तर संधिदिवसीं आग्रयण करून प्रकृतिइष्टीचें अन्वाधान करावें. संगवकालानंतर मध्यान्हकालीं अथवा मध्यान्हाच्या पूर्वी संधि असेल तर संधिदिवसीं आग्रयणेष्टि करून प्रकृतिइष्टि तत्कालीं करावी. अमावास्या पर्व असेल तर पूर्वाण्हकालीं किंवा अपराण्हकालीं संधि असल्यास यथाकालीं दर्शेष्टि करून प्रतिपदेमध्यें आग्रयणेष्टि करावी. याप्रमाणें नक्षत्राग्रयणाच्या पक्षींहि पौर्णिमेष्टीच्या पूर्वी, आणि अमावास्येष्टीच्या नंतर जसें होईल त्याप्रमाणें आग्रयण करावें. याविषयीं दीपिकेमध्यें " दर्शेष्टीच्या नंतर, आणि पौर्णिमा इष्टीच्या पूर्वी आग्रयण करावें असें सांगितलें आहे." जरीहि **"अथो पूर्वाण्हपर्वक्षये"** असा आरंभ आहे याकरितां पूर्वाण्हसंधीचे ठिकाणीं, पर्वक्षयकालीं हा क्रम जाणावा; असें हेमाद्रीच्या सिद्धांताला मिळणारें दीपिकामत आहे, तथापि कसाहि संधि असला तरी याप्रमाणेंच क्रम होतो, असा कौस्तुभाच्या सिद्धांताला मिळणारा एथील सिद्धांत जाणावा. ह्या पक्षीं '**अथो**' हें पद चकारार्थी योजावें, आणि 'पूर्वाण्हसंधीचे व पर्वक्षयाचे ठिकाणीं' असा अर्थ करावा. याप्रमाणें कृष्णपक्षाचे ठिकाणीं होत नाहीं असें सिद्ध झालें. अमावास्यापर्वाचे ठिकाणीं आग्रयण करावें ह्मणून सांगितलें त्यापेक्षां अखंड अमावास्येचे दिवसीं व्यर्थत्वाची आपत्ति येणार याकरितां हें दीपिकाकाराचें मत योग्य नाहीं, असें गृह्याग्निसागराचें मत आहे तें प्रशस्त नाहीं असें मला वाटतें. कारण, खंडपर्व असतां प्रकृतीच्या नंतर अन्य विकृति प्रतिपदेचे ठिकाणीं केल्या तथापि पर्वाचे ठिकाणीं केल्यासारखें जसें फळ येतें तसें अखंड अमावास्या असली तथापि प्रतिपदेचे ठिकाणीं करावयाचें जें आग्रयण त्याला अमावास्यापर्वाचें फल, मिळण्याच्या संमतीचा संभव आहे. खंड अमावास्या असतां अमावास्यापर्वाचे विधानेंकरून सार्थकता होण्याचा संभव आहे, याप्रमाणें सिद्धांत जाणावा. श्रावण इत्यादिक मासांचे ठिकाणीं श्यामाकांचें ( सांव्यांचें ) आग्रयण न केलें तर शरदृतूचे ठिकाणीं व्रीहींच्या आग्रयणासह समान तंत्र करावें. त्याविषयीं स्मार्ताग्नीचे ठिकाणीं, **"व्रीह्याग्रयणं श्यामाकाग्रयणं च तंत्रेण करिष्ये,"** असा संकल्प करून **इंद्राग्नि** व **विश्वेदेव** या देवतांकरितां सुपांत आठ मुठी तांदूळ घेऊन दुसऱ्या सुपांत आठ मुठी श्यामाक **"सोमाय०"** ह्या नाममंत्रानें घेऊन पुनः पहिल्या सुपामध्यें **द्यावापृथिवी** देवतांसाठीं तांदूळ घ्यावे. याप्रमाणें होमाचे ठिकाणींहि **विश्वेदेव** होम झाल्यानंतर **सोमदेवताक** जो श्यामाकचरु त्याचा होम करून मग **द्यावापृथिवी** देवतांचा होम करावा. आश्विन पौर्णिमेचे दिवसीं अपराण्ह इत्यादिक संधीचे ठिकाणीं आग्रयण करणें तें आश्वयुजीकर्मासह समान तंत्रेंकरून आग्रयण करावें. तसेंच जुन्या तांदुळांचा चरु, नव्या तांदुळांचा चरु, आणि नवा असा श्यामाकचरु,

असे तीन चरु तीन पात्रांचे ठिकाणीं पृथक् पृथक् करावे. पौर्णिमेच्या दिवसीं पूर्वाण्ह इत्यादिक संधि असेल तर संधिदिवसीं प्रकृतियाग केल्यानंतर आश्वयुजीकर्म करून पूर्व दिवसीं किंवा संधिदिवसीं प्रकृतियागाच्या पूर्वीं आग्रयण करावें. याप्रमाणें दोन कर्मांचा निरनिराळा काल आहे याकरितां दोन कर्में एकतंत्रानें करूं नयेत. श्यामाकांचा चरु न मिळेल तर श्यामाकतृणाची मुष्टि करून ती स्रुवापात्राच्या उत्तर प्रदेशीं हातरून त्याचेवर स्रुचिपात्र ठेवावें, इतकें केल्यानें श्यामाकाग्रयणाची सिद्धि होते, असें वृत्तिकार नारायण ह्मणतो. यवांचें आग्रयण करावें किंवा न करावें. व्रीह्याग्रयणाचा वसंतऋतूपर्यंत गौणकाल आहे. यवाग्रयणाचा वर्षाऋतूपर्यंत गौणकाल आहे. आपत्तिकालावांचून गौणकालीं आग्रयण करील तर मुख्य कालाचें उल्लंघन झालें त्याचें प्रायश्चित्त पूर्वीं करून नंतर आग्रयण करावें. आपत्तिकाल असतां गौणकालीं करील तर प्रायश्चित्त करूं नये. गौणकालाचेंहि उल्लंघन होईल तर वैश्वानरेष्टिरूप प्रायश्चित्त करून राहिलेलें आग्रयण करावें. स्मार्ताग्नीचे ठिकाणीं वैश्वानर देवता ज्याची आहे असा स्थालीपाक ( चरु ) ग्रहण करावा. कारण, "अग्निहोत्री याचे जे पुरोडाश तेच स्मार्ताग्निवंताचे चरु" असें वचन आहे. प्रथम आग्रयण करावयाचें तें शरदृतूंत करावें. तें त्या ऋतूंत न झालें तर विभ्रष्ट इष्टि, किंवा तद्देवताक स्थालीपाक करून पुढें येणारा जो मुख्य काल त्या कालीं पहिलें आग्रयण करावें. गौणकालीं पहिलें आग्रयण होत नाहीं. ज्यांचा पूर्वीं आरंभ केलेला नाहीं असे दर्शपौर्णमास, आग्रयण इत्यादिक यांचें प्रायश्चित्त करण्याविषयीं विकल्प आहे ह्मणजे प्रायश्चित्त करावें किंवा न करावें असें आहे याकरितां विभ्रष्ट इष्टि सुद्धां वैकल्पिक जाणावी, ह्मणजे करावी किंवा न करावी. आग्रयण केल्यावांचून कोणतेंहि नवें उत्पन्न झालेलें धान्य भक्षण करूं नये. "आग्रयण केल्यावांचून जर कोणी मनुष्य नवें धान्य भक्षण करील तर त्यानें वैश्वानर देवतेसाठीं चरु करावा, अथवा पूर्णाहुति करावी. किंवा "समिंद्रराया०" ह्या मंत्राचा शंभर वेळ जप करावा."

---

अथाग्रयणानुकल्पाः पृथगाग्रयणप्रयोगाशक्तौप्रकृतीष्टिसमानतंत्राग्रयणप्रयोगः तत्रपौर्णमासेष्ट्यासमानतंत्रत्वेआदावाग्रयणप्रधानंपश्चात्प्राकृतप्रधानं दर्शेष्ट्यैकतंत्रत्वेपूर्वंदर्शेष्टिप्रधानयागःपश्चादाग्रयणप्रधानयागः अन्यत्पूर्वोक्तरांगजातमाग्रयणविकृतिसंबंध्येवकार्यं विरोधेवैकृतंतंत्रमितिसिद्धांतात् एतदसंभवेनवश्यामाकव्रीहियवैःपुरोडाशंकृत्वादर्शपौर्णमासौकुर्यात् यद्वानवव्रीह्यादिभिरग्निहोत्रहोमंकुर्यात् अथवानवान्नान्यग्निहोत्र्यागवाखादयित्वातस्याःपयसाग्निहोत्रंजुहुयात् यद्वानवान्नेनब्राह्मणान्भोजयेदितिसंक्षेपः इदंमलमासेनकार्यं गुर्वाद्यस्तेपिनकार्यमितिकेचित् जीर्णधान्यालाभेतुमलमासादौकार्यं ॥

## यानंतर आग्रयणाचे गौण प्रकार सांगतों.

ज्याला निराळें आग्रयण करण्याविषयीं सामर्थ्य नसेल त्यानें प्रकृतीष्टीशीं समान तंत्र असा आग्रयणाचा प्रयोग करावा. त्यामध्यें पौर्णिमेष्टीच्या बरोबर एकतंत्रानें आग्रयण करणें त्यामध्यें पूर्वीं आग्रयणाचें प्रधानकर्म करून नंतर प्रकृति इष्टीचें प्रधान कर्म करावें. दर्शेष्टीच्या बरो-

वर एकतंत्रानें करणें असेल तर पूर्वी दर्शेष्टीचें प्रधान कर्म करून नंतर आग्रयणाचें प्रधान कर्म करावें. दुसरीं पूर्वींचीं व पुढचीं सर्व अंगभूत कर्में आग्रयण विकृतिसंबंधि असतील तींच करावीं, इष्टिसंबंधीं करूं नयेत; कारण, कर्मविरोध असेल तर विकृतितंत्र करावें, असा सिद्धांत आहे. ह्याचा संभव नसेल तर नवे असे श्यामाक, व्रीहि आणि यव यांचा पुरोडाश करून दर्शपौर्णमास स्थालीपाक करावे. अथवा नवे व्रीहि इत्यादिक घेऊन त्यांहींकरून अग्निहोत्रसंबंधि होम करावा. किंवा नवीन धान्यें अग्निहोत्राच्या गाईकडून खाववून नंतर तिच्या दुधाचा अग्निहोत्राचे ठिकाणीं होम करावा. अथवा नवीन अन्नाचें ब्राह्मणांला भोजन द्यावें. हें आग्रयण मलमासांत करूं नये. गुरुशुक्रांच्या अस्तकालींहि करूं नये, असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. जुनें धान्य न मिळेल तर मलमासादिकांत करावें.

---

**अस्यामेवपौर्णमास्यांज्येष्ठापत्यनीराजनादिकंपरविद्धायांकार्यं ॥**

ह्याच पौर्णिमेचे दिवसीं ज्येष्ठ पुत्र किंवा ज्येष्ठ कन्या यांला नीराजनविधि करणें तो प्रतिपदेनें विद्ध अशा पौर्णिमेचे दिवसीं करावा.

---

**आश्विनकृष्णचतुर्थीकरकचतुर्थी साचंद्रोदयव्यापिनीग्राह्या दिनद्वयेतद्व्याप्त्यादौसंकष्ट चतुर्थीवन्निर्णयः ॥**

आश्विनकृष्णपक्षांतील जी चतुर्थी तिला **करकचतुर्थी** असें ह्मणतात. ती चतुर्थी चंद्रोदयव्यापिनी असेल ती घ्यावी. जर दोन दिवसीं चंद्रोदयव्याप्ति, अव्याप्ति इत्यादिक असेल तर संकष्टचतुर्थीप्रमाणें निर्णय जाणावा.

---

**कृष्णाष्टम्यांराधाकुंडेस्नानंमथुरामंडलवासिभिःकार्यं साअरुणोदयव्यापिनीतदभावेसूर्योदयव्यापिनीग्राह्या ॥**

मथुरा देशांत राहणारे जनांनीं आश्विनकृष्ण अष्टमीचे दिवसीं राधाकुंडांत स्नान करावें. त्या स्नानाविषयीं अष्टमी अरुणोदयव्यापिनी घ्यावी. अरुणोदयव्यापिनी नसल्यास सूर्योदयव्यापिनी घ्यावी.

---

**आश्विनकृष्णद्वादशीगोवत्सद्वादशी साप्रदोषव्यापिनीग्राह्या दिनद्वयेतदव्याप्तौपरा सायंकालाख्यगौणकालेसत्त्वात् उभयत्रतद्व्याप्तौपूर्वेतिबहवः परेतिकेचित् अत्रवत्सतुल्यवर्णांसवत्सांपयस्विनींगांसंपूज्यगोपादेताम्रपात्रेणार्घ्यंदद्यात् तत्रमंत्रः क्षीरोदार्णवसंभूतेसुरासुरनमस्कृते सर्वदेवमयेमातर्गृहाणार्घ्यंनमोस्तुते ततोमाषादिवटकान्गोग्रासार्थंदत्वाप्रार्थयेत् सर्वदेवमयेदेविसर्वदेवैरलंकृते मातर्ममाभिलषितंसफलंकुरुनंदिनि तद्दिनेतैलपक्वंस्थालीपाकं गोक्षीरंगोघृतंगोदधितक्रंचवर्जयेत् नक्तंमाषान्नभोजनभूशय्याब्रह्मचर्यंचकार्यं इमामेवद्वादशीमारभ्यपंचसुदिनेषुपूर्वरात्रेनीराजनविधिर्नारदेनोक्तः नीराजयेयुर्देवांश्चविप्रान्गाश्चतुरंगमान् ज्येष्ठान्श्रेष्ठान्जघन्यांश्चमातृमुख्याश्चयोषितइति त्रयोदश्यामपमृत्युनाशार्थंयमायनिशामुखे बहिर्दीपोदेयः इमामेवत्रयोदशीमारभ्यगोत्रिरात्रव्रतमुक्तं तत्प्रयोगःकौस्तुभे ॥**

आश्विनकृष्णपक्षांतील जी द्वादशी तिला **गोवत्सद्वादशी** असें ह्मणतात. ती प्रदोषकालव्यापिनी घ्यावी. दोन दिवसीं प्रदोषकालव्यापिनी नसेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी; कारण, सायंकाल हा तिचा गौणकाल असून त्या कालीं तिची व्याप्ति आहे. दोन दिवसीं प्रदोषकालव्यापिनी असेल तर पूर्वदिवसाची घ्यावी, असें पुष्कळ ग्रंथकार ह्मणतात. दुसऱ्या दिवसाची घ्यावी, असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. ह्या द्वादशीचे दिवसीं वत्सतुल्यवर्ण असून सवत्स व दूध देणारी अशा गाईचें पूजन करून तिच्या पायाचे ठिकाणीं तांब्याच्या पात्रानें अर्घ्य द्यावें. अर्घ्याचा मंत्र–"**क्षीरोदार्णव संभूते सुरासुरनमस्कृते ॥ सर्वदेवमये मातर्गृहाणार्घ्यं नमोस्तु ते.**" तदनंतर उडीद इत्यादि धान्यांचे वडे गाईला भक्षणार्थ देऊन प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र–"**सर्वदेवमये देवि सर्वदेवैरलंकृते ॥ मातर्ममाभिलषितं सफलं कुरु नंदिनि.**" ह्या गोवत्सद्वादशीचे दिवसीं तेलांत तळलेले, स्थालींत शिजवलेले, गाईचें दूध, गाईचें घृत, गाईचें दहीं, आणि ताक हे पदार्थ वर्ज्य करावे. नक्तव्रत, उडीदमिश्रित अन्नाचें भोजन, भूमीचे ठिकाणीं शयन, ब्रह्मचर्य हेहि नियम पाळावे. ह्याच द्वादशीला आरंभ करून पांच दिवसपर्यंत पूर्व रात्रीचे ठिकाणीं नीराजनविधि करावा असें नारद सांगतात. "देव, ब्राह्मण, गाई, घोडे, ज्येष्ठ, श्रेष्ठ, कनिष्ठ, या सर्वांला माता आदिकरून सर्व स्त्रियांनीं दिवे ओवाळावे." अपमृत्यूचा नाश व्हावा एतदर्थ त्रयोदशीचे दिवसीं यमासाठीं प्रदोषकालीं घरापासून बाहेर दिवा लावावा. ह्याच त्रयोदशीला आरंभ करून **गोत्रिरात्र** व्रत करावें. त्याचा प्रयोग कौस्तुभांत पाहावा.

---

आश्विनकृष्णचतुर्दश्यांचंद्रोदयव्यापिन्यांनरकभीरुभिस्तिलतैलेनाभ्यंगस्नानंकार्यं अत्ररात्र्यंत्ययाममारभ्यारुणोदयावधिस्ततश्चंद्रोदयावधिस्ततःसूर्योदयावधिरितिकालत्रयेपूर्वःपूर्वोजघन्यउत्तरउत्तरःश्रेष्ठः अतश्चंद्रोदयोत्तरोमुख्यकालः प्रातःकालोगौणः तत्रपूर्वदिनेएवचंद्रोदयव्याप्तौपूर्वा परत्रैवतद्व्याप्तौपरा अस्मिन्पक्षेतद्दिनेस्तमयादिकालेविहितमुल्कादानंदीपदानादिकंतत्कालेचतुर्दश्यभावेपिकार्यं दिनद्वयेचंद्रोदयव्याप्तौपूर्वा दिनद्वयेचंद्रोदयव्याप्तौपक्षत्रयं संभवति पूर्वत्रचंद्रोदयोत्तरमुषःकालंसूर्योदयंचव्याप्यप्रवृत्ताचतुर्दशीपरत्रचंद्रोदयात्पूर्वंसमाप्ता यथात्रयोदशीघट्यः ५८ पलानि ५० चतुर्दशी ५७ अस्मिन्प्रथमपक्षेउषःकालैकदेशे चतुर्दशीयुक्तेऽभ्यंगस्नानंकार्यं अथपूर्वत्रसूर्योदयमात्रंव्याप्यप्रवृत्तापरत्रचंद्रोदयात्पूर्वंसमाप्ता अथवासूर्योदयास्पर्शेनक्षयएवचतुर्दश्याः यथात्रयोदशी ५९।५९ चतुर्दशी ५७ यथावात्रयोदशी २ तद्दिनेचतुर्दशी ५४ अत्रपक्षद्वयेपरत्रचंद्रोदयेऽभ्यंगस्नानं चतुर्थयामादिजघन्यकालेचतुर्दशीव्याप्तिसत्त्वात् एतत्पक्षद्वयेकेचिदरुणोदयात्पूर्वमपिचतुर्दशीमध्येएवस्नानंकार्यमितिवदंति अपरेत्वरुणोदयोत्तरंचंद्रोदयादिकालेऽमावास्यायुक्तेपिस्नानमितिवदंति यत्तुचतुर्दशीक्षयेपूर्वत्रत्रयोदश्यांचंद्रोदयेस्नानमित्याहुस्तदयुक्तं अत्राभ्यंगस्नानेविशेषः सीतालोष्ठसमायुक्तसकंटकदलान्वित हरपापमपामार्गभ्राम्यमाणःपुनःपुनरितिमंत्रेणलांगलोद्धृतलोष्ठयुतापामार्गतुंबीचक्रमर्दनशाखानांस्नानमध्येत्रिवारंभ्रामणंकार्यं अभ्यंगस्नानोत्तरंतिलकादि कृत्वाकार्तिकस्नानंकार्यं उक्तकालेषुस्नानासंभवेसूर्योदयोत्तरंगौणकालेपियत्यादिभिरप्यवश्य

**मभ्यंगस्नानंकार्यं कार्तिकस्नानोत्तरंचयमतर्पणंकार्यं तद्यथा यमायनमः यमंतर्पयामीत्युक्त्वा तिलमिश्रांस्त्रीनंजलीन्सव्येनापसव्येनवादेवतीर्थेनपितृतीर्थेनवादक्षिणामुखोदद्यात् एवमग्रेपि धर्मराजाय० मृत्यवे० अंतकाय० वैवस्वताय० कालाय० सर्वभूतक्षयाय० औदुंबराय० दध्नाय० नीलाय० परमेष्ठिने० वृकोदराय० चित्राय० चित्रगुप्ताय० जीवत्पितृकस्तुयवैर्देवतीर्थेनसव्येनकुर्यात् ततःप्रदोषसमयेदीपान्दद्यान्मनोहरान् देवालयेमठेवापिप्राकारोद्यानवीथिषु गोवाजिहस्तिशालायामेवंघस्त्रत्रयेपिच तुलासंस्थेसहस्रांशौप्रदोषेभूतदर्शयोः उल्काहस्तानराःकुर्युःपितॄणांमार्गदर्शनं तत्रदानमंत्रः अग्निदग्धाश्चयेजीवायेप्यदग्धाःकुले मम उज्ज्वलज्ज्योतिषादग्धास्तेयांतिपरमांगतिं यमलोकंपरित्यज्यआगतायेमहालये उज्ज्वलज्ज्योतिषावर्त्मप्रपश्यंतुव्रजंतुते अस्यांनक्तभोजनंमहाफलं ॥**

चंद्रोदयव्यापिनी अशा आश्विनकृष्ण चतुर्दशीचे दिवसीं नरकाला भिणारे त्यांनीं तिलतैलाचा अभ्यंग करून स्नान करावें. याविषयीं रात्रीच्या शेवटच्या प्रहरापासून आरंभ करून अरुणोदयापर्यंत, तेथून चंद्रोदयापर्यंत, तेथून सूर्योदयापर्यंत, याप्रमाणें तीन कालांमध्यें पहिला पहिला गौण व पुढचा पुढचा श्रेष्ठ आहे याकरितां चंद्रोदयानंतरचा तो मुख्य काल, प्रातःकाल तो गौणकाल जाणावा. त्यामध्यें पूर्व दिवसींच चंद्रोदयव्याप्ति असेल तर पूर्व दिवसाची करावी. दुसऱ्या दिवसींच चंद्रोदयव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. ह्या चंद्रोदयव्याप्तिपक्षीं त्या दिवसीं सूर्यास्तादिकालीं करण्याविषयीं सांगितलेलें असें उल्कादान ( कोलीथ दाखवणें ), दीपदान इत्यादिक तें, चंद्रोदयकालीं चतुर्दशी नसली तत्रापि करावें. दोन दिवसीं चंद्रोदयव्याप्ति असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी. दोन दिवसीं चंद्रोदयव्याप्ति नसेल तर तीन पक्ष संभवतात. पूर्वदिवसीं चंद्रोदयानंतर उषःकालाला व सूर्योदयाला व्यापून राहणारी चतुर्दशी ती दुसऱ्या दिवसीं चंद्रोदयाच्या पूर्वीं समाप्त झाली. याविषयीं उदाहरण;—त्रयोदशी घ० ५८, पळें ५०, चतुर्दशी घ० ५७, ह्या पहिल्या पक्षीं, चतुर्दशीनें युक्त अशा उषःकालाच्या एकदेशाचे ठिकाणीं अभ्यंगस्नान करावें. यानंतर पूर्व दिवसीं चतुर्दशी केवळ सूर्योदयाला मात्र व्यापून राहणारी, आणि दुसऱ्या दिवसीं चंद्रोदयाच्या पूर्वीं समाप्त झाली. अथवा सूर्योदयाला स्पर्श नाहीं तेव्हां चतुर्दशीचा क्षय आहे; उदाहरण;—त्रयोदशी घ० ५९, पळें ५९, चतुर्दशी घ० ५७, अथवा दुसरें उदाहरण;—त्रयोदशी घ० २, त्या दिवसीं चतुर्दशी घ० ५४, ह्या दोन पक्षांचे ठिकाणीं दुसऱ्या दिवसीं चंद्रोदयकालीं स्नान करावें; कारण, चतुर्थ प्रहर इत्यादिक जो स्नानाचा गौणकाल त्या कालीं चतुर्दशीची व्याप्ति आहे. ह्या दोन पक्षीं कितीएक ग्रंथकार, अरुणोदयाच्या पूर्वीं सुद्धां चतुर्दशीमध्येंच स्नान करावें, असें ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, अरुणोदयानंतर चंद्रोदय इत्यादिक जो काळ तो अमावास्येनें युक्त असेल तथापि त्याचे ठिकाणीं स्नान करावें, असें ह्मणतात. चतुर्दशीचा क्षय असेल तर, पूर्व दिवसीं त्रयोदशीचे ठिकाणीं चंद्रोदयकालीं स्नान करावें असें जे कितीएक ग्रंथकार ह्मणतात तें योग्य नाहीं. ह्या अभ्यंगस्नानाविषयीं विशेष प्रकार—"**सीतालोष्ठसमायुक्तसकंटकदलान्वित ॥ हर पापमपामार्ग भ्राम्यमाणः पुनः पुनः**" ह्या मंत्रेंकरून

नांगरानें उकरून काढलेलें असें मातीचें ढेंकूळ; आघाडा, दुधीण भोपळी, टाकळा यांच्या फांद्या स्नानामध्यें तीन वेळ आपल्या आंगावरून फिरवाव्या. अभ्यंगस्नान केल्यानंतर गंधादिकाचा टिळक लावून मग कार्तिकस्नान करावें. पूर्वी सांगितलेल्या मुख्य कालांचे ठिकाणीं स्नान न झालें तर सूर्योदयानंतर गौणकालामध्येंहि करावें. संन्यासी इत्यादिकांनींसुद्धां अवश्य अभ्यंग करून स्नान करावें. कार्तिक स्नान केल्यानंतर यमतर्पण करावें. तें असें,–"यमाय नमः यमं तर्पयामि" असें ह्मणून दक्षिण दिशेला संमुख होत्साता तिलयुक्त तीन अंजलि सव्यानें अथवा अपसव्यानें देवतीर्थें[1]करून किंवा पितृतीर्थें[2]करून द्याव्या. याप्रमाणें पुढें सांगावयाचे आहेत त्याहि मंत्रांनीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें तर्पण करावें. ते मंत्र;–"धर्मराजाय० धर्मराजं तर्पयामि ॥ मृत्यवे नमः मृत्युं तर्पयामि ॥ अंतकाय नमः अंतकं तर्पयामि ॥ वैवस्वताय नमः वैवस्वतं तर्पयामि ॥ कालाय नमः कालं तर्पयामि ॥ सर्वभूतक्षयाय नमः सर्वभूतक्षयं तर्पयामि ॥ औदुंबराय नमः औदुंबरं तर्पयामि ॥ दध्नाय नमः दध्नं त० ॥ नीलाय० नीलं त० ॥ परमेष्ठिने० परमेष्ठिनं त० ॥ वृकोदराय० वृकोदरं त०॥ चित्राय० चित्रं त० ॥ चित्रगुप्ताय० चित्रगुप्तं त०" ज्याचा पिता जिवंत असेल त्यानें यवांनीं देवतीर्थेंकरून सव्यानें तर्पण करावें. "तदनंतर प्रदोषकालीं सुशोभित असे दिवे, देवालय, मठ, तट, कोट, बाग, मार्ग, गोठा, अश्वशाला, हस्तिशाळा, यांचे ठिकाणीं लावावे. याप्रमाणें तीनहि दिवस लावावे." तूळराशीला सूर्य गेल्यानंतर चतुर्दशी व अमावास्या ह्या दोन दिवसीं प्रदोषकालीं पुरुषांनीं हातामध्यें कोलीत, चुडी हीं घेऊन पितरांला मार्ग दाखवावा. त्याचा मंत्र–"अग्निदग्धाश्च ये जीवा येप्यदग्धाः कुले मम ॥ उज्ज्वलज्ज्योतिषा दग्धास्ते यांति परमां गतिं ॥ यमलोकं परित्यज्य आगता ये महालये ॥ उज्ज्वलज्ज्योतिषा वर्त्म प्रपश्यंतु व्रजंतु ते." ह्या चतुर्दशीचे दिवसीं नक्तभोजन केलें असतां महाफल आहे.

---

अथाश्विनामावास्यायांप्रातरभ्यंगः प्रदोषेदीपदानलक्ष्मीपूजनादिविहितं तत्रसूर्योदयंव्याप्यास्तोत्तरंघटिकाधिकरात्रिव्यापिनिदर्शेसतिनसंदेहः अत्रप्रातरभ्यंगदेवपूजादिकंकृत्वापराण्हेपार्वणश्राद्धंकृत्वाप्रदोषसमयेदीपदानोल्काप्रदर्शनलक्ष्मीपूजनानिकृत्वाभोजनंकार्यं अत्रदर्शेबालवृद्धादिभिन्नैर्दिवानभोक्तव्यंरात्रौभोक्तव्यमितिविशेषोवाचनिकः तथाचपरदिनेएवदिनद्वयेवाप्रदोषव्याप्तौपरा पूर्वत्रैवप्रदोषव्याप्तौलक्ष्मीपूजादौपूर्वा अभ्यंगस्नानादौपरा एवमुभयत्रप्रदोषव्याप्त्यभावेपि पुरुषार्थचिंतामणौतुपूर्वत्रैवव्याप्तिरितिपक्षेपरत्रयामत्रयाधिकव्यापिदर्शापेक्षयाप्रतिपद्वृद्धिसत्त्वेलक्ष्मीपूजादिकमपिपरत्रैवेत्युक्तं एतन्मतेउभयत्रप्रदोषाव्याप्तिपक्षेपिपरत्रदर्शस्यसार्धयामत्रयाधिकव्यापित्वात्परैवयुक्तेतिभाति चतुर्दश्यादिदिनत्रयेपिदीपावलिसंज्ञकेयत्रयत्रान्हिस्वातीनक्षत्रयोगस्तस्यतस्यप्राशस्त्यातिशयः अस्यामेवनिशीथोत्तरंनगरस्त्रीभिः स्वगृहांगणादलक्ष्मीनिःसारणंकार्यं इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारेद्वितीयपरिच्छेदआश्विनमासकृत्यनिर्णयउद्देशःसमाप्तः ॥

---

१ देवतीर्थ ह्मणजे अंगुलींच्या अग्रांनीं. २ अंगुष्ठ व तर्जनी यांच्या मध्यभागेंकरून.

यानंतर आश्विन अमावास्येचे दिवशीं प्रातःकालीं तैलाभ्यंग करून स्नान करावें, प्रदोषकालीं दिवे लावावे, व लक्ष्मीचें पूजन इत्यादिक करावें. त्या विषयीं सूर्योदयाला व्यापून सूर्यास्तानंतर एक घटिकेपेक्षां अधिक असी रात्रिव्यापिनी अमावास्या असेल तर संशय नाहीं. ह्या अमावास्येचे दिवशीं प्रातःकालीं तैलाभ्यंग करून स्नान करावें. नंतर देवपूजा इत्यादिक करून अपराण्हकालीं पार्वणश्राद्ध करावें, व प्रदोषकालीं दिवे लावणें, उल्कादर्शन, लक्ष्मीपूजन हीं कृत्यें करून भोजन करावें. ह्या अमावास्येचे दिवशीं बाल, वृद्ध, रोगी यांवांचून इतरांनीं दिवसा भोजन करूं नये, रात्रीं भोजन करावें असा वचनप्रयुक्त विशेष जाणावा. तसेंच दुसऱ्या दिवसींच प्रदोषव्याप्ति असेल किंवा दोन दिवशीं प्रदोषव्याप्ति असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी, पूर्व दिवसींच प्रदोषव्याप्ति असेल तर लक्ष्मीपूजन इत्यादिकांविषयीं पूर्व दिवसाची घ्यावी. अभ्यंगस्नान इत्यादिकांविषयीं दुसऱ्या दिवसाची घ्यावी. याप्रमाणें दोन दिवशीं प्रदोषव्यापिनी नसली तथापि पूर्वीप्रमाणेंच घ्यावी. पुरुषार्थचिंतामणीमध्यें तर पूर्व दिवसींच प्रदोषव्यापिनी आहे, असा पक्ष असेल तर दुसऱ्या दिवशीं तीन प्रहरांपेक्षां अधिक असी अमावास्या असतां अमावास्येहून प्रतिपदा वाढती असल्यास लक्ष्मीपूजनादिक सुद्धां दुसऱ्या दिवसींच करावें, असें सांगितलें. ह्या मतानें दोन दिवशीं प्रदोषव्यापिनी नाहीं असा पक्ष असतांहि दुसऱ्या दिवशीं अमावास्या साडेतीन प्रहरांपेक्षां अधिकव्यापिनी आहे याकरितां दुसऱ्या दिवसाचीच घेण्याविषयीं योग्य असें वाटतें. चतुर्दशी, अमावास्या आणि प्रतिपदा ह्या तीन दिवसांला दीपावलि असें नांव आहे, व ह्या तीन दिवसांमध्यें ज्या दिवशीं स्वातीनक्षत्राचा योग असेल तो दिवस अतिउत्तम असें समजावें. अमावास्येचे दिवशीं मध्यरात्रीच्या नंतर, नगरांतील स्त्रियांनीं आपापल्या गृहसंबंधी आंगण्यांतून अलक्ष्मीला घालवावी.

**इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे द्वितीयपरिच्छेदे आश्विनमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥**

---

**अथकार्तिकमासः वृश्चिकसंक्रांतौपूर्वाःषोडशनाड्यःपुण्याःशेषंप्रागवत् अथकार्तिकशुक्लप्रतिपत्कृत्यं अत्राभ्यंगआवश्यकःएवंचचतुर्दश्यादिदिनत्रयेभ्यंगाद्युत्सवस्याकरणेनरकादिदोषश्रवणात्करणेलक्ष्मीप्राप्त्यलक्ष्मीपरिहारादिफलश्रवणाच्चनित्यकाम्योभयरूपत्वं अस्यांप्रतिपदिबलिपूजादीपोत्सवोगोक्रीडनंगोवर्द्धनपूजामार्गपालीबंधनं वष्टिकाकर्षणंनववस्त्रादिधारणाद्युत्सवोद्यूतंनारीकर्तृकनीराजनंमंगलमालिकाचेत्येवमादीनिकृत्यानि तत्रयदिउदयंव्याप्यदशमुहूर्ताप्रतिपत्तदाचंद्रदर्शनाभावाच्चंद्रदर्शनप्रयुक्तद्वितीयावेधनिषेधाप्रवृत्तेः सर्वेकार्याणिपरप्रतिपद्येवभवंति इष्टिनिर्णयप्रकरणेत्रिमुहूर्तद्वितीयाप्रवेशमात्रेणचंद्रदर्शनमुक्तंतत्सूक्ष्मदर्शनाभिप्रायं अत्रतुस्थूलदर्शनमेवनिषेधप्रयोजकंतच्चषण्मुहूर्तद्वितीयाप्रवेशएवेतिनविरोधइतिभाति यदिनवममुहूर्तोनास्तितदाबलिपूजागोक्रीडागोवर्धनपूजामार्गपालीबंधनवष्टिकाकर्षणानि पूर्वविद्धप्रतिपदिकार्याणि** अभ्यंगनववस्त्रादिधारणद्यूतनारीकर्तृकनीराजनमंगलमालिकादीनि**औदयिकमुहूर्तव्यापिन्या**मपिकार्याणि बलिपूजादेःकेनचिन्निमित्तेनपूर्वविद्धायामनुष्ठानासं

भवेपरविद्धायामनुष्ठानंकार्यंनतुकर्मत्यागस्तिथ्यंतरपरिग्रहोवा यथाबौधायनीयाद्यैःस्वस्वसूत्रो क्तानुष्ठानासंभवेआपस्तंबीयादिसूत्रोक्तानुष्ठानंकार्यंनतुकर्मलोपः शाखांतरपरिग्रहोवातद्वदि तिमाधवीयेस्पष्टं तत्रराजापंचवर्णरंगैर्बलिंद्विभुजमालिख्यअन्यजनाःशुक्लतंडुलैर्विरच्यपूजये युः तत्रमंत्रः बलिराजनमस्तुभ्यंविरोचनसुतप्रभो भविष्येंद्रसुराराते पूजेयंप्रतिगृह्यतां बलि मुद्दिश्ययत्किंचिद्दानकरणेऽक्षय्यविष्णुप्रीतिकरंतत् योयादृशेनभावेनतिष्ठत्यस्यांमुनीश्वर हर्षे दैन्यादिरूपेणतस्यवर्षंप्रयातिहि अस्यांद्यूतंप्रकर्तव्यंप्रभातेसर्वमानवैः तस्मिन्द्यूतेजयोयस्यत स्यसंवत्सरेजयः विशेषवच्चभोक्तव्यंप्रशस्तैर्ब्राह्मणैःसह बलिराज्येदीपदानात्सदालक्ष्मीः स्थिराभवेत् दीपैर्नीराजनादत्रसैषादीपावलीस्मृता बलिराज्यंसमासाद्ययैर्नदीपावलीकृता ते षांगृहेकथंदीपाःप्रज्वलिष्यंतिकेशवेत्यादि ॥

## आतां कार्तिकमासांतील कृत्यें सांगतों.

वृश्चिक संक्रांतीच्या पूर्वीच्या सोळा घटिका पुण्यकाळ जाणावा. बाकी निर्णय पूर्वी सांगितल्याप्रमाणें. यानंतर कार्तिकशुक्ल पक्षांतील प्रतिपदेचें कृत्य सांगतों. ह्या प्रतिपदेचे दिवसीं तैलाभ्यंग अवश्य करावा. याप्रमाणें चतुर्दशी इत्यादि तीन दिवसीं, तैलाभ्यंग इत्यादिक उत्सव न केला असतां नरकप्राप्ति होते इत्यादिक दोषश्रवण आहे, आणि तो उत्सव केला असतां लक्ष्मीची प्राप्ति होऊन अलक्ष्मीचा नाश होतो इत्यादिक फलाचें श्रवण आहे याकरितां हा उत्सव नित्य व काम्य असा दोन प्रकारचा आहे. ह्या प्रतिपदेचे दिवसीं बलिदैत्याची पूजा, दीपोत्सव, गोक्रीडा, गोवर्धनपूजा, मार्गपालीबंधन, तृणाची दोरी ओढणें, नवीं वस्त्रादिक धारण करणें इत्यादिक उत्सव, द्यूत करणें, स्त्रियांनीं ओवाळणें, मंगलमालिका इत्यादिक कृत्यें करावीं. त्यामध्यें जर उदयाला व्यापून वीस घटिका प्रतिपदा असेल तर त्या दिवसीं चंद्रदर्शन नाहीं याकरितां चंद्रदर्शनयुक्त जी द्वितीया तिच्या वेधाचा निषेध त्या दिवसीं प्राप्त होत नाहीं यास्तव सर्व कृत्यें दुसऱ्या दिवसाच्या प्रतिपदेचे ठिकाणींच होतात. इष्टीच्या निर्णयप्रकरणीं प्रतिपदेचे दिवसीं सहा घटिका द्वितीयेचा प्रवेश असल्यानें चंद्रदर्शन होतें ह्मणून जें सांगितलें तें सूक्ष्म दृष्टीच्या अभिप्रायानें सांगितलें. ह्या स्थलीं तर स्थूलदर्शन तेंच निषेधास कारण आहे व तें चंद्रदर्शन बारा घटिका द्वितीया प्रविष्ट झाली असेल तरच होतें त्यापेक्षां विरोध नाहीं असें वाटतें. जर सूर्योदयापासून प्रतिपदा आठ मुहूर्त आहे, नववा मुहूर्त नाहीं, तर बलिपूजा, गोक्रीडा, गोवर्धनपूजा, मार्गपालीबंधन, वष्टिकाकर्षण, हीं कृत्यें पूर्वतिथीनें विद्ध अशा प्रतिपदेचे ठिकाणीं करावीं. तैलाभ्यंग, नवीन वस्त्रादिकांचें धारण, द्यूत, स्त्रियांनीं दिवे ओवाळणें, मंगलमालिका इत्यादिक कृत्यें सूर्योदयकालीं दोन घटिका व्याप्ति असली तत्रापि तिचे ठिकाणींच करावीं. बलिपूजा इत्यादिक कृत्यें कांहींएक निमित्तानें पूर्वतिथीनें विद्ध अशा प्रतिपदेचे दिवसीं न होतील तर पुढच्या तिथीनें विद्ध अशा प्रतिपदेचे ठिकाणीं करावीं, परंतु कर्माचा त्याग करूं नये, व दुसऱ्या तिथीचे ठिकाणीं करूं नये. जसें बौधायनीय शाखी इत्यादिकांनीं आपापल्या सूत्रांत सांगितल्याप्रमाणें अनुष्ठान न झाल्यास आपस्तंबीय इत्यादिक सूत्रांत सांगितल्याप्रमाणें अनुष्ठान करावें, परंतु कर्माचा लोप किंवा अ-

न्यशाखेचें ग्रहण करूं नये, त्याप्रमाणें हेंहि करावें, असें माधवाच्या ग्रंथांत आहे. त्या प्रतिपदेचे दिवसीं राजानें पांच प्रकारच्या रंगांनीं, दोन भुजांनीं युक्त असी बलीची मूर्ति काढून पूजा करावी. इतर लोकांनीं पांढऱ्या तांदुळांनीं मूर्ति करून पूजा करावी. पूजेचा मंत्र–"बलिराज नमस्तुभ्यं विरोचनसुत प्रभो ॥ भविष्येंद्रसुराराते पूजेयं प्रतिगृह्यतां." बलीच्या उद्देशेंकरून जें कोणतेंहि दान केलें असतां तें अक्षय्य विष्णूची प्रीति करणारें होतें. "ह्या प्रतिपदेचे दिवसीं जो जशा हर्षदैन्यरूप भावानें राहतो त्याचें सर्व वर्ष तसें जातें." ह्मणजे दैन्यपणानें राहील तर सर्व वर्षभर दैन्यपण प्राप्त होतें, व हर्षानें राहील तर सर्व वर्षभर हर्ष प्राप्त होतो असें तात्पर्य. "ह्या प्रतिपदेचे दिवसीं प्रातःकालीं सर्व मनुष्यांनीं द्यूतकर्म करावें, व त्या द्यूतामध्यें ज्याचा जय होतो त्याचा वर्षपर्यंत जय होतो. प्रशस्त ( सत्पात्र ) ब्राह्मणांसहवर्तमान पक्कान्नाचें भोजन करावें. बलिराज्याचे[1] दिवसीं दिवे लावले असतां लक्ष्मी सार्वकाल स्थिर राहते–दिवे लावून ओंवाळावे असा विधि आहे याकरितां ह्या प्रतिपदेला दीपावली असें नांव आहे. हे केशवा, बलिराज्याचे दिवसीं ज्यांनीं दीपांची पंक्ति लाविली नाहीं, त्यांचे गृहाचे ठिकाणीं दिवे कसे प्रज्वलित होतील, इत्यादि."

---

अत्रलक्ष्मीपूजाकुबेरपूजाचोक्ता लक्ष्मीर्यालोकपालानांधेनुरूपेणसंस्थिता घृतंवहतियज्ञार्थे ममपापंव्यपोहतु अग्रतःसंतुमेगावोगावोमेसंतुपृष्ठतः गावोमेहृदयेसंतुगवांमध्येवसाम्यहं इतिमंत्राभ्यां गवांसवत्सानांबलीवर्दानांचपूजनंविभूषणंचकृत्वादोहनभारवाहनादिकंवर्जयेत्

ह्या प्रतिपदेचे दिवसीं लक्ष्मीची पूजा व कुबेराची पूजा करावी. "लक्ष्मीर्या लोकपालानां धेनुरूपेण संस्थिता ॥ घृतं वहति यज्ञार्थे मम पापं व्यपोहतु ॥ अग्रतः संतु मे गावो गावो मे संतु पृष्ठतः ॥ गावो मे हृदये संतु गवां मध्ये वसाम्यहं," ह्या मंत्रांनीं सवत्स गाईंची व वृषभांची पूजा करून पुष्पांच्या माला इत्यादिक घालून त्यांला भूषित करावें, व त्या दिवसीं गाईचें दूध काढणें व बैलांवर भार घालणें इत्यादिक करूं नये.

---

अथगोवर्धनपूजा मुख्यगोवर्धनसान्निध्येतस्यैवपूजा तदसान्निध्येगोमयेनान्नकूटेनवागोवर्धनंकृत्वातत्सहितगोपालपूजा कार्या तत्र श्रीकृष्णप्रीत्यर्थंगोवर्धनपूजनगोपालपूजनात्मकंकर्म होत्सवंकरिष्यइतिसंकल्प्य बलिराज्ञोद्वारपालोभवानद्यभवप्रभो निजवाक्यार्थनार्थायसगोवर्धनगोपतेइतिमंत्रेणसगोवर्धनंगोपालमावाह्यस्थापयेत् ततो गोपालमूर्तेविश्वेशशक्रोत्सवविभेदक गोवर्धनकृतच्छत्रपूजांमेहरगोपते गोवर्धनधराधारगोकुलत्राणकारक विष्णुबाहुकृतच्छायगवांकोटिप्रदोभवेतिमंत्राभ्यां श्रीगोपालगोवर्धनौषोडशोपचारैःपूजयेत् तत्रयथावैभवंमहानैवेद्योदेयः ततःतदंगत्वेनप्रत्यक्षधेनौमृद्धेनौवागोपूजांपूर्वोक्तमंत्राभ्यांकृत्वाआगावोअग्मन्प्रैतेवदंत्वितिऋग्भ्यांगृहसिद्धचरुहोमःकार्यः ब्राह्मणेभ्योन्नगवादिदानंगोभ्यस्तृणदानंगिरयेबलिदानंच ततोगोविप्रहोमाग्निगिरिप्रदक्षिणासहचरीभिर्गोभिर्युतैःकार्या ॥

---

[1] आश्विनवद्य चतुर्दशीपासून जे चार दिवस त्यांला बलिराज्य असें नांव आहे.

## आतां गोवर्धनपूजेचा विधि सांगतों.

मुख्य गोवर्धनपर्वत ज्यांला जवळ असेल त्यांनीं त्याचीच पूजा करावी. तो जवळ नसेल तर गोमयाचा किंवा अन्नराशीचा गोवर्धन पर्वत करून त्या गोवर्धनासहित गोपालाची पूजा करावी. त्या पूजेविषयीं, "**श्रीकृष्णप्रीत्यर्थं गोवर्धनपूजनं गोपालपूजनात्मकं महोत्सवं क रिष्ये,**" असा संकल्प करून "**बलिराज्ञो द्वारपालो भवानद्य भव प्रभो ॥ निजवाक्यार्थनार्थाय सगोवर्धन गोपते,**" ह्या मंत्रेंकरून गोवर्धनयुक्त गोपालाचें आवाहन करून स्थापना करावी. तदनंतर, "**गोपालमूर्ते विश्वेश शक्रोत्सवविभेदक ॥ गोवर्धनकृतच्छत्र पूजां मे हर गोपते ॥ गोवर्धनधराधार गोकुलत्राणकारक ॥ विष्णुबाहुकृतच्छाय गवां कोटिप्रदो भव,**" ह्या मंत्रांनीं श्रीगोपाल व गोवर्धन यांची षोडशोपचारेंकरून पूजा करावी. त्या पूजेमध्यें जसी संपत्ति असेल त्याप्रमाणें महानैवेद्य ( अन्नाचा पर्वत ) द्यावा. त्यानंतर त्याच्या अंगत्वेंकरून प्रत्यक्ष गाईचे ठिकाणीं किंवा मृत्तिकेची गाई करून तिचे ठिकाणीं गोपूजा पूर्वीं सांगितलेल्या मंत्रांनीं करून "**आगावो अग्मन्प्रैते वदंतु०**" ह्या ऋचांनीं, घरांत सिद्ध केलेल्या चरूचा होम करावा. ब्राह्मणांला अन्न, आणि गायी यांचें दान करावें, आणि गाईला तृण घालावें, व पर्वताला बलिदान करावें. तदनंतर बरोबर गाई घेऊन त्यांच्यासह गाई, ब्राह्मण, होम, अग्नि, पर्वत, यांला प्रदक्षिणा करावी.

---

अथापराण्हेमार्गपालीबंधनं तत्रपूर्वस्यांदिशिकुशकाशमयरज्जुविशेषंयथाचारंकृत्वोच्चस्तंभेवृक्षेचबध्वा मार्गपालिनमस्तेस्तुसर्वलोकसुखप्रदे विधेयैःपुत्रदाराद्यैःपुनरेहिव्रतस्यमेइतिनमस्कृत्यप्रार्थ्यतदधोमार्गेणगोगजादिसहिताःविप्रराजादयःसर्वेगच्छेयुः एवंकाशादिमयींवष्टिकांदृढांकृत्वाएकतोराजपुत्राअन्यत्रहीनजातयोजयज्ञानार्थंकर्षयेयुः अत्रहीनजातिजयेराजजयः प्रातर्द्यूतंकार्यमित्युक्तं एवंनारीभिर्नीराजनमपिप्रातरेवकार्यं रात्रौगीतवाद्याद्युत्सवःकार्यः नवैर्वस्त्रैश्चसंपूज्याद्विजसंबंधिबांधवाइति ॥

यानंतर अपराण्हकालीं मार्गपालीबंधन करावें, तें असें,—जसा ज्याचा आचार असेल तदनुसार कुशांचा किंवा मोळांचा मोठा दोर करून तो दोर पूर्वदिशेचे ठिकाणीं मार्गावर उंच खांबाला व वृक्षाला बांधून, "**मार्गपालि नमस्तेस्तु सर्वलोकसुखप्रदे ॥ विधेयैः पुत्रदाराद्यैः पुनरेहि व्रतस्य मे,**" ह्या मंत्रेंकरून नमस्कार करून प्रार्थना करावी आणि त्या दोराच्या खालून जो मार्ग, त्या मार्गानें गाई, हत्ती, घोडे इत्यादिकांसहवर्तमान ब्राह्मण, राजा इत्यादिकांनीं गमन करावें. याप्रमाणें मोळ इत्यादिक तृणांचा मोठा दोर करून त्या दोराला एकीकडे राजपुत्रांनीं धरावें, व दुसरीकडे हीनजाति असतील त्यांनीं धरून तो दोर जयपरीक्षा पाहण्याकरितां आपापल्याकडे ओढावा. ह्या ओढण्यामध्यें हीनजातीचा जय झाला असतां राजाचा जय आहे असें समजावें. ह्या प्रतिपदेचे दिवसीं प्रातःकालीं द्यूत कर्म करावें. याप्रमाणें स्त्रियांनीं दिवे ओवळायाचे तेहि प्रातःकालींच ओवाळावे. रात्रीचे ठिकाणीं गायन, वाद्यें इत्यादिक उत्सव करावा. "ब्राह्मण, आप्त, बांधव यांला नवीं वस्त्रें देऊन त्यांचा पूजा सत्कार करावा.

अथद्वितीया यमोयमुनयापूर्वंभोजितःस्वगृहेस्वयं अतोयमद्वितीयासाप्रोक्तालोकेयुधिष्ठिर अस्यांनिजगृहेनभोक्तव्यंयत्नेनभगिनीहस्ताद्भोक्तव्यं तेनधनधान्यसुखलाभः वस्त्रालंकरणैःसर्वाभगिन्यःपूज्याः स्वभगिन्यभावेमित्रादिभगिन्यःपूज्याः भगिन्याअपिभ्रातृपूजनेअवैधव्यंभ्रातुश्चिरजीवनंतदकरणेसप्तजन्मसुभ्रातृनाशः इयंपूर्वेद्युरेवापराण्हव्याप्तौपूर्वा उभयत्रव्याप्त्यव्याप्त्यादिपक्षांतरेषुपरैव अस्यांयमुनास्नानमपराण्हेचित्रगुप्तयमदूतसहितयमपूजनं यमायार्घ्यदानंचविहितं ॥

## आतां यमद्वितीयेचा निर्णय सांगतों.

“पूर्वी यमुनेनें आपल्या गृहीं यमाला सत्कारपूर्वक बोलावून त्याला भोजन दिलें याकरितां हे युधिष्ठिरा, लोकांमध्यें या द्वितीयेला यमद्वितीया असें ह्मणतात.” ह्या द्वितीयेचे दिवशीं आपल्या घरीं भोजन करूं नये. तर महाप्रयत्न करणें होईल तथापि तसें करून भगिनीच्या हातून भोजन करावें, तेणेंकरून धन, धान्य, सुख यांची प्राप्ति होते. वस्त्रें, अलंकार, यांहींकरून सर्व बहिणींची पूजा करावी. आपणाला बहीण नसल्यास मित्रादिकांच्या बहिणी असतील त्याच ‘आपल्या’ असी कल्पना करून त्यांची पूजा करावी. भगिनीनेंहि भ्रात्याचें पूजन करावें, तेणेंकरून अवैधव्य, भ्रात्याला चिरकाल आयुष्य असें फळ मिळतें. तें न केलें असतां सप्तजन्मपर्यंत भ्रात्याचा नाश होतो. ही यमद्वितीया पूर्व दिवसींच अपराण्हकालव्यापिनी असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी. दोन दिवसीं अपराण्हव्यापिनी असेल किंवा नसेल इत्यादिक दुसऱ्या पक्षांचेठिकाणीं दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. ह्या द्वितीयेचे दिवसीं यमुनास्नान; अपराण्हकालीं चित्रगुप्त, यमदूत यांसहित यमाचें पूजन; यमाला अर्घ्यदान हीं करावीं.

---

कार्तिकशुक्लषष्ठ्यांभौमयुतायांवन्हिंसमभ्यर्च्यतत्प्रीत्यर्थंविप्रभोजनंकार्यं ॥

भौमवारयुक्त कार्तिकशुद्ध षष्ठीचे दिवसीं अग्नीची पूजा करून अग्निप्रीत्यर्थ ब्राह्मणभोजन करावें.

---

कार्तिकशुक्लाष्टमीगोपाष्टमी अत्रगोपूजनगोप्रदक्षिणगवानुगमनैरिष्टकामावाप्तिः ॥

कार्तिकशुक्ल पक्षांतील जी अष्टमी तिला गोपाष्टमी असें ह्मणतात. ह्या अष्टमीचे दिवसीं गोपूजा, गाईला प्रदक्षिणा करणें, आणि गाईच्या बरोबर रानांत जाणें इत्यादि कृत्यें करावीं; तेणेंकरून इष्टमनोरथ प्राप्त होतात.

---

कार्तिकशुक्लनवम्यांमथुराप्रदक्षिणोक्ता इयंयुगादिरपि अस्यांपूर्वाण्हव्यापिन्यामपिंडकंश्राद्धमुक्तं अत्रविशेषोवैशाखप्रकरणेउक्तः ॥

कार्तिक शुद्ध नवमीचे दिवसीं मथुरेला प्रदक्षिणा करावी. ही नवमी युगादि आहे. ह्या

पूर्वाण्हकालव्यापिनी नवमीचे दिवशीं पिंडरहित श्राद्ध करावें. याविषयीं विशेषप्रकार वैशाखप्रकरणीं सांगितला आहे.

---

एकादश्यादिदिनपंचकेभीष्मपंचकव्रतमुक्तं तच्चशुद्धैकादश्यामारभ्यचतुर्दश्यविद्धौदयिकपौर्णमास्यांसमापनीयं यदिशुद्धैकादश्यामारंभेक्षयवशेनपौर्णमास्यांपंचदिनात्मकव्रतसमाप्तिर्नघटतेतदाविद्धैकादश्यामप्यारंभः शुद्धैकादश्यामारंभेपिदिनवृद्धिवशेनपरविद्धपौर्णमास्यांसमापनेयदिषट्दिनापत्तिस्तदाचतुर्दशीविद्धपौर्णिमायामपिसमाप्तिःकार्याव्रतप्रयोगःकौस्तुभादौज्ञेयः कार्तिकमासेएकादश्यादिपर्वणिचंद्रतारादिबलान्वितेशिवविष्णुमंत्रग्रहणादिरूपादीक्षाकर्तव्याकार्तिकेतुकृतादीक्षानृणांजन्मविमोचनीतिनारदोक्तेः तथात्रतुलसीकाष्ठमालाधारणमुक्तंस्कांदद्वारकामाहात्म्येविष्णुधर्मेच निवेद्यकेशवेमालांतुलसीकाष्ठसंभवां वहतेयोनरोभक्त्यातस्यनैवास्तिपातकं तुलसीकाष्ठसंभूतेमालेकृष्णजनप्रिये बिभर्मित्वामहंकंठेकुरुमांकृष्णवल्लभं एवंसंप्रार्थ्यविधिवन्मालांकृष्णगलेर्पितां धारयेत्कार्तिकेयोवैसगच्छेद्वैष्णवंपदमितिनिर्णयसिंधौस्पष्टं यत्तुतत्रैवमालाधारणप्रकरणांतेसर्वपुस्तकेष्वदृश्यमानमपि अत्रमूलंचिंत्यमितिवाक्यंक्वचिन्निर्णयसिंधुपुस्तकेदृश्यतेतस्यमालाधारणविधिवाक्यानांनाप्रामाणिकत्वेतात्पर्यं स्वयमेवस्कंदपुराणस्थविष्णुधर्मस्थस्वेनोक्तानांस्वयमेवाप्रामाणिकत्वोक्तौव्याघातप्रसंगात् तुलसीकाष्ठघटितैरुद्राक्षाकारकारितैः निर्मितांमालिकांकंठेनिधायार्चनमारभेत् तुलसीकाष्ठमालयाभूषितःकर्मआचरन् पितॄणांदेवतानांचकृतंकोटिगुणंभवेत्इतिपद्मपुराणेपातालखंडेनवसप्ततितमाध्याये प्रत्यक्षोपलभ्यमानवचनविरोधाच्च किंत्वाषाढमासप्रकरणेआषाढशुद्धद्वादश्यामनुराधायोगरहितायांपारणंकार्यमित्युक्त्वा तत्रप्रमाणत्वेनाभाकासितपक्षेषुमैत्राद्यपादेस्वपितीहविष्णुरित्यादीनिभविष्यस्थविष्णुधर्मस्थानिवाक्यानिलिखित्वा यथांतेइदंनिर्मूलमित्युक्तंएवंप्रकरणांतरेपितस्यचमाधवादिमूलग्रंथेषुनोपलभ्यतेइत्येवतत्परिभाषातातात्पर्यं नत्वप्रामाणिकत्वेतथात्वे भाद्रकार्तिकयोस्तद्वाक्यानुसारेणपारणनिर्णयलेखनासांगत्यप्रसंगात् कौस्तुभादिसर्वनवीनग्रंथेषुतद्वाक्यानुसारेणैवनिर्णयस्यासंगत्यापाताच्च सर्वशिष्टानांतदनुसारेणैवपारणाचरणस्याप्यप्रमाणत्वापत्तेश्चतद्वदत्रापिज्ञेयं एतेनमाधवादिष्वनुपलंभादेवाप्रामाण्यापत्तिरितिनिरस्तं बहूनांमाधवादिलिखितानांवाक्यानामाचाराणांचाप्रामाण्यापत्तेः यत्रतुयानियत्तुइत्येवमादिरूपेणयत्पदोपक्रममनूद्यतानिनिर्मूलानीत्येवमादिरीत्यादूष्यंते यथाश्रवणद्वादशीप्रकरणे श्रवणस्योत्तराषाढावेधनिषेधकवाक्यानितत्रतेषामप्रमाणत्वेएवसर्वथातात्पर्यमितिसूक्ष्मबुद्धयोविदांकुर्वंतु ननुमाधवादिग्रंथेष्वनुपलंभान्ननिर्मूलत्वमुच्यतेकिंतुकाष्ठमालाधारणनिषेधवाक्यानांबाधकानामुपलंभादितिचेत् किंतानिवाक्यानिसामान्यतःकाष्ठमालाधारणनिषेधकानिदृश्यंतेविशेषतस्तुलसीकाष्ठमालानिषेधकानिवा आद्येसामान्यतःकाष्ठमालानिषेधकवाक्यानांविशेषरूपैस्तुलसीधात्रीकाष्ठमालाधारणविधिवाक्यैर्बाधःस्पष्टः द्वितीयेषोडशीग्रहणाग्रहणवद्विहितप्रतिषिद्धत्वेनविकल्पमवगच्छ सचविकल्पोवैष्णवावैष्णवविषयतयाव्यव

स्थितोभविष्यति मूलवाक्येषुविष्णवादिपदश्रवणादितिननिर्मूलत्वसंभवः अतएवैतद्वाक्यानां माधवाद्यनुल्लेखस्याशयोहरिवासरलक्षणवाक्येपुरुषार्थचिंतामणौ वैष्णवानामेवावश्यकत्वादे तदनुपन्यासेपिमाधवादीनांनन्यूनतेत्युक्तयारीत्योहितुंशक्यः एवंधात्रीकाष्ठमालाधारणविधि र्ज्ञेयः रामार्चनचंद्रिकादौतुलसीकाष्ठमालयाजपविधिवाक्यानितुलसीकाष्ठघटितैर्मणिभिर्जप मालिकेत्यादीनिस्पष्टानि एवंग्रंथांतरेषुबहूनिवाक्यान्युपलभ्यंतेतथाचप्रयोगपारिजातान्हिके पूजाप्रकरणेउक्तं आदौदेवपूजासाधनमग्रोदकगंधपुष्पाक्षतादिकंसंभृत्यपादौपाणीप्रक्षाल्यय थाशक्तिधृतदुकूलादिशुद्धवस्त्रोभूषणभूषितो मुक्ताफलप्रवालपद्माक्षतुलसीमणिनिर्मितमालाः कंठेधृत्वाइतिसर्वदेशीयवैष्णवेषुतुलसीकाष्ठमालाधारणजपाचारश्चोपलभ्यतेभस्मादिधारणद्वे षिवैष्णवस्पर्धयाशैवागमाग्रहिभिः केवलंद्विष्यतइत्यलंबहुनेतिदिक् ॥

एकादशीपासून पांच दिवस भीष्मपंचकव्रत करावें. तें भीष्मपंचक व्रत, शुद्ध एकादशीचे दिवसीं आरंभून चतुर्दशीनें विद्ध नसून सूर्योदयव्यापिनी अशा पौर्णिमेचे ठिकाणीं समाप्त करावें. जर शुद्ध एकादशीचे दिवसीं आरंभ केला असतां क्षयाच्या योगानें दिवस कमी होऊन पौर्णिमेचे ठिकाणीं पांच दिवसांच्या व्रताची समाप्ति घडत नसेल तर विद्ध एकादशीचे दिवसींहि आरंभ करावा. शुद्ध एकादशीचे दिवसींहि आरंभ केला असतां दिनवृद्धीच्या योगानें प्रतिपदेनें विद्ध अशा पौर्णिमेचे ठिकाणीं समाप्ति येईल तर सहा दिवस होतील आणि व्रत तर पांच दिवसांचें आहे याकरितां चतुर्दशीनें विद्ध अशा पौर्णिमेच्या दिवसींहि समाप्ति करावी. ह्या व्रताचा प्रयोग कौस्तुभादिक ग्रंथीं पाहावा. कार्तिक मासामध्यें एकादशी इत्यादिक पर्वणीचे ठिकाणीं चंद्रबळ व ताराबळ पाहून शिव व विष्णु यांच्या मंत्रांची दीक्षा ग्रहण करावी. कारण, "कार्तिक मासांत मंत्रदीक्षा ग्रहण केली असतां ती दीक्षा जन्मापासून सोडविणारी, ह्मणजे मुक्ति देणारी होते," असें नारदाचें वचन आहे. तसेंच ह्या कार्तिक मासांत तुलसीच्या काष्ठांची माला धारण करावी असें स्कंदपुराणांतील द्वारकामाहात्म्याचे ठिकाणीं व विष्णुधर्माचे ठिकाणीं सांगितलें आहे. "तुलसीच्या काष्ठांची माला केशवाला अर्पण करून नंतर ती माला जो मनुष्य भक्तिपूर्वक धारण करितो त्याचें पातक निश्चयेंकरून राहत नाहीं." मालेच्या प्रार्थनेचा मंत्र—"तुलसीकाष्ठसंभूते माले कृष्णजनप्रिये ॥ बिभर्मि त्वामहं कंठे कुरु मां कृष्णवल्लभं," "ह्या मंत्रेंकरून मालेची प्रार्थना करून कृष्णाच्या कंठाचे ठिकाणीं अर्पण केलेली माला, कार्तिक मासामध्यें यथाविधि जो धारण करितो तो विष्णुपदाला जातो," असें निर्णयसिंधूंत स्पष्ट सांगितलें आहे. जें निर्णयसिंधूमध्येंच मालाधारणाच्या प्रकरणाच्या शेवटीं सर्व पुस्तकांचे ठिकाणीं जरी मिळत नाहीं तथापि 'याविषयीं मूळ विचार करावा' असें वाक्य एकाद्या निर्णयसिंधूच्या पुस्तकांत आढळतें. त्याचें तात्पर्य, मालाधारणाविषयीं जीं विधिवाक्यें आहेत तीं प्रमाणभूत नाहींत अशाविषयीं नाहीं. कारण, निर्णयसिंधुकार आपणच स्कंदपुराणांतील विष्णुधर्मामध्यें लिहिलेलीं वाक्यें सांगून आपणच तीं वाक्यें अप्रमाण असें ह्मणतील तर मोठा हानिप्रसंग येईल, आणि "रुद्राक्षांच्या आकाराप्रमाणें केलेले असे जे तुलसीकाष्ठांचे मणि त्यांची माळा करून ती गळ्यांत धारण करून पूजेला आरंभ करावा, तुलसीकाष्ठांच्या मालेनें भूषित होत्साता पितर किंवा देव

यांची पूजा इत्यादिक करील तर तें कर्म कोटिगुणित होतें," असीं पद्मपुराणामध्यें पातालखंडीं एकुणऐंशिव्या अध्यायाचे ठिकाणीं प्रत्यक्ष मिळणारीं जीं वचनें त्यांच्याशीं विरोध येईल. तर आषाढमासप्रकरणीं आषाढ शुद्ध पक्षांतील द्वादशीविषयीं अनुराधायोगरहित द्वादशीचे ठिकाणीं पारणा करावी असें सांगून त्याविषयीं प्रमाणभूत असीं, "आभाकासितपक्षेषु, मैत्राद्यपादे स्वपितीह विष्णुः" इत्यादिक भविष्यपुराणांतील विष्णुधर्मग्रंथाचीं वाक्यें लिहून जसें शेवटीं हें निर्मूल आहे असें सांगितलें, तसें त्याच्या दुसऱ्या प्रकरणाविषयींहि जाणावें. माधवादिक मूल ग्रंथांमध्यें तें वचन मिळत नाहीं असेंच निर्णयसिंधूच्या परिभाषेचें तात्पर्य, अप्रमाणाविषयीं तात्पर्य नाहीं. अप्रमाणाविषयीं मानलें असतां भाद्रपदमास व कार्तिकमास यांचे ठिकाणीं त्याच वाक्याला अनुसरून जो पारणानिर्णय लिहिला त्याची संगति होणार नाहीं. व कौस्तुभादिक जे सर्व नवीन ग्रंथ त्यांमध्यें त्याच वाक्याला अनुसरून जो निर्णय सांगितला त्याचीहि संगति होणार नाहीं. आणि सर्व शिष्ट त्या वाक्याला अनुसरून त्याप्रमाणेंच जी पारणा करितात त्यालाहि प्रमाण नाहीं असें होईल, यास्तव त्याप्रमाणें एथेंहि जाणावें. येणेंकरून, माधवादिक ग्रंथांमध्यें मिळत नाहीं यास्तव हें अप्रमाण असें जें ह्मटलें तें खंडित झालें; आणि माधवादिकांनीं लिहिलेलीं बहुत वाक्यें व आचार हीं प्रमाणभूत नाहींत असी आपत्ति येईल. जेथें 'यानि' 'यत्तु' अशा स्वरूपेंकरून यत्पदाचा उपक्रम दाखविल्यावांचून 'तीं निर्मूल आहेत' इत्यादिक रीतीनें दूषित होतात. जसें श्रवणद्वादशीप्रकरणीं श्रवणाला उत्तराषाढाचे वेधाच्या निषेधाचीं वाक्यें जीं सांगितलीं तेथें त्यांचें अप्रमाणाविषयींच सर्वथा तात्पर्य असें सूक्ष्मबुद्धि जाणोत. एथें शंका—माधवादिक ग्रंथांमध्यें मिळत नाहीं याकरितां निर्मूल असें नाहीं, तर काष्ठमालाधारणाचा निषेध करणारीं असीं बाधक वाक्यें मिळतात यास्तव निर्मूल, असें ह्मणसील तर तीं कोणतीं वाक्यें? सामान्येंकरून काष्ठमालाधारणाचा निषेध करणारीं मिळतात तीं, किंवा विशेषेंकरून तुलसीकाष्ठमालेचा निषेध करणारीं मिळतात तीं? प्रथम पक्षाविषयीं समाधान—सामान्येंकरून काष्ठमालाधारणाचा निषेध करणारीं जीं वाक्यें त्यांचा बाध, विशेषरूप जीं तुलसी, आवळी यांच्या काष्ठांची माला धारण करण्याविषयीं सांगणारीं वाक्यें त्यांहींकरून स्पष्ट होतो. दुसऱ्या पक्षाविषयीं समाधान—जसें अतिरात्र यज्ञामध्यें षोडशी या पात्राचें ग्रहण विधिनिषेधरूपानें वैकल्पिक ह्मणजे ग्रहण करावें किंवा न करावें तसा तुलसीकाष्ठमालाधारणाचा विकल्प आहे असें जाण. तो विकल्प वैष्णव आणि अवैष्णव या भेदानें व्यवस्थित होईल. कारण, मूलवचनांमध्यें विष्णु इत्यादिक पदें मिळतात यास्तव निर्मूल असें होत नाहीं, याकरितांच हीं वाक्यें माधवादिकांनीं लिहिलीं नाहींत त्यांचा अभिप्राय हरिवासराच्या लक्षणाचें जें वचन त्याचे ठिकाणीं पुरुषार्थचिंतामणीमध्यें वैष्णव जे त्यांनींच हरिवासर अवश्य पाळावा असें सांगितलें आहे यास्तव यांचें ग्रहण जरी न केलें तथापि तितक्यानें माधवादिकांला कमीपणा येत नाहीं, अशा रीतीनें जाणण्याला शक्य आहे. याप्रमाणें आवळीच्या काष्ठांची माला धारण करण्याचा विधि जाणावा. रामार्चनचंद्रिका इत्यादिक ग्रंथांमध्यें तुलसीच्या काष्ठांची माला करून त्या मालेनें जप करावा अशा प्रकारचीं, "तुलसीच्या काष्ठांचे मणि करून त्यांची जपमाळा करावी," इत्यादिक विधि-

वाक्यें स्पष्ट आहेत, व असीं दुसऱ्या ग्रंथांमध्येंहि बहुत मिळतात. तसेंच प्रयोगपारिजातांत आन्हिकामध्यें पूजाप्रकरणीं सांगितलें आहे, तें असें,—पूर्वी अग्रोदक, गंध, पुष्पें, अक्षता इत्यादिक पूजासामग्री मिळवून हात पाय धुवून जसी शक्ति असेल तदनुसार पीतांबर इत्यादिक शुद्ध वस्त्र धारण करून अलंकार धारण करीत होत्साता मोत्यें, पोवळीं, कमलाक्ष, तुलसीच्या काष्ठांचे माणि ह्यांच्या माळा कंठाचे ठिकाणीं धारण करून पूजा आरंभावी. याप्रमाणें सर्व देशांतील वैष्णवांमध्यें तुलसीच्या काष्ठांची माला धारण करून जप करण्याचा सांप्रदायहि मिळतो. त्यापेक्षां, भस्म इत्यादिकांचे धारणाचा द्वेष करणारे जे वैष्णव त्यांच्या द्वेषानें शैवमार्गाचा आग्रह धरणारे शैव मात्र तुलसीकाष्ठमालेचा द्वेष करितात, याप्रमाणें निर्णय झाला. याहून विशेष विस्तार करण्याचें प्रयोजन नाहीं.

---

अथधात्रीमूलेदेवपूजाविधिः सर्वपापक्षयद्वाराश्रीदामोदरप्रीत्यर्थंधात्रीमूलेश्रीदामोदरपूजां करिष्ये पुरुषसूक्तेनषोडशोपचारैःसंपूज्यगंधपुष्पफलयुतमर्घ्यंदद्यात् अर्घ्यंगृहाणभगवन्सर्वकामप्रदोभव अक्षयासंततिर्मेस्तुदामोदरनमोस्तुते ततोपराधसहस्राणीतिप्रार्थ्यधात्रींकुंकुमगंधादिनाभ्यर्च्यपुष्पैःपूजयेत् धात्र्यैनमः शांत्यैन० मेधायै० प्रकृत्यै० विष्णुपत्न्यै० महालक्ष्म्यै० रमायै० कमलायै० इंदिरायै० लोकमात्रे० कल्याण्यै० कमनीयायै० सावित्र्यै० जगद्धात्र्यै० गायत्र्यै० सुधृत्यै० अव्यक्तायै० विश्वरूपायै० सुरूपायै० अब्धिभवायै० ततोधात्रीमूलेसव्येनतर्पणंकार्यं पितापितामहश्चान्येअपुत्रायेचगोत्रिणः तेपिबंतुमयादत्तंधात्रीमूलेऽक्षयंपयः आब्रह्मस्तंबपर्यंतं० दामोदरनिवासायैधात्र्यैदेव्यैनमोस्तुते सूत्रेणानेनबध्नामिसर्वदेवनिवासिनीमितिसूत्रेणवेष्टयेत् धात्र्यैनमइतिचतुर्दिक्षुबलीन्दत्वाष्टदीपान्दद्यात् अष्टकृत्वःप्रदक्षिणीकृत्यनमेत् धात्रिदेविनमस्तुभ्यंसर्वपापक्षयंकरि पुत्रान्देहिमहाप्राज्ञेयशोदेहिबलंचमे प्रज्ञांमेधांचसौभाग्यंविष्णुभक्तिंचशाश्वतीं नीरोगंकुरुमांनित्यंनिष्पापंकुरुसर्वदा ततोघृतपूर्णंसहेमकांस्यपात्रंदद्यादितिसंक्षेपः ॥

आतां आवळीवृक्षाच्या मूलाचे ठिकाणीं देवपूजेचा विधि सांगतों,—"सर्वपापक्षयद्वारा श्रीदामोदरप्रीत्यर्थं धात्रीमूले श्रीदामोदरपूजां करिष्ये," असा संकल्प करून पुरुषसूक्तानें षोडशोपचार पूजा करून, गंध, पुष्प, फल यांहीं युक्त अर्घ्य द्यावें. अर्घ्याचा मंत्र;—अर्घ्यं गृहाण भगवन् सर्वकामप्रदो भव ॥ अक्षया संततिर्मेस्तु दामोदर नमोस्तु ते." तदनंतर "अपराधसहस्राणि०" ह्या मंत्रानें प्रार्थना करून आवळीवृक्षाची कुंकुम, गंध, इत्यादिकांनीं पूजा करून मग पुष्पांनीं पूजा करावी. पुष्पपूजेचे मंत्र;—"धात्र्यै नमः, शांत्यैन०, मेधायै०, प्रकृत्यै०, विष्णुपत्न्यै०, महालक्ष्म्यै०, रमायै०, कमलायै०, इंदिरायै०, लोकमात्रे०, कल्याण्यै०, कमनीयायै०, सावित्र्यै०, जगद्धात्र्यै०, गायत्र्यै०, सुधृत्यै०, अव्यक्तायै०, विश्वरूपायै०, सुरूपायै०, अब्धिभवायै०" याप्रमाणें पूजा झाल्यानंतर आवळीवृक्षाचे मूलाचे ठिकाणीं सव्यानें तर्पण करावें. तर्पणाचा मंत्र;—"पिता पितामहश्चान्ये अपुत्रा ये च गोत्रिणः ॥ ते पिबंतु मया दत्तं धात्रीमूलेऽक्षयं पयः ॥ आब्रह्मस्तंबपर्यंतं०" असें तर्पण करून नंतर, "दामोदरनिवासायै धात्र्यै देव्यै नमोस्तु ते ॥

सूत्रेणानेन बध्नामि सर्वदेवनिवासिनीं." ह्या मंत्रानें आवळीवृक्षाला सभोंवार सूत्राचें वेष्टण करावें. आणि "धात्र्यै नमः" या मंत्रानें पूर्वादिक चार दिशांचे ठिकाणीं बलि देऊन आठ दीप लावावे, व आठ प्रदक्षिणा करून नमस्कार करावा, आणि प्रार्थना करावी.—प्रार्थना व नमस्कार यांचे मंत्र;—"धात्रि देवि नमस्तुभ्यं सर्वपापक्षयंकरि ॥ पुत्रान्देहि महाप्राज्ञे यशो देहि बलं च मे ॥ प्रज्ञां मेधां च सौभाग्यं विष्णुभक्तिं च शाश्वतीं ॥ नीरोगं कुरु मां नित्यं निष्पापं कुरु सर्वदा." त्यानंतर घृतपूर्ण व सुवर्णयुक्त अशा कांस्यपात्राचें दान करावें. याप्रमाणें संक्षेपानें पूजाप्रयोग सांगितला.

---

कार्तिकशुक्लद्वादश्यांरेवतीयोगरहितायांपारणं अपरिहार्ययोगेचतुर्थपादोवर्ज्यइत्यादिविशेषःश्रवणनिर्णयप्रकरणोक्तोद्रष्टव्यः ॥

कार्तिकशुक्ल द्वादशीचे दिवशीं रेवतीनक्षत्रयोगानें रहित अशा द्वादशीचे ठिकाणीं पारणा करावी. सर्व नक्षत्र टाकण्यास अशक्य असेल तर चवथा पाद वर्ज्य करावा, इत्यादिक विशेष प्रकार श्रवणनिर्णयप्रकरणीं सांगितला आहे तो पहावा.

---

अथप्रबोधोत्सवतुलसीविवाहौ तत्रप्रबोधोत्सवःकार्तिकशुक्लैकादश्यांकचिदुक्तःरामार्चनचंद्रिकादौद्वादश्यामुक्तः उत्थापनमंत्रेद्वादशीग्रहणात्द्वादश्यामेवयुक्तः तत्रापिद्वादश्यारेवत्यंतपादयोगोरात्रिप्रथमभागेप्रशस्तः तदभावेतत्रैवरात्रौरेवतीनक्षत्रमात्रयोगोपि तदभावेरात्रिप्रथमभागेकेवलद्वादश्यपि एवंकेवलरेवत्यपि द्वादशीरेवत्योरुभयोरपिरात्रावभावेदिवैवद्वादशीमध्येकार्यइतिकौस्तुभेस्थितं तथापिपारणाहेपूर्वरात्रौइतिवचनात्पारणाहेरात्रिपूर्वभागेद्वादश्यभावेपित्रयोदश्यामेवपारणाहेप्रबोधोत्सवइतिदेशाचारः एवंतुलसीविवाहस्यनवम्यादिदिनत्रयेएकादश्यादिपूर्णिमांतेयत्रक्कापिदिने कार्तिकशुक्लांतर्गतविवाहनक्षत्रेषुवाविधानादनेककालत्वं तथापिपारणाहेप्रबोधोत्सवकर्मणासहतंत्रतयैवसर्वत्रानुष्ठीयतेइतिसोपिपारणाहेपूर्वरात्रेकार्यः प्रबोधोत्सवात्पृथक्चिकीर्षायांकालांतरेवाकार्यःतत्रपुण्याहवाचननांदीश्राद्धविवाहहोमाद्यंगसहितस्तुलसीविवाहप्रयोगःकौस्तुभादौज्ञेयः संक्षेपतस्तुप्रबोधोत्सवेनकतंत्रतयाशिष्टाचारमनुसृत्यलिख्यते देशकालौसंकीर्त्यश्रीदामोदरप्रीत्यर्थंप्रबोधोत्सवंसंक्षेपतस्तुलसीविवाहविधिंचतंत्रेणकरिष्ये तदंगतयापुरुषसूक्तेनविधिनाषोडशोपचारैस्तंत्रेण श्रीमहाविष्णुपूजांतुलसीपूजांचकरिष्ये न्यासादिविधाय श्रीविष्णुंतुलसींचध्यात्वासहस्रशीर्षेतिश्रीमहाविष्णुं तुलसींचावाह्य पुरुषएवेत्यादिभिःश्रीमहाविष्णवेदामोदरायश्रीदेव्यैतुलस्यैचनमआसनमित्यादिस्नानांते मंगलवाद्यैः सुगंधितैलहरिद्राभ्यांनागवल्लीदलगृहीताभ्यां उष्णोदकेनचमंगलस्नानं विष्णवेतुलस्यैचसुवासिनीभिःकारयित्वास्वयंवादत्वापंचामृतस्नानंसमर्प्यशुद्धोदकेनाभिषिच्यवस्त्रयज्ञोपवीतचंदनंदत्वातुलस्यैहरिद्राकुंकुमकंठसूत्रमंगलालंकारान्दत्वामंत्रपुष्पांतपूजांसमाप्य घंटादिवाद्यघोषेणदेवंप्रबोधयेत् तत्रमंत्राः इदंविष्णु० योजागारेतितुआचारप्राप्तः ब्रह्मेंद्ररुद्राग्निकुबेरसूर्यसोमादिभिर्वंदितवंदनीयः बुध्यस्वदेवेशजगन्निवासमंत्रप्रभावेनसुखेनदेव इयंचद्वादशीदेवप्रबोधार्थंतुनिर्मिता त्वयैवसर्वलोकानांहितार्थंशेषशायिना उत्तिष्ठोत्तिष्ठगोविंदत्य

जनिद्रांजगत्पते त्वयिसुप्तेजगत्सुप्तमुत्थितेचोत्थितंजगत् एवमुत्थाप्य चरणंपवित्रं० गतामेघा वियच्चैवनिर्मलंनिर्मलादिशः शारदानिचपुष्पाणिगृहाणममकेशवेत्यादिमंत्राभ्यांपुष्पांजलिंद द्यात् अथाचारात्तुलसीसंमुखांश्रीकृष्णप्रतिमांकृत्वामध्येंतःपटंधृत्वामंगलाष्टकपद्यानिपठित्वा अंतःपटंविसृज्याक्षताप्रक्षेपंकृत्वादामोदरहस्तेतुलसीदानंकुर्यात् देवींकनकसंपन्नांकनकाभर णैर्युताम् दास्यामिविष्णवेतुभ्यंब्रह्मलोकजिगीषया मयासंवर्धितांयथाशक्त्यलंकृतामिमांतुलसीं देवींदामोदरायश्रीधरायवरायतुभ्यमहंसंप्रददे देवपुरतःसाक्षतजलंक्षिपेत् श्रीमहाविष्णुः प्रीयतामित्युक्त्वाइमांदेवींप्रतिगृण्हातुभवान्इतिवदेत् ततोदेवहस्तस्पर्शंतुलस्याःकृत्वा कइदंक स्माअदात्कामःकामायादात्कामोदाताकामः प्रतिगृहीताकामंसमुद्रमाविशकामेनत्वाप्रतिगृ ण्हामिकामैतत्तेवृष्टिरसिद्यौस्त्वाददातुपृथिवीप्रतिगृण्हातु इतिमंत्रमन्येनवाचयेत् यजमानः त्वंदेविमेग्रतोभूयास्तुलसीदेविपार्श्वतः देवित्वंपृष्ठतोभूयास्त्वद्दानान्मोक्षमाप्नुयाम् दानस्यप्रतिष्ठा सिद्ध्यर्थमिमांदक्षिणांसंप्रददेदेवपुरतोदक्षिणामर्पयेत् ततःस्वस्तिनोमिमीतांशंनइत्यादिस्वस्व शाखोक्तानिशांतिसूक्तानिविष्णुसूक्तानिचपठेयुः तुलसीयुतायविष्णवेमहानीराजनंकृत्वामंत्र पुष्पंदत्वासपत्नीकःसगोत्रजःसामात्योयजमानश्चतस्त्रःप्रदक्षिणाःकुर्वीत ब्राह्मणेभ्योदक्षिणांद त्वायथाशक्तिब्राह्मणभोजनंसंकल्प्यकर्मेश्वरार्पणंकुर्यात् एवंदेवंप्रबोध्यकार्तिकेयद्यत्द्रव्यस्यव र्जनं कृतंतत्तद्द्रव्यमुक्तरीत्याद्रव्यांतरंच ब्राह्मणेभ्योदत्वाव्रतपूर्णतांप्रार्थयेत् इदंव्रतंमयादेवकृतं प्रीत्यैतवप्रभो न्यूनंसंपूर्णतांयातुत्वत्प्रसादाज्जनार्दनेति ततोव्रतंभगवदर्पणंकुर्यात् चातुर्मास्यव्र तसमाप्तिरप्यत्रैवेतिकेचित् कार्तिकमासव्रतोद्यापनंचातुर्मास्यव्रतोद्यापनंचतुर्दश्यांपूर्णिमायांवे त्यपरे ॥

## आतां प्रबोधोत्सव व तुळसीविवाह यांचा विधि सांगतों.

प्रबोधोत्सव कार्तिकशुक्ल एकादशीचे दिवसीं करावा, असें कित्येक ग्रंथांत सांगितलें आहे. रामार्चनचंद्रिका इत्यादिक ग्रंथीं द्वादशीचे दिवसीं करावा असें सांगितलें आहे. उत्थापनाच्या मंत्रामध्यें द्वादशी तिथीचा उच्चार केला आहे, याकरितां द्वादशीचे दिवसींच करावा हें योग्य. त्यांमध्येंहि द्वादशी, व रेवतीचा शेवटचा पाद यांचा योग रात्रीच्या प्रथम भागीं असल्यास चांगला. तसा नसेल तर त्याच रात्रीचे ठिकाणीं रेवतीनक्षत्राचा मात्र योग असेल तर तोहि प्रशस्त. रेवतीनक्षत्राचाहि योग नसल्यास रात्रीच्या प्रथम भागीं केवल द्वादशी असेल तर तीहि प्रशस्त होय. याप्रमाणें केवल रेवतीनक्षत्र तेंहि प्रशस्त जाणावें. द्वादशी व रेवती हीं दोनहि रात्रीं नसतील तर दिवसासच द्वादशीमध्यें करावा असें कौस्तुभांत आहे, तथापि "पारणेच्या दिवसीं पूर्वरात्रीं" असें वचन आहे याकरितां पारणेच्या दिवसीं रात्रीच्या पूर्वभागीं द्वादशी नसली तथापि त्रयोदशीमध्येंच पारणादिवसीं प्रबोधोत्सव करण्याचा देशाचार आहे. याप्रमाणें तुळसीविवाह हा नवमी, दशमी आणि एकादशी या तीन दिवसांचे ठिकाणीं करावा, अथवा एकादशीपासून पौर्णिमेपर्यंत कोणत्याहि दिवसीं, किंवा कार्तिकशुक्ल पक्षांतील विवाहनक्षत्रांचे ठिकाणीं करावा. असे तुळसीच्या विवाहाचे अनेक काल सांगितले आहेत तथापि पारणादिवसीं प्रबोधोत्सवकर्मासहवर्तमान एकतंत्रानेंच सर्वत्र करितात, तोहि पारणेच्या

दिवसीं पूर्व रात्रीं करावा. प्रबोधोत्सवाहून निराळा करावयाचा असेल तर दुसऱ्या कालीं करावा. त्याविषयीं पुण्याहवाचन, नांदीश्राद्ध, विवाहहोम इत्यादिक अंगभूत कर्मासहित तुलसीविवाहाचा प्रयोग कौस्तुभादिक ग्रंथीं पाहावा. संक्षेपानें प्रबोधोत्सवासहवर्तमान एकतंत्रानें करण्याचा शिष्टाचार आहे त्याला अनुसरून प्रयोग लिहितों. देशकालांचा उच्चार करून "**श्रीदामोदरप्रीत्यर्थं प्रबोधोत्सवं संक्षेपतस्तुलसीविवाहविधिं च तंत्रेण करिष्ये, तदंगतया पुरुषसूक्तेनविधिना षोडशोपचारैस्तंत्रेण श्रीमहाविष्णुपूजां तुलसीपूजां च करिष्ये,**" असा संकल्प करून न्यास इत्यादिक करून श्रीविष्णु व तुलसी यांचें ध्यान करून, "**सहस्रशीर्षा०** ह्या मंत्रानें श्रीमहाविष्णु व तुलसी यांचें आवाहन करून "**पुरुषएवेदं०**" "**श्रीमहाविष्णवे दामोदराय श्रीदेव्यै तुलस्यै च नमः**" इत्यादिक मंत्रांनीं आसन इत्यादिकांपासून स्नानापर्यंत पूजा झाल्यानंतर मंगल वाद्यें वाजवून सुवासिनीकडून किंवा आपण नागवल्लीच्या पानांनीं सुगंधि तेल व हळद लावून उष्णोदकानें मंगलस्नान विष्णु व तुलसी यांना घालून पंचामृतस्नान अर्पण करून शुद्धोदकानें अभिषेक करावा. नंतर वस्त्र, यज्ञोपवीत, चंदन अर्पण करून तुलसीला हळद, कुंकुम, कंठसूत्र असे मंगल अलंकार समर्पण करून मंत्रपुष्पापर्यंत पूजा समाप्त करून घंटा इत्यादिक वाद्यांचा गजर करून देवाला जागृत करावें. जागृत करण्याचे मंत्र–"**इदंविष्णु०**" "**योजागार०**". हा मंत्र तर आचारानें प्राप्त आहे. **ब्रह्मेंद्ररुद्राग्निकुबेरसूर्यसोमादिभिर्वंदितवंदनीयः ॥ बुध्यस्व देवेश जगन्निवास मंत्रप्रभावेन सुखेन देव ॥ इयं च द्वादशी देव प्रबोधार्थं तु निर्मिता ॥ त्वयैव सर्वलोकानां हितार्थं शेषशायिना ॥ उत्तिष्ठोत्तिष्ठ गोविंद त्यज निद्रां जगत्पते ॥ त्वयि सुप्ते जगत्सुप्तमुत्थिते चोत्थितं जगत्.**" याप्रमाणें उठवून "**चरणं पवित्रं०**" "**गता मेघा वियच्चैव निर्मलं निर्मला दिशः ॥ शारदानि च पुष्पाणि गृहाण मम केशव,**" इत्यादिक मंत्र ह्मणून पुष्पांजलि द्यावी. यानंतर आचाराप्रमाणें तुलसीच्या संमुख श्रीकृष्णमूर्ति करून मध्यें अंतःपट धरून मंगलाष्टकांचे श्लोक पठण करून अंतःपट दूर करावा. नंतर मूर्ति व तुलसी यांच्यावर अक्षता टाकून दामोदराच्या हातावर तुलसीचें दान करावें. दानाचा मंत्र–"**देवीं कनकसंपन्नां कनकाभरणैर्युतां ॥ दास्यामि विष्णवे तुभ्यं ब्रह्मलोकजिगीषया ॥ मया संवर्द्धितां यथाशक्त्यलंकृतां इमां तुलसीदेवीं दामोदराय श्रीधराय वराय तुभ्यमहं संप्रददे,**" ह्या मंत्रांनीं दान करून देवाच्या पुढें अक्षतांसहित उदक सोडावें. नंतर "**श्रीमहाविष्णुः प्रीयतां,**" असें ह्मणून "**इमां देवीं प्रतिगृण्हातु भवान्**" असें वाक्य बोलावें. तदनंतर तुलसीला देवाचा हस्तस्पर्श करून "**क इदं कस्मा० पृथिवीप्रतिगृण्हातु ॥**" हा मंत्र दुसऱ्याकडून ह्मणवावा. नंतर यजमानानें "**त्वं देवि मेऽग्रतो भूयास्तुलसीदेवि पार्श्वतः ॥ देवि त्वं पृष्ठतो भूयास्त्वद्दानान्मोक्षमाप्नुयां ॥ दानस्य प्रतिष्ठासिद्ध्यर्थं इमां दक्षिणां संप्रददे,**" असे मंत्र ह्मणून देवाच्या पुढें दक्षिणा समर्पण करावी. त्यानंतर "**स्वस्तिनो मिमीता०, शन्न इंद्राग्नी,०**" इत्यादिक आपापल्या शाखेमध्यें सांगितलेलीं शांतिसूक्तें व विष्णुसूक्तें ब्राह्मणांनीं पठण करावीं. मग तुलसीसह विष्णूला महाआर्ती करून मंत्रपुष्प समर्पण करून सपत्नीक यजमानानें आपले गोत्रज, अमात्य यांसहवर्तमान चार प्रदक्षिणा कराव्या, आणि ब्राह्मणांला दक्षिणा देऊन यथाशक्ति ब्राह्मणभोजनाचा संकल्प करून कर्म ईश्वराला अर्पण करावें. याप्र-

माणें देवाला जागृत करून कार्तिकमासांत जे जे पदार्थ वर्ज्य केले असतील ते ते पदार्थ किंवा पूर्वी सांगितल्याप्रमाणें दुसरें द्रव्य ब्राह्मणाला देऊन व्रत सांग होण्याची प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र;—"इदं व्रतं मया देव कृतं प्रीत्यै तव प्रभो ॥ न्यूनं संपूर्णतां यातु त्वत्प्रसादाज्जनार्दन." त्यानंतर व्रत ईश्वराला अर्पण करावें. चातुर्मास्यव्रतांची समाप्ति करणें ती ह्याच दिवसीं करावी असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार कार्तिकमासव्रतांचें उद्यापन व चातुर्मास्यव्रतांचें उद्यापन हीं चतुर्दशी किंवा पौर्णिमा या दिवसीं करावीं असें ह्मणतात.

---

अथवैकुंठचतुर्दशी पूर्वेद्युरुपवासंकृत्वारुणोदयव्यापिन्यांचतुर्दश्यांशिवंसंपूज्यप्रातःपारणंकार्यम् तथाचचतुर्दशीयुक्तारुणोदयवतिअहोरात्रेउपवासःफलितः उभयत्रारुणोदयव्याप्तौ परत्रारुणोदयेपूजापूर्वत्रोपवासः उभयत्राव्याप्तौचतुर्दशीयुक्ताहोरात्रेएवारुणोदयेपूजापूर्वत्रोपवासश्च केचित्तुविष्णुपूजायामियंनिशीथव्यापिनीग्राह्या दिनद्वयेतद्व्याप्तौनिशीथप्रदोषोभयव्यापिनीग्राह्येत्याहुः अस्यामेवचतुर्दश्यांपरविद्धायांकार्तिकमासव्रतोद्यापनांगत्वेनोपवासंकृत्वाधिवासनंविधाय रात्रौजागरणंकुर्याद्गीतवाद्यादिमंगलैः नराणांजागरेविष्णोर्गीतंनृत्यंचकुर्वताम् गोसहस्रंचददतांफलंसममुदाहृतमित्यादिवाक्यैर्विहितंगीतनृत्यवाद्यविष्णुचरितपठनस्वेच्छालापलीलानुकारैर्हरिजागरंकृत्वापरविद्धपौर्णमास्यांसपत्नीकाचार्यंवृत्वाअतोदेवेति द्वाभ्यांतिलपायसंहुत्वागोदानंकार्यमितिमासव्रतोद्यापनं कार्तिकशुक्लाद्वादशीपौर्णमासीचमन्वादिः सापौर्वाण्हिकीग्राह्या अन्यत्पूर्वमुक्तं ॥

## आतां वैकुंठचतुर्दशीचा निर्णय सांगतों.

पूर्व दिवसीं उपोषण करून अरुणोदयव्यापिनी अशा चतुर्दशीचे दिवसीं शिवाची पूजा करून प्रातःकालीं पारणा करावी. तसें झाल्यानें चतुर्दशीयुक्त अशा अरुणोदययुक्त अहोरात्राचे ठिकाणीं उपोषण होतें. दोन दिवस अरुणोदयव्याप्ति असेल तर पूर्व दिवसीं उपोषण करून दुसऱ्या दिवसीं अरुणोदयकालीं पूजा करावी. दोनहि दिवसीं अरुणोदयव्याप्ति नसेल तर पूर्व दिवसीं उपोषण करून चतुर्दशीयुक्त अहोरात्राचे ठिकाणींच अरुणोदयकालीं पूजा करावी. कोणी ग्रंथकार तर विष्णुपूजेविषयीं वैकुंठचतुर्दशी निशीथव्यापिनी घ्यावी, दोन दिवसीं निशीथव्यापिनी असेल तर निशीथकाल व प्रदोषकाल असी दोन कालीं व्याप्ति असेल ती घ्यावी, असें ह्मणतात. पौर्णिमेनें विद्ध अशा ह्याच चतुर्दशीचे दिवसीं कार्तिकमासव्रताच्या उद्यापनाचें अंगभूत असें उपोषण करून अधिवासन करून, "विष्णूच्या पुढें गायन, वाद्यें, नृत्य इत्यादिक मंगलांनीं जागरण करावें. विष्णूच्या जागरामध्यें गायन, नृत्य करणारे यांस, सहस्र गोप्रदानें करणारे यांच्या सारखें फल मिळतें," इत्यादि वाक्यांनीं विहित असा गायन, नृत्य, वाद्यें, विष्णुचरित्रांचें पठण, स्वेच्छालाप, भगवल्लीलांचें अनुकरण इत्यादिकांनीं हरिजागर करून प्रतिपदेनें विद्ध अशा पौर्णिमेचे दिवसीं सपत्नीक असा आचार्य वरून"अतो देवा०"या दोन मंत्रांनीं तिळ व पायस यांचा होम करून गोदान क-

रावें. याप्रमाणें मासव्रताचें उद्यापन करावें. कार्तिकशुक्लपक्षांतील द्वादशी व पौर्णिमा ह्या दोन तिथि मन्वादि आहेत ह्या पूर्वाण्हकालव्यापिनी घ्याव्या. इतर निर्णय पूर्वी सांगितला आहे.

---

अस्यांचातुर्मास्यव्रतसमाप्तिः तत्र चातुर्मास्यव्रतानांसमाप्तौदानानि नक्तव्रतेवस्त्रयुग्मम् एकांतरोपवासेगौः भूशयनेशय्या षष्ठकालभोजनेगौः व्रीहिगोधूमादिधान्यत्यागेसौवर्णव्रीहिगोधूमादिदानम् कृच्छ्रव्रतेगोयुग्मम् शाकाहारेगौः पयोमात्रभक्षणेपयोवर्जनेचगौः मधुदधिघृतवर्जनेवस्त्रंगौश्च ब्रह्मचर्येस्वर्णम् तांबूलवर्जनेवस्त्रयुग्मम् मौनेघंटाघृतकुंभोवस्त्रद्वयंच रंगवल्लीकरणेगौःसुवर्णपद्मंच दीपदानव्रतेदीपिकावस्त्रद्वयंच भूमिभोजनेकांस्यपात्रंगौश्च गोग्रासेगोवृषौ प्रदक्षिणाशतेवस्त्रम् अभ्यंगवर्जनेतैलपूर्णघटः नखकेशधारणेमधुसर्पिर्हेमदानम् यत्रविशेषतोदानंनोक्तंतत्रस्वर्णंगौश्च गुडवर्जनेगुडपूर्णंससुवर्णंताम्रपात्रंएवंलवणवर्जनेलवणपूर्णताम्रपात्रमितिक्वचित् अस्यामेवलक्षप्रदक्षिणालक्षनमस्काराणामाषाढ्यादावारब्धानामुद्यापनंकार्यम् एवंतुलसीलक्षपूजांकार्तिकेमाघेवारभ्यप्रत्यहंसहस्रतुलसीसमर्पणेनलक्षंसमाप्यमाघ्यां वैशाख्यांवोद्यापनंकार्यं एवंपुष्पादिलक्षपूजाअपि तत्रबिल्वपत्रलक्षेणलक्ष्मीप्राप्तिःफलं दूर्वालक्षेणारिष्टशांतिः चंपकलक्षेणायुष्यम् अतसीलक्षेणविद्या तुलसीलक्षेणविष्णुप्रसादः गोधूमतंडुलादिप्रशस्तधान्यलक्षेणदुःखनाशः एवंसर्वपुष्पैःसर्वकामावाप्तिः एवंलक्षवर्तिव्रतमपिमासत्रयंकृत्वाकार्तिकेमाघेवैशाखेवाउत्तरोत्तरप्रशस्तेसमापनीयम् एवंधारणपारणव्रतोद्यापनमपिपूर्णमास्यामेवकार्तिकमासव्रतानांमासोपवासादीनांद्वादश्यामेवसमापनम् तत्रासंभवेपौर्णमास्याम् एवंगोपद्मव्रतमाषाढशुक्लैकादश्यादावारभ्यप्रत्यहंत्रयस्त्रिंशद्गोपद्मानि विलिख्य गंधपुष्पैःप्रपूज्यतावत्संख्याकार्घ्यनमस्कारप्रदक्षिणाःकृत्वा कार्तिकद्वादश्यांत्रयस्त्रिंशदपूपवायनंदद्यादेवंवत्सरपंचकमनुष्ठायोद्यापनंकुर्यात् लक्षप्रदक्षिणादिगोपद्मपर्यंतोद्यापनानामितिकर्तव्यताः कौस्तुभेद्रष्टव्याः कार्तिकेपौर्णमास्याःकृत्तिकानक्षत्रयोगेमहापुण्यत्वं रोहिणीयोगेमहाकार्तिकीत्वम् कार्तिक्यांकृत्तिकायोगेयःकार्तिकेयदर्शनंकरोतिससप्तसुजन्मसुधनाढ्योवेदपारगोविप्रोभवेत् विशाखास्थेसूर्येसतियद्दिनेचंद्रनक्षत्रंकृत्तिकातत्रपद्मकयोगः अयंपुष्करतीर्थेतिप्रशस्तः ॥

ह्या पौर्णिमेच्या दिवसीं चातुर्मास्यव्रतांची समाप्ति करावी. चातुर्मास्यव्रतांचे समाप्तीचे ठिकाणीं दानें करावयाचीं तीं सांगतों,—नक्तव्रताचे ठिकाणीं दोन वस्त्रें, धारणेंपारणें व्रताचे ठिकाणीं गोप्रदान, भूमीवर शयनव्रत केलें तर शय्यादान, सहाव्या कालीं भोजन केलें असतां गोप्रदान करावें. तांदूळ, गहूं इत्यादिक धान्यें सोडलीं असतां सुवर्णाचे तांदूळ, गहूं इत्यादिक करून त्यांचें दान करावें. कृच्छ्रव्रत धारण केलें असल्यास दोन गाई द्याव्या. शाकाहार केला असल्यास गोप्रदान करावें. दुग्धभक्षण केलें किंवा दूध सोडलें असल्यास गोप्रदान करावें. दहीं, मध, तूप हीं सोडलीं असतां वस्त्र व गाई यांचें दान करावें. ब्रह्मचर्य धारण केलें असल्यास सुवर्णदान करावें. तांबूल वर्ज्य केलें असेल तर दोन वस्त्रें दान करावीं. मौनव्रत धारण केलें असल्यास घंटा, घृतकुंभ आणि दोन वस्त्रें यांचें दान करावें. देवाक-

यांत रांगोळी घातली असेल तर गाई आणि सुवर्णाचें कमळ यांचें दान करावें. दीप देवाल्यांत किंवा ब्राह्मणगृहीं दीप लावला असल्यास समई व दोन वस्त्रें भूमीवर भोजन केलें असल्यास कांस्यपात्र व गाई. गोग्रास दिला असेल तर गाई व वृषभ. प्रत्यहीं शंभर प्रदक्षिणा घालणें ह्या व्रतीं वस्त्र. अभ्यंग वर्ज्य असल्यास तेलानें पूर्ण घट, याप्रमाणें दानें करावीं. नख, केश यांचें धारण केलें असतां मध, घृत आणि सुवर्ण यांचें दान करावें. ज्या व्रताला विशेषेंकरून दान सांगितलें नसेल त्या व्रतीं सुवर्ण व गाई यांचें दान करावें. गूळ वर्ज्य असल्यास गुळानें ताम्रपात्र भरून सुवर्णासहित त्याचें दान करावें. याप्रमाणें मीठ वर्ज्य असेल तर ताम्रपात्र मिठानें भरून त्याचें दान करावें, असें क्वचित् ग्रंथीं आहे. आषाढी पौर्णिमा इत्यादिक दिवसीं आरंभलेलीं जीं लक्षप्रदक्षिणा, लक्षनमस्काररूप व्रतें त्यांचें उद्यापन ह्याच पौर्णिमेचे दिवसीं करावें. याप्रमाणें तुलसींची लक्षपूजा, कार्तिकांत अथवा माघांत आरंभून दररोज सहस्रतुलसी अर्पण कराव्या. याप्रमाणें लक्षपूजा समाप्त करून माघी किंवा वैशाखी पौर्णिमेचे दिवसीं उद्यापन करावें. याप्रमाणें पुष्पादिक लक्षपूजांचाहि निर्णय जाणावा. त्यामध्यें बिल्वपत्रांच्या लक्षपूजेनें लक्ष्मीची प्राप्ति हें फल. दूर्वांच्या लक्षपूजेनें अरिष्टाचा नाश. चंपकपुष्पांच्या लक्षपूजेनें आयुष्यवृद्धि. अळशीच्या पुष्पांच्या पूजेनें विद्या. तुलसींच्या लक्षपूजेनें विष्णुप्रसाद. गहूं, तांदूळ इत्यादिक शुद्ध धान्यांच्या लक्षपूजेनें दुःखनाश. याप्रमाणें सर्व प्रकारच्या पुष्पांच्या लक्षपूजांनीं सर्व मनोरथसिद्धि होते. असें लक्षवातींचें व्रत सुद्धां तीन मासपर्यंत करून उत्तरोत्तर प्रशस्त अशा कार्तिक, माघ किंवा वैशाख या मासांत समाप्त करावें. याप्रमाणें धारणापारणाव्रताचें उद्यापनहि पौर्णिमेचे दिवसींच करावें. मासपर्यंत उपोषण इत्यादिक जीं कार्तिकमासव्रतें त्यांची समाप्ति द्वादशीचे दिवसींच करावी. द्वादशीचे दिवसीं न झाल्यास पौर्णिमेचे दिवसीं करावी. याप्रमाणें आषाढ शुद्ध एकादशी इत्यादिक दिवसीं गोपद्मव्रताचा आरंभ करून दररोज तेहेतीस गोपद्में घालून गंधपुष्पांनीं त्यांची पूजा करून अर्घ्यें, नमस्कार, प्रदक्षिणा तेहेतीस तेहेतीस करून कार्तिकशुद्ध द्वादशीचे दिवसीं तेहेतीस अपूपांचें वायन द्यावें. याप्रमाणें पांच वर्षेंपर्यंत गोपद्मव्रत करून नंतर उद्यापन करावें. लक्षप्रदक्षिणा इत्यादिक व्रतांपासून गोपद्मव्रतापर्यंत उद्यापनांचे विधि कौस्तुभग्रंथीं पाहावे. कार्तिक पौर्णिमेच्या दिवसीं कृत्तिकानक्षत्राचा योग असेल तर महापुण्य आहे. रोहिणीचा योग असेल तर तिला महाकार्तिकी असें नाम आहे. कृत्तिकानक्षत्रानें युक्त अशा कार्तिक पौर्णिमेचे दिवसीं कार्तिकस्वामीचें जो दर्शन करितो तो सात जन्मपर्यंत धनाढ्य, वेदपारग, ब्राह्मण असा होईल. विशाखानक्षत्रीं सूर्य असून ज्या दिवसीं चंद्रनक्षत्र कृत्तिका येईल त्या दिवसीं पद्मकयोग होतो. हा पद्मकयोग पुष्कर तीर्थाचे ठिकाणीं अतिपुण्यकारक आहे.

---

**अस्यामेवत्रिपुराख्यदीपदानमुक्तम् कार्तिकेपौर्णमास्यांकाम्यवृषोत्सर्गोतिप्रशस्तः एवं गजाश्वरथघृतधेन्वादिमहादानमपिप्रशस्तम् वृषोत्सर्गस्याश्विनीपौर्णमासीग्रहणद्वयमयनद्वयं विषुवद्वयंचेतिकालांतराणि अन्यत्रमाघीचैत्रीवैशाखीफाल्गुन्याषाढीचेतिपौर्णमास्योरेवती-**

नक्षत्रंवैधृतिव्यतीपातौयुगादिमन्वादिसूर्यसंक्रांतिपितृक्षयाहाष्टकाअपिकालाउक्ताः अत्रवृषोत्सर्गप्रयोगोतिविस्तृतोनानाशाखाभेदभिन्नःकौस्तुभेद्रष्टव्यः ॥

ह्या ( कार्तिक ) पौर्णिमेचे दिवसींच त्रिपुरदिवे लावावे. कार्तिकमासांत पौर्णिमेचे दिवसीं काम्यवृषोत्सर्ग करावा, व तो अतिपुण्यकारक होतो. याप्रमाणें हत्ती, घोडे, रथ, घृत, धेनु इत्यादिक जीं महादानें तींहि प्रशस्त होत. वृषोत्सर्ग करण्याविषयीं अश्विनी पौर्णिमा, चंद्रग्रहण, सूर्यग्रहण, कर्कसंक्रांति, मकरसंक्रांति, तुळासंक्रांति, मेषसंक्रांति, असे दुसरे काल सांगितले आहेत. दुसऱ्या ग्रंथीं माघी, चैत्री, वैशाखी, फाल्गुनी, आषाढी ह्या पौर्णिमा व रेवतीनक्षत्र, वैधृति, व्यतीपात, युगादि, मन्वादि, सूर्यसंक्रांति, पित्याचा क्षयदिवस, अष्टकाश्राद्धांचे[1] दिवस हेहि काम्यवृषोत्सर्गाचे काल सांगितले आहेत. याविषयीं अतिविस्तृत व शाखापरत्वें निरनिराळा असा वृषोत्सर्गाचा प्रयोग कौस्तुभग्रंथीं पाहावा.

---

कार्तिककृष्णाष्टमीकालाष्टमी इयंपूर्णिमांतमासपक्षेमार्गशीर्षेकृष्णाष्टमीत्युच्यते सेयंमध्यान्हव्यापिनीग्राह्या दिनद्वयेमध्यान्हव्याप्तौपूर्वैवेतिसिंधौस्थितं प्रदोषव्यापिनीतिकौस्तुभे उभयदिनेप्रदोषव्याप्तौतदेकदेशस्पर्शेवापरैव यदापूर्वत्रप्रदोषव्याप्तिरेवपरत्रमध्यान्हव्याप्तिरेव तदाबहुशिष्टाचारानुरोधात्प्रदोषव्याप्त्यैवनिर्णयोनमध्यान्हव्याप्त्येतिभाति अत्रकालभैरवपूजांकृत्वात्रयोर्घ्यादेयाः उपवासोजागरश्चकार्यः इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे कार्तिकमासकृत्यनिर्णयोद्देशः समाप्तः ॥

कार्तिक कृष्णपक्षांतील जी अष्टमी तिला कालाष्टमी असें ह्मणतात. पौर्णिमांत मास या पक्षानें[2] मार्गशीर्षांतील ही कृष्णाष्टमी होते. ती ही अष्टमी मध्यान्हकालव्यापिनी घ्यावी. दोन दिवस मध्यान्हकालव्याप्ति असल्यास पूर्व दिवसाचीच घ्यावी असें निर्णयसिंधूमध्यें आहे. प्रदोषव्यापिनी घ्यावी असें कौस्तुभांत सांगितलें आहे. दोन दिवस प्रदोषव्यापिनी असेल, किंवा प्रदोषकालीं एकदेशव्याप्ति असेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. जेव्हां पूर्व दिवसीं प्रदोषव्यापिनीच असून दुसऱ्या दिवसीं मध्यान्हकालव्यापिनीच असेल तेव्हां बहुशिष्टाचाराच्या अनुरोधास्तव प्रदोषकालव्याप्तीनेंच निर्णय करावा, मध्यान्हकालव्याप्तीनें करूं नये असें वाटतें. ह्या अष्टमीचे दिवसीं कालभैरवाची पूजा करून तीन अर्घ्यें द्यावीं, व उपोषण, जागरण इत्यादिक करावें. इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे कार्तिकमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥

---

अथमार्गशीर्षमासः धनुःसंक्रांतौपराःषोडशनाड्यःपुण्याः अन्यत्प्रागुक्तं ॥

## आतां मार्गशीर्ष मासांतील कृत्यें सांगतों.

धनुःसंक्रांतीच्या पुढच्या सोळा घटिका पुण्यकाळ. इतर निर्णय पूर्वी सांगितला आहे.

---

१ अष्टकाश्राद्धांचे दिवस कोणते ते मार्गशीर्ष मासांत सांगितले आहेत, तर तेथें पाहावे. २ पौर्णिमांत मासांत पूर्वी कृष्णपक्ष, नंतर शुक्लपक्ष.

मार्गशीर्षशुक्लपंचम्यांनागपूजादाक्षिणात्यानांप्रसिद्धा इयंषष्ठीयुताग्राह्येत्यादिविशेषः प्रथमपरिच्छेदेउक्तः ॥

मार्गशीर्षशुद्ध पंचमीचे दिवसीं नागपूजा करावी. ती नागपूजा दक्षिण देशांतील लोकांत प्रसिद्ध आहे. ही पंचमी षष्ठीयुक्त घ्यावी इत्यादिक विशेष निर्णय प्रथम परिच्छेदांत सांगितला आहे.

---

मार्गशीर्षशुक्लषष्ठीचंपाषष्ठीमहाराष्ट्रेषुप्रसिद्धा अत्रतिथिद्वैधेयस्मिन्दिनेरविवारभौमवारशततारकावैधृतीनांमध्येधिकैर्योगः सापूर्वापरावामुहूर्तत्रयव्यापिनीग्राह्या दिनद्वयेपियोगाभावेपरैवत्रिमुहूर्ताग्राह्या इयमेवस्कंदषष्ठीसापूर्वाग्राह्या अथसप्तम्यांसूर्यव्रतंतद्विधिःकौस्तुभे मृगयुतायांपौर्णमास्यांलवणदानेसुंदररूपता ॥

मार्गशीर्षशुक्ल पक्षांतील जी षष्ठी तिला चंपाषष्ठी असें ह्मणतात. ही चंपाषष्ठी महाराष्ट्र लोकांत प्रसिद्ध आहे. ही चंपाषष्ठी दोन दिवस असेल तर रविवार, भौमवार, शततारका, वैधृति यांतून अधिकांचा योग असा ज्या दिवसीं येईल ती सहा घटिका व्यापिनी असी पूर्व दिवसाची किंवा दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दोनहि दिवसीं पूर्वी सांगितलेला योग नसेल तर सहा घटिका व्यापिनी असी दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. ह्या षष्ठीलाच स्कंदषष्ठी असें नाम आहे. ती पूर्व दिवसाची घ्यावी. यानंतर सप्तमीचे दिवसीं सूर्यव्रत करावें व त्याचा विधि कौस्तुभांत सांगितला आहे. मृगनक्षत्रानें युक्त अशा मार्गशीर्ष पौर्णिमेचे दिवसीं लवणाचें दान केलें असतां स्वरूपसौंदर्य प्राप्त होतें.

---

मार्गशीर्षपौर्णमास्यांदत्तात्रेयोत्पत्तिः इयंप्रदोषव्यापिनीग्राह्या मार्गशीर्षशुक्लचतुर्दश्यांपौर्णमास्यांवाप्रदोषेआश्वलायनैःप्रत्यवरोहणंकार्यं तत्रकर्मकालव्यापिनीतिथिः तत्प्रयोगःप्रयोगरत्नकौस्तुभादौज्ञेयः मार्गशीर्षादिमासचतुष्टयस्यकृष्णाष्टमीष्वष्टकाश्राद्धानितत्पूर्वसप्तमीषुपूर्वेद्युःश्राद्धानितदुत्तरनवमीषुचान्वष्टक्यश्राद्धानिकर्तव्यानि एवंभाद्रकृष्णपक्षेपिअष्टकादिश्राद्धानिकार्याणीतिपंचाष्टकापक्षआश्वलायनभिन्नशाखिनां आश्वलायनानांतुमार्गादिचतुरष्टकापक्षएव भाद्रपदकृष्णाष्टम्यांतुमाघ्यावर्षश्राद्धंकरिष्येइतिसंकल्प्यसर्वमष्टकाश्राद्धवत्कार्यं सप्तम्यांतुमाघ्यावर्षश्राद्धंकर्तुं पूर्वेद्युःश्राद्धंकरिष्यइतिसंकल्पः नवम्यामन्वष्टकाश्राद्धंकरिष्यइतिसंकल्पइतिविशेषः एवंभाद्रकृष्णाष्टमीश्राद्धस्यमाघ्यावर्षसंज्ञकत्वादाश्वलायनानांचतुरष्टकापक्षः अन्यशाखिनांपौषादित्र्यष्टकापक्षोपि एवंसर्वाअष्टकाःकर्तुमशक्तेनएकैवाष्टकाकार्या साचमाघपौर्णमास्यनंतरकृष्णपक्षस्थसप्तम्यामष्टम्यांनवम्यामितिदिनत्रयेकार्या दिनत्रयेश्राद्धत्रयंकर्तुमशक्तेनमाघकृष्णेष्टमीश्राद्धमेवकार्यं तत्राष्टकाश्राद्धेऽपराण्हव्यापिन्यष्टमीग्राह्या दिनद्वयेव्याप्त्यव्याप्त्यादौदर्शवन्निर्णयः अष्टम्यनुरोधेनपूर्वपरदिनयोः पूर्वेद्युःश्राद्धान्वष्टक्यश्राद्धेकार्ये नतुसप्तम्यादेरपराण्हव्याप्तिरपेक्षणीया एकदिनेप्यशक्तस्यप्रत्याम्नायाः अनडुह्येयवसमाहरेत्अग्निनावाकक्षंदहेदपिवानूचानेभ्यउदकुंभमाहरेदपिवाश्राद्धमंत्रानधीयीतेति क्वचिदुपवासोप्युक्तः एवंश्रवणाकर्मादिपाकसंस्थालोपेप्रतिपाकयज्ञंप्राजापत्य

**कृच्छ्रंप्रायश्चित्तमुक्तं मलमासेष्टकाश्राद्धानिनकार्याणीतिनारायणवृत्तिः अष्टकादिश्राद्धत्रय प्रयोगःकौस्तुभप्रयोगरत्नादौ अत्राष्टमीश्राद्धेकामकालसंज्ञकौविश्वेदेवौ सप्तमीनवम्योस्तुपुरूरवार्द्रवाविति आहिताग्नेःपूर्वेद्युःश्राद्धांगहोमोष्टकांगहोमोन्वष्टकाग्नौकरणहोमोदिनत्रयेहविः श्रपणंचदक्षिणाग्नौभवतीतिविशेषः शेषमनाहिताग्निवत् अष्टकालोपेप्राजापत्यमुपवासोवाप्रायश्चित्तं अन्वष्टक्यलोपेतद्दिनेशतवारमेभिर्द्युभिःसुमनाइतिमंत्रजपः ॥**

मार्गशीर्ष पौर्णिमेचे दिवसीं दत्तात्रेयाचा अवतार झाला. ही पौर्णिमा प्रदोषव्यापिनी घ्यावी. मार्गशीर्षशुद्ध चतुर्दशी किंवा पौर्णिमा या दिवसीं प्रदोषकालीं आश्वलायनशाखी जे त्यांनीं **प्रत्यवरोहण** नामक कर्म करावें. त्या प्रत्यवरोहणाविषयीं [1]कर्मकालव्यापिनी तिथि घ्यावी. प्रत्यवरोहणाचा प्रयोग प्रयोगरत्न ( नारायणभट्टी ), कौस्तुभ इत्यादिक ग्रंथीं पाहावा. मार्गशीर्षादिक जे चार मास त्यांच्या कृष्णपक्षांच्या अष्टमीचे दिवसीं **अष्टकाश्राद्धें**, त्यांच्या पूर्वीच्या सप्तमीचे ठिकाणीं **पूर्वेद्युःश्राद्धें** आणि त्यांच्या पुढच्या नवमींचे दिवसीं **अन्वष्टक्य** श्राद्धें, याप्रमाणें श्राद्धें करावीं. याप्रमाणें भाद्रपदकृष्ण पक्षाचे ठिकाणींहि अष्टकादिक श्राद्धें करावीं असा, पांच अष्टकाश्राद्धांचा पक्ष, आश्वलायनांहून जे इतर शाखी त्यांनीं करावा. आश्वलायन जे त्यांनीं तर मार्गशीर्षादिक चार अष्टकाश्राद्धांचा पक्षच करावा. भाद्रपद कृष्णाष्टमीचे दिवसीं तर, "**माघ्यावर्षश्राद्धं करिष्ये,**" असा संकल्प करून सर्व कर्म अष्टकाश्राद्धाप्रमाणेंच करावें. सप्तमीचे दिवसीं तर, "**माघ्यावर्षश्राद्धं कर्तुं पूर्वेद्युःश्राद्धं करिष्ये**" असा संकल्प करावा. नवमीचे दिवसीं तर, "**अन्वष्टका श्राद्धं करिष्ये,**" असा संकल्प करणें हा विशेष सांगितला. याप्रमाणें भाद्रपदकृष्णपक्षांतील जें अष्टमीचें श्राद्ध त्याला **माघ्यावर्ष** असी संज्ञा आहे, याकरितां आश्वलायन जे त्यांनीं चार अष्टकापक्ष करावा. अन्यशाखी जे त्यांनीं पौषादिक तीन अष्टकापक्षहि करावा. याप्रमाणें जर सर्व अष्टकाश्राद्धें करण्याला समर्थ नसेल तर त्यानें एकच अष्टकाश्राद्ध करावें. तेंहि माघी पौर्णिमेनंतर कृष्णपक्षांतील सप्तमी, अष्टमी व नवमी अशा तीन दिवसांचे ठिकाणीं करावें. तीन दिवस श्राद्ध करण्याला समर्थ नसेल तर त्यानें माघकृष्ण पक्षीं अष्टमीश्राद्धच करावें. त्या अष्टकाश्राद्धाविषयीं अष्टमी घेणें ती अपराण्हकालव्यापिनी घ्यावी. दोन दिवस अपराण्हकालव्यापिनी असेल किंवा नसेल तर दर्शश्राद्धाप्रमाणें निर्णय जाणावा. अष्टमी ज्या दिवसीं होईल त्याच्या पूर्व दिवसीं पूर्वेद्युःश्राद्ध, आणि अष्टमीच्या दुसऱ्या दिवसीं अन्वष्टक्यश्राद्ध याप्रमाणें श्राद्धें करावीं. सप्तमी व नवमीचे दिवसीं अपराण्हकालव्याप्तीचें कारण नाहीं. एक दिवसहि अष्टकाश्राद्ध करण्याला समर्थ नसेल तर त्यानें प्रत्याम्नाय ( गौणपक्ष ) स्वीकारावे, ते असे;— "बैलाला तृण घालावें, अग्नीकडून शुष्क तृणाचें दहन करावें, गुरूपासून सांग वेदाचें अध्ययन केलेले त्यांला उदकुंभ द्यावा, अथवा श्राद्धांचे मंत्र पठण करावे." क्वचित् ग्रंथीं उपोषण करावें असेंहि सांगितलें आहे. याप्रमाणें श्रवणाकर्म इत्यादिक ज्या पाकसंस्था त्यांचा लोप होईल तर दरएक पाकयज्ञाला प्राजापत्य कृच्छ्र प्रायश्चित्त करावें असें आहे. मलमासांत अष्टकाश्राद्धें करूं नयेत असें ( आश्वलायनगृह्यसूत्राचे ) नारायणाचे वृत्तींत आहे. अष्टका-

---

१ कर्मकाल सूर्यास्तानंतर आहे याकरितां सूर्यास्तानंतर व्यापिनी तिथि घ्यावी.

दिक तीन श्राद्धांचा प्रयोग कौस्तुभ, प्रयोगरत्न इत्यादिक ग्रंथीं पाहावा. ह्या अष्टमी श्राद्धाचे ठिकाणीं कामकालसंज्ञक विश्वेदेव घ्यावे. सप्तमी व नवमी या श्राद्धांचे ठिकाणीं पुरूरवार्द्र-वसंज्ञक घ्यावे. आहिताग्नि ( अग्निहोत्री ) असेल तर त्यानें पूर्वेद्युःश्राद्धाचा अंगभूत होम, अष्टकाश्राद्धाचा अंगभूत होम आणि अन्वष्टकाश्राद्धाचा अग्नौकरणहोम व तीन दिवस हवीचें श्रपण हीं दक्षिणाग्नीचे ठिकाणीं करावीं. बाकीचें कर्म गृह्याग्नीप्रमाणें करावें. अष्टकाश्राद्धाचा लोप होईल तर प्राजापत्य[1], किंवा उपोषण हें प्रायश्चित्त करावें. अन्वष्टक्यश्राद्धाचा लोप झाल्यास त्या दिवशीं, "एभिर्द्युभिःसुमना०" या मंत्राचा शंभरवेळ जप करावा.

---

मार्गशीर्षादिरविवारेषुकाम्यंसौरव्रतमुक्तं तत्रभक्ष्याणि मार्गेतुलसीपत्रत्रयं पौषेत्रिपलंघृतं माघेतिलानांमुष्टित्रयं फाल्गुनेत्रिपलंदधि चैत्रेत्रिपलंदुग्धं वैशाखेगोमयं ज्येष्ठेतोयांजलित्रयं आषाढेमरीचकत्रयं श्रावणेत्रिपलाःसक्तवः भाद्रेगोमूत्रं आश्विनेशर्करा कार्तिकेसद्धविरिति इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारेमार्गशीर्षमासकृत्यनिर्णयउद्देशःसमाप्तः ॥

मार्गशीर्षापासून बारा मासांचे ठिकाणीं दरएक रविवारीं काम्य असें सौर ( सूर्याचें ) व्रत करावें. त्या व्रताचे दिवशीं कोणते पदार्थ भक्षण करावे ते,—मार्गशीर्षात तीन तुळसीपत्रें, पौषांत तीन पलें[2] घृत, माघमासांत तीन मुठी तीळ, फाल्गुनांत तीन पलें दहीं, चैत्रांत तीन पलें दूध, वैशाखांत गोमय, ज्येष्ठांत तीन अंजलि उदक, आषाढमासीं तीन मिरीं, श्रावणांत तीन पलें भाजलेल्या सातूंचें पीठ, भाद्रपदांत गोमूत्र, आश्विनांत साखर, कार्तिकांत शुद्ध हवि याप्रमाणें भक्षण करावे. इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे मार्गशीर्षमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥

---

अथपौषःदिवामकरसंक्रमेसंक्रांत्यनंतरंचत्वारिंशन्नाड्यःपुण्याःघटिकाद्यल्पदिनशेषेमकरसंक्रांतौसंक्रांत्यासन्नपूर्वकालेदिवैवस्नानश्राद्धदानभोजनानिकार्याणि रात्रौश्राद्धदानादेर्निषेधात्स्वल्पदिनभागे स्नानश्राद्धस्वभोजनादेःकर्तुमशक्यत्वाद्रात्रौभोजननिषेधात्पुत्रवद्गृहिणउपवासनिषेधाच्चतस्मादीदृशेविषयेपरपुण्यकालत्वंबाधित्वा मकरसंक्रांतेःपूर्वभागएवपुण्यत्वंज्ञेयं रात्रौपूर्वभागेनिशीथेवामकरसंक्रमेउत्तरदिनंपुण्यं तत्राप्युत्तरदिनपूर्वार्धंपुण्यतरं तत्रापिसूर्योदयोत्तरंपंचनाड्यःपुण्यतमाः एवंरात्रिसंक्रांतिविषयेन्यत्रापियत्रपूर्वदिनोत्तरार्धस्यपुण्यत्वं तत्रदिनांतेपंचनाडीनांपुण्यतमत्वं यत्रोत्तरदिनपूर्वार्धस्यपुण्यत्वंतत्रोदयोत्तरंपंचनाडीनांपुण्यतमत्वंएवंदिवासंक्रमेपिसंक्रांतिसन्निहितनाडीनां मकरादिषूत्तरासांकर्कादिषुपूर्वासांपुण्यतमत्वंज्ञेयम् यायाःसन्निहितानाड्यस्तास्ताः पुण्यतमाःस्मृताइत्युक्तेःमुहूर्तचिंतामण्यादौतुसूर्यास्ता

---

१ तीन दिवसपर्यंत दररोज एक वेळ प्रातःकालीं १५ किंवा २६ ग्रास कुक्कुटांडप्रमाण घ्यावे. पुनः तीन दिवसपर्यंत सायंकालीं १२ किंवा २२ ग्रास घ्यावे. पुनः तीन दिवसपर्यंत अयाचित भोजन एक वेळ करावें, तें चौवीस ग्रास परिमित करावें. पुनः तीन दिवसपर्यंत उपोषण करावें, याला प्राजापत्य ह्मणतात. २ एका पलाचे व्यावहारिक मासे ४०, तीन पलांचे १२० मासे, ह्मणजे बारा माशांचा तोळा या मानानें १० तोळे.

**कृच्छ्रंप्रायश्चित्तमुक्तं मलमासेष्टकाश्राद्धानिनकार्याणीतिनारायणवृत्तिः अष्टकादिश्राद्धत्रय प्रयोगःकौस्तुभप्रयोगरत्नादौ अत्राष्टमीश्राद्धेकामकालसंज्ञकौविश्वेदेवौ सप्तमीनवम्योस्तुपुरूरवार्द्रवाविति आहिताग्नेःपूर्वेद्युःश्राद्धांगहोमोष्टकांगहोमोन्वष्टकाग्नौकरणहोमोदिनत्रयेहविः श्रपणंचदक्षिणाग्नौभवतीतिविशेषः शेषमनाहिताग्निवत् अष्टकालोपेप्राजापत्यमुपवासोवाप्रायश्चित्तं अन्वष्टक्यलोपेतद्दिनेशतवारमेभिर्द्युभिःसुमनाइतिमंत्रजपः ॥**

मार्गशीर्ष पौर्णिमेचे दिवसीं दत्तात्रेयाचा अवतार झाला. ही पौर्णिमा प्रदोषव्यापिनी घ्यावी. मार्गशीर्षशुद्ध चतुर्दशी किंवा पौर्णिमा या दिवसीं प्रदोषकालीं आश्वलायनशाखी जे त्यांनीं **प्रत्यवरोहण** नामक कर्म करावें. त्या प्रत्यवरोहणाविषयीं [1]कर्मकालव्यापिनी तिथि घ्यावी. प्रत्यवरोहणाचा प्रयोग प्रयोगरत्न ( नारायणभट्टी ), कौस्तुभ इत्यादिक ग्रंथीं पाहावा. मार्गशीर्षादिक जे चार मास त्यांच्या कृष्णपक्षांच्या अष्टमीचे दिवसीं **अष्टकाश्राद्धें**, त्यांच्या पूर्वीच्या सप्तमीचे ठिकाणीं **पूर्वेद्युःश्राद्धें** आणि त्यांच्या पुढच्या नवमींचे दिवसीं **अन्वष्टक्य** श्राद्धें, याप्रमाणें श्राद्धें करावीं. याप्रमाणें भाद्रपदकृष्ण पक्षाचे ठिकाणींहि अष्टकादिक श्राद्धें करावीं असा, पांच अष्टकाश्राद्धांचा पक्ष, आश्वलायनांहून जे इतर शाखी त्यांनीं करावा. आश्वलायन जे त्यांनीं तर मार्गशीर्षादिक चार अष्टकाश्राद्धांचा पक्षच करावा. भाद्रपद कृष्णाष्टमीचे दिवसीं तर, "**माघ्यावर्षश्राद्धं करिष्ये,**" असा संकल्प करून सर्व कर्म अष्टकाश्राद्धाप्रमाणेंच करावें. सप्तमीचे दिवसीं तर, "**माघ्यावर्षश्राद्धं कर्तुं पूर्वेद्युःश्राद्धं करिष्ये**" असा संकल्प करावा. नवमीचे दिवसीं तर, "**अन्वष्टका श्राद्धं करिष्ये,**" असा संकल्प करणें हा विशेष सांगितला. याप्रमाणें भाद्रपदकृष्णपक्षांतील जें अष्टमीचें श्राद्ध त्याला **माघ्यावर्ष** असी संज्ञा आहे, याकरितां आश्वलायन जे त्यांनीं चार अष्टकापक्ष करावा. अन्यशाखी जे त्यांनीं पौषादिक तीन अष्टकापक्षहि करावा. याप्रमाणें जर सर्व अष्टकाश्राद्धें करण्याला समर्थ नसेल तर त्यानें एकच अष्टकाश्राद्ध करावें. तेंहि माघी पौर्णिमेनंतर कृष्णपक्षांतील सप्तमी, अष्टमी व नवमी अशा तीन दिवसांचे ठिकाणीं करावें. तीन दिवस श्राद्ध करण्याला समर्थ नसेल तर त्यानें माघकृष्ण पक्षीं अष्टमीश्राद्धच करावें. त्या अष्टकाश्राद्धाविषयीं अष्टमी घेणें ती अपराण्हकालव्यापिनी घ्यावी. दोन दिवस अपराण्हकालव्यापिनी असेल किंवा नसेल तर दर्शश्राद्धाप्रमाणें निर्णय जाणावा. अष्टमी ज्या दिवसीं होईल त्याच्या पूर्व दिवसीं पूर्वेद्युःश्राद्ध, आणि अष्टमीच्या दुसऱ्या दिवसीं अन्वष्टक्यश्राद्ध याप्रमाणें श्राद्धें करावीं. सप्तमी व नवमीचे दिवसीं अपराण्हकालव्याप्तीचें कारण नाहीं. एक दिवसहि अष्टकाश्राद्ध करण्याला समर्थ नसेल तर त्यानें प्रत्याम्नाय ( गौणपक्ष ) स्वीकारावे, ते असे;— "बैलाला तृण घालावें, अग्नीकडून शुष्क तृणाचें दहन करावें, गुरूपासून सांग वेदाचें अध्ययन केलेले त्यांला उदकुंभ द्यावा, अथवा श्राद्धांचे मंत्र पठण करावे." क्वचित् ग्रंथीं उपोषण करावें असेंहि सांगितलें आहे. याप्रमाणें श्रवणाकर्म इत्यादिक ज्या पाकसंस्था त्यांचा लोप होईल तर दरएक पाकयज्ञाला प्राजापत्य कृच्छ्र प्रायश्चित्त करावें असें आहे. मलमासांत अष्टकाश्राद्धें करूं नयेत असें ( आश्वलायनगृह्यसूत्राचे ) नारायणाचे वृत्तींत आहे. अष्टका-

---

१ कर्मकाल सूर्यास्तानंतर आहे याकरितां सूर्यास्तानंतर व्यापिनी तिथि घ्यावी.

दिक तीन श्राद्धांचा प्रयोग कौस्तुभ, प्रयोगरत्न इत्यादिक ग्रंथीं पाहावा. ह्या अष्टमी श्राद्धाचे ठिकाणीं कामकालसंज्ञक विश्वेदेव घ्यावे. सप्तमी व नवमी या श्राद्धांचे ठिकाणीं पुरूरवार्द्रवसंज्ञक घ्यावे. आहिताग्नि ( अग्निहोत्री ) असेल तर त्यानें पूर्वेद्युःश्राद्धाचा अंगभूत होम, अष्टकाश्राद्धाचा अंगभूत होम आणि अन्वष्टकाश्राद्धाचा अग्नौकरणहोम व तीन दिवस हवीचें श्रपण हीं दक्षिणाग्नीचे ठिकाणीं करावीं. बाकीचें कर्म गृह्याग्नीप्रमाणें करावें. अष्टकाश्राद्धाचा लोप होईल तर प्राजापत्य, किंवा उपोषण हें प्रायश्चित्त करावें. अन्वष्टक्यश्राद्धाचा लोप झाल्यास त्या दिवशीं, "एभिर्द्युभिःसुमना०" या मंत्राचा शंभरवेळ जप करावा.

---

मार्गशीर्षादिरविवारेषुकाम्यंसौरव्रतमुक्तं तत्रभक्ष्याणि मार्गेतुलसीपत्रत्रयं पौषेत्रिपलंघृतं माघेतिलानांमुष्टित्रयं फाल्गुनेत्रिपलंदधि चैत्रेत्रिपलंदुग्धं वैशाखेगोमयं ज्येष्ठेतोयांजलित्रयं आषाढेमरीचकत्रयं श्रावणेत्रिपलाःसक्तवः भाद्रेगोमूत्रं आश्विनेशर्करा कार्तिकेसद्धविरिति इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारेमार्गशीर्षमासकृत्यनिर्णयउद्देशःसमाप्तः ॥

मार्गशीर्षापासून बारा मासांचे ठिकाणीं दरएक रविवारीं काम्य असें सौर ( सूर्याचें ) व्रत करावें. त्या व्रताचे दिवशीं कोणते पदार्थ भक्षण करावे ते,–मार्गशीर्षांत तीन तुळसीपत्रें, पौषांत तीन पळें घृत, माघंमासांत तीन मुठी तीळ, फाल्गुनांत तीन पळें दहीं, चैत्रांत तीन पळें दूध, वैशाखांत गोमय, ज्येष्ठांत तीन अंजलि उदक, आषाढमासीं तीन मिरीं, श्रावणांत तीन पळें भाजलेल्या सातूंचें पीठ, भाद्रपदांत गोमूत्र, आश्विनांत साखर, कार्तिकांत शुद्ध हवि याप्रमाणें भक्षण करावे. इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे मार्गशीर्षमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥

---

अथपौषःदिवामकरसंक्रमेसंक्रांत्यनंतरंचत्वारिंशन्नाड्यःपुण्याःघटिकाद्यल्पदिनशेषेमकरसंक्रांतौसंक्रांत्यासन्नपूर्वकालेदिवैवस्नानश्राद्धदानभोजनानिकार्याणि रात्रौश्राद्धदानादेर्निषेधात्स्वल्पदिनभागे स्नानश्राद्धस्वभोजनादेःकर्तुमशक्यत्वाद्रात्रौभोजननिषेधात्पुत्रवद्गृहिणउपवासनिषेधाच्चतस्मादीदृशेविषयेपरपुण्यकालत्वंबाधित्वा मकरसंक्रांतेःपूर्वभागएवपुण्यत्वंज्ञेयं रात्रौपूर्वभागेनिशीथेवामकरसंक्रमेउत्तरदिनंपुण्यं तत्राप्युत्तरदिनपूर्वार्धंपुण्यतरं तत्रापिसूर्योदयोत्तरंपंचनाड्यःपुण्यतमाः एवंरात्रिसंक्रांतिविषयेन्यत्रापियत्रपूर्वदिनोत्तरार्धस्यपुण्यत्वं तत्रदिनांतेपंचनाडीनांपुण्यतमत्वं यत्रोत्तरदिनपूर्वार्धस्यपुण्यत्वंतत्रोदयोत्तरंपंचनाडीनांपुण्यतमत्वंएवंदिवासंक्रमेपिसंक्रांतिसन्निहितनाडीनां मकरादिषूत्तरासांकर्कादिषुपूर्वासांपुण्यतमत्वंज्ञेयम् यायाःसन्निहितानाड्यस्तास्ताः पुण्यतमाःस्मृताइत्युक्तेःमुहूर्तचिंतामण्यादौतुसूर्योस्ता

---

१ तीन दिवसपर्यंत दररोज एक वेळ प्रातःकालीं १५ किंवा २६ ग्रास कुक्कुटांडप्रमाण घ्यावे. पुनः तीन दिवसपर्यंत सायंकालीं १२ किंवा २२ ग्रास घ्यावे. पुनः तीन दिवसपर्यंत अयाचित भोजन एक वेळ करावें, तें चौवीस ग्रास परिमित करावें. पुनः तीन दिवसपर्यंत उपोषण करावें, याला प्राजापत्य म्हणतात. २ एका पलाचे व्यावहारिक मासे ४०, तीन पलांचे १२० मासे, म्हणजे बारा माशांचा तोळा या मानानें १० तोळे.

दूर्ध्वंघटीत्रयंसंध्याकालस्तत्रमकरसंक्रमे परदिनेपुण्यत्वंबाधित्वापूर्वदिनेपुण्यत्वमुक्तंनेदंसर्वत्रधर्मशास्त्रग्रंथेषुदृश्यते शुक्लपक्षेतुसप्तम्यांसंक्रांतिर्ग्रहणाधिका अत्रकृत्यं रविसंक्रमणेप्राप्ते नस्नायाद्यस्तुमानवः सप्तजन्मनिरोगीस्यान्निर्धनश्चैवजायतइतिवचनान्मनुष्यमात्रस्यस्नानं नित्यं एवंश्राद्धमप्यधिकारिणोनित्यं तच्चापिंडकं संक्रांतौयानिदत्तानिहव्यकव्यानिदातृभिः तानिनित्यंददात्यर्कःपुनर्जन्मनिजन्मनि अयनसंक्रांतौत्रिदिनमुपवासःयद्वासंक्रांतिमत्यहोरात्रेपुण्यकालवत्यहोरात्रेवोपवासंकृत्वोक्तपुण्यकालेस्नानदानादिकार्यं अयमुपवासःसापत्यगृहस्थेननकार्यः धेनुंतिलमयींराजन्दद्याच्चैवोत्तरायणे तिलतैलेनदीपाश्चदेयाःशिवगृहेशुभाःसतिलैस्तंदुलैश्चैवपूजयेद्विधिवच्छिवं तस्यांकृष्णतिलैःस्नानंकार्यंचोद्वर्तनंतिलैः तिलादेयाश्चहोतव्याभक्ष्याश्चैवोत्तरायणे शुक्लतिलैर्देवादितर्पणंकृष्णतिलैःपितृतर्पणंचकार्यं अत्रशंभौघृताभिषेकोमहाफलः अत्रसुवर्णयुततिलताम्रपात्रंदेयंतत्प्रयोगोवक्ष्यते अत्रैवंशिवपूजाव्रतं पूर्वदिने उपोष्यसंक्रांतिदिनेतिलोद्वर्तनतिलस्नानतिलतर्पणानिकृत्वाशिवंगव्येनाज्येनमर्दयित्वाशुद्धोदकेनप्रक्षाल्य वस्त्राद्युपचारैःपूजयित्वा सुवर्णहीरकनीलपद्मरागमौक्तिकमितिपंचरत्नानिकर्षार्धसुवर्णवासमर्प्यतिलदीपैःससुवर्णैःसाक्षतैस्तिलैःसंपूज्यघृतकंबलंदत्वा वितानचामरेसमर्प्यविप्रेभ्यःससुवर्णतिलान्दत्वातिलान्हुत्वाविप्रान्यतींश्चसंभोज्य दक्षिणांदत्वासतिलंपंचगव्यंपीत्वापारणंकुर्यादिति अत्रवस्त्रदानंमहाफलं तिलपूर्वमनड्वाहंदत्वारोगैःप्रमुच्यते अत्रक्षीरेणभास्करंस्नापयेत्सूर्यलोकप्राप्तिः दिवाविषुवायनसंक्रांतौतस्मिन्दिनेपूर्वरात्रौआगामिरात्रौचानध्यायःरात्रौतत्संक्रमेतस्यांरात्रौपूर्वदिवसेआगामिदिवसेचेतिपक्षिण्यनध्यायः अत्ररात्रौसंक्रमेग्रहणवद्रात्रावेवस्नानदानादीतिपक्षःकैश्चिल्लिखितोनसर्वशिष्टसंमतः अयनदिनंतत्परंकरिसंज्ञकंचदिनंशुभेषुवर्ज्यमित्युक्तं तत्रार्धरात्रादर्वागयनसंक्रांतौतद्दिनंतत्परदिनंचवर्ज्यं निशीथात्परत्रनिशीथेवासंक्रांतौपरंतत्परंचवर्ज्यमितिभाति एवंग्रहणेप्यूह्यं ॥

## आतां पौषमासांतील कृत्यें सांगतों.

मकरसंक्रांति दिवसा झाली असतां पुढच्या चाळीस घटिका पुण्यकाळ. एक घटिकादिक अल्प असा दिवस शेष राहिला असून मकरसंक्रांति होईल तर संक्रांतीच्या जवळचा जो पूर्वकाल त्या कालीं दिवसासच स्नान, दान, श्राद्ध, भोजन इत्यादि करावीं. कारण, रात्रीं श्राद्ध, दान इत्यादिकांचा निषेध आहे, व स्वल्प दिवसाच्या भागांत स्नान, श्राद्ध, आपलें भोजन इत्यादिक होण्यास अशक्य आहे, आणि संक्रांतीच्या रात्रीं भोजनाचा निषेध आहे व पुत्रवान्गृहस्थाश्रमी याला उपोषणाचाहि निषेध आहे, तस्मात् अशा प्रसंगीं दुसऱ्या दिवसाचा पुण्यकाल बाधित करून मकरसंक्रांतीच्या पूर्वभागांत पुण्यकाल जाणावा. रात्रीमध्यें रात्रीच्या पूर्वभागीं किंवा उत्तर भागीं अथवा निशीथकालीं मकरसंक्रांत होईल तर पुढचा दिवस पुण्यकाल, त्यामध्यें पुढच्या दिवसाचें पूर्वार्ध विशेष पुण्यकाल, त्यामध्येंहि सूर्योदयानंतर पांच घटिका अतिशय पुण्यकाल जाणावा. याप्रमाणें रात्रीं संक्रांति झाली असतां

---

१ याकाचनसंक्रांतिरित्यर्थः.

अन्यस्थलींहि असेंच समजावें. जेथें पूर्व दिवसाचें उत्तरार्ध पुण्यकाल असें असेल तेथें दिवसाच्या अंतीं पांच घटिका विशेष पुण्यकाल. जेथें पुढच्या दिवसाचें पूर्वार्द्ध पुण्यकाल असें असेल तेथें सूर्योदयानंतर पांच घटिका अतिशय पुण्यकाल. याप्रमाणें दिवसा संक्रांति झाली असतांहि मकरादिक सहा संक्रांतींचे ठिकाणीं संक्रांतीच्या जवळच्या अशा पुढच्या घटिका अतिशय पुण्यकारक होत. कर्कादिक सहा संक्रांतींचे ठिकाणीं संक्रांतीच्या जवळच्या अशा पूर्वींच्या घटिका अतिशय पुण्यकारक होत, असें जाणावें. कारण, "संक्रांतीच्या जवळच्या ज्या ज्या घटिका, त्या त्या अतिशय पुण्यकारक सांगितल्या," असें वचन आहे. मुहूर्तचिंतामणि इत्यादिक ग्रंथीं तर सूर्यास्तानंतर तीन घटिका संध्याकाल सांगितला त्या कालीं मकरसंक्रांति झाली असतां दुसऱ्या दिवसाचा पुण्यकाल बाधित करून पूर्व दिवसीं पुण्यकाल सांगितला, परंतु हें सर्व धर्मशास्त्रग्रंथांमध्यें मिळत नाहीं. "शुक्लपक्षामध्यें सप्तमीचे दिवसीं कोणतीहि सूर्यसंक्रांति होईल तर ती ग्रहणापेक्षां अधिक होय." ह्या संक्रांतीचे ठिकाणीं कृत्यें—"सूर्यसंक्रांति झाली असतां जो मनुष्य स्नान करीत नाहीं, तो सात जन्मपर्यंत रोगी होत्साता निर्धन होतो," असें वचन आहे याकरितां सर्व मनुष्यमात्रांला स्नान नित्य आहे. याप्रमाणें अधिकारी असेल त्याला श्राद्ध जें तेंहि नित्य आहे. तें श्राद्ध पिंडरहित करावें.—"संक्रांतीचे दिवसीं देवपितरांच्या उद्देशानें दात्यांनीं जीं दानें केलीं तीं दानें पुनः सूर्य जन्मजन्माचे ठिकाणीं देतो." अयनसंक्रांतिनिमित्त तीन दिवस उपोषण करावें. अथवा ज्या अहोरात्रांत संक्रांति झाली त्या अहोरात्राचे ठिकाणीं किंवा पुण्यकालयुक्त अहोरात्राचे ठिकाणीं उपोषण करून पूर्वीं सांगितलेल्या पुण्यकालीं स्नानदानादिक करावें. हें उपोषण अपत्ययुक्त जो गृहस्थाश्रमी त्यानें करूं नये. "हे राजा, तिळांची धेनु[1] करून उत्तरायणाचे ठिकाणीं ( मकरसंक्रांतीचे दिवसीं ) द्यावी. तिळांच्या तेलाचे उत्तम दिवे शिवालयांत लावावे. तिळ व तांदूळ यांहींकरून यथाविधि शिवाची पूजा करावी. मकरसंक्रांतीचे दिवसीं आंगाला तीळ लावून तिळोदकानें स्नान करावें, तिळांचें दान करावें व तिळहोम करावा, व तीळ भक्षण करावे. ह्या मकरसंक्रांतीचे दिवसीं श्वेत तिळांनीं देवादिकांचें तर्पण, व कृष्ण तिळांनीं पितरांचें तर्पण करावें. ह्या संक्रांतीच्या दिवसीं महादेवावर घृताचा अभिषेक केला असतां महाफल प्राप्त होतें. ह्या संक्रांतीचे दिवसीं सुवर्णयुक्त तीळ, ताम्रपात्रांत घालून त्यांचें दान करावें, त्याचा प्रयोग सांगेन. या संक्रांतीचे दिवसीं पुढें सांगतों याप्रमाणें शिवपूजारूप व्रत करावें. तें असें,—पूर्व दिवसीं उपोषण करून संक्रांतीचे दिवसीं तिलोद्वर्तन, तिलस्नान, तिलतर्पण हीं करून गाईच्या घृतानें शिवाला मर्दन करून शुद्ध उदकानें प्रक्षालन करून नंतर वस्त्रादिक उपचारांनीं पूजा करावी. नंतर सुवर्ण, हिरा, नीळ, माणिक, मोतीं असीं पंचरत्नें किंवा आठ मासे सुवर्ण शिवाला समर्पण करून सुवर्णासहित तिळांचे दिवे, तीळ व तांदूळ यांहीं पूजा करून घृतकंबल[2] समर्पण करून चांदवा, चामर समर्पण करून ब्राह्मणाला सुवर्णयुक्त तिळ देऊन तिळांचा होम करावा. नंतर ब्राह्मण, संन्यासी यांला भोजन घालून द-

---

१ तिलधेनूचा प्रकार दानकमलाकर ग्रंथीं सांगितला आहे.

२ घृतकंबलाचा विधि व्रतराज, व्रतार्क या ग्रंथीं पाहा.

क्षिणा देऊन, नंतर तिळांसहित पंचगव्य प्राशन करून पारणा करावी. ह्या दिवसीं वस्त्रदान केलें असतां महाफल मिळतें. "तिलपूर्वक वृषभाचें दान केलें असतां रोगापासून मुक्त होतो." ह्या संक्रांतीचे दिवसीं सूर्याला दुधाचा अभिषेक करावा, तेणेंकरून सूर्यलोक प्राप्त होतो. मेष, तुला, मकर आणि कर्क ह्या संक्रांति दिवसा होतील तर त्या दिवसीं, त्याच्या पूर्वरात्रीं, आणि येणाऱ्या रात्रीं असा (बारा प्रहर) अनध्याय. पूर्वी सांगितलेल्या संक्रांति रात्रीं होतील तर त्या रात्रीं, त्याच्या पूर्व दिवसीं, आणि पुढें येणाऱ्या दिवसीं अनध्याय. याप्रमाणें पक्षिणी (ह्मणजे बारा प्रहर) अनध्याय जाणावा. ही मकरसंक्रांति रात्रीं होईल तर ग्रहणाप्रमाणेंच रात्रीमध्येंच स्नान, दान करावें, असा पक्ष कितीएक ग्रंथकारांनीं लिहिला आहे, परंतु तो सर्व शिष्टांला मान्य नाहीं. अयनसंक्रांतीचा दिवस आणि त्याच्या पुढचा करिसंज्ञक दिवस हे दोन दिवस शुभकार्याला वर्ज्य करावे, ह्मणजे ह्या दोन दिवसीं कोणतें शुभकार्य करूं नये. त्यामध्यें अर्धरात्रीच्या पूर्वी अयनसंक्रांति होईल तर तो संक्रांतिदिवस व त्याच्या पुढचा दिवस हे वर्ज्य करावे. निशीथकालीं किंवा निशीथकालानंतर संक्रांति होईल तर पुढचा दिवस व त्याच्या पुढचा दिवस हे वर्ज्य करावे, असें वाटतें. याप्रमाणें ग्रहणाचे ठिकाणींहि हा निर्णय जाणावा.

---

**पौषशुक्लाष्टम्यांबुधवासरयुतायांस्नानजपहोमतर्पणविप्रभोजनानिकार्याणि अस्यांभरणीयोगेमहापुण्यत्वमित्येके रोहिण्याद्रायोगेइतिपरे ॥**

पौषशुक्ल अष्टमीचे दिवसीं बुधवारयोग असेल तर स्नान, जप, होम, तर्पण आणि ब्राह्मणभोजन हीं करावीं. ह्या अष्टमीचे दिवसीं भरणीनक्षत्राचा योग असल्यास तो योग महापुण्यकारक होय असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. रोहिणी, आर्द्रा यांचा योग असतां महापुण्यकारक असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात.

---

**पौषशुक्लैकादशीमन्वादिः तन्निर्णयः प्रागुक्तः ॥**

पौषशुक्लपक्षांतील एकादशी तिथि मन्वादि होय, तिचा निर्णय पूर्वी सांगितला आहे.

---

**अथमाघस्नानम् तत्रपौषस्यशुक्लैकादश्यांपौर्णमास्याममावास्यायांवामाघस्नानारंभः माघेद्वादशीपूर्णिमादौसमापनम् यद्वामकरसंक्रमणप्रभृतिकुंभसंक्रमणपर्यंतंस्नानंकार्यं अथस्नानकालः अरुणोदयमारभ्यप्रातःकालावधिः उत्तमंतुसनक्षत्रंलुप्ततारंचमध्यमम् सवितर्युदितेभूपततोहीनंप्रकीर्तितम् माघमासेरटंत्यापःकिंचिदभ्युदितेरवौ ब्रह्मघ्नंवासुरापंवाकंपतंतंपुनीमहे अत्राधिकारिणः ब्रह्मचारीगृहस्थोवावानप्रस्थोथभिक्षुकः बालवृद्धयुवानश्चनरनारीनपुंसकाइति अथजलतारतम्येनफलंतप्तेनवारिणास्नानंयद्गृहेक्रियतेनरैःषडब्दफलदंतद्धिमकरस्थेदिवाकरे वाप्यादौद्वादशाब्दफलं तडागेतद्विगुणं नद्यांतच्चतुर्गुणं महानद्यांशतगुणं महानदीसंगमेतच्चतुर्गुणं गंगायांसहस्रगुणं गंगायमुनासंगमेएतच्छतगुणमिति यत्रकुत्रापिस्नानेप्रयागस्मरणंकार्यं इदंसमुद्रेप्यतिप्रशस्तं ॥**

## यानंतर माघस्नानाचा निर्णय सांगतों.

माघस्नानाचा आरंभ करणें तो पौषशुक्लपक्षांतील एकादशी, पौर्णिमा किंवा अमावास्या या दिवसीं करावा, व माघमासांत द्वादशी, पौर्णिमा इत्यादिक दिवसीं समाप्ति करावी. अथवा मकरसंक्रांतीपासून कुंभ संक्रांतीपर्यंत माघस्नान करावें. यानंतर स्नानाचा काल;–अरुणोदयाला आरंभ करून प्रातःकालपर्यंत स्नानकाल जाणावा. "नक्षत्रें दिसत आहेत तावत्पर्यंत स्नान करावें तें उत्तम. नक्षत्रें लुप्त झाल्यानंतर करावें तें मध्यम. हे राजा, सूर्याचा उदय झाल्यानंतर करावें तें हीन होय." "सूर्याचा किंचित् उदय झाला असतां माघमासांत उदकें असीं बोलतात कीं, ब्रह्महत्या करणारा, सुरापान करणारा असे कोणी पातकी असतील त्यांला आह्मीं पावन करतों." ह्या माघस्नानाविषयीं अधिकारी "ब्रह्मचारी, गृहस्थाश्रमी, वानप्रस्थ, संन्यासी, बाल, वृद्ध, तरुण असे पुरुष, स्त्रिया, नपुंसक हे सर्व जाणावे." यानंतर उदकाच्या तारतम्येंकरून स्नानाचें फल सांगतों–"मकरसंक्रांतीला सूर्य असतां गृहाचे ठिकाणीं उष्णोदकानें जें स्नान करावें तें षडब्दफल[1] देणारें होतें." विहीर इत्यादिकीं स्नान केलें असतां द्वादशाब्दाचें फल देणारें होतें. तडागाचे ठिकाणीं स्नान केलें असतां द्वादशाब्दाचे द्विगुणित फल. नदीचे ठिकाणीं द्वादशाब्दाचे चौपट फल. महानदीचे ठिकाणीं शतगुणित फल. दोन महानदींच्या संगमीं त्याच्या चतुर्गुणित फल. गंगेचे ठिकाणीं सहस्रगुणित फल. गंगा व यमुना यांच्या संगमाचे ठिकाणीं ह्याच्या शतगुणित फल जाणावें. कोणत्याहि ठिकाणीं स्नानकालीं प्रयागाचें स्मरण करावें. हें माघस्नान समुद्राचे ठिकाणींहि केलें असतां अतिउत्तम होय.

---

अथविधिः माघमासमिमंपूर्णंस्नास्येहंदेवमाधव. तीर्थस्यास्यजलेनित्यमितिसंकल्प्यचेतसि इत्येकतीर्थंपरिगृह्य दुःखदारिद्र्यनाशायश्रीविष्णोस्तोषणायच प्रातःस्नानंकरोम्यद्यमाघेपापविनाशनं मकरस्थेरवौमाघेगोविंदाच्युतमाधव स्नानेनानेनमेदेवयथोक्तफलदोभव इमौमंत्रौसमुच्चार्यस्नायान्मौनसमन्वितः प्रत्यहंसूर्यार्घ्यमंत्रः सवित्रेप्रसवित्रेचपरंधामजलेमम त्वत्तेजसापरिभ्रष्टंपापंयातुसहस्रधेति पितृतर्पणादिनित्यंविधायमाधवंपूजयेत् भूमौशयीतहोतव्यमाज्यंतिलसमन्वितं हविष्यंब्रह्मचर्यंचमाघमासेमहाफलं अत्रेंधनकंबलवस्त्रोपानत्तैलघृततूलपूर्णपटीसुवर्णान्नदानानिमहाफलानि नवन्हिंसेवयेत्स्नातोह्यस्नातोपिवरानने होमार्थंसेवयेद्वन्हिंहसीतार्थेनकदाचन अहन्यहनिदातव्यास्तिलाःशर्करयान्विताः त्रयोभागास्तिलानांचतुर्थःशर्करायाः अत्राभ्यंगोवर्ज्यः माघेमास्युषसिस्नानंकृत्वादांपत्यमर्चयेत् माघेयत्नेनसंत्याज्यंमूलकंमदिरोपमम् पितृणांदेवतानांचमूलकंनैवदापयेत् यदामाघोमलमासोभवतितदाकाम्यानांतत्रसमाप्तिनिषेधान्मासद्वयंस्नानंतन्नियमाश्चकर्तव्याः मासोपवासचांद्रायणादिकंतुमलमासएवसमापयेदित्युक्तं इदंमाघस्नानंनित्यकाम्योभयरूपं मासपर्यंतस्नानेप्यशक्तस्त्र्यहमेकाहंवास्नायात् तत्राद्यंदिनत्रयमितिकेचित् त्रयोदश्यादिदिनत्रयमितिबहुसंमतं पौषपूर्णिमानंतरासुअ

---

[1] षडब्द, द्वादशाब्द यांचीं लक्षणें पुढें तिसऱ्या परिच्छेदांत कृच्छ्रप्रकरणीं सांगितलीं आहेत.

ष्टमीसप्तमीनवमीष्वष्टकादिश्राद्धानिप्रागुक्तानि पौषामावास्यायामर्धोदययोगः अमार्कपात श्रवणैर्युक्ताचेत्पौषमाघयोः अर्धोदयःसविज्ञेयःकोटिसूर्यग्रहैःसमःकिंचिन्न्यूनंमहोदयइतिच तुर्थपादंकेचित्पठंति पौषमाघयोर्मध्यवर्तिनीत्यर्थइत्येके अमांतमासेपौषस्यपूर्णिमांतमासेमाघस्यचेत्यर्थइत्यपरे सर्वथापौषपौर्णमास्युत्तरामावास्येत्यर्थःदिवैवयोगःशस्तोयंनतुरात्रौकदाचन अर्धोदयेतुसंप्राप्तेसर्वेगंगासमंजलं शुद्धात्मानोद्विजाःसर्वेभवेयुर्ब्रह्मसन्निभाः यत्किंचिद्दीयतेदानंतद्दानंमेरुसन्निभं ॥

## आतां माघस्नानाचा विधि सांगतों.

"हे माधवा देवा, ह्या तीर्थाचे उदकाचे ठिकाणीं संपूर्ण माघमासपर्यंत नित्य मी स्नान करीन, असा मनामध्यें संकल्प करून स्नानाकरितां एक तीर्थ योजून, "दुःखदारिद्र्यनाशाय श्रीविष्णोस्तोषणाय च ॥ प्रातःस्नानं करोम्यद्य माघे पापविनाशनं ॥ मकरस्थे रवौ माघे गोविंदाच्युत माधव ॥ स्नानेनानेन मे देव यथोक्तफलदो भव," हे मंत्र ह्मणून मौनयुक्त होत्साता स्नान करावें. दररोज स्नान झाल्यानंतर सूर्याला अर्घ्य द्यावें. अर्घ्याचा मंत्र–"सवित्रे प्रसवित्रेच परंधाम जले मम ॥ त्वत्तेजसा परिभ्रष्टं पापं यातु सहस्रधा." याप्रमाणें अर्घ्य दिल्यानंतर पितृतर्पण इत्यादिक नित्य कर्म करून माधवाची पूजा करावी. " माघमासाचे ठिकाणीं भूमिशयन, तिलयुक्त घृताचा होम, हविष्य पदार्थाचें भक्षण आणि ब्रह्मचर्य हीं महाफलदायक होत. ह्या माघमासांत काष्ठें, उर्णावस्त्रें, उपानह, तैल, घृत, गाद्या, लेपें, सुवर्ण आणि अन्न यांचीं दानें महाफल देणारीं होत. " हे स्त्रिये, स्नान केला असेल अथवा स्नानविरहित असेल त्यानेंहि अग्नीचें सेवन करूं नये, होमाकरितां अग्नीचें सेवन करावें, शीतनिवारणार्थ कधींहि करूं नये." "दररोज शर्करायुक्त तिळ द्यावे." ते असे,–तीन भाग तीळ, चवथा भाग साखर याप्रमाणें द्यावे. ह्या माघमासांत तैलाभ्यंग वर्ज्य करावा. " माघमासाचे ठिकाणीं उषःकालीं ( पंचावन्न घटिका परिमित कालीं ) स्नान करून दांपत्याचें पूजन करावें. माघमासांत सर्वथा मुळा वर्ज्य करावा, कारण तो मद्याप्रमाणें निषिद्ध आहे. पितर व देव यांलाहि मुळा अर्पण करूं नये. ज्या वर्षी माघमास मलमास होतो त्या वर्षी मलमासांत काम्यव्रतांच्या समाप्तीचा निषेध आहे याकरितां माघस्नान व तत्संबंधी नियम दोन महिनेपर्यंत करावे. मासपर्यंत उपोषण, चांद्रायण इत्यादिक व्रतें तर मलमासांतच समाप्त करावीं असें सांगितलें आहे. हें माघस्नान नित्य व काम्य असें दोन प्रकारचें आहे. संपूर्ण मासपर्यंत स्नान करण्याला असमर्थ असेल तर त्यानें तीन दिवस किंवा एक दिवस स्नान करावें. त्यामध्यें पहिले तीन दिवस स्नान करावें असें कोणी ह्मणतात. त्रयोदशीपासून तीन दिवस करावें असें बहुसंमत आहे. पौष पौर्णिमेच्या नंतर ज्या अष्टमी, सप्तमी आणि नवमी तिथि त्यांचे ठिकाणीं कर्तव्य जीं अष्टकादिक श्राद्धें तीं पूर्वी सांगितलींच आहेत. पौष अमावास्येचे दिवसीं अर्धोदययोग होतो तो असा;–"पौष, माघमासांतील अमावास्येचे दिवसीं रविवार, व्यतीपात, श्रवणनक्षत्र यांचा योग असेल तर तो 'अर्धोदय' ह्मणावा, व तो कोटिसूर्यग्रहणांशीं तुल्य आहे." " यांत कांहीं योग कमी असल्यास 'महोदय' होतो असा चवथा पाद कोणी पठण करितात, पौष व माघ यांच्या मधली अमावास्या असा अर्थ कोणी

दुसरे ग्रंथकार करितात. अमांत मासामध्यें पौषी अमावास्या, आणि पौर्णिमांत मासामध्यें माघी अमावास्या असा अर्थ आणखी दुसरे ग्रंथकार करितात. सर्व प्रकारानें पौषपौर्णिमेच्या नंतरची अमावास्या असा अर्थ समजावा. "हा अर्धोदययोग दिवसाचे ठिकाणींच प्रशस्त आहे, रात्रीमध्यें कधींहि प्रशस्त नाहीं. अर्धोदय आला असतां सर्व उदक गंगेप्रमाणें पवित्र, व सर्व ब्राह्मण ब्रह्मदेवासारखे शुद्ध होत. ह्या अर्धोदयकालीं अल्प जें कांहीं दान करावें तें मेरुपर्वताप्रमाणें मोठें होतें."

---

अथामत्रदानप्रयोगः देशकालौसंकीर्त्यसमुद्रमेखलायाःपृथ्व्याःसम्यग्दानफलकामोहमर्धोदयविहितामत्रदानंकरिष्येइतिसंकल्प्योपलिप्तेदेशेधौततंडुलैरष्टदलंकृत्वा तत्रचतुःषष्टिपलंचत्वारिंशत्पलंवापंचविंशतिपलंवाकांस्यपात्रंकृताभ्युत्तारणंस्थापयेत् तत्राष्टगुंजात्मकोमाषःचत्वारिंषन्माषाःकर्षःपलंकर्षचतुष्टयं अमरसिंहमतेतु अशीतिगुंजात्मकःकर्षःपलंकर्षचतुष्टयं कांस्यपात्रेपायसंनिक्षिप्यपायसेष्टदलंकृत्वातत्कर्णिकायांकर्षतदर्धतदर्धान्यतमपरिमाणहेमलिंगंनिधाय कांस्यपात्रेब्रह्माणंपायसेविष्णुंलिंगेशिवंयथाधिकारंवैदिकैर्मंत्रैर्नामभिर्वावाहनाद्युपचारैःसंपूजयेत् ततोविप्रंवस्त्रादिभिःपूजयेत् सुवर्णपायसामत्रंयस्मादेतत्त्रयीमयं आवयोस्तारकंयस्मात्तद्गृहाणद्विजोत्तम अमुकगोत्रायामुकशर्मणेतुभ्यंइदंसुवर्णलिंगपायसयुक्तममत्रंसमुद्रमेखलापृथ्वीदानफलकामोहं संप्रददेनममेतिविप्रहस्तेजलंदद्यात् विप्रःदेवस्यत्वेतिगृण्हीयात् दातादानस्यसंपूर्णतार्थमिमांदक्षिणांसंप्रददइतियथाशक्तिहिरण्यंदद्यात् हेमाद्र्याद्युक्तःप्रकारांतरेणार्धोदयव्रतप्रयोगो ब्रह्मादियुततिलपर्वतत्रयशय्यात्रयगोत्रयदानहोमादिसहितःकौस्तुभेद्रष्टव्यः इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारेपौषमासकृत्यनिर्णयउद्देशःसमाप्तः ॥

## आतां यानंतर पात्रदानाचा प्रयोग सांगतों.

देशकालांचा उच्चार करून, "**समुद्रमेखलायाःपृथ्व्याः सम्यग्दानफलकामोऽहमर्धोदयविहितामत्रदानं करिष्ये,**" असा संकल्प करून नंतर सारवलेल्या अशा शुद्ध भूमीवर धुतलेल्या तांदुळांचें अष्टदल करून चौसष्ट पलें वजनाचें किंवा चाळीस पलें वजनाचें अथवा पंचवीस पलें वजनाचें असें कांस्यपात्र घेऊन त्या अष्टदलावर अभ्युत्तारणपूर्वक त्या पात्राची स्थापना करावी. **वजनाचें मान**—आठ गुंजांचा एक मासा, चाळीस माशांचा एक कर्ष, चार कर्षांचें एक पल. अमरसिंहाच्या मतीं तर ऐंशी गुंजांचा एक कर्ष, चार कर्षांचें एक पल. कांस्यपात्रामध्यें पायस ( क्षीर ) घालून पायसाचे ठिकाणीं अष्टदल काढून त्या अष्टदलाच्या कर्णिकेचे ठिकाणीं कर्ष, अर्धा कर्ष, किंवा पाव कर्ष यांतून कोणत्याहि परिमाणाचें असें सुवर्णाचें लिंग ठेवून कांस्यपात्राचे ठिकाणीं ब्रह्मा, पायसाचे ठिकाणीं विष्णु, आणि, लिंगाचे ठिकाणीं शिव यांची जसा अधिकार असेल त्याप्रमाणें वैदिकमंत्रांनीं किंवा नाममंत्रांनीं आवाहनादिक उपचारेंकरून पूजा करावी, त्यानंतर वस्त्रादिकांनीं ब्राह्मणाची पूजा करून त्या कांस्यपात्राचें दान करावें. दानाचा मंत्र—"**सुवर्णपायसामत्रं यस्मादेतत् त्रयी-**

**मयं ॥ आवयोस्तारकं यस्मात्तद्गृहाण द्विजोत्तम ॥ अमुकगोत्रायामुकशर्मणे तुभ्यं इदं सुवर्णलिंगपायसयुक्तममत्रे समुद्रमेखलापृथ्वीदानफलकामोहं संप्रददे न मम,"** असें दानवाक्य ह्मणून ब्राह्मणाच्या हस्तावर उदक घालावें, व ब्राह्मणानें **"देवस्यत्वा०"** ह्या मंत्रानें दान घ्यावें. दात्यानें **"दानस्य संपूर्णतार्थमिमां दक्षिणां संप्रददे,"** असें वाक्य ह्मणून यथाशक्ति सुवर्ण द्यावें. हेमाद्रि इत्यादिक ग्रंथकारांनीं सांगितलेला असा दुसऱ्या प्रकारचा, अर्धोदयाच्या व्रताचा प्रयोग आहे. तो असा,—ब्रह्मा, विष्णु, शिव यांहीं युक्त असे तिळांचे तीन पर्वत, तीन शय्या व तीन गाई या सर्वांचें दान करून होम इत्यादिक करावें. हा प्रयोग कौस्तुभग्रंथीं पाहावा. इति **श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे पौषमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥**

---

**अथमाघमासः कुंभसंक्रांतौपूर्वषोडशनाड्यःपुण्याःमाघेवेणीस्नानमहिमा सितासितेतुयत्स्नानंमाघमासेयुधिष्ठिर नतेषांपुनरावृत्तिःकल्पकोटिशतैरपि कुरुक्षेत्रसमागंगायत्रकुत्रावगाहिता तस्माद्दशगुणाविंध्येकाश्यांशतगुणाततः काश्याःशतगुणाप्रोक्तागंगायमुनयान्विता सहस्रगुणितासापिमाघेपश्चिमवाहिनी ॥**

## आतां माघमासांतील कृत्यें सांगतों.

कुंभसंक्रांतीच्या पूर्वीच्या सोळा घटिका पुण्यकाळ. माघमासामध्यें त्रिवेणीचे ठिकाणीं स्नानाचा महिमा सांगतों—" हे युधिष्ठिरा, माघमासामध्यें गंगा व यमुना यांच्या संगमाचे ठिकाणीं जे स्नान करितात त्यांला कल्पकोटिशतानंतरहि पुनः जन्म होत नाहीं. ज्या कोणत्याहि स्थलीं गंगेचें स्नान कुरुक्षेत्रासमान होतें. कुरुक्षेत्राच्या दशगुणित विंध्यपर्वतस्थलीं, त्याच्या शतगुणित काशीचे ठिकाणीं, काशीच्या शतगुणित गंगा व यमुना यांचे संगमाचे ठिकाणीं, त्याच्या सहस्रगुणित माघमासीं पश्चिमवाहिनीचें फल, याप्रमाणें स्नानाचें फळ जाणावें."

---

**अथमाघेतिलपात्रदानंप्रशस्तं तत्प्रयोगः ताम्रपात्रेतिलान्कृत्वापलषोडशनिर्मिते सहिरण्यंस्वशक्त्यावाविप्रायप्रतिपादयेत् वाङ्मनःकायजत्रिविधपापनाशपूर्वकंब्रह्मलोकप्राप्तिकामस्तिलपात्रदानंकरिष्ये उक्तपरिमाणेताम्रपात्रेप्रस्थतिलान्कर्षसुवर्णयुतान्यथाशक्तिसुवर्णयुतान्वाकृत्वाविप्रंसंपूज्य देवदेवजगन्नाथवांछितार्थफलप्रद तिलपात्रंप्रदास्यामितवांगेसंस्थितोह्यहमितिमंत्रेणदद्यात् धान्यमानेतुकुडवोमुष्टीनांस्याच्चतुष्टये चत्वारःकुडवाःप्रस्थश्चतुःप्रस्थमथाढकं अष्टाढकोभवेद्द्रोणोद्विद्रोणःशूर्पउच्यतेसार्धशूर्पोभवेत्खारीत्युक्तरीत्या पलंसुवर्णाश्चत्वारःकुडवंप्रस्थमाढकं द्रोणंचखारिकाचेतिपूर्वपूर्वाच्चतुर्गुणमित्युक्तरीत्यावाप्रस्थमानस्वरूपंज्ञेयं यद्वाहिरण्यरहितान्तिलांस्ताम्रपात्रेनिधाय तिलाःपुण्याःपवित्राश्चसर्वपापहराःस्मृताः शुक्लाश्चैवतथाकृष्णाविष्णुगात्रसमुद्भवाः यानिकानिचपापानिब्रह्महत्यासमानिच तिलपात्रप्रदानेनतानिनश्यंतुमेसदा इदंतिलपात्रंयथाशक्तिदक्षिणासहितंयमदैवतंब्रह्मलोकप्राप्तिकामस्तुभ्यमहंसंप्रददेइतिदद्यात् अथसहिरण्यतुलसीपत्रदानमंत्रः सुवर्णतुलसीदानाद्ब्रह्मणःकायसंभवात् पापंप्रशममायातुसर्वेसंतुमनोरथाः अथशालग्रामदानमंत्रःशालग्रामशिलापुण्याभुक्तिमु**

**क्तिप्रदायिनी शालग्रामप्रदानेनममसंतुमनोरथाः चक्रांकितसमायुक्तशालग्रामशिलाशुभा दानेनैवभवेत्तस्याउभयोर्वांछितंफलं ॥**

माघमासाचे ठिकाणीं तिलपात्राचें दान करणें हें फार उत्तम होय. त्याचा प्रयोग सांगतों—" सोळांपलें वजनाचे ताम्रपात्रांत तीळ घालून सुवर्णयुक्त किंवा यथाशक्ति ब्राह्मणाला दान करावें." दानाचा संकल्प— " **वाङ्मनःकायजत्रिविधपापनाशपूर्वकब्रह्मलोकप्राप्तिकामस्तिलपात्रदानं करिष्ये,**" असा संकल्प करून पूर्वी सांगितलेल्या वजनाच्या ताम्रपात्रांत प्रस्थपरिमित तीळ घालून त्यांत ऐशीं गुंजा सुवर्ण किंवा यथाशक्ति सुवर्ण घालून ब्राह्मणाची पूजा करून तिळपात्राचें दान करावें. दानाचा मंत्र—" **देवदेव जगन्नाथ वांछितार्थफलप्रद ॥ तिलपात्रं प्रदास्यामि तवांगे संस्थितो ह्यहं.**" धान्याच्या मापाचें परिमाण— चार मुष्टींचा एक कुडव, चार कुडवांचा एक प्रस्थ, चार प्रस्थांचा एक आढक, आठ आढकांचा एक द्रोण, दोन द्रोणांचा एक शूर्प, दीड शूर्पाची एक खारी, ह्या रीतीनें—किंवा चार सुवर्णांचें[1] एक पल, चार पलांचा एक कुडव, चार कुडवांचा एक प्रस्थ, चार प्रस्थांचा एक आढक, चार आढकांचा एक द्रोण, चार द्रोणांची एक खारी ह्या रीतीनें प्रस्थमानाचें स्वरूप समजावें अथवा सुवर्णरहित असे तिळ ताम्रपात्रांत घालून, "**तिलाः पुण्याः पवित्राश्च सर्वपापहराः स्मृताः ॥ शुक्लाश्चैव तथा कृष्णा विष्णुगात्रसमुद्भवाः ॥ यानि कानि च पापानि ब्रह्महत्यासमानि च ॥ तिलपात्रप्रदानेन तानि नश्यंतु मे सदा इदं तिलपात्रं यथाशक्ति दक्षिणासहितं यमदैवतं ब्रह्मलोकप्राप्तिकामस्तुभ्यमहं संप्रददे,**" या मंत्रांनीं तिळपात्राचें सुवर्णसहित दान करावें. यानंतर तुलसीपत्राच्या दानाचा मंत्र—" **सुवर्णतुलसीदानात् ब्रह्मणः कायसंभवात् ॥ पापं प्रशममायातु सर्वे संतु मनोरथाः.**" शालग्रामदानाचा मंत्र—" **शालग्रामशिला पुण्या भुक्तिमुक्तिप्रदायिनि ॥ शालग्रामप्रदानेन मम संतु मनोरथाः ॥ चक्रांकितसमायुक्तशालग्रामशिला शुभा ॥ दानेनैव भवेत्तस्या उभयोर्वांछितं फलं,**" या मंत्रांनीं शालग्रामाचें दान करावें.

---

**अथप्रयागेवेणीदानं तत्रसर्वेषांवपनविधिः उर्ध्वमब्दाद्विमासोनाद्यदातीर्थंव्रजेन्नरः तदा तद्वपनंशस्तंप्रायश्चित्तमृतेद्विज प्रयागेतुयोजनत्रयादागतस्यदशमासादर्वागपि प्रथमयात्रायां तु जीवत्पितृकगुर्विणीपतिकृतचूडबालानामपिसभर्तृकस्त्रीणामपिवपनमितिविशेषः केचित्तुसभर्तृकस्त्रीणांसर्वान्केशान्समुद्धृत्यछेदयेदंगुलद्वयमित्याहुः तत्प्रयोगः वेणीभूतकेशा कृतमांगलिकवेषास्त्रीभर्तारंनत्वा तदाज्ञयासर्ववपनंद्व्यंगुलकेशच्छेदंवाकृत्वास्नात्वात्रिवेणीपूजां कुर्यात्भर्त्रावाकारयेत् पूजांतेपत्नीछिन्नवेणीयुक्तंवैणवपात्रमंजलौधृत्वातस्यांहेमवेणींमौक्तिकादिकंचनिधाय वेण्यांवेणीप्रदानेनममपापंव्यपोहतु जन्मांतरेष्वपिसदासौभाग्यंममवर्धतामितित्रिवेण्यांक्षिपेत् विप्राःसुमंगलीरियंवधूरितिपठेयुः ततोविप्रान्सुवासिनीश्चवस्त्रादिना तोषयेत् ॥**

---

१ व्यवहारिक त्रेपन्न तोळे व चार मासे.

## आतां प्रयागाचे ठिकाणीं वेणीदानाचा विधि सांगतों.

प्रयागाचे ठिकाणीं सर्वांनीं क्षौर करावें. जर दहा महिन्यांनंतर पुरुष तीर्थाला जाईल तर त्यानें प्रायश्चित्ताव्यतिरिक्त क्षौर करावें. प्रयागाचे ठिकाणीं तर बाराकोशांवरून दहा महिन्यांच्या पूर्वींहि आलेला त्यानेंहि क्षौर करावें. पहिलीच यात्रा असेल तर ज्याचा पिता जिवंत आहे तो, गर्भिणीपति, चौलकर्म झालेले असे बाल, सौभाग्यवती स्त्रिया या सर्वांनींहि प्रयागाचे ठिकाणीं केशवपन करावें, हा विशेषविधि जाणावा. कोणी ग्रंथकार तर सौभाग्यवती स्त्रियांनीं सर्व केश धरून दोन अंगुळें छेदावे असें ह्मणतात. त्याचा प्रयोग,—वेणी घातलेली अशा स्त्रियेनें मांगलिक वेष धारण करून पतीला नमस्कार करावा. नंतर पतीची आज्ञा घेऊन सर्व केशांचें वपन किंवा दोन अंगुळें केशांचें छेदन करून स्नान करून त्रिवेणीची पूजा करावी, अथवा पतीकडून पूजा करवावी. पूजा झाल्यानंतर छिन्न केलेली वेणी बांबूच्या पात्रांत घालून तें पात्र अंजलीचे ठिकाणीं धरून त्या छिन्न वेणीवर सोन्याची वेणी, व मोतीं हीं ठेवून, " **वेण्यां वेणीप्रदानेन मम पापं व्यपोहतु ॥ जन्मांतरेष्वपि सदा सौभाग्यं वम वर्धतां,**" हा मंत्र ह्मणून तें पात्र त्रिवेणीचे ठिकाणीं टाकावें. नंतर ब्राह्मणांनीं, " **सुमंगलीरियं वधूः०**" या मंत्राचा पाठ करावा. नंतर ब्राह्मण, सुवासिनी यांला वस्त्रें, दक्षिणा इत्यादिक देऊन त्यांचा संतोष करावा.

---

अथत्रिवेण्यांदेहत्यागविधिः येवैतन्वं१विसृजंतिधीरास्तेजनासोअमृतत्वंभजंतइतिश्रुतिर्माघमासविषया तनुंत्यजतिवैमाघेतस्यमुक्तिर्नसंशयइतिब्रह्मोक्तेः अन्यमासेतनुत्यागात्स्वर्गप्राप्तिः तत्रयथाशक्तिसर्वप्रायश्चित्तंकृत्वाश्राद्धाधिकार्यभावेस्वीयजीवच्छ्राद्धंसपिंडनांतंकृत्वागोदानादिकृत्वाकृतोपवासःपारणाहेफलोल्लेखपूर्वकंसंकल्प्य विष्णुंध्यात्वावेणींप्रविशेदिति जीवच्छ्राद्धप्रयोगःकौस्तुभेद्रष्टव्यः माघंप्रकृत्य तिलस्नायीतिलोद्वर्तीतिलहोमीतिलोदकी तिलभुक्तिलदाताचषट्तिलाःपापनाशनाइत्युक्तेवाक्ये तिलस्नायिपदेनतिलयुक्तोदकेनस्नानंतिलहोमपदेनायुतलक्षतिलहोमाद्यात्मकस्यग्रहमखस्यापिसंग्रहः तिलोदकीतितिलयुक्तोदकेनदेवपूजातर्पणसंध्यादिकंपानंचकार्यमित्यर्थः सचहोमस्त्रिधा प्रथमोयुतहोमःस्याल्लक्षहोमस्ततःपरः कोटिहोमस्तृतीयस्तुसर्वकामफलप्रदइति लक्षहोमादिप्रयोगःकुंडमंडपनिर्माणादिसहितः कौस्तुभमयूखादौज्ञेयः ॥

## आतां त्रिवेणीचे ठिकाणीं जलसमाधीचा विधि सांगतों.

गंगा व यमुना ह्या नद्या जेथें एकत्र झाल्या तेथें जे स्नान करितात ते स्वर्गलोकाला जातात, व जे जन धीर होत्साते देहाचें विसर्जन ह्मणजे जलसमाधि करितात ते मोक्षाला जातात," असी जी श्रुति ती माघमासाविषयीं आहे. कारण, " माघमासाचे ठिकाणीं जो तनूचें ( प्रयागाचे ठिकाणीं ) विसर्जन करितो त्याला निःसंशय मुक्ति मिळते, " असें ब्रह्मपुराणाचें वचन आहे. इतर महिन्यांमध्यें जळसमाधि केल्यानें स्वर्गप्राप्ति होते. त्या प्रयागीं यथाशक्ति सर्व प्रायश्चित्त करून आपली क्रिया करणारा कोणी नसेल तर आपण आपलीं

जिवंताचीं श्राद्धें, सपिंडीपर्यंत क्रिया हीं सर्व करून गोदानादिक करावें. नंतर उपोषण करून पारणेच्या दिवसीं फलाचा उल्लेख ज्यांत आहे असा संकल्प करून विष्णूचें ध्यान करून त्रिवेणीचे ठिकाणीं प्रवेश करावा. जीवंतश्राद्धांचा प्रयोग कौस्तुभग्रंथीं पाहावा. माघमासाला उद्देशून, "तिलस्नायी, तिलोद्वर्ती, तिलहोमी, तिलोदकी, तिलभुक्, तिलदाता हे सहा तिल पापाचा नाश करणारे होत," असें जें सांगितलेलें वाक्य त्याचे ठिकाणीं 'तिलस्नायी' या पदेंकरून तिलयुक्त उदकानें स्नान करावें. 'तिलहोमी' या पदेंकरून अयुतलक्ष तिलांचा होम इत्यादिकरूप ग्रहयज्ञहि करावा. 'तिलोदकी' या पदेंकरून तिलयुक्त उदकानें देवपूजा, तर्पण, संध्या इत्यादिक करून तिलोदक प्राशन करावें असा अर्थ होतो. होम सांगितला तो तीन प्रकारचा—"पहिला दहा सहस्र होम, दुसरा लक्षसंख्याक होम, तिसरा कोटिसंख्याक होम. तो सर्व मनोरथ फल देणारा होतो." लक्ष होम इत्यादिकांचा कुंडमंडपविधियुक्त प्रयोग कौस्तुभ, मयूख इत्यादिक ग्रंथीं पहावा.

---

माघशुक्लचतुर्थ्यांढुंढिराजोद्देशेननक्तव्रततत्पूजातिललड्डुकादिनैवेद्यंतिलभक्षणंचोक्तं अत्र प्रदोषव्यापिनीग्राह्या अस्यामेवप्रदोषव्यापिन्यांकुंदपुष्पैःशिवंसंपूज्योपवासंनक्तभोजनंवाकुर्यात् श्रियंप्राप्नुयात् अत्रविनायकव्रतस्यतुभाद्रशुक्लचतुर्थीवन्निर्णयः ॥

माघशुक्ल चतुर्थीचे दिवसीं ढुंढिराजाच्या ( गणपतीच्या ) उद्देशेंकरून नक्तव्रत, त्याची पूजा, तिळांचे लाडू इत्यादि करून त्यांचा नैवेद्य, व तिलभक्षण हीं करावीं. याविषयीं चतुर्थी प्रदोषव्यापिनी घ्यावी. ह्याच प्रदोषव्यापिनी चतुर्थीचे दिवसीं कुंदाच्या पुष्पांनीं शिवाची पूजा करून उपोषण किंवा नक्तभोजन करावें, तेणेंकरून लक्ष्मी प्राप्त होते. ह्या चतुर्थीचे दिवसीं जें विनायकाचें व्रत त्याचा निर्णय भाद्रपदशुक्लचतुर्थीसारखा जाणावा.

---

माघशुक्लपंचमीवसंतपंचमीतस्यांवसंतोत्सवारंभः अस्यांरतिकामयोःपूजोक्ताइयंपरत्रैवपूर्वाण्हव्याप्तौपरा अन्यथापूर्वैव ॥

माघशुक्ल पक्षांतील जी पंचमी तिला **वसंतपंचमी** असें ह्मणतात. ह्या पंचमीचे दिवसीं वसंताच्या उत्सवाचा आरंभ करावा. ह्या पंचमीचे दिवसीं रति, व काम यांची पूजा करावी. ही पंचमी दुसऱ्या दिवसींच पूर्वाण्हकालव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. दुसऱ्या दिवसीं पूर्वाण्हकालव्याप्ति नसेल तर पूर्व दिवसाचीच घ्यावी.

---

माघशुक्लसप्तमीरथसप्तमीसारुणोदयव्यापिनीग्राह्या दिनद्वयेरुणोदयव्याप्तौपूर्वा यदाघटिकादिमात्राषष्ठीसप्तमीचक्षयवशादरुणोदयात्पूर्वंसमाप्यतेतदाषष्ठीयुक्ताग्राह्या तत्रषष्ठ्यां सप्तमीक्षयघटीःप्रवेश्यारुणोदयेस्नानंकार्यं अत्रव्रतेषष्ठ्यामेकभक्तंकृत्वासप्तम्यामरुणोदयेस्नानंकार्यं तत्रमंत्रः यदाजन्मकृतंपापंमयाजन्मसुजन्मसु तन्मेरोगंचशोकंचमाकरीहंतुसप्तमी एतज्जन्मकृतंपापंयच्चजन्मांतरार्जितं मनोवाक्कायजंयच्चज्ञाताज्ञातेचयेपुनः इतिसप्तविधंपापं

---

१ जसी इच्छा असेल तदनुसार स्वर्ग किंवा मुक्ति यांच्या प्राप्तीचा उल्लेख.

स्नानान्मेसप्तसप्तिके सप्तव्याधिसमायुक्तंहरमाकरिसप्तमि अथार्घ्यमंत्रः सप्तसप्तिवहप्रीतसप्तलोकप्रदीपन सप्तमीसहितोदेवगृहाणार्घ्यंदिवाकरेति इयंचमन्वादिरपि शुक्लपक्षमन्वादित्वात्पौर्वाण्हिकीग्राह्येत्युक्तं ॥

माघशुक्लपक्षांतील जी सप्तमी तिला रथसप्तमी असें ह्मणतात. ती अरुणोदयव्यापिनी घ्यावी. दोन दिवसीं अरुणोदयव्याप्ति असल्यास पूर्व दिवसाची घ्यावी. जेव्हां एक घटिका किंवा कांहीं अधिक इतकी मात्र षष्ठी असेल आणि सप्तमी क्षयाच्या योगानें अरुणोदयाच्या पूर्वीं समाप्त होत असेल तेव्हां षष्ठीयुक्त घ्यावी. त्यामध्यें षष्ठींत सप्तमीचे क्षयाच्या घटिका मिळवून अरुणोदयकालीं स्नान करावें. ह्या व्रताचे ठिकाणीं षष्ठीचे दिवसीं एकवेळ भोजन करून सप्तमीचे दिवसीं अरुणोदयकालीं स्नान करावें.—स्नानाचे मंत्र—“ यदाजन्मकृतं पापं मया जन्मसु जन्मसु ॥ तन्मे रोगं च शोकं च माकरी हंतु सप्तमी ॥ एतज्जन्मकृतं पापं यच्च जन्मांतरार्जितं ॥ मनोवाक्कायजं यच्च ज्ञाताज्ञाते च ये पुनः ॥ इति सप्तविधं पापं स्नानान्मे सप्तसप्तिके ॥ सप्तव्याधिसमायुक्तं हर माकरि सप्तमि.” याप्रमाणें स्नान झाल्यानंतर सूर्याला अर्घ्य द्यावें. अर्घ्याचा मंत्र—“ सप्तसप्तिवह प्रीत सप्तलोकप्रदीपन ॥ सप्तमीसहितो देव गृहाणार्घ्यं दिवाकर. ” ही सप्तमी मन्वादि आहे. ही शुक्लपक्षांतील मन्वादि आहे याकरितां पूर्वाण्हकालव्यापिनी घ्यावी असें सांगितलें आहे.

---

माघशुक्लाष्टमीभीष्माष्टमी अस्यांभीष्मोद्देशेनयेश्राद्धंकुर्वंतितेसंततिमंतोभवंति तत्रश्राद्धं काम्यंतर्पणंतुनित्यं तर्पणेकृतेसंवत्सरोपात्तदुरितनाशः अकृतेपुण्यनाशइत्युक्तेः तत्रतर्पणमंत्रः वैयाघ्रपद्यगोत्रायसांकृत्यप्रवरायच गंगापुत्रायभीष्मायआजन्मब्रह्मचारिणे अपुत्रायजलं दद्मिनमोभीष्मायवर्मणे भीष्मःशांतनवोवीरःसत्यवादीजितेंद्रियः आभिरद्भिरवाप्नोतुपुत्रपौत्रोचितांक्रियामिति एवमपसव्येनतर्पणंकृत्वाचम्यसव्येनार्घ्यंदद्यात् वसूनामवतारायशंतनोरात्मजायच अर्घ्यंददामिभीष्मायआबाल्यब्रह्मचारिणेइति अत्रजीवत्पितृकस्यनाधिकारइति कौस्तुभः जीवत्पितृकस्याप्यधिकारइतिबहवः अत्रमध्यान्हव्यापिनीअष्टमीग्राह्या श्राद्धादेरेकोद्दिष्टत्वादिति ॥

माघशुक्लपक्षांतील जी अष्टमी तिला भीष्माष्टमी असें ह्मणतात. ह्या अष्टमीचे दिवसीं भीष्माचे उद्देशेंकरून जे श्राद्ध करितात ते संततियुक्त होतात. तें श्राद्ध कामनिक आहे व तर्पण तर नित्य आहे. तर्पण भीष्माच्या उद्देशानें केलें असतां एक वर्षपर्यंत केलेल्या पातकाचा नाश होतो. कारण, “ न केलें असतां पुण्याचा नाश होतो, ” असें वचन आहे. तर्पणाचा मंत्र—“वैयाघ्रपद्यगोत्राय सांकृत्यप्रवराय च ॥ गंगापुत्राय भीष्माय आजन्मब्रह्मचारिणे ॥ अपुत्राय जलं दद्मि नमो भीष्माय वर्मणे ॥ भीष्मः शांतनवो वीरः सत्यवादी जितेंद्रियः ॥ आभिरद्भिरवाप्नोतु पुत्रपौत्रोचितां क्रियां. ” याप्रमाणें अपसव्यानें तर्पण करून आचमन करावें व अर्घ्य द्यावें. अर्घ्याचा मंत्र—“ वसूनामवताराय शंतनोरात्मजाय च ॥ अर्घ्यं ददामि भीष्माय आबाल्यब्रह्मचारिणे. ” जीवत्पितृक असेल त्याला ह्या तर्पणाविषयीं अधिकार नाहीं असें, कौस्तुभांत आहे, व जीवत्पितृक त्यालाहि अधिकार आहे

असेंहि पुष्कळ ग्रंथकार ह्मणतात. याविषयीं अष्टमी मध्यान्हकालव्यापिनी घ्यावी. कारण, ह्या अष्टमीचे दिवसीं श्राद्ध इत्यादिक करावयाचें तें एकोद्दिष्ट करण्याविषयीं सांगितलें आहे, व त्याचा काळ मध्यान्ह आहे.

---

**माघशुक्लद्वादश्यांतिलोत्पत्तिरतोस्यामुपोष्य तिलस्नानंतिलैर्विष्णुपूजनंतिलनैवेद्यंतिलतैले नदीपदानंतिलहोमस्तिलदानंचतिलभक्षणंचकार्यं ॥**

माघशुक्लद्वादशीचे दिवसीं तिलांची उत्पत्ति झाली याकरितां ह्या द्वादशीचे दिवसीं उपोषण करून तिल्युक्त उदकानें स्नान, तिलेंकरून विष्णूची पूजा, तिलनैवेद्य, तिळांच्या तेलाचा दीप, तिलहोम, तिलदान, तिलभक्षण हीं करावीं.

---

**माघीपौर्णिमापरा अत्रकृत्यं एवंमाघावसानेतुदेयंभोज्यमवारितं भोजयेद्द्विजदांपत्यंभूषयेद्वस्त्रभूषणैः कंबलाजिनरत्नवस्त्राणितूलगर्भचोलकानिउपानहौप्रच्छादनपटाश्चैतानिमाधवः प्रीयतामित्युक्त्वादेयानि अथकृतस्यमाघस्नानस्यसांगतार्थमुद्यापनंकरिष्येइतिसंकल्प्य सवित्रे प्रसवित्रेचपरंधामजलेमम त्वत्तेजसापरिभ्रष्टंपापंयातुसहस्रधा दिवाकरजगन्नाथप्रभाकरनमोस्तुते परिपूर्णंकरिष्येहंमाघस्नानंतवाज्ञयेतिमंत्राभ्यामपिसंकल्पःकार्यःएवंचतुर्दश्यांसंकल्पोपवासाधिवासनमाधवपूजनानिकृत्वापौर्णिमायां तिलचर्वाज्यैरष्टोत्तरशतहोमंकृत्वातिलशर्करागर्भत्रिंशन्मोदकात्मकंवायनंदेयं तत्रमंत्रौ सवितःप्रसवस्त्वंहिपरंधामजलेमम त्वत्तेजसापरिभ्रष्टंपापंयातुसहस्रधा दिवाकरजगन्नाथप्रभाकरनमोस्तुते परिपूर्णंकुरुष्वेहमाघस्नानमुषःपतेइतिततोदंपत्योःसूक्ष्मवाससीसप्तधान्यानिचदत्वा ब्राह्मणेभ्योदांपत्यायचषड्रसभोजनंदेयं तत्रमंत्रःसूर्योमेप्रीयतांदेवोविष्णुमूर्तिर्निरंजनइति एवंमाघप्लवीयातिभित्वादेवंदिवाकरं परिव्राड्योगयुक्तश्चरणेचाभिमुखोहतइति ॥**

माघी पौर्णिमा दुसऱ्या दिवसाची घ्यावी. ह्या पौर्णिमेचे दिवसीं कृत्य—"याप्रमाणें माघीपौर्णिमेचे दिवसीं अन्नदान द्यावें, व ब्राह्मणदांपत्याला भोजन घालून वस्त्रें, अलंकार, यांहींकरून भूषित करावें. कांबळ कृष्णाजिन, तांबडीं वस्त्रें, रुवाचे आंगराखे, चर्मी जोडा, उपवस्त्र, हीं सर्व 'माधव संतुष्ट असो' अशा वचनेंकरून द्यावीं. यानंतर "**कृतस्य माघस्नानस्य सांगतार्थं उद्यापनं करिष्ये,**" असा संकल्प करून नंतर "**सवित्रे प्रसवित्रे च परं धाम जले मम ॥ त्वत्तेजसा परिभ्रष्टं पापं यातु सहस्रधा ॥ दिवाकर जगन्नाथ प्रभाकर नमोस्तु ते॥ परिपूर्णं करिष्येऽहं माघस्नानं तवाज्ञया,**" ह्या मंत्रांनींहि संकल्प करावा. याप्रमाणें चतुर्दशीचे दिवसीं संकल्प, उपोषण, अधिवासन आणि माधवाची पूजा हीं करून पौर्णिमेचे दिवसीं तिल, चरु ( भात ), घृत या द्रव्यांचा दरएकाचा एकशें आठ, याप्रमाणें सर्व होम करून तिल, साखर ज्यांत घातलीं आहेत अशा तीस मोदकांचें वायन द्यावें. वायनाच्या दानाचे मंत्र—"**सवितः प्रसवस्त्वं हि परं धाम जले मम ॥ त्वत्तेजसा परिभ्रष्टं पापं यातु सहस्रधा ॥ दिवाकर जगन्नाथ प्रभाकर नमोस्तु ते॥ परिपूर्णं कुरुष्वेह माघस्नानमुषःपते.**" तदनंतर दांपत्याला बारीक वस्त्रें व सप्त धान्यें देऊन इतर ब्राह्मण आणि दांपत्य यांला षड्रसभोजन

द्यावें. त्याचा मंत्र—" सूर्यो मे प्रीयतां देवो विष्णुमूर्तिर्निरंजनः" याप्रमाणें माघस्नान करणारा, योगयुक्त संन्यासी, आणि रणांगणांत शत्रूच्या समोर मृत झालेला हे सर्व सूर्यदेवाचा भेद करून जातात.

---

**माघकृष्णाष्टम्यांचतुरष्टकाकरणाशक्तएकाष्टकांपूर्वेद्युःश्राद्धान्वष्टक्यश्राद्धसहितांकुर्यात् दिनत्रयेकर्तुमशक्तोष्टम्यामेवैकामष्टकांकुर्यात् ॥**

चार अष्टकाश्राद्धें करण्याला जो अशक्त असेल त्यानें माघकृष्ण अष्टमीचे दिवसीं एक अष्टकाश्राद्ध, पूर्वेद्युःश्राद्ध व अन्वष्टक्यश्राद्ध यांहीं युक्त करावें. ह्मणजे सप्तमीचे दिवसीं पूर्वेद्युःश्राद्ध, अष्टमीचे दिवसीं अष्टकाश्राद्ध आणि नवमीचे दिवसीं अन्वष्टक्य श्राद्ध याप्रमाणें तीन दिवस तीन श्राद्धें करावीं. तीन दिवस श्राद्धें करण्याला असमर्थ असेल तर अष्टमीचे दिवसीं एकच अष्टकाश्राद्ध करावें.

---

**अथशिवरात्रिः सानिशीथव्यापिनीग्राह्या निशीथस्तुरात्रेरष्टमोमुहूर्तइत्युक्तं तत्रपरदिन** एवार्धरात्रौपरा पूर्वत्रैवतद्व्याप्तौपूर्वा दिनद्वयेप्यर्धरात्रव्याप्त्यभावेपिपरैव दिनद्वयेकार्त्स्न्येनैकदेशेनवार्धरात्रव्याप्तौपूर्वेतिहेमाद्र्याशयानुसारीकौस्तुभः परैवेतिमाधवनिर्णयसिंधुपुरुषार्थचिंतामण्यादयोबहवः परेद्युर्निशीथैकदेशव्याप्तौपूर्वेद्युःसंपूर्णतद्व्याप्तौपूर्वैव पूर्वदिनेनिशीथैकदेशव्याप्तौपरदिनेसंपूर्णतद्व्याप्तौपरैवइदंव्रतंरविवारभौमवारयोगेशिवयोगयोगेचातिप्रशस्तम् ॥

## आतां शिवरात्रीचा निर्णय सांगतों.

माघकृष्ण पक्षांतील जी चतुर्दशी तिला **शिवरात्रि** असें ह्मणतात. ती चतुर्दशी निशीथव्यापिनी घ्यावी. रात्रीचा जो आठवा मुहूर्त त्याचें नांव **निशीथ** असें जाणावें. त्यामध्यें जर दुसऱ्या दिवसींच निशीथव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. पूर्व दिवसींच निशीथव्यापिनी असेल तर पूर्वदिवसाची घ्यावी. दोनहि दिवसीं अर्धरात्र (निशीथ) व्यापिनी नसेल तथापि दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. दोन दिवसीं निशीथकालीं संपूर्णव्याप्ति किंवा एकदेशव्याप्ति असी असल्यास पूर्व दिवसाची घ्यावी असें, हेमाद्रीच्या अभिप्रायाप्रमाणें कौस्तुभांत आहे. दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी असें माधव, निर्णयसिंधु, पुरुषार्थचिंतामणि इत्यादिक बहुत ग्रंथकार ह्मणतात. दुसऱ्या दिवसीं निशीथकालीं एकदेशव्याप्ति असेल आणि पूर्व दिवसीं निशीथकालीं संपूर्णव्याप्ति असेल तर पूर्व दिवसाचीच घ्यावी. पूर्व दिवसीं निशीथकालीं एकदेशव्याप्ति असेल, व दुसऱ्या दिवसीं निशीथकालीं संपूर्णव्याप्ति असेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. ह्या शिवरात्रिव्रताचे दिवसीं रविवार, मंगळवार, व शिवयोग यांचा योग असेल तर अति उत्तम होय.

---

**अथपारणानिर्णयः यामत्रयादर्वाक्चतुर्दशीसमाप्तौचतुर्दश्यंतेपारणं यामत्रयोर्ध्वगामिन्यांचतुर्दश्यांप्रातश्चतुर्दशीमध्येएवपारणमितिमाधवादयः निर्णयसिंधौतुयामत्रयादर्वाक्चतुर्दशीसमाप्तावपिचतुर्दशीमध्येएवपारणंनतुकदाचिदपिचतुर्दश्यंते उपोषणंचतुर्दश्यांचतुर्द**

श्यांचपारणं कृतैःसुकृतलक्षैस्तुलभ्यतेयदिवानवा सिक्थेसिक्थेफलंतस्यशक्तोवक्तुंनपार्वती त्यादिनाचतुर्दशीमध्येपारणेपुण्यातिशयोक्तेरित्युक्तं अत्रैवंव्यवस्थाबोध्या यदानित्यकृत्यपूर्वकपारणपर्याप्ताचतुर्दशीनास्तितदावा येषांचतुर्दशीशेषदिनेदर्शादिश्राद्धप्रसक्तिस्तैर्वातिथ्यंतेपारणंकार्यं द्वादश्यामिवात्रनित्यकृत्यापकर्षकवाक्याभावात् तिथ्यंतपारणविधायकवाक्यसत्त्वेनसंकटविषयकजलपारणविधिवाक्यानामत्राप्रवृत्तेश्च कर्मपर्याप्तचतुर्दशीसत्त्वेश्राद्धप्रसक्त्यभावेचतिथिमध्यएवपारणमिति ॥

## आतां शिवरात्रिव्रताच्या पारणेचा निर्णय सांगतों.

तीन प्रहरांच्या पूर्वी चतुर्दशी संपेल तर चतुर्दशीच्या अंतीं पारणा करावी, आणि तीन प्रहरांपेक्षां अधिक चतुर्दशी असेल तर प्रातःकालीं चतुर्दशीमध्येंच पारणा करावी असें माधवादिक ग्रंथकार ह्मणतात. निर्णयसिंधूमध्यें तर तीन प्रहरांच्या पूर्वी चतुर्दशी समाप्त होईल तथापि चतुर्दशीमध्येंच पारणा करावी, चतुर्दशीच्या शेवटीं कधींहि करूं नये. कारण, "हे पार्वति, चतुर्दशीचे ठिकाणीं उपोषण करून चतुर्दशीमध्यें पारणा करणें हा योग लक्षावधि पुण्यांनींहि मिळण्याचा संशय आहे, व त्या पारणेचे ठिकाणीं एकेक शिताचें फल सांगण्याविषयीं मी समर्थ नाहीं," इत्यादिक वचनेंकरून चतुर्दशीमध्यें पारणा केली असतां पुण्याच्या अतिशयाचें वचन आहे असें सांगितलें. याविषयीं असी व्यवस्था जाणावी—जेव्हां आपलें नित्यकृत्य, पारणा हीं होत इतकी चतुर्दशी नसेल तेव्हां, अथवा ज्यांचें दर्शादिक श्राद्ध चतुर्दशीच्या शेषदिवसीं येईल त्यांनीं चतुर्दशीच्या अंतीं पारणा करावी. कारण, द्वादशीप्रमाणें ह्या चतुर्दशीचे दिवसीं नित्यकर्माचा अपकर्ष (पुढचें कर्म आदी करणें) करण्याविषयीं वचन नाहीं, व तिथीच्या अंतीं पारणा करावी अशाविषयीं वाक्यें असल्यामुळें, संकटविषयीं जलपारणा करावी असें सांगणारीं जीं वाक्यें त्यांची ह्या चतुर्दशीव्रताचे ठिकाणीं प्रवृत्ति नाहीं. नित्यकृत्य व पारणा हीं सर्व होतील इतकी चतुर्दशी असेल आणि श्राद्धदिवस नसेल तर चतुर्दशी तिथीमध्येंच पारणा करावी.

---

अत्रव्रतप्रयोगः त्रयोदश्यांकृतैकभक्तश्चतुर्दश्यांकृतनित्यक्रियः प्रातर्मंत्रेणसंकल्पंकुर्यात् शिवरात्रिव्रतंह्येतत्करिष्येहंमहाफलं निर्विघ्नमस्तुमेवात्रत्वत्प्रसादाज्जगत्पते चतुर्दश्यांनिराहारोभूत्वाशंभोपरेहनि भोक्ष्येहंभुक्तिमुक्त्यर्थंशरणंमेभवेश्वरेति द्विजस्तुरात्रींप्रपद्येजननीमित्यृचावपिपठित्वाजलमुत्सृजेत् ततःसायान्हेकृष्णतिलैःस्नानंकृत्वाधृतभस्मत्रिपुंड्ररुद्राक्षोनिशामुखेशिवायतनंगत्वाक्षालितपादःस्वाचांतउदङ्मुखोदेशकालौसंकीर्त्य शिवरात्रौप्रथमयामपूजांकरिष्येइतियामचतुष्टयेपूजाचतुष्टयचिकीर्षायांसंकल्पः सकृत्पूजाचिकीर्षायांश्रीशिवप्रीत्यर्थंशिवरात्रौश्रीशिवपूजांकरिष्यइतिसंकल्पः तत्रादौसामान्यतःपूजाविधिरुच्यतेयामभेदेनविशेषस्तुवक्ष्यतेअस्यश्रीशिवपंचाक्षरमंत्रस्यवामदेवऋषिः अनुष्टुप्छंदः श्रीसदाशिवोदेवतान्यासेपूजनेजपेचविनियोगः वामदेवऋषयेनमःशिरसि अनुष्टुप्छंदसेनमोमुखे श्रीसदाशिवदेवतायैनमोहृदि ॐनंतत्पुरुषायनमःहृदये ॐमंअघोरायनमःपादयोः ॐशिंसद्योजाता

द्यावें. त्याचा मंत्र–" सूर्यो मे प्रीयतां देवो विष्णुर्मूर्तिर्निरंजनः" याप्रमाणें माघस्नान करणारा, योगयुक्त संन्यासी, आणि रणांगणांत शत्रूच्या समोर मृत झालेला हे सर्व सूर्यदेवाचा भेद करून जातात.

---

**माघकृष्णाष्टम्यांचतुरष्टकाकरणाशक्तएकाष्टकांपूर्वेद्युःश्राद्धान्वष्टक्यश्राद्धसहितांकुर्यात् दिनत्रयेकर्तुमशक्तोष्टम्यामेवैकामष्टकांकुर्यात् ॥**

चार अष्टकाश्राद्धें करण्याला जो अशक्त असेल त्यानें माघकृष्ण अष्टमीचे दिवसीं एक अष्टकाश्राद्ध, पूर्वेद्युःश्राद्ध व अन्वष्टक्यश्राद्ध यांहीं युक्त करावें. ह्मणजे सप्तमीचे दिवसीं पूर्वेद्युःश्राद्ध, अष्टमीचे दिवसीं अष्टकाश्राद्ध आणि नवमीचे दिवसीं अन्वष्टक्य श्राद्ध याप्रमाणें तीन दिवस तीन श्राद्धें करावीं. तीन दिवस श्राद्धें करण्याला असमर्थ असेल तर अष्टमीचे दिवसीं एकच अष्टकाश्राद्ध करावें.

---

**अथशिवरात्रिः सानिशीथव्यापिनीग्राह्या निशीथस्तुरात्रेरष्टमोमुहूर्तइत्युक्तं तत्रपरदिन एवार्धरात्रौपरा पूर्वत्रैवतद्व्याप्तौपूर्वा दिनद्वयेप्यर्धरात्रव्याप्त्यभावेपिपरैव दिनद्वयेकात्स्न्र्येनैक** देशेनवार्धरात्रव्याप्तौपूर्वेतिहेमाद्र्याशयानुसारीकौस्तुभः परैवेतिमाधवनिर्णयसिंधुपुरुषार्थचिंतामण्यादयोबहवः परेद्युर्निशीथैकदेशव्याप्तौपूर्वेद्युःसंपूर्णतद्व्याप्तौपूर्वैव पूर्वदिनेनिशीथैकदेशव्याप्तौपरदिनेसंपूर्णतद्व्याप्तौपरैवइदंव्रतंरविवारभौमवारयोगेशिवयोगयोगेचातिप्रशस्तम् ॥

# आतां शिवरात्रीचा निर्णय सांगतों.

माघकृष्ण पक्षांतील जी चतुर्दशी तिला **शिवरात्रि** असें ह्मणतात. ती चतुर्दशी निशीथव्यापिनी घ्यावी. रात्रीचा जो आठवा मुहूर्त त्याचें नांव **निशीथ** असें जाणावें. त्यामध्यें जर दुसऱ्या दिवसींच निशीथव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. पूर्व दिवसींच निशीथव्यापिनी असेल तर पूर्वदिवसाची घ्यावी. दोनहि दिवसीं अर्धरात्र (निशीथ) व्यापिनी नसेल तथापि दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. दोन दिवसीं निशीथकालीं संपूर्णव्याप्ति किंवा एकदेशव्याप्ति असी असल्यास पूर्व दिवसाची घ्यावी असें, हेमाद्रीच्या अभिप्रायाप्रमाणें कौस्तुभांत आहे. दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी असें माधव, निर्णयसिंधु, पुरुषार्थचिंतामणि इत्यादिक बहुत ग्रंथकार ह्मणतात. दुसऱ्या दिवसीं निशीथकालीं एकदेशव्याप्ति असेल आणि पूर्व दिवसीं निशीथकालीं संपूर्णव्याप्ति असेल तर पूर्व दिवसाचीच घ्यावी. पूर्व दिवसीं निशीथकालीं एकदेशव्याप्ति असेल, व दुसऱ्या दिवसीं निशीथकालीं संपूर्णव्याप्ति असेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. ह्या शिवरात्रिव्रताचे दिवसीं रविवार, मंगळवार, व शिवयोग यांचा योग असेल तर अति उत्तम होय.

---

**अथपारणानिर्णयः यामत्रयादर्वाक्चतुर्दशीसमाप्तौचतुर्दश्यंतेपारणं यामत्रयोर्ध्वगामि**न्यांचतुर्दश्यांप्रातश्चतुर्दशीमध्येएवपारणमितिमाधवादयः निर्णयसिंधौतुयामत्रयादर्वाक्चतुर्दशीसमाप्तावपिचतुर्दशीमध्येएवपारणंनतुकदाचिदपिचतुर्दश्यंते उपोषणंचतुर्दश्यांचतुर्

श्यांचपारणं कृतैःसुकृतलक्षैस्तुलभ्यतेयदिवानवा सिक्थेसिक्थेफलंतस्यशक्तोवक्तुंनपार्वती त्यादिनाचतुर्दशीमध्येपारणेपुण्यातिशयोक्तेरित्युक्तं अत्रैवंव्यवस्थाबोध्या यदानित्यकृत्यपूर्वकपारणपर्याप्ताचतुर्दशीनास्तितदावा येषांचतुर्दशीशेषदिनेदर्शादिश्राद्धप्रसक्तिस्तैर्वातिथ्यंतेपारणकार्यं द्वादश्यामिवात्रनित्यकृत्यापकर्षकवाक्याभावात् तिथ्यंतपारणविधायकवाक्यसत्त्वेनसंकटविषयकजलपारणविधिवाक्यानामत्राप्रवृत्तेश्च कर्मपर्याप्तचतुर्दशीसत्त्वेश्राद्धप्रसक्त्यभावेचतिथिमध्यएवपारणमिति ॥

## आतां शिवरात्रिव्रताच्या पारणेचा निर्णय सांगतों.

तीन प्रहरांच्या पूर्वी चतुर्दशी संपेल तर चतुर्दशीच्या अंतीं पारणा करावी, आणि तीन प्रहरांपेक्षां अधिक चतुर्दशी असेल तर प्रातःकालीं चतुर्दशीमध्येंच पारणा करावी असें माधवादिक ग्रंथकार ह्मणतात. निर्णयसिंधूमध्यें तर तीन प्रहरांच्या पूर्वी चतुर्दशी समाप्त होईल तथापि चतुर्दशीमध्येंच पारणा करावी, चतुर्दशीच्या शेवटीं कधींहि करूं नये. कारण, "हे पार्वति, चतुर्दशीचे ठिकाणीं उपोषण करून चतुर्दशीमध्यें पारणा करणें हा योग लक्षावधि पुण्यांनींहि मिळण्याचा संशय आहे, व त्या पारणेचे ठिकाणीं एकेक शिताचें फल सांगण्याविषयीं मी समर्थ नाहीं," इत्यादिक वचनेंकरून चतुर्दशीमध्यें पारणा केली असतां पुण्याच्या अतिशयाचें वचन आहे असें सांगितलें. याविषयीं असी व्यवस्था जाणावी—जेव्हां आपलें नित्यकृत्य, पारणा हीं होत इतकी चतुर्दशी नसेल तेव्हां, अथवा ज्यांचें दर्शादिक श्राद्ध चतुर्दशीच्या शेषदिवसीं येईल त्यांनीं चतुर्दशीच्या अंतीं पारणा करावी. कारण, द्वादशीप्रमाणें ह्या चतुर्दशीचे दिवसीं नित्यकर्माचा अपकर्ष (पुढचें कर्म आदी करणें) करण्याविषयीं वचन नाहीं, व तिथीच्या अंतीं पारणा करावी अशाविषयीं वाक्यें असल्यामुळें, संकटविषयीं जलपारणा करावी असें सांगणारीं जीं वाक्यें त्यांची ह्या चतुर्दशीव्रताचे ठिकाणीं प्रवृत्ति नाहीं. नित्यकृत्य व पारणा हीं सर्व होतील इतकी चतुर्दशी असेल आणि श्राद्धदिवस नसेल तर चतुर्दशी तिथीमध्येंच पारणा करावी.

---

अत्रव्रतप्रयोगः त्रयोदश्यांकृतैकभक्तश्चतुर्दश्यांकृतनित्यक्रियः प्रातर्मंत्रेणसंकल्पंकुर्यात् शिवरात्रिव्रतंह्येतत्करिष्येहंमहाफलं निर्विघ्नमस्तुमेवात्रत्वत्प्रसादाज्जगत्पते चतुर्दश्यांनिराहारोभूत्वाशंभोपरेहनि भोक्ष्येहंभुक्तिमुक्त्यर्थंशरणंमेभवेश्वरेति द्विजस्तुरात्रींप्रपद्येजननीमित्यृचावपिपठित्वाजलमुत्सृजेत् ततःसायान्हेकृष्णतिलैःस्नानंकृत्वाधृतभस्मत्रिपुंड्ररुद्राक्षोनिशामुखेशिवायतनंगत्वाक्षालितपादःस्वाचांतउदङ्मुखोदेशकालौसंकीर्त्य शिवरात्रौप्रथमयामपूजांकरिष्येइतियामचतुष्टयेपूजाचतुष्टयचिकीर्षायांसंकल्पः सकृत्पूजाचिकीर्षायांश्रीशिवप्रीत्यर्थंशिवरात्रौश्रीशिवपूजांकरिष्यइतिसंकल्पः तत्रादौसामान्यतःपूजाविधिरुच्यतेयामभेदेनविशेषस्तुवक्ष्यतेअस्यश्रीशिवपंचाक्षरमंत्रस्यवामदेवऋषिः अनुष्टुप्छंदः श्रीसदाशिवोदेवतान्यासेपूजनेजपेचविनियोगः वामदेवऋषयेनमःशिरसि अनुष्टुप्छंदसेनमोमुखे श्रीसदाशिवदेवतायैनमोहृदि ॐनंतत्पुरुषायनमःहृदये ॐमंअघोरायनमःपादयोः ॐशिंसद्योजाता

द्यावें. त्याचा मंत्र—" सूर्यो मे प्रीयतां देवो विष्णुर्मूर्तिर्निरंजनः" याप्रमाणें माघस्नान करणारा, योगयुक्त संन्यासी, आणि रणांगणांत शत्रूच्या समोर मृत झालेला हे सर्व सूर्यदेवाचा भेद करून जातात.

---

**माघकृष्णाष्टम्यांचतुरष्टकाकरणाशक्तएकाष्टकांपूर्वेद्युःश्राद्धान्वष्टक्यश्राद्धसहितांकुर्यात् दिनत्रयेकर्तुमशक्तोष्टम्यामेवैकामष्टकांकुर्यात् ॥**

चार अष्टकाश्राद्धें करण्याला जो अशक्त असेल त्यानें माघकृष्ण अष्टमीचे दिवसीं एक अष्टकाश्राद्ध, पूर्वेद्युःश्राद्ध व अन्वष्टक्यश्राद्ध यांहीं युक्त करावें. ह्मणजे सप्तमीचे दिवसीं पूर्वेद्युःश्राद्ध, अष्टमीचे दिवसीं अष्टकाश्राद्ध आणि नवमीचे दिवसीं अन्वष्टक्य श्राद्ध याप्रमाणें तीन दिवस तीन श्राद्धें करावीं. तीन दिवस श्राद्धें करण्याला असमर्थ असेल तर अष्टमीचे दिवसीं एकच अष्टकाश्राद्ध करावें.

---

**अथशिवरात्रिः सानिशीथव्यापिनीग्राह्या निशीथस्तुरात्रेरष्टमोमुहूर्तइत्युक्तं तत्रपरदिन एवार्धरात्रौपरा पूर्वत्रैवतद्व्याप्तौपूर्वा दिनद्वयेप्यर्धरात्रव्याप्त्यभावेपिपरैव दिनद्वयेकात्स्न्र्येनैकदेशेनवार्धरात्रव्याप्तौपूर्वेतिहेमाद्र्याशयानुसारीकौस्तुभः परैवेतिमाधवनिर्णयसिंधुपुरुषार्थचिंतामण्यादयोबहवः परेद्युर्निशीथैकदेशव्याप्तौपूर्वेद्युःसंपूर्णतद्व्याप्तौपूर्वैव पूर्वदिनेनिशीथैकदेशव्याप्तौपरदिनेसंपूर्णतद्व्याप्तौपरैवइदंव्रतंरविवारभौमवारयोगेशिवयोगयोगेचातिप्रशस्तम् ॥**

## आतां शिवरात्रीचा निर्णय सांगतों.

माघकृष्ण पक्षांतील जी चतुर्दशी तिला शिवरात्रि असें ह्मणतात. ती चतुर्दशी निशीथव्यापिनी घ्यावी. रात्रीचा जो आठवा मुहूर्त त्याचें नांव **निशीथ** असें जाणावें. त्यामध्यें जर दुसऱ्या दिवसींच निशीथव्यापिनी असेल तर दुसऱ्या दिवसाची घ्यावी. पूर्व दिवसींच निशीथव्यापिनी असेल तर पूर्वदिवसाची घ्यावी. दोनहि दिवसीं अर्धरात्र (निशीथ) व्यापिनी नसेल तथापि दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. दोन दिवसीं निशीथकालीं संपूर्णव्याप्ति किंवा एकदेशव्याप्ति असी असल्यास पूर्व दिवसाची घ्यावी असें, हेमाद्रीच्या अभिप्रायाप्रमाणें कौस्तुभांत आहे. दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी असें माधव, निर्णयसिंधु, पुरुषार्थचिंतामणि इत्यादिक बहुत ग्रंथकार ह्मणतात. दुसऱ्या दिवसीं निशीथकालीं एकदेशव्याप्ति असेल आणि पूर्व दिवसीं निशीथकालीं संपूर्णव्याप्ति असेल तर पूर्व दिवसाचीच घ्यावी. पूर्व दिवसीं निशीथकालीं एकदेशव्याप्ति असेल, व दुसऱ्या दिवसीं निशीथकालीं संपूर्णव्याप्ति असेल तर दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. ह्या शिवरात्रिव्रताचे दिवसीं रविवार, मंगळवार, व शिवयोग यांचा योग असेल तर अति उत्तम होय.

---

**अथपारणानिर्णयः यामत्रयादर्वाक्चतुर्दशीसमाप्तौचतुर्दश्यंतेपारणं यामत्रयोर्ध्वगामिन्यांचतुर्दश्यांप्रातश्चतुर्दशीमध्येएवपारणमितिमाधवादयः निर्णयसिंधौतुयामत्रयादर्वाक्चतुर्दशीसमाप्तावपिचतुर्दशीमध्येएवपारणंनतुकदाचिदपिचतुर्दश्यंते उपोषणंचतुर्दश्यांचतुर्**

श्यांचपारणं कृतैःसुकृतलक्षैस्तुलभ्यतेयदिवानवा सिक्थेसिक्थेफलंतस्यशक्तोवक्तुंनपार्वती त्यादिनाचतुर्दशीमध्येपारणेपुण्यातिशयोक्तेरित्युक्तं अत्रैवंव्यवस्थाबोध्या यदानित्यकृत्यपूर्वकपारणपर्याप्ताचतुर्दशीनास्तितदावा येषांचतुर्दशीशेषदिनेदर्शादिश्राद्धप्रसक्तिस्तैर्वातिथ्यंतेपारणंकार्यं द्वादश्यामिवात्रनित्यकृत्यापकर्षकवाक्याभावात् तिथ्यंतपारणविधायकवाक्यसत्त्वेनसंकटविषयकजलपारणविधिवाक्यानामत्राप्रवृत्तेश्च कर्मपर्याप्तचतुर्दशीसत्त्वेश्राद्धप्रसक्त्यभावेचतिथिमध्यएवपारणमिति ॥

## आतां शिवरात्रिव्रताच्या पारणेचा निर्णय सांगतों.

तीन प्रहरांच्या पूर्वीं चतुर्दशी संपेल तर चतुर्दशीच्या अंतीं पारणा करावी, आणि तीन प्रहरांपेक्षां अधिक चतुर्दशी असेल तर प्रातःकालीं चतुर्दशीमध्येच पारणा करावी असें माधवादिक ग्रंथकार ह्मणतात. निर्णयसिंधूमध्यें तर तीन प्रहरांच्या पूर्वीं चतुर्दशी समाप्त होईल तथापि चतुर्दशीमध्येंच पारणा करावी, चतुर्दशीच्या शेवटीं कधींहि करूं नये. कारण, "हे पार्वति, चतुर्दशीचे ठिकाणीं उपोषण करून चतुर्दशीमध्यें पारणा करणें हा योग लक्षावधि पुण्यांनींहि मिळण्याचा संशय आहे, व त्या पारणेचे ठिकाणीं एकेक शिताचें फल सांगण्याविषयीं मी समर्थ नाहीं," इत्यादिक वचनेंकरून चतुर्दशीमध्यें पारणा केली असतां पुण्याच्या अतिशयाचें वचन आहे असें सांगितलें. याविषयीं असी व्यवस्था जाणावी–जेव्हां आपलें नित्यकृत्य, पारणा हीं होत इतकी चतुर्दशी नसेल तेव्हां, अथवा ज्यांचें दर्शादिक श्राद्ध चतुर्दशीच्या शेषदिवसीं येईल त्यांनीं चतुर्दशीच्या अंतीं पारणा करावी. कारण, द्वादशीप्रमाणें ह्या चतुर्दशीचे दिवसीं नित्यकर्माचा अपकर्ष (पुढचें कर्म आदी करणें) करण्याविषयीं वचन नाहीं, व तिथीच्या अंतीं पारणा करावी अशाविषयीं वाक्यें असल्यामुळें, संकटविषयीं जलपारणा करावी असें सांगणारीं जीं वाक्यें त्यांची ह्या चतुर्दशीव्रताचे ठिकाणीं प्रवृत्ति नाहीं. नित्यकृत्य व पारणा हीं सर्व होतील इतकी चतुर्दशी असेल आणि श्राद्धदिवस नसेल तर चतुर्दशी तिथीमध्येंच पारणा करावी.

---

अत्रव्रतप्रयोगः त्रयोदश्यांकृतैकभक्तश्चतुर्दश्यांकृतनित्यक्रियः प्रातर्मंत्रेणसंकल्पंकुर्यात् शिवरात्रिव्रतंह्येतत्करिष्येहंमहाफलं निर्विघ्नमस्तुमेवात्रत्वत्प्रसादाज्जगत्पते चतुर्दश्यांनिराहारोभूत्वाशंभोपरेहनि भोक्ष्येहंभुक्तिमुक्त्यर्थंशरणंमेभवेश्वरेति द्विजस्तुरात्रींप्रपद्येजननीमित्यृचावपिपठित्वाजलमुत्सृजेत् ततःसायान्हेकृष्णतिलैःस्नानंकृत्वाधृतभस्मत्रिपुंड्रुद्राक्षोनिशामुखेशिवायतनंगत्वाक्षालितपादःस्वाचांतउदङ्मुखोदेशकालौसंकीर्त्य शिवरात्रौप्रथमयामपूजांकरिष्येइतियामचतुष्टयेपूजाचतुष्टयचिकीर्षायांसंकल्पः सकृत्पूजाचिकीर्षायांश्रीशिवप्रीत्यर्थंशिवरात्रौश्रीशिवपूजांकरिष्यइतिसंकल्पः तत्रादौसामान्यतःपूजाविधिरुच्यतेयामभेदेनविशेषस्तुवक्ष्यतेअस्यश्रीशिवपंचाक्षरमंत्रस्यवामदेवऋषिः अनुष्टुप्छंदः श्रीसदाशिवोदेवतान्यासेपूजनेजपेचविनियोगः वामदेवऋषयेनमःशिरसि अनुष्टुप्छंदसेनमोमुखे श्रीसदाशिवदेवतायैनमोहृदि ॐनंतत्पुरुषायनमःहृदये ॐमंअघोरायनमःपादयोः ॐशिंसद्योजाता

यनमः गुह्ये ॐवांवामदेवाय० मूर्ध्नि ॐयंईशानाय० मुखे ॐॐहृदयायनमः ॐनंशिरसे स्वाहा ॐमंशिखायैवषट् ॐशिंकवचायहुं ॐवांनेत्रत्रयायवौषट् ॐयंअस्त्रायफट् कुंभ पूजांविधाय ध्यायेन्नित्यंमहेशंरजतगिरिनिभंचारुचंद्रावतंसंरत्नाकल्पोज्ज्वलांगंपरशुमृगव राभीतिहस्तंप्रसन्नं पद्मासीनंसमंतात्स्तुतममरगणैर्व्याघ्रकृत्तिंवसानंविश्वाद्यंविश्ववंद्यंनिखि लभयहरंपंचवक्त्रंत्रिनेत्रं इतिध्यात्वाप्राणप्रतिष्ठांकृत्वा स्थाप्यलिंगंस्पृशन् ॐभूः पुरुषं सांबसदाशिवमावाहयामि ॐभुवः पुरुषंसांब० ॐस्वः पुरुषंसांब० ॐभूर्भुवःस्वः पुरुषं सां० इत्यावाहयेत् स्वामिन्सर्वजगन्नाथयावत्पूजावसानकं तावत्त्वंप्रीतिभावेनलिंगेस्मिन्स न्निधौभवेतिपुष्पांजलिंदद्यात् स्थावरलिंगेपूर्वसंस्कृतचरलिंगेचप्राणप्रतिष्ठाद्यावाहनांतंनकार्यं ॐसद्योजातंप्रपद्यामिसद्योजातायवैनमोनमः ॐनमः शिवायश्रीसांबसदाशिवायनमः आस नंसमर्पयामि स्त्रीशूद्रश्चेत् ॐनमः शिवायेतिपंचाक्षरीस्थानेश्रीशिवायनमइतिनमोंतमंत्रेणपूज येत् ॐभवेभवेनातिभवेभवस्वमां ॐनमः शिवायश्रीसांबसदाशिवायनमः पाद्यंसमर्पयामि ॐभवोद्भवायनमः ॐनमः शिवायसांबस० अर्घ्यं० ॐवामदेवायनमः ॐनमः शिवायश्री सांब० आचमनं० ॐज्येष्ठायनमः ॐनमः शिवाय स्नानं ततोमूलमंत्रेणआप्यायस्वेत्यादि भिश्चपंचामृतैःसंस्नाप्यआपोहिष्ठेतितिसृभिः शुद्धोदकेनप्रक्षाल्य एकादशावृत्त्यैकावृत्त्यावारु द्रेणपुरुषसूक्तेनचचंदनकुंकुमकर्पूरवासितजलेनाभिषेकंकृत्वा ॐनमः शिवायेतिस्नानांतेआ चमनंदत्वासाक्षतजलेनतर्पणंकार्यं ॐभवंदेवंतर्पयामि १ शर्वंदेवंतर्पयामि २ ईशानंदेवंत र्पयामि ३ पशुपतिंदेवंतर्पयामि ४ उग्रंदेवंत० ५ रुद्रंदेवंत० ६ भीमंदेवंत० ७ महांतंदेवं त० ८ भवस्यदेवस्यपत्नींतर्पयामि शर्वस्यदेवस्यपत्नींतर्पयामि ईशानस्यदेवस्यपत्नींत० पशुप तेर्देवस्यप० उग्रस्यदेवस्यप० रुद्रस्यदेवस्यप० भीमस्यदेवस्यप० महतोदेवस्यप० ८ ॐज्ये ष्ठायनमः ॐनमः शिवायश्रीसांब० वस्त्रं० मूलेनाचमनं ॐरुद्रायनमः ॐनमः शिवाय० यज्ञो पवीतं० मूलेनाचमनं ॐकालायनमः ॐनमः शिवायसांबसदाशिवायनमः चंदनं० ॐक लविकरणायनमः ॐनमः शिवायसांबसदाशिवायनमः अक्षतान् ॐबलविकरणायनमः ॐनमः शिवायश्रीसांबसदाशिवायनमः पुष्पाणि सहस्रमष्टोत्तरशतंवासहस्रादिनामभिर्मूल मंत्रेणवाबिल्वपत्राणिदद्यात् ॐबलायनमः ॐनमः शिवायश्रीसांबसदाशिवायनमः धूपं० ॐबलप्रमथनायनमः ॐनमः शिवायसां० दीपं० ॐसर्वभूतदमनायनमः ॐनमः शिवाय० नैवेद्यं० मूलेनाचमनंफलंच ॐमनोन्मनायनमः ॐनमः शिवाय० तांबूलं० मूलेनवैदिकैर्मंत्रै श्चनीराजनं० ईशानः सर्वविद्यानामीश्वरः सर्वभूतानांब्रह्माधिपतिर्ब्रह्मणोधिपतिर्ब्रह्माशिवोमेअ स्तुसदाशिवों ॐनमः शिवाय० मंत्रपुष्पं० भवायदेवायनमः शर्वायदेवायेत्याद्यष्टौभवस्यदेव स्यपत्न्यैइत्यष्टौचनमस्कारान्कृत्वा शिवाय० रुद्राय० पशुपतये० नीलकंठाय० महेश्वराय० हरिकेशाय० विरूपाक्षाय० पिनाकिने० त्रिपुरांतकाय० शंभवे० शूलिने० महादेवायन मइतिद्वादशनामभिर्द्वादशपुष्पांजलीन्दत्वामूलेनप्रदक्षिणानमस्कारान्कृत्वामूलमंत्रमष्टोत्तर शतंजप्त्वाक्षमापयित्वाऽनेनपूजनेनसांबसदाशिवः प्रीयतामितिनिवेदयेत् ॥

## आतां शिवरात्रिव्रताचा प्रयोग सांगतों.

त्रयोदशीचे दिवसीं एकभुक्त राहून चतुर्दशीचे दिवसीं नित्य कर्म करून प्रातःकालीं मंत्र ह्मणून संकल्प करावा. संकल्पाचे मंत्र—"शिवरात्रिव्रतं ह्येतत् करिष्येऽहं महाफलं ॥ निर्विघ्नमस्तु मेवात्र त्वत्प्रसादाज्जगत्पते ॥ चतुर्दश्यां निराहारो भूत्वा शंभो परेऽहनि ॥ भोक्ष्येऽहं भुक्तिमुक्त्यर्थं शरणं मे भवेश्वर." ब्राह्मण असेल तर त्यानें "रात्रीं प्रपद्ये जननीं०" ह्या दोन ऋचाहि पठण करून उदक सोडावें. यानंतर सायान्हकालीं काळे तीळ आंगाला लावून स्नान करून भस्माचा त्रिपुंड्र व रुद्राक्ष धारण करीत होत्साता प्रदोषकालीं शिवाच्या देवालयांत जाऊन हस्त पाद प्रक्षालन करून आचमन करावें. नंतर देश, काल यांचा उच्चार करून "शिवरात्रौ प्रथमयामपूजां करिष्ये," असा संकल्प, चार प्रहरांच्या चार पूजा करणें असतील तर करावा. एक वेळच पूजा करणें असेल तर, "श्रीशिवप्रीत्यर्थं शिवरात्रौ श्रीशिवपूजां करिष्ये," असा संकल्प करावा. त्यामध्यें प्रथम सामान्येंकरून पूजेचा विधि सांगतों— दरएक प्रहराचे ठिकाणीं पूजेचा विशेष प्रकार तर पुढें सांगेन. "अस्य श्रीशिवपंचाक्षरमंत्रस्य वामदेवऋषिः ॥ अनुष्टुप् छंदः ॥ श्रीसदाशिवो देवता न्यासे पूजने जपे च विनियोगः ॥ वामदेवऋषये नमः शिरसि ॥ अनुष्टुप्छंदसे नमो मुखे ॥ श्रीसदाशिव दैवतायै नमः हृदि ॥ ॐ नं तत्पुरुषाय नमः हृदये ॥ ॐ मं अघोराय नमः पादयोः ॥ ॐ शिं सद्योजाताय नमः गुह्ये ॥ ॐ वां वामदेवाय नमः मूर्ध्नि ॥ ॐ यं ईशानाय नमः मुखे ॥ ॐ ॐ हृदयाय नमः ॥ ॐ नं शिरसे स्वाहा ॥ ॐ मं शिखायै वषट् ॥ ॐ शिं कवचाय हुं ॥ ॐ वां नेत्रत्रयाय वौषट् ॐ यं अस्त्राय फट्." याप्रमाणें न्यास करून कलशाची पूजा करावी. नंतर "ध्यायेन्नित्यं महेशं रजतगिरिनिभं चारुचंद्रावतंसं रत्नाकल्पोज्ज्वलांगं परशुमृगवराभीतिहस्तं प्रसन्नं ॥ पद्मासीनं समंतात्स्तुतममरगणैर्व्याघ्रकृत्तिं वसानं विश्वाद्यं विश्ववंद्यं निखिलभयहरं पंचवक्त्रं त्रिनेत्रं," या मंत्रानें ध्यान करून प्राणप्रतिष्ठा करावी. नंतर स्थापना करून लिंगाला स्पर्श करीत होत्साता, "ॐ, भूः पुरुषं सांबसदाशिवमावाहयामि ॥ ॐ भुवः पुरुषं सांब० ॥ ॐ स्वः पुरुषं सांब० ॥ ॐ भूर्भुवःस्वः पुरुषं सांब० ॥ याप्रमाणें मंत्र ह्मणून आवाहन करावें. नंतर हातांत पुष्पें घेऊन "स्वामिन्सर्वजगन्नाथ यावत्पूजावसानकं ॥ तावत्त्वं प्रीतिभावेन लिंगेऽस्मिन्सन्निधौ भव," या मंत्रेंकरून पुष्पांजलि समर्पण करावी. स्थावरलिंग व पूर्वीं अर्चासंस्कार केलेलें चरलिंग ह्यांचे ठिकाणीं प्राणप्रतिष्ठेपासून आवाहनपर्यंत विधि करूं नये. "ॐ सद्यो जातं प्रपद्यामि सद्यो जाताय वै नमो नमः ॐ नमः शिवाय श्रीसांबसदाशिवाय नमः आसनं समर्पयामि." स्त्रिया, शूद्र हे पूजा करणारे असतील तर "ॐ नमः शिवाय," असा जो पंचाक्षरमंत्र त्याचे स्थानीं "श्रीशिवाय नमः" अशा (नमःशब्द ज्याच्या शेवटीं) मंत्रानें पूजा करावी. "ॐ भवे भवे नातिभवे भवस्व मां ॐ नमः शिवाय श्रीसांबसदाशिवाय नमः पाद्यं समर्पयामि ॥ ॐ भवोद्भवाय नमः ॐ नमः शिवाय श्रीसांबसदाशिवाय० अर्घ्यं० ॥ ॐ वामदेवाय नमः ॐ नमः शिवाय श्रीसांब० आचमनं० ॥ ॐ ज्येष्ठाय नमः ॐ नमः शिवाय श्रीसांब० स्नानं०" तदनंतर मूलमंत्रानें

व " आप्यायस्व० " इत्यादिक मंत्रांनीं पंचामृताचें स्नान घालून आपोहिष्ठा० " ह्या तीन ऋचांनीं शुद्ध उदकानें लिंग धुवून रुद्राची एकादशिनी किंवा एक आवर्तन, व पुरुषसूक्त ह्मणून चंदन, कापूर, केशर यांहीं सुगंधित अशा उदकानें अभिषेक करावा. नंतर " ॐ नमः शिवाय " ह्या मंत्रानें स्नान घातल्यानंतर आचमन देऊन अक्षतायुक्त उदकानें तर्पण करावें. तें असें,--" ॐ भवं देवं तर्पयामि १ ॥ ॐ शर्वं देवं त० २॥ ॐ ईशानं देवं त० ३ ॥ ॐ पशुपतिं देवं त० ४ ॥ ॐ उग्रं देवं त० ५ ॥ ॐ रुद्रं देवं त० ६ ॥ ॐ भीमं देवं त० ७ ॥ ॐ महांतं देवं त० ८ ॥ भवस्य देवस्य पत्नीं तर्पयामि ॥ शर्वस्य देवस्य पत्नीं तर्पयामि ॥ ईशानस्य देवस्य पत्नीं तर्प० ॥ पशुपतेर्देवस्य पत्नीं त० ॥ उग्रस्य देवस्य पत्नीं० ॥ रुद्रस्य देवस्य पत्नीं० ॥ भीमस्य देवस्य पत्नीं० ॥ महतो देवस्य पत्नीं त० ८ ॥ ॐ ज्येष्ठाय नमः ॐ नमः शिवाय श्रीसां० वस्त्रं० ॥ नंतर " ॐ नमः शिवाय " ह्या मूलमंत्रानें आचमन द्यावें. नंतर " ॐ रुद्राय नमः ॐ नमः शिवाय श्रीसांब० यज्ञोपवीतं स० " नंतर मूलमंत्रानें आचमन द्यावें. तदनंतर " ॐ कालाय नमः ॐ नमः शिवाय श्रीसां० चंदनं० ॥ ॐ कलविकरणाय नमः ॐ नमः शिवाय श्रीसां० अक्षतान्० ॥ ॐ बलविकरणाय नमः ॐ नमः शिवाय श्रीसां०पुष्पाणि० " याप्रमाणें पुष्पपर्यंत पूजा झाल्यानंतर सहस्र किंवा एकशें आठ असीं बिल्वपत्रें, शिवाच्या सहस्रनामांनीं किंवा मूलमंत्रानें समर्पण करावीं. नंतर " ॐ बलाय नमः ॐ नमः शिवाय श्रीसांब० धूपं स० ॥ ॐ बलप्रमथनाय नमः ॐ नमः शिवाय श्रीसांब० दीपं० ॥ ॐ सर्वभूतदमनाय नमः ॐ नमः शिवाय श्रीसांब० नैवेद्यं०" नंतर मूलमंत्रानें आचमन, फल हीं अर्पण करावीं. नंतर " ॐ मनोन्मनाय नमः ॐ नमः शिवाय श्रीसांब० तांबूलं स०" नंतर मूलमंत्रानें व वेदमंत्र यांहींकरून आरती करावी. नंतर " ईशानः सर्वविद्यानां० ॐ नमः शिवाय श्रीसांब० मंत्रपुष्पं० " याप्रमाणें मंत्रपुष्पापर्यंत पूजा झाल्यानंतर " भवाय देवाय नमः ॥ शर्वाय देवाय नमः " इत्यादिक आठ, आणि " भवस्य देवस्य पत्न्यै नमः" असे आठ, याप्रमाणें नमस्कार करून " शिवाय नमः, रुद्राय नमः, पशुपतये०, नीलकंठाय०, महेश्वराय०, हरिकेशाय०, विरूपाक्षाय०, पिनाकिने०, त्रिपुरांतकाय०, शंभवे०, शूलिने०, महादेवाय०" अशा बारा नामांनीं बारा पुष्पांजलि समर्पण करून मूलमंत्रानें प्रदक्षिणा व नमस्कार करून मूलमंत्राचा १०८ जप करून प्रार्थना करून "अनेन पूजनेन सांबसदाशिवः प्रीयतां," असें ह्मणून पूजा निवेदन करावी.

---

अथचतुर्षुयामेषुपूजाचतुष्टयेविशेषः तत्रप्रथमयामेमूलमंत्रांतेश्रीशिवायासनंसमर्पयामी तिशिवनाम्नासर्वोपचारसमर्पणम् द्वितीययामेशिवरात्रौद्वितीययामपूजांकरिष्यइतिसंकल्प्य श्रीशंकरायासनमितिशंकरनाम्ना ततोमहानिशिपूजांकरिष्यइतिसंकल्प्यपूर्ववत्पूजाततस्तृतीययामपूजांकरिष्यइत्युक्त्वाश्रीमहेश्वरायासनमित्यादि एवमेवचतुर्थयामेश्रीरुद्रायेतिरुद्रनाम्ना प्रतियामंतैलाभ्यंगपंचामृतोष्णोदकशुद्धोदकगंधोदकाभिषेकाःकार्याः यज्ञोपवीतांतेगोरोचन कस्तूरीकुंकुमकर्पूरागरुचंदनमिश्रितानुलेपेनलिंगंलेपयेत् पंचविंशतिपलमितःसर्वोनुलेपइति

अनुलेपपरिमाणं यथाशक्तिवा धत्तूरकरवीरकुसुमैर्बिल्वपत्रैश्चपूजनमतिप्रशस्तंपुष्पाभावेशालितंडुलगोधूमयवैःपूजानैवेद्योत्तरंतांबूलमुखवासौउक्तौनागवल्लीपत्रक्रमुकफलशुक्त्यादिचूर्णेतित्रयंतांबूलसंज्ञं एतदेवनारिकेलकर्पूरेलाकंकोलैःसहितंमुखवाससंज्ञं एतेषामन्यतमद्रव्यालाभेतत्तद्द्रव्यंस्मरेद्बुधः सर्वपूजांतेप्रार्थना नित्यंनैमित्तिकंकाम्यंयत्कृतंतुमयाशिव तत्सर्वंपरमेशानमयातुभ्यंसमर्पितमितिशिवरात्रिव्रतंदेवपूजाजपपरायणः करोमिविधिवद्दत्तंगृहाणार्घ्यंनमोस्तुतेइत्यर्घ्यः एवंयामचतुष्टयेर्घ्यभेदःकौस्तुभे ततःप्रभातेस्नात्वापुनःशिवंसंपूज्य पूर्वोक्तद्वादशनामभिर्द्वादशब्राह्मणानशक्तावेकंवासंपूज्यतिलपक्वान्नपूर्णान् द्वादशकुंभानेकंवाद त्वाव्रतमर्पयेत् यन्मयाद्यकृतंपुण्यंतद्रुद्रस्यनिवेदितं त्वत्प्रसादान्मयादेवव्रतमद्यसमर्पितं प्रसन्नोभवमेश्रीमन्सद्गतिःप्रतिपाद्यतां त्वदालोकनमात्रेणपवित्रोस्मिनसंशयइति ततोब्राह्मणान्भोजयित्वापूर्वनिर्णीतकालेस्वजनैःसहपारणंकुर्यात् तत्रमंत्रः संसारक्लेशदग्धस्यव्रतेनानेनशंकर प्रसीदसुमुखोनाथज्ञानदृष्टिप्रदोभवेति इतिशिवरात्रिव्रतविधिः ॥

यानंतर चार प्रहरांच्या ज्या चार पूजा त्यांचा विशेष प्रकार सांगतों–पहिल्या प्रहरीं–मूलमंत्राचा उच्चार करून **“श्रीशिवायासनं समर्पयामि,”** असें ह्मणून ‘शिव’ या नामानें सर्व उपचार समर्पण करावे. दुसऱ्या प्रहरीं–**“शिवरात्रौ द्वितीययामपूजां करिष्ये,”** असा संकल्प करून **“श्रीशंकराय आसनं समर्पयामि,”** असे शंकरनामेंकरून उपचार समर्पण करावे. तदनंतर **“महानिशिपूजां करिष्ये,”** असा संकल्प करून पूर्वींप्रमाणें पूजा करावी. तिसऱ्या प्रहरीं–**“तृतीययामपूजां करिष्ये,”** असा संकल्प करून **“श्रीमहेश्वराय आसनं समर्पयामि,”** असें ह्मणून आसनादिक पूजा करावी. याप्रमाणेंच चवथ्या प्रहरीं–**“चतुर्थयामपूजां करिष्ये,”** असा संकल्प करून, **“श्रीरुद्राय आसनं समर्पयामि,”** असें ह्मणून पूर्वींप्रमाणें पूजा करावी. दरएक प्रहरीं तैलाभ्यंग, पंचामृतें, उष्णोदक, शुद्धोदक, गंधोदक, अभिषेक हीं करावीं. यज्ञोपवीत समर्पण केल्यानंतर गोरोचन, कस्तूरी, केशर, कापूर, अगरुचंदन यांहीं मिश्रित अशा अनुलेपानें (गंधानें) लिंग लिंपावें. पंचवीस पलें वजन असें सर्व अनुलेपन, याप्रमाणें अनुलेपाचें प्रमाण समजावें. अथवा यथाशक्ति घ्यावें. धुतरा, कण्हेर यांच्या पुष्पांनीं व बिल्वपत्रांनीं पूजा करणें अतिउत्तम होय. पुष्पें नसतील तर साळीचे तांदूळ व गहूं, यव यांहींकरून पूजा करावी. नैवेद्य समर्पण केल्यानंतर तांबूल, मुखवास, हे समर्पण करावे. पानवेलीचीं पानें, सुपारी, शिंपी इत्यादिकांचा चुना हे तीन पदार्थ मिळून तांबूल होय. हेंच तांबूल खोबरें, वेलची, कंकोळ या पदार्थांनीं युक्त केलें असतां त्याला मुखवास असें ह्मणावें. ह्या पदार्थांतून एकादा पदार्थ न मिळेल तर त्या त्या पदार्थाचें स्मरण करावें. याप्रमाणें सर्व पूजा झाल्यानंतर प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र–**“नित्यं नैमित्तिकं काम्यं यत्कृतं तु मया शिव ॥ तत्सर्वं परमेशान मया तुभ्यं समर्पितं.”** याप्रमाणें प्रार्थना केल्यावर अर्घ्य द्यावें. अर्घ्याचा मंत्र–**“शिवरात्रिव्रतं देव पूजाजपपरायणः ॥ करोमि विधिवद्दत्तं गृहाणार्घ्यं नमोस्तु ते.”** याप्रमाणें चार प्रहरांचे ठिकाणीं निरनिराळीं अर्घ्यें द्यावयाचीं त्यांचा प्रकार कौस्तुभांत पाहावा. त्यानंतर प्रातःकालीं स्नान करून पुनः शिवाची पूजा करून पूर्वीं सांगितलेलीं जीं बारा नांवें त्यांहींकरून

बारा ब्राह्मणांची पूजा, अथवा शक्ति नसेल तर एक ब्राह्मणाची पूजा करून तिल, व पक्कान्नें यांहीं पूर्ण असे बारा किंवा एक कलश देऊन व्रत देवाला अर्पण करावें. अर्पणाचा मंत्र—"यन्मयाद्य कृतं पुण्यं तद्रुद्रस्य निवेदितं ॥ त्वत्प्रसादान्मयादेव व्रतमद्य समर्पितं ॥ प्रसन्नो भव मे श्रीमन्सद्गतिः प्रतिपाद्यतां ॥ त्वदालोकनमात्रेण पवित्रोस्मि न संशयः." त्यानंतर ब्राह्मणाला भोजन घालून पूर्वीं निर्णय करून सांगितलेल्या कालीं आपल्या आप्तलोकांसहवर्तमान पारणा करावी. पारणेच्या समयीं प्रार्थनेचा मंत्र—"संसारक्लेशदग्धस्य व्रतेनानेन शंकर ॥ प्रसीद सुमुखो नाथ ज्ञानदृष्टिप्रदो भव." याप्रमाणें शिवरात्रिव्रताचा विधि समाप्त झाला.

---

अथमृन्मयलिंगेशिवपूजाचिकीर्षायांतद्विधिः ॐहरायनमइतिमृदमाहृत्यशोधितायांतस्यांजलप्रक्षेपेणसंपीड्यतेनपिंडेनॐमहेश्वरायनमइतिलिंगंकुर्यात् तच्चलिंगमशीतिगुंजात्मककर्षादधिकपरिमाणमंगुष्ठमात्रंततोधिकंवाकार्यंनन्यूनं मृन्मयलिंगेपंचसूत्रसंपादनाभावेपिन दोषः अतएवसप्तकृत्वस्तुलारूढंवृद्धिमेतिनहीयते बाणलिंगमितिप्रोक्तंशेषंनार्मदमुच्यतेइत्युक्तलक्षणाद्बाणलिंगादतिदुर्लभाद्दुःसंपाद्यपंचसूत्रसंपादनात्सुवर्णादिलिंगाच्चमृन्मयलिंगंश्रेष्ठं द्वापरेपारदंश्रेष्ठंपार्थिवंतुकलौयुगइतिवचनाच्च ततः ॐशूलपाणयेनमः शिवइहप्रतिष्ठितोभवेतिसबिल्वपत्रेपूजापीठेप्रतिष्ठाप्य ध्यायेन्नित्यंमहेशमितिध्यात्वाॐपिनाकधृषेनमःश्रीसांबशिवइहागच्छइहप्रतिष्ठेहसन्निहितोभवेत्यावाहयेत् इहद्विजानांसर्वत्रमूलमंत्रोपिज्ञेयः ततः ॐनमःशिवायेतिमूलमंत्रेणपाद्यमर्घ्यमाचमनंदत्वापशुपतयेनमइतिमूलेनचस्नानंवस्त्रमुपवीतं गंधंपुष्पंधूपदीपनैवेद्यफलतांबूलनीराजनमंत्रपुष्पांजलीन्दत्वाशर्वायक्षितिमूर्तयेनमइतिप्राच्यांपूजयेत् भवायजलमूर्तयेनमईशान्यां रुद्रायाग्निमूर्तये०उदीच्यांउग्रायवायुमूर्तयेनमःवायव्यां भीमायाकाशमू०प्रतीच्यां पशुपतयेयजमानमूर्तयेनमइतिनैर्ऋत्यां महादेवायसोममूर्तयेनमइतिदक्षिणस्यां ईशानायसूर्यमूर्तयेनमइत्याग्नेय्यां ततःस्तुत्वानमस्कृत्यमहादेवायनमइतिविसर्जयेदितिसंक्षेपः विस्तारस्तुपुरुषार्थचिंतामणौज्ञेयः शिवरात्रिश्चेत्पूर्वोक्तपूजाविधिः पार्थिवलिंगेपिकार्यः पार्थिवलिंगोद्यापनविधिःकौस्तुभादौज्ञेयः ॥

यानंतर मृत्तिकेच्या लिंगाचे ठिकाणीं शिवाची पूजा करणें झाल्यास त्याचा विधि सांगतों.—"ॐहराय नमः" ह्या मंत्रेंकरून मृत्तिका घेऊन ती चांगली शोधून तींत उदक घालून चांगली मळून त्याचा गोळा करून "ॐमहेश्वराय नमः" ह्या मंत्रानें लिंग करावें. तें लिंग ऐशीं गुंजाप्रमाण जो कर्ष त्याहून अधिक परिमाणाचें, अंगुष्ठप्रमाण किंवा त्याहून अधिक मोठें असें करावें, याहून लहान करूं नये. मृत्तिकेच्या लिंगाचे ठिकाणीं पंचसूत्राची कृति न केली तथापि दोष नाहीं, याकारितां "सात वेळ कांट्यामध्यें घालून वजन केलें असतां दरएक वेळेस कांहीं तरी अधिक वजन येतें, कमी होत नाहीं असें जें लिंग त्याला बाणलिंग ह्मणावें, बाकीचीं लिंगें तीं नार्मद ( नर्मदा नदींतील ) जाणावीं." याप्रमाणें सांगितलेल्या लक्षणानें युक्त असें बाणलिंग मिळणें फार दुर्लभ आहे व सुवर्ण इत्यादिकांचें

लिंग करावें तर त्याचे ठिकाणीं पंचसूत्राची जी कृति करण्याविषयीं सांगितली ती अति श्रमसाध्य आहे यास्तव सर्वांमध्यें मृत्तिकेचें लिंग श्रेष्ठ होय. कारण, " द्वापरयुगांत पाऱ्याचें लिंग उत्तम, कलीमध्यें पार्थिव ( मृत्तिकेचें ) लिंग उत्तम, " असें वचन आहे. तदनंतर " ॐशूलपाणये नमः शिव इह प्रतिष्ठितो भव, " ह्या मंत्रानें बिल्वपत्रयुक्त अशा पूजापीठाचे ठिकाणीं लिंगाची स्थापना करावी, व " ध्यायेन्नित्यं महेशं० " ह्या मंत्रानें ध्यान करून " ॐपिनाकधृषे नमः श्रीसांबशिव इहागच्छ.इह प्रतिष्ठ इह सन्निहितो भव, " असें ह्मणून आवाहन करावें. ह्या पूजेचे ठिकाणीं द्विजांनीं ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांनीं ) मूळमंत्रहि ग्रहण करावा. त्यानंतर " ॐनमःशिवाय " ह्या मूळमंत्रानें पाद्य, अर्घ्य, आचमन हे उपचार देऊन " पशुपतये नमः " ह्या मंत्रानें व मूळमंत्रानें स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, फल, तांबूल, आरती, मंत्रपुष्पांजलि इतके उपचार अर्पण केल्यानंतर " शर्वाय क्षितिमूर्तये नमः " ह्या मंत्रानें पूर्व दिशेचे ठिकाणीं पूजा करावी. " भवाय जलमूर्तये नमः " ह्या मंत्रानें ईशान्यदिशेचे ठिकाणीं, " रुद्रायाग्निमूर्तये नमः " ह्या मंत्रानें उत्तर दिशेचे ठिकाणीं, " उग्राय वायुमूर्तये नमः " ह्या मंत्रानें वायुदिशेचे ठिकाणीं, " भीमायाकाशमूर्तये० " ह्या मंत्रानें पश्चिम दिशेचे ठिकाणीं, " पशुपतये यजमानमूर्तये० " ह्या मंत्रानें नैर्ऋति दिशेचे ठिकाणीं, " महादेवाय सोममूर्तये० " ह्या मंत्रानें दक्षिण दिशेचे ठिकाणीं, " ईशानाय सूर्यमू० " ह्या मंत्रानें आग्नेय दिशेचे ठिकाणीं, याप्रमाणें आठ दिशांचे ठिकाणीं पूजा करून नंतर स्तुति करून व नमस्कार करून " महादेवाय नमः " ह्या मंत्रानें ( अक्षता टाकून ) विसर्जन करावें, याप्रमाणें संक्षेपानें पूजाविधि जाणावा. याहून विस्तार पुरुषार्थचिंतामणीमध्यें पाहावा. पूर्वीं सांगितलेली पूजा शिवरात्रीचे दिवशीं, मृत्तिकेच्या लिंगाचे ठिकाणींहि करावी. मृत्तिकेच्या लिंगाचा उद्यापनविधि कौस्तुभ इत्यादिक ग्रंथीं पाहावा.

---

**लिंगविशेषेणफलविशेषः आयुष्यंहीरजेलिंगे मौक्तिकेरोगनाशः वैडूर्येशत्रुनाशः पाद्मरागेलक्ष्मीः पुष्परागजेसुखं ऐंद्रनीलेयशः मारकतेपुष्टिः स्फाटिकेसर्वकामाः राजतेराज्यं पितृमुक्तिः हैमेसत्यलोकः ताम्रेपुष्टिरायुश्च पैत्तलेतुष्टिः कांस्येकीर्तिः लौहेशत्रुनाशः सीसजेआयुष्यं मतांतरे सौवर्णेब्रह्मस्वपरिहारःस्थिरलक्ष्मीश्च एवंगंधमये सौभाग्यं हस्तिदंतजेसेनापत्यं व्रीह्यादिधान्यपिष्टजेपुष्टिसुखरोगनाशादि माषजेस्त्रीः नावनीतेसुखं गोमयजेरोगनाशः गौडेन्नादि वंशांकुरजेवंशवृद्धिरित्यन्यत्रविस्तरः एवंलिंगसंख्याविशेषात्फलविशेषःकौस्तुभे ॥**

## कोणत्या लिंगाच्या पूजनानें कोणतें फळ मिळतें तें सांगतों.

हिऱ्याच्या लिंगाच्या पूजनानें आयुष्यवृद्धि होते. मोत्यांच्या लिंगाच्या पूजनानें रोगनाश. वैडूर्यमण्याच्या लिंगानें शत्रुनाश. माणिकाच्या लिंगानें लक्ष्मीप्राप्ति. पुष्पराजमण्याच्या लिंगानें सुखप्राप्ति. नीळमण्याच्या लिंगानें यश. पाचरत्नाच्या लिंगानें पुष्टि. स्फटिकाच्या लिंगानें सर्वमनोरथप्राप्ति. रुप्याच्या लिंगानें राज्य व पितृमुक्ति. सुवर्णाच्या लिंगानें सत्यलोकप्राप्ति.

तांब्याच्या लिंगानें पुष्टि व आयुष्य. पितळेच्या लिंगानें संतोष. कांस्याच्या लिंगानें कीर्ति. लोखंडाच्या लिंगानें शत्रुनाश. शिस्याच्या लिंगानें आयुष्यवृद्धि. दुसऱ्या ग्रंथकारांच्या मतीं— सुवर्णाच्या लिंगानें ऋणमुक्ति, व स्थिर लक्ष्मी. गंधाच्या लिंगानें सौभाग्य. हस्तिदंताच्या लिंगानें सेनेचें आधिपत्य. तांदूळ इत्यादिक धान्याचे पिठाच्या लिंगानें पुष्टि, सुख, रोगनाश इत्यादिक. उडीद यांचे पिठाचें लिंग करून पूजन केलें असतां स्त्रीप्राप्ति. नवनीताच्या लिंगानें सुख. गोमयाच्या लिंगानें रोगनाश. गुळाच्या लिंगानें अन्न इत्यादिक. वेळूचे अंकुर आणून त्यांचें लिंग करून पूजा केल्यानें वंशवृद्धि होते. याप्रमाणें दुसऱ्या ग्रंथीं विस्तार सांगितला आहे. याप्रमाणें लिंगाच्या संख्याविशेषेंकरून फलाचा विशेष कौस्तुभांत पहावा.

---

**शिवनिर्माल्यग्रहणाग्रहणविचारस्तृतीयपरिच्छेदेज्ञेयः मासशिवरात्रिनिर्णयःप्रथमपरिच्छेदेउक्तः शिवरात्रिव्रतोद्यापनंकौस्तुभादौज्ञेयं मासशिवरात्रिव्रतोद्यापनमपिकौस्तुभेस्पष्टं माघामावास्यायामपराण्हव्यापिन्यांयुगादित्वादपिंडकंश्राद्धंकार्यं तच्चदर्शश्राद्धेनसहतंत्रेकार्यं माघामावास्यायांशततारकायोगेपरमःपुण्यकालस्तत्रश्राद्धात्परमापितृतृप्तिः धनिष्ठायोगेतुतिलान्नेनश्राद्धंकार्यं तेनवर्षायुतकालंपितृतृप्तिः इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारेमाघमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥**

शिवाचा निर्माल्य ग्रहण करावा किंवा न करावा याच्या निर्णयाचा विचार तृतीय परिच्छेदांत पाहावा. मासशिवरात्रीचा निर्णय प्रथम परिच्छेदांत सांगितला आहे. शिवरात्रिव्रताचे उद्यापनाचा विधि कौस्तुभ इत्यादिक ग्रंथीं पाहावा. मासशिवरात्रीचे व्रताचें उद्यापनहि कौस्तुभांत स्पष्ट सांगितलें आहे. माघ अमावास्या ही युगादि आहे याकरितां अपराण्हकालव्यापिनी अशा ह्या अमावास्येचे दिवसीं अपिंडक श्राद्ध करावें, व तें युगादिश्राद्ध दर्शश्राद्धाबरोबर एकतंत्रानें करावें. माघअमावास्येचे दिवसीं शततारकानक्षत्राचा योग असेल तर तो अतिपुण्यकाल व त्या पुण्यकालीं श्राद्ध केलें असतां अत्यंत पितरांची तृप्ति होते. धनिष्ठानक्षत्राचा योग असेल तर तिळयुक्त अन्नानें श्राद्ध करावें, तेणेंकरून दाहा सहस्र वर्षेंपर्यंत पितरांची तृप्ति होते. इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे माघमासकृत्यनिर्णयउद्देशः समाप्तः ॥

---

**अथफाल्गुनमासः मीनसंक्रांतौपराः षोडशनाड्यःपुण्याः रात्रौतुप्रागुक्तं फाल्गुनेगोव्रीहिवस्त्रदानंगोविंदप्रीतयेकार्यं अथफाल्गुनशुक्लप्रतिपदमारभ्यद्वादशदिनपर्यंतंपयोव्रतंश्रीभागवतेउक्तं तत्प्रयोगोमूलानुसारेणोह्यः ॥**

## आतां फाल्गुनमासांतील कृत्यें सांगतों.

मीनसंक्रांतीच्या पुढच्या सोळा घटिका पुण्यकाळ. रात्रीं संक्रांति होईल तर त्याचा निर्णय पूर्वीं सांगितला आहे. गोविंदाचा संतोष होण्यासाठीं फाल्गुन मासांत गाई, तांदूळ, वस्त्रें यांचीं दानें करावीं. यानंतर, फाल्गुनशुक्ल प्रतिपदेपासून बारा दिवसपर्यंत पयोव्रत क-

रावें, व तें श्रीमद्भागवतांत ( अष्टमस्कंधीं ) सांगितलें आहे. त्याचा प्रयोग मूळाप्रमाणें ( भागवतांत सांगितल्याप्रमाणें ) जाणावा.

---

**फाल्गुनीपौर्णमासीमन्वादिःसापौर्वाण्हिकीग्राह्या इयमेवहोलिकासाप्रदोषव्यापिनीभद्रारहिताग्राह्या दिनद्वयेप्रदोषव्याप्तौपरदिनेप्रदोषैकदेशव्याप्तौवापरैव पूर्वदिनेभद्रादोषात् पर** दिनेप्रदोषस्पर्शाभावेपूर्वदिनेप्रदोषेभद्रासत्त्वेयदिपूर्णिमापरदिने सार्धत्रियामा ततोधिकावात त्परदिनेचप्रतिपद्वृद्धिगामिनीतदापरदिनेप्रतिपदिप्रदोषव्यापिन्यांहोलिकाउक्तविषयेयदि प्रतिपदोह्रासस्तदापूर्वदिनेभद्रापुच्छेवा भद्रामुखमात्रंत्यक्त्वा भद्रायामेववाहोलिकादीपनं परदिनेप्रदोषस्पर्शाभावेपूर्वदिनेयदिनिशीथात्प्राक्भद्रासमाप्तिस्तदाभद्रावसानोत्तरमेवहोलिकादीप **नं निशीथोत्तरंभद्रासमाप्तौभद्रामुखंत्यक्त्वाभद्रायामेव प्रदोषेभद्रामुखव्याप्तेभद्रोत्तरंप्रदोषोत्त रंवा** दिनद्वयेपिपूर्णिमायाःप्रदोषस्पर्शाभावेपूर्वदिनएवभद्रापुच्छेतदलाभेभद्रायामेवप्रदोषोत्त **रमेव**होलिका रात्रौपूर्वार्धभद्रायाग्राह्यत्वोक्तेः नतुपूर्वप्रदोषादौचतुर्दश्यांनवापरत्रसायान्हादौ **दिवा**होलिकादीपनंतुसर्वग्रंथविरुद्धं इदंहोलिकापूजनंश्रवणाकर्मादिवद्धुक्त्वापिकुर्वंति युक्तं **चैतत्** केचिद्धोलिकापूजनंकृत्वाभुंजतेतेषांभोजनस्यपूजनस्यवाननियमेनशास्त्रविहितकालला **भः** इदंचंद्रग्रहणसत्त्वेवेधमध्येकार्यं ग्रस्तोदयेपरदिनेप्रदोषेपूर्णिमासत्त्वेग्रहणमध्यएवकार्यं **अन्यथापूर्वेदिने ॥**

फाल्गुनी पौर्णिमा ही मन्वादि आहे. ती पूर्वाण्हकालव्यापिनी घ्यावी. ह्या पौर्णिमेलाच होलिका असें ह्मणतात. ती होलिकापौर्णिमा प्रदोषव्यापिनी असून कल्याणीविरहित असी घ्यावी. दोन दिवस प्रदोषव्यापिनी असेल अथवा दुसऱ्या दिवसीं प्रदोषकालीं एकदेशव्याप्ति असेल तर पूर्व दिवसीं कल्याणीदोष आहे याकरितां दुसऱ्या दिवसाचीच घ्यावी. दुसऱ्या दिवसीं प्रदोषकालीं स्पर्श नसेल आणि पूर्व दिवसीं प्रदोषकालीं कल्याणी असून जर पौर्णिमा दुसऱ्या दिवसीं साडेतीन प्रहर किंवा त्याहून अधिक असेल आणि त्याच्या पुढच्या दिवसीं प्रतिपदा वाढती तिथि असेल तर प्रदोषव्यापिनी प्रतिपदेचे ठिकाणीं होलिका करावी. जर पूर्वी सांगितलेल्या प्रसंगीं प्रतिपदा तिथीचा क्षय असेल तर पूर्व दिवसीं कल्याणीच्या पुच्छाचे ठिकाणीं किंवा कल्याणीचें मुखमात्र टाकून कल्याणीमध्येंच होलिका प्रदीप्त करावी. दुसऱ्या दिवसीं प्रदोषकालीं पौर्णिमेचा स्पर्श नसेल व पूर्व दिवसीं जर मध्यरात्रीच्या पूर्वी कल्याणी समाप्त होईल तर कल्याणी संपल्यानंतरच होलिका प्रदीप्त करावी. जर मध्यरात्रीच्या नंतर कल्याणी संपेल तर कल्याणीचें मुखमात्र टाकून कल्याणीमध्येंच होलिका प्रदीप्त करावी. प्रदोषकालीं कल्याणीचें मुख असेल तर कल्याणीच्या नंतर, किंवा प्रदोषकालानंतर होळी प्रदीप्त करावी. जर दोनहि दिवसीं प्रदोषकालीं पौर्णिमेचा स्पर्श नसेल तर पूर्व दिवसींच भद्रापुच्छांत प्रदीप्त करावी. कल्याणीचें पुच्छ नसेल तर कल्याणीमध्येंच प्रदोषकालानंतरच होळी प्रदीप्त करावी. कारण, रात्रीमध्यें पूर्व रात्रीची कल्याणी घ्यावी असें वचन आहे. परंतु पूर्वदिवसाच्या प्रदोष इत्यादिक कालीं चतुर्दशीचे ठिकाणीं किंवा दुसऱ्या दिवसीं सायान्ह इत्यादिककालीं होळी प्रदीप्त करूं नये. दिवसा होळी प्रदीप्त करणें हें सर्व

ग्रंथांशीं विरुद्ध आहे. हें होळीचें पूजन, श्रवणाकर्मादिकाप्रमाणें भोजन करून करितात, आणि तसें करणें योग्य आहे. जे कितीएक लोक होळीची पूजा करून नंतर भोजन करितात त्यांला नियमेंकरून भोजनाला किंवा पूजेला शास्त्रोक्त काळ मिळत नाहीं. ही होळीची पूजा चंद्रग्रहण असेल तर वेधामध्येंहि करावी. ग्रहण ग्रस्तोदय असून दुसऱ्या दिवसीं प्रदोषकालीं पौर्णिमा असेल तर ग्रहणामध्येंच पूजा करावी. प्रदोषकालीं पौर्णिमा नसेल तर पूर्वदिवसीं पूजा करावी.

---

अथभद्रामुखपुच्छलक्षणं पूर्णिमायांभद्रायास्तृतीयपादांतेघटीत्रयंपुच्छं चतुर्थपादाद्यघटीपंचकंमुखं तथाचमध्यममानेनषष्टिघटीमितायांपूर्णिमायांपूर्णिमाप्रवृत्त्युत्तरंसार्धैकोनविंशतिघटिकोत्तरंघटीत्रयंपुच्छं सार्धद्वाविंशतिघटिकोत्तरंघटीपंचकंमुखं तिथेश्चतुःषष्टिघटीमितत्वेपूर्णिमायाएकविंशतिघटिकोत्तरंपुच्छं चतुर्विंशतिघटिकोत्तरंमुखं एवंतिथेर्मानांतरेप्यूह्यं॥

## आतां कल्याणीचें मुख आणि पुच्छ यांचें लक्षण सांगतों.

पौर्णिमेचे ठिकाणीं कल्याणीच्या तिसऱ्या पादाच्या शेवटच्या ज्या तीन घटिका तें कल्याणीचें पुच्छ होय, आणि चवथ्या पादाच्या पहिल्या ज्या पांच घटिका तें मुख होय. तसेंच मध्यम मानानें साठ घटिका पौर्णिमा असतां पौर्णिमेच्या आरंभानंतर साडे एकोणीस घटिका गेल्यानंतर ज्या तीन घटिका तें पुच्छ होय, व साडे बेवीस घटिका गेल्यानंतर ज्या पांच घटिका तें मुख होय. जर चौसष्ट घटिका पौर्णिमा असेल तर पौर्णिमेच्या एकवीस घटिका गेल्यानंतर पुच्छ व चोवीस घटिका गेल्यानंतर मुख, याप्रमाणें तिथीच्या दुसऱ्या मानाविषयींहि मुख व पुच्छ यांचा निर्णय जाणावा.

---

अथपूजाविधिः देशकालौसंकीर्त्यसकुटुंबस्यममढुंढाराक्षसीप्रीत्यर्थंतत्पीडापरिहारार्थंहोलिकापूजनमहंकरिष्येइतिसंकल्प्य शुष्कानांकाष्ठानांगोमयपिंडानांचराशिंकृत्वावन्हिनाप्रदीप्यतत्र अस्माभिर्भयसंत्रस्तैःकृतात्वंहोलिकेयतः अतस्त्वांपूजयिष्यामिभूतेभूतिप्रदाभवेति पूजामंत्रेणश्रीहोलिकायैनमोहोलिकामावाहयामीत्यावाह्य होलिकायैनमइतिमंत्रेणासनपाद्यादिषोडशोपचारान्दत्वा तमग्निंत्रिःपरिक्रम्यगायंतुचहसंतुच जल्पंतुस्वेच्छयालोकानिःशंकायस्ययन्मतं ज्योतिर्निबंधे पंचमीप्रमुखास्तासुतिथयोनंतपुण्यदाः दशस्युःशोभनास्तासुकाष्ठस्तेयंविधीयते चांडालसूतिकागेहाच्छिशुहारितवन्हिना प्राप्तायांपूर्णिमायांतुकुर्यात्तत्काष्ठदीपनं ग्रामाद्बहिश्चमध्येवातूर्यनादसमन्वितः स्नात्वाराजाशुचिर्भूत्वास्वस्तिवाचनतत्परः दत्वादानानिभूरीणिदीपयेद्धोलिकाचितिं ततोभ्युक्ष्यचितिंसर्वांसाज्येनपयसासुधीः नालिकेरानिदेयानिबीजपूरफलानिच गीतवाद्यैस्तथानृत्यैरात्रिःसानीयतेजनैः तमग्निंत्रिःपरिक्रम्यशब्दैर्लिंगभगांकितैः तेनशब्देनसापापाराक्षसीतृप्तिमाप्नुयात् एवंरात्रौहोलिकोत्सवंकृत्वाप्रातःप्रतिपदियःश्वपचंदृष्ट्वास्नानंकुर्यात् नतस्यदुष्कृतंकिंचिन्नाधयोव्याधयोपिच कृत्वाचावश्यकार्याणिसंतर्प्यपितृदेवताः वंदयेद्धोलिकाभूतिंसर्वदुष्टोपशांतये वंदनेमंत्रः वंदितासिसुरेंद्रेणब्रह्मणाशंकरेणच अतस्त्वंपाहिनोदेविभूतेभूतिप्रदाभवेति होलिकादिनंकरिसंज्ञकंतदुत्तरदिनंचशुभेवर्ज्यं होलि

काग्रहणभावुकायनप्रेतदाहदिवसोत्रपंचमःतत्परंचकरिसंज्ञकंदिनंवर्जितं सकलकर्मसुभयमि त्युक्तेः ग्रहणायनप्रेतदाहेषुनिशीथविभागेनपूर्वदिनपरदिनयोर्निर्णयोज्ञेयः नरोदोलागतंदृष्ट्वा गोविंदंपुरुषोत्तमं फाल्गुन्यांसंयतोभूत्वागोविंदस्यपुरंव्रजेत् ॥

## आतां होळीच्या पूजेचा विधि सांगतों.

देशकालांचा उच्चार करून "सकुटुंबस्य मम ढुंढाराक्षसीप्रीत्यर्थं तत्पीडापरिहारार्थं होलिकापूजनमहं करिष्ये," असा संकल्प करून सुकीं काष्ठें व गोवऱ्या यांची राशि करून ती राशि अग्नीनें पेटवून त्याच्यावर "अस्माभिर्भयसंत्रस्तैः कृतात्वं होलिके यतः ॥ अतस्त्वां पूजयिष्यामि भूते भूतिप्रदा भव," ह्या पूजेच्या मंत्रानें, "श्रीहोलिकायै नमः होलिकां आवाहयामि," असें आवाहन करून "होलिकायै नमः" ह्या नाममंत्रानें आसन, पाद्य इत्यादिक सोळा उपचार समर्पण करून "त्या अग्नीला तीन प्रदक्षिणा करून ज्यांचें जसें मत असेल तदनुसार निःशंकपणानें लोकांनीं गायन, हास्य, आपल्या इच्छेनुरूप आलाप करावे." ज्योतिर्निबंध ग्रंथांत—"शुद्ध पंचमीपासून वद्य पंचमीपर्यंत ज्या पंधरा तिथि त्यांमध्यें दहा तिथि उत्तम व असंख्य पुण्यकारक होत, व त्या तिथींचे ठिकाणीं काष्ठें, गोवऱ्या यांची चोरी करावी, आणि चांडाल, बाळंतीण यांच्या घरांतून बालांनीं हरण केलेल्या अग्नीनें पूर्णिमेच्या दिवशीं गांवाच्या बाहेर किंवा मध्यें तीं काष्ठें दीपन करावीं. राजानें वाद्यांचा गजर करवून नंतर स्नान करून शुद्ध होऊन पुण्याहवाचन करून बहुत दानें द्यावीं, व होळी प्रदीप्त करावी. नंतर दूध व घृत यांहींकरून ती सर्व होळी विझवून नारळ, महाळुंगें वांटावीं. तसेंच लोकांनीं गायनें, वाद्यें, नृत्यें यांहींकरून आनंदानें ती रात्र घालवावी. व लिंग, भग यांहीं युक्त असे बीभत्स शब्द बोलून अग्नीला तीन प्रदक्षिणा कराव्या. त्या बीभत्स शब्दांनीं पापरूपिणी ती ढुंढा राक्षसी तृप्त होते." याप्रमाणें रात्रीमध्यें होळीचा उत्सव करून प्रातःकालीं प्रतिपदेचे दिवशीं चांडालाला स्पर्श करून स्नान करावें, "तेणेंकरून त्यांला कोणतें पातक, मानसी व्यथा, व्याधि हीं होत नाहींत. नित्य कृत्यें करून पितर, देव यांचें तर्पण करून सर्व अरिष्टांचा नाश होण्याकरितां होळीच्या विभूतीला नमस्कार करावा.—नमस्काराचा मंत्र—"वंदितासि सुरेंद्रेण ब्रह्मणा शंकरेण च ॥ अतस्त्वं पाहि नो देवि भूते भूतिप्रदा भव." होळीचा दिवस, आणि त्याच्या पुढचा करिदिवस हे शुभकार्याला वर्ज्य करावे. कारण, "होळीचा दिवस, ग्रहणदिवस, भावुकादिवस (वैशाख अमावास्या), अयनसंक्रांतींचे दिवस दोन आणि प्रेतदहनाचा दिवस, व ह्यांचे पुढचा करिदिवस हे सर्व शुभ कर्माला वर्ज्य करावे" असें वचन आहे. ग्रहणदिवस, अयनदिवस व प्रेतदाहदिवस यांचे ठिकाणीं मध्यरात्रीच्या विभागानें पूर्वदिवस व करिदिवस यांचा निर्णय समजावा. "फाल्गुनी पौर्णिमेचे दिवशीं पुरुषोत्तम जो गोविंद त्याला हिंदुळ्यामध्यें बसवून झोंपा काढाव्या आणि त्याचें दर्शन घ्यावें, तेणेंकरून वैकुंठाला जातो."

---

फाल्गुनकृष्णप्रतिपदिवसंतारंभोत्सवःसाचौदयिकीग्राह्या दिनद्वयेसत्त्वेपूर्वा अत्रतैलाभ्यंगउक्तः अत्रप्रतिपदिचूतपुष्पप्राशनमुक्तं तत्प्रकारः गोमयोपलिप्तेगृहांगणेशुक्लवस्त्रासन

उपविष्टःप्राङ्मुखःसुवासिन्याकृतचंदनतिलकनीराजनःसचंदनमाम्रकुसुमंप्राश्नीयात् तत्र मंत्रः चूतमग्र्यंवसंतस्यमाकंदकुसुमंतव सचंदनंपिबाम्यद्यसर्वकामार्थसिद्धयइति ॥

फाल्गुनकृष्ण प्रतिपदेचे दिवसीं वसंताच्या आरंभाचा उत्सव करावा. त्या उत्सवाविषयीं प्रतिपदा सूर्योदयव्यापिनी घ्यावी. दोन दिवस सूर्योदयव्यापिनी असल्यास पूर्व दिवसाची घ्यावी. ह्या प्रतिपदेचे दिवसीं तैलाभ्यंग करावा. ह्या प्रतिपदेचे दिवसीं आंब्याचा महूर भक्षण करावा. त्याच्या भक्षणाचा विधि असा,—गोमयानें सारवलेल्या अंगणामध्यें आसन घालून त्याजवर पांढरें वस्त्र घालून त्याजवर पूर्वाभिमुख बसावें. नंतर सुवासिनीकडून चंदनाचा तिलक, आरती करवून चंदनयुक्त असा आंब्याचा महूर भक्षण करावा. भक्षणाचा मंत्र—" चूतमग्र्यं वसंतस्य माकंद कुसुमं तव ॥ सचंदनं पिबाम्यद्य सर्वकामार्थसिद्धये. "

---

कृष्णद्वितीयायांदेशग्रामाधिपतिर्वितते वितानादिशोभितेदेशेरम्यासनेउपविश्य पौरजानपदान्लोकान्सिंदूरादिक्षोदैःचंदनादिभिः पट्टवासैश्चविकीर्यतेभ्यस्तांबूलादिदत्वानृत्यगीतविनोदैर्महोत्सवंकुर्यात् इदानींप्राकृतजनास्तुकृष्णपंचमीपर्यंतमेतमुत्सवंकुर्वंति इतिहोलिकोत्सवः॥

फाल्गुनकृष्णपक्षांतील द्वितीयेचे दिवसीं देश, गांव, खेडीं यांच्या अधिपतीनें विस्तृत असी जागा पाहून तेथें मोठें छत इत्यादिक देऊन जागा सुशोभित करावी, व तेथें उत्तम आसन मांडून त्याजवर त्या गांवाच्या अधिपतीनें बसून नगरवासी व देशवासी, अशा सर्व आपल्या लोकांवर शेंदूर, गुलाल, चंदन, बुका इत्यादिक टाकून त्यांला तांबूल इत्यादिक देऊन नृत्य, गायन, विनोद इत्यादिक करून मोठा उत्सव करावा. हल्लीं प्राकृत लोक तर कृष्ण पंचमीपर्यंत हा उत्सव करितात. याप्रमाणें होळीचा उत्सव समाप्त झाला.

---

फाल्गुनामावास्यामन्वादिः सापराण्हव्यापिनीग्राह्या इतिश्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारेफाल्गुनमासकृत्यनिर्णयउद्देशःसमाप्तः ॥

फाल्गुन अमावास्या ही मन्वादि तिथि आहे. ती अपराण्हकालव्यापिनी घ्यावी. इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे फाल्गुनमासकृत्यनिर्णय-उद्देशः समाप्तः ॥

---

अथपरिच्छेदद्वयशेषाख्यंप्रकीर्णप्रकरणमुच्यते द्वादशस्वपिमासेषुश्राद्धेव्यतीपातादियोगस्यभरण्यादिनक्षत्रस्यचापराण्हव्याप्त्यादर्शवन्निर्णयोज्ञेयः उपवासादौप्रचुराचाराभावान्नोक्तः अथचांद्रसांवत्सरभेदाःप्रभवोविभवःशुक्लःप्रमोदोथप्रजापतिः अंगिराःश्रीमुखोभावोयुवाधातातथैवच १ ईश्वरोबहुधान्यश्चप्रमाथीविक्रमोवृषः चित्रभानुःसुभानुश्चतारणःपार्थिवोव्ययः २ सर्वजित्सर्वधारीचविरोधीविकृतिःखरः नंदनोविजयश्चैवजयोमन्मथदुर्मुखौ ३ हेमलंबीविलंबीचविकारीशार्वरीप्लवः शुभकृच्छोभकृत्क्रोधीविश्वावसुपराभवौ ४ प्लवंगःकीलकःसौम्यःसाधारणविरोधकृत् परिधावीप्रमादीचआनंदोराक्षसोनलः ५ पिंगलःकालयुक्तश्चसिद्धार्थीरौद्रदुर्मतिः दुंदुभीरुधिरोद्गारीरक्ताक्षीक्रोधनःक्षयः इति ६ रवेःराशिसंक्रमवन्नक्षत्रसंक्रमेपिषोडशनाड्यःपूर्वत्रपरत्रचपुण्यकालः ॥

## आतां यानंतर दोन परिच्छेदांतील बाकी राहिलेले किरकोळ निर्णय सांगतों.

बारा मासांमध्येंहि व्यतीपात इत्यादिक जे योग त्या योगांचा व भरणी इत्यादिक जीं नक्षत्रें त्यांचा श्राद्धाविषयीं निर्णय अपराण्हकालव्याप्तीनें दर्शाप्रमाणें जाणावा. व्यतीपात इत्यादिक योग व भरण्यादिक नक्षत्रें यांचे ठिकाणीं उपोषण इत्यादिक करण्याचा विशेष आचार नाहीं, याकरितां त्याचा निर्णय सांगितला नाहीं. **यानंतर चांद्र संवत्सरांचीं नांवें सांगतों–** "प्रभव, विभव, शुक्ल, प्रमोद, प्रजापति, अंगिरा, श्रीमुख, भाव, युवा, धाता, ईश्वर, बहुधान्य, प्रमाथी, विक्रम, वृष, चित्रभानु, सुभानु, तारण, पार्थिव, व्यय, सर्वजित्, सर्वधारी, विरोधी, विकृति, खर, नंदन, विजय, जय, मन्मथ, दुर्मुख, हेमलंबी, विलंबी, विकारी, शार्वरी, प्लव, शुभकृत्, शोभकृत्, क्रोधी, विश्वावसु, पराभव, प्लवंग, कीलक, सौम्य, साधारण, विरोधकृत्, परिधावी, प्रमादी, आनंद, राक्षस, अनल, पिंगल, काल्युक्त, सिद्धार्थी, रौद्र, दुर्मति, दुंदुभि, रुधिरोद्गारी, रक्ताक्षी, क्रोधन आणि क्षय." याप्रमाणें साठ चांद्र संवत्सरांचीं नांवें होत. सूर्याच्या संक्रांतीचा जसा पुण्यकाल पूर्वी सांगितला त्याप्रमाणें नक्षत्राच्या संक्रांतीचाहि, पुढच्या व मागच्या सोळा सोळा घटिका पुण्यकाळ जाणावा.

---

अथचंद्रादीनांसंक्रांतौपुण्यकालः चंद्रस्यसंक्रांतौप्राक्परत्रचत्रयोदशपलाधिकाएकाघटी पुण्यकालः भौमस्यैकपलाधिकाश्चतस्रोनाड्यः बुधस्यचतुर्दशपलाधिकास्तिस्रः गुरोःसप्तत्रिंशत्पलाधिकाश्चतस्रः शुक्रस्यैकपलाधिकाश्चतस्रः शनेःसप्तपलाधिकाः षोडश एताःसर्वाः प्राक्परत्रचबोद्धव्याःरात्रौग्रहांतराणांसंक्रमेरात्रावेवपुण्यकालः सूर्यसंक्रांतिवद्दिवापुण्यत्व विधायकाभावात्चंद्रादिसंक्रांतिषुस्नानंकाम्यंनतुनित्यं ॥

## आतां चंद्र, मंगळ इत्यादि ग्रहांच्या संक्रांतीचा पुण्यकाळ सांगतों.

चंद्राच्या संक्रांतीचा पूर्वींची व पुढची एक घटिका आणि तेरा पळें पुण्यकाळ. मंगळाच्या संक्रांतीचा चार घटिका एक पळ पुण्यकाळ. बुधाच्या संक्रांतीचा तीन घटिका चवदा पळें पुण्यकाळ. बृहस्पतीच्या संक्रांतीचा चार घटिका सततीस पळें पुण्यकाळ. शुक्राच्या संक्रांतीचा चार घटिका एक पळ पुण्यकाळ. शनीच्या संक्रांतीचा सोळा घटिका सात पळें पुण्यकाळ. ह्या सर्व पुण्यकाळाच्या घटिका मागच्या व पुढच्या याप्रमाणें जाणाव्या. सूर्यावांचून इतर ग्रहांच्या संक्रांति रात्रीचे ठिकाणीं झाल्या असतां रात्रीचे ठिकाणींच पुण्यकाळ. कारण, सूर्यसंक्रांतीसारखा दिवसा पुण्यकाळ घेण्याविषयीं वचन नाहीं. चंद्र इत्यादि ग्रहांच्या संक्रांतींचे दिवसीं स्नान करणें तें काम्य आहे, नित्य नाहीं.

---

आदित्यादिसूचितपीडानिरासार्थंस्नानानि मंजिष्ठागजमदकुंकुमरक्तचंदनानिजलपूर्णे ताम्रपात्रेप्रक्षिप्यस्नानंसूर्यपीडाहरं उशीरशिरीषकुंकुमरक्तचंदनयुतशंखतोयेनस्नानंचंद्रदोषहरं खदिरदेवदारुतिलामलकयुतरौप्यपात्रजलेनस्नानंभौमे गजमदयुतसंगमजलेनमृत्पात्रस्थेनस्नानंबुधे औदुंबरबिल्ववटामलकानांफलैर्युतसौवर्णपात्रजलेनस्नानंगुरौ गोरोचनगजमदशतपुष्पाशतावरीयुतराजतपात्रजलेनस्नानंशुक्रे तिलमाषप्रियंगुगंधपुष्पयुतलोहपात्रस्थजलेन

इच्छा करणारानें विषमदिवसीं गमन करावें, त्यामध्येंहि पुढच्या पुढच्या रात्रि प्रशस्त होत. एका रात्रीमध्यें एकवेळच गमन करावें. एकवार गमन करणें तेंहि सर्व समरात्रींचे ठिकाणीं अवश्य करावें असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. इतर कालीं कांहींएक प्रतिबंधादिकानें गमन न होईल तर श्राद्धदिवस, एकादशी दिवस या कालींहि गमन करावें, असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. स्त्रियांच्या कामाचा नाश करणारा पापी होईल असा वर स्मरण करीत होत्साता स्त्रियेच्या इच्छेनें ऋतुकालाव्यतिरिक्तहि गमन करील तथापि दोषी होत नाहीं; तर ब्रह्मचर्याचा नाश मात्र होतो. "जो ऋतुकालीं स्त्रियेचे ठिकाणीं गमन करितो, आणि ऋतुकालाव्यतिरिक्त कदापि गमन करीत नाहीं, तो जिवंत आहेपर्यंत ब्रह्मचारी असें ऋषींनीं सांगितलें आहे." अष्टमी, चतुर्दशी, पौर्णिमा, अमावास्या, सूर्यसंक्रांति, वैधृती, व्यतीपात, परिघाचें पूर्वार्ध, कल्याणी, संधिकाल, मातापितरांचा मृतदिवस, श्राद्धदिवस, श्राद्धाच्या पूर्वीचा दिवस, जन्मनक्षत्र आणि दिवसा इतक्या कालीं स्त्रीगमन वर्ज्य करावें.

---

**अथगर्भाधानकालः चतुर्थीषष्ठीचतुर्दश्यष्टमीपंचदशीरहितास्तिथयःप्रशस्ताः चंद्रबुधगुरुशुक्रवाराःशुभाः मूलमघारेवतीज्येष्ठानक्षत्राणिवर्ज्यानि भरणीकृत्तिकार्द्राश्लेषापूर्वात्रयविशाखामध्यमानि शेषाणिशुभानि सर्वकार्येषुगोचरेचंद्रबलमावश्यकं तद्यथा चंद्रोन्नमधनंसौख्यंरोगंकार्यक्षतिंश्रियं स्त्रियंमृत्युंनृपभयंसुखमायंव्ययंक्रमात् १ स्थानेषुद्वादशस्वेतज्जन्मराशेःप्रयच्छति शुक्लपक्षेशशीश्रेष्ठोद्विपंचनवमेष्वपि २ अनेकभार्यस्यऋतुयौगपद्येविवाहक्रमेणऋतुप्राप्तिक्रमेणवागर्भाधानं ऋतावप्यगमनेदोषापवादः व्याधितोबंधनस्थोवाप्रवासेष्वथपर्वसु वृद्धांवंध्यामसद्वृत्तांमृतापत्यामपुष्पिणीं कन्यासूंबहुपुत्रांचअगच्छन्नैवदोषभाक् ॥**

## आतां गर्भाधानाचा काल सांगतों.

चतुर्थी, षष्ठी, चतुर्दशी, अष्टमी, पौर्णिमा, अमावास्या, ह्या तिथि वर्ज्य करून बाकी तिथि गर्भाधानाला ग्रहण कराव्या. सोमवार, बुधवार, गुरुवार, शुक्रवार हे वार गर्भाधानाला शुभ होत. मूळ, मघा, रेवती, ज्येष्ठा हीं नक्षत्रें वर्ज्य करावीं. भरणी, कृत्तिका, आर्द्रा, आश्लेषा, तीन पूर्वा ( पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा), विशाखा हीं मध्यम होत. बाकी राहिलीं तीं शुभ जाणावीं. सर्व कार्याचे ठिकाणीं गोचरीं चंद्रबल अवश्य असावें. तें असें,–"अन्नलाभ, धननाश, सुख, रोग, कार्यनाश, धनलाभ, स्त्रीलाभ, मृत्यु, राजभय, सुख, धनलाभ, धननाश याप्रमाणें चंद्र, आपल्या जन्मराशीपासून बारा स्थानांवर असतां क्रमेंकरून फल देतो." शुक्लपक्षामध्यें दुसरा, पांचवा, नववा चंद्र शुभ होय. ज्याला अनेक स्त्रिया असून त्या स्त्रियांला ऋतुदर्शन एकसमयीं होईल तर त्यानें गर्भाधान; विवाहाच्या क्रमानें किंवा ऋतुदर्शनाच्या क्रमानें करावें. **ऋतुकालींहि गमन न केलें असतां दोषाचा अपवाद सांगतों**– "व्याधिष्ट, बंधनांत सांपडलेला किंवा प्रवासांत गेलेला, पर्वदिवसीं," अशा समयीं ऋतुकालीं स्त्रीगमन न केल्या-

विषयीं दोष नाहीं.— आणि "वृद्धा, वंध्या ( वांझ ), दुराचरणी, मृतवंध्या, रजोदर्शनविरहित, कन्या प्रसवणारी आणि बहुपुत्रा अशा स्त्रीशीं गमन न केलें असतां दोषी होत नाहीं.

---

तत्रप्रथमर्तुगमनंगर्भाधानहोमंगृह्याग्नौकृत्वाकार्यं द्वितीयादिकऋतुगमनेचनहोमादिकं येषांसूत्रेहोमोनोक्तस्तैर्होमवर्ज्यमंत्रपाठादिरूपोगर्भाधानसंस्कारःप्रथमगमनेकार्यः आहिताग्नेरर्धाधानिनोऽनाहिताग्नेश्चौपासनाग्निसिद्धिसत्त्वेतत्रैवहोमः औपासनाग्निविच्छेदेद्वादशदिनपर्यंतमयाश्चेत्याज्याहुत्याततऊर्ध्वंप्रायश्चित्तपूर्वकंपुनःसंधानविधिनाग्निमुत्पाद्यतत्रकार्यः तत्रप्रत्यब्दंप्राजापत्यकृच्छ्रप्रायश्चित्तं तत्रेत्थंसंकल्पः ममगृह्याग्निविच्छेददिनादारभ्यैतावंतंकालंगृह्याग्निविच्छेदजनितदोषपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गृह्याग्निविच्छेददिनादारभ्यैतावदब्दपर्यंतं प्रत्यब्दमेकैककृच्छ्रान्यथाशक्तितत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतरजतनिष्कनिष्कार्धनिष्कपादनिष्कपादार्धान्यतमद्रव्यदानेनाहमाचरिष्ये तथाएतावद्दिनेषुगृह्याग्निविच्छेदेनलुप्तसायंप्रातरौपासनहोमद्रव्यं लुप्तदर्शपौर्णमासस्थालीपाकादिकर्मपर्याप्तव्रीह्याद्याज्यद्रव्यंचतन्निष्क्रयंवादातुमहमुत्सृजे कृच्छ्रप्रत्याम्नायांतरचिकीर्षायांतथोहःकार्यः अशीतिगुंजात्मकोनिष्कपादः अयंचतुर्गुणितोनिष्कः एवंसंकल्प्य विच्छिन्नस्यगृह्याग्नेःपुनःसंधानंकरिष्यइतिसंकल्पपूर्वकंस्वस्वसूत्रानुसारेणगृह्याग्निंसंसाधयेत् सर्वाधानिनापिएवमेवपुनःसंधानेनगृह्याग्निमुत्पाद्यगर्भाधानपुंसवनादिहोमःकार्यः तत्रकृच्छ्रसंकल्पोहोमादिद्रव्यदानसंकल्पश्चनकार्यः गर्भाधानहोमंकर्तुंगृह्यपुनःसंधानंकरिष्यइत्येवसंकल्पः गर्भाधानांतेऽग्नित्यागः अर्धाधानिनामपिपक्षद्वयं गृह्याग्नौसायंप्रातर्होमःस्थालीपाकाःकार्याइत्येकः गृह्याग्निःकेवलंसंरक्ष्योनतुतत्रहोमादिकार्यमित्यपरः आद्यपक्षेपूर्वोक्तहोमादिद्रव्यदानंकार्यं होमाद्यकरणपक्षेप्रायश्चित्तमात्रंकार्यं नतुद्रव्यदानं द्विभार्यस्याग्निद्वयसंसर्गात्पूर्वमुभयाग्न्यनुगतौ उभयविच्छेददिनादब्दगणनयापृथक्पृथक्कृच्छ्रप्रायश्चित्तंपृथक्पृथक्होमद्रव्यदानंस्थालीपाकद्रव्यदानंचकृत्वा पुनःसंधानद्वयेनाग्निद्वयमुत्पाद्याग्निद्वयसंसर्गंविधायतत्रगर्भाधानहोमः अग्निद्वयसंसर्गात्पूर्वंएकाग्न्यनुगतौतन्मात्रप्रायश्चित्तंतद्धोमद्रव्यमात्रदानंचकार्यं नतुस्थालीपाकद्रव्यदानं भार्यांतरस्यासन्निधानेयस्यांगर्भाधानंतदग्निविच्छेदप्रायश्चित्तादिनागृह्यमुत्पाद्यतत्रहोमः सर्वत्रपुनःसंधानेस्थालीपाकानारंभेस्थालीपाकादिद्रव्यदानंकृताकृतं एवंयथायथंगृह्याग्निसिद्धिंकृत्वाममास्यांभार्यायांसंस्कारातिशयद्वाराऽस्यांजनिष्यमाणसर्वगर्भाणांबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंगर्भाधानाख्यंकर्मकरिष्ये तदंगत्वेनस्वस्तिवाचनेत्यादिसंकल्प्य पुण्याहवाचनमातृकापूजननांदीश्राद्धादिकृत्वायथागृह्यंगर्भाधानसंस्कारःकार्यः अत्रगर्भाधानकर्मणोब्रह्मदेवताकत्वात्पुण्याहवाचनांतेकर्मांगदेवताब्रह्माप्रीयतामितिवदेत् औपासनांगेस्वस्तिवाचनेअग्निसूर्यप्रजापतयः प्रीयंतां स्थालीपाकारंभेअग्निःप्रीयतामिति एवमन्यत्रग्रंथांतरादूह्यं ॥

त्यामध्यें पहिल्या ऋतूचे ठिकाणीं गमन करणें तें गृह्याग्नीवर गर्भाधानसंबंधी होम करून करावें. दुसऱ्या इत्यादिक ऋतूंचे ठिकाणीं गमन करणें त्याविषयीं होम इत्यादिक नाहीं. ज्यांच्या सूत्रांत होम करण्याविषयीं सांगितलें नाहीं, त्यांनीं होम न करितां मंत्रांचा पाठ

मात्र पहिल्या गमनाविषयीं करावा. अर्धाधानी[1] अग्निहोत्री व अनाहिताग्नि[2] यांचा गृह्याग्नि सिद्ध असेल तर त्यावरच गर्भाधानहोम करावा. बारा दिवसपर्यंत गृह्याग्नीचा विच्छेद (नाश) झाला असल्यास "अयाश्चा०" ह्या मंत्रानें आज्याच्या आहुतीनें प्रायश्चित्त करावें. अग्नीचा नाश होऊन बारा दिवसांपेक्षां ज्यास्त दिवस होतील तर पूर्वी प्रायश्चित्त करून नंतर पुनःसंधानविधीनें अग्नि उत्पन्न करून त्या अग्नीवर गर्भाधानहोम करावा. प्रायश्चित्त करणें तें दरवर्षास प्राजापत्यकृच्छ्र करावें. त्याविषयीं असा संकल्प करावा. "मम गृह्याग्निविच्छेददिनादारभ्यै तावंतं कालं गृह्याग्निविच्छेदजनितदोषपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गृह्याग्निविच्छेददिनादारभ्यै तावदब्दपर्यंतं प्रत्यब्दं एकैककृच्छ्रान् यथाशक्तितत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतरजतनिष्कनिष्कार्धनिष्कपादनिष्कपादार्धान्यतमद्रव्यदानेनाहमाचरिष्ये तथा एतावद्दिनेषुगृह्याग्निविच्छेदेन लुप्तसायंप्रातरौपासनहोमद्रव्यं लुप्तदर्शपौर्णमासस्थालीपाकादिकर्मपर्याप्तव्रीह्याद्याज्यद्रव्यंचतन्निष्क्रयंवादातुमहमुत्सृजे." कृच्छ्रांच्या स्थानीं दुसरा प्रत्याम्नाय करणें असेल तर तसा उच्चार करावा. ऐशीं गुंजांचा निष्कपाद, हा चौपट केला ह्मणजे एक निष्क होतो. याप्रमाणें संकल्प करून, "विच्छिन्नस्य गृह्याग्नेः पुनःसंधानं करिष्ये," असा संकल्प करून आपापल्या सूत्राप्रमाणें गृह्याग्नि सिद्ध करावा. सर्वाधानी[3] जो त्यानेंहि असाच पुनःसंधानविधीनें गृह्याग्नि उत्पन्न करून त्या अग्नीवर गर्भाधान, पुंसवन इत्यादिकांचा होम करावा. सर्वाधानी जो त्यानें कृच्छ्रांचा संकल्प, व होमादिक द्रव्याच्या दानाचा संकल्प हे करूं नयेत. तर, "गर्भाधानहोमं कर्तुं गृह्यपुनःसंधानं करिष्ये," असाच संकल्प करावा, व गर्भाधान झाल्यानंतर अग्नीचा त्याग करावा. अर्धाधानी जे त्यांचेहि दोन पक्ष आहेत. पहिला पक्ष—गृह्याग्नीवर सायंकालीं व प्रातःकालीं होम व स्थालीपाक करावे. दुसरा पक्ष—केवळ गृह्याग्नीचें रक्षण मात्र करावें, त्यावर होमादिक करूं नये. पहिल्या पक्षीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें होमादिकाचे द्रव्याचें दान करावें. होमादिक न करणें ह्या पक्षीं प्रायश्चित्त मात्र करावें, होमादिकांचे द्रव्याचें दान करूं नये. दोन ज्याला स्त्रिया आहेत त्याच्या दोन अग्नींचा संसर्ग होण्याच्या पूर्वी दोन अग्नि नष्ट होतील तर दोहोंचा नाश ज्या दिवसीं झाला त्या दिवसापासून वर्षें मोजून त्याप्रमाणें दोहोंचें निरनिराळें कृच्छ्र प्रायश्चित्त व निरनिराळें होमाच्या द्रव्याचें दान आणि स्थालीपाकाच्या द्रव्याचें दान हीं सर्व करून दोन पुनःसंधानें करून दोन अग्नि उत्पन्न करावे. नंतर त्या दोन अग्नींचा संसर्ग करून त्या संसर्गाग्नीवर गर्भाधानप्रयुक्त होम करावा. दोन अग्नींचा संसर्ग करण्याच्या पूर्वी दोहोंतून कए अग्नि नष्ट झाला असतां त्याचें प्रायश्चित, व त्याच्या होमाच्या द्रव्याचें दान हीं मात्र करावीं, स्थालीपाकाच्या द्रव्याचें दान करूं नये. दुसरी स्त्री जवळ नसेल तर ज्या स्त्रियेचें गर्भाधान करावयाचें तिच्या अग्नीचा विच्छेद ( नाश ) झाल्याचें प्रायश्चित्त इत्यादिक करून पुनःसंधानविधीनें अग्नि उत्पन्न करून त्यावर गर्भाधानहोम करावा. स्थालीपाकाचा आरंभ न झाला असेल तर सर्वत्र पुनःसंधानकालीं स्थालीपाक इत्यादिकांच्या द्रव्याचें दान कृताकृत ( करावें न करावें ) असें आहे. याप्रमाणें यथायोग्य गृह्याग्नि

---

१ गृह्याग्नीनें युक्त जो अग्निहोत्री त्याला अर्धाधानी असें ह्मणतात. २ केवल स्मार्ताग्नीनें युक्त तो अनाहिताग्नि. ३ अग्निहोत्री असून गृह्याग्निरहित त्याला सर्वाधानी असें ह्मणतात.

सिद्ध करून, "ममास्यां भार्यायां संस्कारातिशयद्वाराऽस्यां जनिष्यमाणसर्वगर्भाणां बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गर्भाधानाख्यं कर्म करिष्ये, तदंगत्वेन स्वस्तिवाचनं," इत्यादिक संकल्प करून पुण्याहवाचन, मातृकापूजन आणि नांदीश्राद्ध इत्यादिक करून जसें ज्याचें गृह्यसूत्र असेल तदनुसार गर्भाधानसंस्कार करावा. ह्या गर्भाधानसंस्काराची देवता ब्रह्मा आहे याकरितां पुण्याहवाचनाच्या शेवटीं, "कर्मांगदेवता ब्रह्मा प्रीयतां," असा उच्चार करावा. अग्नि सिद्ध करावयाचा त्या कालीं कर्तव्य जें अंगभूत पुण्याहवाचन त्याचे ठिकाणीं, "अग्निसूर्यप्रजापतयः प्रीयंतां," असा उच्चार करावा. स्थालीपाकाच्या आरंभकालीं, "अग्निः प्रीयतां," असा उच्चार करावा. याप्रमाणें इतर कर्मांचे ठिकाणीं उच्चार करावयाचा तो दुसऱ्या ग्रंथांत पाहावा.

---

अथनांदीश्राद्धविचारः गौर्यादिमातृकापूजनंनांदीश्राद्धांगं यत्रनांदीश्राद्धंनक्रियतेतत्र मातृकापूजनमपिनकार्यं तत्र पूर्वंमातृपार्वणंततःपितृपार्वणंततःसपत्नीकमातामहपार्वणंइति पार्वणत्रयात्मकंनांदीश्राद्धं मातृजीवने सपत्नमातृमरणेपिनमातृपार्वणं एवंमातामह्याजीवनेमातामहीसपत्न्यामरणेपिनमातामहादेःसपत्नीकत्वं एवंदर्शादावपिमातृजीवनेसपत्नमातृमरणेपिनसपत्नीकत्वंपित्रादेः अत्रस्वधाशब्दस्थानेस्वाहाशब्दः सव्येनैवसर्वाःक्रियाःप्रतिपार्वणंदैवेचयुग्माब्राह्मणाः कुशस्थानेदूर्वाःविवाहादिमंगलकर्मांगेवृद्धिश्राद्धे यज्ञादिकर्मांगेतु अमूलादर्भाग्राह्याः दूर्वादर्भाश्चयुग्माएव उदङ्मुखःकर्ताप्राङ्मुखाविप्राःप्राङ्मुखोवाकर्ताउदङ्मुखाविप्राःपूर्वाण्हकालः प्रदक्षिणंकर्म आधानांगंत्वपराण्हेकार्यं पुत्रजन्मनिमित्तकंरात्रावपिएवंचविश्वेदेवार्थविप्रसहिताअष्टौविप्राअत्यशक्तौचत्वारोवा वृद्धिश्राद्धेविश्वेदेवाः सत्यवसुसंज्ञकाः सोमयागगर्भाधानपुंसवनसीमंतोन्नयनाधानादिकर्मांगभूतवृद्धिश्राद्धेक्रतुदक्षसंज्ञकाः गर्भाधानादिसंस्कारेषुवापीदेवप्रतिष्ठादिपूर्तकर्मसुअपूर्वाधानादिषुसंन्यासस्वीकारेकाम्यवृषोत्सर्गेगृहप्रवेशेतीर्थयात्रायां श्रवणाकर्मसर्पबल्याश्वयुज्याग्रयणादिपाकसंस्थानांप्रथमारंभेनांदीश्राद्धमावश्यकं पुनराधानेसोमयागादिभिन्नेअसकृत्क्रियमाणेकर्मणिअष्टकादिश्राद्धकर्मसुचनांदीश्राद्धंनकार्यं गर्भाधानपुंसवनसीमंतचौलमौंजीविवाहातिरिक्तसंस्कारेषुश्रवणाकर्मादिषुचनांदीश्राद्धंवैकल्पिकं जातकर्मांगंपुत्रजन्मनिमित्तकंचनांदीश्राद्धंपृथगेव जन्मकालेएवजातकर्मणिक्रियमाणेपुत्रजन्मनिमित्तकंजातकर्मांगंचवृद्धिश्राद्धंतंत्रेणकरिष्ये इति संकल्प्यसकृदेवकार्यं नामकर्मणासहजातकर्मचिकीर्षायांपुत्रजन्मनिमित्तंजन्मकालेएवहेम्ना कृत्वाकर्मांगंनामकर्मकालेकार्यं तदातदकरणेनामकर्मकालेएवपुत्रजन्मनिमित्तकंजातकर्मनामकर्मांगंचनांदीश्राद्धंतंत्रेणकरिष्यइतिसंकल्प्यैकमेवकार्यं एवंचौलादिकर्मणासहजातकर्मादिषुक्रियमाणेषुपुत्रजन्मनिमित्तकंचौलांतसंस्कारांगंचनांदीश्राद्धंतंत्रेणकरिष्य इतिसंकल्पः तथाचसहैवक्रियमाणेषुचौलादिष्वन्येषुचकर्मसुनांदीश्राद्धस्यसकृदेवानुष्ठानंनतुप्रतिकर्मपृथगनुष्ठानम् एवंयमलयोर्युगपदेकसंस्कारकरणेपिज्ञेयं ऋक्शाखिभिःकात्यायनैश्चपितृपिताम

हप्रपितामहाइतिपितृपूर्वकउच्चारःकार्यःअन्यशाखिभिस्तुप्रपितामहपितामहपितरोनांदीमुखा इतिप्रपितामहपूर्वकउच्चारःमातृपार्वणेनांदीमुखशब्देऽपीष्विकल्पान्नांदीमुख्यइतिनांदीमुखाइ तिपक्षद्वयमुच्चारेअनादिसंज्ञात्वेननखमुखात्संज्ञायामितिनिषेधानवतारादितिपुरुषार्थचिंताम णीकारः ॥

## आतां नांदीश्राद्धाचा निर्णय सांगतों.

गौरी इत्यादिक ज्या मातृकादेवता त्यांचें पूजन करणें तें नांदीश्राद्धाचें अंग होय. ज्या कर्माचे ठिकाणीं नांदीश्राद्ध करीत नाहीं तेथें मातृकादेवतांचें पूजनहि करूं नये. नांदीश्राद्धांत प्रथम मातृपार्वण, त्यानंतर पितृपार्वण, तदनंतर सपत्नीक मातामहपार्वण याप्रमाणें तीन पार्वणें ज्यामध्यें आहेत तें नांदीश्राद्ध होय. माता जीवंत असेल आणि सापत्नमाता मृत झाली असेल तथापि मातृपार्वण नाहीं. याप्रमाणें मातामही जीवंत असेल आणि मातामहीची सवत मृत असेल तथापि मातामह इत्यादिकांला सपत्नीकपणा नाहीं. याप्रमाणें दर्शादिक श्राद्धांविषयींहि माता जीवंत असेल आणि सापत्नमाता मृत झाली असेल तथापि पित्रादिक त्रयीला सपत्नीकत्व नाहीं. ह्या नांदीश्राद्धांत 'स्वधा' ह्या शब्दस्थानीं 'स्वाहा' शब्द उच्चारावा व सव्यानेंच सर्व कर्में करावीं. दरएक पार्वणाचे ठिकाणीं व देवपार्वणाचे ठिकाणीं दोन दोन ब्राह्मण सांगावे. विवाहादि मंगलकार्याचें अंगभूत नांदीश्राद्ध असेल तर कुशस्थानीं दूर्वा घ्याव्या. यज्ञादिक कर्माचें अंगभूत नांदीश्राद्ध असेल तर मूलरहित दर्भ घ्यावे. दूर्वा व दर्भ हे दोन दोनच घ्यावे. नांदीश्राद्धकर्ता उत्तराभिमुख असावा, ब्राह्मण पूर्वाभिमुख असावे; अथवा कर्ता पूर्वाभिमुख, ब्राह्मण उत्तराभिमुख असावे. पूर्वाण्हकाल असावा. सर्वकर्म प्रदक्षिण करावें. आधानाचें अंगभूत नांदीश्राद्ध अपराण्हकालीं करावें. पुत्रजन्मनिमित्तक नांदीश्राद्ध रात्रींहि करावें. याप्रमाणें विश्वेदेवसंबंधी ब्राह्मणासह आठ ब्राह्मण सांगावे. तितके सामर्थ्य नसल्यास चार सांगावे. नांदीश्राद्धांत सत्यवसु संज्ञक देव घ्यावे. सोमयाग, गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, आधान, इत्यादि कर्माचें अंगभूत जें नांदीश्राद्ध त्यांत ऋतुदक्ष संज्ञक देव घ्यावे. गर्भाधान इत्यादिक संस्कार; वापी ( विहीर ), देवाची अर्चा इत्यादिक पूर्तकर्में; पूर्वी न केलेलीं असीं आधान ( अग्निस्थापन ) इत्यादि कर्में; संन्यास घेणें; काम्यवृषोत्सर्ग; गृहप्रवेश; तीर्थयात्रा; श्रवणाकर्म, सर्पबलि, आश्वयुजीकर्म, आग्रयण इत्यादिक ज्या पाकसंस्था त्यांचा प्रथमारंभ; ह्या कृत्यांच्या आरंभीं नांदीश्राद्ध अवश्य करावें. सोमयागादिविरहित पुनराधान, वारंवार करावयाचें कर्म, आणि अष्टका इत्यादिक श्राद्धकर्में यांमध्यें नांदीश्राद्ध करूं नये. गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, चौल, मौंजी आणि विवाह हे संस्कार खेरीज करून इतर संस्कार व श्रवणाकर्मादिक कर्में यांचे ठिकाणीं नांदीश्राद्ध कृताकृत. जातकर्माचें अंगभूत जें नांदीश्राद्ध तें, व पुत्रजन्मसंबंधी नांदीश्राद्ध हीं निरनिराळीं करावीं. जन्मसमयींच जातकर्मसंस्कार करणें असेल तर, "**पुत्रजन्मनिमित्तकं जातकर्मांगं च वृद्धिश्राद्धं तंत्रेण करिष्ये,**" असा संकल्प करून एकवारच नांदीश्राद्ध करावें. नामकरणाबरोबर जातकर्म करणें असेल तर पुत्रजन्मसंबंधी नांदीश्राद्ध जन्मसमयींच हिरण्यानें

करून कर्माचें अंगभूत नांदीश्राद्ध नामकर्मकालीं करावें. जन्मकालीं तें न केलें असतां नामकर्मकालींच, "**पुत्रजन्मनिमित्तकं जातकर्मनामकर्मांगं च नांदीश्राद्धं तंत्रेण करिष्ये,**" असा संकल्प करून एकच करावें. याप्रमाणें चौल इत्यादि कर्मांसहवर्तमान जातकर्मादिक संस्कार करावयाचे असतील तर, "**पुत्रजन्मनिमित्तकं चौलांतसंस्कारांगं च नांदीश्राद्धं तंत्रेण करिष्ये,**" असा संकल्प करावा. तसेंच बरोबरच करावयाचे असे चौलादिक संस्कार व इतर कर्में यांमध्यें नांदीश्राद्ध एकवेळच करावें, दरएक कर्मांत निराळें करूं नये. याप्रमाणें जुळे जे त्यांचे एककालीं संस्कार करणें त्याविषयींहि असाच निर्णय जाणावा. ऋकूशाखी व कात्यायन यांनीं "**पितृपितामहप्रपितामहाः**" असा पितृपूर्वक उच्चार करावा. अन्यशाखी जे त्यांनीं तर, "**प्रपितामहपितामहपितरो नांदीमुखाः**" असा प्रपितामहपूर्वक उच्चार करावा. मातृपार्वणामध्यें **नांदीमुख** ह्या शब्दाचे ठिकाणीं **ङीष्** प्रत्यय वैकल्पिक आहे याकरितां "**नांदीमुख्यः**" असा, किंवा "**नांदीमुखाः**" असा याप्रमाणें दोन पक्ष उच्चाराविषयीं होतात, यांतून कोणताहि एक घ्यावा. "नख आणि मुख एतदंत प्रातिपदिक कोणाची संज्ञा असेल तर त्यापुढें ङीष् होत नाहीं, टाप् होतो," असा जो निषेध सांगितला त्याची ह्या स्थलीं प्राप्ति नाहीं, कारण संज्ञा अनादि आहे असें पुरुषार्थचिंतामणीकार ह्मणतात.

---

अथवृद्धिश्राद्धकर्तुर्जीवत्पितृकत्वेनिर्णयः जीवेत्तुयदिवर्गाद्यस्तंवर्गंतुपरित्यजेदितिन्यायेनजीवत्पितृकःस्वापत्यसंस्कारेषुमातृमातामहपार्वणयुतंनांदीश्राद्धंकुर्यात् मातरिजीवत्यांमातामहपार्वणकमेव मातामहेजीवतिमातृपार्वणकमेव केवलमातृपार्वणेविश्वेदेवानकार्याः वर्गत्रयाद्येषुमातृपितृमातामहेषुजीवत्सुनांदीश्राद्धलोपएवसुतसंस्कारेषूचितः **द्वितीयविवाहाधानपुत्रेष्टिसोमयागादिषुस्वसंस्कारकर्मसुयेभ्यएवपितादद्यात्तेभ्योदद्यात् तथाचमृतमातृमातामहकोपिजीवत्पितृकःस्वसंस्कारेपितुर्मातृपितामहीप्रपितामह्यः पितुःपितृपितामहप्रपितामहाः पितुर्मातामहमातृपितामहमातृप्रपितामहाः इत्येवपार्वणत्रयमुद्दिश्यश्राद्धंकुर्यात् नतुस्व**मातृमातामहपार्वणोद्देशःपितरिपितामहेचजीवतिस्वसंस्कारे पितामहस्यमातृपितामहीप्रपितामह्य इत्याद्युद्देशः एवंप्रपितामहेपियोज्यंपितुर्मात्रादिजीवनेतत्पार्वणलोपएव तथाचयेभ्यएवपितादद्यादितिपक्षस्यवर्गाद्यजीवनेतत्पार्वणलोपइतिद्वारलोपपक्षस्यचस्वसंस्कारस्वापत्यसंस्का**रभेदेनव्यवस्थासिद्धांतितेतिज्ञेयं केचित्तुपक्षद्वयस्यैच्छिकोविकल्पोनतुव्यवस्थितइत्याहुः एवं**मृतपितृकस्यजीवन्मातृमातामहस्यपितृपार्वणेनैवनांदीश्राद्धसिद्धिर्ज्ञेया समावर्तनस्यमाणवककर्तृत्वेपितदंगभूतनांदीश्राद्धेपितुस्तदभावेज्येष्ठभ्रात्रादेरधिकारइतिकेचित् तत्रपितापुत्रसमावर्तनेस्वपितृभ्योनांदीश्राद्धंकुर्यात् पिताजीवत्पितृकश्चेत्सुतसंस्कारत्वात्द्वारलोपपक्षोयुक्तइतिभाति माणवकपितुःप्रवासादिनाअसंनिधानेभ्रात्रादिर्माणवकस्यपितुर्मातृपितामहीप्रपितामह्य इत्याद्युच्चार्यश्राद्धंकुर्यात् मृतपितृकमाणवकसमावर्तनेपितृव्यभ्रात्रादिरस्यमाणवकस्यमातृपितामहीत्याद्युच्चारयेत् भ्रात्रादेरभावेस्वयमेवस्वपितृभ्योदद्यात् एवंजीवत्पितृकोपिपितुरस**न्निधानेभ्रात्रादेरभावेपितुः पितृभ्यःस्वयमेवनांदीमुखंकुर्यात् उपनयनेनकर्माधिकारस्यजात**

त्वात् एवंविवाहेपिद्रष्टव्यं मृतपितृकस्यचौलोपनयनादिकंपितृव्यमातुलादि:कुर्वन्अस्यसं. स्कार्यस्यपितृपितामहेत्याद्युच्चार्यश्राद्धंकुर्यात् जीवत:पितुरसन्निधानेनकुर्वन्मातुलादिरस्यसं स्कार्यस्यपितुर्जनकादीनुद्दिश्यकुर्यान्नतुसंस्कार्यस्यमृतानपिमात्रादीनितिसंक्षेप: ॥

## आतां नांदीश्राद्ध करणाराचा पिता जिवंत असेल तर त्याविषयीं निर्णय सांगतों.

माता ( आई ), पितामही ( आजी ), प्रपितामही ( पणजी ) ह्या तीन मिळून एक वर्ग; पिता ( बाप ), पितामह ( आजा ), प्रपितामह ( पणजा ) हे तीन मिळून एक वर्ग; मातामह ( मातेचा पिता ), मातु:पितामह ( मातेचा आजा ), मातु:प्रपितामह ( मातेचा पणजा ) हे सपत्नीक तीन मिळून एक वर्ग; याप्रमाणें वर्ग आहेत, यांमध्यें "वर्गांतील पहिला जिवंत असेल तर तो सर्व वर्ग टाकावा," असा न्याय आहे याकरितां ज्याचा पिता जिवंत असेल त्यानें आपल्या अपत्याचे संस्कारांमध्यें मातृपार्वण व मातामहपार्वण ह्या दोन पार्वणांनीं युक्त असें नांदीश्राद्ध करावें. माता जिवंत असेल तर मातामहपार्वणयुक्तच नांदीश्राद्ध करावें. मातामह जिवंत असेल तर मातृपार्वणयुक्तच नांदीश्राद्ध करावें. नुस्तें एक मातृपार्वणच असेल तर नांदीश्राद्धाचे ठिकाणीं विश्वेदेव करूं नयेत. तीन वर्गांतील पहिले तीन माता, पिता, मातामह, हे जिवंत असतील तर सुतसंस्कारांमध्यें नांदीश्राद्धाचा लोपच करावा हें योग्य होय. दुसरा विवाह, अग्न्याधान, पुत्रेष्टि आणि सोमयाग इत्यादिक आपल्या संस्कारकर्मांत "आपला पिता ज्या पितरांला पार्वणें देतो त्याच पितरांला पुत्रानें द्यावीं." तसेंच ज्याची माता व मातामह हे मृत असून पिता जिवंत असेल त्यानें पिता ज्यांचा उच्चार करितो त्यांचाच उच्चार आपल्या संस्कारांतील नांदीश्राद्धसमयीं करावा. तो असा,— "पितुर्मातृपितामहीप्रपितामह्य:, पितु:पितृपितामहप्रपितामहा:, पितुर्मातामहमातृपितामहमातृप्रपितामहा:," इतकाच उच्चार करून पार्वणत्रयाच्या उद्देशानें नांदीश्राद्ध करावें, आपल्या मातृपार्वणाचा व मातामहपार्वणाचा उद्देश करूं नये. पिता आणि पितामह हे जिवंत असतील तर आपल्या संस्कारामध्यें पितामहाच्या मातृपार्वणाचा उच्चार करावा. तो असा,—"पितामहस्य मातृपितामहीप्रपितामह्य:," इत्यादिक. याप्रमाणें प्रपितामह जिवंत असतांहि असीच योजना करावी. पित्याची माता इत्यादिक जिवंत असेल तर त्या पार्वणाचा लोपच करावा. तसेंच "ज्या पितरांला पिता पार्वणें देतो त्याच पितरांला पुत्रानें द्यावीं," असा जो पक्ष सांगितला त्याची व्यवस्था व वर्गाचा पहिला जिवंत असेल तर त्या पार्वणाचा लोप करावा अशी द्वारलोपपक्षाची व्यवस्था, आपले संस्कार व आपल्या आपत्याचे संस्कार या भेदेंकरून व्यवस्थित जाणावी; ह्मणजे आपल्या संस्कारामध्यें पित्याचीं पार्वणें ध्यावीं, व पुत्राचे संस्कारामध्यें आपलीं पार्वणें ध्यावीं हें तात्पर्य. कोणी ग्रंथकार तर, पूर्वी सांगितलेल्या दोन पक्षांचा विकल्प ऐच्छिक ( इच्छाप्राप्त ) आहे, व्यवस्थायुक्त नाहीं असें ह्मणतात. असेंच ज्याचा पिता मृत झाला असून माता व मातामह हे जिवंत असतील त्याचे नांदीश्राद्धाची सिद्धि एका पितृपार्वणानेंच होते असें जाणावें. समावर्तन ( सोडमुंज ) संस्कार करणारा स्वत: बटु जरी

असेल तथापि समावर्तनाचें अंगभूत नांदीश्राद्ध पित्यानें करावें, पिता नसेल तर ज्येष्ठभ्राता इत्यादिकानें करावें असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. पित्यानें पुत्राच्या समावर्तनकालीं नांदीश्राद्ध करणें तें आपल्या पितरांच्या उद्देशानें करावें. पिता जीवत्पितृक ( जिवंत आहे पिता ज्याचा तो) असेल तर पुत्राचा संस्कार आहे याकरितां तेथें द्वारलोपपक्ष योग्य आहे असें वाटतें. बटूचा पिता प्रवास इत्यादिक कारणानें जवळ नसेल तर बटूचा भ्राता इत्यादिक यानें बटूच्या पित्याच्या पार्वणांनीं नांदीश्राद्ध करावें. त्याचा उच्चार असा,–"माणवकस्य पितुर्मातृपितामहीप्रपितामह्यः," इत्यादिक उच्चार करावा. मृतपितृक बटूच्या समावर्तनामध्यें चुलता, भ्राता इत्यादिकांनीं बटूच्या पार्वणांनीं नांदीश्राद्ध करावें. त्याचा उच्चार असा,– "अस्य माणवकस्य मातृपितामहीप्रपितामह्यः." चुलता, भ्राता इत्यादिक नसतील तर स्वतां बटूनेंच आपल्या पितरांच्या उद्देशानें नांदीश्राद्ध करावें. याप्रमाणें ज्याचा पिता जिवंत आहे अशा बटूनेंहि पिता जवळ नसतां व भ्राता नसतां पित्याच्या पितरांच्या उद्देशानें स्वतांच त्यानें नांदीश्राद्ध करावें, कारण मौंजी झाली आहे या कारणानें बटूला कर्माचा अधिकार आहे. याप्रमाणें विवाहांताहि निर्णय जाणावा. मृतपितृकाचे चौल, मौंजी इत्यादिक संस्कार करणें ते चुलता, मातुळ इत्यादिक करणारे असतील तर ज्याचा संस्कार करावयाचा त्याच्या पार्वणांनीं नांदीश्राद्ध करावें. त्याचा उच्चार असा,–"अस्य संस्कार्यस्य पितृपितामहप्रपितामहाः," इत्यादिक उच्चार करावा. पिता जिवंत असून जवळ नसल्या कारणानें मातुळ इत्यादिक संस्कार करणारा असेल तर ज्याचे संस्कार करावयाचे त्याच्या पित्याचे जे माता, पिता इत्यादिक, त्यांच्या उद्देशेंकरून नांदीश्राद्ध करावें, बटूचे माता इत्यादिक मृत झाले असतील तथापि त्यांच्या उद्देशानें करूं नये. याप्रमाणें नांदीश्राद्धाच्या पार्वणाचा संक्षेपानें निर्णय सांगितला.

---

नांदीश्राद्धेपिंडदानंकुलधर्मानुसारेणवैकल्पिकं पिंडेषुदधिमधुबदरद्राक्षामलकमिश्रणं दक्षिणायांद्राक्षामलकानि प्रथमांतेनसंकल्पः सर्वत्रोच्चारेसंबंधनामगोत्रंवर्जयेत् मालतीमल्लिकाकेतकीकमलानांमालादेयानतुरक्तपुष्पाणां कुंकुमचंदनाद्यलंकृताःसर्वे नांदीश्राद्धारंभे पाकांतरेणवैश्वदेवःसाग्निकानग्निकैःसर्वशाखिभिःकार्यः द्वयोर्द्वयोर्विप्रयोर्युगपन्निमंत्रणं भवद्भ्यांक्षणःक्रियतामोंतथाप्राप्नुतांभवंतौप्राप्नुवावेत्युक्तिः शंनोदेवीत्यनुमंत्र्ययवानेवक्षिपेत् यवोसिसोमदेवत्योगोसवेदेवनिर्मितः प्रत्नवद्भिःप्रत्तःपुष्ट्यानांदीमुखान्पितृनिमाँल्लोकान्प्रीणयाहिनःस्वाहानमइतिपित्र्येमंत्रः द्विर्द्विर्गंधादिदानं पाणिहोमोग्नयेकव्यवाहनायस्वाहासोमायपितृमतेस्वाहेति अन्नश्राद्धेनापसव्यंनतिलाःनचपितृतीर्थेनदानं पावमानीःशंवतीःशकुनिसूक्तं स्वस्तिसूक्तंचश्रावयेत् मधुवाताइतित्र्यृचस्थानेउपास्मैगायेतिपंचर्चः अक्षंनमीमदंतेतिच तृप्तिप्रश्नस्थानेसंपन्नमिति दैवेरुचितमितिप्रश्नःपूर्वाग्रेषुकुशेषुदूर्वासुवाएकस्यद्वौद्वौपिंडौ अक्षय्यस्थानेनांदीमुखाःपितरःप्रीयंतां स्वधावाचनस्थानेनांदीमुखान्पितॄन्वाचयिष्येइत्यादिन स्वधांप्रयुंजीत स्यमूषुवाजिनमितिविप्रविसर्जनं केचिन्नांदीश्राद्धांतेवैश्वदेवोबह्वृचानामित्या

हु: नात्रश्राद्धांगतर्पणं अत्राहिताग्निनापिंडदानंकार्यं पितुर्मात्रादिवर्गत्रयोद्देशेनश्राद्धेपितुर्मातामहीचैवतथैवप्रपितामहीत्यादि श्लोकपाठः द्वारलोपपक्षेयत्पार्वणलोपस्तत्पार्वणविषयकश्लोकैकदेशलोप: केवलमातृपार्वणेदेवानकार्याः एताभवंतुसुप्रीताइत्यूह:कार्य: सांकल्पविधिनासंक्षिप्तनांदीश्राद्धप्रयोग:प्रयोगरत्नादौद्रष्टव्यः इतिनांदीश्राद्धविचारः ॥

नांदीश्राद्धामध्यें पिंडप्रदान करणें तें जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें कृताकृत आहे. पिंडांमध्यें दहीं, मध, बोरें, द्राक्षें, आवळे हे पदार्थ घालावे. दक्षिणा देणें ती द्राक्षें, आवळे हे द्यावे. प्रथमांत विभक्तीनें संकल्प करावा. सर्वत्र उच्चारांत संबंध, नाम, गोत्र हीं वर्ज्य करावीं. जाई, चमेली, मोगरी, केतकी आणि कमळें यांची माला ( ब्राह्मणाला ) द्यावी, तांबड्या फुलांची माला देऊं नये. केशर, चंदन इत्यादिकानें अलंकृत सर्व जन असावे. नांदीश्राद्धाला आरंभ झाल्यानंतर वैश्वदेव करणें तो दुसरा भात करून साग्निक निरग्निक असे सर्व शाखी यांनीं करावा. दोन दोन ब्राह्मणांला एकदम निमंत्रण करावें, त्याचा उच्चार असा,–"भवद्भ्यां क्षण: क्रियतां ॐ तथा, प्राप्नुतां भवंतौ, प्राप्नुवाव." "शंनो देवी०" ह्या मंत्रानें अभिमंत्रण करून यवच टाकावे. "यवोसि सोमदेवत्यो गोसवे देवनिर्मितः ॥ प्रत्नवद्भिः प्रत्तः पुष्ट्या नांदीमुखान् पितॄनिमाँल्लोकान्प्रीणयाहि नः स्वाहा नमः," असा मंत्र पित्र्यकर्माचे ठिकाणीं योजावा. गंध इत्यादिक उपचार दोन दोन वेळ द्यावे. ब्राह्मणांचे हस्तांचे ठिकाणीं होम करणें तो, "अग्नये कव्यवाहनाय स्वाहा, सोमाय पितृमते स्वाहा," ह्या मंत्रानें करावा. ह्या नांदीश्राद्धामध्यें अपसव्य करूं नये, तिळ घेऊं नयेत व पितृतीर्थानें[1] दान करूं नये. पावमानी ऋचा, शंवती ऋचा, शकुनिसूक्त आणि स्वस्तिसूक्त हीं सूक्तें ब्राह्मणाकडून श्रवण करवावीं. "मधुवाता०" ह्या तीन ऋचांच्या स्थानीं "उपास्मै गायता०" ह्या पांच ऋचा, व "अक्षन्नमीमदंत०" ही ऋचा अशा ह्मणाव्या. तृप्तिप्रश्नाच्या स्थानीं "संपन्नं" असा उच्चार करावा. देवकर्माचे ठिकाणीं "रुचितं" असा प्रश्न करावा. पूर्व दिशेला अग्रें केलेल्या अशा दर्भांचे ठिकाणीं किंवा दूर्वांचे ठिकाणीं एकाला दोन दोन असे पिंड द्यावे. "अक्षय्यं" ह्या स्थानीं "नांदीमुखाः पितरः प्रीयंतां" असा उच्चार करावा. स्वधावाचन स्थानीं "नांदीमुखान् पितॄन् वाचयिष्ये," इत्यादिक उच्चार करावा, स्वधाशब्दाचा उच्चार करूं नये. नंतर "त्यमूषुवाजिनं०" ह्या मंत्रानें ब्राह्मणांचें विसर्जन करावें. कोणी ग्रंथकार, नांदीश्राद्धाचे शेवटीं ऋग्वेदी यांनीं वैश्वदेव करावा असें ह्मणतात. ह्या नांदीश्राद्धाचे ठिकाणीं श्राद्धसंबंधी तर्पण करूं नये. ह्या नांदीश्राद्धामध्यें अग्निहोत्री यानें पिंडदान करावें. पित्याचे माता इत्यादिक जे तीन वर्ग त्यांच्या उद्देशानें नांदीश्राद्ध असेल तर त्यामध्यें, "पितुर्मातामहीचैव तथैव प्रपितामही," इत्यादिक श्लोकपाठ करावा. द्वारलोपपक्ष असेल तर ज्या पार्वणाचा लोप असेल त्या पार्वणसंबंधी जो श्लोक त्याच्या एकदेशाचा लोप करावा. केवल मातृपार्वणयुक्त नांदीश्राद्ध असल्यास देवांचें कारण नाहीं. एथें "एता भवंतु सुप्रीताः" असा ऊह करावा. सांकल्प-

---

१ अंगुष्ठ व तर्जनी यांच्या मूलांचा जो मध्यभाग त्याला पितृतीर्थ असें ह्मणतात.

विधीनें संक्षिप्त नांदीश्राद्धाचा प्रयोग प्रयोगरत्न इत्यादिक ग्रंथीं पाहावा. याप्रमाणें नांदी-श्राद्धाचा निर्णय समाप्त झाला.

---

**एवंस्वस्तिवाचनंक्रतुदक्षसंज्ञकविश्वेदेवयुतंचनांदीश्राद्धंगर्भाधानांगंकृत्वा यथाशाखंगर्भाधानसंस्कारःकार्यः आश्वलायनैर्गृह्याग्नौप्राजापत्यंचरुंहुत्वाविष्णुंषड्वारंसकृत्प्रजापतिंचाज्येनहुत्वाजपोपस्थानेनस्तः करणादिकंचकार्यं विष्णुर्योनिंजपेत्सूक्तंयोनिंस्पृष्ट्वात्रिभिर्व्रती गर्भाधानंततःकुर्यात्सुपुत्रोजायतेध्रुवं एवंनेजमेषेत्यादिजपोपि सर्वथाहोमासंभवेअश्वगंधारसंउदीर्ष्वातइतिमंत्रेणदक्षिणनासायामासिच्योपगमनंकार्यं एवंगर्भाधानसंस्कारमकृत्वास्त्रीगमनेगर्भोत्पत्तौतत्प्रायश्चित्तंगोदानंकृत्वापुंसवनंकार्यं ॥**

याप्रमाणें पुण्याहवाचन व ऋतुदक्षसंज्ञक देवसहित असें गर्भाधानाचें अंगभूत नांदीश्राद्ध करून जसी ज्याची शाखा असेल त्याप्रमाणें त्यानें गर्भाधानसंस्कार करावा. आश्वलायन-शाखी जे त्यांनीं गृह्याग्नीचे ठिकाणीं प्राजापत्य ( प्रजापतिदेवताक ) चरूचा होम करून वि-ष्णुदेवतेला सहा, प्रजापतिदेवतेला एक अशा घृताच्या आहुतींनीं होम करून जप, अग्नीचें उपस्थान ( प्रार्थना ), नाकांत दूर्वांचा रस पिळणें इत्यादिक करावें. "व्रती होत्साता तीन बोटांनीं योनीला स्पर्श करून "विष्णुर्योनिं०" या सूक्ताचा जप करावा, त्यानंतर गर्भाधान करावें, तेणेंकरून खचीत सुपुत्र होतो." याप्रमाणें "नेजमेष०" इत्यादिक मंत्रांचाहि जप करावा. सर्वथा होम करण्याचा संभव नसेल तर उजव्या नासिकेंत अश्वगंधेचा रस "उदी-र्ष्वातः०" ह्या मंत्रानें पिळून नंतर स्त्रीचे ठिकाणीं गमन करावें. याप्रमाणें गर्भाधानसंस्कार केल्याखेरीज स्त्रीगमन केलें व त्यापासून गर्भ राहिला असतां त्याचें प्रायश्चित्त गोप्रदान करून पुंसवन करावें.

---

**अथमैथुनांते ऋतौतुगर्भशंकित्वात्स्नानंमैथुनिनःस्मृतं अनृतौतुयदागच्छेच्छौचंमूत्रपुरीषवत्इत्युक्तरीत्याशौचंकृत्वाचामेत् आचमनंविनामूत्रपुरीषोत्सर्गेतु तैलाभ्यक्तस्त्वनाचांतःश्मश्रुकर्मणिमैथुने मूत्रोच्चारंयदाकुर्यादहोरात्रेणशुद्ध्यतिइत्येकाहोपवासः स्त्रीणांतुनस्नानं शयनादुत्थितानारीशुचिःस्यादशुचिःपुमान्इत्युक्तेः इतिगर्भाधानाद्युपयोगिनिर्णयः ॥**

यानंतर मैथुनांतीं कर्तव्य विधि.—" ऋतुकालीं गमन केलें असतां गर्भधारणाचा संभव आहे याकरितां मैथुन करणारानें मैथुनांतीं स्नान करावें. ऋतुकालावांचून अन्यकालीं गमन करील तर मूत्रपुरीषाप्रमाणें शौच (हातपाय धुणें इत्यादिक) करावें," याप्रमाणें सांगितल्या रीतीनें हात व पाय इत्यादिक धुवून आचमन करावें. आचमनावांचून मूत्रपुरीष यांचा उत्सर्ग करील तर, " जर अभ्यंग किंवा श्मश्रुकर्म अथवा मैथुन करून आचमन न करितां मूत्र-पुरीष यांचा उत्सर्ग करील तर तो एक अहोरात्रेंकरून शुद्ध होतो," असें वचन आहे यास्तव त्यानें एक अहोरात्र उपवास करावा. मैथुनानंतर स्त्रियांनीं स्नान करूं नये, कारण, "पलं-गावरून उठलेली स्त्री शुद्ध होय, पुरुष शुद्ध नाहीं," असें वचन आहे. याप्रमाणें गर्भाधान इत्यादिकांच्या उपयोगी असा निर्णय समाप्त झाला.

---

एवंकृतेपिगर्भाधानेयदिगर्भोत्पत्त्यभावोमृतापत्यतावातदा प्रतिबंधकप्रेतोपद्रवनिवृत्त्यर्थंनारायणबलिर्नागबलिश्चकार्यः तत्रनारायणबलिःशुक्लैकादश्यांपंचम्यांश्रवणेवा कालांतरानुपलब्धेः तत्प्रयोगःपरिशिष्टस्मृत्यर्थसारानुसारीकौस्तुभे शुक्लैकादश्यांनदीतीरेदेवालयादौतिथ्यादिकीर्तनांतेमदीयकुलाभिवृद्धिप्रतिबंधकप्रेतस्यप्रेतत्वनिवृत्त्यर्थंनारायणबलिंकरिष्येविधिनास्थापितकुंभद्वयेहेमादिप्रतिमयोर्विष्णुंवैवस्वतयमंचावाह्यपुरुषसूक्तेनयमायसोममितिमंत्रेणचषोडशोपचारैःसंपूजयेत् अत्रकेचित्कुंभपंचकेब्रह्मविष्णुशिवयमप्रेतान्पूजयंतितत्पूर्वभागेरेखायांदक्षिणाग्रकुशेषुशुंधंतांविष्णुरूपीप्रेतइतिदशस्थानेषुदक्षिणसंस्थमपोनिनीय मधुघृततिलयुतान्दशपिंडान्काश्यपगोत्रदेवदत्तप्रेतविष्णुदैवतअयंतेपिंडइति दक्षिणमुखःप्राचीनावीतिवामंजान्वाच्यपितृतीर्थेनदद्यात् गंधादिभिरभ्यर्च्यप्रवाहणांतंकृत्वाविसर्जयेत् तस्यामेवरात्रौश्वःकरिष्यमाणश्राद्धेक्षणःक्रियतामिति एकंत्रीन्पंचवाविप्रान्निमंत्र्योपोषितोजागरंकुर्यात् श्वोभूतेमध्यान्हे विष्णुंसंपूज्यविष्णुरूपंप्रेतंविष्णुब्रह्मशिवयमप्रेतान्वोद्दिश्यैकोद्दिष्टविधिनापादक्षालनादितृप्तिप्रश्नांतंकृत्वा रेखाकरणाद्यवनेजनांतंतूष्णींकृत्वा विष्णवेब्रह्मणेशिवायसपरिवारयमायेतिचतुरःपिंडान्नाममंत्रैर्दत्वा विष्णुरूपंप्रेतंध्यायन्काश्यपगोत्रदेवदत्तविष्णुरूपप्रेतअयंतेपिंडइतिपंचमंपिंडंदत्वाअर्चनादिप्रवाहणांतेआचांतान्दक्षिणादिभिःसंतोष्य तेष्वेकस्मैगुणवतेप्रेतबुद्ध्यावस्त्राभरणादिदत्वाविप्रान्वदेत् भवंतःप्रेतायतिलोदकांजलिदानंकुर्वंत्विति तेचपवित्रपाणयःकुशतिलतुलसीयुततिलांजलिं प्रेतायकाश्यपगोत्रायविष्णुरूपिणेअयंतिलांजलिरितिदद्युः विप्रान्वाचयेत् अनेननारायणबलिकर्मणाभगवान्विष्णुरिमंदेवदत्तंप्रेतंशुद्धमपापमर्हंकरोत्विति विसृज्यस्नात्वाभुंजीतेति सिंधौतुकुंभपंचकेविष्णुब्रह्मशिवयमप्रेतेतिपंचकंपूजयेत् स्वर्णरूप्यताम्रलोहमयाश्चत्वारः प्रेतोदर्भमयः अग्निंप्रतिष्ठाप्यश्रपितचरुंनारायणायपुरुषसूक्तेनषोडशाहुतिभिर्हुत्वादशपिंडांतेपुरुषसूक्ताभिमंत्रितशंखोदकेनप्रेतंप्रत्यृचंतर्पयेत् विष्ण्वादिचतुर्भ्योबलिंदद्यात् श्वोभूतेएकोद्दिष्टविधिनाश्राद्धपंचकंकरिष्यइतिसंकल्प्यविप्रपंचकेपाद्यादिपिंडदानांतेतर्पणादीतिविशेषउक्तः शेषंपूर्ववत् ॥

याप्रमाणें गर्भाधान केलें असतांहि जर गर्भाची उत्पत्ति न होईल अथवा मुलें होऊन मृत होतील तर संततीचा प्रतिबंधक जो पिशाच त्याचा उपद्रव दूर होण्याकरितां नारायणबलि व नागबलि हे विधि करावे. त्यामध्यें नारायणबलि करणें तो शुक्लपक्षांतील एकादशी, पंचमी किंवा श्रवणनक्षत्र या दिवसीं करावा; कारण, याहून दुसरे काल सांगितलेले मिळत नाहींत. त्या नारायणबलीचा प्रयोग परिशिष्ट व स्मृत्यर्थसार यांच्या अनुरोधानें कौस्तुभांत सांगितला आहे. तो असा,—शुक्लपक्षांतील एकादशीचे दिवसीं नदीच्या तीरीं, देवालय इत्यादिक पवित्रस्थानीं नारायणबलि करावा. तिथि, वार इत्यादिकांचा उच्चार केल्यानंतर, "मदीयकुलाभिवृद्धिप्रतिबंधकप्रेतस्य प्रेतत्वनिवृत्त्यर्थं नारायणबलिं करिष्ये," असा संकल्प करून यथाविधि दोन कुंभांची स्थापना करून त्या दोन कलशांवर सुवर्ण इत्यादिकांच्या दोन प्रतिमा ठेवून त्यांच्यावर विष्णु, वैवस्वतयम यांचें आवाहन करून पुरुषसूक्तानें विष्णूची व

"यमाय सोमं०" ह्या मंत्रानें यमाची असी षोडशोपचारपूजा करावी. एथें कोणी पांच कलशांचे ठिकाणीं ब्रह्मा, विष्णु, शिव, यम आणि प्रेत यांची पूजा करितात. कलशाच्या पूर्वभागीं रेखा करून दक्षिणदिशेला अग्रें केलेले अशा दर्भावर "शुंधंतां विष्णुरूपी प्रेतः" असें ह्मणून दहा जागीं, उत्तरेकडून आरंभ करून दक्षिणसंस्थ असें उदक देऊन मध, तूप, आणि तिळ यांहीं युक्त असे दहा पिंड "काश्यपगोत्र देवदत्त प्रेत विष्णुदैवत अयं ते पिंडः," असा उच्चार करून दक्षिणदिशेला संमुख होत्साता अपसव्य करून व डावा ढोपा (गुडघा) खालीं करून पितृतीर्थानें पिंड द्यावा. गंधादिकांनीं पूजा करून पिंडांचे प्रवाहणापर्यंत कर्म करून विसर्जन करावें. त्याच रात्रीमध्यें "श्वः करिष्यमाणश्राद्धे क्षणः क्रियतां," असा उच्चार करून एक, तीन अथवा पांच ब्राह्मणांला आमंत्रण करून उपोषित होत्साता जागरण करावें. नंतर दुसऱ्या दिवसीं मध्यान्हकालीं विष्णूची पूजा करून विष्णुरूपी जो प्रेत त्याच्या, किंवा विष्णु, ब्रह्मा, शिव, यम, प्रेत यांच्या उद्देशेंकरून एकोद्दिष्टविधीनें पादप्रक्षालनापासून तृप्तिप्रश्नपर्यंत कर्म करून रेखाकरणापासून उदकदानापर्यंत मंत्ररहित कर्म करून "विष्णवे, ब्रह्मणे, शिवाय, सपरिवारयमाय," असा उच्चार करून चार पिंड नाममंत्रांनीं देऊन विष्णुरूप प्रेताचें ध्यान करीत होत्साता "काश्यपगोत्र देवदत्त विष्णुरूप प्रेत अयं ते पिंडः" असें ह्मणून पांचवा पिंड देऊन पूजा इत्यादि पिंडप्रवाहणांत कर्म करून ब्राह्मणांनीं आचमन केल्यानंतर त्यांला दक्षिणा इत्यादिक देऊन त्यांचा संतोष करावा. नंतर त्या ब्राह्मणांतून एका गुणवान् अशा ब्राह्मणाला प्रेताच्या बुद्धीनें वस्त्रें, अलंकार इत्यादिक देऊन ब्राह्मणांला सांगावें कीं, तुह्मी प्रेताला तिलोदकाची अंजलि द्यावी. मग त्या ब्राह्मणांनीं हातांत दर्भाचें पवित्रक धारण करून तिळ, दर्भ, तुळसी, यांहीं युक्त असी तिलांजलि घेऊन "प्रेताय काश्यपगोत्राय विष्णुरूपिणे अयं तिलांजलिः" असें ह्मणून द्यावी. नंतर ब्राह्मणांकडून बोलवावें, तें असें,—"अनेन नारायणबलिकर्मणा भगवान् विष्णुरिमं देवदत्तं प्रेतं शुद्धमपापमर्हं करोतु." तदनंतर विसर्जन करून स्नान करून भोजन करावें. निर्णयसिंधूमध्यें तर पांच कुंभांचे ठिकाणीं विष्णु, ब्रह्मा, शिव, यम, प्रेत ह्या पांच देवतांची पूजा करावी. सुवर्ण, रुपें, तांबें, लोखंड यांच्या चार प्रतिमा, व प्रेत दर्भमय करावा. अग्नीची स्थापना करून त्यावर चरु शिजवून पुरुषसूक्ताच्या सोळा ऋचांनीं नारायणाच्या उद्देशानें हवन करून दहा पिंड दिल्यानंतर पुरुषसूक्तानें अभिमंत्रित अशा शंखोदकेंकरून दर एक ऋचेनें प्रेताचें तर्पण करावें. विष्णु इत्यादिक चार देवतांला बलि द्यावा. दुसऱ्या दिवसीं "एकोद्दिष्टविधिना श्राद्धपंचकं करिष्ये" असा संकल्प करून पांच ब्राह्मणांची पाद्यादिक पूजा करून पिंडदानपर्यंत कर्म झाल्यानंतर तर्पण करावें, असा विशेषविधि सांगितला आहे. शेष राहिलें तें पूर्वीप्रमाणें करावें.

---

अथनागबलिः ॥ सचदर्शेपौर्णमास्यांपंचम्यामाश्लेषायुतनवम्यांवाकार्यः तत्रपर्षदंप्रदक्षिणीकृत्यनत्वा तदग्रेगोवृषनिष्क्रयंनिधायसभार्यस्यममेहजन्मनिजन्मांतरेवाजातसर्पवधदोषपरिहारार्थंप्रायश्चित्तमुपदिशंतुभवंतः सर्वेधर्मविवेक्तारइत्यादि० विप्रैश्चतुर्दशकृच्छ्रप्रायश्चि

त्तेनअमुकप्रत्याम्नायद्वारापूर्वोक्तरांगसहितेनाचरितेनतवशुद्धिर्भविष्यतीत्युपदिष्टो देशकालौ संकीर्त्य पर्षदुपदिष्टंचतुर्दशकृच्छ्रप्रायश्चित्तंअमुकप्रत्याम्नायेनाहमाचरिष्येइतिसंकल्प्य वप नादिविधिना तदाचरेत् वपनासंभवे द्विगुणःकृच्छ्रप्रत्याम्नायःसर्पवधदोषपरिहारार्थमिमंलो हदंडंसदक्षिणंतुभ्यमहंसंप्रददइतिदत्वागुर्वनुज्ञांलब्ध्वा गोधूमव्रीहितिलान्यतमपिष्टेनसर्पाकृ तिंकृत्वाशूर्पेनिधायसर्पंप्रार्थयेत् एहिपूर्वमृतःसर्पअस्मिन्पिष्टेसमाविश संस्कारार्थमहंभक्त्या प्रार्थयामिसमाहितः आवाहनादिषोडशोपचारैःसंपूज्यनत्वाभोसर्पइमंबलिंगृहाणममाभ्युदयं कुरुइतिबलिंदत्वापादौप्रक्षाल्याचामेत् देशकालौसंकीर्त्यसभार्यस्यममेहजन्मनिजन्मान्तरेवा ज्ञानादज्ञानाद्वाजातसर्पवधोत्थदोषपरिहारार्थंसर्पसंस्कारकर्मकरिष्यइतिसंकल्प्य स्थंडिलेग्निं प्रतिष्ठाप्यध्यात्वा अस्मिन्सर्पसंस्कारहोमकर्मणिदेवतापरिग्रहार्थमन्वाधानंकरिष्ये चक्षुषी आज्येनेत्यंतेअग्नौअग्निंवायुंसूर्यंआज्येनसर्पमुखेप्रजापतिमाज्येनआज्यशेषेणसर्पंसद्योयक्ष्येइ तिसमिधावाधायअग्नेराग्नेयदिशिप्रोक्षितभूमौचितिंकृत्वा अग्निंचितिंचपरिसमुह्याग्नेयाग्रदर्भैः परिस्तीर्यपरिषिच्यषट्पात्रासादनादिचक्षुषीहुत्वासर्पंचित्यामारोप्यजलंश्रोत्रंचस्पृष्ट्वा अग्नौ भूःस्वाहाअग्नयइदमित्यादिव्याहृतित्रयेणाज्याहुतीर्हुत्वासमस्तव्याहृतिभिश्चतुर्थींसर्पमुखे जुहु यात् आज्यशेषंस्रुवेणैवसर्पदेहेनिषिंचेत् नात्रस्विष्टकृतादिशेषं चमसजलैः समस्तव्याहृत्या सर्पपाणिनाप्रोक्ष्य अग्नेरक्षाणोवसिष्ठोग्निर्गायत्री सर्पायाग्निदानेवि० अग्नेरक्षाणोअंहसऋक् अथोपस्थानं नमोअस्तुसर्पेभ्योयेकेचपृथिवीमनुयेअंतरिक्षे येदिवितेभ्यःसर्पेभ्योनमः येदोरो चनेदिवोयेवासूर्यस्यरश्मिषु येषामप्सुसदस्कृतंतेभ्यः० याइषवोयातुधानानांयेवावनस्पतिं रनु येवावटेषुशेरतेतेभ्यः०त्राहित्राहिमहाभोगिन्सर्पोपद्रवदुःखतः संततिंदेहिमेपुण्यांनिर्दु ष्टांदीर्घदेहिनीम् प्रपन्नंपाहिमांभक्त्याकृपालोदीनवत्सल ज्ञानतोज्ञानतोवापिकृतःसर्पवधोम या जन्मांतरेतथैतस्मिन्मत्पूर्वैरथवाविभो तत्पापंनाशयक्षिप्रमपराधंक्षमस्वमे इतिसंप्रार्थ्यैना ग्नेर्गंस्नात्वागत्यततःपुनः व्याहृतिभिःक्षीराज्येनाग्निंसंप्रोक्ष्यहुतेसर्पजलेनाग्निंसिंचेत् यज्ञोपवी तिनासर्वंसर्पसंस्कारकर्मतु नास्थिसंचयनंकुर्यात्स्नात्वाचम्यगृहंव्रजेत् सभार्यस्यकर्तुस्त्रिरात्र माशौचंब्रह्मचर्यंचकार्यम् चतुर्थेहनिसचैलंस्नात्वाघृतपायसभक्ष्यैरष्टौविप्रान्भोजयेत् तद्यथा सर्पस्वरूपिणेब्राह्मणायइदंतेपाद्यम् अनंतस्वरूपिणे० शेषस्वरूपि० कपिलस्व० नागस्व० कालिकस्व० शंखपालस्व० भूधरस्व० इत्यष्टसुदत्वास्वपादौप्रक्षाल्याचम्य सर्पस्वरूपिणेब्रा० इदमासनंआस्यतां एवमनंतादिषु ततःसर्पस्थानेक्षणःक्रियतामित्यादि ओंतथाप्राप्नोतुभवान्प्रा प्नुवानि भोसर्परूपइदंतेगंधं एवंअनंतादिषु एवंपुष्पधूपदीपवस्त्रादिदत्वाअन्नंपरिविष्यप्रोक्ष्य सर्पायइदमन्नंपरिविष्टंपरिवेक्ष्यमाणंचदत्तंदास्यमानंचातृप्तेरमृतरूपेणस्वाहासंपद्यतांनमम एव मनंतादिभ्योपि आचांतेषुभोसर्पअयंतेबलिरित्यादिनाममंत्रैर्बलिदानं तेषुपिंडेषुवस्त्रादिपूजा चकार्या इदमपिसर्वंसव्येनैव विप्रेभ्यस्तांबूलदक्षिणादिदत्वाआचार्यंसंपूज्य कलशेसुवर्णना गमावाहनादिषोडशोपचारैःसंपूज्यप्रार्थयेत् ब्रह्मलोकेचयेसर्पाःशेषनागपुरोगमाः नमोस्तुते भ्यःसुप्रीताःप्रसन्नाःसंतुतेसदा विष्णुलोकेचयेसर्पावासुकिप्रमुखाश्चये नमोस्तु० रुद्रलोकेचये सर्पास्तक्षकप्रमुखास्तथा नमोस्तु० खांडवस्यतथादाहेस्वर्गंयेचसमाश्रिताः नमोस्तु० सर्पस

त्रेचयेसर्पाआस्तिकेनचरक्षिताः नमोस्तु० मलयेचैवयेसर्पाःकर्कोटप्रमुखाश्चये नमोस्तु० धर्मलोकेचयेसर्पावैतरण्यांसमाश्रिताः नमो० येसर्पाःपार्वतीयेषुदरीसंधिषुसंस्थिताः नमो० ग्रामेवायदिवारण्येयेसर्पाःप्रचरंतिहि नमो० पृथिव्यांचैवयेसर्पायेसर्पाबलिसंस्थिताः नमो० रसातलेचयेसर्पाअनंताद्यामहाबलाः नमो० एवंस्तुत्वादेशकालौसंकीर्त्यकृतस्यसर्पसंस्कारकर्मणःसांगतार्थमिमंहैमनागंसकलशंसवस्त्रंसदक्षिणंतुभ्यमहंसंप्रददेनमम अनेनस्वर्णनागदानेनानंतादयोनागदेवताःप्रीयंताम् आचार्यायगोदानं यस्यस्मृत्याच० मयाकृतंसर्पसंस्काराख्यकर्मतद्भवतांविप्राणांवचनात्परमेश्वरप्रसादात्सर्वंपरिपूर्णमस्तु तथास्त्वितितेब्रूयुः ब्राह्मणांस्तोषयेत् सांगतार्थंब्राह्मणान्भोजयेत् कृत्वासर्पस्यसंस्कारमनेनविधिनानरः विरोगोजायतेक्षिप्रंसंततिंलभतेशुभाम् इतिसर्पबलिः ॥ एवमपिपुत्रोत्पत्त्यसिद्धौकर्मविपाकग्रंथोक्तहरिवंशश्रवणादिविधानंकुर्यात् तत्रषडब्दंचतुरब्दंत्र्यब्दंसार्धाब्दं अब्दंवाप्रायश्चित्तंकृत्वावाकार्यं ॥

## आतां नागबलीचा विधि सांगतों.

नागबलि करणें तो अमावास्या, पौर्णिमा, पंचमी अथवा आश्लेषायुक्त नवमी यांतून कोणत्याहि दिवसीं करावा. तो असा,—ब्राह्मणाच्या सभेला प्रदक्षिणा करून नमस्कार करावा. नंतर त्या सभेच्या पुढें, १ गाई व १ बैल यांची किंमत ठेवून प्रार्थना करावी, ती असी— " स्त्रियेसहवर्तमान अशा ह्या माझ्या जन्मामध्यें अथवा पूर्वजन्मामध्यें झालेला जो सर्पवधाचा दोष त्याचा परिहार व्हावा एतदर्थ तुह्मी मला प्रायश्चित्त सांगावें, तुह्मी सर्व, धर्माचा विचार करणारे आहां इत्यादिक, " असी प्रार्थना केल्यानंतर " ब्राह्मणांनीं पूर्वांग व उत्तरांग यांहीं युक्त व अमुक प्रत्याम्नायद्वारें असें चवदा कृच्छ्रांचें पूर्वोत्तरांगसहित प्रायश्चित्त घेतल्यानें तुह्मी शुद्धि होईल असें सांगावें. " याप्रमाणें सांगितल्यानंतर यजमानानें देश, काल यांचा उच्चार करून " पर्षदुपदिष्टं चतुर्दशकृच्छ्रप्रायश्चित्तं अमुकप्रत्याम्नायेनाहमाचरिष्ये," असा संकल्प करून क्षौर इत्यादिक विधिपूर्वक प्रायश्चित्त करावें. क्षौर न केलें असतां दुप्पट असा ( २८ ) कृच्छ्रांचा प्रत्याम्नाय करावा. नंतर सर्पवधाचा दोष दूर होण्याकरितां लोहदंडाचें दान करावें. तें असें, "सर्पवधदोषपरिहारार्थमिमं लोहदंडं सदक्षिणं तुभ्यमहं संप्रददे." याप्रमाणें दान करून नंतर गुरूची आज्ञा घेऊन गहूं, तांदूळ किंवा तीळ यांतून कोणत्याहि पिठाचा सर्प करून तो सुपांत ठेवावा. नंतर त्या सर्पाची प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र,— " एहि पूर्वमृतः सर्प अस्मिन्पिष्टे समाविश ॥ संस्कारार्थमहं भक्त्या प्रार्थयामि समाहितः. " नंतर आवाहन इत्यादिक सोळा उपचारांनीं त्या सर्पाची पूजा करून नमस्कार करावा व त्याला बलि द्यावा. तो असा,—" भो सर्प इमं बलिं गृहाण ममाभ्युदयं कुरु," याप्रमाणें बलि देऊन हात पाय धुवून आचमन करावें. नंतर देशकाल यांचा उच्चार करून संकल्प करावा. तो असा,—"सभार्यस्य ममेहजन्मनिजन्मांतरे वा ज्ञानादज्ञानाद्वा जातसर्पवधोत्थदोषपरिहारार्थं सर्पसंस्कारकर्म करिष्ये," असा संकल्प करून स्थंडिलाचे ठिकाणीं अग्नीची स्थापना करून ध्यान करून अन्वाधानाचा संकल्प करावा. तो असा,—" अस्मिन्सर्पसंस्कारहोमकर्मणि देवतापरिग्रहार्थमन्वाधानं करिष्ये चक्षुषी आज्येनेत्यंते अग्नौ

अग्निं वायुं सूर्यं आज्येन सर्पमुखे प्रजापतिमाज्येन आज्यशेषेण सर्पं सद्यो यक्ष्ये," असा संकल्प ( अन्वाधान ) केल्यानंतर, दोन समिधा अग्नीचे ठिकाणीं हवन केल्यानंतर, अग्नीच्या आग्नेय दिशेचे ठिकाणीं भूमि प्रोक्षण करून तेथें चिता करावी. नंतर अग्नि व चिता यांला परिसमूहन ( एक प्रकारचा उदकसंस्कार ) करून आग्नेयदिशेला अग्रें करून दर्भाचीं परिस्तरणें घालावीं. नंतर पर्युक्षण ( उदकसंस्कार ) करून सहा पात्रें मांडून चक्षुषीहोमपर्यंत कर्म करून सर्पाला चितेवर ठेवावा. नंतर उदक व कर्ण यांला स्पर्श करून अग्नीमध्यें होम करावा. तो असा,—" भूः स्वाहा अग्नय इदं न मम," इत्यादिक तीन व्याहृतिमंत्रांनीं तीन घृताच्या आहुतींनीं होम करून समस्त ( सर्व ) व्याहृतिमंत्रानें चवथी आहुति सर्पाच्या मुखाचे ठिकाणीं द्यावी. बाकी राहिलेलें घृतशेष स्रुवा पात्रांत घेऊन सर्पावर घालावें. एथें स्विष्टकृतादिक होमशेष नाहीं. चमस पात्रांत उदक घेऊन त्या उदकानें, समस्त व्याहृतिमंत्र ह्मणून हातानें तो सर्प धुवावा. नंतर तो चितेवर ठेवून त्याला अग्नि द्यावा, अग्नि देण्याचा मंत्र,—" अग्ने रक्षाणो वसिष्ठोग्निर्गायत्री ॥ सर्पायाग्निदाने विनियोगः ॥ अग्ने रक्षाणो अंहस० ऋक्," याप्रमाणें अग्नि दिल्यानंतर त्या सर्पाची प्रार्थना करावी, प्रार्थनेचे मंत्र,—" नमो अस्तु सर्पेभ्यो ये केच पृथिवीमनु ॥ ये अंतरिक्षे ये दिवि तेभ्यः सर्पेभ्यो नमः ॥ ये दोरोचने दिवो येवा सूर्यस्य रश्मिषु ॥ येषामप्सु सदस्कृतं तेभ्यः० ॥ या इषवो यातुधानानां येवा वनस्पतिँ्रनु ॥ येवा वटेषु शेरते तेभ्यः० ॥ त्राहि त्राहि महाभोगिन् सर्पोपद्रवदुःखतः ॥ संततिं देहि मे पुण्यां निर्दुष्टां दीर्घदेहिनीं ॥ प्रपन्नं पाहि मां भक्त्या कृपालो दीनवत्सल ॥ ज्ञानतोऽज्ञानतो वापि कृतः सर्पवधो मया ॥ जन्मांतरे तथैतस्मिन् मत्पूर्वैरथवा विभो ॥ तत्पापं नाशय क्षिप्रमपराधं क्षमस्व मे," असी सर्पाची प्रार्थना करून नंतर स्नान करावें. त्यानंतर दूध व तूप घेऊन व्याहृतिमंत्रांनीं अग्नीचें प्रोक्षण करून सर्प दग्ध झाल्यानंतर उदकानें अग्नि विझवावा. " सर्पाचें सर्व संस्कारकर्म सव्यानेंच करावें. अस्थींचें संचयन करूं नये, व स्नान करून आचमन करून घरीं जावें." स्त्रियेसहवर्तमान कर्त्यानें त्रिरात्र आशौच धरून ब्रह्मचर्य धारण करावें. चवथ्या दिवसीं वस्त्रांसहित स्नान करून तूप, क्षीर व इतर भक्ष्य पदार्थ यांहींकरून आठ ब्राह्मणांला भोजन घालावें. तें असें,—" सर्पस्वरूपिणे ब्राह्मणाय इदं ते पाद्यं ॥ अनंतस्वरूपिणे० शेषस्वरूपिणे० कपिलस्वरूपिणे० नागस्वरूपिणे० कालिकस्वरूपिणे० शंखपालस्वरूपिणे० भूधरस्वरूपिणे०" याप्रमाणें आठ ब्राह्मणांला पाद्य देऊन नंतर आपले पाय धुवून आचमन करावें. नंतर आसन द्यावें. तें असें,—" सर्पस्वरूपिणे ब्राह्मणाय इदमासनं आस्यतां." याप्रमाणें अनंतादिक जे सात त्यांलाहि आसन द्यावें. तदनंतर क्षण द्यावा. तो असा,—" सर्पस्थाने क्षणः क्रियतां इत्यादि ओं तथा प्राप्नोतु भवान् प्राप्नुवानि" " भोः सर्परूप इदं ते गंधं०" याप्रमाणें अनंतादिक जे त्यांलाहि क्षण, गंध द्यावें. याप्रमाणें पुष्प, धूप, दीप, वस्त्र इत्यादिक उपचार देऊन पात्रें मांडून त्यांवर सर्व पदार्थ वाढून पात्रें प्रोक्षण करून अन्ननिवेदन ( अर्पण ) करावें. तें असें,—" सर्पाय इदमन्नं परिविष्टं परिवेक्ष्यमाणं च दत्तं च दास्यमानं चातृप्तेरमृतरूपेण स्वाहा संपद्यतां न मम."

याप्रमाणें अनंतादिक जे त्यांलाहि अन्नाचें निवेदन करावें. नंतर ब्राह्मणभोजन करून आचमन केल्यावर बलिदान करावें. तें असें,–" भो सर्प अयं ते बलिः इत्यादि. " याप्रमाणें नाममंत्रांनीं बलिदान करावें, व त्या पिंडांची वस्त्रादिक उपचारांनीं पूजा करावी. हेंहि सर्व कर्म सव्यानेंच करावें. नंतर ब्राह्मणांला विडा, दक्षिणा इत्यादिक देऊन आचार्याची पूजा करावी, आणि कलशाचे ठिकाणीं सुवर्णाच्या नागाची स्थापना करून आवाहनादिक सोळा उपचारांनीं पूजा करून प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र " ब्रह्मलोके च ये सर्पाः शेषनागपुरोगमाः ॥ नमोस्तु तेभ्यः सुप्रीताः प्रसन्नाः संतु ते सदा ॥ विष्णुलोके च ये सर्पा वासुकिप्रमुखाश्च ये ॥ नमोस्तु ते० ॥ रुद्रलोके च ये सर्पास्तक्षकप्रमुखास्तथा ॥ नमोस्तु०॥ खांडवस्य तथा दाहे स्वर्गं ये च समाश्रिताः ॥ नमोस्तु० ॥ सर्पसत्रे च ये सर्पा आस्तिकेन च रक्षिताः ॥ नमोस्तु० ॥ मलये चैव ये सर्पाः कर्कोटप्रमुखाश्च ये ॥ नमोस्तु० ॥ धर्मलोके च ये सर्पा वैतरण्यां समाश्रिताः ॥ नमोस्तु० ॥ ये सर्पाः पार्वतीयेषु दरीसंधिषु संस्थिताः ॥ नमोस्तु० ॥ ग्रामे वा यदि वारण्ये ये सर्पाः प्रचरंति हि ॥ नमो० ॥ पृथिव्यां चैव ये सर्पा ये सर्पा बलिसंस्थिताः ॥ नमो० ॥ रसातले च ये सर्पा अनंताद्या महाबलाः ॥ नमो० " याप्रमाणें प्रार्थना केल्यानंतर देशकालांचें संकीर्तन करून कलशावर स्थापित केलेल्या नागाचें दान करण्याचा संकल्प करून दान करावें. तें असें,–" कृतस्य कर्मणः सांगतार्थं इमं हैमनागं सकलशं सवस्त्रं सदक्षिणं तुभ्यमहं संप्रददे न मम ॥ अनेन स्वर्णनागदानेन अनंतादयो नागदेवताः प्रीयंतां, " याप्रमाणें दान करून आचार्याला गाईचें दान करून कर्म समाप्त करावें. तें असें,–" यस्यस्मृत्या च० ॥ मया कृतं सर्पसंस्काराख्यकर्म तद्भवतां विप्राणां वचनात्परमेश्वरप्रसादात् सर्वं परिपूर्णमस्तु," याप्रमाणें कर्मसमाप्तीचे वाक्याचा उच्चार केल्यानंतर ब्राह्मणांनीं " तथास्तु " असें बोलावें. मग ब्राह्मणांचा संतोष करावा, व कर्माच्या सांगतेकरितां ब्राह्मणांला भोजन द्यावें–" ह्या विधीनें सर्पाचा संस्कार केला असतां निरोगी होत्साता त्वरित उत्तम संतति पावतो. " अशानेंहि पुत्रोत्पत्ति न होईल तर, कर्मविपाक ग्रंथामध्यें सांगितलेल्याप्रमाणें हरिवंशग्रंथाचें श्रवण इत्यादिक विधि करावा. तो विधि–षडब्द ( सहा वर्षें ), चतुरब्द ( चार वर्षें ), त्र्यब्द ( तीन वर्षें ), सार्धाब्द ( दीडवर्ष ) अथवा अब्द ( एक वर्ष ) असें प्रायश्चित्त करून नंतर करावा.

---

तत्रत्रिंशत्कृच्छ्रात्मकोब्दः कृच्छ्रस्तुद्वादशदिनसाध्यः तथाहिप्रथमेदिनेमध्यान्हेहविष्यस्यैकभक्तस्यषड्विंशतिर्ग्रासाभोक्तव्याः द्वितीयेहनिनक्तंद्वाविंशतिर्ग्रासाः तृतीयेअयाचितस्यचतुर्विंशतिर्ग्रासाः चतुर्थेनिरशनं अयंपादकृच्छ्रःकथंचित्त्रिगुणीकृतोयंप्राजापत्यः कृच्छ्रः एकभक्तनक्तायाचितद्वयोपवासद्वयैरर्धकृच्छ्रःयद्वा त्र्यहमयाचितंत्र्यहमुपवासइत्यर्धकृच्छ्रःएकभक्तायाचितोपवासैःकथंचित्त्रिगुणैःपादोनकृच्छ्रःयेषुनवदिनेषुभोजनप्राप्तिस्तत्रग्रासनियमंत्यक्त्वापाणिपूरान्नभोजनेअतिकृच्छ्रःएकग्रासपर्याप्तस्यप्राणधारणपर्याप्तस्यवादुग्धस्यएकविंशतिदिनेषुभक्षणेकृच्छ्रातिकृच्छ्रःएकदिनेसकुशोदकमिश्रपंचगव्याशनंएकउपवासइतिद्विरात्रि

कः सांतपनकृच्छ्रः पंचगव्यकुशोदकानाममिश्राणामेकैकस्यैकैकदिनेऽशनमेकउपवासइतिस प्राहसाध्योमहासांतपनः त्र्यहंमिश्रितपंचगव्याशनेयतिसांतपनंतप्तानांदुग्धघृतजलानामेकैक स्यत्रिदिनेपानमुपवासत्रयंचेतितप्तकृच्छ्रः शीतानांपानेशीतकृच्छ्रः यद्वातप्तानांघृतादीनामेकैक दिनेऽशनंचतुर्थदिनेउपवासइतिदिनचतुष्टयसाध्यस्तप्तकृच्छ्रः द्वादशाहोपवासेनपराककृच्छ्रः शुक्लपक्षेप्रतिपदादितिथिषुमयूरांडसमानैकैकग्रासान्वर्धयन्पूर्णिमायांपंचदशग्रासाःक्षयेचतुर्द शवृद्धौषोडशसंपद्यंते कृष्णपक्षेएकैकग्रासन्हासेनामायामुपवासइतिमाससाध्यंयवमध्यसं ज्ञंचांद्रायणं कृष्णपक्षेप्रतिपदिचतुर्दशग्रासान्भुक्त्वाएकैकग्रासन्हासेनदर्शेअनशनंशुक्लेवृद्धि रिति कृष्णादिशुक्लांतेतंपिपीलिकामध्यचांद्रायणं कृच्छ्रचांद्रायणादेःत्रिकालस्नानग्रासाभिमं त्रणादिविधियुतःप्रयोगःप्रायश्चित्तप्रकरणेज्ञेयः अतिकृच्छ्रादिलक्षणंप्रसंगादत्रोक्तं अब्दगण नातुप्राजापत्यकृच्छ्रैरेव ॥

## आतां कृच्छ्रांचीं लक्षणें सांगतों.

तीस कृच्छ्र ह्मणजे एक अब्द; एक कृच्छ्र बारा दिवसांनीं साध्य होतो, तो असा,—पहिल्या दिवसीं मध्यान्हकालीं एक वेळ हविष्यान्नाचे सवीस ग्रास भक्षण करावे, दुसऱ्या दिवसीं नक्त करावें, व त्यामध्यें बेवीस ग्रास भक्षण करावे, तिसऱ्या दिवसीं कोणाजवळ याचना केल्यावांचून जें अन्न मिळेल त्याचे चोवीस ग्रास भक्षण करावे, आणि चवथ्या दिवसीं उपोषण करावें, याला पादकृच्छ्र ह्मणतात. हा तिप्पट केला ह्मणजे तो प्राजापत्यकृच्छ्र होतो. पहिल्या दिवसीं दोन प्रहरीं एकवेळ भोजन, दुसऱ्या दिवसीं नक्तभोजन, तिसरा व चवथा या दोन दिवसीं अयाचित भोजन, पांचवा व सहावा या दोन दिवसीं उपोषण, याला अर्धकृच्छ्र असें ह्मणतात. अथवा तीन दिवस अयाचित भोजन, तीन दिवस उपोषण, यालाहि अर्धकृच्छ्र असें ह्मणतात. पहिल्या दिवसीं एकवेळ दोनप्रहरीं भोजन, दुसऱ्या दिवसीं अयाचित, तिसऱ्या दिवसीं उपोषण; याप्रमाणें तिप्पट केल्यानें पादोनकृच्छ्र होतो. ज्या नवव्या दिवसांत भोजन करण्याचा प्रसंग येतो तेथें ग्रासनियम सोडून हातांत राहील इतक्या अन्नाचें भोजन करणें त्याला अतिकृच्छ्र असें ह्मणतात. प्राण मात्र वांचतील इतक्यापुरतें अथवा एकग्रासपरिमित दूध एकवीस दिवसपर्यंत पिणें याला कृच्छ्रातिकृच्छ्र असें ह्मणतात. एक दिवस कुशोदकमिश्र पंचगव्य पिऊन एक दिवस उपोषण करणें असा हा दोन रात्रींनीं होणारा, याला सांतपनकृच्छ्र असें ह्मणतात. पहिल्या दिवसीं गोमूत्रप्राशन, दुसऱ्या दिवसीं गोमय, तिसऱ्या दिवसीं दूध, चवथ्या दिवसीं दहीं, पांचव्या दिवसीं तूप, सहाव्या दिवसीं कुशोदक, सातव्या दिवसीं उपोषण, याप्रमाणें सात दिवसांनीं होणारा, याला महासांतपन ह्मणतात. तीन दिवसपर्यंत नुस्तें पंचगव्य प्राशन करावें याला यतिसांतपन ह्मणतात. पहिले तीन दिवसपर्यंत उष्ण दूध प्यावें, चवथ्या दिवसापासून तीन दिवस उष्ण तूप प्यावें, सातव्या दिवसापासून तीन दिवस उष्णोदक प्यावें, व नंतर तीन दिवस उपोषण करावें, याला तप्तकृच्छ्र असें ह्मणतात. दूध, तूप व उदक हीं पूर्वीं सांगितल्याप्रमाणें शीत (थंड) प्राशन केलीं असतां

त्याला शीतकृच्छ्र असें ह्मणतात. अथवा तप्त (तापवलेलीं) अशीं दूध, तूप, उदक यांतून दररोज एकेक प्राशन करावें, व चवथ्या दिवसीं उपोषण करावें, असा हा चार दिवसांनीं होणारा, याला तप्तकृच्छ्र असें ह्मणतात. बारा दिवसपर्यंत उपोषण करावें त्याला पराककृच्छ्र असें ह्मणतात. शुक्लपक्षामध्यें प्रतिपदा इत्यादिक तिथींचे ठिकाणीं मोराच्या अंड्याप्रमाण असा एकेक ग्रास दररोज वाढवीत आणून पूर्णिमेचे दिवसीं पंधरा ग्रास भक्षण करावे. तिथीचा क्षय असल्यास चवदा ग्रास, तिथीची वृद्धि असल्यास सोळा ग्रास होतात. याप्रमाणें कृष्ण-पक्षांत दररोज एकेक ग्रास कमी करावा व अमावास्येचे दिवसीं उपोषण करावें, याप्रमाणें एक महिन्यानें होणारें, याला यवमध्यचांद्रायण असें ह्मणतात. कृष्णपक्षामध्यें प्रतिपदेचे दिवसीं चवदा ग्रास भक्षण करून द्वितीयेपासून एकेक कमी करावा व अमावास्येचे दिवसीं उपोषण करून शुक्लपक्षामध्यें दररोज एकेक ग्रासाची वृद्धि करावी, याप्रमाणें कृष्णपक्षापासून आरंभ करून शुक्लपक्षीं समाप्त करणें, याला पिपीलिकामध्यचांद्रायण असें ह्मणतात. कृच्छ्र-चांद्रायण इत्यादिकांमध्यें तीन वेळ स्नान करणें, ग्रासांचें अभिमंत्रण करणें इत्यादिक विधि-युक्त प्रयोग प्रायश्चित्तग्रंथीं पाहावा. अतिकृच्छ्र इत्यादिकांचें लक्षण एथें प्रासंगिक सांगितलें आहे. अब्दांची संख्या करणें ती तर प्राजापत्यकृच्छ्रांवरूनच करावी.

---

अथप्रत्याम्नायाः तत्रप्राजापत्यप्रत्याम्नायाः दशसहस्रगायत्रीजपः गायत्र्यासहस्रंतिलहोमः क्वचित्सहस्रंव्याहृत्यातिलहोमउक्तः शतद्वयंप्राणायामाः द्वादशब्राह्मणभोजनं यावत्केशशोषणंविरम्यतीर्थेद्वादशस्नानानि वेदसंहितापारायणं योजनयात्रा द्वादशसहस्रंनमस्काराः द्वात्रिंशदुत्तरशतंप्राणायामान्कृत्वाअहोरात्रमुपोषितःप्राङ्मुखस्तिष्ठेत् गोमूत्रेणयावकभक्षणेऐकाहिककृच्छ्रं कश्चित्तुरुद्रैकादशिनीजपात्कृच्छ्रमाह पावकेष्टिः पावमानेष्टिःषड्डुपवासाःप्राजापत्यप्रत्याम्नायाः एकविप्रभोजनमुपवासस्य अत्यशक्तौसहस्रगायत्रीजपोद्वादशप्राणायामावेतिस्मृत्यर्थसारे प्राजापत्येष्वशक्तस्तुधेनुंदद्यात्पयस्विनीं धेनोरभावेनिष्कंस्यात्तदर्धंपादमेववा अशीतिगुंजात्मकःकर्षः चत्वारःकर्षानिष्कं निष्कनिष्कार्धनिष्कपादान्यतमप्रमाणंहेमरूप्यंवाधेनुमूल्यंदेयं अत्यशक्तेननिष्कपादार्धरजतंतत्समंधान्यादिवादेयं अतिकृच्छ्रेगोद्वयं सांतपनेगोद्वयं पराकेतप्तकृच्छ्रेचगोत्रयं कृच्छ्रातिकृच्छ्रेगोचतुष्टयंगोत्रयंवा चांद्रायणे अष्टौपंचचतस्रस्तिस्रोवागावः मासंपयोव्रतेयावकव्रतेमासोपवासेचपंचगावः मासंगोमूत्रयावकव्रतेषट्गावः ॥

## आतां यानंतर कृच्छ्रांचे प्रतिनिधि सांगतों.

त्यामध्यें प्राजापत्याचे प्रतिनिधि.—दहा सहस्र गायत्रीमंत्राचा जप करावा. गायत्रीमंत्रानें एक हजार तिळ होम करावा. क्वचित् ग्रंथीं व्याहृतिमंत्रानें एक हजार तिल्होम करावा असें सांगितलें आहे. दोनशें प्राणायाम करावे. बारा ब्राह्मणांला भोजन घालावें. तीर्थाचे ठि-काणीं स्नान करून केश वाळत तेथपर्यंत थांबून पुनः स्नान करावें, असीं बारा स्नानें करावीं. वेदाच्या संहितेचें पारायण करावें. चार कोशांपर्यंत तीर्थयात्रा करावी. बारा हजार नमस्कार

घालावे. एकशें बत्तीस प्राणायाम करून अहोरात्र उपोषित होत्साता पूर्व दिशीला संमुख उभें राहावें. गोमूत्राबरोबर यव (जव) भक्षण केले असतां एक दिवसांत कृच्छ्र होतो. कोणीएक ग्रंथकार रुद्राच्या एकादशिनीचा जप केल्यानें कृच्छ्र होतो असें सांगतो. पावकेष्टि करावी. पावमानेष्टि करावी. सहा उपोषणें हे प्रत्येक प्राजापत्याचे प्रतिनिधि होत. एका ब्राह्मणाला भोजन देणें, हा उपोषणाचा प्रतिनिधि होय. अति असामर्थ्य असेल तर एक हजार गायत्रीमंत्राचा जप करावा, अथवा बारा प्राणायाम करावे असें स्मृत्यर्थसारग्रंथीं सांगितलें आहे. "जर प्राजापत्यकृच्छ्र करण्यास अशक्त असेल तर त्यानें पुष्कळ दूध देणारी असी गाई द्यावी. गाई नसेल तर निष्कपरिमित, अर्धनिष्क अथवा निष्काचा चतुर्थांश द्रव्य द्यावें." ऐशीं गुंजा ह्मणजे एक कर्ष होतो. चार कर्ष ह्मणजे एक निष्क होतो. निष्क, अर्धा निष्क किंवा निष्काचा चतुर्थांश यांतून कोणत्याहि प्रमाणानें सुवर्ण किंवा रुपें असी गाईची किंमत द्यावी. अति अशक्त असेल त्यानें निष्काचा आठवा हिसा रुपें किंवा तितक्या किंमतीचें धान्य इत्यादिक द्यावें. अतिकृच्छ्राचे स्थानीं दोन गाई द्याव्या. सांतपनाचे स्थानीं दोन गाई. पराक व तप्तकृच्छ्र यांचे स्थानीं तीन तीन गाई द्याव्या. कृच्छ्रातिकृच्छ्रांचे स्थानीं चार किंवा तीन गाई द्याव्या. चांद्रायणाचे स्थानीं आठ, पांच, चार अथवा तीन अशा गाई द्याव्या. मासपर्यंत उदक प्राशन करणें, जव भक्षण करणें व मासपर्यंत उपोषणें करणें, यांचे स्थानीं पांच पांच गाई द्याव्या. मासपर्यंत गोमूत्राबरोबर यव भक्षण करणें ह्या व्रताचे स्थानीं सहा गाई द्याव्या.

---

**अथप्रायश्चित्तप्रयोगः** सचैलंस्नात्वाशक्तौक्लिन्नवासाःपर्षदग्रेगोवृषप्रत्याम्नायंनिष्कादिप्रमाणंब्रह्मदंडंनिधायसाष्टांगंप्रणम्यपर्षदंप्रदक्षिणीकुर्यात् सर्वेधर्मविवेक्तारोगोप्तारःसकलाद्विजाः ममदेहस्यसंशुद्धिंकुर्वंतुद्विजसत्तमाः मयाकृतंमहाघोरंज्ञातमज्ञातकिल्बिषं प्रसादःक्रियतांमह्यंशुभानुज्ञांप्रयच्छथ पूज्यैःकृतपवित्रोहंभवेयंद्विजसत्तमाः मामनुगृण्हंतुभवंतइतिब्रदेत् विप्रैःकिंतेकार्यंमिथ्यामावादीःसत्यमेववदेतिपृष्टःस्वपापंख्यापयेत्मयाममपत्न्यावाइहजन्मनिजन्मांतरेवा अनपत्यत्वमृतापत्यत्वादिनिदानभूतबालघातविप्ररत्नापहारादिदुरितंतस्यनाशायकरिष्यमाणे हरिवंशश्रवणादौकर्मविपाकोक्तेविधानेऽधिकारार्थंदीर्घायुष्मत्पुत्रादिसंततिप्राप्तयेप्रायश्चित्तमुपदिशंतुभवंतइतिप्रार्थयेत् तेचपापिनापूजितानुवादकाग्रे षडब्दत्र्यब्दसार्धाब्दान्यतमप्रायश्चित्तेनपूर्वोत्तरांगसहितेनाचरितेनतवशुद्धिर्भविष्यति तेनत्वंकृतार्थोभविष्यसीतिवदेयुःअनुवादकःपापिनंवदेत् ततःकर्ताओमित्यंगीकृत्यपर्षदंविसृज्यदेशकालौसंकीर्त्यसभार्यस्यममैतज्जन्मजन्मांतरार्जितानपत्यत्वादिनिदानभूतबालघातविप्ररत्नापहारादिजन्यदुरितसमूलनाशकर्मविपाकोक्तविधिनाधिकारसिद्धिद्वारादीर्घायुष्मद्बहुपुत्रादिसंततिप्राप्तये षडब्दंत्र्यब्दंसार्धाब्दंवाप्रायश्चित्तंपूर्वोत्तरांगसहितममुकप्रत्याम्नायेनाहमाचरिष्यइतिसंकल्प्य दिनांतेकेशरोमनखादिवापयित्वास्नात्वा आयुर्बलंयशोवर्चःप्रजाःपशुवसूनिच ब्रह्मप्रज्ञांचमेधांचत्वंनोदेहिवनस्पतेइतिविहितकाष्ठेनदंतधावनंकुर्यात् ततोदशस्नानानि तत्रभस्मस्नानं ईशानायनमःशिरसि तत्पुरुषायनमःमुखे अघोरायनमःहृदये वामदेवायनमोगुह्ये सद्योजातायनमः पादयोः प्रणवेनसर्वांगेषुभस्मविलिंपेत् ईशानादिपदोपेतैर्मंत्रैर्वाभस्मलेपः ततः स्नात्वाचामेत्॥

## आतां यानंतर प्रायश्चित्ताचा प्रयोग सांगतों.

वस्त्रासहवर्तमान स्नान करून, सशक्त असेल तर ओलें वस्त्र धारण केला होत्साता ब्राह्मणांच्या सभेपुढें एक गाई व बैल यांचा प्रतिनिधि असा निष्क इत्यादि परिमित ब्रह्मदंड ठेवून साष्टांग नमस्कार करून सभेला प्रदक्षिणा करून ब्राह्मणांची प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र,–"सर्वे धर्मविवेक्तारो गोप्तारः सकला द्विजाः ॥ मम देहस्य संशुद्धिं कुर्वंतु द्विजसत्तमाः ॥ मया कृतं महाघोरं ज्ञातमज्ञातकिल्बिषं ॥ प्रसादः क्रियतां मह्यं शुभानुज्ञां प्रयच्छथ ॥ पूज्यैः कृतपवित्रोहं भवेयं द्विजसत्तमाः" "मामनुगृण्हंतु भवंत इति वदेत्" अर्थ–याप्रमाणें ब्राह्मणांची प्रार्थना केल्यावर, तुह्मी मजवर अनुग्रह करा, असें बोलावें. "विप्रैः किं ते कार्यं मिथ्या मावादीः सत्यमेव वदेति पृष्टः स्वपापं ख्यापयेत्" अर्थ–कोणतें तुझें कार्य आहे ? खोटें बोलूं नको, खरेंच बोल, असें ब्राह्मणांनीं विचारिलें होत्साता त्यानें आपलें पाप सांगावें; तें असें,–"मया मम पत्न्या वा इहजन्मनि जन्मांतरे वा अनपत्यत्वमृतापत्यत्वादिनिदानभूतबालघातविप्ररत्नापहारादि दुरितं कृतं तस्य नाशाय करिष्यमाणे हरिवंशश्रवणादौ कर्मविपाकोक्ते विधानेऽधिकारार्थं दीर्घायुष्मत्पुत्रादिसंततिप्राप्तये प्रायश्चित्तमुपदिशंतु भवंतः"( अर्थ–मी किंवा माझ्या पत्नीनें, ह्या जन्मीं अथवा अन्यजन्मीं वांझपणा, मृतवांझपणा यांला कारणभूत असें बालहत्या, ब्राह्मणाच्या रत्नांचा अपहार इत्यादिक पातक केलें त्याचा नाश व्हावा याकरितां करावयाचें असें, कर्मविपाकांत सांगितलेला जो हरिवंशग्रंथाचें श्रवण इत्यादिक विधि त्याचा अधिकार प्राप्त होऊन दीर्घायु असी पुत्र इत्यादिक संतति प्राप्त होण्याकरितां प्रायश्चित्त तुह्मी मला सांगावें ) असी प्रार्थना केल्यानंतर त्या ब्राह्मणांनीं, पाप्यानें पूजा केलेला असा जो अनुवादक त्याच्या जवळ, " षडब्दत्र्यब्दसार्धोब्दान्यतमप्रायश्चित्तेन पूर्वोत्तरांगसहितेनाचरितेन तव शुद्धिर्भविष्यति तेन त्वं कृतार्थो भविष्यसि " ( अर्थ–सहा अब्द, तीन अब्द, दीड अब्द यांतून कोणतेंहि प्रायश्चित्त पूर्वोत्तरांगसहित असें घेतल्यानें तुझी शुद्धि होऊन तूं कृतकार्य होशील ) असें बोलावें. अनुवादकानें पापी याच्याजवळ सांगावें. तदनंतर प्रायश्चित्तकर्त्यानें " ॐ " ( बरें आहे ) असें ह्मणून अनुवादकानें सांगितलें त्याचा अंगीकार करावा, व सभेचें विसर्जन करून देशकालांचा उच्चार करून संकल्प करावा. तो असा,–" सभार्यस्य ममैतज्जन्मजन्मांतरार्जितानपत्यत्वादिनिदानभूतबालघातविप्ररत्नापहारादिजन्यदुरितसमूलनाशकर्मविपाकोक्तविधिनाधिकारसिद्धिद्वारा दीर्घायुष्मद्बहुपुत्रादिसंततिप्राप्तये षडब्दं त्र्यब्दं सार्धाब्दं वा प्रायश्चित्तं पूर्वोत्तरांगसहितममुकप्रत्याम्नायेनाहमाचरिष्ये," असा संकल्प करून दोन प्रहरीं क्षौर करून स्नान करावें. नंतर वनस्पतीची प्रार्थना करावी. प्रार्थनामंत्र,–"आयुर्बलं यशो वर्चः प्रजाः पशुवसूनि च ॥ ब्रह्म प्रज्ञां च मेधां च त्वं नो देहि वनस्पते," याप्रमाणें प्रार्थना करून विहित काष्ठानें दंतधावन करावें. तदनंतर दहा स्नानें करावीं, त्यांमध्यें प्रथम भस्मेंकरून स्नान करावें; तें असें;–( भस्म हातीं घेऊन ) " ईशानाय नमः" या मंत्रानें मस्तकाला भस्म लावावें. " तत्पुरुषाय नमः" या मंत्रानें मुखाला, " अघोराय नमः" यानें हृदयाला, " वामदेवाय नमः" ह्या मंत्रानें गुह्यस्थानीं, " सद्योजाताय नमः" या मंत्रानें

पायांला, प्रणवमंत्रानें सर्व अंगाला भस्म लावावें. अथवा ईशानादि पदांनीं युक्त जे मंत्र त्यांहींकरून भस्म लावावें. नंतर स्नान करून आचमन करावें.

---

**अथगोमयस्नानं गोमयमादाय प्रणवेनदिक्षुदक्षिणभागंतीर्थेचोत्तरभागंप्रक्षिप्यशेषंमानस्तोकेत्यभिमंत्र्यगंधद्वारामितिसर्वांगमालिप्यहिरण्यशृंगमितिद्वाभ्यांप्रार्थ्ययाःप्रवतइतितीर्थमभिमृश्यस्नात्वाद्विराचामेत् ॥**

**आतां गोमयस्नान सांगतों.**—गोमय घेऊन प्रणवमंत्रानें गोमयाचा दक्षिणभाग चार दिशांचे ठिकाणीं टाकावा, व उत्तर भाग तीर्थात टाकून बाकी राहिलेलें गोमय "**मानस्तोके०**" या मंत्रानें अभिमंत्रण करून "**गंधद्वारां०**" या मंत्रानें गोमय सर्व शरीराला लावावें. नंतर "**हिरण्यशृंगं०**" ह्या दोन मंत्रांनीं तीर्थाची प्रार्थना करून "**याःप्रवत०**" ह्या मंत्रानें तीर्थाला स्पर्श करून स्नान करून दोन वेळ आचमन करावें.

---

**अथमृत्तिकास्नानं अश्वक्रांतेरथक्रांतेविष्णुक्रांतेवसुंधरे शिरसाधारयिष्यामिरक्षस्वमांपदेपदेइतिमृत्तिकामभिमंत्र्य उद्धृतासिवराहेणकृष्णेनशतबाहुना मृत्तिकेहरमेपापंयन्मयादुष्कृतंकृतं इतितामादाय नमोमित्रस्येतिसूर्यायप्रदर्श्यगंधद्वारामितिमंत्रेणस्योनापृथिवीतिमंत्रेणवाइदंविष्णुरितिवाशिरःप्रभृत्यंगानिविलिंपेत्स्नात्वाद्विराचामेत् ॥**

**आतां मृत्तिकास्नान सांगतों.**—"**अश्वक्रांते रथक्रांते विष्णुक्रांते वसुंधरे ॥ शिरसा धारयिष्यामि रक्षस्व मां पदे पदे,**" ह्या मंत्रानें मृत्तिकेचें अभिमंत्रण करून, "**उद्धृतासि वराहेण कृष्णेन शतबाहुना ॥ मृत्तिके हर मे पापं यन्मया दुष्कृतं कृतं,**" या मंत्रानें मृत्तिका घेऊन "**नमोमित्रस्य०**" या मंत्रानें सूर्याला दाखवावी. नंतर "**गंधद्वारां०**" ह्या मंत्रानें, किंवा "**स्योनापृथिवी०**" ह्या मंत्रानें, अथवा "**इदंविष्णु०**" ह्या मंत्रानें मस्तकादि सर्व अंगांला मृत्तिका लावून स्नान करून दोन वेळ आचमन करावें.

---

**अथवारिस्नानं आपोअस्मानित्युक्त्वाभास्कराभिमुखःस्थितः इदंविष्णुर्जपित्वाचप्रतिस्रोतोनिमज्जति ततःपंचगव्यकुशोदकैःपृथक्पृथक्स्नात्वास्नानांगतर्पणादिकुर्यात् विष्णुश्राद्धंपूर्वांगगोप्रदानंचकृत्वा अग्निंप्रतिष्ठाप्यपंचगव्यहोमंव्याहृतिभिरष्टोत्तरशतमष्टाविंशतिंवाऽऽज्यहोमंचकृत्वाव्रतंग्रहीष्यइतिविप्रान्प्रार्थ्यहुतशेषंपंचगव्यंप्रणवेनपिबेत् ॥**

**आतां उदकाचें स्नान सांगतों.**—"**आपो अस्मान्०**" हा मंत्र ह्मणून सूर्याच्या समोर उभा राहात होत्साता, "**इदंविष्णु०**" या मंत्राचा जप करून उदकाच्या प्रवाहाभिमुख बुडी मारावी. तदनंतर पंचगव्य व कुशोदक यांचीं निरनिराळीं स्नानें करून स्नानसंबंधी तर्पण इत्यादिक करावें. नंतर विष्णुश्राद्ध व पूर्वांगसंबंधी गोप्रदान हीं करून अग्नीची स्थापना करून पंचगव्याचा होम, व्याहृतिमंत्रांनीं १०८ अथवा २८ असा घृताचा होम करून, "**व्रतं ग्रहीष्ये,**" ( व्रत घेतों ) असी ब्राह्मणांची प्रार्थना करून बाकी उरलेलें पंचगव्य प्रणवमंत्रानें प्राशन करावें.

---

मुख्यप्रायश्चित्तकृच्छ्रान्संकल्पानुसारेणानुष्ठायव्याहृत्याज्यहोमविष्णुश्राद्धगोदानानिपूर्ववत्कुर्यात् आज्यहोमेपंचगव्यहोमेचइध्माधानादिस्थालीपाकेतिकर्तव्यतांकेचिन्नेच्छंति व्याहृत्याज्यहोमेपापापहमहाविष्णुर्देवतेतिकेचित् ॥

मुख्य प्रायश्चित्ताचे कृच्छ्र संकल्पाप्रमाणें करून व्याहृतिमंत्रानें घृताचा होम, विष्णुश्राद्ध आणि गाईचें दान हीं पूर्वीप्रमाणें करावीं. घृताचा होम व पंचगव्याचा होम यांचे ठिकाणीं इध्मास्थापन इत्यादिक स्थालीपाकाचा विधि नको असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. व्याहृतिमंत्रेंकरून जो घृताचा होम त्याचे ठिकाणीं पापाचा नाश करणारा महाविष्णु देवता असें कोणी ग्रंथकार ह्मणतात.

---

पंचगव्यविधिस्तुताम्रेपालाशेवापात्रेताम्रायागोर्मूत्रमष्टमाषप्रमाणंगायत्र्यादाय गंधद्वारामितिश्वेतगोशकृत्षोडशमाषमादायआप्यायस्वेतिपीतगोक्षीरंद्वादशमाषंदधिक्राव्णइतिनीलगोर्दधिदशमाषं तेजोसिशुक्रमसीतिकृष्णगोघृतमष्टमाषमादायतत्रदेवस्यत्वेतिकुशोदकंचतुर्माषंप्रक्षिप्यप्रणवेनालोडयेत् अत्रमाषःपंचगुंजात्मकः तत्सप्तपत्रैःसाग्रैःकुशैर्जुहुयात् इरावतीतिपृथ्वीं इदंविष्णुरितिविष्णुं मानस्तोकेतिरुद्रं शन्नोदेवीत्यपः ब्रह्मजज्ञानमितिब्रह्माणंवा अग्निंसोमंचनाम्नागायत्र्यासूर्यंप्रजापतेनत्वेतिसमस्तव्याहृतिभिर्वाप्रजापतिंप्रणवेनप्रजापतिंअग्निंस्विष्टकृतंचनाम्नेत्येताः पंचगव्येनाग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचेतिवामहाविष्णुंवाज्येनाष्टाविंशतिसंख्याहुतिभिरित्यन्वाधानं स्त्रीशूद्राणांहोमोनकार्यः केचिद्ब्राह्मणद्वाराहोमःकार्यइत्याहुः स्त्रीशूद्राणांपंचगव्यपानेविकल्पइतिमहार्णवः ॥

आतां पंचगव्याचा विधि सांगतों.—तांब्याचें पात्र किंवा पळसाचा द्रोण घेऊन त्यांत पुढें सांगितल्याप्रमाणें पदार्थ घालावे. ते असे,—तांबड्या वर्णाच्या गाईचें गोमूत्र आठ मासे गायत्रीमंत्रानें घालावें. श्वेत गाईचें गोमय सोळा मासे "गंधद्वारां०" या मंत्रानें घालावें. पिंवळ्या वर्णाच्या गाईचें दूध बारा मासे "आप्यायस्व०" ह्या मंत्रानें घालावें. निळ्या गाईचें दहीं दहा मासे "दधिक्राव्ण०" ह्या मंत्रानें घालावें. काळ्या गाईचें तूप आठ मासे "तेजोसि शुक्रमसि०" ह्या मंत्रानें घालावें, व "देवस्यत्वा०" ह्या मंत्रानें चार मासे कुशोदक घालून प्रणवमंत्रानें ढवळावें. एथें पांच गुंजांचा मासा धरावा. असें पंचगव्य करून साग्र असे सात दर्भ घेऊन त्यांहीं करूनत्या पंचगव्याचा होम करावा. त्याचें अन्वाधान असें— "इरावतीति पृथिवीं. इदंविष्णुरिति विष्णुं मानस्तोकेति रुद्रं शन्नोदेवीत्यपः ब्रह्मजज्ञानमितिब्रह्माणं वा अग्निं सोमं च नाम्ना गायत्र्या सूर्यं प्रजापतेनत्वेति समस्तव्याहृतिभिर्वा प्रजापतिं प्रणवेन प्रजापतिं अग्निं स्विष्टकृतं च नाम्नेत्येताः पंचगव्येन अग्निं वायुं सूर्यं प्रजापतिं चेति वा महाविष्णुं वाज्येनाष्टाविंशतिसंख्याहुतिभिः०" याप्रमाणें अन्वाधान करून तदनुसार होम करावा. स्त्रिया, शूद्र यांनीं होम करूं नये. कोणी ग्रंथकार ( स्त्रीशूद्रांनीं ) ब्राह्मणाकडून होम करवावा असें ह्मणतात. स्त्रिया व शूद्र यांनीं पंचगव्य प्राशन करावें किंवा न करावें असा महार्णवग्रंथांत विकल्प आहे.

---

स्त्रीशूद्रौविप्रैःपंचगव्यंकारयित्वातूष्णींपिबतइतिस्मृत्यर्थसारः अयंप्रायश्चित्तविधिःकृच्छ्र्न्यूनप्रायश्चित्तेषुनकार्यः कृच्छ्रप्रभृतिषुसर्वत्रप्रायश्चित्तेष्वनुष्ठेयः एवंकृच्छ्राद्यनुष्ठायसूर्यारुण

संवादमहार्णवादिकर्मविपाकग्रंथोक्तहरिवंशादिश्रवणादिकर्मकुर्यात् तत्रशुभेदिनेदेशकालौ संकीर्त्य अनेकजन्मार्जितानपत्यत्वमृतापत्यत्वादिनिदानभूतबालघातनिक्षेपहरणविप्ररत्नापहरणादिजन्यदुरितसमूलनाशद्वारादीर्घायुष्मद्बहुपुत्रादिसंततिप्राप्तिकामोहरिवंशंश्रोष्यामीत्येकस्यकर्तृत्वे दंपत्योःकर्तृत्वेश्रोष्यावइतिसंकल्प्यगणेशपूजनस्वस्तिवाचननांदीश्राद्धानिविनायकशांतिंचकृत्वाहरिवंशश्रवणार्थंश्रावयितारंत्वांवृणे विप्रंवृत्वावस्त्रालंकारैःपूजयेत् वाचकंप्रत्यहंपायसादिनाभोजयेत् दंपतीप्रतिदिनंत्रायंतामित्यादिवैदिकैःसुरास्त्वामितिपौराणैश्चमंत्रैःसुस्नातावलंकृतौतदेकचित्तौशृण्वंतौतैलतांबूलक्षौरमैथुनखट्वाशयनानियावत्समाप्तिवर्जयंतौहविष्यंभुंजीयातां अंतेवाचकायगांसुवर्णत्रयमेकंवासुवर्णंदक्षिणांदत्वाप्रत्यवरोहमंत्रेणसहस्रंतिलाज्यंहुत्वा शतंविप्रान्चतुर्विंशतिमिथुनानिवापायसेनभोजयेदितिहरिवंशश्रवणप्रयोगः॥

स्त्रिया व शूद्र यांनीं ब्राह्मणांकडून पंचगव्य करवून मंत्रविरहित तें पंचगव्य प्राशन करावें असें स्मृत्यर्थसार ग्रंथांत आहे. हा प्रायश्चित्ताचा विधि कृच्छ्राहून कमी असीं जीं प्रायश्चित्तें त्यांचे ठिकाणीं करूं नये, कृच्छ्र इत्यादिक जीं सर्व प्रायश्चित्तें त्यांचे ठिकाणीं करावा. याप्रमाणें कृच्छ्रादिक प्रायश्चित्त करून सूर्यारुणसंवाद व महार्णव इत्यादिक जे कर्मविपाकग्रंथ, त्यांमध्यें सांगितलें जें हरिवंश इत्यादिक ग्रंथांचें श्रवणादिक कर्म तें करावें. हरिवंशादिक ग्रंथ श्रवण करणें तो चांगला दिवस पाहून त्या दिवशीं देशकालांचा उच्चार करून संकल्प करावा. तो असा,– " अनेकजन्मार्जितानपत्यत्वमृतापत्यत्वादिनिदानभूतबालघातनिक्षेपहरणविप्ररत्नापहरणादिजन्यदुरितसमूलनाशद्वारा दीर्घायुष्मत्बहुपुत्रादिसंततिप्राप्तिकामो हरिवंशं श्रोष्यामि," असा एकटा श्रवण करणारा असेल तर, स्त्रीपुरुष दोघें श्रवण करणारीं असल्यास "श्रोष्यावः" असा संकल्प करून गणेशपूजन, पुण्याहवाचन, नांदीश्राद्ध व विनायकशांति इतकीं करून हरिवंशश्रवणाकरितां ब्राह्मण वरावा. तो असा,–"हरिवंशश्रवणार्थं श्रावयितारं त्वां वृणे," याप्रमाणें ब्राह्मणाला वरून त्याची वस्त्र, अलंकार यांहींकरून पूजा करावी व ग्रंथ वाचणाराला प्रतिदिवशीं पायस इत्यादिकानें भोजन घालावें. दंपतींनीं दररोज "त्रायंतां०" इत्यादिक वेदमंत्रांनीं व "सुरास्त्वा०" इत्यादिक पौराणमंत्रांनीं स्नान करून अलंकारयुक्त होऊन एकाग्रतेनें ग्रंथ श्रवण करीत होत्साते तैल, तांबूल, क्षौर, मैथुन, पलंगावर निद्रा करणें, इतके प्रकार ग्रंथाची समाप्ति होई तावत्पर्यंत वर्ज्य करावे, आणि हविष्यान्नभोजन करावें. शेवटीं ग्रंथ वाचणाराला गाई व शास्त्रीयमानानें तीन तोळे किंवा एक तोळा[1] असी सुवर्णदक्षिणा देऊन "प्रत्यवरोह०" या मंत्रानें तिळ व घृत (तूप) यांचा हजार हजार होम करून शंभर ब्राह्मण किंवा चोवीस दंपती यांला पायसाचें (खिरीचें) भोजन घालावें. याप्रमाणें हरिवंशग्रंथाचे श्रवणाचा प्रयोग समाप्त झाला.

---

अथविधानांतराणि सौवर्णबालकंकृत्वादद्याद्दोलासमन्वितं अथवावृषभंदद्याद्विप्रोद्वाहनमेववा महारुद्रजपोवापिलक्षपद्मैःशिवार्चनं स्वर्णधेनुःप्रदातव्यासवत्सावायथाविधि घृतकुंभ

---

१. ८० गुंजांचा तोळा.

प्रदानंवासंक्षेपादिदमीरितं अथवाप्रत्यहंपार्थिवलिंगपूजांकृत्वाअभिलाषाष्टकजपंसंवत्सरंकु र्यात् अभिलाषाष्टकस्तोत्रंकौस्तुभेज्ञेयं एवमपिफलाप्राप्तौदत्तपुत्रोग्राह्यः ॥

## आतां दुसरे विधि (संतति होण्याविषयीं) सांगतों.

"सोन्याचा बालक करून दोला (पाळण्या) सहित त्याचें दान करावें. अथवा बैलाचें दान करावें, किंवा ब्राह्मणाचा विवाह करावा. महारुद्राचा जप किंवा शिवावर कमळांची लाखोली वाहावी. सोन्याची सवत्स गाई करून तिचें दान करावें. अथवा प्रत्यक्ष सवत्स गाईचें यथाविधि दान करावें, किंवा घृतानें भरलेल्या कुंभाचें दान करावें. याप्रमाणें संक्षेपानें हें सांगितलें." अथवा दररोज पार्थिवलिंगाची पूजा करून अभिलाषाष्टकस्तोत्राचा जप एक वर्षपर्यंत करावा. अभिलाषाष्टकस्तोत्र कौस्तुभांत सांगितलें आहे, तें पाहावें. इतकेंहि करून संतति न होईल तर दत्तपुत्र घ्यावा.

---

अथदत्तकेग्राह्याग्राह्यविचारः ब्राह्मणानांसोदरभ्रातृपुत्रोमुख्यत्वात्प्रथमंग्राह्यः तदभावेस गोत्रसपिंडोयःकश्चित् सापत्नभ्रातृपुत्रोवा तदभावेत्वसगोत्रसपिंडोमातुलकुलजपितृष्वस्रा दिकुलजः तदभावेत्वसपिंडःसमानगोत्रःतदभावेत्वसपिंडःपृथक्गोत्रोपि असगोत्रसपिंडेषु भागिनेयदौहित्रौवर्ज्यौ एवंविरुद्धसंबंधापत्त्यापुत्रबुद्ध्यनर्होमातुलोपिनग्राह्यःअतएवसगोत्र सपिंडेषुभ्रातापितृव्योवानग्राह्यः विप्रादीनांवर्णानांसमानवर्णएव तत्रापिदेशभेदप्रयुक्तगुर्जर त्वांध्रत्वादिनासमानजातीयएव सर्वोपिसभ्रातृकएवग्राह्यः तत्रापिज्येष्ठपुत्रोनग्राह्योनदेयः शूद्रस्यदौहित्रभागिनेयावपिग्राह्यौ अत्रमूलं भ्रातॄणामेकजातानामेकश्चेत्पुत्रवान्भवेत् सर्वेते तेनपुत्रेणपुत्रिणोमनुरब्रवीत् अनेनवचनेननापुत्रस्यलोकोस्तिजायमानोवैब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवा न्जायतइत्यादिशास्त्रबोधितस्याप्रजत्वप्रयुक्तदोषस्यनिवृत्तिर्विधिनाअस्वीकृतेनापिभ्रातृपुत्रेण पितृव्यस्यभवतीतिबोध्यते अतःपुत्रसदृशत्वात्ग्राह्येषुमुख्यइतिज्ञाप्यते मुख्याभावेतत्सदृशः प्रतिनिधिरितिन्यायात् नचास्मादेववाक्याद्विधिवत्प्रतिग्रहंविनैवतस्यपुत्रत्वमितिशंक्यंतथास तिऔरसदत्तकादिद्वादशविधपुत्रवदेतस्यपत्नीतःपूर्वमेवधनहारित्वपिंडदत्वौचित्येन पत्नीदु हितरश्चैवपितरौभ्रातरस्तथा तत्सुतागोत्रजाबंधुरितितत्क्रमवाक्येभ्रात्रनंतरंभ्रातृसुतनिवेशा नुपपत्तेः तस्मात्पत्नीतःपूर्वंमदीयपिंडदानधनग्रहणेधिकारीकश्चिद्भवत्वितिकामनायांविधिव त्स्वीकृतएवतथाधिकारीभवतिनान्यथातादृशकामनायाअभावेतुपितृऋणापाकरणादिपारलौ किकमात्रार्थंदत्तपुत्रोनग्राह्यः भ्रातृपुत्रेणैवतत्सिद्धेरित्येवंवचनतात्पर्यं क्वचिद्देशेवैदिकविधिं विनापिदातृग्रहीतृसंमतिराजपुरुषाद्यनुमत्यादिलौकिकव्यापारमात्रेणोपनयनादिसंस्कारकर णमात्रेणचसगोत्रसपिंडेपुत्रत्वसिद्धिव्यवहारोदृश्यते तत्रमूलंनोपलभ्यते सर्वासामेकपत्नी नामेकाचेत्पुत्रिणीभवेत् सर्वास्तास्तेनपुत्रेणपुत्रिण्योमनुरब्रवीत्इतिवचनंतुसापत्नपुत्रस्यागृही तस्यापिपुत्रत्वपिंडदानाद्यधिकारित्वविधायकं तेनैकसपत्न्याःसपुत्रत्वेन्यसपत्न्यापुत्रोनग्रा ह्यःदौहित्रोभागिनेयश्चशूद्राणांविहितःसुतः ब्राह्मणादित्रयेनास्तिभागिनेयःसुतःक्वचित् नत्वे

---

१ सोनें किती असावें इत्यादि सर्व विधि दानचंद्रिकेंत पाहावा.

वैकंपुत्रंदद्यात्प्रतिगृण्हीयाद्वेतिनज्येष्ठंपुत्रंदद्यादितिच अत्रौरसानेकपुत्रेणपुत्रदानंकार्यमिति विधीयते तेनपूर्वंदत्तकोगृहीतःततःऔरसोजातस्तादृशानेकपुत्रेणदत्तकएकलऔरसोवानदेयः सधवयास्त्रियापत्यनुज्ञयापुत्रोगृहीतव्योदातव्यश्च भर्त्रनुज्ञाभावेतुनग्राह्योनदेयः एवंविधवयापिस्त्रियाल्वयापुत्रः स्वीकार्यइतिउक्काभर्तरिमृतेग्राह्यःस्पष्टमीदृशानुज्ञाभावेभर्तृजीवनदशायांतन्मरणोत्तरमाप्तमुखाद्वापुत्रस्वीकारविषयकभर्त्रभिप्रायंज्ञातवत्यापिग्राह्यइतिसर्वसंमतं एतदुभयविधभर्त्रनुज्ञाभावेपि तत्तच्छास्त्रान्नित्यकाम्यव्रतादिधर्माचरणइवपुत्रप्रतिग्रहेपिनापुत्रस्यलोकोस्तीत्यादिसामान्यशास्त्रादेवविधवायाअधिकारः नस्त्रीपुत्रंदद्यात्प्रतिगृण्हीयाद्वान्यत्र भर्त्रनुज्ञानादितिवसिष्ठवाक्यंतुभर्त्रनुज्ञारहितांप्रतिपुत्राप्रतिग्रहाभ्यनुज्ञापरं नतुपुत्रप्रतिग्रहनिषेधपरं शास्त्रप्राप्तनिषेधायोगात् अतस्तादृशस्त्रियाःपुत्रप्रतिग्रहप्रतिबंधेनवृत्तिलोपपिंडविच्छेदादिकुर्वन्नरकभाग्भवति योब्राह्मणस्यवृत्तौतुप्रतिकूलंसमाचरेत् विट्भुजांतुकृमीणांस्यादिति शास्त्रदितिकौस्तुभेविस्तरः स्त्रीभिःपुत्रस्वीकारेव्रतादिवद्विप्रद्वाराहोमादिकंकार्यं एवंशूद्रेणापि विप्रःशूद्रदक्षिणामादायवैदिकमंत्रैस्तदीयहोमादिकरोतितत्रशूद्रःपुण्यफलभाग्भवति किंतुविप्रस्यैवप्रत्यवायः पुत्रंप्रतिगृह्यगृहीत्राजातकर्माद्याश्चूडाद्यावासंस्काराःकार्याइतिमुख्यःपक्षः असंभवेसगोत्रसपिंडेषुकृतोपनयनोपिविवाहितोपिवादत्तकोभवति असंजातपुत्रएवविवाहितो ग्राह्यइतिमेभाति असपिंडसगोत्रेषुकृतोपनयनएवेत्यपिभातिभिन्नगोत्रस्तुअकृतोपनयनएवग्राह्यः केचित्तुकृतोपनयनोपिभिन्नगोत्रोग्राह्यइत्याहुः इतिग्राह्याग्राह्यविवेकः ॥

## आतां दत्तक पुत्र कोणता घ्यावा व कोणता न घ्यावा याचा निर्णय सांगतों.

ब्राह्मणांनीं दत्तक घेणें तो आपल्या सोदर (सख्ख्या) बंधूचा पुत्र हा मुख्य आहे याकरितां प्रथम तोच घ्यावा. सोदर बंधूचा पुत्र न मिळेल तर जो कोणी आपल्या गोत्राचा सपिंड असेल तो घ्यावा, अथवा सापत्नबंधूचा पुत्र घ्यावा. त्यांतला नसेल तर भिन्नगोत्रांतला असून सपिंड असा मातुळकुळांतला, किंवा पित्याच्या भगिनी इत्यादिकांच्या कुळांतला घ्यावा. तसा न मिळेल तर असपिंड समानगोत्र असा घ्यावा. असपिंड समानगोत्र असाहि न मिळेल तर, असपिंड असून निराळ्या गोत्रांतलाहि घ्यावा. आपल्या गोत्रांतले नसून सपिंड असे जे त्यांमध्यें भागिनेय (बहिणीचा पुत्र) व आपल्या कन्येचा पुत्र हे दत्तक घेऊं नयेत. याप्रमाणें विरुद्धसंबंध होतो या योगानें पुत्र असें मनांत आणण्याला अयोग्य असा मातुळ तोहि घेऊं नये, व याकरितांच सगोत्र असून सपिंड असे जे त्यांतील आपला भाऊ किंवा चुलता हे घेऊं नयेत. ब्राह्मण इत्यादिक वर्णांनीं आपापल्या वर्णांतलाच घ्यावा. त्यामध्येंहि देशभेदप्रयुक्त गुर्जरत्व, आंध्रत्व इत्यादिकेंकरून समान (तुल्य) जातीचाच घ्यावा. कोणताहि दत्तक घेणें तो भ्रातृसहित असेल तोच घ्यावा. त्यामध्येंहि ज्येष्ठ (वडील) पुत्र घेऊं नये, व देऊं नये. शूद्रानें कन्येचा पुत्र व बहिणीचा पुत्र हेहि दत्तक घ्यावे. याविषयीं मूळवचन,—“सोदर बंधूंमध्यें एकाला जर पुत्र असेल तर त्या पुत्रेंकरून सर्व बंधु पुत्रवान् होतात असें मनु सांगतो.” ह्या वचनेंकरून, “पुत्ररहिताला स्वर्गलोक नाहीं,” “उत्पन्न झा-

लेला ब्राह्मण तीन ऋणांनीं ( देव ऋषि पितृऋणांनीं ) युक्त असतो," इत्यादिक शास्त्रानें सांगितलेला असा जो चुलत्यास अपुत्रत्वप्रयुक्त दोष त्याची निवृत्ति, विधिपूर्वक न घेतलेल्या सोदरबंधूच्या पुत्रानें होते, या हेतूनें तो ( भ्रात्याचा पुत्र ) पुत्राप्रमाणेंच आहे यास्तव घेण्याला योग्य जे दत्तपुत्र त्यांमध्यें हा मुख्य आहे असें जाणावें, कारण मुख्य नसेल तर त्या स्थानीं त्यासारखा दुसरा योजावा, असा न्याय आहे. विधिपूर्वक घेतल्यावांचून ह्याच वाक्यावरून तो बंधूचा पुत्र आपला पुत्र होतो असें मानूं नये. पुत्र होतो असें मानलें तर औरस, दत्तक इत्यादिक जे बारा प्रकारचे पुत्र त्यांसारखा ह्या सोदर बंधूच्या पुत्राला स्त्रियेच्या पूर्वींच द्रव्य घेणें, पिंड देणें हे अधिकार प्राप्त झाल्यानें " स्त्री, कन्या, आई, बाप, भ्राते, भ्रातृपुत्र, गोत्रज आणि बंधु ( मामेबंधु, आतेबंधु, माऊसबंधु ), पूर्वींच्या अभावीं पुढचा असा जो क्रम सांगितला त्या वाक्यांत भ्रात्यानंतर भ्रात्याच्या पुत्राचें जें ग्रहण केलें त्याची संगति होणार नाहीं. यावरून पत्नीच्या पूर्वी मला पिंड देणें व माझें द्रव्य घेणें यांविषयीं कोणी अधिकारी असावा अशा इच्छेनें विधिपूर्वक घेतलेला तोच तसा अधिकारी होतो, विधिपूर्वक घेतल्यावांचून होत नाहीं. तसी इच्छा नसेल तर पितरांचे ऋणाचें दूरीकरण इत्यादिक परलोकसंबंधी कृत्याकरितां दत्तपुत्र घेऊं नये; कारण भ्रात्याच्या पुत्रेंकरूनच पितृऋणाचे दूरीकरणाची सिद्धि होते, असें ह्या वचनाचें तात्पर्य जाणावें. कितीएक देशांत वैदिक विधीवांचूनहि पुत्र देणारा व घेणारा यांची संमति, व राजपुरुष इत्यादिकांची संमति इत्यादिक लौकिकव्यवहारानें, अथवा केवळ मौंजी इत्यादिक संस्कार केल्यानें सगोत्र असून सपिंड असा जो पुत्र त्याला आपला पुत्र असें मानून सर्व व्यवहार चालतो असा आचार दृष्टीस पडतो, परंतु त्याविषयीं प्रमाण मिळत नाहीं. " एका पुरुषाच्या पुष्कळ स्त्रिया असून त्यांमध्यें एका स्त्रियेला पुत्र असेल तर त्या एक पुत्रानें त्या सर्व स्त्रिया पुत्रवती होतात असें मनु सांगतो," असें जें वचन तें तर सपत्नीचा ( सवतीचा ) पुत्र जरी विधिपूर्वक घेतलेला नसेल तथापि त्यालाहि पुत्रत्व व पिंड देणें इत्यादिकांविषयीं अधिकार उत्पन्न करणारें आहे, यावरून असें सिद्ध होतें कीं, एका सवतीला पुत्र असेल तर दुसऱ्या सवतीनें दत्तपुत्र घेऊं नये. " कन्येचा पुत्र, बहिणीचा पुत्र हे शूद्रांनीं दत्तक घ्यावे; ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनीं बहिणीचा पुत्र व कन्येचा पुत्र हे कधींहि दत्तक घेऊं नयेत." "एक पुत्र असेल तर तो निश्चयें दत्तक देऊं नये व घेऊंहि नये असें आहे, आणि ज्येष्ठ पुत्रहि दत्तक देऊं नये;" ह्या स्थलीं ज्याला औरसपुत्र अनेक असतील त्यानें दत्तपुत्र द्यावा असा विधि प्राप्त होतो; तथापि पूर्वी दत्तक पुत्र घेतला आणि त्यानंतर औरस पुत्र झाला अशा प्रकारच्या अनेकपुत्रवानानें एक दत्तक किंवा औरस पुत्र देऊं नये. पति विद्यमान आहे अशा स्त्रियेनें पतीची आज्ञा घेऊन पुत्र घ्यावा व द्यावा. पतीची आज्ञा नसेल तर घेऊं नये व देऊं नये. याप्रमाणें विधवास्त्रीनेंहि, 'तूं दत्तक पुत्र घे' असें पतीनें सांगून नंतर मृत झाला असेल तर घ्यावा. 'पुत्र घे' अशी स्पष्ट आज्ञा नसतां पति जीवंत असून किंवा तो मृत झाल्यानंतर आप्ताच्या मुखांतून 'दत्तक पुत्र घ्यावा' असा पतीचा अभिप्राय जाणणाऱ्या स्त्रियेनेंहि दत्तपुत्र घ्यावा असें सर्वसंमत आहे. ह्या वर सांगितलेल्या दोन प्रकारांतून कोणतीहि आज्ञा नसेल तथापि नित्यव्रतें व काम्यव्रतें

इत्यादिक धर्म आचरण करण्याविषयीं जसा त्या त्या शास्त्रेंकरून अधिकार आहे तसा दत्तपुत्र घेण्याविषयींहि, "अपुत्राला स्वर्गलोक नाहीं," इत्यादिक सामान्य शास्त्रेंकरूनच विधवा स्त्रीला अधिकार आहे. "पतीच्या आज्ञेवांचून स्त्रियेनें पुत्र देऊं नये, अथवा घेऊं नये," असें जें वसिष्ठवाक्य आहे तें तर ज्या स्त्रियेला भर्त्याची आज्ञा नाहीं अशा स्त्रियेला दत्तकपुत्र घेणें नसल्यास मात्र अनुमति देतें; सर्वथा स्त्रियेनें दत्तपुत्र घेऊं नये असा निषेध सांगत नाहीं. कारण, शास्त्रानें जें प्राप्त झालें त्याचा निषेध संभवत नाहीं. याकरितां दत्तपुत्र घेण्यास योग्य जी स्त्री तिला दत्तपुत्र घेण्याविषयीं प्रतिबंध ( अडथळा ) करणारा वृत्तीचा ( उपजीविकेचा) लोप व पिंडाचा विच्छेद ( नाश ) इत्यादिकांचा कर्ता होऊन नरकास पात्र होतो. कारण, "ब्राह्मणाच्या वृत्तीला जो विघ्न करितो तो विष्ठा भक्षण करणाऱ्या कृमींमध्यें उत्पन्न होतो." असें शास्त्र आहे; याप्रमाणें कौस्तुभग्रंथांत विस्तार केला आहे. स्त्रियांनीं दत्तपुत्र घेतला असतां होम इत्यादिक करणें तो व्रतादिकाप्रमाणें ब्राह्मणद्वारा करवावा. शूद्रानेंहि असेंच करावें. जो ब्राह्मण शूद्रापासून दक्षिणा घेऊन वेदमंत्रांनीं त्याचा होम इत्यादिक करितो त्या कर्मांत शूद्र हा पुण्यफलभागी होतो, व ब्राह्मणास मात्र दोष लागतो. दत्तपुत्र घेऊन, घेणारानें( त्या पुत्राचे ) जातकर्म इत्यादिक किंवा चौल इत्यादिक संस्कार करावे हा मुख्य पक्ष. तसा संभव नसेल तर सगोत्र व सपिंड यांत मौंजी झालेला अथवा विवाह झालेलाहि दत्तक पुत्र होतो. विवाहित असेल तथापि ज्याला पुत्र झाला नसेल तोच दत्तक घ्यावा असें मला वाटतें. असपिंड व असगोत्र यांमध्यें दत्तक घेणें तो मौंजी झालेला तोच घ्यावा, असेंहि वाटतें. भिन्न गोत्रांतला दत्तक घेणें तर मौंजी न झालेलाच घ्यावा. कोणी ग्रंथकार तर भिन्नगोत्र असा मौंजी झालेलाहि घ्यावा असें ह्मणतात. याप्रमाणें दत्तपुत्र घ्यावा कोणता व न घ्यावा कोणता याचा निर्णय समाप्त झाला.

---

अथऋग्वेदिनांपुत्रप्रतिग्रहप्रयोगः पूर्वेद्युःकृतोपवासःपवित्रपाणिःप्राणानायम्यदेशकालौ संकीर्त्य ममाप्रजस्त्वप्रयुक्तपैतृकऋणापाकरणपुंनामनरकत्राणद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं शौनकोक्तविधिनापुत्रप्रतिग्रहंकरिष्ये तदंगत्वेनस्वस्तिवाचनमाचार्यवरणंविष्णुपूजनमन्नदानंचकरिष्ये आचार्यमधुपर्कांतेविष्णुंसंपूज्यब्राह्मणादिभोजनंसंकल्पयेत् आचार्यःयजमानानुज्ञयापुत्रप्रतिग्रहांगत्वेनविहितंहोमंकरिष्येइतिसंकल्प्यअग्निंप्रतिष्ठाप्यचक्षुषीआज्येनेत्यंतेसकृदग्निंसूर्यंसावित्रींषड्वारंचरुणाअग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचाज्येन शेषेणस्विष्टकृतमित्यादिअन्वाधाय अष्टाविंशतिमुष्टीस्तूष्णींनिरूप्यतथैवप्रोक्ष्याज्योत्पवनांतंकुर्यात् दातारंगत्वाएतस्मैपुत्रंदेहीति याचयेत्दातादेशकालौसंकीर्त्यश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंपुत्रदानंकरिष्येइति संकल्प्यगणपतिपूजनांतेप्रतिगृहीतारंयथाशक्त्यासंपूज्य येयज्ञेनेतिपंचानांनाभानेदिष्ठोमानवोविश्वेदेवास्त्रिष्टुप् पंचम्यनुष्टुप् पुत्रदानेविनियोगः येयज्ञेनेतिऋक्पंचकांतेइमंपुत्रंतवपैतृकऋणापाकरणपुन्नामनरकत्राणसिद्ध्यर्थंआत्मनःश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंतुभ्यमहंसंप्रददेनममप्रतिगृण्हातुपुत्रंभवान् इति प्रतिगृहीतृहस्तेजलंक्षिपेत् ग्रहीतादेवस्येतिहस्ताभ्यांप्रतिगृह्यस्वांकेउपवेश्यअंगादंगात्संभवसी

तिमंत्रेणमूर्धनिजिघ्रेत् वस्त्रकुंडलाद्यलंकृतंगीतवाद्यैःस्वस्तिमंत्रैश्चस्वगृहमानीय पादौप्रक्षाल्या चम्याचार्यदक्षिणतःस्वयंस्वदक्षिणेभार्योत्संगेपुत्रइत्युपविशेत् आचार्योबर्हिरासादनाद्याज्य भागांतेचरुमवदाय यस्त्वाहृदेतिद्वयोरात्रेयोवसुश्रुतोग्निस्त्रिष्टुप् पुत्रप्रतिग्रहांगहोमेविनियो गः यस्त्वाहृदेतिऋक्द्वयेनैकमेवावदानंजुहुयात् यजमानोग्नयइदंनमम तुभ्यमग्नेपर्यवह न्सूर्यासावित्रीसूर्यासावित्र्यनुष्टुप्तुभ्य० सूर्यासावित्र्याइदं० सोमोददिदितिपंचानांसूर्यासा वित्रीसूर्यासावित्रीअनुष्टुभौजगतीत्रिष्टुप्अनुष्टुप्सोमो० पंचस्वपि सूर्यासावित्र्याइदं० एवं सप्तचर्वाहुतीर्हुत्वाज्यंव्यस्तसमस्तव्याहृतिभिर्हुत्वास्विष्टकृदादिसमाप्याचार्यायधेनुंदत्वा विप्रा न्भोजयेत् ॥

## आतां यानंतर ऋग्वेदी यांनीं दत्तपुत्र घ्यावा कसा याचा प्रयोग सांगतों.

पूर्व दिवसीं उपोषण करून दुसऱ्या दिवसीं नित्यकृत्य केल्यानंतर हातांत दर्भपवित्रक धारण करून आचमन, प्राणायाम इत्यादिक करून देशकालांचा उच्चार करून संकल्प करावा. तो असा;—" ममाप्रजस्त्वप्रयुक्तपैतृकऋणापाकरणपुंनामनरकत्राणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं शौनकोक्तविधिना पुत्रप्रतिग्रहं करिष्ये ॥ तदंगत्वेन स्वस्तिवाचनमाचार्यवरणं विष्णुपूजनमन्नदानं च करिष्ये," असा संकल्प करून आचार्याची मधुपर्कानें पूजा केल्यानंतर विष्णूची पूजा करून ब्राह्मणादिकांच्या भोजनाचा संकल्प करावा. नंतर आचार्यानें " यजमानानुज्ञया पुत्रप्रतिग्रहांगत्वेन विहितं होमं करिष्ये," असा संकल्प करून अग्निस्थापन करावें. नंतर " चक्षुषी आज्येनेत्यंते सकृदग्निं सूर्यासावित्रीं षड्वारं चरुणा अग्निं वायुं सूर्यं प्रजापतिं चाज्येन शेषेण स्विष्टकृतमित्यादि," असें अन्वाधान करून पात्रांत अठ्ठावीस मुठी तांदुळांचा मंत्रविरहित निर्वाप करून मंत्रविरहित प्रोक्षण करून आज्योत्पवनांत कर्म करावें. नंतर दात्याकडे जाऊन ' याला पुत्र दे ' असी याचना करावी. दात्यानें देशकालांचा उच्चार करून " श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं पुत्रदानं करिष्ये," असा संकल्प करून गणपतिपूजन झाल्यानंतर पुत्र घेणाराची यथाशक्ति पूजा करून पुत्राचें दान करावें तें असें,—"येयज्ञेनेतिपंचानांनाभानेदिष्ठोमानवोविश्वेदेवास्त्रिष्टुप् ॥ पंचम्यनुष्टुप् ॥ पुत्रदाने विनियोगः ॥ येयज्ञेन० " ह्या पांच ऋचा ह्मटल्यानंतर, " इमं पुत्रं तव पैतृकऋणापाकरणपुंनामनरकत्राणसिद्ध्यर्थं आत्मनः श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं तुभ्यमहं संप्रददे न मम ॥ प्रतिगृण्हातु पुत्रं भवान् " असें वाक्य ह्मणून पुत्र घेणाराच्या हातावर उदक घालावें. पुत्रप्रतिग्रह करणारानें, " देवस्यत्वा० " हा मंत्र ह्मणून पुत्राचे दोन हात धरून त्याला आपल्या मांडीवर बसवून "अंगादंगात्संभवसि०" या मंत्रेंकरून टाळू हुंगावी. नंतर वस्त्रें, कुंडलें इत्यादिकांनीं भूषित केलेला अशा पुत्राला गीत, वाद्यें आणि स्वस्तिमंत्रांचे पाठ यांसहित ( वाजतगाजत मंत्र ह्मणत ) आपल्या घरीं आणून पुत्र घेणारानें पाय धुवून आचमन करून आचार्याच्या उजव्या बाजूस आपण बसावें, आणि आपल्या उजव्या बाजूस स्त्रियेच्या मांडीवर पुत्राला बसवावें. नंतर आचार्यानें बर्हीच्या आसादनापासून आज्यभागापर्यंत कर्म केल्यानं-

तर चरु घेऊन त्याचा होम करावा, तो असा;—"यस्त्वाहृदेतिद्वयोरात्रेयोवसुश्रुतोग्निस्त्रिष्टुप् ॥ पुत्रप्रतिग्रहांगहोमे विनियोगः ॥ यस्त्वाहृदा० " अशा दोन ऋचांनीं एकच आहुति द्यावी. यजमानानें, "अग्नय इदं न मम," असा त्याग उच्चारावा. नंतर तुभ्यमग्रेपर्यवहन्सूर्यासावित्रीसूर्यासावित्र्यनुष्टुप् ॥ ॐ तुभ्यमग्रे०॥ सूर्यासावित्र्या इदं न मम ॥ सोमोददद्वितिपंचानां सूर्यासावित्रीसूर्यासावित्री ॥ अनुष्टुभौजगतीत्रिष्टुबनुष्टुप् ॥ ॐ सोमोददत्० " अशा पांच ऋचांनीं प्रत्येक ऋचेस होम करावा. पांचांहि आहुतींचा "सूर्यासावित्र्या इदं न मम" असा त्याग करावा. याप्रमाणें चरूच्या सात आहुति देऊन व्यस्तसमस्तव्याहृतिमंत्रांनीं ( ॐ भूः स्वा० ॐ भुवः स्वा० ॐ स्वः स्वा० ॐ भूर्भुवः स्वःस्वा० अशा घृताच्या आहुति देऊन स्विष्टकृत् इत्यादिक होमाची समाप्ति करून आचार्याला गोप्रदान देऊन ब्राह्मणांस भोजन घालावें.

---

अथयजुर्वेदिनांबौधायनोक्तरीत्याप्रयोगः तत्रराज्ञःशिष्टानांबंधूनांचानुमतिंलब्ध्वासंकल्पादिआचार्यपूजांतंप्राग्वत्कुर्यात् ब्राह्मणभोजनसंकल्पांतेआचार्योदेवयजनोल्लेखनादिआप्रणीताभ्यःकुर्यात् गृहीतादातुःसमक्षंगत्वापुत्रंमेदेहीतिस्वयमेवभिक्षेत् दाताददामीत्याहदातुःसंकल्पादिपुत्रदानांतंपूर्ववत् गृहीताधर्मायत्वागृण्हामिसंतत्यैत्वागृण्हामीतिपरिगृह्यैनंपुत्रंवस्त्रकुंडलांगुलीयकैरलंकुर्यात् आचार्यःकुशमयंबर्हिःपालाशमयमिध्मंचसंपाद्यपरिधानप्रभृतिअग्निमुखंकृत्वाचरुश्रपणासादनांते पूर्वांगहोमंकृत्वायस्त्वाहृदाकीरिणेतिपुरोनुवाक्यामुक्त्वायस्मैत्वंसुकृतेइतियाज्ययाहुत्वाव्यस्तसमस्तव्याहृतीर्हुत्वास्विष्टकृदादिकुर्यात् आचार्यायदक्षिणावस्त्रकुंडलांगुलीयकंदद्यादिति ॥

## आतां यानंतर यजुर्वेदी यांचा बौधायनानें सांगितल्या रीतीनें प्रयोग सांगतों.

दत्तपुत्राविषयीं राजा, शिष्ट व बांधव यांची संमति घेऊन संकल्पापासून आचार्यपूजेपर्यंत कर्म पूर्वीप्रमाणें करावें. मग ब्राह्मणभोजनाचा संकल्प झाल्यानंतर आचार्यानें देवयजन, स्थंडिलकरण इत्यादिकांपासून प्रणीतापात्रपर्यंत कर्म करावें. नंतर पुत्र घेणारानें प्रत्यक्ष दात्याच्या जवळ जाऊन 'पुत्र मला दे' असी आपणच याचना करावी. नंतर दात्यानें 'देतों' असें बोलावें. दात्यानें संकल्प इत्यादिकांपासून पुत्रदानापर्यंत कर्म पूर्वीप्रमाणें करावें. पुत्र घेणारानें "धर्माय त्वा गृण्हामि संतत्यै त्वा गृण्हामि" ह्या मंत्रानें पुत्राला हातीं धरून त्याला वस्त्र, कुंडलें, आंगठ्या इत्यादिक अलंकार घालून भूषित करावें. नंतर आचार्यानें दर्भांचा बर्हि व पळसाच्या समिधांचा इध्मा संपादन करून पात्रासादन इत्यादिक अग्निमुख करून चरुश्रपण करून आसादनांत कर्म झाल्यानंतर पूर्वांगहोम करून " यस्त्वाहृदाकीरिणा० " हा पुरोनुवाक्यामंत्र ह्मणून " यस्मै त्वं सुकृते०" अशा याज्यमंत्रानें होम करून व्यस्तसमस्त व्याहृतिमंत्रांनीं होम करून स्विष्टकृत् इत्यादिक करावें. नंतर आचार्याला दक्षिणा, वस्त्रें, कुंडलें व आंगठ्या इत्यादिक द्यावीं.

---

परगोत्रोत्पन्नदत्तकस्योपनयनमात्रेपालकगोत्रेणकृतेउपनयनोत्तरंप्रतिग्रहेवादत्तकेनाभि वादनश्राद्धादिकर्मसुगोत्रद्वयोच्चारःकार्यः चूडादिसंस्कारेपालकेनकृतेपालकैकगोत्रएव वि वाहेतुसर्वदत्तकेनजनकपालकयोरुभयोरपिपित्रोर्गोत्रप्रवरसंबंधिनीकन्यावर्जनीयानात्रसाप्त पुरुषंपांचपुरुषमित्येवंपुरुषनियमउपलभ्यते सापिंड्यंतुजनकगोत्रेणोपनयनेजनकपितृमात्रोः कुलेसाप्तपुरुषंपंचपुरुषं गृहीतृमातृपितृकुलेत्रिपुरुषं गृहीतृगोत्रेणोपनयनमात्रेकृतेउभयत्रपां चपुरुषंपितृकुलेमातृकुलेत्रिपुरुषं जातकर्माद्युपनयनांतसंस्कारेगृहीत्राकृतेगृहीतृकुलेसाप्तपु रुषं मातृतःपंचपुरुषं अतोन्यूनंजनककुलेकल्प्यंकेचित्तुदत्तकप्रवेशेकुलद्वयेपिसर्वथान्यूनमे वसापिंड्यमित्याहुः एवंदत्तकसंततेरपिसापिंड्यंज्ञेयं दत्तकस्यमरणेपूर्वापरपित्रोस्त्रिरात्रंसपिं डानामेकाहमाशौचं उपनीतदत्तकमरणादौपालकसपिंडानांदशाहादीतिनीलकंठीयेदत्तनि र्णये एवंदत्तकेनापिपूर्वापरपित्रोर्मृतौत्रिरात्रंपूर्वापरसपिंडानांमरणेएकाहं पित्रोरौर्ध्वदेहिक करणेतुकर्मांगंदशाहमेव दत्तकस्यपुत्रपौत्रादेर्जन्ममरणयोःसपिंडानामेकाहःसगोत्रसपिंडेद त्तीकृतेतुसर्वेषांदशरात्रमेव पत्नीदुहित्रादिसत्त्वेपिदत्तकएवपितृधनभागीभवतिदत्तकग्रह णोत्तरमौरसेजातेदत्तकश्चतुर्थांशभागीनसमभागी केचित्तुप्रतिग्रहीत्राजाताद्युपनयनांतसं स्कारेविधानेचकृतेऔरससमानांशभागित्वं संस्कारमात्रकरणेविधानाभावेविवाहमात्रलाभो नान्यधनलाभः कतिपयसंस्कारकरणेचतुर्थांशलाभइत्याहुः दत्तकसत्त्वेप्यौरसस्यैवपित्रोः पिंडदानेधिकारः जनकस्यपिंडदानाभावेदत्तोजनकपालकयोरुभयोरपिश्राद्धंकुर्यात्धनंचोभ योर्गृण्हीयादितिनीलकंठीये एवंदत्तकन्यायाअपिस्वीकारउक्तविधिनाकार्यःतत्रपरगोत्रोत्पन्ना याग्रहणेविवाहेगोत्रद्वयवर्जनंप्राग्वत् पुत्रपत्न्योरभावेदत्तकन्यैवपितृधनभागिनी इति दत्तो पयोगिसर्वनिर्णयः ॥

परगोत्रांत उत्पन्न झालेला अशा दत्तकाची पालकाच्या गोत्रानें नुस्ती मौंजी मात्र केली असेल, अथवा मौंजी झाल्यानंतर दत्तक घेतला असेल तर दत्तकानें अभिवादन, श्राद्ध इ- त्यादि कर्मांचे ठिकाणीं दोन गोत्रांचा उच्चार करावा. चौल इत्यादिक संस्कार पालकपि- त्यानें केले असतील तर पालकपित्याच्या गोत्राचाच उच्चार करावा. विवाहाचे ठिकाणीं तर सर्व दत्तकानें जनकपिता व पालकपिता ह्या दोघांच्या गोत्रप्रवरसंबंधी कन्या वर्ज्य करावी. याविषयीं सात पुरुषपर्यंत किंवा पांच पुरुषपर्यंत वर्ज्य करावी असा पुरुषांचा नियम कोठें ग्रंथांत मिळत नाहीं. दत्तक सापिंड्य सांगतों—जनकपित्याच्या गोत्रानें दत्तकाची मौंजी झाली असेल तर जनक जीं पिता व माता यांच्या कुळामध्यें क्रमानें सात पुरुषपर्यंत व पांच पुरुषपर्यंत सापिंड्य मानावें. दत्तक घेणारा याच्या मातेच्या व पित्याच्या कुळामध्यें तीन पु- रुषपर्यंत सापिंड्य मानावें. दत्तक घेणाराच्या गोत्रानें दत्तकाची नुस्ती मौंजी मात्र झाली असेल तर दोन्ही पित्यांच्या कुळांमध्यें पांच पुरुषांपर्यंत सापिंड्य मानावें, व उभय मातृ- कुळांमध्यें तीन पुरुषांपर्यंत सापिंड्य मानावें. जातकर्मापासून मौंजीपर्यंत संस्कार दत्तक घेणारानें केले असतील तर घेणाराचे कुळामध्यें सात पुरुषांपर्यंत सापिंड्य. मातृकुळामध्यें पांच पुरुषांपर्यंत सापिंड्य. याहून जनकाच्या कुळामध्यें सापिंड्य कमी मानावें. कोणी ग्रंथकार

तर, दत्तकाचा प्रवेश झाला असतां दोनहि कुळांचे ठिकाणीं सर्वथा कमीच सापिंड्य मानावें असें सांगतात. याप्रमाणें दत्तकाच्या संततीचेंहि सापिंड्य जाणावें. दत्तक पुत्र मृत झाला असतां जनक व पालक असे जे आईबाप त्यांनीं तीन दिवस आशौच धरावें. सपिंडांनीं एक दिवस आशौच धरावें. मौंजी झालेला असा दत्तक मृत होईल तर पालकपिता व सपिंड यांनीं दशाहादि आशौच धरावें असें, नीलकंठाच्या दत्तकनिर्णयांत सांगितलें आहे. याप्रमाणें मागचे व पुढचे असे आईबाप मृत झाले असतां दत्तकानेंहि त्रिरात्र आशौच धरावें. मागचे व पुढचे सपिंड मृत झाले असतां एक दिवस आशौच धरावें. आईबाप यांची उत्तरक्रिया करणें असेल तर कर्मसंबंधी दहा दिवसच आशौच धरावें. दत्तकाचे पुत्र, नातू इत्यादिक यांच्या जन्ममरणांचें आशौच सपिंडांनीं एक दिवस धरावें. सगोत्र असून सपिंड असा दत्तक असेल तर सर्वांनीं दहा दिवसच आशौच धरावें. स्त्री, कन्या इत्यादिक असतील तथापि पित्याच्या द्रव्याचा वारिसदार दत्तपुत्रच होतो. दत्तक घेतल्यानंतर औरसपुत्र होईल तर दत्तक चवथ्या हिशाचा भागी होतो, समभागी होत नाहीं. कोणी ग्रंथकार तर, पुत्र घेणारानें जातकर्मापासून मौंजीपर्यंत संस्कार व दत्तविधान हीं केलीं असतील तर औरस पुत्राच्या बरोबरीनें दत्तक भागीदार होतो, संस्कार केले असून दत्तविधान केलें नसेल तर त्याचा विवाह मात्र करावा, इतर धन त्याला मिळणार नाहीं, कितीएक संस्कार केले असतील तर चतुर्थांश द्रव्य मिळेल असें सांगतात. दत्तक असेल तत्रापि आईबापांला पिंड देण्याचा अधिकार औरसालाच आहे. जनकपित्याला पिंड देणारा कोणी नसेल तर दत्तकानें जनक व पालक या दोघांचेंहि श्राद्ध करावें, व दोघांचें द्रव्यहि घ्यावें, असें नीलकंठाचे दत्तनिर्णयांत सांगितलें आहे. याप्रमाणें पूर्वीं सांगितल्या विधीकरून कन्या जी तीहि दत्तक घ्यावी. ती कन्या परगोत्रांतली घेतली असेल तर तिच्या विवाहाचे ठिकाणीं दोन गोत्रें पाळावीं. पुत्र व स्त्री यांतून एकहि नसेल तर दत्तकन्या जी तीच पित्याच्या द्रव्याची विभागी होते. याप्रमाणें दत्तपुत्राच्या उपयोगी सर्व निर्णय समाप्त झाला.

---

अथकन्यानामेवोत्पत्तौपुत्रार्थपुत्रकामेष्टिः ऋतुकालात्षष्ठेदिनेसभार्यःकृताभ्यंगःप्राणानायम्यदेशकालौसंकीर्त्य पुत्रकामःपुत्रकामेष्टिंकरिष्यइतिसंकल्प्यस्वस्तिवाचनादिनांदीश्राद्धांतेग्निंप्रतिष्ठाप्य चक्षुषीआज्येनात्रप्रधानं अग्निंपंचवारंवरुणंपंचवारंविष्णुंपृथ्वींविष्णुंसोमं सूर्यासावित्रींपायसेनशेषेणस्विष्टकृतमित्यादिनिर्वापकालेतूष्णींषष्टिमुष्टीन्निरूप्य तथैवप्रोक्ष्य श्वेतवत्सश्वेतगोःक्षीरेणचरुंपक्त्वाज्यभागांते आतेगर्भइतिअग्निरैतुइतिसूक्तद्वयस्यहिरण्यगर्भ ऋषिःक्रमेणाग्नीवरुणौदेवते अनुष्टुप्जगत्यौछंदसी पायसचरुहोमेविनि० ॥ ॐआतेगर्भोयोनिमैतुपुमान्बाणइवेषुधिं आवीरोजायतांपुत्रस्तेदशमास्यःस्वाहा अग्नयइदं०करोमितेप्राजापत्यमागर्भोयोनिमैतुते अनूनःपुत्रोजायतामश्रोणोपिशाचधीतःस्वाहा अग्नय०पुमांस्तेपुत्रोनारीतंपुमाननुजायतां तानिभद्राणिबीजान्यृषभाजनयंतुनौस्वाहा अग्न०यानिभद्राणिबीजान्यृषभाजनयंतिनः तैस्त्वंपुत्रान्विंदस्वसाप्रसूर्धेनुकाभवस्वाहा अग्न०कामःसमृध्यतांमह्यमपराजितमेवमे यंकामंकामयेदेवतन्मेवायोसमर्धयस्वाहा अग्न०अग्निरैतुप्रथमोदेवतानांसोस्यैप्रजां

मुंचतुमृत्युपाशात् तदयंराजावरुणोनुमन्यतांयथेयंस्त्रीपौत्रमघन्नरोदात्स्वाहा वरुणायेदं०इमा मग्निस्त्रायतांगार्हपत्यःप्रजामस्यैनयतुदीर्घमायुः अशून्योपस्थाजीवतामस्तुमातापौत्रमानंदमभि प्रबुध्यतामियंस्वाहा वरु० मातेगृहेनिशिघोषउत्थादन्यत्रत्वद्रुदंत्यःसंविशंतु मात्वंविकेश्युर आवधिष्ठाजीवपत्नीपतिलोकेविराजपश्यंतीप्रजांसुमनस्यमानास्वाहा वरु० अप्रजस्तांपौत्र मृत्युंपाप्मानमुतवाघं शीर्ष्णःस्रजमिवोन्मुच्यद्विषद्भ्यःप्रतिमुंचामिपाशंस्वाहा वरुणा०दैवकृतं ब्राह्मणंकल्पमानंतेनहन्मियोनिषदःपिशाचान् क्रव्यादोमृत्युंनधरान्पातयामिदीर्घमायुस्तवजी वंतुपुत्राःस्वाहा वरु० नेजमेषेतितिसृणांविष्णुस्त्वष्टागर्भकर्ताविष्णुपृथ्वीविष्णवोनुष्टुप् ॥ पायसचरुहोमेवि०॥ नेजमेष०विष्णव०यथेयंपृथिवी०पृथिव्याइ०विष्णोःश्रेष्ठेन०विष्णव० सोमोधेनुंराहूगणोगौतमःसोमस्त्रिष्टुप् पायसचरुहोमेवि० सोमोधेनुं० सोमायेदं० तांपूषन् सूर्यासावित्रीसूर्यासावित्रीत्रिष्टुप् पायसहोमेवि०तांपूषञ्छिव० सूर्यासावित्र्याइदं० इतिपं चदशाहुतीर्हुत्वास्विष्टकृद्धोमंकृत्वा दंपतीअपश्यंत्वेतिद्वयोःप्रजावान्प्राजापत्यःप्रजापतिस्त्रि ष्टुप् हुतशेषचरुप्राशनेविनियोगः अपश्यंत्वेतिद्वाभ्यांप्राश्य पिशंगभृष्टिमित्यस्यदैवोदासिः परुच्छेपइंद्रोगायत्री नाभ्यालंभनेवि० पिशंगभृष्टिं० इतिदंपतीनाभ्यालंभनंकुर्यातां यजमा नःप्रायश्चित्तादिहोमशेषंसमाप्यविप्रेभ्योगांसुवर्णादिदक्षिणांचदत्वारात्रौदंपतीदर्भास्तरणेश यीयातां इतिपुत्रकामेष्टिप्रयोगः ॥

## आतां यानंतर सर्व कन्याच होत असतील तर पुत्र होण्याकरितां पुत्रकामेष्टि सांगतों.

ऋतुकालापासून सहाव्या दिवसीं स्त्रियेसहवर्तमान अभ्यंग स्नान केलें होत्साता नित्यकृत्य करून आचमन प्राणायाम करून देशकालांचा उच्चार केल्यानंतर संकल्प करावा. तो असा;— "पुत्रकामः पुत्रकामेष्टिं करिष्ये," असा संकल्प करून पुण्याहवाचनापासून नांदीश्राद्धा-पर्यंत कर्म झाल्यानंतर अग्निस्थापन करून अन्वाधान करावें. तें असें;—"चक्षुषी आज्ये-नात्र प्रधानं अग्निं पंचवारं वरुणं पंचवारं विष्णुं पृथ्वीं विष्णुं सोमं सूर्यासावित्रीं पा-यसेन शेषेण स्विष्टकृतमित्यादि." असें अन्वाधान केल्यानंतर निर्वापकालीं मंत्रविरहित अशा साठ मुठी तांदूळ पात्रांत घालून अमंत्रक धुवून श्वेतवर्ण आहे वत्स जीचा अशा श्वेत-वर्ण गाईचे दुधानें चरु ( भात ) शिजवून आज्यभाग झाल्यानंतर चरु होम करावा, तो असा,—"आतेगर्भ इति अग्निरैतु इति सूक्तद्वयस्य हिरण्यगर्भऋषिः ॥ क्रमेणाग्नीवरुणौ-देवते ॥ अनुष्टुप्जगत्यौ छंदसी ॥ पायसहोमे विनियोगः ॥ आतेगर्भो० अग्नयइदंनमम ॥ करोमि ते०अग्नय इदं ॥ पुमांस्ते०अग्नयइदं० ॥ यानिभद्राणि० अग्नयइदं० ॥ कामः समृ० ॥ अग्नय इदं० ॥ अग्निरैतुप्र० वरुणायइदं०॥ इमामग्निस्त्रायतां०॥ वरुणायेदं०॥ मातेगृहेनिशि०॥ वरुणायेदं० ॥ अप्रजस्तांपौत्र० वरुणायेदं० ॥ दैवकृतं ब्राह्मणं० वरु-णायेदं० ॥ नेजमेषेतितिसृणांविष्णुस्त्वष्टागर्भकर्ताविष्णुपृथ्वीविष्णवोनुष्टुप् ॥ पायसहोमे वि० ॥ नेजमेष० विष्णवइदंनमम ॥ यथेयंपृथिवी० पृथिव्याइ० ॥ विष्णोःश्रेष्ठे० ॥ विष्णव इ० ॥ सोमोधेनुंराहूगणो गौतमःसोमस्त्रिष्टुप् ॥ पायसहोमेवि० ॥ सोमो०सोमाये-

द० ॥ तांपूषन् सूर्यासावित्रीसूर्यासावित्री त्रिष्टुप् ॥ पायसहोमेवि० ॥ तांपूषञ्छि० ॥ सूर्यासावित्र्याइ० ॥ ” याप्रमाणें पंधरा आहुतींनीं होम करून स्विष्टकृत् होम करावा. नंतर दंपतींनीं, “ अपश्यंत्वेतिद्वयोःप्रजावान्प्राजापत्यःप्रजापतिस्त्रिष्टुप् हुतशेषपायसप्राशनेविनियोगः अपश्यंत्वा० ” ह्या दोन मंत्रांनीं होमशेष पायस भक्षण करून “ पिशंगभृष्टि० ” ह्या मंत्रानें दंपतींनीं नाभीला स्पर्श करावा. त्यानंतर यजमानानें प्रायश्चित्तादि होमशेषाची समाप्ति करून ब्राह्मणांला गोप्रदान व सुवर्ण इत्यादिक दक्षिणा देऊन रात्रीचे ठिकाणीं दंपतींनीं दर्भ हातरून त्यांजवर निद्रा करावी. याप्रमाणें पुत्रकामेष्टिप्रयोग समाप्त झाला.

---

अथपुंसवनं तच्चव्यक्तेगर्भेद्वितीयेचतुर्थेषष्ठेष्टमेवामासेसीमंतेनसहवाकार्यं शुक्लपंचमीमारभ्यकृष्णपंचमीपर्यंतेचतुर्थीनवमीचतुर्दशीपंचदशीवर्जितेतिथौसूर्यभौमगुरुवारेषुप्रशस्तं क्वचिच्चंद्रबुधशुक्रवाराउक्ताः नक्षत्राणितुपुंनामकानिप्रशस्तानि तानिच पुष्यश्रवणहस्तपुनर्वसुमृगाभिजित्मूलानुराधाश्विनीत्येतानि अत्रपुष्योमुख्यः तदभावेश्रवणस्तदभावेहस्तादीनि अयमेवानवलोभनस्यापिकालः पुंसवनेनसहकरणीयत्वविधानात् पुंसवनानवलोभनेप्रतिगर्भंकार्ये गर्भसंस्कारत्वात् गर्भाधानसीमंतोन्नयनेतुस्त्रीसंस्कारत्वात्प्रतिगर्भंनावर्तेते किंतुप्रथमगर्भेएवकार्ये प्रथमगर्भेलोपेतुप्रतिगर्भंतयोर्लोपप्रायश्चित्तंआवश्यकं नचप्रथमापत्येतयोःप्रायश्चित्तेनद्वितीयादिगर्भाणांसंस्कारसिद्धिर्भवति प्रायश्चित्तेनहिप्रत्यवायपरिहारमात्रं नत्वपूर्वाख्यातिशयोत्पादनं तत्तुसंस्कारविधिनैवेतियुक्तंप्रतिगर्भंप्रायश्चित्तं पुंसवनानवलोभनयोस्तुप्रथमगर्भेनुष्ठानेपिप्रतिगर्भंतयोर्लोपेप्रायश्चित्तं तच्चपादकृच्छ्रंप्रतिसंस्कारंकार्यं बुद्धिकृतलोपेद्विगुणंपुंसवनेपतिःकर्तातदभावेदेवरादिः ॥

## आतां पुंसवनसंस्कार सांगतों.

हा पुंसवनसंस्कार गर्भाचें स्पष्ट ज्ञान झाल्यानंतर दुसरा, चवथा, सहावा किंवा आठवा यांतून कोणत्याहि मासांत करावा. अथवा सीमंतसंस्काराबरोबर करावा. शुक्लपक्षांतील पंचमीपासून आरंभ करून कृष्णपक्षांतील पंचमीपर्यंत जे दिवस त्यांतून चतुर्थी, नवमी, चतुर्दशी आणि पौर्णिमा ह्या तिथि वर्ज्य करून इतर दिवसीं रवि, मंगळ, गुरु ह्या वारीं करावा. क्वचित् ग्रंथांत सोमवार, बुधवार व शुक्रवार या दिवसीं करावा असें सांगितलें आहे. पुरुष नांवाचीं नक्षत्रें ह्या संस्काराला प्रशस्त सांगितलीं आहेत, ह्मणजे पुरुषनक्षत्र ज्या दिवसीं असेल त्या दिवसीं हा संस्कार करावा. पुरुषनक्षत्रें—पुष्य, श्रवण, हस्त, पुनर्वसु, मृग, अभिजित्, मूल, अनुराधा आणि अश्विनी. यांमध्यें पुष्यनक्षत्र मुख्य आहे. पुष्य न मिळेल तर श्रवण घ्यावें, श्रवण न मिळेल तर हस्तादिक घ्यावीं. अनवलोभन ह्या संस्काराचाहि हाच ( पुंसवनाचाच ) काळ जाणावा. कारण, पुंसवन संस्काराबरोबर अनवलोभन करावें असें सांगितलें आहे. पुंसवन व अनवलोभन हे संस्कार दरएक गर्भाला करावे; कारण ते गर्भाचे संस्कार आहेत. गर्भाधान आणि सीमंतोन्नयन हे संस्कार तर, स्त्रीसंस्कार आहेत याकरितां दरएक गर्भाचे ठिकाणीं करूं नयेत, तर पहिल्या गर्भाचे ठिकाणींच करावे. पहिल्या गर्भाचे ठिकाणीं ते न केले असतील तर, दरएक गर्भाचे ठिकाणीं त्यांच्या लोपाचें

प्रायश्चित्त अवश्य करावें. कारण, पहिल्या अपत्याचे ठिकाणीं त्यांचें ( गर्भाधान व सीमंतोन्नयन यांचें ) प्रायश्चित्त केल्यानें दुसरा, तिसरा, इत्यादिक गर्भांचे संस्कारांची सिद्धि होत नाहीं, प्रायश्चित्त केल्यानें दोषाचा परिहार मात्र होतो, पुण्याचा अतिशय उत्पन्न होत नाहीं, तो पुण्यातिशय संस्काराचा विधि केल्यानेंच उत्पन्न होतो, याकरितां दरएक गर्भाचे ठिकाणीं प्रायश्चित्त करावें हें योग्य होय. पुंसवन व अनवलोभन हे संस्कार पहिल्या गर्भाचे केले तथापि दरएक गर्भाचे करावे, कारण ते गर्भसंस्कार आहेत. ते दरएक गर्भाचे न केले तर त्यांच्या लोपाचें प्रायश्चित्त करावें. तें प्रायश्चित्त दरएक संस्काराचें पादकृच्छ्र करावें. समजून उमजून लोप झाला असेल तर दुप्पट प्रायश्चित्त करावें. पुंसवनसंस्कार पतीनें करावा, तो सन्निध नसेल तर दीर इत्यादिकानें कराबा.

---

अथसीमंतकाल: तच्चतुर्थेष्टमेषष्ठेपंचमेमासिवाविहितं नवमेमासिवाकुर्यात्यावद्गर्भविमोचनं स्त्रीयद्यकृतसीमंताप्रसूयेतकदाचन गृहीतपुत्राविधिवत्सातंसंस्कारमर्हतिपक्षतिथिवारनक्षत्राणिपुंसवनोक्तान्येवप्रशस्तानि क्वचिद्दशमीपर्यंतंकृष्णोपिग्राह्य:षष्ठयष्टमीद्वादश्योरिक्ता:पंचदशीचवर्ज्या: तासुसंकटेचतुर्थीचतुर्दशीपौर्णमास्योग्राह्या:क्रमेणाष्टचतुर्दशदशनाडिकाआद्यास्त्यक्त्वाषष्ठ्यष्टमीद्वादश्योपिग्राह्या: पुंनक्षत्राणामलाभेरोहिणीरेवत्युत्तरात्रयाणिग्राह्याणि उक्तनक्षत्राणांप्रथमांत्यपादौत्यक्त्वामध्यमपादद्वयंग्राह्यमित्युक्तं इदंकर्मसकृदेवकार्यमित्युक्तं कात्यायनानांतुगर्भसंस्कारत्वात्प्रतिगर्भमावर्तनीयं सीमंतोन्नयनेपतिरेवकर्ता गर्भाधानलोपेतत्प्रायश्चित्तार्थंविप्रायगांदत्वापुंसवनादिकार्यं तत्राश्वलायनानांदेशकालसंकीर्तनांते ममास्यां भार्यायामुत्पत्स्यमानगर्भस्यगार्भिकबैजिकदोषपरिहारपुंरूपतासिद्धिज्ञानोदयप्रतिरोधपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं पुंसवनमनवलोभनंममास्यांभार्यायां गर्भाभिवृद्धिपरिपंथिपिशितरुधिरप्रियालक्ष्मीभूतराक्षसीगणदूरनिरसनक्षमसकलसौभाग्यनिदानमहालक्ष्मीसमावेशनद्वाराप्रतिगर्भंबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वाराचश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं स्त्रीसंस्काररूपंसीमंतोन्नयनाख्यंकर्मचतंत्रेणकरिष्यइतिसंकल्प:सीमंतेनसहत्रयाणांकरणेज्ञेय: नांदीश्राद्धेक्रतुदक्षसंज्ञकाविश्वेदेवा: पुंसवनस्यपृथक्त्वेपवमानसंज्ञकमौपासनाग्निंप्रतिष्ठापयेत् त्रयाणां सहत्वेमंगलनामानंप्रतिष्ठापयेत् गृह्याग्निविच्छेदेसर्वाधानिनश्चाग्न्युत्पत्ति:पूर्ववत् पुंसवनेप्रजापतिंचरुणासीमंतेधातारंद्वि:राकांद्वि:विष्णुंत्रि:प्रजापतिंसकृदाज्येनजुहुयात् अवशिष्ट:प्रयोगोन्यत्रज्ञेय: शाखांतरेषुचतत्तद्ग्रंथेभ्योज्ञेय:अत्रप्रतिसंस्कारंदशदशत्रींस्त्रीन्वाब्राह्मणान्भोजयेत् शक्तेनशतंशतं सीमंतांगभोजनेप्रायश्चित्तंपारिजाते ब्रह्मौदनेचसोमेचसीमंतोन्नयनेतथा जातश्राद्धेतथाभुक्त्वाभोक्ताचांद्रायणंचरेत् यद्वाअराइवेतिमंत्रस्यशतवारंजप: एतच्चआधानांगब्रह्मौदनांगभोजनइवसीमंतांगभोजनेज्ञेयं नतुतद्दिनेतद्गृहेभोक्तृमात्रस्येतिपारिजातोक्तंयुक्तं ॥

## आतां सीमंतोन्नयनसंस्काराचा काल सांगतों.

सीमंतोन्नयनसंस्कार करणें तो चवथा, आठवा, सहावा, पांचवा “ अथवा नववा या महिन्यांतून कोणत्याहि एकांत करावा. प्रसूति होई तेथपर्यंत त्याची मर्यादा आहे. सीमंतोन्नयनसं-

स्कार केल्याखेरीज स्त्री प्रसूत होईल तर ती पुत्र हातांत घेऊन यथाविधि संस्कार करण्याला योग्य होते." पक्ष, तिथि, वार आणि नक्षत्रें हीं सर्व पुंसवनाला जीं सांगतलीं तींच एथेंहि घ्यावीं. क्वचित् ग्रंथांत दशमीपर्यंत कृष्णपक्षहि घेण्याविषयीं सांगितलें आहे. षष्ठी, अष्टमी, द्वादशी, रिक्ता (चतुर्थी, नवमी, चतुर्दशी) व पौर्णिमा ह्या तिथि वर्ज्य कराव्या. संकटविषय असेल तर त्यामध्यें चतुर्थी, चतुर्दशी व पौर्णिमा ह्या घ्याव्या. तसेंच षष्ठी, अष्टमी, द्वादशी ह्या तिथींच्या पहिल्या घटिका क्रमानें ८।१४।१० टाकून त्याहि घ्याव्या. पुरुषनक्षत्रें न मिळतील तर रोहिणी, रेवती व तीन उत्तरा हीं नक्षत्रें घ्यावीं. उक्त नक्षत्रांचा पहिला व शेवटचा असे चरण टाकून मधले दोन चरण घ्यावे असें सांगितलें आहे. हा सीमंतोन्नयनसंस्कार एकवारच करावा, असें सांगितलें आहे. कात्यायन जे त्यांनीं तर, हा गर्भसंस्कार आहे याकरितां दरएक गर्भाचे ठिकाणीं करावा. सीमंतोन्नयनसंस्कार पतीनेंच करावा. गर्भाधानसंस्काराचा लोप होईल तर, त्याच्या प्रायश्चित्ताकरितां ब्राह्मणाला गोप्रदान देऊन पुंसवनादिक संस्कार करावे. त्यामध्यें आश्वलायनशाखी यांनीं देश, काल यांचा उच्चार केल्यानंतर "ममास्यां भार्यायामुत्पत्स्यमानगर्भस्य गार्भिकबैजिकदोषपरिहारपुंरूपतासिद्धिज्ञानोदयप्रतिरोधपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं पुंसवनमनवलोभनं ममास्यां भार्यायां गर्भाभिवृद्धिपरिपंथिपिशितरुधिरप्रियालक्ष्मीभूतराक्षसीगणदूरनिरसनक्षमसकलसौभाग्यनिदानमहालक्ष्मीसमावेशनद्वारा प्रतिगर्भं बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा च श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं स्त्रीसंस्काररूपं सीमंतोन्नयनाख्यं कर्म च तंत्रेण करिष्ये," असा संकल्प, सीमंतोन्नयनसंस्काराबरोबर तीनहि संस्कार करणें असल्यास जाणावा. ह्या संस्काराचे ठिकाणीं नांदीश्राद्धांत देव घेणें ते क्रतुदक्ष संज्ञक विश्वेदेव घ्यावे. पुंसवनसंस्कार निराळा करणें असेल तर, पवमानसंज्ञक औपासनाग्नीची स्थापना करावी. पुंसवन, अनवलोभन आणि सीमंतोन्नयन हे तीन संस्कार एकतंत्रानें करणें असतील तर, मंगलनामक अग्नीची स्थापना करावी. गृह्याग्नीचा नाश झाला असतां व सर्वाधानी असल्यास त्याच्या अग्नीची उत्पत्ति पूर्वी सांगितल्याप्रमाणें करावी. पुंसवनसंस्कारीं प्रजापतीच्या उद्देशेंकरून चरूचा होम करावा. सीमंतोन्नयनसंस्कारीं धातृदेवतेच्या उद्देशानें दोन आहुति, राका देवतेच्या उद्देशानें दोन आहुति, विष्णु देवतेच्या उद्देशानें तीन आहुति, प्रजापति देवतेच्या उद्देशानें एक आहुति, याप्रमाणें घृताचा होम करावा. अवशिष्ट प्रयोग ग्रंथांतरीं पहावा. अन्यशाखांचा प्रयोग त्या त्या ग्रंथांतून पहावा. एथें दरएक संस्कारीं दहा दहा किंवा तीन तीन ब्राह्मणांला भोजन घालावें. समर्थ असेल तर शंभर शंभर ब्राह्मणांस भोजन घालावें. सीमंतसंस्कारसंबंधी भोजन केलें असतां पारिजात ग्रंथांत प्रायश्चित्त सांगितलें आहे. "ब्रह्मौदन, सोमयाग, सीमंतसंस्कार व जातकर्मसंबंधी नांदीश्राद्ध यांचे ठिकाणीं भोजन केलें असतां भोजन करणारानें चांद्रायण प्रायश्चित्त करावें." अथवा "अराइव०" ह्या मंत्राचा शंभर वेळ जप करावा. हें प्रायश्चित्त, आधानांग ब्रह्मौदनसंबंधी भोजनासारखें सीमंतसंस्कारसंबंधी भोजन केलें असतां जाणावें. त्या दिवसीं त्या घरीं नुस्तें भोजन करणारा जो त्याला प्रायश्चित्त नाहीं, असें पारिजात ग्रंथामध्यें जें सांगितलें तें योग्य आहे.

**अथगर्भिणी**धर्माः गर्भिणीकुंजराश्वादिशैलहर्म्यादिरोहणं व्यायामंशीघ्रगमनं**शकटारोहणंत्यजेत्** नभस्मादावुपविशेन्मुसलोलूखलादिषु त्यजेज्जलावगाहंचशून्यंस**द्मतरोस्तलं कलहंगात्रभंगं**चतीक्ष्णात्युष्णादिभक्षणं संध्यायामतिशीताम्लंगुर्वाहारंपरित्यजेत् **व्यवायशोकासृङ्मोक्षंदिवास्वापंनिशिस्थितिं भस्मांगारनखैर्भूमिलेखनंशयनंसदा त्यजेदमंगलंवाक्यंनचहास्याधिकाभवेत् नमुक्तकेशानोद्विग्नाकुक्कुटासनगानच गर्भरक्षासदाकार्यानित्यंशौचनिषेवणात् प्रशस्तमंत्रलिखनाच्छस्तमाल्यानुलेपनात् विशुद्धगेहवसनाद्दानैःश्वश्र्वादिपूजनैः हरिद्राकुंकुमंचैवसिंदूरंकज्जलंतथा केशसंस्कारतांबूलंमांगल्याभरणंशुभं चतुर्थेमासिषष्ठेवाप्यष्टमेगर्भिणीवधूः यात्रांविवर्जयेन्नित्यमाषष्ठात्तुविशेषतः ॥**

## आतां गर्भिणीस्त्रीचे धर्म सांगतों.

“ गर्भिणी स्त्रीनें हत्ती, घोडा इत्यादिकांवर बसूं नये. पर्वत व मजल्याचें घर, यांच्यावर चढूं नये. व्यायाम करणें, त्वरित चालणें, गाडींत बसणें, हीं वर्ज्य करावीं. राखाडी इत्यादिक स्थलीं, मुसळ, उखळ इत्यादिकांवर बसूं नये. उदकांत बुडी मारून स्नान करणें, शून्य गृह, वृक्षाच्या तळीं बसणें इत्यादिक वर्ज्य करावीं. कलह करणें, अंग पिळणें, तिखट पदार्थभक्षण, अति उष्ण पदार्थभक्षण हीं वर्ज्य करावीं. संध्याकालीं अति थंड व अति आंबट असे पदार्थ, जडान्नाचा आहार करणें हीं वर्ज्य करावीं. मैथुन, शोक, रक्त काढणें, दिवसा निद्रा, रात्रीं जागरण, हीं वर्ज्य करावीं. राखाडी, कोळसे, नखें यांहींकरून भूमीवर रेषा काढणें, सार्वकाल निद्रा, हीं वर्ज्य करावीं. अमंगळ शब्द बोलूं नये. फार हसूं नये. मोकळे केश सोडूं नये. उद्विग्न असूं नये. कुक्कुटासन करूं नये. स्वच्छता ठेवणें, चांगले मंत्र लिहिणें, सुगंधपुष्पांच्या माळा, गंधाची उटी घेणें, स्वच्छ घरांत राहणें, दानें करणें, सासूसासरे यांची पूजा करणें इत्यादिकांनीं गर्भाचें संरक्षण नित्य करावें. हळद, कुंकू, शेंदूर, काजळ, नाहणें, वेणीफणी करणें, तांबूलभक्षण, सौभाग्याचे अलंकार घालणें हीं शुभकारक होत. चवथा, सहावा अथवा आठवा या महिन्यांत गर्भिणी स्त्रीनें नित्य प्रयाण करूं नये. सहाव्या मासानंतर तर विशेषेंकरून नित्य प्रयाण वर्ज्य करावें.

---

**अथगर्भिणीपतिधर्माः गर्भिणीवांछितंद्रव्यंतस्यैदद्याद्यथोचितं सूतेचिरायुषंपुत्रमन्यथादोषमर्हति सिंधुस्नानंद्रुमच्छेदंवपनंप्रेतवाहनं विदेशगमनंचैवनकुर्याद्गर्भिणीपतिः वपनंमैथुनंतीर्थंश्राद्धभोजनमेवच वर्जयेत्सप्तमान्मासान्नावआरोहणंतथा युद्धादिवास्तुकरणंनखकेशनिकर्तनं चौलंशवानुगमनंविवाहंचविवर्जयेत् मुंडनंपिंडदानंचप्रेतकर्मचसर्वशः नजीवत्पितृकःकुर्याद्गुर्विणीपतिरेवच अत्रकर्तनमपिनिषिद्ध्यते वपनस्यनिषेधेपिकर्तनंतुविधीयतइति वाक्यंतुजीवत्पितृकादीनांयोवपननिषेधस्तत्रकर्तनविधिपरं एतदपवादः क्षौरंनैमित्तिकंकुर्यान्निषेधेसत्यपिध्रुवं पित्रोःप्रेतविधानंचगर्भिणीपतिराचरेत् अन्वष्टक्याष्टकयोर्गर्भिणीपतिः पिंडदानंकुर्यात् केचित्पित्रोःप्रतिसांवत्सरिकेपिंडदानंकुर्वंति दर्शमहालयादिषुनैवकार्यं ॥**

## आतां गर्भिणीपतीचे धर्म सांगतों.

"गर्भिणी स्त्रीची इच्छा ज्या पदार्थावर होईल तो तिला यथायोग्य द्यावा; तेणेंकरून चिरायु पुत्र प्रसवते. इच्छा पूर्ण न केल्यास पति दोषी होतो. समुद्रस्नान, वृक्ष तोडणें, क्षौर, प्रेत वाहणें, परदेशप्रयाण, हीं गर्भिणीपतीनें वर्ज्य करावीं. क्षौर, मैथुन, तीर्थयात्रा, श्राद्धभोजन आणि नौकेंत बसणें इतकीं वर्ज्य करावीं. युद्ध; ग्रह बांधणें; नखें, केश यांचा छेद; चौल; प्रेताबरोबर जाणें; विवाह हीं सातव्या महिन्यापासून वर्ज्य करावीं. क्षौर, पिंडदान, प्रेताची क्रिया, हीं ज्याचा पिता जिवंत आहे त्यानें व गर्भिणीपतीनें करूं नयेत." एथें नखें व केश यांचा छेदहि निषिद्ध सांगितला. "क्षौराचा जरी निषेध आहे तथापि नखें, केश यांचा छेद करावा," असें जें वाक्य तें तर जीवत्पितृक इत्यादिकांला जो क्षौराचा निषेध सांगितला त्याविषयीं नखें व केश यांचा छेद करावा असें सांगतों. या क्षौराविषयीं अपवाद—"निश्चयेंकरून जरी क्षौराचा निषेध असेल तथापि नैमित्तिक क्षौर करावें, व गर्भिणीपति असेल तथापि त्यानें आईबापांची प्रेतक्रिया करावी. अन्वष्टक्य व अष्टका ह्या श्राद्धांचे ठिकाणीं गर्भिणीपतीनें पिंडदान करावें. कितीएक लोक आईबापांच्या प्रतिसांवत्सरिक श्राद्धीं पिंडदान करितात, दर्शश्राद्ध व महालय इत्यादिश्राद्धांचे ठिकाणीं पिंडदान करूं नये.

---

अथगर्भस्रावहरंकांचनयज्ञोपवीतदानंमहार्णवे इदंस्त्रीकर्तृकं शुभदिनेस्त्रीआचम्यदेशकालौसंकीर्त्यममगर्भस्रावनिदानसकलदोषपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंवायुपुराणोक्तंसुवर्णयज्ञोपवीतदानविधिंकरिष्येइतिसंकल्प्य पलेनतदर्धेनतदर्धेनयथाशक्तिवाहैमंयज्ञोपवीतंग्रंथिप्रदेशेमौक्तिकयुतंकृत्वातथैववज्रमणियुतंराजतमुत्तरीयकंचकृत्वोभयंपंचगव्येन गायत्र्याप्रक्षाल्य ताम्रपात्रेद्रोणमितंदधिनिक्षिप्यतन्मध्येद्रोणमितमाज्यंनिक्षिप्याज्योपरितदुभयंसंस्थाप्यभर्तीब्राह्मणोवागायत्रीमंत्रेणगंधादिभिःपूजयेत् अष्टगुंजात्मकोमाषःदशमाषाःसुवर्णं पलकुडवप्रस्थाढकद्रोणाःसुवर्णादिपूर्वपूर्वचतुर्गुणाः दध्याज्ययोर्द्रोणपरिमाणाभावेशक्त्यनुसारिपरिमाणं ब्राह्मणद्वाराआज्यमधुमिश्रैस्तिलैरष्टोत्तरशतंगायत्र्याव्याहृतिभिर्वाहोमंकारयेत् त्यागंभर्तावास्त्रीवाकुर्यात् होमकर्तारंविप्रंवस्त्राद्यैःसंपूज्यप्राङ्मुखायतस्मैउदङ्मुखास्त्रीदानंकुर्यात् तद्यथा उपवीतंपरिमितंब्रह्मणाविधृतंपुरा भवनौकास्यदानेनगर्भंसंधारयेह्यहंइतिमंत्रेण विप्रस्यनामगोत्रेउच्चार्यताम्रपात्रस्थदध्याज्यसंस्थंसुपूजितंसोत्तरीयकमिदं यज्ञोपवीतंगर्भस्रावनिदानदोषपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंतुभ्यमहंसंप्रददेनमम प्रतिगृह्यतां विप्रःप्रतिगृण्हामीत्यादि यथाशक्तिदक्षिणांदत्वान्येभ्योपियथाशक्तिदक्षिणांदत्वाप्रतिग्रहीतुरनुव्रज्यनमस्कारक्षमापनादिकृत्वाविप्रभोजनंसंकल्प्यकर्मेश्वरायार्पयेत् एतच्चस्रवद्गर्भाभवेत्सातुबालकंहंतिया विषैरित्युक्तेर्बालहत्याप्रायश्चित्तंकृत्वाकार्यं अन्यत्रतुस्वर्णधेनुदानहरिवंशश्रवणादीन्युक्त्वाघृतपूर्णताम्रकलशदानादिविधानानिउक्तानि ॥

यानंतर गर्भाचा स्राव होत असल्यास तो बंद करणारें असें सोन्याचें यज्ञोपवीताचें दान महार्णव ग्रंथांत सांगितलें आहे. हें दान स्त्रियेनें करावें. तें असें,—शुभ दिवस पाहून त्या दिवशीं स्त्रियेनें आचमन करून देशकालांचा उच्चार करून संकल्प करावा. तो असा;— " मम गर्भस्रावनिदानसकलदोषपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं वायुपुराणोक्तं सुवर्णयज्ञोपवीतदानविधिं करिष्ये, " असा संकल्प करून एक पलपरिमित अथवा अर्धपलाचें किंवा पावपलाचें अथवा यथाशक्ति असें सोन्याचें यज्ञोपवीत करून त्या यज्ञोपवीताचे ग्रंथीचे ठिकाणीं मोतीं लावावें. तसेंच वज्रमणीनें युक्त असी रुप्याची उत्तरी करावी. नंतर तीं दोन गायत्रीमंत्रानें पंचगव्येंकरून धुवून तांब्याच्या पात्रांत द्रोणपरिमित ( व्यावहारिक ८९३ तोळे, ४ मासे ) दहीं घालून त्यांत द्रोणपरिमित तूप घालून त्या तुपावर तीं दोन ठेवावीं. नंतर पति किंवा ब्राह्मण यानें गायत्रीमंत्रानें त्यांची पूजा करावी. आठ गुंजांचा एक मासा, दहा मासे ह्मणजे एक सुवर्ण, चार सुवर्ण ह्मणजे एक पल, चार पलें ह्मणजे एक कुडव, चार कुडव ह्मणजे एक प्रस्थ, चार प्रस्थ ह्मणजे एक आढक, चार आढक ह्मणजे एक द्रोण. दहीं व तूप हीं द्रोणपरिमित न मिळतील तर यथाशक्तिप्रमाण घ्यावीं. ब्राह्मणाकडून तूप, मध यांहींकरून युक्त अशा तिलांचा अष्टोत्तर शत ( १०८ ) होम, गायत्री किंवा व्याहृति या मंत्रांनीं करवावा. होमाचा त्याग करणें तो पति किंवा स्त्री यांतून कोणीएकानें करावा. होम करणाऱ्या ब्राह्मणाचीं वस्त्रें इत्यादिकांनीं पूजा करून पूर्व दिशेला संमुख अशा ब्राह्मणाला उत्तरदिशेला संमुख अशा स्त्रीनें उत्तरीसह त्या यज्ञोपवीताचें दान करावें, तें असें;— " उपवीतं परिमितं ब्रह्मणा विधृतं पुरा ॥ भव नौकास्य दानेन गर्भं संधारये ह्यहं, " असा मंत्र ह्मणून ब्राह्मणाचें नाम, गोत्र यांचा उच्चार करून दान करावें. दानवाक्य;—"ताम्रपात्रस्थदध्याज्यसंस्थं सुपूजितं सोत्तरीयकमिदं यज्ञोपवीतं गर्भस्रावमिदानदोषपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं तुभ्यमहं संप्रददे न मम ॥ प्रतिगृह्यतां, " असें दानकर्त्यानें वाक्य ह्मटल्यानंतर ब्राह्मणानें " प्रतिगृण्हामि, " असें वाक्य बोलावें, इत्यादिक. नंतर यथाशक्ति ( दानसांगतेकरितां ) दक्षिणा देऊन इतर ब्राह्मणांलाहि यथाशक्ति दक्षिणा देऊन दान घेणाराला पोंचविणें, नमस्कार, प्रार्थना इत्यादिक करून ब्राह्मणभोजनाचा संकल्प करून कर्म ईश्वराला समर्पण करावें. हें दान करणें तें, " विषप्रयोग करून जी स्त्री बालकाला मारत्ये तिच्या गर्भाचा स्राव होतो, " असें वचन आहे याकरितां बालहत्येचें प्रायश्चित्त करून नंतर हें सांगितलेलें दान करावें. दुसऱ्या ग्रंथांत तर, सुवर्णधेनूचें दान, हरिवंशग्रंथाचें श्रवण इत्यादिक सांगून तांब्याची घागर घृतानें भरलेली असी करून तिचें दान करावें, इत्यादिक विधानें सांगितलीं आहेत.

---

अथसूतिकागृहप्रवेशः गृहनैर्ऋत्यांसूतिकागृहंकृत्वा तत्राश्विनीरोहिणीमृगपुनर्वसुपुष्य त्र्युत्तराहस्तचित्रास्वात्यनुराधाधनिष्ठाद्यततारकानक्षत्रेषुरिक्तादिवर्ज्यतिथौ चंद्रानुकूल्येशुभ लग्नेसूतिकाप्रवेशोगोविप्रदेवपूजनंकृत्वामंत्रवाद्यघोषेणसापत्यस्त्रीभिःसहकार्यः असंभवेस द्योवाप्रसवप्रतिबंधेऋग्विधाने प्रमंदिनेइत्यृचंविजिहीष्वेतिसूक्तंवाजपेत् एताभ्याममभिमंत्रि

तजलंवापाययेत् तेनसुखप्रसवः शीघ्रप्रसवमंत्रस्तु हिमवत्युत्तरेपार्श्वेसुरथानामयक्षिणी तस्याः स्मरणमात्रेणविशल्यागर्भिणीभवेत् ॐक्षीं ॐस्वाहेतिमंत्रेणदूर्वांकुरेणातिलतैलंशतंसहस्रंवा ऽभिमंत्र्यकिंचित्पाययेत्किंचिन्मात्रस्यगर्भेलेपश्च सम्यग्लेपेशीघ्रंसुखप्रसवः अस्थिमात्राव शिष्टगोमस्तकस्यसूतिकागृहोपरिनिधानेसुखप्रसवः वंशनिंबयोस्त्वक्तुलसीमूलंकपित्थपत्रं करवीरबीजंचसमभागंमहिषीदुग्धेनपेषयित्वातेनसतैलेनयोनिलेपेसद्यःप्रसवः ॥

## आतां बाळंत होण्याच्या गृहांत गर्भिणीचा प्रवेश सांगतों.

गृहाच्या नैर्ऋति दिशीचे ठिकाणीं सूतिकागृह करून त्या गृहांत अश्विनी, रोहिणी, मृग, पुनर्वसु, पुष्य, तीन उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाती, अनुराधा, धनिष्ठा आणि शततारका, ह्या नक्षत्रीं; रिक्तादि तिथि वर्ज्य करून अन्य तिथींचे ठिकाणीं; व चंद्र अनुकूल असतां; गाई, ब्राह्मण, देव यांची पूजा करून मंत्र आणि वाद्यें यांचा घोष व अपत्ययुक्त अशा सुवासिनी स्त्रिया यांसहवर्तमान शुभ लग्नाचे ठिकाणीं सूतिकेनें प्रवेश करावा. तसा संभव नसेल तर तत्कालीं प्रवेश करावा. प्रसवाचा प्रतिबंध झाला असतां ऋग्विधान ग्रंथांत उपाय सांगितला आहे तो असा;—" प्रमंदिने० " ह्या ऋचेचा, किंवा " विजिहीर्ष्व० " ह्या सूक्ताचा जप करावा. अथवा ऋचा व सूक्त यांहींकरून उदक मंत्रून तें प्राशन करावें, तेणेंकरून सुखानें प्रसव होतो. त्वरित प्रसव होण्याविषयीं मंत्र—" हिमवत्युत्तरे पार्श्वे सुरथानाम यक्षिणी ॥ तस्याःस्मरणमात्रेण विशल्या गर्भिणी भवेत् ॥ ॐ क्षीं ॐ स्वाहा, " हा मंत्र ह्मणून दूर्वांकुरेंकरून तिळांचें तेल शंभर वेळ किंवा सहस्र वेळ मंत्रून त्यांतून थोडें प्राशन करवावें, व थोडें गर्भस्थानीं लावावें. आणि तें चांगलें लावलें असतां त्वरित सुखेंकरून प्रसव होतो. गाईच्या मस्तकाची करटी आणून सूतिकेच्या घरावर ठेवावी, तेणेंकरून सुखानें प्रसव होतो. वेळू, निंबवृक्ष यांची साल; तुळसीची मुळी; कपित्थ वृक्षाचें पान आणि कण्हेरीचें बीज हीं समभाग घेऊन ह्मशीच्या दुधांत वाटून त्यांत तिळांचें तेल घालून त्याचा लेप योनीला दिला असतां तत्काल प्रसव होतो.

---

अथजातकर्म मूलज्येष्ठाव्यतीपातादावनुत्पन्नस्यजातमात्रस्यपुत्रस्यपितामुखंकुलदेवतावृद्धप्रणामपूर्वकमवलोक्यनद्यादावुदङ्मुखःस्नायात् तदसंभवेगृहेआनीताभिःशीताभिःस्वर्णयुताभिरद्भिःस्नायात् एतच्चरात्रावपिनद्यादौकार्यं अशक्तोरात्रावग्निसन्निधौस्वर्णयुतशीतोदकैः मूलादिषुजननेतुमुखमदृष्ट्वैवस्नानं देशांतरगतेजनकेपुत्रजन्मश्रवणोत्तरंस्नानं सर्वत्रस्नानात्प्रागस्पृश्यत्वं एवंकन्योत्पत्तावपिस्नानंतत्प्राक्अस्पृश्यत्वंचज्ञेयं अन्यसपिंडाशौचमध्येजननेपि पितुस्तात्कालिकीस्नानदानादौजातकर्मणिचशुद्धिः केचिन्मृताशौचेपुत्रजननेजातकर्माशौचांतेकार्यमित्याहुः नालच्छेदनात्पूर्वंसंपूर्णसंध्यावंदनादिकर्मणिनाशौचं प्रथमदिनेपंचमषष्ठदशमदिनेचदानप्रतिग्रहयोर्नदोषः शृतमन्नंनग्राह्यंज्योतिष्टोमादिदीक्षावतास्वयमन्येनवाजातकर्म नकार्यं किंतुअवभृथस्नानांतेदीक्षांविसृज्यस्वयंकार्यं श्रेष्ठःकनिष्ठेनपुंसवनादिकंनकारयेत् जातकर्मतुकारयेत् अतिक्रांतंतुस्वयमेवकुर्यात् महारोगार्तोजातकर्मस्वयंनकुर्यात् अच्छिन्ननाभिकर्तव्यंश्राद्धंवैपुत्रजन्मनि पुत्रपदेनकन्यापिगृह्यते तथाचसंस्कारांगभिन्नंकन्यापुत्रयोर्जा

न्मनिमित्तकंनांदीश्राद्धंविधीयते एतद्रात्रावपिकार्यं तच्चहेम्नैवकार्यंनत्वन्नादिना तथाचक्ता तोलंकृतः पिताअकृतनालच्छेदमपीतस्तन्यमन्यैरस्पृष्टंप्रक्षालितंकुमारंमातुरुत्संगेकारयित्वा चमनादिदेशकालादिकीर्तनांते अस्यकुमारस्यगर्भांबुपानजनितदोषनिबर्हणायुर्मेधाभिवृद्धिबी जगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंजातकर्मकरिष्ये तदादौस्वस्तिपुण्याहवाच नंमातृकापूजनंचकरिष्ये हिरण्येनपुत्रजन्मनिमित्तकंजातकर्मांगंचनांदीश्राद्धंतंत्रेणकरिष्ये इतिसंकल्प्ययथागृह्यंकुर्यात् ततोदद्यात्सुवर्णंचभूमिंगांतुरगंरथं छत्रंछागंचमाल्यंचशयनंचा सनंगृहं तिलपूर्णानिपात्राणिसहिरण्यानिचैवहि भक्षयित्वातुपक्वान्नंद्विजश्चांद्रायणंचरेत् सूत केतुसकुल्यानांनदोषोमनुरब्रवीत् ॥

## आतां जातकर्म ( पुत्रावण ) संस्कार सांगतों.

मूल, ज्येष्ठा, व्यतीपात इत्यादि अशुभकालीं उत्पन्न न झालेला असा पुत्र उत्पन्न होतांच पित्यानें कुलदेवता, वडील यांना पूर्वी नमस्कार करून पुत्राचें मुख पाहून नदी इत्यादिक ठिकाणीं उत्तर दिशेला संमुख होत्साता स्नान करावें. नदी इत्यादिक नसेल तर घरीं आणलेलें जें शीतोदक त्यांत सुवर्ण घालून त्या उदकानें स्नान करावें. हें स्नान रात्रीचे ठिकाणींहि नदी इत्यादिक स्थलीं करावें. अशक्त असेल तर रात्रीं अग्नीच्या जवळ सुवर्णयुक्त शीतोदकानें स्नान करावें. मूळ इत्यादिक नक्षत्रांचे ठिकाणीं जन्म झालें असेल तर पुत्राचें मुख पाहिल्यावांचूनच स्नान करावें. पिता देशांतरीं गेला असल्यास ‘पुत्र झाला’ असें समजल्यानंतर स्नान करावें. स्नानाच्या पूर्वी कोणालाहि स्पर्श करूं नये, असें सर्वत्र जाणावें. याप्रमाणें कन्या झाली तथापि स्नान करावें व स्नानाच्या पूर्वी स्पर्श करूं नये. दुसरें जें सपिंडांचें आशौच तें असून त्यामध्यें पुत्राचें जन्म झालें असतांहि स्नान, दान इत्यादिक व पुत्रावण हीं कृत्यें करण्याविषयीं पित्याला त्या कालीं शुद्धि आहे. कोणी ग्रंथकार, मृताशौचामध्यें पुत्राचें जन्म झालें असतां जातकर्म करणें तें, मृताशौच गेल्यानंतर करावें, असें ह्मणतात. नालच्छेदनाच्या पूर्वी सर्व संध्या इत्यादिक कर्म करण्याविषयीं आशौच नाहीं. पहिला, पांचवा, सहावा आणि दहावा ह्या दिवसीं दान देणें व घेणें यांविषयीं दोष नाहीं. शिजलेलें अन्न घेऊं नये. ज्योतिष्टोम इत्यादिकांची दीक्षा ज्याला आहे त्यानें स्वतां किंवा दुसऱ्याकडून जातकर्म करूं नये; तर अवभृथस्नान[1] झाल्यानंतर यज्ञदीक्षेचें विसर्जन करून स्वतां जातकर्म करावें. ज्येष्ठानें कनिष्ठाकडून पुंसवन इत्यादिक करवूं नये. जातकर्म तर ( कनिष्ठाकडून ) करवावें. अतिक्रांत ( पूर्वी करावयाचें राहिलेलें) असेल तर, पित्यानेंच करावें. पिता महारोगानें पीडित असेल तर त्यानें स्वतां जातकर्म करूं नये. “पुत्रजन्म झालें असतां नालच्छेदन करण्याच्या पूर्वी नांदीश्राद्ध करावें,” ह्या वाक्यांत पुत्र असा शब्द आहे तथापि कन्येचेंहि ग्रहण करावें. तसेंच संस्कारसंबंधी नांदीश्राद्धाहून निराळें असें कन्यापुत्रांच्या जन्मसंबंधी नांदीश्राद्ध करावें असा विधि प्राप्त होतो. हें जन्मसंबंधी नांदीश्राद्ध रात्रीचे ठिकाणींहि करावें, व तें द्रव्यद्वारा करावें, अन्नादिकेंकरून करूं

---

१ यज्ञ समाप्त झाल्यानंतर जें स्नान करणें त्याला अवभृथस्नान असें ह्मणतात.

नये. तसेंच पित्यानें स्नान करून अलंकारयुक्त होत्साता नालच्छेदन न केलेला, स्तनपान न केलेला व इतरांनीं स्पर्श न केलेला आणि उदकानें धुतलेला असा पुत्र मातेच्या मांडीवर देवून आचमन करून देशकालांचा उच्चार केल्यानंतर संकल्प करावा. तो असा;— " अस्य कुमारस्य गर्भांबुपानजनितदोषनिबर्हणायुर्मेधाभिवृद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हण द्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं जातकर्म करिष्ये ॥ तदादौस्वस्तिपुण्याहवाचनं मातृकापूजनं च करिष्ये ॥ हिरण्येन पुत्रजन्मनिमित्तकं जातकर्मांगं च नांदीश्राद्धं तंत्रेण करिष्ये, " असा संकल्प करून जसें गृह्यसूत्र असेल तदनुसार प्रयोग करावा. " तदनंतर सुवर्ण, भूमि, गाई, घोडा, रथ, छत्र, मेंढा, पुष्पमाला, मंचक, आसन, गृह, सुवर्णसहित तिळपूर्णपात्रें हीं दानें करावीं. आशौची जो त्याच्या गृहांतील शिजलेलें अन्न द्विजानें भक्षण केलें असतां चांद्रायणप्रायश्चित्त करावें. सुतकामध्यें सकुल्यांनीं ( सगोत्रसपिंडांनीं ) अन्न भक्षण केलें तर दोष नाहीं असें मनु सांगतो."

---

अथारिक्तपाणिज्योंतिर्विदंसंपूज्यतस्माज्जन्मलग्नगतशुभाशुभग्रहनिर्णयंज्ञात्वाप्रतिकूलग्रहानुकूल्यार्थंतत्तद्ग्रहप्रीत्यर्थंदानानिकुर्यात् ग्रहमंत्रजपादिशांतिसूक्तजपादिकर्मणिविप्रान्वानियोजयेत् ततोनालच्छेदंकारयित्वाहिरण्योदकेनमातुर्दक्षिणस्तनंप्रक्षाल्यमात्राकुमारंपाययेत् तत्रइमांकुमारइत्यादिमंत्रंविप्रादिःपठेत् जातकर्माद्यन्नप्राशनांतसंस्कारेषुआश्वलायनानांहोमःकृताकृतः होमपक्षेनांदीश्राद्धांतेजातकर्मांगहोमंकरिष्येइतिसंकल्प्यलौकिकाग्निंप्रतिष्ठाप्यान्वाधानाद्याज्यभागांते अग्निमिंद्रंप्रजापतिंविश्वान्देवान्ब्रह्माणमाज्येनजुहुयात् मधुसर्पिःप्राशनादिमूर्धाघ्राणांतेस्विष्टकृदादिकुर्यादितिक्रमः अन्येषांयथागृह्यंहोमादिज्ञेयं ॥

यानंतर श्रीफल इत्यादिक हातांत घेऊन ज्योतिषी याची पूजा करून त्यापासून जन्मलग्नीं इष्टानिष्ट ग्रह कसे आहेत याचा निर्णय समजून घेऊन प्रतिकूल ग्रह असतील ते अनुकूल होण्याकरितां त्या त्या ग्रहांच्या संतोषार्थ दानें करावीं. अथवा ग्रहांच्या मंत्रांचा जप इत्यादिक व शांतिसूक्तांचा जप इत्यादिक कर्माचे ठिकाणीं ब्राह्मण योजावा. त्यानंतर नालच्छेदन करवून सुवर्णयुक्त उदकानें मातेचा उजवा स्तन प्रक्षालन करवून मातेकडून पुत्राला स्तनपान करवावें. त्या स्तनपानाविषयीं " इमां कुमार० " इत्यादिक मंत्र, ब्राह्मण इत्यादिकानें पठण करावा. जातकर्मापासून अन्नप्राशनापर्यंत जे संस्कार त्यांचे ठिकाणीं आश्वलायन शाखी जे त्यांनीं होम करावा किंवा न करावा. होम करणें यापक्षीं, नांदीश्राद्ध झाल्यानंतर " जातकर्मांगहोमं करिष्ये, " असा संकल्प करून लौकिकाग्नि स्थापन करून अन्वाधानापासून आज्यभागापर्यंत कर्म झाल्यानंतर अग्नि, इंद्र, प्रजापति, विश्वेदेव आणि ब्रह्मा ह्या देवतांच्या उद्देशेंकरून घृताचा होम करावा. नंतर मध, तूप यांचें प्राशन इत्यादिकापासून टाळू हुंगणें एथपर्यंत कर्म झाल्यानंतर स्विष्टकृत इत्यादिक कर्म करावें, याप्रमाणें क्रम जाणावा. आश्वलायनभिन्नशाखी यांनीं आपापल्या गृह्यसूत्राप्रमाणें होम इत्यादिक प्रयोग जाणावा.

---

कुमार्याअपिजातकर्मादिसंस्काराश्चौलांताःसर्वेअमंत्रकंकार्याःविवाहस्तुसमंत्रकः अतः कन्यायाजातकर्मादिसंस्कारलोपेतत्कालेविवाहकालेवाप्रायश्चित्तंकृत्वाविवाहःकार्यः अत्र

सर्वत्रजातकर्मनामकर्मादौमुख्यकालातिक्रमे गुर्वाद्यस्तरहितेशुभनक्षत्रादौजातकर्मादिकंकार्यं तत्रजातकर्मणिनक्षत्राणिरोहिणीत्र्युत्तराश्विनीहस्तपुष्यानुराधारेवतीमृगचित्राश्रवणादित्रयस्वातीपुनर्वसवः रिक्तापर्वरहितास्तिथयः भौमशनिभिन्नावाराः भद्रावैधृत्यादिशून्येसुकेंद्रलग्नेशुभं ॥

कन्येचेहि जातकर्मापासून चौलापर्यंत सर्व संस्कार मंत्ररहित करावे. विवाहसंस्कार मात्र समंत्रक करावा, याकरितां कन्येचे जातकर्म इत्यादिक संस्कार लुप्त झाले असतां ह्मणजे ते न केले असतां ज्या कालीं जो संस्कार करावयाचा त्या कालीं, किंवा विवाहाच्या समयीं त्या संस्कारांच्या लोपांचें प्रायश्चित्त करून विवाह करावा. एथें व सर्व ठिकाणीं जातकर्म व नामकर्म इत्यादिक संस्कारांच्या मुख्य कालाचें उल्लंघन झालें असतां, गुरु इत्यादिकांच्या अस्ताविरहित व शुभनक्षत्र, इत्यादिक ज्या दिवसीं असेल त्या दिवसीं जातकर्मादिक करावें. त्या जातकर्मविषयीं नक्षत्रें—रोहिणी, तीन उत्तरा, अश्विनी, हस्त, पुष्य, अनुराधा, रेवती, मृग, चित्रा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, स्वाती आणि पुनर्वसु; रिक्ता ( चतुर्थी, नवमी, चतुर्दशी ) व पर्व ( पौर्णिमा, अमावास्या ) ह्या तिथि वर्ज्य करून अन्य तिथि घ्याव्या. मंगळ, शनि वर्ज्य करून वार घ्यावे. कल्याणी, वैधृति इत्यादिकांनीं विरहित अशा शुभदिवसीं व सुकेंद्र लग्न असतां जातकर्म शुभ होय.

अथपंचमषष्ठदिनयोर्जन्मदानांपूजनं रात्रेःप्रथमयामेपित्रादिःस्नात्वाचम्यदेशकालौसंकीर्त्यअस्यशिशोःसमातृकस्यायुरारोग्यप्राप्तिसकलानिष्टशांतिद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंविघ्नेशस्य जन्मदानांजीवंत्यपरनाम्न्याःषष्ठीदेव्याः शस्त्रगर्भाभगवत्याश्चपूजनंकरिष्ये इतिसंकल्प्यतंडुलपुंजेषुविघ्नेशंजन्मदाश्चनाममंत्रेणावाह्य आयाहिवरदादेविमहाषष्ठीतिविश्रुते शक्तिभिः सहबालंमेरक्षजागरवासरे इतिषष्ठीदेवीमावाह्यनाम्नाभगवतीमावाह्यनामभिः शक्तिस्त्वंसर्वदेवानांलोकानांहितकारिणी मातर्बालमिमंरक्षमहाषष्ठिनमोस्तुते इतिमंत्रेणचषोडशोपचारैः संपूज्यप्रार्थयेत् लंबोदरमहाभागसर्वोपद्रवनाशन त्वत्प्रसादादविघ्नेशचिरंजीवतुबालकः जननीसर्वभूतानांबालानांचविशेषतः नारायणीस्वरूपेणबालंमेरक्षसर्वदा प्रेतभूतपिशाचेभ्यो शाकिनीडाकिनीषुच मातेवरक्षबालंमेश्वापदेपन्नगेषुच गौरीपुत्रोयथास्कंदःशिशुलेरक्षितः पुरा तथाममाप्ययंबालःषष्ठिकेरक्ष्यतांनमः इतिविप्रेभ्यस्तांबूलदक्षिणादिदद्यात् रात्रौजागरणंकुर्यात्पंचमषष्ठदिनयोर्दानप्रतिग्रहेनदोषः दशमदिनेबलिदानंस्वीयेभ्योन्नदानंचकार्यं ॥

आतां यानंतर पांचवा व सहावा या दिवसीं जन्मदानामक देवतांचें पूजन करावें. तें असें;—रात्रीच्या पहिल्या प्रहरीं पिता इत्यादिकानें स्नान करून आचमन करून देशकालांचा उच्चार करून संकल्प करावा. तो असा;— "अस्य शिशोः समातृकस्यायुरारोग्यप्राप्तिसकलानिष्टशांतिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं विघ्नेशस्य जन्मदानां जीवंत्यपरनाम्न्याः षष्ठीदेव्याः शस्त्रगर्भाभगवत्याश्च पूजनं करिष्ये," असा संकल्प करून तंडुलराशींचे ठिकाणीं विघ्नेश व जन्मदा ह्या देवतांचें नाममंत्रानें आवाहन करून, "आयाहि वरदा देवि महाषष्ठीति विश्रुते ॥ शक्तिभिःसह बालं मे रक्ष जागर वासरे," ह्या मंत्रानें षष्ठीदे-

वीचें आवाहन करून नाममंत्रानें भगवती देवीचें आवाहन करून नाममंत्रांनीं व पुढें सांगतों या मंत्रानें पूजा करावी. पूजेचा मंत्र--"शक्तिस्त्वं सर्वदेवानां लोकानां हितकारिणी ॥ मातर्बालमिमं रक्ष महाषष्ठि नमोस्तु ते" या मंत्रेंकरून सोळा उपचारांनीं पूजा करून प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र-- "लंबोदर महाभाग सर्वोपद्रवनाशन ॥ त्वत्प्रसादाद्विघ्नेश चिरं जीवतु बालकः ॥ जननी सर्वभूतानां बालानां च विशेषतः ॥ नारायणीस्वरूपेण बालं मे रक्ष सर्वदा ॥ प्रेतभूतपिशाचेभ्यो शाकिनीडाकिनीषु च ॥ मातेव रक्ष बालं मे श्वापदे पन्नगेषु च ॥ गौरीपुत्रो यथा स्कंदः शिशुत्वे रक्षितः पुरा ॥ तथा ममाप्ययं बालः षष्ठिके रक्ष्यतां नमः," याप्रमाणें प्रार्थना करून ब्राह्मणांला तांबूल दक्षिणा इत्यादिक द्याव्या, व रात्रीं जागरण करावें. पांचवा व सहावा ह्या दिवसीं दान देणें व घेणें ह्याविषयीं दोष नाहीं. दहाव्या दिवसीं बलिदान व आप्तवर्गाला अन्नदान करावें.

---

अथाशौचेकर्तव्यनिर्णयः सूतकेमृतकेकुर्यात्प्राणायाममंत्रकं तथामार्जनमंत्रांश्चमनसोच्चार्यमार्जयेत् गायत्रींसम्यगुच्चार्यसूर्यायार्घ्यंनिवेदयेत् उपस्थानंनैवकार्यंमार्जनंतुकृताकृतं सूर्यंध्यायन्नमस्कुर्यात्गायत्रीजपोनकार्यः अर्घ्यांतामानसीसंध्येत्युक्तेः केचिन्मनसादशगायत्रीजपःकार्यइत्याहुः वैश्वदेवब्रह्मयज्ञादयःपंचमहायज्ञानकार्याः वेदाभ्यासोनकार्यः औपासनहोमपिंडपितृयज्ञावसगोत्रेणकारयेत् केचिच्छ्रौतकर्मणिसद्यःशुद्ध्युक्तेरग्निहोत्रहोमःस्वयंकार्यइत्याहुः अपरेतुसर्वस्याप्याशौचापवादस्यानन्यगतिकत्वात्सतिब्राह्मणेब्राह्मणद्वारैवकार्यःब्राह्मणाभावेस्वयंकार्यइत्याहुः स्थालीपाकोनकार्यः आशौचांतेकार्यः सर्वथालोपप्रसक्तौस्थालीपाकोपिब्राह्मणद्वाराकार्यः अन्वाधानोत्तरंसूतकप्राप्तौब्राह्मणद्वाराश्रौतेष्टिस्थालीपाकौ होमादौत्यागःस्नात्वास्वयंकार्यः दर्शादिश्राद्धस्यलोपएवप्रतिसांवत्सरिकंश्राद्धंआशौचांतेएकादशाहेकार्यं तत्रासंभवेदर्शव्यतीपातादिपर्वणि एवंपत्न्यामृतुमत्यामपिपिंडयज्ञदर्शश्राद्धेकार्ये अन्वाधानोत्तरंरजोदोषेइष्टिस्थालीपाकौकार्यौअन्यथाकालांतरे दानप्रतिग्रहाध्ययनानिवर्ज्यानि आशौचेन्यस्यान्नंनाश्नीयात् पितृयज्ञस्थालीपाकश्रवणाकर्मादिसंस्थानांप्रथमारंभोब्राह्मणद्वाराप्याशौचयोर्नभवति प्रथमारंभोत्तरंश्रवणाकर्मादिकंविप्रद्वाराशौचेपिपत्न्यार्तवेपिकार्यं आग्रयणंतुनभवति अग्निसमारोपप्रत्यवरोहौआशौचेनभवतः तेनसमारोपोत्तरमाशौचेतैत्तिरीयाणांत्रिदिनंहोमलोपेबह्वृचादीनांद्वादशदिनंहोमलोपेग्निनाशादाशौचांतेश्रौतस्मार्तयोः पुनराधानमेव समारोपप्रत्यवरोहयोरन्यकर्तृकत्वाभावात् अभ्यनुगमेप्रायश्चित्तपूर्वकपुनरुत्पत्तिरन्यद्वाराभवति भोजनकालेआशौचप्राप्तौमुखस्थंग्रासंत्यक्त्वास्नायात् तद्ग्रासभक्षणेएकोपवासः सर्वान्नभक्षणेत्रिरात्रोपवासः सूतकेमृतकेचैवनदोषोराहुदर्शनइत्युक्तेर्ग्रहणेस्नात्वाश्राद्धदानजपादिकमाशौचेपिकार्यं एवंसंक्रांतिस्नानदानादिकमपि संकटेनांदीश्राद्धोत्तरंमौंजीविवाहयोर्नाशौचं संकटेमधुपर्कोत्तरमृत्विजांनाशौचं यजमानस्यदीक्षणीयोत्तरंप्रागवभृथान्नाशौचं अवभृथमाशौचोत्तरंकार्यं व्रतेषुनाशौचमित्युक्तेरनंतव्रतादिकमन्यैःकारयेत् प्रारब्धान्नसत्रस्यान्नदानादिषुनाशौचं पूर्वसंकल्पितान्नेपुनदोषःपरिकीर्तितः उदकदुग्धदधिघृतलवणफलमूलभ

**र्जिताद्यन्नानांसूतकिगृहस्थितानांस्वयंग्रहणेदोषाभावः सूतकिहस्तात्तुनग्राह्यं केचित्तंडुलादि कमपक्कमन्नंग्राह्यमाहुः इतिसंक्षेपेणनिर्णयोविशेषस्तुवक्ष्यते ॥**

आतां आशौचांत कोणतीं कर्मे करावीं व कोणतीं न करावीं तीं सांगतों— " मृताशौचामध्यें प्राणायाम अमंत्रक करावा. तसेच मार्जनाचे मंत्र मनांत ह्मणून मार्जन करावें. गायत्रीमंत्राचा स्पष्ट उच्चार करून सूर्याला अर्घ्य द्यावें. उपस्थान (प्रार्थना) सर्वथा करूं नये. मार्जन तें तर करावें किंवा न करावें." सूर्याचें ध्यान करून नमस्कार करावा. गायत्रीमंत्राचा जप करूं नये. कारण, " अर्घ्यापर्यंत मनांत उच्चार करून संध्या करावी " असें वचन आहे. कोणी ग्रंथकार, मनांत उच्चार करून दहा वेळ गायत्रीजप करावा असें ह्मणतात. वैश्वदेव, ब्रह्मयज्ञ इत्यादिक पंचमहायज्ञ करूं नयेत, व वेदाचा पाठ करूं नये. औपासनहोम व पिंडपितृयज्ञ हे भिन्नगोत्री असेल त्याकडून करवावे. कोणी ग्रंथकार, श्रौतकर्माचे ठिकाणीं तेवढ्या कर्मापुरती शुद्धि आहे असें वचन आहे याकरितां अग्निहोत्राचा होम स्वतां करावा असें ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, सर्व जो आशौचाचा अपवाद त्याला दुसरी गति नाहीं याकरितां ब्राह्मण असेल तर ब्राह्मणाकडूनच होम करवावा, ब्राह्मण नसल्यास स्वतां करावा, असें ह्मणतात. स्थालीपाक आशौचांत करूं नये, आशौचाची निवृत्ति झाल्यानंतर करावा. सर्वथाच स्थालीपाकाचा लोपप्रसंग येईल तर स्थालीपाकहि ब्राह्मणाकडून करवावा. अन्वाधान झाल्यानंतर आशौच प्राप्त झालें असतां ब्राह्मणाकडून श्रौतेष्टि व स्थालीपाक करवावे. होम इत्यादिकांचे ठिकाणीं त्याग करणें तो स्नान करून आपण करावा. दर्श इत्यादिक श्राद्धाचा लोपच करावा. प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करणें असेल तर तें आशौच गेल्यानंतर अकराव्या दिवसीं करावें. अकराव्या दिवसीं श्राद्ध करण्याचा असंभव असेल (व्हावयाजोगें नाहीं) तर अमावास्या, व्यतीपात इत्यादिक पर्वदिवसीं करावें. याप्रमाणें स्त्री रजस्वला झाली असतांहि पिंडपितृयज्ञ व दर्शश्राद्ध हीं (पांचव्या दिवसीं) करावीं. अन्वाधान झाल्यानंतर स्त्री रजस्वला झाली असतांहि इष्टि व स्थालीपाक करावे. अन्वाधानाच्या पूर्वी रजस्वला झाल्यास अन्यकालीं करावे. दान घेणें व देणें, अध्ययन हीं वर्ज्य करावीं. आशौचामध्यें दुसऱ्याचें अन्न भक्षण करूं नये. पिंडपितृयज्ञ, स्थालीपाक व श्रवणाकर्म इत्यादिक संस्था यांचा पहिल्यानें आरंभ करणें असल्यास तो, जननाशौच व मृताशौच यांचे ठिकाणीं ब्राह्मणाकडूनहि होत नाहीं. पहिल्या आरंभाच्या नंतर श्रवणाकर्म इत्यादिक करणें असेल तर आशौच किंवा स्त्री रजस्वला असली तथापि ब्राह्मणाकडून करवावें, आग्रयण मात्र करूं नये. अग्नीचा समारोप (समिध शेकून त्याजवर अग्नि घेणें), प्रत्यवरोहण (शेकून ठेवलेली समिध पुढें अग्नींत हवन करणें) हीं आशौचांत होत नाहींत. यावरून असें होतें कीं, अग्नीचा समारोप केल्यानंतर आशौच प्राप्त होईल तर, तैत्तिरीयशाखी यांचा तीन दिवस होमलोप झाला असतां अग्नीचा नाश होतो व ऋक्शाखी यांचा बारा दिवस होमलोप झाला असतां अग्निनाश होतो याकरितां आशौच गेल्यानंतर (तैत्तिरीयशाखी व ऋक्शाखी यांनीं) श्रौताग्नि व स्मार्ताग्नि यांचें निश्चयें पुनः आधान (स्थापन) करावें. कारण अग्निसमारोप व प्रत्यवरोहण हीं कर्मे दुसऱ्याकडून करविण्यास आधार नाहीं यास्तव

करवूं नयेत. अग्नि विच्छिन्न झाला असतां अग्निनाश झाल्याचें प्रायश्चित्त करून दुसऱ्याकडून अग्नि उत्पन्न करवावा. भोजनकाळीं आशौच प्राप्त झालें असतां मुखांतील ग्रास टाकून स्नान करावें. मुखांतील ग्रास भक्षण केला असतां एक उपोषण करावें. सर्व ( पात्रावर घेतलेलें ) अन्न भक्षण केलें असतां तीन रात्रि उपोषण करावें. "जननाशौच व मृताशौच यांत ग्रहण प्राप्त झालें असतां दोष नाहीं," असें वचन आहे यास्तव ग्रहण प्राप्त झालें असतां स्नान करून आशौचामध्येंहि श्राद्ध, दान, जप, इत्यादिक करावें. याप्रमाणें संक्रांतिनिमित्तकहि स्नान, दान इत्यादिक करावें. संकटविषय असेल तर नांदीश्राद्ध झाल्यानंतर मौंजी, विवाह यांविषयीं आशौच नाहीं. संकट असतां मधुपर्क पूजेनंतर ऋत्विजांला आशौच नाहीं. यजमानाला यज्ञदीक्षा घेतल्यानंतर अवभृथस्नानाच्या पूर्वीं आशौच नाहीं. अवभृथस्नान आशौच गेल्यानंतर करावें. "व्रतांविषयीं आशौच नाहीं," असें वचन आहे याकरितां अनंतव्रत इत्यादिक दुसऱ्याकडून करवावें. पूर्वीं घातलेलें जें अन्नसत्र त्याचीं जीं अन्नदानें इत्यादिक त्यांविषयीं आशौच नाहीं. "पूर्वीं ज्यांचा संकल्प झालेला अशा अन्नांविषयीं दोष नाहीं." उदक, दूध, दहीं, तूप, मीठ, फळें, मुळें, भाजलेले पोहे इत्यादिक अन्नें हे पदार्थ सुतक्याचे घरांतले आपण घेतले असतां दोष नाहीं. सुतकी जो त्याचे हातून घेऊं नयेत. कोणी ग्रंथकार, तांदूळ इत्यादिक हिरवें अन्न घ्यावें असें ह्मणतात. याप्रमाणें संक्षेपानें निर्णय सांगितला. विशेष निर्णय सांगणें तो पुढें सांगेन.

---

अथसूतिकाशुद्धिःदशाहांतेसूतिकायाअस्पृश्यत्वनिवृत्तिर्नामकर्मजातकर्मादिप्राप्तकर्माधिकारश्चजातेष्टिविवाहोपनयनादिकर्मसुतुपुत्रप्रसूनांविंशतिरात्रांतेधिकारः कन्याप्रसूनांमासांतेऽधिकारः ॥

## आतां बाळंतिणीची शुद्धि सांगतों.

प्रसूति होऊन दाहा दिवस झाल्यानंतर सूतिकेचा विटाळ जातो व नामकर्म, जातकर्म इत्यादिक प्राप्त झालेलीं कर्में करण्याचा अधिकार येतो. जातेष्टि, विवाह, मौंजी इत्यादिक कर्मांविषयीं तर, पुत्र झाला आहे ज्यांना त्यांस वीस रात्रि झाल्यानंतर अधिकार होतो, आणि कन्या झाली आहे ज्यांना त्यांस एक महिन्यानंतर अधिकार होतो.

---

अथजन्मनिदुष्टकालस्तच्छांतयश्चनिर्णीयंते तत्रादौगोप्रसवः यत्रजन्मकालेपितुर्मातुः सुतस्यचारिष्टमुक्तंतत्रगोप्रसवशांतिस्तत्तन्नक्षत्रादिशांतिश्चकार्या धनाद्यरिष्टेषुनकार्या मूलाश्लेषाज्येष्ठामघानक्षत्रेषुजननेचतुर्थपादादिषुपित्राद्यरिष्टाभावेपिगोप्रसवः अश्विनीरेवतीपुष्यचित्रासुनक्षत्रशांत्यभावेपिगोप्रसवशांतिरेवकार्या तत्रअस्यशिशोरमुकदुष्टकालोत्पत्तिसूचितारिष्टनिवृत्त्यर्थंगोमुखप्रसवशांतिंकरिष्येइतिसंकल्प्य गणेशपूजनमात्रंकृत्वाअंगादंगादितिमंत्रेणशिशुमूर्धावघ्राणांतेप्रयोगमध्यएवपुण्याहवाचनमितिकौस्तुभमयूखौ पुण्याहवाचनंशाखोसंकृत्वामूर्धावघ्राणांते अस्यगोमुखप्रसवस्यपुण्याहंभवंतोब्रुवंत्वित्येकवाक्यमेवत्रिर्वदेत् स

त्विजश्चप्रतिब्रूयुर्नतुशाखोक्तमितिकमलाकरः नांदीश्राद्धंनकार्यं अग्निप्रतिष्ठांतेकस्मिंश्चित्पीठे नवग्रहान्अधिदेवतादिरहितान्प्रतिष्ठाप्यान्वाधानंकुर्यात् आज्यभागांतेअपःआपोहिष्ठेति त्र्यृचेनअप्सुमेसोमइतिगायत्र्याऋचाच मिलितदधिमध्वाज्येनप्रत्यृचंअष्टाष्टसंख्याहुतिभिर्वि ष्णुंतद्विष्णोरित्यृचामिलितदधिमध्वाज्येनाष्टाहुतिभिः यक्ष्महणंअक्षीभ्यामितिसूक्तेन प्रत्यृच मष्टाष्टमिलितदधिमध्वाज्याहुतिभिर्नवग्रहान्दधिमध्वाज्येनाष्टाष्टसंख्याहुतिभिःशेषेणेत्यादि मयूखादयः कमलाकरस्तुदधिमध्वाज्येनापश्चतुर्वारंविष्णुंसकृत्यक्ष्महणमक्षीभ्यामितिसूक्ते नप्रत्यृचमष्टाष्टसंख्याहुतिभिर्नवग्रहानेकैकयाहुत्याशेषेणस्विष्टकृतमित्याह आज्यभागहोमां तेएकस्मिन्कुंभेविष्णुवरुणौप्रतिमयोःसंपूज्यौ प्रतिमासु विष्णुवरुणयक्ष्महणःपूज्याइतिमयू खे ततोयथान्वाधानहोमइतिसंक्षेपः अवशिष्टप्रयोगःशांतिग्रंथेषु एवमग्रेपिदेवताद्रव्याहुति संख्यानिमित्तफलमात्रंलिख्यतेविस्तरोन्यत्रज्ञेयः ॥

## आतां जन्मसमयीं जे दुष्ट काल व त्यांच्या शांति ह्यांचा निर्णय सांगतों.

त्यामध्यें प्रथम गोप्रसवशांति सांगतों—ज्या जन्मसमयीं पित्याला, मातेला आणि अपत्याला असें अरिष्ट सांगितलें त्या जन्मसमयीं गोप्रसवशांति व त्या त्या नक्षत्र इत्यादिकांची शांति करावी. द्रव्यनाश इत्यादिक अरिष्टें असतील तर शांति करूं नये. मूळ, आश्लेषा, ज्येष्ठा, मघा ह्या नक्षत्रांवर जन्म झालें असतां चवथा इत्यादिक पादाचे ठिकाणीं पिता इत्यादिकांला अरिष्ट नसलें तथापि गोप्रसवशांति करावी. अश्विनी, रेवती, पुष्य, चित्रा, ह्या नक्षत्रीं जन्म झालें असतां नक्षत्रशांति नाहीं, तथापि गोप्रसवशांतिच करावी. त्या गोप्रसवशांतीचा संकल्प— "अस्य शिशोरमुकदुष्टकालोत्पत्तिसूचितारिष्टनिवृत्त्यर्थं गोमुखप्रसवशांतिं करिष्ये," असा संकल्प करून गणपतिपूजनमात्र करून "अंगादंगा०" ह्या मंत्रानें मुलाची टाळू हुंगल्यानंतर प्रयोगाच्या मध्येंच पुण्याहवाचन करावें असें कौस्तुभ व मयूख ग्रंथांत आहे. आपल्या शाखेला सांगितलेलें पुण्याहवाचन करून टाळू हुंगावी. नंतर यजमानानें, "अस्य गोमुखप्रसवस्य पुण्याहं भवंतो ब्रुवंतु" असें एकच वाक्य तीन वेळ ह्मणावें. ऋत्विजांनींहि प्रतिवचन द्यावें. शाखेला सांगितलेलें पुण्याहवाचन करूं नये, असें शांतिकमलाकर ग्रंथांत आहे. नांदीश्राद्ध करूं नये. अग्निस्थापन करून नंतर कोणत्या एकाद्या पीठावर ( आसनावर ) अधिदेवतादिविरहित अशा नवग्रहांचें स्थापन करून अन्वाधान करावें. नंतर आज्यभागपर्यंत कर्म झाल्यानंतर प्रधानहोम करावा. तो असा—अपदेवतांचा "आपोहिष्ठा०" ह्या तीन ऋचांनीं, "अप्सुमेसोमो०" ह्या ऋचेनें व गायत्रीमंत्रानें दधि, मध व घृत हीं तीन मिश्रित करून दरएक ऋचेचा आठ वेळ याप्रमाणें होम करावा. विष्णुदेवतेचा "तद्विष्णो०" ह्या ऋचेनें दधि, मध, घृत हीं तीन मिश्रित करून त्यांचा आठवेळ होम करावा. यक्ष्महणदेवतेचा "अक्षीभ्यां०" ह्या सूक्ताच्या प्रत्येक ऋचेनें आठ आठ वेळ, मिश्रित दधिमधुघृतांचा होम करावा. नवग्रहांचा मिश्रित दधिमधुघृताच्या आठ

आठ आहुतींनीं होम करावा. शेष द्रव्यानें स्विष्टकृत् होम इत्यादिक करावें असें मयूख इत्यादिक ग्रंथांत सांगितलें आहे. कमलाकर ग्रंथ तर दधिमध्वाज्येंकरून आपदेवतांचा चार वेळ, विष्णुदेवतेचा एकवार, यक्ष्महण देवतेचा "अक्षीभ्यां०" या सूक्ताच्या दरएक ऋचेनें आठ आठ वेळ, आणि नवग्रहांचा एकेक वेळ, शेष द्रव्यानें स्विष्टकृत् होम करावा असें सांगतो. आज्यभागहोमापर्यंत कर्म झाल्यावर एका कलशाचे ठिकाणीं विष्णु व वरुण यांच्या दोन प्रतिमांचें स्थापन करून त्यांची पूजा करावी. तीन प्रतिमा स्थापन करून त्या तीन प्रतिमांचे ठिकाणीं विष्णु, वरुण व यक्ष्महा ह्यांची पूजा करावी, असें मयूखांत सांगितलें आहे. तदनंतर जसें अन्वाधान केलें असेल तदनुसार होम करावा. याप्रमाणें संक्षेप सांगितला. बाकीचा प्रयोग शांतींचे ग्रंथांत पहावा. याप्रमाणें पुढेंहि देवता, द्रव्यें, आहुतींची संख्या आणि निमित्ताचें फल, हीं मात्र सांगेन. बाकी सर्व विस्तार दुसऱ्या ग्रंथांतून जाणावा.

---

अथकृष्णचतुर्दशीजननशांतिः कृष्णपक्षेचतुर्दश्यांप्रसूतेःषड्विधंफलं चतुर्दशींचषड्भागांकुर्यादादौशुभंस्मृतं द्वितीयेपितरंहंतितृतीयेमातरंतथा चतुर्थेमातुलंहंतिपंचमेवंशनाशनं षष्ठेतुधनहानिःस्यादात्मनोवंशनाशनं तत्रचतुर्दश्याःषडंशानांमध्येद्वितीयतृतीयषष्ठांशेषुजननेगोमुखप्रसवपूर्वकंचतुर्दशीशांतिः अन्यभागेकेवलचतुर्दशीशांतिः अस्यशिशोःकृष्णचतुर्दश्याअमुकांशजननसूचितसर्वारिष्टनिरासद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थमित्यादिसंकल्पः आग्नेयादिचतुर्दिक्षुचत्वारः कुंभामध्येशतच्छिद्रकुंभेप्रतिमायांरुद्रावाहनं मयूखेतु पीठादौरुद्रप्रतिमांसंपूज्यतत्प्राच्यामुदीच्यांवाशतच्छिद्रादिपंचकलशस्थापनंपूजनं अन्वाधानेग्रहानष्टाष्टसंख्यसमिदाज्यचरुभिरधिदेवतादीन्एकैकसंख्यसमिच्चर्वाज्याहुतिभिः रुद्रंअश्वत्थप्लक्षपलाशखदिरसमिद्भिश्चर्वाहुतिभिराज्याहुतिभिर्माषैस्तिलैःसर्षपैश्चप्रतिद्रव्यमष्टोत्तरशताष्टाविंशत्यन्यतरसंख्ययात्र्यंबकमितिमंत्रेणअग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचतिलाहुतिभिरमुकसंख्याभिःसकृद्व्यस्तसमस्तव्याहृतिभिःयद्वाप्रजापतिमेवसमस्तव्याहृतिभिस्तिलैःशेषेणेत्यादि ॥

## आतां कृष्णपक्षांतील चतुर्दशीचे ठिकाणीं जन्म झालें असतां त्याचें फळ व शांति सांगतों.

"कृष्णपक्षांतील चतुर्दशीचे ठिकाणीं जन्म झालें असतां त्याचें सहा प्रकारचें फळ आहे. तें असें,—एकंदर चतुर्दशीच्या घटिका मोजून त्यांचे सहा भाग करावे, आणि त्यांवरून फल जाणावें. प्रथमभागीं जन्म झालें असतां शुभ होय. दुसऱ्या भागीं जन्म झाल्यास पित्याला मृत्यु. तिसऱ्या भागीं मातेला मृत्यु. चवथ्या भागीं मातुळाला मृत्यु. पांचव्या भागीं वंशाचा नाश. सहाव्या भागीं द्रव्यहानि व आपल्या वंशाचा नाश, याप्रमाणें फळें जाणावीं. त्या चतुर्दशीच्या सहा अंशांमध्यें दुसरा, तिसरा व सहावा ह्या अंशांचे ठिकाणीं जन्म झालें असतां गोमुखप्रसवांशति करून चतुर्दशीशांति करावी. इतर अंशीं जन्म असतां नुस्ती चतुर्दशीशांति करावी. शांतीचा संकल्प—"अस्य शिशोः कृष्णचतुर्दश्या अमुकांशजननसूचितसर्वारिष्टनिरासद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं," इत्यादिक संकल्प करावा. आग्नेयी इ-

त्यादि चार दिशांचे ठिकाणीं चार कलश स्थापन करावे, व मध्यें शतच्छिद्र ( शंभर छिद्रांनीं युक्त असा ) कलश स्थापन करून त्याचे ठिकाणीं प्रतिमा ठेवून त्या प्रतिमेवर रुद्रदेवतेचें आवाहन करावें. मयूखग्रंथांत तर पीठादिकांचे ठिकाणीं रुद्रप्रतिमेची पूजा करून त्याच्या पूर्व दिशेचे ठिकाणीं किंवा उत्तर दिशेच्या ठिकाणीं शतच्छिद्रादिक पांच कलशांचें स्थापन करून पूजा करावी असें आहे. अन्वाधान करावें कसें तें सांगतों—" ग्रहानष्टाष्टसंख्यसमिदाज्यचरुभिरधिदेवतादीन्एकैकसंख्यसमिद्वर्वाज्याहुतिभिः रुद्रंअश्वत्थप्लक्षपलाशखदिरसमिद्भिश्चर्वाहुतिभिराज्याहुतिभिर्माषैस्तिलैःसर्षपैश्चप्रतिद्रव्यमष्टोत्तरशताष्टाविंशत्यन्यतरसंख्ययात्र्यंबकमिति मंत्रेण अग्निं वायुं सूर्यं प्रजापतिं च तिलाहुतिभिरमुकसंख्याभिः सकृद्वा व्यस्तसमस्तव्याहृतिभिः यद्वा प्रजापतिमेवसमस्तव्याहृतिभिस्तिलैः शेषेण स्विष्टकृतमित्यादि."

---

अथसिनीवालीकुहूदर्शजननशांतयः तत्रामावास्यायाःप्रथमोयामःसिनीवाली अंत्योपांत्ययामौकुहूः मध्यवर्तिपंचयामादर्शइतिकेचित् अपरेतुचतुर्दशीमात्रयुतेऽहोरात्रेवर्तमानाअमावास्यासिनीवाली प्रतिपन्मात्रयुतेऽहोरात्रेवर्तमानाकुहूः तेनामायावारत्रयस्पर्शित्वलक्षणदिनवृद्ध्यभावेसूर्योदयस्पर्शलाभावलक्षणक्षयाभावेचदर्शोनास्त्येव उदयात्पूर्वाहोरात्रेवर्तमानायाःसिनीवालीत्वात् उदयोत्तरंवर्तमानायाःकुहूत्वात् दिनक्षयेसर्वाप्यमादर्शसंज्ञा नतत्र सिनीवालीकुहूभागौ केवलचतुर्दशीकेवलप्रतिपद्युक्तत्वाभावात् एवंदिनवृद्धौत्रिदिनस्पर्शेमध्यदिनस्थाषष्टिनाडीमितामावास्यादर्शसंज्ञा चतुर्दश्यादियोगाभावात् पूर्वोत्तरदिनस्थौभागौ सिनीवालीकुहूसंज्ञावित्याहुःइदंमयूखेस्पष्टं सिनीवाल्यांप्रसूतास्याद्यस्यभार्यापशुस्तथा गजाश्वमहिषीचैवशक्रस्यापिश्रियंहरेत् गोपक्षिमृगदासीनांप्रसूतिरपिवित्तहृत् कुहूप्रसूतिरत्यर्थंसर्वदोषकरीस्मृता यस्यप्रसूतिरेतेषांतस्यायुर्धननाशनं शांत्यभावेईतित्यागमत्रजातोनसंशयः अत्यागेनाशयेत्किंचित्स्वयंवानाशमाप्नुयात्सिनीवालीजननसूचितारिष्टनाशेत्यादिःकुहूजननसूचितारिष्टनाशेत्यादिश्चसंकल्पः कुहूजननेगोप्रसवोपीतिकेचित् अत्रोभयत्रापिचतुर्दशीशांतिवच्छतच्छिद्रकलशसहिताः पंचकलशाः मध्येरुद्रःप्रधानदेवताइंद्रःपितरश्चपार्श्वदेवते इतिप्रतिमात्रयं इंद्रस्यपितॄणांचप्रधानरुद्रन्यूनसंख्ययाप्रधानोक्तसर्वद्रव्यैर्होमः अवशिष्टान्वाधानदेवतोहश्चतुर्दशीशांतिवत् प्रधानदेवतापूजोत्तरंगोवस्त्रस्वर्णदानानिकृत्वा गोभूतिलहिरण्याज्यवासोधान्यंगुडानिच रौप्यंलवणमित्येतद्दशदानानिदापयेत् क्षीराज्यगुडदानंचकृत्वा होमंसमारभेत् एतानिदानानिऋत्विग्भ्योदेयानि तेनांतेपृथक्दक्षिणादानंनकार्यं अतएवात्र गवादेर्दक्षिणारूपत्वात्सदक्षिणंदानंनभवति अन्यत्रदशदानादीनांसदक्षिणंदानंकार्यं ॥

## आतां सिनीवाली, कुहू आणि दर्श या तिथींत जन्म झालें असतां त्याचीं फळें व शांति सांगतों.

अमावास्येचा पहिला जो प्रहर त्याला सिनीवाली असी संज्ञा होय. शेवटचे जे दोन प्रहर त्यांला कुहू असी संज्ञा होय. मध्यवर्ती जे पांच प्रहर त्यांला दर्श असी संज्ञा जाणावी,

असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, चतुर्दशीनें युक्त जें अहोरात्र त्यामध्यें प्राप्त होणारी जी अमावास्या तिचें नांव सिनीवाली. प्रतिपदा तिथीनें युक्त जें अहोरात्र त्यामध्यें प्राप्त होणारी जी अमावास्या तिचें नांव कुहू. यावरून अमावास्येच्या तीन दिवसांला स्पर्श होणारी दिनवृद्धि ती नसेल तर, आणि सूर्योदयाला स्पर्श न करणारा जो दिनक्षय तो नसेल तर दर्श सर्वथा नाहींच. कारण, सूर्योदयाच्या पूर्वीचें जें अहोरात्र त्यामध्यें प्राप्त होणारी जी अमावास्या ती सिनीवाली संज्ञक होते, व उदयानंतर प्राप्त होणारी जी अमावास्या ती कुहूसंज्ञक होते. दिनक्षय असतां जी अमावास्या ती दर्शसंज्ञक होय, व तिचे ठिकाणीं सिनीवाली व कुहू हे भाग नाहींत. कारण त्या दिवसीं केवल चतुर्दशी व केवल प्रतिपदा यांचा योग नाहीं. याप्रमाणें दिनवृद्धि असेल तर तीन दिवसांचा जो स्पर्श त्याच्या मध्यस्थ दिवसाच्या साठ घटिकापरिमित जी अमावास्या ती दर्शसंज्ञक होते. कारण त्यादिवसीं चतुर्दशी व प्रतिपदा यांचा योग नाहीं. दिनवृद्धीच्या पूर्व दिवसांतला भाग व पुढच्या दिवसांतला भाग हे दोन भाग क्रमानें सिनीवाली व कुहूसंज्ञक आहेत असें ह्मणतात. हें मयूख ग्रंथांत स्पष्ट सांगितलें आहे. "स्त्री, पशु ( गाई इत्यादि ), हस्तीण, घोडी, ह्मैस ह्या ज्याच्या, सिनीवालीमध्यें प्रसूत झाल्या तर तो प्रसव इंद्राचेहि लक्ष्मीचा नाशक होतो. गाई, पक्षी, मृग, दासी, ह्या प्रसूत झाल्या असतांहि द्रव्याचा नाश होतो. कुहू तिथींत (ह्या सांगितल्या तिथींत ) जी प्रसूति ती सर्वदोषकारक होते. ज्याच्या पश्वादिकांची प्रसूति होते त्याच्या आयुष्याचा व द्रव्याचा नाश होतो. शांति न केली असतां जन्म झालेल्याचा त्याग करावा, यांत संशय नाहीं. त्याग न केला असतां कांहीं तरी नाश करील, किंवा स्वतां नाश पावेल." त्या शांतीविषयीं संकल्प करावा तो असा;—"**सिनीवालीजननसूचितारिष्टनाशेत्यादिः, कुहूजननसूचितारिष्टनाशेत्यादिः,**" याप्रमाणें संकल्प करावा. कुहूचे ठिकाणीं जन्म झालें असतां गोप्रसवशांतिहि करावी असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. ह्या दोनहि शांतींचे ठिकाणीं चतुर्दशी शांतीप्रमाणें छतच्छिद्र कलशासहित पांच कलश स्थापावे. मध्यम कलशावर रुद्र ही प्रधान देवता, इंद्र व पितर ह्या दोन पार्श्व देवता, याप्रमाणें तीन प्रतिमांचें स्थापन करावें. इंद्र आणि पितर ह्या देवतांचा होम, मुख्य जी रुद्र देवता तिच्या होमाच्या संख्येहून कमी संख्येनें करावा, व तो मुख्य देवतेला सांगितलेल्या सर्व द्रव्येंकरून करावा व बाकीच्या अन्वाधानामध्यें देवतांचा ऊह करणें तो चतुर्दशी शांतीप्रमाणें करावा. मुख्य देवतेची पूजा झाल्यानंतर गाई, वस्त्र, सुवर्ण यांचीं दानें करून गाई, भूमि, तिल, सुवर्ण, घृत, वस्त्र, धान्य, गूळ, रुपें, लवण हीं दहा दानें करावीं. दूध, घृत, गूळ यांचीं दानें देऊन होमाला आरंभ करावा; हीं दानें ऋत्विजांला द्यावीं, व शेवटीं निराळी दक्षिणा देऊं नये. याकरितां या स्थलीं गाई इत्यादिक जीं दानें सांगितलीं तीं दक्षिणेच्या ऐवजीं आहेत यास्तव तीं दक्षिणायुक्त दानें नाहींत. इतर ठिकाणीं दश दानें करणें तीं दक्षिणायुक्त करावीं.

---

**अथैतेषांमानं भुवोमानंगोचर्म सप्तहस्तोदंडः त्रिंशद्दंडावर्तनं दशवर्तनानिगोचर्म तिलानांद्रोणः सुवर्णरजतयोर्दशमाषतदर्धतदर्धान्यतमं आज्यस्यचत्वारिंशत्पलानि वाससश्चि**

**हस्तत्वं धान्यस्यपंचद्रोणाःएवंगुडलवणयोः एतावत्प्रमाणाशक्तौनित्यनैमित्तिकेयथाशक्तिदेयानि यथाशक्तिहिरण्यंवातत्प्रतिनिधित्वेनहिरण्यगर्भेतिमंत्रेणदेयं नैमित्तिकादेरकरणेप्रत्यवायात् अभ्युदयादिफलार्थंतुदशदानानिशक्तिंविनानकार्याणीतिभाति होमांतेबलिदानाभिषेकादि इतिसिनीवालीकुहूशांतिः ॥**

आतां ह्या दशदानांचें प्रमाण सांगतों—भूमीचें प्रमाण गोचर्म. तें असें—सात हात ह्मणजे एक दंड, तीस दंड ह्म० एक वर्तन, दहा वर्तनें ह्मणजे एक गोचर्म ( २१०० हात जिचें क्षेत्रफळ इतकी भूमि ) द्यावी. तिळ एक द्रोणपरिमित ( अदमणी ) द्यावे. सोनें व रुपें ह्यांविषयीं दहा मासे, पांच मासे, अडीच मासे यांतून कोणतेंहि प्रमाण घ्यावें. घृत ४० पलें. वस्त्र तीन हात. धान्य पांच द्रोण. गूळ व मीठ यांचें असेंच प्रमाण जाणावें. इतकीं अशा प्रमाणेंकरून देण्याविषयीं सामर्थ्य नसेल तर नित्य, नैमित्तिक ह्या कर्मांचे ठिकाणीं यथाशक्ति द्यावीं. अथवा जीं जीं दानें द्यावयाचीं त्या त्या स्थानीं जसी शक्ति असेल त्याप्रमाणें सोनें "हिरण्यगर्भ०" ह्या मंत्रेंकरून द्यावें. कारण, नैमित्तिक इत्यादिक न केलें असतां दोष आहे. पुण्य इत्यादिकासाठीं दशदानें करणें तीं शक्ति नसतां करूं नयेत असें वाटतें. होम झाल्यानंतर बलिदान, अभिषेक इत्यादिक करावें. याप्रमाणें सिनीवाली व कुहू यांची शांति समाप्त झाली.

---

**अथदर्शशांतिः अथातोदर्शजातानांमातापित्रोर्दरिद्रता तद्दोषपरिहारार्थंशांतिंवक्ष्यामितेसदा अस्यदर्शजननसूचितारिष्टनिरासार्थंशांतिंकरिष्येइतिसंकल्पः स्थंडिलात्पूर्वदेशेकलशंप्रतिष्ठाप्यकलशाग्न्योर्मध्येसर्वतोभद्रपीठेब्रह्मादिमंडलदेवताआवाह्य तन्मध्येस्वर्णप्रतिमायांयेचेहेतिमंत्रेणपितॄनावाहयेत् तद्दक्षिणेरजतप्रतिमायामाप्यायस्वेतिसोममुत्तरतस्ताम्रप्रतिमायांसवितापश्चातादितिसूर्यंचावाह्यसंपूज्याग्निंप्रतिष्ठाप्य सर्वतोभद्रैशान्यांग्रहस्थापनादि अन्वाधानेआदित्यादिग्रहान्अमुकसंख्याभिःसमिच्चर्वाज्याहुतिभिःपितॄन्अष्टाविंशतिसंख्याकाभिःसमिच्चरुभ्यांसोमंसूर्यंचप्रत्येकमष्टोत्तरशतसंख्यसमिच्चर्वाहुतिभिः शेषेणस्विष्टकृतमित्यादि अत्रस्विष्टकृतः पूर्वंमातापितृशिशूनांकलशोदकेनाभिषेकस्ततःस्विष्टकृद्बलिदानादीतिविशेषः इतिदर्शशांतिः ॥**

## आतां दर्शशांति सांगतों.

"अमावास्येचे दिवसीं ज्यांचें जन्म होतें त्यांच्या आईबापांला दरिद्र प्राप्त होतें. तो दरिद्रदोष दूर होण्याकरितां शांति सांगतों." "**अस्य शिशोः दर्शजननसूचितारिष्टनिरासार्थं शांतिं करिष्ये,**" याप्रमाणें शांतीचा संकल्प करावा. नंतर स्थंडिलाच्या पूर्व दिशेचे ठिकाणीं कलशाची स्थापना करून कलश व अग्नि यांच्या मध्यभागीं सर्वतोभद्रपीठावर ब्रह्मादिक मंडलदेवतांचें आवाहन करून त्या मंडलदेवतांच्या मध्यप्रदेशीं सुवर्णप्रतिमेचे ठिकाणीं "**येचेह०**" ह्या मंत्रानें पितृदेवतांचें आवाहन करावें. त्याच्या दक्षिणप्रदेशीं रौप्याच्या प्रतिमेचे ठिकाणीं "**आप्यायस्व०**" ह्या मंत्रानें सोमाचें आवाहन करून उत्तर भागीं

तांन्याच्या प्रतिमेचे ठिकाणीं, "सवितापश्चा०" ह्या मंत्रानें सूर्याचें आवाहन करून पूजा करून अग्निस्थापना करून सर्वतोभद्राच्या ईशान्य दिशेचे ठिकाणीं नवग्रहस्थापन इत्यादिक करावें. नंतर अन्वाधान करावें. तें असें;—"आदित्यादिग्रहान् अमुकसंख्याभिः समिच्चर्वाज्याहुतिभिः पितॄन् अष्टाविंशतिसंख्याकाभिः समिच्चरुभ्यां सोमं सूर्यं च प्रत्येकमष्टोत्तरशतसंख्यसमिच्चर्वाहुतिभिः शेषेणस्विष्टकृतं इत्यादि." या शांतींत स्विष्टकृत् होमाच्या पूर्वी माता, पिता व शिशु यांच्यावर कलशांतील उदकानें अभिषेक करून, नंतर स्विष्टकृत् होम व बलिदान इत्यादि करावीं, हा विशेष जाणावा. याप्रमाणें दर्शशांति समाप्त झाली.

---

अथनक्षत्रशांतिः तत्रमूलनक्षत्रफलं पिताम्रियेतमूलाद्येपादेपुत्रजनिर्यदि द्वितीयेजननीनाशोधननाशस्तृतीयके चतुर्थेकुलनाशोतःशांतिःकार्याप्रयत्नतः क्वचिच्चतुर्थचरणःशुभउक्तोमनीषिभिः एवंचदुहितुर्ज्ञेयंमूलजातफलंबुधैः केचित्तु नकन्याहंतिमूलर्क्षेपितरंमातरंतथा मूलजाश्वशुरंहंतिश्वश्रूमाश्लेषजासुता ज्येष्ठायांतुपतिज्येष्ठंविशाखोत्थातुदेवरं शांतिर्वापुष्कलास्याच्चेत्तर्हिदोषोनविद्यतइत्याहुः अभुक्तमूलसंभवंपरित्यजेत्तुबालकं समाष्टकंपिताथवानतन्मुखंविलोकयेत् ज्येष्ठांतेघटिकाचैकामूलादौघटिकाद्वयं अभुक्तमूलमथवासंधिनाडीचतुष्टयं वृषालिसिंहेघुघटेचमूलंदिविस्थितंयुग्मतुलांगनांत्ये पातालगंमेषधनुःकुलीरनक्रेषुमर्त्येष्वितिसंस्मरंति एतल्लग्नफलं स्वर्गेमूलेभवेद्राज्यंपातालेचधनागमः मृत्युलोकेयदामूलंतदाशून्यंसमादिशेत् नवमासंसार्पदोषोमूलदोषोष्टवर्षकं ज्येष्ठोमासान्पंचदशतावद्दर्शनवर्जनम् व्यतीपातेंगहानिःस्यात्परिघेमृत्युमादिशेत् वैधृतौपितृहानिःस्यान्नष्टेंदावंधतांव्रजेत् मूलेसमूलनाशःस्यात्कुलनाशोधृतौभवेत् विकृतांगश्चहीनश्चसंध्ययोरुभयोरपि तद्वत्सदंतजातस्तुपादजातस्तथैवच तस्माच्छांतिंप्रकुर्वीतग्रहाणांक्रूरचेतसां व्यतीपातादौग्रहमखसहितातत्तच्छांतिरवश्यंकार्या इतरशांतिषुग्रहमखोनावश्यकइत्यर्थः ॥

## आतां यानंतर नक्षत्रांच्या शांति व मूळनक्षत्राचें फल हीं सांगतों.

"मूळनक्षत्राच्या प्रथमचरणीं पुत्राचें जन्म झालें असतां पित्याला मृत्यु प्राप्त होतो. दुसऱ्या चरणीं जन्म असतां मातेला मृत्यु. तिसऱ्या चरणीं जन्म असतां द्रव्यनाश. चवथ्या चरणी जन्म झालें असतां कुळाचा नाश. याप्रमाणें दुष्ट फलें होतात; यास्तव मोठ्या यत्नानें शांति करावी. क्वचित् मतीं चवथा चरण शुभ असें पंडितांनीं सांगितलें आहे. कन्या मूळनक्षत्रावर जन्मली असतां असेंच फल बुधांनीं जाणावें." कोणाच्या मतीं, "मूळनक्षत्रीं झालेली कन्या आईबापांचा नाश करणारी होत नाहीं; तर मूळावर झालेली कन्या सासऱ्याला मारत्ये, व आश्लेषानक्षत्रीं झालेली कन्या सासवेला मारणारी होते; ज्येष्ठानक्षत्रावर जन्मलेली ज्येष्ठ दिराला मारत्ये; विशाखा नक्षत्रीं उत्पन्न झालेली कनिष्ठ दिराला मारत्ये; याप्रमाणें दुष्ट फलें होतात, याकरितां त्याविषयीं जर मोठी शांति केली तर पूर्वोक्त दोषांचा नाश होतो, असें ह्मणतात. अभुक्त मूळाचे ठिकाणीं उत्पन्न झालेला जो पुत्र त्याचा त्याग पित्यानें आठ वर्षांपर्यंत करावा. अथवा पित्यानें आठ वर्षेंपर्यंत त्याचें मुखावलोकन करूं नये. "ज्येष्ठानक्षत्राची शेवटची एक घटिका, व मूळनक्षत्राच्या पहिल्या दोन घटिका, मिळून ज्या तीन

घटिका, तें अभुक्तमूळ होय. अथवा ज्येष्ठांच्या शेवटच्या दोन घटिका व मूळाच्या पहिल्या दोन घटिका मिळून चार संधिघटिका अभुक्त मूळ होय." "वृष, वृश्चिक, सिंह, कुंभ ह्या लग्नीं मूळनक्षत्र स्वर्गलोकीं राहतें. मिथुन, तुळा, कन्या, मीन ह्या लग्नीं पाताळीं राहातें. मेष, धनु, कर्क, मकर ह्या लग्नीं मनुष्यलोकीं राहतें असें सांगतात." ह्या लग्नांचें फळ— "स्वर्गलोकीं मूळ असतां राज्यप्राप्ति होईल, पाताळीं मूळ असतां धनप्राप्ति, मृत्युलोकीं मूळ असतां शून्य जाणावें, याप्रमाणें लग्नफळ समजावें." "आश्लेषांचा दोष नऊ महिने, मूळाचा दोष आठ वर्षें, ज्येष्ठानक्षत्राचा दोष पंधरा महिने, याप्रमाणें दोष आहे याकरितां तेथपर्यंत त्या मुलाचें दर्शन वर्ज्य करावें." "व्यतीपाताचें ठिकाणीं अंगहानि, परिघाचे ठिकाणीं मृत्युफळ, वैधृतीचे ठिकाणीं आईबापांचा नाश, अमावास्येचे ठिकाणीं अंधपणा, मूळाचे ठिकाणीं समूळ नाश होतो, धृतीचे ठिकाणीं कुलनाश होतो. दोन संधिकालांचे ठिकाणीं विकृतांग आणि हीनांग होतें. तसेंच दंतयुक्त असा झालेला आणि पायांकडून झालेला हे मोठें अरिष्ट करणारे होतात, याकरितां क्रूर ग्रहांची शांति करावी." व्यतीपात इत्यादिकांचे ठिकाणीं सग्रहमख अशी त्या त्या अनिष्टाची शांति अवश्य करावी. इतर शांतींत ग्रहमख अवश्य करावा असें नाहीं.

---

**मुख्यकालंप्रवक्ष्यामिशांतिहोमस्ययत्नतः जातस्यद्वादशाहेतुजन्मर्क्षेवाशुभेदिने जननाद्वा दशाहेशांतिकरणेशांत्युक्तनक्षत्राहुतिवन्हिचक्रावलोकनादिकंनावश्यकं कालांतरेआवश्य कंएवमन्यशांतिष्वपिज्ञेयं ॥**

"**शांतीच्या होमाचा मुख्य काल सांगतों.**— जन्मदिवसापासून बाराव्या दिवसीं, अथवा जन्मनक्षत्रीं किंवा शुभदिवसीं शांति करावी. जन्मदिवसापासून बाराव्या दिवसीं शांति करणें असेल तर शांतीला सांगितलेलीं नक्षत्रें, आहुति, अग्निचक्र हीं पाहण्याची आवश्यकता नाहीं. दुसऱ्या कालीं शांति करणें झाल्यास अवश्य पाहावीं. याप्रमाणें अन्य शांतींविषयींहि जाणावें.

---

**तद्यथा शुक्लादितस्तिथिःसैकावारयुक्ताब्धिशेषिता खेगुणेभुविवासोग्नेर्द्व्येकयोःस्यादधो दिवि भूमावग्निःशुभःहोमाहुतिःसूर्यभतस्त्रिभंत्रिभंगण्यंमुहुस्तत्रचचंद्रभावधिसूर्यज्ञशुक्रार्कजचंद्रभूमिजाजीवस्तमःकेतुरसत्यसन्मुखे संस्कारनित्यकर्मसुनिमित्ताव्यवहितनैमित्तिकेषु रोगातुरेचवन्हिचक्रादिकंनापेक्षितं अग्नेःस्थापनवेलायांपूर्णाहुत्यामथापिवा आहुतिर्वन्हिवासश्चविलोक्यौशांतिकर्मणि ॥**

**अग्निचक्र पाहण्याचा प्रकार**—"शुक्लप्रतिपदेपासून वर्तमान तिथीपर्यंत तिथि मोजून जी संख्या येईल तींत एक मिळवावा आणि जो वर्तमानवार असेल तितके अंक त्यांत मिळवून त्या संख्येस ४ यांनीं भागून शेष अंक उरेल त्यावरून अग्नि पहावा. शून्य अथवा तीन शेष असतां भूमीचे ठिकाणीं अग्नि, एक शेष असतां स्वर्गलोकीं अग्नि, दोन शेष असतां पाताळीं अग्नि." भूमीचे ठिकाणीं अग्नि शुभ होय. **होमाची आहुति पाहण्याचा प्रकार**— "सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्रापावेतों नक्षत्रें मोजून तीन तीन नक्षत्रेंकरून एकेक ग्रहाचे

मुखीं आहुति पडते ती असी;—पहिल्या तीन नक्षत्रीं सूर्याचे मुखीं, दुसऱ्या तीन नक्षत्रीं बुधाचे मुखीं, तिसऱ्या तीन नक्षत्रीं शुक्राचे मुखीं, चवथ्या तीन नक्षत्रीं शनीचे मुखीं, पांचव्या तीन नक्षत्रीं चंद्राचे मुखीं, सहाव्या तीन नक्षत्रीं मंगळाच्या मुखीं, सातव्या तीन नक्षत्रीं बृहस्पतीच्या मुखीं, आठव्या तीन नक्षत्रीं राहुमुखीं, नवव्या तीन नक्षत्रीं केतुमुखीं, याप्रमाणें आहुति पडतात. याकरितां ज्या दिवसीं पापग्रहाच्या मुखीं आहुति पडते ती अशुभ, व शुभ ग्रहाचे मुखीं पडते ती शुभ होय.'' संस्कार, नित्यकर्मे, निमित्त प्राप्त होतांच कर्तव्य जीं नैमित्तिक कर्मे, व रोगानें आतुर यांविषयीं अग्निचक्र इत्यादिक पाहण्याची गरज नाहीं. शांतिकर्माविषयीं अग्निस्थापनकालीं अथवा पूर्णाहुतीचे समयीं आहुति व अग्नि हे पहावे.

---

त्र्युत्तरारोहिणीश्रवणधनिष्ठाशततारकापुनर्वसुस्वातीमघाश्विनीहस्तपुष्यानुराधारेवतीनक्षत्रेषुगुरुशुक्रास्तमलमासरहितेशुभवारतिथ्यादौशांतिःकार्या निमित्ताव्यवहितनैमित्तिके रोगशांतौचअस्तादिविचारणानास्ति इतिप्रसंगात्सर्वशांत्युपयोगीशुभदिननिर्णयः ॥

तीन उत्तरा,रोहिणी, श्रवण, धनिष्ठा, शततारका, पुनर्वसु, स्वाती, मघा, अश्विनी, हस्त, पुष्य, अनुराधा, रेवती, ह्या नक्षत्रीं; गुरु व शुक्र यांचें अस्त, मलमास यांहीं रहित अशा शुभवार, शुभतिथि इत्यादिक दिवसीं शांति करावी. निमित्ताच्या सन्निहित कर्तव्य जें नैमित्तिक कर्म व रोगसंबंधी शांति ह्यांविषयीं अस्त इत्यादिकांचा विचार करूं नये. याप्रमाणें ह्या शांतीच्या प्रसंगानें सर्व शांतींला उपयोगी असा शुभ दिवसाचा निर्णय सांगितला.

---

अभुक्तमूलोत्पत्तौवर्षाष्टकंशिशुत्यागः ततःशांतिः तदन्यमूलोत्पत्तौद्वादशाहेअव्यवहितागामिमूलयुतेशुभदिनेवान्यत्रशुभदिनेवा गोप्रसवशांतिंकृत्वास्यशिशोर्मूलप्रथमचरणोत्पत्तिसूचितारिष्टनिरासार्थंसग्रहमखांशांतिंकरिष्यइतिसंकल्पयेत् द्वितीयादिपादोत्पत्तौसंकल्पेतथोहः अक्षसदस्यौकृताकृतौऋत्विजोष्टौचत्वारोवा मध्यकलशेस्वर्णप्रतिमायांरुद्रावाहनादि तस्यचतुर्दिक्षुकुंभचतुष्टयेऽक्षतपुंजेषुवरुणपूजा यद्वामध्येकुंभेप्रतिमायांरुद्रस्तदुत्तरकुंभेवरुणःपूज्यइति कुंभद्वयं रुद्रकुंभोत्तरतःकुंभेप्रतिमासुनिर्ऋतिमिंद्रमपश्चावाह्य पद्मस्यचतुर्विंशतिदलेषुउत्तराषाढाद्यनुराधांतचतुर्विंशतिनक्षत्राणांविश्वेदेवादिचतुर्विंशतिदेवतास्तंडुलपुंजादिष्वावाह्य दिक्षुलोकपालांश्चावाह्यपूजयेत् अग्निग्रहस्थापनाद्यंतेऽन्वाधानेऽर्कादिग्रहान्समिच्चर्वाज्याहुतिभिः निर्ऋतिंप्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्याभिर्घृतमिश्रपायससमिदाज्यचर्वाहुतिभिः यद्वापायसेनाष्टोत्तरशतसंख्ययासमिदाज्यचरुभिरष्टाविंशतिसंख्यया इंद्रमपश्चप्रतिद्रव्यमष्टाविंशतिसंख्यपायससमिदाज्यचर्वाहुतिभिर्विश्वेदेवादिचतुर्विंशतिदेवताअष्टाष्टपायसाहुतिभिः रक्षोहणमग्निंकृणुष्वपाजेतिपंचदशऋग्भिःप्रत्यृचमष्टाष्टसंख्यकृसराहुतिभिः १२० सवितारंदुर्गांत्र्यंबकंकवीन्दुर्गांवास्तोष्पतिंअग्निंक्षेत्रपालंमित्रावरुणावग्निंचाष्टाष्टकृसराहुतिभिः श्रियंहिरण्यवर्णामितिपंचदशऋग्भिःप्रत्यृचमष्टाष्टसमिदाज्यचर्वाहुतिभिः सोमंत्रयोदशपायसाहुतिभिः रुद्रंस्वराजंचतुर्गृहीताज्येनाग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचाज्येनशेषेणस्विष्टकृतमित्यादि

कवीनित्यत्रऋत्विकूस्तुतिमित्युद्देशोमयूखादौ शूर्पत्रयंनिर्वापः तत्रप्रथमेशूर्पेपायसार्थंतूष्णीं द्वादशमुष्टीन्निर्ऋतिमिंद्रमपश्चोद्दिश्यनिरूप्य द्वितीयेचर्वर्थंतदेवत्रयमुद्दिश्यद्वादशमुष्टीन् पुनः प्रथमेषण्णवतिमुष्टीन्पायसार्थंतृतीयेशूर्पेकृसरार्थंचतुश्चत्वारिंशन्मुष्टीन्द्वितीयेपुनश्चतुरो मुष्टीन्प्रथमेपुनःसोमार्थंचतुर्मुष्टीन्निरूप्यततः शूर्पत्रयेआहुतिपर्याप्ततंडुलान्गृहीत्वानिर्वापसंख्ययाप्रोक्ष्यपात्रत्रयेहविस्त्रयंश्रपयेत्तिलमिश्रतंडुलपाकेनकृसरोभवति ग्रहार्थंगृहसिद्धान्नं ग्राह्यं सर्वग्रंथेषुनिर्ऋत्याद्यर्थंनिर्वापादिक्रमेणश्रपणमेवोक्तं अतोगृहसिद्धान्नएवतिलदुग्धमिश्रेणकृसरादिसंपादनंप्रमादालस्यादिकृतकर्मभ्रंशएव ततोहोमकालेयजमानस्त्यागंकुर्यात् तत्र **एतावत्संख्याहुतिपर्याप्तंसमिदाज्यचरुद्रव्यमादित्यादिनवग्रहेभ्योनमम एवमधिदेवतादिभ्यः** ततोष्टोत्तरशतसंख्याहुतिपर्याप्तंघृतमिश्रपायसंअष्टोत्तरशताहुतीनामष्टाविंशत्याहुतीनांवापर्याप्तंसमिदाज्यचर्वात्मकद्रव्यत्रयमिदंनिर्ऋतयेनममअष्टाविंशत्याहुतिपर्याप्तंपायससमिच्चर्वाज्यमिंद्रायनममएवमग्रुथः अष्टाष्टाहुतिपर्याप्तंपायसंविश्वेभ्योदेवेभ्यो० १ विष्णवे २ वसुभ्यो ३ **वरुणाय ४ अजैकपदे ५ अहयेबुध्न्याय ६ पूष्णे ७ अश्विभ्यां ८ यमाय ९ अग्नये १० प्रजापतये ११ सोमाय १२ रुद्राय १३ अदित्यै १४ बृहस्पतये १५ सर्पेभ्यः १६ पितृभ्यः १७ भगाय १८ अर्यम्णे १९ सवित्रे २० त्वष्ट्रे २१ वायवे २२ इंद्राग्निभ्यां २३ मित्राय २४ नमम विंशत्यधिकशताहुतिपर्याप्तंकृसरंरक्षोघ्नेऽग्नयेनमम अष्टाष्टाहुतिपर्याप्तंकृसरंसवित्रेदुर्गायैत्र्यंबकायकविभ्योदुर्गायैवास्तोष्पतयेऽग्नयेक्षेत्रपालायमित्रावरुणाभ्यामग्नयेचनमम प्रतिद्रव्यंविंशत्यधिकशताहुतिपर्याप्तानिसमिच्चर्वाज्यानिश्रियैनमम त्र**योदशाहुतिपर्याप्तंपायसंसोमायचतुर्गृहीताज्यंरुद्रायस्वराजे एकैकाहुतिपर्याप्तमाज्यंअग्नयेवायवेसूर्यायप्रजापतयेचनममएवंसविस्तरंतत्तद्द्रव्यसंख्यादेवतोच्चारेणत्यागःसर्वत्रज्ञेयः केचित्तुइदमुपकल्पितमन्वाधानोक्तद्रव्यजातमन्वाधानोक्ताहुतिसंख्यापर्याप्तमन्वाधानोक्ताभ्यो यक्ष्यमाणाभ्योदेवताभ्योनममेतिसंक्षेपेणत्यागंकुर्वंति ततोग्रहमंत्रैर्निर्ऋत्यादिमंत्रैश्चयथायथंहोमांतेग्रहपूजास्विष्टकृन्नवाहुतिबलिदानपूर्णाहुतिपूर्णपात्रविमोकादिवन्हिपूजांतेयजमानाद्यभिषेकेकृतेधृतशुक्लवस्त्रगंधोयजमानोमानस्तोकेतिविभूतिंधृत्वा मुख्यदेवतापूजनविसर्जनश्रेयोग्रहणदक्षिणादानानिकुर्यात् शतंतदर्धंदशवाब्राह्मणान्भोजयेदितिसंक्षेपः ॥

अभुक्त मूळाचे ठिकाणीं जन्म झालें असतां आठ वर्षेपर्यंत मुलाचा त्याग करून त्यानंतर शांति करावी. अभुक्तमूळाहून अन्य जें मूळ नक्षत्र त्याजवर जन्म झालें असेल तर बाराव्या दिवसीं अथवा जवळ येणाऱ्या मूळ नक्षत्रानें युक्त अशा शुभ दिवसीं, अथवा अन्य शुभ दिवसीं गोप्रसवशांति करून "**अस्य शिशोर्मूलप्रथमचरणोत्पत्तिसूचितारिष्टनिरासार्थं सग्रहमखां शांतिं करिष्ये,**" असा संकल्प करावा. दुसरा, तिसरा इत्यादिक चरणीं जन्म झालें असल्यास संकल्पांत तसा ऊह करावा. ब्रह्मा व सदस्य हे कृताकृत आहेत. ऋत्विज आठ किंवा चार असावे. मध्य कलशावरतीं सुवर्णाच्या प्रतिमेवर रुद्रदेवतेचें आवाहन इत्यादिक करावें. त्या मध्यम कलशाच्या चार दिशांचे ठिकाणीं चार कलश स्थापन करून त्या कलशांवर तांदुळांच्या राशींचे ठिकाणीं वरुणाची पूजा करावी. अथवा मध्यभागीं कलशावर

प्रतिमेचे ठिकाणीं रुद्राची पूजा करावी, व त्याच्या उत्तरेकडे कलशावर वरुणाची पूजा करावी, याप्रमाणें दोन कलश स्थापावे. रुद्रकलशाच्या उत्तरेकडे जो कलश त्याच्यावर प्रतिमांचे ठिकाणीं निर्ऋति, इंद्र, अप्, ह्या देवतांचें आवाहन करून कमळाच्या चोवीस दलांचे ठिकाणीं उत्तराषाढापासून अनुराधापर्यंत जीं चोवीस नक्षत्रें त्यांच्या विश्वेदेव इत्यादिक ज्या चोवीस देवता त्यांचें तांदुळांचे राशी इत्यादिकांवर आवाहन करून आठ दिशांचे ठिकाणीं इंद्रादिक आठ लोकपालांचें आवाहन करून सर्वांची पूजा करावी. अग्नि व ग्रह यांचें स्थापन इत्यादिक कर्म झाल्यानंतर अन्वाधान करावें. तें असें;—"अर्कादिग्रहान् समिच्चर्वाज्याहुतिभिः निर्ऋतिं प्रतिद्रव्यं अष्टोत्तरशतसंख्याभिर्घृतमिश्रपायससमिदाज्यचर्वाहुतिभिः यद्वा पायसेनाष्टोत्तरशतसंख्यया समिदाज्यचरुभिरष्टाविंशतिसंख्यया इंद्रमपश्च प्रतिद्रव्यमष्टाविंशतिसंख्यपायससमिदाज्यचर्वाहुतिभिर्विश्वेदेवादिचतुर्विंशतिदेवता अष्टाष्टपायसाहुतिभिः रक्षोहणमग्निंकृणुष्वपाजेतिपंचदशऋग्भिः प्रत्यृचमष्टाष्टसंख्यकृसराहुतिभिः १२० सवितारं दुर्गां त्र्यंबकं कवीन् दुर्गां वास्तोष्पतिं अग्निं क्षेत्रपालं मित्रावरुणावग्निंचाष्टाष्टकृसराहुतिभिः श्रियं हिरण्यवर्णामिति पंचदशऋग्भिः प्रत्यृचमष्टाष्टसमिदाज्यचर्वाहुतिभिः सोमं त्रयोदशपायसाहुतिभिः रुद्रं स्वराजं चतुर्गृहीताज्येनाग्निं वायुं सूर्यं प्रजापतिं चाज्येन शेषेण स्विष्टकृतमित्यादि," असें अन्वाधान करावें. अन्वाधानांत 'कवीन्' असें जेथें ह्मटलें आहे तेथें 'ऋत्विक् स्तुतिं' असा उद्देश करावा असें मयूख इत्यादिक ग्रंथांत सांगितलें आहे. तीन सुपांमध्यें निर्वाप ह्मणजे तांदूळ घ्यावे. त्यामध्यें पहिल्या सुपांत पायसाकरितां मंत्ररहित बारा मुठी तांदूळ निर्ऋति, इंद्र, अप् यांच्या उद्देशेंकरून घ्यावे. दुसऱ्या सुपांत चरु करण्याकरितां त्याच तीन देवतांच्या उद्देशेंकरून बारा मुठी घ्यावे. पुनः पहिल्या सुपांत ९६ मुठी पायसाकरितां घ्यावे. तिसऱ्या सुपांत कृसरासाठीं ४४ मुठी घ्यावे. दुसऱ्या सुपामध्यें पुनः चार मुठी घ्यावे. पुनः पहिल्या सुपांत सोमदेवतेकरितां चार मुठी घ्यावे. नंतर तीन सुपांमध्यें सर्व आहुतींला पुरत इतके तांदूळ घेऊन पूर्वीं जितक्या जितक्या मुठी तांदूळ घेतले त्या त्या संख्येनें ते निरनिराळे धुवून तीन पात्रांमध्यें तीन चरु शिजवावे. तिलमिश्रित तांदूळ करून त्यांचा पाक करावा ह्मणजे कृसर होतो. ग्रहांच्या होमाकरितां चरु घेणें तो घरांत शिजलेला घ्यावा. निर्ऋति इत्यादिक देवतांसाठीं जसे तांदूळ ज्या क्रमानें घेतले त्याच क्रमानें त्यांचा पाक करावा असें सर्व ग्रंथांत सांगितलें आहे, ह्मणून घरांत सिद्ध झालेल्या अन्नांतच तीळ, दूध मिश्रित करून कृसर व पायस इत्यादिक सिद्ध करणें असें जें अलक्ष्य, आळस इत्यादिकेंकरून केलेलें कर्म तें व्यर्थच होय. तदनंतर यजमानानें द्रव्यांचा त्याग करावा. तो असा;— "एतावत्संख्याहुतिपर्याप्तं समिदाज्यचरुद्रव्यमादित्यादिनवग्रहेभ्यो न मम ॥ एवमधिदेवतादिभ्यः ॥ ततोऽष्टोत्तरशतसंख्याहुतिपर्याप्तं घृतमिश्रपायसं अष्टोत्तरशताहुतीनामष्टाविंशत्याहुतीनां वापर्याप्तं समिदाज्यचर्वात्मकद्रव्यत्रयमिदं निर्ऋतये न मम ॥ अष्टाविंशत्याहुतिपर्याप्तं पायससमिच्चर्वाज्यमिंद्राय न मम ॥ एवमद्भ्यः ॥ अष्टाष्टाहुतिपर्याप्तं पायसं विश्वेभ्यो देवेभ्यो १ विष्णवे २ वसुभ्यो ३ वरुणाय ४ अजैकपदे ५ अहयेबुध्न्याय

६ पूष्णे ७ अश्विभ्यां ८ यमाय ९ अग्नये १० प्रजापतये ११ सोमाय १२ रुद्राय १३ अदित्यै १४ बृहस्पतये १५ सर्पेभ्यः १६ पितृभ्यः १७ भगाय १८ अर्यम्णे १९ सवित्रे २० त्वष्ट्रे २१ वायवे २२ इंद्राग्निभ्यां २३ मित्राय २४ न मम ॥ विंशत्यधिकशताहुतिपर्याप्तं कृसरं रक्षोघ्नेऽग्नये न मम ॥ अष्टाष्टाहुतिपर्याप्तं कृसरं सवित्रे दुर्गायै त्र्यंबकाय कविभ्यो दुर्गायै वास्तोष्पतयेऽग्नये क्षेत्रपालाय मित्रावरुणाभ्यामग्नये च न मम ॥ प्रतिद्रव्यं विंशत्यधिकशताहुतिपर्याप्तानि समिच्चर्वाज्यानि श्रियै न मम ॥ त्रयोदशाहुतिपर्याप्तं पायसं सोमाय चतुर्गृहीताज्यं रुद्राय स्वराजे एकैकाहुतिपर्याप्तमाज्यं अग्नये वायवे सूर्याय प्रजापतये च न मम" याप्रमाणें विस्तारसहित त्या त्या द्रव्यांची संख्या व देवता यांच्या उच्चारेंकरून सर्वत्र त्याग करावा. कोणी ग्रंथकार तर, संक्षिप्त रीतीनें त्याग करितात, तो असा;– "इदं उपकल्पितमन्वाधानोक्तद्रव्यजातमन्वाधानोक्ताहुतिसंख्यापर्याप्तमन्वाधानोक्ताभ्यो यक्ष्यमाणाभ्यो देवताभ्यो न मम" तदनंतर ग्रहांच्या मंत्रांनीं व निर्ऋति इत्यादिक देवतांच्या मंत्रांनीं यथायोग्य होम केल्यानंतर ग्रहांची पूजा, स्विष्टकृत्, प्रायश्चित्तहोम, बलिदान, पूर्णाहुति, प्रणीतापात्र नेणें इत्यादिक, अग्निपूजा, एथपर्यंत कर्म झाल्यानंतर यजमान इत्यादिकांला अभिषेक करावा. नंतर यजमानानें शुभ्र वस्त्र, गंध धारण करून "मानस्तोके०" ह्या मंत्रानें विभूति धारण करून मुख्य देवतांचें पूजन, विसर्जन, श्रेयोग्रहण, दक्षिणादान हीं कर्मे करावीं, व शंभर, पन्नास किंवा दहा ब्राह्मणांला भोजन घालावें. याप्रमाणें संक्षेप सांगितला.

---

तत्राश्लेषाफलं आश्लेषायाःक्रमेणपंचसप्तद्वित्रिचतुरष्टैकादशषट्नवपंचेतिदशधाविभक्तनाडीषुक्रमेणराज्यंपितृनाशोमातृनाशःकामभोगःपितृभक्तिर्बलंहिंसकत्वंत्यागोभोगोधनमितिफलानि अथपादविभागेनफलं तत्राद्यपादःशुभः द्वितीयेपादेधनस्यनाशः तृतीयेमातुः चतुर्थेपितुः आश्लेषांत्यपादत्रयजातकन्याश्वश्रूंहंति एवंवरोपिअंत्यपादत्रयजः स्वश्वश्रूंहंति आश्लेषासर्वपादेषुशांतिःकार्याप्रयत्नतः जातस्यद्वादशाहेतुशांतिकर्मसमाचरेत् असंभवेतुजन्मर्क्षेअन्यस्मिन्वाशुभेदिने ॥

## आतां यानंतर आश्लेषाशांति सांगतों.

**आश्लेषानक्षत्राचें फल.**–आश्लेषानक्षत्राच्या एकंदर घटिका साठ त्यांचे क्रमानें दहा भाग करावे. ते असे;–पहिला भाग पांच घटिका, दुसरा सात घटिका, तिसरा दोन घटिका, चवथा तीन घटिका, पांचवा चार घटिका, सहावा आठ घटिका, सातवा अकरा घटिका, आठवा सहा घटिका, नववा नऊ घटिका, दहावा पांच घटिका, याप्रमाणें भाग करून ज्या भागांत जन्म होईल त्याप्रमाणें त्यांचीं फलें क्रमानें जाणावीं. तीं असीं,–राज्य, पित्याचा नाश, मातेचा नाश, कामभोग, पितृभक्ति, बळ, हिंसकपणा, त्याग, भोग, धन. **यानंतर चरणविभागानें फळ.** तें असें–आश्लेषांचा पहिला चरण शुभ होय, दुसऱ्या चरणीं धननाश, तिसऱ्या चरणीं मातेचा नाश, चवथ्या चरणीं पित्याचा नाश. आश्लेषानक्षत्राच्या शेवटच्या तीन चरणांवर कन्या जन्मली असतां सासवेला मारत्ये. याप्रमाणें वर जो तोहि

शेवटच्या तीन चरणांवर जन्मला असतां आपल्या सासवेला मारतो. "आश्लेषानक्षत्राच्या कोणत्याहि चरणीं जन्म झालें असतां त्याची, जन्मदिवसापासून बाराव्या दिवसीं यत्नानें शांति करावी. बाराव्या दिवसीं न झाल्यास जन्मनक्षत्रीं अथवा शुभदिवसीं करावी.

---

**अथोक्तकालेगोमुखप्रसवंकृत्वाअस्यशिशोराश्लेषाजननसूचितसर्वारिष्टपरिहारेत्यादिसंकल्पंकृत्वामूलशांतिवत्कुंभद्वयेरुद्रवरुणौद्वौसंपूज्य चतुर्विंशतिदलपद्मस्थकुंभेप्रतिमायामाश्लेषाधिपतीन्सर्पानावाह्यतद्दक्षिणेपुष्यदेवतांबृहस्पतिमुत्तरतोमघादेवतांपितॄंश्चावाह्यदलेषुपूर्वदल** मारभ्य प्रादक्षिण्येनपूर्वाधिपतिभगादिपुनर्वसुदेवतादितिपर्यंतचतुर्विंशतिदेवतावाहनादिकुर्यात् कौस्तुभेतुतैत्तिरीयकमंत्रैःपुष्यमघादिपूर्वादिनक्षत्राणामेवावाहनमुक्तंनतुनक्षत्रदेवतानां ततोलोकपालानावाह्यावाहितसर्वदेवताःसंपूज्याग्निग्रहांश्चप्रतिष्ठाप्यान्वादध्यात् आदित्यादिग्रहाद्युद्देशांते प्रधानदेवताःसर्पान्प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्यमष्टाविंशतिसंख्यंवाघृतमिश्रपायससमिदाज्यचर्वाहुतिभिःबृहस्पतिंपितॄंश्चाष्टाविंशतिसंख्यमष्टसंख्यंवातैरेवद्रव्यैर्भगादि चतुर्विंशतिदेवताःअष्टाष्टपायसाहुतिभिः रक्षोहणमित्यादिशेषदेवतानिर्देशोमूलशांतिवत् तद्वदेवपायसकृसरचरूणांश्रपणंहविस्त्यागश्चकार्यः कौस्तुभोक्तप्रधानदेवतामंत्रैस्तत्तद्धोमः **शेषंमूलशांतिवत् ॥**

यानंतर उक्तकालीं गोमुखप्रसवशांति करून "**अस्य शिशोः आश्लेषाजननसूचितसर्वारिष्टपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं इत्यादि,**" असा संकल्प करून मूळशांतीप्रमाणें दोन कलशांवर रुद्र व वरुण या देवतांची पूजा करून चोवीस दलांनीं युक्त असें कमळ काढून त्याजवर कलश स्थापून त्या कलशाचे ठिकाणीं प्रतिमेवर आश्लेषानक्षत्राची देवता जे सर्प त्यांचें आवाहन करून त्यांच्या दक्षिणप्रदेशीं पुष्यनक्षत्राची देवता जो बृहस्पति त्याचें आवाहन करून उत्तर प्रदेशीं मघानक्षत्राची देवता पितर त्यांचें आवाहन करून चोवीस दलांचे ठिकाणीं पूर्वदलापासून आरंभ करून प्रदक्षिणवर्तनानें पूर्वानक्षत्राची देवता जो भग त्यापासून पुनर्वसुनक्षत्राची देवता अदितिपर्यंत चोवीस देवतांचें आवाहन इत्यादिक करावें. कौस्तुभ ग्रंथांत तर, तैत्तिरीय शाखेच्या मंत्रांनीं पुष्य, मघा आदिकरून पूर्वा इत्यादिक नक्षत्रांचेंच आवाहन करण्याविषयीं सांगितलें आहे, नक्षत्रांच्या देवतांचें आवाहन सांगितलें नाहीं. तदनंतर अष्टौ दिक्पालांचें आवाहन करून आवाहन केलेल्या सर्व देवतांचें पूजन करावें. त्यानंतर अग्नि व ग्रह यांची स्थापना करून अन्वाधान करावें. आदित्यादि ग्रहांच्या अन्वाधानाचा उद्देश केल्यानंतर प्रधानदेवतांचें अन्वाधान करावें. तें असें;—"प्रधानदेवताः सर्पान् प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्यमष्टाविंशतिसंख्यंवाघृतमिश्रपायससमिदाज्यचर्वाहुतिभिः बृहस्पतिं पितॄंश्चाष्टाविंशतिसंख्यमष्टसंख्यंवा तैरेवद्रव्यैर्भगादिचतुर्विंशतिदेवताः अष्टाष्टपायसाहुतिभिः रक्षोहणमित्यादि." अवशिष्ट देवतांचा निर्देश मूळशांतीप्रमाणें करावा. मूळशांतीप्रमाणेंच पायस, कृसर आणि चरु हीं द्रव्यें शिजवून तयार करावीं व त्यांचा त्यागहि तसाच करावा. कौस्तुभामध्यें सांगितलेले प्रधानदेवतांचे जे मंत्र त्यांहींकरून त्या त्या देवतांचा होम करावा. अवशिष्ट सर्व कर्म मूळशांतीप्रमाणें जाणावें.

---

**अथज्येष्ठानक्षत्रफलं ज्येष्ठायादशभागेषुआद्येमातामहीमृतिः मातामहंद्वितीयेचतृतीये हंतिमातुलं तुर्येजातोमातरंचहंत्यात्मानंतुपंचमे गोत्रजान्षष्ठभागेचसप्तमेतूभयंकुलं अष्टमे स्वाग्रजंहंतिनवमेश्वशुरंतथा दशमांशकजातस्तुसर्वंहंतिशिशुर्ध्रुवं ज्येष्ठर्क्षेतुपुमान्जातोज्येष्ठ भ्रातुर्विनाशकः ज्येष्ठर्क्षेकन्यकाजाताहंतिशीघ्रंधवाग्रजं पादत्रयेजातनरोज्येष्ठोप्यत्रप्रजायते ज्येष्ठांत्यपादजातस्तुपितुःस्वस्यचनाशकः ॥**

## जन्मकालीं ज्येष्ठा नक्षत्र असतां त्याचें फल सांगतों.

"ज्येष्ठानक्षत्राच्या एकंदर घटिका साठ. त्यांचे समसमान दहा भाग करून ज्या भागांत जन्म होईल त्याचें फल पुढें सांगतों त्याप्रमाणें जाणावें. तें असें;—प्रथम भागीं जन्म झालें असतां मातेची आई मृत होते. दुसऱ्या भागीं मातेचा पिता मृत होतो. तिसऱ्या भागीं मातुळ मृत होतो. चवथ्या भागीं माता मृत होते. पांचव्या भागीं स्वतां आपण नाश पावतो. सहाव्या भागीं आपल्या गोत्रजांचा नाश करितो. सातव्या भागीं मातेचें कुळ व पित्याचें कुळ यांचा नाश करितो. आठव्या भागीं ज्येष्ठबंधूचा नाश करितो. नवव्या भागीं सासऱ्याला मारितो. दहाव्या भागीं निश्चयेंकरून सर्वांला मारितो असें जाणावें. ज्येष्ठानक्षत्रावर पुत्र जन्मला असतां आपल्या ज्येष्ठभ्रात्याचा नाश करणारा होतो. ज्येष्ठा नक्षत्रावर कन्या जन्मली असतां ज्येष्ठ दिराला शीघ्र मारिते. ज्येष्ठानक्षत्राच्या पहिल्या तीन चरणांवर पुत्र जन्मला असतां तो श्रेष्ठहि होतो. ज्येष्ठानक्षत्राच्या शेवटच्या (चवथ्या) चरणीं पुत्र जन्म पावला असतां पित्याचा व आपला नाश करणारा होतो."

---

**द्वादशाहेशांत्युक्तशुभदिनेवा गोप्रसवशांतिंकृत्वास्यशिशोर्ज्येष्ठर्क्षजननसूचितसर्वारिष्टप रिहारद्वारेत्यादिसंकल्प्य मध्यकलशेसुवर्णप्रतिमायांशचीसहितमैरावतारूढमिंद्रं लोकपालां श्चावाह्यरक्तवस्त्रद्वयशष्कुलीनैवेद्यसहितषोडशोपचारैःपूजयेत् तस्यचतुर्दिक्षुकुंभचतुष्टयंतत्पू र्वेमध्यमभागेशतच्छिद्रंचनिधायपूर्णपात्रयुतेषुफलादौवरुणावाहनपूजनादि अन्वाधानेग्रहा न्वाधानांतेइंद्रंपलाशसमिदाज्यचरुद्रव्यैःप्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्यया इंद्रायेन्दोमरुत्वतइति मंत्रेणप्रजापतिमष्टोत्तरशततिलाहुतिभिः समस्तव्याहृतिमंत्रेणशेषेणस्विष्टकृतमित्यादि अ ष्टोत्तरशतंब्राह्मणान्भोजयेत् इतिज्येष्ठाशांतिसंक्षेपः ॥**

## आतां ज्येष्ठानक्षत्रशांति सांगतों.

बाराव्या दिवसीं किंवा शांत्युक्त शुभदिवसीं गोप्रसवशांति करून, "**अस्य शिशोर्ज्येष्ठर्क्षजननसूचितसर्वारिष्टपरिहारद्वारा०,**" इत्यादिक संकल्प करून मध्यम कलशावर सुवर्णाच्या प्रतिमेचे ठिकाणीं इंद्राणीसहित ऐरावतावर आरोहण केलेला इंद्र आणि लोकपाल यांचें आवाहन करून दोन आरक्तवस्त्रें, कर्ज्यांचा नैवेद्य यांहींयुक्त सोळा उपचारांनीं पूजा करावी. त्या कलशाच्या चार दिशांचे ठिकाणीं चार कलश, व त्याच्या पूर्व प्रदेशीं मध्यभागीं शतच्छिद्र कलश असे पांच कलश स्थापून त्यांच्यावर पूर्णपात्रें ठेवून फलादिकावर वरुणाचें आवाहन, पूजा इत्यादिक करावीं. अन्वाधानांत, ग्रहांचें अन्वाधान

झाल्यानंतर "**इंद्रं पलाशसमिदाज्यचरुद्रव्यैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्यया इंद्रायेंदो मरुत्वत इतिमंत्रेण प्रजापतिमष्टोत्तरशततिलाहुतिभिः समस्तव्याहृतिमंत्रेण शेषेण स्विष्टकृतं,**" इत्यादिक अन्वाधान करावें. एकशें आठ ब्राह्मणांला भोजन घालावें. याप्रमाणें ज्येष्ठानक्षत्रशांतीचा संक्षेप सांगितला.

---

**चित्राद्येर्धेपुष्यमध्येद्विपादेपूर्वाषाढाधिष्ण्यपादेतृतीये जातःपुत्रश्चोत्तराद्येविधत्तेपित्रोर्भ्रातुःस्वस्यचापिप्रणाशं उत्तराफल्गुन्याद्यपादेइत्यर्थः अत्रेत्थंभातिचित्रापूर्वार्धेजातस्यगोप्रसवंकृत्वानक्षत्राधिपतिप्रतिमांसंपूज्यअजादानंकार्यं एवंपुष्यद्वितीयतृतीयपादयोर्जननेगोप्रसवनक्षत्राधिपपूजागोदानानिकार्याणि उत्तराफल्गुनीप्रथमपादेजननेनक्षत्राधिपपूजांतिलपात्रदानंचकुर्यात् एवंपूर्वाषाढातृतीयपादेजननेनक्षत्रेशपूजाकांचनदानं मघाप्रथमपादजननेमूलवत्फलं तत्रगोप्रसवनक्षत्रेशपूजनग्रहमखाः कार्याः मघायाआद्यघटिद्वयजननेनक्षत्रगंडांतशांतिरपि रेवत्यंतघटिद्वयेश्विन्याद्यद्वयेजननेनक्षत्रगंडांतशांतिगोप्रसवग्रहमखाःकार्याः रेवत्यश्विन्योरितरभागेषुमघांतिमपादत्रयेचदोषविशेषानुक्तेर्नशांत्यादिकं एवंविशाखाचतुर्थपादजननेशालकदेवरनाशादिदुष्टफलोक्तेर्ग्रहमखःकार्यः यत्रकालेदुष्टफलमुक्तंशांतिर्नोक्ता तत्रग्रहमखइतिकमलाकरोक्तेः एवमितरत्राप्यूह्यं इतिनक्षत्रशांतयः ॥**

" चित्रानक्षत्राचें पूर्वार्ध, पुष्यनक्षत्राचे मधले दोन पाद, पूर्वाषाढानक्षत्राचा तिसरा पाद, आणि उत्तरांचा आद्य पाद यांचे ठिकाणीं पुत्र झाला असतां माता, पिता, भ्राता व आपण यांचा नाश करितो." उत्तराद्ये ह्मणजे उत्तराफल्गुनीच्या प्रथम चरणीं असा अर्थ. याविषयीं असा विचार दिसतो—चित्रानक्षत्राच्या पूर्वार्धीं जन्म झालें असतां गोप्रसव करून नक्षत्रदेवतेच्या प्रतिमेची पूजा करून अजादान करावें. याप्रमाणें पुष्याच्या दुसऱ्या व तिसऱ्या चरणीं जन्म झालें असतां गोप्रसव, नक्षत्रदेवतेची पूजा, गोदान हीं करावीं. उत्तराफल्गुनीच्या पहिल्या चरणीं जन्म असतां नक्षत्रदेवतेची पूजा व तिळपात्राचें दान हीं करावीं. असेंच पूर्वाषाढांच्या तिसऱ्या चरणीं जन्म असतां नक्षत्रदेवतेची पूजा, सुवर्णदान हीं करावीं. मघानक्षत्राच्या पहिल्या चरणीं जन्म असतां मूळनक्षत्राप्रमाणें फळ होतें, यास्तव त्याविषयीं गोप्रसव व नक्षत्रदेवतेची पूजा, ग्रहमख हीं करावीं. मघानक्षत्राच्या पहिल्या दोन घटिकांत जन्म झालें असतां नक्षत्रगंडांतशांति जी तीहि करावी. रेवतीनक्षत्राच्या शेवटच्या दोन घटिका व अश्विनीनक्षत्राच्या पहिल्या दोन घटिका, ह्यांत जन्म झालें असतां नक्षत्रगंडांतशांति, गोप्रसव, ग्रहमख हीं सर्व करावीं. रेवती, अश्विनी यांच्या इतर भागांचे ठिकाणीं, आणि मघानक्षत्राच्या शेवटच्या तीन चरणीं जन्म असतां दोषविशेषाविषयीं वचन नाहीं याकरितां शांति इत्यादिक करण्याचें कारण नाहीं. असेंच विशाखांच्या चवथ्या चरणीं जन्म झालें असतां शालक ( पत्नीचा भ्राता ), दीर यांचा नाश होतो इत्यादिक दुष्टफल सांगितलें आहे यास्तव ग्रहमख करावा. कारण, ज्या कालाविषयीं दुष्टफल सांगून त्याची शांति सांगितली नाहीं तेथें ग्रहमख करावा असें कमलाकराचें वचन आहे. याप्रमाणें इतर ठिकाणींहि जाणावें. याप्रकारें नक्षत्रांच्या शांति समाप्त झाल्या.

---

अथव्यतीपातवैधृतिसंक्रांतिशांतिः कुमारजन्मकालेतुव्यतीपातश्चवैधृतिः संक्रमश्चरवे स्तत्रजातोदारिद्र्यकारकः अश्रियंमृत्युमाप्नोतिनात्रकार्याविचारणा स्त्रीणांचशोकदुःखंचसर्व नाशकरोभवेत् गोमुखप्रसवंकुर्याच्छांतिंचसनवग्रहां उक्तकालेसंकल्पादिकंकृत्वापंचद्रोणप रिमितव्रीहिराशिंकृत्वा तदुपरिसार्धद्रोणद्वयमिततंडुलराशिंतदुपरिसपादद्रोणपरिमिततिलरा शिंचकृत्वातिलराशौविधिनास्थापितकुंभे सौवर्णप्रतिमायांसूर्यमावाह्यतद्दक्षिणोत्तरयोरग्निरु द्रावावाह्यतिस्रोदेवताःव्यतीपातशांतौसंक्रांतिशांतौचपूजयेत् व्यतीपातसंक्रांत्योर्जननेव्यती पातसंक्रांतिशांतितंत्रेणसंकल्प्यैकैवशांतिः कार्या अत्रपूजाहोमादेःप्रसंगसिद्धिःद्विगुणोवाप्र धानहोमइतिभाति ग्रहपीठदेवतान्वाधानांतेसूर्यंउत्सूर्योबृहदितिमंत्रेणसमिदाज्यचर्वाहुतिभिः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्याभिः अग्निरुद्रंचतैरेवद्रव्यैः प्रत्येकमष्टाविंशतिसंख्याहुतिभिरग्निं दूतमितित्र्यंबकमितिमंत्राभ्यांमृत्युंजयमष्टोत्तरशततिलाहुतिभिः शेषेणेत्यादि अभिषेकांतेगो वस्त्रस्वर्णादिदत्वाशतंब्राह्मणान्भोजयेत् इतिव्यतीपातवैधृतिसंक्रांतिशांतिः ॥

## आतां व्यतीपात, वैधृति, संक्रांति यांचीं फलें व शांति सांगतों.

"पुत्राच्या जन्मसमयीं व्यतीपात, वैधृति व सूर्यसंक्रांत हीं असून त्याजवर जन्म झालें असतां दरिद्र, द्रव्यनाश, आपणास मृत्यु हीं होतात. व स्त्रियांला शोक, दुःख, सर्वनाश यांतें करणारा होतो, यास्तव गोमुखप्रसव व नवग्रहांनीं युक्त अशी शांति हीं करावीं." उक्तकालीं संकल्प इत्यादिक करून पांच द्रोण ( पांच अदमणी ) परिमित भात ( साळी ) याची राशि करून त्याच्यावर अडीच द्रोणपरिमित तांदुळांची राशि, त्याच्यावर सवा द्रोणपरिमित तिळांची राशि करून त्या तिळांच्या राशीवर विधिपूर्वक कलश स्थापित करून त्या कलशावर सुवर्णाच्या प्रतिमेचे ठिकाणीं सूर्याचें आवाहन करून त्याच्या दक्षिण व उत्तर ह्या प्रदेशांचे ठिकाणीं अग्नि व रुद्र यांचें आवाहन करून तीन देवतांची व्यतीपातशांति व संक्रांतिशांति यांचे ठिकाणीं पूजा करावी. व्यतीपात आणि संक्रांति या दोहोचें ठिकाणीं जन्म झालें असतां व्यतीपात व संक्रांति या दोनहि शांतींचा एकतंत्रानें संकल्प करून एकच शांति करावी. ह्या एकतंत्रशांतीमध्यें पूजा, होम इत्यादिकांची प्रसंगसिद्धि होते, ह्मणजे पूजा, होम इत्यादिक द्विगुण करण्याचें प्रयोजन नाहीं. अथवा प्रधानदेवतेचा होम दुप्पट करावा असें वाटतें. ग्रहपीठस्थ देवतांचें अन्वाधान झाल्यानंतर " सूर्यं उत्सूर्यो बृहदितिमंत्रेण समिदाज्यचर्वाहुतिभिः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्याभिः अग्निं रुद्रं च तैरेव द्रव्यैः प्रत्येकमष्टाविंशतिसंख्याहुतिभिः अग्निंदूतमिति त्र्यंबकमिति मंत्राभ्यां मृत्युंजयमष्टोत्तरशततिलाहुतिभिः शेषेणेत्यादि." याप्रमाणें अन्वाधान करावें. नंतर अभिषेक केल्यावर गाई, वस्त्र, सुवर्ण इत्यादिक दानेंकरून शंभर ब्राह्मणांला भोजन घालावें. याप्रमाणें व्यतीपात, संक्रांति यांची शांति समाप्त झाली.

---

अथवैधृतिशांतौविशेषः पूर्ववत्व्रीहितंडुलतिलराशौस्थापितकुंभेमध्येत्र्यंबकमितिमंत्रेण रुद्रंदक्षिणतःउत्सूर्यइतिसूर्यंउत्तरतआप्यायस्वेतिसोममावाह्यपूजयेत् अन्वाधानेरुद्रंसमिच्चर्वा

ज्यैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्याहुतिभिः सूर्यसोमौ प्रत्येकमष्टाविंशतिसंख्यैस्तैरेवद्रव्यैर्मृत्युंजयमष्टोत्तरसहस्रशतान्यतरसंख्यतिलाहुतिभिः शेषेणेत्यादि अन्यत्पूर्ववत् संक्रांतिदिनेवैधृतिसत्त्वेदेवताभेदाच्छांतिद्वयंपृथक्कार्यं इतिवैधृतिशांतिः ॥

## आतां वैधृतिशांतीचा विशेष प्रकार सांगतों.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें भात, तांदूळ व तिळ यांचे राशीवर कलश स्थापन करून त्या कलशावर "त्र्यंबकं०" ह्या मंत्रानें मध्यें रुद्रदेवतेचें व त्याच्या दक्षिणेस "उत्सूर्यं०" ह्या मंत्रानें सूर्याचें, त्याच्या उत्तरेस "आप्यायस्व०" ह्या मंत्रानें सोमाचें याप्रमाणें आवाहन करून पूजा करावी. नंतर अन्वाधान करावें. तें असें;—"रुद्रं समिच्चर्वाज्यैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्याहुतिभिः सूर्यसोमौ प्रत्येकमष्टाविंशतिसंख्यैस्तैरेवद्रव्यैर्मृत्युंजयं अष्टोत्तरसहस्रशतान्यतरसंख्यतिलाहुतिभिः शेषेणेत्यादि." याप्रमाणें अन्वाधान करून अवशिष्ट कर्म पूर्वीप्रमाणें करावें. संक्रांतीच्या दिवसीं वैधृति असेल तर संक्रांति व वैधृति या दोहोंच्या देवता निरनिराळ्या आहेत याकरितां दोन शांति निरनिराळ्या कराव्या याप्रमाणें वैधृतिशांतीचा प्रयोग समाप्त झाला.

---

अथैकनक्षत्रजननशांतिः एकस्मिन्नेवनक्षत्रेभ्रात्रोर्वापितृपुत्रयोः प्रसूतिश्चेत्तयोर्मृत्युर्भवेदेकस्यनिश्चितः पितृनक्षत्रेमातृनक्षत्रेवाकन्यायाःपुत्रस्यवोत्पत्तौगोमुखप्रसवंकृत्वाशांतिःकार्या सोदरभ्रातृभगिन्योर्नक्षत्रेभ्रातुर्भगिन्यावोत्पत्तौगोप्रसवमकृत्वैवशांतिमात्रंकार्यं संकल्पेपित्रैकनक्षत्रोत्पत्तिसूचितसर्वारिष्टेत्याद्यूहः कलशेरक्तवस्त्रेयस्मिन्नक्षत्रेजन्मतन्नक्षत्रप्रतिमांतन्नक्षत्रदेवताप्रतिमांवाअग्निर्नःपातुकृत्तिकाइत्यादितैत्तिरीयमंत्रैःपूजयेत् अन्वाधानेइदंनक्षत्रंअमुकांनक्षत्रदेवतांवा समिच्चर्वाज्यैःप्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्यंशेषेणेत्यादिअंतेययोरेकनक्षत्रेजन्मतयोरभिषेकः अत्रग्रहमखोनावश्यकः क्वचित्संपूजितहरिहरप्रतिमादानमप्युक्तं ॥

## एक नक्षत्रावर जन्म झालें असतां त्याचीं फळें व शांति सांगतों.

"भ्राते किंवा पितापुत्र ह्यांचें एकाच नक्षत्रावर जन्म झालें असतां त्यांतून एकाला निश्चयेंकरून मृत्यु प्राप्त होतो." पित्याच्या जन्मनक्षत्रीं किंवा मातेच्या जन्मनक्षत्रीं पुत्राचें किंवा कन्येचें जन्म झालें असतां गोमुखप्रसव करून एकनक्षत्रजननाची शांति करावी. सोदर भ्राता व सोदर बहीण यांच्या नक्षत्रीं भ्रात्याचें अथवा बहिणीचें जन्म झालें असतां गोप्रसव केल्यावांचूनच शांति मात्र करावी. संकल्पामध्यें "पित्रैकनक्षत्रोत्पत्तिसूचितसर्वारिष्टनिरसन," इत्यादिक ऊह करावा. कलशाचे ठिकाणीं आरक्त वस्त्रावर, ज्या नक्षत्रीं जन्म झालें असेल त्या नक्षत्राच्या प्रतिमेची, अथवा त्या नक्षत्राच्या देवतेच्या प्रतिमेची "अग्निर्नः पातु कृत्तिका" इत्यादिक तैत्तिरीयमंत्रांनीं पूजा करावी. नंतर अन्वाधानामध्यें ऊह करावा तो असा,—"इदं नक्षत्रं अमुकांनक्षत्रदेवतांवासमिच्चर्वाज्यैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्यं शेषेणेत्यादि." मग शेवटीं ज्यांचें एकनक्षत्रीं जन्म झालें असेल त्यांवर अभिषेक क-

रावा. ह्या शांतीमध्यें ग्रहमखाची आवश्यकता नाहीं. क्वचित् ग्रंथामध्यें प्रतिमांचे ठिकाणीं हरिहरांची पूजा करून त्या प्रतिमांचें दान करावें असेंहि सांगितलें आहे.

---

**अथग्रहणशांतिः** ग्रहणेचंद्रसूर्यस्यप्रसूतिर्यदिजायते इत्थंसंजायतेयस्तुतस्यमृत्युर्नसंशयः व्याधिपीडाचदारिद्र्यंशोकश्चकलहोभवेत् अत्रगोमुखप्रसवःकार्यइतिभाति ग्रहमखःकृताकृतः संकल्पेसूर्यग्रहणकालिकप्रसूतिसूचितेत्याद्यूहःग्रहणकालिकनक्षत्रस्यनक्षत्रदेवतायावाहेमप्रतिमांसूर्यग्रहेसूर्यस्यहेमप्रतिमां चंद्रग्रहेराजतंचंद्रबिंबंकृत्वोभयत्रसीसेनराहोर्नागाकृतिंकृत्वागोमयोपलिप्तेशुचिदेशेश्वेतवस्त्रोपरिदेवतात्रयपूजनं नात्रकलशस्थापनादि तत्रमध्येआकृष्णेनेतिसूर्यं दक्षिणतःस्वर्भानोरधइतिराहुं उत्तरतोनक्षत्रदेवतांपूजयेत् चंद्रग्रहेतुआप्यायस्वेतिमध्येचंद्रःपूज्यः पार्श्वयोराहुनक्षत्रदेवतेपूर्ववत् अन्वाधानेसूर्यग्रहेसूर्यंअर्कसमिदाज्यचरुतिलैः प्रत्येकंअष्टोत्तरशतसंख्ययाराहुंदूर्वाज्यचरुतिलैस्तावत्संख्यैर्नक्षत्रदेवतांजलवृक्षसमिदाज्यचरुतिलैस्तावत्संख्ययाशेषेणेत्यादि चंद्रग्रहेचचंद्रंपालाशसमिदाज्यचरुतिलैःशेषंपूर्ववत् अंतेग्रहकलशोदकेनपंचगव्यपंचत्वक्पंचपल्लवादियुतलौकिकोदकेनचलौकिकेनैववाभिषेकः वेधकालेजन्मनिनैवशांतिः किंतुदुष्टकालत्वाद्रुद्राभिषेकःकार्यइतिभाति ॥

## आतां ग्रहणावर जन्म झाल्याचें फळ व त्याची शांति हीं सांगतों.

"चंद्र व सूर्य यांच्या ग्रहणीं जर जन्म होईल तर ग्रहणावर होणारा जो त्यास निश्चयें मृत्यु होतो, व रोगपीडा, दारिद्र्य, शोक, कलह हीं प्राप्त होतात. ह्या ग्रहणशांतींत गोमुखप्रसव करावा असें वाटतें. ग्रहमख करावा किंवा न करावा. संकल्पांत, "**सूर्यग्रहणकालिकप्रसूतिसूचितनिरसन,**" इत्यादिक ऊह करावा. ग्रहणसमयीं जें नक्षत्र असेल त्याची किंवा त्या नक्षत्रदेवतेची सुवर्णप्रतिमा करावी. सूर्यग्रहण असेल तर सूर्याची सुवर्णप्रतिमा, चंद्रग्रहण असेल तर रुप्याचें चंद्रबिंब ( जसें असेल तसें ) करून दोनहि ग्रहणांमध्यें शिशाची राहुप्रतिमा नागाकार करून गोमयानें सारवलेल्या अशा शुद्ध भूमीवर शुभ्र वस्त्र घालून त्याजवर तीन देवतांची पूजा करावी. एथें कलश स्थापन इत्यादिक करूं नये. त्या वस्त्रावर मध्यभागीं "**आकृष्णेन०**" ह्या मंत्रानें सूर्य, त्याच्या दक्षिणभागीं "**स्वर्भानोरध०**" ह्या मंत्रानें राहु व उत्तरप्रदेशीं नक्षत्रदेवता, याप्रमाणें आवाहन करून पूजा करावी. चंद्रग्रहण असतां "**आप्यायस्व०**" ह्या मंत्रेंकरून मध्यभागीं चंद्राची पूजा करावी, व दोन पार्श्वभागीं राहु व नक्षत्रदेवता यांचें आवाहन पूर्वींप्रमाणें करून पूजा करावी. सूर्यग्रहण असेल तर अन्वाधानामध्यें "**सूर्यं अर्कसमिदाज्यचरुतिलैः प्रत्येकं अष्टोत्तरशतसंख्ययाराहुं दूर्वाज्यचरुतिलैस्तावत्संख्यैर्नक्षत्रदेवतांजलवृक्षसमिदाज्यचरुतिलैस्तावत्संख्यया शेषेणेत्यादि,**" असा ऊह करावा. चंद्रग्रहण असेल तर "**चंद्रं पालाशसमिदाज्यचरुतिलैः**" असा विशेष, अवशिष्टकर्म पूर्वींप्रमाणें जाणावें. शेवटीं ग्रहांच्या कलशांतील उदकानें अथवा पंचगव्य, पंचत्वचा, पंच पल्लव इत्यादिकांनीं युक्त अशा लौकिक उदकानें अथवा केवल लौकिक उदकानेंच अभिषेक करावा.—ग्रहणाच्या वेधसमयीं जन्म झालें तर शांति करूंच नये, तर दुष्ट काल आहे याकरितां रुद्राभिषेक करावा असें वाटतें.

---

**अथनक्षत्रगंडांतशांतिः** रेवत्याश्लेषाज्येष्ठानक्षत्राणामंत्यघटिद्वयमश्विनीमघामूलानामाद्यघटिद्वयमितिघटिकाचतुष्टयमितंत्रिविधंनक्षत्रगंडांतं अश्विनीमघामूलानांपूर्वार्धेबाध्यते पिता पूषाहिशक्रपश्चार्द्धेजननीबाध्यतेशिशोः सर्वेषांगंडजातानांपरित्यागोविधीयते वर्जयेद्दर्शनंयावत्तस्यषाण्मासिकंभवेत् शांतिर्वापुष्कलाकार्यासोममंत्रेणभक्तिमान् अस्यशिशोरेवत्यश्विनीसंध्यात्मकगंडांतजननसूचितारिष्टनिरासार्थंनक्षत्रगंडांतशांतिंकरिष्यइत्यादिसंकल्पः गोमुखप्रसवंकृत्वाषोडशपलमष्टपलंवाचतुःपलंवाकांस्यपात्रंविधाय तस्मिन्पायसंपयोवानिक्षिप्यतत्रनवनीतपूर्णंशंखंनिधायतस्मिन्राजतंचंद्रबिंबंसंस्थाप्य सोमोहमितिध्यानपूर्वकंचंद्रमाप्यायस्वेतिपूजयेत् पूजांतेआप्यायस्वेतिमंत्रस्यसहस्रंजपः ग्रहमखहोमः कार्यः नात्रप्रधानदेवताहोमः ग्रंथांतरेतुताम्रकलशेराजतप्रतिमायांबृहस्पतिमंत्रेणवागीश्वरंसंपूज्यतदुत्तरेकुंभचतुष्टयेपंचपल्लवादिकंकुंकुमचंदनकुष्ठगोरोचनानिक्षिप्त्वावरुणंपूजयेदित्युक्तं आचार्यायसशंखसमौक्तिकचंद्रदानं ग्रंथांतरपक्षेताम्रपात्रसहितवागीश्वरदानंआयुर्वृद्ध्यर्थंसहस्राक्षेणेतिमंत्रजपःदशावरब्राह्मणभोजनंचेति ॥

## आतां नक्षत्रगंडांत व त्याची शांति हीं सांगतों.

रेवती, आश्लेषा आणि ज्येष्ठा ह्या तीन नक्षत्रांच्या शेवटच्या दोन दोन घटिका; अश्विनी, मघा, मूळ ह्या तीन नक्षत्रांच्या पहिल्या दोन दोन घटिका, याप्रमाणें चार घटिकापरिमित असा तीन प्रकारचा नक्षत्रगंडांत होतो. "अश्विनी, मघा व मूळ यांच्या पूर्वार्धीं पुत्राचें जन्म झालें असतां पित्याला पीडा होते. रेवती, आश्लेषा आणि ज्येष्ठा यांच्या उत्तरार्धीं जन्म झालें असतां मातेला पीडा होते. गंडांतावर जन्म झालेल्या सर्वांचा त्याग करावा. सहा महिन्यांपर्यंत त्या मुलाचें दर्शन करूं नये. अथवा भक्तिमान् होत्साता सोमाच्या मंत्रानें मोठी शांति करावी." शांतीचा संकल्प— "अस्य शिशो रेवत्यश्विनीसंध्यात्मकगंडांतजननसूचितारिष्टनिरासार्थं नक्षत्रगंडांतशांतिं करिष्ये," असा संकल्प करावा. गोमुखप्रसव करून सोळा पलें आठ पलें, किंवा चार पलें वजन असें कांस्यपात्र करून त्यामध्यें पायस (खीर), किंवा दूध घालून त्यांत लोण्यानें भरलेला असा शंख ठेवून त्या शंखावर रुप्याचें चंद्रबिंब ठेवून "सोमोहं" या भावनेनें ध्यान करून "आप्यायस्व०" ह्या मंत्रानें चंद्राची पूजा करावी. पूजा झाल्यावर "आप्यायस्व०" ह्या मंत्राचा एक हजार जप करावा, व ग्रहमखसंबंधी होम करावा. ह्या शांतींत प्रधानदेवतेचा होम नाहीं. दुसऱ्या ग्रंथामध्यें तर तांब्याच्या कलशावर रुप्याचे प्रतिमेचे ठिकाणीं बृहस्पतीच्या मंत्रानें वागीश्वराची पूजा करून त्याच्या उत्तरेस चार कलश स्थापून त्यांमध्यें पंचपल्लव इत्यादिक, कुंकुम, चंदन, कुष्ठ, गोरोचन हीं घालून वरुणाची पूजा करावी असें सांगितलें आहे. नंतर आचार्याला शंख व मौक्तिक यांसह चंद्रबिंबाचें दान करावें. वर दाखविलेला ग्रंथांतरींचा पक्ष स्वीकारला असतां तांब्याच्या कलशासहित वागीश्वरप्रतिमेचें दान आयुष्याच्या वृद्धीकरितां, "सहस्राक्षेण०" ह्या मंत्राचा जप, व दहापेक्षां ज्यास्त ब्राह्मणांला भोजन हीं करावीं.

---

१ एक पल म्हणजे हल्लीं लौकिक रीतीचे मासे ४० होतात.

**अथतिथिगंडांतलग्नगंडांतशांतिः पंचमीषष्ठ्योर्दशम्येकादश्योःपंचदशीप्रतिपदोःसंधिभूतंघटीद्वयंतिथिगंडांतं कर्कसिंहयोर्वृश्चिकधनुषोर्मीनमेषयोश्चलग्नयोःसंधिभूतैकाघटिकालग्नगंडांतं** तत्रतिथिगंडांतेपूर्वार्धेजन्मनितत्कालेस्नात्वावृषभदानंतन्मूल्यदानंवाकृत्वासूतकांतेशांतिःकार्या उत्तरार्धेजन्मनिशांतिमात्रं लग्नगंडांतपूर्वार्धेजन्मनिकांचनदानं उत्तरार्धेशांतिमात्रं कुंभेहेमप्रतिमायांवरुणंसंपूज्यवरुणोद्देशेनप्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्ययासमिच्चर्वाज्यतिलयवानांहोमःकार्यः यवव्रीहिमाषतिलमुद्गानांदक्षिणात्वेनदानमिति ॥

## आतां तिथिगंडांत, लग्नगंडांत त्यांची शांति हीं सांगतों.

पंचमी, षष्ठी; दशमी, एकादशी; पौर्णिमा किंवा अमावास्या, प्रतिपदा ह्या तिथींचे संधीच्या ज्या दोन घटिका (ह्मणजे पंचमीची शेवटची एक व षष्ठीची पहिली एक) त्यांला तिथिगंडांत असें ह्मणतात. कर्क, सिंह; वृश्चिक, धनु; मीन, मेष; ह्या लग्नांचे संधीची एक घटिका ( कर्काची अर्धी व सिंहांची अर्धी मिळून एक ) तिला लग्नगंडांत ह्मणतात. त्यामध्यें तिथिगंडांताच्या पूर्वार्धी जन्म झालें असतां तत्कालीं स्नान करून वृषभाचें दान किंवा तितकें द्रव्य दान करून जननाशौच गेल्यानंतर शांति करावी. तिथिगंडांताच्या उत्तरार्धी जन्म झालें असतां शांति मात्र करावी. लग्नगंडांताच्या पूर्वार्धी जन्म झालें असतां सुवर्णाचें दान करावें. उत्तरार्धी जन्म झालें असतां शांति मात्र करावी. कलशावर सुवर्णाच्या प्रतिमेचे ठिकाणीं वरुणाची पूजा करून वरुणाच्या उद्देशानें प्रत्येक द्रव्याचा १०८ याप्रमाणें समिधा, चरु, तिळ आणि यव यांचा होम करावा. जव, व्रीहि, उडीद, तिळ, मूग यांचें दक्षिणेच्या स्थानीं दान करावें.

---

अथदिनक्षयादिशांतिः दिनक्षयेचभद्रायांप्रसूतिर्यदिजायते यमघंटेदग्धयोगेमृत्युयोगेचदारुणे दुष्टयोगतिथीनांचनिषिद्धांशेषुचेत्तदा अतिदोषकरीप्रोक्तातस्मिन्पापयुतेसति यमघंटादयोज्योतिर्ग्रंथेप्रसिद्धाः **दुर्योगतिथीनांनिषिद्धभागास्तु विष्कंभवज्रयोस्तिस्रःषट्चगंडातिगंडयोः परिघार्धंपंचशूलेव्याघातेंकघटीस्त्यजेत् चतुःषडष्टनिध्यर्कभूततिथ्याद्यनाडिकाः अष्टां ८ क ९ मनु १४ तत्त्वा २५ शा १० बाण ५ संख्याविवर्जयेदित्युक्ताज्ञेयाः दिनक्षयादिदोषेष्वेकैकदोषदूषितकालेजननेशिवेरुद्रैकादशिन्यभिषेकःकार्यः द्वित्रादिदोषसमुच्चयेग्रहयज्ञाश्वत्थप्रदक्षिणादिसमुच्चयः दीपंशिवालयेभक्त्याघृतेनपरिदापयेत् गाणपत्यंपुरुषसूक्तंसौरंमृत्युंजयंशुभम् शांतिजाप्यंरुद्रजाप्यंकृत्वामृत्युंजयीभवेदितिवाक्याद्बहुदोषेउक्तजपादिसमुच्चयोपि** ॥

## आतां दिनक्षय इत्यादिकांची शांति सांगतों.

" दिनक्षय, कल्याणी, यमघंटयोग, दग्धयोग, मृत्युयोग, दुष्टयोग आणि तिथींच्या निषिद्ध घटिका यांचे ठिकाणीं व पापवारयोगीं जन्म झालें असतां तें जन्म अतिदोषकारक होतें." यमघंट इत्यादिक योग ज्योतिष ग्रंथांत प्रसिद्ध आहेत. **दुष्टयोग व तिथि यांच्या निषिद्ध घटिका**–" विष्कंभ व वज्रयोग यांच्या पहिल्या तीन तीन घटिका, गंड व अतिगंड यांच्या सहा सहा घटिका, परिघाचें अर्ध, शूलाच्या पांच घटिका, व्याघाताच्या नऊ घटिका याप्रमाणें घटिका टाकाव्या. चतुर्थीच्या ८, षष्ठीच्या ९, अष्टमीच्या १४, नव-

मीच्या २९, द्वादशीच्या १०, चतुर्दशीच्या ९, याप्रमाणें तिथींच्या पहिल्या घटिका टाकाव्या." याप्रमाणें सांगितलेल्या त्या जाणाव्या. दिनक्षय इत्यादिक जे दोष त्यांतून एकेक दोषानें दूषित अशा कालीं जन्म झालें असतां शिवावर रुद्राच्या एकादशिनीनें अभिषेक करावा. दोन तीन दोष असून त्या समयीं जन्म असतां ग्रहयज्ञ, पिंपळाला प्रदक्षिणा इत्यादिक दोन तीन प्रकार करावे. "शिवाच्या देवालयीं भक्तीकरून घृताचा दिवा लावावा. गणपतीचें सूक्त, पुरुषसूक्त, सौरसूक्त, मृत्युंजयजप, शांतिसूक्तांचा जप, रुद्रजप, हीं केल्यानें मृत्यूला जिंकणारा होतो," असें वचन आहे याकरितां बहुत दोष असतील तर वाक्यांत सांगितलेले जपहि करावे.

---

**अथविषघटीशांतिः तत्रकौस्तुभेतिथिवारनक्षत्राणांविषनाड्यउक्तास्तथापिज्योतिर्ग्रंथेषु नक्षत्रविषघटीनामेवमहादोषत्वेनोक्तेर्नक्षत्रविषघटीष्वेवजननेउक्तशांतिःकार्या तिथ्यादिविषघटीनामुपदोषत्वाद्रुद्राभिषेकादिकंकार्यं विषघटीलक्षणंकौस्तुभादौज्ञेयं विषनाडीषुसंजा** तःपितृमातृधनात्मनां नाशकृद्विषशस्त्राग्नैःक्रूरेलग्नेंशकेपिच एतद्विषनाडीषु शिशुजननसूचितारिष्टेत्यादिसंकल्पः एककुंभेप्रतिमाचतुष्टयेरुद्रयमाग्निमृत्युदेवताः कद्रुद्राययमायसोममग्निर्मूर्धापरंमृत्योरितिमंत्रैःसंपूजयेत् ग्रहान्वाधानांते रुद्रयमाग्निमृत्यून्समिच्चरुघृततिलाहुतिभिः प्रतिदैवतंप्रतिद्रव्यमष्टोत्तरशतसंख्याभिःशेषेणेत्यादि गृहसिद्धान्नस्यहोमः ॥

## आतां विषघटींची शांति सांगतों.

कौस्तुभांत तिथि, वार आणि नक्षत्रें यांच्या विषघटिका सांगितल्या आहेत तथापि ज्योतिष ग्रंथांमध्यें नक्षत्रांच्याच विषघटिका महादोषकारक असें सांगितलें याकरितां नक्षत्रांच्या विषघटींतच जन्म झालें असतां सांगितलेली शांति करावी. तिथि, वार यांच्या ज्या विषघटी त्या अल्पदोषकारक आहेत यास्तव त्यांचे ठिकाणीं जन्म असतां रुद्राभिषेक इत्यादिक करावा. विषघटींचें लक्षण कौस्तुभ इत्यादिक ग्रंथांतून पाहावें. "विषघटिका व पापग्रहानें युक्त असें लग्न व लग्नांश यांचे ठिकाणीं जो उत्पन्न झाला तो पिता, माता, धन व आपण यांचा नाश—विष, शस्त्रें, अस्त्रें, यांहींकरून करणारा होतो." "एतद्विषनाडीषु शिशुजननसूचितारिष्टेत्यादि." असा संकल्प करून एका कलशावर चार प्रतिमा ठेवून त्यांचे ठिकाणीं रुद्र, यम, अग्नि, आणि मृत्यु या देवतांची, "कद्रुद्राय० यमायसोमं० अग्निर्मूर्धा० परंमृत्यो०" ह्या मंत्रांनीं पूजा करावी. ग्रहांचें अन्वाधान केल्यानंतर "रुद्रयमाग्निमृत्यून्समिच्चरुघृततिलाहुतिभिः प्रतिदैवतं प्रतिद्रव्यं अष्टोत्तरशतसंख्याभिः शेषेण०" असें अन्वाधान करावें. घरांत सिद्ध केलेल्या चरूचा होम करावा.

---

**अथयमलजननशांतिः तत्रश्रौताग्निमतःसोम्रयेमरुत्वतेत्रयोदशकपालंपुरोडाशंनिर्वपेदिति ऋग्वेदब्राह्मणोक्तेष्टिः यद्वाआश्वलायनसूत्रोक्तःकेवलमारुतयागः गृह्याग्निमतआश्वलायनस्यगृह्याग्नौमारुतश्चरुः** अथयस्यवधूर्गौर्वाजनयेद्यमौततः समरुद्भ्यश्चरुंकुर्यात्पूर्णाहुतिमथापिवेतिकारिकोक्तेः गृह्याग्निशून्यबह्वृचःकात्यायनोक्तशांतिंलौकिकाग्नौकुर्यात् ममभार्यायम

लजननसूचितसर्वारिष्टपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंमारुतेष्ट्यायक्ष्यइतिसंकल्पःश्रौताग्नि मतः स्मार्ताग्निमतस्तुमारुतस्थालीपाकेनयक्ष्यइतिसंकल्पःनिरग्निस्तुसग्रहमखांकात्यायनोक्तां शांतिंकरिष्येइतिसंकल्प्यस्वस्तिवाचनादिआचार्यवरणांतंकुर्यात् अष्टदिक्षुअष्टकलशान्वि धिनासंस्थाप्यउदकपूरणादिसर्वौषधीप्रक्षेपांतेवरुणंपूजयेत् अष्टकलशोदकैर्दंपत्योरभिषेकः आपोहिष्ठेतितिसृभिःकयानइतिद्वेआनःस्तुतइतिपंचेतिसप्तभिरैंद्रीभिर्मोषुवरुणइतिपंचभिरिद मापइत्येकयाअपनइत्यष्टाभिराग्नेयीभिर्ऋग्भिःकार्यः अभिषिक्तौदंपतीधृतश्वेतवस्त्रचंदनौउद ङ्मुखौतिष्ठेतां प्राङ्मुखआचार्योग्निग्रहस्थापनांतेअपस्तिसृभिराज्याहुतिभिरिंद्रंसप्तभिर्वरुणं पंचभिरपएकयाग्निमष्टाभिराज्याहुतिभिः पूर्वाभिषेकार्थमुक्तैश्चतुर्विंशतिमंत्रैरग्निंसोमंपवमानं पावकंमारुतंमरुतः यमंअंतकंमृत्युंचैकैकयाचर्वाहुत्यानाममंत्रैःशेषेणेत्यादिअन्वादध्यात् ष ट्त्रिंशद्वारंतूष्णींनिर्वापप्रोक्षणे अंतेग्रहकलशोदकादिनाभिषेकः दासीमहिषीवडवागोहस्ति नीनांयमलजननेपीयंशांतिःकार्या इयंशांतिर्ग्रहोत्पातेषुउलूककपोतगृध्रश्येनानांगृहप्रवेशेस्तं भप्ररोहेवल्मीकप्ररोहे मधुजनने आसनशयनयानभंगेपल्लीपतनेसरठारोहणेछत्रध्वजविना शेषु अन्येषूत्पातेषुचकार्येतिचकात्यायनमतंसाचसाग्निकैःकात्यायनैःस्वगृह्याग्नौकार्या निरग्नि कैस्तैरन्यैश्चलौकिकाग्नौ इतियमलजननादिशांतिः ॥

## आतां यमल (जुळे) जननाची शांति सांगतों.

ज्याची स्त्री जुळें प्रसवेल त्यानें शांति करावी. तो अग्निहोत्री असेल तर त्यानें "मरुत्वत् अग्नीला, तेरा कपालांनीं युक्त असा पुरोडाश करावा" असी ऋग्वेदशाखेच्या ब्राह्मणांत सांगितलेली इष्टि करावी. अथवा आश्वलायनसूत्रांत सांगितलेला केवळ मारुत (मरुत् आहे देवता ज्याची तो) याग करावा. गृह्याग्नीनें युक्त असा आश्वलायनशाखी असेल तर त्यानें मारुत चरु (मारुतस्थालीपाक) करावा. कारण, "ज्याची स्त्री किंवा गाई जुळें प्रसवेल त्यानें मरुत् देवतांसाठीं चरु किंवा पूर्णाहुति करावी" असें कारिकावचन आहे. गृह्याग्निविरहित आश्वलायन असेल त्यानें कात्यायनानें सांगितलेली शांति लौकिकाग्नीवर करावी. अग्निहोत्री असेल तर त्यानें, "ममभार्यायमलजननसूचितसर्वारिष्टपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं मारुतेष्ट्या यक्ष्ये," असा संकल्प करावा. गृह्याग्नियुक्त असेल त्यानें, "मारुतस्थालीपाकेन यक्ष्ये," असा संकल्प करावा. अग्निविरहित असेल त्यानें, "सग्रहमखां कात्यायनोक्तां शांतिं करिष्ये," असा संकल्प करून पुण्याहवाचनापासून आचार्यवरणांत कर्म करावें. आठ दिशांचे ठिकाणीं आठ कलश यथाविधि स्थापन करून त्या कलशांत उदक घालणें इत्यादिक पासून सर्वौषधी घालणें एथपर्यंत कर्म करून वरुणाची पूजा करावी. आठ कलशांतल्या उदकानें दंपतींला अभिषेक "आपोहिष्ठा० ऋचा ३, कयान० ऋचा २, आनःस्तुत० ऋचा ५, एकून ऐंद्री ऋचा ७, मोषुवरुण० ऋचा ५, इदमापः० ऋचा १, अपनः० अग्निऋचा ८," ह्या ऋचांनीं करावा. नंतर अभिषेक केलेल्या दंपतीनीं शुभ्र वस्त्रें व चंदन धारण करून उत्तर दिशेचे सम्मुख बसावें. पूर्वाभिमुख होत्साता आचार्यानें अग्नि व ग्रह यांची स्थापना केल्यानंतर अन्वाधान करावें तें असें,—"अपस्तिसृभिराज्याहुतिभिरिंद्रं

**सप्तभिर्वरुणं पंचभिरपएकयाग्निमष्टाभिराज्याहुतिभिः पूर्वाभिषेकार्थमुक्तैश्चतुर्विंशतिमंत्रैरग्निं सोमं पवमानं पावकं मारुतं मरुतः यमं अंतकं मृत्युं चैकैकया चर्वाहुत्या नाम मंत्रैः शेषेण०”** इत्यादिक अन्वाधान करावें. छत्तीस वेळ मंत्ररहित निर्वाप ( तांदूळ घेणें ) करून तितक्या संख्येनें ते धुवावे. शेवटीं ग्रहांच्या कलशांतील उदक इत्यादिकानें अभिषेक करावा. दासी, म्हैस, घोडी, गाई, हत्तीण ह्या जुळें प्रसवल्या असतांहि ही शांति करावी. ग्रहसंबंधी उत्पात; घुबड, कपोत, गीध, ससाणा, हे पक्षी घरांत शिरले असतां; स्तंभ प्ररोह ( खांबाला पल्लव येणें ); वारुळ उत्पन्न होणें; मधमाशांनीं घरांत मोहोळ करणें; आसन, पलंग, यान ( पालखी इ०) यांचा आकस्मिक नाश होणें; पाल पडणें; सरठ चढणें; छत्र, ध्वज यांचा आकस्मिक नाश; असेच दुसरे उत्पात होणें यांचे ठिकाणींहि ही शांति करावी असें कात्यायन ऋषीचें मत आहे. ती शांति साग्निक असे कात्यायनशाखी यांनीं आपल्या गृह्याग्नीवर करावी. अग्निविरहित असे कात्यायन यांनीं व इतरांनीं लौकिकाग्नीवर करावी. याप्रमाणें यमलजनन इत्यादिकांची शांति समाप्त झाली.

---

**अथत्रिकप्रसवशांतिः सुतत्रयेसुताचेत्स्यात्तत्रयेवासुतोयदि मातापित्रोःकुलस्यापितदानि**ष्टंमहद्भवेत् ज्येष्ठनाशोवित्तहानिर्दुःखंवासुमहद्भवेत् गोप्रसवंकृत्वाममसुतत्रयजन्मानंतरं कन्याजननसूचितसर्वारिष्टेतिवाकन्यात्रयजन्मानंतरंपुत्रजननसूचितेतिवानिमित्तानुसारेण संकल्पः स्थंडिलपूर्वभागेग्रहस्थापनांतेतदुत्तरतःकलशपंचकेस्वर्णप्रतिमासुब्रह्मविष्णुमहेशेंद्र रुद्रानावाह्यपूजयेत् तत्रमंत्राः ब्रह्मजज्ञानं० इदंविष्णु० त्र्यंबकं० यतइंद्र० कद्रुद्रायेति ग्रह **पीठदेवतान्वाधानांतेब्रह्माणंविष्णुंमहेशंइंद्रंरुद्रंचप्रत्येकंसमिदाज्यचरुतिलैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरसहस्राष्टोत्तरत्रिशताष्टोत्तरशतान्यतमसंख्याहुतिभिःशेषेणेत्यादि ॥**

## आतां तीन पुत्र होऊन चवथी कन्या किंवा तीन कन्या होऊन चवथा पुत्र असे झाले तर त्याचें फळ व शांति सांगतों.

“तीन सारखे पुत्र होऊन चवथी कन्या होईल अथवा तीन सारख्या कन्या होऊन चवथा पुत्र होईल तर माता, पिता, कुल यांला मोठें अनिष्ट होतें. ज्येष्ठपुत्राचा नाश, द्रव्यहानि किंवा मोठें दुःख हीं होतात.” गोप्रसव करून शांतीचा संकल्प करावा. तो असा;— “**ममसुतत्रयजन्मानंतरं कन्याजननसूचितसर्वारिष्टेति**” अथवा “**कन्यात्रयजन्मानंतरं पुत्रजननसूचितेति,**” याप्रमाणें तीन पुत्र किंवा तीन कन्या जसें निमित्त असेल तसा संकल्प करावा. स्थंडिलाच्या पूर्वप्रदेशीं ग्रहांचें स्थापन झाल्यानंतर ग्रहांच्या उत्तर दिशेचे ठिकाणीं पांच कलश स्थापून त्या कलशांवर सुवर्णप्रतिमांचे ठिकाणीं ब्रह्मा, विष्णु, महेश, इंद्र आणि रुद्र यांचें आवाहन करून त्यांची पूजा करावी. आवाहन व पूजा यांचे मंत्र— “**ब्रह्मजज्ञानं०इदंविष्णु०त्र्यंबकं०यतइंद्र०कद्रुद्राय०.**” ग्रहपीठस्थ देवतांचें अन्वाधान केल्यानंतर “**ब्रह्माणं विष्णुं महेशं इंद्रं रुद्रंच प्रत्येकं समिदाज्यचरुतिलैःप्रतिद्रव्यमष्टोत्तरसहस्राष्टोत्तरत्रिशताष्टोत्तरशतान्यतमसंख्याहुतिभिःशेषेण०**” इत्यादिक अन्वाधान करावें.

---

अथसदंतजननशांतिः उपरिप्रथमंयस्यजायंतेथशिशोर्द्विजाः दंतैर्वासहयस्यस्याज्जन्म भार्गवसत्तम द्वितीयेचतृतीयेचचतुर्थेपंचमेतथा यदादंताश्चजायंतेमासेचैवमहद्भयं मातरंपि तरंवाथखादेदात्मानमेवच बालानामष्टमेमासिषष्ठेमासिततःपुनः दंतायस्यचजायंतेमातावा म्रियतेपिता बालकःपीड्यतेवात्रस्वयमेवनसंशयः केचित्तुअष्टमेमासिदंतजन्मशुभमाहुःत त्रास्यशिशोःप्रथममूर्ध्वदंतजननसूचितसर्वारिष्टेत्यादिसदंतजननसूचितेत्यादिवाद्वितीयमासे दंतजन्मसूचितेत्यादिवासंकल्पंयथानिमित्तंयोजयेत् स्थंडिलोत्तरभागेनौकायांस्वर्णपीठेवास्व स्तिकयुतेबालमुपवेश्य सर्वौषध्यादियुक्तजलैः स्नापयित्वास्थंडिलपूर्वतःकलशेप्रतिमासुधा तारंवन्हिंसोमंवायुंपर्वतान्केशवंचेतिषट्देवताःसंपूज्य ग्रहान्वाधानांतेधातारंसकृच्चरुणाव न्ह्यादिपंचदेवताएकैकयाज्याहुत्याशेषेणेत्यादिअन्वादध्यात् धात्रेत्वाजुष्टंनिर्वपामीत्यादिनि र्वापप्रोक्षणे नाम्नाचरुहोमः स्रुवेणवन्ह्यादिभ्यःपंचाज्याहुतयोपिनाम्नैव होमांतेदक्षिणांद त्वासप्ताहंयथाशक्तिब्राह्मणान्भोजयेत् अष्टमदिनेकांचनादिदत्वाकर्मेश्वरार्पणंकुर्यात् षष्ठाष्ट ममासयोर्दंतजननेतुएकस्याबृहस्पतिदेवतायाः पूजनं दधिमधुघृताक्तानामश्वत्थसमिधामष्टो त्तरशतंबृहस्पतिमंत्रेणहोमः आज्येनस्विष्टकृतादि इतिसदंतजननशांतिः ॥

## आतां दंतांसहित जन्म झालें असतां त्याची शांति सांगतों.

"ज्या मुलास दांत प्रथम वरचे येतात, अथवा दंतांसह जो जन्मतो, दुसरा, तिसरा, चवथा, पांचवा या मासांत जर दांत आले तर मोठें भय प्राप्त होतें, अथवा मातेला, पित्याला किंवा आपणालाच खातो. आठव्या मासांत किंवा सहाव्या मासांत ज्या मुलाला दांत येतात त्याची माता अथवा पिता हे नाश पावतात. अथवा स्वतां बालकच पीडित होतो, यांत संशय नाहीं. कोणी ग्रंथकार तर, आठव्या मासांत दांत आले असतां शुभ असें सांगतात—**शांतीचा संकल्प**—पहिल्यानें वरचे दांत आले असल्यास, "**अस्य शिशोः प्रथम मूर्ध्वदंतजननसूचितसर्वारिष्टेत्यादि.**" दंतांसहित जन्म झालें असल्यास, "**सदंतजननसूचित०**" दुसऱ्या मासांत दांत आले असल्यास, "**द्वितीयमासे दंतजननसूचित०**" याप्रमाणें जसें निमित्त असेल तसा संकल्प करावा. स्थंडिलाच्या उत्तरप्रदेशीं नौका किंवा स्वस्तिकानें युक्त सुवर्णपीठ याच्यावर बालकाला बसवून सर्वौषधींनीं युक्त अशा उदकानें बालकाला स्नान घालावें. नंतर स्थंडिलाच्या पूर्वभागीं कलशावर सहा प्रतिमा मांडून त्या प्रतिमांचे ठिकाणीं धाता, वन्हि, सोम, वायु, पर्वत आणि केशव ह्या सहा देवतांची पूजा करून ग्रहांचें अन्वाधान केल्यानंतर, "**धातारं सकृच्चरुणा वन्ह्यादिपंचदेवता एकैकयाज्याहुत्या शेषेण०**" इत्यादिक अन्वाधान करावें. नंतर "**धात्रे त्वा जुष्टं निर्वपामि०**" इत्यादिक ह्मणून निर्वाप, प्रोक्षण हीं कर्मे करावीं. नाममंत्रानें चरुहोम करावा. स्रुवापात्रानें वन्हि इत्यादिक पांच देवतांला पांच घृताच्या आहुति देणें त्या नाममंत्रानेंच द्याव्या. होम झाल्यानंतर दक्षिणा देऊन सात दिवस यथाशक्ति ब्राह्मणांला भोजन घालावें. आठव्या दिवसीं सुवर्ण इत्यादिक दान करून कर्म ईश्वराला समर्पण करावें. सहावा व आठवा या मासांत दांत आले असतील तर एका बृहस्पति देवतेची पूजा करावी, व दहीं, मध, घृत यांमध्यें

भिजवलेल्या अशा पिंपळाच्या समिधांचा बृहस्पतीच्या मंत्रानें १०८ होम करून घृतानें स्विष्टकृत् इत्यादिक होम करावा. याप्रमाणें दंतांसहित जन्म झाल्याची शांति समाप्त झाली.

---

अथप्रसववैकृतशांतिः यत्रगर्भेविपर्यासोमानुषाणांगवामपि अद्भुतानिप्रसूयंतेतत्रदेशस्य विप्लवः मानुषामानुषाणांचगजाश्वमृगपक्षिणां जायंतेजातिभेदाश्चसदंताविकृतास्तथा बहुशीर्षाअशीर्षावाबहुकर्णाअकर्णकाः एकशृंगाद्वित्रिशृंगास्तथैवत्रिचतुर्भुजाः दीर्घकर्णामहाकर्णागजकर्णाश्चमानवाः राजश्रेष्ठेकुलेनाशोधनस्यचकुलस्यच अष्टोत्तरसहस्राणिचरुंवैजुहुयाद्घृतं समिधांतुपलाशानांतर्पयेत्पूर्ववद्द्विजान् अशिराजायतेजंतुस्तथाद्वित्रिशिरास्तथा अत्रसूर्याद्भुतेसूर्यंपूजयेज्जुहुयादपि दध्याज्यमधुसंयुक्ताःसमिधस्त्वर्कसंभवाः मृगीजनयते सर्पान्मंडूकांश्चैवमानुषान् अत्राद्भुतेगीष्पतयेपूजांहोमंचकारयेत् औदुंबरस्यसमिधोदधिसर्पिःसमन्विताः स्त्रीगर्भपातोयमलंप्रसूयंतेथवास्त्रियः सदंताश्चैवजायंतेजातमात्राहसंतिच बुधाद्भुतेबुधायात्रपूजाहोमौसमाचरेत् ॥

## आतां विपरीत उत्पत्ति झाली असतां त्याची शांति सांगतों.

" जेथें मनुष्यांच्या, गाईच्या गर्भाचे ठिकाणीं विपर्यास ( जसा असावा तसा न होणें तो ) होतो, व अद्भुतें उत्पन्न होतात तेथें त्या देशाचा नाश होतो. मनुष्य, पशु, गज, अश्व, मृग, पक्षी, यांला विजातीय, दंतांसहित, अकाळविकाळ असे गर्भ होतात, व जेथें पुष्कळ डोक्यांचे, मस्तकरहित, पुष्कळ कानांचे, कर्णरहित, एकशृंगाचे, दोन शृंगांचे, तीन शृंगांचे, तीन भुजांचे, चार भुजांचे, लांब कानांचे, गजासारख्या कानांचे, असे मनुष्य होतात तेथें श्रेष्ठ अशा राजकुळाचा व धनाचा नाश होतो. याकरितां चरु, घृत, पळसाच्या समिधा यांचा दरएक द्रव्याचा १००८ होम करावा. ब्राह्मणांस भोजनादि दानें करून तृप्त करावें. मस्तकहीन, तसाच दोन तीन मस्तकांनीं युक्त असा प्राणी झाला असतां तें सूर्यसंबंधी अद्भुत होय, याकरितां सूर्याची पूजा करून दधि, मध, घृत यांत भिजवलेल्या अशा रुईच्या समिधांनीं सूर्याच्या उद्देशानें होमहि करावा. हरिणी सर्प, बेडूक, मनुष्य यांतें प्रसवली असतां तें अद्भुत बृहस्पतिसंबंधी होय. त्याविषयीं बृहस्पतीची पूजा करून दधि, घृत यांत भिजवलेल्या अशा उंबराच्या समिधांचा होम करावा. स्त्रियेचा गर्भपात अथवा स्त्रिया यमल ( जुळें ) किंवा दंतांसहित प्रसवतात, उत्पन्न होतांच हसतात, इत्यादिक जें अद्भुत तें बुधसंबंधी होय. यास्तव याविषयीं बुधासाठीं पूजा, होम करावे.

---

संक्षेपेणयथाप्राज्ञमित्थंजननशांतयः उक्ताजपाभिषेकार्थसूक्तादिबहुविस्तृताः प्रयोगाः कौस्तुभादौचप्रसिद्धाबहुशःपराः ॥ अनेनप्रीयतांदेवोभगवान्विठ्ठलःप्रभुः ॥

याप्रमाणें संक्षेपेंकरून यथामति जननशांति सांगितल्या. जप, अभिषेक यांकरितां सूक्तादिकांनीं अति विस्तृत असून प्रसिद्ध असे दुसरे प्रयोग कौस्तुभ इत्यादिक ग्रंथीं पुष्कळ सांगितले आहेत. ह्या माझ्या ग्रंथाच्या कृतीनें भगवान् विठ्ठल प्रभु संतुष्ट असो.

---

अथनामकरणं तत्रजन्मदिनेजातकर्मानंतरंतत्कालःक्वचित् एकादशाहेद्वादशाहेवाविप्र

स्यनामकर्मद्वादशदिने आशौचसत्त्वेपिवचनान्नामकर्मकार्यमितिकेचित् क्षत्रियाणांत्रयोदशे षोडशेवादिने वैश्यानांषोडशेविंशतितमेवादिने द्वाविंशेमासांतेवाशूद्राणां मासांतेशततमे दिनेवत्सरांतेवेतिविप्रादीनांगौणकालः मुख्यकालेकुर्वन्विप्रादिःपुण्यतिथिनक्षत्रचंद्रानुकूल्यादिगुणादरंनकुर्यात् उक्तमुख्यकालातिक्रमेशुभनक्षत्रादिकमावश्यकं वैधृतिव्यतीपातसंक्रांतिग्रहणदिनामावास्याभद्रासुप्राप्तकालेपिनामकर्मादिशुभकर्मनकार्यं अत्रमलमासगुरुशुक्रास्तादिदोषोनास्तीत्युक्तं अपराण्हेरात्रौचनामकर्मवर्ज्यं ॥

## आतां नामकरणसंस्कार सांगतों.

जन्मदिवसीं जातकर्मसंस्कार केल्यानंतर नामकर्माचा काल क्वचित् ग्रंथांत सांगितला आहे. अकराव्या दिवसीं अथवा बाराव्या दिवसीं ब्राह्मणाचा नामकर्मसंस्कार करावा. दहाव्या दिवसीं, आशौच असतांहि वचन आहे याकरितां नामकर्म करावें, असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. क्षत्रियांचा नामकरणसंस्कार तेराव्या किंवा सोळाव्या दिवसीं करावा. वैश्यांचा सोळाव्या अथवा विसाव्या दिवसीं करावा. शूद्रांचा बाविसाव्या दिवसीं किंवा मासांतीं करावा. मासांतीं, शंभराव्या दिवसीं, अथवा वर्षांतीं याप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांचा क्रमानें गौणकाल जाणावा. ब्राह्मण इत्यादि मुख्यकालीं ( नामकर्म ) करील तर शुभतिथि, शुभ नक्षत्रें, अनुकूल चंद्र इत्यादिक गुण पाहण्याची गरज नाहीं. सांगितलेला मुख्यकाल टळून गेला असतां शुभतिथि, शुभनक्षत्र इत्यादिक अवश्य पाहावें. वैधृति, व्यतीपात, संक्रांति, ग्रहणदिवस, अमावास्या, भद्रा ह्या दिवसीं जरी काल प्राप्त झालेला असेल तथापि त्या दिवसीं नामकर्मादिक शुभ कर्म करूं नये. ह्या नामकर्माविषयीं मलमास, गुरुशुक्रांचें अस्त इत्यादिकांचा दोष नाहीं असें सांगितलें आहे. अपराण्हकालीं व रात्रीं नामकर्म करूं नये.

---

अथोक्तकालातिक्रमेऽपेक्षितशुभतिथ्यादि चतुर्थीषष्ठ्यष्टमीनवमीद्वादशीचतुर्दशीपंचदशीरहितास्तिथयःप्रशस्ताः चंद्रबुधगुरुशुक्रावासराः अश्विनीत्र्युत्तरारोहिणीमृगपुनर्वसुपुष्यहस्तस्वात्यनुराधाश्रवणधनिष्ठाशततारकारेवत्योनक्षत्राणि वृषभसिंहवृश्चिकलग्नानिप्रशस्तानि ॥

यानंतर उक्त काल टळून गेला असतां अपेक्षित असीं शुभतिथि इत्यादिक सांगतों—चतुर्थी, षष्ठी, अष्टमी, नवमी, द्वादशी, चतुर्दशी, पौर्णिमा यांवांचून इतर तिथि प्रशस्त होत. सोमवार, बुधवार, गुरुवार व शुक्रवार हे शुभ होत. अश्विनी, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, रोहिणी, मृग, पुनर्वसु, पुष्य, हस्त, स्वाती, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, रेवती हीं नक्षत्रें शुभ होत. वृषभ, सिंह, वृश्चिक हीं लग्नें प्रशस्त होत.

---

तानिनामानिचतुर्विधानि देवतानाममासनामनाक्षत्रनामव्यावहारिकनामेति तत्रामुकदेवताभक्तइत्याकारकंदेवतानामप्रथमं चैत्रादिमासनामानिवैकुंठोथजनार्दनः उपेंद्रोयज्ञपुरुषोवासुदेवस्तथाहरिः योगीशःपुंडरीकाक्षःकृष्णोनंतोच्युतस्तथा चक्रीतिद्वादशैतानिक्रमादाहुर्मनीषिणइत्यनुसारेणमासनामद्वितीयकं मासाश्चात्रचांद्राः तेचशुक्लादिकृष्णांताएव यस्मिन्नक्षत्रेजन्मतन्नक्षत्रवाचकशब्दात्तत्रजातइत्यधिकारेविहिततद्धितप्रत्ययेकृतेनिष्पन्ननाक्षत्रना

मतृतीयं तद्यथा आश्वयुक् आपभरणः कार्तिकः रौहिणः मार्गशीर्षः आर्द्रकः पुनर्वसुः तिष्यः आश्लेषः माघः पूर्वाफल्गुनः उत्तराफल्गुनः हस्तः चैत्रः स्वातिः विशाखः अनुराधः ज्यैष्ठः मूलकः पूर्वाषाढः उत्तराषाढः आभिजितः श्रावणः श्रविष्ठा शतभिषक् पूर्वाप्रौष्ठपादः उत्तराप्रौष्ठपादः रैवतइतिकेचित्तुचूचेचोलाश्विनीप्रोक्तेत्यादिज्योतिर्ग्रंथोक्तावकहडाचक्रानुसारेणाश्विन्यादेश्चतुर्षुचरणेषुचूडामणिश्चेदीशश्चोलेशोलक्ष्मणइत्यादिकानिनाक्षत्रनामानिकुर्वंति तन्नश्रौतग्रंथादिबहुसंमतं शांखायनास्तुकृत्तिकोत्पन्नस्याग्निशर्मेतिनक्षत्रदेवतासंबद्धंनाक्षत्रंनामकुर्वंति एवंकातीयाअपि नाक्षत्रनामैवाभिवादनीयंगुप्तंचामौंजीबंधनात् मातापितरावेवजानीयातां व्यावहारिकंनामचतुर्थं तच्चकवर्गादिषुतृतीयचतुर्थपंचमवर्णहकारान्यतमवर्णाद्यावयवकं यरलवान्यतममध्यवर्णयुतंऋलृवर्णरहितंविसर्गांतंपित्रादिपुरुषत्रयान्यतमवाचकं शत्रुवाचकभिन्नंतद्धितप्रत्ययरहितंकृत्प्रत्ययांतंयुग्माक्षरंपुंसांअयुग्माक्षरंस्त्रीणांकार्यं यथादेवइतिहरिरिति उक्तसर्वलक्षणाभावेसमाक्षरंपुंसांअयुग्माक्षरंस्त्रीणामित्येकलक्षणयुतमेव यथारुद्रइतिराजेत्यादि अक्षरमत्रस्वरः व्यंजनेषुनसंख्यानियमः अत्रविशेषः द्व्यक्षरंप्रतिष्ठाकामश्चतुरक्षरंब्रह्मवर्चसकामःअंत्यलकाररेफंवर्जयेदिति आपस्तंबहिरण्यकेशिसूत्रेतु प्रातिपदिकादिधालंतंयथाहिरण्यदाइतिउपसर्गयुतंवा सुश्रीरित्यादीतिविशेषउक्तः तच्चव्यावहारिकंनामशर्मपदांतंदेवपदांतंवाब्राह्मणस्यवर्मेतिराजेतिवापदयुतंक्षत्रियस्य गुप्तदत्तान्यतरांतंवैश्यस्य दासांतंशूद्रस्यकार्यं व्यावहारिकंनामप्रासादादीनामपिकार्यं देवालयगजाश्वानांवृक्षाणांवापिकूपयोः सर्वापणानांपण्यानांचिन्हानांयोषितांनृणां काव्यादीनांकवीनांचपश्वादीनांविशेषतः राजप्रासादयज्ञानांनामकर्मयथोदितमित्युक्तेः ॥

नामें चार प्रकारचीं आहेत. तीं असीं,—देवतासंबंधी नाम, माससंबंधी नाम, नक्षत्रसंबंधी नाम आणि व्यवहारसंबंधी नाम, याप्रमाणें चार प्रकारचीं नामें जाणावीं. अमुक देवताभक्त ( जसें, हरिहरेश्वरभक्त इ० ) अशा आकाराचें जें देवतानाम तें पहिलें. “ चैत्रादिक माससंबंधीं नांवें—वैकुंठ, जनार्दन, उपेंद्र, यज्ञपुरुष, वासुदेव, हरि, योगीश, पुंडरीकाक्ष, कृष्ण, अनंत, अच्युत आणि चक्री, याप्रमाणें हीं बारा नांवें क्रमेंकरून सांगतात,” याप्रमाणें जें माससंबंधीं नांव तें दुसरें. ह्या नामप्रकरणीं मास घेणें ते चांद्रमास घ्यावे, व ते शुक्लपक्षापासून कृष्णपक्षापर्यंतच घ्यावे. ज्या नक्षत्रीं जन्म झालें असेल त्या नक्षत्राचा वाचक जो शब्द त्या शब्दाहून ‘जातः’ ह्या अर्थीं विहित तद्धित प्रत्यय करून जें सिद्ध झालें नाम तें नक्षत्र नाम तिसरें. तें जसें,—आश्वयुक् ( अश्विनी नक्षत्रावर झालेला तो इ०, याप्रमाणें पुढच्या सर्व नक्षत्रसंबंधीं नामांचे अर्थ जाणावे. ) आपभरण, कार्तिक, रौहिण, मार्गशीर्ष, आर्द्रक, पुनर्वसु, तिष्य, आश्लेष, माघ, पूर्वाफल्गुन, उत्तराफल्गुन, हस्त, चैत्र, स्वाति, विशाख, अनुराध, ज्यैष्ठ, मूलक, पूर्वाषाढ, उत्तराषाढ, आभिजित, श्रावण, श्रविष्ठ, शतभिषक्, पूर्वाप्रौष्ठपाद, उत्तराप्रौष्ठपाद, रैवत, याप्रमाणें जाणावीं. कोणी ग्रंथकार तर, “ चू, चे, चो, ला अश्विनी ” इत्यादिक ज्योतिष ग्रंथामध्यें सांगितलेलें जें अवकहडाचक्र त्यावरून अश्विनी इत्यादिकांचे चार चरणांचे ठिकाणीं चूडामणि, चेदीश, चोलेश, लक्ष्मण इत्यादिक नाक्षत्र नांवें ठेवितात. परंतु तसें नांव ठेविणें तें श्रौतग्रंथादिकांला मान्य नाहीं. शांखायन जे ते

तर, कृत्तिकांवर उत्पन्न झालेल्याचें 'अग्निशर्मा' असें नक्षत्रदेवताप्रयुक्त नांव ठेवितात. याप्रमाणें कात्यायनशाखी जे तेहि असेंच नाक्षत्र नांव ठेवितात. नक्षत्रसंबंधी नांव तेंच अभिवादनीय ( माता, पिता व गुरु यांना नमस्कार करण्यास योग्य ), व तें मौंजी होई-पर्यंत गुप्त असून आईबापांला मात्र माहीत असावें. व्यवहारसंबंधी नांव तें चवथें. तें व्याव-हारिक नांव कवर्ग इत्यादिक वर्गांतील तिसरा, चवथा व पांचवा आणि हकारवर्ण, यांतून कोणत्याहि वर्णाचें पहिलें अक्षर असावें, य, र, ल, व यांतून कोणताहि वर्ण मध्यें असावा, व ऋ, ऌ, या वर्णांनीं विरहित असून अंतीं विसर्ग, आणि पिता, पितामह ( आजा ), प्र-पितामह ( पणजा ) ह्या तीन पुरुषांतून कोणाचेंहि वाचक असून शत्रुनामांनीं भिन्न, तद्धित-प्रत्ययविरहित, कृत्प्रत्यय आहे शेवटीं ज्यास असें पुरुषाचें समसंख्य अक्षरांचें, स्त्रियांचें विष-मसंख्य अक्षरांचें असें नांव ठेवावें. जसें,–देव, हरि: याप्रमाणें सांगितलेलीं सर्व लक्षणें न मिळ-तील तर सम अक्षरांचें पुरुषांचें व विषमाक्षरांचें स्त्रियांचें, याप्रमाणें एक लक्षणानें युक्त अ-सेंच ठेवावें. जसें,–रुद्र, राजा इत्यादिक. एथें अक्षर ह्मणजे स्वर समजावे. व्यंजनें जीं त्यांविषयीं संख्यानियम नाहीं. याविषयीं विशेष सांगतों– प्रतिष्ठेची इच्छा करणारा असेल तर दोन अक्षरांचें व ब्रह्मतेजाची इच्छा करणारा असेल तर चार अक्षरांचें नांव ठेवावें, व नांवाच्या शेवटीं लकार, रेफ हे नसावे. आपस्तंब हिरण्यकेशि सूत्रामध्यें तर, प्रातिपदिक आहे आदि ज्यास व धातु आहे अंतीं ज्यास असें नांव ठेवावें; जसें,–हिरण्यदा, याप्रमाणें; किंवा उपसर्गानें युक्त असें, जसें, सुश्री: इत्यादिक विशेषप्रकार सांगितला आहे. तें व्यवहा-रसंबंधी नांव, शर्मपदांत किंवा देवपदांत ब्राह्मणाचें ठेवावें. वर्मपदांत अथवा राजपदांत क्षत्रि-याचें ठेवावें. गुप्तपदांत किंवा दत्तपदांत वैश्याचें ठेवावें. शूद्राचें दासपदांत ठेवावें. व्या-वहारिक नांवें देवालयें, राजवाडे इत्यादिकांचींहि ठेवावीं. कारण, " देवालयें, गज, अश्व, वृक्ष, वापी, कूप, सर्व बाजार, विकण्याचे पदार्थ, चिन्हें, स्त्रिया, पुरुष, काव्यादिक, कवि, पशु, इत्यादिक व राजवाडे, यज्ञ, ह्यांचीं यथायोग्य नांवें ठेवावीं असें वचन आहे.

---

अथप्रयोगेविशेष:गर्भाधानादिसंस्कारलोपेप्रत्येकंपादकृच्छ्रंबुद्धिपूर्वकमकरणेप्रत्येकमर्धकृच्छ्रंप्रायश्चित्तंजातकर्मण:कालातिपत्तिनिमित्तकाज्यहोमपूर्वकंकार्यं तद्यथा जातकर्मण:कालातिपत्तिनिमित्तकदोषपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रायश्चित्तहोमंकरिष्यइतिसंकल्प्याग्निस्थापनेध्माधानादिपाकयज्ञतंत्रसहितंवन्हिस्थापनाज्यसंस्कारमात्रसहितंवाभूर्भुव:स्व:स्वाहेतिसमस्तव्याहृत्याज्यहोमंकुर्यात् होमंसमाप्यगर्भाधानपुंसवनानवलोभनसीमंतोन्नयनलोपजनितदोषपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं एतावत: पादकृच्छ्रान्बुद्धिपूर्वकलोपेर्धकृच्छ्रान्तत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतद्रव्यदानेनाहमाचरिष्ये इतिसंकल्प्यद्रव्यंदद्यात् जातकर्मनाम्नो:सहचिकीर्षायांपूर्वोक्तजातकर्मसंकल्पवाक्यमुच्चार्यअस्यकुमारस्यायुरभिवृद्धिव्यवहारसिद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंनामकर्मचतंत्रेणकरिष्यइतिसंकल्प्यस्वस्तिवाचनादिकुर्यात् तत्रजातकर्मनामकर्मणो:पुण्याहंभवंतोब्रुवंत्वित्युक्त्वाअस्यकुमारस्यजातकर्मणेएतन्नाम्नेअस्मैचस्वस्तिभवंतोब्रुवंत्वितिस्वस्तिपर्यायेवदेत् तदनुसारेणैवविप्रप्रतिव

चनं केवलनामचिकीर्षायांनामकर्मणः पुण्याहंभवंतोब्रुवंत्वित्युक्त्वास्वस्तिपर्यायेअमुकनाम्नेअस्मैस्वस्तिभवंतोब्रुवंत्वितिवदेत् विप्राश्चामुकनाम्नेअस्मैस्वस्तीतिप्रतिब्रूयुः लेखनादौनामत्रयंशर्मादिपदरहितंकृत्वाव्यावहारिकंनामशर्माद्यंतंकुर्यात् अभिवादनेनाक्षत्रनामापिशर्माद्यंतंसर्वत्रोच्चारणीयं अवशिष्टःप्रयोगःप्रयोगग्रंथेषु ॥

## आतां यानंतर प्रयोगाचा विशेष प्रकार सांगतों.

गर्भाधान इत्यादिक संस्कारांचा लोप झाला असेल तर प्रत्येक संस्काराचें पादकृच्छ्र, समजून उमजून न केले असतील तर अर्धकृच्छ्र प्रायश्चित्त, जातकर्माचा काल टळून गेला एतन्निमित्तक कर्तव्य जो घृताचा होम तो पूर्वी करून नंतर करावें. तें असें;—"**जातकर्मणः कालातिपत्तिनिमित्तकदोषपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रायश्चित्तहोमं करिष्ये,**" असा संकल्प करून अग्निस्थापन, इध्मास्थापन इत्यादिक जें पाकयज्ञाचें तंत्र त्यानें युक्त किंवा अग्निस्थापन, आज्याचा संस्कार, पात्रांचा संस्कार यांहींकरून मात्र युक्त असा, "**भूर्भुवः स्वःस्वाहा**" ह्या समस्त व्याहृतिमंत्रानें आज्याचा होम करावा. होम समाप्त करून संस्कारलोपाचा प्रायःश्चित्तसंकल्प करावा. तो असा;– "**गर्भाधानपुंसवनानवलोभनसीमंतोन्नयनलोपजनितदोषपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं एतावतःपादकृच्छ्रान् बुद्धिपूर्वकलोपेऽर्धकृच्छ्रान् तत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतद्रव्यदानेनाहमाचरिष्ये,**" असा संकल्प करून तितकें द्रव्य द्यावें. जातकर्म व नामकर्म हे दोन संस्कार एकतंत्रानें कर्तव्य असतील तर पूर्वी सांगितलेल्या जातकर्माचे संकल्पाचे वाक्याचा उच्चार करून एकतंत्राचा संकल्प करावा. तो असा,–"**अस्य कुमारस्यायुरभिवृद्धिव्यवहारसिद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं नामकर्म च तंत्रेण करिष्ये,**" असा संकल्प करून पुण्याहवाचन इत्यादिक करावें. पुण्याहवाचनांत वाक्य ह्मणावें. तें असें;–"**जातकर्मनामकर्मणोः पुण्याहं भवंतो ब्रुवंतु,**" असें ह्मणून "**अस्य कुमारस्य जातकर्मणे एतन्नाम्नेअस्मै च स्वस्ति भवंतो ब्रुवंतु,**" असें स्वस्ति शब्दाविषयीं ह्मणावें. त्या रीतीनेंच ब्राह्मणांनीं प्रतिवचन ( प्रत्युत्तर ) ह्मणावें. नुस्तें नामकरण कर्तव्य असेल तर, "**नामकर्मणः पुण्याहं भवंतो ब्रुवंतु,**" असें ह्मणून स्वस्ति शब्दाविषयीं "**अमुकनाम्ने अस्मै स्वस्ति भवंतो ब्रुवंतु**" असें ह्मणावें. ब्राह्मणांनीं "**अमुकनाम्ने अस्मै स्वस्ति,**" असें प्रतिवचन बोलावें. नांवें लिहिणें त्यांमध्यें तीन नामें शर्मादि शब्दविरहित लिहून व्यावहारिक नांव शर्मादिपदांत लिहावें. अभिवादनाविषयीं ( नामगोत्रोच्चारपूर्वक नमस्काराविषयीं ) नाक्षत्र नाम जें त्याचाहि शर्मादिपदांत सर्वत्र उच्चार करावा. अवशिष्ट ( ह्या ग्रंथीं न सांगितलेला ) प्रयोग प्रयोगग्रंथांमध्यें पहावा.

---

**अथस्त्रीणांनामकर्म संकल्पेअस्याःकुमार्याइतिविशेषः स्वस्तिवाचनेएतन्नाम्न्यैअस्यैस्वस्तीत्यादि भक्त्येत्याबंतंदेवतानाम** मासनामसुचक्रिणीवैकुंठीवासुदेवीतित्रीणिङीबंतानिहरिरित्यविकृतं **अवशिष्टानिअष्टावाब**ंतानि रौहिणीकृत्तिकेत्येवंयथायथंनाक्षत्रनामेतिमातृदत्तमते **आश्वलायनैर्नाक्षत्रनामस्त्रीणांनकार्यं व्यावहारिकंयज्ञदाशर्मेतिपुंवत् पूजादिकंवैदिकमंत्ररहितंपुंवत्कार्यं पितुरसन्निधौस्त्रीपुंसयोर्नामपितामहादिःकुर्यात् इतिनामकरणम् ॥**

## आतां स्त्रियांचें नामकर्म सांगतों.

संकल्पामध्यें "अस्याः कुमार्याः" इतका विशेष जाणावा. पुण्याहवाचनामध्यें "एतन्नाम्न्यै अस्यै स्वस्ति," इत्यादिक विशेष समजावा. 'भक्ता' असें आबंत देवतानाम; मासनांवांमध्यें चक्रिणी, वैकुंठी, वासुदेवी, हीं तीन ङीबंत जाणावीं, हरि हें नांव कन्यापुत्रांविषयीं सारखें. बाकी आठ ( जनार्दना, उपेंद्रा, यज्ञपुरुषा, योगीशा, पुंडरीकाक्षा, कृष्णा, अनंता, अच्युता ) आबंत जाणावीं. रौहिणी, कृत्तिका याप्रमाणें यथायोग्य नाक्षत्र नांव ठेवावें असें मातृदत्ताचें मत आहे. आश्वलायनशाखी यांनीं स्त्रियांचें नाक्षत्र नांव ठेवूं नये. व्यावहारिक नांव ठेवणें तें 'यज्ञदाशर्मा' असें पुरुषाप्रमाणें ठेवावें. पूजा इत्यादिक कर्म करणें तें वैदिकमंत्रविरहित पुरुषाप्रमाणें करावें. पिता सन्निध नसेल तर कन्या व पुत्र यांचा नामसंस्कार पितामह (पित्याचा पिता) इत्यादिकानें करावा. याप्रमाणें नामसंस्कार समाप्त झाला.

---

अथांदोलारोहणं आंदोलाशयनेपुंसोद्वादशोदिवसःशुभः त्रयोदशस्तुकन्यायाननक्षत्रविचारणा अन्यस्मिन्दिवसेचेत्स्याच्छुभकालंविचारयेत् उत्तरात्रयरोहिणीहस्ताश्विनीपुष्यरेवत्यनुराधामृगचित्रापुनर्वसुश्रवणस्वातिनक्षत्रेषुशुभवारेरिक्तातिरिक्ततिथौचंद्रताराबलेकुलयोषिद्भिरांदोलाशयनंकार्यं ॥

## आतां आंदोलारोहण ह्मणजे मुलास पाळण्यांत घालणें तें सांगतों.

"पुत्राला पाळण्यांत घालण्याविषयीं बारावा दिवस शुभ होय; कन्येला पाळण्यांत घालण्यास तेरावा दिवस शुभ होय; ह्या दोन दिवसीं शुभ नक्षत्राचा विचार करण्याची गरज नाहीं. इतर दिवसीं असेल तर दिनशुद्धि पाहावी." उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, रोहिणी, हस्त, अश्विनी, पुष्य, रेवती, अनुराधा, मृग, चित्रा, पुनर्वसु, श्रवण, स्वाती, ह्या नक्षत्रीं; शुभवारीं ( सोमवार, बुधवार, बृहस्पतवार, शुक्रवार ह्या वारीं ); रिक्ता तिथि ( चतुर्थी, नवमी, चतुर्दशी ) व्यतिरिक्त तिथींचे ठिकाणीं; चंद्रबळ व ताराबळ यांहीं युक्त अशा दिवसीं कुलस्त्रियांनीं मुलास पाळण्यांत घालावें.

---

एकत्रिंशेदिनेद्वितीयजन्मर्क्षेवादोलारोहोक्तनक्षत्रैर्वापूर्वाण्हमध्यान्हयोःकुलदेवताविप्रयोःपूजांविधायशंखेनगोदुग्धंपाययेत् इतिदुग्धपानं ॥

जन्म झाल्यापासून एकतिसाव्या दिवशीं किंवा दुसऱ्या जन्मनक्षत्रीं, अथवा दोलारोहास जीं सांगितलीं नक्षत्रें त्या नक्षत्रीं, पूर्वाण्हकाल व मध्यान्हकाल ह्या कालीं कुलदेवता, ब्राह्मण यांची पूजा करून शंखानें गाईचें दूध मुलास प्राशन करवावें. याप्रमाणें दुग्धप्राशन समाप्त झालें.

---

सूत्यामासोत्तरंबुधसोमगुरुवारेषुरिक्तान्यतिथौ श्रवणपुष्यपुनर्वसुमृगहस्तमूलानुराधानक्षत्रेषुजलस्थानंगत्वाजलपूजाकार्या अत्रगुरुशुक्रास्तचैत्रपौषमासाधिमासावर्ज्याः इतिजलपूजनं ॥

## आतां जलपूजा सांगतों.

सूतिकेनें पूर्ण एक मास झाल्यानंतर बुध, सोम, गुरु ह्या वारीं; रिक्ताव्यतिरिक्त तिथींचे ठिकाणीं; श्रवण, पुष्य, पुनर्वसु, मृग, हस्त, मूळ, अनुराधा, ह्या नक्षत्रीं; उदकाच्या स्थानीं जाऊन उदकाची पूजा करावी. एथें गुरुशुक्रास्त आणि चैत्र, पौष व अधिकमास हे वर्ज्य करावेत. याप्रमाणें जलपूजन समाप्त झालें.

---

**तृतीयेमासिसूर्यावलोकनंचतुर्थेमासिअन्नप्राशनकालेवानिष्क्रमणं तत्रकालः शुक्लपक्षः शुभःप्रोक्तःकृष्णश्चांत्यत्रिकंविना रिक्ताषष्ठयष्टमीदर्शद्वादशीचविवर्जिता गुरुशुक्रबुधवारा श्विनीरोहिणीमृगपुष्योत्तरात्रयहस्तधनिष्ठाश्रवणरेवतीपुनर्वसुअनुराधानक्षत्राणिचशस्तानि इदंनिष्क्रमणंनित्यंकाम्यं सूर्यावलोकननिष्क्रमणयोर्नांदीश्राद्धंकृताकृतं ॥**

तिसऱ्या मासांत मुलाला सूर्यावलोकन ( सूर्याचें दर्शन ) करावें. चवथ्या मासांत किंवा अन्नप्राशनकालीं निष्क्रमण ( मुलास घराबाहेर न्यावें तें ) करावें. त्याविषयीं मुहूर्त—" शुक्लपक्ष शुभ होय. शेवटचे पांच दिवस वर्ज्य करून कृष्णपक्षहि शुभ होय. रिक्ता, षष्ठी, अष्टमी, अमावास्या, द्वादशी ह्या तिथि वर्ज्य कराव्या." गुरु, शुक्र, बुध हे वार शुभ होत. अश्विनी, रोहिणी, मृग, पुष्य, तीन उत्तरा, हस्त, धनिष्ठा, श्रवण, रेवती, पुनर्वसु, अनुराधा, हीं नक्षत्रें शुभ होत. हें निष्क्रमण नित्य व काम्य असें आहे. सूर्यावलोकन व निष्क्रमण यांचे ठिकाणीं नांदीश्राद्ध कृताकृत ( करावें किंवा न करावें ) असें आहे.

---

**अथभूम्युपवेशनकालःपंचममासेनिष्क्रमोक्ततिथ्यादौभौमबलेसतिभूम्युपवेशनंकार्यं ॥**

## आतां यानंतर भूम्युपवेशनकाल ह्मणजे बालकाला भूमीवर ठेवणें त्याचा काल सांगतों.

पांचव्या मासीं; निष्क्रमणाला उक्त जीं तिथि, वार, नक्षत्रें त्या दिवसीं; भौमबल ( मंगळाचें बल ) असतां; भूमीवर बालकाला ठेवावें.

---

**अथान्नप्राशनकालः षष्ठेष्टमेदशमेद्वादशेवामासेपूर्णेवत्सरेवापुंसोन्नप्राशनं पंचमसप्तम नवममासेषुस्त्रीणां द्वितीयाचतृतीयाचपंचमीसप्तमीतथा त्रयोदशीचदशमीप्राशनेतिथयः शुभाः बुधशुक्रगुरुवाराःशुभाः रविचंद्रवारौक्वचित् अश्विनीरोहिणमृगपुनर्वसुपुष्योत्तरात्र यहस्तचित्रास्वात्यनुराधाश्रवणधनिष्ठाशततारकारेवत्यःशुभाः जन्मनक्षत्रमशुभमितिकेचि त् भद्रावैधृतिव्यतीपातगंडातिगंडवज्रशूलपरिघावर्ज्याः विष्णुशिवचंद्रार्कदिक्पालभूमिदि शाब्राह्मणान्संपूज्यमात्रुत्संगगतस्यशिशोःकांचनेकांस्येवापात्रेस्थितंदधिमधुघृतमिश्रंपायसं सुवर्णयुतहस्तेनसमंत्रंप्राशयेत् सूर्यावलोकनादीन्यन्नप्राशनांतानिअन्नप्राशनकालेशिष्टाःसहै वानुतिष्ठंति एतेषांसहप्रयोगसंकल्पादिकंकौस्तुभादौज्ञातव्यं ॥**

## आतां अन्नप्राशनसंस्काराचा काल सांगतों.

सहावा, आठवा, दहावा, बारावा या मासीं अथवा पूर्ण वर्ष झालें असतां त्या कालीं पुरुषाचा अन्नप्राशनसंस्कार करावा. पांचवा, सातवा, नववा या मासीं स्त्रियांचें अन्नप्राशन

करावें. " द्वितीया, तृतीया, पंचमी, सप्तमी, त्रयोदशी आणि दशमी ह्या तिथि अन्नप्राशना-विषयीं शुभ होत." बुधवार, गुरुवार, शुक्रवार, हे वार शुभ होत. रवि, चंद्र हे वार क्वचित् ग्रंथांत शुभ सांगितले आहेत. अश्विनी, रोहिणी, मृग, पुनर्वसु, पुष्य, तीन उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाति, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका आणि रेवती हीं नक्षत्रें शुभ होत. जन्मनक्षत्र अशुभ असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. भद्रा, वैधृति, व्यतीपात, गंड, अतिगंड, वज्र, शूल, परिघ हे योग वर्ज्य करावे. विष्णु, शिव, चंद्र, सूर्य, दिक्पाल, भूमि, दिशा, ब्राह्मण यांची पूजा करून मातेच्या मांडीवर बसलेला अशा बालकाला सुवर्णाच्या पात्रांत किंवा कांस्यपात्रांत दधि, मध, घृत यांहीं मिश्रित असी क्षीर सुवर्णयुक्त हस्तानें घेऊन ती त्या बालकाला मंत्रेंकरून प्राशन करवावी. सूर्यावलोकन इत्यादिकांपासून अन्नप्राशनापर्यंत सर्व कर्में अन्नप्राशनाचे समयीं शिष्ट करितात. ह्यांचे अन्नप्राशनाबरोबर करण्याचे प्रयोग, संकल्प इत्यादिक सर्व विस्तार कौस्तुभ इत्यादिक ग्रंथीं पाहावा.

---

अथान्नप्राशनांतेकर्तव्यं अग्रतोऽथपरिन्यस्यशिल्पवस्तूनिसर्वशः शस्त्राणिचैववस्त्राणित तःपश्येत्तुलक्षणं प्रथमंयत्स्पृशेद्बालःपुस्तकादिस्वयंतदा जीविकातस्यबालस्यतेनैवतुभविष्यति अन्नप्राशनांतसंस्कारेषुमलमासगुरुशुक्रास्तादिदोषोनास्तिइत्युक्तंतच्छुद्धकालेष्वसंभवेज्ञेयं ते नषष्ठादिमासेअस्तादिदोषसत्त्वेऽष्टमादिमासेकार्यं इतिसूर्यावलोकननिष्क्रमणभूम्युपवेशना न्नप्राशनानि ॥

**आतां अन्नप्राशन झाल्यानंतर कर्तव्यविधि.**—" बालकाच्या पुढें कलाकौशल्याचे सर्व पदार्थ, शस्त्रें, वस्त्रें, इत्यादिक ठेवून त्यांवरून त्या बालकाचें लक्षण पाहावें. पुढें ठेवलेल्या पदार्थांतून ज्या पदार्थाला बालक स्पर्श करील त्या पदार्थानें त्याची पुढें उपजीविका होईल." अन्नप्राशनपर्यंत जे संस्कार त्यांविषयीं मलमास, गुरुशुक्रांचें अस्तादिक यांचा दोष नाहीं असें जें सांगितलें तें, शुद्धकालीं न झालें असतां जाणावें, यावरून सहाव्या इत्यादिक मासाचे ठिकाणीं अस्तादिक दोष असतील तर अन्नप्राशन, आठवा इत्यादिक जे मास सांगितले त्यांचे ठिकाणीं करावें. याप्रमाणें सूर्यावलोकन, निष्क्रमण, भूम्युपवेशन आणि अन्नप्राशन हे संस्कार समाप्त झाले.

---

**अथकर्णवेधः दशमेद्वादशेवान्हिषोडशेकर्णवेधनं मासेषष्ठेसप्तमेवाअष्टमेदशमेपिवा द्वा** दशेवाततोब्देचप्रथमेवातृतीयके नकर्तव्यंसमेवर्षेस्त्रीपुंसःश्रुतिवेधनं तृतीयादिवत्सरेमासाः कार्तिकेपौषमासेवाचैत्रेवाफाल्गुनेपिवा शुक्लपक्षःशुभःप्रोक्तोजन्ममासोनिषेधितः भद्रायांवि ष्णुशयनेकर्णवेधंविवर्जयेत् तेनकार्तिकमासविधिःशुक्लद्वादश्युत्तरंज्ञेयः केचिन्मीनस्थसूर्येचै त्रंधनुस्थेपौषंमासंवर्जयंति द्वितीयादशमीषष्ठीसप्तमीचत्रयोदशी द्वादशीपंचमीशस्तातृतीया कर्णवेधने चंद्रबुधगुरुशुक्रवाराःपुष्यपुनर्वसुमृगोत्तरात्रयहस्तचित्राश्विनीश्रवणरेवतीधनि ष्ठाःशुभाः विष्णुरुद्रब्रह्मसूर्यचंद्रदिक्पालनासत्यसरस्वतीगोब्राह्मणगुरुपूजांकृत्वालक्तकरसां कितंकर्णंपुंसःपूर्वंदक्षिणंविध्येत्पश्चाद्वामं स्त्रीणांपूर्वंवामं सौवर्णीराजपुत्रस्यराजतीविप्रवैश्य योः शूद्रस्यचायसीसूचीबालकाष्ठांगुलामता कर्णरंध्रेरवेश्छायाप्रविशेद्वर्धयेत्तथा अन्यथाद र्शनेतस्यपूर्वपुण्यविनाशनं इतिकर्णवेधः ॥

## आतां कर्णवेध ( कान टोंचणें ) सांगतों.

" जन्मदिवसापासून दहावा, बारावा किंवा सोळावा ह्या दिवसीं बालकाचे कान टोंचावे. अथवा सहावा, सातवा व आठवा, दहावा, बारावा ह्या मासांमध्यें; किंवा प्रथम वर्षी; तिसऱ्या वर्षी; याप्रमाणें बालकाचे कान टोंचावे. पुत्र व कन्या यांचा कर्णवेध समवर्षी करूं नये. " तिसऱ्या इत्यादिक वर्षी कर्तव्य असल्यास मास सांगतों—कार्तिक, पौष, चैत्र, फाल्गुन या मासांत शुक्लपक्षीं कर्णवेध करावा. जन्ममासांत करूं नये. भद्रा, ( कल्याणी ), विष्णुशयन ( चातुर्मास्य ), यांचे ठिकाणीं कर्णवेध करूं नये. यावरून कार्तिकमासाचा जो विधि सांगितला तो शुद्ध द्वादशीच्या नंतर समजावा. कोणी ग्रंथकार मीनराशीचा सूर्य असतां चैत्रमास, व धनुराशीचा सूर्य असतां पौषमास कर्णवेधाविषयीं वर्ज्य सांगतात. " द्वितीया, दशमी, षष्ठी, सप्तमी, त्रयोदशी, द्वादशी, पंचमी, तृतीया ह्या तिथि कर्णवेधाविषयीं प्रशस्त जाणाव्या. " चंद्र, बुध, गुरु, शुक्र हे वार प्रशस्त. पुष्य, पुनर्वसु, मृग, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, हस्त, चित्रा, अश्विनी, श्रवण, रेवती, धनिष्ठा हीं नक्षत्रें शुभ होत. विष्णु, रुद्र, ब्रह्मा, सूर्य, चंद्र, दिक्पाल, नासत्य ( अश्विनीकुमार ), सरस्वती, गाई, ब्राह्मण, गुरु यांची पूजा करून अळत्याच्या रसानें अंकित असा कान पुरुषाचा पूर्वी उजवा टोंचून नंतर डावा टोंचावा. स्त्रियांचा डावा पूर्वी टोंचावा. बालकाची आठ अंगुळें लांबीची सूची ( सुई ) असावी. ती असी—राजपुत्राच्या कर्णवेधाविषयीं सुवर्णाची, ब्राह्मण व वैश्य यांना रुप्याची, शूद्राला लोखंडाची, याप्रमाणें सुई करावी. कानाला छिद्र ( भोंक ) करणें तें सूर्याचे किरण आंत शिरत इतकें मोठें करावें. कर्णवेधावांचून बालकाला पाहिलें असतां पूर्व पुण्याचा नाश होतो. याप्रमाणें कर्णवेध समाप्त झाला.

---

**अथबालस्यदुष्टदृष्टिदोषादौरक्षाविधिः वासुदेवोजगन्नाथःपूतनातर्जनोहरिः रक्षतुत्वरितोबालंमुंचमुंचकुमारकं कृष्णरक्षशिशुंशंखमधुकैटभमर्दन ॥ प्रातःसंगवमध्यान्हसायान्हेषुचसंध्ययोः महानिशिसदारक्षकंसारिष्टनिषूदन यद्गोरजःपिशाचांश्चग्रहान्मातृग्रहानपि बालग्रहान्विशेषेणछिंधिछिंधिमहाभयान् त्राहित्राहिहरेनित्यंत्वद्रक्षाभूषितंशिशुं इतिभस्माभिमंत्र्यैवभूषयेत्तेनभस्मना शिरोललाटाद्यंगेषुरक्षांकुर्याद्यथाविधिइति प्रयोगसागरे रक्षरक्षमहादेवनीलग्रीवजटाधर ग्रहैस्तुसहितोरक्षमुंचमुंचकुमारकं अमुंमंत्रंभूर्जपत्रेविलिख्यतत्पत्रंभुजेबध्नीयात् बालरोदनपरिहारार्थयंत्रमुक्तंमयूखे षडस्रमध्येऱ्हींकारस्तन्मध्येशिशोर्नामविलिख्य षट्कोणेषु ॐलुलुवस्वाहेतिमंत्रषडक्षराणिविलिख्यतद्बहिर्नेमिवद्वृत्तद्वयंविलिख्यतद्बहिरधोमुखैरर्धचंद्रैरावेष्ट्यपंचोपचारैःसंपूज्यबालहस्तेबध्नीयादिति बालग्रहशांत्यादिकंबालग्रहस्तवश्चशांतिकमलाकरशांतिमयूखयोर्द्रष्टव्यं ॥**

## आतां बालकाला दुष्टदृष्टिदोषादिक झालें असतां त्याचा रक्षाविधि सांगतों.

बालकाला कोणा दुष्टाची दृष्टि लागली असतां विभूत अभिमंत्रून त्याला लावावी. अ-

भिमंत्रणाचा मंत्र—" **वासुदेवो जगन्नाथः पूतनातर्जनो हरिः ॥ रक्षतु त्वरितो बालं मुंच मुंच कुमारकं ॥ कृष्ण रक्ष शिशुं शंखमधुकैटभमर्दन ॥ प्रातःसंगवमध्यान्हसायान्हेषु च संध्ययोः ॥ महानिशि सदा रक्ष कंसारिष्टनिषूदन ॥ यद्गोरजःपिशाचांश्च ग्रहान् मातृग्रहानपि ॥ बालग्रहान् विशेषेण छिंधि छिंधि महाभयान् ॥ त्राहि त्राहि हरे नित्यं त्वद्रक्षाभूषितं शिशुं,**" "ह्या मंत्रांनीं भस्म अभिमंत्रण करून त्या भस्मेंकरून बालकाला भूषित करावें, व मस्तक, कपाळ, इत्यादिक अवयवांला तें भस्म यथाविधि लावावें." **प्रयोगसागर** ग्रंथामध्यें दुसरा प्रकार सांगतों—" **रक्ष रक्ष महादेव नीलग्रीव जटाधर ॥ ग्रहैस्तु सहितो रक्ष मुंच मुंच कुमारकं,**" हा मंत्र भूर्जपत्रावर लिहून तें भूर्जपत्र बालकाचे बाहूवर बांधावें. बालक रोदन करीत असेल तर त्याच्या परिहाराविषयीं मयूखग्रंथीं यंत्र सांगितलें आहे. तें असें;—सहा कोनांच्या आकृतीचें यंत्र काढून त्याच्या सहा कोनांचे मध्यभागीं 'न्हीं' हें अक्षर लिहून यंत्राच्या मध्यभागीं मुलाचें नांव लिहून सहा कोनांमध्यें ॐ "लुलुवस्वाहा" ह्या मंत्राचीं सहा अक्षरें ( दरएक कोनीं एक अक्षर याप्रमाणें ) लिहून त्याच्या बाह्यप्रदेशीं रथाच्या चाकाच्या प्रांतभागासारखीं दोन वर्तुळें लिहून त्याच्या बाह्यप्रदेशीं अधोमुख असे अर्ध चंद्र काढावे, नंतर गंधादिक पांच उपचारांनीं यंत्राची पूजा करून बालकाच्या हाताला तें यंत्र बांधावें. बालग्रहांची शांति इत्यादिक, व बालग्रहांचीं स्तोत्रें इत्यादिक विधि **शांतिकमलाकर, शांतिमयूख** ह्या ग्रंथांत पाहावे.

---

**अथवर्धापनविधिः सवर्षपर्यंतंप्रतिमासंजन्मतिथौकार्यः वर्षोत्तरंप्रत्यब्दंजन्मतिथौकार्यः तिथिद्वैधेयत्रजन्मर्क्षयोगःसाग्राह्या दिनद्वयेजन्मनक्षत्रयोगसत्त्वासत्त्वयोरौदयिकीद्विमुहूर्ताधिकाग्राह्या द्विमुहूर्तन्यूनत्वेपूर्वा जन्ममासस्यअधिमासत्वेशुद्धमासेप्रत्याब्दिकवर्धापनविधिर्नत्वधिके ॥**

## आतां वर्धापनाचा ( वाढदिवसाचा ) विधि सांगतों.

ज्या दिवशीं जन्म झालें त्या दिवसाला वाढदिवस असें ह्मणतात. वाढदिवसाचा विधि करणें तो वर्षपर्यंत दरएक मासीं जन्मतिथीचे दिवशीं करावा. वर्षानंतर दरएक वर्षी करणें तो जन्मतिथीचे दिवशीं करावा. जन्मतिथि दोन दिवस असेल तर ज्या दिवशीं जन्मनक्षत्राचा योग असेल ती घ्यावी. दोन दिवशीं जन्मनक्षत्राचा योग असेल किंवा दोनहि दिवशीं नसेल तर सूर्योदयकालव्यापिनी असी चार घटिकांहून अधिक असेल ती घ्यावी. चार घटिकांहून कमी असल्यास पूर्व दिवसाची घ्यावी. जन्ममास अधिकमास आला असतां शुद्धमासीं दरएक वर्षाचा वर्धापनविधि करावा, अधिक मासांत करूं नये.

---

अथसंक्षेपतःप्रयोगः आयुरभिवृद्ध्यर्थंवर्षवृद्धिकर्मकरिष्यइतिसंकल्प्यतिलोद्वर्तनपूर्वकंतिलोदकेनस्नात्वाकृततिलकादिविधिर्गुरुंसंपूज्याक्षतपुंजेषुदेवताःपूजयेत् तत्रादौकुलदेवतायैनम इतिकुलदेवतामावाह्यजन्मनक्षत्रंपितरौप्रजापतिंभानुंविघ्नेशंमार्कंडेयंव्यासंजामदग्न्यरामं अश्वत्थामानंकृपंबलिंप्रल्हादंहनुमंतंबिभीषणंषष्ठींचनाम्नैवावाह्यपूजयेत् षष्ठ्यैदधिभक्तनैवेद्यः

पूजांतेप्रार्थना चिरंजीवीयथात्वंभोभविष्यामितथामुने रूपवान्वित्तवांश्चैवश्रियायुक्तश्चसर्वदा मार्कंडेयनमस्तेस्तुसप्तकल्पांतजीवन आयुरारोग्यसिद्ध्यर्थंप्रसीदभगवन्मुने चिरंजीवीयथा त्वंतुमुनीनांप्रवरोद्विज कुरुष्वमुनिशार्दूलतथामांचिरजीविनं मार्कंडेयमहाभागसप्तकल्पांत जीवन आयुरारोग्यसिद्ध्यर्थमस्माकंवरदोभव अथषष्ठीप्रार्थना जयदेविजगन्मातर्जगदानंदकारिणि प्रसीदममकल्याणिनमस्तेषष्ठिदेवते त्रैलोक्येयानिभूतानिस्थावराणिचराणिच ब्रह्मविष्णुशिवैःसार्धंरक्षांकुर्वंतुतानिमे ततस्तिलगुडमिश्रंपयःपिबेत् तत्रमंत्रः सतिलंगुडसंमिश्रमंजल्यर्धमितंपयः मार्कंडेयाद्वरंलब्ध्वापिबाम्यायुर्विवृद्धये क्वचित्पूजितषोडशदेवताभ्यो नाम्नाप्रत्येकमष्टाविंशतिसंख्यतिलहोमउक्तः ततोविप्रभोजनंतद्दिनेनियमाः खंडनंनखकेशानांमैथुनाध्वागमौतथा आमिषंकलहंहिंसांवर्षवृद्धौविवर्जयेत् मृतेजन्मनिसंक्रांतौश्राद्धेजन्मदिनेतथा अस्पृश्यस्पर्शनेचैवनस्नायादुष्णवारिणा ॥

## आतां वर्धापनाचा ( वाढदिवसाचा ) संक्षेपानें प्रयोग सांगतों.

"आयुरभिवृद्ध्यर्थं वर्षवृद्धिकर्म करिष्ये," असा संकल्प करून अंगाला तिळ लावून तिलोदकानें स्नान करून कपाळीं गंध लावून नित्यकर्म करावें. नंतर गुरूची पूजा करून तांदुळांचे राशींवर देवतांची पूजा करावी. त्यामध्यें प्रथम "कुलदेवतायै नमः" ह्या नाममंत्रानें कुलदेवतेचें आवाहन करून जन्मनक्षत्र, मातापितर, प्रजापति, भानु, विघ्नेश, मार्कंडेय, व्यास, जामदग्न्य राम, अश्वत्थामा, कृप, बलि, प्रल्हाद, हनुमान्, बिभीषण आणि षष्ठी ह्या देवतांचें नाममंत्रानेंच आवाहन करून पूजा करावी. षष्ठी देवीला दहिंभाताचा नैवेद्य अर्पण करावा. पूजा झाल्यानंतर प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र— "चिरंजीवी यथा त्वं भो भविष्यामि तथा मुने ॥ रूपवान् वित्तवांश्चैव श्रियायुक्तश्च सर्वदा ॥ मार्कंडेय नमस्तेस्तु सप्तकल्पांतजीवन ॥ आयुरारोग्यसिद्ध्यर्थं प्रसीद भगवन् मुने ॥ चिरंजीवी यथा त्वं तु मुनीनां प्रवरो द्विज ॥ कुरुष्व मुनिशार्दूल तथा मां चिरजीविनं ॥ मार्कंडेय महाभाग सप्तकल्पांतजीवन ॥ आयुरारोग्यसिद्ध्यर्थमस्माकं वरदो भव." याप्रमाणें प्रार्थना करून षष्ठीदेवीची प्रार्थना करावी. प्रार्थनामंत्र—"जय देवि जगन्मातर्जगदानंदकारिणि ॥ प्रसीद मम कल्याणि नमस्ते षष्ठि देवते ॥ त्रैलोक्ये यानि भूतानि स्थावराणि चराणि च ॥ ब्रह्मविष्णुशिवैः सार्धं रक्षां कुर्वंतु तानि मे." तदनंतर तिळ, गूळ यांहीं मिश्रित असें दुग्ध प्राशन करावें. दुग्धप्राशनाचा मंत्र—"सतिलं गुडसंमिश्रमंजल्यर्धमितं पयः ॥ मार्कंडेयाद्वरं लब्ध्वा पिबाम्यायुर्विवृद्धये." क्वचित् ग्रंथामध्यें, पूजा केलेल्या ज्या सोळा देवता त्यांच्या उद्देशानें नाममंत्रेंकरून दरएक देवतेला अठ्ठावीस याप्रमाणें तिळांचा होम करावा असें सांगितलें आहे. तदनंतर ब्राह्मणांला भोजन घालावें. त्या दिवसीं नियम पाळावे ते—"नखें, व केश यांचें छेदन, मैथुन, प्रयाण, मांसभक्षण, कलह, हिंसा हे वर्धापन दिवसीं वर्ज्य करावे. मृत व जन्म आणि संक्रांति, श्राद्ध, जन्मदिवस, स्पर्शाला अयोग्य अशाचा स्पर्श, यांतील कोणतेंही निमित्त असतां उष्णोदकानें स्नान करूं नये.

---

अथचौलं जन्मतोगर्भतोवाब्देप्रथमेथद्वितीयके तृतीयेपंचमेचापिचौलकर्मप्रशस्यते यद्वा

सहोपनीत्यात्रकुलाचाराद्व्यवस्थितिः माघफाल्गुनवैशाखज्येष्ठेमासिशुभंस्मृतं जन्ममासेधिमासेनज्येष्ठेज्येष्ठसूनोभवेत् शुक्लपक्षःशुभःप्रोक्तःकृष्णश्चांत्यत्रिकंविना द्वितीयाथतृतीयाचपंचमीसप्तमीशुभा दशम्येकादशीवापित्रयोदश्यपिशस्यते रविभौमार्किशनयोवाराविप्रादिवर्णतः गुरुशुक्रबुधाःशुक्लेसोमःसर्वेशुभावहाः अश्विनीमृगपुनर्वसुपुष्यहस्तचित्रास्वातीज्येष्ठाश्रवणधनिष्ठाशततारकारेवत्यःशुभाः क्षौरप्रयाणभैषज्येजन्मर्क्षंवर्जयेत्सदा आयुःक्षयोनुराधा त्रित्र्युत्तरारोहिणीमघे सिंहस्थेगुरौचौलादिशुभकर्मनकार्यं सूनोर्मातरिगर्भिण्यांचूडाकर्मनकारयेत् पंचमाब्दात्प्रागूर्ध्वंतुगर्भिण्यामपिकारयेत् सहोपनीत्याकुर्याच्चेत्तदादोषोनविद्यते पृथक्चूडाकर्मपृथगुपनयनंचमातरिगर्भिण्यांनकार्यं उभयोःसहानुष्ठानेतुनदोषः गर्भिण्यामपि पंचममासपर्यंतंनदोषः पंचममासादधःकुर्यादतऊर्ध्वंनकारयेदित्युक्तेः ज्वरितस्यचौलादिमंगलंनकार्यं विवाहव्रतचूडासुमातायदिरजस्वला तस्याःशुद्धेःपरंकार्यंमंगलंमनुरब्रवीत् नांदीश्राद्धोत्तरंरजस्वलायांशांतिंकृत्वाकार्यं केचित्तुमुहूर्तांतराभावेप्रारंभात्प्रागपिरजोदोषेश्रीपूजनादिविधिनाशांतिंकृत्वाकार्यमित्याहुः मातुलपितृव्यादौकर्तरितत्पत्न्यांरजस्वलायामपिमंगलंनेतिसिंधुः त्रिपुरुषात्मककुलेषण्मासमध्येमौंजीविवाहरूपमंगलोत्तरंमुंडनाख्यंचूडाकर्मादिनकार्यं संकटेतुअब्दभेदेकार्यं चतुःपुरुषपर्यंतंकुलेसपिंडीकरणमासिकश्राद्धांतप्रेतकर्मसमाप्तेः प्राक् चूडाकर्मादिकमाभ्युदयिकंकर्मनकार्यं एकमातृजयोरेकवत्सरेपत्ययोर्द्वयोः नसंस्कारःसमानःस्यान्मातृभेदेविधीयते प्रारंभोत्तरंसूतकप्राप्तौकूष्मांडीभिर्ऋग्भिर्घृतंहुत्वागांदत्वाचूडोपनयनोद्वाहनादिकमाचरेत् अत्रविशेषोविवाहप्रकरणेवक्ष्यते मध्येमुख्याएकाशिखाअन्याश्चपार्श्वादिभागेष्वितियथाकुलाचारंप्रवरसंख्ययाशिखाश्चूडासमयेकार्याः उपनयनकालेमध्यशिखेतरशिखानांवपनंकृत्वामध्यभागेएवोपनयनोत्तरंशिखाधार्या चौलकर्मणिजातकर्मणिचभोजने सांतपनकृच्छ्रंप्रायश्चित्तं अन्येषुसंस्कारेषुउपवासेनशुद्धिः चूडांताःसर्वेसंस्काराःस्त्रीणाममंत्रकाःकार्याः होमस्तुसमंत्रकः होमोप्यमंत्रकःकार्योनवाकार्यइतिवृत्तिकृदादिमतं एवंशूद्रस्याप्यमंत्रकंचौलं इदानींशिष्टेषुस्त्रीणांचूडादिसंस्कारकरणंनदृश्यते विवाहकालेचूडादिलोपप्रायश्चित्तमात्रंकुर्वंति चौलोत्तरंमासत्रयपर्यंतंसपिंडैःपिंडदानंतिलतर्पणंचनकार्यं महालयेगयायांपित्रोःप्रत्यब्दश्राद्धेचपिंडदानादिकार्यं ॥

## आतां चौलसंस्कार सांगतों.

" जन्मापासून किंवा गर्भापासून पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या, पांचव्या ह्या वर्षी चौलसंस्कार करावा. अथवा मौंजीबरोबर करावा. याविषयीं जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें व्यवस्था जाणावी. माघ, फाल्गुन, वैशाख, ज्येष्ठ ह्या मासांत चौलसंस्कार शुभ होय. जन्ममास, अधिकमास यांचे ठिकाणीं चौलकर्म करूं नये, आणि ज्येष्ठमासांत ज्येष्ठ पुत्राचें चौलकर्म करूं नये. शुक्लपक्ष शुभ होय. शेवटचे पांच दिवस वर्ज्य करून कृष्णपक्षहि शुभ होय. द्वितीया, तृतीया, पंचमी, सप्तमी, दशमी, एकादशी, त्रयोदशी ह्या तिथि प्रशस्त होत. रवि, मंगळ, शनि, शनि, हे वार क्रमेंकरून ब्राह्मणादिक वर्णांला प्रशस्त होत, ह्मणजे ब्राह्मणाला रविवार, क्षत्रियाला मंगळवार, वैश्याला शनिवार, शूद्राला शनिवार. गुरु, शुक्र, बुध हे वार

सर्वांला शुभ होत. शुक्लपक्षामध्यें सोमवार शुभ होय." अश्विनी, मृग, पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, स्वाती, ज्येष्ठा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, रेवती, हीं नक्षत्रें शुभ होत. "क्षौर कर्म, प्रयाण, औषधसेवन," यांविषयीं जन्मनक्षत्र सर्वदा वर्ज्य करावें. "अनुराधा, कृत्तिका, तीन उत्तरा, रोहिणी, मघा या नक्षत्रीं चौलकर्म केलें असतां आयुष्याचा क्षय होतो." सिंहींचा गुरु असतां चौलादिक शुभ कर्में करूं नयेत. ज्याचें चौल करावयाचें त्याची माता गर्भिणी असून त्या पुत्राचें वय पांच वर्षांचे आंत असेल तर चौल करूं नये, पांच वर्षांपेक्षां वय अधिक असल्यास माता गर्भिणी असली तथापि चौल करावें. मौंजीबरोबर केलें असतां दोष नाहीं. चौल कर्म व मौंजी हे संस्कार माता गर्भिणी असतां निरनिराळे करूं नयेत. दोन बरोबर केले असतां दोष नाहीं. गर्भिणी असेल तथापि पांचव्या महिन्यापर्यंत दोष नाहीं. कारण, "पांचव्या महिन्याच्या पूर्वीं करावें, पांचव्या महिन्यानंतर करूं नये," असें वचन आहे. ज्वरानें जो युक्त अशाचें चौलादिक मंगल कार्य करूं नये. "विवाह, मौंजी, चौल हे संस्कार कर्तव्य असतां माता रजस्वला होईल तर तिची शुद्धि झाल्यानंतर मंगलकार्य करावें असें मनु सांगतो." नांदीश्राद्ध झाल्यानंतर रजस्वला होईल तर शांति करून मंगलकार्य करावें. कोणी ग्रंथकार तर, दुसरा मुहूर्त न मिळेल तर प्रारंभाच्या पूर्वींहि रजस्वला झाली असतां श्रीपूजनादिक विधीनें शांति करून मंगलकार्य करावें असें ह्मणतात. मातुळ, चुलता इत्यादिक कर्ता असेल आणि त्याची स्त्री रजस्वला होईल तथापि मंगल करूं नये असें निर्णयसिंधु ग्रंथांत सांगितलें आहे. तीन पुरुषरूप कुळामध्यें मौंजी व विवाहरूप मंगलकार्य झाल्यानंतर सहा महिन्यांपर्यंत मुंडन नांवाचें, चौलकर्म इत्यादिक कर्म करूं नये. संकट असेल तर वर्षभेदेंकरून करावें, ह्मणजे फाल्गुनांत विवाह झाला असतां चैत्रांत चौलादिक करावें. चार पुरुषांपर्यंत जें कुळ त्यामध्यें सपिंडीकरण, मासिक श्राद्धें हीं कर्में आहेत शेवट ज्याचा असें जें प्रेतकर्म त्याची समाप्ति होण्याचे पूर्वीं चौलकर्मादिक मांगलिक कर्म करूं नये. "एका मातेपासून झालेले असे दोन सोदर भ्राते किंवा बहिणी यांचा समान संस्कार ( मुंज, मुंज; विवाह, विवाह ) एका वर्षांत करूं नये, माता निराळी असतां करावा." प्रारंभ झाल्यानंतर आशौच प्राप्त झालें असतां कूष्मांडी ऋचांनीं घृताचा होम करून गोप्रदान देऊन चौल, मौंजी, विवाह इत्यादिक करावें. याविषयीं विशेष निर्णय आहे तो विवाहप्रकरणीं सांगेन. मध्यभागीं मुख्य एक शिखा ( शेंडी ) ठेवून बाकी शिखा बाजूचे भागांचे ठिकाणीं, याप्रमाणें जसा कुलाचार असेल त्याप्रमाणें प्रवरांच्या संख्येनें, ह्मणजे तीन प्रवरांचे असतील तर तीन, पांचप्रवरी असल्यास पांच, याप्रमाणें शिखा चौलकर्मसमयीं ठेवाव्या. मौंजीच्या समयीं मध्यशिखा ठेवून बाकीच्या सर्व शिखा काढून टाकाव्या आणि मौंजीनंतर मध्यभागींच शिखा धारण करावी. चौल, जातकर्म, ह्या संस्कारीं भोजन केलें असतां सांतपनकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. इतर संस्कारीं भोजन केलें असतां एका उपोषणानें शुद्धि होते. जातकर्मापासून चौलापर्यंत सर्व संस्कार स्त्रियांचे अमंत्रक करावे, होम मात्र समंत्रक करावा. होमहि अमंत्रक करावा किंवा करूं नये, असें वृत्तिकर्ता इत्यादिकांचें मत आहे. याप्रमाणें शूद्राचेंहि चौलकर्म अमंत्रक करावें. विद्यमानकालीं शिष्ट जनांमध्यें, स्त्रियांचे

चौल इत्यादिक संस्कार करणें दृष्टीस पडत नाहीं. विवाहकालीं चौलादिक संस्कारांच्या लो-पांचें प्रायश्चित्त मात्र करितात. चौल केल्यानंतर सपिंडांनीं तीन महिन्यांपर्यंत पिंडदान, तिलतर्पण हीं करूं नयेत. महालय, गयाश्राद्ध, मातापितरांचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध यांमध्यें पिंडदान इत्यादिक करावें.

---

अथविद्यारंभः पंचमेवर्षेअक्षरलेखनारंभउत्तरायणेकार्यः अत्रकुंभस्थःसूर्योवर्ज्यःशुक्लपक्षःशुभःप्रोक्तःकृष्णश्चांत्यत्रिकंविना द्वितीयातृतीयापंचमीदशम्येकादशीद्वादशीत्रयोदश्यः श्रेष्ठाः अश्विनीमृगार्द्रापुनर्वसुपुष्यहस्तचित्रास्वात्यनुराधाश्रवणधनिष्ठाशततारकारेवत्योभौमशनिभिन्नवाराश्चशुभाः विघ्नेशंलक्ष्मीनारायणौसरस्वतींस्ववेदंसूत्रकारंचपूजयित्वागुरुंब्राह्मणान्धात्रींचसंपूज्यनत्वासर्वांस्त्रिःप्रदक्षिणीकृत्यप्रणवपूर्वकमक्षरमारभेत् ततोगुरुंनत्वादेवताविसर्जयेत् ततोत्रभुवनमातःसर्ववाङ्मयरूपेणागच्छागच्छेतिसरस्वत्यावाहनमंत्रःप्रणवेनषोडशोपचारार्पणं ॥

## आतां विद्येचा आरंभकाल सांगतों.

पांचव्या वर्षी उत्तरायणसमयीं अक्षर लिहिण्याचा प्रारंभ करावा. ह्या अक्षरलेखनाविषयीं कुंभींचा सूर्य वर्ज्य करावा. शुक्लपक्ष शुभ होय. शेवटचे पांच दिवस खेरीज करून कृष्णपक्षहि शुभ होय. द्वितीया, तृतीया, पंचमी, दशमी, एकादशी, द्वादशी आणि त्रयोदशी, ह्या तिथि श्रेष्ठ होत. अश्विनी, मृग, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, स्वाती, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, रेवती हीं नक्षत्रें शुभ होत. मंगळ, शनि, हे वार वर्ज्य करून अन्य वार शुभ होत. विघ्नेश, लक्ष्मी, नारायण, सरस्वती, आपला वेद आणि सूत्रकार, यांची पूजा करून गुरु, ब्राह्मण, उपमाता (दाई) यांची पूजा करून नमस्कार करून सर्वांला तीन प्रदक्षिणा करून ॐकार पूर्वी लिहून नंतर दुसरीं अक्षरें लिहिण्यास आरंभ करावा. नंतर गुरूला नमस्कार करून देवतांचें विसर्जन करावें. तदनंतर "अत्र भुवनमातः सर्ववाङ्मयरूपेणागच्छागच्छ," ह्या मंत्रानें सरस्वतीचें आवाहन करावें व प्रणवमंत्रानें सोळा उपचार अर्पण करावे.

---

अथानुपनीतधर्माः प्रागुपनयनात्कामचारकामवादकामभक्षाः तेनमूत्रपुरीषोत्सर्गादावाचमनाद्याचारोनास्ति लघुपातकहेतुलशुनपर्युषितोच्छिष्टादिभक्षणेदोषाभावःएवमपेयपानेअनृतावाच्यभाषणेपि महादोषहेतुमांसांत्यजरजस्वलादिस्पृष्टान्नभक्षणेमद्यादिपानेचदोषोस्त्येवरजस्वलादिसंस्पर्शेस्नानमेवकुमारके शिशोरभ्युक्षणंप्रोक्तंबालस्याचमनंस्मृतं तत्रप्रागन्नप्राशनाच्छिशुसंज्ञा ततऊर्ध्वंप्राक्चौलात्त्रिवर्षाद्वाबालसंज्ञा ततआमौंजीबंधात्कुमारसंज्ञा अत्राचमनमितित्रिरुदकपानमेव नतुओष्ठमार्जनादिकल्पइतिज्ञेयं नचानुपनीतोवेदमुच्चारयेत् पित्रोरंत्यक्रियायांत्वनुपनीतेनापिमंत्रोच्चारःकार्यः सचद्वित्रिवर्षयोःकृतचूडस्यैवत्रिवर्षोर्ध्वंत्वकृतचूडस्यापि एतच्चौरसपुत्रविषयं पित्रोरनुपनीतोपिविदध्यादौरसःसुतः और्ध्वदेहिकमन्येतुसंस्कृताःश्राद्धकारकाइतिस्कांदात् बालानामपथ्यंपित्रादिभिर्निवारणीयं तस्मात्सर्वप्रयत्नेनबालानग्रेतुभोजयेत् बालानांक्रीडनदानेस्वर्गसुखं तेषांभोज्यप्रदानेगोदानफलं ॥

## आतां यानंतर मौंजी न झालेला त्याचे धर्म सांगतों.

मौंजी होण्याच्या पूर्वी बालकाला इच्छेस वाटेल त्याप्रमाणें संचार करणें, इच्छेस वाटेल त्याच्याशीं भाषण करणें, पाहिजे तें भक्षण करणें इत्यादिकांविषयीं दोष नाहीं, असें आहे, यावरून लघुशंका, शौचविधि इत्यादिकांविषयीं आचमन करणें, इत्यादिक आचार जो उक्त आहे तो मौंजीच्या पूर्वी नाहीं. अल्पपातकास कारण असीं जीं लसुण, शिळें अन्न, उच्छिष्ट इत्यादिक तीं भक्षण केलीं असतां दोष नाहीं. याप्रमाणें प्राशन करण्यास अयोग्य असा पदार्थ प्राशन केला असतां, अनृत व अवाच्य असें भाषण केलें असतांहि दोष नाहीं. महादोषाला कारण असीं जीं मांस, अंत्यज, रजस्वला इत्यादिक त्यांचा स्पर्श झालेला असें अन्न भक्षण केलें असतां व मद्य इत्यादिक प्राशन केलें असतां दोष आहेच. "रजस्वला इत्यादिकांचा कुमाराला स्पर्श होईल तर कुमारानें स्नानच करावें. शिशूला उदकाचें प्रोक्षण (सिंचन) करावें. बालकानें आचमन करावें." अन्नप्राशनाच्या पूर्वी शिशुसंज्ञा होय. अन्नप्राशनानंतर व चौलाच्या पूर्वी, किंवा तीन वर्षांच्या पूर्वी बालसंज्ञा होय. चौलानंतर मौंजीबंधन होईपर्यंत कुमारसंज्ञा होय. एथें आचमन करावें ह्मणजे तीन वेळ उदकप्राशनच करावें, ओष्ठमार्जनादिक पक्ष नाहीं, असें जाणावें. मौंजी न झालेला त्यानें वेदाचा उच्चार करूं नये. मातापितरांच्या अंत्यक्रियेचे ठिकाणीं तर मौंजी न झालेला असेल तथापि त्यानेंहि मंत्राचा उच्चार करावा. तो मंत्रोच्चाराचा अधिकार, दोन तीन वर्षांमध्यें ज्याचें चौल झालें असेल त्यालाच आहे. तीन वर्षांनंतर तर चौलकर्म न झालेला अशालाहि आहे. मौंजी न झालेला अशा पुत्रानेंहि मातापितरांच्या क्रियेच्या निमित्त मंत्रोच्चार करावा असें जें सांगितलें तें औरसपुत्राविषयीं जाणावें. कारण, "औरसपुत्र मौंजी न झालेला असा जरी आहे तथापि त्यानेंहि मातापितरांची अंत्यक्रिया करावी, इतर क्रिया करणारे असतील तर मौंजी झालेले असे ते श्राद्धाधिकारी होतात," असें स्कंदपुराणस्थ वचन आहे. बालांच्या अपथ्याचें (निंद्य गोष्टीचें) निवारण पिता इत्यादिकांनीं करावें. "तस्मात् सर्व प्रयत्नेंकरून पहिल्यानें बालांस भोजन घालावें," बालकांस खेळणीं दिलीं असतां स्वर्गसुख मिळतें. बालकांस भक्षण करण्याचे पदार्थ दिले असतां गोदानाचें फळ मिळतें.

---

अथोपनयनं उपनयनंनाम आचार्यसमीपनयनांगकोगायत्र्युपदेशप्रधानकःकर्मविशेषकः उपनयनपदस्ययोगरूढत्वात् तत्राधिकारिणः पितैवोपनयेत्पुत्रंतदभावेपितुःपिता तदभावेपितुर्भ्रातातदभावेतुसोदरः तदभावेसगोत्रसपिंडाः तदभावेमातुलादयोऽसगोत्रसपिंडाः तदभावे असपिंडसगोत्रजाः एतेचकुमारापेक्षयावयोज्येष्ठाविवक्षिताः कनिष्ठकर्तृकोपनयनस्यनिषिद्धत्वात् सर्वाभावेश्रोत्रियः जन्मनाब्राह्मणोज्ञेयःसंस्कारैर्द्विजउच्यते विद्यत्वाच्चापिविप्रत्वंत्रिभिःश्रोत्रियउच्यते कृच्छ्रत्रयंचोपनेतात्रीन्कृच्छ्रांश्चबटुश्चरेत् गायत्र्याद्वादशाधिकसहस्रजपश्चोपनयनेत्राधिकारसिध्यर्थंकार्यः केचिद्द्वादशसाहस्रींजपंति ॥

## आतां उपनयन (मुंजी) संस्कार सांगतों.

उपनयन ह्मणजे, कुमाराला आचार्याजवळ नेणें हें अंगरूप कर्म व गायत्रीमंत्राचा उप-

देश करणें हें प्रधानकर्म, या दोहोंनीं युक्त जें विशेष कर्म त्याला उपनयन असें ह्मणतात. कारण, 'उपनयन' हा शब्द योगरूढ आहे. उपनयन संस्कार करण्याविषयीं अधिकारी सांगतों.—"पित्यानेंच उपनयन करावें. पिता नसेल तर पित्याचे पित्यानें करावें. पित्याचा पिता नसल्यास चुलत्यानें करावें. चुलता नसेल तर सोदर भ्रात्यानें करावें. सोदर भ्राता नसेल तर सगोत्र असून सपिंड असतील त्यांनीं करावें. सगोत्र सपिंड नसतील तर मातुळ इत्यादिक जे असगोत्र सपिंड त्यांनीं करावें. मातुळ इत्यादिक नसतील तेव्हां असपिंड सगोत्रज जे त्यांनीं करावें. हे सर्व जे उपनयन करण्याविषयीं अधिकारी सांगितले ते कुमारापेक्षां वयानें ज्येष्ठ असावेत. कारण, कुमारापेक्षां जो वयानें कनिष्ठ त्यानें केलेलें उपनयन निषिद्ध आहे. पूर्वी सांगितले जे अधिकारी यांतून कोणीहि नसेल तर श्रोत्रियानें करावें. "जन्मेंकरून ब्राह्मण जाणावा; ज्या ब्राह्मणाचे संस्कार झाले तो द्विज होय; वेदाध्ययन केल्यानें विप्र होय; जन्मानें ब्राह्मण असून संस्कार झालेला व वेदाध्ययन केलेला असा जो तो श्रोत्रिय होय." "उपनयन करणारानें तीन कृच्छ्र प्रायश्चित्त करावें." कुमारानें तीन कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. उपनयनकर्त्यानें उपनयन करण्याचा अधिकार प्राप्त होण्याकरितां गायत्रीमंत्राचा १,०१२ जप करावा. कितीएक १२,००० जप करितात.

---

अथोपनयनकालः गर्भतोजन्मतोवापंचमेष्टमेवावर्षेब्राह्मणस्योपनयनं एकादशेद्वादशेवाक्षत्रियस्य द्वादशेषोडशेवावैश्यस्य षष्ठेतुधनकामस्यविद्याकामस्यसप्तमे अष्टमेसर्वकामस्यनवमेकांतिमिच्छतः केचित्तुविप्रस्यषष्ठंनमन्यंते आषोडशादाद्वाविंशादाचतुर्विंशाच्चवर्षात्ब्राह्मणादेर्गौणकालः अत्रगर्भादिःसंख्या तथाचजन्मतःपंचदशवर्षपर्यंतंविप्रस्यनविशेषतःप्रायश्चित्तं षोडशवर्षेसशिखवपनमेकविंशतिरात्रंयावकाशनमंतेसप्तब्राह्मणभोजनमितिप्रायश्चित्तं सप्तदशादिवर्षेषुकृच्छ्रत्रयादिप्रायश्चित्तपूर्वकमुपनयनंबोध्यं विप्रक्षत्रिययोरुत्तरायणेमौंजीबंधः वैश्यस्यदक्षिणायनेपि वसंतेब्राह्मणमुपनयीतग्रीष्मेराजन्यंशरदिवैश्यं माघादिज्येष्ठांतकपंचमासाःसाधारणावासकलद्विजानामितिगर्गोक्तेर्वसंतालाभेशिशिरग्रीष्मावपिग्राह्यौ वसंतविधिनोत्तरायणादिविधेःसंकोचायोगात् एवंमाघादिमासपंचकनियमात्पौषाषाढयोःसत्युत्तरायणेउपनयनंनकार्यं तत्रापिमीनार्कमारभ्ययावन्मिथुनप्रवेशंप्रशस्तःकालःमीनमेषयोस्तुप्रशस्ततरः मकरकुंभस्थेर्केमध्यमं मीनमेषस्थेउत्तमं वृषभमिथुनस्थेऽधममुपनयनमित्यभिधानात्मीनार्कविशिष्टश्चैत्रोऽनिष्टबृहस्पत्यादिबहुविधदोषापवादकतयाप्रशस्ततमः जीवभार्गवयोरस्तेसिंहस्थेदेवतागुरौ चंद्रसूर्येदुर्बलेपिगोचरेनिष्टदेगुरौ मेखलाबंधनंकार्यंचैत्रेमीनगतेरवावित्यर्थकस्मृतेः अत्रगुरुशुक्रास्तदोषापवादोऽतिमहासंकटविषयत्वान्नकथनीयः मीनार्केचैत्रेजन्ममासनक्षत्रदोषोनास्तिजन्ममासजन्मनक्षत्रजन्मतिथिजन्मलग्नजन्मराशिलग्नेषुविप्राणामुपनयनंनदोषाय क्षत्रियवैश्ययोरप्रथमगर्भेदोषोन ज्येष्ठापत्यस्यज्येष्ठमासेमंगलंन शुक्लपक्षःशुभःप्रोक्तःकृष्णश्चांत्यत्रिकंविनेतिगुरूक्तेःकृष्णपक्षेदशमीपर्यंतंसंकटेपिकृष्णपक्षेपंचमीपर्यंतमेवकुर्वंति ॥

## आतां यानंतर मौंजीचा काल सांगतों.

गर्भापासून किंवा जन्मापासून पांचव्या किंवा आठव्या वर्षी ब्राह्मणाची मौंजी करावी. अकराव्या वर्षी किंवा बाराव्या वर्षी क्षत्रियाची मौंजी करावी. बाराव्या वर्षी किंवा सोळाव्या वर्षी वैश्याची मौंजी करावी. "धनाची इच्छा करणारा त्याची साहाव्या वर्षी, विद्येची इच्छा करणारा त्याची सातव्या वर्षी, सर्वांची इच्छा करणारा त्याची आठव्या वर्षी, कांतीची इच्छा करणारा त्याची नवव्या वर्षी मौंजी करावी. कोणी ग्रंथकार सहावें वर्ष ब्राह्मणाला उक्त नाहीं असें मानतात. गौणकाल सांगतों–सोळा वर्षेपर्यंत ब्राह्मणाचा, बेवीस वर्षेपर्यंत क्षत्रियाचा, चोवीस वर्षेपर्यंत वैश्याचा, याप्रमाणें गौणकाल जाणावा. ह्या गौणकालाविषयीं गर्भादिक ( गर्भकालापासून ) संख्या घ्यावी. तसेंच जन्मापासून पंधरा वर्षेपर्यंत ( मुंज न झाल्यास ) ब्राह्मणाला विशेषेंकरून प्रायश्चित्त नाहीं. सोळावें वर्ष असतां, शिखेसुद्धां वपन करून एकवीस रात्रीपर्यंत यव भक्षण करावे, नंतर शेवटीं सात ब्राह्मणांला भोजन द्यावें, हें प्रायश्चित्त करावें. सतराव्या इत्यादिक वर्षी असतां तीन कृच्छ्र इत्यादिक प्रायश्चित्त पूर्वी करून नंतर मौंजी करावी. याप्रमाणें निर्णय जाणावा. ब्राह्मण, आणि क्षत्रिय यांची मौंजी उत्तरायणांत करावी. वैश्याची दक्षिणायनांतहि करावी. "ब्राह्मणाची मौंजी वसंतऋतूंत करावी, क्षत्रियाची ग्रीष्मऋतूंत, वैश्याची शरदृतूंत करावी." "माघापासून ज्येष्ठपर्यंत पांच महिने साधारणपणानें सर्व द्विजांला उक्त होत," असें गर्गऋषीचें वचन आहे याकरितां वसंत न मिळेल तर शिशिर ऋतु व ग्रीष्म ऋतु हेहि ग्रहण करावे. कारण वसंतऋतूमध्यें ब्राह्मणाची मौंजी करावी असा जो वसंतविधि सांगितला येणेंकरून उत्तरायण इत्यादिक विधींचा संकोच घडत नाहीं. याप्रमाणें माघ इत्यादिक पांच महिने घ्यावे असा नियम सांगितला. याकरितां पौष मास व आषाढ मास यांचे ठिकाणीं जरी उत्तरायण असलें तथापि मौंजी करूं नये. त्यामध्येंहि मीन राशीचा सूर्य झाल्यापासून मिथुनाचा सूर्य होईपर्यंत जो काल तो प्रशस्त होय. मीनींचा व मेषींचा सूर्य असतां फार प्रशस्त. "मकराचा, व कुंभाचा सूर्य असतां मध्यम, मीनींचा व मेषींचा सूर्य असतां उत्तम, वृषभींचा व मिथुनींचा सूर्य असतां अधम उपनयन," असें वचन आहे याकरितां मीनार्कानें युक्त चैत्र असून त्यामध्यें अनिष्ट बृहस्पति इत्यादिक अनेक प्रकारचे जरी दोष असतील तथापि त्यांविषयीं अपवाद असल्याच्या योगानें तो चैत्र मास फारच प्रशस्त होय. कारण, "गुरुशुक्रांचें अस्त, सिंहस्थ गुरु, चंद्र व सूर्य हे दुर्बल, गोचरींचा गुरु अनिष्ट इत्यादिक दोष असतील, परंतु जर मीनींचा सूर्य असेल तर चैत्रमासांत मौंजी करावी, अशा अर्थाची स्मृति आहे." ह्या मौंजीविषयीं गुरुशुक्रांच्या अस्तदोषाचा जो अपवाद सांगितला तो अति महासंकट असेल तर आहे; याकरितां तो सांगूं नये. चैत्र मासांत मीनींचा सूर्य असल्यास जन्ममास, जन्मनक्षत्र यांचा दोष नाहीं. जन्ममास, जन्मनक्षत्र, जन्मतिथि, जन्मलग्न, जन्मराशि यांचे ठिकाणीं ब्राह्मणाची मौंजी केली असतां दोष नाहीं. क्षत्रिय व वैश्य यांला दुसरा इत्यादि गर्भाविषयीं दोष नाहीं. ज्येष्ठ अपत्याचें ज्येष्ठ मासांत मंगल करूं नये. "शुक्लपक्ष शुभ व शेवटचे पांच दिवस टाकून कृष्णपक्ष शुभ," असें बृहस्पतीचें वचन आहे याकरितां कृष्णपक्षांत दशमी-

पर्यंत, संकट असतां मौंजी करावी. शिष्टजन तर, संकट असलें तथापि कृष्णपक्षांत पंचमी-पर्यंतच मौंजी करितात.

---

अथतिथिविचारः द्वितीयातृतीयापंचमीषष्ठीदशम्येकादशीद्वादश्यःप्रशस्ताः क्वचित्सप्तमीत्रयोदशीकृष्णप्रतिपद्विधिः पुनरुपनयनमूकाद्युपनयनविषयः तिथौसोपपदाख्यायामनध्यायेगलग्रहे अपराण्हेचोपनीतःपुनःसंस्कारमर्हति सिताज्येष्ठेद्वितीयाचआश्विनेदशमीसिता चतुर्थीद्वादशीमाघेएताःसोपपदाः स्मृताः अनध्यायाःपौर्णमासीचतुर्दश्यष्टमीअमाप्रतिपत्सूर्यसंक्रांतिमन्वाद्याश्चयुगादयः कृष्णपक्षेद्वितीयाश्चकार्तिकाषाढफाल्गुने विषुवायनसंक्रांत्योःपक्षिणीअनध्यायइतिपूर्वपरिच्छेदेउक्तं सोपपदानामनध्यायतिथीनांचदिनद्वयेसूर्योदयोत्तरंसूर्यास्तात्पूर्वंचत्रिमुहूर्तसत्त्वेदिनद्वयमनध्यायः शिष्टास्तुप्रतिपच्छेषेघटिकादिमात्रेपित्रतबंधेऽनध्यायंवदंति विषुवायनेतरसंक्रांतिमन्वादियुगादिषुतुप्रथमद्वितीयपरिच्छेदोक्तरीत्यायत्रदिनेसंक्रांतिपुण्यकालोयुगमन्वादिश्राद्धकालश्चतद्दिनेनध्यायः नतुतेषामस्तादौमुहूर्तत्रयेसत्त्वमनध्यायहेतुः त्रयोदश्यादिचत्वारिसप्तम्यादिदिनत्रयं चतुर्थीचैकतःप्रोक्ताअष्टावेतेगलग्रहाः अत्रचतुर्थीनवमीचव्रतकालेत्याज्येतिभाति केचिच्चतुर्थीशेषयुतपंचम्यांव्रतबंधंनकुर्वंतितत्रमूलंमृग्यं नवमीशेषयुतदशम्यांमौंजीनकार्येतिमयूखे अपराण्हस्त्रेधाविभक्तदिनतृतीयांशोव्रतबंधेवर्ज्यः दिनमध्यमभागोमध्यमः प्रथमभागोमुख्यः मन्वादियुगादयोद्वितीयपरिच्छेदेदर्शिताः तत्रोपनयनेचैत्रशुक्लतृतीयायाः मन्वादेर्वैशाखशुक्लतृतीयायायुगादेश्चप्रसक्तिः अन्येषांयुगादिमन्वादितिथीनांप्रसक्तिर्नास्तिअनयोरपवादःसिंधुकौस्तुभादौस्मर्यते याचैत्रवैशाखसितातृतीयामाघस्यसप्तम्यथफाल्गुनस्य कृष्णेद्वितीयोपनयेप्रशस्ताप्रोक्ताभरद्वाजमुनींद्रमुख्यैरिति अत्रमाघसप्तम्यामन्वादेरपवादः पुनरुपनयनादिविषयः फाल्गुनकृष्णद्वितीयायाश्चातुर्मास्यद्वितीयात्वेनानध्यायत्वंप्राप्तंतस्यापवादोयं यत्तुअनध्यायस्यपूर्वेद्युरनध्यायात्परेहनि व्रतारंभंविसर्गंचविद्यारंभंचवर्जयेदितिस्मृत्यंतरं तद्द्वितीयाविध्यनुपपत्त्यागलग्रहत्वेनप्राप्तसप्तमीनवमीत्रयोदशीनिषेधानुवादकमितिभाति अप्राप्तनिषेधकत्वेमन्वादियुगादिसंक्रांत्यादिप्रयुक्तानध्यायेभ्योपिपूर्वपरदिनयोर्निषेधापत्त्या चैत्रशुक्लद्वितीयादेरपिनिषिद्धत्वापातात् नचेष्टापत्तिः शिष्टाचारग्रंथेषुचानुपलंभात् मुहूर्तमार्तंडोक्त्यामाघेशुक्लद्वितीयाकृष्णद्वितीयावैशाखकृष्णद्वितीयाचेत्यनध्यायत्रयमुपनयनेधिकंप्राप्नोति एतदपरेनाद्रियंते बहुग्रंथेषुमूलानुपलंभात् मौंजीप्रकरणेमुहूर्तचिंतामण्यादिग्रंथेषुक्काप्यनुक्तेश्च अतोमार्तंडोक्तानामतिरिक्तानध्यायानामुपनिषत्पाठादिविषयत्वंनतुमौंजीविषयत्वमितियुक्तंभाति तत्रतृतीयाषष्ठीद्वादशीषुप्रदोषसत्त्वेमौंजीनकार्या रात्रेःप्रथमयामेचतुर्थीसार्धयामेसप्तमीयामद्वयेत्रयोदशीचेत्तदाप्रदोषः दिनद्वयेप्रथमयामादिषुचतुर्थ्यादिव्याप्तौपूर्वदिनेप्रदोषोनोत्तरदिनेइतिकौस्तुभे प्रदोषदिनेमंदवारेकृष्णपक्षांत्यत्रिकेचोपनयनेपुनरुपनयनमितिमयूखे एतेनित्यानध्यायाः ॥

## आतां मौंजीविषयीं तिथि कोणत्या घ्याव्या तें सांगतों.

द्वितीया, तृतीया, पंचमी, षष्ठी, दशमी, एकादशी आणि द्वादशी ह्या तिथि प्रशस्त होत.

क्वचित् ग्रंथांत सप्तमी, त्रयोदशी व कृष्णप्रतिपदा ह्या तिथि घेण्याविषयीं सांगितलें आहे; परंतु त्या पुनरुपनयन व मुके इत्यादिकांचें उपनयन यांविषयीं घ्याव्या. "सोपपदा तिथि, अनध्याय, गलग्रह आणि अपराण्हकाल, यांतील कोणत्या एकावर ज्याची मौंजी झाली तो पुनः मौंजीला योग्य होतो." " ज्येष्ठमासांतील शुक्लपक्षींची द्वितीया, आश्विनमासांतील शुक्लपक्षींची दशमी, माघ मासांतील चतुर्थी व द्वादशी ह्या तिथींला सोपपदा असें नांव आहे. " अनध्याय सांगतो—"पौर्णिमा; चतुर्दशी; अष्टमी; अमावास्या; प्रतिपदा; सूर्यसंक्रांति; मन्वादितिथि; युगादितिथि; कार्तिक, आषाढ आणि फाल्गुन या मासांतील कृष्णपक्षींच्या द्वितीया; ह्या तिथि अनध्याय होत. तुला, मेष व अयन ( कर्क, मकर ) संक्रांति यांचा पक्षिणी (बारा प्रहर) अनध्याय असें प्रथमपरिच्छेदांत सांगितलें आहे. सोपपदातिथि; व अनध्यायतिथि ह्या दोन दिवसीं सूर्योदयानंतर व सूर्यास्ताच्या पूर्वी सहा घटिकांपर्यंत असतील तर दोन दिवसपर्यंत अनध्याय जाणावा. शिष्ट जन तर, एक दोन घटिका जरी प्रतिपदा शेष असली तथापि मौंजीविषयीं तो अनध्याय होय असें सांगतात. तुला, मेष, अयन यांहून इतर ज्या संक्रांति; मन्वादि; आणि युगादि यांविषयीं तर प्रथमपरिच्छेदांत सांगितल्या रीतीनें संक्रांतीचा पुण्यकाळ, व युगादि मन्वादि तिथींचा श्राद्धकाळ हीं ज्या दिवसीं येतील त्या दिवसीं अनध्याय जाणावा, त्या (तुला, मेष, अयन ह्यांहून इतर संक्रांति; मन्वादि; युगादि) अस्त इत्यादिक समयीं सहा घटिका असल्या तथापि तो अनध्याय असें समजूं नये. त्रयोदशीपासून प्रतिपदेपर्यंत तिथि ४, व सप्तमी, अष्टमी, नवमी, चतुर्थी ह्या आठ तिथि गलग्रहसंज्ञक होत. एथें चतुर्थी, नवमी ह्या तिथि मौंजीबंधनाविषयीं टाकाव्या असें वाटतें. कितीएक अल्प चतुर्थीनें युक्त अशी जी पंचमी तिचे ठिकाणीं मौंजी करीत नाहींत, परंतु त्याविषयीं मूळ शोध करावा. नवमीशेषयुक्त दशमीचे ठिकाणीं मौंजी करूं नये असें मयूखांत सांगितलें आहे. अपराण्ह ह्मणजे दिवसाचे तीन भाग करून तिसरा भाग जो तो मौंजीविषयीं वर्ज्य करावा. दिवसाचा मध्यमभाग तो मध्यम, प्रथम भाग तो मुख्य होय. मन्वादि, व युगादि दुसऱ्या परिच्छेदांत सांगितल्या आहेत. चैत्रशुक्ल तृतीया ही मन्वादि व वैशाखशुक्ल तृतीया ही युगादि ह्या दोन तिथींची मौंजीविषयीं प्राप्ति आहे, इतर ज्या युगादि मन्वादि तिथि त्यांची प्राप्ति नाहीं. चैत्रशुक्ल तृतीया, व वैशाखशुक्ल तृतीया ह्यांचा अपवाद निर्णयसिंधु, कौस्तुभ इत्यादिक ग्रंथीं सांगतात. " चैत्र व वैशाख या मासांतील शुक्लपक्षींच्या तृतीया, माघमासांतील सप्तमी आणि फाल्गुनमासांतील कृष्णपक्षींची द्वितीया ह्या तिथि मौंजीविषयीं प्रशस्त असें भरद्वाज जे मुनींद्रमुख्य यांनीं सांगितलें. एथें माघमासांतील सप्तमीचा जो अपवाद सांगितला तो पुनरुपनयनाविषयीं आहे. फाल्गुनकृष्ण द्वितीयेला चातुर्मास्याचे द्वितीयेच्या संबंधानें प्राप्त झालें जें अनध्यायत्व त्याचा हा अपवाद समजावा. जी तर " अनध्यायाच्या पूर्वदिवसीं आणि अनध्यायाच्या दुसऱ्या दिवसीं मौंजी, सोडमुंज, विद्यारंभ हीं करूं नयेत," असी दुसरी स्मृति आहे ती तर, द्वितीयेच्या विधीची जी अनुपपत्ति (असिद्धि) तिणेंकरून, गलग्रहाच्या ( गलग्रहतिथींच्या ) योगानें प्राप्त झाला जो सप्तमी, नवमी व त्रयोदशी या तिथींस निषेधाचा अनुवाद ह्मणजे पुनरुक्ति तीस करणारी आहे असें मला वाटतें.

जर कदाचित् हा अपूर्व निषेध मानावा तर मन्वादि, युगादि आणि संक्रांति इत्यादिप्रयुक्त जे अनध्याय त्यांहून जे पूर्व व पर दिवस त्यांसहि निषेध प्राप्त झाल्यानें चैत्रशुक्ल द्वितीयेलाहि निषेध प्राप्त होईल; यास्तव ती इष्टापत्ति नाहीं; कारण, शिष्टाचार ग्रंथांमध्यें तसें मिळत नाहीं. मुहूर्तमार्तंडकाराच्या वचनानें माघमासांतील शुक्लद्वितीया व कृष्णद्वितीया आणि वैशाखकृष्ण द्वितीया हे तीन मौंजीविषयीं अनध्याय अधिक प्राप्त होतात, परंतु इतर ग्रंथकार हे तीन अनध्याय मानीत नाहींत. कारण पुष्कळ ग्रंथांमध्यें आधार मिळत नाहीं. मुहूर्तचिंतामणि इत्यादिक ग्रंथांमध्यें मौंजीप्रकरणीं हे कोठेंहि सांगितले नाहींत. यास्तव मार्तंडामध्यें अधिक जे अनध्याय सांगितले ते उपनिषदें इत्यादिकांच्या पाठाविषयीं होत, मौंजीविषयीं नाहींत, असें मला योग्य वाटतें. त्यामध्यें तृतीया, षष्ठी व द्वादशी ह्या तिथींचे ठायीं प्रदोष असतां मौंजी करूं नये. रात्रीच्या पहिल्या प्रहरीं चतुर्थी, दीड प्रहरामध्यें सप्तमी, आणि दोन प्रहरांमध्यें त्रयोदशी याप्रमाणें तिथि असतां प्रदोष होतो. दोन दिवसीं पहिला प्रहर इत्यादिकांचे ठायीं चतुर्थी इत्यादिक तिथींची व्याप्ति ह्मणजे दोन दिवस रात्रीच्या प्रथमप्रहरीं चतुर्थीची व्याप्ति; दोन दिवस रात्रीच्या दीड प्रहरीं सप्तमीची व्याप्ति, दोन दिवस रात्रीच्या दोन प्रहरीं त्रयोदशीची व्याप्ति असेल तर पूर्व दिवसीं प्रदोष; दुसऱ्या दिवसीं नाहीं, असें कौस्तुभांत सांगितलें आहे. प्रदोषाचा दिवस, शनिवार आणि कृष्णपक्षाचे शेवटचे पांच दिवस ह्या दिवसीं मौंजी केली असतां पुनः मौंजी करावी असें मयूखांत सांगितलें आहे. हे नित्य अनध्याय सांगितले.

---

**अथनैमित्तिकाः विवाहप्रतिष्ठोद्यापनादिष्वासमाप्तेःसगोत्राणामनध्यायइतिस्मृत्यर्थसारोक्तेस्त्रिपुरुषसपिंडेषुब्रह्मयज्ञादिव**र्जनात् मौंजीविवाहादिनिमित्तकमंडपप्रतिष्ठाद्युत्सवसमाप्ति **पर्यंतमुपनयनंनकार्यमितिभाति** विवाहादिमंगलकरणेदोषोन शोभनदिनेचानध्यायइत्युक्तेर्गर्भाधानादिशुभकार्यदिनेएककुलेएकगृहेवाव्रतबंधोनकार्यइतिभाति भूकंपेभूविदारणेवज्रपाते उल्कापातेधूमकेतूत्पत्तौग्रहणेचदशाहंसप्ताहंवाव्रतबंधादिमंगलंनकार्यंकेचित्संकटेत्रिदिनमन **ध्यायमाहुः अकालवृष्टौत्रिरात्रंपक्षिणीवानध्यायः पौषादिचैत्रांतमकालवृष्टिः केचिदार्द्रादि** ज्येष्ठांतसूर्यनक्षत्रादन्यत्राकालवृष्टिरित्याहुः यस्मि**न्देशेयोवर्षाकालस्ततोन्यत्राकालवृष्टिरि** तिसिद्धांतः अतिवृष्टौकरकावृष्टौरुधिरवृष्टौचत्र्यहं **प्रातःसंध्यागर्जनेत्वहोरात्रं गुरुशिष्यऋत्विक्मरणेत्र्यहं पशुमंडूकनकुलश्वाहिमार्जारमूषकैरंतरागमनेहोरात्रं आरण्यमार्जारादिगमनेत्रिरात्रं सृगालवानरैर्द्वादशरात्रं श्रवणद्वादशीयमद्वितीयामहाभरण्यादयोऽन्येप्यनध्या** यानित्यानैमित्तिकाश्चबहवोग्रंथेषूक्तास्तेषामुपनयनेप्रसक्त्यभावादत्रनोक्ताः **व्रतबंधेनांदीश्राद्धोत्तरं**पूर्वोक्तप्रातर्गर्जितादिनैमित्तिकानध्यायप्राप्तौज्योतिर्निबंधे नांदीश्राद्धं**कृतंचेत्स्यादनध्या** यस्त्वकालिकः तदोपनयनंकार्यंवेदारंभंनकारयेदिति वेदारंभंनकारयेदिति**निषेधोयाजुषादिविषयः बव्हृचानामुपाकर्मण्येववेदारंभोक्त्यामौंजीदिनेवेदारंभाप्रसक्तेः तदोपनयनंकार्यमि** तिबव्हृचादिसर्वसाधारणःयाजुषादिभिर्मौंज्युत्तरमपिअनध्यायप्राप्तौवेदारंभोवर्ज्यः **नांदीश्रा** द्धात्प्राक्नैमित्तिकानध्यायेमुहूर्तांतरेकार्यं मौंज्युत्तरमनुप्रवचनीयात्प्राक्गर्जनेवक्ष्यते **इति अनध्यायादिनिर्णयः ॥**

## आतां नैमित्तिक ( निमित्तानें प्राप्त ) अनध्याय सांगतों.

विवाह, प्रतिष्ठा ( मंडपप्रतिष्ठा, अर्चा इत्यादि ), उद्यापन इत्यादि कार्यांत कार्याची समाप्ति होईपर्यंत सगोत्र जे त्यांस अनध्याय आहे असें स्मृत्यर्थसार ग्रंथांत सांगितलें आहे. यास्तव तीन पुरुषपर्यंत सपिंडांनीं ब्रह्मयज्ञ, वैश्वदेव, इत्यादिक कर्में वर्ज्य करावीं ह्मणून सांगितलें आहे. याकरितां मौंजी, विवाह इत्यादिक निमित्तानें केलेले जे मंडपप्रतिष्ठा इत्यादिक उत्सव त्यांची समाप्ति होईपर्यंत मौंजी करूं नये असें वाटतें. विवाह इत्यादिक मंगलकार्यें केलीं असतां दोष नाहीं. 'मंगलकार्याचे दिवसीं अनध्याय,' असें वचन आहे याकरितां गर्भाधान इत्यादिक मंगल कार्य ज्या दिवसीं असेल त्या दिवसीं एका कुलामध्यें किंवा एका घरामध्यें मौंजी करूं नये असें वाटतें. भूमिकंप, भूमिविदारण, वज्रपात ( वीज पडणें ), उल्कापात ( आकाशांतून अग्निरूप तारा पडणें ), धूमकेतूची ( शेंडे नक्षत्राची ) उत्पत्ति, ग्रहण इत्यादिक झालीं असतां दहा दिवस किंवा सात दिवसपर्यंत मौंजी इत्यादिक मंगल कार्य करूं नये. कोणी ग्रंथकार, संकट असतां तीन दिवस अनध्याय असें सांगतात. अकालीं वृष्टि झाली असतां तीन रात्रि किंवा पक्षिणी ( बारा प्रहर ) अनध्याय. पौषापासून चैत्रमासापर्यंत जी वृष्टि ती अकालवृष्टि होय. कोणी ग्रंथकार आर्द्रा नक्षत्रापासून ज्येष्ठा नक्षत्रापर्यंत जीं सूर्यनक्षत्रें त्यांवांचून इतर कालीं जी वृष्टि ती अकालवृष्टि असें ह्मणतात. ज्या देशामध्यें जो वृष्टीचा समय असेल त्याहून अन्यकालीं जी वृष्टि होते ती अकालवृष्टि होय, असा सिद्धांत जाणावा. अतिवृष्टि, करकावृष्टि ( गारांचा पर्जन्य ), अथवा रक्ताची वृष्टि झाली असतां तीन दिवस अनध्याय. प्रातःसंध्यासमयीं गर्जना झाली असतां एक अहोरात्र अनध्याय. गुरु, शिष्य अथवा ऋत्विक् ह्यांतून कोणींहि मृत झाला असतां तीन दिवस अनध्याय. पशु, बेडूक, मुंगुस, कुत्रा, सर्प, माजर, उंदीर, ह्यांतून एखादें मधून गेलें असतां एक अहोरात्र अनध्याय. अरण्यांतील मार्जारादि मधून गेलें असतां तीन रात्र अनध्याय. कोल्हे, वानर हे मधून गेले असतां बारा रात्रींपर्यंत अनध्याय. श्रवणद्वादशी, यमद्वितीया, महाभरणी इत्यादिक दुसरेहि अनध्याय नित्य नैमित्तिक असे बहुत ग्रंथांमध्यें सांगितले आहेत परंतु मौंजीविषयीं त्यांची प्राप्ति नसल्या कारणानें ते एथें सांगितले नाहींत. मौंजीप्रसंगीं नांदीश्राद्ध झाल्यानंतर पूर्वीं सांगितले जे प्रातःकालीं गर्जितादि नैमित्तिक अनध्याय ते प्राप्त झाले असतां ज्योतिर्निबंध ग्रंथीं सांगतात–" नांदीश्राद्ध केल्यानंतर जर अकालिक अनध्याय प्राप्त होईल तर उपनयन ( मौंजी ) करावें, वेदारंभ करूं नये." वेदारंभ करूं नये असा जो निषेध सांगितला तो यजुःशाखीविषयीं जाणावा; कारण ऋक्शाखी यांनीं उपाकर्मकालींच वेदारंभ करावा असें सांगितल्यामुळें त्यांस मौंजीच्या दिवसीं वेदारंभाची प्राप्ति नाहीं, याकरितां 'उपनयन करावें, वेदारंभ करूं नये' असा जो निषेध तो ऋक्शाखी इत्यादिक सर्वांला साधारणपणानें सांगितला. यजुःशाखी इत्यादिकांनीं मौंजी झाल्यानंतरहि अनध्याय प्राप्त झाला असतां वेदारंभ वर्ज्य करावा. नांदीश्राद्धाच्या पूर्वीं नैमित्तिक अनध्याय प्राप्र झाला असतां दुसऱ्या मुहूर्तावर मौंजी करावी. मौंजी झाल्यानंतर व अनुप्रवचनीय होमाच्या पूर्वीं गर्जना झाली असतां त्याविषयीं पुढें सांगेन. याप्रमाणें अनध्यांय इत्यादिकांचा निर्णय समाप्त झाला.

---

**इत्थंतिथिं तत्प्रसंगप्राप्तमनध्यायादिकंचविचार्यवारादिचिंत्यते गुरुशुक्रबुधवाराः श्रेष्ठाः सूर्यवारोमध्यमः चंद्रवारोधमः भौममंदवारौनिषिद्धौ सामवेदिनांक्षत्रियाणांचभौमवारः प्रशस्तः शाखाधिपतिवाराश्चशाखाधिपबलंतथा शाखाधिपतिलग्नंचदुर्लभंत्रितयंव्रते गुरुशुक्रौ भौमबुधावृग्वेदाद्यधिपाःस्मृताः पतीसितेज्यौविप्राणांनृपाणांकुजभास्करौ वैश्यानांशशभृत्सौम्याविितिवर्णाधिपाः स्मृताः पितुःसूर्यबलंश्रेष्ठंशाखावर्णेशयोर्बटोः पितुर्बटोश्चसर्वेषांबलंवाक्पतिचंद्रयोःबटुतत्पित्रोरुभयोर्गुरुचंद्रबलालाभेबटोरुभयबलमावश्यकंतत्रचंद्रबलंगर्भाधानप्रसंगेउक्तं द्विपंचसप्तनवैकादशस्थोगुरुःशुभफलप्रदःजन्मतृतीयषष्ठदशमस्थानेषुपूजाहोमात्मकशांत्याशुभः चतुर्थाष्टमद्वादशस्थानेषुदुष्टफलः कर्कधनुर्मीनराशिषुचतुर्थादिस्थानेपिनदोषः अतिसंकटेचतुर्थद्वादशस्थोद्विगुणपूजाहोमादिनाशुभः अष्टमस्तुत्रिगुणपूजादिनाशुभः केचिदनिष्टोवामवेधेशुभइत्याहुस्तन्नेतिराजमार्तंडः अष्टमवर्षादिमुख्यकालेगुरुबलाभावेपिमीनगतरवियुतचैत्रेवाशांत्यावाव्रतबंधःकार्योनतुमुख्यकालातिक्रमः नित्यकालस्यबलीयस्त्वात् ॥**

**याप्रमाणें तिथि, व तिथींच्या प्रसंगानें अनध्याय इत्यादिकांचा निर्णय सांगून आतां वारादिकांचा निर्णय सांगतों,—** गुरु, शुक्र, बुध, हे वार श्रेष्ठ होत. रविवार मध्यम, सोमवार अधम होय. भौम व शनिवार हे निषिद्ध होत. सामवेदी व क्षत्रिय यांला भौमवार प्रशस्त होय. "शाखाधिपतीचे वार, शाखाधिपतीचें बल आणि शाखाधिपतीचें लग्न हीं तीन मौंजीचे ठिकाणीं दुर्लभ होत. गुरुवार ऋग्वेदाचा अधिपति, शुक्रवार यजुर्वेदाचा अधिपति, मंगळवार सामवेदाचा अधिपति, बुधवार अथर्वणवेदाचा अधिपति, याप्रमाणें वेदांचे अधिपति सांगितले. गुरु व शुक्र हे ब्राह्मणांचे अधिपति, मंगळ व रवि हे क्षत्रियांचे अधिपति, चंद्र व बुध हे वैश्यांचे अधिपति, याप्रमाणें वर्णाधिपति सांगितले. पित्याला सूर्यबल श्रेष्ठ, बटूला शाखाधिपति व वर्णाधिपति यांचें बल श्रेष्ठ होय. पिता, बटु व इतर सर्व यांला बृहस्पति व चंद्र यांचें बल श्रेष्ठ होय." बटु व त्याचा पिता व माता यांला गुरु व चंद्र यांचें बल नसेल तर बटूला गुरुचंद्रांचें बल अवश्य असावें. त्यामध्यें चंद्र बल गर्भाधानप्रसंगीं सांगितलें. जन्मराशीपासून २।५।७।९।११ ह्या स्थानींचा गुरु शुभ फल देणारा होय. १।३।६।१० ह्या स्थानींचा गुरु पूजाहोमरूप शांति केल्यानें शुभ होय. ४।८।१२ ह्या स्थानींचा गुरु दुष्टफल होय. कर्क, धनु, मीन ह्या राशींचा गुरु असेल तर, ४।८।१२ ह्या स्थानींचा असला तथापि दोष नाहीं. अति संकट असेल तर चवथा, बारावा द्विगुणपूजा, होम इत्यादिक केल्यानें शुभ होतो. आठवा असेल तर त्रिगुणपूजा, होम इत्यादिकानें शुभ होतो. कोणी ग्रंथकार, अनिष्ट गुरु वामवेधानें शुभ असें सांगतात, परंतु राजमार्तंड ग्रंथकार तें मानीत नाहीं. आठवें वर्ष इत्यादिक जे मौंजीचे मुख्य काल त्या कालीं गुरुबळ नसेल तथापि मीनराशिस्थ सूर्यानें युक्त अशा चैत्रांत मौंजी करावी, अथवा शांति करून मौंजी करावी, पण मुख्य काल टळूं देऊं नये; कारण नित्यकाल हा बलिष्ठ आहे.

---

अथनक्षत्राणि पूर्वात्रयहस्तचित्रास्वातीमूलाश्लेषार्द्राश्रवणेषुऋग्वेदिनांमौंजीशस्तारोहिणीमृगपुष्यपुनर्वसुत्र्युत्तराहस्तानुराधाचित्रारेवतीषुयाजुषाणां अश्विनीपुष्योत्तरात्रयार्द्राहस्तधनिष्ठाश्रवणेषुसामगानां अश्विनीमृगानुराधाहस्तधनिष्ठापुनर्वसुरेवतीषुअथर्ववेदिनां एषां नक्षत्राणामसंभवेभरणीकृत्तिकामघाविशाखाज्येष्ठाशततारकावर्जयित्वा सर्वाणिसर्वेषांग्राह्याणि राजमार्तंडेपुनर्वसुनिषेधोनिर्मूलइतिबहवः केचिदृक्सामवेदविषयःपुनर्वसुनिषेधइत्याहुः व्यतीपातवैधृतिपरिघार्धेषुविष्कंभादीनांनिषिद्धनाडीषुभद्रायांग्रहणेचमौंजीवर्ज्या ॥

## आतां मौंजीचीं नक्षत्रें सांगतों.

पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, हस्त, चित्रा, स्वाती, मूळ, आश्लेषा, आर्द्रा आणि श्रवण ह्या नक्षत्रांचे ठिकाणीं ऋक्शाखी जे त्यांची मौंजी प्रशस्त होय. रोहिणी, मृग, पुष्य, पुनर्वसु, तीन उत्तरा, हस्त, अनुराधा, चित्रा व रेवती ह्या नक्षत्रांवर यजुःशाखी जे त्यांची मौंजी प्रशस्त होय. अश्विनी, पुष्य, तीन उत्तरा, आर्द्रा, हस्त, धनिष्ठा, श्रवण ह्या नक्षत्रीं सामवेदी जे त्यांची मौंजी प्रशस्त. अश्विनी, मृग, अनुराधा, हस्त, धनिष्ठा, पुनर्वसु आणि रेवती ह्या नक्षत्रांवर अथर्वणवेदी जे त्यांची मौंजी प्रशस्त. हीं पूर्वोक्त नक्षत्रें न मिळतील तर भरणी, कृत्तिका, मघा, विशाखा, ज्येष्ठा, शततारका, हीं वर्ज्य करून सर्व नक्षत्रें सर्वांनीं घ्यावीं. राजमार्तंडांत पुनर्वसूचा जो निषेध सांगितला तो निर्मूल आहे असें पुष्कळ ग्रंथकार ह्मणतात. कोणी ग्रंथकार, पुनर्वसूचा निषेध ऋग्वेदी व सामवेदी यांविषयीं आहे असें ह्मणतात. व्यतीपात, वैधृति, परिघाचें अर्ध, विष्कंभ[1] इत्यादि योगांच्या निषिद्ध घटिका; भद्रा; ग्रहण यांतील एकहि असतां मौंजी करूं नये.

---

अथलग्नेग्रहबलं व्रतेग्राह्याद्वादशाष्टषट्वर्ज्याःशुभखेचराः खलास्त्र्यायारिगाश्चंद्रः शुक्रगोकर्कगस्तनौ कचित्सूर्यस्तनौश्रेष्ठोऽष्टमेवर्ज्योऽखिलोग्रहः लग्नेशःशुक्रचंद्रौचषष्ठेवर्ज्याः सितोंत्यगः लग्नेचंद्रखलाश्चैवेंदुर्वर्ज्योद्वादशाष्टमे पंचेष्टग्रहहीनंचलग्नंसर्वत्रवर्जयेत् तुलामिथुनकन्याख्याधनुर्वृषझषाव्हयाः नवमांशाःशुभाःप्रोक्ताःकर्कांशंवर्जयेद्व्रते षड्वर्गशुद्ध्यादिकमिष्टकालसाधनादिविचारश्चज्योतिर्ग्रंथेभ्योज्ञातव्यः मातरिरजस्वलायांमातुलज्येष्ठभ्रात्रादीनांपित्रसान्निध्यात्कर्तृणांपत्न्यांरजस्वलायांचमौंजीविवाहादिनकार्यं नांदीश्राद्धोत्तरंमातृरजसिभ्रात्रादिकर्त्रंतरसत्त्वेपिसन्निहितमुहूर्तांतरालाभेशांतिंकृत्वाकार्यं अन्यथामुहूर्तांतरेएव नांदीश्राद्धोत्तरंमातुलादिकर्तृणांपत्नीरजोदोषेआरब्धत्वाच्छांतिंविनैवकार्यं मौंजीविवाहोत्तरंमंडपोद्वासनात्प्राक्मातृरजोदोषेपिशांतिःकार्या मंगलस्यासमाप्तत्वादितिमुहूर्तचिंतामणिटीकायां प्रारंभात्प्रागपिरजोदोषेमुहूर्तांतरालाभेशांतिंकृत्वातिसंकटेव्रतबंधादिकंकार्यमितिकौस्तुभे शांतिप्रकारश्च ममामुकमंगलेसंस्कार्यजननीरजोदोषजनिताशुभफलनिरासार्थंशुभफलावाप्त्यर्थंश्रीपूजनादिशांतिंकरिष्यइतिसंकल्प्यमाषसुवर्णनिर्मितांलक्ष्मींश्रीसूक्तेनषोडशोपचारैः संपूज्य स्वगृह्योक्तविधिनाश्रीसूक्तेनप्रत्यृचंपायसंहुत्वाकलशोदकेनाभिषिच्यविष्णुंस्मृत्वाकर्मे

---

[1] विष्कंभाच्या ३ घटिका, व्याघाताच्या ९ घटिका, शूलाच्या ५, वज्रयोगाच्या ९, गंडाच्या ६, अतिगंडाच्या ६, याप्रमाणें ह्या पहिल्या घटिका वर्ज्य समजाव्या.

**श्वरार्पणंकुर्यादिति प्रारंभोत्तरंसूतकप्राप्तौएकोदरयोःसमानसंस्कारेप्रेतकर्मासमाप्तौचचौलप्र करणेउक्तं विशेषस्तुवक्ष्यते ॥**

## आतां लग्नाविषयीं ग्रहबल सांगतों.

मौंजीविषयीं लग्नशुद्धि पाहणें ती असी;—बारा, आठ, सहा ह्या स्थानींचे वर्ज्य करून शुभ ग्रह मौंजीला उक्त होत. ३।६।११। ह्या स्थानांचे पापग्रह उक्त होत. शुक्लपक्षांतील चंद्र वृषभींचा व कर्कीचा होत्साता लग्नीं स्थित असेल तर शुभ होय. क्वचित् ग्रंथामध्यें लग्नीं रवि असेल तर श्रेष्ठ होय, असें सांगितलें आहे, व अष्टमस्थानीं कोणताहि ग्रह असल्यास तो वर्ज्य करावा. षष्ठस्थानीं लग्नपति, शुक्र व चंद्र आणि बारावा शुक्र हे वर्ज्य करावे. चंद्र व पापग्रह हे लग्नीं नसावे, आणि बारावा, आठवा चंद्र वर्ज्य करावा. पांच इष्ट ग्रह ज्या लग्नास येत नाहींत तें लग्न सर्वत्र वर्ज्य करावें. तुला, मिथुन, कन्या, धनु, वृषभ, मीन, हे नवमांश शुभ होत. मौंजीविषयीं कर्कांश वर्ज्य करावा. षड्वर्गशुद्धि इत्यादिक, आणि इष्ट-काल साधन इत्यादिकांचा विचार करणें तो ज्योतिष ग्रंथांतून पाहावा. ज्याची मौंजी क-रावयाची त्याची माता रजस्वला असेल तर, आणि पिता जवळ नसल्यामुळें मातुळ, ज्येष्ठ भ्राता इत्यादिक मौंजी करणारे असून त्यांची स्त्री रजस्वला असेल तर मौंजी, विवाह इत्या-दिक करूं नये. नांदीश्राद्ध झाल्यानंतर माता रजस्वला असतां भ्राता इत्यादिक जरी दुसरा कर्ता असेल तथापि दुसरा मुहूर्त जवळ न मिळेल तर शांति करून उपनयन करावें. तसें नसेल तर दुसऱ्या मुहूर्तावरच करावें. नांदीश्राद्ध झाल्यानंतर मातुळ इत्यादिक जे कर्ते त्यांची स्त्री रजस्वला झाली असल्यास आरंभ झालेला आहे याकरितां शांति केल्यावांचूनच करावें. मौंजी, विवाह हीं झाल्यानंतर आणि मंडपोद्वासनाच्या पूर्वी माता रजस्वला झाली असेल त-थापि मंगलाची समाप्ति झाली नाहीं याकरितां शांति करावी, असें मुहूर्तचिंतामणीचे टीके-मध्यें सांगितलें आहे. प्रारंभाच्या पूर्वींहि रजस्वला झाली असेल आणि दुसरा मुहूर्त मिळत नसेल तर अति संकट असतां शांति करून मौंजी इत्यादिक कार्य करावें, असें कौस्तुभांत सांगितलें आहे. शांतीचा प्रकार सांगतों—"**ममामुकमंगले संस्कार्यजननीरजोदोषज-निताशुभफलनिरासार्थं शुभफलावाप्त्यर्थं श्रीपूजनादिशांतिं करिष्ये,**" असा संकल्प करून एक मासा सोन्याची लक्ष्मीची प्रतिमा करून त्या प्रतिमेची श्रीसूक्तानें षोडशोपचार पूजा क-रून आपल्या गृह्यसूत्रांत सांगितलेल्या विधीकरून श्रीसूक्ताच्या दरएक ऋचेनें पायसाचा होम करून कलशांतील उदकानें अभिषेक करून विष्णूचें स्मरण करून कर्म ईश्वराला अर्पण क-रावें. प्रारंभ झाल्यानंतर आशौच प्राप्त झालें असतां, सोदरभ्रात्यांचा समानसंस्कार असतां, आणि प्रेतकर्माची समाप्ति न झाली असतां ह्याविषयींचा निर्णय चौलप्रकरणीं सांगितला आहे. विशेष निर्णय सांगणें तो पुढें सांगूं.

---

**अथपदार्थसंपादनं कौपीनंप्रावारश्चकार्पासजमहतंसंपाद्यं ईषद्धौतंनवंश्वेतंसदशंवस्त्रमह तसंज्ञं**प्रावारार्थमजिनंवा तच्चत्र्यंगुलंचतुरंगुलंवाबहिर्लोमाखंडंत्रिखंडंवाष्टाचत्वारिंशदंगुलं धार्यं त्रिखंडपक्षेचतुर्विंशत्यंगुलाष्टांगुलषोडशांगुलाःक्रमेणत्रयःखंडाः कार्पासंयज्ञोपवीतं ॥

## आतां मौंजीविषयीं पदार्थ कोणते मिळवावे तें सांगतों.

कौपीन ( लंगोटी ), पांघुरण्याचें वस्त्र, हें कापसाचें अहत असें मिळवावें. थोडें धुत-लेलें असून नवें व श्वेतवर्ण आणि दशायुक्त असें जें वस्त्र तें अहतसंज्ञक होय, तें पांघुर-ण्याकरितां मिळवावें, अथवा कृष्णाजिन मिळवावें. तें कृष्णाजिन तीन अंगुळें किंवा चार अंगुळें बहिर्लोम असें अखंड किंवा त्रिखंड ४८ अंगुळें धारण करावें. त्रिखंड धारण करणें असेल तर २४ अंगुळांचा, आठ अंगुळांचा व सोळा अंगुळांचा याप्रमाणें क्रमानें तीन तुकडे असावे. यज्ञोपवीत करणें तें कापसाचें करावें.

---

तन्निर्माणप्रकारः ब्राह्मणेनब्राह्मणस्त्रीभिर्विधवादिभिश्चनिर्मितंसूत्रंग्राह्यं संहतचतुरंगुलिमूलेषुषण्णवत्यासूत्रमावेष्ट्य तन्त्रिगुणीकृत्योर्ध्ववृत्तंवलितंकृत्वा पुनरधोवृत्तरीत्यात्रिगुणीकृतंतत्सूत्रंनवतंतुकंसंपद्यते तन्त्रिरावेष्ट्यदृढग्रंथिंकुर्यात् स्तनादूर्ध्वमधोनाभेर्नधार्यंतत्कथंचनविच्छिन्नंवाप्यधोयातंभुक्त्वानिर्मितमुत्सृजेत् सिद्धेमंत्राःप्रयोक्तव्याइतिन्यायेनसिद्धंयज्ञोपवीतंत्रिगुणीकरणादिमंत्रैरभिमंत्र्ययज्ञोपवीतंपरममितिमंत्रेणधारयेत् तद्यथा गायत्र्यात्रिगुणीकृत्यापोहिष्ठेतितिसृभिःप्रक्षाल्य पुनर्गायत्र्यात्रिगुणीकृत्यग्रंथौविष्णुब्रह्मरुद्रान्न्यसेत् केचिन्नवतंतुषुनवदेवतान्यासमाहुः ततोगायत्र्यादशवारमभिमंत्रिताभिरद्भिर्यज्ञोपवीतंप्रक्षाल्योदुत्यमितित्र्यृचेनसूर्यायप्रदर्श्ययज्ञोपवीतमितिमंत्रेणप्रथमंदक्षिणंबाहुमुद्धृत्यपश्चात्कंठेधारयेदितिउपवीतंब्रह्मसूत्रंप्रोद्धृतेदक्षिणेकरे प्राचीनावीतमन्यस्मिन्निवीतंकंठलंबितं चितिकाष्ठचितिधूमचंडालरजस्वलाशवसूतिकास्पर्शेस्नात्वायज्ञोपवीतत्यागः कंठलंबितत्वाद्यकृत्वामलमूत्रोत्सर्गेचत्यागः मासचतुष्टयोत्तरंचयज्ञोपवीतत्यागः केचिज्जननशावाशौचयोरंतेपितत्त्यागमाहुःसमुद्रंगच्छस्वाहेतिमंत्रेणसप्रणवव्याहृतिभिर्वाजीर्णयज्ञोपवीतत्यागः यज्ञोपवीतंप्रमादाद्गतंचेत्तूष्णींलौकिकंधृत्वामनोज्योतिरितिअग्नेव्रतपतेव्रतंचरिष्यामितच्छकेयंतन्मेराध्यतां वायोव्रतपते०आदित्यव्रतपतेइत्यादिमंत्रचतुष्टयेनचतस्रआज्याहुतीर्हुत्वाविधिवन्नूतनंधारयेत् अथवायज्ञोपवीतनाशजन्यदोषनिरासार्थंप्रायश्चित्तंकरिष्येइतिसंकल्प्य आचार्यवरणाग्निप्रतिष्ठादिआज्यभागांतेसवितारंगायत्र्यातिलैराज्येनचाष्टोत्तरशतंसहस्रंवाजुहुयात् नूतनंधृत्वातिक्रांतंसंध्याद्याचरेत्इति यज्ञोपवीतहीनः क्षणंतिष्ठेच्चेच्छतगायत्रीजपः यज्ञोपवीतंविनाभोजनेविण्मूत्रकरणेवागायत्र्यष्टसहस्रंजपः वामस्कंधात्कूर्परेमणिबंधांतेवापतितेयथास्थानंधृत्वात्रीन्षड्वा यथाक्रमंप्राणायामान्कृत्वानवंधारयेत् कोपादिनास्वयंयज्ञोपवीतत्यागेपूर्ववल्लौकिकंधृत्वाप्रायश्चित्तांतेनवंधारयेत् ब्रह्मचारिणएकंयज्ञोपवीतं स्नातकस्यद्वे उत्तरीयाभावेतृतीयकं जीवत्पितृकेणजीवज्ज्येष्ठभ्रातृकेणचोत्तरीयंतत्स्थानेतृतीयंयज्ञोपवीतंवानधार्यं आयुष्कामस्यत्र्यधिकानिबहूनियज्ञोपवीतानि अभ्यंगेचोदधिस्नानेमातापित्रोर्मृतेहनि तैत्तिरीयाःकठाःकण्वाश्चरकावाजसनेयिनः कंठादुत्तार्यसूत्रंतुकुर्युर्वैक्षालनंद्विजाः अन्ययाजुषैर्बह्वृचैःसामगैश्चकंठादुत्तारणेतस्यत्यक्त्वानवंधार्यं ॥

# आतां यज्ञोपवीत करावें कसें तें सांगतों.

यज्ञोपवीत करण्याकरितां सूत घेणें तें ब्राह्मणानें व ब्राह्मणाच्या स्त्रियांनीं काढलेलें आणि विधवा इत्यादिकांनीं निर्मिलेलें घ्यावें. एकत्र सारखीं केलेलीं जीं चार अंगुळें त्यांचे मूलांचे ठिकाणीं शाण्णव वेळ सूत वेष्टून तें सूत त्रिगुण करून पहिल्यानें ऊर्ध्ववृत्त वळून पुनः त्रिगुण करून अधोवृत्त रीतीनें वळावें. असें केल्यानें तें सूत नवसुती होतें. नंतर ती नवसुती तीन वेळ वेष्टण करून घट्ट गांठ द्यावी. "स्तनाच्या वर व नाभीच्या खालीं यज्ञोपवीत कधींहि धारण करूं नये. तुटलें असतां किंवा खालीं गेलें असतां व भोजन करून निर्माण केलें तें टाकावें." "सिद्धपदार्थाचे ठायीं मंत्र योजावे," असा न्याय आहे याकरितां यज्ञोपवीत तयार झाल्यानंतर त्रिगुणीकरणादिकांच्या मंत्रांनीं यज्ञोपवीत अभिमंत्रून "यज्ञोपवीतं परमं०" ह्या मंत्रानें धारण करावें. तें असें;—गायत्रीमंत्रानें त्रिगुणित करून "आपोहिष्ठा०" ह्या तीन ऋचांनीं प्रक्षालन करून पुनः गायत्रीमंत्रानें त्रिगुणित करून ग्रंथीचे ठायीं विष्णु, ब्रह्मा, रुद्र यांचा न्यास करावा. कोणी ग्रंथकार, नवसुतीचे ठायीं नऊ देवतांचे न्यास करावे असें सांगतात. तदनंतर गायत्रीमंत्रानें दहा वेळ अभिमंत्रित केलेल्या उदकानें यज्ञोपवीत प्रक्षालन करून "उदुत्यं०" ह्या तीन ऋचांनीं सूर्याला दाखवून "यज्ञोपवीतं०" ह्या मंत्रानें, प्रथम उजवा बाहु उंच करून नंतर कंठाचे ठायीं धारण करावें. "डाव्या खांद्यावरून वर केलेला उजवा हात असतां घातलेलें जें ब्रह्मसूत्र तें उपवीत, उजव्या खांद्यावरून घातलेलें जें ब्रह्मसूत्र तें प्राचीनावीत, कंठाचे ठायीं सरळ माळेसारिखें घातलें जें ब्रह्मसूत्र तें निवीत होय." चितिकाष्ठ; चितीचा धूर; चांडाल; रजस्वला; प्रेत; बाळंतीण यांचा स्पर्श झाला असतां स्नान करून यज्ञोपवीत टाकावें, म्हणजे दुसरें धारण करावें. निवीती इत्यादिक केल्यावांचून मलमूत्रांचा उत्सर्ग केला असतांहि यज्ञोपवीत टाकावें. चार महिने झाल्यानंतर यज्ञोपवीत टाकावें. कोणी ग्रंथकार जननाशौच व मृताशौच यांच्या अंतींहि यज्ञोपवीत टाकावें असें सांगतात—जीर्णयज्ञोपवीताचा त्याग करणें तो, "समुद्रं गच्छ स्वाहा" ह्या मंत्रानें किंवा ओंकारसहित व्याहृतिमंत्रांनीं करावा. यज्ञोपवीत विस्मरणानें हरवलें असतां मंत्रविरहित लौकिक यज्ञोपवीत घालून "मनोज्योतिः० अग्ने व्रतपते व्रतं चरिष्यामि तच्छकेयं तन्मे राध्यतां, वायो व्रतपते०, आदित्य व्रतपते०" इत्यादि चार मंत्रांनीं चार घृताच्या आहुतींचा होम करून नंतर समंत्रक नवें यज्ञोपवीत धारण करावें. अथवा "यज्ञोपवीतनाशजन्यदोषनिरासार्थं प्रायश्चित्तं करिष्ये," असा संकल्प करून आचार्यवरण, अग्निस्थापन इत्यादि आज्यभागांत कर्म करून सविता देवतेच्या उद्देशानें गायत्रीमंत्रेंकरून तिळांचा व घृताचा अष्टोत्तरशत ( १०८ ) किंवा सहस्र होम करावा. नंतर नवें यज्ञोपवीत घालून राहिलेलें संध्यादिक कर्म करावें. यज्ञोपवीतावांचून एक क्षण जरी राहील तरी शंभरगायत्रीजप करावा. यज्ञोपवीतावांचून भोजन केलें असतां किंवा शौच मूत्र केलें असतां गायत्रीमंत्राचा आठ सहस्र जप करावा. डाव्या खांद्यावरून कोपरावर किंवा मनगटाच्या ( यज्ञोपवीत ) शेवटीं पडलें असतां जेथच्या तेथें धरून तीन किंवा सहा क्रमानें प्राणायाम करून नवें धारण करावें. क्रोध इत्यादिकांच्या योगानें आपण यज्ञोपवीत टाकलें असतां

पूर्वीं सांगितल्याप्रमाणें लौकिक यज्ञोपवीत धारण करून प्रायश्चित्त केल्यानंतर नवें धारण करावें. ब्रह्मचारी यानें एक यज्ञोपवीत घालावें. स्नातकानें दोन घालावीं. उत्तरीय वस्त्राच्या अभावीं तिसरें घालावें. ज्याचा पिता जिवंत असेल त्यानें व ज्याचा वडील भाऊ जिवंत असेल त्यानें उत्तरीय वस्त्र, किंवा त्याच्या स्थानीं तिसरें यज्ञोपवीत धारण करूं नये. आयुष्याची इच्छा करणारा यानें तीहींपेक्षां अधिक असीं बहुत यज्ञोपवीतें घालावीं. "अभ्यंगस्नान, समुद्रस्नान, मातापितरांचा मृतदिवस (श्राद्धदिवस) इतक्या दिवसीं तैत्तिरीय, कठ, कण्व, चरक आणि वाजसनेयी इतके ब्राह्मण यांनीं कंठापासून यज्ञोपवीत काढून निश्चयें प्रक्षालन करावें." इतर यजुःशाखी, ऋग्वेदी व सामवेदी यांनीं कंठापासून काढलें असतां तें टाकून नवें धारण करावें.

---

**अथमेखला मौंजीत्रिवृत्समाश्लक्ष्णाकार्याविप्रस्यमेखला त्रिवृत्ताग्रंथितैकेनत्रिभिःपंचभिरेवच मुंजाभावेतुकर्तव्याकुशाश्मंतकबल्वजैः ब्राह्मणस्यभवेद्दंडःपालाशःकेशसंमितः सर्वेषां यज्ञियोवास्यादूर्ध्वनासाग्रसंमितः बटुहस्तेनचतुर्हस्ताहस्तोच्छ्रिताचतुरस्रासोपानांकिताप्रागुदक्प्रवणाकदलीस्तंभाद्यलंकृतावेदिः संपाद्या ॥**

## आतां यानंतर मेखला, दंड इत्यादिक सांगतों.

"मुंज (मोळ) तृणाची तिपेड, सारखी, बारीक असी मेखला ब्राह्मणाची करावी. त्या मेखलेचे तीन फेरे घालून पहिली गांठ एका फेऱ्याची, दुसरी तीन फेऱ्यांची, तिसरी पांच फेऱ्यांची याप्रमाणें बांधावी. मुंजतृण न मिळेल तर कुश, अश्मंतक, बल्वज ह्या तृणांची करावी. ब्राह्मणाला केशापर्यंत उंचीचा असा पळसाचा दंड उक्त होय. अथवा सर्वांला यज्ञिय वृक्षाचा दंड वरच्या नासिकाग्रापर्यंत उंचीचा उक्त होय." बटूच्या हातानें लांबी व रुंदी चार चार हात, व उंची एक हात, व चतुष्कोण, पायऱ्यांनीं युक्त, पूर्वेकडे व उत्तरेकडेस उतरती, कदलीच्या स्तंभादिकांनीं अलंकृत असी वेदी करावी.

---

**अथोपनयनांतर्गतपदार्थेषुविशेषउच्यते वासःपरिधानोत्तरंलौकिकमाचमनंयज्ञोपवीतधारणोत्तरंतुयथाविधि आचमनविधिर्वक्ष्यते एवमाज्यपात्रादुत्तरभागेबटुमाचमय्यप्रणीतापश्चिमदेशरूपतीर्थेनप्रवेश्याचार्याग्न्योर्मध्येननीत्वाचार्यदक्षिणतउपवेशयेत् ततोबर्हिरास्तरणादिस्रुवसंमार्गांतेयज्ञोपवीतदानाद्याचमनांतं ततःशिष्यांजलौजलावक्षरणादिसमिदाधानांतं गायत्र्युपदेशांगंबटोःशुचित्वसिद्ध्येअग्नयेसमिधमितिमंत्रएकश्रुत्याप्रयोक्तव्यःततः परिदानाभिवादनांतेआचारप्राप्तंगायत्रीपूजनंकृत्वाऽग्नेरुत्तरदेशेगायत्र्युपदेशःकार्यः अवक्षारणमप्युत्तरदेशेउक्तं प्राङ्मुखआचार्यःप्रत्यङ्मुखायोपविष्टायबटवेगायत्रीमुपदिशेत् ॥**

## आतां मौंजीचे जे अंतर्गत पदार्थ त्यांमध्यें विशेष सांगतों.

वस्त्रधारण केल्यानंतर लौकिक आचमन करावें. यज्ञोपवीत धारण केल्यानंतर तर विधियुक्त आचमन करावें. आचमनाचा विधि पुढें सांगेन. याप्रमाणें आज्यपात्राच्या उत्तरप्रदेशीं बटूकडून आचमन करवून प्रणीतापात्राच्या पश्चिमप्रदेशरूप तीर्थेंकरून प्रवेश करवून आचार्य

व अग्नि यांच्या मधून नेऊन आचार्याच्या उजव्या बाजूस बसवावें. तदनंतर बर्हीचे आस्तरणापासून स्रुवसंमार्गात कर्म केल्यानंतर यज्ञोपवीताचें दान इत्यादिक आचमनापर्यंत कर्म करावें. त्यानंतर शिष्याचे अंजलीचे ठायीं जलाचें अवक्षरण इत्यादिकापासून समिदाधानापर्यंत गायत्री उपदेशाचें अंगभूत कर्म करावें. बटूला शुचित्वाची सिद्धि व्हावी एतदर्थ "अग्नये समिधं०" हा मंत्र एक वेळ ह्मणवावा. तदनंतर परिदान ( सूर्य आणि प्रजापति यांना मनेंकरून बटूला देणें ), अभिवादन ( अग्नीला यथाविधि नमन करणें ), हीं झाल्यानंतर आचारप्राप्त असें गायत्रीपूजन करून अग्नीच्या उत्तर प्रदेशीं बटूला गायत्रीचा उपदेश करावा. अवक्षारण करणें तेंहि अग्नीच्या उत्तर प्रदेशीं करावें. पूर्व दिशेला संमुख अशा आचार्यानें पश्चिमाभिमुख बसलेल्या बटूला गायत्रीचा उपदेश करावा.

---

**अथोपसंग्रहणप्रकारः उपसंग्रहणंनामामुकप्रवरान्वितामुकगोत्रोमुकशर्माहंभोअभिवादय इत्युक्त्वादक्षिणोत्तरकर्णौवामदक्षिणपाणिभ्यांस्पृष्ट्वा दक्षिणहस्तेनगुरोर्दक्षिणपादंवामेनवामं स्पृष्ट्वाशिरोवनमनमिति एवंगुरुषुमातापित्रादिषुचअभिवादनपूर्वकपादस्पर्शात्मकमुपसंग्रहणं वृद्धतरेषुत्वभिवादनमात्रं वृद्धेषुनमस्कारः अशुचिंवमंतमभ्यक्तंस्नानंकुर्वंतंजपादिरतंपुष्पजलभैक्षादिभारवाहंननमेत् तन्नमनेउपवासः शूद्रनतौत्रिरात्रं अंत्यजेकृच्छ्रं देवतागुरुयतिनमनाकरणेउपवासः ॥**

## आतां उपसंग्रहण ह्मणजे गुरूचे पाय धरणें त्याचा विधि सांगतों.

उपसंग्रहण ह्मणजे "अमुक प्रवरांनीं युक्त, अमुकगोत्र, अमुकशर्मा असा मी नमस्कार करितों," असें बोलून बटूनें आपल्या उजव्या व डाव्या कानांला, डाव्या व उजव्या हातांनीं स्पर्श करून उजव्या हातानें गुरूच्या उजव्या पायाला व डाव्या हातानें डाव्या पायाला याप्रमाणें स्पर्श करून मस्तक नम्र करणें हें उपसंग्रहण होय. याप्रमाणें गुरु, माता, पिता इत्यादिकांचे पायांला अभिवादनपूर्वक स्पर्श करणें तें उपसंग्रहण होय. वृद्धतर जे त्यांस अभिवादन मात्र करावें. वृद्ध जे त्यांला नमस्कार करावा. अशुचि; वांती करणारा; अभ्यंग केलेला; स्नान करणारा; जपादिकांत असणारा; पुष्प, जल, भिक्षादिकांचा भार वाहणारा यांला त्या त्या कालीं नमस्कार करूं नये. त्यांला नमस्कार केला असतां उपोषण करावें. शूद्राला नमस्कार केला असतां त्रिरात्र उपोषण करावें. अंत्यजाला नमस्कार केला असतां कृच्छ्रप्रायश्चित्त करावें. देवता, गुरु, संन्यासी यांला नमस्कार न केला असतां उपोषण करावें.

---

**अथप्रत्यभिवादनं तत्रांत्यस्वरःप्लुतःकार्यः तद्यथा आयुष्मान्भवसौम्यदेवदत्ता ३ एकारौकारांतेनाग्नि हरा ३ इ शंभा ३ उ इतिसंध्यक्षरविश्लेषेणपूर्वभागाकारःप्लुतइतिअनुप्रवचनीयार्थभिक्षायांभिक्षांभवान्ददातुभिक्षांभवतीददात्विति वा भवच्छब्दमध्यमकोभिक्षावाक्यप्रयोगः अन्यभिक्षायामादावंतेवाभवच्छब्दइति ॥**

## आता प्रत्यभिवादन ह्मणजे शिष्यानें नमस्कार केल्यानंतर गुरूनें आशीर्वाद देणें तें सांगतों.

त्या प्रत्यभिवादनाविषयीं शेवटचें स्वर अक्षर प्लुत असावें. तें असें;—"**आयुष्मान् भव सौम्य-देवदत्ता ३**" **अर्थ**—हे सौम्यदेवदत्ता, आयुष्मान् हो. एकार व ओकार हे आहेत अंतीं ज्याच्या असें नाम असेल तर, "**हरा ३ इ, शंभा ३ उ**" **अर्थ**—हे हरे, हे शंभो. याप्रमाणें संधीच्या अक्षराच्या वियोगानें पूर्वभागाचा 'आ' कार तो प्लुत होय. अनुप्रवचनीय होमाकरितां जी भिक्षा तिचे ठायीं "**भिक्षां भवान्ददातु,**" किंवा "**भिक्षां भवती ददातु,**" याप्रमाणें '**भवत्**' हा शब्द मध्यें ज्या वाक्यांत आहे असा भिक्षावाक्याचा प्रयोग करावा. अनुप्रवचनीयव्यतिरिक्त भिक्षा असेल तर पूर्वी किंवा शेवटीं 'भवत्' हा शब्द असावा.

---

**अथोपनयनविवाहादौनिर्विघ्नफलप्राप्त्यर्थमुपसर्गनिरासायवा सपिंडमरणादिनिमित्तक प्रतिकूलनिवृत्त्यर्थंवाविनायकशांतिःकार्या तत्रकालःशुक्लपक्षचतुर्थीगुरुवारःपुष्यश्रवणोत्तरा रोहिणीहस्ताश्विनीमृगनक्षत्राणिशस्तानि उपनयनादौतुप्रधानकालानुरोधेनयथासंभवकालो ग्राह्यः तत्रामुककर्मणोनिर्विघ्नफलसिद्ध्यर्थमितिवाउपसर्गनिवृत्त्यर्थमितिवामुकसपिंडमरण निमित्तकाशुचित्वप्रातिकूल्यनिरासार्थमितिवासंकल्पऊह्यः अवशिष्टप्रयोगोन्यत्रज्ञेयः ॥**

## आतां विनायकशांति सांगतों.

मौंजी, विवाह इत्यादिक कार्यांत निर्विघ्नरूप फल प्राप्त होण्याकरितां, किंवा उपसर्गाचा ( शुभाशुभसूचक उपद्रवाचा ) निरास (नाश) होण्याकरितां; अथवा सपिंडाचें मरण इत्यादिक निमित्तानें प्राप्त होणारें जें प्रतिकूल त्याची निवृत्ति होण्याकरितां विनायकशांति करावी. त्याविषयीं काल—शुक्लपक्षांतील चतुर्थी, गुरुवार, पुष्य, श्रवण, उत्तरा, रोहिणी, हस्त, अश्विनी आणि मृग हीं नक्षत्रें प्रशस्त होत. मौंजीं इत्यादिक कार्यांचे ठिकाणीं मुख्य कालाच्या अनुरोधानें जसा मिळेल तसा काल घ्यावा. **शांतीचा संकल्प— "अमुककर्मणोनिर्विघ्नफलसिद्ध्यर्थं,"** अथवा "**उपसर्गनिवृत्त्यर्थं,**" किंवा "**अमुकसपिंडमरणनिमित्तकाशुचित्वप्रातिकूल्यनिरासार्थं,**" याप्रमाणें जसें निमित्त असेल तदनुसार संकल्पांत ऊह करावा. अवशिष्ट प्रयोग दुसऱ्या (कौस्तुभादि) ग्रंथीं पाहावा.

---

**विवाहोपनयनादिष्वाभ्युदयकर्मस्वादौग्रहयज्ञंकुर्यात् श्राद्धातिरिक्तेष्वनाभ्युदयिकेष्वपि शांत्यादिकर्मसुग्रहानुकूल्यकामोग्रहयज्ञंकुर्यात् अरिष्टनिरासार्थंउत्पातेषुशांतिस्थानेष्वप्रधानोपिग्रहमखउक्तःप्रधानकर्मणःपूर्वमव्यवहितेव्यवहितेवाकालेकुर्यात् व्यवहितपक्षेसप्तदिनाधिकव्यवधानंनकार्यं प्रतिग्रहंदशावरप्रधानाहुतिसंख्यायामेकएवऋत्विक् दशाधिकपंचाशत्पर्यंतसंख्यायांचत्वारऋत्विजः ततऊर्ध्वंशतावरहोमेष्टौऋत्विजोनवमआचार्यः तत्राचार्यआचार्यकर्मकृत्वाआदित्यायजुहुयात् अष्टभ्यःसोमादिभ्योष्टौऋत्विजोजुहुयुः ऋत्विक्चतुष्टयपक्षेद्वाभ्यांग्रहाभ्यांएकैकोजुहुयात् आचार्योक्तायताम्रादिमयीषुप्रतिमासुसर्वासुसौवर्णीषुवाफलेष्वक्षतपुंजेषुवाआदित्यादिपूजनं होमसंख्यानुसारेणकुंडस्यस्थंडिलस्यवाग्रहवेदेश्चहस्तादिमानं तत्रप्रधानांगाहुतीनांपंचाशदवरसंख्यत्वेरत्निमितंकुंडं शतावरत्वेअरत्निमितं सहस्रा**

वरत्वेहस्तमितं अयुतादिहोमेहस्तद्वयं लक्षहोमेचतुर्हस्तं तत्रकृतमुष्टिःकरोरत्निः मुक्तकनिष्ठिकःकरःअरत्निः चतुर्विंशत्यंगुलोहस्तः यवोनचतुस्त्रिंशदंगुलानिहस्तद्वयं अष्टचत्वारिंशदंगुलानिहस्तचतुष्टयं कुंडेमेखलायोनिनाभिखातादिमानंग्रंथांतरेभ्योज्ञेयं इदंकुंडादिमानंसर्वत्रज्ञेयं समिच्चर्वाज्यंद्रव्यं अर्कःपलाशःखदिरश्चापामार्गोथपिप्पलः औदुंबरःशमीदूर्वाकुशोर्कादेःक्रमात्समित् केचित्तिलानपिआहुः अर्कादिप्रधानहोमसंख्यादशांशेनाधिदेवताप्रत्यधिदेवतानांहोमः अधिदेवताद्यर्धसंख्ययाक्रतुसंरक्षकक्रतुसाद्गुण्यदेवतानां शांत्यंगभूतेग्रहयज्ञेबलिदानंकुर्वंतिअन्यत्रग्रहमखेबलिदानंनकुर्वंतिप्रधानभूतायाएकाहुतेरेकविप्रभोजनंश्रेष्ठं शताहुतेरेकविप्रभोजनंमध्यमं सहस्राहुतेरेकविप्रभोजनंजघन्यं सुविस्तरप्रयोगादिकमन्यत्र इतिग्रहयज्ञः ॥

## आतां ग्रहमख सांगतों.

विवाह, मौंजी इत्यादिक मंगल कार्य ( कर्तव्य ) असतां प्रथम ग्रहयज्ञ करावा. श्राद्धव्यतिरिक्त जीं मंगलरहित असीं शांति इत्यादिक कर्में ( कर्तव्य ) असतांहि, ग्रह अनुकूळ व्हावे असी इच्छा करणारा त्यानें ग्रहयज्ञ करावा. शांतीचीं स्थानें असे जे उत्पात ते झाले असतां, जरी तो मुख्य नाहीं तथापि अरिष्टाचा नाश होण्याकरितां ग्रहमख करावा असें सांगितलें आहे, याकरितां प्रधानकर्माच्या ( शांतीच्या ) पूर्वी जवळच्या किंवा दूरच्या कालीं करावा. दूरच्या काळीं करणें असेल तर (प्रधानकर्माच्या दिवसापासून) सात दिवसांपेक्षां अधिक अंतर असूं नये. दरएक ग्रहाचे मुख्य आहुतींची संख्या दहांच्या आंत असेल तर एकच ऋत्विज करावा. दहांपेक्षां अधिक पन्नासपर्यंत होमसंख्या असेल तर चार ऋत्विज करावे. पन्नासांपेक्षां अधिक शंभरांपर्यंत होम असल्यास आठ ऋत्विज व नववा आचार्य करावा. त्यामध्यें आचार्यानें आचार्यकर्म करून सूर्याचा होम करावा. सोमादिक आठ ग्रहांचा होम आठ ऋत्विजांनीं करावा. चार ऋत्विज असतील तर दोन दोन ग्रहांचा एकेकानें होम करावा, व आचार्यानें सूर्याचा होम करावा. तांबें ईत्यादिकांच्या प्रतिमांचे ठायीं अथवा सर्व सुवर्णाच्या प्रतिमांचे ठायीं किंवा फलांचे ठायीं अथवा तांदुळांचे राशींचे ठायीं आदित्यादि नवग्रहांचें पूजन करावें. जसी जसी होमाची संख्या असेल त्या त्याप्रमाणें कुंड, किंवा स्थंडिल व ग्रहांची वेदि यांचें हस्तादिक प्रमाण घ्यावें. प्रधान आहुति, व अंगदेवतांच्या आहुति ह्या मिळून पन्नासांपर्यंत असतील तर रत्निपरिमित कुंड करावें. शंभरांचे आंत असतां अरत्निपरिमित करावें. सहस्राचे आंत असतां हस्तपरिमित करावें. दहा सहस्र इत्यादिक होम असेल तर दोन हात कुंड करावें. एक लक्ष होम असेल तर चार हात करावें. मुष्टि केलेला जो हात तो रत्नि होय. विस्तृत जी कनिष्ठांगुलि तिणें युक्त जी मुष्टि तद्युक्त जो हात तो अरत्नि होय. चोवीस अंगुळें ह्मणजे एक हात. एक यवानें कमी अशा चौतीस अंगुळांचे दोन हात. अठ्ठेचाळीस अंगुळांचे चार हात. कुंडाच्या मेखला, योनि, नाभि, खोली, इत्यादिकांचें प्रमाण दुसऱ्या

१ सूर्याची तांब्याची, चंद्राची स्फटिक मण्याची, मंगळाची रक्तचंदनाची, बुधाची सुवर्णाची, बृहस्पतीची सुवर्णाची, शुक्राची रुप्याची, शनीची लोखंडाची, राहूची शिशाची, केतूची कांस्याची, याप्रमाणें नवग्रहांच्या प्रतिमा आणाव्या.

ग्रंथांतून पाहावें. हें कुंडादिकांचें प्रमाण सर्वत्र जाणावें. समिधा, चरु, घृत, हीं द्रव्यें होत. "रुई, पळस, खैर, अपामार्ग (आघाडा), पिंपळ, उंबर, शमी, दूर्वा, दर्भ याप्रमाणें सूर्यादिकनवग्रहांच्या क्रमानें समिधा जाणाव्या. कोणी ग्रंथकार तिळहि घ्यावे असें ह्मणतात. सूर्य इत्यादिक ज्या प्रधानदेवता त्यांच्या मुख्य होमाची जी संख्या तिच्या दहाव्या अंशानें, अधिदेवता व प्रत्यधिदेवता यांचा होम करावा. अधिदेवता इत्यादिकांची जी संख्या असेल तिच्या अर्ध्या संख्येनें क्रतुसंरक्षक व क्रतुसाद्गुण्य ह्या देवतांचा होम करावा. शांतीचा अंगभूत जो ग्रहयज्ञ त्याचे ठायीं बलिदान करितात. शांतिव्यतिरिक्त ग्रहमखाचे ठायीं बलिदान करीत नाहींत. प्रधानभूत असी एक आहुति असतां एक ब्राह्मणाला भोजन देणें तें श्रेष्ठ. शंभर आहुति असतां एक ब्राह्मणाला भोजन देणें तें मध्यम. सहस्र आहुति असतां एका ब्राह्मणाला भोजन देणें तें अधम होय. सविस्तर प्रयोगादिकांचा प्रकार दुसऱ्या ग्रंथीं पाहावा. याप्रमाणें ग्रहमख समाप्त झाला.

---

कुमारस्योपनयनकालेकन्यायाविवाहेवाबृहस्पत्यानुकूल्याभावेशौनकाद्युक्ताशांतिःकार्या अस्यकुमारस्योपनयनेअस्याःकन्यकायाविवाहेवाबृहस्पत्यानुकूल्यसिद्धिद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंबृहस्पतिशांतिंकरिष्यइतिसंकल्प्याचार्यंवृणुयात् स्थंडिलेईशान्यांयथाविधिस्थापितेश्वेतकलशे पंचगव्यकुशोदकविष्णुक्रांताशतावरीप्रमुखौषधिप्रक्षेपपूर्णपात्रनिधानांतेहरिताक्षतनिर्मितदीर्घचतुरस्रपीठेहैमींगुरुप्रतिमांप्रतिष्ठाप्यस्थंडिलेग्निस्थापनादि अन्वाधाने बृहस्पतिमश्वत्थसमिदाज्यसर्पिर्मिश्रपायसैःसाज्येनमिश्रितयवव्रीहितिलेनचप्रतिद्रव्यमष्टोत्तरशताहुतिभिःशेषेणस्विष्टकृतमित्यादि आज्यभागांतेप्रतिमायांषोडशोपचारैर्गुरुपूजा तत्रपीतवस्त्रयुग्मपीतयज्ञोपवीतपीतचंदनपीताक्षतपीतपुष्पघृतदीपदध्योदननैवेद्यार्पणांते माणिक्यंसुवर्णंवा दक्षिणांदत्वाग्रहमखोक्तरीत्याकुंभानुमंत्रणांते बृहस्पतिमंत्रेणदधिमध्वाक्तसमिदाज्यगृहसिद्धपायसमिश्रितयवाद्यैर्यथान्वाधानंहोमः होमशेषंसमाप्यगंधादिभिर्बृहस्पतिंसंपूज्यपीतगंधाक्षतपुष्पफलयुतताम्रपात्रस्थजलेनार्घ्यंदद्यात् तत्रमंत्रः गंभीरदृढरूपांगदेवेज्यसुमतेप्रभो नमस्तेवाक्पतेशांतगृहाणार्घ्यंनमोस्तुते प्रार्थयेत् भक्त्यायत्तेसुराचार्यहोमपूजादिसत्कृतं तत्त्वंगृहाणशांत्यर्थंबृहस्पतेनमोनमः जीवोबृहस्पतिःसूरिराचार्योगुरुरंगिराः वाचस्पतिर्देवमंत्रीशुभंकुर्यात्सदाममेति विसर्जनप्रतिमादानांतेकुमारादियुतयजमानाभिषेकः तत्रमंत्राःआपोहिष्ठेतितिस्रः तत्त्वायामि० ३ स्वादिष्ठया० ३ समुद्रज्येष्ठाः० ४ इदमापःप्रवह० १ तामग्निवर्णां० १ याओषधीः० १ अश्वावतीर्गोमतीर्न० १ यद्देवादेवहेडनमित्याद्याःकूष्मांडमंत्राःपुनर्मनःपुनरायुरित्यंतास्तैत्तिरीयशाखायांप्रसिद्धाःकौस्तुभादौलिखिताएतैरभिषिच्यविप्रान्भोजयेदिति इतिबृहस्पतिशांतिः ॥

## आतां बृहस्पतीची शांति सांगतों.

कुमाराच्या मौंजीसमयीं किंवा कन्येच्या विवाहसमयीं बृहस्पति अनुकूळ नसेल तर शौनक इत्यादिकांनीं सांगितलेली शांति करावी. ती असी,—"अस्य कुमारस्य उपनयने अस्याः कन्यकाया विवाहे वा बृहस्पत्यानुकूल्यसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं बृहस्पतिशांतिं करिष्ये," असा संकल्प करून आचार्याला वरावें. स्थंडिलाच्या ईशान्यदिशेचे ठिकाणीं

यथाविधि स्थापन केलेल्या श्वेत कलशांत पंचगव्य, कुशोदक, विष्णुक्रांता, शतावरी इत्यादि औषधि टाकून पूर्णपात्र स्थापन केल्यानंतर पिंवळ्या अक्षतांनीं केलेलें असें जें दीर्घ चतुष्कोण पीठ त्याच्यावर सुवर्णमय असी बृहस्पतीची प्रतिमा स्थापन करून स्थंडिलावर अग्नि स्थापन इत्यादिक कर्म करावें. नंतर अन्वाधान करावें. तें असें,—"**बृहस्पतिमश्वत्थसमिदाज्यसपिर्मिश्रपायसैः साज्येन मिश्रितयवव्रीहितिलेन च प्रतिद्रव्यमष्टोत्तरशताहुतिभिः शेषेण स्विष्टकृतं०**" इत्यादिक अन्वाधान करून आज्यभागापर्यंत कर्म केल्यावर प्रतिमेचे ठायीं षोडशोपचारांनीं गुरूची पूजा करावी. त्या पूजेमध्यें पिंवळीं दोन वस्त्रें, पिंवळें यज्ञोपवीत, पिंवळा चंदन, पिंवळ्या अक्षता, पिवळीं पुष्पें, घृतदीप, दहिंभाताचा नैवेद्य, हे उपचार अर्पण केल्यानंतर माणिक्य किंवा सुवर्ण दक्षिणा देऊन ग्रहमखांत सांगितल्या रीतीनें कलशाचें अभिमंत्रण केल्यानंतर बृहस्पतीच्या मंत्रानें दधि, मध यांत भिजवलेल्या समिधा; आज्य; घरांत सिद्ध केलेलें पायस; मिश्रित यवादिक ह्या द्रव्यांनीं, जसें अन्वाधान केलें असेल तदनुसार होम करावा. नंतर होमशेष समाप्त करून गंधादिक उपचारांनीं बृहस्पतीची पूजा करून तांब्याचे पात्रांत उदक घेऊन त्यांत पिंवळ्या अक्षता, पिंवळें गंध, पिंवळीं पुष्पें, हीं घालून त्या उदकानें अर्घ्य द्यावें. अर्घ्याचा मंत्र—"**गंभीरदृढरूपांग देवेज्य सुमते प्रभो ॥ नमस्ते वाक्पते शांत गृहाणार्घ्यं नमोस्तु ते.**" नंतर प्रार्थना करावी—प्रार्थनेचे मंत्र—"**भक्त्या यत्ते सुराचार्य होमपूजादि सत्कृतं ॥ तत्त्वं गृहाण शांत्यर्थं बृहस्पते नमोनमः ॥** जीवो **बृहस्पतिः सूरिराचार्यो गुरुरंगिराः ॥ वाचस्पतिर्देवमंत्री शुभं कुर्यात्सदा मम,**" याप्रमाणें प्रार्थना करून नंतर देवतेचें विसर्जन, प्रतिमेचें दान हीं केल्यानंतर कुमार इत्यादिकांनीं युक्त अशा यजमानावर अभिषेक करावा. अभिषेकाचे मंत्र—"**आपोहिष्ठा० ऋचा ३, तत्त्वायामि० ऋचा ३, स्वादिष्ठया० ऋचा ३, समुद्रज्येष्ठा० ऋचा ४, इदमापः प्रवह० ऋचा १, तामग्निवर्णां० ऋचा १, या ओषधी० ऋचा १, अश्वावतीर्गोमतीर्न० ऋचा १, यद्देवा देवहेडनं०**" इत्यादिक कूष्मांडमंत्र "**पुनर्मनः पुनरायुः०**" एथपर्यंत तैत्तिरीय शाखेचे ठायीं प्रसिद्ध, ते कौस्तुभ इत्यादि ग्रंथांत लिहिलेले आहेत. ह्या मंत्रांनीं अभिषेक करून ब्राह्मणांला भोजन घालावें. याप्रमाणें बृहस्पतिशांति समाप्त झाली.

---

**अथोपनयनादौसंकल्पाः तत्रोपनयनात्पूर्वेद्युराचार्यो ममोपनेतृत्वयोग्यतासिद्ध्यर्थंकृच्छ्रत्रयंतत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतद्रव्यदानेनाहमाचरिष्ये तथाद्वादशाधिकस**हस्रगायत्रीजपमुपनेतृत्वयोग्यतासिद्ध्यर्थंकरिष्येइतिसंकल्पयेत् यदिपूर्वसंस्काराअतीतास्तदाअस्यकुमारस्यपुंसवनादीनामथवाजातकर्मादीनांचौलांतानांसंस्काराणांकालातिपत्तिजनित**प्रत्यवायपरिहारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रतिसंस्कारमेकैकांभूर्भुवःस्वःस्वाहेतिसमस्तव्याहृत्याज्याहुतिंहोष्यामिइतिसंकल्प्याग्निस्थापनेध्माधानादिपाकयज्ञतंत्रसहितावन्हिस्थापनाज्य**संस्कारपात्रसंमार्गमात्रसहितावाऽतीतसंस्कारसमसंख्यसमस्तव्याहृत्याज्याहुतीर्जुहुयात् ततोस्यकुमारस्यपुंसवनानवलोभनसीमंतोन्नयनजातकर्मनामकर्मसूर्यावलोकननिष्क्रमणोपवेशनान्नप्राशनचौलसंस्काराणांलोपनिमित्तप्रत्यवायपरिहारार्थं प्रतिसंस्कारंपादकृच्छ्रंप्रायश्चित्तं**चौलस्यार्धकृच्छ्रंबुद्धिपूर्वकलोपेप्रतिसंस्कारमर्धकृच्छ्रंचूडायाःकृच्छ्रंतत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभू**

तयथाशक्तिरजतद्रव्यदानेनाहमाचरिष्ये चौलस्योपनीत्यासहकरणस्यकुलधर्मप्राप्तत्वेकालातिपत्तिहोमंचौललोपप्रायश्चित्तंचनकार्यं केचित्संस्कारलोपप्रायश्चित्तंबटुनाकारयंतिततोबटुर्मम कामचारकामवादकामभक्षादिदोषपरिहारद्वारोपनेयत्वयोग्यतासिद्ध्यर्थं कृच्छ्रत्रयप्रायश्चित्तं तत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतदानद्वाराआचरिष्येइतिसंकल्पयेत् निष्कंनिष्कार्धं निष्कपादंनिष्कपादार्धंवारजतंगोमूल्यंदेयंनतुन्यूनंअष्टगुंजमाषरीत्याचत्वारिंशन्माषोनिष्क इत्युक्तंततःप्रायश्चित्तेकृतेपश्चादतीतमपिकर्मैवै कार्यमित्येकआचार्यानेत्यन्येपिविपश्चित इतिवचनाज्जातकर्मादिसंस्काराःकार्यानकार्याइतिपक्षद्वयंतत्रप्रायश्चित्तेनप्रत्यवायपरिहारेपिसंस्कारजन्यापूर्वोत्पत्त्यर्थंसंस्कारानुष्ठानपक्षेसंकल्पः पत्न्याकुमारेणचसहोपविश्यदेशकालौसंकीर्त्यास्यकुमारस्यगर्भांबुपानजनितदोषनिबर्हणायुर्मेधाभिवृद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंअतिक्रांतंजातकर्म तथाबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणायुरभिवृद्धिव्यवहारसिद्धिद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंनामकर्म आयुरभिवृद्धिद्वाराश्रीपर० सूर्यावलोकनं आयुःश्रीवृद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वाराश्रीपर० निष्क्रमणंआयुरभिवृद्धिद्वारा० उपवेशनं मातृगर्भमलप्राशनशुद्ध्यन्नाद्यब्रह्मवर्चसतेजइंद्रियायुरभिवृद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वाराश्रीप०अन्नप्राशनंचाद्यकरिष्येबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणेनबलायुर्वर्चोभिवृद्धिद्वाराश्रीप० चूडाकर्मद्विजत्वसिद्ध्यावेदाध्ययनाधिकारार्थंउपनयनंचश्वःकरिष्ये जातादिसर्वसंस्कारांगत्वेनपुण्याहवाचनंमातृकापूजनंनांदीश्राद्धंकरिष्ये उपनयनांगत्वेनमंडपदेवतास्थापनंकुलदेवतास्थापनंचकरिष्ये इतिस्वस्वगृह्यग्रंथानुसारेणसंकल्प्यनांदीश्राद्धांतंतंत्रेण अनेकोद्देशेन सकृदंगानुष्ठानंतंत्रंकृत्वा मंडपदेवतास्थापनादिकं बटुपितृभ्यांसुहृत्कृतवस्त्रदानांतंकृत्वान्नप्राशनांताःसंस्कारायथागृह्यंपूर्वदिनेकार्याः चौलोपनयनेपरदिनेकार्ये सर्वेषांसद्यःकरणेपूर्वोक्तसर्वसंकल्पवाक्यांतेउपनयनंचाद्यकरिष्येइतिसंकल्पः संस्काराणामकरणपक्षेचूडाकर्मोपनयनेसंकल्प्योभयांगत्वेनपुण्याहवाचनंनांदीश्राद्धंउपनयनांगत्वेनमंडपदेवतास्थापनंकुलदेवतास्थापनं करिष्ये इतिसंकल्पः नांदीश्राद्धांतेपूर्वपूजितमातृकासहितमंडपदेवतास्थापनंततः पूर्वोक्तरीत्यावेदिनिर्माणं इतिपूर्वदिनकृत्यं ॥

## आतां मौंजी इत्यादिक संस्कारांचे समयीं संकल्प करावयाचे ते सांगतों.

मौंजीच्या पूर्व दिवसीं आचार्यानें “ ममोपनेतृत्वयोग्यतासिद्ध्यर्थं कृच्छ्रत्रयं तत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्ति रजतद्रव्यदानेनाहमाचरिष्ये, ” “तथा द्वादशाधिकसहस्रगायत्रीजपमुपनेतृत्वयोग्यतासिद्ध्यर्थं करिष्ये, ” असा संकल्प करावा. जर मौंजीच्या पूर्वींचे संस्कार अंतरले असतील तर, “ अस्य कुमारस्य पुंसवनादीनामथवाजातकर्मादीनां चौलांतानां संस्काराणां कालातिपत्तिजनितप्रत्यवायपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रतिसंस्कारमेकैकां भूर्भुवःस्वःस्वाहेति समस्तव्याहृत्याज्याहुतिं होष्यामि, ” असा संकल्प करून अग्निस्थापन, इध्मास्थापन इत्यादिक पाकयज्ञाच्या तंत्रासहित, अथवा अग्निस्थापन, आज्यसंस्कार, पात्रसंमार्ग इतक्यांनीं मात्र युक्त अशा व प्रत्येक संस्काराची एक याप्रमाणें जितके संस्कार अंतरलेले असतील तितक्या संख्याक समस्तव्याहृतिमंत्रानें आज्याच्या आहुतींचा होम

करावा. तदनंतर, " **अस्य कुमारस्य पुंसवनानवलोभनसीमंतोन्नयनजातकर्मनामकर्मसूर्यावलोकननिष्क्रमणोपवेशनान्नप्राशनचौलसंस्काराणां लोपनिमित्तप्रत्यवायपरिहारार्थं प्रतिसंस्कारं पादकृच्छ्रं प्रायश्चित्तं चौलस्यार्धकृच्छ्रं बुद्धिपूर्वकलोपे प्रतिसंस्कारं अर्धकृच्छ्रं चूडायाः कृच्छ्रं तत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतद्रव्यदानेनाहमाचरिष्ये.** " चौलसंस्कार मौंजीसहवर्तमान करण्याचा कुलधर्म असेल तर काल अतिक्रांत झाल्याचा होम व चौलाच्या लोपाचें प्रायश्चित्त करूं नये. कोणी शिष्टजन संस्काराच्या लोपाचें प्रायश्चित्त बटूकडून करवितात. तदनंतर बटूनें, " **मम कामचारकामवादकामभक्षादिदोषपरिहारद्वारोपनेयत्वयोग्यतासिद्ध्यर्थं कृच्छ्रत्रयप्रायश्चित्तं तत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्ति रजतदानद्वारा आचरिष्ये,** " असा संकल्प करावा. निष्क, अर्धा निष्क, निष्काचा चतुर्थांश किंवा निष्काचा अष्टमांश याप्रमाणें रौप्य, गाईचें मौल्य द्यावें, याहून कमी देऊं नये. आठ गुंजांचा मासा एक, या मानानें चाळीस मासे ह्मणजे एक निष्क असें सांगितलें आहे—तदनंतर, " प्रायश्चित्त केलें तथापि अंतरलेलें कर्म जें तेंहि निश्चयें करावें, असें कितीएक आचार्य सांगतात. दुसरे आचार्य प्रायश्चित्त केल्यानंतर अंतरलेलें कर्म करूं नये असें ह्मणतात, " असें वचन आहे याकरितां प्रायश्चित्त केलें असतां जातकर्मादिक संस्कार करावे किंवा न करावे, याप्रमाणें दोन पक्ष आहेत. त्यामध्यें प्रायश्चित्तानें दोषाचा जरी परिहार झाला तथापि संस्कारजन्य पुण्य उत्पन्न होण्याकरितां संस्कार करणें असतील तर त्या पक्षीं संकल्प करावे. ते असे;—पत्नी, कुमार यांसह यजमानानें बसून देशकालांचा उच्चार करून, "**अस्य कुमारस्य** गर्भांबुपानजनितदोषनिबर्हणायुर्मेधाभिवृद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा **श्रीपरमेश्वर**प्रीत्यर्थं अतिक्रांतं जातकर्म, तथा बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणायुरभिवृद्धिव्यव**हारसिद्धिद्वा**रा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं नामकर्म, आयुरभिवृद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं सू**र्यावलोकनं,** आयुःश्रीवृद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं निष्क्रमणं, **आयुरभिवृद्धि**द्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं उपवेशनं, मातृगर्भमलप्राशनशुद्ध्यन्नाद्यब्रह्मवर्च**सतेजइंद्रियायुरभिवृद्धिबीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं अन्नप्राशनं चाद्य करिष्ये, बीजगर्भसमुद्भवैनोनिबर्हणबलायुर्वर्चोभिवृद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं चूडाकर्म, द्विजत्वसिद्ध्या वेदाध्ययनाधिकारार्थं उपनयनं च श्वः करिष्ये, जातादिसर्वसंस्कारांगत्वेन पुण्याहवाचनं मातृकापूजनं नांदीश्राद्धं च करिष्ये, उपनयनांगत्वेन मंडपदेवतास्थापनं कुलदेवतास्थापनं च करिष्ये,** " याप्रमाणें आपापल्या गृह्यग्रंथांत सांगितल्याप्रमाणें संकल्प करून नांदीश्राद्धांत कर्म एकतंत्रानें करावें. अनेकांच्या उद्देशानें एकवार अंगभूत कर्माचें अनुष्ठान करणें तें तंत्र होय. मंडपदेवतांचे स्थापनापासून बटु व त्याचे मातापितर यांला आप्तवर्गांनीं केलेल्या वस्त्रदाना ( अहेरा ) पर्यंत कर्म करून अन्नप्राशनापर्यंत सर्व संस्कार आपापल्या गृह्यसूत्राप्रमाणें पूर्वदिवसीं करावे. चौल व मौंजी हीं दुसऱ्या दिवसीं करावीं. सर्व संस्कार मौंजीच्या दिवसीं कर्तव्य असल्यास पूर्वी सांगितलीं जीं सर्व संकल्पांचीं वाक्यें त्यांच्या शेवटीं, " **उपनयनं चाद्य करिष्ये,** " असा संकल्प करावा. संस्कार न करणें असा पक्ष असेल तर चौलकर्म व उपनयन यांचे संकल्प करून, " **उभयां-**

गत्वेन पुण्याहवाचनं नांदीश्राद्धं उपनयनांगत्वेन मंडपदेवतास्थापनं कुलदेवतास्थापनं च करिष्ये," असा संकल्प करावा. नांदीश्राद्ध झाल्यानंतर पूर्वीं पूजा केलेल्या अशा ज्या मातृका त्यांहीं युक्त मंडपदेवतांचें स्थापन करावें. नंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें वेदि करावी. याप्रमाणें मौंजीच्या पूर्व दिवसाचें कृत्य समाप्त झालें.

---

ततःपरदिनेतिक्रांतचौलंकृत्वापूर्वजातचौलंत्वभ्यंगस्नानेनस्नापयित्वामात्रासहभोजयेत् तदाब्रह्मचारिभ्योभोजनंदेयमित्याचारः ततोदेशकालौसंकीर्त्यास्यकुमारस्यद्विजत्वसिद्धिद्वाराश्री परमेश्वरप्रीत्यर्थंगायत्र्युपदेशंकर्तुं तत्प्राच्यांगभूतंवापनादिकरिष्यइतिसंकल्प्यवापनादिकुर्यात् मुख्यशिखान्यशिखानांचौलेधृतानामत्रवापनंततःस्नातमहतवस्त्रंबद्धशिखंकृतमंगलतिलकंबटुंकुर्युः मौहूर्तिकंसंपूज्यतदुक्तेसुमुहूर्तेआचार्योवेद्यांप्राङ्मुखउपविष्टोंतःपटमपसार्यबटुमुखमीक्षेत कृतनमस्कारांतेस्वांकेकुर्वीत ततोविप्रायथाचारंमंत्रैरुभयोःशिरस्यक्षतान्क्षिपेयुःएवं यथागृह्यमुपनयनप्रयोगंज्ञात्वानुष्ठेयं सर्वत्रबटुनागायत्र्यादिमंत्रान्वाचयन्संधिकृतंवर्णविकारं नान्यथाकुर्यात् प्रयोगशेषंसमाप्यद्विशतेशतंयथाशक्तिवाब्राह्मणभोजनंसंकल्प्यविप्रेभ्योभूयसीं दक्षिणांदद्यात् ततोब्रह्मचारीनूतनभिक्षाभाजनेमातरंमातृष्वस्रादिकांवा भिक्षांभवतीददात्विति अनुप्रवचनीयार्थंतंडुलान्याचेत पितरंभिक्षांभवान्ददात्वितियाचेत भैक्ष्यमाचार्यायनिवेद्यमध्यान्हसंध्यामुपास्यगुरुसन्निधावहःशेषंनयेत् तद्दिनेमध्यान्हसंध्या विकल्पितेत्यन्ये ब्रह्मयज्ञस्तुद्वितीयदिनमारभ्यगायत्र्याकार्यःअनुप्रवचनीयहोमारंभात्पूर्वं गर्जितवृष्ट्यादिसंभावनायां दिवैवचरुश्रपणांतंकृत्वास्तमितेजुहुयात् पाकाभावेगर्जितादिनिमित्तेतुशांतिंकृत्वापाकःकार्यः॥

तदनंतर दुसऱ्या दिवशीं अतिक्रांत (अंतरलेलें) चौल करावें आणि जर पूर्वीं चौल झालेला असा बटु आहे तर अभ्यंग स्नान घालून त्याला मातेसह भोजन घालावें. त्या वेळीं ब्रह्मचारी जे त्यांना भोजन घालावें असा आचार आहे. नंतर देशकालांचा उच्चार करून, "अस्य कुमारस्य द्विजत्वसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गायत्र्युपदेशं कर्तुं तत्प्राच्यांगभूतं वापनादि करिष्ये," असा संकल्प करून वपन इत्यादिक करावें. मुख्य शिखा ठेवून इतर ज्या चौलांत धारण केलेल्या शिखा त्यांचें एथें वपन करावें, ह्मणजे त्या काढून टाकाव्या. तदनंतर बटूला स्नान घालून नवें वस्त्र अंगावर देऊन शिखाबंधन करून मांगलिक तिलक लावावा. ज्योतिषी जो त्याची पूजा करून त्यानें सांगितलेल्या मुहूर्तावर, वेदीचे ठिकाणीं पूर्वाभिमुख बसलेल्या आचार्यानें अंतःपट एकीकडे दूर करून बटूचें मुख अवलोकन करावें. नंतर बटूनें नमस्कार केल्यानंतर आपल्या मांडीवर त्याला बसवावें. तदनंतर ब्राह्मणांनीं जसा आचार असेल तदनुसार मंत्रेंकरून दोघांच्या मस्तकांवर अक्षता टाकाव्या. याप्रमाणें जसें सूत्र असेल त्याप्रमाणें मौंजीचा प्रयोग पाहून सर्व कर्म आचरण करावें. सर्व ठिकाणीं बटूकडून गायत्री इत्यादिक मंत्र ह्मणवीत होत्साता संधिकृत अक्षरें अशुद्ध ह्मणवूं नयेत. प्रयोगशेष समाप्त करून दोनशें, शंभर अथवा जसी शक्ति असेल त्याप्रमाणें ब्राह्मणभोजनाचा संकल्प करून ब्राह्मणांला भूयसी दक्षिणा द्यावी. तदनंतर ब्रह्मचारी यानें नूतन अशा भिक्षापात्रामध्यें माता किंवा मावशी इत्यादिकांपाशीं, "भिक्षां भवती ददातु" असें

वाक्य ह्मणून अनुप्रवचनीय होमाकरितां तांदूळ मागावे. पित्याजवळ, "**भवान् भिक्षां ददातु**" असें वाक्य ह्मणून मागावे. नंतर ती भिक्षा आचार्याजवळ देऊन मध्यान्हसंध्या करून शेष राहिलेला दिवस गुरूच्या जवळ घालवावा. मौंजीच्या दिवसीं मध्यान्हसंध्या वैकल्पिक ( करावी किंवा न करावी असी ) आहे असें कोणी ग्रंथकार ( कृष्णभट्टीकार इत्यादि ) ह्मणतात. ब्रह्मयज्ञ करणें तो दुसऱ्या दिवसीं आरंभ करून गायत्रीमंत्रानें करावा. अनुप्रवचनीय होमाच्या आरंभाच्या पूर्वी गर्जना, पर्जन्यवृष्टि इत्यादि होण्याचा संभव असेल तर दिवसासच चरुश्रपणापर्यंत कर्म करून सूर्यास्त झाल्यानंतर होम करावा. पाक ( चरु ) करून न ठेवितां गर्जना इत्यादिक निमित्त प्राप्त होईल तर शांति करून नंतर चरु करावा.

**अथशांतिप्रयोगः ब्रह्मौदनपाकात्पूर्वंगर्जितेनसूचितस्यब्रह्मचारिकर्तृकाध्ययनविघ्नस्यनिरासद्वाराश्रीपर०शांतिंकरिष्यइतिसंकल्प्यस्वस्तिवाचनाचार्यवरणेकृतेआचार्योग्निंप्रतिष्ठाप्य च**क्षुषीआज्येनेत्यंते सवितारमष्टोत्तरशतसंख्यसाज्यपायसाहुतिभिर्गायत्रीमंत्रेणशेषेणस्वि**ष्टकृ**तमित्यादिप्रायश्चित्तहोमांतेगायत्र्यासवितारमाज्येनेतिअन्वाधायगृहसिद्धपायसहोमांते **बृहस्पतिसूक्तजपः अंतेआचार्यायधेनुंदत्वाशतंयथाशक्तिवाविप्रान्भोजयिष्येइतिसंकल्पयेत् ॥**

## आतां शांतीचा प्रयोग सांगतों.

**शांतीचा संकल्प.**—"**ब्रह्मौदनपाकात्पूर्वं गर्जितेन सूचितस्य ब्रह्मचारिकर्तृकाध्ययनविघ्नस्य निरासद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं शांतिं करिष्ये,**" असा संकल्प करून पुण्याहवाचन, आचार्यवरण हीं कर्में केल्यानंतर आचार्यानें अग्निस्थापन करून अन्वाधान करावें. तें असें,— "**चक्षुषीआज्येनेत्यंते सवितारं अष्टोत्तरशतसंख्यसाज्यपायसाहुतिभिर्गायत्रीमंत्रेण शेषेण स्विष्टकृतं,**" "**प्रायश्चित्तहोमांते गायत्र्या सवितारमाज्येन,**" याप्रमाणें अन्वाधान करून घरांत सिद्ध केलेल्या पायसाचा होम केल्यानंतर बृहस्पतिसूक्ताचा जप करावा. शेवटीं आचार्याला गोप्रदान देऊन, "**शतं यथाशक्ति वा विप्रान् भोजयिष्ये,**" असा ब्राह्मणभोजनाचा संकल्प करावा.

मेधाजननात्पूर्वकालिकाग्निकार्यंयावत्अग्निनाशेउपनयनाहुतिभिः कटिसूत्रधारणादिमाणवकसंस्कारावक्षारणाग्निकार्यगायत्र्युपदेशरहिताभिःपूर्वोत्तरतंत्रसहिताभिरग्निमुत्पाद्यतत्रानुप्रवचनीयपूर्वभाव्यग्निकार्यंकृत्वानुप्रवचनीयहोमंकृत्वा मेधाजननात्प्राक्तनान्यग्निकार्याणिकृत्वामेधाजननंकार्यमितिकौस्तुभेउपपादितं नष्टोपनयनाग्नेःपुनरुत्पत्तिहोमेविनियोगइतिविशेषइतिचोक्तं ममतुउपनयनाहुतिभिरग्निमुत्पाद्यतत्रमेधाजननपूर्वभाव्यग्निकार्याणिकृत्वामे**धाजननंकार्यंअनुप्रवचनपूर्वभाव्यग्निकार्यमनुप्रवचनीयहोमश्चनकार्यंइतिभाति गायत्र्युपदेशानुप्रवचनीयमेधाजननानांत्रयाणां समप्रधानभावेनाध्ययनांगत्वादग्नेस्तितयांगत्वात्कौस्तुभोक्तरीत्या** गायत्र्युपदेशतत्पूर्वाग्निकार्यावृत्त्यभाववदनुप्रवचनीयतत्पूर्वाग्निकार्ययोरावृत्त्यभावौ**चित्यात्** नह्यग्निष्टोमांगपशुत्रयस्यांगेयूपेपशुद्वयानुष्ठानानंतरंनष्टेतृतीयपश्वर्थंयूपोत्पादनेद्वि**तीयपश्वनु**ष्ठानमप्यावर्तते अत्रसदसत्सद्भिर्विचार्यानुष्ठेयं सायंसंध्याग्निकार्येकृतेनुप्रवचनीय**होमंब्रह्मचारीकुर्यात् बटोरशक्तौचरुश्रपणांतमन्यःकुर्यात् होममात्रंबटुःकुर्यात् हुतचरुशेषेणत्र्यवरब्राह्मणभोजनं ॥**

मेधाजननाच्या पूर्वकालीं होणारें जें अग्निकार्य तें झाल्यावांचून उपनयनाग्नि नष्ट झाला असतां कटिसूत्रधारण इत्यादिक बटूचे संस्कार, अवक्षारण, अग्निकार्य, गायत्र्युपदेश ह्यांवांचून व पूर्वोत्तरतंत्रसहित अशा ज्या उपनयनाच्या आहुति त्यांहींकरून अग्नि उत्पन्न करून त्या अग्नीवर अनुप्रवचनीय होमाच्या पूर्वी होणारें अग्निकार्य करून नंतर अनुप्रवचनीय होम करून मेधाजननाच्या पूर्वीचीं अग्निकार्यें करून मेधाजनन करावें असें कौस्तुभांत सांगितलें आहे, व "**नष्टोपनयनाग्नेः पुनरुत्पत्तिहोमे विनियोगः**" असा होमाविषयीं विशेषहि सांगितला आहे. मला तर, उपनयनाच्या आहुतींनीं अग्नि उत्पन्न करून त्या अग्नीवर मेधाजननाच्या पूर्वी होणारीं अग्निकार्यें करून मेधाजनन करावें, व अनुप्रवचनाच्या पूर्वी होणारें अग्निकार्य आणि अनुप्रवचनीय होम हीं करूं नयेत असें वाटतें. कारण, गायत्र्युपदेश, अनुप्रवचनीय आणि मेधाजनन हीं तीन कर्में सारखीं प्रधान असल्यामुळें अध्ययनाचीं अंगें असून अग्नि त्या तीन प्रधान कर्मांचें अंग आहे याकरितां कौस्तुभांत सांगितल्या रीतीनें गायत्र्युपदेश, व तत्पूर्वी होणारें अग्निकार्य यांच्या आवृत्तीचा जसा अभाव करावा तसा अनुप्रवचनीय व त्याच्या पूर्वीचें अग्निकार्य यांच्या आवृत्तीचा अभाव मानावा हें योग्य आहे. अग्निष्टोमाचीं अंगें असे जे तीन पशुयाग त्यांचें अंग जो यूप (यज्ञांगस्तंभ) तो, दोन पशुयाग केल्यानंतर नष्ट होईल तर तिसरा पशुयाग करण्यासाठीं नष्ट झालेल्या यूपाची उत्पत्ति करण्याविषयीं दुसऱ्या पशुयागाचें अनुष्ठानहि होत नाहीं. याविषयीं विद्वानांनीं सदसद्विचार करून करणें तें करावें. सायंसंध्या, अग्निकार्य हीं करून ब्रह्मचारी यानें अनुप्रवचनीय होम करावा. ब्रह्मचारी अशक्त असेल तर अन्यानें, चरु श्रपणापर्यंत कर्म करावें, होम मात्र ब्रह्मचारी यानें करावा. होम करून शेष जो चरु (भात) राहिला असेल तेणेंकरून तीनपर्यंत ब्राह्मणांला भोजन घालावें.

---

**अथबटुव्रतं क्षारादिवर्जमश्नीयाद्ब्रह्मचारीदिनत्रयं शयीताधश्चतुर्थेन्हिमेधाजननमाचरेत् यद्वाद्वादशरात्रंस्यादब्दव्रतमथापिवा मेधाजननविधिरन्यत्र ॥**

**बटु (ब्रह्मचारी) याचें व्रत सांगतों.**–"क्षार, लवण, इत्यादिकानें वर्ज्य असें भोजन ब्रह्मचारी यानें तीन दिवस करावें. खालीं निद्रा करावी, चवथ्या दिवसीं मेधाजनन करावें. अथवा बारा रात्रींपर्यंत किंवा एक वर्षपर्यंत पूर्वोक्त व्रत धारण करावें" मेधाजननाचा विधि दुसऱ्या ग्रंथीं पहावा.

---

**अथमंडपदेवतोत्थापनं तत्स्थापनदिनात्समदिवसेपंचमसप्तमदिनयोश्चशुभं षष्ठदिनेविषमदिनेचाशुभं ॥**

**आतां यानंतर मंडपदेवतांचें उत्थापन (देवदेवक उठविणें) सांगतों.**–तें मंडपदेवतांचें उत्थापन, ज्या दिवसीं मंडपदेवतांचें स्थापन केलें त्या दिवसापासून समदिवसीं व पांचवा, सातवा ह्या दिवसीं करावें, तें शुभ होय. सहाव्या दिवसीं व विषम दिवसीं अशुभ होय.

---

**अथमंडपोद्वासनपर्यंतंनिषेधाः नांदीश्राद्धेकृतेपश्चाद्यावन्मातृविसर्जनं दर्शश्राद्धंक्षयश्राद्धं स्नानंशीतोदकेनच अपसव्यंस्वधाकारंनित्यश्राद्धंतथैवच ब्रह्मयज्ञंचाध्ययनंनदीसीमातिलंघनं**

उपवासव्रतंचैवश्राद्धभोजनमेवच नैवकुर्युःसपिंडाश्चमंडपोद्वासनावधि अत्रस्वधाकारग्रहणं तत्सहचरितवैश्वदेवनिषेधार्थं अत्रसपिंडास्त्रिपुरुषपर्यंताइतिपुरुषार्थचिंतामणौ अभ्यंगेसूतकेचैवविवाहेपुत्रजन्मनि मांगल्येषुचसर्वेषुनधार्यंगोपिचंदनं एतेषुभस्मधारणमपिनकुर्वंति जननाशौचेभस्मगोपीचंदनेनिषिद्धे मृतकेभस्मधार्यं ॥

आतां मंडपदेवतांचें विसर्जन होई तावत्कालपर्यंत सपिंडांनीं कोणतीं कर्में वर्ज्य करावीं तीं सांगतों—" नांदीश्राद्ध केल्यानंतर मातृकांचें विसर्जन होई तावत्कालपर्यंत दर्शश्राद्ध, मातापितरांचें सांवत्सरिक श्राद्ध, शीतोदकानें स्नान, अपसव्य, स्वधाकार, नित्यश्राद्ध, ब्रह्मयज्ञ, अध्ययन, नदीचें उल्लंघन, सीमोल्लंघन, उपोषणव्रत, श्राद्धभोजन हीं सर्व सपिंडांनीं मंडपदेवतांचें विसर्जन होईपर्यंत वर्ज्य करावीं." एथें स्वधाकाराचें जें ग्रहण केलें तें स्वधाकारविशिष्ट जो वैश्वदेव त्याच्या निषेधाकरितां आहे, यावरून वैश्वदेवहि करूं नये असें सांगितलें. एथें सपिंड घेणें ते तीन पुरुषपर्यंत घ्यावे असें पुरुषार्थचिंतामणीमध्यें सांगितलें आहे— " अभ्यंग, आशौच, विवाह, पुत्रजन्म आणि सर्व मांगलिक कार्यें यांमध्यें गोपीचंदन लावूं नये." अभ्यंग इत्यादिक जीं, पूर्वीं सांगितलीं त्यांमध्यें भस्म सुद्धां धारण करीत नाहींत. जननाशौचामध्यें भस्म, गोपीचंदन धारण करूं नयेत. मृताशौचामध्यें भस्म धारण करावें.

---

षंढांधबधिरमूकपंगुकुब्जवामनादयःसंस्कार्याः मत्तोन्मत्तौनसंस्कार्यावित्येके पातित्यंतु नास्ति कर्मानधिकारात् तदपत्यंसंस्कार्यं ब्राह्मण्यांब्राह्मणादुत्पन्नोब्राह्मणएवेतिश्रुतेःअन्येतुमत्तोन्मत्तावपिसंस्कार्यावित्याहुः अत्रहोममाचार्यःकरोति उपनयनंचाचार्यसमीपनयनमग्निसमीपनयनंवागायत्रीवाचनंवाविकलांगविषयेप्रधानं एतत्त्रयान्यतममात्रंविकलांगेसंपाद्यंअन्यदंगंयथासंभवंकार्यं मूकबधिरादेःसावित्रीवाचनासंभवेस्पृष्ट्वासावित्रीजपःकार्यः संस्कारमंत्रावासःपरिधानमंत्राश्चाचार्येणवाच्याः केचित्तूष्णींवासःपरिधानादिक्रमाहुः एवंविवाहेपि कन्यास्वीकरणादन्यत्सर्वंविप्रेणकारयेदित्यादिवचनात् इतिविकलांगोपनयनादिविचारः ॥

षंढ, बहिरा, मुका, पांगळा, कुबडा आणि वामन ( खुजा, ऱ्हस्व, ) इत्यादिकांचे संस्कार करावे. मत्त, उन्मत्त यांचे संस्कार करूं नयेत असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. पातित्य जें तें तर नाहीं; कारण, त्यांना कर्माचा अधिकार नाहीं. मत्त, उन्मत्त यांच्या अपत्यांचे संस्कार करावे; कारण " ब्राह्मणापासून ब्राह्मणीस्त्रीचेठायीं जो उत्पन्न झाला तो ब्राह्मणच होय," असी श्रुति आहे. दुसरे ग्रंथकार तर मत्त, उन्मत्त यांचेहि संस्कार करावे असें ह्मणतात. ह्या संस्कारांमध्यें होम करणें तो आचार्यानें करावा. विकलांग ह्मणजे ज्यास अवयव कमी आहेत तो, त्याचें उपनयन ह्मणजे आचार्याच्या जवळ त्याला नेणें, किंवा अग्नीच्या जवळ नेणें, अथवा गायत्रीमंत्र ह्मणणें, हीं तीन कर्में विकलांगाच्या उपनयनाविषयीं प्रधान आहेत; याकरितां ह्या तिहींतून कोणतें एक मात्र करावें. इतर अंगरूप कर्में जसा संभव असेल त्याप्रमाणें करावीं. मुका, बहिरा इत्यादिकांस गायत्रीमंत्र ह्मणण्याचा संभव नाहीं यास्तव त्याला स्पर्श करून गायत्रीमंत्राचा जप करावा. संस्काराचे मंत्र व वस्त्रपरिधान कर-

ण्याचे मंत्र ह्मणणें ते आचार्यानें ह्मणावे. कोणी ग्रंथकार, वस्त्रपरिधान इत्यादिक करणें तें मंत्रविरहित करावें असें ह्मणतात. याप्रमाणें विवाहामध्येंहि असाच निर्णय जाणावा; कारण, "कन्येचे पाणिग्रहणावांचून इतर सर्व कर्म ब्राह्मणाकडून करवावें," असें वचन आहे. याप्रमाणें विकलांगाचे मौंजी इत्यादिकांचा निर्णय समाप्त झाला.

---

अमृतेजारजःकुंडोमृतेभर्तरिगोलकः एतयोःकुंडगोलकयोःसंस्कार्यत्ववचनंयुगांतरविषयं तस्यक्षेत्रजपुत्रविषयत्वात् कलियुगेदत्तौरसातिरिक्तपुत्राणांनिषेधात् ज्येष्ठेत्वकृतसंस्कारेगर्भाधानादिकर्मभिः कनिष्ठोनैवसंस्कार्यइतिशातातपोब्रवीत् इदंचौलोपनयनांतसंस्कार्यविषयं विवाहविषयेतुविकलांगेषुनायंनियमः कन्यास्वपिज्येष्ठाविवाहानंतरमेवकनिष्ठायाविवाहः ज्येष्ठपुत्रविवाहाभावेपिकनिष्ठाकन्यासंस्कार्या ज्येष्ठस्योपनयनाभावेकनिष्ठानविवाह्या ॥

"पति जीवंत असतां जारापासून जो झाला तो कुंड होय, आणि पति मृत झाल्यावर जारापासून झाला तो गोलक होय." हे जे कुंड व गोलक यांचे संस्कार करावे अशा अर्थाचें जें वचन आहे तें अन्ययुगांविषयीं आहे; कारण तें वचन क्षेत्रजपुत्रविषयक आहे, व कलियुगामध्यें दत्तक, औरस ह्यांवांचून अन्यपुत्रांचा निषेध आहे. "वडील पुत्राचे संस्कार झाले नसतील तर कनिष्ठाचे गर्भाधानादिक संस्कार निश्चयें करूं नयेत, असें शातातप सांगतो," हें वचन चौलापासून मौंजीपर्यंत जे संस्कार त्यांविषयीं निषेध सांगतें. विवाहाविषयीं तर विकलांग जे त्यांविषयीं हा नियम नाहीं. कन्यांविषयींहि हाच निर्णय समजावा, ह्मणजे वडील कन्येचा विवाह झाल्यानंतरच कनिष्ठेचा विवाह करावा. ज्येष्ठपुत्राचा विवाह झाला नसेल तथापि कनिष्ठ कन्येचा संस्कार ( विवाह ) करावा. ज्येष्ठपुत्राची मौंजी झाली नसेल तर कनिष्ठ कन्येचा विवाह करूं नये.

---

अथपुनरुपनयनं तच्चत्रिविधं प्रत्यवायनिमित्तकंप्रायश्चित्तभूतंपुनरुपनयनमाद्यं तच्चजातकर्मादिसहितंतद्रहितंप्रायश्चित्तांतरसहितंकेवलंचेत्यनेकविधं कृतस्योपनयनस्योक्तकालाद्यंगवैगुण्येनवैफल्यापत्तावपरं वेदांतराध्ययनार्थविहितंतृतीयं तत्रप्रथमंयथा अमत्याऔषधांतरानाश्यरोगनाशार्थंपैष्ट्याःसुरायाःपानेत्रिमासंकृच्छ्राचरणंपुनरुपनयनंच मत्यापैष्ट्यन्यसुरायाऔषधार्थपानेकृच्छ्रातिकृच्छ्रौपुनरुपनयनंच पैष्टीपानेद्वादशाब्दं अज्ञानाद्वारुणीगौडीमाध्वीसुरापीताचेत्पुनरुपनयनंतप्तकृच्छ्रंच अज्ञानाद्रेतोविन्मूत्राणामशनेसुरासंसृष्टान्नजलादिभक्षणेचपुनःसंस्कारस्तप्तकृच्छ्रंच ज्ञात्वाविण्मूत्राद्यशनेचांद्रायणपुनःसंस्कारौ लशुनपलांडुगृंजनविड्वराहग्रामकुक्कुटनरगोमांसभक्षणेद्विजातीनांतत्तत्प्रायश्चित्तांतेपुनरुपनयनं अविखरोष्ट्रमानुषीक्षीरपानेहस्तिनीवडवाक्षीरपानेचतप्तकृच्छ्रं पुनःसंस्कारःरासभोष्ट्राद्यारोहणेकृच्छ्रः पुनःसंस्कारश्च इदंहेमाद्रिमतमितिसिंधौक्वचित्मिताक्षरास्मृत्यर्थसारादिमतेरासभोष्ट्रारोहेउपवासत्रयादिमात्रंनतुपुनःसंस्कारः कौस्तुभाशयोप्येवंवृषभारोहणेअमत्याकृच्छ्रंमत्याकृच्छ्रत्रयादि केचिद्वृषारोहेपुनःसंस्कारंकुर्वंतितत्रमूलंमृग्यं एवमजबस्तमहिषारोहेपि मांसभक्षकपशोर्विट्भक्षणेपुनरुपनयनमात्रं केचिन्मानुषमलभक्षणेपिपुनःसंस्कारमात्रमाहुःप्रेतशय्याप्र

तिंग्राहीपुन:संस्कारमर्हति जीवतोमृतवार्ताश्रुत्वांत्यकर्मकरणे तंघृतकुंभेनिमज्योद्धृत्यस्नापाय त्वाजातकर्माद्युपनयनांतसंस्कारान्कृत्वात्रिरात्रव्रतांते पूर्वभार्ययातस्यांमृतायामन्यभार्ययावा विवाह:कार्य:आहिताग्निश्चेत्पुनराधानायुष्मदिष्टयादितीर्थयात्रांविनाकालिंगांगवंगांध्रसिंधुसौ वीरप्रत्यंतवासिदेशगमनेपुन:संस्कार: चांडालान्नभक्षणेचांद्रायणं बुद्धिपूर्वभक्षणेकृच्छ्राब्दं उभयत्रपुन:संस्कार:अजिनंमेखलादंडोभैक्ष्यचर्याव्रतानिच निवर्ततेद्विजातीनांपुन:संस्कारक र्मणि वपनंमेखलेतिस्मृत्यंतरेपाठ: ब्रह्मचारिणोमधुमांसाशनेपुनरुपनयनंप्राजापत्यंत्रिरात्रोपवा सोवा मत्याभक्षणेपराक:अभ्यासेद्विगुणंपुन:संस्कारश्च पितृमातृगुरुभ्योभिन्नस्यप्रेतस्यांत्यकर्म करणेब्रह्मचारिण: पुनरुपनयनंहस्तमथितदधिभक्षणेबहिर्वेदिपुरोडाशाशने अभ्यासेकृच्छ्र: पुन:संस्कारश्च य:संन्यासंगृहीत्वाततोनिवृत्यगार्हस्थ्यंचिकीर्षतिसषण्मासंकृच्छ्रान्कृत्वाजात कर्मादिसंस्कारै: संस्कृत:शुद्धोगार्हस्थ्यंकुर्यात् एवमनशनंमरणार्थसंकल्प्यनिवृत्तोपिकुर्यात् कर्मनाशाजलस्पर्शात्करतोयाविलंघनात् गंडकीबाहुतरणात्पुन:संस्कारमर्हति ॥

## आतां पुनरुपनयन सांगतों.

तें पुनरुपनयन तीन प्रकारचें आहे. प्रत्यवाय (दोष) ह्या निमित्तानें प्राप्त झालेलें जें प्रायश्चित्तरूप तें पहिलें पुनरुपनयन होय. तें पुनरुपनयन जातकर्म इत्यादिक संस्कारांनीं युक्त, जातकर्मादिसंस्कारविरहित, दुसऱ्या प्रायश्चित्तानें युक्त आणि केवल (नुस्तें) याप्रमाणें अनेक प्रकारचें आहे. एक वेळ केलेल्या उपनयनामध्यें उक्त कालादिकांचा कमीपणा प्राप्त झाल्यानें केलेलें व्यर्थ होऊन पुन: करणें प्राप्त झालें तें दुसरें पुनरुपनयन होय. एका वेदाचें अध्ययन करून दुसऱ्या वेदाचें अध्ययन करण्याकरितां सांगितलें तें तिसरें पुनरुपनयन होय. त्यांमध्यें पहिलें कसें तें सांगतों.–दुसऱ्या औषधानें दूर न होणारा अशा रोगाचा नाश होण्याकरितां, स्वमति नसून (वैद्यानें सांगितल्यामुळें) पैष्टी सुरेचें पान केलें असतां तीन मासपर्यंत कृच्छ्र प्रायश्चित्त करून पुनरुपनयन करावें. पैष्टी सुरेवांचून दुसरी सुरा स्वबुद्धीनें औषधाकरितां प्राशन केली असतां कृच्छ्र, अतिकृच्छ्र प्रायश्चित्त करून पुनरुपनयन करावें. पैष्टी सुरेचें प्राशन केलें असतां द्वादशाब्द प्रायश्चित्त करावें. वारुणी, गौडी (गुळाची), माध्वी (मधुकपुष्पांपासून झालेलें मद्य), ह्या सुरा न जाणून प्राशन केल्या असतां पुनरुपनयन आणि तप्तकृच्छ्र हीं प्रायश्चित्तें करावीं. अज्ञानेंकरून रेत, विष्ठा, मूत्र हीं प्राशन केलीं असतां, व मद्यमिश्रित अन्न, उदक इत्यादिक भक्षण केलीं असतां पुन:संस्कार (पुनरुपनयन), तप्तकृच्छ्र हें प्रायश्चित्त करावें. जाणून विष्ठा, मूत्र इत्यादिक भक्षण केलें असतां चांद्रायण, पुन:संस्कार हें प्रायश्चित्त करावें. द्विजाति (ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य) यांनीं लसूण, कांदे, गाजरें, हीं भक्षण केलीं असतां व गांवडुकर, गांवकोंबडे, मनुष्य, गाई यांचें मांस भक्षण केलें असतां तीं तीं प्रायश्चित्तें करून पुनरुपनयन करावें. मेंढी, गाढवी, उंट आणि मनुष्यस्त्री यांचें दूध प्राशन केलें असतां व हस्तिणी घोडी यांचें दूध प्राशन केलें असतां तप्तकृच्छ्र व पुन:संस्कार हें प्रायश्चित्त करावें. गाढव, उंट इत्यादिक जनावरांवर आरोहण केलें असतां कृच्छ्र व पुन:संस्कार हें प्रायश्चित्त करावें; हें हेमाद्रीचें मत आहे

असें निर्णयसिंधूच्या एकाद्या पुस्तकांत मिळतें. मिताक्षरा, स्मृत्यर्थसार इत्यादिक ग्रंथांच्या मतीं गाढव, उंट यांच्यावर आरोहण केलें असतां तीन उपोषणें इत्यादिक मात्र प्रायश्चित्त करावें, पुनःसंस्कार करूं नये. कौस्तुभग्रंथाचाहि अभिप्राय असाच आहे. न जाणून बैलावर आरोहण केलें असतां एक कृच्छ्र, जाणून केलें असतां तीन कृच्छ्र इत्यादिक प्रायश्चित्त करावें. कितीएक जन, बैलावर आरोहण केलें असतां पुनःसंस्कार करितात; परंतु त्याविषयीं मूळ शोध करावा. याप्रमाणें मेंढा, बोकड, टोणगा, यांच्यावर आरोहण केलें असतांहि हाच निर्णय जाणावा. मांसभक्षण करणाऱ्या पशूची विष्ठा भक्षण केली असतां पुनरुपनयन मात्र करावें. कोणी ग्रंथकार मनुष्याची विष्ठा भक्षण केली असतांहि पुनःसंस्कार मात्र करावा असें सांगतात. "मृतशय्येचें दान घेणारा पुनःसंस्काराला पात्र होतो." जिवंताची 'मृत झाला' असी वार्ता ऐकून त्याची और्ध्वदेहिक क्रिया केली असतां त्याला (ज्याची क्रिया केली तो ) घृताच्या कुंभांत बुडवून नंतर बाहेर काढून स्नान घालून जातकर्मापासून मौंजीपर्यंत संस्कार करून त्रिरात्रव्रत धारण केल्यानंतर पूर्वीच्या स्त्रियेबरोबर किंवा ती मृत असल्यास दुसऱ्या स्त्रियेबरोबर विवाह करावा. अग्निहोत्री असेल तर त्यानें पुनराधान, आयुष्मत् इष्टि करावी. तीर्थयात्रा इत्यादिक कारणावांचून कलिंग, अंगदेश, वंग, आंध्र, सिंधु, सौवीर, प्रत्यंत देश ( पश्चिम देश—म्लेच्छ देश ) ह्या देशांमध्यें गमन केलें असतां पुनःसंस्कार करावा. चांडालाचें अन्न भक्षण केलें असतां चांद्रायण व बुद्धिपूर्वक, चांडालाचें अन्न भक्षण केलें असतां कृच्छ्राब्द याप्रमाणें प्रायश्चित्त करून दोनही ठिकाणीं पुनःसंस्कार करावा. अजिन, मेखला, दंड यांचें धारण; भिक्षा मागणें; व्रतें इतके प्रकार द्विजाति ( ब्राह्मणादिक) जे त्यांच्या पुनःसंस्कारकर्मामध्यें वर्ज्य आहेत. 'अजिनं, मेखला' या ठिकाणीं 'वपनं, मेखला' असा दुसऱ्या स्मृतीमध्यें पाठ आढळतो. ब्रह्मचारी यानें मधु (मद्य), मांस हीं भक्षण केलीं असतां पुनरुपनयन, प्राजापत्य अथवा तीन रात्रि उपोषण हें प्रायश्चित्त करावें. बुद्धिपूर्वक ( जाणून ) भक्षण केलें असतां पराक प्रायश्चित्त करावें. अभ्यास ( वारंवार भक्षण ) असतां दुप्पट प्रायश्चित्त करून पुनःसंस्कार करावा. ब्रह्मचारी यानें पिता, माता व गुरु यांहून इतर मृत झालेल्याची अंत्यक्रिया केली असतां त्यानें पुनरुपनयन करावें. हातानें मथित केलेलें ( घुसळलेलें ) दहीं अभ्यासानें भक्षण करील, व वेदीच्या बाहेर पुरोडाश अभ्यासानें भक्षण करील तर कृच्छ्र, पुनःसंस्कार हें प्रायश्चित्त करावें. जो ब्राह्मण संन्यास घेऊन नंतर त्या आश्रमांतून निवृत्त होऊन गृहस्थाश्रमसंबंधी धर्मांत येण्याची इच्छा करितो त्यानें सहा महिने कृच्छ्र प्रायश्चित्त करून जातकर्मादिक संस्कारांनीं संस्कृत होत्साता शुद्ध होतो, नंतर त्यानें गृहस्थाश्रमसंबंधी कर्में करावीं. याप्रमाणें मरण येण्याकरितां उपोषणाचा संकल्प करून पुनः निवृत्त होईल तर त्यानेंहि असें प्रायश्चित्त करावें. "कर्मनाशा नदीच्या उदकाला स्पर्श, करतोया नदीचें उल्लंघन, गंडकी नदींत हातांनीं पोहणें यांपासून तो पुनःसंस्काराला पात्र होतो."

---

**अथ द्वितीयंपुनरुपनयनं प्रदोषेनिश्यनध्यायेमंदेकृष्णेगलग्रहे अपराण्हेचोपनीतःपुनःसंस्कारमर्हति अत्रप्रदोषःप्रदोषदिनंकृष्णःकृष्णपक्षएकादश्यादिरंत्यत्रिकरूपोपराण्हश्चदिन**

**तृतीयभागरूपइत्युक्तं** अनध्यायाअपिनित्याएवपौर्णिमाप्रतिपदादयःपुनरुपनयननिमित्तं न तुनैमित्तिकाअकालवृष्ट्यादिनिमित्तकत्रिरात्रादयः नैमित्तिकेषुप्रातर्गर्जितनिमित्तानध्याय एवपुनःसंस्कारनिमित्तं अत्रविस्तरःकौस्तुभे अंसाभिमर्शपूर्वकंबटोःसमीपमानयनंप्रधानक र्मतस्यविस्मरणेपुनरुपनयनं एवंगायत्र्युपदेशविस्मरणेपि ॥

## आतां दुसरें पुनरुपनयन सांगतों.

"प्रदोष, रात्रि, अनध्याय, शनिवार, कृष्ण, गलग्रहतिथि आणि अपराण्हकाल यांचे ठिकाणीं मौंजी झालेला पुनःसंस्काराला पात्र होतो." एथें प्रदोष ह्मणजे प्रदोषाचा दिवस. कृष्ण ह्मणजे कृष्णपक्ष; तो एकादशी इत्यादिक शेवटचे पांच दिवस. अपराण्ह ह्मणजें दिवसाचा तिसरा भाग असें सांगितलें आहे. अनध्यायांमध्येंहि पौर्णिमा, प्रतिपदा इत्यादिक जे नित्य अनध्याय सांगितले तेच पुनरुपनयनाला कारण होत. अकालीं वृष्टि होणें इत्यादि नैमित्तिक त्रिरात्रादि अनध्याय; ते पुनरुपनयनाला कारण होत नाहींत. नैमित्तिक अनध्यायांमध्यें प्रातःकालीं गर्जनानिमित्त अनध्याय तोच पुनःसंस्काराला कारण होतो; याविषयीं विस्तार कौस्तुभांत सांगितला आहे. पूर्वी खांद्यांला स्पर्श करीत होत्साता अशा बटूला गुरूजवळ आणणें हें जें प्रधानकर्म त्याचें विस्मरण झालें असतां पुनरुपनयन करावें. याप्रमाणें गायत्रीमंत्राच्या उपदेशाचें विस्मरण झालें असतांहि पुनरुपनयन करावें.

---

**तृतीयःपुनरुपनयननिमित्तप्रकारः एकंवेदमधीत्यवेदांतराध्ययनचिकीर्षायांप्रतिवेदंपुनरु पनयनमित्येके अन्यवेदिनामृग्वेदाध्ययनार्थमुपनयनमित्यपरे अन्येतुएकेनैवोपनयनेनवेद त्रयाध्ययनाधिकारः अथर्ववेदाध्ययनार्थंद्वितीयमुपनयनमित्याहुः तेनऋगादिवेदत्रयाध्या** यिनोमुंडमांडूक्याद्याथर्वणोपनिषदोविनापुनःसंस्कारंपठंतितेचिंत्याः **युगपदनेकवेदारंभे नो** पनयनावृत्त्यपेक्षेतिसकृदुपनीत्यायुगपत्सकलवेदारंभःसिद्ध्यतीतिपरे **तत्रएकवेदाध्ययनानं** तरंयद्वेदाध्ययनचिकीर्षातदेतिकर्तव्यताकंपुनरुपनयनं तत्रवपनंत्र**यौदनंमेधाजननंदीक्षाच कृताकृतापरिदानरहिताक्रियाभवति अनध्यायादिकेद्वितीयेपुनरुपनयननिमित्तेसर्वमविकृतं यथोक्तकालेउपनयनं ॥**

## आतां तिसरा पुनरुपनयनाचा प्रकार सांगतों.

एका वेदाचें अध्ययन करून दुसऱ्या वेदाचें अध्ययन करण्याची इच्छा असेल तर दरएक वेदाचे अध्ययनाविषयीं पुनरुपनयन करावें असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. अन्यवेदी यांना ऋग्वेदाचें अध्ययन करणें असेल तर त्यांचें पुनरुपनयन करावें, असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात. आणखीं दुसरे ग्रंथकार तर, एकाच उपनयनेंकरून तीन वेदांचे अध्ययनाचा अधिकार येतो, व अथर्वणवेदाचे अध्ययनाकरितां दुसरें उपनयन करावें असें ह्मणतात. तेणेंकरून ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद या तीन वेदांचें अध्ययन करणारे पुनःसंस्कार केल्यावांचून मुंड, मांडूक्य इत्यादि, अथर्वणवेदाचीं उपनिषदें पठण करितात ते चिंत्य आहेत. एककालीं अनेक वेदांच्या अध्ययनाचा आरंभ केला असतां पुनरुपनयनाच्या आवृत्तीची गरज

नाहीं, असें आहे यावरून एक्या उपनयनेंकरून एकाकालीं सर्व वेदांचा आरंभ झाला असें सिद्ध होतें, असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात. त्यामध्यें एका वेदाचें अध्ययन केल्यानंतर ज्या दुसऱ्या वेदाचें अध्ययन करण्याची इच्छा असेल त्या वेदामध्यें जसें सांगितलें असेल त्या विधीनें पुनरुपनयन करावें. त्यामध्यें वपन, ब्रह्मौदन, मेधाजनन आणि दीक्षा हीं कर्में कृताकृत; परिदानक्रिया नाहीं. दुसऱ्या उपनयनाला कारण जे अनध्यायादिक त्यांचे ठायीं उपनयन झाल्यामुळें जें पुनरुपनयन करणें तें कोणतेंहि कर्म वर्ज्य न करितां उक्तकालीं करावें.

---

अथप्रायश्चित्तार्थेव्रतबंधेविशेषः तत्रनिमित्तानंतरमेवकरणेउदगयनपुण्यनक्षत्राद्युक्तकालोनापेक्ष्यते अन्यथातुयथोक्तकालापेक्षा तत्रकर्तापितातदभावेपितृव्यादिःसपिंडः तदभावेन्यःकश्चित् यत्रपुनरुपनयनंप्रायश्चित्तत्वेनोक्तंतत्रपर्षदुपदिष्टविधिनातदेवकार्यं यत्रतुप्रायश्चित्तांतरसहितंतत्रोक्तविधिनाप्रायश्चितं संस्कार्येणकारयित्वाचार्येणतस्योपनयनंकार्यं यत्रजातकर्मादिसंस्कारसहितमुपनयनंविहितंतत्रजातादिचौलांतसंस्कारान्कृत्वाकार्यं पुनरुपनयनेगायत्रीस्थाने तत्सवितुर्वृणीमहइत्यस्या उपदेशादाचार्येणास्याएवऋचोद्वादशोत्तरसहस्रजपःकृच्छ्रत्रयंचोपनेतृत्वाधिकारार्थंकार्यं तत्रास्यकृतौर्ध्वदैहिकस्यपुनःसंस्कारद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंजातकर्माद्युपनयनांतसंस्कारान्करिष्ये एवंनिमित्तांतरेपिसंकल्पऊह्यः सर्वसंस्कारोद्देशेनतंत्रेणनांदीश्राद्धादिश्मश्रुवपनानंतरंचौलकेशवपनं मनुष्यादिक्षीरपानादिनिमित्तांतरेतुसंस्कार्योमुकदोषपरिहारार्थंपर्षदुपदिष्टममुकप्रायश्चित्तंकरिष्यइतिसंकल्प्यतत्कुर्यात् आचार्यस्तुअस्यामुकदोषपरिहारार्थंपुनःसंस्कारसिद्धिद्वाराश्री०पुनरुपनयनंकरिष्यइतिसंकल्प्योपनयनमात्रंकुर्यात् यत्रोपनयनमात्रोक्तिस्तत्रसंस्कार्यस्यनसंकल्पः किंत्वाचार्यस्यैव पुनरुपनयनंग्रामाद्बहिःप्राच्यामुदीच्यांवागत्वाकार्यं नांदीश्राद्धांतेमंडपदेवतास्थापनं कृतमंगलस्नानं संस्कार्यंभोजयित्वावपनपक्षेवपनस्नानेकारयित्वा अस्यप्रायश्चित्तार्थपुनरुपनयनहोमेदेवतापरिग्रहार्थमन्वाधानंकरिष्ये अस्मिन्नन्वाहितेग्नावित्यादिनित्यवत् ब्रह्मचारिणःपुनरुपनयनेसमंत्रकंवासोधारणंनित्यं अन्यस्यवैकल्पिकं ब्रह्मसूत्रधारणादिसूर्येक्षणांतंनित्यवत् ततोयुवासुवासाइत्येतन्मंत्रकंप्रदक्षिणमावर्तनादिवासोबद्धांजलिग्रहणांते प्रणवव्याहृतीनांऋष्यादिस्मृत्वा तत्सवितुर्वृणीमहइत्यस्यश्यावाश्वःसवितानुष्टुप् पुनरुपनयनेउपदेशेविनियोगः पादशोर्धर्चशःसर्वामितित्रिर्वाचयेत् ब्रह्मचारिणोमेखलादानादिनित्यवत्ब्रह्मचर्योपदेशांतं अन्यस्यमेखलाजिनदंडधारणंपाक्षिकं ब्रह्मचर्योपदेशोदिवामास्वाप्सीरित्यंतः वेदमधीष्वेत्यादिकंन ततः स्विष्टकृतादि मेधाजननपक्षेतत्पर्यंताग्निधारणं भिक्षापूर्वकानुप्रवचनीयः गायत्र्याःस्थानेतत्सवितुर्वृणीमहइतिहोमः त्रिरात्रव्रतांतेयस्मिन्नाश्रमेपुनरुपनयनंतदाश्रमधर्मान्कुर्यात् यत्र पुनरुपनयनांतेपुनर्विवाहःकृतौर्ध्वदैहिकादेःश्रूयतेतत्रमेखलादिधारणपूर्वकं कतिचिद्दिनानि ब्रह्मचर्यं कृत्वोचितकालेसमाप्यपूर्वभार्ययान्यययावाविवाहंकुर्यात् इतिऋग्वेदिनांपुनःसंस्कारः॥

## आतां प्रायश्चित्तार्थ जें पुनरुपनयन त्याविषयीं विशेष सांगतों.

निमित्त प्राप्त झाल्यानंतर तत्कालींच पुनरुपनयन करणें असेल तर उत्तरायण, शुभनक्षत्र

इत्यादिक उक्तकाल पाहण्याची गरज नाहीं. तत्कालीं करणें नसेल तर यथोक्तकाल पाहण्याची आवश्यकता आहे. त्या पुनरुपनयनाविषयीं कर्त्ता पिता, पिता नसल्यास चुलता इत्यादिक सपिंडांनीं करावें. चुलता इत्यादिक सपिंड नसतील तर दुसरा कोणी यानें करावें. जेथें प्रायश्चित्तरूपानें पुनरुपनयन सांगितलें तेथें सभेनें सांगितलेल्या विधीनें तेंच करावें. आणि जेथें दुसऱ्या प्रायश्चित्तासहवर्तमान पुनरुपनयन सांगितलें असेल तेथें, ज्याचें पुनरुपनयन करावयाचें त्याचेकडून उक्तविधीनें प्रायश्चित्त करवून आचार्यानें त्याचें उपनयन करावें. जेथें जातकर्मादिक संस्कारांसहवर्तमान पुनरुपनयन करण्याविषयीं सांगितलें तेथें जातकर्मापासून चौलापर्यंत संस्कार करून नंतर करावें. पुनरुपनयनीं गायत्रीस्थानीं "**तत्सवितुर्वृणीमहे०**" ह्या सावित्रीचा उपदेश करावा असें सांगितलें आहे याकरितां आचार्यानें ह्याच ऋचेचा १२,००० जप, व तीन कृच्छ्र प्रायश्चित्त हीं मौंजी करण्याच्या अधिकाराकरितां करावीं. नंतर संकल्प करावा. तो असा—"**अस्य कृतौर्ध्वदैहिकस्य पुनःसंस्कारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं जातकर्माद्युपनयनांतसंस्कारान् करिष्ये,**" याप्रमाणें दुसरें निमित्त असतांहि त्या त्याप्रमाणें संकल्पांत ऊह करावा. सर्व संस्कारांच्या उद्देशेंकरून एकतंत्रानें नांदीश्राद्धादिक कर्म करून श्मश्रूंचें वपन केल्यानंतर चौलसंबंधी केशांचें वपन करावें. मनुष्य इत्यादिकांचें दूध प्राशन इत्यादिक दुसरें निमित्त असेल तर संस्कार्यानें ( ज्याचा संस्कार त्यानें ) "**अमुकदोषपरिहारार्थं पर्षदुपदिष्टं अमुकप्रायश्चित्तं करिष्ये,**" असा संकल्प करून तें प्रायश्चित्त करावें. आचार्यानें तर, "**अस्यामुकदोषपरिहारार्थं पुनःसंस्कारसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं पुनरुपनयनं करिष्ये,**" असा संकल्प करून उपनयन मात्र करावें. जेथें उपनयन मात्र सांगितलें तेथें संस्कार्याला संकल्प नाहीं; तर आचार्यानेंच संकल्प करावा. पुनरुपनयन करणें तें गांवापासून बाहेर पूर्व किंवा उत्तर दिशेचे ठायीं जाऊन करावें. नांदीश्राद्धपर्यंत कर्म केल्यानंतर मंडपदेवतांचें स्थापन करावें. मंगलस्नान केलेला अशा संस्कार्याला, भोजन करवून वपन करण्याचा पक्ष असेल तर वपन, स्नान हीं करवून, "**अस्य प्रायश्चित्तार्थं पुनरुपनयनहोमे देवतापरिग्रहार्थमन्वाधानं करिष्ये ॥ अस्मिन्नन्वाहितेऽग्नौ,**" इत्यादिक अन्वाधान नित्याप्रमाणें करावें. ब्रह्मचाऱ्याला पुनरुपनयनांत समंत्रक वस्त्राचें धारण करणें हें नित्य आहे, ब्रह्मचारी नसेल तर त्याला कृताकृत आहे. यज्ञोपवीतधारणापासून सूर्याचें ईक्षण ( दर्शन ) करणें एथपर्यंत कर्म नित्याप्रमाणें करावें. तदनंतर "**युवासुवासा०**" हा आहे मंत्र ज्याचा असें जें प्रदक्षिण फिरणें इत्यादिकापासून वस्त्रानें अंजलि बांधून ती ग्रहण करणें एथपर्यंत कर्म केल्यानंतर प्रणव, व्याहृति यांचे ऋषि, देवता इत्यादिकांचें स्मरण करून उपदेश करावा. तो असा—"**तत्सवितुर्वृणीमहइत्यस्य श्यावाश्वःसवितानुष्टुप् ॥ पुनरुपनयने उपदेशे विनियोगः ॥ तत्सवि०**" याप्रमाणें प्रथम चरणरूपानें, दुसऱ्यानें अर्धी ऋचा, तिसऱ्यानें सर्व याप्रमाणें तीन वेळ ह्मणवावी. ब्रह्मचारी असेल तर त्याला मेखलादान इत्यादिकापासून ब्रह्मचर्याचा उपदेशपर्यंत कर्म नित्य आहे. इतरास मेखला, अजिन, दंड यांच्या धारणाचा विकल्प आहे. ब्रह्मचर्याचा उपदेश "**दिवामास्वाप्सीः**" ( दिवसास निद्रा करूं नको ) एथपर्यंत करावा. "**वेदमधीष्व**" ( वे-

दाचें अध्ययन कर ) इत्यादिक उपदेश करूं नये. तदनंतर स्विष्टकृत् होम इत्यादिक कर्म करावें. मेधाजनन करण्याचा पक्ष असेल तर मेधाजनन होई तेथपर्यंत अग्नि रक्षण करावा. भिक्षा मागून अनुप्रवचनीय होम करावा. गायत्रीच्या स्थानीं, " तत्सवितुर्वृणीमहे० " ह्या मंत्रानें होम करावा. त्रिरात्रव्रत धारण केल्यानंतर पूर्वी ज्या आश्रमामध्यें असतां पुनरुपनयन केलें त्या आश्रमाचे धर्म आचरण करावे. केलें आहे प्रेतकर्म ज्याचें असा जो त्याचें पुनरुपनयन झाल्यानंतर पुनः विवाह करावा असें जेथें सांगितलें असेल तेथें पूर्वी मेखला इत्यादि धारण करून कांहीं दिवसपर्यंत ब्रह्मचर्य करून योग्यकालीं त्याची समाप्ति करून पूर्वीच्या स्त्रियेबरोबर किंवा ( ती मृत असतां ) दुसऱ्या स्त्रियेबरोबर विवाह करावा. याप्रमाणें ऋग्वेदी यांचा पुनःसंस्कार समाप्त झाला.

---

अथयजुर्वेदिनां तत्रबौधायनोब्रह्मचारिणःपितृज्येष्ठाभ्यामन्योच्छिष्टभक्षणेस्त्रियासहभोजने मधुमांसश्राद्धसूतकान्नगणान्नगणिकान्नाशनेपुनरुपनयनमित्यादिउक्त्वाअग्निमुखंकृत्वा ज्यात्कपालाशसमिधमादायवाचयतिपुनस्त्वादित्या०कामाःस्वाहेतियन्मआत्मनोमिंदाभूदग्निः पुनरग्निश्चक्षुरदादितिद्वाभ्यांहुत्वाचरुंपक्त्वाजुहोति सप्तते अग्ने०घृतेनस्वाहेति ततोयेनदेवाः पवित्रेणेतितिसृभिरुपहोमास्ततः स्विष्टकृत्प्रभृतिसिद्धमाधेनुवरप्रदानात्अथापरमापरिधानात्कृत्वापालाशींसमिधमादाय व्रात्यप्रायश्चित्तंजुहोतिव्याहृतीर्जुहोतिअथापरोब्राह्मणवचनात् सावित्र्याशतकृत्वोभिमंत्रितंघृतंप्राश्यकृतप्रायश्चित्तोभवतीत्यादिकमवदत् अत्रोक्तपक्षाणांशक्ताशक्तभेदेनव्यवस्था इदंकौस्तुभेद्रष्टव्यं एवंशाखांतरेष्वपिवपनमेखलाजिनदंडभैक्ष्यचर्याव्रतादिकंवैकल्पिकव्यवस्थयानुष्ठायस्वस्वशाखोक्तोपनयनं कार्यं ॥

## आतां यजुर्वेदी यांचा पुनः संस्कार सांगतों.

" ब्रह्मचारी यानें पिता व आपणापेक्षां ज्येष्ठ यांहून इतरांचें उच्छिष्ट भक्षण केलें असतां; स्त्रियेसह भोजन केलें असतां; मद्य, मांस यांचें भक्षण केलें असतां, श्राद्धान्न, सूतकान्न, गणान्न ( बहुतांचें अन्न एकत्र शिजवलेलें ), वेश्येकडचें अन्न, यांचें भक्षण केलें असतां पुनरुपनयन करावें इत्यादिक सांगून अग्निमुख ह्मणजे स्थंडिलकरणादि कर्म करून आज्यानें भिजलेली पळसाची समिधा घेऊन मंत्र ह्मणावे. ते असे— "पुनस्त्वा० कामाः स्वाहा," "यन्म आत्मनो मिंदाभूदग्निः पुनरग्निश्चक्षुरदात्०" अशा दोन मंत्रांनीं हवन करून चरु शिजवून होम करावा. होमाचा मंत्र– " सप्तते अग्ने० घृतेन स्वाहा." तदनंतर "येन देवाः पवित्रेण०" ह्या तीन ऋचांनीं उपहोम करावे. नंतर स्विष्टकृत् होमापासून गुरूला गोप्रदान देणें एथपर्यंत कर्म करावें. दुसरा पक्ष—वस्त्रधारणापर्यंत कर्म करून पळसाची समिधा घेऊन व्रात्यप्रायश्चित्ताचा होम करून व्याहृतिमंत्रांनीं होम करावा. तिसरा पक्ष— ब्राह्मणाकडून गायत्रीमंत्रानें शंभर वेळ घृत अभिमंत्रित करवून तें घृत प्राशन केलें असतां कृतप्रायश्चित्त ( शुद्ध ) होतो इत्यादिक प्रकार बौधायन सांगतो. एथें जे पक्ष सांगितले त्यांची शक्ताशक्तभेदानें व्यवस्था करावी, हें कौस्तुभांत पाहावें. याप्रमाणें दुसऱ्या शाखांचे

ठिकाणींहि वपन, मेखला, अजिन, दंड, भिक्षाचरण, व्रतें इत्यादिक कर्में कृताकृतव्यवस्थेनें करून आपापल्या शाखेमध्यें सांगितल्याप्रमाणें पुनरुपनयन करावें.

---

**अथब्रह्मचारिधर्माः तत्रसंध्यात्रयमग्निपरिचरणंभैक्षंचनित्यं तत्राग्निकार्यंप्रातःसायंच सायमेवसकृद्वा तत्रपालाशखदिराश्वत्थशमीसमिधःश्रेष्ठास्तदलाभेऽर्कवेतसां भवच्छब्दपूर्विकाभिक्षाविप्राणां साचविप्रगृहेष्वेव आपदिशूद्रगृहेषुआमान्नंगृण्हीयात् हव्येश्राद्धभिन्न कव्येचाभ्यर्थितोभुंजीत अस्यब्रह्मयज्ञोपिनित्यः सचोपाकरणात्पूर्वंगायत्र्याकार्यः गुरूच्छिष्टं मध्वादिकंनिषिद्धमपितदन्यापरिहार्यरोगनिवृत्त्यर्थंभक्षणीयं निषिद्धान्यद्गुरूच्छिष्टंत्वनौषधमपिभक्ष्यं एवंज्येष्ठभ्रातुःपितुश्चोच्छिष्टेषुज्ञेयं दिवास्वापोनेत्रेकज्जलमुपानच्छत्रंमंचादौशयनंचवर्ज्यं तांबूलाभ्यंजनंचैवकांस्यपात्रेचभोजनं यतिश्चब्रह्मचारीचविधवाचविवर्जयेत् मधुसूतकान्नश्राद्धान्नादेर्निषेधाःपुनःसंस्कारप्रकरणोक्ताअनुसंधेयाः मेखलामजिनंदंडमुपवीतंच नित्यशः कौपीनंकटिसूत्रंचब्रह्मचारीविधारयेत् मेखलोपवीतादौत्रुटितेजलेप्रास्यान्यद्धारयेत् यज्ञोपवीतनाशेमनोज्योतिरित्यनेनव्रातपतिभिश्चेतिचतस्रआज्याहुतीर्जुहुयादित्युक्तं अस्यगुरुपरिचर्याप्रकारोऽन्यत्रज्ञेयः ॥**

## आतां ब्रह्मचारी याचे धर्म सांगतों.

त्रिकाळ संध्यावंदन, अग्नीची सेवा आणि भिक्षा हीं ब्रह्मचारी याला नित्य आहेत. त्यांमध्यें अग्नीची सेवा सकाळीं संध्याकाळीं करावी; अथवा सायंकाळींच एक वेळ करावी. पळस, खैर, पिंपळ आणि शमी ह्या समिधा उत्तम व त्यांचा अलाभ असेल तर रुई, वेत यांच्या घ्याव्या. “भवत्” शब्दपूर्वक भिक्षा ब्राह्मणांनीं मागावी. ती भिक्षा ब्राह्मणांचे घरींच मागावी. आपत्तिकालीं शूद्रांच्या घरीं आमान्नाची भिक्षा घ्यावी. हव्य (देवप्रीत्यर्थ जें अन्न तें), श्राद्धावांचून कव्य (पितृप्रीत्यर्थ जें अन्न तें) यांचे ठिकाणीं बलावलें असतां भोजन करावें. ब्रह्मचारी याला ब्रह्मयज्ञाहि नित्य आहे. तो ब्रह्मयज्ञ उपाकर्माच्या पूर्वी गायत्रीमंत्रेंकरून करावा. गुरूचें उच्छिष्ट, मध इत्यादिक निषिद्ध पदार्थ तेहि, त्या निषिद्ध पदार्थावांचून बरा न होणारा असा रोग झाला असल्यास त्याच्या परिहाराकरितां भक्षण करावे. निषिद्धावांचून दुसरें गुरूचें उच्छिष्ट असें औषध नसेल तथापि तें भक्षण करावें. याप्रमाणें वडील भ्राता, पिता यांच्या उच्छिष्टाविषयींहि हाच निर्णय जाणावा. दिवसा निद्रा, नेत्रांत काजळ घालणें, पायांत जोडा घालणें, छत्री घेणें, पलंग इत्यादिकांवर निद्रा करणें हीं वर्ज्य करावीं. “तांबूल, काजळ, कांस्यपात्रांत भोजन हीं संन्यासी, ब्रह्मचारी आणि विधवा यांनीं वर्ज्य करावीं.” मधु, सूतकान्न, श्राद्धान्न इत्यादिकांचे निषेध पुनःसंस्काररप्रकरणामध्यें सांगितले आहेत ते पाळावे. “मेखला, अजिन, दंड, यज्ञोपवीत, कौपीन, कटिसूत्र हीं ब्रह्मचारी याणें नित्य धारण करावीं.” मेखला, यज्ञोपवीत इत्यादिक तुटलीं असतां तुटलेलीं उदकांत टाकून दुसरीं धारण करावीं. यज्ञोपवीताचा नाश झाला असतां “मनोज्योति०” ह्या मंत्रानें व “व्रातपतिभिः०” ह्या तीन मंत्रांनीं घृताच्या चार आहुति हवन कराव्या असें सांगितलें आहे. ब्रह्मचारी यानें गुरूची सेवा करण्याचा प्रकार ग्रंथांतरीं पाहावा.

---

अथब्रह्मचारिव्रतलोपे संध्याग्निकार्यलोपेष्टसहस्रगायत्रीजपः क्वचित्सकृल्लोपेमानस्तोके तिमंत्रस्यशतंजपउक्तः भिक्षालोपेऽष्टशतं अभ्यासेद्विगुणंपुनःसंस्कारश्च मधुमांसाद्यशनेउक्तं स्त्रीसंगेगर्दभपशुः एकानेकव्रतलोपसाधारणमृग्विधाने तंवोधियाजपेन्मंत्रंलक्षंचैवशिवालये ब्रह्मचारीस्वधर्मेषुन्यूनंचेत्पूर्णमेतितत् ॥

## आतां ब्रह्मचारिव्रतांचा लोप झाला असतां प्रायश्चित्त सांगतों.

संध्या, अग्निकार्य यांचा लोप झाला असतां आठसहस्र गायत्रीमंत्राचा जप करावा. क्वचित् ग्रंथामध्यें एक वेळ, संध्या व अग्निकार्य यांचा लोप झाला असतां "मानस्तोके०" ह्या मंत्राचा शंभर वेळ जप करावा असें सांगितलें आहे. भिक्षालोप झाला असतां आठशें जप करावा. अभ्यास असतां द्विगुणित जप करून पुनःसंस्कार करावा. मधु, मांस इत्यादि भक्षण केलें असतां त्याविषयीं पूर्वी सांगितलें आहे. स्त्रियेचा संग झाला असतां ब्रह्मचारी यानें गर्दभपशुयाग करावा. एक किंवा अनेक व्रतांचा लोप झाला असतां साधारण प्रायश्चित्त ऋग्विधानग्रंथामध्यें सांगतो— "ब्रह्मचारी यानें स्वधर्माचे ठिकाणीं कांहीं न्यूनपणा झाला असतां शिवाच्या मंदिरांत बसून "तं वोधिया०" ह्या मंत्राचा लक्ष जप करावा, तेणेंकरून न्यूनपणा जाऊन पूर्णता होते."

---

उपाकर्मकृत्वाप्रागुक्तविद्यारंभकालेक्षरारंभोक्तविष्ण्वादिपूजाप्रकारेणवेदारंभः कार्यः द्विजस्त्रीणांयुगांतरेमौंजीबंधोवेदाध्ययनंचासीत्कलियुगेतुनैतद्द्वयं अतःस्त्रीणांवेदोच्चारादौ दोषः ॥

उपाकर्म करून पूर्वी सांगितलेला जो विद्येच्या आरंभाचा काल त्या कालीं अक्षरविद्येच्या आरंभीं जसी विष्णु इत्यादिक देवतांची पूजा करण्यास सांगितली त्या प्रकारानें पूजा करून वेदाध्ययनाचा आरंभ करावा. अन्ययुगामध्यें द्विजांच्या स्त्रियांला मौंजीबंधन व वेदांचें अध्ययन हे संस्कार होते. कलियुगामध्यें तर, हे दोन संस्कार स्त्रियांला नाहींत, याकरितां स्त्रियांला वेदाचा उच्चार इत्यादिकांविषयीं दोष आहे.

---

अथानध्यायाःतेचनित्यानैमित्तिकाश्चप्रायेणमौंजीप्रकरणेउक्ताःततोन्येपिउभयविधानध्यायाबहवोनिबंधेषूक्तास्तेत्रनप्रपंच्यंते कलिकालेस्मिंस्तावदनध्यायपालनस्यदुर्मेधसामशक्यत्वात् तथाचहेमाद्रौस्मृतिः चतुर्दश्यष्टमीपर्वप्रतिपत्स्वेवसर्वदा दुर्मेधसामनध्यायास्त्वंतरागमनेषुचेति अतःकलौप्रतिपद्द्वयमष्टमीद्वयंचतुर्दशीद्वयंपूर्णिमादर्शोऽयनसंक्रांतिरित्येतावतएवानध्यायांस्त्यक्त्वावेदशास्त्रादिकमध्येतव्यं पुंसांप्रायोल्पप्रज्ञत्वात् शिष्टाचारोप्येवमेव पूर्वदिने सायंपरत्रप्रातश्चत्रिमुहूर्तानध्यायतिथिसत्त्वेउदयेस्तमयेवापीत्यनेनदिनद्वये ऽनध्यायप्राप्तौवचनांतरं केचिदाहुःक्वचिद्देशेयावत्तद्दिननाडिकाः तावदेवत्वनध्यायोनतन्मिश्रेदिनांतरइति इदमप्यल्पप्रज्ञविषयंचतुर्थीसप्तम्यादौप्रदोषनिर्णयउक्तःप्रदोषेषुनस्मरेन्नचकीर्तयेदित्युक्तेरितरानध्यायतोदोषाधिक्यं अनध्यायस्तुनांगेषुनेतिहासपुराणयोः नधर्मशास्त्रेष्वन्येषुपर्वण्येतानिवर्जयेत् नित्येजपेचकाम्येचक्रतौपारायणेपिच नानध्यायोस्तिवेदानांग्रहणेग्राहणेस्मृतः ॥

## आतां अनध्याय सांगतों.

अनध्याय नित्य व नैमित्तिक असे दोन प्रकारचे, ते बहुधा पूर्वी मौंजीप्रकरणांत सांगितले आहेत. त्यांहून दुसरेहि नित्यनैमित्तिक अनध्याय ग्रंथांमध्यें पुष्कळ सांगितले आहेत परंतु ते एथें सांगत नाहीं; कारण ह्या कलियुगामध्ये ते सर्व अनध्याय पाळणें ह्मटलें ह्मणजे जन दुर्मति ( मतिमंद ) असल्यामुळें फार अशक्य आहे. तसेंच हेमाद्रिग्रंथामध्यें स्मृतिवचन सांगतों—" चतुर्दशी, अष्टमी, पर्वणी, प्रतिपदा, मधून गमन, इतके अनध्याय मंदमति यांना होत," याकरितां कलियुगामध्यें दोन प्रतिपदा, दोन अष्टमी, दोन चतुर्दशी, पूर्णिमा, अमावास्या आणि अयनसंक्रांति ( कर्क, मकर ) इतके मात्र अनध्यायदिवस टाकून वेद, शास्त्रें इत्यादिकांचें अध्ययन करावें; कारण पुरुषांची बुद्धि बहुधा मंद आहे, व शिष्टांचा आचारहि असाच आहे. पूर्वदिवसीं सायंकालीं व दुसऱ्या दिवसीं प्रातःकालीं साहा घटिका अनध्यायतिथि असेल तर, " उदयकालीं किंवा अस्तकालीं," ह्या वचनेंकरून दोन दिवसीं अनध्याय प्राप्त झाला असतां दुसरें वचन सांगतों—" ज्या दिवसीं जितक्या अनध्यायतिथीच्या घटिका असतील तितक्याच अनध्याय मानावा, अनध्यायघटिकायुक्त दुसरा दिवस अनध्याय नाहीं, असें कोणी ग्रंथकार सांगतात," हेंहि वचन मंदबुद्धि असतील त्यांविषयीं जाणावें. चतुर्थी, सप्तमी, इत्यादि दिवसीं प्रदोष होतो त्याचा निर्णय पूर्वी सांगितला आहे. " प्रदोषदिवसीं पठण करूं नये व स्मरणहि करूं नये असें वचन आहे, यावरून इतर अनध्यायांहून प्रदोष अनध्यायाचा दोष अधिक असें समजावें." " अंगें, इतिहास ( भारत इ० ), पुराणें, धर्मशास्त्रें व इतर शास्त्रें यांविषयीं अनध्याय नाहींत. पर्वणीचे दिवसीं ह्यांचें ( अंगें इत्यादिकांचें ) अध्ययन करूं नये. नित्यकर्म, जप, काम्यकर्म, यज्ञ, पारायण, यांविषयीं अनध्याय नाहीं. वेदाचें अध्ययन करणें व करविणें यांविषयीं अनध्याय आहे.

---

**अथाध्ययनधर्माः वेदारंभेवसानेगुरोःपादोपसंग्रहणं आदौप्रणवमुच्चार्यवेदमधीत्यांतेप्रणवमुच्चार्यभूमिंस्पृष्ट्वाविरमेत् रात्रेःप्रथमयामेचरमयामेचवेदाध्ययनं यामद्वयंशयानस्तुब्रह्मभूयायकल्पते गुरुंपितरंमातरंचमन्येतकदापिनद्रुह्येत अध्यापितायेगुरुंनाद्रियंतेशिष्यावाचामनसाकर्मणावा यथैवतेनगुरोर्भोजनीयास्तथैवतान्नभुनक्तिश्रुतंतत् इत्यध्ययनधर्माः ॥**

## आतां वेदाचें अध्ययन कसें करावें त्याचे धर्म सांगतों.

वेदाचे अध्ययनाच्या आरंभीं आणि समाप्तिकालीं गुरूचें पादोपसंग्रहण ( गुरूचे चरण धरणें ) करावें. प्रथम ओंकाराचा उच्चार करून नंतर वेदाचें अध्ययन करून शेवटीं ओंकाराचा उच्चार करून भूमीला स्पर्श करून विराम करावा. रात्रीच्या पहिल्या प्रहरीं, व शेवटच्या प्रहरीं वेदाध्ययन करावें. "दोन प्रहरपर्यंत निद्रा करणारा ब्रह्मत्वाला पावतो." गुरु, पिता, माता, यांचा सन्मान ठेवावा, कधींहि द्रोह करूं नये. " गुरूपासीं अध्ययन केलेले असे शिष्य वाणी, मन, कर्म यांहींकरून जर गुरूचा सत्कार न करितील तर जसे ते गुरूला पालन करण्याला योग्य नाहींत तसे वेदहि त्यांचें पालन करीत नाहींत; ह्मणजे त्यांस ते फलद्रूप होत नाहींत." याप्रमाणें अध्ययनाचे धर्म समाप्त झाले.

---

अथव्रतानि तानिमहानाम्नीव्रतमहाव्रतोपनिषद्व्रतगोदानव्रताख्यानिचत्वारिक्रमेणजन्म तस्त्रयोदशादिषुवर्षेषूत्तरायणेचौलोक्ततिथिनक्षत्रवारादिषुकार्याणि अत्रविस्तृतप्रयोगाःकौस्तुभादौस्वस्वगृह्येषुचद्रष्टव्याः एतेषांलोपेप्रत्येकमेकैककृच्छ्रंचरित्वागायत्र्याशताहुतीर्जुहुयात् त्रीन्षट्द्वादशवाकृच्छ्रान्कुर्यात्इत्यन्यत्र ॥

## आतां व्रतें सांगतों.

तीं व्रतें महानाम्नीव्रत, महाव्रत, उपनिषद्व्रत आणि गोदानव्रत अशा नांवाचीं चार प्रकारचीं आहेत. तीं चार व्रतें क्रमेंकरून जन्मापासून तेराव्या इत्यादिक वर्षांचे ठिकाणीं उत्तरायणांत चौलसंस्काराला उक्त जीं तिथि, नक्षत्रें, वार यांचे ठायीं करावीं. ह्या व्रतांचे विस्तृत प्रयोग कौस्तुभ इत्यादिक ग्रंथांमध्यें व आपापल्या गृह्यसूत्रांत पाहावे. ह्यांचा लोप झाला असतां प्रत्येकाचें एकेक कृच्छ्र प्रायश्चित्त करून गायत्रीमंत्रानें शंभर आहुति होम करावा. तीन, सहा किंवा बारा कृच्छ्र प्रायश्चित्त करावें असें दुसऱ्या ग्रंथीं सांगितलें आहे.

---

अथसमावर्तनं गुरवेक्षेत्राद्यन्यतमंदत्वातदनुज्ञयास्नायात् स्नानंनामसमावर्तनं तानिच क्षेत्रंहेमगौरश्वश्चछत्रोपानहौधान्यंवस्त्रत्रयंशाकमित्येतानि एषुयद्गुरोःप्रियंतद्देयंदानंविनैवगुरुप्रीतौतदनुज्ञयैवस्नायात् क्षेत्रादिनापिनविद्यानिष्क्रयः एकैकमक्षरंयस्तुगुरुःशिष्येनिवेदयेत् पृथिव्यांनास्तितद्द्रव्यंयद्दत्वात्वनृणीभवेदित्युक्तेः सचस्नातकस्त्रिविधःविद्यास्नातकोव्रतस्नातकोविद्याव्रतोभयस्नातकइति तत्रैकंद्वौत्रीन्चतुरोवावेदान्वेदैकदेशंवाधीत्यतदर्थंचज्ञात्वाद्वादशवर्षादिब्रह्मचर्यकालावधेःप्रागेवस्नातिसविद्यास्नातकः उपनयनव्रतसावित्रीव्रतवेदव्रतान्यनुष्ठायवेदसमाप्तेःपूर्वमेवस्नातोव्रतस्नातकः द्वादशवर्षादिब्रह्मचर्यसमाप्त्यावेदंसमाप्यस्नातोविद्याव्रतोभयस्नातकः तत्रोपनयनोत्तरंमेधाजननपर्यंतंत्रिरात्रद्वादशरात्रादिव्रतमुपनयनव्रतं मेधाजननोत्तरमुपाकर्मांतंब्रह्मचारिधर्मानुष्ठानंसावित्रीव्रतं तदुत्तरंवेदाध्ययनार्थंद्वादशवर्षादिकालावच्छिन्नव्रतंवेदव्रतं स्वाध्यायोध्येतव्यइतिविधेरर्थज्ञानपर्यंतत्वाद्वेदार्थज्ञानंविनावेदाध्ययनमात्रेणसमावर्तनेऽधिकारोनेतिपूर्वमीमांसकाः वेदग्रहणमेवविधिफलंपूर्वकांडार्थज्ञानंकर्मानुष्ठानाक्षिप्तं उत्तरकांडार्थज्ञानंकाम्यश्रोतव्यविधिप्राप्तमित्युत्तरमीमांसकाः तत्रसंहिताब्राह्मणंचमिलित्वैकोवेदः आरण्यकांडंब्राह्मणांतर्गतमेव संपूर्णैकवेदाध्ययनेष्वशक्तोवेदैकदेशंपठेत् अत्यशक्तेनसंहितायाः प्रथमचरमसूक्तेकतिपयसूक्तानांप्रथमाऋचः सर्वसूक्तानांप्रथमाऋचोवाध्येतव्याः एवंवेदैकदेशाध्ययनोत्तरंसमावृत्तोविवाहितोवाब्रह्मचर्योक्तनियमेनवेदाध्ययनंकुर्यात् तत्रऋतौभार्यागमनंकार्यं ब्रह्मचारीव्रतलोपप्रायश्चित्तंकृच्छ्रत्रयंकृत्वामहाव्याहृतिहोमंचकृत्वासमावर्तनंकार्यंएतच्चसंध्याग्निकार्यभिक्षालोपशूद्रादिस्पर्शकटिसूत्रमेखलाजिनत्यागदिवास्वापांजनपर्युषितभोजनादिव्रतभंगेषु अल्पकालमल्पव्रतभंगेज्ञेयम् बहुधर्मलोपेतुतंवोधियानव्यस्याशविष्ठमितिमंत्रस्यलक्षजपः शिवालयेइत्युक्तं एवंचमहानाम्न्यादिव्रतलोपस्यब्रह्मचर्यव्रतलोपस्यचप्रायश्चित्तोत्तरंसमावर्तनाधिकारः ॥

## आतां समावर्तन ह्मणजे सोडमुंज हा संस्कार सांगतों.

वेदाचें अध्ययन झाल्यानंतर गुरूला क्षेत्र ( शेत, जमीन ) इत्यादिकांतून एकादें देऊन नंतर त्या गुरूची आज्ञा घेऊन स्नान करावें, स्नान ह्मणजे समावर्तन करावें. **गुरूला द्यावयाचीं क्षेत्रें इत्यादिक तीं सांगतों**–क्षेत्र, सोनें, गाई, घोडा, छत्री, जोडा, धान्य, तीन वस्त्रें, भाजी यांमध्यें गुरूला जें प्रिय ( आवडत ) असेल तें द्यावें. कांहीं दिल्यावांचूनच गुरूचा संतोष झाला असल्यास त्याची आज्ञा घेऊनच स्नान करावें. क्षेत्र इत्यादिक दिलें असतांहि विद्येचें मौल्य होत नाहीं; कारण, "जो गुरु एकेक अक्षर शिष्याला पढवितो, त्या गुरूचा अनृणी, जो पदार्थ गुरूला दिला असतां होईल असा पदार्थ पृथ्वींत नाहीं," असें वचन आहे. **तो स्नातक तीन प्रकारचा–विद्यास्नातक, व्रतस्नातक आणि विद्याव्रतोभयस्नातक** असा तीन प्रकारचा स्नातक जाणावा. त्यामध्यें एक, दोन, तीन अथवा चार वेद किंवा वेदाचा एक भाग यांचें पठण करून व त्याचा अर्थ जाणून बारा वर्षें इत्यादिक ब्रह्मचर्याचे कालाचा अवधि ( मर्यादा ) जो सांगितला त्याचे पूर्वींच स्नान करितो ह्मणजे समावर्तन करितो तो विद्यास्नातक होय. उपनयनव्रत, सावित्रीव्रत आणि वेदव्रत हीं आचरण करून वेदाचे अध्ययनाची समाप्ति होण्याचे पूर्वींच स्नान करितो तो व्रतस्नातक होय. बारा वर्षें इत्यादिकपर्यंत ब्रह्मचर्य धारण करून त्या ब्रह्मचर्याची समाप्ति करून वेदाची समाप्ति करून जो स्नान करितो तो विद्याव्रतोभयस्नातक होय. मौंजी झाल्यानंतर मेधाजननापर्यंत जें तीन रात्रि, बारा रात्रि इत्यादि व्रतधारण करणें तें उपनयनव्रत होय. मेधाजनन झाल्यानंतर उपाकर्मापर्यंत जे ब्रह्मचाऱ्याचे धर्म आचरण करणें तें सावित्रीव्रत होय. उपाकर्मानंतर वेदाचें अध्ययन करण्याकरितां बारा वर्षें इत्यादिक कालापर्यंत जें व्रत आचरण करणें तें वेदव्रत होय. "वेदाच्या अर्थाचें ज्ञान होईपर्यंत वेदाचें अध्ययन करावें," असा विधि आहे याकरितां वेदाच्या अर्थाचें ज्ञान झाल्यावांचून केवल वेदाचा पाठ केल्यानें समावर्तनाविषयीं अधिकार नाहीं असें पूर्वमीमांसाशास्त्रकर्ते ह्मणतात. वेद साद्यंत पठण करणें हेंच विधीचें फल होय, पूर्वकांडाच्या अर्थाचें ज्ञान संपादन करणें तें कर्माच्या अनुष्ठानाकरितां उपयुक्त होय, उत्तरकांडाच्या अर्थाचें ज्ञान काम्यकर्माच्या श्रवणीय विधीनें प्राप्त आहे असें उत्तरमीमांसाशास्त्रकर्ते ह्मणतात. त्यांमध्यें संहिता व ब्राह्मण मिळून एक वेद होतो. आरण्यकांड जें तें ब्राह्मणाचा अंतर्गतच भाग आहे. समग्र वेदाचें अध्ययन करण्याला ज्याला सामर्थ्य नसेल त्यानें वेदाचा एक भाग अध्ययन करावा. अति अशक्त असेल त्यानें संहितेचें पहिलें व शेवटचें असीं सूक्तें, किंवा कितीएक सूक्तांच्या पहिल्या ऋचा, अथवा सर्व सूक्तांच्या पहिल्या ऋचा यांचें अध्ययन करावें. याप्रमाणें वेदाच्या एका भागाचें अध्ययन केल्यानंतर समावर्तन झालेला किंवा विवाह झालेला होत्साता त्यानें ब्रह्मचर्यामध्यें सांगितलेल्या नियमेंकरून अध्ययन करावें. त्या ब्रह्मचर्यनियमांमध्यें ऋतुकालीं स्त्रीगमन करावें. ब्रह्मचारिव्रताच्या लोपाचें प्रायश्चित्त तीन कृच्छ्र करून महाव्याहृतिमंत्राचा होम करून समावर्तनसंस्कार करावा. हें प्रायश्चित्त संध्या, अग्निकार्य, भिक्षा यांचा लोप असतां; शूद्रादिकांचा स्पर्श झाला असतां; कटिसूत्र, मेखला, अजिन यांचा त्याग झाला असतां; दिवसा

निद्रा; डोळ्यांत काजळ घालणें; शिळें अन्न भक्षण इत्यादिक व्रतभंगामध्यें थोडे दिवसपर्यंत अल्प व्रतभंग असतां त्याविषयीं जाणावें. पुष्कळ धर्माचा लोप झाला असेल तर, "तंवो-धियानव्यस्याशविष्ठं० " ह्या मंत्राचा लक्ष जप शिवाच्या देवालयांत करावा असें पूर्वी सांगितलें आहे. याप्रमाणें महानाम्नी इत्यादिक व्रतांचा लोप झाला असतां त्यांचें व ब्रह्मचर्यव्रताच्या लोपाचें असें प्रायश्चित्त करून नंतर समावर्तनसंस्काराचा अधिकार प्राप्त होतो.

---

अथसमावर्तनकालः तत्रोपनयनोक्तकालेसमावर्तनमितिबह्वोज्योतिर्ग्रंथाःतेनानध्यायेप्रदोषदिनेभौमशनिवारयोःपौषाषाढयोर्दक्षिणायनेचनभवति मार्गशीर्षेविवाहप्रसक्तौदक्षिणायनेपिभवति अन्यथाअनाश्रमीनतिष्ठेतदिनमेकमपिद्विजइतिनिषेधातिक्रमापत्तेःअन्येतुमौंज्युक्तकालोपादानेमूलाभावात् रिक्तात्रयपूर्णिमामावास्याष्टमीप्रतिपद्भिन्नतिथिषुशुक्लेंत्यत्रिकभिन्नकृष्णेचगुरुशुक्रास्तादिदिनक्षयभद्राव्यतीपातादिदोषशून्येशुभवारेसमावर्तनंकार्यं नात्रप्रदोषसोपपदादितिथिवर्जनमावश्यकमित्याहुः पुष्यपुनर्वसुमृगरेवतीहस्तानुराधोत्तरात्रयरोहिणीश्रवणविशाखाचित्राःश्रेष्ठाः एतदलाभेमौंज्युक्तभानि क्वचिद्भौमशनिवारौसिंधावुक्तौ॥

## आतां समावर्तनाचा काल सांगतों.

समावर्तन ह्मणजे सोडमुंज करणें ती मौंजीला जो काल सांगितला त्या कालीं करावी असें बहुत ज्योतिष ग्रंथांत सांगितलें आहे. त्यांवरून अनध्याय, प्रदोषदिवस, भौमवार, शनिवार, पौषमास, आषाढमास, दक्षिणायन ह्यांचे ठायीं समावर्तन करूं नये. मार्गशीर्ष मासांत त्याचा विवाह करण्याचा प्रसंग आल्यास दक्षिणायनांतहि समावर्तन करावें. विवाह नसतां समावर्तन केल्यास "द्विजानें एक दिवसहि आश्रमावांचून राहूं नये," असा जो निषेध सांगितला त्याचें उल्लंघन होईल. दुसरे ग्रंथकार तर, मौंजीला जो काल सांगितला तो समावर्तनाला घ्यावा असें मूळ प्रमाण कोठें मिळत नाहीं याकरितां तीन रिक्ता तिथि ( ४, ९, १४ ), पौर्णिमा, अमावास्या, अष्टमी, प्रतिपदा ह्या तिथि वर्ज्य करून अन्यतिथि; शुक्लपक्ष; शेवटचे पांच दिवस वर्ज्य करून कृष्णपक्ष; गुरुशुक्रांचें अस्तादिक, दिनक्षय, भद्रा, व्यतीपात इत्यादिक दोषरहित अशा शुभवारीं समावर्तन करावें, ह्या समावर्तनाविषयीं प्रदोष, सोपपदा इत्यादिक तिथि हीं वर्ज्य करणें आवश्यक नाहींत असें सांगतात. पुष्य, पुनर्वसु, मृग, रेवती, हस्त, अनुराधा, तीन उत्तरा, रोहिणी, श्रवण, विशाखा आणि चित्रा हीं नक्षत्रें शुभ आहेत. हीं न मिळतील तर मौंजीला सांगितलेलीं नक्षत्रें घ्यावीं. क्वचित्समयीं शनिवार, भौमवार घ्यावे असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे.

---

अथमणिकुंडलवस्त्रयुगच्छत्रोपानद्युगदंडस्रगुन्मर्दनानुलेपांजनोष्णीषाणिआत्मनेआचार्यायचसंपाद्यालाभेआचार्यायैववासंपादयेत् देशकालौसंकीर्त्यममब्रह्मचर्यनियमलोपजनितसंभावितदोषपरिहारेणसमावर्तनाधिकारसंपादनद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थमाज्यहोमपूर्वकं कृच्छ्रत्रयं महानाम्न्यादिव्रतचतुष्टयलोपजनितप्रत्यवायपरिहारार्थंप्रतिसंस्कारमेकैकंकृच्छ्रंच गायत्र्याज्यहोमपूर्वकंतंत्रेणाहमाचरिष्य इतिसंकल्प्याग्निप्रतिष्ठादिचक्षुषीआज्येनात्रप्रधानं

अग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचचतसृभिराज्याहुतिभिःअग्निंपृथिवींमहांतमेकयाज्याहुत्यावायुमंतरिक्षंमहांतमेकया०आदित्यंदिवंमहांतमेकया०चंद्रमसंनक्षत्राणिदिशोमहांतमेकया० अग्निंद्विःविभावसुं शतक्रतुंअग्निंअग्निंअग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचेत्यष्टावेकैकयाज्याहुत्याशेषेणेत्यादि आज्यभागांते व्यस्तसमस्तव्याहृतिभिर्हुत्वा भूरग्नयेचपृथिव्यैचमहतेचस्वाहा अग्नयेपृथिव्यैमहते इदमित्यादियथान्वाधानंत्यागः भुवोवायवेचांतरिक्षायचमहतेचस्वाहा सुवरादित्यायचदिवेच महतेचस्वाहा भूर्भुवःसुवश्चंद्रमसेचनक्षत्रेभ्यश्चदिग्भ्यश्चमहतेचस्वाहा चंद्रमसेनक्ष०पाहिनो अग्नएनसेस्वाहा पाहिनोविश्ववेदसेस्वाहा यज्ञंपाहिविभावसोस्वाहा सर्वंपाहिशतक्रतोस्वाहा पुनरूर्जानिवर्तस्वपुनरग्नइइहायुषा पुनर्नःपाह्यंहसःस्वाहासहरय्यानिवर्तस्वाग्नेपिन्वस्वधारया विश्वप्स्नियाविश्वतस्परिस्वाहा पुनर्व्यस्तसमस्तव्याहृतिचतुष्टयं ८ ततःव्रतचतुष्टयार्थंगायत्र्याज्यहोमःकृच्छ्रत्रयगोनिष्क्रयंदत्वाहोमशेषंसमापयेत् महानाम्न्यादिलोपेप्रत्येकमष्टोत्तरशतमष्टाविंशतिमष्टौवागायत्र्याज्याहुतीर्हुत्वाएकैकंकृच्छ्रंचरेत् इतिप्रायश्चित्तप्रयोगः ॥

यानंतर मणि, कुंडलें, दोन वस्त्रें, छत्री, उपानह ( जोडा ), दंड, माळ, अभ्यंग, उटी, काजळ आणि पागोटें हे पदार्थ आपल्याकरितां व आचार्याकरितां मिळवावे. अथवा दोघांला पुरत इतके न मिळतील तर आचार्याकरितांच मिळवावे. नंतर देश, काल, यांचा उच्चार करून, “ मम ब्रह्मचर्यनियमलोपजनितसंभावितदोषपरिहारेण समावर्तनाधिकारसंपादनद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं आज्यहोमपूर्वकं कृच्छ्रत्रयं महानाम्न्यादिव्रतचतुष्टयलोपजनितप्रत्यवायपरिहारार्थं प्रतिसंस्कारमेकैकं कृच्छ्रं च गायत्र्याज्यहोमपूर्वकं तंत्रेणाहमाचरिष्ये,” असा संकल्प करून अग्निस्थापन इत्यादिक कर्म केल्यानंतर अन्वाधान करावें. तें असें–“ चक्षुषी आज्येनात्रप्रधानं अग्निं वायुं सूर्यं प्रजापतिं च चतसृभिराज्याहुतिभिः अग्निं पृथिवीं महांतमेकयाज्याहुत्या वायुमंतरिक्षंमहांतमेकयाज्याहुत्या आदित्यं दिवं महांतमेकयाज्याहुत्या चंद्रमसं नक्षत्राणिदिशोमहांतमेकयाज्याहुत्या अग्निंद्विःविभावसुं शतक्रतुं अग्निं अग्निं अग्निं वायुं सूर्यं प्रजापतिंचेत्यष्टावेकैकयाज्याहुत्या शेषेणस्विष्टकृतं०” इत्यादिक अन्वाधान करून आज्यभागांपर्यंत कर्म केल्यानंतर व्यस्तसमस्तव्याहृतिमंत्रांनीं होम करून पुनः होम करावा. त्याचे मंत्र–“भूरग्नये च पृथिव्यै च महते च स्वाहा ( अग्नये पृथिव्यै महते इदं न मम,” इत्यादिक जसें अन्वाधान केलें आहे त्याप्रमाणें त्याग करावा.) भुवोवायवे चांतरिक्षाय च महते च स्वाहा ॥ सुवरादित्याय च दिवे च महते च स्वाहा ॥ भूर्भुवःस्वश्चंद्रमसे च नक्षत्रेभ्यश्च दिग्भ्यश्च महते च स्वाहा ॥ चंद्रमसे नक्ष० ॥ पाहिनो अग्नएनसे स्वाहा ॥ पाहिनो विश्ववेदसे स्वाहा ॥ यज्ञं पाहि विभावसो स्वाहा ॥ सर्वं पाहि शतक्रतो स्वाहा ॥ पुनरूर्जानिवर्तस्वपुनरग्नइइहायुषा ॥ पुनर्नःपाह्यंहसःस्वाहा ॥ सहरय्यानिवर्तस्वाग्नेपिन्वस्वधारया विश्वप्स्निया विश्वतस्परिस्वाहा,” याप्रमाणें होम करून पुनः व्यस्तसमस्तव्याहृतिमंत्रांनीं चार आहुति द्याव्या. तदनंतर चार व्रतांकरितां गायत्रीमंत्रानें आज्यहोम करावा. तीन कृच्छ्र गाईची किंमत देऊन होमशेष समाप्त करावा. महानाम्नी इत्यादिकांचे लोपाविषयीं प्रत्येक व्रताच्या एकशें आठ, अथवा अठ्ठावीस किंवा आठ आहुति

गायत्रीमंत्रानें आज्याचें ( घृताचें ) हवन करून एकेक कृच्छ्रप्रायश्चित्त करावें. याप्रमाणें प्रायश्चित्ताचा प्रयोग समाप्त झाला.

---

अथसमावर्तनसंकल्पादि ममगृहस्थाश्रमार्हतासिद्धिद्वाराश्रीपर०समावर्तनंकरिष्यइति संकल्प्यनांदीश्राद्धांतंबटुरेवकुर्यात् ब्रह्मचारीजीवत्पितृकश्चेत्पितुर्मात्राद्युद्देशः ब्रह्मचार्यशक्तश्चेत्पित्रादिस्तत्प्रतिनिधित्वेननांदीश्राद्धंकुर्यात् समावर्तनउपनयनादाविवपित्रादिरेवनांदीश्राद्धकर्तेतिमतांतरेणप्रागुक्तं अवशिष्टप्रयोगःस्वस्वगृह्यानुसारेण दशत्रीन्वाविप्रान्भोजयेत् दास्यंतिमधुपर्कंयेतत्रैतांरजनींवसेत् ततोव्रतानिसंकल्पयेत् तानिचस्वसूत्रोक्तानिस्मृत्युक्तानिचेतिद्विविधानि सर्वाण्यपिपुरुषार्थान्येवनतुसमावर्तनांगानितत्राशक्तःसूत्रोक्तान्येवव्रतानि कुर्यात् शक्तस्तुस्मृत्युक्तान्यपि तानियथा निमित्तंविनाननक्तंस्नास्यामि ननग्नःस्नास्यामि न नग्नःशयिष्ये ननग्नांस्त्रियमीक्षिष्येन्यत्रमैथुनात् वर्षतिनधाविष्ये नवृक्षमारोहिष्ये नकूपमवरोहिष्ये नबाहुभ्यांनदींतरिष्यामि नप्राणसंशयमभ्यापत्स्ये इतिसूत्रोक्तानि ॥

## आतां समावर्तनाचा संकल्प इत्यादिक सांगतों.

यानंतर समावर्तनाचा संकल्प इत्यादिक करावा. तो असा—“ मम गृहस्थाश्रमार्हतासिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं समावर्तनं करिष्ये, ” असा संकल्प करून नांदीश्राद्धापर्यंत कर्म बटूनेंच करावें. ब्रह्मचारी जीवत्पितृक ( जिवंत आहे पिता ज्याचा तो ) असेल तर नांदीश्राद्धामध्यें पिता जो त्याच्या माता इत्यादिकांचा उद्देश करावा. ब्रह्मचारी अशक्त असेल तर पिता इत्यादिकानें त्याच्या प्रतिनिधिरूपानें नांदीश्राद्ध करावें. मौंजी इत्यादिक संस्कारांचे ठायीं जसा नांदीश्राद्ध करणारा पिता इत्यादिकच अधिकारी तसा समावर्तनाचे ठायींहि नांदीश्राद्ध करणारा पिता इत्यादिकच असें मतांतरानें पूर्वी सांगितलें आहे. अवशिष्ट प्रयोग आपापल्या गृह्यसूत्राप्रमाणें करावा. दहा अथवा तीन ब्राह्मणांला भोजन द्यावें. जे मधुपर्क देतात ह्मणजे मधुपर्कानें पूजा करितात तेथें त्या रात्रीं राहावें. तदनंतर व्रतांचा संकल्प करावा. तीं व्रतें आपल्या सूत्रांत सांगितलेलीं व स्मृतींत सांगितलेलीं असीं दोन प्रकारचीं आहेत. तीं सर्व, पुरुषार्थरूपच होत, समावर्तनाचीं अंगरूप नव्हेत. त्यांमध्यें अशक्त असेल त्यानें सूत्रांत सांगितलेलीं व्रतें मात्र करावीं. सशक्त असेल तर सूत्रांत सांगितलेलीं करून स्मृतींत सांगितलेलीं तींहि करावीं. तीं असीं—निमित्तावांचून रात्रौ मी स्नान करणार नाहीं. नग्न होत्साता स्नान करणार नाहीं. नग्न होत्साता निद्रा करणार नाहीं. मैथुनावांचून अन्यकालीं नग्नस्त्रियेला पाहणार नाहीं. वृष्टीमध्यें धांवत गमन करणार नाहीं. वृक्षावर आरोहण करणार नाहीं. विहिरींत उतरणार नाहीं. बाहूंकरून नदीतें तरून जाणार नाहीं. जेणेंकरून प्राणसंशय ह्मणजे प्राण जातील किंवा राहतील असा संशय येईल तें कर्म करणार नाहीं. याप्रमाणें सूत्रोक्त व्रतें जाणावीं.

---

अथस्मृत्युक्तानि नित्यंयज्ञोपवीतद्वयंधारयिष्ये सोदककमंडलुंछत्रमुष्णीषंपादुकेउपानहौ सुवर्णकुंडलेदर्भमुष्टिंचधारयिष्ये कर्तनेनह्रस्वीकृतकेशश्मश्रुनखःस्यां निमित्तंविनामुंडनं नकरिष्यइत्यर्थः नसमावृत्तामुंडेरन्निति निषेधात् नित्यमध्ययनरतःस्यां स्वशरीराद्धुद्धृतंस्व

निर्माल्यंपुष्पचंदनादिपुनर्नधारयिष्ये शुक्लांबरधरःस्यां सुगंधीप्रियदर्शनःस्यां विभवेसतिजीर्णवासामलवद्वासाश्चनस्यांरक्तंवासःशरीरपीडावहंवावस्त्रंनधारयिष्ये गुरुंविनान्यैर्धृतंवस्त्रमलंकारंस्रजंच नधारयिष्ये अशक्तस्तुअन्यधृतमपि वस्त्रादिप्रक्षाल्य धारयेत् अन्यधृतोपवीतमुपानहौचनधारये कंथांनधारयिष्ये नस्वरूपमुदकेनिरीक्षिष्ये नभार्ययासाकमेकपात्रेएककालेवाश्नीयां एतद्विवाहभिन्नविषयं शूद्रायधर्मज्ञानंनीतिज्ञानंव्रतकल्पंचनोपदिशामि एतत्साक्षादुपदेशपरं कृत्वाब्राह्मणमग्रतइतिब्राह्मणद्वारकोपदेशेदोषाभावात् गृहमेधिशूद्रायस्वोच्छिष्टंनदास्ये शूद्रायहोमशेषंनदास्ये उद्धृतोदकेनतिष्ठन्नाचमनंनकरिष्ये जानुमात्रेतदधिकेवाजलेतिष्ठदाचमनेदोषाभावात् अशुचिनाएकहस्तेनवाआनीतजलैर्नाचमिष्ये पादेनपादधावनंनकरिष्ये अकल्पांस्त्रियंनगमिष्यामि नप्रावृतमस्तकोऽहंनिपर्यटिष्यामि रात्रौमलमूत्रोत्सर्गेचप्रावृतशिराःस्यां सोपानत्कोशनाभिवादननमस्कारान्नकरिष्ये पादेनासनंनापकर्षिष्यामि एवमन्यान्यपिस्मृत्युक्तानिज्ञेयानि एतेषुव्रतेषुयानिकर्तुंशक्नुयात्तावंत्येवसंकल्पयेत् अत्रसंकल्पितव्रतोल्लंघनेमत्याकृतेत्र्यहमभोजनं अमत्याकृतेएकरात्रमभोजनंप्रायश्चित्तं अशक्तश्चेनेकंवाविप्रंभोजयेत् इतिस्नातकव्रतानि ॥

**यानंतर स्मृतींत सांगितलेलीं व्रतें सांगतों.**—नित्य दोन यज्ञोपवीतें धारण करीन. उदकयुक्त असा कमंडलु, छत्री, पागोटें, पादुका, जोडा, सुवर्णाचीं कुंडलें आणि दर्भमुष्टि हीं धारण करीन. छेदें करून लहान केलेल्या दाढी, मिशा आणि नखें असा राहीन; ह्मणजे निमित्तावांचून क्षौर करणार नाहीं असा अर्थ समजावा. कारण, “ज्यांचें समावर्तन झालें त्यांनीं क्षौर करूं नये,” असा निषेध आहे. नित्य अध्ययनांत आसक्त असेन. आपल्या अंगावरून काढलेलीं तीं आपणाला निर्माल्य असीं पुष्पें, चंदन इत्यादिक पुनः धारण करणार नाहीं. पांढरीं वस्त्रें धारण करीन. सुगंधयुक्त व प्रीतिकारक ज्याचें दर्शन असा होईन. संपत्ति असल्यास फाटकीं वस्त्रें व मळकट वस्त्रें धारण करणार नाहीं. तांबडें वस्त्र अथवा शरीराला पीडाकारक वस्त्र धारण करणार नाहीं. गुरूवांचून दुसऱ्यांनीं धारण केलेलें वस्त्र, अलंकार, माळा हीं धारण करणार नाहीं. अशक्त असेल तर इतरानें धारण केलेलें वस्त्र इत्यादिक तेंहि धुवून धारण करावें. इतरानें धारण केलेलें यज्ञोपवीत, जोडा हीं धारण करणार नाहीं. कंथा ( गोदडी ) धारण करणार नाहीं. आपलें रूप उदकांत पाहणार नाहीं. स्त्रियेबरोबर एका पात्रांत किंवा एककालीं भोजन करणार नाहीं; हें विवाहावांचून जाणावें. शूद्राला धर्मोपदेश, नीतीचा उपदेश व व्रताचा उपदेश करणार नाहीं; हें साक्षात् उपदेश करण्याविषयीं जाणावें. कारण, “ब्राह्मणाला पुढें करून उपदेश करावा,” असें वचन आहे याकरितां ब्राह्मणद्वारा उपदेश केला असतां दोष नाहीं. गृहस्थाश्रमी शूद्राला आपलें उच्छिष्ट देणार नाहीं. शूद्राला होमाचें शेष देणार नाहीं. वर काढलेल्या उदकानें, उभा रहात होत्साता आचमन करणार नाहीं; कारण जानुमात्र किंवा त्याहून अधिक उदकांत उभें राहून आचमन केलें असतां दोष नाहीं. अशुचि जो त्यानें किंवा एका हातानें काढलेल्या उदकानें आचमन करणार नाहीं. पायानें पाय धुणार नाहीं. रोगादिकानें असमर्थ अशा स्त्रियेप्रत गमन करणार नाहीं. मस्तकास वस्त्र गुंडाळून दिवसा फिर-

णार नाहीं. रात्रौ आणि मलमूत्रोत्सर्गसमयीं मस्तकास वस्त्र गुंडाळीन. पायांत जोडा घालून भोजन, अभिवादन ( नामगोत्रोच्चारपूर्वक नमस्कार ), नमन करणार नाहीं. पायानें आसन ( पीठ, पाट ) एकीकडे लोटणार नाहीं. याप्रमाणें दुसरींहि स्मृत्युक्त व्रतें आहेत तीं पाहावीं. या व्रतांमध्यें जीं आपणास करण्याला शक्य वाटतील तितक्यांचाच संकल्प करावा. ह्या संकल्प केलेल्या व्रतांचें बुद्धिपूर्वक उल्लंघन केलें असतां तीन दिवस उपोषण करावें. न जाणून उल्लंघन झालें असतां एक रात्रपर्यंत उपोषण हें प्रायश्चित्त करावें. उपोषण करण्यास अशक्त असेल तर तीन किंवा एक ब्राह्मणाला भोजन घालावें. याप्रमाणें स्नातकाचीं व्रतें समाप्त झालीं.

---

**आतुरदशायांयथोक्तसमावर्तनासंभवेसंक्षेपतस्तत्कार्यं तत्प्रयोगःसंकल्प्यब्रह्मचारीलिंगानिमेखलादीनित्यक्त्वावपनंकृत्वातीर्थेस्नात्वा वासःपरिधानाचमनतिलकधारणानिकृत्वाऽग्निंप्रतिष्ठाप्यतत्रप्रजापतिंमनसाध्यायंस्तूष्णींसमिधमादध्यात् अन्यदपिअविरोधितूष्णीमेवकर्तव्यमिति इतिसमावर्तनानुकल्पः ॥**

आतुर अवस्थेमध्यें यथाविधि समावर्तनाचा असंभव असेल तर संक्षेपेंकरून समावर्तन करावें. त्याचा संक्षिप्त प्रयोग.—संकल्प करून ब्रह्मचारी यानें मेखला इत्यादिक चिन्हें टाकून वपन करून तीर्थामध्यें स्नान करावें. नंतर वस्त्रपरिधान, आचमन, तिलकधारण हीं करून अग्नीची स्थापना करावी. नंतर त्या अग्नीमध्यें, प्रजापतीचें मनेंकरून ध्यान करीत होत्साता मंत्रविरहित समिध द्यावी. इतरहि कर्म विरुद्ध नसेल तें मंत्ररहितच करावें. याप्रमाणें समावर्तनाचा गौण पक्ष समाप्त झाला.

---

**ब्रह्मचर्यदशायांदशाहाशौचहेतुसपिंडमरणेसमावर्तनोत्तरमुदकदानपूर्वकंत्रिरात्रमतिक्रांताशौचंकार्यं अनुपनीतसपिंडेमातुलादौचमृतेऽतिक्रांताशौचंन एवंजननाशौचेप्यतिक्रांताशौचंन ततश्चदशाहाशौचापादकसपिंडकमृतौसमावर्तनोत्तरंत्रिरात्रमध्येविवाहोनकार्यः कस्यचिन्मरणाभावेतुनविवाहेदोषः ॥**

ब्रह्मचर्यावस्थेंत दहा दिवस आशौच धरण्यासारखा कोणी आपल्या सपिंडांतला मृत झाला असेल तर समावर्तन झाल्यानंतर मृताला तिळांजलि देऊन तीन दिवस अतिक्रांत आशौच धरावें. मौंजी न झालेला असा सपिंड मृत झाला असेल किंवा मातुल इत्यादिक मृत असेल तर अतिक्रांत आशौच धरूं नये. याप्रमाणें जननाशौचनिमित्तकहि अतिक्रांताशौच नाहीं. त्यावरून जर दहा दिवस आशौच धरण्याला योग्य असा सपिंड मृत झाला असेल तर समावर्तन झाल्यानंतर तीन दिवसपर्यंत विवाह करूं नये, कोणी मृत झाला नसल्यास विवाहाविषयीं दोष नाहीं.

---

**इत्थंव्रतांतकर्माण्यनंतोपाध्यायसूनुना निर्णीयश्रीविठ्ठलांघ्र्योर्वाग्विलासःसमर्पितः ॥**

अनंतोपाध्यायाचा पुत्र मी यानें याप्रकारें स्नातकव्रतांपर्यंत सर्व कर्मांचा निर्णय करून आपल्या वाणीचा शृंगार श्रीविठ्ठलाचे चरणीं समर्पण केला.

---

**अथश्रीभगवत्पादौपुंडरीकवरप्रदौ श्रीगुरून्पितरौनत्वाविवाहंवक्तुमुद्यतः ॥ १ ॥**

यानंतर पुंडरीकाला वरप्रदान देणारे असे श्रीविठ्ठलाचे चरण, श्रीगुरु आणि मातापितर या सर्वांला नमस्कार करून विवाह सांगण्याविषयीं उद्युक्त होतों.

---

**उद्वहेत्तुद्विजोभार्यांसवर्णांलक्षणैर्युतां अव्यंगांगींसौम्यनाम्नींमृद्वंगींचमनोहरां भाविशुभाशुभज्ञानहेतुलक्षणविचारोष्टौमृत्पिंडान्कृत्वेत्यादिरूपआश्वलायनसूत्रेउक्तः ज्योतिःशास्त्रोक्त राशिनक्षत्रादिघटितविचारोपिशुभादिज्ञानहेतुः सचसंक्षेपेणोच्यते तत्रमेषादिराशिस्वामिनः भौमःशुक्रोबुधश्चंद्रः सूर्यःसौम्योभृगुःकुजः ॥ गुरुःशनैश्चरोमंदःसुरेज्योराशिपाःस्मृताः ॥**

## आतां यानंतर विवाह संस्कार सांगतों.

द्विजानें आपल्या जातींतली, लक्षणांनीं युक्त, अवयवांनीं अव्यंग, सौम्यनांवाची, कोमलांगी, सुंदर असी स्त्री वरावी. पुढें होणारें जें शुभाशुभ त्याचे ज्ञानाला कारण, जीं लक्षणें त्यांचा विचार, "मातीचे आठ पिंड करावे," इत्यादि, आश्वलायनसूत्रांत सांगितला आहे. ज्योतिःशास्त्रामध्यें सांगितलीं जीं राशि, नक्षत्रें इत्यादिक, त्यांच्या घटिताचा विचार तोहि शुभादिकाचे ज्ञानाला कारण आहे याकरितां तो संक्षेपानें सांगतों. त्यामध्यें प्रथम मेषादिकराशींचे स्वामी सांगतों—" मंगळ, शुक्र, बुध, चंद्र, सूर्य, बुध, शुक्र, मंगळ, बृहस्पति, शनि, शनि आणि बृहस्पति याप्रमाणें क्रमेंकरून मेषादिक बारा राशींचे स्वामी जाणावे.

---

**अथग्रहाणांशत्रुमित्रादि रवेर्गुरुभौमचंद्रामित्राणि शनिशुक्रौशत्रु बुधःसमः इंदोःसूर्यबुधौमित्रे भौमगुरुशुक्रशनयःसमाः अस्यशत्रुर्न कुजस्यबुधोरिपुः सूर्यगुरुचंद्रामित्राणि शनिशुक्रौसमौ बुधस्यार्कशुक्रौमित्रे चंद्रोरिः शनिभौमगुरवःसमाः गुरोःसूर्यभौमचंद्रामित्राणि शुक्रबुधौशत्रु शनिःसमः शुक्रस्यशनिबुधौमित्रेसूर्यचंद्रावरी भौमगुरुसमौ शनेःशुक्रबुधौमित्रे कुजसूर्यचंद्राअरयः गुरुःसमः अत्रगुणविचारः राश्योरेकाधिपत्वेराशिपत्योर्मित्रत्वेचपंचगुणाः राशिपयोःसमत्वशत्रुत्वेऽर्धोगुणः समत्वमित्रत्वेचत्वारः शत्रुत्वमित्रत्वेएकः द्वयोःसमत्वेत्रयः द्वयोःशत्रुत्वेगुणाभावः ॥**

## आतां ग्रहांचे मित्र, सम, शत्रु हे सांगतों.

**सूर्याचे**—गुरु, मंगळ, चंद्र, हे मित्र होत. शनि, शुक्र हे शत्रु होत. बुध हा सम होय. **चंद्राचे**—सूर्य, बुध मित्र. मंगळ, गुरु, शुक्र, शनि हे सम होत. चंद्राला शत्रु नाहीं. **मंगळाचे**—बुध हा शत्रु. सूर्य, गुरु, चंद्र हे मित्र. शनि, शुक्र हे सम. **बुधाचे**—रवि, शुक्र हे मित्र. चंद्र हा शत्रु. शनि, मंगळ, गुरु हे सम होत. **बृहस्पतीचे**—सूर्य, मंगळ, चंद्र हे मित्र. शुक्र, बुध हे शत्रु. शनि सम होय. **शुक्राचे**—शनि, बुध हे मित्र. सूर्य, चंद्र हे शत्रु. मंगळ, गुरु हे सम. **शनीचे**—शुक्र, बुध हे मित्र. मंगळ, सूर्य, चंद्र हे शत्रु. गुरु सम होय. **याविषयीं गुणांचा विचार**—वधूवरांचे राशिस्वामी एक, किंवा राशिस्वामींचें परस्पर मित्रत्व असतां पांच गुण जाणावे. राशिस्वामींचें समत्व व शत्रुत्व असेल तर अर्धा गुण. समत्व व मित्रत्व असतां चार गुण. शत्रुत्व व मित्रत्व असतां एक गुण. दोघांचें समत्व असतां तीन गुण. दोघांचें शत्रुत्व असेल तर शून्य जाणावें.

---

**अथगणाः पूर्वात्रयोत्तरात्रयभरणीरोहिण्यार्द्रामनुष्यगणः हस्तरेवतीपुनर्वसुपुष्यस्वातीमृगश्रवणाश्विन्यनुराधादेवगणः कृत्तिकाश्लेषामघाचित्राविशाखाज्येष्ठामूलधनिष्ठाशततारका राक्षसगणः गणैक्येशुभं देवमनुष्ययोर्मध्यमं देवरक्षसोर्वैरं राक्षसमनुष्ययोर्मरणं अतोमनुष्यराक्षसयोर्विवाहोनकार्यः अत्रगुणाः गणैक्येषट्गुणाः वरोदेवोनृगणाकन्यात्रापिषट् वैपरीत्येपंच वरोराक्षसःकन्यादेवगणाअत्रैकः वैपरीत्येगुणाभावः मनुष्यराक्षसत्वेपिगुणाभावः ॥**

## आतां गणमैत्री सांगतों.

पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, भरणी, रोहिणी, आर्द्रा, ह्या नक्षत्रीं जन्म असल्यास **मनुष्यगण.** हस्त, रेवती, पुनर्वसु, पुष्य, स्वाती, मृग, श्रवण, अश्विनी आणि अनुराधा ह्या नक्षत्रीं जन्म असतां **देवगण.** कृत्तिका, आश्लेषा, मघा, चित्रा, विशाखा, ज्येष्ठा, मूळ, धनिष्ठा, शततारका ह्या नक्षत्रीं जन्म असतां **राक्षसगण.** वधूवरांचा एक गण असतां शुभ होय. देव मनुष्यगण असतां मध्यम होय. देवगण व राक्षसगण असतां वैर असेल. राक्षसगण मनुष्यगण असतां मृत्यु होतो, याकरितां मनुष्यगण व राक्षसगण यांचा परस्पर विवाह करूं नये. **गणमैत्रीचे गुण सांगतों.**— वधूवरांचा एक गण असतां सहा गुण. पुरुषाचा देवगण आणि स्त्रीचा मनुष्यगण असतां सहा गुण. तेच विपरीत असतां ह्मणजे पुरुषाचा मनुष्यगण आणि स्त्रीचा देवगण असतां पांच गुण. वराचा राक्षसगण व वधूचा देवगण असतां एक गुण. यांहून विपरीत असतां शून्य गुण जाणावा. एकाचा मनुष्यगण व दुसऱ्याचा राक्षसगण असतांहि शून्य गुण जाणावा.

---

**अथराशिकूटं द्विर्द्वादशकेनिर्धनत्वं नवपंचमत्वेनिःपुत्रता षट्काष्टकेमरणंविपत्तिर्वाउभयसप्तमेतृतीयैकादशेचतुर्थेदशमेचशुभं नक्षत्रैक्येचरणभेदेशुभं अत्रराश्यैक्येतिशुभं राशिभेदेपिकूटदोषोन नक्षत्रभेदेराश्यैक्येचशुभं अत्रनाडीगणादिदोषोन चरणैक्यंषट्काष्टकंच वर्ज्यं द्विर्द्वादशकेनवपंचमेचमध्यमं शेषेशुभं अत्रगुणाःसत्कूटेसप्त दुःकूटेग्रहमैत्रीसत्वेचत्वारः अन्यथाएकः चरणैक्येगुणाभावः ॥**

**आतां राशिकूट सांगतों.**—वधूचे राशीपासून वराची राशि, अथवा वराचे राशीपासून वधूची राशि दुसरी किंवा बारावी असतां निर्धनत्व होतें. पांचवी किंवा नववी असतां पुत्रराहित्य होतें. सहावी किंवा आठवी असतां मरण अथवा विपत्ति होते. दोहोंकडूनहि सातवी, तिसरी, अकरावी, चवथी आणि दहावी असतां शुभ होय; व वधूवरांचें नक्षत्र एक असतां चरण भिन्न असेल तर शुभ होय. उभयतांची राशि एक असेल तर अतिशुभ होय. राशि भिन्न असल्यास तथापि कूटाचा दोष नाहीं. उभयतांचें नक्षत्र भिन्न व राशि एक असतां शुभ होय. ह्या राशिकूटाविषयीं नाडी, गण, ग्रहमैत्री इत्यादि दोष नाहीं. वधूवरांचा नक्षत्रचरण एक, व सहावी, आठवी राशि हीं वर्ज्य करावीं. दुसरी, बारावी, नववी आणि पांचवी यांचे ठिकाणीं मध्यम होय. यांहून ज्या शेष राशि त्यांचे ठिकाणीं शुभ होय. **येथें गुण सांगतों.**—सत्कूट असतां सात गुण. दुष्टकूट ( द्विर्द्वादशादिक ) व ग्रहमैत्री असतां चार गुण. या दोहोंतून एक असतां एक गुण. वधूवरांचा नक्षत्रचरण एक असल्यास गुण नाहीं.

---

अथनाडी अश्विन्यार्द्रापुनर्वसूत्तराफल्गुनीहस्तज्येष्ठामूलशततारकापूर्वाभाद्रपदेतिप्रथमनाडी भरणीमृगपुष्यपूर्वाफल्गुनिचित्रानुराधापूर्वाषाढाधनिष्ठोत्तराभाद्रपदेतिमध्यमनाडी कृत्तिकारोहिण्याश्लेषामघास्वातीविशाखोत्तराषाढाश्रवणरेवतीतिचरमनाडी अत्रनाड्यैक्ये मृत्युःनाडीभेदेष्टौगुणाः नाड्यैकंसर्वथावर्ज्यं शूद्रादौपार्श्वैकनाडीद्वयंसंकटेशुभंअत्रवर्णवश्यभकूटयोनिकूटानामल्पगुणत्वात्विवाहविघटकत्वाभावाच्चस्वरूपंनोक्तं अत्रसर्वगुणमेलने नविंशतिगुणसंभवेमध्यमं विंशत्यधिकगुणत्वेऽतिशुभं विंशत्यूनत्वेत्वशुभं इतिनक्षत्रादिघटितविचारः ॥

## आतां नाडी सांगतों.

अश्विनी, आर्द्रा, पुनर्वसु, उत्तरा, हस्त, ज्येष्ठा, मूळ, शततारका, पूर्वाभाद्रपदा, यांची प्रथमनाडी होय. भरणी, मृग, पुष्य, पूर्वा, चित्रा, अनुराधा, पूर्वाषाढा, धनिष्ठा, उत्तराभाद्रपदा, यांची मध्यनाडी. कृत्तिका, रोहिणी, आश्लेषा, मघा, स्वाती, विशाखा, उत्तराषाढा, श्रवण, रेवती ह्या नक्षत्रांची अंत्यनाडी होय. वधूवरांची एक नाडी असतां मृत्यु होतो. वधूवरांची भिन्न नाडी असतां आठ गुण होत. एक नाडी सर्वथा वर्ज्य करावी. शूद्र इत्यादिक वर्णांस पार्श्वनाडी, व एकनाडी संकट असतां शुभ होत. वर्ण, वश्य, नक्षत्रकूट आणि योनिकूट यांचे गुण अल्प असून तीं विवाहाला बाधक नाहींत, याकरितां एथें त्यांचें स्वरूप सांगितलें नाहीं. सर्व गुण एकत्र मिळवून पाहावे आणि वीस गुण आले असतां मध्यम; विसांहून अधिक गुण आल्यास अतिशुभ होय. विसांपेक्षां कमी असल्यास अशुभ होय. याप्रमाणें नक्षत्र इत्यादिक घटिताचा विचार समाप्त झाला.

---

अनन्यपूर्विकांकांतामसपिंडांयवीयसीं अरोगिणींभ्रातृमतीमसमानार्षगोत्रजामितियाज्ञवल्क्याद्युक्तकन्याविशेषणेषु कांतत्वनीरोगत्वभातृमत्त्वभिन्नविशेषणानामभावेइहपरत्रपातित्यात्तानिप्रपंच्यंते तत्रान्यपूर्विकाःपुरुषांतरपूर्विकाःमनोदत्तावाचादत्ताग्निंपरिगतासप्तमंपदंनीताभुक्तागृहीतगर्भाप्रसूतेतिसप्तविधपुनर्भवास्तदभिन्नामनन्यपूर्विकां सप्तपदीविधेःपूर्वमाद्यानांतिसृणांसंकटेन्येनविवाहोभवति सप्तपदीविधौजातेबलाद्विवाहितापिनान्यत्रदेया असपिंडां समानःएकःपिंडः पिंडदानक्रियामूलपुरुषशरीरंवायस्याःसासपिंडातद्भिन्नां तत्र लेपभाजश्चतुर्थाद्याः पित्राद्याः पिंडभागिनः पिंडदःसप्तमस्तेषांसापिंड्यंसाप्तपौरुषमितिमात्स्योक्तेरेकस्यां पिंडदानक्रियायांदातृत्वपिंडभाक्त्वलेपभाक्त्वान्यतमसंबंधेनप्रवेशोनिर्वाप्यसापिंड्यमितिकेषांचिन्मतं अत्रस्त्रीणामपिपतिभिःसहकर्तृत्वात्सापिंड्यसिद्धिः मूलपुरुषैकशरीरावयवान्वयेनावयवसापिंड्यमित्यपरंमतं यद्यपिभ्रातृपत्नीनांपरस्परंनैतत्संभवतितथाप्याधारत्वेनैकशरीरान्वयः एकमूलपुरुषावयवानांपुत्रद्वारास्वाधानादितिज्ञेयं उभयत्रापिगयादौमित्रादेरपिपिंडभाक्त्वादेकशरीरान्वयस्यसप्तमात्परेषुपरश्यतेष्वपिसत्त्वाच्चातिप्रसंगप्राप्तेर्वध्वावरस्वाताताःकूटस्थाद्यदिसप्तमः पंचमीचेत्तयोर्मातातत्सापिंड्यंनिवर्ततइत्यादिवचनैर्निरासः मातृत्वपितृत्वादिसंबंधेसत्येवपंचमसप्तमपर्यंतमेवेत्युभयनियमस्वीकारात् तथाचपितृद्वारकसा

पिंड्यविचारेसप्तमादूर्ध्वसापिंड्यनिवृत्तिः मातृद्वारकसापिंड्यविचारेतुपंचमादूर्ध्वंतन्निवृत्तिरितिनिर्णयः ॥

## आतां सापिंड्यनिर्णय सांगतों.

" दान, उपभोग यांहींकरून जीचें ग्रहण दुसऱ्या पुरुषानें केलेलें नाहीं अशी, वराचे मनाला व नेत्रांला आनंद उत्पन्न करणारी, पुढें सांगावयाचें जें सापिंड्य तें आपल्याशीं नाहीं जीचें अशी, व वरापेक्षां वयानें व शरीरानें कमी, रोगरहित, भ्रातृयुक्त आणि वराशीं असमान ह्मणजे भिन्न आहेत प्रवर आणि गोत्रें ज्याचीं अशा कुलामध्यें उत्पन्न झालेली असी, स्त्री वरावी," याप्रमाणें याज्ञवल्क्य इत्यादिकांनीं सांगितलीं जीं कन्येचीं विशेषणें त्यांमध्यें कांतत्व, नीरोगत्व आणि भ्रातृमत्त्व या विशेषणांवांचून जीं इतर विशेषणें तीं त्या कन्येचे अंगीं नसतां ती कन्या वरली तर इहलोकीं व परलोकीं पातित्य प्राप्त होतें यास्तव तीं लक्षणें विस्तारेंकरून सांगतों—त्यांमध्यें अन्यपूर्विका ह्मणजे पूर्वी, पुढील सात प्रकारांनीं अन्य पुरुषाच्या न झालेल्या; त्या अशा—" मनेंकरून दिलेली, वाग्दान झालेली, विवाहहोमापर्यंत संस्कार झालेली, सप्तपदीविधि पूर्ण झालेली, उपभोग केलेली, गर्भधारण झालेली आणि प्रसूत झालेली, याप्रमाणें सात प्रकारच्या पुनर्भू होत, एतद्भिन्न जी ती अनन्यपूर्विका जाणावी. सप्तपदीविधि ( विवाहहोम झाल्यानंतर जो सप्तपदी ह्मणून विधि आहे तो होण्याच्या पूर्वी सातांमध्यें पहिल्या तीन ( मनेंकरून दिलेली, वाग्दान झालेली, विवाहहोमापर्यंत संस्कार झालेली ) अशा ज्या कन्या त्यांचा विवाह संकट असतां दुसऱ्या वराबरोबर होतो. बलात्कारानें विवाह झालेली असी जरी असेल तथापि सप्तपदीविधि झाल्यानंतर त्या कन्येचा दुसऱ्या वराशीं विवाह करूं नये. समान ह्मणजे एक आहे पिंड ह्मणजे पिंडदानक्रिया अथवा मूलपुरुषशरीरावयवसंबंध जीचा ती सपिंडा, तद्भिन्ना जी ती असपिंडा असी असावी. त्या सापिंड्याविषयीं, " पिता, पितामह आणि प्रपितामह हे पिंडभागी होत, व वृद्धप्रपितामहादि वरचे तीन पुरुष लेपभागी होत, याप्रमाणें हे जे साहा यांला जो सातवा तो पिंड देणारा आहे; यास्तव सात पुरुषांपर्यंत सापिंड्य होतें," असें मत्स्यपुराणांतील वचन आहे; याकरितां एका पिंडदानाच्या क्रियेमध्यें दातृत्व, पिंडभाक्त्व आणि लेपभाक्त्व यांतून कोणत्याहि संबंधेंकरून जो प्रवेश होतो त्याचें नांव निर्वाप्यसापिंड्य असें कितीएक ग्रंथकारांचें मत आहे. ह्या सापिंड्यांत पतीसहवर्तमान स्त्रियांसाहि कर्तृत्व असल्यामुळें त्यांस सापिंड्य सिद्ध होतें. मूलपुरुषाच्या एकशरीरसंबंधी अवयवांचें अस्तित्व आहे यास्तव अवयवसापिंड्य असें दुसरें मत आहे. हें सापिंड्य जरी भ्रात्यांच्या स्त्रियांस परस्पर संभवत नाहीं तथापि आधारत्वानें एकशरीराचा अन्वय होतो. कारण, भ्रात्यांचा जो एक मूळपुरुष, त्याच्या अवयवांचें पुत्रद्वारा स्थापन त्या भ्रात्यांच्या स्त्रियांचे ठिकाणीं होतें यावरून जाणावें. निर्वाप्यसापिंड्य ह्मणजे पिंडदानक्रियारूप सापिंड्य व शरीरावयवसापिंड्य या दोनहि सापिंड्यलक्षणांत गयादिश्राद्धांमध्यें मित्रादिकांसहि पिंड प्राप्त होतो यामुळें व एकशरीराचा अवयवसंबंध सातांहून पलीकडे शेकडोंपर्यंतहि असल्यामुळें त्यांसहि सापिंड्यप्राप्ति येईल आणि तसें झाल्यानें अनवस्थाप्रसंग प्राप्त झाला त्याचा निरास, " कन्येचा किंवा वराचा पिता कूटस्थपुरुषापासून जर सातवा

होईल व त्या वधूवरांची माता जर पांचवी होईल तर तें सापिंड्य दूर होतें," इत्यादिक जीं वचनें त्यांहींकरून होतो. कारण, मातृत्व, पितृत्व इत्यादिक संबंध असतांच पांचवी माता व सातवा पिता एथपर्यंतच सापिंड्य अशाविषयीं दोन नियमांचा स्वीकार केला आहे, यावरून पित्याकडून सापिंड्याचा विचार केला असतां सातव्या पुरुषानंतर सापिंड्याची निवृत्ति होते, व मातेकडून सापिंड्याचा विचार केला असतां पांचव्यानंतर सापिंड्याची निवृत्ति होते, याप्रमाणें निर्णय जाणावा.

---

## अत्रोदाहरणानि.

| विष्णुर्मूलभूतः | विष्णुर्मूलभूतः | विष्णुर्मूलभूतः | विष्णुर्मूलभूतः |
|---|---|---|---|
| कांतिः २ गौरी २ | दत्तः २ चैत्रः २ | दत्तः २ चैत्रः २ | दत्तः २ चैत्रः २ |
| सुधीः ३ हरः ३ | सोमः ३ मैत्रः ३ | सोमः ३ मैत्रः ३ | सोमः ३ मैत्रः ३ |
| बुधः ४ मैत्रः ४ | सुधीः ४ बुधः ४ | सुधीः ४ बुधः ४ | सुधीः ४ बुधः ४ |
| चैत्रः ५ शिवः ५ | श्यामा ५ रतिः ५ | श्यामा ५ नर्मदा ५ | श्यामा ५ शिवः ५ |
| गणः ६ भूपः ६ | शिवः ६ गौरी ६ | शिवः ६ कामः ६ | कांतिः ६ हरः ६ |
| मृडः ७ अच्युतः ७ | | रमा ७ कविः ७ | |
| रतिः ८ कामः ८ | | | |
| अत्र रतिकामयोरष्टमयोर्विवाहः पितृद्वारकत्वात् ॥ | अत्रगौरीशिवयोः षष्ठयोर्विवाहः मातृद्वारकत्वात् ॥ | अत्ररमाकव्योर्नविवाहः मंडूकप्लुत्यासापिंड्यानुवृत्तेः ॥ | अत्रकांतिहरयोर्नविवाहः एकतोनिवृत्तावपिअन्यतोनुवृत्तेः ॥ |

## याविषयीं उदाहरणें.

| विष्णु मूळ पुरुष. | | | |
|---|---|---|---|
| कांति. | २ | गौरी. | २ |
| सुधी. | ३ | हर. | ३ |
| बुध. | ४ | मैत्र. | ४ |
| चैत्र. | ५ | शिव. | ५ |
| गण. | ६ | भूप. | ६ |
| मृड. | ७ | अच्युत. | ७ |
| रति. | ८ | काम. | ८ |

या उदाहरणीं रति आणि काम यांचा विवाह होतो; कारण, पित्याकडून दोनहि आठवीं होतात.

| विष्णु मूळ पुरुष. | | | |
|---|---|---|---|
| दत्त. | २ | चैत्र. | २ |
| सोम. | ३ | मैत्र. | ३ |
| सुधी. | ४ | बुध. | ४ |
| श्यामा. | ५ | रति. | ५ |
| शिव. | ६ | गौरी. | ६ |

या उदाहरणीं गौरी व शिव यांचा विवाह होतो; कारण, मातेकडून दोन्हीं सहावीं होतात.

| विष्णु मूळ पुरुष. | | | |
|---|---|---|---|
| दत्त. | २ | चैत्र. | २ |
| सोम. | ३ | मैत्र. | ३ |
| सुधी. | ४ | बुध. | ४ |
| श्यामा. | ५ | नर्मदा. | ५ |
| शिव. | ६ | काम. | ६ |
| रमा. | ७ | कवि. | ७ |

या उदाहरणीं रमा व कवि यांचा विवाह होत नाहीं; कारण, मंडूकप्लुतीनें एथें सापिंड्य येतें. मंडूकप्लुति ह्मणजे एक पिढी सोडून पुढच्या पिढीला जें सापिंड्य येतें त्याला मंडूकप्लुतिसापिंड्य ह्मणतात. या उदाहरणीं शिव आणि काम यांचें परस्पर सापिंड्य निवृत्त झालें; कारण, मातेकडून पांच पुरुषपर्यंत सापिंड्य आहे आणि शिव व काम हीं दोनहि मूळपुरुषापासून सहावीं आहेत. परंतु यांची जी पुढची पिढी रमा व कवि यांस परस्पर सापिंड्य आलें; कारण पित्याकडून सात पुरुषपर्यंत सापिंड्य आहे.

| विष्णु मूळ पुरुष. | | | |
|---|---|---|---|
| दत्त. | २ | चैत्र. | २ |
| सोम. | ३ | मैत्र. | ३ |
| सुधी. | ४ | बुध. | ४ |
| श्यामा. | ५ | शिव. | ५ |
| कांति. | ६ | हर. | ६ |

या उदाहरणीं कांति व हर यांचा विवाह होत नाहीं; कारण एकीकडून ह्मणजे कांतीकडून सापिंड्यनिवृत्ति होते, परंतु दुसऱ्याकडून ह्मणजे हराकडून सापिंड्यनिवृत्ति होत नाहीं; कारण, कांतीकडून मातृद्वारक आहे व हराकडून पितृद्वारक आहे असें तात्पर्य जाणावें.

विष्णोर्मूलात्कांतिगौर्यौजातौताभ्यांसुधीहरौ बुधमैत्रौचैत्रशिवौगणभूपौमृडाच्युतौ १ तज्जातयोरष्टमयोर्विवाहोरतिकामयोः ॥

"मूळपुरुष विष्णु, त्याच्या दोन कन्या; एक कांति व दुसरी गौरी. त्यांतून कांतीचा पुत्र सुधी, सुधीचा पुत्र बुध, बुधाचा पुत्र चैत्र, चैत्राचा पुत्र गण, गणाचा पुत्र मृड, मृडाची कन्या रति, ती मूळ पुरुष जो विष्णु त्यापासून आठवी होते. दुसरी कन्या गौरी तिचा पुत्र हर, हराचा पुत्र मैत्र, मैत्राचा पुत्र शिव, शिवाचा पुत्र भूप, भूपाचा पुत्र अच्युत, अच्युताचा पुत्र काम, तो मूळ पुरुष जो विष्णु त्यापासून आठवा होतो याकरितां रति व काम हीं दोनहि आठवीं असल्यामुळें यांचा विवाह होतो."

---

विष्णोर्मूलाद्दत्तचैत्रौसोममैत्रौसुधीबुधौ२ताभ्यांश्यामारतीतज्जशिवगौर्योःकरग्रहः ॥

"मूळपुरुष विष्णु, त्याचे पुत्र दोन; एक दत्त व दुसरा चैत्र. दत्ताचा पुत्र सोम, सोमाचा पुत्र सुधी, सुधीची कन्या श्यामा, श्यामेचा पुत्र शिव, तो मूळपुरुष जो विष्णु त्यापासून सहावा होतो. दुसरा पुत्र चैत्र, त्याचा पुत्र मैत्र, मैत्राचा बुध, बुधाची कन्या रति, रतीची कन्या गौरी, ती मूळपुरुष जो विष्णु त्यापासून सहावी होते. याप्रमाणें शिव व गौरी हीं उभयतां सहावीं आहेत याकरितां यांचा विवाह होतो."

---

विष्णोर्मूलाद्दत्तचैत्रौसोममैत्रौसुधीबुधौ ॥ ३ ॥ ताभ्यांश्यामानर्मदाचशिवकामौरमाकवी ॥ मंडूकप्लुतिसापिंड्यंरमाकव्योर्विवाहहृत् ॥ ४ ॥

"मूळपुरुष विष्णु, त्याचे पुत्र दोन; दत्त व चैत्र. दत्ताचा पुत्र सोम, सोमाचा पुत्र सुधी, सुधीची कन्या श्यामा, श्यामेचा पुत्र शिव, शिवाची कन्या रमा, ती मूळ पुरुषापासून सातवी होते. दुसरा चैत्र, चैत्राचा पुत्र मैत्र, मैत्राचा बुध, बुधाची कन्या नर्मदा, नर्मदेचा पुत्र काम, कामाचा पुत्र कवि, हा मूळ पुरुषापासून सातवा होतो, येथें मंडूकप्लुतिसापिंड्य होतें; याकरितां रमा व कवि, यांचा विवाह होत नाहीं."

---

विष्णोर्मूलाद्दत्तचैत्रौसोममैत्रौसुधीबुधौ ॥ श्यामाशिवौकांतिहरौहरकांतीनदंपती ॥५॥ निवृत्तमप्येकतस्तदन्यतस्त्वनुवर्तते दिङ्मात्रेणोदाहृतात्रसेयंसापिंड्यपद्धतिः ॥ ६ ॥

"मूळपुरुष विष्णु, त्याचे पुत्र दोन; एक दत्त व दुसरा चैत्र. दत्ताचा पुत्र सोम, सोमाचा पुत्र सुधी, सुधीची कन्या श्यामा, श्यामेची कन्या कांती, ही मूळपुरुष जो विष्णु त्यापासून सहावी होते. दुसरा पुत्र चैत्र, त्याचा पुत्र मैत्र, मैत्राचा पुत्र बुध, बुधाचा शिव, शिवाचा हर, हाहि मूळपुरुष जो विष्णु त्यापासून सहावा होतो; परंतु कांती व हर यांचा विवाह होत नाहीं. कारण एकीकडून ह्मणजे कांतीकडून मातृद्वारक सापिंड्य असल्यामुळें सापिंड्यनिवृत्ति होते, परंतु दुसऱ्याकडून ह्मणजे हराकडून पितृद्वारक सापिंड्य असल्यामुळें निवृत्ति होत नाहीं. याप्रमाणें एथें ही सापिंड्यपद्धति दिक्प्रदर्शनेंकरून सांगितली आहे.

कूटस्थात्पंचम्योः कन्ययोःसंततौमातृद्वारकत्वात्सापिंड्यनिवृत्तिः पंचम्योःकन्यययोर्यौपुत्रौतयोःसंततौपितृद्वारकत्वात्सापिंड्यमनुवर्तत इतीदंमंडूकप्लुतिसापिंड्यं ॥

मूळपुरुषापासून पांचव्या अशा ज्या दोन कन्या त्यांचे संततीला मातृद्वारक ( मातेकडून) सापिंड्य आहे ह्मणून सापिंड्यनिवृत्ति होते. आणि मूळपुरुषापासून पांचव्या कन्या त्यांचे जे पुत्र त्या पुत्रांची जी संतति तिला पितृद्वारक ( पित्याकडून ) सापिंड्य आहे ह्मणून तें निवृत्त होत नाहीं; ह्याला मंडूकप्लुतिसापिंड्य ह्मणतात.

---

पंचम्याःकन्यायाः पुत्रस्यषष्ठस्यकूटस्थात्पंचमादिः सपिंडोनभवतितथापिद्वितीयसंततिपंक्तौपंचमषष्ठादेः पितृद्वारकत्वादिनासापिंड्यसत्त्वादेकतोनिवृत्तावप्यन्यतोनुवृत्त्यापंचमषष्ठादिनापंचम्याःकन्यायाःसंततिर्नेविवाह्या एवंकूटस्थमारभ्याष्टमादेःकूटस्थमारभ्यद्वितीयतृतीयादेश्चैकतोनिवृत्तिपरतोनुवृत्त्योःसत्त्वमूह्यं एवमाशौचविषयकसापिंड्येपिएकतोनुवृत्त्यादिकंयथासंभवंसर्वमूह्यं ॥

मूळ पुरुषापासून पांचवी जी कन्या तिचा पुत्र जो सहावा पुरुष त्याचा, मूळ पुरुषापासून पांचवा आदिकरून जो पुरुष तो सपिंड होत नाहीं तथापि दुसऱ्या संततीच्या पंक्तीचे ठिकाणीं पांचवा सहावा इत्यादि पुरुषांला पितृद्वारक सापिंड्य आहे ह्मणून एकीकडून ह्मणजे मातृद्वारकत्वानें सापिंड्य निवृत्त झालें तथापि दुसरीकडून ह्मणजे पितृद्वारकत्वानें आहे; यास्तव पांचव्या सहाव्या इत्यादिक पुरुषानें पांचव्या कन्येच्या संततीशीं विवाह करूं नये. याप्रमाणें मूळपुरुषाला आरंभ करून आठवा इत्यादिक पुरुषाला आणि मूळपुरुषापासून दुसरा, तिसरा इत्यादिकांला एकीकडून सापिंड्याची निवृत्ति होते, व दुसरीकडून सापिंड्यप्राप्ति आहे असें योजावें. याप्रमाणें आशौचसंबंधी सापिंड्याविषयींहि एकीकडून निवृत्ति व दुसरीकडून सापिंड्यप्राप्ति याप्रमाणें जसें असेल तसें जाणावें.

---

एवंपितृद्वारकसापिंड्यंसप्तमादूर्ध्वंनिवर्ततेमातृद्वारकंतुपंचमादूर्ध्वमितिमुख्यकल्पेनवर्जनीयानांकन्यानांसंख्याचेत्थंसंपद्यते पितृकुलेषोडशाधिकद्विसाहस्री २०१६ मातृकुलेपंचोत्तरशतं १०५ कुलद्वयेमेलनेनैकविंशत्युत्तरशताधिकसहस्रद्वयसंख्या २१२१ कन्यावर्ज्याः संपद्यंते अत्रगणनाप्रकारस्तत्रमूलश्लोकास्तद्व्याख्याचकौस्तुभेस्पष्टाः बालानांदुर्बोधतयानेहोच्यते तथाचमुख्यकल्पेनकुलद्वयेएतावत्यःवर्जनीयाएव नत्वनुकल्पानुसरणेनसप्तमात्पंचमादर्वाग्विवाहःकार्यः पंचमेसप्तमेचैवयेषांवैवाहिकीक्रिया क्रियापराअपिहितेपतिताःशूद्रतांगताः सप्तमात्पंचमाद्वीमान्यःकन्यामुद्वहेद्द्विजः गुरुतल्पीसविज्ञेयःसगोत्रांचैवमुद्वहन्इत्यादिस्मृतिभ्यः यानितु चतुर्थीमुद्वहेत्कन्यांचतुर्थःपंचमोवरः तृतीयांवाचतुर्थींवापक्षयोरुभयोरपिइत्यादिवचनानितेषुकानिचिन्निर्मूलानिकानिचिद्दत्तकसापत्न्यादिसंबंधविषयतयाविप्राणांक्षत्रियादिषुसापिंड्यविषयतयावानेयानिइतिनिर्णयसिंधुमतं कौस्तुभेतु उद्वहेत्सप्तमादूर्ध्वंतदभावेतुसप्तमीं पंचमींतदभावेतुपितृपक्षेप्ययंविधिः ॥

याप्रमाणें पितृद्वारक सापिंड्य, मूळपुरुषापासून सातव्या पुरुषानंतर निवृत्त होतें. व मातृद्वारक सापिंड्य तर मूळपुरुषापासून पांचव्या पुरुषानंतर निवृत्त होतें, ह्मणून मुख्य पक्षेंकरून वर्ज्य करण्याला योग्य ज्या कन्या त्यांची संख्या याप्रमाणें होते. ती अशी—पितृकुळामध्यें

२०१६, व मातृकुळामध्यें १०५, याप्रमाणें दोन कुळें मिळून २,१२१ कन्या वर्ज्य कराव्या. याच्या गणनेचा प्रकार व त्याविषयीं मूळ श्लोक आणि श्लोकांची व्याख्या हें सर्व कौस्तुभांत स्पष्ट सांगितलें आहे. व ज्यांला शास्त्रव्युत्पत्ति नाहीं त्यांला तें दुर्बोध असल्यामुळें तें एथें सांगत नाहीं. तेव्हां मुख्यपक्षीं दोन कुळें मिळून इतक्या (२,१२१) कन्या निश्चयें वर्ज्य कराव्या. अनुकल्पाचा आश्रय करून सातव्या, पांचव्या पुरुषाचे आंत विवाह करूं नये. कारण, "ज्या पुरुषांचा विवाहसंस्कार पांचव्या सातव्या सपिंडेशीं होतो ते पुरुष क्रियातत्पर जरी असले तथापि पतित होत्साते शूद्रत्वाला पावतात." "सातव्या व पांचव्या पुरुषाच्या आंतली अथवा सगोत्रा ह्मणजे समान गोत्रांतली अशा कन्येशीं जो बुद्धिमान् द्विज विवाह करील तो गुरुतल्पी ह्मणजे गुरुपत्नीशीं गमन करणारा असा जाणावा," इत्यादिक स्मृतिवाक्यें आहेत. "मूळ पुरुषापासून चवथा वर यानें चवथी कन्या वरावी, आणि पांचवा वर यानें तिसरी अथवा चवथी कन्या वरावी; याप्रमाणें दोनहि पक्षीं (मातृपक्षीं व पितृपक्षीं) जाणावें," इत्यादिक जीं वचनें आहेत त्यांमध्यें कांहीं वचनें निर्मूळ व कांहीं वचनें दत्तक, सापत्न इत्यादिक संबंधविषयेंकरून ब्राह्मणाविषयीं योजावीं, अथवा क्षत्रियादिकांविषयीं जें सापिंड्य त्याविषयीं योजावीं, असें निर्णयसिंधूचें मत आहे. कौस्तुभामध्यें तर, "मूळपुरुषापासून सातव्या पुरुषानंतरची वरावी, तिच्या अभावीं सातवी, तिच्या अभावीं पांचवी याप्रमाणें कन्या वरावी, व हा विधि मातृपक्षीं असून पितृपक्षींहि आहे."

---

**सप्तमींचतथाषष्ठींपंचमींचतथैवच एवमुद्वाहयेत्कन्यांनदोषःशाकटायनः तृतीयांवाचतुर्थींवापक्षयोरुभयोरपि विवाहयेन्मनुःप्राहपाराशर्योयमोंगिराः यस्तुदेशानुरूप्येणकुलमार्गेण चोद्वहेत् नित्यंसव्यवहार्यःस्याद्वेदाचैतत्प्रतीयतइत्यादिवचनानांचतुर्विंशतिमतषट्त्रिंशन्मतादिषूपलभ्यमानत्वात्सापिंड्यसंकोचेनविवाहस्यबहुदेशेषुदर्शनाच्चयेषांकुलेदेशेचानुकल्पत्वेन सापिंड्यसंकोचः परंपरयासमागतस्तेषांसापिंड्यसंकोचेनविवाहोनदोषायस्वकुलदेशविरुद्धे नसापिंड्यसंकोचेनविवाहेदोषोभवत्येव जनपदधर्माग्रामधर्माश्चतान्विवाहेप्रतीयात् येनास्यपितरोयातायेनयाताःपितामहाः तेनयायात्सतांमार्गंतेनगच्छन्नदुष्यतिइत्यादिवाक्यैःस्वकुलदेशाचाराविरुद्धस्यैवशास्त्रस्यविवाहेनुसर्तव्यत्वात् एवंमातुलकन्यापरिणयनेपि तृप्तांजुहुर्मातुलस्येवयोषाभागस्तेपैतृष्वसेयीवपाभिवेतिमंत्रलिंगैःमातुलस्यसुतामूढ्वामातृगोत्रांतथैवच समानप्रवरांचैवत्यक्त्वाचांद्रायणंचरेत्इत्यादिस्मृतीनांबाधात्येषांकुलेमातुलकन्यापरिणयः परंपराप्राप्तस्तैःसकार्यःगोत्रान्मातुःसपिंडाच्चविवाहोगोवधस्तथेतिमातुलकन्याविवाहस्यकलिवर्ज्यत्ववचनमपियेषांकुलेदेशेमातुलकन्याविवाहोनास्तितत्परं मातुलकन्यापरिणयनस्यानेकश्रुतिस्मृतिसिद्धत्वात् अतएवमातुलकन्योद्वाहिनांश्राद्धेनिमंत्रणनिषेधोपिस्वकुलाचारादिविरोधेनतदुद्वाहिपरः उक्तविधसापिंड्यसंकोचेनविवाहंकुर्वतांशिष्टैःश्राद्धादौभोजनाद्याचारादिबहूपपादितं परंतुसापिंड्यसंकोचस्वीकारेपिकतिथीकन्याकतिथेनपुरुषेणविवाह्याकतिथेननविवाह्येति व्यवस्थानोपपादिता ॥**

"सातवी, सहावी आणि पांचवी, असी कन्या वरावी, याप्रमाणें वरली असतां दोष

नाहीं असें शाकटायन सांगतो." "दोनहि पक्षीं तिसरी, अथवा चवथी कन्या वरावी असें मनु, पाराशर्य, यम आणि अंगिरा हे सांगतात. जो पुरुष देशाचार व कुलाचार यांला अनुसरून विवाह करितो तो नित्य व्यवहाराला योग्य होतो असें वेदांतहि सांगितलें आहे." इत्यादिक वचनें चतुर्विंशतिमत, व षट्त्रिंशतिमत इत्यादिक ग्रंथांमध्यें मिळतात; यास्तव आणि सापिंड्याचा संकोच मानून पुष्कळ देशांमध्यें विवाह करण्याचा आचार दृष्टीस पडतो याकरितां ज्यांच्या कुलामध्यें व देशामध्यें अनुकल्पानें सापिंड्याचा संकोच परंपराप्राप्त असेल, त्यांनीं सापिंड्याचा संकोच मानून विवाह केला असतां दोष नाहीं. आपल्या कुळाला व देशाचाराला विरुद्ध असा सापिंड्यसंकोचेंकरून विवाह केला असतां निश्चयें दोष प्राप्त होतो. कारण, "देशाचार, ग्रामाचार आणि कुलाचार हे विवाहामध्यें करावे," असें आश्वलायन सांगतो. "ज्या आचारानें आपले पितृ, पितामह सन्मार्गीं गेले त्या आचारानेंच आपण जावें; कारण तसा जाणारा दोषी होत नाहीं," इत्यादिक वचनांनीं आपलें कुळ व आपला देश यांमध्यें जो आचार असेल त्याला विरुद्ध नाहीं असें जें शास्त्र तें विवाहाविषयीं घ्यावें. याप्रमाणें मातुलाच्या कन्येशीं विवाह करण्याविषयींहि देशाचार व कुलाचार यांस अविरुद्ध असें शास्त्र पाहून त्याप्रमाणें करावें. "यज्ञामध्यें जसी वपा ही इंद्राचा भाग असल्यामुळें ऋत्विक् तिचा होम करितात त्याप्रमाणें मातुळकन्या, आतेबहीण ह्या भागरूप असल्यामुळें यांचेंहि ग्रहण करितात," अशा मंत्रप्रमाणांनीं मातुळकन्या, मातुळाच्या गोत्रांतली कन्या व आपणाशीं एक आहे प्रवर जीचा ती कन्या इतक्यांतून कोणत्याहि कन्येशीं विवाह केला असतां तिचा त्याग करून चांद्रायण प्रायश्चित्त करावें, इत्यादिक स्मृतिवचनें (मातुलकन्येशीं विवाह करण्याविषयीं) बाधित आहेत; यास्तव ज्याच्या कुळांत मातुळकन्येशीं विवाह करणें परंपराप्राप्त असेल त्यांनीं तो करावा. "आतेबहीण, व मातुळकन्या यांच्याशीं विवाह करणें, गोवध करणें" हीं कलींत वर्ज्य करावीं, असें जें कलिवर्ज्यप्रकरणीं मातुलकन्येशीं विवाह न करण्याविषयीं वचन आहे तेंहि ज्यांच्या कुळांत व देशांत मातुलकन्यांशीं विवाह करीत नाहींत त्यांविषयीं जाणावें. कारण, मातुलाच्या कन्येशीं विवाह करणें हें बहुत श्रुतिस्मृति प्रमाणेंकरून सिद्ध आहे, यास्तवच 'मातुलकन्येशीं विवाह केलेले जे त्यांना श्राद्धीं आमंत्रण करूं नये' असा जो निषेध तोहि आपल्या कुलाचाराला विरुद्ध असा जो मातुलकन्येशीं विवाह करणारा त्याविषयीं जाणावा. पूर्वीं सांगितलें जें सापिंड्य त्याचा संकोच करून विवाह करणारे जे पुरुष त्यांला श्राद्धादिकांमध्यें भोजनादिकांला सांगण्याचा शिष्टांचा आचार आहे, इत्यादिक बहुत सांगितलें आहे; परंतु सापिंड्यसंकोच स्वीकारला असतांहि कितवी कन्या कितव्या पुरुषानें वरावी, कितव्या पुरुषानें न वरावी ही व्यवस्था सांगितली नाहीं.

---

सापिंड्यदीपिकाकारादयोर्वाचीनास्तुचतुर्थीमुद्वहेत्कन्यांचतुर्थःपंचमोवरः पराशरमतेषष्ठींपंचमोनतुपंचमीमित्यादिवचनानांसमूलत्वंनिश्चित्यअशक्तैः संकटेसमाश्रयणीयस्यसापिंड्यसंकोचस्यव्यवस्थामूचुः तथाहिचतुर्थीकन्यापितृपक्षेमातृपक्षेचचतुर्थेनपंचमेनवापुंसाविवाह्याद्वितीयतृतीयषष्ठाद्यैश्चतुर्थीनोद्वाह्या पराशरमतेपंचमःषष्ठीमुद्वहेत् द्वितीयतृतीयचतुर्थादिःषष्ठींनोद्वहेत् पंचमःपंचमींनोद्वहेत् मातृतःपितृतश्चापिषष्ठः षष्ठींसमुद्वहेदितिवचनांतरात्

षष्ठेनापिषष्ठीविवाह्या पंचमषष्ठभिन्नैःषष्ठीनविवाह्येतिपर्यवसन्नं तथापितृपक्षेसप्तमीमातृपक्षे पंचमीचतृतीयाद्यैःसर्वैःपरिणेया पितृपक्षात्सप्तमींमातृपक्षात्तुपंचमीमितिव्यासवचनात् उद्वहेत्सप्तमादूर्ध्वंतदभावेतुसप्तमीं पंचमींतदभावेतुपितृपक्षेप्ययंविधिरितिचतुर्विंशतिमतोक्तेश्चपितृपक्षेपिपंचमीतृतीयाद्यैःपरिणेया तत्रापिमातृपक्षेपितृपक्षेपिपंचमेनपंचमीनोद्वाह्या पंचमोनतुपंचमीमितिसर्वत्रनिषेधात् तृतीयांवाचतुर्थींवापक्षयोरुभयोरपीतिवचनात्तुतृतीयाविवाह्याप्राप्नोतितत्रव्यवस्थोच्यते मातृपक्षेतावत्तृतीयामातुलकन्यामातृष्वसृकन्यावासंभवति पितृपक्षेतुतृतीयापितृव्यकन्यापितृष्वसृकन्यावा तत्रपितृव्यकन्यासगोत्रत्वात्त्याज्या पैतृष्वसेयींभगिनींस्वस्रीयांमातुरेवच एतास्तिस्रस्तुभार्यार्थेनोपयच्छेतबुद्धिमानितिमनूक्तेः पितृष्वसृमातृष्वसृकन्येअपित्याज्ये पितृष्वसृकन्यांमातुर्भगिनींमातृष्वसारंमातुःस्वस्रीयांमातृष्वसृकन्यामेतास्तिस्रोनोद्वहेदितितदर्थात् मातुलकन्यैवतृतीयापूर्वोक्तरीत्याकुलपरंपरागतत्वेपरिणेया एवंचतृतीयापितृतीयेनैवमातुलकन्यैवपरिणेयानचतुर्थादिनाकेनापि केचित्संकटेपितृष्वसृकन्यापरिणयनमाहुःतत्रदेशकुलाचाराद्व्यवस्थाज्ञातव्या अत्रायंसापिंड्यदीपिकादिसिद्धार्थसंग्रहः तृतीयामातुलकन्यैवोद्वाह्या चतुर्थीचतुर्थपंचमाभ्यामेव पंचमीपंचमभिन्नैःतृतीयाद्यैः सप्तमांतैःषष्ठीपंचमषष्ठाभ्यामेव सप्तमीतृतीयाद्यैःसप्तमांतैरिति अयंसापिंड्यसंकोचेनविवाहःसंकटेष्वशक्तेनकार्यः कन्यांतरलाभेशक्तैर्नकार्यःगुरुतल्पादिदोषस्मृतेः सापिंड्यसंकोचवाक्यानामशक्तविषयत्वस्यस्पष्टत्वात् प्रभुःप्रथमकल्पस्ययोनुकल्पेनवर्तते सनाप्नोतिफलंचेहेतिशक्तैरनुकल्पस्वीकारेदोषोक्तेः दत्तकसापिंड्यंदत्तकनिर्णयेप्रागेवोक्तं ॥

सापिंड्यदीपिकाकार इत्यादिक जे अर्वाचीन ग्रंथकार ते तर, "चवथा किंवा पांचवा पुरुष यानें चवथी कन्या वरावी, पराशराच्या मतीं सहावी वरावी; परंतु पांचवा यानें पांचवी कन्या वरूं नये," इत्यादिक वचनें प्रमाणभूत आहेत असा निश्चय करून अशक्तांनीं संकटसमयीं स्वीकारण्याला योग्य असा जो सापिंड्याचा संकोच त्याची व्यवस्था सांगतात. ती अशी,–पितृपक्षीं आणि मातृपक्षीं चवथी कन्या, चवथा किंवा पांचवा पुरुष यानें वरावी. दुसरा, तिसरा आणि सहावा इत्यादि पुरुष यानें चौथी कन्या वरूं नये. पराशराच्या मतीं पांचवा यानें सहावी कन्या वरावी. दुसरा, तिसरा आणि चवथा इत्यादि पुरुषानें सहावी कन्या वरूं नये. पांचवा पुरुष यानें पांचवी कन्या वरूं नये. "मातृकुळाकडून आणि पितृकुळाकडून जो सहावा पुरुष त्यानें सहावी कन्या वरावी," असें दुसरें वचन आहे; याकरितां सहाव्या पुरुषानेंहि सहावी कन्या वरावी. पांचवा व सहावा यांहून जे भिन्न त्यांनीं सहावी कन्या वरूं नये असा शेवटचा अर्थ समजावा. तसेंच, पितृपक्षीं सातवी कन्या, व मातृपक्षीं पांचवी कन्या तिसरा इत्यादिक सर्वांनीं वरावी. कारण, "पितृपक्षीं सातवी, व मातृपक्षीं पांचवी कन्या वरावी असें व्यासाचें वचन आहे." "मूळपुरुषापासून सातव्या पुरुषानंतरची वरावी, तिच्या अभावीं सातवी, तिच्या अभावीं पांचवी वरावी व हा विधि मातृपक्षीं असून पितृपक्षींहि आहे असें चतुर्विंशतिस्मृतींत वचन आहे; याकरितां पितृपक्षींहि पांचवी कन्या तिसरा इत्यादिकांनीं करावी. त्यामध्येंहि मातृपक्ष व पितृपक्ष यांतीलहि पांचवा

पुरुष यानें पांचवी कन्या वरूं नये. कारण, " पांचवा पुरुष यानें पांचवी कन्या वरूं नये," असा सर्वत्र निषेध आहे. " मातृपक्ष व पितृपक्ष या दोनहि पक्षीं तिसरी किंवा चौथी कन्या वरावी, " असें वचन आहे, यावरून तर, तिसरी कन्या वरावी असें प्राप्त होतें त्याविषयीं व्यवस्था सांगतों. मातृपक्षीं तिसरी मातुल कन्या किंवा मातेच्या बहिणीची कन्या ह्या संभवतात. पितृपक्षीं तर तिसरी चुलत्याची कन्या किंवा पित्याच्या बहिणीची कन्या ह्या संभवतात, त्यांतून चुलत्याची कन्या ही एकगोत्री असल्यामुळें ती वर्ज्य करावी. कारण " बापाचे बहिणीची कन्या ( आतेबहीण ), व मातेची बहीण, मातेच्या बहिणीची कन्या ( माऊसबहीण ) ह्या तीन कन्या बुद्धिमान् जो त्यानें वरूं नयेत असें मनूचें वचन आहे; याकरितां आतेबहीण व माऊसबहीण ह्याहि वरूं नयेत. पित्याचे बहिणीची कन्या, मातेची भगिनी ह्मणजे मातृष्वसा, मातेची स्वस्रीया ह्मणजे मातेच्या बहिणीची कन्या ह्या तीन कन्या वरूं नयेत, ह्याप्रमाणें वाक्याचा अर्थ होतो; यास्तव मातुलकन्या हीच तिसरी पूर्वी सांगितल्या रीतीनें कुलपरंपरागत आचार असेल तर वरावी. याप्रमाणें तिसरी कन्या जी तीहि तिसऱ्या पुरुषानेंच मातुलकन्याच वरावी, चौथा इत्यादिक कोण्याहि पुरुषानें वरूं नये. कोणी ग्रंथकार संकट असतां पितृष्वसृकन्येशीं ( आतेबहिणीशीं विवाह करावा असें ह्मणतात, परंतु त्याविषयीं देशाचार व कुलाचार असेल तदनुसार व्यवस्था जाणावी. एथें सापिंड्यदीपिका इत्यादिकांनीं सिद्ध केलेल्या अर्थाचा हा संग्रह सांगितला. तिसरी कन्या वरणें ती मातुलकन्याच वरावी. चौथी कन्या वरणें ती चौथा व पांचवा पुरुष यानेंच वरावी. पांचवी कन्या वरणें ती पांचवा वर्ज्य करून तिसरा, चौथा, सहावा व सातवा यांनीं वरावी. सहावी कन्या वरणें ती पांचवा व सहावा यांनींच वरावी. सातवी कन्या वरणें ती तिसरा, चौथा, पांचवा, सहावा आणि सातवा यांनीं वरावी. याप्रमाणें सापिंड्याचा संकोच मानून जो हा विवाह सांगितला तो अशक्त असेल त्यानें संकटें असतां करावा. दुसरी कन्या मिळत असेल तर सापिंड्यसंकोचानें शक्तिमंत यांनीं विवाह करूं नये. कारण, सापिंड्यसंकोच मानून विवाह केला असतां गुरुपत्नीगमनाचा दोष आहे, व सापिंड्यसंकोच्याविषयीं जीं वचनें आहेत तीं अशक्तविषयक होत हें स्पष्टच आहे. कारण, " मुख्य कल्पाविषयीं समर्थ असून जो अनुकल्पानें कर्म करितो त्याला कर्माचें फल प्राप्त नाहीं," असें वचन असल्यामुळें जे शक्त आहेत त्यांनीं अनुकल्पाचा स्वीकार केला असतां दोष लागतो असें सांगितलें आहे. दत्तकाविषयीं सापिंड्याचा निर्णय दत्तकाच्या निर्णयप्रसंगीं पूर्वीच सांगितला आहे.

---

अथसापत्नमातृकुलेसापिंड्यप्रकारंसुमंतुराह पितृपत्न्यःसर्वामातरः तद्भ्रातरोमातुलाः तद्भगिन्योमातृष्वसारः तद्दुहितरश्चभगिन्यः तदपत्यानिभागिनेयानि अन्यथासंकरकारिणःस्युरिति अत्रलक्षणयासापत्नमातृकुलेचतुःपुरुषसापिंड्यंविवाहनिषेधायविधीयतइति केचित् अपरेतुविवाहमात्रविषयत्वेमानाभावादाशौचादिविषयकत्वस्यापिसंभवात् यावद्वाचनिकंप्रमाणमितिन्यायेनपरिगणितेष्वेवसापिंड्यमितिवदंति तथाचसुमंतुवाक्येवाक्यभेदाश्रयणेनैवंवाक्यार्थाःपर्यवस्यंति पितृपत्न्यःसर्वामातरइतिप्रथमवाक्येसापत्नमातरिमुख्यमातृ

वतूसंमामनंतद्वधेमातृवधप्रायश्चित्तंतद्गमनेमातृगमनप्रायश्चित्तादिकंचातिदिश्यतेनात्रातिक्रां तविषयेदशाहाशौचातिदेशः त्रिरात्रविधिनाबाधात् तद्भ्रातरोमातुलाइत्यत्रमातुलत्वप्रयुक्तमा शौचादिकंमातुलस्यस्वभगिनीसपत्न्याः कन्योद्वाहनिषेधश्च अत्रमातुलत्वातिदेशेपिनतत्पुत्रा दिषुमातुलपुत्रत्वाद्यतिदेशः तेनबंधुत्रयत्वप्रयुक्तमाशौचंन मातुलकन्यादौविवाहविधिनिषेधा वपिन एवंमातुलकन्यादौपितुर्भगिनीत्वातिदेशाभावेनतत्पुत्रंप्रत्यपिपितृष्वसृत्वाद्यतिदेशोनभ वति तद्भगिन्योमातृष्वसारइत्यत्राशौचंविवाहनिषेधश्च मातृष्वसृपुत्रेबंधुत्रयत्वंचन सापत्न मातृष्वसृकन्याविवाहनिषेधस्तुविरुद्धसंबंधत्वादेववक्ष्यते तदपत्यानिभगिन्यइत्यत्राशौचंसं माननादिकंच नात्रविवाहप्रसक्तिःसगोत्रत्वात् अत्रसापत्नमातुलसापत्नभ्रातृसापत्नमातृ ष्वसृसापत्नभगिनीनांस्वमातुलसोदरभ्रात्राद्यनंतरंतर्पणंमहालयादावुद्देशोप्यतएववचनादाव श्यकइतिभाति तदपत्यानिभागिनेयानिइत्यत्राशौचंविवाहनिषेधश्च भागिनेयीत्वातिदेशेपित त्कन्यासुभागिनेयीकन्यात्वातिदेशोनयावदुक्तंप्रमाणमितिन्यायादितिदिक् ॥

यानंतर सापत्नमातेच्या कुळामध्यें सापिंड्यनिर्णयाचा प्रकार सुमंतु ऋषि सांगतो.— " पित्याच्या ज्या पत्नी त्या सर्व माता होत. पित्याच्या पत्नींचे ( सापत्न मातांचे ) जे भ्राते ते मातुल होत. सापत्न माता त्यांच्या ज्या बहिणी त्या मावशा होत. सापत्न मातांच्या ज्या कन्या त्या बहिणी होत. त्या बहिणींचीं अपत्यें तीं भागिनेय होत. असें न मानल्यास ते संकर करणारे होतील." ह्या स्थलीं अतिदेशेंकरून सापत्नमातेच्या कुलांतील चारपुरुषपर्यंत सापिंड्य, विवाहनिषेधासाठीं सांगितलें आहे असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, केवल विवाहाविषयींच हें चारपुरुषपर्यंत सापिंड्य ध्यावें याविषयीं प्रमाण नाहीं, यास्तव व आशौच इत्यादिकांविषयींहि घेण्याचा संभव असल्यामुळें ' जितक्यांचा उच्चार करून सांगितलें तितकेंच प्रमाण ' असा न्याय आहे; याकरितां " पित्याच्या पत्नी त्या सर्व माता होत इत्यादिक जीं कंठरवानें सांगितलीं त्याविषयींच सापिंड्य आहे असें सांगतात. ' जितकें कंठरवानें सांगितलें तितकें प्रमाण,' असें मानलें आहे ह्मणून सुमंतुवाक्यांचीं निरनिराळीं वाक्यें तोडून अर्थ केले असतां पुढें सांगतों याप्रमाणें वाक्याचे अर्थ संभवतात. " पित्याच्या पत्नी त्या सर्व माता होत," ह्या पहिल्या वाक्यानें सापत्नमातेला मुख्यमातेप्रमाणें मानणें, सापत्नमातेचा वध केला असतां मातृवधाचें प्रायश्चित्त, सापत्न मातेचे ठिकाणीं गमन केलें असतां मातृगमनाचें प्रायश्चित्त करणें इत्यादिकांचा अतिदेश येतो; ह्मणजे वचनबलेंकरून मानावें लागतें. " पित्याच्या पत्नी त्या सर्व माता," ह्या वाक्यानें अतिक्रांत आशौचाविषयीं दहा दिवसांच्या आशौचाचा अतिदेश होत नाहीं; कारण, सापत्न मातेचें अतिक्रांताशौच तीन दिवस धरावें असें विशेष वचन असल्यामुळें बाध आहे. "सापत्नमातेचे भ्राते ते मातुल होत," ह्या वाक्यानें 'मातुल' या निमित्तानें जें आशौच इत्यादिक प्राप्त होतें तें व मातुलाला आपल्या बहिणीची जी सवत तिच्या कन्येशीं विवाहाचा निषेध, हे सूचित होतात. एथें मातुलत्वाचा

॥ १ तद्दुहितरश्च ॥

जरी अतिदेश ह्मणजे आरोप प्राप्त होतो तथापि सापत्नमातुलांचे पुत्रांचे ठायीं मातुलपुत्रत्वादिकाचा अतिदेश येत नाहीं; याकरितां बंधुत्रयसंबंधी आशौच नाहीं. सापत्नमातुलकन्या इत्यादिक कन्यांशीं विवाह करणें याविषयीं विधि नाहीं व निषेधहि नाहीं. याप्रमाणें मातुलकन्या इत्यादिकांचे ठायीं 'पित्याची मामेबहीण,' असा अतिदेश नसल्यामुळें त्या पुत्राप्रतहि पितृष्वसृत्वादिकाचा (मामेआतेइत्यादिकांचा) अतिदेश होत नाहीं. "सापत्न मातेच्या बहिणी त्या **मावशा** होत," ह्या वाक्यानें 'मावशा,' या संबंधेंकरून आशौच व विवाहाचा निषेध हे प्राप्त होतात, सापत्न मातेच्या बहिणीचे पुत्राविषयीं बंधुत्रयत्व नाहीं. सापत्न मातेच्या बहिणीच्या कन्येशीं विवाह करूं नये ह्मणून जो निषेध सांगितला तो तर विरुद्धसंबंध होतो, यास्तवच, तो विरुद्ध संबंध कसा तें पुढें सांगेन. "सापत्नमातेच्या कन्या त्या **बहिणी** होत," ह्या वाक्यानें सापत्नबहिणींचें आशौच धरणें व त्यांचा सन्मान करणें हीं प्राप्त होतात. सापत्नभगिनीचे ठिकाणीं विवाहाचा प्रसंग नाहीं. कारण, समान गोत्र आहे. ह्या स्थलीं आपले मातुल व आपले सोदर भ्राते यांचा उच्चार केल्यानंतर सापत्न मातुल, सापत्न भ्राता, सापत्न मावशी, सापत्न बहीण यांचें तर्पण करणें, व महालय इत्यादिक श्राद्धांत उच्चार करणें तें ह्याच वचनेंकरून आवश्यक करण्याविषयीं सांगितलें असें वाटतें. "सापत्नबहिणीच्या ज्या कन्या त्या **भागिनेयी** (भाच्या) होत," ह्या वाक्यानें सापत्न भगिनीकन्येचें आशौच व तिच्याशीं विवाहाचा निषेध हीं प्राप्त होतात. भागिनेयीत्वाचा जरी अतिदेश आहे तथापि सापत्नभागिनेयींच्या ज्या कन्या त्यांचे ठायीं भागिनेयीकन्यात्वाचा अतिदेश होत नाहीं. कारण 'जितकें सांगितलें तितकेंच प्रमाण' असा न्याय आहे. याप्रमाणें दिक्प्रदर्शन केलें.

---

**क्वचित्सापिंड्याभावेपिवचनादविवाहः अविरुद्धसंबंधामुपयच्छेत दंपत्योर्मिथःपितृमातृसाम्येविरुद्धसंबंधः यथाभार्यास्वसुर्दुहितापितृव्यपत्नीस्वसाचेतिपरिशिष्टोक्तेः बौधायनः मातुः सपत्न्याभगिनींतत्सुतांचविवर्जयेत् पितृव्यपत्नीभगिनींतत्सुतांचविवर्जयेत् केचिज्ज्येष्ठभ्रातापितुःसमइत्युक्तेर्ज्येष्ठभ्रातृपत्न्याभगिनीमातृष्वसृतुल्यत्वान्नविवाह्येत्याहुः यवीयसींस्वापेक्षयावयसावपुषाचन्यूनामुद्वहेत् असमानार्षगोत्रजां आर्षप्रवरःस्वसमानेआर्षगोत्रे यस्यतज्जानभवतियातां असमानगोत्रामसमानप्रवरांचोद्वहेदित्यर्थः ॥**

क्वचित् स्थलीं सापिंड्य नसतांहि विशेष वचन आहे याकरितां विवाह होत नाहीं असें सांगितलें आहे. "विरुद्ध संबंध जीचा नसेल त्या कन्येशीं विवाह करावा." ज्यांचा परस्पर विवाह करणें आहे असे जे वधू व वर त्यांचे ठिकाणीं वरास वधूचे पित्याचें साम्य नसणें व वधूस वराचे मातेचें साम्य नसणें याचें नांव अविरुद्धसंबंध; आणि तसें साम्य असल्यास तो विरुद्धसंबंध होय. तो असा—"आपल्या स्त्रियेच्या बहिणीची कन्या, व चुलत्याचे स्त्रियेची बहीण," असें परिशिष्टांत सांगितलें आहे. या स्थलीं आपल्या स्त्रियेच्या बहिणीची जी कन्या तिचा आपण मावसा होतो, ह्मणून पितृसाम्य आलें. चुलत्याचे स्त्रियेची जी बहीण ती आपल्यास आईप्रमाणें असल्यामुळें मातृसाम्य आलें, याप्रमाणें विरुद्धसंबंध जा-

णावा. **बौधायन दुसऱ्या प्रकारें विरुद्धसंबंध सांगतो.—** " सापत्न मातेची बहीण व त्या बहिणीची कन्या, ह्या वर्ज्य कराव्या; व चुलत्याचे स्त्रियेची बहीण व त्या बहिणीची कन्या ह्या वर्ज्य कराव्या. " कोणी ग्रंथकार, " ज्येष्ठभ्राता हा पितृतुल्य आहे, " असें वचन असल्यामुळें ज्येष्ठभ्रात्याच्या स्त्रियेची बहीण ही आपणास मावशीप्रमाणें आहे याकरितां ती वरूं नये असें ह्मणतात. तसेंच जी कन्या वरायाची ती यवीयसी ह्मणजे आपणापेक्षां वयानें व शरीरानें कमी असेल ती व असमानार्षगोत्रजा ह्मणजे आपणाशीं भिन्न आहेत गोत्रप्रवर ज्याचे अशा कुळांत झालेली, ह्मणजे असमानगोत्रा असून असमानप्रवरा असी वरावी, हा तात्पर्यार्थ होय.

---

**अथसंक्षेपतोगोत्रप्रवरनिर्णयःतत्रगोत्रलक्षणं विश्वामित्रोजमदग्निर्भरद्वाजोथगौतमः अत्रिर्वसिष्ठःकश्यपइत्येतेसप्तऋषयः सप्तानामृषीणामगस्त्याष्टमानांयदपत्यंतद्गोत्रमित्याचक्षते यद्यपिकेवलभार्गवेष्वार्ष्टिषेणादिषुकेवलांगिरसेषुहारीतादिषुचनैतल्लक्षणं भृग्वंगिरसोरष्टऋषिष्वनंतर्गतत्वात् तथाप्यत्रप्रवरैक्यादेवाविवाहः यद्यपिगोत्राणिअनंतानि गोत्राणांतुसहस्राणिप्रयुक्तान्यर्बुदानिचेत्युक्तेस्तथापिऊनपंचाशदेवगोत्रभेदाः व्यावर्तकप्रवरभेदानांतावतामेव दर्शनात् प्रवरलक्षणंतुगोत्रवंशप्रवर्तकऋषीणांव्यावर्तकाऋषिविशेषाः प्रवराइत्येवसंक्षेपतो ज्ञेयं समानगोत्रत्वंसमानप्रवरत्वंचपृथक्पृथक्विवाहप्रतिबंधकं तत्रप्रवरसाम्यंद्विविधं एकप्रवरसाम्यंद्वित्रिप्रवरसाम्यंच तत्रभृग्वंगिरोगणेतरेषुएकप्रवरसाम्यमपिविवाहप्रतिबंधकंकेवलभृगुगणेषुकेवलांगिरोगणेषुचैकप्रवरसाम्यंनविवाहबाधकं किंतुत्रिप्रवरेषुद्विप्रवरसाम्यमेवपंचप्रवरेषुत्रिप्रवरसाम्यमेवचविवाहबाधकं पंचानांत्रिषुसामान्यादविवाहस्त्रिषुद्वयोः भृग्वंगिरोगणेष्वेवंशेषेष्वेकोपिवारयेदित्यादिवचनात् जामदग्न्यभृगुगणेषुगौतमांगिरसेषुभरद्वाजांगिरसेषुचैकप्रवरसाम्येपिकचित्प्रवरसाम्याभावेपिचसगोत्रत्वादेवाविवाहः ॥**

## आतां संक्षेपानें गोत्रें आणि प्रवर यांचा निर्णय सांगतों.

**त्यामध्यें प्रथम गोत्राचें लक्षण सांगतों.—** " विश्वामित्र, जमदग्नि, भरद्वाज, गौतम, अत्रि, वसिष्ठ, कश्यप हे सात ऋषि आणि आठवा अगस्त्य यांचें जें अपत्य ह्मणजे वंश त्याला गोत्र असें ह्मणतात. जरीहि केवल भार्गव जे आर्ष्टिषेणादिक, व केवल अंगिरस जे हारीतादिक यांचे ठायीं हें पूर्वी सांगितलेलें गोत्राचें लक्षण येत नाहीं; कारण भृगुऋषि व अंगिराऋषि हे दोन, पूर्वी सांगितलेल्या आठ ऋषींच्या वंशांत नाहींत तथापि एकप्रवर असल्यामुळें विवाह होत नाहीं. सहस्र, प्रयुत, अर्बुद अशी गोत्रांची संख्या आहे असें वचन आहे, यास्तव जरीहि गोत्रें अनंत आहेत तथापि एकुणपन्नास इतकेच गोत्रांचे भेद आहेत. कारण, निरनिराळे प्रवरांचे भेद एकुणपन्नासच मिळतात. **प्रवरांचें लक्षण—**गोत्रांचे[1] व वंशांचे प्रवर्तक जे ऋषि त्यांचे भेद दाखविणारे जे तद्वंशीय विशेष ऋषि तेच प्रवर असें संक्षेपेंकरून जाणावें. एकगोत्रत्व व एकप्रवरत्व हें निरनिराळें विवाहाला प्रतिबंधक आहे, ह्मणजे एकगोत्र व एकप्रवर आलें असतां विवाह करूं नये. त्यामध्यें प्रवरांचें साम्य ह्मणजे

---

१ गोत्रप्रवर्तकानांविश्वामित्रादीनांवंशप्रवर्तकानांभृग्वादीनांचऋषीणामित्यर्थः ॥

सारखेपणा तो दोन प्रकारचा. कोठें एक ऋषीचें साम्य येतें व कोठें दोहोंचें किंवा तिघांचें साम्य येतें. त्यामध्यें भृगुगण व अंगिरोगण ह्यांवांचून इतर गणांत एक प्रवराचें साम्य आहे तथापि तेंहि विवाहप्रतिबंधक ह्मणजे विवाहाचें निषेधक होतें. केवल भृगुगण व केवल अंगिरोगण यांमध्यें एकप्रवराचें साम्य जरी आहे तथापि तें विवाहाला बाधक होत नाहीं; तर तीन प्रवरांमध्यें दोन प्रवरांचें साम्य, आणि पांच प्रवरांमध्यें तीन प्रवरांचें साम्य हींच विवाहाला बाधक होतात. कारण, "भृगुगण व अंगिरोगण यांत पांच प्रवरांमध्यें तीन प्रवर सारखे येतील तर, आणि तीन प्रवरांमध्यें दोन प्रवर सारखे येतील तर विवाह करूं नये, आणि अवशिष्ट गणांत एक जरी सारखा प्रवर येईल तथापि विवाह करूं नये," इत्यादिक वचनआहे. जामदग्न्यभृगुगण, गौतमांगिरस, आणि भारद्वाजांगिरस यांमध्यें एका प्रवराचें जरी साम्य आहे आणि क्वचित् स्थलीं प्रवर सारखे नसले तथापि एकगोत्र आहे याकरितांच यांचा परस्पर विवाह होत नाहीं.

---

गोत्राणांप्रवराणांचगणनाप्रोच्यतेधुना संक्षेपात्सुखबोधायभगवत्प्रीतयेपिच सप्तभृगवः सप्तदशांगिरसः चत्वारोत्रयःदशविश्वामित्राः त्रयःकश्यपाः चत्वारोवसिष्ठाः चत्वारोगस्तयइत्येकोनपंचाशद्गणास्तथापिसर्वग्रंथमतसंग्रहेणाधिकास्तत्रतत्रवक्ष्यंते तत्रसप्तभृगुगणाःवत्साः विदाः एतौजामदग्न्यौ आर्ष्टिषेणाः यस्काःमित्रयुवः वैन्याः शुनकाः एतेचपंचकेवलभृगवः एवंसप्त तत्र वत्साः मार्कंडेयाः मांडूकेयाः इत्यादयःशतद्वयाधिकावत्सगोत्रभेदाः एतेषांपंचप्रवराः भार्गवच्यावनाप्नवानौर्वजामदग्न्येति भार्गवौर्वजामदग्न्येतित्रयोवा भार्गवच्यावनाप्नवानेतित्रयोवा विदाः शैलाः अवटाइत्यादयोविंशत्यधिकाविदाः तेषांपंचप्रवराः भार्गवच्यावनाप्नवानौर्ववैदेति भार्गवौर्वजामदग्न्येतिवाआर्ष्टिषेणाः नैर्ऋतयः ग्राम्यायणः इत्यादयो विंशत्यधिकाआर्ष्टिषेणाः एषांभार्गवच्यावनाप्नवानार्ष्टिषेणानूपेतिपंच भार्गवार्ष्टिषेणानूपेति त्रयोवा एतेषांत्रयाणांवत्सविदार्ष्टिषेणानांपरस्परमविवाहः द्वित्रिप्रवरसाम्यात् आद्ययोर्जामदग्न्यत्वेनसगोत्रत्वाच्च यद्यपित्रिप्रवरार्ष्टिषेणानांवत्सविदैःसहनद्विप्रवरसाम्यंनापिसगोत्रत्वं जामदग्न्यत्वाभावात् तथापिपंचप्रवरपक्षगतमपित्रिप्रवरसाम्यंविवाहबाधकं एवमग्रेपिज्ञेयं वात्स्यानांभार्गवच्यावनाप्नवानेतित्रयः वत्सपुरोधसोभार्गवच्यावनाप्नवानवत्सपौरोधसेतिपंच बैजमथितयोर्भार्गवच्यावनाप्नवानबैजमथितेतिपंचएतेत्रयः क्वचित्एतेषांपरस्परंपूर्वोक्तैश्चत्रिभिर्नेविवाहः त्रिप्रवरसाम्यात् यस्काःमौनाःमूकाइत्यादयस्त्रिपंचाशदधिकायस्काः एषांभार्गववैतहव्यसावेतसेतित्रयःमित्रयुवः रौक्षायनाः सार्पिंडिनाः इत्यादयस्त्रिंशदधिकामित्रयुवः तेषांभार्गववाध्र्यश्वदिवोदासेतित्रयः भार्गवच्यावनदैवोदासेतिवा वाध्र्यश्वेत्येकोवा वैन्याः पार्थाः बाष्कलाः श्येताइत्येतेवैन्याः एषांभार्गववैन्यपार्थेतित्रयः शुनकाः गार्त्समदाः यज्ञपतयः इत्यादयःसप्तदशाधिकाःशुनकाः एषांशौनकेत्येकः गार्त्समदेतिवा भार्गवगार्त्समदेति द्वौवा भार्गवशौनहोत्रगार्त्समदेतित्रयोवा यस्कादीनांचतुर्णांस्वस्वगणंहित्वापरस्परंपूर्वैर्जामदग्न्यवत्सादिभिश्चसहविवाहोभवति एकप्रवरसाम्येपिद्वित्रिप्रवरसाम्याभावात् भृगुगणेषुए

**कप्रवरसाम्यस्यदूषकत्वाभावात् अजामदग्न्यत्वेनासगोत्रत्वात् मित्रयूनांपाक्षिकद्विप्रवरसाम्यात्त्रिप्रवरैर्वत्सादिभिः सहनविवाहइतिकेचित् तत्प्रवरपक्षग्राहिणामविवाहः पक्षांतरग्राहिणांमित्रयूनांविवाहएवेत्यन्ये क्वचिदधिकंगणद्वयमुक्तं वेदविश्वज्योतिषांभार्गववेदवैश्वज्योतिषेतित्रयः शाठरमाठराणांभार्गवशाठरमाठरेतित्रयः अनयोःपरस्परंपूर्वैश्चसर्वैर्विवाहः इति भृगुगणः ॥**

गोत्रें आणि प्रवर यांचा सर्वांला सुखेंकरून बोध व्हावा, व भगवंताची प्रीति व्हावी यांसाठीं त्या गोत्रप्रवरांची आतां संख्या संक्षेपानें सांगतों. ७ भृगुगण, १७ आंगिरसगण, ४ अत्रिगण, १० विश्वामित्रगण, ३ कश्यपगण, ४ वसिष्ठगण, ४ अगस्तिगण; हे सर्व मिळून एकुणपन्नास गण होतात, तथापि सर्व ग्रंथांच्या मतांचा संग्रह करून पाहिलें असतां यांहून अधिक गण सांपडतात ते त्या त्या ठिकाणीं सांगूं–त्यामध्यें **प्रथम भृगुगण सांगतों**– वत्स, विद, हे जामदग्न्यभृगु होत. आर्ष्टिषेण, यस्क, मित्रयु, वैन्य आणि शुनक हे पांच केवल भृगु होत. याप्रमाणें पूर्वीं सांगितलेले जामदग्न्य भृगु ( २ ) व हे ( ५ ) मिळून सात भृगुगण जाणावे. त्यांमध्यें १ वत्स, मार्कंडेय, मांडूकेय, इत्यादिक दोनशांपेक्षां अधिक वत्सगोत्राचे भेद आहेत. ह्या वत्सगोत्राच्या भेदांचे प्रवर पांच ते असे–भार्गव, च्यावन, आप्नवान, और्व आणि जामदग्न्य, याप्रमाणें पांच जाणावे. अथवा भार्गव, और्व, जामदग्न्य असे तीन प्रवर होत. किंवा भार्गव, च्यावन, आप्नवान असे तीन प्रवर होत. २ विद, शैल, अवट, इत्यादिक विसांपेक्षां अधिक विद होत. **यांचे प्रवर**–भार्गव, च्यावन, आप्नवान, और्व आणि वैद याप्रमाणें पांच. अथवा भार्गव, और्व, जामदग्न्य असे तीन प्रवर होत–३ **आर्ष्टिषेण**, नैर्ऋति, ग्राम्यायण इत्यादिक विसांपेक्षां अधिक आर्ष्टिषेण जाणावे. **यांचे प्रवर**–भार्गव, च्यावन, आप्नवान, आर्ष्टिषेण आणि अनूप याप्रमाणें पांच जाणावे. अथवा भार्गव, आर्ष्टिषेण, अनूप असे तीन प्रवर होत. वत्स, विद, आणि आर्ष्टिषेण हे जे तीन यांचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, यांचे दोन तीन प्रवर सारखे आहेत, व पहिले जे दोन वत्स व विद हे जामदग्न्य असल्यामुळें यांचें एकगोत्रत्व आहे. तीन आहेत प्रवर ज्यांचे असे जे आर्ष्टिषेण त्यांचे जरी वत्स व विद यांच्याशीं दोन प्रवर सारखे होत नाहींत, व सगोत्रत्वहि नाहीं, कारण ते जामदग्न्य नाहींत, तथापि पांच प्रवरांतलेहि तीन प्रवर सारखे आहेत ह्मणून ते तीन प्रवर विवाहाला बाधक होतात. याप्रमाणें पुढेंहि असेंच जाणावें. ४ **वात्स्य** जे **त्यांचे प्रवर**– भार्गव, च्यावन, आप्नवान याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. ५ वत्सपुरोधस्. **यांचे प्रवर**–भार्गव, च्यावन, आप्नवान, वत्स आणि पौरोधस् याप्रमाणें पांच जाणावे. ६,७ **बैज**, व **मथित यांचे प्रवर**–भार्गव, च्यावन, आप्नवान, बैज आणि मथित याप्रमाणें पांच प्रवर जाणावे. क्वचित् ग्रंथांत हे तीन प्रवर सांगितले आहेत. ह्यांचा ( वात्स्य, वत्स, पुरोधा, बैज, मथित ह्यांचा ) परस्पर विवाह होत नाहीं, व पूर्वीं सांगितले जे तीन ( वत्स, विद, आर्ष्टिषेण ) गण त्यांच्याशींहि ह्या वात्स इत्यादिकांचा विवाह होत नाहीं. कारण, तीन प्रवर सारखे येतात. ८ **यस्क**, मौन, मूक इत्यादिक त्रेपन्नांपेक्षां अधिक यस्क आहेत. **यांचे प्रवर**–भार्गव, वैतहव्य सावेतस याप्रमाणें तीन प्रवर जा-

णावे. ९ मित्रयु, रौष्ठयायन, सार्पिडिन इत्यादिक तिसांपेक्षां अधिक मित्रयु आहेत, यांचे प्रवर–भार्गव, वाध्र्यश्व, दिवोदास याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. अथवा–भार्गव, च्यावन, दैवोदास याप्रमाणें तीन. किंवा वाध्र्यश्व हा एकच प्रवर जाणावा. १० वैन्य, पार्थ, बाष्कल आणि श्येत याप्रमाणें हे वैन्य होत. यांचे प्रवर–भार्गव, वैन्य, पार्थ याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. ११ शुनक, गार्त्समद, यज्ञपति इत्यादिक सतरांपेक्षां अधिक शुनक होत. यांचे प्रवर–शौनक हा एक प्रवर. किंवा गार्त्समद हा एक प्रवर जाणावा. अथवा भार्गव, गार्त्समद याप्रमाणें दोन प्रवर जाणावे. किंवा भार्गव, शौनहोत्र, गार्त्समद असे तीन प्रवर जाणावे. यस्क इत्यादिक जे चार त्यांचा विवाह, आपापला गण वर्ज्य करून परस्पर होतो, आणि पूर्वी सांगितलेले जे जामदग्न्य वत्सादिक त्यांच्याशींहि ह्या यस्क इत्यादिक चोहोंचा विवाह होतो. कारण, एक प्रवर जरी सारखा आहे तथापि दोन तीन प्रवर सारखे नाहींत, व भृगुगणांमध्यें जरी एक प्रवर सारखा आहे तथापि तो विवाहाला बाधक नाहीं, आणि ते जामदग्न्य नसल्यामुळें एकगोत्री नाहींत. मित्रयु जे त्यांचे एका पक्षानें दोन प्रवर सारखे येतात, याकरितां त्रिप्रवरी जे वत्सादिक त्यांच्याशीं मित्रयूंचा विवाह होत नाहीं असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. वत्सादिकांच्या प्रवरांचा पक्ष ग्रहण करणारे जे मित्रयु त्यांचा विवाह होत नाहीं, दुसऱ्या प्रवरांचा पक्ष ग्रहण करणारे जे मित्रयु त्यांचा मात्र विवाह होतो असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात. क्वचित् ग्रंथांत दोन गण अधिक सांगितले आहेत. ते असे–१ वेद, आणि २ विश्वज्योतिष. यांचे प्रवर–भार्गव, वेद, वैश्वज्योतिष याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. १ शाठर, माठर. यांचे प्रवर–भार्गव, शाठर, माठर, याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. या दोहोंचा परस्पर विवाह होतो, व पूर्वी सांगितलेल्या सर्वांशींहि यांचा विवाह होतो. याप्रमाणें भृगुगण सांगितला.

---

अथांगिरसः तेत्रिविधाः गौतमाः भरद्वाजाः केवलाश्चेति तत्रगौतमांगिरसोदश आयास्याः १ शारद्वताः २ कौमंडाः ३ दीर्घतमसः ४ करेणुपालयः ५ वामदेवाः ६ औशनसाः ७ राहूगणाः ८ सोमराजकाः ९ बृहदुक्थाश्चेति १० तत्रआयास्याः श्रोणिवेधाः मूढरथाइत्यादयोष्टादशाधिकाआयास्याः तेषामांगिरसायास्यगौतमेतित्रयः शारद्वताः अभिजिताः रौहिण्याइत्यादयःसप्तत्यधिकाः शारद्वतास्तेषामांगिरसगौतमशारद्वतेतित्रयः कौमंडाः मामंथरेषणाः मासुराक्षाइत्यादयोदशाधिकाःकौमंडास्तेषामांगिरसौतथ्यकाक्षीवतगौतमकौमंडेतिपंच आंगिरसौतथ्यगौतमौशिजकाक्षीवतेतिवा आंगिरसायास्यौशिजगौतमकाक्षीवतेतिवा आंगिरसौशिजकाक्षीवतेतित्रयोवा आंगिरसौतथ्यकाक्षीवतेतिवाऔतथ्यगौतमकौमंडेतिवा अथदीर्घतमसोगौतमास्तेषामांगिरसौतथ्यकाक्षीवतगौतमदैर्घतमसेतिपंच आंगिरसौतथ्यदैर्घतमसेतित्रयोवा करेणुपालयः वास्तव्याः श्वेतीयाइत्यादयः सप्ताधिकाःकरेणुपालयस्तेषामांगिरसगौतमकरेणुपालेतित्रयः वामदेवानामांगिरसवामदेव्यगौतमेतित्रयः आंगिरसवामदेव्यबार्हदुक्थेतिवा औशनसाःदिश्याःप्रशस्ताःइत्यादिकानवाधिकाऔशनसास्तेषामांगिरसगौतमौशनसेतित्रयः राहूगणानामांगिरसराहूगणगौतमेतित्रयः सोमराजका

**नांआंगिरससोमराजगौतमेतित्रयः बृहदुक्थानामांगिरसबार्हदुक्थगौतमेतित्रयः १० क्वचि द्गणद्वयमधिकं उतथ्यानामांगिरसौतथ्यगौतमेति राघुवानामांगिरसराघुवगौतमेति गौतमा नांसर्वेषामविवाहःसगोत्रत्वात्प्रायेणद्वित्रिप्रवरसाम्याच्च ॥**

**आतां यानंतर आंगिरसगण सांगतों.**–ते आंगिरस तीन प्रकारचे आहेत, ते असे–गौतम, भरद्वाज व केवल आंगिरस. त्यांमध्यें गौतमांगिरस दहा प्रकारचे, ते असे– १ आयास्य, २ शारद्वत, ३ कौमंड, ४ दीर्घतमस, ५ करेणुपालि, ६ वामदेव, ७ औशनस, ८ राहूगण, ९ सोमराजक, १० बृहदुक्थ याप्रमाणें दहा प्रकारचे जाणावे. त्यांमध्यें १ आयास्य, श्रोणिवेध, मूढरथ इत्यादिक अठरांपेक्षां अधिक आयास्य जाणावे. **यांचे प्रवर**–आंगिरस, आयास्य, गौतम याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. २ शारद्वत, अभिजित, रौहिण्य इत्यादिक सत्तरांपेक्षां अधिक शारद्वत होत. **यांचे प्रवर**–आंगिरस, गौतम, शारद्वत असे तीन प्रवर जाणावे. ३ कौमंड, मामंथरेषण, मासुराक्ष इत्यादिक दहांपेक्षां अधिक **कौमंड. यांचे प्रवर**–आंगिरस, औतथ्य, काक्षीवत, गौतम, कौमंड याप्रमाणें पांच प्रवर जाणावे. अथवा आंगिरस, औतथ्य, गौतम, औशिज, काक्षीवत असे पांच प्रवर. किंवा आंगिरस, आयास्य, औशिज, गौतम, काक्षीवत, याप्रमाणें पांच प्रवर जाणावे. अथवा आंगिरस, औशिज, काक्षीवत असे तीन प्रवर जाणावे. किंवा आंगिरस, औतथ्य, काक्षीवत असे तीन होत. अथवा औतथ्य, गौतम, कौमंड, असे तीन प्रवर होतात. ४ यानंतर **दीर्घतमस् गौतम. यांचे प्रवर**–आंगिरस, औतथ्य, काक्षीवत, गौतम, दैर्घतमस याप्रमाणें पांच प्रवर जाणावे. अथवा आंगिरस, औतथ्य, दैर्घतमस याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. ५ करेणुपालि, वास्तव्य, श्वेतीय इत्यादिक सातांपेक्षां अधिक करेणुपालि जाणावे. **यांचे प्रवर**–आंगिरस, गौतम, करेणुपाल याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. ६ **वामदेव. यांचे प्रवर**–आंगिरस, वामदेव्य, गौतम याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. अथवा आंगिरस, वामदेव्य, बार्हदुक्थ याप्रमाणें तीन प्रवर होत. ७ औशनस, दिश्य, प्रशस्त इत्यादिक नवांपेक्षां अधिक औशनस होत. **यांचे प्रवर**–आंगिरस, गौतम, औशनस असे तीन प्रवर जाणावे. ८ **राहूगण. यांचे प्रवर**–आंगिरस, राहूगण, गौतम असे तीन प्रवर जाणावे. ९ **सोमराजक. यांचे प्रवर**–आंगिरस, सोमराज, गौतम असे तीन प्रवर होत. १० **बृहदुक्थ. यांचे प्रवर**–आंगिरस, बार्हदुक्थ, गौतम, याप्रमाणें तीन प्रवर होतात. याप्रमाणें दहा जे गौतमांगिरस त्यांचे प्रवर सांगितले. क्वचित् ग्रंथीं दोन गण अधिक सांगितले आहेत. ते असे–१ उतथ्य, २ राघुव. **उतथ्यांचे प्रवर.**–आंगिरस, औतथ्य, गौतम याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. **राघुवांचे प्रवर**–आंगिरस, राघुव, गौतम याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. पूर्वी सांगितले जे दहा गौतमांगिरस यांचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, त्या सर्वांचें एकगोत्र आहे, व बहुधा दोन तीन प्रवर सारखे आहेत. याप्रमाणें आंगिरसगणांतले पहिले दहा गौतमांगिरस सांगितले.

---

**अथभरद्वाजाः तेचत्वारः भारद्वाजाःगर्गाःऋक्षाःकपयश्चेति भरद्वाजाः क्षाम्यायणाः देवाश्वाइत्यादयः षष्ठ्युत्तरशताधिकाभरद्वाजास्तेषामांगिरसबार्हस्पत्यभारद्वाजेतित्रयः ग**

र्गाःसांभरायणाः सखीनयः इत्यादयःपंचाशदधिकागर्गास्तेषामांगिरसबार्हस्पत्यभारद्वाजशै न्यगार्ग्येतिपंच आंगिरसशैन्यगार्ग्येतित्रयोवा अंत्ययोर्व्यत्ययोवा भारद्वाजगार्ग्यशैन्येतिवा गर्गभेदानामांगिरसतैत्तिरिकापिभुवेति ऋक्षाः रौक्षायणाः कपिलाः इत्यादयोनवाधिकाऋ क्षास्तेषामांगिरसबार्हस्पत्यभारद्वाजवांदनमातवचसेतिपंच आंगिरसवांदनमातवचसेतित्र योवा कपयःस्वस्तितरयः दंडिनइत्यादयःपंचविंशत्यधिकाः कपयस्तेषामांगिरसामहय्यौरु क्षय्येतित्रयः आंगिरसामहीयवौरुक्षयसेत्याश्वलायनपाठः आत्मभुवामांगिरसभारद्वाजबार्ह स्पत्यवरात्मभुवेतिपंच अयंगणःक्वचित् भरद्वाजानांसर्वेषांपरस्परमविवाहः सगोत्रत्वात् प्रा येणद्वित्रिप्रवरसाम्याच्च ऋक्षांतर्गतानांकपिलानांविश्वामित्रैरप्यविवाहः इतिभरद्वाजांगिरसाः॥

आतां यानंतर भरद्वाज (आंगिरस गणांतले दुसरे) सांगतों—ते भारद्वाज चार.— १ भारद्वाज, २ गर्ग, ३ ऋक्ष, ४ कपि याप्रमाणें चार आहेत. १ भरद्वाज, क्षाम्यायण, देवाश्व इत्यादिक एकशें साठांपेक्षां अधिक भरद्वाज होत. यांचे प्रवर—आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. २ गर्ग, सांभरायण, सखीनि इत्यादिक पन्नासांपेक्षां अधिक गर्ग जाणावे. यांचे प्रवर—आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज, शैन्य, गार्ग्य याप्रमाणें पांच प्रवर. अथवा आंगिरस, शैन्य, गार्ग्य असे तीन प्रवर. अथवा अंत्यांचा व्यत्यय करावा. अथवा भारद्वाज, गार्ग्य, शैन्य असे तीन प्रवर. गर्गांच्या भेदांचे प्रवर—आंगिरस, तैत्तिरि, कापिभुव याप्रमाणें तीन प्रवर. ३ ऋक्ष, रौक्षायण, कपिल इत्यादिक नवांपेक्षां अधिक ऋक्ष जाणावे. त्यांचे प्रवर—आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज, वांदन, मातवचस, याप्रमाणें पांच प्रवर होतात. अथवा आंगिरस, वांदन, मातवचस याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. ४ कपि, स्वस्तितरि, दंडि इत्यादिक पंचविसांपेक्षां अधिक कपि जाणावे. यांचे प्रवर—आंगिरस, आमहय्य, औरुक्षय्य याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. 'आंगिरस, आमहीयव, औरक्षयस' असा आश्वलायनसूत्रांत पाठ आहे. आत्मभू. यांचे प्रवर—आंगिरस, भारद्वाज, बार्हस्पत्य, वर, आत्मभुव याप्रमाणें पांच प्रवर होतात. हा गण क्वचित् ग्रंथांत सांगितला आहे. सर्व भरद्वाजांचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, सर्व भरद्वाजांचें गोत्र एक आहे, व बहुधा दोन तीन प्रवर सर्वांचे सारखे आहेत. ऋक्षांचे अंतर्गत जे कपिल त्यांचा विश्वामित्रांशींहि विवाह होत नाहीं. याप्रमाणें भरद्वाज आंगिरस सांगितले.

---

अथकेवलांगिरसः तेचषट् हारीताः कुत्साः कण्वाः रथीतराः विष्णुवृद्धाःमुद्गलाश्चेति हारीताः सौभगाः नैय्यगवाइत्यादयोद्वात्रिंशदधिकाहारीतास्तेषामांगिरसांबरीषयौवनाश्वेति आद्योमांधातावा कुत्सानामांगिरसमांधात्रकौत्सेतित्रयः कण्वाःऔषमर्कटाःबाष्कलायनाःइ त्यादयएकविंशत्यधिकाःकण्वास्तेषामांगिरसाजमीढकाण्वेतित्रयः आंगिरसघौरकाण्वेतिवा रथीतराःहस्तीदाः नैतिरक्षयः इत्यादयश्चतुर्दशाधिकारथीतरास्तेषामांगिरसवैरूपरथीतरेति त्रयः आंगिरसवैरूपपार्षदश्वेतिवा अष्टादंष्ट्रवैरूपपार्षदश्वेतिवा अंत्ययोर्व्यत्ययोवा विष्णुवृ द्धाः शठाः भरणाइत्यादयःपंचविंशत्यधिकाविष्णुवृद्धास्तेषामांगिरसपौरुकुत्स्यत्रासदस्यवे

**तित्रयः मुद्गलाः सात्यमुग्रियः हिरण्यस्तंबयःइत्यादिकाअष्टादशाधिकास्तेषामांगिरसभा र्म्यश्वमौद्गल्येतित्रयः आद्यस्ताक्ष्योंवा आंगिरसताविमौद्गल्येतिवाएषांषण्णांकेवलांगिरसा नांस्वस्वगणंहित्वापरस्परंपूर्वैश्चसर्वैर्विवाहोभवति अंगिरसोगस्त्याष्टमसप्तर्षिभिन्नत्वेनतदपत्या नांसगोत्रत्वाभावात् द्वित्रिप्रवरसाम्याभावाच्च हारीतकुत्सयोस्तुनविवाहः पाक्षिकद्विप्रवर साम्यात् ॥**

**आतां यानंतर केवल आंगिरस सांगतों.**—ते केवल आंगिरस साहा. १ हारीत, २ कुत्स, ३ कण्व, ४ रथीतर, ५ विष्णुवृद्ध, ६ मुद्गल याप्रमाणें साहा आहेत. १ हारीत, सौभग, नैय्यगव इत्यादिक बत्तिसांपेक्षां अधिक हारीत आहेत. **यांचे प्रवर**—आंगिरस, आंबरीष, यौवनाश्व याप्रमाणें तीन प्रवर. अथवा ह्या तीन प्रवरांमध्यें पहिला मांधाता प्रवर जाणावा. **२ कुत्स, यांचे प्रवर**—आंगिरस, मांधात्र, कौत्स याप्रमाणें तीन प्रवर आहेत. **३ कण्व**, औषमर्कट, बाष्कलायन, इत्यादिक एकविसांपेक्षां अधिक कण्व आहेत. **यांचे प्रवर**—आंगिरस, आजमीढ, काण्व याप्रमाणें तीन प्रवर होतात. अथवा आंगिरस, घौर, काण्व, याप्रमाणें तीन प्रवर होतात. **४ रथीतर**, हस्तीद, नैतिरक्षि इत्यादिक चवदांपेक्षां अधिक रथीतर आहेत. **यांचे प्रवर**—आंगिरस, वैरूप, रथीतर असे तीन प्रवर होतात, अथवा आंगिरस, वैरूप, पार्षदश्व असे तीन प्रवर होतात. किंवा अष्टादंष्ट्र, वैरूप, पार्षदश्व, असे तीन प्रवर होतात. अथवा अंत्यांचा व्यत्यय करावा. **५ विष्णुवृद्ध**, शठ, भरण इत्यादिक पंचविसांपेक्षां अधिक विष्णुवृद्ध आहेत. **यांचे प्रवर**—आंगिरस, पौरुकुत्स्य, त्रासदस्यु, याप्रमाणें तीन प्रवर आहेत. **६ मुद्गल**, सात्यमुग्रि, हिरण्यस्तंबि इत्यादि अठरांपेक्षां अधिक मुद्गल आहेत. **यांचे प्रवर**—आंगिरस, भार्म्याश्व, मौद्गल्य, याप्रमाणें तीन प्रवर होतात. अथवा तार्क्ष्य, भार्म्याश्व, मौद्गल्य असे तीन प्रवर होतात. किंवा आंगिरस, तावि, मौद्गल्य याप्रमाणें तीन प्रवर होतात. हे जे सहा केवल आंगिरस यांचा विवाह, आपापला गण खेरीजकरून परस्पर होतो, व पूर्वी सांगितले जे सर्व त्यांच्याशींहि यांचा विवाह होतो; कारण अगस्ति आहे आठवा ज्यांला असे जे सप्तर्षि त्यांहून अंगिरस हा निराळा असल्या कारणानें त्याच्या पुत्रांचें एक गोत्र नाहीं, व दोन तीन प्रवरहि सारखे नाहींत. हारीत आणि कुत्स यांचा तर विवाह परस्पर होत नाहीं; कारण, पक्षीं दोन प्रवर सारखे येतात.

---

**अथअत्रयः तेचत्वारः अत्रयः गविष्ठिराः वाद्भुतकाः मुद्गलाश्चेति अत्रयोभूरयःछांद यइत्यादयश्चतुर्नवत्यधिकाअत्रयस्तेषामात्रेयार्चनानसश्यावाश्वेतित्रयः १ गविष्ठिराः दक्षयः भलंदनाइत्यादयश्चतुर्विंशत्यधिकागविष्ठिरास्तेषामात्रेयार्चनानसगाविष्ठिरेतित्रयः आत्रेयगा विष्ठिरपौर्वातिथेतिवा २ वाद्भुतकानामात्रेयार्चनानसवाद्भुतकेतित्रयः ३ मुद्गलाः शालिसं धयः अर्णवाः इत्यादयोदशावरामुद्गलास्तेषामात्रेयार्चनानसपौर्वातिथेतित्रयः ४क्वचित्अतिथ योवामरथ्याःसुमंगलाबीजवापाधनंजयाश्चेतिपंचगणाअधिकाः तत्राद्यचतुर्णामात्रेयार्चनान सातिथेतित्रयः आत्रेयार्चनानसगाविष्ठिरेतिवासुमंगलानामत्रिसुमंगलश्यावाश्वेतिवा धनंज यानामात्रेयार्चनानसधानंजयेति वालेयाः कौंद्रेयाः शौभ्रेयाः वामरथ्याः इत्यादयःअत्रेःपुत्रि**

कापुत्रास्तेषामात्रेयवामरथ्यपौत्रिकेतित्रयः अत्रीणांसर्वेषामविवाहः सगोत्रत्वात्सप्रवर त्वाच्च अत्रेःपुत्रिकापुत्राणांवामरथ्यादीनांचवसिष्ठविश्वामित्राभ्यामप्यविवाहः इत्यत्रयः ॥

**आतां अत्रिगण सांगतों.**–ते अत्रि, चार–अत्रि, गविष्ठिर, वाद्धुतक, मुद्गल याप्रमाणें चार अत्रि आहेत. १ **अत्रि**, भूरि, छांदि इत्यादिक चवऱ्याण्णवांपेक्षां अधिक अत्रि आहेत. **यांचे प्रवर**–आत्रेय, आर्चनानस, श्यावाश्व याप्रमाणें तीन आहेत. २ **गविष्ठिर**, दक्षि, भलंदन इत्यादिक चौविसांपेक्षां अधिक गविष्ठिर आहेत. **यांचे प्रवर**–आत्रेय, आर्चनानस, गाविष्ठिर असे तीन आहेत. अथवा आत्रेय, गाविष्ठिर, पौर्वातिथ याप्रमाणें तीन आहेत. ३ **वाद्धुतक यांचे प्रवर**–आत्रेय, आर्चनानस, वाद्धुतक याप्रमाणें तीन प्रवर आहेत. ४ मुद्गल, शालिसंधि, अर्णप इत्यादिक दहांपेक्षां न्यून मुद्गल आहेत. **यांचे प्रवर**–आत्रेय, आर्चनानस, पौर्वातिथ याप्रमाणें तीन आहेत. क्वचित् ग्रंथामध्यें अतिथि, वामरथ्य, सुमंगल, बीजवाप, धनंजय असे पांच गण अधिक सांगितले आहेत. त्यांमध्यें पहिले जे चार त्यांचे **प्रवर**–आत्रेय, आर्चनानस, आतिथ याप्रमाणें तीन प्रवर. अथवा आत्रेय, आर्चनानस, गाविष्ठिर असे तीन आहेत. सुमंगल जे त्यांचे **प्रवर**–अत्रि, सुमंगल, श्यावाश्व, असे तीन आहेत. धनंजय जे त्यांचे **प्रवर**–आत्रेय, आर्चनानस, धानंजय याप्रमाणें तीन आहेत. वालेय, कौद्रेय, शौभ्रेय, वामरथ्य, इत्यादिक अत्रीच्या कन्येचे पुत्र आहेत. **यांचे प्रवर**–आत्रेय, वामरथ्य, पौत्रिक याप्रमाणें तीन आहेत. अत्रि जे सर्व यांचा परस्पर विवाह होत नाहीं; कारण सर्व अत्रींचें गोत्र एक आहे, व प्रवरहि सर्वांचे एकसारखे आहेत. अत्रीच्या कन्येचे पुत्र जे वामरथ्यादिक त्यांचा वसिष्ठ, विश्वामित्र यांच्याशीं विवाह होत नाहीं. याप्रमाणें अत्रि गण सांगितला.

---

अथविश्वामित्राः तेदश कुशिकाः लोहिताःरौक्षकाःकामकायनाः अजाः कताः धनंजयाः अघमर्षणाः पूरणाः इंद्रकौशिकाश्चेति कुशिकाःपर्णजंघाः वारक्याइत्यादयःसप्तत्यधिकाःकुशिकास्तेषांविश्वामित्रदेवरातौदलेतित्रयः १ लोहिताःकुडक्याश्चाक्रवर्णायनाइत्यादयः पंचाधिकालोहिताः रोहिताइतिकेचित् तेषांवैश्वामित्राष्टकलौहितेतित्रयः अंत्ययोर्व्यत्ययोवा वैश्वामित्रमाधुच्छंदसाष्टकेतिवा विश्वामित्राष्टकेतिद्वौवा २ रौक्षकाणांविश्वामित्रगाथिनरेवणेतित्रयः विश्वामित्ररौक्षकरैवणेतिवा एतेरेवणावा ३ कामकायनाः देवश्रवसाः देवतरसाइत्यादयःपंचावराःकामकायनाः श्रौमतावा तेषांवैश्वामित्रदेवश्रवसदैवतरसेतित्रयः ४ अजानांवैश्वामित्रमाधुच्छंदसाजेतित्रयः ५ कताःऔदुंबरयः शैशिरयःइत्यादयोविंशत्यधिकाःकतास्तेषांवैश्वामित्रकात्याक्षीलेतित्रयः ६ धनंजयाः पार्थिवाः बंधुलाःइत्यादयःसप्तावराधनंजयास्तेषांवैश्वामित्रमाधुच्छंदसधानंजयेतित्रयः वैश्वामित्रमाधुच्छंदसाघमर्षणेतिवा ७ अघमर्षणानांवैश्वामित्राघमर्षणकौशिकेतित्रयः ८ पूरणानांवैश्वामित्रपूरणेतिद्वौ वैश्वामित्रदेवरातपौरणेतिवा ९ इंद्रकौशिकानांवैश्वामित्रेंद्रकौशिकेतिद्वौ १० क्वचिदन्येप्येकादशोक्ताः आश्मरथ्याः १ साहुलाः २ गाथिनाः ३ वैणयाः ४ हिरण्यरेतसः ५ सुवर्णरे

तसः ६ कपोतरेतसः ७ शालंकायनाः ८ घृतकौशिकाः ९ कथकाः १० रौहिणाइति ११ आश्मरथ्यानांवैश्वामित्राश्मरथ्यवाधुलेतित्रयः १ साहुलानांवैश्वामित्रसाहुलमाहुलेतित्रयः २ गाथिनानांवैश्वामित्रगाथिनरैणवेतित्रयः ३ वेणुवेतिक्वचित्पाठः एतेएवरेणवइति उद्वेणवइतिचोच्यंते ३ वैणवानांवैश्वामित्रगाथिनवैणवेति ४ हिरण्यरेतसांवैश्वामित्रहैरण्यरेतसेतिद्वौ ५ सुवर्णरेतसांवैश्वामित्रसौवर्णरेतसेतिद्वौ ६ कपोतरेतसांवैश्वामित्रकापोतरेतसेतिद्वौ ७ शालंकायनानांवैश्वामित्रशालंकायनकौशिकेतित्रयः एतेएवकौशिकाइतिजन्हवइतिचोच्यंते ८ घृतकौशिकानांवैश्वामित्रघृतकौशिकेतिद्वौ ९ कथकानांवैश्वामित्रकाथकेति १० रौहिणानांवैश्वामित्रमाधुच्छंदसरौहिणेतित्रयः ११ वैश्वामित्रगणानांसर्वेषांपरस्परमविवाहः सगोत्रत्वात्सप्रवरत्वाच्च कुशिकानां देवरातप्रवरसाम्येनदेवराताद्भेदानिर्णयाद्वक्ष्यमाणदेवरातवदेवजामदग्न्यैरप्यविवाहइतिभाति धनंजयानांविश्वामित्रैरत्रिभिश्चाविवाहः कातानांभरद्वाजैर्विश्वामित्रैश्चाविवाहः द्विगोत्रत्वात् इतिविश्वामित्राः ॥

आतां यानंतर विश्वामित्र गण सांगतों.—ते विश्वामित्र दहा—कुशिक, लोहित, रौक्षक, कामकायन, अज, कत, धनंजय, अघमर्षण, पूरण आणि इंद्रकौशिक याप्रमाणें दहा विश्वामित्र आहेत. १ कुशिक, पर्णजंघ, वारक्य इत्यादिक सत्तरांपेक्षां अधिक कुशिक आहेत. यांचे प्रवर—विश्वामित्र, देवरात, औदल असे तीन आहेत. २ लोहित, कुडक्य, चाक्रवर्णायन इत्यादिक पांचांपेक्षां अधिक लोहित आहेत. 'लोहित' या स्थानीं 'रोहित' असें कोणी ह्मणतात. यांचे प्रवर—वैश्वामित्र, आष्टक, लौहित असे तीन प्रवर आहेत. अथवा अंत्यांचा व्यत्यय करावा. किंवा वैश्वामित्र, माधुच्छंदस, आष्टक असे तीन आहेत. अथवा विश्वामित्र, आष्टक असे दोन आहेत. ३ रौक्षक. यांचे प्रवर—विश्वामित्र, गाथिन, रेवण असे तीन आहेत. अथवा विश्वामित्र, रौक्षक, रैवण याप्रमाणें तीन आहेत. किंवा हे रेवण जाणावे. ४ कामकायन, देवश्रवस, देवतरस, इत्यादिक पांचांपर्यंत कामकायन किंवा श्रौमत आहेत. यांचे प्रवर—वैश्वामित्र, देवश्रवस, दैवतरस असे तीन आहेत. ५ अज. यांचे प्रवर—वैश्वामित्र, माधुच्छंदस, आज याप्रमाणें तीन आहेत. ६ कत, औदुंबरि, शैशिरि, इत्यादिक विसांपेक्षां अधिक कत आहेत. यांचे प्रवर—वैश्वामित्र, कात्य, आक्षील, असे तीन आहेत. ७ धनंजय, पार्थिव, बंधुल इत्यादिक सातांपर्यंत धनंजय आहेत. यांचे प्रवर—वैश्वामित्र, माधुच्छंदस, धानंजय याप्रमाणें तीन आहेत. अथवा वैश्वामित्र, माधुच्छंदस, अघमर्षण याप्रमाणें तीन आहेत. ८ अघमर्षण. यांचे प्रवर—वैश्वामित्र, अघमर्षण, कौशिक याप्रमाणें तीन प्रवर जाणावे. ९ पूरण. यांचे प्रवर—वैश्वामित्र, पूरण याप्रमाणें दोन प्रवर आहेत. अथवा वैश्वामित्र, देवरात, पौरण याप्रमाणें तीन प्रवर आहेत. १० इंद्रकौशिक. यांचे प्रवर—वैश्वामित्र, इंद्रकौशिक, याप्रमाणें दोन प्रवर आहेत. क्वचित् ग्रंथामध्यें दुसरेहि अकरा गण सांगितले आहेत. ते असे,—आश्मरथ्य, २ साहुल, ३ गाथिन, ४ वैणय, ५ हिरण्यरेतस, ६ सुवर्णरेतस, ७ कपोतरेतस, ८ शालंकायन, ९ घृतकौशिक, १० कथक, ११ रौहिण, याप्रमाणें अकरा गण जाणावे. १ आश्मरथ्य, यांचे प्रवर—वैश्वामित्र, आश्मरथ्य, वाधुल

याप्रमाणें तीन प्रवर आहेत. २ साहुल. यांचे प्रवर–वैश्वामित्र, साहुल, माहुल याप्रमाणें तीन आहेत. ३ गाथिन. यांचे प्रवर–वैश्वामित्र, गाथिन, रैणव, याप्रमाणें तीन आहेत. 'रैणव' ह्या स्थानीं 'वेणुव' असा क्वचित् ग्रंथीं पाठ आहे. ह्यांसच 'रेणव' 'उदवेणव' असेंहि ह्मणतात. ४ वैणव. यांचे प्रवर–वैश्वामित्र, गाथिन, वैणव याप्रमाणें तीन आहेत. ५ हिरण्यरेतस. यांचे प्रवर–वैश्वामित्र, हैरण्यरेतस, याप्रमाणें दोन आहेत. ६ सुवर्णरेतस. यांचे प्रवर–वैश्वामित्र, सौवर्णरेतस याप्रमाणें दोन आहेत. ७ कपोतरेतस. यांचे प्रवर–वैश्वामित्र, कपोतरेतस याप्रमाणें दोन आहेत. ८ शालंकायन. यांचे प्रवर–वैश्वामित्र, शालंकायन, कौशिक याप्रमाणें तीन आहेत. यांलाच 'कौशिक' 'जन्हव' असेंहि ह्मणतात. ९ घृतकौशिक. यांचे प्रवर–वैश्वामित्र, घृतकौशिक असे दोन आहेत. १० कथक. यांचे प्रवर–वैश्वामित्र, काथक याप्रमाणें दोन आहेत. ११ रौहिण. यांचे प्रवर–वैश्वामित्र, माधुच्छंदस, रौहिण याप्रमाणें तीन आहेत. वैश्वामित्र जे सर्व गण यांचा परस्पर विवाह होत नाहीं; कारण हे सर्व विश्वामित्रगण एकगोत्री व प्रवरांनीं सारखे आहेत. कुशिकांचे व देवरतांचे प्रवर सारखे आहेत याकरितां कुशिक हे देवरातांहून निराळे किंवा त्यांतलेच आहेत याचा निर्णय होत नसल्यामुळें, पुढें सांगावयाचे असे जे देवरात त्यांचा जसा विवाह जामदग्न्यांशीं होत नाहीं, त्याप्रमाणें कुशिकांचाहि विवाह जामदग्न्यांशीं होत नाहीं असें वाटतें. धनंजय जे त्यांचा विश्वामित्र व अत्रि यांच्याशीं विवाह होत नाहीं. कत जे त्यांचा विवाह भरद्वाज व विश्वामित्र यांच्याशीं होत नाहीं; कारण कत जे त्याला गोत्रें दोन आहेत. याप्रमाणें विश्वामित्रगण सांगितला.

---

अथकश्यपाः तेत्रयः निध्रुवाः रेभाः शंडिलाश्चेति तत्रनिध्रुवाःकश्यपाःअष्टांगिरसः इत्यादयश्चत्वारिंशदधिकशतावरानिध्रुवास्तेषांकाश्यपावत्सारनैध्रुवेतित्रयः निर्णयसिंधौतु निध्रुवगणोत्तरंकश्यपगणमुक्त्वाकश्यपानांकाश्यपावत्सारासितेतिहिप्रवरत्रयमुक्तं अत्रशिष्टाचारोपिदृश्यते १ रेभाणांकाश्यपावत्साररैभ्येतित्रयः २ शंडिलाः कोहलाःउदमेधा इत्यादयः षष्ट्यवराःशंडिलास्तेषांकाश्यपावत्सारशांडिल्येतित्रयः अंत्यस्थानेदेवलोवाअसितोवा काश्यपासितदेवलेतिवा अंत्ययोर्व्यत्ययोवा देवलासितेतिद्वौवा एषांकश्यपानांपरस्परमविवाहः सगोत्रत्वात्सप्रवरत्वाच्च ॥

आतां यानंतर कश्यपगण सांगतों.–ते कश्यप तीन आहेत. १ निध्रुव, २ रेभ, ३ शंडिल याप्रमाणें तीन. त्यांमध्यें १ निध्रुव, कश्यप, अष्टांगिरस इत्यादिक चाळिसांपेक्षां अधिक शंभरांपर्यंत निध्रुव आहेत. यांचे प्रवर–काश्यप, अवत्सार, नैध्रुव याप्रमाणें तीन आहेत. निर्णयसिंधूमध्यें तर निध्रुवगणानंतर कश्यपगण सांगून कश्यपांचे 'काश्यप, अवत्सार, असित' असे तीन प्रवर सांगितले आहेत व यांविषयीं शिष्टाचाराहि आढळतो. २ रेभ. यांचे प्रवर–काश्यप, अवत्सार, रैभ्य याप्रमाणें तीन आहेत. ३ शंडिल, कोहल, उदमेध इत्यादिक साठांपर्यंत शंडिल आहेत. यांचे प्रवर–काश्यप, अवत्सार, शांडिल्य याप्रमाणें तीन आहेत. 'शांडिल्य' या स्थानीं 'देवल' किंवा 'असित' असा

प्रवर आहे. अथवा काश्यप, असित, देवल याप्रमाणें तीन प्रवर आहेत. अथवा अंत्यांचा व्यत्यय करावा. अथवा देवल, असित असे दोन आहेत. हे जे कश्यप यांचा परस्पर विवाह होत नाहीं. कारण, हे कश्यप एकगोत्री व एकसारखे प्रवरी आहेत.

---

**अथवसिष्ठाः तेचत्वारः वसिष्ठाः १ कुंडिनाः २ उपमन्यवः ३ पराशराश्च ४ वसिष्ठा वैतालकवयः रकयइत्यादयःषष्ट्यधिकाः वसिष्ठास्तेषांवासिष्ठेंद्रप्रमदाभरद्वस्वितित्रयः वासिष्ठेत्येकोवा १ कुंडिनाः लोहितायनाः गुग्गुलयः इत्यादयः पंचविंशत्यवराःकुंडिनास्तेषांवासिष्ठमैत्रावरुणकौंडिण्येतित्रयः २ उपमन्यवः औदलयः मांडलेखयइत्यादयःसप्तत्यवराःउपमन्यवस्तेषांवासिष्ठेंद्रप्रमदाभरद्वस्वितित्रयः आभरद्वसव्येतिपाठांतरं वासिष्ठाभरद्वस्विंद्रप्रमदेतिवा आद्ययोर्व्यत्ययोवा ३ पराशराः कांडुशयाः वाजयइत्यादयःसप्तचत्वारिंशदवराःपराशरास्तेषांवासिष्ठशाक्त्यपराशर्येतित्रयः ४ एषांवसिष्ठानांपरस्परमविवाहः इतिवसिष्ठाः ॥**

**आतां यानंतर वसिष्ठगण सांगतों.**–ते वसिष्ठ चार; १ वसिष्ठ, २ कुंडिन, ३ उपमन्यु, ४ पराशर याप्रमाणें चार आहेत. १ **वसिष्ठ**, वैतालकवि, रकि इत्यादिक साठांपेक्षां अधिक वसिष्ठ आहेत. **यांचे प्रवर**–वासिष्ठ, इंद्रप्रमद, आभरद्वसु याप्रमाणें तीन आहेत. अथवा वासिष्ठ असा एक प्रवर आहे. २ **कुंडिन.** लोहितायन, गुग्गुलि इत्यादिक पंचविसांपर्यंत कुंडिन आहेत. **यांचे प्रवर**–वासिष्ठ, मैत्रावरुण, कौंडिण्य याप्रमाणें तीन आहेत. ३ **उपमन्यु**, औदलि, मांडलेखि इत्यादिक सत्तरांपर्यंत उपमन्यु आहेत. **यांचे प्रवर**–वासिष्ठ, इंद्रप्रमद, आभरद्वसु असे तीन आहेत. 'आभरद्वसु' या स्थानीं 'आभरद्वसव्य' असा दुसरा पाठ आहे. अथवा वासिष्ठ, आभरद्वसु, इंद्रप्रमद असे तीन प्रवर आहेत. अथवा आद्यांचा व्यत्यय करावा. ४ **पराशर**, कांडुशय, वाजि, इत्यादिक सत्तेचाळीसपर्यंत पराशर आहेत. **यांचे प्रवर**–वासिष्ठ, शाक्त्य, पराशर्य असे तीन प्रवर आहेत. हे जे चार वसिष्ठ सांगितले यांचा परस्पर विवाह होत नाहीं. याप्रमाणें वसिष्ठ गण सांगितला.

---

**अथागस्त्याः तेदश इध्मवाहाः १ सांभवाहाः २ सोमवाहाः ३ यज्ञवाहाः ४ दर्भवाहाः ५ सारवाहाः ६ अगस्तयः ७ पूर्णमासाः ८ हिमोदकाः ९ पाणिकाश्चेति १० इध्मवाहाः विशालाद्याः स्फालायनाःइत्यादयः पंचाशदधिकाइध्मवाहास्तेषामागस्त्यदार्ढ्यच्युतेध्मवाहेतित्रयः आगस्त्येत्येकोवा १ सांभवाहानामागस्त्यदार्ढ्यच्युतसांभवाहेतित्रयः २ सोमवाहानांसोमवाहोंत्यःआद्यौपूर्वोक्तावेव ३ एवंयज्ञवाहानांयज्ञवाहोंत्यः ४ दर्भवाहानांदर्भवाहोंत्यः ५ सारवाहानांसारवाहोंत्यः ६ अगस्तीनामागस्त्यमाहेंद्रमायोभवेति ७ पूर्णमासानामागस्त्यपौर्णमासपारणेतित्रयः ८ हिमोदकानामागस्त्यहैमवर्चिहैमोदकेतित्रयः ९ पाणिकानामागस्त्यपैनायकपाणिकेतित्रयः १० अगस्तीनांसर्वेषामविवाहः सगोत्रत्वात्सप्रवरत्वाच्च इत्यगस्तयः ॥**

**आतां यानंतर आगस्त्यगण सांगतों.**–ते आगस्त्य दहा–१ इध्मवाह, २ सांभवाह, ३

सोमवाह, ४ यज्ञवाह, ५ दर्भवाह, ६ सारवाह, ७ अगस्ति, ८ पूर्णमास, ९ हिमोदक, १० पाणिक याप्रमाणें दहा आगस्त्यगण आहेत. १ **इध्मवाह**, विशालाद्य, स्फालायन, इत्यादिक पन्नासांपेक्षां अधिक इध्मवाह आहेत. **यांचे प्रवर**— आगस्त्य, दार्ढ्यच्युत, इध्मवाह याप्रमाणें तीन आहेत. अथवा आगस्त्य हा एक प्रवर आहे. २ **सांभवाह. यांचे प्रवर**—आगस्त्य, दार्ढ्यच्युत, सांभवाह याप्रमाणें तीन आहेत. ३ **सोमवाह. यांचे प्रवर**—आगस्त्य, दार्ढ्यच्युत, सोमवाह असे तीन आहेत. ४ **यज्ञवाह. यांचे प्रवर**— आगस्त्य, दार्ढ्यच्युत, यज्ञवाह याप्रमाणें तीन होत. ५ **दर्भवाह. यांचे प्रवर**— आगस्त्य, दार्ढ्यच्युत, दर्भवाह याप्रमाणें तीन होत. ६ **सारवाह. यांचे प्रवर**—आगस्त्य, दार्ढ्यच्युत, सारवाह असे तीन होत. ७ **अगस्ति. यांचे प्रवर**—आगस्त्य, माहेंद्र, मायोभव असे तीन प्रवर. ८ **पूर्णमास. यांचे प्रवर**— आगस्त्य, पौर्णमास, पारण असे तीन. ९ **हिमोदक. यांचे प्रवर**—आगस्त्य, हैमवर्चि, हैमोदक याप्रमाणें तीन जाणावे. १० **पाणिक. यांचे प्रवर**—आगस्त्य, पैनायक, पाणिक असे तीन जाणावे. याप्रमाणें दहा जे अगस्तिगण सांगितले या सर्वांचा परस्पर विवाह होत नाहीं; कारण, हे सर्व अगस्ति यांचें गोत्र व प्रवरहि सर्वांचे एकसारखे आहेत. याप्रमाणें अगस्तिगण सांगितला.

---

**अथद्विगोत्राः तत्रभारद्वाजाच्छुंगात्वैश्वामित्रस्यशैशिरेःक्षेत्रेजातःशौंगशैशिरिर्नामऋषिः तस्यगोत्रलक्षणाक्रांतत्वाद्गोत्रत्वं तद्गोत्राणामांगिरसबार्हस्पत्यभारद्वाजशौंगशैशिरेतिपंच आंगिरसबार्हस्पत्यभारद्वाजकात्याक्षीलेतिवा आंगिरसकात्याक्षीलेतित्रयोवा आद्योभरद्वाजोवा एषांसर्वभरद्वाजैःसर्वैर्विश्वामित्रैश्चाविवाहः संकृतयः पूतिमाषाः तंडयइत्यादयोष्टाविंशत्यवराःसंकृतयस्तेषामांगिरसगौरिवीतिसांकृत्येतित्रयः शात्त्यगौरिवीतिसांकृत्येतिवा अंत्ययोर्व्यत्ययोवा एषांस्वगणस्थैःपूतिमाषादिभिःसर्वैवसिष्ठगणैश्चाहर्वसिष्ठसंज्ञकवक्ष्यमाणलौगाक्षिभिश्चाविवाहः केवलांगिरोगणैस्तुविवाहोभवत्येव आंगिरसत्वेपिसगोत्रत्वाभावात्द्वित्रिप्रवरसाम्याभावाच्च केचिद्भारद्वाजांगिरसत्वमाश्रित्यभारद्वाजशौंगशैशिरैःसहाविवाहमाहुः तन्न भारद्वाजत्वेदृढप्रमाणाभावात् प्रयोगपारिजातेकाश्यपैःसहैषामविवाहइत्युक्तंतत्रहेतुश्चिंत्यइतिकौस्तुभे लौगाक्षयः दार्भायणाः इत्यादयोष्टत्रिंशदधिकालौगाक्षयस्तेषांकाश्यपावत्सारवासिष्ठेतित्रयःकाश्यपावत्सारासितेतिवा एतेअहर्वसिष्ठाःनक्तंकाश्यपाः दिनकर्मणिवासिष्ठत्वप्रत्युक्तकार्यभाजः रात्रिकर्मणिकाश्यपत्वप्रयुक्तकार्यभाजइत्यर्थः एतेषांसर्वैःकाश्यपैः सर्वैश्चवसिष्ठैःसंकृतिभिश्चाविवाहः ॥ ३ ॥**

## आतां यानंतर द्विगोत्र ( दोन गोत्रांचे ) सांगतों.

भारद्वाज ( भरद्वाजकुलोत्पन्न ) जो शुंग त्यापासून वैश्वामित्र जो शैशिरि त्याच्या क्षेत्राचे ( स्त्रियेचे ) ठायीं झालेला शौंगशैशिरीमामक ऋषि तो गोत्राच्या लक्षणानें युक्त असल्यामुळें त्याला गोत्रत्व आहे. **त्याच्या गोत्रांचे प्रवर**—आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज, शौंग, शैशिर, असे पांच आहेत. अथवा आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज, कात्य, आक्षील असे पांच **प्रवर**. किंवा आंगिरस, कात्य, आक्षील असे तीन आहेत. अथवा भारद्वाज, कात्य, आ-

क्षील असे तीन प्रवर आहेत. ह्यांचा विवाह सर्व भरद्वाज, व सर्व विश्वामित्र यांशीं होत नाहीं. संकृति, पूतिमाष, तंडि इत्यादिक अठ्ठावीसपर्यंत संकृति आहेत. यांचे प्रवर–आंगिरस, गौरिवीति, सांकृत्य असे तीन आहेत. अथवा शाक्त्य, गौरिवीति, सांकृत्य असे तीन आहेत. अथवा अंत्यांचा व्यत्यय करावा. यांचा विवाह आपल्या गणांतील जे पूतिमाषादिक ते, सर्व वसिष्ठगण, आणि अहर्वसिष्ठसंज्ञक असे पुढें सांगावयाचे आहेत जे लौगाक्षि ते या सर्वांशीं होत नाहीं. केवल जे अंगिरोगण त्यांच्याशीं तर यांचा विवाह होतोच; कारण, ते जरी आंगिरस आहेत तथापि एकगोत्री नसून त्यांचे दोन तीन प्रवरहि एकसारखे नाहींत. कोणी ग्रंथकार, भारद्वाजांस आंगिरसत्व स्वीकारून भारद्वाज जे शौंगशैशिरि यांसहवर्तमान यांचा विवाह होत नाहीं असें ह्मणतात, परंतु तें योग्य नाहीं. कारण यांला भारद्वाजत्व आहे याविषयीं प्रबल प्रमाण नाहीं. प्रयोगपारिजात ग्रंथांत काश्यपांसहवर्तमान यांचा विवाह होत नाहीं असें सांगितलें आहे, परंतु त्याविषयींचें कारण योग्य नाहीं असें कौस्तुभांत आहे. लौगाक्षि, दार्भायण, इत्यादिक अठतिसांपेक्षां अधिक लौगाक्षि आहेत. यांचे प्रवर–काश्यप, अवत्सार, वासिष्ठ असे तीन आहेत. अथवा काश्यप, अवत्सार, असित असे तीन आहेत. त्यांना अहर्वसिष्ठ व नक्तंकाश्यप असें ह्मणतात, ह्मणजे दिवसाचे कर्माचे ठिकाणीं वासिष्ठत्वप्रयुक्त जें कार्य तें करणारे आणि रात्रिकर्माचे ठिकाणीं काश्यपत्वप्रयुक्त कार्य करणारे असा अर्थ होतो. ह्यांचा विवाह सर्व काश्यप, सर्व वसिष्ठ व संकृति यांच्याशीं होत नाहीं.

---

अथस्मृत्यर्थसाराद्युक्ताद्विगोत्राः देवरातानांवैश्वामित्रदेवरातौदलेतित्रयः एतेषांसर्वैर्जामदग्न्यैर्विश्वामित्रैश्चाविवाहः १ धनंजयानांविश्वामित्रमाधुच्छंदसधानंजयेतित्रयः एषांसर्वैर्विश्वामित्रैरत्रिभिश्चाविवाहः अयंविश्वामित्रगणेप्रागुक्तः २ जातूकर्ण्यानांवासिष्ठात्रेयजातूकर्ण्येति एषांवसिष्ठैरत्रिभिश्चाविवाहः अयंवसिष्ठगणेसिंधावुक्तः ३ पूर्वमत्रिगणेषूक्तानां वामरथ्यादीनामत्रिपुत्रिकापुत्राणांचवसिष्ठात्रिभ्यामविवाहः अत्रिविश्वामित्राभ्यामितिकेचित् ४ पूर्वंभरद्वाजगणस्थऋक्षांतरगणत्वेनोक्तानांकपिलानामांगिरसबार्हस्पत्यभारद्वाजवांदनमातवचसेतिपंचप्रवराणांविश्वामित्रभरद्वाजाभ्यामविवाहः ५ पूर्वंविश्वामित्रेषूक्तानां कतानांवैश्वामित्रकात्याक्षीलेतित्रिप्रवराणांविश्वामित्रभरद्वाजाभ्यामविवाहः ६ अनेनैवन्यायेनपरगोत्रोत्पन्नदत्तकादीनामिदानींतनानामपिद्विगोत्रत्वात् जनकप्रतिग्रहीतृपित्रोर्द्वयोरपि सगोत्रैःसहअविवाहोज्ञेयः नात्रपुरुषसंख्या तेनशतपुरुषोत्तरमपिद्विगोत्रत्वंनापैति क्षत्रियवैश्यौतुपुरोहितगोत्रप्रवरावितिसर्वसिद्धांतः ॥

आतां यानंतर स्मृत्यर्थसार इत्यादिक ग्रंथांत सांगितलेले द्विगोत्र सांगतों.–१ देवरात–यांचे प्रवर–वैश्वामित्र, देवरात, औदल असे तीन आहेत. ह्या देवरातांचा विवाह सर्व जामदग्न्य व विश्वामित्र यांशीं होत नाहीं. २ धनंजय. यांचे प्रवर–विश्वामित्र, माधुच्छंदस, धानंजय असे तीन आहेत. ह्या धनंजयांचा विवाह सर्व विश्वामित्र व अत्रि यांशीं होत नाहीं. हा गण विश्वामित्रगणांमध्यें पूर्वीं सांगितला आहे. ३ जातूकर्ण्य. यांचे प्रवर–वासिष्ठ, आत्रेय, जातूकर्ण्य याप्रमाणें तीन प्रवर आहेत. ह्या जातूकर्ण्यांचा विवाह

वसिष्ठ व अत्रि यांशीं होत नाहीं. हा गण वसिष्ठ गणामध्यें निर्णयसिंधूंत सांगितला आहे. ४ पूर्वी अत्रीच्या गणांत सांगितलेले असे अत्रीच्या कन्येचे पुत्र जे वामरथ्यादिक यांचा विवाह वसिष्ठ व अत्रि यांच्याशीं होत नाहीं. अत्रि व विश्वामित्र यांच्याशीं होत नाहीं असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. ५ पूर्वी भरद्वाजगणांतला जो ऋक्ष ह्मणून अंतर्गत गण सांगितला त्यामध्यें सांगितलेले आंगिरस, बार्हस्पत्य, भारद्वाज, वांदन, मातवचस ह्या पंच प्रवरांनीं युक्त कपिल त्यांचा विवाह विश्वामित्र व भरद्वाज यांच्याशीं होत नाहीं. ६ पूर्वी विश्वामित्र गणामध्यें सांगितलेले; वैश्वामित्र, कात्य, आक्षील या तीन प्रवरांनीं युक्त असे जे कत त्यांचा विवाह विश्वामित्र व भरद्वाज यांच्याशीं होत नाहीं. याच न्यायेंकरून परगोत्रांत उत्पन्न झालेले असे विद्यमानकालींचे दत्तकादिक त्यांलाहि दोन गोत्रें आहेत याकरितां जनकपिता व दत्तक घेणारा पिता यांचे जे एकगोत्री त्यांच्याशीं त्या दत्तकादिकांचा विवाह होत नाहीं असें जाणावें. याविषयीं अमुक पुरुषपर्यंत विवाह होणार नाहीं असी ज्यापेक्षां पुरुषसंख्या कोठें सांगितली नाहीं, यावरून शंभर पुरुषांनंतरहि दत्तकाचें द्विगोत्रत्व दूर होत नाहीं. क्षत्रिय व वैश्य हे पुरोहितगोत्रप्रवरी आहेत, असा सर्व सिद्धांत जाणावा.

---

**अथस्वगोत्राज्ञानेऽपनयनेयआचार्यस्तद्गोत्रप्रवरैरेवकर्माणिविवाहाविवाहौचेति आचार्यगोत्राज्ञानेतु दत्वात्मानंतुकस्मैचित्तद्गोत्रप्रवरोभवेत् ॥**

## आतां आपलें गोत्र माहीत नसेल तर त्याचा निर्णय सांगतों.

आपलें गोत्र माहीत नसेल तर मौंजीमध्यें जो आचार्य असेल त्याचें गोत्र व प्रवर ग्रहण करून त्यांवरूनच सर्व कर्में करावीं, व विवाह होतो, न होतो हें सर्व आचार्याचेच गोत्रप्रवरांवरून पाहावें. आचार्याचें गोत्र माहीत नसेल तर, “ कोणाएकाला आपलें आपण दान करून दान घेणाराचा गोत्रप्रवरी व्हावें. ”

**अथमातृगोत्रवर्जननिर्णयः तत्रमातृगोत्रपदेनमातामहगोत्रमेववर्ज्यं तच्चगांधर्वादिविवाहोढापुत्राणांसर्वेषांवर्ज्यं ब्राह्मविवाहोढापुत्राणांतुसर्वेषांमातामहगोत्रंनवर्ज्यं किंतुमाध्यंदिनानामेव मातृगोत्रंमाध्यंदिनीयानामितिसत्याषाढवचनात् तथैवसर्वत्रशिष्टाचाराच्च ॥**

## आतां विवाहाविषयीं मातेचें गोत्र वर्ज्य करावें त्याचा निर्णय सांगतों.

विवाहाविषयीं मातृगोत्र वर्ज्य करावें ह्मणून जें सांगितलें त्यावरून मातामहगोत्रच वर्ज्य करावें. मातामहगोत्र वर्ज्य करणें तें गांधर्व इत्यादिक विवाह करून ज्या वरलेल्या स्त्रिया त्यांच्या सर्व पुत्रांस तें वर्ज्य आहे. ब्राह्मविवाह करून वरलेल्या ज्या स्त्रिया त्यांच्या सर्व पुत्रांस मातामहगोत्र वर्ज्य नाहीं; तर माध्यंदिनशाखी जे त्यांलाच मातामहगोत्र वर्ज्य आहे. कारण, “ मातृगोत्र ( मातामहगोत्र ) वर्ज्य करणें तें माध्यंदिनीयशाखी जे त्यांनीं वर्ज्य करावें,” असें सत्याषाढाचें वचन आहे, व तसाच सर्व शिष्टांचा आचारहि आहे.

---

**अथसगोत्रादिविवाहादौप्रायश्चित्तं तत्राज्ञानतःसगोत्रसप्रवरविवाहेकन्यांत्यक्त्वाचांद्रायणंप्रायश्चित्तंकार्यं ज्ञानतोद्विगुणं एवंकन्यायाएतदर्धं एवंसपिंडायाविवाहेपि त्यागश्चब्राह्म**

ण्याःसंभोगधर्मकार्ययोरेव मातृवत्परिपालयेदित्यन्नादिनापालनोक्तेः यस्तुसगोत्रादिकांविवाह्योपगच्छतितस्याज्ञानेविवाहप्रयुक्तचांद्रायणंसगोत्रागमनप्रयुक्तंचांद्रायणद्वयाधिकं ज्ञानतस्तुअधिकंकल्प्यमितिकेचित् अन्येतुगुरुतल्पव्रताच्छुध्येदितिगुरुतल्पसाम्योक्तेःषडब्दंप्रायश्चित्तं अज्ञानतस्त्र्यब्दंचांद्रायणत्रयंवेत्याहुः अज्ञानतः सगोत्रादिषूत्पन्नानांजनकप्रायश्चित्तोत्तरंकाश्यपगोत्रेणव्यवहारःकार्योनतुत्यागः ज्ञानतस्तुसगोत्राद्युत्पन्नानांचांडालत्वमेव आरूढपतितापत्यंब्राह्मण्यांयश्चशूद्रजः सगोत्रोढासुतश्चैवचांडालास्त्रयईरिताइतियमस्मृतेः ॥

## आतां सगोत्र ( एकगोत्र ) इत्यादिकांशीं विवाह झाला असतां प्रायश्चित्त सांगतों.

सगोत्री व समानप्रवर अशा कुळांतल्या कन्येशीं न जाणून विवाह झाला असतां ती कन्या टाकून चांद्रायण प्रायश्चित्त करावें. जाणून बिवाह होईल तर पूर्वीपेक्षां द्विगुणित प्रायश्चित्त करावें. याप्रमाणें कन्येनें याच्या अर्धे प्रायश्चित्त करावें. याप्रमाणें सपिंडांतील कन्येशीं विवाह झाला असतांहि हाच निर्णय जाणावा. ब्राह्मणी स्त्रियेचा त्याग करणें तो संभोग व धर्मकार्य यांविषयीं मात्र करावा; पालनाविषयीं त्याग करूं नये. कारण, " मातेप्रमाणें त्या स्त्रियेचें पालन करावें, " असें वचन असल्यामुळें तिला अन्नवस्त्र इत्यादिक देऊन तिचें रक्षण केलें पाहिजे. जो पुरुष सगोत्र अशा कुळांतील कन्येशीं अज्ञानेंकरून विवाह करून तिशीं गमन करितो त्यानें सगोत्रकन्येशीं विवाह झाला याकरितां तत्प्रयुक्त चांद्रायण प्रायश्चित्त करून सगोत्रकन्येशीं गमन केलें यास्तव दोन चांद्रायणांपेक्षां अधिक प्रायश्चित्त करावें. जाणून सगोत्र कन्येशीं विवाह होऊन गमन झाल्यास पूर्वीपेक्षां अधिक प्रायश्चित्त करावें असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, " गुरुपत्नीशीं गमन करणारा याला जें प्रायश्चित्त त्यानें तो शुद्ध होतो, " असें वचन आहे यास्तव गुरुपत्नीसारखी सगोत्रा कन्या असें वचन असल्यामुळें षडब्द प्रायश्चित्त करावें; अज्ञानेंकरून होईल तर त्र्यब्द किंवा तीन चांद्रायणें प्रायश्चित्त करावें असें ह्मणतात. न जाणून सगोत्र इत्यादि कन्यांशीं विवाह होऊन त्यांचे ठिकाणीं जे पुत्र उत्पन्न झाले असतील त्यांचा सर्व व्यवहार, पित्यानें प्रायश्चित्त केल्यानंतर काश्यपगोत्रेंकरून करावा, परंतु त्यांचा त्याग करूं नये. जाणून सगोत्रा इत्यादिकांचे ठायीं जे उत्पन्न त्यांस चांडालत्वच प्राप्त होतें; कारण, " आरूढपतिताचें अपत्य, शूद्रापासून ब्राह्मणी स्त्रीचेठायीं झालेला पुत्र, सगोत्र कन्येशीं विवाह करून तिचेठायीं झालेला पुत्र हे तीन चांडाल कथन केले, " असी यमस्मृति आहे.

---

अथान्येपिविवाहेनिषेधाः प्रत्युद्वाहोनैवकार्योनैकस्मैदुहितृद्वयं नचैकजन्ययोःपुंसोरेकजन्येतुकन्यके अत्रापवादः सोदरयोःसोदरकन्यकेवत्सरादिकालव्यवधानेमहानद्यादिव्यवधानेवादेये पूर्वकन्यायादत्तायाःमृतौतस्यैववरस्यद्वितीयाकन्यादेया प्रत्युद्वाहोदारिद्र्यादिसंकटेकार्यः सोदराणांतुल्यसंस्कारोवर्षमध्येनिषिद्धः गृहनिर्माणविवाहौवर्षांतर्नकार्यौ गृहप्रवे

शस्यनिषेधाभावाद्गृहप्रवेशोत्तरंविवाहःकार्यः सोदरयोःपुत्रयोःकन्यापुत्रयोर्वाकन्ययोर्वावि वाहौषण्मासाभ्यंतरेविशेषतोनिषिद्धौ पुरुषत्रयात्मककुलेविवाहान्मौंजीबंधःषण्मासेनिषिद्धः षण्मासेशुभकार्यत्रयंनकार्यं अत्रशुभकार्यपदेनमौंजीविवाहावेव तेनगर्भाधाननामकर्मादि संस्काराणांनत्रित्वनिषेधः नवागर्भाधानादिनाचतुष्ट्वादिसंपादनं नाग्निकार्यत्रयंभवेदित्य नेनैकवाक्यतालाघवादितिभाति भिन्नोदराणामग्निकार्यत्रयंनदोषायेतिकश्चित् केचिन्नकुर्या न्मंगलत्रयमित्यस्यभिन्नार्थत्वंस्वीकृत्ययत्किंचिच्छुभकार्याणामपित्रित्वंनशुभमित्याहुः पुरुषोद्वा हात्रूयुद्वाहःषण्मासाभ्यंतरेनिषिद्धः ज्येष्ठमंगलाल्लघुमंगलंनकार्यं बहिर्मंडपेविहितंज्येष्ठमं गलं तद्भिन्नंलघु गर्भाधानादिकस्यप्राप्तकालस्यननिषेधःएवंशांत्यादेरपिनैमित्तिकस्यप्राप्तकाल स्यननिषेधः अतिपन्नस्यत्वयंनिषेधः एवंव्रतोद्यापनादीनांवास्तुप्रवेशादीनांचलघुत्वादेवविवाहा द्युत्तरंनिषेधः इदंनिषेधचतुष्टयंत्रिपुरुषात्मककुलेषण्मासाभ्यंतरएव एवंमुंडनद्वयनिषेधंव्रत बंधाद्यौलनिषेधंचकेचिदाहुः ॥

## आतां यानंतर दुसरेहि विवाहाविषयीं निषेध सांगतों.

"आपली कन्या ज्याचे पुत्रास दिली त्याची कन्या आपल्या पुत्रास करणें याला प्रत्युद्वाह असें ह्मणतात, तर तसा विवाह निश्चयें करूं नये. एक वराला दोन सोदर बहिणी देऊं नयेत. सोदर भ्रात्यांला सोदर बहिणी देऊं नयेत," याविषयीं अपवाद—सोदर भ्रात्यांला सोदर बहिणी देणें असतील तर विवाहामध्यें एक वर्ष इत्यादिक काळ मध्यें टाकून नंतर द्याव्या, म्हणजे एका कन्येचा विवाह झाल्यानंतर दुसरी कन्या त्या वराच्या सोदरभ्रात्याला देणें असेल तर एका वर्षानंतर द्यावी. अथवा महानदीचें अंतर असतां द्यावी. पूर्वी दिलेली कन्या मृत झाली असतां त्याच वराला दुसरी कन्या द्यावी. प्रत्युद्वाह करणें तो दारिद्र्य इत्यादिक संकट असेल तर करावा. सोदर पुत्र किंवा कन्या यांचे तुल्य संस्कार (मुंज, मुंज, किंवा विवाह, विवाह,) एका वर्षामध्यें करूं नयेत. गृह बांधणें, विवाह करणें हीं दोन एका वर्षामध्यें करूं नयेत. गृहप्रवेश करण्याविषयीं निषेध नाहीं याकरितां गृहप्रवेश केल्यानंतर विवाह करावा. दोन सोदर पुत्र, अथवा एक सोदर कन्या व पुत्र, किंवा दोन सोदर कन्या यांचा विवाह सहा मासांच्या आंत विशेषेंकरून निषिद्ध आहे, ह्मणजे एका सोदर पुत्राचा किंवा कन्येचा विवाह केल्यानंतर सहा महिन्यांच्या आंत दुसऱ्या सोदर पुत्राचा किंवा कन्येचा विवाह करूं नये. त्रिपुरुष कुलामध्यें विवाह झाल्यापासून सहा महिनेपर्यंत मौंजी करूं नये. सहा महिन्यामध्यें तीन शुभ कार्यें करूं नयेत. ह्या स्थलीं '**शुभ कार्यें**' ह्या वाक्यानें मौंजी, व विवाह यांचाच निषेध केला, यावरून गर्भाधान, नामकरण इत्यादिक संस्कार तीन करण्याचा निषेध नाहीं. अथवा गर्भाधान, इत्यादिकेंकरून चार कार्यांची पूर्ति करूं नये. "तीन अग्निकार्यें होत नाहींत," असें जें वचन तेणेंकरून एकवाक्यतालाघव होतें; यास्तव तसें नाहीं असें वाटतें. भिन्नोदर जे त्यांचीं तीन अग्निकार्यें झालीं असतां दोष नाहीं असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. कोणी ग्रंथकार, "तीन मंगलकार्यें करूं नयेत," ह्या वाक्याचा निराळा अर्थ स्वीकारून कोणतींहि तीन शुभ कार्यें करूं नयेत असें ह्मणतात.

१ पुत्राचा विवाह केल्यानंतर कन्येचा विवाह साहा मासांमध्यें करूं नये. २ ज्येष्ठमंगल केल्यानंतर लघु मंगल करूं नये. बाहेर मंडपामध्यें जें करण्यास सांगितलें तें ज्येष्ठ मंगल. त्याहून जें निराळें तें लघुमंगल होय. प्राप्त आहे काल ज्यांचा असे जे गर्भाधानादिक संस्कार त्यांचा निषेध नाहीं. निमित्तानें प्राप्त आहे काल ज्यांचा असीं जीं शांति इत्यादिक नैमित्तिक कर्मे त्याचाहि निषेध नाहीं. ३ ज्याचा काळ टळून गेला असेल त्याला मात्र हा निषेध जाणावा. ४ याप्रमाणें व्रतांचीं उद्यापनें इत्यादिक, व गृहप्रवेश इत्यादिक हीं कार्यें लघु असल्या कारणानेंच विवाह इत्यादिक केल्यानंतर यांचा निषेध, ह्मणजे हीं करूं नयेत. हे जे चार निषेध सांगितले ते त्रिपुरुष कुळामध्यें सहा महिन्यांच्या आंतच जाणावे. याप्रमाणें दोन मुंडन कर्मे यांचा निषेध व मौंजी झाल्यानंतर चौलसंस्काराचा निषेध हे दोन निषेध कोणी ग्रंथकार सांगतात.

---

**अथैषामपवादाः सोदराणामपिसमानसंस्कारौविवाहौचसंकटेअब्दभेदात्कार्यौ चतुर्दिनव्यवधानादेकदिनव्यवधानाद्वाकार्यौ अतिसंकटेएकदिनेकर्तृभेदेनमंडपभेदेनवाकार्यौ द्वाभ्यांकर्तृभ्यांएकस्मिन्नपिलग्नेएकस्मिन्नपिगृहेभिन्नोदरयोर्विवाहःकार्यः एवंपूर्वोक्तनिषेधचतुष्टयेपिवर्षभेदेदोषाभावः यमलयोरेककालेएकमंडपेवासमानसंस्काराणांनदोषःएवंमातृभेदेपिषण्मासाभ्यंतरेसमानसंस्कारेदोषोन मातृभेदेएकजातकन्ययोरेकदिनेएकमंडपेपिवेदीभेदेनविवाहोनदोषायेतिकेचित् पुरुषत्रयात्मककुलेमंगलकार्योत्तरंषण्मासाभ्यंतरे मुंडनयुक्तंकर्मनकार्यं अत्रसर्वत्रपुरुषत्रयगणनाप्रकारः प्रतिकूलविचारेस्पष्टीकरिष्यते मुंडनकर्मतु चौलंनांगसंस्कारादिकमाधानादिकमभ्युदयार्थमैच्छिकसर्वप्रायश्चित्तादिकंक्षौरप्रापकतीर्थयात्रादिकंचोह्यं** व्रतबंधस्तुकात्यायनमतेमंगलरूपत्वाद्विवाहाद्युत्तरंकार्यः अन्येषांमतेमुंडनरूपत्वान्नकार्यः पित्रोरंत्यक्रियादिप्राप्तमुंडनमाकस्मिकप्राप्तप्रायश्चित्तमुंडनमासन्नमरणेनसर्व **प्रायश्चित्तीयमुंडनंचकर्तव्यमेव नित्यत्वाद्दर्शपूर्णमासचातुर्मास्यादिमुंडनेपिनदोषः नचमुं**डनंचौलमित्युक्तंव्रतोद्वाहौतुमंगलमितिवचसामंडनमुंडनयोः परिगणनादाधानादीनांनदोष इतिवाच्यं वाक्यस्योदाहरणार्थत्वात् अन्यथाव्रतोद्वाहान्नचौलकमित्येववक्तव्येमंडनान्नतु मुंडनमितिसामान्येनवचनरचनानर्थक्यापातात् तस्माद्गर्भाधानादिलघुमंगलादुद्वाहादिज्ये**ष्ठमंगलाच्चाधानादिमुंडनमपिवर्ज्यमितिभाति एवंसतिकुलेबहुकर्मोपरोधःस्यादितिचेत् विवाहव्रतचूडोत्तरमंगलेषुपिंडदानादौ मासाद्यल्पकालप्रतिबंधवत्पित्राद्यन्यमरणेल्पकालप्रतिकूल** निर्णयवच्चलघुमंगलोत्तरंमासाद्यल्पकालमुंडननिषेधकल्पनंयुक्तिबलादाश्रयणीयमिति **भाति** अत्रविषयेप्राचीननिबंधेषुविशेषोनदृश्यतेतथापिधाष्ट्र्येनमयोक्तोविशेषोयुक्तश्चेद्ग्राह्यः **इति मंडनमुंडननिर्णयः ॥**

## आतां ह्या निषेधांचे अपवाद सांगतों.

सोदर भ्राते जरी असतील तथापि त्यांचेहि तुल्य संस्कार व विवाह, संकट असतां वर्षभेदानें करावे. अथवा चार दिवसांच्या अंतरानें किंवा एक दिवसाच्या अंतरानें करावे. अति संकट असेल तर एक दिवसीं कर्त्याच्या भेदानें किंवा मंडपाच्या भेदानें करावे. दोन कर्ते असतील तर एका लग्नावर, एका घरीं भिन्नोदरांचा विवाह करावा. याप्रमाणें

पूर्वी सांगितले जे चार निषेध त्यांविषयींहि वर्षभेद असेल तर दोष नाहीं. जुळ्यांचे, एकसमयीं किंवा एका मंडपांत समान संस्कार (मुंज, मुंज किंवा विवाह, विवाह) केले असतां दोष नाहीं. याप्रमाणें माता निराळ्या असतील तर सहा मासांमध्यें समान संस्कार केला असतां दोष नाहीं. पिता एक असून दोघी कन्यांच्या माता निराळ्या असतील तर त्या कन्यांचा विवाह एक दिवसीं, एका मंडपांत, वेदी मात्र निराळी करून केला असतां तो दोषाकारणें होत नाहीं असें कोणी ह्मणतात. त्रिपुरुष कुळांमध्यें मंगलकार्य केल्यानंतर साहा महिन्यांमध्यें मुंडनयुक्त कर्म करूं नये. याविषयीं सर्व ठिकाणीं त्रिपुरुषांची संख्या मोजण्याचा प्रकार कसा तो सर्व प्रतिकूलाच्या विचारप्रसंगीं स्पष्ट होईल. मुंडनकर्म कोणतें तें सांगतों,—चौल, सर्पसंस्कार (नागबलि) इत्यादिक, आधानादिक, उत्कर्ष होण्यासाठीं इच्छाप्राप्त असें सर्वप्रायश्चित्त इत्यादिक, क्षौराला कारण तीर्थयात्रा इत्यादिक हीं सर्व मुंडनकर्में होत. कात्यायनाच्या मतीं व्रतबंध तर मंगलरूप आहे, याकरितां विवाह इत्यादिक केल्यानंतर व्रतबंध करावा. इतर जे सर्व त्यांचे मतीं व्रतबंध मुंडनरूप आहे याकरितां तो करूं नये. माता, पिता यांची अंत्यक्रिया इत्यादिकानें प्राप्त झालेलें मुंडन, अकस्मात् प्राप्त झालेलें असें प्रायश्चित्तसंबंधी मुंडन, मरणसमय समीप आल्यामुळें कर्तव्य जें सर्वप्रायश्चित्त तत्संबंधी मुंडन हीं निश्चयें करावीं. दर्श, पूर्णमास, आणि चातुर्मास्यें इत्यादिसंबंधी मुंडन केलें असतां दोष नाहीं; कारण तें दर्शपूर्णमासादिसंबंधी मुंडन नित्य आहे. "चौलसंस्कार हें मुंडन होय, मौंजी व विवाह हें मंगल होय," असें जें वचन तेणेंकरून मंडन, आणि मुंडन हीं निराळीं दाखविलीं याकरितां आधान इत्यादिक केलीं असतां दोष नाहीं असें ह्मणूं नये; कारण वचन जें सांगितलें तें केवळ उदाहरण दाखविण्याकरितां आहे; असें न मानावें तर 'मौंजी, विवाह झाल्यानंतर चौल करूं नये' असें सांगावयाचें होतें, तसें न सांगतां 'मंडनानंतर मुंडन करूं नये' असें जें सामान्येंकरून वचन सांगितलें त्याला वैयर्थ्यापत्ति (व्यर्थ सांगितलें असा दोष) येईल. याकरितां गर्भाधानादिक लघुमंगल व विवाहादिक ज्येष्ठमंगल हीं मंगलकार्यें झालीं असतां आधानादिक मुंडनहि वर्ज्य करावें असें वाटतें. असें झालें असतां बहुत कर्में करण्याचीं बंद राहतात असें असेल तर विवाह, मौंजी, चौल यांच्या नंतर मंगलकार्यें झालीं असतां जसा पिंडदान इत्यादिकाविषयीं एक महिना इत्यादिक अल्पकाळाचा प्रतिबंध, व पिता, माता यांहून दुसरा कोणी मृत झाला असतां अल्प कालपर्यंत प्रतिकूल होतें ह्मणून जसा निर्णय सांगितला त्याप्रमाणें लघुमंगल झाल्यानंतर एकमास इत्यादिक अल्पकालपर्यंत मुंडनाच्या निषेधाची कल्पना करावी असें युक्तिबलानें ग्रहण करावें याप्रमाणें मला वाटतें. याविषयीं प्राचीन ग्रंथांमध्यें विशेष निर्णय कोठें आढळत नाहीं, तथापि मी केवळ हा विशेष, धारिष्टानें सांगितला आहे, योग्य वाटल्यास ग्रहण करावा. याप्रमाणें मंडनमुंडनांचा निर्णय सांगितला.

---

अथप्रतिकूलविचारः विवाहनिश्चयोत्तरंवरस्यकन्यायावासगोत्रत्रिपुरुषात्मककुलेकस्यचिन्मरणेप्रतिकूलदोषः विवाहनिश्चयश्चवैदिकोलौकिकोवाग्राह्यः तत्रवैदिकोवाग्दानाख्यविधिनाकृतोमुख्यः लौकिकोलग्नतिथिनिश्चयादिर्वरवध्वोःशुल्कभाषाबंधपूगीफलदानादिश्च

सगोत्रत्रिपुरुषेत्युक्त्यामातामहकुलादिव्यावृत्तिः तथाचवरस्तत्पूर्वपत्नीवरमातापितरौवरपितामहपितामह्यावनूढापितृष्वसाचेतिपूर्वत्रिपुरुषी वरस्तस्यभ्रातापत्नीपुत्रानूढकन्यासहितो वरस्यानूढाभगिनिवरस्यस्नुषापुत्रौअनूढाकन्याचपौत्रस्तद्भार्याचानूढापौत्रीचेतिपरत्रिपुरुषी पितृव्यतत्पत्न्यौपितृव्यपुत्रस्तत्पत्न्यावनूढापितृव्यकन्याचेतिसंतानभेदेत्रिपुरुषीचेति सगोत्रत्रिपुरुषीपुरुषपरिगणना एतेषामन्यतममरणेप्रतिकूलमितिपर्यवसितोर्थः अत्रभ्रातापुत्रपौत्रादिश्चानुपनीतोपित्रिवर्षाधिकवयाःग्राह्यः एवमनूढभगिन्यादेरपित्रिवर्षाधिकत्वंयुक्तंभाति एवंवधूकुलेप्यूह्यं एवमेवमंडनमुंडनादावपित्रिपुरुषगणनोह्या ॥

## आतां प्रतिकूलाचा निर्णय सांगतों.

विवाहाचा निश्चय झाल्यानंतर वराच्या किंवा कन्येच्या सगोत्र त्रिपुरुषरूप कुलामध्यें कोणी मृत झालें असतां प्रतिकूलदोष होतो. विवाहाचा निश्चय घेणें तो वैदिक किंवा लौकिक या दोहोंतून एक ग्रहण करावा. त्यामध्यें वाग्दाननामक विधीकरून जो निश्चय झाला तो वैदिक निश्चय, व तो मुख्य होय. लग्न, तिथि यांचा निश्चय इत्यादिक; वर आणि कन्या यांला जें अलंकारादिक देणें त्याचा परस्पर भाषाबंध; सुपारी देणें इत्यादिक जो तो लौकिक निश्चय होय. ‘सगोत्र त्रिपुरुष’ असें जें ह्मटलें यावरून मातामहकुलादिकाची व्यावृत्ति झाली. आतां त्रिपुरुषी कोणत्या तें सांगतों.—वर, त्याची पूर्वीची स्त्री, वराची माता व पिता, वराचा पितामह व पितामही, विवाह न झालेली असी पित्याची बहीण ही पूर्व त्रिपूरुषी होय. वर, त्याचा भ्राता, भ्रातृपत्नी, भ्रातृपुत्र, विवाह न झालेली भ्रात्याची कन्या, विवाह न झालेली वराची बहीण, वराची सून व पुत्र; विवाह न झालेली वराची कन्या, नातू, नातवाची स्त्री, विवाह न झालेली नात, याप्रमाणें ही परत्रिपुरुषी होय. वराचा चुलता, चुलती, चुलत्याचा पुत्र, चुलत्याच्या पुत्राची स्त्री, विवाह न झालेली चुलत्याची कन्या व संतानभेद असेल तर ती त्रिपुरुषी, याप्रमाणें सगोत्र त्रिपुरुषीचे पुरुषांची संख्या जाणावी. हे जे पूर्वी सांगितलेले यांतून कोणताहि मृत झाला असतां प्रतिकूलदोष होतो असा शेवटचा अर्थ समजावा. या प्रतिकूलाविषयीं भ्राता, पुत्र, नातू इत्यादिक यांची मौंजी झाली नसेल तथापि तीन वर्षांहून अधिक वयाचा असेल तो घ्यावा. याप्रमाणें विवाह न झालेली कन्या तीहि तीन वर्षांहून अधिक वयाची घ्यावी असें योग्य वाटतें. याप्रमाणें कन्येच्या कुळामध्येंहि हाच निर्णय जाणावा. याप्रमाणेंच मंडन, मुंडन इत्यादिकांविषयींहि तीन पुरुषांची संख्या योजावी.

---

अत्रविशेषः पितामातापितामहः पितामहीपितृव्यःपूर्वपत्नीपूर्वस्त्रियाः पुत्रोभ्रातानूढाभगिनीचैतेषांमरणेविशेषतः प्रतिकूलदोषान्नैवकर्तव्योविवाहः एतदन्यत्रिपुरुषसपिंडमरणे शांत्यादिनादोषंपरिहृत्यविवाहःकार्यः संकटेतुपित्रादिमरणेपिकालप्रतीक्षाशांतिभ्यांदोषंनिर्हृत्यविवाहःकार्यः तत्रव्यवस्था निश्चयोत्तरंमातापित्रोर्द्वयोरपिमरणेकालप्रतीक्षाशांतिभ्यामपिदोषशांत्यभावान्नकार्योविवाहः मातापित्रोरेकैकमरणेतुशांत्यादिनाविवाहः तत्रपितुर

ब्दमिहाशौचंतदर्धंमातुरेवच मासत्रयंतुभार्यायास्तदर्धंभ्रातृपुत्रयोः अन्येषांतुसपिंडानामा शौचंमाससंमितं तदंतेशांतिकंकृत्वाततोलग्नंविधीयते प्रतिकूलेनकर्तव्यंलग्नंयावदृतुत्रयं प्रतिकूलेसपिंडस्यमासमेकंविवर्जयेदित्यादिवाक्याश्रयेणव्यवस्थोच्यते अत्राशौचपदेनप्रतिकूलकृतंविवाहानधिकारमात्रंकालप्रतीक्षार्थमुच्यते अतःपितृमरणेवर्षोत्तरंविनायकशांतिंकृत्वा संकटेविवाहःकार्यः अतिसंकटेषण्मासोत्तरंविनायकशांतिंश्रीपूजनादिशांतिंचकृत्वाविवाहः ततोप्यतिसंकटेमासोत्तरंशांतिद्वयांतेविवाहइतिसंकटतारतम्येनपक्षत्रयं मातुर्मरणेषण्मासांतेविनायकशांत्याविवाहः अतिसंकटेमासांतेशांतिद्वयंकृत्वोद्वाहः यत्तुप्रमीतौपितरौयस्यदेहस्तस्याशुचिर्भवेत् नदैवंनापिवापित्र्यंयावत्पूर्णोनवत्सरइतिपित्रोर्मृतौवर्षपर्यंतंसर्वशुभकर्मनिषेधवचनंतत्प्राङ्निश्चयात्पित्रोर्मृतौसंकटाभावेवाज्ञेयं भार्यामरणेमासत्रयांतेमासांतेवाश्रीपूजनादिशांतिः भ्रातृमरणेसार्धमासांतेमासांतेवाविनायकशांतिः पुत्रमृतौसार्धमासंमासंवाप्रतीक्ष्यश्रीपूजनादिशांतिः पितृव्यमरणेमासांतेविनायकशांतिः पितामह्याअनूढभगिन्याश्चमरणेमासांतेश्रीपूजनादिशांतिः एतदन्यत्रिपुरुषसपिंडमरणेमासांतेश्रीपूजनादिशांतिः ततो विवाहः गुणवत्तरमातुर्मृतौषण्मासेनमनःखेदानपगमेवर्षप्रतीक्षा एवंगुणवत्तरभार्यायाःषण्मासपर्यंतंप्रतीक्षा ज्योतिःप्रकाशेतु अतिसंकटवशेनमात्रादिमरणेमासाधिकप्रतीक्षायाअसंभवेमासमध्येपिदशाहोत्तरंकंचित्कालंप्रतीक्ष्योक्तव्यवस्थयाविनायकशांतिंश्रीपूजनादिशांतिंचकृत्वागांदत्वापुनर्वाग्दानादिचरेदित्युक्तं सर्वोप्ययमपवादःसंकटेषुतारतम्येनबुधैर्योज्यः अल्पसंकटविषयेमहासंकटविषयकविधिकथनेवक्तुःकर्तुश्चदोषएव दुर्भिक्षराष्ट्रभंगादिभयेपित्रोर्मरणाशंकायांचनप्रतिकूलं दीर्घरोगिदूरदेशस्थविरक्तानांकन्यायाःप्रौढत्वेचप्रतिकूलदोषोनेत्यपवादः ॥

**ह्या प्रतिकूलाविषयीं विशेष सांगतों**— पिता, माता, पितामह, पितामही, चुलता, पूर्वीची स्त्री, पूर्वीच्या स्त्रियेचा पुत्र, भ्राता, विवाह न झालेली बहीण यांतून कोणी मृत झाला असतां विशेषेंकरून प्रतिकूल होतें याकरितां विवाह करूंच नये. हे जे पिता इत्यादिक सांगितले यांहून दुसरा कोणी त्रिपुरुषसपिंडांतील मृत होईल तर शांति इत्यादिकानें दोष दूर करून विवाह करावा. संकट असेल तर पिता इत्यादिक मृत होईल तथापि कालप्रतीक्षा, शांति यांहींकरून दोष दूर करून विवाह करावा. **त्याविषयीं व्यवस्था सांगतों**— विवाहाचा निश्चय झाल्यानंतर माता व पिता या दोघांलाहि मरण प्राप्त झालें असतां कालाची प्रतीक्षा व शांति केली असतांहि दोष निरसन होत नाहीं याकरितां विवाह करूं नये. माता व पिता यांतून एकेक मृत झालें असेल तर शांति इत्यादिक करून विवाह करावा.— त्यामध्यें, " विवाहाविषयीं एक वर्षपर्यंत पित्याचें आशौच, मातेचें सहा महिने आशौच, स्त्रियेचें तीन महिने आशौच, भ्राता व पुत्र यांचें दीड महिना आशौच, इतर सपिंडांचें एक मास आशौच, त्या आशौचाची निवृत्ति झाल्यानंतर शांति करून नंतर विवाह करावा. प्रतिकूलदोष असेल तर सहा महिनेपर्यंत विवाह करूं नये. सपिंड मृत होऊन प्रतिकूल असेल तर एक मास वर्ज्य करावा," इत्यादिक वचनांच्या आश्रयानें याची व्यवस्था सांगतों,—

ह्या वाक्यांत 'आशौच' असा जो शब्द आहे तेणेंकरून प्रतिकूलानें झालेला विवाहाचा अनधिकार मात्र कालप्रतीक्षा करण्याकरितां सांगितला, याकरितां पिता मृत झाला असतां एक वर्षानंतर विनायकशांति करून संकट असतां विवाह करावा. अति संकट असेल तर सहा महिन्यांनंतर विनायकशांति, व श्रीपूजनादिक शांति हीं करून विवाह करावा. त्याहून अति संकट असेल तर एक मासानंतर दोन शांति ( विनायकशांति व श्रीपूजनादिक शांति ) करून विवाह करावा, याप्रमाणें संकटाच्या तारतम्येंकरून तीन पक्ष सांगितले. माता मृत झाली असेल तर सहा महिन्यांनंतर विनायकशांति करून विवाह करावा. अति संकट असेल तर एक मासानंतर दोन शांति करून विवाह करावा. "ज्याचा पिता व माता मृत झालीं असतील त्याचा देह एक वर्षपर्यंत अशुचि होय, याकरितां वर्ष पुरें होईतावत्पर्यंत दैवकर्म व पित्र्य कर्म यांविषयीं अधिकार नाहीं," याप्रमाणें पिता, माता मृत झालीं असतां एक वर्षपर्यंत संपूर्ण शुभकर्मांचा निषेध करणारें जें वचन तें निश्चय होण्याच्या पूर्वी पिता माता मृत झालीं असतां विवाह करील किंवा संकट नसतां विवाह करील तर त्याविषयीं जाणावें. स्त्री मृत झाली असतां तीन मासांनंतर किंवा एक मासानंतर श्रीपूजनादिकशांति करावी. भ्राता मृत झाला असतां दीड महिन्यानंतर किंवा एक मासानंतर विनायकशांति करावी. पुत्र मृत झाला असतां दीडमहिना किंवा एक महिना प्रतीक्षा करून नंतर श्रीपूजनादिक शांति करावी. चुलता मृत झाला असतां एक मासानंतर विनायकशांति करावी. पितामही व विवाह न झालेली बहीण ह्यांतून कोणी मृत असतां एक मासानंतर श्रीपूजनादिक शांति करावी. यांहून दुसरें कोणी त्रिपुरुषसपिंडांतील मृत झालें असतां एकमासानंतर श्रीपूजनादिक शांति करावी, व तदनंतर विवाह करावा. अति गुणवती असी माता मृत असेल व सहा महिन्यांनीं मनांतील शोक दूर न होईल तर एक वर्षपर्यंत प्रतीक्षा करावी. याप्रमाणें अति गुणवती स्त्री मृत झाली असतां सहा महिनेपर्यंत प्रतीक्षा करावी. ज्योतिःप्रकाश ग्रंथांत तर, माता इत्यादिक मृत झाली असून अति संकट असेल व एक मासापेक्षां अधिक प्रतीक्षा करण्याचा असंभव असेल तर महिन्यामध्येंहि दहा दिवस गेल्यानंतर कांहीं दिवसपर्यंत प्रतीक्षा करून पूर्वी सांगितल्या व्यवस्थेनें विनायकशांति व श्रीपूजनादिक शांति करून गोप्रदान करून पुनः वाग्दान इत्यादिक करावें असें सांगितलें आहे. सर्व जो हा अपवाद सांगितला तो बहु संकट असतां तारतम्येंकरून पंडितांनीं योजावा. अल्प संकटाविषयीं महासंकटविषयक विधि सांगितला असतां सांगणारा व कर्ता या दोघांलाहि दोष आहे. दुष्काळ, राष्ट्राचा नाश इत्यादिक भय, आईबापांचे मरणाची आशंका यांविषयीं प्रतिकूलदोष नाहीं. कन्या मोठी वाढली असतां फार दिवसांचा रोगी, दूरदेशीं राहणारा, विरक्त यांच्या संबंधी प्रतिकूलदोष नाहीं, याप्रमाणें प्रपिकूलाचा अपवाद जाणावा.

---

**श्रीपूजनादिशांतिश्चश्रियेजातइतिश्रियंइदंविष्णुरितिविष्णुंगौरीर्मिमायेतिगौरींत्र्यंबकमितिरुद्रंपरंमृत्योरितियमंचसंपूज्याष्टोत्तरशततिलाज्यं जुहुयात् भूःस्वाहामृत्युर्नश्यतांक्षुधा**

यैसुखंवर्धतांस्वाहेतिततोहोमंसमाप्याथगोद्वयंदक्षिणाभवेदितिकौस्तुभेद्रष्टव्या इतिप्रतिकूल विचारः ॥

## आतां श्रीपूजनादि शांतीचा विधि सांगतों.

" श्रियेजात० " ह्या मंत्रेंकरून श्रीची पूजा, " इदंविष्णु०" ह्या मंत्रेंकरून विष्णूची पूजा, " गौरीर्मिमाय० " ह्या मंत्रेंकरून गौरीची पूजा, " त्र्यंबकं० " ह्या मंत्रेंकरून रुद्राची पूजा, " परंमृत्यो० " ह्या मंत्रेंकरून यमाची पूजा याप्रमाणें पूजा करून १०८, तिलांचा व घृताचा होम करावा. " भूः स्वाहा मृत्युर्नश्यतां तुषार्थै सुखं वर्धतां स्वाहा, " या मंत्रानें होम करावा. " तदनंतर होमाची समाप्ति करून दोन गोप्रदानें दक्षिणा द्यावी." याप्रमाणें कौस्तुभग्रंथांत शांति पाहावी. याप्रमाणें प्रतिकूलाचा निर्णय सांगितला.

---

प्रेतकर्माण्यनिर्वर्त्यचरेन्नाभ्युदयक्रियां आचतुर्थंततःपुंसिपंचमेशुभदंभवेत् अत्रप्रेतकर्मपदेनसपिंडीकरणात्पूर्वभाविकर्माणिसपिंडीकरणं चसपिंडीकरणोत्तरंपार्वणविधिनोक्तानिमासिकानिचोच्यंते सपिंडीकरणादर्वागपकृष्यकृतान्यपि पुनरप्यपकृष्यंतेवृद्ध्युत्तरनिषेधनादित्यनुमासिकानामप्यपकर्षोक्तेः अभ्युदयपदेननांदीश्राद्धयुक्तंकर्ममात्रंग्राह्यं कैश्चिद्विवाहाद्येवग्राह्यमित्युक्तं आचतुर्थमितिनांदीश्राद्धकर्तारंपुरुषमारभ्यजनकचतुःपुरुषीजन्यचतुःपुरुषीसंतानभेदेचचतुःपुरुषीसगोत्रागृह्यते तथाचनांदीश्राद्धकर्तुः पितृपितामहप्रपितामहाः पत्नीसहिताः कर्तुर्भार्यापुत्रपौत्रप्रपौत्रास्तद्भार्याश्चभ्रातातत्पुत्रपौत्रास्तद्भार्याः पितृव्यतत्पुत्रपौत्रास्तद्भार्याश्चप्रपितामहस्यपुत्रपौत्रप्रपौत्रास्तद्भार्याश्चैतेषां मृतानामनुमासिकांतप्रेतकर्माकरणेमंगलंनकार्यमित्यर्थः नांदीश्राद्धकर्तात्रमुख्यएवग्राह्योनतुमातुलादिर्गौणः मृतपितृकस्योपनयनादौसंस्कार्यमारभ्यैवचतुःपुरुषीगणना मातामहादेर्भिन्नगोत्रत्वेपिनांदीश्राद्धदेवतात्वात्प्रेतकर्माभावेमंगलंनभवति मातामह्यादेःस्वातंत्र्येणदेवतात्वाभावात्दशाहांत्यकर्माभावेपिमंगलप्रतिबंधोनास्ति इत्यंतकर्माभावनिमित्तकमंगलप्रतिबंधनिर्णयः ॥

" प्रेतकर्मे समाप्त केल्याखेरीज आचतुर्थ ह्मणजे चार पुरुष सापिंड्यपर्यंत अभ्युदय क्रिया ह्मणजे मांगलिक कर्म करूं नये. तदनंतर पांचव्या पुरुषापासून शुभदायक होतें. " ह्या वाक्यामध्यें 'प्रेतकर्म' ह्या पदेंकरून सपिंडी करण्याच्या पूर्वी होणारीं कर्मे, सपिंडीकरण आणि सपिंडी केल्यानंतर पार्वणविधीनें सांगितलेलीं मासिकें इतक्यांचें ग्रहण केलें; कारण, " सपिंडी करण्यापूर्वी अपकर्ष ( पुढचें आदि करणें ) करून केलेलीं कर्मे तींहि पुनरपि अपकर्षेंकरून करावीं; कारण, वृद्धिश्राद्ध केल्यानंतर तीं प्रेतकर्मे करण्याचा निषेध आहे, " असें अनुमासिकांचा अपकर्ष करण्याविषयीं वचन आहे. 'अभ्युदय' ह्या पदेंकरून नांदीश्राद्धयुक्त जें कर्म तेंच ग्रहण करावें. कितीएक ग्रंथकारांनीं विवाहादिकच घ्यावें असें सांगितलें आहे. 'आचतुर्थ' ह्या पदेंकरून नांदीश्राद्ध करणाऱ्या पुरुषापासून आरंभ करून पित्यापासून मागचे चार पुरुष, पुढें होणारे चार पुरुष आणि संतानभेद असतां ते चार पु-

---

१ मातामहमातृपितामहप्रपितामहानामित्यर्थः ॥ २ सपत्नीकानामेवनांदीश्राद्धेदेवतात्वात्स्वातंत्र्याभावः ॥

रुष इतक्या सगोत्र पुरुषांचें ग्रहण होतें. ते पुरुष असे—नांदीश्राद्धकर्त्याचे पिता, पितामह, प्रपितामह, सपत्नीक; नांदीश्राद्धकर्त्याचे स्त्री, पुत्र, पुत्राचा पुत्र व त्यांच्या स्त्रिया; तसेच भ्राता, भ्रातृपुत्र, भ्रातृपौत्र व त्यांच्या स्त्रिया; चुलता, त्याचा पुत्र, त्याचा पौत्र, त्यांच्या स्त्रिया; प्रपितामहाचे पुत्र, पौत्र, प्रपौत्र, व त्यांच्या स्त्रिया हे मृत झाले असतां यांचें अनुमासिकपर्यंत प्रेतकर्म केलें नसेल तर मंगलकार्य करूं नये. एथें मुख्य नांदीश्राद्धकर्ताच ग्रहण करावा, मातुळ इत्यादिक गौणकर्ता घेऊं नये. मृत झाला आहे पिता ज्याचा त्याच्या मौंजी इत्यादिक संस्कारांचे ठिकाणीं संस्कार्य जो त्यापासूनच आरंभ करून चार पुरुषांची संख्या ग्रहण करावी. मातामह, मातृपितामह आणि मातृप्रपितामह हे निराळ्या गोत्रांतील जरी आहेत तथापि ते नांदीश्राद्धाच्या देवता आहेत याकरितां यांचें प्रेतकर्म झालें नसेल तर मंगलकार्य होत नाहीं. मातामही, मातृपितामही व मातृप्रपितामही ह्या स्वतंत्रपणानें नांदीश्राद्धाच्या देवता नाहींत याकरितां यांचें दशाहांत कर्म झालें नसेल तथापि मंगल करण्यास प्रतिबंध नाहीं. याप्रमाणें और्ध्वदेहिक कर्म न केलें एतन्निमित्तक मंगलकार्याविषयीं प्रतिबंधाचा निर्णय सांगितला.

---

**मौंजीविवाहयोर्नांदीश्राद्धमारभ्यमंडपोद्वासनपर्यंतंमध्येदर्शदिनंयथानपतेत्तथाकार्यंदर्शान्यत्पित्रोःक्षयाहादिश्राद्धदिनंयदिज्ञानादज्ञानाद्वापतति तदात्रिपुरुषसपिंडैर्विवाहादिमंगल समाप्त्युत्तरंश्राद्धंकार्यं एवंचदर्शान्यश्राद्धस्यैवस्वरूपतोविवाहमध्येनिषेधः नतुदर्शवच्छ्राद्ध रहितस्यापिश्राद्धतिथिमात्रस्य वृत्तेविवाहेपरतस्तुकुर्याच्छ्राद्धमित्याद्युक्तेः एतेनसंक्रांतिमन्वाद्यष्टकादिदिनानांश्राद्धदिनत्वाद्दर्शवन्मध्ये पातोनिषिद्धइतिशंकानिरस्तातेनषण्णवतिश्राद्धकर्तृभिःसपिंडैर्मध्यपतितमन्वादेःप्रायश्चित्तादिनासंपत्तिःसंपाद्या इतिचतुर्थीकर्ममध्येदर्शादि निर्णयः ॥**

मौंजी, विवाह या मंगलकार्यांमध्यें नांदीश्राद्धाला आरंभ करून मंडपोद्वासन होई तावत्पर्यंत मध्यें दर्शदिवस न येईल असें करावें. दर्शावांचून इतर, मातापितरांचा क्षयदिवस इत्यादिक श्राद्धदिवस जर जाणून किंवा न जाणून मध्यें येईल तर तीन पुरुषपर्यंत सपिंडांनीं, विवाहादिक मंगलकार्याची समाप्ति झाल्यानंतर श्राद्ध करावें. यावरून असें होतें कीं, दर्शाखेरीज इतर श्राद्धाचाच स्वरूपेंकरून विवाहामध्यें निषेध सांगितला, दर्शाचा जसा निषेध सांगितला तसा श्राद्धविरहित अशा श्राद्धतिथिमात्राचा निषेध सांगितला नाहीं; कारण, "विवाह झाल्यानंतर पुढें श्राद्ध करावें," इत्यादिक वचन आहे. येणेंकरून संक्रांति, मन्वादि, अष्टकादिक हे श्राद्धदिवस असल्यामुळें दर्शासारखे विवाहामध्यें पडतील तर ते निषिद्ध होत असी जी शंका ती दूर केली, व यावरून षण्णवति श्राद्धें करणारे सपिंड असतील व त्या षण्णवति श्राद्धसंबंधी मन्वादि दिवस विवाहामध्यें पडेल तर त्या श्राद्धाचें प्रायश्चित्तादिक करून त्याची सिद्धि करावी, प्रत्यक्ष श्राद्ध करूं नये. याप्रमाणें विवाहसंबंधी चार दिवसांमध्यें दर्शादिक दिवस प्राप्त झाले असतां त्यांचा निर्णय सांगितला.

---

**प्रारंभात्प्रागारंभोत्तरं वामातुःपितृव्यादेःकर्त्रंतरस्यपत्न्यावारजोदोषेयद्वक्तव्यंतद्व्रतबंधप्रकरणे विस्तरेणोक्तंततएवज्ञेयं ॥**

प्रारंभाच्या पूर्वी किंवा नंतर वराच्या किंवा कन्येच्या मातेला अथवा चुलता इत्यादिक अन्य नांदीश्राद्धकर्ता असून त्याच्या स्त्रियेला रजोदर्शन होईल तर जो निर्णय सांगावयाचा तो मौंजीप्रकरणीं विस्तारपूर्वक सांगितला आहे तो तेथेंच पाहावा.

---

**रजोदोषजननाशौचादिसंभावनायांनांदीश्राद्धस्यापकृष्यानुष्ठानेदिनावधिः एकविंशत्यहर्यज्ञेविवाहेदशवासराः त्रिषट्चौलोपनयनेनांदीश्राद्धंविधीयते दशदिनाद्यतिक्रमेपुनर्नांदीश्राद्धमित्यर्थात्सिद्धं नांदीश्राद्धोत्तरंसूतकमृतकयोःप्राप्तौनविवाहादिप्रतिबंधः विवाहव्रतयज्ञेषु श्राद्धेहोमेर्चनेजपे आरब्धेसूतकंनस्यादनारब्धेतुसूतकं प्रारंभोवरणंयज्ञेसंकल्पोव्रतसत्रयोः नांदीमुखंविवाहादौश्राद्धेपाकपरिक्रियेत्युक्तेः इदंसन्निहितमुहूर्तांतराभावादिसंकटेएवज्ञेयं संकटाभावेतुनांदीश्राद्धेजातेपिसूतकांतेमुहूर्तांतरेएवमंगलं सर्वोप्याशौचापवादोऽनन्यगतित्वेआर्तौचज्ञेयइतिसिंधूक्तेः तेनव्रतेसंकल्पोत्तरमाशौचेपिविप्रद्वारैवपूजादि यज्ञादौमधुपर्कविधिनावरणोत्तरमपिऋत्विगंतरालाभादिकेनन्यगतौसंकटेएवचमधुपर्कविधिनावृतस्याशौचाभावः एवंजपहोमादावप्यूह्यं श्राद्धेपाकपरिक्रियापाकप्रोक्षणं एतदप्यार्तिसत्त्वे महासंकटे प्रारंभात्प्रागपिसूतकप्राप्तौकूष्मांडमंत्रैर्घृतहोमंकृत्वापयस्विनींगांदत्वापंचगव्यंप्राश्यशुद्धश्चूडोपनयनोद्वाहप्रतिष्ठादिकमाचरेत् उपकल्पितबहुसंभारस्यसन्निहितलग्नांतराभावेननाशाद्यापत्तावप्येवंशुद्धिः इदंजननाशौचमात्रविषयमितिमार्तंडादौ ॥**

रजोदर्शन, जननाशौच प्राप्त होतील असा संभव असेल तर नांदीश्राद्ध पुढें करणें तें अपकर्षानें पूर्वी केलें असतां तें किती दिवसपर्यंत राहतें तें सांगतों– “यज्ञसंबंधी नांदीश्राद्ध एकवीस दिवसपर्यंत, विवाहसंबंधी दहा दिवसपर्यंत, चौलसंबंधी तीन दिवस, मौंजीसंबंधी सहा दिवस, याप्रमाणें नांदीश्राद्ध करावें.” दहा दिवस इत्यादिक जी मर्यादा सांगितली तिचें उल्लंघन झालें असतां पुनः नांदीश्राद्ध करावें, असें अर्थसिद्ध आहे. नांदीश्राद्ध झाल्यानंतर जननाशौच व मृताशौच हीं प्राप्त होतील तर विवाहादिक करण्याला प्रतिबंध नाहीं; कारण “विवाह, व्रत, यज्ञ, श्राद्ध, होम, पूजा, जप, यांचा पूर्वी आरंभ झाला असून नंतर आशौच प्राप्त होईल तर त्याविषयीं आशौच नाहीं, आरंभ झाला नसेल तर आशौच आहे.” प्रारंभाचें लक्षण सांगतों–यज्ञाविषयीं ऋत्विज वरणें तो प्रारंभ, व्रत व सत्र यांचा संकल्प झाला म्हणजे तो प्रारंभ, विवाह इत्यादिक कार्यात नांदीश्राद्ध झालें ह्मणजे तो प्रारंभ, श्राद्धाविषयीं पाकपरीक्रिया (पाकाचें प्रोक्षण) झाली ह्मणजे तो प्रारंभ, असें वचन आहे, याप्रमाणें प्रारंभाचें लक्षण जाणावें. हा निर्णय, जवळ दुसरा मुहूर्त मिळत नाहीं इत्यादिक संकट असेल तरच ग्रहण करावा. संकट नसेल तर नांदीश्राद्ध झालें असेल तथापि आशौच गेल्यानंतर दुसऱ्या मुहूर्तावरच मंगल करावें; कारण सर्व जो आशौचाचा अपवाद सांगितला तो अनन्यगतिक व आपत्ति असतां जाणावा असें निर्णयसिंधूमध्यें सांगितलें आहे. यावरून व्रताविषयीं संकल्प झाल्यानंतर आशौच प्राप्त झालें तथापि ब्राह्मणा-

कडूनच पूजा इत्यादिक करवावें. यज्ञादिकाचे ठायीं मधुपर्क विधीकरून ऋत्विजांचें वरण झाल्यानंतरहि दुसरे ऋत्विजांचा अलाभ इत्यादिक अशा अनन्यगतिक संकटसमयींच मधुपर्कविधीनें वरलेला त्याला आशौच नाहीं. याप्रमाणें जप, होम इत्यादिकांविषयींहि असाच निर्णय जाणावा. श्राद्धाचे ठिकाणीं पाकपरिक्रिया ह्मणजे पाकाचें प्रोक्षण; हाहि निर्णय आपत्ति असतां जाणावा. महासंकट असेल तर प्रारंभ होण्याच्या पूर्वींहि आशौच प्राप्त झालें असतां कूष्मांडमंत्रांनीं घृताचा होम करून दुग्ध देणारी अशा गाईचें दान करून पंचगव्य प्राशन करून शुद्ध होत्साता चौलकर्म, मौंजी, विवाह, प्रतिष्ठा इत्यादिक करावें. जवळ दुसरा मुहूर्त नसल्यामुळें सिद्ध केलेल्या सर्व पदार्थांचा नाश होणार इत्यादिक आपत्तिकालीं सुद्धां याप्रमाणेंच शुद्धि जाणावी. हा निर्णय जननाशौचाविषयीं मात्र जाणावा असें मार्तंडादि ग्रंथांत सांगितलें आहे.

---

**कूष्मांडहोमादिना शुद्धिपूर्वकं सूतकमृतकयोर्मध्यआरब्धेविवाहादौ विप्राणांपूर्वं संकल्पितान्नभोजनेदोषोन पाकपरिवेषणादिकमपिसूतकिभिःकार्यंहोमादिविधिनाशुद्धिं संपादनादिति कौस्तुभेस्थितं नैतद्युक्तं लोकविद्विष्टत्वादतःपरगोत्रैरेवान्नदानंयुक्तंभाति नांदीश्राद्धोत्तरं सूतकमृतकयोःप्राप्तौपूर्वमन्नसंकल्पाभावेपिविवाहोत्तरकालसंकल्पितान्नभोजनंविप्रैः कार्यं अत्रापिपरैरन्नंप्रदातव्यंभोक्तव्यंचद्विजोत्तमैरितिसर्वसंमतं परैरसगोत्रैरितिसिंधुमयूखादौव्याख्यानात् पूर्वसंकल्पितान्नस्यापिभोजनसमयेसूतकप्राप्तौभोक्तृभिर्भुक्तशेषंत्यक्त्वापरगृहोदकैराचांततादि**विधेयं पाकशेषःसूतकिभिर्भोक्तव्यः भुंजानेषुचविप्रेषुत्वंतरामृतसूतके अ**न्यगेहोदकाचांता**इतिस्मृतेः नांदीश्राद्धोत्तरंभोजनादन्यकालेसूतकप्राप्तौसूतकिगृहेभोक्तव्यं **भुंजानेषुसूतकप्राप्तौभोक्तृभिःपात्रस्थमप्यन्नंत्याज्यमितिवाचनिकएवविशेषः नहिवचनस्यातिभारइतिन्यायात् ममतुभुंजानेष्वितिवाक्यमारब्धानारब्धसर्वकर्मसुअसंकल्पितान्नविषयमितिभाति इतिविवाहादौरजोदोषसूतकप्राप्तिनिर्णयः ॥**

कूष्माडमंत्रांनीं होम इत्यादिक करून पूर्वी शुद्धि केल्यानंतर जननाशौच व मृताशौच यांमध्यें आरंभलेलें जें विवाहादिक मंगलकार्य त्यामध्यें पूर्वी संकल्प करून ठेवलेलें अन्न ब्राह्मणांनीं भक्षण केलें असतां दोष नाहीं. पात्रांवर पदार्थ वाढावयाचे तेहि आशौची यांनीं वाढावे; कारण होमादिक विधीकरून शुद्धि केली आहे असें कौस्तुभांत आहे; तथापि हें योग्य नाहीं; कारण लोकांमध्यें तें निंदास्पद होतें याकरितां परगोत्रांतील असतील त्यांनींच पात्रांवर पदार्थ वाढावे हें योग्य असें वाटतें. नांदीश्राद्ध केल्यानंतर जननाशौच व मृताशौच प्राप्त झालें असतां नांदीश्राद्धाच्या पूर्वी जरी अन्नाचा संकल्प केला नसेल तथापि विवाह झाल्यानंतर पुढच्या कालीं संकल्प केलेलें अन्न ब्राह्मणांनीं भक्षण करावें. याविषयींहि, "परांनीं अन्न वाढावें व तें ब्राह्मणांनीं भक्षण करावें," असें सर्वसंमत आहे, कारण, पर ह्मणजे परगोत्री असा निर्णयसिंधु, मयूख इत्यादिक ग्रंथांत परशब्दाचा अर्थ केला आहे. पूर्वी संकल्प करून ठेवलेल्या अन्नाच्या भोजनसमयीं सूतक प्राप्त असतां भोजन करणारांनीं भुक्तशेष टा-

रून दुसऱ्यांच्या घरांतील उदकानें आचवणें इत्यादिक करावें. कारण, " ब्राह्मण भोजन करीत असतां तत्कालीं मृताशौच प्राप्त होईल तर दुसऱ्याच्या घरांतील उदकानें आचवणें करावें असी स्मृति आहे." शेष अन्न राहिलें असेल तें आशौची यांनीं भक्षण करावें. नांदीश्राद्ध केल्यानंतर भोजनकालाहून अन्यकालीं आशौच प्राप्त झालें असतां सुतक्याच्या घरीं भोजन करावें. ब्राह्मण भोजन करीत असतां आशौच प्राप्त होईल तर भोजन करणाऱ्या ब्राह्मणांनीं पात्रावरीलहि अन्न टाकावें, असा वाचनिकच विशेषनिर्णय आहे. कारण, वचनाला अतिभार नाहीं असा न्याय आहे. मला तर, " ब्राह्मण भोजन करीत असतां तत्कालींच मृताशौच प्राप्त होईल तर दुसऱ्याच्या घरांतील उदकानें आचवणें करावें," इत्यादिक जें वाक्य सांगितलें तें, आरंभ झालेलीं किंवा आरंभ न झालेलीं अशा सर्व कर्मांचे ठिकाणीं असंकल्पित अशा अन्नाविषयीं आहे असें वाटतें. याप्रमाणें विवाह इत्यादिक मंगलकार्यसमयीं रजोदर्शन, आशौच प्राप्त झालें असतां त्याचा निर्णय सांगितला.

---

विवाहात्पूर्वंकन्यायारजोदर्शनेमातृपितृभ्रातॄणांनरकपातः कन्यायाःवृषलीत्वंतद्भर्तुर्वृषलीपतित्वं अत्रशुद्धिप्रकारः कन्यादाताऋतुसंख्ययागोदानानिएकंवागोदानंयथाशक्तिब्राह्मणभोजनंवाकृत्वाकन्यादानेयोग्योभवेत् कन्यात्रुपवासत्रयांतेगव्यपयःपानंकृत्वाविप्रकुमार्यैसरत्नभूषणंदत्वोद्वाहयोग्याभवति वरश्चकूष्मांडहोमपूर्वकंतामुद्वहन्नदोषीस्यादिति विवाहहोमकालेरजोदोषेतांस्नापयित्वायुंजानेतितैत्तिरीयमंत्रेणप्रायश्चित्तंहुत्वाहोमतंत्रंसमापयेत्यदातुदात्रभावाद्रजोदर्शनंतदाकन्यावर्षत्रयंप्रतीक्ष्यस्वयंवरंवृणुयात् नात्रवरस्यापिदोषः इतिकन्यारजोदोषनिर्णयः ॥

विवाह होण्याच्या पूर्वीं कन्येला रजोदर्शन होईल तर तेणेंकरून त्या कन्येची माता, पिता, भ्राता यांला नरकप्राप्ति होते. कन्येला वृषलीत्व प्राप्त होऊन तिच्या पतीला वृषलीपतित्व होतें. याविषयीं शुद्धीचा प्रकार सांगतों—कन्येचें दान करणारा यानें कन्येचे ऋतु मोजून जी संख्या येईल तितकीं गोप्रदानें किंवा एक गोप्रदान अथवा यथाशक्ति ब्राह्मणभोजन यांतून कोणतेंहि केलें असतां तो कन्यादानाविषयीं योग्य होतो. कन्येनें तर तीन दिवस उपोषण केल्यानंतर गाईचें दूध प्राशन करून ब्राह्मणाच्या कुमारीला रत्नयुक्त अलंकाराचें दान करावें, तेणेंकरून ती विवाहाला योग्य होते. वरानें कूष्मांडमंत्रांनीं घृताचा होम करून ती कन्या वरावी ह्मणजे दोषी होत नाहीं. विवाहहोमाच्या समयीं कन्येला रजोदर्शन होईल तर कन्येला स्नान घालून "युंजान०" ह्या तैत्तिरीय शाखेच्या मंत्रानें प्रायश्चित्तहोम करून होमतंत्र समाप्त करावें. ज्या कालीं, दान करणारा नाहीं या कारणानें कन्या प्रौढ होऊन तिला रजोदर्शन होईल त्याकालीं तीन वर्षेंपर्यंत कालप्रतीक्षा करून नंतर कन्येनें आपण पति वरावा. याविषयीं वरालाहि दोष नाहीं. याप्रमाणें कन्येच्या रजोदोषाचा निर्णय सांगितला.

---

पक्षमध्येतिथिद्वयस्यक्षयेणत्रयोदशदिनात्मकःपक्षःसक्षयपक्षः तदाबहुप्रजासंहारोराजसंहारोवा क्षयपक्षेचौलोपनयनोद्वाहादिवास्तुकर्मादिशुभंनकार्यं क्षयमासाधिमासगुरुशुक्रास्तादौविवाहनिषेधःप्रथमपरिच्छेदे एवंसिंहस्थगुरुनिषेधनिर्णयोपिप्रथमपरिच्छेदेद्रष्टव्यः

क्षयसंवत्सरोपिनिषिद्धः शीघ्रगत्यापूर्वराशिशेषमतिक्रम्यराश्यंतरसंचारोतिचारस्तंप्राप्तोगुरुः पुनः पूर्वराशिंवक्रगत्यायदिनायातितदासक्षयसंवत्सरःसर्वकर्मसुवर्ज्यः तत्रमेषवृषभवृश्चिककुंभमीनराशिषुनदोषः केचिद्गोदादक्षिणदेशेकोप्यतिचारादिगुरुदोषोनेत्याहुः इतिक्षयपक्षादिविचारः ॥

## आतां क्षयपक्षादिकांचा निर्णय सांगतों.

एका पंध्रवड्यामध्यें दोन तिथींचा क्षय होऊन तेरा दिवसांचा जो पंध्रवडा होतो त्याला क्षयपक्ष असें ह्मणतात, व त्या काळीं बहुत प्रजांचा संहार अथवा राजाचा संहार होतो. क्षयपक्षांत चौल, मौंजी, विवाह, घर बांधणें इत्यादिक शुभ कार्य करूं नये. क्षयमास, अधिकमास, गुरुशुक्रांचें अस्तादिक यांचे ठायीं विवाहाचा निषेध प्रथम परिच्छेदांत सांगितला आहे. याप्रमाणें सिंहस्थ गुरूच्या निषेधाचाहि निर्णय प्रथम परिच्छेदांत सांगितला आहे तो पाहावा. क्षयसंवत्सर तोहि शुभ कार्याला निषिद्ध आहे. शीघ्रगतीनें पूर्वींच्या राशीचें शेष उल्लंघून दुसऱ्या राशीचे ठायीं जो संचार त्याचें नांव अतिचार, त्या अतिचाराप्रत गुरु गेला असतां पुनः वक्रगतीनें ज्याकालीं पूर्व राशीला येत नाहीं त्या कालीं तो क्षयसंवत्सर होतो. तो सर्व कर्माला वर्ज्य आहे. त्यामध्यें मेष, वृषभ, वृश्चिक, कुंभ, मीन ह्या राशींचा बृहस्पति असेल तर दोष नाहीं. कोणी ग्रंथकार, गोदेच्या दक्षिणप्रदेशीं अतिचारादिक गुरूचा कोणताहि दोष नाहीं असें ह्मणतात. याप्रमाणें क्षयपक्षादिकांचा निर्णय समाप्त झाला.

---

मुख्यंगुरुबलंवध्वावरस्येष्टंरवेर्बलं द्विपंचसप्तनवैकादशस्थोगुरुःकन्यायाःशुभः जन्मतृतीयषष्ठदशमस्थानेषुपूजाहोमात्मकशांत्याशुभः चतुर्थाष्टमद्वादशस्थानेषुदुष्टफलः कर्कधनुर्मीनगश्चतुर्थादिस्थानेपिनदुष्टः संकटेचतुर्थद्वादशस्थोद्विवारमष्टमस्त्रिवारंहोमादिरूपपूजयार्चितःशुभः ॥

## आतां गुरुबळाचा निर्णय सांगतों.

कन्येला गुरुबल हें मुख्य होय. वराला रविबल इष्ट होय. कन्येच्या जन्मराशीपासून दुसरा, पांचवा, सातवा, नववा, अकरावा हा गुरु कन्येला शुभ जाणावा. जन्मस्थ, तिसरा, सहावा, दहावा, पूजाहोमरूप शांति केल्यानें शुभ होतो. चतुर्थ, अष्टम, द्वादश ह्या स्थानींचा दुष्टफल होय. कर्क, धनु, मीन ह्या राशींचा असतां चतुर्थ इत्यादि स्थानींचा असेल तथापि दुष्ट नाहीं. संकटसमयीं चतुर्थ, द्वादश ह्या स्थानींचा असेल तर दोन वेळ; अष्टम असेल तर तीन वेळ होमादिरूप पूजा केल्यानें शुभ होतो.

---

वरराशेस्त्रिषट्दशैकादशस्थानेरविःशुभः अन्यत्रग्रहमखोक्तपूजयाशुभः गुरुपूजाप्रकारउपनयनप्रकरणेउक्तः ॥

वराच्या राशीपासून तृतीय, षष्ठ, दश, एकादश ह्या स्थानींचा रवि शुभ होय. इतर स्थानींचा रवि, ग्रहमखांत सांगितलेली पूजा केली असतां शुभ होतो. गुरुपूजेचा प्रकार मौंजीप्रकरणीं सांगितला आहे.

---

जन्मतोगर्भतोवापंचमवर्षप्रभृतिअष्टमवर्षपर्यंतंकन्याविवाहेउचितःकालः षड्वर्षोत्तरंवर्षद्वयंप्रशस्ततरः षडब्दमध्येनोद्वाह्याकन्यावर्षद्वयंयतः सोमोभुंक्तेततस्तद्वद्गंधर्वेश्चततोनलःइत्युक्तेः नवमदशमयोर्मध्यमः एकादशवर्षेधमः द्वादशादौप्रायश्चित्तावहः ॥

## आतां कन्येच्या विवाहाचा काल सांगतों.

जन्मापासून, किंवा गर्भसमयापासून पांचव्या वर्षापासून आठव्या वर्षापर्यंत कन्येच्या विवाहाविषयीं काल उक्त आहे. सहा वर्षांनंतर दोन वर्षे अतिप्रशस्त जाणावा. कारण, "सहा वर्षेपर्यंत कन्येचा विवाह करूं नये. जन्मापासून दोन वर्षे तिचा उपभोग सोम करितो, तदनंतर दोन वर्षे गंधर्व उपभोग करितो, नंतर दोन वर्षे अग्नि उपभोग करितो, याप्रमाणें सहा वर्षेपर्यंत देवता कन्येचा उपभोग करितात," असें वचन आहे. नवम वर्ष व दशम वर्ष हा मध्यमकाल होय. अकराव्या वर्षाचेठायीं विवाह अधम होय. बाराव्या इत्यादिक वर्षीं विवाह केला असतां तो प्रायश्चित्तकारक होतो.

---

ब्राह्मोदैवआर्षःप्राजापत्यआसुरोगांधर्वोराक्षसःपैशाचइत्यष्टौविवाहाः योग्यवरमाहूयालंकृत्यकन्यादानविधिनातस्मैदानंब्राह्मोविवाहःयज्ञेऋत्विक्कर्मकुर्वतेऽलंकृत्यकन्यार्पणंदैवः वरादेकंगोमिथुनंद्वेवागृहीत्वातस्मैकन्यार्पणमार्षः इदंगोमिथुनग्रहणंननिंदितं तस्यकुमारीपूजनार्थत्वेनकन्याविक्रयाभावात् त्वयैतयैवसहगृहधर्मआचरणीयएतस्याजीवनपर्यंतंविवाहांतरं चतुर्थाश्रमोवानकार्यइत्याभाष्यकन्यादानंप्राजापत्यः ज्ञातिभ्योयथेच्छंधनंदत्वाविवाहआसुरः वरवध्वोरिच्छयान्योन्यसंयोगोगांधर्वः युद्धादिनाबलाद्धरणंराक्षसःचौर्येणकन्याहरणंपैशाचः पूर्वचतुर्षुपूर्वःपूर्वःश्रेष्ठः उत्तरेषूत्तरउत्तरोनिंद्यः तत्रविप्रस्यब्राह्मदैवौप्रशस्तौ क्षत्रियस्यगांधर्वराक्षसौ आसुरोवैश्यस्य आर्षप्राजापत्यपैशाचाःसर्वेषां संकटेराक्षसभिन्नाः सप्तविप्रस्य ब्राह्मदैवेतरेषट्क्षत्रियस्य वैश्यशूद्रयोर्ब्राह्मदैवराक्षसभिन्नाःपंच सर्वेष्वपिविवाहेषुतत्तत्प्रकारैः कन्यापरिग्रहोत्तरंस्वस्वगृह्यरीत्याविवाहहोमादिविधिरावश्यकःदानविधिनादानंसर्वत्रनभवति पैशाचादौसप्तपदीविधेःपूर्वमन्यस्मैकन्यादेया ब्राह्मादिष्वपिकन्यादानोत्तरमपि सप्तपदीविधेःपूर्ववरस्यषंढत्वादिदोषज्ञानेवरमतौवाकन्यान्यस्मैदेया ब्राह्मविवाहोढायांजातः पुत्रोदशपूर्वान्दशपरानपितॄंस्तारयेत् दैवोढापुत्रःसप्तसप्त प्राजापत्योढापुत्रःषट्षट् आर्षोढापुत्रस्त्रींस्त्रीन् आश्वलायनसूत्रेतुब्राह्मादिषुद्वादशदशाष्टौसप्तचपूर्वान्परांश्चपुत्रस्तारयतइत्युक्तं अन्येषुदुर्विवाहेषुब्रह्मधर्मद्विषःसुताः वाग्दानोत्तरंवरस्यदेशांतरगमनेषण्मासंप्रतीक्ष्यान्यस्मैदेया कन्यायाःशुल्कंप्रदायगमनेवर्षप्रतीक्षा यत्तुबलाद्विवाहेसगोत्रत्वक्लीबत्वादिवरदोषेवाकन्यासप्तपदीविध्युत्तरमपिअन्यस्मैदेयेतितत्कलियुगेनिषिद्धं वाग्दानोत्तरंपातित्यादिदोषाभावेपिकन्यामदातुर्दंडउक्तःएवंकन्यायाअपस्मारदोषमनुक्त्वादातापिदंड्यः अधर्म्योद्वाहेशुद्धिर्जैर्भोजनादौकृतेआसुरेएकरात्रंउपवासोगांधर्वेत्रिरात्रंराक्षसपैशाचयोश्चांद्रायणंप्रायश्चित्तं इतिविवाहभेदाः ॥

## आतां विवाह किती प्रकारचे ते सांगतों.

ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व, राक्षस आणि पैशाच याप्रमाणें आठ

विवाह आहेत. योग्य वराला सत्कारपूर्वक बलावून अलंकारयुक्त अशा कन्येचें दान कन्यादानाच्या विधीनें त्याला करावें तो **ब्राह्मविवाह.** यज्ञांत ऋत्विजाचें कर्म करणारा ब्राह्मण त्याला अलंकारयुक्त कन्या अर्पण करणें तो **दैवविवाह.** वरापासून एक गोमिथुन ( गाई व बैल ) किंवा दोन गोमिथुनें घेऊन त्याला कन्या अर्पण करणें तो **आर्षविवाह.** हें जें गोमिथुन घेणें तें निंद्य नाहीं; कारण, तें कन्येच्या पूजेकरितां ह्मणजे सत्काराकरितां घ्यावें असें सांगितलें आहे; यास्तव त्यापासून कन्येचा विक्रय होत नाहीं. तूं याच स्त्रियेसहवर्तमान गृहस्थाश्रमधर्म आचरावा व ही स्त्री जीवंत आहे तावत्पर्यंत दुसरा विवाह किंवा संन्यास आश्रम करूं नये, असें सांगून कन्या देणें तो **प्राजापत्यविवाह.** ज्ञाति जे त्यांला यथेच्छ द्रव्य देऊन विवाह करावा तो **आसुरविवाह.** वर आणि कन्या यांच्या इच्छेनें परस्परांचा संयोग होतो तो **गांधर्वविवाह.** युद्ध, इत्यादिक करून बलात्कारानें कन्या हरण करणें तो **राक्षसविवाह.** चोरी करून कन्या हरण करणें तो **पैशाचविवाह,** याप्रमाणें आठ विवाह आहेत. त्यांमध्यें प्रथमचे जे चार ( ब्राह्म, दैव, आर्ष व प्राजापत्य ) त्यांमध्यें पहिला श्रेष्ठ ह्मणजे प्राजापत्य विवाहापेक्षां आर्ष श्रेष्ठ, आर्षाहून दैव श्रेष्ठ, दैवाहून ब्राह्मविवाह श्रेष्ठ असें समजावें. पुढचे जे चार ( आसुर, गांधर्व, राक्षस आणि पैशाच ) त्यांमध्यें पुढचा पुढचा निंद्य होय, ह्मणजे आसुराहून गांधर्वविवाह निंद्य, गांधर्वाहून राक्षसविवाह निंद्य, राक्षसविवाहाहून पैशाचविवाह निंद्य होय याप्रमाणें जाणावें. त्या आठ विवाहांमध्यें ब्राह्मविवाह, व दैवविवाह हे ब्राह्मणाला प्रशस्त होत. क्षत्रियाला गांधर्व, राक्षस हे प्रशस्त आहेत. वैश्याला आसुरविवाह प्रशस्त आहे. आर्ष, प्राजापत्य आणि पैशाच हे सर्वांला प्रशस्त आहेत. संकट असतां राक्षसविवाह खेरीज करून सात विवाह ( ब्राह्म, दैव, आर्ष, प्राजापत्य, आसुर, गांधर्व आणि पैशाच ) ब्राह्मणाला उक्त आहेत. संकट असतां ब्राह्म, दैव यांवांचून इतर सहा विवाह क्षत्रियाला उक्त आहेत. संकट असतां वैश्य व शूद्र यांला ब्राह्म, दैव आणि राक्षस यांवांचून इतर पांच उक्त आहेत. सर्व विवाहांमध्यें त्या त्या प्रकारांनीं कन्येचा स्वीकार केल्यानंतर आपापल्या गृह्यसूत्राच्या रीतीनें विवाहहोम इत्यादिक विधि अवश्य करावा. दानाच्या विधीनें सर्व विवाहांत दान होत नाहीं. पैशाचादिक विवाहांमध्यें सप्तपदीविधि होण्याच्या पूर्वीं दुसऱ्या वराला कन्या द्यावी. ब्राह्म इत्यादिक विवाहांचे ठायीं कन्येचें दान झाल्यानंतरहि सप्तपदीविधि होण्याच्या पूर्वीं, वराला नपुंसकत्व इत्यादि दोष आहेत असें समजेल किंवा वर मृत होईल तर ती कन्या दुसऱ्या वराला द्यावी. ब्राह्मविवाहानें वरली जी स्त्री तिचे ठायीं झालेला पुत्र, दहा पूर्वींचे व दहा पुढचे अशा वीस पितरांला तारितो. दैवविवाहानें वरलेल्या स्त्रीचा पुत्र सात सात पुरुषांला तारितो. प्राजापत्य विवाहानें वरलेल्या स्त्रीचा पुत्र सहा सहा पुरुषांला तारितो. आर्ष विवाहेंकरून वरलेल्या स्त्रीचा पुत्र तीन तीन पुरुषांला तारितो. आश्वलायनगृह्यसूत्रांत तर ब्राह्मादिक चार विवाह असतां १२।१०।८।७ असे मागचे व पुढचे पुरुष यांला पुत्र तारितो असें सांगितलें आहे. “इतर दुर्विवाह यांचे ठायीं जे पुत्र होतात ते ब्राह्मणधर्माचे द्वेष्टे असे होतात.” वाग्दान करून नंतर वर देशांतरीं गेला असेल तर सहा महिनेपर्यंत त्याची वाट पाहून नंतर दुसऱ्या वराला कन्या द्यावी. कन्येचें मौल्य देऊन

गेला असेल तर एक वर्षपर्यंत वाट पाहावी. बलात्कारानें विवाह झाला असेल, अथवा एकगोत्रत्व, नपुंसकत्व इत्यादिक वरास दोष आहे असें समजेल तर सप्तपदीविधि झाला असेल तथापि दुसऱ्या वराला कन्या द्यावी असें जें सांगितलें तें कलियुगांत निषिद्ध आहे असें जाणावें. वाग्दान केल्यानंतर पातित्यादिक दोष नसून कन्या न देईल तर कन्यादात्यालाहि दंड करावा असें सांगितलें आहे. याप्रमाणें कन्येला अपस्मारदोष ( फेंपरें ) असून तो चोरून ठेवील तर कन्यादाताहि दंडास पात्र होतो. अधर्म्य विवाहांचे ठायीं ब्राह्मणांनीं भोजन केलें असतां, आसुरविवाहाचे ठायीं एकरात्र उपोषण, गांधर्वविवाहाचे ठायीं त्रिरात्र उपोषण, राक्षस व पैशाच यांचे ठायीं चांद्रायणप्रायश्चित्त करावें. याप्रमाणें विवाहाचे भेद सांगितले.

---

दाराग्निहोत्रसंयोगंकुरुतेयोग्रजेस्थिते सकनिष्ठःपरिवेत्ताज्येष्ठः परिवित्तिः एवंज्येष्ठाया मनूढायांकनिष्ठकन्योद्वाहेज्येष्ठाकन्यादिधिषुः कनिष्ठाग्रेदिधिषुः अत्रप्रायश्चित्तं अज्ञानतः पित्रादिदत्तोद्वाहेभ्रात्रोःपरिवेत्तृपरिवित्तिसंज्ञयोःकृच्छ्रद्वयंकन्यायाः कृच्छ्रंदातुरतिकृच्छ्रंयाजकस्यचांद्रायणं ज्ञानतः पित्राद्यदत्तोद्वाहेसर्वेषांवत्सरंकृच्छ्राचरणं कामतःपित्रादिदत्तोद्वाहेत्रैमासिकं अज्ञानेनादत्तोद्वाहेचांद्रायणादि दिधिष्वादिपतेरतिकृच्छ्रकृच्छ्रौ अत्रापवादः सापत्नेदत्तकेवाज्येष्ठेकनिष्ठस्यदाराग्निहोत्रग्रहणेदोषोन सोदरेपिक्लीबेमूकबधिरवामनभग्नपादत्वादिदोषयुतेदेशांतरस्थे वेश्यासक्ते पतितेमहारोगिण्यतिवृद्धेकृषिसक्तेधनवृद्धिराजसेवादिव्यापारासक्तेचौर्यासक्तेउन्मत्तेविवाहाग्निहोत्रेच्छानिवृत्तेचज्येष्ठे कनिष्ठस्यदाराग्निहोत्रग्रहणेदोषोन देशांतरगतंज्येष्ठमष्टौद्वादशवावर्षाणिकनिष्ठः प्रतीक्षेत् एवंकन्यायाअपिज्येष्ठायाभिन्नमातृजत्वेकनिष्ठाविवाहेदोषोन एवंमूकत्वादिदोषयुतायांज्येष्ठायामूह्यं इतिपरिवेत्रादिनिर्णयः ॥

"ज्येष्ठ बंधूचा विवाह न होतां जो कनिष्ठ बंधु, विवाह व अग्निहोत्र धारण करितो त्याला परिवेत्ता व ज्येष्ठाला परिवित्ति असें ह्मणतात." याप्रमाणें ज्येष्ठकन्या अविवाहित असून कनिष्ठ कन्येचा विवाह केला असतां ज्येष्ठ कन्येला दिधिषु व कनिष्ठ कन्येला अग्रेदिधिषु असें ह्मणतात. याविषयीं प्रायश्चित्त सांगतों—पिता इत्यादिकांनीं दिलेली जी कन्या तिच्याशीं न समजून विवाह झाला असतां परिवेत्ता व परिवित्ति या भ्रात्यांला दोन दोन कृच्छ्र प्रायश्चित्त, कन्येला एक कृच्छ्र, कन्यादात्याला अतिकृच्छ्र, उपाध्यायाला चांद्रायण, याप्रमाणें प्रायश्चित्त करावें. पिता इत्यादिकांनीं न दिलेली तिच्याशीं जाणून विवाह केला असतां सर्वांनीं एक वर्षपर्यंत कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. इच्छेंकरून पिता इत्यादिकांनीं दिलेलीचा विवाह केला असतां त्रैमासिक करावें. पिता इत्यादिकांनीं दिलेली नसून अज्ञानेंकरून विवाह झाला असतां चांद्रायण इत्यादिक प्रायश्चित्त करावें. याप्रमाणें दिधिषूच्या पतीनें अतिकृच्छ्र, अग्रेदिधिषूच्या पतीनें कृच्छ्र, असें प्रायश्चित्त करावें. याविषयीं अपवाद सांगतों— सापत्न किंवा दत्तक ज्येष्ठ भ्राता असेल तर कनिष्ठास विवाह व अग्निहोत्र हीं ग्रहण करण्याविषयीं दोष नाहीं. सोदरभ्राता असून नपुंसक, मुका, बहिरा, खुजा, पंगु इत्यादिक दोषांनीं युक्त; देशांतरीं राहणारा; वेश्येचे ठिकाणीं आसक्त; बाटलेला; महारोगी; अतिवृद्ध;

कृषीचे ठिकाणीं आसक्त; द्रव्यवृद्धि, राजाची चाकरी इत्यादिक व्यापार यांमध्यें आसक्त; चौर्यासक्त; उन्मत्त; विवाह व अग्निहोत्र यांविषयीं निरिच्छ असा ज्येष्ठ भ्राता असेल तर कनिष्ठाला विवाह, अग्निहोत्र घेण्याविषयीं दोष नाहीं. ज्येष्ठ भ्राता देशांतरीं गेलेला असल्यास आठ वर्षें किंवा बारा वर्षें कनिष्ठानें प्रतीक्षा करावी. याप्रमाणेंच ज्येष्ठकन्येची भिन्न माता असतां कनिष्ठ कन्येच्या विवाहाविषयीं दोष नाहीं. याप्रमाणें मुकेपणा इत्यादिक दोषयुक्त ज्येष्ठ कन्या असतां असाच निर्णय जाणावा. याप्रमाणें परिवेत्ता इत्यादिकांचा निर्णय सांगितला.

---

**अथकन्यादातृक्रमः पितापितामहोभ्रातापितृकुलस्थपितृव्यादिर्मातृकुलस्थोमातामहमातुलादिःसर्वाभावेजननीत्येवंपूर्वाभावेपरःपरः भ्रातॄणामुपनीतानामेवाधिकारः अनुपनीतभ्रातुर्मात्रादेश्चसत्त्वेमात्रादेरेवाधिकारोनत्वनुपनीतभ्रातुः सर्वाभावेकन्यास्वयंवरंवृणुयात् कन्यास्वयंवरेमातुर्दातृत्वेचताभ्यामेवनांदीश्राद्धंकार्यं तत्रमाताकन्यावास्वयंप्रधानसंकल्पमात्रंकृत्वान्यद्ब्राह्मणद्वाराकारयेत् वरस्तुसंस्कृतभ्रात्राद्यभावेस्वयमेवनांदीश्राद्धंकुर्यान्नमाता उपनयनेनकर्माधिकारस्यजातत्वात् द्वितीयादिविवाहेवरःस्वयमेवनांदीश्राद्धंकुर्यात् परकीयकन्यादानेविशेषः आत्मीकृत्यसुवर्णेनपरकीयांतुकन्यकां धर्मेणविधिनादानमसगोत्रेपियुज्यते इतिदातृनिर्णयेवरवध्वोरपिनांदीश्राद्धकर्तृत्वनिर्णयः ॥**

## आतां कन्यादाते यांचा अनुक्रम सांगतों.

कन्येचें दान करणें तें पित्यानें करावें. पिता नसेल तर पित्याचा पिता, त्याच्या अभावीं भ्राता, भ्रात्याच्या अभावीं पित्याच्या कुळांतील चुलता इत्यादिक यांनीं करावें. यांचा अभाव असतां मातेच्या कुळांतील मातेचा पिता, मातुल इत्यादिकांनीं कन्यादान करावें. सर्वांच्या अभावीं माता याप्रमाणें पूर्वीच्या अभावीं पुढचा पुढचा अधिकारी होतो असें जाणावें. मौंजी झालेल्या भ्रात्यांसच कन्यादानाधिकार आहे. मौंजी न झालेला भ्राता व माता इत्यादिक असतील तर मातेलाच अधिकार आहे, मौंजी न झालेल्या भ्रात्याला अधिकार नाहीं. सर्वांच्या अभावीं कन्येनें आपण वर वरावा. कन्या आपण स्वतां वरणारी, व माता दान करणारी असतां कन्येनेंच किंवा मातेनेंच नांदीश्राद्ध करावें. त्याविषयीं मातेनें किंवा कन्येनें प्रधानसंकल्प मात्र करून इतर सर्व कृत्य ब्राह्मणाकडून करवावें. वरानें तर, संस्कार झालेला भ्राता इत्यादिक नसल्यास आपणच नांदीश्राद्ध करावें; मातेनें करूं नये; कारण, उपनयनेंकरून वराला कर्माचा अधिकार प्राप्त झाला आहे. दुसऱ्या इत्यादिक विवाहाचे ठायीं वरानें आपणच नांदीश्राद्ध करावें. दुसऱ्याच्या कन्येचे दानाविषयीं विशेष सांगतों—"दुसऱ्याची कन्या सुवर्ण देऊन आपली असी करून तिचें धर्मविधीनें दान करणें तें परगोत्रांतील कन्या असली तथापि युक्त होतें." याप्रमाणें कन्यादात्यांच्या निर्णयामध्यें वर व कन्या यांचाहि नांदीश्राद्धकर्तृत्वाचा निर्णय सांगितला.

---

**मूलनक्षत्राद्यपादत्रयजातौवधूवरौस्वस्वश्वशुरंनाशयतः आश्लेषांत्यपादत्रयजातौश्वश्रूं ज्येष्ठांत्यपादजातावन्योन्यज्येष्ठभ्रातरं विशाखांत्यपादजावन्योन्यकनिष्ठभ्रातरं मघाप्रथमपादे**

मूलवत्फलंकेचिदाहुः केचिदुपनयनस्यद्वितीयजन्मरूपत्वात्तेनचद्वितीयजन्मनापूर्वजन्मसंभवमूलादिदोषस्यनिरस्तत्वाद्वरस्यश्वशुरघातित्वादिदोषोनेत्यपवादंसंकटेवदंति श्वशुराद्यभावे वध्वाअपिनदोषः नर्क्षवृक्षनदीनाम्नींनांत्यपर्वतनामिकां नपक्ष्यहिप्रेष्यनाम्नींनविभीषणनामिकामुद्वहेदिति वरायपुंस्त्वंपरीक्ष्यकन्यादेया यस्याप्सुप्लवतेबीजंन्हादिमूत्रंचफेनिलमित्यादिपुंस्त्वपरीक्षा कुलंचशीलंचवपुर्वयश्चविद्यांचवित्तंचसनाथतांच एतान्गुणान्सप्तपरीक्ष्यदेयाकन्याबुधैःशेषमचिंतनीयं इतिवधूवरयोर्मूलजातत्वादिगुणदोषनिर्णयः ॥

मूलनक्षत्राच्या पहिल्या तीन चरणांवर कन्या व वर यांचें जन्म झालें असतां ते कन्यावर आपापल्या श्वशुराचा नाश करितात. आश्लेषानक्षत्राच्या शेवटच्या तीन चरणांवर जन्म झालें असेल तर सासवेचा नाश करितात. ज्येष्ठानक्षत्राच्या शेवटच्या चरणावर जन्म झालें असेल तर परस्पर ज्येष्ठभ्रात्याचा नाश करितात. विशाखांच्या शेवटच्या चरणावर जन्म झालें असतां परस्पर कनिष्ठभ्रात्याचा नाश करितात. मघानक्षत्राच्या पहिल्या चरणावर जन्म झालें असतां मूळाप्रमाणें फळ होतें असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. कोणी ग्रंथकार, उपनयन हें दुसरें जन्मरूप असल्यामुळें त्या उपनयनरूप दुसऱ्या जन्मेंकरून, पूर्व जन्मामध्यें उत्पन्न झालेला मूलादिकनक्षत्राचा दोष दूर होतो याकरितां, ‘मूळ नक्षत्रावर जन्म झालेला वर श्वशुरघातक होतो, इत्यादिक दोष नाहीं,’ असा अपवाद संकटविषयीं सांगतात. सासरा इत्यादिकांचा अभाव असेल तर कन्येलाहि दोष नाहीं. “आस्वल, वृक्ष, नदी या नांवाची; चांडाल, पर्वत या नांवाची; पक्षी, सर्प, दास या नांवाची; भयंकर नांवाची असी कन्या वरूं नये.” वराला कन्या देणें ती पुरुषत्वाची परीक्षा करून द्यावी. “ज्या पुरुषाचें रेत उदकावर तरतें, व मूत्र सशब्द, फेंसयुक्त असतें” इत्यादि पुंस्त्वाची परीक्षा जाणावी. कुल, स्वभाव, वपु (शरीरसौंदर्य), वय, विद्या, द्रव्य, पालकत्व, हे सात गुण ज्ञात्यांनीं वराचे आंगीं पाहून कन्या द्यावी. ह्याहून इतर गुण पाहण्याची गरज नाहीं. याप्रमाणें कन्या व वर यांचें मूळ इत्यादिक नक्षत्रीं जन्म झालें असतां त्यांच्या गुणदोषांचा निर्णय सांगितला.

---

अथविवाहेमासादिनिर्णयः माघफाल्गुनवैशाखज्येष्ठमासाःशुभप्रदाः मार्गशीर्षोमध्यमः स्यात्कचिदाषाढकार्तिकौ अत्रमिथुनेर्केआषाढोवृश्चिकेकार्तिकश्चदेशाचारानुरोधेनग्राह्योन सर्वदेशे एवंमकरस्थपौषोमेषस्थचैत्रोपि ज्येष्ठयोर्वधूवरयोर्ज्येष्ठेमासिविवाहोनशुभः मासांतरेमध्यमः नज्येष्ठयोर्विवाहःस्याज्ज्येष्ठेमासिविशेषतः द्वौज्येष्ठौमध्यमौप्रोक्तावेकज्येष्ठंसुखावहं ज्येष्ठत्रयंनकुर्वीतविवाहेसर्वसंमतमित्युक्तेः तथाचज्येष्ठमासोज्येष्ठगर्भस्यमंगलेमध्यमः जन्ममासजन्मनक्षत्रादिकंज्येष्ठापत्यस्यनिषिद्धं सार्वकालमेकेविवाहमितित्वासुराद्यधर्मेविवाहविषयं ॥

## आतां विवाहाविषयीं मासादिकांचा निर्णय सांगतों.

“विवाहाला मास घेणें ते माघ, फाल्गुन, वैशाख, ज्येष्ठ, हे शुभदायक होत. मार्गशीर्ष मध्यम होय. क्वचित् ग्रंथांत आषाढ, कार्तिक हेहि सांगितले आहेत.” विवाहाविषयीं मिथुनस्थ सूर्य असतां आषाढमास, व वृश्चिकस्थ सूर्य असतां कार्तिक मास याप्रमाणें ज्या देशांत

जसा आचार असेल तदनुरोधानें घ्यावे, सर्व देशांत ग्रहण करूं नयेत. याप्रमाणें मकरींचा रवि असतां पौषमास, मेषींचा रवि असतां चैत्रमास हेहि ग्रहण करावे. ज्येष्ठ कन्या व ज्येष्ठ वर यांचा विवाह ज्येष्ठ मासांत शुभकारक नाहीं. ज्येष्ठ कन्या व ज्येष्ठ वर यांचा विवाह ज्येष्ठमासावांचून अन्य मासांत केला असतां मध्यम होय. कारण, " ज्येष्ठ कन्या, आणि ज्येष्ठ वर यांचा विवाह विशेषेंकरून ज्येष्ठमासांत करूं नये. दोन ज्येष्ठ असतील तर ते मध्यम होत. ज्येष्ठ कन्या, ज्येष्ठ वर आणि ज्येष्ठ मास यांतून एक ज्येष्ठ असणें हें सुखकारक होय. विवाहाचे ठिकाणीं तीन ज्येष्ठ ( ह्मणजे ज्येष्ठ कन्या, ज्येष्ठ वर आणि ज्येष्ठ मास ) करूं नयेत असें सर्वसंमत वचन आहे. " तसेंच ज्येष्ठ कन्या किंवा ज्येष्ठ वर यांच्या मंगलकार्याविषयीं ज्येष्ठ मास मध्यम होय. जन्ममास, जन्मनक्षत्र इत्यादिक, ज्येष्ठ अपत्याचे संस्काराविषयीं निषिद्ध आहे. " कितीएक आचार्य सार्वकाल विवाह करावा असें ह्मणतात," तें वचन तर आसुरादिक जे अधर्म्यविवाह त्यांविषयीं आहे.

---

मयूखेआर्द्रादिदशनक्षत्रेषुसूर्याधिष्ठितेषु विवाहमौंज्यादिकंवसिष्ठादिभिर्निषिद्धमित्युक्तं नैतत्कौस्तुभसिंध्वादिग्रंथेमार्तंडादिज्योतिर्ग्रंथेपीतिबहवः शिष्टाःआर्द्रादिप्रवेशदोषंनमन्यंते अमावास्यानिषिद्धा रिक्ताष्टमीषष्ठ्योल्पफलाः अन्यास्तिथयोबहुफलाः शुक्लपक्षः श्रेष्ठः कृष्णस्त्रयोदशीपर्यंतोमध्यमः सोमबुधगुरुशुक्रवाराः शुभाः अन्येमध्यमाः रोहिणीमृगमघा स्तिस्रउत्तराहस्तस्वातीमूलानुराधारेवत्यःसर्वसंमतनक्षत्राणि हरदत्तमतेचित्राश्रवणधनिष्ठा श्विन्यइत्यधिकानिचत्वारि तत्रापिखलग्रहयुतंनक्षत्रंवर्ज्यं चंद्रताराबलंकन्यावरयोरुभयोरपि अन्यतरस्यचंद्रबलाभावेरजतादिदानंकार्यं ॥

आर्द्रादिक दहा नक्षत्रीं सूर्य असतां विवाह, मौंजी इत्यादिक मांगलिक कार्यें निषिद्ध होत असें वसिष्ठ इत्यादिक ऋषींनीं सांगितलेलें आहे; परंतु कौस्तुभ, निर्णयसिंधु इत्यादिक ग्रंथांत व मार्तंडादिक ज्योतिष ग्रंथांत नाहीं यास्तव बहुत शिष्टजन आर्द्रादिक नक्षत्रांच्या प्रवेशाचा दोष मानीत नाहींत. अमावास्या विवाहाविषयीं निषिद्ध होय. रिक्ता ( चतुर्थी, नवमी, चतुर्दशी ), अष्टमी, षष्ठी ह्या तिथि विवाहाविषयीं अल्पफल ह्मणजे मध्यम होत. इतर ज्या तिथि त्या उत्तमफल होत. शुक्लपक्ष श्रेष्ठ होय. कृष्णपक्ष त्रयोदशीपर्यंत मध्यम होय. सोमवार, बुधवार, गुरुवार आणि शुक्रवार हे वार विवाहाला शुभ होत. इतर वार मध्यम होत. रोहिणी, मृग, मघा, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, हस्त, स्वाती, मूळ, अनुराधा, रेवती हीं नक्षत्रें विवाहाला सर्वमान्य होत. हरदत्ताच्या मतीं चित्रा, श्रवण, धनिष्ठा, अश्विनी हीं चार अधिक उक्त आहेत. हीं जीं विवाहाचीं नक्षत्रें सांगितलीं त्यांमध्येंहि जें नक्षत्र पापग्रहानें युक्त असेल तें वर्ज्य करावें. चंद्रबळ व ताराबळ हीं कन्या व वर या दोघांलाहि अवश्य असावीं, दोघांतून एकाला चंद्रबळ नसेल तर रौप्यादिक दान करावें.

---

मेषःकन्याघटःसिंहोनक्रंयुग्मंधनुर्वृषः मीनःसिंहोधनुःकुंभोजादीनांघातचंद्रमाः यात्रायांयुद्धकार्येषुघातचंद्रंविवर्जयेत् विवाहेसर्वमांगल्येचौलादौव्रतबंधने घातचंद्रोनैवचिंत्योयज्ञेसीमंतजातयोः मृत्युयोगेपरिघार्धेभद्रायांपातवैधृतौ विष्कंभादेर्दुष्टभागेतिथिवृद्धिक्षयेपिच

**यामार्धकुलिकादौचगंडांतेरविसंक्रमे** केतूद्गमेभूमिकंपेविवाहाद्यंविवर्जयेत् ग्रहणेपादादिग्रासेत्रिचतुःषडष्टदिवसाः प्रागर्धितावर्ज्याः भूकंपेउल्कापातेचत्रिदिनंवज्रपातेचैकंदिनंवर्ज्यं यावत्केतूद्गमस्तावदशुभःसमयोभवेत् अस्यापवादः भूकंपादेर्नदोषोस्तिवृद्धिश्राद्धेकृतेसति दिवाविवाहःप्रशस्तः रात्रावपिकन्यादानंहेमाद्र्यादिमतेप्रशस्तंभवति ॥

**घातचंद्र**—"मेषराशीचा पहिला, वृषभराशीचा ५ वा, मिथुनराशीचा ९ वा, कर्कराशीचा २ रा, सिंहराशीचा सहावा, कन्याराशीचा १० वा, तूळ राशीचा ३ रा, वृश्चिकराशीचा ७ वा, धनराशीचा ४ था, मकरराशीचा ८ वा, कुंभराशीचा ११ वा, मीन राशीचा १२ वा, याप्रमाणें घातचंद्र जाणावे. प्रयाण, युद्धकार्यें इत्यादिकीं घातचंद्र वर्ज्य करावा. विवाह, सर्व मांगलिक कर्में, चौलादिक, मौंजी, यज्ञ, सीमंतोन्नयन व जातकर्म हीं कर्तव्य असतां घातचंद्र पाहूं नये. मृत्युयोग, परिघाचें पूर्वार्ध, भद्रा, व्यतीपात, वैधृति, विष्कंभादिक योगांच्या निषिद्ध घटिका, तिथिवृद्धि, तिथिक्षय, यामार्ध, कुलिकादिक, तीन प्रकारचा गंडांत, सूर्यसंक्रांति झाली तो दिवस, केतूद्गम ह्मणजे शेंड्ये नक्षत्राचा उदय, भूकंप यांवर विवाहादिक मंगलकार्य करूं नये." एक चरण ग्रास असतां ग्रहणदिवसापासून तीन दिवस, दोन चरण ग्रास असतां चार दिवस, तीन चरण ग्रास असतां सहा दिवस, चार चरण ग्रास असतां आठ दिवस असे दिवस, पूर्वीं निमे व पुढें निमे वर्ज्य करावे. भूकंप, उल्कापात (आकाशांतून अग्निरूप जो तारा पडतो तो) हीं निमित्तें असतां तीन दिवस, वज्रपात असतां एक दिवस याप्रमाणें दिवस वर्ज्य करावे. "जितके दिवसपर्यंत शेंड्यें नक्षत्र दिसत आहे तितके दिवस अशुभ होत, यास्तव तितके दिवसपर्यंत शुभ कार्य करूं नये." **याचा अपवाद सांगतों**—"नांदीश्राद्ध केल्यानंतर भूकंपादिकांचा दोष नाहीं." दिवसास विवाह प्रशस्त होय. कन्यादान रात्रीमध्येंहि प्रशस्त होय असें हेमाद्रि इत्यादिकांच्या मतीं आहे.

---

**अथलग्नेग्रहबलं त्रि ३ षष्ठा ६ ष्ट ८ स्वर्कस्त्रि ३ जल ४ धन २ गोब्जःक्षितिसुतस्त्रि ३ षष्ठ ६ स्थोज्ञेज्यौव्ययनिधन १२।८ वर्ज्यौभृगुसुतः द्वितीयाब्धीष्वंकाभ्रतनुषु २।४।५। ९।१०।१ रिपु ६ त्र्य ३ ष्ट ८ सुशनिस्तमःकेतुश्चाये ११ भवतिसुखहेतुश्चसकलः ॥**

## आतां विवाहलग्नीं ग्रहबल सांगतों.

ज्या लग्नीं विवाह करावयाचा त्या लग्नापासून तृतीय, षष्ठ, अष्टम या स्थानीं रवि; तृतीय चतुर्थ, द्वितीय या स्थानीं चंद्र; तृतीय, षष्ठ या स्थानीं मंगळ; बुध व गुरु हे द्वादश व अष्टम या स्थानीं वर्ज्य; द्वितीय, चतुर्थ, पंचम, नवम, दशम लग्न या स्थानीं शुक्र; षष्ठ, तृतीय, अष्टम या स्थानीं शनि, राहु व केतु; एकादश स्थानीं सर्व ग्रह हे विवाहाविषयीं शुभ होत.

---

**अथलग्नेवर्ज्यग्रहाः रविर्लग्ने१चंद्रस्तनुरिपुमृति १।६।८ स्थःक्षितिसुतोष्टलग्नाभ्रे ८।१। १० ज्ञेज्यौनिधन८उशनाव्य३ ष्ट८ रिपु ६ षु शनिःशेषौलग्ने १ तनुपतिरथार्ये६ ष्टम ८ गृहेविवाहेस्युःसर्वेमदनसदने ७ नैवशुभदाःशेषौराहुकेतू अन्येद्वादशगं १२ चंद्रंदकेशन वमांशपौ षष्ठाष्ट ६।८ गौगुर्वाभ्रे १० वर्ज्यानाहुर्मनीषिणः ॥**

## आतां लग्नीं वर्ज्य ग्रह कोणते ते सांगतों.

लग्नीं रवि; लग्न, षष्ठ, अष्टम या स्थानीं चंद्र; अष्टम, लग्न, दशम या स्थानीं मंगळ; बुध व गुरु हे अष्टमस्थानीं; तृतीय, अष्टम, षष्ठ या स्थानीं शुक्र; लग्नीं शनि, व शेषग्रह; लग्नस्वामी षष्ठ, अष्टम या स्थानीं आणि सप्तमस्थानीं सर्व ग्रह याप्रमाणें हे सर्व अशुभ ग्रह होत. शेष शब्देंकरून राहु व केतु जाणावे. दुसरे ग्रंथकार बारावा चंद्र; द्रेष्काणस्वामी व नवमांशस्वामी हे सहावे व आठवे; दहावा बुध हे वर्ज्य करावे असें सांगतात.

---

मेषान्नक्रात्तुलात्कर्कात्त्रिर्गण्यानवमांशकाः शस्तावृषनृयुक्कर्ककन्यातूलधनुर्झषाः ॥

**नवांश प्रवृत्ति.**—मेष, सिंह, धन यांची प्रवृत्ति मेषापासून; वृषभ, कन्या, मकर यांची प्रवृत्ति मकरापासून; मिथुन, तुळा, कुंभ यांची प्रवृत्ति तुळापासून; कर्क, वृश्चिक, मीन यांची प्रवृत्ति कर्कापासून याप्रमाणें तीन तीन वेळ मोजले असतां नवमांश होतात. त्यांमध्यें वृषभ, मिथुन, कर्क कन्या, तूळ, धनु आणि मीन हे नवमांश शुभ होत.

---

अथैकविंशतिमहादोषाः दुःपंचांग्यष्टमोसृक्सविधुखलतनुःषण्मृतींदुःसितोरौसंक्रांतिर्गंडदोषःसखलभदिनजौचक्रचक्रार्धपातौ रंध्रंलग्नंकुवर्गोस्तगखलउदयास्ताशुचिःक्रूरवेधःकर्तर्येकार्गलांघ्रिर्ग्रहणभकुलवौदुःक्षणोत्पातभेच ॥

## आतां एकवीस महादोष सांगतों.

१ दुःपंचांगी ह्मणजे ज्या कार्याला तिथि, वार, नक्षत्रें, योग, करण हीं पांच दुष्ट वर्जित असतील तीं त्या कार्याला टाकावीं. २ अष्टमोऽसृक्—लग्नापासून अष्टमस्थानीं मंगळ. ३ सविधुखलतनुः—चंद्र व पापग्रह यांहीं युक्त असें लग्न. ४ षण्मृतींदुः—लग्नापासून षष्ठ व अष्टम या स्थानीं चंद्र. ५ सितोरौ—लग्नापासून षष्ठस्थानीं शुक्र. ६ संक्रांतिः—सूर्याचे राश्यंतरगमनाचा दिवस. ७ गंडदोषः—तीन प्रकारचा गंडांत ( लग्नगंडांत, तिथिगंडांत नक्षत्रगंडांत ) दोष. ८ सखलभ—पापग्रहयुक्त नक्षत्र. ९ दिनज—वारापासून उत्पन्न झालेले कुलिक, अर्धयामादिक दोष. १० चक्रचक्रार्धपातौ—वैधृतिव्यतीपात संज्ञक चंद्रसूर्याचें क्रांतिसाम्यलक्षण. ११ रंध्रलग्नं—जन्मराशि व जन्मलग्न यांपासून अष्टम लग्न. १२ कुवर्ग—षट्वर्गामध्यें पापग्रहवर्ग अधिक असणें. १३ अस्तगखल—लग्नापासून सप्तमस्थानीं पापग्रह. १४ उदयास्ताशुचि—ह्मणजे लग्न व अंश स्वस्वपतींनीं युक्त अथवा दृष्ट असणें ही उदयशुद्धि होय, व लग्नांशापासून सप्तम लग्न व अंश स्वस्वपतींनीं युक्त किंवा दृष्ट असणें ही अस्तशुद्धि होय, याप्रमाणें उदयशुद्धि व अस्तशुद्धि नसणें ती. १५ क्रूरवेध—पापग्रहानें विद्ध नक्षत्र असणें. १६ कर्तरीदोष ह्मणजे चंद्रापासून अथवा लग्नापासून २।१२ या दोहों स्थानीं पापग्रह असणें तो. १७ एकार्गलांघ्रिः—विष्कंभ, अतिगंड, व्याघात, वज्र, व्यतीपात, परिघ, वैधृति, शूल, गंड, हे नऊ दुष्टयोग असतां दिवस नक्षत्रापासून अभिजित्सहित मोजून विषमनक्षत्रीं सूर्य नसेल तर एकार्गल्योग होतो. या एकार्गलानें विद्ध नक्षत्रचरण. १८ ग्रहणभ—ज्या नक्षत्रीं ग्रहण झालें असेल तें नक्षत्र. १९ कुलव—अनुक्तनवांश. २० दुःक्षण—दु-

मुहूर्त. ते असे—शुक्रवारीं ९ वा मुहूर्त, सोमवारीं नववा, गुरुवारीं १२ वा, शनिवारीं १ ला हे दिवसास; व भौमवारीं ७ वा रात्रीस; हे दुर्मुहूर्त होत. २१ उत्पातभ—ज्या नक्षत्रीं भूकंप इत्यादिक उत्पात झाला असेल तें नक्षत्र. याप्रमाणें हे एकवीस महादोष सांगितले. यांतून एकहि दोष विवाहाविषयीं नसावा.

---

अथसंकटेगोधूलं गोधूलंपदजातकेशुभकरंपंचांगशुद्धौरवेरर्धास्तात्परपूर्वतोर्धघटिकंतत्रेंदुमष्टारिगं सोग्रांगंकुजमष्टमंगुरुयमाह:पातमर्कक्रमंजह्याद्विप्रमुखेतिसंकटइदंसद्यौवनाढ्येक्वचित् ॥

## आतां संकटविषयीं गोधूल ( गोरज ) मुहूर्त सांगतों.

सायंकालीं सूर्याचे अर्धास्तापूर्वी १५ पळें व पुढें १५ पळें मिळून जी अर्धघटिका तिला गोधूल ( गोरज ) लग्न असें ह्मणतात. विवाहाला उक्त जी पंचांगशुद्धि ती असेल तर हा गोरज मुहूर्त शूद्रजातीस विवाहाविषयीं शुभ होय. सहावा व आठवा चंद्र, पापग्रहयुक्त लग्न, आठवा मंगळ, गुरु व शनि हे वार, महापात ( सिद्धांतशिरोमणींत सांगितलेला ), सूर्यसंक्रांति ज्या दिवशीं झाली तो दिवस, हे दोष गोधूलमुहूर्तीं वर्ज्य करावे. इतर दोष त्याज्य नाहींत. ब्राह्मणादिकांनीं संकटसमयीं, अथवा कन्या तारुण्ययुक्त झाली असेल तर गोधूलमुहूर्त विवाहाविषयीं घ्यावा असें क्वचित् ग्रंथांत सांगितलें आहे.

---

यथोक्तचंद्रताराद्यभावेदानानि चंद्रेचशंखंलवणंचतारेतिथौविरुद्धेत्वथतंडुलांश्च धान्यंचदद्यात्करणेचवारेयोगेविरुद्धेकनकंचदेयं ॥

चंद्र, तारा इत्यादिक जसीं असावीं तसीं नसतील तर त्याविषयीं दानें सांगतों.— चंद्र अशुभ असल्यास शंखदान करावें. तारा अनिष्ट असल्यास लवणदान करावें. अनिष्ट तिथि असेल तर तांदुळांचें दान करावें. कल्याणी असेल तर धान्यदान, व्यतीपातादिक दुष्ट योग व दुष्ट वार असतां सुवर्णदान याप्रमाणें दानें करावीं.

---

षड्वर्गशुद्ध्यादिविचार: कालसाधनादिप्रकार: कुलिकादिस्वरूपाणिचज्योतिर्ग्रंथेभ्योज्ञातव्यानि विस्तरभयान्नेहोच्यंते इतिमुहूर्तविचारसंक्षेप: मंडपनिर्माणाद्यंगजातमंगिनोविवाहादेरुक्तनक्षत्रादौकार्यं कंडनदलनयवारकमंडपमृद्वेदिवर्णकाद्यखिलं तत्संबंधिगतागतमृक्षे वैवाहिकेकुर्यादित्युक्ते: यवारकंचिकसाइतिभाषायां एवंहरिद्रादिषुअंगेषुचंद्रबलंनापेक्ष्यं विवाहांगंविवाहात्प्राक्तृतीयषष्ठनवमदिनेषुनकार्यं तत्रमंडप: षोडशद्वादशदशाष्टान्यतमसंख्यहस्तश्चतुर्द्वार:कार्य: मंडपेचतुर्वरकरांपंचवधूकरांवावेदींचतुरस्रांसोपानयुतांप्राक्प्रवणांरंभास्तंभादिभि:सर्वत:सुशोभितांगृहनिर्गमाद्वामभागेकुर्यात् ॥

गृह, होरा, द्रेष्काण, नवमांश, द्वादशांश आणि त्रिंशांश हे जे षट्वर्ग यांची शुद्धि इत्यादिक पाहावी कसी त्याचा निर्णय, व लग्नवेलासाधन इत्यादिक प्रकार आणि कुलिकादिकांचीं स्वरूपें हीं सर्व, ज्योतिष ग्रंथांतून पाहावीं, ग्रंथविस्तार होईल याकरितां तीं एथें सांगितलीं नाहींत. याप्रमाणें मुहूर्ताचा विचार संक्षेपानें सांगितला. विवाहाचीं अंगभूत असीं मंडप घालणें इत्यादिक

कार्यें करावयाचीं तीं अंगीभूत विवाहादिकांला उक्त जीं नक्षत्रें, तिथि इत्यादिक सांगितलीं त्यांवर करावीं. कारण, " कांडण, दळण, यवारक, मंडप घालणें, मृत्तिकेची वेदी घालणें, घर व भिंती यांला रंग देणें इत्यादिक संपूर्ण, विवाहाचे पूर्वींचीं व पुढचीं अंगभूत कार्यें करणें तीं विवाहनक्षत्रीं करावीं असें वचन आहे." 'यवारक' ह्मणजे प्राकृतामध्यें ज्याला 'चिकसा' असें ह्मणतात तो. याप्रमाणें हळद लावणें, उडदामुहूर्त इत्यादिक अंगभूत कार्यें करण्याला चंद्रबलाची गरज नाहीं. विवाहाचीं अंगभूत कार्यें करावयाचीं तीं विवाहाच्या पूर्वीं तिसरा, सहावा व नववा या दिवसीं करूं नयेत. विवाहाचा मंडप करावयाचा तो सोळा हात, बारा हात, दाहा हात, अथवा आठ हात यांतून कोणत्या एका संख्येचा, चार दरवाजांनीं युक्त असा करावा. आणि त्या मंडपामध्यें वराच्या हातांनीं चार हात, अथवा कन्येच्या हातांनीं पांच हात, लांबीनें व रुंदीनें सारखी, पायऱ्यांनीं युक्त, पूर्वेच्या बाजूस उतरती, व कदलीचे खांब इत्यादिकांनीं सर्वत्र सुशोभित असी वेदी ( बहुलें ) घरांतून जो बाहेर जाण्याचा दरवाजा त्याच्या डाव्या बाजूस करावी.

---

अथकन्यायाजन्मकालीनग्रहादियोगसूचितवैधव्यपरिहारोपायःतत्रमूर्तिदानं कन्यादेशकालौसंकीर्त्य वैधव्यहरंश्रीविष्णुप्रतिमादानंकरिष्यइतिसंकल्प्यपलतदर्धतदर्धान्यतमप्रमाणहेमनिर्मितांविष्णुप्रतिमांचतुर्भुजां सायुधांवृतेनाचार्येणाग्न्युत्तारणादिपूर्वकंषोडशोपचारैः पूजयेत् वस्त्रार्पणकालेपीतवस्त्रेपुष्पार्पणकालेकुमुदोत्पलमालांचदद्यात् पूजांतेकन्यादेवंप्रणम्यमंत्रेणदद्यात् यन्मयाप्रांचिजनुषिघ्नंत्यापतिसमागमं विषोपविषशस्त्राद्यैर्हतोवापिविरक्तया प्राप्यमाणंमहाघोरंयशःसौख्यधनापहं वैधव्याद्यतिदुःखौघंतन्नाशयसुखाप्तये बहुसौभाग्यवृद्ध्यैचमहाविष्णोरिमांतनुं सौवर्णींनिर्मितांशक्त्यातुभ्यंसंप्रददेद्विजेतिततोयथाशक्तिहेमदक्षिणांदत्वा अनघाद्याहमस्मीतित्रिर्वदेत् एवमस्त्वितिविप्रोपित्रिः ततोविप्रभोजनं ॥

आतां यानंतर कन्येला जन्मकालीं ग्रहादिकांच्या योगेंकरून सूचित जें वैधव्य त्याच्या परिहाराचा उपाय सांगतोः—त्याविषयीं मूर्तीचें दान करावें. तें असें—कन्येनें देशकालांचा उच्चार करून " वैधव्यहरं श्रीविष्णुप्रतिमादानं करिष्ये " असा संकल्प करून एक पळ ( ४० मासे ) किंवा अर्ध पळ, पाव पळ यांतून कोणत्या एका मानानें सुवर्णाची केलेली, सायुध, चतुर्भुज असी विष्णुमूर्ति तिची अग्न्युत्तारणपूर्वक षोडशोपचार पूजा, पूर्वीं वरलेल्या आचार्याकडून करवावी. पूजेमध्यें ज्या वेळीं वस्त्र अर्पण करावयाचें त्या वेळीं २ पिंवळीं वस्त्रें, व पुष्पें अर्पण करावयाचीं त्या वेळीं कुमुदें व कमळें यांची माळा हीं अर्पण करावीं. याप्रमाणें पूजा झाल्यानंतर कन्येनें मूर्तीला नमस्कार करून मंत्रेंकरून त्या मूर्तीचें दान करावें. दानाचा मंत्र—" यन्मया प्रांचि जनुषि घ्नंत्या पतिसमागमं ॥ विषोपविषशस्त्राद्यैर्हतो वापि विरक्तया ॥ प्राप्यमाणं महाघोरं यशःसौख्यधनापहं ॥ वैधव्याद्यतिदुःखौघं तन्नाशयसुखाप्तये ॥ बहुसौभाग्यवृद्ध्यै च महाविष्णोरिमां तनुं ॥ सौवर्णीं निर्मितां शक्त्या तुभ्यं संप्रददे द्विज" याप्रमाणें मंत्र म्हणून दान करावें. नंतर यथाशक्ति सुवर्णदक्षिणा देऊन " अनघाद्याहमस्मि " असें कन्येनें तीन वेळ ह्मणावें. " एवमस्तु " असें ब्राह्मणानेंहि तीन वेळ म्हणावें. नंतर ब्राह्मणभोजन घालावें.

---

**अथवैधव्यहरःकुंभविवाहः विवाहकर्तापित्रादिःकन्यावैधव्यहरंकुंभविवाहंकरिष्यइति** संकल्प्य नांदीश्राद्धांतंकृत्वामहीद्यौरित्यादिनाकुंभस्थापनांतेतत्रवरुणप्रतिमायांवरुणंसंपूज्य तत्रकलशमध्येविष्णुप्रतिमायांविष्णुंषोडशोपचारैःसंपूज्यप्रार्थयेत् वरुणांगस्वरूपायजीवना नांसमाश्रय पतिंजीवयकन्यायाश्चिरंपुत्रसुखंकुरु देहिविष्णोवरंदेवकन्यांपालयदुःखतइति त तोविष्णुरूपिणेकुंभायेमांकन्यांश्रीरूपिणींसमर्पयामीतिसमर्प्य परित्वेत्यादिमंत्रैरधस्तादुपरिच **कुंभंकन्यांच मंत्रावृत्त्यापरिवेष्ट्य ततः कुंभंनिःसार्य जलाशयेप्रभज्यशुद्धजलेनसमुद्रज्येष्ठे त्यादिमंत्रैः पंचपल्लवैःकन्यामभिषिच्यविप्रान्भोजयेदिति इतिकुंभविवाहः ॥**

## आतां वैधव्यदोष दूर करणारा कुंभविवाह सांगतों.

कन्येचा विवाह करणारा पित्रादिक यानें, " **कन्यावैधव्यहरं कुंभविवाहं करिष्ये,** " असा संकल्प करून नांदीश्राद्धापर्यंत कर्म करून " **महीद्यौः०** " इत्यादिक विधीनें कुंभ-स्थापन केल्यानंतर त्या कुंभावर वरुणाच्या प्रतिमेचे ठायीं वरुणाची पूजा करून त्या कल-शाच्या मध्यभागीं विष्णूची प्रतिमा स्थापून त्या प्रतिमेवर विष्णूची षोडशोपचारांनीं पूजा करून प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र—" **वरुणांगस्वरूपाय जीवनानां समाश्रय ॥ पतिं जीव-य कन्यायाश्चिरं पुत्रसुखं कुरु ॥ देहि विष्णो वरं देव कन्यां पालय दुःखतः,** " याप्र-माणें प्रार्थना केल्यानंतर, " **विष्णुरूपिणे कुंभायेमां कन्यां श्रीरूपिणीं समर्पयामि** " असें वाक्य ह्मणून कन्या कुंभाला देऊन " **परित्वा०** " इत्यादिक मंत्रांनीं खालीं व वर कुंभ आणि कन्या यांला मंत्राच्या आवृत्तीनें सूत्राचें वेष्टन करावें. तदनंतर कुंभ एकीकडे करून तो जलाशयांत नेऊन टाकावा. नंतर शुद्धोदकानें "**समुद्रज्येष्ठा०**" इत्यादिक मंत्रांनीं पंचपल्लवांहीं-करून कन्येवर अभिषेक करून ब्राह्मणांला भोजन घालावें. याप्रमाणें कुंभविवाह सांगितला.

---

अथवरस्यमृतभार्यात्वपरिहारोपायः तत्रपरिवेत्तृत्वपापात्मृतभार्यात्वंतत्पापपरिहारायप्रा जापत्यत्रयंचांद्रायणत्रयंकृत्वाअसकृन्मृतभार्यात्वयोगेतदुभयत्रयमावृत्त्याकृत्वा मृतभार्यात्वनि **रासद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंअयुतसंख्यचर्वाज्यहोमंकरिष्यइति संकल्प्याग्निस्थापनांतेऽन्वा** धानं दुर्गाग्निविष्णून्अष्टाधिकायुतसंख्याभिश्चर्वाज्याहुतिभिः शेषेणस्विष्टकृत**मित्यादि प्रति** दैवतंतूष्णींनिरूप्यप्रोक्ष्यचत्यागकालेअष्टोत्तरायुतसंख्याहुतिपर्याप्तंचर्वाज्यद्रव्यं **यथामंत्रलिंगं** दुर्गायैअग्नयेविष्णवेचनममेतित्यजेत् जातवेदसेइत्यनुवाकस्यउपनिषदृषयः **दुर्गाग्निविष्ण वोदेवताः त्रिष्टुप्छंदः चर्वाज्यहोमेविनियोगः अनुवाकानुवृत्त्याप्रत्यृचंहोमः तत्रप्रथमंचतु रधिकपंचसहस्रसंख्यश्चरुहोमस्ततश्चतुरधिकपंचसहस्राज्यहोमइत्येवमयुतहोमः होमशेषंस माप्यदशविप्रान्भोजयेदिति अथवाकस्यचिद्ब्राह्मणस्यविवाहंकुर्यात् ॥**

यानंतर वराला मृतभार्यात्वदोष असेल तर त्याच्या परिहाराचा उपाय सांगतोंः— परिवेत्तृत्वपापानें मृतभार्यात्वदोष प्राप्त होतो यास्तव त्या दोषाचा परिहार होण्याकरितां तीन प्राजापत्यें व तीन चांद्रायणें करावीं. वारंवार मृतभार्यात्वयोग असेल तर तीन प्राजापत्यें व तीन चांद्रायणें आवृत्तीनें करून, " **मृतभार्यात्वनिरासद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं अयुतसं-**

**स्यचर्वाज्यहोमं करिष्ये** ” असा संकल्प करून अग्निस्थापनपर्यंत कर्म केल्यानंतर अन्वाधान करावें. **तें असें,**–“ **दुर्गाग्निविष्णून् अष्टाधिकायुतसंख्याभिश्चर्वाज्याहुतिभिः शेषेण स्विष्टकृतमित्यादि,** ” असें अन्वाधान करून प्रत्येक देवतेस मंत्रविरहित चारवेळ निर्वाप करून ह्मणजे चरु शिजविण्याकरितां स्थालींत चारवेळ तांदूळ घेऊन ते धुवावे. नंतर त्यागकालीं “ **अष्टोत्तरायुतसंख्याहुतिपर्याप्तं चर्वाज्यद्रव्यं यथामंत्रलिंगं दुर्गायै अग्नये विष्णवे च नमम** ” असा त्याग करावा. नंतर होम करावा. तो असा–“ **जातवेदसे इत्यनुवाकस्य उपनिषदृषयः ॥ दुर्गाग्निविष्णवो देवताः ॥ त्रिष्टुप् छंदः ॥ चर्वाज्यहोमे विनियोगः** ” ॥ पुनःपुनः तोच तोच अनुवाक ह्मणून तेणेंकरून प्रत्येक ऋचेनें होम करावा. त्यामध्यें प्रथम ५,००४ चरु होम करून नंतर ५,००४ आज्यहोम करावा. याप्रमाणें दहासहस्र होम करावा. नंतर होमशेष समाप्त करून ब्राह्मणांला भोजन घालावें. अथवा कोणाएका ब्राह्मणाचा विवाह करावा.

---

**अथमृतपुत्रत्वदोषेब्राह्मणोद्वाहनंहरिवंशश्रवणंमहारुद्रजपश्चेति त्रीणिव्यस्तानिसमस्तानि वाशक्त्यपेक्षयाकुर्यात् रुद्रजपेदशांशेनाज्याक्तदूर्वाहोमः हरिवंशश्रवणविधिरन्येपिविधयो विस्तरेणप्रागुक्ताः ॥**

यानंतर मृतपुत्रत्वदोष असेल तर त्याचा परिहार–पुत्र होऊन मृत होतात तो मृतपुत्रत्व दोष, तसा दोष असतां ब्राह्मणाचा विवाह, हरिवंशग्रंथाचें श्रवण व महारुद्राचा जप असे हे तीन उपाय सांगितले आहेत. यांतून एक, दोन किंवा शक्ति असल्यास तीनहि करावे. रुद्राचा जप केला असेल तर जपाच्या दशांशेंकरून, आज्यामध्यें भिजवलेल्या दूर्वांचा होम करावा. हरिवंशाचे श्रवणाचा विधि व दुसरेहि आणखी विधि विस्तारपूर्वक पूर्वी सांगितले आहेत.

---

**यथाशक्तिभूषणालंकृतकन्याप्रदाताश्वमेधयाजीभयेषुप्राणदाताचेतित्रयः समपुण्याः श्रुत्वाकन्याप्रदातारंपितरःसपितामहाः विमुक्ताःसर्वपापेभ्योब्रह्मलोकंव्रजंतिते इतिकन्यादानप्रशंसा॥**

यथाशक्ति अलंकारांनीं कन्या अलंकृत करून त्या कन्येचें दान करणारा, अश्वमेधयज्ञ करणारा, आणि प्राणांतभयकालीं दुसऱ्याचे प्राण रक्षण करणारा हे तीन समपुण्य होत. “ पितामहासह सर्व पितर, कन्यादान करणारा यातें श्रवण करून सकल पातकांपासून मुक्त होत्साते ब्रह्मलोकाप्रत जातात. ” याप्रमाणें कन्यादानप्रशंसा जाणावी.

---

**विष्णुंजामातरंमत्वातस्यकोपंनकारयेत् अप्रजायांतुकन्यायांनाश्नीयात्तस्यवैगृहे इतिकन्यागृहेपित्रोर्भोजननिषेधः· विवाहमध्येस्त्रियासहभोजनेपिनदोषः अन्यदापत्न्यासहभोजने चांद्रायणप्रायश्चित्तं ॥**

“जामाता हा विष्णु आहे असें मानून त्याच्यावर कोप करूं नये. ” कन्या अप्रजा आहे तावत्कालपर्यंत जांवयाच्या घरीं कन्येच्या पित्यानें, व मातेनें भोजन करूं नये. ” याप्रमाणें मातापितरांस कन्यागृहीं भोजनाचा निषेध सांगितला. विवाहामध्यें स्त्रियेसहवर्तमान भोजन

केलें असतांहि दोष नाहीं. विवाहाखेरीज अन्यकालीं स्त्रियेसहवर्तमान भोजन केलें असतां चांद्रायण प्रायश्चित्त करावें.

---

अथवाग्दानादिविचारः विवाहनक्षत्रादियुतेसुदिनेवरस्यपित्रादिः कन्यागृहंगत्वाकन्यापूजनंकरिष्ये तदंगत्वेनगणपतिपूजनंवरुणपूजनंचकरिष्यइतिसंकल्पयेत् कन्यापितातुकरिष्यमाणकन्यादानांगभूतंवाग्दानंकरिष्ये तदंगगणपतिपूजनंवरुणपूजनंचकरिष्ये इतिसंकल्पयेत् अवशिष्टप्रयोगोन्यत्रज्ञेयः ॥

## आतां वाग्दान इत्यादिकांचा निर्णय सांगतों.

विवाहनक्षत्रादिकानें युक्त अशा शुभ दिवसीं वराचा पिता इत्यादिकानें कन्येच्या गृहाप्रत जाऊन, "कन्यापूजनं करिष्ये, तदंगत्वेन गणपतिपूजनं वरुणपूजनं च करिष्ये," असा संकल्प करावा. कन्येच्या पित्यानें तर, "करिष्यमाणकन्यादानांगभूतं वाग्दानं करिष्ये, तदंगगणपतिपूजनं वरुणपूजनं च करिष्ये," असा संकल्प करावा, व अवशिष्ट प्रयोग दुसऱ्या ग्रंथीं पाहावा.

---

अथ विवाहदिनेतत्पूर्वदिनेवावध्वाहरिद्रातैलादिनामंगलस्नानंकारयित्वातच्छेषहरिद्रादिनावरस्यमंगलस्नानंकारणीयमित्याचारः ॥

यानंतर विवाहदिवसीं किंवा विवाहाच्या पूर्व दिवसीं कन्येच्या अंगाला हळद, तेल, इत्यादिक लावून तिला मंगलस्नान करवून कन्येची शेष राहिलेली हळद इत्यादिक तेणेंकरून वराला मंगलस्नान करवावें असा आचार आहे त्याप्रमाणें करावें.

---

एवंवरस्यपित्रादिः पत्न्यासंस्कार्येणचसहकृताभ्यंगस्नानोऽहतवासाःप्राङ्मुखउपविश्यस्वदक्षिणेपत्नींतद्दक्षिणेसंस्कार्यमुपवेश्यदेशकालौसंकीर्त्य ममास्यपुत्रस्यदैवपित्र्यऋणापाकरणहेतुधर्मप्रजोत्पादनसिद्धिद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंविवाहाख्यंसंस्कारकर्मकरिष्ये तदंगत्वेन स्वस्तिवाचनंमातृकापूजनंनांदीश्राद्धंनंदिन्यादिमंडपदेवतास्थापनंचकरिष्ये तदादौनिर्विघ्नतासिद्ध्यर्थंगणपतिपूजांकरिष्ये इतिपुत्रविवाहेसंकल्पः कन्याविवाहेतुजातकर्मादिलोपे ममास्याःकन्यायाः जातकर्मनामकर्मसूर्यावलोकननिष्क्रमणोपवेशनान्नप्राशनचौलसंस्काराणांबुद्धिपूर्वकलोपजन्यप्रत्यवायपरिहारार्थंप्रतिसंस्कारमर्धकृच्छ्रंचूडायाः कृच्छ्रंतत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतदानेनाहमाचरिष्ये गर्भाधानसीमंतयोर्लोपेतयोरप्यूहः ततोममास्याः कन्यायाः भर्त्रासहधर्मप्रजोत्पादनद्रव्यपरिग्रहधर्माचरणेष्वधिकारसिद्धिद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंविवाहाख्यंसंस्कारंकरिष्यइतिविशेषः शेषंपूर्ववत् भ्राताममभ्रातुरितिभगिन्याइतिवा पितृव्यादिःकर्ताममभ्रातृसुतस्यभ्रातृकन्यायाइतिवासंकल्पोहंकुर्यात् वरवध्वोःस्वयंकर्तृत्वे ममदैवपित्र्यऋणेत्यादिममभर्त्रासहेत्यादिचसंकल्पः केचित्स्वस्तिवाचनकालेकन्यादानादिकालेवा प्रधानविवाहसंस्कारसंकल्पंनकुर्वंतिसप्रमादइतिबहवः अन्येतुकन्यादानविवाहहोमादिसंकल्पएवप्रधानसंकल्पस्तदतिरिक्तविवाहपदार्थाभावादित्याहुः मातृकापूजांतेमृतपितृमातृमातामहोवरवध्वोः पितास्वपित्राद्युद्देश्यकपार्वणत्रययुतंनांदीश्राद्धंकुर्यादित्यसंदिग्धं मात

र्येवजीवंत्यांतत्पार्वणलोपः मातामहमात्रजीवनेतत्पार्वणमात्रलोपः तथाचोभयत्रपार्वणद्वयेनै वनांदीश्राद्धसिद्धिः मातृमातामहयोर्जीवनेपितृपार्वणेनैवतत्सिद्धिः पितृप्रपितामहमृतौपिताम हजीवनेचपितृप्रपितामहतत्पितॄनुद्दिश्यपितृपार्वणं तथाचपितृप्रपितामहतत्पितरोनांदीमुखा इदंवःपाद्यमित्यादिप्रयोगः प्रपितामहमातृजीवनेपितृपितामहतत्पितामहाइत्युद्देशः पितृमृतौ पितामहप्रपितामहजीवनेपितुः पितामहस्यपितामहप्रपितामहौचनांदीमुखाइत्युच्चारः एवंमा तृमरणेपितामहीमात्रजीवनेमातःपितुः पितामहीप्रपितामह्यौचनांदीमुखाइत्युच्चारः प्रपिताम हीमात्रजीवनेमातृपितामह्यौपितुः प्रपितामहिचनांदीमुखाइत्युच्चारः पितामहीप्रपितामह्योर्जी वनेमातः पितामहस्यपितामहीप्रपितामह्यौचेत्युच्चारः मुख्यमातृजीवनेसपत्नमातृमरणेपिनमा तृपार्वणं एवंमुख्यपितामहीजीवनेपितामह्याः सपत्नीमृतावपितयासहनमातृपार्वणं किंतुपू र्वोक्तएवोच्चारःएवंप्रपितामहीसपत्नीविषयेपि एवंमुख्यमातामहीजीवनेतत्सपत्न्यादिमरणे पिनमातामहादीनांसपत्नीकत्वेनोच्चारःकिंतुकेवलानामेव दर्शादौमातृजीवनेसापत्नमातुर्मृतौ केवलानामेवपित्रादीनामुद्देशइतिसिद्धांतात् ॥

याप्रमाणें वराचा पिता इत्यादिक याणें पत्नी व संस्कार्य यांसहवर्तमान केलें आहे अभ्यं-गस्नान ज्यानें असा होत्साता व नूतन वस्त्र परिधान केलेला, पूर्वाभिमुख बसून आपल्या उजव्या बाजूस स्त्री, व स्त्रियेच्या उजव्या बाजूस संस्कार्य, असीं बसवून देशकालांचा उच्चार करून "**ममास्य पुत्रस्य दैवपित्र्यऋणापाकरणहेतुधर्मप्रजोत्पादनसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वर-प्रीत्यर्थं विवाहाख्यं संस्कारकर्म करिष्ये ॥ तदंगत्वेन स्वस्तिवाचनं मातृकापूजनं नांदी-श्राद्धं नंदिन्यादिमंडपदेवतास्थापनं च करिष्ये ॥ तदादौ निर्विघ्नतासिद्ध्यर्थं गणपतिपूजां करिष्ये,**" याप्रमाणें पुत्राच्या विवाहाचा संकल्प करावा. कन्येच्या विवाहाविषयीं तर जात-कर्मादि संस्कारांचा लोप असतां, "**ममास्याः कन्यायाः जातकर्मनामकर्मसूर्यावलो-कननिष्क्रमणोपवेशनान्नप्राशनचौलसंस्काराणां बुद्धिपूर्वकलोपजन्यप्रत्यवायपरिहारार्थं प्र-तिसंस्कारमर्धकृच्छ्रं चूडायाः कृच्छ्रं तत्प्रत्याम्नायगोनिष्क्रयीभूतयथाशक्तिरजतदाने नाहमाचरिष्ये.**" गर्भाधान व सीमंतोन्नयन यांचा लोप झालेला असेल तर त्यां-चाहि ऊह संकल्पांत करावा. नंतर, "**ममास्याः कन्यायाः भर्त्रासह धर्मप्रजोत्पादनद्र-व्यपरिग्रहधर्माचरणेष्वधिकारसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं विवाहाख्यं संस्कारं करिष्ये**" याप्रमाणें संकल्पांत विशेष जाणावा. अवशेष सर्व प्रयोग पूर्वीप्रमाणें करावा. भ्राता कर्ता असेल तर त्यानें '**मम भ्रातुः**' असा किंवा '**मम भगिन्याः**' असा, अथवा चुलता इत्या-दिक कर्ता असेल तर त्यानें '**मम भ्रातृसुतस्य**' किंवा '**भ्रातृकन्यायाः**' असा संकल्पांत ऊह करावा. वर व कन्या हीं स्वतां विवाह करणारीं असतील तर, वरानें "**मम दैवपि-त्र्यऋणे इत्यादिक**" व कन्येनें "**मम भर्त्रासहेत्यादिक**" संकल्प करावा. कोणी ग्रंथ-कार, प्रधान जो विवाहसंस्कार त्याचा संकल्प पुण्याहवाचनाच्या समयीं किंवा कन्यादान इत्यादिकसमयीं करीत नाहींत परंतु हा त्यांचा प्रमाद होय असें बहुत ह्मणतात. दुसरे तर, कन्यादान, विवाहहोम इत्यादिकांचा जो संकल्प तोच प्रधानसंकल्प होय; कारण, क-न्यादान, विवाहहोम यांवांचून अन्य कर्मास '**विवाह**' असी संज्ञा नाहीं असें ह्मणतात. मा-

तृकापूजन झाल्यानंतर नांदीश्राद्ध करावयाचें तें ज्याचे माता, पिता व मातामह हे मृत असतील असा जो वरपिता किंवा कन्यापिता त्यानें, आपला पिता इत्यादिकांच्या उद्देशेंकरून तीन पार्वणांनीं युक्त असें करावें, हें निःसंशय होय. माताच जिवंत असेल तर मातृपार्वणाचा लोप करावा. केवळ मातामह मात्र जिवंत असेल तर त्याच्या पार्वणाचा लोप करावा, ह्मणजे दोहोंकडे दोन दोन पार्वणांनींच नांदीश्राद्धाची सिद्धि होते. माता व मातामह हे दोन जिवंत असतील तर केवळ पितृपार्वण केल्यानेंच नांदीश्राद्धाची सिद्धि होते. पिता, व प्रपितामह ( पणजा ) हे मृत असून पितामह जिवंत असेल तर पिता, प्रपितामह व प्रपितामहाचा पिता यांच्या उद्देशेंकरून पितृपार्वण करावें, ह्मणजे " **पितृप्रपितामहतत्पितरो नांदीमुखा इदं वः पाद्यं** " इत्यादिक प्रयोग करावा. प्रपितामह जिवंत असेल तर " **पितृपितामहतत्पितामहाः**" असा प्रयोग करावा. पिता मृत असून पितामह, प्रपितामह हे जिवंत असतील तर "**पितुः प्रपितामहस्य पितामहप्रपितामहौ च नांदीमुखाः**" असा उच्चार करावा. याप्रमाणें माता मृत असून पितामही मात्र जिवंत असेल तर, "**मातः पितुः पितामहीप्रपितामह्यौ च नांदीमुखाः**" असा उच्चार करावा. प्रपितामही मात्र जिवंत असेल तर, " **मातृपितामह्यौ पितुः प्रपितामहि च नांदीमुखाः**" असा उच्चार करावा. पितामही व प्रपितामही जिवंत असतील तर " **मातः पितामहस्यपितामहीप्रपितामह्यौ च नांदीमुखाः**" असा उच्चार करावा. मुख्य माता जिवंत असून सापत्न माता मृत झाली असेल तथापि मातृपार्वण करूं नये. याप्रमाणें मुख्य पितामही जिवंत असून पितामहीची सवत मृत असेल तथापि पितामहीच्या सवतीसहवर्तमान मातृपार्वण करूं नये, तर पूर्वीं सांगितलेलाच उच्चार करावा. याप्रमाणें प्रपितामहीची सवत मृत असेल तर तीविषयींहि असाच निर्णय जाणावा. याप्रमाणें मुख्य मातामही जिवंत असून तिची सवत इत्यादिक मृत असेल तथापि मातामहादिकांचा उच्चार '**सपत्नीक**' असा करूं नये, तर केवल मातामहादिकांचाच उच्चार करावा; कारण दर्शादिक श्राद्धांविषयीं माता जिवंत असून सापत्न माता मृत असेल तर पिता इत्यादिकांचाच केवळ उच्चार करावा, असा सिद्धांत आहे.

---

**अथमातामहमृतौमातुःपितामहजीवनेमातामहतत्पितामहप्रपितामहाइत्युच्चारः मातुः प्रपितामहमात्रजीवनेमातामहमातृपितामहौमातामहस्यप्रपितामहश्चनांदीमुखाइत्युच्चारः द्वयोर्जीवनेमातामहमातुःपितामहस्यपितामहप्रपितामहौचनांदीमुखाइत्युच्चारः ॥**

यानंतर मातामह ( मातेचा बाप ) मृत असून मातेचा पितामह जिवंत असेल तर, " **मातामहतत्पितामहप्रपितामहाः**" असा उच्चार करावा. मातेचा पणजा मात्र जिवंत असेल तर, "**मातामहमातृपितामहौ मातामहस्य प्रपितामहश्च नांदीमुखाः**" असा उच्चार करावा. मातेचा आजा व पणजा हे जिवंत असतील तर, "**मातामह मातुःपितामहस्य पितामहप्रपितामहौ च नांदीमुखाः**" असा उच्चार करावा.

---

**अथजीवत्पितृकोमृतमातृमातामहश्चविवाहोपनयनजातकर्मादिषुपुत्रसंस्कारेषुमातृमातामहपार्वणद्वयमेवकुर्यात् मातर्यपिजीवत्यांमातामहपार्वणमेव मातामहजीवनेमातृमरणेजीवत्पितृकः सुतसंस्कारेमातृपार्वणमेवदेवरहितंकुर्यात् त्रिष्वपिजीवत्सुसुतसंस्कारेपितुःपित्रा**

**दीनुद्दिश्यपार्वणत्रयंकुर्यात् त्रिष्वपिजीवत्सु सुतसंस्कारे नांदीश्राद्धलोपएवेतिपक्षांतरंग्रंथारंभेउक्तं ॥**

यानंतर पिता जिवंत असून माता व मातामह हे ज्याचे मृत आहेत असा जो त्यानें विवाह, मौंजी, जातकर्म इत्यादिक पुत्राच्या संस्कारीं नांदीश्राद्धांत मातृपार्वण व मातामह-पार्वण हीं दोनच पार्वणें करावीं. माताच जीवंत असतां मातामहपार्वणच घ्यावें. जीव-त्पितृकानें, माता मृत असून मातामह जिवंत असेल तर सुतसंस्कारीं मातृपार्वणयुक्तच, देव-रहित नांदीश्राद्ध करावें. माता, पिता व मातामह हे तीनहि जिवंत असून सुतसंस्कार असेल तर पित्याचे जे पिता इत्यादिक त्यांच्या उद्देशानें तीन पार्वणें करून नांदीश्राद्ध करावें. पिता, माता व मातामह जीवंत असतील तर सुतसंस्कारीं नांदीश्राद्धाचा लोपच करावा असा दुसरा पक्ष ह्या ग्रंथाच्या तृतीय परिच्छेदांत आरंभीं सांगितला आहे.

---

**द्वितीयविवाहसमावर्तनाधानादिषुस्वसंस्कारेषुनांदीश्राद्धंकुर्वन्जीवत्पितृकः पितुःपित्रादीनुद्दिश्यपार्वणत्रयंकुर्यात् पितुर्मातृपितामहीप्रपितामह्यः पितुःपितृपितामहप्रपितामहाः पितुर्मातामहमातुःपितामहमातुःप्रपितामहानांदीमुखाइतितत्रोच्चारः अत्रपितुर्मात्रादिजीवनेतत्पार्वणलोपः मृतपितृकस्तुस्वपित्रादीनुद्दिश्येतिनसंदिग्धं पितृपितामहयोर्जीवनेपितामहस्यमात्रादिपार्वणत्रयोद्देशः त्रयाणांजीवनेपिपार्वणलोपः तत्रसुतसंस्कारइवस्वसंस्कारेमातृमातामहयोःपार्वणाभ्यामेवनांदीश्राद्धसिद्धिः पित्रादित्रयजीवनेमातृमातामहयोश्चजीवनेप्रपितामहस्यपित्रादिपार्वणत्रयोद्देशेननांदीश्राद्धं एवंप्रथमविवाहेपिकर्त्रंतराभावात्वरएवनांदीश्राद्धंकुर्वन्मृतपितृकः स्वपित्रादीनुद्दिश्यजीवत्पितृकस्तुपितुःपित्रादीनुद्दिश्यकुर्यात् जीवत्पितृपितामहस्तुपितामहस्यपित्रादिपार्वणत्रयोद्देशेनप्रपितामहस्यापिजीवने प्रपितामहस्यपित्रादिपार्वणत्रयोद्देशेनवापितृपार्वणलोपेनवानांदीश्राद्धं अत्रसर्वत्रपितुःपितामहादेर्वापित्रादिपार्वणोद्देशपक्षेस्वमातृमातामहयोर्मरणेपिनस्वमातृमातामहयोः पार्वणं किंतुपित्रादेर्मातृमातामहयोरेवेतिज्ञेयं इतिजीवत्पितृकनांदीश्राद्धप्रयोगः ॥**

आपण जीवत्पितृक असून दुसरा विवाह, समावर्तन (सोडमुंज), आधान इत्यादिक आपले संस्कार तन्निमित्तक नांदीश्राद्ध करणें तें आपल्या पित्याचे जे पिता इत्यादिक त्यांच्या उद्देशेंकरून तीन पार्वणांनीं युक्त करावें. त्याचा उच्चार असा,—"**पितुर्मातृपितामहीप्रपितामह्यः ॥ पितुः पितृपितामहप्रपितामहाः ॥ पितुर्मातामहमातुःपितामहमातुःप्रपितामहाः नांदीमुखाः**" याप्रमाणें तेथें उच्चार करावा. पित्याचीं माता इत्यादिक जीवंत असतां ह्या स्थलीं मातृपार्वणाचा लोप करावा. मृतपितृक असतां आपला पिता इत्यादिकांच्या उद्देशें-करून करावें, याविषयीं संशय नाहीं. पिता व पितामह हे दोघे जिवंत असतां पितामहाची माता इत्यादिक जीं तीन पार्वणें त्यांच्या उद्देशेंकरून करावें. तीन जीवंत असतां पार्वणांचा लोप करावा. त्यामध्यें सुतसंस्कारीं मातृपार्वण, व मातामहपार्वण ह्या दोन पार्वणांनीं जसी सिद्धि होते त्याप्रमाणें स्वकीयसंस्कारीं मातृपार्वण व मातामहपार्वण या दोन पार्वणांनींच नांदी-श्राद्धाची सिद्धि होते. पिता इत्यादिक तीन जीवंत असतील व माता, मातामह हे जीवंत

असतील तर प्रपितामहाचीं जीं पिता इत्यादिक तीन पार्वणें त्यांच्या उद्देशेंकरून नांदीश्राद्ध करावें. याप्रमाणें पहिल्या विवाहीं दुसरा कर्ता नसल्यामुळें मृतपितृक असा स्वतां वरच नांदीश्राद्ध करणारा असेल तर त्यानें आपले जे पिता इत्यादिक त्यांच्या उद्देशेंकरून नांदीश्राद्ध करावें. जीवत्पितृक असा वरच नांदीश्राद्धकर्ता असेल तर त्यानें, पित्याचे जे पिता इत्यादिक त्यांच्या उद्देशेंकरून नांदीश्राद्ध करावें. पिता व पितामह हे ज्याचे जिवंत आहेत असा जो वर त्यानें पितामहाचीं जीं पिता इत्यादिक तीन पार्वणें त्यांच्या उद्देशानें नांदीश्राद्ध करावें. प्रपितामह जो तोहि जीवंत असेल तर, प्रपितामहाचीं जीं पिता इत्यादि तीन पार्वणें त्यांच्या उद्देशेंकरून किंवा पितृपार्वणाचा लोप करून नांदीश्राद्ध करावें. एथें सर्व ठिकाणीं पित्याचे पिता इत्यादिक, किंवा पितामहादिकांचे पिता इत्यादिक या पार्वणांचा उद्देश करून नांदीश्राद्ध करणें असा पक्ष असेल तर आपली माता, व मातामह हे जरी मृत झाले असतील तथापि आपल्या मातेचें व मातामहाचें पार्वण घेऊं नये, तर आपल्या पिता इत्यादिकांची जी माता व मातामह तीं पार्वणें घ्यावीं असें जाणावें. याप्रमाणें जीवत्पितृकाचा नांदीश्राद्धप्रयोग सांगितला.

---

यदातुकन्याविवाहंपुत्रस्योपनयनंप्रथमविवाहंच पितृव्यमातुलादिः **करोतितदासंस्कार्यस्य** मृतपितृकत्वेअस्यसंस्कार्यस्यपितृपितामहप्रपितामहाइत्यादिप्रयोगंकुर्यात् **सोदरभ्रातुर्नोच्चारेविशेषः भ्रातुः पित्रादीनांसंस्कार्यपित्रादीनांचैक्यात् सापत्नभ्रातातुसंस्कार्यस्यमातृपितामहीप्रपितामह्यइत्याद्युच्चारयेत् संस्कार्यमात्रजीवनेतत्पार्वणलोपः संस्कार्यस्यजीवत्पितृकत्वेमातुलादिः कर्तासंस्कार्यपितुः मातृपितामहीप्रपितामह्यः संस्कार्यपितुः पितृपितामहप्रपितामहाइ**त्याद्युच्चार्यतत्पितुः पित्रादिपार्वणत्रयंकुर्यात् संस्कार्यस्यपितृपितामहयोर्जीवनेमातुलादिः संस्कार्यपितुर्मात्रादीन्मातामहादींश्चोद्दिश्यपार्वणद्वयंकुर्यात् पितुर्वर्गद्वयाद्यजीवनेएकैकवर्गपार्वणे पितुर्वर्गत्रयाद्यजीवनेमातुलादिः पितामहस्यमात्रादिपार्वणत्रयोद्देशंकुर्यात् पितामहस्यमात्रादिजीवनेतत्पार्वणलोपःपूर्ववत् पितृव्येजीवत्पितृकसंस्कारकर्त्तरिनोच्चारेविशेषः संस्कार्यपितुःपित्रादीनांपितृव्यस्यपित्रादीनांचैक्यात् पितामहस्यसंस्कर्तृत्वेसंस्कार्यपितृमरणेसंस्कार्यस्यपितः ममपितृपितामहौचनांदीमुखाः संस्कार्यस्यमात्रादयोमातामहादयश्चेत्याद्युच्चारः **संस्कार्यपितृजीवनेपितामहः कर्तास्वमातृपितृमातामहपार्वणानिममेतिपदरहितानितत्साहितानिवोच्चारयेत् एवंप्रपितामहेकर्तर्यपियोज्यं ॥**

ज्या समयीं कन्येचा विवाह, पुत्राची मौंजी व प्रथम विवाह हीं करणारा चुलता, मातुळ, इत्यादिक असेल त्या वेळीं संस्कार्य मृतपितृक असेल तर त्या संस्कारकर्त्यानें, “**अस्य संस्कार्यस्य पितृपितामहप्रपितामहाः**” इत्यादिक प्रयोग करावा. सोदरभ्राता संस्कारकर्ता असल्यास त्याला उच्चार करण्याविषयीं विशेष नाहीं; कारण, सोदर भ्रात्याचे पिता इत्यादिक आणि संस्कार्याचे पिता इत्यादिक हे एक आहेत. सापत्न भ्राता संस्कारकर्ता असेल तर त्यानें “**संस्कार्यस्य मातृपितामहीप्रपितामह्यः**” इत्यादिक उच्चार करावा. ज्याचा संस्कार करावयाचा त्याची माता जीवंत असल्यास मातृपार्वणाचा लोप करावा. संस्कार्य

हा जीवत्पितृक असून संस्कारकर्ता मातुळादिक असेल तर त्यानें, "संस्कार्यपितुःमातृ-पितामहीप्रपितामह्यः ॥ संस्कार्यपितुः पितृपितामहप्रपितामहाः" इत्यादिक उच्चार करून संस्कार्याच्या पित्याचीं जीं पिता इत्यादिक तीन पार्वणें तीं घ्यावीं. संस्कार्याचा पिता व पितामह हे जीवंत असतील तर मातुळादिकर्त्यानें संस्कार्याच्या पित्याचीं जीं माता इत्यादिक व मातामहादिक त्यांच्या उद्देशेंकरून दोन पार्वणें करावीं. पित्याचे जे दोन वर्ग ( मातृवर्ग व पितृवर्ग ) त्यांमध्यें प्रत्येक वर्गाचा पहिला ह्मणजे मातृवर्गाची पहिली ह्मणजे माता व पितृवर्गाचा पहिला ह्मणजे पिता व मातामहवर्गाचा पहिला ह्मणजे मातामह, यांतून कोणत्याहि दोन वर्गांचे आद्य हे जीवंत असतील तर एकेक वर्गाचें पार्वण करावें. पित्याचे तीन वर्गांचे पहिले जीवंत असून मातुळ इत्यादिक कर्ता असेल तर पितामहाचीं जीं माता इत्यादिक तीन पार्वणें त्यांचा उद्देश करावा. पितामहाची माता इत्यादिक जीवंत असेल तर त्या मातृपार्वणाचा लोप पूर्वी सांगितल्याप्रमाणें करावा. जीवत्पितृकाचा संस्कारकर्ता चुलता असेल तर पार्वणाच्या उच्चाराविषयीं विशेष नाहीं; कारण, संस्कार्याच्या पित्याचे पिता इत्यादिक व चुलत्याचे पिता इत्यादिक हे एक आहेत. संस्कार्याचा पिता मृत झाल्यामुळें संस्कारकर्ता पितामह असेल तर त्यानें, "संस्कार्यस्य पितः मम पितृपितामहौ च नांदीमुखाः ॥ संस्कार्यस्य मातृपितामहीप्रपितामह्यः ॥ संस्कार्यस्य मातामहमातुःपितामहमातुःप्रपितामहाः" इत्यादिक उच्चार करावा. संस्कार्याचा पिता जिवंत असून संस्कारकर्ता पितामह असेल तर त्यानें आपलीं माता, पिता व पितामह हीं पार्वणें 'मम' ह्या पदानें रहित किंवा तत्सहित असीं उच्चारावीं. याप्रमाणें प्रपितामह कर्ता असतांहि असीच योजना करावी.

---

**दातुमशक्नुवताकन्यादानाधिकारिणात्वंकन्यादानंकुर्वितिप्रार्थितोयः परकीयकन्यांदातुमिच्छतियश्चसुवर्णेनात्मीयांकृत्वाअनाथांज्ञात्वावान्यकन्यांदातुमिच्छतिसोपि संस्कार्यायाः कन्यायाःपित्रादीनुच्चारयेत् तस्याः पितृजीवनेतदीयमात्रादीन्तस्यावर्गत्रयाद्यजीवनेपितुःपित्रादीनितियथासंभवमूह्यं इतिपित्रन्यकर्तृकनांदीश्राद्धप्रयोगः ॥**

कन्यादान करण्याविषयीं असमर्थ असा कन्यादानाचा अधिकारी याणें 'तूं कन्यादान कर' असी प्रार्थना केलेला जो कोणी दुसऱ्याची कन्या देण्याविषयीं इच्छितो त्यानें, व सुवर्ण देऊन दुसऱ्याची कन्या आपली असी करून तिचें दान करणारा यानें, अथवा दुसऱ्याची कन्या, अनाथ असी समजून तिचें दान करण्याविषयीं जो इच्छितो त्यानेंहि संस्कार्य जी कन्या तिच्या पिता इत्यादिकांचा उच्चार करावा. त्या कन्येचा पिता जिवंत असेल तर कन्येचें मातृपार्वण व मातामहपार्वण यांचा उच्चार करावा. त्या कन्येच्या तीन वर्गांचे पहिले पिता, माता व मातामह हे जिवंत असतील तर कन्येच्या पित्याचीं जीं पिता इत्यादि तीन पार्वणें त्यांचा उच्चार करावा. याप्रमाणें जसा संभव असेल तसें करावें. याप्रमाणें पित्याहून अन्यानें नांदीश्राद्ध कर्तव्य असतां त्याचा प्रयोग सांगितला.

---

१ मातृमातामहपार्वणद्वयमेवेत्यर्थः.

**दत्तकन्यायाविवाहंकुर्वन्प्रतिग्रहीतापितास्वपित्रादीनुद्दिश्यैवकुर्यात् दत्तकस्तुपुत्रोयदि अधिकार्यंतराभावाल्लब्धजनकपितृधनस्तदाजनकपित्रादीन् प्रतिग्रहीतृपित्रादींश्चपितरौपि तामहौप्रपितामहौचनांदीमुखाइत्येवमुच्चार्यश्राद्धंकुर्यात् एवंमातृपार्वणेमातामहपार्वणेचद्विव चनप्रयोगऊह्यः यदितुजनकधनग्रहणेधिकार्यंतरसत्त्वादलब्धजनकधनस्तदाप्रतिगृहीतृपि त्रादीनेवोद्दिश्यकुर्यात्नपितृद्वयोद्देशेन अत्रसर्वत्रसंभ्रमेणक्वचित्मातृपार्वणपितृपार्वणयोः क्रमवैपरीत्यपातेपिसक्रमोन**विवक्षितः सर्वत्रनांदीश्राद्धेषुपूर्वंमातृपार्वणंततः पितुःपार्वणंत **तोमातामहस्येतिक्रमस्यनिश्चि**तत्वात् बव्हृचकात्यायनैर्मातृपितामहीप्रपितामह्यइत्यादिनानु **लोम्येनपार्वणत्रयेप्युच्चारः** तैत्तिरीयादिभिस्तुप्रपितामहपितामहपितरइत्येवमादिनाव्युत्क्रमे **णोच्चारःकार्यः एकसंस्कार्यस्या**नेकसंस्काराणांसहानुष्ठानेनांदीश्राद्धंसकृदेव एवंयमलयोर्द्वयोः पुत्रयोःकन्ययोर्वाविवाहोपनयनादिसंस्काराणांसहैवानुष्ठानेपिनांदीश्राद्धंसकृदेव यमलयोः संस्काराणामेकमंडपेएककालेएकेनकर्त्रासहकरणेदोषोनेत्युक्तं नांदीश्राद्धेअन्नाभावेआममा माभावेहिरण्यंदद्यात् हिरण्याभावेयुग्मब्राह्मणभोजनपर्याप्तान्ननिष्क्रयीभूतंयथाशक्तिकिंचित् द्रव्यंस्वाहानममेतिवदेत् अन्यःसर्वोपिविशेषोगर्भाधानप्रकरणेविस्तरेणोक्तस्ततएवानुसंधेयः **इतिनांदीश्राद्धं ॥**

दत्तक अशा कन्येचा विवाह, दत्तक घेणारा पिता करणारा असेल तर त्यानें आपलीं पिता इत्यादिक जीं तीन पार्वणें त्यांच्या उद्देशेंकरूनच नांदीश्राद्ध करावें. दत्तक पुत्र असून जनकपित्याचा दुसरा कोणी अधिकारी नसल्यामुळें जर जनकपित्याचें धन त्याला (दत्त-काला) मिळालें असेल तर त्या दत्तकपुत्रानें जनकपिता इत्यादिक व आपला प्रतिग्रहीता पिता इत्यादिक यांचा उच्चार करावा. तो असा— **"पितरौ पितामहौ च प्रपितामहौ च नांदीमुखाः"** याप्रमाणें उच्चार करून नांदीश्राद्ध करावें. याप्रमाणें मातृपार्वण व मातामहपार्वण यांमध्येंहि द्विवचनांत प्रयोग करावा, ह्मणजे **"मातरौ पितामह्यौ प्रपितामह्यौ च नांदीमुखाः ॥ मातामहौ मातुः पितामहौ मातुः प्रपितामहौ च नांदीमुखाः"** असा उच्चार करावा. जनकपित्याचें धन घेण्याविषयीं दुसरा अधिकारी असल्यामुळें जर याला (दुसऱ्याचा दत्तक झालेला याला) जनकपित्याचें धन न मिळेल तर आपला प्रतिग्रहीता पिता इत्यादिक यांच्याच उद्देशेंकरून करावें, दोन पित्यांच्या उद्देशानें करूं नये. ह्या सर्व नांदीश्राद्धप्रकरणांत संभ्रमेंकरून क्वचित् स्थलीं मातृपार्वण व पितृपार्वण यांचा सांगण्यामध्यें व्युत्क्रम पडला असेल तथापि तो अनुक्रम विवक्षित नाहीं. कारण, सर्वत्र नांदीश्राद्धामध्यें पूर्वी मातृपार्वण, नंतर पितृपार्वण व त्यानं-तर मातामहपार्वण याप्रमाणें अनुक्रम निश्चित आहे. ऋग्वेदी व कात्यायन यांनीं **मातृपि-तामहीप्रपितामह्यः"** इत्यादिक क्रमेंकरून तीन पार्वणांमध्येंहि उच्चार करावा. तैत्तिरीय इत्यादिक शाखी यांनीं तर, **"प्रपितामह पितामहपितरः"** इत्यादिक व्युत्क्रमानें उच्चार करावा. एक संस्कार्याचे अनेक संस्कार एककालीं करणें असतील तर नांदीश्राद्ध एकवारच करावें. याप्रमाणें जुळे दोन पुत्र किंवा जुळ्या दोन कन्या यांचे विवाह, मौंजी इत्यादिक संस्कारांचें बरोबरच अनुष्ठान आहे तथापि त्यांतहि नांदीश्राद्ध एकवारच करावें. जुळे जे

त्यांचे संस्कार एका मंडपांत, एककालीं, एका कर्त्यानें बरोबर केले असतां दोष नाहीं असें सांगितलें आहे. नांदीश्राद्धामध्यें अन्न नसेल तर आमान्न द्यावें. आमान्न नसेल तर हिरण्य द्यावें. हिरण्याचा अभाव असतां दोन ब्राह्मणांचें भोजन होईल इतक्या अन्नाचें मौल्य असें यथाशक्ति किंचित् द्रव्य द्यावें. त्याचा उच्चार असा–"**युग्मब्राह्मणभोजनपर्याप्तान्ननिष्क्रयीभूतं यथाशक्ति किंचित्द्रव्यं स्वाहा नमम,**" याप्रमाणें उच्चार करावा. इतर सर्व विशेषनिर्णय, गर्भाधान-प्रकरणीं विस्तारेंकरून सांगितला आहे तो तेथें पाहावा. याप्रमाणें नांदीश्राद्ध सांगितलें.

---

**ततोमंडपदेवतास्थापनंग्रहयज्ञश्चस्वस्तिवाचनात्पूर्वंनांदीश्राद्धोत्तरंवाकार्यः ॥**

तदनंतर मंडपदेवतांचें स्थापन, ग्रहयज्ञ हीं कृत्यें पुण्याहवाचनाच्या पूर्वी किंवा नांदीश्राद्धानंतर करावीं.

---

**अथकन्यादातावरगृहंगतः करिष्यमाणकन्याविवाहांगत्वेनवरस्यसीमांतपूजांकरिष्यइ**तिसंकल्प्यगणेशवरुणौसंपूज्यवरंपादप्रक्षालनवस्त्रगंधपुष्पनीराजनैःसंपूज्य यथाचारंदुग्धादिप्राशयेत् ततोवरोमंगलघोषैःवाहनारूढोवधूगृहंगच्छेत्वरपितावधूंवस्त्रादिनापूजयेदितियथाचारं लग्नदिनेकन्यापिताकन्यावाअन्योन्यालिंगितगौरीहरयोःप्रतिमांसुवर्णरौप्यादिनिर्मितांकात्यायनीमहालक्ष्मीशचीभिःसहपूजयेत् तत्रकोणचतुष्टयस्थापितकल**शश्रेणीनांमध्ये**उपलयुतदृषदिवस्त्रेवातंडुलपूर्णेगौरीहरौमंत्रेणपूजयेत् तत्र सिंहासनस्थांदेवे**शींसर्वालंकारसं**युतां पीतांबरधरंदेवंचंद्रार्धकृतशेखरं करेणाधःसुधापूर्णंकलशंदक्षिणेनतु **वरदंचाभयंवामे**नाश्लिष्यचतनुप्रियामितिध्यानमंत्रः गौरीहरमहेशानसर्वमंगलदायक पूजां**गृहाणदेवेशसर्व**दामंगलंकुरु इतिपूजामंत्रः कन्यादेहप्रमाणेनसप्तविंशतितंतुभिः कृतयावर्**तिकयादीपंप्रज्वा**ल्यसुवासिनीब्राह्मणान्भोजयेत् इतिगौरीहरपूजा ॥

## आतां सीमांतपूजनाचा विधि सांगतों.

यानंतर कन्यादाता वराचे गृहाप्रत गेला होत्साता त्यानें "**करिष्यमाणकन्याविवाहांगत्वेन वरस्य सीमांतपूजां करिष्ये,**" असा संकल्प करून गणपति व वरुण यांची पूजा करून वराचे पाय धुवून वस्त्र, गंध, पुष्प, नीराजन यांहींकरून त्याची पूजा करावी. नंतर जसा आचार असेल तदनुसार दूध इत्यादिक वराला प्राशन करवावें. तदनंतर वर वाहनावर ( घोडा इत्यादिकांवर ) बसला होत्साता त्यानें मंगलघोषेंकरून वधूच्या गृहाप्रत गमन करावें. नंतर वराच्या पित्यानें जसा आचार असेल त्याप्रमाणें वस्त्र इत्यादिकांनीं वधूची पूजा करावी. विवाहाच्या दिवसीं कन्यापित्यानें किंवा कन्येनें परस्परांनीं आलिंगित असे गौरीहर यांची सुवर्ण, रौप्य इत्यादिकानें केलेली जी प्रतिमा तिची कात्यायनी, महालक्ष्मी, शची या देवतांसहवर्तमान पूजा करावी. चार कोनांचे ठायीं स्थापन केलेल्या ज्या कलशांच्या पंक्ति ( ऐरी ) त्यांच्या मध्यभागीं तंदुलांनीं परिपूर्ण असा पाठावरवंटा किंवा वस्त्र त्याच्यावर गौरीहरांची मंत्रानें पूजा करावी. त्यांच्या ध्यानाचा मंत्र– "**सिंहासनस्थां देवेशीं सर्वालंकारसंयुतां ॥ पीतांबरधरं देवं चंद्रार्धकृतशेखरं ॥ करेणाधः सुधापूर्णं कलशं दक्षिणेन तु वरदं चाभयं वामेनाश्लिष्य चतनुप्रियां,**" याप्रमाणें ध्यान करून पूजा करावी. पूजामंत्र–

"गौरीहर महेशान सर्वमंगलदायक ॥ पूजां गृहाण देवेश सर्वदा मंगलं कुरु," याप्रमाणें मंत्र म्हणून पूजा करावी. नंतर कन्येची जितकी उंची असेल त्या प्रमाणानें सत्तावीस सुतांची वात करून तिचा दीप लावून सुवासिनी, ब्राह्मण यांला भोजन घालावें. याप्रमाणें गौरीहरांची पूजा सांगितली.

---

पंचविंशतिदर्भाणांवेण्यग्रग्रंथिसंयुतोलंबाग्रोविष्टरःसंपाद्यः वरस्ययाभवेच्छाखातच्छाखागृह्यचोदितः मधुपर्कःप्रदातव्योह्यन्यशाखेपिदातरि दधिमधुमिश्रंमधुपर्कः तत्रदध्यलाभे पयोजलंवा मध्वलाभेसर्पिर्गुडोवाप्रतिनिधिः गृहागतंस्नातकंवरंमधुपर्केणार्हयिष्यइतिसंकल्पः वरस्यद्वितीयोद्वाहेतुस्नातकमितिपदलोपः ततोयथागृह्यंमधुपर्कप्रयोगोज्ञातव्यः एवंगुरुःश्रेष्ठविप्राःराजाचेतिगृहागतायज्ञेवृताऋत्विजश्चमधुपर्केणपूजनीयाः ऋत्विगादीनामपिअर्च्यशाखयैवमधुपर्कोनतुदातृशाखया जयंतस्तुसर्वत्रयजमानशाखयैवमधुपर्कइत्याहअत्रगंधपुष्पधूपदीपपूजांतेउपहारोमाषविकारसहितोभोजनार्थंदेयः एवंमधुपर्केतत्पूर्वंवाकृतभोजनायैववरायोपोषितोदाताकन्यांदद्यात् ॥

## आतां मधुपर्काचा विधि सांगतों.

पंचवीस दर्भ घेऊन त्यांची वेणी करून शेवटीं गांठ दिलेला व लांब आहेत अग्रें ज्याचीं असा विष्टर करावा. "कन्यादाता भिन्नशाखी असला तथापि वराची जी शाखा त्या शाखेच्या गृह्यसूत्रामध्यें जसा विधि सांगितला असेल तसा मधुपर्क करावा." दहीं व मध मिश्र करणें त्याला मधुपर्क असें ह्मणतात. त्यामध्यें दहीं न मिळेल तर दूध किंवा उदक घ्यावें. मध न मिळेल तर घृत अथवा गूळ हा प्रतिनिधि जाणावा. "गृहागतं स्नातकं वरं मधुपर्केणार्हयिष्ये," याप्रमाणें मधुपर्काचा संकल्प करावा. वराचा दुसरा विवाह असेल तर संकल्पांत 'स्नातक' ह्या पदाचा लोप करावा. तदनंतर जसें गृह्यसूत्र असेल तदनुसार मधुपर्काचा प्रयोग जाणावा. याप्रमाणें गुरु, श्रेष्ठ ब्राह्मण, राजा यांतून कोणी आपल्या घरीं आले असतां त्यांची मधुपर्केंकरून पूजा करावी व यज्ञामध्यें वरलेले ऋत्विज यांचीहि मधुपर्कानें पूजा करावी. ऋत्विज इत्यादिकांचा मधुपर्क करावयाचा तो ऋत्विजादिकांची जी शाखा तदनुसारच करावा, दात्याच्या शाखेनें करूं नये. जयंत ग्रंथकार तर, सर्वत्र यजमानाच्या शाखेंकरूनच मधुपर्क करावा असें सांगतो. ह्या मधुपर्कपूजेमध्यें गंध, पुष्प, धूप, दीपपर्यंत पूजा झाल्यानंतर उडदांच्या डाळीचे लाडू इत्यादिक उपहार वराला भक्षणार्थ द्यावा. याप्रमाणें मधुपर्क केल्यानंतर किंवा त्याच्या पूर्वीं, भोजन केलेला अशाच वराला दाता उपोषित होत्साता त्यानें कन्या द्यावी.

---

अथलग्नघटिस्थापनं दशपलमितताम्रघटितंषडंगुलोन्नतंद्वादशांगुलविस्तृतंघटीयंत्रंकुर्यादितिसिंधुः द्वादशार्धपलोन्मानंचतुर्भिश्चतुरंगुलैः स्वर्णमाषैःकृतच्छिद्रंयावत्प्रस्थजलप्लुतमिति तुश्रीभागवतेतृतीयस्कंधेउक्तं अस्यार्थः अशीतिगुंजात्मकःकर्षः अस्यैवसुवर्णसंज्ञा कर्षचतुष्टयंपलं तथाचषट्पलताम्रविरचितंपात्रंविंशतिगुंजोन्मितसुवर्णनिर्मितचतुरंगुलदीर्घशलाकयामूलेकृतच्छिद्रंकुर्यात् तेनछिद्रेणयावत्प्रस्थपरिमितंजलंप्रविशतितेनचप्रस्थजलपूरणेनतत्पात्रं

**जलेमग्नंभवतितत्पात्रंघटीकालप्रमाणं तत्रप्रस्थमानंतुषोडशपलात्मकं पलंसुवर्णाश्चत्वारःकुडवःप्रस्थमाढकं द्रोणंचखारिकाचेतिपूर्वंपूर्वंचतुर्गुणमित्युक्तेः ग्रंथांतरेचतुर्मुष्टिःकुडवश्चत्वारः कुडवाःप्रस्थइति केचित्षष्टिसंख्याकगुरुवर्णोच्चारेपलसंज्ञःकालःषष्टिपलकालानाडिकेत्याहुः एवंप्रमाणीकृतंघटीयंत्रंसूर्यमंडलस्यार्धोदयेर्धास्तेवाजलपूर्णेताम्रपात्रेमृत्पात्रेवाक्षिपेत् तत्रमंत्रः मुख्यंत्वमसियंत्राणांब्रह्मणानिर्मितंपुरा भवभावायदंपत्योःकालसाधनकारणं अनेनमंत्रेणगणेशवरुणपूजनपूर्वकंघटीयंत्रंस्थापयेत् एवंस्थापिताघटीआग्नेययाम्यनैर्ऋतवायव्यदिग्गता नशुभा मध्यस्थितान्यदिग्गताचशुभाएवमाग्नेयादिपंचदिक्षुपूर्णानशुभा इतिघटीविचारः ॥**

## आतां लग्नघटिकेचे स्थापनाचा विधि सांगतों.

दाहा पळें ( व्यावहारिक ३३ तोळे, चार मासे ) वजन तांबें घेऊन त्याचें सहा अंगुळें उंच व बारा अंगुळें विस्तृत असें घटीयंत्र करावें असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे. "**द्वादशार्द्धपलोन्मानं चतुर्भिश्चतुरंगुलैः ॥ स्वर्णमाषैः कृतच्छिद्रं यावत्प्रस्थजलप्लुतं,**" असें तर श्रीमद्भागवतांत तृतीयस्कंधीं सांगितलें. याचा अर्थ–ऐशीं गुंजा ह्मणजे एक कर्ष, यालाच सुवर्ण असी संज्ञा आहे. चार कर्ष ह्मणजे एक पल, या मानानें सहा पळें वजन तांबें घेऊन त्याची घटिका करावी, आणि वीस गुंजा सोन्याची शलाका चार अंगुळें लांबीची करून त्या शलाकेनें घटिकेच्या मूळाला छिद्र पाडावें. नंतर त्या छिद्रानें त्या घटिकापात्रांत एक प्रस्थ-परिमित उदक शिरतें, तें एक प्रस्थपरिमित उदक भरल्यानें तें घटिकापात्र उदकांत बुडतें, तें पात्र एक घटिकाकालाचें प्रमाण आहे. त्यामध्यें प्रस्थाचें प्रमाण तर, सोळा पळें ह्मणजे एक प्रस्थ होतो. कारण, "चार सुवर्ण ह्मणजे एक पल, चार पळें ह्मणजे एक कुडव, चार कुडव ह्मणजे एक प्रस्थ, चार प्रस्थ ह्मणजे एक आढक, चार आढक ह्मणजे एक द्रोण, चार द्रोण ह्मणजे एक खारिका," असें वचन आहे. दुसऱ्या ग्रंथांत चार मुठी ह्मणजे एक कुडव, चार कुडव ह्मणजे एक प्रस्थ, असें सांगितलें आहे. कोणी ग्रंथकार, साठ वेळ गुरु अक्षर उच्चारावयास जो काळ लागतो तो काळ पलसंज्ञक होय आणि साठ पळें ह्मणजे एक घटिका असें ह्मणतात. अशा प्रमाणानें केलेली ती घटिका, सूर्यमंडलाचा अर्धा उदय किंवा अर्धास्त झाला असतां उदकानें भरलेल्या तांब्याच्या किंवा मातीच्या पात्रांत ठेवावी. त्याविषयीं मंत्र– "**मुख्यं त्वमसि यंत्राणां ब्रह्मणा निर्मितं पुरा ॥ भव भावाय दंपत्योः कालसाधनकारणं,**" ह्या मंत्रेंकरून ( गणपति, वरुण यांची पूजा पूर्वी करून ) घटिकेची स्थापना करावी. याप्रमाणें स्थापन केलेली घटिका आग्नेय, दक्षिण, नैर्ऋत्य आणि वायव्य ह्या दिशांकडे गेली असतां ती शुभ नाहीं. मध्यभागीं व अन्य दिशेस गेली असतां शुभ होय. याप्रमाणें आग्नेय इत्यादिक पांच दिशांचे ठायीं पूर्ण झाली असतां शुभ नाहीं. याप्रमाणें घटिका निर्णय सांगितला.

---

**अथज्योतिर्विदादिष्टेशुभकालेहस्तांतरालेतंदुलराशीपूर्वापरौकृत्वा पूर्वराशौप्रत्यङ्मुखंवरं अपरस्मिन्प्राङ्मुखींकन्यांअवस्थाप्यतयोर्मध्येकुंकुमादिकृतस्वस्तिकांकितमंतःपटमुदग्दशंधारयेयुः कन्यावरयोःपित्रादिर्ज्योतिर्विदंसंपूज्यतद्दत्ताक्षताःफलयुताःकन्यावरयोरंजलौदद्यात् कन्यावरौसाक्षतहस्तौस्वस्तिकालोकनपरौअमुकदेवतायैनमइतिस्वस्वकुलदेवतांध्यायंतौतिष्ठ**

तः ज्योतिर्विदामंगलपद्याष्टकपाठांतेस्वोक्तकालेतदेवलग्नमितिपठित्वा सुमुहूर्तमस्तु ॐप्रतिष्ठे त्युक्तेअंतःपटमुत्तरतोपसारयेयुः ततःकन्यावरौपरस्परशिरसोरक्षतप्रक्षेपंपरस्परेक्षणंचकुर्या तां वरोवध्वाभ्रूमध्येदर्भाग्रेणॐभूर्भुवःस्वरितिपरिमृज्यदर्भंनिरस्यापःस्पृशेत् वैदिकैःपठ्य मानब्राह्मणखंडवाक्यांतेकन्यापूर्वकंताभ्यामक्षतारोपणंप्रतिवाक्यंकार्यं ततःप्राङ्मुखंवरंप्रत्य ङ्मुखींकन्यांकृत्वादातादक्षिणेसपत्नीकउपविश्यवरदत्तालंकारादिरहितामहतवस्त्रस्वदेयालं कारमात्रयुतां कनकयुक्तांजलिं वरपूजावशिष्टगंधलिप्तहस्तपादांकन्यामेवंदद्यात् कुशहस्तो देशकालौसंकीर्त्य अमुकप्रवरामुकगोत्रोमुकशर्माहंममसमस्तपितृणांनिरतिशयानंदब्रह्मलोका वाप्त्यादिकन्यादानकल्पोक्तफलावाप्तयेअनेनवरेणास्यांकन्यायामुत्पादयिष्यमाणसंतत्या द्वाद शावरान्द्वादशपरान्पुरुषांश्चपवित्रीकर्तुमात्मनश्चश्रीलक्ष्मीनारायणप्रीतये ब्राह्मविवाहविधि नाकन्यादानंकरिष्ये इतिकुशाक्षतजलेनसंकल्प्यउत्थायकन्यांसंप्रगृह्य कन्यांकनकसंपन्नां कनकाभरणैर्युतां दास्यामिविष्णवेतुभ्यंब्रह्मलोकजिगीषया विश्वंभरःसर्वभूतःसाक्षिण्यःसर्वदे वताः इमांकन्यांप्रदास्यामिपितॄणांतारणायचेत्युक्त्वाकांस्यपात्रस्थकन्यांजलेरुपरिवरांजलिंनि धायदक्षिणस्थितपत्न्या संततांक्रियमाणांशुद्धोदकधारांसहिरण्येवरहस्तेनिक्षिपेत् कन्यातार यतु पुण्यंवर्धयतु शांतिःपुष्टिस्तुष्टिश्चास्तु पुण्याहंभवंतोब्रुवंतुइत्यादिवाक्यचतुष्टयांतेअमुक प्रवरामुकगोत्रोमुकशर्माहं ममसमस्तेत्यादिप्रीतयेइत्यंतमुक्त्वाअमुकप्रवरोपेतामुकगोत्रायामुक शर्मणः प्रपौत्रायामुकशर्मणःपौत्रायामुकशर्मणःपुत्रायामुकशर्मणेश्रीधररूपिणेवराय अमुक प्रवरामुकगोत्राममुकशर्मणःप्रपौत्रींअमुकशर्मणःपौत्रींअमुकशर्मणःममपुत्रीं अमुकनाम्नींक न्यांश्रीरूपिणींप्रजापतिदैवत्यांप्रजोत्पादनार्थं तुभ्यमहंसंप्रददेइतिसहिरण्यहस्तेसाक्षतजलंक्षि पेत् प्रजापतिःप्रीयतां कन्यांप्रतिगृण्हातुभवानितिवदेत् एवंत्रिवारंकन्यातारयत्वित्यादिनाक न्यादानंकार्यं वरःॐस्वस्तिइत्युक्त्वाकन्यादक्षिणांसंस्पृष्ट्वा कइदंकस्माअदात्० पृथिवीप्रति गृण्हात्वितित्रिरुक्त्वाधर्मप्रजासिद्ध्यर्थंप्रतिगृण्हामीतिवदेत् दाता गौरींकन्यामिमांविप्रयथाश क्तिविभूषितां गोत्रायशर्मणेतुभ्यंदत्तांविप्रसमाश्रय कन्येममाग्रतोभूयाःकन्येमेदेविपार्श्वयोः कन्येमेपृष्ठतोभूयास्त्वद्दानान्मोक्षमाप्नुयाम् ममवंशकुलेजातापालितावत्सराष्टकं तुभ्यंविप्रम यादत्तापुत्रपौत्रप्रवर्धिनी धर्मेचार्थेचकामेचनातिचरितव्यात्वयेयं वरोनातिचरामीति दाता उपविश्यकन्यादानप्रतिष्ठासिद्ध्यर्थंइदंसुवर्णमग्निदैवत्यंदक्षिणात्वेनसंप्रददे ॐस्वस्तीतिवरः ततोभोजनपात्रजलपात्रादिदानानि पितामहोदानकर्ताचेत्पौत्रीमित्यतःपूर्वंममेतिवदेत् पुत्री मित्यतःपूर्वंनवदेत् भ्रात्रादिःपुरुषत्रयकीर्तनमेवकुर्यात्क्वापिममेतिनवदेत् प्रपितामहःप्रपौत्री मित्यत्रममेतिवदेत् मातुलादिरन्योवादातास्वगोत्रंस्वविशेषणत्वेनोक्त्वामुकशर्मणः समस्तपि तृणामितिकन्यापितृनामषष्ठ्यंतमुक्त्वाकन्याविशेषणत्वेनतद्गोत्रादिवदेत् ममवंशकुलेजातेत्य त्रममेतिस्थानेकन्यापितृनामवदेत् दत्तककन्यादानेममवंशकुलेदत्तेतिऊहः ॥

यानंतर ज्योतिषी यानें सांगितलेल्या शुभसमयीं, एक हात मध्यें जागा सोडून पूर्वेकडे एक व पश्चिमेकडे एक अशा तांदुळांच्या दोन राशि करून पूर्वेकडच्या राशीवर पश्चिमाभिमुख

वर, व पश्चिमेकडच्या राशीवर पूर्वाभिमुख कन्या, याप्रमाणें वधूवरांला उभें करून त्या दोघांच्या मध्यें, कुंकुमादिकानें काढलेलें जें स्वस्तिक तेणेंकरून चिन्हित असून उत्तर दिशेकडे दशा केलेला असा अंतःपट धरावा. कन्या व वर यांचा पिता इत्यादिकानें ज्योतिषी याची पूजा करून ज्योतिषी यानें दिलेल्या अक्षता फलसहित, कन्यावरांच्या ओंजळींत घालाव्या. ह्मातामध्यें अक्षता घेतलेले कन्यावर अंतःपटावरचें स्वस्तिक पाहात होत्साते "अमुकदेवतायै नमः" असें आपापल्या कुलदेवतेचें ध्यान करीत त्यांनीं उभें राहावें. मंगळाष्टकें ह्मटल्यानंतर ज्योतिषी यानें आपण सांगितलेला जो मुहूर्त तत्समयीं "तदेव लग्नं०" हें वाक्य पठण करून "सुमुहूर्तमस्तु ॐप्रतिष्ठ०" असें ह्मटल्यानंतर अंतःपट उत्तरदिशेकडे घ्यावा. तदनंतर कन्यावरांनीं परस्परांच्या मस्तकावर अक्षता टाकाव्या व परस्परांला अवलोकन करावें. वरानें वधूच्या भ्रुकुटींच्या मध्यभागीं दर्भाच्या अग्रानें "ॐभूर्भुवःस्वः" ह्या मंत्रेंकरून रेषा करून दर्भ टाकून उदकाला स्पर्श करावा. वैदिक ब्राह्मणांनीं पठण करावयाचीं जीं ब्राह्मणाच्या खंडांतील वाक्यें त्यांच्या शेवटीं ह्मणजे प्रत्येक वाक्याच्या शेवटीं पूर्वी कन्येनें वराच्या मस्तकावर अक्षता घालाव्या, नंतर वरानें कन्येच्या मस्तकावर अक्षता घालाव्या, याप्रमाणें प्रत्येक वाक्याचे अंतीं वधूवरांनीं परस्परांवर अक्षता घालाव्या. तदनंतर वराला पश्चिमाभिमुख व कन्येला पूर्वाभिमुख करून वधूवरांच्या दक्षिणदिशेस दाता सपत्नीक बसून वरदत्त अलंकारादिकांनीं विरहित, नवीन वस्त्र व आपण द्यावयाचे अलंकार यांहींकरून मात्रयुक्त, कनकानें युक्त आहे अंजलि जीचा असी, व वराची पूजा करून शेष राहिलेलें गंध तेणेंकरून लिप्त आहेत हस्त व पाय जीचे अशा प्रकारची कन्या द्यावी. दाता दर्भपाणि होत्साता त्यानें देशकालांचा उच्चार करून कन्यादानाचा संकल्प करावा. तो असा,— "अमुकप्रवरामुकगोत्रोमुकशर्माहं मम समस्तपितॄणां निरतिशयानंदब्रह्मलोकावाप्त्यादिकन्यादानकल्पोक्तफलावाप्तये अनेन वरेणास्यां कन्यायामुत्पादयिष्यमाणसंतत्या द्वादशावरान् द्वादशपरान् पुरुषांश्च पवित्रीकर्तुमात्मनश्च श्रीलक्ष्मीनारायणप्रीतये ब्राह्मविवाहविधिना कन्यादानं करिष्ये," असा संकल्प करून दर्भ व अक्षता यांहीं युक्त उदक सोडावें. नंतर उठून कन्येला घेऊन, "कन्यां कनकसंपन्नां कनकाभरणैर्युतां ॥ दास्यामि विष्णवे तुभ्यं ब्रह्मलोकजिगीषया ॥ विश्वंभरः सर्वभूतः साक्षिण्यः सर्वदेवताः ॥ इमां कन्यां प्रदास्यामि पितॄणां तारणाय च," हे मंत्र ह्मणून, कांस्यपात्रामध्यें कन्येच्या अंजलीवर वराची अंजलि ठेवून उजव्या बाजूला उभी राहिलेली जी स्त्री तिनें संतत करावयाची असी शुद्धोदकधारा ती हिरण्ययुक्त असा जो वराचा हस्त त्यावर पाडावी. नंतर, "कन्या तारयतु ॥ पुण्यं वर्धयतु ॥ शांतिः पुष्टिस्तुष्टिश्चास्तु पुण्याहं भवंतो ब्रुवंतु" इत्यादिक चार वाक्यें उच्चारल्यानंतर, "अमुकप्रवरामुकगोत्रोमुकशर्माहं मम समस्तेत्यादि प्रीयते" एथपर्यंत वाक्य ह्मणून, "अमुकप्रवरोपेतामुकगोत्रायामुकशर्मणः प्रपौत्रायामुकशर्मणः पौत्रायामुकशर्मणः पुत्रायामुकशर्मणे श्रीधररूपिणे वराय ॥ अमुकप्रवरामुकगोत्रामुकशर्मणः प्रपौत्रीं अमुकशर्मणः पौत्रीं अमुकशर्मणः मम पुत्रीं अमुकनाम्नीं कन्यां श्रीरूपिणीं प्रजापतिदैवत्यां प्रजोत्पादनार्थं तुभ्यमहं संप्रददे," असें

वाक्य ह्मणून सहिरण्य हस्तावर अक्षतांसहवर्तमान उदक सोडावें, आणि "प्रजापतिः प्रीयतां कन्यां प्रतिगृण्ह्हातु भवान्" असें ह्मणावें. याप्रमाणें तीन वेळ "कन्या तारयतु" इत्यादिक पूर्वोक्त प्रकारानें कन्यादान करावें. नंतर वरानें "ॐस्वस्ति" असें ह्मणून कन्येच्या उजव्या खांद्याला स्पर्श करून, "कइदं कस्माअदात्० पृथिवी प्रतिगृण्ह्हातु," हा मंत्र तीन वेळ ह्मणून "धर्मप्रजासिद्ध्यर्थं प्रतिगृण्ह्हामि" असें वाक्य बोलावें. नंतर दात्यानें "गौरीं कन्यामिमां विप्र यथाशक्ति विभूषितां ॥ गोत्राय शर्मणेतुभ्यं दत्तां विप्रसमाश्रय ॥ कन्ये ममाग्रतो भूयाः कन्ये मे देवि पार्श्वयोः ॥ कन्ये मे पृष्ठतो भूयास्त्वद्दानान्मोक्षमाप्नुयां ॥ मम वंशकुले जाता पालिता वत्सराष्टकं ॥ तुभ्यं विप्रमया दत्ता पुत्रपौत्रप्रवर्धिनी ॥ धर्मेचार्थेच कामेच नातिचरितव्या त्वयेयं." असीं वाक्यें ह्मटल्यानंतर वरानें "नातिचरामि" असें वाक्य ह्मणावें. नंतर दात्यानें बसून कन्यादान सांगतेकरितां वराला सुवर्णदक्षिणा द्यावी, व दक्षिणा देण्याचें वाक्य ह्मणावें, तें असें— "कन्यादानप्रतिष्ठासिद्ध्यर्थं इदं सुवर्णं अग्निदैवत्यं दक्षिणात्वेनसंप्रददे," असें वाक्य ह्मणून सुवर्णदक्षिणा द्यावी. नंतर वरानें "ॐस्वस्ति" असें ह्मणून दक्षिणा घ्यावी. तदनंतर भोजनांचीं पात्रें (ताटें वाट्या इ०) व उदकपात्रें यांचीं दानें करावीं. पितामह (आजा) कन्यादान करणारा असेल तर दानवाक्यामध्यें 'पौत्रीं' ह्या पदाच्या पूर्वीं 'मम' असा उच्चार करावा, 'पुत्रीं' ह्या पदाच्या पूर्वीं 'मम' असा उच्चार करूं नये. कन्यादान करणारा भ्राता इत्यादिक असेल तर त्यानें तीन पुरुषांचा उच्चारच करावा, 'मम' असा उच्चार कोठेंहि करूं नये. प्रपितामह कर्ता असेल तर त्यानें 'प्रपौत्रीं' ह्या पदाच्या पूर्वीं 'मम' असा उच्चार करावा. मातुळ इत्यादिक किंवा अन्य कोणी कन्यादाता असल्यास त्यानें आपल्या विशेषणानें स्वकीय गोत्राचा उच्चार करून "अमुकशर्मणः समस्तपितॄणां" असें कन्येच्या पित्याचें नांव षष्ठीविभक्त्यंत उच्चारून कन्येच्या विशेषणसहित तिच्या पित्याचें गोत्र इत्यादिक उच्चारावें. 'ममवंशकुलेजाता' ह्या स्थलीं 'मम' ह्या स्थानीं कन्येच्या पित्याचे नामाचा उच्चार करावा. दत्तककन्येचें दान असेल तर 'ममवंशकुले जाता' ह्या स्थानीं ममवंशकुलेदत्ता' असा ऊह करावा.

---

अथकन्यादानांगत्वेनगवादिदानमंत्राः यज्ञसाधनभूतायाविश्वस्याघौघनाशिनी विश्वरूपधरोदेवः प्रीयतामनयागवा हिरण्यगर्भसंभूतंसुवर्णचांगुलीयकं सर्वप्रदंप्रयच्छामिप्रीणातु कमलापतिः इत्यंगुलीयस्य क्षीरोदमथनेपूर्वमुद्धृतंकुंडलद्वयं श्रियासहसमुद्भूतंददेश्रीःप्रीयतामितिकुंडलयोः कांचनंहस्तवलयंरूपकांतिसुखप्रदं विभूषणंप्रदास्यामिविभूषयतुमेसदेतिवलययोः परापवादपैशून्यादभक्ष्यस्यचभक्षणात् उत्पन्नपापंदानेनताम्रपात्रस्यनश्यतु इतिताम्रजलपात्रस्य यानिपापानिकाम्यानिकामोत्थानिकृतानिच कांस्यपात्रप्रदानेनतानिनश्यंतुमे सदा इतिभोजनार्थकांस्यपात्रस्य अगम्यागमनंचैवपरदाराभिमर्शनं रौप्यपात्रप्रदानेनतानिनश्यंतुमेसदेतिजलार्थस्यभोजनार्थस्यचरौप्यपात्रस्य पूरितंपूगपूगेननागवल्लीदलान्वितं पूर्णेनचूर्णपात्रेणकर्पूरपिष्टकेनच सपूगखंडनंदिव्यंगंधर्वाप्सरसांप्रियं ददेदेवनिरातंकंत्वत्प्र

सादात्कुरुष्वमामितितांबूलस्य एवंदासीमहिषीगजाश्वभूमिस्वर्णपात्रपुस्तकशय्यागृहरजतवृषभानांदानमंत्राःकौस्तुभेद्रष्टव्याः ॥

यानंतर कन्यादानाच्या अंगत्वानें जीं गाई इत्यादिक दानें त्यांचे मंत्र सांगतों. गोदानाचा मंत्र—"यज्ञसाधनभूताया विश्वस्याघौघनाशिनी ॥ विश्वरूपधरोदेवः प्रीयतामनया गवा." आंगठ्या, जोडवीं इत्यादिकांचा मंत्र—"हिरण्यगर्भसंभूतं सुवर्णंचांगुलीयकं ॥ सर्वप्रदं प्रयच्छामि प्रीणातुकमलापतिः." कुंडलांचा मंत्र—"क्षीरोदमथनेपूर्वमुद्धृतंकुंडलद्वयं ॥ श्रियासहसमुद्भूतं ददेश्रीःप्रीयतामिति." कडीं तोडे यांचा मंत्र—"कांचनं हस्तवलयं रूपकांतिसुखप्रदं ॥ विभूषणं प्रदास्यामि विभूषयतु मे सदा." तांब्याच्या उदकपात्रांचा मंत्र—"परापवादपैशून्या दभक्ष्यस्यच भक्षणात् ॥ उत्पन्नपापं दानेन ताम्रपात्रस्य नश्यतु." भोजनासाठीं जें कांस्यपात्र त्याचा मंत्र—"यानिपापानि काम्यानि कामोत्थानि कृतानिच ॥ कांस्यपात्रप्रदानेन तानिनश्यंतुमेसदा." उदकाकरितां व भोजनाकरितां जीं रुप्याचीं पात्रें द्यावयाचीं त्यांचा मंत्र—"अगम्यागमनंचैव परदाराभिमर्शनं ॥ रौप्यपात्रप्रदानेन तानिनश्यंतुमेसदा." तांबूलाचा मंत्र—"पूरितंपूगपूगेन नागवल्लीदलान्वितं ॥ पूर्णेनचूर्णपात्रेण कर्पूरपिष्टकेनच ॥ सपूगखंडनंदिव्यं गंधर्वाप्सरसांप्रियं ॥ ददेदेवनिरातंकं त्वत्प्रसादात्कुरुष्वमां." याप्रमाणें दासी, म्हैस, हत्ती, अश्व, भूमि, सुवर्णपात्रें, पुस्तक, शय्या, गृह, रौप्य, वृषभ यांच्या दानाचे मंत्र कौस्तुभांत पहावे.

---

अंतःपटधारणादिकन्यादानांतंकेचिदग्निप्रतिष्ठापनोत्तरंकुर्वंति केचित्पूर्वांगहोमोत्तरंकेचिदाज्यसंस्कारोत्तरमित्यनेकेपक्षास्तत्रस्वस्वगृह्यानुसारेणाचारानुसारेणचव्यवस्था ततोवधूवराभिषेकः ततः कंकणबंधनं अथाक्षतारोपणं वधूवराभ्यांअन्योन्यतिलककरणंमालाबंधनं अष्टपुत्रीकंचुकीमांगल्यतंत्वादिदानं गणेशपूजा लड्डुकबंधनं उत्तरीयवस्त्रांतग्रंथियोजनं लक्ष्म्यादिपूजादि इतिकन्यादानानुक्रमः प्रायोबह्वृचानामन्येषांचयथागृह्यंज्ञेयः ॥

अंतःपट धरणें इत्यादिकापासून कन्यादानापर्यंत कृत्य, कितीएक जन अग्निस्थापन केल्यानंतर करितात, कितीएक पूर्वांगहोम झाल्यानंतर करितात, कोणी आज्यसंस्कार झाल्यानंतर करितात, याप्रमाणें अनेक पक्ष आहेत त्याविषयीं आपापल्या गृह्यसूत्रांत जसें सांगितलें असेल तदनुसार व जसा ज्याचा आचार असेल तदनुरूप व्यवस्था जाणावी. तदनंतर वधूवरांवर अभिषेक करावा. त्यानंतर कंकणबंधन करावें. अक्षतारोपण, वधूवरांनीं परस्परांला तिलक करणें, परस्परांनीं गळ्यांत माळा बांधणें, अष्टपुत्री, कंचुकी, मंगळसूत्र इत्यादिक वरानें वधूला देणें, गणपतिपूजन, लाडू बांधणें, आंगावरचे वस्त्रांचे शेवटांस गांठ देणें, लक्ष्मी इत्यादिकांची पूजा इत्यादिक करणें, याप्रमाणें ऋक्शाखी यांच्या कन्यादानाचा अनुक्रम बहुधा असा आहे व इतरशाखी यांचा अनुक्रम त्यांच्या त्यांच्या गृह्यसूत्राप्रमाणें जाणावा.

---

अथविवाहहोमः वधूवरौपूर्वोक्तलक्षणांवेदींमंत्रघोषेणारुह्यवरःस्वासनेउपविश्यवधूंदक्षिणतउपवेश्यदेशकालौसंकीर्त्यप्रतिगृहीतायामस्यांवध्वांभायात्वसिद्धयेविवाहहोमंकरिष्ये इतिसं

कल्प्ययथागृह्यंविवाहहोमंकुर्यात् एतदादिविवाहाग्निंरक्षेत् रक्षितोग्निश्चतुर्थीकर्मपर्यंतंगृहप्र वेशनीयहोमात्पूर्वमनुगतश्चेद्विवाहहोमःपुनःकार्यः गृहप्रवेशनीयोत्तरंगतौहोमद्वयमपिपुनः कार्यं केचित्तुद्वादशरात्रपर्यंतंवृत्त्युक्तायाश्चेत्याज्याहुतेः सार्वत्रिकत्वमाश्रित्यात्रापिअयाश्चे त्याहुतिमेवाहुः ॥

## आतां विवाहहोमाचा विधि सांगतों.

वधूवरांनीं पूर्वीं सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त अशा वेदीवर मंत्रघोषानें आरोहण करून वरानें आपल्या आसनावर बसून वधूला आपल्या दक्षिणभागीं बसवून देशकालांचा उच्चार करून संकल्प करावा. तो असा—"**प्रतिगृहीतायामस्यां वध्वां भार्यात्वसिद्धये विवाहहोमं करिष्ये,**" असा संकल्प करून जसें गृह्यसूत्र असेल तदनुसार विवाहहोम करावा. ह्या वेळेपासून विवाहाग्नि रक्षण करून ठेवावा. रक्षण केलेला अग्नि चतुर्थीकर्मपर्यंत असावा. तो अग्नि गृहप्रवेशनीय होमाच्या पूर्वीं नष्ट होईल तर पुनः विवाहहोम करावा. गृहप्रवेशनीय होम झाल्यानंतर जाईल तर दोनहि होम पुनः करावे. बारा दिवसपर्यंत गृह्याग्नि नष्ट झाला असतां वृत्तीमध्यें सांगितलेली "**अयाश्चा०**" ही घृताची आहुति द्यावी असा सार्वत्रिक निर्णय आहे यास्तव त्याचा आश्रय करून ह्या स्थलींहि "**अयाश्चा०**" ही आहुतिच द्यावी असें कोणी ग्रंथकार ह्मणतात.

---

अथगृहप्रवेशनीयहोमः सचवध्वासहस्वगृहंगतस्यविहितस्तथापिशिष्टाःश्वशुरगृहेएवकुर्वंति तत्रार्धरात्रोत्तरंविवाहहोमेपरेद्युःप्रातस्तिथ्यादिसंकीर्त्यममाग्नेर्गृह्याग्नित्वसिद्धिद्वाराश्रीपरमे०र्थं गृहप्रवेशनीयाख्यंहोमंकरिष्यइतिसंकल्पःकार्यः अर्धरात्रात्पूर्वंविवाहहोमेतदैवहोमोत्तरंपुनस्तिथ्यादिसंकीर्त्य संकल्पपूर्वंकंरात्रावपिगृहप्रवेशनीयहोमकरणेदोषोन यत्तुविवाहहोमगृहप्रवेशनीयहोमयोरेकतंत्रेणानुष्ठानंकुर्वंतितन्नयुक्तं विवाहाग्नेरेवगृहप्रवेशनीयहोमोत्तरंगृह्यत्वसिद्धिराश्वलायनतैत्तिरीयादीनांभवति तैत्तिरीयकात्यायनादीनांपुनराधानेप्रकारांतरमस्ति यदिरात्रौषट्घटीमध्येऽग्न्युत्पत्तिस्तदागृहप्रवेशनीयाभावेपिव्यतीपातादिसंभवेपितदैवोपासनहोमारंभः तदुत्तरंचेत्परदिनेसायमौपासनारंभः सचेत्थं सायंसंध्यामुपास्यविवाहाग्निंप्रज्वाल्य प्राणानायम्य देशकालौसंकीर्त्यास्मिन्विवाहाग्नौयथोक्तकालेश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं यावज्जीवमुपासनंकरिष्यइतिसंकल्प्य पुनर्देशकालौसंकीर्त्यश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंसायंप्रातरौपासनहोमौकरिष्ये तत्रेदानींसायमौपासनहोमंकरिष्ये प्रातस्तुपूर्वसंकल्पितप्रातरौपासनहोमं करिष्ये इतिसंकल्प्यहोमःकार्यः ॥

## आतां गृहप्रवेशनीय होम सांगतों.

वर वधूसहवर्तमान आपल्या गृहाप्रत गेल्यानंतर वरानें स्वगृहीं गृहप्रवेशनीय होम करावा असें सांगितलें आहे, तथापि शिष्ट सासऱ्याच्या घरींच करितात. तो विवाहहोम मध्यरात्रीनंतर झाला असतां दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं तिथि, वार इत्यादिकांचा उच्चार करून "**ममाग्नेर्गृह्याग्नित्वसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं गृहप्रवेशनीयाख्यं होमं करिष्ये,**" असा संकल्प करावा. मध्यरात्रीच्या पूर्वीं विवाहहोम झाला असतां विवाहहोमानंतर तत्कालींच

पुनः तिथि, वार इत्यादिकांचा उच्चार करून संकल्प करून रात्रीमध्येंहि गृहप्रवेशनीय होम केला असतां दोष नाहीं. विवाहहोम व गृहप्रवेशनीय होम यांचें एकतंत्रानें जें अनुष्ठान करितात तें योग्य नाहीं. आश्वलायन, तैत्तिरीयशाखी इत्यादिक यांच्या गृह्याग्नीची सिद्धि होणें ती गृहप्रवेशनीय होम झाल्यानंतर व विवाहाग्नीपासूनच होते. तैत्तिरीय, कात्यायन इत्यादिक शाखी यांच्या पुनराधानाविषयीं दुसरा प्रकार आहे. जर रात्रीचे ठायीं सहा घटिकांमध्यें अग्नि उत्पन्न होईल तर गृहप्रवेशनीय होम झाला नसेल तथापि व्यतीपात इत्यादिक कुयोगांचा संभव असला तरी तत्कालींच औपासनहोमाचा आरंभ करावा. सहा घटिकांनंतर अग्नि उत्पन्न होईल तर दुसऱ्या दिवसीं सायंकालीं औपासनहोमाचा आरंभ करावा. तो असा—सायंसंध्या करून विवाहाग्नि प्रदीप्त करून प्राणायाम करून देशकालांचा उच्चार करून संकल्प करावा. तो असा—"**अस्मिन् विवाहाग्नौ यथोक्तकाले श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं यावज्जीवमुपासनं करिष्ये,**" असा संकल्प करून पुनः देशकालांचा उच्चार करून "**श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं सायंप्रातरौपासनहोमौ करिष्ये ॥ तत्रेदानीं सायमौपासनहोमं करिष्ये,**" असा संकल्प करावा. प्रातःकालीं संकल्प करणें तो तर, "**पूर्वसंकल्पितप्रातरौपासनहोमं करिष्ये,**" असा संकल्प करून होम करावा.

---

**अथत्रिरात्रंवधूवरौब्रह्मचारिणावलंकुर्वाणावधःशायिनावक्षारालवणाशिनौतिष्ठेतां ॥**

यानंतर त्रिरात्रपर्यंत वधू व वर हे ब्रह्मचारी, अलंकारयुक्त, भूमीवर निद्रा करणारे, क्षारलवणरहित भोजन करणारे असे असावे.

---

अथचतुर्थदिवसेऐरिणीदानं तच्चवधूपितृभ्यामुपोषिताभ्यामुपोषितायैवरमात्रेकार्यं वरमातूरजोदोषेतस्याः शुद्धिप्रतीक्षाकरणासंभवेमनसापात्रमुद्दिश्येतिरीत्यातांमनसोद्दिश्यैरिणीदानं वधूवरमात्रोर्विवाहोत्तरंदेवकोत्थापनात्प्राक्रजोदोषेपूर्वोक्तांशांतिंकृत्वाशुद्ध्यंतेसंकटेशुद्धेः प्रागपिदेवकोत्थापनंकार्यं मातुलादेःकर्त्रंतरस्यपत्न्यारजसिमौंजीप्रकरणेउक्तंएवंविवाहोत्तरमा**शौचपातेचतुर्थीकर्मपर्यंतंप्राप्तकर्मकरणेदातुर्वरस्यकन्यायाश्चनाशौचं आशौचांतेदेवकोत्थापनं असंभवेआशौचमध्येएवदेवकोत्थापनं**कृत्वाआशौचंकार्यं विवाहात्पूर्वमाशौचरजोदोषयो**स्तुप्रागुक्तं चतुर्थीकर्महोमःकौस्तुभेउक्तः** एतंकेचित्ऋक्शाखिनोनकुर्वंति मंडपोद्वासनदि**ननिर्णयोमंडपोद्वासनपर्यंतंकर्तव्याकर्तव्यनिर्णयश्चोपनयनप्रकरणेउक्तस्तत्रैवद्रष्टव्यः नस्नाथादुत्सवेतीतेमंगलंविनि**वर्त्यच अनुव्रज्यसुहृद्बंधूनर्चयित्वेष्टदेवतां स्नानं**सचैलंतिलमिश्रकर्म प्रेतानुयानंकलशप्रदानं** अपूर्वतीर्थामरदर्शनंचविवर्जयेन्मंगलतोऽब्दमेकं **मासषट्कंविवाहादौव्रतप्रारंभणेपिच जीर्णभांडादिनत्याज्यंगृहसंमार्जनंतथा ऊर्ध्वंविवाहात्पुत्रस्यतथाचव्रतबंधनात् आत्मनोमुंडनंचैववर्षंवर्षार्धमेवच मासमन्यत्रसंस्कारेत्रिमासंचौलकर्मणि पिंडदानं** मृदास्नानंनकुर्यात्तिलतर्पणं अयंविवाहव्रतबंधचौलोत्तरंवर्षषण्मासत्रिमासेषु अन्यवृद्धिश्राद्धयुतमंगलोत्तरंचमासमेकंपिंडदानतिलतर्पणनिषेधस्त्रिपुरुषसपिंडानामेव एवंमुंडननिषेधोपि व्रतोद्वाहौतुमंगलमितिपक्षेमौंज्युत्तरंमुंडननिषेधः व्रतबंधस्यमुंडनरूपत्वपक्षेतुननिषेधः आत्मनोमुंडनमितिकर्मांगतयाप्राप्तंरागप्राप्तंचमुंडनंनिषिध्यते अत्रापवादः गंगायांभास्करक्षेत्रेमा

तांपत्रोर्मृताहनि आधानेसोमयागादौदर्शादौक्षौरमिष्यते महालयेगयाश्राद्धेपित्रोःप्रत्याब्दिके तथा सपिंड्यंतप्रेतकर्मश्राद्धषोडशकेष्वपि कृतोद्वाहादिकःकुर्यात्पिंडदानंचतर्पणं केचिद्भ्रातृपितृव्यादेराब्दिकेप्येवमूचिरे एवंपिंडपितृयज्ञेअष्टकान्वष्टकापूर्वेद्युःश्राद्धेषुनपिंडदाननिषेधः दर्शश्राद्धंत्वपिंडकमेव तेनबव्हृचानांव्यतिषंगोन इतिमंडपोद्वासनोत्तरंकार्याकार्यनिर्णयः ॥

**यानंतर चवथ्या दिवसीं ऐरिणीदान करावें.**—तें ऐरिणीदान वधूच्या उपोषित आई-बापांनीं उपोषित जी वराची माता तिला द्यावें. वराची माता रजस्वला असतां ती शुद्ध होईपर्यंत प्रतीक्षा करण्याचा असंभव असेल तर, ( कोणाला दान करणें असतां ज्याला द्या-वयाचें तो जवळ नसल्यामुळें मनानें त्या पात्राचा उद्देश करून जसें दान करितात या रीतीनें ) वरमातेचा मनामध्यें उद्देश करून ऐरिणीदान करावें. विवाह झाल्यानंतर देवको-त्थापनाच्या पूर्वीं वधूमाता व वरमाता यांला रजोदर्शन होईल तर शुद्धि झाल्यानंतर पूर्वीं सां-गितलेली श्रीशांति करून देवकोत्थापन करावें. संकट असेल तर शुद्धीच्या पूर्वींहि शांति करून देवकोत्थापन करावें. मातुळ इत्यादिक अन्य कर्ता असून त्याची स्त्री रजस्वला होईल तर त्याचा निर्णय मौंजीप्रकरणीं सांगितला आहे. याप्रमाणें विवाह झाल्यानंतर आशौच प्राप्त होईल तर चतुर्थीकर्मापर्यंत प्राप्त झालेलें कर्म करण्याविषयीं दाता, वर आणि कन्या यांला आशौच नाहीं. आशौच गेल्यानंतर देवकोत्थापन करावें. आशौच गेल्यानंतर देवकोत्था-पन करण्याचा संभव नसेल तर आशौचामध्येंच देवकोत्थापन करून आशौच धरावें. विवाह होण्याच्या पूर्वीं आशौच, रजोदोष हे प्राप्त झाले असतां त्यांचा निर्णय पूर्वीं सांगितला आहे. चतुर्थीकर्मसंबंधी होम कौस्तुभांत सांगितला आहे. कितीएक ऋक्शाखी हा चतुर्थीकर्मसं-बंधी होम करीत नाहींत. मंडपोद्वासनाचे दिवसाचा निर्णय व मंडपोद्वासन होईपर्यंत को-णतीं कर्में करावीं, कोणतीं करूं नयेत यांचा निर्णय उपनयनप्रकरणीं सांगितला आहे तो तेथें पाहावा. “उत्सव समाप्त झाल्यानंतर; मंगलकार्य समाप्त झाल्यावर; सुहृद्, बांधव यांच्या अनुलक्षानें गमन करून; इष्टदेवतेची पूजा केल्यानंतर इतकीं कृत्यें केलीं असतां स्नान करूं नये. मंगलकार्य झाल्यानंतर एक वर्षपर्यंत सचैल स्नान, तिलतर्पण, प्रेतामागून गमन, कुंभदान, अपूर्वतीर्थयात्रा, अपूर्वदेवाचें दर्शन हीं कृत्यें करूं नयेत. विवाहादिक, व्रताचा प्रारंभ हीं केलीं असतील तर सहा महिनेपर्यंत जीर्णपात्रें टाकूं नयेत व घर झाडणें, सारवणें इत्यादिक करूं नये. पुत्राचा विवाह केल्यानंतर एक वर्षपर्यंत व पुत्राची मौंजी झाल्यानंतर सहा महिनेपर्यंत ( कर्त्यानें ) आपलें मुंडन करूं नये. चौलव्यतिरिक्त इतर संस्कार केला असतां एक मासपर्यंत, चौलसंस्कार केला असतां तीन मासपर्यंत पिंडदान, मृत्तिकास्नान, व तिलतर्पण हीं करूं नयेत. विवाह, मौंजी, चौल हे संस्कार झाल्यानंतर क्रमेंकरून एक वर्ष, सहा महिने, तीनमहिने पर्यंत; व इतर नांदीश्राद्धयुक्त मंगलकार्य झाल्यानंतर एक महिनापर्यंत पिंडदान, तिलतर्पण हीं करूं नयेत असा जो हा निषेध सांगितला तो त्रिपुरुषस-पिंडविषयकच जाणावा. याप्रमाणें मुंडनाचा निषेध तोहि त्रिपुरुषसपिंडविषयक आहे. मौंजी, विवाह हें मंगल होय अशा पक्षीं मौंजी केल्यानंतर मुंडन करूं नये. मौंजी ही मुं-डनरूप आहे अशा पक्षीं तर मुंडनाचा निषेध नाहीं, ह्मणजे मुंडन करण्याला दोष नाहीं.

'आपलें मुंडन करूं नये' असें जें सांगितलें तेणेंकरून कर्माच्या अंगत्वानें प्राप्त झालेलें मुंडन व रागप्राप्त मुंडन यांचा निषेध प्राप्त होतो. ह्या मुंडनाच्या निषेधाविषयीं अपवाद— " गंगा, भास्करक्षेत्र, मातापितरांचा मृतदिवस, आधान, सोमयाग इत्यादिक, आणि दर्शादिक हीं निमित्तें असतां क्षौर करावें." विवाहादिक केलेला असेल तथापि त्यानें महालय, गयाश्राद्ध, मातापितरांचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध, सपिंडीपर्यंत मृताची क्रिया, आणि षोडश मासिकश्राद्धें यांमध्यें पिंडदान, तिलतर्पण हीं करावीं. कोणी ग्रंथकार भ्राता, चुलता इत्यादिकांच्या प्रतिसांवत्सरिक श्राद्धामध्येंहि पिंडदान, तर्पण करावें असें सांगतात. याप्रमाणें पिंडपितृयज्ञ, अष्टका, अन्वष्टका आणि पूर्वेद्युःश्राद्ध ह्या श्राद्धांमध्यें पिंडदानाचा निषेध नाहीं. दर्शश्राद्ध तर पिंडरहितच करावें, व यावरून ऋकूशाखी यांला व्यतिषंग (दोहोंचा बरोबर प्रयोग) नाहीं. याप्रमाणें मंडपोद्वासन झाल्यानंतर करावें कोणतें व न करावें कोणतें याचा निर्णय सांगितला.

---

अथवधूप्रवेशः विवाहात्षोडशदिनांतःसमदिनेषुपंचमसप्तमनवमदिनेषुचरात्रौस्थिरलग्ने नूतनभिन्नगृहेवधूप्रवेशःशुभः प्रथमदिनेपिकेचित् षष्ठदिनेनिषेधःप्रयोगरत्नोक्तोनिर्मूलःषोडशदिनमध्येपूर्वोक्तदिनेषुप्रवेशोक्तनक्षत्रतिथिवारगोचरस्थचंद्रबलाद्यभावेपि गुरुशुक्रास्तादावपिनदोषः व्यतीपातेक्षयतिथौग्रहणेवैधृतौतथा अमासंक्रांतिविष्ट्यादौप्राप्तकालेपिनाचरेत् प्रथमनववधूप्रवेशेविवाहार्थगमनेचप्रतिशुक्रदोषोनास्ति द्विरागमनेएवसंमुखशुक्रदोषः षोडशदिनोत्तरंमासपर्यंतंविषमदिनेषुमासोत्तरंविषममासेषुवर्षोत्तरंविषमवर्षेषुवधूप्रवेशःशुभःसमेष्वेतेषुवैधव्यादिदोषः पंचमवर्षोत्तरंसमविषमविचारोनास्ति षोडशदिनोत्तरंवधूप्रवेशेनक्षत्राणि अश्विनीरोहिणीमृगपुष्यमघोत्तरात्रयहस्तचित्रास्वात्यनुराधामूलश्रवणधनिष्ठारेवत्यः शुभाः मासोत्तरंमार्गशीर्षमाघफाल्गुनवैशाखज्येष्ठमासाःशुभाः चतुर्थीनवमीचतुर्दशीपंचदश्यमावास्याभिन्नतिथयोरविभौमेतरवाराश्चशुभाः इतिनववधूप्रवेशः ॥

## आतां वधूप्रवेशाचा निर्णय सांगतों.

विवाहापासून सोळा दिवसपर्यंत समदिवसीं, व पांचवा, सातवा, नववा ह्या विषम दिवसीं, रात्रौ, स्थिरलग्नीं, नूतनभिन्न गृहीं वधूप्रवेश शुभ होय. प्रथम दिवसींहि वधूप्रवेश करावा असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. प्रयोगरत्नग्रंथांत सहाव्या दिवसाचा निषेध सांगितला आहे परंतु त्याला प्रमाण नाहीं. सोळा दिवसांमध्यें पूर्वी सांगितलेल्या दिवसीं प्रवेशास उक्त जीं नक्षत्र, तिथि, वार, गोचरस्थचंद्रबल इत्यादिक तीं जरी नसतील तथापि दोष नाहीं, व गुरुशुक्रांचे अस्तादिकाचाहि दोष नाहीं. " व्यतीपात, क्षयतिथि, ग्रहण, वैधृति, अमावास्या, संक्रांति आणि भद्रा इत्यादिक कुयोग असतील तर, प्राप्तकालकर्म जरी आहे तथापि तें करूं नये; ह्मणजे ज्या शुभकर्माचा जो दिवस त्यादिवसीं जर व्यतीपात इत्यादिक असेल तर त्या दिवसीं तें शुभकर्म करूं नये. पहिल्यानें नवीन वधूचा प्रवेश, व विवाहासाठीं गमन यांविषयीं प्रतिशुक्राचा दोष नाहीं. द्विरागमनाविषयींच संमुख शुक्राचा दोष आहे. सोळा दिवसांनंतर

वधूप्रवेश करणें तो एक महिन्यापर्यंत विषमदिवसीं करावा, मासानंतर करणें तो विषम मासीं करावा, वर्षानंतर करणें तो विषमवर्षी करावा, तो शुभ होय. सोळा दिवसांनंतर समदिवसीं, सममासीं, समवर्षी वधूप्रवेश केला असतां वैधव्यादिक दोष प्राप्त होतो. पांचव्या वर्षानंतर वधूप्रवेशाविषयीं समविषमांचा विचार करण्याची गरज नाहीं. **सोळा दिवसांनंतर वधूप्रवेशाविषयीं नक्षत्रें**–अश्विनी, रोहिणी, मृग, पुष्य, मघा, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, हस्त, चित्रा, स्वाती, अनुराधा, मूळ, श्रवण, धनिष्ठा आणि रेवती हीं नक्षत्रें वधूप्रवेशाविषयीं शुभ होत. एक मासानंतर मार्गशीर्ष, माघ, फाल्गुन, वैशाख, ज्येष्ठ हे मास शुभ होत. चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, पौर्णिमा, अमावास्या ह्या तिथि वर्ज्य करून इतर तिथि शुभ होत. रविवार व भौमवार हे वर्ज्य करून इतर वार शुभ होत. याप्रकारें नववधूचा प्रवेश सांगितला.

---

**अथद्विरागमनं तत्रमाघफाल्गुनवैशाखाःशुक्लपक्षश्चशुभाः अश्विनीरोहिणीपुनर्वसुपुष्योत्तरात्रयानुराधाज्येष्ठाहस्तस्वातीचित्राश्रवणशततारकानक्षत्रेषुचंद्रबुधगुरुशुक्रवारेगुरुशुक्रास्तादिरहितेस्थिरलग्नादिशुभकालेद्वितीयवधूप्रवेशःशुभः ॥**

## आतां द्विरागमन सांगतों.

द्विरागमनाविषयीं माघ, फाल्गुन, वैशाख, शुक्लपक्ष, हे शुभ होत. अश्विनी, रोहिणी, पुनर्वसु, पुष्य, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, अनुराधा, ज्येष्ठा, हस्त, स्वाती, चित्रा, श्रवण, शततारका, ह्या नक्षत्रीं; चंद्र, बुध, गुरु, शुक्र ह्या वारीं; गुरुशुक्रांच्या अस्तादिकानें रहित अशा स्थिरलग्नादि शुभकालीं, द्वितीय वधूप्रवेश शुभ होय.

---

**द्विरागमनेधिमासविष्णुशयनमासाःसमवत्सराःप्रतिशुक्रादिदोषाश्चवर्ज्याः द्विरागमोपि** यदिविवाहमारभ्यषोडशदिनमध्येक्रियतेतदाप्रतिशुक्रादिदोषोस्तादिदोषश्चनास्ति द्विरागमेषोडशवासरांतरेकादशाहेसमवासरेषु नचात्रऋक्षंनतिथिर्नयोगोनवारशुद्ध्यादिविचारणीयं केवलांगिरसकेवलभृगुभरद्वाजवसिष्ठकश्यपात्रिवत्सगोत्राणांप्रतिशुक्रदोषोन रेवत्यश्विनीभरणीकृत्तिकाद्यचरणेषुचंद्रेसतिशुक्रस्यांधत्वात्प्रतिशुक्रदोषोन दुर्भिक्षेदेशविप्लवेविवाहेतीर्थगमनेएकनगरग्रामयोश्चप्रतिशुक्रदोषोन इतिद्विरागमः ॥

द्विरागमनाविषयीं अधिक मास, विष्णुशयनमास (आषाढ शुक्ल एकादशीपासून कार्तिक शुक्ल द्वादशीपर्यंत चार मास), सम वर्षे आणि प्रतिशुक्रादिक दोष हे वर्ज्य करावे. जर विवाहापासून सोळा दिवसांमध्यें द्विरागमन करणें असेल तर त्याविषयीं प्रतिशुक्रादिक दोष व अस्तादिक दोष नाहींत. " विवाहापासून सोळा दिवसांमध्यें अकराव्या दिवसीं व समदिवसीं द्विरागमन केलें असतां त्याविषयीं नक्षत्र, तिथि, योग, दिनशुद्धि इत्यादिकांचा विचार करण्याची गरज नाहीं. केवलांगिरस केवल भृगु, भरद्वाज, वसिष्ठ, कश्यप, अत्रि, वत्स हीं ज्यांचीं गोत्रें आहेत त्यांना प्रतिशुक्रदोष नाहीं. रेवती, अश्विनी, भरणी व कृत्तिकांचा प्रथम चरण यांचेठायीं चंद्र असतां शुक्राला अंधत्व दोष असतो याकरितां प्रतिशुक्राचा दोष

नाहीं. दुष्काळ, देशोपद्रव, विवाह, तीर्थयात्रा, एक नगर, एक ग्राम यांचेठायीं प्रतिशुक्र-दोष नाहीं. याप्रमाणें द्विरागमनाचा निर्णय सांगितला.

---

उद्वाहात्प्रथमेशुचौयदिवसेद्भर्तुर्गृहेकन्यकाहन्यात्तज्जननींक्षयेनिजतनुंज्येष्ठेपतिज्येष्ठकं पौषेचश्वशुरंपतिंचमलिनेचैत्रेस्वपित्रालयेतिष्ठंतीपितरंनिहंतिनभयंतेषामभावेभवेत् इतिव ध्वाःप्रथमाब्देनिवासविचारः ॥

## भर्त्रादिगृहीं प्रथमवर्षीं वासाचा निषेध सांगतों.

विवाहापासून पहिल्या वर्षी आषाढमासीं जर भर्त्याच्या गृहीं कन्या राहील तर भर्त्याची माता ह्मणजे स्वकीय सासू तिचा ती कन्या नाश करील. क्षयमासीं स्वशरीराचा, ज्येष्ठमासीं वडील दिराचा, पौषमासीं सासऱ्याचा, अधिकमासीं पतीचा, चैत्रमासीं पित्याच्या गृहीं असेल तर पित्याचा नाश करील, यास्तव या मासीं त्या त्या गृहीं कन्येनें राहूं नये. सासू इत्यादिक नसतील तर भय नाहीं. याप्रमाणें प्रथम वर्षी कन्येच्या राहण्याचा निर्णय सांगितला.

---

अथपुनर्विवाहः दुष्टलग्नेयथोक्तग्रहताराद्यभावेऽन्यत्रापिदुष्टयोगाद्यशुभकालेकूष्मांडीघृतहोमादियथोक्तविधिंविनासूतकादौचविवाहेजातेतयोरेवदंपत्योःसुमुहूर्तेपुनर्विवाहःकर्तव्यः सुरापीव्याधिताधूर्तावंध्यार्थघ्न्यप्रियंवरा स्त्रीप्रसूश्चाधिवेत्तव्यापुरुषद्वेषिणीतथा अधिवेदनंभार्यांतरकरणं अप्रजांदशमेवर्षेस्त्रीप्रजांद्वादशेत्यजेत् मृतप्रजांपंचदशेसद्यस्त्वप्रियवादिनीं अत्राप्रियवादोव्यभिचारः प्रतिकूलभाषणरूपस्यतस्यप्रायःकलौसार्वत्रिकत्वात् आज्ञासंपादिनीं दक्षांवीरसूंप्रियवादिनीं पत्नींत्यक्त्वाभोगार्थमन्योद्वाहीपूर्वभार्यायैस्वधनस्यतृतीयांशंदद्यात् निर्धनश्चेत्तांपोषयेत् मनुः अधिविन्नातुयानारीनिर्गच्छेद्रोषितागृहात् सासद्यःसन्निरोद्धव्यात्याज्यावाकुलसन्निधौ अग्निशुश्रूषादिधर्माचरणंज्येष्ठयासहकार्यं नतुकनिष्ठया इदंज्येष्ठायाआज्ञासंपादिनीत्वे यदितुरोषादिशीलेनसमनंतरोक्तमनुवाक्याज्ज्येष्ठाकुलसन्निधौत्यागार्हा गृहांतरेनिरोधार्हावातर्हिकनिष्ठयापिसहधर्मंचरेदन्यथाधर्मभ्रंशापातात् तथावीरसुतायास्यादाज्ञासंपादिनीचया दक्षाप्रियंवदाशुद्धातामत्रविनियोजयेदितिमाधवीयेस्मृतेश्चद्वितीयविवाहहोमःपूर्वविवाहसंबंधिगृह्याग्नावेवकार्यः तदसंभवेलौकिकाग्नौकार्यः लौकिकाग्नौकरणपक्षेद्वितीयविवाहहोमादिनोत्पन्नाग्नेर्गृह्याग्निनाद्वयोर्गृह्याग्न्योःसंसर्गःकार्यः ॥

## आतां पुनर्विवाह सांगतों.

दुष्ट लग्न, यथोक्त ग्रह तारा नसणें, इतर दुष्ट योग इत्यादिक अशुभ काल अशा समयीं विवाह झाला असेल, अथवा आशौच प्राप्त झालें असून कूष्मांडीमंत्रांनीं यथोक्त विधि केल्यावांचून आशौचांत विवाह झाला असेल तर त्याच वधूवरांचा सुमुहूर्तावर पुनः विवाह करावा. “मद्यपान करणारी, व्याधिष्ठ, प्रतारणा करणारी, वंध्या, अर्थनाश करणारी, अप्रियवाद करणारी, कन्या प्रसवणारी आणि पतीचा द्वेष करणारी असी जी स्त्री ती अधिवेत्तव्या.” अधिवेदन ह्मणजे दुसरी स्त्री करणें तें, ह्मणजे दुसरी स्त्री करावी हा फलितार्थ होय.

“ जीला संतति होत नसेल तिचा त्याग दहाव्या वर्षी करावा. कन्या प्रसवणारी तिचा त्याग बाराव्या वर्षी करावा. मृतवंध्येचा त्याग पंधराव्या वर्षी, अप्रियवादिनीचा त्याग तात्कालिक करावा. एथें अप्रियवाद ह्मणजे व्यभिचार असा अर्थ जाणावा. कारण, कलीमध्यें बहुधा सर्वत्र ठिकाणीं प्रतिकूलभाषणरूप अप्रियवाद आहे. आज्ञेमध्यें वागणारी, गृहकृत्यामध्यें दक्ष, वीर पुत्राला प्रसवणारी, प्रिय भाषण करणारी, असी स्त्री असून तिचा त्याग करून उपभोगाकरितां दुसऱ्या स्त्रीशीं विवाह करील तर त्यानें पूर्वीच्या स्त्रियेला आपल्या संपत्तीचा तिसरा अंश द्यावा. दरिद्री असेल तर तिचें अन्नाच्छादनेंकरून पोषण करावें. मनु सांगतो— “ अधिविन्ना (एका पुरुषानें विवाहित ज्या दोन स्त्रिया त्यांतील पहिली स्त्री ) जी स्त्री ती रोषानें घरांतून जाईल तर तिला तत्काल दुसऱ्या घरांत बंदोबस्तानें ठेवावी, अथवा, आपल्या कुलसन्निध टाकावी ह्मणजे कुळांतील श्रेष्ठ पुरुषांच्या स्वाधीन करावी.” अग्नीची सेवा इत्यादिक धर्माचरण ( सायंप्रातः औपासन, अग्निहोत्र, इत्या० ) करणें तें ज्येष्ठ स्त्रियेबरोबर करावें, कनिष्ठ स्त्रियेबरोबर करूं नये. ज्येष्ठ स्त्रियेबरोबर धर्माचरण करावें ह्मणून जें सांगितलें तें, ज्येष्ठ स्त्री आज्ञा मान्य करणारी असेल तर असें समजावें. जर रागीट स्वभावाची असल्यामुळें पूर्वी समीप सांगितलेल्या मनुवाक्यें‌करून ज्येष्ठ स्त्री कुलसन्निध टाकण्यास योग्य असी असेल अथवा अन्य गृहीं निरोध करून ठेवण्यास योग्य असेल तर कनिष्ठेसहवर्तमानाहि धर्माचें आचरण करावें. तसें न करील तर धर्माचा नाश प्राप्त होईल. तसीच वीरपुत्राची माता, आज्ञा संपादन करणारी, गृहकार्याविषयीं दक्ष, प्रियभाषिणी, आचरणानें शुद्ध असी कनिष्ठ स्त्री असेल तर ती धर्मकार्याविषयीं योजावी, ह्मणजे तिच्या सहवर्तमान धर्माचरण करावें, अशी माधवग्रंथांतील स्मृति आहे. दुसऱ्या विवाहसंबंधी होम करावयाचा तो पूर्वीच्या विवाहसंबंधी गृह्याग्नीवरच करावा. पूर्वीचा विवाहसंबंधी अग्नि नसेल तर लौकिकाग्नीवर करावा. लौकिकाग्नीवर करणें ह्या पक्षीं दुसऱ्या विवाहाचें जें विवाहहोमादिक तेणेंकरून सिद्ध झालेला जो अग्नि तो गृह्याग्नि असल्यामुळें दोन गृह्याग्नींचा संसर्ग करावा.

---

अथाग्निद्वयसंसर्गप्रयोगः देशकालौसंकीर्त्यममद्वाभ्यांभार्याभ्यांसहनिष्पन्नगृह्याग्न्योःताभ्यांसहाधिकारसिद्धिद्वाराश्री० र्थंसंसर्गंकरिष्यइतिसंकल्प्यस्वस्तिवाचनंकृत्वाउदगपवर्गेस्थंडिलेकृत्वादक्षिणेस्थंडिलेज्येष्ठायागृह्याग्निमुत्तरेकनिष्ठायागृह्याग्निंप्रतिष्ठाप्यं प्रथमाग्नौज्येष्ठपत्न्यान्वारब्धोन्वाधानंकुर्यात् अग्निद्वयसंसर्गार्थेप्रथमाग्निहोमकर्मणिदेवतापरिग्रहार्थमन्वाधानंकरिष्येचक्षुषीआज्येनेत्यंतेअग्निंनवभिराज्याहुतिभिःशेषेणेत्यादि अग्निमीळेइतिनवानांमधुच्छंदाअग्निर्गायत्री अग्निद्वयसंसर्गार्थप्रथमाग्नौप्रधानाज्यहोमेवि०अग्निमीळेइत्यादिनवभिर्ऋग्भिःप्रत्यृचंस्रुवेणनवाज्याहुतीर्जुहुयात् अग्नयइदमितिसर्वत्रत्यागः होमशेषंसमाप्य अयंतेयोनिरितिमंत्रेणज्येष्ठाग्निंसमिधिसमारोप्यप्रत्यवरोहेतिमंत्रेणतंद्वितीयाग्नौप्रत्यवरोह्य ध्यात्वापत्नीद्वयान्वारब्धोन्वाधानंकुर्यात् अग्निद्वयसंसर्गार्थेप्रथमसंसृष्टद्वितीयाग्नौविहितहोमेदेवतापरिग्रहार्थमन्वाधानंकरिष्ये आज्यभागांतेअग्निंप्रधानंषड्वारमाज्येनशेषेणेत्यादिप्रोक्षणींकुशान्दर्वीस्रुवौप्रणीताज्यपात्रेइध्माबर्हिषीत्यष्टौपात्राणि स्रुचिचतुर्गृहीतमाज्यंगृहीत्वापत्नीद्वया

न्वारब्धोजुहुयात् अग्नावग्निरित्यस्यहिरण्यगर्भोग्निरष्टी अग्निद्वयसंसर्गार्थेसंसृष्टाग्नौप्रधाना ज्यहोमेविनि० अग्नावग्निश्चरतिप्रविष्टऋषीणांपुत्रोअधिराजएषः तस्मैजुहोमिहविषाघृतेनमा देवानांमोमुहद्भागधेयंस्वाहा अग्नयइदं०एवमग्रेपि आज्यस्यस्रुचिचतुर्ग्रहणंविनियोगस्त्यागश्च अग्निनाग्निर्मेधातिथिःकाण्वोग्निर्गायत्री अग्निनाग्निःसमिध्यते० अस्तीदमितितिसृणांविश्वा मित्रोग्निरनुष्टुप्अंत्येत्रिष्टुभौ अस्तीदमधि० अरण्यो० उत्तानायाम० पाहिनोअग्नइत्यस्यभ र्गःप्रगाथोग्निर्बृहती पाहिनो०भिर्वसो०होमशेषंसमाप्याहिताग्नयेगोयुग्मंदत्वाविप्रान्भोजयेत् इत्यग्निद्वयसंसर्गप्रयोगः ॥

## आतां दोन अग्नींचा संसर्गप्रयोग सांगतों.

देशकालांचा उच्चार करून संकल्प करावा. तो असा—" मम द्वाभ्यां भार्याभ्यां सह निष्पन्नगृह्याग्न्योः ताभ्यां सहाधिकारसिद्धिद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं संसर्गं करिष्ये," असा संकल्प करून पुण्याहवाचन करावें. नंतर दक्षिण दिशेला एक स्थंडिल व उत्तर दिशेला दुसरें स्थंडिल याप्रमाणें दोन स्थंडिलें घालून दक्षिण स्थंडिलावर ज्येष्ठ स्त्रियेचा गृह्याग्नि व उत्तर स्थंडिलावर कनिष्ठ स्त्रियेचा गृह्याग्नि याप्रमाणें दोन अग्नि स्थापन करून ज्येष्ठ पत्नीनें अन्वारब्ध होत्साता त्यानें पहिल्या अग्नीवर अन्वाधान करावें. तें असें—" अग्निद्वयसंसर्गार्थे प्रथमाग्निहोमकर्मणि देवतापरिग्रहार्थमन्वाधानं करिष्ये ॥ चक्षुषी आज्येनेत्यंते अग्निं नवभिराज्याहुतिभिः शेषेणेत्यादि," याप्रमाणें अन्वाधान करून चक्षुषीपर्यंत कर्म झाल्यावर प्रधानहोम करावा. त्याचे मंत्र—" अग्निमीळे इतिनवानां मधुच्छंदा अग्निर्गायत्री ॥ अग्निद्वयसंसर्गार्थप्रथमाग्नौ प्रधानाज्यहोमेविनियोगः ॥ अग्निमीळे० " इत्यादिक अशा नऊ ऋचांनीं प्रत्येक ऋचेनें स्रुवापात्रें करून घृताच्या नऊ आहुति हवन कराव्या, व " अग्नयइदंनमम " असा सर्वत्र त्याग ह्मणावा. याप्रमाणें प्रधानहोम करून होमशेष समाप्त करून, " अयंतेयोनिः० " या मंत्रानें ज्येष्ठाग्नीचा समिधेवर समारोप करून, "प्रत्यवरोह०" या मंत्रानें तो ज्येष्ठाग्नि दुसऱ्या अग्नीवर प्रत्यवरोह करावा ह्मणजे अग्निसमारोप केलेली समिधा दुसऱ्या अग्नीमध्यें हवन करावी, नंतर अग्नीचें ध्यान करावें. नंतर दोन्ही स्त्रियांनीं अन्वारब्ध होत्साता त्यानें अन्वाधान करावें. तें असें—" अग्निद्वयसंसर्गार्थे प्रथमसंसृष्टद्वितीयाग्नौ विहितहोमे देवतापरिग्रहार्थमन्वाधानं करिष्ये ॥ आज्यभागांते अग्निं प्रधानं षड्वारमाज्येन शेषेणेत्या० " याप्रमाणें अन्वाधान करावें. प्रोक्षणी, कुश, दर्वी, स्रुवा, प्रणीता, आज्यपात्र, इध्मा, बर्हि याप्रमाणें आठ पात्रें स्थापावीं. आज्यभागपर्यंत कर्म झाल्यावर दर्वीपात्रामध्यें स्रुवापात्रेंकरून चार वेळ आज्य घेऊन दोन्ही पत्नींनीं अन्वारब्ध होत्साता होम करावा. होमाचे मंत्र—" अग्नावग्निरित्यस्य हिरण्यगर्भोग्निरष्टी ॥ अग्निद्वयसंसर्गार्थे संसृष्टाग्नौ प्रधानाज्यहोमे विनियोगः ॥ अग्नावग्निश्चरतिप्रविष्ट ऋषीणांपुत्रोअधिराजएषः ॥ तस्मैजुहोमिहविषाघृतेन मादेवानांमोमुहद्भागधेयं स्वाहा " याप्रमाणें आहुति देऊन " अग्नयइदंनमम, " असा त्याग ह्मणावा. याप्रमाणें पुढेंहि जाणावें. प्रत्येक आहुतिसमयीं दर्वीपात्रांत चार वेळ घृत घेणें, विनियोग करणें व त्यागाचा उच्चार करणें हें सर्व

पूर्वीप्रमाणें पुढेंहि करावें. पुढच्या आहुतींचे मंत्र—"अग्निनाग्निर्मेधातिथिः काण्वोग्निर्गायत्री ॥ अग्निनाग्निः समि० ॥ अस्तीदमिति तिसृणांविश्वामित्रोग्निरनुष्टुप् ॥ अंत्येत्रिष्टुभौ ॥ अस्तीदमधि० ॥ अरण्यो० ॥ उत्तानाया० ॥ पाहिनो अग्नइत्यस्य भर्गः प्रगाथोग्निर्बृहती ॥ पाहिनो० भिर्वसो०," याप्रमाणें प्रधानहोम करून होमशेष समाप्त करून अग्निहोत्री ब्राह्मणाला दोन गोप्रदानें करून ब्राह्मणांला भोजन घालावें. याप्रमाणें दोन अग्नींचा संसर्गप्रयोग सांगितला.

---

पत्न्योरेकायदिमृतादग्ध्वातेनैवतांपुनः आदधीतान्ययासार्धमाधानविधिनागृही ॥

"दोन स्त्रियांतून एक जर मृत होईल तर त्या संसर्गाग्नीकरूनच तिचें दहन करून गृहस्थाश्रमी यानें दुसऱ्या स्त्रियेसहवर्तमान आधानविधीकरून अग्नि उत्पन्न करून तो धारण करावा."

---

द्वितीयादिविवाहकालः प्रमदामृतिवासरादितःपुनरुद्वाहविधिर्वरस्यच विषमेपरिवत्सरेशुभोयुगुलेचापिमृतिप्रदोभवेत् संकटेमहारुद्राभिषेकंमृत्युंजयमंत्रजपंवाकृत्वाविवाहः कार्य इतिभाति तृतीयामानुषीकन्यानोद्वाह्याम्रियतेहिसा विधवावाभवेत्तस्मात्तृतीयेर्कंसमुद्वहेत् ॥

दुसरा, इत्यादिक जो विवाह त्याचा काल सांगतों.—"वरानें पुनः विवाह करणें तो स्त्रियेच्या मृतदिवसापासून विषम वर्षी करावा तो शुभ होय. समवर्षी केला असतां मृत्युदायक होतो." संकट असेल तर महारुद्राचा अभिषेक किंवा मृत्युंजयमंत्राचा जप करून विवाह करावा असें मला वाटतें. "तिसरी मनुष्यकन्या वरूं नये, वरिली असतां ती मृत होईल, अथवा विधवा होईल यास्तव तिसऱ्या विवाहाचे ठिकाणीं अर्कासहवर्तमान (रुईबरोबर) विवाह करावा.

---

अथार्कविवाहः रविशन्योर्वारेहस्तर्क्षेवान्यत्रशुभदिनेवापुष्पफलयुतमर्कंगत्वाअर्ककन्या दातारमाचार्यंवृत्वारक्तगंधादिभूषितोदेशकालौस्मृत्वा ममतृतीयमानुषीविवाहजन्यदोषपरिहारार्थंतृतीयमर्कविवाहंकरिष्ये आचार्यंवृत्वानांदीश्राद्धांतंकुर्यात् दातामधुपर्कयज्ञोपवीतवस्त्रगंधमाल्यादिभिर्वरंपूजयेत् अर्कस्यपुरतःस्थित्वा त्रिलोकवासिन्सप्ताश्वछाययासहितोरवे तृतीयोद्वाहजंदोषंनिवारयसुखंकुरुइतिप्रार्थ्य छायायुतंरविमर्केध्यात्वाब्लिंगैरभिषिच्यवस्त्रादिभिराकृष्णेनेतिमंत्रेणसंपूज्य श्वेतवस्त्रेणसूत्रेणचावेष्ट्यगुडौदनंनिवेद्यतांबूलंदद्यात् ममप्रीतिकरायेयंमयासृष्टापुरातनी अर्कजाब्रह्मणासृष्टाह्यस्मान्संप्रतिरक्षतुइत्यर्कंप्रदक्षिणीकृत्य नमस्तेमंगलेदेविनमःसवितुरात्मजे त्राहिमांकृपयादेविपत्नीत्वंमइहागता अर्कत्वंब्रह्मणासृष्टः सर्वप्राणिहितायच वृक्षाणामधिभूतस्त्वंदेवानांप्रीतिवर्धन तृतीयोद्वाहजंपापंमृत्युंचाशुविनाशयेतिचप्रदक्षिणीकुर्यात् अंतःपटधारणादिकन्यादानपर्यंतंविधिंकृत्वा कन्यादातादित्यस्यप्रपौत्रींसवितुःपौत्रीमर्कस्यपुत्रींकाश्यपगोत्रामर्ककन्याममुकगोत्रायवरायतुभ्यंसंप्रददे अर्ककन्यामिमांविप्रयथाशक्तिविभूषितां गोत्रायशर्मणेतुभ्यंदत्तांविप्रसमाश्रय दक्षिणांदत्वागायत्र्यावेष्टितसूत्रेणबृहत्सामेतिमंत्रेणअर्कवरयोःकंकणंबध्वार्कस्यचतुर्दिक्षुकुंभेषुविष्णुंनाममंत्रेणषो

**डशोपचारैःसंपूज्यअर्कस्योत्तरेर्कपत्न्यान्वारब्धोवरःअस्याःसम्यक्भार्यात्वसिद्ध्यर्थंपाणिग्रह** होमंकरिष्ये आघारदेवतेआज्येनेत्यंतेबृहस्पतिंअग्निंअग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचाज्यद्रव्येणशेषेण स्विष्टकृतं आघारांतंकृत्वासंगोभिरित्यस्यांगिरसोबृहस्पतिस्त्रिष्टुप् आज्यहोमेविनियोगः सं गोभिरांगिरसो०बृहस्पतयइदं०यस्मैत्वेतिवामदेवोग्निस्त्रिष्टुप् यस्मैत्वांकामकामायवयंसम्राड्य जामहे तमस्मभ्यंकामंदत्वाथेदंत्वंघृतंपिबस्वाहा अग्नयइदं० ततोव्यस्तसमस्तव्याहृतिभिर्हु त्वाहोमशेषंसमाप्यमयाकृतमिदंकर्मस्थावरेषुजरायुणा अर्कापत्यानिनोदेहितत्सर्वंक्षंतुमर्हसि इतिप्रार्थ्यशांतिसूक्तपाठांतेगोयुग्ममाचार्यायदत्वास्वधृतवस्त्राणिगुरवेदत्वान्यानिधारयेत् दश **त्रयोवाविप्राभोज्याः इत्यर्कविवाहः ॥**

## आतां अर्कविवाह सांगतों.

कर्त्यानें रविवारीं किंवा शनिवारीं अथवा हस्तनक्षत्रीं, अथवा दुसऱ्या कोणत्या एका शुभदिवसीं पुष्पफलांनीं युक्त असा अर्कवृक्ष पाहून त्या वृक्षाच्या समीप जाऊन अर्ककन्यादान करणारा आचार्य वरून आरक्त गंधादिकानें भूषित होत्साता देशकालांचा उच्चार करून संकल्प करावा. तो असा–"**ममतृतीयमानुषीविवाहजन्यदोषपरिहारार्थंतृतीयमर्कविवाहं करिष्ये,**" असा संकल्प करून आचार्याला वरून नांदीश्राद्धापर्यंत कर्म करावें. दात्यानें मधुपर्क, यज्ञोपवीत, वस्त्रें, गंध, पुष्पमाळा इत्यादिक उपचारांनीं वराची पूजा करावी. नंतर अर्कवृक्षाच्या पुढें बसून प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र–"**त्रिलोकवासिन् सप्ताश्व छायया सहितो रवे ॥ तृतीयोद्वाहजं दोषं निवारय सुखं कुरु,**" असी प्रार्थना करून छायायुक्त रवीचें अर्काचे ठायीं ध्यान करून अब्लिंगमंत्रांनीं ( समुद्रज्येष्ठा इ० ) अभिषेक करून वस्त्रादिक उपचारांनीं "**आकृष्णेने०**" ह्या मंत्रेंकरून पूजा करून श्वेत वस्त्र, व सूत्र यांहींकरून वृक्षाला वेष्टन करून गुडौदन निवेदन करून तांबूल द्यावें. नंतर, "**ममप्रीतिकरायेयं मया सृष्टा पुरातनी ॥ अर्कजा ब्रह्मणा सृष्टाद्यास्मान्संप्रति रक्षतु,**" या मंत्रानें अर्कवृक्षाला प्रदक्षिणा करून पुनः "**नमस्तेमंगले देवि नमः सवितुरात्मजे ॥ त्राहि मां कृपया देवि पत्नी त्वं म इहागता ॥ अर्क त्वं ब्रह्मणा सृष्टः सर्वप्राणिहितायच ॥ वृक्षाणामधिभूतस्त्वं देवानां प्रीतिवर्धन ॥ तृतीयोद्वाहजं पापं मृत्युं चाशु विनाशय,**" या मंत्रांनीं प्रदक्षिणा करावी. मग अंतःपटधारणापासून कन्यादानपर्यंत विधी करून कन्यादात्यानें "**आदित्यस्य प्रपौत्रीं सवितुः पौत्रीं अर्कस्य पुत्रीं काश्यपगोत्रामर्ककन्याममुकगोत्राय वराय तुभ्यं संप्रददे ॥ अर्ककन्यामिमां विप्र यथाशक्तिविभूषितां ॥ गोत्राय शर्मणे तुभ्यं दत्तां विप्र समाश्रय,**" या मंत्रानें अर्ककन्या द्यावी. नंतर दक्षिणा देऊन गायत्रीमंत्रानें अर्क व वर यांला सूत्राचें वेष्टन करून त्या सूत्रानें "**बृहत्साम०**" या मंत्रानें अर्कवृक्ष व वर यांला कंकण बांधून अर्कवृक्षाच्या चार दिशांचेठायीं चार कलश मांडून त्या प्रतिकलशावर नाममंत्रानें विष्णूची षोडशोपचार पूजा करून अर्कवृक्षाच्या उत्तरेस अर्कपत्नीनें अन्वारब्ध होत्साता वर यानें, "**अस्याःसम्यक्भार्यात्वसिद्धये पाणिग्रहहोमं करिष्ये,**" असा संकल्प करून अन्वाधान करावें. तें असें–"**आघारदेवते आज्येनेत्यंते बृहस्पतिं अग्निं अग्निं वायुं सूर्य**

प्रजापतिं चाज्यद्रव्येण शेषेण स्विष्टकृतं," याप्रमाणें अन्वाधान करून आघारांत कर्म करून प्रधानहोम करावा. नंतर "संगोभिरित्यस्यांगिरसो बृहस्पतिस्त्रिष्टुप् ॥ आज्यहोमेविनियोगः ॥ संगोभिरांगिरसो० ॥ बृहस्पतय इदं न मम ॥ यस्मैत्वेति वामदेवोग्निस्त्रिष्टुप् ॥ यस्मै त्वां काम कामाय वयं सम्राड्यजाम हे ॥ तमस्मभ्यं कामं दत्वाथेदं त्वं घृतं पिब स्वाहा ॥ अग्नय इदं०" या मंत्रांनीं होम करून नंतर व्यस्तसमस्तव्याहृति मंत्रानीं होम करून होमशेष समाप्त करून, "मया कृतमिदं कर्म स्थावरेषु जरायुणा ॥ अर्कापत्यानि नो देहि तत्सर्वं क्षंतुमर्हसि," या मंत्रानें प्रार्थना करून शांतिसूक्तांचा पाठ केल्यानंतर दोन गाई आचार्याला देऊन आपण धारण केलेलीं वस्त्रें आचार्याला देऊन दुसरीं वस्त्रें धारण करावीं. दहा अथवा तीन ब्राह्मणांला भोजन द्यावें. याप्रमाणें अर्कविवाह सांगितला.

---

**श्रीमन्नाथांघ्रिकमलंदीनानाथदयार्णवं स्मारंस्मारंकामपूरमान्हिकाचरणंब्रुवे ॥**

## आतां यानंतर आन्हिकविधि सांगतों.

दीन, अनाथ यांविषयीं दयासागर, भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारें असें जें श्रीमान् लक्ष्मीपतीचें चरणकमल त्याचें स्मरण करून स्मरण करून आन्हिक आचार सांगतों.

---

**प्रथमोक्तोबव्हृचानांप्रकारःसतुयाजुषैः ग्राह्योयत्रस्वसूत्रोक्तोविशेषःस्यान्नबाधकः ॥**

ऋक्शाखी यांचा पूर्वी जो प्रकार ( निर्णय ) सांगितला त्याला आपल्या सूत्रामध्यें सांगितलेला विशेषनिर्णय बाधक नसेल तर तो यजुःशाखी यांनीं घ्यावा.

---

**ब्राह्मेमुहूर्तेउत्थायश्रीविष्णुंस्मृत्वागजेंद्रमोक्षादिपठित्वाइष्टदेवतादिस्मरेत् समुद्रवसनेदेविपर्वतस्तनमंडिते विष्णुपत्निनमस्तुभ्यंपादस्पर्शंक्षमस्वमइतिभूमिंप्राथ्र्यगवादिमंगलानिपश्येत्।**

ब्राह्ममुहूर्तीं[1] ( पाहाटे ) उठून श्रीविष्णूचें स्मरण करून गजेंद्रमोक्षादिक स्तोत्रांचा पाठ करून इष्ट देवतादिकांचें स्मरण करावें. नंतर भूमीची प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र— "समुद्रवसनेदेवि पर्वतस्तनमंडिते ॥ विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे" याप्रमाणें प्रार्थना करून गाई इत्यादिक मंगलपदार्थांचें दर्शन घ्यावें.

---

**अथमूत्रपुरीषोत्सर्गादिविधिः तृणाद्यंतर्हितभूमौशिरः प्रावृत्ययज्ञोपवीतंनिवीतंपृष्ठतः कर्णेवाकृत्वाघ्राणपिधानंकृत्वादिवासंध्ययोरुदङ्मुखोरात्रौदक्षिणामुखोमौनी अनुपानत्कआसीनोमूत्रपुरीषोत्सर्गंकुर्यात् यज्ञोपवीतस्यनिवीतत्वंविनैवकर्णेधारणमनाचारः मार्गजलदेवालयनदीतीरादौमलोत्सर्गोनिषिद्धःहस्तान्द्वादशसंत्यज्यमूत्रंकुर्याज्जलाशयात् अवकाशेषोडशेवा पुरीषेतुचतुर्गणं प्रत्यर्कादिमेहनेस्वशकृद्दर्शनेचसूर्यंगांवापश्येत् ततोगृहीतशिश्नउत्थायशौचं कुर्यात् मूत्रोत्सर्गेशुद्धमृदंसकृत्लिंगेत्रिवारंवामकरेद्विवारमुभयोःकरयोर्दत्वातावद्वारंजलेन क्षालयेत् मूत्रात्तुद्विगुणंशुक्रेमैथुनेत्रिगुणंस्मृतं पुरीषेतु एकालिंगेगुदेतिस्रस्तथावामकरेदश उभयोःकरयोःसप्तसप्तत्रिर्वापिपादयोः द्विगुणंब्रह्मचर्येस्याद्यतीनांचचतुर्गुणं एवंमृद्भिर्जलैःशौचंतदर्धंनिशिकीर्तितं तदर्धमातुरेशूद्रस्त्रीबालानांतदर्धतः उक्तसंख्ययागंधलेपक्षयाभावेयावता**

---

[1] रात्रीच्या चवथ्या प्रहराच्या तिसऱ्या मुहूर्तास ब्राह्ममुहूर्त असें म्हणतात, व प्रहराचे मुहूर्त चार होतात.

तत्क्षयस्तावच्छौचं मृदार्द्रामलकमात्रा जलालाभेनशौचविलंबेसचैलंस्नानं यथोक्तशौचाक रणेतु गायत्र्यष्टशतंजप्त्वाप्राणायामत्रयंचरेत् अथमूत्रेचत्वारोगंडूषाःपुरीषेद्वादशाष्टौवाभो जनांतेषोडशकार्याः ॥

## आतां मूत्रपुरीषोत्सर्गादिविधि सांगतों.

भूमीवर तृण इत्यादिक हातरून मस्तकाला वस्त्र गुंडाळून यज्ञोपवीत कंठलंबित, किंवा पृष्ठभागीं अथवा कानावर ठेवून नासिकेवर आच्छादन करून दिवसा व दोहों संधिकालीं उत्तराभिमुख आणि रात्रौ दक्षिणामुख, मौनी, पायांत जोडा न घातलेला, बसलेला असा होत्साता मूत्रपुरीषोत्सर्ग करावा. कंठलंबित केल्यावांचूनच यज्ञोपवीत कानावर धारण करणें हा अनाचार होय. मार्ग, जल, देवालयसंबंधी स्थल, नदीचें तीर इत्यादिक स्थलीं मलोत्सर्ग (मलत्याग) करूं नये. अधिक जागा असल्यास मूत्रोत्सर्ग करणें तो तलाव इत्यादिक जलाशयापासून बारा किंवा सोळा हात जागा सोडून करावा. मलोत्सर्ग करणें तो, मूत्रोत्सर्गाच्या चतुर्गुणित जागा सोडून करावा. सूर्याच्या संमुख मलोत्सर्ग केला असतां व स्वकीय मल अवलोकन केला असतां सूर्य किंवा गाई यांचें दर्शन घ्यावें. तदनंतर शिश्न हातांत धरलें होत्साता उठून शौच (शुद्धि) करावें. मूत्रोत्सर्गाचे ठायीं शुद्ध मृत्तिका घेऊन लिंगास एक वेळ, डाव्या हातास तीन वेळ आणि उभय हातांस दोन वेळ याप्रमाणें मृत्तिका लावावी, व तितक्या वेळ उदकानें प्रक्षालन करावें. “रेतस्खलन झालें असतां मूत्राच्या द्विगुण, मैथुनाचे ठायीं त्रिगुण शुद्धि करावी असें सांगितलें आहे.” मलोत्सर्गाविषयीं शुद्धि— “लिंगास एक वेळ, गुदद्वारास तीन वेळ, डाव्या हातास दहा वेळ, व दोहों हातांस सात वेळ, पायांला सात सात वेळ किंवा तीन वेळ याप्रमाणें मृत्तिका लावावी. प्रत्येक मृत्तिका लावल्यावर उदकानें प्रक्षालन करावें. गृहस्थाश्रमी याला जें शौच सांगितलें त्याच्या द्विगुण ब्रह्मचारी यानें करावें, व चतुर्गुणित संन्यासी यांनीं करावें, याप्रमाणें मृत्तिका व जल यांहींकरून शुद्धि करावी. दिवसा जो शुद्धीचा प्रकार सांगितला त्याच्या अर्ध्याभागानें रात्रौ शुद्धि जाणावी. रात्रीच्या अर्ध्याभागानें रोगी यानें शौच करावें. रोगी याच्या अर्ध्याभागानें शूद्र, स्त्रिया व बालकें यांस शुद्धि सांगितली आहे.” पूर्वी मृत्तिका इत्यादिकाची जी संख्या सांगितली त्याप्रमाणें शौच करून जर मल, दुर्गंध दूर न होतील तर जितक्या वेळ आणखी मृत्तिका लावणें अवश्य वाटेल तितक्या वेळ लावून मल व दुर्गंध दूर होतील असी शुद्धि करावी. शौचाविषयीं मृत्तिका घेणें ती ओल्या आवळ्याच्या परिमाणाची असावी. जल न मिळाल्या कारणानें शुद्धि करण्यास विलंब होईल तर सचैल स्नान करावें. यथोक्त शौच न केलें असतां, गायत्रीमंत्राचा आठशें जप करून तीन प्राणायाम करावे. यानंतर **चूळ भरून टाकणें ते सांगतों.**—केवल मूत्र केलें असतां चार, मलाचा त्याग केला असतां बारा किंवा आठ, आणि भोजन झाल्यावर सोळा ह्याप्रमाणें उदकानें चूळ भरून टाकावे.

---

अथाचमनविधिः अप्रावृतशिरःकंठउपविष्ट उपवीतीप्राङ्मुखोवाअंगुष्ठमूलेनमुक्तांगुष्ठ कनिष्ठहस्तेनानुष्णंफेनादिरहितंजलंहृदयंगतंत्रिःपिबेत् केशवाद्यैस्त्रिभिःपीत्वैकेनदक्षकरंमृ

जेत् द्वाभ्यामोष्ठौचसंमृज्यएकेनोन्मार्जयेत्ततौ जलमेकेनसंमंत्र्यैकेनवामकरंमृजेत् एकेनद क्षिणंपादंवाममेकेनचैवहि संप्रोक्ष्यैकेनमूर्धानमूर्ध्वोष्ठंनासिकाद्वयं नेत्रयुग्मंश्रोत्रयुग्मंदक्षिणो पक्रमंक्रमात् नाभिंहृदयमूर्धानौदक्षवामभुजौस्पृशेत् ॥

## आतां आचमनाचा विधि सांगतों.

मस्तकास व कंठास वस्त्र न गुंडाळलेला, बसलेला, डाव्या खांद्यावरून यज्ञोपवीत धारण केलेला असा पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख होत्साता, मुक्त आहेत अंगुष्ठ कनिष्ठिका ज्याच्या अशा हस्तानें फेस व बुडबुडे यांहींकरून रहित, शीत, हृदयास पोंचणारें (हृदयाला स्पर्श झाला असें ज्ञान होई इतकें) असें उदक अंगुष्ठमूलेंकरून त्रिवार प्राशन करावें. "केशवायनमः, नारायणायनमः, माधवायनमः, ह्या तीन नामांनीं प्रत्येक नामास उदक प्राशन करावें. "गोविंदायनमः" ह्या एक मंत्रानें दक्षिणकराचें प्रक्षालन करावें. "विष्णवेनमः मधुसूदनायनमः" ह्या दोन मंत्रांनीं दोन ओष्ठ प्रक्षालन करावे. "त्रिविक्रमायनमः" ह्या एक मंत्रानें दोन ओष्ठांस प्रोक्षण करावें. "वामनायनमः" ह्या एक मंत्रानें उदक अभिमंत्रण करून "श्रीधरायनमः" ह्या एक मंत्रानें वामकराचें प्रक्षालन करावें. "हृषीकेशायनमः" ह्या एक मंत्रानें दक्षिण पायाचें प्रक्षालन करावें. "पद्मनाभायनमः" ह्या एक मंत्रानें वाम पायाचें प्रक्षालन करावें. "दामोदरायनमः" ह्या एक मंत्रानें मस्तकावर प्रोक्षण करावें. "संकर्षणायनमः" ह्या मंत्रानें ऊर्ध्वोष्ठाचें प्रोक्षण करावें. "वासुदेवायनमः" ह्या मंत्रानें नासिकेच्या दक्षिण छिद्रास स्पर्श करावा. "प्रद्युम्नायनमः" ह्या मंत्रानें नासिकेच्या वाम छिद्रास स्पर्श करावा. "अनिरुद्धायनमः" ह्या मंत्रानें दक्षिण नेत्रास स्पर्श करावा. "पुरुषोत्तमायनमः" ह्या मंत्रानें वामनेत्रास स्पर्श करावा. "अधोक्षजायनमः" ह्या मंत्रानें दक्षिण कर्णास स्पर्श करावा. "नारसिंहायनमः" ह्या मंत्रानें वामकर्णास स्पर्श करावा. याप्रमाणें दक्षिणोपक्रमानें क्रमेंकरून जाणावें. "अच्युतायनमः" ह्या मंत्रानें नाभीस स्पर्श करावा. "जनार्दनायनमः" ह्या मंत्रानें हृदयास स्पर्श करावा. "उपेंद्रायनमः" ह्या मंत्रानें मस्तकास स्पर्श करावा. "हरयेनमः" ह्या मंत्रानें दक्षिणभुजास स्पर्श करावा. "श्रीकृष्णायनमः" ह्या मंत्रानें वामभुजास स्पर्श करावा.

---

केचित्केशवाद्यैस्त्रिभिःपीत्वाद्वाभ्यांप्रक्षालयेत्करौ गंडोष्ठौमार्जयेद्भ्द्विर्द्विरेकैकंपाणिपादयोः यद्वा ओष्ठमार्जोन्मृजेद्द्विर्द्विरेकैकंपाणिपादयोः शेषंप्राग्वदित्याहुः तत्रोर्ध्वोष्ठस्यांगुल्यग्रैः स्पर्शः अंगुष्ठतर्जनीभ्यांनासिकयोः अंगुष्ठानामिकाभ्यांनेत्रयोःअंगुष्ठकनिष्ठिकाभ्यांकर्ण योर्नाभेश्च तलेनहृदयस्य पाणिनामूर्ध्नःअंगुल्यग्रैर्भुजयोः एतावदाचमनविधावशक्तस्त्रिःपीत्वा करंप्रक्षाल्यदक्षिणकर्णंस्पृशेत् कांस्यायःसीसत्रपुपित्तलपात्रैर्नाचामेत् श्रौताचमनंतुदेव्यास्त्र यःपादाआपोहिष्ठेतिनवपादाः सप्तव्याहृतयोदेवीपादत्रयंद्वेधाविभक्तंदेवीशिरश्चेतिचतुर्विंश तिस्थानानि ॥

कोणी ग्रंथकार केशवादिक तीन नामांनीं प्रत्येक नामांस आचमन करावें, दोन (गोविंद, विष्णु) नामांनीं दोन हस्तांचें प्रक्षालन करावें, दोन (मधुसूदन, त्रिविक्रम) नामांनीं दोन

कपोलांस मार्जन करावें, दोन ( वामन, श्रीधर ) नामांनीं दोन ओष्ठांस मार्जन करावें. एक ( हृषीकेश ) नामानें हस्तास मार्जन करावें, एक ( पद्मनाभ ) नामानें पायास मार्जन करावें, अथवा दोन दोन नामांनीं ओष्ठास मार्जन व प्रक्षालन करावें, हस्त व पाय यांला एकेक नामानें मार्जन करावें, अवशिष्ट नामें पूर्वीप्रमाणें जाणावीं असें ह्मणतात. **त्यामध्यें स्पर्श करावा कसा तें सांगतों—** अंगुलींच्या अग्रांनीं ऊर्ध्वोष्ठास स्पर्श करावा. अंगुष्ठ व तर्जनी यांहींकरून नासिकाछिद्रांस स्पर्श करावा. अंगुष्ठ व अनामिका यांहींकरून नेत्रांला स्पर्श करावा. अंगुष्ठ व कनिष्ठिका यांहींकरून कान व नाभि यांला स्पर्श करावा. पसरलेल्या हातानें हृदयाला स्पर्श करावा. हस्तानें मस्तकाला स्पर्श, अंगुलींच्या अग्रांनीं भुजांला स्पर्श करावा. पूर्वोक्त हा आचमनाचा विधि करण्याविषयीं असमर्थ असेल तर त्यानें केशवादिक तीन नामांनीं तीन आचमनें करून हस्तप्रक्षालन करून दक्षिणकर्णास स्पर्श करावा. कांस्य, लोखंड, शिसें, कथील आणि पितळ ह्या धातूंच्या पात्रांनीं आचमन करूं नये. **श्रौताचमन सांगतों—** गायत्रीमंत्राचे तीन चरण; “**आपोहिष्ठा०**” ह्या तीन ऋचांचे नऊ चरण; सात व्याहृतिमंत्र; गायत्रीचे तीन चरण; आणि शिरोमंत्राचे दोन भाग याप्रमाणें चोवीस स्थानें जाणावीं.

---

**अथाचमननिमित्तानि कर्मकुर्वन्नधोवायुनिःसरणेश्रुपातेक्रोधेमार्जारस्पर्शेक्षुतेवस्त्रपरिधानेरजकाद्यंत्यजदर्शनेआचामेत् स्नात्वापीत्वाभुक्त्वासुप्त्वाचाचामेत् विण्मूत्ररेतःशौचांतेआचामेत् सर्वत्राचमनासंभवेदक्षिणकर्णस्पर्शः दंतलग्नान्नंमृदूपायेननिर्हरेत् रक्तनिर्गमेदोषोक्तेः दंतलग्नंचदंतवत् तस्यान्नस्यकालांतरेनिर्गमेआचमनं वामहस्तस्थितेदर्भेदक्षिणेननचाचामेत् करद्वयस्थितेदर्भेआचामेत्सोमपोभवेत् नचोच्छिष्टंपवित्रंतद्भुक्तेपित्र्येचसंत्यजेत् विण्मूत्रोत्सर्गेचत्यजेत् ॥**

**आतां आचमनाचीं निमित्तें सांगतों—**कर्मकालीं अधोवायु सरणें, अश्रुपात, क्रोध, मार्जारस्पर्श, शिंक, वस्त्रपरिधान, रजकादिक व चांडाल यांचें दर्शन यांतील कोणतेंहि निमित्त असतां आचमन करावें. स्नान केल्यावर, कांहीं पदार्थ प्राशन केल्यावर, भोजन केल्यावर, निद्रा करून उठल्यावर आचमन करावें. मलोत्सर्ग, मूत्रोत्सर्ग, व रेत एतत्संबंधी शौच झाल्यानंतर आचमन करावें. सर्व ठिकाणीं आचमनाचा असंभव असेल तर दक्षिणकर्णास स्पर्श करावा. दांतांमध्यें अडकलेलें अन्न फार संभाळून काढावें; कारण, रक्त निघालें असतां दोष सांगितला आहे. दांतांत अडकलेलें तें दांतांप्रमाणें होय, अडकलेलें अन्न तत्कालीं न निघतां कालांतरीं निघालें असतां त्यावेळीं आचमन करावें. “डाव्या हातीं दर्भ असतां दक्षिण हस्तानें आचमन करूं नये. दोन हातांमध्यें दर्भपवित्र धारण करून आचमन करावें, तेणेंकरून तो सोमपान करणारा होईल, तें पवित्रक उच्छिष्ट होत नाहीं; भोजन व पित्र्यकर्म केलें असतां तें पवित्रक टाकावें.” विष्ठा व मूत्र यांच्या उत्सर्गकालीं दर्भपवित्रक टाकावें.

---

**अथदंतधावनं कंटकीक्षीरवृक्षापामार्गादिकाष्ठैःकार्यं काष्ठालाभेश्राद्धोपवासादिनिषिद्धदिनेचपर्णादिनाप्रदेशिनीवर्ज्यांगुल्यावाद्वादशगंडूषैर्वादंतान्शोधयेत् ॥**

## आतां दंतधावन सांगतों.

दंतधावन करावयाचें तें खदिरादि कंटकीवृक्ष, अर्कादि क्षीरवृक्ष व आघाडा इत्यादि काष्ठांनीं करावें. दांतवणाचें काष्ठ ज्या दिवसीं न मिळेल त्या दिवसीं, व श्राद्ध, उपोषण इत्यादि निषिद्ध दिवसीं वृक्षाच्या पानादिकानें किंवा आंगठ्याजवळचे अंगुलीवांचून इतर अंगुलींनीं अथवा बारा चुळांनीं दांत शुद्ध करावे.

---

अथसंक्षेपतःस्नानविधिः नद्यादौगत्वाशिखांबध्वाजानूर्ध्वेजलेतिष्ठन्अन्यथातूपविश्याचम्यममकायिकवाचिकमानसिकदोषनिरसनपूर्वकंसर्वकर्मसुशुद्धिसिद्ध्यर्थं प्रातःस्नानंकरिष्ये इतिसंकल्प्यजलंनत्वाप्राङ्मुखः प्रवाहाभिमुखोवात्रिरवगाह्यांगानिनिमृज्यस्नात्वा द्विराचम्यापोहिष्ठेतिमार्जनंकृत्वाइमंमेगंगेइतित्रिर्जलमालोड्याघमर्षणंत्रिरावृतेन ऋतंचेतिसूक्तेन कात्यायनैर्द्रुपदेतिऋचाजलनिमग्नतयाकृत्वाप्लुत्याचम्यजलतर्पणंकुर्यान्नवा तदित्थंउपवीतीब्रह्मादयोयेदेवास्तान्देवान्०भूर्देवानित्यादि निवीतीकृष्णद्वैपायनादयोयेऋषयः तानित्यादि प्राचीनावीतीसोमःपितृमान्यमोंगिरस्वानग्निष्वात्तादयोयेपितरस्तानित्यादि एकनद्यांस्नानेअन्यांनदींनस्मरेत् अत्रतैत्तिरीयादिभिस्तर्पणेऋष्यादीनांनामांतराण्युक्तानितानिसंक्षेपविधौतस्य तर्पणस्यकृताकृतत्वान्नोक्तानि ॥

## आतां संक्षेपानें स्नानविधि सांगतों.

नदी इत्यादिक तीर्थाप्रत जाऊन शिखाबंधन करून गुढग्याच्या वर उदक असेल तर उभें राहावें, तितकें उदक नसेल तर बसावें, नंतर आचमन करून संकल्प करावा. तो असा—"**मम कायिकवाचिकमानसिकदोषनिरसनपूर्वकं सर्वकर्मसु शुद्धिसिद्ध्यर्थं प्रातः-स्नानं करिष्ये,**" असा संकल्प करून उदकास नमस्कार करावा. नंतर पूर्वाभिमुख किंवा प्रवाहाच्या संमुख होत्साता तीन वेळ बुडी मारून सर्व अंगांचें प्रक्षालन करून स्नान करावें. नंतर दोनवेळ आचमन करून "**आपोहिष्ठा०**" ह्या तीन ऋचांनीं मार्जन करून "**इमंमेगंगे०**" ह्या मंत्रानें तीन वेळ उदक ढवळून "**ऋतंच०**" हें सूक्त तीन वेळ ह्मणून अघमर्षण करावें. (कात्यायनशाखी यांनीं "**द्रुपदा०**" ह्या ऋचेनें अघमर्षण करावें.) उदकामध्यें निमग्न होत्साता स्नान करून आचमन करून जलतर्पण करावें किंवा न करावें. तें असें—उपवीती होत्साता, "**ब्रह्मादयो येदेवास्तान्देवांस्तर्पयामि ॥ भूर्देवानित्यादि.**" नंतर निवीती करून "**कृष्णद्वैपायनादयोयेऋषयःतान्ऋषींस्तर्पयामि**" इत्यादि. नंतर प्राचीनावीती करून "**सोमःपितृमान्यमोंगिरस्वानग्निष्वात्तादयोयेपितरः तान्पितॄंस्तर्पयामि इत्यादि,**" याप्रमाणें तर्पण करावें. एका नदीमध्यें स्नान करीत असतां अन्यनदीचें स्मरण करूं नये. ह्या जलतर्पणसमयीं तैत्तिरीयशाखी इत्यादिकांनीं तर्पणामध्यें ऋषि इत्यादिक दुसऱ्या देवता सांगितल्या आहेत परंतु संक्षेपविधीमध्यें तें जलतर्पण कृताकृत असल्यामुळें ते ऋषि व देवता सांगितल्या नाहींत.

---

अथगृहेउष्णोदकेनस्नानंनतुशीतोदकेन तद्विधिश्चपात्रेशीतोदकंप्रक्षिप्यतदुपरिउष्णोदकेनापूर्यशंनोदेवी०आपःपुनंतु०द्रुपदादिवे०ऋतंच० आपोहिष्ठेतिपंचभिर्ऋग्भिरभिमंत्र्य इमंमे

इत्यादिनातीर्थानिस्मरन्स्नायात् गृहस्नानेसंकल्पआचमनंअघमर्षणंतर्पणंचन अंतेआचमनंमार्जनंचकार्यं एवंस्नात्वावस्त्रेणपाणिनावाजलापनयनमकृत्वाशुष्कंशुभ्रकार्पासिवस्त्रंपरिधायस्नानार्द्रवस्त्रमूर्ध्वतउत्तारयेत् विकच्छोनुत्तरीयश्चानग्नश्चावस्त्रएवच श्रौतस्मार्तेनैवकुर्यात् द्विगुणवस्त्रोदग्धवस्त्रःस्यूतग्रथितवस्त्रःकाषायवस्त्रादयोदिगंबरश्चनग्नाः निष्पीडितंवस्त्रंनस्कंधेक्षिपेत् चतुर्गुणीकृत्यवस्त्रंगृहेऽधोदशंनद्यामूर्ध्वदशंस्थलेनिष्पीडयेत् नतुत्रिगुणं उत्तरीयंजीवत्पितृकजीवज्ज्येष्ठभ्रातृकैर्नधार्यं प्रावारवस्त्रंतुसर्वैर्धार्यं इतिप्रातर्नित्यस्नानं ॥

आतां गृहस्नान सांगतों—घरीं उष्णोदकानें स्नान करावें, शीतोदकानें करूं नये. त्याचा विधि—पात्रांत शीतोदक घालून त्या शीतोदकावर उष्णोदक घालावें. नंतर "शंनोदेवी०, आपः पुनंतु०, द्रुपदादिवे०, ऋतंच०, आणि आपोहिष्ठा०" ह्या पांच ऋचांनीं तें उदक अभिमंत्रण करून, "इमंमेगंगे०" इत्यादिक मंत्रांनीं तीर्थांचें स्मरण करून स्नान करावें. घरीं स्नान केलें असतां संकल्प, आचमन, अघमर्षण व तर्पण हीं करूं नयेत. स्नान केल्यानंतर आचमन, मार्जन हीं करावीं. याप्रमाणें स्नान करून वस्त्रानें किंवा हातानें अंगावरील उदक न घालवितां ह्मणजे आंग न पुसतां सुकें, स्वच्छ पांढरें असें कापसाचें वस्त्र नेसून स्नान केलेलें ओलें वस्त्र वरून उतरावें. "कच्छहीन, उत्तरीयरहित, नग्न, वस्त्ररहित, अशा पुरुषानें श्रौतस्मार्त कर्मे करूं नयेत." दुहेरी वस्त्र धारण करणारा, दग्धवस्त्र धारण करणारा, शिवलेले व ग्रंथियुक्त वस्त्र धारण करणारा, भगवें वस्त्र परिधान करणारा आणि दिगंबर हे नग्न होत. पिळलेलें वस्त्र खांद्यावर धारण करूं नये. घरीं वस्त्र पिळावयाचें तें चौघडी करून खालीं दशा केलेलें असें स्थलावर पिळावें, नदीचे ठायीं पिळणें तें वर दशा केलेलें असें भूमीवर पिळावें, त्रिघडी केलेलें पिळूं नये. ज्यांचा पिता व ज्येष्ठ भ्राता हे जिवंत असतील त्यांनीं उत्तरीय धारण करूं नये. आंगवस्त्र तर सर्वांनीं धारण करावें. याप्रमाणें प्रातःकालीन नित्यस्नान सांगितलें.

---

चंडालसूतकिसूतिकोदक्याचितिकाष्ठशवचंडालछायादिस्पर्शेस्नानं चांडालादिस्पर्शिनमारभ्यतत्स्पृष्टस्पृष्टेषुतृतीयपर्यंतंसचैलंस्नानं चतुर्थस्याचमनमात्रं तदूर्ध्वंप्रोक्षणंद्वितीयादेर्दंडतृणाद्यंतरितस्पर्शेत्वाचमनमेव वस्त्रांतरितःसाक्षात्स्पर्शएवेतितत्रचतुर्थस्यैवाचमनं नैमित्तिकस्नानंरात्रावपि मृतेजन्मनिसंक्रांतौश्राद्धेजन्मदिनेतथा अस्पृश्यस्पर्शनेचैवनस्नायादुष्णवारिणा नैमित्तिकेजलतर्पणादिविधिर्न नित्यस्नानमकृत्वाभुक्तौउपवासःग्रहसंक्रांत्यादिनैमित्तिकस्नानमकृत्वाभोजनेपानेअष्टसहस्रजपः शूद्रादिस्पर्शनिमित्तेउपवासः श्वकाकचंडालादिस्पर्शेस्नानमकृत्वाभुक्तौपानेचत्रिरात्रं रजकादिस्पर्शेतदर्धं इतिनैमित्तिकस्नानं ॥

चांडाल, सुतकी, बाळंतीण, रजस्वला, चितासंबंधी काष्ठ, प्रेत, चांडालाची सांवली इत्यादिकांचा स्पर्श झाला असेल तर सचैल स्नान करावें. चांडाल इत्यादिकांला जो स्पर्श

---

१ मध्यान्हस्नानमपिनित्यमित्यन्ये ॥

२ माध्यान्हस्नान हेंहि नित्यस्नान होय असें कोणी ग्रंथकार ह्मणतात.

करणारा त्यापासून आरंभ करून त्यानें दुसऱ्याला स्पर्श केला, दुसऱ्यानें तिसऱ्याला याप्रमाणें स्पर्श झाला असतां तिसऱ्यापर्यंत सचैल स्नान करावें. चौथ्यानें आचमन मात्र करावें. पांचव्यापासून पुढें उदकानें प्रोक्षण करावें. दुसरा, इत्यादिकास काठी, तृण इत्यादिकाच्या अंतरानें स्पर्श झाला असेल तर आचमनच करावें. वस्त्राच्या व्यवधानानें साक्षात् स्पर्शच होतो यास्तव त्याविषयीं चौथा जो त्यानेंच आचमन करावें. कांहींएक निमित्तानें स्नान प्राप्त असेल तर तें रात्रीमध्येंहि करावें. मृतदिवस, पुत्रादिजन्मकाल, संक्रांति, श्राद्धदिवस, स्वकीय जन्मदिवस, स्पर्शास अयोग्य अशाचा स्पर्श हीं निमित्तें असतां उष्णोदकानें स्नान करूं नये. नैमित्तिक स्नानामध्यें उदकानें तर्पण करणें इत्यादिक विधि नाहीं. नित्यस्नान (प्रातःकालीन स्नान) केल्याखेरीज भोजन केलें असतां उपोषण करावें. ग्रहण, संक्रांति इत्यादिक निमित्त प्राप्त झालें असून स्नान केल्यावांचून भोजन, पान करील तर गायत्रीमंत्राचा आठ हजार जप करावा. शूद्रादिकांचा स्पर्श झाला असून स्नान केल्यावांचून भोजन करील तर उपोषण करावें. कुतरा, कावळा, चांडाल इत्यादिकांचा स्पर्श झाला असतां स्नान केल्यावांचून भोजन, पान करील तर त्रिरात्रव्रत करावें. रजक इत्यादिकांचा स्पर्श झाला असेल तर त्याच्या अर्धें प्रायश्चित्त करावें. याप्रमाणें नैमित्तिक स्नान सांगितलें.

---

**दर्शव्यतीपातरथसप्तम्यादौस्नानंकार्तिकस्नानंमाघस्नानादिकंचकाम्यं इतिजलावगाहादिरूपवारुणस्नानानि ॥**

दर्श, व्यतीपात, रथसप्तमी इत्यादि पर्वणीदिवसीं स्नान, कार्तिकस्नान आणि माघस्नानादिक हीं काम्य स्नानें होत. याप्रमाणें जलावगाहादिरूप ( जलामध्यें बुडी इत्यादि मारून स्नानें करणें तीं ) वारुणस्नानें सांगितलीं.

---

**अथगौणस्नानानि आपोहिष्ठादिभिर्मंत्रैःप्रोक्षणंमंत्रस्नानं गायत्र्यादशकृत्वोजलमभिमंत्र्यतेनसर्वांगप्रोक्षणंगायत्र्यं भस्मस्नानमाग्नेयं आर्द्रवस्त्रेणांगमार्जनंकापिलं विष्णुपादोदकविप्रपादोदकप्रोक्षणविष्णुध्यानादिभिश्चस्नानांतराणि गौणस्नानैर्जपसंध्यादौशुद्धिर्नतुश्राद्धदेवार्चनादौ ब्रह्मयज्ञेविकल्पः ॥**

आतां गौणस्नानें सांगतों.— “आपोहिष्ठा०” इत्यादिक मंत्रांनीं अंगावर प्रोक्षण करणें तें **मंत्रस्नान** होय. गायत्रीमंत्रानें दहा वेळ उदक अभिमंत्रित करून त्या उदकानें सर्व अंगें प्रोक्षण करणें तें **गायत्र्यस्नान** होय. भस्मानें स्नान करणें तें **आग्नेयस्नान**. ओलें वस्त्र करून त्यानें आंग पुसणें तें **कापिलस्नान**. विष्णूचें चरणतीर्थ, ब्राह्मणाचें चरणतीर्थ यांहींकरून प्रोक्षण, व विष्णूचें ध्यान इत्यादिक दुसरीं अनेक स्नानें सांगितलीं आहेत. गौणस्नानांनीं जप, संध्या इत्यादिक करण्याविषयीं शुद्धि होते, श्राद्धकर्म, देवपूजा इत्यादिकाविषयीं शुद्धि होत नाहीं. गौणस्नानेंकरून ब्रह्मयज्ञ करावा किंवा न करावा.

---

**अथतिलकविधिः प्रातःपुंड्रंमृदाकुर्याद्धुत्वाचैवतुभस्मना मृदश्चगोपीचंदनतुलसीमूलसिंधुतीरजान्हवीतीरवल्मीकादिस्थाः ललाटोदरहृदयकंठेदक्षिणपार्श्वबाहुकर्णदेशेवामपार्श्वबा**

हुकर्णदेशेपृष्ठेककुदिचेतिद्वादशस्थानेषुशुक्लेकेशवादिनामभिःकृष्णपक्षेसंकर्षणादिनामभिः शिरसिवासुदेवेतिमृदातिलकोविधेयः ॥

## आतां तिलकाचा विधि सांगतों.

“प्रातःकालीन स्नान केल्यानंतर मृत्तिकेनें (उभा) तिलक करावा. नित्य होम केल्यानंतर भस्मानें (आडवा) तिलक करावा. गोपीचंदन, तुलसीमूल, सिंधुतीर, भागीरथीचें तीर आणि ज्या ठिकाणीं वारुळें असतात तें स्थल, इत्यादिक स्थलांतल्या मृत्तिका घ्याव्या. याप्रमाणें मृत्तिका घेऊन त्या मृत्तिकेचा ललाट, उदर, हृदय, कंठ, दक्षिणपार्श्व, दक्षिणबाहु, दक्षिणकर्णदेश, वामपार्श्व, वामबाहु, वामकर्णदेश, पृष्ठ, ककुत् (ग्रीवापृष्ठभाग) ह्या द्वादश स्थानीं, शुक्लपक्षीं केशवादि द्वादश नामांनीं, व कृष्णपक्षीं संकर्षणादि द्वादश नामांनीं आणि मस्तकीं वासुदेव ह्या नामानें तिलक लावावा.

---

**अथभस्मत्रिपुंड्रः श्राद्धेयज्ञेजपेहोमेवैश्वदेवेसुरार्चने भस्मत्रिपुंड्रैःपूतात्मामृत्युंजयतिमानवः भस्मगृहीत्वाअग्निरितिभस्मवायुरितिभस्मजलमितिभस्मस्थलमितिभस्मव्योमेतिभस्मसर्वंहवाइदंभस्ममनएतानिचक्षूंषिभस्मानीतिमंत्रेणाभिमंत्र्य जलमिश्रितेनमध्यमांगुलित्रयगृहीतेनललाटहृदयनाभिगलांसबाहुसंधिपृष्ठशिरःस्थानेषुशिवमंत्रेणनारायणाष्टाक्षरेणवागायत्र्यावाप्रणवेनवात्रिपुंड्रान्कुर्यात् ॥**

**आतां भस्माचा त्रिपुंड्र सांगतों.**–“श्राद्ध, यज्ञ, जप, होम, वैश्वदेव, देवपूजा यांचे ठायीं भस्माचा त्रिपुंड्र लावावा, तेणेंकरून तो मानव पूतात्मा होत्साता मृत्यूस जिंकितो.” **भस्माचे त्रिपुंड्रधारणाचा** विधि–हातामध्यें भस्म घेऊन “**अग्निरितिभस्म वायुरितिभस्म जलमितिभस्म स्थलमितिभस्म व्योमेतिभस्म सर्वंहवाइदंभस्म मनएतानिचक्षूंषिभस्मानि,**” ह्या मंत्रानें तें भस्म अभिमंत्रित करून त्यांत उदक घालून दक्षिण कराच्या मधल्या तीन अंगुलींनीं भस्म घेऊन ललाट, हृदय, नाभि, कंठ, स्कंध, बाहुसंधि, पृष्ठ आणि शिर ह्या स्थानीं शिवमंत्रानें, अथवा नारायणाच्या अष्टाक्षरमंत्रानें किंवा गायत्रीमंत्रानें त्रिपुंड्र करावे.

---

**अथसंध्याकालः उत्तमातारकोपेतामध्यमालुप्ततारका अधमासूर्यसहिताप्रातःसंध्यात्रिधामता उत्तमासूर्यसहितामध्यमालुप्तभास्करा अधमातारकोपेतासायंसंध्यात्रिधामता अध्यर्धयामादासायंसंध्यामाध्यान्हिकीष्यते सर्वेषांसंध्यात्रयंनद्यादौबहिरेवप्रशस्तं साग्निकस्यतु प्रादुष्करणाद्यनुरोधेनसायंप्रातःसंध्येगृहेकर्तव्ये ॥**

## आतां संध्याकाल सांगतों.

“प्रातःकालीं नक्षत्रें चांगलीं दिसत असतां संध्योपासनास आरंभ करणें हा उत्तमकाल, नक्षत्रें अदृश्य होत असतां आरंभ करणें तो मध्यमकाल, आणि सूर्योदय झाल्यानंतर आरंभ करणें हा कनिष्ठकाल होय, याप्रमाणें प्रातःसंध्याकाल तीन प्रकारचा जाणावा. सायंकालीं सूर्य चांगला दिसत असतां संध्योपासनास आरंभ करावा तो उत्तमकाल, सूर्यास्त झालें असतां आरंभ करावा तो मध्यमकाल, आणि नक्षत्रें दिसत असतां आरंभ करणें तो कनिष्ठकाल होय,

याप्रमाणें सायंसंध्येचा काल तीन प्रकारचा जाणावा. दीडप्रहर दिवसापासून सायंकालपर्यंत माध्यान्हसंध्याकाल होय. नदी इत्यादिक तीर्थ असतां सर्वशाखी यांनीं तीनहि संध्या बाहेर कराव्या हें प्रशस्त होय. साग्निक असेल तर त्यानें प्रादुष्करण ( अग्निप्रदीप्त करणें ) इत्यादिकाच्या अनुरोधेंकरून सायंकालीन व प्रातःकालीन संध्या घरीं करावी.

---

अथसंक्षेपतःसंध्याप्रयोगोबव्हृचानां दर्भद्वयकृतेपवित्रेग्रंथियुतेग्रंथिरहितेवाहस्तयोर्धृत्वा द्विराचम्यप्राणायामंकुर्यात् प्रणवस्यपरब्रह्मऋषिःपरमात्मादेवतादेवीगायत्रीच्छंदः सप्तानां व्याहृतीनांविश्वामित्रजमदग्निभरद्वाजगौतमात्रिवसिष्ठकश्यपाऋषयः अग्निवाय्वादित्यबृहस्पतिवरुणेंद्रविश्वेदेवादेवताः गायत्र्युष्णिगनुष्टुप्बृहतीपंक्तित्रिष्टुप्जगत्यश्छंदांसिगायत्र्या विश्वामित्रऋषिःसवितादेवतागायत्रीच्छंदः गायत्रीशिरसःप्रजापतिर्ऋषिःब्रह्माग्निवाय्वादित्यादेवताःयजुश्छंदः प्राणायामेविनियोगः सर्वांगुलीभिस्तर्जनीमध्यमाभिन्नाभिर्वानासांधृत्वा दक्षिणेनवायुमाकृष्यरोधयेत् ओंभूः ओंभुवः ओंस्वः ओंमहः ओंजनः ओंतपः ओंसत्यं ओंतत्सवितुर्वरेण्यं०यात् ओंआपोज्योतीरसोमृतंब्रह्मभूर्भुवःसुवरोम् इतिसप्रणवसप्तव्याहृतिगायत्रीशिरस्त्रिःपठित्वावामनासयावायुंविसृजेदितिप्राणायामःसर्वशाखासाधारणः ममोपात्तदुरितक्षयद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रातःसंध्यामुपासिष्येआपोहिष्ठेतितृचस्यांबरीषःसिंधुद्वीपआपोगायत्री मार्जनेविनि० आपोहिष्ठेतिनवभिःपादैःसप्रणवैः कुशोदकेनमूर्ध्निनवकृत्वोमार्जयेत् यस्यक्षयायेत्यधोमार्जयेत् नद्यादौतीर्थस्थंताम्रमृन्मयादिभूमिष्ठपात्रस्थंवावामकरस्थंवाजलंदर्भादिनादायमार्जनंसर्वत्र नतुधाराच्युतजलेन ॥

## आतां ऋक्शाखी यांचा संध्याप्रयोग संक्षेपानें सांगतों.

दोन दोन दर्भांचीं पवित्रकें ग्रंथियुक्त किंवा ग्रंथिविरहित करून दोन हस्तांमध्यें धारण करून दोन वेळ आचमन करून प्राणायाम करावा. तो असा—"प्रणवस्य परब्रह्मऋषिः॥ परमात्मादेवता ॥ देवी गायत्रीच्छंदः सप्तानां व्याहृतीनां विश्वामित्रजमदग्निभरद्वाजगौतमात्रिवसिष्ठकश्यपा ऋषयः ॥ अग्निवाय्वादित्यबृहस्पतिवरुणेंद्रविश्वेदेवादेवताः गायत्र्युष्णिगनुष्टुप्बृहतीपंक्तित्रिष्टुप्जगत्यश्छंदांसि ॥ गायत्र्या विश्वामित्रऋषिः ॥ सविता देवता ॥ गायत्रीच्छंदः ॥ गायत्रीशिरसः प्रजापतिर्ऋषिः ॥ ब्रह्माग्निवाय्वादित्यादेवताः ॥ यजुश्छंदः ॥ प्राणायामे विनियोगः" सर्व अंगुलींनीं अथवा तर्जनीमध्यमाविरहित अंगुलींनीं नासिका धरून दक्षिणच्छिद्रानें वायु वर ओढून कोंडावा. नंतर "ॐभूः ॐभुवः ॐस्वः ॐमहः ॐजनः ॐतपः ॐसत्यं ॐ तत्सवितुर्वरेण्यं० यात् ॐ आपोज्योतीरसोमृतंब्रह्मभूर्भुवः सुवरोम्," याप्रमाणें प्रणव, सप्तव्याहृति, गायत्री आणि शिर हीं तीन वेळ ह्मणून डाव्या नासिकाछिद्रानें, कोंडलेला वायु सोडावा, याप्रमाणें सर्वशाखासाधारण प्राणायाम जाणावा. अशा रीतीनें प्राणायाम केल्यानंतर, "ममोपात्तदुरितक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रातःसंध्यामुपासिष्ये," असा संकल्प करून मार्जन करावें. मार्जनाचा मंत्र— "आपोहिष्ठेतितृचस्यांबरीषः सिंधुद्वीपआपोगायत्री ॥ मार्जनेविनि० ॥ आपोहिष्ठा०"

ह्या तीन ऋचांचे, प्रणवयुक्त नऊ पादांनीं कुशोदकेंकरून मस्तकावर नऊ वेळ मार्जन करावें, व "यस्यक्षयाय०" ह्या मंत्रानें अधोभागीं मार्जन करावें. नदी इत्यादिकांचे ठायीं तीर्थांतील उदक अथवा तांब्याचें किंवा मृत्तिका इत्यादिकाचें पात्र भूमीवर ठेवून त्या पात्रांतील उदक, किंवा वामकरावर घेतलेलें उदक दर्भ इत्यादिकानें घेऊन मार्जन करावें, धारेनें पडणाऱ्या उदकानें मार्जन करूं नये. याप्रमाणें सर्वत्र मार्जनाचा निर्णय जाणावा.

---

अथमंत्राचमनं सूर्यश्चेतिमंत्रस्ययाज्ञवल्क्यउपनिषदऋषिः सूर्यमन्युमन्युपतयोरात्रिश्चदेवताःप्रकृतिश्छंदःमंत्राचमनेविनियोगः सूर्यश्चमामन्युश्चमन्युपतयश्चमन्युकृतेभ्यः पापेभ्योरक्षंतां यद्रात्र्यापापमकार्षं मनसावाचाहस्ताभ्यां पद्भ्यामुदरेणशिश्ना रात्रिस्तदवलुंपतु यत्किंचदुरितंमयि इदमहंमाममृतयोनौसूर्येज्योतिषिजुहोमिस्वाहेतिजलंपिबेत् आचम्य आपोहिष्ठेतिनवर्चस्यांबरीषःसिंधुद्वीपआपोगायत्रीअंत्येद्वेअनुष्टुभौ मार्जनेविनियोगः प्रणवेनव्याहृतिभिर्गायत्र्याप्रणवांतया आपोहिष्ठेतिसूक्तेनमार्जनंचचतुर्थकं ऋगंतेर्धर्चांतेवापादांतेवापि मार्जयेत् गायत्रीशिरसाचांतेमार्जयित्वाघमर्षणं ऋतंचेतितृचस्यमाधुच्छंदसोघमर्षणोभाववृतमनुष्टुप् अघमर्षणेविनि० दक्षिणहस्तेजलंकृत्वाऋतंचेतिऋक्त्रयंद्रुपदेतिऋचंवाजप्त्वा दक्षिणनासयापापपुरुषंनिरस्य तज्जलंनावलोक्यवामभागेक्षितौक्षिपेत् आचम्य गायत्र्याविश्वामित्रःसवितागायत्री श्रीसूर्यायार्घ्यदानेवि० प्रणवव्याहृतिपूर्वयागायत्र्यातिष्ठन्सूर्योन्मुखःजलांजलिंत्रिःक्षिपेत् कालातिक्रमेप्रायश्चित्तार्थंचतुर्थं असावादित्योब्रह्मेतिप्रदक्षिणंभ्रमन् जलंसिंचेत् अर्घ्यांजलौतर्जन्यंगुष्ठयोगोनकार्यः इदमर्घ्यदानंप्रधानमित्येके अंगमितिपरे ॥

आतां मंत्राचमन सांगतों–"सूर्यश्चेतिमंत्रस्य याज्ञवल्क्यउपनिषदऋषिः सूर्यमन्युमन्युपतयो रात्रिश्चदेवताः॥प्रकृतिश्छंदः॥ मंत्राचमने विनियोगः॥ सूर्यश्चमामन्युश्चमन्युपतयश्चमन्युकृतेभ्यः॥ पापेभ्योरक्षंतां॥ यद्रात्र्यापापमकार्षं॥ मनसावाचाहस्ताभ्यां॥ पद्भ्यामुदरेणशिश्ना॥ रात्रिस्तदवलुंपतु यत्किंचदुरितंमयि॥ इदमहंमाममृतयोनौसूर्येज्योतिषिजुहोमिस्वाहा." हा मंत्र ह्मणून उदक प्राशन करावें. नंतर आचमन करून मार्जन करावें. मार्जनाचा मंत्र–"आपोहिष्ठेतिनवर्चस्यांबरीषः सिंधुद्वीपआपोगायत्री॥ अंत्येद्वेअनुष्टुभौ॥ मार्जनेविनियोगः॥ आपोहिष्ठा०" "प्रणवमंत्रानें पहिलें, समस्त व्याहृतिमंत्रांनीं दुसरें, प्रणवांत गायत्रीमंत्रानें तिसरें, आणि "आपोहिष्ठा०" ह्या सूक्तानें चवथें अशीं मार्जनें करावीं. 'आपोहिष्ठा०' ह्या सूक्ताची प्रत्येक ऋचा, किंवा ऋचेचें प्रत्येक अर्ध, अथवा ऋचेचा प्रत्येक चरण ह्मणून मार्जनार्थ मस्तकावर उदकसिंचन करावें. गायत्रीशिरोमंत्रानें मार्जन करून नंतर अघमर्षण करावें. अघमर्षणाचा मंत्र–"ऋतंचेति तृचस्य माधुच्छंदसोऽघमर्षणो भाववृतमनुष्टुप् ॥ अघमर्षणेविनियोगः" दक्षिण हातावर उदक घेऊन "ऋतंच०" ह्या तीन ऋचा किंवा "द्रुपदा०" ही ऋचा जपून दक्षिण नासाछिद्रेंकरून उच्छ्वासरूपानें पापपुरुष दक्षिणहस्तस्थ उदकावर टाकावा, आणि तें उदक अवलोकन केल्यावांचून वामभागाच्या भूमीवर टाकावें. नंतर आचमन करून अर्घ्यप्रदान करावें. तें असें– "गायत्र्या विश्वामित्रःसविता गायत्री ॥

श्रीसूर्यायार्घ्यप्रदाने विनियोगः" असें ह्मणून सूर्याच्या संमुख उभा राहात होत्साता प्रणव-व्याहृतिपूर्वक गायत्रीमंत्रानें उदकाचा अंजलि द्यावा. याप्रमाणें तीन उदकांजलि द्यावे. संध्येचा काळ टळला असेल तर प्रायश्चित्तार्थ चौथें अर्घ्य द्यावें. नंतर, "असावादित्यो ब्रह्म," ह्या मंत्रानें, प्रदक्षिण फिरत होत्साता उदकसिंचन करावें. अर्घ्याच्या अंजलीमध्यें अंगुष्ठ, व तर्जनी यांचा योग करूं नये ह्मणजे अंगुष्ठ व तर्जनी परस्परांस संलग्न करूं नये. कोणी ग्रंथकार अर्घ्यदान हें प्रधानकर्म होय असें ह्मणतात. दुसरे ग्रंथकार अर्घ्य हें अंगभूत आहे असें ह्मणतात.

---

अथगायत्रीजपः प्राणायामंकृत्वा गायत्र्याविश्वामित्रःसवितागायत्रीजपेवि० तत्सवितुर्हृदयायनमः वरेण्यंशिरसेस्वाहा भर्गोदेवस्यशिखायैवषट् धीमहिकवचायहुं धियोयोनोनेत्रत्रयायवौषट् प्रचोदयात्अस्त्रायफट् इतिषडंगन्यासःकार्यः नवाकार्योन्यासविधेरवैदिकत्वादितिगृह्यपरिशिष्टेस्पष्टं एतेनाक्षरन्यासपादन्यासादीनांमुद्रादिविधेःशापमोचनादिविधेश्चतांत्रिकत्वेनावैदिकत्वादनावश्यकत्वंवेदितव्यं मंत्रदेवतांध्यायेत् केचिद्गायत्र्यादिध्यानंवदंति आगच्छवरदेदेविजपेमेसन्निधौभव गायंतंत्रायसेयस्माद्गायत्रीत्वंततः स्मृतेतितामावाह्य यो देवःसवितास्माकंधियोधर्मादिगोचरे प्रेरयेत्तस्यतद्भर्गस्तद्वरेण्यमुपास्महे इतिमंत्रार्थंचिंतयन् मौनीप्रातःसूर्याभिमुखस्तिष्ठन्नामंडलदर्शनात्सप्रणवव्याहृतिकायाःगायत्र्या अष्टशतमष्टाविंशतिंदशकंवाजपेत् सायंवायव्याभिमुखआनक्षत्रदर्शनादितिविशेषः अनध्यायेष्टाविंशतिंप्रदोषेदशैवजपेदितिकारिकायां रुद्राक्षविद्रुमादिमालाभिरंगुलीपर्वभिर्वाजपः अष्टशतंचतुःपंचाशत्सप्तविंशतिर्वामालामणयः उत्तरन्यासंकृत्वोपस्थानं जातवेदसे०तच्छंयो०नमोब्रह्मण इतिमंत्रैःसायंप्रातश्चोपतिष्ठेदितिपरिशिष्टमतं स्मृत्यंतरेमित्रस्यचर्षणीत्यादिमित्रदेवताकैःप्रातः इमंमेवरुणेत्यादिभिर्वरुणपदोपेतैः सायंसूर्योपस्थानमुक्तं प्राच्यैदिशेनमइंद्रायनमःआग्नेय्यैदिशेनमोग्नयेनमःइत्यादिनादशदिग्वंदनांते संध्यायैनमःगायत्र्यैनमःसावित्र्यै०सरस्वत्यै० सर्वाभ्योदेवताभ्योनमइतिनत्वा उत्तमेशिखरेजातेभूम्यांपर्वतमूर्धनि ब्राह्मणैरभ्यनुज्ञातागच्छ देवियथासुखमितिविसृज्यभद्रंनोअपिवातयमनःइतित्रिरुक्त्वाप्रदक्षिणं भ्रमन्नासत्यलोकादा पातालादालोकालोकपर्वतात् येसंतिब्राह्मणादेवास्तेभ्योनित्यंनमोनमइतिभूम्युपसंग्रहंनमस्कृत्यद्विराचामेदिति ॥

आतां गायत्रीमंत्राचा जप सांगतों.—प्राणायाम करून "गायत्र्या विश्वामित्रः सविता गायत्री ॥ जपेविनि० तत्सवितुर्हृदयायनमः वरेण्यं शिरसेस्वाहा ॥ भर्गोदेवस्य शिखायै वषट् ॥ धीमहि कवचायहुं ॥ धियोयोनो नेत्रत्रयायवौषट् ॥ प्रचोदयात् अस्त्रायफट्," याप्रमाणें षडंगन्यास करावा, अथवा करूं नये; कारण, न्यासाचा विधि वेदांत सांगितला नाहीं असें गृह्यपरिशिष्टांत स्पष्ट आहे. यावरून अक्षरन्यास, पादन्यासादि, मुद्रादिक विधि, मंत्रांचा शापमोचनादि विधि हे प्रकार तंत्रग्रंथांत सांगितले आहेत, वेदांत सांगितले नाहींत, यावरून हेहि अवश्य कर्तव्य आहेत असें नाहीं. नंतर मंत्रदेवतेचें ध्यान करावें. कोणी ग्रंथकार गायत्री इत्यादिक देवतांचें ध्यान करावें असें सांगतात. नंतर "आगच्छ वरदे देवि

जपे मे सन्निधौ भव ॥ गायंतं त्रायसे यस्मात् गायत्री त्वं ततःस्मृता," ह्या मंत्रानें गायत्रीचें आवाहन करून नंतर, "यो देवः सविताऽस्माकं धियोधर्मादिगोचरे ॥ प्रेरयेत्तस्य तद्भर्गस्तद्वरेण्यमुपास्महे," याप्रमाणें मंत्रार्थाचें चिंतन करीत मौनी होत्साता, प्रातःकालीं सूर्याच्या संमुख उभा राहून सूर्यमंडल दृष्टिगोचर होई तावत्कालपर्यंत, प्रणव व व्याहृति यांहीं युक्त अशा गायत्रीमंत्राचा १०८, किंवा २८, अथवा १० जप करावा. सायंकालीं वायव्य दिशेला संमुख होत्साता नक्षत्रें दृष्टिगोचर होत तोंपर्यंत जप करावा, हा विशेष जाणावा. अनध्यायदिवसीं अठ्ठावीस, प्रदोषदिवसीं दहा जप करावा असें कारिकेमध्यें सांगितलें आहे. रुद्राक्ष, पोवळीं, इत्यादिकांच्या माला करून त्या मालांनीं, अथवा अंगुलींच्या पर्वांनीं जप करावा. एकशें आठ, चौपन अथवा सत्तावीस असे मालेस मणि असावे. उत्तरन्यास करून उपस्थान करावें. तें असें,—"जातवेद० तच्छंयो० नमोब्रह्मणे०" या मंत्रांनीं सायंकालीं व प्रातःकालीं उपस्थान करावें, असें गृह्यपरिशिष्टाचें मत आहे. स्मृत्यंतरीं, सूर्य आहे देवता ज्यांची अशा "मित्रस्यचर्षणी०" इत्यादिक मंत्रांनीं प्रातःकालीं, व वरुणपदांनीं युक्त अशा "इमंमेवरुण०" इत्यादिक मंत्रांनीं सायंकालीं सूर्योपस्थान करावें असें सांगितलें आहे. उपस्थानानंतर "प्राच्यै दिशेनमइंद्रायनमः, आग्नेय्यैदिशेनमोग्नयेनमः" इत्यादि प्रकारें करून दश दिशांचें वंदन केल्यानंतर, "संध्यायै नमः, गायत्र्यैनमः, सावित्र्यैनमः, सरस्वत्यैनमः, सर्वाभ्योदेवताभ्योनमः" असे नमस्कार करून "उत्तमे शिखरे जाते भूम्यां पर्वतमूर्धनि ॥ ब्राह्मणैरभ्यनुज्ञाता गच्छ देवि यथासुखं" या मंत्रानें संध्येचें विसर्जन करून, "भद्रंनोअपिवातयमनः" हा मंत्र त्रिवार ह्मणून प्रदक्षिण फिरत होत्साता, "आसत्यलोकादापातालादालोकालोकपर्वतात् ॥ ये संतिब्राह्मणा देवास्तेभ्यो नित्यं नमोनमः" या मंत्रानें भूमीस स्पर्शपूर्वक नमस्कार करून द्विवार आचमन करावें. याप्रमाणें ऋक्शाखी यांचा संध्याविधि संक्षेपानें सांगितला.

---

अथतैत्तिरीयाणांसंकल्पांतंपूर्ववत् गायत्रींध्यात्वा आयातुवरदादेवीअक्षरंब्रह्मसंमितं गायत्रींछंदसांमातेदंब्रह्मजुषस्वमे सर्ववर्णेमहादेविसंध्याविद्येसरस्वति अजरेअमरेदेविसर्वदेवि नमोस्तुते ओजोसिसहोसिबलमसिभ्राजोसिदेवानांधामनामासिविश्वमसिविश्वायुःसर्वमसि सर्वायुरभिभूरोंगायत्रीमावाहयामि सावित्रीमावाहयामि सरस्वतीमावाहया० छंदऋषीनावाह० श्रियं०ह्रियमावाहयामि इत्यावाह्यमार्जनंपूर्ववत् आपोवाइद९सर्वंविश्वाभूतान्यापःप्राणावाआपःपशवआपोन्नमापोमृतमापःसम्राडापोविराडापः स्वराडापश्छंदा९स्यापोज्योती९ष्यापोयजू९ष्यापः सत्यमापः सर्वादेवताआपोभूर्भुवःसुवरापॐमितिजलमभिमंत्र्यसूर्यश्चेतिपूर्ववन्मंत्राचमनं दधिक्राव्णोअकारिषमितिऋचमुक्त्वाआपोहिष्ठेतितिसृभिःहिरण्यवर्णाइतिपवमानःसुवर्जनइत्यनुवाकेनचऋगंतेमार्जनांतेऽघमर्षणंकृत्वा नकृत्वावार्घ्यदानादि गायत्रीजपांतमावाहनंमंत्रवर्ज्यपूर्ववत् न्यासविधेरवैदिकत्वमुक्तमेव जपांतेउपस्थानं मित्रस्यचर्षणी० मित्रोजना० प्रसमित्र० यच्चिद्धिते० यत्किंचेदं० कितवासोयद्रि० इतिषड्भिरुपस्थाय प्राच्यैदिशेयाश्चदेवताएतस्यांप्रतिवसंत्येताभ्यश्चनमोनमइत्यादिना अधरांताः

षट्नत्वाअवांतरायैदिशेयाश्चदेवताइतिचनत्वानमोगंगायमुनयोर्मध्येइत्यादिनामुनिदेवान्नत्वा सःस्रवंतुदिशोइतिमंत्रंपठित्वा गोत्राद्युच्चार्यपूर्ववद्भूम्युपसंग्रहंनत्वापूर्ववत्संध्यांविसृजेदिति ॥

## आतां तैत्तिरीयशाखी यांचा संध्याप्रयोग सांगतों.

आचमनापासून संकल्पापर्यंत प्रयोग पूर्वीप्रमाणें तैत्तिरीयशाखी यांनीं करून गायत्रीचें ध्यान करून आवाहन करावें. आवाहनाचे मंत्र—"आयातु वरदा देवी अक्षरं ब्रह्मसम्मितं॥ गायत्रीं छंदसां मातेदं ब्रह्म जुषस्व मे ॥ सर्ववर्णे महादेवि संध्याविद्ये सरस्वति ॥ अजरे अमरे देवि सर्वदेवि नमोस्तुते ॥ ओजोसि सहोसि बलमसि भ्राजोसि देवानां धामनामासि विश्वमसि विश्वायुः सर्वमसि सर्वायुरभिभूरोम् ॥ गायत्रीमावाहयामि ॥ सावित्रीमावाहयामि ॥ सरस्वतीमावाहयामि ॥ छंदऋषीनावाहयामि ॥ श्रियमावाह०॥ ह्रियमावाह०"या मंत्रांनीं संध्येचें आवाहन करून मार्जन पूर्वीप्रमाणें करावें. मार्जन केल्यानंतर हातावर उदक घेऊन "आपोवाइदःसर्वंविश्वाभूतान्यापःप्राणावाआपःपशवआपोन्नमापो मृतमापः सम्राडापोविराडापः स्वराडापश्छंदाःस्यापोज्योतीःष्यापोयजूःष्यापः सत्यमापः सर्वा देवता आपो भूर्भुवः सुवराप ॐ" ह्या मंत्रानें उदक अभिमंत्रण करून "सूर्यश्च०" या मंत्रेंकरून पूर्वीप्रमाणें मंत्राचमन करावें. नंतर "दधिक्राव्णो०" ही ऋचा ह्मणून "आपोहिष्ठा०" ह्या तीन ऋचा, "हिरण्यवर्णाः०," आणि "पवमानःसुवर्जनः०" हा अनुवाक, ह्या मंत्रेंकरून प्रत्येक ऋचेच्या अंतीं मार्जन याप्रमाणें सर्व मंत्रांनीं मार्जन करावें. नंतर अघमर्षण करून किंवा न करितां अर्घ्यदानापासून गायत्रीजपांत कर्म करावें. गायत्रीचें आवाहन करणें तें मंत्रविरहित पूर्वीप्रमाणें करावें. न्यासविधि वेदांत सांगितला नाहीं हें पूर्वी सांगितलेंच आहे. गायत्रीजप केल्यानंतर उपस्थान करावें. तें असें—"मित्रस्यचर्षणी० मित्रोजनान्० प्रसमित्र० यच्चिद्धिते० यत्किंचेदं० कितवासोयद्रि०" ह्या सहा ऋचा ह्मणून उपस्थान करून "प्राच्यै दिशे याश्च देवता एतस्यां प्रतिवसंत्येताभ्यश्च नमोनमः" इत्यादिक मंत्रांनीं पूर्वादिक चार दिशा, ऊर्ध्वदिशा आणि अधरदिशा ह्या सहा दिशांला नमस्कार करून, "अवांतरायै दिशे याश्च देवता एतस्यां प्रतिवसंत्येताभ्यश्च नमोनमः" इत्यादिक मंत्रांनीं विदिशांला नमस्कार करावा. नंतर "नमो गंगायमुनयोर्मध्ये०" इत्यादिक मंत्रानें ऋषि, देव यांला नमस्कार करून, "सःस्रवंतुदिशो०" हा मंत्र पठण करून गोत्र, प्रवर, नाम यांचा उच्चार करून पूर्वीप्रमाणें भूमीला स्पर्शपूर्वक नमस्कार करून पूर्वी सांगितल्याप्रमाणें संध्येचें विसर्जन करावें. याप्रमाणें तैत्तिरीयशाखी यांचा संध्याप्रयोग सांगितला.

---

अथकात्यायनानांसंध्याप्रयोगः आचम्यभूःपुनातुभुवःपुनातुस्वःपुनातुभूर्भुवःस्वःपुनात्वि त्यादिनापावनंकृत्वा अपवित्रःपवित्रोवेतिविष्णुंस्मृत्वाआसनादिविधिंकृत्वाद्भिराचम्यप्राणा नायम्यपूर्ववत्संकल्प्य गायत्रींत्र्यक्षरांबालांसाक्षसूत्रकमंडलुं रक्तवस्त्रांचतुर्वक्त्रांहंसवाहनसं स्थितां ब्रह्माणींब्रह्मदैवत्यांब्रह्मलोकनिवासिनीं आवाहयाम्यहंदेवीमायांतींसूर्यमंडलात् आग च्छवरदेदेवित्र्यक्षरेब्रह्मवादिनि गायत्रींछंदसांमातर्ब्रह्मयोनेनमोस्तुतेइत्यावाह्यपूर्ववत्आपो

ह्रिष्ठेतितृचेनमार्जयेत् सूर्यश्चेतिमंत्रस्यनारायणऋषि:सूर्योदेवताअनुष्टुप्छंद:आचमनेविनियो ग: सूर्यश्चेति०जलंप्राश्याचम्य आपोहिष्ठेतिनवऋकूमार्जनंकुर्यादितिकेचिदाहु: बहवस्तुसं कल्पाद्यंतेसूर्यश्चेतिमंत्राचमनंकृत्वापोहिष्ठेतितिसृभि:प्रतिपादंमार्जनांतेऽघमर्षणंकार्यं नतुमा र्जनद्वयमित्याहु: सुमित्र्यादुर्मित्र्याइतिद्वयो:प्रजापतिर्ऋषि:आपोदेवतायजुश्छंद:आदानप्र क्षेपे०सुमित्र्यानआपओषधय:संतुइतिजलमादायदुर्मित्र्यास्तस्मैसंतुयोस्मान्द्वेष्टियंचवयंद्विष्म इतिवामभुविक्षिपेत् ततऋतंचेतितृचेनद्रुपदेतित्रिरुक्तऋचावाघमर्षणंपूर्ववत् सायंप्रातश्च त्रिरर्घ्यदानंपुष्पयुतजलेनपूर्ववत् मध्यान्हेसकृत्गायत्र्यापरितउक्षणं अथोपस्थानं उद्वयमुदुत्य मितिद्वयो: प्रस्कण्व:सूर्योनुष्टुप्गायत्र्यौ चित्रंदेवानामांगिरस:कुत्स: सूर्यस्त्रिष्टुप् तच्चक्षुर्दध्य ङ्ङाथर्वण:सूर्य:पुरउष्णिक् उपस्थाने०उद्वयंतमस० १ उदुत्यंजा० १ चित्रंदे० १ तच्चक्षुर्दे वहितंइतिऊर्ध्वबाहु:सूर्यमुदीक्षमाणोयथाशाखंपठेत् प्राणायामादिविधायन्यासमुद्रार्पणा दिविधि: कृताकृत: तेजोसीतिपरमेष्ठीप्रजापतिराज्यंयजु:आवाहने० तेजोसिशुक्रमस्यमृत मसिधामनामासिप्रियंदेवानामनाधृष्टंदेवयजनमसि परोरजसइतिविमल:परमात्मानुष्टुप् गायत्र्युपस्था० गायत्र्यस्येकपदीद्विपदीत्रिपदीचतुष्पद्यपदसिनहिपद्यसेनमस्तेतुरीयायदर्शना यपदायपरोरजसेसावदोम् ततोगायत्रीजपांतंपूर्ववत् तत:शक्तेनविभ्राडित्यनुवाकेनपुरुष सूक्तेनवाशिवसंकल्पेनवामंडलब्राह्मणेनवोपस्थानंकार्यं अत्रऋक्शाखोक्तवत्दिग्वंदनंकेचि त्कुर्वंति ततउत्तमेशिखरे० देवागातुविदोगातुमितिमंत्राभ्यांविसर्जनं भूम्युपसंग्रहंनमस्कारा दिपूर्ववत् इतिकात्यायनसंध्या ॥

## आतां कात्यायनांचा संध्याप्रयोग सांगतों.

आचमन करून, "भू:पुनातु भुव:पुनातु स्व:पुनातु भूर्भुव:स्व:पुनातु" इत्यादिक मंत्रविधीनें पावन (शुद्धि) करून "अपवित्र: पवित्रोवा०" ह्या मंत्रानें विष्णुस्मरण करावें. नंतर आसनादिक विधि करून द्विवार आचमन करून प्राणायाम करावा, व पूर्वीप्रमाणें संकल्प करून गायत्री देवीचें आवाहन करावें. आवाहनाचे मंत्र– "गायत्रींत्र्यक्षरांबालांसाक्षसूत्रकमंडलुं ॥ रक्तवस्त्रांचतुर्वक्त्रांहंसवाहनसंस्थितां ॥ ब्रह्माणींब्रह्मदैवत्यांब्रह्मलोकनिवासिनीं ॥ आवाहयाम्यहंदेवीमायांतीं सूर्यमंडलात् ॥ आगच्छवरदेदेवित्र्यक्षरेब्रह्मवादिनि ॥ गायत्रीं छंदसां मातर्ब्रह्मयोने नमोस्तु ते," हे मंत्र ह्मणून गायत्रीचें आवाहन करून पूर्वी सांगितल्याप्रमाणें "आपोहिष्ठा०" ह्या तीन ऋचांनीं मार्जन करावें. "सूर्यश्चेतिमंत्रस्य नारायणऋषि: ॥ सूर्यो देवता ॥ अनुष्टुप् छंद: ॥ आचमनेविनियोग: ॥ सूर्यश्च०" हे मंत्र ह्मणून उदक प्राशन करून, नंतर आचमन करावें. "आपोहिष्ठा०" ह्या नऊ ऋचांनीं मार्जन करावें असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. बहुत ग्रंथकार तर, संकल्प इत्यादिक केल्यानंतर "सूर्यश्चेति०" ह्या मंत्रानें मंत्राचमन करून "आपोहिष्ठा०" ह्या तीन ऋचांनीं प्रत्येक चरणाच्या अंतीं मार्जन करून नंतर अघमर्षण करावें, दोन मार्जनें करूं नयेत असें ह्मणतात. "सुमित्र्या दुर्मित्र्या इतिद्वयो: प्रजापतिर्ऋषि: आपोदेवता ॥ यजुश्छंद:

आदानप्रक्षेपेविनियोगः ॥ सुमित्र्या न आप ओषधयःसंतु" ह्या मंत्रेंकरून हातावर उदक घेऊन, "दुर्मित्र्यास्तस्मै संतुयोऽस्मान्द्वेष्टि यं च वयं द्विष्मः" हा मंत्र ह्मणून वामभागाच्या भूमीवर तें उदक टाकावें. तदनंतर "ऋतंच०" ह्या तीन ऋचा ह्मणून किंवा "द्रुपदा०" ही त्रिवार ऋचा ह्मणून पूर्वीप्रमाणें अघमर्षण करावें. सायंकालीं व प्रातःकालीं पुष्पयुक्त उदकानें त्रिवार अर्घ्य पूर्वीप्रमाणें द्यावें, मध्यान्हकालीं अर्घ्य एकच द्यावें. गायत्रीमंत्रानें आसमंतात् उदक सिंचन करीत प्रदक्षिण फिरावें. आतां उपस्थान सांगतों. उपस्थानाचे मंत्र— "उद्वयमुदुत्यमिति द्वयोः प्रस्कण्वः सूर्योनुष्टुप्गायत्र्यौ ॥ चित्रंदेवानामांगिरसः कुत्सः सूर्यस्त्रिष्टुप् ॥ तच्चक्षुर्दध्यङ्ङाथर्वणः सूर्यः पुरउष्णिक् ॥ उपस्थाने विनियोगः ॥ उद्वयंतमस० १, उदुत्यंजा० १, चित्रंदेवा० १, तच्चक्षुर्देवहितं०" ह्या ऋचा, ऊर्ध्वबाहु, सूर्याकडे पाहात होत्साता शाखानुरूप पठण कराव्या. नंतर प्राणायाम इत्यादिक करावा. न्यास, मुद्रा, तर्पण इत्यादिकविधि कृताकृत आहे. "तेजोसीति परमेष्ठी प्रजापतिराज्यं यजुः ॥ आवाहनेविनियोगः ॥ तेजोसि शुक्रमस्यमृतमसि धामनामासि प्रियंदेवानामनाधृष्टं देवयजनमसि ॥ परोरजस इतिविमलः परमात्मानुष्टुप् ॥ गायत्र्युपस्थाने विनियोगः॥ गायत्र्यस्येकपदीद्विपदी त्रिपदी चतुष्पद्यपदसि नहिपद्यसे नमस्ते तुरीयाय दर्शताय पदाय परोरजसे सावदोम्" या मंत्रांनीं उपस्थान केल्यानंतर गायत्रीजपापर्यंत कर्म पूर्वीप्रमाणें करावें. तदनंतर शक्तिमान् असेल तर त्यानें "विभ्राट्०" हा अनुवाक किंवा पुरुषसूक्त, अथवा शिवसंकल्पसूक्त, किंवा मंडलब्राह्मण यांहींकरून उपस्थान करावें. ऋक्शाखेमध्ये जसें दिशांस वंदन करण्याविषयीं उक्त आहे तद्वत् एथें दिशांला वंदन कितीएक करितात. तदनंतर, "उत्तमे शिखरे०" "देवागातु०विदोगातुं०" ह्या मंत्रांनीं संध्येचें विसर्जन करावें. भूमीला नमस्कार, इत्यादिक कर्म पूर्वीप्रमाणें करावें. याप्रमाणें कात्यायनांची संध्या सांगितली.

---

संध्यामुपासतेयेतेनिष्पापाब्रह्मलोकगाः अन्यकर्मफलंनास्तिसंध्याहीनेशुचित्वतः जीवमानोभवेच्छूद्रोमृतःश्वाजायतेध्रुवं ॥

"जे द्विज, नियमेंकरून संध्येची उपासना करितात ते निष्पाप होत्साते अंतीं ब्रह्मलोकाप्रत जातात." जो द्विज संध्या करीत नाहीं तो अपवित्र होय, व तो अपवित्र असल्यामुळें जें अन्य धर्मकृत्य करील त्या कृत्याचें त्यास फल मिळणार नाहीं, आणि तो जिवंत असतां शूद्र होतो व मृत झाल्यानंतर निश्चयें श्वान होतो असें समजावें.

---

संध्यात्रयेकालातिक्रमेप्रायश्चित्तार्थमेकमर्घ्यमधिकंदत्वारात्रौप्रहरपर्यंतंदिनोक्तकर्माणिकुर्यात् ब्रह्मयज्ञंसौरंचवर्जयेत् सर्वथासंध्यालोपेप्रतिसंध्यमेकोपवासोयुतमष्टोत्तरसहस्रंवागायत्रीजपः अल्पशक्तौप्रतिसंध्यालोपेशतगायत्रीजपः द्व्यहंत्र्यहंलोपेतदावृत्तिःततःपरंकृच्छ्रादिकल्प्यं ॥

प्रातःसंध्या, माध्यान्हसंध्या व सायंसंध्या ह्यांचे जे मुख्यकाल सांगितले आहेत ते टळतील तर प्रायश्चित्तार्थ एक अर्घ्यदान अधिक करावें, व रात्रौ प्रहरपर्यंत दिवसास सांगितलेलीं कर्में करावीं. ब्रह्मयज्ञ, सौरसूक्तपठन हीं रात्रीं करूं नयेत. सर्वथा संध्येचा लोप

होईल तर प्रत्येक संध्यानिमित्तक एक उपोषण, दहा सहस्र, किंवा १,००८ गायत्रीजप करावा. अति असामर्थ्य असल्यामुळें संध्येचा लोप होईल तर प्रतिसंध्येस १०० गायत्रीजप करावा. दोन दिवस, तीन दिवस संध्यालोप होईल तर हीं सांगितलीं यांची आवृत्ति करावी; तीन दिवसांहून अधिक दिवस संध्येचा लोप होईल तर कृच्छ्रादिक प्रायश्चित्त करावें.

---

अथौपासनहोमः स्वयंहोमोमुख्यः अशक्तौपत्नीपुत्रःकुमारीभ्राताशिष्योभागिनेयोजामाताऋत्विग्वा पुत्रादिर्दंपत्योःसंनिधानेएकतरसंनिधानेवाजुहुयात् त्यागंयजमानः पत्नीवाकुर्यात् तस्याअसंनिधौतदाज्ञयाऋत्विगादिरपि पत्न्याऋतुप्रसवोन्मादादिदोषेतुतदाज्ञांविनापि ऋत्विगादिस्त्यागंकुर्यात्स्वयंहोमेफलंयत्स्यादन्यैर्होमेतदर्धकंपर्वणितुस्वयमेवजुहुयात् तत्रप्रातःसूर्योदयात्प्राक्अग्नीनांगृह्याग्नेर्वाप्रादुष्करणंकृत्वासूर्योदयास्तोत्तरंहोमःकार्यः प्रादुष्करणकालातिक्रमे ॐभूर्भुवःस्वःस्वाहेतिमंत्रेणस्रुवाज्याहुतिरूपंसर्वप्रायश्चित्तमाज्यसंस्कारपूर्वकंकृत्वाहोमः सूर्योदयोत्तरंदशघटिकापर्यंतंप्रातर्होमकालोमुख्यः ततआसायंगौणः सायंनवनाडिकापर्यंतंमुख्यः ततआप्रातर्गौणः मुख्यकालातिक्रमेकालातिक्रमनिमित्तप्रायश्चित्तपूर्वकममुकहोमंकरिष्यइति संकल्प्याज्यंसंस्कृत्यस्रुचिचतुर्गृहीतंगृहीत्वासायंकालेदोषावस्तर्नमःस्वाहेतिहुत्वा प्रातस्तुप्रातर्वस्तर्नमःस्वाहेतिहुत्वाहोम्यंसंस्कृत्यनित्यहोमः श्रौतहोमंकृत्वास्मार्तहोमः केचित्स्मार्तहोमंपूर्वमाहुः आधानेपुनराधानेसायमुपक्रमोहोमः सायंप्रातर्होमयोर्द्रव्यैक्यंकर्त्रैक्यंच प्रातर्यजमानःकर्ताचेत्कर्तृभेदोनदोषाय ॥

## आतां औपासनहोम ह्मणजे सायंप्रातः अग्नीवर होम देणें तो सांगतों.

सायंकालीं व प्रातःकालीं अग्नीमध्यें होम देणें तो आपण द्यावा हा मुख्य होय. आपणास होम देण्यास शक्ति नसेल तर पत्नी, पुत्र, कुमारी, भ्राता, शिष्य, भागिनेय (भगिनीपुत्र), जामता अथवा ऋत्विक् यांतून कोणाकडून देववावा. पुत्र इत्यादिकानें होम देणें असेल तर दंपतींनीं जवळ असतां किंवा दोघांतून एक तरी जवळ असतां द्यावा, यजमान किंवा पत्नी यांनीं त्याग ह्मणावा. यजमानपत्नी संनिध नसेल तर तिच्या आज्ञेंकरून ऋत्विक् इत्यादिकानेंहि त्याग ह्मणावा. पत्नी रजस्वला, बाळंतीण, भ्रांतिष्ठ इत्यादिक असेल तर तिच्या आज्ञेवांचूनहि ऋत्विक् इत्यादिकानें त्याग ह्मणावा. "आपण होम करून जें फल प्राप्त होतें त्याच्या अर्धे फल अन्यांनीं होम केला असतां प्राप्त होतें." पर्वाचे दिवसीं तर होम आपणच करावा. प्रातःकालीं सूर्योदयाच्या पूर्वीं, व सायंकालीं सूर्यास्ताच्या पूर्वीं अग्नि (दक्षिणाग्नि, गार्हपत्य व आहवनीय) किंवा गृह्याग्नि यांचें प्रादुष्करण (प्रज्वलित करणें) करून प्रातःकालीं सूर्योदयानंतर, व सायंकालीं अस्तानंतर होम द्यावा. प्रादुष्करणाचा काळ टळेल तर आज्यसंस्कारपूर्वक स्रुवापात्रानें आज्याहुति "ॐभूर्भुवः स्वः स्वाहा" ह्या मंत्रानें द्यावी, हें सर्व प्रायश्चित्त करून नंतर होम द्यावा. सूर्योदयापासून दहा घटिकांपर्यंत प्रातर्होमाचा मुख्य काल होय. दहा घटिकांनंतर सायंकालपर्यंत गौणकाल जाणावा. सायंकालीं नऊ घटिकां-

पर्यंत मुख्यकाल, नऊ घटिकांनंतर प्रातःकालपर्यंत गौणकाल जाणावा. होमाचा मुख्यकाल टळेल तर, "कालातिक्रमनिमित्तप्रायश्चित्तपूर्वकममुकहोमं करिष्ये," असा संकल्प करून आज्यसंस्कार करावा. नंतर स्रुचिपात्रामध्यें चार वेळ आज्य घेऊन सायंकालीं, "दोषावस्तर्नमः स्वाहा," ह्या मंत्रानें आहुति द्यावी. प्रातःकालीं असेल तर, "प्रातर्वस्तर्नमःस्वाहा," ह्या मंत्रानें द्यावी. याप्रमाणें प्रायश्चित्ताहुति देऊन होमद्रव्याचा संस्कार करून नित्यहोम करावा. पूर्वी श्रौत होम करून नंतर स्मार्तहोम करावा. कोणी ग्रंथकार स्मार्तहोम पूर्वी करावा असें ह्मणतात. आधान व पुनराधान यांचे ठायीं सायंकालीं होमाचा आरंभ करावा. सायंकालीं व प्रातःकालीं होमद्रव्य एक, व होमकर्ताहि एक असावा. जर प्रातःकालीं होम देणारा यजमान आहे तर कर्ता भिन्न झाला असा दोष नाहीं.

---

**अथाश्वलायनस्मार्तहोमः** आचम्यप्राणानायम्यदेशकालौसंकीर्त्यश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंसायमौपासनहोमंप्रातरौपासनहोमंवामुकद्रव्येणकरिष्ये चत्वारिशृंगेतिध्यात्वासोदकहस्तेनत्रिः परिसमुह्यपरिस्तीर्यत्रिः पर्युक्ष्यहोमद्रव्यंसमिद्युतमुत्तरतःस्थितंदर्भेणावज्वाल्यप्रोक्ष्यत्रिःपर्यग्निकृत्वाग्नेः पश्चिमतोदर्भेनिधायविश्वानिनइत्यभ्यर्च्यप्रजापतिंमनसाध्यायन्समिधमग्नौप्रक्षिप्यतथैवत्यक्त्वासमिधिप्रदीप्तायांशततंडुलैरग्नयेस्वाहेतिसायंप्रथमाहुतिःसूर्यायस्वाहेतिप्रातः प्रथमाहुतिःशताधिकतंडुलैः प्रजापतयइतिमनसोच्चार्यहोमत्यागाभ्यांद्वितीयाहुतिरुभयकाले परिस्तरणंविसृज्यपरिसमूहनपर्युक्षणेकृत्वोपस्थानं अग्नआयूंषीतितिसृणांशतंवैखानसाग्निःपवमानोगायत्री अग्न्युपस्थानेविनियोगः अग्नेत्वन्नइतिचतसृणांगौपायनाबंधुःसुबंधुःश्रुतबंधुर्विप्रबंधुश्चाग्निर्द्विपदाविराट् अग्न्युपस्थानेवि० प्रजापतेहिरण्यगर्भःप्रजापतिस्त्रिष्टुप् प्रजापत्युपस्थानेविनियोगः तंतुंतन्वन्देवाअग्निर्जगती यद्वादेवाप्रजापतिर्जगती उपस्थानेविनियोगः हिरण्यगर्भोहिरण्यगर्भःप्रजापतिस्त्रिष्टुप् प्रजापत्युप० इतिवायव्यदेशेतिष्ठन्नुपस्थायउपविश्यमानस्तोकइत्यादिनाविभूतिधारणंकचिदुक्तं विष्णुंस्मृत्वा अनेनहोमकर्मणाश्रीपरमेश्वरःप्रीयतामित्यर्पयेत् प्रातस्तुसूर्योनोदिवःसूर्यश्चक्षुःसूर्योगायत्री सूर्योप० उदुत्यंकाण्वःप्रस्कण्वःसूर्योगायत्री सूर्योप० चित्रंदेवानामांगिरसःकुत्सः सूर्यस्त्रिष्टुप् सूर्योप०नमोमित्रस्यसूर्योभितपाःसूर्योजगती सू०इतिचतुर्भिःपूर्वोक्तैस्त्रिभिःप्राजापत्यैश्चोपस्थानं केचित्प्रातस्तंतुंतन्वन्निातिनपठंति पत्नीकुमारीकर्तृकहोमेध्यानोपस्थानादौमंत्रावर्ज्याः ॥

## आतां आश्वलायनांचा स्मार्तहोमाचा प्रयोग सांगतों.

कर्त्यानें आचमन करून प्राणायाम करून देशकालांचा उच्चार केल्यानंतर, "श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं सायमौपासनहोमं प्रातरौपासनहोमंवामुकद्रव्येण करिष्ये," असा संकल्प करून "चत्वारिशृंगा०" हा मंत्र ह्मणून अग्नीचें ध्यान करावें. नंतर हातांत उदक घेऊन तीन वेळ, कुंडाच्या अथवा स्थंडिलाच्या सभोंवतीं सिंचन करावें. तसेंच दर्भांचें परिस्तरण करावें, व त्रिवार उदक प्रोक्षण करावें. नंतर कुंडाच्या उत्तरेस ठेविलेलें असें समिधायुक्त होमद्रव्य, प्रज्वलित अशा दर्भानें प्रकाशित करून उदकानें प्रोक्षण करून तेंच दर्भकोलीत पुनः त्रि-

वार होमद्रव्याच्या सभोंवतीं फिरवून टाकावें, व होमद्रव्य अग्नीच्या पश्चिमेस दर्भावर ठेवून, "विश्वानिनो०" ह्या मंत्रानें अग्नीची गंधादिकांनीं पूजा करून प्रजापतीचें मनामध्यें ध्यान करीत असतां अग्नीवर समिध देऊन तसाच त्याग मनांत ह्मणून समिध प्रदीप्त झाल्यानंतर शतसंख्याक तांदुळ घेऊन त्या तांदुळांची "अग्नये स्वाहा" या मंत्रानें सायंकालीं पहिली आहुति, व "सूर्याय स्वाहा" या मंत्रानें प्रातःकालीं पहिली आहुति, आणि शंभरांपेक्षां अधिक असे तांदुळ घेऊन त्यांहींकरून, "प्रजापतये०" असा मनांत उच्चार करून होम व त्याग यांहींकरून दुसरी आहुति सायंकालीं व प्रातःकालीं द्यावी. परिस्तरण घातलेले दर्भ काढून पूर्वीप्रमाणें उदकाचें सिंचन व प्रोक्षण करून उभें राहून अग्नीचें उपस्थान करावें. उपस्थानाचे मंत्र असे—"अग्नआयूंषीतितिसृणांशतंवैखानसाग्निःपवमानोगायत्री ॥ अग्न्युपस्थानेविनियोगः ॥ अग्नेत्वन्नइतिचतसृणांगौपायनाबंधुःसुबंधुः श्रुतबंधुर्विप्रबंधुश्चाग्निर्द्विपदाविराट् ॥ अग्न्युपस्थानेवि० ॥ प्रजापतेहिरण्यगर्भःप्रजापतिस्त्रिष्टुप् प्रजापत्युपस्थानेवि० ॥ तंतुन्तन्वन्देवाअग्निर्जगती ॥ यद्वादेवाप्रजापतिर्जगती ॥ उपस्थानेवि० ॥ हिरण्यगर्भोहिरण्यगर्भःप्रजापतिस्त्रिष्टुप् ॥ प्रजापत्युपस्थानेवि०" याप्रमाणें मंत्र ह्मणून उपस्थान करून बसून, "मानस्तोके०" इत्यादिक मंत्रानें विभूतिधारण करावें असें क्वचित् ग्रंथांत सांगितलें आहे. विष्णूचें स्मरण करून, "अनेनहोमकर्मणाश्रीपरमेश्वरःप्रीयतां," असें वाक्य ह्मणून कर्म ईश्वरास अर्पण करावें. प्रातःकालीं उपस्थान करणें त्याचे मंत्र—"सूर्योनोदिवःसूर्यश्चक्षुःसूर्योगायत्री ॥ सूर्योपस्थानेवि० उदुत्यंकाण्वः प्रस्कण्वःसूर्योगायत्री सूर्यो० ॥ चित्रंदेवानामांगिरसःकुत्सःसूर्यस्त्रिष्टुप् ॥ सूर्योप० ॥ नमोमित्रस्यसूर्योभितपाः सूर्योजगती ॥ सूर्योप०" हे चार मंत्र, व पूर्वी सांगितलेले प्रजापतिदेवताक (प्रजापति आहे देवता ज्यांची ते) तीन मंत्र याप्रमाणें सात मंत्रेंकरून प्रातःकालीं सूर्योपस्थान करावें. कोणी शिष्ट जन प्रातःकालीं "तंतुंतन्व" हा मंत्र ह्मणत नाहींत. पत्नी किंवा कुमारी ह्या होम करणाऱ्या असतील तर ध्यान, उपस्थान इत्यादिक कर्मांत मंत्र वर्ज्य करावे. याप्रमाणें आश्वलायनांचा स्मार्तहोमप्रयोग सांगितला.

---

अथहिरण्यकेशीयानांपूर्वोक्तसंकल्पाद्यंते यथाहतद्वसवइतिपरिसमुह्यपरिस्तीर्य अदितेनुमन्यस्वेतिदक्षिणतःप्राचीनंपर्युक्षेत् अनुमतेनुमन्यस्वेतिपश्चादुदीचीनं सरस्वतेनुमन्यस्वेति उत्तरतःप्राचीनंदेवसवितःप्रसुवेतिसर्वतः तूष्णींसमिधमाधायहोमादिप्राग्वत् अदितेन्वमंस्थाः अनुमतेन्व० सरस्वतेन्व० देवसवितःप्रासावीरितिपूर्ववत्परिसेचनंउदुत्यंचित्रंदेवानामितिप्रातरुपस्थानं अग्निर्मूर्धादिवइतित्वामग्नेपुष्करादधीतिद्वाभ्यांसायमुपस्थानं आपस्तंबानांसायमग्नयेस्वाहाग्नयेस्विष्टकृतेस्वाहेतिद्वेआहुतीप्रातस्तुसूर्यायस्वाहाग्नयेस्विष्टकृतेस्वाहेतिविशेषःशेषंहिरण्यकेशीयवत् ॥

## आतां हिरण्यकेशीय यांच्या स्मार्तहोमाचा प्रयोग सांगतों.

पूर्वी सांगितल्याप्रमाणें हिरण्यकेशीय यांनीं संकल्प इत्यादिक करून नंतर "यथाहतद्वसव०" या मंत्रानें कुंडाच्या सभोंवतीं उदक सिंचन करून तसेच सभोंवतीं दर्भ घालून

"अदितेनुमन्यस्व" ह्या मंत्रेंकरून दक्षिणेकडे पश्चिमेपासून पूर्वेपर्यंत, व "अनुमतेनुमन्यस्व" या मंत्रेंकरून पश्चिमेकडे दक्षिणेपासून उत्तरेपर्यंत व "सरस्वतेनुमन्यस्व" या मंत्रेंकरून उत्तरेकडे पश्चिमेपासून पूर्वेपर्यंत व "देवसवितःप्रसुव" या मंत्रेंकरून सभोंवतीं ईशानीपासून ईशानीपर्यंत प्रदक्षिण याप्रमाणें उदक सिंचन करावें. नंतर अग्नीवर अमंत्रक समिध देऊन होमादिक कर्म पूर्वीप्रमाणें करावें. नंतर "अदितेन्वमꣳस्थाः ॥ अनुमतेन्व० सरस्वतेन्व० ॥ देवसवितःप्रासावीः०" हे चार मंत्र ह्मणून पूर्वी सांगितल्याप्रमाणें उदकाचें सिंचन करावें. "उदुत्यं०, चित्रंदेवाना०" हे दोन मंत्र ह्मणून प्रातःकालीं उपस्थान करावें. व "अग्निर्मूर्धादिवः०" हा व "त्वामग्नेपुष्करादधि०" हा असे दोन मंत्र ह्मणून सायंकालीं उपस्थान करावें. आपस्तंब जे त्यांच्या सायंकालच्या "अग्नयेत्वा० अग्नयेस्विष्टकृतेस्वाहा," अशा दोन आहुति होत. प्रातःकालीं तर, "सूर्याय स्वाहा, अग्नये स्विष्टकृते स्वाहा" ह्या दोन आहुति होत, हा विशेष जाणावा. शेष कर्म, हिरण्यकेशीय यांचेप्रमाणें करावें.

---

अथकात्यायनानांसायमस्तमितेहोमः प्रातःसूर्येऽनुदितेहोमः तत्रप्रातरुपस्थानांतांसंध्यां कृत्वाहोमांतेगायत्रीजपादिसंध्यासमापनं तत्रपूर्ववत्संकल्पांतेउपयमनान्कुशानादायसव्ये कृत्वादक्षिणकरेणतिस्रःसमिधोग्नावाधाय मणिकोदकेनपर्युक्ष्याग्निमर्चयित्वाग्नयेस्वाहाप्रजापतयेस्वाहेतिसायंदध्नातंडुलैर्वाहुत्वाप्रातस्तथैवसूर्यायप्रजापतयेचजुहुयात् समास्त्वेत्यनुवाकेन सायमुपस्थानंप्रातस्तुविभ्राडित्यनुवाकेन अत्रदधिहोमादौसंस्रवप्राशनमाहुः होमलोपेष्टोत्तरसहस्रगायत्रीजपः मुख्यकालातिक्रमेअनादिष्टहोमः ॥

## आतां कात्यायनांचा स्मार्तहोमप्रयोग सांगतों.

कात्यायन यांनीं सायंकालीं सूर्यास्तानंतर होम करावा. प्रातःकालीं सूर्योदयाच्या पूर्वी होम करावा. तो असा—प्रातःकालीं उपस्थानापर्यंत संध्या करून होम द्यावा. नंतर गायत्रीजप इत्यादिक शेषसंध्या समाप्त करावी. त्या होमाविषयीं पूर्वी सांगितल्याप्रमाणें संकल्प करून नंतर उपयमनसंज्ञक दर्भ घेऊन ते डाव्या हातांत घेऊन उजव्या हातानें तीन समिधा अग्नीमध्यें देऊन कलशांतील उदकानें कुंडाचे सभोंवार प्रोक्षण करून अग्नीचें पूजन करून सायंकालीं "अग्नये स्वाहा, प्रजापतये स्वाहा" ह्या दोन आहुतींनीं दधि, किंवा तांदुळ यांचा होम करावा, व प्रातःकालीं सायंकालीन होमाप्रमाणें "सूर्याय स्वाहा, प्रजापतये स्वाहा" ह्या दोन आहुतींनीं होम करावा. "समास्त्व०" ह्या अनुवाकानें सायंकालीं उपस्थान करावें, व प्रातःकालीं तर "विभ्राट्०" ह्या अनुवाकानें उपस्थान करावें. दधि इत्यादिक द्रव्याचा होम केला असतां ह्या स्थलीं संस्रावाचें प्राशन करावें असें सांगतात. होमाचा लोप झाला असतां १,००८ गायत्रीजप करावा. मुख्य होमकाल टळेल तर अनादिष्टहोम[1] करावा.

---

१ कर्म मात्र सांगून जेथें होमाचा आदेश नाहीं तेथें अनादिष्ट ( अनादेश ) होम करावा, म्हणजे अग्नि १, वायु २, सूर्य ३, प्रजापति ४, अग्नीवरुण ५, अग्नीवरुण ६, अयाअग्नि ७, वरुण, सविता, विष्णु, विश्वेदेव, मरुत्, स्वर्क ८, वरुण, आदित्य, अदिति ९, अशा नऊ आहुतींनीं उक्त देवतांच्या उद्देशानें होम करावा.

अथहोमद्रव्याणि व्रीहिश्यामाकयवानांतंडुलाःपयोदधिसर्पिर्यवव्रीहिगोधूमप्रियंगवःस्वरूपेणापिहोम्याः तिलास्तुस्वरूपेणैव तंडुलादयःशतसंख्याहस्तेनहोतव्याः दध्यादिद्रवद्रव्यंस्रुवेण सर्वत्रोत्तराहुतिःपूर्वतोभूयसी समिधश्चार्कपलाशखदिरापामार्गपिप्पलोदुंबरशमीदूर्वादर्भमयादशद्वादशांगुलाःसत्वचः वटप्लक्षबिल्वादिजाहेमाद्रौ होमाहुत्योःसंसर्गेयत्रवेत्थेतिमंत्रेणाग्नयेसमिद्धोमः नित्यहोमेत्वतिक्रांतेआज्यंसंस्कृत्यचतुर्गृहीत्वामनोज्योतिर्जुषतामितिजुहुयात् द्वादशदिनपर्यंतंहोमलोपेइदमेवप्रायश्चित्तंततःपरमग्निनाशः एवंहोमलोपप्रायश्चित्तंकृत्वातिक्रांतहोमार्थंद्रव्यंसंस्कृत्यसायंप्रातःक्रमेणद्वेद्वेआहुतीदिनगणनयाजुहुयात् अग्निसूर्यप्रजापतीनुपतिष्ठेन्नवाजुहुयात्प्रायश्चित्तेनचारितार्थ्यात् सूतकादिनाहोमलोपेप्येवं हिरण्यकेशीयानामप्येवंआपस्तंबादीनांत्रिरात्रात्परमग्निनाशोभवतीतिसूतकेपिस्वयंहोमःकार्यः समारोपोत्तरंसूतकपातेप्रत्यवरोहासंभवेनत्रिरात्रंहोमलोपेपुनराधानं ॥

आतां होमाचीं द्रव्यें सांगतों.—व्रीहि ( भात ), श्यामाक ( सावे ), यव ( जव ) ह्यांचे तांदूळ घ्यावे. किंवा पय, दधि, घृत, यव, व्रीहि, गहूं, प्रियंगु (कांग, राळे) हीं द्रव्यें स्वरूपें-करून्हि ( भात इत्यादिकांचे तांदूळ केल्यावांचूनहि ) होमास योग्य आहेत. तिळ तर जसे असतील तसेच होमास घ्यावे. तांदूळ इत्यादिक होमास घेणें ते प्रत्येक आहुतीस शंभर घेऊन हातानें त्यांचा होम करावा. दधि इत्यादिक पातळ द्रव्य स्रुवापात्रानें हवन करावें. जेथें दोन आहुति सांगितल्या असतील तेथें पहिल्या आहुतीहून दुसरी आहुति परिमाणानें किंचित् अधिक द्यावी, असा सर्वत्र नियम आहे. समिधा— रुई, पळस, खैर, आघाडा, अश्वत्थ, उंबर, शमी, दूर्वा आणि कुश या वृक्षांच्या समिधा दहा किंवा बारा अंगुळें लांबीच्या, त्वचायुक्त अशा ग्रहण कराव्या. वट, प्लक्ष ( पिंपरीवृक्ष ), बिल्व ( बेल ), इत्यादि वृक्षांच्या घ्याव्या असें हेमाद्रींत सांगितलें आहे. दोन आहुति यांचा संसर्ग होईल तर "यत्रवेत्थ०" ह्या मंत्रानें अग्नीच्या उद्देशेंकरून समिधेचा होम करावा. नित्यहोम अतिक्रांत होईल तर आज्याचा संस्कार करून तें आज्य चार वेळ (स्रुचीमध्यें) घेऊन "मनोज्योतिर्जुषतां०" ह्या मंत्रानें होम करावा. बारा दिवसपर्यंत होमाचा लोप होईल तर हेंच प्रायश्चित्त करावें. बारा दिवसांहून अधिक दिवस होमाचा लोप झाल्यास अग्नि नष्ट होतो. याप्रमाणें होमलोप झाल्याचें प्रायश्चित्त करून अतिक्रांत झालेला होम करण्याकरितां होमद्रव्याचा संस्कार करून सायंकालीं व प्रातःकालीं क्रमेंकरून दोन दोन आहुति, याप्रमाणें जितके दिवस होमाचा लोप झाला असेल तितके दिवस मोजून त्याप्रमाणें होम करावा, व अग्नि, सूर्य, प्रजापति यांचें उपस्थान करावें. अथवा अतिक्रांतहोम करूं नये; कारण, प्रायश्चित्त केल्यानें होम केल्याचें फळ मिळतें. आशौच इत्यादिक प्राप्त झाल्यानें होमाचा लोप होईल तर असाच निर्णय जाणावा. हिरण्यकेशीय जे त्यांचाहि याप्रमाणेंच निर्णय जाणावा. आपस्तंब इत्यादिक जे त्यांचा होमलोप झाला असतां तीन रात्रींनंतर अग्नि नष्ट होतो, याकरितां त्यांनीं आशौचामध्येंहि स्वतां होम करावा. जर अग्नीचा समारोप केल्यानंतर आशौच प्राप्त होईल व त्या कारणानें प्रत्यवरोह करण्याचा संभव नसल्यामुळें त्रिरात्र होमाचा लोप होईल तर (आपस्तंब इत्यादिकांनीं) पुनराधान करावें.

---

अथसमस्यहोमः सायंप्रातर्होमौसमस्यकरिष्ये पूर्ववत्सायंकालहोमांतंकृत्वापर्युक्ष्यपुनर्द्रव्यंसंस्कृत्यसमिधंप्रक्षिप्यसूर्यप्रजापत्याहुतींदत्वाहविष्पांतमित्युपतिष्ठेत् हविष्पांतमितिपंचर्चस्यवामदेवः सूर्यवैश्वानरौत्रिष्टुप् नित्यवत्प्रजापत्युपस्थानं ॥

## आतां समस्यहोम सांगतों.

( कांहीं एक आपत्तिकाल प्राप्त असतां सायंहोम व प्रातःकालीन होम असे दोन होम सायंकालींच करणें त्याला समस्यहोम असें ह्मणतात. ) त्याचा प्रयोग— "सायंप्रातर्होमौ समस्य करिष्ये," असा संकल्प करून पूर्वी सांगितल्याप्रमाणें सायंकालहोमापर्यंत कर्म करून उदकानें प्रोक्षण करून पुनः द्रव्याचा संस्कार करून अग्नीमध्यें समिध देऊन सूर्य व प्रजापति यांच्या उद्देशानें एकेक आहुति देऊन "हविष्पांतं०" ह्या पांच ऋचांनीं उपस्थान करावें. "हविष्पांतमितिपंचर्चस्य वामदेवः सूर्यवैश्वानरौ त्रिष्टुप्" नित्याप्रमाणें प्रजापतिमंत्रांनीं उपस्थान करावें.

---

अथपक्षहोमः प्रतिपदि अद्यसायमारभ्यचतुर्दशीसायमवधिकान्पक्षहोमान्तंत्रेणकरिष्ये सायंतंडुलान्पात्रद्वयेवृद्धिक्षयानुसारेणचतुर्दशादिवारंगृहीत्वाहोमकालेअग्नयेस्वाहेतिसर्वान्पूर्वपात्रस्थानेकदैवहुत्वाद्वितीयपात्रस्थान्प्रजापतयेतथैवजुहुयात् एवंद्वितीयायांप्रातरद्यावधिपर्वप्रातरवधिकान्पक्षहोमान्तंत्रेणकरिष्यइत्यादिसायंवत् विशेषस्तुप्रथमपात्रस्थान्सूर्यायस्वाहेतिजुहुयात् द्वितीयपात्रस्थान्प्रजापतयेस्वाहेतिहुत्वोभयत्रसमिदेकोपस्थानादिसकृत् पक्षमध्येआपत्प्राप्तौतत्सायंकालाच्चतुर्दशीसायंपर्यंतान्शेषहोमान्सायंपक्षहोमवद्धुत्वा पर्वप्रातर्होमांतान्प्रातर्जुहुयात् सर्वथापर्वसायंहोमःप्रतिपत्प्रातर्होमश्चपृथगेव इतिपक्षहोमःशेषहोमौ पक्षमध्येआपन्निवृत्तावपकृष्टाहोमाः पुनःकार्याः संततपक्षहोमअग्नेयेग्निनाशात्तृतीयेपक्षेप्रतिदिनंहोमः सर्वथापन्निवृत्त्यभावेयावज्जीवंपक्षहोमाः ॥

## आतां पक्षहोम सांगतों.

( महा आपत्तिकाल प्राप्त होईल तर प्रतिपदेपासून चतुर्दशीपर्यंत चवदा दिवसांचे सायंप्रातर्होम अपकर्षानें करणें त्याला पक्षहोम असें ह्मणतात. ) त्याचा विधि—प्रतिपदेच्या दिवसीं "अद्यसायमारभ्य चतुर्दशीसायमवधिकान् पक्षहोमान् तंत्रेण करिष्ये," असा संकल्प करून वृद्धि किंवा क्षय असें असेल तदनुसार ( चवदा वेळ, तेरा वेळ, किंवा पंधरा वेळ ) सायंकालीन होमाचे तांदूळ दोन पात्रांमध्यें घेऊन, होमकालीं "अग्नये स्वाहा" ह्या मंत्रानें, पूर्वी घेतलेले पात्रांतले तांदुळांचा एककालींच होम करून दुसऱ्या पात्रांतल्या तांदुळांचा होम "प्रजापतये स्वाहा" ह्या मंत्रानें पूर्वीप्रमाणेंच करावा. याप्रमाणें द्वितीयेच्या दिवसीं, "प्रातरद्यावधि पर्वप्रातरवधिकान् पक्षहोमान् तंत्रेण करिष्ये," इत्यादिक सायंहोमाप्रमाणें कर्म करावें. विशेषविधि तर, पहिल्या पात्रांत घेतलेले तांदुळांचा होम "सूर्याय स्वाहा" ह्या मंत्रानें करावा, व दुसऱ्या पात्रांतील तांदुळांचा होम "प्रजापतये स्वाहा"

ह्या मंत्रानें करावा. दोनहि दिवसीं अग्नींत समिध द्यावयाची ती एक वेळ द्यावी, व उपस्थानहि एक वेळ करावें. पक्षामध्यें कांहीं आपत्ति प्राप्त होईल तर त्या सायंकालापासून चतुर्दशी दिवसाच्या सायंकालपर्यंत जे शेषहोम ते, सायंपक्षहोमाप्रमाणें करून प्रातःकालीं, पर्वाच्या प्रातःकालीन होमापर्यंत होम करावा. पर्वाचा सायंहोम, व प्रतिपदेचा प्रातर्होम हे सर्वथा निरनिराळेच करावे. याप्रमाणें पक्षहोम व शेषहोम, पक्षामध्यें आपत्ति दूर होईल तर अपकर्षानें केलेले होम पुनः करावे. सतत तीन पक्षहोम झाल्यानें अग्नि नष्ट होतो याकरितां तिसऱ्या पक्षीं प्रतिदिवसीं होम द्यावा. सर्वथा आपत्ति दूर न होईल तर यावज्जीवपर्यंत पक्षहोम करावे.

---

अथसमारोपःअयंतेयोनिरित्यस्यविश्वामित्रोग्निरनुष्टुप् अग्निसमा०अनेनमंत्रेणहोमोत्तरमरणीमश्वत्थसमिधंवाप्रताप्याग्निसमारोहंतत्रभावयेत् होमादिकालेअरणींनिर्मथ्यप्रत्यवरोहेतिमंत्रेणस्थंडिलेग्निंप्रतिष्ठापयेत् समित्समारोपेश्रोत्रियागारादग्निंप्रतिष्ठाप्यप्रत्यवरोहेतिमंत्रेणतांसमिधमग्नावादध्यात् सूत्रांतरेआजुह्वानउद्बुध्यस्वेतिमंत्राभ्यांप्रत्यवरोहणंप्रत्यहंसमारोपादिद्वादशदिनमेव पर्वणिसायंहोमकालपर्यंतंप्रत्यवरोहणाभावेग्निनाशइतिकेचित् समारोपप्रत्यवरोहौयजमानकर्तृकावेव तेनसमारोपोत्तरंपर्वण्याशौचप्राप्तौप्रत्यवरोहासंभवादग्निनाशः इदमापस्तंबादिपरं आश्वलायनानांतुद्वादशरात्रमध्येपर्वणिप्रत्यवरोहाभावेपिनाग्निनाशः किंतुद्वादशरात्रोत्तरंहोमलोपएवेत्यपरे राजक्रांत्यादिसंकटेऋत्विग्द्वारापिसमारोपादि केचिदृत्विगाद्यभावेनानन्यगतिकत्वेआशौचपातात्पूर्वंपर्वहोमसहितानपिहोमानपकृष्यकृत्वा नकृत्वावा समारोपंकृत्वासूतकांतेप्रत्यवरोहःकार्योनात्रपर्वोल्लंघनदोषइत्याहुः ॥

## आतां अग्निसमारोप सांगतों.

( ज्याचा अग्नि असेल त्यानें अरणीमध्यें किंवा समिधेमध्यें अग्नि आला असी जी विधिपूर्वक भावना करणें त्याला अग्निसमारोप असें ह्मणतात. ) त्याचा विधि असा—“ **अयंतेयोनिरित्यस्य विश्वामित्रोग्निरनुष्टुप् ॥ अग्निसमारोपेविनियोगः** ” हा मंत्र ह्मणून होमानंतर अरणी, किंवा अश्वत्थाची समित् अग्नीवर तापवून तो अग्नि अरणीवर किंवा समिधेवर आला असी भावना करावी, नंतर पुनः होमादिकाचा समय येईल त्या वेळीं त्या अरणीचें मंथन करून अग्नि उत्पन्न करून , “ **प्रत्यवरोह०** ” ह्या मंत्रेंकरून स्थंडिलामध्यें त्या अग्नीची स्थापना करावी. समिधेचेठायीं समारोप केला असेल तर, श्रोत्रियाच्या घरांतील अग्नि आणून त्याची स्थंडिलामध्यें स्थापना करून “ **प्रत्यवरोह०** ” ह्या मंत्रेंकरून ती समित् अग्नीमध्यें हवन करावी. दुसऱ्या सूत्रामध्यें “ **आजुह्वान०, उद्बुध्यस्व०** ” ह्या दोन मंत्रांनीं प्रत्यवरोहण करावें असें सांगितलें आहे. प्रतिदिवसीं समारोपादिक करणें तें बारा दिवसपर्यंतच करावें. पर्वदिवसीं सायंहोमकालापर्यंत, प्रत्यवरोहण नसेल तर अग्नि नष्ट होतो असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. समारोप व प्रत्यवरोह यांचा कर्ता यजमानच होय, ह्मणजे ते यजमानानेंच करावे, यावरून समारोप केल्यानंतर पर्वदिवसीं आशौच प्राप्त होईल तर प्रत्यवरोहाचा संभव नसल्यामुळें अग्नि नष्ट होतो, परंतु हा निर्णय आपस्तंब इत्यादिकशाखी जे त्यांविषयीं आहे.

बारा रात्रींत पर्व प्राप्त असतां त्या दिवसीं प्रत्यवरोहाचा अभाव असतांहि नष्ट होत नाहीं, तर बारा रात्रींनंतर होमाचा लोप मात्रच होतो असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात. राजक्रांति इत्यादिक संकट प्राप्त होईल तर ऋत्विजाकडूनहि समारोपादिक करावें. कोणी ग्रंथकार, ऋत्विज इत्यादिक प्रातिनिधि नसल्या कारणानें अनन्यगतिक ( दुसरी गति नसणें ) असेल तर आशौच प्राप्त होण्याच्या पूर्वी पर्वहोमासहितहि होमांचा अपकर्ष करून होम करून किंवा केल्यावांचून समारोप करून आशौच गेल्यानंतर प्रत्यवरोह करावा, याविषयीं पर्वाचे उल्लंघनाचा दोष नाहीं असें ह्मणतात.

---

**समारोपोत्तरंदंपत्योःप्रवासेसीमानद्योरुल्लंघनकालेउभाभ्यामन्यतरेणवासमिदाद्यन्वारंभः कार्यः अन्यथाग्निनाशःयजमानस्यैवप्रवासेकृत्यं अभयंवोभयंमेस्त्वितिअग्निमुपस्थायप्रवासं गच्छेत् ततआगत्यगृहामाबिभीतोपवःस्वस्त्येवोस्मासुचप्रजायध्वंमाचवोगोपतीरिषदितिमंत्रे णस्वगृहंनिरीक्ष्य गृहानहंसुमनसःप्रपद्येवीरघ्नोवीरवतःसुवीरान् इरांवहंतोघृतमुक्षमाणास्ते ष्वहंसुमनाःसंविशामीतिगृहंप्रविश्यशिवंशग्मंशंयोःशंयोरितिपुनस्त्रिरनुवीक्ष्यनित्यहोमांते अ भयंवोभयंमेस्त्वित्यग्निमुपतिष्ठेत् ज्येष्ठपुत्रशिरःपाणिभ्यांपरिगृह्यअंगादंगात्संभवसीतिमंत्रंज पित्वामूर्धानंत्रिर्जिघ्रेत् एवमितरपुत्राणांप्रत्तकन्यानांतूष्णींजिघ्रेत् प्रवासादागतंप्रतिज्ञातमपि अप्रियंतद्दिनेनवदेयुः ॥**

समारोप केल्यानंतर दंपती जेव्हां प्रयाण करतील आणि ग्रामाची सीमा व नदी यांच्या उल्लंघनाचा समय येईल त्या वेळीं उभयतांनीं किंवा दोघांतून एकानें, समारोपित अशा त्या समिधेस किंवा अरणीस स्पर्श करावा, स्पर्श न केला तर अग्नि नष्ट होतो. यजमानासच कर्तव्यप्रवासाविषयीं विधि– “ **अभयं वोभयंमेस्तु०** ” ह्या मंत्रानें अग्नीचें उपस्थान करून प्रवासाप्रत जावें. तदनंतर प्रवासांतून येऊन “ **गृहा मा बिभीतोपवः स्वस्त्येवोस्मासु च प्रजायध्वं मा च वो गोपतीरिषत्** ” हा मंत्र ह्मणून स्वकीय गृह अवलोकन करावें. नंतर, “ **गृहानहं सुमनसः प्रपद्ये वीरघ्नो वीरवतः सुवीरान् ॥ इरां वहंतो घृतमुक्षमाणास्तेष्वहं सुमनाः संविशामि,** ” हा मंत्र ह्मणून गृहांत प्रवेश करून “**शिवं शग्मं शंयोः शंयोः**” हा मंत्र ह्मणून त्रिवार पाठीमागें पाहून नित्यहोम दिल्यानंतर “ **अभयं वोभयं मेस्तु** ” ह्या मंत्रानें अग्नीचें उपस्थान करावें. ज्येष्ठपुत्राचें मस्तक दोहों हातांनीं ग्रहण करून, “ **अंगादंगात्संभवसि०** ” ह्या मंत्राचा जप करून मस्तक ( टाळू ) तीन वेळ हुंगावा. याप्रमाणें इतर पुत्र व विवाहितकन्या यांचीं मस्तकें मंत्रविरहित हुंगावीं. प्रवासांतून आलेल्याजवळ त्या दिवसीं प्रतिज्ञात असें जरी असेल तथापि अप्रिय भाषण कोणी बोलूं नये.

---

**प्रोषितेपत्यौपत्नीस्मार्तहोमौस्वयंकृत्वादर्शपूर्णमासस्थालीपाकपिंडपितृयज्ञान्विप्रेणकारये त् अनुगतप्रायश्चित्तादिपत्न्यांरजस्वलायामपिऋत्विक्कुर्यात् पुनःसंधानंतुपत्यौप्रोषितेनभवेत् नैमित्तिकाजातेष्टिगृहदाहेष्ट्योपिनभवंतिप्रायश्चित्तेष्टेःपूर्णाहुतिः ॥**

पति प्रवासांत असेल तर स्त्रियेनें स्मार्तहोम आपण स्वतां करून दर्शपूर्णमासस्थालीपाक, पिंडपितृयज्ञ ब्राह्मणाकडून करवावे. पति प्रवासास गेल्यानंतर अग्नि नष्ट झाल्याचें प्राय-

श्चित्त इत्यादिक करणें तें स्त्री रजस्वला असेल तथापि ऋत्विजानें करावें. पुनःसंधान करणें तें तर पति प्रवासस्थ असतां होत नाहीं. नैमित्तिक इष्टि, जातेष्टि व गृहदाहेष्टि ह्याहि इष्टि पति प्रवासांत असतां करूं नयेत. प्रायश्चित्तेष्टीची पूर्णाहुति करूं नये.

---

अथौपासनाग्न्यनुगमनेगृह्याग्नेरनुगमप्रायश्चित्तंकरिष्ये इतिसंकल्प्यआयतनस्थंभस्मदूरीकृत्योपलेपादिकृत्वाग्निंप्रतिष्ठाप्याज्यंसंस्कृत्य अयाश्चेतिमंत्रेणैकामाज्याहुतिंसर्वप्रायश्चित्तंचहुत्वादंपत्योरन्यतरेणापरहोमकालपर्यंतमुपोषितेनस्थातव्यं एवंद्वादशरात्रपर्यंतं केचिदुपवासमयाश्चेतिहोमंवाकुर्यात्नद्वयमित्याहुः एतद्वृत्तिकारमतं केचित्तुयद्यग्न्यनुगमनेहोमकालद्वयातिक्रमस्तदानष्टाग्निसंधानं तत्रत्रिरात्रमग्निनाशेप्राणायामशतं ततआविंशतिरात्रमेकदिनोपवासः ततआमासद्वयंत्रिरात्रोपवासः ततऊर्ध्वंसंवत्सरपर्यंतंप्राजापत्यकृच्छ्रं ततःप्रतिवर्षंकृच्छ्रावृत्तिः एवंप्रायश्चित्तंकृत्वाआधानोक्तसंभाराभिधायनष्टस्यगृह्याग्नेःप्रायश्चित्तंकरिष्येइतिसंकल्प्यायाश्चेत्याज्येनस्रुवाहुतिपत्न्युपवासादिपूर्ववत् लाजहोमादिकंवा एवंद्वादशरात्रपर्यंतमग्न्युत्पत्तिरित्याहुः द्वादशदिनोत्तरंविच्छेदप्रायश्चित्तंहोमादिद्रव्यदानंचकृत्वाविवाहहोमादिविधिनायथास्वस्वगृह्यंपुनःसंधानं ॥

**यानंतर औपासनाग्नि नष्ट झाला असतां कर्तव्य विधि.**—औपासनाग्नि नष्ट होईल तर "गृह्याग्नेरनुगमप्रायश्चित्तं करिष्ये" असा संकल्प करून कुंडांतील भस्म दूर करून गोमयानें कुंडाचें सारवण इत्यादिक करून अग्नीची स्थापना करावी. नंतर आज्याचा संस्कार करून "अयाश्चा०" ह्या मंत्रानें एक आज्याची आहुति व सर्वप्रायश्चित्ताहुति होम करून दंपतींतून एकानें दुसऱ्या होमकालपर्यंत उपोषित रहावें. याप्रमाणें बारा रात्रींपर्यंत असतां हा निर्णय जाणावा. कोणी ग्रंथकार, उपवास अथवा "अयाश्चा०" ह्या मंत्रानें होम, ह्यांतून एक करावें; दोन ( उपवास व होम ) करूं नयेत असें ह्मणतात, व हें वृत्तिकाराचें मत होय. कोणी ग्रंथकार तर, जर अग्नि नष्ट होऊन दोन होमांचा काल अतिक्रांत होईल तर नष्ट झालेला अग्नि सिद्ध करावा, त्यामध्यें त्रिरात्रपर्यंत अग्नि नष्ट होईल तर शंभर प्राणायाम करावे, त्रिरात्रापासून वीस रात्रींपर्यंत एक दिवस उपवास करावा, वीस रात्रींपासून दोन महिन्यांपर्यंत त्रिरात्र उपवास करावा, दोन महिन्यांनंतर वर्षपर्यंत प्राजापत्य कृच्छ्र करावें, एक वर्षानंतर प्रतिवर्षास कृच्छ्राची आवृत्ति करावी. याप्रमाणें प्रायश्चित्त करून आधानास सांगितलेली सामग्री संपादन करून, "नष्टस्य गृह्याग्नेः प्रायश्चित्तं करिष्ये," असा संकल्प करून, "अयाश्चा०" ह्या मंत्रानें आज्यानें स्रुवाहुति देणें, व स्त्रियेनें उपोषण करणें इत्यादिक कर्म पूर्वी सांगितल्याप्रमाणें करावें, अथवा लाजहोमादिक करावें, याप्रमाणें बारा रात्रींपर्यंत अग्नीची उत्पत्ति करावी असें ह्मणतात. बारा दिवसांनंतर असेल तर अग्निविच्छेदाचें प्रायश्चित्त, होमादिक द्रव्याचें दान हीं करून विवाहहोमादिविधीनें आपापल्या गृह्यसूत्रानुसार पुनःसंधान करावें.

---

अथान्वाहिताग्नेःप्राक्यागादनुगतौ अयाश्चेतिपूर्ववदग्निमुत्पाद्य पुनरन्वाधानंकृत्वाभूर्भुवःस्वरित्युपस्थायसर्वप्रायश्चित्तंहुत्वास्थालीपाकंकुर्यात् अन्वाधानोत्तरंप्रयाणप्राप्तौतुभ्यंताअंगिर

स्तमइत्याज्याहुतिमग्नयेहुत्वासर्वप्रायश्चित्तंहुत्वाग्निंसमारोप्य गच्छेत् समारूढसमिन्नाशेपु नराधेयमिष्यते उपलेपादिकंकृत्वानष्टाग्निप्रायश्चित्तंपुनराधेयंसंकल्प्यआधानोक्तसंभाराभि धायाग्निंप्रतिष्ठाप्यअयाश्चेतिस्रुवाज्याहुतिंसर्वप्रायश्चित्तंचजुहुयादितिपुनराधेयं स्वाग्निभ्रमेणा न्याग्नौस्वयंयजनेस्वाग्नावन्ययजनेवापथिकृत्स्थालीपाकंकरिष्येइतिसंकल्प्यचरुःकार्योथवापथि कृत्स्थानेपूर्णाहुतिंहोष्यामीतिसंकल्प्यस्रुचिद्वादशवारंचतुर्वारंवाज्यंगृहीत्वाअग्नयेपथिकृतेस्वा हेतिजुहुयात् विवाहोत्तरमाधानोत्तरंवापौर्णमास्यांस्थालीपाकारंभः प्रतिपदियागोतिक्रांतश्चे दागामिपर्वपूर्वतिथिषुचतुर्थीनवमीचतुर्दशीर्द्वितीयापंचम्यष्टमीर्विहायकार्यः नात्रकालातिक्रम प्रायश्चित्तं अन्वाधानोत्तरंप्रतिपदीष्टयकरणेतृतीयादितिथिषुसर्वप्रायश्चित्तंहुत्वापुनरन्वाधा ययागः द्वितीयपर्वप्राप्तौअतीतेष्टिःपथिकृच्चरुपूर्वकंपर्वणिकार्या तत्राप्यतिक्रमेद्वितीयप्रतिपदि लुप्तेष्टेःपादकृच्छ्रंकृत्वाप्राप्तकालयागः द्वितीययागस्यापिआगामितिथिषुलोपेतत्पर्वणिपादकृ च्छ्रपथिकृत्पूर्वकंद्वितीययागः तत्राप्यतिक्रमेतृतीयप्रतिपदिअर्धकृच्छ्रंयागद्वयस्यकृत्वाप्राप्तया गः तृतीययागस्योक्ततिथावर्धकृच्छ्रपथिकृत्पूर्वकंचतुर्थपर्वणिवाअकरणेअग्निनाशात्पुनराधेयं अत्रपुनराधेयस्वरूपंसंभारनिधानपूर्वकमयाश्चेतिस्रुवाज्याहुतिरित्यन्वारूढसमिन्नाशस्थले उ क्तमेव पुनराधानंतुविवाहहोमादिरूपंपुनराधेयाद्भिन्नं आयतनाद्बहिःशम्यापरासात्प्राक्वन्हि पातेइदंतएकमित्यृचातमायतनेप्रक्षिप्यसर्वप्रायश्चित्तंजुहुयात् पर्वणिव्रतलोपेग्नयेव्रतपतयेचरुः पूर्णाहुतिर्वा पर्वणिदंपत्योरन्यतराश्रुपातेग्नयेव्रतभृतेचरुः पूर्णाहुतिर्वा पवित्रनाशेग्नयेपवित्र वतेचरुःपूर्णाहुतिर्वा अन्वाधानेष्टिमध्येचंद्रग्रहणेअत्राहगोरितिचंद्रायाज्यंहुत्वानवोनवोइत्यु पस्थायेध्माधानादियागः सूर्योपरागेउद्वयमितिसूर्यायाज्यंहुत्वाचित्रंदेवानामित्युपस्थानं अन्वा धानोत्तरंस्वप्रेरेतोविसर्गेइमंमेवरुणतत्वायामीतिवरुणायद्वेआज्याहुतीरविपूजापुनर्मामेति सौ त्रमंत्रयोर्जपश्च बुद्ध्यारेतोविसर्गेग्निव्रतपतिचरुः अन्यदास्वप्रेरेतोविसर्गेसूर्यनमस्कारत्रयंइध्मा धानोत्तरंहविर्दोषेदुष्टस्थानेआज्यंप्रतिनिधिंकृत्वा यागंसमाप्यदुष्टंजलेत्यक्त्वान्वाधानादिस्तद्दे वताकःपुनर्यागः इध्माधानात्पूर्वंहविर्दोषेतद्देवताकंहविःपुनरुत्पाद्ययागः स्विष्टकृदर्थहविर्दो षेआज्येनस्विष्टकृतंकुर्यात् अंगहविर्दोषेतदाज्यंपुनरुत्पादयेत् ॥

यानंतर यागाच्या पूर्वी अन्वाधान केलेला अग्नि नष्ट होईल तर, " अयाश्चा० " ह्या मंत्रानें पूर्वी सांगितल्याप्रमाणें अग्नि उत्पन्न करून पुनः अन्वाधान करून " भूर्भुवः स्वः " ह्या मंत्रानें उपस्थान करून सर्व प्रायश्चित्ताहुति देऊन स्थालीपाक करावा. अन्वाधान केल्यानंतर प्रयाण करण्याचें प्राप्त होईल तर, " तुभ्यंता अंगिरस्तम० "ह्या मंत्रानें आज्याची आहुति अग्नीच्या उद्देशानें देऊन सर्वप्रायश्चित्ताहुतिहोम करून अग्नीचा समारोप करून प्रयाण करावें. " अग्निसमारोप केलेल्या समिधेचा नाश झाला तर पुनराधेय करावें. " तें पुनराधेय असें—गोमयानें कुंडाचें सारवण इत्यादिक करून नष्टाग्नीचे प्रायश्चित्ताचा व पुनराधेयाचा संकल्प करून आधानास सांगितलेले पदार्थ संपादन करून अग्नीची स्थापना करून, "अयाश्चा०" ह्या मंत्रानें स्रुवाज्याहुति एक व सर्वप्रायश्चित्ताहुति यांचा होम करावा, हें पुनराधेय होय. हा स्वकीय अग्नि आहे अशा भ्रमानें दुसऱ्याच्या अग्नीवर स्वकीय होम करील, अथवा आपल्या अग्नीवर अन्य स्वकीय होम करील तर " पथिकृत् स्थालीपाकं करिष्ये," असा संकल्प करून चरु

करावा. अथवा, "पथिकृत्स्थाने पूर्णाहुतिं होष्यामि," असा संकल्प करून स्रुचिपात्रामध्यें बारा वेळ किंवा चार वेळ घृत घेऊन, "अग्नये पथिकृते स्वाहा" ह्या मंत्रानें आहुति द्यावी. स्थालीपाकाला आरंभ करावयाचा तो विवाहानंतर किंवा आधान केल्यानंतर पौर्णिमेच्या दिवसीं करावा. प्रतिपदेच्या दिवसीं याग होण्याचा राहील तर पुढें येणारें जें पर्व त्याच्या पूर्वींच्या ज्या तिथि त्यांचे ठायीं ( चतुर्थी, नवमी, चतुर्दशी, द्वितीया, पंचमी आणि अष्टमी ह्या तिथि वर्ज्य करून ) करावा. याविषयीं, कालातिक्रांत झाल्याचें प्रायश्चित्त नाहीं. अन्वाधान केल्यानंतर प्रतिपदेचे दिवसीं इष्टि करावी, ती न करील तर तृतीया इत्यादिक ज्या उक्त तिथि त्यांचे ठायीं, सर्वप्रायश्चित्त होम करून पुनः अन्वाधान करून याग करावा. दुसरें पर्व प्राप्त झालें असतां अतीत ( पूर्वी करावयाची राहिलेली ) इष्टि पथिकृत्चरुपूर्वक (पथिकृत्स्थालीपाक पूर्वी करून) पर्वदिवसीं करावी. त्या पर्वदिवसींहि न होईल तर दुसऱ्या प्रतिपदेचे दिवसीं इष्टिलोपाचें पादकृच्छ्र प्रायश्चित्त करून प्राप्त झालेल्या कालीं याग करावा. दुसऱ्या यागाचाहि येणाऱ्या तिथीचे ठायीं लोप झाला तर त्या पर्वदिवसीं पादकृच्छ्र करून पथिकृत्चरु करून दुसरा याग करावा. त्या दिवसींहि न झाला तर तिसऱ्या प्रतिपदेचे दिवसीं, दोन यागांचें अर्धकृच्छ्र प्रायश्चित्त करून प्राप्त झालेला याग करावा. अर्धकृच्छ्र व पथिकृत्स्थालीपाकपूर्वक, तिसरा याग उक्त तिथीचे दिवसीं अथवा चतुर्थपर्वाचे दिवसीं करावा, न केला तर अग्नि नष्ट होतो, याकरितां पुनराधेय करावें. एथें पुनराधेयाचा प्रकार—आधानोक्त पदार्थ संपादन करून " अयाश्चा० " ह्या मंत्रानें स्रुवाज्याहुति द्यावी. समारोप केलेल्या समिधेचा नाश झाला असतां त्याच्या निर्णयस्थलीं सांगितलेंच आहे. एथें पुनराधान जें तें तर विवाहहोमादिरूप असें पुनराधेयाहून भिन्न आहे. कुंडापासून बाहेर व शम्यापरासाच्या[1] आंत अग्नि पडला तर, " इदंत एकं० " ह्या ऋचेनें तो अग्नि कुंडांत घालून सर्वप्रायश्चित्तहोम करावा. पूर्वदिवसीं व्रतलोप झाला तर, व्रतपति जो अग्नि त्याच्या उद्देशानें चरु अथवा पूर्णाहुति करावी. पर्वदिवसीं दंपतींतून कोणास अश्रुपात झाला तर, व्रतधारी जो अग्नि त्याच्या उद्देशानें चरु किंवा पूर्णाहुति करावी. पवित्राचा नाश झाला तर पवित्रवान् अग्नीच्या उद्देशानें चरु किंवा पूर्णाहुति करावी. अन्वाधानेष्टीमध्यें चंद्रग्रहण प्राप्त झालें तर "अत्राहगो०" ह्या मंत्रेंकरून चंद्राच्या उद्देशानें आज्याहुति देऊन, "नवोनवो०" ह्या मंत्रानें उपस्थान करून इध्मास्थापनादि याग करावा. सूर्यग्रहण असेल तर, "उद्वयं० " ह्या मंत्रानें सूर्याच्या उद्देशानें आज्याची आहुति देऊन " चित्रं देवानां० " ह्या मंत्रानें उपस्थान करावें. अन्वाधान केल्यानंतर स्वप्नांत रेतस्खलन झालें तर, " इमंमेवरुण० तत्वायामि० " ह्या दोन मंत्रांनीं वरुणाला दोन आज्याहुति देऊन सूर्याची पूजा व "पुनर्माम०" ह्या सूत्रोक्तमंत्राचा जप करावा. बुद्धिपूर्वक रेतःपतन झालें तर, व्रतपति जो अग्नि त्याच्या उद्देशानें चरु करावा. अन्य समयीं स्वप्नांत रेतःपात झाला तर सूर्याला तीन नमस्कार करावे. इध्माचें स्थापन केल्यानंतर होमद्रव्यास कांहीं दोष उत्पन्न झाला तर, दुष्ट झालेल्या होमद्रव्याच्या स्थानीं आज्यप्रतिनिधि करून याग समाप्त करून दुष्ट झालेलें होमद्रव्य उदकांत

---

१ शम्यापरास म्हणजे छत्तीस अंगुळें परिमित लांबीचें स्थल.

टाकून अन्वाधानादिक तद्देवताक ( तीच आहे देवता ज्याची तो ) पुनः याग करावा. इ-ध्मास्थापनाचे पूर्वी होमद्रव्यास दोष उत्पन्न झाला तर तद्देवताक होमद्रव्य पुनः दुसरें घेऊन याग करावा. स्विष्टकृतासाठीं घेतलेल्या हवनीय द्रव्याला कांहीं दोष उत्पन्न झाला तर आज्यें करून स्विष्टकृत् करावें. अंगभूत होमद्रव्याला दोष झाला तर तत्कालीं पुनः आज्यग्रहण करावें.

---

हविर्दोषास्तु प्रच्युतनखकेशैःकीटैरक्तास्थिविण्मूत्रश्लेष्माद्यैर्बीभत्सितैश्चमार्जारनकुलकाकैर्मुखजलबिंदुघर्मनासिकामलाश्रुकर्णमलैः सूतिकारजस्वलाचांडालादिदृष्टिभिश्चसंसर्गाः देवताहविर्मंत्रादिविपर्यासेयद्वोदेवाइतिमरुद्भ्यआज्यहोमः कृत्स्नहविर्दाहेतद्धविरुत्पाद्यसएवयागोनतुपुनर्यागः पूर्वादिचतुर्दिक्षुचरूत्सेकेअग्नयेयमायवरुणायसोमायेतिक्रमेणहुत्वासर्वतउत्सेकेचतुर्भ्योपिहुत्वाकोणेषूत्सेकेव्याहृतीर्हुत्वा चरुमाप्यायस्वसंतेपयांसीतिमंत्राभ्यामाज्येनाप्याययति अग्नौमिंदाहुतीचद्वेइतिकेचित् स्वगृह्याग्नेरन्यगृह्याग्निनासंसर्गेउभौयजमानौयुगपत्तमग्निंसमारोप्योभौप्रत्यवरोहणंकृत्वाऽग्नयेविविचयेचरुंकुर्यातां शवाग्निनासंसर्गेऽग्नयेशुचयेचरुः पचनाग्निनासंसर्गेसंवर्गायाग्नयेचरुः सर्वत्रसंसर्गेसमारोपप्रत्यवरोहणोत्तरंचरुः स्वयमग्निप्रज्वलनेउद्दीप्यस्वजातवेदो० मानोहिंसीर्जातवेदोगामश्वंपुरुषंजगत् अबिभ्रदग्नआगहिश्रियामापरिपातयेतिद्वाभ्यांद्वेसमिधावग्नयेजुहुयात् सर्वत्रविध्यपराधेसांगतार्थंसर्वप्रायश्चित्तं गृहदाहेग्नयेक्षामवतेचरुः एवमन्यान्यपिप्रायश्चित्तानिबव्हृचब्राह्मणादिषूक्तानिज्ञेयानि यत्रतुप्रायश्चित्तविशेषोनोक्तस्तत्रसर्वप्रायश्चित्तं भूर्भुवःस्वरित्यनेनाज्याहुतेःसर्वप्रायश्चित्तसंज्ञा ॥

होमद्रव्याचे दोष सांगतों.—प्रच्युत असीं नखें, व केश, कीट, रक्त, अस्थि, विष्ठा, मूत्र, श्लेष्मा, इत्यादिक बीभत्स ( वाईट ) पदार्थ; मांजर, मुंगुस, कावळे, मुखसंबंधी जलबिंदु ( थुंकीचे तुषार ); नाकांतील मळ, अश्रु, कानांतील मळ, बाळंतीण, रजस्वला, चांडाल, इत्यादिकांच्या दृष्टि ह्यांचे जे संसर्ग होणें हे दोष होत. देवता, होमद्रव्यें आणि मंत्र यांचा विपर्यास ( व्यतिक्रम ) झाला तर, " यद्वोदेवा०"ह्या मंत्रेंकरून मरुद्देवतांच्या उद्देशानें आ-ज्याचा होम करावा. सर्व होमद्रव्य दग्ध झालें तर तें होमद्रव्य उत्पन्न करून तोच याग करावा, पुनः याग करूं नये. पूर्वादिक चार दिशांला चरूचा उत्सेक ( ऊत ) झाला तर क्रमेंकरून पूर्वदिशेस अग्नीच्या उद्देशानें, दक्षिण दिशेस यमाच्या उद्देशानें, पश्चिम दिशेस व-रुणाच्या उद्देशानें, उत्तर दिशेस सोमाच्या उद्देशानें, होम करावा. चारीहि दिशांकडे ऊत आला तर चारहि देवतांच्या उद्देशानें होम करावा. कोनांकडे ऊत आला तर व्याहृतिहोम करून "आप्यायस्व०, संतेपयांसि०" ह्या दोन मंत्रांनीं चरु आज्यानें प्लुत करावा. कोणी ग्रंथकार, अग्नीमध्यें दोन मिंदाहुति ( यन्मआ० पुनर० ) द्याव्या असें ह्मणतात. आ-पल्या गृह्याग्नीचा अन्य गृह्याग्नीशीं संसर्ग झाला तर दोन यजमानांनीं एककालीं त्या अग्नीचा समारोप करून दोघांनीं प्रत्यवरोहण कर्म करून विविचिनामक जो अग्नि त्याचे उद्देशेंकरून चरु करावा. शवाच्या अग्नीचा संसर्ग झाला तर शुचिनामक अग्नीच्या उद्देशानें चरु करावा. पाकाग्नीचा संसर्ग झाला तर संवर्ग अग्नीच्या उद्देशानें चरु करावा. सर्वत्र संसर्गाचे ठायीं स-

मारोप, व प्रत्यवरोहण हीं केल्यानंतर चरु करावा. आपोआप अग्नि प्रदीप्त होईल तर "उद्दीप्यस्वजातवेदो०, मानोहिंसीर्जातवेदो०" ह्या दोन मंत्रांनीं दोन समिधा अग्नीच्या उद्देशानें हवन कराव्या. सर्वत्र अनुष्ठानाच्या विधीमध्यें चूक झाली तर सांगतार्थ सर्वप्रायश्चित्ताहुति द्यावी. गृह दग्ध असतां क्षामवान् अग्नीच्या उद्देशानें चरु करावा. याप्रमाणें आणखी प्रायश्चित्तें ऋग्वेदाच्या ब्राह्मणादि ग्रंथांत सांगितलीं आहेत तीं पहावीं. ज्या स्थलीं विशेषप्रायश्चित्त सांगितलें नाहीं त्या स्थलीं सर्वप्रायश्चित्ताहुति करावी. " भूर्भुवःस्वः " ह्या मंत्रानें जी आज्याची आहुति तीस सर्वप्रायश्चित्त असी संज्ञा आहे.

---

अथाग्न्युपघातनिमित्तानि श्वशूकररासभकाकसृगालमर्कटशूद्रांत्यजपतितकुणपसूतिकारजस्वलाभिः पुरीषमूत्ररेतोश्रुपूयश्लेष्मशोणितास्थिमांसादिभिरन्यैर्वाजुगुप्सितैरारोपितारणिस्पर्शेग्नेःस्पर्शेवाग्निनाशः तत्रारणिगतेवन्हौनष्टेपुनराधेयमग्नेःस्पर्शेपुनराधानं यद्वापुनस्त्वादित्यारुद्रावसवःसमिंधतांपुनर्ब्रह्माणोवसुनीथयज्ञैः घृतेनत्वंतन्वंवर्धयस्वसत्याःसंतुयजमानस्यकामाःस्वाहा आदित्यरुद्रवसुभ्यइदंनममेतिसमिद्धोमःस्रुवेणाज्याहुतिर्वाअग्नौजलोपघातेपीदमेव स्वस्यजीविनोमृतशब्दश्रवणेग्नयेसुरभिमतेचरुःपूर्णाहुतिर्वा प्रधानाहुतीनांस्विष्टकृतासंसर्गेसर्वप्रायश्चित्तं पिंडपितृयज्ञेअतिप्रणीतनाशेतत्राहोमपक्षेसर्वप्रायश्चित्तं होमपक्षेपुनःप्रणयनमपि· आपस्तंबानांप्रायश्चित्तांतेप्रणयनमेवनित्यं पिंडपितृयज्ञलोपेवैश्वानरश्चरुःसप्तहोत्राख्यमहाहविर्होतेत्यादिमंत्रैःपूर्णाहुतिर्वा श्रवणाकर्मसर्पबल्याश्वयुजाग्रयणप्रत्यवरोहणकर्मणामन्यतमलोपेप्राजापत्यकृच्छ्रं अकृताग्रयणस्यनवान्नभक्षणेग्नयेवैश्वानरायचरुः अष्टकालोपेउपवासः पूर्वेद्युःश्राद्धलोपेप्युपवासः उपवासप्रत्याम्नायएकविप्रभोजनंवा अन्वष्टक्यलोपेएभिर्द्युभिःसुमनाएभिरिंदुभिरितिऋचःशतंजपः सर्वत्रचरुस्थानेपूर्णाहुतिः दर्शपूर्णमासानारंभेआलस्यादिनापूर्णाहुतिकरणेतुयागपर्याप्तंव्रीह्याज्यंदेयमितिगृह्याग्निसागरे निषिद्धतिथ्यादौस्वभार्यागमनेअयाज्ययाजनेलशुनादिगणिकान्नाद्यभोज्यभोजनेनिषिद्धप्रतिग्रहेपुनर्मामैत्विंद्रियं० इमेयेधिष्ण्यासइतिद्वाभ्यामाज्यहोमःसमिद्धोमोवाजपोवा गृहोपरिकपोतोपवेशनेदेवाःकपोतइतिपंचर्चसूक्तजपःप्रत्यृचमाज्यहोमोवापाकयज्ञतंत्रेण दुःस्वप्नदर्शनेयोमेराजन्युज्योवेतिऋचासूर्योपस्थानं आतुरत्वनाशाययक्ष्मरोगनाशायवामुंचामित्वेतिसूक्तेनप्रत्यृचंचरोर्होमः यक्ष्मनाशायेदंनममेतिपंचसुत्यागः षष्ठंस्विष्टकृदिति प्रोक्षणीप्रणीतास्थजलानांबिंदुपातेस्रावेवाआपोहिष्ठेतितृचेनपुनःपूरणंततंमेअपस्तदुतायतेइत्यृचाज्याहुतिः इध्माधानलोपेतस्याज्यभागोत्तरंस्मरणेविपर्यासप्रायश्चित्तंकृत्वेध्माधानंचकृत्वाप्रधानयागः प्रधानयागोत्तरंस्मरणेग्निसमिंधनरूपद्वारस्याभावाल्लोपएवेतिप्रायश्चित्तेनैवसिद्धिःअन्यांगेष्वप्येवमूह्यं ॥

## आतां अग्नीचा नाश होण्याचीं निमित्तें सांगतों.

कुत्रा, डुकर, गर्दभ, कावळा, कोल्हा, वानर, शूद्र, अंत्यज, पतित (बाटलेला), प्रेत, बाळंतीण, रजस्वला, विष्ठा, मूत्र, रेत, अश्रु, पूय, श्लेष्मा, रक्त, अस्थि, मांस इत्यादिक, व जुगुप्सित (निंदित) पदार्थ यांचा स्पर्श आरोपित (ज्या अरणीवर अग्निसमारोप केलेला

त्या ) अरणीला स्पर्श किंवा साक्षात् अग्नीला स्पर्श झाला तर अग्नि नष्ट होतो. त्यामध्यें अरणीसंबंधी अग्नि नष्ट असतां पुनराधेय करावें, साक्षात् अग्नीला स्पर्श असतां पुनराधान करावें. अथवा, "**पुनस्त्वादित्या०**" या मंत्रेंकरून समिधाहोम करून "**आदित्यरुद्र वसुभ्यइदंनमम**" असा त्याग करावा. अथवा स्रुवेंकरून आज्याहुति द्यावी. अग्नीमध्यें उदक पडेल तर हेंच प्रायश्चित्त करावें. आपण जीवंत असतां मी मृत झालों असा शब्द श्रुत होईल तर, सुरभिमान् जो अग्नि त्याच्या उद्देशानें चरु किंवा पूर्णाहुति करावी. प्रधानाहुतींचा स्विष्टकृताशीं संसर्ग झाला तर सर्वप्रायश्चित्ताहुति द्यावी. पिंडपितृयज्ञांत अतिप्रणीतनामक अग्नीचा नाश झाला असतां होमपक्ष नसेल तर त्याविषयीं सर्वप्रायश्चित्त करावें. होमपक्ष असेल तर पुनः प्रणयन ( पुनः अग्नि नेणें ) पूर्वक सर्वप्रायश्चित्त करावें. आपस्तंब जे त्यांला प्रायश्चित्ताहुति दिल्यानंतर प्रणयनच अवश्य आहे. पिंडपितृयज्ञाचा लोप झाला तर वैश्वानरचरु करावा. अथवा, "**सप्तहोत्राख्यमहाहविर्होता०**" इत्यादि मंत्रांनीं पूर्णाहुति करावी. श्रवणाकर्म, सर्पबलि, आश्वयुजीकर्म, आग्रयण आणि प्रत्यवरोहण ह्या कर्मांतून एकाद्याचा लोप झाला तर प्राजापत्यकृच्छ्र करावें. आग्रयण केल्यावांचून नवान्न भक्षण केलें असतां वैश्वानर अग्नीच्या उद्देशानें चरु करावा. अष्टकाश्राद्धाचा लोप झाला तर उपवास करावा. पूर्वेद्युःश्राद्धाचा लोप झाला असतांहि उपोषण करावें. किंवा उपोषणाचा प्रत्याम्नाय, एका ब्राह्मणास भोजन द्यावें. अन्वष्टक्यश्राद्धाचा लोप झाला तर, "**एभिर्द्युभिःसुमना०, एभिरिंदुभिः,**" या ऋचेचा शंभरवेळ जप करावा. ज्या ज्या स्थलीं चरु करावा असें सांगितलें असेल त्या त्या स्थलीं दर्शपूर्णमासाचा आरंभ केला नसतां पूर्णाहुति करावी. आळस इत्यादि कारणानें पूर्णाहुति केली असेल तर यागाची पूर्ति होईल इतके तांदूळ व घृत यांचें दान करावें असें गृह्याग्निसागरांत सांगितलें आहे. निषिद्ध अशी तिथि इत्यादिकाचे दिवसीं स्त्रियेचे ठिकाणीं गमन, होम करण्यास जो अयोग्य त्याच्या घरीं होम करणें, लसूण इत्यादिक व वेश्येकडचें अन्न इत्यादि अभक्ष्य भक्षण करणें, निषिद्ध प्रतिग्रह करणें यांविषयीं, "**पुनर्मामैत्विंद्रियं०, इमेयेधिष्ण्यासः०**" या दोन मंत्रांनीं आज्यहोम, किंवा समिधेचा होम, अथवा जप करावा. कपोतपक्षी घरावर बसला तर, "**देवाः कपोत०**" या पांच ऋचांचे सूक्ताचा जप अथवा पाकयज्ञतंत्रानें या प्रत्येक ऋचेनें आज्यहोम करावा. दुष्ट स्वप्न दृष्टीस पडलें तर "**योमेराजन्युज्योवा०**" या ऋचेंकरून सूर्याचें उपस्थान करावें. रोगपरिहार होण्याकरितां अथवा यक्ष्मरोग ( क्षयरोग ) याचा नाश होण्याकरितां, "**मुंचामित्वा०**" ह्या सूक्ताच्या प्रत्येक ऋचेनें चरूचा होम करावा, व पांच ऋचांचेठायीं, "**यक्ष्मनाशायेदंनमम,**" असा त्याग ह्मणावा. सहावी स्विष्टकृत् आहुति द्यावी. प्रोक्षणी व प्रणीता या पात्रांतील उदकाचा बिंदु बाहेर पडला किंवा स्राव झाला तर, "**आपोहिष्ठा०**" ह्या तीन ऋचा ह्मणून पुनः त्या पात्रांत उदक घालावें, व "**ततंमेअपस्तदुतायते०**" ह्या ऋचेनें आज्याहुति द्यावी. इध्मास्थापनाचा लोप झाला असतां आज्यभाग झाल्यानंतर त्याचें स्मरण होईल तर विपर्यास झाल्याचें प्रायश्चित्त करून इध्मास्थापन करून प्रधानयाग करावा. प्रधानयाग झाल्यानंतर त्याचें स्मरण होईल तर अग्निसमिंधनरूप ( अग्निप्रज्वलनरूप ) द्वाराचा अभाव असल्यामुळें

लोपच होय व प्रायश्चित्तेंकरूनच त्या इध्माची सिद्धि होते. इतर जीं अंगें त्यांविषयींहि असाच निर्णय जाणावा.

---

अथाग्निनाशकानि दंपत्योरन्यतरोग्निसमीपेउदयास्तमयकालेवसेत् उभौदंपतीगृहसीमां ग्रामसीमांवानदींवोल्लंघ्यहोमकालेबहिर्वसेतांतदापुनराधानं अग्नीनामजस्रहरणेशम्यापरासात्प्रागुच्छ्वासेग्निनाशः कर्मार्थंहरणेग्नीनांनानुच्छ्वासादिचोद्यते आत्मसमारोपणपक्षेप्सुमज्जने मैथुनेशूद्रादिस्पर्शनेग्निनाशः पत्न्यनेकत्वेपिएकस्यामपिहोमकालेगृहसीम्नोबहिर्गतायामग्निनाशः ॥

## आतां अग्नीचा नाश करणारीं निमित्तें सांगतों.

दंपतींतून एकानें, अग्नीजवळ उदयकालीं व अस्तकालीं वास करावा. दोघें दंपती घराची सीमा किंवा ग्रामाची सीमा अथवा नदी यांतें उल्लंघन करून होमकालीं बाहेर वास करतील तर पुनराधान केलें पाहिजे. कुंडांतून सर्व अग्नि बाहेर घेऊन जाणें यापक्षीं अग्नि घेऊन जात असतां शम्यापरासाच्या पूर्वी उच्छ्वास झाला तर अग्नींचा नाश होतो. कांहींएक कर्मविशेषासाठीं कुंडांतून अग्नि नेत असतां ह्या समयीं उच्छ्वासाचा रोध केला पाहिजे असें नाहीं. आपल्याठायीं अग्निसमारोप केला आहे यापक्षीं त्यानें उदकांत बुडणें, मैथुन, शूद्रादिकांचा स्पर्श हीं केलीं असतां अग्नि नष्ट होतो. बहुत स्त्रिया असतांहि त्यांतून एकहि स्त्री होमकालीं गृहाच्या सीमेबाहेर गेली असतां अग्नि नष्ट होतो.

---

ज्येष्ठायामग्निसमीपस्थायांकनिष्ठयासहयजमानप्रवासोनदोषाय दंपतीउभावपिग्रामगृहयोःसीम्नोर्बहिर्गत्वाहोमकालात्पूर्वमागतौचेन्नदोषः यजमानेग्निसमीपस्थेपिहोमकालेपत्न्याग्रामांतरस्थितौपुनराधानमाहुः प्रवासेन्यतरेणसमारूढाग्नेरन्वारंभासत्त्वेनदीसीम्नोरुल्लंघनेपुनराधानं अग्निंविहाययजमानस्यशतयोजनगमनेवर्षपर्यंतंस्वयंहोमाभावेवाग्निनाशःतत्रपुनराधानंपवित्रेष्टिर्वा विनाग्निभिर्यदापत्नीनदीमंबुधिगामिनीं अतिक्रमेत्तदाग्नीनांविनाशःस्यादिति श्रुतिः अग्निसमीपेपत्यौपत्न्यंतरेवापत्न्यानदीलंघनेदोषोन पतिप्रवासेपत्न्याअग्निभिःसहसीमोल्लंघनेग्निनाशः एवंपत्युरपिपत्नीप्रवासे जलेनहेतुनाग्निरुपशांतश्चेत्पुनराधेयं तदेवपुनराधेयमग्नावनुगतेसति असमाधायचेत्स्वामीसीमामुल्लंघ्यगच्छतिसमारोपणंविनाशम्यापरासादूर्ध्वमग्नीनांहरणेनाशः रजोदोषेसमुत्पन्नेसूतकेमृतकेपिवाप्रवसन्नग्निमान्विप्रःपुनराधानमर्हति बह्वीनामपिचैकस्यामुदक्यायांनतुव्रजेत् एकादशेचतुर्थेन्हिगंतुमिच्छेन्निमित्ततः नचाग्निहोमवेलायांप्रवसेन्नचपर्वणि होमद्वयात्ययेदर्शपूर्णमासात्ययेपुनराधेयमापस्तंबादिविषयं पचनाग्नौपचेदन्नंसूतकेमृतकेपिवा अपक्कातुवसेद्रात्रिंपुनराधानमर्हतीदंकात्यायनादिपरं पत्नीप्रवासेपुनराधानमुक्तंतदेकभार्यस्य बहुभार्यस्यतुज्येष्ठाप्रवासएवपुनराधानमितिकेचित् एतेषुनिमित्तेषुस्थितानग्नीनुत्सृज्यान्येषामाधानंआरादुपकारकांगलोपेकर्मसमाप्तेःप्राक्प्रायश्चित्तंकृत्वातदंगंकुर्यात् कर्मसमाप्तौप्रायश्चित्तमेवनांगावृत्तिः सन्निपत्योपकारकांगस्यद्रव्यसंस्काररूपस्य लोपेप्रधानात्प्राकृतत्कार्यं प्रधानोत्तरंप्रायश्चित्तमेवनावृत्तिः ॥

ज्येष्ठ स्त्री अग्नीच्या सन्निध असतां कनिष्ठस्त्रीसहवर्तमान यजमानाचा प्रवास दोषकारक होत नाहीं. दोघेंहि यजमान व पत्नी ग्राम व गृह यांच्या सीमेच्या बाहेर जाऊन होमकाला-पूर्वी घरीं येतील तर दोष नाहीं. होमकालीं स्त्री दुसऱ्या ग्रामीं असतां यजमान अग्नीच्या जवळ असला तथापि पुनराधान करावें असें ह्मणतात. प्रवासामध्यें नदी व ग्रामाची सीमा यांच्या उल्लंघनसमयीं दंपतींतून एक जर समारोपित अग्नीस स्पर्श न करील तर पुनराधान केलें पाहिजे. यजमान अग्नीचा परित्याग करून शंभर योजनें ( चारशें कोश ) पर्यंत प्रयाण करील, अथवा एक वर्षपर्यंत स्वतां होम न देईल तर अग्नि नष्ट होतो, व तसें झालें असतां पुनराधान किंवा पवित्रेष्टि करावी. "बरोबर अग्नि घेतल्यावांचून स्त्री, समुद्राला मिळणारी अशा नदीचें उल्लंघन करील तर अग्नीचा नाश होतो असें श्रुतिप्रमाण आहे." अग्नीच्या समीप पति किंवा अन्य स्त्री असेल तर स्त्रियेनें नदीचें उल्लंघन केलें असतां दोष नाहीं. पति प्रवासांत असून स्त्रियेनें अग्नींसहवर्तमान सीमेचें उल्लंघन केलें असतां अग्नींचा नाश होतो. याप्रमाणेंच स्त्री प्रवासांत असून पतीनें अग्नींसह सीमेचें उल्लंघन केलें असतां अग्नीचा नाश होतो. उदकाच्या योगानें अग्नि नष्ट झाला तर पुनः आधेय करावें. अग्नि नष्ट झाला असतां यजमान अग्नीचें उपस्थान केल्यावांचून सीमेचें उल्लंघन करील तर तेंच पुनः आधेय करावें. समारोप केल्याखेरीज शम्यापरासाच्या ( छत्तीस अंगुळें प्रमाण शम्यापरास ) पलीकडे अग्नि नेले असतां नष्ट होतात. "स्त्री रजस्वला असतां, अथवा जननाशौच, मृताशौच असतां अग्निमान् असा ब्राह्मण प्रवास करील तर तो पुनराधानास योग्य होतो. बहुत स्त्रियांतून एक जरी रजस्वला असली तथापि प्रवासास जाऊं नये. निमित्तापासून अकराव्या दिवसीं व चवथ्या दिवसीं प्रवासास जाण्याची इच्छा करावी. अग्नीच्या होमसमयीं, व पर्वदिवसीं प्रयाण करूं नये." दोन होमांचा नाश (लोप) होईल, अथवा दर्शपूर्णमासस्थालीपाकांचा नाश होईल तर पुनराधेय करावें असें जें सांगितलें तें आपस्तंबादिशाखाविषयक आहे. "जननाशौच व मृताशौच हीं असतां पाकाग्नीवर पाक करावा. पाकाग्नीवर पाक न करितां एक रात्र तसाच राहील तर पुनराधान करावें असें जें सांगितलें तें कात्यायनादिक शाखी जे त्यांविषयीं आहे. स्त्री प्रवास करील तर पुनराधान करावें असें जें सांगितलें तें ज्याला एक स्त्री असेल त्याविषयीं आहे. बहुत स्त्रिया ज्याला असतील त्यानें ज्येष्ठ स्त्री प्रवास करील तरच पुनराधान करावें असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. हीं पूर्वोक्त निमित्तें प्राप्त झालीं असतां पहिले अग्नि टाकून अन्य अग्नींचें आधान करावें. साक्षात् उपकार करणारें जें अंगभूत कर्म ( प्रयाजादि ) त्याचा लोप झाला असतां कर्मसमाप्ति होण्याचे पूर्वी प्रायश्चित्त करून लुप्त झालेलें अंगभूत कर्म करावें. कर्मसमाप्ति झाल्यानंतर लोप झाला असतां प्रायश्चित्तच करावें, अंगभूत कर्माची आवृत्ति करूं नये. परंपरासंबंधानें द्रव्यसंस्काररूप उपकारक अंगाचा, झाला तर प्रधानकर्माच्या पूर्वी तें अंगभूत कर्म करावें. प्रधानोत्तर लोप झाला असतां प्रायश्चित्तच करावें, आवृत्ति करूं नये.

---

मृतायैपत्न्यैदाहायार्धाग्निंदत्वावशिष्टाग्नौसायंप्रातर्होमस्थालीपाकाग्रयणानिकुर्यात् कौस्तुभेतुअर्धाग्निदानादिकमुक्त्वा विधुरस्यापूर्वाधानप्रकारस्तस्यविच्छेदेपुनराधानप्रकारश्चोक्तः

तत्राधानप्रकारोयच्छिष्टाग्नेःप्राक्होमनाशपरः वाश्रौताग्निभार्यार्थेअर्धाग्निदानंकृत्वाउत्स र्गेष्ट्यापूर्वाग्नीन्परित्यज्य पुनराधानंकृत्वाग्निहोत्रंकार्यमित्युक्तंतद्वदत्रापिउत्सर्गेष्ट्यापूर्वाग्नि त्यागोत्तरमपूर्वाधानंकौस्तुभेउक्तमितियोज्यमितिभाति ॥

पत्नी मृत झाली असतां तिचें दहन करण्याकरितां अर्धा अग्नि देऊन शेष राहिलेल्या अग्नीवर सायंप्रातर्होम, स्थालीपाक व आग्रयण हीं करावीं. कौस्तुभांत तर, अर्धा अग्नि द्यावा इत्यादिक सांगून विधुरानें ( मृतपत्नीकानें ) अपूर्वाधान करावें, व तो शेष राहिलेला अग्नि नष्ट झाला तर पुनराधान करावें असें सांगितलें, त्यामध्यें आधान करण्याविषयीं जो प्रकार सांगितला तो, शेष राहिलेला अग्नि होमाच्या पूर्वी नष्ट होईल तर तत्पर जाणावा. अ-थवा श्रौताग्नि जे त्यांतून स्त्रियेला ( दहनाकरितां ) अर्धे अग्नि देऊन उत्सर्गेष्टि करून पूर्वीचे अग्नि टाकून पुनराधान करून अग्निहोत्र करावें ह्मणून जसें सांगितलें तसें ह्या स्थलींहि उत्स-र्गेष्टि करून पूर्वीचे अग्नीचा त्याग केल्यानंतर अपूर्वाधान करण्याविषयीं कौस्तुभांत सांगितलें, याप्रमाणें एथें योजना करावी असें वाटतें.

---

अरणिस्रुवादिपात्राणांलक्षणवृक्षादिविचारोन्यत्रज्ञेयः एतेषांविधीनांसंकल्पादिविस्तरयु क्ताःप्रयोगागृह्याग्निसागरे प्रायश्चित्तादिविधयःप्रायःसर्वसूत्रेषुसमानाएव क्वचित्क्वचित्स्व स्वसूत्रोक्ताविशेषाऊह्याः विवाहहोमोगृहप्रवेशनीयहोमेनसमानतंत्रोनुष्ठीयमानोबह्वृचानांपु नराधानं अन्येषांविवाहहोमाद्भिन्नमेवेतिविशेषः ॥

अरणी, स्रुवा इत्यादिक पात्रांचीं लक्षणें कसीं व तीं कोणत्या वृक्षाचीं करावीं याचा नि-र्णय दुसऱ्या ग्रंथीं पहावा. ह्या पूर्वी सांगितलेल्या सर्व विधींचे संकल्प इत्यादिक विस्तारयुक्त प्रयोग गृह्याग्निसागरांत पहावे. प्रायश्चित्तें इत्यादिकांचे विधि बहुधा सर्व सूत्रांत सारखेच सांगितले आहेत, आपापल्या सूत्रामध्यें क्वचित् क्वचित् विशेष असल्यास ते पहावे. विवाह-होम, गृहप्रवेशनीय होमासहवर्तमान एकतंत्रानें करणें तो ऋग्वेदी यांचें पुनराधान होय, इतर शाखी जे त्यांनीं विवाहहोमाहून निराळेंच पुनराधान करावें, हा विशेष जाणावा.

---

अथकात्यायनोपयोगिकिंचिदुच्यते पराग्निपक्वंनाश्नीयाद्गुडगोरसमंतरा आहिताग्नेरयं धर्मोयाज्ञिकानांतुसंमतः इक्षुक्षीरविकाराश्चभ्राष्ट्रभृष्टयवाअपि पराग्निपक्वंनज्ञेयंप्रवासेचा ग्निहोत्रिणः यदन्नंवारिहीनंचपक्वंकेवलपावके तदन्नंफलवत्ग्राह्यमन्नदोषोनविद्यते प्रातर्हो मंतुनिर्वर्त्यसमुद्धृत्यहुताशनात् शेषंमहानसेकृत्वातत्रपाकंसमाचरेत् पूर्वेणयोजयित्वातंत स्मिन्होमोविधीयते अतोस्मिन्वैश्वदेवादिकर्मकुर्यादतंद्रितः ॥

## आतां कात्यायनांचे उपयोगी कांहीं निर्णय सांगतों.

( कात्यायनांनीं ) " गूळ, गोरस, यांवांचून अन्य पदार्थ दुसऱ्याच्या अग्नीवर पक्व झालेले भक्षण करूं नयेत. आहिताग्नि ( अग्निहोत्री) यांचा हा धर्म याज्ञिकांला मान्य आहे. ऊंस व दूध यांपासून झालेले पदार्थ, खापरांत भाजलेले यव हे पदार्थ दुसऱ्याच्या अग्नीवर

पक्व झाले तथापि प्रवासांत अग्निहोत्र्यानें दुसऱ्याच्या अग्नीवर पक्व असे समजूं नयेत, ( ग्रहण करावे. ) केवळ लौकिकाग्नीवर उदकावांचून पक्व झालेलें जें अन्न तें फळाप्रमाणें घ्यावें, तें घेतलें असतां अन्नदोष नाहीं. प्रातःकालीन होम समाप्त करून नंतर त्या अग्नींतून अल्प अग्नि घेऊन तो स्वयंपाकगृहांत प्रदीप्त करून त्याच्यावर सर्व पाकनिष्पत्ति करावी. नंतर पुनः तो अग्नि कुंडस्थ अग्नींत मिळवून त्याच्यावर होम द्यावा, असें आहे यास्तव निरालस्य होत्साता वैश्वदेवादि कर्म गृह्याग्नीवर करावें.

---

बह्वृचकारिकायां नित्यंपाकायशालाग्नेरेकदेशस्यकार्यतः पाकार्थमुल्मुकंहृत्वातत्रपक्त्वाम हानसे वैश्वदेवोऽप्यगारेस्यात्पाकार्थोऽग्निश्चलौकिकः भूरिपाकोभवेद्यत्रश्राद्धादावुत्सवेषुच कृतेचवैश्वदेवेषलौकिकोनैवकार्यतः दीपकोधूपकश्चैवतापार्थंयश्चनीयते सर्वेतेलौकिकाश्चैवास्ता वन्मात्रापवर्गतः बहुधाविहृतोऽप्यग्निरावसथ्यात्कथंचन यावदेकोऽपितिष्ठेततावदन्योनमथ्य ते वैश्वदेवास्तथाहोमात्प्राकृश्चेषंनैवमंथनं पचनाग्नावपक्त्वाहः पुनराधानमर्हति आरोपितारणी चोभेएकावायदिनश्यति तत्राग्न्याधेयमिच्छंतिपुनराधेयमेववा अथानारोपितारण्योःक्षयेप्राप्ते नवेपुनः तदलाभेयदोद्वायादत्रस्यात्पुनराहितिः शूद्रोदक्यांत्यजैश्चैवपतितामेध्यरासभैः अना रूढारणिस्पर्शेतेविहायान्ययोर्ग्रहः आरूढारणिस्पर्शेपुनराधेयमुक्तं भवतंनःसमेत्यप्सुमज्जये द्दूषितारणीएकारण्येवदुष्टाचेत्तामेवाप्सुनिमज्जयेत् तत्रान्यारणिलाभात्प्रागुद्वातेपुनराहितिः उद्वातेऽग्नौनष्टे नष्टायामरणौयावदग्निस्तिष्ठतिवेश्मनि तावद्धोमादिकंकृत्वातन्नाशेपुनराहरे त् अत्रैकारणिनाशेन्यामेकांमंत्रेणोपादायोभाभ्यांमंथनमितिकेचित् अवशिष्टांतामेवछित्वा मंथनमित्यपरे एकस्याःदोषेप्यरणिद्वयंत्यक्त्वानूतनद्वयोपादानमितिनारायणवृत्त्याशयःअयम रणिविचारःश्रौतस्मार्तसाधारणःसर्वशाखासाधारणश्च ॥

बव्हृचकारिकेमध्यें सांगतात.–"प्रतिदिवसीं पाकनिष्पत्ति करण्यासाठीं गृह्याग्नींतील एका बाजूचें, पाक करणें हेंच आहे अर्थ ह्मणजे प्रयोजन ज्याचें असें उल्मुक ( प्रज्वलित कोलीत) घेऊन तें स्वयंपाकगृहांत नेऊन तो अग्नि प्रदीप्त करावा, व त्यावर सर्व पाकनिष्पत्ति करावी. पाकनिष्पत्ति ज्याच्यावर केली तो लौकिकाग्नि होय याकरितां वैश्वदेव करणें तो गृह्याग्नीवर करावा. श्राद्ध इत्यादिक निमित्त, उत्सव या दिवसीं ज्या अग्नीवर मोठा स्वयंपाक होतो त्यावर वैश्वदेव करावा; कारण कार्याच्या अनुरोधानें तो लौकिकाग्नि नव्हे. दीप लावण्याकरितां, धूप दाखविण्याकरितां व तापविण्याकरितां, घेतलेले जे गृह्याग्नींतून अग्नि ते सर्व लौकिकाग्नि होत. कारण, तें तें कार्य झाल्यानंतर त्या त्या अग्नीचें गृह्याग्नित्व नष्ट होतें. गृह्याग्नींतून निरनिराळ्या कार्याकरितां बहुत वेळ अग्नि ग्रहण केला असेल तर त्या ग्रहण केलेल्या अग्नींतून जेथपर्यंत एक तरी अग्नि आहे तावत्कालपर्यंत अरणी मंथन करून दुसरा अग्नि घेऊं नये. वैश्वदेव, होम हे करण्यापूर्वी अग्नि मंथन करूं नये. पाकनिष्पत्ति करण्याकरितां गृह्याग्नींतून जो अग्नि घेतला तो पचनाग्नि होय, याकरितां पचनाग्नीवर दिवसा पाक न करील तर त्यानें पुनराधान करावें. अग्निसमारोप केलेल्या अशा दोन अरणी त्यांतील एक किंवा दोन नष्ट झाल्या असतां त्या कालीं अग्नीचें आधेय किंवा पुनराधानच करावें असें सांगतात. अग्निसमा-

रोप न केलेल्या अशा अरणी नष्ट होतील तर पुनः दुसऱ्या नूतन अरणी घ्याव्या. दुसऱ्या नूतन अरणी न मिळतील आणि अग्नि नष्ट होईल तर पुनराधान करावें. "शूद्र, रजस्वला, अंत्यज, पतित, अपवित्र, गर्दभ इत्यादिक यांनीं समारोप न केलेल्या अरणीला स्पर्श केला असतां त्या टाकून दुसऱ्या अरणी घ्याव्या." समारोप केलेल्या अरणीला शूद्र इत्यादिकांचा स्पर्श झाला तर पुनराधेय करावें असें सांगितलें आहे. समारोप केलेल्या अरणी दूषित झाल्या तर त्या अरणी, "भवतंनःसम०" या मंत्रेंकरून उदकांत टाकाव्या. एकच अरणी दूषित झाली तर तीच उदकांत टाकावी. दूषित झालेल्या अरणी उदकांत टाकल्यानंतर व दुसऱ्या अरणी मिळण्यापूर्वी अग्नि नष्ट झाला तर पुनराधान करावें. अरणी नष्ट झाली असतां यावत्कालपर्यंत अग्नि गृहामध्यें आहे तावत्कालपर्यंत होमादिक करावें, व तो अगदीं नष्ट झाला तर पुनराधान करावें. या स्थलीं एका अरणीचा नाश झाला असतां दुसरी एक अरणी समंत्रक घेऊन दोन अरणींचें मंथन करून अग्नि उत्पन्न करावा असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, शेष राहिलेली जी अरणी तीच तोडून दोन अरणी करून त्यांचें मंथन करावें असें ह्मणतात. दोन अरणींतून एक जरी दूषित झाली तथापि दोनही अरणी टाकून नवीन दोन अरणी घ्याव्या असा नारायणवृत्तीचा अभिप्राय आहे. हा अरणींचा निर्णय श्रौतकर्म व स्मार्तकर्म यांचा साधारण व सर्व शाखांचा साधारण सांगितला आहे.

---

**अग्निसमारोपेकात्यीयैर्वैश्वदेवःपाकश्चलौकिकेग्नौकार्यइत्याहुः यस्यवेदश्चवेदीचविच्छिद्येते त्रिपूरुषं सवैदुर्ब्राह्मणोज्ञेयःसर्वकर्मसुगर्हितः अग्निहोत्रंप्रकुर्वीतज्ञानवान्श्रद्धयान्वितः अग्निहोत्रात्परोधर्मोनभूतोनभविष्यति श्रौतेकर्मणिनोशक्तोज्ञानद्रव्याद्यभावतः स्मार्तंकुर्याद्यथाशक्तोत्राप्याचारंलभेत्सदा कृतदारोनतिष्ठेतक्षणमप्यग्निनाविना तिष्ठेतचेद्द्विजोव्रात्यस्तथाच पतितोभवेत् नगृण्हीयाद्विवाहाग्निंगृहस्थइतिमन्यते अन्नंतस्यनभोक्तव्यंवृथापाकोहिसस्मृतः योदद्यात्कांचनंमेरुंपृथिवींचससागरां तत्सायंप्रातर्होमस्यतुल्यंभवतिवानवा इतिहोमप्रकरणं॥**

अग्नीचा समारोप केला असतां कात्यायनशाखी यांनीं वैश्वदेव, पाक (स्वयंपाक), लौकिकाग्नीवर करावा असें ह्मणतात. ज्या कुळामध्यें तीन पुरुषांपर्यंत वेदाध्ययन व अग्निहोत्र ग्रहण केलें नाहीं तो दुर्ब्राह्मण होय, व तो दुर्ब्राह्मण असल्यामुळें कोणत्याहि सत्कर्मास योग्य नाहीं. अग्निहोत्रासारखा उत्तम धर्म मागें झाला नाहीं, व पुढें होणारहि नाहीं, याकरितां ज्ञानवान् व भक्तिमान् अशा पुरुषानें अग्निहोत्र धारण करावें. ज्ञान (विद्वत्ता), द्रव्य इत्यादिकांच्या अभावामुळें श्रौतकर्म (अग्निहोत्रादि) करण्याविषयीं जो समर्थ नाहीं त्यानें यथाशक्ति स्मार्तकर्म करावें. ह्या स्मार्तकर्मामध्येंहि सार्वकाल आचार (धर्म) प्राप्त होतो. ज्या द्विजानें यथाविधि विवाह करून स्त्रीपरिग्रह केला त्यानें एक क्षणहि अग्नीवांचून राहूं नये. कदाचित् द्विज अग्नीवांचून राहिला तर तो व्रात्य (संस्कारहीन) व पतित होतो. जो ब्राह्मण विवाहाग्नि (गृह्याग्नि) धारण करीत नाहीं आणि आपण गृहस्थाश्रमी असें मानितो त्याचें अन्न भक्षण करूं नये, कारण त्याचा तो पाक (पतित असल्यामुळें पंचमहायज्ञाविषयीं

अनधिकारी आहे ह्मणून ) व्यर्थ होय. सुवर्णमय असा मेरुपर्वत व समुद्रांसहित पृथ्वी यांचें जो दान करितो व त्याला जें दानाचें फल मिळतें तें व सायंकालीं, प्रातःकालीं जो अग्नींत होम द्यावा त्या होमाचें जें फल तें असी उभय फलांची तुलना केली असतां तें दानफल होमाची तुलना पावेल किंवा नाहीं, ह्मणजे सुवर्णाचा मेरु व पृथ्वी यांचें दान करून जें फल त्यापेक्षां होमाचें फल विशेष आहे असें तात्पर्य जाणावें. याप्रमाणें होमाचें प्रकरण सांगितलें.

---

अथनित्यदानं एकस्मिन्नप्यतिक्रांतेदिनेदानविवर्जिते दस्युभिर्मुषितस्येवयुक्तमाक्रंदितुं भृशम् तस्माद्विभवानुसारेणधनधान्यादिदेयमसंभवेपूगीफलादिकमपिप्रत्यहंदेयं ततोगोब्राह्मणादिमंगलदर्शनं इत्यष्टधाविभक्तदिनस्यप्रथमभागकृत्यं ॥

## आतां नित्यदान सांगतों.

"दानावांचून एकहि दिवस जर गेला तर, चोरांनीं घर लुटून सर्वस्वापहार केला असतां जसा तो दिवस अत्यंत दुःखास पात्र, तसा दानविरहित दिवस दुःखास पात्र होय; याकरितां जसें ऐश्वर्य असेल तदनुसार धन, धान्य इत्यादिक कांहीं अल्प तरी दान करावें. द्रव्य, धान्य इत्यादिक देण्यास शक्ति नसेल तर सुपारी इत्यादिकाचेंहि दान प्रतिदिवसीं करावें. तदनंतर गाई, ब्राह्मण, इत्यादि मंगल पदार्थांचें दर्शन घ्यावें. याप्रमाणें दिवसाचे आठ भाग करून जो प्रथम भाग त्याचें कृत्य सांगितलें.

---

द्वितीयभागेवेदशास्त्राभ्यासः पठेदध्यापयेद्वेदान्जपेच्चैवविचारयेत् अवेक्षेतचशास्त्राणि धर्मादीनिद्विजोत्तमः देवार्चनमपिप्रातर्होमोत्तरंवाचतुर्थभागेब्रह्मयज्ञोत्तरंवाकार्यं विधायदेवतापूजांप्रातर्होमादनंतरं कुर्वीतदेवतापूजांजपयज्ञादनंतरमित्यादिद्विविधस्मृतेः देवार्चनं प्रकर्तव्यंत्रिकालेपियथाक्रमं अशक्तौविस्तरात्प्रातर्मध्यान्हेगंधमादितः सायंनीराजनंकुर्यात् त्रिकालेतुलसीदलं यथासंध्यातथापूजात्रिकालेमोक्षदास्मृतेतिकमलाकरः तत्रविष्णुशिवब्रह्मसूर्यशक्तिविनायकादिष्वभिमतांदेवतामर्चयेत् तत्रापिकलौहरिहरयोः पूजाप्रशस्ता नविष्णवाराधनात्पुण्यंविद्यतेकर्मवैदिकं तस्मादनादिमध्यांतंनित्यमाराधयेद्धरिं अथवादेवमीशानंभगवंतंसनातनं प्रणवेनाथवारुद्रगायत्र्यात्र्यंबकेनवा तथोनमःशिवायेतिमंत्रेणानेनवा यजेत् तत्रापिप्रतिमास्थंडिलादिभ्यःशालिग्रामेबाणलिंगेचप्रशस्ता आवाहनादिकंविनासदा देवतासन्निधानात् श्रीमद्भागवते उद्वासावाहनेनस्तःस्थिरायामुद्धवार्चनेअस्थिरायांविकल्पः स्यात्स्थंडिलेतुभवेद्द्वयं ॥

दिवसाच्या दुसऱ्या विभागीं (पावणेचार इत्यादि घटिकांनंतर) वेद, शास्त्रें यांचा अभ्यास (अध्ययन) करावा. "ब्राह्मणानें वेद पठण करावे, दुसऱ्याला शिकवावे, जप करावा, वेदाच्या अर्थाचा विचार करावा, आणि धर्मशास्त्रें अर्थविचारेंकरून पाहावीं." प्रातःकालीन होम दिल्यानंतर देवाची पूजा करावी अथवा दिवसाच्या चौथ्या विभागीं (सुमारें सवा अकरा घटिकांनंतर) ब्रह्मयज्ञ केल्यानंतर करावी. कारण, "प्रातःकालीन होम दिल्यानंतर देवपूजा

करावी, किंवा जपयज्ञ ह्मणजे ब्रह्मयज्ञ केल्यानंतर देवपूजा करावी," इत्यादिक दोन प्रकारचें स्मृतिवचन आहे. "देवपूजा त्रिकाली यथाक्रमेंकरून करावी. त्रिकाल विस्तारें पूजा करण्यास शक्ति नसेल तर प्रातःकाली विस्तारेंकरून करावी, व माध्यान्हकाली गंधादिक उपचारेंकरून करावी, व सायंकाली धूप, दीप, आरती इत्यादिक उपचारेंकरून करावी." त्रिकाल तुलसीपत्रांनीं पूजा करावी. जसी त्रिकालसंध्या मोक्ष देणारी, तसी त्रिकालपूजा मोक्ष देणारी होते असें कमलाकर सांगतो. त्यामध्यें विष्णु, शिव, ब्रह्मा, सूर्य, देवी, गणपति इत्यादिक ज्या देवता त्यांमध्यें आपणास जी देवता इष्ट तिचें पूजन करावें. त्यांतूनहि कलियुगामध्यें विष्णु व शिव यांची पूजा करणें प्रशस्त होय. "विष्णूच्या पूजेपेक्षां पुण्यकारक वैदिककर्म कोणतेंच नाहीं, याकरितां ज्यास आदि, मध्य, अंत नाहींत अशा संसारदुःखहरण करणाऱ्या विष्णूचें नित्य पूजन करावें. अथवा द्योतमान, षड्गुणैश्वर्यसंपन्न, शाश्वत, अशा शिवाची पूजा प्रणवमंत्रानें, अथवा रुद्रगायत्रीमंत्रानें किंवा त्र्यंबकमंत्रानें, किंवा "ॐनमः शिवाय" ह्या षडक्षर मंत्रानें करावी." त्यामध्येंहि प्रतिमा ( मूर्ति ), स्थंडिल, इत्यादिकांपेक्षां शाळग्राम व बाणलिंग यांचेठायीं पूजा करावी ती प्रशस्त होय; कारण, आवाहन इत्यादिक केल्यावांचून देवतेचें सान्निध्य शालग्राम व बाणलिंग यांचे ठायीं नित्य आहे. श्रीमद्भागवतांत "हे उद्धवा, स्थिरमूर्तीची पूजा कर्तव्य असतां आवाहन व विसर्जन हीं करूं नयेत. अस्थिरमूर्तीची पूजा कर्तव्य असतां आवाहन, विसर्जन यांविषयीं विकल्प ( आवाहनविसर्जन करावें किंवा न करावें असा ) आहे. स्थंडिलाचे ठायीं तर दोनहि करावीं.

---

तत्रसंक्षेपतः पूजाप्रयोगउच्यते विशेषविचारस्तुमूर्तिप्रतिष्ठाप्रसंगेनवक्ष्यते तत्रोदयात्पूर्वंनिर्माल्यमपसार्ययथाकालेपूजारंभः येभ्योमाता० एवापित्रे० इतिपठन्घंटानादंकृत्वाचम्यप्राणानायम्यदेशकालादिसंकीर्तनांतेश्रीमहाविष्णुपूजांकरिष्यइति पंचायतनपक्षेश्रीरुद्रविनायकसूर्यशक्तिपरिवृतश्रीमहाविष्णुपूजांकरिष्यइतिसंकल्प्यासनादिविधाय सहस्रशीर्षेतिषोडशर्चस्यसूक्तस्यनारायणःपुरुषोनुष्टुप्अंत्यात्रिष्टुप्न्यासेपूजायांचविनि० ततःप्रथमामृचंवामेकरेद्वितीयांदक्षिणेन्यसेत् तृतीयांवामेपादेचतुर्थीदक्षिणेपंचमींवामेजानुनिषष्ठींदक्षिणेसप्तमींवामकटौअष्टमींदक्षिणेनवमींनाभौदशमींहृदि एकादशींकंठेद्वादशींवामबाहौत्रयोदशींदक्षिणेचतुर्दशींमुखेपंचदशीमक्ष्णोःषोडशींमूर्ध्नि एवंदेहेचदेवेचन्यासंकुर्याद्विधानतः अंत्याभिःपंचभिर्ऋग्भिर्हृदयाद्यंगपंचके कलशंशंखघंटेचपाद्यार्घ्याचमनीयकं संपूज्यप्रोक्ष्यचात्मानंपूजासंभारमेवच ध्यायेदभिमतांविष्णुमूर्तिसंपूजयेत्ततः प्रथमयापुरुषसूक्तस्यर्चावाहनंशालग्रामादौआवाहनाभावान्मंत्रपुष्पं ऋगंतेश्रीमहाविष्णवेश्रीकृष्णायेत्येवमभिमतमूर्तिचतुर्थ्योद्दिश्यसर्वोपचारार्पणं पंचायतनेतुश्रीविष्णवेशिवविनायकसूर्यशक्तिभ्यश्चेत्येवंयथोपास्यमुच्चारः नैवेद्यादौपार्थक्याभावेयथांशतइतिवदेत् द्वितीययाऽऽसनं दद्यात् तृतीययापाद्यं चतुर्थ्यार्घ्यं पंचम्याऽऽचमनं षष्ठ्यास्नानं संभवेपंचामृतस्नानान्याप्यायस्वेत्यादिमंत्रैः चंदनोशीरकर्पूरकुंकुमागरुवासितजलैःसुवर्णघर्मानुवाकमहापुरुषविद्यापुरुषसूक्तराजनसामभिरभिषेकः सप्तम्यावस्त्रं अष्टम्यायज्ञोपवीतं नवम्यागंधं दशम्यापुष्पाणि एकाद

श्याधूपं द्वादश्यादीपं स्नानेधूपेचदीपेचघंटादेर्नादमाचरेत् त्रयोदश्यानैवेद्यं संभवेतांबूलफल दक्षिणानीराजनंच चतुर्दश्यानमनं पंचदश्याप्रदक्षिणाः षोडश्याविसर्जनंपुष्पांजलिर्वा स्नानेवस्त्रेचनैवेद्येदद्यादाचमनंतथा दत्वाषोडशभिर्ऋग्भिःषोडशान्नस्यचाहुतीः सूक्तेनप्रत्यृचं पुष्पंदत्वासूक्तेनसंस्तुयात् ततःपौराणैःप्राकृतैश्चस्तुत्वा शिरोमत्पादयोःकृत्वाबाहुभ्यांचपरस्परं प्रपन्नंपाहिमामीशभीतंमृत्युग्रहार्णवात् इतिवदन्नमेत्निर्माल्यंदेवदत्तंभावयित्वाशिरसिधार येत् विष्णुमूर्ध्निस्थितंपुष्पंशिरसानवहेन्नरः शंखोदकंशिरसिधृत्वादेवतीर्थंपूजांतेवैश्वदेवांते वाशिरसिधार्यंपेयंच तत्रक्रमः विप्रपादोदकंपीत्वाविष्णुपादोदकंपिबेत् शालग्रामशिलातोय मपीत्वायस्तुमस्तके प्रक्षेपणंचकुरुतेब्रह्महासनिगद्यते पात्रांतरेणवैग्राह्यंनकरेणकदाचनेति कमलाकरः क्षालनेनएकस्यैववस्त्रस्यप्रतिदिनेदानेदोषोन एवंस्वर्णादिभूषणानामपि सुवर्ण मययज्ञोपवीतेप्येवमाचारः एवंपूजायाःफलंस्कांदे कामासक्तोथवाक्रुद्धःशालग्रामशिलार्च नात् भक्त्यावायदिवाऽभक्त्याकलौमुक्तिमवाप्नुयात् कथांयःकुरुतेविष्णोःशालग्रामशिलाग्रतः वैवस्वतभयंनास्तितथाचकलिकालजं प्रायश्चित्तंहिपापानांकलौपादोदकंहरेः धृतेशिरसिपीते चसर्वास्तुष्यंतिदेवताः बौधायनोक्तोहरिहरयोःपूजाविधिःपराशरमाधवे मयातुशिवपूजावि धिःशिवरात्रिप्रकरणेद्वितीयपरिच्छेदेउक्तइतिनेहोच्यते कौर्मे योमोहादथवालस्यादकृत्वादेव तार्चनं भुंक्तेसयातिनरकंसूकरेष्वभिजायते एवंदेवंसंपूज्यमातापितृप्रमुखान्गुरून्पूजयेत् यस्यदेवेपराभक्तिर्यथादेवेतथागुराविति श्रुतेरितिमाधवः ॥

## आतां संक्षेपेंकरून देवपूजेचा प्रयोग सांगतों.

ह्या स्थलीं देवपूजेचा प्रयोग संक्षेपानें सांगतों, विशेष विचार करणें तो मूर्तींच्या अर्चेच्या प्रसंगानें पुढें सांगितला जाईल. त्यामध्यें सूर्योदयाच्या पूर्वीं देवावरील निर्माल्य काढून विहितकालीं पूजेचा आरंभ करावा. "येभ्योमाता०, एवापित्रे०" हे मंत्र पठण करून घंटा वाजवावी. नंतर आचमन, प्राणायाम करून देशकालांचें संकीर्तन केल्यानंतर, "श्रीमहाविष्णुपूजां करिष्ये," असा संकल्प करावा. पंचायतनाची पूजा कर्तव्य ह्या पक्षीं, "श्रीरुद्रविनायकसूर्यशक्तिपरिवृतश्रीमहाविष्णुपूजां करिष्ये," असा संकल्प करून आसनादिक विधि करून पुरुषसूक्तानें न्यास करावा. तो असा,—"सहस्रशीर्षेति षोडशर्चस्य सूक्तस्य नारायणः पुरुषोनुष्टुप् ॥ अंत्यात्रिष्टुप् ॥ न्यासेपूजायां च विनियोगः" तदनंतर पहिली ऋचा ह्मणून डाव्या करतलावर न्यास करावा, दुसऱ्या ऋचेचा उजव्या करतलावर न्यास, तिसऱ्या ऋचेचा डाव्या चरणावर न्यास, चवथ्या ऋचेचा उजव्या चरणावर न्यास, पांचव्या ऋचेचा वामजानूवर न्यास, सहाव्या ऋचेचा दक्षिण जानूवर न्यास, सातव्या ऋचेचा वामकटीवर न्यास, आठव्या ऋचेचा दक्षिण कटीवर न्यास, नवव्या ऋचेचा नाभिस्थानीं, दहाव्या ऋचेचा हृदयस्थानीं, अकराव्या ऋचेचा कंठस्थानीं, बाराव्या ऋचेचा वामबाहुस्थानीं, तेराव्या ऋचेचा दक्षिणबाहुस्थानीं, चवदाव्या ऋचेचा मुखस्थानीं, पंधराव्या ऋचेचा उभयनेत्रस्थानीं, सोळाव्या ऋचेचा मस्तक स्थानीं न्यास करावा. याप्रमाणें पुरुषसूक्ताच्या सोळा ऋचा ह्मणून आपल्या

करावी, किंवा जपयज्ञ ह्मणजे ब्रह्मयज्ञ केल्यानंतर देवपूजा करावी," इत्यादिक दोन प्रकारचें स्मृतिवचन आहे. "देवपूजा त्रिकालीं यथाक्रमेंकरून करावी. त्रिकाल विस्तारें पूजा करण्यास शक्ति नसेल तर प्रातःकालीं विस्तारेंकरून करावी, व माध्यान्हकालीं गंधादिक उपचारेंकरून करावी, व सायंकालीं धूप, दीप, आरती इत्यादिक उपचारेंकरून करावी." त्रिकाल तुलसीपत्रांनीं पूजा करावी. जसी त्रिकालसंध्या मोक्ष देणारी, तसी त्रिकालपूजा मोक्ष देणारी होते असें कमलाकर सांगतो. त्यामध्यें विष्णु, शिव, ब्रह्मा, सूर्य, देवी, गणपति इत्यादिक ज्या देवता त्यांमध्यें आपणास जी देवता इष्ट तिचें पूजन करावें. त्यांतूनहि कलियुगामध्यें विष्णु व शिव यांची पूजा करणें प्रशस्त होय. "विष्णूच्या पूजेपेक्षां पुण्यकारक वैदिककर्म कोणतेंच नाहीं, याकरितां ज्यास आदि, मध्य, अंत नाहींत अशा संसारदुःखहरण करणाऱ्या विष्णूचें नित्य पूजन करावें. अथवा द्योतमान, षड्गुणैश्वर्यसंपन्न, शाश्वत, अशा शिवाची पूजा प्रणवमंत्रानें, अथवा रुद्रगायत्रीमंत्रानें किंवा त्र्यंबकमंत्रानें, किंवा "ॐनमः शिवाय" ह्या षडक्षर मंत्रानें करावी." त्यामध्येंहि प्रतिमा ( मूर्ति ), स्थंडिल, इत्यादिकांपेक्षां शाळग्राम व बाणलिंग यांचेठायीं पूजा करावी ती प्रशस्त होय; कारण, आवाहन इत्यादिक केल्यावांचून देवतेचें सान्निध्य शालग्राम व बाणलिंग यांचे ठायीं नित्य आहे. श्रीमद्भागवतांत "हे उद्धवा, स्थिरमूर्तीची पूजा कर्तव्य असतां आवाहन व विसर्जन हीं करूं नयेत. अस्थिरमूर्तीची पूजा कर्तव्य असतां आवाहन, विसर्जन यांविषयीं विकल्प ( आवाहनविसर्जन करावें किंवा न करावें असा ) आहे. स्थंडिलाचे ठायीं तर दोनहि करावीं.

---

तत्रसंक्षेपतः पूजाप्रयोगउच्यते विशेषविचारस्तुमूर्तिप्रतिष्ठाप्रसंगेनवक्ष्यते तत्रोदयात्पूर्वंनिर्माल्यमपसार्ययथाकालेपूजारंभः येभ्योमाता० एवापित्रे० इतिपठन्घंटानादंकृत्वा चम्यप्राणानायम्यदेशकालादिसंकीर्तनांतेश्रीमहाविष्णुपूजांकरिष्यइति पंचायतनपक्षेश्रीरुद्रविनायकसूर्यशक्तिपरिवृतश्रीमहाविष्णुपूजांकरिष्यइतिसंकल्प्यासनादिविधाय सहस्रशीर्षेतिषोडशर्चस्यसूक्तस्यनारायणःपुरुषोनुष्टुप्अंत्यात्रिष्टुप्न्यासेपूजायांचविनि० ततःप्रथमामृचंवामेकरेद्वितीयांदक्षिणेन्यसेत् तृतीयांवामेपादेचतुर्थींदक्षिणेपंचमींवामेजानुनिषष्ठींदक्षिणेसप्तमींवामकटौअष्टमींदक्षिणेनवमींनाभौदशमींहृदि एकादशींकंठेद्वादशींवामबाहौत्रयोदशींदक्षिणेचतुर्दशींमुखेपंचदशीमक्ष्णोःषोडशीमूर्ध्नि एवंदेहेचदेवेचन्यासंकुर्याद्विधानतः अंत्याभिःपंचभिर्ऋग्भिर्हृदयाद्यंगपंचके कलशंशंखघंटेचपाद्यार्घ्याचमनीयकं संपूज्यप्रोक्ष्यचात्मानंपूजासंभारमेवच ध्यायेदभिमतांविष्णुमूर्तिंसंपूजयेत्ततः प्रथमयापुरुषसूक्तस्यर्चावाहनंशालग्रामादौआवाहनाभावान्मंत्रपुष्पं ऋगंतेश्रीमहाविष्णवेश्रीकृष्णायेत्येवमभिमतमूर्तिचतुर्थ्योद्दिश्यसर्वोपचारार्पणं पंचायतनेतुश्रीविष्णवेशिवविनायकसूर्यशक्तिभ्यश्चेत्येवंयथोपास्यमुच्चारः नैवेद्यादौपार्थक्याभावेयथांशतइतिवदेत् द्वितीययाऽऽसनं दद्यात् तृतीययापाद्यं चतुर्थ्यार्घ्यं पंचम्याऽऽचमनं षष्ठ्यास्नानं संभवेपंचामृतस्नानान्याप्यायस्वेत्यादिमंत्रैः चंदनोशीरकर्पूरकुंकुमागरुवासितजलैःसुवर्णघर्मानुवाकमहापुरुषविद्यापुरुषसूक्तराजनसामभिरभिषेकः सप्तम्यावस्त्रं अष्टम्यायज्ञोपवीतं नवम्यागंधं दशम्यापुष्पाणि एकाद

श्याधूपं द्वादश्यादीपं स्नानेधूपेचदीपेचघंटादेर्नादमाचरेत् त्रयोदश्यानैवेद्यं संभवेतांबूलफल दक्षिणानीराजनंच चतुर्दश्यानमनं पंचदश्याप्रदक्षिणाः षोडश्याविसर्जनंपुष्पांजलिर्वा स्नानेवस्त्रेचनैवेद्येदद्यादाचमनंतथा दत्वाषोडशभिर्ऋग्भिःषोडशान्नस्यचाहुतीः सूक्तेनप्रत्यृचं पुष्पंदत्वासूक्तेनसंस्तुयात् ततःपौराणैःप्राकृतैश्चस्तुत्वा शिरोमत्पादयोःकृत्वाबाहुभ्यांचपरस्परं प्रपन्नंपाहिमामीशभीतंमृत्युग्रहार्णवात् इतिवदन्नमेत्निर्माल्यंदेवदत्तंभावयित्वाशिरसिधार येत् विष्णुमूर्ध्निस्थितंपुष्पंशिरसानवहेन्नरः शंखोदकंशिरसिधृत्वादेवतीर्थंपूजांतेवैश्वदेवांते वाशिरसिधार्यंपेयंच तत्रक्रमः विप्रपादोदकंपीत्वाविष्णुपादोदकंपिबेत् शालग्रामशिलातोय मपीत्वायस्तुमस्तके प्रक्षेपणंचकुरुतेब्रह्महासनिगद्यते पात्रांतरेणवैग्राह्यंनकरेणकदाचनेति कमलाकरः क्षालनेनएकस्यैववस्त्रस्यप्रतिदिनेदानेदोषोन एवंस्वर्णादिभूषणानामपि सुवर्ण मययज्ञोपवीतेप्येवमाचारः एवंपूजायाःफलंस्कांदे कामासक्तोथवाक्रुद्धःशालग्रामशिलार्च नात् भक्त्यावायदिवाऽभक्त्याकलौमुक्तिमवाप्नुयात् कथांयःकुरुतेविष्णोःशालग्रामशिलाग्रतः वैवस्वतभयंनास्तितथाचकलिकालजं प्रायश्चित्तंहिपापानांकलौपादोदकंहरेः धृतेशिरसिपीते चसर्वास्तुष्यंतिदेवताः बौधायनोक्तोहरिहरयोःपूजाविधिःपराशरमाधवे मयातुशिवपूजावि धिःशिवरात्रिप्रकरणेद्वितीयपरिच्छेदेउक्तइतिनेहोच्यते कौर्मे योमोहादथवालस्यादकृत्वादेव तार्चनं भुंक्तेसयातिनरकंसूकरेष्वभिजायते एवंदेवंसंपूज्यमातापितृप्रमुखान्गुरून्पूजयेत् यस्यदेवेपराभक्तिर्यथादेवेतथागुरावितिश्रुतेरितिमाधवः ॥

## आतां संक्षेपेंकरून देवपूजेचा प्रयोग सांगतों.

ह्या स्थलीं देवपूजेचा प्रयोग संक्षेपानें सांगतों, विशेष विचार करणें तो मूर्तीच्या अर्चेच्या प्रसंगानें पुढें सांगितला जाईल. त्यामध्यें सूर्योदयाच्या पूर्वी देवावरील निर्माल्य काढून विहितकालीं पूजेचा आरंभ करावा. "येभ्योमाता०, एवापित्रे०" हे मंत्र पठण करून घंटा वाजवावी. नंतर आचमन, प्राणायाम करून देशकालांचें संकीर्तन केल्यानंतर, "श्रीमहाविष्णुपूजां करिष्ये," असा संकल्प करावा. पंचायतनाची पूजा कर्तव्य ह्या पक्षीं, "श्रीरुद्रविनायकसूर्यशक्तिपरिवृतश्रीमहाविष्णुपूजां करिष्ये," असा संकल्प करून आसनादिक विधि करून पुरुषसूक्तानें न्यास करावा. तो असा,—"सहस्रशीर्षेति षोडशर्चस्य सूक्तस्य नारायणः पुरुषोनुष्टुप् ॥ अंत्यात्रिष्टुप् ॥ न्यासेपूजायां च विनियोगः" तदनंतर पहिली ऋचा ह्मणून डाव्या करतलावर न्यास करावा, दुसऱ्या ऋचेचा उजव्या करतलावर न्यास, तिसऱ्या ऋचेचा डाव्या चरणावर न्यास, चवथ्या ऋचेचा उजव्या चरणावर न्यास, पांचव्या ऋचेचा वामजानूवर न्यास, सहाव्या ऋचेचा दक्षिण जानूवर न्यास, सातव्या ऋचेचा वामकटीवर न्यास, आठव्या ऋचेचा दक्षिण कटीवर न्यास, नवव्या ऋचेचा नाभिस्थानीं, दहाव्या ऋचेचा हृदयस्थानीं, अकराव्या ऋचेचा कंठस्थानीं, बाराव्या ऋचेचा वामबाहुस्थानीं, तेराव्या ऋचेचा दक्षिणबाहुस्थानीं, चवदाव्या ऋचेचा मुखस्थानीं, पंधराव्या ऋचेचा उभयनेत्रस्थानीं, सोळाव्या ऋचेचा मस्तक स्थानीं न्यास करावा. याप्रमाणें पुरुषसूक्ताच्या सोळा ऋचा ह्मणून आपल्या

देहावर आणि देवाच्या देहावर न्यास करावा, व पुनः शेवटच्या पांच (ब्राह्मणो०, चंद्रमा०, नाभ्या०, सप्तास्या०, यज्ञेन० ह्या ) ऋचांचा क्रमेंकरून हृदय, मस्तक, शिखा, कवचरूप, अस्त्ररूप न्यास करावा. नंतर कलश, शंख, घंटा, यांची पूजा करून पाद्योदक, अर्घ्योदक, व आचमनीयोदक यांची पूजा करून शंखोदकानें आपल्या अंगावर व पूजापदार्थांवर प्रोक्षण करावें. नंतर आपणास इष्ट जी विष्णुमूर्ति तिचें ध्यान करून त्या मूर्तीची पूजा करावी. पुरुषसूक्ताच्या पहिल्या ऋचेनें आवाहन करावें. शालग्राम इत्यादिक देवांचें आवाहन नसल्यामुळें मंत्रपुष्प अर्पण करावें. प्रत्येक सूक्ताची ऋचा ह्मटल्यानंतर "श्रीमहाविष्णवे, श्रीकृष्णाय" याप्रमाणें आपणास जी इष्ट देवता असेल तिचा चतुर्थीविभक्तीनें उद्देश करून सर्वोपचार समर्पण करावे. पंचायतनपूजा असेल तर "श्रीविष्णवे शिवविनायकसूर्यशक्तिभ्यश्च" याप्रमाणें जी जी उपास्य देवता असेल तिचा उद्देश पूर्वी करून नंतर इतरांचा करावा. नैवेद्य इत्यादिक उपचार निरनिराळे नसतील तर "यथांशतः" असें ह्मणावें. दुसऱ्या ऋचेनें आसन द्यावें. तिसऱ्या ऋचेनें पाद्य द्यावें. चवथ्या ऋचेनें अर्घ्य द्यावें. पांचव्या ऋचेनें आचमन द्यावें. सहाव्या ऋचेनें स्नान घालावें. संभव असेल तर, "आप्यायस्व०" इत्यादिक मंत्रेंकरून पंचामृतस्नानें घालावीं. चंदन, वाळा, कापूर, केशर, कृष्णागुरु हे पदार्थ घालून सुवासित केलेल्या उदकांनीं व सुवर्णघर्मानुवाक ( सुवर्णं घर्मं परिवेदनं इत्यादि ), महापुरुषविद्या ( जितं ते पुंडरीकाक्ष नमस्ते विश्वभावन० हा श्लोक ), पुरुषसूक्त ( सहस्रशीर्षेत्यादि ), आणि राजनसाम (इंद्रंनरोनेमधिताहवंत ह्या ऋचेंत सांगितलेलें ) या मंत्रांनीं अभिषेक करावा. सातव्या ऋचेनें वस्त्र अर्पण करावें. आठव्या ऋचेनें यज्ञोपवीत अर्पण करावें. नवव्या ऋचेनें गंध, व दहाव्या ऋचेनें पुष्पें वहावीं. अकराव्या ऋचेनें धूप, बाराव्या ऋचेनें दीप दाखवावा. "स्नान, धूप व दीप हे उपचार अर्पण करावयाचे त्या वेळीं घंटेचा नाद करावा." तेराव्या ऋचेनें नैवेद्य अर्पण करावा, संभव असेल तर तांबूल, फल, दक्षिणा व आरती हे उपचार समर्पण करावे. व चवदाव्या ऋचेनें नमस्कार करावा. पंधराव्या ऋचेनें प्रदक्षिणा कराव्या. सोळाव्या ऋचेनें विसर्जन करावें, अथवा पुष्पांजलि अर्पण करावी. स्नान घातल्यावर, व वस्त्र व यज्ञोपवीत दिल्यावर आणि नैवेद्यानंतर आचमनाकरितां उदक द्यावें. पुरुषसूक्ताच्या सोळा ऋचांनीं चरूच्या सोळा आहुतींनीं होम करून पुनः त्याच पुरुषसूक्ताच्या सोळा ऋचांनीं सोळा पुष्पें अर्पण करावीं, व पुनः पुरुषसूक्तानें स्तुति करावी. तदनंतर पुराणांतील स्तोत्रें व प्राकृतस्तोत्रें यांहींकरून स्तुति करून नमस्कार करावा. तो असा—" माझ्या ( देवाच्या ) चरणावर मस्तक ठेवून दक्षिणोत्तर हस्तांनीं देवाचे दक्षिणोत्तर पाय ग्रहण करून, अथवा आपल्या पृष्ठभागीं परस्पर निबद्ध हस्त करून कृतापराधासारखा होऊन हे ईश, मृत्युग्रहरूप समुद्रापासून भीत अतएव शरणागत जो मी मातें रक्षण कर," असी प्रार्थना करून नमस्कार करावा. नंतर निर्माल्य, देवानें दिला असी भावना करून तो मस्तकावर धारण करावा. विष्णूच्या मस्तकावर वाहिलेलें पुष्प मनुष्यानें आपल्या मस्तकावर ठेवूं नये. " शंखोदक आपल्या मस्तकावर धारण करूं नये." देवाचें तीर्थ, पूजा झाल्यानंतर अथवा वैश्वदेवानंतर मस्तकावर धारण

करून प्राशनहि करावें. त्याविषयीं अनुक्रम—“ ब्राह्मणाचें तीर्थ प्राशन करून विष्णूचें तीर्थ प्राशन करावें. जो मनुष्य शालग्रामशिलेचें तीर्थ प्राशन केल्यावांचून आपल्या मस्तकावर उडवील तो ब्रह्महा ह्मणजे ब्रह्महत्या करणारा असा होतो. तीर्थ घेणें तें दुसऱ्या पात्रानेंच घ्यावें, हस्तानें कदापि घेऊं नये,” असें कमलाकर सांगतो. देवास अर्पण केलेलें एकच वस्त्र उदकानें प्रक्षालन करून तेंच प्रतिदिवसीं अर्पण केलें असतां दोष नाहीं. याप्रमाणें सुवर्णादिक अलंकारांविषयींहि असाच निर्णय जाणावा. सुवर्णाचे यज्ञोपवीताविषयींहि असाच आचार आहे. याप्रमाणें शालग्रामाचे पूजेचें फल स्कंदपुराणांत सांगतात. “कामाच्या स्वाधीन असो, अथवा क्रोधयुक्त असो, भक्तीनें किंवा भक्तीवांचूनहि कलीमध्यें जो (ब्राह्मण) शालग्रामशिलेची पूजा करील तो मोक्षास जाईल. शालग्रामशिलेच्या पुढें जो विष्णूचें कीर्तन करितो त्याला यमाचें व कलिकालाचें भय प्राप्त होत नाहीं. कलियुगामध्यें पातकांचें निरसन होण्यास प्रायश्चित्त असें विष्णूचें तीर्थ होय. तें तीर्थ मस्तकावर धारण केल्यानें व प्राशन केल्यानें सर्व देवता संतुष्ट होतात.” विष्णु व शिव यांचे पूजेचा विधि बौधायनानें सांगितलेला पराशरमाधवांत पाहावा. मी तर शिवपूजाविधि दुसऱ्या परिच्छेदांत शिवरात्रिप्रकरणीं सांगितला आहे, याकरितां एथें सांगत नाहीं. कूर्मपुराणांत—“मोहानें किंवा आळसानें जो मनुष्य देवपूजा केल्यावांचून भोजन करितो तो नरकाप्रत जातो आणि पुढें सूकरयोनींत त्याला जन्म प्राप्त होतें.” याप्रमाणें देवाची पूजा करून माता पिता आदिकरून गुरूंची पूजा करावी. कारण; “ज्याची, देवाचे ठिकाणीं नैष्ठिक भक्ति असून जसी देवाचे ठिकाणीं निष्ठा तसी गुरूवर असावी,” असी श्रुति आहे असें माधव ह्मणतो.

---

**तृतीयभागेपोष्यवगार्थधनार्जनं यजनाध्ययनदानयाजनाध्यापनप्रतिग्रहाःषट्विप्रकर्माणि षण्णांतुकर्मणामस्यत्रीणिकर्माणिजीविका याजनाध्यापनेचैवविशुद्धाच्चप्रतिग्रहःश्रीभागवते प्रतिग्रहंमन्यमानस्तपस्तेजोयशोनुदं अन्याभ्यामेवजीवेतशिलैर्वादोषदृक्तयोरिति तथा वार्ताविचित्राशालीनयायावरशिलोंछनं विचित्रावार्ताकृष्यादिः शालीनमयाचितं यायावरं प्रत्यहंधान्ययाच्ञाकणिशोपादानंकणोपादानंचशिलोंछनं अत्रोत्तरोत्तराप्रशस्ता शिलोंछनं** कलौनिषिद्धं कुसूलकुंभीधान्योवात्र्याहिकोश्वस्तनोपिवा कुटुंबपोषणेद्वादशाहपर्याप्तधान्यः कुसूलधान्यःषडहपर्याप्तधान्यःकुंभीधान्यः नकुर्यात्कृषिवाणिज्यंसेवावृत्तिंतथैवच ब्राह्मण्याद्धीयतेतेनतस्मात्तानिविवर्जयेदित्युक्तेर्वार्तावृत्तिरापद्विषया पुत्रमांसंवरंभोक्तुंनतुराजप्रतिग्रह **इतिवाक्यमधमंवर्तिराजप्रतिग्रहविषयं वृद्धौचमातापितरौसाध्वीभार्याशिशुःसुतश्चायाज्ययाजनशूद्रप्रतिग्रहादिनापिपोषणीयाइत्यप्यापदि शाकपयोदधिपुष्पजलकुशभूमयःकुलटाषंढपतितभिन्नात् नीचादप्ययाचितप्राप्ताग्राह्याः ब्रह्मचारीयतिश्चैवविद्यार्थीगुरुपोषकःअध्वगःक्षीणवृत्तिश्चषट्पकाअस्यभिक्षुकाः शूद्रस्यद्विजशुश्रूषावृत्तिः आपदिकृष्यादिः ॥**

दिवसाच्या तिसऱ्या विभागीं आपल्या पोष्यवर्गा (माता, पिता, गुरु, वृद्धजन, भार्या, पुत्रादिक, अनाथ, आश्रित, पूर्वीं कधींहि न आलेला असा पाहुणा, एकरात्र राहाणारा पा-

हुणा, आणि गृह्याग्नि ह्या समुदायास पोष्यवर्ग असें ह्मणतात ) करितां धन संपादन करावें. यज्ञ करणें, वेदादिकांचें अध्ययन करणें, दान देणें, ऋत्विक्कर्म करणें, शिष्यांकडून वेदादिकांचें अध्ययन करविणें, आणि दान घेणें असीं सहा कर्में ब्राह्मणास विहित आहेत. "ह्या यज्ञादि सहा कर्मांमध्यें ऋत्विक् कर्मानें धनसंपादन करणें, धर्मबुद्धीनें शिष्यांस वेदादिकांचें अध्ययन सांगून ते कृतविद्य झाल्यानंतर प्रत्युपकारबुद्धीनें जें धन देतील तें घेणें व न्यायानें धन मिळविण्याऱ्या यजमानापासून प्रतिग्रह घेणें हीं तीन कर्में ब्राह्मणाच्या उदरपोषणाविषयीं साधनभूत आहेत." श्रीभागवतांत— तपश्चर्या, ब्रह्मतेज, कीर्ति यांची हानि करणारा प्रतिग्रह आहे असें जो मानणारा त्यानें ऋत्विक् कर्मानें धन संपादन करणें, व शिष्यांस वेदादिकांचें अध्ययन सांगून ते प्रत्युपकारबुद्धीनें धन देतील तें घेणें, ह्या दोन साधनांनीं उपजीविका करावी. पूर्वोक्त दोन उपजीविकांमध्यें कृपणता इत्यादि दोषदृष्टि असेल तर, स्वामीनें टाकल्यामुळें क्षेत्रांत पडलेले दाणे निवडून आणून त्यांहींकरून उपजीविका करावी. तसेंच वार्ताविचित्रा, शालीन, यायावर, शिलोंछन ह्या चार उपजीविका होत. वार्ताविचित्रा ह्मणजे कृषिकर्म करणें इत्यादिक, शालीन ह्मणजे याचनेवांचून जें मिळेल तें ग्रहण करणें, यायावर ह्मणजे प्रत्यहीं धान्य मागणें, शिलोंछन ह्मणजे स्वामीनें टाकलेलीं असीं शेतांतील कणसें व दाणे ग्रहण करणें, याप्रमाणें चार उपजीविका सांगितल्या यांमध्यें पुढची पुढची प्रशस्त होय. शिलोंछनवृत्ति कलीमध्यें निषिद्ध आहे. कुसूलधान्य, कुंभीधान्य, त्र्याहिक ( तीन दिवस पुरे इतकें धान्य ज्याच्या जवळ आहे तो ), श्वस्तन (ह्मणजे उद्यांच्या दिवसास पुरे इतकें धान्य ज्याच्या जवळ आहे तो ) असा असावा. कुटुंबपोषणाविषयीं बारा दिवस पर्यंत पुरे इतकें धान्य ज्याच्या जवळ आहे त्याला कुसूलधान्य असें ह्मणतात. सहा दिवसपर्यंत पुरे इतकें धान्य बाळगणारा त्याला कुंभीधान्य असें ह्मणतात. " कृषिकर्म, व्यापार, सेवा (चाकरी) हीं ब्राह्मण करील तर तो ब्राह्मण्यांतून भ्रष्ट होतो, याकरितां तीं करूं नयेत," असें वचन आहे यास्तव कृषिकर्मवृत्ति आपत्तिकालीं करावी. " पुत्राचें मांस भक्षण करणें बरें; परंतु राजापासून प्रतिग्रह घेणें बरें नाहीं, " असें जें वचन तें अधार्मिक राजापासून प्रतिग्रह घेणें निषेध करितें असें जाणावें. अयाज्ययाजन ( होमादि करण्यास अनधिकारी जो त्याचे घरीं होमादि करणें ), शूद्रापासून दान घेणें, इत्यादिकेंकरूनहि वृद्ध असे माता, पिता, साध्वी स्त्री, लहान पुत्र यांचें पोषण करावें, असें जें सांगितलें तेंहि आपत्तिकालीं जाणावें. जारिणी स्त्री, षंढ, पतित ( जातिभ्रष्ट ) यांवांचून जो इतर नीच त्यापासूनहि याचनेवांचून प्राप्त झालेले असे शाक, दूध, दहीं, पुष्पें, उदक, कुश, आणि भूमि इत्यादि पदार्थ ग्रहण करावे. " ब्रह्मचारी, संन्यासी, विद्यार्थी, गुरु व मातापितर इत्यादि वृद्ध ह्यांचें पोषण करणारा, पांथस्थ, आणि धान्यादिजीविकेनें हीन हे सहा शिजलेल्या अन्नाचे भिक्षुक होत; ह्मणजे यांला शिजलेलें अन्न द्यावें." ब्राह्मणाची सेवा करणें ही शूद्राची वृत्ति होय. आपत्तिकालीं शूद्रानें कृषिकर्म इत्यादिक वृत्ति करावी. याप्रमाणें तिसऱ्या विभागाचें कृत्य सांगितलें.

---

चतुर्थभागेमध्यान्हस्नानं प्रातर्गोमयस्नानं मध्यान्हेमृत्तिकास्नानं अनयोर्विधिःप्रायश्चित्ते उक्तः शेषविधिःप्रातःस्नानवत् ब्रह्मयज्ञांगतर्पणात्प्राक्वस्त्रनिष्पीड्यमितिविशेषः ततोधृत पुंड्रोमध्यान्हसंध्यांकुर्यात् अध्यर्धयामादासायंसंध्यामाध्यान्हिकीष्यते तत्रविशेषः सूर्यश्चे तिस्थानेआपःपुनंत्वितिमंत्राचमनं आपःपुनंत्वित्यस्यनारायणयाज्ञवल्क्यआपः पृथिवी ब्रह्म णस्पतिरष्टी मंत्राचमनेविनियोगः ओंआपःपुनंतुपृथिवींपृथिवीपूतापुनातुमां पुनंतुब्रह्मणस्प तिर्ब्रह्मपूतापुनातुमां यदुच्छिष्टमभोज्यंयद्वादुश्चरितंमम सर्वंपुनंतुमामापोसतांचप्रतिग्रहंस्वाहे तिपिबेत् अघमर्षणांतेतिष्ठन् हंसःशुचिषदित्यस्यगौतमःसूर्योजगतीअर्घ्यदानेविनियोगः ओंहंसःशुचिष० एकार्घ्यं अर्घ्यांतेउपस्थानं ऊर्ध्वबाहुःउदुत्यमितित्रयोदशर्चस्यप्रस्कण्वः सूर्योगायत्री अंत्याश्चतस्रोनुष्टुभः सूर्योपस्थाने०केचित्चित्रंदेवानामितिषड्भिरप्युपतिष्ठंते शेषमुपस्थानवर्ज्यंप्रातःसंध्यावत् रात्रौमध्यान्हसंध्यायांआकृष्णेनेत्यर्घ्यदानं गायत्र्याप्राय श्चित्तार्थंद्वितीयंदत्वा हविष्पांतमितिपंचर्चोपस्थानं ॥

चतुर्थविभागीं माध्यान्हस्नान करावें. प्रातःकालीं गोमयेंकरून स्नान करावें. माध्यान्हकालीं मृत्तिकेनें स्नान करावें. ह्या दोन स्नानांचा विधि प्रायश्चित्तप्रकरणीं सांगितला आहे. शेष राहिलेला विधि प्रातःस्नानासारखा जाणावा. ब्रह्मयज्ञसंबंधी तर्पण करण्याच्या पूर्वी वस्त्र पिळूं नये, हा विशेष जाणावा. माध्यान्हस्नान केल्यानंतर पुंड्र धारण केला होत्साता माध्यान्हसंध्या करावी. “दीडप्रहर दिवसानंतर सायंकालपर्यंत माध्यान्ह संध्या करणें ती इष्ट होय.” माध्यान्हसंध्येविषयीं विशेष विधि—“सूर्यश्च०” ह्या मंत्राच्या स्थानीं “आपःपुनंतु०” ह्या मंत्रानें मंत्राचमन करावें. तें असें—(हातावर उदक घेऊन) “आपःपुनंत्वित्यस्य नारायणयाज्ञवल्क्य आपः पृथिवी ब्रह्मणस्पतिरष्टी मंत्राचमने विनियोगः ॐआपःपुनंतु०” हा मंत्र ह्मणून हातावरील उदक प्राशन करावें. अघमर्षणांत कर्म झाल्यानंतर उभें राहून “हंसःशुचिषदित्यस्य गौतमः सूर्यो जगती अर्घ्यदाने विनियोगः ॐहंसः शुचिष०” हा मंत्र ह्मणून एक अर्घ्य द्यावें. अर्घ्य दिल्यानंतर उपस्थान करावें. तें असें—ऊर्ध्वबाहु स्थित होऊन “उदुत्यमितित्रयोदशर्चस्य प्रस्कण्वः सूर्यो गायत्री ॥ अंत्याश्चतस्रोऽनुष्टुभः ॥ सूर्योपस्थाने विनियोगः” कोणी शिष्ट “चित्रंदेवानां०” ह्या सहा ऋचांनींहि उपस्थान करितात. उपस्थान वर्ज्य करून शेष कर्म प्रातःसंध्येप्रमाणें करावें. रात्रौ माध्यान्हसंध्या कर्तव्य असतां, “आकृष्णेन०” ह्या मंत्रानें अर्घ्य द्यावें, व गायत्रीमंत्रानें प्रायश्चित्तार्थ दुसरें अर्घ्य देऊन “हविष्पांतं०” ह्या पांच ऋचांनीं उपस्थान करावें.

---

अथतैत्तिरीयाणां आपःपुनंत्वित्यपः पीत्वादधिक्राव्णेतिपूर्ववत्कृत्वासूर्यायैकमर्घ्यंगायत्र्या दत्वोर्ध्वबाहुस्तिष्ठन्नुपतिष्ठेत् उद्वयं०१उदुत्यंजातवेदसं०१चित्रंदेवाना०१तच्चक्षुर्देवहितंपुर स्तात्० १ यउदगान्महतो० १ ततोजपादिउपस्थानवर्ज्यंप्राग्वत् ॥

यानंतर तैत्तिरीयशाखी जे त्यांची माध्यान्हसंध्या—“आपःपुनंतु०” ह्या मंत्रानें मंत्राचमन करून “दधिक्राव्णो०” ह्या मंत्रानें पूर्वी सांगितल्या रीतीनें (मार्जन) करून सूर्याला

एक अर्घ्य, गायत्रीमंत्रानें देऊन ऊर्ध्वबाहु स्थित होऊन उपस्थान करावें. उपस्थानाचे मंत्र— "१ उद्वयं०, १ उदुत्यंजातवेदसं०, १ चित्रंदेवाना०, १ तच्चक्षुर्देवहितंपुरस्तात्०, १ यउदगान्महतो०," याप्रमाणें उपस्थान केल्यानंतर जपादिक, उपस्थान वर्ज्य करून पूर्वीप्रमाणें करावें.

---

अथकातीयानां आपःपुनंत्विति प्राग्वत् गायत्र्याएकार्घ्यं उद्वयमित्यादिचतुर्भिरुपस्थानं जपांतेशक्तस्यपूर्वोक्तैर्विभ्राडित्यनुवाकादिभिरुपस्थानं शेषंप्राग्वत् ॥

यानंतर कात्यायनशाखी जे त्यांची माध्यान्हसंध्या—"आपःपुनंतु०" ह्या मंत्रानें मंत्राचमन पूर्वीप्रमाणें करावें, व गायत्रीमंत्रानें एक अर्घ्य देऊन, "उद्वयं" इत्यादिक चार ऋचांनीं उपस्थान करावें. जप केल्यानंतर सशक्तानें, पूर्वी सांगितले जे "विभ्राट्०" असे अनुवाकादिक त्यांहींकरून उपस्थान करावें. शेष कर्म पूर्वीप्रमाणें करावें.

---

अथब्रह्मयज्ञः सचप्रातर्होमोत्तरंवामध्यान्हसंध्योत्तरंवावैश्वदेवांतेवासकृदेवकार्यः भट्टोजिदीक्षितीयेतुप्रातराहुतेरनंतरकालःशाखांतरविषयः आश्वलायनैस्तुमध्यान्हसंध्योत्तरमेवानुष्ठेयइत्युक्तं शुष्कंवासस्तदभावेआर्द्रंत्रिर्विधुन्वन्परिधायाचम्यप्राणानायम्यश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंब्रह्मयज्ञंकरिष्ये तदंगतयादेवऋष्याचार्यतर्पणंकरिष्ये मृतपितृकैःपितृतर्पणंचकरिष्येइतिसंकल्प्यदर्भेषुदर्भपाणिःप्राङ्मुखएवोपविश्य वामजंघोपरिमूलदेशेदक्षिणपादंनिधायाथवा वामपादांगुष्ठोपरिदक्षिणपादांगुष्ठंनिधायैवमुपस्थंकृत्वा दक्षिणजानुस्थेवामेकरेउत्तानेप्रागग्रांगुलौप्रागग्रेद्वेपवित्रेधृत्वादक्षिणकरेणतथैवसंपुटीकृत्यद्यावापृथिव्योः संधिमीक्षमाणोनिमीलिताक्षोवाओंकारव्याहृतीःसकृदुच्चार्यगायत्रींपच्छोर्धर्चशःसर्वामनवानामितित्रिर्जपेत् ततोग्निमीळइतिसूक्तंपठित्वासंहिताब्राह्मणषडंगानिएकंसमाप्यापरमिति अध्यायंसूक्तमृचंवायथाशक्तिक्रमशःपठेत् मंत्रब्राह्मणादीनिभागशःसर्वाणियथाशक्तिप्रतिदिनंपठेदितिकेचित् एवंचतुर्वेदाध्यायीक्रमशश्चतुर्वेदान्भागशःसर्वानेववाऋग्वेदपूर्वकान्पठेत् एकैकशाखाध्यायीतुस्वशाखामेव शाखाध्ययनाभावेसूक्तमृचंवापठित्वैकंयजुः सामचोपनिषदश्चेतिहासपुराणादींश्चपठेत् पुरुषसूक्तमुक्त्वानमोब्रह्मणेनमोअस्त्वग्नयइतिऋचंत्रिःपठेत् नात्रऋष्यादिस्मरणं विद्युदसीत्यादेराद्यंतेपाठस्तैत्तिरीयविषयः उपविश्यपाठाशक्तस्तिष्ठन्व्रजन्शयानोवापठेदित्याश्वलायनः अनध्यायेष्वल्पंपठेत् ॥

## आतां ब्रह्मयज्ञविधि सांगतों.

ब्रह्मयज्ञ करणें तो प्रातःकालीन होम केल्यानंतर, अथवा माध्यान्हसंध्या केल्यानंतर किंवा वैश्वदेव केल्यानंतर एक वेळच करावा. भट्टोजिदीक्षितांच्या आन्हिक ग्रंथांत तर, प्रातःकालीन होम दिल्यानंतर ब्रह्मयज्ञाचा जो काल सांगितला तो दुसऱ्या शाखांविषयीं आहे, आश्वलायनशाखी जे त्यांनीं तर माध्यान्हसंध्या केल्यानंतर ब्रह्मयज्ञ करावा, असें सांगितलें आहे. शुष्क वस्त्र परिधान करावें. शुष्क नसल्यास ओलें वस्त्र तीन वेळ झाडून परिधान करावें. नंतर आचमन, प्राणायाम करून संकल्प करावा. तो असा— "श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं ब्रह्मयज्ञं करिष्ये, तदंगतया देवऋष्याचार्यतर्पणं करिष्ये." ज्यांचा

पिता मृत असेल त्यांनीं, "पितृतर्पणंच करिष्ये" असा संकल्प करून दर्भासन घालून त्या दर्भावर दर्भपाणि ( हतांत दर्भपवित्र धारण केलेला ) होत्साता पूर्वाभिमुखच बसून आ-कुंचित केलेल्या डाव्या पायाच्या पोटरीच्या मूलप्रदेशीं उजवा पाय ( पाऊल ) ठेवून अ-थवा डाव्या पायाच्या अंगुष्ठावर उजव्या पायाचा अंगुष्ठ ठेवून याप्रमाणें उपस्थ करून ब-सावें. नंतर ज्याच्या अंगुली पूर्वेस होतील असा असून उजव्या जानूवर ठेवलेला व उताणा अशा डाव्या हातामध्यें दोन पूर्वाग्रदर्भपवित्रें धरून उजव्या हातानें तसाच संपुटित करून आकाश व पृथ्वी यांच्या मध्यभागीं दृष्टि करून अथवा नेत्र मिटून ॐकार, व तीन समस्त-व्याहृति हे एकवेळ ह्मणून पादशः, अर्धशः, व पृथक् पादरहित सर्व ऋचा असा त्रिवार जप करावा. तदनंतर "अग्निमीळेपु०" हें सूक्त पठण करून संहिता, ब्राह्मण, षडंगें (शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद आणि ज्योतिष ) एक समाप्त करून दुसरें याप्रमाणें अध्याय, किंवा सूक्त, अथवा एक ऋचा जसी शक्ति असेल तदनुरूप क्रमेंकरून पठण करावीं. मंत्र ब्राह्मण इत्यादि पठण करणें तीं यथाविभागेंकरून सर्व, जसी शक्ति असेल त्याप्रमाणें प्रति-दिवसीं पठण करावीं असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. याप्रमाणें चार वेदांचें अध्ययन केलेला असेल तर त्यानें क्रमेंकरून चार वेद भागाभागानें अथवा सर्व, ऋग्वेदपूर्वक पठण करावे. एक शाखेचें अध्ययन केलेला असले तर त्यानें स्वकीय शाखाच पठण करावी. सर्व शाखेचें अध्ययन केलें नसेल तर सूक्त, अथवा ऋचा, पठण करून एक यजुर्वेदाचा मंत्र, एक साम, आणि एक उपनिषद्, व इतिहास, पुराण इत्यादिक पठण करावीं. नंतर पुरुषसूक्त ह्मणून "नमो ब्रह्मणे नमो अस्त्वग्नये०" ही ऋचा त्रिवार ह्मणावी. ह्या ब्रह्मयज्ञांत ऋषि, देवता, छंद यांचें स्मरण करूं नये ह्मणजे मंत्रांचे छंदऋषि ह्मणूं नयेत. "विद्युदसि०" इत्यादिक मंत्राचा पूर्वीं व शेवटीं जो पाठ तो तैत्तिरीयशाखाविषयक आहे. बसून पाठ करण्यास अ-शक्त असेल त्यानें उभ्यानें, चालतांना, निजल्यानें अशा कोणत्याहि स्थितीनें ब्रह्मयज्ञाचें अध्ययन करावें असें आश्वलायन सांगतो. अनध्यायाचे दिवसीं अल्प पठण करावें.

---

**अथतर्पणं तत्रसव्येनदेवतीर्थेनदर्भाग्रैर्देवतर्पणं तद्यथा साक्षतजलैर्देवर्षितर्पणं सतिलजलैराचार्यपितृतर्पणं प्रजापतिस्तृप्यतु १ ब्रह्मातृ० २ वेदास्तृ० ३ देवा० ४ ऋषयस्तृ० ५ सर्वाणिछंदांसि० ६ ओंकार० ७ वषट्कार० ८ व्याहृतय० ९ सावित्री तृ० १० यज्ञा० ११ द्यावापृथिवीतृप्यतां १२ अंतरिक्षं० १३ अहोरात्राणितृप्यंतु १४ सांख्या० १५ सिद्धा० १६ समुद्रा० १७ नद्य० १८ गिरय० १९ क्षेत्रौषधिवनस्पतिगंधर्वाप्सरस० २० नागा० २१ वयांसि० २२ गाव० २३ साध्या० २४ विप्रा० २५ यक्षा० २६ रक्षांसि० २७ भूतानि० २८ एतमंतानितृप्यंतु० २९ अथऋषयः निवीती कनिष्ठिकामूलेनदर्भमध्यैः शतर्चिनस्तृ० माध्यमास्तृ० गृत्समद० विश्वामित्र० वामदेव० अत्रि० भरद्वाज० वसिष्ठ० प्रगाथा० पावमान्य०क्षुद्रसूक्ता० महासूक्ता० १२ एकत्वद्वित्वबहुत्वेषुतृप्यतुतृप्यतांतृप्यंतुइतियथायथंवदेत् अथप्राचीनावीती पितृतीर्थेनद्विगुणीकृतदर्भमूलाग्रैः सुमंतुजैमिनिवैशंपायनपैलसूत्रभाष्यभारतमहाभारतधर्माचार्यास्तृप्यंतु १ जानंतिबाहविगा**

र्ग्यगौतमशाकल्यबाभ्रव्यमांडव्यमांडूकेयास्तृप्यंतु २ गर्गीवाचक्नवी० ३ वडवाप्रातीथेयी० ४ सुलभामैत्रेयी० ५ कहोळंत० ६ कौषीतकं० ७ महाकौषीतकं० ८ पैंग्यं० ९ महापैंग्यं० १० सुयज्ञंतर्पया० ११ सांख्यायनंत० १२ ऐतरेयंत० १३ महैतरेयंत० १४ शाकलं० १५ बाष्कलं० १६ सुजातवक्रं० १७ औदवाहिं० १८ महौदवाहिं० १९ सौजामिं० २० शौनकं० २१ आश्वलायनं० २२ येचान्येआचार्यास्तेसर्वेतृप्यंतु २३ ततो मृतपितृकः पितृत्रयींमातृत्रयींसापत्नमातरंसपत्नीकमातामहत्रयींपत्न्याद्येकोद्दिष्टगणांश्च महालयप्रकरणोक्तान्मृतांस्तर्पयेत् संबंधंप्रथमंब्रूयान्नामगोत्रमनंतरं पश्चाद्रूपंविजानीयात्क्रम एषसनातनः एकैकमंजलिंदेवेभ्योद्वौद्वौऋषिभ्यस्त्रींस्त्रीन्पितृभ्यइतिसंख्याविशेषःआश्वलायनानांवैकल्पिकः तत्सूत्रेसंख्याऽनुक्तेः येषांसूत्रेसंख्योक्तिस्तेषांनित्यइतिमाधवः मातृत्रयीभिन्नस्त्रीभ्यएकांजलिः एतावद्भिस्तृततर्पणाशक्तौ आब्रह्मस्तंबपर्यंतंदेवर्षिपितृमानवाः तृप्यंतुपितरःसर्वेमातृमातामहादयः अतीतकुलकोटीनांसप्तद्वीपनिवासिनां आब्रह्मभुवनाल्लोकादिदमस्तुतिलोदकमितित्रिस्त्रिर्दद्यात् ततोयेकेचास्मत्कुलेजाताअपुत्रागोत्रिणोमृताः तेगृण्हंतुमया दत्तंवस्त्रनिष्पीडनोदकमितिपरिधानवस्त्रंभूमौनिष्पीड्यदद्यात् अत्रबह्वृचानांप्राचीनावीती अन्येषांनिवीती इदंगृहेनिषिद्धंब्रह्मयज्ञोग्रामाद्बहिरुदकसमीपेविहितोग्रामेमनसाधीयीत सव्यान्वारब्धदक्षिणेनवाअंजलिनावातर्पणं तर्पणंबर्हिषाच्छन्नेस्थलेकार्यंनतुजले पात्राद्वाजलमादायशुभेपात्रांतरेक्षिपेत् जलपूर्णेथवागर्तेनस्थलेतुविबर्हिषि हेमरौप्यताम्रकांस्यमयेपात्रेन मृन्मये यत्राशुचिस्थलंतत्रतर्पणंस्यान्नदीजले अनामिकाधृतंहेमतर्जन्यांरौप्यमेवच कनिष्ठिकाधृतंखड्गंतेनपूतोभवेन्नरः अंगुल्यग्रेतीर्थंदैवंस्वल्पांगुल्योर्मूलेकायं मध्येंगुष्ठांगुल्योःपित्र्यंमूलेत्वंगुष्ठस्य ब्राह्मं उद्धृतजलेनपितृतर्पणेतिलान्संमिश्रयेज्जले अनुद्धृतजलेनतर्पणेवामहस्तेतिला ग्राह्याः तिलतर्पणंगृहेनिषिद्धंरविभृगुवारेसप्तमीनंदासुकृत्तिकामघाभरणीषुमन्वादौयुगादौ च पिंडदानंमृदास्नानंनकुर्यात्तिलतर्पणं पित्रोःश्राद्धदिनेनित्यतर्पणेतिलानिषिद्धाः पर्वदिनेनिषिद्धतिथिवारादिष्वपितिलतर्पणं विकिरेपिंडदानेचतर्पणेस्नानकर्मणि आचांतःसन्प्रकुर्वीतदर्भसंत्याजनंबुधः दर्भत्यागमंत्रस्तु येषांपितानभ्रातानपुत्रोनान्यगोत्रिणः तेसर्वेतृप्तिमायांतुमयोत्सृष्टैःकुशैस्तथेति ॥

आतां यानंतर तर्पण सांगतों–त्यामध्यें देवांचें तर्पण करणें तें सव्येंकरून देवतीर्थानें ( अंगुलींच्या अग्रांनीं ) व दर्भांच्या अग्रांनीं करावें. तें असें, उदकांत अक्षता घालून त्या उदकानें देव व ऋषि यांचें तर्पण करावें. उदकांत तिळ टाकून त्या उदकानें आचार्य व पितर यांचें तर्पण करावें. तर्पणाच्या देवता अशा–" १ प्रजापतिस्तृप्यतु, २ ब्रह्मातृ०, ३ वेदास्तृप्यं०, ४ देवास्तृप्यं०, ५ ऋषयस्तृप्यं०, ६ सर्वाणिछंदांसितृप्यं०, ७ ओंकारस्तृ०, ८ वषट्कारस्तृप्य०, ९ व्याहृतयस्तृप्यं०, १० सावित्रीतृप्य०, ११ यज्ञास्तृप्यं० १२ द्यावापृथिवीतृप्यतां, १३ अंतरिक्षंतृ०, १४ अहोरात्राणितृप्यंतु, १५ सांख्यास्तृप्यं० १६ सिद्धास्तृप्यं०, १७ समुद्रास्तृप्यं०, १८ नद्यस्तृप्यं०, १९ गिरयस्तृप्यं०, २० क्षेत्रौषधिवनस्पतिगंधर्वाप्सरसस्तृप्यंतु, २१ नागास्तृप्यंतु, २२ वयांसितृप्यं ०, २३ गावस्तृ०

२४ साध्यास्तृ०, २५ विप्रास्तृप्यंतु, २६ यक्षास्तृप्यंतु, २७ रक्षांसि तृप्यंतु, २८ भूतानि तृप्यंतु, २९ एवमंतानि तृप्यंतु." याप्रमाणें देवतर्पण करून निवीती ( सरळ माळेसारखें यज्ञोपवीत केलेला ) होत्साता कनिष्ठिकेच्या मूलानें, दर्भांच्या मध्यभागेंकरून ऋषींचें तर्पण करावें. त्या ऋषिदेवता अशा–" १ शतर्चिनस्तृप्यं०, २ माध्यमास्तृप्यं०, ३ गृत्समदस्तृप्य०, ४ विश्वामित्रस्तृप्य०, ५ वामदेवस्तृप्य०, ६ अत्रिस्तृप्यतु, ७ भरद्वाजस्तृप्यतु, ८ वसिष्ठस्तृप्यतु, ९ प्रगाथास्तृप्यंतु, १० पवमान्यस्तृप्यंतु, ११ क्षुद्रसूक्तास्तृप्यं०, १२ महासूक्तास्तृप्यं०, एकवचन, द्विवचन व बहुवचन यांचे ठायीं क्रमेंकरून " तृप्यतु, तृप्यतां, तृप्यंतु " याप्रमाणें जसें जेथें योग्य असेल तसा उच्चार करावा. यानंतर प्राचीनावीती ( उजव्या स्कंधावरून यज्ञोपवीत धारण केलेला ) होत्साता पितृतीर्थेंकरून द्विगुणित केलेल्या दर्भांच्या मूलाग्रांनीं तर्पण करावें. त्याच्या देवता अशा– " १ सुमंतुजैमिनिवैशंपायनपैलसूत्रभाष्यभारतमहाभारतधर्माचार्यास्तृप्यंतु, २ जानंतिबाहविगार्ग्यगौतमशाकल्यबाभ्रव्यमांडव्यमांडूकेयास्तृप्यंतु, ३ गर्गीवाचक्नवीस्तृप्यतु, ४ वडवाप्रातीथेयी तृप्यतु, ५ सुलभामैत्रेयी तृप्यतु, ६ कहोळं तर्पयामि, ७ कौषीतकं तर्पयामि, ८ महाकौषीतकं तर्पयामि, ९ पैंग्यंतर्पयामि, १० महापैंग्यं तर्पयामि, ११ सुयज्ञं तर्पयामि, १२ सांख्यायनं तर्पयामि, १३ ऐतरेयं तर्पयामि, १४ महैतरेयं तर्पयामि, १५ शाकलं तर्पयामि, १६ बाष्कलं तर्पयामि, १७ सुजातवक्रं तर्पयामि, १८ औदवाहिं तर्पयामि, १९ महौदवाहिं तर्पयामि, २० सौजामिं तर्पयामि, २१ शौनकं तर्पयामि, २२ आश्वलायनं तर्पयामि, २३ ये चान्ये आचार्यस्ते सर्वे तृप्यंतु," याप्रमाणें आचार्यतर्पण करून नंतर ज्याचा पिता मृत असेल त्यानें पितृत्रयी, मातृत्रयी, सापत्नमाता, सपत्नीक मातामहत्रयी, आणि महालयप्रकरणीं सांगितलेले मृत जे पत्नी इत्यादिक एकोद्दिष्टगण त्यांचें तर्पण करावें. " ज्या पितरांचें तर्पण करावयाचें त्यांचा व आपला संबंध ( नातें ) त्याचा प्रथम उच्चार करावा, (उदाहरण; अस्मत्पितरं इत्यादि. ) नंतर नाम व गोत्र ( अमुक शर्माणं, अमुक गोत्रं इत्यादि) यांचा उच्चार करावा. नंतर त्या पितरांचें जें वस्वादिक रूप, त्रयी असेल तर वसुरुद्रादित्यस्वरूपाः, एकोद्दिष्ट असेल तर वसुरूपः याचा उच्चार करावा. याप्रमाणें हा निर्बाध अनुक्रम जाणावा. तर्पणाविषयीं उदकाचा अंजलि देवांस एकेक द्यावा, ऋषींस दोन दोन अंजलि द्यावे, व पितरांस तीन तीन अंजलि द्यावे असा जो संख्येचा विशेष सांगितला आहे तो आश्वलायनशाखी जे त्यांस वैकल्पिक जाणावा; कारण, आश्वलायनाच्या सूत्रामध्यें अंजलींची संख्या सांगितली नाहीं. ज्यांच्या सूत्रामध्यें अंजलींची संख्या उक्त असेल त्यांस तो नित्य आहे, ह्मणून त्यांनीं त्याप्रमाणें अंजलि अवश्य द्यावेत असें माधव सांगतो. मातृत्रयीवांचून ज्या इतर स्त्रिया त्यांला एकेक अंजलि द्यावा. इतकें विस्तारपूर्वक तर्पण करण्यास शक्ति नसेल तर "आब्रह्मस्तंबपर्यंतं देवर्षिपितृमानवाः ॥ तृप्यंतुपितरः सर्वेमातृमातामहादयः ॥ अतीतकुलकोटीनां सप्तद्वीपनिवासिनां ॥ आब्रह्मभुवनाल्लोकादिदमस्तुतिलोदकं," हे मंत्र ह्मणून तीन तीन अंजलि द्यावे. तदनंतर " येकेचास्मत्कुलेजाता अपुत्रा गोत्रिणोमृताः ॥ तेगृह्णंतुमया दत्तंवस्त्रनिष्पीडनोदकं," हा मंत्र ह्मणून परिधान केलेलें वस्त्र भूमीवर निष्पीडन करून उ-

दक द्यावें. ह्याविषयीं आश्वलायनांनीं प्राचीनावीती करावी. इतर शाखी जे त्यांनीं निवीती करावी. वस्त्रनिष्पीडन करून उदक देणें तें गृहांत निषिद्ध आहे. ब्रह्मयज्ञ करणें तो ग्रामापासून बाहेर उदकाच्या सन्निध करावा, ग्रामांत ब्रह्मयज्ञ कर्तव्य असतां सर्व अध्ययन मनोमय करावें. दक्षिण हस्तास वामहस्त सलग्न करून त्या दक्षिण हस्तानें, किंवा दोन हस्तांचा अंजलि करून त्या अंजलीनें तर्पण करावें. "तर्पण करणें तें दर्भाच्छादित भूमीवर करावें. उदकांत सोडूं नये. अथवा पात्रांतील उदक घेऊन दुसऱ्या शुद्धपात्रांत सोडावें, अथवा उदकानें भरलेल्या भूमीच्या खांचेंत सोडावें, परंतु दर्भविरहित भूमीवर सोडूं नये. तर्पणाविषयीं पात्र सुवर्णाचें, रौप्याचें, अथवा तांब्याचें किंवा कांस्यमय घ्यावें, मातीचें पात्र घेऊं नये. ज्या कालीं तर्पण करावयाचें त्यावेळीं ती भूमि अपवित्र असेल तर नदीवर जाऊन नदीच्या उदकांत तर्पण करावें. अनामिकेंत ( करांगळीजवळचे बोटांत ) सुवर्ण धारण, तर्जनीमध्यें रौप्य धारण, आणि कनिष्ठिकेमध्यें खड्गधारण यांहींकरून मनुष्य पवित्र होतो. अंगुलीचें जें अग्र तें देवतीर्थ होय, अनामिका व कनिष्ठिका यांचें जें मूल तें काय ( प्रजापति ) तीर्थ होय. अंगुष्ठ व तर्जनी यांचा जो मध्यभाग तें पितृतीर्थ होय. अंगुष्ठाचें जें मूळ तें ब्राह्म तीर्थ होय." उदक बाहेर काढून त्यानें पितृतर्पण करणें असल्यास त्या उदकांत तिळ मिश्र करून करावें. अनुद्धृत (न काढलेलें) उदकानें तर्पण कर्तव्य असेल तर डाव्या हस्तामध्यें तिळ घ्यावे. तिळमिश्रित उदकानें तर्पण घरीं करूं नये. रविवार, भृगुवार, सप्तमी, नंदातिथि, कृत्तिका, मघा, भरणी, मन्वादितिथि, युगादितिथि, ह्या दिवसीं पिंडदान, मृत्तिकास्नान, व तिलतर्पण हीं करूं नयेत. मातापितरांच्या श्राद्धदिवसीं जें नित्य तर्पण त्याविषयीं तिल घेऊं नयेत. पर्व दिवसीं निषिद्ध तिथि, वार इत्यादिक जरी असतील तथापि तिलतर्पण करावें. "स्नात्या पुरुषानें विकिर, पिंडदान, तर्पण व स्नानकर्म हीं केल्यानंतर आचमन करून धारण केलेले दर्भ टाकावे." दर्भत्यागाचा मंत्र— **"येषां पिता न न भ्राता न पुत्रो नान्यगोत्रिणः ॥ ते सर्वे तृप्तिमायांतु मयोत्सृष्टैः कुशैस्तथा."**

---

**अथहिरण्यकेशीयानांसंकल्पादित्रिर्गायत्रीजपातंप्राग्वत् ततइषेत्वोर्जेतिअध्यायानुवाकंवायथाशक्तिपठित्वाऋचंसामषडंगेतिहासपुराणादीनिपठित्वानमोब्रह्मणइत्येतयात्रिः परिदधाति ॥**

## आतां हिरण्यकेशीय यांचा ब्रह्मयज्ञविधि सांगतों.

हिरण्यकेशीय यांचे संकल्पापासून त्रिवार गायत्रीजपापर्यंत कर्म पूर्वीप्रमाणेंच जाणावें. तदनंतर, "**इषेत्वोर्जेत्वा ०**" इत्यादिक अध्याय किंवा अनुवाक यथाशक्ति पठण करून ऋचा, साम, षडंगें, इतिहास, पुराण, इत्यादिक पठण करून "**नमोब्रह्मणे०**" ही ऋचा तीनवेळ पठण करावी.

---

**अथतर्पणं तच्चतैत्तिरीयाणांब्रह्मयज्ञांगंनभवति तेनब्रह्मयज्ञोत्तरंव्यवहितकालेपिब्रह्मयज्ञात्प्रागपिभवति एवंकाण्वमाध्यंदिनानामपि अतोदेवर्ष्याचार्यपितृतृप्तिद्वाराश्रीपरमेश्वर० दे**

वर्ष्याचार्यपितृतर्पणंकरिष्येइतिपृथगेवसंकल्पःपूर्ववदेकैकांजलिनादेवतर्पणं ब्रह्माणंतर्पयामि प्रजापतिंतर्प० बृहस्पतिं० अग्निं० वायुं० सूर्यं० चंद्रमसं० नक्षत्राणि० इंद्रंऽराजानं० यमंऽराजानं० वरुणंऽराजानं० सोमंऽराजानं० वैश्रवणंऽराजानं० वसून्० रुद्रान्०आदित्यान्० विश्वान्देवान्० साध्यान्० ऋभून्० भृगून्०मरुतः० अथर्वणः०अंगिरसस्तर्पयामीति निवीती उदङ्मुखः विश्वामित्रं० जमदग्निं० भरद्वाजं० गौतमं० अत्रिं० वसिष्ठं० कश्यपं० अरुंधतीं० अगस्त्यं० कृष्णद्वैपायनं० जातूकर्ण्यं० तरुक्षं० तृणबिंदुं० वर्मिणं० वरूथिनं० वाजिनं० वाजिश्रवसंतर्पयामि सत्यश्रवसंत०सुश्रवसंत०सुतश्रवसं० सोमशुष्मायणं० सत्ववंतं० बृहदुक्थं० वामदेवं० वाजिरत्नं० हर्यज्वायनं० उदमयं० गौतमं० ऋणंजयं० ऋतंजयं० कृतंजयं० धनंजयं० बभ्रुं० त्र्यरुणं० त्रिवर्षं० त्रिधातुं० शिबिं० पराशरं० विष्णुंत० रुद्रं० स्कंदं० काशीश्वरं० ज्वरंत० धर्मं० अर्थं० कामं० क्रोधं० वसिष्ठं० इंद्रं० त्वष्टारंत० कर्तारं० धर्तारं० धातारं० मृत्युं० सवितारंत० सावित्रींतर्प० ऋग्वेदंत० यजुर्वेदं० सामवेदं० अथर्ववेदं० इतिहासपुराणंत० ६१ इतिद्वौद्वावंजली प्राचीनावीती दक्षिणामुखः वैशंपायनं० पिलिंगुं० तित्तिरंत० उखंत०आत्रेयंपदकारं० कौंडिण्यंवृत्तिकारं० सूत्रकारान्० सत्याषाढंत० प्रवचनकर्तॄन्०आचार्यान्० ऋषीन्० वानप्रस्थान्०ऊर्ध्वरेतसः० एकपत्नीस्तर्पयामीतित्रींस्त्रीनंजलीनितिविशेषः शेषंपितृतर्पणादिसर्वंप्रागुक्तमेव ॥

आतां यानंतर तर्पणाचा विधि सांगतों.—तें तर्पण तैत्तिरीयशाखी जे त्यांचें ब्रह्मयज्ञाचें अंग होत नाहीं. याकरितां ब्रह्मयज्ञ ह्मणजे ( अध्ययन ) केल्यानंतर मध्यें कांहीं वेळ टाकूनहि किंवा ब्रह्मयज्ञाच्या पूर्वींहि होतें. याप्रमाणें काण्व, माध्यंदिन यांविषयींहि हाच निर्णय आहे याकरितां " देवर्ष्याचार्यपितृतृप्तिद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंदेवर्ष्याचार्यपितृतर्पणं करिष्ये " असा निराळाच संकल्प करावा, व पूर्वी सांगितल्याप्रमाणें एकेक अंजलि देऊन देवतर्पण करावें. देवतर्पणाच्या देवता अशा—" १ ब्रह्माणं तर्पयामि २ प्रजापतिं तर्पयामि ३ बृहस्पतिंत० ४ अग्निंत० ५ वायुंत० ६ सूर्यंत० ७ चंद्रमसंत० ८ नक्षत्राणित० ९ इंद्रंऽराजानंत० १० यमंऽराजानंत० ११ वरुणंऽराजानंत० १२ सोमंऽराजानंत० १३ वैश्रवणंऽराजानंत० १४ वसून्त० १५ रुद्रान्त० १६ आदित्यान्त० १७ विश्वान्देवान्त० १८ साध्यान्त० १९ ऋभून्तर्पया० २० भृगून्त० २१ मरुतःत० २२ अथर्वणस्त० २३ अंगिरसस्तर्पयामि." याप्रमाणें देवांचें तर्पण करून निवीती करून उत्तरदिशेस सम्मुख होऊन ऋषितर्पण करावें. ऋषितर्पणाच्या देवता अशा—"१ विश्वामित्रंत० २ जमदग्निंत० ३ भरद्वाजंत० ४ गौतमंत० ५ अत्रिंत० ६ वसिष्ठंत० ७ कश्यपंत० ८ अरुंधतींतर्प० ९ अगस्त्यंतर्पयामि १० कृष्णद्वैपायनं० ११ जातूकर्ण्यं० १२ तरुक्षं० १३ तृणबिंदुंत० १४ वर्मिणं० १५ वरूथिनंत० १६ वाजिनं० १७ वाजिश्रवसं० १८ सत्यश्रवसंत० १९ सुश्रवसं० २० सुतश्रवसं० २१ सोमशुष्मायणंत० २२ सत्ववंतं० २३ बृहदुक्थं० २४ वामदेवंत० २५ वाजिरत्नं० २६ हर्यज्वायनं० २७ उदमयं० २८ गौतमं० २९ ऋणंजयंत० ३० ऋतंजयंत० ३१ कृतंजयं० ३२ धनंजयं० ३३ बभ्रुंत० ३४ त्र्यरुणंत० ३५ त्रिवर्षं० ३६ त्रिधातुं० ३७ शिबिं० ३८ पराशरं०

३९ विष्णुंत० ४० रुद्रं० ४१ स्कंदं० ४२ काशीश्वरं० ४३ ज्वरं० ४४ धर्मंत० ४५ अर्थं० ४६ कामं० ४७ क्रोधं० ४८ वसिष्ठं० ४९ इंद्रं० ५० त्वष्टारंत० ५१ कर्तारं० ५२ धर्तारं० ५३ धातारं० ५४ मृत्युं० ५५ सवितारं० ५६ सावित्रींत० ५७ ऋग्वेदंत० ५८ यजुर्वेदंतर्पया० ५९ सामवेदं० ६० अथर्ववेदं० ६१ इतिहासपुराणं०" याप्रमाणें एकेकास दोन दोन अंजलि देऊन तर्पण करावें. नंतर प्राचीनावीती करून दक्षिणामुख होत्साता आचार्यतर्पण करावें. आचार्यतर्पणाच्या देवता अशा—" १ वैशंपायनं० २ पिलिंगुंत० ३ तित्तिरं० ४ उखंत० ५ आत्रेयंपदकारं० ६ कौंडिण्यंवृत्तिकारं० ७ सूत्रकारान्० ८ सत्याषाढं० ९ प्रवचनकर्तॄन्० १० आचार्यान्० ११ ऋषीन्त० १२ वानप्रस्थान्तर्पयामि १३ ऊर्ध्वरेतसस्त० १४ एकपत्नीस्त० " याप्रमाणें एकेकास तीन तीन अंजलि देऊन तर्पण करावें हा विशेष जाणावा. शेष पितृतर्पणादिक सर्व कर्म पूर्वी सांगितलें आहे त्याप्रमाणें करावें.

---

अथापस्तंबादीनांब्रह्मादयोयेदेवास्तान्दे० सर्वान्दे० सर्वान्देवगणान्० सर्वादेवपत्नीः० सर्वान्पुत्रां० सर्वान्पौत्रान्० भूर्देवां० भुवर्देवां० सुवर्देवां० भूर्भुवःसुवर्देवां० कृष्णद्वैपायनादयोयेऋषयः तानृषीं० सर्वानृषीं० सर्वानृषिगणां० सर्वाऋषिपत्नीः० सर्वानृषिपुत्रां० सर्वानृषिपौत्रां०६ भूर्ऋषीं०४ एवंसोमः पितृमान्यमोंगिरस्वामग्निष्वात्ताः० तान्पितॄनित्यादयोदशपितृपर्यायाऊह्याः एवमन्येषामप्यूह्यं ॥

यानंतर आपस्तंब इत्यादिकांच्या तर्पणाचा विधि सांगतों.— त्या तर्पणाच्या देवता अशाः—" १ ब्रह्मादयोयेदेवास्तान्देवां० २ सर्वान्देवां० ३ सर्वान्देवगणांस्त० ४ सर्वादेवपत्नीस्त० ५ सर्वान्पुत्रांस्तर्पयामि ६ सर्वान्पौत्रांस्त० ७ भूर्देवांस्त० ८ भूवर्देवांस्त० ९ सुवर्देवांस्त० १० भूर्भुवःसुवर्देवांस्त० ११ कृष्णद्वैपायनादयोयेऋषयः तान्ऋषींस्त० १२ सर्वानृषींस्त० १३ सर्वानृषिगणांस्त० १४ सर्वाऋषिपत्नीस्त० १५ सर्वानृषिपुत्रांस्त० १६ सर्वानृषिपौत्रांस्त० १७ भूर्ऋषींस्त० १८ भुवर्ऋषीं० १९ सुवर्ऋषीं० २० भूर्भुवःसुवर्ऋषींस्त० एवंसोमःपितृमान्यमोंगिरःस्वानग्निष्वात्ताःकव्यवाहनादयोयेपितरः २१ तान्पितॄंस्त०" इत्यादिक दहा पितृपर्यायांचा ऊह करावा, व याप्रमाणें इतरांनीहि असेंच जाणावें.

---

अथकात्यायनानां प्राङ्मुखआचम्यपवित्रेधृत्वाप्राणानायम्यश्रीपर०र्थंब्रह्मयज्ञेनयक्ष्ये दर्भानंजलौधृत्वादक्षिणजानौधृत्वासूत्रांतराद्गायत्रींत्रिरुच्चार्य इषेत्वेत्यादिआरभ्यसंहितांब्राह्मणंचपूर्वोक्तरीत्यापठेत् अंतेउपनिषदितिहासपुराणादिपठित्वाअंतेओंस्वस्तीतिवदेत्सूत्रांतरोक्तत्वात्नमोब्रह्मणइतित्रिःपठंतिकेचित् ॥

यानंतर कात्यायनशाखी जे त्यांचा ब्रह्मयज्ञविधि.—पूर्वाभिमुख बसून आचमन करून हातांत दर्भपवित्रकें धारण करून प्राणायाम करून संकल्प करावा. तो असा— "श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं ब्रह्मयज्ञेन यक्ष्ये," याप्रमाणें संकल्प केल्यानंतर अंजलींत दर्भ धारण करून तो अंजलि उजव्या जानूवर ठेवून दुसऱ्या सूत्रांत सांगितल्याप्रमाणें त्रिवार गायत्री ह्मणून

"इषेत्वा०" इत्यादिकापासून आरंभ करून संहिता व ब्राह्मण यांचें पूर्वी सांगितल्या रीतीनें अध्ययन करावें. नंतर उपनिषद्, इतिहास, पुराण इत्यादिक पठण करून अंतीं "ॐ स्वस्ति" असें ह्मणावें. दुसऱ्या सूत्रांत सांगितली याकरितां "नमोब्रह्मणे०" ही ऋचा त्रिवार क्वचित् पठण करितात.

---

अथतर्पणं एतच्चप्रातःसंध्योत्तरंवामध्यान्हेब्रह्मयज्ञोत्तरंवासकृदेवकार्यं ब्रह्मयज्ञस्यवैकल्पिकंकालत्रयमुक्तं तत्रदेवर्षिपितृतर्पणंकरिष्येइतिसंकल्प्यादौपूर्वोक्तधर्मेणदेवतर्पणंभूमौताम्रादिपात्रेवादर्भानास्तीर्यविश्वेदेवासआगतेतिदेवानावाह्यविश्वेदेवाःशृणुतेममितिजपित्वात्रीन्प्रागग्रान्दर्भान्धृत्वादेवतीर्थेन ओंब्रह्मातृप्यतां विष्णुस्तृप्य० रुद्र० प्रजापति० देवास्तृ० छंदांसि० वेदा० ऋषय० पुराणाचार्या० गंधर्वा० इतराचार्या० संवत्सरःसावयव० देव्यस्तृप्यंतां० अप्सरसस्तृ० देवानुगा० नागा० सागरा० पर्वता० सरित० मनुष्या० यक्षा० रक्षांसि० पिशाचा० सुपर्णा० भूतानितृ० पशव० वनस्पतय० ओषधय० भूतग्रामश्चतुर्विधस्तृप्यतामितिसर्वत्रसप्रणवंप्रथमांतंनामोच्चार्यतर्पयेत् २९ सप्तऋषयइतिमंत्रेणर्षीनावाह्यनिवीतीद्विर्द्विः सनकस्तृप्यतु सनंदन० सनातन० कपिल० आसुरी० वोढुस्तृ० पंचशिख० अपसव्यं उशंतस्त्वेतिपितॄनावाह्य आयंतुनःपितरइतिजपित्वापितृतीर्थेनत्रिस्त्रिः कव्यवाडनलस्तृप्यतां० सोम० यम० अर्यमा० अग्निष्वात्ताः पितरस्तृप्यंतां सोमपाःपितरस्तृ० बर्हिषदस्तृ० यमायनमस्तर्पयामि धर्मराजाय० मृत्यवे० अंतकाय० वैवस्वताय० कालाय० सर्वभूतक्षयाय० औदुंबराय० दध्नाय० नीलाय० परमेष्ठिने० वृकोदराय० चित्राय० चित्रगुप्ताय० २१ यमतर्पणंवैकल्पिकं सूत्रेएकेइत्युक्तेःजीवत्पितृकस्यमणिबंधपर्यंतमपसव्यंसर्वत्र ततोमृतपितृकः पित्रादित्रयींमात्रादित्रयींचतर्पयित्वा उदीरतामितिनवभिर्ऋग्भिस्तर्पणंजलस्थानेअंजलिनाधारांनिषिंचेत् उदीरतां० १ अंगिरसोनःपितरो० २ आयंतुनः० ३ ऊर्जंवहंतिरमृतं० ४ पितृभ्यः स्वधानमः ५ येचेह०६ मधुवाताइतितिस्रइति ९ प्रत्यृचंप्रत्येकंकुर्यात्तृप्यध्वमितिचत्रिःसिंचेत् ततोनमोवः पितरइत्यष्टौयजूंषिपठित्वामातामहादीनेकोद्दिष्टगणांश्चतर्पयेत् देवागातुविदइतिविसर्जयेत् स्नानवस्त्रनिष्पीडनोदकदानादि प्राग्वत् प्रातर्होमोत्तरंदेवतार्चनंनकृतंचेच्चतुर्थभागेब्रह्मयज्ञोत्तरंकार्यं ॥

यानंतर तर्पण सांगतों.—हें तर्पण करणें तें प्रातःसंध्या झाल्यानंतर करावें, अथवा मध्यान्हकालीं ब्रह्मयज्ञ केल्यानंतर एकवारच करावें. ब्रह्मयज्ञाचे काल विकल्पेंकरून तीन सांगितले आहेत. त्यांमध्यें "देवर्षिपितृतर्पणं करिष्ये," असा संकल्प करून पूर्वी सांगितल्या रीतीनें प्रथम देवतर्पण करावें. तें असें—भूमि अथवा तांबें इत्यादिकांचें पात्र यावर दर्भ हांतरून "विश्वेदेवास आगत०" हा मंत्र ह्मणून देवांचें आवाहन करून "विश्वेदेवाःशृणुतेम०" ह्या मंत्राचा जप करून पूर्वदिशेला अग्रें होतील असे तीन दर्भ घेऊन देवतीर्थानें (अंगुलींच्या अग्रांनीं) तर्पण करावें. देवतर्पणाच्या देवता अशा—"ॐ ब्रह्मातृप्यतां, विष्णुस्तृप्यतां, रुद्रस्तृ० प्रजापतिस्तृ० देवास्तृप्यं० छंदांसितृप्यं० वेदास्तृप्यं० ऋषयस्तृप्यं० पुराणाचार्यास्तृप्यं० गंधर्वा० इतराचार्यास्तृप्यं० संवत्सरःसावयवस्तृप्य० देव्यस्तृप्यं० अप्सरसस्तृप्यं०

देवानुगास्तृप्यं० नागास्तृप्यं० सागरास्तृप्यं० पर्वतास्तृप्यं० सरितस्तृप्यं० मनुष्यास्तृप्यं० यक्षास्तृप्यं० रक्षांसितृप्यं० पिशाचास्तृप्यं० सुपर्णास्तृप्यं० भूतानितृप्यं० पशवस्तृप्यं० वनस्पतयस्तृप्यं० ओषधयस्तृप्यं० भूतग्रामश्चतुर्विधस्तृप्यतां० २९" याप्रमाणें सर्वत्र प्रणवासहित प्रथमा विभक्त्यंत नाम उच्चारून तर्पण करावें. नंतर, "सप्तऋषयः०" या मंत्रानें ऋषींचें आवाहन करून निवीती होत्साता प्रत्येक ऋषीस दोन दोन अंजलि असें तर्पण करावें. ऋषितर्पणाच्या देवता अशा—"सनकस्तृप्य०, सनंदनस्तृप्य०, सनातनस्तृप्यतु, कपिलस्तृप्यतु, आसुरीतृप्यतु, वोढुस्तृप्यतु, पंचशिखस्तृप्यतु", याप्रमाणें तर्पण करून प्राचीनावीती होत्साता, "उशंतस्त्वा०" ह्या मंत्रानें पितरांचें आवाहन करून "आयंतुनःपितरः०" ह्या मंत्राचा जप करून पितृतीर्थानें प्रत्येकास तीन तीन वेळ असें तर्पण करावें. त्याच्या देवता अशा—"कव्यवाडनलस्तृप्यतां, सोमस्तृप्य० यमस्तृप्य० अर्यमातृप्य० अग्निष्वात्ताःपितरस्तृप्यंतां, सोमपाःपितरस्तृप्यं० बर्हिषदस्तृप्यंतां, यमायनमस्तर्पयामि, धर्मराजायनमस्तर्पयामि, मृत्यवे० अंतकाय० वैवस्वताय० कालाय० सर्वभूतक्षयाय० औदुंबराय० दध्नाय० नीलाय० परमेष्ठिने० वृकोदरा० चित्राय० चित्रगुप्ताय० २१" याप्रमाणें तर्पण करावें. यमतर्पण करावयाचें तें वैकल्पिक आहे ह्मणजे करावें किंवा न करावें असें आहे. कारण सूत्रामध्यें "एके" असें वचन आहे, ह्मणजे कोणी आचार्य करावें असें ह्मणतात. ज्याचा पिता जिवंत आहे त्यानें अपसव्य करणें तें मणिबंधा (मनगटा) पर्यंतच करावें असा सर्वत्र निर्णय जाणावा. तदनंतर मृतपितृकानें पितृत्रयी, मातृत्रयी यांचें तर्पण करून, "उदीरता०" ह्या नऊ ऋचांनीं तर्पण करावें, व जेथें उदक असेल त्या स्थानीं अंजलीनें उदकधारा सोडावी. त्या ऋचा अशा—"उदीरता० १, अंगिरसोनपितरो०२, आयंतुनः० ३, ऊर्जवहंतिरमृतं० ४, पितृभ्यःस्वधानमः० ५, येचेहपि० ६, मधुवाता० ऋचा ३," ह्या नऊ ऋचांनीं प्रत्येक ऋचेस प्रत्येक वेळीं 'तृप्यध्वं' असें ह्मणून अंजलीनें त्रिवार उदकधारा पाडावी. तदनंतर, "नमोवः पितर०" हे आठ यजुर्मंत्र ह्मणून मातामहादित्रयी व एकोद्दिष्टगण यांचें तर्पण करावें. नंतर "देवागातुविद०" हा मंत्र ह्मणून विसर्जन करावें. स्नान केलेलें वस्त्र पिळून उदक देणें इत्यादिक शेषकर्म पूर्वी सांगितल्याप्रमाणें जाणावें. प्रातःकालीन होम दिल्यानंतर देवपूजा केली नसेल तर चौथ्या भागामध्यें ब्रह्मयज्ञ केल्यानंतर करावी.

---

अथपंचमभागकृत्यं वैश्वदेवःप्रकर्तव्यःपंचसूनापनुत्तये कंडणीपेषणीचुल्लीजलकुंभोपमार्जनीतिपंचहिंसास्थानानिपंचसूनाः वैश्वदेवस्यप्रातरेवप्रारंभोनत्वग्निहोत्रादिवत्सायंतेनप्रातःसायंवैश्वदेवेत्यादिरेवसंकल्पः पंचमहायज्ञाअहरहःकर्तव्याः तेचब्रह्मयज्ञदेवयज्ञभूतयज्ञपितृयज्ञमनुष्ययज्ञाख्याः तत्रब्रह्मयज्ञउक्तः बह्वृचादीनांवैश्वदेवोदेवयज्ञादियज्ञत्रयरूपः मनुष्ययज्ञस्तुमनुष्येभ्योन्नदानं गृहपक्वहविष्यान्नैस्तैलक्षारादिवर्जितैः जुहुयात्सर्पिषाभ्यक्तैर्गृह्येग्नौलौकिकेपिवा यस्मिन्नग्नौपचेदन्नंतस्मिन्होमोविधीयते वैश्वदेवांतर्गतपितृयज्ञेनैवनित्यश्राद्धसिद्धेर्नेनित्यश्राद्धार्थंविप्रभोजनं अनेनैवदर्शश्राद्धस्यापिसिद्ध्यादर्शश्राद्धमप्यशक्तैःसंवत्सर

मध्येसकृदेवकार्यमितिभट्टोजीये सूतकेपंचमहायज्ञानांलोपइत्युक्तं सचायंवैश्वदेवआत्मसंस्कारार्थोन्नसंस्कारार्थश्चतेनाविभक्तानांपाकैक्येपृथग्वैश्वदेवोन विभक्तानांतुपाकैक्येपिद्रविण्यांतरेणपृथगेव अविभक्तानांपाकभेदेपृथक्वैश्वदेवःकृताकृतइतिभट्टोजीये पाकासंभवेएकादश्यादौतंडुलैर्वापयोदधिघृतफलोदकादिभिर्वाकार्यः हस्तेनान्नादिभिःकुर्यादद्भिरंजलिना जले कोद्रवंचणकंमाषंमसूरंचकुलित्थकं क्षारंचलवणंसर्वंवैश्वदेवेविवर्जयेत् प्रवसतागृहेपुत्रलिंगादिद्वारावैश्वदेवःकारयितव्यः गृहेकर्त्रंतराभावेप्रवासेस्वयंकार्यः वैश्वदेवोबव्हृचैस्तैत्तिरीयैश्चदिवारात्रौचेतिद्विवारंकार्यः अशक्तैस्त्वेककालेएवद्विरावृत्त्यासहवाकार्यः बव्हृचतैत्तिरीययोर्लौकिकाग्नौपाकोवैश्वदेवश्चेतिप्रायेणाचारः ॥

## आतां यानंतर पांचव्या भागाचें कृत्य सांगतों.

गृहस्थाश्रमी जो त्यास सर्वदा पंचसूनासंबंधी दोष प्राप्त होतो त्याचा नाश होण्याकरितां प्रत्यहीं वैश्वदेव करावा. कंडणी ह्मणजे उखळ, मुसळ इत्यादिक कांडण्याचें साधन; पेषणी ह्मणजे जातें, पाटा, वरवंटा इत्यादिक पिष्ट करण्याचें साधन; चुल्ली ह्मणजे चूल, अहाळ इत्यादिक पाक करण्याचें साधन; जलकुंभा ह्मणजे घट, हांडा इत्यादि उदक ठेवण्याचें साधन; मार्जनी ह्मणजे केरसुणी, खराटा, कुंचा इत्यादि गृहशुद्धि करण्याचें साधन; याप्रमाणें हीं पांच साधनें कृमिकीटकादिकांचीं अलक्षित हिंसा होण्याचीं स्थलें त्या पंचसूना होत. वैश्वदेवाचा प्रारंभ प्रातःकालींच होतो, अग्निहोत्राप्रमाणें प्रारंभ सायंकालीं होत नाहीं, यास्तव संकल्प करणें तो, “ प्रातःसायंवैश्वदेव० ” इत्यादिकच करावा. पंचमहायज्ञ प्रतिदिवसीं करावे. ते हे,—ब्रह्मयज्ञ देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ, आणि मनुष्ययज्ञ याप्रमाणें पंचमहायज्ञ होत, त्यांमध्यें ब्रह्मयज्ञ सांगितला. ऋक्शाखी इत्यादिक जे त्यांचा वैश्वदेव देवयज्ञ, भूतयज्ञ, व पितृयज्ञ हे तीन यज्ञ मिळून होतो, व मनुष्यांला ( अतिथींला ) अन्न देणें हा मनुष्ययज्ञ होय. “ गृहामध्यें पक्क असून तैल, क्षार इत्यादिकांनीं विरहित, घृतयुक्त असीं जीं हविष्यान्नें त्यांचा होम गृह्याग्नीवर अथवा लौकिकाग्नीवर करावा. ज्या अग्नीवर पाक ( चरु ) केला असेल त्या अग्नीवर वैश्वदेव करावा. ” वैश्वदेवसंबंधी पितृयज्ञ केल्यानें नित्यश्राद्धाची सिद्धि होते. नित्यश्राद्धाकरितां ब्राह्मणभोजन करूं नये. वैश्वदेवसंबंधी जो पितृयज्ञ तेणेंकरूनच दर्शश्राद्धाचीहि सिद्धि होते त्याकरितां प्रतिमासीं दर्शश्राद्ध करण्यास ज्यांला शक्ति नसेल त्यांनीं वर्षामध्यें एकवारच करावें असें भट्टोजिदीक्षितांनीं केलेल्या आन्हिकांत सांगितलें आहे. आशौचांमध्यें पंचमहायज्ञ करूं नयेत असें सांगितलें आहे. वैश्वदेव हा आत्मसंस्कार ( शरीरसंस्कार ) व अन्नसंस्कार एतत्प्रयोजक आहे. अविभक्त बंधूंचा एक पाक असतां पृथक् वैश्वदेव करूं नये. विभक्त असून सर्वांचा पाक जरी एक असेल तथापि त्यांनीं दुसऱ्या हविष्यद्रव्यानें निराळाच वैश्वदेव करावा. बंधु विभक्त नसून पाकभेद असतां पृथक् वैश्वदेव कृताकृत असें भट्टोजिदीक्षितकृत आन्हिकांत सांगितलें आहे. पाकाचा असंभव असतां एकादशी इत्यादिकांचे ठायीं तांदूळ, दूध, दहीं, तूप, फळें अथवा उदक इत्यादिकांनीं करावा. “ अन्न इत्यादिक हवनीय द्रव्यांचा वैश्वदेव हस्तानें करावा, व उदकेंकरून अंजलीनें जलांत

करावा. कोद्रु धान्य, चणे, उडीद, मसुरा, व कुळीथ, सर्व क्षार, सर्व लवण हे पदार्थ वैश्वदेवाविषयीं वर्ज्य करावे. जो गृहस्थ प्रवासी असेल त्यानें स्वगृहीं पुत्र, ऋत्विक् इत्यादिकांकडून वैश्वदेव करवावा. स्वगृहीं वैश्वदेव करणारा दुसरा कोणी नसेल तर प्रवासामध्यें स्वतां करावा. ऋग्वेदी, व तैत्तिरीयशाखी यांनीं वैश्वदेव दिवसा व रात्रीं असा दोन वेळ करावा. दिवसा व रात्रीं असा दोन वेळ करण्यास ज्यांला शक्ति नसेल त्यांनीं एककालींच द्विरावृत्तीनें अथवा एकतंत्रानें करावा. ऋग्वेदी व तैत्तिरीयशाखी यांचा बहुधा आचार, पाक व वैश्वदेव हे लौकिकाग्नीवर करण्याचा आहे.

---

अथप्रात:सायंवैश्वदेवस्यसहकरणपक्षेतंत्रप्रयोग: तत्रवैष्णवैर्भगवतेषोडशोपचारेषुदीपांतानुपचारान्समर्प्यसर्वान्नात्पुरुषाहारपर्याप्तंनैवेद्यंसमर्प्यशेषान्नेनवैश्वदेव:कार्य: वैष्णवभिन्नैस्तुवैश्वदेवांतेतच्छेषेणनैवेद्य:कार्य: विष्णोर्निवेदितान्नेनयष्टव्यंदेवतांतरं पितृभ्यश्चापितद्देयंतदानंत्यायकल्पतइत्यादिवचनानांवैष्णवविषयकत्वस्यनिबंधकारैरुक्तत्वात् अत्रवैष्णवानारायणाष्टाक्षरादिवैष्णवमंत्रदीक्षोपदेशजपवंतोमुख्या: उपदेश:कलौयुगइतिस्मृत्योपदेशमात्रस्यापिदीक्षासमफलत्वात् गौणाश्चपारंपर्यागतारुणोदयविद्धैकादश्यनुपवासशुक्लकृष्णैकादश्युपवासादियत्किंचिद्धर्ममात्रपरामंत्रोपदेशादिरहिता: ननुपांचरात्राद्यागमोक्तदीक्षांप्राप्तोहिवैष्णवइत्युक्ते:किंचिद्धर्ममात्रानुष्ठानेनकथंवैष्णवत्वमितिचेत् गायत्र्यध्ययनादिक्षत्रियवैश्यसाधारणधर्मवतांयाजनाध्यापनप्रतिग्रहरूपासाधारणधर्मशून्यानांपित्रादिपरंपरया वैश्यादिवृत्तिपराणामप्यव्यभिचरितैकगोत्रत्वादियत्किंचिद्ब्राह्मणधर्ममात्रेणयथाब्राह्मणत्वं तदुचितसूतकाद्याचारश्चतथाकलियुगेकिंचिद्धर्मेणापिवैष्णवत्वंतदुचिताचारश्चयुज्यते क्षत्रियाणांहिपुरोहितभेदेनगोत्रभेदस्तेनयदुवंशेषुपरस्परंविवाहोनैवंब्राह्मणेष्वितिस्पष्टं एवंश्राद्धेपिनैवेद्यंसमर्प्यपितृभ्योन्ननिवेदनंज्ञेयं ममात्मान्नसंस्कारपंचसूनाजनितदोषपरिहारद्वाराश्रीपर० प्रातर्वैश्वदेवंसायंवैश्वदेवंचसहतंत्रेणकरिष्ये कुंडेस्थंडिलादौवापचनाग्निंव्याहृतिभि: पावकनामानंप्रतिष्ठाप्यचत्वारिशृंगेतिध्यात्वापरिसमुह्यपर्युक्ष्यविश्वानिनइत्यर्चनादिविधाय घृताक्तमन्नमग्नावधिश्रित्य प्रोक्ष्योद्वास्याग्ने: पश्चाभिधायत्रिधाविभज्यप्रथमभागंदेवेभ्योजुहुयात् तद्यथा हृदिसव्यंकरंनिधायोत्तानहस्तेनसूर्यायस्वाहासूर्यायेदंनमम प्रजापतये० सोमायवनस्पतये० अग्नीषोमाभ्यां० इंद्राग्निभ्यां० द्यावापृथिवीभ्यां० धन्वंतरये० इंद्राय० विश्वेभ्योदेवेभ्य:० ब्रह्मणे० इतिदशप्रातर्वैश्वदेवाहुतय: ॥

यानंतर प्रात:कालीन व सायंकालीन असे दोन वैश्वदेव बरोबर करणें ह्या पक्षाचा एकतंत्रप्रयोग सांगतों.—त्यामध्यें वैष्णवांनीं भगवंताला (श्रीविष्णूला) सोळा उपचारांमध्यें दीपापर्यंत उपचार अर्पण करून सर्व अन्नांतून, एका पुरुषाचे आहाराची पर्याप्ति होई इतका नैवेद्य भगवंताला अर्पण करून शेष राहिलेल्या अन्नानें वैश्वदेव करावा. जे वैष्णव नसतील त्यांनीं तर पूर्वी वैश्वदेव करून जो शेष पाक राहिला असेल तेणेंकरून नैवेद्य समर्पण करावा; कारण, “विष्णूस अर्पण केलेलें अन्न घेऊन त्या अन्नानें दुसऱ्या

देवतांचा यज्ञ ( वैश्वदेवादिक ) करावा, व पितरांलाहि तें अन्न द्यावें, ह्मणजे त्या अन्नानें श्राद्ध करावें, व तें कर्म अनंत फल देणारें होतें," इत्यादिक जीं वचनें तीं वैष्णवपर आहेत असें निबंधकारांनीं सांगितलें आहे. या वैष्णवत्वाविषयीं विचार केला असतां असें सिद्ध होतें कीं, नारायणाच्या अष्टाक्षर इत्यादिक वैष्णवमंत्रांचे दीक्षेचा उपदेश घेऊन जे जप करितात ते मुख्य वैष्णव होत; कारण, "कलियुगामध्यें उपदेश ग्रहण करावा," अशा स्मृतिवचनानें उपदेशमात्राचेंहि दीक्षेच्या फलासारिखें फल आहे. परंपरागत अरुणोदयानें विद्ध अशा एकादशीचें उपोषण न करितां शुक्ल कृष्ण एकादशीचें उपोषण करणें इत्यादिक कांहीं अल्पस्वल्प धर्म पाळणारे असून मंत्रोपदेशानें विरहित असे जे ते गौणवैष्णव होत. शंका—" पांचरात्र इत्यादिक जें वैष्णवशास्त्र त्यांमध्यें सांगितलेली दीक्षा ज्यानें ग्रहण केली असेल तो वैष्णव होय, " असें वचन आहे याकरितां अल्पस्वल्प वैष्णव धर्म आचरण केल्यानें कसा वैष्णवपणा येईल ? समाधान—गायत्रीचें अध्ययन करणें इत्यादिक जो, क्षत्रियवैश्यांचा साधारण धर्म तो मात्र पाळणारे; दुसऱ्याचे घरीं ऋत्विक्कर्म करणें, वेदाचें अध्ययन शिकविणें, व दान घेणें असा जो विशेष धर्म तेणेंकरून शून्य असणारे; बाप, आजा इत्यादिकांच्या परंपरेनें वैश्यादिकांची वृत्ति ( व्यापार ) करणारे असे ब्राह्मण असतांहि केवल त्याचें व आपलें गोत्र एक व जाति एक इत्यादिक अल्पस्वल्प ब्राह्मणधर्मानें जसे ते ब्राह्मण व ब्राह्मणाला योग्य असा आशौच धरणें इत्यादिक आचार जसा चालतो तसा कलियुगामध्यें अल्पस्वल्प वैष्णवधर्मानेंहि वैष्णवपणा व त्या वैष्णवांचा योग्य आचार हे मानले जातात. क्षत्रिय जे त्यांस वस्तुतः गोत्र नसून त्यांचे पुरोहिताचें जें गोत्र तें त्यांचें गोत्र अशा नियमानें क्षत्रियांचे पुरोहित अनेक झाल्यामुळें क्षत्रियांचीं गोत्रेंहि अनेक झालीं, आणि तेणेंकरून यदुवंशामध्यें परस्पर विवाह झाला असा ब्राह्मणांत होत नाहीं हें स्पष्ट आहे. याप्रमाणें श्राद्ध असेल तथापि नैवेद्य अर्पण करून पितरांला अन्न समर्पण करावें असें जाणावें. वैश्वदेवाचा संकल्प असा—" ममात्माऽन्नसंस्कारपंचसूनाजनितदोषपरिहारद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं प्रातर्वैश्वदेवं सायंवैश्वदेवंच सहतंत्रेण करिष्ये," याप्रमाणें संकल्प करून कुंडांत किंवा स्थंडिल इत्यादिकांत पचनाग्नीचें ( ज्याच्यावर पाक केला तो ) व्याहृतिमंत्रांनीं पावकनामा असें स्थापन करून, "चत्वारिशृंगा०" ह्या मंत्रानें अग्नीचें ध्यान करून परिसमुह्य ह्मणजे अग्नीच्या सभोंवतीं उदक सिंचन करून पर्युक्ष्य ह्मणजे सभोंवतीं उदक सिंचन करून "विश्वानिनो०" ह्या मंत्रांनीं पूजा, स्तुति करून घृतयुक्त अन्न अग्नीवर किंचित् शिजल्यासारखें करून तें उदकानें प्रोक्षित करून उत्तरेकडून आणून अग्नीच्या पश्चिमभागीं स्थापन करून त्याचे तीन भाग करून पहिल्या भागाचा देवांच्या उद्देशानें होम करावा. तो असा—डावा हस्त हृदयावर ठेवून उताण्या अशा उजव्या हातानें " सूर्याय स्वाहा सूर्यायेदंनमम, प्रजापतये० सोमायवनस्पतये० अग्नीषोमाभ्यां० इंद्राग्निभ्यां० द्यावापृथिवीभ्यां० धन्वंतरये० इंद्राय० विश्वेभ्योदेवेभ्यः० ब्रह्मणे०" याप्रमाणें होम करावा. ह्या दहा आहुतिं प्रातःकालीन वैश्वदेवाच्या होत.

---

अथसायंवैश्वदेवीयाः अग्नयेस्वाहेतिहुत्वाप्रजापतयइत्यादिपुनर्नवजुहुयात् एवंविंशत्या

हुतीर्हुत्वाप्रायश्चित्तार्थंव्यस्तसमस्तव्याहृतिभिर्हुत्वानहुत्वावापरिसमूहनपर्युक्षणेकुर्यात् ओंच मइत्युपतिष्ठेत् इतिदेवयज्ञः ॥

यानंतर सायंकालीन वैश्वदेवाच्या आहुति सांगतों.–" अग्नये स्वाहा " ही आहुति देऊन, " प्रजापतये स्वाहा " इत्यादिक पुनः नऊ आहुतींनीं होम करावा. याप्रमाणें वीस आहुतींनीं होम करावा. प्रायश्चित्तार्थ व्यस्तसमस्तव्याहृतिमंत्रांनीं होम करणें तो करावा किंवा न करावा. नंतर परिसमूहन, पर्युक्षण ( पूर्वी सांगितल्याप्रमाणें कुंडाच्या सभोंवार उदकसंस्कार ) हीं करावीं. व " ॐ चमे० " ह्या मंत्रानें उपस्थान करावें. याप्रमाणें देवयज्ञ सांगितला.

---

अथबलिहरणाख्योभूतयज्ञः द्वितीयभागाद्गृहीत्वाशुद्धभूमौसूर्यायस्वाहासूर्यायेदंनममेत्येवंदशाहुतीःप्राक्संस्थानिरंतराहुत्वामध्येंतरालंत्यक्त्वा अद्भ्यःस्वाहा ओषधिवनस्पतिभ्यः० गृहा० गृहदेवताभ्यः० वास्तुदेव० इतिप्राक्संस्थाहुत्वा अद्भ्यआहुतेःपश्चात्इंद्राय० तदुत्तरे इंद्रपुरुषेभ्यः० अंतरालस्यदक्षिणेयमाय० तदुत्तरेयमपुरुषेभ्यः० ब्रह्मणआहुतेःप्राक् वरुणाय० तदुत्तरेवरुणपुरुषेभ्यः० अंतरालस्योत्तरेसोमाय० तदुत्तरेसोमपुरुषेभ्यः० अंतराले ब्रह्मणे० ब्रह्मपुरुषे० विश्वेभ्योदेवेभ्यः० सर्वेभ्योभूतेभ्यः० दिवाचारिभ्यः० सोमपुरुषोत्तरे रक्षोभ्यः० एवमेवसूर्यस्थानेप्रथममग्नयेहुत्वाप्रजापतयइत्यादिपूर्ववत्सायंवैश्वदेवसंबंधिद्वितीयबलिहरणंकुर्यात् तत्रदिवाचारिभ्यइत्यस्यस्थानेनक्तंचारिभ्यः स्वाहेतिजुहुयात्इतिविशेषः इतिभूतयज्ञः ॥

यानंतर बलिहरणनामक भूतयज्ञ सांगतों.– अन्नाच्या दुसऱ्या भागांतून अन्न घेऊन शुद्ध भूमीवर " सूर्यायस्वाहा सूर्यायेदंनमम," याप्रमाणें दहा आहुति एकीच्या पुढें दुसरी याप्रमाणें मध्यें अंतर न ठेवितां पूर्वेकडे घालीत जाव्या. नंतर मध्यें कांहीं अंतर टाकून " अद्भ्यः स्वाहा, ओषधिवनस्पतिभ्यः०, गृहाय०, गृहदेवताभ्यः०, वास्तुदेवताभ्यः-स्वाहा," अशा पूर्वसंस्थ आहुति देऊन 'अद्भ्यः' ह्या आहुतीच्या पाठीमागें " इंद्राय० " ही आहुति द्यावी, तिच्या उत्तरेस "इंद्रपुरुषेभ्यः०" ही द्यावी. अंतरालाच्या दक्षिणेस "यमाय०" ही देऊन तिच्या उत्तरेस " यमपुरुषेभ्यः० " ही द्यावी. ' ब्रह्मणे० ' ह्या आहुतीच्या पूर्वेस "वरुणाय०" ही आहुति देऊन तिच्या उत्तरेस "वरुणपुरुषेभ्यः०" ही आहुति द्यावी. अंतरालाच्या उत्तरेस "सोमाय०" ही आहुति देऊन तिच्या उत्तरेस "सोमपुरुषेभ्यः०" ही द्यावी. मध्यभागीं " ब्रह्मणे०, ब्रह्मपुरुषेभ्यः०, विश्वेभ्योदेवेभ्यः०, सर्वेभ्योभूतेभ्यः०, दिवाचारिभ्यः०" याप्रमाणें आहुति देऊन 'सोमपुरुष०' असी जी आहुति तिच्या उत्तरेस " रक्षोभ्यः० " ही आहुति द्यावी. याप्रमाणेंच सूर्याच्या स्थानीं प्रथम "अग्नये०" ही आहुति देऊन "प्रजापतये०" इत्यादिक पूर्वी सांगितल्याप्रमाणें सायंकालीन वैश्वदेवसंबंधी दुसरें बलिहरण घालावें. त्या सायंकालच्या बलिहरणामध्यें ' दिवाचारिभ्यः० ' ह्या आहुतीच्या स्थानीं " नक्तंचारिभ्यः स्वाहा " ही आहुति द्यावी, हा विशेष जाणावा. याप्रमाणें भूतयज्ञ सांगितला.

---

प्राचीनावीती तृतीयभागादादायस्वधापितृभ्यः इतियमबलेर्दक्षिणतोदत्वापितृभ्यइदंनम मेतित्यक्त्वाद्वितीयबलेर्दक्षिणतःद्वितीयपितृयज्ञमेवकुर्यात् इतिपितृयज्ञः ॥

नंतर प्राचीनावीती होत्साता अन्नाच्या तिसऱ्या भागांतून अन्न घेऊन "स्वधापितृभ्यः" असी आहुति यमाच्या आहुतीच्या दक्षिणभागीं देऊन "पितृभ्यइदंनमम" असा त्याग ह्मणून दुसऱ्या आहुतीच्या दक्षिणप्रदेशीं दुसरा पितृयज्ञच करावा. याप्रमाणें पितृयज्ञ सांगितला.

---

अपरेचक्राकारंबलिमाहुः बलावनुद्धृतेनाद्यान्नोद्धरेच्चस्वयंबलिं ततोगृहांगणेभूमावपआ सिच्य ऐंद्रवारुणवायव्यांयाम्यांनैर्ऋतिकाश्चये तेकाकाःप्रतिगृण्हंतुभूम्यांपिंडंमयोज्झितं इतिपितृयज्ञशेषेणदत्वा वैवस्वतकुलेजातौद्वौश्यामशबलौशुनौ ताभ्यांपिंडोमयादत्तोरक्षेतांप थिमांसदा येभूताःप्रचरंति० इतिद्वयंभूतयज्ञशेषेणदद्यात् येभूताइतिमंत्रेतंत्रेणवैश्वदेवप्रयोगे दिवानक्तंबलिमितिपाठः अह्निरात्रौचपृथक्प्रयोगेदिवाबलिमिच्छंतोनक्तंबलिमिच्छंतइतिवि भागेनपाठः प्रक्षालितपाणिपादआचम्यगृहंप्रविश्यशांतापृथिवीत्यादिजपित्वाविष्णुंस्मृत्वाक मार्पयेत् ॥

कोणी दुसरे ग्रंथकार चक्राप्रमाणें ( वर्तुळ ) बलिहरण घालावें असें सांगतात. "बलिहरण काढून टाकल्यावांचून भोजन करूं नये, व आपण ( कर्त्यानें ) काढूं नये. तदनंतर घराच्या आंगणांत भूमीवर उदक सिंचन करून, "ऐंद्रवारुणवायव्यां याम्यां नैर्ऋतिकाश्च ये ॥ ते काकाः प्रतिगृह्णंतु भूम्यां पिंडं मयोज्झितं" हा मंत्र ह्मणून पितृयज्ञशेष जें अन्न असेल त्याचा पिंड देऊन "वैवस्वतकुले जातौ द्वौ श्यामशबलौ शुनौ ॥ ताभ्यां पिंडो मया दत्तो रक्षेतां पथि मां सदा ॥ ये भूताः प्रचरंति०" ह्या दोन मंत्रांनीं दोन पिंड भूतयज्ञशेषान्नाचे द्यावे. एकतंत्रानें वैश्वदेवाचा प्रयोग कर्तव्य असेल तर "ये भूताः०" ह्या मंत्राचे ठिकाणीं 'दिवानक्तं' असा पाठ जाणावा. दिवसा आणि रात्रौ निरनिराळा वैश्वदेवप्रयोग कर्तव्य असल्यास "दिवाबलिमिच्छंतो०, नक्तंबलिमिच्छंतो" अशा विभागेंकरून पाठ जाणावा. तदनंतर हस्तपाद प्रक्षालन केले होत्साता आचमन करून गृहांत जाऊन "शांतापृथिवी०" इत्यादि मंत्रांचा जप करून विष्णूचें स्मरण करून कर्म ईश्वराला समर्पण करावें.

---

अथमनुष्ययज्ञः अतिथिभोजनपर्याप्तंवाषोडशग्रासमितंवाग्रासचतुष्टयंवाग्रासमितंवान्नंस नकादिमनुष्येभ्योहंतइदंनममेतिदद्यात् बहुषुभिक्षुकेष्वागतेष्वशक्तेनत्रिभ्योग्रासत्रयंदेयं ॥

यानंतर मनुष्ययज्ञ सांगतों.—अतिथीचें भोजन होईल इतकें अन्न अथवा सोळा ग्रासपरिमित किंवा चार ग्रास अथवा एकग्रासपरिमित अन्न "सनकादिमनुष्येभ्योहंतइदंनमम," असें वाक्य ह्मणून द्यावें. बहुत भिक्षुक आले असतील आणि तितक्यांस अन्न देण्याचें सामर्थ्य नसेल तर तीन भिक्षेकऱ्यांला तीन ग्रास अन्न द्यावें.

---

अथतैत्तिरीयाणां श्राद्धदिनेभिन्नपाकेनादौवैश्वदेवःदेवयज्ञादिचतुष्टयंचभवति अपरेआ दौवैश्वदेवांतेतुपंचमहायज्ञाइत्याहुः याजुषाःसामगाःपूर्वंमध्येकुर्वंत्यथर्वणाः बह्वृचाःश्राद्धशे

षेणतत्राप्यादौतुसाग्निकाः स्वर्गपुष्ट्यर्थमात्मसंस्कारार्थंप्रातःसायंवैश्वदेवौतंत्रेणकरिष्ये औपासनाग्निंपचनाग्निंवाप्रतिष्ठापितमौपासनहोमवत्परिसमुह्यपरिषिच्यान्नमग्नावधिश्रित्य प्रोक्ष्योद्वास्याभिघार्याग्निंसंपूज्यान्नंत्रेधाविभज्य हस्तेनजुहुयात् अग्नयेस्वाहा विश्वेभ्योदेवेभ्यः० ध्रुवायभूमाय० ध्रुवक्षितये० अच्युतक्षितये० अग्नयेस्विष्टकृते० परिसमुह्यपर्युक्ष्य अग्नेः पश्चादेकत्रैवदेशेव्यजनाकारश्चक्राकारोवाबलिः तत्रदेवताः धर्मायस्वाहा धर्मायेदं० अधर्माय० अद्भ्यः० ओषधिवनस्पतिभ्यः० रक्षोदेवजनेभ्यः० गृह्याभ्यः० अवसानेभ्यः० अवसानपतिभ्यः० सर्वभूतेभ्यः० कामाय० अंतरिक्षाय० यदेजतिजगतियच्चचेष्टतिनाम्नोभागोयन्नाम्नेस्वाहा नाम्नइदं० केचिद्वायवइदमितित्यागमाहुः पृथिव्यैस्वाहा अंतरिक्षाय० दिवे० सूर्याय० चंद्रमसे० नक्षत्रेभ्यः० इंद्राय० बृहस्पतये० प्रजापतये० ब्रह्मणे० सर्वान्सकृत्परिषिच्य पृथक्पृथक्परिषेचनपक्षे द्वावेकंद्वेचचत्वारिप्रत्येकंत्रीणिचैवहि पृथिव्यादिदशस्वेकमतऊर्ध्वंपृथक्क्रमादितिज्ञेयं प्राचीनावीती तद्दक्षिणतः स्वधापितृभ्यःस्वाहा तदुत्तरतउपवीती नमोरुद्रायपशुपतयेस्वाहा पितृरुद्रबलीपृथक्परिषिंचेत् इतिवैश्वदेवः ॥

## आतां तैत्तिरीयशाखी यांचा वैश्वदेवप्रयोग सांगतों.

तैत्तिरीयशाखी यांनीं श्राद्धदिवसीं निराळा पाक करून श्राद्धाच्या पूर्वी वैश्वदेव व देवयज्ञादिक चार यज्ञ करावेत. दुसरे ग्रंथकार, पूर्वी वैश्वदेव केल्यानंतर पंचमहायज्ञ करावे असें ह्मणतात. "यजुःशाखी व सामवेदी यांनीं श्राद्धाच्या पूर्वी करावा, अथर्वणवेदी यांनीं श्राद्धाच्या मध्यें वैश्वदेव करावा, आणि ऋग्वेदी यांनीं श्राद्ध करून श्राद्धशेषान्नानें करावा. त्यामध्येंहि जे साग्निक ऋग्वेदी असतील त्यांनीं श्राद्धाच्या पूर्वी वैश्वदेव करावा." वैश्वदेवाचा संकल्प–"स्वर्गपुष्ट्यर्थं आत्मसंस्कारार्थं प्रातःसायंवैश्वदेवौ तंत्रेण करिष्ये," असा संकल्प करून औपासनाग्नि किंवा स्थापना केलेला पचनाग्नि (ज्याच्यावर पाक केला तो) याला औपासन होमाप्रमाणें परिसमूहन, परिषिंचन (उदकसंस्कार) करून अन्न अग्नीवर थोडें उष्ण करून त्यावर उदकानें प्रोक्षण करून अग्नीवरून उतरून त्यावर आज्य घालून तें अन्न अग्नीच्या पश्चिमेस ठेवावें. नंतर अग्नीची पूजा करून त्या अन्नाचे तीन विभाग करून प्रथम भागांतील अन्नाचा हस्तानें होम करावा. होमाचे मंत्र असे–"अग्नयेस्वाहा, विश्वेभ्योदेवेभ्यः० ध्रुवायभूमाय० ध्रुवक्षितये० अच्युतक्षितये० अग्नयेस्विष्टकृते०" याप्रमाणें होम करून परिसमूहन, पर्युक्षण करून अग्नीच्या पश्चिमेस एकाच प्रदेशीं विंजण्याच्या आकाराचें किंवा चक्राच्या आकाराचें बलिहरण घालावें. बलिहरणाच्या देवता अशा–"धर्मायस्वाहा धर्मायेदंनमम, अधर्माय० अद्भ्यः० ओषधिवनस्पतिभ्यः० रक्षोदेवजनेभ्यः० गृह्याभ्यः० अवसानेभ्यः० अवसानपतिभ्यः० सर्वभूतेभ्यः० कामाय० अंतरिक्षाय० यदेजतिजगतियच्चचेष्टतिनाम्नोभागोयन्नाम्नेस्वाहा नाम्नइदंन०" या स्थानीं कोणी ग्रंथकार "वायवइदं०" असा त्याग ह्मणावा असें सांगतात. "पृथिव्यै स्वा० अंतरिक्षाय० दिवे० सूर्याय० चंद्रमसे० नक्षत्रेभ्यः० इंद्राय० बृहस्पतये० प्रजापतये० ब्रह्मणे०" याप्रमाणें आहुति देऊन सर्व आहुतींस उदकानें एकवार सिंचन

करावें. निरनिराळें सिंचन करणें हा पक्ष गृहीत असेल तर 'धर्म व अधर्म' ह्या दोन आहुति मिळून एक वेळ सिंचन; 'अद्भ्यः' ह्या आहुतीस सिंचन; 'ओषधिवनस्पति व रक्षोदेवजन' ह्या दोन आहुति मिळून सिंचन; 'गृह्याभ्य० अवसान० अवसानपति० व सर्वभूत०' ह्या चार आहुति मिळून सिंचन; 'काम०, अंतरिक्ष०, यदेजति०,' ह्या तीन आहुतींस पृथक् पृथक् सिंचन; व पृथिवीपासून ब्रह्मापर्यंत, दहा आहुति मिळून एकवार सिंचन, याच्या पुढच्या ज्या आहुति त्यांला प्रत्येकीस निरनिराळें सिंचन या क्रमानें उदकाचें सिंचन जाणावें. "नंतर प्राचीनावीती होत्साता पृथिव्यादि दहा आहुतींच्या दक्षिणप्रदेशीं "स्वधापितृभ्यःस्वाहा" ही आहुति द्यावी, व हिच्या उत्तरप्रदेशीं उपवीती होत्साता "नमोरुद्राय पशुपतये स्वाहा" ही आहुति देऊन पितर व रुद्र यांच्या आहुतींवर निरनिराळें सिंचन करावें. याप्रमाणें वैश्वदेव सांगितला.

---

**अथदेवयज्ञादिचतुष्टयं देवयज्ञेनयक्ष्येइतिसंकल्प्याग्निंपरिषिच्यदेवेभ्यः स्वाहेत्यग्नौहुत्वोत्तरपरिषेकः प्राचीनावीती पितृयज्ञेनयक्ष्ये दक्षिणतोभूमौपितृभ्यः स्वधास्तुइतिदत्वात्यक्त्वा परिषिच्य यज्ञोपवीतीअपःस्पृष्ट्वा भूतयज्ञेनयक्ष्ये भूतेभ्योनमइतिभूमौदत्वापरिषिच्य निवीतीमनुष्ययज्ञेनयक्ष्ये उक्तप्रमाणमन्नंमनुष्येभ्योहंतेतिदद्यात् सर्वयज्ञेषुआद्यंतयोः क्रमेणविद्युदसिवृष्टिरसीतिमंत्रयोःपाठःप्रायेणैषां बलिशिष्टमन्नंयेभूताःप्रचरंतीतिगृहांगणेगत्वाकाशेउत्क्षिपेत् ततोयथाचारंश्ववायसादिबलिः ॥**

आतां यानंतर देवयज्ञादिक चार यज्ञ सांगतों.– "देवयज्ञेनयक्ष्ये," असा संकल्प करून अग्नीच्या सभोंवार उदकाचें सिंचन करून "देवेभ्यःस्वाहा," ह्या मंत्रानें अग्नीमध्यें आहुति देऊन उत्तर परिषेक करावा. नंतर प्राचीनावीती होत्साता "पितृयज्ञेनयक्ष्ये" असा संकल्प करून दक्षिणप्रदेशीं भूमीवर "पितृभ्यःस्वधास्तु" ह्या मंत्रानें आहुति देऊन त्याग उच्चारून उदकाचा परिषेक करावा. नंतर यज्ञोपवीती होत्साता उदकाला स्पर्श करून "भूतयज्ञेनयक्ष्ये" असा संकल्प करावा. नंतर "भूतेभ्यो नमः" ह्या मंत्रानें भूमीवर आहुति देऊन उदकाचा परिषेक करावा. नंतर निवीती होत्साता "मनुष्ययज्ञेन यक्ष्ये" असा संकल्प करून उक्तप्रमाण ( पूर्वी सांगितलें आहे प्रमाण ज्याचें असें ) अन्न "मनुष्येभ्योहंत" ह्या मंत्रानें द्यावें. तैत्तिरीयशाखी हे सर्व यज्ञामध्यें पूर्वी व शेवटीं क्रमेंकरून "विद्युदसि० आणि वृष्टिरसि०" ह्या मंत्रांचा पाठ बहुधा करितात. बलिहरण घालून शेष अन्न जें असेल तें घेऊन घराच्या आंगण्यामध्यें जाऊन "ये भूताः प्रचरंति दिवा०" हा मंत्र ह्मणून तें वर आकाशांत उडवावें. तदनंतर जसा आचार असेल त्याप्रमाणें श्व (कुत्रे), वायस ( कावळे ) यांना बलि द्यावा.

---

**अथकातीयानां तत्रसाग्निकानामेकपाकेनैवश्राद्धदिनेआदौवैश्वदेवः अन्येषामंते आवसथ्योल्मुकंमहानसेकृत्वातत्रपाकंविधायमहानसस्थांगारान्गृह्याग्नौनिधाय पाकादन्नंघृताक्तमादायपूर्ववदात्मा०र्थे वैश्वदेवाख्यंकर्मकरिष्यइतिसंकल्पः अथवादेवभूतपितृमनुष्यान्वैश्वदेवान्नेनयक्ष्ये गृह्याग्निंमणिकोदकेनपर्युक्ष्यहस्तेनाग्नौजुहुयात् ब्रह्मणेस्वाहाइदंब्रह्मणेनमम**

**एवमग्रेपि प्रजापतये० गृह्याभ्यः० कश्यपाय० अनुमतये० इतिदेवयज्ञः ततोमणिकसमीपेबलित्रयमुदक्संस्थं पर्जन्यायनमःस्वाहाइदंपर्जन्यायनमम अद्भ्योन० पृथिव्यै० अथद्वार्यशाखयोःप्राक्संस्थंबलिद्वयं धात्रे० विधात्रे० उदकेनचतुरस्रंकृत्वातत्रपूर्वेवायवे० दक्षिणेवायवे० पश्चिमेवायवे० उत्तरेवायवे० प्रागादिषुवायुबलेःप्रागुदग्वाप्राच्यैदिशे० दक्षिणस्यैदि० प्रतीच्यैदि० उदीच्यैदि० मध्येप्राक्संस्थं ब्रह्मणे० अंतरिक्षाय० सूर्याय० एषामुत्तरेविश्वेभ्योदेवेभ्यो० विश्वेभ्योभूतेभ्यो० अनयोरुत्तरेउषसे० भूतानांचपतये० इतिभूतयज्ञः प्राचीनावीतीब्रह्मादिबलित्रयस्यदक्षिणेपितृतीर्थेन पितृभ्यःस्वधानमइदंपितृभ्योनममेतिदद्यात् इतिपितृयज्ञः ॥**

## आतां यानंतर कात्यायनशाखी यांचा वैश्वदेवप्रयोग सांगतों.

कात्यायनशाखी जे त्यांमध्यें जे साग्निक असतील त्यांनीं एका पाकानें ( श्राद्धपाकानेंच ), श्राद्धदिवसीं श्राद्धाच्या पूर्वीं वैश्वदेव करावा. जे साग्निक नसतील त्यांनीं श्राद्धानंतर त्याच पाकानें वैश्वदेव करावा. गृह्याग्नींतून ज्वालायुक्त कोलीत घेऊन स्वयंपाकघरांत तो प्रदीप्त करून त्याच्यावर सर्व पाक करून स्वयंपाकघरांतील अग्नि घेऊन तो गृह्याग्नींत मिळवावा. नंतर सिद्ध केलेल्या पाकांतून घृतयुक्त अन्न ( चरु ) घेऊन पूर्वीप्रमाणें, **“आत्मान्नसंस्कारार्थं वैश्वदेवाख्यं कर्म करिष्ये”** असा संकल्प करावा. अथवा **“देवभूतपितृमनुष्यान् वैश्वदेवान्नेन यक्ष्ये”** असा संकल्प करावा. नंतर कलशोदकानें गृह्याग्नीच्या आसमंतात् प्रोक्षण करून हस्तेंकरून अग्नींत होम करावा. त्याच्या देवता अशा— **“ब्रह्मणे स्वाहा इदंब्रह्मणेनमम”** याप्रमाणें पुढेंहि जाणावें. **“प्रजापतये गृह्याभ्यः० कश्यपाय० अनुमतये०”** याप्रमाणें देवयज्ञ सांगितला. तदनंतर कलशाजवळ उत्तरेकडे जाणाऱ्या अशा तीन आहुति एकापुढें एक याप्रमाणें द्याव्या. त्या अशा— **“पर्जन्याय नमः स्वाहा इदं पर्जन्याय न मम, अद्भ्यो न० पृथिव्यै०.”** यानंतर द्वारशाखांचे ठिकाणीं पूर्वसंस्थ दोन आहुति द्याव्या. त्या अशा— **“धात्रे० विधात्रे०.”** नंतर उदकानें चतुष्कोण मंडल करून त्या मंडलावर पूर्वप्रदेशीं **“वायवे०,”** दक्षिणप्रदेशीं **“वायवे०,”** पश्चिमप्रदेशीं **“वायवे०”** उत्तरप्रदेशीं **“वायवे०”** याप्रमाणें आहुति देऊन पुनः पूर्वादि दिशांपासून, वायुबलीच्या पूर्वेस अथवा उत्तरेस **“प्राच्यै दिशे०, दक्षिणस्यै दिशे०, प्रतीच्यै दिशे०, उदीच्यै दिशे०”** ह्या आहुति द्याव्या. नंतर मध्यभागीं पूर्वसंस्थ **“ब्रह्मणे०, अंतरिक्षाय०, सूर्याय०”** ह्या आहुति द्याव्या, व यांच्या उत्तरेस **“विश्वेभ्यो देवेभ्यः० विश्वेभ्यो भूतेभ्यो०”** अशा द्याव्या. यांच्या उत्तरेस, **“उषसे० भूतानां च पतये०”** ह्या आहुति द्याव्या. याप्रमाणें भूतयज्ञ सांगितला. नंतर प्राचीनावीती होत्साता ब्रह्मादि तीन आहुतींच्या दक्षिणप्रदेशीं पितृतीर्थानें, **“पितृभ्यः स्वधा नम इदं पितृभ्यो नमम”**असा मंत्र ह्मणून आहुति द्यावी. याप्रमाणें पितृयज्ञ सांगितला.

---

**पात्रंप्रक्षाल्यसव्येनब्रह्मादिबलितोवायव्यांयक्ष्मैतत्तेनिर्णेजनमितितज्जलंनिनयेत् पूर्ववन्मनुष्ययज्ञः निरग्निकस्तु लौकिकाग्निमाहृत्यपृष्ठोदिवीतिप्रतिष्ठाप्यतत्सवितु० तात्सवितु० विश्वानिदेव० इतित्रिभिःसावित्रैःप्रज्वाल्यतत्रनित्यौपासनहोमंकृत्वापाकंपचेद्वैश्वदेवंचकुर्यात्**

दितिगदाधरः अत्राप्यशक्तौबव्हृचाद्युक्तरीत्यापचनाग्निंप्रतिष्ठाप्यध्यात्वासंपूज्यतत्रपूर्वोक्तरीत्यावैश्वदेवस्तत्रअग्नयेस्विष्टकृतेस्वाहेतिपंचाहुतीनामुत्तरंहोमःसर्वत्रनिरग्नेरितिविशेषः शेषंप्राग्वत् कात्यायनानांदिवैवैकोवैश्वदेवोनद्वितीयोरात्रौ सामगाथर्वणैरपिस्वगृह्योक्तरीत्यापंचमहायज्ञाः कार्याः स्वगृह्यानुपलंभेबव्हृचोक्तरीत्योपनयनादिसंस्काराःपंचमहायज्ञादयश्चकार्याः।

चरूचें पात्र प्रक्षालन करून डाव्या बाजूनें ब्रह्मादिक आहुतींच्या वायव्यप्रदेशीं "यक्ष्मैतत्ते निर्णेजन०" ह्या मंत्रानें तें उदक द्यावें. नंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें मनुष्ययज्ञ करावा. निरग्निक असेल तर, लौकिकाग्नि आणून "पृष्टोदिवि०" ह्या मंत्रानें त्या अग्नीची स्थापना करून "तत्सवि०, ता९सवितु०, विश्वानिदेव०" ह्या तीन सावित्र (सवितृदेवताक) मंत्रांनीं प्रदीप्त करून त्या अग्नीवर नित्याचा औपासनहोम करून त्या अग्नीवर पाक करून वैश्वदेव करावा, असें गदाधर सांगतो. याविषयींहि असामर्थ्य असेल तर ऋग्वेदी इत्यादिकांला जी रीति सांगितली त्या रीतीनें पचनाग्नि (पाक ज्याच्यावर केला तो) स्थापून ध्यान करून पूजा करावी. नंतर त्या अग्नीवर पूर्वी सांगितल्या रीतीनें वैश्वदेव करावा. त्यामध्यें पहिल्या पांच आहुति दिल्यानंतर, "अग्नयेस्विष्टकृतेस्वाहा०" ह्या मंत्रानें आहुति द्यावी, याप्रमाणें निरग्निकाचा सर्वत्र विशेष जाणावा. शेष कर्म पूर्वीप्रमाणें करावें. कात्यायनशाखी यांनीं दिवसासच एक वैश्वदेव करावा, रात्रौ दुसरा करूं नये. सामवेदी व अथर्वणवेदी यांनींहि आपापल्या गृह्यसूत्रांत सांगितल्या रीतीनें पंचमहायज्ञ करावे. त्यांना आपापलें गृह्यसूत्र न मिळेल तर ऋग्वेदी यांना सांगितल्या रीतीनें त्यांनीं उपनयनादिक संस्कार व पंचमहायज्ञ करावेत.

---

**शाखांतरमतंसम्यगनालोच्यस्वधाष्ट्यर्तः शाखांतरान्हिकंप्रोक्तंज्ञात्वाशोध्यंस्वशाखिभिः इति ॥**

"अन्यशाखांचीं मतें यथार्थ पाहिल्यावांचून आपल्या धैर्यानें यथामति अन्य शाखांचें आन्हिकप्रकरण मी सांगितलें आहे, असें जाणून स्वशाखी यांनीं शोधून पाहावें."

---

**इक्षूनपःफलंमूलंतांबूलंपयऔषधं भक्षयित्वापिकर्तव्याःस्नानदानादिकाःक्रियाः पंचमहायज्ञेष्वन्यतमस्यलोपेउपवासः धनिकस्यातुरस्यचप्रतियज्ञंकृच्छ्रार्धं अन्येत्वेकाहलोपेमनस्वत्याहुतिर्द्व्यहत्र्यहलोपेतिसृभिस्तंतुमतीभिर्होमोवारुणीनांचतसृणांजपोद्वादशाहलोपेतंतुमतीस्थालीपाकोवारुणीभिराज्यहोमश्चेत्याहुः ॥**

"ऊंस, उदक, फल, मूल, तांबूल, दूध आणि औषध हीं भक्षण करूनहि स्नान, दान इत्यादिक कर्में करावीं." पंचमहायज्ञांतून एकाद्या यज्ञाचा लोप होईल तर उपोषण करावें. धनवान् व रोगी यांनीं प्रत्येक यज्ञाच्या लोपास अर्धकृच्छ्र प्रायश्चित्त करावें. दुसरे ग्रंथकार तर, एक दिवस पंचमहायज्ञांचा लोप झाला असतां "मनस्वति०" ह्या आहुतीचा होम, दोन दिवस, तीन दिवस लोप झाला असेल तर तीन "तंतुमती०" ह्या आहुतींनीं होम, आणि चार वारुणी ऋचांचा जप करावा; बारा दिवसपर्यंत लोप होईल तर, तंतुमतीस्थालीपाक, व वारुणी ऋचांनीं आज्यहोम करावा असें ह्मणतात.

---

अथसर्वसाधारणोभोजनादिविधिः हैमेराजतेपात्रेआम्रादिपत्रेवाभोजनंशस्तं एकएवतु भुंजीतकांस्यपात्रेनान्योच्छिष्टे तांबूलाभ्यंजनंचैवकांस्यपात्रेचभोजनं यतिश्चब्रह्मचारीचविधवाचविवर्जयेत् पलाशपर्णेषुयत्यादेःप्रशस्तं गृहिणस्तुचांद्रायणं इदंवल्लीपलाशविषयमितिस्मृत्यर्थसारे कदलीकुटजमधुजंबूपनसाम्रचंपकोदुंबरपत्राणिशस्तानि अर्काश्वत्थवटादिपत्राणि निषिद्धानि ॥

## आतां सर्वांला साधारणपणानें भोजनादिकांचा विधि सांगतों.

सोन्याचे पात्रांत, रुप्याचे पात्रांत अथवा आंबा इत्यादिक वृक्षांच्या पानांवर भोजन करावें तें प्रशस्त होय. कांस्यपात्रांत भोजन करणें असेल तर ज्या कांस्यपात्रांत आपण भोजन करितों त्यांत इतरानें करूं नये, दुसऱ्यानें भोजन केलेल्या कांस्यपात्रांत उच्छिष्ट झाल्यामुळें भोजन करूं नये. "संन्यासी, ब्रह्मचारी आणि विधवा यांनीं तांबूल, तैलाभ्यंग, कांस्यपात्रांत भोजन हीं विशेषेंकरून वर्ज्य करावीं." संन्यासी इत्यादिकांनीं पळसाच्या पानांवर भोजन करावें तें प्रशस्त होय. गृहस्थाश्रमी यानें पळसाच्या पानावर भोजन करूं नये; केलें असतां चांद्रायण करावें. हें चांद्रायण, वल्लीरूप जो पळसाचा वृक्ष तद्विषयक होय असें स्मृत्यर्थसारांत सांगितलें आहे. कदली, कुडा, मोहाचा वृक्ष, जांबूळ, फणस, आंबा, चांफा आणि उंबर यांचीं पानें भोजनाला प्रशस्त होत. रुई, पिंपळ, वड इत्यादिकांचीं पानें निषिद्ध होत.

---

चतुरस्रमंडलेप्रक्षालितपात्रंनिधायपंचयज्ञावशिष्टंघृतादियुतंपरिविष्टमन्नमस्माकं नित्यमस्त्वेतदितिवदन्नत्वाग्रंथिरहितपवित्रयुतदक्षिणपाणिः पादाभ्यांपादेनवाभुवंस्पृशन् व्याहृतिभिर्गायत्र्याचाभिमंत्र्यसत्यंत्वर्तेनपरिषिंचामिइतिदिवा ऋतंत्वासत्येनपरिषिंचामीतिरात्रौपरिषेचनंकृत्वा अंतश्चरतिभूतेषुगुहायांविश्वतोमुखः त्वंयज्ञस्त्वंवषट्कारस्त्वंविष्णुःपुरुषःपरः पात्राद्दक्षिणेभूमौ भूपतयेनमः भुवनपतयेनमः भूतानांपतये० इतित्रीन्बलीन्दद्यात् यद्वाचित्राय चित्रगुप्ताययमाययमधर्मायसर्वभूतेभ्यइतिवा व्यस्तसमस्तव्याहृतिभिर्वाचत्वारः धर्मराजाय चित्रगुप्तायेतिद्वौवा भूपत्यादित्रययुतावेताविति पंचवादेयाः हस्तपादमुखार्द्रः आपोशनार्थं जलमादाय अन्नंब्रह्मरसोविष्णु० अहंवैश्वानरोभूत्वेत्यर्थंध्यात्वावामकरेणपात्रंधृत्वाअमृतोपस्तरणमसीत्यपःप्राश्यमौनी ओंप्राणायस्वाहा ओंअपानायस्वाहा ओंव्यानाय० ओंउदानाय० ओंसमानाय० इतिसघृताःसक्षीरावापंचाहुतीःसर्वांगुलिभिःसर्वग्रासंग्रसन्मुखेजुहुयात् ब्रह्मणेस्वाहेतिषष्ठींक्वचित् प्राणाहुतिपर्यंतंपात्रालंभोमौनंचनियतमग्रेऐच्छिकंद्वयं भोजनंप्राङ्मुखंप्रत्यङ्मुखंवाशस्तं दक्षिणामुखंयशःफलंकाम्यं उदङ्मुखमधमं विदिङ्मुखंनिषिद्धं कृत्स्नंग्रासंग्रसन्द्वात्रिंशदादिनियतग्रासमनियतग्रासंवाभुक्त्वा अमृतापिधानमसीतिगंडूषार्धंपीत्वार्धंभूमौनिनीय पवित्रंत्यक्त्वा मुखहस्तोच्छिष्टंसम्यक्प्रक्षालयेत् तर्जन्यामुखंनशोधयेत् किंचित्गंडूषोत्तरंहस्तप्रक्षालनंषोडशगंडूषांतेद्विराचामेत् भोजनगृहेचनाचामेत् अनाचांतोमूत्रपुरीषौनकुर्यात् उत्तरापोशनमकृत्वोत्थानेस्नात्वाशुद्धिः हस्तौसंमृज्यप्रस्राव्यांगु

**छेननेत्रयोर्निर्पिव्येष्टदेवतांस्मरेत् नांजलिनापिबेत् पालाशंदग्धमयोबद्धंचपीठंवर्जयेत् नशिशुभिःसहभुंजीत भार्ययासहविवाहवर्ज्यंनभुंजीत बालवृद्धेभ्योऽप्रमदत्वानभुंजीत नप्रौढपादोनासनारूढपादोनप्रसारितपादोनविदिक्तुंडोनदुष्टैकपंक्तौ नशून्याग्निपाकगृहेनदेवालयेभुंजीत नसंध्ययोर्नमहानिशायांनयज्ञोपवीतहीनोनवामहस्तेननशूद्रशेषंभुंजीत आदौमधुरंमध्येलवणाम्लमंतेतिक्तादिपूर्वंद्रवंमध्येकठिनमतेद्रवं अष्टौग्रासायतेःषोडशद्वात्रिंशद्वागृहिणोवनस्थस्यषोडश यथेष्टंब्रह्मचारिणः सर्वसशेषमश्नीयान्निःशेषंघृतपायसं क्षीरंदधिमधुभुंजीत दिवारात्रौचेतिद्विवारमेवनांतराभोजनं ॥**

चतुष्कोण मंडल करून त्या मंडलावर धुतलेलें पात्र ठेवून ज्या अन्नानें पंचमहायज्ञ केले असें शेष, घृत इत्यादिकानें युक्त असून पात्रावर वाढलेलें हें अन्न निरंतर आह्मांस प्राप्त होऊ असें बोलत होत्साता नमस्कार करून उजव्या हातांत ग्रंथिविरहित दर्भपवित्र धारण केलेला असून उभयचरणांनीं किंवा एका चरणानें भूमीला स्पर्श करीत होत्साता व्याहृति व गायत्री या मंत्रांनीं पात्रावरील अन्न अभिमंत्रण करून "**सत्यंत्वर्तेनपरिषिंचामि,**" ह्या मंत्रानें दिवसा व "**ऋतंत्वासत्येनपरिषिंचामि,**" ह्या मंत्रानें रात्रौ पात्राच्या सभोंवार उदकाचें सिंचन करावें. नंतर "**अंतश्चरतिभूतेषु गुहायांविश्वतोमुखः ॥ त्वंयज्ञस्त्वंवषट्कारस्त्वंविष्णुःपुरुषःपरः**" ह्या मंत्रानें प्रार्थना करून पात्राच्या उजव्या बाजूस भूमीवर "**भूपतयेनमः, भुवनपतयेनमः, भूतानांपतयेनमः**" अशा तीन मंत्रांनीं तीन आहुती द्याव्या. अथवा "**चित्राय०, चित्रगुप्ताय०, यमाय०, यमधर्माय०, सर्वभूतेभ्यः०**" अशा मंत्रांनीं पांच आहुति द्याव्या. अथवा व्यस्तसमस्तव्याहृतिमंत्रांनीं चार द्याव्या. किंवा "**धर्मराजाय०, चित्रगुप्ताय०**" अशा दोन द्याव्या. अथवा भूपत्यादिक तीन आहुति व धर्मराज, चित्रगुप्त ह्या दोन आहुति मिळून पांच द्याव्या. हस्त, पाद आणि मुख हीं ज्याचीं आर्द्र ( भिजलेलीं ) आहेत असा होत्साता आपोशनाकरितां उदक हस्तांत घेऊन "**अन्नंब्रह्मरसोविष्णुर्भोक्ता०, अहंवैश्वानरोभूत्वा०**" हे मंत्र ह्मणून यांचा अर्थ[1] मनांत आणावा. डाव्या हस्तानें पात्र धरून "**अमृतोपस्तरणमसि**" ह्या मंत्रानें हातांत घेतलेलें उदक प्राशन करावें. नंतर मौनी होत्साता "**ॐप्राणायस्वा०, ॐअपानायस्वा०, ॐव्यानायस्वा०, ॐउदानायस्वा०, ॐसमानायस्वा०**" हे मंत्र ह्मणून प्रत्येक मंत्रानें एकेक अशा घृतयुक्त किंवा दुग्धयुक्त पांच आहुति सर्व अंगुलींनीं, सर्व ग्रास भक्षण करीत होत्साता मुखामध्यें हवन कराव्या. "**ब्रह्मणे स्वा०**" ही सहावी आहुति क्वचित् ग्रंथांत उक्त आहे. पात्र हातानें धरणें व मौन हीं प्राणाहुतीपर्यंत नित्य आहेत, प्राणाहुतीनंतर हीं दोन ऐच्छिक आहेत. भोजन करणें तें पूर्वाभिमुख किंवा पश्चिमाभिमुख करावें तें प्रशस्त होय. दक्षिणाभिमुख भोजन करावें तें काम्य होय, त्याचें फल यश. उत्तरदिशेस मुख करून भोजन करणें तें

---

१ तो अर्थ असा–" अन्न हें ब्रह्मरस होय, मी भोजन करणारा हा साक्षात् विष्णु होय, ह्या अन्नेंकरून द्योतमान्, महेश्वर, षड्गुणैश्वर्यसंपन्न, सर्वांचा नियंता असा परमात्मा सदाशिव संतुष्ट असो. मी जठराग्नि होऊन प्राण्यांच्या देहाचा आश्रय करीत होत्साता प्राणवायु व अपानवायु यांहींकरून प्रदीप्त होऊन चार प्रकारच्या ( लेह्य, चोष्य, खाद्य, पेय ) अन्नांचा पाक करितों."

निंद्य होय. विदिशांस मुख करून भोजन करणें तें निषिद्ध होय. अन्नाचा सर्व ग्रास भक्षण करीत होत्साता बत्तीस इत्यादिक ग्रासपरिमित किंवा यथेच्छग्रास भोजन करून हातावर उदक घेऊन "अमृतापिधानमसि" ह्या मंत्रानें तें उदक अर्धें प्राशन करून शेष भूमीवर टाकावें. नंतर हातांतील पवित्रक टाकून मुख व हात चांगले प्रक्षालन करावे. तर्जनीनें मुख प्रक्षालन करूं नये. पूर्वी कांहीं चूळ भरून टाकून नंतर हात धुवावे. सोळा चूळी भरून टाकल्यानंतर दोन वेळ आचमन करावें. भोजनगृहांत आचमन करूं नये. आचमन केल्यावांचून मूत्रपुरीष करूं नयेत. उत्तरापोशन घेतल्यावांचून उठलें असतां स्नान केल्यावांचून शुद्धि होत नाहीं. हातावर उदक घेऊन तें खालीं पाघळवून त्या उदकेंकरून अंगुष्ठानें नेत्रांवर सिंचन करून इष्टदेवतेचें स्मरण करावें. उदक अंजलीनें प्राशन करूं नये. पळसाचा, दग्ध झालेला, लोखंडाचे खिळ्यांनीं युक्त असा पाट बसायाला घेऊं नये. लहान मुलें जवळ घेऊन त्यांच्या बरोबर भोजन करूं नये. विवाहावांचून स्त्रियेबरोबर भोजन करूं नये. बाल, वृद्ध, यांला भोजन घातल्यावांचून भोजन करूं नये. मांडीवर पाय चढवून, पाटावर पाय ठेवून अथवा पाय पसरून, विदिशेला मुख करून भोजन करूं नये. दुष्टयुक्त पंक्तींत भोजन करूं नये. अग्नि व पाकनिष्पत्ति यांहींकरून हीन अशा गृहीं, व देवालयीं भोजन करूं नये. दिवस व रात्रि यांचे संध्यासमय, मध्यरात्र या समयीं भोजन करूं नये. यज्ञोपवीतविरहित भोजन करूं नये. डाव्या हस्तानें भोजन करूं नये. शूद्र भोजन करून शेष राहिलेलें अन्न भक्षण करूं नये. भोजन करणें तें पूर्वी मधुर पदार्थ, मध्यें खारट व आंबट पदार्थ, शेवटीं कटु इत्यादिक पदार्थ अशा रीतीनें भोजन करावें. पूर्वी पातळ पदार्थ, मध्यें कठिण पदार्थ, शेवटीं पातळ पदार्थ भक्षण करावे. संन्यासी यानें आठ ग्रास; गृहस्थाश्रमी यानें सोळा किंवा बत्तीस ग्रास; वानप्रस्थानें सोळा ग्रास; व ब्रह्मचारी यानें यथेच्छ, याप्रमाणें भोजन करावें. घृत व पायस हे पदार्थ निःशेष ( शेष ठेवल्यावांचून ) भक्षण करावे. इतर पदार्थ पात्रावर थोडथोडे शेष राखून भक्षण करावे. भोजनांत दूध, दहीं व मध हे पदार्थ भक्षण करावे. दिवसा व रात्रीं मिळून दोन वेळच भोजन करावें, मध्यें आणखीं तिसऱ्यानें भोजन करूं नये.

---

अर्कपर्वद्वयेरात्रौचतुर्दश्यष्टमीदिवा एकादश्यामहोरात्रंभुक्त्वाचांद्रायणंचरेत् यस्तुपाणितलेभुंक्तेयश्चफूत्कारसंयुतं प्रसृतांगुलिभिर्यश्चतस्यगोमांसवत्तत् नाजीर्णेभोजनंकुर्यात्कुर्यान्नातिबुभुक्षितः नार्द्रवासानार्द्रशिरानपादारोपितेकरे ग्रासशेषंचनाश्नीयात्पीतशेषंपिबेन्नच शाकमूलफलादीनिदंतच्छेदैर्नभक्षयेत् नोच्छिष्टोघृतमादद्यान्नपदाभाजनंस्पृशेत् पिबतोयत्पतेत्तोयंभाजनेमुखनिःसृतं अभोज्यंतत् पीतावशिष्टतोयपानेचांद्रायणं हस्तनखस्पृष्टजलपानेवामहस्तोद्धृतजलपानेचसुरापानसमं एकपंक्त्युपविष्टानांविप्राणांभुंजानानामेकस्मिन्नप्युत्थितेआचांतेवान्यैर्नभोज्यं अत्रोत्थितस्यभोक्तुश्चदोषः गुरोर्नदोषः लवणंव्यंजनंचैवघृतंतैलंतथैवच लेह्यंपेयंचविविधंहस्तदत्तंनभक्षयेत् ताम्रेगव्यंकांस्येनारीकेलेक्षुरसौसगुडंदधिसगुडमार्द्रकंचमद्यसमं सैंधवसामुद्रभिन्नप्रत्यक्षलवणभक्षणंमृद्भक्षणंचगोमांससमं उदक्यामपिचां

डालंश्वानंकुक्कुटमेवच भुंजानोयदिपश्येत्तुतदन्नंतुपरित्यजेत् भुंजानस्यगुदस्रावेउपवासःपंचगव्यंच आपोशनोत्तरंप्राणाहुतेःप्राक्तत्स्रावेस्नानंषट्प्राणायामाः भुंजानस्याशौचप्राप्तौग्रासंत्यक्त्वास्नानं ग्रासाशनेउपवासः सर्वाशनेत्रिरात्रं विष्ठादिस्पर्शेस्नानंप्राणायामत्रयंच चांडालपतितोदक्यावाक्यंश्रुत्वाभोजनेएकोपवासःस्नात्वाशतगायत्रीजपोवा कलहघरटोलूखलमुसलानांयावच्छब्दस्तावदभोजनं अप्येकपंक्त्यानाश्नीयाद्ब्राह्मणैःस्वजनैरपि कोपिजानातिकिंकस्यप्रच्छन्नंपातकंभवेत् ततोग्निनाभस्मनाचस्तंभेनसलिलेनच द्वारेणैवचमार्गेणपंक्तिभेदंचरेद्बुधः केशपिपीलिकामक्षिकाभिःसहपक्वमन्नंत्यजेदेव पाकोत्तरंकेशपिपीलिकादिकीटकमक्षिकासंसृष्टेगवाघ्रातेवान्ने सलिलंभस्ममृद्वापिप्रक्षेप्तव्यंविशुद्धये इतिविज्ञानेश्वरः शूद्रान्नंशूद्रदत्तब्राह्मणान्नंरात्रिपर्युषितंरजस्वलाचांडालपतितादिदृष्टंकाकादिपक्ष्युच्छिष्टमभोज्यं स्नेहपक्वमंडकादिचपर्युषितंग्राह्यं अवत्सायागोरनिर्दशानांगोमहिष्यजानांगर्भिण्याएककालांतरितदोहायायमलसूस्रवत्स्तन्योरजवर्जेद्विस्तनीनामुष्ट्रीवडवयोरारण्यकमृगादेरवेश्चक्षीराणिवर्ज्यानि शिग्रुहिंगुवर्ज्यंरक्तंवृक्षनिर्यासंपुरीषस्थानोत्पन्नतंडुलीयकादिकंदेवाद्युद्देशंविनाकृतं संयावपायसापूपशष्कुलीकृसरंवर्जयेत् शणकुसुंभालाबुवार्ताककोविदारवटादिफलानिमातुलिंगंचवर्ज्यं पलांडुलशुनगृंजनभक्षणेचांद्रायणं भुंजानेषुपरस्परस्पर्शेअन्नत्यागः पात्रस्थान्नभक्षणेस्नात्वाष्टोत्तरशतगायत्रीजपः अधिकभोजनेसहस्रं भुंजानस्याशुचिनाविप्रेणस्पर्शेन्नत्यागः भुक्तोच्छिष्टस्पर्शेसवर्णेस्नानंजपोवा असवर्णेतूपवासः भुक्तोच्छिष्टस्यश्वशूद्रादिस्पर्शेउपोष्यपंचगव्यं रजकादिस्पर्शेत्रिरात्रं परिवेषणंकुर्वन्नुच्छिष्टस्पर्शेपयोदधिघृतादिलघुद्रव्यमत्यजन्नाचांतःशुचिः भक्ष्याद्यन्नस्यत्यागएव वस्त्रेविकल्पः परिवेषणादिकालेरजोदृष्टौतत्स्पृष्टान्नत्यागः ॥

" रविवार, पौर्णिमा व अमवास्या ह्या दिवसीं रात्रीं भोजन करूं नये; चतुर्दशी व अष्टमी ह्या दिवसीं दिवसा भोजन करूं नये; एकादशीचे दिवसीं अहोरात्र भोजन करूं नये; कारण त्या दिवसीं भोजन केलें असतां चांद्रायण करावें असें सांगितलें आहे." जो मनुष्य हातावर अन्न घेऊन भोजन करितो, जो मनुष्य उष्ण अन्नावर फुंकर घालून भोजन करितो, व जो प्रसृत (पसरलेल्या) अंगुलींनीं भोजन करितो त्याचें तें भोजन गोमांसभक्षण केल्याप्रमाणें होतें. अजीर्ण असतां, अति भुकेलेला त्यानें तत्कालींच, ओलें वस्त्र परिधान करून, मस्तक ओलें असतां, पायांवर हात ठेवून व ग्रासाचें शेष भोजन करूं नये. उदक प्राशन करून पात्रांत शेष राहिलेलें उदक प्राशन करूं नये. शाक, मूल, फलें इत्यादिक पदार्थ दांतांनीं तोडून भक्षण करूं नयेत. उच्छिष्ट होत्साता त्यानें तूप घेऊं नये. पायानें पात्राला स्पर्श करूं नये. उदक प्राशन करीत असतां मुखापासून पात्रांत उदक पडेल तर तें पात्रांतलें अन्न भक्षण करूं नये. उदक प्राशन करून पात्रांत शेष राहिलेलें उदक प्राशन केलें असतां चांद्रायण प्रायश्चित्त करावें. हाताचे नखांचा स्पर्श झालेलें उदक प्राशन केलें असतां, व डाव्या हस्तानें उचललेलें उदक प्राशन केलें असतां सुरापानासम जाणावें. जर एका पंक्तींत बसून ब्राह्मण भोजन करीत असतां त्यांतून एकादा उठेल किंवा उत्तरापोशन घेईल तथापि इतरांनीं शेष राहिलेलें अन्न भोजन करूं नये. त्याविषयीं उ-

ठणारा व भोजन करणारा या उभयतांला दोष आहे. गुरु असेल तर त्याला दोष नाहीं. लवण, व्यंजन ( चटण्या, कोशिंबिरी इत्यादि ), घृत, तैल, लेह्यपदार्थ ( चाटून खाण्यास योग्य ते ), पेय ( पिण्यास योग्य ते ) इत्यादिक अनेक प्रकारचे पदार्थ हातानें दिलेले भक्षण करूं नयेत. तांब्याच्या पात्रांत गाईचें दूध इत्यादिक, कांस्यपात्रांत नारळाचें उदक व उंसाचा रस, गूळमिश्रित दहीं, आणि गुडयुक्त आलें हीं मद्यसमान होत. सैंधव मीठ व समुद्रांत उत्पन्न झालेलें मीठ यांवांचून जें प्रत्यक्ष लवण तें भक्षण करणें व मृत्तिका भक्षण करणें हीं गोमांसतुल्य होत. भोजन करीत असतां रजस्वला, चांडाल, कुत्रा आणि कुक्कुट, यांचें दर्शन होईल तर तें अन्न टाकावें. भोजन करणाराचा गुदस्राव होईल तर त्यानें एक उपोषण करून पंचगव्य ग्रहण करावें. आपोशन घेतल्यानंतर प्राणाहुतींच्या पूर्वीं गुदस्राव झाला असतां स्नान करून सहा प्राणायाम करावे. भोजन करीत असतां तत्कालीं आशौच प्राप्त होईल तर मुखांतील ग्रास टाकून स्नान करावें, मुखांतील ग्रास भक्षण करील तर स्नानपूर्वक उपोषण करावें. सर्व अन्न भक्षण करील तर त्रिरात्र उपोषण करावें. भोजन करीत असतां विष्ठा इत्यादिकांचा स्पर्श होईल तर स्नान करून तीन प्राणायाम करावे. चांडाल, पतित, व रजस्वला यांचा शब्द ऐकून भोजन केलें असतां एक उपोषण करावें, अथवा स्नान करून शंभर गायत्रीजप करावा. कलह, घरट, उखळ, मुसळ यांचा जोंपर्यंत शब्द होत आहे तावत्कालपर्यंत भोजन करूं नये. " ब्राह्मणांनीं, स्वकीय आप्त जन यांच्या सहवर्तमानहि एका पंक्तीस बसून भोजन करूं नये; कारण कोणाचें कसें काय गुप्त पातक असेल तें कोणासहि समजत नाहीं. याकरितां ज्ञात्या पुरुषानें अग्नि, भस्म, स्तंभ, उदक, दरवाजा अथवा मार्ग यांतून कोणत्या एका प्रकारानें पंक्तिभेद करावा." केंस, मुंग्या व माशा यांसहित जें अन्न शिजलें तें टाकावेंच. पाक झाल्यानंतर तें अन्न केंस, मुंग्या, किडे, माशा इत्यादिकांनीं मिश्र झालें अथवा तें अन्न गाईनें हुंगिलें असतां " त्या अन्नाच्या शुद्धीकरितां उदक, भस्म अथवा मृत्तिका त्यावर टाकावी," असें विज्ञानेश्वर सांगतो. शूद्रान्न; शूद्रानें दिलेलें ब्राह्मणाकडचें अन्न; रात्रीचें शिळें अन्न; रजस्वला, चांडाल, पतित, इत्यादिकांनीं अवलोकन केलेलें अन्न; कावळे इत्यादिक पक्ष्यांचें उच्छिष्ट अन्न हीं अभोज्य होत. तूप, तेल यांत तळलेले ( वडे, इत्यादिक ), मांडे, घिवर हे पदार्थ शिळे ग्रहण करावे. जीस वासरूं नाहीं अशी गाई; सुवेर गेला नाहीं अशा गाई, महिषी, मेंढी, बकरी; व गर्भिणी; एकांत्रा आड दूध देणारी; जुळें प्रसवणारी; स्तनांतून नित्य दूध स्रवणारी; मेंढी बकरी यांवांचून द्विस्तनी; उंटीण; घोडी; अरण्यांतील हरिणी इत्यादिक; आणि एडकी यांचीं दुग्धें वर्ज्य होत. शेगवा व हिंग खेरीज करून तांबडा असा वृक्षाचा चीक; विष्ठेच्या स्थळीं उत्पन्न झालेले माठ, तांदुळजा इत्यादिक; देवादिकांच्या उद्देशावांचून केलेले असे मोहनभोग, पायस, अपूप, करंज्या, कृसर ( खिचडी, तिलमिश्र ओदन ) हे पदार्थ वर्ज्य करावे. ताग, कर्डई, दुध्या भोंपळा, वांगें, कोरळ, वट इत्यादिक फलें व माहळुंगें, हीं भक्षण करूं नयेत. पलांडु, लसूण आणि गाजरें हीं भक्षण केलीं असतां चांद्रायण करावें. भोजन करीत असतां परस्पर स्पर्श झाला तर त्या अन्नाचा त्याग करावा. पात्रावरचें अन्न भक्षण

केलें असतां स्नान करून अष्टोत्तरशत (१०८) गायत्रीजप करावा. पात्रावरील अन्न भक्षण करून आणखी अन्न भक्षण केलें असतां स्नानपूर्वक सहस्रगायत्रीजप करावा. अशुचि ब्राह्मणांशीं भोजन करणाराचा स्पर्श झाला असतां तें अन्न टाकावें. भोजन केल्यानंतर उच्छिष्टावस्थेमध्यें स्पर्श होईल व स्पर्श करणारा आपल्या वर्णांतला असेल तर स्नान किंवा जप करावा, आपल्या वर्णांतला नसेल तर उपवास करावा. भोजनानंतर उच्छिष्टावस्थेमध्यें कुत्रा, शूद्र इत्यादिकांचा स्पर्श झाला तर उपोषण करून पंचगव्य प्राशन करावें. रजक इत्यादिकांचा स्पर्श झाला असल्यास त्रिरात्र व्रत करावें. पात्रावर पदार्थ वाढीत असतां उच्छिष्टाचा स्पर्श झाला तर दूध, दहीं, घृत इत्यादिक हलके पदार्थ टाकूं नयेत, व हस्तपाद प्रक्षालन करून आचमन केल्यानें शुद्ध होतो. भक्ष्य (भोज्य) इत्यादिक अन्नाचा त्यागच करावा. वस्त्राच्या त्यागाविषयीं विकल्प आहे ह्मणजे टाकावें किंवा न टाकावें. स्त्री पात्रावर पदार्थ वाढीत असतां त्या समयीं रजस्वला झाली तर तिचा स्पर्श झालेलें अन्न टाकावें.

---

**भोजनांतेउच्छिष्टशेषान्नं रौरवेपूयनिलयेपद्मार्बुदनिवासिनां प्राणिनांसर्वभूतानामक्षय्यमुपतिष्ठत्वितिदद्यात् आचांतोप्यशुचिस्तावद्यावत्पात्रमनुद्धृतं उद्धृतेप्यशुचिस्तावद्यावन्नोन्मृज्यतेमही पर्णस्याग्रंचमूलंचशिरांचैवविशेषतःचूर्णपर्णंवर्जयित्वातांबूलंखादयेद्बुधः अनिधाय मुखेपर्णंपूगंवैभक्षयेन्नच इतिपंचमभागकृत्यं ॥**

भोजन झाल्यानंतर उच्छिष्ट जें शेष अन्न तें घेऊन "रौरवे पूयनिलये पद्मार्बुदनिवासिनां। प्राणिनां सर्वभूतानामक्षय्यमुपतिष्ठतु," हा मंत्र ह्मणून द्यावें. "भोजनपात्र जोंपर्यंत काढलें नाहीं तावत्कालपर्यंत, (जरी हस्त पाद मुख प्रक्षालन करून आचमन केलें तथापि) तो अशुचि होय." "पात्र काढल्यानंतरहि जेथपर्यंत भूमीचें सारवण केलें नाहीं तेथपर्यंत तो अशुचि होय." "नागवेलीच्या पानाचें अग्र, मूळ व शिरा हीं अवश्य काढून चुन्याचें पान वर्ज्य करून ज्ञात्या पुरुषानें तांबूल भक्षण करावें. मुखांत पान घातल्यावांचून सुपारी भक्षण करूं नये; ह्मणजे पूर्वीं पान नंतर सुपारी याप्रमाणें तांबूल भक्षण करावें." याप्रमाणें पांचव्या भागाचें कृत्य सांगितलें.

---

**इतिहासपुराणाद्यैःषष्ठसप्तमकौनयेत् अष्टमेलोकयात्रातुबहिःसंध्याततःपुनः सायंसंध्याप्रातःसंध्यावत् अग्निश्चमामन्युश्च० यदन्हापापमकार्षं० अहस्तदवलुंपतु० सत्येज्योतिषिजुहोमिस्वाहेतिमंत्राचमनेविशेषः पश्चिमाभिमुखस्तिष्ठन् अर्घ्यंदद्यात् ऊर्ध्वजानुरुपविश्य प्रत्यङ्मुखएवगायत्रींजपेत् सायंहोमस्तूक्तएव सायंवैश्वदेवेपुनःपाकः अतिथिंसंपूज्यघटिकात्रयानंतरंसार्धयामात्प्राक्भुक्त्वाशयीत ॥**

" दिवसाचा सहावा व सातवा हे भाग भारतादि इतिहास, पुराणें इत्यादिकांच्या वाचनपूर्वक अर्थविचारानें घालवावे, आणि दिवसाच्या आठव्या भागांत आपले इष्ट, मित्र, आप्त इत्यादिकांस भेटणें, संभाषण करणें इत्यादिक संसारसंबंधी कार्यें करून योग्य कालीं गां-

वाच्या बाहेर नदी, तळें इत्यादिकांवर सायंसंध्या करावयास जावें." सायंकालची संध्या प्रातःसंध्येप्रमाणें करावी. प्रातःसंध्येहून सायंसंध्येचा कांहीं विशेष प्रकार आहे. तो असा— "अग्निश्च मामन्युश्च०, यदन्हापापमकार्षं०, अहस्तदवलुंपतु०, सत्येज्योतिषि जुहोमि स्वाहा" याप्रमाणें मंत्राचमनांत विशेष जाणावा. पश्चिम दिशेला संमुख उभा राहत होत्साता अर्घ्य द्यावें. ऊर्ध्व जानु होतील असा पश्चिमाभिमुखच बसून गायत्रीचा जप करावा. सायंकालचा होम पूर्वी सांगितलाच आहे तसा करावा. सायंकालीं वैश्वदेव करणें असल्यास पुनः पाक करावा. अतिथीची पूजा करून तीन घटिका रात्रि झाल्यानंतर, आणि दीड प्रहर रात्रीच्या पूर्वी भोजन करून निद्रा करावी.

---

भोजनकालेदीपनाशेपात्रमालभ्यसूर्यंस्मृत्वापुनर्दीपंदृष्ट्वापात्रस्थंभुंजीतनान्यत् श्राद्धतत्पूर्वदिनेपातधृतिसंक्रांत्यादिषुननिशिभोजनं चतुर्थप्रथमौयामौविद्याभ्यासैर्नयेन्निशि प्रहरद्वय शायीतुब्रह्मभूयायकल्पते प्राक्प्रत्यक्दक्षिणस्यांशिरःकृत्वाशयीतनकदाचिदुदक्शिराःरात्रिसूक्तंजप्त्वासुखशायिनःस्मृत्वाविष्णुंनत्वास्वप्यात् अगस्तिर्माधवश्चैवमुचुकुंदोमहामुनिः कपिलोमुनिरास्तीकः पंचैतेसुखशायिनः ॥

भोजन करीत असतां दीप नष्ट झाला तर भोजनपात्र हातांत धरून सूर्याचें स्मरण करून पुनः दीप प्रज्वलित झाल्यानंतर तो पाहून पात्रावरचें अन्न भक्षण करावें, दुसरें भक्षण करूं नये. श्राद्धाचा पूर्व दिवस, श्राद्धदिवस, व्यतीपात, वैधृति, संक्रांति इत्यादिक ह्या दिवसीं रात्रीं भोजन करूं नये. "रात्रीचा चवथा व पहिला हे प्रहर विद्याभ्यासानें घालवावे ह्मणजे ह्या प्रहरांत विद्याभ्यास करावा. मधल्या दोन प्रहरपर्यंत जो निद्रा करितो तो ब्रह्मत्वाकारणें योग्य होतो." पूर्व, पश्चिम किंवा दक्षिणदिशा यांतून कोणत्याहि दिशेस उसें करून निद्रा करावी, उत्तर दिशेला उसें करून कधींहि निजूं नये. रात्रिसूक्ताचा ( रात्रीव्यख्यदायती० इत्यादिक ऋचा८ ) जप करून सुखशायींचें स्मरण करून विष्णूला नमस्कार करून निद्रा करावी. सुखशायी—अगस्ति, माधव, मुचुकुंद, महामुनि, कपिल आणि आस्तीक हे पांच मुनि सुखशायी होत, याकरितां निद्राकालीं यांचें स्मरण केल्यानें निद्रा सुखकारक होते.

---

नसंध्यायांनधान्येनगोगृहेनदेवविप्रगुरूणामुपरिनोच्छिष्टोनदिवाननग्नःशयीत निद्राकाले तांबूलंमुखात्स्त्रियंशयनाद्भालात्तिलकंशिरसःपुष्पंत्यजेत् गर्भाधानप्रकरणोक्तकालेसार्धयामोत्तरंदीपेसत्यसतिवानिवीतंयज्ञोपवीतंकंठादौकृत्वापत्नींगच्छेत् अष्टम्यांचचतुर्दश्यांदिवापर्वणिमैथुनं कृत्वासचैलंस्नात्वातुवारुणीभिश्चमार्जयेत् पुनर्मामैत्विजपश्चोक्तएव ॥

संध्यासमयीं;धान्यावर; गाईच्या गोष्ठांत; देव, ब्राह्मण व गुरु यांच्या उपरिप्रदेशीं; उच्छिष्ट होत्साता; दिवसा; नग्नपणीं निद्रा करूं नये. निद्रासमयीं मुखांतून तांबूल, पलंगावरून स्त्री, मस्तकाच्या गंधाचा तिलक, आणि रतिकालीं मस्तकावर धारण केलेलीं पुष्पें या सर्वांचा त्याग करावा. गर्भाधानप्रकरणीं सांगितलेला जो स्त्रीगमनकाल त्याकालीं दीड प्रहर रात्र गेल्यानंतर दीप असो किंवा नसो यज्ञोपवीत निवीत ( कंठामध्यें माळेसारखें लोंबतें ) कंठादिकांचे ठायीं करून स्त्रियेप्रत गमन करावें. "अष्टमी, चतुर्दशी, दिवा, पर्वणी, या-

समयीं मैथुनकर्त्यानें सचैल स्नान करून वारुणी ऋचांनीं मार्जन करावें, आणि "पुनर्मामैत्विं०" ह्या मंत्राचा जप करावा व तो पूर्वी सांगितलाच आहे.

---

एवंस्नानभोजनादिकेबहुविधविधिनिषेधाकुले आन्हिककर्मणिन्यूनाधिकदोषविधिनिषेधातिक्रमदोषपरिहारार्थं प्रायश्चित्ताज्ञानेतत्सांगतार्थंप्रायश्चित्तसांगतार्थंच श्रीविष्णुनामोच्चारणादिकंकार्यं प्रायश्चित्तान्यशेषाणि तपःकर्मात्मकानिच यानितेषामशेषाणांकृष्णानुस्मरणंपरं यस्यस्मृत्याचनामोक्त्यातपोयज्ञक्रियादिषु न्यूनंसंपूर्णतांयातिसद्योवंदेतमच्युतं नाम्नोस्ति यावतीशक्तिःपापनिर्हरणेहरेः तावत्कर्तुंनशक्नोतिपातकंपातकीजनः लौकिकंवैदिकंकर्मेश्वरेर्पणीयं यत्करोषियदश्नासियज्जुहोषिददासियत् यत्तपस्यसिकौंतेयतत्कुरुष्वमदर्पणमित्युक्तेः युगपत्सर्वकर्मार्पणेमंत्रः कामतोकामतोवापियत्करोमिशुभाशुभं तत्सर्वंत्वयिसंन्यस्तंत्वत्प्रयुक्तःकरोम्यहं ॥

याप्रमाणें अनेक प्रकारच्या विधिनिषेधांनीं युक्त अशा स्नान, भोजन इत्यादिक आन्हिक कर्मांमध्यें न्यूनाधिक दोष, विधिनिषेधाचा अतिक्रम ( उल्लंघन ) केल्याचा दोष, हे सर्व दोष परिहार होण्याकरितां, प्रायश्चित्ताचें ज्ञान नसल्यास कर्म सांग होण्याकरितां व प्रायश्चित्ताची सांगता होण्यासाठीं श्रीविष्णूच्या नामाचें उच्चारण इत्यादिक करावें. " तपोरूप व कर्मरूप अशीं जीं सर्व प्रायश्चित्तें त्या सर्वांमध्यें श्रेष्ठ प्रायश्चित्त कृष्णस्मरण हें होय. तपश्चर्या, यज्ञयागादिक कर्में यांमध्यें जें कांहीं न्यून होतें तें ज्याच्या स्मरणमात्रानें व नामोच्चारणमात्रानें परिपूर्णतेला पावतें असा जो सनातन विष्णु त्याला नमस्कार करितों, पातकाचा नाश करण्याविषयीं हरीच्या नामामध्यें जितकी शक्ति आहे तितकी शक्ति पापी जनाला पातक करण्याविषयीं नाहीं. " लौकिक, वैदिक ( वेदोक्त ) कर्म ईश्वराला समर्पण करावें; कारण गीतेंत श्रीकृष्ण सांगतात—" हे अर्जुना, स्वभावेंकरून किंवा शास्त्रविधीनें जें कर्म करितोस, जें भक्षण करितोस, जें हवन करितोस, जें देतोस, आणि जें तप करितोस तें सर्व कर्म मला जसें अर्पण होईल असें कर, " असें वचन आहे. एकदांच सर्व कर्में ईश्वराला समर्पण करण्याचा मंत्र—" कामतोऽकामतोवापियत्करोमिशुभाशुभं ॥ तत्सर्वंत्वयिसंन्यस्तंत्वत्प्रयुक्तःकरोम्यहं. "

---

अपारमान्हिकंकर्मगहनंबहुभेदयुक् निःशेषमक्षमोवक्तुंयथामत्यवदल्लघु अनंतोपाध्यायजनिःकाशीनाथाभिधःसुधीः तुष्यतांतेनभगवांछ्रीनाथोविठ्ठलःप्रभुः इत्यनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारेतृतीयपरिच्छेदेआन्हिकाचारप्रकरणंसमाप्तं ॥

" शाखापरत्वें अनेक प्रकारचे ज्यांत भेद आहेत असें हें अपार आन्हिककर्म अत्यंत गहन असल्यामुळें तें सर्व सांगण्याविषयीं, अनंतोपाध्यायांचा पुत्र, काशीनाथ नामक असा पंडित मी असमर्थ आहें, परंतु यथामति संक्षेपानें सांगितलें आहे. तेणेंकरून श्रीरुक्मिणीपति भगवान् प्रभु विठ्ठल संतुष्ट होवो. " इत्यनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे तृतीयपरिच्छेदे आह्निकाचारप्रकरणंसमाप्तं ॥

आवश्यंप्रत्यहंकृत्यमुक्त्वातच्छेषउच्यते काम्यंनैमित्तिकंचापिप्रायःसिंधुक्रमादथ ॥

प्रतिदिवसीं करावयाचें असें आवश्यक आन्हिककर्म सांगून यानंतर त्या आन्हिकाचेंच शेष राहिलेलें आणि काम्य व नैमित्तिक कर्म बहुधा निर्णयसिंधूच्या क्रमानें सांगतों.

---

अथाधानविचारः तत्राधाननक्षत्रादिकालविचारः प्रथमपरिच्छेदेउक्तः आवसथ्याधानंतुदारकालेदायविभागकालेवा अग्निर्वैवाहिकोयेननगृहीतःप्रमादिना पितर्युपरतेतेनगृहीतव्यःप्रयत्नतः गृह्याग्निहीनस्यान्नमभोज्यं पितरिज्येष्ठभ्रातरिवासाग्निकेकनिष्ठादेरविभक्तस्यनिरग्नित्वदोषोन एवंज्ञानाध्ययनादिनिष्ठस्यापिनदोषः गृहस्थस्याप्यध्ययनोक्तेःस्मार्ताधानमपिज्येष्ठेभ्रातरिअकृताधानेसतिनकार्यमितिनिर्णयसिंध्वादौगार्ग्योक्तिः अत्रैवंनिर्णयोभाति यत्रज्येष्ठेनदायाद्यपक्षमवलंब्यविवाहकालेयावज्जीवमौपासनंकरिष्येइत्येवंसंकल्पपूर्वकंविवाहाग्निर्नगृहीतस्तद्विषयोयंकनिष्ठस्यनिषेधः येनज्येष्ठेनविवाहकालेतथासंकल्पपूर्वकमग्निःपरिगृहीतः सपश्चात्परिचरणाभावेनाविद्यमानाग्निकोपिउच्छिन्नाग्निरेवनत्वकृताधानइतितत्रकनिष्ठस्याधानेदोषोनेति अत्राधिकारिणोपिभ्रातुरनुज्ञयाकनिष्ठस्याधानंभवति विवाहस्तुअनुज्ञयापिन एवंपितुरनुज्ञयाप्याधानं संन्यस्तेछिन्नहस्तादौयद्वाषंढादिदूषणे जनकेसोदरेज्येष्ठे कुर्यादेवेतरःक्रियामित्यादिविशेषः विवाहप्रकरणेपरिवेत्तृप्रसंगेउक्तः ॥

## आतां यानंतर आधानाचा निर्णय सांगतों.

त्यामध्यें आधान कोणत्या नक्षत्रीं व कोणत्या कालीं करावें इत्यादिक निर्णय पहिल्या परिच्छेदांत सांगितला आहे तो पहावा. गृह्याग्नीचें आधान करणें तें तर, विवाहकालीं पिता इत्यादिकांपासून प्राप्त होणार जो दाय ह्मणजे धन त्याच्या विभागकालीं करावें. "प्रमाद (अनवधान, असावधपणा) इत्यादिकारणेंकरून ज्याणें विवाहाग्नि (गृह्याग्नि) धारण केला नाहीं त्यानें पिता मृत झाल्यानंतर मोठ्या प्रयत्नेंकरून धारण करावा, ह्मणजे धारण करण्याविषयीं जरी अनेक संकटें प्राप्त झालीं तथापि तीं सर्व सहन करून अवश्य धारण करावा." गृह्याग्नीनें जो हीन त्याचें अन्न कोणी भक्षण करूं नये. पिता किंवा ज्येष्ठ भ्राता साग्निक असून कनिष्ठ इत्यादिक विभक्त नसेल तर त्या कनिष्ठास अग्नि धारण न केल्याचा दोष नाहीं. याप्रमाणें ज्ञान, अध्ययन इत्यादिकाविषयीं जो नैष्ठिक त्यालाहि अग्नि धारण न केल्याचा दोष नाहीं. कारण, गृहस्थाश्रमी यानेंहि वेदाध्ययन करावें असें वचन आहे. जर ज्येष्ठ भ्रात्यानें आधान केलें नसेल तर कनिष्ठानें स्मार्ताग्नीचेंहि आधान करूं नये, असें निर्णयसिंधु इत्यादिक ग्रंथामध्यें गर्गऋषीचें वचन आहे. याविषयीं मला असा निर्णय वाटतो— जेथें ज्येष्ठ भ्रात्यानें दायाचा पहिला पक्ष स्वीकारून विवाहकालीं, "यावज्जीवमौपासनं करिष्ये," असा संकल्प पूर्वी करून विवाहाग्नि घेतला नसेल तद्विषयक हा कनिष्ठाला आधानाचा निषेध सांगितला. ज्या ज्येष्ठ भ्रात्यानें विवाहकालीं तसा संकल्प पूर्वी करून विवाहाग्नि घेतला आणि पुढें त्याप्रमाणें अग्नि धारण केला नाहीं या कारणानें तो ज्येष्ठ भ्राता अविद्यमानाग्निक (विद्यमान ज्याला अग्नि नाहीं तो) झाला तथापि तो उच्छिन्नाग्निच (नष्ट आहे अग्नि ज्याचा तो) होय, आधान न केलेला असा नव्हे, यास्तव तशा स्थलीं कनिष्ठानें

आधान केलें असतां दोष नाहीं. या आधानाविषयीं कनिष्ठ जरी अधिकारी आहे तथापि त्यानें ज्येष्ठ भ्रात्याची आज्ञा घेऊन आधान करावें, विवाह, ज्येष्ठाची आज्ञा असेल तथापि होणार नाहीं. याप्रमाणें पित्याची आज्ञा घेऊनहि पुत्रानें आधान करावें. "पिता किंवा ज्येष्ठ भ्राता हा संन्यासी असेल किंवा तुटलेला हात इत्यादिक व नपुंसकत्व इत्यादिक दोष त्यास असेल तर कनिष्ठानेंच सर्व कर्में (अग्निहोत्रादिक) करावीं," इत्यादिक विशेष निर्णय विवाहप्रकरणीं परिवेत्त्याच्या प्रसंगांत सांगितला आहे.

---

अथशूद्रसंस्कारविचारः गर्भाधानपुंसवनानवलोभनसीमंतोन्नयनजातकर्मनामकर्मनिष्क्रमणान्नप्राशनचौलोपनयनमहानाम्न्यादिव्रतचतुष्टयसमावर्तनविवाहाइति षोडशसंस्कारा द्विजानां जातकर्मनामकर्मनिष्क्रमणान्नप्राशनचूडाविवाहाइतिषट्द्विजस्त्रीणां तत्रविवाहः समंत्रकोन्येमंत्ररहिताः गर्भाधानसीमंतौस्त्रीपुरुषसाधारणौ चूडांतानवविवाहश्चेतिदशामंत्रकाःशूद्राणामितिबहुसंमतं शूद्रकमलाकरेशूद्राणांपंचमहायज्ञाअप्युक्ताःकेचिदवैदिकमंत्रेणोपनयनमप्याहुः श्राद्धेतुविवाहमात्रंसंस्कारंशूद्रोपिलभतांसदेत्युक्तं अत्रसदसच्छूद्रगोचरत्वेनवापरंपराप्राप्तप्रकारेणवाव्यवस्था अस्यद्विजसेवावृत्तिः आपदिवाणिज्यशिल्पादिशूद्रेणलवणादिविक्रेयं मद्यंमांसंचन कापिलाक्षीरपानेनब्राह्मणीगमनेनच वेदाक्षरविचारेण शूद्रश्चांडालतांव्रजेत् शूद्रोवर्णश्चतुर्थोपिवर्णत्वाद्धर्ममर्हति वेदमंत्रस्वधास्वाहावषट्कारादिभिर्विना स्त्रीशूद्रधर्मेषुव्रतादिषुसर्वत्रविप्रेणमंत्रःपठनीयः सोपिपौराणएव भारतपुराणयोःश्रवणेस्त्रीशूद्रयोरधिकारोनत्वध्ययने श्रावयेच्चतुरोवर्णान्कृत्वाब्राह्मणमग्रतःशूद्रस्यपंचयज्ञश्राद्धादिकर्माणिकातीयसूत्रानुसारेणेतिमयूखे आगमोक्ताविष्णुशिवादिमंत्राःनमोंताःप्रणवरहिताः पुराणादिनाश्रवणनिदिध्यासनादिकृत्वाब्रह्मज्ञानमपिस्त्रीशूद्रैःसंपाद्यं उपनिषच्छ्रवणेतुनाधिकारइतिशूद्रस्यतदनादरश्रवणादित्यधिकरणे शूद्रस्यसर्वश्राद्धान्यामेनैव केचित्सर्वप्रजानांकाश्यपत्वात्सर्वशूद्राणांकाश्यपगोत्रंतच्चश्राद्धएवकीर्तनीयंनान्यत्रेत्याहुः एवंशांतिकादावधिकारोविप्रद्वारैव यदिविप्रःशूद्रदक्षिणामादायवैदिकमंत्रैस्तदीयहोमाभिषेकादिकरोति तदातत्रशूद्रस्तत्पुण्यफलभाक्विप्रस्तुमहाप्रत्यवायीतिमाधवः ॥

## आतां यानंतर शूद्रांच्या संस्कारांचा निर्णय सांगतों.

गर्भाधान, पुंसवन, अनवलोभन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकर्म, निष्क्रमण, अन्नप्राशन, चौल, मौंजी, महानाम्न्यादिक चार व्रतें, समावर्तन (सोडमुंज) आणि विवाह याप्रमाणें हे सोळा संस्कार द्विजांचे होत. जातकर्म, नामकर्म, निष्क्रमण, चौल अन्नप्राशन व विवाह हे सहा संस्कार द्विजांच्या स्त्रियांचे होत. त्यांमध्यें स्त्रियांचा विवाह करावयाचा तो समंत्रक करावा, व इतर संस्कार अमंत्रक करावे. गर्भाधान, सीमंतोन्नयन हे संस्कार स्त्रीपुरुषांचे साधारण होत. गर्भाधान, पुंसवन, अनवलोभन, सीमंतोन्नयन, जातकर्म, नामकर्म, निष्क्रमण, अन्नप्राशन, चौल हे नऊ व विवाह असे दहा संस्कार शूद्रांचे अमंत्रक होत असें बहुसंमत आहे. शूद्रकमलाकर ग्रंथांत शूद्रांस पंचमहायज्ञ सुद्धां सांगितले आहेत. कोणी ग्रंथकार, पुराणोक्त मं-

त्रांनीं शूद्रांचें उपनयनसुद्धां करावें असें सांगतात. ब्रह्मपुराणांत तर, "शूद्राचा विवाह संस्कार मात्र निरंतर करावा" असें सांगितलें, तेव्हां याविषयीं सच्छूद्र व असच्छूद्र या विषयत्वानें किंवा परंपरा चालत आलेल्या प्रकारानें व्यवस्था जाणावी, ह्या शूद्राची वृत्ति द्विजांची (त्रैवर्णिकांची) सेवा ही होय. आपत्तिकालामध्यें व्यापार, शिल्प इत्यादिक जाणावी. शूद्रानें लवण इत्यादिकांचा विक्रय करावा, मद्यमांसाचा विक्रय करूं नये. "कपिला गाईचें दुग्धपान, ब्राह्मणस्त्रीचे ठिकाणीं गमन, आणि वेदाच्या अक्षरांचा विचार हीं केल्यानें शूद्र चांडालत्वाला पावतो." "शूद्रवर्ण हा चवथा आहे; तथापि मुख्यवर्ण जे त्यांतला, असल्यामुळें, वेदमंत्र, स्वधाकार, स्वाहाकार, आणि वषट्कार इत्यादिक वर्ज्य करून इतर धर्माचरणास तो योग्य आहे." स्त्रिया, शूद्र यांच्या व्रतें इत्यादिक धर्मामध्यें ब्राह्मणानें सर्वत्र ठिकाणीं मंत्र ह्मणावा व तोहि मंत्र पुराणोक्तच ह्मणावा. स्त्रिया व शूद्र यांस भारत, पुराणें हीं श्रवण करण्याचा अधिकार आहे, अध्ययनाचा अधिकार नाहीं. "वक्त्यानें श्रोता ब्राह्मण पुढें बसवून चार वर्णांकडून पुराण श्रवण करवावें." शूद्राचे पंचमहायज्ञ व श्राद्धादिककर्में कातीय सूत्राप्रमाणें होतात असें मयूखांत सांगितलें आहे. आगमांत (विष्णुशिवप्रतिपादक ग्रंथविशेषांत) सांगितलेले असून ज्यांच्या अंतीं नमः शब्द आहे असे विष्णु, शिव इत्यादि देवतांचे मंत्र, प्रणवरहित, शूद्रांनीं पठण करावे. स्त्रिया व शूद्र यांनीं पुराणादिकाच्या साधनानें श्रवण, निदिध्यास इत्यादिक करून ब्रह्मज्ञानसुद्धां संपादन करावें. उपनिषदांच्या श्रवणाविषयीं तर अधिकार नाहीं; कारण, 'तदनादरश्रवणात्' ह्या अधिकरणांत शूद्रास उपनिषदांचें आदरेंकरून श्रवण नाहीं असें सांगितलें आहे. शूद्रानें सर्व श्राद्धें आमान्नेंकरूनच करावीं. कोणी ग्रंथकार, सर्व प्रजासृष्टि कश्यपाची आहे याकरितां सर्व शूद्रांचें काश्यपगोत्र आहे, व तें काश्यपगोत्र शूद्रांनीं श्राद्धामध्येंच उच्चारावें, अन्य कर्मांत उच्चारूं नये असें सांगतात. याप्रमाणें शूद्रास शांति इत्यादिक कर्म करण्याविषयीं जो अधिकार सांगितला तो ब्राह्मणद्वाराच आहे असें जाणावें. जर ब्राह्मण शूद्रापासून दक्षिणा घेऊन वैदिकमंत्रांनीं त्या शूद्राचीं होम, अभिषेक इत्यादिक कर्में करील तर त्याविषयीं तो शूद्र त्या कर्माच्या पुण्याचा फलभागी होतो, व ब्राह्मण तर महादोषी असें माधवांत सांगितलें आहे.

---

अहिंसासत्यास्तेयशौचेंद्रियनिग्रहदानशमदमक्षमादयः शूद्रादिसर्वसाधारणाधर्माःपरपदप्रापकाः स्वस्तिवाचनादिशूद्रकर्मणांप्रयोगास्तुशूद्रकमलाकरेज्ञेयाः ॥

हिंसा न करणें, सत्य भाषण करणें, चोरी न करणें, शुचिर्भूतपणा ठेवणें, इंद्रियनिग्रह करणें, दान, शम, दम, क्षमा इत्यादिक हे शूद्र इत्यादिक सर्व लोकांचे साधारण धर्म असून ईश्वरपदाची प्राप्ति देणारे होत. पुण्याहवाचन आदिकरून जीं शूद्रांचीं कर्में त्यांचे प्रयोग पाहणें असतील तर शूद्रकमलाकर ग्रंथांत पहावे.

---

अथवापीकूपाद्युत्सर्गादि गृहग्रामयोराग्नेयदक्षिणनैर्ऋत्यवायव्येषुमध्येचदुष्टफलः कूपः शेषदिक्षुशुभः वापीकूपतडागाद्युत्सर्गउत्तरायणेमाघादिमासषट्कस्यशुक्लपक्षेषुप्रशस्तः जल

क्षयसंभावनायांकार्तिकमार्गशीर्षयोरपि नकालनियमस्तत्रसलिलंकारणंपरमित्युक्तेः चतुर्षु विष्णुशयनमासेषुशुक्रास्तादौचवर्ज्यं ॥

## आतां विहिरी तलाव इत्यादिकांचा उत्सर्ग इत्यादिक सांगतों.

घर, किंवा गांव यांच्या आग्नेय, दक्षिण, नैर्ऋत्य आणि वायव्य ह्या दिशांचे ठिकाणीं व घराच्या अथवा गांवाच्या मध्यभागीं जी विहीर ती दुष्टफल देणारी होते. इतर दिशांचे ठिकाणीं शुभ होय. वापी, कूपे, तलाव इत्यादिकांचा उत्सर्ग करणें तो उत्तरायणीं माघादिक जे सहा मास त्यांमध्यें शुक्लपक्षीं प्रशस्त होय. माघादि सहा मासांत त्या वापी, कूप इत्यादिकांतलें उदक शुष्क होण्याचा संभव असेल तर कार्तिक व मार्गशीर्ष या मासांतहि उत्सर्ग करावा; कारण " उत्सर्ग करण्यास कारण उदक आहे " यामुळें ज्या कालीं कूपादिकांत उदक असेल त्या कालीं उत्सर्ग करावा. त्याविषयीं कालाचा नियम नाहीं असें वचन आहे. विष्णूच्या शयनाचे जे चार मास ( आषाढ शुद्ध एकादशीपासून कार्तिकशुद्ध एकादशीपर्यंत ) व शुक्राचें अस्तादिक यांत करूं नयें.

---

अश्विनीरोहिणीमृगपुष्यमघात्र्युत्तरामूलश्रवणादित्रयहस्तज्येष्ठानुराधारेवतीषुद्वितीयातृतीयापंचमीसप्तमीदशम्येकादशीत्रयोदशीतिथिषुबुधगुरुशुक्रसोमवारेषुजलोत्सर्गःशुभः उत्सर्गाभावेजलंनग्राह्यं वापीकूपतडागादौयज्जलंस्यादसंस्कृतं नस्पृष्टव्यंनपेयंचपीलाचांद्रायणंचरेत् उत्सर्गप्रयोगोन्यतोज्ञेयः ॥

जलोत्सर्गाचीं नक्षत्रें—अश्विनी, रोहिणी, मृग, पुष्य, मघा, उत्तरा, उत्तराषाढा, उत्तराभाद्रपदा, मूळ, श्रवण, धनिष्ठा, शततारका, हस्त, ज्येष्ठा, अनुराधा आणि रेवती हीं नक्षत्रें; द्वितीया, तृतीया, पंचमी, सप्तमी, दशमी, एकादशी, त्रयोदशी, ह्या तिथि; बुध, गुरु, शुक्र, आणि सोम हे वार यांचे ठायीं जलाचा उत्सर्ग शुभ होय. ज्या उदकाचा उत्सर्गसंस्कार केला नसेल तें उदक घेऊं नये. "वापी, कूप, तलाव इत्यादिकांच्या उदकाचा संस्कार केला नसेल तर तें असंस्कृत उदक होय, व त्याला स्पर्शहि करूं नये. प्राशन केलें असतां चांद्रायण प्रायश्चित्त करावें. " उत्सर्गाचा प्रयोग दुसऱ्या ग्रंथीं पहावा.

---

अथवृक्षादिरोपणं अश्विनीरोहिणीमृगपुष्यमघोत्तरात्रयहस्तचित्राविशाखानुराधामूलशततारकारेवतीषुसत्तिथिवारेषुवृक्षलतारोपःशस्तः आश्लेषायांसोमवारःसोमोलग्नेबालन्वितः योगेस्मिन्रोपयेद्दिक्षुकदलीक्रमुकादिकान् नारीकेलान्वपेद्भूमावश्विन्यांलग्नेगेरवौ नागवल्लींगुरौलग्नेचंद्रेस्वांशस्थितेसति ॥

## आतां वृक्ष इत्यादिकांचें रोपण ( लावणी ) सांगतों.

अश्विनी, रोहिणी, मृग, पुष्य, मघा, तीन उत्तरा, हस्त, चित्रा, विशाखा, अनुराधा, मूल, शततारका आणि रेवती ह्या नक्षत्रीं; शुभ तिथि, शुभ वार ह्या दिवसीं वृक्ष, लता यांची

---

१ ज्या विहिरीस आंत उतरण्याकरितां पायऱ्या असतात ती वापी.

२ ज्या विहिरीस आंत उतरण्यास पायऱ्या नाहींत तो कूप होय.

लावणी शुभ होय. आश्लेषा नक्षत्र, सोमवार, लग्नीं बलिष्ठ चंद्र अशा योगावर ऊंस, कदलीवृक्ष, आणि क्रमुक (पोफळीवृक्ष) इत्यादिकांची लावणी करावी. लग्नीं रवि असतां अश्विनी नक्षत्रावर नारळीचे वृक्ष भूमींत लावावे. चंद्र स्वांशस्थ, व लग्नीं गुरु असतां नागवल्लीची लावणी करावी.

---

अथमूर्तिप्रतिष्ठा प्रतिष्ठासर्वदेवानांवैशाखज्येष्ठफाल्गुने चैत्रेतुस्याद्विकल्पेनमाघेविष्णवन्यमूर्तिषु सौम्यायनेशुभाप्रोक्तानिंदितादक्षिणायने मातृभैरववाराहनरसिंहत्रिविक्रमाः दक्षिणेप्ययनेस्थाप्यादेव्यश्चेत्यूचिरेपरे विष्णोःशस्ताश्चैत्रमासाश्विनश्रावणकाअपि माघफाल्गुनवैशाखज्येष्ठाषाढसहःसुच श्रावणेचनभस्येचलिंगस्थापनमुत्तमं देव्यामाघेश्विनेमासेप्युत्तमा सर्वकामदा अश्विनीरोहिण्युत्तरात्रयमृगपुनर्वसुपुष्यहस्तचित्रास्वात्यनुराधाश्रवणत्रयरेवतीषुशनिभौमान्यवासरेदर्शरिक्तान्यतिथौसर्वदेवप्रतिष्ठाशुभा श्रवणेकृत्तिकादिविशाखांतेषु चद्वादश्यांचविष्णोःप्रशस्ता चतुर्थीगणेशस्योक्तानवमीमूलभंचदेव्याः तथास्वस्वनक्षत्राणिसर्वेषां यथार्द्राशिवस्यहस्तःसूर्यस्येत्यादि ॥

## आतां यानंतर मूर्तिप्रतिष्ठेचा काल सांगतों.

"मूर्तीची प्रतिष्ठा ह्मणजे अर्चा करावयाची ती वैशाख, ज्येष्ठ, व फाल्गुन या मासांत सर्व देवांची अर्चा करावी. चैत्र मासांत विकल्पेंकरून होते, ह्मणजे कितीएकांच्या मतीं होत नाहीं व कितीएकांच्या मतीं होते. विष्णूच्या अर्चेवांचून इतर मूर्तींची अर्चा माघमासांत करावी. उत्तरायणांत शुभ होय. दक्षिणायनांत निंद्य होय. कोणी ग्रंथकार, मातृका, भैरव, वाराह, नारसिंह, त्रिविक्रम, आणि देवी यांची स्थापना दक्षिणायनांतहि करावी असें ह्मणतात. चैत्र, आश्विन आणि श्रावण ह्या मासांत विष्णूची अर्चा करावी. माघ, फाल्गुन, वैशाख, ज्येष्ठ, आषाढ, मार्गशीर्ष, श्रावण आणि भाद्रपद या मासांत लिंगाचें स्थापन उत्तम होय. माघ, आश्विन या मासांत देवीची अर्चा करावी, ती उत्तम व सर्व काम देणारी होते." अश्विनी, रोहिणी, तीन उत्तरा, मृग, पुनर्वसु, पुष्य, हस्त, चित्रा, स्वाती, अनुराधा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, आणि रेवती ह्या नक्षत्रीं; शनिवार व भौमवार हे वर्ज्य करून अन्यवारीं; अमावास्या, रिक्ता ( चतुर्थी, नवमी, चतुर्दशी ) ह्या तिथि वर्ज्य करून अन्य तिथींचे ठिकाणीं सर्व देवांची अर्चा शुभ होय. श्रवण, कृत्तिका, रोहिणी, मृग, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, मघा, पूर्वा, उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, द्वादशी यांचे ठिकाणीं विष्णूची अर्चा शुभ होय. गणपतीच्या अर्चेविषयीं चतुर्थी उक्त होय. देवीच्या अर्चेविषयीं नवमी, व मूलनक्षत्र हीं उक्त होत. तसेंच ज्या देवतेचें जें नक्षत्र असेल त्या नक्षत्रीं त्या त्या देवतेची अर्चा करावी. उदाहरण,—शिवाची अर्चा आर्द्रा नक्षत्रीं, सूर्याची अर्चा हस्त नक्षत्रीं इत्यादिक जाणावें.

---

हंत्यर्थहीनाकर्तारंमंत्रहीनातुऋत्विजं स्त्रियंलक्षणहीनातुनप्रतिष्ठासमोरिपुः ब्रह्मातुब्राह्मणैःस्थाप्योगायत्रीसहितःप्रभुः सर्ववर्णैस्तथाविष्णुःप्रतिष्ठाप्यःसुखार्थिभिः मातृभैरवाद्याः सर्वैः शिवलिंगंयतिनापि पुराणप्रसिद्धजीर्णलिंगंस्त्रीशूद्रैरपिपूज्यं नूतनस्थापितंलिंगंस्त्रीशूद्रो

वापिनस्पृशेत् शिवादिप्रतिष्ठायांस्त्रीशूद्रादेर्नाधिकारः शूद्रोवानुपनीतोवास्त्रियोवापतितोपिवा केशवंवाशिवंवापिस्पृष्ट्वानरकमश्नुते स्थिरप्रतिमाःप्राङ्मुखीरुदङ्मुखोयजेत् चलप्रतिमासुप्राङ्मुखः सौवर्णीराजतीताम्रीमृन्मयीप्रतिमाभवेत् पाषाणधातुमुक्तावाकांस्यपित्तलयोरपि अंगुष्ठपर्वमानात्सावितस्तियावदेवतु गृहेषुप्रतिमाकार्यानाधिकाशस्यतेबुधैः मृद्दारुलाक्षागोमेदमधूच्छिष्टेनचक्वचित् श्रीमद्भागवते शैलीदारुमयीलौहीलेप्यालेख्याचसैकती मनोमयीमणिमयीप्रतिमाष्टविधास्मृता लौहीसौवर्णीदारुमधूकवृक्षस्यैव सप्तांगुलाधिकाद्वादशांगुलपर्यंतागृहेप्रतिमेतिदेवीपुराणे अर्चकस्यतपोयोगादर्चनस्यातिशायनात् आभिरूप्याच्चबिंबानां देवःसान्निध्यमृच्छति प्रतिमापट्टयंत्राणांनित्यंस्नानंनकारयेत् कारयेत्पर्वदिवसेयदाचमलधारणं पार्थिवलिंगपूजादिविचारोद्वितीयपरिच्छेदेउक्तः ॥

"द्रव्यविरहित अर्चा कर्त्याचा नाश अरिते, मंत्रहीन अर्चा ऋत्विजाचा नाश करिते, लक्षणहीन अर्चा स्त्रियेचा नाश करिते, याकरितां अर्चेसारखा दुसरा शत्रु नाहीं. गायत्रीसहित ब्रह्मदेवाची स्थापना ब्राह्मणांनीं करावी. सुखाची इच्छा करणाऱ्या सर्व वर्णांनीं विष्णूची स्थापना करावी." मातृका, भैरव इत्यादिक देवतांची स्थापना सर्वांनीं करावी. शिवलिंगाची स्थापना संन्यासी यानेंहि करावी. पुराणप्रसिद्ध अशा प्राचीन लिंगाची पूजा स्त्रिया व शूद्र यांनींहि करावी. "नूतन स्थापित केलेलें अशा लिंगास स्त्रिया व शूद्र यांनीं स्पर्श करूं नये." स्त्रिया व शूद्र यांला शिव इत्यादि देवतांच्या स्थापनेविषयीं अधिकार नाहीं. "शूद्र अथवा मौंजी न झालेला, स्त्रिया, अथवा पतित (जातिबहिष्कृत) यांतून कोणीहि विष्णु किंवा शिव यांला स्पर्श करील तर तो नरकभोक्ता होईल." ज्या स्थिर मूर्ति पूर्वाभिमुख असतील त्यांची पूजा उत्तराभिमुख होत्साता करावी. चलमूर्तींची पूजा प्राङ्मुख होत्साता करावी. "मूर्ति करावयाची ती सुवर्णमयी, रौप्यमयी, ताम्रमयी, मृन्मयी, करावी. अथवा पाषाण, धातु, मौक्तिक, कांस्य, आणि पितळ यांतून कोणतीहि मूर्ति करावी. गृहामध्यें पूजेला मूर्ति करावयाची ती ज्ञात्यांनीं अंगुष्ठपर्वपरिमाणापासून एक वीतपर्यंत उंचीची करावी ती शुभ होय, एक वितीहून अधिक उंचीची मूर्ति प्रशस्त नाहीं, असें शास्त्र जाणणारे सांगतात." "क्वचित् ग्रंथांत मृत्तिका, लाख, गोमेद मणि, मेण यांची मूर्ति करावी असें सांगितलें आहे." श्रीमद्भागवतांत–" पाषाणमयी, दारुमयी, लौही, लेप्या (मृन्मयी) लेख्या (भिंती इत्यादिकांवर रंगानें काढलेली), वालुकामयी, मनोमयी, मणिमयी याप्रमाणें आठ प्रकारच्या मूर्ति कराव्या असें सांगितलें आहे." लौही ह्मणजे सुवर्णमयी. दारु (काष्ठ) तें मधूक ह्मणजे मोहाच्या वृक्षाचेंच ग्रहण करावें. गृहामध्यें पूजेला मूर्ति करणें ती सात अंगुळांहून अधिक बारा अंगुळांपर्यंत इतक्या उंचीची करावी असें देवी पुराणांत सांगितलें आहे. "पूजा करणाराचें तप, पूजेचा भक्तिविशेष, आणि मूर्तीचें सौंदर्य ह्या तीन कारणांनीं देवतेचें पूजाकालीं सान्निध्य असतें. मूर्ति, पट्ट, यंत्रें यांला नित्य स्नान घालूं नये, पर्वणीच्या दिवसीं स्नान घालावें, किंवा मूर्ति मलिन झाल्या असतां स्नान घालावें." पार्थिवलिंगाची पूजा इत्यादिकाचा निर्णय दुसऱ्या परिच्छेदांत सांगितला आहे.

---

अथपंचसूत्रीनिर्णयः लिंगोच्चतालिंगविस्तारोलिंगस्थौल्यंपीठविस्तारःप्रनालिकामानंचेति

पंचसूत्राणि तत्रलिंगमस्तकविस्तारंलिंगोच्चतातुल्यंकृत्वातद्द्विगुणसूत्रवेष्टनार्हंलिंगस्थौल्यंकृत्वालिंगात्सर्वतोलिंगसमविस्तारंपीठंवर्तुलंकुर्यात् पीठोच्चतालिंगोच्चद्विगुणा पीठाद्बहिःपीठोत्तरभागेलिंगसमदीर्घामूलेदैर्घ्यसमविस्ताराअग्रेतदर्धविस्ताराप्रनालिका लिंगोच्चत्वत्रिगुणापीठोच्चतेतिकेचित् अथपीठमध्यभागेलिंगात्द्विगुणस्थूलं पीठोच्चतातृतीयांशेनकंठंकुर्यात् कंठस्योर्ध्वाधोभागयोःसमवप्रद्वयंकृत्वा पीठोपरिलिंगविस्तारषष्ठांशेनमेखलांकृत्वा तदंतःसंलग्नंतत्समंखातंकुर्यात् प्रनालिकायामपिविस्तारतृतीयांशेनखातःपीठवन्मेखलाचकार्येति ॥

## आतां यानंतर पंचसूत्रीनिर्णय सांगतों.

लिंगाची उंची, लिंगाची रुंदी, लिंगाचा जाडेपणा, शाळुंखीचा विस्तार, आणि प्रनालिकापरिमाण हीं पांच सूत्रें जाणावीं. त्यामध्यें लिंगाची उंची जितकी असेल तावत्परिमाण लिंगाच्या मस्तकाचा विस्तार ( व्यास ) करून त्याच्या द्विगुण सूत्राचें वेष्टन केलें असतां पुरेल इतका लिंगाचा जाडेपणा करून लिंगाच्या सभोंवार लिंगाइतक्या विस्तारानें युक्त असें वर्तुळाकार पीठ करावें. पीठाची उंची लिंगाच्या उंचीपेक्षां दुप्पट करावी. पीठाच्या बाहेर पीठाच्या उत्तरभागीं लिंगाइतकी लांब असून मूलाचे ठिकाणीं, लांबीच्या समान जीचा विस्तार ह्मणजे व्यास आहे असी असून अग्रभागीं मूलाच्या अर्ध्या भागाच्या विस्तारानें युक्त प्रनालिका करावी. लिंगाची जी उंची तिच्या तिप्पट पीठाची उंची करावी असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. नंतर पीठाच्या मध्यभागीं लिंगाहून दुप्पट जाड असा, पीठाच्या उंचीच्या तिसऱ्या अंशानें कंठ करावा. कंठाचा वरचा भाग व अधोभाग यांचे ठिकाणीं सारख्या प्रमाणाच्या दोन मेखला करून पीठाच्या वर, लिंगाचा जो व्यास असेल त्याच्या सहाव्या अंशानें मेखला करून त्या मेखलेच्या आंत लागून राहील असी तत्तुल्य गर्ता करावी. प्रनालिकेचे ठिकाणींहि विस्ताराच्या तिसऱ्या अंशेंकरून गर्त्ता करून पीठाच्या मानाप्रमाणें मेखला करावी. याप्रमाणें पंचसूत्रीचा प्रकार जाणावा.

---

गृहेलिंगद्वयंनार्च्यंशालग्रामद्वयंतथा द्वेचक्रेद्वारकायास्तुनार्च्येसूर्यद्वयंतथा शक्तित्रयंत्रिविघ्नेशंद्वौशंखौनार्चयेत्सुधीः अन्यत्रतु चक्रांकमिथुनंपूज्यंनैकंचक्रांकमर्चयेदित्युक्तंतेन विकल्पः नार्चयेच्चतथामत्स्यकूर्मादिदशकंगृहे अग्निदग्धाश्चभग्नाश्चनपूज्याःप्रतिमागृहे भग्नावास्फुटितावापिशालग्रामशिलाशुभा शालग्रामाःसमाःपूज्याःसमेषुद्वितयंनहि विषमानैवपूज्यंतेविषमेष्वेकएवहि ससुवर्णशालग्रामदानेपृथ्वीदानफलं शतशालग्रामपूजनेऽनंतफलं अविभक्तानामपिभ्रातॄणांदेवतार्चनमग्निहोत्रंसंध्याब्रह्मयज्ञश्चपृथगेव स्त्रीशूद्रोवास्पर्शसहितंशालग्रामचक्रांकितबाणलिंगानिनार्चयेत् शूद्रोवानुपनीतोवासधवाविधवांगना दूरादेवास्पृशन्पूजांप्रकुर्याच्छिवकृष्णयोः शालग्रामबाणयोरेवस्पर्शननिषेधोनतुप्रतिमादौ सर्ववर्णैस्तुसंपूज्याःप्रतिमाःसार्वदेवताः लिंगान्यपितुपूज्यानिमणिभिःकल्पितानिचेत्युक्तेः शालग्रामशिलाक्रीतामध्यमायाचिताधमा उक्तलक्षणसंपन्नापारंपर्यक्रमागता उत्तमासातुविज्ञेयागुरुदत्तातुतत्समा तत्राप्यामलकीतुल्यापूज्यासूक्ष्मैवयाभवेत् यथायथाशिलासूक्ष्मातथास्यात्सुम

हत्फलं यवमात्रंतुगर्तःस्याद्यवार्धलिंगमुच्यते शिवनाभिरितिख्यातस्त्रिषुलोकेषुदुर्लभः शालग्रामशिलायास्तुप्रतिष्ठानैवविद्यते महापूजांतुकृत्वादौपूजयेत्तांततोबुधः बाणलिंगानिराजेंद्रख्यातानिभुवनत्रये नप्रतिष्ठानसंस्कारस्तेषामावाहनंतथा वासुदेवसंकर्षणप्रद्युम्नानिरुद्धाविप्राद्यैःक्रमेणपूज्याः तल्लक्षणंतु पंचचक्रोवासुदेवः षड्भिश्चक्रैःप्रद्युम्नः सप्तभिःसंकर्षणः एकादशभिरनिरुद्धइति प्रणवोच्चारणाच्चैवशालग्रामशिलार्चनात् ब्राह्मणीगमनाच्चैवशूद्रश्चांडालतांव्रजेत् दीक्षायुक्तैस्तथाशूद्रैर्मद्यपानविवर्जितैः कर्तव्यंब्राह्मणद्वाराशालग्रामशिलार्चनम् विष्णुप्रीतिकरंनित्यंतुलसीकाष्ठचंदनम् कार्तिकेकेतकीपुष्पंयेनदत्तंहरेःकलौ दीपदानंचदेवेतारितंतेनवैकुलं शालग्रामसंबंधितोयवच्चक्रांकशिलातोयस्यापिपानविधानात्सापिशालग्रामसन्निधौपूज्या अग्राह्यंशिवनिर्माल्यंपत्रंपुष्पंफलंजलं शालग्रामस्यसंस्पर्शात्सर्वंयातिपवित्रतां मध्यमानामिकामध्येपुष्पंसंगृह्यपूजयेत् अंगुष्ठतर्जन्यग्राभ्यांनिर्माल्यमपनोदयेत् विनाभस्मत्रिपुंड्रेणविनारुद्राक्षमालया पूजितोपिमहादेवोनस्यात्तस्यफलप्रदः विनामंत्रंनबिभृयाद्रुद्राक्षान्भुविमानवः पंचामृतंपंचगव्यंस्नानकालेप्रयोजयेत् रुद्राक्षस्यप्रतिष्ठायांमंत्रंपंचाक्षरंतथा त्र्यंबकादिकमंत्रंचतथातत्रप्रयोजयेत् अष्टोत्तरशतंकुर्याच्चतुःपंचाशदेवतु सप्तविंशतिमानावामालाहीनानयुज्यते सप्तविंशतिरुद्राक्षमालयादेहसंस्थया यःकरोतिनरःपुण्यंसर्वंकोटिगुणंभवेत् ॥

"गृहामध्यें दोन लिंगें पुजूं नयेत. तसेच दोन शाळग्राम, दोन द्वारकाचक्रें (चक्रांक), दोन सूर्यकांत, तीन देवी, तीन गणपति, दोन शंख पुजूं नयेत." दुसऱ्या ग्रंथांत तर, "दोन चक्रांक पुजावे, एक चक्रांक पुजूं नये" असें सांगितलें आहे व पूर्वी दोन चक्रांकांचा निषेध केला यावरून असें सिद्ध होतें कीं, दोन चक्रांक पुजण्याविषयीं विकल्प आहे. "तसेंच, गृहामध्यें मत्स्य, कूर्म इत्यादिक दशावतारमूर्ति पुजूं नयेत. अग्नीनें दग्ध झालेल्या व मोडक्या, फुटक्या मूर्ति घरांत पुजूं नयेत. शालग्रामशिळा भग्न असो अथवा फुटलेली असो ती पूजेला शुभ होय. शालग्राम पुजावयाचे ते सम (४, ६, ८, १०) पुजावे, समांमध्यें दोन पुजूं नयेत व विषम (३, ५, ७ १०) पुजूं नयेत, विषमांमध्यें एक मात्र पुजावा." सुवर्णासहित शाळग्रामाचें दान केलें असतां पृथ्वीदानाचें फळ मिळतें. शंभर शाळग्रामांची पूजा केली असतां अनंत फळ मिळतें. भ्राते अविभक्त असतील तथापि त्यांनीं देवपूजा, अग्निहोत्र, संध्या, ब्रह्मयज्ञ हीं निरनिराळीं करावीं. स्त्रिया किंवा शूद्र यांनीं शाळग्राम, चक्रांक आणि बाणलिंग यांची स्पर्शसहित पूजा करूं नये. "कारण शूद्र, मौंजी न झालेला, सौभाग्यवती स्त्री, विधवा स्त्री यांनीं स्पर्श न करितां दुरून शिव व विष्णु यांची पूजा करावी," असें वचन आहे. शालग्राम व बाणलिंग यांच्याच स्पर्शाविषयीं निषेध आहे; मूर्ति इत्यादिकांच्या स्पर्शाविषयीं निषेध नाहीं; कारण "सर्व वर्णांनीं सर्व देवांच्या मूर्ति पुजाव्या, व मणिमय केलेलीं लिंगें सुद्धां पुजावीं असें" वचन आहे. "विकत घेतलेली शालग्रामशिळा ती मध्यम होय व याचना करून संपादन केलेली अधम होय. उक्त लक्षणसंपन्न असून परंपरेनें प्राप्त झालेली जी शालग्रामशिळा ती उत्तम जाणावी व आपल्या गुरूनें दिलेली तीहि त्यासारखी (उत्तम) जाणावी. त्यामध्येंहि जी शाळग्रामशिला आवळ्याएवढी लहान

असेल तीच पूज्य होय; याहिपेक्षां जितकी जितकी लहान असेल तिच्या पूजेपासून महत्फल ( मोक्ष ) प्राप्त होतें. ज्या शालग्रामांत एक यव परिमित खळगा असून यवार्धपरिमित लिंग असतें त्या शालग्रामास शिवनाभि असें ह्मणतात व तो शालग्राम स्वर्ग, मृत्यु, पाताल अशा तीन लोकांत दुर्लभ आहे. शालग्रामशिळेची निश्चयें अर्चा करूं नये; तर पूर्वी महापूजा करून नंतर तिची पूजा करावी. हे राजेंद्रा, बाणलिंगें त्रिभुवनांत प्रसिद्ध आहेत, त्या बाणलिंगांचा अर्चासंस्कार व आवाहन हीं करूं नयेत." वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न आणि अनिरुद्ध यांची विप्रादिकांनीं क्रमेंकरून पूजा करावी, ह्मणजे ब्राह्मणानें वासुदेवाची, क्षत्रियानें संकर्षणाची, वैश्यानें प्रद्युम्नाची, शूद्रानें अनिरुद्धाची पूजा करावी. त्यांचीं लक्षणें— ज्या शालग्रामशिळेवर पांच चक्रें असतील ती वासुदेवमूर्ति, जिच्यावर सहा चक्रें असतील तो प्रद्युम्न, जिच्यावर सात चक्रें असतील तो संकर्षण, आणि अकरा चक्रांनीं युक्त तो अनिरुद्ध याप्रमाणें लक्षणें जाणावीं. " प्रणवाचा उच्चार, शालग्रामशिळेची पूजा, ब्राह्मणी स्त्रीचे ठायीं गमन हीं केल्यानें शूद्र चांडालत्वाला पावतो. मद्यपानानें विरहित असून विष्णुदीक्षेनें युक्त अशा शूद्रांनीं ब्राह्मणाकडून शालग्रामशिलेची पूजा करावी. हे नारदा, विष्णूचा नित्य संतोष करणारें असें तुलसीकाष्ठाचें चंदन, कार्तिकमासीं केतकीपुष्प, दीपदान हीं कलियुगामध्यें हरीला ज्याणें अर्पण केलीं त्यानें स्वकीय कुलाचें तारण केलें असें होतें." शालग्रामसंबंधी तीर्थाप्रमाणें चक्रांकित शिळेचेंहि तीर्थ प्राशन करावें असा विधि आहे, याकरितां शालग्रामशिळेच्या सन्निध चक्रांकिताचीहि पूजा करावी. " शिवाचा निर्माल्य असीं पत्रें, पुष्पें, फलें आणि जल हीं अग्राह्य होत, याकरितां शालग्रामाच्या स्पर्शानें सर्व शिवनिर्माल्य पवित्र होतो. देवावर पुष्प वाहणें तें मध्यमांगुली व अनामिका यांच्या मध्यें पुष्प घेऊन वाहावें. देवावरील निर्माल्य काढावयाचा तो अंगुष्ठ व तर्जनी यांच्या अग्रांनीं काढावा. भस्माचा त्रिपुंड्र लाविल्यावांचून, व रुद्राक्षांची माला धारण केल्यावांचून महादेव पूजिला तथापि पूजा करणाराला तो फलदायक होत नाहीं. पृथ्वीवर मनुष्यानें मंत्रावांचून रुद्राक्ष धारण करूं नयेत. रुद्राक्षाच्या स्नानाच्या वेळीं पंचामृत व पंचगव्य योजावें. रुद्राक्षाच्या प्रतिष्ठेविषयीं पंचाक्षरमंत्र ( **नमः शिवाय** ) व त्र्यंबकादिक मंत्र हे योजावे. माला करणें ती अष्टोत्तरशत किंवा चौपन्न, अथवा सत्ताविसांची करावी. याहून कमी मण्यांची माला करूं नये. सत्तावीस रुद्राक्षांची माला कंठामध्यें धारण करून जो मनुष्य जप इत्यादिक पुण्यकर्म करितो त्याचें तें सर्व कोटिगुणित होईल."

---

**अथरुद्राक्षतुलस्यादिसर्वजपमालानांसंस्कारः कुशोदकसहितैःपंचगव्यैर्मालांप्रक्षाल्य ॐ ह्रींअंआंइंईंउंऊंऋंॠंलृंलॄंएंऐंओंऔंअंअः कंखंगंघंङं चंछंजंझंञं टंठंडंढंणं तंथंदंधंनं पंफं बंभंमं यंरंलंवंशंषंसंहंळंक्षंइत्येतानिपंचाशन्मातृकाक्षराणि अश्वत्थपत्रस्थापितमालायांविन्यस्य ॐसद्योजातं० वामदेवाय० अघोरेभ्यो० तत्पुरुषाय० ईशानःसर्वविद्याना० इतिपंचमंत्रान्जपित्वा सद्योजातेतिमंत्रेणमालांपंचगव्येनप्रोक्ष्यशीतजलेनप्रक्षाल्यवामदेवेतिचंदनेनाघृष्याघोरेतिमालांधूपयित्वातत्पुरुषेतिचंदनकस्तूर्यादिनालेपयित्वेशानइतिमंत्रेण प्रतिमणिं**

**शतवारंदशवारंवाभिमंत्र्यअघोरइतिमंत्रेणमेरुंशतवारमभिमंत्रयेत् ततएतैरेवपंचभिर्मंत्रैर्मालांपंचोपचारैःपूजयेदिति ॥**

## आतां रुद्राक्ष, तुलसी इत्यादिक सर्व जपमालांचा संस्कार सांगतों.

कुशोदकसहित पंचगव्यांनीं ( दूध, दहीं, घृत, गोमय, गोमूत्र ) मालेचें प्रक्षालन करून ती माला पिंपळाच्या पानावर स्थापन करून तीवर हात ठेवून पुढें सांगतों तीं अक्षरें ह्मणावीं. तीं असीं— " **ॐह्रीं अंआंइंईंउंऊंऋंॠंलृंलॄंएंऐंओंऔंअंअः कंखंगंघंङं चंछंजंझंञं टंठंडंढंणं तंथंदंधंनं पंफंबंभंमं यंरंलंवंशंषंसंहंक्षं** " याप्रमाणें पन्नास मातृकाक्षरें यांचा न्यास मालेवर करावा. नंतर " **सद्योजातं०, वामदेवाय०, अघोरेभ्यो०, तत्पुरुषाय०, ईशानःसर्व०** " ह्या पांच मंत्रांचा जप करून " **सद्योजातं०** " ह्या मंत्रानें पंचगव्येंकरून मालेचें प्रोक्षण करून शीतोदकानें ती माला प्रक्षालन करावी. नंतर " **वामदेवा०** " ह्या मंत्रानें तिला चंदनानें घांसून " **अघोरे०** " ह्या मंत्रानें धूप दाखवून " **तत्पुरुषा०** " हा मंत्र ह्मणून चंदन, कस्तूरी इत्यादिकानें लिप्त करून " **ईशानःस०** " ह्या मंत्रानें प्रत्येक मण्याला शंभर वेळ किंवा दहा वेळ अभिमंत्रण करून " **अघोरे०** " हा मंत्र ह्मणून मालेचा जो मेरु त्याला शंभर वेळ अभिमंत्रण करावें. तदनंतर ह्याच पांच मंत्रांनीं मालेची गंधादि पंचोपचारांनीं पूजा करावी. याप्रमाणें मालासंस्कारविधि सांगितला.

---

**बोपदेवः रुद्राक्षान्कंठदेशेदशन ३२ परिमितान्मस्तकेविंशतीद्वे ४० षट्षट्कर्णतदेशेकरयुगुलकृतेद्वादशद्वादशैव बाह्वोरिंदोःकलाभि१६र्नयनयुगकृतेएकमेकंशिखायांवक्षस्यष्टाधिकंयःकलयतिशतकंसस्वयंनीलकंठः रुद्राक्षदानाद्रुद्रपदप्राप्तिः ॥**

**बोपदेव रुद्राक्षधारणाची संख्या सांगतो**—" कंठाचे ठिकाणीं ३२, मस्तकाचे ठायीं ४०, प्रत्येक कर्णाचे ठायीं सहा सहा, दोन हस्तांचे ठायीं बारा बारा, दोन बाहूंचे ठायीं सोळा, दोन नेत्रांचे ठायीं एकेक, शिखेचे ठायीं एक, वक्षस्थळीं १०८, याप्रमाणें जो मनुष्य रुद्राक्ष धारण करितो तो साक्षात् शंकर जाणावा. " रुद्राक्षाचें दान केलें असतां रुद्रपदाची प्राप्ति होते.

---

**पंचविंशत्पलंलिंगेष्वभ्यंगंकारयेदथ स्नापयेत्तिलतैलैश्चकरयंत्रोद्भवैःशिवं स्नानंपलशतंज्ञेयमभ्यंगःपंचविंशतिः पलानांद्विसहस्रेणमहास्नानंजलेनतत् पयोदधिघृतक्षौद्रशर्कराद्यैस्ततःक्रमात् शिवस्यसर्पिषास्नानंप्रोक्तंपलशतेनवै तावतामधुनाचैवदध्नाचपयसापिच पलसार्धसहस्रेणरसेनैवैक्षवेणच भक्त्याचोष्णोदकैःशीतोदकैःसंस्नापयेच्छिवं श्रीविष्णुंक्षीरदध्याद्यैःक्रमाद्दशगुणोत्तरैः स्नापयेत्केचिदूचुश्चक्षीराद्यैःपंचभिःसमैः ॥**

" लिंगास अभ्यंग करविणें तो पंचविंशतिपलपरिमित करवावा. हाताच्या यंत्रापासून काढलेलें अशा तिळांच्या तेलानें शिवाला स्नान घालावें. शंभर पलें उदकाचें घालावें तें

---

१ एक पल ह्मणजे शास्त्रीय चार तोळे, ह्मणजे गुंजा ३२० ह्यांचे शास्त्रीय मासे ६४ व हल्लीं लौकिक रीतीचे मासे ४० होतात.

स्नान होय. अभ्यंग करणें तो पंचवीस पलपरिमित करावा. दोन सहस्र पलपरिमित उदक घेऊन स्नान घालावें तें महास्नान होय. तदनंतर क्रमेंकरून दुग्ध, दहीं, मधु, घृत आणि शर्करा यांहींकरून क्रमानें स्नान घालावें. शिवाला शंभर पलें घृताचें स्नान घालावें असें सांगितलें आहे. मधु, दहीं, दूध हीं शंभर शंभर पलें घेऊन स्नान घालावें. पंधराशें पलें प्रमाण उंसाच्या रसाचें स्नान घालावें. शिवाला उष्णोदक व शीतोदक यांहींकरून भक्तिपुरःसर स्नान घालावें. श्रीविष्णूला दूध, दहीं इत्यादि पंचामृतांनीं स्नान घालणें तें दशगुणित क्रमानें उत्तरोत्तर घालावें; ह्मणजे दुधाहून दहीं दशगुणित, दह्यांहून घृत दशगुणित याप्रमाणें घालावें. कोणी ग्रंथकार, दूध इत्यादिक पंचामृतें समान घेऊन स्नान घालावें असें ह्मणतात. ”

---

**अथश्रीविष्णवादिपंचायतनानि विष्णुर्मध्येशिवेभास्यसूर्यार्याईशदिक्क्रमात् शंभौमध्ये विष्णुसूर्यगजास्यार्यास्तथाक्रमात् १ रवौमध्यगतेरुद्रगणेशाच्युतशक्तयः मध्येदेवीविष्णु शिवगणेशरवयः क्रमात् २ मध्येगणपतिर्विष्णुशिवसूर्यांबिकास्तथा ऐशान्यादिक्रमेणैवपंचायतनपंचकं ३ ॥**

## आतां विष्णु इत्यादिकांचीं पंचायतनें मांडावीं कसीं तीं सांगतों.

**विष्णुपंचायतन**—मध्यें विष्णु, ऐशानी दिशेस शिव, आग्नेयीस गणपति, नैर्ऋत्येस सूर्य, वायवीदिशेस देवी याप्रमाणें स्थापावे. **शिवपंचायतन**—मध्यें शिव, ऐशानीस विष्णु, आग्नेयीस सूर्य, नैर्ऋतीस गणपति, वायवीस देवी याप्रमाणें स्थापावे. **सूर्यपंचायतन**—मध्यें सूर्य, ऐशानी दिशेपासून क्रमानें शिव, गणपति, विष्णु आणि देवी याप्रमाणें स्थापावे. **देवीपंचायतन**—मध्यें देवी, विष्णु, शिव, गणपति, सूर्य याप्रमाणें ऐशानीक्रमेंकरून मांडावे. **गणपतिपंचायतन**—मध्यें गणपति, नंतर क्रमानें विष्णु, शिव, सूर्य आणि देवी यांची ऐशानीक्रमानें स्थापना करावी. याप्रमाणें ईशानादि क्रमानें पांच पंचायतनें मांडण्याचा क्रम जाणावा.

**पंचायतनें.**

उत्तरदिशा

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| शंकर | गणेश | विष्णु | सूर्य | शंकर | गणेश | विष्णु | शंकर | विष्णु | शंकर |
| २ | ३ | २ | ३ | २ | ३ | २ | ३ | २ | ३ |
| विष्णु | | शंकर | | सूर्य | | देवी | | गणपति | |
| १ | | १ | | १ | | १ | | १ | |
| देवी | सूर्य | देवी | गणेश | देवी | विष्णु | सूर्य | गणेश | देवी | सूर्य |
| ५ | ४ | ५ | ४ | ५ | ४ | ५ | ४ | ५ | ४ |

दक्षिणदिशा

**अथकेशवादिचतुर्विंशतिमूर्तिनिर्णायकबोपदेवश्लोकःसिंधौव्याख्यातः तस्यायंसंग्रहः केशवादेश्चतुर्बाहोर्दक्षिणोर्ध्वकरक्रमात् शंखचक्रगदापद्मायुधैःकेशवउच्यते १ नारायणः पद्मगदाचक्रशंखायुधैःक्रमात् माधवश्चक्रशंखाभ्यांपद्मेनगदयाभवेत् २ गोविंदोगदयापद्म**

शंखचक्रैः क्रमाद्भवेत् विष्णुःपद्मेनशंखेनचक्रेणगदयाक्रमात् ३ शंखपद्मगदाचक्रैर्मधुसूद नईरितः त्रिविक्रमोगदाचक्रशंखपद्मैरनुक्रमात् ४ वामनःशंखचक्राभ्यांपद्मेनगदयापिच च क्रेणगदयाशंखपद्माभ्यांश्रीधरःस्मृतः ५ हृषीकेशःस्मृतश्चक्रपद्मशंखगदायुधैः पद्मनाभःप द्मचक्रगदाशंखैःक्रमात्स्मृतः ६ दामोदरःशंखगदाचक्रपद्मैरुदीर्यते संकर्षणःशंखपद्मचक्रा युधगदायुधैः ७ वासुदेवश्चक्रगदापद्मशंखाख्यलक्षणैः प्रद्युम्नःस्याच्छंखगदापद्मचक्रैःक्रमा द्धृतैः ८ अनिरुद्धोगदाशंखपद्मचक्रैरनुक्रमात् पद्मशंखगदाचक्रायुधैःस्यात्पुरुषोत्तमः ९ अधोक्षजोगदाशंखचक्रपद्मैःकरस्थितैः नरसिंहः पद्मगदाशंखचक्रायुधैर्भवेत् १० अच्युतः पद्मचक्राभ्यांशंखेनगदयाक्रमात् जनार्दनश्चक्रशंखगदापद्माद्यबाहुभिः ११ उपेंद्रोगदया चक्रपद्मशंखान्वितैःकरैः चक्रपद्मगदाशंखैःकरस्थैःस्यात्क्रमाद्धरिः १२ श्रीकृष्णाख्योग दापद्मचक्रशंखैर्मतोविभुः इतिप्रोक्ताःकेशवादिचतुर्विंशतिमूर्तयः १३ ॥

यानंतर केशवादिक चोवीस मूर्तींच्या निर्णयाचा श्लोक बोपदेवानें केलेला, निर्णयसिंधूंत व्याख्यासहित लिहिला आहे, त्याचा हा एथें संग्रह करितों. चतुर्भुज अशा ज्या केशवादिक चोवीस मूर्ति त्यांचे चार हस्तांमध्यें जीं चार आयुधें त्यांच्या उलटपालटीनें त्या त्या मूर्ति जाणाव्या, व तो आयुधांचा क्रम वरच्या दक्षिण बाहूपासून समजावा. तो असा—१ वरच्या दक्षिण हस्तांत शंख, खालच्या दक्षिण हस्तांत चक्र, खालच्या वामहस्तांत गदा, वरच्या वामहस्तांत पद्म अशा आयुधांनीं युक्त तो **केशव.** २ वरच्या दक्षिण हस्तांत पद्म, खालच्या दक्षिण हस्तांत गदा, खालच्या वामहस्तांत चक्र, वरच्या वामहस्तांत शंख अशा आयुधांनीं युक्त तो **नारायण.** ३ चक्र, शंख, पद्म व गदा अशा आयुधांनीं सहित तो **माधव.** ४ गदा, पद्म, शंख आणि चक्र यांहींकरून युक्त तो **गोविंद.** ५ पद्म, शंख, चक्र व गदा या क्रमानें युक्त तो **विष्णु.** ६ शंख, पद्म, गदा, चक्र यांहींकरून युक्त तो **मधुसूदन.** ७ गदा, चक्र, शंख आणि पद्म यांहींकरून युक्त तो **त्रिविक्रम.** ८ शंख, चक्र, पद्म व गदा अशा क्रमानें युक्त तो **वामन.** ९ चक्र, गदा, शंख, पद्म यांहींकरून युक्त **श्रीधर** जाणावा. १० चक्र, पद्म, शंख आणि गदा यांहींकरून युक्त तो **हृषीकेश.** ११ पद्म, चक्र, गदा, शंख यांहींकरून युक्त तो **पद्मनाभ** जाणावा. १२ शंख, गदा, चक्र, पद्म यांहीं युक्त तो **दामोदर.** १३ शंख, पद्म, चक्र, गदा ह्या आयुधांनीं युक्त तो **संकर्षण.** १४ चक्र, गदा, पद्म, शंख अशा आयुधांनीं युक्त **वासुदेव** जाणावा. १५ शंख, गदा, पद्म, चक्र या क्रमानें धारण केलेल्या आयुधांनीं **प्रद्युम्न.** १६ गदा, शंख, पद्म, आणि चक्र या अनुक्रमानें युक्त तो **अनिरुद्ध.** १७ पद्म, शंख, गदा, व चक्र या आयुधांनीं युक्त तो **पुरुषोत्तम.** १८ गदा, शंख, चक्र, पद्म अशा क्रमानें हस्तांत धारण केलेल्या आयुधांनीं **अधोक्षज.** १९ पद्म, गदा, शंख आणि चक्र ह्या आयुधांनीं युक्त तो **नरसिंह.** २० पद्म, चक्र, शंख व गदा या क्रमेंकरून **अच्युत** जाणावा. २१ चक्र, शंख, गदा, पद्म या आयुधांतें दक्षिणादि बाहूंनीं धारण करणारा **जनार्दन** होतो. २२ गदा, चक्र, पद्म, शंख यांहीं युक्त बाहूंनीं **उपेंद्र** जाणावा. २३ चक्र, पद्म, गदा, शंख ह्या क्रमानें हस्तांत

धारण केलेल्या आयुधांनीं हरि जाणावा. २४ गदा, पद्म, चक्र व शंख यांहींकरून युक्त तो श्रीकृष्ण. याप्रमाणें आयुधांच्या धारणावरून केशवादिक चोवीस मूर्ति सांगितल्या.

---

अथसिंध्वनुसारेणदेवप्रतिष्ठाप्रयोगः यजमानोद्वादशादिहस्तंमंडपंकृत्वाआग्नेयेपूर्वेतोवाह्स्तमात्रंकुंडंस्थंडिलंवाकृत्वामध्येवेदींतदुपरिसर्वतोभद्रंग्रहचिकीर्षायांपूर्वेतःईशान्यांवाग्रहवेदीं प्रासादसंस्कारेमंडपसंस्कारेवाचिकीर्षितेनैर्ऋतेवास्तुपीठंकृत्वाअस्यांमूर्तौ लिंगेवादेवतासान्निध्यार्थं दीर्घायुर्लक्ष्मीसर्वकामसमृद्ध्यक्षय्यसुखकामोमुक्तदेवमूर्तिप्रतिष्ठांकरिष्येइतिसंकल्प्य स्वस्तिवाचनादिनांदीश्राद्धांतेआचार्यंवृत्वाष्टौचतुरोवाऋत्विजोवृत्वापूजयेत् आचार्योयदत्रेति सर्षपान्विकीर्यापोहिष्ठेतिकुशोदकैर्भूमिंप्रोक्ष्य देवाआयांतुयातुधानाअपयांतुविष्णोदेवयजनं रक्षस्वेतिभूमौप्रादेशंकृत्वा मंडपप्रतिष्ठांकृत्वानकृत्वावा मूर्तिपंचगव्यंहिरण्ययवदूर्वाश्वत्थपलाशपर्णान्युदकुंभेप्रक्षिप्य ताभिरद्भिरापोहिष्ठेतितिसृभिर्हिरण्यवर्णाःशुचयःपावकायासुजातः कश्यपोयास्विंद्रः अग्निंयागर्भंदधिरेविरूपास्तानआपःशꣳस्योनाभवंतु १ यासाꣳराजावरुणो यातिमध्येसत्यानृतेअवपश्यंजनानां मधुश्चुतःशुचयोयाःपावकास्ता० २ यासांदेवादिविकृण्वंतिभक्षंयाअंतरिक्षेबहुधाभवंति याःपृथिवींपयसोंदंतिशुक्रास्तान० ३ शिवेनमाचक्षुषापश्यतापःशिवयातनुवोपस्पृशतत्वचंमे सर्वाꣳअग्निꣳरप्सुषदोहुवेवोमयिवर्चोबलमोजोनिधत्त ४ पवमानःसुवर्जनः पवित्रेणविचर्षणिः यःपोतासपुनातुमा पुनंतुमादेवजनाः पुनंतुमनवोधिया पुनंतुविश्वआयवः जातवेदःपवित्रवत् पवित्रेणपुनाहिमा शुक्रेणदेवदीद्यत् अग्नेक्रत्वाक्रतूꣳरनु १ यत्तेपवित्रमर्चिषि अग्नेविततमंतरा ब्रह्मतेनपुनीमहे उभाभ्यांदेवसवितः पवित्रेणसवेनच इदंब्रह्मपुनीमहे वैश्वदेवीपुनतीदेव्यागात् यस्यैबह्वीस्तनुवोवीतपृष्ठाः तयामदंतःसधमाद्येषु वयꣳस्यामपतयोरयीणां २ वैश्वानरोरश्मिभिर्मापुनातु वातःप्राणेनेषिरोमयोभूः द्यावापृथिवीपयसापयोभिः ऋतावरीयज्ञियेमापुनीतां बृहद्भिःसवितस्तृभिः वर्षिष्ठैर्देवमन्मभिः अग्नेदक्षैःपुनाहिमा येनदेवाअपुनत येनापोदिव्यंकशः तेनदिव्येनब्रह्मणा ३ इदंब्रह्मपुनीमहे यःपावमानीरध्येति ऋषिभिःसंभृतꣳरसं सर्वꣳसपूतमश्नाति स्वदितंमातरिश्वना पावमानीर्योअध्येति ऋषिभिः संभृतꣳरसं तस्मैसरस्वतीदुहे क्षीरꣳसर्पिर्मधूदकं पावमानीःस्वस्त्ययनीः ४ सुदुघाहिपयस्वतीः ऋषिभिःसंभृतोरसः ब्राह्मणेष्वमृतꣳहितं पावमानीर्दिशंतुनः इमंलोकमथोअमुं कामान्समर्धयंतुनः देवीर्देवैःसमाभृताः पावमानीःस्वस्त्ययनीः सुदुघाहिघृतश्चुतः ऋषिभिः संभृतोरसः ५ब्राह्मणेष्वमृतꣳहितं येनदेवाःपवित्रेणआत्मानंपुनतेसदा तेनसहस्रधारेण पावमान्यःपुनंतुमा प्राजापत्यंपवित्रं शतोद्यामꣳहिरण्मयं तेनब्रह्मविदोवयं पूतंब्रह्मपुनीमहे इंद्रःसुनीतीसहमापुनातु सोमःस्वस्त्यावरुणःसमीच्या यमोराजाप्रमृणाभिः पुनातुमा जातवेदामूर्जयंत्यापुनातु ६ इत्यनुवाकेनचाभिषिच्यव्याहृतिभिरिदंविष्णुरितिचफलयवदूर्वाःसमर्प्य रक्षोहणमितिदेवहस्तेकंकणंबध्वावाससाच्छाद्य अवतेहेळोउदुत्तममितिजलेधिवासयेत् ॥

## आतां निर्णयसिंधूमध्यें सांगितल्या रीतीनें देवप्रतिष्ठेचा प्रयोग सांगतों.

यजमानानें द्वादश इत्यादि हस्तपरिमित मंडप करून आग्नेयी दिशेस किंवा पूर्व दिशेस हस्तपरिमित कुंड अथवा स्थंडिल करून मध्यभागीं वेदी करून त्या वेदीवर सर्वतोभद्र मंडल घालावें. ग्रह करण्याची इच्छा असल्यास, पूर्व दिशेकडे किंवा ऐशानी दिशेकडे ग्रह स्थापन करण्याकरितां वेदी करावी. प्रासादाचा ( देवालयाचा ) संस्कार, किंवा मंडपाचा संस्कार कर्तव्य असतां, नैर्ऋत्य दिशेस वास्तुपीठ करून यजमानानें संकल्प करावा. तो असा— "**अस्यां मूर्तौ लिंगे वा देवतासान्निध्यार्थं दीर्घायुर्लक्ष्मीसर्वकामसमृद्ध्यक्षय्यसुखकामोऽमुकदेवमूर्तिप्रतिष्ठां करिष्ये,**" याप्रमाणें संकल्प करून पुण्याहवाचन व नांदीश्राद्ध झाल्यानंतर आचार्याला वरून आठ किंवा चार ऋत्विज वरून त्यांची पूजा करावी. नंतर आचार्यानें, "**यदत्र०**" हा मंत्र ह्मणून पूर्वादि आठ दिशांला सर्षप ( मोहऱ्या ) टाकून "**आपोहिष्ठा०**" ह्या मंत्रांनीं कुशोदकेंकरून भूमीवर प्रोक्षण करून "**देवा आयांतु, यातुधाना अपयांतु, विष्णो देवयजनं रक्षस्व**" असीं वाक्यें ह्मणून भूमीवर प्रादेश करावा. नंतर मंडपप्रतिष्ठा करून किंवा न करितां मूर्तीला पंचगव्य, सुवर्ण, यव, दूर्वा, अश्वत्थ, पळस यांचीं पत्रें हे पदार्थ उदकाच्या कलशांत घालून नंतर त्या उदकानें स्नान घालावें. ते स्नानाचे मंत्र—"**आपोहिष्ठा ऋचा ३, हिरण्यवर्णाः शुचयः पावकायासुजातःकश्यपोयास्विद्रः अग्नियागर्भंदधिरेविरूपास्तानआपःशꣳस्योनाभवंतु १ यासाꣳराजावरुणोयातिमध्ये सत्यानृतेअवपश्यंजनानां मधुश्चुतःशुचयोयाःपावकास्ता० २ यासांदेवादिविकृण्वंतिभक्षं यार्अंतरिक्षेबहुधाभवंति याःपृथिवींपयसोंदंतिशुक्रास्तान० ३ शिवेनमाचक्षुषापश्यतापः शिवयातनुवोपस्पृशतत्वचंमे सर्वाꣳअग्निꣳरप्सुषदोहुवेवोमयिवर्चोबलमोजोनिधत्त ४ पवमानःसुवर्जनः पवित्रेणविचर्षणिः यःपोतासपुनातुमा पुनंतुमादेवजनाः पुनंतुमनवोधिया पुनंतुविश्वआयवः जातवेदःपवित्रवत् पवित्रेणपुनाहिमा शुक्रेणदेवदीद्यत् अग्नेक्रत्वाक्रतूꣳरनु १ यत्तेपवित्रमर्चिषि अग्नेविततमंतरा ब्रह्मतेनपुनीमहे उभाभ्यांदेवसवितः पवित्रेण सवेनच इदंब्रह्मपुनीमहे वैश्वदेवीपुनतीदेव्यागात् यस्यैबह्वीस्तनुवोवीतपृष्ठाः तयामदंतःसधमाद्येषु वयꣳस्यामपतयोरयीणां २ वैश्वानरोरश्मिभिर्मापुनातु वातःप्राणेनेषिरोमयोभूः द्यावापृथिवीपयसापयोभिः ऋतावरीयज्ञियेमापुनीतां बृहद्भिःसवितस्तृभिः वर्षिष्ठैर्देवमन्मभिः अग्नेदक्षैःपुनाहिमा येनदेवाअपुनत येनापोदिव्यंकशः तेनदिव्येनब्रह्मणा ३ इदंब्रह्मपुनीमहे यःपावमानीरध्येति ऋषिभिःसंभृतꣳरसं सर्वꣳसपूतमश्नाति स्वदितंमातरिश्वना पावमानीर्योअध्येति ऋषिभिःसंभृतꣳरसं तस्मैसरस्वतीदुहे क्षीरꣳसर्पिमधूदकं पावमानीः स्वस्त्ययनीः ४ सुदुघाहिपयस्वतीः ऋषिभिःसंभृतोरसः ब्राह्मणेष्वमृतꣳहितं पावमानीर्दिशंतुनः इमंलोकमथोअमुं कामान्समर्धयंतुनः देवीर्देवैःसमाभृताः पावमानीःस्वस्त्ययनीः सुदुघाहिघृतश्चुतः ऋषिभिःसंभृतोरसः ५ ब्राह्मणेष्वमृतꣳहितं येनदेवाःपवित्रेण आत्मानं पुनतेसदा तेनसहस्रधारेण पावमान्यःपुनंतुमा प्राजापत्यंपवित्रं शतोद्यामꣳहिरण्मयं तेन ब्रह्मविदोवयं पूतंब्रह्मपुनीमहे इंद्रःसुनीतीसहमापुनातु सोमःस्वस्त्यावरुणःसमीच्या यमो राजाप्रमृणाभिःपुनातुमा जातवेदामूर्जयंत्यापुनातु**" या अनुवाकानें अभिषेक करून व्याहृ-

तिमंत्रानें व " इदंविष्णु० " ह्या मंत्रानें फल, यव, दूर्वा हे पदार्थ देवाला अर्पण करावे. नंतर, " रक्षोहणं० " हा मंत्र ह्मणून देवाच्या हातांत कंकण बांधून वस्त्रेंकरून देवास आच्छादित करावें. नंतर " अवतेहेळो०, उदुत्तमं० " हे मंत्र ह्मणून देवास उदकांत बुडवून ठेवावें.

---

अथचलप्रतिष्ठायामग्निंप्रतिष्ठाप्यध्यात्वाग्रहादिपक्षेग्रहान्वास्तुदेवताश्चप्रतिष्ठाप्यान्वादध्यात् चक्षुषी आज्येनेत्यंतेग्रहादिहोमपक्षेग्रहानधिदेवतादींश्चसमिच्चर्वाज्येनवास्तुपीठदेवताश्चान्वाधानेउद्दिश्य इंद्रंपृथिवींशर्वंअग्निंअग्निमूर्तिंपशुपतिंयमंयजमानमूर्तिंउग्रंनिर्ऋतिंसूर्यमूर्तिंरुद्रंवरुणंजलमूर्तिंभवंवायुंवायुमूर्तिंईशानंकुबेरंसोममूर्तिंमहादेवंईशानंआकाशंभीमंएताः लोकपालमूर्तिमूर्तिपतिदेवताःपलाशोदुंबराश्वत्थशम्यपामार्गसमिद्भिःआज्याहुतिभिस्तिलाहुतिभिश्चप्रतिदैवतंप्रतिद्रव्यमष्टाष्टसंख्याकाभिःस्थाप्यदेवताममुकां पलाशोदुंबराश्वत्थशम्यपामार्गसमित्तिलचर्वाज्यैः प्रतिद्रव्यमष्टोत्तरसहस्रमष्टोत्तरशतमष्टाविंशतिसंख्ययावाअग्निर्यजुर्भिरित्यनुवाकेनविश्वान्देवांस्तिलाज्याभ्यांदशदशाहुतिभिः एवंद्वितीयेपर्यायेएताएवदेवतास्तत्तत्संख्याकैस्तैरेवद्रव्यैरेवंतृतीये पर्याये एताएवदेवतास्तत्तत्संख्याकैस्तैरेवद्रव्यैर्ब्रह्मादिमंडलदेवतास्तिलाज्याहुतिभिः प्रतिदैवतंदशदशसंख्याकाभिःशेषेणस्विष्टकृतमित्यादि शूर्पेप्रधानदेवतार्थंतूष्णींचतुरोमुष्टीन्निरूप्यहोमपर्याप्तंगृहीत्वातथैवप्रोक्ष्यगोक्षीरेनीवारचरुंश्रपयेदाज्यभागांते यजमानः इदमुपकल्पितमन्वाधानोक्तद्रव्यजातमन्वाधानोक्ताहुतिसंख्यापर्याप्तमन्वाधानोक्ताभ्योयक्ष्यमाणाभ्योदेवताभ्योस्तुनममेति त्यागंकुर्यात् गृहसिद्धान्नादिनाग्रहादिहोमंविधायलोकपालमूर्तिमूर्तिपतिभ्यः समित्पंचकंतिलाज्येचजुहुयात् प्रतिद्रव्यहोमांतेदेवंपादनाभिशिरसिस्पृशेत् आज्यहोमेचोत्तरतःसजलकुंभेसंपातान्नयेत् तेषांमंत्राःइंद्रायेंदोइतींद्रस्यस्योनेतिपृथिवीमूर्तेः अघोरेभ्यइतितत्पतेःशर्वस्य अग्नआयाहीत्यग्नेः अग्निंदूतमित्यग्निमूर्तेः नमःशर्वायचपशुपतयेचेतिपशुपतेः यमायसोममितियमस्य असिहिवीरेतियजमानमूर्तेः स्तुहिश्रुतमितितत्पतेरुग्रस्य असुन्वंतमितिनिर्ऋतेः आकृष्णेनेतिसूर्यमूर्तेः योरुद्रोअग्नावितितत्पतेरुद्रस्य इमंमे० वरुणस्य शन्नोदेवी० जलमूर्तेः नमोभवायचेतिभवस्य आनोनियुद्भिः० वायोः वातआवातु०वायुमूर्तेः तमीशानं० ईशानस्य आप्यायस्व० कुबेरस्य वयंसोम० सोममूर्तेः तत्पुरुषाय० महादेवस्य अभित्वादे० ईशानस्य आदित्प्रत्नस्य० आकाशस्य नमउग्रायचेतिभीमस्य ततःस्थाप्यदेवमंत्रेणसमित्पंचकपायसचरुतिलाज्यहोमः प्रतिद्रव्यहोमांतेदेवेपादनाभिशिरःस्पर्शः देवमंत्रश्चतांत्रिकोमूलमंत्रोदेवगायत्रीवावैदिकोवाग्राह्यः अग्निर्यजुर्भिः सविता स्तोमैः इंद्रउक्थामदैः मित्रावरुणावाशिषा अंगिरसोधिष्ण्यैरंगिभिः मरुतःसदोहविर्धानाभ्यां आपःप्रोक्षणीभिः ओषधयोबर्हिषा अदितिर्वेद्या सोमोदीक्षया त्वष्टेध्मेन विष्णुर्यज्ञेन वसवआज्येन आदित्यादक्षिणाभिः विश्वेदेवाऊर्जा पूषास्वगाकारेण बृहस्पतिःपुरोधसा प्रजापतिरुद्गीथेन अंतरिक्षंपवित्रेण वायुःपात्रैःअहश्रद्धयास्वाहेत्यनुवाकेनतिलाज्ययोर्दशदशाहुतय[illegible]स्यपादौस्पृशेत् संपातजलेनदेवमभिषिंचेत् ॥

यानंतर कर्तव्य विधि—चलार्चा असेल तर अग्नि स्थापन करून अग्नीचें ध्यान करून ग्रहस्थापन इत्यादिक पक्ष असल्यास नवग्रह, वास्तुदेवता यांची स्थापना करून अन्वाधान करावें. तें असें—“ चक्षुषीआज्येन ” इतकें ह्मटल्यानंतर ग्रह इत्यादिकांचा होम करणें हा पक्ष असेल तर ग्रह व त्यांच्या अधिदेवता इत्यादि देवता आणि समिधा, चरु, आज्य हीं त्यांचीं द्रव्यें व वास्तुपीठदेवता या सर्वांचा अन्वाधानामध्यें उद्देश करून नंतर “इंद्रं, पृथिवीं, शर्वं, अग्निं अग्निमूर्तिं पशुपतिं, यमंयजमानमूर्तिं उग्रं निर्ऋतिंसूर्यमूर्तिं रुद्रंवरुणं जलमूर्तिं भवं वायुं वायुमूर्तिं ईशानं कुबेरं सोममूर्तिं महादेवं ईशानं आकाशं भीमं एताःलोकपालमूर्तिमूर्तिपतिदेवताःपलाशोदुंबराश्वत्थशम्यपामार्गसमिद्भिःआज्याहुतिभिस्तिलाहुतिभिश्चप्रतिदैवतंप्रतिद्रव्यमष्टाष्टसंख्याकाभिः स्थाप्यदेवताममुकांपलाशोदुंबराश्वत्थशम्यपामार्गसमित्तिलचर्वाज्यैःप्रतिद्रव्यमष्टोत्तरसहस्रमष्टोत्तरशतमष्टाविंशतिसंख्ययावा अग्निर्यजुर्भिरित्यनुवाकेनविश्वान्देवांस्तिलाज्याभ्यांदशदशाहुतिभिः एवंद्वितीयेपर्यायेएताएवदेवतास्तत्तत्संख्याकैस्तैरेवद्रव्यैरेवंतृतीयेपर्याये एताएवदेवतास्तत्तत्संख्याकैस्तैरेवद्रव्यैर्ब्रह्मादिमंडलदेवतास्तिलाज्याहुतिभिःप्रतिदैवतंदशदशसंख्याकाभिःशेषेणस्विष्टकृतमित्यादि ” याप्रमाणें अन्वाधान करावें. नंतर शूर्पामध्यें प्रधान देवतांसाठीं मंत्ररहित चार मुष्टि नीवार घेऊन नंतर होमास चरु पुरे होईल इतके घेऊन मंत्ररहित प्रोक्षण करून गाईच्या दुधामध्यें नीवारांचा चरु शिजवावा. आज्यभागांपर्यंत कर्म केल्यानंतर यजमानानें त्यागाचा उच्चार करावा. तो असा— “ इदमुपकल्पितमन्वाधानोक्तद्रव्यजातमन्वाधानोक्ताहुतिसंख्यापर्याप्तमन्वाधानोक्ताभ्यो यक्ष्यमाणाभ्यो देवताभ्योस्तु नमम, ” याप्रमाणें त्याग केल्यानंतर गृहामध्यें सिद्ध केलेल्या अन्नादिकानें ग्रहादिकांचा होम करून लोकपाल, मूर्ति, आणि मूर्तिपति यांच्या उद्देशानें पांच प्रकारच्या ( पलाश, उंबर, अश्वत्थ, शमी, अपामार्ग ) समिधांचा व तिल, आज्य यांचा होम करावा. प्रत्येक द्रव्याचा होम व आज्यहोम केल्यानंतर देवाचे चरण, नाभि, मस्तक यांला स्पर्श करावा. नंतर उत्तरभागीं जो स्थापित केलेला उदकयुक्त कलश त्यांत संपातोदक घालावें. त्या संपातोदकाचे मंत्र—“ इंद्रायेंदो० ” हा मंत्र इंद्राचा, “ स्योना० ” हा मंत्र पृथिवीमूर्तीचा, “ अघोरेभ्यो० ” हा मंत्र तत्पति जो शर्व त्याचा, “ अग्नआयाहि० ” हा मंत्र अग्नीचा, “ अग्निंदूतं० ” हा अग्निमूर्तीचा, “नमःशर्वायचपशुपतयेच” हा पशुपतीचा, “ यमायसोमं० ” हा यमाचा, “ असिहिवीर० ” हा यजमानमूर्तीचा, “स्तुहिश्रुतं० ” हा तत्पति जो उग्र त्याचा, “ असुन्वंत० ” हा निर्ऋतीचा, “आकृष्णे०” हा सूर्यमूर्तीचा, “ योरुद्रोअग्नौ० ” हा तत्पति जो रुद्र त्याचा, “ इमंमे० ” हा वरुणाचा, “ शन्नोदेवी० ” हा जलमूर्तीचा, “ नमोभवायच० ” हा भवाचा, “ आनोनियुद्भिः० ” हा वायूचा, “ वातआवातु० ” हा वायुमूर्तीचा, “ तमीशानं० ” हा ईशानाचा, “आप्यायस्व०” हा कुबेराचा, “ वयंसोम० ” हा सोममूर्तीचा, “ तत्पुरुषाय० ” हा महादेवाचा, “अभित्वा दे०” हा ईशानाचा, “ आदित्प्रत्न० ” हा आकाशाचा, “ नमउग्रायच० ” हा भीमाचा याप्रमाणें त्या त्या देवतेच्या मंत्रानें त्या त्या देवतेचें संपातोदक कलशांत घालावें. नंतर जी देवता स्थाप्य असेल त्या देवतेच्या मंत्रानें पांच प्रकारच्या समिधा (पळस इत्यादिक ), पायस,

चरु, तिळ आणि आज्य यांचा होम करावा. प्रत्येक द्रव्याचा होम केल्यानंतर देवाचे पाद, नाभि व शिर यांला स्पर्श करावा. स्थाप्य देवतेचा मंत्र घेणें तो तांत्रिक, मूळ मंत्र, देवगायत्रीमंत्र किंवा वैदिक मंत्र घ्यावा. नंतर "अग्निर्यजुर्भिः सवितास्तोमैः इंद्रउक्थामदैः मित्रावरुणावाशिषा अंगिरसोधिष्ण्यैरंगिभिः मरुतःसदोहविर्धानाभ्यां आपःप्रोक्षणीभिः ओषधयोर्बर्हिषा अदितिर्वेद्या सोमोदीक्षया त्वष्टेध्मेन विष्णुर्यज्ञेन वसवआज्येन आदित्यादक्षिणाभिः विश्वेदेवाऊर्जा पूषास्वगाकारेण बृहस्पतिःपुरोधसा प्रजापतिरुद्गीथेन अंतरिक्षंपवित्रेण वायुःपात्रैः अहश्श्रद्धयास्वाहा" याप्रमाणें हा अनुवाक ह्मणून तिळांच्या दहा व आज्याच्या दहा आहुति द्याव्या. आणि देवाच्या चरणांस स्पर्श करावा, व संपातोदकानें देवाला अभिषेक करावा.

---

एवमेवद्वितीयपर्यायेणहुत्वादेवस्यनाभिंस्पृशेत् तृतीयपर्यायेणहुत्वाशिरःस्पृशेत् प्रतिपर्यायंसंपाताभिषेकः एकपर्यायेआहुतिसंख्या पलाशसमिधः १९२ औदुंबर १९२ अश्वत्थ १९२ शमी १९२ अपामार्ग १९२ आज्य १९२ तिल १९२ स्थाप्यदेवस्याष्टाविंशतिपक्षेसमित्पंचकं १४० चर्वाज्यतिलाः ८४ अनुवाक २० मिलिताः १५८८ पर्यायत्रये ४७६४ एवंहुत्वार्चांशोधयेत् देवंनला स्वागतंदेवदेवेशविश्वरूपनमोस्तुते शुद्धेपिलदधिष्ठानेशुद्धिंकुर्मःसहस्वतामितिप्रार्थ्यउत्तिष्ठब्रह्मणस्पतइतिसार्त्विगुत्थाप्याभ्युत्तारणंकुर्यात् अग्निः सप्तिमितिसूक्तमग्निपदहीनंपठित्वातत्सहितंपुनःपठेत् एवमष्टशतमष्टाविंशतिवारंवापठन् जलंपातयेत् ततोर्चांद्वादशवारंमृदाजलेनचप्रक्षाल्यमंत्रैःपंचगव्यंकृत्वा पयःपृथिव्यांपयओषधीषुपयोदिव्यंतरिक्षेपयोधाः पयस्वतीःप्रदिशःसंतुमह्यं आवोराजानमितिचसंस्नाप्यआप्यायस्वेतिपंचमंत्रैःपंचामृतेनसंस्नाप्य लिंगंचेन्नमस्तेरुद्रइत्यष्टाभिःसंस्नाप्यघृताभ्यंगमुद्वर्तनमुष्णोदकेनक्षालनंचकृत्वागंधंदत्वासंपातोदकैरभिषिच्य सपल्लवैश्चतुर्भिःकुंभैःक्रमेणापोहिष्ठा० योव० तस्मा० आकलशेषु० इतिसंस्नाप्यसमुद्रज्येष्ठेतिचतसृभिराकलशेष्वितिचमिलितचतुःकुंभैःसंस्नाप्य औदुंबरादिपीठेर्चामुपवेश्यपरितोष्टदिक्षुसजलकुंभेषुगंधपुष्पदूर्वाःक्षिप्त्वाद्यकुंभेसप्तमृदःद्वितीयेपुष्करपर्णशमीविकंकताश्मंतकत्वचः पल्लवांश्च तृतीयेसप्तधान्यं चतुर्थेपंचरत्नं पंचमेफलपुष्पाणि षष्ठेकुशदूर्वालोचनाः सप्तमेसंपातोदकं अष्टमेसर्वौषधीःक्षिप्त्वाक्रमेणापोहिष्ठेतित्रिभिः हिरण्यवर्णाःशुचयइतिचतुर्भिःपवमानानुवाकेनचाभिषिच्य एककुंभेशमीपलाशवटखदिरबिल्वाश्वत्थविकंकतपनसाम्रशिरीषोदुंबराणांपल्लवान्कषायांश्चक्षिप्त्वाश्वत्थेवइत्यभिषिच्य पंचरत्नोदकेनहिरण्यवर्णाःशुचयइतिसंस्नाप्यवाससीदत्वोपरिवितानंबध्नंतिकेचित्॥

याप्रमाणेंच दुसऱ्या पर्यायानें होम करून देवाच्या नाभीला स्पर्श करावा. तिसऱ्या पर्यायानें होम करून देवाच्या मस्तकाला स्पर्श करावा. प्रत्येक पर्यायीं संपातोदकानें देवाला अभिषेक करावा. एक पर्यायाविषयीं आहुतींची संख्या—पलाशसमिधा १९२, औदुंबरसमिधा १९२, अश्वत्थ १९२, शमी १९२, अपामार्ग १९२, आज्याहुति १९२, तिलाहुति १९२, स्थाप्यदेवतेचा अठ्ठावीस होम करण्याच्या पक्षीं आहुतिसंख्या—पांच प्रकारच्या समिधांच्या आहुति १४०; चरु, आज्य, व तिल यांच्या ( प्रत्येकाच्या २८ प्रमाणें ) ८४, अनुवाक२०,

मिळून १९८८. तीन पर्याय मिळून आहुति ४७६४, याप्रमाणें होम करून मूर्तीची शुद्धि करावी. देवाला नमस्कार करून प्रार्थना करावी. प्रार्थनामंत्र—"स्वागतंदेवदेवेश विश्वरूपनमोस्तुते ॥ शुद्धेपित्वदधिष्ठाने शुद्धिंकुर्मः सहस्व तां," याप्रमाणें प्रार्थना करून ऋत्विजांसहवर्तमान आचार्यानें "उत्तिष्ठ ब्रह्मणस्पते०" ह्या मंत्रेंकरून देवाला उठवून अग्न्युत्तारण करावें. तें असें—"अग्निः सप्तिं०" हें सूक्त अग्निपदहीन पठण करून पुनः अग्निपदसहित पठण करावें. याप्रमाणें अष्टशत किंवा अठ्ठावीस वेळ पठण करीत होत्साता उदक देवतेवर पाडावें. तदनंतर मृत्तिका व जल यांहींकरून मूर्तीला बारा वेळ प्रक्षालन करून समंत्रक पंचगव्य करून "पयःपृथिव्यां पयओषधीषु पयो दिव्यंतरिक्षे पयोधाः ॥ पयस्वतीः प्रदिशः संतु मह्यं ॥ आवो राजानं०" ह्या मंत्रांनीं स्नान घालून "आप्यायस्व०" इत्यादि पांच मंत्रांनीं पंचामृताचें स्नान घालावें. लिंग असेल तर, "नमस्ते रुद्र०" ह्या आठ ऋचांनीं स्नान घालून घृताचा अभ्यंग, उटणें हीं लावून उष्णोदकानें स्नान घालून गंध लावून संपातोदकांनीं अभिषेक करून सपल्लव अशा चार कुंभांनीं क्रमेंकरून "आपोहिष्ठा० योव० तस्मा० आकलशेषु०" ह्या मंत्रांनीं स्नान घालून नंतर "समुद्रज्येष्ठा०" ह्या चार ऋचा व "आकलशे०" ही एक ऋचा मिळून चार कलशांनीं स्नान घालावें. नंतर उंबर इत्यादिकांच्या पीठावर ( पाटावर ) मूर्तीला बसवून देवाच्या आसमंतात् पूर्वादि आठ दिशांस उदकयुक्त कलश मांडून त्या कलशांमध्यें गंध, पुष्प, दूर्वा हे पदार्थ टाकून पहिल्या कुंभांत सप्तमृत्तिका; दुसऱ्या कुंभांत कमलपत्र, शमी, विकंकत ( वेहकळी वृक्ष ) आणि अश्मंतक (आपटावृक्ष) यांच्या त्वचा आणि पल्लव; तिसऱ्या कलशांत सप्तधान्यें (यव, गहूं, भात, तिळ, कांग, सांवे, हरभरे ); चवथ्या कलशांत पंचरत्नें ( सुवर्ण, वज्रमणि, नीलमणि, पोवळें आणि मौक्तिक ); पांचव्या कलशांत फळें व पुष्पें; सहाव्या कलशांत कुश, दूर्वा, गोरोचन; सातव्यांत संपातोदक; आठव्यांत सर्वौषधी (कुष्ट, जटामांसी, स्वातिहळद, दारुहळद, मोरमांसी, शिलाजित, चंदन, वेखंड, चंपक, मुस्ता ); याप्रमाणें आठ कलशांत पदार्थ टाकून क्रमेंकरून "आपोहिष्ठा०" मंत्र ३, "हिरण्यवर्णाःशुचयः०" मंत्र ४, आणि पवमानानुवाक १ याप्रमाणें आठ मंत्रांनीं आठ कलशोदकांनीं अभिषेक करून एका कलशांत शमी, पळस, वट, खदिर, बिल्व, अश्वत्थ, विकंकत, फणसवृक्ष, आम्र, शिरीषवृक्ष आणि उंबर यांचे पल्लव व कषाय टाकून "अश्वत्थेव०" ह्या मंत्रानें अभिषेक करून पंचरत्नोदकाचें "हिरण्यवर्णाःशुचयः०" ह्या मंत्रांनीं स्नान घालून देवाला दोन वस्त्रें देऊन कित्येक जन देवावर चांदवा बांधतात.

---

यज्ञोपवीतगंधपुष्पधूपदीपान्दत्वा हिरण्यगर्भः० १ यआत्मदा० २ यःप्राणतो० ३ यस्येमे० ४ येनद्यौ० ५ यंक्रंदसी० ६ आपोहयत्० ७ यश्चिदापो० ८ इत्यष्टौपीठदीपान्दत्वासुवर्णशलाकयातैजसपात्रस्थंमधुघृतंचगृहीत्वाचित्रंदेवाना० तेजोसि० शुक्रमस्यमृतमसिधामनामासिप्रियंदेवानामनाधृष्टंदेवयजनमितिमंत्राभ्यां ओंनमोभगवतेतुभ्यंशिवायहरयेनमः हिरण्यरेतसेविष्णोविश्वरूपायतेनमइतिचदक्षिणसव्येदेवनेत्रेमंत्रावृत्त्यालिखेत् अं

जंतित्वेत्यंजनेनाङ्क्त्वा देवस्यत्वासवितुःप्रसवे० इंद्रस्येंद्रियेणानज्मीतिमध्वाज्यशर्कराभि रङ्क्त्वाअंजनेनपुनरंजयेत् ततआदर्शभक्ष्यादिदर्शयेत् अत्रकर्ताचार्यायगामृत्विग्भ्योदक्षि णांदद्यात् आचार्यःप्रत्यृचमादौप्रणवंवदन्पुरुषसूक्तेनस्तुत्वावंशपात्रस्थपंचवर्णौदनेनदेवंनी राजयित्वारुद्रायचतुष्पथादौदद्यात् मंत्रस्तुॐनमोरुद्रायसर्वभूताधिपतयेदीप्तशूलधरायोमाद यितायविश्वाधिपतयेरुद्रायवैनमोनमः शिवमगर्हितंकर्मास्तुस्वाहेति अश्वत्थपर्णेभूतेभ्योन मइति ॥

नंतर यज्ञोपवीत, गंध, पुष्प, धूप, दीप अर्पण करून "हिरण्यगर्भः० १, यआत्मदा० २, यःप्राणतो० ३, यस्येमे० ४, येनद्यौ०५, यंक्रंदसी०६, आपोहयत्०७, यश्चिदापो० ८," याप्रमाणें आठ मंत्रांनीं आठ दीप देवाच्या पीठावर लावून सोन्याचे शलाकेनें धातूच्या पात्रांतील मध व घृत घेऊन "चित्रंदेवा०, तेजोसि०" हे दोन मंत्र व "ॐ नमोभगवतेतुभ्यंशिवायहरयेनमः ॥ हिरण्यरेतसेविष्णोविश्वरूपायतेनमः" हा मंत्र अशा तीन मंत्रांनीं देवाच्या उजव्या व डाव्या नेत्रावर मंत्रावृत्तीनें लिखन करावें. "अंजंति त्वा०" हा मंत्र ह्मणून काजळानें नेत्र अंकित करून "देवस्यत्वा० इंद्रस्येंद्रियेणानज्मि" ह्या मंत्रानें मध, घृत, शर्करा यांहींकरून अंकित करून पुनः काजळ नेत्रांस लावावें. तदनंतर आरसा दाखवावा, व भक्ष्यादि पदार्थ अर्पण करावे. ह्या अर्चास्थानीं कर्त्यानें आचार्याला गोप्रदान व ऋत्विजांला दक्षिणा द्यावी. आचार्य पुरुषसूक्ताच्या प्रत्येक ऋचेच्या पूर्वी ओंकार ह्मणत होत्साता पुरुषसूक्तानें स्तुति करून वंशपात्रांत पंचवर्ण अन्न ( भात ) घालून तेणेंकरून देवाला आरती करून तें अन्न चवाठ्यावर रुद्राला द्यावें. त्याचा मंत्र— "ॐनमोरुद्रायसर्वभूताधिपतयेदीप्तशूलधरायोमादयितायविश्वाधिपतयेरुद्रायवैनमोनमः ॥ शिवमगर्हितंकर्मास्तुस्वाहा." अश्वत्थाच्या पानावर "भूतेभ्यो नमः" असें ह्मणन द्यावें.

---

अथाचार्यः सर्वतोभद्रेदेवताआवाहयेत् मध्येब्रह्माणं पूर्वादिदिक्षुइंद्रादिलोकपालान् ईशानेंद्राद्यंतरालेषुवसून् १ रुद्रान् २ आदित्यान् ३ अश्विनौ ४ विश्वान्देवान् ५ पितॄन् ६ नागान् ७ स्कंदवृषौ ८ ब्रह्मेशानाद्यंतरालेषु दक्षं १ विष्णुं २ दुर्गां ३ स्वधाकारं ४ मृत्युरोगान् ५ समुद्रान्सरितः ६ मरुतः ७ गणपतिं ८ मध्येपृथिवींमेरुंस्थाप्य देवंचावाह्य प्रागादिषु वज्रंशक्तिंदंडंखड्गंपाशंअंकुशंगदांशूलं तद्बाह्येगौतमंभरद्वाजंविश्वामित्रंकश्यपंजमदग्निंवसिष्ठमत्रिंअरुंधतींच तद्बाह्ये नवग्रहान् तद्बाह्येऐंद्रींकौमारींब्राह्मींवाराहींचामुंडांवैष्णवींमाहेश्वरींवैनायकींएतानामभिरावाह्यसंपूज्य प्रतिमायांदेवंतन्मंत्रेणावाह्य मंडलमध्येप्रतिमांसुप्रतिष्ठितोभवेतिनिवेश्य संपूज्यवन्हौमंडलदेवतानांनामभिस्तिलाज्येन दशदशाहुतीर्हुत्वापुष्पांजलिंसमर्प्यनमोमहदितिदेवंनत्वामंडलादुत्तरतः स्वस्तिकेमंचकंतदुपरिशय्यांकृत्वाउत्तिष्ठेतिदेवमुत्थाप्यमंगलघोषैःशय्यायांदेवमुपवेश्य पुरुषसूक्तोत्तरनारायणाभ्यांस्तुत्वादेवेन्यासंकुर्यात् तथाहि पुरुषात्मनेनमःप्राणात्मने० प्रकृतितत्वाय० बुद्धितत्वाय० अहंकारतत्वाय० मनस्तत्वाय० इतिसर्वांगेषु प्रकृतितत्वाय० बुद्धितत्वाय० हृदि शब्दतत्वाय० शिरसि स्पर्शतत्वाय० त्वचि रूपतत्वाय० हृदि एवंहृदयेवरसगंधश्रोत्रत्वक्च

क्षुर्जिव्हाघ्राणवाक्पाणिपादपायूपस्थपृथिव्यप्तेजोवाय्वाकाशसत्वरजस्तमोदेहतत्वानिविन्य सेत् ततःपुरुषसूक्ताद्यंऋक्‌द्वयंकरयोः तदुत्तरद्वयंजानुनोः तदुत्तरद्वयंकट्योः ततःतिस्रोना भिहृत्कंठेषु ततोद्वयंबाह्वोः ततोद्वयंनासयोः ततोद्वयमक्ष्णोः अंत्यांशिरसि ततःसुखशा यीभवेतिशय्यायांदेवंस्वापयित्वामंडलशय्ययोरंतरानगंतव्यमितिप्रैषंदत्वा स्विष्टकृदादिहोम शेषंसमाप्यमंडलदेवताभ्योनामभिश्चरुणाबलीन्दद्यात् नीवारचरुशेषेणदिग्बलिं ततोधामं तइतिपूर्णाहुतिंजुहुयात् इत्यधिवासनं ॥

यानंतर आचार्यानें सर्वतोभद्रमंडलावर देवतांचें आवाहन करावें. तें असें–" मध्यभागीं ब्रह्मा; पूर्वादि अष्ट दिशांला इंद्रादिक आठ लोकपाल; ईशान, इंद्र इत्यादिक जे आठ त्यांचे मध्यभागीं वसु, रुद्र, आदित्य, अश्विनौ, विश्वेदेव, पितर, नाग आणि स्कंदवृष, ब्रह्मा, ईशान इत्यादिकांचे जे आठ मध्यप्रदेश त्यांचे ठिकाणीं दक्ष, विष्णु, दुर्गा, स्वधाकार, मृत्यु-रोग, समुद्र, सरित्, मरुत्, गणपति; मध्यभागीं पृथिवी, मेरु आणि स्थाप्यदेव याप्रमाणें आवाहन करून पूर्वादिक आठ दिशांला वज्र, शक्ति, दंड, खड्ग, पाश, अंकुश, गदा आणि शूल यांची स्थापना करावी. त्यांच्या बाह्यप्रदेशीं गौतम, भरद्वाज, विश्वामित्र, कश्यप, जमदग्नि, वसिष्ठ, अत्रि आणि अरुंधती यांची स्थापना करावी. त्यांच्या बाह्यप्रदेशीं नवग्रह यांची स्थापना करावी. त्याच्या बाह्यप्रदेशीं ऐंद्री, कौमारी, ब्राह्मी, वाराही, चामुंडा, वैष्णवी, माहेश्वरी, आणि वैनायकी ह्यांचें नाममंत्रांनीं आवाहन करून पूजा करावी. नंतर मूर्तीवर देवाचें आवाहन त्या देवतेच्या मंत्रानें करून त्या मूर्तीला मंडलाच्या मध्यभागीं " सुप्रतिष्ठितो भव " असें ह्मणून बसवावी, व तिची पूजा करून मंडलदेवतांच्या नाममंत्रांनीं तिल व आज्य या प्रत्येक द्रव्याच्या दहा दहा आहुतींनीं अग्नीमध्यें होम करावा. मग देवाला पुष्पांजलि समर्पण करून " नमोमहत्० " ह्या मंत्रानें देवाला नमस्कार करून मंडलाच्या उत्तर प्रदेशीं स्वस्तिकावर मंचक स्थापून त्या मंचकावर शय्या करून "उत्तिष्ठब्र०" हा मंत्र ह्मणून देवाला उठवून मंगलवाद्यांच्या शब्देंकरून देवाला त्या शय्येवर बसवावें. नंतर पुरुषसूक्त व उत्तरनारायण यांहींकरून देवाची स्तुति करून देवावर न्यास करावा. तो असा–"पुरुषात्मनेनमः, प्राणात्मने०, प्रकृतितत्वाय०, बुद्धितत्वाय०, अहंकारतत्वाय०, मनस्तत्वाय० " याप्रमाणें सर्व अवयवांवर न्यास करून " प्रकृतितत्वाय० बुद्धितत्वाय हृदि, शब्दतत्वाय० शिरसि, स्पर्शतत्वाय० त्वचि, रूपतत्वाय० हृदि, " याप्रमाणें न्यास करून हृदयाचे ठिकाणींच " रस, गंध, श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिव्हा, घ्राण, वाक्, पाणि, पाद, पायु, उपस्थ, पृथिवी, आप, तेज, वायु, आकाश, सत्व, रज, तम, " ह्या देहतत्वांचा न्यास करावा. नंतर पुरुषसूक्ताचा न्यास करावा. तो असा–पहिल्या दोन ऋचांचा दक्षिणवाम हस्तांवर न्यास, त्याच्या पुढच्या दोन ऋचांचा दक्षिणवाम जानूंवर, त्याच्या पुढच्या दोन ऋचांचा दक्षिणवाम कटींवर, त्याहून पुढच्या तीन ऋचांचा नाभि, हृदय व कंठ यांचे ठिकाणीं, त्याहून पुढच्या दोन ऋचांचा दोन दक्षिणवाम बाहूंवर, त्याहून पुढच्या दोन ऋचांचा दोन नासारंध्रांवर, त्याहून पुढच्या दोन ऋचांचा दक्षिणवाम नेत्रांवर, शेवटच्या ऋचेचा मस्तकावर याप्रमाणें न्यास करून नंतर " सुखशायी भव " असें ह्मणून

देवाला शय्येवर निजवून मंडल आणि शय्या यांच्या मधून कोणीं जाऊं नये असें सांगून स्विष्टकृत् इत्यादिक होमशेष समाप्त करून मंडलदेवतांला नाममंत्रांनीं भाताचे बलि द्यावे. नीवार चरुशेषानें दिग्बलि द्यावा. तदनंतर "धामंते०" ह्या मंत्रानें पूर्णाहुति हवन करावी. याप्रमाणें अधिवासनाचा प्रयोग सांगितला.

---

**अथस्थिरार्चायांक्रमोविशेषश्च संकल्पादिजलाधिवासांतंकृत्वादेवंनत्वास्वागतंदेवदेवेशे** त्यादिप्रार्थनोत्थापनाभ्युत्तारणादिनेत्रोन्मीलनांतंपूर्ववत् तत्रस्थिरेशिवलिंगेस्वर्णसूच्यागंधेन ॐनमोभगवतेरुद्रायहिरण्यरेतसेपरायपरमात्मनेविश्वरूपायोमाप्रियायनमइत्युक्त्वा अंजनादिनांजयेदितिनेत्रोन्मीलनेलिंगेविशेषः ततःसूक्तस्तुत्यादिमंडलदेवतास्थापनांतं ततोमंडले मूर्तिनिवेशस्ततःशय्यायांदेवतारोहणंततःस्तुतिःपूर्वोक्तन्यासः ततःशय्यायांदेवशयनं ततो **ग्निस्थापनादि पूर्वोक्तान्वाधानेविष्णौनारायणंषोडशाज्याहुतिभिः शिवश्चेत्यातइषुःद्रापेस हस्राणीत्यनुवाकस्थऋग्भीरुद्रमाज्येनेतिप्रधानोत्तरमूहइतिविशेषः लोकपालमूर्तिमूर्तिपतिहोमांतंपूर्ववत् स्थाप्यदेवताहोमेनैवारश्चरुर्नास्ति सप्तैवहवींषि ततश्चविष्णोःस्थिरार्चायांपूर्वोक्त समित्तिलाज्यहोमोत्तरंपुरुषसूक्तेनप्रत्यृचमाज्यंहुत्वाइदंविष्णुरितिपादौस्पृष्ट्वापुनस्ताएवहुत्वा अतोदेवेतिशिरःस्पृष्ट्वा पुनस्ताएवहुत्वापुरुषसूक्तेनसर्वांगंस्पृशेत् स्थिरंलिंगंचेत्समिदाज्य तिलहोमांतेयातइषुइत्यनुवाकांतेनद्रापेइतिसहस्राणीत्यनुवाकाभ्यांचप्रत्यृचमाज्यंहुत्वा सर्वोवै रुद्रइतिमूलंस्पृशेत् पुनस्ताएवहुत्वाकद्रुद्रायेतिमध्यंपुनस्ताएवहुत्वानमोहिरण्यबाहवइत्यग्रंस्पृशेत् पुनस्ताएवहुत्वा सर्वरुद्रेणसर्वांगंस्पृशेत् इत्यधिवासनेविशेषः ॥**

## आतां यानंतर स्थिर अर्चेविषयीं अनुष्ठानक्रम व विशेष सांगतों.

संकल्प इत्यादिकापासून जलाधिवासपर्यंत कर्म करून देवाला नमस्कार करून "**स्वागतं देवदेवेश०**" इत्यादिक प्रार्थना, उत्थापन, अभ्युत्तारण इत्यादि नेत्रोन्मीलनपर्यंत कर्म पूर्वीप्रमाणें करावें. त्यामध्यें स्थिर जें शिवलिंग त्याविषयीं, सोन्याच्या शलाकेनें गंध घेऊन त्या गंधानें "**ॐनमोभगवते रुद्राय हिरण्यरेतसे पराय परमात्मने विश्वरूपायोमाप्रियाय नमः**" असा मंत्र ह्मणून काजळ इत्यादिकानें नेत्र चिन्हित करावे, इतका नेत्रोन्मीलनाचा लिंगाविषयीं विशेष जाणावा. तदनंतर पुरुषसूक्तानें स्तुति इत्यादिक मंडलदेवतास्थापनापर्यंत कर्म केल्यानंतर मंडलाचे ठिकाणीं मूर्ति बसवावी, व नंतर शय्येवर देवतेला ठेवून नंतर स्तुति, व पूर्वी सांगितल्याप्रमाणें न्यास करावे. नंतर शय्येवर देवाला निजवावें, नंतर अग्नीची स्थापना इत्यादिक करावें. पूर्वी सांगितलेलें अन्वाधान करावयाचें त्या कालीं विष्णु देवता असेल तर "**नारायणं षोडशाज्याहुतिभिः**" आणि शिवदेवता असेल तर, "**यात इषुः०द्रापे० सहस्राणीत्यनुवाकस्थऋग्भीरुद्रमाज्येन**" असा प्रधानदेवतेच्या नंतर अन्वाधानांत ऊह करावा, इतका विशेष जाणावा. लोकपालमूर्ति, व मूर्तिपति यांच्या होमापर्यंत कर्म पूर्वीप्रमाणें करावें. स्थाप्य देवतेच्या होमाचे ठायीं नीवारांचा चरु करूं नये. सातच होमद्रव्यें घ्यावीं. तदनंतर विष्णूच्या स्थिर अर्चेमध्यें पूर्वी सांगितलेला असा समिधा, तिळ व आज्य यांचा

होम केल्यानंतर पुरुषसूक्ताच्या प्रत्येक ऋचेनें आज्याचा होम करून " इदंविष्णु० " हा मंत्र ह्मणून देवाच्या चरणांला स्पर्श करून पुनः त्याच ( पुरुषसूक्ताच्या ) ऋचांनीं होम करून " अतोदेवा० " हा मंत्र ह्मणून देवाच्या मस्तकाला स्पर्श करून, पुनः त्याच ऋचांनीं होम करून पुरुषसूक्त ह्मणून सर्वांगाला स्पर्श करावा. स्थिर लिंगाची अर्चा असेल तर समिधा, आज्य, आणि तिळ यांचा होम केल्यानंतर, " यात इषुः० " हा अनुवाक, "द्रापे०" हा अनुवाक व " सहस्राणि० " हा अनुवाक अशा तीन अनुवाकांच्या प्रत्येक ऋचेनें आज्याचा होम करून " सर्वोवैरु० " ह्या मंत्रेंकरून लिंगाच्या मूळाला स्पर्श करावा. पुनः त्याच ऋचांनीं होम करून " कद्रुद्राय० " ह्या मंत्रेंकरून लिंगाच्या मध्यभागाला स्पर्श करावा. नंतर पुनः त्याच ऋचांनीं होम करून " नमो हिरण्यबाहवे० " ह्या अनुवाकेंकरून लिंगाच्या अग्राला स्पर्श करावा. नंतर पुनः त्याच ऋचांनीं होम करून सर्व रुद्राचा पाठ करून सर्व अंगाला स्पर्श करावा. याप्रमाणें अधिवासनाचा विशेष जाणावा.

---

परेद्युःपीठिकांस्नापयित्वामहीमूष्वित्यावाह्यअदितिर्द्यौरितिस्तुत्वा ऱ्हींनमइतिसंपूज्य तेनैवपूर्णाहुतिंहुत्वाउत्तिष्ठब्रह्मणइतिदेवमुत्थाप्यपुष्पांजलिंदत्वापुरुषसूक्तेनस्तुत्वाउदुत्यमित्युत्थाप्यकनिक्रददितिसूक्तेनविष्णुंसद्योजातमितिपंचानुवाकैर्लिंगंगृहंप्रवेश्य पीठिकायामिंद्रादिनामभिरष्टरत्नानिक्षिप्त्वासप्तधान्यरौप्यमनःशिलाःक्षिप्त्वा पायसेनसंलिप्यप्रणवेनांगन्यासंकृत्वासुवर्णशलाकामंतरितांकृत्वा सुलभ्नेप्रतितिष्ठपरमेश्वरेतिउक्त्वातोदेवेतिविष्णुंरुद्रेणलिंगंच स्थापयेत् ततश्चरुहोमप्राणप्रतिष्ठादि ततःस्थिरार्चायामधिवासनेपरेद्युःकृत्येचविशेषोन्यत्सर्वमुक्तवक्ष्यमाणचलार्चावदेव ॥

---

दुसऱ्या दिवसीं पीठिकेला स्नान घालवून " महीमूषु० " हा मंत्र ह्मणून आवाहन करून " अदितिर्द्यौ० " ह्या मंत्रानें स्तुति करून " ऱ्हीं नमः " ह्या मंत्रानें पूजा करून त्याच मंत्रानें पूर्णाहुति हवन करून " उत्तिष्ठब्रह्मणस्पते० " ह्या मंत्रानें देवाला उठवून पुष्पांजलि देऊन पुरुषसूक्तानें स्तुति करून " उदुत्यं० " ह्या मंत्रानें देवाला उठवून " कनिक्रद० " ह्या सूक्तानें विष्णुमूर्तीचा व " सद्योजातं० " ह्या पांच अनुवाकांनीं लिंगाचा घरांत प्रवेश करवून पीठिकेवर इंद्रादिनामेंकरून आठ रत्नें घालून सप्त धान्यें, रौप्य, मनशीळ, हे पदार्थ घालून पायसानें लिप्त करून प्रणवमंत्रानें अंगन्यास करून सुवर्णाची शलका मध्यें घालून " सुलभ्ने प्रतितिष्ठ परमेश्वर " असें वाक्य ह्मणून " अतो देवा० " ह्या सूक्तानें विष्णूची व रुद्रानें लिंगाची स्थापना करावी. नंतर चरुहोम, प्राणप्रतिष्ठा इत्यादिक कर्म करावें. तदनंतर स्थिर अर्चेत अधिवासनामध्यें व दुसऱ्या दिवसींच्या कृत्यामध्यें जो विशेष प्रकार व इतर सर्व कर्म पूर्वी सांगितल्याप्रमाणें व पुढें सांगावयाची जी चलार्चा तीप्रमाणें करावें.

---

अथचलप्रतिष्ठायामधिवासनांतेपरेद्युरेकाहपक्षेसद्योवाउत्तिष्ठब्रह्मणइतिदेवमुत्थाप्यपुरुषसूक्तोत्तरनारायणाभ्यांस्तूयात् ॥

यानंतर चलार्चेमध्यें अधिवासन केल्यानंतर दुसऱ्या दिवशीं, किंवा एकाह (एक दिवसाचा) पक्ष असल्यास तत्कालीं "उत्तिष्ठ ब्रह्मण०" ह्या मंत्रानें देवाला उठवून पुरुषसूक्त व उत्तरनारायण यांहींकरून स्तुति करावी.

---

**अथप्रायःस्थिरचलार्चयोःसाधारणःप्रयोगः** प्रतिष्ठांगंपरेद्युर्होमंकरिष्यइतिसंकल्प्यच क्षुषीआज्येनेत्यंतेस्थाप्यदेवंतन्मंत्रेण घृतपक्वव्रीहिचरुणादशाहुतिभिरग्निंसोमंधन्वंतरिंकुहूमनुमतिंप्रजापतिंपरमेष्ठिनंब्रह्माणमग्निंसोमंअग्निमन्नादंअग्निमन्नपतिंप्रजापतिंविश्वान्देवान्सर्वान्देवानग्निंस्विष्टकृतंपूजांगहोमेविष्णुश्चेत्संकर्षणादिद्वादशदेवताःशार्ङ्गिणंश्रियंसरस्वतींविष्णुंकृसरेणैकैकयाहुत्याविष्णुंषड्वारंकृसरेण शिवश्चेद्भवंशर्वंईशानंपशुपतिंरुद्रमुग्रंभीमंमहांतंकृसरेणैकैकया भवस्यदेवस्यपत्नीमित्याद्यष्टौगुडौदनेनैकैकया० भवस्यदेवस्यसुतमित्यादि ८ हरिद्रोदनेनएकै० रुद्रंसप्तदशवारंशिवंशंकरं सहमानंशितिकंठंकपर्दिनंताम्रमरुणमपगुरमाणंहिरण्यबाहुंसस्पिंजरंबभ्लुशंहिरण्यमेताःकृसरेणैकैकया० शेषेणस्विकृतमित्यादि शूर्पेतूष्णींस्थाप्यदेवतायैचतुर्मुष्टीनग्न्यादिषोडशदेवताभ्योनाम्नाचतुश्चतुर्मुष्टीन्निरूप्यतथैवप्रोक्ष्यसघृतजलेश्रपयित्वा स्रुच्यावदानधर्मेणस्थाप्यदेवमंत्रेणदश दशाहुतीर्हुत्वानामभिर्जुहुयात् अग्नयेस्वाहा १ सोमाय० २ धन्वंतरये० ३ कुह्वै० ४ अनुमत्यै० ५ प्रजापतये० ६ परमेष्ठिने० ७ ब्रह्मणे० ८ अग्नये० ९ सोमाय० १० अग्नयेन्नादाय० ११ अग्नयेन्नपतये० १२ प्रजापतये० १३ विश्वेभ्योदेवेभ्यः० १४ सर्वेभ्योदेवेभ्यः० १५ भूर्भुवःस्वरग्नयेस्विष्टकृतेस्वाहा १६ इति सप्ततेअग्नेसमिधःसप्तजिह्वाःसप्तऋषयःसप्तधामप्रियाणि सप्तहोत्राःसप्तधात्वायजंतिसप्तयोनीरापृणस्वाघृतेन पुनस्त्वादित्यारुद्रावसवःसमिंधतांपुनर्ब्रह्माणोवसुनीथयज्ञैः घृतेनत्वंतन्वंवर्धयस्वसत्याःसंतुयजमानस्यकामाइतिमंत्राभ्यांपूर्णाहुतिंकृत्वाचार्यो याओषधीरितिपुष्पफलसर्वौषधीःसमर्प्यसंपातोदकंताम्रपात्रेआदायदेवमंत्रेणशतवारमभिमंत्र्यतेनदेवशिरसिसिंचेत् ततउत्तिष्ठब्रह्मणइतिदेवमुत्थाप्यविश्वतश्चक्षुरित्युपतिष्ठेत् एतेउत्थापनोपस्थानेचलार्चायामेव एवंध्यात्वाजपेत् ब्रह्मणेनमःविष्णवेनमःरुद्राय० इंद्रादीनष्टौ० ८ वसुभ्यो० रुद्रेभ्यो० आदित्येभ्यो० अश्विभ्यां० मरुद्भ्यो० कुबेराय० गंगादिमहानदीभ्यो० अग्नीषोमाभ्यां० इंद्राग्निभ्यां० द्यावापृथिवीभ्यां० धन्वंतरये० सर्वेशाय० विश्वेभ्योदेवेभ्यो० ब्रह्मणइति ततःसंपातोदकेनयजमानाभिषेकः देवंध्यात्वाप्रतितिष्ठपरमेश्वरेतिपुष्पांजलिंदत्वासच्चिदानंदंब्रह्मैवभक्तानुग्रहायगृहीतविग्रहं स्वायुधाढ्यंनिजवाहनाद्युपेतंनिजहृत्कमलेवस्थितं सर्वलोकसाक्षिणमणीयांसंपरमेष्ठ्यसिपरमांश्रियंगमयेतिमंत्रेण पुष्पांजलावागतंविभाव्यार्चायांविन्यस्यप्राणप्रतिष्ठांकुर्यात् यथा अस्यश्रीप्राणप्रतिष्ठामंत्रस्यब्रह्मविष्णुरुद्राऋषयः ऋग्यजुःसामानिछंदांसि क्रियामयवपुःप्राणाख्यदेवता आंबीजं क्रौंशक्तिःप्राणप्रतिष्ठायांविनियोगः ब्रह्मविष्णुरुद्रऋषिभ्योनमःशिरसि ऋग्यजुःसामछंदोभ्यो० मुखे प्राणाख्यदेवतायै० हृदि आंबीजाय० गुह्ये क्रौंशक्त्यै पादयोः ॐकंखंगंघंङंअंपृथिव्यप्तेजोवाय्वाकाशात्मने आंहृदयाय० ॐचंछंजंझंञंइंशब्दस्पर्शरूपरसगंधात्मनेईंशिरसेस्वाहा ॐ टंठंडंढंणंउंश्रोत्रत्वक्चक्षुर्जिह्वाघ्राणात्मनेऊंशिखायैवषट् ॐतंथंदंधंनंएंवाक्पाणिपादपायूपस्थात्मनेऐंक

वचायहुं ॐपंफंबंभंमंॐवचनादानविहरणोत्सर्गानंदात्मनेअौनेत्रत्रयायवौषट् ॐयंरंलंवं शंषंसंहंक्षंअंमनोबुद्ध्यहंकारचित्तात्मनेअः अस्त्रायफट्एवमात्मनिदेवेचकृत्वादेवंस्पृष्ट्वाजपेत् ॐआंऱ्हींक्रोंयंरंलंवंशंषंसंहंसः देवस्यप्राणाइहप्राणाः ॐ आंऱ्हीं० हंसःदेवस्यजीवइहस्थितः ॐ आंऱ्हीं० हंसःदेवस्य सर्वेंद्रियाणि० ॐआंऱ्हीं० हंसः देवस्यवाङ्मनश्चक्षुःश्रोत्रघ्राणप्राणाइहागत्यस्वस्तयेसुखेनसुचिरंतिष्ठंतुस्वाहा अर्चाहृदंगुष्ठंदत्वाजपेत् अस्यैप्राणाः प्रतिष्ठंतुअस्यैप्राणाःक्षरंतुच अस्यैदेवत्वमर्चायैमामहेतिचकश्चन प्रणवेनसंरुध्यसजीवंध्यात्वाध्रुवाद्यौरितित्यृचंजप्त्वाकर्णेगायत्रींदेवमंत्रंचजप्त्वापुरुषसूक्तेनोपस्थाय पादनाभिशिरःस्पृष्ट्वा इहैवैधीतित्रिर्जपेत् ततःकर्ता स्वागतंदेवदेवेशमद्भाग्यात्त्वमिहागतः प्राकृतंत्वमदृष्ट्वामां बालवत्परिपालय धर्मार्थकामसिद्ध्यर्थंस्थिरोभवशिवायनः सान्निध्यंतुतदादेवस्वार्चायांपरिकल्पय यावच्चंद्रावनीसूर्यास्तिष्ठंत्यप्रतिघातिनः तावत्त्वयात्रदेवेशस्थेयंभक्तानुकंपया भगवन्देवदेवेशत्वंपितासर्वदेहिनां येनरूपेणभगवंस्त्वयाव्याप्तंचराचरं तेनरूपेणदेवेशस्वार्चायांसन्निधौभवेतिनमेत् ॥

## आतां यानंतर बहुधा स्थिरार्चा व चलार्चा यांचा साधारण प्रयोग सांगतों.

"प्रतिष्ठांगं परेद्युर्होमं करिष्ये," असा संकल्प करून अन्वाधान करावें. तें असें— " चक्षुषीआज्येनेत्यंतेस्थाप्यदेवं तन्मंत्रेणघृतपक्वव्रीहिचरुणादशाहुतिभिरग्निंसोमंधन्वंतरिंकुहूमनुमतिं प्रजापतिंपरमेष्ठिनंब्रह्माणमग्निंसोमंअग्निमन्नादंअग्निमन्नपतिंप्रजापतिंविश्वान्देवान्सर्वान्देवान्अग्निंस्विष्टकृतं." विष्णु देवता असेल तर पूजांगहोमामध्यें " संकर्षणादि द्वादशदेवताःशार्ङ्गिणंश्रियंसरस्वतींविष्णुंकृसरेणैकैकयाहुत्याविष्णुंषड्वारंकृसरेण. शिव देवता असेल तर भवंशर्वंईशानंपशुपतिंरुद्रमुग्रंभीमंमहांतं कृसरेणैकैकयाहुत्या भवस्यदेवस्य पत्नीमित्याद्यष्टौगुडौदनेनैकैकया० भवस्यदेवस्यसुतमित्याद्यष्टौ हरिद्रौदनेनएकै० रुद्रंस प्तदशवारंशिवंशंकरंसहमानंशितिकंठंकपर्दिनंताम्रमरुणमपगुरमाणंहिरण्यबाहुंसस्पिंजरंबभ्लुशंहिरण्यमेताःकृसरेणैकैकया० शेषेणस्विष्टकृतमित्यादि," याप्रमाणें अन्वाधान करावें. शूर्पामध्यें मंत्ररहित स्थाप्य देवतेकरितां चार मुष्टि आणि अग्नि इत्यादि सोळा देवतांकरितां त्या त्या देवतेच्या नामानें चार चार मुठी तांदूळ घेऊन तसेंच प्रत्येक देवतेच्या नामानें प्रोक्षण करून घृतयुक्त उदकानें चरु शिजवून स्रुचीकरून अवदानाच्या नियमाप्रमाणें, स्थाप्य देवतेच्या मंत्रेंकरून दहा आहुति देऊन नाममंत्रांनीं होम करावा. तो असा—" अग्नयेस्वाहा १, सोमाय० २, धन्वंतरये० ३, कुह्वै० ४, अनुमत्यै० ५, प्रजापतये० ६, परमेष्ठिने० ७, ब्रह्मणे० ८, अग्नये० ९, सोमाय० १०, अग्नयेऽन्नादाय० ११, अग्नयेऽन्नपतये० १२, प्रजापतये० १३, विश्वेभ्योदेवेभ्यः० १४, सर्वेभ्योदेवेभ्यः० १५, भूर्भुवःस्वरग्नये स्विष्टकृते स्वाहा १६, " याप्रमाणें नाममंत्रांनीं होम करावा. " सप्तते अग्ने० १, पुनस्त्वादित्या०" ह्या दोन मंत्रांनीं पूर्णाहुति हवन करून आचार्यानें " या ओषधी० " ह्या मंत्रानें पुष्पें, फलें व सर्वौषधि समर्पण करून संपातोदक ताम्रपात्रांत घेऊन तें उदक देवाच्या मंत्रानें शंभर वेळ अभिमंत्रण करून तें त्या मंत्रानें देवाच्या मस्तकावर सिंचन करावें.

नंतर "उत्तिष्ठ ब्रह्मण०" ह्या मंत्रानें देवाला उठवून "विश्वतश्चक्षु०" ह्या मंत्रानें उपस्थान करावें. उत्थापन व उपस्थान हीं चलार्चा असतांच करावीं. याप्रमाणें ध्यान करून जप करावा. तो असा– "ब्रह्मणे नमः विष्णवेनमः रुद्राय० इंद्राय० अग्नये० यमाय० निर्ऋतये० वरुणाय० वायवे० सोमाय० ईशाना० वसुभ्यो० रुद्रेभ्यो० आदित्येभ्यो० अश्विभ्यां० मरुद्भ्यो० कुबेराय० गंगादिमहानदीभ्यो० अग्नीषोमाभ्यां० इंद्राग्निभ्यां० द्यावापृथिवीभ्यां० धन्वंतरये० सर्वेशाय० विश्वेभ्योदेवेभ्यो० ब्रह्मणे०" याप्रमाणें जप केल्यानंतर संपातोदकानें यजमानावर अभिषेक करावा. नंतर देवाचें ध्यान करून "प्रतितिष्ठपरमेश्वर" असें ह्मणून पुष्पांजलि समर्पण करून हातांत पुष्पें घेऊन अंजलि करावी. नंतर "सच्चिदानंदं ब्रह्मैव भक्तानुग्रहाय गृहीतविग्रहं स्वायुधाढ्यं निजवाहनाद्युपेतं निजहृत्कमलेवस्थितं सर्वलोकसाक्षिणमणीयांसं परमेष्ठयसि परमां श्रियं गमय" याप्रमाणें मंत्र ह्मणून पुष्पांजलीमध्यें देव आला अशी भावना करून तीं पुष्पें मूर्तीवर समर्पण करून प्राणप्रतिष्ठा करावी. ती अशी–"अस्य श्रीप्राणप्रतिष्ठामंत्रस्य ब्रह्मविष्णुरुद्राऋषयः ॥ ऋग्यजुःसामानि छंदांसि ॥ क्रियामयवपुःप्राणाख्यादेवता ॥ आंबीजं क्रौंशक्तिः प्राणप्रतिष्ठायांविनियोगः ॥ ब्रह्मविष्णुरुद्रऋषिभ्योनमः शिरसि ॥ ऋग्यजुःसामछंदोभ्यो० मुखे ॥ प्राणाख्यदेवतायै० हृदि ॥ आंबीजाय० गुह्ये ॥ क्रौंशक्त्यै० पादयोः ॥ ॐ कंखंगंघंङंअंपृथिव्यप्तेजोवाय्वाकाशात्मने आं हृदयाय० ॐ चंछंजंझंञं इं शब्दस्पर्शरूपरसगंधात्मने ईं शिरसे स्वाहा ॥ ॐ टंठंडंढंणं उं श्रोत्रत्वक्चक्षुर्जिव्हाघ्राणात्मने ऊं शिखायैवषट् ॥ ॐ तंथंदंधंनं एं वाक्पाणिपादपायूपस्थात्मने ऐं कवचायहुं ॥ ॐ पंफंबंभंमं ॐ वचनादानविहरणोत्सर्गानंदात्मने औं नेत्रत्रयायवौषट् ॥ ॐ यंरंलंवंशंषंसंहंक्षं अं मनोबुद्ध्यहंकारचित्तात्मने अः अस्त्रायफट्" ॥ याप्रमाणें आपल्या शरीरीं व देवाच्या शरीरीं न्यास करून देवाला स्पर्श करून पुढें सांगतों हा जप करावा. तो असा– "ॐआंऱ्हींक्रौंअंयंरंलंवंशंषंसंहंसः देवस्य प्राणा इह प्राणाः ॥ ॐ आंऱ्हीं०हंसः देवस्य जीव इह स्थितः ॐ आंऱ्हीं० हंसः देवस्य सर्वेंद्रियाणिः० ॐ आंऱ्हीं० हंसःदेवस्य वाङ्मनश्चक्षुःश्रोत्रघ्राणप्राणाइहागत्यस्वस्तये सुखेन सुचिरं तिष्ठंतु स्वाहा" याप्रमाणें जप केल्यानंतर मूर्तीच्या हृदयावर अंगुष्ठ ठेवून जप करावा. तो असा–"अस्यै प्राणाः प्रतिष्ठंतु अस्यै प्राणाः क्षरंतुच ॥ अस्यै देवत्वमर्चायै मामहेति च कश्चन" याप्रमाणें जप करून प्रणवानें वायु रोधून सजीव असें ध्यान करून "ध्रुवाद्यौ०" ह्या ऋचेचा जप करून देवाच्या कर्णांत गायत्री व देवमंत्र यांचा जप करून पुरुषसूक्तानें स्तुति करून देवाचे चरण, नाभि आणि मस्तक यांला स्पर्श करून "इहैवैधि०" ह्या मंत्राचा तीन वेळ जप करावा. तदनंतर कर्त्यानें "स्वागतं देवदेवेश मद्भाग्यात्त्वमिहागतः ॥ प्राकृतं त्वमदृष्ट्वा मां बालवत्परिपालय ॥ धर्मार्थकामसिद्ध्यर्थं स्थिरो भव शिवाय नः ॥ सान्निध्यं तु तदा देव स्वार्चायां परिकल्पय ॥ यावच्चंद्रावनीसूर्यास्तिष्ठंत्यप्रतिघातिनः ॥ तावत्त्वयात्र देवेश स्थेयं भक्तानुकंपया ॥ भगवन्देवदेवेश त्वं पिता सर्वदेहिनां ॥ येन रूपेण भगवन् त्वया व्याप्तं चराचरं ॥ तेन रूपेण देवेश स्वार्चायां सन्निधौ भव," हे मंत्र ह्मणून नमस्कार करावा.

---

अथाचार्यःकर्ताबालिंगमर्चांवाभूःपुरुषमावाहयामि भुवःपुरुषमा० स्वःपुरुष० भूर्भुवः स्वःपुरुष०इत्यावाह्यप्रणवेनासनंदत्वादूर्वाश्यामाकविष्णुक्रांतापद्ममिश्रंपाद्यंॐइमाआपःशिवतमाःपूताःपूततमामेध्यामेध्यतमाअमृताअमृतरसाःपाद्यास्ताजुषतांप्रतिगृह्यतां प्रतिगृण्हातु भवान्महाविष्णुर्विष्णवेनमइतिपाद्यं भगवान्महादेवोरुद्रायनमइतिलिंगे एवंदेवतांतरेषूह्यं इमाआपःशिव० आचमनीयास्ताजुषतांप्रतिगृह्य० इमाआ० अर्घ्यास्ताइत्यर्घ्यं पंचामृतस्नानं देवंमंत्रैःसंस्नाप्यइदंविष्णुरितिविष्णौनमोअस्तुनीलग्रीवायेतिलिंगेकंकणंविसृज्यवस्त्रंयज्ञोपवीतंचदत्वा इमेगंधाःशुभादिव्याःसर्वगंधैरलंकृताः पूताब्रह्मपवित्रेणपूताःसूर्यस्यरश्मिभिःपूताइत्यादिपूर्ववदितिगंधं इमेमाल्याःशुभादिव्याःसर्वमाल्यैरलंकृताः पूताइत्यादिइतिमालाः इमेपुष्पाइतिपुष्पं वनस्पतिरसोधूपो० धूपोयंप्रतिगृह्यतांप्रतिगृण्हातुभवानित्यादिज्योतिःशुक्रंच तेजश्चदेवानांसततंप्रियं प्रभाकरःसर्वभूतानांदीपो०तां प्रतिगृण्हातुभवानितिदीपंदत्वाविष्णौसंकर्षणादिद्वादशनामभिःपुष्पाणिसमर्प्य तैरेवतर्पणंकृत्वापायसगुडौदनचित्रौदनानिपवित्रंतेविततमितिनिवेद्यसंकर्षणादिनामभिर्द्वादशगृहसिद्धान्नकृसराहुतीर्हुत्वा कृसरेणैवशार्ङ्गिणे० श्रियै० सरस्वत्यै० विष्णवे० इतिहुत्वा विष्णोर्नुकं० तदस्यप्रियम० प्रतद्विष्णु० परोमात्रया० विचक्रमे० त्रिर्देवः पृथिवीं० इतिमंत्रैःषट्जुहुयात् लिंगेतुदीपांतंकृत्वाभवाय देवाय० शर्वायदेवाय० ईशानायदेवाय० पशुपतयेदेवा० रुद्रायदेवा० उग्रायदेवाय० भीमायदेवाय० महतेदेवायनमइतिपुष्पाणिदत्वातैरेवतर्पणंकृत्वापवित्रंतेइतिपायसंगुडौदनंच निवेद्यभवायदेवायस्वाहेत्याद्यष्टभिःकृसरंजुहुयात् तिलमिश्रौदनःकृसरः भवस्यदेवस्यपत्न्यै स्वाहेत्याद्यष्टभिर्गुडौदनंहुत्वा भवस्यदेवस्यसुतायस्वाहेत्याद्यष्टभिर्हरिद्रोदनंहुत्वा त्र्यंबकं० मानोमहांतं० मानस्तोके० आरात्ते० विकिरिद० सहस्राणिसहस्र० इतिद्वादशऋचःएतैः कृसरंहुत्वा शिवाय० शंकराय० सहमानाय० शितिकंठाय० कपर्दिने० ताम्राय० अरुणाय० अपगुरमाणाय० हिरण्यबाहवे० सस्पिंजराय० बभ्लुशाय० हिरण्यायेतिद्वादशनामभिर्जुहुयात् स्विष्टकृदादिहोमशेषंसमाप्यपूर्वोक्तसर्वहविर्भिर्विष्णवेलिंगायवाबलिंदद्यात् मंत्रस्तु त्वामेकमाद्यंपुरुषंपुरातनंनारायणंविश्वसृजंयजामहे त्वमेवयज्ञोविहितोविधेयस्त्वमात्मनात्मन्प्रतिगृण्हीष्वहव्यं लिंगेतुनारायणपदेरुद्रंशिवमितिवदेत् अश्वत्थपर्णेभूर्भुवःस्वरोमिति हुतशेषंनिधायप्रदक्षिणीकृत्य विश्वभुजेसर्वभुजेआत्मनेपरमात्मनेनमइतिनत्वाचार्यायद्वादशतिस्रएकांवागांदत्वाऋत्विग्भ्योदक्षिणांदत्वाशतंद्वादशवाविप्रान्भोजयेदिति प्रासादेनूतनेजलाशयोक्तप्रतिष्ठाविधिःकार्यः तत्रगोरुत्तारणपात्रीप्रक्षेपादिनकुर्यात् वारुणहोमस्थानेवास्तुहोमः इतिस्थिरार्चाचलार्चयोःप्रतिष्ठाप्रयोगः ॥

यानंतर आचार्य किंवा यजमान यानें लिंग अथवा मूर्ति यांचेठायीं आवाहन करावें. तें असें–भूःपुरुषमावाहयामि भुवःपुरुषमावाह० स्वःपुरुषमा० भुर्भूवःस्वःपुरुष०" याप्रमाणें आवाहन करून प्रणवमंत्रानें आसन देऊन दूर्वा, श्यामाक ( सांवे ), विष्णुक्रांता ( काळी गोकर्णी, शंखपुष्पी ) आणि कमल यांहीं मिश्रित असें पाद्योदक करून "ॐइमाआपः शिवतमाःपूताःपूततमा मेध्या मेध्यतमा अमृता अमृतरसाः पाद्यास्ता जुषतां प्रतिगृह्यतां

प्रतिगृण्हातु भवान् महाविष्णुर्विष्णवे नमः" ह्या मंत्रानें तें पाद्योदक समर्पण करावें. लिंग असेल तर "भगवान् महादेवो रुद्राय नमः" असा मंत्राच्या शेवटच्या भागांत ऊह करावा. याप्रमाणें अन्य देवतांविषयींहि ऊह करावा. "इमाआपःशिव० आचमनीयास्ता जुषतां प्रतिगृह्य० इमाआप० अर्घ्यास्ताः" याप्रमाणें आचमन, व अर्घ्य द्यावें. नंतर पंचामृत स्नान घालून देवाला मंत्रांनीं शुद्ध स्नान घालावें. "इदंविष्णु०" ह्या मंत्रानें विष्णूस. "नमोअस्तुनीलग्रीवाय०" ह्या मंत्रानें लिंगास. नंतर कंकणाचें विसर्जन करून वस्त्र, यज्ञोपवीत देऊन "इमेगंधाःशुभादिव्याःसर्वगंधैरलंकृताः ॥ पूताब्रह्मपवित्रेणपूताः सूर्यस्यरश्मिभिः" या मंत्रानें आणि "पूता०" इत्यादिक पूर्वीं सांगितलेल्या मंत्रानें गंध समर्पण करावें. "इमेमाल्याःशुभादिव्याःसर्वमाल्यैरलंकृताः ॥ पूता०" इत्यादिक मंत्रानें माला अर्पण कराव्या. "इमेपुष्पाःशुभा०" या मंत्रानें पुष्पें समर्पण करावीं. "वनस्पतिरसोधूपो० धूपोयंप्रतिगृह्यतां प्रतिगृण्हातुभवान्" या मंत्रानें धूप, "ज्योतिःशुक्रंचतेजश्च देवानांसततंप्रियं ॥ प्रभाकरःसर्वभूतानांदीपो० प्रतिगृण्हातुभवान्" याप्रमाणें दीप देऊन विष्णु देव असेल तर त्याला संकर्षण इत्यादिक द्वादश नामेंकरून पुष्पें अर्पण करून त्याच द्वादश नामांनीं तर्पण करून पायस, गुडमिश्रित अन्न आणि चित्रविचित्र अन्न हीं "पवित्रंते विततं०" ह्या मंत्रानें निवेदन करून संकर्षणादिक द्वादश नामांनीं घरांत सिद्ध केलेल्या कृसरान्नाच्या दहा दहा आहुति हवन करून कृसरअन्नानेंच "शार्ङ्गिणे० श्रियै० सरस्वत्यै० विष्णवे०" याप्रमाणें होम करून "विष्णोर्नुकं० तदस्यप्रिय० प्रतद्विष्णु० परोमात्रया० विचक्रमे० त्रिर्देवःपृथिवी०" ह्या सहा मंत्रांनीं होम करावा. लिंगदेवता असेल तर दीपांत पूजा करून "भवाय देवाय० शर्वाय देवाय० ईशानाय देवाय० पशुपतये देवाय० रुद्राय देवाय० उग्राय देवाय० भीमाय देवाय० महते देवाय०" याप्रमाणें पुष्पें अर्पण करून त्याच नाममंत्रांनीं तर्पण करून "पवित्रंते०" ह्या मंत्रानें पायस, गुडौदन निवेदन करून "भवाय देवाय स्वाहा" इत्यादि आठ नाममंत्रांनीं कृसरान्नाचा होम करावा. तिळमिश्रित जो ओदन (भात) तो कृसर होय. "भवस्य देवस्य पत्न्यै स्वाहा" इत्यादि आठ नाममंत्रांनीं गुडौदनाचा होम करून "भवस्य देवस्य सुताय स्वाहा" इत्यादिक आठ नामांनीं हरिद्रौदनाचा होम करावा. नंतर "त्र्यंबकं० मानोमहांत० मानस्तोके० आरात्ते० विकिरिद० सहस्राणि०" ह्या बारा ऋचा यांहींकरून कृसरान्नाचा होम करून "शिवाय० शंकराय० सहमानाय० शितिकंठाय० कपर्दिने० ताम्राय० अरुणाय० अपगुरमाणाय० हिरण्यबाहवे० सस्पिंजराय० बभ्लुशाय० हिरण्याय०" अशा ह्या द्वादश नामेंकरून होम करावा. नंतर स्विष्टकृत इत्यादिक होमशेष समाप्त करून पूर्वीं सांगितलेल्या सर्व होमद्रव्यांनीं विष्णु किंवा लिंग जी देवता असेल तिला बलिदान समर्पण करावें. बलिदानाचा मंत्र—"त्वामेकमाद्यं पुरुषं पुरातनं नारायणं विश्वसृजं यजामहे ॥ त्वमेव यज्ञो विहितो विधेयस्त्वमात्मनात्मन् प्रतिगृण्हीष्व हव्यं." लिंग असेल तर "नारायणं" ह्या पदाचे ठिकाणीं 'रुद्रं, शिवं' असें पठण करावें. अश्वत्थाच्या पत्रावर "भुर्भूवःस्वरोम्" ह्या मंत्रानें हुतशेष ठेवून प्रदक्षिणा करून "विश्वभुजे

सर्वभुजे आत्मने परमात्मने नमः" ह्या मंत्रानें नमस्कार करून आचार्याला बारा, तीन अथवा एक गोप्रदान देऊन ऋत्विजांला दक्षिणा देऊन शंभर अथवा बारा ब्राह्मणांला भोजन घालावें. नवीन देवालय असेल तर जलाशयाला सांगितलेला जो प्रतिष्ठाविधि तो करावा. त्या प्रासादविधीमध्यें गाईचा उत्तारणविधि व पात्रीचा प्रक्षेप ( टाकणें ) इत्यादिक हे विधि करूं नयेत. वारुणहोमाच्या स्थानीं वास्तुदेवतेच्या उद्देशानें होम करावा. याप्रमाणें स्थिरार्चा आणि चलार्चा यांचा प्रतिष्ठाप्रयोग सांगितला.

---

**अथातोपिसंक्षिप्तएकाध्वरविधानेनचलप्रतिष्ठाप्रयोगः संकल्पादिनांदीश्राद्धांतंप्राग्वत् एकमाचार्यंवृणुयात् आचार्योमुकदेवप्रतिष्ठाकर्मकरिष्येइत्यादिसर्षपविकिरणांतं सर्वतोभद्र मंडलेप्राग्वन्नामभिर्ब्रह्मादिमंडलदेवताआवाह्यसंपूज्य यथागृह्यमग्निंप्रतिष्ठाप्यान्वादध्यात् आज्यभागांतेस्थाप्यदेवतांसहस्रमष्टोत्तरशतंवासमिदाज्यचरुतिलद्रव्यैर्ब्रह्मादिमंडलदेवताः प्रत्येकंदशदशतिलाज्याहुतिभिःशेषेणेत्यादि तूष्णींनिर्वापप्रोक्षणे आज्यभागांते तडागनदी तीरगोष्ठचत्वरपर्वतगजाश्वऱ्हदवल्मीकसंगमेतिदशमृद्भिरष्टवारंदेवंस्नाप्यपंचगव्यैःक्रमेण स्नापयित्वादूर्वासिद्धार्थपल्लवोपेतैरष्टकलशैरापोहिष्ठादिमंत्रैरभिषिच्याभ्युत्तारणंकुर्यात् सर्वतो भद्रस्थपीठेदेवमुपवेश्यनाम्नावस्त्रगंधधूपादिदत्वाष्टदिक्षुपल्लवादियुतोदकुंभानष्टौदीपांश्च संस्था प्यप्राग्वन्नेत्रोन्मीलनंचित्रान्नेनबलिंदत्वापुरुषसूक्तेनस्तुत्वोक्तद्रव्यचतुष्टयंस्थाप्यदेवमंत्रेण हुत्वाएकैकद्रव्यहोमांतेदेवंस्पृशेत् आज्यहोमेकुंभेसंपातान्क्षिपेत् मंडलदेवताभ्योहुत्वाहोम शेषंसमाप्यपूर्णाहुतिंकुर्यात् ॥**

**आतां यानंतरहि संक्षिप्त असा एकाध्वरविधिकरून चलप्रतिष्ठेचा प्रयोग सांगतो.—** संकल्पापासून नांदीश्राद्धापर्यंत कर्म पूर्वीप्रमाणें करावें. एक आचार्य वरावा. नंतर आचार्यांनें "**अमुकदेवताप्रतिष्ठाकर्म करिष्ये,**" असा संकल्प इत्यादिकपासून सर्षपांचें विकिरण एथपर्यंत कर्म करावें. नंतर सर्वतोभद्रमंडलावर पूर्वी सांगितल्याप्रमाणें नाममंत्रेंकरून ब्रह्मा इत्यादिक मंडलदेवतांचें आवांहन करून त्यांची पूजा करून आपल्या गृह्यसूत्रानुसार अग्नीची स्थापना करून अन्वाधान करावें. आज्यभागांपर्यंत कर्म झाल्यावर अन्वाधान करावें. तें असें—"**स्थाप्यदेवतां सहस्रमष्टोत्तरशतंवा समिदाज्यचरुतिलद्रव्यैर्ब्रह्मादिमंडलदेवताः प्रत्येकंदशदश तिलाज्याहुतिभिः शेषेण इत्यादि.**" चरु करण्याकरितां प्रत्येक देवतेला चार चार मुष्टि सुपांत तांदूळ घेणें व त्यांचें प्रोक्षण करणें हीं कर्में मंत्रविरहित करावीं. आज्यभागापर्यंत कर्म झाल्यानंतर तडाग, नदीतीर, गोष्ठ, आंगण, पर्वत, हस्तिशाळा, अश्वशाळा, ऱ्हद, वारूळ, चवाठा ह्या स्थानाच्या दहा मृत्तिकांनीं आठ वेळ देवाला स्नान घालून पंचगव्याचें क्रमानें स्नान घालून दूर्वा, शिरस व पंचपल्लव यांहींकरून युक्त जे आठ कलश त्यांहींकरून "**आपोहिष्ठा०**" इत्यादिक मंत्रांनीं अभिषेक करून अभ्युत्तारण करावें. सर्वतोभद्रावरील पीठावर देवाला बसवून नाममंत्रानें वस्त्र, गंध, धूप इत्यादि देऊन आठ दिशांचे ठायीं पंचपल्लवादिकांनीं युक्त असे आठ उदकुंभ व आठ दीप स्थापन करून पूर्वीप्रमाणें नेत्रोन्मीलन करावें. चित्रान्नेंकरून बलिदान करून पुरुषसूक्तानें स्तुति

करून पूर्वी सांगितलेल्या चार द्रव्यांचा, स्थाप्यदेवाच्या मंत्रानें होम करून एकेक द्रव्याचा होम केल्यानंतर देवाला स्पर्श करावा. व आज्यहोमानंतर कुंभांत संपात टाकावे. मंडलदेवतांचा होम करून होमशेष समाप्त करून पूर्णाहुति हवन करावी.

---

**ततःपूर्वोक्तरीत्यासूक्तन्यासावाहनप्राणप्रतिष्ठांतंकृत्वा इहैवैधीतितृचंपुरुषसूक्तंचजप्त्वा मूलमंत्रादिनावाहनादिपंचामृतस्नानांतेसंपातोदकैरिमाआपःशिवतमाइत्यादिनाभिषेकः वस्त्रादिनैवेद्यांतंप्राग्वत् तांबूलफलदक्षिणानीराजननमस्कारप्रदक्षिणादिविधाय पुष्पांजलिंदत्वा साचार्यःकर्तादेवंनत्वाक्षमाप्याचार्यदक्षिणांतेऽष्टकुंभोदकैर्यजमानाभिषेकःविष्णुंस्मृत्वा कर्मेश्वरेर्पयेदितिसंक्षेपः ॥**

तदनंतर पूर्वी सांगितलेल्या रीतीनें सूक्ताचा न्यास, आवाहन, प्राणप्रतिष्ठा एथपर्यंत कर्म करून “ **इहैवैधि०** ” ह्या तीन ऋचा व पुरुषसूक्त यांचा जप करून मूलमंत्रादिकानें आवाहन इत्यादिकापासून पंचामृतस्नानापर्यंत कर्म झाल्यावर संपातोदकेंकरून “ **इमाआपः शिवतमा०** ” इत्यादि मंत्रांनीं अभिषेक करावा. नंतर वस्त्र इत्यादिकापासून नैवेद्यापर्यंत पूजा पूर्वीप्रमाणें करावी. नंतर तांबूल, फल, दक्षिणा, नीराजन, नमस्कार, प्रदक्षिणा इत्यादिक करून पुष्पांजलि समर्पण करून आचार्यासहवर्तमान कर्त्यानें देवाला नमस्कार करून प्रार्थना करून आचार्याला दक्षिणा दिल्यानंतर आचार्यानें आठ कुंभांतील उदकेंकरून यजमानावर अभिषेक करावा, व विष्णूचें स्मरण करून कर्म ईश्वराला अर्पण करावें, याप्रमाणें संक्षेप जाणावा.

---

**अथपुनःप्रतिष्ठा मद्यचांडालस्पृष्टावन्हिदग्धाविप्ररक्तदूषिताशवपापिस्पृष्टाचप्रतिमापुनःसंस्कार्या खंडितेस्फुटितेस्थानभ्रंशेपूजनाभावेश्वगर्दभादिस्पर्शेपतितरजस्वलाचोरैःस्पर्शेचपुनःप्रतिष्ठा खंडितांभग्नांविधिनोद्धृत्यान्यांस्थाप्य अर्चायाभंगचौर्यादौतद्दिनेउपवासः ताम्रादिधातुमूर्तीनांचोरचांडालादिस्पर्शेताम्रादिधातूक्तशुद्धिंकृत्वापुनःप्रतिष्ठापूर्वप्रतिष्ठितायाअबुद्धिपूर्वकमेकरात्रमेकमासंद्विमासंवार्चनादिविच्छेदेशूद्ररजस्वलाद्युपस्पर्शेनेवाजलाधिवासंकृत्वा कलशेनस्नापयेत् ततःपंचगव्येनस्नापयित्वाऽष्टसहस्रमष्टशतमष्टाविंशतिसंख्यंवाकलशैःशुद्धोदकेनपुरुषसूक्तेनस्नापयेत् गंधपुष्पादिनापूजयित्वागुडौदनंनिवेदयेदितिशुद्धिः ॥**

## आतां पुनःप्रतिष्ठा सांगतों.

मद्य, चांडाल यांचा स्पर्श जीस झाला ती, अग्नीनें दग्ध झालेली, ब्राह्मणाच्या रक्तानें दूषित झालेली, प्रेत व पापी यांनीं स्पर्श केलेली अशा मूर्तीची पुनः प्रतिष्ठा ( अर्चा ) करावी. खंडित; स्फुटित; स्थानभ्रष्ट; पूजेचा अभाव; कुत्रा, गर्दभ इत्यादिकांचा स्पर्श व पतित, रजस्वला, चोर यांचा स्पर्श; हीं झालीं असतां पुनःप्रतिष्ठा करावी. खंडित झालेली, किंवा भग्न झालेली असी मूर्ति विधीकरून काढून दुसरी मूर्ति स्थापन करावी. मूर्तीचा नाश, किंवा चोरीस गेली इत्यादि ज्या दिवशीं घडलें त्या दिवशीं उपोषण करावें. तांबें इत्यादिक धातूच्या मूर्तीस चोर, चांडाल इत्यादिकांचा स्पर्श झाला असतां तांबें इत्यादिक धातूंची सांगितल्याप्रमाणें शुद्धि करून पुनः प्रतिष्ठा करावी. पूर्वी प्रतिष्ठा केलेल्या मूर्तीची,

न जाणून एक रात्र, एक महिना किंवा दोन महिनेपर्यंत पूजा इत्यादिकांचा नाश होईल, अथवा शूद्र, रजस्वला इत्यादिकांचा स्पर्श होईल तर जलाधिवास करून कलशानें स्नान घालावें. तदनंतर पंचगव्यानें स्नान घालून आठ सहस्र, अथवा अष्टशत किंवा अठ्ठावीस कलशांनीं शुद्धोदकेंकरून पुरुषसूक्तानें स्नान घालावें. नंतर गंध, पुष्प, इत्यादि उपचारांनीं पूजा करून गुडौदन समर्पण करावें, याप्रमाणें मूर्तीची शुद्धि करावी.

---

**बुद्धिपूर्वपूजनविच्छेदेशूद्रस्पर्शादौचपुनःप्रतिष्ठयैवशुद्धिः अन्येतु एकाहपूजाविहतौकुर्याद्द्विगुणमर्चनं द्विरात्रेतुमहापूजांसंप्रोक्षणमतःपरं मासादूर्ध्वंपूजाविहतौपुनःप्रतिष्ठाप्रोक्षणविधिर्वाकार्यइत्याहुः पुनःप्रतिष्ठादिमलमासशुक्रास्तादावपिकार्यं देवालयवापीकूपतडागभेदनेआरामसेतुसभाभंगेइदंविष्णुर्मानस्तोकेविष्णोःकर्माणिपादोस्येतिचतस्रआज्याहुतीर्हुत्वाब्राह्मणान्भोजयेदिति ॥**

बुद्धिपूर्वक पूजेचा नाश किंवा शूद्राचा स्पर्श इत्यादिक झाला असतां पुनः प्रतिष्ठा केल्यानेंच शुद्धि होते. दुसरे ग्रंथकार तर, एक दिवस पूजा अंतरली असतां द्विगुण पूजा करावी, दोन दिवस अंतरली तर महापूजा करावी, दोन दिवसांहून अधिक दिवस अंतरली असल्यास प्रोक्षणविधि करावा, एक महिन्याहून अधिक पूजा अंतरली असतां पुनः प्रतिष्ठा किंवा प्रोक्षणविधि करावा असें ह्मणतात. पुनःप्रतिष्ठा इत्यादिक करणें ती मलमास, शुक्राचें अस्तादिक यांमध्येंहि करावी. देवालय, वापी, कूप, तडाग यांचा भेद झाला असतां; बाग, सेतु, सभा यांचा नाश झाला असतां "**इदंविष्णु० मानस्तोके० विष्णोःकर्माणि० पादोस्य०**" ह्या चार ऋचांनीं चार आज्याहुति हवन करून ब्राह्मणांला भोजन घालावें.

---

**अथप्रोक्षणविधिः देवमुद्वास्यपंचवारंमृज्जलैःप्रक्षाल्यपंचगव्यैःस्नापयित्वाकुशोदकैर्विशोध्यमूलेनाष्टोत्तरशतवारंप्रोक्ष्यमूलेनमूर्धादिपीठांतंसंस्पृश्य तत्त्वन्यासलिपिन्यासमंत्रन्यासपूर्वकंप्राणप्रतिष्ठांकृत्वामहापूजांकुर्यात् पूजाहीनादिषुह्येषसंप्रोक्षणविधिःस्मृतः ॥**

## आतां प्रोक्षणाचा विधि सांगतों.

देवाचें विसर्जन करून मृत्तिका, उदक यांहींकरून देवाला पांच वेळ प्रक्षालन करून पंचगव्येंकरून स्नान घालून कुशोदकांनीं देवाची शुद्धि करून मूलमंत्रानें अष्टोत्तरशतवेळ प्रोक्षण करून मूलमंत्रानें मस्तकापासून पीठिकेपर्यंत स्पर्श करावा. नंतर तत्त्वन्यास, लिपिन्यास आणि मंत्रन्यास हे करून प्राणप्रतिष्ठा करून महापूजा करावी. "पूजेनें हीन इत्यादि झालेल्या ज्या मूर्ति त्यांविषयींहि हा प्रोक्षणविधि सांगितला आहे."

---

**अथजीर्णोद्धारः सचलिंगादौभग्नेदग्धेचलितेवाकार्यः अयंचानादिसिद्धप्रतिष्ठितलिंगादौ भंगादिदोषेपिनकार्यः तत्रतुमहाभिषेकःकार्यः ॥**

## आतां जीर्णोद्धारविधि सांगतों.

जीर्णोद्धार करणें तो लिंग इत्यादिक भग्न, किंवा दग्ध अथवा चलित झालें असतां क-

रावा. अनादिसिद्ध स्थापित ज्या लिंग, मूर्ति इत्यादिक त्यांला भंगादिदोष असला तथापि हा जीर्णोद्धार करूं नये, तर त्याविषयीं महाभिषेक करावा.

---

**कर्तामुकदेवस्यजीर्णोद्धारंकरिष्येइत्युक्त्वा नांदीश्राद्धांतंकृत्वाचार्यंवृत्वा पीठेमंडलदेवता आवाह्यलिंगेव्यापकेश्वरहृदयायनमः ॐव्यापकेश्वरशिरसेस्वाहेत्यादिषडंगंकृत्वा देवतांतरे मूलमंत्रेणषडंगंकृत्वार्चयेत्** अघोरेतिमंत्रमष्टोत्तरशतंजप्त्वाग्निंप्रतिष्ठाप्यअघोरेणघृताक्तसर्षपैःसहस्रंहुत्वेंद्रादिभ्योनाम्नाबलिंदत्वाजीर्णंदेवं प्रणवेनसंपूज्यसाज्यतिलैर्मंडलदेवताहोमंकृत्वा **प्रार्थयेत् जीर्णभग्नमिदंचैवस**र्वदोषावहंनृणां अस्योद्धारेकृतेशांतिःशास्त्रेस्मिन्कथितात्वया **जीर्णोद्धारविधानंचनृपराष्ट्रहितावहं तदधिष्ठायतांदेवप्रहरामितवाज्ञया क्षीराज्यमधुदूर्वासमिद्भिर्देवमंत्रेणाष्टोत्तरशतंहुत्वा**तिलैःसहस्रंहुत्वापायसेनशतंहुत्वालिंगं **प्रार्थयेत् लिंगरूपंसमागत्य** येनेदंसमधिष्ठितं यायास्त्वंसंमितंस्थानंसंत्यज्यैवशिवाज्ञया अत्र**स्थानेचयाविद्यासर्वविद्येश्वरैर्युताः शिवेनसहसंतिष्ठेतिमंत्रितजलेनाभिषिच्यविसर्जयेत् अस्त्रमंत्रितेनखनित्रेणखात्वालिंगमादायवामदेवमंत्रेणनद्यादौक्षिपेत्** मूर्तिंप्रणवेनक्षिपेत् दारुजंमधुनाभ्यज्याघोरेणदहेत् **हेमादिमयंयोग्यंकृत्वातत्रैवस्थापयेत्** ततःशांत्यर्थमघोरेणघृतक्षीरमध्वक्तैस्तिलैःसहस्रंहुत्वाप्रा**र्थयेत् भगवन्भूतभव्येशलोकनाथजगत्पते जीर्णलिंगसमुद्धारःकृतस्तवाज्ञयामया अग्निनादारुजंदग्धंक्षिप्तंशैलादिकंजले प्रायश्चित्तायदेवेशअघोरास्त्रेणतर्पितं ज्ञानतोज्ञानतोवापियथोक्तंनकृतंयदि तत्सर्वंपूर्णमेवास्तुत्वत्प्रसादान्महेश्वर अथयजमानःप्रार्थयेत् गोविप्रशिल्पिभूपानामाचार्यस्यचयज्वनः शांतिर्भवतुदेवेशअच्छिद्रंजायतामिदं मूर्तौतुविशेषः त्वत्प्रसादेननिर्विघ्नंदेहंनिर्मापयत्यसौ वासंकुरुसुरश्रेष्ठतावत्त्वंचाल्पकेगृहे वसक्लेशंसहित्वेहमूर्तिंचैतवपूर्ववत् यावत्कारयतेभक्तःकुरुतस्यचवांछितं ततोनवांमूर्तिंलिंगंवाकृत्वोक्तविधिनाप्रतिष्ठाकालानपेक्षयामासादर्वाक्स्थापयेत् इतिजीर्णोद्धारः ॥**

कर्त्यानें "**अमुकदेवस्य जीर्णोद्धारं करिष्ये**" असा संकल्प करून नांदीश्राद्धापर्यंत कर्म केल्यानंतर आचार्याला वरून सर्वतोभद्रपीठावर मंडलदेवतांचें आवाहन करून लिंगाचे ठिकाणीं "**व्यापकेश्वरहृदयाय नमः ॐव्यापकेश्वरशिरसे स्वाहा**" इत्यादिक षडंगन्यास करून पूजा करावी. "**अघोरे०**" ह्या मंत्राचा अष्टोत्तरशत (१०८) जप करून अग्निस्थापना करून "**अघोरेभ्यो०**" ह्या मंत्रेंकरून, घृतानें भिजवलेल्या सर्षपांचा सहस्र होम करून इंद्रादिक देवतांला नाममंत्रांनीं बलि देऊन प्रणवमंत्रानें जीर्ण देवाची पूजा करून घृतयुक्त तिलांनीं मंडलदेवतांचा होम करून प्रार्थना करावी. प्रार्थनामंत्र– "**जीर्णभग्नमिदंचैव सर्वदोषावहंनृणां ॥ अस्योद्धारेकृतेशांतिः शास्त्रेस्मिन्कथितात्वया ॥ जीर्णोद्धारविधानंच नृपराष्ट्रहितावहं ॥ तदधिष्ठायतां देव प्रहरामितवाज्ञया,**" याप्रमाणें प्रार्थना करून दुग्ध, आज्य, मध, दूर्वा आणि समिधा यांहींकरून देवाच्या मंत्रानें १०८ होम करून तिळांचा एक सहस्र होम करून पायसाचा शंभर होम करून लिंगाची प्रार्थना करावी. प्रार्थना मंत्र–"**लिंगरूपं समागत्य येनेदं समधिष्ठितं ॥ यायास्त्वं संमितं स्थानं संत्यज्यैव शिवाज्ञया ॥ अत्रस्थानेच या विद्या सर्वविद्येश्वरैर्युताः**"

याप्रमाणें प्रार्थना करून "शिवेन सह संतिष्ठ०" ह्या मंत्रानें अभिमंत्रित उदकेंकरून अभिषेक करून विसर्जन करावें. अस्त्रमंत्रानें मंत्रित केलेलें जें खनित्र (कुदळ इ०) तेणें-करून खणून तें लिंग घेऊन "वामदेव०" ह्या मंत्रेंकरून नदी इत्यादिकांत टाकावें. मूर्ति असेल तर ती प्रणवमंत्रेंकरून टाकावी. काष्ठमय असल्यास मधामध्यें भिजवून "अ-घोरेभ्यो०" ह्या मंत्रानें दहन करावें. सुवर्ण इत्यादि धातूंचें असेल तर तें यथायोग्य नीट करून त्याच स्थानीं पुनः स्थापावें. तदनंतर शांतीकरितां "अघोरे०" ह्या मंत्रेंकरून घृत, दूध, मध यांत भिजवलेल्या तिळांचा सहस्र होम करून प्रार्थना करावी. प्रार्थनामंत्र—"भ-गवन्भूतभव्येश लोकनाथ जगत्पते ॥ जीर्णलिंगसमुद्धारः कृतस्तवाज्ञया मया ॥ अग्निना दारुजं दग्धं क्षिप्तंशैलादिकं जले ॥ प्रायश्चित्ताय देवेश अघोरास्त्रेण तर्पितं ॥ ज्ञानतो-ऽज्ञानतो वापि यथोक्तं न कृतं यदि ॥ तत्सर्वं पूर्णमेवास्तु त्वत्प्रसादान्महेश्वर." यानंतर यजमानानें प्रार्थना करावी. ती असी—"गोविप्रशिल्पिभूपानामाचार्यस्य च यज्वनः ॥ शांतिर्भवतु देवेश अच्छिद्रं जायतामिदं." मूर्ति असेल तर प्रार्थनेचा विशेष— "त्वत्प्रसा-देन निर्विघ्नं देहं निर्मापयत्यसौ ॥ वासं कुरु सुरश्रेष्ठ तावत्त्वं चाल्पके गृहे ॥ वस क्लेशं सहित्वेह मूर्तिर्वै तव पूर्ववत् ॥ यावत्कारयते भक्तः कुरुतस्यचवांछितं." तदनंतर नवी-न मूर्ति किंवा लिंग करून पूर्वी सांगितल्या विधीनें, अर्चेच्या कालाची अपेक्षा न धरितां एक महिन्याच्या पूर्वी स्थापना करावी. याप्रमाणें जीर्णोद्धार सांगितला.

---

प्रतिमाशिवलिंगप्रासादकलशादिभंगेस्वामिनोमरणंभवेत् तत्रशांतिः कुंडंकृत्वाविधाने नततोहोमंसमाचरेत् चरुंचयमदैवत्यंसाधयित्वाविधानतः दधिक्षौद्रघृताक्तानामश्वत्थसमि धांततः जुहुयादष्टशतंप्राज्ञइमारुद्रेतिमंत्रवित् माषैर्मुद्गैस्तिलैश्चैवघृतेनमधुनापिच एभिःपंच सहस्राणिशक्तिबीजेनहोमयेत् शक्तिबीजंऱ्हींबीजं भूमिंधेनुमनड्वाहंस्वर्णंधान्यंसदक्षिणं द त्त्वाथपंचगव्येनस्नायाद्देवालयेद्विजः बलिंदद्याद्यमायाथकृसरैःपायसैस्तथा ईशानायबलिंदत्वा कृतकृत्योभवेन्नरः अत्रमूलंकमलाकरे ॥

मूर्ति, शिवलिंग, देवालय, देवालयाचा कळस इत्यादिकांचा नाश झाला असतां स्वा-मीला मरण प्राप्त होतें याकरितां त्याविषयीं शांति करावी. ती असी— विधानेंकरून कुंड करून नंतर होम करावा. विधिपूर्वक यमदेवताक (यम आहे देवता ज्याची तो) चरु करून त्या चरूचा; व दधि, मधु, घृत यांत भिजवलेल्या अशा समिधांचा "इमारुद्रा०" ह्या मंत्रेंकरून मंत्रज्ञ आणि विद्वान् अशा आचार्यानें अष्टोत्तरशत होम करावा. उडीद; मूग, तिळ, घृत आणि मध यांहींकरून प्रत्येकाचा सहस्र याप्रमाणें शक्तिबीजमंत्रानें होम करावा. शक्तिबीज ह्मणजे 'ऱ्हीं' बीज जाणावें. द्विजानें भूमि, गाय, वृषभ, सुवर्ण आणि धान्य यांचीं सदक्षिण दानें करून देवालयामध्यें पंचगव्यानें स्नान करावें. नंतर कृ-सरान्नाचा बलि यमाला देऊन ईशानाला पायसाचा बलि द्यावा. तेणेंकरून तो मनुष्य कृ-तकृत्य होतो. याविषयीं मूळ प्रमाण कमलाकरांत सांगितलें आहे.

---

अपर्युषितनिच्छिद्रैःप्रोक्षितैर्जंतुवर्जितैः आत्मारामोद्भवैर्मुख्यैर्भक्त्यासंपूजयेत्सुरान् त्यजेत्कीटावपन्नानिशीर्णपर्युषितानिच स्वयंपतितपुष्पाणिमलाद्युपहतानिच मुकुलैर्नार्चयेद्देवमपक्कैःकृमियुक्फलैः पुष्पाभावेपत्रपूजा पत्रालाभेफलैरपि निवेदयेत्फलालाभेतृणगुल्मौषधीरपि समित्पुष्पकुशादीनिब्राह्मणःस्वयमाहरेत् शूद्रानीतैःक्रयक्रीतैःकर्मकुर्वन्पतत्यधः लक्षपुष्पार्चनंक्रयक्रीतैरपि केचिद्धर्मार्जितधनक्रीतैर्यःकुर्यात्केशवार्चनम् नपर्युषितदोषोस्तिमालाकारगृहेषुचेत्याद्युक्तेर्मालाकारानीतैःक्रयक्रीतैरपिपुष्पपत्रैःपूजयंति नित्यपूजार्थंपरोपवनादेरपिपुष्पादिग्रहेचौर्यदोषोन पूजार्थंपुष्पादिनयाचेत् समित्पुष्पकुशादीनिवहंतंनाभिवादयेत् तद्धारीचैवनान्यान्हिनिर्माल्यंतद्भवेत्तयोः देवोपरिधृतंवामहस्तेधोवस्त्रेचधृतंजलेंतःक्षालितंचपुष्पंनिर्माल्यं वर्ज्यंपर्युषितंपुष्पंवर्ज्यंपर्युषितंजलं नवर्ज्यंतुलसीपत्रंनवर्ज्यंतीर्थजंजलं प्रहरंतिष्ठतेजातीकरवीरमहर्निशं नैवपर्युषितंपद्मंतुलसीबिल्वपत्रकं कुंदंचदमनंचैवागस्त्यंचकलिकातथा ॥

आतां देवपूजेविषयीं पुष्पें कशीं असावीं तें सांगतो.—“ अपर्युषित ( नूतन ), छिद्ररहित, प्रोक्षण केलेलीं, जंतुवर्जित असीं असून आपल्या बागांत उत्पन्न झालेलीं जीं पुष्पें तीं मुख्य होत, अशा पुष्पांनीं भक्तीकरून देवांची पूजा करावी. कीटकांनीं भक्षण केलेलीं, शीर्ण ( गळलेलीं ), पर्युषित ( शिळीं ), आपोआप पडलेलीं, मळादिकानें वाईट झालेलीं असीं पुष्पें देवपूजेविषयीं ग्रहण करूं नयेत. प्रफुल्लित न झालेल्या कळ्या, व पक्क न झालेलीं व किडे ज्यांत आहेत असीं फळें यांहींकरून देवाची पूजा करूं नये.” पुष्पें न मिळतील तर पत्रांनीं पूजा करावी. पत्रें न मिळतील तर फलांनींहि पूजा करावी. “ फलें न मिळतील तर दूर्वादि तृणें, गुल्म ( वल्लीच्या तंतूंचे गुच्छ ) व ओषधी (व्रीहियवादिक) यांहींकरून पूजा करावी. ब्राह्मणानें समिधा, पुष्पें आणि दर्भ इत्यादिक आपण आणावीं, शूद्राकडून आणलेलीं, व विकत घेतलेलीं अशा पुष्पादिकांनीं पूजादिक करणारा अधोयोनि पावतो.” लक्ष पुष्पांनीं पूजा करणें तीं पुष्पें विकत घेऊनहि करावी. कितीएक जन “ न्यायानें संपादित केलेल्या द्रव्यानें विकत घेतलेलीं जीं पुष्पें इत्यादिक त्यांहींकरून जो केशवाचें पूजन करितो त्याला दोष नाहीं, व माळ्याच्या गृहांतील जीं पुष्पें त्यांच्याविषयीं पर्युषित दोष नाहीं,” असें वचन आहे यास्तव माळ्याकडून विकत आणलेल्या पुष्पांनीं पूजा करितात. नित्यपूजेकरितां दुसऱ्याच्या बाग इत्यादिकांतूनहि पुष्पें, पत्रें इत्यादि ग्रहण केलीं असतां चोरी केल्याचा दोष नाहीं. पूजेकरितां पुष्पें, पत्रें इत्यादिकांची याचना करूं नये. “समिधा, पुष्पें, दर्भ इत्यादि पूजासाहित्य नेत असतां इतरांनीं त्यास व त्यानें इतरांस नमस्कार करूं नये. त्या दोघांपैकीं एकानेंहि परस्परविषयक नमस्कार केला असतां तें जवळ घेतलेलें पूजासाहित्य निर्माल्य ह्मणजे पूजेला निरुपयोगी होतें.” जें पुष्प देवास अर्पण केलेलें, केवळ वामहस्तांत घेतलेलें, नेसलेल्या वस्त्रांत ग्रहण केलेलें, व उदकामध्यें घालून प्रक्षा-

१ स्वकीयपुष्पवाटिकोत्थपुष्पाणांमुख्यत्वं परारामोद्भवानांवनस्थानांचमध्यमत्वं याचितानामधमत्वमितिग्रंथांतरे ॥

२ स्वतांच्या पुष्पवाटिकेंतील पुष्पें मुख्यत्वें घ्यावीं. दुसऱ्याच्या वाडींतील आणि वनांतील पुष्पें मध्यम होत. याचना केलेलीं पुष्पें अधम असें ग्रंथांतरीं सांगितलें आहे.

लन केलेलें तें पुष्प निर्माल्य होय. "पर्युषित पुष्प वर्ज्य करावें. पर्युषित जल वर्ज्य करावें. तुलसीपत्रें आणि तीर्थोदक हीं पर्युषित असतील तथापि तीं वर्ज्य नाहींत. जाईचें पुष्प एक प्रहरपर्यंत पर्युषित नाहीं. कण्हेरीचें पुष्प एक अहोरात्र पर्युषित होत नाहीं. कमळें, तुळशी, बिल्वपत्रें, कुंदपुष्पें, दमन (दवणा), अगस्त्यपुष्पें, कळ्या, हीं पर्युषित होत नाहींत."

---

**बिल्वादेरपर्युषितत्वदिनसंख्या बिल्वः ३० अपामार्गः ३ जाती १ तुलसी ६ शमी ६ शतावरी ११ केतकी ४ भृंगराजः ९ दूर्वा ८ मंदारः १ पद्मं १ नागकेसरः२ दर्भाः ३०अगस्त्यः३ तिलः १ मल्लिका ४ चंपकः९ करवीरं ८ एतेषामेतद्दिनोत्तरंपर्युषितत्वं॥**

बिल्व इत्यादिक पत्रें व पुष्पें हीं किती दिवसपर्यंत शिळीं होत नाहींत त्यांचे दिवसांचे अंक त्या त्या पदार्थांपुढें दिले आहेत त्यांवरून तितक्या दिवसपर्यंत पर्युषित होत नाहींत असें जाणावें. बिल्व ३०, आघाडा ३, जाती १, तुलसी ६, शमी ६, शतावरी ११, केतकी ४, भृंगराज ९, दूर्वा ८, मंदार १, पद्म १, नागचांफा २, दर्भ ३०, अगस्त्य ३, तिळ १, मल्लिका ४, सोनचांफा ९, कण्हेर ८, याप्रमाणें हीं इतक्या दिवसांनंतर पर्युषित होतात.

---

**तुलसीग्रहणकालः वैधृतौचव्यतीपातेभौमभार्गवभानुषु पर्वद्वयेचसंक्रांतौद्वादश्यांसूतकद्वये तुलसींयेविचिन्वंतितेछिंदंतिहरेःशिरः नैवछिंद्याद्रवौदूर्वांतुलसींनिशिसंध्ययोः धात्रीपत्रंकार्तिकेचपुण्यार्थीमतिमान्नरः द्वादश्यांचदिवास्वापस्तुलस्यवचयस्तथा विष्णोश्चैवदिवास्नानंवर्जनीयंसदाबुधैः अत्रदिवानिषेधाद्रात्रौस्नानादिषोडशोपचारैःपूजाकार्या दिवातुगंधादिपुष्पांजल्यंताएवोपचाराइतिकमलाकराह्निके विष्णोर्द्वादश्यांनिर्माल्यापनयनमपिनकार्यमिति तंत्रांतरेस्मर्यते एतदपवादःपुरुषार्थचिंतामणौनारदीये पंचामृतेनसंस्नाप्यएकादश्यांजनार्दनं द्वादश्यांपयसास्नाप्यहरिसायुज्यमश्नुतेइति देवार्थेतुलसीछेदोहोमार्थेसमिधांतथा इंदुक्षयेनदुष्येतगवार्थेतुतृणस्यच तुलसीग्रहणमंत्रः तुलस्यमृतनामासिसदात्वंकेशवप्रिये केशवार्थंविचिन्वामिवरदाभवशोभने जातिमल्लिकाकरवीराशोकोत्पलचंपकबकुलबिल्वशमीकुशाएतानिसर्वदेवतानांविहितानि ॥**

तुलसीग्रहणाविषयीं काल सांगतों.—"वैधृति, व्यतीपात, भौमवार, शुक्रवार, रविवार, पौर्णिमा, अमावास्या, संक्रांति, द्वादशी, जननाशौच व मृताशौच, हीं असतां तुलसी तोडितात ते हरीचा शिरच्छेद करितात असें होय, याकरितां या दिवसीं तुलसी तोडूं नयेत. पुण्येच्छु बुद्धिमान् अशा मनुष्यानें रविवारीं दूर्वा; रात्रि व दोन संधिकाल यांचे ठायीं तुलसी; व कार्तिक मासांत धात्रीपत्र तोडूं नये. दिवसा निद्रा, तुलसी तोडणें, विष्णूस दिवसा स्नान हीं द्वादशीचे दिवसीं सार्वकाल बुधांनीं वर्ज्य करावीं." ह्या वाक्यांत दिवसा स्नानाचा निषेध सांगितला यास्तव रात्रौ स्नानादिक सोळा उपचारेंकरून पूजा करावी. दिवसा जे पूजेचे उपचार वाहणें ते तर गंधापासून पुष्पांजलीपर्यंतच अर्पण करावे असें कमलाकराच्या आन्हिकांत सांगितलें आहे. द्वादशीचे दिवसीं विष्णूवरील निर्माल्यहि काढूं नये असें अन्य

तंत्रामध्यें सांगितलें आहे. याचा अपवाद, पुरुषार्थचिंतामणीमध्यें नारदीय पुराणवचनानें सांगितला आहे तो असा—" एकादशीचे दिवसीं जनार्दनास पंचामृताचें स्नान घातल्यानें व द्वादशीचे दिवसीं दुग्धाचें स्नान घातल्यानें हरीचे ठायीं सायुज्यमुक्ति पावतो. " "अमावास्येचे दिवसीं विष्णुपूजेकरितां तुलसी तोडणें, होमाकरितां समिधा आणणें, व गाईकरितां तृण कापणें हीं दोषकारक होत नाहींत. " तुलसीग्रहणाचा मंत्र—" **तुलस्यमृतनामासि सदा त्वं केशवप्रिये ॥ केशवार्थं विचिन्वामिवरदा भव शोभने.**" जाई, मोगरी, कण्हेर, अशोक, कमलें, चांफा, बकुळपुष्पें, शमी आणि कुश हीं पुष्पें सर्व देवांस अर्पण करण्याविषयीं प्रशस्त होत.

---

**अथविहितप्रतिषिद्धत्वाद्वैकल्पिकानि पाटलाशमीपत्रंचदुर्गायाः कुंदपलाशबकुलदूर्वाः शिवस्य कुमुदतगरेसूर्यस्य तुलसीभृंगराजतमालपत्राणिशिवदुर्गयोः अगस्तिमाधवीलतालोध्रपुष्पंविष्णुशिवयोः धत्तूरमंदारौविष्णुसूर्ययोः इतिविकल्पितानि ॥**

यानंतर विहित आणि प्रतिषिद्ध अशीं असल्यामुळें वैकल्पिक होत. तीं हीं—पाटला, शमीपत्रें हीं दुर्गादेवीस विहितनिषिद्ध होत. कुंद, पलाशपुष्प, बकुळ, दूर्वा हीं शिवास विहितनिषिद्ध. कुमुदें व तगर हीं सूर्यास. तुलसी, माका, तमालपत्र हीं शिव व दुर्गा यांला विहितनिषिद्ध होत. अगस्ति, माधवीलता ( कुसेरी ), लोध्रपुष्प ( धायटीपुष्प ) हीं शिव व विष्णु यांना विहितप्रतिषिद्ध होत. धुतरा व मंदार हीं विष्णु व सूर्य यांला विहितप्रतिषिद्ध होत. याप्रमाणें वैकल्पिक पुष्पें जाणावीं.

---

**अथ विष्णोःप्रियाणि मालतीजातीकेतकीमल्लिकाशोकचंपकपुन्नागबकुलोत्पलकुंदकरवीरपाटलातगरपुष्पाणि अन्यानिचसुरभीणिविष्णोःप्रियाणि अपामार्गभृंगराजखदिरशमीदूर्वाकुशदमनकबिल्वतुलसीपत्राण्युत्तरोत्तराधिकप्रियाणितुलसीसर्वाधिका जातिपुष्पसहस्रेण मालार्पणेकल्पकोटिसहस्रंविष्णुपुरेवासः आम्रमंजर्यापूजनेगोकोटिदानफलं ॥**

**यानंतर विष्णूस प्रिय पुष्पें कोणतीं तीं सांगतो**:—मालती, जाई, केतकी, मोगरी, अशोक, चंपक, पुन्नाग ( उंडिणीचें पुष्प ), बकुळ, कमळ, कुंद, कण्हेर, पाटलापुष्प, (सुरपुन्नाग ), तगर हीं पुष्पें विष्णूस प्रिय होत. इतर सुगंधी पुष्पें विष्णूस प्रिय होत. अपामार्ग ( आघाडा ), माका, खदिर, शमी, दूर्वा, कुश, दमनक, बिल्व, तुलसी यांचीं पत्रें एकाहून एक अधिक प्रिय होत. सर्वांपेक्षां तुलसी अधिक प्रिय आहे. जाईच्या सहस्र पुष्पांची माला करून ती विष्णूस अर्पण केली असतां कल्पकोटि सहस्रवर्षेंपर्यंत विष्णुपुराचे ठायीं वास होतो. आंब्याच्या मोहुरानें पूजा केली असतां गोकोटिदानाचें फळ मिळतें.

**अथशिवस्य चतुर्णांपुष्पजातीनांगंधमाघ्रातिशंकरः अर्कस्यकरवीरस्यबिल्वस्यचबकस्यच दशसुवर्णदानफलंश्वेतार्कपुष्पं ततःसहस्रगुणंबकपुष्पं एवंधत्तूरशमीपुष्पद्रोणपुष्पनीलोत्पलानामुत्तरोत्तराणांसहस्रगुणत्वं मणिमुक्ताप्रवालैस्तुरत्नैरप्यर्चनंकृतं नगृण्हामिविनादेवि बिल्वपत्रैर्वरानने सर्वकामप्रदंबिल्वंदारिद्र्यस्यविनाशनं नीलोत्पलसहस्रेणमालार्पणेकल्पकोटि सहस्रंशिवपुरेवासः धत्तूरैर्बृहतीपुष्पैश्चपूजनेगोलक्षफलं पाटलामंदारापामार्गजातीचंपको**

शीरतगरनागकेसरपुन्नागजपामल्लिसहकारकुसुंभपुष्पाणिशिवप्रियाणि धत्तूराणिकदंबानि रात्रौदेयानिशंकरे मदनरत्ने केतकानिकदंबानीतिपाठःअभावेपुष्पपत्राणामन्नाद्येनाभिपूजयेत् शालितंडुलगोधूमयवैर्वापिसमाचरेत् ॥

यानंतर शिवास प्रिय पुष्पें कोणतीं तीं सांगतों—शंकर अर्कपुष्प, कण्हेर, बिल्व आणि बकपुष्प या चार जातींच्या पुष्पांचा सुगंध ग्रहण करितो. श्वेत अर्कपुष्पानें शंकराची पूजा केली असतां दहा सुवर्णाच्या दानाचें फळ मिळतें. अर्कपुष्पाहून सहस्रगुण बकपुष्प प्रिय होय. याप्रमाणें धत्तूर ( धोत्रा ), शमीपुष्प, द्रोणपुष्प, निळीं कमळें हीं एकाहून दुसरें अधिक याप्रमाणें सहस्रगुण प्रिय होत. "हे वरानने, हे पार्वति, बिल्वपत्रांवांचून हिरे, मोत्यें, पोवळीं व रत्नें यांहींकरूनहि माझी पूजा केली तथापि ती मी ग्रहण करणार नाहीं." बिल्वपत्र हें दरिद्राचा नाश करणारें व सर्व मनोरथ पूर्ण करणारें आहे. सहस्र निळ्या कमळांची माला अर्पण केली असतां कल्पकोटि सहस्र वर्षेंपर्यंत शिवपुरांत वास प्राप्त होतो. धत्तूरपुष्पें व बृहतीपुष्पें यांहींकरून पूजा केली असतां लक्षसंख्याक गोदानाचें फळ मिळतें. पाटला, मांदार, अपामार्ग, जाई, चंपक, उशीर, तगर, नागकेशर, पुन्नाग, जासवंद, मोगरी, आंबा, कर्डईचें पुष्प, हीं शिवास प्रिय होत. धत्तूर, कदंब हीं पुष्पें शंकरास रात्रीं अर्पण करावीं. मदनरत्न ग्रंथांत "धत्तूर कदंब" या स्थानीं 'केतक, कदंब' असा पाठ आहे. पुष्पें व पत्रें न मिळाल्यास अन्न इत्यादिकानें पूजा करावी. साळीचे तांदूळ, गहूं अथवा यव यांहींकरूनहि शंकराची पूजा करावी.

---

अथनिषिद्धानि बंधूककुंदातिमुक्तकेतकीकपित्थबकुलशिरीषनिंबानि पुष्पपत्रादिकंस्वाभिमुखमुत्तानमर्पयेत् पत्रंपुष्पंफलंचैवयथोत्पन्नंतथार्पयेदितिवचनात् बिल्वपत्रंतुस्वाभिमुखाग्रंन्युब्जमर्पयेत् पक्काम्रफलस्यशिवार्पणेवर्षायुतंशिवपुरेवासः सव्यंव्रजेत्ततोसव्यंप्रणालींनैव लंघयेदित्यादिस्थिरलिंगेप्रदक्षिणाप्रकारः चरेतुसव्येनैव देव्याअपिबकुलकुंदादिसहितान्येतान्येवप्रियाणि धान्यानांसर्वपत्रैश्चपुष्पैर्देवींप्रपूजयेत् दूर्वाकुंदैःसिंधुवारैर्बंधूकागस्तिसंभवैःबिल्वपत्रैःपूजनेराजसूयफलं करवीरस्रजाग्निष्टोमस्य बकुलस्रजावाजपेयस्य द्रोणस्रजाराजसूयस्येति एवंसूर्यविघ्नेशादेरपिप्रायोविष्णुवत्ज्ञेयानि ॥

यानंतर निषिद्ध पुष्पें सांगतों—बंधूक, कुंद, अतिमुक्त ( कस्तुरमोगरा ), केतकी, कपित्थ, बकुल, शिरीष आणि निंब हीं शिवास निषिद्ध होत. पुष्पें पत्रें इत्यादिक अर्पण करणें तीं आपणाकडे अग्रें करून उताणीं अशीं अर्पण करावीं; कारण "पत्र, पुष्प आणि फल हीं जशीं उत्पन्न होतात तशीं अर्पण करावीं" असें वचन आहे. बिल्वपत्र तर आपणाकडे अग्र करून उपडें वाहावें. पक्क झालेलें आम्रफळ शिवास अर्पण केलें असतां दहा सहस्र वर्षेंपर्यंत शिवपुरीं वास प्राप्त होतो. "शिवाला प्रदक्षिणा करावयाची ती पूर्वी सव्य प्रदेशानें प्रणाली ( पन्हळी-गायमुख ) पर्यंत जावें. नंतर तेथून पुनः फिरून अपसव्यानें प्रणालीपर्यंत जावें; परंतु प्रणालीचें उल्लंघन करूं नये," इत्यादिक प्रदक्षिणेचा प्रकार स्थिरलिंगाविषयीं जाणावा. चरलिंगाविषयीं तर, सव्य प्रदेशानेंच प्रदक्षिणा करावी. बकुल, कुंदा-

दिसहित हींच पुष्पें देवीलाहि प्रिय होत. " धान्यवृक्षांचीं सर्व पत्रें व पुष्पें, दूर्वा, कुंद, निर्गुंडी, बंधूक आणि अगस्ति यांच्या पुष्पांनींहि देवीचें पूजन करावें. " बिल्वपत्रेंकरून पूजा केली असतां राजसूयाचें फल मिळतें. कण्हेरीच्या पुष्पांच्या मालेनें अग्निष्टोमाचें फल प्राप्त होतें. बकुलपुष्पांच्या मालेनें वाजपेयाचें फल मिळतें. द्रोणपुष्पांच्या मालेनें राजसूयाचें फल मिळतें. याप्रमाणें सूर्य, गणपति इत्यादिक देवतांचीं प्रिय पुष्पें बहुधा विष्णूप्रमाणें जाणावीं, ह्मणजे विष्णूला जीं प्रिय पुष्पें तीं सूर्य, गणपति यांला प्रिय होत असें तात्पर्य जाणावें.

---

**अथशिवनिर्माल्यग्रहणविचारः अग्राह्यंशिवनैवेद्यंपत्रंपुष्पंफलंजलं शालग्रामशिलासंगात्सर्वंयातिपवित्रतां शैवसौरनैवेद्यभक्षणेचांद्रायणंअभ्यासेद्विगुणं मत्याभ्यासेसांतपनं अन्यनिर्माल्येप्यनापद्येवं इदंचज्योतिर्लिंगस्वयंभूलिंगसिद्धप्रतिष्ठापितलिंगातिरिक्तस्थावरलिंगविषयं ज्योतिर्लिंगादौतुपूजकेनदत्तंफलतीर्थादिकंभक्त्याशुद्ध्यर्थंग्राह्यंनलोभेन पंचायतनस्थितलिंगेषुचरेषुप्रतिमासुचान्नादेरपिस्वयंग्रहणेपिनदोषः ज्योतिर्लिंगाद्यन्यस्थिरलिंगेषुतीर्थोदकचंदनमात्रंश्रद्धावद्भिःशिवोपासकैरेवग्राह्यं ज्योतिर्लिंगादौपूजकदत्तमन्नमपिभक्ष्यमितिकेचित्॥**

## आतां यानंतर शिवनिर्माल्यग्रहणाचा निर्णय सांगतों.

" शिवास अर्पण केलेला नैवेद्य, पत्र, पुष्प, फल, जल हीं अग्राह्य होत; परंतु शालग्रामशिळेच्या संबंधानें शिवाचें सर्व नैवेद्यादिक पवित्र होतें. " शिव, व सूर्य यांचा नैवेद्य भक्षण केला असतां चांद्रायण करावें. अभ्यास असतां दुप्पट चांद्रायण करावें. बुद्धिपूर्वक अभ्यास असतां सांतपन करावें. आपत्ति नसतां इतर देवतांच्या निर्माल्य ( नैवेद्यादिक ) ग्रहणाविषयींहि असाच निर्णय जाणावा. ज्योतिर्लिंग, स्वयंभूलिंग आणि सिद्ध पुरुषांनीं स्थापन केलेलें लिंग ह्यांवांचून अन्य जीं स्थावरलिंगें तद्विषयक हा शिवनिर्माल्यग्रहणाचा निषेध जाणावा. ज्योतिर्लिंग इत्यादिकाविषयीं तर, पूजकानें दिलेलें फल, तीर्थादिक भक्तीकरून शुद्धीकरितां ग्रहण करावें, लोभानें ग्रहण करूं नये. पंचायतनांतील चरबाणलिंगें व प्रतिमा त्यांचा अन्नादिक नैवेद्यहि स्वतां ग्रहण केला तथापि दोष नाहीं. ज्योतिर्लिंगादिकांहून इतर जीं स्थिरलिंगें त्यांचें तीर्थोदक, चंदन हें मात्र भक्तिमान् शिवोपासकांनींच ग्रहण करावें. ज्योतिर्लिंगादिकाविषयीं पूजकानें दिलेलें असें अन्नहि भक्षण करावें असें कितीएक सांगतात.

---

**त्र्युत्तरारोहिणीध्रुवं मघाभरणीपूर्वात्रयंक्रूरं श्रवणत्रयपुनर्वसुस्वात्यश्चरं अश्विनीहस्तपुष्यंक्षिप्रं अनुराधारेवतीमृगचित्रंमृदु कृत्तिकाविशाखेमिश्रं मूलाश्लेषाज्येष्ठार्द्रास्तीक्ष्णं इति नक्षत्रसंज्ञाः ॥**

## आतां यानंतर नक्षत्रांच्या संज्ञा सांगतों.

उत्तरा, उत्तराषाढा, उत्तरा भाद्रपदा आणि रोहिणी हीं नक्षत्रें ध्रुवसंज्ञक होत. मघा, भरणी, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, हीं क्रूरसंज्ञक होत. श्रवण, धनिष्ठा, शततारका,

पुनर्वसु आणि स्वाती हीं चरसंज्ञक जाणावीं. अश्विनी, हस्त, पुष्य हीं क्षिप्रसंज्ञक होत. अनुराधा, रेवती, मृग, चित्रा हीं मृदुसंज्ञक होत. कृत्तिका, विशाखा हीं मिश्रसंज्ञक. मूल, आश्लेषा, ज्येष्ठा, आर्द्रा, हीं तीक्ष्णसंज्ञक. याप्रमाणें नक्षत्रांच्या संज्ञा सांगितल्या.

---

**यत्रनोक्तातिथिस्तत्रग्राह्यारिक्तामामांविना वारोपियत्रनप्रोक्तस्तत्रार्कार्किकुजान्विना चर मृदुक्षिप्रध्रुवमूलविशाखामघासुसकुजेशुभवारेभूकर्षणंहितं सूर्यत्यक्तनक्षत्रात्त्र्यष्टनवाष्टसु अशुभंशुभमशुभंशुभमितिहलचक्रं अत्रैवनक्षत्रेशनिभौमभिन्नवारेबीजवाः सस्यारोपणंच धान्यच्छेदश्च क्षीरवृक्षजन्यःखलमध्येस्तंभः धान्यानांमर्दनंज्येष्ठामूलमघाश्रवणरेवतीरोहिण्यनुराधाफल्गुनीद्वयेशुभं धान्यसंग्रहःक्षिप्रध्रुवचरमृदुमूलेषुज्ञगुरुशुक्रेषुचरभिन्नलग्नेशुभः ॐधनदायसर्वलोकहितायदेहिमेधान्यंस्वाहेतिमंत्रंलिखित्वाधान्यागारेक्षिपेत् तेनधान्यवृद्धिः बुधमंददिनेनैवधनधान्यव्ययःशुभः अद्यान्नवान्नंसद्वारेमृदुक्षिप्रचरेदिवा ॥**

ज्याविषयीं तिथि सांगितल्या नाहींत त्याविषयीं रिक्ता व अमावास्या यांवांचून इतर तिथि घ्याव्या. जेथें वारहि सांगितला नाहीं तेथें रविवार, शनिवार आणि भौमवार हे वर्ज्य करून इतर वार घ्यावे. चर, मृदु, क्षिप्र, ध्रुव, मूल, विशाखा, मघा हीं नक्षत्रें; भौमवार, शुभवार ( चंद्रवार, बुधवार, बृहस्पतिवार व शुक्रवार ) या वारीं भूकर्षण ( भूमि नांगरणें ) शुभ होय. सूर्यानें त्यक्त ह्मणजे भोगून टाकलें जें नक्षत्र त्यापासून ह्मणजे सूर्यनक्षत्राचे पूर्व नक्षत्रापासून ३, ८, ९, ८ या नक्षत्रीं क्रमानें अशुभ, शुभ, अशुभ आणि शुभ, याप्रमाणें हलचक्र जाणावें. हीं जीं हलचक्राचीं नक्षत्रें सांगितलीं याच नक्षत्रीं; शनि व भौम हे वार वर्ज्य करून अन्य वारीं बीज पेरणें, शेत लावणें, व शेत कापणें हीं शुभ होत. क्षीरवृक्षाचा (वटवृक्षाचा) स्तंभ ( तिवडा ) घालावा. ज्येष्ठा, मूल, मघा, श्रवण, रेवती, रोहिणी, अनुराधा, पूर्वा आणि उत्तरा या नक्षत्रीं धान्याचें मर्दन ह्मणजे मळणी काढणें ती शुभ होय. क्षिप्र, ध्रुव, चर, मृदु, मूल, या नक्षत्रीं; बुध, गुरु, शुक्र या वारीं; चर लग्नें वर्ज्य करून इतर लग्नीं धान्याचा संग्रह शुभ होय. धान्यसंग्रहकालीं " ॐधनदायसर्वलोकहितायदेहिमेधान्यंस्वाहा " याप्रमाणें मंत्र लिहून कोठारांत टाकावा, तेणेंकरून धान्याची वृद्धि होते. बुधवार व मंदवार या वारीं धन आणि धान्य यांचा व्यय ( व्याजावर रुपये लावणें, सवाई दिढीवर धान्य देणें तो ) करूं नये. मृदु, क्षिप्र, आणि चर ह्या नक्षत्रीं; शुभवारीं; दिवसा नवान्न भक्षण करावें.

---

**अथवस्त्रादि वस्त्रभूषणविधिर्ध्रुवाश्विनीहस्तपंचकपुनर्वसुद्वये पौष्णवासवभयोश्चसत्तिथौ मंदभौमशशिवासरान्विना अनुक्तेपीष्टदंवस्त्रंविप्राज्ञोत्सवलब्धिषु ध्रुवपुष्यादितौयोषिद्धत्तेया वस्त्रभूषणे नप्राप्नोतिपतिप्रीतिंस्वातिवारुणभेचया पादुकासनशय्यादेर्भोगःसत्तिथिवासरे ध्रुवक्षिप्रमृदुश्रोत्रभरणीषुपुनर्वसौ चेन्नव्यवस्त्रंमध्यांशेदग्धस्फुटितपंकितं तत्त्यजेच्छांतिकंकुर्यात्त्यजेदेवांत्यभागयोः विज्ञेयमेतच्छय्यायामास्तृतौपादुकास्वपि सूचीकर्मानुराधाश्विचित्रामृगपुनर्वसौ वस्त्रंक्षाल्यंधारणोक्तेकालेबुधदिनंविना भोजनंभाजनेरौप्यस्वर्णकांस्यादिनिर्मिते कु**

**र्यादमृतयोगेषुचरक्षिप्रमृदुध्रुवैः स्याद्भूषणानांघटनंचरक्षिप्रमृदूध्रुवैः शुभवारेरत्नवतांमिश्रभे पिरवौकुजे इतिवस्त्रादिविचारः ॥**

## आतां यानंतर वस्त्रादिधारणाचा मुहूर्त सांगतों.

ध्रुवसंज्ञक, अश्विनी, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, पुनर्वसु, पुष्य, रेवती आणि धनिष्ठा, या नक्षत्रीं; शुभ तिथीचे दिवसीं; भौम, शनि व चंद्र यांवांचून अन्यवारीं वस्त्रें व भूषणें धारण करावीं. ब्राह्मणाची आज्ञा, विवाहादि उत्सव, लाभ हीं असतां निंद्य दिवसींहि वस्त्र धारण केलें असतां तें इष्टदायक होतें. ध्रुवसंज्ञक नक्षत्रें, पुष्य, पुनर्वसु या नक्षत्रीं जी स्त्री वस्त्र व अलंकार धारण करिते आणि शततारका नक्षत्रीं स्नान करिते ती पतीच्या प्रीतीस पात्र होत नाहीं. शुभ तिथि व शुभ वार या दिवसीं; ध्रुव, क्षिप्र, मृदु, श्रवण, भरणी, पुनर्वसु या नक्षत्रीं पादुका, आसन, शय्यादिक यांचा उपभोग करावा. नूतन वस्त्राचे नऊ भाग मानून मध्यम तीन अंशांवर जर तें वस्त्र नूतन असतां दग्ध होईल अथवा फाटेल किंवा कर्दमयुक्त होईल तर तें टाकून शांति करावी. शेवटच्या दोन अंशांवर दग्ध इत्यादिक होईल तर केवळ वस्त्र मात्र टाकावें, शांति करूं नये. हा निर्णय शय्येवरील गादि इत्यादिक पादुका, आसन यांविषयींहि जाणावा. अनुराधा, अश्विनी, चित्रा, मृग, पुनर्वसु या नक्षत्रीं सूचीकर्म ह्मणजे शिवणकाम करावें. वस्त्रधारणास जो काल सांगितला त्या कालीं बुधवारावांचून अन्यवारीं वस्त्रक्षालन करावें. रौप्य, सुवर्ण, कांस्य इत्यादि धातूंचें केलेलें जें पात्र त्यामध्यें भोजन करणें तें अमृतयोगीं व चर, क्षिप्र, मृदु, आणि ध्रुवसंज्ञक या नक्षत्रीं करावें. चर, क्षिप्र, मृदु, ध्रुव नक्षत्रीं आणि शुभवारीं अलंकार घडवावे. मिश्रनक्षत्रीं व रवि, मंगळ या वारीं रत्नजडित अलंकार घडवावे.याप्रमाणें वस्त्रादिधारणाचे मुहूर्त सांगितले.

---

**शस्त्राणांघटनंक्रूरमिश्राश्विमृगतीक्ष्णभे शस्त्रंधार्यंध्रुवक्षिप्रमृदुज्येष्ठाविशाखके सेवाकार्याक्षिप्रमैत्रध्रुवैर्ज्ञेज्यार्कभार्गवे मंदेपिचेत्सेवकर्क्षंस्वामिभान्नद्वितीयकं हस्तषट्कध्रुवश्रोत्ररेवतीपुष्यभेशुभं पुनर्वसौचशिबिकागजाश्वादिषुरोहणं राज्ञांविलोकनंक्षिप्रश्रुतिद्वयमृदुध्रुवे नृत्यारंभःपुष्यमृगध्रुवज्येष्ठाधनिष्ठयोः अनुराधाशतभिषग्धस्तेस्याच्छुभवासरे विपणिःस्यान्मृदुक्षिप्रध्रुवैरिक्ताकुजान्विना क्रयःकार्योश्विनीस्वातीश्रवश्चित्राशतांत्यभे विक्रयोभरणीपूर्वात्रयाश्लेषासुमिश्रभे सेतुबंधोध्रुवेस्वात्यांजीवार्कशनिवासरे नानापशुक्रियाहस्तपुष्याद्रामृगमिश्रभे पुनर्वसौधनिष्ठाश्विपूर्वाज्येष्ठाशतांत्यभे त्यक्त्वार्कभौमेंदुशनीन्श्रुतिचित्राध्रुवाणिच अमारिक्ताष्टमीश्चापिगतिक्रियमुखाःशुभाः द्रव्यंलघुचरैर्योज्यंवृद्ध्यर्थंचरलग्नके ऋणंभौमे नगृण्हीयाद्वृद्धियोगेर्कसंक्रमे धनिष्ठापंचकेहस्तेत्रिपुष्करद्विपुष्करे भौमादिषुऋणच्छेदंकुर्याच्च धनसंग्रहं बुधेधनंनप्रदेयंसंग्रहस्तुबुधेशुभः शन्यर्कारैस्त्रिपादर्क्षेभद्रातिथ्यात्रिपुष्करः मृगचित्राधनिष्ठासुतत्तिथ्यन्हिद्विपुष्करः शुभाशुभेषुत्रिगुणंद्विगुणंचफलंक्रमात् मिश्रक्रूरेषुतीक्ष्णेषुस्वात्यांद्रव्यंनलभ्यते दत्तंप्रयुक्तंनिक्षिप्तंनष्टंचेत्याहनारदः ॥**

---

१ पशुगमनंपशुक्रयादिकमित्यर्थः ॥

क्रूर, मिश्र, अश्विनी, मृग, आणि तीक्ष्ण या नक्षत्रीं खड्ग इत्यादि शस्त्रें घडवावीं. ध्रुव, क्षिप्र, मृदु, ज्येष्ठा आणि विशाखा ह्या नक्षत्रीं शस्त्रें धारण करावीं. क्षिप्र, मैत्र, आणि ध्रुव या नक्षत्रीं; बुध, गुरु, रवि, व शुक्र या वारीं; व स्वामिनक्षत्रापासून सेवकाचें नक्षत्र दुसरें नसेल तर, शनिवारींहि स्वामीची सेवा करावी, ह्मणजे चाकरीस रहावें. हस्त, चित्रा, स्वाति, विशाखा, अनुराधा, ज्येष्ठा, ध्रुवसंज्ञक, श्रवण, रेवती, पुष्य आणि पुनर्वसु या नक्षत्रीं पालखी, हस्ति, अश्व, इत्यादिकांवर आरोहण करावें तें शुभ होय. क्षिप्र, श्रवण, धनिष्ठा, मृदु, ध्रुव या नक्षत्रीं राजांचें दर्शन करावें. पुष्य, मृग, ध्रुव, ज्येष्ठा, धनिष्ठा, अनुराधा, शततारका आणि हस्त या नक्षत्रीं; शुभवारीं नृत्यारंभ शुभ होय. मृदु, क्षिप्र, ध्रुव, या नक्षत्रीं ( रिक्ता-तिथि व भौमवार वर्ज्य करून ) विपणि ( विक्रीचा बाजार ) शुभ होय. अश्विनी, स्वाति, श्रवण, चित्रा, शततारका आणि रेवती या नक्षत्रीं क्रय (मौल्य देऊन वस्तु घेणें तो) करावा. भरणी, पूर्वा, पूर्वाषाढा, पूर्वाभाद्रपदा, आश्लेषा, आणि मिश्रसंज्ञक नक्षत्रें या नक्षत्रीं विक्रय ( मौल्य घेऊन वस्तु देणें तो ) करावा. ध्रुवसंज्ञक, स्वाति, या नक्षत्रीं; गुरु, रवि, शनि या वारीं सेतुबंध करावा. हस्त, पुष्य, आर्द्रा, मृग, मिश्रसंज्ञक नक्षत्रें, पुनर्वसु, धनिष्ठा, अश्विनी, तीन पूर्वा, ज्येष्ठा, शततारका, रेवती, या नक्षत्रीं; ( रविवार, मंगळवार, चंद्रवार, शनि, श्रवण, चित्रा, व ध्रुवनक्षत्रें अमावास्या, रिक्ता हीं वर्ज्य करून) पशु नेणें व आणणें, विक्रय करणें, विकत घेणें इत्यादिक नानाप्रकारचीं पशुसंबंधी कर्में शुभ होय. लघुचरसंज्ञक नक्षत्रीं, चरलग्नीं वृद्धि होण्याकरितां द्रव्याचा व्यापार करावा. भौमवार, वृद्धियोग, सूर्यसंक्रांति या दिवसीं कर्ज काढूं नये. धनिष्ठा, शततारका, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा, रेवती, हस्त, त्रिपुष्कर, द्विपुष्कर, भौम, बुध, गुरु, शुक्र आणि शनि या दिवसीं कर्ज देणें व धनसंग्रह करणें हीं करावीं, बुधवारीं धन देऊं नये. बुधवारीं धनसंग्रह तर शुभ होय. शनिवार, रविवार, भौमवार हे वार; त्रिपाद नक्षत्रें ह्मणजे कृत्तिका, पुनर्वसु, उत्तरा, विशाखा, उत्तरा-षाढा, पूर्वाभाद्रपदा; भद्रा तिथि ह्मणजे द्वितीया, सप्तमी, द्वादशी ह्या तिथि; या तिहींचा योग असतां त्रिपुष्कर योग होतो. मृग, चित्रा, धनिष्ठा हीं नक्षत्रें; भद्रातिथि; शनिवार, भौमवार, रविवार या तिहींचा योग असतां द्विपुष्कर योग होतो. हे त्रिपुष्कर द्विपुष्कर योग शुभाशुभ कार्याविषयीं क्रमानें त्रिगुण द्विगुण फल देणारे होतात. ( ह्मणजे, हा योग असून त्या दिवसीं कोणी मृत झाल्यास तत्सहित त्याचे तीन मृत होतील, जर कांहीं वस्तु नष्ट होईल तर तत्सहित तीन नष्ट होतील. तसाच कांहीं लाभ झाला असतां तिप्पट लाभ होईल असें जाणावें, व द्विपुष्कराचेंहि फळ असेंच जाणावें. ) मिश्र, क्रूर, तीक्ष्ण आणि स्वाति या नक्षत्रीं दिलेलें, ठेवलेलें, प्रयुक्त, नष्ट झालेलें द्रव्य प्राप्त होत नाहीं असें नारद सांगतो.

---

अंधंमंदंचचिपिटंसुलोचनमितिक्रमात् गणनीयंरोहिणीभादंधेनष्टंलभेद्रुतं मंदेयत्नाल्लभेतै वचिपिटस्वर्क्षयोर्नेहि अन्विष्यंपूर्वतोंधेषुमंदसंज्ञेषुदक्षिणे प्रतीच्यांचिपिटाख्येषुसुलोचनउद गिदशि राजाभिषेकःश्रवणेध्रुवर्क्षेज्येष्ठामृदुक्षिप्रऊदमवीस्यात् त्यक्त्वारिक्ताधिकचैत्ररात्री

श्चंद्रेज्यशुक्राभ्युदयेशुभाय जलाशयानांखननंमघापुष्यध्रुवेमृगे पूर्वाषाढानुराधांत्यधनिष्ठाश तहस्तभे जलराशिगतेचंद्रेलग्नस्थेचबुधेगुरौ क्षौरंचौलोक्तनक्षत्रवारादिषुशुभंजगुः पंचमेपं चमेराज्ञांदिनेन्येषांयदृच्छया श्मश्रुकर्मभवेन्नैवनवमेदिवसेक्वचित् क्षौरंभूतेरतंदर्शेवर्जयेच्च जिजीविषुः क्षौरंनकुर्युरभ्यक्तभुक्तस्नातविभूषिताः प्रयाणसमरारंभेनरात्रौनचसंध्ययोः श्रा द्धाहप्रतिपद्रिक्तव्रताह्निचनवैधृतौ प्रशस्तंजन्मनक्षत्रंसर्वकर्मसुकीर्तितं क्षौरप्रयाणभैषज्यंवि वादेषुनशोभनं षष्ठ्यमापूर्णिमापातचतुर्दश्यष्टमीतथा आशुसन्निहितंपापंतैलेषुस्त्रीभगेक्षुरे राजकार्यनियुक्तानांनराणांभूपजीविनां श्मश्रुलोमनखच्छेदेनास्तिकालविशोधनं क्षौरंनैमि त्तिकंकार्यंनिषेधेसत्यपिध्रुवं यज्ञेमृतौबंधमोक्षेनृपविप्राज्ञयापिच प्राग्वयस्कैःसपितृकैर्नकार्यं मुंडनंसदा मुंडनस्यनिषेधेपिकर्तनंतुविधीयते उदङ्मुखःप्राङ्मुखोवावपनंकारयेत्सुधीः के शश्मश्रुलोमनखान्युदक्संस्थानिवापयेत् आनर्तोह्यिच्छत्रःपाटलिपुत्रोदितिर्दितिःश्रीशः क्षौ रेस्मरणादेषांदोषानश्यंतिनिःशेषाः ॥

रोहिणी नक्षत्रापासून चार चार नक्षत्रें मोजून तीं क्रमेंकरून अंध, मंद, चिबिट आणि सुलोचनसंज्ञक होतात. ह्मणजे रोहिणी अंध; मृग मंद; आर्द्रा चिबिट; आणि पुनर्वसु सु-लोचन याप्रमाणें पुढें जाणावीं. अंध नक्षत्रावर नष्ट झालेली वस्तु शीघ्र सांपडेल. मंद नक्षत्रावर नष्ट झालेली वस्तु यत्नेंकरून सांपडेल. चिबिट व सुलोचन या नक्षत्रांवर नष्ट झा-लेली प्राप्त होणार नाहीं. अंध नक्षत्रावर नष्ट झालेली वस्तु पूर्व दिशेस शोधावी, मंद नक्ष-त्रावर नष्ट झालेली दक्षिण दिशेस, चिबिट नक्षत्रावर नष्ट झालेली वस्तु पश्चिम दिशेस, सु-लोचन नक्षत्रावर नष्ट झालेली उत्तर दिशेस पहावी. श्रवण, ध्रुवसंज्ञक, ज्येष्ठा, मृदु, क्षिप्र, या नक्षत्रीं; रवि उत्तरायणीं असतां व चंद्रवारीं; गुरु, शुक्र यांचा उदय असतां; मंगळवार, रिक्ता, अधिक मास, चैत्र मास, रात्रि हीं वर्ज्य करून राजाभिषेक करावा तो कल्याणार्थ होतो. मघा, पुष्य, ध्रुव, मृग, पूर्वाषाढा, अनुराधा, रेवती, धनिष्ठा, शततारका, आणि हस्त या नक्षत्रीं; व जलराशिगत चंद्र असून बुध व गुरु हे लग्नीं असतां वापी, कूप, तडा-गादिक खणावीं. चौलास जीं उक्त नक्षत्रें व वार इत्यादि सांगितले त्यांवर क्षौर कर्म करावें तें शुभ असें सांगतात. राजे यांनीं क्षौर करणें तें पांच पांच दिवसांनीं करावें. इत-रांनीं उक्त दिवसीं करावें. नवव्या दिवसीं श्मश्रुकर्म कधींहि करूं नये. प्राण वां-चण्याची इच्छा करणारानें चतुर्दशी दिवसीं श्मश्रु, व अमावास्येचे दिवसीं स्त्रीसंभोग हीं वर्ज्य करावीं. अभ्यंगयुक्त, भोजन केलेला, स्नान केलेला, अलंकरादिकांनीं भूषित, अशांनीं क्षौर करूं नये. प्रयाणदिवस, युद्धाचा आरंभदिवस, रात्रि, संधिकाल, श्राद्धदिवस, प्रतिपदा, रिक्तातिथि, व्रतदिवस, वैधृति, या दिवसीं श्मश्रु करूं नये. सर्व कर्में करण्याविषयीं जन्मनक्षत्र प्रशस्त आहे; परंतु श्मश्रु, प्रयाण, औषधसेवन आणि वादविवाद, यांविषयीं प्रशस्त नाहीं. षष्ठी, अमावास्या, पौर्णिमा, व्यतीपात, चतुर्दशी, आणि अष्टमी या दिवसीं तैलसेवन, स्त्रीसंभोग, श्मश्रु हीं करूं नयेत. राजकार्याचेठायीं नियुक्त, राजाच्या योगानें उपजीविका करणारे यांनीं श्मश्रु, लोम, नखें यांच्या छेदाविषयीं कालशुद्धिविचार करूं नये. निषेध जरी असेल तथापि नैमित्तिक व यज्ञ, मृति, बंधमोक्ष, राजाज्ञा, ब्राह्मणाज्ञा हीं असतां क्षौर निश्चयें करावें.

जीवत्पितृक अशा पूर्ववयस्कांनीं मुंडन करूं नये. मुंडन करूं नये, असा जरी निषेध आहे, तथापि केशांचें कर्तन सदा करावें. श्मश्रुकर्म करविणें तें सुधी पुरुषानें उत्तराभिमुख किंवा पूर्वाभिमुख होत्साता करवावें. केश, श्मश्रु, लोम आणि नखें यांचा छेद उदक्संस्थ करावा. निंद्यवारादि दिवसीं श्मश्रुकर्म कर्तव्य असतां दोषनिरसनाचा उपाय– "**आनर्तोहिच्छत्रः पाटलिपुत्रोऽदितिर्दितिः श्रीशः ॥ क्षौरे स्मरणादेषांदोषा नश्यंति निःशेषाः**" ( आनर्त, अहिच्छत्र, पाटलिपुत्र, आदिति, दिति, आणि श्रीश यांचें श्मश्रुकालीं स्मरण केल्यानें सर्व दोष दूर होतात. )

---

**अथरोगोत्पत्तौनक्षत्रफलं अश्विन्यांरोगोत्पत्तौएकाहंनवदिनानिवापंचविंशतिदिनानि वापीडा १ भरण्यामेकादशैकविंशतिर्वामासंवामृत्युर्वा २ कृत्तिकायांदशनवैकविंशतिर्वा ३ रोहिण्यांदशवानववासप्तवात्रीणिवाहानि ४ मृगेपंचनववात्रिंशद्वा ५ आर्द्रायांमृत्युर्वा दशाहंवामासंवा ६ पुनर्वसौसप्तनववामृत्युर्वा ७ पुष्येसप्तवामृत्युर्वा ८ आश्लेषायांमृत्युर्विंशतिर्विंशद्वानववादिनानिपीडा ९ मघायांमृत्युर्वासार्धमासंवामासंत्रविंशतिदिनानिवापीडा १० पूर्वाफल्गुन्यांमृत्युर्वाब्दंमासंवापीडापंचदशवाषष्टिर्वादिनानि ११ उत्तरायांसप्तविंशतिःपंचदशसप्तवादिनानि १२ हस्तेमृत्युरष्टवानववासप्तवापंचदशवाहानि १३ चित्रायां पक्षमष्टवादशवाएकादशवाहानि १४ स्वात्यांमृत्युर्वैकद्वित्रिचतुःपंचमासैर्वादशदिनैर्वारोगनाशः १५ विशाखायांमासंवापक्षंवाष्टदिनंविंशतिदिनंवापीडा १६ अनुराधायांदशरात्रमष्टाविंशतिरात्रंवा १७ ज्येष्ठायांमृत्युर्वापक्षंवामासंवैकविंशतिरात्रंवापीडा १८ मूलेमृत्युःपक्षंनवरात्रंविंशतिरात्रंवापीडा १९ पूर्वाषाढायांमृत्युर्वाद्वित्रिषडादिमासैर्विंशतिदिनैःपक्षेणवारोगनाशः २० उत्तराषाढायांसार्धमासंविंशतिरात्रंवामासंवा २१ श्रवणेपंचविंशतिर्दशवाएकादशवाषष्टिर्वाहानि २२ धनिष्ठायांदशरात्रंपक्षंमासंत्रयोदशरात्रंवा २३ शततारकायांद्वादशैकादशवा २४ पूर्वाभाद्रायांमृत्युर्वाद्वित्र्यादिमासंवादशरात्रंवा २५ उत्तराभाद्रायांसार्धमासंपक्षंसप्ताहंदशाहंवा २६ रेवत्यांज्वराद्युत्पत्तौदशाहमष्टाविंशतिरात्रंवापीडा २७ जन्मनक्षत्रेजन्मराशौअष्टमचंद्रेरोगोत्पत्तौमृत्युः २८ अर्कादिवारेक्रमेणमघाद्वादश्यौ विशाखैकादश्यौपंचम्यार्द्रे तृतीयोत्तराषाढे शतताराषष्ठ्यौ अष्टम्यश्विन्यौ पूर्वाषाढानवम्यौ चेतित्रयाणांयोगेमृत्युः एवमर्कादौअनुराधाभरण्यौआर्द्रोत्तराषाढेमघाशततारेविशाखाश्विन्यौज्येष्ठामृगौश्रवणाश्लेषेपूर्वाभाद्रपदाहस्तौचेन्मृत्युयोगः अत्रोक्तास्तिथिवारनक्षत्रशांतयो विस्तृताःकार्याःयेषुनक्षत्रेषुमरणमुक्तंतत्रशांतिरावश्यकीअन्यत्रकृताकृता ॥**

## आतां यानंतर रोग उत्पन्न झाला असतां नक्षत्रांचीं फलें सांगतों.

१ अश्विनी नक्षत्रावर रोगांची ( ज्वरादिकांची ) उत्पत्ति झाली असेल तर एक दिवस, अथवा नऊ दिवस, किंवा पंचवीस दिवस पीडा जाणावी. २ भरणी नक्षत्राची पीडा अकरा दिवस, किंवा एकवीस दिवस, मासपर्यंत अथवा मृत्यु. ३ कृत्तिका नक्षत्राची दहा दिवस, नऊ दिवस किंवा एकवीस दिवस. ४ रोहिणी नक्षत्राची दहा, किंवा नऊ, अथवा

सात, तीन दिवस पीडा. ५ मृगाची पांच, नऊ, किंवा तीस दिवस पीडा. ६ आरद्रा नक्षत्रीं मृत्यु, दहा दिवस, अथवा मासपर्यंत पीडा. ७ पुनर्वसूची सात दिवस, नऊ दिवस पीडा किंवा मृत्यु. ८ पुष्याची पीडा सात दिवस किंवा मृत्यु. ९ आश्लेषा नक्षत्रीं मृत्यु, अथवा वीस दिवस, तीस दिवस, नऊ दिवस पीडा. १० मघा नक्षत्रीं मृत्यु, अथवा दीड महिना किंवा एक महिना, अथवा वीस दिवस पीडा. ११ पूर्वा नक्षत्रीं मृत्यु, किंवा वर्षपर्यंत, मासपर्यंत, अथवा पंधरा दिवस, साठ दिवस पीडा. १२ उत्तरा नक्षत्रीं सत्तावीस दिवस, पंधरा दिवस किंवा सात दिवस पीडा. १३ हस्त नक्षत्रीं मृत्यु, अथवा आठ दिवस, नऊ दिवस, सात दिवस, पंधरा दिवस पीडा. १४ चित्रा नक्षत्रीं पंधरा दिवस, आठ दिवस, दहा दिवस, अकरा दिवस पीडा. १५ स्वाती नक्षत्रीं मृत्यु, अथवा एक, दोन, तीन, चार आणि पांच महिन्यांनीं किंवा दहा दिवसांनीं रोगाचा नाश होईल. १६ विशाखा नक्षत्रीं मास, पक्ष, अथवा आठ दिवस, वीस दिवस पीडा. १७ अनुराधा नक्षत्रीं दहा रात्री, किंवा अठ्ठावीस रात्रींपर्यंत पीडा. १८ ज्येष्ठा नक्षत्रीं मृत्यु अथवा पक्ष, मास, किंवा एकवीस रात्रींपर्यंत पीडा. १९ मूळ नक्षत्रीं मृत्यु किंवा पक्ष, नऊ रात्रि, अथवा वीस रात्रींपर्यंत पीडा. २० पूर्वाषाढा नक्षत्रीं मृत्यु किंवा दोन, तीन, सहा, इत्यादिक मासांनीं अथवा वीस दिवस, पक्ष यांहींकरून रोगनाश होईल. २१ उत्तराषाढा नक्षत्रीं दीड महिना, वीस रात्रि, किंवा एक मासपर्यंत पीडा. २२ श्रवण नक्षत्रीं पंचवीस दिवस किंवा दहा दिवस अथवा अकरा, किंवा साठ दिवस पीडा. २३ धनिष्ठा नक्षत्रीं दहा रात्री, पक्ष, मास, अथवा तेरा रात्रींपर्यंत पीडा. २४ शततारका नक्षत्रीं बारा दिवस किंवा अकरा दिवस पीडा. २५ पूर्वाभाद्रपदा नक्षत्रीं मृत्यु अथवा दोन तीन महिने; किंवा दहा रात्रींपर्यंत पीडा. २६ उत्तराभाद्रपदा नक्षत्रीं दीड महिना, पक्ष, सात दिवस, दहा दिवस पीडा. २७ रेवती नक्षत्रीं ज्वर इत्यादि रोग उत्पन्न झाला असतां दहा दिवस अथवा अठ्ठावीस रात्रींपर्यंत पीडा. २८ जन्मनक्षत्र, जन्मराशि, आणि अष्टम चंद्र यांचे ठायीं रोगाची उत्पत्ति झाली असतां मृत्यु प्राप्त होईल. रवि इत्यादिक वारीं क्रमेंकरून मघा व द्वादशी, विशाखा व एकादशी, पंचमी व आर्द्रा, तृतीया व उत्तराषाढा, शततारका व षष्ठी, अष्टमी व अश्विनी, पूर्वाषाढा व नवमी, याप्रमाणें वार, तिथि, नक्षत्र, या तिन्हींचा योग असतां रोग उत्पन्न होईल तर मृत्यु प्राप्त होतो. याप्रमाणें रवि इत्यादिक वारीं अनुराधा व भरणी, आरद्रा व उत्तराषाढा, मघा व शततारका, विशाखा व अश्विनी, ज्येष्ठा व मृग, श्रवण व आश्लेषा, पूर्वाभाद्रपदा व हस्त, हीं असतां मृत्युयोग होतो. याविषयीं सांगितलेल्या तिथि, वार आणि नक्षत्रें यांच्या शांति मोठ्या कराव्या. ज्या नक्षत्रीं मरण सांगितलें त्या नक्षत्राची शांति अवश्य करावी. अन्य नक्षत्रांची कृताकृत आहे.

---

अथसर्वनक्षत्रसाधारणःशांतिप्रयोगः देशकालौसंकीर्त्यममोत्पन्नव्याधेर्जीवच्छरीराविरोधेनसमूलनाशार्थममुकनक्षत्रशांतिंकरिष्यइतिसंकल्प्य गणेशपूजादिआचार्यंवृत्वाकुंभोपरिपूर्णपात्रेद्वादशदलेनक्षत्रदेवताप्रतिमांसौवर्णींसंपूज्य द्वादशदलेषुसंकर्षणादिद्वादशमूर्तीर्द्वाद

**शादित्यान्वासंपूज्यदूर्वासमित्तिलक्षीराज्यैर्गायत्र्यातत्तद्देवतायै अष्टोत्तरशतंहुत्वामरणादिपीडाधिक्योक्तौसहस्रंहुत्वादध्योदनबलिंदत्वाचार्यायगांप्रतिमांचदद्यादितिसंक्षेपः शांतिमयूखादौनक्षत्रभेदेनहविर्मंत्रबलिधूपादिभेदस्तिथिवारदेवतामंत्रादिभेदविस्तारोत्रद्रष्टव्यः कर्मविपाके जातवेदसइत्यृचोयुतंलक्षंवाजपोरुद्रेनमकानुवाकैःसहस्रकलशस्नानंवाविष्णौसहस्रावृत्तपुरुषसूक्तेनसहस्रघटस्नानंवाज्वरनाशकं यद्वाश्रीभागवतस्थज्वरस्तोत्रजपः ॥**

## आतां सर्व नक्षत्रांचा साधारण शांतिप्रयोग सांगतों.

देशकालांचा उच्चार करून " **ममोत्पन्नव्याधेर्जीवच्छरीराविरोधेनसमूलनाशार्थं अमुकनक्षत्रशांतिं करिष्ये,** " असा संकल्प करून गणपतिपूजादिक करावें. नंतर आचार्याला वरून कलशावर पूर्णपात्रामध्यें द्वादशदलांचे ठायीं नक्षत्रदेवतेची प्रतिमा सुवर्णाची पूजून द्वादश दलांचे ठायीं संकर्षणादि द्वादश मूर्ति किंवा द्वादशादित्य यांची पूजा करून दूर्वा, समिधा, तिल, दुग्ध आणि आज्य यांहींकरून गायत्रीमंत्रानें त्या त्या देवतेच्या उद्देशानें १०८ होम करावा. मरण इत्यादिक बहुत पीडा प्राप्त होईल असें सांगितलें त्याविषयीं सहस्र होम करून दहिंभाताचा बलि देऊन आचार्याला गोप्रदान व प्रतिमादान करावें. याप्रमाणें संक्षेप जाणावा. शांतिमयूख इत्यादि ग्रंथांत नक्षत्रांच्या भेदानें होमद्रव्यें, मंत्र, बलिदान, धूपादिक यांचे भेद ह्मणजे निरनिराळे प्रकार व तिथि, वार, ह्यांच्या देवता व मंत्रादिक या सर्वांचे निरनिराळे प्रकार इत्यादिक विस्तार पाहावा. कर्मविपाकांत "**जातवेदसे०**" ह्या ऋचेचा दहा सहस्र किंवा एक लक्ष जप, अथवा शिवावर नमकानुवाकांनीं सहस्र कलशांनीं स्नान किंवा विष्णूवर पुरुषसूक्ताच्या सहस्रावर्तनांनीं सहस्र घटांनीं स्नान घातलें असतां ज्वराचा नाश होतो असें सांगितलें आहे. अथवा श्रीमद्भागवतांतील ज्वरस्तोत्राचा जप करावा.

---

**अथसर्वरोगनाशकानि रोगानुसारेणलघुरुद्रमहारुद्रातिरुद्राणांजपोभिषेकोवा विष्णुसहस्रनामस्तोत्रस्यशतंसहस्रमयुतंवाजपः सौरंजपःसूर्यनमस्कारार्घ्यदानानिमुंचामित्वेतिसूक्तजपोऽच्युतानंतगोविंदेतिनामत्रयजपोमृत्युंजयजपश्चरोगानुसारेणेति सर्वरोगहराणि ॥**

## आतां सर्वरोगनाशक विधि सांगतों.

लहान मोठा जसा रोग असेल तदनुसार लघुरुद्र, महारुद्र अथवा अतिरुद्र यांचा जप किंवा अभिषेक करावा. विष्णुसहस्रनामस्तोत्राचा शंभर किंवा सहस्र अथवा दहा सहस्र जप करावा. अथवा सौराचा ( उद्यंनद्य० ह्या ऋचेचा मात्र जप ) जप, सूर्याला नमस्कार आणि सूर्याचें अर्घ्यप्रदान, "**मुंचामित्वा०**" ह्या सूक्ताचा जप, "**अच्युतानंतगोविंद०**" ह्या तीन नामांचा जप, आणि मृत्युंजयजप हीं जसा रोग लहान मोठा असेल त्याप्रमाणें सर्व रोग दूर करणारीं आहेत.

---

१ उद्यंनद्येतितृचमात्रजपः ॥

**ज्येष्ठामूलश्रुतिस्वातीमृदुक्षिप्रपुनर्वसौ गुरुशुक्रेंदुवारेषुशस्तंभेषजभक्षणं रिक्तायांचरलग्ने मिश्रक्षिप्रेंद्रमूलपूर्वासु चित्राभरणीश्रवणत्रयभेरविकुजबुधार्कजेस्नायात् वैधृतौचव्यतीपाते भद्रायांसंक्रमेतथा रोगमुक्तस्नानमत्रचंद्रताराबलंनवा ॥**

ज्येष्ठा, मूल, श्रवण, स्वाति, मृदुसंज्ञक, क्षिप्रसंज्ञक आणि पुनर्वसु ह्या नक्षत्रीं; गुरु, शुक्र, आणि इंदु ह्या वारीं औषध भक्षण करणें प्रशस्त होय. रिक्तातिथि, चरलग्नें, मिश्रसंज्ञक, क्षिप्रसंज्ञक, ज्येष्ठा, मूल, तीन पूर्वा, चित्रा, भरणी, श्रवण, धनिष्ठा, शततारका, या नक्षत्रीं; रवि, मंगळ, बुध, शनि ह्या वारीं स्नान करावें. वैधृति, व्यतीपात; भद्रा, संक्रांति ह्या दिवसीं रोगमुक्त स्नान करावें, याविषयीं चंद्रबळ व ताराबळ असो अथवा नसो.

---

**अथाभ्यंगः भद्रासंक्रमपातवैधृतिसितेज्यार्कारषष्ठ्यादिषुश्राद्धाहेप्रतिपद्द्वयेपरिहरेद्धेतुं** विनाभ्यंजनं मांगल्यंविजयोत्सवोब्दवदनंदीपावलीहेतवोभ्यंगस्याथबुधांबुपर्क्षेपितृभाभ्यंगात्पतिघ्न्यंगना अथापवादः सार्षपंगंधतैलंचयत्तैलंपुष्पवासितं द्रव्यांतरयुतंतैलंपक्वंतैलंनदुष्यति किंचिद्गोघृतयुक्तंवाविप्रपादरजोन्वितं नित्याभ्यंगेचनोदुष्टंतैलंनिंद्येन्हिसर्वदा रवौपुष्पंगुरौदूर्वाभौमवारेचमृत्तिकां भार्गवेगोमयंक्षिप्त्वातैलस्नानंसुखावहं ॥

**अभ्यंगास निषिद्ध काल.**—भद्रा, संक्रांति, व्यतीपात, वैधृति, शुक्र, गुरु, रवि, भौम, हे वार; षष्ठीपासून १० तिथि; श्राद्धदिवस; प्रतिपदा; द्वितीया ह्या दिवसीं कारणावांचून अभ्यंग स्नान करूं नये. विवाहादि मंगल कार्य; आश्विन शुक्ल दशमी; संवत्सरारंभ; प्रतिपदा; दीपावली हे अभ्यंग करण्याचे कारणदिवस होत. या दिवसीं निषिद्ध दिवस असतांहि अभ्यंग करावा. बुधवार, शततारका, मघा यांचे ठायीं अभ्यंग करून स्त्रीनें स्नान केलें तर ती स्त्री पतीचा नाश करणारी होते. **यानंतर याचा अपवाद सांगतों.**— सार्षप तेल; सुगंधितेल अथवा पुष्पांनीं सुवासित केलेलें तेल, दुसरें द्रव्य घालून मिश्र केलेलें, कढवलेलें अथवा गाईच्या घृतानें युक्त तेल, किंवा ब्राह्मणाचे पादरजानें युक्त केलेलें तेल ह्या तेलानें निषिद्ध दिवसींहि अभ्यंग केला असतां दोष नाहीं. नित्य अभ्यंग कर्तव्य असतां दोष नाहीं. रविवारीं तेलांत पुष्प टाकावें, गुरुवारीं दूर्वा टाकावी, भौमवारीं तेलांत मृत्तिका टाकावी, भृगुवारीं गोमय टाकावें याप्रमाणें तेलामध्यें द्रव्य टाकून निषिद्ध दिवसीं तें तेल लावून स्नान केलें असतां तें सुखदायक होतें.

---

**वैशाखेफाल्गुनेपौषेश्रावणेमार्गशीर्षके गृहारंभप्रवेशौस्तःस्तंभोच्छ्रायश्चशस्यते ज्येष्ठकार्तिकमाघांश्चशुभदान्प्राहनारदः** तृणगेहंसर्वमासेपौषेमुख्यगृहंनहि हस्तत्रयध्रुवमृदुधनिष्ठाद्वयपुष्यभे रिक्ताअर्ककुजौत्यक्त्वागृहंकुर्याद्विशेदपि शिलान्यासंचखातंचश्रुत्यश्विक्रूरमित्रभैः आश्लेषामूलपुष्यार्कमृगांत्यध्रुवभैरपि केंद्राष्टमेपापहीनेवेश्मकृत्यंस्थिरोदये धनिष्ठापंचकेवर्ज्यःस्तंभोच्छ्रायःसदाबुधैः नेष्टानिसप्तसूर्यर्क्षादिष्टान्येकादशाष्टमात् दशशिष्टानिनेष्टानिचक्रेस्युर्वृषवास्तुनि यद्वातुर्यात्पंचदशात्त्रयोविंशतिसंख्यकात् वेदाब्धिपंचनेष्टानिगृहारंभप्रवेशयोः स्नानंपाकस्वापवस्त्रभुजीनांपशुकोशयोः देवानांचगृहान्कुर्यात्पूर्वादौमुख्यवेश्मनः उदग्दिशं ध्रुवमुखाज्ज्ञात्वाप्राचींप्रसाधयेत् कोणाध्वभ्रमकूपद्वाःपंकस्तंभद्रुमामरैः विद्धादुष्टाद्वार्नदोषो

**गृहोक्तद्विगुणांतरे सूत्रंभित्तिशिलान्यासंस्तंभस्यारोपणंतथा आग्नेयींदिशमारभ्यकुर्यादित्याह कश्यपः अन्यवेश्मस्थितंदारुनान्येवेश्मनियोजयेत् नूतनेनूतनंकाष्ठंजीर्णेजीर्णप्रशस्यते द्वात्रिंशाधिकहस्तेचतृणागारेचतुर्मुखे नतत्रचिंतयेद्धीमान्गुणानायव्ययादिकान् ॥**

**गृहारंभास मुहूर्त.**—वैशाख, फाल्गुन, पौष, श्रावण आणि मार्गशीर्ष या मासांत घर बांधण्यास आरंभ व प्रवेश आणि खांब उभा करणें हीं शुभ होत. ज्येष्ठ, कार्तिक व माघ हे मास गृहकर्माविषयीं शुभ असें नारद सांगतो. तृणगृह सर्व मासांत बांधावें. मुख्य गृह पौषमासांत बांधूं नये. हस्त, चित्रा, स्वाति, ध्रुवसंज्ञक, मृदुसंज्ञक, धनिष्ठा, शततारका, पुष्य, या नक्षत्रीं; रिक्तातिथि, रविवार व मंगळवार हीं वर्ज्य करून गृहाचा आरंभ करावा व गृहांत प्रवेशहि करावा. श्रवण, अश्विनी, क्रूरसंज्ञक, अनुराधा, आश्लेषा, मूळ, पुष्य, हस्त, मृग, रेवती, ध्रुवसंज्ञक या नक्षत्रीं शिलान्यास, खात हीं करावीं. केंद्रस्थान व अष्टमस्थान या स्थानीं पापग्रह नसतां स्थिरलग्नीं गृहकृत्य करावें. बुधांनीं धनिष्ठापासून पांच नक्षत्रीं घराचा खांब पुरणें वर्ज्य करावें. **वृषवास्तुचक्र**—सूर्य नक्षत्रापासून दिवस नक्षत्रापावेतों नक्षत्रें मोजावीं, पहिलीं सात नक्षत्रें अशुभ, आठव्यापासून अकरा नक्षत्रें शुभ, अवशिष्ट दहा तीं अशुभ याप्रमाणें वृषवास्तुचक्र पाहून ज्या दिवसीं शुभ नक्षत्र असेल त्या दिवसीं आरंभ करावा. अथवा चवथ्या नक्षत्रापासून, पंधराव्या नक्षत्रापासून आणि तेविसाव्या नक्षत्रापासून क्रमानें ४।४।९ हीं नक्षत्रें गृहारंभ व प्रवेश यांविषयीं अशुभ होत. मुख्य गृहाचे पूर्व दिशेपासून स्नानगृह, पाकगृह, शयनगृह, वस्त्रगृह, भोजनगृह, पशुगृह, भांडारगृह, देवगृह याप्रमाणें गृहें करावीं. ध्रुवमुखावरून उत्तरदिशा समजून प्राचीदिशा साधावी. कोण, मार्ग, घरट, कुलालचक्रादियंत्र, कूप ( विहीर ), अन्यद्वार, चिखल, स्तंभ, वृक्ष, देव, यांनीं विद्ध ( यांचे समोरासमोर ) गृहद्वार दुष्ट होय; गृहाचे उंचीचे दुप्पटीनें कोणादिकांचें अंतर असल्यास वेधदोष नाहीं. सूत्रन्यास, भिंतीचा आरंभ, शिलान्यास, आणि खांब पुरणें यांचा आरंभ आग्नेयी दिशेपासून करावा असें कश्यप सांगतो. एक्या घराला लावलेलें लांकूड दुसऱ्या घराला लावूं नये. नूतन घराला नूतन काष्ठेंच घ्यावीं, व जीर्णाला जीर्ण घ्यावीं, तीं प्रशस्त होत. बत्तीस हातांहून अधिक गृह चतुर्द्वार, तृणगृह या गृहांविषयीं बुद्धिमान् पुरुषानें आयव्ययादिक गुणांचा विचार करूं नये.

---

**अथगृहप्रवेशः** वास्तुपूजाविधिःकार्यःपूर्वमेवप्रवेशतः मैत्रध्रुवक्षिप्रचरमूलभैर्धनपुत्रकृत् **वास्तुशांतिप्रयो**गोन्यतोज्ञेयः वास्तुशांतिर्दिवैवोक्ताप्रवेशस्तुनिशिक्कचित् गृहप्रवेशःप्रारंभो**दितमासादिकैः** शुभः क्कचिन्माघोर्जशुक्रेषुकैश्चिदुक्तोमृदुध्रुवे श्रेष्ठःक्षिप्रैश्चरैर्मध्योनिंद्यस्ती**क्ष्णोग्रमिश्रभैः** त्रिषडायेखलैःसद्भिःषडष्टव्ययवर्जितैः शुद्धेंबुरंध्रेचतनौविजनुर्लग्नभाष्टमे ऋ**क्षाणिपंचसूर्यर्क्ष**स्त्रेष्टान्यत्रचतुर्दशात् शेषभानिशुभान्येवंप्रवेशेवटचक्रकं इतिवास्तुप्रकरणं ॥

**यानंतर गृहप्रवेश सांगतों.**—नूतन गृहांत प्रवेश करावयाचा त्याच्या पूर्वीं वास्तुपूजाविधि म्हणजे वास्तुशांति मैत्रसंज्ञक, ध्रुवसंज्ञक, क्षिप्रसंज्ञक, चरसंज्ञक, मूळ या नक्षत्रीं करावी; तेणेंकरून धन, पुत्र प्राप्त होतात. वास्तुशांतीचा प्रयोग ग्रंथांतरीं पाहावा. वास्तुशांति

दिवसासच प्रशस्त, गृहांत प्रवेश करावयाचा तो क्वचित् ग्रंथांत रात्रीं करण्याविषयीं सांगितला आहे. गृहारंभास जीं मास, नक्षत्रें इत्यादिक सांगितलीं त्यांजवर गृहप्रवेश शुभ होय. क्वचित् ग्रंथांत माघ, कार्तिक, ज्येष्ठ या मासीं; मृदुसंज्ञक व ध्रुवसंज्ञक या नक्षत्रीं गृहप्रवेश श्रेष्ठ असें सांगितलें आहे. क्षिप्र, चर या नक्षत्रीं मध्यम होय. तीक्ष्ण, उग्र आणि मिश्र या नक्षत्रीं निंद्य होय. **गृहप्रवेशास लग्नशुद्धि**—ज्या लग्नीं प्रवेश करावयाचा त्या लग्नापासून तृतीय, एकादश व षष्ठ या स्थानीं पापग्रह शुभ होय; षष्ठ, अष्टम आणि द्वादश या स्थानीं शुभ ग्रह नसावे. चतुर्थ व अष्टम या स्थानीं कोणी ग्रह नसावा; जन्मलग्न व जन्मराशि यांपासून अष्टम लग्न नसावें. सूर्य नक्षत्रापासून पांच नक्षत्रें अशुभ होत, चवदाव्या नक्षत्रापासून आठ नक्षत्रें अशुभ, ह्मणजे १।२।३।४।५।१४।१५।१६।१७।१८।१९।२०।२१ या नक्षत्रीं प्रवेश करूं नये. शेष नक्षत्रें प्रवेशाविषयीं शुभ होत. हें कलशचक्र. प्रमाणें वास्तुप्रकरण सांगितलें.

---

**अथधनाद्यर्थगमनं श्रुतिद्वयाश्विपुष्यांत्यानुराधामृगहस्तभे पुनर्वसौगोचरेष्टप्रदवारेव्रजेन्नरः अभिजिद्गमेश्रेष्ठंदक्षिणाशांविनाक्षणः मघाचित्रास्त्रया श्लेषाभरण्यार्द्राःसकृत्तिकाः पूर्वाभाद्राचनेष्टाःस्युःप्रयाणेजन्मभंतथा त्यजेद्रिक्तांपर्वषष्ठयष्टमीद्वादशिकास्तिथीः कृत्तिकाभरणीपूर्वामघानांघटिकाःक्रमात् एकविंशतिसप्ताथषोडशैकादशत्यजेत् ज्येष्ठाश्लेषाविशाखासुस्वात्यांचापिचतुर्दश भृगोर्मतेसंकटेपिसर्वास्वातींमघांत्यजेत् स्वातीपित्र्याग्निपूर्वार्द्धेचित्राश्लेषांतकोत्तरं ॥**

**यानंतर द्रव्यसंपादन इत्यादि कार्याच्या उद्देशानें गमन.**—श्रवण, धनिष्ठा, अश्विनी, पुष्य, रेवती, अनुराधा, मृग, हस्त आणि पुनर्वसु या नक्षत्रीं; गोचरीं शुभफलप्रद ग्रहांचे वारीं प्रयाण करावें. अभिजित् नक्षत्र व अभिजिन्मुहूर्त दक्षिण दिशेवांचून प्रयाणाविषयीं शुभ होत. मघा, चित्रा, स्वाति, विशाखा, आश्लेषा, भरणी, आर्द्रा, कृत्तिका, पूर्वाभाद्रपदा, आणि जन्मनक्षत्र हीं नक्षत्रें प्रयाणाविषयीं अशुभ होत. रिक्तातिथि, पर्व, षष्ठी, अष्टमी, द्वादशी ह्या तिथि वर्ज्य कराव्या. कृत्तिका, भरणी, तीन पूर्वा, मघा या नक्षत्रांच्या पहिल्या घटिका क्रमेंकरून २१।७।१६।११ अशा टाकाव्या. ज्येष्ठा, आश्लेषा, विशाखा आणि स्वाति या नक्षत्रांच्या चवदा चवदा घटिका टाकाव्या. भृगूच्या मतीं स्वाति आणि मघा हीं नक्षत्रें सर्व टाकावीं, स्वाति, मघा व कृत्तिका यांचें पूर्वार्ध, चित्रा, आश्लेषा आणि भरणी यांचें उत्तरार्ध टाकावें.

---

**वारशूलःसोमशनीप्राच्या**मीज्यस्तुदक्षिणे रविशुक्रौप्रतीच्यांस्यादुदीच्यांबुधमंगलौ **पूर्वादिदिक्षुमेषाद्याःक्रमात्त्रिश्चंद्र**राशयः संमुखोदक्षिणोब्जःसन्प्रष्ठेवामेतिनिंदितः दि**शियत्रोदेतिशुक्रस्तांदिशंनव्रजेन्नरः** नव्रजेत्संमुखेज्ञेपिशुभंपृष्ठोपिवामतः रेवतीमेषगेचंद्रेशु**क्रांध्यात्संमुखंव्रजेत् ॥**

**वारशूल.**—पूर्वदिशेस प्रयाणीं सोम, शनि हे वार; दक्षिण दिशेस गुरुवार; रवि, शुक्र हे वार पश्चिमेस; उत्तर दिशेस बुध व मंगळ हे वार वर्ज्य करावे. पूर्वादि दिशांचे ठायीं

क्रमेंकरून मेषादिक चंद्रराशि त्रिवार गणून चंद्र संमुख व दक्षिण प्रदेशीं असतां शुभ होय. पृष्ठभागीं व वामभागीं असतां निंद्य होय. ज्या दिशेस शुक्र उदय पावतो त्या दिशेस प्रयाण करूं नये. संमुख बुध असतांहि प्रयाण वर्ज्य करावें. पृष्ठभागीं व वामभागीं बुध शुभ होय. चंद्र रेवती नक्षत्रीं व मेष राशीस असतां शुक्र अंध होतो यास्तव शुक्राच्या संमुख गमन शुभ होय.

---

**प्रयाणेशुभाःकेंद्र १।४।७।१० कोणेषु।९।५ शस्ताःखलाश्चायषट्त्रिखेष्वनिष्टः ३।११।६। १० शनिःखे कविःसप्तमेग्लौःषडष्टांत्यलग्नेविलग्नेश्वरोप्यस्तषष्ठाष्टमांत्ये केंद्रेवक्रीवक्रिवर्गोलग्नेवारश्चवक्रिणः कुंभःकुंभनवांशश्चलग्नेत्याज्याःप्रयत्नतः मीनलग्नेतदंशे वायातुर्मार्गोतिदुःखदः शत्रुंलग्नभतःषष्ठंतत्पतिर्वामृतिप्रदः शत्रुक्षेत्रेतदंशेवातद्दृष्टेगमनंनस तू लग्नेस्तंगतराशिश्चजन्मराशिश्चनोशुभः शशीवर्गोत्तमेलग्नेवर्गोत्तमयुतेजयः ॥**

**प्रयाणास लग्नशुद्धि.**—प्रयाण ज्या लग्नीं करावयाचें त्या लग्नापासून १।४।७।१०।९।५ या स्थानींचे शुभ ग्रह इष्ट होत. ३।११।६।१० या स्थानींचे पापग्रह शुभ होत. दशम शनि अशुभ. सप्तम शुक्र अनिष्ट होय. ६।८।१२।१ या स्थानींचा चंद्र अशुभ. यात्रालग्नस्वामी ७।६।८।१२ या स्थानींचा अशुभ होय. केंद्रीं वक्रीग्रह, लग्नीं वक्रिग्रहाचा वर्ग, वक्रिग्रहाचा वार, कुंभलग्न, कुंभलग्नाचा नवांश हे प्रयाणलग्नीं प्रयत्नानें वर्ज्य करावेत. मीनलग्नीं किंवा मीनांशीं प्रयाण करणारास मार्ग अति दुःखद होतो. आपल्या लग्नापासून किंवा जन्मराशीपासून सहावा राशि अथवा त्याचा स्वामी हे मृत्यु देणारे होत. शत्रुगृहीं किंवा त्याच्या अंशीं त्याची दृष्टि असतां प्रयाण शुभ नाहीं. अस्तंगतराशि व जन्मराशि लग्नीं शुभ नाहीं. वर्गोत्तमीं व वर्गोत्तमयुक्त लग्नीं चंद्र असेल तर जय प्राप्त होतो.

---

**शुक्लादितिथिवारर्क्षयोगोग्नैरष्टभिस्त्रिभिः त्रिस्थस्तष्टोवशिष्टश्चेत्सर्वांकःसार्वकामिकः त्रिषुक्रमाद्भवेच्छून्यंदुःखदारिद्र्यमृत्युदं यद्येकस्मिन्नेवदिनेपुराद्गच्छेत्पुरांतरे प्रावेशिकीकालशुद्धिस्तदाज्ञेयानयात्रिकी प्रवेशान्निर्गमोनेष्टःप्रवेशोनिर्गमादपि जिष्णोःकदापिनवमेधिष्ण्येवा रेतिथौतथा याम्यादिग्गमनंशय्यावितानंछादनंगृहे नकुंभमीनगेचंद्रेतृणकाष्ठस्यसंग्रहः तर्पितान्निसुहृद्विप्रभार्यादिस्तृप्तिमान्व्रजेत् स्वकीयांपरकीयांवास्त्रियंपुरुषमेववा ताडयित्वातुयोगच्छेद्ब्राह्मणानवमान्यच व्याधितःक्षुधितोवापितदंतंतस्यजीवितं ॥**

शुक्लपक्षापासून तिथि, वार व नक्षत्रें मोजून व त्यांचा योग करून ७।८।३ या अंकांनीं भागून सर्वांचा शेष जर अंक राहील तर तो सर्वकाम देणारा होतो. तीनहि ठिकाणीं शून्य शेष राहिलें तर क्रमेंकरून दुःख, दारिद्र्य व मृत्यु देणारें होतें. एका दिवसामध्यें व एका नगरांतून दुसऱ्या नगरांत प्रयाण करील तर प्रवेशकालाची शुद्धि पहावी, प्रयाणकालाची शुद्धि पाहूं नये. जयप्राप्तीची इच्छा करणारा त्यानें प्रयाण दिवसापासून नवव्या वारीं, नवव्या तिथीस आणि नवव्या नक्षत्रीं स्वगृहीं प्रवेश करूं नये, व प्रवेश केल्या दिवसापासून नवव्या वारीं नवव्या तिथीस व नवव्या नक्षत्रीं गमन करूं नये. कुंभ व मीन यांचा चंद्र असतां दक्षिण दिशेस गमन, माचा व बाज विणणें, घर शिवणें, तृण व काष्ठ यांचा संग्रह हीं करूं

नयेत. अग्नि, सुहृत्, ब्राह्मण, स्त्री, यांची तृप्ति करून आपण तृप्त होत्साता प्रयाण करावें. आपली किंवा परस्त्री, अथवा पुरुष यांस ताडन करून व ब्राह्मणांचा अवमान करून प्रयाण करील अथवा रोगग्रस्त, क्षुधित होत्साता प्रयाण करील तर त्यास मरण प्राप्त होईल.

---

क्रोधंक्षौरंतथावांतिंतैलाभ्यंगाश्रुमोचनं मद्यंमांसंगुडंतैलंसितान्यतिलकंतथा श्वेतभिन्नंच वसनंप्रयाणेपरिवर्जयेत् क्षौरंपंचदिनंदुग्धंत्रिदिनंसप्तरात्रकं मैथुनंचापरंतैलंमध्वाज्यंतद्दिनेत्य जेत् स्त्र्यार्तवंबीजदानांतंतथाकुशकुनांस्त्यजेत् सुमुहूर्तेस्वयंगमनासंभवेप्रस्थानंकार्यं प्रस्थानं नामाभीष्टवस्तुचालनं यज्ञोपवीतकंशस्त्रंमधुचस्थापयेत्फलं विप्रादिःक्रमतःसर्वैःस्वर्णधान्यांब रादिकं राजादशाहंपंचाहमन्योनप्रस्थितोवसेत् स्वयंगमनाद्वस्तुस्थापनाख्यप्रस्थानेर्धफलं ॥

**प्रयाणीं नियम.**—क्रोध, श्मश्रुकर्म, वांति, तैलाभ्यंग, अश्रुपात, मद्य, मांस, गुड, तैल, श्वेततिलकावांचून अन्य तिलक, श्वेतभिन्न वस्त्र, हे पदार्थ प्रयाणकालीं वर्ज्य करावे. प्रयाण-दिवसाच्या पूर्वी क्षौर पांच दिवस, दूध तीन दिवस, मैथुन सात रात्रि, मध, तेल व घृत हीं प्रयाणदिवसीं वर्ज्य करावीं. संभोगदानापर्यंत स्त्रियेचें रजस्वलात्व व तसेच दुष्ट शकुन प्रयाणास वर्ज्य करावे. सुमुहूर्ती स्वतां गमनाचा संभव नसेल तर प्रस्थान करावें. प्रस्थान ह्मणजे इष्ट वस्तु नेऊन ठेवणें तें. ब्राह्मणानें यज्ञोपवीत, क्षत्रियानें आयुध, वैश्यानें मध, शूद्रानें फल, गमनमुहूर्ती दुसऱ्या गृहीं नेऊन ठेवावें. सुवर्ण, धान्य, वस्त्र इत्यादिक सर्वांनीं ठेवावीं. प्रस्थान केल्यानंतर राजानें १० दिवस, अन्यानें पांच दिवस घरीं रहावें; यांहून अधिक दिवस राहूं नये. स्वतां प्रयाण करणें त्याहून यज्ञोपवीतादिक वस्तु नेऊन ठेवणें त्याचें अर्धें फल जाणावें.

---

प्रस्थानदेशावधिः गेहाद्गेहांतरंगर्गःसीम्नःसीमांतरंभृगुः बाणक्षेपंभरद्वाजोवसिष्ठोनगरा द्बहिः प्रस्थानेपिकृतेनेयान्महादोषान्वितेदिने प्रस्थानदिनेपिक्रोधादिकंवर्जयेत् शकुनापशकु नप्रपंचोन्यत्रइतियात्राप्रकरणं ॥

**प्रस्थानाविषयीं देशमर्यादा.**—आपल्या गृहापासून दुसऱ्याचे घरीं जावें असें गर्गाचें मत, सीमा उल्लंघन ह्मणजे दुसऱ्या सीमेंत जावें असें भृगूचें मत, स्वबलेंकरून टाकलेला बाण जितका दूर जाईल तावन्मात्र जावें असें भरद्वाजाचें मत, नगरापासून बाहेर जावें असें वसिष्ठाचें मत. प्रस्थान केलें असतांहि महादोषयुक्त दिवस असेल तर त्या दिवसीं प्रयाण करूं नये. ज्या दिवसीं प्रस्थान करावयाचें त्या दिवसींहि क्रोधादिक वर्ज्य करावें. शुभ शकुन व दुष्ट शकुन यांचा विस्तार ग्रंथांतरीं पहावा. याप्रमाणें यात्राप्रकरण सांगितलें.

---

अथगोचरप्रकरणं जन्मराशेःक्रूरचंद्रास्त्रिषट्दशमगाःशुभाः सप्ताद्यगश्चापिचंद्रः शुक्ले द्विनवपंचसु बुधोव्यंत्यसमे २ । ४ । ६ । ८ । १० जीवोद्विपंचनवसप्तसु जन्मादिपंच सुतथानवाष्टद्वादशेभृगुः एकादशेसर्वखेटाःशुभाःस्युरितिसंग्रहः जन्मसंपद्विपत्क्षेमंप्रत्य रिःसाधिकावधः मैत्रातिमैत्राःस्युस्तारास्त्रिरावृत्त्यास्वजन्मभात् क्रमतःसूर्यादिबलं नृपदर्श नसर्वकार्ययुद्धेषु शशाकरग्रहयात्रादीक्षासूद्यविशेषेण अनिष्टसूर्यादीनांदानानिद्वितीयपरि च्छेदांते ॥

## यानंतर गोचरप्रकरण सांगतों.

"जन्मराशीपासून पापग्रह व चंद्र ३।६।१० या स्थानीं शुभ. चंद्र ७।१ या स्थानीं शुभ. शुक्लपक्षीं चंद्र २।९।५ या स्थानीं शुभ होय. बुध २।४।६।८।१० या स्थानीं शुभ. गुरु २।५।९।७ या स्थानीं शुभ. शुक्र १।२।३।४।५।९।८।१२ या स्थानीं शुभ. एकादशस्थानीं सर्व ग्रह शुभ होत. आपल्या जन्मनक्षत्रापासून दिवसनक्षत्रापावेतों त्रिरावृत्तीनें नक्षत्रें मोजावीं. नंतर नऊ नऊ नक्षत्रांस जन्म, संपत्, विपत्, क्षेम, प्रत्यरि, साधिका, वध, मैत्र आणि अतिमैत्र ह्या संज्ञा ( नामसदृश फल देणाऱ्या ) होतात. क्रमेंकरून सूर्यादिक ग्रहांचें बल पहावें. राजदर्शनास रविबल, सर्व कृत्यांस चंद्रबल, युद्धाविषयीं भौमबल, शास्त्राभ्यास करण्यास बुधबळ, विवाहाविषयीं गुरुबळ, प्रयाणाविषयीं शुक्रबळ, आणि मंत्रदीक्षेविषयीं शनिबळ याप्रमाणें विशेषेंकरून त्या त्या ग्रहांचें बळ पाहून तें तें कार्य करावें." अनिष्ट जे सूर्यादिक ग्रह त्यांचीं दानें द्वितीय परिच्छेदाच्या शेवटीं सांगितलीं आहेत.

---

दक्षांगोदरनाभिहृत्सुपतितापल्लीवरांगेहनुंमुक्तानुःशुभदास्त्रियाःफलमिदं वामेतरव्यत्ययात् इत्याहुःसरठप्ररोहणफलंपातेन्यथैकेवृथापल्यारोहणकेपिवस्त्रसहितंस्नात्वाचरेच्छांतिकं इति ॥

पल्ली ( पाल ) पतन सांगतों.—पुरुषाचें उजवें आंग आणि हनुवटीवांचून उदर, नाभि, हृदय, मस्तक यांचे ठायीं पल्लीपतन झालें असतां शुभ होय. हेंच स्त्रीचे डावे आंगीं शुभ होय. सरठाचे आरोहणीं हेंच फळ जाणावें. पल्लीचे आरोहणीं व सरठाचे पतनीं विपरीत फळ जाणावें. पल्लीसरठांचे आरोहणपतनीं शुभाशुभ फळ व्यर्थ ( नाहीं ) असें कोणीं आचार्य ह्मणतात. पल्लीसरठांचे पतनारोहणीं वस्त्रसहित स्नान करून शांति करावीं.

---

अथपल्लीसरठशांतिः तयोःस्पर्शमात्रेस्नानंकृत्वापंचगव्यंप्राश्याज्यमवलोक्याशुभनाशार्थं शुभवृद्ध्यर्थंवाशांतिःकार्या पल्ल्याःसरठस्यवाहेम्नाप्रतिमांकृत्वारक्तवस्त्रेणसंवेष्ट्यसंपूज्यकलशेरुद्रंसंपूज्य मृत्युंजयमंत्रेणखादिरसमिद्भिरष्टोत्तरशतंतिलैर्व्याहृतिभिरष्टोत्तरसहस्रंशतंवा हुत्वास्विष्टकृदाद्यभिषेकांतेस्वर्णवस्त्रतिलदानं ॥

## यानंतर पल्लीसरठांची शांति सांगतों.

पाल आणि सरठ यांचा स्पर्श झाला असतां स्नान करून पंचगव्य प्राशन करून आज्यावलोकन करून अशुभ नाशाकरितां किंवा शुभवृद्धीकरितां शांति करावी. पालीची किंवा सरठाची सुवर्णप्रतिमा करून त्या प्रतिमेस रक्तवस्त्रानें वेष्टित करून पूजा करावी. नंतर कलशाचे ठायीं रुद्राची पूजा करून मृत्युंजयमंत्रेंकरून खदिरसमिधांचा अष्टोत्तरशत ( १०८ ), व्याहृतिमंत्रांनीं तिळांचा अष्टोत्तरसहस्र ( १,००८ ); किंवा शंभर होम करून स्विष्टकृतापासून अभिषेकापर्यंत कर्म केल्यानंतर सुवर्ण, वस्त्र व तिळ यांचीं दानें करावीं.

---

अथकपोतप्रवेशमधुवल्मीकोत्पत्तिपिंगलास्वरकाकवैकृतग्राम्यारण्यादिमृगपक्षिविकारे शांतिः देवाःकपोतइतिपंचर्चसूक्तंसहस्रंशतंवाजपित्वा यतइंद्रभयामहेस्वस्तिदाविशत्र्यंबक मितिमंत्रैर्हुत्वाव्याहृतिभिरष्टोत्तरशतंतिलहोमंकुर्यात् अथवापंचविप्रैःक्रमेणदेवाःकपोतइति सूक्तंसुदेवोअसीत्यृचंकनिक्रददितिशाकुंतसूक्तंनमोब्रह्मणेनमोअग्नयइतिमंत्रंचसहस्रादिसंख्य याजप्त्वोपनिषदश्चपठित्वाव्याहृतिभिस्तिलहोमंकुर्यात् ॥

यानंतर घरांत कपोतपक्ष्याचा प्रवेश, मधमाशांचें पोहळ, वारुळ वाढणें, पिंगळा पक्ष्याचा शब्द, काकवैकृत, ग्राम्य व आरण्यक इत्यादि मृगपक्षी यांचा विकार हीं असतां शांति करावी. " देवाःकपोत० " ह्या पांच ऋचांचे सूक्ताचा सहस्र किंवा शंभर जप करून " यतइंद्रभयामहे० स्वस्तिदाविशः० त्र्यंबकं० " ह्या मंत्रांनीं होम करून व्याहृतिमंत्रांनीं १०८ तिलहोम करावा. अथवा पांच ब्राह्मणांकडून क्रमानें "देवाःकपोत० " हें सूक्त, " सुदेवोअसि० " ही एक ऋचा, " कनिक्रदत्० " हें शाकुंतसूक्त आणि " नमोब्रह्मणेनमोअग्नये० " हा मंत्र यांचा सहस्रादि संख्येनें जप करून उपनिषदें पठण करून व्याहृतिमंत्रांनीं तिळांचा होम करावा.

---

अथकाकस्पर्शमैथुनादिशांतिः संकल्पाग्निप्रतिष्ठापनांतेकुंभेसौवर्णमिंद्रंलोकपालांश्चसंपूज्याग्नौचरुंश्रपयित्वा पलाशसमिच्चर्वाज्यव्रीहिभिःप्रत्येकमष्टोत्तरसहस्रंशतंवायतइंद्रेतिमंत्रेणहुत्वालोकपालेभ्यस्तैरेवद्रव्यैर्दशकृत्वोहुत्वा लोकपालबलिंकुंभाग्रेवायसेभ्यो बलिमैंद्रवारुणे तिमंत्रेणदत्वायजमानोभिषेकांतेशतंदशवाविप्रान्भोजयेत् ॥

## यानंतर कावळ्याचा स्पर्श, मैथुन इत्यादिकांची शांति सांगतों.

संकल्प, अग्निस्थापन एथपर्यंत कर्म झाल्यानंतर कलशावर सुवर्णमय इंद्र व लोकपाल यांची पूजा करून अग्नीवर चरु शिजवून पळसाच्या समिधा, चरु, आज्य आणि व्रीहि या द्रव्यांचा प्रत्येकाचा १,००८, किंवा शंभर " यतइंद्र० " ह्या मंत्रानें होम करून लोकपाल देवतांच्या उद्देशानें त्याच द्रव्यांच्या दहा दहा आहुतींनीं होम करून कुंभाच्या अग्रभागीं लोकपालांचें बलिप्रदान, व वायसांस बलिदान " ऐंद्रवारुण० " ह्या मंत्रानें करून अभिषेक झाल्यानंतर यजमानानें शंभर किंवा दाहा ब्राह्मणांला भोजन घालावें.

---

घरट्टोलूखलमुसलदृषदासनमंचकादेरकस्मात्स्फोटनेघृताक्तमधुयुताश्वत्थसमिधः प्रजापतयेहुत्वागायत्र्यष्टोत्तरसहस्रेणाभिमंत्रयेत् ॥

घिरट, उखळ, मुसळ, पाटा, वरवंटा, आसन, पाट इत्यादिक, माचा इत्यादिक अकस्मात् ( एकाएकीं ) फुटेल तर घृतांत भिजवलेल्या अशा मधुयुक्त अश्वत्थसमिधांचा प्रजापतीच्या उद्देशानें होम करून १,००८ सहस्र गायत्रीमंत्रानें अभिमंत्रण करावें.

---

नानाविधदिव्यभौमांतरिक्षोत्पातेषुशांतिः संकल्पादिकृत्वाकुंभेइंद्ररुद्रौसंपूज्ययतइंद्रस्व स्तिदाविशस्पतिःअघोरेभ्योथेतिमंत्रैः समिदाज्यचरुव्रीहितिलान्प्रतिद्रव्यमष्टोत्तरशतंहुत्वा

व्याहृतिभिःकोटिहोमंलक्षहोममयुतहोमंतत्पादहोमंवातिलैर्वित्तानुसारेण निमित्तानुसारेणच सप्तरात्रंत्रिरात्रमेकरात्रंवाकृत्वा सूर्यगणेशक्षेत्रपालदुर्गामंत्राणांजपंकृत्वापायसादिनाब्राह्मण भोजनंकार्यं यद्वाचंडीसप्तशतीजपः अथवारुद्रैर्जपोभिषेकोवा अश्वत्थप्रदक्षिणाशिवपूजा गोविप्रपूजादिवेतिनानोत्पातसामान्यशांतयः ॥

नानाप्रकारचे दिव्य ( केत्वादि ), भौम (भूकंपादि) आणि आंतरिक्ष ( गंधर्वनगरादि ) हे उत्पात असतां शांति सांगतों—संकल्पादि करून कलशावर इंद्र व रुद्र यांची पूजा करून "यतइंद्र०, स्वस्तिदाविशस्पतिः०, अघोरेभ्योथ०" ह्या मंत्रेंकरून समिधा, आज्य, चरु, व्रीहि आणि तिल या प्रत्येक द्रव्याचा १०८ याप्रमाणें होम करून व्याहृतिमंत्रांनीं तिळांचा कोटिहोम, लक्षहोम, अयुत ( १०,००० ) होम अथवा त्याचा चतुर्थांश ( २,५०० ) होम, द्रव्यशक्ति असेल त्याप्रमाणें व जसें लहान मोठें निमित्त असेल तदनुसार सप्तरात्र, त्रिरात्र अथवा एकरात्र करून सूर्य, गणेश, क्षेत्रपाल, दुर्गा यांच्या मंत्रांचा जप करून पायसादिकानें ब्राह्मणभोजन करावें. अथवा चंडीसप्तशतीचा जप करावा, किंवा रुद्राचा जप अथवा अभिषेक करावा, किंवा अश्वत्थाला प्रदक्षिणा, शिवपूजा, गाईब्राह्मणांची पूजा इत्यादिक करावीं. याप्रमाणें नानाविध उत्पातांच्या सामान्यशांति सांगितल्या.

---

अथगायत्रीपुरश्चरणप्रयोगः देशकालौसंकीर्त्यकरिष्यमाणगायत्रीपुरश्चरणेधिकारसिद्ध्यर्थंकृच्छ्रत्रयममुकप्रत्याम्नायेनाहमाचरिष्येइतिसंकल्प्यहोमादिप्रत्याम्नायविधिनाकृच्छ्राण्यनुष्ठायामुकशर्मणोमम गायत्रीपुरश्चरणेनेनकृच्छ्रत्रयानुष्ठानेनाधिकारसिद्धिरस्त्वितिविप्रान्वदेत् विप्राअधिकारसिद्धिरस्त्वितिब्रूयुःततःकरिष्यमाणपुरश्चरणांगत्वेनविहितं गायत्रीजपादिकरिष्ये इतिसंकल्प्यस्वयंविप्रद्वारावाकुर्यात् तद्यथा सप्रणवव्याहृतिगायत्र्याअयुतंजप्त्वाआपोहिष्ठेतिसूक्तंएतोन्विंद्रमितितिस्रःऋतंचेतिसूक्तंस्वस्तिनइत्याद्याःस्वस्तिमतीस्वादिष्ठयेत्याद्याःपावमानीश्चसर्वाःप्रत्येकंदशवारंस्वयमन्यद्वारावाजपित्वा तत्सवितुरित्यस्याचार्यमृषिंविश्वामित्रंतर्पयामि गायत्रीछंदस्त० सवितारंदेवतां० इतितर्पणंकृत्वारुद्रंनमस्कृत्यकद्रुद्रायेत्यादीनिरुद्रसूक्तानिजपेत् ॥

## यानंतर गायत्रीपुरश्चरणाचा प्रयोग सांगतों.

देशकालांचा उच्चार करून संकल्प करावा. तो असा—"करिष्यमाण गायत्री पुरश्चरणेऽधिकारसिद्ध्यर्थं कृच्छ्रत्रयममुकप्रत्याम्नायेनाहमाचरिष्ये," असा संकल्प करून होमादिकाचा जो प्रत्याम्नायविधि तेणेंकरून तितके कृच्छ्र आचरण करून "अमुक शर्मणो मम गायत्रीपुरश्चरणेऽनेन कृच्छ्रत्रयानुष्ठानेनाधिकारसिद्धिरस्तु," असें ब्राह्मणांप्रत बोलावें. नंतर ब्राह्मणांनीं "अधिकारसिद्धिरस्तु" असें बोलावें. तदनंतर, "करिष्यमाणपुरश्चरणांगत्वेन विहितं गायत्रीजपादि करिष्ये," असा संकल्प करून आपण किंवा ब्राह्मणद्वारा जप करावा. तो असा—प्रणव व व्याहृति यांहींयुक्त गायत्रीचा दहासहस्र जप करून "आपोहिष्ठा०" हें सूक्त, "एतोन्विंद्रं०" ह्या तीन ऋचा, "ऋतं च०" हें सूक्त, "स्वस्तिनो०" इत्यादिक स्वस्तिमती ऋचा, आणि "स्वादिष्ठया०" इत्यादिक पावमानीऋचा

ह्या सर्व ऋचांचा, प्रत्येक ऋचेचा दहा वेळ याप्रमाणें आपण किंवा दुसऱ्याकडून जप करून "तत्सवितुरित्यस्याचार्यमृषिंविश्वामित्रं तर्पयामि ॥ गायत्रीछंदस्तर्प० सवितारंदेवतां०" याप्रमाणें तर्पण करून रुद्रास नमस्कार करून "कद्रुद्राय०" इत्यादिक रुद्रसूक्तांचा जप करावा.

---

ततोदिनांतरेदेशकालौसंकीर्त्यममसकलपापक्षयद्वाराश्रीपरमेश्वरप्रीत्यर्थंचतुर्विंशतिलक्षात्मकगायत्रीपुरश्चरणंस्वयंविप्रद्वारावाकरिष्ये तदंगत्वेनस्वस्तिवाचनंमातृकापूजनंनांदीश्राद्धं विप्रद्वाराजपेजपकर्तृवरणंचकरिष्यइतिसंकल्पः संकल्पस्यापिऋत्विक्कर्तृकत्वेमुकशर्मणोयजमानस्यसकलपापक्षयेत्यादियजमानानुज्ञयाकरिष्ये एवंपूर्वत्रापिसंकल्पऊह्यः नांदीश्राद्धांतेसविताप्रीयतामिति गायत्रीपुरश्चरणेजपकर्तारंत्वांवृणेइतिविप्रमेकैकंवृणुयात् वस्त्रादिभिः पूजयेत् ॥

तदनंतर दुसऱ्या दिवशीं देशकालांचा उच्चार करून "मम सकल पापक्षयद्वारा श्रीपरमेश्वरप्रीत्यर्थं चतुर्विंशतिलक्षात्मक गायत्रीपुरश्चरणं स्वयं विप्रद्वारा वा करिष्ये, तदंगत्वेन स्वस्तिवाचनं मातृकापूजनं नांदीश्राद्धं (ब्राह्मणद्वारा जप कर्तव्य असतां) जपकर्तृवरणं च करिष्ये" असा संकल्प करावा. ऋत्विक् यानें संकल्प करणें असतां "अमुकशर्मणो यजमानस्य सकलपापक्षयेत्यादि० यजमानानुज्ञया करिष्ये" याप्रमाणें पूर्वींहि संकल्प जाणावा. नांदीश्राद्धाच्या शेवटीं "सविता प्रीयतां" असें ह्मणावें. "गायत्रीपुरश्चरणे जपकर्तारं त्वां वृणे" असें वाक्य ह्मणून एकेका ब्राह्मणास वरावें, व वस्त्रादिकांनीं त्यांची पूजा करावी.

---

अथनित्यकर्म एकैकोविप्रःस्वयंवाकुशाद्यासनोपविष्टःपवित्रपाणिराचम्यप्राणानायम्यदेवताःप्रार्थयेत् सूर्यःसोमोयमःकालःसंध्येभूतान्यहःक्षपा पवमानोदिक्पतिर्भूराकाशंखेचरामराः ब्रह्मशासनमास्थायकल्पध्वमिहसंनिधिमिति ततोदेशकालौसंकीर्त्यप्रात्यहिकजपंसंकल्प्यगुरवेनमः गणपतये० दुर्गायै०मातृभ्यो० इतिनत्वात्रिःप्राणानायम्य तत्सवितुरितिगायत्र्याविश्वामित्रऋषिः सवितादेवतागायत्रीछंदःजपेवि० विश्वामित्रऋषयेनमःशिरसि गायत्रीछंदसेनमोमुखे सवितृदेवतायैनमोहृदि इतिन्यस्य तत्सवितुरंगुष्ठाभ्यां० वरेण्यंतर्जनी० भर्गोदेवस्यमध्यमा० धीमह्यनामिका० धियोयोनःकनिष्ठिकाभ्यां० प्रचोदयात् करतलकरपृष्ठाभ्यांनमइतिकरन्यासंकृत्वैवंहृदयादिषडंगन्यासंकुर्यात् पूर्वोक्तरीत्यासंस्कृतांजपमालांपात्रेनिधायसंप्रोक्ष्य ओंमहामाये महामालेसर्वशक्तिस्वरूपिणि चतुर्वर्गस्त्वयिन्यस्तस्तस्मान्मेसिद्धिदाभवेतिप्रार्थ्य ॐअविघ्नंकुरुमालेत्वमितितामादाय मंत्रदेवतांसवितारंध्यायन् हृदयेमालांधारयन्मंत्रार्थंस्मरन्मध्यंदिनावधिजपेत् अतित्वरायांसार्धत्रयप्रहरावधि जपांतेपुनः प्रणवमुक्त्वा त्वंमालेसर्ववेदानांप्रीतिदाशुभदाभव शिवंकुरुष्वमेभद्रेयशोवीर्यंचसर्वदाइति मालांशिरसिनिधायत्रिःप्राणानायम्यन्यासत्रयंकृत्वाजपमीश्वरार्पणंकुर्यात् प्रत्यहंसमानसंख्यएवजपोनतुन्यूनाधिकः एवंपुरश्चरणजपसमाप्तौहोमः पुरश्चरणसांगतासिद्ध्यर्थंहोमविधिंकरिष्यइतिसंकल्प्याग्निंप्रतिष्ठाप्यपीठेसूर्यादिनवग्रहपूजनादिकलशस्थापनांतेअन्वादध्यात् च

क्षुधीआज्येनेत्यंते ग्रहपीठदेवतान्वाधानं अर्कादिसमिधर्वाज्याहुतिभिःकृत्वाप्रधानदेवतांसवितारंचतुर्विंशतिसहस्रतिलाहुतिभिः त्रिसहस्रसंख्याकाभिः पायसाहुतिभिर्घृतमिश्रतिलाहुतिभिर्दूर्वाहुतिभिःक्षीरद्रुमसमिदाहुतिभिश्चशेषेणस्विष्टकृतमित्यादि चरुपायसतिलैःसहाज्यस्य पर्यग्निकरणादि आज्यभागांतेइदंहवनीयद्रव्यंअन्वाधानोक्तदेवताभ्यःअस्तुनममेतियजमानस्त्यागंकुर्यात् होमेसप्रणवाव्याहृतिरहितास्वाहांतागायत्री दूर्वात्रयस्यैकाहुतिःदूर्वासमिधां दधिमध्वाज्यांजनं स्विष्टकृदादिबलिदानांतेसमुद्रज्येष्ठाइत्यादिभिर्यजमानाभिषेकः प्रतिलक्षं सुवर्णनिष्कत्रयंतदर्धंवाशक्त्यावादक्षिणा होमांतेजलेदेवंसवितारंसंपूज्यहोमसंख्यादशांशेन २४०० गायत्र्यंतेसवितारंतर्पयामीत्युक्त्वातर्पणंकार्यं तर्पणदशांशेन २४० गायत्र्यंते आत्मानमभिषिंचामिनमइतिमूर्ध्न्यभिषेकः होमतर्पणाभिषेकाणांमध्येयदेवनसंभवतितत्स्थानेतत्संख्याद्विगुणोजपःकार्यः अभिषेकसंख्यादशांशेनाधिकंवाविप्रभोजनं पुरश्चरणंपूर्णमस्त्विति विप्रान्वाचयित्वेश्वरार्पणंकार्यं प्रत्यहंयज्जाग्रतइतिशिवसंकल्पमंत्रस्यत्रिःपाठः कर्ताब्राह्मणैः सहहविष्याशीसत्यवागधः शायीपरिगृहीतभूप्रदेशानतिचारीचभवेत् इत्यनंतदेवीयानुसारेणचतुर्विंशतिलक्षपुरश्चरणप्रयोगः ॥

यानंतर नित्यकर्म सांगतों.—एकेक ब्राह्मण अथवा स्वतां आपण कुशासनादिकावर उपविष्ट, हातांत दर्भपवित्र धारण केलें होत्साता आचमन प्राणायाम करून देवतांची प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र—“ सूर्यःसोमोयमःकालःसंध्येभूतान्यहःक्षपा ॥ पवमानोदिक्पतिर्भूराकाशंखेचरामराः ॥ ब्रह्मशासनमास्थायकल्पध्वमिहसंनिधिं, ” याप्रमाणें प्रार्थना केल्यानंतर देशकालांचा उच्चार करून प्रत्यहीं कर्तव्य जपाचा संकल्प करून “ गुरवे नमः गणपतये० दुर्गायै० मातृभ्यो० ” याप्रमाणें नमस्कार करून तीन प्राणायाम करून “ तत्सवितुरिति गायत्र्या विश्वामित्र ऋषिः ॥ सविता देवता ॥ गायत्री छंदः ॥ जपे वि० विश्वामित्रऋषये नमः शिरसि ॥ गायत्रीछंदसे नमो मुखे ॥ सवितृदेवतायै नमो हृदि ” असा न्यास करून “ तत्सवितुरंगुष्ठाभ्यां० वरेण्यं तर्जनीभ्यां० भर्गोदेवस्य मध्यमाभ्यां० धीमह्यनामिकाभ्यां० धियोयोनः कनिष्ठिकाभ्यां० प्रचोदयात् करतलकरपृष्ठाभ्यां० ” याप्रमाणें करन्यास करून असाच हृदयादि सहा अंगांचे ठायीं न्यास करावा. नंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें संस्कार केलेली जपमाला पात्रामध्यें ठेवून प्रोक्षण करून मालेची प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र—“ ॐमहामाये महामाले सर्वशक्तिस्वरूपिणि ॥ चतुर्वर्गस्त्वयिन्यस्तस्तस्मान्मां सिद्धिदा भव, ” अशी प्रार्थना करून “ ॐअविघ्नं कुरुमाले त्वं० ” ह्या मंत्रानें ती हातीं घेऊन मंत्रदेवतासवितेचें ध्यान करीत होत्साता हृदयाचे ठायीं माला धारण करून मंत्रार्थाचें स्मरण करीत मध्यंदिनावधिपर्यंत जप करावा. अतित्वरा असेल तर साडेतीन प्रहरांपर्यंत जप करावा. जपाच्या अंतीं पुनः प्रणव ह्मणून “ त्वं माले सर्वदेवानां प्रीतिदा शुभदा भव ॥ शिवं कुरुष्व मे भद्रे यशोवीर्यं च सर्वदा, ” या मंत्रानें माला मस्तकावर ठेवून तीन प्राणायाम करून तीन न्यास करून जप ईश्वरास अर्पण करावा. प्रत्यहीं जप समानसंख्यच करावा, अधिक उणा करूं नये. याप्रमाणें पुरश्चरणजपाची समाप्ति झाली असतां होम करावा. होमाचा विधि सांगतों—“ पुरश्चरणसांगतासिद्ध्यर्थं होमविधिं क-

रिष्ये," असा संकल्प करून अग्नीची स्थापना करून पीठावर सूर्यादि नवग्रहांच्या पूजेपासून कलशस्थापनपर्यंत कर्म केल्यानंतर अन्वाधान करावें, तें असें–"**चक्षुषीआज्येन,**" इतकें झटल्यानंतर ग्रहपीठदेवतांचें अन्वाधान अर्कादिसमिच्चर्वाज्याहुतींनीं करून प्रधान अन्वाधान करावें. तें असें–"प्रधानदेवतां सवितारं चतुर्विंशतिसहस्रतिलाहुतिभिस्त्रिसहस्रसंख्याकाभिः पायसाहुतिभिर्घृतमिश्रतिलाहुतिभिर्दूर्वाहुतिभिः क्षीरद्रुमसमिदाहुतिभिश्च-शेषेण स्विष्टकृतमित्यादि," याप्रमाणें अन्वाधान करावें. चरु, पायस आणि तिल यांसहवर्तमान आज्याचें पर्यग्निकरणादिक ( द्रव्यसंस्कार ) करावें. आज्यभागांत कर्म झाल्यानंतर, "**इदंहवनीयद्रव्यं अन्वाधानोक्तदेवताभ्यः अस्तु न मम,**" असा यजमानानें त्याग करावा. होमाचे ठायीं सप्रणवव्याहृतिरहित, व स्वाहाकारपर्यंत गायत्री ह्मणावी. तीन दूर्वांची एक आहुति द्यावी. दूर्वा व समिधा हीं द्रव्यें दहीं, मध आणि आज्य यांत भिजवावीं. स्विष्टकृतापासून बलिदानापर्यंत कर्म केल्यानंतर, "**समुद्रज्येष्ठा०**" इत्यादि मंत्रांनीं यजमानावर अभिषेक करावा. प्रत्येक लक्षसंख्याक जपास तीन निष्क सुवर्ण, अथवा दीड निष्क सुवर्ण, किंवा यथाशक्ति दक्षिणा द्यावी. होम केल्यानंतर उदकामध्यें सविता देवतेची पूजा करून होमसंख्येच्या दशांशेंकरून ( २,४०० ) गायत्रीमंत्राच्या अंतीं "**सवितारं तर्पयामि,**" असें ह्मणून तर्पण करावें. तर्पणाच्या दशांशें ( २४० ) करून गायत्रीमंत्राच्या अंतीं "**आत्मानमभिषिंचामि नमः**" असें ह्मणून आपल्या मस्तकावर अभिषेक करावा. होम, तर्पण, अभिषेक यांमध्यें जें करण्यास असंभव असेल तत्स्थानीं त्याच्या त्याच्या द्विगुण जप करावा. अभिषेकसंख्येच्या दशांशेंकरून अथवा अधिक ब्राह्मणभोजन करावें. "**पुरश्चरणं पूर्णमस्तु**" असें ब्राह्मणाकडून बोलवून कर्म ईश्वरास अर्पण करावें. प्रतिदिनीं "**यज्जाग्रतो०**" ह्या शिवसंकल्पमंत्राचे तीन पाठ करावे. कर्ता यानें ब्राह्मणांसहवर्तमान हविष्यभोजन, सत्यवाक्, खालीं निद्रा करणें परिगृहीत भूमीच्या बाहेर संचार न करणें असें रहावें. याप्रमाणें अनंतदेवाच्या ग्रंथांत सांगितल्या रीतीनें चोवीसलक्षपुरश्चरणाचा प्रयोग सांगितला.

---

**ऋग्विधानेतु मध्यान्हेमितभुङ्मौनीत्रिःस्नानार्चनतत्परः लक्षत्रयंजपेद्धीमानितित्रिलक्षं पुरश्चरणमुक्तं जपशतांशस्त्रिसहस्रंहोमः कलौचतुर्गुणंप्रोक्तमितिपक्षेद्वादशलक्षजपः द्वादश सहस्रहोमइत्याद्यूह्यं विष्णुशयनमासेषुपुरश्चरणंनकार्यं तीर्थादौशीघ्रंसिद्धिःबिल्ववृक्षाश्रयेणजपेएकाहात्सिद्धिरितिसर्वमंत्रप्रक्रिया इतिगायत्रीपुरश्चरणं ॥**

"ऋग्विधानग्रंथीं तर मध्यान्हीं मितभोजन करणारा व मौनी होत्साता त्रिकाल स्नान, देवपूजा करून बुद्धिमान् अशा पुरुषानें मंत्राचा तीन लक्ष जप करावा," असें तीन लक्ष जपाचें पुरश्चरण सांगितलें आहे. जपाच्या शतांशानें तीन सहस्र होम करावा. "कलियुगीं चतुर्गुणित सांगितलें," या पक्षीं बारा लक्ष जप करावा, व बारा सहस्र होम करावा, इत्यादिक जाणावें. विष्णुशयनमासांत ( आषाढ शुक्ल एकादशीपासून कार्तिक शुक्ल एकादशीपर्यंत ) पुरश्चरण करूं नये. तीर्थादिस्थानीं त्वरित सिद्धि प्राप्त होते. बिल्ववृक्षाच्या आश्रयानें जप

केला असतां एका दिवसानें सिद्धि होते असी सर्वत्र मंत्रप्रक्रिया जाणावी. याप्रमाणें गायत्रीमंत्राचें पुरश्चरण सांगितलें.

---

अथपूर्तकमलाकरे अश्वत्थोपनयनंतत्रवर्णैःक्रमेणवृक्षस्थापनादष्टमैकादशेद्वादशेवर्षेउपनयनोक्तमुहूर्तेपूर्वाण्हेकार्यं शूद्रस्थापिताश्वत्थेपौराणिकमंत्रैरारामप्रतिष्ठामात्रंकार्यंनोपनयनं॥

## यानंतर पूर्तकमलाकरांतील, अश्वत्थाचे उपनयनाचा प्रयोग सांगतों.

तें अश्वत्थोपनयन तीन वर्णांनीं ( ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य यांनीं) क्रमेंकरून, वृक्ष लाविल्या दिवसापासून आठव्या, अकराव्या व बाराव्या वर्षी उपनयनास उक्त जो मुहूर्त त्यावर पूर्वाण्हकालीं करावें. शूद्रानें स्थापन केलेल्या अश्वत्थाची, पुराणोक्त मंत्रांनीं आरामप्रतिष्ठा मात्र करावी, उपनयन करूं नये.

---

अथप्रयोगः कर्तादेशकालौसंकीर्त्यसर्वपापक्षयकुलकोटिसमुद्धरणपूर्वकविष्णुसायुज्यप्राप्तिकामोश्वत्थोपनयनंकरिष्येइतिसंकल्प्यनांदीश्राद्धांतेआचार्यंवृणुयात् आचार्यःपंचामृतैःशुद्धोदकैःसर्वौषधिजलैश्चाश्वत्थमभिषिंच्य पिष्टातकेनालंकृत्यतत्पूर्वेस्थंडिलेग्निंप्रतिष्ठाप्यान्वाधाने अग्निंवायुंसूर्यंत्रिरग्निंपवमानंप्रजापतिंद्विरोषधीर्वनस्पतिंपिप्पलंप्रजापतिंचपलाशसमिच्चर्वाज्यैःप्रत्येकमेकैकयाहुत्याशेषेणेत्यादि अष्टचत्वारिंशन्मुष्टीनांतूष्णींनिर्वापप्रोक्षणेश्रपणाद्याज्यभागांते युवंवस्त्राणीत्यश्वत्थंवस्त्रयुग्मेनावेष्ट्ययज्ञोपवीतमितियज्ञोपवीतंदत्वा प्रावेपामेतिमेखलांत्रिरावेष्ट्यअजिनंदंडंचतूष्णींदत्वाअश्वत्थेवइत्यृचागंधपुष्पैःसंपूज्यदेवस्यत्वेतिमंत्रांते हस्तंगृण्हाम्यश्वत्थेतिस्पृष्ट्वासप्रणवव्याहृतिकांगायत्रींत्रिर्जपित्वा अश्वत्थेवोनिषदनमितिसूक्तेनव्याहृतिभिश्चाश्वत्थंस्थापयामीतिस्वर्णशलाकयास्पृष्ट्वाज्यपलाशसमिच्चरुभिः प्रत्येकंद्वादशमंत्रैर्द्वादशाहुतीर्जुहुयात् मंत्रास्तु भूःस्वा० अग्नय० भुवःस्वा० वायव० स्वःस्वा० सूर्याये० अग्नआयूंषि० अग्निर्ऋषिः० अग्नेपवस्वेतित्रिभिरग्नयेपवमानायेदं० प्रजापतेनत्व० प्रजापतय० ओषधयःसंवदंते० अश्वत्थेवो० ओषधीभ्यइदं० वनस्पतेशत० वनस्पतयइ० द्वासुपर्णा० पिप्पलायेदं० समस्तव्याहृतिभिः प्रजापतयइदं० स्विष्टकृदादिहोमशेषंसमाप्यश्वत्थेवइति गंधपुष्पधूपदीपनैवेद्यफलतांबूलाद्यैःसंपूज्याश्वत्थंस्पृष्ट्वाचार्यायगामन्येभ्यो दक्षिणांदत्वाश्वत्थवस्त्रादिकमाचार्यायदत्वाष्टौविप्रान्भोजयेदिति ॥

यानंतर प्रयोग सांगतों.—कर्त्यानें देशकालांचा उच्चार करून "सर्वपापक्षयकुलकोटिसमुद्धरणपूर्वकविष्णुसायुज्यप्राप्तिकामोऽश्वत्थोपनयनं करिष्ये," असा संकल्प करून नांदीश्राद्धांत कर्म केल्यानंतर आचार्याला वरावें. नंतर आचार्यानें पंचामृतें, शुद्धोदकें आणि सर्वौषधियुक्त उदकें यांहींकरून अश्वत्थास स्नान घालून पिष्टातकानें ( सुवासिक चूर्णविशेष बुका इ० ) अश्वत्थास सुशोभित करून अश्वत्थाच्या पूर्वदिशेस स्थंडिलावर अग्नि स्थापन करून अन्वाधान करावें. तें असें— "अग्निं वायुं सूर्यं त्रिरग्निं पवमानं प्रजापतिं द्विरोषधीर्वनस्पतिं पिप्पलं प्रजापतिं च पलाशसमिच्चर्वाज्यैः प्रत्येकमेकैकया हुत्या शेषेणेत्यादि." अठेचाळीस मुठी तांदुळ मंत्ररहित घेऊन मंत्ररहित प्रोक्षण करून चरुश्रपणापासून आज्य-

भागांत कर्म केल्यानंतर " युवं वस्त्राणि०" ह्या मंत्रानें दोन वस्त्रें अश्वत्थास सभोंवार वेष्टित करून " यज्ञोपवीतं० " ह्या मंत्रानें यज्ञोपवीत देऊन " प्रावेपा० " ह्या मंत्रानें मेखलेचें तीन वेळ वेष्टन करून अजिन व दंड हे मंत्रविरहित द्यावे. नंतर " अश्वत्थे० " ह्या ऋचेनें गंधपुष्पांनीं पूजा करून " देवस्यत्वा० " हा मंत्र ह्मटल्यानंतर " हस्तंगृण्हाम्य-श्वत्थ," असें वाक्य ह्मणून अश्वत्थाला स्पर्श करून प्रणव व व्याहृति यांहींयुक्त गायत्री-मंत्राचा तीन वेळ जप करावा. " अश्वत्थेवोनिषदनं० " ह्या सूक्तानें व व्याहृतिमंत्रांनीं "अश्वत्थं स्थापयामि," असें वाक्य ह्मणून सुवर्णाच्या शलाकेनें ( काडीनें ) स्पर्श करून आज्य, पळसाच्या समिधा आणि चरु या द्रव्यांचा प्रत्येकाच्या बारा आहुति याप्रमाणें बारा मंत्रांनीं होम करावा. होमाचे मंत्र—" भूःस्वा० अग्नय० भुवःस्वा० वायव० स्वः-स्वाहा सूर्याये० अग्नआयूंषि० अग्निर्ऋषिः० अग्नेपवस्व० ( ह्या तीन ऋचांचा प्रत्येक ऋचेनें होम करावा. ) अग्नयेपवमानायेदं० प्रजापते० प्रजापतय० ओषधयः संव० अ-श्वत्थेवो० ओषधीभ्यइदं० वनस्पतेशत० वनस्पतय० द्वासुपर्णा० पिप्पलाये० समस्तव्या-हृतिभिः प्रजापतय इ० " याप्रमाणें होम करून स्विष्टकृत् इत्यादि होमशेष समाप्त करून " अश्वत्थेवो० " ह्या मंत्रानें गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, फल, तांबूल इत्यादि उपचा-रांनीं पूजा करून अश्वत्थाला स्पर्श करून आचार्याला गोप्रदान व इतर ब्राह्मणांला दक्षिणा देऊन अश्वत्थाला समर्पण केलेलीं वस्त्रें इत्यादिक आचार्यास देऊन आठ ब्राह्मणांला भोजन घालावें. याप्रमाणें प्रयोग सांगितला.

---

अपुत्रेणपुंसास्त्रियावावटप्लक्षाम्रादेःपुत्रत्वेनप्रतिग्रहःकार्यःदेशकालौसंकीर्त्यमहापापक्षय कुलत्रयसमुद्धरणप्रजापतिपुरगमननिरयस्थपित्रुद्धारमधुधारातृप्तिसिद्ध्यर्थं सत्पुत्रत्वसिद्ध्यर्थं अमुकवृक्षंप्रतिगृहीष्येइतिसंकल्प्योपवासंकृत्वा रात्रौअष्टविप्रानाहूयचंद्रंसंपूज्यजागरंभूशय नंवाकृत्वाप्रातर्वृक्षंसंपूज्यतच्छायायांविप्रान्संभोज्यपुण्याहंवाचयित्वाप्रार्थयेत् अपुत्रोभगवं तोत्रपुत्रप्रतिकृतिंतरुं गृहीष्यामिममानुज्ञांकर्तुमर्हथसत्तमाः ताम्रपात्रेपंचसौवर्णफलानिबी जपंचरत्नयुतान्यधिवास्यलोकपालबलीन्दद्यात् ॥

पुत्ररहित अशा पुरुषानें अथवा स्त्रियेनें वट, प्लक्ष, आंबा इत्यादि वृक्षांस पुत्र असें मानून त्यांचा प्रतिग्रह करावा. त्याचा विधि—देशकालांचा उच्चार करून " महापापक्षय कुलत्र-यसमुद्धरण प्रजापतिपुरगमन निरयस्थपित्रुद्धार मधुधारातृप्ति सिद्ध्यर्थं सत्पुत्रत्वसिद्ध्यर्थं अमुकवृक्षं प्रतिगृहीष्ये, " असा संकल्प करून उपोषण करून रात्रीं आठ ब्राह्मणांला बलावून चंद्राची पूजा करून जागरण अथवा भूमिशयन करून प्रातःकालीं वृक्षाची पूजा करून त्याच्या छायेखालीं ब्राह्मणांला भोजन घालून " पुण्याहं० " असें बोलून ब्राह्मणांची प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र—"अपुत्रोभगवंतोत्र पुत्रप्रतिकृतिंतरुं ॥ गृहीष्यामिममा-नुज्ञां कर्तुमर्हथसत्तमाः " ह्या मंत्रानें प्रार्थना करून तांब्याचे पात्रांत, बीजरूप पंचरत्नें ज्यांत आहेत असीं पांच सुवर्णाचीं फलें ठेवून लोकपालांस बलि द्यावे.

---

परेद्युस्तिलाज्यचरुभिरष्टशतंवनस्पतिमंत्रेणहुत्वाजातकर्मादिविवाहांतसंस्कारान्कृत्वाभि

षिक्तःकर्तापुष्पांजलिमादायप्रार्थयेत् येशाखिनःशिखरिणांशिरसांविभूषायेनंदनादिषुवनेषु कृतप्रतिष्ठाः येकामदाःसुरनरोरगकिन्नराणांतेमेनतस्यदुरितार्तिहराभवंतु एतेद्विजाविधिवदत्र हुतोहुताशःपश्यत्वसौचहिमदीधितिरंतरस्थः त्वंवृक्षपुत्रपरिकल्प्यमयावृतोसिकार्यंसदैवभव ताममपुत्रकार्यं अंगादंगादितिस्पृष्ट्वाविप्रेभ्योदक्षिणांदत्वाविसृजेत् इतिवटादितरुपुत्रविधिः॥

यानंतर दुसऱ्या दिवशीं तिल, आज्य आणि चरु यांचा आठशें होम वनस्पतिमंत्रानें करून जातकर्मापासून विवाहापर्यंत संस्कार करून अभिषेक केलेला असा कर्ता यानें पुष्पांजलि घेऊन प्रार्थना करावी. प्रार्थनेचे मंत्र—येशाखिनःशिखरिणांशिरसांविभूषायेनंदनादिषुवनेषुकृतप्रतिष्ठाः॥ येकामदाःसुरनरोरगकिंनराणांतेमेनतस्यदुरितार्तिहराभवंतु॥ एतेद्विजाविधिवदत्रहुतोहुताशःपश्यत्वसौचहिमदीधितिरंतरस्थः॥ त्वंवृक्षपुत्रपरिकल्प्यमयावृतोसि कार्यं सदैव भवता मम पुत्रकार्यं" ह्या मंत्रांनीं प्रार्थना करून "अंगादंगात्सं०" ह्या मंत्रानें वृक्षाला स्पर्श करून ब्राह्मणाला दक्षिणा देऊन विसर्जन करावें. याप्रमाणें वटादितरूंचा पुत्रविधि सांगितला.

---

अथसकलकर्मसाधारणपरिभाषा सर्वेषुपाकयज्ञेषुभवेद्ब्रह्माकृताकृतः पात्रासादनमिच्छातआज्यादिश्रपणादिच स्रुवादिमार्जनंचेध्मरज्जुप्रहरणंतथा पूर्णपात्रंभवेन्नित्यमाज्यस्योत्पवनेतथा व्रीहीणामवघातश्चतंडुलेषुकृताकृतः द्रवीभूतघृतस्यापिविलापनविधिस्तथा प्रतिपदोक्ताज्यहोमेपरिस्तरणंविकल्पितं अनादिष्टाज्यहोमेतुनित्यं आज्यभागसहिततद्रहितकर्मणोस्तंत्रप्रयोगेआज्यभागाननुष्ठानमेवयुक्तं सर्वत्राज्यभागयोर्विकल्पात् अनेकपाकयज्ञानामेककालानुष्ठानेसमानतंत्रता तेनस्विष्टकृदाद्येकमेव यत्रद्रव्यंनोक्तंतत्राज्यंग्राह्यं मंत्रांतेकर्मकर्तव्यं मंत्रस्यकरणत्वतः कर्माभ्यासेतुमंत्रस्याप्यावृत्तिर्गृह्यकर्मणि समंत्रकहोमेतूष्णींनिर्वापः नाम्नाहोमेनाम्नैवनिर्वापादि यत्रमंत्रेणनाम्नावाहोमोनोक्तस्तत्रनाम्नैवहोमः समंत्रकहोमेसहैवानेकदैवत्यचरुपाकेपिनविभागोनाभिमर्शश्च अनुक्तौदक्षिणकरः दिशामनुक्तौप्राच्युदीचीशान्यः तिष्ठन्नासीनइत्याद्यनुक्तावासीनतैव अनादेशेस्वयंकर्ता अविज्ञातस्वरोमंत्रःसौत्रएकश्रुतिर्भवेत् होमेषुमंत्रंस्वाहांतंप्रणवाद्यंचकारयेत् विप्रादीनांद्विदर्भंस्यात्पवित्रंग्रथितंनवा॥

## यानंतर सकलकर्मांची साधारण परिभाषा सांगतों.

सर्व पाकयज्ञांमध्यें ब्रह्मा कृताकृत आहे. पात्रासादन, आज्यादि द्रव्यांचें श्रपण इत्यादि हीं ऐच्छिक होत. स्रुवादि पात्रांचें संमार्जन, इध्माचें रज्जुप्रहरण, पूर्णपात्र, आज्योत्पवन हीं नित्य होत. तंडुलांचे ठायीं व्रीहींचा अवघात ( कंडन ) कृताकृत आहे. द्रवीभूत जें घृत त्याचा विलापनविधिहि कृताकृत आहे. प्रतिपदोक्त जो आज्यहोम त्यामध्यें परिस्तरण वैकल्पित ( कृताकृत ) आहे. अनादिष्ट जो आज्यहोम त्यामध्यें परिस्तरण नित्य आहे. आज्यभागसहित व आज्यभागरहित जीं कर्में त्यांच्या तंत्रप्रयोगामध्यें आज्यभाग देऊं नयेत हेंच योग्य होय. कारण, सर्वत्र ठिकाणीं आज्यभागांचा विकल्प आहे. अनेक पाकयज्ञांचें एककालीं अनुष्ठान कर्तव्य असतां समानतंत्र करावें असें आहे. यावरून स्विष्टकृत् इत्यादिक

एकच करावें. जेथें द्रव्य सांगितलें नाहीं तेथें आज्य ग्रहण करावें. मंत्र हा कर्माचें साधन असल्यामुळें मंत्राच्या अंतीं कर्म करावें. गृह्यकर्मामध्यें कर्माची आवृत्ति असेल तर मंत्राची आवृत्ति करावी. समंत्रक होमामध्यें मंत्रविरहित निर्वाप करावा. नाममंत्रानें होम असतां नाममंत्रानेंच निर्वापादिक करावें. जेथें मंत्रानें अथवा नाममंत्रानें होम सांगितला नाहीं तेथें नाममंत्रानेंच होम करावा. समंत्रक होमामध्यें बरोबरच अनेक दैवत्य चरूचें श्रपण असतांहि विभाग व अभिमर्श करूं नये. अमुक हस्तानें कर्म करावें असें जेथें सांगितलें नसेल तेथें दक्षिण हस्त जाणावा. जेथें दिशा सांगितली नसेल तेथें पूर्व, उत्तर अथवा ईशानी दिशा घ्याव्या. जेथें उभा राहून किंवा बसून इत्यादिक सांगितलें नसेल तेथें आसीन ( बसून ) कर्म करावें. जेथें कर्ता सांगितला नसेल तेथें स्वयं ( यजमान ) कर्ता जाणावा. अविज्ञात आहेत स्वर ज्याचे तो व सूत्रोक्त हे मंत्र एकश्रुतीनें ( सरळ ) ह्मणावे. होमामध्यें मंत्रोच्चार करणें तो प्रणव आहे पूर्वी ज्यास व स्वाहाकार आहे अंतीं ज्यास असा मंत्र ह्मणावा. विप्रादिकांनीं दोन दर्भांचें पवित्रक धारण करावें; तें पवित्रक ग्रंथियुक्त करावें किंवा न करावें.

---

**आहुतिप्रमाणं कर्षप्रमाणमाज्यादिलाजामुष्टिमितामताः अन्नंग्राससमंग्राह्यंकंदानामष्ट मोंशकः तिलसक्तुकणादीनांमृगीमुद्राप्रमाणतः ॥**

**आहुतीचें प्रमाण.**—प्रत्येक आहुतीस आज्यादि पातळ द्रव्य एक कर्ष ( शास्त्रीयमानानें एक तोळा ) प्रमाण घ्यावें. लाह्या मुष्टिपरिमित, अन्न ( चरु ) ग्रासपरिमित; कंदाचा अष्टमांश; तिळ, सक्तु ( पीठ ) आणि धान्यादिक यांची आहुति मृगीमुद्राप्रमाण घ्यावी. याप्रमाणें आहुतीचें प्रमाण जाणावें.

---

**ताम्रपात्रेणपिहितेताम्रपात्रादिकेशुभे अग्निप्रणयनंकार्यंन्मृन्मयेराजतादिके उत्तमः श्रोत्रियागारान्मध्यमःस्वगृहादितः नाप्रोक्षितमिंधनमग्नावादध्यात् सदोपवीतिनाभाव्यंसदा बद्धशिखेनच सदेतिकर्मांगतापुरुषार्थताच तेनकर्मकालेशिखाबंधाद्यभावेप्रायश्चित्तद्वयम न्यदैकमेव दशविधादर्भाउक्ताः वटप्लक्षबिल्ववैकंकतचंदनदेवदारुसरलवृक्षजाअपिक्वचित्समिधः प्रभुःप्रथमकल्पस्ययोनुकल्पेनवर्तते सनाप्नोतिफलंतस्यपरत्रेतिश्रुतिःस्मृतिः बहुल्पंवास्वगृह्योक्तंयस्ययत्कर्मचोदितं तस्यतावतिशास्त्रार्थेकृतेसर्वः कृतोभवेत् ॥**

“ रौप्यपात्र किंवा तांब्याचें पात्र अथवा मृत्तिकापात्र यांत अग्नि घेऊन त्या पात्रावर, तांब्याच्या पात्राचें आच्छादन घालून तो अग्नि आणावा. श्रोत्रियाचे घरांतून घ्यावा तो उत्तम, आपल्या गृहादिकांतून घ्यावा तो मध्यम होय.” अग्नींत इंधनें ह्मणजे ( काष्ठें ) घालणें तीं उदकानें प्रोक्षित न केलेलीं घालूं नयेत. सदा ( सार्वकाल ) उपवीती, शिखाबंधन केलेला असें असावें. ‘ सदा ’ असें जें पद यानें शिखाबंधन हें कर्माचें अंग असून पुरुषार्थपणा आहे असें सूचित केलें. यावरून असें सिद्ध होतें कीं, कर्मकालीं शिखाबंधनादिक न केलें असतां दोन प्रायश्चित्तें प्राप्त होतात, इतर कालीं एकच प्राप्त होतें. दहा प्रकारचे दर्भ सांगितले. वट, प्लक्ष ( पिंपरी ), बेल, वैकंकत ( वेहकळी ), चंदन, देवदारु आणि सरल ह्या वृक्षांच्याहि समिधा क्वचित् सांगितल्या आहेत. “ प्रथम कल्पानें ह्मणजे मुख्य

कल्पानें कर्म करण्यास समर्थ असून जो अनुकल्पानें गौणकल्पानें कर्म करितो त्यास त्या कृतकर्माचें फल परलोकीं मिळत नाहीं अशी श्रुति व स्मृति आहे. आधिक किंवा उणें ज्यास जें आपल्या गृह्यसूत्रांत कर्म सांगितलेलें तें तितकें त्यानें यथाशास्त्र केलें असतां सर्व शास्त्रार्थ केल्यासारखा होतो."

---

अथकर्मविशेषेग्निनामानि अग्निस्तुमरुतोनामगर्भाधानेविधीयते पवमानःपुंसवनेसीमंते मंगलाभिधः प्रबलोजातसंस्कारेपार्थिवोनामकर्मणि अन्नाशनेशुचिःप्रोक्तःसभ्यःस्याच्चौलकर्मणि व्रतादेशेसमुद्भवः गोदानादौसूर्यः विवाहेयोजकः आवसथ्येद्विजनामाप्रायश्चित्तेविटः पाकयज्ञेषुपावकः पित्र्येकव्यवाहनः दैवेहव्यवाहनः शांतिकेवरदः प्रोक्तः पौष्टिकेबलवर्धनः मृतदाहेक्रव्यादः ज्ञात्वैवमग्निनामानिगृह्यकर्मसमारभेत् पलाशेनजुहूः कार्याखदिरेण स्रुवःस्रुचः तदभावेयथालाभयज्ञियवृक्षजाः तदभावेपलाशमध्यपर्णैर्वापिप्पलपर्णैर्वाहोमः एवंचमसादयोपिखदिरादियज्ञियवृक्षजाः काम्येप्रतिनिधिर्नास्तिनित्येनैमित्तिकेहिसः काम्येप्युपक्रमादूर्ध्वमन्येप्रतिनिधिंविदुः नस्यात्प्रतिनिधिर्मंत्रकर्मदेवाग्निकर्तृषु नदेशारणिकालेषुत्रिषुप्रतिनिधिर्मतः नापिप्रतिनिधातव्यंनिषिद्धंवस्तुकुत्रचित् स्वकालादुत्तरोगौणःकालःसर्वस्यकर्मणः तर्पणेष्वासनेश्राद्धेभुक्तौमूत्रपुरीषयोः षट्सुनिर्माल्यकादर्भादर्व्याद्याअभिचारके मंत्रोपियश्चशूद्रार्थेब्राह्मणःप्रेतभोजने ॥

## यानंतर कर्माच्या विशेषेंकरून अग्नीचीं नामें सांगतों.

"गर्भाधान संस्कारामध्यें जो अग्नि स्थापन करितात तो मरुतनामक जाणावा. पुंसवनाचे ठायीं जो अग्नि तो पवमानसंज्ञक, सीमंतोन्नयनीं मंगलनामा, जातकर्मसंस्कारीं प्रबलनामक, नामसंस्कारीं पार्थिवसंज्ञक, अन्नप्राशनीं शुचिनामा, चौलसंस्कारीं सभ्य, व्रत ह्मणजे मौंजी इत्यादि व्रतीं समुद्भवनामा, गोदान इत्यादिकांचे ठायीं सूर्यनामा, विवाहसंस्कारीं योजक, आवसथ्य ह्मणजे गृह्याग्निसंबंधी कर्म त्याचे ठायीं द्विजसंज्ञक होय. प्रायश्चित्ताचा विट, पाकयज्ञांचे ठायीं पावकनामा, पित्र्यकर्माचे ठायीं कव्यवाहन, दैवकर्माचे ठायीं हव्यवाहन, शांतिकर्मामध्यें वरदनामा, पौष्टिक कर्मामध्यें बलवर्धननामक, मृताच्या दहनाविषयीं जो अग्नि तो क्रव्याद, याप्रमाणें अग्नीचीं नामें जाणून गृह्याग्निसंबंधी कर्माला आरंभ करावा." "पळसाच्या काष्ठाची जुहू करावी. खदिराच्या काष्ठाचीं स्रुवा व स्रुचि हीं पात्रें करावीं." ते वृक्ष न मिळतील तर यथासंभव यज्ञिय ( यज्ञास योग्य ) वृक्षांचीं करावीं. यज्ञियवृक्षाचा अभाव असतां पळसाच्या मध्यम पर्णांनीं अथवा पिंपळाच्या पर्णांनीं होम करावा. याप्रमाणें चमस इत्यादिक पात्रेंहि खदिर इत्यादि यज्ञियवृक्षांचीं करावीं. "काम्य कर्मांत प्रतिनिधि करूं नये. नित्यकर्म व नैमित्तिक कर्म यांमध्यें प्रतिनिधि होतो. काम्य कर्मामध्येंहि आरंभानंतर प्रतिनिधि करावा असें दुसरे ग्रंथकार सांगतात. मंत्र, कर्म, देवता, अग्नि आणि कर्ता यांचे ठायीं प्रतिनिधि करूं नये. देश, अरणी आणि काल यांचे ठायीं प्रतिनिधि करूं नये. कोणत्याहि कर्मामध्यें निषिद्ध पदार्थ प्रतिनिधिस्थानीं योजूं नये. सर्व कर्माचा जो स्वकाल त्याहून जो पुढचा काल तो गौण होय. तर्पण, श्राद्ध, आसन, भोजन, मूत्र, पुरीष या सहांचे

ठायीं दर्भ निर्माल्य होतात; अभिचारकर्माचे ठायीं दर्वी आदिकरून जीं पात्रें तीं निर्माल्य होतात ह्मणजे त्या त्या कर्मानंतर ते दर्भ, व पात्रें अन्य कर्मास योग्य नाहींत. शूद्राच्या कार्याविषयीं योजलेला मंत्र, व प्रेतश्राद्धीं भोजन केलेला ब्राह्मण हे निर्माल्य होत."

---

अथकर्मांगदेवताः विवाहस्याग्निर्देवता तेनविवाहांगभूतस्वस्तिवाचनाद्यंतेकर्मांगदेवताग्निःप्रीयतामितिवदेत् औपासनेग्निसूर्यप्रजापतयः स्थालीपाकेग्निः गर्भाधानेब्रह्मापुंसवनेप्रजापतिः सीमंतेधाता जातकर्मणिमृत्युः नामकर्मनिष्क्रमणान्नप्राशनेषुसविताचौलेकेशिनः उपनयनेइंद्रश्रद्धामेधाः अंतेसुश्रवाः पुनरुपनयनेग्निः समावर्तनस्येंद्रः उपाकर्मणिव्रतेषुचसविता वास्तुहोमेवास्तोष्पतिरंतेप्रजापतिः आग्रयणेआग्रयणदेवताः सर्पबलेःसर्पाः तडागादीनांवरुणः ग्रहयज्ञेआदित्यादिनवग्रहाः कूष्मांडहोमेचांद्रायणेअग्न्याधानेचाग्न्यादयः अग्निष्टोमस्याग्निः अन्येष्विष्टकर्मसुप्रजापतिरिति ॥

## यानंतर कर्मांच्या अंगदेवता सांगतों.

विवाहाची देवता अग्नि आहे याकरितां विवाहाचीं अंगभूत जीं पुण्याहवाचन इत्यादि कर्में त्यांच्या अंतीं "कर्मांगदेवता अग्निः प्रीयतां" असें ह्मणावें. औपासनाचे ठायीं अग्नि, सूर्य आणि प्रजापति ह्या देवता होत. स्थालीपाकाची अग्निदेवता. गर्भाधानाची ब्रह्मा. पुंसवनसंस्काराची प्रजापति. सीमंतोन्नयनाची धाता. जातकर्माची मृत्यु. नामकर्म, निष्क्रमण, अन्नप्राशन यांची देवता सविता. चौलसंस्काराची केशिन. उपनयनाच्या इंद्र, श्रद्धा व मेधा ह्या देवता, अंतीं सुश्रवा देवता. पुनरुपनयनाची अग्नि देवता. समावर्तनाची इंद्र देवता. उपाकर्म व महानाम्न्यादि व्रतें यांची सविता. वास्तुहोमाचे ठायीं वास्तोष्पति, त्याच्या अंतीं प्रजापति देवता. आग्रयणाची आग्रयण देवता. सर्पबलीच्या सर्पदेवता. तडागादिकांची वरुण देवता. ग्रहयज्ञाच्या आदित्यादि नवग्रह देवता. कूष्मांड होम, चांद्रायण आणि अग्न्याधान यांच्या अग्न्यादिदेवता. अग्निष्टोमाची अग्नि देवता. इतर जीं इष्ट कर्में त्यांच्या देवता प्रजापति.

---

अथकलियुगेकार्याकार्यविवेकः गीतागंगातथाविष्णुःकपिलाश्वत्थसेवनं एकादशीव्रतंचैवसप्तमंनकलौयुगे विष्णुंशिवंवाभजतांगुरोःपित्रोश्चसेविनां गोवैष्णवमहाशैवतुलसीसेविनामपि नस्यात्कलिकृतोदोषःकाश्यांनिवसतामपि कलौगुरूणांभजनमीशभक्त्यधिकंस्मृतं जपादौयत्रयासंख्याकलौसास्याच्चतुर्गुणा कलौदानंमहाश्रेष्ठंशिवविष्णोश्चकीर्तनं कृतेयद्दशभिर्वर्षैस्त्रेतायांहायनेनतु द्वापरेतत्तुमासेनअहोरात्रेणतत्कलौ प्रथमस्कंधेकुशलान्याशुसिध्यंति नेतराणिकृतानियदितिकलौपुण्यकर्मणांसंकल्पेपिसिद्धिः पापानांत्वाचरणादेवेत्युक्तं स्मृत्यंतरविरोधेतुकलौपाराशरीस्मृतिः ध्यायन्कृतेयजन्यज्ञैस्त्रेतायांद्वापरेर्चयन् यदाप्रोतितदाप्रोतिकलौसंकीर्त्यकेशवमितिहेमाद्रौव्यासवचनं अत्रकृतयुगाद्यधिकरणकध्यानादिफलार्थेकल्यधिकरणकंकीर्तनंविधीयतइतिवाक्यार्थःकौस्तुभकर्तृपितामहैर्भक्तिनिर्णयेविस्तरेणनिरूपितः हे

**माद्रौकलिंसभाजयंत्यार्यागुणज्ञाःसारभागिनः यत्रसंकीर्तनेनैवसर्वःस्वार्थोभिलभ्यतइतिश्रीभागवतवचनमुदाहृत्यसंकीर्तनेनहरिसंकीर्तनेनेत्यर्थइतिहेमाद्रावेवव्याख्यातं कृष्णवर्णंत्विषाकृष्णंसांगोपांगास्त्रपार्षदं यज्ञैःसंकीर्तनप्रायैर्यजंतिहिसुमेधसः यज्ञादिस्वस्वाचारमाचरद्भिरपि** कालेषुसंकीर्तननिष्ठैर्भाव्यमित्याशयइतिकौस्तुभे **अनेनचतुर्वर्गफलंनारायणाश्रयणमात्रेणभवतीतिसिद्धं** यावैसाधनसंपत्तिःपुरुषार्थचतुष्टये **तयाविनातदाप्नोतिनरोनारायणाश्रयइतिभारतोक्तेः ॥**

## यानंतर कलियुगीं करावें कोणतें व न करावें कोणतें याचा निर्णय सांगतों.

"गीता, गंगा, विष्णु, कपिलागाई, अश्वत्थसेवा आणि एकादशीव्रत हीं सहा सेव्य आहेत, सातवें कलियुगामध्यें नाहीं. विष्णु, शिव, यांचें भजन करणारे; गुरु व मातापिता यांची सेवा करणारे; गाई, वैष्णव, महाशैव आणि तुलसी यांची सेवा करणारे; काशीक्षेत्रांत वास करणारे या सर्वांला कलिसंबंधी दोष प्राप्त होत नाहीं. कलियुगामध्यें गुरुभजन देवाच्या भक्तीहून विशेष असें सांगितलें आहे. जपादिकांविषयीं जी संख्या सांगितली ती कलियुगीं चौपट जाणावी. शिव व विष्णु यांचें नामसंकीर्तन व दान हीं कलियुगांत महाश्रेष्ठ होत. कृतयुगीं जी दहा वर्षांनीं सिद्धि होते ती त्रेतायुगीं एक वर्षानें, द्वापरयुगांत एक मासानें, आणि कलियुगांत एका अहोरात्रानें सिद्धि होते." **प्रथमस्कंधांत**—"ज्या कलियुगाचे ठायीं कुशलें ह्मणजे पुण्यें शीघ्र फलद्रूप होतात, तसीं इतर ह्मणजे पापें शीघ्र सिद्ध होत नाहींत." कारण, केलेलीं पापें तींच सिद्ध होतात, असें वचन असल्यामुळें कलियुगीं पुण्यकर्माची संकल्पमात्रेंकरूनहि सिद्धि होते; पापें आचरण केलेलीं तींच सिद्ध होतात असें सांगितलें आहे. "दुसऱ्या स्मृतीशीं विरोध असेल तर कलियुगीं पाराशरस्मृति ग्रहण करावी." "कृतयुगीं ध्यान करून, त्रेतायुगांत यज्ञेंकरून आणि द्वापारयुगांत पूजा करून जें प्राप्त होतें तें कलियुगांत केशवाच्या नामसंकीर्तनानें प्राप्त होतें." असें **हेमाद्रींत** व्यासाचें वचन आहे. ह्या स्थलीं कृतयुगादिकांत जें ध्यानादिकानें फल सांगितलें त्याच्या प्राप्त्यर्थ कलियुगांत केशवाचें कीर्तन करावें असा वाक्यार्थ, कौस्तुभाचा कर्ता जो अनंतदेव त्याच्या पितामहांनीं भक्तिनिर्णयग्रंथांत विस्तारानें निरूपण केला आहे. हेमाद्रीमध्यें, "चार युगांमध्यें कलिच श्रेष्ठ होय असें समजून कलीचा गुण जाणणारे, गुणाचा अंश ग्रहण करणारे असे आर्य ह्मणजे साधु कलीची प्रशंसा करितात. कारण, ज्या कलीमध्यें संकीर्तनेंकरूनच सर्व स्वार्थ प्राप्त होतो," असें श्रीभागवतांतील वचन सांगून संकीर्तन ह्मणजे हरिकीर्तन असा अर्थ, याप्रमाणें हेमाद्रीमध्येंच सांगितलें आहे. "अंगें ह्मणजे हृदयादिक, उपांगें ह्मणजे कौस्तुभादिक, अस्त्र ह्मणजे सुदर्शन, पार्षद ह्मणजे सुनंदनंदादिक यांहींयुक्त, व कांतीकरून इंद्रनीलमण्यासारखा उज्ज्वल असा जो कृष्ण परमात्मा त्याची पूजा, प्रायशः नामोच्चारण आहे ज्यामध्यें अशा यज्ञेंकरून विवेकी करितात." पंचमहायज्ञादिक आपापल्या आचारानें आचरण करणारे जे त्यांनींहि कीर्तननिष्ठ व्हावें ह्मणजे आपलें नित्य कर्म करून जो अवशिष्ट

काल त्या काली भगवन्नामसंकीर्तन करावें असा अभिप्राय कौस्तुभांत आहे. येणेंकरून धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ह्या चतुर्विध पुरुषार्थाचें फल प्राप्त होणें तें नारायणाच्या आश्रयमात्रानें होतें असें सिद्ध झालें; कारण, धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांचे प्राप्तीविषयीं जी साधनसंपत्ति तीवांचून नारायणाश्रय मनुष्यास ते ( धर्मार्थकाममोक्ष ) प्राप्त होतात, असें भारतांतील वचन आहे.

---

**श्रीभागवतेपि धर्मार्थकाममोक्षाख्यंयइच्छेच्छ्रेयआत्मनः एकंह्येवहरेस्तत्रकारणंपादसेवनमिति अत्रएकपदावधारणादिपदैरन्यसाधनानपेक्षत्वंभक्तियोगस्योच्यते ज्ञानयोगादेश्चहरिपादसेवनसापेक्षत्वंध्वन्यते तथाचस्पष्टमेकादशादौ तस्मान्मद्भक्तियुक्तस्ययोगिनोवैमदात्मनः नज्ञानंनचवैराग्यंप्रायःश्रेयोभवेदिह यत्कर्मभिर्यत्तपसाज्ञानवैराग्यतश्चयत् योगेनदानधर्मेणश्रेयोभिरितरैरपि सर्वंमद्भक्तियोगेनमद्भक्तोलभतेंजसा स्वर्गापवर्गमद्धामकथंचिद्यदि** वांछतीति श्रेयःस्रुतिंभक्तिमुदस्यतेविभोक्लिश्यंतियेकेवलबोधलब्धये तेषामसौक्लेशलएवशिष्यते नान्यद्यथास्थूलतुषावघातिनामित्यादिपरसहस्रवचनानि ज्ञानयोगस्यभगवदाराधनंतत्प्रसादंचविनैवसिद्धिरितिक्वापिकेनाप्यनुक्तेश्च सर्वापेक्षाचयज्ञादिश्रुतेरश्ववदित्यधिकरणेज्ञानोत्पत्तौयज्ञादिसर्वसाधनापेक्षोक्तेश्च किंचभक्तियोगेदुराचारिणोपिदृढवैराग्यरहितस्याप्यधिका**रोगम्यते अपिचेत्सुदुराचारोभजतेमामनन्यभाक् साधुरेवसमंतव्यःसम्यग्व्यवहितोहिसः क्षिप्रंभवतिधर्मात्माशश्वच्छांतिंनिगच्छति कौंतेयप्रतिजानीहिनमेभक्तःप्रणश्यति ननिर्विण्णोनातिसक्तोभक्तियोगोस्यसिद्धिदइत्यादिवचनेभ्यः नैवंदुराचारिणापिदृढवैराग्यादिसाधनचतुष्टयसंपत्त्यभावेपिवेदांतश्रवणाद्यनुष्ठितौज्ञानोत्पत्तिर्भवतीतिक्वाप्युपलभ्यते नचयथोक्ताधिकारसंपत्तिंविनानुष्ठितंसाधनंकिमपिफलायकल्पते तस्मात्सर्वथासर्वैःकलौश्रीहरिपादसेवनादिभक्तियोगाश्रयणमेवकर्तव्यमितिसिद्धं ॥**

**श्रीभागवतांतहि सांगतो.**— "जो मनुष्य धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष एतन्नामक कल्याणाची इच्छा करील त्यास त्याच्या प्राप्तीविषयीं एकच हरीचें पादसेवन कारण होय." ह्या वाक्यांत एकपद, अवधारणादि पदें आहेत यांहींकरून भक्तियोगास इतर साधनांची गरज नाहीं असें सूचित होतें, व ज्ञानयोगादिकांस हरिपादसेवेची अपेक्षा आहे असा ध्वनितार्थ निघतो. तसेंच अकरावा इत्यादिक स्कंधांत स्पष्ट सांगितलें आहे तें असें.— "माझ्या भक्तीनें युक्त अतएव माझे ठायीं आहे आत्मा ह्मणजे चित्त ज्याचें असा जो योगी त्याचें श्रेयःसाधन बहुधा ज्ञान व वैराग्य हीं होणार नाहींत, जें कर्मांनीं प्राप्त होणारें, जें तपश्चर्येनें प्राप्त; ज्ञान, वैराग्य यांहींकरून जें प्राप्त; योग, दान, धर्म व इतर श्रेयःसाधनें जीं तीर्थव्रतादिक यांहींकरून जें प्राप्त तें सर्व माझ्या भक्तियोगानें माझ्या भक्ताला अनायासेंकरून प्राप्त होतें. स्वर्ग, मोक्ष व वैकुंठ यांची जरी कदाचित् इच्छा करील तरी तींहि प्राप्त होतात." " भक्तीवांचून ज्ञानाची प्राप्ति नाहीं असें प्रतिपादन करितात. हे विभो, अभ्युदय, मोक्ष, यांतें देणारी अशी तुझी भक्ति सोडून जे पुरुष ज्ञानप्राप्तीविषयीं यत्न करितात त्यांला केवळ क्लेश मात्र होतात; दुसरें कांहीं प्राप्त नाहीं; याविषयीं दृष्टांत—जाडा कोंडा घेऊन

त्याचें कंडण करणारे जसे क्लेश पावतात, तद्वत् तुझी भक्ति तुच्छ मानून ज्ञानाविषयीं विचार करणारे होत," इत्यादि आणखी हजारों वचनें आहेत. भगवदाराधन व भगवत्प्रसाद यांवांचून ज्ञानयोगाची सिद्धि होते असें कोणीहि कोणत्याहि ठिकाणीं सांगितलेलें नाहीं. "सर्वापेक्षाचयज्ञादिश्रुतेःअश्ववत्" ह्या अधिकरणांत 'अश्व जसा रथवहनाला साधन आहे' ह्या दृष्टांतानें "विविदिषंतियज्ञेन" या श्रुत्यनुरोधानें ज्ञानोत्पत्तीविषयीं यज्ञादि सर्व साधनांची आवश्यकता आहे असें सांगितलें आहे. आणखी दृढवैराग्यरहित, दुराचारी असा जरी असेल तथापि त्यालाहि भक्तियोगाविषयीं अधिकार आहे. "अत्यंत दुराचारी असा जरी असेल आणि दुसऱ्या देवतेची भक्ति न करितां माझेंच भजन पूजन करील तर तो साधुच आहे असा मानावा. कारण, 'मी परमेश्वराच्या भजनानेंच कृतार्थ होईन, असा त्यानें सत्व्यवसाय केला आहे." तो दुराचारी असेल तथापि मातें भजणारा धर्मात्मा होऊन परमेश्वरनिष्ठारूप शांतीतें पावतो. हे कौंतेय अर्जुना, अशी प्रतिज्ञा जाण कीं, माझा भक्त कधींहि नाश पावत नाहीं. निर्विण्ण नसला आणि अति आसक्त नसला तरी त्यास भक्तियोग सिद्धि देणारा होतो" इत्यादि वचनें आहेत. दुराचारी असेल तथापि त्यानेंहि दृढवैराग्यादिक जीं चार साधनें तद्रूप संपत्ति त्याच्या अंगीं नसेल तथापि वेदांताचें श्रवणादिक केलें असतां ज्ञानोत्पत्ति होते असें कोठेंहि प्रमाण मिळत नाहीं. यथोक्ताधिकारसंपत्तीवांचून कांहींएक साधन आचरण केलें असतां त्यापासून फलप्राप्ति होत नाहीं. तस्मात् सर्वात्मभावेंकरून सर्वांनीं कलियुगामध्यें श्रीहरिचरणांची सेवा करणें इत्यादिक जो भक्तियोग त्याचाच आश्रय करावा असें सिद्ध होतें.

---

अथकलौनिषिद्धानि समुद्रयातुःस्वीकारःकमंडलुविधारणं द्विजानामसवर्णासुकन्यासूपयमस्तथा देवराद्यैःसुतोत्पत्तिर्मधुपर्केपशोर्वधः मांसदानंतथाश्राद्धेवानप्रस्थाश्रमस्तथा दत्ताक्षतायाःकन्यायाःपुनर्दानंपरस्यच दीर्घकालंब्रह्मचर्यंनरमेधाश्वमेधकौ महाप्रस्थानगमनं गोमेधश्चतथामखः इमान्धर्मान्कलियुगेवर्ज्यानाहुर्मनीषिणः मद्यंवर्ज्यमहापापेमरणांतविशोधनं सौत्रामण्यादियज्ञेपिसुरापात्रग्रहस्तथा मद्यभक्षादिवामाद्यागमस्तुनमानता मीमांसाद्वितयेसर्वेशिष्टैश्चतदनादरात् औरसोदत्तकश्चैतौपुत्रौकलियुगेस्मृतौ अन्यान्दशविधान्पुत्रान्क्रीताद्यान्वर्जयेत्कलौ कौस्तुभेस्वयंदत्तस्तृतीयोपिकलौविहितइति नवैवकलौनिषिद्धाइत्युक्तं कलियुगेब्रह्महंत्रादेरेवान्यवहार्यत्वादिरूपंपातित्यं तत्संसर्गिणस्तुनरकहेतुदोषसत्त्वेपिपातित्यंनास्ति संसर्गदोषःपापेष्वितिकलिवर्ज्येषुवचनात्कृतेसंभाष्यपततित्रेतायांस्पर्शनेनतु द्वापरेत्वन्नमादायकलौपततिकर्मणेतिवचनाच्च ब्रह्महननादिकर्मणैवपातित्यंनसंसर्गमात्रेणेतितदर्थात् इदंचलोकेष्वबहिष्कृतपातकिषुलोकविद्विष्टत्वेनापरिहार्यसंसर्गेपातित्याभावपरं नहिलोकेष्वबहिष्कृतानांप्रच्छन्नाभक्ष्यभक्षणापेयपानागम्यागमनादिपातकवतांतज्ज्ञानवतातिशिष्टेनापिसंभाषणादिसंसर्गोनरकहेतुरपिपरिहर्तुंशक्यतेलोकविद्वेषापातात् लोकबहिष्कृतपापिनांसंसर्गस्तुपातित्यहेतुरेव तथैवशिष्टाचारादितिमेभाति अतएवत्यजेद्देशंकृतयुगेत्रेतायांग्राममुत्सृजेत् द्वापरेकुलमेकंतुकर्तारंतुकलौयुगेइतिवाक्येकर्तृत्यागोविधीयते त्या

गोहिंसंसर्गपरिहारएव किंचानेनवाक्येनयत्रकुलादौब्रह्महत्यादिपातकीनिष्पद्यतेतत्कुलादिकंद्वापरादावेवबहिष्कार्यंनतुकलौकुलादेर्बहिष्कारः किंतुकर्तुरेवकलौबहिष्कारइतिप्रतिपाद्यते नचैतद्वाक्यविरोधिवाक्यांतरंपतितसगोत्रसपिंडादीनांकर्मानर्हत्वासंव्यवहार्यत्वप्रतिपादकंक्कापिग्रंथेउपलभ्यते यत्तुनिर्णयसिंधौघटस्फोटप्रकरणेगृहेषुस्वैरमापद्येरन्इतिवसिष्ठवचनसामर्थ्यात् पात्रनिनयनात्प्राक्पतितज्ञातीनांधर्मकार्येष्वधिकारोनास्तीत्यपरार्कव्याख्यानमुपन्यस्तंतन्नसर्वपतितविषयं किंतुघटस्फोटार्हप्रायश्चित्तानीच्छुपतितविषयं अन्यथापात्रनिनयनात्प्रागितिनवदेत् प्रायश्चित्तात्प्रागित्येववदेत् कर्तारंतुकलौयुगे इत्यादिप्रत्यक्षवचनेनविरोधेर्थापत्तिमूलकस्यसर्वपतितविषयककुलबहिष्कारवर्णनस्य पुरुषव्याख्यानरूपस्याप्रामाण्यापाताच्चेतिभाति इतिसंक्षेपः ॥

## यानंतर कलियुगांत निषिद्ध सांगतों.

द्विजांनीं नौकेंत बसून समुद्रपर्यटन करणाराचा स्वीकार करणें, उदकयुक्त कमंडलूचें धारण करणें, असवर्णकन्यांशीं[1] द्विजांनी विवाह करणें, दीरइत्यादिकांपासून पुत्र उत्पन्न करणें, मधुपर्कामध्यें पशूचा वध, श्राद्धांत मांस देणें, वानप्रस्थाश्रम स्वीकारणें, उदकपूर्वक दान केलेली जी अक्षता कन्या तिचें दान पुनः दुसऱ्यास करणें, दीर्घकाल ब्रह्मचर्य, नरमेध, अश्वमेध, महाप्रस्थानगमन ह्मणजे उत्तर दिशेची यात्रा करणें, गोमेधयज्ञ हे धर्म कलीमध्यें द्विजांनीं वर्ज्य करावे असें विद्वान् ह्मणतात. मद्यपान वर्ज्य करावें. महापापाविषयीं मरणांत प्रायश्चित्त, सौत्रामण्यादिक यज्ञांतहि सुरापात्राचें ग्रहण वर्ज्य करावें. मद्यभक्षणादिक जीं वाममार्गादिकाचीं शास्त्रें तीं मानूं नयेत; कारण, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा या दोनहि शास्त्रांत शिष्टांनीं मद्याचा निषेध केला आहे. औरस व दत्तक हे दोन पुत्र कलीमध्यें उक्त आहेत. इतर जे क्रीत इत्यादिक दहा प्रकारचे पुत्र ते कलीमध्यें वर्ज्य होत. कौस्तुभग्रंथांत स्वयंदत्त असा तिसराहि पुत्र कलीमध्यें विहित होय असें सांगून नऊच पुत्र कलीमध्यें निषिद्ध असें सांगितलें आहे. कलियुगांत ब्रह्महत्या करणारासच अव्यवहार्यत्वादिरूप पातित्य आहे, ब्रह्महत्या करणाराचा संसर्गी जो त्याला तर, नरकास कारण असा दोष आहे परंतु पातित्य नाहीं; कारण, पापामध्यें संसर्गदोष नाहीं असें कलिवर्ज्यांत वचन आहे. "कृतयुगांत पाप्याशीं संभाषणादिकानें पातित्य होतें; त्रेतायुगांत पाप्याला स्पर्श केल्यानें पातित्य, द्वापरयुगांत पाप्यापासून अन्नस्वीकार केला असतां पातित्य, आणि कलींत साक्षात् पापकर्म करावें तेव्हां पातित्य होतें, असेंहि वचन आहे. ब्रह्महत्या इत्यादि कर्मानेंच पातित्य प्राप्त होतें, संसर्गमात्रानें पातित्य नाहीं असा त्या वचनाचा अर्थ आहे याकरितां हें वचन लोकांमध्यें बहिष्कृत नसून जे पातकी त्यांविषयीं लोकविद्विष्टेंकरून परिहार करण्यास अशक्य असा जो संसर्ग त्याविषयीं पातित्य नाहीं एतत्पर जाणावें. लोकांत बहिष्कृत नाहींत परंतु गुप्तपणानें अभक्ष्यभक्षण, अपेयपान, अगम्यागमन, इत्यादि पातकें करणारे जे त्यांना जाणणाऱ्या महाशिष्टानेंहि, त्यांच्याशीं संभाषणादिक संसर्ग करणें हें जरी नरकास कारण आहे

---

१ स्वजातिभिन्न कन्या.

तथापि त्याचा परिहार करणें अशक्य आहे; कारण, तसें केल्यानें लोकांत द्वेष उत्पन्न होतो. लोकांतून बहिष्कृत झालेल्या पाप्यांचा संसर्ग तर, पातित्याला कारण आहेच आणि शिष्टाचारहि तसाच आहे असें मला वाटतें. याकरितां "कृतयुगांत देशाचा त्याग करावा, त्रेतायुगांत ग्रामाचा त्याग करावा, द्वापरयुगांत एक कुलाचा त्याग करावा आणि कलियुगांत तर, पातककर्त्याचा त्याग करावा; असें जें वाक्य त्यामध्यें कर्त्याचा त्याग करावा असा विधि प्राप्त होतो; त्याग ह्मणजे संसर्गाचा परिहारच जाणावा. आणखी ह्या वाक्येंकरून ज्या कुलादिकामध्यें ब्रह्महत्यादि पातकें करणारा उत्पन्न होतो तें कुलादिक द्वापरादिक युगांमध्येंच बहिष्कृत करावें; कलीमध्यें कुलादिकास बहिष्कार नाहीं; तर प्रत्यक्ष कर्त्यासच बहिष्कार असें प्रतिपादन होतें. ह्या वाक्याला विरुद्ध असें दुसरें वचन पतिताचे सगोत्र सपिंडांनीं कोणतेंहि कर्म करूं नये, व लोकांशीं कोणताहि व्यवहार करूं नये असें सांगणारें कोणत्याहि ग्रंथांत मिळत नाहीं. जें निर्णयसिंधूंत घटस्फोटप्रकरणीं "गृहामध्यें स्वैच्छ यावें," असें वसिष्ठवचन प्रबल मानून पात्रनिनयनाच्या पूर्वीं पतिताचे ज्ञातींला धर्मकार्याविषयीं अधिकार नाहीं असें अपरार्कग्रंथाचे व्याख्यानाचा उपन्यास केला तें सर्व पतितविषयक नाहीं तर घटस्फोटाविषयीं योग्य असून प्रायश्चित्ताची इच्छा न करणारा जो पतित तद्विषयक आहे. तसें नसतें तर 'पात्रनिनयनाच्या पूर्वीं,' असें न सांगतां 'प्रायश्चित्ताच्या पूर्वीं,' इतकेंच सांगितलें असतें. 'कलियुगांत कर्त्याचा त्याग करावा,' इत्यादिक जें प्रत्यक्ष वचन त्याच्याशीं विरोध असतां अर्थापत्तिमूलक, सर्व पतितविषयक, कुलबहिष्कारवर्णन, पुरुषव्याख्यानरूप जें तें अप्रमाण होईल असें वाटतें. याप्रमाणें संक्षेप सांगितला.

---

नचैवंघटस्फोटविधिर्व्यर्थइतिवाच्यं तस्यपारलौकिकदोषपरिहारार्थत्वात् लोकबहिष्कृतपातकिविषये संभाषणादिसंसर्गस्यपातित्यहेतुत्वाभावेपिपरत्रनरकजनकदोषहेतुत्ववत्पतितेनसहैककुलत्वसंसर्गस्यापीहपातित्यादिदोषहेतुत्वाभावेपिपारत्रिकदोषहेतुत्वात् अत्रचघटस्फोटविधेरेवार्थापत्तिविधायमानत्वात् तथाचपारत्रिकदोषपरिहारार्थंघटस्फोटविधिरितिनतद्विधिबलेनपतितमात्रस्यकुलेबहिष्कारः सत्राख्यंयज्ञःकलौवर्ज्यः ब्रह्महत्यादिमहापातकेषुप्रायश्चित्तेननरकनिवृत्तिर्नभवतिकिंत्विहलोकेव्यवहार्यतामात्रंकलौभवतिस्वर्णस्तेयादिषुतुप्रायश्चित्तेननरकनिवृत्तिर्व्यवहार्यताच केचित्तुरहस्यकृतेषुमहापापेषुरहस्यप्रायश्चित्तंकलौनोपदेष्टव्यमित्याहुः विप्रादिस्त्रीसंभोगेनभ्रष्टानांशूद्रादीनांप्रायश्चित्तेपिसंसर्गोनिषिद्धः यज्ञेपशुमारणंसोमविक्रयश्चविप्राणांकलौवर्ज्यः ज्येष्ठादिसर्वभ्रातॄणांसमभागःकलौस्मृतः आततायिद्विजानांनोधर्मयुद्धेपिहिंसनं अब्धौनौयातुर्द्विजस्यप्रायश्चित्तेपिसंसर्गोन गवार्थेब्राह्मणार्थेचप्राणत्यागःकलौनहि द्विजानांगोपशूद्रादौभोज्यान्नत्वंकलौनहि शिष्यस्यगुरुपत्नीषुनचिरंवासशीलता आपदिक्षत्रवैश्यादिवृत्तिविप्रःकलौत्यजेत् कलौद्विजोनहिभवेदश्वस्तनिकजीविकः द्वादशाब्दंगुरौवासंमुखाग्निधमनक्रियां यतेर्भिक्षांसर्ववर्णेकलौत्रीणिविवर्जयेत् नवोदकनिषेधंचद

---

१ शूद्रहस्तेनकार्यंनतुविप्रेणस्वयंकार्यमित्यर्थः ॥

क्षिणांगुरुवांछितां वृद्धरुग्णादिमरणंजलाग्निपतनादिभिः गोतृप्तिमात्रेभूमिष्ठेपयस्याचमन क्रियां पितृवादेसाक्षिदंडंकलौपंचविवर्जयेत् घृतदुग्धादिभिःपक्कमन्नंशूद्रात्कलौत्यजेत् भिक्षामटन्यतीरात्रौनवसेत्गृहिणांगृहे विधूमसन्नमुसलेकालेभिक्षांकलौत्यजेत् चत्वार्यब्दसहस्राणिचत्वार्यब्दशतानिच कलेर्यदागमिष्यंतितदात्रेतापरिग्रहः संन्यासश्चनकर्तव्योब्राह्मणेनविजानता त्रेतापरिग्रहःसर्वाधानं अर्धाधानंस्मृतंश्रौतस्मार्ताग्न्योस्तुपृथक्कृतिः सर्वाधानंतयोरैक्यकृतिःपूर्वयुगाश्रया अस्यापवादः यावद्वर्णविभागोस्तियावद्वेदःप्रवर्तते संन्यासंचाग्निहोत्रंचतावत्कुर्यात्कलौयुगेइति शपथाःशकुनाःस्वप्नाःसामुद्रिकमुपश्रुतिः देवपूजोपहारादेःसंकल्पःकार्यसिद्धये प्रश्नोत्तरंकालविदांसंभवंतिकलौक्वचित् इतिकलौकार्याकार्यनिर्णयः ॥

एतावता घटस्फोटाचा जो विधि सांगितला तो व्यर्थ असें ह्मणूं नये; कारण तो घटस्फोटविधि केल्यानें, परलोकसंबंधी दोषाचा परिहार होतो. लोकांतून बहिष्कृत केलेले जे पातकी त्यांच्याशीं संभाषण इत्यादि संसर्ग केला असतां तो संसर्ग जरी पातित्यास कारण नाहीं तथापि परलोकीं नरक उत्पन्न करणाऱ्या दोषास जसा कारण आहे, तसा पतिता-सहवर्तमान एककुलरूप संसर्ग या लोकीं पातित्यादि दोषाला कारण जरी नाहीं; तथापि तो परलोकसंबंधी दोषास कारण आहे. ह्या स्थलीं घटस्फोटविधि 'अर्थापत्ति' अशा प्रकारानें प्रमाणभूत आहे, व तसेंच परलोकसंबंधी दोषाचा परिहार होण्याकरितां घटस्फोटविधि आहे तेव्हां घटस्फोटविधीच्या सामर्थ्यानें पतितमात्राच्या कुलाचेठायीं बहिष्कार घडत नाहीं. सत्रनामक यज्ञ कलींत वर्ज्य करावा. कलियुगांत ब्रह्महत्या इत्यादि महापातकें झालीं असतां प्रायश्चित्तेंकरून नरकनिवृत्ति होत नाहीं; तर, या लोकीं व्यवहाराची मात्र योग्यता कलींत प्राप्त होते. सुवर्णाची चोरी इत्यादिक पातकांचे ठायीं तर, प्रायश्चित्त केल्यानें नरकनिवृत्ति व व्यवहाराची योग्यता हीं प्राप्त होतात. कोणी ग्रंथकार, एकांतांत झालेल्या अशा महापातकांविषयीं रहस्यप्रायश्चित्त कलियुगांत सांगूं नये असें ह्मणतात. ब्राह्मण इत्यादिकांच्या स्त्रियांच्या संभोगानें भ्रष्ट झालेल्या शूद्रादिकांनीं प्रायश्चित्त केलें तथापि त्यांचा संसर्ग निषिद्ध आहे. यज्ञांत पशूचा वध व सोमविक्रय हीं कलियुगांत ब्राह्मणांनीं करूं नयेत. "कलियुगांत ज्येष्ठ ( वडील ) इत्यादिक सर्व भ्रात्यांस समान भाग उक्त आहे. आततायी द्विजांची धर्मयुद्धांतहि हिंसा करूं नये. नौकेंत बसून समुद्रांत जाणाऱ्या द्विजानें प्रायश्चित्त केलें तथापि त्याचा संसर्ग करूं नये. कलीमध्यें गाईकरितां व ब्राह्मणाकरितां प्राणत्याग करूं नये. कलीमध्यें द्विजांनीं गवळी, शूद्र इत्यादिकांचें अन्न भक्षण करूं नये. शिष्यानें गुरूच्या स्त्रियांजवळ चिरकाळ वास करूं नये. आपत्तिकाळांत ब्राह्मणानें क्षत्रिय, वैश्य इत्यादिकांचे वृत्तीचा त्याग करावा. कलियुगांत द्विजानें अश्वस्तनिकजीविक ह्मणजे दोन तीन दिवस पुरेल इतका धान्यसंचय करून उपजीविका करणारा असें राहूं नये. गुरूजवळ बारा वर्षें वास, मुखेंकरून अग्नि प्रदीप्त करणें, संन्यासी यानें सर्व वर्णांकडे भिक्षा करणें हीं तीन कलियुगांत वर्ज्य करावीं. नूतन उ-

---

१ शूद्राचे हातून करवावा, स्वतां ब्राह्मणानें करूं नये असा अर्थ.

२ अग्निदोगरदश्चैव शस्त्रपाणिर्धनापहः । क्षेत्रदारापहारीच षडेतेह्याततायिनइत्युक्ताः ॥

दक न घेणें; गुरु मागेल ती दक्षिणा देणें; वृद्ध, रोगी इत्यादिकांनीं जळसमाधि, अग्निपतन, भृगुपतन यांपासून मरणें; गाईची तृप्तिमात्र होण्यास योग्य अशा थिल्लरोदकांत आचमन करणें; पितापुत्रांच्या वादांत साक्षीस दंड करणें हीं पांच कलींत वर्ज्य करावीं. तुपांत व दुधांत पक्व झालेलें अन्न शूद्रापासून घेणें तें कलींत घेऊं नये. भिक्षेकरितां भ्रमण करणारा संन्यासी यानें गृहस्थाश्रमी यांचे घरीं रात्रीं राहूं नये. धूम, मुसलाचे आघात यांहींकरून हीन अशा समयीं संन्यासी यानें भिक्षा वर्ज्य करावी. कलीचीं ४,४०० वर्षे गेल्यानंतर झाल्या ब्राह्मणानें त्रेतापरिग्रह, संन्यास हीं धारण करूं नयेत. त्रेतापरिग्रह ह्मणजे सर्वाधान. "श्रौताग्नि व स्मार्ताग्नि हे निरनिराळे करणें त्याचें नांव अर्धाधान, आणि ते (श्रौताग्नि व स्मार्ताग्नि) एकत्र करणें तें सर्वाधान व तें एकत्र करणें पूर्वयुगीं होतें." याचा अपवाद—कलीमध्यें जेथपर्यंत वर्णाश्रमधर्म व वेद हे चालत आहेत तेथपर्यंत संन्यास, अग्निहोत्र हीं आचरण करावीं. शपथ; शकुन; स्वप्न; सामुद्रिक; उपश्रुति; कार्यसिद्धीकरितां देवपूजा, उपहार इत्यादिकांचा संकल्प; कालवेत्त्यांचीं प्रश्नोत्तरें हीं कलियुगांत क्वचित् संभवतील. याप्रमाणें कलियुगांत करावीं कोणतीं व न करावीं कोणतीं यांचा निर्णय सांगितला.

---

अथस्वप्नविचारः स्वप्नोद्विविधः इष्टफलोनिष्टफलश्चेति तत्रसामान्यतइष्टफलोयथा नदीसमुद्रतरणमाकाशगमनंतथा गृहनक्षत्रमार्तंडचंद्रमंडलदर्शनं हर्म्यस्यारोहणंचैवप्रासादशिरसोपिवा स्वप्नेचमदिरापानंवसामांसस्यभक्षणं कृमिविष्ठानुलेपश्चरुधिरेणाभिषेचनं भोजनंदधिभक्तस्यश्वेतवस्त्रानुलेपनं रत्नान्याभरणादीनिस्वप्नेदृष्ट्वाप्रसिद्ध्यति देवताविप्रपृथ्वीशान्प्रशस्ताभरणांगनाः वृषेभपर्वतक्षीरिफलिवृक्षाधिरोहणं दर्पणामिषमाल्याप्तिंशुक्लपुष्पांबराश्रितान् द्रष्टुःस्वप्नेर्थलाभःस्याद्व्याधिमोक्षश्चजायते ॥

## यानंतर स्वप्नांचा निर्णय सांगतों.

शुभफल व अशुभफल या भेदानें दोन प्रकारचा स्वप्न आहे. त्यामध्यें सामान्येंकरून शुभफल स्वप्न सांगतों.—"नदी, समुद्र तरणें; आकाशांत गमन; ग्रह, नक्षत्रें, सूर्यमंडळ व चंद्रमंडळ यांचें दर्शन; गृह, देवालय अथवा राजवाडा यांच्या शिखरावर आरोहण; मद्यपान; मज्जा व मांस यांचें भक्षण; कीटक, विष्ठा, आंगास लागणें; रुधिराचें स्नान; दहिंभात भक्षण करणें; श्वेत वस्त्र व श्वेत गंध, रत्नें, अलंकार हीं स्वप्नांत पाहिलीं असतां कार्यसिद्धि होईल. देवता; ब्राह्मण; राजा; उत्तम प्रकारचे अलंकार धारण केलेल्या स्त्रिया; बैल, पर्वत, औदुंबरवृक्ष, फलयुक्तवृक्ष, यांच्यावर आरोहण; आरसा, मांस, पुष्पें यांची प्राप्ति; श्वेतपुष्पें, श्वेतवस्त्र धारण करणारे इतकीं स्वप्नामध्यें पहाणाराला द्रव्यलाभ होईल व रोग दूर होईल.

---

अथानिष्टफलः दुष्टंकिंशुकवल्मीकपारिभद्राधिरोहणं तैलकार्पासपिण्याकलोहप्राप्तिर्विपत्तये विवाहकरणंस्वप्नेरक्तस्रग्वस्त्रधारणं स्रोतसाहरणंनेष्टंपक्वमांसस्यभोजनं आदित्यस्याथचंद्रस्यनिष्प्रभस्यावलोकनं नक्षत्रादेश्चपातस्यस्वप्नेमरणशोककृत् अशोककरवीरपलाशानांपुष्पितानांस्वप्नेदर्शनेशोकः नौकारोहणेप्रवासः रक्तवस्त्रगंधधारिण्यास्त्रियालिंगनेमृत्युः

घृततैलादिनाभ्यंगेव्याधिः केशदंतपातेधननाशः पुत्रशोकोवा खरोष्ट्रमहिषैर्यानेतद्युक्तरथारोहणेवामृत्युः कर्णनासाकरादिच्छेदेपंकमज्जनेतैलाभ्यंगेविषभक्षणेप्रेतालिंगनेनलदमालिनोदिगंबरस्ययानेकृष्णपुरुषदर्शनेचमृत्युः ॥

यानंतर अशुभ स्वप्न सांगतों.—पळस, वारूळ, कडुलिंब इतक्यांवर आरोहण; तेल, कापूस, पेंड, लोखंड, यांची प्राप्ति हीं विपत्ति करणारीं होत. विवाह करणें; तांबड्या पुष्पांची माळा, व आरक्त वस्त्र, हीं धारण करणें; उदकाच्या प्रवाहानें हरण केलें आणि शिजलेलें मांसभक्षण हीं पाहिलीं असतां नाशकारक जाणावीं. सूर्य व चंद्र हे प्रभाहीन व आकाशांतून तार्‍यांचें पतन हीं स्वप्नांत पाहिलीं असतां मरणशोककारक होतात. अशोक, करवीर, पळस हे वृक्ष पुष्पें आलेले पाहिले असतां शोक प्राप्त होतो. नौकेंत आरोहण केलें असें पाहिलें असतां प्रवास होईल. आरक्त वस्त्र व आरक्त पुष्पें धारण करणार्‍या स्त्रियेनें आलिंगन केलें असतां मृत्यु प्राप्त होतो. घृत, व तैलादिक यांचा अंगास अभ्यंग केला असें पाहिलें असतां व्याधि प्राप्त होईल. केश गळाले व दांत पडले असें पाहिलें असतां धननाश किंवा पुत्रशोक होईल. गर्दभ, उंट, टोणगा यांजवर बसणें; अथवा ते रथास जुंपून त्यांत आरोहण हें पाहिल्यानें मृत्यु. नाक, कान, इत्यादिक अवयवांचा छेद; चिखलांत बुडणें; तैलाभ्यंग; विषभक्षण; प्रेताचें आलिंगन; जासवंदीच्या पुष्पांच्या माळा धारण केलेला असून नग्न अशा कृष्णवर्ण पुरुषाचें दर्शन हीं सर्व मृत्युकारक होत.

---

अथजागृतावनिष्टानि अरुंधतींध्रुवंचैवनभोमंदाकिनींतथा स्वनासाग्रंचचंद्रांकमायुर्हीनोनपश्यति पांसुपंकादिषुन्यस्तचरणंखंडितंयदि स्नानांबुलिप्तगात्रस्ययस्यास्यंप्राक्प्रशुष्यति गात्रेष्वार्द्रेषुसर्वेषुसूर्यादिद्वयदर्शनं स्वर्णप्रतीतिर्वृक्षेषुस्वपदानामदर्शनं पिहितेकर्णयुगुलेयस्य घोषानुपश्रुतिः अदर्शनंस्वशिरसःप्रतिबिंबेजलादिषु छिद्रप्रतीतिश्छायायांसचिरंनैवजीवति॥

यानंतर जागृतावस्थेंतील अरिष्टें सांगतों.—अरुंधती, ध्रुव, आकाशगंगा, स्वकीय नासिकाग्र, चंद्रांतील काळा डाग हीं ज्याचा आयुदार्य हीन झाला त्याला दिसत नाहींत, ह्मणजे तो फार दिवस वांचणार नाहीं. ज्याचीं पाउलें धूळ, चिखल इत्यादिकांत तुटकीं दिसतील; अथवा स्नान केलें असतां सर्व अवयव ओले असून ज्याचें मुख मात्र शीघ्र शुष्क होतें; सूर्य इत्यादिक दोन दोन दिसतात; सर्व वृक्ष सुवर्णासारखे पिंवळे दिसणें; चिखलांत आपलीं पाउलें न दिसणें; दोनहि कानांत बोटें घातलीं असतां आंत होणारा ध्वनि ऐकूं न येणें; जळादिकांत प्रतिबिंबाच्या ठायीं आपलें शिर न दिसणें; आपल्या छायेंत छिद्रें दिसणें, इत्यादिक लक्षणें झालीं असतां तो फार दिवस वांचणार नाहीं.

---

अथविशेषइष्टफलाःस्वप्राः यस्तुपश्यतिवैस्वप्नेराजानंकुंजरंहयं सुवर्णंवृषभंगांवाकुटुंबंतस्यवर्धते वृषंवृक्षंवारुह्यतत्रस्थस्यजागरेधनाप्तिः श्वेतसर्पेणदक्षिणभुजदंशेदशदिनेसहस्रधनलाभः जलस्थस्यवृश्चिकोरगग्रासेजयपुत्रधनानि प्रासादशैलारोहणेसमुद्रतरणेराज्यं तडा

गमध्येपद्मपत्रेषुघृतपायसभोजनेराज्यं बलाकाकुक्कुटीक्रौंचीदर्शनेभार्याप्राप्तिः निगडैर्बंधेब द्धपाशबंधेवापुत्रधनादि आसनेशयनेयानेशरीरेवाहनेगृहे ज्वलमानेविबुध्येततस्यश्रीःसर्व तोमुखी सूर्यचंद्रमंडलदर्शनेरोगिणोरोगनाशोन्यस्यधनं सुरारुधिरयोःपानेविप्रस्यविद्याशूद्रा देर्धनं शुक्लांबरगंधधारिण्यासुभगस्त्रियालिंगनेसंपत्तिः छत्रपादुकोपानहखड्गलाभेधनं वृ षभयुक्तरथारोहणेधनं दधिलाभेवेदाप्तिः दधिपयःपानेघृतलाभेचयशः घृतभक्षणेक्लेशः अं त्रैर्वेष्टनेराज्यं मनुष्यस्यचरणमांसभक्षणेशतंलाभः बाहुभक्षणेसहस्रं शीर्षमांसभक्षणेराज्यं वासहस्रधनंवा सफेनक्षीरपानेसोमपानं गोधूमदर्शनेधनलाभः यवदर्शनेयज्ञः गौरसर्षपद र्शनेलाभः नागपत्रंलभेत्स्वप्नेकर्पूरागमनंतथा चंदनंपांडुरंपुष्पंतस्यश्रीःसर्वतोमुखी सर्वाणि शुक्लान्यतिशोभनानिकार्पासभस्मौदनतक्रवर्ज्यं सर्वाणिकृष्णान्यतिनिंदितानिगोहस्तिदेवद्वि जवाजिवर्ज्यं स्वप्नस्तुप्रथमेयामेवत्सरांतेफलप्रदः द्वितीयेष्टमासैः तृतीयेत्रिमासांते चतुर्थे यामेमासांते अरुणोदयेदशाहांते सूर्योदयेसद्यःफलं ॥

**आतां विशेषेंकरून शुभफलस्वप्न सांगतों.**—जो पुरुष स्वप्नामध्यें राजा, हस्ती, अश्व, सुवर्ण, बैल आणि गाय यांतें अवलोकन करितो त्याचें कुटुंब वृद्धिंगत होईल. बैल अथवा वृक्ष यांवर आरोहण केलों असें पाहून तसाच आरोहण केलें असतां जागा होईल तर द्रव्य-प्राप्ति होईल. श्वेतसर्पानें दक्षिण भुजास दंश केला असें अवलोकन करील तर दहा दिव-सांनीं सहस्र धन मिळेल. उदकांत स्थित असतां विंचू, सर्प यांनीं ग्रस्त केलें असें पाहील तर जय, पुत्र आणि धन प्राप्त होतील. देवालय, राजगृह व पर्वताचें शिखर यांजवर च-ढलों, समुद्रांत पोहलों, असें पाहील तर राज्यप्राप्ति. तलावाच्या मध्यभागीं कमलांच्या पत्रां-वर घृत, क्षीर यांचें भोजन केलें असें पाहील तर राज्यप्राप्ति. बलाका ( बाळेढोंक ), कों-बडी आणि क्रौंचपक्षिणी यांस अवलोकन केल्यानें स्त्रियेची प्राप्ति होते. आपणास सांखळ-दंडानें अथवा दोऱ्यांनीं बांधिलें असें जो पहातो त्याला पुत्र, धन इत्यादि प्राप्त होतात. आसन, बिछाना, पालखी व गाडी इत्यादि वाहन, शरीर, गृह, इत्यादिकांना आग लागली असें पाहून जो जागा होईल त्यास लक्ष्मी सार्वकाल सम्मुख असेल. सूर्यमंडळ व चंद्रमंडळ यांतें पाहील तर रोगी असल्यास त्याचा रोगपरिहार होईल; इतरांस धनप्राप्ति. मद्य अथवा रुधिर प्राशन करील तर ब्राह्मणास विद्या, शूद्रादिकांस धन प्राप्त होईल. श्वेतवस्त्र व श्वेतगंध धारण करणाऱ्या स्त्रियेनें आलिंगन दिलें असतां संपत्ति प्राप्त होते. छत्र, पादुका, उपानह, तलवार यांचा लाभ झाला असतां धनप्राप्त. बैल जुंपलेल्या रथावर आरोहण केलें असें पा-हिल्यानें धन. दह्यांचा लाभ असतां वेदप्राप्ति. दहीं व दूध प्राशन केलें असतां व घृत मिळालें असतां यशप्राप्ति. घृत भक्षण केलें असतां क्लेश. अंत्रांनीं ( आंतड्यांनीं ) वेष्टन असतां राज्य. मनुष्याचे चरणाचें मांस भक्षण केलें असतां शंभर लाभ होईल. बाहू भक्षण असतां सहस्रलाभ. मस्तकाचें मांस भक्षण असतां राज्य किंवा सहस्र धन प्राप्त होईल. सफेन दुग्ध प्राशन केलें असतां सोमपान. गहूं धान्याचें दर्शन असतां धनलाभ. यवांचें दर्शन असतां यज्ञप्राप्ति. श्वेत शिरीस पाहिले असतां लाभ. नागपत्र, कापूर, चंदन, श्वेत-पुष्प ह्यांचा लाभ स्वप्नांत ज्यास होईल त्यास सर्वकाल लक्ष्मी प्रसन्न होईल. स्वप्नांत कापूस,

भस्म, भात, ताक, यांवांचून सर्व श्वेत पदार्थ चांगले; आणि गाय, हत्ती, देव, ब्राह्मण यांवांचून सर्व कृष्ण पदार्थ वाईट. पहिल्या प्रहरीं स्वप्न पाहिलें असतां एका वर्षानें फल. दुसऱ्या प्रहरीं आठ मासांनीं, तिसऱ्या प्रहरीं तीन मासांनंतर, चवथ्या प्रहरीं मासांतीं, अरुणोदयकालीं दहा दिवसांच्या अंतीं, सूर्योदयकालीं तात्काळ फल प्राप्त होईल.

---

**अथदुःस्वप्नदर्शनेकृत्यं योमेराजन्नित्यृचासूर्योपस्थानेदुःस्वप्ननाशः अधःस्वप्नस्येतिजपाद्वा क्वचिद्दर्शवच्छ्राद्धेनदुःस्वप्ननाशः चंडीसप्तशतीपाठेनवा यद्वाश्रीविष्णुसहस्रनामस्तोत्रजपःकार्यःअथवाश्रीभारतस्थस्यश्रीमद्भागवतस्थस्यवागजेंद्रमोक्षस्यश्रवणंपाठोवा इतिदुःस्वप्ननाशकविधिः ॥**

**यानंतर दुष्टस्वप्न पाहिलें असतां त्याचा परिहार.**—"योमेराजन्०" ह्या ऋचेनें सूर्याचें उपस्थान करावें, अथवा "अधःस्वप्नस्य०" ह्या मंत्राचा जप करावा, तेणेंकरून दुष्टस्वप्नाचा नाश होतो. क्वचित् ग्रंथांत, दर्शाप्रमाणें श्राद्ध करावें, तेणेंकरून दुष्ट स्वप्नाचा नाश होतो असें सांगितलें आहे. अथवा चंडीसप्तशतीचा पाठ करावा. किंवा श्रीविष्णुसहस्रनामस्तोत्राचा जप करावा. अथवा श्रीभारतांतील किंवा श्रीमद्भागवतांतील गजेंद्रमोक्षाचें श्रवण किंवा पाठ करावा. याप्रमाणें दुःस्वप्ननाशक विधि सांगितला.

---

**इत्थंगर्भाधानादुद्वाहांताःसमस्तसंस्काराः ॥ सपरिकरानिर्णीताअस्मिंस्तार्तीयपूर्वार्धे ॥१॥**

याप्रमाणें तृतीय परिच्छेदाच्या पूर्वार्धांत गर्भाधानापासून विवाहापर्यंत सर्व संस्कारांचा प्रयोगांसह निर्णय सांगितला.

---

**ततआन्हिकआचारस्ततआधानादिकाःप्रकीर्णार्थाः ॥**
**शांतिकपौष्टिकमुख्यानित्यानैमित्तिकाश्चोक्ताः ॥ २ ॥**

नंतर आन्हिक आचार; तेथून पुढें आधानादिक मिश्र विषय; शांतिक, पौष्टिक प्रमुख असे नित्यनैमित्तिक सांगितले.

---

**पूर्वपरिच्छेदकयोःकालःसामान्यतोविशेषाच्च ॥**
**निर्णीतःसहकृत्यैस्तिथिमासाद्येषुविध्युक्तैः ॥ ३ ॥**

प्रथम व दुसऱ्या परिच्छेदांत तिथि व मास इत्यादिकांचे ठायीं विधिप्रयुक्त नानाविध कृत्यांसहित सामान्येंकरून व विशेषेंकरून कालाचा निर्णय सांगितला.

---

**नानापापेप्रायश्चित्तंव्यवहारविस्तरश्चापि॥उपदानमहादानादिविधिश्चोक्तोमयूखादौ॥४॥**

नानाविध पातकांविषयीं प्रायश्चित्तें, व्यवहाराचा विस्तार आणि उपदानें व महादानें इत्यादिकांचा विधि हे विषय मयूखादि ग्रंथांत सांगितले आहेत.

---

श्राद्धविधिःसांगोप्याशौचेनिर्णीतिरंत्यसंस्कारः॥तार्तीयीकस्योत्तरखंडेमेसंप्रवक्ष्यंते ॥५॥

यथासांग श्राद्धविधि, आशौचनिर्णय आणि अंत्यसंस्कार हे सर्व यापुढें तृतीयपरिच्छेदाच्या उत्तरार्धीं सांगूं.

---

मूलभूतानिपद्यानिविकृतानिक्वचित्क्वचित् ॥
निर्विकाराण्यपिनवान्यप्युक्तान्यत्रकानिचित् ॥ ६ ॥

मूळचे श्लोक क्वचित् क्वचित् अशुद्ध असल्यामुळें कितीएक नवे श्लोक शुद्ध लिहिले आहेत.

---

मीमांसाधर्मशास्त्रज्ञाःसुधियोनलसाबुधाः ॥ कृतकार्याःप्राङ्निबंधैस्तदर्थंनायमुद्यमः ॥७॥

## ग्रंथकार हा ग्रंथ करण्याचें प्रयोजन काय तें सांगतात.

मीमांसा, धर्मशास्त्र यांतें जाणणारे व बुद्धिमान्, आलस्यरहित असे जे पंडित ते महाविद्वानांनीं केलेले पूर्वीचे ग्रंथ पाहून त्यांवरून कृतकार्य होतात, ह्मणजे प्राप्त झालेलीं कार्यें करितात, याकरितां माझा हा ग्रंथ करण्याचा उद्योग त्यांच्याकरितां नाहीं.

---

येपुनर्मंदमतयोलसाअज्ञाश्चनिर्णयं ॥ धर्मेवेदितुमिच्छंतिरचितस्तदपेक्षया ॥ ८ ॥
निबंधोयंधर्मसिंधुसारनामासुबोधनः ॥ अमुनाप्रीयतांश्रीमद्विठ्ठलोभक्तवत्सलः ॥ ९ ॥

तर जे मंदबुद्धि, आळसी, अविद्वान् असे असून धर्माविषयीं निर्णय जाणण्याची इच्छा करितात त्यांच्याकरितां धर्मसिंधुसार नांवाचा असा हा सुबोध ग्रंथ मी केला आहे. या ग्रंथेंकरून भक्तवत्सल असा श्रीमद्विठ्ठल संतुष्ट असो.

---

प्रेम्णासद्भिर्ग्रंथःसेव्यः शब्दार्थतः सदोषोपि ॥
संशोध्यवापिहरिणा सुदाममुनिसतुषपृथुकमुष्टिरिव ॥ १० ॥

हा माझा ग्रंथ क्वचित् स्थलीं शब्दार्थानें जरी सदोष असेल तथापि विद्वानांनीं विचारपूर्वक शोधून ग्रहण करण्यास योग्य आहे. याला दृष्टांत सांगतात—सुदाम ब्राह्मणाचे पोहे कोंड्यानें युक्त असे जरी होते तथापि हरीनें त्यांतील कोंडा इत्यादि टाकून चांगले शुद्ध करून ते जसे भक्षण केले तद्वत् विद्वानांनीं ह्या माझ्या ग्रंथाचा स्वीकार करावा.

---

श्रीकाश्युपाध्यायवरोमहात्माबभूवविद्वद्द्विजसार्वभौमा ॥
तस्मादुपाध्यायकुलावतंसोयज्ञेश्वरोनंतइमावभूतां ॥ ११ ॥

विद्वान् ब्राह्मणांमध्यें केवळ सार्वभौम असे महात्मे श्रीकाश्युपाध्याय होते झाले. त्यांपासून उपाध्यायकुलावतंस असे यज्ञेश्वरोपाध्याय व अनंतोपाध्याय असे दोन पुत्र झाले.

---

यज्ञेश्वरोयज्ञविधानदक्षोदैवज्ञवेदांगसुशास्त्रशिक्षः ॥
भक्तोत्तमोनंतगुणैकधामानंताह्वयोनंतकलावतारः ॥ १२ ॥

त्यांमध्यें श्रौतमार्गांत निष्णात, ज्योतिषी, वेदाचें अंग जें उत्तमशास्त्र व्याकरण त्यांत सुशिक्ष असे यज्ञेश्वरोपाध्याय होते. भक्तांमध्यें श्रेष्ठ असून अनंताचा अंशभूत अवतार असल्यामुळें अनंत गुणांचें वसतिस्थान असे अनंतोपाध्याय होते.

---

एषोत्यजज्जन्मभुवंस्वकीयांतांकौंकणाख्यांसुविरक्तिशाली ॥
श्रीपांडुरंगेवसतिंविधाय भीमातटेमुक्तिमगात्सुभक्त्या ॥ १३ ॥

हे अनंतोपाध्याय वैराग्यशाली होत्साते त्यांनीं आपली कोंकणनामक जन्मभूमि सोडून श्रीपंढरीक्षेत्रांत श्रीपांडुरंगाच्या सन्निध वास्तव्य करून पांडुरंगाच्या भक्तिकरून भीमानदीच्या तटाकीं मुक्तीप्रत पावते झाले.

---

तस्यानंताभिधानस्योपाध्यायस्यसुतःकृती ॥
काशीनाथाभिधोधर्मसिंधुसारंसमातनोत् ॥ १४ ॥

त्या अनंतोपाध्यायांचा पुत्र, विद्वान्, असा काशीनाथनामक यानें हा धर्मसिंधुसार नामक ग्रंथ केला.

**इति श्रीमत्काश्युपाध्यायसूरि० धर्मसिंधुसारे तृतीयपरिच्छेदे पूर्वार्धः समाप्तः ग्रंथसंख्या ४,५००.**



## ॥ श्रीगणेशाय नमः ॥

गणनायकमाराध्य विघ्नसंघनिवारकं ॥
तार्तीयीकोत्तरार्धस्य व्याख्यानं क्रियते मया ॥ १ ॥

असें आरंभीं मंगलाचरण करून तृतीयपरिच्छेदाचे उत्तरार्धाचें भाषांतर करण्यास प्रारंभ करितों;—

श्रीपांडुरंगाय नमः श्रीरुक्मिणीपांडुरंगंप्रणम्यपितरौगुरून् ॥
तृतीयपरिच्छेदोत्तरार्द्धंतनोमिश्रीशतुष्टये ॥ १ ॥

श्रीरुक्मिणीयुक्त पांडुरंग, माता, पिता आणि गुरु यांला नमस्कार करून श्रीपांडुरंगाचा संतोष होण्यासाठीं तृतीयपरिच्छेदाचें उत्तरार्ध करितों.

श्रीनाथःकरुणासिंधुरिंदिराशंकरःसती ॥ विघ्नेशोभास्करेंद्राद्याविघ्नान्घ्नंतुसदैवमे ॥२॥

करुणासागर असा श्रीनाथ, लक्ष्मी, शंकर, पार्वती, विघ्नेश, सूर्य आणि इंद्रादिक देव हे निश्चयें सार्वकाल माझ्या विघ्नांचा नाश करोत.

तत्रतावच्छ्राद्धादिनिर्णयंवक्तुमधिकारनिर्णयायजीवत्पितृकाधिकारोविविच्यते पादुकेचोत्तरीयंचतर्जन्यांरूप्यधारणं नजीवत्पितृकःकुर्याज्ज्येष्ठेभ्रातरिजीवति अत्रपादुकेकाष्ठमय्यौ उत्तरीयंसग्रंथिपरिमंडलंवस्त्रमेकंद्व्यंगुलादिविस्तृतंसूत्रकृतंपरिमंडलरूपंवाउत्तरीयस्थानापन्नं स्मृत्युक्तंतृतीययज्ञोपवीतंवा जीवत्पितृकेणजीवज्ज्येष्ठभ्रातृकेणचनधार्यमितितात्पर्यं प्रावरणरूपंद्वितीयवस्त्रंतुजीवत्पितृकादिभिःसर्वैर्धार्यं एकवस्त्रोनभुंजीतनकुर्याद्देवतार्चनमित्यादिनासर्वकर्मस्वेकवस्त्रत्वनिषेधात् पितरिपितामहेज्येष्ठभ्रातरिचाकृताधानेजीवतिपुत्रपौत्रकनिष्ठभ्रातृभिराधानंनकार्यं ज्येष्ठभ्रातर्यकृतविवाहेकनिष्ठेनविवाहोनकार्यः अत्रविशेषःपूर्वार्द्धे उक्तः एवंपित्रादिषुअकृतसोमयागेषुजीवत्सुपुत्रादेःसोमेनाधिकारः एवंपूर्णमासेष्टौदर्शेष्टावग्निहोत्रहोमेचपित्राद्यैरनारब्धेपुत्रादेर्नाधिकारः एवंसंन्यासेपि कनिष्ठस्यसोदरस्यैवदोषो नभिन्नोदरस्यभ्रातुः पित्रादेराज्ञायांपुत्रादेर्नदोषइतिकेचित् अधिकारिणिपितरिसत्याज्ञायामपिदोषः पातित्यजात्यंधत्वादिदोषैरनधिकारिण्याज्ञयानदोषः पातित्यादावाज्ञांविनापिनदोषइत्यपरे तथाजीवत्पितृकस्यपितृकृत्येषुदर्शादिश्राद्धतर्पणपैतृकदानेषुनाधिकारः अत्रविशेषः स्वापत्यसंस्कारस्वद्वितीयविवाहादिनिमित्तकनांदीश्राद्धेचातुर्मास्यांतर्गतपितृयज्ञेसोमांगतृतीयसवनस्थपितृयज्ञेजीवत्पितुरधिकारः पिंडपितृयज्ञेहोमांतः पिंडपितृयज्ञोनारंभोवापिंडपितृयज्ञस्येतिपक्षद्वयं पितुःपित्राद्युद्देशेनपिंडदानमितितृतीयःपक्षःक्वचित् एवमष्टकादिविकृतिष्वपिपक्षत्रयं गयांप्रसंगतोगत्वामातुःश्राद्धंसुतश्चरेत् जीवत्पितामातुःश्राद्धमुद्दिश्यगयां नगच्छेत् महानदीषुसर्वासुतीर्थेचप्राप्तेजीवत्पितृकःपितुःपितृमात्राद्युद्देशेनश्राद्धंकुर्यात् नवम्यामन्वष्टकाश्राद्धंक्षयाहेमातुः प्रत्यब्दश्राद्धंचसपिंडकमेवजीवत्पितृकःकुर्यात् तथा संन्य

**स्तोतातेपतितेचतातेजीवत्यपिसतिदर्शश्राद्धमहालयसंक्रांतिग्रहणादिश्राद्धानिसर्वाणि पितुः पित्राद्युद्देशेनजीवत्पितृकेणकार्याणि एतानिचसांकल्पिकविधिनापिंडरहितानिकार्याणि अन्वष्टक्यादाविवपिंडदानेविशेषवचनाभावात् ॥**

त्यामध्यें श्राद्धादिकांचा निर्णय सांगणें आहे याकरितां अधिकाराचा निर्णय सांगितला पाहिजे या हेतूनें जीवत्पितृकाचे अधिकाराचा विचार करितों. "जीवत्पितृकानें ज्येष्ठभ्राता जीवंत असतां पादुका, उत्तरीय, तर्जनीमध्यें रौप्यधारण, हीं धारण करूं नयेत." येथें पादुका काष्ठमय समजाव्या. उत्तरीय ह्मणजे ग्रंथियुक्त वाटोळें वस्त्र, अथवा दोन इत्यादि अंगुळें रुंदीचें, सुताचें केलेलें असें वाटोळें तें, किंवा उत्तरीयस्थानापन्न असें स्मृतिवाक्यानें सांगितलेलें तिसरें यज्ञोपवीत जीवत्पितृकानें व ज्याचा ज्येष्ठभ्राता जीवंत असेल त्यानें धारण करूं नये असें तात्पर्य. प्रावरणरूप जें दुसरें वस्त्र तें तर, जीवत्पितृकादि सर्वांनीं धारण करावें. कारण, " एक वस्त्र असतां भोजन, देवपूजन हीं करूं नयेत " इत्यादि वचनेंकरून सर्व कर्मामध्यें एक वस्त्रत्वाचा निषेध आहे. पिता, पितामह आणि ज्येष्ठ भ्राता हे जीवंत असून अकृताधान ( आधान न केलेले ) असतील तर पुत्र, पौत्र, कनिष्ठ भ्राता यांनीं आधान करूं नये. ज्येष्ठभ्राता अविवाहित असतां कनिष्ठ भ्रात्यानें विवाह करूं नये; याविषयीं विशेष निर्णय पूर्वार्धांत सांगितला आहे. याप्रमाणें पिता इत्यादिक जीवंत असून अकृतसोमयाग ( सोमयाग न केलेले ) असतील तर पुत्रादिकांस सोमयाग करण्याचा अधिकार नाहीं. याप्रमाणें पूर्णमासेष्टि, दर्शेष्टि आणि अग्निहोत्रहोम हे पिता इत्यादिकांनीं आरंभिले नसतील तर पुत्रादिकांस ते करण्याविषयीं अधिकार नाहीं. याप्रमाणें संन्यासाविषयींहि हाच निर्णय जाणावा. सोदर अशा कनिष्ठासच दोष आहे, भिन्नोदर भ्रात्यास दोष नाहीं. पिता इत्यादिकांची आज्ञा असेल तर पुत्रादिकांस दोष नाहीं असें कोणीं ग्रंथकार ह्मणतात. अधिकारी पिता असेल तर आज्ञा असतांहि दोष आहे. पातित्य, जात्यंधत्वादि दोष पित्यास असल्या कारणानें अनधिकारी असतां आज्ञेंकरून दोष नाहीं, पातित्यादिक असतां आज्ञा नसेल तथापि दोष नाहीं, असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात. तसेंच पित्याचीं कृत्यें जीं दर्शादि श्राद्ध, तर्पण, पैतृकदान यांविषयीं जीवत्पितृकास अधिकार नाहीं. **याविषयीं विशेष निर्णय**—आपल्या अपत्याचा संस्कार, आपला दुसरा विवाह इत्यादिनिमित्तक नांदीश्राद्ध, चातुर्मास्यांतर्गत पितृयज्ञ, आणि सोमयागाचें अंग जें तृतीयसवन त्यामध्यें कर्तव्य पितृयज्ञ यांविषयीं जीवत्पितृकास अधिकार आहे. पिंडपितृयज्ञामध्यें होमापर्यंत पिंडपितृयज्ञ करावा, अथवा आरंभ करूं नये, याप्रमाणें पिंडपितृयज्ञाचे दोन पक्ष आहेत. पित्याचे जे पिता इत्यादिक त्यांच्या उद्देशेंकरून पिंडदान करावें असा तिसरा पक्ष क्वचित् ग्रंथांत आहे. याप्रमाणें अष्टकादिक ज्या विकृति त्यांविषयींहि तीन पक्ष आहेत. " गयेप्रत प्रसंगानें पुत्र गेला असतां त्यानें मातेचें श्राद्ध करावें. जीवत्पितृकानें मातेच्या श्राद्धोद्देशेंकरून गयेप्रत जाऊं नये. सर्व महानदी व तीर्थें हीं प्राप्त असतां जीवत्पितृकानें पित्याचे जे पिता, माता इत्यादिक त्यांच्या उद्देशानें श्राद्ध करावें. नवमीचे दिवसीं अन्वष्टकाश्राद्ध, क्षयदिवसीं मातेचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध हीं जीवत्पितृकानें सपिंडकच करावीं. तसेंच पिता संन्यासी किंवा पतित असा जीवंत असतांहि

दर्शश्राद्ध, महालय, संक्रांति, ग्रहण इत्यादि सर्व श्राद्धें पित्याचे जे पिता इत्यादिक त्यांच्या उद्देशेंकरून जीवत्पितृकानें करावीं. हीं श्राद्धें सांकल्पिकविधीनें पिंडरहित करावीं. कारण, अन्वष्टक्य इत्यादि श्राद्धांत पिंडदानाविषयीं जसें वचन आहे तसें या श्राद्धांत पिंडदानाविषयीं विशेष वचन नाहीं.

---

आश्विनशुक्लप्रतिपदिदौहित्रोजीवत्पितृकःसपिंडकंमातामहश्राद्धंकुर्यात् तथाभ्रातृपुत्रोऽपुत्रस्यपितृव्यस्यप्रत्यब्दश्राद्धंसपिंडंकुर्यात् एवंकनिष्ठभ्राताप्यपुत्रज्येष्ठभ्रातुः प्रत्यब्दं तथा सपत्नीपुत्रःसापत्नमातुःश्राद्धं एवंदौहित्रोऽपुत्रस्यमातामहस्यप्रत्यब्दं इत्थंचपितृव्यादिश्राद्धचतुष्टयेजीवत्पितृकस्याप्यधिकारः पितृव्यभ्रात्रादीनामपुत्राणांपत्नीसत्त्वेसैवाधिकारिणी नतुभ्रातृपुत्रादेःश्राद्धाधिकारः एवंपतिरेवपुत्राभावेभार्याश्राद्धंकुर्यात् सपत्नीपुत्रसत्त्वेतुसएवकुर्यान्नभर्ता दौहित्रभ्रातृपुत्रयोःसत्त्वे मृतस्यविभक्तत्वेदौहित्रएव अविभक्तत्वेभ्रातृपुत्रः केचित्भ्रातृतत्पुत्रयोःसत्त्वेभ्रात्रैवश्राद्धंकार्यमित्याहुः तथाजीवत्पितृकस्य पितृपितामहादिमनुष्यपितृतर्पणनिषेधेप्यग्निष्वात्तादिदेवर्षिपितृतर्पणनिषेधाभावात्स्नानांगतर्पणेब्रह्मयज्ञांगभूतदेवर्षिपितृतर्पणेचाधिकारोस्त्येव एवंयदीयश्राद्धेधिकारस्तदीयश्राद्धांगतर्पणेप्यधिकारः जीवत्पितापिकुर्वीततर्पणंयमभीष्मयोः श्राद्धांगतर्पणभिन्नतर्पणंजीवत्पितृकेणतिलैर्नकार्यं श्राद्धप्रयोगमध्येवामजानुन्यग्भावोनीवीबंधश्चनकार्यः नद्यादौस्नात्वातर्पणांतेसमंत्रकंवस्त्रनिष्पीडनंविहितंतन्नकार्यं तथाखड्गमौक्तिकहस्तेनकर्तव्यंपितृतर्पणमितिविहितंखड्गधारणंनकार्यं अपसव्यंद्विजाग्र्याणांपित्र्येकर्मणिकीर्तितं आप्रकोष्ठात्तुकर्तव्यमेतत्पितरिजीवति जीवतिसंन्यस्तादिरूपेपितरिमृतमातृमातामहकोपिपुत्रःपितुःपितृपितामहप्रपितामहानांपितुर्मातृपितामहीप्रपितामहीनांपितुर्मातामहमातृपितामहमातृप्रपितामहानामितिपार्वणत्रयमेकोद्दिष्टगणंच स्वमातरंपितुःपत्न्याइतिस्वपितृव्यंपितुर्भ्रातुरितिस्वमातामहंचपितुःश्वशुरस्येत्येवमादिना पितृसंबंधपुरस्कारेणैवोद्दिश्यमहालयश्राद्धंकुर्यात् एवंदर्शादिषूह्यम् पितुःसंन्यासाभावेपि तीर्थश्राद्धंजीवत्पितुरेवमेव एवंवृद्धिश्राद्धेप्यूह्यं ब्रह्मयज्ञांतेनित्यंपितृतर्पणमपिसंन्यस्तादिरूपजीवत्पितृकेणैवमेवकार्यमित्याहुः ॥

जीवत्पितृक अशा दौहित्रानें आश्विनशुक्ल प्रतिपदेच्या दिवसीं मातामहश्राद्ध सपिंडक करावें. तसेंच, भ्रात्याच्या पुत्रानें पुत्ररहित पितृव्याचें ( चुलत्याचें ) प्रतिसांवत्सरिक श्राद्ध सपिंडक करावें. याप्रमाणें कनिष्ठ भ्रात्यानेंहि पुत्ररहित ज्येष्ठ भ्रात्याचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करावें. तसेंच सवतीच्या पुत्रानें सापत्नमातेचें श्राद्ध करावें. याप्रमाणें दौहित्रानें पुत्ररहित मातामहाचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध करावें. याप्रमाणें पितृव्यादिक चार श्राद्धें ( पितृव्य, ज्येष्ठभ्राता, सापत्नमाता व मातामह ) करण्याविषयीं जीवत्पितृकासहि अधिकार आहे. पुत्ररहित पितृव्य, भ्राता इत्यादिकांची स्त्री असेल तर तीच अधिकारिणी, भ्रातृपुत्रादिकांस श्राद्धाधिकार नाहीं. याप्रमाणें पुत्र नसेल तर पतीनेंच स्त्रियेचें श्राद्ध करावें. सवतीचा पुत्र असेल तर त्यानेंच श्राद्ध करावें, पतीनें करूं नये. दौहित्र व भ्रात्याचा पुत्र हे असून मृत झालेला विभक्त असेल तर दौहित्रच अधिकारी, विभक्त नसल्यास भ्रात्याचा पुत्र अधिकारी. भ्राता

व भ्रातृपुत्र हे दोघे असतां भ्रात्यानेंच श्राद्ध करावें असें कोणीं ग्रंथकार ह्मणतात. तसेंच जीवत्पितृकास पिता, पितामह इत्यादिक जे मनुष्यपितर यांचें तर्पण करण्याविषयीं जरी निषेध आहे तथापि अग्निष्वात्तादिक जे देवऋषिपितर त्यांचे तर्पणाचा निषेध नसल्यामुळें स्नानांगतर्पण व ब्रह्मयज्ञांगभूत देवर्षिपितृतर्पण यांविषयीं अधिकार आहेच. याप्रमाणें ज्याचें श्राद्ध करण्याचा अधिकार आहे, त्याचें श्राद्धांगतर्पण करण्याविषयींहि अधिकार आहे. "जीवत्पितृकानेंहि यम व भीष्म यांचें तर्पण करावें." जीवत्पितृकानें श्राद्धांग तर्पणाहून इतर तर्पण तिलांनीं करूं नये. व श्राद्धप्रयोगामध्यें वामजानु खालीं करणें व वस्त्राचा नीवीबंध हीं करूं नयेत. नदी इत्यादिकांत स्नान करून तर्पण केल्यानंतर समंत्रक वस्त्रनिष्पीडन करावें ह्मणून जें सांगितलें तें करूं नये. तसेंच "खड्ग, मौक्तिक हस्तांत धारण करून पितृतर्पण करावें," या वचनानें प्राप्त जें खड्गधारण तें करूं नये. "द्विजाग्र्यांनीं पित्र्यकर्मांचे ठायीं अपसव्य करावें असें सांगितलें आहे याकरितां जीवत्पितृकानें अपसव्य करणें तें प्रकोष्ठापर्यंत ( कोंपराच्या खालच्या भागापर्यंत ) करावें." पिता संन्यासी इत्यादिस्वरूप जीवंत असतां आणि मृत आहेत माता व मातामह ज्याचे अशा पुत्रानेंहि "पितुःपितृपितामहप्रपितामहानां, पितुर्मातृपितामहीप्रपितामहीनां, पितुर्मातामहमातृपितामहमातृप्रपितामहानां" हीं तीन पार्वणें, एकोद्दिष्टगण, आपल्या मातेचा उच्चार "पितुःपत्न्याः" असा, आपल्या पितृव्याचा उच्चार "पितुर्भ्रातुः" असा आणि आपल्या मातामहाचा उच्चार "पितुःश्वशुरस्य," इत्यादि पितृसंबंधपुरस्कारेंकरूनच उद्देश करून महालयश्राद्ध करावें. याप्रमाणें दर्शादि श्राद्धांविषयींहि असेंच जाणावें. पिता संन्यासी नसेल तथापि जीवत्पितृकानें तीर्थश्राद्ध करणें तें असेंच करावें. याप्रमाणें नांदीश्राद्धामध्येंहि असाच निर्णय जाणावा. ब्रह्मयज्ञाच्या अंतीं नित्य जें पितृतर्पण करावयाचें तेंहि, संन्यासी इत्यादिस्वरूप असा जीवंत पिता ज्याचा त्यानेंहि याप्रमाणेंच करावें असें ह्मणतात.

---

**यदातुमातुर्वार्षिकमपुत्रमातामहवार्षिकमपुत्रपितृव्यवार्षिकंवाक्रियतेतदाक्रमेणमातृपितामहीप्रपितामहीनांमातामहमातृपितामहमातृप्रपितामहानांपितृव्यपितामहप्रपितामहाना मित्येवोद्देशः यदाचपित्रादिभिःस्वाशक्त्यादिनानियोजितः पित्रादिकरणीयंश्राद्धंस्वयंपित्रादेः प्रतिनिधीभूयकरोतितदा पितुरमुकशर्मणोयजमानस्यपितृपितामहप्रपितामहानामित्येवंयथा श्राद्धमुद्देशः सर्वत्रपितृकृत्येभ्रातृष्वविभक्तेषुज्येष्ठस्यैवाधिकारः विभक्तेषु पृथक्पृथक् सापत्नभ्रातरिज्येष्ठेसत्यपिकनिष्ठएवस्वमातृवार्षिकान्वष्टक्यादिकुर्यात् जीवत्पितृपितामहकस्य संन्यस्तपितृपितामहकस्यचपितामहस्यपित्राद्युद्देशेनवृद्धिश्राद्धंतीर्थश्राद्धंदर्शादिश्राद्धं वाभवति पित्रादिषुत्रिषुजीवत्सुसत्सुसंन्यस्तेषुचनकिमपिश्राद्धंकार्यं केचित्तुपित्रादित्रयात् परेभ्यःश्राद्धंदेयमाहुः मृतेपितरिपितामहजीवनेपित्रेपितामहात्पराभ्यांचश्राद्धंदेयं एवंपितृपितामहमरणेप्रपितामहजीवनेप्यूह्यम् ॥**

ज्या कालीं मातेचें वार्षिक श्राद्ध, पुत्ररहित मातामहाचें वार्षिक श्राद्ध, अथवा अपुत्र पितृव्याचें वार्षिक श्राद्ध करण्याचा प्रसंग प्राप्त होईल त्या कालीं क्रमेंकरून, "मातृपिता-

महीप्रपितामहीनां, मातामहमातृपितामहमातृप्रपितामहानां, पितृव्यपितामहप्रपितामहानां" याप्रमाणेंच उद्देश करावा. ज्या वेळीं पिता इत्यादिकांनीं 'आपणास शक्ति नाहीं' इत्यादि कारणानें पुत्राची योजना केली यास्तव तें पिता इत्यादिकांनीं करावयाचें श्राद्ध, आपण पिता इत्यादिकांचा प्रतिनिधि होऊन करील त्या वेळीं "पितुः अमुकशर्मणो यजमानस्य पितृपितामहप्रपितामहानां" याप्रमाणें जसें श्राद्ध असेल तदनुसार उद्देश करावा. अविभक्त भ्राते असतां सर्वत्र पितृकृत्याविषयीं ज्येष्ठभ्रात्यासच अधिकार आहे. विभक्त असतां पृथक् पृथक् अधिकार आहे. सापत्न भ्राता ज्येष्ठ असला तथापि कनिष्ठानेंच आपल्या मातेचें वार्षिकश्राद्ध व अन्वष्टक्यादिक श्राद्ध करावें. पिता, पितामह हे जीवंत असतां व उभयतां संन्यासी असतील तर पितामहाचे जे पित्रादिक त्यांच्या उद्देशानें नांदीश्राद्ध, तीर्थश्राद्ध अथवा दर्शादिश्राद्ध करावें. पिता, पितामह व प्रपितामह हे तीन जीवंत असतां व संन्यासी असतां कोणतेंहि श्राद्ध करूं नये. कोणी ग्रंथकार, पिता इत्यादिक जे तीन त्यांच्या पुढचे जे वृद्ध प्रपितामहादिक त्यांच्या उद्देशानें श्राद्ध करावें असें सांगतात. पिता मृत आणि पितामह जीवंत असतां पिता, व पितामहाचे पलीकडचे दोन या तिघांच्या उद्देशानें श्राद्ध करावें. याप्रमाणें पिता व पितामह मृत आणि प्रपितामह जीवंत असतांहि असेंच जाणावें.

---

यस्तुगृह्याग्निमान्[1]जीवन्मातृपितृकःपितुःपित्रादिभ्यः पिंडदानमितितृतीयपक्षाश्रयेणारब्धपिंडपितृयज्ञाष्टकान्वष्टकाश्राद्धोन्वष्टकायांच पितुःपित्रादिमात्रादिमातामहादिभ्यःपिंडादिकंददानआसीदनंतरंचमातामृतासोन्वष्टकायांस्वमात्रादिभ्यःपितुःपित्रादिभ्यश्चदद्यात् यदाचपिंडपितृयज्ञान्वष्टकाद्यनारंभपक्षोजीवत्पितृकस्यतदापिसंन्यस्तादिपितृकस्यदर्शादिश्राद्धंपितुःपित्राद्युद्देशेनव्यतिषंगभिन्नप्रयोगेणसांकल्पिकेनभवत्येव ॥

जीवंत आहे माता व पिता ज्याचे अशा गृह्योग्नियुक्त[2] पुत्रानें पित्याचे जे पिता इत्यादिक त्यांस पिंडदान करावें, असा तिसरा पक्ष स्वीकारून आरंभलेलीं जीं पिंडपितृयज्ञ, अष्टका, अन्वष्टका श्राद्धें त्यांमध्यें अन्वष्टकाश्राद्धांत पित्याच्या ज्या पितृत्रयी, मातृत्रयी व मातामहादि त्रयी त्यांच्या उद्देशानें पिंडादिक द्यावें. नंतर माता मृत झाली असतां त्यानें अन्वष्टकाश्राद्धामध्यें स्वकीय मातृत्रयी व पित्याची पितृत्रयी यांच्या उद्देशानें पिंडादिक द्यावें. ज्या कालीं जीवत्पितृक असल्यामुळें पिंडपितृयज्ञ, अन्वष्टका इत्यादिकांचा आरंभ केला नसेल व पिता संन्यासी इत्यादिक असेल त्या कालीं दर्शादिश्राद्ध पित्याचे जे पित्रादिक त्यांच्या उद्देशेंकरून व्यतिषंगाहून निराळा प्रयोग जो सांकल्पिकविधि तेणेंकरून होतेंच.

---

पितुरविभक्तैःपुत्रैःपृथग्वैश्वदेवोनकार्यः पितृपाकोपजीवीस्यात्भ्रातृपाकोपजीवकइत्युक्तेः अतएवगृह्याग्नौपाकवैश्वदेवकरणपक्षेपिसाग्निकेपितरिसाग्निकैरप्यविभक्तैःपुत्रैःपृथग्वैश्वदेवोनकार्यः येषांपाकाभावेग्नेलौकिकत्वंमतंतैःपाकमात्रमग्निसंस्कारार्थंकार्यमितिभातिवि

---

१ श्रौताग्निमतोप्युपलक्षणमेतद् ॥

२ गृह्याग्नियुक्त हें श्रौताग्निमानाचेंहि उपलक्षण आहे.

**भक्तैस्तुपृथग्वैश्वदेवःकार्यः तत्रवैश्वदेवस्यदेवयज्ञभूतयज्ञपितृयज्ञात्मकत्वाज्जीवत्पितृकैर पिपंचमहायज्ञांतर्गतः पितृयज्ञःकार्यः वैश्वदेवाद्भिन्नाःपंचमहायज्ञास्तैत्तिरीयाणांतैरपि विभक्तैर्जीवत्पितृकैःपितृयज्ञःकार्यः तस्यदेवरूपिपितृदेवताकत्वेनपितृपितामहादिमनुष्यरू पिपितृदेवकत्वाभावात् मुंडनंपिंडदानंचप्रेतकर्मचसर्वशः नजीवत्पितृकःकुर्याद्गुर्विणीपतिरे वच अत्रमुंडनंक्षुरेणशिरसोवपनं तेनकर्तनंसिद्ध्यति सर्वंप्रेतकर्मप्रेतदहनवहनसपिंडीकर णांतौर्ध्वदेहिकादिकमित्यर्थः मुंडनंरागप्राप्तमेवनिषिद्ध्यते तेनचौलोपनयनादिषुआधानदर्श पौर्णमासज्योतिष्टोमादिषुनित्यंप्राप्तं तीर्थप्रायश्चित्तमातृमरणादौनैमित्तिकप्राप्तंचभवत्येव के चित्काम्यनागबल्यादिषुकाम्यमपिभवतीत्याहुः गंगायांभास्करक्षेत्रेमातापित्रोर्गुरोर्मृतौ आ धानेसोमपानेचवपनंसप्तसुस्मृतं गुरोरितिदत्तकस्यपूर्वापरपित्रोरित्यर्थः वाक्यांतरेतीर्थमात्रे क्षौरोक्तेर्गंगाभास्करक्षेत्रग्रहणंजीवत्पितृकस्यतत्रविशेषतःक्षौरविधानार्थं जीवत्पितृकस्यपिं डदाननिषेधःनांदीश्राद्धतीर्थश्राद्धयोःसंन्यस्तादिपितृकस्यदर्शमहालयादिश्राद्धेषुचपिंडरहित सांकल्पिकश्राद्धबोधनार्थः ॥**

पित्यापासून जे पुत्र विभक्त नसतील त्यांनीं निराळा वैश्वदेव करूं नये. "कारण, पितृपाकानें उपजीविका करणारा व भ्रातृपाकानें उपजीविका करणारा असा असावा, याप्रमाणें वचन आहे यास्तवच गृह्याग्नीवर पाक, वैश्वदेव करण्याचा पक्ष असेल तथापि साग्निक पिता असतां एकत्र रहाणारे पुत्र साग्निक यांनींहि निराळा वैश्वदेव करूं नये. गृह्याग्नीवर पाक न झाला असतां तो गृह्याग्नि लौकिक होतो असें ज्यांचें मत आहे त्यांनीं अग्निसंस्काराकरितां पाक मात्र गृह्याग्नीवर करावा असें वाटतें. विभक्त असतील तर त्यांनीं निराळा वैश्वदेव करावा. त्यामध्यें वैश्वदेव, देवयज्ञभूतयज्ञपितृयज्ञरूप आहे यास्तव जीवत्पितृकांनींहि पंचमहायज्ञांतील पितृयज्ञ करावा. तैत्तिरीयशाखी यांचे पंचमहायज्ञ वैश्वदेवाहून जरी भिन्न आहेत तथापि जीवत्पितृक असे विभक्त तैत्तिरीयशाखी त्यांनींहि पितृयज्ञ करावा. कारण, तो पितृयज्ञ, देवरूपि पितृदेवताक असल्यामुळें त्यास पितृपितामहादिमनुष्यरूपि पितृदेवकत्व नाहीं. "मुंडन, पिंडदान आणि सर्व प्रेतकर्म हीं जीवत्पितृक व गर्भिणीपति यांनीं करूं नयेत." ह्या स्थलीं मुंडन ह्मणजे क्षुरेंकरून मस्तकस्थ केशांचें वपन होय, यावरून कर्तन सिद्ध होतें. सर्व प्रेतकर्म ह्मणजे प्रेताचें दहन, वहन आणि सपिंडीकरणापर्यंत और्ध्वदेहिकादिक कर्म असा अर्थ. मुंडन रागप्राप्तच निषिद्ध आहे, यावरून चौल, उपनयन इत्यादिकांमध्यें; आधान, दर्शपौर्णमास, ज्योतिष्टोम इत्यादिकांमध्यें नित्य प्राप्त झालेलें व तीर्थ, प्रायश्चित्त, मातेचें मरण इत्यादिकांत प्राप्त झालेलें नैमित्तिक मुंडन हीं करावींच. कोणी ग्रंथकार, नागबलि इत्यादिक जीं काम्य कर्में त्यांत कर्तव्य जें काम्यमुंडन तेंहि करावें असें ह्मणतात. "गंगा; भास्करक्षेत्र; माता, पिता व गुरु ह्यांचें मरण; आधान; आणि सोमपान या सातांतून कोणतेंहि प्राप्त असतां वपन करावें." गुरु ह्मणजे दत्तकाचा जनकपिता व दत्तक घेणारा पिता असा अर्थ. दुसऱ्या वाक्यांत, तीर्थीं क्षौर करावें असें सांगितलें असतां एथें गंगा, भास्करक्षेत्र यांचें जें ग्रहण केलें तें जीवत्पितृकानें तेथें ( गंगा व भास्करक्षेत्र या स्थानीं ) विशेषेंकरून क्षौर करावें असें विधान करण्याकरितां आहे. जीवत्पितृकास पिंडदानाचा जो निषेध

सांगितला तो, नांदीश्राद्ध, तीर्थश्राद्ध आणि पिता संन्यासी इत्यादिक असल्यामुळें पुत्रकर्तृक दर्शमहाल्यादि श्राद्धें यांमध्यें पिंडरहित सांकल्पिक श्राद्ध करावें असा बोध होण्याकरितां आहे.

---

**महापितृयज्ञेसोमयागेमातृमातामहादेर्वार्षिकश्राद्धेषु गयायामन्वष्टक्यादौचपिंडदानं भवत्येवेत्युक्तं पिंडदानंप्रकुर्वीतमातापित्रोःक्षयाहनीतिश्राद्धविधिनापिंडदानेसिद्धे पुनःपिंड विधिःपित्रोर्वार्षिकेगर्भिणीपतित्वनिषिद्धकालादिप्रयुक्तनिषेधबाधनार्थं तेनविवाहव्रतचूडा सुवर्षमर्धंतदर्धकं पिंडदानंमृदास्नानंनकुर्यात्तिलतर्पणमितिनिषेधस्यापिबाधः क्षयाहग्रहणं सपिंडीकरणमासिकेष्वपिपिंडदानोपलक्षणपरं ॥**

महापितृयज्ञ; सोमयाग; माता, मातामहादिक यांचीं वार्षिक श्राद्धें; गयाश्राद्ध आणि अन्वष्टक्यादि श्राद्धें यांमध्यें पिंडदान होतेंच असें पूर्वी सांगितलें आहे. “ मातापितरांचे क्षयदिवसीं पिंडदान करावें ” असा जो श्राद्धाचा विधि तेणेंकरून पिंडदान करावें असें सिद्ध झालें असतां पुनः पिंडदानाचा जो विधि सांगितला तो मातापितरांच्या वार्षिक श्राद्धीं, गर्भिणीपतित्व निषिद्धकालादि तत्प्रयुक्त निषेधाचा बाध होण्याकरितां आहे. व त्यावरून “ विवाह, उपनयन, चौल हीं झालीं असतां क्रमेंकरून एक वर्ष, सहा मास आणि तीन मासपर्यंत पिंडदान, मृत्तिकास्नान व तिलतर्पण हीं करूं नयेत असा जो निषेध त्याचाहि बाध होतो. क्षयदिवसाचें ग्रहण केलें तें सपिंडीकरण, मासिकें यांमध्येंहि जें पिंडदान करणें त्याचें उपलक्षणपर आहे.

---

**अथप्रेतकर्मप्रतिप्रसवः जीवत्पितृकःस्वमातुरपुत्रसापत्नमातुःस्वपुत्रसपत्नीपुत्ररहितभार्यायाअपुत्रपितृव्यस्यापुत्रमातामहमातामह्योश्चदाहादिप्रेतकर्माणिकुर्यात् अत्रापुत्रपदेनमुख्यगौणपुत्रपौत्रप्रपौत्राभावोविवक्षितः मातुरौर्ध्वदेहिकमनुपनीतोपिजीवत्पितृकःकुर्यात् तत्रविशेषः ऊनत्रिवर्षश्चूडारहितश्चेद्दाहमात्रंसमंत्रकंकृत्वान्यदन्येनकारयेत् यदातुकृतचूडः पूर्णत्रिवर्षोवातदासर्वंसमंत्रकंप्रेतकर्मकुर्यात् ब्रह्मचारीतुपित्रोर्मातामहस्यचांत्यकर्मकुर्यान्नान्यस्य भर्तृदौहित्रयोःसत्त्वेभर्तैवपत्न्यादाहादिकुर्यात् मुंडनंतुभर्तुर्न एवमपुत्रस्यपत्नीदौहित्रयोः सत्त्वेपत्न्येवपत्युःकुर्यात् तत्रदाहमात्रंसमंत्रकंकृत्वान्यत्संकल्पमात्रंस्वयंविधायब्राह्मणद्वारा कारयेत् भर्तृसपत्नीपुत्रयोःसत्वेसापत्नपुत्रएवकुर्यान्नभर्ता सपत्नीपुत्रदौहित्रयोःसत्त्वेसपत्नीपुत्रएव अपुत्रयोर्विधवाविधुरयोर्भ्रातृपुत्रदौहित्रयोःसत्त्वेदौहित्रएवाधिकारीतिबहवः विधवायाभर्तुर्भ्रातृपुत्रएव विधुरस्यस्वभ्रातृपुत्रएवेतिजीवपितृकनिर्णयभट्टाः अपुत्रस्यपत्नीभ्रातृपुत्रयोःसत्त्वेपत्न्येव एवंपुत्रासन्निधौपौत्रादेःपितामहपितामह्याद्यौर्ध्वदेहिकाद्यधिकारः इत्थं पित्र्यकर्ममुंडनप्रेतकर्माद्यधिकारानधिकारौजीवत्पितृकस्यप्रपंचितौ अत्रविषयभेदाद्बालबोधार्थत्वाच्चपुनरुक्तिर्नातिदोषाय सपिंडानांसगोत्रसपिंडमरणेसकृत्सकृत्तिलांजलिदानंविहितं तज्जीवत्पितृकेणापिकार्यम् एवंमातामहाचार्यादिभ्योपि इतिजीवत्पितृकनिर्णयः ॥**

## आतां यानंतर प्रेतकर्माचा प्रतिप्रसव[1] सांगतों.

जीवत्पितृकानें स्वकीय माता; अपुत्र सापत्न माता; स्वपुत्र व सपत्नीपुत्र यांहीं विरहित स्त्री; अपुत्र पितृव्य; अपुत्र मातामह व मातामही यांचीं दहन इत्यादि प्रेतकर्मे करावीं. एथें अपुत्र पदेंकरून मुख्य व गौण असे पुत्र, पौत्र आणि प्रपौत्र यांचा अभाव विवक्षित आहे, ह्मणजे यांतून कोणी नसतील तर असा अर्थ होतो. मौंजी न झालेल्या जीवत्पितृकानेंहि मातेचें अंत्यकर्म करावें. त्याविषयीं विशेष निर्णय—तीन वर्षांहून कमी वयाचा असून चौल न झालेला जर असेल तर त्यानें दहन मात्र समंत्रक करून इतर क्रिया दुसऱ्याकडून करवावी. ज्या कालीं चौल झालेला, किंवा पुरा तीन वर्षांचा असेल त्या कालीं सर्व प्रेतकर्म समंत्रक स्वतां करावें. ब्रह्मचारी असेल तर त्यानें माता, पिता व मातामह यांचें अंत्यकर्म करावें, इतरांचें करूं नये. भर्ता व दौहित्र ( कन्यापुत्र ) असतां भर्त्यानेंच स्त्रियेचें दहनादिक करावें. भर्त्यानें मुंडन करूं नये. याप्रमाणें पुत्ररहिताची स्त्री, व दौहित्र असतील तर स्त्रियेनेंच पतीचें अंत्यकर्म करावें. त्यामध्यें दहन मात्र समंत्रक स्वतां करून इतर कर्म, संकल्पमात्र आपण करून ब्राह्मणाकडून करवावें. भर्ता व सवतीचा पुत्र अशीं असतां सापत्न पुत्रानेंच अंत्य कर्म करावें, भर्त्यानें करूं नये. सापत्नपुत्र व दौहित्र असतील तर सापत्नपुत्रानेंच करावें. पुत्ररहित विधवा व विधुर यांचे भ्रातृपुत्र व दौहित्र असतील तर दौहित्रच अधिकारी असें बहुत ग्रंथकार ह्मणतात. विधवेच्या भर्त्याचा भ्रातृपुत्रच अधिकारी, आणि विधुराचा स्वकीय भ्रात्याचा पुत्रच अधिकारी असें जीवत्पितृक निर्णयांत भट्ट सांगतात. अपुत्राची पत्नी व भ्रातृपुत्र असतां पत्नीच अधिकारी होय. याप्रमाणें पुत्र जवळ नसेल तर पौत्र इत्यादिकांला पितामह व पितामही इत्यादिकांच्या अंत्यकर्मादिकाचा अधिकार आहे. याप्रमाणें जीवत्पितृकास पित्र्यकर्म, मुंडन व प्रेतकर्म इत्यादिकांचे अधिकार आणि अनधिकार ते विस्तारेंकरून सांगितले. या स्थलीं विषयांचा बहुत भेद असल्यामुळें व शास्त्रव्युत्पत्तिरहितास बोध होण्यास्तव जी पुनरुक्ति झाली असेल ती अतिदोषाकारणें नाहीं. सगोत्र, सपिंड मृत झाला असतां सपिंडांनीं एकेकवार तिळांजलि द्यावी असें सांगितलें आहे यास्तव ती तिळांजलि जीवत्पितृकानेंहि द्यावी. याप्रमाणें मातामह, आचार्य ( गुरु ) इत्यादिकांसहि द्यावी. याप्रमाणें जीवत्पितृकाचा निर्णय सांगितला.

---

**अथश्राद्धाद्यधिकारिनिर्णयः तत्रसांवत्सरिकादिश्राद्धेषुदाहाद्यौर्ध्वदेहिकक्रियायांचौरसःपुत्रोमुख्योधिकारी औरसपुत्राणांबहुत्वेज्येष्ठएवाधिकारी ज्येष्ठस्याभावेऽसन्निधानेवापा**तित्यादिनाधिकाराभावेवाज्येष्ठानुजः यत्तुज्येष्ठासन्निधौसर्वतःकनिष्ठोधिकारीनतुमध्यमाइतितन्निर्मूलम् तत्रपुत्राणांविभक्तत्वेकनिष्ठेभ्योधनंगृहीत्वाज्येष्ठेनैवसपिंडीकरणांताक्रियाकार्या सांवत्सरिकादिकंतु पृथक्पृथक् अविभक्तत्वेतुसांवत्सरिकादिकमप्येकेनैवकार्यं एकेनकृतेपिसर्वेषांफलभागित्वात्सर्वैःपुत्रैर्ब्रह्मचर्यपरान्नवर्जनादयोनियमाःकार्याः पुत्राणामेकदेशस्थित्यभावेदेशांतरेगृहांतरेवास्थितैस्तैरविभक्तैरपिपृथगेववार्षिकादिकंकार्यम् तत्रयदाज्येष्ठास

---

[1] प्रतिप्रसव ह्मणजे एकाद्या कार्याचा जो सामान्यतः निषेध केला त्याचा विशेषेंकरून पुनः जो विधि करावा तो.

भिधौकनिष्ठोदाहादिकंकरोतितदाषोडशश्राद्धांतमेवकुर्यान्नसपिंडीकरणम् वर्षपर्यंतंज्येष्ठप्र तीक्षांकुर्यात् तन्मध्येज्ञातेज्येष्ठेनैवकार्यम् नोचेद्वर्षांतेकनिष्ठेनापिकार्यम् वर्षात्प्राक्पुत्रभिन्ने नकृतमपिमासिकानुमासिकसपिंडीकरणंपुत्रेणपुनःकार्यं एवंकनिष्ठेनकृतमपिज्येष्ठपुत्रेणपुनः कार्यं विशेषस्त्वग्रेवक्ष्यते ॥

## आतां श्राद्धादिकांचे अधिकारी यांचा निर्णय सांगतों.

त्यामध्यें सांवत्सरिकादिक श्राद्धें व दहन इत्यादिक और्ध्वदेहिक क्रिया यांविषयीं औरस पुत्र मुख्य अधिकारी. औरस पुत्र बहुत असतां ज्येष्ठपुत्रच अधिकारी. ज्येष्ठाचा अभाव किंवा सन्निध नसेल अथवा पातित्यादि कारणानें ज्येष्ठास अनधिकार असेल तर ज्येष्ठाहून जो कनिष्ठ ( द्वितीय ) तो अधिकारी. ज्येष्ठ सन्निध नसतां सर्वत्र कनिष्ठ अधिकारी, मध्यम अधिकारी नाहींत असें जें तें निर्मूल आहे. त्यामध्यें पुत्रांचा विभक्तपणा असतां कनिष्ठां-पासून धन घेऊन ज्येष्ठपुत्रानेंच सपिंडीकरणापर्यंत क्रिया करावी, सांवत्सरिकादि श्राद्ध तर निरनिराळें करावें. विभक्तपणा नसतां सांवत्सरिकादिकहि एकानेंच करावें. एकानें केलें अस-तांहि सर्व फलभागी होतात यास्तव सर्व पुत्रांनीं ब्रह्मचर्य, परान्नवर्जन इत्यादि नियम धारण करावे. पुत्रांचें एका देशांत राहणें नसेल आणि देशांतरीं अथवा दुसऱ्या घरीं राहतील तर त्या अविभक्तांनींहि निराळेंच वार्षिकादिक श्राद्ध करावें. त्यामध्यें ज्या कालीं ज्येष्ठ समीप नसल्यामुळें कनिष्ठानें दहन इत्यादिक केलें असेल त्या कालीं षोडशश्राद्धापर्यंतच कनिष्ठानें क्रिया करावी, सपिंडी करूं नये. वर्षपर्यंत ज्येष्ठ भ्रात्याची प्रतीक्षा करावी. एका वर्षाचे आंत ज्ञात झालें असल्यास ज्येष्ठानेंच सपिंडी करावी. तसें नसेल तर वर्षांतीं कनिष्ठानेंहि करावी. वर्षाच्या पूर्वीं पुत्रावांचून इतरानें मासिक, अनुमासिक, सपिंडीकरण इत्यादि क्रिया केली असेल तथापि पुत्रानें पुनः करावी. याप्रमाणें कनिष्ठानें केली असेल तथापि ज्येष्ठ पुत्रानें पुनः करावी. याविषयीं विशेष निर्णय पुढें सांगूं.

---

कनिष्ठस्यसाग्निकत्वेसपिंडीकरणमपिद्वादशेन्हिकनिष्ठेनकार्यं औरसपुत्राभावेपुत्रिकासुतक्षेत्रजादयोद्वादशविधाः पुत्राउक्तास्तथापि कलौतेषांपुत्राणांनिषेधादौरसपुत्राभावेदत्तक एवाधिकारी मातापितृभ्यामन्यतरेणवाविधिपूर्वंदत्तःप्रतिगृहीतृसवर्णोदत्तकः भार्यानुम त्यापत्युःपुत्रदातृत्वंतदप्यापदि अत्यंतापदितुभार्यानुमत्यभावेपि पत्न्याःपत्यनुमत्यैव अत्रविशे षविचारःप्रागुक्तः दत्तकाभावेपौत्रः पौत्राभावेप्रपौत्रः अन्येत्वौरसाभावेपौत्रः तदभावे प्रपौत्रः प्रपौत्राभावेदत्तकइत्याहुः उपनीतपौत्रसत्त्वेप्यनुपनीतस्याप्यौरसपुत्रस्यैवाधिकारः सचकृतचूडस्यैववर्षाधिकवयसः पूर्णत्रिवर्षस्यत्वकृतचूडस्यापि अनुपनीतेनापिमंत्रपाठपूर्व कमेवपित्रोरौर्ध्वदेहिकंसांवत्सरिकादिकंश्राद्धंचकार्यं अशक्तौत्वग्निदानमात्रंसमंत्रकमनुप नीतेनकार्यं अन्यत्त्वन्यद्द्वारा एवंश्राद्धेदर्शमहालयादौसंकल्पमात्रंकार्यं अन्यदितरेण के चित्तूनत्रिवर्षेणचूडारहितेनापिदाहमात्रंसमंत्रकंकार्यंशेषमन्येनेत्याहुः दत्तकस्तूपनीतएवाधि कारी दत्तकाभावेप्रपौत्राभावेचभर्तुःपत्नीपत्न्याभर्ताचदाहाद्यौर्ध्वदेहिकंसांवत्सरिकश्राद्धा

दिकंचकुर्यात् भर्तुरपिसपत्नीपुत्रसत्त्वेधिकारोन त्रिदध्यादौरसःपुत्रोजनन्याऔर्ध्वदेहिकं तदभावेसपत्नीजइत्युक्तेः भार्ययापिसमंत्रकमेवौर्ध्वदेहिकादिकंकार्यं अशक्तौत्वग्निदानमात्रं समंत्रकंकृत्वाशेषमन्येनकार्यं श्राद्धेसंकल्पमात्रंकृत्वाशेषमन्येन ॥

कनिष्ठ पुत्र अग्नियुक्त असेल तर सपिंडीकरणाहि बाराव्या दिवसीं कनिष्ठानें करावें. औरसपुत्राचा अभाव असतां पुत्रिकापुत्र, क्षेत्रज इत्यादिक बारा प्रकारचे पुत्र उक्त आहेत तथापि कलियुगांत त्या पुत्रांचा निषेध आहे याकरितां औरस पुत्राच्या अभावीं दत्तकच अधिकारी. माता व पिता या उभयतांनीं अथवा दोहोंतून एकानें विधिपूर्वक दत्त केला असून तो प्रतिग्रहीच्या वर्णातला असावा तो दत्तक होय. स्त्रियेचें अनुमोदन घेऊन पतीनें पुत्र देणें तेंहि आपत्तिविषयक जाणावें. अत्यंत आपत्ति असेल तर स्त्रियेचें अनुमोदन नसतांहि पतीनें द्यावा. स्त्रियेस पुत्र देण्याचा अधिकार पतीच्या अनुमतीकरूनच आहे. याविषयीं विशेष विचार पूर्वी सांगितला आहे. दत्तकाच्या अभावीं पौत्र, पौत्राच्या अभावीं प्रपौत्र. दुसरे ग्रंथकार तर औरसाच्या अभावीं पौत्र, त्याच्या अभावीं प्रपौत्र, प्रपौत्राच्या अभावीं दत्तक असें सांगतात. मौंजी झालेला पौत्र असला तथापि मौंजी न झालेला असाहि औरस पुत्रच अधिकारी आहे. तो अधिकार एक वर्षाहून अधिक वयाचा असून चौलसंस्कार झालेल्यासच आहे. चौलसंस्कार न झालेला असून पूर्ण तीन वर्षांचा असेल तर त्यालाहि अधिकार आहे. मौंजी न झालेल्यानेंहि मंत्रपाठपूर्वकच मातापितरांचें अंत्यकर्म व सांवत्सरिकादि श्राद्ध करावें. सर्व कर्म करण्यास सामर्थ्य नसेल तर, समंत्रक अग्नि देणें मात्र मौंजी न झालेल्यानें करून इतर कर्म दुसऱ्याकडून करवावें. याप्रमाणें श्राद्ध, दर्शश्राद्ध, महालय इत्यादिकीं संकल्प मात्र करून इतर कर्म दुसऱ्याकडून करवावें. कोणी ग्रंथकार तर, तीन वर्षांहून कमी वयाचा असून चौलसंस्कार न झालेला असला तथापि त्यानेंहि समंत्रक दहन मात्र करून शेषकर्म दुसऱ्याकडून करवावें असें ह्मणतात. मौंजी झालेलाच दत्तक पुत्र अधिकारी होतो. दत्तकाचा अभाव व प्रपौत्राचा अभाव असतां भर्त्याचें पत्नीनें व पत्नीचें भर्त्यानें दहन इत्यादिक और्ध्वदेहिक कर्म व सांवत्सरिकश्राद्धादिक करावें. सापत्न पुत्र असेल तर भर्त्यालाहि अधिकार नाहीं; कारण, “ मातेचें अंत्यकर्म औरसपुत्रानें करावें, त्याच्या अभावीं सापत्नपुत्रानें करावें ” असें वचन आहे. स्त्रियेनेंहि पतीचें समंत्रक और्ध्वदेहादिक कर्म करावें. सामर्थ्य नसेल तर समंत्रक अग्नि देणें मात्र आपण करून शेषकर्म दुसऱ्याकडून करवावें. श्राद्धांत संकल्प मात्र स्वतां करून शेषकर्म दुसऱ्याकडून करवावें.

---

यद्यप्यविभक्तस्यसंसृष्टस्यवा भ्रातुरेव धनग्रहाधिकारस्तथापिक्रियाधिकारःपत्न्या एव विभक्तासंसृष्टेतु भ्रातरिधनाधिकारोपिपत्न्याएव पत्न्यभावेविभक्तासंसृष्टस्यकन्यापिंडदा धनहारिणीच तत्रापिविवाहितैवपिंडदा धनहरात्वनूढापि दुहितुरभावेदौहित्रोधनहारी पिंडदश्च दौहित्राभावेभ्राता भ्रातुरभावेभ्रातुःपुत्रः अविभक्तस्यसंसृष्टस्यचपत्न्यभावेभ्राता संसृष्टोनामपूर्वविभक्तोभूत्वापुनःस्वधनंभ्रातृधनैरेकीकृत्यैकपाकाद्युपजीवनः तत्रसोदरासोदरसमवायेसोदरएव तत्रापिज्येष्ठकनिष्ठयोःसत्त्वेकनिष्ठएव कनिष्ठभ्रातुरभावेज्येष्ठभ्रातैव

**कनिष्ठबहुत्वेमृतानंतरस्तदभावेतदनंतरादयः** एवंज्येष्ठबहुत्वेमृतानंतरक्रमेणैव सोदरभ्रातुर **भावेसापत्नभ्राता अत्रापिज्येष्ठत्वादिविचारः**पूर्ववदेव केचित्तुदुहितृदौहित्रयोर्धनहारित्वेपि **विभक्तासंसृष्टस्यदाहादिकंभ्रात्रैवकार्यं** सगोत्रसद्भावेभिन्नगोत्रस्यतदनधिकारादित्याहुः **भ्रातुरभावेभ्रातृपुत्रः तत्रापिसोदरभ्रातृपुत्रोमुख्यः तदभावेसापत्नभ्रातृपुत्रः तदभावेपिता पितुरभावेमाता मात्रभावेस्नुषा तदभावेभगिनी तत्रानुजाग्रजसोदरासोदराणांसमवायेभ्रातृ वत् भगिन्यभावेभगिनीपुत्रः समवायेतद्वदेव तदभावेपितृव्यतत्पुत्रादयःसपिंडाः तदभावे सोदकाः तदभावेगोत्रजाः तदभावेमातामहमातुलतत्पुत्रादयोमातृसपिंडाअनुक्रमेण मातृ सपिंडाभावेस्वपितृष्वसृमातृष्वसृपुत्राः तदभावेपितुःपितृष्वसृमातृष्वसृमातुलपुत्ररूपाःपितृ बंधवः एवंमातुःपितृष्वस्रादिपुत्ररूपमातृबंधवः पितृबंधूनामभावेधिकारिणः तदभावेशिष्यः शिष्याभावेजामाताश्वशुरस्य श्वशुरोजामातुः तदभावेसखा तदभावेविप्रस्यकश्चिद्धनहारी विप्रभिन्नस्यराज्ञाधनंगृहीत्वातेनधनेनान्यद्द्वाराकारणीयं अथवाविप्राद्यैर्मरणोन्मुखैर्धर्मे पुत्रःकार्यः ॥**

जरी अविभक्त अथवा संसृष्ट अशा भ्रात्यासच धनग्रहणाचा अधिकार आहे तथापि क्रिया करण्याचा अधिकार स्त्रीसच आहे. विभक्त व असंसृष्ट भ्राता असतां धनग्रहणाचाहि अधिकार स्त्रीसच आहे. पत्नी नसेल तर विभक्त, असंसृष्ट असा जो मृत त्याची जी कन्या तीच पिंड देणारी व धन घेणारी आहे, तत्रापि विवाह झालेली तीच पिंड देणारी आहे. धन घेणारी तर अविवाहितहि आहे. कन्या नसेल तर कन्येचा पुत्र धन घेणारा व पिंड देणारा होतो. कन्येचा पुत्र नसेल तर भ्राता; भ्राता नसेल तर भ्रात्याचा पुत्र अधिकारी. अविभक्त व संसृष्ट याची पत्नी नसेल तर भ्राता अधिकारी. संसृष्ट ह्मणजे पूर्वी विभक्त होऊन पुनः आपलें धन भ्रात्याच्या धनांत मिळवून एका स्वयंपाकादिकानें उपजीविका करणारे ते. त्यांमध्यें सोदर ( सख्खा भ्राता ), असोदर असे असतील तर सख्खा भ्राताच अधिकारी, त्यामध्येंहि ज्येष्ठ भ्राता व कनिष्ठ भ्राता असे दोन असतील तर कनिष्ठच अधिकारी. कनिष्ठ भ्राता नसेल तर ज्येष्ठ भ्राताच अधिकारी. कनिष्ठ भ्राते बहुत असतील तर मृत-झालेल्याहून जो कनिष्ठ तो अधिकारी; तो नसेल तर त्याच्या पुढचे अधिकारी होत. याप्रमाणें ज्येष्ठ बहुत असतील तर मृताच्या अनंतर जो त्याच्या क्रमानेंच अधिकारी जाणावे. सोदर भ्राता नसेल तर सापत्न भ्राता, ह्या सापत्न भ्रात्याविषयींहि ज्येष्ठत्वादिकाचा निर्णय पूर्वीप्रमाणेंच जाणावा. कोणी ग्रंथकार तर, कन्या व कन्यापुत्र हे जरी धनग्रहणाधिकारी आहेत तत्रापि विभक्त असून असंसृष्ट अशा भ्रात्याचें दहनादिक भ्रात्यानेंच करावें, कारण, सगोत्री असतां भिन्नगोत्री याला त्या कर्माचा अधिकार नाहीं असें ह्मणतात. भ्राता नसेल तर भ्रातृपुत्र; त्यामध्येंहि सोदर भ्रात्याचा पुत्र मुख्य होय. तो नसेल तर सापत्नभ्रातृपुत्र; तो नसेल तर पिता; पिता नसेल तर माता; माता नसेल तर स्नुषा; स्नुषा नसतां भगिनी; त्यामध्यें अनुज; अग्रज, सोदर, असोदर असे बहुत असतील तर भ्रात्याप्रमाणें निर्णय जाणावा. भगिनी नसेल तर भगिनीपुत्र; भगिनीपुत्र बहुत असतील तर भ्रात्यांप्रमाणें निर्णय जाणावा. भगिनीपुत्र नसेल तर पितृव्य, पितृव्यपुत्रादिक, सपिंड अधिकारी जाणावे.

सपिंड नसतील तर सोदक; सोदक नसतील तर गोत्रज; गोत्रज नसतील तर मातामह, मातुल, मातुलपुत्र इत्यादिक मातृसपिंड अनुक्रमेंकरून अधिकारी होतात. मातृसपिंडांतील नसतील तर आपले आतेबंधु व माऊसबंधु; आतेबंधु व माऊसबंधु नसतील तर पित्याचे आतेबंधु, माऊसबंधु आणि मामेबंधुरूप पितृबंधु याप्रमाणें पितृबंधु नसतां मातेचे पितृष्वस्रादिपुत्ररूप मातृबंधु अधिकारी होतात. ते नसतील तर शिष्य; शिष्य नसेल तर जामाता श्वशुराचा अधिकारी आणि श्वशुर जामाताचा अधिकारी; जामाता नसेल तर सखा ( मित्र ) अधिकारी; सखा नसेल तर ब्राह्मणाचा कोणीएक धनहारी जाणावा. ब्राह्मणाहून इतर असल्यास त्याचें धन राजानें घेऊन त्या द्रव्येंकरून दुसऱ्याकडून कर्म करवावें. अथवा मरणोन्मुख अशा विप्रादिकांनीं धर्मपुत्र करावा.

---

**अथस्त्रीणांदाहाद्यधिकारिणः अनूढायाःस्त्रियाःपिता तदभावेभ्रात्रादिः ऊढायास्तत्पुत्राभावेसपत्नीपुत्रः तदभावेपौत्रप्रपौत्राः तदभावेपतिः तदभावेदुहिता तदभावेदौहित्रः तदभावेपत्युर्भ्राता तदभावेपत्युर्भ्रातृपुत्रः तदभावेस्नुषा तदभावेपिता पितुरभावेभ्राता तदभावेभ्रातृपुत्रादयःपूर्वोक्ताः अत्रसर्वत्रपुत्रभिन्नानांपुत्रासन्निधानात्पुत्राभावाद्वाकर्तृत्वमितिस्थितम् तत्रयदिपुत्रासन्निधानात्कर्तृत्वंतदापुत्रभिन्नैर्दाहमारभ्यसपिंडीकरणात्प्राचीनकर्मैवकार्यम् नतुपुत्रभिन्नैःसपिंडीकरणंकार्यम् पुत्राभावेत्वन्यैःसपिंडीकरणमपिकार्यम् तत्रापिसपिंडादिभिर्नृपांतैर्दाहमारभ्यदशाहक्रियाकार्याएव ताएवपूर्वाइत्युच्यंते ततएकादशाहमारभ्यसपिंडीकरणांतामध्यमसंज्ञास्तासुसपिंडादीनांकृताकृतत्वम् तदूर्ध्वाअनुमासिकसांवत्सरिकाद्यास्ताउत्तराख्याःसपिंडादिभिर्नकार्याएव इदंचतदीयवृत्त्यादिस्थावरधनस्यचरधनस्यवाग्रहणाभावे तदन्यतरधनग्रहणेतुसपिंडादिभिरपिमध्यमोत्तराख्याअपिक्रियाःकार्याएव राज्ञातुमृतधनसत्त्वेतद्धनद्वारातत्सजातीयवर्णहस्तेनसर्वाअपिक्रियाः करणीयाएव धनाभावेतुपूर्वाताएवावश्यंकरणीयानान्याः सपिंडादिनृपांतभिन्नानांतुमृतस्यधनाभावेपिस्वधनेनैवसपिंडीकरणांतक्रियाकरणमावश्यकं मृतस्यधनंगृहीत्वाप्रेतकार्याकरणेनृपांतानांतद्वर्णवधप्रायश्चित्तं पुत्राद्यैर्भ्रातृसंतत्यंतैर्दौहित्रैश्चतत्पुत्रैश्चत्रिविधाअपिक्रियाधनग्रहणसत्त्वेतदसत्त्वेवापि कार्याएव तत्रस्त्रीणामुत्तराःक्रियामृताहन्येव नतुदर्शादौ भर्तृश्राद्धेनैवनिर्वाहस्मृतेः पूर्वमध्यमाख्यास्तुपृथगेवस्त्रीणाम् केचित्पुत्रपत्योरभावेस्त्रीणांदौहित्रादिभिःसपिंडीकरणरहिताएवोत्तराःक्रियाःकार्याः सपिंडीकरणंतुतासांनकार्यम् सपिंडीकरणाभावेपिएकोद्दिष्टविधिनावार्षिकादिकंकार्यमित्याहुः ब्राह्मणस्त्वन्यवर्णानांनकुर्यात्कर्मपैतृकं कामाल्लोभाद्भयान्मोहात्कृत्वातज्जातितांव्रजेत् शूद्रेणापिब्राह्मणस्यनकार्यंपैतृकंक्वचित् ॥**

## यानंतर स्त्रियांचे दहनादिकर्मांचे अधिकारी सांगतों.

अविवाहित स्त्रियेचा पिता अधिकारी; पिता नसेल तर भ्राता इत्यादिक अधिकारी; विवाहित असून तिचा पुत्र नसेल तर सापत्नपुत्र अधिकारी; सापत्नपुत्र नसल्यास पौत्र, प्रपौत्र अधिकारी; त्यांच्या अभावीं पति; पति नसेल तर कन्या; कन्या नसल्यास कन्यापुत्र;

कन्यापुत्र नसल्यास पतीचा भ्राता; पतीचा भ्राता नसल्यास पतीच्या भ्रात्याचा पुत्र; त्याच्या अभावीं स्नुषा; तिच्या अभावीं पिता; पित्याच्या अभावीं भ्राता; त्याच्या अभावीं पूर्वी सांगितलेले भ्रातृपुत्रादिक अधिकारी होत. एथें सर्व ठिकाणीं पुत्रव्यतिरिक्त जे अधिकारी सांगितले त्यांस क्रियाधिकार, पुत्र समीप नसतील अथवा पुत्राचा अभाव असेल तर आहे, असें जाणावें. त्यामध्यें पुत्र समीप नसल्यामुळें जर दुसरा कर्ता असेल तर पुत्रव्यतिरिक्तांनीं दहनाला आरंभ करून सपिंडीकरण्याच्या पूर्वीचेंच कर्म करावें, पुत्रव्यतिरिक्तांनीं सपिंडीकरण करूं नये. पुत्राचा अभाव असेल तर इतरांनीं सपिंडीकरणहि करावें. त्यामध्येंहि सपिंडापासून राजापर्यंत जे अधिकारी त्यांतून कोणीहि दहनाला आरंभ करून दहा दिवसांच्या क्रिया निश्चयें कराव्या, व त्याच क्रिया पूर्वा अशा होत. तदनंतर अकराव्या दिवसाला आरंभ करून सपिंडीकरणांत क्रिया त्या मध्यमसंज्ञक होत. त्या संपिडादिकांस कृताकृत आहेत. सपिंडीपलीकडच्या क्रिया अनुमासिक, सांवत्सरिक इत्यादिक त्या उत्तरसंज्ञक क्रिया होत, व त्या सपिंडादिकांनीं न कराव्याच. मृताची वृत्ति इत्यादि स्थावर धन व जंगम धन घेतलें नसतां हा निर्णय जाणावा. स्थावर व जंगम यांतून कोणतें एक धन घेतलें असेल तर सपिंडादिकांनींहि मध्यम, उत्तरसंज्ञकहि क्रिया कराव्याच. राजानें तर, मृताचें धन असल्यास त्या धनानें, मृताचा जो सजातीय असेल त्याच्या हातून त्या मृताच्या निश्चयें सर्व क्रिया करवाव्या. धन नसेल तर पूर्वाता मात्र क्रिया अवश्य करवाव्या, इतर करवूं नयेत. सपिंडांपासून राजापर्यंत जे अधिकारी तद्भिन्नांनीं मृताचें धन नसेल तथापि आपल्या धनेंकरूनच सपिंडीकरणांत क्रिया करणें अवश्य आहे. मृताचें धन घेऊन त्याचें प्रेतकार्य न केलें असतां राजापर्यंत सर्व अधिकारी यांला तद्वर्णवधाचें प्रायश्चित्त आहे. पुत्र आहे आदि ज्यांस व भ्रात्याची संतति आहे अंतीं ज्यांस ते, दौहित्र, दौहित्रपुत्र यांनीं पूर्वोक्त तीन प्रकारच्या क्रिया, धन घेतलेलें असो किंवा नसो तथापि निश्चयें कराव्या. त्यामध्यें स्त्रियांच्या उत्तरक्रिया मृत दिवसींच कराव्या, दर्शादिदिवसीं करूं नयेत. कारण भर्त्याचे श्राद्धानेंच निर्वाह होतो असें स्मृतिवचन आहे. पूर्व, मध्यमसंज्ञक क्रिया तर स्त्रियांच्या पृथक् कराव्या. कोणी ग्रंथकार, पुत्र व पति यांचा अभाव असेल तर स्त्रियांच्या, दौहित्र इत्यादिकांनीं सपिंडीकरणविरहितच उत्तरसंज्ञक क्रिया कराव्या, सपिंडीकरण तर स्त्रियांचें करूं नये, सपिंडीकरण नाहीं तथापि एकोद्दिष्टविधि करून वार्षिकादिक करावें असें ह्मणतात. "ब्राह्मणानें इतर वर्णाचें पैतृककर्म करूं नये. काम, लोभ, मोह यांच्या आधीन होऊन कदाचित् करील तर तज्जातित्वाला पावतो. शूद्रानेंहि ब्राह्मणाचें पैतृककर्म करूं नये."

---

दत्तकस्तु जनकपितुःपुत्राद्यभावे जनकपितुःश्राद्धंकुर्याद्धनंचगृण्हीयात् जनकपालकयोरुभयोःपित्रोः संतत्यभावे दत्तकोजनकपालकयोरुभयोरपिधनंहरेत् श्राद्धंचप्रतिवार्षिकमुभयोःकुर्यात् दर्शमहालयादौतु द्वयोःपित्राद्योःश्राद्धंदेयं तत्र द्वयोःपित्राद्योःपृथक्पिंडदानं पित्रादिद्वयद्वयोद्देशेनैकैकोवापिंडः एवं दत्तकस्यपुत्रोपि दत्तकजनकस्यपुत्राद्यभावेस्यपितरंपितामहद्वयंप्रपितामहद्वयंचोच्चार्यदर्शादिकंकुर्यात् तथैवधनंहरेत् एवंदत्तकपौत्रोपित

ज्जनककुलेप्रपितामहस्यपुत्राद्यभावेपितरंपितामहंचैकमुच्चार्यप्रपितामहद्वयमुच्चार्यदर्शादिश्राद्धंकुर्यात्प्रपितामहस्यधनंचहरेत् यद्येषांस्वासुभार्यास्वपत्यंनस्यात्रिकथंहरेयुः पिंडंचैभ्यस्त्रिपुरुषंदद्युरित्यादिरेकपिंडेद्वावनुकीर्तयेद्गृहीतारंचोत्पादयितारंचातृतीयात्पुरुषादित्यादेश्च लौगाक्ष्यादिस्मृतिवचनात् यदिजनकपालकयोरुभयोरपिपुत्रादिसंततिसत्त्वंतदादत्तकउभयोरप्यौर्ध्वदेहिकंवार्षिकादिकंचनकुर्यात् पालकपितुरौरसपुत्राद्विभक्तेनदत्तकेनदर्शमहालयादिश्राद्धमात्रंपालकपित्रापिपार्वणोद्देशेनकार्यम् अविभक्तस्यतुतदौरसकृतदर्शादिनैवदत्तकस्य दर्शादिसिद्धिरितिभाति ॥

दत्तकानें तर, जनकपित्याचा पुत्रादिक कोणीं अधिकारी नसेल तर जनक पित्याचें श्राद्ध करावें, व धनहि घ्यावें. जनक पिता व पालक पिता या उभयतांस संतति नसेल तर दत्तकानें जनक व पालक या उभयतांचें धन ग्रहण करावें, व उभयतांचें प्रतिसांवत्सरिक श्राद्धहि करावें. दर्श, महालय इत्यादि दिवसीं तर पिता इत्यादिक दोघांचें श्राद्ध करावें. त्यांमध्यें दोन पित्रादिकांस निराळें पिंडदान करावें, अथवा पित्रादिक दोघांदोघांच्या उद्देशानें एकेक पिंड द्यावा. याप्रमाणें दत्तकाच्या पुत्रानेंहि दत्तकाचे जनक पित्यास पुत्रादिक नसेल तर आपला पिता, दोन पितामह आणि दोन प्रपितामह ह्यांचा उच्चार करून दर्शादि श्राद्ध करावें, व धनहि त्याप्रमाणेंच ग्रहण करावें. याप्रमाणें दत्तकाच्या पौत्रानेंहि त्याच्या जनकपित्याच्या कुळामध्यें प्रपितामहास पुत्रादिक नसेल तर एक पिता व एक पितामह यांचा उच्चार करून दोन प्रपितामहांचा उच्चार करून दर्शादिश्राद्ध करावें आणि प्रपितामहाचें धनहि ग्रहण करावें. कारण, जर जनकपित्यापासून मागचे जे तीन पुरुष त्यांच्या स्त्रियांस अपत्य नसेल तर दत्तकानें, व त्याच्या पुत्रादिकांनीं तीन पुरुषांस पिंड देऊन त्यांचें धन घ्यावें, आणि एका पिंडाचे ठायीं दत्तक घेणारा पिता, व जनकपिता या दोघांचा उच्चार करावा, याप्रमाणें तिसऱ्या पुरुषापर्यंत जाणावें इत्यादिक लौगाक्षि इत्यादि स्मृतिवचन आहे. जर जनकपिता व पालकपिता या उभयतांसहि पुत्रादि संतति असेल तर दत्तकानें दोघांचेंहि अंत्यकर्म व वार्षिकादि श्राद्ध करूं नये. पालकपित्याचा औरसपुत्र असून त्या औरसापासून दत्तक विभक्त असेल तर त्यानें दर्श, महालय इत्यादि श्राद्ध मात्र पालकपिता इत्यादि पार्वणाच्या उद्देशानें करावें. विभक्त नसेल तर औरसपुत्रानें केलेलें जें दर्शादिश्राद्ध तेणेंकरूनच दत्तकाची दर्शादिश्राद्धसिद्धि होईल असें वाटतें.

---

ब्रह्मचारिणोमासिकाब्दिकादिश्राद्धंमातापितृभिःकार्यम् ब्रह्मचारिणातुमातृपितृमातामहोपाध्यायाचार्यभिन्नानांशवनिर्हरणंदाहाद्यंत्यकर्मचनकार्यम् अन्याधिकार्यभावेमातृपितृमातामहाचार्याणांदाहादिकंब्रह्मचारिणाकार्यम् तत्रदशाहकर्मकरणेदशाहमाशौचं दाहमात्रकरणे एकाहम् तदाप्यस्यनित्यकर्मलोपोनास्ति अशुचित्वेप्याशौचिनामन्नंतेननभोक्तव्यं तैःसहनवस्तव्यं तदुभयकरणेप्रायश्चित्तपुनरुपनयनेवक्ष्येते अन्येषांदाहादौकृच्छ्रत्रयंपुनरुपनयनंच ध

१ त्यांच्या स्त्रियादि अधिकारींचा अभाव असतां दत्तकादिकांस हा अधिकार आहे.

मार्थंकेनचित्कस्यचित्स्ववर्णस्यदाहादिश्राद्धादिकरणेसंपत्त्यादिफलं अयंसर्वोपिश्राद्धविधिः शूद्राणाममंत्रकःकार्यः अत्रकेचिद्वैदिकमंत्रपाठएवशूद्राणांवर्ज्यः पौराणमंत्रास्तुपठनीयाइत्याहुः पौराणमंत्राअपिशूद्रेणस्वयंनपठनीयाःकिंतुविप्रद्वारापठनीयाः वेदमंत्रास्तुनविप्रद्वारापीतिसिंधुः एवंद्विजस्त्रियोपि व्रतोद्यापनादाविवसंकल्पमात्रंस्वयंकृत्वावैदिकमंत्रादिप्रयुक्तंसर्वंश्राद्धंविप्रद्वाराकारयेयुरितिपारिजातकारमतम् शूद्रस्यसदामश्राद्धमेव पित्रेनमःपितामहायनमइत्येवमादिना नमोंतनाममंत्रेणनिमंत्रणपाद्यासनगंधपुष्पादिनाविप्रान्संपूज्यामंनिवेद्य सक्तुनापिंडदानादिकृत्वादक्षिणादानादिश्राद्धंसमाप्य सजातीयान्गृहसिद्धपक्वान्नेनभोजयेत् यत्तु सिंधौनाममंत्रेणावाहनाग्नौकरणकाश्यपगोत्रोच्चारपूर्वकपिंडदानादिकंतर्पणादिकंपाकेन पिंडदानादिकंचोक्तंतत्सच्छूद्रविषयम् सप्तपुरुषंत्रिपुरुषंवा परंपरया स्नानवैश्वदेवतर्पणादिकंशूद्रकमलाकरादिग्रंथसंगृहीतंधर्मंनियमेनाचरन्सच्छूद्र उच्यते एवंकिरातयवनादिहीनजातीयानांविप्रेभ्यआमदानदक्षिणादानपूर्वकंस्वस्वजातीयभोजनात्मकमेवश्राद्धम् राजकार्येनियुक्तस्यबंधनिग्रहवर्तिनः व्यसनेषुचसर्वेषुश्राद्धंविप्रेणकारयेत् अत्रप्रथमंजीवत्पितृकनिर्णय उक्तस्तत्रप्रसंगात्किंचिदधिकारविचारोप्युक्तः इदानींतुसर्वोप्यधिकारक्रमविचारःसविस्तर उक्तइतितेनात्रपुनरुक्तिर्बालबोधनार्थत्वान्नदोषाय इतिश्रीमदनंतोपाध्यायसूनुविरचितेधर्मसिंधुसारेश्राद्धाधिकारदाहाद्यधिकारनिर्णयः ॥

ब्रह्मचारी याचें मासिक, वार्षिक इत्यादि श्राद्ध मातापितरांनीं करावें. ब्रह्मचारी यानें तर माता, पिता, मातामह, उपाध्याय (अध्ययन सांगणारा), आचार्य यांवांचून इतरांचें शव नेणें व दहनादिक अंत्यकर्म करूं नये. दुसरा अधिकारी नसेल तर माता, पिता, मातामह आणि आचार्य यांचें दहनादिक अंत्यकर्म करावें. त्यामध्यें दहा दिवसांचें कर्म करणें असल्यास दहा दिवस आशौच धरावें, व दहन मात्र केलें असल्यास एक दिवस आशौच धरावें. त्या कालीं अंत्यकर्मामध्येंहि ब्रह्मचारी याला कर्मलोप नाहीं. ब्रह्मचारी अशुचि असला तथापि आशौची यांचें अन्न त्यानें भक्षण करूं नये, व त्यांच्याशीं वास करूं नये. तीं दोन (आशौची यांचें अन्न भक्षण, त्यांची संगति) केलीं तर प्रायश्चित्त व पुनरुपनयन हीं पुढें सांगेन. इतरांचें दहनादिक कर्म करील तर तीन कृच्छ्र व पुनरुपनयन करावें. धर्मार्थ कोणी कोण्या एका स्वकीय वर्णाचें दहनादिक व श्राद्धादिक करील तर संपत्ति इत्यादिक फळ प्राप्त होतें. हा सर्व श्राद्धविधि शूद्रांचा अमंत्रक करावा. याविषयीं कोणी ग्रंथकार, वैदिक मंत्राचा पाठ मात्र शूद्रांस वर्ज्य आहे, पौराणमंत्र तर शूद्रांनीं पठण करावे असें ह्मणतात. पौराणमंत्र जे तेहि शूद्रांनीं स्वतां पठण करूं नयेत, तर ब्राह्मणाकडून पठण करवावे, वेदमंत्र तर ब्राह्मणाकडूनहि पठण करवूं नयेत असें निर्णयसिंधूंत आहे. याप्रमाणें द्विजांच्या स्त्रिया यांनींहि व्रतोद्यापनाप्रमाणें संकल्प मात्र स्वतां करून वैदिकमंत्रांनीं युक्त सर्व श्राद्ध ब्राह्मणाकडून करवावें असें पारिजातकाराचें मत आहे. शूद्रानें सर्वदा आमान्नेंकरूनच श्राद्ध करावें. "पित्रे नमः पितामहाय नमः" इत्यादिक नमोंत नाममंत्रानें निमंत्रण, पाद्य, आसन, गंध, पुष्प इत्यादि उपचारांनीं ब्राह्मणाची पूजा करून आमान्न निवेदन करून

पिष्टेंकरून पिंडदानादिक करून दक्षिणादान इत्यादिक विधीनें श्राद्ध समाप्त करून आपले सजातीय यांस घरांत सिद्ध झालेल्या पक्वान्नेंकरून भोजन घालावें. जें निर्णयसिंधूमध्यें नाममंत्रानें आवाहन, अग्नौकरण, काश्यपगोत्रोच्चारपूर्वक पिंडदानादिक व तर्पणादिक आणि पाकानें पिंडदानादिक करावें ह्मणून सांगितलें तें सच्छूद्राविषयीं जाणावें. सात पुरुषांपर्यंत, अथवा तीन पुरुषांपर्यंत परंपरेनें स्नान, वैश्वदेव, तर्पणादिक शूद्रकमलाकरादि ग्रंथांत संग्रहीत केलेला धर्म आचरण करणारा तो सच्छूद्र होय. याप्रमाणें भिल्ल, यवन इत्यादि हीनजातीय यांनीं ब्राह्मणांस आमान्नाचें दान, दक्षिणादान करून आपापल्या जातीस भोजन देणें हेंच श्राद्ध करावें. "राजाच्या कार्यांत नियुक्त, कारागृहांत रहाणारा, सर्व व्यसनें असतां अशा समयीं ब्राह्मणाकडून श्राद्ध करवावें. ह्या उत्तरार्धांत प्रथम जीवत्पितृकाचा निर्णय सांगितला तेथें प्रसंगेंकरून किंचित् अधिकाराचा विचारहि सांगितला. विद्यमानकालीं तर, सर्वहि अधिकाराच्या क्रमाचा विचार सविस्तर सांगितला; तेणेंकरून व ज्यांला शास्त्रव्युत्पत्ति नाहीं त्यांला बोध व्हावा यास्तव अशा हेतूनें एथें पुनरुक्ति झाली ती दोषास कारण नाहीं. इति श्रीमदनंतोपाध्यायसूनुविरचिते धर्मसिंधुसारे श्राद्धाधिकारनिर्णयः समाप्तः ॥

---

अथश्राद्धशब्दार्थः पित्रादीन्मृतानुद्दिश्यविहितेकालेदेशेपक्वान्नामान्नहिरण्यान्यतमद्रव्यस्यविधिनादानंश्राद्धम् तत्राग्नौकरणंपिंडदानंब्राह्मणभोजनंचप्रधानम् तदुक्तं होमश्चपिंडदानंचतथाब्राह्मणभोजनम् श्राद्धशब्दाभिधेयंस्यादेकस्मिन्नौपचारिकमिति क्वचिद्वचनादशक्त्यावापिंडदानाद्यकरणे ब्राह्मणभोजनादिमात्रमपिश्राद्धपदार्थःसंपद्यतइतिचतुर्थपादार्थः तथाच वचनांतरं यजुषांपिंडदानंतुबव्हृचानांद्विजार्चनम् श्राद्धशब्दाभिधेयंस्यादुभयंसामवेदिनाम् अश्रद्धयापितरोनसंतीतिमत्वाश्राद्धमकुर्वाणस्यरक्तंपितरःपिबंति ॥

## आतां यानंतर श्राद्ध या शब्दाचा अर्थ सांगतों.

मृत जे पिता इत्यादिक त्यांच्या उद्देशानें विहित कालीं व देशीं पक्वान्न, आमान्न, हिरण्य यांतून कोणत्या एका द्रव्याचें विधीकरून दान करणें तें श्राद्ध होय. त्यामध्यें अग्नौकरण, पिंडदान आणि ब्राह्मणभोजन हें प्रधान होय. तें सांगितलें– "होम, पिंडदान, तसेंच ब्राह्मणभोजन हीं तीन कर्में मिळून जें विशेषकर्म तें श्राद्ध होय." क्वचित् स्थलीं वचनेंकरून अथवा अशक्तीनें पिंडदान इत्यादिक न केलें असतां ब्राह्मणभोजनादि मात्र करणें तें श्राद्ध होय, असा 'श्राद्ध' या पदाचा अर्थ सिद्ध होतो, याप्रमाणें चवथ्या पादाचा अर्थ सांगितला. तसेंच दुसरें वचन– "यजुःशाखी यांचें पिंडदान हें श्राद्ध होय, ऋक्शाखी यांचें द्विजांचें पूजन हें श्राद्ध होय, आणि सामवेदी यांचें पिंडदान व ब्राह्मणपूजन हें श्राद्ध होय." 'पितर नाहींत' असें अभक्तीनें मानून जो श्राद्ध न करणारा त्याचे पितर रुधिरपान करितात.

---

अथश्राद्धभेदाः तत्रश्राद्धंचतुर्विधम् पार्वणश्राद्धमेकोद्दिष्टश्राद्धंनांदीश्राद्धंसपिंडीकरणश्राद्धंचेति भेदात् पित्रादित्रयोद्देशेनविहितंपिंडत्रययुतंपार्वणम् तच्चैकपार्वणकद्विपार्वणक

त्रिपार्वणकमितित्रिविधम् तत्रपित्रादेर्मृततिथौक्रियमाणंप्रतिसांवत्सरिकमेकपार्वणकं अमा वास्यादिषण्णवतिश्राद्धनित्यश्राद्धानिमहालयान्वष्टक्यभिन्नानिद्विपार्वणकानि एतेषुसपत्नीक पित्रादित्रयसपत्नीकमातामहादित्रययोरेवोद्देशात् अन्वष्टकाश्राद्धंत्रिपार्वणकंपित्रादित्रयमा त्रादित्रयसपत्नीकमातामहादित्रयाणामुद्देशात् महालयश्राद्धंतीर्थश्राद्धंचपार्वणैकोद्दिष्टरूपम् पित्रादिपार्वणत्रयस्यपत्न्याद्येकोद्दिष्टगणस्यचोद्देशात् केचिदेतद्द्वयंमातामहमातामह्योःपार्व णभेदेनपार्वणचतुष्टययुतंकुर्वंति केषांचित्सूत्रेदर्शोपित्रिपार्वणकश्चतुःपार्वणकोवेतिहेमाद्रौ एकोद्देशेनक्रियमाणमेकपिंडयुतमेकोद्दिष्टम् तदपित्रिविधं नवसंज्ञंनवमिश्रसंज्ञंपुराणसंज्ञं चेति मृतस्यप्रथमदिनमारभ्यदशाहांतंविहितानिनवसंज्ञानि एकादशाहादीन्यूनाब्दांतानि नवमिश्राणि एतानिविश्वदेवहीनानि ततःपराणिकनिष्ठभ्रातृवार्षिकशस्त्रहतचतुर्दशीश्राद्धा दीनिपुराणसंज्ञानि केचित्सपिंड्युत्तरंक्रियमाणानांपार्वणानामपिपुराणसंज्ञामाहुः पुत्रजन्म विवाहादौक्रियमाणंवृद्धिश्राद्धंनांदीश्राद्धम् इदंपूर्वार्द्धेविस्तरेणप्रपंचितम् तदेवगर्भाधानपुंस वनसीमंतेषुआधानेसोमेचक्रियमाणंकर्मांगमितिचोच्यते अत्रक्रतुदक्षौविश्वेदेवाः अन्यकर्म सुवृद्धिसंज्ञम् तत्रसत्यवसुविश्वेदेवाःइतिनामभेदोदेवभेदश्चान्यत्समानं एतच्चपार्वणत्रययुत त्वात्पार्वणभेदांतर्गतमपिदर्शादितोबहुधर्मभेदात्पृथगुद्दिष्टं मृतस्यद्वादशाहादिकालेपिंडार्घ्यसं योजनादिरूपंसपिंडीकरणं एतदपिपार्वणैकोद्दिष्टविकाररूपं अत्रविशेषोवक्ष्यते एवंचपार्व णमेकोद्दिष्टमितिद्विविधमेवश्राद्धं एतत्पुनस्त्रिविधं नित्यंनैमित्तिकंकाम्यंचेति नियतनिमित्तेवि हितंनित्यं यथादर्शादि प्रत्यहंविहितमपिश्राद्धंनित्यसंज्ञंपार्वणद्वययुतंविश्वदेवहीनमुक्तं अनि यतनिमित्तेविहितंनैमित्तिकं यथासूर्यचंद्रग्रहणादौ एतदपिषट्दैवतं फलकामनोपाधिकंका म्यं यथापंचम्यादितिथौकृत्तिकादिनक्षत्रेच ॥

## यानंतर श्राद्धाचे भेद सांगतों.

त्यांमध्यें श्राद्ध चार प्रकारचें—पार्वणश्राद्ध, एकोद्दिष्टश्राद्ध, नांदीश्राद्ध आणि सपिंडीकरणश्राद्ध या भेदेंकरून चार प्रकारचें जाणावें. पित्रादि तिघांच्या उद्देशेंकरून विहित, तीन पिंडांनीं युक्त तें पार्वणश्राद्ध. तें एकपार्वणक, द्विपार्वणक, त्रिपार्वणक असें तीन प्रकारचें. त्यामध्यें पिता इत्यादिकांचे मृततिथीचे दिवसीं करावयाचें जें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध तें एकपार्वणक होय. अमावास्यादिक षण्णवति श्राद्धें, नित्यश्राद्धें, महालय व अन्वष्टक्य यांवांचून इतर श्राद्धें तीं द्विपार्वणक होत; कारण, या द्विपार्वणक श्राद्धांमध्यें सपत्नीक पित्रादित्रयी, व सपत्नीक मातामहादित्रयी यांचाच उद्देश आहे. अन्वष्टकाश्राद्ध जें तें त्रिपावर्णक होय. कारण; या श्राद्धांत पित्रादित्रयी, मात्रादित्रयी आणि सपत्नीक मातामहादित्रयी या तीन पार्वणांचा उद्देश आहे. महालयश्राद्ध व तीर्थश्राद्ध, हीं पार्वणैकोद्दिष्टरूप आहेत; कारण या दोन श्राद्धांत पित्रादि तीन पार्वणें, व पत्नी इत्यादि एकोद्दिष्टगण यांचा उद्देश आहे. कितीएक शिष्ट मातामह व मातामही यांचीं पृथक् पार्वणें करून चार पार्वणांनीं युक्त हीं दोन श्राद्धें करितात. कितीएकांच्या सूत्रांत दर्शश्राद्धहि तीन पार्वणांनीं युक्त किंवा चार पार्वणांनीं

युक्त करावें असें उक्त आहे, असें हेमाद्रींत सांगितलें आहे. एकाच्या उद्देशानें करावयाचें असें एक पिंडानें युक्त तें एकोद्दिष्ट. तें एकोद्दिष्टहि तीन प्रकारचें. नवसंज्ञक, नवमिश्रसंज्ञक आणि पुराणसंज्ञक असें तीन प्रकारचें. मृताच्या प्रथम दिवसाला आरंभ करून दहा दिवस-पर्यंत जीं विहित श्राद्धें तीं नवसंज्ञक होत. एकादशाह आहे आदि ज्यांस आणि ऊनाब्द आहे अंतीं ज्यांस असीं जीं श्राद्धें तीं नवमिश्र श्राद्धें होत. हीं श्राद्धें विश्वदेवहीन आहेत. त्यांहून पुढचीं कनिष्ठ भ्रात्याचें वार्षिक, शस्त्रानें हत झालेल्याचें चतुर्दशीश्राद्ध इत्यादिक तीं पुराणसंज्ञक होत. कोणी ग्रंथकार, सपिंडीनंतर करावयाचीं जीं पार्वणश्राद्धें तीं पुराणसंज्ञक होत असें ह्मणतात. पुत्रजन्म, विवाह इत्यादिकांत जें करावयाचें वृद्धिश्राद्ध तें नांदी-श्राद्ध होय. हें नांदीश्राद्ध पूर्वार्धांत विस्तारेंकरून निर्णीत केलें आहे. गर्भाधान, पुंस-वन, सीमंतोन्नयन, आधान आणि सोमयाग यांत करावयाचें जें कर्माचें अंगभूत वृद्धिश्राद्ध त्यास इष्टिश्राद्ध असें ह्मणतात. ह्या इष्टिश्राद्धांत क्रतुदक्षसंज्ञक विश्वेदेव घ्यावे. अन्यकर्मा-मध्यें जें नांदीश्राद्ध तें वृद्धिसंज्ञक होय. वृद्धिसंज्ञक श्राद्धांत सत्यवसुसंज्ञक विश्वेदेव, याप्रमाणें नामभेद व देवभेद आहेत, इतर सर्व समान जाणावें. हें नांदीश्राद्ध तीन पार्वणांनीं युक्त आहे याकरितां पार्वणभेदांतर्गत जरी आहे तथापि दर्शादि श्राद्धाहून याचे धर्म पुष्कळ भिन्न अस-ल्यामुळें निराळें सांगितलें. मृताचा बारावा दिवस इत्यादि कालीं पिंड व अर्घ्य यांचें संयो-जन ( मीलन ) इत्यादिरूप जें कर्म तें सपिंडीकरण होय. हें सपिंडीकरणहि पार्वण व एको-द्दिष्ट असें विकाररूप आहे. याविषयीं विशेष निर्णय पुढें सांगेन. याप्रमाणें पार्वण व एको-द्दिष्ट असें दोन प्रकारचेंच श्राद्ध आहे. हें श्राद्ध पुनः तीन प्रकारचें—नित्य, नैमित्तिक आणि काम्य असें; नियतनिमित्त प्राप्त असतां जें विहित तें नित्य होय. जसें—दर्शादिश्राद्ध. प्र-त्यहीं विहित जें श्राद्ध तेंहि नित्यसंज्ञक, तें दोन पार्वणांनीं युक्त व विश्वेदेवहीन असें सांगितलें आहे. अनियतनिमित्त प्राप्त असतां विहित जें श्राद्ध तें नैमित्तक होय. जसें—सूर्यचंद्रांच्या ग्रहणादिकालीं. हेंहि षट्दैवत आहे. फलाच्या इच्छेनें जें कर्तव्य तें काम्यश्राद्ध होय. जसें—पंचमी इत्यादि तिथींचे ठायीं व कृत्तिकादि नक्षत्रीं कर्तव्य श्राद्ध.

---

अथश्राद्धदेशाः दक्षिणाप्रवणेगोमयोपलिप्तेकृमिकेशास्थिश्लेष्मादिवर्जितेकृत्रिमभूमिव र्जितेरजस्वलादर्शनादिवर्जितेश्राद्धंकार्यं कुरुक्षेत्रप्रभासपुष्करप्रयागकाशीगंगायमुनानर्मदा दितीरनैमिषगंगाद्वारगयाशीर्षाक्षय्यवटादिषुश्राद्धंमहाफलं शमीपत्रप्रमाणेनपिंडंदद्याद्गया शिरे उद्धरेत्सप्तगोत्राणिकुलमेकोत्तरंशतं पितामाताचभार्याचभगिनीदुहितातथा पितृमातृ ष्वसाचैवसप्तगोत्राणिवैविदुः एषांगोत्राणिपुरुषाःक्रमेणचतुर्विंशतिर्विंशतिषोडशद्वादशैका दशदशाष्टाविल्येकोत्तरशतसंख्यास्तेषामुद्धारइत्यर्थः तत्रपितृकुलेद्वादशपूर्वाद्वादशपराइति चतुर्विंशतिरेवमग्रेपि तुलसीकाननच्छायाशालग्रामस्यसन्निधिः चक्रांकितस्यसान्निध्यमेषुय त्क्रियतेनरैः स्नानंदानंतपःश्राद्धंसर्वमक्षय्यतांव्रजेत् गोगजाश्वादिदुष्टप्रदेशेम्लेच्छदेशेचश्रा द्धंनकार्यं परकीयगृहादौश्राद्धकरणेतद्भूमिस्वामिपितरोभागंहरंति तेनगृहस्वामिनेमूल्यंदत्वा

कार्यं स्वाम्यनुज्ञयावाकार्यं वनानिगिरयोनद्यस्तीराण्यायतनानिच देवखाताश्चगर्ताश्चनस्वाम्यं तेषुकस्यचित् नैकवासानचद्वीपेनांतरिक्षेकदाचन श्रुतिस्मृत्युदितंकर्मनकुर्यादशुचिःक्वचित् ॥

## आतां श्राद्धदेश सांगतों.

दक्षिण दिशेस उतरती; गोमयानें सारवलेली; कीटक, अस्थि, केश, श्लेष्मा इत्यादिकांनीं वर्जित; कृत्रिमभूमि ( माडी ) वर्जित, रजस्वलादर्शनादिकानें वर्जित अशा भूमीचे ठायीं श्राद्ध करावें. कुरुक्षेत्र; प्रभास; पुष्कर; प्रयाग; काशी; गंगा, यमुना, नर्मदा इत्यादिकांचें तीर; नैमिषारण्य; गंगाद्वार; गयाशीर्ष; अक्षय्य वट इत्यादि स्थानीं श्राद्ध केलें असतां महाफल होतें. "गयाशिरावर शमीपत्रप्रमाण पिंड द्यावा, तेणेंकरून सात गोत्रें, १०१ कुलें, यांचा उद्धार होतो." "पिता, माता, भार्या, भगिनी, कन्या, पितृष्वसा आणि मातृष्वसा हीं सात गोत्रें जाणावीं." यांचीं गोत्रें ह्मणजे क्रमेंकरून २४,२०,१६,१२,११,१०,८ याप्रमाणें १०१ पुरुष त्यांचा उद्धार होतो असा अर्थ. त्यामध्यें पितृकुलांतील बारा मागचे व बारा पुढचे मिळून चोवीस पुरुष याप्रमाणें पुढेंहि जाणावें. "तुलसींचे अरण्याची छाया, शालग्रामाचें सान्निध्य आणि चक्रांकिताचें सान्निध्य या स्थानीं मनुष्यांनीं जें स्नान, दान, तप आणि श्राद्ध केलें तें सर्व अक्षय्य होतें. गाय, हस्ती आणि अश्व यांहींकरून दुष्ट झालेला प्रदेश, व म्लेच्छदेश यांमध्यें श्राद्ध करूं नये. परकीय घर इत्यादिक स्थानीं श्राद्ध केल्यानें त्या भूमीच्या स्वामीचे ( मालकाचे ) पितर त्या श्राद्धाचा भाग हरण करितात, याकरितां त्या गृहाच्या स्वामीस मूल्य ( भाडें ) देऊन श्राद्ध करावें, अथवा गृहस्वामीची आज्ञा घेऊन करावें. "वनें, पर्वत, नदीचीं तीरें, देवालयें, देवखात ( अकृत्रिम विवर ) आणि गर्त यांचे ठायीं कोणाचेंहि स्वत्व नाहीं." एक वस्त्र धारण केलेला; अशुचि; यानें कोठेंहि व दीप, अंतरिक्ष अशा स्थलीं श्रुतिस्मृतिविहित कर्म कदापि करूं नये.

---

अथश्राद्धकालाः तेचप्रायेणामासंक्रांतियुगादिमन्वादिमहालयादयःपूर्वपरिच्छेदेउक्ताएव केचित्तूच्यंते महातीर्थप्राप्तिर्व्यतीपातोमृताहोग्रहणद्वयंश्राद्धंप्रतिरुचिः श्रोत्रियादिब्राह्मणसंपत्तिरर्धोदयकपिलाषष्ठ्याद्यलभ्ययोगाग्रहपीडादुःस्वप्नदर्शनंनवान्नप्राप्तिर्नवोदकप्राप्तिर्गृहप्रच्छादनादिनिमित्तंचश्राद्धकालाः यदाविष्टिर्व्यतीपातोभानुवारस्तथैवच पद्मकोनामयोगोयममादेश्चतुर्गुणः सर्वमासानांकृष्णपक्षेषुश्राद्धमुक्तम् अत्रप्रत्यहंपंचम्यादिवायदहःसंपत्तिर्वेतित्रयःपक्षाः एकदिनपक्षेदर्शएव नारायणवृत्तौतुदर्शश्राद्धेनैवपक्षश्राद्धसिद्धिरुक्ता सर्वमासेषुदर्शश्राद्धाशक्तौकन्याकुंभवृषस्थेर्केसतिदर्शत्रयेएकत्रदर्शेवाश्राद्धं साग्निकस्यत्वशक्तस्यपिंडपितृयज्ञमात्रेणदर्शसिद्धिः निरग्निकस्यब्राह्मणभोजनमात्रेणधान्यादिद्रव्यदानेनवादर्शसिद्धिः कृष्णपक्षेषुमहालयापरपक्षस्यश्रेष्ठत्वं तत्रापिपंचदशाहादिपक्षाअन्योपिबहुविस्तरो द्वितीयपरिच्छेदेउक्तः अत्रविशेषांतरंकालतत्त्वविवेचनेपंचदशाहव्यापिमहालयप्रयोगारंभोत्तरमाशौचपातेकृतमहालयानांवैफल्यं तेनशुद्ध्यंतेकस्यांचित्तिथौसकृन्महालयमात्रमनुष्ठेयं

---

१ एकस्मिन्नित्येकत्र ॥

एवंपंचम्यादिपक्षेपि प्रतिबंधांतरेप्रतिनिधिद्वाराशेषमहालयानुष्ठानं पितृव्यज्येष्ठभ्रात्रादीनामपुत्राणांमहालयापरपक्षेतत्तन्मृततिथौतदेकपार्वणकमहालयश्राद्धंजीवत्पितृकेणापिकार्यमिति द्वादशपौर्णमास्योसंभवेमाघीश्रावणीप्रौष्ठपद्योनित्याः कस्मिंश्चित्कृष्णपक्षेप्रतिपदादिपंचदशतिथिषुकृत्तिकादिभरण्यंतनक्षत्रेषुविष्कंभादियोगेषुसूर्यादिवारेषुबवादिकरणेषुच श्राद्धेफलविशेषोक्तेरेतेतिथ्यादयः काम्यश्राद्धकालाज्ञेयाः इतिसामान्यकालः ॥

## यानंतर श्राद्धाचे काल सांगतों.

ते श्राद्धकाल अमावास्या, संक्रांति, युगादि, मन्वादि, आणि महालय इत्यादिक बहुधा पूर्वीच्या परिच्छेदांत सांगितलेच आहेत. आणखी कितीएक आहेत ते सांगतों—महातीर्थप्राप्ति, व्यतीपात, मृतदिवस, दोन ग्रहणें; श्राद्ध करावें अशी इच्छा, श्रोत्रियादिक ब्राह्मणाचें आगमन, अर्धोदय, कपिलाषष्ठी इत्यादिक अलभ्य योग, ग्रहपीडा, दुष्टस्वप्न पहाणें, नवान्नप्राप्ति, नूतन उदकाची प्राप्ति, गृहप्रच्छादन ( घरशिवणी ) इत्यादिक निमित्त, हे श्राद्धकाल होत. “ भद्रा, व्यतीपात, रविवार इतक्यांचा योग जर आला तर तो पद्मक योग होय, व तो अयनादिकांहून चतुर्गुणित पुण्यकारक आहे.” सर्व मासांत कृष्णपक्षांचे ठायीं श्राद्ध करावें असें सांगितलें आहे. या पक्षांत प्रतिदिवसीं, किंवा पंचमीपासून, अथवा ज्या दिवसीं श्राद्ध करण्याला अनुकूल असेल तो दिवस असे तीन पक्ष आहेत. मासांतून एक दिवसीं कर्तव्य ‘हा पक्ष’ असतां अमावास्यादिवसींच करावें. नारायणवृत्तीमध्यें तर, दर्शश्राद्धेंकरूनच पक्षश्राद्धाची सिद्धि होते असें सांगितलें आहे. सर्व मासांत दर्शश्राद्ध करण्यास सामर्थ्य नसेल तर कन्या, कुंभ व वृषभ या राशींस रवि असतां तीन अमावास्या तिथींस अथवा एक अमावास्या तिथीस श्राद्ध करावें. साग्निक परंतु अशक्त असेल तर पिंडपितृयज्ञमात्रानें त्याचे दर्शश्राद्धाची सिद्धि होते. निरग्निकाच्या दर्शश्राद्धाची सिद्धि. ब्राह्मणभोजनमात्रानें अथवा धान्यादि द्रव्यदानानें होते. सर्व कृष्णपक्षांमध्यें महालयाचा जो कृष्णपक्ष तो श्रेष्ठ, त्यामध्येंहि पंधरा दिवस इत्यादि पक्ष व इतरहि बहुत विस्तार दुसऱ्या परिच्छेदांत सांगितला आहे. याविषयीं दुसरा विशेष निर्णय **कालतत्त्वविवेचन** ग्रंथीं आहे. पंधरा दिवसपर्यंत जो महालयपक्ष त्याच्या प्रयोगाचा आरंभ केल्यानंतर आशौच प्राप्त झालें असतां केलेले महालय व्यर्थ होतात याकरितां आशौचनिवृत्ति झाल्यानंतर कोणत्या एका तिथीचे दिवसीं सकृन्महालय मात्र करावा. याप्रमाणें पंचमी इत्यादिक पक्षींहि असाच निर्णय जाणावा. आशौचावांचून दुसरा प्रतिबंध प्राप्त होईल तर प्रतिनिधिद्वारा शेष महालय करवावे. अपुत्र असे पितृव्य, ज्येष्ठ भ्राता इत्यादिक यांचें एकपार्वणक महालयश्राद्ध अपरपक्षामध्यें त्यांच्या त्यांच्या मृततिथीचे दिवसीं जीवत्पितृकानेंहि करावें. बारा पौर्णिमांचा संभव नसेल तर माघी, श्रावणी, प्रौष्ठपदी ( भाद्रपदी ) ह्या नित्य आहेत. कोणत्याहि कृष्णपक्षांत प्रतिपदादि पंधरा तिथि, कृत्तिकापासून भरणीपर्यंत नक्षत्रें, विष्कंभादियोग, सूर्यादिक वार आणि बवादिक करणें यांचे ठायीं श्राद्ध करावें असें विशेष वचन आहे याकरितां हे तिथि इत्यादिक जे काल सांगितले ते काम्यश्राद्धाचे काल जाणावे. याप्रमाणें श्राद्धाचा सामान्यकाल सांगितला.

---

अथापराण्हादिविशेषनिर्णयः दिनस्यपंचविभागास्त्रित्रिमुहूर्तकास्तत्राद्योभागः प्रातःसंज्ञः द्वितीयःसंगवः तृतीयोमध्यान्हः चतुर्थोपराण्हः पंचमोभागःसायान्हः दिनस्यपंचदशोभागोमुहूर्तः तत्रसप्तमोगंधर्वोष्टिमोमुहूर्तःकुतुपः नवमोरौहिणः तत्रदर्शादिश्राद्धानांनिर्णयः पूर्वपरिच्छेदयोःप्रायेणोक्तः विशेषस्तूच्यते साग्निकानांकात्यायनादीनामन्वाधानपिंडपितृयज्ञदर्शश्राद्धानामेकदिनकर्तव्यत्वनियमात् त्रेधाविभक्तदिनतृतीयभागरूपापराण्हव्यापिन्याममायां दर्शश्राद्धंकर्तव्यं ॥

## यानंतर अपराण्हादिविशेषेंकरून निर्णय सांगतों.

एकेक भाग तीन मुहूर्तांचा याप्रमाणें दिवसाचे पांच भाग करावे, त्यामध्यें पहिला जो भाग तो प्रातःसंज्ञक, दुसरा भाग संगव, तिसरा भाग मध्यान्ह, चवथा भाग अपराण्ह, पांचवा भाग सायान्ह. दिवसाचा पंधरावा भाग तो मुहूर्त होय. त्यामध्यें सातवा मुहूर्त गंधर्वसंज्ञक, आठवा मुहूर्त कुतुपसंज्ञक व नववा मुहूर्त रौहिणसंज्ञक. त्यामध्यें दर्शादिक श्राद्धाचा निर्णय बहुधा पूर्वींच्या दोन परिच्छेदांत सांगितला आहे. त्याहून जो विशेष निर्णय तो सांगतों.—साग्निक असे कात्यायन इत्यादिकांनीं अन्वाधान, पिंडपितृयज्ञ आणि दर्शश्राद्ध हीं तीन एक दिवशीं करावीं असा नियम सांगितला आहे; यास्तव दिवसाचे तीन भाग करून तिसरा भाग जो अपराण्हकाल तद्व्यापिनी अमावास्येंत दर्शश्राद्ध करावें.

अथप्रतिसांवत्सरिकमासिकादिनिर्णयउच्यते तत्रैकोद्दिष्टंमध्यान्हेसप्तमाष्टमनवममुहूर्तरूपेकार्यं तत्रापिकुतुपरौहिणसंज्ञकावष्टमनवममुहूर्तौमुख्यःकालः तत्रपूर्वत्रैवपरत्रैववादिनेमध्यान्हव्याप्तौसैवतिथिर्ग्राह्या दिनद्वयेमध्यान्हव्याप्तौमध्यान्हास्पर्शेवापूर्वत्रैव दिनद्वयेसाम्येनैकदेशव्याप्तौपूर्वा खर्वदर्पाद्यैर्व्यवस्थेत्यन्ये वैषम्येणैकदेशव्याप्तावाधिक्येननिर्णयः पार्वणेत्वपराण्हव्यापिनीग्राह्या पूर्वत्रैवपरत्रैववापराण्हव्याप्तौसैवग्राह्या दिनद्वयेतद्व्याप्तौतदस्पर्शेवांशतःसमव्याप्तौवापूर्वा विषमव्याप्तौत्वधिकाग्राह्या माधवाचार्यास्तुदिनद्वयेपूर्णापराण्हव्याप्तावंशतःसमव्याप्तौचोत्तरतिथेःक्षयेपूर्वा वृद्धौपरा उत्तरतिथेः क्षयवृद्ध्यभावेपिपरेत्याहुः अयंक्षयाहनिर्णयःप्रत्याब्दिकेमासिकेसकृन्महालयेचज्ञेयः ॥

## यानंतर प्रतिसांवत्सरिक आणि मासिकादिक यांचा निर्णय सांगतों.

त्यामध्यें एकोद्दिष्ट श्राद्ध सातवा, आठवा व नववा या मुहूर्तांनीं युक्त अशा मध्यान्हकालीं करावें. त्यामध्येंहि आठवा आणि नववा असे दोन कुतुपरौहिणसंज्ञक मुहूर्त तो मुख्य काल होय. त्यामध्यें पूर्व दिवसींच अथवा दुसऱ्या दिवसींच मध्यान्हव्याप्ति असतां तीच तिथि घ्यावी. दोन दिवसीं मध्यान्हव्याप्ति असेल किंवा दोन दिवसीं मध्यान्हकालीं स्पर्श नसेल तर पूर्वदिवसींच करावें. दोन दिवसीं सारखी एकदेशव्याप्ति असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी. खर्व दर्प इत्यादिकांनीं व्यवस्था जाणावी असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात. वैषम्येंकरून एक-

१ मृततिथौ क्रियमाणसकृन्महालये इत्यर्थः ॥

देशव्याप्ति असेल तर आधिक्यानें निर्णय करावा. पार्वणश्राद्धाविषयीं तर, अपराण्हव्यापिनी तिथि घ्यावी. पूर्व दिवसींच अथवा दुसऱ्या दिवसींच अपराण्हव्याप्ति असेल तर तीच घ्यावी. दोन दिवसीं अपराण्हव्याप्ति असेल अथवा नसेल, किंवा अंशेंकरून सारखी व्याप्ति असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी. विषमव्याप्ति असेल तर अधिकव्यापिनी घ्यावी. माधवाचार्य तर, दोन दिवसीं पूर्ण अपराण्हव्याप्ति आणि अंशेंकरून सारखी व्याप्ति असून उत्तर तिथी-चा क्षय असेल तर पूर्व दिवसाची घ्यावी, उत्तर तिथीची वृद्धि असतां दुसऱ्या दिवसाची घ्यावी, उत्तर तिथीचा क्षय व वृद्धि दोनहि नसतील तथापि दुसऱ्या दिवसाची घ्यावी असें ह्मणतात. हा क्षयदिवसाचा निर्णय प्रतिसांवत्सरिक श्राद्ध, मासिक श्राद्ध आणि मृत तिथीचे दिवसीं करावयाचा सकृन्महालय यांविषयीं जाणावा.

---

श्राद्धेभरण्यादिनक्षत्रंव्यतीपातादियोगश्चापराण्हव्यापीत्युक्तंद्वितीये केचिच्छुक्लपक्षेउदयव्यापिनक्षत्रंकृष्णपक्षेस्तमयव्यापियोगस्तुकुतुपादिव्यापीत्याहुः एतच्चपार्वणश्राद्धंकुतुपादिमुहूर्तपंचकेकार्यंनसायान्हेनरात्रौनप्रातःसंगवयोः पिंडपितृयज्ञदिनेसायान्हेपिपार्वणमनुज्ञायते यदाविघ्नवशाद्दिनेसांवत्सरिकश्राद्धंनकृतंतदारात्रावपिप्रथमप्रहरपर्यंतंकार्यं मृताहातिक्रमेचांडालत्वादिदोषोक्तेः ग्रहणदिनेदर्शमासिकप्रतिवार्षिकादिश्राद्धप्राप्तौतद्दिनेएवान्नेनामेनवाहेम्नावाकुर्यान्नोत्तरदिने प्रथमाब्दिकंत्रयोदशेमलमासेकार्यमित्युक्तं तेनयत्रद्वादशमासिकंशुद्धमासेभवतितत्रत्रयोदशेधिकएवप्रथमाब्दिकंकार्यं यदात्वधिकमध्येद्वादशंमासिकंतदाद्वादशमासिकस्यद्विरावृत्तिंकृत्वाचतुर्दशेशुद्धमासेप्रथमाब्दिकं एवंद्वितीयादिमासिकस्यापिमलमासेप्राप्तस्यद्विरावृत्तिर्ज्ञेया द्वितीयाब्दिकंतुशुद्धमासेएव एवंमहालयोपिशुद्धेएव नाधिकेमासेकिंचिदपि मलमासमृतानांतुयदासएवमलमासोभवतितदाधिकएवसांवत्सरिकं नशुद्धे दर्शदिनेवार्षिकप्राप्तौपूर्ववार्षिकंकृत्वाततःपिंडपितृयज्ञंपाकांतरेणदर्शश्राद्धंचकुर्यात् परेतुआदौपिंडपितृयज्ञस्ततोवार्षिकंततोदर्शइतिक्रममाहुः एवंमासिकादिष्वपिज्ञेयं॥

भरणी इत्यादि नक्षत्रें, व व्यतीपातादि योग श्राद्धाविषयीं घेणें ते अपराण्हव्यापि घ्यावे असें दुसऱ्या परिच्छेदांत सांगितलें आहे. कोणी ग्रंथकार, शुक्लपक्षामध्यें सूर्योदयव्यापि व कृ-ष्णपक्षांत अस्तमयव्यापि नक्षत्र घ्यावें आणि योग तर, कुतुपादिव्यापी घ्यावे असें ह्मणतात. हें पार्वणश्राद्ध कुतुपादिक पांच मुहूर्तांचे ठायीं करावें; सायान्ह, रात्रि, प्रातःकाल आणि संगव या कालीं करूं नये. पिंडपितृयज्ञाच्या दिवसीं सायान्हकालींहि पार्वणश्राद्ध करावें. ज्या कालीं कांहींएक विघ्नेंकरून दिवसास सांवत्सरिकश्राद्ध केलें नसेल त्या कालीं रात्रींहि पहिल्या प्रह-रापर्यंत करावें; कारण, मृतदिवसाचें उल्लंघन झालें असतां चांडालत्वादि दोष प्राप्त होतो असें वचन आहे. ग्रहणदिवसीं दर्श, मासिक आणि प्रतिसांवत्सरिकश्राद्ध हीं तीन प्राप्त झालीं असतां त्या दिवसींच अन्न, अथवा आमान्न किंवा हिरण्य यांहींकरून करावीं, दुसऱ्या दिवसीं करूं नयेत. प्रथमाब्दिकश्राद्ध तेराव्या मलमासांत करावें असें सांगितलें आहे, याकरितां ज्या कालीं बारावें मासिकश्राद्ध शुद्ध मासांत होतें त्या कालीं तेराव्या अधिकमासांतच प्रथमाब्दिक करावें.

ज्या कालीं अधिकमासांत बारावें मासिक प्राप्त होईल त्या कालीं बाराव्या मासिकाची द्विरावृत्ति करून चवदाव्या शुद्ध मासांत प्रथमाब्दिक करावें. याप्रमाणें मलमासांत प्राप्त झालेल्या द्वितीयादि मासिकांचीहि द्विरावृत्ति करावी. द्वितीयादिक आब्दिकश्राद्ध तर शुद्ध मासांतच करावें. याप्रमाणें महालय करणें तोहि शुद्ध मासांतच करावा, अधिकमासांत कोणतेंहि करूं नये. मलमासांत मृत झाले असतील आणि ज्या कालीं तोच मलमास येईल त्या कालीं अधिकमासांतच सांवत्सरिक श्राद्ध करावें, शुद्ध मासांत करूं नये. दर्श दिवसीं वार्षिक ( सांवत्सारिक ) श्राद्ध प्राप्त होईल तर पूर्वी वार्षिकश्राद्ध करून नंतर पिंडपितृयज्ञ व दर्शश्राद्ध दुसरा पाक करून करावीं. दुसरे ग्रंथकार तर, पूर्वी पिंडपितृयज्ञ, नंतर वार्षिक श्राद्ध, त्यानंतर दर्शश्राद्ध करावें असा क्रम सांगतात. याप्रमाणें मासिकादिश्राद्धांविषयीं असाच निर्णय जाणावा.

---

सपिंडीकरणादूर्ध्वंयावदब्दत्रयंभवेत् तावदेवनभोक्तव्यंतदीयेश्राद्धमात्रके प्रथमाब्देस्थ्यादिभोजीद्वितीयेमांसभक्षकः तृतीयेरक्तभोजीस्याच्छुद्धंश्राद्धंचतुर्थके इत्यास्तांप्रासंगिकंप्रकृतमनुसरामः पार्वणमपिहेमश्राद्धमामश्राद्धंचद्वेधाविभक्तदिनपूर्वभागेएवकार्यं सर्वंचश्राद्धंतत्तन्निर्णीतकालेतत्तत्तिथ्यभावेपिकर्तव्यं साकल्यवचनादिनाशास्त्रतस्तत्रतत्तत्तिथिसत्त्वादितिकालतत्त्वविवेचने वृद्धिश्राद्धंप्रातःसंगवयोःकार्यं मध्यान्होगौणः अपराण्हसायान्हरात्रयोनिषिद्धाः रात्रौविवाहेप्रातर्वृद्धिश्राद्धंनकृतंतदारात्रावपिकार्यमितिक्वचित् ग्रहणनिमित्तकंपार्वणश्राद्धंपुत्रजन्मनिमित्तकंजातकर्मांगंवृद्धिश्राद्धंचरात्रावपिकार्यं इतिकालनिर्णयः ॥

" सपिंडीकरणानंतर तीन वर्षेपर्यंत त्याच्या श्राद्धमात्रीं भोजन करूं नये. प्रथम वर्षी भोजन केल्यानें अस्थि इत्यादिकांचें भोजन करणारा, दुसऱ्या वर्षी मांसभक्षक, तिसऱ्या वर्षी रक्तभोजी, चवथ्या वर्षी तें श्राद्ध शुद्ध होय. " याप्रमाणें प्रासंगिक विषय पुरे. आतां प्रकृत विषयाकडे अनुसरतों. पार्वणरूप असेल तथापि हिरण्यश्राद्ध आणि आमश्राद्ध, हीं श्राद्धें दिवसाचे दोन भाग करून जो पूर्व भाग त्या भागांतच करावीं. सर्व श्राद्धें त्याच्या त्याच्या निर्णीत कालीं त्या त्या तिथीचा अभाव असेल तथापि करावीं; कारण साकल्यवचनादिक शास्त्रेंकरून त्या त्या कालीं ती ती तिथि आहे असें कालतत्त्वविवेचन ग्रंथांत सांगितलें आहे. वृद्धिश्राद्ध प्रातःकाल व संगवकाल यांत करावें. मध्यान्ह हा गौणकाल आहे. अपराण्ह, सायान्ह आणि रात्रि हे काल निषिद्ध होत. रात्रौ विवाह करावयाचा असतां प्रातःकालीं वृद्धिश्राद्ध न करील तर रात्रींहि करावें असें क्वचित् ग्रंथांत आहे. ग्रहणनिमित्तक पार्वणश्राद्ध व पुत्रजन्मनिमित्तक असें जातकर्माचें अंगभूत वृद्धिश्राद्ध हीं रात्रीमध्येंहि करावीं. याप्रमाणें कालाचा निर्णय सांगितला.

---

१ तेनदिनद्वयेपराण्हेतिथिस्पर्शाभावस्थलेपूर्वदिनेतत्कालेतिथ्यभावेप्यपराण्हएवश्राद्धंनसायान्हे ॥

२ यावरून असें होतें कीं, दोन दिवसीं अपराण्हकालीं तिथीचा स्पर्श नाहीं अशा स्थलीं पूर्वदिवसीं अपराण्हकालीं तिथि नसेल तथापि अपराण्हकालींच श्राद्ध करावें, सायान्हकालीं करूं नये.

पुत्रादिभिः पितृमात्राद्युद्देशेनश्राद्धेक्रियमाणेनामगोत्रंमंत्राश्चतत्तदन्नंतान्पितॄन्प्रापयंति तत्रपित्रादीनांदेवरूपत्वेतदन्नममृतरूपंभूत्वा तत्रोपतिष्ठतेगांधर्वत्वेभोग्यरूपेणपशुत्वेतृणरूपेण सर्पत्वेवायुरूपेणयक्षत्वेपानरूपेणदानवादित्वेमांसत्वेन प्रेतत्वेरुधिरत्वेनमनुष्यत्वेन्नादिरूपेणेति ग्रंथांतरे तस्यतेपितरःश्रुत्वाश्राद्धकालमुपस्थितं अन्योन्यंमनसाध्यात्वासंपतंतिमनोजवाः तैर्ब्राह्मणैःसहाश्नंतिपितरोवायुरूपिणः अतएवश्रीरामेणश्राद्धेक्रियमाणेसीताविप्रेषुदशरथादीन्ददर्शेतिकथाश्रूयते प्रावृष्यंतेयमःप्रेतान्पितॄंश्चापियमालयात् विसर्जयतिभूलोकंकृत्वाशून्यं स्वकंपुरं तेपुत्रादेःप्रकांक्षंतिपायसंमधुसंयुतं कन्यागतेसवितरिपितरोयांतिवैसुतान् अमावास्यादिनेप्राप्तेगृहद्वारंसमाश्रिताः श्राद्धाभावेस्वभवनंशापंदत्वाव्रजंतिते अतोमूलैःफलैर्वापितथाप्युदकतर्पणैः पितृतृप्तिंप्रकुर्वीतनैवश्राद्धंविवर्जयेत् किंचश्राद्धेनब्रह्मादिस्तंबपर्यंतसकलभूततृप्तिःश्रूयते तत्रपिशाचादिरूपाणांविकिरादिभिस्तृप्तिर्वृक्षादिरूपाणांस्नानवस्त्रोदकादिना केषांचिदुच्छिष्टपिंडादिनेति अतोब्रह्मीभूतपितृकेणापिश्राद्धंकार्यं तत्रपितृपितामहप्रपितामहादिरूपमेकैकंपार्वणंवसुरुद्रादित्यादिभेदेनध्येयं एकोद्दिष्टंवसुरूपेणेतिसर्वत्र केचित्तु पितृपितामहप्रपितामहाःप्रद्युम्नसंकर्षणवासुदेवात्मनाध्येयाः कर्तानिरुद्धात्मनेत्याहुः एवंवरुणप्रजापत्यग्निरूपेणक्वचित् क्वचिन्मासऋतुवत्सररूपेणेति तत्रयथाचारंसमुच्चयेविकल्पेनवा ध्यानमितिव्यवस्था पित्रादिपार्वणंयत्रतत्रमातामहादयः सर्वत्रैवहिकर्तव्यानाब्दिकेमासिकेषुन मासिकेषुत्वाब्दिकेचत्रिदैवत्यंप्रकीर्तितं वृद्धौतीर्थेन्वष्टकासुगयायांचमहालये त्रिपार्वणकमत्रेष्टंशेषंषाट्पौरुषंविदुः सपत्नीकंपित्रादित्रयंसपत्नीकंमातामहादित्रयमितिषाट्पौरुषत्वं क्षयाहंवर्जयित्वैकंस्त्रीणांनास्तिपृथक्क्रिया अन्वष्टकासुवृद्धौचगयायांचक्षयेहनि अत्रमातुःपृथक्श्राद्धमन्यत्रपतिनासह ॥

पुत्र इत्यादिकांनीं पिता, माता इत्यादिकांच्या उद्देशेंकरून जें करावयाचें श्राद्ध त्यांतील नाम, गोत्र आणि मंत्र हे तें तें अन्न त्या पितरांस नेऊन देतात. त्यामध्यें पिता इत्यादिक देवरूपी असतील तर तें अन्न अमृतरूप होऊन त्या स्थानीं त्यांस प्राप्त होतें. गंधर्वरूपी असतां भोग्यरूपानें, पशुरूपी असतां तृणरूपानें, सर्परूपी असतां वायुरूपानें, यक्षरूपी असतां पानरूपानें, दानवरूपी असतां मांसरूपानें, प्रेतरूपी असतां रुधिररूपानें, मनुष्यरूपी असतां अन्नादिरूपानें याप्रमाणें तत्तत्स्वरूपानें त्या त्या स्थानीं प्राप्त होतें. दुसऱ्या ग्रंथीं—“श्राद्धकर्त्याचे ते पितर श्राद्धकाल प्राप्त झाला असें श्रवण करून परस्परांचें मनामध्यें ध्यान करून मनाच्या वेगानें प्राप्त होतात. नंतर वायुरूपी ते पितर, श्राद्धाला जे निमंत्रित ब्राह्मण त्यांसहवर्तमान भोजन करितात,” या हेतूस्तवच, श्रीरामानें श्राद्ध केलें त्या कालीं सीतेनें ब्राह्मणाचे ठायीं दशरथादिक पितर अवलोकन केले, अशी कथा श्रवण केलेली आहे. “यम वर्षाऋतु समाप्त झाल्यानंतर प्रेत, पितर यांला यमालयापासून आपलें नगर शून्य करून भूलोकीं पाठवितो. नंतर ते पितर पुत्रादिकांपासून मधुयुक्त पायस प्राप्त व्हावें अशी इच्छा करितात. कन्यागत सूर्य झाला असतां निश्चयें पितर पुत्रांप्रत येतात. अमावास्या दिवस प्राप्त झाला असतां गृहाच्या द्वाराचा आश्रय करून श्राद्धप्रतीक्षा करीत राहतात. पुत्रादि-

कानें श्राद्ध न केलें असतां त्याला शाप देऊन आपल्या मंदिराप्रत जातात. याकरितां मूलें किंवा फलें आणि उदकानें तर्पण यांहींकरून पितरांची तृप्ति करावी, निश्चयें श्राद्ध वर्ज्य करूं नये." आणखी, श्राद्धेंकरून ब्रह्मादिस्तंबपर्यंत सकलभूतांची तृप्ति होते असें श्रुत आहे. त्यामध्यें पिशाचादिरूप जे त्यांची तृप्ति विकिरादिकांनीं होते. वृक्षादिकरूप जे त्यांची तृप्ति स्नानोत्तर जें वस्त्रनिष्पीडनोदकादिक तेणेंकरून होते. कितीएकांची उच्छिष्ट पिंडादिकानें होते, यास्तव ब्रह्मीभूतपितृकानेंहि श्राद्ध करावें. त्यामध्यें पितृपितामहप्रपितामहादिरूप असें एकेक पार्वण वसु, रुद्र, आदित्य इत्यादि भेदेंकरून ध्येय (ध्यान करण्यास योग्य) आहे. ह्मणजे पिता वसुरूपी, पितामह रुद्ररूपी, प्रपितामह आदित्यरूपी असें जाणावें. एकोद्दिष्ट गणाचें वसुरूपानें ध्यान करावें याप्रमाणें सर्वत्र जाणावें. कोणीं ग्रंथकार तर, पिता, पितामह आणि प्रपितामह यांचें ध्यान प्रद्युम्न, संकर्षण आणि वासुदेव या रूपानें करावें, व कर्ता अनिरुद्धरूपी आहे असें सांगतात. याप्रमाणें वरुण, प्रजापति, अग्नि यांच्या रूपानें ध्येय होत असें क्वचित् ग्रंथांत आहे. क्वचित् ग्रंथांत मास, ऋतु आणि वत्सर या रूपांनीं ध्येय होत. त्यांमध्यें जसा आचार असेल त्याप्रमाणें समुच्चयेंकरून अथवा विकल्पेंकरून ध्यान करावें, याप्रमाणें व्यवस्था जाणावी. "पिता इत्यादिक पार्वण जेथें आहे तेथें मातामहादिक पार्वणाचा उद्देश करावा. आब्दिक व मासिक श्राद्धें यांमध्यें मातामहादिकांचा उद्देश करूं नये. मासिक श्राद्धें व आब्दिक या श्राद्धांमध्यें तीन देवता उक्त आहेत. वृद्धिश्राद्ध (नांदीश्राद्ध), तीर्थश्राद्ध, अन्वष्टकाश्राद्ध, गयाश्राद्ध आणि महालय या श्राद्धांत तीन पार्वणें इष्ट आहेत, इतर श्राद्ध षाट्पौरुष असें सांगतात." सपत्नीक पित्रादित्रयी, आणि सपत्नीक मातामहादित्रयी यांचें नांव षाट्पौरुष. "एक क्षय दिवस वर्ज्य करून स्त्रियांचें पृथक् श्राद्ध नाहीं. अन्वष्टकाश्राद्ध, वृद्धिश्राद्ध, गयाश्राद्ध, आणि क्षयदिवस या श्राद्धीं मातेचें निराळें श्राद्ध करावें, इतर स्थलीं पतीसहवर्तमान करावें.

---

**अथविश्वेदेवाः यत्रविशेषोनोच्यतेतत्रसर्वत्रपार्वणश्राद्धेपुरूरवार्द्रवसंज्ञकाविश्वेदेवाः काम्यश्राद्धेमहालयेचधूरिलोचनसंज्ञकाः नैमित्तिकेऽष्टकाख्याष्टमीश्राद्धेचकामकालसंज्ञकाः एकोद्दिष्टंसपिंडीकरणंवानैमित्तिकसंज्ञं नांदीश्राद्धेसत्यवसुसंज्ञकाः तत्रापिगर्भाधानपुंसवनसीमंतोन्नयनेतिसंस्कारत्रयांगमग्न्याधानसोमयागांगंचनांदीश्राद्धमिष्टिश्राद्धसंज्ञकं कर्मांगश्राद्धसंज्ञकंचतत्रक्रतुदक्षसंज्ञकाविश्वेदेवाः पार्वणद्वयाद्ययोर्जीवनान्मातृपार्वणकमेवक्रियमाणंनांदीश्राद्धंदेवरहितंकार्यं एवंपार्वणत्रयस्यभिन्नत्वेनानुष्ठीयमानेनांदीश्राद्धेपिमातृपार्वणंदेवहीनं नांदीश्राद्धेहिदिनत्रयेक्रमेणपार्वणत्रयंकार्यं एकस्मिन्दिनेपृथक्पृथक्पार्वणत्रयंसहतंत्रेणपार्वणत्रयमितित्रयःपक्षाः नित्यश्राद्धंदेवरहितंकार्यं एवंसपिंडीकरणात्प्राक्तनान्येकोद्दिष्टश्राद्धान्यपिदेवहीनानि इतिश्राद्धदेवतानिर्णयः ॥**

## यानंतर विश्वेदेव सांगतों.

ज्या श्राद्धीं विशेष सांगितला नसेल त्या सर्वत्र पार्वणश्राद्धीं पुरूरवार्द्रवसंज्ञक विश्वेदेव घ्यावे. काम्यश्राद्ध व महालय या श्राद्धीं धूरिलोचनसंज्ञक विश्वेदेव घ्यावे. नैमित्तिक श्राद्ध,

अष्टकाख्य अष्टमीश्राद्ध यांमध्यें कामकालसंज्ञक ध्यावे. एकोद्दिष्ट, अथवा सपिंडीकरण हें श्राद्ध नैमित्तिक श्राद्ध होय. नांदीश्राद्धीं सत्यवसुसंज्ञक ध्यावे. त्यामध्येंहि गर्भाधान, पुंसवन, सीमंतोन्नयन, ह्या तीन संस्कारांचें अंगभूत; व अन्वाधान, सोमयाग यांचें अंगभूत असें नांदीश्राद्ध; इष्टिश्राद्धसंज्ञक व कर्मांचें अंगभूतसंज्ञक नांदीश्राद्ध यांमध्यें क्रतुदक्षसंज्ञक विश्वेदेव ध्यावे. पितृपार्वण व मातामहपार्वण या दोन पार्वणांचा पहिला जीवंत आहे याकरितां मातृपार्वणयुक्तच जें करावयाचें नांदीश्राद्ध तें देवरहित करावें. याप्रमाणें निरनिराळीं पार्वणें करून जें नांदीश्राद्ध करावयाचें त्यामध्येंहि मातृपार्वण देवहीन करावें. तीन दिवस नांदीश्राद्धांमध्यें क्रमेंकरून तीन पार्वणें करावीं. एका दिवशीं निरनिराळें पार्वण अथवा बरोबर तीन पार्वणें किंवा एकतंत्रानें तीन पार्वणें असे तीन पक्ष आहेत. नित्य श्राद्ध करणें तें देवरहित करावें. याप्रमाणें सपिंडीकरणाच्या पूर्वींचीं जीं एकोद्दिष्ट श्राद्धें तींहि देवहीन करावीं. याप्रमाणें श्राद्धदेवतांचा निर्णय सांगितला.

---

अथश्राद्धेब्राह्मणाः तत्रजातकर्मादिसंस्कारैःसंस्कृतःसत्यवाक्शुचिः वेदाध्ययनसंपन्नःषट्सुकर्मस्ववस्थितः पुरुषत्रयविख्यातःसवैब्राह्मणउच्यते इतिब्राह्मणसामान्यलक्षणंतत्रोत्तममध्यमाधमभेदेनत्रिविधाब्राह्मणाः ॥

## यानंतर श्राद्धाविषयीं ब्राह्मण सांगतों.

त्यामध्यें, “जातकर्मादि संस्कारांनीं संस्कृत असून सत्यवक्ता, शुचिर्भूत, वेदाध्ययनानें युक्त, षट्कर्मी (अध्ययन, अध्यापन, यजन, याजन, दान, आणि प्रतिग्रह) आणि पिता इत्यादि तीन पुरुष ज्याचे विख्यात असा जो तो ब्राह्मण होय. याप्रमाणें ब्राह्मणाचें सामान्य लक्षण सांगितलें, त्यामध्यें उत्तम, मध्यम आणि अधम या भेदेंकरून तीन प्रकारचे ब्राह्मण होत.

---

तत्रोत्तमाः वेदाध्ययनसंपन्नावेदांगाध्यायिनोपिच येवैयाकरणायेचमीमांसाध्ययनेरताः पौराणिकश्चवेदांतीधर्मशास्त्ररतोपिच एतेषामपियेपुत्राब्रह्मवेत्तातथैवच वेदार्थज्ञःकर्मनिष्ठस्तपोनिष्ठश्चयोगिनः पितृमातृपरश्चैवस्वधर्मनिरतस्तथा शिशुरप्यग्निहोत्रीचसोमादिश्रौतकर्मवित् शिवभक्तोविष्णुभक्तोभार्यायामृतुकालगः गुरुभक्तोज्ञाननिष्ठःसोमयाजीचसत्यवाक् सुशीलस्नातकयतिब्रह्मचारिणउत्तमाः एतेसर्वेसपत्नीकायुवत्वादिगुणान्विताः सापिंड्ययोनिशिष्यत्वादिसंबंधैश्चवर्जिताः कुष्ठापस्मारादिदोषैर्हीनाश्चेदुत्तमाःस्मृताः तत्रदशाहादिसूतकादिप्रयोजकसापिंड्यसगोत्रसोदकत्वरूपसंबंधःसापिंड्यपदाभिधेयः योनिसंबंधोमातुलत्वश्वशुरत्वशालकत्वादिः आदिनागुरुत्वसहाध्यायित्वमित्रत्वादयः तथाचसपत्नीकत्वादिगुणयुक्ताउक्तसंबंधहीनाअपस्मारांधत्वादिदोषहीनावेदाध्यायित्वादिसप्तविंशतिप्रकाराविप्राउत्तमा इतिसिद्धं तत्रविशेषः यद्येकंभोजयेच्छ्राद्धेछंदोगंतत्रपूजयेत् ऋचोयजूंषिसामानित्रितयंतत्रविद्यते ऋग्वेदिनंचपित्रर्थेयाजुषंतुपितामहे प्रपितामहेसामगंचभोजयेच्छ्राद्धकर्मणि अथर्ववेदिनंवैश्वदेवेपित्र्येचभोजयेत् एतेनस्वशाखीयद्विजाभावेद्विजानन्याश्निमंत्रयेदितिनिरस्तं के

---

१ आदिपदात्स्नानं ॥ २ भोजयेच्छ्राद्धयज्ञेषुसामगंप्रपितामहे ॥

चिद्यथाकन्यातथाहविरितिनियमात्यैःसहयोनिसंबंधस्तएवपरशाखीयाः श्राद्धार्हाइत्याहुस्त न्निर्मूलं केचिच्छ्राद्धकर्तृसगोत्रसप्रवरावर्ज्याः पितृपुत्रौभ्रातरौद्वौनिरग्निंगुर्विणीपतिं सगोत्र प्रवरंचैववर्जयेच्छ्राद्धकर्मणीतिवचनादित्याहुः विनामांसेनमधुनाविनादक्षिणयाशिषा परिपू र्णंभवेच्छ्राद्धंयतिषुश्राद्धभोजिषुइतियतिप्रशंसा ॥

त्यांमध्यें उत्तम ब्राह्मण सांगतों.–वेदाध्ययनानें युक्त, वेदांचीं जीं अंगें त्यांचें अध्ययन करणारे, वैयाकरण ( व्याकरणशास्त्राचें अध्ययन केलेले ), मीमांसाशास्त्राचें अध्ययन करणारे, पौराणिक, वेदांती, धर्मशास्त्ररत हे व यांचे पुत्र, ब्रह्मवेत्ता, वेदार्थ जाणणारा, कर्मनिष्ठ, तपोनिष्ठ, योगी, पिता, माता यांची सेवा करणारा, स्वधर्मसक्त, वयानें लहान परंतु अग्निहोत्री, सोमादि श्रौतकर्म जाणणारा, शिवभक्त, विष्णुभक्त, स्वस्त्रियेप्रत ऋतुकालीं गमन करणारा, गुरुभक्त, ज्ञाननिष्ठ, सोमयाग करणारा, सत्यवक्ता, सुशील, स्नातक, संन्यासी आणि ब्रह्मचारी हे सर्व उत्तम होत. हे सर्व सपत्नीक व युवत्वादि ( तारुण्यादि ) गुणांनीं युक्त असून सापिंड्यसंबंध, योनिसंबंध आणि शिष्यत्वादिसंबंध एतद्विरहित, व कुष्ठ, अपस्मार इत्यादि दोषांनीं हीन असे असतील तर ते उत्तम होत. त्यामध्यें दशाहादिक जें सूतक ( जननाशौच व मृताशौच ) इत्यादिकांस कारण असा जो सापिंड्यसगोत्रसोदकत्वरूप संबंध तो सापिंड्यसंबंध. मातुलत्व, श्वशुरत्व व शालकत्व इत्यादिरूप जो संबंध तो योनिसंबंध. आदिशब्देंकरून गुरुत्व, सहाध्यायित्व व मित्रत्व इत्यादि संबंध ग्रहण करावे. याप्रमाणें विचार केला असतां सपत्नीकत्वादिगुणयुक्त असून पूर्वोक्त संबंधांनीं विरहित, अपस्मार व अंधत्व इत्यादिक दोषांनीं हीन, वेदाध्ययनानें युक्त इत्यादिक सत्तावीस प्रकारचे ब्राह्मण ते उत्तम होत असें सिद्ध झालें. त्यांमध्यें विशेष– “जर एक ब्राह्मण श्राद्धीं सांगणें असेल तर छंदोग ( अथर्वणवेदी ) सांगावा, छंदोग ब्राह्मणाचेठायीं ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेद असे तीन वेद राहतात. श्राद्धकर्मामध्यें ब्राह्मण भोजनाला सांगावयाचे ते ऋग्वेदी याला पितृस्थानीं, यजुर्वेदी याला पितामहस्थानीं, सामवेदी याला प्रपितामहस्थानीं, अथर्वणवेदी याला विश्वेदेव व पितर या स्थानीं सांगावे. येणेंकरून, स्वशाखीय द्विजांचा अभाव असतां अन्यशाखी यांला निमंत्रण करावें, असें जें मत त्याचें खंडण झालें. कोणी ग्रंथकार, “जसी कन्या तसें हवि” असा नियम आहे यासाठीं ज्यांच्या बरोबर योनिसंबंध घडतो तेच परशाखीय श्राद्धास योग्य होत असें जे सांगतात तें निर्मूल आहे. कोणी ग्रंथकार, श्राद्धकर्त्याचे सगोत्री व सप्रवरी वर्ज्य करावे; “पिता, व पुत्र, दोन भ्राते, निरग्निक, गर्भिणीपति, सगोत्री, सप्रवरी, हे श्राद्धकर्माविषयीं वर्ज्य करावे” असें वचन असल्यामुळें सांगतात. “श्राद्धाचे ठायीं संन्यासी यांनीं भोजन केलें असतां मांसावांचून, मधूवांचून दक्षिणेवांचून व आशीर्वादावांचून श्राद्ध परिपूर्ण होतें,” याप्रमाणें संन्यासीप्रशंसा जाणावी.

---

अथमध्यमाविप्राः मातामहोमातुलोभागिनेयोदौहित्रोजामातागुरुः शिष्योयाज्यःश्वशुर

---

१ आदिपदेंकरून हीं दोन्ही ज्ञानापर्यंत समजावीं.

ऋत्विक्शालकः पितृष्वसृपुत्रो मातृष्वसृपुत्रो मातुलपुत्रोतिथिः सगोत्रो मित्रमित्येते मध्यमाः दौहित्रजामातृस्वस्त्रीयादीनां विद्यादिगुणवतां श्राद्धे निमंत्रणाभावे दोषः गुणहीनत्वे तु न दोषः षड्भ्यस्तु पुरुषेभ्योर्वाक् श्राद्धार्हा नैव गोत्रिणः षड्भ्यस्तु परतो भोज्या अलाभे गोत्रजा अपि अत्र विशेषः ऋत्विजः सपिंडाः संबंधिनः शिष्याश्च वैश्वदेवस्थाने नियोज्या न तु पित्र्ये एवमन्येपि विगुणा विप्रा देवस्थाने योज्याः पिता पितामहो भ्राता पुत्रो वाथ सपिंडकाः न परस्परमर्घ्याः स्युर्न श्राद्धे ऋत्विजस्तथा वैश्वदेवे नियोक्तव्या यद्येते गुणवत्तराः ॥

यानंतर मध्यम-ब्राह्मण सांगतो.—मातामह, मातुळ, भागिनेय, दौहित्र, जामाता, गुरु, शिष्य, यजमान, श्वशुर, ऋत्विज, शालक, आतेबंधु, माऊसबंधु, मामेबंधु, अतिथि, सगोत्री आणि मित्र हे मध्यम होत. दौहित्र, जामाता, भगिनीपुत्र इत्यादिक हे विद्यादिगुणांनीं युक्त असून यांस श्राद्धीं निमंत्रण न केलें असतां दोष आहे, गुणहीन असतील तर दोष नाहीं. "सहा पुरुषांच्या अलीकडचे असे सगोत्री श्राद्धाचे निमंत्रणीं योग्य नाहींत; ह्मणजे श्राद्धीं त्यांस बसवूं नये. परगोत्री न मिळतील तर सहा पुरुषांपलीकडचे गोत्रजाहि भोजनास (क्षणास) सांगावे." याविषयीं विशेष—ऋत्विज, सपिंड, संबंधी आणि शिष्य हे देवस्थानीं योजावे, पितृस्थानीं योजूं नये. याप्रमाणें दुसरेहि गुणहीन ब्राह्मण देवस्थानीं योजावे. "पिता, पितामह, भ्राता, अथवा पुत्र, सपिंडक" हे परस्पर पूज्य नाहींत, ह्मणजे परस्परांस श्राद्धास सांगूं नये असें तात्पर्य. तसेंच ऋत्विज श्राद्धीं पूज्य नाहींत. जर हे अतिगुणवंत असतील तर देवस्थानीं योजावे.

---

अथ वर्ज्या विप्राः क्षयश्वासमूत्रकृच्छ्रभगंदरादिमहारोगी हीनांगोधिकांगः काणो बधिरो मूकः शत्रुः कितवो भृतकाध्यापको मित्रद्रोही पिशुनः कुनखी कृष्णदंतः क्लीबो मातापितृगुरुत्यागी चोरो नास्तिकः पापकर्मा विहितकर्मत्यागी नक्षत्रोपजीवी वैद्यो राजभृत्यो गायको लेखकः कुसीदजीवी वेदविक्रयी कविलजीवी देवार्चनजीवी नटो गृहदाही समुद्रगामी शस्त्रकर्ता सोमविक्रयी पक्षिपोषकः परिवेत्तादिधिषुपतिः कुमाराध्यापकः पुत्रात्प्राप्तविद्यो द्रव्यप्राप्त्यर्थं वेदघोषकारी ग्रामयाजी केशपशुविक्रयी शिल्पी पित्रातिवादकारी शूद्रयाजको जटी श्मश्रुहीनो निर्दयो रजस्वलापतिर्गर्भिणीपतिः कुब्जो वामनो रक्तनेत्रो वाणिज्योपजीवी छिन्नोष्ठश्छिन्नलिंगो गण्डुमान्ज्वरितो देवलको विधुरो निरग्निः शूद्रगुरुः शूद्रशिष्यो दांभिको गोविक्रयी रसविक्रयी वेदनिंदको वृक्षरोपकः सदायाचकः कदर्यः कृषिजीवी साधुनिंदितो मेषमहिषपोषकः कपिलकेशो विस्मृतवेदो निष्ठुरवागित्यादयो विप्रा हव्यकव्ययोर्वर्ज्याः धर्मार्थमुदरार्थं वौषधकारी विगर्हितः देवार्चनपरो नित्यं वित्तार्थी वत्सरत्रयम् असौ देवलको नाम देवस्वग्राहकोपि च वर्जनीयः स विज्ञेयः सर्वकर्मसु सर्वदा इदं मनुष्यस्थापितदेवताविषयमिति भाति दाराग्निहोत्रसंयोगं कुरुते योग्रजे स्थिते परिवेत्ता स विज्ञेयः परिवित्तिस्तु अग्रजः अग्रजानुज्ञादौ न दोष इत्युक्तम् ज्येष्ठायां यद्यनूढायां कन्यायामूह्यतेनुजा साचाग्रेदिधिषुर्ज्ञेया पूर्वा तु दिधिषुर्मता प्रतिमाविक्रयं यो वै करोति पतितस्तु सः जीवनार्थं परास्थीनि नयते पतितः स च गाननृत्यादिकमुदरार्थं निषिद्धं न तु भगवदर्थम् ॥

यानंतर वर्ज्य ब्राह्मण सांगतों.—क्षय, दमा, मूत्रकृच्छ्र, भगंदर इत्यादि महारोगांनीं युक्त; हीनांग; अधिकांग; काणा; बहिरा; मुका; शत्रु; कितव (जुवेबाज, जुगारी इ०); वेतन घेऊन अध्ययन सांगणारा; मित्रद्रोही; दुर्जन; कुनखी; कृष्णदंत; षंढ; माता, पिता, गुरु, यांचा त्याग करणारा; चोर; नास्तिक; पापकर्मी; विहितकर्माचा (स्नानसंध्यादिकांचा) त्याग करणारा; क्षत्रविद्येवर उपजीविका करणारा; वैद्य; राजसेवक; गायक; लेखक; व्याजबट्टा करून उपजीविका करणारा; वेदविक्रय करणारा; कविता करून उपजीविका करणारा; देवपूजा करून उपजीविका करणारा; तमाशांत सोंगें घेणारा; गृहास अग्नि लावणारा; समुद्रांत गमन करणारा; शस्त्रें करणारा; सोमाचा विक्रय करणारा; पक्षी पाळणारा; परिवेत्ता; दिधिषूचा पति; कुमाराध्यापक (पंतोजी); पुत्रापासून विद्या शिकलेला; द्रव्यप्राप्तीसाठीं वेदघोष करणारा; ग्रामोपाध्याय; केश व पशु यांचा विक्रय करणारा; शिल्पकाम करणारा; पित्याशीं अतिवाद करणारा; शूद्राकडे यजन (होमादि) करणारा; जटाधारी; श्मश्रुहीन; निर्दय; रजस्वलापति; गर्भिणीपति; कुबडा; खुजा; आरक्तनेत्र; वाणिज्यानें उपजीविका करणारा; छिन्नोष्ठ (ओंठ तुटलेला); छिन्नलिंग; गडुमान् (वाळुक आलेला); ज्वरित; देवलक; विधुर (मृतपत्नीक); निरग्नि; शूद्रगुरु; शूद्रशिष्य; दांभिक; गाई व बैल यांचा विक्रय करणारा; रसाचा विक्रय करणारा; वेदनिंदक; वृक्षांची लावणी करणारा; निरंतर याचना करणारा; कृपण; कृषीवर उपजीविका करणारा; साधूंनीं निंदित; मेंढे, महिष यांला पाळणारा; पिंगटकेश; वेदाध्ययन विसरलेला; निष्ठुरवाणी; इत्यादिक ब्राह्मण दैवकर्म व पित्र्यकर्म यांविषयीं वर्ज्य होत. "धर्माकरितां अथवा उदरनिर्वाहाकरितां औषधें करणारा ब्राह्मण निंदित होय." द्रव्याकरितां तीन वर्षें सतत देवपूजा करणारा व देवाचें द्रव्य घेणारा तो देवलक होय, हा सर्व कर्माविषयीं सर्वदा वर्ज्य करावा," हें वचन मनुष्यानें स्थापित ज्या देवता तद्विषयक आहे असें वाटतें. "ज्येष्ठ भ्राता अविवाहित व निरग्निक असतां जो कनिष्ठ भ्राता विवाह व अग्निहोत्र धारण करितो तो परिवेत्ता आणि ज्येष्ठ परिवित्ति असें जाणावें." "ज्येष्ठ भ्रात्याची आज्ञा इत्यादिक असेल तर दोष नाहीं असें सांगितलें आहे." "ज्येष्ठ कन्या अविवाहित असून ज्या कनिष्ठ कन्येचा विवाह केला ती कनिष्ठा कन्या अग्रेदिधिषु जाणावी, व ज्येष्ठा कन्या दिधिषु जाणावी." मूर्तीचा जो विक्रय करितो तो पतित होय, व उपजीविकेकरितां परकीयाच्या अस्थि जो नेतो तोहि पतित होय." गायन, नृत्य इत्यादिक उपजीविकेसाठीं करणें तें निषिद्ध, भगवत्प्रीत्यर्थ निषिद्ध नाहीं.

---

अत्रविप्राणांग्राह्यत्वोक्त्यैवतद्भिन्नानांवर्ज्यत्वेसिद्धे पुनर्वर्ज्यपरिगणनंवर्ज्यभिन्नानांनिर्गुणानामपिग्राह्यत्वार्थम् विद्याशीलादिगुणवत्त्वेकुष्ठित्वकाणत्वादिशारीरदोषाणांनदूषकत्वम् गयायांतुनिर्गुणाअपितेएवभोज्याः नविचार्यंकुलंशीलं विद्याचतपएवच पूजितैस्तैस्तुसंतुष्टा देवाःसपितृगुह्यकाइत्युक्तेः ब्राह्मणान्नपरीक्षेततीर्थेक्षेत्रनिवासिनः यत्तुनब्राह्मणंपरीक्षेतदैवेकर्मणिधर्मवित् पित्र्येकर्मणितुप्राप्तेपरीक्षेतप्रयत्नतइतितदसंभवपरम् गायत्रीसारमात्रोपिवरं विप्रःसुयंत्रितः नायंत्रितश्चतुर्वेदीसर्वाशीसर्वविक्रयीतिहेमाद्रौव्यासः श्राद्धेकाणादयोभोज्या मिश्रितावेदपारगैःविप्रानिमंत्रणात्पूर्वमेवपरीक्षणीयानतुनिमंत्रणोत्तरम् इतिब्राह्मणविचारः॥

ह्या स्थलीं ग्राह्य ब्राह्मणांविषयीं जी उक्ति तिणेंकरूनच तद्भिन्न वर्ज्य करावे असें सिद्ध झालें असतां पुनः वर्ज्य ब्राह्मणांची जी परिगणना सांगितली ती वर्ज्यांहून जे निराळे ते निर्गुण असले तत्रापि ग्रहण करावे अशासाठीं आहे. विद्या, आचरण इत्यादिक गुणांनीं युक्त असतां कुष्ठित्व, काणत्व इत्यादिक शारीरदोष दूषणकारक नाहींत. गयेच्याठायीं तर निर्गुण असले तत्रापि तेच ( गयावळच ) श्राद्धीं भोजनास सांगावे. " कुल, शील, विद्या, तप यांचा विचार करूं नये, व त्यांची पूजा केल्यानें पितर व गुह्यक यांसहवर्तमान देव संतुष्ट होतात, " असें वचन आहे यास्तव तीर्थी क्षेत्रांत रहाणाऱ्या ब्राह्मणाची परीक्षा करूं नये. "धर्मवेत्त्या पुरुषानें दैवकर्मांचे ठायीं ब्राह्मणाची परीक्षा करूं नये, पित्र्यकर्म प्राप्त झालें असतां प्रयत्नेंकरून परीक्षा करावी, " असें जें वचन तें असंभवपर आहे. " आचारसंपन्न असून केवळ गायत्री मात्र जाणणारा असेल तथापि तो उत्तम, आणि आचारसंपन्न नसून सर्व खाणारा व सर्व पदार्थ विकणारा तो चार वेद जाणणारा असला तथापि निंद्य जाणावा, " असें हेमाद्रींत व्यासाचें वचन आहे. " वेदपारग ब्राह्मणांनीं मिश्रित असे काणादिक श्राद्धीं भोजनास सांगावे. " श्राद्धाचें निमंत्रण करण्यापूर्वी ब्राह्मणांची परीक्षा करावी, निमंत्रण केल्यानंतर परीक्षा करूं नये. याप्रमाणें ब्राह्मणांचा विचार सांगितला.

---

अथश्राद्धार्हद्रव्याणि तत्रदर्भाः दर्भग्रहणेकालोमंत्रोदर्भभेदाश्चद्वितीयपरिच्छेदेउक्ताःविशेषस्तूच्यते कुशामुख्याःकुशाभावेकाशदूर्वोशीरतृणादयः तत्रकाशैर्दूर्वाभिर्वाकृतपवित्रहस्तो नाचामेत् द्वाभ्यामनामिकाभ्यांतुधार्येदर्भपवित्रके एकानामिकयावापिद्वयोर्मध्येतुपर्वणोः साग्रौविगर्भौतुकुशौकार्यौताभ्यांपवित्रकम् द्वाभ्यांतत्स्याच्चतुर्भिर्वाग्रंथियुक्तंनवाभवेत् स्नानेदानेजपेहोमेस्वाध्यायेपितृकर्मणि सपवित्रौसदर्भौवाकरौकुर्वीतनान्यथा ब्रह्मग्रंथिपवित्राढ्योनाचामेच्चबुधःसदा केचिद्ग्रंथितपवित्राभावेसाग्रदर्भौद्वौदक्षिणकरेवामेतुत्रीन्द्वौवाबिभृयादित्याहुः आसनेद्वौदर्भौ पितृकर्मणिसमूलाद्विगुणादर्भाः दैवेसाग्राऋजवः पित्र्येपिसपिंडीकरणपर्यंतमृजुदर्भास्तदूर्ध्वंद्विगुणाभुग्नाइति येचपिंडाश्रितादर्भायैःकृतंपितृतर्पणं मलमूत्रोत्सर्गधृतामलमूत्राद्यमध्यगाः मार्गेचितौयज्ञभूमौस्थितायेस्तरणासने ब्रह्मयज्ञेचयेदर्भास्त्यागार्हाः सर्वएवते अन्यानिचपवित्राणिकुशदूर्वात्मकानिच हेमात्मकपवित्रस्यकलांनार्हंतिषोडशीं पंचगुंजमाषमानेनषोडशमाषंहेममयंपवित्रकमित्याहुः ॥

## यानंतर श्राद्धाचीं योग्य द्रव्यें सांगतों.

त्यामध्यें प्रथम दर्भ सांगतों— दर्भग्रहणाविषयीं काल, मंत्र आणि दर्भांचे भेद द्वितीय परिच्छेदांत (कुशग्रहणीं अमावास्याप्रकरणीं) सांगितले आहेत. त्याहून विशेष मात्र सांगतों— कुश हे मुख्य होत. कुशांच्या अभावीं काश, दूर्वा, उशीरतृण इत्यादि ग्रहण करावे. त्यामध्यें काश अथवा दूर्वा यांचें पवित्रक हस्तांत घालून आचमन करूं नये. दोन अनामिकांमध्यें दोन दर्भपवित्रकें धारण करावीं. अथवा एका अनामिकेचे ठायीं पवित्रक दोन पर्वांचे मध्यभागीं धारण करावें. ज्याच्या गर्भांत अन्य दल नाहीं असे साग्र दोन कुश घे-

ऊन त्यांचें पवित्रक करावें. दोन कुशांचें अथवा चार कुशांचें ग्रंथियुक्त किंवा ग्रंथिविरहित असें करावें. स्नान, दान, जप, होम, ब्रह्मयज्ञ आणि पितृकर्म हीं कर्में कर्तव्य असतां उभय हस्तांत पवित्रकें अथवा दर्भ धारण करावे, दर्भावांचून कर्म करूं नये. ह्मत्या पुरुषानें ब्रह्मग्रंथियुक्त पवित्रक हातांत घालून आचमन करूं नये. कोणी ग्रंथकार, ग्रंथियुक्त पवित्रक नसेल तर साग्र असे दोन दर्भ दक्षिणहस्तांत व वामहस्तांत तीन किंवा दोन धारण करावे असें सांगतात. आसनाचे ठायीं दोन दर्भ, पितृकर्माचे ठायीं मूलासहित द्विगुण दर्भ घ्यावे. दैवकर्माचे ठायीं साग्र, सरळ घ्यावे. पित्र्यकर्माविषयींहि सपिंडीकरणपर्यंत सरळ दर्भ घ्यावे, सपिंडीकरण झाल्यानंतर द्विगुणभुग्न (दोन वेळ मोडलेले) असे असावे. "पिंडप्रदान केलेले दर्भ; पितृतर्पण केलेले दर्भ; मलमूत्रोत्सर्गीं धारण केल्यानें अशुद्ध झालेले व मलमूत्र इत्यादिकानें अपवित्र झालेले दर्भ; मार्ग, चिता, यज्ञभूमि या स्थानींचे दर्भ; परिस्तरण व आसन यांतील दर्भ; ब्रह्मयज्ञांतील दर्भ हे सर्व टाकण्यास योग्य होत. सुवर्णपवित्रकाच्या सोळाव्या अंशाचे बरोबरीचीं इतर कुश व दूर्वांचीं पवित्रकें नाहींत; ह्मणजे सर्व जातीच्या दर्भपवित्रकांहून सुवर्णाचें पवित्रक श्रेष्ठ आहे." पांच गुंजांचा एक मासा या मानानें सोळा मासे वजनाचें सुवर्णपवित्रक असावें असें सांगतात.

---

**अथहवि**: व्रीहियवतिलमाषगोधूमश्यामाकप्रियंगुमुद्गसर्षपाःश्राद्धेप्रशस्ताःचणकोविकल्पितः **याव**नालोपिविकल्पितः इष्टापूर्तेमृताहेचदर्शवृद्ध्यष्टकासुच पात्रेभ्यस्त्वेषुकालेषुदेयंनैवकुभोजनं अगोधूमंचयच्छ्राद्धंमाषमुद्गविवर्जितं तैलपक्केनरहितंकृतमप्यकृतंभवेत् राजमाषाश्चनिष्पावाअपिशस्ताःसतीनकाः राजमाषामहाराष्ट्रभाषयाचवळीतिप्रसिद्धाःनिष्पावाःपावटेइति सतीनकावाटाणेइतिकदलीफलमाम्रफलंसूरणःपनसःत्रिविधंकर्कटीफलं कोशातकीदोडकाइतिप्रसिद्धा कुस्तुंबुरुवैकल्पिकं पटोलंबदरमामलकंखर्जूरीफलंचिंचार्द्रकंशुंठीमूलकंद्राक्षालवंगैलापत्रकाणिजीरकंहिंगुदाडिमफलमिक्षुःशर्करागुडःकर्पूरःसैंधवसामुद्रेलवणेपूगीफलंतांबूलपत्रमितिश्राद्धेप्रोक्तानिहवींषिगव्येदधिदुग्धेघृतंगव्यंमाहिषंचकेचित्माहिषंतक्रंसद्यःकृतमनुद्धृतनवनीतंग्राह्यमाहुः केचिन्महिषीक्षीरंशर्करादियुतं ग्राह्यमाहुः मथितंनिर्जलंदधिसर्वंनिषिद्धं जंबीरफलंविहितप्रतिषिद्धत्वाद्विकल्पितं अक्षोटअक्रोडइतिप्रसिद्धः शृंगाटकःशिंगाडेइतिप्रसिद्धः चिर्भटंखर्बुजइतिप्रसिद्धं शीतकंदलीरताळीतिप्रसिद्धं एते श्राद्धेविहिताः आम्रातकआंबाडाइतिप्रसिद्धस्तंडुलीयोमाठइतिप्रसिद्धः एतौद्वौविहितप्रतिषिद्धौ केचिद्राजमाषंकृष्णेतरमुद्गंकृष्णनिष्पावंचनिषिद्धमाहुः कथंचिद्यदिविप्रेभ्योनदत्तंभोजनेमधु पिंडास्तुनैवदातव्याःकदाचिन्मधुनाविना अक्षतागोपशुश्चैवश्राद्धेमांसंतथामधु देवराच्चसुतोत्पत्तिःकलौपंचविवर्जयेदितिवचनद्वयान्मधुनिऐच्छिकविकल्पः केचिद्यथाचारंप्रदेयंतुमधुमांसादिकंतथेतिवचनाद्देशाचारानुसारेणव्यवस्थितविकल्पमाहुः मांसंश्राद्धेषुनैवदेयंकलिवर्ज्यत्वात् नदद्यादामिषंश्राद्धेनचाद्याद्धर्मतत्त्ववित्दित्यादिश्रीभागवतवचनाच्च अन्यानिमुंजातचव्यकसेरुकाले यानिद्रव्याणिबहूनिमहानिबंधेषूक्तानितान्यप्रसिद्धत्वाच्छ्राद्धेवश्यापेक्षोपयोगयोरभावाच्चनोच्यंते ॥

## आतां हवि ह्मणजे श्राद्धास शुद्ध पदार्थ कोणते तें सांगतों.

व्रीहि ( साळी ), जव, तीळ, उडीद, गहूं, सांवे, कांग, मूग, सर्षप ( शिरिस ), हे पदार्थ श्राद्धीं प्रशस्त होत. चणे विकल्पानें प्रशस्त होत. जोंधळेहि विकल्पानें प्रशस्त होत. " इष्टापूर्त ( वापीकूपाद्युत्सर्ग ), मृतदिवस, दर्शश्राद्ध, वृद्धिश्राद्ध, अष्टकाश्राद्धें ह्या कालीं पात्रांकारणें ( ब्राह्मणांकारणें ) निंद्य पदार्थांचें भोजन निश्चयें देऊं नये. ज्या श्राद्धांत गहूं, उडीद, मूग आणि तैलपक्क पदार्थ नाहींत तें केलें असून न केल्यासारखें ( व्यर्थ ) होय. राजमाष, निष्पाव आणि सतीनक हेहि प्रशस्त होत." राजमाष ह्मणजे महाराष्ट्र भाषेनें चवळी असे प्रसिद्ध होत. निष्पाव ह्मणजे पावटे. सतीनक ह्मणजे वाटाणे. कदलीफलें, आंबे, सुरण, फणस तीन प्रकारचीं काकडीफळें, कोशातकी ह्मणजे दोडका असी प्रसिद्ध आहे. कुस्तुंबरु ( कोथिंबीर ) वैकल्पिक होय. पटोल ( पडवळ ) बोरें, आंवळे, खजूर, चिंच, आलें, सुंठ, पांढरा मुळा, द्राक्षें, लवंगा, वेलची, पत्री, जिरें, हिंग, डाळिंब, ऊंस, साखर, गूळ, कापूर, सैंधव, समुद्रोत्पन्न लवण, सुपारी, नागवल्लीचीं पानें हे पदार्थ श्राद्धाविषयीं प्रशस्त सांगितले आहेत. गाईचें दहीं व दूध, गाईचें व ह्मशीचें घृत. कोणी ग्रंथकार, ह्मशीचें तक्र तत्कालीं केलेलें असून त्याचें नवनीत न काढलेलें असें ग्राह्य आहे असें सांगतात. कोणी ग्रंथकार, ह्मशीचें दूध, साखर इत्यादिक घालून घ्यावें असें सांगतात. निर्जल असें मथित दहीं सर्व निषिद्ध होय. इडनिंबू विहित व प्रतिषिद्ध असल्यामुळें विकल्पित आहे. अक्षोट ह्मणजे अक्रोड या नांवानें प्रसिद्ध. शृंगाटक ह्मणजे शिंगाडे असे प्रसिद्ध. चिर्भट ह्मणजे खर्बूज असें प्रसिद्ध आहे. शीतकंदली ह्मणजे रताळी अशी प्रसिद्ध आहे; हे पदार्थ श्राद्धास विहित होत. आम्रातक ह्मणजे आंबाडा असा प्रसिद्ध, तंदुलीय ह्मणजे माठ असा प्रसिद्ध, हे दोन विहित प्रतिषिद्ध जाणावे. कोणी ग्रंथकार, राजमाष, काळेमुगांवांचून इतर मूग, आणि काळे पावटे हें निषिद्ध होत असें सांगतात. " जर कदाचित् भोजनांत ब्राह्मणांस मध न वाढला असेल तर असो, परंतु पिंड तर मधावांचून कदापि देऊं नयेत." "अक्षताकन्या, गोरूपपशु, श्राद्धामध्यें मांस आणि मध व देवरापासून पुत्रोत्पत्ति हीं पांच कलींत वर्ज्य होत," अशीं दोन वचनें असल्यामुळें मधाविषयीं इच्छाप्राप्त विकल्प आहे. कोणी ग्रंथकार, "जसा स्वकीय आचार असेल तदनुसार मध, मांस इत्यादिक द्यावें" असें वचन असल्यामुळें देशाचारानुरोधानें व्यवस्थित विकल्प आहे असें सांगतात. श्राद्धामध्यें मांस देऊं नये, कारण, कलियुगीं मांस वर्ज्य सांगितलें आहे, व " धर्मतत्त्ववेत्त्या पुरुषानें श्राद्धामध्यें मांस देऊं नये व भक्षणहि करूं नये, " असें श्रीभागवतवचनहि आहे. खारा रानसुरण, वेखंड, कसेरु ( जलजकंद ); कालेय इत्यादिक बहुत पदार्थ मोठ्या निबंधग्रंथांत सांगितले आहेत; परंतु ते अप्रसिद्ध असून श्राद्धाविषयीं अवश्य उपयोगी नसल्यामुळें सांगत नाहीं.

---

**अथवर्ज्यानि यद्यपिविहितोक्त्यैवतद्भिन्नानामग्राह्यत्वंप्राप्तंतथापिविशेषदोषप्रदर्शनायाप्राप्तनिषेधज्ञापनायचतानिसंगृह्यंते उत्कोचादिनाप्राप्तंपतितांत्यजादेःप्राप्तमन्यायार्जितंकन्याविक्रयादिलब्धंधनंनिंद्यं पित्रर्थमेदेहीतियाचनार्जितमपिनिषिद्धं आढकीकुलित्थमसूरकोद्रव**

राजसर्षपानिषिद्धाः लांकेतिप्रसिद्धाः मर्कटकाश्चवर्ज्याः शिग्रुकूष्मांडोभयविधालाबुकरम दोर्द्रमरीचपिंडमूलककुसुंभशणवंशांकुराः दशविधालशुनादिपलांडुभेदाः कृत्रिमलवणानिर क्तबिल्वंश्वेतंकृष्णंवृंताकंगाजरापरपर्यायंगृंजनं भोकरसंज्ञःश्लेष्मातकोरक्तनिर्यासाश्चवर्ज्याः सामुद्रंसैंधवेभक्ष्येप्रत्यक्षंलवणेबुधैः बिडालोच्छिष्टमाघ्रातंश्राद्धेद्रव्यंविवर्जयेत् करीरफल पुष्पाणिविडंगमरिचानिच बीजपूरंपटोलंचश्राद्धेदत्वापतत्यधः कृष्णधान्यानिसर्वाणिवर्ज येच्छ्राद्धकर्मणि नवर्जयेत्तिलांश्चैवमुद्गमाषांस्तथैवच दातुर्यद्यत्प्रियंतत्तद्देयंनिंद्यंनचेद्भितं अ जाविमहिषीक्षीरंतद्विकारांश्चवर्जयेत् वालुकाकीटपाषाणैःकेशैर्यच्चाप्युपद्रुतं वस्त्रेणवीजितं चान्नंवर्जयेच्छ्राद्धकर्मणि अमेध्यैर्जंगमैःस्पृष्टंशुष्कंपर्युषितंचयत् द्विःपक्वंपरिदग्धंचसिद्धभ क्षांश्चवर्जयेत् यत्सकृत्पाकेनभक्षणार्हमपिहिंगुजीरकादिसंस्कारार्थंपुनःपच्यतेतद्विःपक्वंवर्ज्यं यत्तुद्विःपाकेनैवभक्षणार्हंतन्ननिषिद्धमितिसिंधुःयदन्नैकदेशः केनचित्पूर्वमास्वादितस्तदन्नंश्राद्धे वर्ज्यं मारीषंराजगिरेतिप्रसिद्धंशाकंधान्यंचवर्ज्यं वटप्लक्षोदुंबरकपित्थनीपमातुलिंगफला निनभक्षयेत् क्षीरंचलवणैर्मिश्रंताम्रेगव्यंसुरासमम् अस्यापवादः पयोनुद्धृतसारंचपयसा संयुतंदधि घृतंचैतानिगव्यानिनैवदुष्टानिताम्रके पिप्पलीवर्तुलमरीचादेःप्रत्यक्षस्यनिषेधोन त्वन्यद्रव्यमिश्रितस्य नारिकेलंविहितप्रतिषिद्धंयवपौतिकशाकादिकंजीर्णतक्रंसंधिन्यादिक्षीर मनिर्दशायाःक्षीरंमृग्यादिक्षीरंफेनिलतक्रादिकंहस्तदत्तस्नेहलवणादिकंचनित्यभोजनेनिषिद्ध म् तत्सर्वंश्राद्धेपिवर्जयेत् माधवीये मृतैर्मक्षिकाकृमिजंतुभिःकेशरोमनखादिभिश्चदूषितंसति संभवेवर्जयेत् असंभवेतुकेशादिकमुद्धृत्यसंप्रोक्ष्यहिरण्यस्पर्शंकृत्वाभुंजीत श्वमार्जारमूषका दिभिरालीढादिकंत्वापद्यपिवर्ज्यमित्युक्तम् यत्तुमंडकवटकसक्तुपायसापूपकृसरादीनांस्नेह सिद्धानांचपर्युषितत्वदोषोनास्तीतिवचनंतन्नित्यभोजनपरंनतुश्राद्धपरमितिशिष्टाः यदग्निपक्वं सदेकरात्रिद्विरात्राद्यंतरितंतत्पर्युषितमुच्यते ॥

## आतां वर्ज्य पदार्थ सांगतों.

जरीहि विहित सांगितले इतक्यानेंच तद्भिन्न ते अग्राह्य होत असें प्राप्त झालें तथापि विशेष दोष दाखविण्याकरितां व अप्राप्त निषेध जाणविण्याकरितां त्यांचा संग्रह करितों ह्मणजे ते सांगतों. लांच इत्यादिकापासून मिळालेलें, पतित व अंत्यज इत्यादिकापासून प्राप्त झालेलें, अनीतीनें संपादन केलेलें, आणि कन्येचा विक्रय इत्यादिकापांसून मिळालेलें द्रव्य तें निंद्य होय. ‘ पितृकर्मासाठीं मजकारणें दे ’ असी याचना करून संपादन केलेलें द्रव्यहि निषिद्ध होय. तूर, कुळीथ, मसूर, कोद्रू, राजसर्षप ( काळे शिरिस, ) हे निषिद्ध होत. लांक ह्मणून जे प्रसिद्ध ते मर्कटक वर्ज्य होत. शेगवा, कूष्मांड, दोन प्रकारचा भोपळा ( काळा व पांढरा ), करवंद, ओलीं मिरें, पिंडमूलक ( वाटोळा मुळा ), कर्डई, शण ( कर्टोली ), वेळूचे कोंब, दहा प्रकारचे लसुण इत्यादिक पलांडूचे भेद, कृतीचीं लवणें, तांबडें बेलफळ, पांढरें व काळें वांगें, गृंजन ह्मणजे गाजर, श्लेष्मातक ह्मणजे भोंकर, आणि रक्तवर्ण चीक हे पदार्थ वर्ज्य होत. “ सामुद्र व सैंधव हीं लवणें प्रत्यक्ष भक्षण करावीं, मांजरानें उच्छिष्ट

---

१ माधवीयेतुमार्जारोच्छिष्टादेरपिकुशादिप्रोक्षणायुक्तम् ॥

( हुंगलेला ) पदार्थ श्राद्धीं वर्ज्य करावा असें बुधांनीं सांगितलें आहे. "करीरवृक्षाचीं फलें व पुष्पें, विडंग ( वावडिंग ) व मिऱ्यें, महाळुंग, पटोल हीं श्राद्धांत दिलीं असतां अधोयोनि प्राप्त होते." श्राद्धांत काळीं धान्यें सर्व वर्ज्य करावीं, परंतु तिळ, मूग, उडीद हीं वर्ज्य करूं नयेत. "दात्यास जो जो पदार्थ प्रिय असेल तो निंद्य नसेल तर द्यावा, व तो हितकारक होतो." शेळी, मेंढी व महिषी यांचें दूध व त्या दुधापासून झालेले पदार्थ ( दहीं इत्यादिक ) वर्ज्य करावे. वाळू, कीटक व खडे, रेंव, केश, यांहीं जें दूषित झालेलें व वस्त्रानें वीजित ह्मणजे वारा घातलेलें तेंहि अन्न श्राद्धीं वर्ज्य करावें. अशुद्ध प्राणी यांनीं स्पर्शलेलें, शुष्क, शिळें, द्विःपक्क, दग्धान्न, पूर्वीं तयार करून ठेविलेले पदार्थ हीं सर्व वर्ज्य करावीं. जें एक वेळ शिजविल्यानें भक्षण करण्यास योग्य असतांहि हिंग, व जिरें इत्यादिकांचा संस्कार करण्याकरितां पुनः शिजविलें जातें तें द्विःपक्क होय व तें वर्ज्य करावें. जें दोन वेळ शिजविल्यानेंच भक्षण करण्यास योग्य तें निषिद्ध नाहीं असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे. ज्या अन्नाचा एकदेश कोणीं प्राण्यानें हुंगला तें अन्न श्राद्धीं वर्ज्य करावें. मारीष ह्मणजे राजगिरा या नांवानें प्रसिद्ध शाक व धान्य वर्ज्य होय. वट, प्लक्ष ( पिंपरीवृक्ष), उंबर, कपित्थ (कवठी वृक्ष ), नीप ( कळंब ), महाळुंग यांचीं फलें भक्षण करूं नयेत. "लवणयुक्त दूध, ताम्रपात्रांतील गाईचें दूध हीं सुरेसमान होत. याचा अपवाद—अनुद्धृतसार असें दूध, व पयोयुक्त दहीं, आणि घृत हीं तांब्याच्या पात्रांतील असतील तथापि निषिद्ध नाहींत. पिंपळी, वाटोळीं मिऱ्यें इत्यादिकांचा प्रत्यक्ष निषेध आहे, दुसरें द्रव्य मिश्रित केलेल्यांचा दोष नाहीं. नारळ विहित व प्रतिषिद्ध आहे. जे—पौतिकशाक[1] इत्यादिक, शिळें तक्र, संधिनी ह्मणजे बैलानें मैथुनार्थ आक्रमिलेली गाई, इत्यादिकांचें दूध, प्रसूत होऊन दहा दिवस न झालेल्या गाईचें दूध, हरिणी इत्यादिकांचें दूध, फेंसयुक्त तक्रादिक, हस्तावर दिलेलें स्नेहद्रव्य व लवण इत्यादिक पदार्थ नित्यभोजनांत निषिद्ध ते सर्व श्राद्धींहि वर्ज्य करावे. माधवाच्या ग्रंथांत[2] मृत झालेले असे मक्षिका, कीटक इत्यादिक प्राणी व केश, रोम, नखें इत्यादिक यांहींकरून दूषित झालेलें अन्न, संभव असतां वर्ज्य करावें. संभव नसेल तर, केशादिक काढून प्रोक्षण करून हिरण्याचा स्पर्श करून भक्षण करावें. कुत्रा, मांजर, उंदीर इत्यादिकांनीं चाटलेलें इत्यादिक असेल तर आपत्तीमध्येंहि वर्ज्य करावें, असें सांगितलें आहे. मांडे, वडे, सक्तु (भाजलेल्या धान्याचें पीठ ), पायस, अपूप, कृसर ( तिलमिश्र ओदन ) इत्यादिक आणि तेलांत सिद्ध केलेले हे पदार्थ पर्युषित असतील तथापि दोष नाहीं असें जें वचन तें नित्यभोजनपर आहे, श्राद्धपर नव्हे असें शिष्ट सांगतात. जें अग्नीनें पक्क झालें असून त्यावरून एक दोन इत्यादि रात्रि गत झाल्या तें पर्युषित असें ह्मटलें आहे.

---

कदर्यादीनामन्नंनित्यभोजनेश्राद्धकर्मणिचनग्राह्यम् तेचकदर्यश्चोरोनटोवीणोपजीवीवार्धुषिकोभिशस्तोगणिकाचिकित्सकःक्रुद्धः पुंश्चलीमत्तःक्रूरःशत्रुःपतितोदांभिकःपतिपुत्ररहि

---

[1] बीजापासून उत्पन्न झालेला कोंब किंवा मायाळ इत्यादिक. [2] माधवाचे ग्रंथांत तर, मांजराचें उच्छिष्ट इत्यादिक अन्नासहि कुशादिकानें प्रोक्षणादिक करावें असें सांगितलें आहे.

ताम्बीस्वर्णकारः स्त्रीजितोग्रामयाजकोघातुकःकर्मारस्तंतुवायःकृतघ्नोवस्त्रक्षालनोपजीवीदारोपजीवीसोमविक्रयीचित्रकर्मागायकइत्यादयस्त्रैवर्णिकाअपिअग्राह्यान्नाः आत्मानंधर्मकृत्यंच पुत्रदारांश्चपीडयेत् लोभाद्यःपितरौभृत्यान्सकदर्यइतिस्मृतः द्वावेवाश्रमिणौभोज्यौब्रह्मचारी गृहीतथा वानप्रस्थोयतीर्लिंगीनभोज्यान्नाःप्रकीर्तिताः षण्मासंयोद्विजोभुंक्तेशूद्रस्यान्नंविगर्हितम् सतुजीवन्भवेच्छूद्रोमृतःश्वाचाभिजायते अन्यानिचद्रव्याणिनिबंधेषुबहूनिनिषिद्धानि तानिविहितोक्त्यर्थसिद्धत्वादप्रसिद्धत्वाच्चनोक्तानि दुर्गंधिफेनिलंक्षारंपंकिलंपल्वलोदकम् न भवेद्यत्रगोतृप्तिर्नक्तंयच्चाप्युपाहृतम् नग्राह्यंतज्जलंश्राद्धेयच्चाभोज्यनिपानजम् स्नानमाचमनं दानंदेवतापितृतर्पणम् शूद्रोदकैर्नकुर्वीततथामेघाद्विनिःसृतैः नाहरेदुदकंरात्रौतुलसींगोमयं मृदं तुलसीबिल्वजान्हवीजलभिन्नंपर्युषितंजलंपुष्पंचत्यजेत् दौहित्रःकुतुपःकालश्छागःकृष्णाजिनंतथा रौप्यंदर्भास्तिलागावःखड्गपात्रंपितृप्रियम् आरण्याःकृष्णतिलामुख्याः तदभावे ग्राम्यागौराःकृष्णाश्च छागसान्निध्यंश्राद्धेतिप्रशस्तं कुक्कुटविड्वराहकाकमार्जारशूद्रषंढरजस्वलासान्निध्यमतिनिंद्यम् चांडालरजस्वलाखंजश्वित्रिन्यूनांगातिरिक्तांगादिभिर्वीक्षितमन्नम भोज्यं आपदिमूत्रभस्महिरण्योदकस्पर्शाद्भोज्यम् पावमानीतरत्समंदीमंत्रैर्गायत्र्यादिभिश्चदर्भजलप्रोक्षणेदुष्टान्नशुद्धिः पादुकोपानहौछत्रंरक्तंचित्रांबरंतथा रक्तपुष्पंचमार्जारंश्राद्धभूमौ विवर्जयेत् घंटानादोश्वधत्तूरशंखशुक्तिसान्निध्यंचवर्ज्यम् ॥

कदर्य इत्यादिकांचें अन्न नित्यभोजन व श्राद्धकर्म यांविषयीं घेऊं नये. ते असे—कदर्य, चोर, नट, वीणावाद्यानें उपजीविका करणारा, व्याजावर उपजीविका करणारा, लोकापवादानें दूषित झालेला, गणिका, वैद्य, क्रुद्ध, जारिणी, मत्त, क्रूर, शत्रु, पतित, दांभिक, पति व पुत्र एतद्विरहिता स्त्री, सोनार, स्त्रीजित, ग्रामोपाध्याय, घातुक, कर्मार (शिल्पी), कोष्टी, कृतघ्न, वस्त्रक्षालनानें उपजीवी (रजक), स्त्रीपासून उपजीविका करणारा, सोमविक्रयी, चितारी, गायक इत्यादिक हे त्रैवर्णिक (ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य) जरी असतील तथापि त्यांचेपासून अन्न घेऊं नये. "आत्मा, धर्मकृत्य, पुत्र, स्त्रिया आणि मातापितर यांला लोभास्तव जो पीडितो तो कदर्य होय." "ब्रह्मचारी, गृहस्थाश्रमी हे दोनच आश्रमी भोज्यान्न होत; वानप्रस्थ, संन्यासी आणि लिंगी हे भोज्यान्न नाहींत. जो द्विज सहा महिने शूद्रसंबंधी विगर्हित असें अन्न भक्षण करितो, तो जीवंतपणीं शूद्र होत्साता मृत झाल्यानंतर कुत्र्याचे योनीप्रत प्राप्त होतो." इतर पदार्थ मोठ्या निबंधांत पुष्कळ निषिद्ध केलेले आहेत व ते, विहित पदार्थांच्या उक्तीनेंच निषिद्ध होत हें अर्थसिद्ध असल्यामुळें व ते अप्रसिद्ध असल्यामुळें सांगितले नाहींत. "दुर्गंधयुक्त, फेंसयुक्त, खारें, कर्दमयुक्त, पल्वलोदक (डबकणांतील उदक), ज्या उदकांत गाईची तृषा हरण होत नाहीं तें, आणि रात्रौ भरून ठेवलेलें असें उदक श्राद्धास घेऊं नये, व अभोज्यान्नाच्या डोणींतलें व टाक्यांतलें जें उदक तेंहि ग्रहण करूं नये. स्नान, आचमन, दान, देवता व पितर यांचें तर्पण हीं शूद्रानें आणलेल्या उदकानें व मेघोदकानें करूं नयेत. उदक, तुळसी, गोमय आणि मृत्तिका हीं रात्रौ आणूं नयेत." तुळसी, बेल यांवांचून इतर पुष्पें, व जान्हवीवांचून इतर उदक हीं

पर्युषित टाकावीं. "दौहित्र, कुतुपकाल, छाग (मेंढा), कृष्णाजिन, रौप्य, दर्भ, तिळ, गाई, खड्गपात्र (गेंड्याचे शिंगाचें पात्र), हे पदार्थ पितृप्रिय होत." अरण्यसंबंधी काळे तिळ मुख्य होत, त्यांच्या अभावीं ग्रामसंबंधी पांढरे व काळे ग्रहण करावे. श्राद्धीं छागाचें सान्निध्य अति प्रशस्त आहे. कुक्कुट, गांवडुकर, काक, मांजर, शूद्र, षंढ, रजस्वला यांचें सान्निध्य अति निंद्य होय. चांडाल, रजस्वला, लंगडा, कुष्ठी, न्यूनांग, अतिरिक्तांग इत्यादिकांनीं अवलोकित अन्न अभोज्य जाणावें. आपत्ति असतां मृत्तिका, भस्म, हिरण्य अथवा उदक यांच्या स्पर्शानें भक्षण करण्यास योग्य होय. पावमानीऋचा व तरत्समंदी, ह्या मंत्रांनीं व गायत्री इत्यादिक मंत्रांहींकरून दर्भांनीं जलाचें प्रोक्षण केलें असतां दूषित अन्नाची शुद्धि होते. "पादुका, उपानह, छत्री, तांबडें वस्त्र, चित्रवस्त्र, आरक्त पुष्पें आणि मांजर हे पदार्थ श्राद्धभूमीचे ठायीं नसावेत. घंटानाद, अश्व, धोतरा, शंख, शुक्ति हे पदार्थ समीप नसावेत.

---

अथश्राद्धदिनकृत्यम् गोमयादिभिर्भूमिभांडशुद्धिः देवताब्रह्मचारियतिशिशूनांपिंडदान पर्यंतमन्नंनदेयम् अतिशिशवस्तुगृहांतरेभोजनीयाः तिलानवकिरेत्तत्रसर्वतोबंधयेदजान् पाकःश्राद्धकर्त्रास्वयमेवकार्यः तदभावेशुद्धपत्न्यातदभावेतुबांधवैः सगोत्रैर्वासपिंडैर्वामित्रैर्वासुगुणान्वितैः पुंश्चलींचतथावंध्यांविधवांचान्यगोत्रजां वर्जयेच्छ्राद्धपाकार्थममातृपितृवंशजाम् नपाकंकारयेत्पुत्रींगर्भिणींचापिदुर्मुखीं पाकभांडानिसौवर्णरौप्यताम्रोद्भवानिच कांस्यानिमृन्मयंतूक्तंनव्यमेवमनीषिभिः पैत्तलंरंगजातंचविहितंनोननिंदितम् नकदाचित्पचेदन्नमयस्स्थालीषुपैतृकम् फलशाकादिछेदनार्थभिन्नानामायसानांशस्त्राणां भांडानांचदर्शनमपि पाकादिस्थानेनिषिद्धं पक्वान्नस्थापनार्थंतुशस्यंतेदारुजान्यपि गृह्याग्नौतुपचेदन्नंश्राद्धीयंलौकिकेपिवा यस्मिन्नग्नौपचेदन्नंतस्मिन्होमोविधीयते ॥

## यानंतर श्राद्धदिवसाचें कृत्य सांगतों.

गोमय इत्यादिकांनीं भूमि व पात्रें यांची शुद्धि करावी. देवता, ब्रह्मचारी, संन्यासी आणि बालक यांस पिंडदान होई तावत्पर्यंत अन्न देऊं नये. अति लहान बालकांस दुसऱ्या घरीं भोजन घालावें. "श्राद्धभूमीचे ठायीं तिळ टाकावे, व सर्वत्र बोकड बांधावे." श्राद्धसंबंधी पाक करणें तो श्राद्धकर्त्यानें स्वतांच करावा. "स्वतां करण्याचा अभाव असेल तर शुचिर्भूत पत्नीकडून करवावा. तसी स्त्री नसेल तर बांधव अथवा सगोत्र, अथवा सपिंड, किंवा गुणी असे मित्र यांजकडून करवावा. जारिणी, वंध्या, विधवा, परगोत्रांत जन्मलेली आणि श्राद्धकर्त्याचे मातापितरांच्या वंशांत जन्मलेली नव्हे अशी, ह्या स्त्रिया श्राद्धाचे पाकाविषयीं वर्ज्य होत. कन्या, गर्भिणी, दुर्मुखी यांच्याकडून पाक करवूं नये. श्राद्धपाकाचीं भांडीं सोन्याचीं, रुप्याचीं, तांब्याचीं आणि कांस्यमय असीं असावीं. मृत्तिकेचीं असल्यास सर्व नवींच असावीं, असें विद्वानांनीं सांगितलें आहे. पितळेचीं पात्रें, रंगजात पात्रें हीं विहित नाहींत व निषिद्धहि नाहींत. लोखंडाच्या स्थालींत श्राद्धान्न कदापि शिजवूं नये." फळें, शाका, इत्यादिक चिरण्याकरितां जीं विळी इत्यादिक शस्त्रें तद्व्यतिरिक्त लोखंडी शस्त्रें व भांडीं यांचें दर्शन सुद्धां पाकादि स्थानांत निषिद्ध आहे. "पक्व झालेले पदार्थ

ठेवण्याकरितां काष्ठाचींहि पात्रें प्रशस्त होत. श्राद्धाचा पाक गृह्याग्नि अथवा लौकिकाग्नि यांवर करावा. ज्या अग्नीवर पाक केला असेल त्या अग्नीवर होम करावा.”

---

तत्रगृह्याग्नौपाकेविशेषः प्रातर्होमंकृत्वातदेकदेशंमहानसेकृत्वापाकंकुर्यात् पाकांतेपाकाग्न्येकदेशंगृह्याग्नौसंयोज्यगृह्येऽग्नौकरणवैश्वदेवादिकार्यम् अत्रैवंव्यवस्था कात्यायनादीनां गृह्याग्नौपाकः आश्वलायनानांतुनैत्यकेपचनाग्नौ अग्नौकरणंत्वाश्वलायनानांव्यतिषंगेणश्राद्धे गृह्याग्निपक्वचरुणागृह्यएव व्यतिषंगाभावेपाणिहोमः अन्यशाखीयस्यगृह्याग्नावग्नौकरणं विधुरस्योच्छिन्नाग्निकस्यचपृष्टोदिविविधानादिनाग्निसंपादनं तच्चपूर्वार्धेउक्तम् भोजनपात्राणितुहेमरौप्यकांस्यजानिवापलाशकमलकदलीमधूकपत्रनिर्मितानिवा ॥

त्यामध्यें गृह्याग्नीवर पाक करणें असतां विशेष सांगतों.—प्रातःकाळीं होम करून त्या गृह्याग्नींतून एकीकडचा अग्नि घेऊन तो स्वयंपाकघरांत नेऊन त्या अग्नीवर पाक करावा. पाक झाल्यानंतर पाकाग्नींतून कांहीं अग्नि गृह्याग्नींत मिळवून गृह्याग्नीवर अग्नौकरण, वैश्वदेव इत्यादिक करावें. याविषयीं याप्रमाणें व्यवस्था करावी. कात्यायन इत्यादिकांनीं गृह्याग्नीवर पाक करावा. आश्वलायनांनीं तर, नित्याच्या पाकाग्नीवर पाक करावा. अग्नौकरण करणें तें आश्वलायनांनीं व्यतिषंगेंकरून श्राद्ध असतां गृह्याग्नीवर चरु पक्व करून गृह्याग्नीवरच करावें. व्यतिषंगाचा अभाव असेल तर पाणिहोम करावा. अन्यशाखी यानें गृह्याग्नीवरच अग्नौकरण करावें. विधुर ( मृतपत्नीक ) व विच्छिन्नाग्निक ( नष्ट झाला आहे अग्नि ज्याचा तो ) असेल तर “पृष्टोदिवि०” विधानादिकानें अग्नि उत्पन्न करावा. तें विधान पूर्वार्धांत सांगितलें आहे. भोजनाचीं पात्रें तर सुवर्णाचीं, रुप्याचीं, कांस्यमय असावीं. अथवा पळस, कमळ, केळी, मोह यांच्या पानाचीं केलेलीं असावीं.

---

अथनिमंत्रणादिश्राद्धाहेभुक्तान्नपरिणामपर्यंतंकर्तुर्विप्राणांचनियमाः स्त्रीसंगपुनर्भोजनानृतभाषणाध्यापनद्यूतायासभारोद्वहनहिंसादानप्रतिग्रहचौर्याध्वगमनदिवास्वापकलहादि वर्जनंकर्तृभोक्तृउभयधर्माः स्त्रीसंगश्चश्राद्धदिनेतत्पूर्वदिनेचऋतुकालेपिवर्ज्यः तांबूलक्षुरकर्माभ्यंगदंतधावनवर्जनंकर्तृधर्माः भोक्तृविप्राणांतैलाभ्यंगेउद्वर्तनेक्षौरेचविकल्पः कर्तुर्भोक्तुश्च मुख्यवारुणस्नानेनैवाधिकारोनतुगौणस्नानेन श्राद्धकृच्छुक्लवासाःस्यान्मौनीचविजितेंद्रियः उपवासंपरान्नंचऔषधंचविवर्जयेत् अवस्त्रत्वंमलवद्वस्त्रत्वंकौपीनवत्त्वंकच्छहीनत्वमनुत्तरीयत्वंकाषायवस्त्रत्वमार्द्रवस्त्रत्वंद्विगुणवस्त्रत्वंरक्तवस्त्रत्वंदग्धवस्त्रत्वंस्यूतवस्त्रत्वमित्येकादशविधनग्नत्वंकर्तृभोक्तृभ्यांवर्ज्यं कर्तुर्ललाटेऊर्ध्वपुंड्रादेर्विकल्पः भोक्तुस्तुभवत्येव चंदनतिलकस्तुपिंडदानात्प्राक्कर्तुर्वर्ज्यः भोक्तुस्तुभोजनकालात्प्राक्वर्ज्यः सदर्भहस्तेनतिलकोनकार्यः करणे आचमनंदर्भत्यागश्च कर्त्रानिमंत्रितविप्रत्यागोनकार्यः प्रमादेनत्यागेयत्नेनविप्रःप्रसादनीयः बुद्धिपूर्वकत्यागेयतिचांद्रायणंप्रायश्चित्तं आमंत्रितस्तुयोविप्रोभोक्तुमन्यत्रगच्छति नरकाणां शतंगत्वाचांडालेष्वभिजायते आमंत्रितस्तुयःश्राद्धेविलंबंकुरुतेद्विजः देवद्रोहीपितृद्रोहीपच्यतेनरकेषुसः स्त्रीसंगःपुनर्भोजनंचश्राद्धपूर्वरात्रावपिकर्तृभोक्तृभ्यांवर्ज्यं दशकृत्वःपिबेदा

पोगायत्र्याश्राद्धभुक्द्विजः सायंसंध्यामुपासीतजपेच्चजुहुयादपि सूतकेचप्रवासेचअशक्तौश्राद्धभोजने औपासनादिकंहोमंनकुर्यात्किंतुकारयेत् निमंत्रितस्तुनश्राद्धेकुर्याद्भार्यादिताडनं अपराण्हाख्यमुहूर्तत्रयेवनस्पतिच्छेदंदधिमंथनंसर्वैर्नकार्यं यदाकर्तुरशक्त्यातत्पुत्रशिष्यादिः प्रतिनिधिःश्राद्धंकरोतितदा यजमानप्रतिनिधिभ्यामुभाभ्यांपूर्वोक्ताःसर्वेकर्तृनियमाःकार्याः मुक्तकच्छातुयानारीमुक्तकेशीतथैवच हसतेवदतेत्यंतंनिराशाःपितरोगताः सवर्णप्रेषयेदाप्तं द्विजानांतुनिमंत्रणे अभोऽज्यंब्राह्मणस्यान्नंवृषलेननिमंत्रितं तथैववृषलस्यान्नंब्राह्मणेननिमंत्रितं वृषलःशूद्रः ॥

यानंतर निमंत्रणापासून श्राद्धदिवसीं भक्षण केलेल्या अन्नाचा परिपाक होई तावत्कालपर्यंत श्राद्धकर्त्याचे व ब्राह्मणांचे नियम सांगतों.—स्त्रीसंग, पुनःभोजन, अनृत भाषण, अध्यापन, द्यूत, आयास, भार वाहणें, हिंसा, दान, प्रतिग्रह, चोरी करणें, मार्ग चालणें, दिवसा निद्रा, कलह इत्यादिक वर्ज्य करणें हे कर्ता व भोक्ते या उभयतांचे धर्म होत. स्त्रीसंग वर्ज्य करणें ती श्राद्धदिवसीं, श्राद्धाच्या पूर्व दिवसीं ऋतुकालींहि वर्ज्य करावा. तांबूल, श्मश्रुकर्म, अभ्यंग, दंतधावन हीं वर्ज्य करणें हे श्राद्धकर्त्याचे धर्म होत. श्राद्धभोक्ते जे ब्राह्मण त्यांला उद्वर्तन, श्मश्रुकर्म आणि तैलाभ्यंग यांविषयीं विकल्प आहे. कर्ता व भोक्ता यांना मुख्य वारुण स्नानानेंच ( उदकस्नानानें ) अधिकार येतो, गौणस्नानानें येत नाहीं. "श्राद्धकर्ता शुक्लवस्त्र परिधान केलेला, मौनी, जितेंद्रिय असावा, आणि कर्त्यानें उपोषण, परान्न आणि औषध वर्ज्य करावें. अवस्त्रत्व, मलिनवस्त्रत्व, कौपीनवत्त्व, कच्छहीनत्व, अनुत्तरीयत्व, काषायवस्त्रत्व, आर्द्रवस्त्रत्व, द्विगुणवस्त्रत्व, रक्तवस्त्रत्व, दग्धवस्त्रत्व, स्यूत ( शिवलेलें ) वस्त्रत्व, याप्रमाणें अकरा प्रकारचें नग्नत्व कर्ता व भोक्ता यांनीं वर्ज्य करावें." कर्त्याला ललाटीं ऊर्ध्वपुंड्र इत्यादिक धारण करण्याचा विकल्प आहे. भोक्त्यानें तर, ऊर्ध्वपुंड्र निश्चयें धारण करावा. चंदनाचा तिलक पिंडदानाच्या पूर्वी कर्त्यानें करूं नये. भोक्त्यास भोजनकालाच्या पूर्वी वर्ज्य आहे. दर्भसहित हस्तानें तिलक करूं नये, केला असतां आचमन करून दर्भांचा त्याग करावा. कर्त्यानें निमंत्रित अशा ब्राह्मणाचा त्याग करूं नये, प्रमादानें त्याग केला असतां मोठ्या यत्नानें त्या ब्राह्मणास प्रसन्न करावा. बुद्धिपूर्वक त्या ब्राह्मणाचा त्याग केला असतां यतिचांद्रायण प्रायश्चित्त करावें. "आमंत्रण दिलेला जो ब्राह्मण तो भोजनासाठीं अन्यत्र गेला असतां शंभर नरकांप्रत जाऊन अंतीं त्यास चांडालामध्यें जन्म होतें. श्राद्धीं आमंत्रण दिलेला द्विज जर विलंब करील तर तो देवद्रोही व पितृद्रोही होऊन निश्चयें नरकांमध्यें पचतो."स्त्रीसंग व पुनर्भोजन, श्राद्धदिवसाच्या पूर्वरात्रींहि कर्ता व भोक्ता यांनीं वर्ज्य करावें. "श्राद्धीं भोजन केलेल्या ब्राह्मणानें दहावेळ गायत्रीमंत्रानें अभिमंत्रित केलेलें उदक प्राशन करावें, सायंसंध्या करावी, जप व होमहि करावा." "सूतक, प्रवास, असामर्थ्य, श्राद्धभोजन इतक्या समयीं औपासनादिक होम स्वतां करूं नये, तर दुसऱ्याकडून करवावा. श्राद्धीं निमंत्रित असतां स्त्री इत्यादिकांला ताडन करूं नये." अपराण्हनामक जो त्रिमुहूर्तपरिमितकाल त्या कालीं सर्वांनीं वृक्ष तोडूं नये, व दधि मंथन करूं नये. ज्या कालीं कर्त्यास सामर्थ्य नसल्यामुळें त्याचा पुत्र, शिष्यादिक प्रतिनिधि श्राद्ध कारितो त्या कालीं यजमान व प्रतिनिधि या उभयतांनीं पूर्वी

सांगितलेले कर्त्याचे सर्व नियम पाळावे. "मुक्तकच्छा, व मुक्तकेशी अशी स्त्री व फार हसली व बोलली असतां पितर निराश होत्साते जातात. ब्राह्मणांस निमंत्रण करण्याविषयीं स्वकीय वर्णातला, आप्त असा पाठवावा. ब्राह्मणाचें अन्न वृषलानें निमंत्रित असेल तर तें अभोज्य होय, व वृषलाचें अन्न ब्राह्मणानें निमंत्रित असलें तरी तें अभोज्य होय." वृषल ह्मणजे शूद्र जाणावा.

---

अथश्राद्धेब्राह्मणसंख्या वैश्वदेवेसमाःपित्र्येविषमाः तेनद्वौवैश्वदेवेत्रयःपितृपार्वणे इति पंचविप्राः अथवाचत्वारोदैवेपार्वणेतुपित्रादीनामेकैकस्यत्रयस्त्रयइतित्रयोदशविप्राः यद्वापित्रादेरेकैकस्यपंचेत्येकोनविंशतिः किंवाएकैकस्यसप्तेतिपंचविंशतिः एवंदर्शादौपार्वणाधिक्ये विप्राधिक्यमूह्यं तथाचवैश्वदेवेद्वौचतुरोवोपवेश्यपित्रादिष्वेकैकस्यस्थानेएकंत्रीन्पंचसप्तनव वोपवेशयेदितिनिष्कर्षः सत्क्रियांदेशकालौचद्रव्यब्राह्मणसंपदं शौचंचविस्तरोहंतीतिपक्षेअशक्तौवादैवेएकःपितृपार्वणेचैकइतिद्वौविप्रौ तदुक्तंश्रीभागवते द्वौदैवेपितृकार्येत्रीनेकैकमुभयत्रवा भोजयेत्सुसमृद्धोपिश्राद्धेकुर्यान्नविस्तरं देशकालोचितश्रद्धाद्रव्यपात्रार्हणानिच सम्यग्भवंतिनैतानिविस्तरात्स्वजनार्पणादिति एतेनद्वौदैवेएकःपित्र्येइतिविप्रत्रयपक्षोनिर्मूलोवेदितव्यः द्वौदैवेथर्वणौविप्रौप्राङ्मुखावुपवेशयेत् पित्र्येतूदङ्मुखांस्त्रींश्चऋग्यजुःसामवेदिनः अत्यशक्तौपार्वणद्वयेएकोविप्रः ॥

## यानंतर श्राद्धास ब्राह्मण किती असावे त्यांची संख्या सांगतों.

वैश्वदेवस्थानीं सम, व पित्र्यस्थानीं विषम असावे असें आहे त्यापेक्षां वैश्वदेवांकडे दोन, पितृपार्वणीं तीन मिळून पांच ब्राह्मण असावे. अथवा देवस्थानीं चार आणि पार्वणस्थानीं तर पिता इत्यादिक जे तीन त्यांमध्यें एकेकास तीन तीन असे सर्व मिळून तेरा ब्राह्मण सांगावे. अथवा पिता इत्यादिक एकेकास पांच पांच असे सर्व मिळून एकोणीस ब्राह्मण. किंवा एकेकास सात सात मिळून पंचवीस. याप्रमाणें दर्शादि श्राद्धीं पार्वणें अधिक असतील तर ब्राह्मणहि अधिक सांगावे. ह्मणजे वैश्वदेवस्थानीं दोन अथवा चार बसवून पिता इत्यादिकांच्या एकेकाच्या स्थानीं एक, तीन, पांच, सात अथवा नऊ बसवावे असें तात्पर्य. "श्राद्धविस्तर केला असतां सत्क्रिया, देश, काल, द्रव्य, ब्राह्मणसंपत्ति आणि शुचिर्भूतपणा यांचा नाश होतो," अशा पक्षीं अथवा असामर्थ्य असतां देवस्थानीं एक, व पितृपार्वणीं एक मिळून दोन सांगावे. तेंच श्रीमद्भागवतांत सांगितलें. "देवकार्यीं दोन व पितृकार्यीं तीन, अथवा देवांकडे एक व पितरांकडे एक, असे ब्राह्मण भोजनास सांगावे. सुसमृद्ध ( महाधनिक ) असला तथापि श्राद्धाचे ठायीं विस्तार करूं नये. स्वकीय आप्तांस भोजनास सांगितल्यानें जो विस्तार तेणेंकरून देश, काल, उचितश्रद्धा, द्रव्यें, पात्रें, पूजा, हीं यथाविधि घडत नाहींत." यावरून दैवस्थानीं दोन व पित्र्यस्थानीं एक असे तीन ब्राह्मणांचा जो पक्ष तो निर्मूल जाणावा. "दैवकर्मीं दोन अथर्वणवेदी ब्राह्मण पूर्वाभिमुख बसवावे. पित्र्यस्थानीं तर, ऋग्यजुःसामवेदी असे उत्तराभिमुख तीन ब्राह्मण सांगावे." अति असामर्थ्य असेल तर दोन पार्वणीं एक ब्राह्मण सांगावा.

---

यदैकएवविप्रस्तदाविश्वेदेवस्थाने शिवलिंगंशालग्रामंवासंस्थाप्य सर्वंश्राद्धंसमाचरेत् दैवान्नंतक्षिपेदग्नौदद्याद्वाब्रह्मचारिणे स्थानत्रयेएकोविप्रइतिपक्षःसपिंडीकरणादन्यत्र सपिंडीकरणेतुपार्वणेत्रयएवविप्राः वृद्धिश्राद्धेतुदैवेद्वौप्रतिपार्वणंद्वौ द्वावेवमष्टौनिकृष्टपक्षे संपदिदैवेचत्वारःप्रतिपार्वणंचत्वारइतिषोडशेत्येवंदैवेपित्र्येचसमाविप्राइतिविशेषः सर्वथाब्राह्मणालाभे कृत्वादर्भमयान्बटून् प्रेषानुप्रेषसंयुक्तंसर्वंश्राद्धंप्रकल्पयेत् अत्रविप्रानुकूल्यरूपदृष्टप्रयोजनाभावेप्यदृष्टार्थंदक्षिणादेया एवंयतेःश्राद्धोपवेशनेपि साचदक्षिणाकालांतरेन्यस्मैप्रतिपादनीया अथवाभ्यर्चितंलिंगंशालग्राममथापिवा संस्थाप्यदेवपित्रर्थंपीठेश्राद्धंचरेन्नरः पितरस्तस्यतिष्ठंतिकल्पकोटिशतंदिवि निमंत्रणंतुविप्राणांपूर्वेद्युःसद्यएववा कुर्याद्विप्रांश्चनियमांच्छ्रावयेत्पैतृकान्बुधः अक्रोधनैःशौचपरैःसततंब्रह्मचारिभिःभवितव्यंभवद्भिश्चमयाचश्राद्धकारिणेति॥

ज्या कालीं एकच ब्राह्मण असेल त्या कालीं विश्वेदेवस्थानीं शिवलिंग, अथवा शाळग्राम स्थापन करून सर्व श्राद्ध करावें. " देवांचें अन्न तें अग्नींत टाकावें अथवा ब्रह्मचारी याला द्यावें. तीन स्थानीं मिळून एक ब्राह्मण सांगावा असा जो पक्ष तो सपिंडीकरणाहून अन्यत्र जाणावा. सपिंडीकरणामध्यें तर पार्वणाचे ठायीं तीनच ब्राह्मण सांगावे. वृद्धिश्राद्धामध्यें तर, देवस्थानीं दोन आणि प्रत्येक पार्वणीं दोन दोन मिळून आठ ब्राह्मण निकृष्टपक्षीं असावे. संपत्ति असतां दैवस्थानीं चार, प्रत्येक पार्वणीं चार याप्रमाणें सोळा असे देवस्थानीं व पितृस्थानीं सम ब्राह्मण सांगावे, याप्रमाणें विशेष जाणावा. " सर्वथा ब्राह्मण न मिळतील तर दर्भमय बटु करून प्रेष, अनुप्रेष यांसहित सर्व श्राद्ध करावें. " ह्या दर्भबटुश्राद्धीं ब्राह्मणांचें आनुकूल्यरूप दृष्टप्रयोजन जरी नाहीं तथापि अदृष्टफलाकरितां दक्षिणा द्यावी. याप्रमाणें संन्यासी श्राद्धीं बसला असतांहि दक्षिणा द्यावी. ती ( दर्भबटूंस दिलेली ) दक्षिणा अन्यकालीं दुसऱ्याकारणें द्यावी. "अथवा पूजा केलेलें लिंग किंवा शालग्राम देवपितृस्थानीं पीठावर ठेवून जो मनुष्य श्राद्ध करितो त्याचे पितर कल्पकोटिशतपर्यंत स्वर्गीं रहातात. ब्राह्मणांस श्राद्धाचें निमंत्रण करणें तें पूर्वदिवसीं अथवा श्राद्धदिवसींच करावें; आणि श्राद्धसंबंधी नियम आपण करावे व ब्राह्मणांकडून श्रवण करवावे. ते नियम असे—" क्रोधरहित, शौचतत्पर, निरंतर ब्रह्मचारी, असा मी श्राद्धकर्ता व तुह्मीं असावें.

---

अथसामान्यतःश्राद्धपरिभाषा निपात्यदक्षिणंजानुंदेवान्परिचरेत्सदा पितृणांपरिचर्यातु वामजानुनिपातनात् प्रदक्षिणंतुदेवानांपितृणामप्रदक्षिणम् पितृणांद्विगुणाभुग्नादर्भादैवेऋजुलगाः दैवेतूदङ्मुखःकर्तापित्र्येस्याद्दक्षिणामुखः संकल्पेक्षणदानेपाद्येआसनेआवाहनेर्घ्यदाने गंधाद्याच्छादनांतपंचोपचारेन्नदानेपिंडदानेंजनाभ्यंजनयोरक्षय्येस्वधावाचनेचसंबंधगोत्रनामोच्चारणमावश्यकमन्यत्रकृताकृतम् संबंधगोत्रनामरूपाणीतिसंबंधनामगोत्ररूपाणीतिवोच्चारणेक्रमः तत्रसकारेणतुवक्तव्यंगोत्रंसर्वत्रधीमतेतिवाक्यात्काश्यपसगोत्रस्यकाश्यपगोत्रस्येतिवोच्चारः केचिच्छाखाभेदाद्व्यवस्थामाहुः गोत्रस्यत्वपरिज्ञानेकाश्यपंगोत्रमुच्यते शर्मांतंविप्रनामोक्तंवर्मांतंक्षत्रियस्यतु गुप्तांतंचैववैश्यस्यदासांतंशूद्रजन्मनः पित्रादिनामाज्ञानेतुतातपिता

महप्रपितामहेत्येवंब्रूयात् ननामोच्चारयेदित्याश्वलायनः शाखांतरेतुपितुर्नाम्नः स्थाने पृथिवीषदितिपितामहस्यांतरिक्षसदितिप्रपितामहस्यदिविषदितिनामोच्चार्यम् स्त्रीणांदांतंनामसावित्रीदेत्येवमुच्चार्यम् केचिद्देवीशब्दांतमाहुः अन्येदेवीदापदयोःसमुच्चयमूचुः विभक्तिभिस्तुयत्किंचिद्दीयतेपितृकर्मणि तत्सर्वंसफलंज्ञेयंविपरीतंनिरर्थकम् षष्ठीविभक्त्यासंकल्पः क्षणश्चाक्षय्यकर्मेच षष्ठ्यावास्याच्चतुर्थ्यावासनदानंद्विजातये द्वितीययावाहनंस्याद्विभक्तिस्तु चतुर्थिका अन्नदानेपिंडपूजास्वधास्त्वस्तीतिवाचने पिंडदानेतुसंबुद्धिर्येचत्वेत्यादितःपुरा ततःपरंचतुर्थीचेत्युभयंसर्वसंमतम् शेषाणिसर्वकर्माणिसंबुद्ध्यंतेयथायथम् इदंतेवाइदंवोत्राप्रयुज्यैवसमाचरेत् सव्येनदैवंकर्मस्यादपसव्येनपैतृकम् विप्रप्रदक्षिणाविप्रस्वागतंचार्घ्यदानकम् सूक्तस्तोत्रजपोन्नस्यपात्रेषुपरिवेषणम् आह्वानमन्नस्याघ्राणंतथाचस्वस्तिवाचनम् तांबूलदानमारभ्यासमाप्तेरितिपैतृकम् प्रदक्षिणाद्येतदुक्तंसव्येनैवसमाचरेत् देवार्चादक्षिणादिःस्यात्पादजान्वंसमूर्धसु शिरोंसजानुपादेषुवामांगादिषुपैतृके अक्षय्यासनार्घ्येवर्ज्यंस्वधाकारेणपितृभ्यःसर्वदानम् देवेभ्यःस्वाहापदेन दैवतीर्थेनदैवंतत्पितृतीर्थेनपैतृकम् ॥

## यानंतर सामान्येंकरून श्राद्धपरिभाषा सांगतों.

" दक्षिणजानु ( ढोंपर ) खालीं पाडून देवांची पूजा करावी. वामजानु खालीं पाडून पितरांची पूजा करावी. देवांचें कृत्य प्रदक्षिण करावें, व पितरांचें अप्रदक्षिण करावें. पितरांस दर्भ मध्यें मोडलेले ( दुप्पट केलेले ) असे असावे. दैवकर्माविषयीं सरळ मोडल्यावांचून असे असावे. दैवकर्माविषयीं कर्ता उत्तराभिमुख, पित्र्यकर्माविषयीं दक्षिणाभिमुख असावा. " संकल्प, क्षण देणें, पाद्य, आसन, आवाहन, अर्घ्यदान, गंधापासून आच्छादनापर्यंत पांच उपचार, अन्नदान, पिंडदान, अंजन, अभ्यंजन, अक्षय्य आणि स्वधावाचन यांचे ठायीं संबंध, गोत्र, नाम यांचा उच्चार आवश्यक आहे, इतर ठिकाणीं कृताकृत आहे. संबंध, गोत्र, नाम आणि रूप या क्रमानें; किंवा संबंध, नाम, गोत्र, रूप या क्रमानें उच्चार करावा. त्यामध्यें, " बुद्धिमान् अशा पुरुषानें सर्वत्र गोत्र उच्चारणें तें सकारेंकरून उच्चारावें असें वचन आहे यास्तव " काश्यपसगोत्रस्य, किंवा काश्यपगोत्रस्य " असा उच्चार करावा. कोणीं ग्रंथकार, शाखाभेदेंकरून व्यवस्था सांगतात—" गोत्र अज्ञात असतां काश्यप गोत्र उच्चारावें. ब्राह्मणांचें शर्मांत, क्षत्रियांचें वर्मांत, वैश्यांचें गुप्तांत, शूद्रांचें दासांत, याप्रमाणें नाम उच्चारावें." पिता इत्यादिकांचे नामांचें अज्ञान असेल तर, " तात पितामह प्रपितामह " असाच उच्चार करावा; नामोच्चार करूं नये असें आश्वलायन सांगतो. अन्य शाखेचे ठायीं तर, पित्याचे नामस्थानीं ' पृथिवीषत् ' असें, पितामहाचे नामस्थानीं ' अंतरिक्षसत् ' असें, आणि प्रपितामहाचे नामस्थानीं ' दिविषत् ' असें, नाम उच्चारावें. स्त्रियांचें दांत नाम ' सावित्रीदा ' असेंच उच्चारावें. कोणीं ग्रंथकार, देवीशब्दांत उच्चारावें असें सांगतात, दुसरे ग्रंथकार ' देवी ' आणि ' दा ' या पदांचा समुच्चय सांगतात, ह्मणजे दोनहि पदांचा उच्चार करावा असें सांगतात. जसें—सावित्रीदेवीदा. "पितृकर्मामध्यें विभक्तींकरून जें समर्पण करावें तें

सर्व सफल जाणावें. विभक्तीवांचून द्यावें तें व्यर्थ होय. संकल्प, क्षण आणि अक्षय्यकर्म हीं षष्ठीविभक्तीनें करावीं, ब्राह्मणास आसन देणें तें षष्ठी अथवा चतुर्थी यांतून कोणत्या एका विभक्तीनें द्यावें. आवाहन द्वितीयाविभक्तीनें करावें. अन्नदान, पिंडांची पूजा, स्वधा, स्वस्तिवाचन हीं चतुर्थीविभक्तीनें करावीं. "येचत्वा०" इत्यादिक उच्चाराच्या पूर्वी जें पिंडदान करणें तें संबुद्धिविभक्तीनें करावें. त्यानंतर चतुर्थीविभक्ति याप्रमाणें हीं दोन सर्वसंमत आहेत. शेष सर्व कर्में संबुद्धिविभक्तीच्या शेवटीं यथायोग्य 'इदंते' (एकवचनांत), अथवा 'इदं वो' (बहुवचनांत) याप्रमाणें योजना करून कर्म करावें. सव्येंकरून देवकर्म करावें, व अपसव्येंकरून पितृकर्म करावें. विप्रप्रदक्षिणा, विप्रस्वागत, अर्घ्यदान, सूक्तें व स्तोत्रें यांचा जप, पात्रांवर अन्न वाढणें, आव्हान, अन्नाचें अवघ्राण, स्वस्तिवाचन, तांबूलदानापासून आरंभ करून समाप्तीपर्यंत याप्रमाणें हें पितृकर्म प्रदक्षिणादिक जें सांगितलें तें सव्येंकरूनच करावें. देवांची पूजा करणें ती पाद, जानु, अंस आणि मस्तक दक्षिण अंगपूर्वक करावी; ह्मणजे प्रथम पायांकडून वरतीं करीत जावें. पितृस्थानीं वामांगपूर्वक मस्तक, अंस, जानु आणि पाद असी करावी." अक्षय्य, आसन, अर्घ्य हीं वर्ज्य करून पितरांस इतर सर्व देणें तें स्वधाकारानें द्यावें. देवांस स्वाहाकारानें द्यावें. "देवकर्म दैवतीर्थानें व पितृकर्म पितृतीर्थानें करावें."

---

**अथाचमनानि श्राद्धारंभेद्विराचमनंविप्रपादक्षालनांते स्वपादक्षालनपूर्वकं द्विराचमनं देवार्चनांते पित्रर्चनांतेचैकैकमाचमनमाघ्राणांतेएकंविकिरदानांतेद्विरेकंवा श्राद्धांतेस्वपादक्षालनपूर्वकंद्विराचमनमिति अन्येभस्ममर्यादांतेकरशुद्ध्यंतेउच्छिष्टचालनांतेचाप्येकैकमाहुः॥**

## यानंतर आचमनें सांगतों.

श्राद्धाच्या आरंभीं द्विवार आचमन करावें. ब्राह्मणांचे पाय प्रक्षालन केल्यानंतर आपले पाद प्रक्षालन करून द्विवार आचमन, देवांची पूजा केल्यानंतर व पितरांची पूजा केल्यानंतर एकेक वार आचमन करावें. अवघ्राणानंतर एक वेळ आचमन, विकिर दिल्यानंतर एक वेळ किंवा दोन वेळ आचमन, श्राद्धाच्या अंतीं आपले पाद प्रक्षालन करून दोन वेळ आचमन करावें. दुसरे ग्रंथकार, भस्ममर्यादा ह्मणजे पिशंगी घातल्यानंतर, करशुद्धीच्या नंतर, व उच्छिष्ट चालन केल्यानंतर एकेक वेळ आचमन करावें असें सांगतात.

---

**अथभोक्तुःपादशौचांतेद्विराचमनंपाणिहोमांतेएकंभोजनांतेद्विरिति ॥**

यानंतर भोक्त्यास आचमन सांगतों.—पादप्रक्षालनानंतर द्विवार आचमन, पाणिहोम ह्मणजे हस्तांवर अग्नौकरण झाल्यानंतर एक वेळ आचमन, भोजनांतीं द्विवार आचमन करावें.

---

**अथदर्भाः आचांतःप्राक्कुशांस्त्यक्त्वापाणावन्यांश्चधारयेत् तथाचश्राद्धारंभेधृतान्दर्भान्पाद्यांतेचविसर्जयेत् ततोदेवार्चनांतेपित्रर्चनांतेपिंडशेषाघ्राणांतेविकिरदानांतेश्राद्धांतेचपूर्वधृत**

दर्भांस्त्यजेत् श्राद्धसागरादिप्रयोगेतुपित्रर्चनांतेदर्भत्यागोनदृश्यते तेनक्कचिदाचमनेपिदर्भत्यागोनेतिभाति ॥

## यानंतर दर्भ सांगतों.

आचमन केल्यानंतर पूर्वी धारण केलेले दर्भ टाकून हस्तांत दुसरे दर्भ धारण करावे. तसेच "श्राद्धाच्या आरंभीं धारण केलेले दर्भ पाद्याच्या अंतीं टाकावे." तदनंतर देवांची पूजा केल्यानंतर, पितरांची पूजा केल्यानंतर, पिंडांचें शेष अवघ्राण केल्यानंतर, विकिर दिल्यानंतर आणि श्राद्धाच्या अंतीं पूर्वी धारण केलेले दर्भ टाकावे. श्राद्धसागरादिप्रयोगग्रंथीं तर, पितृपूजेनंतर दर्भ टाकावे असें आढळत नाहीं, यावरून क्वचित् आचमनींहि दर्भांचा त्याग करावा असें वाटत नाहीं.

---

अथोहविचारः यत्रबहुवचनांतःपितृशब्दस्तत्रपितृशब्दस्यसर्वपितृवाचित्वादूहोन यथार्घ्यपात्रेपितॄनिमान्प्रीणयेत्यत्रमात्रादिश्राद्धेमातॄनितिनवदेत् तत्रापिशुंधनमंत्रेषुशुंधंतांपितरःशुंधंतांपितामहाइत्यादिशुंधंतांमातरःइत्यादिचोहएव बहुवचनंतुनोह्यते प्रथममंत्रेएवपूज्यत्वार्थकत्वात् ऋचंनोहेदितिनिषेधादृक्मंत्रेषुनोहः पिंडदानेयेचत्वामत्रानुतेभ्यश्चेत्यत्रमातृश्राद्धे याश्चत्वामत्रानुताभ्यश्चेतिनवदेत् स्त्रीणांस्त्रियःपुरुषाश्चानुगाइतिपुमान्स्त्रियेतिपुल्लिंगशेषादिति वृत्तिकृत् अन्येतुयाश्चेत्याद्यूहमाहुः मात्रादिद्वित्वेपिंडदानेएतद्वामस्मन्मातरौयज्ञदाश्रीदेयेचयुवामत्रान्वित्येकंपिंडंदत्वास्मन्मातृभ्यां० अयंपिं०इत्यादिअभ्यंजनेस्मन्मातरौ० अभ्यंजाथां०अंजनेअंजाथां एवंपितामहीप्रपितामहीद्वित्वेप्यूहः ॥

## यानंतर ऊहाचा निर्णय सांगतों.

ज्या स्थलीं बहुवचनांत पितृशब्द असेल त्या स्थलीं पितृशब्द सर्व पितरांचा वाची आहे याकरितां ऊह करूं नये. जसें अर्घ्यपात्राचे ठायीं 'पितॄनिमान् प्रीणय' ह्या स्थानीं मात्रादिकांचे श्राद्धीं 'मातॄन्' असें ह्मणूं नये. त्यामध्येंहि शुंधनमंत्रांत "शुधंतांपितरः शुधंतां पितामहाः" इत्यादिक व "शुंधंतां मातरः" इत्यादिक ऊह करावाच. बहुवचनीं तर ऊह करूं नये; कारण, प्रथममंत्रामध्येंच पूज्यत्वाचा अर्थ आहे. ऋग्वेदाविषयीं ऊह करूं नये असा निषेध असल्यामुळें ऋग्वेद मंत्रांचे ठायीं ऊह करूं नये. पिंडदानामध्यें 'येचत्वामत्रानुतेभ्यश्च' ह्या स्थानीं मातृश्राद्धीं 'याश्चत्वामत्रानुताभ्यश्च' असा ऊह करूं नये. स्त्रियांमध्यें स्त्रिया आणि पुरुष अनुयायी होत; कारण, "पुमान् स्त्रिया" या सूत्रानें स्त्रियासहोक्ति असतां पुल्लिंगशेष राहतें असें वृत्तिकार ह्मणतो. दुसरे ग्रंथकार तर, 'याश्च' इत्यादिक ऊह करावा असें सांगतात. माता इत्यादिक दोन असतील तर, पिंडदानामध्यें 'एतद्वामस्मन्मातरौयज्ञदाश्रीदेयेचयुवामत्रानु०' याप्रमाणें ऊह करून एक पिंड देऊन 'अस्मन्मातृभ्यां० अयंपिंडः०' इत्यादि उच्चार करावा. अभ्यंजनाविषयीं 'अस्मन्मातरौ० अभ्यंजाथां०' अंजनाविषयीं 'अंजाथां०,' याप्रमाणें पितामही व प्रपितामही दोन दोन असतांहि असाच ऊह करावा.

---

अथबहुले एतद्वोस्मन्मातरोयज्ञदेश्रीदेरुद्रदेयथानामगोत्रायेचयुष्मानत्रानुइत्येकपिंडदानादि अभ्यंजनेभ्यङ्ध्वं अंजनेऽअङ्ध्वमित्यादि एकनामत्वेएकमेवनामद्विवचनांतंबहुवचनांतंवावदेत् एवमर्घ्यदानकालेप्यस्मन्मातरावित्याद्यूहेनसंबोध्यइदंवामर्घ्यमिदंवोअर्घ्यमित्यूहोबोद्धव्यः तथाचायंतुनःपितरःसो० तिलोसिसोमदेवत्यो० उशंतस्त्वानि० पिंडानुमंत्रणदशादानोपस्थानप्रवाहणप्राशनादिमंत्रेषु बहुवचनांतपितृपदयुक्तत्वादिहेतोर्नोहइतिप्रसिद्धं नाप्रोक्षितंस्पृशेद्वस्तुनवदेन्मानुषींगिरम् नचोद्वीक्षेतभुंजानंनचैवाश्रूणिपातयेत् दैवेपित्र्येचसर्वत्रजपहोमादिकर्मसु मौनंकुर्यात्प्रयत्नेनसकलंफलमाप्नुयात् यदिमौनस्यलोपःस्याज्जपहोमार्चनादिषु व्याहरेद्वैष्णवंमंत्रंस्मरेद्वाविष्णुमव्ययम् यस्यस्मृत्याचनामोक्त्यातपोयज्ञक्रियादिषु न्यूनंसंपूर्णतांयातिसद्योवंदेतमच्युतं आदिमध्यावसानेषुश्राद्धस्येदमुदाहरेत् ॥

यानंतर बहुत माता असतां त्याविषयीं.–‘एतद्वोस्मन्मातरोयज्ञदेश्रीदेरुद्रदे यथानामगोत्रायेचयुष्मानत्रानु’ असा ऊह करून एक पिंड देणें इत्यादिक जाणावें. अभ्यंजनाविषयीं ‘अभ्यङ्ध्वं,’ अंजनाविषयीं ‘अङ्ध्वं’ इत्यादिक जाणावें. एक नाम असतां एकच नाम द्विवचनांत अथवा बहुवचनांत उच्चारावें. याप्रमाणें अर्घ्यदानकालींहि ‘अस्मन्मातरौ’ इत्यादिक ऊहानें संबोधन करून ‘इदंवामर्घ्यमिदंवोअर्घ्यं’ असा ऊह जाणावा. तसेंच “आयंतुनः पितरःसो०, तिलोसिसोमदेवत्यो०, उशंतस्त्वानि०.” पिंडानुमंत्रण, दशादान, उपस्थान, प्रवाहण, प्राशन इत्यादिकांचे मंत्र बहुवचनांत पितृपदांनीं युक्त असल्यामुळें त्यांमध्यें ऊह नाहीं हें प्रसिद्ध आहे. “प्रोक्षणविरहित वस्तूला स्पर्श करूं नये, मानुषी वाणी उच्चारूं नये, भोजन करणाऱ्या ब्राह्मणाप्रत अवलोकन करूं नये, अश्रु पाडूं नये. दैवकर्म, पित्र्यकर्म, जप, होमादिक कर्में यांचे ठायीं प्रयत्नेंकरून मौन धारण करावें, तेणेंकरून सकल कर्माचें फल मिळतें. जर जप, होम, पूजा इत्यादि कर्मामध्यें मौनाचा लोप होईल तर, वैष्णवमंत्राचा उच्चार करावा, अथवा सनातन विष्णूचें स्मरण करावें.” स्मरणाचा मंत्र—“यस्यस्मृत्याचनामोक्त्या तपोयज्ञक्रियादिषु ॥ न्यूनं संपूर्णतां याति सद्यो वंदे तमच्युतं.” श्राद्धाच्या आरंभीं, मध्यें आणि समाप्तिकालीं विष्णुनाम इत्यादिकांचें उच्चारण करावें.

---

अथसंक्षेपतआश्वलायनादीनांप्रयोगक्रमः सव्येनापसव्येनवादेशकालौसंकीर्त्यापसव्येन तत्तच्छाखार्हपितॄणांषष्ठीविभक्त्याएतेषाममुकश्राद्धंसदैवंसपिंडंपार्वणविधिनैकोद्दिष्टेनवाऽन्नेनामेनवाहिरण्येनवाश्वःसद्योवाकरिष्यइतिसंकल्पोयथासंभवंकार्यः सर्वत्रकुरुष्वेत्यादियथोचितंब्राह्मणैःप्रतिवचनंदेयमेव ततोदैवधर्मेणविप्रस्यदक्षिणजानुंस्पृष्ट्वामुकपितॄणाममुकश्राद्धेअमुकविश्वेदेवार्थंत्वयाक्षणःक्रियतामितिक्षणंदद्यात् ओंतथेतिविप्रोवदेत् कर्ताप्राप्नोतुभवानितिविप्रःप्राप्नवानीति एवंपितृधर्मेणवामजानुस्पर्शेनामुकश्राद्धेमुकस्यस्थानेत्वयाक्षणइत्यादिपूर्ववत् त्रयस्थानेएकविप्रत्वेपितृपितामहप्रपितामहानांस्थानेइत्यादिः अक्रोधनैरित्यादिप्रार्थना अत्रसर्वत्रदेवपूर्वत्वं क्वचित्पितृपूर्वकत्वंवक्ष्यते इदंसंकल्पक्षणदानादिपूर्वेद्युःसद्योवाकार्यं ततः कुतुपेस्नातःस्नातान्धौतपादान्विप्रान्सन्निधापयेत् ततःसव्येनतिलोदकयवोदकेआचारात्का

---

१ निमंत्रयेत् ॥

र्ये ततःसव्येनशुद्ध्यर्थप्रायश्चित्तार्थसूक्तजपःप्रदक्षिणाच समस्तसंपदितिनमस्कारः अपस व्येनाचारादधिकारवाचनं ततआचमनप्राणायामौसव्येनकृत्वाअपसव्येनद्वितीयःसंकल्पः ·केचित्सद्यःकरणपक्षेद्वितीयसंकल्पंनेच्छंति ततस्तिष्ठन्सव्येनैवदेवेपित्र्येचभवतांस्वागतमिति प्रतिविप्रंप्रश्नः पूर्ववत्द्वितीयंक्षणदानम् अत्रबह्वृचानांगृह्याग्निमतांदर्शश्राद्धान्वष्टकापूर्वेद्युः श्राद्धेषुपिंडपितृयज्ञव्यतिषंगेणश्राद्धप्रयोगोनान्येषांनापिश्राद्धांतरेषु सचद्वितीयक्षणदानांत श्राद्धतंत्रंकृत्वापरिसमूहनादीध्माधानांतपिंडपितृयज्ञतंत्रांतेपादक्षालनादिभस्ममर्यादांतं अ ग्नावग्नौकरणंकृत्वापरिवेषणादिसंपन्नवचनांतेपिंडदानादिपात्रोत्सर्गपर्यंतंकृत्वा विकिरादि श्राद्धशेषंसमापनीयमित्येवंरूपः एवंहिरण्यकेशीयादीनामपिप्रथमसंकल्पोत्तरमग्न्युपसमाधा नान्वाधानाद्याज्यसंस्कारांतेपाद्यादिपूजांतेतत्तन्मंत्रोहयुतःसविस्तरोग्नौकरणहोमोज्ञेयः ॥

## यानंतर संक्षेपेंकरून आश्वलायन इत्यादिकांचा प्रयोगक्रम सांगतों.

सव्येंकरून अथवा अपसव्येंकरून देशकालांचा उच्चार करून अपसव्यानें, त्या त्या श्राद्धास योग्य जे पितर त्यांचा षष्ठीविभक्तीकरून "एतेषाममुकश्राद्धंसदैवंसपिंडंपार्वणविधिनैकोद्दिष्टेनवान्नेनामेनवाहिरण्येनवाश्वःसद्योवाकरिष्ये," असा संकल्प जसा संभव असेल तदनुरूप करावा. सर्व ठिकाणीं 'कुरुष्व' असें यथायोग्य ब्राह्मणांनीं प्रतिवचन अवश्य द्यावें. तदनंतर दैवधर्मेंकरून ब्राह्मणाच्या दक्षिण गुडघ्यास स्पर्श करून "अमुकपितॄणाममुकश्राद्धेअमुकविश्वेदेवार्थंत्वयाक्षणःक्रियतां" एथपर्यंत ह्मणून क्षण द्यावा. ह्मणजे निमंत्रण करावें. नंतर "ॐतथा" असें ब्राह्मणानें ह्मणावें. कर्त्यानें "प्राप्नोतु भवान्" असें ह्मणावें. ब्राह्मणानें "प्राप्नवानि" असें बोलावें. याप्रमाणें पितृधर्मेंकरून ब्राह्मणाच्या वामगुडघ्यास स्पर्श करून "अमुकश्राद्धेअमुकस्यस्थानेत्वयाक्षणः०" इत्यादिक पूर्वीप्रमाणें करावें. त्रयीचे ठिकाणीं एक ब्राह्मण असेल तर "पितृपितामहप्रपितामहानांस्थाने" इत्यादिक जाणावें. "अक्रोधनैः०" इत्यादिक प्रार्थना करावी. एथें सर्व ठिकाणीं देवपूर्वक कर्म करावें. क्वचित् ठिकाणीं पितृपूर्वक कर्म सांगेन. संकल्प करणें, क्षण देणें इत्यादिक हें कर्म पूर्वदिवसीं किंवा श्राद्धदिवसीं करावें. तदनंतर कुतुपकालीं ( अष्टममुहूर्तीं ) स्नान केलें होत्साता कर्त्यानें स्नान, पाय धुतलेले असे ब्राह्मण सन्निध बसवावे. तदनंतर सव्येंकरून तिलोदक व यवोदक आचार असल्यामुळें करावीं. नंतर सव्येंकरून शुद्धीकरितां व प्रायश्चित्तार्थ सूक्तांचा जप व प्रदक्षिणा हीं कर्में करावीं. व "समस्तसंपत्०" ह्या मंत्रेंकरून नमस्कार करावा. आचार असल्यामुळें अपसव्येंकरून अधिकारवाचन करावें. तदनंतर आचमन व प्राणायाम सव्यानें करून अपसव्यानें दुसरा संकल्प करावा. कोणी ग्रंथकार, सद्यःकरणपक्ष असतां दुसरा संकल्प करूं नये असें सांगतात. तदनंतर उभा राहत होत्साता सव्येंकरूनच देवांकडे व पितरांकडे "भवतांस्वागतं" असा प्रत्येक ब्राह्मणाप्रत प्रश्न करून पूर्वी सांगितल्याप्रमाणें दुसऱ्यानें क्षण द्यावा. याविषयीं गृह्याग्नियुक्त बह्वृच असतील तर त्यांनीं दर्शश्राद्ध, अन्वष्टकाश्राद्ध आणि पूर्वेद्युःश्राद्ध यांचे ठायीं, पिंडपितृयज्ञाच्या व्यतिषंगेंकरून श्राद्धप्रयोग करावा, इतर शाखी यांनीं करूं नये, व बह्वृचांनींहि इतर श्राद्धाविषयीं करूं नये,

तो व्यतिषंग प्रयोग असा—दुसऱ्यानें क्षण देणें एथपर्यंत श्राद्धतंत्र करून परिसमूहनापासून इध्मास्थापनापर्यंत पिंडपितृयज्ञाचें तंत्र केल्यानंतर ब्राह्मणाचे पादप्रक्षालनापासून भस्ममर्यादांत ह्मणजे पिशंगी घालणें एथपर्यंत कर्म केल्यानंतर अग्नीच्या ठायीं अग्नौकरण करून परिवेषणापासून संपन्नवचनापर्यंत कर्म झाल्यानंतर पिंडदानापासून पात्रचालनापर्यंत करून विकिरादिक श्राद्धशेष समाप्त करावें, अशा स्वरूपाचा व्यतिषंगप्रयोग जाणावा. याप्रमाणें हिरण्यकेशीय इत्यादिकांचा पहिला संकल्प केल्यानंतर अग्नीचें स्थापन, अन्वाधान इत्यादिक आज्यसंस्कारापर्यंत कर्म झाल्यानंतर पाद्यादिक पूजा, त्यानंतर त्या त्या मंत्रांच्या ऊहांनीं युक्त, सविस्तर अग्नौकरणहोम जाणावा.

---

**अथपाद्यं अंगणेश्राद्धदेशद्वारेवाचतुरस्रंद्विहस्तंप्रादेशमात्रंवोदक्प्लवंदेवमंडलंकृत्वा ततो दक्षिणेषडंगुलंत्यक्त्वादक्षिणाप्लवंचतुर्हस्तंवितस्तिमात्रंवा पितृमंडलंवर्तुलंसव्यापसव्यप्रादक्षि** ण्याप्रादक्षिण्यादिदैवपैतृधर्मेणगोमूत्रगोमयाभ्यांकार्यं यथायथंदर्भयवतिलगंधपुष्पैस्तदर्चनं मंडलसमीपेपीठेउपविष्टस्यैवप्राङ्मुखस्यविप्रस्यपादयोरुदङ्मुखः प्रत्यङ्मुखोवाकर्तामुकसंज्ञकाविश्वेदेवाइदंवः पाद्यंस्वाहानमइतियवगंधपुष्पयुतजलमंजलिनाप्रक्षिप्यशंनोदेवीरितिशुद्धोदकेनपादावुपर्येवप्रक्षालयेत् नाधोभागेनापिसग्रंथिकपवित्रहस्तेनपितृमंडलेउदङ्मुखस्योपविष्टस्यपादयोर्दक्षिणामुखस्तिलगंधादिजलमंजलिनापितृतीर्थेन पितरमुकनामरूपगोत्रेदंतेपाद्यंस्वधानमइतित्रयस्थानेएकविप्रत्वेपितृपितामहप्रपितामहाइदंवःपाद्यमिति बहुवचनांतेनप्र **क्षिप्यशंनोदेवीरित्यादिपूर्ववत् एवमग्रेपिपित्रादित्रयेब्राह्मणत्रयपक्षेइदंतेइत्येकविप्रपक्षेइदंवइतिवचनोहो**ज्ञेयः एवंमातामहादिपार्वणेपिबोध्यम् अत्रपाद्यात्पूर्वंपादार्घ्यःपाद्योत्तरंचगंधपु **ष्पाक्षतैः** पादादिमूर्धांतमर्चनपूर्वकंदैवेएषवःपादार्घ्यइतिदत्वापित्र्येपितिलैर्मूर्धाद्यर्चनपूर्वकंपा **दार्घ्यदान**मुक्तंतत्कात्यायनादीनामेवाचारात्तेषामेव बह्वृचानांतुनैषआचारः ततःपाद्यशेषंगंध **यवतिलादिसव्यापसव्याभ्यांमंडलयोस्त्यक्त्वास्वपादक्षालनंपवित्रत्यागंचकृत्वान्यपवित्रेधृत्वा देवमंडलोत्तरेस्वयंविप्राश्च द्विराचम्यश्राद्धदेशंगच्छेयुः पादक्षालनोदकाचमनोदकयोःसंसर्गो नकार्यः अपसव्येनामुकश्राद्धसिद्धिरस्त्वितिवदेत्तैःप्रत्युक्तःनिरंगुष्ठंविप्रदक्षिणहस्तंधृत्वासव्यापसव्याभ्यांभूर्भुवःस्वः समाध्वमितिसदर्भेषुपीठेष्वविलंबेनोपवेशयेत् तत्रदैवेप्राङ्मुखो विप्रःपित्र्येतूदङ्मुखःअसंभवेदक्षिणान्यदिङ्मुखः ॥**

**यानंतर पाद्य सांगतों.**—अंगण, अथवा श्राद्धभूमीचें द्वार यांचे ठायीं चतुष्कोण, दोन हस्तपरिमित किंवा प्रादेशमात्र उत्तरेकडे उतरतें असें देवमंडल करून नंतर दक्षिणप्रदेशीं सहा अंगुळें जागा सोडून दक्षिणेकडे उतरतें, चारहात परिमित, किंवा वितस्तिमात्र असें पितृमंडल वर्तुळ सव्य व अपसव्य; प्रादक्षिण्य व अप्रादक्षिण्य; इत्यादि दैवपितृधर्मेंकरून गोमूत्र व गोमय यांहींकरून करावें. नंतर यथायोग्य दर्भ, यव, तिळ, गंध आणि पुष्पें यांहींकरून त्या मंडलांची पूजा करावी. मंडलाच्या समीप पाटावर पूर्वाभिमुख बसलेला जो ब्राह्मण त्याच्या पायांवर, उत्तराभिमुख किंवा पश्चिमाभिमुख श्राद्धकर्ता यानें

"**अमुकसंज्ञका विश्वेदेवा इदं वः पाद्यं स्वाहा न मम**" असें ह्मणून यव, गंध, पुष्प यांहीं युक्त उदक अंजलीनें घालून "**शन्नोदेवी०**" ह्या मंत्रानें शुद्धोदकेंकरून ब्राह्मणाचे पाय वरतींच प्रक्षालन करावे, पायांचे अधोभाग प्रक्षालन करूं नये, व ग्रंथियुक्त पवित्रक हातांत घालून पादप्रक्षालन करूं नये. पितृमंडलाचे ठायीं उत्तराभिमुख बसलेला जो ब्राह्मण त्याचे पायांवर, कर्ता दक्षिणामुख होत्साता तिल, गंध इत्यादिकानें युक्त उदक अंजलीनें पितृतीर्थें-करून "**पितरमुकनामरूपगोत्रेदंते पाद्यं स्वधा नमः**" याप्रमाणें तीन ठिकाणीं करावें. एक ब्राह्मण असेल तर "**पितृपितामहप्रपितामहा इदं वः पाद्यं**" असें बहुवचनांत वाक्य ह्मणून तेणेंकरून उदक घालावें, व "**शंनोदेवी०**" इत्यादिक मंत्रेंकरून पूर्वीप्रमाणें पाय धुवावे. याप्रमाणें पुढेंहि पित्रादित्रयीस्थानीं तीन ब्राह्मणांचा पक्ष असतां '**इदंते**' असा एक ब्राह्मणपक्षीं जो ऊह तो '**इदं वः**' असा बहुवचनानें ऊह जाणावा. याप्रमाणें मातामहादि पार्वणांविषयीं असेंच जाणावें. ह्या पाद्यसमयीं पाद्याचे पूर्वी पादार्घ्य, व पाद्याचे नंतर गंध, पुष्प व अक्षता यांहींकरून पायांपासून मस्तकापर्यंत पूजनपूर्वक देवांकडे "**एषवःपादार्घ्यः**" अशा वाक्यानें देऊन पितरांकडेहि तिलेंकरून मस्तकापासून पायांपर्यंत पूजनपूर्वक पादार्घ्य-दान करावें असें सांगितलें आहे तें कात्यायन इत्यादिकांचाच आचार असल्यामुळें त्यांसच विहित आहे, ऋग्वेदी यांला हा आचार नाहीं. तदनंतर पाद्य देऊन जें शेष गंध, यव, तिलादिक तें सव्यानें व अपसव्यानें उभय मंडलांवर टाकून आपले पाय प्रक्षालन करून पवित्रकें टाकून दुसरीं पवित्रकें धारण करून देवमंडलाच्या उत्तरप्रदेशीं आपण व ब्राह्मण यांनीं द्विवार आचमन करून श्राद्धभूमीप्रत जावें. पादप्रक्षालनाचें उदक व आचमनाचें उदक यांचा संसर्ग ( मीलन ) करूं नये. अपसव्येंकरून "**अमुकश्राद्ध सिद्धिरस्तु**" असें ह्मणावें. नंतर ब्राह्मणांनीं प्रतिवचन दिलें होत्साता ब्राह्मणाचा अंगुष्ठविरहित दक्षिणहस्त धरून सव्य व अपसव्य यांहींकरून "**भूर्भुवःस्वः समाध्वं**" असें ह्मणून दर्भसहित पीठांवर ब्राह्मणांस शीघ्र बसवावें. त्यामध्यें दैवस्थानीं पूर्वाभिमुख ब्राह्मण, पित्र्यस्थानीं तर उत्तराभिमुख, असंभव असतां दक्षिणदिशा वर्ज्य करून अन्यदिशाभिमुख बसवावा.

---

**अथआसनानि हैमंराजतंताम्रंवादुकूलंकंबलंवादारुजंतृणमयंपर्णमयंवासनंप्रशस्तम् दारुजेषुश्रीपर्णीजंबूकदंबाम्रबकुलशमीश्लेष्मातकशालवृक्षजन्यान्यासनानिशस्तानि अयःशंकुमयंपीठंप्रदेयंनोपवेशने अग्निदग्धान्यायसानिभग्नानिचविवर्जयेत् प्राक्संस्थादक्षिणासंस्थाभोक्तृपंक्तिस्तुपैतृके तत्रदेवासनेप्रागग्रौद्वौदर्भौपित्र्येदक्षिणाग्रैकैकंदर्भंस्थापयेत् घृतैस्तिलादितैलैर्वास्थापयेच्चप्रतिद्विजं दीपंसव्यापसव्याभ्यांदीपमेकंतुसव्यतः ब्राह्मणाश्चेतःप्रभृत्या श्राद्धसमाप्तेर्मौनिनःपवित्रहस्ताउच्छिष्टोच्छिष्टस्पर्शंवर्जयंतोवर्तेरन् अत्रयथालक्षणअतिथिरागतश्चेत्सव्येनविप्रपंक्तौविष्णूद्देशेनपूजयेत्** सव्येनापवित्रःपवित्रोवेतिमंत्रंपठित्वा**वैष्णव्यै** नमः काश्यप्यैनमः क्षमायै० इतिभूमिंनत्वामेदिनीलोकमातात्वमित्यादिश्लोकैःस्तुत्वाच **श्राद्ध** भूमिंगयांध्यात्वाध्यात्वादेवंगदाधरं प्राचीनावीति तद्विष्णोःपरमंपदं० तद्विप्रासो० **गाय** त्रींचजपित्वा सव्येनप्राणायाममतिथ्यादिकीर्तनांतेपसव्येनामुकपितॄणामुपक्रांतममुक**श्राद्धंक**

**रिष्येइतिसंकल्प्यात्रादौमध्येंतेचदेवताभ्यःपितृभ्यश्च० अमूर्तानांच० चतुर्भिश्च० यस्यस्मृत्ये तिचत्रिःपठेत् ॥**

**यानंतर आसनें सांगतों.**—सुवर्णाचें, रुप्याचें अथवा तांब्याचें, अथवा वस्त्रमय, कंबल, काष्ठमय, तृणमय, पर्णमय आसन प्रशस्त होय. काष्ठांच्या आसनामध्यें शिवण, जांबुळ, कदंब, आंबा, बकुळ, शमी, भोंकर, सालवृक्ष, यांचीं आसनें ( पाट ) प्रशस्त होत. "लोखंडाचे खिळ्यांनीं युक्त पाट ब्राह्मणास बसण्याविषयीं देऊं नये. अग्नीनें दग्ध झालेलीं, लोखंडाचीं, भग्न झालेलीं, अशीं वर्ज्य होत. " पितरांकडे प्राक्संस्था, दक्षिणसंस्था ब्राह्मणांची पंक्ति बसवावी. " त्यामध्यें देवांच्या आसनीं पूर्वेकडे अग्रें होतील असे दोन दर्भ, पितरांच्या आसनीं दक्षिणेकडे अग्र होईल असा एकेक दर्भ याप्रमाणें आसनावर दर्भ स्थापावे. "प्रत्येक ब्राह्मणाजवळ तुपाचा किंवा तेलाचा एकेक दीप सव्यानें व अपसव्यानें लावावा. एकच दीप लावणें असेल तर सव्येंकरून लावावा." या वेळेपासून श्राद्धाची समाप्ति होईपर्यंत मौन धारण केलेले, हातांत पवित्रक धारण केलेले, उच्छिष्टोच्छिष्टाचा स्पर्श वर्ज्य करणारे असे ब्राह्मण रहावे. ह्या समयीं लक्षणयुक्त अतिथि येईल तर सव्येंकरून ब्राह्मणाच्या पंक्तीस त्यास बसवून विष्णूच्या उद्देशानें त्याची पूजा करावी. सव्येंकरून " **अपवित्रःपवित्रोवा०** " हा मंत्र ह्मणून "**वैष्णव्यै नमः, काश्यप्यै नमः, क्षमायै नमः,**" याप्रमाणें भूमीस नमस्कार करून "**मेदिनी लोकमातात्व०**" इत्यादिक श्लोकेंकरून स्तुतीहि करावी. नंतर "**श्राद्धभूमिंगयांध्यात्वाध्यात्वादेवंगदाधरं**" इत्यादिक मंत्र ह्मणून प्राचीनावीति करून "**तद्विष्णोः परमं पदं० तद्विप्रासोवि०**" या मंत्रांचा व गायत्रीमंत्राचा जप करून सव्य करून प्राणायाम, तिथ्यादिक यांचा उच्चार केल्यानंतर अपसव्येंकरून " **अमुकपितॄणामुपक्रांतममुकश्राद्धंकरिष्ये** " असा संकल्प करून ह्या स्थलीं पूर्वी, मध्यें आणि शेवटीं " **देवताभ्यःपितृभ्यश्च०, अमूर्तानां०, चतुर्भिश्च०, यस्यस्मृत्या०** " याप्रमाणें त्रिवार पाठ करावा.

---

अथदक्षिणेवामेवाकुक्षौतिलैःसहकुशत्रयं परिहितवस्त्रांचलबद्धंकृत्वाकटिसंलग्नंबाह्यभागेनसंवेष्ट्यरक्षणाख्योनीवीबंधोनिहन्मिसर्वंयदमेध्यवद्भवेदितिश्लोकमंत्रेणकार्यः सर्वतश्चापसव्येनापहतेत्यप्रदक्षिणं तिलान्क्षिप्त्वोदीरतेतिसव्येनप्रोक्षणंस्मृतं तिलारक्षंतुमंत्रेणद्वारेकुशतिलान्क्षिपेत् तरत्समंदीसूक्तेनपावमानीभिरेवच अभिमंत्र्यजलंतेनपाकादिप्रोक्षयेत्सुधीः यद्वातद्विष्णोर्मंत्रेणगायत्र्यावाभिमंत्रितं यद्देवाइतिमंत्राणांत्रयेणैवान्यशाखिनः वाचयेत्पाकपूतत्वंपुष्पाद्यंसर्वमुक्षयेत् नाप्रोक्षितंस्पृशेच्छ्राद्धकालेत्येतंजपेत्ततः पदार्थयोग्यतां वाचयित्वादेवार्चनंचरेत् तत्रप्रत्युपचारंदैवेपित्र्येचाद्यंतयोरपोदद्यात् देवद्विजसन्निधावुदङ्मुखउपविश्य तद्दक्षिणकरमुत्तानंवामकरेणधृत्वादक्षिणेनसयवंदर्भद्वयममुकेषांविश्वेषांदेवानांभूर्भुवःस्वरिदमासनंस्वाहेतिहस्तेजलमासिच्यदक्षिणभागेआसनेक्षिपेन्नहस्तेदर्भदानं आसनेष्वासनंदद्यान्नतुपाणौकदाचन पितृकर्मणिवामेचदैवेदद्यात्तुदक्षिणे विप्रोधर्मोसिविशिराजाप्रतिष्ठितइतिमंत्रेणगृहीत्वास्वासनमितिवदेत् कर्तासनंस्पृशन्नपोदत्वास्यतामितिविप्रोधर्मोसीतिवदेत् अपोदत्वादैवेक्षणःक्रियतामितिनिरंगुष्ठंकरंगृहीयादोंतथेत्यादिप्राग्वत् इदंतृतीयमिमंत्रणं ॥

यानंतर दक्षिण अथवा वामकुक्षि यांचे ठायीं तिलांसहित तीन कुश, परिधान केलेल्या वस्त्राच्या शेवटास बांधून कटीस संलग्न झालेला जो वस्त्राचा बाहेरचा भाग तेणेंकरून वेष्टन करून रक्षणनामक नीवीबंध, "निहन्मिसर्वंयदमेध्यवद्भवेत्०" ह्या श्लोकमंत्रानें करावा. "सर्वत्र अपसव्येंकरून "अपहता०" ह्या मंत्रानें अप्रदक्षिणकर्म करावें, व "उदीरता०" ह्या मंत्रानें तिळ टाकून सव्येंकरून प्रोक्षण करावें. "तिलारक्षंतु०" ह्या मंत्रेंकरून श्राद्धभूमीचे द्वारदेशीं कुशयुक्त तिळ टाकावे. "तरत्समंदी०" ह्या सूक्तानें व "पावमानी०" ह्या ऋचांनीं उदक अभिमंत्रण करून त्या उदकानें पाकादि पदार्थावर प्रोक्षण करावें. अथवा "तद्विष्णो०" ह्या मंत्रानें, किंवा गायत्रीमंत्रानें, अथवा "यद्देवा०" ह्या मंत्रानें उदक अभिमंत्रित करावें. अन्यशाखी यांनीं तीन मंत्रांनींच अभिमंत्रण करावें. पाकपवित्रता बोलावी, आणि त्या अभिमंत्रित उदकानें पुष्पादिक पूजेचे सर्व उपचार प्रोक्षण करावे. श्राद्धकालीं प्रोक्षणाविरहित पदार्थास स्पर्श करूं नये. प्रोक्षणाचें उल्लंघन झालें असतां त्या मंत्राचा जप करावा. पदार्थयोग्यता बोलून देवांची पूजा करावी." त्यामध्यें प्रत्येक उपचार समर्पण करावयाचा त्या कालीं देवांकडे व पितरांकडे उपचाराचे आद्यंतीं उदक द्यावें. देवस्थानीं जो ब्राह्मण त्याच्या सन्निध उत्तरामुख बसून त्या ब्राह्मणाचा उताणा दक्षिण हात डाव्या हातानें धरून उजव्या हातानें यवांसहित दोन दर्भ, "अमुकेषांविश्वेषांदेवानांभूर्भुवःस्वरिदमासनं स्वाहा" असें ह्मणून हातावर उदक सिंचन करून दक्षिणभागीं आसनावर द्यावें, हातावर दर्भ देऊं नयेत. "आसनांचे ठायीं आसन द्यावें, हातावर कदापि देऊं नये. पितृकर्माचे ठायीं वामभागीं व दैवकर्माचे ठायीं दक्षिणभागीं आसन द्यावें." ब्राह्मणानें "धर्मोसिविशिराजाप्रतिष्ठितः" ह्या मंत्रानें घेऊन "स्वासनं" असें प्रतिवचन द्यावें. कर्त्यानें आसनास स्पर्श करून उदक देऊन "आस्यतां" असें ह्मटल्यानंतर ब्राह्मणानें "धर्मोसि" असें ह्मणावें. नंतर उदक देऊन "दैवे क्षणः क्रियतां" असें ह्मणून अंगुष्ठविरहित हस्त धरावा. "ॐतथा" इत्यादिक पूर्वी सांगितल्याप्रमाणें जाणावें. हें तिसरें निमंत्रण होय.

---

अथार्घ्यकल्पना तत्रपात्राणिहैमंरौप्यंताम्रमयंवादारुजंवापलाशादिपर्णमयंवाकांस्यंवाशंखशुक्तिजंवाखड्गपात्रंवार्घ्यपात्रंप्रशस्तं अत्रविप्रैकत्वद्वित्वचतुष्केष्वपिदैवेर्घ्यपात्रद्वयमेव यत्तुदैवेद्वेर्घ्यपात्रेपित्र्येत्रीण्युभयत्रैकैकंवेत्येकपात्रत्वपक्षांतरंतदशक्तिपरं एवंपात्रद्वयंप्रोक्षितायांभुविप्रागग्रकुशेषुन्युब्जमुत्तानंवासाद्यप्रोक्ष्य न्युब्जपक्षेउत्तानीकृत्यतयोर्द्विकुशेद्वेद्वेपवित्रे निधायशंनोदेवीरितिमंत्रावृत्त्यापआसिच्ययवोसीतिमंत्रेणावृत्त्यायवानोप्यतूष्णींगंधपुष्पाणि क्षिपेत् केचिद्गंधद्वारांओषधीःप्रतिमोदध्वमित्यृग्भ्यांगंधपुष्पाणिक्षिपंति देवार्घ्यपात्रेसंपन्नेइत्युक्त्वा सुसंपन्नेइतिप्रत्युक्तोवामकरंविप्रदक्षिणजानुनिन्यस्यामुकविश्वान्देवान्भवत्स्वावाहयिष्येइतिपृष्ट्वावाहयेत्यनुज्ञातोविश्वेदेवासआगतेत्यृचाप्रतिविप्रंदक्षिणपादादियुग्मंक्रमेणजान्वंसमूर्धांतंयवान्विकिरेत् विश्वेदेवाःशृणुतेत्यृचोपस्थायभूमौशिष्टान्यवान्विकिरेत् हिरण्यकेशीयादयस्त्वर्घ्यदानगंधादिपूजोत्तरमग्नौकरणकालेयेदेवासइत्यायातपितरइतिमंत्राभ्यामग्निदक्षिणतोदेवपित्रावाहनंकुर्वंति कातीयैस्त्वर्घ्यपात्रासादनात्प्रागेवदेवपित्रावाहनंकार्यं तथैवका

त्यायनसूत्रात् ततोर्घ्यपात्रसंपत्तिंवाचयित्वाद्विजोत्तमान् तदग्रेचार्घ्यपात्रेतुस्वाहार्घ्यइतिवि न्यसेत् अपोदत्वाविप्रहस्तेदद्यादर्घ्यपवित्रके यादिव्याइतिमंत्रेणहस्तेष्वर्घ्यंविनिक्षिपेत् विश्वेदेवाइदंवोर्घ्यंस्वाहानमइतीरयन् प्रतिविप्रंयादिव्येत्यावृत्तिः केचित्तुयादिव्याइत्यनेनदत्तार्घ्यानुमंत्रणमाहुः मयूखेकातीयप्रयोगेविप्रहस्तेर्घ्यपवित्रदानांतेआवाहनवदंगेष्वर्चनंकृत्वार्घ्यदानमित्युक्तं एकविप्रत्वेएकस्यैवहस्तेद्विरर्घ्यदानंविप्रचतुष्टयपक्षेएकैकंपात्रंविभज्यद्वयोर्द्वयोर्देयं कूर्चस्तुतत्तत्पात्रस्थएव ॥

यानंतर अर्घ्यकल्पना सांगतों.—त्यामध्यें पात्रें—सुवर्णाचें, रौप्याचें, तांब्याचें अथवा काष्ठाचें अथवा पळस इत्यादिकांचे पानाचा द्रोण, किंवा कांस्यपात्र, अथवा शंख, शुक्ति यांचें किंवा खड्गपात्र ( गेंड्याचे शिंगाचें पात्र ), हीं अर्घ्यपात्रें प्रशस्त होत. ह्या अर्घ्याविषयीं एक, अथवा दोन, चार इतके जरी ब्राह्मण असतील तथापि देवांकडे अर्घ्यपात्रें दोनच मांडावीं. दैवकर्माकडे दोन अर्घ्यपात्रें, पित्र्यकर्माकडे तीन, अथवा दोहोंकडे एकेक याप्रमाणें एकपात्रत्वरूप जो दुसरा पक्ष तो अशक्तिविषयक आहे. याप्रमाणें प्रोक्षण केलेल्या भूमीवर पूर्वेस अग्रें होतील असे दर्भ घालून त्यांजवर उपडीं अथवा उताणीं दोन पात्रें ठेवून प्रोक्षण करून, उपडीं यापक्षीं उताणीं करून त्या दोन पात्रांवर दोन दोन दर्भांचें एक याप्रमाणें दोन दोन पवित्रें ठेवून "शन्नोदेवीः०" ह्या मंत्रावृत्तीनें त्या पात्रांत उदक घालून "यवोसि०" या मंत्रावृत्तीनें यव घालून मंत्रविरहित गंधपुष्पें टाकावीं. कितीएक शिष्ट "गंधद्वारां०, ओषधीःप्रतिमोदध्वं०" ह्या दोन ऋचांनीं गंधपुष्पें घालतात. नंतर "देवार्घ्यपात्रेसंपन्ने०" असें वाक्य ह्मणून "सुसंपन्ने" असें ब्राह्मणांनीं प्रतिवचन दिल्यानंतर कर्त्यानें आपला डावा हस्त, ब्राह्मणाच्या उजव्या गुडघ्यावर ठेवून "अमुकविश्वान्देवान्भवत्स्वावाहयिष्ये" अशा वाक्यानें विचारून "आवाहय" असी आज्ञा दिली होत्साता "विश्वेदेवास आगत०" ह्या ऋचेनें प्रत्येक ब्राह्मणाचे उजव्या पायांपासून आरंभ करून युग्म असें क्रमेंकरून जानु, अंस, मस्तकापर्यंत यव टाकावे. नंतर "विश्वेदेवाः शृणुत०" ह्या ऋचेनें उपस्थान ( प्रार्थना ) करून शेष राहिलेले यव भूमीवर टाकावे. हिरण्यकेशीयादिक तर, अर्घ्यदान, गंधादिपूजा हीं केल्यानंतर अग्नौकरणकालीं "येदेवास०" हा मंत्र, व "आयातपितर०" हा मंत्र ह्या दोन मंत्रांनीं अग्नीचे दक्षिणप्रदेशीं देव व पितर यांचें आवाहन करितात. कातीयांनीं तर, अर्घ्यपात्रें स्थापन करण्याचे पूर्वींच देवपितरांचें आवाहन करावें; कारण, कात्यायनसूत्र तसेंच आहे. "तदनंतर ब्राह्मणाकडून अर्घ्यपात्रसंपत्ति बोलवून ब्राह्मणाचे अग्रभागीं अर्घ्यपात्रें "स्वाहाअर्घ्यः" असें ह्मणून मांडावीं. नंतर ब्राह्मणाच्या हस्तावर उदक देऊन अर्घ्यपात्रांतील पवित्रकें हस्तावर द्यावीं, व "यादिव्या०" ह्या मंत्रानें हस्तावर अर्घ्य देऊन "विश्वेदेवा इदंवोर्घ्यंस्वाहानमः" असें वाक्य ह्मणावें. प्रत्येक ब्राह्मणाचे ठायीं "यादिव्या०" ह्या मंत्राची आवृत्ति करावी. कोणी ग्रंथकार तर, "यादिव्या०" ह्या मंत्रेंकरून दिलेल्या अर्घ्याचें अनुमंत्रण करावें असें सांगतात. मयूखांत कातीय प्रयोगामध्यें ब्राह्मणाच्या हस्तावर अर्घ्यावरचीं पवित्रकें दिल्यानंतर आवाहनासारखें अंगाचे ठायीं अर्चन

करून नंतर अर्घ्यदान करावें असें सांगितलें आहे. एक ब्राह्मण असेल तर एकाच्याच हस्तावर दोन वेळ अर्घ्य द्यावें. चार ब्राह्मणांचा पक्ष असेल तर एकेक पात्र वांटून दोन दोन ब्राह्मणांस द्यावें. कूर्च तर त्या त्या पात्रांवरचाच ग्रहण करावा.

---

क्वचित्क्षीरदधिघृततिलतंडुलसर्षपकुशाग्रपुष्पेतिद्रव्याष्टकमर्घ्यपात्रेप्रक्षिप्यमित्युक्तं आद्यंतयोरपोयच्छन्गंधाद्यैरर्चनंचरेत् अमुकविश्वेदेवाअयंवोगंधःस्वाहानमइतिकरेणैवविप्रहस्तेष्वेवद्विर्द्विर्दानं एवंसर्वत्रदैवेस्वाहानमइत्यंतमुच्चार्योपचारदानं चंदनागरुकर्पूरकुंकुमानिप्रदापयेत् गंधद्वारेतिवैगंधमायनेतेचपुष्पकं धूरसीत्यमुनाधूपमुद्दीप्यस्वेतिदीपकं युवंवस्त्राणिमंत्रेणवस्त्रंदद्यात्प्रयत्नतः आसनेस्वासनंब्रूयादर्घ्येस्त्वर्घ्यंद्विजोत्तमः सुगंधश्चसुपुष्पाणिसुमाल्यानिसुधूपकः सुज्योतिश्चैवदीपश्चस्वाच्छादनमितिक्रमः कर्तास्कंधधृतोत्तरीयोविगतपवित्रकरोविप्रहस्तदत्तगंधैर्विप्रभालाद्यंगेषुलिंपेत् विप्रभालेवर्तुलपुंड्रंत्रिपुंड्रंवानकुर्यात् अत्रविप्राणांकस्तूरीविकल्पिता आयनेतेइतिवौषधीःप्रतिमोदध्वमितिवागंधदानवद्धस्तेष्वेवेदंवः पुष्पमितिपुष्पदानंकार्यं ॥

क्वचित् ग्रंथांत दूध, दहीं, घृत, तिळ, तांदूळ, शिरस, कुशांचीं अग्रें आणि पुष्पें याप्रमाणें आठ द्रव्यें अर्घ्यपात्रांत टाकावीं असें सांगितलें आहे. "प्रत्येक उपचाराच्या आद्यंतीं उदक देत होत्साता गंधादिक उपचारांनीं पूजा करावी." "अमुकविश्वेदेवा अयंवोगंधः स्वाहा नमः" ह्या वाक्यानें हस्तेंकरूनच ब्राह्मणाच्या हस्तावरच दोन दोन वेळ गंध द्यावें. याप्रमाणें सर्वत्र ठिकाणीं देवांकडे "स्वाहा नमः" एथपर्यंत उच्चार करून उपचार द्यावे. "चंदन, अगरु, कापूर आणि केशर हे पदार्थ अर्पण करावे. "गंधद्वारां०" ह्या मंत्रानें गंध, "आयनेते०" ह्या मंत्रानें पुष्प, "धूरसि०" ह्या मंत्रानें धूप, "उद्दीप्यस्व०" ह्या मंत्रानें दीप, "युवंवस्त्राणि०" ह्या मंत्रानें वस्त्र प्रयत्नानें द्यावें. आसनाविषयीं "स्वासनं" असें, अर्घ्याविषयीं 'अस्त्वर्घ्यं' असें ब्राह्मणानें बोलावें. गंधादिकाविषयीं 'सुगंधः,' 'सुपुष्पाणि,' 'सुमाल्यानि,' 'सुधूपकः,' 'सुज्योतिः' अथवा 'सुदीपः,' 'स्वाच्छादनं' याप्रमाणें क्रम जाणावा." कर्त्यानें स्कंधावर उत्तरीय वस्त्र धारण करून हातांतील पवित्रक काढून ब्राह्मणाच्या हातावर दिलेले गंधानें ब्राह्मणांच्या कपाळ इत्यादिक अंगास उटी द्यावी. ब्राह्मणाच्या कपाळीं वाटोळा पुंड्र किंवा त्रिपुंड्र करूं नये. ह्या गंधलेपनाविषयीं ब्राह्मणांस कस्तूरी विकल्पित आहे. "आयनेते०" ह्या मंत्रानें, अथवा "ओषधीःप्रतिमोदध्वं०" ह्या मंत्रानें, गंधदानासारखें हातावरच "इदंवःपुष्पं" असें ह्मणून पुष्पदान करावें.

---

तत्रविहितपुष्पाणि अगस्त्यंभृंगराजंचतुलसीकमलंतथा चंपकंतिलपुष्पंचदूर्वाश्चपितृवल्लभाः विहिताप्रतिषिद्धाचतुलसीपिंडपूजने सुकुमारैःकिसलयैर्यवदूर्वांकुरैरपि जलोद्भवैश्चकुसुमैर्मल्लिकाचूतपुष्पकैः अतिमुक्तैश्चतगरैःसंपूज्याःपितरःसदा जातीपुष्पैर्विप्रपूजांकुर्यात्पिंडार्चनंतुन ॥

त्यामध्यें विहित पुष्पें सांगतों.—"अगस्त्य, भृंगराज (माका), तुलसी, कमल, चंपक, तिलपुष्प आणि दूर्वा हीं पितृप्रिय होत. पिंडांच्या पूजेविषयीं तुलसी विहिता आणि प्रति-

षिद्धा असी आहे. कोमल पल्लव, यव, दूर्वांकुर, जलोत्पन्न पुष्पें, मोगरी, आंब्याचा मोहूर, मधुमाधवीचें पुष्प, तगरपुष्पें, यांहींकरून पितरांची सार्वकाल पूजा करावी. जाईच्या पुष्पांनीं ब्राह्मणांची पूजा करावी, पिंडांची पूजा करूं नये. ''

**अथवर्ज्यपुष्पाणि करवीरंचधत्तूरंबिल्वपत्रंचकेतकीं बकुलंकुंदपुष्पंचकिंशुकंचकुरंटिकां सर्वाणिरक्तपुष्पाणिवर्जयेच्छ्राद्धकर्मणि जलोद्भवानिदेयानिरक्तान्यपिविशेषतः ॥**

यानंतर वर्ज्य पुष्पें सांगतों.—''कण्हेर, धोतरा, बिल्वपत्र, केतकी, बकुळ, कुंदपुष्प, पलाशपुष्प, कोरांटी आणि सर्व प्रकारचीं आरक्त पुष्पें हीं श्राद्धकर्माविषयीं वर्ज्य करावीं. जलांत उत्पन्न झालेलीं आरक्तहि विशेषेंकरून अर्पण करावीं. ''

**अथधूपः धूपस्तुगुग्गुलुर्देयस्तथाचंदनसारजः अगरुश्चसकर्पूरोघृतमध्वादिसंयुतः येतुप्राण्यंगजाधूपाहस्तवाताहताश्चये नतेश्राद्धेनियोक्तव्यायेचकेचोग्रगंधयः घृतंनकेवलंदद्याद्दुष्टं वातृणगुग्गुलं पाददेशेयं वोधूपइतिदानं ॥**

यानंतर धूप सांगतों.—''गुग्गुलु धूप; चंदनाचे नारापासून झालेला; घृत, मध इत्यादिकानें युक्त व कापूरसहित अगरु समर्पण करावा. प्राण्यांच्या अंगापासून उत्पन्न झालेले, व हातानें वारा घालून प्रदीप्त केलेले, आणि उग्रगंधी हे धूप श्राद्धीं अर्पण करूं नयेत. निषिद्ध घृत, अथवा तृणगुग्गुलानें दुष्ट झालेलें घृत देऊं नये. ब्राह्मणाच्या पायांजवळ ''अयंवोधूपः'' असें ह्मणून धूप द्यावा.

**अथदीपः घृतेनदीपोदातव्यस्तिलतैलेनवापुनः वसामेदादिदीपोवर्ज्यः इदंवोज्योतिरिति वायंवोदीपप्रकाशइतिवामुखसमीपेदीपः ॥**

यानंतर दीप सांगतों.—''घृत, किंवा तिलतैल यांचा दीप समर्पण करावा.'' वसामांसजन्य स्नेह, मेदोधातु इत्यादिकांचा दीप वर्ज्य जाणावा. ''इदंवोज्योतिः,'' अथवा ''अयंवो दीपप्रकाशः'' असें ह्मणून ब्राह्मणाच्या मुखाजवळ दीप समर्पण करावा.

**कौशेयंकार्पासंवावस्त्रंविहितं कृष्णंमलिनमुपभुक्तंछिद्रितंनिर्दशंरजकधौतंचनिषिद्धंयज्ञोपवीतंदातव्यंवस्त्राभावेविजानता निष्क्रयोवायथाशक्तिवस्त्रालाभेप्रदीयते पितॄन्सत्कृत्यवासोभिर्दद्याद्यज्ञोपवीतकं यज्ञोपवीतदानेनविनाश्राद्धंतुनिष्फलं यज्ञोपवीतंयतिस्त्रीशूद्रश्राद्धेष्वपिज्ञेयं ॥**

रेशमाचें अथवा कापसाचें वस्त्र विहित होय. काळें, मलिन, नेसलेलें, छिद्रें पडलेलें, दशाविरहित, रजकानें धुतलेलें, हीं वस्त्रें निषिद्ध होत. '' वस्त्र नसेल तर ज्ञात्यानें यज्ञोपवीत द्यावें. अथवा वस्त्राचा अलाभ असतां यथाशक्ति वस्त्राचें मौल्य ( किंमत ) द्यावें. पितरांचा वस्त्रांनीं सत्कार करून यज्ञोपवीत अर्पण करावें. यज्ञोपवीतदानावांचून केलेलें श्राद्ध निष्फळ होतें. '' संन्यासी, स्त्रिया, शूद्र यांच्या श्राद्धामध्येंहि यज्ञोपवीत द्यावें.

**अथान्यान्यपिदेयानि धातुमयानिधूपदीपपात्राणि कमंडलुंताम्रमयंकाष्ठजंवापिमृन्मयं नारिकेलमयंवापिश्राद्धेदद्यात्प्रयत्नतः छत्रोपानदासनशयनदर्पणचामरव्यजनपादुकाकेश**

प्रसाधनीपटवासादिसुगंधचूर्णागारधानिकायष्टिकंबलांजनशलाकाश्चदेयाः अलंकाराश्चदात व्यायथाशक्तिहिरण्मयाः केयूरहारकटकमुद्रिकाकुंडलादयः स्त्रीभ्योयोषिदलंकारादेयाःश्रा द्धेषुयोषितां मंजीरमेखलादामकर्णिकाकंकणादयः सौवर्णराजतंकांस्यंदद्याद्भोजनभाजनं कर्पू रादेश्चभांडानितांबूलायतनंतथास्वयमन्येनवाबंदीकृतानांकेनाप्युपायेनमोचनेपितॄणांब्रह्मपदं॥

यानंतर दुसरेहि देय ( द्यावयास योग्य ) पदार्थ सांगतों.— धातुमय असीं धूप व दीप यांचीं पात्रें ( समया, नीरांजन इत्यादि ) द्यावीं. "श्राद्धामध्यें प्रयत्नेंकरून तांब्याचा, काष्ठाचा अथवा मृत्तिकेचा किंवा नारळाचा कमंडलु द्यावा." छत्री, जोडा, आसन, मंचक, बिछाना, आरसा, चवरी, पंखा, पादुका, फणी, बुका इत्यादि सुगंध चूर्ण, शेगडी, काठी, कंबल, काजळ, शलाका हे पदार्थ द्यावे. "केयूर ( बाहुभूषणें ), हार, कडींतोडे, आंगठया, कुंडलें इत्यादिक यथाशक्ति सुवर्णाचे अलंकारहि द्यावे. स्त्रियांचे श्राद्धामध्यें मंजीर (नूपुर), कमरपट्टा, दाब, कर्णभूषणें, कंकणें इत्यादिक स्त्रियांचे अलंकार स्त्रियांस द्यावे. सुवर्णाचें, रुप्याचें, कांस्यमय असीं भोजनपात्रें, कर्पूराचीं भांडीं, तांबूलाचीं पात्रें हीं द्यावीं." स्वतां किंवा अन्यानें बंदीवान केलेले जे त्यांला कोणत्याहि उपायेंकरून बंधमुक्त केलें असतां पितरांस ब्रह्मपद प्राप्त होतें.

---

इत्थंचोक्तवचनादाच्छादनदानांते पृथग्यज्ञोपवीतंदत्वाशक्तिसत्त्वेछत्रालंकारादिकंदत्वा तत्कालेस्पर्शायोग्यानांसंकल्पंकृत्वापूजनंपूर्णमस्तुसंकल्पसिद्धिरस्त्वित्युक्त्वाप्रत्युक्तौ मंत्रहीनं क्रियाहीनंसंपद्धीनंद्विजोत्तमाः श्राद्धंसंपूर्णतांयातुप्रसादाद्भवतांमम यस्यस्मृत्या० देवताभ्य० इतिजपेत् एवमासनादिसर्वपूजाकांडंदैवंसमाप्यपैतृकमासनप्रभृतिपूजाकांडमारभेदितिकां डानुसमयक्रमएवमाधवसंमतः ॥

याप्रमाणें सांगितलेलें वचन आहे यास्तव आच्छादन दिल्यानंतर पृथक् यज्ञोपवीत देऊन शक्ति असल्यास छत्रालंकारादिक द्यावें. तत्कालीं स्पर्श करण्यास अयोग्य जे असतील त्यांचा संकल्प करून " पूजनं पूर्णमस्तु, संकल्पसिद्धिरस्तु " असें बोलून प्रतिवचन दिल्यानंतर "मंत्रहीनं क्रियाहीनं संपद्धीनं द्विजोत्तमाः ॥ श्राद्धं संपूर्णता यातु प्रसादाद्भवतां मम ॥ यस्य स्मृत्या० देवताभ्यः०" याप्रमाणें जप करावा. याप्रमाणें आसनादिक सर्व पूजाकांड देवांसंबंधी समाप्त करून पितृसंबंधी आसनादिक पूजाकांडास आरंभ करावा; याप्रमाणें कांडानुसमयक्रमच माधवास संमत आहे.

---

कातीयास्त्वासनक्षणावाहनार्घ्यपर्यंतं पाद्यांतप्रयोगात्पदार्थानुसमयक्रमेणैवदैवेपित्र्येचकृ त्वागंधादिपूजामेवकांडानुसमयेनकुर्वंति एकंपदार्थंदैवपित्र्यादिषुसर्वत्रानुष्ठायतेनैवक्रमेण द्वितीयादिपदार्थाअनुष्ठेयाइत्ययंपदार्थानुसमयः एकत्रैवसर्वपदार्थान्समाप्यान्यत्रसर्वपदा र्थानुष्ठानमितिकांडानुसमयः ॥

कातीय ( कात्यायनशाखी ) तर, आसन, क्षण, आवाहन आणि अर्घ्य एथपर्यंत, पाद्यपर्यंत प्रयोग आहे याकरितां पदार्थानुसमयक्रमेंकरूनच देवांकडे व पितरांकडे करून गंधादिक पूजाच कांडानुसमयेंकरून करितात. एक पदार्थ देवांकडे व पितरांकडे सर्व ठिकाणीं समर्पण

करून त्याच क्रमानें दुसरा इत्यादिक पदार्थ अर्पण करणें यास **पदार्थानुसमय** असें ह्मणतात. एकीकडेच सर्व पदार्थांची समाप्ति करून नंतर दुसरीकडे सर्व पदार्थ समर्पण करणें यास **कांडानुसमय** असें ह्मणतात.

---

**अथान्यपवित्रेधृत्वापित्रर्चनं संकल्प्यासनाद्याच्छादनांतपूजावैश्वदेवोक्तरीत्यैवपितृधर्मेण कार्या विशेषस्तूच्यते द्विगुणभुग्नंकुशत्रयंविप्रवामेक्षिपेत् पार्वणस्थानेविप्रत्रयपक्षेपितुर्यथानामगोत्रस्येदमासनमित्यादिपृथगुच्चारः एकविप्रत्वेपितृपितामहप्रपितामहानामिदमासनमित्युच्चारः एवमग्रिमोपचारेष्वप्यूह्यं शेषंप्राग्वत् ततस्तृतीयनिमंत्रणमपिप्राग्वद्धस्तधारणपूर्वकंकार्यं॥**

यानंतर दुसरीं पवित्रकें धारण करून पितरांचे पूजेचा संकल्प करून आसनापासून आच्छादनपर्यंत पूजा, वैश्वदेवोक्तरीतीनें ह्मणजे देवांकडे जी रीति सांगितली त्या रीतीकरून पितृधर्मेंकरून करावी. **विशेष तो मात्र सांगतों**—मध्यें मोडून दुप्पट केलेले असे तीन कुश ब्राह्मणाच्या वामप्रदेशीं टाकावे. पार्वणस्थानीं तीन ब्राह्मण असा पक्ष असेल तर **"पितुर्यथानामगोत्रस्येदमासनं"** इत्यादिक पृथक् उच्चार करावा. एक ब्राह्मण असेल तर **"पितृपितामहप्रपितामहानामिदमासनं"** असा उच्चार करावा. याप्रमाणें पुढच्या उपचारांविषयीं असाच ऊह करावा. शेषकर्म पूर्वीप्रमाणें करावें. तदनंतर तिसरें निमंत्रणसुद्धां पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ब्राह्मणाचा पूर्वी हस्त धरून करावें.

---

**अथार्घ्यासादनं द्विजाग्रेदक्षिणाग्रांस्त्रीन्दर्भानास्तीर्यतेष्वाग्नेयीसंस्थानिप्रतिपार्वणंपात्राणित्रीणित्रीण्येवासाद्य पितृपात्रपश्चिमेमातामहादिपार्वणस्यप्रतिपार्वणमेकविप्रत्वेनवविप्रत्वादिपक्षेपित्रीण्येवपात्राणि एकविप्रत्वेतद्धस्तेएवार्घ्यत्रयं नवविप्रत्वादिपक्षेएकैकंपात्रंविभज्यत्रिषुत्रिषुदेयं प्रतिपात्रोपरिदक्षिणाग्राद्विगुणाःसाग्रानिरग्रावात्रयस्त्रयःकुशापितृतीर्थेनपात्रेषुजलमापूर्यशंनोदेवीरितिसर्वपात्रेषुसकृदनुमंत्रणमाश्वलायनानां तद्भिन्नैःकातीयादिभिःशन्नोदेवीरितिमंत्रेणप्रतिपात्रंमंत्रावृत्त्याजलमापूर्य हिरण्यकेशीयास्तुशन्नोदेवीरितिमंत्रंनेच्छंति सर्वमतेतिलोसीतिमंत्रावृत्त्याप्रतिपात्रंतिलावापः अत्रपितृशब्दस्यानूहइत्युक्तं गंधादिप्रक्षेपः प्राग्वत् ततःपित्रर्घ्यपात्रंसंपन्नमित्यादियथालिंगंसंपत्तिंवाचयित्वापोदत्वादक्षिणामुखस्तिष्ठन् सव्यंकरंकुशतिलयुतंविप्रवामजानुनिन्यस्यपितृपितामहादीन्द्वितीयांतानुच्चार्यभवत्सुआवाहयिष्येइतिपंक्तिमूर्धन्यमेकंविप्रंपृच्छेत् सर्वत्रपंक्तिमूर्धन्यंप्रत्येवप्रश्नः आवाहयेत्यनुज्ञातउशंतस्त्वेतिमंत्रावृत्त्यामुकममुकनामगोत्ररूपमावाहयामीतिप्रतिविप्रंमूर्धादिपादांतमंसादियुग्मांगेषुतिलविकिरणेनावाह्यसर्वविप्रावाहनांतेआयंतुनःपितरइतिसकृदुपतिष्ठेत् अत्रकातीयैर्नमोवःपितरइत्यादिइहसंतःस्यामेत्यंतेनार्चनमुक्तं आवाहनेसव्यापसव्ययोर्विकल्पः हस्तशिष्टतिलान्विप्राग्रेभूमौविकीर्यपित्रर्घ्यपात्रसंपत्तिरस्त्वित्युक्त्वाप्रत्युक्तः सव्यंकृत्वापोदत्वाधःस्थदर्भैःसहार्घ्यपात्रमेकैकंपाणिभ्यामुद्धृत्यविप्राग्रेस्वधार्घ्याइतिमंत्रावृत्त्यास्थापयेत् एकविप्रत्वेएकाग्रेएवपात्रत्रयंमंत्रावृत्त्या नवविप्रत्वेपितृविप्रत्रयमुख्याग्रेपात्रन्यासोमंत्रेण एवंपितामहादिषुमुख्याग्रेएव एवंचत्रिरेवस्वधार्घ्याइतिमंत्रोच्चारःप्रतिपार्वणे ॥**

**यानंतर अर्घ्यपात्रांचें स्थापन सांगतों.**— ब्राह्मणाच्या अग्रभागीं, दक्षिण दिशेस अग्रें होतील असे तीन तीन दर्भ आस्तीर्ण करून त्या दर्भावर आग्नेयीसंस्थ, प्रत्येक पार्वणास तीन तीन पात्रें मांडून पितृपात्रांचे पश्चिमप्रदेशीं मातामहादि पार्वणांचीं, प्रत्येक पार्वणीं एक ब्राह्मण असा पक्ष, किंवा नऊ ब्राह्मण इत्यादि पक्ष कोणत्याहि पक्षीं तीनच पात्रें मांडावीं. एक ब्राह्मण असेल तर त्याचेच हातावर तीन अर्घ्यें द्यावीं. नऊ ब्राह्मण इत्यादि पक्ष असेल तर एकेक अर्घ्यपात्र तीन तीन ब्राह्मणांस वांटून द्यावें. प्रत्येक पात्रावर दक्षिणदिशेस अग्रें होतील असे, मध्यें मोडून-दुप्पट केलेले, साग्र अथवा निरग्र तीन तीन कुश घालावे. पितृतीर्थेंकरून त्या अर्घ्यपात्रांत उदक घालून "**शंनोदेवी०**" ह्या मंत्रेंकरून सर्व पात्रांचें एकवार अनुमंत्रण आश्वलायनांनीं करावें. आश्वलायनशाखींहून जे अन्य कात्यायन इत्यादि शाखी यांनीं "**शन्नोदेवी०**" ह्या मंत्रेंकरून प्रत्येक पात्रीं मंत्रावृत्तीनें उदक घालावें. हिरण्यकेशीय तर, "**शन्नोदेवी०**" हा मंत्र इच्छीत नाहींत. सर्वांचे मतीं "**तिलोसि०**" ह्या मंत्राचे आवृत्तीनें प्रत्येक पात्रांत तिळ घालावे. एथें पितृशब्दाचा ऊह करूं नये असें सांगितलें आहे. गंधादिक द्रव्यें टाकणें तीं पूर्वीप्रमाणें टाकावीं. तदनंतर "**पित्रर्घ्यपात्रंसंपन्नं**" इत्यादि जसें लिंग असेल तदनुसार संपत्ति बोलून उदक देऊन दक्षिणाभिमुख स्थित होत्साता डावा हस्त कुशतिलांनीं युक्त असा ब्राह्मणाच्या डाव्या गुडघ्यावर ठेवून पितृपितामहादिकांचा द्वितीयाविभक्त्यंत उच्चार करून "**भवत्सुआवाहयिष्ये**" असें ह्मणून पंक्तीच्या आरंभीं बसलेल्या एका ब्राह्मणास पृच्छा करावी. सर्वत्र ठिकाणीं पंक्तीचा जो पहिला ब्राह्मण त्यालाच प्रश्न करावा. नंतर "**आवाहय**" असा अनुज्ञात होत्साता "**उशंतस्त्वा०**" ह्या मंत्रावृत्तीनें "**अमुकममुकनामगोत्ररूपमावाहयामि**" असें ह्मणून प्रत्येक ब्राह्मणाप्रत मस्तकापासून पायांपर्यंत अंसादिक जीं युग्म अंगें त्यांचे ठायीं तिल टाकून आवाहन करावें. याप्रमाणें सर्व ब्राह्मणांचें आवाहन केल्यानंतर "**आयंतुनःपितरः०**" ह्या मंत्रानें एक वेळ प्रार्थना करावी. ह्या स्थानीं कात्यायनशाखी यांनीं "**नमोवःपितर०**" इत्यादिकापासून "**इहसंतःस्याम**" एथपर्यंत मंत्रेंकरून अर्चन सांगितलें आहे. आवाहनाविषयीं सव्य व अपसव्य यांचा विकल्प आहे. आवाहन करून हातावर शेष राहिलेले तिळ ब्राह्मणाच्या अग्रभागीं भूमीवर टाकून "**पित्रर्घ्यपात्रसंपत्तिरस्तु**" असें ह्मणून प्रतिवचन दिलें होत्साता सव्य करून उदक देऊन भूमीवर आस्तीर्ण केलेल्या दर्भासहित एकेक अर्घ्यपात्र दोहों हातांनीं उचलून ब्राह्मणाच्या अग्रभागीं, "**स्वधार्घ्याः**" ह्या मंत्रावृत्तीनें स्थापन करावें. एक ब्राह्मण असेल तर एकाच्याच अग्रभागीं तीन पात्रें मंत्रावृत्तीनें स्थापावीं. नऊ ब्राह्मण असतील तर पितृस्थानीं जे तीन ब्राह्मण त्यांतील मुख्य ब्राह्मणाच्या अग्रभागीं, मंत्रेंकरून पात्रें स्थापन करावीं. याप्रमाणें पितामहादिकांचे स्थानीं मुख्याचे अग्रभागींच पात्रें स्थापन करावीं. याप्रमाणें प्रत्येक पार्वणाचे ठायीं "**स्वधार्घ्याः**" असा तीन वेळच मंत्रोच्चार करावा.

---

**अथर्ववेदिनांप्रपितामहादिपित्रंतंप्रातिलोम्येनसर्वःप्रयोगः ततःसंत्वर्घ्याइतिप्रत्युक्तोपोदत्वापात्रस्थंपवित्रंविप्रहस्तेषुदत्वा प्रथमपात्रोदकंसशेषंखड्गपात्रेपात्रांतरेवागृहीत्वापितरिदंते अर्घ्यंपितामहेदंतेअर्घ्यमित्यादियथालिंगंप्रत्येकमर्घ्यंदेयं पित्रादित्रयाणामेकविप्रत्वेत्रिभिःपात्रै**

**रेकस्यैवहस्तेर्घ्यदेयं षण्णामेकविप्रत्वेषट्पात्राण्येकहस्ते पितुःस्थानेविप्रत्रयादिपक्षेएकार्घ्यं विभज्यतेषुदेयं अर्घ्यांतेजलदानंपितरिदंतेअर्घ्यमित्यर्घ्यमंत्रश्चप्रतिविप्रमावर्तते एवंपिता महादिविप्रेष्वपि एवमर्घ्यंदत्वाविप्रहस्तात्स्रवंतीरपोयादिव्याइतिमंत्रेणप्रतिविप्रमनुमंत्रयेदि तिबह्वृचःअन्यशाखिनांतुयादिव्याइतिमंत्रेणार्घ्यदानम् अर्घ्यदानांतेप्रतिविप्रमपोदानंतथाचै कविप्रत्वेनुमंत्रणमपोदानंचांतेसकृदेवविप्रभेदेत्वावर्ततेअर्घ्यदानेनामगोत्राद्युच्चारो नक्रियते श्राद्धसागरकारैस्तुकार्यइतियुक्तंभातीत्युक्तं ॥**

अथर्वणवेदी यांचा सर्व प्रयोग प्रपितामहापासून पित्यापर्यंत असा प्रातिलोम्येंकरून जाणावा. तदनंतर "संत्वर्घ्याः" असें प्रतिवचन दिलें होत्साता उदक देऊन पात्रांतील पवित्रक ब्राह्मणाचे हस्तांवर देऊन पहिल्या पात्रांतलें उदक ( पात्रांत शेष ठेवून) खड्गपात्रांत अथवा दुसऱ्या पात्रांत घेऊन "पितरिदंतेअर्घ्यं पितामहेदंतेअर्घ्यं" इत्यादिक जसें लिंग असेल तदनुसार प्रत्येक अर्घ्य द्यावें. पित्रादिक त्रयीच्या स्थानीं एक ब्राह्मण असतां तीन पात्रांचें एकाच्याच हातावर अर्घ्य द्यावें. सहांचा एक ब्राह्मण असतां सहा पात्रें एकाच्या हातावर द्यावीं. पित्याचे स्थानीं तीन ब्राह्मण इत्यादिक पक्ष असेल तर एक अर्घ्य विभागून तीन ब्राह्मणांस द्यावें. अर्घ्याचे अंतीं उदक देणें व "पितरिदंतेअर्घ्यं" हा अर्घ्यमंत्र ह्मणणें हें प्रत्येक ब्राह्मणाचे ठिकाणीं करावें. याप्रमाणें पितामहादिकांचे ब्राह्मणाविषयींहि जाणावें. याप्रमाणें अर्घ्य देऊन ब्राह्मणांचे हस्तापासून स्रवणारें उदक "यादिव्या०" ह्या मंत्रानें प्रत्येक ब्राह्मणाप्रत अनुमंत्रण करावें, असा ऋग्वेदी यांचा प्रकार जाणावा. अन्यशाखी यानें तर, "यादिव्या०" ह्या मंत्रानें अर्घ्यदान करावें. अर्घ्यदान झाल्यानंतर प्रत्येक ब्राह्मणास उदक द्यावें. तसेंच एक ब्राह्मण असतां अनुमंत्रण करणें व उदक देणें हें शेवटीं एकवेळच करावें, निरनिराळे ब्राह्मण असतील तर आवृत्तीनें प्रत्येक ब्राह्मणाचे ठिकाणीं करावें. अर्घ्यदानाविषयीं नाम, गोत्र इत्यादिकांचा उच्चार करूं नये. श्राद्धसागरग्रंथकर्त्यांनीं तर नाम, गोत्र इत्यादिकांचा उच्चार करावा हें योग्य असें वाटतें असें सांगितलें आहे.

---

**अथशेषजलयुतप्रथमार्घ्यपात्रेपात्रद्वयस्थशेषोदकमेकीकृत्यतेनजलेनमुखांजनंकार्यं आयुःकामेननेत्रसेचनंकार्यं संस्रवान्त्समवनीयेत्याद्याश्वलायनसूत्रात् केचिद्विप्रहस्तगलितांबु संस्रावस्तस्यैकीकरणमाहुः दर्शादौमातामहपात्रोदकेतत्पात्रद्वयोदकंसमवनीयमातामहपात्रो दकंपितृपात्रस्थसंस्रावेसंनयेत् मातृपार्वणभेदेमातामहपात्रसमनीतोदकंमातृपात्रस्थसमवनी तोदकेनतदुदकंपितृपात्रस्थैकीकृतोदकइति तत्संस्रावपात्रंदैविकविप्रादुत्तरतोरत्निमात्रेप्रो क्षितेदर्भेषुन्युब्जंसकूर्चंपितृभ्यःस्थानमसीत्यासादयेत् यद्वाप्रथमपात्रमुत्तानंसंस्रावोदकसहि तंमंत्रेणासाद्यतृतीयपात्रेणसकूर्चपवित्रंतदाच्छादयेत् पक्षद्वयेपिगंधादिनाभ्यर्च्यासमाप्तेर्नचा लयेन्नचस्पृशेत् ॥**

यानंतर शेष उदकयुक्त जें पहिलें अर्घ्यपात्र त्यांत, दोन पात्रांतील शेष उदक एकत्र करून त्या उदकानें मुख आर्द्र करावें. आयुष्याची इच्छा करणारानें नेत्रांबर सेचन करावें. कारण,

"संस्रवान्त्समवनीय" ( संस्रव ह्मणजे अर्घ्यपात्रांतील शेषोदकें एकत्र करावीं ) इत्यादिक आश्वलायनसूत्र आहे. कोणीं ग्रंथकार, ब्राह्मणाच्या हस्तापासून गलित झालेलें जें उदक तो संस्राव, त्याचें एकीकरण करावें असें सांगतात. दर्शादिकश्राद्धीं मातामहपात्रांतील उदकांत मातुःपितामहादि दोन पात्रांतलें उदक एकत्र करून मातामहपात्रांतलें उदक पितृपात्रांतल्या संस्रावांत मिळवावें. मातृपार्वण पृथक् असेल तर, मातामहपात्रांत एकत्र केलेलें उदक मातेच्या पात्रांतल्या उदकांसीं एकत्र करून तें उदक पितृपात्रांतल्या एक केलेल्या उदकांत एकत्र करावें, व तें संस्रावाचें पात्र देवांच्या ब्राह्मणांचे उत्तरेकडे अरत्निमात्र ( मुंडाहात ), प्रोक्षण केलेल्या अशा प्रदेशीं दर्भांचे ठायीं उपडें व कूर्चासहित "पितृभ्यः स्थानमसि" ह्या मंत्रानें स्थापावें. अथवा पहिलें पात्र उताणें, संस्रावोदकासहित मंत्रेंकरून स्थापून तिसऱ्या पात्रेंकरून कूर्चपवित्रांसहित आच्छादन करावें. या दोनहि पक्षीं गंधादिक उपचारांनीं त्या पात्राची पूजा करून समाप्तीपर्यंत तें पात्र चाळवूं नये, व स्पर्शहि करूं नये.

---

कातीयास्तुशुंधंतामितिभूमिंप्रोक्ष्यपितृषदनमसीतिकुशानास्तीर्येपितृभ्यःस्थानमसीतिप्रथमंन्युब्जंकृत्वागंधादिदीपांतैरर्चंति ॥

कात्यायनशाखी तर, "शुंधंतां" ह्या मंत्रानें भूमि प्रोक्षण करून "पितृषदनमसि" ह्या मंत्रानें कुश आस्तीर्ण करून "पितृभ्यः स्थानमसि" ह्या मंत्रानें प्रथम पात्र उपडें करून गंधापासून दीपापर्यंत उपचारांनीं पूजा करितात.

---

अथप्राचीनावीति आद्यंतयोरपोयच्छन्गंधाद्यैःपूजनंचरेत् अमुकशर्मन्यथानामगोत्रायंते गंधःस्वधानमइतिएकविप्रत्वेशर्माणोयंवोगंधइत्यादिनात्रिस्त्रिर्गंधदानंशेषंप्राग्वत् केचिदमीते गंधाइतिबहुत्वंगंधेप्राहुःअर्घ्यदानभिन्नेसर्वत्रस्वधानमइत्यंतेनदानम् अत्रपित्र्यविप्रपूजनेगंधादेःपदार्थानुसमयःकांडानुसमयोवा संपूर्णवाचनादिप्राग्वत् कृत्वाचतुष्कोणंवर्तुलंचयथाक्रमं वारिणागोमयभस्मादिनावामंडलानिसव्यापसव्याभ्यांकुर्यात् तत्रनैर्ऋतीमारभ्येशानीपर्यंतंदैवेईशानीतोनैर्ऋतीपर्यंतंपित्र्येचप्रादक्षिण्याप्रादक्षिण्याभ्यांकार्याणि तत्रपूर्वोक्तपात्राण्यासादयेत्नायसान्यपिपात्राणिपैत्तलानिनतुक्वचित् नचसीसमयानीहशस्यंतेत्रपुजान्यपि कांस्यपात्रंविकल्पितंपर्णपात्रेषुपलाशमधूकोदुंबरकुटजप्लक्षजानिशस्तानि कदलीचूतपनसजंबुचंपकानिमध्यमानि एवंपात्राण्यासाद्यपितृपूर्वकंपरितोभस्ममर्यादांपितृपूर्वकंविप्राणांकरशुद्धिंचसव्यापसव्याभ्यांकुर्यात् तत्रपिशंगइतिरक्षाणइतिमंत्रद्वयंकेचिदाहुः आचम्यकरशुद्धिजलंपादक्षालनमंडलेक्षिपेत् ॥

यानंतर प्राचीनावीति करून "आद्यंतीं उदक देत होत्साता गंधादिक उपचारांनीं पूजा करावी." ती असी–"अमुकशर्मन् यथानामगोत्रायं ते गंधः स्वधानमः" असें, एक ब्राह्मणपक्ष असतां "शर्माणोयंवोगंधः" इत्यादिक प्रकारानें तीन तीन वेळ गंध द्यावें. शेष कर्म पूर्वीप्रमाणें करावें. कोणीं ग्रंथकार, "अमीते गंधाः" असा बहुवचनांत गंधाविषयीं उच्चार सांगतात. अर्घ्यदानावांचून सर्वत्र "स्वधानमः" असा शेवटीं उच्चार करून उपचार द्यावे. एथें पितरांकडील ब्राह्मणाच्या पूजेमध्यें गंधादिक उपचार पदार्थानुसमयानें

किंवा कांडानुसमयानें द्यावे. संपूर्णवाचनादिक पूर्वीप्रमाणें करून चतुष्कोण वर्तुळ यथाक्रमें-करून ( देवांकडे चतुष्कोण, व पितरांकडे वर्तुळ ) उदकानें अथवा गोमय, व भस्म इत्यादिकानें मंडलें सव्यापसव्यांनीं करावीं. त्यामध्यें नैर्ऋतीदिशेस आरंभ करून ईशानीपर्यंत देवांकडे, आणि ईशानीपासून नैर्ऋतीपर्यंत पितरांकडे, प्रदक्षिण व अप्रदक्षिण असीं करावीं, आणि त्या मंडलांवर पूर्वी सांगितलेलीं पात्रें मांडावीं. " लोखंडाचीं व पितळेचीं पात्रें कदापि प्रशस्त नाहींत. शिस्याचीं, कथलाचीं पात्रेंहि प्रशस्त नाहींत. " कांस्यपात्र विकल्पित आहे. पानाच्या पात्रांमध्यें पळस, मोह, उंबर, कुडा, पिंपरी या वृक्षांचीं पानें प्रशस्त होत. कदली, आंबा, फणस, जांबूळ, आणि चांफा हीं पात्रें मध्यम होत. याप्रमाणें पात्रें मांडून पितृपूर्वक, पात्रांच्या सभोंवार भस्ममर्यादा ( पिशंगी ) आणि पितृपूर्वक ब्राह्मणाची करशुद्धि हीं सव्य व अपसव्य यांहींकरून करावीं. त्या पिशंगीविषयीं "पिशंग०" व "रक्षाणो०" हे दोन मंत्र कोणी ह्मणतात. आचमन करून करशुद्धीचें उदक पादक्षालनाचे मंडलावर टाकावें.

---

अथाग्नौकरणम् तच्चाश्वलायनानांगृह्याग्निमतांव्यतिषंगेणश्राद्धप्रयोगेगृह्याग्निपक्वचरुणागृह्याग्नावेवकार्यं व्यतिषंगाभावेपाणिहोमः श्रौताग्निमतांदर्शेव्यतिषंगाभावात्पाणिहोमएव पूर्वेद्युरन्वष्टक्ययोर्दक्षिणाग्नौश्रपणंहोमश्च निरग्निकानांतुसर्वत्रपाणिहोमएव आपस्तंबादीनां श्रौताग्निमतांसर्वाधानिनांदक्षिणाग्नौ अर्धाधानिनांगृह्याग्निमात्रवतांचगृह्याग्नावेव प्रवासस्थानांनिरग्निकानांचअयाश्चाग्ने मनोज्योतिरुद्बुध्यध्वंव्याहृतिहोमेनोत्पादितेलौकिकाग्नौहुत्वाग्नेरुत्सर्गः नत्वेषांक्वापिपाणिहोमः पाकस्तुसर्वत्रपचनाग्नावेवकातीयानांगृह्याग्निमतांगृह्याग्निविहृतपचनाग्नौपाकोग्नौकरणंतुगृह्याग्नावेव श्रौताग्निमतांसर्वाधानपक्षेदक्षिणाग्नावर्धाधानपक्षेऔपासनाग्नावितिकाशिकायामुक्तं कातीयानामर्धाधानपक्षएवयुक्तइतिभाति निरग्नीनां कातीयानामपसव्यादिनापित्र्यादिद्विजहस्तएवाग्नौकरणम् तत्रपक्षद्वयम् देवद्विजकरेएवसव्येनहोमः यद्वापसव्येनपित्र्यद्विजपंक्तौप्रथमद्विजकरेइति बह्वृचानांतुपित्र्यद्विजकरेष्वेवप्रतिविप्रंहोमः वाजसनेयिनांत्वेकहोमएवेतिश्राद्धकाशिकायांकातीयसूत्रवृत्तौ केचित्तुपृष्टोदिविविधानेनाग्निमुत्पाद्याग्नावेवजुह्वति सामगादीनांसाग्नीनामग्नावग्नेरसंनिधानेदैवकरेपित्र्यकरेवा निरग्नीनांतुदेवद्विजकरएव मृतभार्यस्यापत्नीकस्यप्रथमदेवद्विजकरएवहोमोनपित्र्ये इतिसर्वसाधारणम् ॥

यानंतर अग्नौकरण सांगतों—तें अग्नौकरण गृह्याग्निमान् अशा आश्वलायनांनीं व्यतिषंगानें श्राद्धप्रयोग असतां गृह्याग्नीवर चरु शिजवून त्या चरूनें गृह्याग्नीवरच करावें. व्यतिषंग-प्रयोग नसेल तर ब्राह्मणाच्या हातावर होम करावा. श्रौताग्निमंत यांनीं, दर्शश्राद्धीं व्यतिषंग नसल्यामुळें पाणिहोमच करावा. पूर्वेद्युःश्राद्ध व अन्वष्टक्यश्राद्ध या श्राद्धीं दक्षिणाग्नीवर चरु-श्रपण व होम हीं करावीं. निरग्निकांनीं तर, सर्वत्र ब्राह्मणांच्या हातांवरच होम करावा. आपस्तंबशाखी इत्यादिक श्रौताग्निमंत सर्वाधानी यांनीं दक्षिणाग्नीवर चरुश्रपण व होम हीं करावीं. अर्धाधानी व गृह्याग्नीनें युक्त यांनीं गृह्याग्नीवरच करावीं. प्रवासांत असणारे व निरग्निक यांनीं " अयाश्चाग्ने०, मनोज्योतिरुद्बुध्यध्वं०, " आणि व्याहृति यांचा होम करून उत्पन्न केलेल्या लौकिकाग्नीवर होम करून अग्नीचें विसर्जन करावें. ह्या आपस्तंबादिकांस पाणिहोम

कोठेंहि सांगितला नाहीं. पाक करावयाचा तो तर पचनाग्नीवरच करावा. गृह्याग्नियुक्त जे कात्यायन त्यांनीं गृह्याग्नींतून अग्नि घेऊन त्या पचनाग्नीवर पाक करावा, व अग्नौकरण करणें तें तर गृह्याग्नीवरच करावें, श्रौताग्नियुक्त असून सर्वाधानपक्ष असेल तर दक्षिणाग्नीवर अग्नौकरण, आणि अर्धाधानपक्ष असेल तर गृह्याग्नीवर अग्नौकरण करावें असें काशिकाग्रंथीं सांगितलें आहे. कात्यायनांस अर्धाधानपक्ष हाच योग्य आहे असें वाटतें. निरग्निक असे जे कात्यायन त्यांनीं अपसव्यादिकानें पितरांकडच्या पहिल्या ब्राह्मणाचे हस्तावरच अग्नौकरण करावें. त्याविषयीं दोन पक्ष—देवांकडच्या ब्राह्मणाचे हस्तावरच सव्यानें होम करावा. अथवा अपसव्यानें, पितरांकडच्या ब्राह्मणाचे पंक्तीमध्यें पहिल्या ब्राह्मणाचे हस्तावर होम करावा; याप्रमाणें दोन पक्ष जाणावे. बह्वृचांनीं तर, पितरांकडच्या ब्राह्मणांचे हस्तावरच प्रत्येक ब्राह्मणाचे ठायीं होम करावा. वाजसनेयी यांनीं तर, एक होमच करावा असें श्राद्धकाशिकाग्रंथीं कातीयसूत्राच्या वृत्तींत सांगितलें आहे. कितीएक शिष्ट तर, 'पृष्टोदिवि' ह्या विधानेंकरून अग्नि उत्पन्न करून अग्नीमध्येंच अग्नौकरण होम करितात. साग्निक अशा सामगादिकांनीं अग्नीवर अग्नौकरण करावें. अग्नि सन्निध नसेल तर देवांकडच्या ब्राह्मणाचे हस्तावर अथवा पितरांकडचे ब्राह्मणाचे हस्तावर करावें. निरग्निक असतील तर त्यांनीं देवांकडचे ब्राह्मणाचे हस्तावरच करावें. मृतपत्नीक जो अपत्नीक यानें पहिल्या देवब्राह्मणाच्या हस्तावरच होम करावा, पितरांकडच्या ब्राह्मणाचे हस्तावर करूं नये, याप्रमाणें हा निर्णय सर्वसाधारण जाणावा.

---

अथहोमप्रकारः बह्वृचानांव्यतिषंगपक्षेग्नावग्नौकरणंकरिष्ये इतिपृष्ट्वाक्रियतामितिअनुज्ञातो गृह्यपक्वंचरुमुद्धृत्यद्विधाविभज्यापसव्येनोत्तरभागादवदानसंपदामेक्षणेऽवदायसोमायपितृमतेस्वधानमः सोमायपितृमतइदंनममेतिहोमत्यागौकृत्वादक्षिणभागात्पुनस्तथैवावदायाग्नयेकव्यवाहनायस्वधानमइति होमत्यागौकुर्यात् सव्येनापसव्येनवामेक्षणमग्नावनुप्रहरेत् यद्वा सव्येनस्वाहांतोक्तमंत्रेणाहुतिद्वयंसोमाग्न्योर्व्यत्यासेनादायजुहुयादिति कातीयानांतुगृह्ये श्रपणमकृत्वैवपचनाग्निपक्वमन्नमादायघृताक्तंकृत्वा पूर्ववत्प्रश्नानुज्ञानंतरंस्मार्तोद्यग्निंपरिस्तीर्य तिस्रः समिधआधायसव्येनाग्नयेकव्यवाहनायस्वाहासोमायपितृमतेस्वाहेतिमेक्षणेनाहुतिद्वयं जुहुयात्अपसव्येनवापाणिहोमेपीत्थमेवप्रकारऊह्योविशेषस्तूक्तः आपस्तंबानांतुआज्यभागांतेउद्ध्रियतामग्नौचक्रियतामितिप्रश्नेकाममुद्ध्रियतामितिअनुज्ञानं हिरण्यकेशीयानामुद्धरिष्याम्यग्नौकरिष्यामीतिप्रश्नः यन्मेमातेत्यादिमंत्रैःसप्तान्नाहुतयःषडाज्याहुतयइतित्रयोदशाहुतयः मंत्रास्तुविस्तरभयान्नोक्ताः हिरण्यकेशीयानामाज्यभागांतेसोमायपितृमतेइत्यादिषोडशमंत्रैः षोडशाज्याहुतयःषोडशान्नाहुतयश्चप्रतिपार्वणंबोध्याः मंत्रेषुपित्रादिपदोहआज्यान्नपदयोरूहश्चतत्तत्ग्रंथेष्वेवज्ञेयोतिविस्तृतत्वान्नोच्यते ॥

यानंतर होमाचा प्रकार सांगतों.—ऋग्वेदी यांचा व्यतिषंगपक्ष असेल तर "अग्नौ अग्नौकरणं करिष्ये" असा प्रश्न करून "क्रियतां" अशी आज्ञा ग्रहण केली होत्साता गृह्याग्नीवर पक्व झालेला चरु घेऊन त्याचे दोन भाग करून अपसव्यानें उत्तर भागांतून अव-

दानधर्मानें चरु मेक्षणावर घेऊन **"सोमायपितृमते स्वधानमः सोमायपितृमतइदंनमम"** याप्रमाणें होम व त्याग करून दक्षिणभागांतून पुनः तसेंच अवदान घेऊन **"अग्नयेकव्यवाहनाय स्वधानमः"** याप्रमाणें होम व त्याग करावे. सव्यानें अथवा अपसव्यानें मेक्षण अग्नींत टाकावें. अथवा सव्येंकरून स्वाहांत उक्तमंत्रानें दोन आहुति सोम व अग्नि यांच्या व्यत्यासानें घेऊन होम करावा. कात्यायनांनीं तर गृह्याग्नीवर चरु शिजविल्यावांचूनच पचनाग्नीवर शिजलेला चरु घेऊन त्यावर घृत घालून पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्रश्न, आज्ञा झाल्यानंतर स्मार्ताग्नीस परिस्तरणें घालून तीन समिधा हवन करून सव्येंकरून **"अग्नये कव्यवाहनाय स्वाहा, सोमाय पितृमते स्वाहा"** याप्रमाणें मेक्षणेंकरून दोन आहुति हवन कराव्या, अथवा अपसव्यानें हवन कराव्या. पाणिहोमाविषयींहि असाच प्रकार जाणावा, इतर विशेष पूर्वी सांगितला आहे. आपस्तंब जे त्यांचा तर आज्यभागांनंतर **"उद्ध्रियतां अग्नौचक्रियतां"** असा प्रश्न असतां **"काममुद्ध्रियतां"** अशी अनुज्ञा जाणावी. हिरण्यकेशीय यांचा **"उद्धरिष्याम्यग्नौकरिष्यामि"** असा प्रश्न, व **"यन्मेमाता०"** इत्यादि मंत्रांनीं सात चरूच्या आहुति व सहा आज्याच्या आहुति याप्रमाणें तेरा आहुति जाणाव्या. मंत्र तर विस्तरभयास्तव सांगितले नाहींत. हिरण्यकेशीय यांच्या, आज्यभागानंतर **"सोमायपितृमते०"** इत्यादि सोळा मंत्रांनीं सोळा आज्याहुति व सोळा अन्नाहुति अशा प्रत्येक पार्वणाविषयीं जाणाव्या. मंत्रांमध्यें पित्रादि पदांचा ऊह, आज्य व अन्न ह्या पदांचा ऊह करणें तो त्या त्या ग्रंथांत पाहावा, अतिविस्तार होईल यास्तव एथें सांगत नाहीं.

---

**अथपाणिहोमप्रकारः तत्रविप्रपाणावग्नौकरणंकरिष्येइतिप्रश्नः क्रियतामित्यनुज्ञा करिष्येइतिप्रश्नेकुरुष्वेत्यनुज्ञानभवतीतिसर्वत्राश्वलायनमतं कातीयादीनांतुभवत्येव आश्वलायन सूत्रवृत्तौतुपाणिहोमेकथमपिप्रश्नःप्रतिवचनंचनकार्यमितिद्योतितं ॥**

यानंतर पाणिहोमाचा प्रकार सांगतों.— त्या पाणिहोमामध्यें **"विप्रपाणावग्नौकरणं करिष्ये"** असा प्रश्न, **"क्रियतां"** असें अनुमोदन. **"करिष्ये"** असा प्रश्न असतां **"कुरुष्व"** असी अनुज्ञा ( अनुमोदन) होत नाहीं असें सर्वत्र आश्वलायनाचें मत जाणावें. कात्यायन इत्यादिकांचें तर होतेंच. आश्वलायनसूत्राचे वृत्तीमध्यें तर पाणिहोमाचे ठायीं कसाहि प्रश्न व प्रतिवचन हीं करूं नयेत असें प्रकाशित केलें आहे.

---

**सदर्भेपित्र्यविप्रपाणिंसव्येनपरिसमूह्यपर्युक्ष्यमेक्षणेनकरेणवापूर्ववदाहुतिद्वयंसोमायेत्यादिमंत्राभ्यांप्राचीनावीत्येवजुहुयात् तत्रकरेणहोमपक्षेवामहस्तेनदर्भेणदक्षिणकरेउपस्तीर्यदक्षिणेनद्विरवदायवामेनाभिघार्यचतुरवत्तिलादिसंपाद्यं बह्वृचानांसर्वपित्र्यकरेषुहोमएकोद्दिष्टविप्रकरेहोमःकृताकृतः होमांतेसव्येनपरिसमूहनोक्षणे पाणिहोमेमेक्षणानुप्रहरणंन केचित्पाणिहोमेपरिसमूहनादिकंमेक्षणंचनेच्छंति विप्राश्चपाणिहुतान्नंकर्त्रादेवपूर्वंसव्येनैवामांसुपक्वमितिमंत्राभिघारितेस्वस्वपात्रेसंस्थाप्यभोजनस्थानादन्यत्राचम्ययथास्थानमुपविशेयुः अग्नौकरणशेषंपिंडार्थमवस्थाप्यपित्र्यपात्रेष्वेवसर्वान्नपरिवेषणांते केचिदग्नौकरणशेषपरिवेषणोत्तरंसर्वान्नपरिवेषणमाहुः अग्नौकरणशेषंदेवपात्रेषुनदेयं कातीयानांतुसाग्नीनामग्नौहोमेदे**

वपूर्वंसर्वपात्रेषुशेषदानं निरग्नेर्देवविप्रकरेहोमेपितृपात्रेष्वेवपित्र्यकरेहोमेदेवादिसर्वपात्रेषुहु तशेषदानमितिकाशिका अन्नंपाणौहुतंयच्चयच्चान्यत्परिवेषितं एकीकृत्यैवभोक्तव्यंपृथक्भ क्षोनविद्यते बौधायनानांतुपाणिहुतेन्नेभक्षितेन्यान्नपरिवेषणमुक्तं ॥

पितरांकडचे ब्राह्मणाचा दर्भासहित हस्त सव्यानें परिसमूहन करून व पर्युक्षण करून मेक्षणानें अथवा हस्तानें पूर्वीप्रमाणें दोन आहुति "सोमाय०" इत्यादि दोन मंत्रांनीं प्राचीनावीतीनेंच हवन कराव्या. त्यामध्यें हस्तानें होम करण्याचा पक्ष असेल तर, डाव्या हस्तानें दर्भेंकरून उजव्या हस्तास घृत लावून उजव्या हस्तानें दोन वेळ चरु घेऊन डाव्या हस्तानें अभिघार करून चतुरवत्तित्व इत्यादिक करावें. ऋग्वेदी यांनीं सर्व पितरांकडच्या ब्राह्मणांचे हातांवर होम करावा. एकोद्दिष्टाचे जे ब्राह्मण त्यांचे हस्तावर होम कृताकृत आहे. होम झाल्यानंतर सव्येंकरून परिसमूहन व पर्युक्षण हीं करावीं. पाणिहोमाचे ठायीं मेक्षण व अनुप्रहरण करूं नये. कितीएक ग्रंथकार पाणिहोमामध्यें परिसमूहन इत्यादिक व मेक्षण हीं इच्छीत नाहींत. ब्राह्मणांनीं, हातावर होम केलेलें अन्न कर्त्यानें देवपूर्वक सव्येंकरूनच "आमासुपक्व०" ह्या मंत्रेंकरून अभिघार केलेल्या आपापल्या पात्रावर ठेवून भोजनस्थानाहून अन्य ठिकाणीं आचमन करून पुनः आपापल्या स्थानीं येऊन बसावें. अग्नौकरण करून शेष राहिलेलें अन्न पिंडांसाठीं ठेवून पितरांकडचे ब्राह्मणाच्या पात्रांवरच, सर्व पदार्थ वाढल्यानंतर तें वाढावें. कोणीं ग्रंथकार, अग्नौकरणाचें शेष अन्न वाढल्यानंतर इतर सर्व पदार्थ वाढावे असें ह्मणतात. अग्नौकरणाचें शेष अन्न देवांचे पात्रावर वाढूं नये. साग्निक असे कात्यायन यांनीं तर, अग्नीमध्यें अग्नौकरणहोम असतां देवपूर्वक सर्व पात्रांवर शेष अन्न वाढावें. निरग्निकास देवांकडच्या ब्राह्मणांचे हस्तावर होम असतां पितरांच्या पात्रांवरच शेषान्नदान, पितरांच्या ब्राह्मणाचे हस्तावर होम असेल तर देवादिक सर्व पात्रांवर शेषान्नदान असें श्राद्धकाशिकाग्रंथीं सांगितलें आहे. "हस्तावर जें अन्न हवन केलें तें, व दुसरें जें अन्न पात्रावर वाढलें तें असें सर्व अन्न एकत्र करूनच भक्षण करावें, निराळें भक्षण करूं नये." बौधायनशाखी यांस तर, हस्तावर हवन केलेलें अन्न भक्षण केल्यानंतर दुसरें अन्न वाढावें असें सांगितलें आहे.

---

अथपूर्वोक्तवद्देवपूर्वंघृताभिघारितपात्रेषुपूर्वोक्तहविष्यान्नपरिवेषणं स्वयंपत्नीवान्योवाकुर्यात् नापवित्रेणनैकेनहस्तेनचविनाकुशं नायसेनापिपात्रेणश्राद्धेषुपरिवेषयेत् व्यंजनादिकं पर्णाद्यंतर्हितहस्तैर्देयं दर्व्यादेयंघृतंचान्नंसमस्तव्यंजनानिच उदकंचैवपक्वान्नंनोदर्व्यातुकदाचन हस्तदत्तंतुनाश्नीयाल्लवणव्यंजनादिकं अपक्वंतैलपक्वंचहस्तेनैवप्रदीयते घृतादिपात्राणिभूमौस्थापयेन्नभोजनपात्रे ओदनेपरमान्नेचपात्रमासाद्यतत्रघृतपूरणेरुधिरतुल्यता पंक्तौविषमदातुश्च निष्कृतिर्नैवविद्यते सर्वदाचतिलाग्राह्यापितृकृत्येविशेषतः भोज्यपात्रेतिलान्दृष्ट्वानिराशाःपितरोगताः हिंगुशुंठीपिप्पलीमरीचकानिशाकादिसंस्कारार्थान्येवनतुसाक्षाद्भक्षयेत् परिवेषणकालेएवतत्सर्वप्रकारमन्नंपिंडार्थंपिंडपात्रेपरिवेषणीयमितिसागरे ॥

यानंतर पूर्वी सांगितल्याप्रमाणें देवपूर्वक, घृताचा अभिघार केलेल्या पात्रावर पूर्वी सांगितलेलें हविष्यान्न ( शुद्धान्न ) आपण, किंवा स्त्री अथवा दुसरा कोणीं यानें वाढावें. "अपवित्र हातानें, व कुशावांचून व एका हातानें, आणि लोखंडाच्या पात्रानें श्राद्धामध्यें पदार्थ वाढूं नयेत." कोशिंबिरी, चटण्या इत्यादिक पदार्थ पान इत्यादिकेंकरून अंतर्हित हस्तांनीं वाढावे. "तूप, अन्न व सर्व चटण्या, कोशिंबिरी इत्यादिक पदार्थ व उदक पळीनें वाढावें. पळीनें तर पक्वान्नें वाढूं नयेच. हातानें वाढलेले असे लवण, चटण्या, कोशिंबिरी इत्यादिक पदार्थ भक्षण करूं नयेत. अपक्व व तैलपक्व हे पदार्थ हातानेंच वाढावे." घृतादिक पदार्थांचीं पात्रें ( वाट्या, द्रोण इ० ) भूमीवर ठेवावीं, भोजनपात्रावर ठेवूं नयेत. भात व क्षीर यांत पात्र ठेवून त्या पात्रांत तूप वाढलें असतां तें रुधिरसमान होय. "पंक्तीमध्यें एकास कमी, एकास अधिक अशा भेदानें वाढणाराच्या पापाचा नाश होण्यासारखें प्रायश्चित्त नाहींच. पितृकृत्याविषयीं सर्वदा विशेषेंकरून तीळ घ्यावे. पितर भोजनाच्या पात्रावर तिळ अवलोकन करून निराश होत्साते जातात." हिंग, सुंठ, पिंपळी, मिर्च्ये हे पदार्थ, शाकादिकांचा संस्कार ह्मणजे फोडणी इत्यादिक यांत परिणाम झालेले भक्षण करावे, प्रत्यक्ष भक्षण करूं नयेत. पदार्थ वाढण्याच्या समयींच तें सर्व प्रकारचें अन्न पिंडांकरितां पिंडपात्रावर वाढावें असें श्राद्धसागरांत सांगितलें आहे.

---

अथोपवीती दैवेपात्रेपरितःकुशयवान्विकीर्य पित्र्येतुतिलान्विकीर्यान्नंगायत्र्याप्रोक्ष्यतूष्णींपरिषिच्यदक्षिणहस्तउपरिवामोधोदैवेपित्र्येतुविपरीतइत्येवंस्वस्तिकाकारकराभ्यांपात्रमालभेत् तत्रमंत्रः पृथिवीतेपात्रंद्यौरपिधानंब्राह्मणस्त्वामुखेमृतंजुहोमिब्राह्मणानांत्वाविद्यावतांप्राणापानयोर्जुहोम्यक्षितमसिमामैषांक्षेष्ठाअमुत्रामुष्मिंल्लोके इतिअयंमंत्रआपस्तंबकात्यायनादिभिर्नानाविधःपठितोयथासंप्रदायंवाच्यः इत्यभिमंत्र्यअतोदेवेतिवाइदंविष्णुरितिवाऋचमुक्त्वाविष्णोहव्यंरक्षस्वेतिपित्र्येतुकव्यंरक्षस्वेतिन्युब्जेनकरेणन्युब्जं द्विजांगुष्ठमनखमन्नेनिवेश्यप्रदक्षिणंभ्रामयेत् पित्र्येत्वप्रदक्षिणंअत्रकातीयानामपहताइतियवानांदैवेतिलानांपित्र्येपात्रपरितोविकिरणमुक्तम् ततोवामकरेणपात्रंस्पृशन्नमुकेविश्वेदेवादेवताइदमन्नंहव्यमयंब्राह्मणआहवनीयार्थेइयंभूर्गया अयंभोक्तागदाधरइदमन्नंब्रह्म इदंसौवर्णपात्रमक्षय्यवटच्छायेयंअमुकदेवेभ्यः इदमन्नंसोपस्करममृतरूपंपरिविष्टंपरिवेक्ष्यमाणंचातृप्तेःस्वाहाहव्यंनमोनमम ओंतत्सदितिसयवदर्भजलंदक्षिणकरेपात्रवामभागेभूमौक्षिपेत् एवंदैविकविप्रांतरेपि ततोयेदेवासइत्युपस्थानम् ततःपित्र्यधर्मेणपितृपात्रालंभांगुष्ठनिवेशनाद्यंतेवामेनपात्रमालभ्यपितादेवताएकविप्रत्वेपित्रादयोयथानामगोत्रादेवताइदमन्नंकव्यमित्यादि० इदंराजतंपात्रमक्षय्यवटच्छायेयंअस्मत्पित्रेमुकनामगोत्ररूपाय त्रयस्थानेविप्रैक्येस्मत्पितृपितामहप्रपितामहेभ्योमुकगोत्रनामरूपेभ्यः इदमन्नंसोपस्करममृतरूपंपरिविष्टंपरिवेक्ष्यमाणंचातृप्तेःस्वधाकव्यंनमोनमम ॐतत्सदितितिलकुशजलंपितृतीर्थेनवामकराधोनीतेनदक्षिणकरेणपात्रदक्षिणेभूमौक्षिपेत् एवमन्यत्रापियथादैवतमूहः पितृस्थानेनेकविप्रत्वेत्रिषुविप्रेषुपित्रेइत्यादिनैकवचनांतेनत्यागः एवम

**ग्रेपिग्निषुग्निषूह्यम् ततोयेचेहेतिसकृदुपस्थानम् अतिथिश्चेद्देवधर्मेणस्वेष्टदेवतायैइदमन्नमित्यादियेदेवासइत्यादि अपसव्यं देवताभ्यःपितृभ्य०सप्तव्या० अमूर्तानां०ब्रह्मार्पणं०हरिर्दाता० चतुर्भिश्च० ओंतत्सद्ब्रह्मार्पणमस्तु येषामुद्दिष्टंतेषामक्षय्याप्रीतिरस्तु इतितिलोदकमुत्सृजेत्सव्यं एकोविष्णु०अन्नहीनंक्रियाहीनंमंत्रहीनंचयद्भवेत् तत्सर्वमच्छिद्रंजायतामित्युक्त्वाविप्रैर्जायतांसर्वमच्छिद्रमित्युक्ते अनेनपितृयज्ञेनपितृरूपीजनार्दनवासुदेवःप्रीयतामितितिलकुशजलमुत्सृजेदित्याचारः ॥**

यानंतर उपवीती होत्साता दैवपात्राच्या सभोंवार कुश, यव टाकून पितरांच्या पात्रांच्या सभोंवार तिळ टाकून गायत्रीमंत्रानें अन्न प्रोक्षण करून तूष्णीं ( मंत्रविरहित ) उदक सिंचन करून उजवा हात वर, डावा हात खालीं याप्रमाणें देवांकडे, पितरांकडे तर विपरीत ह्मणजे डावा हात वर व उजवा हात खालीं याप्रमाणें स्वस्तिकाकार हातांनीं पात्र धरावें. त्याविषयीं मंत्र—“ **पृथिवी ते पात्रं द्यौरपिधानं ब्राह्मणस्त्वामुखेमृतं जुहोमि ब्राह्मणानां त्वाविद्यावतां प्राणापानयोर्जुहोम्यक्षितमसि मामैषांक्षेष्ठा अमुत्रामुष्मिंल्लोके.**” हा मंत्र आपस्तंब, कात्यायन इत्यादिकांनीं नानाविध पठण केला आहे, यास्तव जसा संप्रदाय असेल तसा ह्मणावा. याप्रमाणें अभिमंत्रण करून “**अतोदेवा०**” किंवा “**इदंविष्णु०**” यांतून एक ऋचा ह्मणून “ **विष्णोहव्यं रक्षस्व** ” याप्रमाणें देवांकडे; पितरांकडे तर, “ **कव्यंरक्षस्व**” असें ह्मणून उपड्या हस्तानें उपडा, नखवर्ज्य असा, ब्राह्मणाचा अंगुष्ठ अन्नावर ठेवून प्रदक्षिण फिरवावा. पितरांकडे तर अप्रदक्षिण फिरवावा. एथें कात्यायनांस “ **अपहता०** ” ह्या मंत्रानें यव देवांकडे, व तिळ पितरांकडे पात्राचे सभोंवार टाकण्याविषयीं सांगितलें आहे. तदनंतर डाव्या हातानें पात्राला स्पर्श करीत होत्साता “ **अमुके विश्वेदेवादेवता इदमन्नं हव्यमयं ब्राह्मण आहवनीयार्थे इयंभूर्गया अयंभोक्ता गदाधर इदमन्नं ब्रह्म इदं सौवर्णं पात्रमक्षय्यवटच्छायेयं अमुकदेवेभ्यः इदमन्नं सोपस्करममृतरूपं परिविष्टं परिवेक्ष्यमाणंचातृप्तेः स्वाहा हव्यं नमो नमम ॥ ॐतत्सत्** ” असा मंत्र ह्मटल्यानंतर यव, दर्भ यांसहित उदक, उजव्या हातानें पात्राच्या डाव्या भागीं भूमीवर सोडावें. याप्रमाणें देवांकडचे दुसऱ्या ब्राह्मणांविषयींहि असेंच करावें. तदनंतर “ **येदेवास०** ” ह्या मंत्रानें प्रार्थना करावी. तदनंतर पित्र्यधर्मेंकरून पितरींच्या पात्रांचें आलंभन ( धारण ) व अंगुष्ठनिवेशन ( आंगठा ठेवणें ) एथपर्यंत कर्म झाल्यानंतर डाव्या हातानें पात्र धरून “ **पितादेवता** ” असा ऊह, एक ब्राह्मण असतां “**पित्रादयो यथानामगोत्रादेवता इदमन्नंकव्यं इत्यादि० इदंराजतंपात्रमक्षय्यवटच्छायेयं अस्मत्पित्रेमुकनामगोत्ररूपाय०**” असा ऊह, त्रयीच्या स्थानीं एक ब्राह्मण असेल तर “**अस्मत्पितृपितामहप्रपितामहेभ्योमुकगोत्रनामरूपेभ्यः इदमन्नं सोपस्करममृतरूपं परिविष्टंपरिवेक्ष्यमाणं चातृप्तेः स्वधा कव्यं नमोनमम ॐतत्सत्**” असा मंत्र ह्मटल्यावर तिळ, कुश व उदक पितृतीर्थेंकरून, डाव्या हाताच्या खालीं केलेल्या उजव्या हातानें पात्राच्या दक्षिणभागीं भूमीवर सोडावें. याप्रमाणें दुसरीकडेहि जसें दैवत असेल तसा ऊह करावा. पितृस्थानीं अनेक ब्राह्मण असतील तर तीन तीन ब्राह्मणांचे ठायीं “ **पित्रे** ”

इत्यादि एकवचनांतेंकरून त्याग करावा, व याप्रमाणें पुढेंहि तीन तीन ब्राह्मणांचे ठायीं असेंच जाणावें. तदनंतर "येचेह०" या मंत्रेंकरून एक वेळ प्रार्थना करावी. अतिथि असेल तर देवधर्मेंकरून "स्वेष्टदेवतायै इदमन्नं" इत्यादिक ह्मणून "येदेवास०" इत्यादिक मंत्र ह्मणावा. तदनंतर अपसव्य करून "देवताभ्यः पितृभ्य० सप्तव्या० अमूर्तानां० ब्रह्मार्पणं० हरिर्दाता० चतुर्भिश्च० ॐतत्सद्ब्रह्मार्पणमस्तु ॥ येषामुद्दिष्टं तेषामक्षय्या प्रीतिरस्तु" असे मंत्र ह्मणून तिळोदक सोडावें. नंतर सव्य करून "एकोविष्णु० अन्नहीनंक्रियाहीनं मंत्रहीनंचयद्भवेत् ॥ तत्सर्वमच्छिद्रं जायतां" असें ह्मणून ब्राह्मणांनीं "जायतां सर्व मच्छिद्रं" असें प्रतिवचन दिल्यावर "अनेन पितृयज्ञेन पितृयज्ञरूपी जनार्दनवासुदेवः प्रीयतां" असें ह्मणून तिळ, कुश यांसहित उदक सोडावें, असा हा आचार आहे.

---

केचिद्ब्रह्मार्पणमित्यादिसंकल्पोत्सर्गेसव्यमेकोविष्णुरित्यादावपसव्यंकुर्वंति तत्रब्रह्मार्पणेतिएकोविष्णुरित्यनयोःसंकल्पयोर्विभागेसव्यापसव्यविभागेच प्रत्यक्षवचनानुपलंभाद्यथाचारंकार्यं अकृतेसंकल्पेन्नंविप्रानस्पृशेयुः ईशानवि०गयायै०गदाधराय० पुंडरीकाक्षा०इतिनत्वापितृपूर्वविप्रकरेषुजलेदत्तेविप्रास्तेनान्नंप्रोक्ष्यत्रिर्गायत्र्याभिमंत्रयेयुः कर्तासव्येनपितृपूर्वकमापोशनार्थमुदकंदत्वासव्याहृतिकांगायत्रींत्रिः सकृद्वामधुवाताइतितृचमुक्त्वामधुमधुमध्वितित्रिरुक्त्वा ॐतत्सद्यथासुखंजुषध्वमितिवदेत् विप्राश्चबलिदानवर्ज्यंनित्यवदापोशनंकृत्वा कर्त्राश्रद्धायांप्राणेनिविष्टोमृतंजुहोमिशिवोमाविशाप्रदाहायप्राणायस्वाहेत्यादिपंचमंत्रेषूच्यमानेषुपंचप्राणाहुतीःकृत्वा ब्रह्मणिमआत्मामृतत्वायेत्युच्यमानेषष्ठींकुर्युः ॥

कितीएक शिष्ट "ब्रह्मार्पणं०" इत्यादिक संकल्पाचे उत्सर्गाविषयीं सव्य, व "एकोविष्णु०" इत्यादिकाविषयीं अपसव्य करितात. त्यामध्यें "ब्रह्मार्पणं० व एकोविष्णु०" ह्या दोन संकल्पांच्या विभागाविषयीं ह्मणजे हे दोन संकल्प निरनिराळे करावे याविषयीं व सव्य आणि अपसव्य हीं दोहोंकडे निरनिराळीं करावीं याविषयीं प्रत्यक्ष वचन मिळत नाहीं यास्तव जसा आचार असेल तदनुरूप करावें. संकल्प केल्यावांचून ब्राह्मणांनीं अन्नास स्पर्श करूं नये. "ईशानवि० गयायै० गदाधराय० पुंडरीकाक्षाय०" याप्रमाणें नमस्कार करून पितृपूर्वक ब्राह्मणांच्या हातांवर उदक द्यावें. नंतर ब्राह्मणांनीं त्या उदकेंकरून अन्नाचें प्रोक्षण करून तीन वेळ गायत्रीमंत्रानें अभिमंत्रण करावें. कर्त्यानें सव्येंकरून आपोशनाकरितां पितृपूर्वक उदक देऊन व्याहृतिसहित गायत्रीमंत्र तीन वेळ अथवा एक वेळ ह्मणून "मधुवाता०" ह्या तीन ऋचा ह्मणून "मधु मधु मधु" असें तीन वेळ ह्मणून "ॐ तत्सद्यथासुखं जुषध्वं" असें ह्मणावें. ब्राह्मणांनीं बलिदान ह्मणजे चित्राहुति वर्ज्य करून नित्याप्रमाणें आपोशन घ्यावें. कर्ता "श्रद्धायां प्राणेनिविष्टोमृतंजुहोमि ॥ शिवोमाविशाप्रदाहाय प्राणायस्वाहा" इत्यादि पांच मंत्र पठण करीत असतां ब्राह्मणांनीं पांच प्राणाहुति घेऊन "ब्रह्मणिमआत्मामृतत्वाय०" असा मंत्र ह्मटल्यानंतर सहावी आहुति घ्यावी.

---

ततोमौनिनोमुखशब्दंचापल्यंवर्जयंतःसशेषंभुंजीरन् दधिक्षीरघृतपायसानितुनिःशेषम् आपोशनकरेविप्रेसंकल्पाच्छिद्रभाषणात् निराशाःपितरोयांति आपोशनंदक्षिणभागेकार्यंन तुवामभागे पुनरापूर्यापोशनंसुरापानसमम् आपोशनमकृत्वान्नंमर्दयेन्नैवकर्हिचित् विप्रैर्बलि दानंनकार्यं केचिदाज्येनकुर्वंति तन्न पायसाज्यमाषान्नैर्बलिदाननिषेधात् विप्राश्चवामकरेणा न्नंनस्पृशेयुर्नपदाभाजनंस्पृशेयुःसंपादितमेववस्तुकरादिनायाचेयुर्नासंपादितम् अन्नगुणदोषान्न कीर्तयेयुः कर्ताचानिषिद्धान्नंभोक्तुःपितुश्चात्मनश्चप्रियंप्रयच्छन्तत्तदन्नमाधुर्यादिगुणकीर्तनेन प्ररोचयन्ददामीत्यवदन्याचितं यच्छन्भुंजानानपश्यन्हविर्गुणानपृच्छन्दैन्याश्रुपातक्रोधादि कमकुर्वन्जलंपाययन्शनैर्भोजयेत् उच्छिष्टाःपितरोयांतिपृच्छतोलवणादिकं ॥

तदनंतर मौनधारी, मुखशब्द, चापल्यरहित अशा ब्राह्मणांनीं सशेष ( पात्रावर शेष ठेवून) भोजन करावें. दहीं, दूध, घृत आणि पायस हे पदार्थ सर्व भक्षण करावे. "ब्राह्मणानें स्वयें आपोशन घेणें, संकल्प (ब्रह्मार्पणं०, एकोविष्णु०) हा करणें आणि छिद्र[1]भाषण करणें ह्या तीन कृत्यांपासून पितर निराश होत्साते जातात." आपोशन करणें तें दक्षिणभागीं करावें, वामभागीं करूं नये. आपोशनाकरितां उदक घेणें तें एकदांच पूर्ण घ्यावें, पुनः पूर्ण केलें असतां तें सुरापानसम होतें. "आपोशन घेतल्यावांचून कदापि अन्न मर्दन करूं नये." ब्राह्मणांनीं चित्राहुति घालूं नयेत. कितीएक घृताच्या चित्राहुति घालितात, परंतु तें योग्य नाहीं; कारण, पायस, घृत आणि माषान्न यांच्या आहुति घालण्याविषयीं निषेध आहे. ब्राह्मणांनीं डाव्या हातानें अन्नास स्पर्श करूं नये, व पायानें पात्रास स्पर्श करूं नये. सिद्ध केलेले पदार्थ असतील तेच, हात इत्यादिक खुणेनें मागावे; सिद्ध नसतील ते मागूं नयेत. अन्नाचे गुणदोष बोलूं नयेत. कर्त्यानें निषिद्ध नव्हत असे पदार्थ भोक्ता, पिता आणि आपण यांस प्रीतिकारक असे द्यावे, व त्या त्या अन्नाचे माधुर्यादिक जे गुण त्यांच्या कथनेंकरून रुचि उत्पन्न करीत होत्साता देतों असें न बोलतां जें मागतील तें द्यावें; भोजन करणाराकडे पाहूं नये; पदार्थांचे गुण विचारूं नये; दैन्य, अश्रुपात, क्रोधादिक करूं नये; उदक प्राशनार्थ देत होत्साता सावकाश असें ब्राह्मणास जेववावें. "लवणादिक पदार्थ 'पाहिजेत' असें विचारिलें असतां त्याचे पितर उच्छिष्ट होत्साते जातात."

---

अथसव्येनैवसव्याहृतींगायत्रींत्रिरुक्त्वापौरुषंसूक्तं कृणुष्वपाजोरक्षोहणमित्याद्यारक्षो घ्नीःपितृलिंगकानिंद्रेशसोमसूक्तपावमानीसूक्तानि अप्रतिरथसंज्ञमाशुःशिशानसूक्तम्विष्णुब्र ह्मरुद्रार्कस्तोत्रादिकंभोक्तृविप्रान्श्रावयेत् असंभवेगायत्रीजपंकुर्यात् वीणावंशध्वनिंचापि विप्रेभ्यःसन्निवेदयेत् मंडलब्राह्मणंपाठ्यंनाचिकेतत्रयंतथा त्रिमधुत्रिसुपर्णंचपावमानयजूंषिच आशुःशिशानसूक्तंचअग्नयेकव्यवाहनं प्रौढपादोबहिःकक्षोबहिर्जानुकरोपिवा अंगुष्ठेन विनाभातिमुखशब्देनवापुनः पीतावशिष्टतोयानिपुनरुद्धृत्यवापिबेत् खादितार्धंपुनःखादेन्मो दकादिफलादिकम् मुखेनवाधमेदन्नंनिष्ठीवेद्भाजनेपिच इत्थमश्नन्द्विजःश्राद्धंहत्वागच्छत्यधो

[1] छिद्रभाषण ह्मणजे पाकसंबंधी दोषोत्कीर्तन (खारट, तिखट इत्यादिक ).

गतिम् श्राद्धपंक्तौतुभुंजानोब्राह्मणोब्राह्मणंस्पृशेत् तदन्नमत्यजन्भुक्त्वागायत्र्यष्टशतंजपेत् पात्रे विप्रांतरोच्छिष्टसंसर्गेतन्निरस्य हस्तंप्रक्षाल्यभुक्त्वास्नात्वाद्विशतंजपेत् उच्छिष्टभोजनेसहस्रं जपेत् भुंजानेषुतुविप्रेषुप्रमादात्स्रवतेगुदम् पादकृच्छ्रंततःकृत्वाअन्यंविप्रंनियोजयेत् ॥

यानंतर सव्येंकरूनच व्याहृतिसहित गायत्री तीन वेळ ह्मणून पुरुषसूक्त, "कृणुष्वपाजः०" आणि "रक्षोहणं०" इत्यादिक राक्षोघ्नी ऋचा, पितर आहे लिंग ज्यांचें असीं इंद्र, ईश व सोम यांचीं सूक्तें; पावमानीसूक्तें; अप्रतिरथसंज्ञक "आशुःशिशान०" सूक्त; विष्णु, ब्रह्मा, रुद्र आणि अर्क यांचीं स्तोत्रें इत्यादिक भोजनकर्त्या ब्राह्मणाकडून श्रवण करवावीं. इतकीं सूक्तें श्रवण करविण्याचा असंभव असेल तर गायत्रीमंत्राचा जप करावा. "वीणा, मुरली ( पांवा ) यांचा ध्वनि ब्राह्मणांस श्रवण करवावा. मंडलब्राह्मण, नाचिकेत तीन वल्ली, त्रिमधु, त्रिसुपर्ण, पावमान असीं यजुर्वेदांतील सूक्तें; आशुःशिशानसूक्त, अग्नयेकव्यवाहन हीं सूक्तें श्रवण करवावीं." "पायांवर पाय चढवीत होत्साता, कक्षा बाहेर करीत ह्मणजे आसन मर्यादा सोडीत असतां, जानूच्या बाहेर हस्त ज्याचे असा, अंगुष्ठावांचून केवल अंगुलींनीं खातो, अथवा मिटक्या मारीत भोजन करितो व एक वेळ उदकपान करून पात्रांत शेष राखलेलें पुनः घेऊन पान करितो, मोदकादिक व फलादिक पदार्थ अर्धा भक्षण करून पात्रावर ठेवून जर तो पुनः भक्षण करील, अथवा मुखानें अन्नावर फुंकर मारील किंवा पात्रांत थुंकी टाकील अशा प्रकारें ब्राह्मण भोजन करील तर तो तें श्राद्ध व्यर्थ करून अधोगतीस जातो." श्राद्धपंक्तींत ब्राह्मण भोजन करणारा जर दुसऱ्या ब्राह्मणास स्पर्श करील तर तें त्यानें पात्रावरचें अन्न न टाकितां भोजन करून १०८ गायत्रीजप करावा. भोजनपात्रांत दुसऱ्या ब्राह्मणाचे उच्छिष्टाचा संसर्ग झाला असतां तें अन्न टाकून हात धुवून भोजन करून स्नान करावें, आणि दोनशें गायत्रीजप करावा. उच्छिष्टान्न भक्षण केलें असतां सहस्र गायत्रीजप करावा. "ब्राह्मण भोजन करीत असतां प्रमादेंकरून जर गुदस्राव होईल तर पादकृच्छ्र करून दुसरा ब्राह्मण श्राद्धीं बसवावा."

---

अथविप्रवमने तत्रपित्रादिविप्रवमनेलौकिकाग्निस्थापनचरुनिर्वापाज्यभागांतेनामगोत्रपूर्वकमग्नौपितॄनावाह्यवैश्वदेविकवमनेदेवानावाह्यसंपूज्यान्नत्यागंकृत्वा प्राणायस्वाहेत्यादिमंत्रैर्द्वात्रिंशदाहुतीर्जुहुयात्पुनःश्राद्धंवाकुर्यादितिपक्षद्वयम् पक्षद्वयेपींद्रायसामेतिसूक्तजपोनित्यः अनयोःपक्षयोर्व्यवस्थोच्यते वैश्वदेविकविप्रवमनेहोमएवनपुनःश्राद्धंपित्र्यविप्रेष्वपिपिंडदानोत्तरंवांतौहोमएवनपुनःश्राद्धं पिंडदानात्प्राक्पित्र्यविप्रवांतौतद्दिनेउपवासंकृत्वापरेद्युःपुनःश्राद्धंकार्यं इदंसपिंडीकरणमहैकोद्दिष्टमासिकाब्दिकप्रत्याब्दिकश्राद्धेष्वेव दर्शादौतुवमनेतद्दिनेएवामेनश्राद्धंकार्यं एवमष्टकान्वष्टकापूर्वेद्युःश्राद्धेष्वपि तत्रामश्राद्धे साग्नेर्बह्वृचस्यन्वतिषंगादियथोक्तप्रयोगासंभवात्सांकल्पिकविधिनादर्शान्वष्टकापूर्वेद्युःश्राद्धान्यामेनकार्याणि तत्तल्लोपप्रायश्चित्तंवानिबंधोक्तंकर्तव्यमितिभाति वृद्धिश्राद्धेपिंडरहितसंक्रांत्यादिश्राद्धेनित्यश्राद्धेचवमनेआवृत्तिरेव तीर्थश्राद्धेदर्शवदामेनैव महालयश्राद्धेपार्वणस्थानीयविप्रवमनेपुनरा

**वृत्तिः एकोद्दिष्टस्थानीयविप्रवमनेहोमएवेतिभाति वैश्वदेविकविप्रवमनेसर्वश्राद्धेषुहोमए वेत्युक्तमेव होमपक्षेआवृत्तिपक्षेचसर्वत्रसूक्तजपोनित्यइत्यप्युक्तम् ॥**

**यानंतर ब्राह्मणास वमन झालें असतां कर्तव्यविधि.**–त्यामध्यें पिता इत्यादिक ब्राह्मणास वांति झाली असतां लौकिक अग्नि स्थापन करून चरूचा निर्वाप, आज्यभाग एथपर्यंत कर्म करून नामगोत्रपूर्वक अग्नीमध्यें पितरांचें आवाहन करावें. विश्वेदेवांकडच्या ब्राह्मणास वांति झाली असतां देवांचें आवाहन करावें. नंतर पूजा करून देवतोद्देशानें अन्नत्याग करून "प्राणाय स्वाहा" इत्यादिक मंत्रांनीं बत्तीस आहुतींनीं हवन करावें, अथवा पुनःश्राद्ध करावें, याप्रमाणें दोन पक्ष आहेत. दोनहि पक्षीं "इंद्राय साम०" ह्या सूक्ताचा जप नित्य आहे. **ह्या दोन पक्षांची व्यवस्था सांगतों**—वैश्वदेवांकडच्या ब्राह्मणास वांति झाली असतां होमच करावा, पुनः श्राद्ध करूं नये. पितरांकडच्या ब्राह्मणांसहि पिंडदानानंतर वांति झाली असतां होमच करावा, पुनः श्राद्ध करूं नये. पिंडदानाच्या पूर्वी पितरांकडच्याहि ब्राह्मणास वांति झाली असतां त्या दिवशीं उपवास करून दुसऱ्या दिवशीं पुनः श्राद्ध करावें, व हा निर्णय सपिंडीकरण, महैकोद्दिष्ट, मासिक, आब्दिक आणि प्रतिसांवत्सरिक ह्या श्राद्धांविषयींच जाणावा. दर्शादिक श्राद्धीं तर वांति झाली असतां त्याच दिवशीं आमेंकरून श्राद्ध करावें. याप्रमाणें अष्टका, अन्वष्टका आणि पूर्वेद्युःश्राद्ध यांविषयींहि असाच निर्णय जाणावा. त्यामध्यें साग्निक ऋग्वेदी यांस आमश्राद्धांत व्यतिषंगादि यथोक्त प्रयोगाचा संभव नसल्यामुळें सांकल्पिक विधीकरून दर्श, अष्टका अन्वष्टका, आणि पूर्वेद्युःश्राद्ध हीं आमेंकरून करावीं, अथवा त्या त्या श्राद्धाचे लोपाचें प्रायश्चित्त, निबंधांत सांगितलेलें करावें असें वाटतें. वृद्धिश्राद्ध, पिंडरहित संक्रांत्यादिक श्राद्ध व नित्यश्राद्ध यांमध्यें वांति झाली असतां आवृत्तिच करावी. तीर्थश्राद्ध असेल तर दर्शाप्रमाणें आमान्नेंकरूनच करावें. महालयश्राद्धीं पार्वणस्थानींच्या ब्राह्मणास वांति झाली असतां श्राद्धाची पुनरावृत्ति करावी. एकोद्दिष्टस्थानींच्या ब्राह्मणास वांति झाली असतां होमच करावा असें वाटतें. देवांकडच्या ब्राह्मणास वांति झाली असतां सर्व श्राद्धामध्यें होमच करावा, असें पूर्वी सांगितलेंच आहे. होमपक्षीं व पुनः श्राद्ध करावें यापक्षीं सर्वत्र सूक्ताचा जप नित्य असेंहि सांगितलें आहे.

---

**भोजनांतेप्राचीनावीती तृप्ताःस्थेतिविप्रान्पृष्ट्वा तृप्ताःस्मइतिप्रत्युक्तोगायत्रींमधुवाताइतितृचमक्षन्नमीतिचश्रावयित्वा अथवाक्षन्नमीत्येतदंतेतृप्तिप्रश्नंकृत्वाश्राद्धंसंपन्नमितिपृष्ट्वासुसंपन्नमित्युक्तः परिवेषणकालेनुद्धरणेधुनापिंडार्थंसर्वान्नादुद्धृत्यविकिरार्थंचोद्धृत्य अन्नशेषैश्चकिंकार्यमितिपृच्छेत्तुसद्विजान् तेइष्टैःसहभोक्तव्यमितिप्रत्युक्तिपूर्वकं प्रदद्युःसकलंतस्मैस्वीकुर्युर्वा यथारुचि कातीयैस्तुतृप्तान्ज्ञात्वावक्ष्यमाणप्रकारेणविकिरंदैवेपित्र्येचदत्वाविप्रेभ्यः पितृपूर्वकंसकृदपोदत्वागायत्रींमधुमतीश्चश्रावयित्वातृप्तिप्रश्नःसंपत्तिप्रश्नश्चकार्यः एवंशाखांतरेप्युत्तरापोशनात्पूर्वमेवविकिरदानं बह्वृचानांतुपिंडांतेएवविकिरः हिरण्यकेशीयैराचांतेउक्तः ॥**

याप्रमाणें ब्राह्मणांचें भोजन झाल्यानंतर प्राचीनावीती होत्साता "तृप्ताः स्थ" असें ब्राह्मणांस विचारून "तृप्ताः स्मः" असें ब्राह्मणांनीं प्रतिवचन दिल्यानंतर गायत्री, "मधुवा-

ता०" ह्या तीन ऋचा, आणि "अक्षन्नमी०" हे मंत्र श्रवण करवावे. अथवा "अक्षन्नमी० " ही ऋचा ह्मटल्यानंतर तृप्तिप्रश्न करून "श्राद्धं संपन्नं" असें विचारून "सुसंपन्नं" असें प्रतिवचन दिल्यानंतर, पात्रें वाढण्याच्या समयीं पिंडांकरितां अन्न काढून ठेवलें नसेल तर या वेळीं पिंडांकरितां व विकिरांकरितां सर्व अन्नांतून अन्न काढून ठेवावें. "अन्नशेषेंकरून काय करावें असें कर्त्यानें ब्राह्मणास विचारावें. नंतर त्या ब्राह्मणांनीं इष्टांसहवर्तमान भोजन करावें असें प्रतिवचन पूर्वी देऊन सर्व अन्न त्या श्राद्धकर्त्यास द्यावें, अथवा आपण घ्यावें, याप्रमाणें यथारुचि करावें." कात्यायनांनीं तर ब्राह्मण तृप्त झाले असें जाणून पुढें सांगावयाचा जो प्रकार तेणेंकरून विकिर देवांकडे व पितरांकडे देऊन ब्राह्मणांस पितृपूर्वक एकवार उदक देऊन गायत्री व मधुमती ऋचा हे मंत्र श्रवण करवून तृप्तिप्रश्न व संपत्तिप्रश्न करावे. याप्रमाणें अन्यशाखेचे ठायींहि उत्तरापोशनाच्या पूर्वीच विकिर द्यावा. ऋग्वेदी यांनीं तर, पिंडदानानंतरच विकिर द्यावा. हिरण्यकेशीय यांनीं ब्राह्मणांनीं आचमन केल्यानंतर विकिर द्यावा.

---

**ततउच्छिष्टभाग्भ्योन्नंदीयतामित्युक्ताविप्राः पात्रस्थंभुक्तशेषंदैविकंदक्षिणेपैतृकंवामेबहिःकृत्यपितृपूर्वंदत्तमुत्तरापोशनममृतापिधानमसीतिकुर्युः पिंडदानंत्वाचांतेनाचांतेषुवाविप्रेषुकार्यं विप्राश्चमुखप्रक्षालनपूर्वकहस्तप्रक्षालनादिशरावादौकुर्युर्नकांस्यताम्रपात्रयोःशुद्धोदकेनाचम्यकयानइतितृचंजपेयुः ॥**

तदनंतर "उच्छिष्टभाग्भ्योन्नंदीयतां" असें ब्राह्मणांस सांगितल्यानंतर ब्राह्मणांनीं भोजन करून शेष राहिलेलें पात्रावरचें अन्न देवांकडच्या ब्राह्मणांनीं पात्राच्या दक्षिणभागीं व पितरांच्या ब्राह्मणांनीं पात्राच्या वामभागीं बाहेर ठेवून पितृपूर्वक दिलेलें आपोशन "अमृतापिधानमसि " या मंत्रानें घ्यावें. पिंडदान करणें तें तर, ब्राह्मणांनीं आचमन केल्यानंतर किंवा आचमनाच्या पूर्वी करावें. ब्राह्मणांनीं मुखप्रक्षालनपूर्वक हस्तप्रक्षालनादिक करणें तें शराव ( मृत्तिकापात्र ) इत्यादि पात्रांत करावें, कांस्यपात्रांत किंवा तांब्याच्या पात्रांत करूं नये. शुद्ध उदकानें आचमन करून "कयान० " ह्या ऋचेचा जप करावा.

---

**अथपिंडदानं तच्चार्चनोत्तरमग्नौकरणोत्तरंभोजनोत्तरंविकिरोत्तरंस्वधावाचनोत्तरंविप्रविसर्जनोत्तरमितिषट्पक्षाःस्मृत्युक्ताः तेषांशाखाभेदेनव्यवस्थेतिसिंधुः तत्राश्वलायनानांभुक्तवत्स्वनाचांतेष्वाचांतेषुवाविप्रेषुपिंडदानंततोविकिरः आपस्तंबहिरण्यकेशीयादीनांविप्रविसर्जनांतेपिंडदानं कातीयानांविकिरोत्तरमाचांतेष्वनाचांतेषुवा तत्राग्निहोमेग्निसमीपेपाणिहोमेविप्रसमीपेबह्वृचानांपिंडदानं अन्येषांप्रायोविप्रसमीपएव तत्रद्विजोच्छिष्टादुत्तरतोव्याममात्रेरत्निमात्रेवापिंडदानंसंकल्प्यबह्वृचानामेककरेणान्येषांकराभ्यांधृतेनस्फ्येनखादिरकाष्ठेनदर्भमूलेनवापहताअसुराइतिमंत्रंप्रतिलेखंपठन्आग्नेय्यग्रंप्रत्यगपवर्गंपार्वणसंख्ययारेखामेकांद्वित्र्यादिकांवोल्लिख्य प्रत्येकमभ्युक्षेत् पिंडसंकल्पेरेखाकरणेचसव्यापसव्ययोर्विकल्पः अत्रकातीयैर्येरूपाणीतिमंत्रेणाग्नौकरणाग्नेरुल्मुकंरेखादक्षिणतोनिधेयं रेखासुसकृदा**

च्छिन्नंबर्हिर्दक्षिणाग्रमास्तीर्यशुंधंतांपितरःशुंधंतांपितामहाइत्यादिमंत्रैस्तिलोदकंबर्हिष्यासिंचेत् अत्रकातीयानांपितरमुकनामगोत्रावनेनिंक्ष्वेत्यादिमंत्राः अन्येषांमार्जयंतांपितरःसोम्यासइत्यादयोमंत्राः ॥

यानंतर पिंडदान सांगतों.—पिंडदान करावयाचें तें ब्राह्मणाची पूजा केल्यानंतर, अग्नौकरणानंतर, भोजनानंतर, विकिर दिल्यानंतर, स्वधावाचनानंतर, अथवा ब्राह्मणांचें विसर्जन केल्यानंतर करावें, याप्रमाणें सहा पक्ष स्मृतींत सांगितले त्यांची व्यवस्था शाखापरत्वें जाणावी असें निर्णयसिंधूंत सांगितलें आहे. त्यामध्यें आश्वलायनांनीं, ब्राह्मण जेवले असतां, आचमनाच्या पूर्वीं किंवा आचमन केल्यानंतर पिंडदान करून विकिर द्यावा. आपस्तंब, हिरण्यकेशीय इत्यादिकांनीं, ब्राह्मणांचें विसर्जन केल्यानंतर पिंडदान करावें. कात्यायनांनीं विकिर दिल्यानंतर आचमन करून अथवा आचमनाच्या पूर्वीं पिंडदान करावें. त्यामध्यें ऋग्वेदी यांनीं अग्नींत अग्नौकरण केलें असतां अग्नीच्या सन्निध, पाणिहोम असेल तर ब्राह्मणाच्या सन्निध पिंडदान करावें. अन्यशाखी यांनीं बहुधा ब्राह्मणाच्या सन्निधच करावें. त्यामध्यें ब्राह्मणाच्या उच्छिष्टापासून उत्तरेकडे चार हस्तप्रमाण, अथवा अरत्निप्रमाण (विस्तृत जी कनिष्ठांगुलि तिनें युक्त जी मुष्टि तद्युक्त जो हात तो) प्रदेशीं पिंडदानाचा संकल्प करून ऋग्वेदी यांनीं एका हस्तानें, अन्यशाखी यांनीं दोन हस्तांनीं धारण केलेला जो खैराच्या काष्ठाचा स्फ्य (खड्ग) तेणेंकरून अथवा दर्भमूलेंकरून "अपहता असुरा०" हा मंत्र प्रत्येक रेषेस पठण करीत होत्साता आग्नेयीस अग्रें होत व पश्चिमेस समाप्ति होईल ह्मणजे पश्चिमसंस्थ अशा, जितकीं पार्वणें असतील तत्संख्याक एक, दोन अथवा तीन इत्यादिक रेषा काढून प्रत्येक रेषेस उदक सिंचन करावें. पिंडसंकल्प व रेखाकरण यांविषयीं सव्य व अपसव्य यांचा विकल्प आहे. ह्या स्थलीं कात्यायनांनीं "येरूपाणि०" ह्या मंत्रानें अग्नौकरणाग्नीचें कोलीत रेषेच्या दक्षिण प्रदेशीं ठेवावें. रेखांवर एक वेळ छिन्न केलेला बर्हि (दर्भमुष्टि) दक्षिण दिशेस अग्रें होतील असा पसरून "शुंधंतां पितरः शुंधंतां पितामहाः" इत्यादि मंत्रांनीं तिळोदक त्या दर्भबर्हींवर सिंचन करावें. ह्या स्थलीं कात्यायनांस "पितरमुकनामगोत्रावनेनिंक्ष्व०" इत्यादिक मंत्र आहेत. इतरशाखी यांस "मार्जयंतां पितरः सोम्यास०" इत्यादिक मंत्र आहेत.

---

अग्नौकरणशेषयुतसर्वान्नेनमधुसर्पिस्तिलमिश्रेणपिंडान्पत्न्याकारयित्वारेखायांपराचीनपाणिनापितृतीर्थेनपित्रादिभ्योदद्यात् एतत्तेऽस्मत्पितर्येथानामगोत्रंरूपयेचत्वामत्रानुपित्रे अमुकनामगोत्ररूपायायंपिंडःस्वधानमस्तेभ्यश्चगयायांश्रीरुद्रपदेदत्तमस्त्वित्यादिमंत्रैरूहेण अत्रकेषांचित्पिंडपात्रावनेजनंपात्रन्युब्जीकरणंच केचित्पिंडेषुमाषान्नंवर्जयंति ततोलेपभाक्तृप्तयेहस्तलेपंपिंडदर्भमूलेषुनिमृज्यात्रपितरोमादयध्वं यथाभागमावृषायध्वमितिपिंडान्सकृदनुमंत्र्यसव्यपार्श्वेनोदङ्ङावृत्त्ययथाशक्तिप्राणान्नियम्य पर्यावृत्त्यामीमदंतपितरइतितथैवानुमंत्र्य सव्येनपिंडशेषमाघ्रायाचम्यान्यपवित्रेधृत्वापसव्येनशुंधंतामित्यादियथासूत्रंजलनिनयनंपूर्ववत्कुर्यात् अत्रभुक्तशेषान्नाभावेद्रव्यांतरेणपिंडदानंकार्यं कपित्थबिल्वकुक्कुटांडामलकबदराणांमध्येशक्तितोन्यतमप्रमाणाःपिंडाःकेचित्पार्वणपिंडत्रयेयथोत्तरंप्रमाणाधिक्यमाहुः तथा

**हस्तलेपाभावेपिदर्भेषुहस्तंनिमृज्यादेवेतिमेधातिथिः एकोद्दिष्टश्राद्धेषुदर्भलेपोनेतिसुमंतुः अत्रनीवींविस्रस्याभ्यंजनादीतिकेचित् पिंडपूजनांतेउपस्थानात्प्राक्नीवीविस्रंसइतिसागरे ॥**

---

अग्नौकरणाचे शेषासहित सर्व अन्नांत मध, घृत, तीळ, हे मिश्रित करून त्या अन्नाचे पिंड स्त्रीकडून करवून ते रेखेवर पराचीन ( उतरत्या ) हातानें पितृतीर्थेंकरून पिता इत्यादिकांस द्यावे. त्याचा मंत्र–**"एतत्तेऽस्मत्पितर्यथानामगोत्ररूप येचत्वामत्रानुपित्रे अमुकनामगोत्ररूपायायंपिंडः स्वधानमस्तेभ्यश्च गयायांश्रीरुद्रपदे दत्तमस्तु"** इत्यादि मंत्रेंकरून ऊहानें द्यावे. ह्या पिंडदानीं कितीएकांस पिंडपात्र प्रक्षालन करणें, व पात्र उपडें करणें हीं सांगितलीं आहेत. कितीएक शिष्ट पिंडांविषयीं माषान्न वर्ज्य करितात. तदनंतर लेपभाक् जे त्यांच्या तृप्तीसाठीं हस्तलेप, पिंडांच्या दर्भाचे मूलांचे ठायीं पुसून **"अत्र पितरो मादयध्वं यथाभागमावृषायध्वं"** असा मंत्र ह्मणून पिंडांचें एकवार अनुमंत्रण करून उजव्या पार्श्वभागानें उत्तरेकडे वळून यथाशक्ति प्राणांचा रोध करून पुनः फिरून **"अमीमदंतपितर०"** हा मंत्र ह्मणून तसेंच अनुमंत्रण करून सव्यानें पिंडशेष हुंगावें. नंतर आचमन करून दुसरीं पवित्रकें धारण करून अपसव्यानें **"शुंधंतां०"** इत्यादि जसें सूत्र असेल तदनुसार उदक सिंचन पूर्वीसारखें करावें. ह्या पिंडदानाविषयीं, ब्राह्मणांनीं भोजन करून जर अन्न शेष नसेल तर दुसऱ्या द्रव्यानें पिंडदान करावें. कवठीफळ, बेलफळ, कुक्कुटांड, आंवळा, बोर यांमध्यें यथाशक्तीकरून कोणत्या एका प्रमाणाचे पिंड करावे. कोणी ग्रंथकार, त्रयीच्या तीन पिंडांविषयीं पहिल्यापेक्षां दुसरा मोठा असें उत्तरोत्तर अधिक प्रमाण सांगतात. तसेंच हस्तलेपाचा अभाव असेल तथापि दर्भाचे ठायीं हस्त पुसावाच असें मेधातिथि सांगतो. एकोद्दिष्ट श्राद्धांचे ठायीं हस्तलेप नाहीं असें सुमंतु सांगतो. एथें नीवीचा विस्रंस करून अभ्यंजनादिक करावें असें कोणीं ग्रंथकार ह्मणतात. पिंडांची पूजा केल्यानंतर व उपस्थानाच्या पूर्वी नीवीविस्रंस करावा असें श्राद्धसागरीं आहे.

---

**अथास्मत्पितरमुकनामगोत्ररूपाभ्यंक्ष्वेतियथालिंगमंत्रावृत्त्या पिंडेषुतैलंघृतंवाभ्यंजनंदर्भैर्दत्वातथैवांक्ष्वेतिकज्जलंदद्यात् आपस्तंबानामादावंजनंततोभ्यंजनं एतद्वःपितरोवासइतिमंत्रंप्रतिपिंडंपठन्वासोवादशांवात्रिगुणसूत्रंवाप्रतिपिंडेदद्यादितिहेमाद्रिः सकृन्मंत्रंपठन्सकृदेवदद्यादित्यन्ये कातीयैस्तुमंत्रेणप्रतिपिंडंनामगोत्राद्युच्चार्यत्रिगुणंसूत्रंदेयं ततःकशिपूपबर्हणे निवेद्यास्मत्पितृभ्यइतिचतुर्थ्याक्षतगंधपुष्पधूपदीपसर्वप्रकारकनैवेद्यतांबूलदक्षिणादिभिःपिंडेपूजांसव्येनापसव्येनवाकुर्यात् यत्किंचित्पच्यतेभक्ष्यंभोज्यमन्नमगर्हितं अनिवेद्यनभोक्तव्यं पिंडमूलेकथंचन ततोनमोवःपितरइषइत्यादिमंत्रैःपिंडानुपस्थायोत्तानहस्तेनपरेतनइतिमंत्रेणसकृदुक्तेनयुगपत्प्रवाहयेत् ॥**

यानंतर **"अस्मत्पितरमुकनामगोत्ररूपाभ्यंक्ष्व"** याप्रमाणें जसें लिंग असेल तदनुरूप मंत्रावृत्तीनें पिंडांचे ठायीं तैल, अथवा घृत अभ्यंजन दर्भांनीं देऊन, तसेंच **"अंक्ष्व"** असें ह्मणून काजळ द्यावें. आपस्तंब यांनीं पूर्वी अंजन, तदनंतर अभ्यंजन द्यावें. **"एतद्वःपितरो वासो०"**

हा मंत्र प्रतिपिंडास पठण करीत होत्साता वस्त्र अथवा वस्त्राची दशा किंवा त्रिगुण सूत्र प्रत्येक पिंडास द्यावें असें हेमाद्रींत सांगितलें आहे. एक वेळ मंत्र ह्मणून एक वेळच द्यावें असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात. कात्यायनांनीं तर, मंत्रेंकरून प्रत्येक पिंडास नामगोत्रादिकांचा उच्चार करून त्रिगुणसूत्र द्यावें. तदनंतर गादी, उशा हे पदार्थ निवेदन करून "अस्मत्पितृभ्यः" अशा चतुर्थीविभक्तीनें अक्षता, गंध, पुष्प, धूप, दीप, सर्व प्रकारचा नैवेद्य, तांबूल आणि दक्षिणा इत्यादिक उपचारांनीं पिंडांची पूजा सव्यानें अथवा अपसव्यानें करावी. "भक्ष्य, भोज्य असें शुद्ध अन्न जें कांहीं सिद्ध केलें असेल तें पिंडांचे मूळीं निवेदन केल्यावांचून कदापि भक्षण करूं नये." तदनंतर "नमो वःपितर इषे०" इत्यादि मंत्रेंकरून पिंडांचें उपस्थान (प्रार्थना) करून उताण्या हातानें "परेतन०" हा मंत्र एक वेळ ह्मणून एकदम पिंड किंचित् लोटावे.

---

ततोदक्षिणाग्निहोमपक्षेऽग्नेतमद्याश्वमित्यग्निसमीपमागत्य यदंतरिक्षमितिमंत्रेणगार्हपत्योपस्थानं औपासनेहोमपक्षेगार्हपत्यपदरहिततन्मंत्रेणोपस्थानंइदंबह्वृचानामेव पाणिहोमेतुतेषामपिनास्त्येव वीरंमेदत्तपितरइतिमंत्रेणमध्यममेकंपिंडंपिंडद्वयंवान्वष्टक्यादौमध्यपिंडत्रयमादायपत्न्यैदद्यात् पत्नीआधत्तपितरइतिमंत्रेणसकृत्पठितेनैवपिंडमेकमनेकंवाप्राशयेत् आपस्तंबस्त्वपांत्वौषधीनांरसंप्राशयामिभूतकृतंगर्भंधत्स्वेतिमध्यपिंडंपत्न्यैप्रयच्छति प्राशनमंत्रःस एव यथेहपुरुषोऽसदितिपाठमात्रंभिद्यते इत्थमेवकातीयानां इदंभार्यायाःपिंडप्राशनंप्रजाकामत्वएव केचिन्नित्यमाहुः भार्यानेकत्वेपिंडंविभज्यप्रतिपत्नीमंत्रेणप्राशयेत् पार्वणद्वयेपिंडद्वयंद्वाभ्यांदेयं पत्नीबहुत्वेगुणतोवयसाचयोग्यायैपिंडोदेयः बह्वीयोग्यत्वेएकस्मिन्दर्शेएकस्यै अन्यस्मिन्नपरस्यैइति पत्नीरुग्णान्यदेशस्थागुर्विणीसूतिकापिवा तदातंजीर्णवृषभश्छागोवा भोक्तुमर्हति इतरौजलेक्षिपेत् पुत्रादिकामनाभावेक्षिपेदग्नौजलेपिवा पिंडांस्तुगोजविप्रेभ्यो वायसेभ्यःप्रदापयेत् तीर्थेश्राद्धेसदापिंडान्क्षिपेत्तीर्थेसमाहितः ॥

तदनंतर 'दक्षिणाग्नींत होम' (अग्नौकरणहोम) असा पक्ष असेल तर "अग्नेतमद्याश्व०" हा मंत्र ह्मणून अग्नीच्या सन्निध येऊन "यदंतरिक्षं०" ह्या मंत्रानें गार्हपत्याग्नीचें उपस्थान करावें. 'गृह्याग्नींत होम' असा पक्ष असेल तर 'गार्हपत्य' ह्या पदानें रहित मंत्र ह्मणून उपस्थान करावें, व हें उपस्थान करणें तें ऋग्वेदी यांसच आहे. पाणिहोम असेल तर ऋग्वेदी त्यांसहि उपस्थान नाहींच. "वीरं मे दत्त पितरः" ह्या मंत्रानें मध्यमपिंड एक अथवा दोन, अन्वष्टक्य इत्यादि श्राद्धीं मधले तीन पिंड घेऊन पत्नीकारणें द्यावे. नंतर पत्नीनें "आधत्त पितरः" ह्या एकवारच पठण केलेल्या मंत्रानें एक किंवा अनेक पिंड प्राशन करावे. आपस्तंब तर, "अपां त्वौषधीनां रसं प्राशयामि भूतकृतं गर्भं धत्स्व" या मंत्रेंकरून मध्यम पिंड पत्नीकारणें द्यावा असें सांगतो. प्राशनाविषयीं मंत्र तोच, परंतु "यथेह पुरुषो असत्" याप्रमाणें पाठ मात्र निराळा होतो. याप्रमाणेंच कात्यायनशाखी यांचा निर्णय जाणावा. हें जें स्त्रियेस पिंड प्राशन करण्याविषयीं सांगितलें तें प्रजाकामत्व ह्मणजे संततीची इच्छा असतांच जाणावें, कोणी ग्रंथकार नित्य आहे असें ह्मणतात. भार्या अनेक

असतील तर पिंड विभागून प्रत्येक स्त्रियेनें मंत्रेंकरून प्राशन करावा. दोन त्रयी असतील तर दोन पिंड दोन स्त्रियांकारणें द्यावे. बहुत पत्नी असतील तर गुणांनीं व वयानें जी योग्य असेल तिला पिंड द्यावा. बहुत योग्य असतील तर एका दर्शाचे ठायीं एकीस व दुसऱ्या दर्शाचे ठायीं दुसरीस याप्रमाणें द्यावा. "पत्नी रोगिष्ठ, देशांतरीं राहणारी, गर्भिणी अथवा बाळंतीण असी असेल तेव्हां वृद्ध बैल किंवा बोकड यांस तो पिंड भक्षण करवावा. इतर दोन पिंड उदकांत टाकावे. "पुत्रादिकांची इच्छा नसेल तर अग्नि, जल यांत पिंड टाकावे अथवा गाई, बोकड, अथवा कावळे यांला द्यावे. तीर्थी श्राद्ध असतां पिंड सार्वकाल तीर्थांत टाकावे."

---

**अथपिंडोपघाते श्वसृगालखरैःस्पृष्टःपिंडोभिन्नःप्रमादतः मार्जारमूषकैःस्पृष्टश्चांडालपतितादिभिः प्राजापत्यंचरेत्स्नात्वापुनःपिंडान्यथाविधि पाकांतरेणतेनपाकेनवापिंडदानमात्रं पुनःकार्यं नसर्वश्राद्धावृत्तिरितिसर्वसंमतं काकस्पर्शेतुनदोषः ॥**

यानंतर पिंडोपघात असतां त्याविषयीं सांगतों.—"कुत्रा, कोल्हा, गर्दभ, मांजर, उंदीर, चांडाल आणि पतित इत्यादिकांनीं पिंडास स्पर्श केला असतां व प्रमादानें पिंड भिन्न झाला असतां स्नान करून प्राजापत्य प्रायश्चित्त करावें व पुनः यथाविधि पिंड द्यावे. दुसऱ्या पाकानें अथवा त्या पाकानें पिंडदान मात्र पुनः करावें, सर्व श्राद्धाची आवृत्ति करूं नये असें सर्व संमत आहे. कावळ्याचा स्पर्श झाला असेल तर दोष नाहीं.

**अथपिंडनिषेधः विवाहव्रतचूडासुवर्षमर्धंतदर्धकं संस्कारेषुतथान्येषुवृद्धिमात्रेचमासकं पिंडदानंमृदास्नानंनकुर्यात्तिलतर्पणं श्राद्धांगतर्पणंनित्यतर्पणंचतिलैर्नकार्यमित्यर्थः महालयेगयायांपित्रोःप्रत्यब्देयस्यकस्यापिमृतस्यसपिंडीषोडशमासिकांतेषुप्रेतकृत्येषु कृतमंगलोपि पिंडान्दद्यात् केचिद्भ्रात्रादिवार्षिकेप्याहुः पिंडयज्ञेचयज्ञेचसपिंड्यांदद्युरेवच तथाविकृतान्वष्टकादौयत्र पुनःपिंडदानविधिःयत्रवापूर्वेद्युःश्राद्धादौपिंडपितृयज्ञविकृतित्वंतत्रापिनपिंडदाननिषेधइतिसिंधुः तेनाष्टकाश्राद्धेपिननिषेधइतिभाति अयंचमंगलोत्तरंपिंडदानतिलतर्पणनिषेधस्त्रिपुरुषसपिंडानामितिभाति ॥**

यानंतर पिंडांचा निषेध सांगतों.—"विवाह, उपनयन, चौल, हीं झालीं असतां क्रमेंकरून एक वर्ष, सहा महिने, तीन महिने आणि इतर संस्कार व केवल वृद्धि श्राद्ध यांचे ठायीं एक मासपर्यंत पिंडदान, मृत्तिकास्नान व तिलतर्पण हीं करूं नयेत." श्राद्धांगतर्पण व नित्यतर्पण हीं तिलेंकरून करूं नयेत असा अर्थ. मंगलकार्य केलेला त्यानेंहि महालय, गयाश्राद्ध, मातापितरांचें प्रतिसांवत्सरिक आणि जो कोणीहि मृत झालेला त्याचीं सपिंडी, षोडशमासिकांत प्रेतकृत्यें यांचे ठायीं पिंडदान करावें. कोणी ग्रंथकार भ्राता इत्यादिकांचे वार्षिकश्राद्धीं पिंडदान करावें असें सांगतात. "पिंडयज्ञ, यज्ञ आणि सपिंडी यांमध्यें पिंड द्यावेच." तसाच विकृतिरूप अन्वष्टका इत्यादिकांत जेथें पुनः पिंडदानविधि सांगितला अथवा जेथें पूर्वेद्युःश्राद्धादिकांत पिंडपितृयज्ञास विकृतित्व सांगितलें तेथेंहि पिंडदानाचा निषेध

---

१ जीवत्पितृकत्वगर्भिणीपतित्वप्रयुक्तःपिंडदाननिषेधःप्रतिप्रसवश्चप्रागेवोक्तः ॥

२ जीवंतपितृक व गर्भिणीपति एतत्प्रयुक्त पिंडदानाचा निषेध आणि प्रतिप्रसव हे पूर्वीच सांगितले आहेत.

नाहीं असें निर्णयसिंधूंत आहे, त्यावरून अष्टकाश्राद्धींहि पिंडदानाचा निषेध नाहीं असें वाटतें. हा जो मंगल केल्यानंतर पिंडदान व तिलतर्पण यांचा निषेध सांगितला तो त्रिपुरुषसपिंडांस आहे असें वाटतें.

---

**अथपिंडोद्वासनांतेविकिरोदेयः उपवीतीदैविकद्विजसन्निधौसदर्भभुविअसोमपाश्चयेदेवा इतिमंत्रेणसजलयवमन्नंविकिरेत् प्राचीनावीतीपित्र्यद्विजसन्निधौसदर्भभुवियेअग्निदग्धायेअ नग्निदग्धेतिऋचासतिलमन्नंविकीर्य अग्निदग्धाश्चयेजीवायेप्यदग्धाःकुलेमम भूमौदत्तेनतृ प्यंतुतृप्तायांतुपरांगतिमितिकातीयसौत्रमंत्रेणसतिलजलेनाप्लावयेत् पिंडवद्विकिरोपिसर्वान्न स्यैव केचिदसोमपाइतिदैवेविकिरंदत्वाअसंस्कृतप्रमीतायेइतिपौराणमंत्रेणपित्रेदत्वायेअग्नि दग्धाइत्यृचापृथगुच्छिष्टपिंडंकुशोपरिदद्यादित्याहुः ॥**

यानंतर पिंडांचे विसर्जनाच्या अंतीं विकिर द्यावा. तो असा—उपवीती होत्साता देवांकडचे ब्राह्मणाच्या सन्निध भूमीवर दर्भ देऊन त्या दर्भांवर "असोमपाश्च ये देवाः" ह्या मंत्रेंकरून उदक व यव यांहीं युक्त अन्न टाकावें. प्राचीनावीती होत्साता पितरांकडचे ब्राह्मणाच्या सन्निध भूमीवर दर्भ देऊन त्या दर्भांवर "ये अग्निदग्धाये अनग्निदग्धा०" ह्या मंत्रानें तिलांसहित अन्न टाकून "अग्निदग्धाश्च ये जीवा येप्यदग्धाः कुले मम ॥ भूमौदत्तेनतृप्यंतुतृप्तायांतु परां गतिं" ह्या कात्यायनसूत्रस्थ मंत्रानें तिलयुक्त जलेंकरून तें अन्न भिजवावें. पिंडाप्रमाणें विकिरहि सर्व अन्नाचाच द्यावा. कोणी ग्रंथकार, "असोमपा०" या मंत्रानें देवांकडे विकिर देऊन "असंस्कृतप्रमीताये०" ह्या पौराणमंत्रानें पितरांकडे देऊन "येअग्निदग्धा०" ह्या ऋचेंकरून निराळा उच्छिष्ट पिंड दर्भांवर द्यावा असें ह्मणतात.

---

**हस्तौप्रक्षाल्यद्विराचम्यान्यपवित्रेधृत्वाहरिंस्मरेत् विकिरंपृथगेवनिष्कास्यकाकेभ्यउत्सृ जेदितिकाशिका देवद्विजहस्तेशिवाआपःसंत्वित्यादिभिरपोगंधपुष्पयवान्दत्वाभूमौतेषुत्यक्ते ष्वन्येऽक्षताआशीरर्थंदेयाःएवंपित्र्यहस्तेष्वपसव्येनापोगंधपुष्पतिलदानादिकृत्वासव्येनामुक गोत्रशर्माहमभिवादयामि अस्मद्गोत्रंवर्धतामित्यादि केचिदत्रपित्र्यहस्तेगंधतिलादिदानं सव्ये नाहुः कातीयास्तुहस्तेक्षतदानांतेअक्षय्योदकंदत्वाअघोराःपितरःसंत्वित्युक्त्वाभिवादनंदाता रोनोभिवर्धतामित्यादिकमाहुः ॥**

नंतर हस्त प्रक्षालन करून दोन वेळ आचमन करून दुसरीं पवित्रकें धारण करून हरीचें स्मरण करावें. विकिराचें अन्न निराळेंच काढून कावळ्यांस द्यावें असें काशिका ग्रंथांत आहे. देवांकडचे ब्राह्मणांच्या हातावर "शिवा आपः संतु" इत्यादि वाक्यांनीं उदक, गंध, पुष्प, जव, देऊन भूमीवर ते ब्राह्मणांनीं टाकल्यानंतर आशीर्वादाकरितां दुसऱ्या अक्षता द्याव्या. याप्रमाणें पितरांकडचे ब्राह्मणांच्या हातांवर अपसव्यानें उदक, गंध, पुष्प, तिल इत्यादिक देऊन सव्येंकरून "अमुकगोत्रशर्माहमभिवादयामि ॥ अस्मद्गोत्रं वर्धतां" इत्यादिक ह्मणावें. कोणी ग्रंथकार ह्या स्थलीं पितरांकडचे ब्राह्मणाचे हस्तावर गंध, तिल इत्यादिक देणें तें सव्यानें द्यावें असें ह्मणतात. कात्यायनशाखी तर, हातावर अक्षता दिल्यानंतर अक्षय्यो-

दक देऊन "अघोराः पितरः संतु" असें ह्मणून अभिवादन ( अमुकगोत्रशर्माहमभिवादयामि असें ) करून " दातारो नोभिवर्धंतां " इत्यादिक ह्मणावें असें ह्मणतात.

---

**एवमाशिषोगृहीत्वाक्षतान्मूर्धनिधृत्वास्वयंशिष्यादिभिर्वाभोजनपात्राणिचालयित्वाचामेत् अनुपनीतोनारीचासजातिश्चनचालयेत् सव्येनदैवेपित्र्येचस्वस्तिवाचनं देवेभ्यःस्वस्तीतिब्रूत पितृभ्योमुकनामगोत्रादिभ्यःस्वस्तीतिब्रूतेति ततःसव्यापसव्याभ्यांतत्तदुच्चारपूर्वकमक्षय्योदकदानं ततोन्युब्जपात्रमुत्तानंकृत्वाततःपरंसर्वमुपवीत्येवकुर्यात् द्विजेभ्यःसकर्पूरतांबूलादिदत्वापितृपूर्वकंनामगोत्राद्युच्चार्यदक्षिणांदद्यात् अमुकशर्माहममुकनामगोत्रपित्रादिस्थानोपविष्टायविप्रायरजतदक्षिणांप्रतिपादयामीत्यादिदैवेसुवर्णं अशक्तावुभयत्रयज्ञोपवीतंदक्षिणा दक्षिणाःपांत्वित्युक्त्वास्वधांवाचयिष्येइतिपृष्ट्वावाच्यतामित्युक्तेपितृपितामहेत्याद्युच्चार्यस्वधोच्यतामित्युक्त्वास्तुस्वधेतितैरुक्तेपिंडसमीपेजलंनिषिच्य स्वधासंपद्यंतामितिसंपत्तिंवाचयेत् कातीयेसूत्रेदातारोनोभिवर्धंतामित्याशिषोर्थनंस्वधावाचनंन्युब्जपात्रमुत्तानीकरणंदक्षिणादानंचेतिक्रमः ॥**

याप्रमाणें आशीर्वाद घेऊन अक्षता मस्तकावर धारण करून आपण भोजनपात्रें काढून अथवा शिष्यादिकांकडून काढवून आचमन करावें. उपनयन न झालेला, स्त्री आणि विजातीय यांनीं भोजनपात्रें काढूं नयेत. तदनंतर सव्येंकरून देवांकडे व पितरांकडे स्वस्तिवाचन करवावें. तें असें–"देवेभ्यःस्वस्तीतिब्रूत" इत्यादिक. "पितृभ्योमुकनामगोत्रादिभ्यः स्वस्तीतिब्रूत." तदनंतर सव्य व अपसव्य यांहींकरून तो तो उच्चार पूर्वी करून अक्षय्योदक द्यावें. तदनंतर उपडें ठेवलेलें पात्र उताणें करून तदनंतरचें सर्व कर्म उपवीतीनेंच करावें. ब्राह्मणांस कापूरयुक्त तांबूल इत्यादि देऊन पितृपूर्वक नाम, गोत्र इत्यादिकांचा उच्चार करून दक्षिणा द्यावी. दक्षिणा देण्याचें वाक्य–" अमुकशर्माहममुकनामगोत्रपित्रादिस्थानोपविष्टाय विप्राय रजतदक्षिणां प्रतिपादयामि " इत्यादिक जाणावें. देवांकडे सुवर्णदक्षिणा द्यावी. शक्ति नसेल तर दोहोंकडे यज्ञोपवीतदक्षिणा द्यावी. "दक्षिणाः पांतु" असें ह्मणून " स्वधां वाचयिष्ये" असें विचारून " वाच्यतां " असें प्रतिवचन दिल्यानंतर " पितृपितामह० " इत्यादिक उच्चार करून " स्वधोच्यतां " असें ह्मणून "अस्तु स्वधा" असें ब्राह्मणांनीं प्रतिवचन दिलें असतां पिंडाच्या सन्निध उदक सिंचन करून " स्वधासंपद्यंतां " असें संपत्तिवाचन ब्राह्मणांकडून बोलवावें. कात्यायनसूत्रांत " दातारोनोभिवर्धंतां " ह्या मंत्रानें आशीर्वाद मागणें, नंतर स्वधावाचन, उपडें पात्र उताणें करणें आणि दक्षिणा देणें याप्रमाणें क्रम सांगितला आहे.

---

**ततोदेवादिप्रीतिंवाचयित्वापिंडस्थानेक्षतादिक्षिप्त्वासव्येनैववाजेवाजेइति मंत्रेणोत्तिष्ठंतु पितरोविश्वेदेवैःसहेतियुगपद्धर्मेणपितृपूर्वंविप्रान्स्पृशन्विसृजेत् आमावाजस्येतिप्रदक्षिणीकृत्य ततोदातारोनोभिवर्धंतामित्यादिवरयाचनं येषांविसर्जनांतेपिंडदानंतेषामाचांतेषुसौमनस्यदक्षिणादिकाक्षय्यस्वधावाचनांतेदातारोनोभिवर्धंतामित्यादि ततःपिंडदानादीतिक्रमः हिरण्यकेशीयानांपिंडदानादिप्रयोगोविस्तृतत्वान्नोक्तः विप्रैर्वरेदत्ते स्वादुषंस० ब्राह्मणासः**

पितरः० इतिमंत्रौपठेत् विप्राःइहैवस्तं० आयुःप्रजामितिवदेयुः आशीर्भिर्नंदितोविप्रान्पादाभ्यंगादिनासंतोष्यनत्वाद्यमेसफलंजन्म० मंत्रहीनं० यस्यस्मृत्येत्यादिविष्णुस्मरणपूर्वककर्मार्पयित्वाविप्रान्क्षमापयेत् अष्टौपदान्यनुव्रज्यदक्षिणीकृत्यचागतः दीपंहस्तेननिर्वाप्यपवित्रत्यागपूर्वकं पादशुद्धिर्द्विराचामेदुच्छिष्टोद्वासनंततः बह्वृचोवैश्वदेवंतुयथाविधिचरेत्ततः ततस्तु वैश्वदेवांतेसभृत्यसुतबांधवः भुंजीतातिथिसंयुक्तःसर्वंपितृनिषेवितं श्राद्धशेषान्नंशिष्यायज्ञातिभ्यश्चदेयं नशूद्राय द्विजभुक्तावशिष्टंतुशुचिभूमौनिखानयेत् ॥

तदनंतर देवादिकांचें प्रीतिवचन करवून पिंडस्थानीं अक्षता इत्यादिक टाकून सव्येंकरूनच "वाजे वाजे०" ह्या मंत्रानें "उत्तिष्ठंतु पितरो विश्वेदेवैः सह," असें वाक्य ह्मणून एककालीं दर्भेंकरून पितृपूर्वक ब्राह्मणांस स्पर्श करीत होत्साता विसर्जन करावें. नंतर "आमावाजस्य०" ह्या मंत्रानें ब्राह्मणास प्रदक्षिणा करावी. तदनंतर "दातारो नोभिवर्धतां०" इत्यादि मंत्र ह्मणून वराची याचना करावी. ज्यांस विसर्जनानंतर पिंडदान करण्याविषयीं सांगितलें त्यांचा क्रम, ब्राह्मणांनीं आचमन केल्यानंतर सौमनस्य, दक्षिणादिक, अक्षय्य, स्वधावाचन एथपर्यंत कर्म केल्यानंतर "दातारो नोभिवर्धतां०" इत्यादि, त्यानंतर पिंडदानादिक याप्रमाणें क्रम जाणावा. हिरण्यकेशीय यांचा पिंडदानादिक प्रयोग विस्तृत असल्यामुळें तो एथें सांगितला नाहीं. ब्राह्मणांनीं वर दिल्यानंतर "स्वादुषं० ब्राह्मणासः पितरः०" हे मंत्र पठण करावे. नंतर ब्राह्मणांनीं "इहैवस्तं० आयुः प्रजां०" हे मंत्र ह्मणावे. आशीर्वादांनीं हर्षित होत्साता ब्राह्मणांचे पायांस अभ्यंगादिक लावून ब्राह्मणांस संतुष्ट करून नमस्कार करून "अद्य मे सफलं जन्म० मंत्रहीनं० यस्यस्मृत्या०" इत्यादिक मंत्र ह्मणून विष्णूचें स्मरण करून कर्म ईश्वरास अर्पण करून ब्राह्मणाप्रत क्षमा मागावी. "ब्राह्मणाच्या पाठीमागून आठ पावलें जाऊन त्यांना उजवें घालून स्वस्थानीं यावें. नंतर पवित्रें टाकून हातानें दीप मालवून पादप्रक्षालन करावें, आणि दोन वेळ आचमन करून नंतर उष्टीं काढावीं. तदनंतर ऋग्वेदी यानें यथाविधि वैश्वदेव करावा. त्यानंतर वैश्वदेवाच्या अंतीं दास, पुत्र, बांधव आणि अतिथि यांसहवर्तमान, पित्रांनीं सेवित अशा सर्व अन्नाचें भोजन करावें." श्राद्धशेष अन्न शिष्य व ज्ञाति यांस द्यावें, शूद्रास देऊं नये. "ब्राह्मणभोजन करून शेष राहिलेलें अन्न शुद्ध भूमींत पुरावें."

---

अन्नपर्वादौनिषिद्धंमाषाद्यपिभोक्तव्यं वैधत्वेननिषेधाप्रवृत्तेरितिकेचित् अनिषिद्धभोजनेनापिश्राद्धशेषभोजनविधिसिद्धिरित्यन्ये श्राद्धशेषभोजनाकरणेदोषः श्राद्धदिनेउपवासनिषेधाच्छ्राद्धशेषाभावेपाकांतरेणभोजनं एकादश्यादाववघ्राणं यत्रतूपवासोनावश्यकस्तत्रैकभक्तं श्राद्धशेषंदिवैवभोक्तव्यंनरात्रौ तेननक्तव्रतेऽवघ्राणमेव श्राद्धावशिष्टभोक्तारस्तेवैनिरयगामिनः सगोत्राणांसकुल्यानांज्ञातीनांचनदोषकृत् ब्रह्मचारियतिविधवानांनित्यंनिषिद्धं ज्ञातिगोत्रसंबंधिभिन्नगृहेश्राद्धशेषभोजनेप्राजापत्यंप्रायश्चित्तं यतीनांवपनंलक्षप्रणवजपश्च गुरोर्योगिनोवाश्राद्धशेषंगृहिणोनदोषाय नशूद्रंभोजयेत्तस्मिन्गृहेयत्नेनतद्दिने श्राद्धशेषंन

शूद्रेभ्यःप्रदद्यादखिलेष्वपि इतिश्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारेपार्वणश्राद्धप्रक्रिया समाप्ता ॥

ह्या श्राद्धदिवसीं, पर्वादिदिवसीं निषिद्ध असें माषान्नादिकहि भक्षण करावें. कारण, जें विधिप्राप्त झालें त्याविषयीं निषेधाची प्रवृत्ति नाहीं असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. अनिषिद्धभोजनेंकरूनहि श्राद्धशेषभोजनाचे विधीची सिद्धि होते असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात. श्राद्धशेषाचें भोजन न केलें असतां दोष प्राप्त होतो. श्राद्धदिवसीं उपोषणाचा निषेध आहे यास्तव श्राद्धशेषाचा अभाव असेल तर दुसरा पाक करून भोजन करावें. एकादशी इत्यादि दिवसीं अवघ्राण करावें. ज्या दिवसीं उपवास आवश्यक नाहीं त्या दिवसीं एकभक्त करावें. श्राद्धशेष दिवसासच भक्षण करावें, रात्रीं भक्षण करूं नये, यावरून नक्तव्रत असतां अवघ्राणच करावें. "जे श्राद्धशेषाचें भोजन करितात ते नरकगामी होतात. सगोत्र, सकुल्य, ज्ञाति यांस ( श्राद्धशेषभोजनाचा ) दोष नाहीं." ब्रह्मचारी, संन्यासी आणि विधवा यांस नित्य निषेध आहे. ज्ञाति, सगोत्र, संबंधी यांहून इतरांच्या घरीं श्राद्धशेषाचें भोजन केलें असतां प्राजापत्यप्रायश्चित्त करावें. संन्यासी यांनीं वपन व लक्षसंख्याक प्रणवाचा जप करावा. गुरु अथवा योगी यांचें श्राद्धशेष गृहस्थाश्रमी यास दोषाकारणें होत नाहीं. श्राद्धदिवसीं श्राद्धघरीं शूद्रास भोजन देऊं नये. कोणत्याहि श्राद्धामध्यें शूद्रास श्राद्धशेष देऊं नये. इतिश्रीमदनंतोपाध्यायसूनुकाशीनाथोपाध्यायविरचिते धर्मसिंधुसारे पार्वणश्राद्धप्रक्रिया समाप्ता ॥

---

अथश्राद्धदिनेवैश्वदेवनिर्णयः तत्रतावच्छ्रौताग्निमतांबह्वृचानांश्राद्धात्पूर्वंपृथक्पाकेनवैश्वदेवः स्मार्ताग्निमतांनिरग्निकानांचबह्वृचानांश्राद्धांतएवश्राद्धशेषेणपृथक्पाकेनवा कातीयानांतुस्मार्तश्रौताग्निमतांश्राद्धीयपाकेनपूर्वमेव निरग्निकानामंतेश्राद्धशेषेणपृथक्पाकेनवा तैत्तिरीयाणांतुसाग्निकानांसर्वत्रादौवैश्वदेवः पंचमहायज्ञास्त्वंते अन्येषामादावंतेचेतिविकल्पः तैत्तिरीयाणामेववैश्वदेवात्पंचयज्ञाभिन्नाः सर्वशाखिनांवृद्धिश्राद्धेपाकेनक्रियमाणेपूर्वमेववैश्वदेवः बह्वृचानामंतेवापूर्वंवा आमादिनावृद्धिश्राद्धेसर्वेषांपूर्वमंतेवेतिभाति नित्यश्राद्धेपूर्वमेवएकादशाहाद्येकोद्दिष्टेषुसाग्निरनग्निश्चसर्वोपिश्राद्धशेषंद्विजाधीनंकृत्वापाकांतरेणैववैश्वदेवादिकुर्यात् ॥

## यानंतर श्राद्धदिवसीं वैश्वदेवाचा निर्णय सांगतों.

त्यामध्यें श्रौताग्नींनीं युक्त असे सर्व ऋग्वेदी यांनीं निराळा पाक करून श्राद्धाच्या पूर्वी वैश्वदेव करावा. स्मार्ताग्नीनें युक्त व निरग्निक असे ऋग्वेदी यांनीं श्राद्धाच्या शेवटींच श्राद्धशेषानें अथवा पृथक् पाकानें करावा. स्मार्ताग्नि व श्रौताग्नि यांहीं युक्त जे कात्यायन त्यांनीं श्राद्धाच्या पाकानें श्राद्धाच्या पूर्वींच करावा. निरग्निक कात्यायनांनीं श्राद्धाच्या अंतीं श्राद्धशेषानें अथवा पृथक् पाकानें करावा. साग्निक असे तैत्तिरीयशाखी यांनीं सर्वत्र श्राद्धाच्या पूर्वीं वैश्वदेव करावा. पंचमहायज्ञ तर, श्राद्धाच्या अंतीं करावे. इतरांनीं पूर्वीं किंवा नंतर करावा असा विकल्प आहे. तैत्तिरीयशाखी यांचे मात्र पंचमहायज्ञ वैश्वदेवाहून भिन्न आहेत. वृद्धिश्राद्ध पाकानें करावयाचें असतां सर्व शाखी यांनीं पूर्वींच वैश्वदेव करावा. ऋग्वेदी यांनीं

अंतीं किंवा पूर्वी करावा. आमान्न इत्यादिकानें वृद्धिश्राद्ध कर्तव्य असतां सर्वांनीं पूर्वी किंवा शेवटीं करावा असें वाटतें. नित्यश्राद्धीं पूर्वीच करावा. एकादशाहादिक एकोद्दिष्ट श्राद्धांचे ठायीं साग्निक, निरग्निक अशा सर्वांनींहि श्राद्धशेष ब्राह्मणांच्या स्वाधीन करून दुसऱ्या पाकेंकरून वैश्वदेवादि करावें.

---

अथनित्यश्राद्धं वार्षिकादिश्राद्धदिनेश्राद्धात्पश्चात्तेनैवपाकेनपाकांतरेणवानित्यश्राद्धंकार्यं नित्यश्राद्धीयसर्वदेवतानांप्रथमश्राद्धेप्रवेशेप्रसंगसिद्धिरेव तथाचदर्शादिषुमहालयान्वष्टकादिषुनित्यश्राद्धलोपएव एतच्चदेवहीनंदर्शवत्षट्दैवतंद्वावेकंवाविप्रंनिमंत्र्यदेशकालान्ननियमहीनंपुनर्भोजनब्रह्मचर्यादिकर्तृभोक्तृनियमरहितंयादृशतादृशेनैवानिषिद्धान्नेनदिवैव रात्रौ प्रहरपर्यंतंवाकार्यं स्वस्याशक्तौपुत्रादिना सूतकेदर्शादिवल्लोपः वृद्ध्युत्तरंमंडपोत्थानावधिसपिंडैर्नकार्यं नित्यवैश्वदेवांतर्गतपितृयज्ञोत्तरंमनुष्ययज्ञात्प्रागेवभाति तत्रदर्शवत्षट्पितृन्देवहीनानुच्चार्यनित्यश्राद्धंकरिष्येइतिशिष्यादिश्चेद्यजमानस्यपितृपितामहेत्याद्युच्चार्य संकल्पयेत् पितृणामिदमासनमित्यासनं नित्यश्राद्धेक्षणः क्रियतामितिक्षणः पूर्वोच्चारिताःपितरः अयं वोगंधइत्येवंगंधादिभिर्विप्रमभ्यर्च्य वर्तुलेचतुरस्रेवामंडलेपात्रेन्नंपरिविष्य पृथ्वीतेपात्रमित्यादिब्रह्मार्पणांतंदर्शवत् भोजनांतेदक्षिणांदत्वानवादत्वानमस्कारेणविसर्जयेत् ॥

## यानंतर नित्यश्राद्ध सांगतों.

वार्षिकादिक श्राद्धदिवसीं श्राद्धाच्या नंतर त्याच पाकेंकरून अथवा दुसऱ्या पाकानें नित्य श्राद्ध करावें. नित्यश्राद्धीय सर्व देवतांचा, पहिल्या श्राद्धीं प्रवेश झाला असतां प्रसंगसिद्धिच होते, ह्मणजे दर्शादिक श्राद्धें, महालय, अन्वष्टका इत्यादि श्राद्धें यांचे ठायीं नित्यश्राद्धाचा लोपच करावा. हें नित्य श्राद्ध देवहीन व दर्शासारखें सहा देवतांनीं युक्त, दोन किंवा एक ब्राह्मणास निमंत्रण करून देश, काल, अन्न यांच्या नियमांनीं रहित असून पुनर्भोजन, ब्रह्मचर्य इत्यादिक जे कर्त्यांचे व भोक्त्याचे नियम तद्रहित असें जशा तशाच अनिषिद्ध अन्नानें दिवसासच, अथवा रात्रौ प्रहरपर्यंत करावें. आपणास असामर्थ्य असतां पुत्रादिकांकडून करवावें. सूतक ( जननाशौच व मृताशौच ) असतां दर्शासारखा लोप करावा, वृद्धिश्राद्धानंतर मंडपोद्वासनापर्यंत सपिंडांनीं करूं नये. नित्य वैश्वदेवांतील जो पितृयज्ञ तो झाल्यानंतर व मनुष्ययज्ञाच्या पूर्वीच करावें असें वाटतें. त्या नित्यश्राद्धाचेठायीं दर्शासारखा सहा पितरांचा देवरहित उच्चार करून "नित्यश्राद्धं करिष्ये" असा संकल्प करावा. शिष्यादिक कर्ता असेल तर "यजमानस्य पितृपितामह०" इत्यादिक उच्चार करून संकल्प करावा. "पितृणामिदमासनं" असें ह्मणून आसन, "नित्यश्राद्धे क्षणः क्रियतां" असा क्षण, "पूर्वोच्चारिताः पितरः अयं वो गंधः" याप्रमाणें गंधादिक उपचारांनीं ब्राह्मणाची पूजा करून वर्तुल किंवा चतुष्कोण मंडल करून त्या मंडलावर पात्र मांडून पात्रावर अन्न वाढून "पृथ्वी ते पात्रं०" इत्यादिकापासून ब्रह्मार्पणपर्यंत कर्मे दर्शप्रमाणें करावीं. भोजनानंतर दक्षिणा देऊन अथवा न देऊन नमस्कार करून विसर्जन करावें.

---

विप्रस्यान्नादेर्वाभावेयथाशक्त्यन्नमुद्धृत्यषोढाविभज्यास्मत्पितृपितामहेत्यादिचतुर्थ्यंतं षट् देवताउच्चार्येदमन्नंस्वधानममेतित्यजेत् तदन्नंविप्रायगोभ्योवादेयं जलादौवात्याज्यं अन्नत्याग स्यापिलोपेआर्चंभत्रमरुतइतिऋचादशवारंजपेत् इतिनित्यश्राद्धविधिः ॥

ब्राह्मणाचा अथवा अन्नाचा अभाव असेल तर यथाशक्ति अन्न घेऊन त्या अन्नाचे सहा विभाग करून "अस्मत्पितृपितामह०" इत्यादिक चतुर्थीविभक्त्यंत सहा देवतांचा उच्चार करून "इदमन्नं स्वधा न मम" असें ह्मणून अन्नत्याग करावा. नंतर तें अन्न ब्राह्मण अथवा गाई यांला द्यावें किंवा उदकादिकांत टाकावें. अन्नत्यागाचाहि लोप होईल तर "आर्चंभत्र मरुत०" ह्या ऋचेचा दहा वेळ जप करावा. याप्रमाणें नित्यश्राद्धाचा विधि सांगितला.

---

अथश्राद्धानुकल्पाः अनेकविप्रालाभेदेवस्थानेशालग्रामादिकंस्थापयित्वैकविप्रेपित्रादित्रयं मातामहादिसहितदेवताषट्कंचावाह्यसर्वंश्राद्धंकार्यमित्युक्तं सर्वथाविप्रालाभेदर्भबटुश्राद्ध मित्याद्यप्युक्तं ॥

## यानंतर श्राद्धाचे अनुकल्प सांगतों.

अनेक ब्राह्मण न मिळतील तर देवस्थानीं शालग्रामादिक स्थापून एका ब्राह्मणाचे ठायीं पित्रादित्रयी, व मातामहादिसहित सहा देवता यांचें आवाहन करून सर्व श्राद्ध करावें, असें सांगितलें आहे. सर्वथा ब्राह्मण न मिळेल तर दर्भाचे बटु करून श्राद्ध करावें इत्यादिकहि सांगितलें आहे.

---

अथामश्राद्धं तत्रकेनचित्संकटेनपाकासंभवेजातकर्मणिचग्रहणनिमित्तकश्राद्धेचामश्राद्धं कार्यं सपिंडनश्राद्धंमासिकंप्रतिवार्षिकंमहालयाष्टकान्वष्टकादिश्राद्धंचामेननकार्यं शूद्रस तुदशाहपिंडादिश्राद्धमात्रमामेन नकदापिपाकेन तत्रपितॄनुद्दिश्यामुकश्राद्धंसदैवंसपिंडमा मेनहविषाकरिष्यइतिसंकल्पः अन्यःप्रयोगःपूर्वोक्तएव पाकप्रोक्षणस्थानेआमप्रोक्षणं आ वाहनेउशंतस्त्वेतिमंत्रेहविषेअत्तवेइत्यत्रहविषेस्वीकर्तवेइत्यूहः भस्ममर्यादांतंप्राग्वत् विप्र हस्तेषुतंडुलैरग्नौकरणं अन्नाच्चतुर्गुणंद्विगुणंसमंवातत्तदामंपात्रेषुसंस्थाप्यपाणिहोमशेषंपिंडा र्थंसंस्थाप्यपात्रेषुदत्वापृथिवीतेपात्रमित्यादि इदमामंहव्यंकव्यमित्यादि इदमाममममृतरूपं स्वाहेत्यादियथाधर्ममध्विवत्यंतंप्राकृतं यथासुखंजुषध्वमित्यस्यापोशनप्राणाहुतितृप्तिप्रश्नानांलो पः संपन्नवाचनांतेन्नशेषप्रश्नलोपः सर्वमतेतंडुलैःसक्तुभिर्वापिंडदानंकेचिद्गृहसिद्धान्नेनपाय सेनवापिंडानाहुः ॥

## यानंतर आमान्नश्राद्ध सांगतों.

त्यामध्यें कांहींएक संकटामुळें पाक करण्याचा असंभव असेल तर, व जातकर्म आणि ग्रहणनिमित्तक श्राद्ध यांचे ठायीं आमश्राद्ध करावें. सपिंडीश्राद्ध, मासिक, प्रतिसांवत्सरिक, महालय, अष्टका, आणि अन्वष्टकादि श्राद्ध हीं आमेंकरून करूं नयेत. शूद्रानें तर, दशाहपिंडादि सर्व श्राद्धें आमेंकरून करावीं, कदापि पाकानें करूं नयेत. त्या आमश्राद्धाविषयीं पितरांचा उद्देश करून "अमुकश्राद्धं सदैवं सपिंडमामेन हविषा करिष्ये" असा संकल्प करावा. इतर प्रयोग पूर्वी सांगितल्याप्रमाणेंच करावा. पाकप्रोक्षणस्थानीं आमान्नाचें

प्रोक्षण करावें. आवाहनाचे ठायीं " **उशंतस्त्वा०** " ह्या मंत्रामध्यें ' **हविषे अत्तवे** ' या स्थानीं ' **हविषे स्वीकर्तवे** ' असा ऊह करावा. भस्ममर्यादा ह्मणजे पिशंगी घालणें एथपर्यंत कर्म पूर्वींप्रमाणें करावें. ब्राह्मणांच्या हस्तावर तांदुळांनीं अग्नौकरण करावें. अन्नापेक्षां चतुर्गुणित, द्विगुण अथवा सारखें तें तें आमान्न पात्रांवर ठेवून पाणिहोम करून शेष राहिलेलें पिंडांकरितां ठेवून व पात्रांवर ठेवून " **पृथिवीतेपात्रं०** " इत्यादि. " **इदमामंहव्यंकव्यं** " इत्यादि, " **इदमाममसृतरूपंस्वाहा** " इत्यादिक यथाधर्म, ' **मधु** ' एथपर्यंत पूर्वींप्रमाणें करावें. नंतर " **यथासुखं जुषध्वं** " ह्या वाक्याचा, व आपोशन, प्राणाहुति, तृप्तिप्रश्न यांचा लोप करावा. संपन्नवाचनानंतर अन्नशेषप्रश्नाचा लोप करावा. सर्व मतीं तांदुळांनीं किंवा पिठानें पिंडदान करावें. कोणी ग्रंथकार घरांत सिद्ध झालेल्या अन्नानें अथवा पायसानें पिंड करावे असें सांगतात.

---

**एवंविप्रसमीपेपिंडदानांते नमोवःपितरइषेइत्यत्रोपस्थानमंत्रइषेस्थानेआमद्रव्यायेत्यूहः पिंडोद्वासनांतेपिंडजातीयद्रव्येणविकिरदानं आमश्राद्धेस्वस्तीतिब्रूतेतिवर्ज्यम् वाजेवाजेइति मंत्रेतृप्तायातेतिस्थानेतर्प्स्यथयातेत्यूहः ततःप्राग्वच्छेषंसमापयेत् आमश्राद्धंद्विजैःपूर्वाण्हेकार्यम् शूद्रैरपराण्हएव आमान्नाभावेहिरण्यश्राद्धमप्येवमेव संकल्पादौसर्वत्रहिरण्यपदमामपदस्थानेयोज्यम् ॥**

याप्रमाणें ब्राह्मणाच्या सन्निध पिंडदान केल्यानंतर " **नमोवःपितर इषे०** " ह्या उपस्थानाच्या मंत्रांत ' **इषे** ' या स्थानीं ' **आमद्रव्याय** ' असा ऊह करावा. पिंडांचें उद्वासन ( विसर्जन ) झाल्यानंतर, पिंड ज्या द्रव्याचे दिले असतील त्या द्रव्यानें विकिर द्यावे. आमश्राद्धीं " **स्वस्तीतिब्रूत** " हें वाक्य वर्ज्य करावें. " **वाजेवाजे** " ह्या मंत्रांत ' **तृप्तायात** ' ह्या स्थानीं '**तर्प्स्यथयात**' असा ऊह करावा. तदनंतर पूर्वीं सांगितल्याप्रमाणें शेष कर्म समाप्त करावें. द्विजांनीं आमश्राद्ध पूर्वाण्हीं करावें, शूद्रांनीं अपराण्हीं करावें. आमान्नाचा अभाव असतां हिरण्यश्राद्धहि असेंच करावें. संकल्पादिकांचे ठायीं सर्वत्र आमपदस्थानीं हिरण्यपद योजावें.

---

**आमवद्धेमप्रोक्षणं अत्तवइत्यादिमंत्रत्रयोहःप्राग्वदेव तंडुलादिभिर्हस्तेग्नौकरणं हिरण्यमन्नादष्टगुणंचतुर्गुणंद्विगुणंसमंवादेयम् हिरण्यश्राद्धेदक्षिणास्त्येव श्राद्धीयमामंहेमवाद्विजदत्तंयथेष्टंविनियोज्यं शूद्रदत्तंतुभोजनादन्यत्रविनियोज्यम् श्राद्धीयामेनपंचयज्ञाः श्राद्धंचन कार्यम् हेमश्राद्धेआमश्राद्धेचपिंडदानविकल्पात्सांकल्पिकविधिनाप्येतद्द्वयं ॥**

आमान्नासारखें हिरण्याचें प्रोक्षण करावें. " **अत्तव** " इत्यादि तीन मंत्रांचा ऊह पूर्वींप्रमाणेंच करावा. तांदूळ इत्यादिकेंकरून हस्तावर अग्नौकरण करावें. अन्नापेक्षां हिरण्य अष्टगुण, चतुर्गुण, द्विगुण अथवा सम द्यावें. हिरण्यश्राद्धीं दक्षिणा आहेच. श्राद्धसंबंधी आमान्न अथवा हिरण्य द्विजानें दिलेलें असेल तर यथेष्ट योजना करावी. शूद्रानें दिलेलें असेल तर भोजनाहून अन्य कृत्याकडे योजना करावी. श्राद्धसंबंधी आमान्नेंकरून पंचमहायज्ञ व श्राद्ध हीं करूं नयेत. हिरण्यश्राद्ध व आमान्नश्राद्ध या श्राद्धांत पिंडदानाचा विकल्प असल्यामुळें सांकल्पिक विधीकरूनहि हीं दोन करावीं.

---

सांकल्पिकेचसमंत्रकावाहनार्घ्याग्नौकरणपिंडदानविकिराक्षय्यस्वधावाचनप्रश्नेत्येतत्सप्त कंवर्ज्यं तत्रामुकश्राद्धमामेनहविषाहिरण्येनवासांकल्पिकविधिनाकरिष्यइतिसंकल्पःशूद्र गृहेन्यदीयमपिक्षीराद्यपिनभक्ष्यम् किमुततदीयमामादितद्गृहेपक्त्वानभक्ष्यमिति तस्माच्छूद्रा ल्लब्धंद्विजगृहेपक्त्वाभक्ष्यं इत्यामश्राद्धहेमश्राद्धविधिः ॥

सांकल्पिकविधीचे ठायीं समंत्रक आवाहन, अर्घ्य, अग्नौकरण, पिंडदान, विकिर, अक्षय्य, स्वधावाचनप्रश्न हे सात प्रकार वर्ज्य होत. त्या सांकल्पिकविधीविषयीं "अमुकश्राद्धमामेन हविषा हिरण्येन वा सांकल्पिकविधिना करिष्ये," असा संकल्प करावा. शूद्राच्या घरीं अन्यानें दिलेलेंहि दूध इत्यादिकहि भक्षण करूं नये, मग त्या शूद्रानें दिलेल्या आमान्नादिकाचा त्याचे घरीं पाक करून भक्षण न करावें याविषयीं काय सांगावें. यावरून असें होतें कीं, शूद्रापासून प्राप्त झालेलें आमान्न ब्राह्मणाचे घरीं पाक करून भक्षण करावें. याप्रमाणें आमश्राद्ध व हेमश्राद्ध यांचा विधि सांगितला.

---

अथपक्वान्नद्रव्यकसांकल्पिकविधिः तत्रयेषुसंक्रांतियुगमन्वादिषुवृद्ध्युत्तरकालिकदर्शा दिषुवापिंडदानंनिषिद्धंतत्रसर्वत्रसांकल्पिकविधिः यश्चपिंडदानादिबहुविस्तृतंश्राद्धमनुष्ठातु मशक्तःसोपिसांकल्पिकंकुर्यात् तद्यथा अमुकंश्राद्धंसांकल्पिकविधिनान्नेनहविषाकरिष्येइति संकल्प्य तृतीयक्षणदानांतंपूर्ववत्कृत्वार्घ्यदानंसमंत्रकावाहनंचवर्जयेत् देवानावाहयामीति पितॄनावाहयामीत्येवावाह्य गंधादिपूजनादिभस्ममर्यादांतेग्नौकरणंवर्जयित्वापरिवेषणादिसंप न्नवचनांतेउत्तरापोशनंविकिरपिंडदानवर्जमक्षय्यवचनांतंकृत्वास्वधांवाचयिष्ये स्वधोच्यता मितिवाक्यरहितंसर्वंपूर्ववत्समापयेत् इतिसांकल्पिकप्रयोगः ॥

## यानंतर पक्वान्नद्रव्यक सांकल्पिकविधि सांगतों.

त्यामध्यें जीं संक्रांति, युगादि, मन्वादि श्राद्धें, अथवा वृद्धिश्राद्धानंतर कर्तव्य जीं दर्शादि श्राद्धें त्यांमध्यें पिंडदानाचा निषेध आहे याकरितां त्या सर्व श्राद्धांचे ठायीं सांकल्पिक विधि करावा. आणि पिंडदानादि बहुविस्तृत श्राद्ध करण्याविषयीं ज्यास सामर्थ्य नसेल त्यानेंहि सांकल्पिक विधि करावा. तो असा—"अमुकश्राद्धं सांकल्पिकविधिनान्नेन हविषा करिष्ये" असा संकल्प करून तिसरा क्षण देणें एथपर्यंत प्रयोग पूर्वींप्रमाणें करून अर्घ्यदान व समंत्रक आवाहन हीं वर्ज्य करावीं. "देवानावाहयामि, पितॄनावाहयामि" असेंच आवाहन करून गंधादिक उपचारांनीं पूजन एथपासून पिशंगीपर्यंत कर्म झाल्यानंतर अग्नौकरण वर्ज्य करून परिवेषणापासून संपन्नवचनापर्यंत कर्म झाल्यानंतर उत्तरापोशन, विकिर आणि पिंडदान हीं वर्ज्य करून अक्षय्यवचनापर्यंत कर्म करून "स्वधांवाचयिष्ये स्वधोच्यतां" ह्या वाक्यानें विरहित सर्व प्रयोग पूर्वींप्रमाणें समाप्त करावा. याप्रमाणें सांकल्पिकप्रयोग सांगितला.

---

अथान्येप्यनुकल्पाः तत्रद्विजाद्यभावेदर्भबटुविधानेनपिंडदानमात्रमुक्तं अथवाद्रव्यविप्र योरभावेपक्वान्नस्यपैतृकसूक्तेनहोमःकार्यः यद्वाश्राद्धदिनेप्राप्तेभवेन्निरशनःपुमान् किंचिद्दद्या दशक्तोवाउदकुंभादिकंद्विजे तृणानिवागवेदद्यात्पिंडान्वाप्यथनिर्वपेत् तिलदर्भैःपितॄन्वापि तर्पयेत्स्नानपूर्वकम् अथवातृणभारंदहेत् धान्यंवातिलान्वास्वल्पांदक्षिणांवादद्यात् अथवा

**संकल्पादिसर्वश्राद्धप्रयोगंपठेत् सर्वाभावेवनंगत्वोर्ध्वबाहुःस्वकक्षंदर्शयन्निदंपठेत् नमेस्तिवित्तंनधनंनचान्यच्छ्राद्धोपयोगिस्वपितॄन्नतोस्मि तृप्यंतुभक्त्यापितरोमयैतौभुजौकृतौवर्त्मनिमारुतस्येति प्रभासखंडेन्येपिमंत्राउक्ताः इत्यनुकल्पाः ॥**

## यानंतर दुसरेहि अनुकल्प सांगतों.

त्यामध्यें ब्राह्मणादिकाचा अभाव असतां दर्भबटुविधीकरून पिंडदान मात्र करावें असें सांगितलें. अथवा श्राद्धपदार्थ व ब्राह्मण यांचा अभाव असतां पक्क केलेल्या (शिजवलेल्या) अन्नाचा पितृसूक्तेंकरून होम करावा. "अथवा श्राद्धदिवस प्राप्त झाला असतां पुरुषानें उपोषित रहावें, अथवा अशक्त असल्यास ब्राह्मणाकारणें उदकुंभ इत्यादिक अल्पदान करावें, अथवा गाईस तृण घालावें, किंवा पिंडप्रदान करावें, अथवा तिल, दर्भ यांहींकरून स्नानपूर्वक पितरांचें तर्पण करावें. अथवा तृणाचा भारा दहन करावा. धान्य किंवा तिळ अथवा अल्प दक्षिणा द्यावी. किंवा संकल्पापासून सर्व श्राद्धप्रयोग पठण करावा. सर्वांचा अभाव असतां अरण्यांत जाऊन ऊर्ध्वबाहु होत्साता स्वकीय काखा दाखवून हें पुढें सांगितलेलें वाक्य पठन करावें. तें असें—"**नमेस्ति वित्तं न धनं नचान्यच्छ्राद्धोपयोगिस्वपितॄन्नतोस्मि ॥ तृप्यंतुभक्त्यापितरोमयैतौ भुजौकृतौवर्त्मनिमारुतस्य**" प्रभासखंडांत दुसरेहि मंत्र सांगितले आहेत. याप्रमाणें अनुकल्प सांगितले.

---

अथश्राद्धभोजनेप्रायश्चित्तानि दर्शश्राद्धेषट्प्राणायामाः महालयादिश्राद्धेषुत्रिवर्षोर्ध्वं प्रतिवार्षिकेषुचषट्प्राणायामाः गायत्र्यादशकृत्वोभिमंत्रितस्यजलस्यपानंवा एवमन्येष्वप्यनुक्तप्रायश्चित्तश्राद्धेषूक्तजलपानमेव वृद्धिश्राद्धेप्राणायामत्रयं जातकर्मादिचूडांतसंस्कारांगवृ**द्धिश्राद्धेसांतपनकृच्छ्रं जातकर्मांगश्राद्धेचांद्रायणंवा अन्यसंस्कारांगश्राद्धउपवासः सीमंतसंस्कारेतत्संस्कारांगश्राद्धेचचांद्रायणं आपदिदशाहांतर्नवसंज्ञकश्राद्धेषुएकादशाहेचश्रा**द्धभोजनेप्राजापत्यकृच्छ्रम् द्वादशाहिकसपिंडीश्राद्धेऊनमासेचपादोनकृच्छ्रः द्वितीयमासिकत्रैपक्षिकोनषाण्मासिकोनाब्दिकेष्वर्धकृच्छ्रः अन्यमासिकेषुप्रथमाब्दिकेवर्षांतसपिंडनश्राद्धेचपादकृच्छ्रः उपवासोवा गुरवेद्रव्यंदातुंश्राद्धभोजनेसर्वत्रोक्तार्धम् जपशीलेतदर्धं अनापद्यूनमासांतेषुचांद्रायणंप्राजापत्यंच द्वितीयमासाद्युक्तचतुर्षुपादोनकृच्छ्रः त्रिमासादिषुपूर्वोक्तेष्वर्धकृच्छ्रः प्रथमाब्दिकेपादोनकृच्छ्रः द्वितीयतृतीयाब्दिकेएकोपवासः क्षत्रियश्राद्धेएतद्विगुणं वैश्यश्राद्धेत्रिगुणं शूद्रश्राद्धेसर्वत्रचतुर्गुणं चांडालविषजलसर्पपश्वादिहतपतितक्लीबादिनवश्राद्धेचांद्रायणं एकादशाहांतंचपराकश्चांद्रंच द्वादशाहादौपराकः द्विमासादिचतुर्ष्वतिकृच्छ्रः अन्यमासिकेषुकृच्छ्रः आब्दिकेपादः अभ्यासेसर्वत्रसर्वंद्विगुणं आमहेमश्राद्धेसांकल्पिकेचतत्तदुक्तप्रायश्चित्तार्धं यतिश्चब्रह्मचारीचपूर्वोक्तप्रायश्चित्तंकृत्वोपवासत्रयंप्राणायामशतंघृतप्राशनंचाधिकंचरेत् अनापदिद्विगुणंचरेत् दर्शादौगृहिवदेव ब्रह्मचारिणश्चौलसंस्कारेभोजनेकृच्छ्रः सीमंतेचांद्रं अन्येषूपवासः एकादशाहश्राद्धभोजनेचांद्रंपुनः**संस्कारश्चेतिहेमाद्रिः ॥**

## यानंतर श्राद्धीं भोजन केलें असतां प्रायश्चित्तें सांगतों.

दर्शश्राद्धीं सहा प्राणायाम; महाल्यादिक श्राद्धें, तीन वर्षांनंतरचीं प्रतिसांवत्सरिक

श्राद्धें यांचे ठायीं ( भोजन केलें असतां ) सहा प्राणायाम; अथवा गायत्रीमंत्रानें दहा वेळ उदक अभिमंत्रित करून तें प्राशन करावें. याप्रमाणें प्रायश्चित्तें न सांगितलेल्या अशा इतर श्राद्धांचे ठायींहि पूर्वोक्त उदकपानच करावें. वृद्धिश्राद्धाविषयीं तीन प्राणायाम करावे. जातकर्मापासून चौलापर्यंत जे संस्कार त्यांच्या अंगभूत वृद्धिश्राद्धाविषयीं सांतपन कृच्छ्र करावें, अथवा जातकर्माच्या अंगभूत श्राद्धाविषयीं चांद्रायण करावें. इतर संस्काराच्या अंगभूत वृद्धिश्राद्धीं उपवास करावा. सीमंतसंस्कार व त्या संस्काराचें अंगभूत श्राद्ध यांचे ठायीं चांद्रायण करावें. आपत्तिकालीं, दहा दिवसपर्यंत नवसंज्ञक श्राद्धें, एकादशाहश्राद्ध, यांचे ठायीं श्राद्धभोजन केलें असतां प्राजापत्यकृच्छ्र करावें. बाराव्या दिवसीं कर्तव्य जें सपिंडीश्राद्ध आणि ऊनमासिक श्राद्ध यांविषयीं पादोनकृच्छ्र करावें. द्वितीयमासिक, त्रैपक्षिक, ऊनषाण्मासिक आणि ऊनाब्दिक यांचे ठायीं अर्धकृच्छ्र करावें. इतर मासिकें, प्रथमाब्दिक आणि वर्षांतीं कर्तव्य सपिंडीश्राद्ध यांविषयीं पादकृच्छ्र, अथवा उपोषण करावें. गुप्त द्रव्य देण्यासाठीं श्राद्धभोजन करील तर सर्वत्र उक्त प्रायश्चित्ताचें अर्ध करावें. जप करणारा असेल तर त्यानें चतुर्थांश करावें. आपत्तिकाल नसतां ऊनमासिकपर्यंत श्राद्धांचे ठायीं चांद्रायण व प्राजापत्य हीं दोनहि करावीं. द्वितीयमासिकादिक जीं चार श्राद्धें सांगितलीं त्यांविषयीं पादोनकृच्छ्र करावें. त्रैमासिकादिक जीं पूर्वी सांगितलीं त्यांविषयीं अर्धकृच्छ्र करावें. प्रथमाब्दिकश्राद्धीं पादोनकृच्छ्र. द्वितीय, तृतीय ह्या आब्दिकश्राद्धीं एक उपोषण करावें. क्षत्रियाचें श्राद्ध असेल तर त्याविषयीं त्याहून द्विगुण जाणावें, वैश्यश्राद्धीं त्रिगुण जाणावें आणि शूद्रश्राद्धीं सर्वत्र चतुर्गुण जाणावें. चांडाल, विष, जल, सर्प, पशु इत्यादिकांपासून मृत; पतित; क्लीब इत्यादिकांच्या नवश्राद्धीं चांद्रायण करावें. एकादशाहांत श्राद्धीं पराक व चांद्रायण करावें. द्वादशाहादिश्राद्धीं पराक करावा. द्विमासिकादिक चार श्राद्धांचे ठायीं अतिकृच्छ्र करावा. इतर मासिक श्राद्धांचे ठायीं कृच्छ्र. आब्दिकश्राद्धीं पादकृच्छ्र. अभ्यास असतां सर्वत्र सर्व द्विगुण करावें. आमश्राद्ध, हिरण्यश्राद्ध आणि सांकल्पिक या श्राद्धीं त्या त्या उक्त प्रायश्चित्ताचें अर्ध जाणावें. संन्यासी, ब्रह्मचारी, यांनीं पूर्वोक्त प्रायश्चित्त करून तीन उपोषणें, शंभर प्राणायाम, घृतप्राशन हें अधिक करावें. आपत्ति नसतां द्विगुण करावें. दर्शादिक श्राद्धीं गृहस्थाश्रमीसारखेंच ( संन्यासी, ब्रह्मचारी यांनीं ) प्रायश्चित्त करावें. ब्रह्मचारी यानें चौलसंस्कारीं भोजन केलें असतां कृच्छ्रप्रायश्चित्त करावें. सीमंतसंस्कारीं चांद्रायण, अन्यसंस्कारीं उपोषण, एकादशाहश्राद्धीं भोजन केलें असतां चांद्रायण व पुनःसंस्कार असें हेमाद्रिग्रंथांत आहे.

---

**अथक्षयाहश्राद्धेविशेषः** तत्रयस्यपित्रादेर्मरणंयन्मासेयत्पक्षेयत्तिथौतद्दिनंतस्यमृताहस्तत्रपित्रादित्रिदैवत्यंवार्षिकश्राद्धंपुरूरवार्द्रवदेवसहितंकार्यं नचात्रसपत्नीकत्वंपित्रादीनां नाप्यत्रमातामहादित्रयं अत्रतिथिद्वैधेनिर्णयोरात्रावपिकार्यत्वंग्रहणदिनेतत्प्राप्तौनिर्णयोमलमासादिनिर्णयोदर्शदिनेतत्प्राप्तौनिर्णयः शुद्धिश्राद्धनिर्णयश्चश्राद्धकालनिर्णयप्रसंगेनपूर्वोक्तोनुसंधेयः पारणेमरणेचैवतिथिस्तात्कालिकीमतेतिवचनात् मरणकालिकतिथेरपराण्हादिव्याप्त्याब्दिकश्राद्धनिर्णयोज्ञेयः पित्रोःप्रथमाब्दिकश्राद्धंविभक्तैर्भ्रातृभिःपृथक्कार्यम् अविभक्त

त्वेज्येष्ठेनैव मातृमृताहेमात्रादित्रिदैवत्यंश्राद्धं मातापित्रोर्मृताहैक्येपूर्वंपितुः श्राद्धंकृत्वास्नात्वा मातुःश्राद्धंकार्यम् एवमेकदिनेपित्रोर्मरणेनमातुर्भर्त्रासहदाहकरणेपिज्ञेयं सहगमनेत्वेकमेवपाकंकृत्वापितृमातृपार्वणद्वययुतंश्राद्धम् षट्पिंडाअर्घ्याश्चविश्वेदेवास्तुनभिन्नाः सहगमने सुवासिनीमरणेचविप्रपंक्तौसुवासिनीमधिकांभोजयेत् सुवासिन्यैकुंकुमादिकमलंकारान्दद्यात् सर्वत्रस्त्रीणांश्राद्धेवस्त्रयज्ञोपवीतगंधादिकमेवविप्रेभ्योदेयंनकुंकुमादि एवंसापत्नमातुर्मातामहतत्पत्न्योर्भ्रातुःश्वश्रूश्वशुरयोर्गुरोः पितृष्वसुर्मातृष्वसुर्भार्यायाभर्तुर्भगिन्यादेश्चैतेषामपुत्रत्वेपार्वणविधिनैवप्रतिवार्षिकंश्राद्धंकार्यं केचित्पितृमातृमातामहमातामहीव्यतिरिक्तानांसर्वेषामेकोद्दिष्टविधानेनैवेत्याहुः अत्रदेशाचारानुसारेणव्यवस्था पित्रादिवार्षिकदिनेपितृव्यादिवार्षिकप्राप्तौस्वयंपित्रादिश्राद्धंकार्यं पितृव्यादिश्राद्धंतुपुत्रशिष्यादिद्वाराकार्यं दिनांतरेवास्वयंकार्यं संन्यासिनोप्याब्दिकादिपुत्रःकुर्यात्सपार्वणं प्रथमेवर्षेवर्षांतसपिंडनपक्षेमृताहात्पूर्वदिनेसपिंडनमब्दपूर्तिश्राद्धंचकृत्वापरेद्युर्वार्षिकंकार्यं ॥

## क्षयाहश्राद्धीं विशेष सांगतों.

त्यामध्यें ज्याच्या पिता इत्यादिकांचें, ज्या मासांत, ज्या पक्षांत व ज्या तिथीस मरण झालें असेल तो त्याचा मृत दिवस होय; यास्तव त्या दिवशीं पित्रादि तीन देवतांनीं युक्त असें सांवत्सरिक श्राद्ध पुरूरवार्द्रवदेवसहित करावें. ह्या सांवत्सरिकश्राद्धीं पित्रादित्रयीस सपत्नीकत्व नाहीं, व एथें मातामहादित्रयीहि नाहीं. याविषयीं दोन दिवस तिथि असतां निर्णय, रात्रीहि कर्तव्यत्व, ग्रहणदिवसीं तें प्राप्त असतां त्याचा निर्णय, मलमासादिकाचा निर्णय, दर्शदिवसीं तें प्राप्त असतां त्याचा निर्णय, आणि शुद्धिश्राद्धाचा निर्णय श्राद्धकालाचे निर्णय-प्रसंगेंकरून पूर्वी सांगितलेला जाणावा. "पारणा, मरण, यांविषयीं तत्कालव्यापिनी तिथि घ्यावी," असें वचन आहे यास्तव मरणकालिक तिथीच्या अपराण्हादिकालव्याप्तीनें आब्दिकश्राद्धांचा निर्णय जाणावा. मातापितरांचें प्रथमाब्दिक श्राद्ध, विभक्त भ्रात्यांनीं पृथक् करावें; विभक्त नसतां ज्येष्ठानेंच करावें. मातेच्या मृत दिवसीं मात्रादि तीन देवतांनीं युक्त श्राद्ध करावें. माता व पिता यांचा मृत दिवस एक असेल तर पूर्वी पित्याचें श्राद्ध करून स्नान करून मातेचें श्राद्ध करावें. याप्रमाणें एक दिवसीं मातापितरांस मरण असल्यामुळें मातेचें दहन भर्त्यासह केलें असतांहि असाच निर्णय जाणावा. सहगमन (सती गेलेली) असेल तर एकच पाक करून पिता व माता ह्या दोन पार्वणांनीं युक्त श्राद्ध करावें; पिंड व अर्घ्यें सहा करावीं. विश्वेदेव तर निराळे करूं नयेत. सहगमन, व सुवासिनीमरण असतां ब्राह्मणांच्या पंक्तीचे ठायीं अधिक एक सुवासिनी भोजनास सांगावी. सुवासिनीस कुंकुम इत्यादिक स्त्रियेचे अलंकार द्यावे. सर्वत्र स्त्रियांचे श्राद्धांत ब्राह्मणास वस्त्र, यज्ञोपवीत, गंध इत्यादिक उपचार द्यावे, कुंकुमादिक देऊं नये. याप्रमाणें सापत्नमाता, मातामह, मातामहपत्नी, भ्राता, सासू, सासरा, गुरु, आत, मावशी, भार्या, भर्ता, भगिनी इत्यादिकांचें, ह्यांस पुत्र नसतील तर पार्वणविधीकरूनच प्रतिवार्षिक श्राद्ध करावें. कोणी ग्रंथकार, पिता, माता, मातामह आणि मातामही यांवांचून इतर सर्वांचें एकोद्दिष्टविधीकरून श्राद्ध करावें असें

सांगतात. याविषयीं देशाचारानुरूप व्यवस्था जाणावी. पिता इत्यादिकांच्या वार्षिकश्राद्ध-दिवसीं पितृव्यादिकांचें वार्षिक श्राद्ध प्राप्त होईल तर आपण (पुत्रानें) पिता इत्यादिकांचें श्राद्ध करावें. पितृव्य इत्यादिकांचें श्राद्ध करणें तें तर पुत्र, शिष्यादिक यांकडून करवावें, अथवा दुसऱ्या दिवसीं आपण करावें. "संन्यासी याचेंहि आब्दिकादि श्राद्ध पार्वणसहित असें पुत्रानें करावें." वर्षांतीं सपिंडी करण्याचा पक्ष असेल तर प्रथमवर्षी मृतदिवसाच्या पूर्वदिवसीं सपिंडी व अब्दपूर्त्तिश्राद्ध करून दुसऱ्या दिवसीं (मरणदिवसीं) वार्षिक श्राद्ध करावें.

---

**अथक्षयाहाज्ञानेनिर्णयः** यस्यमृतस्यदेशांतरमरणादिनामासोज्ञायतेतिथिर्नज्ञायतेतस्यतन्मासेदर्शेशुक्लैकादश्यांकृष्णैकादश्यांवाप्रतिवार्षिकश्राद्धं मृततिथिर्ज्ञातामासोनज्ञातस्तदामार्गशीर्षेमाघेवाभाद्रेवाषाढेवातत्तिथौवार्षिकम् तिथिमासयोरज्ञानेयद्दिनेदेशांतरंप्रस्थितस्तन्मासदिवसौग्राह्यौ प्रस्थानदिनादेरज्ञानेमृतवार्ताश्रवणतिथिमासौ प्रस्थानवार्ताश्रवणयोर्मासज्ञानेतिथेरज्ञानेतन्मासेदर्शादौ प्रस्थानादिमासविस्मरणेतिथिस्मरणेमार्गशीर्षादिषूक्तचतुर्षुतत्तिथौवार्षिकम् मरणतच्छ्रवणप्रस्थानानांदिनमासयोरज्ञानेमाघस्यमार्गस्यवादर्शेश्राद्धं द्वादशादिवर्षप्रतीक्षोत्तरंप्रतिकृतिदाहेदाहदिनेवार्षिकादि ॥

## क्षयदिवसाचें अज्ञान असतां त्याचा निर्णय सांगतों.

देशांतरीं मरण प्राप्त झाल्यामुळें ज्या मृत झालेल्याचा मास माहीत असून तिथि माहीत नसेल तर त्या मासांत दर्श, शुक्लैकादशी अथवा कृष्णैकादशी यांतून कोणत्याहि दिवसीं त्याचें वार्षिक श्राद्ध करावें. मृततिथि माहीत असून मास माहीत नसेल तर मार्गशीर्ष, माघ, अथवा भाद्रपद किंवा आषाढ या मासांत त्या तिथीचे ठायीं वार्षिक श्राद्ध करावें. तिथि व मास या दोहोंचेंहि अज्ञान असेल तर ज्या दिवसीं देशांतरीं प्रस्थान केलें तो दिवस व मास घ्यावे. प्रस्थानदिवस इत्यादि माहीत नसेल तर मृत झाल्याची वार्ता ज्या तिथीस श्रुत असेल ती तिथि व मास घ्यावे. प्रस्थान व वार्ताश्रवण यांच्या मासाचें ज्ञान व तिथीचें अज्ञान असेल तर त्या मासांत दर्शादिक तिथींचे ठायीं करावें. प्रस्थानादिमासाचें विस्मरण असून तिथीचें स्मरण असेल तर मार्गशीर्षादि उक्त चार मासांत त्या, तिथीचे ठायीं करावें. मरण, मृतवार्ताश्रवण आणि प्रस्थान यांचा दिवस व मास यांचें अज्ञान असेल तर माघ, किंवा मार्गशीर्ष या मासांत अमावास्येचे दिवसीं श्राद्ध करावें. बारा वर्षेपर्यंत प्रतीक्षा केल्यानंतर पालाशविधीनें दहन केलें असतां दहनदिवसीं वार्षिकादिक करावें.

---

**अथश्राद्धविघ्नेनिर्णयः** निमंत्रणोत्तरंविप्रस्यसूतकेमृतकेवाप्राप्तेआशौचंन निमंत्रणंचद्वितीयक्षणरूपंसमंत्रकंग्राह्यंनलौकिकमितिभाति कर्तुस्तुपाकपरिक्रियोत्तरमाशौचाभावः पाकपरिक्रियाचसमंत्रकंपाकप्रोक्षणमित्याहुः कर्तुर्गृहेभोजनारंभोत्तरंजननेमरणेवाभोजनशेषंत्यक्त्वापरकीयजलेनाचामेत् ममतुप्रतिभातिसर्वस्याप्याशौचापवादस्यानन्यगतिविषयत्वात्संकटाभावेपाकपरिक्रियोत्तरमपिकर्तुराशौचेतदंतेश्राद्धम् भोक्तुस्तुभोजनारंभात्प्रागाशौचज्ञा

नेन्योनिमंत्रणीयः भोजनारंभोत्तरमाशौचेतुकर्त्रातथैवश्राद्धंसमापनीयं भोक्त्रातुभोजनांतेआशौचप्रकरणेवक्ष्यमाणंप्रायश्चित्तंकार्यं संकटेतुपूर्वोक्तमितियुक्तंचेद्ग्राह्यं ॥

## यानंतर श्राद्धास विघ्न असतां त्याचा निर्णय सांगतों.

निमंत्रण केल्यानंतर ब्राह्मणास जननाशौच अथवा मृताशौच प्राप्त असतां आशौच नाहीं. एथें निमंत्रण दुसरा क्षण समंत्रक देणें तें घ्यावें, लौकिक घेऊं नये असें वाटतें. कर्त्यास पाकपरिक्रियेनंतर आशौच नाहीं. पाकपरिक्रिया ह्मणजे मंत्रेंकरून पाकप्रोक्षण करणें तें. कर्त्याचे घरीं भोजनास आरंभ झाल्यानंतर जनन किंवा मरण झालें तर भोजनशेष ( पात्रावरचें शेष अन्न ) टाकून दुसऱ्याकडचे उदकानें आचमन करावें. मला तर असें वाटतें कीं, आशौचाचा सर्व अपवाद अनन्यगतिविषयक असल्यामुळें, संकट नसेल तर पाकपरिक्रिया ( पाकप्रोक्षण ) झाली असेल तथापि कर्त्यास आशौच असतां त्याची निवृत्ति झाल्यानंतर श्राद्ध करावें. भोजन कराणाऱ्या ब्राह्मणास तर भोजनास आरंभ होण्याचे पूर्वीं आशौचाचें ज्ञान झालें असतां दुसरा ब्राह्मण बोलवावा. भोजनाचे आरंभानंतर आशौच प्राप्त होईल तर कर्त्यानें तसेंच श्राद्ध समाप्त करावें. भोक्त्यानें तर, भोजनांतीं, आशौचप्रकरणीं सांगावयाचें प्रायश्चित्त करावें. संकट असेल तर पूर्वीं सांगितलेलें योग्य वाटेल तर घ्यावें.

---

अथसिंधौपाकोत्तरमाशौचाभाववचनस्यकर्तृमात्रपरत्वाद्भोक्तुः प्रायश्चित्तमाशौचंचोक्तं तद्यथा ब्राह्मणस्याशौचेश्राद्धेसकृत्कामतोन्नभोजनेसांतपनकृच्छ्रं अभ्यासेमासंकृच्छ्रंचरेत् अज्ञानाद्विप्रादीनांज्ञाताशौचानामन्नभक्षणे एकाहंत्र्यहंपंचाहंसप्ताहंक्रमेणाभोजनमंतेपंचगव्याशनंच अभ्यासेद्विगुणं आशौचंतुब्राह्मणादीनामाशौचेयःसकृदेवान्नमश्नातितस्यतावदाशौचंयावत्तेषामाशौचंतदंतेप्रायश्चित्तंकुर्यादितिविष्णूक्तंज्ञेयं श्राद्धकालेन्यकालेचैतत्सममेवेतिज्ञेयं दातृभोक्तृभ्यामुभाभ्यामाशौचंनज्ञातंचेन्नदोषः आशौचमध्येश्राद्धदिनपातेआशौचांतेएकादशाहेकार्यम् एकादशाहोमलमासेचेन्मलेपिकार्यम् तत्रातिक्रमेशुद्धमासे[३] एतन्मासिकेप्रतिवार्षिकेचज्ञेयम् दर्शादीनांतुपंचमहायज्ञादिवल्लोपएवनाशौचांतेकर्तव्यत्वंनापिप्रायश्चित्तं आशौचंविनादर्शादीनांलोपेप्युपवासादिरूपंप्रायश्चित्तमेवनकालांतरेनुष्ठानं एकादशाहेऽसंभवेमावास्यायांशुक्लकृष्णैकादश्योर्वावार्षिकं मासिकंचोदकुंभंचयद्यदंतरितंभवेत् तत्तदुत्तरसातंत्र्यादनुष्ठेयंप्रचक्षते केचिदाब्दिकमप्यंतरितंदर्शादिकालासंभवेग्रिममासेतत्तिथौकार्यमित्याहुः आशौचेतरव्याध्यादिविघ्नेविस्मृतौचैवमेव केचिद्व्याध्यादिविघ्नेपुत्रादिनातद्दिने एवान्नेनाब्दिकमाहुः ॥

यानंतर निर्णयसिंधूमध्यें, पाकप्रोक्षणानंतर आशौच नाहीं असें जें वचन तें कर्त्याविषयीं असल्यामुळें भोक्त्यास प्रायश्चित्त व आशौच सांगितलें आहे. तें असें—ब्राह्मणास आशौचामध्यें श्राद्धीं एकवार स्वेच्छेनें भोजन झालें असतां सांतपनकृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे. अभ्यास

---

१ भोजनकालेसूतकप्राप्तौतदन्नभोजनेवक्ष्यमाणमित्यर्थः ॥

२ भोजनकालीं आशौच प्राप्त असतां, तें अन्न भक्षण केलें असतां सांगावयाचें असा अर्थ.

३ एकादशाहातिक्रमेमलेनकार्यमित्यर्थः ॥

असतां मासपर्यंत कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. समजलेलें आहे आशौच ज्यांस अशा ब्राह्मणादिकांचें अन्न न समजून भक्षिलें असतां ब्राह्मणान्नाच्या भोजनीं एक दिवस, क्षत्रियान्नाच्या भोजनीं तीन दिवस, वैश्यान्नाच्या भोजनीं पांच दिवस, आणि शूद्रान्नभोजनीं सात दिवस उपवास करून अंतीं पंचगव्य प्राशन करावें. अन्नभक्षणाचा अभ्यास असतां द्विगुण करावें. आशौच तर, ब्राह्मणादिकांचे आशौचामध्यें एकवारच जो अन्नभक्षण करितो त्यानें, जितकें आशौची यांस आशौच असेल तितकें आशौच धरून अंतीं प्रायश्चित्त करावें असें विष्णूनें सांगितलेलें जाणावें. श्राद्धकालीं व इतरकालीं हें सारखेंच आहे असें जाणावें. दाता व भोक्ता ह्या उभयतांस आशौच समजलें नसल्यास दोष नाहीं. आशौचामध्यें श्राद्धदिवस प्राप्त होईल तर आशौचनिवृत्ति झाल्यानंतर अकराव्या दिवसीं तें श्राद्ध करावें. अकरावा दिवस मलमासांत प्राप्त झाल्यास मलमासांतहि करावें. अकराव्या[1] दिवसाचें उल्लंघन होईल तर शुद्धमासांत करावें. हा निर्णय मासिकश्राद्ध व प्रतिसांवत्सरिक यांविषयीं जाणावा. दर्श इत्यादिक श्राद्धांचा तर, पंचमहायज्ञादिकांसारखा लोपच करावा, आशौचांतीं करूं नये व लोपप्रायश्चित्तहि करूं नये. दर्शादिक श्राद्धाचा लोप आशौचावांचून झाला असतांहि उपवासादिरूप प्रायश्चित्तच करावें, दुसऱ्या कालीं दर्शादिक श्राद्ध करूं नये. अकराव्या दिवसीं असंभव असेल तर अमावास्या किंवा शुक्लकृष्ण एकादशी या दिवसीं वार्षिक श्राद्ध करावें. “मासिकश्राद्ध, उदकुंभश्राद्ध असें जें जें अंतरित असेल तें तें पुढच्या तंत्रासहवर्तमान करावें असें सांगतात.” कोणी ग्रंथकार, अंतरित ( अंतरलेलें ) वार्षिकश्राद्धहि दर्शादिकालाचा असंभव असतां पुढच्या मासांत त्या त्या तिथीस करावें, असें ह्मणतात. आशौचाव्यतिरिक्त व्याधि इत्यादिक विघ्न व विस्मरण असतां असाच निर्णय जाणावा. कोणी ग्रंथकार, व्याधि इत्यादिक विघ्नप्राप्त असतां पुत्रादिकानें त्या दिवसींच अन्नेंकरून वार्षिकश्राद्ध करावें असें ह्मणतात.

---

**अथभार्यारजोदोषे तत्रदर्शयुगादिमन्वाद्यष्टकान्वष्टकादिश्राद्धानिपाककर्त्रंतरसत्त्वेन्नेन तद्दिनेकार्याण्यन्यथामादिद्रव्येण कालादर्शोदर्शश्राद्धंपंचमेहनीतिपक्षांतरमाह सकृन्महालयस्तुदर्शेभार्यारजसिमुख्यकालातिक्रमभियातत्रैवकार्यः एवमाश्विनशुक्लपंचम्यंतकालेप्यूर्ध्वं अष्टम्यादौसकृन्महालयोभार्यारजोदोषेनकार्यः कालान्तरसत्त्वादित्यादिमहालयप्रकरणोक्तमनुसंधेयं प्रत्याब्दिकंमासिकंचरजोदोषेपितद्दिनएवकार्यमित्येकःपक्षः पंचमेहनिकार्यमित्यपरः पक्षद्वयेपिग्रंथसंमतिःशिष्टाचारसंमतिश्च भार्यांतरसत्त्वेतद्दिनएवेतिसर्वसंमतं तद्दिनेकरणपक्षेश्राद्धकालेरजस्वलादर्शनादिकंवर्ज्यं तेनतादृशगृहासंभवेयोग्यपाककर्त्रसंभवेचपंचमेहनीतिपक्षःश्रेयान् अपुत्रास्त्रीरजोदोषेभर्तुराब्दिकादिकंपंचमेहनिकुर्यान्नत्वन्यद्वारातद्दिने॥**

## यानंतर स्त्री रजस्वला असतां निर्णय सांगतों.

त्यामध्यें दर्श, युगादि, मन्वादि, अष्टका, अन्वष्टका इत्यादि श्राद्धें पाक करणारा दुसरा असेल तर अन्नेंकरून त्या दिवसीं करावीं, पाक करणारा नसल्यास आमान्नादि द्रव्यानें करावीं.

---

[1] अकराव्या दिवसाचें उल्लंघन झालें असतां मलमासांत करूं नये असा अर्थ.

कालादर्श ग्रंथ, दर्शश्राद्ध पांचव्या दिवशीं करावें असा दुसरा पक्ष सांगतो. सकृन्महालय तर, स्त्री रजस्वला असतां मुख्य कालाचें उल्लंघन होतें या भीतीस्तव त्याच दिवशीं करावा. याप्रमाणें आश्विनशुक्लपंचमीपर्यंत जो काल त्याविषयींहि असाच निर्णय जाणावा. स्त्री रजस्वला असतां अष्टमी इत्यादि तिथींचे ठायीं सकृन्महालय करूं नये. कारण, त्यास दुसरा काल आहे, इत्यादिक महालयप्रकरणीं सांगितलेला निर्णय जाणावा. प्रतिसांवत्सरिक व मासिक श्राद्ध हीं श्राद्धें स्त्री रजस्वला असतांहि त्या दिवसींच करावीं असा एक पक्ष. पांचव्या दिवसीं करावीं असा दुसरा पक्ष. दोनहि पक्षांविषयीं ग्रंथसंमति व शिष्टाचारसंमति आहे. दुसरी स्त्री असेल तर त्या दिवसींच करावें असें सर्वसंमत आहे. त्या दिवसीं करण्याचा पक्ष असेल तर श्राद्धकालीं रजस्वलादर्शनादिक वर्ज्य करावें. यावरून तसें ( रजस्वलादर्शन न होई असें ) गृह नसेल व यथायोग्य पाक करणारा नसेल तर पांचव्या दिवसीं करावें हा पक्ष उत्तम. अपुत्र स्त्री रजस्वला असेल तर तिणें भर्त्याचें वार्षिकादिश्राद्ध पांचव्या दिवसीं करावें; दुसऱ्याकडून त्या दिवसीं करवूं नये.

अथपतिमुद्दिश्याग्निप्रवेशो तत्रसहगमनमेवविप्राणां क्षत्रियादेस्तुसहगमनमनुगमनंच एकचित्यारोहेणदंपत्योःसहैवमंत्रवद्दाहःसहगमनं भर्तुःसमंत्रकदाहोत्तरंपृथक्चितावग्निप्रवेशोनुगमनं तत्रोभयत्रापितिथ्यैक्येएकदिनेएवतंत्रेणपाकादिकृत्वादर्शवत्षट्पिंडषडर्घ्यविप्रभेदयुतंपितृपार्वणमातृपार्वणविशिष्टंश्राद्धंकार्यं विश्वेदेवास्तुनभिन्नाभिन्नावा तिथिभेदेपिश्राद्धदिनैक्येएवमेव तिथिभेदाच्छ्राद्धदिनभेदेतुवार्षिकादिपृथगेवकार्यं केचित्तुसहगमने तिथिभेदेपिभर्तुःक्षयाहश्राद्धदिनेएवपत्न्याःश्राद्धं नतुदिनांतरइत्याहुस्तदल्पकालव्यवधानेयोज्यं नतुद्वित्र्यादितिथिव्यवधाने ॥

## यानंतर पतीस उद्देशून स्त्रीनें अग्निप्रवेश केला असतां त्याविषयीं सांगतों.

त्यामध्यें ब्राह्मणांस सहगमनच विहित होय. क्षत्रियादिकांस तर सहगमन आणि अनुगमन हीं दोनहि विहित होत. एका चितीवर आरोहण करून दंपतीचा बरोबरच समंत्रक जो दाह ( दहन ) करणें तें सहगमन होय. भर्त्याचा समंत्रक दाह झाल्यानंतर निराळ्या चितेचे ठायीं जो अग्निप्रवेश करणें तें अनुगमन होय. त्यामध्यें दोहोंचीहि एक तिथि असेल तर एक दिवसींच एकतंत्रानें पाक इत्यादिक करून दर्शाप्रमाणें सहा पिंड, सहा अर्घ्यें पृथक् पृथक् ब्राह्मणांचे ठायीं पितृपार्वण व मातृपार्वण एतद्विशिष्ट श्राद्ध करावें. विश्वेदेव तर, भिन्न किंवा अभिन्न असावे असा विकल्प आहे. तिथि निराळी असली तथापि श्राद्धदिवस एक असेल तर असाच निर्णय जाणावा. तिथि निराळी असल्यामुळें श्राद्धदिवस निराळा असेल तर वार्षिकादिक निराळेंच करावें. कोणी ग्रंथकार तर, सहगमनाचे ठायीं तिथि निराळी असली तथापि भर्त्याच्या क्षयाहश्राद्धदिवसींच पत्नीचें श्राद्ध करावें, अन्य दिवसीं करूं नये असें जें ह्मणतात तें अल्प कालाचें अंतर असल्यास त्याविषयीं योजावें, दोन, तीन इत्यादि तिथींचें व्यवधान ( अंतर ) असतां योजूं नये.

अथश्राद्धसंपातेनिर्णयः तत्रपित्रोर्मृताहैक्येपूर्वंपितुःश्राद्धंततःपाकभेदेनमातुरित्युक्तंगृहदाहादिनासपिंडानांयुगपन्मरणेसंबंधसामीप्यक्रमेणश्राद्धानिपाकभेदेनपृथक्कुर्यात् पृथक्पाकेनभिन्नश्राद्धाशक्तौ तंत्रेणश्रपणंकृत्वाश्राद्धंकुर्यात्पृथक्पृथक् क्रमेणैकदिनेमरणेमरणक्रमेण तत्रैकदिनेएकस्त्रयाणांश्राद्धानिनकुर्यात् वार्षिकश्राद्धत्रयप्राप्तौश्राद्धद्वयंस्वयंकुर्यात् तृतीयादिभ्रात्रादिनाकारयेद्दिनांतरेवाकुर्यात् पित्रोःसपिंडस्यचसंपातेतूक्तंश्राद्धंकृत्वातुतस्यैव पुनःश्राद्धंनतद्दिने नैमित्तिकंतुकर्तव्यंनिमित्तोत्पत्त्यनुक्रमात् तथाषण्णवतिश्राद्धेषुसमानदेवताकत्वेतंत्रेणश्राद्धानि अधिकदेवताकत्वेपृथक्श्राद्धानि वार्षिकमासिकोदकुंभश्राद्धेषुनित्यश्राद्धंदर्शादिश्राद्धंचदेवतानांभेदात्पृथक्कार्यं महालयेतीर्थश्राद्धेदर्शादिषण्णवतिषुचनित्यश्राद्धस्यप्रसंगसिद्धिः मासिकेनोदकुंभश्राद्धस्यप्रसंगसिद्धिः तत्रप्रसंगसिद्धिस्थलेदर्शादिकंप्रसंगिश्राद्धमेवसंकल्पपूर्वंसांगमनुष्ठेयं प्रसंगसिद्धंतुनित्यादिकंनसंकल्पादावुच्चार्यमिति लोपापरपर्यायएवप्रसंगसिद्धिपदेनोच्यते तंत्रसिद्धौतुप्रकारद्वयंभाति दर्शव्यतीपातश्राद्धयोस्तंत्रानुष्ठानेषट्पुरुषानुद्दिश्यदर्शश्राद्धंव्यतीपातश्राद्धंचतंत्रेणकरिष्येइतिसंकल्प्यदर्शपातश्राद्धयोःदेवार्थक्षणः करणीयइतिदैवेनिमंत्र्यदर्शपातश्राद्धयोःपित्राद्यर्थेक्षणःकरणीयइतिवर्गद्वयार्थंविप्रद्वयादिकंनिमंत्र्यैकमेवश्राद्धंकार्यमित्येकःप्रकारःअथवापूर्ववत्संकल्प्यदैवेतंत्रेणैकमेवविप्रंनिमंत्र्य षोडशमासिकतंत्रवत्दर्शश्राद्धेक्षणःकरणीयइतिदर्शविप्रनिमंत्रणानंतरंव्यतीपातश्राद्धेक्षणइतिविप्रांतरंनिमंत्र्यविप्रचतुष्टयादियुतंपातश्राद्धेपिंडाभावात्षडर्घ्यपिंडयुतंश्राद्धमेकेनैवपाकेनकार्यमित्यपरःप्रकारःएवंत्रिचतुरादिश्राद्धानांतंत्रेऊह्यं अत्रपक्षद्वयेविचार्ययुक्ततरपक्षःसद्भिरनुष्ठेयः ॥

## आतां श्राद्धसंपात ह्मणजे एक दिवसीं अनेक श्राद्धें प्राप्त असतां निर्णय सांगतों.

त्यामध्यें मातापितरांचा मृतदिवस एक असेल तर पूर्वी पित्याचें श्राद्ध, नंतर निराळा पाक करून मातेचें करावें असें पूर्वी सांगितलें आहे. घराचें दहन इत्यादि कारणानें सपिंडांस एककालीं मरण प्राप्त झालें असतां संबंधाच्या जवळच्या क्रमानें श्राद्धें, निरनिराळा पाक करून करावीं. निरनिराळा पाक करून निरनिराळीं श्राद्धें करण्यास शक्ति नसेल तर, "एकतंत्रानें पाक करून श्राद्धें निरनिराळीं करावीं." क्रमेंकरून एक दिवसीं मरण असतां मरणाच्या क्रमेंकरून करावीं. त्यांमध्यें एक दिवसीं एकानें तिघांचीं श्राद्धें करूं नयेत. तीन वार्षिकश्राद्धें प्राप्त असतां दोन श्राद्धें स्वतां करावीं. तिसरें इत्यादिक श्राद्ध भ्राता इत्यादिकांकडून करवावें, अथवा दुसऱ्या दिवसीं स्वतां करावें. मातापितरांचें व सपिंडाचें श्राद्ध एक दिवसीं प्राप्त असेल तर त्याविषयीं पूर्वी सांगितलें आहे. "एकवार ज्याचें श्राद्ध केलें त्याचेंच पुनः श्राद्ध त्या दिवसीं करूं नये; नैमित्तिक असेल तर करावें; कारण, निमित्ताच्या उत्पत्तीचा अनुक्रम आहे." ह्मणजे षण्णवति श्राद्धांचे ठायीं समान देवता असतां एकतंत्रानें श्राद्धें करावीं. अधिक देवता असतील तर पृथक् श्राद्धें करावीं. वार्षिक, मासिक आणि उदकुंभश्राद्ध हीं असतां नित्यश्राद्ध व दर्शादिक श्राद्ध यांच्या देवता भिन्न असल्यामुळें तीं

पृथक् करावीं. महालय, तीर्थश्राद्ध आणि दर्शादिक षण्णवतिश्राद्धें हीं असतां नित्यश्राद्धाची प्रसंगसिद्धि होते. मासिकश्राद्धेंकरून उदकुंभश्राद्धाची प्रसंगसिद्धि होते. त्या प्रसंगसिद्धिस्थलीं दर्शादिक प्रसंगिश्राद्ध निश्चयें संकल्पपूर्वक सांग करावें. प्रसंगसिद्ध तर नित्यादिक संकल्पादिकांत उच्चारूं नये असा जो लोपाचा दुसरा पर्याय त्यालाच प्रसंगसिद्धि असें नांव आहे. तंत्रसिद्धीविषयीं दोन प्रकार दिसतात–दर्शश्राद्ध व व्यतीपातश्राद्ध हीं एकतंत्रानें कर्तव्य असतां सहा पुरुषांचा उद्देश करून " **दर्शश्राद्धं व्यतीपातश्राद्धंच तंत्रेण करिष्ये,** " असा संकल्प करून " **दर्शपातश्राद्धयोःदेवार्थक्षणःकरणीयः** " असें दैवब्राह्मणास निमंत्रण करून " **दर्शपातश्राद्धयोःपित्राद्यर्थेक्षणःकरणीयः** " याप्रमाणें दोन त्र्यींसाठीं दोन इत्यादि ब्राह्मणांस निमंत्रण करून एकच श्राद्ध करावें, असा एक प्रकार. अथवा पूर्वीप्रमाणें संकल्प करून देवांकडे एकतंत्रानें एकच ब्राह्मणास निमंत्रण करून षोडशमासिकश्राद्धांच्या तंत्राप्रमाणें " **दर्शश्राद्धेक्षणःकरणीयः** " याप्रमाणें दर्शाच्या ब्राह्मणाचें निमंत्रण केल्यानंतर " **व्यतीपातश्राद्धेक्षणः०** " असें दुसऱ्या ब्राह्मणास निमंत्रण करून चार इत्यादि ब्राह्मणांनीं युक्त, व्यतीपातश्राद्धीं पिंडदान नाहीं याकरितां सहा अर्घ्यांनीं युक्त, सपिंडक श्राद्ध एकाच पाकानें करावें असा दुसरा प्रकार. याप्रमाणें तीन, चार इत्यादि श्राद्धांचे तंत्राविषयीं असाच प्रकार जाणावा. ह्या दोन पक्षांविषयीं विचार करून दोहोंतून जो योग्य वाटेल तो विद्वानांनीं ग्रहण करावा.

---

मयूखेतुसपिंडकेनदर्शश्राद्धेनापिंडकस्यव्यतीपातादिश्राद्धस्यैकदेवताकस्यप्रसंगसिद्धिरेव नतंत्रसिद्धिस्तंत्रोदाहरणंतुपातसंक्रांत्यादिरित्युक्तं यत्त्वन्वष्टक्येनपितृमातृवार्षिकमासिकयोःप्रसंगसिद्धिरित्युक्तंतन्महालयेनवार्षिकसिद्ध्यापत्त्याबहुग्रंथविरुद्धं यत्रचदर्शवार्षिकश्राद्धादौ देवताभेदाच्छ्राद्धभेदस्तत्रनिमित्तानियतिश्चात्रपूर्वानुष्ठानकारणमितिवाक्यात् पूर्वंवार्षिकंततोदर्शःयत्सर्वान्प्रत्येकरूप्येणैकदानप्राप्नोति तदनियतनिमित्तकंवार्षिकंमासिकंवापूर्वंकार्यमितिवाक्यार्थः वार्षिकमासिकादीनांसंपातेपितृपूर्वकत्वसंबंधसामीप्यादिकंचानुपदमेवोक्तं दर्शमहालययोःसंपातेपूर्वंमहालयस्ततोदर्शः दर्शवार्षिकमहालययोःप्राप्तौपूर्वंवार्षिकंततो **महालयस्ततोदर्शइतित्रयंपाकभेदेन विस्तरोमहालयप्रकरणेतथा काम्यतंत्रेणनित्यस्यश्राद्धस्य तंत्रंसिद्ध्यति ॥**

मयूखांत तर, सपिंडक जें दर्शश्राद्ध तेणेंकरून अपिंडक, एकदेवताक अशा व्यतीपातादि श्राद्धांची प्रसंगसिद्धिच होते, तंत्रसिद्धि नाहीं, तंत्राचें उदाहरण तर व्यतीपात संक्रांति इत्यादिक असें सांगितलें. अन्वष्टक्यश्राद्धेंकरून पित्याचें व मातेचें वार्षिक व मासिक या श्राद्धांची प्रसंगसिद्धि होते असें जें सांगितलें तें महालयश्राद्धेंकरून वार्षिकाची सिद्धि मानल्यानें बहुत ग्रंथांशीं विरुद्ध होतें. जेथें दर्श व वार्षिक इत्यादि श्राद्धांत देवता भिन्न असल्यामुळें श्राद्धभेद होतो. तेथें " निमित्ताचा अनियम ह्या स्थलीं पूर्वानुष्ठानाविषयीं कारण आहे असें वाक्य आहे यास्तव पूर्वीं वार्षिकश्राद्ध करून तदनंतर दर्शश्राद्ध करावें. सर्वांस एकरूपानें एककालीं जें प्राप्त होत नाहीं तें अनियत निमित्तक असें वार्षिक किंवा मासिक पूर्वीं करावें असा वाक्यार्थ. वार्षिक, मासिक इत्यादिक एक दिवसीं प्राप्त होतील तर पितृ-

पूर्वकत्व, व संबंधसामीप्यादिक असें सन्निधच सांगितलें आहे. दर्श, महालय हीं एक दिवसीं प्राप्त होतील तर पूर्वी महालय, नंतर दर्शश्राद्ध करावें. दर्शदिवसीं वार्षिक व महालय प्राप्त झालीं असतां पूर्वी वार्षिक, नंतर महालय, नंतर दर्श असीं तीन निरनिराळा पाक करून करावीं, याचा विस्तार महालयप्रकरणीं सांगितला आहे. तसेंच "काम्यतंत्रेंकरून नित्यश्राद्धाचें तंत्र सिद्धि पावतें."

---

**अथसंक्रांत्ययनद्वयविषुवद्वययुगादिमन्वादिभाद्रकृष्णत्रयोदशीश्रोत्रियागमनप्रयुक्तमघाभरणीमघायुतत्रयोदशीवैधृतिव्यतीपातोपरागपुत्रोत्पत्तिनिमित्तकालभ्ययोगनिमित्तकश्राद्धानिप्रौष्ठपदीभिन्नसर्वपौर्णमासीश्राद्धानिचैतानिश्राद्धानि पिंडरहितानिसांकल्पविधिनाकार्याणिएषुदर्शवत्षट्पुरुषोद्देशःतेनैषामेककालसंपातेतंत्रेणसिद्धिः नित्यश्राद्धस्यप्रसंगसिद्धिःउपरागश्राद्धस्यभिन्नकालत्वेपृथगनुष्ठानम् उपरागश्राद्धेनसंक्रांतिदर्शादिश्राद्धानांप्रसंगसिद्धिरितिप्रथमपरिच्छेदेमतांतरमुक्तं पुत्रोत्पत्तिनिमित्तकश्राद्धस्यनवदेवताकत्वात्पृथगनुष्ठानं तच्च हेम्नैवकार्यंनत्वामेननाप्यन्नेनेति इतिश्राद्धसंपातेनिर्णयः ॥**

यानंतर संक्रांति, दोन अयनें, दोन विषुव ( तुळा संक्रांति, व मेषसंक्रांति ), युगादि, मन्वादि, भाद्रकृष्णत्रयोदशी, श्रोत्रियाचें आगमननिमित्तक, मघा, भरणी, मघायुक्त त्रयोदशी, वैधृति, व्यतीपात, ग्रहण, पुत्र झाला तन्निमित्तक, अलभ्ययोगनिमित्तक हीं श्राद्धें आणि प्रौष्ठपदीव्यतिरिक्त सर्व पौर्णमासीश्राद्धें हीं श्राद्धें पिंडरहित, सांकल्पविधीकरून करावीं. ह्या श्राद्धांचे ठायीं दर्शाप्रमाणें सहा पुरुषांचा उच्चार करावा, यावरून हीं एककालीं प्राप्त झालीं असतां तंत्रेंकरून सिद्धि होते. नित्यश्राद्धाची प्रसंगसिद्धि करावी. ग्रहणश्राद्ध, भिन्नकालीं असतां पृथक् करावें. ग्रहणश्राद्धेंकरून संक्रांति, दर्श इत्यादि श्राद्धांची प्रसंगसिद्धि होते असें प्रथम परिच्छेदांत मतांतर ( दुसरें मत ) सांगितलें आहे. पुत्रोत्पत्तिनिमित्तक श्राद्धाच्या देवता नऊ आहेत यास्तव तें पृथक् करावें, व तें हिरण्यानेंच करावें, आमान्नानें करूं नये व अन्नानेंहि करूं नये. याप्रमाणें श्राद्धसंपाताचा निर्णय सांगितला.

---

**अथतिलतर्पणं तच्चयच्छ्राद्धेयावंतःपितरस्तर्पितास्तावत्पितृगणोद्देशेनतच्छ्राद्धांगत्वेनतिलैस्तर्पणंकार्यम् तत्रकालनियमः पूर्वंतिलोदकंदर्शेप्रत्यब्देतुपरेहनीत्यादि तदयंनिष्कर्षः दर्शश्राद्धेश्राद्धात्पूर्वंश्राद्धांगतिलतर्पणं तत्रविप्रनिमंत्रणोत्तरंपाकारंभोत्तरंवाब्रह्मयज्ञकरणेब्रह्मयज्ञांगनित्यतर्पणेनैवदर्शांगतिलतर्पणस्यसिद्धिः ततःपूर्वंवैश्वदेवोत्तरंवाब्रह्मयज्ञकरणेश्राद्धीयषट्पुरुषोद्देशेनश्राद्धांगतर्पणंकृत्वाश्राद्धारंभःकार्यः प्रत्याहिकंपितृतर्पणंतुब्रह्मयज्ञकालेकार्यम् एवंयुगादिमन्वादिसंक्रांतिपौर्णमासीवैधृतिव्यतीपातश्राद्धेषुदर्शवत्पूर्वमेव तीर्थश्राद्धेसर्वपित्रुद्देशेनपूर्वं वार्षिकश्राद्धेपरेद्युरेवश्राद्धीयदेवतात्रयोद्देशेन वार्षिकश्राद्धदिनेनित्यतर्पणंतिलैर्नकार्यम् सकृन्महालयेसर्वपित्रुद्देशेनपरेद्युरेव अन्येषुमहालयपक्षेष्वष्टकान्वष्टकापूर्वेद्युःश्राद्धेषु माघ्यावर्षार्धोदयगजच्छायाषष्ठीभरणीमघाश्राद्धेषुहिरण्यश्राद्धेचानुव्रज्यतर्पणंश्राद्धीयदेवतोद्देशेन श्राद्धसंपातेतुयदितत्प्रसंगसिद्धिस्तदातदीयमेवतर्पणं तंत्रत्वेतुपूर्वंतर्पणवतांपश्चात्तर्पणवतांचश्राद्धानांसमसंख्यत्वेआदावंतेवातर्पणं विषमसंख्यत्वेबहुनुरोधेन संक्रांति**

षुग्रहणेपित्रोःश्राद्धेदर्शेव्यतीपातेपितृव्यादिश्राद्धेमहालयेचनिषिद्धेपिदिनेश्राद्धांगतिलतर्पणं कार्यमितिकेचित् अन्येतुसर्वत्रश्राद्धांगतर्पणेकोपितिथ्यादिनिषेधोनेत्याहुः ॥

## आतां तिलतर्पणाचा निर्णय सांगतों.

तें तिलतर्पण ज्या श्राद्धामध्यें जितके पितर संतृप्त झाले तितक्या पितृगणांचे उद्देशानें त्या श्राद्धांगत्वेंकरून तिलांनीं तर्पण करावें. त्याविषयीं कालाचा नियम—दर्शश्राद्धाचे ठायीं पूर्वीं, प्रतिसांवत्सरिक श्राद्धीं दुसऱ्या दिवसीं इत्यादि. त्याचें हें तात्पर्य—दर्शश्राद्धाचे ठायीं श्राद्धाचे पूर्वीं श्राद्धांगतिलतर्पण करावें. त्यामध्यें ब्राह्मणास निमंत्रण केल्यानंतर अथवा पाकास आरंभ केल्यानंतर ब्रह्मयज्ञ कर्तव्य असतां ब्रह्मयज्ञाचे अंगभूत नित्यतर्पणानेंच दर्शश्राद्धाचे अंगभूत तिलतर्पणाची सिद्धि होते. ब्राह्मणाचें निमंत्रण करण्यापूर्वीं अथवा वैश्वदेवानंतर ब्रह्मयज्ञ कर्तव्य असेल तर श्राद्धसंबंधी सहा पुरुषांच्या उद्देशेंकरून श्राद्धांगतर्पण करून श्राद्धास आरंभ करावा. प्रतिदिवसाचें पितृतर्पण करणें तें तर, ब्रह्मयज्ञसमयीं करावें. याप्रमाणें युगादि, मन्वादि, संक्रांति, पौर्णमासी, वैधृति आणि व्यतीपात एतन्निमित्तक श्राद्धांचे ठायीं दर्शाप्रमाणें पूर्वींच करावें. तीर्थश्राद्धीं सर्व पितरांचे उद्देशेंकरून पूर्वीं करावें. वार्षिकश्राद्धदिवसीं नित्यतर्पण तिलांहींकरून करूं नये. सकृन्महालयाचे ठायीं सर्व पितरांचे उद्देशानें दुसऱ्या दिवसींच करावें. इतर महालयपक्ष, अष्टका, अन्वष्टका, पूर्वेद्युःश्राद्ध, माघ्यावर्ष, अर्द्धोदय, गजच्छाया, षष्ठी, भरणी, मघा, हीं श्राद्धें; आणि हिरण्यश्राद्ध यांचे ठायीं श्राद्धीय देवतांचे उद्देशानें श्राद्धानंतर तत्कालींच तर्पण करावें. श्राद्धसंपात ( एक दिवसीं दोन तीन श्राद्धें ) असेल आणि जर त्या श्राद्धांची प्रसंगसिद्धि असेल तर तेंच तर्पण करावें. तंत्र असेल तर पूर्वतर्पणयुक्त व पश्चात्तर्पणयुक्त अशा श्राद्धांची समसंख्या असतां पूर्वीं किंवा अंतीं तर्पण करावें, विषमसंख्या असेल तर बह्वनुरोधानें ह्मणजे पूर्वतर्पणयुक्त व पश्चात्तर्पणयुक्त यांमध्यें ज्यांची संख्या अधिक असेल तदनुसार पूर्वीं किंवा अंतीं करावें. संक्रांति, ग्रहण, मातापितरांचें श्राद्ध, दर्श, व्यतीपात, पितृव्यादिकश्राद्ध आणि महालय यांचे ठायीं, निषिद्ध दिवस असला तथापि श्राद्धांग तिलतर्पण करावें असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, सर्वत्र श्राद्धांग तिलतर्पणाविषयीं तिथि इत्यादिकांचा कोणताहि निषेध नाहीं असें ह्मणतात.

---

अथश्राद्धांगतर्पणनिषेधः वृद्धिश्राद्धेसपिंड्यांचप्रेतश्राद्धेनुमासिके संवत्सरविमोकेच नकुर्यात्तिलतर्पणम् तत्रतर्पणप्रकारः परेह्निनितर्पणेस्नात्वातर्पणंकृत्वानित्यस्नानंप्रातःसंध्यांच कुर्यात् यद्वानित्यस्नानप्रातःसंध्योत्तरंश्राद्धांगतर्पणंसंबंधनामगोत्ररूपाणिद्वितीयांतान्युच्चार्य स्वधानमस्तर्पयामीतिबहुचैर्दक्षिणहस्तेनान्यैरंजलिनात्रिस्त्रिस्तर्पयेत् प्रत्यंजलिमंत्रावृत्तिः एवं नित्यतर्पणेपिज्ञेयम् ॥

## आतां श्राद्धांगतर्पणाचा निषेध सांगतों.

वृद्धिश्राद्ध, सपिंडी, प्रेतश्राद्ध, अनुमासिक आणि संवत्सरविमोक ( अब्दपूर्ति ) यांचे

ठायीं तिलतर्पण करूं नये. त्यामध्यें तर्पणाचा प्रकार—दुसऱ्या दिवशीं तर्पण कर्तव्य असतां स्नान करून तर्पण करून नित्यस्नान व प्रातःसंध्या हीं करावीं. अथवा नित्यस्नान व प्रातःसंध्या हीं केल्यानंतर श्राद्धांगतर्पण करावें. तें असें—संबंध, नाम, गोत्र आणि रूप हीं द्वितीयाविभक्त्यंत उच्चारून " स्वधानमस्तर्पयामि " असें ह्मणून ऋग्वेदी यांनीं उजव्या हातानें व इतरशाखी यांनीं अंजलीनें तीन तीन वेळ तर्पण करावें. प्रत्येक अंजलीस मंत्राची आवृत्ति करावी, व नित्यतर्पणाविषयींहि असाच निर्णय जाणावा.

---

**अथब्रह्मयज्ञांगेनित्यतर्पणेतिलयुक्ततर्पणनिषेधकालः रविभौमभृगुवारेषुप्रतिपत्षष्ठ्येकादशीसप्तमीत्रयोदशीषुभरणीकृत्तिकामघासुनिशिसंध्यासु गृहेजन्मनक्षत्रेशुभकार्यदिनेऽन्यदीयेशोभनयुतगृहेमन्वादिषुयुगादिषुगजच्छायायामयनद्वयेच तिलतर्पणंमृदास्नानंपिंडदानंचनकार्यं केचिदयनद्वयेयुगादिमन्वादिषुतिलतर्पणंनदोषायेत्याहुः विवाहव्रतचूडासुवर्षमर्धंतदर्धकमन्यत्रसंस्कारेमासंमासार्धंवातिलतर्पणादिकं महालयगयाक्षयाहश्राद्धंविनानकार्यमित्युक्तं अत्रनिषिद्धदिनेतिलालाभेवाहेमरौप्ययुतहस्तेनदर्भयुतहस्तेनवानित्यतर्पणंकार्यं ॥**

यानंतर ब्रह्मयज्ञाचें अंगभूत जें नित्यतर्पण त्याविषयीं तिलयुक्त तर्पणाचे निषेधाचा काल सांगतों.—रविवार, भौमवार, भृगुवार, प्रतिपदा, षष्ठी, एकादशी, सप्तमी, त्रयोदशी, भरणी, कृत्तिका, मघा, रात्रि, संधिकाल, गृह, जन्मनक्षत्र, शुभकार्याचा दिवस, शुभकार्यानें युक्त परकीय गृह, मन्वादितिथि, युगादितिथि, गजच्छाया आणि दोन अयनदिवस, यांचे ठायीं तिलतर्पण, मृत्तिकास्नान व पिंडदान हीं करूं नयेत. कोणीं ग्रंथकार दोन अयनदिवस, युगादि, मन्वादि या दिवशीं तिलतर्पण केलें असतां दोष नाहीं असें ह्मणतात. " विवाह, मौंजी, चौल हीं झालीं असतां क्रमेंकरून एक वर्ष; सहा मास; तीन मास; इतर संस्कारीं एक मास किंवा अर्धमासपर्यंत तिलतर्पणादिक महालय, गयाश्राद्ध व क्षयदिवसश्राद्ध यांवांचून करूं नये असें सांगितलें. ह्या निषिद्धदिनीं अथवा तिळांचा अभाव असतां सुवर्ण, रौप्ययुक्त हस्तानें अथवा दर्भयुक्त हस्तानें नित्यतर्पण करावें.

---

**अथतिथ्यादिनिषेधापवादः तीर्थेतिथिविशेषेचगयायांप्रेतपक्षके निषिद्धेपिदिनेकुर्यात्तर्पणंतिलमिश्रितमिति तिथिविशेषोष्टकादिरितिमयूखे अत्रकातीयानांकेषांचिद्वार्षिकादौपरेहनिभरण्यादौविसर्जनांतेचश्राद्धांगतर्पणाचारोनदृश्यतेतत्रमूलंमृग्यं क्षयाहश्राद्धदिनेनित्यतर्पणेतिलग्रहणंतुबहुग्रंथविरुद्धं ॥**

यानंतर तिथ्यादिनिषेधाचा अपवाद सांगतों.—"तीर्थ, तिथिविशेष, गयाश्राद्ध आणि प्रेतपक्ष ( अपरपक्ष ) यांचे ठायीं, निषिद्ध जरी दिवस असेल तथापि तिलतर्पण करावें." तिथिविशेष ह्मणजे अष्टकादिक तिथि, असें मयूखांत आहे. याविषयीं कितीएक कात्यायनांचा, वार्षिकादिक श्राद्धीं दुसऱ्या दिवशीं व भरणी इत्यादिक श्राद्धीं विसर्जनानंतर श्राद्धांगतर्पण करण्याचा आचार आढळत नाहीं, त्याविषयीं मूळ शोधून पाहावें. क्षयाहश्राद्धदिवशीं नित्यतर्पणांत तिल ग्रहण करणें तर बहुग्रंथविरुद्ध आहे.

---

अथनांदीश्राद्धेयद्वक्तव्यंतत्पूर्वार्धेप्रपंचितम् एतच्चोपनयनादिमहाकर्मसुपूर्वेद्युःकार्यं जातकर्माद्यल्पकर्मसुतदहरेव तत्रदेशकालौसंकीर्त्यसत्यवसुसंज्ञकाविश्वेदेवानांदीमुखामातृपितामहीप्रपितामह्योनांदीमुख्यः पितृपितामहप्रपितामहानांदीमु० मातामहमातुः० पत्नीसहितानांदी० एतानुद्दिश्यपार्वणविधानेनसपिंडंनांदीश्राद्धंकरिष्येइतिसंकल्पः अर्घ्यकालेनवैवपात्राण्यासाद्यतेषुद्वौद्वौकुशौनिधाययवोसिसोमदैवत्यइतिपूर्वोक्तोहेनयवानोप्योशंतस्त्वेति द्वयोर्द्वयोरावाह्यामुकविश्वेदेवाः प्रीयंतांनांदीमुखामातरःप्रीयंतांनांदीमुखाःपितामह्यःप्रीयंतामित्यादिनायथालिंगंपात्राणिपुरतोन्यसेत् नांदीमुखामातरइदंतेवोर्घ्यमित्यादिनायथालिंगंद्वाभ्यामर्घ्यपात्रंविभज्यदेयं द्विर्द्विर्गंधदानं चतुर्थ्यंतानुद्दिश्यस्वाहाहव्यंनममेत्यादिदेववदन्नदानं पिंडदानकालेनांदीमुखाभ्योमातृभ्यःस्वाहा नांदीमुखाभ्यःपितामहीभ्यःस्वाहेत्येवंप्रत्येकंद्वौद्वावित्यष्टादशपिंडान्दद्यात् अत्रानुमंत्रणंकृताकृतं एवंसर्वंपित्र्यमपिसव्यादिनादैवधर्मेणैवकार्यमित्यादिसर्वंपूर्वार्धतोज्ञेयं तत्रानुक्तोविशेषएवात्रोक्तः ॥

यानंतर नांदीश्राद्धाविषयीं जें सांगावयाचें त्याचा विस्तार पूर्वार्धांत केला आहे. हें नांदीश्राद्ध उपनयनादि मोठ्या कार्यांचे ठायीं पूर्व दिवसीं करावें. जातकर्मादिक अल्प कार्यांचे ठायीं त्या दिवसींच करावें. त्याविषयीं देश, काल यांचा उच्चार करून "सत्यवसुसंज्ञका विश्वेदेवानांदीमुखाःमातृपितामहीप्रपितामह्योनांदीमुख्यः पितृपितामहप्रपितामहानांदीमु० मातामहमातुः० पत्नीसहितानांदी० एतानुद्दिश्यपार्वणविधानेन सपिंडंनांदीश्राद्धं करिष्ये," याप्रमाणें संकल्प जाणावा. अर्घ्यकालीं नऊच पात्रें स्थापून त्या पात्रांवर दोन दोन कुश ठेवून "यवोसिसोमदैवत्य०" अशा पूर्वी सांगितलेल्या ऊहानें त्या पात्रांत यव टाकून "उशंतस्त्वा०" ह्या मंत्रेंकरून दोघांदोघांचें आवाहन करून "अमुकविश्वेदेवाःप्रीयंतां नांदीमुखामातरःप्रीयंतां नांदीमुखाःपितामह्यःप्रीयंतां" इत्यादिक वाक्येंकरून जसें लिंग असेल तदनुसार पात्रें पुढें मांडावीं. नंतर "नांदीमुखामातरइदंवोर्घ्यं" इत्यादिक वाक्यानें जसें लिंग असेल त्याप्रमाणें दोघांस अर्घ्यपात्र विभागून द्यावें, दोन दोन वेळ गंध द्यावें. चतुर्थीविभक्त्यंत उद्देश करून "स्वाहाहव्यंनमम" इत्यादि प्रकारानें देवांप्रमाणें अन्नदान करावें. पिंडदानकालीं "नांदीमुखाभ्योमातृभ्यःस्वाहा, नांदीमुखाभ्यःपितामहीभ्यःस्वाहा" याप्रमाणें प्रत्येकास दोन दोन पिंड याप्रमाणें अठरा पिंड द्यावे. ह्या स्थलीं अनुमंत्रण कृताकृत आहे. याप्रमाणें सर्व पित्र्यकर्महि सव्यादिकानें व दैवधर्मेंकरूनच करावें इत्यादि सर्व प्रकार पूर्वार्धांतील जाणावा. पूर्वार्धांत न सांगितलेला विशेष प्रकार मात्र एथें सांगितला आहे.

---

अथविभक्ताविभक्तनिर्णयः तत्रजीवत्पितृकनिर्णयेश्राद्धाधिकारिनिर्णयेचप्रायेणोक्तम् विशेषस्तूच्यते विभक्तधनानांभ्रात्रादीनांसर्वेधर्माःपृथगेव सपिंड्यंतप्रेतकर्मषोडशमासिकानिचैकस्यैवेत्यादितुप्रागुक्तं अविभक्तानांतुधननिरपेक्षाणिस्नानसंध्याब्रह्मयज्ञमंत्रजपोपवासपारायणादीनिनित्यनैमित्तिककाम्यानिपृथगेव अग्निसाध्यंश्रौतस्मार्तनित्यकर्मापिपृथगेव पितृपाकोपजीवीस्याद्भ्रातृपाकोपजीविकइतिपक्षांतरंकात्यायनादिपरं पंचमहायज्ञमध्ये देवभूतपितृमनुष्ययज्ञाज्येष्ठस्यैव पाकभेदेआश्वलायनानांवैश्वदेवभेदोविकल्पेन ज्येष्ठेनकृते

वैश्वदेवेकनिष्ठस्यपाकसिद्धौतेनतूष्णींकिंचिदन्नमग्नौक्षिप्त्वाविप्रायदत्वा भोक्तव्यमितिकेचित् देवपूजातुपृथगेकत्रवा प्रतिवार्षिकदर्शसंक्रांतिग्रहणादिश्राद्धानिज्येष्ठस्यैव तीर्थश्राद्धाद्यपियुगपत्सर्वेषामविभक्तानांप्राप्तावेकस्यैव भेदेनप्राप्तौभिन्नं एवंगयाश्राद्धेपियोज्यम् काम्येदान होमादौद्रव्यसाध्येभ्रात्राद्यनुमत्याधिकारः मघात्रयोदशीश्राद्धंपृथगेवेत्युक्तम् ॥

## आतां विभक्त व अविभक्त यांचा निर्णय सांगतों.

त्यामध्यें जीवत्पितृकनिर्णयप्रसंगीं व श्राद्धाधिकारिनिर्णयप्रसंगीं बहुधा सांगितला आहे. त्याहून विशेष तो मात्र सांगतों—विभागून घेतलें आहे धन ज्यांनीं असे भ्राते इत्यादिक यांचे सर्व धर्म निराळेच होत. सपिंडीपर्यंत प्रेतकर्म, षोडशमासिकें हे एकासच इत्यादिक तर पूर्वीं सांगितलें आहे. अविभक्तांचीं तर, द्रव्याची अपेक्षा ज्यांस नाहीं अशीं स्नान, संध्या, ब्रह्मयज्ञ, मंत्रजप, उपवास, पारायण इत्यादिक जीं नित्य, नैमित्तिक आणि काम्यकर्में तीं त्यांनीं पृथकच करावीं. अग्निसाध्य असें श्रौत व स्मार्त कर्म तेंहि निराळेंच करावें. “पितृपाकानें उपजीविका करणारा व भ्रातृपाकानें उपजीविका करणारा,” इत्यादि दुसरा पक्ष सांगितला तो कात्यायनादिपर होय. पंचमहायज्ञांमध्यें देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ आणि मनुष्ययज्ञ हे ज्येष्ठासच होत. पाक निराळा असेल तर आश्वलायनशाखी यांस पृथक् वैश्वदेव विकल्पेंकरून सांगितला आहे. ज्येष्ठानें वैश्वदेव केला असतां कनिष्ठाचा पाक सिद्ध असेल तर त्या कनिष्ठानें तूष्णीं (मंत्रविरहित) अल्प अन्न अग्नीमध्यें टाकून ब्राह्मणास अन्न देऊन भोजन करावें असें कोणी ह्मणतात. देवपूजा करणें ती निराळी किंवा एकत्र करावी. प्रतिसांवत्सरिक, दर्श, संक्रांति, ग्रहण इत्यादि श्राद्धें ज्येष्ठानेंच करावीं. अविभक्त भ्राते, एककालींच तीर्थीं प्राप्त झाले असतां तीर्थश्राद्धादिक करणें तें एकानेंच करावें, पृथक् पृथक् जातील तर निरनिराळें करावें, याप्रमाणें गयाश्राद्धाविषयींहि योजना करावी. द्रव्येंकरून साध्य असें दानहोमादि जें काम्यकर्म त्याविषयीं भ्राता इत्यादिकांच्या अनुमतीनें (कनिष्ठास) अधिकार आहे. मघायुक्त त्रयोदशीश्राद्ध निराळेंच करावें असें सांगितलें आहे.

---

अथतीर्थश्राद्धम् तत्रगंगादितीर्थप्राप्तावर्घ्यावाहनद्विजांगुष्ठनिवेशनतृप्तिप्रश्नविकिरविसर्जनदिग्बंधवर्ज्यंसकृन्महालयवत्सर्वपितृगणोद्देशेनधूरिलोचनसंज्ञकविश्वेदेवसहितंतीर्थश्राद्धंकुर्यात् अग्नौकरणंकृताकृतं करणपक्षेतीर्थजलसमीपेश्राद्धंचेत्तदाप्राकृतमंत्रयुतंतीर्थजले कार्यम् अन्यथाहस्तादौ पिंडानांतीर्थेप्रक्षेपएवप्रतिपत्तिः अत्रतीर्थवासिनएवविप्राविगुणाअपिमुख्याः तदभावेन्ये अत्रश्राद्धीयेदेशेन्नादिद्रव्येचकाकश्वादिभिर्दृष्टेपिनदोषः तीर्थश्राद्धांग तर्पणंदर्शवत्पूर्वकार्यम् देशकालौसंकीर्त्यसर्वपितृगणमुच्चार्यएतेषाममुकतीर्थप्राप्तिनिमित्तकं तीर्थश्राद्धंसपिंडंसदैवंसद्यःकरिष्येइतिसंकल्पः धूरिलोचनविश्वेदेवादिसर्वंसकृन्महालयवत् तीर्थयात्रायांसाग्नेःसपत्नीकस्यैवाधिकारःनिरग्निकस्यलपत्नीकस्यापि स्त्रियाःस्नानदानतीर्थयात्रानामस्मरणादिकंपुत्राद्यनुमत्यैव सधवायायात्रादिकंपत्यासहैव ॥

## आतां तीर्थश्राद्ध सांगतों.

त्यामध्यें गंगादि तीर्थांची प्राप्ति असतां अर्घ्य, आवाहन, ब्राह्मणाचा अंगुष्ठ (अन्ननिवेदनांत) धरणें, तृप्तिप्रश्न, विकिर, विसर्जन, दिग्बंध हीं वर्ज्य करून सकृन्महालयाप्रमाणें सर्व पितृगणांचे उद्देशेंकरून धूरिलोचनसंज्ञकविश्वेदेवांसहित तीर्थश्राद्ध करावें. अग्नौकरण कृताकृत आहे. अग्नौकरण करणें यापक्षीं तीर्थजळाचे सन्निध श्राद्ध कर्तव्य असेल तर प्राकृतमंत्रयुक्त तीर्थजलांत करावें. तसें नसेल तर ब्राह्मणाचे हस्तादिकावर करावें. पिंड तीर्थामध्यें टाकावे असी प्राप्ति (निर्णय) आहे. ह्या तीर्थश्राद्धाविषयीं तीर्थवासी ब्राह्मण गुणहीन असले तथापि तेच मुख्य होत. ते न मिळतील तर दुसरे सांगावे. ह्या तीर्थश्राद्धाविषयीं श्राद्धभूमि व अन्नादि द्रव्यें कावळे, कुत्रे इत्यादिकांनीं पाहिलीं असतांहि दोष नाहीं. तीर्थश्राद्धांगतर्पण करणें तें दर्शासारखें पूर्वी करावें. देशकालांचें संकीर्तन करून सर्व पितृगणांचा उच्चार करून "**एतेषाममुकतीर्थप्राप्तिनिमित्तकंतीर्थश्राद्धंसपिंडंसदैवंसद्यःकरिष्ये**" याप्रमाणें संकल्प करावा. धूरिलोचनविश्वेदेवादि सर्व कृत्य सकृन्महालयाप्रमाणें करावें. साग्निक सपत्नीकासच तीर्थयात्रेविषयीं अधिकार आहे. निरग्निक असेल तर अपत्नीकासहि अधिकार आहे. स्त्रियेनें स्नान, दान, तीर्थयात्रा, नामस्मरण इत्यादिक करणें तें पुत्रादिकांच्या अनुमतीनेंच करावें. सौभाग्यवती स्त्रीनें यात्रादिक पतीसहवर्तमानच करावीं.

---

अथतीर्थयात्राविधिः तीर्थयात्रांचिकीर्षुःप्राग्विधायोपोषणंगृहे पारणाहेघृतश्राद्धंवृद्धिधर्मयुतंचरेत् तथाचषट्दैवतंनवदैवतंवाद्वादशदैवतंवाबहुसर्पिर्युतेनान्नेनश्राद्धंकुर्यात् निवेदनकालेइदंघृतंसान्नंदत्तंदास्यमानंचेत्यादिवदेत् गणेशंविप्रान्साधूंश्चशक्त्यासंपूज्ययात्रासंकल्पंकृत्वाश्राद्धशेषेणपारणांकृत्वाव्रजेदितिकेचित् अन्येतुश्राद्धांतेयात्रासंकल्पंकृत्वाश्राद्धशेषंघृतमात्रमादायग्रामांतरंक्रोशन्यूनंगत्वातत्रश्राद्धशेषघृतसहितान्नांतरेणपारणामित्याहुः श्रीपरमेश्वरप्रीतिकामः पितृमुक्तिकामोवाऽमुकप्रायश्चित्तार्थंवातीर्थयात्रांकरिष्येइतियात्रासंकल्पऊह्यः उपवासात्पूर्वंमुंडनंकार्यमितिकेचित् अन्येतुप्रायश्चित्तार्थयात्रायामेवमुंडनमित्याहुः एवंगयोद्देश्यकयात्रायामपिमुंडनविकल्पः उद्यतस्तुगयांगंतुंश्राद्धंकृत्वाघृताधिकं विधायकार्पटीवेषंग्रामंकृत्वाप्रदक्षिणं ततःप्रतिदिनंगच्छेत्प्रतिग्रहविवर्जितः यश्चान्यंकारयेच्छक्त्यातीर्थयात्रांनरेश्वरः स्वकीयद्रव्ययानाभ्यांतस्यपुण्यंचतुर्गुणं यात्रामध्येआशौचेरजोदोषेवाशुद्धिपर्यंतंस्थित्वातदंतेगच्छेत् विषममार्गेतुनदोषः ॥

## आतां तीर्थयात्रेचा विधि सांगतों.

" तीर्थयात्रा करण्याचें इच्छिणारा यानें पूर्वी घरीं उपोषण करून पारणेच्या दिवसीं वृद्धिश्राद्धाचे धर्मांनीं युक्त घृतश्राद्ध करावें. तेंच सांगतों.—षट्दैवत, नवदैवत अथवा द्वादश दैवत व बहुत घृतानें युक्त अशा अन्नेंकरून श्राद्ध करावें. अन्ननिवेदनकालीं "इदं

---

१ इदंचश्राद्धंयात्रांकृत्वागृहागतोपिकुर्यात् तथाचत्रिस्थलीसेतौ आगत्याभ्यर्च्यर्चापतृन्ययोक्तफलभाग्भवेत् तीर्थयात्रांकृत्वागृहागतेनतत्पुनःश्राद्धंकार्यमित्यर्थइति ॥

घृतं सान्नं दत्तंदास्यमानंच" इत्यादिक वाक्य ह्मणावें. गणेश, ब्राह्मण, साधु यांची यथाशक्ति पूजा करून यात्रेचा संकल्प करून श्राद्धशेषानें पारणा करून प्रयाण करावें असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, श्राद्ध केल्यानंतर यात्रेचा संकल्प करून श्राद्धशेष घृत मात्र घेऊन एक कोशापेक्षां कमी अशा दुसऱ्या ग्रामीं जाऊन तेथें श्राद्धशेष घृतासहित दुसऱ्या अन्नानें पारणा करावी असें ह्मणतात. "श्रीपरमेश्वरप्रीतिकामःपितृमुक्तिकामोवाअमुकप्रायश्चित्तार्थंवातीर्थयात्रां करिष्ये," याप्रमाणें यात्रेच्या संकल्पांत ऊह करावा. उपवासाच्या पूर्वी मुंडन करावें असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, प्रायश्चित्तार्थ जी यात्रा तिच्या ठायींच मुंडन करावें असें ह्मणतात. याप्रमाणें गयेच्या उद्देशानें जी यात्रा तीविषयींहि मुंडनाचा विकल्प आहे. "गयेस जाण्यासाठीं जो उद्युक्त त्यानें घृतप्रचुरश्राद्ध करून कार्पटीवेष ( तीर्थाटन करणाराचा वेष ) घेऊन स्वकीय ग्रामास प्रदक्षिणा करून तदनंतर प्रतिग्रहविवर्जित होत्साता प्रतिदिवशीं प्रयाण करावें. जो राजा अपल्या यथाशक्ति द्रव्यानें व वाहनानें दुसऱ्याकडून यात्रा करवील त्यास चतुर्गुण पुण्य प्राप्त होतें." यात्रेमध्यें आशौच अथवा रजोदोष प्राप्त असतां त्याच्या शुद्धीपर्यंत राहून त्यानंतर प्रयाण करावें. विषम ( भयप्रद ) मार्ग असेल तर दोष नाहीं.

---

संकल्पितयात्रामध्येतीर्थांतरप्राप्तौश्राद्धादिकंकार्यमेव वाणिज्यार्थंगतेनापिमुंडनोपवासादिकंकार्यं कार्यांतरप्रसंगेनतीर्थगमनेर्धंफलं वाणिज्यार्थगमनेपादफलं मार्गेद्विर्भोजनादिकरणेछत्रोपानहसेवनेचपादोनं यानमारुह्यगमनेर्धं अनुषंगेणतीर्थप्राप्तौतीर्थस्नानात्स्नानजंफलं नतीर्थयात्राफलं मार्गेतरानदीप्राप्तौस्नानादिपरपारतः अर्वागेवसरस्वत्याएषमार्गगतोविधिः॥

ज्या यात्रेचा संकल्प केला त्या यात्रेस जात असतां मध्यें मार्गांत अन्य तीर्थ प्राप्त होईल तर श्राद्धादिक अवश्य करावें. व्यापारासाठीं जो तीर्थी गेला त्यानेंहि मुंडन, उपोषण इत्यादिक करावें. अन्य कार्याच्या प्रसंगानें तीर्थास गेलें असतां अर्धें फल, व्यापारासाठीं तीर्थप्रयाण केलें असतां चतुर्थांश फल, मार्गामध्यें द्विवार भोजन इत्यादि केलें व छत्री, जोडा यांचें सेवन केलें तर चतुर्थांशन्यून फल. वाहानावर आरोहण करून प्रयाण केलें असतां अर्धें फल. दुसऱ्याच्या अनुषंगानें तीर्थ प्राप्त असतां तीर्थस्नानेंकरून स्नानसंबंधी फल मिळतें, तीर्थयात्रेचें फल प्राप्त होत नाहीं. "मार्गामध्यें नदी प्राप्त झाली असतां पलीकडच्या तीरीं स्नानादिक करावें. सरस्वती नदीचे आलीकडच्या तीरीं करावें व हा मार्गसंबंधी विधि जाणावा.

---

तीर्थसामीप्यप्राप्तौविधिः यानानितुपरित्यज्यभाव्यंपादचरैर्नरैः भक्त्याचविलुठेत्तत्रकुर्याद्वेषंचकार्पटं तीर्थप्राप्तिपूर्वदिनेतीर्थप्राप्तिदिनेवोपवासःकार्यः तीर्थेमुसलस्नानंकृत्वादेङ्मुखः

---

१ हें श्राद्ध यात्रा करून घरीं आल्यानंतरहि करावें. याविषयीं त्रिस्थली सेतूमध्यें सांगतो–"येऊन पितरांचें पूजन करावें, तेणेंकरून यथोक्त फलभागी होतो." तीर्थयात्रा करून घरीं आला त्यानें पुनः तें श्राद्ध करावें असा अर्थ.

प्राङ्मुखोवाकेशश्मश्रुनखलोमान्युदक्संस्थानिवापयेत् ततःसमंत्रकंस्नानं तत्रप्रणवेनजलमालोड्यतीर्थमावाह्य ॐनमोस्तुदेवदेवायशितिकंठायदंडिने रुद्रायचापहस्तायचक्रिणेवेधसेनमः सरस्वतीचसावित्रीवेदमातागरीयसी सन्निधात्रीभवत्वत्रतीर्थेपापप्रणाशिनीतिमंत्रेणस्नायात् शेषःस्नानविधिर्नित्यवत् ततस्तर्पणादितीर्थश्राद्धं श्राद्धोत्तरदिनेततोगमनं नश्राद्धदिने मुंडनंचोपवासश्चसर्वतीर्थेष्वयंविधिः वर्जयित्वाकुरुक्षेत्रंविशालंविरजंगयाम् सर्वतीर्थेष्वितिप्रसिद्धमहातीर्थेष्वित्यर्थः दशमासोत्तरंपुनस्तीर्थप्राप्तौमुंडनादितीर्थविधिः प्रयागेतुयोजनत्रयादागतस्यदशमासादर्वागपि प्रयागेजीवत्पितृकगुर्विणीपतिकृतचूडबालानामपिसभर्तृकस्त्रीणामपिप्रथमयात्रायांवपनं केचित्सभर्तृकस्त्रीणांसर्वान्केशान्समुद्धृत्यछेदयेदंगुलद्वयमित्याहुः तत्रवेणीदानविधिर्द्वितीयपरिच्छेदेउक्तः यतिभिस्तुतीर्थेप्यृतुसंधिष्वेवकक्षोपस्थवर्जंवपनंकार्यं तीर्थप्राप्तावविलंबेनस्नानपितृतर्पणश्राद्धादिकुर्यात् नपर्वादिकालंविचारयेत् आकस्मिकमहातीर्थप्राप्तौद्वित्रिदिनादिवासासंभवेभुक्तेनापिरात्रावपिसूतकिनापिग्रहणपर्वणीवस्नानंहिरण्यादिनातीर्थश्राद्धंचकार्यं एवंमलमासेपियोज्यं ॥

**तीर्थाची सान्निध्यप्राप्ति झाली असतां कर्तव्य विधि सांगतो.—** " वाहनांचा त्याग करून मनुष्यांनीं पादचारी व्हावें आणि भक्तीकरून तेथें जमिनीवर लोळावें, व कार्पटिकवेष करावा." तीर्थप्राप्तीच्या पूर्व दिवसीं अथवा त्याच दिवसीं उपवास करावा. नंतर तीर्थामध्यें मुसलस्नान ( अविधि व अमंत्रक स्नान ) करून उत्तराभिमुख अथवा पूर्वाभिमुख होत्साता केश, श्मश्रु, लोम, नखें यांचें उदक्संस्थ वपन करावें. तदनंतर समंत्रक स्नान करावें. त्या कालीं प्रणवमंत्रानें उदक ढवळून तीर्थाचें आवाहन करून "**ॐनमोस्तु देवदेवाय शितिकंठाय दंडिने ॥ रुद्राय चापहस्ताय चक्रिणे वेधसे नमः ॥ सरस्वतीच सावित्री वेदमाता गरीयसी ॥ सन्निधात्री भवत्वत्र तीर्थे** पापप्रणाशिनी " ह्या मंत्रानें स्नान करावें. शेष स्नानविधि नित्याप्रमाणें करावा. तदनंतर तर्पणादि तीर्थश्राद्ध करावें. श्राद्धाच्या दुसऱ्या दिवसीं तेथून प्रयाण करावें, श्राद्धदिवसीं करूं नये. मुंडन, उपवास हा विधि कुरुक्षेत्र, विशाल, विरज आणि गया हीं वर्ज्य करून सर्व तीर्थीं आहे. सर्व तीर्थीं ह्मणजे प्रसिद्ध महातीर्थीं असा अर्थ. दहा मासांनंतर पुनः तीर्थ प्राप्त होईल तर मुंडन इत्यादिक तीर्थविधि करावा. प्रयागाचे ठायीं तर तीन योजनापासून आलेला त्यानें दहा मासांच्या पूर्वींहि करावा. जीवत्पितृक, गर्भिणीपति, चौलसंस्कार झालेला बाल, आणि सौभाग्यवती स्त्रिया यांसहि प्रयागीं प्रथम यात्रेचेठायीं वपन आहे. सौभाग्यवती स्त्रियांचे " सर्व केश उचलून दोन अंगुलें छेदावे," असें कितीएक ग्रंथकार सांगतात. प्रयागाचे ठायीं वेणीदान करण्याचा विधि आहे तो दुसऱ्या परिच्छेदांत सांगितला आहे. संन्यासी यांनीं तर तीर्थाचे ठायींहि ऋतूंचे संधिकालींच, कक्षोपस्थ वर्ज्य करून वपन करावें. तीर्थ प्राप्त झालें असतां त्वरेंकरून स्नान, पितृतर्पण, श्राद्धादिक हीं करावीं, पर्वादिकालाचा विचार करूं नये. आकस्मिक ( अकस्मात् ) महातीर्थ प्राप्त झालें असतां दोन तीन इत्यादि दिवस राहण्याचा असंभव असतां भोजन केलेल्यानें, रात्रिसमयीं, अथवा आशौची यानेंहि ग्रहणपर्वासारखें स्नान व हिरण्यादिकानें तीर्थश्राद्ध करावें. असीच मलमासाविषयींहि योजना करावी.

---

अथपरार्थस्नानं मातरंपितरंजायांभ्रातरंसुहृदंगुरुं तीर्थेस्नायाद्यमुद्दिश्यसोष्टमांशंलभेन्नरः यद्वाप्रतिकृतिंदर्भमयींसत्तीर्थवारिषु मज्जयेद्यमुद्दिश्यसोष्टमांशंफलंलभेत् ॥

## यानंतर परार्थस्नानविधि सांगतो.

" माता, पिता, भार्या, भ्राता, सुहृद् आणि गुरु यांतून ज्याच्या उद्देशानें तीर्थस्नान करील तो मनुष्य त्याचा अष्टमांश फल पावेल. अथवा ज्याच्या उद्देशानें दर्भमयी प्रतिमा करून त्या प्रतिमेस महातीर्थोदकीं स्नान घालील तो अष्टमांश फल पावेल."

---

पक्वान्नेनतीर्थेश्राद्धेतेनैवपिंडाः हिरण्यादिनाकृतेपिंडद्रव्याणि सक्तुसंयावपायसपिण्याकगुडान्यतमानि पिंडानांतीर्थेप्रक्षेपएव नान्याप्रतिपत्तिः एतच्चापुत्रयाविधवयाकार्यं सपुत्रयानकर्तव्यंभर्तुःश्राद्धंकदाचनेतिस्मृतेः अनुपनीतेनापिकार्यं यतिनातुनकर्तव्यं दंडंप्रदर्शयेद्भिक्षुर्गयांगत्वानपिंडदः दंडस्पर्शाद्विष्णुपदेपितृभिःसहमुच्यते एवंकूपवटादिष्वपिदंडप्रदर्शनमेव तीर्थेवृत्तिदौर्बल्येनप्रतिग्रहेदशमांशदानेनशुद्धिः ॥

पक्वान्नानें तीर्थी श्राद्ध केलें असतां त्याच अन्नेंकरून पिंडप्रदान करावें. हिरण्यादिकानें श्राद्ध केलें असतां पिंडप्रदानाचीं द्रव्यें, पीठ, संयाव, पायस, पिण्याक ( पेंड ) गूळ, यांतून कोणतेंहि घ्यावें. पिंड तीर्थातच टाकावे, दुसरी प्राप्ति ( निर्णय ) नाहीं. हें तीर्थश्राद्ध अपुत्रविधवेनें करावें. कारण, " पुत्रवती स्त्रीनें भर्त्याचें श्राद्ध कदापि करूं नये असी स्मृति आहे." हें श्राद्ध उपनयन झालेला त्यानेंहि करावें. संन्यासी यानें तर करूं नये. संन्यासी यानें गयेप्रत जाऊन श्राद्ध करूं नये; तर त्यानें दंडाचें प्रदर्शन करावें. विष्णुपदीं दंडस्पर्श केल्यानें पितरांसह मुक्त होतो. याप्रमाणें कूप, वट इत्यादिकीं दंडप्रदर्शनच करावें. उपजीविकेच्या क्षीणतेमुळें तीर्थी प्रतिग्रह केला असतां त्याच्या दशमांशदानानें शुद्धि होते.

---

श्रीविठ्ठलंरुक्मिणींचपितरौदीनवत्सलौ॥ध्यात्वेष्टसिद्ध्येनत्वावक्ष्येऽथाशौचनिर्णयं॥१॥

यानंतर इष्टसिद्धीकरितां श्रीविठ्ठल आणि रुक्मिणी यांचें ध्यान करून आणि दीनदयाळू अशा मातापितरांस नमस्कार करून आशौचनिर्णय सांगतोः—

---

तत्रादौगर्भनाशजननाद्याशौचं आचतुर्थाद्भवेत्स्रावःपातःपंचमषष्ठयोः अतऊर्ध्वंप्रसूतिःस्यात्तत्राशौचंविविच्यते तत्रगर्भस्रावेआद्यमासत्रयेमातुस्त्रिरात्रंचतुर्थमासेचतूरात्रमस्पृश्यत्वरूपमाशौचं पित्रादिसपिंडानांस्रावमात्रेस्नानाच्छुद्धिः पंचमषष्ठमासयोर्गर्भपातेगर्भिण्यामाससमसंख्यंक्रमेणपंचषट्दिनान्यस्पृश्यत्वलक्षणमाशौचं पित्रादिसपिंडानांतुत्रिदिनंजननाशौचं मृताशौचंतुनास्ति इदंस्रावपाताशौचंसर्ववर्णसाधारणं गर्भिण्याःसप्तममासप्रभृतप्रिसवेमातुःपित्रादिसपिंडानांचसंपूर्णजननाशौचं तच्चविप्रेदशाहं क्षत्रियेद्वादशाहं वैश्येपंचदशाहं शूद्रेमासः संकरजातीनांशूद्रवत् विज्ञानेश्वरस्तुनैषामाशौचंकिंतुस्नानमात्रमित्याह सर्ववर्णेषुदशाहंवा जननाशौचेगर्भिण्यादशाहमस्पृश्यत्वंकर्मानधिकारस्तुकन्योत्पत्तौमासंपुत्रोत्पत्तौविंशतिरात्रं इदंस्वस्वाशौचोत्तरमितिविप्रस्त्रियाःक्रमेणचत्वारिंशत्त्रिंशद्दिनान्यनधि

---

१ संकरजातीनां ॥

कारः पितुःसापत्नमातुश्चकन्यायाःपुत्रस्यवोत्पत्तौसचैलस्नानात्प्रागस्पृश्यत्वं पित्रादिसपिंडानां जननाशौचेकर्मानधिकारमात्रं कर्माद्यतिरिक्तकालेस्पर्शेदोषोन. जातकर्मणिदानेचनालच्छेदनात्पूर्वंपितुरधिकारः एवंपंचमषष्ठदशमदिनेषुदानेजन्मदादिपूजनेचाधिकारः तत्रविप्राणां प्रतिग्रहेपिदोषोन ॥

त्यामध्यें प्रथम गर्भाचा नाश व जनन इत्यादिक आशौच सांगतो.—“चतुर्थमासांत जो गर्भनाश तो स्राव होय, पांचव्या, सहाव्या मासांत जो गर्भनाश तो पात होय. सातव्या मासापासून प्रसूति होय. त्याविषयीं आशौचाचें विवेचन करितों.” त्यामध्यें गर्भस्राव असतां पहिल्या तीन मासांत मातेस त्रिरात्र, चवथ्या मासांत चार रात्रि अस्पृश्यत्वरूप आशौच. स्रावमात्राचे ठायीं पिता इत्यादि सर्व सपिंडांची स्नानेंकरून शुद्धि होते. पांचव्या व सहाव्या मासांत गर्भपात असतां गर्भिणीस मासतुल्यक्रमेंकरून पांच, सहा दिवसपर्यंत अस्पृश्यत्वलक्षण आशौच जाणावें. पिता इत्यादि सपिंडांस तर तीन दिवस जननाशौच ( सुव्हेर ); मृताशौच तर नाहीं. हें जें स्राव व पात यांचें आशौच तें सर्ववर्णसाधारण आहे. गर्भिणीचा प्रसव सातव्या मासापासून झाला असतां माता आणि पित्रादि सपिंड ( सात पुरुषपर्यंत ) यांस, संपूर्ण जननाशौच आहे. तें जननाशौच ब्राह्मणाविषयीं दहा दिवस, क्षत्रियाविषयीं बारा दिवस, वैश्याविषयीं पंधरा दिवस, आणि शूद्रास एक मास, संकरजातींस शूद्राप्रमाणें. विज्ञानेश्वर तर, संकरजातींस आशौच नाहीं, तर स्नान मात्र आहे असें सांगतो. अथवा सर्व वर्णांस दहा दिवस आशौच. जननाशौचामध्यें गर्भिणीस दहा दिवस अस्पृश्यत्व. कर्मानधिकार तर, कन्या झाली असल्यास एक मास, पुत्र झाला असल्यास वीस रात्रि जाणावा, व हा निर्णय आपापले आशौचानंतर जाणावा. ब्राह्मण स्त्रियेस क्रमेंकरून चाळीस, तीस दिवसपर्यंत अधिकार नाहीं. कन्या अथवा पुत्र उत्पन्न झाल्यानंतर पिता व सापत्नमाता यांस सचैल स्नानाचे पूर्वीं अस्पृश्यत्व आहे. जननाशौच असतां पिता इत्यादि सपिंडांस कर्मानधिकार मात्र, अस्पृश्यत्व नाहीं. कर्मादि कालाहून अन्य कालीं स्पर्श झाला असतां अन्यास दोष नाहीं. नालच्छेदनापूर्वीं जातकर्मसंस्कार व दान यांविषयीं पित्यास अधिकार आहे. याप्रमाणें पांचवा, सहावा व दहावा या दिवसीं दान व जन्मदादिदेवतांचें पूजन यांविषयीं अधिकार आहे. त्या दिवसीं ब्राह्मणांस प्रतिग्रहाविषयींहि दोष नाहीं.

---

कूटस्थमारभ्यसप्तमपुरुषपर्यंताःसपिंडाःततः सप्तसमानोदकाः ततःसप्तैकविंशतिपर्यंताः सगोत्राः तत्रसपिंडानांदशाहमित्युक्तं सोदकानांत्रिरात्रं सगोत्राणामेकरात्रमितिनागोजीभट्टीये अन्येतुसगोत्राणांनाशौचमित्याहुः अयंसपिंडसोदकाद्याशौचविभागो जननेमरणेच समानः मरणेत्वाशौचविच्छेदेपिस्नानमात्रंयावदेककुलत्वज्ञानंतावद्भवत्येवेतिविशेषः अत्रेदंबोध्यं कूटस्थादारभ्यसंततिभेदएकसंततौकश्चिदष्टमोऽपरसंततौचकश्चित्सप्तमस्तयोश्चैकतःसापिंड्यानुवृत्तिःपरतोनिवृत्तिरित्युक्तं तत्राष्टमेननिवृत्तसापिंड्यकेनसप्तमादीनांपरसंततिस्थानांजननेमरणेत्रिदिनमाशौचंकार्यं सप्तमेनत्वनुवृत्तसापिंड्यकेनाष्टमादीनांजननेमरणे वादशाहमेवकार्यं एवंसोदकत्रिरात्रादौकन्याविषयकत्रिपुरुषसापिंड्येचोह्यं तत्राष्टमस्यमृत

पितृकत्वेजीवत्पितृकत्वेपिचत्रिदिनमेव त्र्यंबकीयेभट्टोजीयेनागोजीयेचाशौचप्रकरणेन्यत्रच पित्रादिजीवनाजीवनकृतविशेषादर्शनादितिकेचित् अपरेतुनिर्णयसिंधौसापिंड्यप्रकरणेआ दशमाद्धर्मविच्छित्तिरित्यादिसुमंतुवाक्यस्यशूलपाणिकृतव्याख्याने एकपिंडदानक्रियान्वयि त्वरूपसापिंड्यलक्षणमनुसृत्यजीवत्पित्रादित्रिकस्यप्रपितामहात्परेत्रयःपिंडभाजस्तदूर्ध्वं त्रयो नवपुरुषपर्यंतालेपभाजः श्राद्धकर्ताचदशमइतिदशमादूर्ध्वंसापिंड्यनिवृत्तिः पितृपितामह जीवनेनवपुरुषपर्यंतंपितृजीवनेष्टपुरुषपर्यंतंसापिंड्यमितिप्रतिपादनादष्टमादेःपित्रादिजीवन दशायांदशाहमाशौचं पित्रादिमरणोत्तरमेवत्रिदिनमितिवदंति अत्रममद्वितीयपक्षएव युक्तोभाति ॥

मूळपुरुषापासून आरंभ करून सातव्या पुरुषापर्यंत ते सपिंड होत; आठव्या पुरुषापासून सात पुरुष समानोदक होत; तेथून सात एकवीस पुरुषपर्यंत ते सगोत्र होत; त्यांमध्यें सपिंडांस दहा दिवस आशौच असें सांगितलें, सोदकांस त्रिरात्र, व सगोत्रांस एक रात्र आशौच असें नागोजीभट्टकृत अशौचनिर्णयांत आहे. दुसरे ग्रंथकार तर, सगोत्रांस आशौच नाहीं असें ह्मणतात. हा सपिंड, सोदक इत्यादिकांचा आशौचविभाग जननाशौच व मरणाशौच यांविषयीं समान आहे. मरणाशौचाविषयीं तर, आशौचाचा विच्छेद झाला असेल ह्मणजे पिढ्या तुटल्या गेल्यामुळें आशौच धरणें नसेल तथापि जावत्कालपर्यंत एक कुलाचें ज्ञान आहे तावत्पर्यंत स्नान आहेच असा हा विशेष जाणावा. एथें हें आवश्यक जाणणें आहे कीं, मूळपुरुषापासून आरंभ करून संततिभेद असतां एका संततीचे ठायीं कोणीएक पुरुष आठवा आणि दुसऱ्या संततीचे ठायीं कोणीएक पुरुष सातवा असे असतील त्यांची एकीकडून सापिंड्याची अनुवृत्ति होते, व दुसरीकडून निवृत्ति होते असें सांगितलें आहे. त्यामध्यें सापिंड्यांतून निवृत्त झालेला जो आठवा त्यानें दुसऱ्या संततींतले जे सप्तमादिक त्यांचें जनन व मरण झालें असतां तीन दिवस आशौच धरावें. अनुवृत्त आहे सापिंड्य ज्याचें अशा सातव्यानें तर, आठवा इत्यादिकांचें जनन, मरण असतां दहा दिवसच आशौच धरावें. याप्रमाणें सोदकत्रिरात्रादिकाविषयीं व कन्याविषयक त्रिपुरुषसापिंड्याविषयींहि असाच निर्णय जाणावा. त्यामध्यें आठवा मृतपितृक अथवा जीवत्पितृक असेल तथापि त्यानें तीन दिवसच आशौच धरावें. कारण, त्र्यंबकभट्टकृत त्र्यंबकींत, भट्टोजीदीक्षितकृत व नागोजीभट्टकृत आशौचप्रकरणीं, व इतर ग्रंथींहि पित्रादिक जीवंत अथवा मृत असल्याविषयींचा विशेष कोठें आढळत नाहीं असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, निर्णयसिंधूमध्यें सापिंड्यप्रकरणीं 'दहाव्या पुरुषापासून धर्मविच्छित्ति' इत्यादिक जें सुमंतूचें वाक्य त्याचे शूलपाणीनें केलेल्या व्याख्यानांत एकपिंडदानक्रियान्वयित्वरूप ह्मणजे एकपिंडदानक्रियेचा संबंध ज्यास आहे असें सापिंड्यलक्षण स्वीकारून, जीवंत आहेत पिता, पितामह व प्रपितामह ज्याचे असा जो त्याचे प्रपितामहापलीकडचे तीन पिंडभाक् होत, पिंडभाक् जे त्यांपासून पलीकडचे तीन नऊ पुरुषांपर्यंत लेपभाक् होत, आणि श्राद्धकर्ता दहावा याप्रमाणें दहाव्या पुरुषानंतर सापिंड्यनिवृत्ति होते; पिता व पितामह हे जीवंत असतील तर नऊ पुरुषांपर्यंत सापिंड्य; पिता जीवंत असेल तर आठ पुरुषांपर्यंत सापिंड्य असें प्रतिपादन केलें आहे; यास्तव आठवा इत्यादिकांचा

पिता इत्यादिक जीवंत असेल तर त्या आठव्यास दहा दिवसपर्यंत आशौच, पिता इत्यादि मृत झाल्यानंतरच तीन दिवस आशौच असें ह्मणतात. याविषयीं मला दुसरा पक्षच योग्य वाटतो.

---

पितृगृहेकन्याप्रसूतौपित्रोस्तद्गृहवर्तिभ्रातॄणांचैकाहः पितृगृहवर्तिपितृव्यादीनांसर्वेषांपितृसपिंडानामेकाहइतिस्मृत्यर्थसारेएवंभ्रात्रादिगृहेभगिन्यादिप्रसवेपितेषामेकाहःमाधवस्तुपितृगृहेकन्यायाःप्रसूतौपित्रोस्त्रिरात्रं तद्गृहवर्तिभ्रातॄणामेकाहइत्याह कन्यायाः पतिगृहेप्रसवे पित्रादीनांनाशौचं मृतजातेशिशौसपिंडानांसंपूर्णमेवजननाशौचं मृताशौचंनास्ति जननोत्तरंनालच्छेदनात्पूर्वंशिशुमरणेपित्रादिसपिंडानांत्रिदिनंजननाशौचं मातुस्तुदशाहमेव मृताशौचंतुनास्ति नालच्छेदनोत्तरंदशाहाभ्यंतरेशिशुमरणेसपिंडादीनांसंपूर्णमेवजननाशौचं मरणाशौचंतुनास्ति ॥

पित्याचे घरीं कन्या प्रसूत होईल तर मातापितरांस व त्या घरीं असणारे भ्राते यांस एक दिवस जननाशौच; पित्याचे घरीं राहणारे जे पितृव्यादिक सर्व पित्याचे सपिंड त्यांस एक दिवस असें स्मृत्यर्थसारांत सांगितलें आहे. याप्रमाणें भ्राता इत्यादिकांचे घरीं भगिनी इत्यादिक प्रसूत झाल्या असतांहि भ्रात्यांस एक दिवस जननाशौच. माधव तर, पित्याचे घरीं कन्या प्रसूत झाली असतां मातापितरांस त्रिरात्र जननाशौच, त्या घरीं राहणारे भ्राते यांस एक दिवस असें सांगतो. "पतीच्या घरीं कन्या प्रसूत झाली तर पित्रादिकांस आशौच नाहीं. शिशु मृत होऊन उत्पन्न झाला तर सपिंडांस संपूर्णच जननाशौच आहे, मृताशौच नाहीं. उत्पत्ति झाल्यानंतर नालच्छेदन करण्याचे पूर्वी शिशु मृत होईल तर पिता इत्यादि सपिंडांस तीन दिवस जननाशौच, मातेस तर दहा दिवसच, मृताशौच तर नाहीं. नालच्छेदन झाल्यानंतर दहा दिवसांच्या पूर्वी शिशु मृत होईल तर सपिंडादिकांस संपूर्णच जननाशौच, मृताशौच तर नाहीं.

---

अथमृताशौचं तत्रमृताशौचवतामस्पृश्यत्वंकर्मानधिकारश्च दशाहानंतरंनामकरणात्प्राक्शिशुमरणेसपिंडानांस्नानमात्रं मातापित्रोस्तुपुत्रमृतौत्रिरात्रंकन्यामृतौचैकाहः सापत्नमातुःसर्वत्रपितृवत् नाम्नःपूर्वंखननमेवनित्यं नामकरणानंतरंचूडाकरणपर्यंतंतदभावेवर्षत्रयपूर्तिपर्यंतंदाहखननयोर्विकल्पः नामकरणोत्तरंदंतोत्पत्तेःप्राक्पुत्रमरणेदाहेसपिंडानामेकाहः खननेतुस्नानाच्छुद्धिः मातापित्रोरुभयत्रापित्रिरात्रं कन्यामृतौतुत्रिपुरुषसपिंडानामुभयत्रस्नानाच्छुद्धिः मातापित्रोःकन्यामृतौदंतोत्पत्तिपर्यंतमुभयत्रैकाहः अत्र नामकरणंद्वादशदिनोपलक्षणं दंतजननंसप्तममासोपलक्षणं तेनद्वादशदिनमारभ्यषण्मासपर्यंतमेकाहादिफलितं सप्तममासप्रभृतिचूडाकरणपर्यंतंतदभावेतृतीयवर्षपूर्तिपर्यंतंदाहेखननेवासपिंडानामेकाहः केचित्खननेएकाहोदाहेत्रिरात्रमित्याहुः मातापित्रोरुभयत्रत्रिरात्रं एतत्पुत्रमृतौ कन्यामृतौतुवर्षत्रयपर्यंतंसपिंडानांस्नानाच्छुद्धिः मातापित्रोःसप्तममासप्रभृतिकन्यामृतौत्रिरात्रं विज्ञानेश्वरस्त्वेकादशदिनमारभ्ययावदुपनयनंपुत्रमृतौकन्यामृतौतुयावद्विवाहंमातापित्रोस्त्रिरात्रमेवेत्याह प्रथमवर्षादौकृतचूडस्यमरणेपित्रादीनांसर्वेषांत्रिदिनंनियतंदाहश्चनि

यतः त्रिवर्षोर्ध्वंकृतचूडस्याकृतचूडस्यवामरणेप्रागुपनयनात्पित्रादिसर्वसपिंडानांत्रिदिनं दाहोनियतः सोदकानांत्वनुपनीतमरणेनूढकन्यामरणेचनाशौचंकिंतुस्नानमात्रं अनुपनीतभ्रातृमरणेभगिन्यानाशौचं ऊनद्विवर्षस्यखननंमुख्यंअनुगमनंवैकल्पिकं पूर्णद्विवर्षस्यदाहोमुख्यः अनुगमनंनित्यं अत्रदाहोदकदानादितूष्णीमेव कृतचूडायपूर्णत्रिवर्षायचभूमौपिंडदानं दंतजननपर्यंतंतत्तुल्यवयस्केभ्योद्वितीयदिनेतदुद्देशेनदुग्धदानं त्रिवर्षांतंचौलांतंवापायसदानं तदूर्ध्वमुपनयनपर्यंतमाशौचांतेसवयोभ्यस्तदुद्देशेनभोजनादिदानं ॥

## यानंतर मृताशौच सांगतों.

त्यामध्यें मृताशौच ज्यांस आहे ते स्पर्शास योग्य नाहींत व त्यांस कर्माचाहि अधिकार नाहीं. दहा दिवसांनंतर नामकरणाच्या पूर्वी शिशुमरण झालें असतां सपिंडांनीं स्नान मात्र करावें, मातापितरांस तर, पुत्रमरणाचे ठायीं त्रिरात्र, व कन्यामरणाचे ठायीं एक दिवस आशौच. सापत्नमातेस सर्वत्र ठिकाणीं पित्याप्रमाणेंच आशौच. नामकरणाच्या पूर्वी नित्य खननच. नामकरणानंतर चौलकरणापर्यंत, चौल झालें नसेल तर तीन वर्षें पूर्ण होत तावत्पर्यंत दहन व खनन यांविषयीं विकल्प, ह्मणजे दहन करावें अथवा खनन करावें. नामकरणानंतर दांत येण्याचे पूर्वी पुत्रमरणीं दहन असेल तर सपिंडांस एक दिवस आशौच, खनन असेल तर स्नानेंकरून शुद्धि. दहन, खनन या उभयपक्षींहि मातापितरांस त्रिरात्र. कन्यामरणीं तर त्रिपुरुष सपिंडांची उभयपक्षीं (दहन व खननपक्षीं) स्नानेंकरून शुद्धि. कन्यामरणीं, दांत उत्पन्न होत तावत्पर्यंत उभयपक्षीं मातापितरांस एक दिवस आशौच. ह्या स्थलीं नामकरण हें बाराव्या दिवसाचें उपलक्षण आहे. दंतोत्पत्ति, ही सातव्या मासाचें उपलक्षण आहे. त्यावरून बाराव्या दिवसापासून सहा महिनेपर्यंत एक दिवस आशौच इत्यादि फलितार्थ होतो. सातव्या मासापासून चूडाकरणापर्यंत, चूडाकरण न झालें तर पूर्ण तीन वर्षेंपर्यंत दहन अथवा खनन असतां सपिंडांस एक दिवस आशौच. कोणी ग्रंथकार, खनन असतां एक दिवस, दहन असतां त्रिरात्र असें सांगतात. मातापितरांस उभयपक्षीं (दहन, खननपक्षीं) त्रिरात्र आशौच, व हें (त्रिरात्राशौच) पुत्रमरणीं जाणावें. कन्यामरणीं तर तीन वर्षेंपर्यंत, सपिंडांची स्नानेंकरून शुद्धि होते. कन्या मृत असतां सातव्या मासापासून मातापितरांस त्रिरात्र आशौच. विज्ञानेश्वर तर, अकराव्या दिवसापासून जावत्कालपर्यंत उपनयन होई तावत्पर्यंत पुत्र मृत असतां, यावद्विवाहापर्यंत कन्या मृत असतां मातापितरांस त्रिरात्र आशौच सांगतो. प्रथम वर्ष इत्यादि समयीं चूडाकर्म केलेला असा पुत्र मृत असतां पिता इत्यादि सर्वांस निश्चयें तीन दिवस आशौच व निश्चयें दहन. तीन वर्षांनंतर, चूडाकरण केलेला अथवा न केलेला पुत्र मृत असतां उपनयनाच्या पूर्वी पित्रादि सर्व सपिंडांस तीन दिवस आशौच व दहन अवश्य करावें. उपनयन न झालेला पुत्र व अविवाहित कन्या मृत असतां सोदकांस तर आशौच नाहीं, तर त्यांनीं (सोदकांनीं) स्नान मात्र करावें. उपनयन न झालेला भ्राता मरण पावला असतां भगिनीस आशौच नाहीं. पूर्ण दोन वर्षें ज्यास नाहींत त्यास खनन मुख्य होय, अनुगमन (मागून जाणें) वैकल्पिक आहे. पूर्ण दोन वर्षांचा त्यास दहन मुख्य होय, व अनुगमन नित्य आहे. याविषयीं दहन, तिलांजलि इत्यादि अमंत्रकच करावें. चूडाकर्म केलेला व पूर्ण तीन व-

र्षांचा यास पिंडदान भूमीवर करावें. दंतोत्पत्तीपर्यंत, त्याच्या वयाचे जे असतील त्यांना त्याच्या उद्देशानें दुसऱ्या दिवशीं दुग्धदान करावें. तीन वर्षांपर्यंत अथवा चौलापर्यंत पायसदान करावें. त्यानंतर उपनयनापर्यंत, आशौचनिवृत्ति झाल्यावर त्याच्या समानवयाचे जे असतील त्यांस त्याच्या उद्देशानें भोजनादिक द्यावें.

---

स्त्रीशूद्रयोस्तुकृतचूडयोरप्युदकदानादिवैकल्पिकं शूद्रस्यत्रिवर्षपर्यंतमेतदेवाशौचं अस्योपनयनस्थानेविवाहः तथाचत्रिवर्षोर्ध्वंविवाहपर्यंततदभावेषोडशवर्षपर्यंतंवाशूद्रस्यमरणे त्रिदिनंतदूर्ध्वंजात्याशौचं कन्यायावर्षत्रयानंतरंवाग्दानात्प्राङ्मरणेत्रिपुरुषसपिंडानामेकाहः मातापित्रोस्त्रिदिनं दाहादितूष्णीं वाग्दानोत्तरंविवाहात्प्राक्कन्यामरणेपितृसपिंडानांभर्तृसपिंडानांचत्रिदिनं अत्रोभयकुलेपिसाप्तपुरुषंसापिंड्यं दाहादितूष्णीमेव जननेनुपनीतमरणे चातिक्रांताशौचंनास्ति पितुरपत्यजननश्रवणेदेशांतरेकालांतरेस्नानंभवत्येव अनुपनीतमरणे तिक्रांतेपिस्नानंभवत्येवेतिस्मृत्यर्थसारः अनुपनीतस्यानूढकन्यायाश्चमातापितृमरणेएवदशाहाशौचं अन्यमरणेतुनकिमपि उपनयनोत्तरंमरणेसपिंडानांदशाहं सोदकानांत्रिरात्रं सगोत्राणामेकाहंस्नानाच्छुद्धिर्वेत्यादिविशेषःप्रागुक्तोत्रानुसंधेयः ॥

स्त्री व शूद्र चूडाकर्म झालेले असले तथापि त्यांस उदकदानादिक वैकल्पिक आहे, ह्मणजे करावें किंवा न करावें. शूद्रास तीन वर्षेंपर्यंत हेंच आशौच जाणावें. ह्यास उपनयनस्थानीं विवाह आहे, ह्मणजे तीन वर्षांनंतर विवाहापर्यंत, अथवा विवाह झाला नसेल तर सोळा वर्षांपर्यंत शूद्र मृत झाला असतां तीन दिवस आशौच, सोळा वर्षांनंतर किंवा विवाहानंतर जात्याशौच जाणावें. कन्या तीन वर्षांनंतर वाग्दानाच्यापूर्वी मृत असतां त्रिपुरुष सपिंडांस एक दिवस व मातापितरांस तीन दिवस आशौच व दाहादिक करणें तें अमंत्रक करावें. वाग्दानानंतर विवाहाचे पूर्वी कन्या मृत असतां पित्याचे सपिंड व भर्त्याचे सपिंड यांस तीन दिवस आशौच; ह्याविषयीं दोनहि कुलांमध्यें साप्तपुरुष सापिंड्य आहे. दाहादिक करणें तें अमंत्रकच करावें. जनन व उपनयन न झाल्याचें मरण यांविषयीं अतिक्रांत आशौच नाहीं. अपत्य ( कन्या किंवा पुत्र ) उत्पन्न झालें असें पित्यास श्रुत झालें असतां देशांतरीं व कालांतरीं त्यानें अवश्य स्नान करावें. उपनयन न झालेला मृत असेल तर अतिक्रांत असतांहि स्नान करावें, असा स्मृत्यर्थसार सांगतो. उपनयन न झालेला पुत्र व अविवाहित कन्या यांस मातापितर मृत असतांच दहा दिवस आशौच; अन्य मृत असेल तर कोणतेंहि आशौच नाहीं. उपनयन झाल्यानंतर मृत असतां सपिंडांस दहा दिवस, सोदकांस त्रिरात्र, सगोत्रांस एक दिवस, किंवा स्नानेंकरून शुद्धि इत्यादि विशेष पूर्वी सांगितलेला ह्या स्थलीं जाणावा.

---

स्त्रीशूद्रयोर्विवाहोत्तरंमरणेदशाहः शूद्रस्यविवाहाभावेषोडशवर्षोत्तरमित्युक्तं विवाहोर्ध्वंकन्यायाःपितृगृहेमरणेमातापित्रोःसापत्नमातुःसापत्नभ्रातुःसोदरभ्रातुश्चत्रिरात्रं पितृव्यादीनांतद्गृहवर्तिनामेकाहः तद्गृहवर्तिनामपिसपिंडानामेकाहइतिकेचित् ग्रामांतरमृतौपित्रोः पक्षिणीतिकेचित् ऊढायाःकन्यायाःपतिगृहेमरणेपित्रोःसापत्नमातुश्चत्रिरात्रं भ्रातुःपक्षिणी पितृव्यादीनांएकाहइतिकेचित् ॥

स्त्री व शूद्र विवाहानंतर मृत होतील तर दहा दिवस आशौच. शूद्राचा विवाह झाला नसल्यास सोळा वर्षानंतर असें पूर्वी सांगितलें आहे. विवाह झाल्यानंतर कन्या पित्याचे घरीं मृत होईल तर मातापितर, सापत्न माता, सापत्न भ्राता आणि सोदर ( सख्खा ) भ्राता यांस त्रिरात्र आशौच. पित्याचे घरीं राहणारे पितृव्यादि यांस एक दिवस आशौच. पित्याचे घरीं राहणाऱ्या सपिंडांसहि एक दिवस आशौच आहे असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. कन्या अन्य ग्रामीं मृत होईल तर मातापितरांस पक्षिणी आशौच असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. विवाहित कन्या पतीच्या घरीं मृत असतां मातापितरांस व सापत्नमातेस त्रिरात्र, भ्रात्यास पक्षिणी आशौच, पितृव्यादिकांस एक दिवस असें कोणी ग्रंथकार ह्मणतात.

---

मातापित्रोर्मरणेसापत्नमातुर्मृतौचोढकन्यायास्त्रिरात्रंदशाहांतः दशाहोर्ध्वंकालांतरेवत्सरांतरेपिपक्षिणी भ्रातुरुपनीतस्यविवाहितभगिन्याश्चपरस्परगृहमरणेपरस्परस्यत्रिरात्रं गृहांतरमृतौपरस्परस्यपक्षिणी ग्रामांतरेत्वेकाहः अत्यंतनिर्गुणत्वेएकग्रामेपिस्नानं एवंसापत्नभ्रातृभगिन्योरपि भगिनीमृतौभगिन्याअप्येवमेवेतिभाति ऊढकन्यायाःपितामहपितृव्यादिमरणेस्नानमेव मातुलमरणेभगिनीपुत्रस्यभगिनीकन्यायाश्चपक्षिणी उपकारकमातुलमरणेस्वगृहेमातुलमरणेचत्रिरात्रं अनुपनीतमातुलमरणेग्रामांतरेमातुलमरणेचैकरात्रं एवंसापत्नमातुलमरणेपि मातुलानीमरणेभर्तृभगिन्यपत्यस्यस्त्रीपुंसरूपस्यपक्षिणी सापत्नमातुलानीमरणेतु नाशौचं उपनीतभागिनेयमरणेमातुलस्यमातुलभगिन्याश्चत्रिरात्रं एवंसापत्नभागिनेयेमृतेपि अनुपनीतभागिनेयमरणेमातुलस्यमातुलभगिन्याश्चपक्षिणी एवंसापत्नभागिनेयेमृतेपि अनुपनीतपदेनावशिष्टोपनयनमात्रःकृतचूडश्चूडायाअभावेत्रिवर्षोर्ध्ववयस्कोवाग्राह्यइतिभाति एवमग्रेप्यनुपनीतपदस्यार्थोबोध्यः भागिनेयीमरणेतुस्नानमात्रमितिभाति मातामहमरणेदुहित्रपत्यस्यपुत्ररूपस्यकन्यारूपस्यवात्रिरात्रं ग्रामांतरेपक्षिणी मातामह्यांमृतायांदौहित्रस्यदौहित्र्याश्चपक्षिणी अत्रसर्वत्रपुरुषस्योपनीतस्यैवस्त्रियाश्चविवाहितायाएवमातापित्रतिरिक्ताशौचेधिकारइत्युक्तं अत्रमातुलमातुलानीमातामहादिमृतौस्त्र्यपत्यस्याशौचोक्तिस्त्र्यंबकीयानुसारेणान्यत्रतुनैवंस्पष्टमुपलभ्यते उपनीतदौहित्रमरणेमातामहस्यमातामह्याश्चत्रिरात्रं अनुपनीते दौहित्रेमृतेमातामहस्यमातामह्याश्चपक्षिणी दौहित्रीमरणेतुनाशौचमितिभाति ॥

माता, पिता व सापत्न माता हीं मृत असतां विवाहित कन्येस दहा दिवसांच्या पूर्वी त्रिरात्र, दहा दिवसांनंतर अन्यकालीं व वर्षांतींहि पक्षिणी आशौच. उपनयन झालेला भ्राता व विवाहित भगिनी हीं परस्परांच्या घरीं मृत असतां परस्परांस त्रिरात्र आशौच. अन्याचे घरीं मृत असतां परस्परांस पक्षिणी, दुसऱ्या ग्रामीं मृत असतां एक दिवस आशौच. अत्यंत निर्गुणत्व असेल तर एक गांवीं असतांहि स्नान करावें. याप्रमाणें सापत्नभगिनी व सापत्न भ्राता यांविषयींहि असाच निर्णय जाणावा. भगिनी मृत झाली असतां भगिनीसहि याप्रमाणेंच आशौच असावें असें वाटतें. पितामह, चुलता इत्यादि मृत असतां विवाहित कन्येनें स्नानच करावें. मातुळ मृत असतां भाचा व भाची यांस पक्षिणी आशौच. उपकारक मातुळ मृत असतां व स्वगृहीं

---

१ नवमदशमदिनयोस्तुपुत्रवच्छेषेणशुद्धिर्युक्ता ॥

(भाच्याचे घरीं) मातुळ मृत असतां त्रिरात्र आशौच. उपनयन झालेला मातुळ मृत असतां व अन्य ग्रामीं मातुळ मृत असतां एक रात्र. सापत्न मातुळ मृत असतांहि असाच निर्णय जाणावा. मातुलानी (मामी) मृत असतां भाचा व भाची यांस पक्षिणी आशौच. सापत्न मातुलानी ह्मणजे सापत्न मामी मृत असतां आशौच नाहीं. उपनयन झालेला भागिनेय (भगिनीपुत्र–भाचा) मृत असतां मातुळ व मातुळभगिनी (मामेबहीण) यांस त्रिरात्र आशौच. याप्रमाणें सापत्न भाच्याविषयींहि असाच निर्णय जाणावा. उपनयन न झालेला भाचा मृत असतां मातुळ व मामेबहीण यांस पक्षिणी आशौच. याप्रमाणें सापत्न भाचा मृत असतांहि असेंच जाणावें. 'उपनयन न झालेला' ह्या पदेंकरून उपनयन मात्र होण्याचें राहिलेलें असून चूडाकर्म झालेला, अथवा चूडाकर्माचा अभाव असतां तीन वर्षांहून अधिक वयाचा असा घ्यावा असें वाटतें. याप्रमाणें पुढेंहि 'उपनयन न झालेला' ह्या पदाचा अर्थ असाच जाणावा. भागिनेयी (भाची) मृत असेल तर स्नान मात्र करावें असें वाटतें. मातामह (मातेचा पिता) मृत असतां कन्येचीं अपत्यें जीं पुत्र व कन्या त्यांस त्रिरात्र आशौच, अन्य ग्रामीं असतां पक्षिणी. मातामही मृत असतां दौहित्र व दौहित्री यांस पक्षिणी. एथें सर्वत्र ठिकाणीं उपनयन झालेला पुरुष व विवाहित स्त्री यांसच मातापितरांचे आशौचावांचून इतर आशौचाविषयीं अधिकार असें सांगितलें आहे. एथें मातुळ, मातुलानी, मातामहादिक मृत असतां स्त्रीरूप अपत्यास जें आशौच सांगितलें तें त्र्यंबकीच्या अनुसारानें आहे, इतर ग्रंथीं तर असें कोठें स्पष्ट आढळत नाहीं. उपनयन झालेला दौहित्र मृत झाला असतां मातामह व मातामही यांस त्रिरात्र आशौच. उपनयन न झालेला दौहित्र मृत असतां मातामह व मातामही यांस पक्षिणी. दौहित्री मृत असेल तर आशौच नाहीं असें वाटतें.

---

**श्वश्रूश्वशुरयोर्मरणेजामातुःसन्निधौत्रिरात्रं असन्निधौतुपक्षिणी उपकारकयोर्मरणेत्वसन्निधावपित्रिरात्रमेव ग्रामांतरेएकरात्रं भार्यामरणेननिवृत्तसंबंधयोःश्वश्रूश्वशुरयोरनुपकारकयोर्मृतेतुपक्षिण्येकाहोवेतिभाति जामातरिमृतेश्वश्रूश्वशुरयोरेकरात्रंस्नानाच्छुद्धिर्वा स्वगृहे जामातृमरणेत्रिरात्रं उपनीतेशालकेमृतेभगिनीभर्तुरेकाहः अनुपनीतेतुशालकेस्नानं ग्रामांतरेमृतेपिस्नानं भार्यामरणेननिवृत्तसंबंधेशालकेस्नानमितिनागोजीभट्टीये शालकसुतमरणे स्नानं कश्चिच्छालिकायांमृतायांशालकवदेकाहादिकमाह मातुःस्वसरिमृतायांस्वसृपत्ययोः कन्यापुत्रयोःपक्षिणी एवंसापत्नमातुःस्वसृमरणेपि पितुःस्वसरिमृतायांभ्रात्रपत्ययोःकन्यापुत्रयोःपक्षिणी पितुःसापत्नस्वसृमरणेतुस्नानमात्रं भ्रात्रपत्यमरणेतुपितृष्वसुःस्नानं स्वगृहे पितृष्वसृमातृष्वसृमरणेत्र्यहं ॥**

सासू व श्वशुर हे मृत असतां जामाता यास सन्निध असतां त्रिरात्र, सन्निध नसेल तर पक्षिणी. उपकार करणारे सासू व श्वशुर मृत असतील तर सन्निध नसतांहि त्रिरात्रच आशौच, अन्यग्रामीं असतां एक रात्र आशौच. भार्या मृत झाली या कारणानें निवृत्तसंबंध (सुटला आहे संबंध ज्यांचा) व उपकार न करणारे असे सासू व श्वशुर मृत असतील तर पक्षिणी अथवा एक दिवस आशौच असें वाटतें. जामाता मृत असतां सासू व सासरा यांस

एक रात्र आशौच किंवा स्नानेंकरून शुद्धि. आपल्या घरीं जामाता मृत असतां त्रिरात्र आशौच. उपनयन झालेला शालक ( पत्नीचा भ्राता ) मृत असतां भगिनीचे भर्त्यास एक दिवस आशौच. उपनयन न झालेला शालक मृत होईल तर स्नान, अन्यग्रामीं मृत असतांहि स्नान. भार्या मृत झाली या कारणानें निवृत्तसंबंध ( सुटला आहे संबंध ज्याचा तो ) शालक मृत असतां स्नान असें नागोजीभट्टकृत आशौचग्रंथांत आहे. शालकाचा पुत्र मृत असतां स्नान. कोणी एकादा ग्रंथकार, शालिका ( पत्नीची बहीण ) मृत असतां शालकाप्रमाणें एक दिवस इत्यादिक आशौच सांगतो. मातृष्वसा ( मातेची बहीण—मावशी ) मृत असतां भगिनीचीं अपत्यें जीं कन्या व पुत्र त्यांस पक्षिणी आशौच. याप्रमाणें सापत्नमावशी मृत असतांहि असाच निर्णय जाणावा. पितृष्वसा ( पित्याची बहीण—आत ) मृत असतां भ्रात्याचीं जीं अपत्यें कन्या व पुत्र त्यांस पक्षिणी आशौच. पित्याची सापत्नभगिनी मृत असेल तर स्नान मात्र. भ्रात्याचें अपत्य मृत असतां पितृष्वसेस ( पित्याचे भगिनीस ) स्नान. आपल्या घरीं आत, मावशी, ह्या मृत होतील तर तीन दिवस आशौच.

---

**उपनीतबंधुत्रयमरणेपक्षिणी अनुपनीतस्यगुणहीनस्यवाबंधुत्रयस्यमरणेएकाहः स्वगृहे मरणेतुत्रिरात्रं अत्रबंधुत्रयपदेनात्मबंधुत्रयंपितृबंधुत्रयंमातृबंधुत्रयमितिनवबंधवोग्राह्याः तेयथा आत्मपितृष्वसुःपुत्राआत्ममातृष्वसुःसुताः आत्ममातुलपुत्राश्चविज्ञेयाआत्मबांधवाः पितुःपितृष्वसुःपुत्राःपितुर्मातृष्वसुःसुताः पितुर्मातुलपुत्राश्चविज्ञेयाःपितृबांधवाः मातुःपितृष्वसुःपुत्रामातुर्मातृष्वसुःसुताः मातुर्मातुलपुत्राश्चविज्ञेयामातृबांधवाइति पितृष्वस्रादिकन्यानांतुविवाहितानांमरणेतद्बंधुवर्गस्त्वेकेनेतिवचनबलादेकाहः अनूढानांतुमरणेस्नानमात्रमितिनिर्णयसिंध्वाशयः नागोजीभट्टास्तुबंधुत्रयवाक्येपुत्रपदंकन्योपलक्षकमित्याहुः तन्मतेपितृष्वस्रादिकन्यानामूढानांमरणेपक्षिणीअनूढानामेकाहइत्यादि पितृष्वस्रादिकन्याभिस्तुबंधुत्रयमरणेस्नानमात्रंकार्यमितिसिंध्वाशयेनसिद्ध्यति भट्टमतेतुपुत्रपदवत्तद्वाक्यस्थात्मपदस्यापिकन्यापरत्वापत्त्याकन्याभिरपिबंधुत्रयाशौचंकार्यमित्यापततितत्रचबहुशिष्टाचारविगानमितिसिंध्वाशयोयुक्तोभाति ॥**

उपनयन झालेलें बंधुत्रय मृत असतां पक्षिणी; उपनयन न झालेलें अथवा गुणहीन बंधुत्रय मृत असतां एक दिवस आशौच; स्वगृहीं मृत असेल तर त्रिरात्र. ह्या स्थलीं ' बंधुत्रय ' पदेंकरून आत्मबंधुत्रय, पितृबंधुत्रय आणि मातृबंधुत्रय याप्रमाणें नऊ बंधु ग्रहण करावे. ते असे—" आपल्या आतेचे पुत्र, आपल्या मावशीचे पुत्र, आणि आपल्या मातुळाचे पुत्र हे आत्मबांधव जाणावे; पित्याचे आतेचे पुत्र, पित्याचे मावशीचे पुत्र आणि पित्याच्या मातुळाचे पुत्र हे पितृबांधव जाणावे; मातेच्या आतेचे पुत्र, मातेच्या मावशीचे पुत्र आणि मातेच्या मातुळाचे पुत्र हे मातृबांधव जाणावे; याप्रमाणें नऊ बंधु होत. आत इत्यादिकांच्या विवाहित कन्या मृत होतील तर, " त्यांचा बंधुवर्ग एक दिवसानें शुद्ध " अशा वचनबलेंकरून एक दिवस आशौच, अविवाहित मृत असतील तर स्नान मात्र असा निर्णयसिंधूचा अभिप्राय आहे. **नागोजीभट्ट** तर बंधुत्रयाच्या वाक्यांत पुत्रपद कन्येचें उपलक्षण होय असें ह्मणतात,

व त्यांच्या मतानें आत इत्यादिकांच्या विवाहित कन्या मृत असतां पक्षिणी, अविवाहित मृत असतां एक दिवस इत्यादि. आत इत्यादिकांच्या कन्यांनीं तर बंधुत्रय मृत असतां स्नान मात्र करावें असें निर्णयसिंधूच्या अभिप्रायावरून सिद्ध होतें. नागोजीभट्टांचे मतीं तर, पुत्रपदाप्रमाणें त्या वाक्यांतील आत्मपदाचाहि कन्यापर अर्थ प्राप्त झाल्यानें कन्यांनींहि बंधुत्रयाचें आशौच धरावें असें प्राप्त होतें. परंतु त्याविषयीं बहुशिष्टाचारनिंदा होते याकरितां निर्णयसिंधूचा अभिप्राय योग्य असें वाटतें.

---

अत्रेदंतत्त्वं देवदत्तीयबंधुनवकमध्येआत्मबंधुत्रयेसंबंधसाम्यात्परस्परमाशौचं अवशिष्टबंधुषट्केतु बंधुषट्कमरणेदेवदत्तस्यआशौचंदेवदत्तस्यमरणेतुबंधुषट्कस्यनाशौचंसंबंधाभावादितिसुधीभिरूह्यं दत्तकस्यमरणेपूर्वापरपित्रोस्त्रिरात्रंसपिंडानामेकाहमाशौचं नीलकंठीयेदत्तकनिर्णयेतूपनीतदत्तकमरणादौपालकपित्रादिसपिंडानांदशाहादिकमेवाशौचमित्युक्तं दत्तकेनापिपूर्वापरपित्रोर्मृतौत्रिरात्रंपूर्वापरसपिंडानांमरणेएकाहः पित्रोरौर्ध्वदेहिककरणेतुकर्मांगंदशाहमेव दत्तकस्यपुत्रपौत्रादेर्जननेमरणेवापूर्वापरसपिंडानामेकाहः एवंपूर्वापरसपिंडमरणादावपिदत्तकपुत्रपौत्रादेरेकाहः इदंसपिंडसमानोदकभिन्नेदत्तीकृतेज्ञेयं सगोत्रसपिंडेसोदकेचदत्तीकृतेयथाक्रमंदशाहंत्रिरात्रंचयथाप्राप्तंभवत्येव ॥

ह्या स्थलीं हें तत्त्व. देवदत्ताचे नऊ बंधूंमध्यें आत्मबंधुत्रयाविषयीं संबंध सारखा असल्यामुळें परस्पर आशौच आहे; अवशिष्ट बंधुषट्काविषयीं तर बंधुषट्क मृत असतां देवदत्तास आशौच आहे, परंतु देवदत्त मृत होईल तर बंधुषट्कास आशौच नाहीं; कारण, संबंधाचा अभाव आहे; याप्रमाणें बुद्धिमंतांनीं जाणावें. दत्तक मृत असतां पूर्वापर मातापितरांस त्रिरात्र, व सपिंडांस एक दिवस आशौच. नीलकंठकृत दत्तकनिर्णयामध्यें तर, उपनयन झालेल्या दत्तकाचें मरणादिक झालें असतां पालकपिता इत्यादि सपिंडांस दहा दिवसादिकच आशौच असें सांगितलें. दत्तकानेंहि पूर्वापर मातापितर मृत असतां त्रिरात्र आशौच, व पूर्वापर सपिंड मृत असतां एक दिवस आशौच धरावें. मातापित्यांचें और्ध्वदेहिक कर्म करणें असेल तर कर्मसंबंधी दहा दिवसच आशौच धरावें. दत्तकाचे पुत्र, पौत्र इत्यादिकांचें जनन अथवा मरण असतां पूर्वापर सपिंडांस एक दिवस आशौच. याप्रमाणें पूर्वापर सपिंडांचें मरणादिक असतां दत्तकाचे पुत्र, पौत्र इत्यादिकांसहि एक दिवस आशौच. हा निर्णय सपिंड, समानोदक यांहून निराळा दत्तक घेतला असल्यास त्याविषयीं जाणावा. सगोत्र सपिंड, व सोदक दत्तक घेतला असल्यास यथाक्रम दहा दिवस, त्रिरात्र, जसें प्राप्त असेल तदनुसार आशौच आहेच.

---

आचार्येमृतेत्रिरात्रं ग्रामांतरेमृतेपक्षिणी उपनीयवेदाध्यापकःआचार्यः स्मार्तकर्मनिर्वाहकोप्याचार्यःआचार्यभार्यासुतयोर्मरणेएकाहः मंत्रोपदेशकगुरुमरणेत्रिरात्रं ग्रामांतरेपक्षिणी शास्त्राध्यापकोव्याकरणज्योतिःशास्त्राद्यंगाध्यापकश्चानूचानसंज्ञकस्तन्मरणेएकाहः सकलवेदाध्यापकगुरुमरणेपक्षिणी वेदैकदेशाध्यापकउपाध्यायस्तन्मरणेएकाहः शिष्यस्योपनीयाध्यापितस्यमृतौत्रिरात्रं निवृत्ताध्ययनस्यमृतौपक्षिणी परोपनीतस्यबहुकालमध्यापितस्यमरणे

एकाहः सहाध्यायिमृतौपक्षिणी ऋत्विज्यनिवृत्तार्त्विक्कर्मणिमृतेत्रिरात्रं ग्रामांतरेपक्षिणी कर्मनिवृत्तौग्रामांतरेएकाहः एकग्रामेपक्षिणी एवंयाज्यमरणेपि सार्थवेदाध्यायीश्रौतस्मार्त कर्मनिष्ठश्चश्रोत्रियस्तयोर्मरणेमैत्रीगृहानंतर्यादिसंबंधेत्रिरात्रं एकतरसंबंधेपक्षिणी संबंधा भावेएकाहः सवर्णमित्रमरणेएकाहः यतिमरणेसर्वसपिंडानांस्नानमात्रं स्वगृहेउदासीनास पिंडमरणेएकाहः स्वाधिष्ठितस्वगृहेअसपिंडमरणेत्र्यहं आशौचप्रयोजकसंबंधिनिस्वगृहेमृ तेत्रिरात्रं ग्रामाधिपदेशाधिपादेर्मृतौसज्योतिः दिवामरणेरात्रौस्नानाच्छुद्धिःरात्रिमरणेदि वाशुद्धिरितिसज्योतिःपदार्थः पक्षिणीपदार्थस्तुदिवामरणेसदिवसःसारात्रिर्द्वितीयदिवसेन क्षत्रदर्शनपर्यंतमिति आगामिवर्तमानाहर्द्वययुतामध्यगतारात्रिः रात्रिमरणेसारात्रिस्तदुत्तर महोरात्रिश्चेतिपक्षिणी केचित्तुरात्रिमरणेपिमरणदिनाद्वितीयदिनस्थनक्षत्रपर्यंतमेवपक्षिणी पदार्थइत्याहुः एवमतिक्रांतेविषयेदिवारात्रौवामरणज्ञानानुसारेणपक्षिणीव्यवस्थायोज्या ॥

आचार्य मृत असतां त्रिरात्र, अन्यग्रामीं मृत असतां पक्षिणी. उपनयन करून वेद पढविणारा तो आचार्य. स्मार्तकर्माचा निर्वाहक तोहि आचार्य होय. आचार्याची स्त्री, पुत्र मृत असतां एक दिवस आशौच. मंत्रोपदेश करणारा गुरु मृत असतां त्रिरात्र, अन्यग्रामीं पक्षिणी आशौच. शास्त्र पढविणारा व व्याकरण, ज्योतिःशास्त्र इत्यादिक अंगें पढविणारा व अनूचानसंज्ञक ( गुरूपासून सांग वेद पढलेला ) हे मृत असतां एक दिवस आशौच. सकल वेद पढविणारा गुरु मृत असतां पक्षिणी. वेदाचा कांहीं भाग पढविणारा तो उपाध्याय; तो मृत असतां एक दिवस आशौच. उपनयन करून अध्ययन शिकविलेला शिष्य मृत असतां त्रिरात्र आशौच. अध्ययन समाप्त झालेला शिष्य मृत असतां पक्षिणी. अन्यानें उपनीत ( उपनयन केलेला ) असून बहुत दिवस अध्ययन शिकविलेला शिष्य मृत असतां एक दिवस आशौच. सहाध्यायी ( आपल्याबरोबर अध्ययन करणारा ) मृत असतां पक्षिणी. ऋत्विक्कर्म समाप्त न केलेला ऋत्विक् मृत असतां त्रिरात्र; अन्यग्रामीं असतां पक्षिणी, कर्मनिवृत्ति असतां अन्यग्रामीं एक दिवस, एक ग्रामीं पक्षिणी. याप्रमाणें याज्य ( यजमान ) मृत असतांहि असाच निर्णय जाणावा. अर्थसहित वेदाचें अध्ययन करणारा, व श्रौतस्मार्तकर्मनिष्ठ असा श्रोत्रिय हे मृत असतां मैत्री व गृहसान्निध्य इत्यादिक संबंध असेल तर त्रिरात्र आशौच, दोहोंतून एक संबंध असतां पक्षिणी, संबंधाचा अभाव असतां एक दिवस. आपल्या वर्णांतला मित्र मृत असतां एक दिवस आशौच. संन्यासी मृत असतां सर्व सपिंडांनीं स्नान मात्र करावें. आपल्या घरीं, उदासीन असा असपिंड मृत असतां एक दिवस आशौच. आपल्या राहण्याच्या स्वगृहीं असपिंड मृत असतां तीन दिवस. आशौचाचा उत्पादकसंबंधी, स्वगृहीं मृत असतां त्रिरात्र. ग्रामाधिपति, देशाधिपति इत्यादिक मृत असतां सज्योति, दिवसा मृत असतां रात्रौ स्नानेंकरून शुद्धि, व रात्रौ मृत असतां दिवसा शुद्धि याप्रमाणें सज्योतिपदाचा अर्थ. पक्षिणीपदाचा अर्थ तर, दिवसा मरण असतां तो दिवस, ती रात्रि आणि दुसऱ्या दिवशीं नक्षत्रदर्शनपर्यंत ही पक्षिणी जाणावी. येणारा व वर्तमान, अशा दोन दिवसांनीं युक्त मध्यगतरात्रि ती पक्षिणी. रात्रीं मृत असेल तर ती रात्रि, व तिच्या पुढचें अहोरात्र मिळून पक्षिणी. कोणी ग्रंथकार तर,

रात्रीं मृत असतांहि मरणादिवसापासून दुसऱ्या दिवसाच्या नक्षत्रांपर्यंतच पक्षिणी पदाचा अर्थ असें ह्मणतात. याप्रमाणें अतिक्रांत आशौचाविषयीं दिवसा अथवा रात्रीं जसें मरणाचें ज्ञान ह्मणजे मृत झाल्याचें समजेल त्याप्रमाणें पक्षिणीची व्यवस्था योजावी.

---

**आचार्यमातुलादीनांत्रिरात्राद्याशौचमन्यस्मिन्नंत्यकर्मकर्तरिज्ञेयं शिष्यादीनामंत्यकर्मकर्तृत्वेतुदशाहाद्येव ॥**

आचार्य, मातुळ इत्यादिकांचें जें त्रिरात्रादिक आशौच सांगितलें तें दुसरा अंत्यक्रियाकर्ता असतां जाणावें. शिष्यादिक अंत्यक्रिया करणारे असतील तर दहा दिवस इत्यादिकच आशौच जाणावें.

---

**ग्राममध्येयावच्छवस्तिष्ठतितावत्ग्रामस्याशौचं नगरेतुनैवं ग्रामनगरलक्षणान्यन्यत्रगृहेगवादिपशुमृतौयावच्छवस्तिष्ठेत्तावदाशौचं द्विजगृहेशुनोमृतौगृहस्यदशरात्रमाशौचंशूद्रमरणेमासं पतितमृतौमासद्वयं म्लेच्छादिमृतौमासचतुष्टयं दासानांगृहजातक्रीतऋणमोक्षितलब्धत्वादिप्रकाराणांस्वामिमरणेस्वजातीयाशौचं युद्धेशस्त्रघातेनसद्योमृतेस्नानमात्रंनाशौचमंत्यकर्मापिदशाहादिकंसद्यएवकर्तव्यं युद्धक्षतेनकालांतरेमरणेएकाहः त्र्यहादूर्ध्वंयुद्धक्षतेनमरणेपराङ्मुखहतेयुद्धेकपटेनहतेचत्रिरात्रं युद्धक्षतेनसप्तरात्रादूर्ध्वंमृतौदशाहइत्याहुः शिष्टास्तुयुद्धेहतस्यसद्यःशौचादिकंलोकविद्विष्टत्वान्नवदंति प्रयागादौकाम्यमरणेस्नानमात्रं प्रायश्चित्तार्थमग्न्यादिमरणेएकाहः महारोगपीडाक्षमाणांजलादिप्रवेशेत्रिरात्रं अत्रापिनशिष्टाचारसंमतिः एवंकारागृहेमृतस्यैकरात्रेपि ॥**

गांवामध्यें जोंपर्यंत प्रेत असेल तोंपर्यंत ग्रामास आशौच आहे. नगराविषयीं तर, आशौच नाहीं. ग्राम व नगर यांचीं लक्षणें दुसऱ्या ग्रंथीं पहावीं. घरीं गाई इत्यादि पशु मृत असतां जोंपर्यंत त्या पशूचें प्रेत राहील तोंपर्यंत गृहास आशौच. द्विजाच्या घरीं कुत्रा मृत झाला असतां घरास दहा रात्रि आशौच, शूद्र मृत झाला असतां मासपर्यंत, पतित मृत असता दोन मास, म्लेच्छादिक मृत असतां चार मास आशौच जाणावें. घरीं झालेला व विकत घेतलेला, कर्जातून सोडविलेला, मिळालेला इत्यादि प्रकारचे दास यांनीं स्वामी (धनी) मृत असतां स्वजातीय आशौच धरावें. युद्धामध्यें शस्त्राचे प्रहारानें तत्कालीं मृत असतां स्नान मात्र करावें, आशौच नाहीं, व त्याचें दशाहादि अंत्यकर्महि तत्कालींच करावें. युद्धसंबंधी क्षतानें कालांतरीं मृत होईल तर एक दिवस आशौच. तीन दिवसांनंतर युद्धसंबंधी क्षतेंकरून मृत असतां, व युद्धांतून पाठीमागें फिरलेला मारला गेला असतां अथवा युद्धांत कपटानें मारला असतां त्रिरात्र आशौच. युद्धाच्या क्षतानें सात रात्रींनंतर मृत असतां दहा दिवस आशौच असें ह्मणतात. शिष्ट तर, युद्धांत मृत झालेल्याची सद्यःशुद्धि लोकविद्विष्टत्वास्तव सांगत नाहींत. प्रयाग इत्यादिक क्षेत्रीं कामनिक मरण असतां स्नान मात्र. प्रायश्चित्तासाठीं अग्नि इत्यादिकानें मरण प्राप्त झालें असतां एक दिवस आशौच. महारोगाची पीडा सहन करण्याविषयीं असमर्थ होऊन उदक इत्यादिकांत प्रवेश करून मृत असतां त्रिरात्र

आशौच, याविषयींहि शिष्टाचाराची संमति नाहीं. याप्रमाणें कारागृह ह्मणजे तुरुंगांत मृत झालेल्याचें जें एकरात्र आशौच त्याविषयींहि शिष्टाचारसंमति नाहीं.

---

अथातिक्रांताशौचं तत्रजननाशौचेतिक्रांताशौचंनास्ति पितुःस्नानमात्रंतत्रापिभवति मृताशौचेप्यनुपनीतमरणादिनिमित्तेषुत्रिरात्रैकरात्रेषुमातुलादिपरगोत्रीयमरणनिमित्तकेषु पक्षिणीत्रिरात्रादिषुचातिक्रांताशौचंनास्ति तत्रोढकन्यायाःपित्रोर्मरणेत्रिरात्रेतिक्रांतेपि दशाहांतरुयहं तदूर्ध्वंवत्सरांतरेपिपक्षिणीत्युक्तं एवंसोदकादिविषयत्रिरात्रादिष्वतिक्रांताशौचंन स्नानमात्रंत्वत्रापिकालांतरेपिभवत्येव किंतुदशाहादिमृताशौचविषयमेवातिक्रांताशौचंकर्तव्यं तत्रदशाहाद्याशौचानांत्रिरात्रादीनांचतत्तदाशौचमध्येज्ञानेवशिष्टदिनैःशुद्धिः पुत्रादेरपिशेषदिनैरेवशुद्धिः अंत्यकर्मापिशेषदिनैरेवसमापनीयं एवमस्थिपर्णशरसंस्कारोपिशेषेणैव एवंसोदकेत्रिरात्रेपिशेषेणशुद्धिः त्रिरात्राद्युत्तरंतुदशाहन्यूनाशौचानांदशाहमध्येज्ञानेपिनातिक्रांताशौचंकिंतुस्नानमात्रं मातापित्रोर्मरणेदूरदेशेपिवत्सरांतरेपिश्रवणेपुत्रस्यश्रवणप्रभृति दशाहादिपूर्णमेवाशौचं दंपत्योःपरस्परंदेशांतरेकालांतरेपिपूर्णदशाहमेव सपत्नीनांपरस्परं देशकालविशेषानपेक्षंदशाहमेव सापत्नमातुर्मरणे पुत्रस्यदशाहोर्ध्वंदेशकालानपेक्षंत्रिरात्रं औरसपुत्रमृतौमातापित्रोर्वत्सरांतरेपित्रिरात्रं दशाहोर्ध्वमेकदेशेसपिंडमरणेज्ञातेमासत्रयपर्यंतंत्रिरात्रं षण्मासपर्यंतंपक्षिणी नवमासपर्यंतमेकरात्रं ततोवर्षपर्यंतंसज्योतिःस्नानमात्रंवा माधवमतेपक्षत्रयपर्यंतंत्रिरात्रं षण्मासपर्यंतंपक्षिणी वर्षपर्यंतमेकरात्रं वर्षोर्ध्वंस्नानमात्रमिति अत्रापदनापद्विषयत्वेनव्यवस्था ॥

## यानंतर अतिक्रांताशौच सांगतों.

त्यामध्यें जननाशौचाविषयीं अतिक्रांत आशौच नाहीं. पिता जो त्यास स्नान मात्र; तें जननाशौचांतहि आहे. मृताशौचामध्येंहि उपनयन न झालेला त्याचें मरण इत्यादि निमित्तक त्रिरात्र; एकरात्र; व परगोत्रांतील मातुलादि यांच्या मरणनिमित्तक जीं पक्षिणी, त्रिरात्रादिक आशौचें त्यांविषयीं अतिक्रांत आशौच नाहीं. त्यामध्यें मातापितर मृत असतां विवाहित कन्येस त्रिरात्र आशौच; तें अतिक्रांत असलें तथापि दहा दिवसांचे आंत त्रिरात्र आशौच आहे. दहा दिवसांनंतर वर्षांतींहि पक्षिणी असें सांगितलें. याप्रमाणें सोदकादिविषयक जीं त्रिरात्रादिक त्यांचेविषयीं अतिक्रांत आशौच नाहीं, तथापि एथें कालांतर असतांहि स्नान मात्र आहेच; तर दहा दिवसादिक जें मृताशौच तद्विषयकच अतिक्रांताशौच धरावें. त्यामध्यें दहा दिवसादिक आशौचें व त्रिरात्रादिक आशौचें यांचें त्या त्या आशौचामध्यें ज्ञान झालें असतां अवशिष्ट दिवसांनीं शुद्धि जाणावी. पुत्रादिकांचीहि शेष दिवसेंकरूनच शुद्धि जाणावी. अंत्यकर्महि शेष दिवसेंकरूनच समाप्त करावें. याप्रमाणें अस्थिसंस्कार, पालाशसंस्कार तेहि शेष दिवसेंकरूनच समाप्त करावे. याप्रमाणें सोदकांचे त्रिरात्राशौचाचीहि शेष दिवसांनीं शुद्धि जाणावी. त्रिरात्रादि आशौचानंतर तर, दहा दिवसांहून कमी आशौचाचें दहा दिवसांमध्यें

---

१ इदंमातुलादित्रिरात्रपक्षिण्यादीनामुपलक्षणं ॥

२ हें, मातुलादिकांचें त्रिरात्र, पक्षिणी इत्यादिक जीं आशौचें त्यांचें उपलक्षण आहे.

ज्ञान झालें असतांहि अतिक्रांत आशौच नाहीं; तर स्नान मात्र करावें. मातापितर मृत असतां दूरदेशीं असतांहि व दुसऱ्या वर्षानंतरहि श्रुत झालें तथापि पुत्रास समजल्या दिवसापासून दहा दिवसादिक संपूर्णच आशौच आहे. दंपतीचें परस्परांस देशांतरीं व कालांतरींहि संपूर्ण दहा दिवसच आशौच आहे. सपत्नींचें ( सवतींचें ) परस्परांस देश, काल यांच्या विशेषाच्या अपेक्षेवांचून दहा दिवसच आशौच आहे. सापत्नमाता मृत असतां पुत्रास दहा दिवसांनंतर देशकालांच्या अपेक्षेवांचून त्रिरात्र आशौच. औरसपुत्र मृत असतां मातापितरांस दुसऱ्या वर्षींहि त्रिरात्र आशौच. दहा दिवसांनंतर, एक देशीं सपिंडाचें मरण समजलें असतां तीन मासांपर्यंत त्रिरात्र, सहा मासांपर्यंत पक्षिणी, नऊ मासपर्यंत एक रात्र, नऊ मासांनंतर वर्षपर्यंत सज्योति किंवा स्नान मात्र करावें; माधवाचे मतीं तर, पक्षत्रय ( दीड महिना ) पर्यंत त्रिरात्र, सहा मासपर्यंत पक्षिणी, वर्षपर्यंत एक रात्र, वर्षानंतर स्नान मात्र. या दोन मतांविषयीं, आपत्ति व अनापत्ति या विषयत्वेंकरून व्यवस्था जाणावी.

---

**अथदेशांतरेसपिंडमरणेदशाहोर्ध्वंज्ञातेपक्षत्रयपर्यंतंत्रिरात्रं षण्मासपर्यंतंपक्षिणी नव मासपर्यंतमेकाहः वर्षपर्यंतंसज्योतिरितिमाधवमतं विज्ञानेश्वरस्तुदेशांतरेसपिंडमरणेदशाहोर्ध्वंज्ञातेस्नानमात्रमित्याह अत्रमाधवमतमेवयुक्तं अतिक्रांताशौचंवयोवस्थानिमित्तकाशौचंचसर्ववर्णसाधारणं देशांतरंतुविप्रस्यविंशतियोजनात्परं क्षत्रियादेःक्रमेणचतुर्विंशतित्रिंशत्षष्टियोजनैः केचिद्विप्रस्यत्रिंशद्योजनोत्तरंदेशांतरमाहुः भाषाभेदसहितमहागिरिणाभाषाभेदसहितमहानद्यावाव्यवधानमपिदेशांतरं यत्तुकेचिद्भाषाभेदरहितमपिगिरिनदीव्यवधानंदेशांतरमाहुः तद्योजनगतविंशत्यादिसंख्यायास्त्रिचतुरादिन्यूनत्वेपिदेशांतरत्वसंपादकतया योज्यमितिभाति अन्यथामहानदीपरपूर्वतीरवासिनामेकयोजनमध्येपिदेशांतरत्वापत्तेः अत्र सगोत्रविषयाशौचान्येवभार्यापतिपुत्रादिभिःसर्वैरनुष्ठेयानि यानितुमातुलत्वभगिनीत्वादिप्रयुक्तानिभिन्नगोत्राशौचानितेषुजायापतिपुत्रादिषुमध्येयत्संबंधियत्तत्तेनैवानुष्ठेयंनसर्वैः ॥**

यानंतर देशांतरीं सपिंडाचें मरण दहा दिवसांनंतर ज्ञात झालें असतां दीड महिनापर्यंत त्रिरात्र, सहा मासपर्यंत पक्षिणी, नऊ मासपर्यंत एक दिवस, वर्षपर्यंत सज्योति; याप्रमाणें माधवाचें मत आहे. विज्ञानेश्वर तर, देशांतरीं सपिंडाचें मरण दहा दिवसांनंतर ज्ञात झालें असतां स्नान मात्र करावें असें सांगतो. याविषयीं माधवाचें मतच योग्य आहे. अतिक्रांत आशौच व वयोवस्थानिमित्तक आशौच हीं सर्ववर्ण साधारण होत. देशांतर—ब्राह्मणांस वीस योजनांपलीकडे व क्षत्रियादिकांस क्रमेंकरून चोवीस, तीस आणि साठ योजनें यांहींकरून देशांतर जाणावें. कोणी ग्रंथकार, तीस योजनांपलीकडे ब्राह्मणांस देशांतर असें ह्मणतात. भाषा निराळी असून मोठा पर्वत, अथवा भाषा निराळी असून मोठी नदी यांचें मध्यें व्यवधान ( अंतर ) असणें हेंहि देशांतर होय. कोणी ग्रंथकार, भाषा निराळी नसेल तथापि पर्वत, नदी यांचें मध्यें अंतर असणें तें देशांतर होय असें जें ह्मणतात तें योजनांच्या वीस इत्यादिक संख्येमध्यें तीन चार योजनें कमीं असलीं तथापि देशांतर संपूर्ण होईल अशा

संपादकत्वेंकरून योजावें असें वाटतें. असें न योजलें तर महानदीच्या पलीकडच्या तीरीं व अलीकडच्या तीरीं जे राहणारे त्यांस एका योजनामध्येंहि देशांतर घडेल. ह्या स्थलीं सगोत्रविषयक आशौचें तीं मात्र भार्या, पति, पुत्र इत्यादि सर्वांनीं धरावीं. जीं मातुलत्व, भगिनीत्वादिप्रयुक्त असीं निराळ्या गोत्रांतलीं आशौचें त्यांमध्यें भार्या, पति, पुत्र इत्यादिकांमध्यें जें ज्याचें संबंधि असेल त्याचें त्यानेंच आशौच धरावें, सर्वांनीं धरूं नये.

---

**रात्रौजननमरणेरात्रौमरणज्ञानेवारात्रिंत्रिभागांकृत्वाप्रथमभागद्वयेपूर्वदिनंतृतीयभागेउत्तरदिनमारभ्याशौचं यद्वार्धरात्रात्प्राक्पूर्वदिनंपरतःपरदिनं अत्रदेशाचारादिनाव्यवस्था ॥**

रात्रौ जनन व मरण झालें, अथवा रात्रौ मरणाचें ज्ञान झालें असतां रात्रीचे तीन भाग करून पहिले दोन भाग असतां पूर्व दिवस, व तिसरा भाग असतां पुढचा दिवस, त्या दिवसापासून आशौच धरावें. अथवा अर्ध्या रात्रीच्या पूर्वीं पूर्व दिवस, आणि पलीकडे पुढचा दिवस; याविषयीं देशाचार इत्यादिकेंकरून व्यवस्था जाणावी.

---

**आहिताग्नेर्मंत्रवद्दाहदिनमारभ्यपुत्रादिभिराशौचंकार्यं अत्राहिताग्निपदेनश्रौताग्नित्रयवान्ग्राह्यः तद्भिन्नोगृह्याग्निमानप्यनाहिताग्निपदेनग्राह्यः आहिताग्नेर्विदेशमरणेमंत्रवद्दाहात्पूर्वंपुत्रादीनामाशौचंसंध्यादिनित्यकर्मलोपश्चनास्ति मंत्रवद्दाहमारभ्यतुपुत्रादिसपिंडानांदुहितृदौहित्रादिभिन्नगोत्राणांचाशौचंभवत्येवनत्वतिक्रांतनिमित्तकआशौचाभावस्तस्यन्हासोवा अतएवाहिताग्नेःपर्णशरदाहेपिदशाहमेवदेशांतरेकालांतरेपिसिद्ध्यति अनाहिताग्नेर्मरणदिनादारभ्यपुत्रादिभिराशौचंकार्यं अनाहिताग्नेर्देशांतरेमरणेअतिक्रांताशौचंमरणश्रवणानंतरमेवपूर्वोक्तव्यवस्थयाकार्यं अनाहिताग्नेरस्थिदाहपर्णशरदाहयोस्तुपूर्वमगृहीताशौचयोर्भार्यापुत्रयोर्दशाहमेव गृहीताशौचयोस्तुसंस्कारकर्तृभिन्नयोर्दाहकालेत्रिरात्रं सपत्न्योर्मिथश्चैवं पत्नीसंस्कारेपत्युश्चैवं एतद्भिन्नसपिंडानांतुपूर्वमगृहीताशौचानामनाहिताग्निसंस्कारकालेत्रिरात्रं गृहीताशौचानांतुसपिंडानांदाहकालेस्नानमात्रं इदं सपिंडानांत्रिरात्रादिकंपुत्रादेर्दशाहादिकंचदशाहोर्ध्वंसंस्कारकरणेज्ञेयं दशाहमध्येसंस्कारकरणेतुशेषदिनैरेवशुद्धिःकर्मसमाप्तिश्च आहिताग्नेरेवदशाहमध्येपिशरीरदाहेस्थिदाहेपर्णशरदाहेवाशेषेणनशुद्धिःसमंत्रकदाहदिनस्यैवप्रथमदिनत्वादित्युक्तं दशाहोर्ध्वंदेशांतरमृतानाहिताग्निवार्ताश्रवणदिनात्कृतत्रिरात्राशौचानांसपिंडानांचतुर्थादिदिनेषुसंस्कारारंभेदाहकाले स्नानं अगृहीताशौचानांत्रिदिनमेव भार्यापुत्रादेःश्रवणदिनादारभ्यदशाहंद्वितीयादावहन्यारंभेचतुर्थदिनेसपिंडशुद्धिः भार्यादेर्दशाहमेवश्रवणदिनादित्यूह्यं देशांतरगतस्यद्वादशवर्षादिप्रतीक्षोत्तरंपर्णशरदाहेप्येवमेव पुत्रादेःसपिंडानांचदशरात्रंत्रिरात्रादिकमूह्यं प्रतीक्षाचयदारभ्यवार्तानश्रूयतेतदारभ्यपंचदशवर्षाणिमातापित्रोः अन्येषांपूर्ववयसिविंशतिः मध्यमेपंचदश उत्तरेवयसिद्वादश प्रतीक्षायुक्त्यादिभिर्मरणनिश्चयासंभवेकार्या ॥**

आहिताग्नीचा समंत्रक दाह ( दहन ) ज्या दिवसीं होईल त्या दिवसापासून आरंभ करून पुत्रादिकांनीं आशौच धरावें. ह्या स्थलीं ‘ आहिताग्नि ’ ह्या पदेंकरून तीन श्रौताग्नींनीं युक्त तो ग्रहण करावा. त्याहून निराळा गृह्याग्निमान् तोहि ‘ अनाहिताग्नि ’ ह्या पदेंकरून ग्रहण करावा. आहिताग्नि विदेशीं मृत असेल तर समंत्रक दाहाचे पूर्वी पुत्रादिकांस आशौच व संध्यादिक नित्यकर्मलोप हीं नाहींत. समंत्रक दहनाचे आरंभापासून तर, पुत्रादिक सपिंड आणि कन्या, दौहित्र इत्यादिक भिन्नगोत्री यांस आशौच आहेच, अतिक्रांतनिमित्तक आशौचाचा अभाव व त्या आशौचाचा ऱ्हास ह्मणजे न्यून करणें हीं नाहींत, याकरितांच आहिताग्नीचा पर्णशर ( पालाशविधि ) दाह झाला असला तथापि देशांतर व कालांतर असतांहि दहा दिवसच आशौच असें सिद्ध होतें. अनाहिताग्नीचें, मरणदिवसापासून आरंभ करून पुत्रादिकांनीं आशौच धरावें. अनाहिताग्नि देशांतरीं मृत असतां अतिक्रांताशौच, मरण श्रुत झाल्यानंतरच पूर्वी सांगितल्या व्यवस्थेंकरून धरावें. अनाहिताग्नीचा अस्थिदाह अथवा पर्णशरदाह असेल तर, पूर्वी आशौच न धरलेले असे भार्या व पुत्र यांनीं दहा दिवसच आशौच धरावें. पूर्वीं भार्यापुत्रांनीं आशौच धरलें असेल तर संस्कारकर्त्यावांचून जीं स्त्री, पुत्र त्यांनीं दहनकालीं त्रिरात्र आशौच धरावें. सवतींचेंहि परस्पर याप्रमाणें आशौच जाणावें. स्त्रियेच्या संस्कारीं पतीसहि याप्रमाणें जाणावें. याहून निराळे जे सपिंड त्यांनीं पूर्वीं आशौच धरलें नसेल तर, अनाहिताग्नीच्या संस्कारकालीं त्रिरात्र आशौच धरावें, ज्या सपिंडांनीं आशौच धरलें असेल त्यांनीं दाहकालीं स्नान मात्र करावें. हें सपिंडांस त्रिरात्रादिक व पुत्रादिकांस दहा दिवस इत्यादिक जें आशौच सांगितलें तें दहा दिवसांनंतर संस्कार करणें असतां जाणावें. दहा दिवसांमध्यें संस्कार केला असतां शेषदिवसांनींच शुद्धि व कर्मसमाप्ति होते. आहिताग्नीचाच दहा दिवसांमध्येंहि शरीरदाह अथवा अस्थिदाह किंवा पालाशविधीनें दाह असतां शेषदिवसांनीं शुद्धि होत नाहीं; कारण, आहिताग्नीचा समंत्रक दाह ज्या दिवसीं होतो तोच त्याचा प्रथम दिवस असें सांगितलें आहे. देशांतरीं मृत झालेला जो अनाहिताग्नि त्याची मृतवार्ता दहा दिवसांनंतर समजल्या कारणानें श्रवण दिवसापासून तीन दिवस आशौच सपिंडांनीं धरलें असून चतुर्थादि दिवसीं क्रियेस आरंभ असेल तर सपिंडांनीं दहनकालीं स्नान मात्र करावें, आशौच न धरलेले जे सपिंड त्यांनीं तीन दिवसच आशौच धरावें. भार्या, पुत्र, इत्यादिकांस श्रवण दिवसापासून दहा दिवस आशौच. दुसरा इत्यादिक दिवसीं संस्कारास आरंभ असतां चौथ्या दिवसीं सपिंडांची शुद्धि होते. भार्यादिकांची श्रवणदिवसापासून दहा दिवसांनींच शुद्धि, याप्रमाणें जाणावें. देशांतरीं गेलेल्याची बारा वर्षेंपर्यंत प्रतीक्षा करून नंतर पालाशविधीनें दाह केला असतांहि असाच निर्णय जाणावा. पुत्रादिक व सपिंड यांस क्रमेंकरून दशरात्र, त्रिरात्र इत्यादिक जाणावें. प्रतीक्षा करणें ती ज्या दिवसापासून वार्ता श्रुत न झाली त्या दिवसापासून पंधरा वर्षें मातापितरांची करावी, इतरांची पूर्व वय असतां वीस वर्षें, मध्यम वय असतां पंधरा वर्षें, उत्तर वय असतां बारा वर्षें, मरणनिश्चयाचा असंभव असतां युक्ति इत्यादिकेंकरून प्रतीक्षा करावी.

---

**अथाशौ**चसंपातेनिर्णयः दशाहमृताशौचेदशाहस्यततोन्यूनस्यवामृताशौचस्यसंपातेपूर्वप्र**वृत्ताशौचस**माप्त्याशुद्धिः १ दशाहजननाशौचेदशाहंन्यूनंवाजननाशौचंपततिचेत्पूर्वप्रवृत्त**समाप्त्याशु**द्धिः २ दशाहमृताशौचेजननाशौचंदशाहंत्र्यहंवासंपतेत्तदामृताशौचसमाप्त्या**शुद्धिः ३** त्र्यहमृताशौचेत्र्यहंततोन्यूनंवामृताशौचंत्र्यहंजननाशौचंवासंपतेत्तदापूर्वप्रवृत्तां**तेशुद्धिः ४ त्रिदिनजननाशौचेत्रिदिनजननाशौचपातेपूर्वांतेशुद्धिः ५ पक्षिणीमृताशौचेपक्षिण्येकाहान्यतरमृतकपातेपूर्वांतेशुद्धिः जननाशौचेनसमेनाधिकेनवामृताशौचं नापैति पक्षिण्यादिरूपमृतकेनत्रिदिनंदशाहंचजननाशौचंत्रिदिनमृताशौचेनदशाहंजाताशौचं चनापैतीतिबहवः कश्चित्तुन्यूनेनापिमृतकेनाधिकस्यापिजाताशौचस्यनिवृत्तिरित्याह त्रिदिनमृताशौचेनदशाहंमृतकंननिवर्तते एवंपक्षिण्यात्रिदिनमेकाहेनपक्षिणीचनापैति त्रिदिनजाताशौचेनदशाहंजाताशौचंननिवर्तते ॥**

## यानंतर आशौचसंपाताविषयीं निर्णय सांगतों.

१ दहा दिवसांचें मृताशौच असतां, त्यांत दहा दिवसांचें अथवा त्याहून कमी असें मृताशौच प्राप्त होईल तर पूर्वी जें प्राप्त आशौच त्याची समाप्ति झाल्यानें शुद्धि होते. २ दहा दिवसांचे जननाशौचामध्यें जर दहा दिवसांचें किंवा त्याहून कमी दिवसांचें जननाशौच प्राप्त झालें तर पूर्वी प्राप्त झालेल्याची समाप्ति झाल्यानें शुद्धि होते. ३ दहा दिवसांच्या मृताशौचामध्यें, दहा दिवसांचें अथवा तीन दिवसांचें जननाशौच प्राप्त होईल त्या कालीं मृताशौचाची समाप्ति झाल्यानें शुद्धि होते. ४ तीन दिवसांचे मृताशौचामध्यें तीन दिवसांचें किंवा त्याहून कमी असें मृताशौच किंवा तीन दिवसांचें जननाशौच प्राप्त होईल त्या कालीं पूर्वी प्राप्त झालेल्याच्या अंतीं शुद्धि होते. ५ तीन दिवसांचे जननाशौचामध्यें तीन दिवसांचें जननाशौच प्राप्त असतां पूर्वाशौचाच्या अंतीं शुद्धि होते. पक्षिणीमृताशौचामध्यें पक्षिणी, एकदिनात्मक यांतून एकादें मृताशौच प्राप्त असतां पूर्व आशौचाचे अंतीं शुद्धि होते. समान किंवा अधिक अशा जननाशौचेंकरून मृताशौच दूर होत नाहीं. पक्षिण्यादिरूप जें मृताशौच तेणेंकरून तीन दिवसांचें व दहा दिवसांचें असें जननाशौच; आणि तीन दिवसांचे मृताशौचानें दहा दिवसांचें जाताशौच हीं जात नाहींत, असें बहुत ग्रंथकार ह्मणतात. कोणीएक ग्रंथकार तर, कमी अशा मृताशौचेंकरून, अधिक अशा जननाशौचाची निवृत्ति होते असें सांगतो. तीन दिवसांचे मृताशौचेंकरून दहा दिवसांचें मृताशौच जात नाहीं. याप्रमाणें पक्षिणीआशौचेंकरून तीन दिवसांचें, व एक दिवसाच्या आशौचेंकरून पक्षिणी आशौच जात नाहीं. तीन दिवसांच्या जननाशौचेंकरून दहा दिवसांचें जननाशौच निवृत्त होत नाहीं.

---

**अत्रेदंबोध्यं संपातोनामाशौचिनामेकाशौचित्वज्ञानेपराशौचित्वज्ञानंतेनपूर्वाशौचमध्ये उत्पन्नमपिपराशौचंपूर्वाशौचांतेज्ञातंचेत्पूर्वेणननिवर्ततेसंपाताभावात् पूर्वत्वपरत्वेतूत्पत्तिकृतेन ज्ञानकृते तेनपूर्वोत्पन्नस्यपरोत्पन्नज्ञानोत्तरंज्ञानेपिपूर्वोत्पन्नेनपरोत्पन्नंतन्मध्येज्ञातंनिवर्ततएव**

संपातएवज्ञानकृतोनतुपूर्वत्वादिकमितिसिद्धांतादिति दशाहांत्यरात्रौयदिनिवृत्तियोग्यंदशाह संपातस्तदादिनद्वयमधिकंकार्यं दशमरात्रेश्चतुर्थयामेनिवृत्तियोग्यदशाहांतरसंपातेदिनत्रयम धिकम् दशाहांत्यरात्रौचतुर्थयामेवानिवृत्तियोग्यत्रिरात्राशौचपातेतुपूर्वेणशुद्धिर्नत्र्यहादिवृ द्धिः एवंत्र्यहाद्याशौचानांनिवृत्तियोग्यानांपरस्परंतृतीयरात्रौतृतीयरात्रिशेषेवासंपातेपूर्वेण शुद्धिर्नत्र्यहादिवृद्धिः वर्धितद्वित्रिदिनेदशाहांतरपातेपूर्वेणद्विरात्रेणत्रिरात्रेणवाननिवृत्तिःव र्धितद्विरात्रेणपक्षिण्यानिवृत्तिः वर्धितत्रिरात्रेणान्यत्रिरात्रस्यनिवृत्तिः ॥

याविषयीं [२] हें जाणावें.—आशौची यास एका आशौचित्वाचें ज्ञान असतां त्यांत दुसऱ्या आशौचित्वाचें जें ज्ञान तो संपात; त्यावरून असें होतें कीं, पूर्वीच्या आशौचामध्यें जरी दुसरें आशौच झालें तथापि पूर्वीच्या आशौचाच्या अंतीं जर ज्ञान झालें तर पूर्वाशौचेंकरून तें आशौच निवृत्त होत नाहीं; कारण संपाताचा अभाव आहे. पूर्वत्व व परत्व हीं उत्पत्तिकृत होत, ज्ञानकृत नव्हत; त्यावरून पूर्वी उत्पन्न झालेल्याचें ज्ञान, पुढें उत्पन्न झाल्याचे ज्ञानानंतर होईल तथापि पूर्वी उत्पन्न झालेलें तेणेंकरून, पुढें उत्पन्न झालेलें मध्यें ज्ञात झालें तर तें निवृत्त होतेंच, कारण संपातच ज्ञानकृत होय, पूर्वत्वादिक ज्ञानकृत नाहीं असा सिद्धांत आहे. दहा दिवसांच्या आशौचाच्या शेवटच्या रात्रीं जर निवृत्ति होण्यास योग्य असें दहा दिवसांचें आशौच प्राप्त झालें तर दोन दिवस अधिक धरावें. दहाव्या रात्रीच्या चवथ्या प्रहरीं निवृत्ति होण्यास योग्य असें दहा दिवसांचें दुसरें आशौच प्राप्त झालें तर तीन दिवस अधिक धरावें. दहा दिवसांचे आशौचाच्या शेवटच्या रात्रीं अथवा चौथ्या प्रहरीं, निवृत्ति होण्यास योग्य असें त्रिरात्र आशौच प्राप्त झालें तर पूर्वीचे आशौचानें शुद्धि होते, दोन दिवस इत्यादिक अधिक धरण्याचें प्रयोजन नाहीं. याप्रमाणें निवृत्ति होण्यास योग्य असीं त्रिदिनादिक आशौचें परस्पर तिसऱ्या रात्रीं अथवा तिसऱ्या रात्रीच्या शेषाचे ठायीं प्राप्त झालीं असतां पूर्वीच्या आशौचानें दुसऱ्याची शुद्धि होते, दोन दिवस इत्यादिक अधिक धरण्याचें कारण नाहीं. अधिक धरलेलें असें जें दोन तीन दिवस आशौच त्यांत दुसरें दहा दिवसांचें आशौच प्राप्त झालें असतां पूर्वीचे दोन किंवा तीन दिवसांचे आशौचानें निवृत्ति होत नाहीं. अधिक धरलेल्या दोन रात्रि आशौचानें पक्षिणीची निवृत्ति होते. अधिक धरलेल्या त्रिरात्र आशौचानें दुसऱ्या त्रिरात्राची निवृत्ति होते.

---

यदातुभागिनेयादिर्मातुलादेरंत्यकर्मकरोतितदातन्निमित्तेदशाहाद्याशौचेसतियदिसपिंड मरणनिमित्तंदशाहादिकंपततितदातस्यपूर्वेणशुद्धिर्नभवति कर्मांगाशौचस्यास्पृश्यतामात्रप्रयो जकत्वेनसंध्यादिकर्मलोपाभावेनलघुत्वात् लघुनागुरोर्निवृत्त्यभावात् एवंत्रिरात्रपातेपिजनन त्रिरात्रस्यनिवृत्तिर्मृतकत्रिरात्रस्यनेत्यादिकमूह्यं पुत्रस्यसपिंडाशौचेनमातापित्रोराशौचंनापैति एवंभार्यायाभर्त्राशौचंनापैति केचित्पत्युर्भार्याशौचमपिनापैतीत्याहुः मात्राशौचमध्येपित्राशौ चपातेपूर्वांतेशुद्धिः स्मृत्यर्थसारादयस्तुपितुःसंपूर्णमेवाशौचंकार्यमित्याहुः पित्राशौचेमातुर्मर

१ योग्यपदंजननदशाहेमृतदशाहवारणाय एवमग्रेप्यूह्यं ॥

२ पुढें सांगतों तें.

णेपित्राशौचंसमाप्यपक्षिणीमधिकांकुर्यात् इयंपक्षिणीवृद्धिर्दशमरात्रेरर्वाक्मरणेतज्ज्ञानेवा भवति दशमरात्रौतद्रात्रिचतुर्थयामेवामातृमरणादौतुद्विरात्रत्रिरात्रावेवनपक्षिणी मातुरनाहिताग्निभर्तुर्मरणात्द्वितीयादिदिनेषुसहगमनेपिनाधिकापक्षिणी भर्त्राशौचांतेशुद्धिः नवश्राद्धपिंडादिकंयुगपत्समापयेत् भर्त्राशौचोत्तरमन्वारोहणेत्रिरात्रं एतत्त्रिरात्रंसपिंडानामेव पुत्रस्यतुमात्राशौचंसंपूर्णमेवेतिभाति सहगमनेसपिंडानामपिपूर्णमेवाशौचंत्रिरात्रंत्वनुगमनपरमितिगौडाः इदमेवयुक्तम् इयंसंपातेपूर्वेणशुद्धिः सूतिकायाअग्निदस्यचनास्ति यदा देशांतरमृतपितुर्वार्तांश्रुत्वापुत्रैर्दशाहमाशौचंकृतं संस्कारस्त्वस्थ्यलाभादिहेत्वंतरवशान्नकृतोदशाहोत्तरंचसंस्कारआरब्धस्तत्रसंस्कारकर्तुःपुत्रस्यकर्मांगंदशाहमाशौचं तदाशौचमध्येसपिंडमरणेपूर्वांतेशुद्धिर्न मातुर्मरणेपिनाधिकापक्षिणी किंतुसपिंडाशौचंमात्राशौचंचसंपूर्णमेवकार्यं अतिक्रांतकालाद्वर्तमानस्य बलवत्त्वात् एवंद्वादशवर्षादिप्रतीक्षोत्तरंपुत्रादिभिः क्रियमाणपित्रादिसंस्कारांगदशाहाशौचेन्यसपिंडादिमरणेपीतिपूर्वशेषेणशुद्धेरपवादःसिंधावुक्तः जननाशौचेमृताशौचेवामृतकसंपातेपिंडदानाद्यंतकर्मप्रतिबंधोनास्ति मृताशौचेजाताशौचेवापुत्रजननेजातकर्मादिप्रतिबंधोनास्तीत्येके पूर्वाशौचांतेजातकर्मेत्यन्ये मातुर्याधिकापक्षिणीतन्मध्येपितुर्मह्हैकोद्दिष्टश्राद्धंवृषोत्सर्गशय्यादानादिकंचकुर्यात् अन्यसपिंडाशौचेत्वेकादशाहकृत्यंनकार्यमितिबहवः कार्यमितिकश्चित् ॥

ज्या कालीं भागिनेय (भाचा) इत्यादिक मातुळादिकांचें अंत्यकर्म करितो त्या कालीं त्यास अंत्यकर्मसंबंधी दहा दिवस इत्यादि आशौच असतां जर त्या (अंत्यकर्मसंबंधी) आशौचामध्यें सपिंडमरणनिमित्तक दहा दिवसात्मक इत्यादि आशौच प्राप्त झालें तर त्याची पूर्वीच्या आशौचानें शुद्धि होत नाहीं; कारण कर्माचें अंगभूत आशौच अस्पृश्यतेस मात्र कारण असल्यामुळें संध्यादिक कर्माचा लोप नसल्या कारणानें तें लघु (अल्प) आहे, याकरितां अल्प आशौचेंकरून मोठ्या आशौचाची निवृत्ति होत नाहीं. याप्रमाणें त्रिरात्र आशौच प्राप्त असतांहि त्रिरात्र जननाशौचाची निवृत्ति व त्रिरात्र मृताशौचाची निवृत्ति होत नाहीं इत्यादि जाणावें. सपिंडाच्या आशौचेंकरून मातापित्यांसंबंधी आशौच पुत्राचें निवृत्त होत नाहीं. याप्रमाणें स्त्रियेस जें भर्त्याचें आशौच तेंहि दूर होत नाहीं. कोणीं ग्रंथकार, पतीस जें स्त्रियेचें आशौच तेंहि दूर होत नाहीं असें ह्मणतात. मातेच्या आशौचामध्यें पित्याचें आशौच प्राप्त असतां पूर्वीच्या समाप्तीनें शुद्धि होते. स्मृत्यर्थसारादिक ग्रंथ तर, पित्याचें संपूर्ण आशौच धरावें असें ह्मणतात. पित्याचे आशौचामध्यें माता मृत असतां पित्याचें आशौच समाप्त करून मातेचें पक्षिणी अधिक आशौच धरावें. हें पक्षिणी अधिक आशौच धरणें तें दहाव्या रात्रीच्या पूर्वीं मरण असतां अथवा समजलें असतां धरावें. दहाव्या रात्रीं किंवा दहाव्या रात्रीच्या चवथ्या प्रहरीं मातेच्या मरणादिकाविषयीं तर दोन तीन रात्रिच अधिक धरावें, पक्षिणी धरूं नये. अनाहिताग्नि (अगृहीताग्नि) भर्त्याचे मरणापासून दुसरा इत्यादिक दिवसीं, मातेनें सहगमन केलें तथापि मातेचें आशौच अधिक पक्षिणी नाहीं, तर भर्त्याचे आशौ-

---

१ समंत्रकदाहकर्ता ॥

चा अंतीं शुद्धि होते. नवश्राद्ध, पिंडादिक एकदांच समाप्त करावें. भर्त्याचे आशौचानंतर स्त्री सती गेली असतां आशौच त्रिरात्र धरावें, व हें त्रिरात्र आशौच सपिंडांनींच धरावें, पुत्रास तर मातेचें आशौच संपूर्णच आहे असें वाटतें. सहगमन ( भर्त्याबरोबर सती जाणें ) असतां सपिंडांसहि पूर्णच आशौच, त्रिरात्र आशौच तर, अनुगमन ( पाठीमागून सती जाणें ) पर आहे असें गौड ह्मणतात, व हेंच मत योग्य होय. ही संपाताविषयीं पूर्वाशौचेंकरून जी शुद्धि ती सूतिकेची व अग्नि देणाऱ्याची होत नाहीं. ज्या कालीं देशांतरीं मृत झालेल्या पित्याची वार्ता ऐकून पुत्रांनीं दहा दिवस आशौच धरलें आणि संस्कार तर अस्थि न मिळाल्या इत्यादि कारणानें केला नाहीं, व दहा दिवसांनंतर संस्कार आरंभला त्या कालीं संस्कार करणाऱ्या पुत्रास कर्माचें अंगभूत दहा दिवसांचें आशौच आहे, त्या आशौचामध्यें सपिंड मृत असतां पूर्वाशौचाचे अंतीं शुद्धि होत नाहीं. माता मृत असतांहि अधिक पक्षिणी आशौच नाहीं, तर सपिंडाशौच व मातेचें आशौच संपूर्णच धरावें; कारण, गतकालाहून वर्तमानकाल बलिष्ठ आहे. याप्रमाणें बारा वर्षें इत्यादि प्रतीक्षा केल्यानंतर पुत्र इत्यादिकांनीं करावयाचा जो पित्रादिकांचा संस्कार त्याचें अंगभूत जें दहा दिवसांचें आशौच त्यामध्यें अन्य सपिंडादिकांचें मरण असतांहि पूर्वशेषेंकरून शुद्धीचा अपवाद निर्णयसिंधूमध्यें सांगितला आहे. जननाशौच अथवा मृताशौच यांमध्यें मृताशौच प्राप्त असतां पिंडदान इत्यादिक अंत्यकर्माचा प्रतिबंध नाहीं. मृताशौच अथवा जननाशौच यांमध्यें पुत्रजनन झालें असतां जातकर्मादि करण्याविषयीं प्रतिबंध नाहीं असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. पूर्वींचे आशौचाअंतीं जातकर्म करावें असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात. मातेचें जें अधिक पक्षिणी आशौच त्यामध्येंहि पित्याचें महैकोद्दिष्ट श्राद्ध, वृषोत्सर्ग, शय्यादान इत्यादिक करावें. अन्य सपिंडांचे आशौचांत तर अकराव्या दिवसाचें कृत्य करूं नये असें बहुत ग्रंथकार ह्मणतात. कोणी एक ग्रंथकार करावें असें ह्मणतो.

---

**अथशवस्पर्शानुगमनादिसंसर्गाशौचं संसर्गाशौचेनित्यकर्मानधिकारोनास्ति किंत्वस्पृश्यत्वमात्रं तदपितदीयभार्यापुत्रादीनांनास्ति किंतुसंसर्गकर्तुरेव एवंतद्गृहवर्तितत्स्वामिकान्ना दिद्रव्याणांनाग्राह्यत्वं तत्रसजातीयशवस्पर्शेसज्योतिराशौचं हीनवर्णस्पर्शेऽधिकंकल्प्यं ॥**

यानंतर शवस्पर्श व शवाच्या मागून गमन इत्यादिक संसर्गाशौच सांगतों.—संसर्गाशौचामध्यें नित्यकर्माचा अनधिकार नाहीं, तर अस्पृश्यत्व मात्र आहे. तें अस्पृश्यत्व त्याचे भार्या, पुत्र इत्यादिक यांस नाहीं, तर संसर्गकर्ता त्यासच आहे. याप्रमाणें त्याच्या घरांतील, त्याचें स्वामित्व ज्यांवर आहे असे अन्नादि पदार्थ न घ्यावे असें नाहीं; त्यामध्यें आपल्या जातींतल्या शवाचा स्पर्श झाला असतां सज्योति आशौच आहे. हीनवर्ण शवाचा स्पर्श असतां अधिक कल्पावें.

---

**अथानुगमने सजातीयस्यविजातीयस्यशवस्यानुगमनेस्नात्वाग्निसंस्पर्शघृतप्राशनंचकृत्वापुनःस्नात्वाप्राणायामंकुर्यात् विप्रस्यशूद्रानुगमनेत्रिरात्रंनद्यांस्नानंघृतप्राशनंप्राणायामशतंचनात्रनित्यकर्मलोपः ॥**

**यानंतर अनुगमन ( प्रेताच्या मागून जाणें ) असतां सांगतों.**—सजातीय अथवा विजातीय शवाच्या मागून गेलें असतां स्नान करून अग्निस्पर्श व घृतप्राशन करून पुनः स्नान करून प्राणायाम करावा. ब्राह्मणानें शूद्रशवाच्या मागून गमन केलें असतां त्रिरात्र, नदीमध्यें स्नान, घृतप्राशन, व शंभर प्राणायाम हीं करावीं, याविषयीं नित्यकर्माचा लोप नाहीं.

---

**अथनिर्हरणे स्नेहेनसजातीयशवनिर्हरणेतदन्नाशनेतद्गृहवासेचदशाहः तद्गृहवासमात्रे अशनमात्रेवात्रिरात्रम् अन्नाशनगृहवासयोरभावेएकाहः ग्रामांतरस्थंशवंनिर्हृत्यग्रामांतर वासेसज्योतिः मौल्यग्रहणेसजातीयनिर्हरणेदशाहः विजातीयनिर्हारेशवजातीयम् भृतिग्रह णेनहीनजातीयनिर्हरणेशवजातीयद्विगुणम् सोदकशवनिर्हरणेपिदशाहः शवालंकारकरणे पादकृच्छ्रं अज्ञानादुपवासः अशक्तौस्नानं धर्मार्थमनाथद्विजशवनिर्हरणेदाहकरणेचाश्व मेधादिपुण्यंस्नानमात्राच्छुद्धिः अग्निस्पर्शोघृताशनंचात्रापि धर्मार्थमपिशूद्रशवनिर्हरणेद्विज स्यैकाहः धर्मार्थमनाथशवानुगमनादौनदोषः ब्रह्मचारिणस्तुपितृमातृमातामहाचार्योपाध्या यभिन्नशवनिर्हरणादौव्रतलोपःपूर्वोक्तरीत्याशौचंच ततस्तेनकृच्छ्रप्रायश्चित्तंपुनरुपनयनंच कार्यं पित्रादेर्निर्हरणेपिब्रह्मचारिणाआशौचिनामन्नंनभक्ष्यं तेषांस्पर्शोपिनकार्यः अत्रापिनि त्यकर्मलोपोन ॥**

**यानंतर शवास खांद घातला असतां सांगतों.**—स्नेहेंकरून सजातीय शवास खांद घातला असतां, त्याचे घरचें अन्न भक्षण केलें असतां आणि त्याचे घरीं वास केला असतां दहा दिवस आशौच. त्याचे घरीं वास मात्र केला असतां अथवा अन्न मात्र भक्षण केलें असतां त्रिरात्र आशौच. अन्न भक्षण करणें व घरीं वास करणें हीं नसतां एक दिवस आशौच. दुसऱ्या गांवांतल्या शवास खांद घालून अन्यग्रामीं वास करील तर सज्योति. मौल्य घेऊन सजातीय शवास खांद घातला असतां दहा दिवस आशौच. विजातीय शवास खांद घातला असतां शवजातीचें आशौच धरावें. मौल्य घेऊन हीनजातीचे शवास खांद घातला असतां शवजातीचे दुप्पट आशौच धरावें. सोदकाचे शवास खांद घातला असतांहि दहा दिवस आशौच. शवास अलंकार ( तिलकादिक ) केले असतां पादकृच्छ्र करावें, अज्ञानेंकरून तिलकादिक केलें असतां उपोषण करावें, उपोषणाविषयीं अशक्त असतां स्नान करावें. धर्मार्थ अनाथ द्विजाचें शव वाहिलें असतां व दहन केलें असतां अश्वमेधादि पुण्य प्राप्त होतें, व स्नानमात्रानें शुद्धि होते. याविषयीं अग्निस्पर्श करून घृतप्राशनहि करावें. धर्मार्थ जरी शूद्राचें शव द्विज वाहील तथापि त्यानें एक दिवस आशौच धरावें. धर्मार्थ अनाथ शवाच्या मागून गमनादिक केलें असतां दोष नाहीं. ब्रह्मचारी यानें पिता, माता, मातामह, आचार्य, उपाध्याय यांवांचून इतरांचे शवास खांद इत्यादि घातला असतां त्याचा व्रतलोप होतो, व त्यानें पूर्वोक्त रीतीकरून आशौच धरावें, नंतर त्या ब्रह्मचाऱ्यानें कृच्छ्र प्रायश्चित्त व पुनरुपनयन करावें. पिता इत्यादिकांचें प्रेत वाहिलें तथापि ब्रह्मचारी यानें आशौची यांचें अन्न भक्षण करूं नये, व त्यांस स्पर्श करूं नये. या आशौचांतहि नित्यकर्माचा लोप नाहीं.

---

अथदाहादौ समोत्कृष्टवर्णप्रेतस्यस्नेहादिनादाहोदकदानादिसकलौर्ध्वदेहिककरणेतत्तज्जात्याशौचं तदंतेस्नेहलोभाद्यनुसारेणगुरुलघुप्राजापत्यादीनांत्रय स्नेहादिनासवर्णानांदाहमात्रकरणेतद्गृहवासेत्रिरात्रं तदन्नभक्षणेदशरात्रं तदुभयाभावेएकाहः हीनवर्णेनोत्तमवर्णस्यदाहमात्रकरणेशवजात्याशौचं भृतिग्रहणेनसवर्णस्यदाहमात्रकरणेपिदशाहाद्येव मौल्येनोत्तमवर्णदाहेद्विगुणं उत्तमेनाधमवर्णदाहनिर्हरणकरणेतज्जात्याशौचंतदंतेक्रमेणद्विगुणं त्रिगुणंचतुर्गुणंप्रायश्चित्तं मौल्येनहीनवर्णदाहादौतुप्रायश्चित्तमाशौचंचोक्तापेक्षयाद्विगुणं धर्मार्थेसमोत्कृष्टवर्णप्रेतस्यदाहादिसकलौर्ध्वदेहिककरणेपिनाशौचं नित्यपिंडदानाद्यनंतरंस्नानमात्राच्छुद्धिः द्विजेनशूद्रस्यधर्मेणापिदाहादिनकार्यं ॥

**यानंतर दहनादिक केलें असतां त्याविषयीं सांगतों.**— समान किंवा उच्च वर्णांतील प्रेताचें स्नेह इत्यादिकानें दहन व उदक देणें इत्यादि सर्व और्ध्वदेहिक कर्म केलें असतां त्या त्या जातीचें आशौच धरावें. व त्या आशौचानंतर स्नेह लोभ जसा असेल तदनुसार गुरु, लघु, प्राजापत्य इत्यादिक तीन प्रायश्चित्तें करावीं. स्नेहादिकारणानें सवर्णाचा दाह मात्र केला असतां व त्याचे घरीं वास केला असतां त्रिरात्र आशौच धरावें, त्याचें अन्न भक्षण केलें असतां दहा रात्रि आशौच धरावें. त्या दोहोंचा ( दहन व अन्नभक्षण यांचा ) अभाव असतां एक दिवस आशौच. हीन वर्णानें उत्तम वर्णाचें दहन मात्र करणें असतां शवाचे जातीचें आशौच धरावें. मौल्य घेऊन सवर्ण शवाचें दहन मात्र करणें असतांहि दहा दिवस इत्यादिकच आशौच धरावें. मौल्य घेऊन उत्तम वर्णाचें दहन केलें असतां द्विगुण आशौच धरावें. उत्तम वर्णानें अधम वर्णाचें दहन, खांद घालणें हीं केलीं असतां त्याचे जातीचें आशौच धरावें, व आशौचांतीं क्रमेंकरून द्विगुण, त्रिगुण व चतुर्गुण प्रायश्चित्त करावें. मौल्य घेऊन हीनवर्णाचें दहन इत्यादि केलें असेल तर प्रायश्चित्त आणि आशौच उक्तापेक्षया द्विगुण करावें. समान व उत्कृष्ट वर्णांतील प्रेताचें धर्मार्थ दहनादि सर्व और्ध्वदेहिक कर्म केलें असतांहि आशौच नाहीं, तर नित्य पिंडदानादिक केल्यानंतर स्नानमात्रेंकरून शुद्धि होते. द्विजानें शूद्राचें दहनादिक धर्मार्थहि करूं नये.

---

अथब्रह्मचारिणापितृमातृमातामहादीनामन्याधिकार्यभावेदाहाद्यंतकर्मकार्यं तदाकर्मांगं दशाहमस्पृश्यत्वलक्षणमाशौचंचकार्यं तदापितेषामाशौचिनामन्नंब्रह्मचारिणानभोक्तव्यं आशौचिस्पृष्टतया वासश्चनकार्यः तदुभयकरणेप्रायश्चित्तंपुनरुपनयनंच ब्रह्मचारिणापूर्वोक्तपित्रादिभिन्नानांदाहाद्यंतकर्मकरणेकृच्छ्रत्रयप्रायश्चित्तंपुनरुपनयनंचाशौचांतेकार्यम् पित्रादेर्दाहमात्रकरणेएकाहमाशौचंकार्यं अत्रसर्वत्रब्रह्मचारिणःसंध्याग्निकार्यादिकर्मलोपोन ब्रह्मचारिभिन्नस्यापिदाहादिनिमित्तकसंसर्गाशौचेब्रह्मयज्ञादिनित्यकर्मलोपोनेत्युक्तं तत्रदेवपूजावैश्वदेवादिकमन्येनकारणीयम् स्वयंकर्तुंयोग्यंतुस्वेनैवकार्यम् ब्रह्मचारिणःपित्राद्यंत्यकर्माकरणेतुपित्रादिमरणेप्याशौचंन समावर्तनोत्तरंपूर्वमृतानांपित्रादिसपिंडानांत्रिरात्रमाशौचंकार्यं ॥

यानंतर ब्रह्मचारी यानें पिता, माता, मातामह इत्यादिक यांचें, दुसरा अधिकारी नसतां दहनादिक अंत्यकर्म करावें, व त्याकालीं कर्माचें अंगभूत असें दहा दिवस अस्पृश्यत्वलक्षण आशौच धरावें, त्या कालींहि त्या आशौची यांचें अन्न, ब्रह्मचारी यानें भक्षण करूं नये, व आशौची यांस स्पर्श होईल असें एकत्र राहूंहि नये. तीं दोन ( अन्नभक्षण व एकत्र राहणें ) केलीं असतां प्रायश्चित्त व पुनरुपनयन करावें. ब्रह्मचारी यानें पूर्वी सांगितले जे पिता इत्यादिक तद्व्यतिरिक्तांचें दहन इत्यादिक अंत्यकर्म केलें असतां आशौचानंतर कृच्छ्रत्रयप्रायश्चित्त व पुनरुपनयन करावें. पित्रादिकांचें दहन मात्र करणें असतां एक दिवस आशौच धरावें. एथें सर्व ठिकाणीं ब्रह्मचारी याचे संध्या, अग्निकार्य इत्यादि कर्मांचा लोप नाहीं. ब्रह्मचाऱ्याहून अन्यासहि दहनादिनिमित्तक संसर्गाशौच असतां ब्रह्मयज्ञादि नित्यकर्मांचा लोप नाहीं असें सांगितलें आहे; त्यामध्यें देवपूजा, वैश्वदेव इत्यादिक दुसऱ्याकडून करवावे; स्वतां करण्यास योग्य जें असेल तें तर, आपणच करावें. ब्रह्मचारी यानें पिता इत्यादिकांचें अंत्यकर्म केलें नसेल तर त्यास पिता इत्यादिकांचें मरणनिमित्तक आशौच नाहीं. समावर्तन ( सोडमुंजी ) झाल्यानंतर पूर्वी मृत जे पिता इत्यादि सपिंड त्यांचें त्रिरात्र आशौच धरावें.

---

**अथरोदनेआशौचादि विप्रादिभिःसवर्णमरणविषयेऽस्थिसंचयनात्पूर्वंरोदनेस्नानं तदुत्तरमाचमनं विप्रस्यशूद्रविषयेऽस्थिसंचयनात्प्राक्त्रिरात्रं तदुत्तरमेकरात्रं शूद्रस्यविषयेतद्गृहवासादिसंबंधेऽस्थिसंचयात्प्रागेकरात्रं तदूर्ध्वंस्नानं सपिंडानांत्वनुगमनरोदनादौनदोषः नात्रापिकर्मलोपः अत्रसर्वत्रयस्ययावानाशौचकालस्तंनिर्वाह्यस्नात्वैवसविशुद्ध्यतिनतुस्नानं विनातावत्कालमात्रातिक्रमेणशुद्धिः अंत्यकर्मकर्तुरस्थिसंचयनात्प्राक्स्त्रीसंगेचांद्रायणंप्रायश्चित्तं ऊर्ध्वंप्राजापत्यत्रयं अन्येषांमृताशौचिनांसंचयनात्प्राक्संगमेत्रिरात्रमुपवासः ऊर्ध्वमेकरात्रं ॥**

**यानंतर रोदन केलें असतां आशौचादि सांगतों.**— ब्राह्मण इत्यादिकांनीं आपल्या सवर्णांतील मृत झाल्याविषयीं अस्थिसंचयनाचे पूर्वी रोदन केलें असतां स्नान, अस्थिसंचयनानंतर रोदन असतां आचमन करावें. शूद्राविषयीं, अस्थिसंचयनाचे पूर्वी रोदन करणाऱ्या ब्राह्मणास त्रिरात्र, अस्थिसंचयनानंतर एक रात्र आशौच. शूद्राविषयीं अस्थिसंचयनाचे पूर्वी त्याच्या घरीं राहणें इत्यादि संबंध असतां एक रात्र, त्यानंतर स्नान करावें. सपिंडांनीं तर अनुगमन, रोदन केलें असतां दोष नाहीं. या आशौचांतहि कर्मलोप नाहीं. एथें सर्व ठिकाणीं ज्यास जितका आशौचकाल सांगितला तितका त्यानें पाळून नंतर स्नानानेंच तो शुद्ध होतो, स्नान केल्यावांचून तितका काळमात्र घालविल्यानें शुद्धि होत नाहीं. अंत्यकर्म करणारा यानें अस्थिसंचयनाचे पूर्वी स्त्रीसंग केला असतां चांद्रायण, अस्थिसंचयनानंतर तीन प्राजापत्यें प्रायश्चित्त करावें. अन्य मृताशौची यांनीं अस्थिसंचयनाचे पूर्वी स्त्रीसंग केला असतां त्रिरात्र उपोषण करावें, अस्थिसंचयनानंतर एक रात्र उपोषण करावें.

---

अथाशौचान्नभक्षणे असगोत्रोनापदिबुद्धिपूर्वंसकृदप्याशौचिस्वामिकंपक्कमन्नंयस्मिन्दिनेभुंक्तेतदारभ्यतेनयावत्तेषामाशौचमवशिष्टंतावदाशौचंकार्यं आशौचांतेचविप्राशौचेसांतपनंप्रायश्चित्तं शूद्राशौचेचांद्रायणं क्षत्रियादेःकलावभावान्नलिख्यते क्वचिल्लेखस्तुव्युत्पादनमात्रार्थोनेदानीमुपयुज्यतेइतिप्रायउपेक्ष्यते मत्याभ्यासेविप्रशूद्राशौचयोः क्रमेणमासंषण्मासंकृच्छ्रादिव्रताचरणं अमत्याभोजनेयावदन्नपाकमाशौचंक्रमेणैकरात्रंसप्तरात्रंचोपोषणंदशशतंचप्राणायामाः अमत्याभ्यासेद्विगुणं आपद्यमत्याभोजनेतदहराशौचमेकःप्राणायामः शूद्राशौचेऽष्टाधिकसहस्रगायत्रीजपः ज्ञानतःआपदित्रिरघमर्षणमष्टोत्तरसहस्रगायत्रीजपः शूद्राशौचेप्राजापत्यं शूद्रस्यद्विजाशौचेस्नानंपंचगव्याशनंच सर्वमिदंजननाशौचेन्यूनंयोज्यं एवमाहिताग्न्याशौचेपिन्यूनमितिस्मृत्यर्थसारे सर्वमिदमाशौचिस्वामिकान्नभोजने ॥

यानंतर आशौची याचें अन्न भक्षण केलें असतां सांगतों—असगोत्री आपत्तिकाल नसतां बुद्धिपूर्वक एक वेळ जरी आशौची याचें शिजलेलें अन्न ज्या दिवसीं भक्षण करील त्या दिवसापासून त्यानें जावत्कालपर्यंत त्याचें आशौच अवशिष्ट आहे तावत्कालपर्यंत आशौच धरावें. आशौचसमाप्तीनंतर, ब्राह्मणाचें आशौच असतां सांतपनप्रायश्चित्त करावें, शूद्राचें आशौच असतां चांद्रायण करावें. क्षत्रियादिकांचा कलीमध्यें अभाव असल्यामुळें त्यांच्याविषयीं लिहीत नाहीं. क्वचित् ग्रंथीं लेख आहे; परंतु तो तर विशेषेंकरून स्पष्टीकरणार्थ असून विद्यमानकालीं त्याचा उपयोग करीत नसल्यामुळें बहुधा तो उपेक्ष्य आहे. बुद्धिपूर्वक अभ्यास असतां ब्राह्मण व शूद्र यांचे आशौचाविषयीं क्रमेंकरून मास, सहा मासपर्यंत कृच्छ्रादि व्रतांचें आचरण करावें. न जाणून भोजन केलें असतां जावत्कालपर्यंत अन्नाचा पाक होई तावत्कालपर्यंत आशौच, क्रमेंकरून एक रात्र व सप्त रात्र उपोषण करून दहा, शंभर प्राणायाम करावे. न जाणून अभ्यास असतां द्विगुण करावें. आपत्तिकालीं न जाणून भोजन केलें असतां तो दिवसपर्यंत आशौच धरून एक प्राणायाम करावा. शूद्रास आशौच असतां १,००८ सहस्र गायत्रीजप करावा. आपत्तिकालीं जाणून भक्षण केलें असतां तीन वेळ अघमर्षण, व १,००८ सहस्र गायत्रीजप करावा. शूद्राचें आशौच असतां प्राजापत्य करावें. द्विजाचें आशौच असतां शूद्रानें स्नान व पंचगव्य प्राशन करावें. सर्व हें ( प्रायश्चित्तादिक ) जननाशौच असतां कमी योजावें. याप्रमाणें आहिताग्नीचे आशौचाविषयींहि न्यून योजावें असें स्मृत्यर्थसार ग्रंथांत सांगितलें आहे, हा सर्व निर्णय, आशौची ज्याचा स्वामी असें अन्न भक्षण केलें असतां जाणावा.

---

यदातुतदस्वामिकमाशौचिस्पृष्टमात्रमन्नंभुंक्तेतदामत्याभोजनेकृच्छ्रं अमत्यार्धमितिस्मृत्यर्थसारेउक्तं आशौचिस्पृष्टाशौचिस्वामिकान्नभोजीतुतत्स्वामिकान्नाशननिमित्तंतत्स्पृष्टान्नाशननिमित्तंचेतिप्रायश्चित्तद्वयंसमुच्चयेनकुर्यात् आशौचिस्वामिकान्नप्रतिग्रहेतूक्तप्रायश्चित्तार्धं आशौचंतुनास्ति दातृभोक्तृभ्यामुभाभ्यामज्ञातेजननेमरणेवानदोषः अन्यतरेणज्ञातेदोषः तत्रदातुर्ज्ञानेभोक्तुरज्ञानेभोक्तुरल्पंप्रायश्चित्तं दातुरज्ञानेपिभोक्तुर्ज्ञानेपूर्णमेव भोजननिमित्ताशौचेपिकर्मलोपोन ॥

ज्या कालीं तर आशौची याचें तें अन्न नसून आशौची यानें स्पर्श केलेलें मात्र अन्न भक्षण करितो त्या कालीं बुद्धिपूर्वक भोजन केलें असतां कृच्छ्रप्रायश्चित्त करावें, न जाणून भोजन केलें असतां अर्ध करावें असें स्मृत्यर्थसार ग्रंथांत सांगितलें आहे. आशौची यानें स्पर्श केलेलें असें आशौचिस्वामिक अन्न भक्षण करणाऱ्यानें तर, आशौचिस्वामिक अन्न भक्षण केलें तन्निमित्तक, आणि त्यानें स्पर्श केलेलें अन्न भक्षण केलें तन्निमित्तक असीं दोन प्रायश्चित्तें समुच्चयानें करावीं. आशौचिस्वामिक आमान्न ग्रहण केलें असेल तर सांगितलेल्या प्रायश्चित्तांतून अर्धें करावें, आशौच तर नाहीं. दाता व भोक्ता या दोघांस अज्ञात, जननाशौच अथवा मृताशौच असतां दोष नाहीं. दोहोंतून एकास ज्ञात असल्यास दोष आहे, त्यामध्यें दात्यास ज्ञात असून भोक्त्यास अज्ञात असतां भोक्त्यास अल्प प्रायश्चित्त, दात्यास अज्ञात असूनहि भोक्त्यास ज्ञात असतां पूर्णच प्रायश्चित्त. भोजन निमित्तक आशौच असलें तथापि कर्मलोप नाहीं.

---

**अथतुकथमपिस्वल्पसंबंधयुक्तेस्नानंवासोयुतंस्यादितित्रिंशत्श्लोकी स्मृत्यर्थसारेप्येवंअयमस्यार्थः स्वल्पेनापिएकाहाद्याशौचप्रयोजकेनसंबंधेनयुक्तेशालकजामात्रादौमृतेसचैलंस्नानं कार्यम् सर्वत्रगुरुणोलघुनोवामृताशौचस्यप्राप्तिकालेसमाप्तिकालेचस्नातव्यमितियावत् अथवास्वल्पैर्दशाहभिन्नपक्षिणीत्रिदिनाद्याशौचप्रयोजकैःसंबंधैःयुक्तेबंधुत्रयमातुलानुपनीतसपिंडादौमृतेदेशांतरेपिकालांतरेस्नानंभवत्येव तथाचयस्यसन्निहितकालेआशौचप्राप्तिस्तस्यातिक्रांतकालेस्नानं यस्यतुसन्निहितकालेपिस्नानमात्रंतस्यकालांतरेस्नानमपिनेत्यर्थः यद्वास्वल्पआशौचप्रयोजकसंबंधभिन्नःसंबंधः यथाशालकसुतत्वंऊढकन्यायाःपितृव्यतत्पुत्रत्वादिभगिन्याभ्रातृपुत्रत्वादितद्युक्तेआशौचाभावेपिस्नानमात्रंभवत्येव यत्किंचित्संबंधेआशौचाभावेपिस्नानमात्रंसन्निधौसर्वत्रकार्यमित्यर्थः पक्षत्रयमपिइदंशिष्टाचारेदृश्यतेइतियुक्तंभाति ॥**

यानंतर तर, कसाहि अल्पस्वल्पसंबंधयुक्त असा मृत असतां सचैल स्नान करावें असें त्रिंशत्श्लोकींत आहे, व स्मृत्यर्थसारांतहि असेंच आहे. याचा हा अर्थ—एक दिवस इत्यादिक आशौच उत्पन्न करणारा असा जो अल्पसंबंध तेणेंकरूनहि युक्त असा शालक, जामाता इत्यादि मृत असतां सचैल स्नान करावें, सर्वत्र ठिकाणीं लहान किंवा मोठें मृताशौच प्राप्त असतां तत्कालीं, व समाप्तिकालीं स्नान करावें असा सिद्धांत. अथवा दहा दिवसांचे आशौचावांचून इतर पक्षिणी, त्रिदिन इत्यादिक आशौचें त्यांस कारणभूत जे संबंध त्यांहींयुक्त असे बंधुत्रय, मातुळ, मौंजी न झालेला सपिंड इत्यादिक मृत असतां देशांतरीं व कालांतरींहि स्नान आहेच. तसेंच, ज्यास सन्निहितकालीं आशौच प्राप्त होतें त्यास अतिक्रांतकालीं स्नान आहे, ज्यास सन्निहितकालींहि स्नान मात्र आहे त्यास कालांतरीं स्नानहि नाहीं असा अर्थ. अथवा आशौचास कारणभूत अशा संबंधावांचून इतर संबंध, जसा शालकपुत्र; विवाहित कन्येस पितृव्य; पितृव्याचा पुत्रादिक; भगिनीस भ्रात्याचा पुत्रादिक; अशा संबंधानें जो युक्त त्याविषयीं आशौच नाहीं तथापि स्नान मात्र आहेच; अल्प स्वल्प संबंधाविषयीं आशौच नाहीं.

तथापि जवळ असतां स्नान मात्र सर्वत्र करावें असा अर्थ; असे हे तीन पक्ष शिष्टाचारांत आढळतात ते योग्य आहेत असें वाटतें.

---

**अथाशौचापवादः सपंचधा कर्तृतः १ कर्मतः २ द्रव्यतः ३ मृतदोषतः ४ विधानतइति ५ ॥**

**यानंतर आशौचाचा अपवाद सांगतों.**—तो अपवाद पांच प्रकारचा—१ कर्त्यापासून, २ कर्मापासून, ३ द्रव्यापासून, ४ मृतदोषापासून, ५ विधानापासून, याप्रमाणें पांच प्रकारचा आहे.

---

**तत्रकर्तृतोयथा यतीनांब्रह्मचारिणांचसपिंडजननमरणयोर्नाशौचं मातापितृमरणेतुयति ब्रह्मचारिणोःसचैलंस्नानमात्रंभवत्येव ब्रह्मचारिणःसमावर्तनोत्तरंब्रह्मचर्यदशायांमृतानांपित्रादिसपिंडानांत्रिरात्रमाशौचंउदकदानंचकार्यं अनुगमननिर्हरणनिमित्तकंत्वाशौचंब्रह्मचारिणोप्यस्त्येव पित्राद्यंत्यकर्मकरणेब्रह्मचारिणआशौचमप्यस्त्येव आरब्धप्रायश्चित्तानांप्रायश्चित्तानुष्ठानसमयेआशौचंन समाप्तेतुप्रायश्चित्तेत्रिरात्रमतिक्रांताशौचं कृतकर्मांगनांदीश्राद्धानां तत्कर्मसमाप्तिपर्यंतं तत्कर्मोपयोगिकार्येआर्त्यादिसंकटेआशौचंन जाताशौचमृताशौचवतोमरणसमयप्राप्तौनाशौचं तेनदानादिकंसतिवैराग्येआतुरस्यसंन्यासोपिभवतीतिसिंध्वादयः देशविप्लवदुर्भिक्षादिमहापदिसद्यःशौचं आपदपगमेआशौचावशेषेअवशिष्टाशौचमस्त्येव ॥**

**१ त्यामध्यें कर्त्याचे योगानें अपवाद असा आहे.**—संन्यासी, ब्रह्मचारी यांस सपिंडाचें जननाशौच व मृताशौच नाहीं. माता व पिता मृत असतील तर संन्यासी व ब्रह्मचारी यांनीं सचैल स्नान अवश्य करावें. ब्रह्मचारी याचें समावर्तन ( सोडमुंज ) झाल्यानंतर आपणास ब्रह्मचर्यदशा असतां जे पिता इत्यादि सपिंड मृत झाले असतील त्यांचें त्रिरात्र आशौच धरून त्यांस उदकदान करावें. शवाचे मागून जाणें, शव वाहणें एतन्निमित्तक आशौच ब्रह्मचारी यासहि आहेच. पिता इत्यादिकांचें अंत्यकर्म केलें असतां ब्रह्मचारी यास आशौच आहेच. ज्यांनीं पूर्वी प्रायश्चित्तें आरंभिलीं त्यांस प्रायश्चित्ताचे अनुष्ठानसमयीं आशौच नाहीं; प्रायश्चित्ताची समाप्ति झाल्यानंतर त्यांनीं त्रिरात्र अतिक्रांत आशौच धरावें. कर्माचें अंगभूत नांदीश्राद्ध ज्यांनीं केलें त्यांस तें कर्म समाप्त होई तावत्पर्यंत त्या कर्माचे उपयोगी जें कार्य त्याविषयीं आर्ति ( पीडा ) इत्यादि संकट असतां आशौच नाहीं. जाताशौच व मृताशौच यांहीं युक्त जे त्यांस मरणसमय प्राप्त असतां आशौच नाहीं, त्यावरून दानादिक व वैराग्य असतां आतुरास ( मुमूर्षूस ) संन्यासहि होतो असे निर्णयसिंधु इत्यादिक ग्रंथ आहेत. देशविप्लव ( देशपीडा ), दुष्काळ इत्यादि मोठी आपत्ति असतां तात्कालिक शुद्धि, आपत्ति दूर झाल्यानंतर आशौच शेष असतां अवशिष्ट आशौच आहेच.

---

**अथकर्मतः अन्नसत्रिणामन्नादिदानेषुनाशौचं प्रतिगृहीतुस्तुआमान्नग्रहणेदोषोन पक्कान्नभोजनेतुत्रिरात्रंक्षीरपानं गृहीतेनंतव्रतादावेकादश्यादौचारब्धकृच्छ्रादिव्रतेचनाशौचं तत्र**

स्नानादिशारीरनियमाःस्वयंकार्याः अनंतपूजादिकमन्येनकारणीयम् ब्राह्मणभोजनादिकमाशौचांते राजादीनांप्रजापालनादौनाशौचं ऋत्विजांमधुपर्कपूजोत्तरंतत्कर्मणिनाशौचं तेनयेष्वाधानपशुबंधादिषुमधुपर्कोनोक्तस्तेषुकृतेपिवरणेतान्त्यक्त्वान्येऋत्विजःकार्याः दीक्षितानां दीक्षणीयोत्तरमवभृथस्नानपर्यंतंयज्ञकर्मणिनाशौचं दीक्षितर्त्विग्भ्यांस्नानमात्रंकर्ममध्येकार्यं अवभृथात्पूर्वमेवाशौचाभावः अवभृथंतुनभवत्येवेतिसिंधुः कर्मांतेतुत्रिरात्रंपूर्वन्यायात् रोगभयराजभयादिनाशार्थेशांतिकर्मणिनाशौचं क्षुत्पीडितकुटुंबस्यप्रतिग्रहेनाशौचं विस्मरणशीलस्याधीतवेदशास्त्राध्ययनेपिनाशौचं वैद्यस्यनाडीस्पर्शनेनाशौचं श्राद्धेतूक्तं मूर्तिप्रतिष्ठाचौलोपनयनविवाहाद्युत्सवतडागाद्युत्सर्गकोटिहोमतुलापुरुषदानादिककर्मसुनांदीश्राद्धोत्तरंनाशौचं संकल्पितेपुरश्चरणजपेऽविच्छेदेनसंकल्पितहरिवंशश्रवणादौचप्रारंभोत्तरंनाशौचं कालादिनियमाभावेतुस्तोत्रहरिवंशादिकमाशौचेहेयमेव सर्वोप्ययमाशौचापवादोनन्यगतिकत्वेआर्तौचज्ञेयइतिसिंधौनागोजीयेचोक्तं तेनानन्यगतिकत्वादिकमालोच्यैवाशौचाभावोयोज्यः अत्रयद्वक्तव्यंतत्पूर्वार्धेतत्रतत्रोक्तमेव ॥

**यानंतर कर्मेंकरून अपवाद.**—अन्नाचें सत्र ज्यांचें आहे त्यांस अन्नादिदानांविषयीं आशौच नाहीं. प्रतिग्रह करणाऱ्यास तर, आमान्न ( हिरवें अन्न ) ग्रहण करण्याविषयीं दोष नाहीं. शिजलेल्या अन्नाचें भोजन केलें तर तीन रात्र दुग्धपानव्रत करावें. पूर्वीं ग्रहण केलेलें असें अनंतव्रतादिक, एकादशी इत्यादि आणि आरंभलेलें कृच्छ्रादिव्रत यांविषयीं आशौच नाहीं; त्यामध्यें स्नानादिक शरीरसंबंधी नियम आपण करावे, अनंतपूजादिक दुसऱ्याकडून करवावें; ब्राह्मणभोजनादि करणें तें आशौचनिवृत्तीनंतर करावें. राजा इत्यादिकांस प्रजापालन इत्यादिकाविषयीं आशौच नाहीं. ऋत्विजांस मधुपर्कपूजेनंतर त्या कर्माविषयीं आशौच नाहीं. त्यावरून आधान, पशुबंध इत्यादिक ज्या यज्ञामध्यें मधुपर्कपूजा सांगितली नाहीं त्या यज्ञांत ऋत्विक्वरण केलें तथापि त्यांस टाकून दुसरे ऋत्विज वरावे. यज्ञदीक्षा ज्यांनीं धारण केली त्यांस, दीक्षणीय इष्टि झाल्यानंतर अवभृथस्नानपर्यंत यज्ञकर्माविषयीं आशौच नाहीं. दीक्षित व ऋत्विक् यांनीं स्नान मात्र कर्मामध्यें करावें. अवभृथाचे पूर्वींच आशौच नाहीं, अवभृथस्नान तर, आशौचांत होत नाहीं असा निर्णयसिंधु आहे. कर्माची समाप्ति झाल्यानंतर तर, पूर्वीं सांगितल्याप्रमाणें त्रिरात्र आशौच धरावें. रोगभय, राजभय, इत्यादिकांच्या नाशार्थ शांतिकर्माविषयीं आशौच नाहीं. ज्याचें कुटुंब क्षुधेनें पीडित झालें असेल त्यास प्रतिग्रहाविषयीं आशौच नाहीं. पुनःपुनः अध्ययन विसरणारास अधीत वेदशास्त्रांच्या अध्ययनाविषयींहि आशौच नाहीं. वैद्यास नाडीस्पर्शाविषयीं आशौच नाहीं. श्राद्धाविषयीं तर पूर्वीं सांगितलें. मूर्तीची अर्चा, चौल, उपनयन, विवाहादिक उत्सव, तडागादिकांचा उत्सर्ग, कोटिहोम, तुलापुरुषदान इत्यादि कर्माविषयीं नांदीश्राद्ध झाल्यानंतर आशौच नाहीं. पूर्वी संकल्प केलेला असा पुरश्चरणजप, व अविच्छेदेंकरून संकल्पित असें हरिवंशश्रवणादिक यांविषयीं प्रारंभानंतर आशौच नाहीं. कालादि नियमाचा अभाव असेल तर, स्तोत्र, हरिवंशादिक आशौचामध्यें वर्ज्य करावेंच. सर्व हा आशौचाचा अपवाद अनन्यगतिक ( दुसरी ज्यास गति नाहीं तें ), आर्ति ( पीडा ) यांविषयीं जाणावा, असें निर्णयसिंधु व नागोजी-

भट्टकृत आशौचनिर्णय यांत सांगितलें आहे, त्यावरून अनन्यगतिकत्व इत्यादि पाहूनच आशौचाचा अभाव योजावा. याविषयीं जें सांगावयाचें तें पूर्वार्धीं त्या त्या स्थलीं सांगितलेंच आहे.

---

केचित्तुव्रतेष्विवदीक्षितानामृत्विजामारब्धोत्सवादीनांचस्वरूपतआरंभतश्चावश्यकत्वादार्त्याद्यभावेप्याशौचाभावइत्याहुः कन्यायाऋतुशंकादिसंकटेमुहूर्तांतराभावेकूष्मांडहोमादिनाजाताशौचेविवाहारंभोपिकार्यइत्युक्तं विवाहादिषुनांदीश्राद्धोत्तरमाशौचपातेपूर्वसंकल्पितान्नमसगोत्रैर्दातव्यंभोक्तव्यंच दातारंभोक्तारंसिद्धान्नंचसूतकीनस्पृशेत् विवाहादौतदन्यत्रवाभुंजानेषुविप्रेषुदातुराशौचपातेपात्रस्थमप्यन्नंत्यक्त्वान्यगेहोदकाचांताःशुद्ध्यंतीत्यादिपूर्वार्धेउक्तं एवंसहस्रभोजनादावपिपूर्वसंकल्पितान्नेषुज्ञेयम् पार्थिवशिवपूजायांनाशौचं आशौचेसंध्याश्रौतस्मार्तहोमादिविषयेपूर्वार्धेउक्तं अग्निसमारोपप्रत्यवरोहावाशौचयोर्नकार्यौ तेनसमारोपोत्तरमाशौचपातेपुनराधानमेव समारोपप्रत्यवरोहयोरन्यकर्तृकत्वस्याशौचापवादस्यचाभावात् इदंबह्वृचानांद्वादशाहंहोमलोपेन्येषांत्र्यहंहोमलोपेएवपुनराधानंज्ञेयं ग्रहणनिमित्तकेस्नानश्राद्धदानादौनाशौचं कश्चित्स्नानमात्रंकार्यंनश्राद्धादीत्याह संक्रांतिस्नानादावपिनाशौचं नित्यकृत्येषुस्नानाचमनभोजननियमास्पृश्यस्पर्शनादिनियमेषुनाशौचं अन्यद्वैश्वदेवब्रह्मयज्ञदेवपूजादिनित्यंनैमित्तिकंकाम्यंचाशौचेषुनकार्यं भोजनकालेआशौचापादकजननमरणश्रवणेमुखस्थंग्रासंत्यक्त्वास्नायात् मुखस्थग्रासभक्षणेएकोपवासः सर्वान्नभोजनेत्रिरात्रोपवासः इतिकर्मतआशौचसदसद्भावविचारः ॥

कोणी ग्रंथकार तर, व्रतांचे ठायीं जसें आशौच नाहीं त्याप्रमाणें दीक्षित, ऋत्विज आणि पूर्वीं आरंभिलेले उत्सवादिक यांस स्वरूपेंकरून व आरंभेंकरून आवश्यकत्व असल्यामुळें पीडा इत्यादिक नसतां आशौच नाहीं असें ह्मणतात. कन्येस ऋतुदर्शन होईल इत्यादि संकटींच दुसरा मुहूर्त नसतां कूष्मांडहोम इत्यादि करून जननाशौचामध्यें विवाहाचा आरंभहि करावा असें सांगितलें आहे. विवाहादिकांमध्यें, नांदीश्राद्धानंतर आशौच प्राप्त असतां पूर्वीं संकल्प करून ठेवलेलें अन्न असगोत्री यांनीं द्यावें व भक्षणहि करावें. सूतकी यानें दाता, भोक्ता व सिद्ध केलेलें अन्न यांस स्पर्श करूं नये. विवाहादिक कार्यांत अथवा अन्य समयीं ब्राह्मण भोजन करीत असतां दात्यास आशौच प्राप्त होईल तर पात्रावरचेंहि अन्न टाकून दुसऱ्याच्या घरांतील उदकानें आंचवले होत्साते ब्राह्मण शुद्ध होतात इत्यादिक पूर्वार्धीं सांगितलें आहे. याप्रमाणें सहस्रभोजनादिकांमध्येंहि पूर्वसंकल्पित जीं अन्नें त्यांविषयीं असाच निर्णय जाणावा. पार्थिवशिवाचे पूजेविषयीं आशौच नाहीं, आशौचामध्यें संध्या, श्रौतस्मार्तहोमादिक यांविषयीं पूर्वार्धांत सांगितलें आहे. अग्निसमारोप व प्रत्यवरोह हे आशौचांत करूं नयेत, त्यावरून समारोप केल्यानंतर आशौच प्राप्त असतां पुनराधानाच करावें; कारण, समारोप व प्रत्यवरोह हे अन्यानें करूं नयेत, व त्याविषयीं आशौचाचा अपवाद नाहीं. हें पुनराधान, ऋग्वेदी यांचा बारा दिवस होमाचा लोप असतां, अन्यशाखी यांचा तीन दिवस होमाचा लोप असतांच जाणावें. ग्रहणनिमित्तक जें स्नान, श्राद्ध, दान इत्यादिक त्याविषयीं आशौच नाहीं. कोणी-

एक ग्रंथकार, स्नान मात्र करावें, श्राद्धादिक करूं नये असें ह्मणतो. संक्रांतीसंबंधी स्नानदानादिकाविषयीं आशौच नाहीं. नित्य कर्तव्य असे स्नान, आचमन, भोजन, नियम, स्पर्शास अयोग्य अशास स्पर्श करणें इत्यादि नियम यांविषयीं आशौच नाहीं. इतर जीं वैश्वदेव, ब्रह्मयज्ञ, देवपूजा इत्यादि नित्यकर्म; नैमित्तिक कर्म व काम्यकर्म हीं आशौचांत करूं नयेत. भोजनसमयीं, आशौच उत्पन्न करणारें असें जननमरण श्रुत झालें असतां मुखांतील ग्रास टाकून स्नान करावें, मुखांतील ग्रास भक्षण केला असतां एक उपोषण करावें, सर्व अन्न भक्षण केलें असतां त्रिरात्र उपोषण करावें. याप्रमाणें कर्मेंकरून आशौच आहे किंवा नाहीं याचा निर्णय सांगितला.

---

अथद्रव्यतः पुष्पफलमूललवणमधुमांसशाकतृणकाष्ठोदकक्षीरदधिघृतौषधतिलतद्विकारेक्षुतद्विकाराणांलाजादिभर्जितान्नस्यलड्डुकादीनांचाशौचिस्वामिनामाशौचिगृहस्थितानांचग्रहणेदोषोन आशौचिहस्तात्तुकिमप्येतन्नग्राह्यं पण्येतुवणिजादेराशौचेपितद्धस्ताल्लवणादेरामान्नस्यचक्रयेनदोषः जलदधिलाजादिकंतुक्रयेणापितद्धस्तान्नग्राह्यं ॥

**यानंतर द्रव्येंकरून अपवाद.**—पुष्प, फल, मूल, लवण, मधु, मांस, शाक, तृण, काष्ठ, उदक, दूध, दहीं, घृत, औषध, तिल, व त्यांचे विकार (तेल इ०), ऊंस व त्याचे विकार (गूळ, काकवी इत्यादिक), लाह्या इत्यादिक भाजलेलें अन्न, आणि लाडू इत्यादिक हे पदार्थ आशौचिस्वामिक ह्मणजे आशौची याचें ज्यांवर स्वत्व असे व आशौची याचे घरांतले ग्रहण करण्याविषयीं दोष नाहीं. आशौच्याचे हातून तर कोणतेहि हे ग्रहण करूं नयेत. बाजारामध्यें तर, दुकानदार इत्यादिकांस आशौच असलें तथापि त्यांचे हातून लवणादिक, आमान्न (शिधासामग्री) विकत घेण्याविषयीं दोष नाहीं. उदक, दहीं, लाह्या इत्यादिक पदार्थ तर, किमतीनेंहि त्याच्या हातून घेऊं नयेत.

---

अथमृतदोषतः शास्त्रानुज्ञांविनाशस्त्राग्निविषजलपाषाणभृगुपातानशनादिभिर्बुद्धिपूर्वकंस्वेच्छयात्मघातकानांनाशौचं तच्चात्मघातनंक्रोधात्परोद्देशेनवास्तुस्वतएवेष्टसाधनताभ्रमेण वा तथाचौर्यादिदोषेराजहतानांपारदार्येतत्पत्यादिहतानांविद्युद्धतानांचनाशौचं अन्यैर्निषिद्धोपिगर्वान्नदीतरणवृक्षाधिरोहकूपावरोहादौप्रवृत्तोमृतस्तस्यापिनाशौचं योगवादिहरणार्थंतद्धननार्थंवाप्रवृत्तोगोसर्पनखिशृंगिदंष्ट्रिगजचोरविप्रांत्यजादिभिर्हतस्तस्यनाशौचं महापातकिनांतत्संसर्गिणांचमहापापितुल्यानांचपतितानांनपुंसकानांचमरणेनाशौचं स्त्रीणांचपत्यादिहंत्रीणांहीनजातिगामिनीनांगर्भघ्नीनांकुलटानांचपूर्वोक्तात्मघातादिपापयुक्तानांचमृतौनाशौचं तत्रैषांशवानांस्पर्शाश्रुपातवहनदहनांत्यकर्माणिनकुर्यात् स्पर्शादिकरणेज्ञानाज्ञानाभ्यासादितारतम्येनकृच्छ्रातिकृच्छ्रसांतपनचांद्रायणादिप्रायश्चित्तानिसिंध्वादिग्रंथांतरतोज्ञेयानि तेनैषांमृतदेहस्यजलेप्रक्षेपः ततःसंवत्सरोत्तरंपुत्रादिस्तदीयात्मघातादिपापानुसारेणप्रायश्चित्तंतस्यकृत्वानारायणबलिंचकृत्वापर्णशरदाहादिपूर्वकमाशौचमौर्ध्वदेहिकंचकुर्यात् केचित्प्रेतशरीरंदग्ध्वादाहनिमित्तंचांद्रायणत्रयंकृत्वाऽस्थीनिसंस्थाप्याब्दांतेपूर्वोक्तरीत्यौर्ध्वदेहिकमित्याहुः

**यानंतर मृतदोषेंकरून अपवाद.**—शास्त्रानुज्ञेवांचून शस्त्र, अग्नि, विष, उदक, पाषाण, भृगुपात ( पर्वताचे कड्यावरून खालीं उडी टाकणें ), उपोषण, इत्यादिकेंकरून बुद्धिपूर्वक स्वेच्छेनें आत्महत्या करून मृत झालेले त्यांचें आशौच नाहीं. ती आत्महत्या क्रोधानें अथवा दुसऱ्याचे उद्देशानें असो अथवा स्वताचें इष्टसाधन होईल अशा भ्रमानें असो. तसेंच, चोरी करणें इत्यादि दोषांकरितां राजानें मारलेले, परस्त्रीलंपट असल्यामुळें त्या स्त्रियेचा पति इत्यादिकांनीं मारलेले आणि वीज पडून मृत झालेले यांचें आशौच नाहीं. अन्यांनीं निषेधिला असूनहि गर्वानें नदींत पोहणें, वृक्षावर चढणें आणि विहीर इत्यादिकांत उतरणें हीं करण्यानें जो मृत झाला त्याचेंहि आशौच नाहीं. गाई इत्यादि चोरण्याकरितां अथवा गाई मारण्याकरितां प्रवृत्त झालेला असा गाई, सर्प, नखी ( व्याघ्रादिक ), शृंगी ( वृषभादिक ), दंष्ट्री ( डुकर इत्यादि ), हत्ती, चोर, ब्राह्मण, चांडाल इत्यादिकांनीं मारला गेला त्याचें आशौच नाहीं. महापातकी, महापाप्यांचे संसर्गी, महापाप्याचे बरोबरीचे पापी, पतित आणि नपुंसक हे मृत असतां त्यांचें आशौच नाहीं. पति इत्यादिकांची हत्या करणाऱ्या, हीनजातीशीं गमन करणाऱ्या, गर्भहत्या करणाऱ्या, कुलटा आणि पूर्वीं सांगितलेलीं आत्महत्यादि पातकें करणाऱ्या अशा स्त्रिया मृत असतां त्यांचें आशौच नाहीं. त्यामध्यें ह्यांच्या प्रेतांस स्पर्श करणें, रडणें, वाहणें, दहन, अंत्यकर्म हीं करूं नयेत. स्पर्शादिक केलें असतां जाणून, न जाणून, अभ्यास इत्यादिकांचे तारतम्येंकरून कृच्छ्र, अतिकृच्छ्र, सांतपन, चांद्रायण इत्यादि प्रायश्चित्तें निर्णयसिंधु इत्यादि ग्रंथांतून पाहावीं; त्यावरून असें होतें कीं, ह्यांचीं प्रेतें उदकांत टाकावीं, त्या हेतुस्तव एक वर्षानंतर पुत्रादिकानें त्यांचीं आत्महत्यादिक जशीं पातकें असतील तदनुसार त्यांचें प्रायश्चित्त करून व नारायणबलि करून पर्णशरविधीनें दहनपूर्वक आशौच आणि अंत्यकर्म करावें. कोणी ग्रंथकार, प्रेतशरीराचें दहन करून दहननिमित्तक तीन चांद्रायणें करून त्याच्या अस्थि ठेवून वर्षानंतर पूर्वीं सांगितल्या रीतीनें अंत्यकर्म करावें असें ह्मणतात.

---

**अथवालौकिकाग्निनातूष्णींदग्ध्वास्वजीवनसंदेहाद्वाभक्त्यावापुत्रादयःसंवत्सरादर्वागपि तत्तदात्मघातादिपापोक्तद्विगुणप्रायश्चित्तपूर्वकंनारायणबलिंकृत्वापर्णशरदाहमस्थिदाहंवाकृत्वाशौचमौर्ध्वदेहिकंचकुर्युः इदंचप्रायश्चित्तार्हाणामेव प्रायश्चित्तानर्हाणांघटस्फोटेनबहिष्कृतानांचदासीद्वारापतितोदकविध्यनंतरंसपिंडीकरणवर्जमौर्ध्वदेहिकं तेनसांवत्सरिकमप्येकोद्दिष्टविधिनैव यद्वात्मघातिनांपुत्रादिर्मृतजातीयवधोक्तब्रह्महत्यादिप्रायश्चित्तसहितंचांद्रायणंतप्तकृच्छ्रद्वयंचकृत्वानारायणबलिपूर्वकंतंदहेत् तथाचात्मघातिनांगोगजव्याघ्रादिहेतुकदुर्मरणवतांचपतितादीनांचपूर्वोक्तानांसर्वेषांनमरणदिनादारभ्याशौचं किंतुतत्तत्प्रायश्चित्तनारायणबलिपूर्वकसमंत्रकदाहदिनमारभ्यैवाशौचं जलाग्न्यादिभिः प्रमादमृतानांतुमरणदिनादारभ्याशौचादिकमस्त्येव तत्रत्रिरात्रमितिकेचित् दशाहमितिबहवः किंतुप्रमादमरणस्यापिदुर्मरणत्वात्तन्निमित्तप्रायश्चित्तपूर्वकमेवदाहादिकार्यम् तदुक्तंस्मृत्यर्थसारे चंडालगोब्राह्मणचोरपशुदंष्ट्रिसर्पाग्न्युदकादिभिः प्रमादान्मरणेचांद्रायणंतप्तकृच्छ्रद्वयंचतत्प्रायश्चित्तंकृ**

**त्वापंचदशकृच्छ्राणिवाप्रायश्चित्तंकृत्वाविधिवद्दहनाशौचोदकदानादिसर्वकार्यमेवेति प्राणांतिकप्रायश्चित्तेनमृतस्यदशाहमाशौचंसर्वाणिप्रेतकार्याणिचकर्तव्यानि प्रायश्चित्तेनतस्यशुद्धत्वात् एवमारब्धप्रायश्चित्तस्यप्रायश्चित्तमध्येमरणेपिशुद्धत्वादिकंज्ञेयं ॥**

अथवा लौकिकाग्नीनें अमंत्रक दहन करून आपण (पुत्रादि अधिकारी) वांचूं किंवा नाहीं अशा संशयास्तव, अथवा भक्तीनें पुत्रादिकांनीं वर्षाचे पूर्वींहि त्या त्या आत्महत्यादि पातकांस उक्त प्रायश्चित्ताचे दुप्पट प्रायश्चित्तपूर्वक नारायणबलि करून पर्णशरदहन अथवा अस्थिदहन करून आशौच आणि अंत्यकर्म करावें. हा निर्णय प्रायश्चित्तास जे योग्य त्यांविषयींच आहे. प्रायश्चित्तास जे योग्य नाहींत ते व घटस्फोट करून बहिष्कृत झालेले त्यांचा दासीकडून पतितोदकविधि केल्यानंतर त्यांचें सपिंडीविरहित और्ध्वदेहिक कर्म करावें. त्यावरून असें होतें कीं, त्यांचें सांवत्सरिक श्राद्धहि एकोद्दिष्ट विधीकरूनच करावें. अथवा आत्महत्या करून मृत झालेले त्यांच्या पुत्रादिकांनीं मृताचे जातीचे वधाविषयीं उक्त जें ब्रह्महत्यादिकांचें प्रायश्चित्त तत्सहित चांद्रायण, आणि दोन तप्तकृच्छ्र असें प्रायश्चित्त करून नारायणबलिपूर्वक त्याचें दहन करावें. तसेंच, आत्महत्येनें मृत झालेले; गाई, हत्ती, व्याघ्र इत्यादि निमित्तक दुर्मरणानें मृत झालेले आणि पतितादिक पूर्वीं सांगितलेले ह्या सर्वांचें मरणदिवसापासून आशौच नाहीं, तर तें तें प्रायश्चित्त व नारायणबलिपूर्वक समंत्रक दहन ज्या दिवसीं होईल त्या दिवसापासूनच आशौच धरावें. उदक, अग्नि इत्यादिकेंकरून असावधपणानें मृत झाले त्यांचें तर मरणदिवसापासून आशौच इत्यादिक आहेच, व तें त्रिरात्र असें कोणी ग्रंथकार ह्मणतात, दहा दिवस असें बहुत ग्रंथकार ह्मणतात. तर, असावधपणानें मरण हेंहि दुर्मरण आहे याकरितां तन्निमित्तक प्रायश्चित्त पूर्वीं करूनच दहनादिक करावें. तें प्रायश्चित्त स्मृत्यर्थसारांत सांगितलें आहे. तें असें—चांडाल, गाई, ब्राह्मण, चोर, पशु, दंष्ट्री (डुकरादिक), सर्प, अग्नि, उदक इत्यादिकेंकरून असावधपणाचे योगानें मरण प्राप्त झालें असतां चांद्रायण, आणि दोन तप्तकृच्छ्र, असें त्यांचें प्रायश्चित्त करून अथवा पंधरा कृच्छ्र प्रायश्चित्त करून यथाविधि दहन, आशौच आणि उदकदान इत्यादिक सर्व कर्म करावेंच. प्राणांतिक प्रायश्चित्तेंकरून जो मृत झाला त्याचें दहा दिवस आशौच, आणि सर्व प्रेतकार्यें हीं करावीं; कारण, प्रायश्चित्तेंकरून तो शुद्ध झालेला आहे. याप्रमाणें ज्यानें प्रायश्चित्त आरंभिलें अशा मनुष्यास प्रायश्चित्तामध्यें मरण प्राप्त झालें असतांहि तो शुद्ध आहे इत्यादिक जाणावें.

---

**आहिताग्नेस्तुपतितादेर्मरणेदर्पादिनाचांडालशृंगिचोरादिहेतुकेचमरणेविशेषः त्रेताग्नीन्प्रक्षिपेदप्सुआवसथ्यंचतुष्पथे पात्राणितुदहेदग्नौसाग्निकेपापकर्मणि ततःप्रायश्चित्तार्हत्वानर्हत्वादिपूर्वोक्तव्यवस्थयानिर्मथ्याग्निनादाहाद्यंतकर्मेति महापातकसंयुक्तःसाग्निकोयदिजीवति पुत्रादिःपालयेदग्नीन्प्रायश्चित्तक्रियावधि प्रायश्चित्तंनकुर्याद्यःकुर्वन्वाम्रियतेयदि जलेग्नीन्प्रक्षिपेदग्नौपात्राणितुजलेषुवा माधवीये आहिताग्नेर्दुर्मरणेप्यात्मघातेचतंलौकिकाग्निनातूष्णींदग्ध्वातदस्थीनिक्षीरेणप्रक्षाल्यतत्प्रायश्चित्तंकृत्वाश्रौताग्निभिः समंत्रकंदाहादिकार्यमित्युक्तं इदंनिरग्नेरपिदुर्मरणेयोज्यं ॥**

पतित इत्यादिक जो आहिताग्नि त्यास मरण प्राप्त झालें असतां व गर्वादिकांच्या योगानें चांडाल, शृंगयुक्त पशु, चोर, इत्यादि कारणानें मरण झालें असतां त्याविषयीं विशेष—" साग्निक ह्मणजे आहिताग्नि पापकर्मी झाला असतां दक्षिणाग्नि, गार्हपत्य आणि आहवनीय हे तीन अग्नि उदकांत टाकावे; गृह्याग्नि चतुष्पथावर टाकावा; पात्रें तर अग्नींत दहन करावीं." तदनंतर प्रायश्चित्तयोग्यता, अयोग्यता इत्यादिक पूर्वीं सांगितल्या व्यवस्थेनें मंथनानें उत्पन्न केलेल्या अग्नीकरून दहन इत्यादिक अंत्यकर्म करावें. " महापातकानें युक्त असा साग्निक जर जीवंत आहे तर पुत्रादिकानें तो प्रायश्चित्त घेई तावत्पर्यंत त्याचे अग्नि रक्षण करावे; जो प्रायश्चित्त घेणार नाहीं, अथवा प्रायश्चित्त करीत असतां मृत होईल तर त्याचे अग्नि उदकांत टाकावे; पात्रें तर अग्नींत किंवा उदकांत टाकावीं." माधवाच्या ग्रंथांत— आहिताग्नि दुर्मरण व आत्महत्या यांहींकरून मृत असतां त्याचें लौकिकाग्नीनें अमंत्रक दहन करून त्याच्या अस्थि दुग्धानें प्रक्षालन करून त्याचें प्रायश्चित्त करून श्रौताग्नींनीं समंत्रक दहनादिक करावें असें सांगितलें आहे. हा निर्णय निरग्निकासहि दुर्मरण प्राप्त झालें असतां योजावा.

---

**अथसर्पहतेविशेषः** प्रमादेनवादर्पादिनावासर्पतोमृतावाशौचादिनकार्यम् वक्ष्यमाणंनागपूजाव्रतंकृत्वानारायणबलिसौवर्णनागदानप्रत्यक्षगोदानानिकृत्वादाहाशौचादिकार्यं सर्वत्र दुर्मरणेपतितादिमरणेचतत्तत्प्रायश्चित्तादिकृत्वादाहाशौचादिकार्यमित्युक्तं ॥

**यानंतर सर्पदंशानें मृत असतां विशेष.**—असावधपणानें अथवा गर्वादिकांचे योगानें सर्पापासून मरण आलें असतां आशौचादिक धरूं नये. पुढें सांगावयाचें असें नागपूजाव्रत करून नारायणबलि, सुवर्णनागाचें दान आणि प्रत्यक्ष गोदान हीं करून दहन, आशौच इत्यादिक करावें. सर्वत्र दुर्मरण व पतितादिमरण असतां तें तें प्रायश्चित्तादि करून दहन, आशौच इत्यादि करावें असें सांगितलें.

---

**तत्रप्रायश्चित्तानिप्रसंगादुच्यंते** बुद्धिपूर्वकमात्मघातेनमृतानांत्रिंशत्कृच्छ्राणिप्रायश्चित्तं एतच्चजातिवधप्रायश्चित्तेनसमुच्चितंकार्यं तद्यथा ब्राह्मणेनात्मघातेकृतेद्वादशाब्दंब्रह्महत्याप्रायश्चित्तंत्रिंशत्कृच्छ्रमात्मघातप्रायश्चित्तंचतत्पुत्रादिःकुर्यात् ब्राह्मणस्त्रियात्मघातेकृतेब्राह्मणस्त्रीवधप्रायश्चित्तंत्रिंशत्कृच्छ्राणिच एवंशूद्राद्यात्मघातेप्यूह्यं अशक्तावात्मघातेचांद्रायणद्वयंतप्तकृच्छ्रचतुष्कं प्रमादेनजलादिमरणेपंचदशकृच्छ्राणि चांद्रायणपूर्वकंतप्तकृच्छ्रद्वयंवा पतितमृतेषोडशकृच्छ्राणि ब्रह्महत्यादिपापिनांप्रायश्चित्तात्पूर्वंमरणेतत्तत्पापप्रायश्चित्तंपुत्रेणकार्यम् प्रायश्चित्तानर्हाणांतुपतितोदकदानविधिरेवनप्रायश्चित्तादीत्युक्तं सिंधौतुप्रायश्चित्तानर्हाणामपिपुत्रादिर्नारायणबलिपूर्वंसर्वमौर्ध्वदेहिकंसपिंडीकरणंदर्शादिश्राद्धंगयादिश्राद्धंचकुर्यादेव एवंम्लेच्छीकृतस्यापि पतितोदकविधिरपुत्रविषयइत्युक्तं इदमेवयुक्तं ॥

**त्यामध्यें प्रसंगेंकरून प्रायश्चित्तें सांगतों.**—बुद्धिपूर्वक आत्महत्या करून जे मृत झाले त्यांचें तीस कृच्छ्र प्रायश्चित्त. हें प्रायश्चित्त जातिवधाचे प्रायश्चित्तासहवर्तमान करावें. तें असें—ब्राह्मणानें आत्महत्या केली असतां द्वादशाब्द असें ब्रह्महत्याप्रायश्चित्त, व तीस कृच्छ्र

आत्महत्याप्रायश्चित्त असीं दोन, पुत्रादिकानें करावीं. ब्राह्मणस्त्रीनें आत्महत्या केली असतां ब्राह्मणस्त्रीवधाचें प्रायश्चित्त आणि तीस कृच्छ्र हीं करावीं. याप्रमाणें शूद्रादिकानें आत्महत्या केली असतांहि हा निर्णय जाणावा. आत्महत्या केली असतां पूर्वोक्त प्रायश्चित्ताविषयीं शक्ति नसेल तर दोन चांद्रायणें व चार तप्तकृच्छ्र करावीं. असावधपणानें जलादिकांपासून मरण असतां पंधरा कृच्छ्र, अथवा चांद्रायणपूर्वक दोन तप्तकृच्छ्र करावीं. पतित मृत असतां सोळा कृच्छ्र. ब्रह्महत्यादिपातकी यांस प्रायश्चित्ताचे पूर्वीं मरण झालें असतां त्या त्या पापाचें प्रायश्चित्त पुत्रानें करावें. प्रायश्चित्ताविषयीं जे अयोग्य त्यांचा तर, पतितोदकदानविधिच करावा, प्रायश्चित्तादि करूं नये असें सांगितलें आहे. निर्णयसिंधूमध्यें तर, प्रायश्चित्ताविषयीं अयोग्य असले तथापि त्यांचे पुत्रादिकानें नारायणबलिपूर्वक सर्व अंत्यकर्म, सपिंडीकरण, दर्शादिश्राद्ध, गयादिश्राद्ध, हीं करावींच. याप्रमाणें म्लेच्छ झालेल्याचेंहि पूर्वोक्त सर्व करावें, पतितोदकविधि जो सांगितला तो अपुत्रविषयक असें सांगितलें आहे, व हेंच योग्य होय.

---

**यस्तुकिंचित्कालंम्लेच्छीकृतः प्रायश्चित्तार्हस्तस्यषोडशकृच्छ्रादिप्रायश्चित्तंपुत्रेणकृत्वापर्णशरदाहादिकार्यम्** प्रमादमरणभिन्नेषुचौर्यपारदार्यादिहेतुकेषुदुर्मरणेषुचांद्रायणद्वयंतप्तकृच्छ्रंवेत्याकरतोविचार्ययोज्यं किंचव्याघ्रादिहेतुकदुर्मरणेषुशातातपोक्तदानादिविधिरपिकार्यः **तथाहि व्याघ्रहतेविप्रकन्याविवाहनं गजहतेचतुर्निष्कपरिमितहेमनिर्मितगजदानं राजहते सौवर्णपुरुषदानं चोरहतेप्रत्यक्षधेनुदानं वैरिहतेवृषदानं वृषभेणहतेयथाशक्तिहेमदानं शय्यायांचमृतेदेयाशय्यातूलीसमन्विता निष्कहेमनिर्मितविष्णुप्रतिमाधिष्ठिताच शौचहीनमरणेद्विनिष्कहैमविष्णुदानं संस्कारहीनमरणेविप्रपुत्रोपनयनं अश्वहतेनिष्कत्रयहेमकृताश्वदानं शुनाहतेक्षेत्रपालस्थापनं सूकरहतेमहिषदानं कृमिभिर्हतेपंचखारीमितगोधूमदानं वृक्षहतेवस्त्रयुतसौवर्णवृक्षदानं शृंगिणाहतेवस्त्रयुतवृषभदानं शकटहतेसोपस्करंकिंचितद्रव्यदानं भृगुपातमृतेधान्यपर्वतदानं अग्निनामृतेउदपानोत्सर्गविधिः काष्ठहतेधर्मार्थसभाकरणं शस्त्रहतेमहिषीदानं अश्महतेसवत्सपयस्विन्यागोदानम् विषेणहतेहेमनिर्मितपृथ्वीदानं उद्बंधनेनमृतेहेमकपिदानं जलेमृतेद्विनिष्कहेमनिर्मितवरुणदानं विषूचिकामृतेस्वाद्वन्नेनशतविप्रभोजनं कंठस्थितकवलस्यमरणेघृतधेनुदानं कासरोगमृतेऽष्टकृच्छ्राणि अतीसारमृतेलक्षगायत्रीजपः शाकिन्यादिग्रहैर्मृतेरुद्रैकादशिनीजपः विद्युत्पातमृतेविद्यादानं अंतरिक्षमृतेवेदपारायणं पतितेमृतेषोडशकृच्छ्राणि अस्पृश्यस्पर्शयुक्तमरणेसच्छास्त्रपुस्तकदानमित्यादि ॥**

जो मनुष्य कांहीं दिवसपर्यंत म्लेच्छ झालेला असून प्रायश्चित्ताला योग्य असेल त्याचें सोळा कृच्छ्र इत्यादि प्रायश्चित्त पुत्रानें करून पालाशविधीकरून दहनादिक करावें. प्रमादमरणावांचून इतर चौर्य, परस्त्रीगमन इत्यादि कारणांनीं जीं दुर्मरणें त्यांविषयीं दोन चांद्रायणें अथवा तप्तकृच्छ्र असीं मोठ्या ग्रंथांतून पाहून योजावीं. आणखी व्याघ्रादिकांच्या योगानें प्राप्त जीं दुर्मरणें त्यांविषयीं शातातपानें सांगितलेला दानादिकविधिहि करावा. तो असा— व्याघ्रानें मृत असतां ब्राह्मणकन्येचा विवाह करावा. हत्तीनें मारला असतां चार निष्क सुव-

र्णाचा हत्ती करून त्याचें दान करावें. राजानें मारला असतां सुवर्णाचा पुरुष करून त्याचें दान करावें. चोरानें मारला असतां प्रत्यक्ष धेनुदान करावें. शत्रूनें मारला असतां वृषभदान, वृषभानें मारला असतां यथाशक्ति सुवर्णदान, शय्येवर मृत असतां निष्कपरिमित सुवर्णाची विष्णुमूर्ति करून ती त्या शय्येवर ठेवून गादीसहित शय्यादान करावें. शुद्धतेवांचून मरण असतां दोन निष्क सुवर्णाचे विष्णुमूर्तीचें दान करावें. संस्कारहीन मरण असतां ब्राह्मणाचे पुत्राचें उपनयन करावें. अश्वानें मारला असतां तीन निष्क सुवर्णाचा अश्व करून त्याचें दान करावें. कुत्र्यानें मारला असतां क्षेत्रपालाची स्थापना करावी. डुकरानें मारला असतां महिषाचें दान, कीटकांनीं मारला असतां पांच खारीपरिमित गहूं यांचें दान करावें. वृक्षाच्या योगानें मृत असतां वस्त्रसहित सुवर्णवृक्षाचें दान करावें. शृंगयुक्त पशूनें मारला असतां वस्त्रयुक्त वृषभाचें दान करावें. गाडीच्या योगानें मृत असतां उपस्करयुक्त किंचित् द्रव्याचें दान करावें. कड्यावरून पडून मृत असतां धान्यपर्वताचें दान करावें. अग्नीकरून मृत असतां विहीर, तलाव इत्यादिकांचा उत्सर्गविधि करावा. काष्ठेंकरून मृत असतां धर्मार्थसभा ह्मणजे धर्मशाळा बांधावी. शस्त्रानें मृत असतां महिषीचें दान करावें. पाषाणाच्या योगानें मृत असतां सवत्स दुभत्या गाईचें दान करावें. विषेंकरून मृत असतां सुवर्णाची पृथ्वी करून तिचें दान करावें. गळफांसानें मृत असतां सुवर्णमय वानराचें दान करावें. उदकांत मृत असतां दोन निष्कपरिमित सुवर्णाची वरुणमूर्ति करून तिचें दान करावें. मोडशीनें मृत असतां मधुरान्नेंकरून शंभर ब्राह्मणांस भोजन घालावें. कंठांत ग्रास अडकून मृत असतां घृतधेनूचें दान करावें. कास (खोकला) रोगानें मृत असतां आठ कृच्छ्रें करावीं. अतिसारानें मृत असतां लक्ष गायत्रीजप करावा. शाकिनी इत्यादि ग्रहांची बाधा होऊन मृत असतां रुद्रैकादशिनीचा जप करावा. वीज पडून मृत असतां विद्यादान करावें. अंतरिक्षमृत असतां वेदाचें पारायण करावें. पतित होत्साता मृत असतां सोळा कृच्छ्रें करावीं. स्पर्शास अयोग्य अशाला स्पर्श करून मृत असतां सच्छास्त्राचे पुस्तकाचें दान इत्यादि करावें.

---

अत्रशय्यामरणेशौचहीनसंस्कारहीनमरणेकृमिविषूचिकाकंठकवलकासातिसाररोगग्रहग्रहणैर्मरणेंतरिक्षमृतेऽस्पृश्यस्पर्शमरणेचदानादिविधिरेवनप्रायश्चित्तंनैवनारायणबलिर्नापि वर्षादिकालप्रतीक्षाव्याघ्रादिहेतुकंविषजलशस्त्रादिहेतुकंचमरणंप्रमादेनदर्पादिनाबुद्ध्याचेत्यनेकधासंभवति तत्रोक्तव्यवस्थयाप्रायश्चित्तंनारायणबलिर्दानादिविधिश्चेतित्रयाणांसमुच्चयः यदिपुत्रादिःपितुर्जलादिदुर्मरणप्रायश्चित्तंब्रह्महत्यादितत्तत्पापप्रायश्चित्तंवात्मघातप्रायश्चित्तंवा कर्तुंनशक्नोति तदोक्तदानादिविधिंनारायणबलिंचकृत्वाऽत्यशक्तौनारायणबलिमात्रंकृत्वौर्ध्वदेहिकंकुर्यात् तावतापुत्रादिसपिंडानांशुद्धिसिद्धेः पित्रादेस्तुपुत्रादिभिस्तत्तत्प्रायश्चित्ताकरणे नरकादिभोगःस्यादेवेतिबोद्ध्यं ॥

ह्या स्थलीं शय्यामरण, शौचहीन व संस्कारहीन मरण; कीटक, विषूचिका (मोडशी इ०), कंठांत ग्रास अडकणें; खोकला, अतिसाररोग, शाकिनी इत्यादि ग्रह यांहींकरून मरण; अंत-

रिक्षमरण आणि अस्पृश्यस्पर्शमरण यांचे ठायीं दानादि विधिच करावा, प्रायश्चित्त करूं नये, व नारायणबलि करूं नये, व वर्षादिकालाची प्रतीक्षा करूं नये. व्याघ्रादिक, विष, उदक, शस्त्रादिक या कारणांनीं जें मरण तें असावधपणानें, गर्व इत्यादिकानें व बुद्धिपूर्वक असें अनेक प्रकारानें संभवतें, त्यामध्यें पूर्वीं सांगितल्या व्यवस्थेंकरून प्रायश्चित्त, नारायणबलि आणि दानादिविधि याप्रमाणें तीन करावीं. जर पुत्र इत्यादिक पित्याचें उदकादिदुर्मरणाचें प्रायश्चित्त अथवा ब्रह्महत्यादि जें जें पाप त्या त्या पापाचें प्रायश्चित्त किंवा आत्महत्येचें प्रायश्चित्त करण्याविषयीं समर्थ नसेल तर पूर्वीं सांगितलेला दानादिविधि व नारायणबलि हीं दोन करून, अति असामर्थ्य असतां नारायणबलि मात्र करून त्यानें अंत्यकर्म करावें; कारण, तितकें केल्यानें पुत्रादिसपिंडांचे शुद्धीची सिद्धि होते. पिता इत्यादिकास तर, पुत्र इत्यादिकांनीं तें तें प्रायश्चित्त न केलें असतां नरकादि भोग प्राप्त होईलच असें जाणावें.

---

**अथविधिविहितजलादिमरणे तत्रप्रयागेसर्ववर्णानांरोगिणामरोगिणांचभागीरथीप्रवेशादिनामरणेकामितमहाफलं शूद्रस्यारोगिणोपिप्रयागभिन्नेपिजलादिमरणमनुज्ञातं व्याधितोभिषजात्यक्तोविप्रोवृद्धोथवायुवा तनुंत्यजेज्जलाग्न्याद्यैःसयथेष्टंफलंलभेत् दुश्चिकित्स्यैर्महारोगैः पीडितोजीवनाक्षमः प्रविशेज्ज्वलनंदीप्तंकरोत्यनशनंतथा अगाधतोयराशिंचभृगोःपतनमेवच गच्छेन्महापथंवापितुषारगिरिमादरात् प्रयागवटशाखाग्राद्देहत्यागंकरोतिच उत्तमान्प्राप्नुयाल्लोकान्नात्मघातीभवेत्क्वचित् नराणामथनारीणांसर्ववर्णेषुसर्वदा आशौचंस्यात्त्र्यहंतेषांवज्रानलहतेतथा वाराणस्यांम्रियेद्यस्तुप्रत्याख्यातभिषक्क्रियः काष्ठपाषाणमध्यस्थोजान्हवीजलमध्यगः अविमुक्तोन्मुखस्तस्यकर्णमूलगतोहरः प्रणवंतारकंब्रूतेइत्यादिवचनोच्चयः पुराणस्थोमाधवादिनिबंधेषुसमुदाहृतः अत्रानुज्ञातेबुद्धिपूर्वकात्मघातेगृहस्थादीनामेवाधिकारः यतेस्तुनाधिकारः त्र्यहाद्याशौचविधानात् यतेःकाम्यकर्मण्यनधिकाराच्चेतिनिर्णयसिंधुः॥**

यानंतर विधीनें विहित जें जलादिकांत मरण त्याविषयीं सांगतों.—त्यामध्यें प्रयागाचे ठायीं रोगी, रोगरहित अशा सर्व वर्णांस भागीरथींत प्रवेश (जळसमाधि) इत्यादि केल्यानें मरण प्राप्त असतां इच्छित महाफल मिळतें. शूद्र रोगी नसेल तथापि त्यास प्रयागावांचून अन्य उदकादिकांतहि मरण विहित आहे. “व्याधिष्ठ, वैद्यानें टाकलेला, असा ब्राह्मण वृद्ध असो, अथवा तरुण असो, जल, अग्नि इत्यादि साधनांनीं जो तनूचें विसर्जन करील त्यास यथेष्ट फल मिळेल. चिकित्सा करण्यास अशक्य अशा महारोगांनीं पीडित यास्तव वांचण्याविषयीं असमर्थ अशा मनुष्यानें प्रदीप्त अग्नींत प्रवेश करावा. तसेंच उपोषणें करावीं. खोल उदकाच्या डोहांत प्रवेश करावा. किंवा उंच कड्यावरून उडी टाकावी. उत्तरयात्रा करावी अथवा आदरेंकरून हिमालयाप्रत जावें. प्रयागक्षेत्रीं वटवृक्षाचे शाखाग्रावरून भागीरथींत जो देहाचा त्याग करितो तो आत्मघाती होत नाहीं व त्यास उत्तम लोक प्राप्त होतात. याप्रमाणें देहविसर्जन करणारे सर्व वर्णांतले पुरुष, स्त्रिया व विजेनें मृत त्यांचेंहि तीन दिवस आशौच धरावें. असाध्य झाल्यामुळें औषधोपचार बंद केले होत्साता जान्हवीचे उदकांत मध्यभागीं स्थित, अथवा काष्ठ, पाषाण यांमध्यें स्थित जो वाराणसी क्षेत्रांत मृत

होतो व काशीस जाण्याविषयीं उन्मुख त्याचे कर्णमूलस्थ विश्वेश्वर होऊन तारकप्रणवाचा उपदेश करितो इत्यादिक पुराणांतलीं वाक्यें माधवादिकांचे ग्रंथांत सांगितलीं आहेत." ह्या स्थलीं शास्त्रानें अनुज्ञात जी बुद्धिपूर्वक आत्महत्या तीविषयीं गृहस्थाश्रमी इत्यादिकांसच अधिकार आहे, संन्यास्याला तर अधिकार नाहीं; कारण, तीन दिवस इत्यादिक आशौचाचें विधान केलें आहे, व संन्यासी यास काम्य कर्माचा अधिकार नाहीं असें निर्णयसिंधु सांगतो.

---

**इदानींतनशिष्टास्तुरोगादिपीडांसोढुमशक्तौसंन्यासाश्रमंगृहीत्वातीर्थादिनात्मघातंकुर्वंति गृहस्थविधुरादयश्चनकुर्वंति केचित्त्वपरिहार्यरोगादिग्रस्तवृद्धादेर्जलादिनाबुद्ध्यात्मघातःकलौप्रयागभिन्नदेशेनभवति भृग्वग्निपतनैश्चैववृद्धादिमरणंतथेतिकलिवर्ज्येषुपरिगणनादित्याहुः एतन्मतेमरणांतप्रायश्चित्तविधयःकाशीखंडादौविप्रादेर्देहत्यागविधयश्चयुगांतरपराः प्रयागमरणंस्त्रीणांसहगमनंचकलियुगेसर्वसंमतं अत्रसर्वत्रसहगमनभिन्नेविधिवाक्यानुज्ञाते देहत्यागेत्रिरात्रमाशौचमितिबहवः दशाहमितिकेचित् एवंफलकामनयाविहितेकाम्यप्रयागमरणेपिपक्षद्वयंज्ञेयं ॥**

विद्यमानकालचे शिष्ट तर रोगादिकांची पीडा सहन करण्याविषयीं असमर्थ असतां संन्यासाश्रम घेऊन तीर्थादि साधनेंकरून आत्महत्या करितात, गृहस्थाश्रमी, विधुर इत्यादिक करीत नाहींत. कोणी ग्रंथकार तर, परिहार होण्यास अशक्य अशा रोगादिकानें ग्रस्त झालेल्या वृद्धादिकाची, जलादिसाधनानें बुद्धिपूर्वक आत्महत्या कलियुगामध्यें प्रयागावांचून अन्यदेशीं होत नाहीं; कारण, "भृगु, अग्नि यांचे ठायीं जीं पतनें त्यांहींकरून वृद्धादिकांचें मरण" याप्रमाणें कलिवर्ज्यांत परिगणन केलें आहे असें ह्मणतात. ह्या मतीं मरणांतप्रायश्चित्तविधि, व काशीखंड इत्यादि ग्रंथांत ब्राह्मणादिकांस सांगितलेले देहत्यागविधि हे अन्ययुगपर होत. प्रयागमरण, स्त्रियांचें सहगमन हीं कलियुगीं सर्वसंमत आहेत. एथें सर्व ठिकाणीं सहगमनावांचून इतर जो विधिवाक्यानें अनुज्ञात देहत्याग त्याविषयीं त्रिरात्र आशौच असें बहुत ग्रंथकार ह्मणतात, दहा दिवस आशौच असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. याप्रमाणें फलाच्या इच्छेनें विहित जें कामनिक प्रयागमरण त्याविषयींहि दोन पक्ष ( त्रिरात्र, अथवा दहा दिवस ) जाणावे.

---

**अथयःपतितोघटस्फोटेनबहिष्कृतोयश्चम्लेच्छीकृतोयश्चप्रायश्चित्तानर्हपापीतस्यत्रिविधस्य पितृमातृभिन्नस्यपतितोदकविध्यनंतरं सपिंडीकरणवर्ज्यमंत्यकर्मपितुर्मातुश्चत्रिविधस्यापिनारायणबलिपूर्वकंसपिंडीकरणसहितंसर्वंभवतीत्युक्तं तत्रपतितोदकदानविधिर्यथा सर्वगांदासीमाहूयतस्यैवेतनंदत्वाअशुद्धपूर्णघटहस्तांतांब्रूयात् हेदासिगच्छमूल्येनतिलान्तोयपूर्णमिमं घटंचशीघ्रमानयततोदक्षिणामुखीउपविश्यवामपादेनतंघटंसतिलंक्षिप घटक्षेपणकालेचामुकसंज्ञकपतितप्रेतपिबपिबेतिमुहुरुच्चारयेति सादासीतद्वाक्यंश्रुत्वामूल्यंगृहीत्वातथाकुर्यात् एवंकृतेपतिततृप्तिर्नान्यथा एतच्चपतितस्यमृतदिनेकार्यं इतिपतितोदकविधिः इतिमृतदोषतआशौचापवादःसप्रसंगःसविस्तरोनिरूपितः ॥**

यानंतर जो घटस्फोट करून बहिष्कृत केलेला पतित, म्लेच्छ झालेला व जो प्रायश्चित्तास अयोग्य असा पापी असे तीन प्रकारचे, मातापितरांहून निराळे त्यांचा पतितोदकविधि झाल्यानंतर सपिंडीकरण वर्ज्य करून अंत्यकर्म व पिता, माता आणि तीन प्रकारचे यांचेंहि नारायणबलिपूर्वक व सपिंडीकरणासहित सर्व अंत्यकर्म होतें असें सांगितलें. त्यांमध्यें पतितोदकदानाचा विधि असा— सर्वांप्रत गमन करणारी असी दासी बलावून तिला वेतन ( मजुरी ) देऊन कुत्सितोदकानें पूर्ण घट हातांत घेतलेली अशा दासीप्रत सांगावें, हे दासि, जा, उदकानें भरलेला घट व मौल्य देऊन तिळ हीं शीघ्र घेऊन ये. तदनंतर दक्षिणदिशेस सम्मुख होत्साति बसून डाव्या पायानें तो घट तिळांसहित ढकलून दे, घट ढकलण्याच्या कालींहि **"अमुकसंज्ञक पतित प्रेत पिब पिब"** (हे अमुकसंज्ञ, पतित प्रेता, प्राशन कर, प्राशन कर,) असा वारंवार उच्चार कर. नंतर त्या दासीनें तें वाक्य श्रवण करून मौल्य घेऊन तसें करावें. याप्रमाणें केलें असतां पतिताची तृप्ति होते, अन्यथा होत नाहीं. हा विधि पतिताचे मृत दिवसीं करावा. याप्रमाणें पतितोदकदानाचा विधि सांगितला. याप्रमाणें मृतदोषेंकरून आशौचाचा अपवाद प्रसंगासहित व विस्तारपूर्वक निरूपण केला.

---

**अथविधानतः यतेर्मृतावाशौचंनास्ति तस्यप्रेतक्रियोदकदानाशौचसपिंडीकरणादेर्निषिद्धत्वात् सपिंडीस्थानएकादशेहनिपार्वणश्राद्धमात्रंकार्यं प्रतिसांवत्सरिकश्राद्धदर्शश्राद्धादिकंतुपार्वणविधिनासपिंडकंभवत्येव अत्रविस्तरोग्रंथांतरेवक्ष्यते एतच्चत्रिदंडिनामेकदंडिनांहंसपरमहंसादीनांसर्वेषामेवज्ञेयं एवंवानप्रस्थमरणेपिनाशौचं कृतजीवच्छ्राद्धेमृतेसपिंडैराशौचादिकर्तव्यंनवेतिविकल्पः ब्रह्मचारिमृतौत्वाशौचमस्त्येव युद्धमृतेप्याशौचंनेतिसर्वग्रंथेषूपलभ्यते नत्वेवंब्राह्मणेषुशिष्टाचारः इतिपंचधाशौचापवादोनिरूपितः ॥**

**यानंतर विधानेंकरून अपवाद सांगतों.**—संन्यासी मृत असतां आशौच नाहीं; कारण त्याची प्रेतक्रिया, उदकदान, आशौच आणि सपिंडीकरणादिक यांचा निषेध आहे. अकराव्या दिवसीं सपिंडीच्या स्थानीं पार्वणश्राद्ध मात्र करावें. प्रतिसांवत्सरिकश्राद्ध, दर्शश्राद्ध इत्यादिक तर, पार्वणविधीकरून सपिंडक होतेंच. याविषयीं विस्तार ग्रंथांतरीं सांगेल. हा निर्णय त्रिदंडीसंन्यासी, एकदंडी, हंस, परमहंस इत्यादि सर्व संन्यासी यांचा असाच जाणावा. याप्रमाणें वानप्रस्थ मृत असतांहि आशौच नाहीं. जीवंत असतांच आपलीं श्राद्धें ज्यानें केलीं तो मृत होईल तर सपिंडांनीं आशौच इत्यादिक धरावें किंवा न धरावें असा विकल्प आहे. ब्रह्मचारी मृत असेल तर आशौच आहेच. युद्धांत मृत असतां आशौच नाहीं असें सर्व ग्रंथांत मिळतें; परंतु ब्राह्मणामध्यें असा शिष्टाचार नाहीं. याप्रमाणें पांच प्रकारचा आशौचाचा अपवाद निरूपण केला.

---

**अथजीवतोप्याशौचं यथापतितस्यघटस्फोटकालेसर्वसपिंडानामेकाहमाशौचं ॥**

## यानंतर जीवंत असतांहि त्याचें आशौच सांगतों.

जसें;— पतिताच्या घटस्फोटसमयीं सर्व सपिंडांस जीवंताचें एक दिवस आशौच आहे.

---

इत्याशौचंसापवादंयथामतिनिरूपितं समर्पितंरुक्मिणीशश्रीमद्विठ्ठलपादयोः इतिसाप वादाशौचप्रकरणं ॥

याप्रकारें अपवादासहित आशौच यथामति निरूपण केलें तें रुक्मिणीपति जो श्रीमान् विठ्ठल त्याचे चरणीं समर्पित असो. याप्रमाणें अपवादासहित आशौचप्रकरण सांगितलें.

---

अथौर्ध्वदेहिकारंभोपयोगिनारायणबल्यादिप्रकारउच्यते तत्रदुर्मरणेष्वात्मघातेजलादि भिःप्रमादमरणे पतितादिमरणेचपूर्वोक्तव्यवस्थयामुकगोत्रस्यामुकशर्मणोमुकदोषनाशार्थमौ र्ध्वदेहिकेसंप्रदानत्वयोग्यतासिद्ध्यर्थममुकप्रायश्चित्तममुकदानंवाकरिष्यइत्यादिसंकल्पपूर्वकं तत्तत्प्रायश्चित्तंदानंचकार्यं अशक्तौदानमेवकार्यं ततोमुकगोत्रामुकशर्मणोमुकदुर्मरणदोषना शार्थमौर्ध्वदेहिकप्रदानत्वयोग्यतासिद्ध्यर्थं नारायणबलिंकरिष्यइतिसंकल्प्य पूर्वार्धोक्तसंत तिफलककाम्यनारायणबलिवत्सर्वंकुर्यात् एतत्तुवर्षांतरकरणपक्षे सद्यःकरणपक्षेतुपूर्वोक्त द्विगुणप्रायश्चित्तंसंकल्प्यशुक्लैकादश्यादिकालमनपेक्ष्यैवसमनंतरोक्तसंकल्पंकृत्वाविधिनास्था पितेकलशद्वयेहेमप्रतिमयोर्विष्णुंवैवस्वतंयमंचावाह्य पुरुषसूक्तेनयमायसोममितिचक्रमेणषो डशोपचारैःसंपूज्य तत्पूर्वभागेरेखायांदक्षिणाग्रकुशानास्तीर्यशुंधंतांविष्णुरूप्यमुकप्रेतइतिद शस्थानेष्वपोनिनीयमधुघृततिलमिश्रानोदनपिंडान्दशामुकगोत्रामुकशर्मप्रेतविष्णुदेवतायंते पिंडइतिदक्षिणसंस्थान्प्राचीनावीतीत्यादिपैतृधर्मेणदद्यात् गंधादिभिरभ्यर्च्यप्रवाहणांतंकृ त्वानद्यांक्षिपेत् श्वःसद्योवापूर्वस्थापितंविष्णुमभ्यर्च्यैकविप्रेविप्रालाभेदर्भबटौवा पादक्षालना दितृप्तिप्रश्नांतंविष्णुरूपप्रेतावाहनपूर्वकंकृत्वाविप्रसमीपेतूष्णींरेखाःकृत्वा दर्भास्तरणेअपोनिन यनंचकृत्वादर्भेषुसव्येनविष्णवेब्रह्मणेशिवायचसपरिवाराययमायचेति चतुर्भ्यः पिंडचतुष्टयंद त्वापसव्येनविष्णुरूपिप्रेतामुकगोत्रनामायंतेपिंडइत्येकंपंचमंपिंडंदत्वा तथैवाभ्यर्च्यप्रवाहणां तेविप्राचांततादिश्राद्धशेषसमापनांतेप्रेतबुद्ध्याविप्रायवस्त्राभरणादिदत्वा विप्रेणप्रेतायतिलांज लिंदापयेत् अमुकगोत्रायामुकशर्मणेविष्णुरूपिणेप्रेतायायंतिलतोयांजलिरितिमंत्रेण विप्राला भेस्वयंदद्यात् ततोविप्रान्वाचयेत् अनेननारायणबलिकर्मणाभगवान्विष्णुरिमममुकंप्रेतंशुद्ध मपापमर्हंकरोत्विति काम्यप्रयोगेस्मिन्प्रयोगेचसंकल्पेनामगोत्रोच्चारेचविशेषः स्पष्टएव पूर्व त्रकाश्यपगोत्रदेवदत्तप्रेतेत्याद्युच्चारःअत्रतुगोत्रनामज्ञानसत्त्वाद्दुर्मरणेनमृतस्ययन्नामगोत्रंतदे वोच्चारयेदितिसंकल्पेविशेषेपिहेतुःस्पष्टएवेति इतिदुर्मरणेऔर्ध्वदेहिकाधिकारार्थंनारायणब लेःप्रयोगः ॥

## यानंतर और्ध्वदेहिक कर्मांचे आरंभास उपयोगी असा नारायणबलि इत्यादि प्रकार सांगतों.

त्यामध्यें दुर्मरणें, आत्महत्या, असावधपणानें उदकादिकांपासून मरण, आणि पतितादि मरण हीं असतां पूर्वी सांगितलेल्या व्यवस्थेनें "अमुकगोत्रस्यामुकशर्मणोमुकदोषनाशार्थ- मौर्ध्वदेहिके संप्रदानत्वयोग्यतासिद्ध्यर्थं अमुकप्रायश्चित्तममुकदानंवा करिष्ये," इत्यादिक

संकल्प पूर्वी करून तें तें प्रायश्चित्त व दान करावें. प्रायश्चित्ताविषयीं असामर्थ्य असल्यास दानच करावें. तदनंतर "अमुकगोत्रामुकशर्मणोमुकदुर्मरणदोषनाशार्थमौर्ध्वदेहिकप्रदानत्वयोग्यतासिद्ध्यर्थं नारायणबलिं करिष्ये," असा संकल्प करून पूर्वार्धामध्यें सांगितलेला जो संततिफलक ( संतति होणें हें ज्याचें फल तो ) असा कामनिक नारायणबलि त्याप्रमाणें सर्व कर्म करावें. हें जें सांगितलें तें 'वर्षांतीं करणें,' असा पक्ष असतां जाणावें. 'तत्कालीं करणें' असा पक्ष असेल तर, पूर्वी सांगितलेल्या दुप्पट प्रायश्चित्ताचा संकल्प करून शुक्लपक्षांतील एकादशी इत्यादि कालाची अपेक्षा न करितां समीप सांगितलेला संकल्प करून यथाविधि स्थापित केलेल्या दोन कलशांवर दोन सुवर्णप्रतिमा स्थापून त्या प्रतिमांवर विष्णु, व वैवस्वत यम यांचें आवाहन करून पुरुषसूक्तानें व "यमायसोमं०" ह्या मंत्रानें क्रमेंकरून षोडशोपचारांनीं पूजा करून त्याच्या पूर्व प्रदेशीं रेखेवर दक्षिण दिशेस अग्रें होतील असे दर्भ विस्तृत करून "शुंधंतां विष्णुरूपी अमुक प्रेत," असें वाक्य ह्मणून दहा ठिकाणीं उदक देऊन मध, घृत आणि तिल ज्यांत मिश्र केले अशा भाताचे दहा पिंड, "अमुकगोत्रामुकशर्मप्रेत विष्णुदेवतायं ते पिंडः" असें ह्मणून दक्षिणसंस्थ असे प्राचीनावीती इत्यादिक पितृधर्मेंकरून द्यावे. नंतर गंधादिक उपचारांनीं त्या पिंडांची पूजा करून पिंडप्रवाहणापर्यंत कर्म करून ते पिंड नदींत टाकावे. दुसऱ्या दिवसीं किंवा तत्कालीं, पूर्वी स्थापन केलेल्या विष्णूची पूजा करून एका ब्राह्मणाचेठायीं, अथवा ब्राह्मण न मिळेल तर दर्भबटूचे ठायीं विष्णुरूपी प्रेताचें पूर्वी आवाहन करून पादप्रक्षालनापासून तृप्तिप्रश्नापर्यंत कर्म करावें. नंतर त्या ब्राह्मणाचे समीप रेखा काढून त्यावर दर्भ पसरून त्या दर्भावर उदक देऊन त्यांवर सव्यानें "विष्णवे ब्रह्मणे शिवाय च सपरिवाराय यमायच" असें ह्मणून चवघांस चार पिंड देऊन अपसव्येंकरून "विष्णुरूपिप्रेतामुकगोत्रनामायंते पिंडः" असें ह्मणून एक पांचवा पिंड देऊन तसीच पूजा करून पिंडप्रवाहणांत कर्म केल्यानंतर ब्राह्मणांचें आचवणें इत्यादि श्राद्धशेषसमाप्तिपर्यंत कर्म झाल्यानंतर प्रेतबुद्धीनें ब्राह्मणांस वस्त्रें, आभरणें इत्यादि देऊन ब्राह्मणांकडून प्रेताकारणें तिलांजलि देववावा. तिलांजलि देण्याचा मंत्र—"अमुकगोत्रायामुकशर्मणे विष्णुरूपिणे प्रेताय तिलतोयांजलिः." ब्राह्मण न मिळेल तर स्वतां द्यावा. तदनंतर ब्राह्मणाकडून बोलवावें. तें असें—"अनेन नारायणबलिकर्मणा भगवान् विष्णुरिमममुकं प्रेतं शुद्धमपापमर्हं करोतु." काम्यप्रयोगीं व ह्या प्रयोगीं संकल्प आणि नामगोत्रांचा उच्चार यांविषयीं विशेष प्रकार स्पष्टच आहे. पूर्वीच्या काम्य प्रयोगांत, "काश्यपगोत्र देवदत्तप्रेत" इत्यादिक उच्चार करावा. ह्या प्रयोगांत तर, गोत्र व नाम यांचें ज्ञान आहे यास्तव दुर्मरणानें जो मृत झाला त्याचें जें नाम, गोत्र तेंच उच्चारावें. याप्रमाणें संकल्पविशेषाविषयींहि हेतु स्पष्टच आहे. याप्रकारें दुर्मरण असतां अंत्यकर्माच्या अधिकाराकरितां नारायणबलीचा प्रयोग सांगितला.

---

अथसर्पहतेव्रतं प्रतिमासंशुक्लपंचम्यांउपवासंनक्तंवाकृत्वापिष्टमयंनागंपंचफणमनंत वासुकिशंखपद्मकंबलकर्कोटकाश्वतरधृतराष्ट्रशंखपालकालियतक्षककपिलेति द्वादशनाम

भिर्द्वादशमासेषुसंपूज्यपायसेनविप्रान्संभोज्यवत्सरांतेहेमनागंप्रत्यक्षांगांचदत्वा नारायणब लिपूर्वकंदाहाशौचादिकंकार्यम् अथवानमोअस्तुसर्पेभ्यइतितिस्रआज्याहुतीर्जुहुयात् पंचम्यां पन्नगंहैमंस्वर्णेनैकेनकारयेत् क्षीराज्यपात्रमध्यस्थंपूज्यविप्रायदापयेत् प्रायश्चित्तमिदंप्रोक्तं नागदष्टस्यशंभुनेति ततोनारायणबल्यादि ॥

## यानंतर सर्पानें मृत असतां व्रत सांगतों.

प्रत्येक मासामध्यें शुक्लपंचमीचे दिवसीं उपोषण अथवा नक्त करून पांच फणांचा असा पिठाचा नाग करून अनंत, वासुकि, शंख, पद्म, कंबल, कर्कोटक, अश्वतर, धृतराष्ट्र, शंखपाल, कालिय, तक्षक आणि कपिल याप्रमाणें बारा नामांनीं बारा मासांमध्यें पूजा करून. पायसेंकरून ब्राह्मणांस भोजन घालून वर्षांतीं सुवर्णाचा नाग व प्रत्यक्ष गाय यांचें दान करून नारायणबलि करून दहन, आशौच इत्यादिक करावें. अथवा "नमोअस्तुसर्पेभ्यो०" या मंत्रेंकरून तीन घृताच्या आहुतींनीं होम करावा. "पंचमीचे दिवसीं ऐशीं गुंजापरिमित सुवर्णाचा नाग करवून दुग्ध, आणि घृत यांहीं युक्त पात्रांत तो नाग ठेवून पूजा करून ब्राह्मणास द्यावा. नागाचे दंशानें जो मृत झाला त्याविषयीं हें प्रायश्चित्त शंभूनें सांगितलें आहे." तदनंतर नारायणबलि इत्यादि विधि करावा.

---

अथपालाशप्रतिकृतिदाहादिविधिः तत्रदेशांतरमरणेपराकद्वयमष्टौकृच्छ्रान्वाकृत्वास्थीनिदहेत् अस्थ्नांचांडालश्वादिस्पर्शेपंचगव्योदकादिभिःप्रक्षाल्यदहेत् यस्यास्थीनिसर्वथान लभ्यंतेतस्यपर्णशरदाहः कुर्याद्दर्भमयंप्रेतंकुशैस्त्रिशतषष्टिभिः पालाशीभिःसमिद्भिर्वासंख्या चैवंप्रकीर्तिता तत्रभूमौकृष्णाजिनमास्तीर्यतत्रशरंदक्षिणायतंनिवेश्यतत्रपलाशवृंतानिन्यसेत् शिरसिचत्वारिंशत् ४० ग्रीवायांदश १० बाह्वोःप्रत्येकंपंचाशदेवंशतं १०० करांगुलीषु दश १० उरसिविंशतिः २० जठरेत्रिंशत् ३० शिश्नेचत्वारि ४ अंडयोस्त्रयंत्रयं ६ ऊर्वोःप्रत्येकंपंचाशदेवंशतं १०० जंघातःपादतलांतंप्रत्येकंपंचदशैवं ३० पादांगुलीषुदश १० एवंषष्ट्यधिकशतत्रयमितैर्दर्भैःपालाशसमिद्भिर्वाशरीरंकृत्वाऊर्णावस्त्रेणबध्वाजलमिश्रपिष्टेनलिंपेत् शक्तौसत्यांनारिकेरादीन्यपि तथाहि शिरसिनारिकेरफलंवर्तुलालाबुवा ललाटेकदलीपत्रं दंतेदाडिमबीजानि कर्णयोःकंकणंब्रह्मपत्रंवा चक्षुषोःकपर्दौ २ नासिकायांतिलपुष्पं नाभावब्जं स्तनयोर्जंबीरफलद्वयं वातेमनःशिलां पित्तेहरितालं कफेसमुद्रफेनं रुधिरे मधु पुरीषेगोमयं मूत्रेगोमूत्रं रेतसिपारदं वृषणयोर्वृंताकद्वयं शिश्नेगृंजनं केशेषुवनसूकरसटावटप्ररोहावा लोमसुऊर्णा मांसेमाषपिष्टलेपः पंचगव्यैःपंचामृतैश्चसर्वतःसिंचनं पुनर्नो असुं० असुनीतेइत्यृग्भ्यांप्राणप्रवेशंभावयेत् यद्वा यत्तेयममितिसूक्तेनशुक्रमसीतिपारदंक्षिप्त्वाअक्षीभ्यामितिशरीरंस्पृशेत् शरीरंस्नापयित्वा चंदनमनुलिप्य वस्त्रोपवीतेपरिधाप्य अयंसदेवदत्तइत्यभिमृश्य इदंचास्योपासनमितिध्यात्वाविधिवद्दाहादिकार्यं अत्राहिताग्नेरस्थिदाहेपर्णशरदाहेवादशाहमाशौचमनाहिताग्नेस्त्र्यहमित्यादिप्रागुक्तमनुसंधेयं द्वादशाब्दादिप्रतीक्षोत्तरंपर्णशरदाहादिक्रियतेचेत्तदात्रिंशत्कृच्छ्राणिचांद्रायणत्रयंवाकृत्वाकार्यं ॥

## यानंतर पळसाच्या समिधाचा पुतळा करून दहनादिविधि सांगतों.

त्यामध्यें देशांतरीं मृत असतां दोन पराक अथवा आठ कृच्छ्र प्रायश्चित्त करून अस्थींचें दहन करावें. चांडाल, कुत्रा इत्यादिकांचा स्पर्श अस्थींस झाला असेल तर पंचगव्य, उदक इत्यादिकांनीं त्या प्रक्षालन करून दहन करावें. सर्वथा ज्याच्या अस्थि मिळत नाहीं त्याचें पर्णशरविधीनें दहन करावें. " तीनशें साठ कुश घेऊन त्यांहींकरून दर्भांचा प्रेत करावा. अथवा तीनशें साठ पळसाच्या समिधांनीं करावा, याप्रमाणें संख्या सांगितली." त्याविषयीं— भूमीवर कृष्णाजिन हातरून त्या कृष्णाजिनावर एक शरसंज्ञक तृण दक्षिणायत ठेवून त्याजवर पळसाचीं वृंतें ( तिकटीं ) स्थापावीं. तीं असीं—मस्तकीं ४०; मानेवर १०; प्रत्येक बाहूवर ५० मिळून १००; हस्तांचे बोटांवर १०; वक्षस्थलावर २०; जठरावर ३०; शिश्नावर ४; अंडावर तीन तीन मिळून ६; प्रत्येक मांडीवर पन्नास मिळून १००; जंघेपासून पायांचे तळव्यापर्यंत प्रत्येकास पंधरा मिळून ३०; पायांचे बोटांवर १०, याप्रमाणें तीनशें साठ दर्भ अथवा पळसाच्या समिधा यांहींकरून शरीर करून तें लोंकरीचे वस्त्रानें बांधून उदकमिश्र पिठानें लिंपावें. शक्ति असेल तर नारळ इत्यादिकाहि घालावीं. तीं असीं—मस्तकाचे ठिकाणीं नारळ किंवा वाटोळा भोपळा; ललाटाचे ठिकाणीं केळीचें पान; दांतांचे ठिकाणीं डाळिंबाच्या बिया; कानाचे ठिकाणीं कंकण किंवा ब्रह्मपत्र; नेत्रांचे ठायीं दोन कवड्या; नासिकास्थानीं तिलपुष्प; नाभीचे ठायीं कमळ; स्तनांचे ठायीं दोन जांभळें; वातस्थानीं मनःशीळ; पित्तस्थानीं हरताळ; कफस्थानीं समुद्रफेण; रुधिरस्थानीं मध; पुरीषस्थानीं गोमय; मूत्रस्थानीं गोमूत्र; रेतस्थानीं पारा; वृषणांच्या स्थानीं दोन वांगीं; शिश्नस्थानीं गाजर; केशस्थानीं वनडुकराचे सड ( केंश ), अथवा वडाच्या पारांब्या; लोमांच्या स्थानीं लोंकर; मांसस्थानीं उडदांचे पिठाचा लेप; पंचगव्यें व पंचामृतें यांहींकरून सर्वत्र सिंचन करावें. नंतर "पुनर्नो- असुं० असुनीते० " ह्या दोन ऋचा ह्मणून प्राणांचा प्रवेश झाला असी भावना करावी. अथवा " यत्तेयमं० " ह्या सूक्तानें व " शुक्रमसि० " ह्या मंत्रानें पारा घालून " अक्षीभ्यां० " ह्या मंत्रानें शरीरास स्पर्श करावा. नंतर शरीरास स्नान घालून चंदनाचें लिंपन करून वस्त्र व यज्ञोपवीत परिधान करवून " अयंसदेवदत्तः " असें वाक्य ह्मणून स्पर्श करून " इदंचास्योपासनं " असें ह्मणून ध्यान करून यथाविधि दहनादिक करावें. ह्या स्थलीं आहिताग्नीचा अस्थिदाह, अथवा पर्णशरदाह हीं असतां दहा दिवस आशौच, व अनाहिताग्नीचें तीन दिवस आशौच इत्यादिक पूर्वीं सांगितलेला निर्णय जाणावा. बारा वर्षें इत्यादि कालपर्यंत प्रतीक्षा केल्यानंतर पर्णशरदाह इत्यादि कर्म कर्तव्य असेल तर त्या कालीं तीस कृच्छ्र अथवा तीन चांद्रायणें करून करावें.

---

**अथातीतप्रेतसंस्कारकालः प्रत्यक्षशवसंस्कारेदिनंनैवविशोधयेत् आशौचमध्येसंस्कारे दिनंशोध्यंतुसंभवे दशाहोत्तरंतुदिनंसंशोध्यैवग्राह्यं तत्रवत्सरादूर्ध्वंक्रियमाणप्रेतकर्मण्युत्त रायणमेवश्रेष्ठं तत्रापिकृष्णपक्षएव तत्रनंदात्रयोदशीचतुर्दशीदिनक्षयान्वर्जयेत् शुक्रशनि वारौवर्ज्यौ भौमवारोपिवर्ज्यइत्येके नक्षत्रेषुभरणीकृत्तिकार्द्राश्लेषामघाज्येष्ठामूलधनिष्ठोत्त**

रार्धंशततारकादिचतुष्टयंचेतिनक्षत्राणि त्रिपुष्करयोगश्चेत्यतिदुष्टानिसर्वथात्यजेत् कृत्तिका पुनर्वसूत्तराफल्गुनीविशाखोत्तराषाढापूर्वाभाद्रपदाचेतित्रिपादनक्षत्राणि द्वितीयासप्तमीद्वादशीचतिथिः कुजशनिरविवाराश्चेतित्रयाणांयोगेत्रिपुष्करः कैश्चिद्रविस्थानेगुरुवारउक्तः एतेष्वेवतिथिवारेषुमृगचित्राधनिष्ठायोगेद्विपुष्करः त्रिपुष्करयोगोवृद्धौलाभेनष्टेहृतेमृतौचत्रिगुणफलदः द्विपुष्करोद्विगुणफलदः तेनप्रेतकार्येद्वावपित्याज्यौ द्वयोर्योगेद्विपुष्करइतिकश्चित् गुरुशुक्रास्तपौषमासमलमासावैधृतिव्यतीपातपरिघयोगाः विष्टिःकरणं चतुर्थाष्टमद्वादशचंद्रश्चेत्यपिसर्वथात्यजेत् रोहिणीमृगपुनर्वसुपूर्वोत्तराफल्गुनीचित्राविशाखाऽनुराधापूर्वोत्तराषाढाधनिष्ठेतिकिंचिद्दुष्टानि संभवेत्यजेत् भौमवारोपित्याज्यइत्येके कर्तुस्तिसृषुजन्मतारासुप्रत्यरितारायांचपर्णशरादिदाहोनेष्टः ॥

## यानंतर अतीत ( अतिक्रांत ) अशा प्रेतसंस्काराचा काल सांगतों.

“ प्रत्यक्ष शवसंस्काराविषयीं दिनशुद्धीचा विचार करूं नये. आशौचामध्यें संस्कार करणें त्याविषयीं संभव असतां दिनशुद्धीचा विचार करवा. ” दहा दिवसांनंतर तर, दिनशुद्धि पाहूनच दिवस घ्यावा. त्यामध्यें वर्षानंतर करावयाचें जें प्रेतकर्म त्याविषयीं उत्तरायणच श्रेष्ठ आहे. त्यामध्येंहि कृष्णपक्षच घ्यावा, त्यामध्यें नंदा ( प्रतिपदा, षष्ठी, एकादशी ), त्रयोदशी, चतुर्दशी आणि दिनक्षय हे वर्ज्य करावे. शुक्र, शनि हे वार वर्ज्य होत. भौमवारहि वर्ज्य होय, असें कोणी ह्मणतात. नक्षत्रांमध्यें,भरणी, कृत्तिका, आर्द्रा, आश्लेषा, मघा, ज्येष्ठा, मूळ, धनिष्ठांचें उत्तरार्ध आणि शततारकादि चार हीं नक्षत्रें व त्रिपुष्करयोग याप्रमाणें अतिदुष्ट हीं सर्वथा वर्ज्य करावीं. कृत्तिका, पुनर्वसु, उत्तराफल्गुनी, विशाखा, उत्तराषाढा, पूर्वाभाद्रपदा, याप्रमाणें हीं त्रिपाद नक्षत्रें व द्वितीया, सप्तमी, द्वादशी ह्या तिथि; मंगळ, शनि व रवि हे वार या तिघांचा योग असतां त्रिपुष्कर योग होय. कितीएकांनीं रविस्थानीं गुरुवार सांगितला आहे. ह्याच तिथि व वार असून मृग, चित्रा, धनिष्ठा यांचा योग असतां द्विपुष्कर योग होतो. वृद्धि, लाभ, नष्ट, चोरी आणि मरण यांच्या ठायीं त्रिपुष्करयोग असतां तो त्रिगुणफल देतो, व द्विपुष्करयोग द्विगुणफल देतो, त्याकरितां प्रेतकार्याविषयीं दोनहि वर्ज्य करावे. दोहोंचा योग असतां द्विपुष्कर होतो असें कोणी ग्रंथकार ह्मणतो. गुरुशुक्रांचें अस्त; पौषमास; मलमास; वैधृति; व्यतीपात; परिघयोग; भद्राकरण; चतुर्थ, अष्टम, द्वादश, या स्थानींचा चंद्र हींहि सर्वथा वर्ज्य करावीं. रोहिणी, मृग, पुनर्वसु, पूर्वा, उत्तराफल्गुनी, चित्रा, विशाखा, अनुराधा, पूर्वाषाढा, उत्तराषाढा आणि धनिष्ठा हीं नक्षत्रें किंचित् दुष्ट होत; याकरितां संभव असतां टाकावीं. मंगळवारहि टाकावा असें कितीएक ह्मणतात. कर्त्याच्या तीन जन्मतारा, आणि प्रत्यरितारा यांचे ठायीं पर्णशरादि दहन इष्ट नाहीं.

---

१ जन्मनक्षत्रे ततोदशमैकोनविंशेचनक्षत्रेइत्यर्थः ॥

२ जन्मनक्षत्र, जन्मनक्षत्रापासून दहावें व एकुणिसावें नक्षत्र ह्यांचे ठायीं असा अर्थ.

तथाचार्कगुरुचंद्रवाराअश्विनीपुष्यहस्तस्वातीश्रवणभानिचप्रशस्तानि मध्यमानिसर्वथा त्याज्यानिचोक्तानि नंदायांशुक्रवारेचतुर्दश्यांत्रिजन्मताराप्रत्यरितारासुचैकोद्दिष्टश्राद्धमतिनिंद्यं साक्षादेकादशाहेनकोपिनिषेधः ॥

तसेंच रवि, गुरु, सोम, हे वार; अश्विनी, पुष्य, हस्त, स्वाति, श्रवण हीं नक्षत्रें प्रशस्त होत. मध्यम व सर्वथा त्याज्य हीं सांगितलीं. नंदातिथि, शुक्रवार, चतुर्दशी, तीन जन्मतारा आणि प्रत्यरितारा यांचे ठायीं एकोद्दिष्टश्राद्ध अतिनिंद्य होय. प्रत्यक्ष अकराव्या दिवशीं कोणताहि दोष नाहीं.

---

अस्यनिषिद्धनक्षत्रादेरपवादः युगमन्वादिसंक्रांतिदर्शेचप्रेतकर्मणि पुनःसंस्कारादिकेपिनक्षत्रादिनशोधयेत् गुरुभार्गवयोर्मौढ्येपौषमासेमलिम्लुचे नातीतःपितृमेधःस्याद्गयांगोदावरींविना इतिपुनःसंस्कारकालः ॥

हीं जीं निषिद्ध नक्षत्रादिक यांचा अपवाद.— " युगादि, मन्वादि, संक्रांति, दर्श, प्रेतकर्म आणि पुनःसंस्कारादि यांविषयीं नक्षत्रादिकांचा विचार करूं नये. गुरुशुक्रांचें अस्त, पौषमास, मलमास हीं असतां अतिक्रांत ( अंतरलेलें ) पितृकर्म, गया व गोदावरी, यांवांचून होत नाहीं. याप्रमाणें पुनःसंस्काराचा काल सांगितला.

---

साग्निकस्यपर्णशरदाहेकृतेपश्चाद्देहलाभेपर्णशरदाहीयार्धदग्धकाष्ठैस्तंदहेत् तादृशकाष्ठालाभेलौकिकाग्निनादग्ध्वातदस्थीनिमहाजलेक्षिपेत् एवमन्येषांनिरग्नीनामपिपर्णशरदाहोत्तरंशरीरलाभेस्थिलाभेवायोज्यं अमृतंमृतमाकर्ण्यकृतंयस्यौर्ध्वदेहिकम् प्रायश्चित्तमसौस्मार्तंकृत्वाग्नीनादधीतच अत्रपुनःसंस्कारादिप्रकारःपूर्वार्धेउक्तः आधानांतेआयुष्मतेष्टिः अनाहिताग्नेस्तुचरुः भर्तरिजीवत्येवमरणवार्तांश्रुत्वायदिस्त्रियासहगमनंकृतंतदातत्स्त्रीमरणमवैधमेव ज्ञातमरणमेवहिसहगमनेनिमित्तं नतुमरणज्ञानमात्रं अतस्तस्याभार्यायाआत्मघातादिदोषप्रायश्चित्तंतत्पुत्रादिभिःकृत्वानारायणबलिपूर्वकमौर्ध्वदेहिकंकार्यं भर्तुस्तुदाहाद्यौर्ध्वदेहिककरणनिमित्तमुक्तपुनःसंस्कारादिकार्यं ॥

साग्निकाचा पर्णशरदाह केल्यानंतर त्याचें शरीर मिळालें असतां पर्णशरदहनाचीं जीं अर्धदग्ध काष्ठें त्यांहींकरून त्या शरीराचें दहन करावें. तसीं काष्ठें न मिळालीं तर लौकिकाग्नीनें दहन करून त्याच्या अस्थि मोठ्या उदकांत टाकाव्या. याप्रमाणें इतर निरग्निकांचाहि पर्णशरदाह झाल्यानंतर शरीर मिळालें असतां अथवा अस्थि मिळाल्या असतां असाच निर्णय जाणावा. " मृत नसतां ' मृत झाला ' असी वार्ता श्रवण करून ज्याचें अंत्यकर्म केलें त्यानें स्मृत्युक्त प्रायश्चित्त करून अग्नीचें आधान करावें. " याविषयीं पुनःसंस्कारादिक प्रकार पूर्वार्धीं ( पुनरुपनयनप्रकरणीं ) सांगितला आहे. आधान केल्यानंतर आयुष्मतेष्टि करावी. अनाहिताग्नि असतां चरु करावा. भर्ता जीवंत असतांच मरणाची वार्ता श्रवण करून जर स्त्रियेनें सहगमन केलें तर तें स्त्रियेचें मरण अविधिच होय. ज्ञात मरण तेंच सहगमनाविषयीं निमित्त, केवळ मरणाचें ज्ञानमात्र निमित्त नाहीं, याकरितां त्या स्त्रियेचें आत्महत्यादि दोषांचें

प्रायश्चित्त तिच्या पुत्रादिकांनीं करून नारायणबलिपूर्वक अंत्यकर्म करावें. भर्त्याचें तर, दहनादिक अंत्यकर्म केलें तन्निमित्तक सांगितलेलें पुनःसंस्कारादिक करावें.

---

**क्वचित्जीवतोप्यंत्यकर्मविहितं यथाप्रायश्चित्तानिच्छोःपतितस्यघटस्फोटे तथाहिमहापातकेनोपपातकेनवापतितोयदिप्रायश्चित्तंनकरोतितदातंगुरूणांबांधवानांराज्ञश्चसमक्षमाहूय** तत्पापंप्रकटीकृत्यतंपुनःपुनरुपादिशेत् प्रायश्चित्तंकुरुष्वाचारंलभस्वेति सयद्येवमपिनांगीकरोतितदारिक्तादिनिंद्यतिथौसायान्हेसपिंडाबांधवाश्चसंभूयदासीहस्तेनानीतममेध्यकुत्सितजलादिपूर्णघटंसर्वतोदास्याद्यन्वारंभंकुर्वंतोदास्यादासस्यवावामपादेनन्युब्जंछिन्नाग्रदर्भेषुकारयित्वा दासीसहितावदेयुरमुमनुदकंकरोमीतिनामग्रहणपूर्वकंप्राचीनावीतिनोमुक्तशिखाश्चसंतःततोधिकारीकर्तादाहवर्ज्यंजीवंतमेवोद्दिश्यपिंडोदकदानादिप्रेतकार्याण्येकादशाहांतानिनाम्नैवकु**र्यात् मिताक्षरायांप्रेतकार्योत्तरंघटनिनयनमुक्तं एकाहमाशौचंसर्वेषां यस्यघटस्फोटःकृतस्तेन सह**संभाषणस्पर्शादिसंसर्गोनकेनापिकार्यः करणेपतिततुल्यता घटस्फोटप्रयोजनंतुपूर्वार्धांतेउ**क्तं** घटस्फोटनिश्चयोत्तरंघटस्फोटदिनात्प्राक्पतितज्ञातीनांधर्मकार्येष्वनधिकारइतिकश्चित् ॥

क्वचित् प्रसंगीं जीवंताचेंहि अंत्यकर्म करावें असें सांगितलें आहे. जसें;—प्रायश्चित्त घेण्याविषयीं इच्छा न करणाऱ्या पतिताचा घटस्फोट केला असतां तो घटस्फोटविधि सांगतों.—महापातक अथवा उपपातक येणेंकरून पतित ( बाटलेला ) असा जर प्रायश्चित्त करणार नाहीं तर गुरु, बांधव व राजा यांच्या समक्ष त्या पतितास बोलावून त्याचें पाप प्रकट करून त्यास पुनःपुनः उपदेश ( समजूत देणें ) करावा. तो असा—प्रायश्चित्त कर, आपला आचार ग्रहण कर, याप्रमाणें उपदेश केला असतांहि तो जर त्याचा अंगीकार न करील तर रिक्तादिक निंद्य तिथीचे दिवसीं सायान्हकालीं सपिंड व बांधव एकत्र मिळून दासीच्या हातून आणविलेला असा अशुद्ध व कुत्सित उदकादिकानें भरलेला घट ( सर्वत्र दासी इत्यादिकांस अन्वारंभ ( स्पर्श ) करीत होत्साते ) दासी अथवा दास यांतून कोणा एकाच्या डाव्या पायानें उपडा, अग्रें तोडलेल्या दर्भांवर करवून प्राचीनावीती केलेले असून शिखाविसर्जन केलें होत्साते दासीसहित सर्वांनीं त्याचें नामग्रहण करून "अमुमनुदकंकरोमि," असें बोलावें. तदनंतर अधिकारी कर्ता यानें दहन वर्ज्य करून जीवंताच्याच उद्देशेंकरून पिंड, उदकदान इत्यादि अकराव्या दिवसापर्यंतचीं प्रेतकार्यें नामेंकरूनच करावीं. मिताक्षरेमध्यें, प्रेतकार्य झाल्यानंतर घट न्यावा असें सांगितलें आहे. सर्वांस एक दिवस आशौच आहे. ज्याचा घटस्फोट केला त्याच्याशीं संभाषण, स्पर्श इत्यादिक संसर्ग कोणींहि करूं नये, केला असतां तो पतिताच्या तुल्य होतो. घटस्फोटाचें कारण तर, पूर्वार्धाचे अंतीं सांगितलें आहे. घटस्फोट करण्याचा निश्चय झाल्यानंतर घटस्फोटदिवसाचे पूर्वीं पतिताचे ज्ञातींस धर्मकार्याविषयीं अधिकार नाहीं असें कोणी ग्रंथकार ह्मणतो.

---

**कृतघटस्फोटस्यपुंसोनुतापेतत्पापप्रायश्चित्तांतेसंग्रहविधिरुच्यते तत्रादौशुद्धिपरीक्षा कृतप्रायश्चित्तोज्ञातिसमक्षंगोभ्यस्तृणभारंदद्यात् गोभिस्तृणेभक्षितेशुद्धिः भक्षणाभावेपुनःप्राय**

**श्चित्तंचरेत् एवंनिश्चितसंशुद्धौसमानेयुर्नवंघटं हैमंवामृन्मयंवापिपवित्रजलपूरितं ततःस पिंडास्तंघटंसंस्पृश्याभिमंत्र्यतज्जलैःपावमानीभिरापोहिष्ठेत्यादिभिस्तरत्समंदीभिश्चपापिनम भिषिच्यतेनसहसर्वेस्नात्वातंजलघटमस्मैदद्युः सचशांताद्यौःशांतापृथिवीशांतंविश्वमंतरिक्षं योरोचनस्तमिहगृह्णामीतियजुर्भिस्तंघटंगृण्हीयात् ततस्तदुदकंतेनैवसाकंसर्वेपिबेयुः ततःस कूष्मांडमंत्रैराज्यहोमंकृत्वासुवर्णंगांचदद्यात् ततस्तस्यजातकर्मादिव्रतबंधांताविवाहांतावासं स्काराःकार्याः एवंकृतेशुद्धेनतेनसंस्पर्शसंभोजनादिव्यवहारंकुर्यात् एवमुपपातकेमहापातके चकृतघटस्फोटस्यशुद्धिर्ज्ञेया इतिसंक्षेपतःकृतघटस्फोटशुद्धिः ॥**

ज्याचा घटस्फोट केला त्यास पश्चात्ताप झाला असतां त्या पापाचें प्रायश्चित्त केल्यानंतर ( त्यास ज्ञातींत ) घेण्याविषयीं विधि सांगतों.—त्यामध्यें प्रथम शुद्धीची परीक्षा—प्रायश्चित्त केलें होत्साता ज्ञातीच्या समक्ष तृणाचा भारा गाईस द्यावा. गाईनीं तृण भक्षण केलें असतां शुद्धि आहे. भक्षण न केलें असतां पुनः प्रायश्चित्त करावें. " याप्रमाणें शुद्धीचा निश्चय झाला असतां सुवर्णाचा किंवा मृत्तिकेचा नूतन घट शुद्ध उदकानें भरलेला आणावा. " तदनंतर सपिंडांनीं त्या घटास स्पर्श करून अभिमंत्रण करून त्या उदकेंकरून पावमानी ऋचा, " **आपोहिष्ठा०** " इत्यादि ऋचा, आणि " **तरत्समंदी०** " ऋचा यांहींकरून पाप्यावर अभिषेक करून त्या पाप्यासह सर्वांनीं स्नान करून तो उदकाचा घट पाप्याकारणें द्यावा. नंतर त्यानें " **शांताद्यौः शांतापृथिवी शांतंविश्वमंतरिक्षंयोरोचनस्तमिहगृह्णामि** " ह्या यजुर्मंत्रांनीं तो घट घ्यावा. नंतर तें उदक त्या पाप्यासहवर्तमानच सर्वांनीं प्राशन करावें. नंतर त्यानें कूष्मांडमंत्रांनीं आज्याचा होम करून सुवर्ण, गाई, यांचें दान करावें. नंतर त्याचे जातकर्मापासून मौंजीपर्यंत अथवा विवाहापर्यंत संस्कार करावे. याप्रमाणें विधि केला असतां शुद्ध झालेला जो त्याच्याशीं स्पर्श, संभोजन इत्यादि व्यवहार करावा. याप्रमाणें उपपातक व महापातक यांविषयीं ज्याचा घटस्फोट केला त्याची शुद्धि जाणावी. याप्रकारें संक्षेपेंकरून, घटस्फोट केलेल्याची शुद्धि सांगितली.

---

**वंदेश्रीमदनंताभिधगुरुचरणौसतांमताचरणौ ।**
**जननीमथान्नपूर्णांसंपूर्णांसद्गुणैर्वंद्याम् ॥ १ ॥**

साधूंस मान्य आहे आचरण ज्यांचें असे श्रीमान् अनंतनामक पित्याचे चरण व पातिव्रत्यादि सद्गुणांनीं संपूर्ण, वंदनास योग्य असी अन्नपूर्णानामक माता या उभयतांप्रत नमस्कार करितों.

---

**श्रीविठ्ठलंनमस्कृत्यविघ्नकक्षहुताशनं अंत्येष्टिनिर्णयंवक्ष्येसर्वशाखोपयोगिनं ॥ २ ॥**

विघ्नरूप शुष्कतृणाविषयीं अग्नि असा जो श्रीविठ्ठल त्याप्रत नमस्कार करून सर्व शाखांस उपयोगी असा अंत्येष्टिनिर्णय सांगतों.

---

**तत्रांत्यक्रियाधिकारिणःश्राद्धारंभेएवोक्ताः सर्वाभावेधर्मपुत्रःकार्यः तत्रपुत्राद्यधिकारिणा पित्रादिकमासन्नमरणंदृष्ट्वासार्धाब्दादिप्रायश्चित्तंमोक्षधेन्वादिदानानिच तेनकारणीयानिस्वयं**

वातमुद्दिश्यकर्तव्यानि तत्रप्रायश्चित्तप्रयोगःप्रायश्चित्तप्रकरणेद्रष्टव्यः शक्तौसत्यांप्रायश्चित्तां तेदशदानानिकार्याणि तत्रगवामंगेषुतिष्ठंतिइतिगोदानमंत्रः सर्वभूताश्रयाभूमिर्वराहेणसमुद्धृता अनंतसस्यफलदाअतःशांतिंप्रयच्छमे इतिभूमेः महर्षेर्गोत्रसंभूताःकाश्यपस्यतिलाःस्मृताः तस्मादेषांप्रदानेनममपापंव्यपोहत्विति तिलानां हिरण्यगर्भगर्भस्थमितिहिरण्यस्य कामधेनुषु संभूतंसर्वक्रतुषुसंस्थितं देवानामाज्यमाहारमतःशांतिंप्रयच्छमेइत्याज्यस्य शरणंसर्वलोकानां लज्जायारक्षणंपरं सुवेषधारिवस्त्रत्वमतः० इतिवस्त्रंदेयं सर्वदेवमयंधान्यंसर्वोत्पत्तिकरंमहत् प्राणिनांजीवनोपायमतःशांतिंप्रयच्छमेइतिधान्यं तथारसानांप्रवरःसदैवेक्षुरसोमतः मम तस्मात्परांलक्ष्मींददस्वगुडसर्वदेतिगुडः प्रीतिर्यतःपितॄणांचविष्णुशंकरयोःसदा शिवनेत्रोद्भवंरूप्यमतः० इतिरजतं यस्मादन्नरसाःसर्वेनोत्कृष्टालवणंविना शंभोःप्रीतिकरंनित्यमतः० इतिलवणं भूम्यादिप्रमाणानितुजननशांतिप्रकरणेउक्तानि प्रायश्चित्तादिकर्मसुविष्ण्वादिनामकीर्तनात्सांगता प्रायश्चित्ताद्यसंभवेपिमरणकालेविष्णुशिवनामकीर्तनमात्रात्सर्वपापक्षयोमुक्तिश्चेतिसर्वपुराणादिसिद्धांतः तथाचश्रीभागवते यस्यावतारगुणकर्मविडंबनानिनामानियेऽसुविगमेविवशागृणंति तेनैकजन्मशमलंसहसैवहित्वासंयांत्यपावृतमृतंतमजंप्रपद्ये इत्यादिमुमूर्षुंपितरंपुत्रोयदिदानंप्रदापयेत् तद्विशिष्टंगयाश्राद्धादश्वमेधशतादपि तानिचतिलपात्रदानंऋणधेनुमोक्षधेनुपापधेनुवैतरणीधेनूत्क्रांतिधेनुदानादीनि व्यतीपातोथसंक्रांतिस्तथैवग्रहणंरवेः पुण्यकालास्तथासर्वेयदामृत्युरुपस्थितः आसन्नमृत्युनादेयागौःसवत्सातुपूर्ववत् तदभावेतुगौरेवनरकोत्तारणायवै शुक्लपक्षेदिवाभूमौगंगायांचोत्तरायणे धन्यास्तातमरिष्यंतिहृदयस्थेजनार्दने इत्यादिवचनात् मुमूर्षोर्दानादौशक्त्यभावेपुत्रादिर्दद्यात् ॥

त्यामध्यें अंत्यकर्माचे अधिकारी श्राद्धाचे आरंभींच सांगितले आहेत. सर्वांचा अभाव असतां धर्मपुत्र करावा. त्यामध्यें पुत्रादिक अधिकारी यानें पिता इत्यादिकांचें मरण समीप आलें असें पाहून सार्धाब्दप्रायश्चित्त व मोक्षधेनु इत्यादिक दानें त्याच्या ( पित्याच्या ) कडून करवावीं, अथवा स्वतां त्याच्या उद्देशेंकरून करावीं. त्यामध्यें प्रायश्चित्ताचा प्रयोग प्रायश्चित्तप्रकरणीं पाहावा. सामर्थ्य असल्यास प्रायश्चित्त केल्यानंतर दश दानें करावीं. त्याविषयीं मंत्र— “ गवामंगेषु तिष्ठंति० ” हा गोदानाचा मंत्र. “ सर्वभूताश्रयाभूमिर्वराहेणसमुद्धृता ॥ अनंतसस्यफलदा ह्यतःशांतिं प्रयच्छ मे, ” हा भूमिदानाचा. “ महर्षेर्गोत्रसंभूताः काश्यपस्यतिलाःस्मृताः ॥ तस्मादेषांप्रदानेन मम पापं व्यपोहतु” हा तिलांचा. “हिरण्यगर्भगर्भस्थं० ” हा सुवर्णाचा. “ कामधेनुषु संभूतं सर्वक्रतुषु संस्थितं ॥ देवानामाज्यमाहारमतः शांतिं प्रयच्छमे ” हा घृताचा. “शरणंसर्वलोकानां लज्जायारक्षणंपरं ॥ सुवेषधारिवस्त्रत्वमतः० ” ह्या मंत्रानें वस्त्र द्यावें. “सर्वदेवमयंधान्यं सर्वोत्पत्तिकरंमहत् ॥ प्राणिनांजीवनोपायमतःशांतिंप्रयच्छमे,” ह्या मंत्रानें धान्याचें दान करावें. “ तथारसानांप्रवरःसदैवेक्षुरसोमतः ॥ ममतस्मात्परांलक्ष्मींददस्वगुडसर्वदा, ” ह्या मंत्रानें गुळाचें दान करावें. “ प्रीतिर्यतःपितॄणांचविष्णुशंकरयोःसदा ॥ शिवनेत्रोद्भवंरूप्यमतः० ” ह्या मंत्रानें रौप्य दान करावें. “ यस्मादन्नरसाः सर्वेनोत्कृष्टालवणंविना ॥ शंभोःप्रीतिकरंनित्यमतः० ”

ह्या मंत्रानें लवण द्यावें. भूमि इत्यादिकांचीं प्रमाणें तर, जननशांतिप्रकरणीं सांगितलीं आहेत. प्रायश्चित्तादि कर्मामध्यें विष्णु इत्यादिकांचे नामसंकीर्तनेंकरून कर्माची सांगता होते. प्रायश्चित्तादिकाचा असंभव असला तथापि मरणकालीं विष्णु, शिव यांचे नामसंकीर्तनमात्रेंकरून सर्व पापांचा क्षय व मुक्ति हीं प्राप्त होतात असा सर्व पुराणादिकांचा सिद्धांत आहे. तसेंच श्रीभागवतांत—अवतार, गुण, कर्म यांचें विडंबन ह्मणजे अनुकरण आहे ज्यांचे ठायीं ( अवतारविडंबनें देवकीनंदन इत्यादिक; गुणविडंबनें सर्वज्ञ, भक्तवत्सल इत्यादिक; कर्मविडंबनें गोवर्धनोद्धारण, कंसाराति इत्यादिक ) असीं ज्याचीं नामें प्राणोत्क्रमणसमयीं पराधीन असतांहि जे उच्चारितात ते अनेक जन्मार्जित पातक एकाएकीं टाकून अज, निरुपाधि व सत्य अशा ब्रह्माप्रत पावतात, त्याप्रत मी शरण जातों " इत्यादि. " ज्याचें मरण समीप आलें अशा पित्याकडून जर पुत्र, दान देववील तर तें दान गयाश्राद्ध, व शंभर अश्वमेध यांहून अधिक होतें." तीं दानें हीं—तिळपात्रदान, ऋणधेनु, मोक्षधेनु, पापधेनु, वैतरणीधेनु, उत्क्रांतिधेनु इत्यादिक दानें द्यावीं. कारण, "व्यतीपात, सूर्यसंक्रांति, तसेंच सूर्यग्रहण, हे जे पुण्यकाळ ते, ज्या कालीं मृत्यु प्राप्त होतो त्या कालीं आहेत." ज्याचा मृत्यु समीप आला त्यानें सवत्सगाई पूर्वीं सांगितल्याप्रमाणें द्यावी. सवत्सगाई नसेल तर, नरकोद्धार होण्यासाठीं केवल गाईच द्यावी. शुक्लपक्ष, दिवसा, भूमि, गंगा, उत्तरायण, यांचे ठायीं आणि हृदयस्थ जनार्दन असतां हे तात, जे मरतील ते धन्य होत इत्यादिक वचन आहे. मुमूर्षूस दानादिक करण्यास सामर्थ्य नसतां पुत्रादिकानें द्यावीं.

---

**तत्रतिलपात्रदानविधिः यथाशक्तिकांस्यपात्रेताम्रपात्रेवातिलान्क्षिप्त्वासुवर्णंचप्रक्षिप्यम मजन्मप्रभृतिमरणांतंकृतनानाविधपापप्रणाशार्थंतिलपात्रदानंकरिष्ये विप्रंसंपूज्यममजन्म प्रभृतिमरणांतंनानाविधपापनाशार्थमिदंतिलपात्रंससुवर्णंसदक्षिणंअमुकशर्मणेतुभ्यं संप्रददे तिलाःपुण्याःपवित्राश्चतिलाःसर्वकराःस्मृताः शुक्लावायदिवाकृष्णाऋषिगोत्रसमुद्भवाः यानि** कानिचपापानिब्रह्महत्यासमानिच तिलपात्रप्रदानेनममपापंव्यपोहतु नममेतिवि**प्रहस्तेजलंक्षि** पेत् पुत्रादिस्वस्यजन्मप्रभृत्यादिसंकल्पमस्यपापंव्यपोहत्विति मंत्रंचवदेत् ऐहि**कामुष्मिकंयच्च** सप्तजन्मार्जितंऋणं तत्सर्वंशुद्धिमायातुगामेकांददतोममेतिऋणधेनुदानमंत्रः **अन्यत्सर्वंसा** मान्यगोदानवत् तद्विधिस्तुद्वितीयपरिच्छेदेउक्तः मोक्षंदेहिहृषीकेशमोक्षंदेहि**जनार्दन मो** क्षधेनुप्रदानेनमुकुंदःप्रीयतांममेति मोक्षधेनुमंत्रः **आजन्मोपार्जितंपापंमनोवाक्कायकर्मभिः** तत्सर्वंनाशमायातुगोप्रदानेनकेशवेतिपापधेनुदानमंत्रः ॥

त्यामध्यें तिलपात्रदानाचा विधि.—यथाशक्ति कांस्यपात्र अथवा ताम्रपात्र घेऊन त्यांत तिळ व सुवर्ण घालून " **ममजन्मप्रभृतिमरणांतंकृतनानाविधपापप्रणाशार्थंतिलपात्रदानं करिष्ये,** " याप्रमाणें संकल्प करून ब्राह्मणाची पूजा करून " ममजन्मप्रभृतिमरणांतंनानाविधपापनाशार्थंइदंतिलपात्रंससुवर्णंसदक्षिणंअमुकशर्मणेतुभ्यं संप्रददे, तिलापुण्याःपवित्राश्चतिलाःसर्वकराःस्मृताः ॥ शुक्लावायदिवाकृष्णाऋषिगोत्रसमुद्भवाः यानिकानिचपापा-

निग्रहहत्यासमानिच ॥ तिलपात्रप्रदानेनममपापंव्यपोहतु ॥ नमम" असे मंत्र ह्मणून ब्राह्मणाचे हातावर उदक घालावें. पुत्रादिकानें तर, "अस्य जन्मप्रभृति०" इत्यादिक संकल्प व "अस्यपापंव्यपोहतु" असा मंत्र हे ह्मणावे. "ऐहिकामुष्मिकंयच्चसप्तजन्मार्जितंऋणं ॥ तत्सर्वंशुद्धिमायातुगामेकांददतोमम" याप्रमाणें ऋणधेनुदानाचा मंत्र. इतर सर्व विधि सामान्य गोदानासारखा जाणावा. तो सामान्य गोदानाचा विधि द्वितीय परिच्छेदांत सांगितला आहे. "मोक्षं देहि हृषीकेश मोक्षं देहि जनार्दन ॥ मोक्षधेनुप्रदानेन मुकुंदः प्रीयतां मम" असा मोक्षधेनुदानाचा मंत्र. "आजन्मोपार्जितंपापंमनोवाक्कायकर्मभिः॥ तत्सर्वंनाशमायातु गोप्रदानेनकेशव" याप्रमाणें पापधेनुदानाचा मंत्र जाणावा.

---

अथवैतरणीविधिः अद्येत्याद्यमुकस्यममयमद्वारस्थितवैतरण्याख्यनद्युत्तारणार्थंगोदानंकरिष्ये विप्रंपादप्रक्षालनवस्त्रगंधमाल्यादिभिरभ्यर्च्यतद्धस्तेशिवाआपःसंतु सौमनस्यमस्तु अक्षतंचारिष्टंचास्तु यच्छ्रेयस्तदस्तु यत्पापंतत्प्रतिहतमस्त्वितिकृत्वा धेनुकेत्वंप्रतीक्षस्वयमद्वारे महापथे उत्तितीर्षुरहंदेविवैतरण्यैनमोस्तुते इतिधेनुंप्रार्थ्य विष्णुरूपद्विजश्रेष्ठभूदेवद्विजपावन तर्तुंवैतरणीमेतांकृष्णांगांप्रददाम्यहमितिविप्रंप्रार्थ्य वैतरणीसंतारणार्थमिमांगांकृष्णवस्त्ररक्तमाल्याद्यलंकृतांयथाशक्तिदक्षिणायुतां तुभ्यमहंसंप्रददे यमद्वारेपथेघोरेघोरावैतरणीनदी तांततुंकामोयच्छामिकृष्णांवैतरणींतुगां नममेतिविप्रहस्तेजलंक्षिपेत् कृष्णायाअभावेऽन्यवर्णादेया गोरभावेद्रव्यंदेयं पुत्रादिर्दाताचेत्प्रथमेमंत्रेउत्तितीर्षुरयमितिपठेत् द्वितीयेतर्तुंवैतरणीमस्येति तृतीयेतांततुंमस्येति ॥

## यानंतर वैतरणिगोदानाचा विधि सांगतों.

"अद्येत्यादि० अमुकस्ययमद्वारस्थितवैतरण्याख्यनद्युत्तारणार्थ गोदानंकरिष्ये," असा संकल्प करून ब्राह्मणाची पादप्रक्षालन, वस्त्र, गंध, माल्य, इत्यादि उपचारांनीं पूजा करून ब्राह्मणाचे हातावर "शिवाआपःसंतु, सौमनस्यमस्तु, अक्षतंचारिष्टंचास्तु, यच्छ्रेयस्तदस्तु, यत्पापंतत्प्रतिहतमस्तु" याप्रमाणें करून "धेनुकेत्वंप्रतीक्षस्वयमद्वारेमहापथे ॥ उत्तितीर्षुरहंदेविवैतरण्यैनमोस्तुते" ह्या मंत्रेंकरून धेनूची प्रार्थना करून "विष्णुरूपद्विजश्रेष्ठभूदेवद्विजपावन ॥ तर्तुंवैतरणीमेतांकृष्णांगांप्रददाम्यहं" ह्या मंत्रानें ब्राह्मणाची प्रार्थना करून "वैतरणीसंतारणार्थंइमांगांकृष्णवस्त्ररक्तमाल्याद्यलंकृतांयथाशक्तिदक्षिणायुतांतुभ्यमहं संप्रददे ॥ यमद्वारेपथेघोरेघोरावैतरणीनदी ॥ तांततुंकामोयच्छामिकृष्णांवैतरणींतु गां, नमम" असे मंत्र ह्मणून ब्राह्मणाचे हातावर उदक घालावें. कृष्णवर्ण गाय न मिळाली असतां अन्यवर्णा द्यावी. गाईचा अभाव असतां द्रव्य द्यावें. पुत्रादिक दानकर्ता असेल तर, प्रथम मंत्रांत "उत्तितीर्षुरयं" असें पठण करावें. दुसऱ्या मंत्रांत "तर्तुंवैतरणीमस्य" असें पठण करावें. तिसऱ्या मंत्रांत "तांततुंमस्य" असें पठण करावें.

---

अथोत्क्रांतिधेनुः अद्येत्याद्यमुकस्यसुखेनप्राणोत्क्रमणप्रतिबंधकसकलपापक्षयद्वारासुखेन प्राणोत्क्रमणाययथाशक्त्यलंकृतामिमामुत्क्रांतिधेनुंरुद्रदैवत्याममुकशर्मणेतुभ्यंसंप्रददे गवामंगेष्वितिमंत्रांतेनममेतिवदेत् धेन्वभावेद्रव्यंदेयं ॥

## यानंतर उत्क्रांतिधेनूचा विधि सांगतों.

"अद्येत्यादिअमुकस्यसुखेनप्राणोत्क्रमणप्रतिबंधकसकलपापक्षयद्वारासुखेनप्राणोत्क्रमणाय यथाशक्त्यलंकृतामिमामुत्क्रांतिधेनुंरुद्रदैवत्याममुकशर्मणेतुभ्यंसंप्रददे ॥ गवामंगेषु०" हा मंत्र ह्मटल्यानंतर "नमम" असें पठण करावें. गाई न मिळेल तर द्रव्य द्यावें.

---

उक्तप्रायश्चित्तादिदानांतविधिमकृत्वापित्रादिमरणेपुत्रादिनाप्रायश्चित्तंकृत्वादाहादि कर्तव्यं दानान्येकादशाहेकार्याणि पितुःपापाभावनिश्चयेप्रायश्चित्तंनावश्यकं केचिदुत्क्रांतिवैतरण्यौदशदानानिचैवहि मृतेपिकृत्वातंप्रेतंदहेदित्याहुः तुलसींसन्निधौकुर्यात्शालग्रामशिलां तथाकेचित्तिललोहहेमकार्पासलवणभूमिधेनुसप्तधान्येत्यष्टदानान्याहुः क्वचिन्मुमूर्षोर्मधुपर्कदानमुक्तं ॥

प्रायश्चित्तापासून दानापर्यंत पूर्वी सांगितलेला विधि केल्यावांचून पित्रादिकांस मरण प्राप्त झालें असतां पुत्रादिकानें प्रायश्चित्त करून दहनादिक करावें, व दानें करणें तीं अकराव्या दिवसीं करावीं. पित्यास पापाचरण नाहीं असा निश्चय असतां प्रायश्चित्त आवश्यक नाहीं. कोणी ग्रंथकार उत्क्रांतिधेनु, वैतरणीधेनु आणि दशदानें हीं, मृत झाल्यानंतरहि करून त्या प्रेताचें दहन करावें असें ह्मणतात. "तुलसी, शालग्रामशिला मरणसमयीं समीप ठेवावीं." कोणी ग्रंथकार तिल, लोखंड, सुवर्ण, कापूस, लवण, भूमि, धेनु आणि सप्तधान्यें याप्रमाणें आठ दानें सांगतात. क्वचित् ग्रंथांत मुमूर्षूनें मधुपर्कदान करावें असें सांगितलें आहे.

---

पुत्रादिः कर्तांत्यकर्माधिकारार्थंकृच्छ्रत्रयादिकंवपनंचकुर्यात् तत्रमातापित्रोःसापत्नमातुः पितृव्यस्यज्येष्ठभ्रात्रादेश्चांत्यकर्मकरणेक्षौरमावश्यकं पुत्राणांकर्तृभिन्नानामपिक्षौरंनित्यं एवं पत्न्याअपिप्रथमेदशमेन्हिवाक्षौरंनित्यं तथादत्तकस्यपूर्वापरयोर्मात्रोःपित्रोर्मृतौक्षौरं रात्रौतु दग्ध्वापिंडान्तंकृत्वावपनवर्जितं वपनंवर्जितंरात्रौश्वस्तनीवपनक्रिया पत्नीपुत्रकनिष्ठभ्रात्रादेरंत्यकर्मणिक्षौरंनकार्यं अन्यत्रकृताकृतं ॥

पुत्रादिक कर्ता यानें अंत्यकर्माचा अधिकार प्राप्त होण्याकरितां तीन कृच्छ्र इत्यादिक प्रायश्चित्त व वपन करावें. त्यामध्यें माता, पिता, सापत्नमाता, पितृव्य, ज्येष्ठ भ्राता इत्यादिकांचें अंत्यकर्म करणें असतां क्षौर आवश्यक आहे. कर्त्यावांचून अन्य पुत्रांसहि क्षौर नित्य आहे. याप्रमाणें स्त्रियेसहि प्रथम दिवसीं अथवा दहाव्या दिवसीं क्षौर नित्य आहे. तसेंच, दत्तकास पूर्वींचे व पुढचे मातापितर मृत असतां क्षौर आहे. "रात्रीं असेल तर, दहन करून वपनावांचून पिंडांत क्रिया करावी. रात्रीचे ठायीं वपन करूं नये, दुसऱ्या दिवसीं वपन करावें." पत्नी, पुत्र, कनिष्ठ भ्राता इत्यादिकांचें अंत्यकर्म करणें असतां क्षौर नाहीं; इतर ठिकाणीं कृताकृत आहे.

---

स्मशानेनीयमानशवस्यशूद्रस्पर्शेशूद्रेणवहनेवा कुंभेसलिलमादायपंचगव्यंतथैवच सुमंत्रैरभिमंत्र्यापस्तेनसंस्नाप्यदाहयेत् कृच्छ्रत्रयंचकुर्यात् सूतिकारजस्वलयोःस्पर्शेप्येवमेव प्राय

श्चित्तंतुपंचदशकृच्छ्राः शूद्रेणद्विजदाहेतुचांद्रायणपराकप्राजापत्यानिसमुच्चयेनपुत्रादिःकृत्वा स्थीनिपुनर्देहेत् अस्थ्यभावेपालाशविधिः ऊर्ध्वोच्छिष्टाधरोच्छिष्टोभयोच्छिष्टेषुकृच्छ्रत्रयं अस्पृश्यस्पर्शनेषट्कृच्छ्राः अंतरालमृतौनवखट्वामरणेद्वादश निगडमृतौपंचदश रज कादिसप्तविधांत्यजादिस्पृष्टमरणेत्वेकत्रिंशत्कृच्छ्राणि देशांतरमरणेपराकद्वयमष्टौकृच्छ्रावा कृच्छ्रत्रयंप्रकुर्वीतआशौचमरणेपिच अर्धदग्धेशवेचितेरस्पृश्यस्पर्शेकृच्छ्रत्रयं एवंपुत्रादयः पित्रादेःपापिनःपापानुसारेणप्रायश्चित्तकांडोक्तंप्रायश्चित्तंदुर्मरणात्मघातादिनिमित्तेपूर्वोक्तप्रा यश्चित्तंनारायणबल्यादिकंचकृत्वैवांत्यकर्मकुर्युः एवमुक्तप्रायश्चित्तंविनादाहादिकृतंव्यर्थंभवे त् उभयोश्चनरकः ॥

श्मशानांत न्यावयाचे शवास शूद्रस्पर्श झाला असेल अथवा त्यास शूद्रानें खांद घातला असेल तर, " कुंभांत उदक व पंचगव्य ग्रहण करून तें उदक सुमंत्रांनीं अभिमंत्रण करून तेणेंकरून स्नान घालून दहन करावें, व तीन कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. " बाळंतीण, रजस्वला यांचा स्पर्श झाला असतांहि असाच निर्णय जाणावा. प्रायश्चित्त तर पंधरा कृच्छ्र करावे. शूद्रानें द्विजाचें दहन केलें असेल तर चांद्रायण, पराक, प्राजापत्य, हीं एकामागून दुसरें याप्रमाणें तीनहि पुत्रादिकानें करून त्याच्या अस्थींचें पुनः दहन करावें. अस्थि न मिळतील तर पालाशविधि करावा. ऊर्ध्वोच्छिष्ट, अधरोच्छिष्ट आणि उभयोच्छिष्ट हीं असतां तीन कृच्छ्र, स्पर्शास अयोग्य अशाचा स्पर्श असतां सहा कृच्छ्र, अंतराल मरण असतां नऊ कृच्छ्र, बाजेवर मरण आलें असतां बारा कृच्छ्र, बंदिखान्यांत मरण आलें असतां पंधरा कृच्छ्र, रज-कादिकें[2] सात प्रकारचे अंत्यजादिकांचा स्पर्श होऊन मरण प्राप्त असेल तर एकतीस कृच्छ्र, देशांतरीं मरण प्राप्त असतां दोन पराक, अथवा आठ कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. " आशौचांत मरण प्राप्त असतांहि तीन कृच्छ्र करावें. शव अर्धें दग्ध झाल्यानंतर चितेस अस्पृश्यस्पर्श झाला असतां तीन कृच्छ्र करावें. याप्रमाणें पुत्रादिकांनीं पिता इत्यादिक पाप्याचें जसें पाप असेल तदनुसार प्रायश्चित्तकांडामध्यें सांगितलेलें प्रायश्चित्त; दुर्मरण, आत्महत्या इत्यादि नि-मित्त असतां पूर्वीं सांगितलेलें प्रायश्चित्त व नारायणबलि इत्यादिक करून अंत्यकर्म करावें. याप्रमाणें उक्त प्रायश्चित्त केल्यावांचून दहनादिक करील तर तें कर्म व्यर्थ होईल, व दोघांस नरक प्राप्त होतो.

---

पतिपत्न्योरेककालेदहनेप्राप्तेभार्यायाःपत्यासहद्विवचनांतमंत्रोहेन दाहंकृत्वा पिंडादिकं पतिपूर्वकंपृथक्कार्यं एवंसपत्नीनामेककालेमृतौसहैवदाहः पिंडादिकंतुज्येष्ठक्रमेणपृथगेव एवंपितापुत्रयोर्भ्रात्रोश्चलौकिकाग्निदाह्ययोर्दाहः सहैवपिंडादिपितृपूर्वज्येष्ठपूर्वंचपृथक्पुंबाला नांस्त्रीबालानांचदहनखननेचैवमेवेतिनागोजीभट्टीये रजस्वलागर्भिण्यादिमरणेसहगमने चवक्ष्यते ॥

पति व स्त्री यांचें दहन एक कालीं प्राप्त झालें असतां पतीसहवर्तमान स्त्रियेचा, द्विवच-नांत मंत्राचे ऊहेंकरून दाह करून पिंडादिक कर्म पतिपूर्वक निराळें करावें. याप्रमाणें बहुत

---

१ याचें लक्षण तृतीय परिच्छेदाच्या पूर्वार्धांत रजस्वलाप्रकरणीं सांगितलें आहे.

२ रजक, चर्मकार, नट, बुरुड, कैवर्त, मेद, भिल्ल.

सवती एक कालीं मृत असतां त्यांचें दहन बरोबरच करावें, पिंडादिक कर्म तर, ज्येष्ठक्रमें-करून निराळेंच करावें. याप्रमाणें लौकिकाग्नीकरून दहन करण्यास योग्य असे पिता व पुत्र अथवा दोन भ्राते यांचें बरोबरच दहन करून पिंडादिक कर्म पितृपूर्वक व ज्येष्ठपूर्वक निराळें करावें. पुरुषबालकें व स्त्रीबालकें यांचें दहन व खनन असतांहि असाच निर्णय जाणावा असें नागोजीभट्टकृत ग्रंथांत सांगितलें आहे. रजस्वला, गर्भिणी इत्यादिकांचें मरण, सहगमन यांविषयीं पुढें सांगूं.

---

अथगोमयोपलिप्तभूमौकुशेषूपविष्टोदक्षिणशिराःशयितोवागोपीचंदनादिमृदाकृततिलकः श्रीविष्णुंस्मरन्पुण्यसूक्तंगीतांसहस्रनामादिस्तोत्राणिपठेच्छृणुयाद्वा अमृतत्वप्राप्त्यर्थंपुण्यसूक्तस्तोत्रादीनांपाठंश्रवणंवाकरिष्येइतिसंकल्पः श्रोतुः संकल्पाशक्तौश्रावयितास्यामुकशर्मणोमृतत्वप्राप्तयेऽमुकंश्रावयिष्यइतिसंकल्पयेत् नानानमितिसूक्तंपुरुषसूक्तंविष्णुसूक्तमुपनिषद्भागाइत्यादिपुण्यसूक्तानि रामकृष्णादिनामस्मरणेजातिमात्रस्याधिकारः ॥

यानंतर गोमयानें सारवलेल्या भूमीवर दर्भ घालून त्या दर्भांवर बसला होत्साता अथवा दक्षिण दिशेस शिर करून निजलेला, गोपीचंदनादिमृत्तिकेंकरून तिलक केलेला होत्साता श्रीविष्णूचें स्मरण करीत पुण्यसूक्त, गीता, सहस्रनामादि स्तोत्रें पठण करावीं, अथवा श्रवण करावीं. "अमृतत्वप्राप्त्यर्थंपुण्यसूक्तस्तोत्रादीनांपाठंश्रवणंवाकरिष्ये," याप्रमाणें संकल्प जाणावा. श्रवण करणारा यास संकल्प करण्याविषयीं सामर्थ्य नसेल तर श्रवण करविणारा यानें "अस्यामुकशर्मणोऽमृतत्वप्राप्तयेऽमुकंश्रावयिष्ये," याप्रमाणें संकल्प करावा. "नानानं०" हें सूक्त, पुरुषसूक्त, विष्णुसूक्त आणि उपनिषद्भाग इत्यादिक पुण्यसूक्तें होत. राम, कृष्ण इत्यादिक नामस्मरणाविषयीं सर्व जातिमात्रांस अधिकार आहे.

---

अथसाग्नेर्विशेषः गृह्याग्निमतोगृह्याग्निनाश्रौताग्निमतस्त्रेताग्निभिर्दाहःकार्यः तत्रगृह्याग्निमतःश्रौताग्निमतश्चकृष्णपक्षेमरणेतदैवसायंकालाहुतीर्दर्शसायंकालपर्यंताःपक्षहोमवत्सकृद्ग्रहणेनैवहुत्वापुनःसंकल्पपूर्वकंप्रातराहुतीश्चप्रतिपत्प्रातर्होमांतास्तद्वदेवहुत्वादर्शयागंकुर्यात् यागासंभवेआज्यंसंस्कृत्यस्रुचिचतुर्वारंगृहीत्वापुरोनुवाक्यायाज्याभ्यामेकैकांप्रधानाहुतिंजुहुयात् स्मार्तेतुचतुर्गृहीताज्येनाग्नयेस्वाहेंद्राग्निभ्यांस्वाहेतिनाम्नैवप्रधानाहुतिद्वयं शुक्लपक्षेरात्रौमरणेसायंहोमस्यकृतत्वात्प्रातर्होममात्रमाकृष्यतदैवकुर्यात् नात्रपौर्णिमांतानांदर्शांतानांवाहोमानामिष्टिप्रधानपूर्णाहुतीनांवाकरणं शुक्लपक्षेदिवामरणेतुनकस्यापिहोमस्याकर्षणं एवंकृष्णपक्षमरणेपिदैवात्पूर्णमासेष्ट्यतिक्रमेहोमापकर्षप्रधानपूर्णाहुत्यादिकंचकृताकृतमनारब्धत्वादितिभाति करणपक्षेऽतिक्रांतपूर्णमासपूर्णाहुतीर्हुत्वापक्षहोमान्कृत्वादर्शपूर्णाहुतयःकार्याः अग्न्यावरण्योरारूढेप्रमीयेतपतिर्यदि प्रेतंस्पृष्ट्वामथित्वाग्निंजप्त्वाचोपावरोहणं वृतंचद्वादशोपात्तंतूष्णींहुत्वाशवक्रिया विच्छिन्नश्रौताग्नेर्मृतौतुप्रेताधानंकार्यं तद्यथा प्रेतंस्वाग्न्यालयेक्षिप्त्वारणीसंनिधाप्य यस्याग्नयोजुह्वतोमांसकामाःसंकल्पयंतेयजमानमांसं जायंतुतेहविषेसादितायस्वर्गंलोकमिमंप्रेतंनयंत्वितियजुर्मंत्रेणमथिताग्निमायतनेप्रणीयद्वादशगृहीताज्येनतूष्णींहुत्वातेनदा

हादिकार्यं नष्टेष्वग्निष्वथारण्योर्नाशेस्वामीम्रियेतचेत् आहरेदरणीद्वंद्वं मनोज्योतिऋचाततः शेषंप्राग्वत् ॥

## यानंतर साग्निकाचा विशेष निर्णय सांगतों.

जो गृह्याग्नीनें युक्त असेल त्याचा गृह्याग्नीनें व श्रौताग्नींनीं युक्त असेल त्याचा तीन श्रौताग्नींनीं दाह करावा. त्यामध्यें गृह्याग्निमान् व श्रोताग्निमान् यांचें मरण कृष्णपक्षामध्यें झालें असतां तत्कालींच सायंकालच्या आहुति दर्शसायंकालपर्यंत पक्षहोमाप्रमाणें एकवारच घेऊन होम करून पुनः संकल्पपूर्वक प्रातःकालच्या आहुति प्रतिपदेच्या प्रातर्होमापर्यंत त्याप्रमाणेंच हवन करून दर्श-याग करावा. यागाचा असंभव असेल तर आज्याचा संस्कार करून तें आज्य स्रुचिपात्रांत चार वेळ घेऊन पुरोनुवाक्या व याज्या ह्या दोन मंत्रेंकरून एकेक प्रधानाहुति हवन करावी. स्मार्ताग्नीचे ठायीं तर चार वेळ घेतलेल्या आज्यानें "अग्नये स्वाहा, इंद्राग्निभ्यां स्वाहा" याप्रमाणें नाममंत्रेंकरूनच दोन प्रधानाहुति द्याव्या. शुक्लपक्षीं रात्रौ मरण प्राप्त असतां सायंका-लचा होम केलेला आहे यास्तव प्रातःकालचा होम मात्र अपकर्षानें तत्कालींच करावा. ह्या शुक्लपक्षीं पौर्णिमांत अथवा दर्शांत होम, अथवा इष्टि आहे प्रधान ज्यामध्यें अशा पूर्णाहुति हीं करण्याचें प्रयोजन नाहीं. शुक्लपक्षामध्यें दिवसा मरण प्राप्त होईल तर कोणत्याहि होमाचा अपकर्ष नाहीं. याप्रमाणें कृष्णपक्षामध्यें मरण प्राप्त असतांहि दैववशेंकरून पूर्णमासेष्टीचा अ-तिक्रम ( उल्लंघन ) असेल तर होमाचा अपकर्ष करणें, प्रधान पूर्णाहुति इत्यादिक, आरंभ झालेला नाहीं याकरितां कृताकृत असें वाटतें. करणपक्ष असेल तर अतिक्रांत पूर्णमास, पू-र्णाहुति यांचें हवन करून पक्षहोम करून दर्शपूर्णाहुति कराव्या. "अरणीवर अग्निसमारोप केला असतां जर पति मृत होईल तर प्रेतास स्पर्श करून अग्नि मंथन करून प्रत्यवरोहणमं-त्राचा जप करून बारा वेळ मृत घेऊन अमंत्रक हवन करून नंतर प्रेतक्रिया करावी." विच्छिन्न आहेत श्रौताग्नि ज्याचे त्यास मरण प्राप्त होईल तर, प्रेताधान करावें. तें असें— प्रेतास अग्नि-शालेमध्यें ठेवून जवळ अरणी आणून "यस्याग्नयोजुव्हतोमांसकामाः संकल्पयंते यजमान मांसं ॥ जायंतुतेहविषेसादितायस्वर्गलोकमिमंप्रेतंनयंतु," ह्या यजुर्मंत्रेंकरून मंथन करून अग्नि कुंडांत नेऊन बारा वेळ घेतलेल्या आज्यानें अमंत्रकहोम करून त्या अग्नीकरून दहना-दिक करावें. "अग्नि नष्ट झाले असतां व अरणींचा नाश झाला असतां यजमान मृत होईल तर "मनोज्योति०" ह्या ऋचेंकरून दोन अरणी कराव्या." शेष कर्म पूर्वीप्रमाणें करावें.

---

स्मार्ताग्निमतःस्मार्ताग्निर्यदिविच्छिन्नस्ततोयतोविच्छेदस्तावत्कालगणनयापूर्वार्धोक्तरीत्या प्रायश्चित्तंतदैवकुर्यात्संकल्पयेद्वा प्रायश्चित्तांतेहोमद्रव्यंस्थालीपाकद्रव्यंचतावत्कालगणनया देयं ततोरणिपक्षेपूर्ववदरणीमंथनं पक्षांतरेमुकशर्मणोग्निविच्छेदनिमित्तकंदाहायाग्निसि द्ध्यर्थं प्रेताधानंकरिष्येइतिसंकल्प्यायतनेसंभारान्निक्षिप्यलौकिकाग्निप्रतिष्ठाप्याज्यंसंस्कृत्या याश्चेतिमंत्रेणयस्याग्नयइतिपूर्वोक्तमंत्रेणचहुत्वाव्याहृतिचतुष्टयंजुहुयात् एवमौपासनःसि द्धोभवति पत्नीमरणेप्येवमितिभट्टाः एवंविधुरस्यापिश्रौताग्निपरिग्रहसत्त्वेयथायथंतत्तदग्नि भ्यांदाहः विधुरस्याग्निपरिग्रहोत्तरंतद्विच्छेदेपूर्वोक्तरीतिभ्यांतत्तदग्न्योराधानं ॥

स्मार्ताग्नि ज्यास असेल त्याचा स्मार्ताग्नि जर विच्छिन्न झाला असेल तर ज्या दिवसापासून अग्नीचा विच्छेद झाला तितके दिवस मोजून पूर्वार्धांत सांगितल्या रीतीनें त्याकालींच प्रायश्चित्त करावें, अथवा संकल्प करावा, प्रायश्चित्त केल्यानंतर होमद्रव्य व स्थालीपाकद्रव्य तितक्या कालाची गणना करून द्यावें. तदनंतर अरणीपक्ष असेल तर पूर्वीप्रमाणें अरणीचें मंथन करावें. दुसरा पक्ष असेल तर, "**अमुकशर्मणोऽग्निविच्छेदनिमित्तकं दाहायाग्निसिद्ध्यर्थं प्रेताधानं करिष्ये,**" असा संकल्प करून त्या स्थानीं सर्व सामग्री सिद्ध करून लौकिकाग्नीची स्थापना करून आज्याचा संस्कार करून "**अयाश्च०**" ह्या मंत्रेंकरून व "**यस्याग्नये०**" ह्या पूर्वोक्त मंत्रानें होम करून चार व्याहृतिमंत्रांनीं होम करावा. याप्रमाणें केलें असतां औपासनाग्नि सिद्ध होतो. पत्नी मृत असतांहि असाच निर्णय जाणावा असें भट्ट ह्मणतात. याप्रमाणें विधुरानेंहि श्रौताग्नि धारण केले असतील तर यथायोग्य त्या त्या ( २ ) अग्निकरून दहन करावें. विधुरानें अग्नि धारण केल्यानंतर त्यांचा ( अग्नींचा ) नाश झाला असतां पूर्वी सांगितल्या दोन रीतींनीं त्या त्या अग्नींचें आधान ( स्थापन ) करावें.

---

**अगृहीतगृह्याग्निकयोः सभार्यविधुरयोर्ब्रह्मचारिसमावृत्तयोश्चानुपनीताविवाहितपुत्रकन्ययोश्चनिरग्निकभार्याविधवयोश्चकपालाग्निनालौकिकाग्निनावादाहः अग्निवर्णकपालेकरीषादिनोत्पादितोभूर्भुवः स्वःस्वाहेत्याज्याहुत्यासंस्कृतोग्निः कपालाग्निः लौकिकाग्निश्चांत्यजाग्निपतिताग्निसूतिकाग्निचिताग्न्यमेध्याग्निभिन्नोग्राह्यः यस्यानयतिशूद्रोग्निंतृणकाष्ठहवींषिवा प्रेतत्वंचसदातस्यशूद्रःपापेनलिप्यते आहिताग्निदंपत्योः पूर्वंपतिमरणेपत्युः सर्वाग्निभिर्दाहः पश्चान्मृतभार्यायास्तुनिर्मथ्याग्निनाकपालाग्निनावा पूर्वंभार्यामरणेतुतस्याअपिसर्वाग्निभिर्दाहः कार्यः सर्वपात्राण्यपितस्यैदेयानि पश्चान्मृतस्यतुपत्युःपुनराधानेनत्रेताग्निसत्त्वेतेनदाहः आधानाकरणेनिर्मथ्येनलौकिकाग्निनावेतिकेचित् याज्ञिकाचारोपिप्रायेणैवमेव ॥**

गृह्याग्नि धारण न केलेला असा सपत्नीक[1] व विधुर, ब्रह्मचारी व समावर्तन झालेला, मौंजी न झालेला पुत्र व अविवाहित कन्या, निरग्निक भार्या व विधवा, यांचा दाह कपालाग्नि अथवा लौकिकाग्नि येणेंकरून करावा. अग्निवर्णकपालांत गोवरी इत्यादिक साधनानें उत्पन्न केलेला असून "**भूर्भुवःस्वःस्वाहा**" ह्या मंत्रेंकरून आज्याहुतीनें संस्कार केलेला जो अग्नि तो कपालाग्नि होय. लौकिकाग्नि घेणें तो अंत्यजाग्नि, पतिताग्नि, सूतिकाग्नि, चिताग्नि आणि अशुद्ध अग्नि यांवांचून घ्यावा. " अग्नि, तृण, काष्टें, होमद्रव्यें हीं ज्याचीं शूद्र आणितो त्याचें प्रेतत्व सार्वकाल राहतें व तो शूद्र पापानें लिप्त होतो." आहिताग्नि दंपतींतून पूर्वी पति मृत झाला असतां सर्व अग्नींनीं पतीचें दहन करावें. पश्चात् मृत झालेल्या स्त्रियेचें दहन निर्मथ्याग्नि अथवा कपालाग्नि येणेंकरून करावें. पूर्वी स्त्री मृत होईल तर तिचें दहन सर्व अग्नींनीं करावें. सर्वपात्रेंहि तीस द्यावीं. स्त्रियेच्या पाठीमागून पति मृत होईल तर, पुनराधान

---

१ सपत्नीकस्यापिदायाद्यपक्षाश्रयेणागृहीताग्नित्वंज्ञेयं ॥

२ सपत्नीकासहि दायाचे प्रथम पक्षाश्रयेंकरून अगृहीताग्नित्व जाणावें.

करून तीन अग्नि असतां त्यांहींकरून दहन करावें. आधान केलें नसल्यास निर्मथ्याग्नि अथवा लौकिकाग्नि यांतून एकानें दहन करावें असें कोणी ग्रंथकार ह्मणतात, व याज्ञिकांचा आचारहि बहुधा असाच आहे.

---

**अत्रनिर्णयसिंधुः साग्नेःपत्नीमृतौद्वौपक्षौ पुनर्विवाहेच्छायांपूर्वाग्निभिर्भार्यांदग्ध्वापुनर्दा**रक्रियांकुर्यात्पुनराधानमेवचेत्येकःपक्षःदाहयित्वाग्निहोत्रेणस्त्रियंवृत्तवतींपतिरित्यादिवचनजातानिपुनर्विवाहेच्छुपराण्येव पुनर्विवाहाशक्तोनिर्मथ्याग्निनातांदग्ध्वापूर्वाग्निष्वेवाग्निहोत्रहोमेष्ट्यादिचातुर्मास्यादिकार्यं सोमयागोनकार्यःपूर्वाग्न्येकदेशेनदहेदितियज्ञपार्श्वदेवयाज्ञिकादयःयानितुतस्मादपत्नीकोप्यग्निहोत्रमाहरेदितिश्रुतिस्मृत्यादिवचनानितानिपूर्वाग्निष्वेवाग्निहोत्रपराणिनत्वपत्नीकस्याधानार्थानिअपत्नीकस्याधानविधायकमूलवचनाभावात् दारकर्मणियद्यशक्तआत्मार्थमग्न्याधेयमित्यापस्तंबसूत्रंतुपुनर्विवाहाशक्तौपूर्वकृतमग्न्याधेयमात्मार्थमेवस्थाप्यंनपत्न्यैदद्यादित्येवंपरं ब्राह्मणभाष्यापरार्काशार्करामांडारादिमतमप्येवमेव येत्वपत्नीकस्या**धानमाहुस्तदाशयंनविद्मइति इदंनिर्णयसिंधुमतमेवयुक्तंभाति याज्ञिकानामाचारस्त्वंतर्गूढविवाहेच्छामूलकोनप्रामाण्यापादकः पुनर्विवाहाशयासर्वाग्निदानेपश्चाद्विवाहासंभवेसिंधुमते आधानाभावान्निर्मथ्याग्निरेवशरणं केषांचिन्मतेपुनराधानं अत्रनिर्मथ्यादिनापूर्वमृतभार्यादाहपक्षेपूर्वाग्नीनामुत्सर्गेष्टयात्यागंकृत्वापुनराधानंकृत्वाग्निहोत्रंकार्यमितिकेचिदाहुः एवंस्मार्ताग्निमतः पूर्वभार्यामरणेपिगृह्याग्न्येकदेशेनतांदहेदवशिष्टाग्नौनित्यहोमस्थालीपाकाग्रयणानिकार्याणिअत्रसर्वत्रश्रौतस्मार्तेचकुशपत्नीविधानेनैवाधानादिकर्माधिकारः ॥**

**याविषयीं निर्णयसिंधु.**—साग्निकाची स्त्री मृत झाली असतां दोन पक्ष—पुनः विवाह करण्याची इच्छा असेल तर पूर्वीच्या अग्नींकरून स्त्रियेचें दहन करून पुनः विवाह करून पुनराधान करावें असा एक पक्ष. "पतीनें सुशील अशा स्त्रियेचें अग्निहोत्रानें ( अग्नींनीं ) दहन करावें" इत्यादिक सर्व वचनें पुनः विवाहाची इच्छा करणारा तत्पर होत. पुनः विवाहाविषयीं असमर्थ असल्यास निर्मथ्याग्नीनें तिचें दहन करून पूर्वीच्या अग्नीचे ठायींच अग्निहोत्रहोम, इष्टि इत्यादि आणि चातुर्मास्यादिक करावें; सोमयाग करूं नये. पूर्वीच्या अग्नींतून अल्प अग्नि घेऊन त्यांहींकरून दहन करावें असें यज्ञपार्श्व, देवयाज्ञिकादिक ह्मणतात. "तस्मात् अपत्नीकानेंहि अग्निहोत्र धारण करावें," असीं जीं श्रुति स्मृति इत्यादि वचनें तीं तर पूर्वीच्या अग्नीचे ठायींच अग्निहोत्र धारण करणें एतत्पर होत, अपत्नीकास आधानाचें विधान सांगणारीं नव्हत; कारण, अपत्नीकास आधानाचा विधि सांगणारें मूळवचन नाहीं. "विवाहाविषयीं जर असमर्थ असेल तर आपणासाठीं अग्नीचें आधेय करावें." असें जें आपस्तंबसूत्र तें तर, पुनः विवाह करण्याविषयीं सामर्थ्य नसतां पूर्वीं केलेलें अग्नीचें आधेय आपणासाठींच ठेवावें, स्त्रियेकारणें देऊं नये एतत्पर आहे. ब्राह्मणभाष्य, अपरार्क, आ-

---

१ अत्रमूलमंत्येष्टिपद्धतौ ॥ किंत्वेतावदिहाप्यस्तिदग्ध्वानिर्मथ्यवन्हिना उत्सर्गेष्ट्यात्यजेदग्नीन् पुनस्तानादधीतच शवाग्नयोवाएतेयेपत्न्यांमृतायांधार्यंतेइतिकठश्रुतिः सिंध्वादावेतत्पक्षानुक्तेरेकीयमतत्वमस्योक्तं इदंमतद्वयं स्मार्तेपियोज्यं ॥

शार्क, रामांडार इत्यादि ग्रंथांचें मतहि असेंच आहे. जे ग्रंथकार अपत्नीकानें आधान करावें असें ह्मणतात त्यांचा अभिप्राय आह्मी जाणत नाहीं, असें जें निर्णयसिंधूचें मत तेंच योग्य असें वाटतें. याज्ञिकांचा आचार तर, अंतर्गत जी गुप्त विवाहाची इच्छा तन्मूलक आहे, प्रामाण्य दाखविणारा नाहीं. पुनः विवाहाचे आशेनें सर्व अग्नि दिले आणि पश्चात् विवाहाचा असंभव असेल तर निर्णयसिंधूच्या मतानें आधानाचा अभाव असतां निर्मथ्याग्निच ग्रहण करावा. कितीएकांच्या मतीं पुनराधान करावें. याविषयीं 'निर्मथ्याग्नि इत्यादिकेंकरून पूर्वी मृत झालेल्या स्त्रियेचें दहन करावें, अशा पक्षीं पूर्वीच्या अग्नींचा उत्सर्गेष्टीनें त्याग करून पुनराधान करून अग्निहोत्र करावें असें कोणी ह्मणतात. याप्रमाणें स्मार्ताग्निमान् याची पूर्वी स्त्री मरण पावली असतांहि गृह्याग्नीच्या एकदेशेंकरून तिचें दहन करावें, आणि अवशिष्ट अग्नीचे ठायीं नित्य होम, स्थालीपाक, आग्रयण हीं करावीं. एथें सर्वत्र ठिकाणीं श्रौतस्मार्ताविषयींहि कुशपत्नीविधानेंकरूनच आधानादि कर्मांचा अधिकार आहे.

---

अनेकभार्यस्यज्येष्ठायांजीवत्यांकनिष्ठभार्यामरणेनिर्मथ्यादिनातांदहेत् नश्रौतस्मार्ताग्निभिः केचित्पूर्वैसर्वाग्निभिःकनिष्ठांदग्ध्वाज्येष्ठयासहपुनराधानंकार्यमित्याहुस्तदग्निद्वयसंसर्गपरंमतांतरपरंवाबोध्यं दाहकालेग्निनाशेतुयजमानेचितारूढेपात्रन्यासेकृतेसतिवर्षाद्यभिहते वन्हौचिताग्निस्थेकथंचन तदार्धदग्धकाष्ठानितानिनिर्मथ्यतंदहेत् ॥

अनेक भार्या ज्यास असतील त्याची ज्येष्ठ भार्या जीवंत असून कनिष्ठ भार्या मरण पावली असतां निर्मथ्य इत्यादिक अग्नीकरून तिचें दहन करावें, श्रौतस्मार्ताग्नींनीं दहन करूं नये. कोणी ग्रंथकार, पूर्वी सर्व अग्नींनीं कनिष्ठेचें दहन करून ज्येष्ठपत्नीसहवर्तमान पुनराधान करावें असें ह्मणतात तें, दोन अग्नींचा संसर्ग जेथें असतो तत्पर अथवा दुसरें जें मत तत्पर जाणावें. दहनसमयीं अग्नीचा नाश होईल तर, "यजमान चितारूढ करून यज्ञपात्रें स्थापन केलीं असतां चितेवरील अग्नि पर्जन्यवृष्टि इत्यादिकेंकरून नष्ट झाला तर त्या कालीं अर्द्ध दग्ध झालेलीं काष्ठें मंथन करून त्या अग्नीनें त्याचें दहन करावें."

---

अथगृहात्स्मशानेशवनयनप्रकारः तत्रविप्रप्रेतंनगरपश्चिमद्वारेणशूद्रंदक्षिणद्वारेणनिःसार्यसजातीयाःशवंप्रच्छादितमुखंप्राक्शिरसंदाहदेशंनयेयुः पूर्वोक्तोग्निःशवाग्रेन्येननेतव्यः प्रेताग्न्योर्मध्येन्येननगंतव्यं सर्वेसपिंडादयोधःकृतोपवीतामुक्तकेशाज्येष्ठपुरःसराःप्रेतमनुगच्छेयुः प्रेतश्चनग्नोनदग्धव्यः निःशेषतश्चनदाह्यः शववस्त्रंचस्मशानवासिभ्योदेयं प्रेतश्चकेशनखादिवापयित्वास्नाप्यगंधपुष्पाद्यैरलंकृत्यदग्धव्यः दिनेमृतोदिवैवदाह्योरात्रिमृतस्यरात्रावेव दिवावारात्रौवास्थितःशवःपर्युषितः पर्युषितशवंपंचगव्येनस्नापयित्वाप्राजापत्यत्रयं

---

१ याविषयीं मूळ अंत्येष्टिपद्धति ग्रंथांत—तर त्या स्थलींहि इतकेंच आहे कीं, निर्मथ्याग्नीनें दहन करून उत्सर्गेष्टिकरून पूर्वीचे अग्नि टाकावे आणि पुनः ते आधानपूर्वक धारण करावे, पत्नी मृत असतां जे अग्नि धारण करावे ते शवाग्नि होत असी कठश्रुति आहे. निर्णयसिंधु इत्यादि ग्रंथांत हा पक्ष सांगितला नाहीं यास्तव हें एकदेशीय मत आहे, व हीं दोनहि मतें स्मार्ताविषयींहि योजावीं.

कृत्वादहेत् मुखस्थसप्तछिद्राणिहिरण्यशकलैराच्छादयेत् अत्रपात्रन्यासोमंत्रवद्दाहादिविधि श्वस्वस्वसूत्रानुसारिश्रौतस्मार्तांत्येष्टिप्रयोगेषुज्ञेयः ततोदाहांतेघटस्फोटादिकंकार्यं शिलाविप र्ययेपिघटस्फोटस्यनावृत्तिः ततश्चितामप्रदक्षिणंसर्वेपर्यावृत्यसचैलंस्नात्वाचम्यसगोत्रसपिंडस मानोदकानांमातामहीमातामहयोराचार्यादेश्चदुहितृभगिन्योश्चावश्यंतिलांजलिंदद्युः तद्यथा वृद्धपूर्वादक्षिणामुखाअमुकगोत्रनामाप्रेतस्तृप्यत्विितिमंत्रेणांजलिनासकृत्पाषाणेसिंचेयुः अत्र स्नानोदकदानेऽपनःशोशुचदघमितिमंत्रेण स्नानमेवतेनमंत्रेणेत्यन्ये स्त्रीणांतुमंत्रोनास्ति मातु लपितृष्वसृमातृष्वसृस्वस्त्रीयश्वशुरमित्रयाजकादीनामुदकदानंकृताकृतं करणपक्षेपिनाश्म न्येवेतिनियमः व्रात्यब्रह्मचारिपतितव्रतिक्लीबचोराश्चनोदकंदद्युः तत्रव्रात्यायथाकालमुपनय नहीनाः व्रतिनः प्रक्रांतप्रायश्चित्ताः चोराःसुवर्णतत्समद्रव्यापहारिणः ब्रह्मचारिभिर्मातापि तृपितामहमातामहगुर्वाचार्यादीनामुदकदानंकार्यंप्रक्रांतप्रायश्चित्तैस्तुतदंतेउदकदानंत्रिरात्रा शौचंचकार्यं व्रात्यादिभिःप्रेतस्पर्शवहनदाहपिंडादिकमपिनकार्यं अन्याभावेब्रह्मचार्यपि पि त्रादेर्दाहमाशौचंकुर्यात् कर्मलोपस्तुनास्तीत्युक्तंइदंचोदकदानमेकवाससापसव्येनैव उदक दानोत्तरंपुनःस्नात्वावस्त्राणिनिष्पीड्यकुलवृद्धाःपुत्रादीन्पूर्वेतिहासैः समाश्वास्यविप्रानुमत्या कनिष्ठानुक्रमेणगृहंगत्वा निंबपत्राणिशनैर्भक्षयित्वाचम्याग्न्युदकगोमयादीन् स्पृष्ट्वाद्वारा श्मनिपदंनिधायगृहंप्रविशेयुः निंबपत्रभक्षणंकृताकृतंततस्तद्दिनेउपवसेयुःउपवासाशक्तावया चितलब्धेनान्यगृहपक्केनवैकेनैवहविष्यान्नेनवर्तेरन् ॥

## यानंतर घरांतून स्मशानामध्यें शव नेण्याचा प्रकार सांगतों.

त्यामध्यें ब्राह्मणाचें प्रेत नगराचे पश्चिम द्वारानें, शूद्राचें दक्षिण द्वारानें बाहेर काढून सजातीय यांनीं शव, मुख आच्छादित केलेलें असून पूर्व दिशेस मस्तक केलेलें असें दहन करण्याचे भूमीप्रत न्यावें. पूर्वी सांगितलेला अग्नि शवाचे पुढें अन्यानें न्यावा. प्रेत व अग्नि यांचे मधून अन्यानें जाऊं नये. सर्व सपिंड इत्यादिक अधोभागीं उपवीती केलेले, मुक्तकेश, ज्येष्ठ आहेत अग्रभागीं ज्यांच्या असे होत्साते प्रेताचे मागून गमन करावें. नग्न प्रेत दहन करूं नये. निःशेषेंकरून्नहि दहन करूं नये. शवाचें वस्त्र स्मशानांत राहणारे त्यांस द्यावें. प्रेताचे केश, नख इत्यादिकांचें वपन करवून स्नान घालवून गंध, पुष्पें इत्यादिकानें अलंकृत करून दहन करावें. दिवसा मृत असतां दिवसासच दहन करावें. रात्रीं मृत झालेल्याचें दहन रात्रींच करावें. दिवसा अथवा रात्रीं प्रेत ( दहन करण्याचें ) राहिलें असतां तें पर्युषित ( शिळें ) होतें. पर्युषित झालेल्या प्रेतास पंचगव्यानें स्नान घालून तीन प्राजापत्यें करून दहन करावें. मुखावरील सात ( मुख, दोन नासिकाछिद्रें, दोन नेत्र, दोन कर्ण, ) छिद्रें हिरण्याचीं शकलें ( तुकडे ) घालून आच्छादित करावीं. ह्या स्थलीं पात्रस्थापन, व समंत्रक दहनादिकविधि हे आपापल्या सूत्राप्रमाणें श्रौत व स्मार्त जे अंत्येष्टिप्रयोग त्यामध्यें पाहावे. नंतर दहन झाल्यावर घट फोडणें इत्यादिक करावें. अश्म्याचा जरी विपर्यास होईल तथापि घट फोडणें याची आवृत्ति करूं नये. तदनंतर सर्वांनीं अप्रदक्षिण असें चितेच्या सभोंवार फिरून सवस्त्रस्नान

करून आचमन करून सगोत्र, सपिंड, समानोदक, मातामही, मातामह, आचार्यादिक, कन्या, भगिनी यांस अवश्य तिलांजलि द्यावा. तो असा—वृद्धपूर्वक दक्षिणामुख होत्साते "**अमुकगोत्रनामाप्रेतस्तृप्यमतु**" ह्या मंत्रेंकरून अंजलीनें एक वेळ अश्म्यावर उदक द्यावें. ह्या स्थलीं स्नानोदक देणें असेल तर "**अपनःशोशुचदघ०**" ह्या मंत्रेंकरून द्यावें. स्नानच त्या मंत्रेंकरून द्यावें असें दुसरे ह्मणतात. स्त्रियांनीं देणें त्याविषयीं मंत्र नाहीं. मातुळ, आत, मावशी, भगिनीपुत्र, श्वशुर, मित्र, उपाध्याय इत्यादिकांस उदकदान कृताकृत आहे. करणपक्ष असतांहि अश्म्याबरच द्यावें असा नियम नाहीं. व्रात्य, ब्रह्मचारी, पतित, व्रती, षंढ, चोर यांनीं उदक ह्मणजे तिलांजलि देऊं नये. त्यामध्यें व्रात्य ह्मणजे यथाकालीं उपनयन न झालेले ते; व्रती ह्मणजे प्रायश्चित्तास आरंभ केलेले; चोर ह्मणजे सुवर्ण व तत्सम द्रव्यें यांचा अपहार करणारे; ब्रह्मचारी यांनीं माता, पिता, पितामह, मातामह, गुरु, आचार्य इत्यादिकांस उदकदान करावें. प्रायश्चित्तास आरंभ केलेले त्यांनीं तर प्रायश्चित्ताची समाप्ति झाल्यानंतर उदकदान व त्रिरात्र आशौच धरावें. व्रात्य इत्यादिकांनीं प्रेतास स्पर्श, वहन, दहन व पिंडादिकहि करूं नये. दुसरा अधिकारी नसल्यास ब्रह्मचारी यानेंहि पिता इत्यादिकांचें दहन करून आशौच धरावें; कर्मलोप तर नाहीं असें सांगितलें आहे. हें उदक देणें तें एकवस्त्र होत्साता अपसव्येंकरूनच द्यावें. उदकदान केल्यानंतर पुनः स्नान करून वस्त्रें पिळून कुलांतील जे वृद्ध त्यांनीं पूर्वींचे इतिहास सांगून पुत्रादिकांचें समाधान करून ब्राह्मणाचे अनुमोदनेंकरून कनिष्ठानुक्रमानें गृहाप्रत जाऊन निंबवृक्षाचीं पानें हळूहळू भक्षण करून आचमन करून अग्नि, उदक, गोमय इत्यादिकांस स्पर्श करून द्वारसंबंधी अश्म्यावर (पायरीवर) पाय देऊन घरांत प्रवेश करावा. निंबवृक्षाचीं पानें भक्षण करावीं किंवा न करावीं. तदनंतर त्या दिवसीं उपोषण करावें. उपोषण करण्यास असामर्थ्य असेल तर याचनेवांचून प्राप्त झालेलें अथवा दुसऱ्याचे घरीं शिजलेलें, असें एकच हविष्यान्न भक्षण करून राहावें.

---

**तत्राशौचमध्येमाषमांसापूपमधुरलवणदुग्धाभ्यंगतांबूलक्षाराणिवर्ज्यानिक्षाराणितु तिलमुद्गादृतेशैब्यंसस्येगोधूमकोद्रवौ धान्याकंदेवधान्यंचशमीधान्यंतथैवच स्विन्नधान्यंतथापण्यंमूलंक्षारगणःस्मृतः केचित्सैंधवंभक्ष्यमित्याहुः आदर्शस्त्रीसंगद्यूतादिहसनरोदनोच्चासनानिनित्यंत्यजेयुः बालवृद्धातुरवर्जंतृणकटास्तीर्णभूमौपृथक्शयीरन्नकंबलाद्यास्तीर्णभूमौ मार्जनादिरहितमेवस्नानं अस्थिसंचयनादूर्ध्वंभार्यापुत्रव्यतिरिक्तानांशय्यासनादिभोगोस्त्येव स्त्रीसंगस्तुनास्ति ॥**

त्या आशौचामध्यें माष (उडीद), मांस, अपूप, मधुर, लवण, दूध, अभ्यंग, तांबूल, आणि क्षार हे पदार्थ वर्ज्य करावे. क्षार पदार्थ— "तिळ, मूग यांवांचून शेंगेंत उत्पन्न होणारें धान्य; सस्यांतील गहूं व कोद्रव हीं धान्यें आणि धणे; देवधान्य, शमीधान्य[1], स्विन्नधा-

---

[1] मूग, उडीद, राजमाष, कुळीथ, चणा (हरभरा) तिल, वाटाणा तूर ह्या आठ धान्यांस शमीधान्य म्हणतात.

न्य ( ओलें धान्य ), पण्य, मुळा याप्रमाणें क्षारगण जाणावा. कोणी ग्रंथकार सैंधव भक्षण करावें असें ह्मणतात. आरसा, स्त्रीसंग, द्यूतादिक, हंसणें, रोदन, उंच आसन हीं नित्य वर्ज्य करावीं. बाल, वृद्ध, रोगी वर्ज्य करून तृणाच्या हांतऱ्या आस्तीर्ण केलेल्या भूमीवर निरनिराळी निद्रा करावी, कांबळें इत्यादिक हांतरलेल्या भूमीवर निद्रा करूं नये. मार्जनादिक न करितांच स्नान करावें. अस्थिसंचयन झाल्यानंतर भार्या, पुत्र यांहून इतरांस आंथरूण, आसन ( पाट ), इत्यादिक भोग आहेच; स्त्रीसंग तर करूं नये.

---

अस्थिसंचयनंतु समंत्राग्निदाहदिनादारभ्यप्रथमदिनेद्वितीयेतृतीयेचतुर्थेसप्तमेनवमेवागोत्रजैःसहस्वस्वसूत्रोक्तप्रकारेणकार्यं तत्रद्विपादत्रिपादनक्षत्राणिकर्तुर्जन्मनक्षत्रंचवर्ज्यं संभवेर्केभौममंदवारावर्ज्याः पालाशदाहास्थिदाहयोःसद्यःसंचयनं अस्थ्नांगंगांभसितीर्थांतरेवा प्रक्षेपः तद्विधिर्वक्ष्यते अरण्येवृक्षमूलेनिखननंवा अस्थीन्यन्यकुलस्थस्यनीत्वाचांद्रायणंचरेत् दययान्यस्यापिनयनेमहापुण्यं अस्थ्नांश्वसूकरशूद्रादिस्पर्शेपंचगव्यशालग्रामतुलस्युदकैःप्रोक्षणं आशौचमध्येसगोत्रजैःसहभोक्तव्यं तद्दिवैव भोजनंचमृन्मयेषुपर्णपुटकेषुवाकार्यं न तुधातुपात्रेषु ॥

अस्थिसंचयन तर, समंत्रक अग्नीनें ज्या दिवसीं दहन झालें त्या दिवसाला आरंभ करून पहिला दिवस, दुसरा, तिसरा, चौथा, सातवा अथवा नववा या दिवसीं गोत्रजांसहवर्तमान आपापल्या सूत्रांत सांगितल्या प्रकारानें करावें. त्याविषयीं द्विपाद, त्रिपाद नक्षत्रें व कर्त्याचें जन्मनक्षत्र हीं वर्ज्य करावीं. संभव असतां रवि, भौम, शनि हे वार वर्ज्य करावे. पालाशविधीनें दहन व अस्थिदहन असतां तत्कालीं अस्थिसंचयन करावें. अस्थि गंगेच्या उदकांत अथवा दुसऱ्या तीर्थी टाकाव्या. त्याचा विधि सांगेन. अरण्यांत अथवा वृक्षाचे मूलाचे ठायीं पुरून ठेवाव्या. “ अन्य कुळांतील मनुष्याच्या अस्थि नेल्या असतां चांद्रायण करावें. ” अन्याच्याहि अस्थि दयेंकरून नेल्या असतां महापुण्य प्राप्त होतें. कुत्रा, डुकर, शूद्र इत्यादिकांचा स्पर्श अस्थींस झाला असतां पंचगव्य, शालग्राम व तुलसी यांचें उदक यांहींकरून प्रोक्षण करावें. आशौचामध्यें आपल्या गोत्रजांसहवर्तमान भोजन करावें, व तें दिवसासच करावें. भोजन करणें तें मृत्तिकापात्रांत, अथवा पानांच्या पत्रावळीवर करावें; धातुपात्रांत भोजन करूं नये.

---

दाहदिनादारभ्यदशपिंडादशदिनमध्येदर्भास्तीर्णभूमावमंत्रकंदेयाः क्षत्रियादीनांनवपिंडाःनवदिनांतंदशमपिंडस्त्वाशौचांत्यदिने प्रथमेहनियोदेशोयश्चकर्तायच्चतंडुलादिद्रव्यंयच्चोत्तरीयशिलापाकपात्रादितदेवदशाहांतं एतदन्यतमव्यत्ययेयतोव्यत्ययस्ततःपुनरावृत्तिः शिलाविपर्ययेपिघटस्फोटादेर्नावृत्तिरित्युक्तेर्लौकिकशिलाग्रहणं तेनपिंडदानतिलांजल्यादिकस्यैवावृत्तिर्नदाहस्य केचिदाचार्यविपर्ययेप्यावृत्तिमाहुः यत्रपुत्रादिमुख्यकर्तुरसन्निधानादमुख्याधिकारिणापिंडदानक्रियारब्धातत्रमध्येपुत्रादिसन्निधानेप्यमुख्यकर्त्रैवदशाहांताक्रियासमापनीया एकादशाहादिकंतुपुत्रादिमुख्येनैव समंत्रकदाहमात्रेन्येनकृतेतुपिंडदानादिदशाहकृत्यं

सन्निकृष्टमुख्येनैवकार्यमितिमिताक्षरादयः अन्येतुसगोत्रोऽसगोत्रोवायःसमंत्रकदाहकर्तास एवदशाहंकुर्यादित्याहुः पत्न्याःकर्तृत्वेरजोदर्शनेजातेसातदंतेकुर्यात् कर्तुरस्वास्थ्येन्येनसर्वाः क्रियाःपुनःकार्याः पिंडद्रव्येषुतंडुलामुख्याः तदभावेफलंमूलशाकतिलमिश्रसक्तवोपि प्रेतश्राद्धेषुपितृशब्दस्वधाशब्दानुशब्दाःपुष्पधूपदीपदानादौमंत्राश्चनवाच्याः त्र्यहाशौचेपर्णशरदाहादौप्रथमेदिनेएकः पिंडःद्वितीयेचत्वारः तृतीयेपंचेतिक्रमोबोध्यः पुत्रेणपर्णशरदाहेकृतेतस्यदशाहाशौचात्तेनत्र्यहमध्येपिंडसमाप्तिर्नकार्या शिरस्त्वाद्येनपिंडेनप्रेतस्यक्रियतेसदा द्वितीयेनतुकर्णाक्षिनासिकाः तृतीयेनकंठस्कंधभुजवक्षांसि चतुर्थेननाभिलिंगगुदानि पंचमेन जानुजंघपादं षष्ठेनमर्माणि सप्तमेननाड्यः अष्टमेनदंतलोमानि नवमेनवीर्यं दशमेनतुपूर्णत्वंतृप्तताक्षुद्विपर्ययः जलंदशाहमाकाशेस्थाप्यंक्षीरंचमृन्मये प्रेतात्रस्नाहीत्युदकं इदंपिबेतिच क्षीरं इदंचकृताकृतं ततः प्रेतोपकृतयेदशरात्रमखंडितं कुर्यात्प्रदीपंतैलेनवारिपात्रंचमार्तिकं भोज्याद्भोजनकालेतुभक्तमुष्टिंचनिर्वपेत् नामगोत्रेणसंबुद्ध्याधरित्र्यांपितृयज्ञवत् भूर्लोकात्प्रेतलोकंतुगंतुंश्राद्धंसमाचरेत् तत्पाथेयंहिभवतिमृतस्यमनुजस्यच ॥

दहनाचे दिवसाला आरंभ करून दहा पिंड, दहा दिवसांमध्यें, दर्भांनीं आस्तीर्ण केलेल्या भूमीवर अमंत्रक द्यावे. क्षत्रियादिकांनीं नऊ पिंड नऊ दिवसपर्यंत द्यावे, दहावा पिंड तर, आशौचाचे शेवटचे दिवसीं द्यावा. पहिल्या दिवसीं जो देश, ( स्थल ), जो कर्ता, जें तांदुळ इत्यादि द्रव्य, जी उत्तरी, जो अश्मा आणि जें पाक करण्याचें पात्र इत्यादि तींच दहा दिवसपर्यंत ग्रहण करावीं. यांतून एकाद्याचा विपर्यास झाला असतां ज्या दिवसापासून विपर्यास झाला त्या दिवसापासून पुनरावृत्ति करावी. अश्म्याचा जरी विपर्यास झाला तथापि घट फोडणें इत्यादिकाची आवृत्ति करूं नये असें सांगितलें आहे; यास्तव लौकिक अश्मा ग्रहण करावा. त्यावरून पिंडदान, तिलांजलि इत्यादिक कर्मांचीच आवृत्ति करावी, दहनाची करूं नये असें होतें. कोणी ग्रंथकार, आचार्याचा (क्रिया सांगणाराचा ) विपर्यास झाला असतांहि आवृत्ति करावी असें ह्मणतात. ज्या कालीं पुत्रादिक मुख्य कर्ता समीप नसल्यामुळें अमुख्य अधिकाऱ्यानें पिंडदानक्रिया आरंभिली असेल त्या कालीं मध्यें पुत्रादिकाचें सन्निधान झालें तथापि अमुख्य कर्त्यानेंच दहा दिवसपर्यंतची क्रिया समाप्त करावी. अकराव्या दिवसाची इत्यादिक क्रिया तर, पुत्रादिक मुख्यानेंच करावी. समंत्रक दहन मात्र दुसऱ्यानें केलें असेल तर, पिंडदानादिक दहा दिवसांची क्रिया समीपस्थ मुख्य असेल त्यानेंच करावी असें मिताक्षरादिक ग्रंथ ह्मणतात. दुसरे ग्रंथ तर, सगोत्र अथवा असगोत्र जो समंत्रक दहन करणारा त्यानेंच दहा दिवसपर्यंत करावी असें ह्मणतात. पत्नी क्रिया करणारी असून ती रजस्वला झाली असतां रजोदर्शनशुद्धीनंतर तिणें क्रिया करावी. कर्त्यास अस्वास्थ्य (शरीरीं अस्वस्थपणा ) असेल तर अन्यानें सर्व क्रिया पुनः कराव्या. पिंडाचीं जीं द्रव्यें त्यामध्यें तांदूळ हे मुख्य होत; तांदूळ नसतील तर फल, मूल, शाक अथवा तिलमिश्र असें भाजलेल्या यवांचें पीठहि घ्यावें. प्रेतश्राद्धाचे ठायीं पितृशब्द, स्वधाशब्द आणि अनुशब्द व पुष्प, धूप, दीपदान इत्यादिकांविषयीं मंत्र ह्मणूं नयेत. तीन दिवसांचे आशौचांत, पालाशविधीनें दहनादिक झालें असेल तर, पहिल्या दिवसीं एक पिंड, दुसऱ्या दिवसीं चार पिंड, तिसऱ्या दिवसीं पांच

असा क्रम जाणावा. पुत्रानें पालाशविधीकरून दहन केलें असतां त्यास दहा दिवस आशौच आहे याकरितां तीन दिवसांमध्यें पिंडांची समाप्ति करूं नये. "प्रथम पिंडेंकरून प्रेतास शिर सार्वकाल प्राप्त होतें." दुसऱ्या पिंडानें कर्ण, नेत्र, नासिका; तिसऱ्या पिंडानें कंठ, स्कंध, भुज, वक्षस्थल; चवथ्या पिंडानें नाभि, लिंग, गुद; पांचव्या पिंडेंकरून गुडघे, मांड्या, पाय; सहाव्या पिंडेंकरून मर्मस्थानें; सातव्या पिंडेंकरून नाडी; आठव्या पिंडेंकरून दांत, लोम; नवव्या पिंडानें वीर्य; दहाव्या पिंडेंकरून तर पूर्णपणा, तृप्तता, क्षुधेचा विपर्यास याप्रमाणें होतात. मृन्मयपात्रांत उदक व दूध घालून दहा दिवस आकाशांत (अंतराल) ठेवावें. "प्रेतात्रस्नाहि" असें ह्मणून उदक ठेवावें. "इदं पिब" असें ह्मणून दूध ठेवावें. हें कृताकृत (करावें न करावें असें) आहे. तदनंतर "प्रेतावर उपकार होण्यासाठीं दहा रात्रींपर्यंत तेलाचा अखंड दीप लावावा, आणि मृन्मय पात्र उदकानें भरून ठेवावें. भोजनसमयीं भक्षण करण्याचे अन्नांतून भाताची मुष्टि घेऊन संबुद्धिविभक्तीनें नामगोत्रांचा उच्चार करून ती पितृयज्ञाप्रमाणें भूमीवर द्यावी. "भूलोकापासून प्रेतलोकाप्रत जाण्याकरितां मृत मनुष्याचें जें श्राद्ध करावें, तें पाथेय श्राद्ध होय."

---

**अथदशाहमध्येदर्शपातेनिर्णयः** पिंडदानादौप्रारब्धेयदिमध्येदर्शप्राप्तिस्तदामातापितृव्यतिरिक्तानांसर्वंदशाहकृत्यमाकृष्यदर्शएवसमापनीयं मातापितृविषयेतुत्र्यहमध्येदर्शपातेनापकर्षः त्रिरात्रात्परंदर्शपातेतुपित्रोरपिसर्वंदर्शएवसमापनीयमितिकेचित् अन्येतुत्रिरात्रोर्ध्वमपिदर्शपातेऔरसपुत्रेणपित्रोस्तंत्रसमाप्तिर्नकार्येत्याहुः अत्रदेशाचाराद्व्यवस्थेतिसिंध्वादयः यदिदैवाद्दर्शात्पूर्वंपिंडदानादितंत्रंनारब्धंतदादाहमात्रेसमंत्रकेजातेपिनदर्शेतंत्रसमाप्तिनियमइतिभाति दर्शोत्तरमेवतंत्रारंभसमाप्तिसंभवेन द्विरेंदवेतुकुर्वाणःपुनःशावंसमश्नुतइत्युक्तदोषाप्रसक्तेः एवंदर्शेपकृष्यतंत्रसमाप्तावप्यग्निपिंडदातुर्दशाहमाशौचमस्त्येव पुत्रादेः सपिंडस्यतुसुतरां दशाहंप्रेतपिंडान्प्रदायास्नात्वाभुक्त्वावसपिंडस्यत्रिरात्रोपवासः सपिंडस्योपवासएकः मत्याद्विगुणं प्रेतकृत्यंकुर्वतास्थिसंचयनादर्वाक्स्त्रीसंगेकृतेचांद्रायणं ऊर्ध्वंकृच्छ्रत्रयं अन्येषामाशौचिनांसंचयनादर्वाक्त्रिरात्रं तदुत्तरमेकोपवासः ॥

## यानंतर दहा दिवसांमध्यें दर्श प्राप्त असतां निर्णय सांगतों.

पिंडदान इत्यादिक कर्माचा आरंभ केला असतां जर मध्यें दर्श प्राप्त झाला तर मातापिताव्यतिरिक्तांचें सर्व दहा दिवसांचें कृत्य अपकर्षेंकरून दर्शदिवसींच समाप्त करावें. मातापितरांविषयीं तर, तीन दिवसांमध्यें दर्श प्राप्त असतां अपकर्ष करूं नये. तीन दिवसांनंतर दर्श प्राप्त असेल तर, मातापितरांचेंहि सर्व कृत्य दर्शदिवसींच समाप्त करावें असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, तीन रात्रींनंतरहि दर्श प्राप्त असतां औरस पुत्रानें मातापितरांची तंत्रसमाप्ति करूं नये, ह्मणजे अपकर्षानें कृत्य समाप्त करूं नये असें ह्मणतात. याविषयीं देशाचारेंकरून व्यवस्था करावी असें निर्णयसिंधु इत्यादिक ग्रंथ ह्मणतात. जर दैववशेंकरून दर्शाचे पूर्वीं पिंडदानादि तंत्र आरंभलें नाहीं आणि दहनमात्र समंत्रक झालें असेल तथापि दर्शदिवसीं तंत्रसमाप्तीविषयीं नियम नाहीं असें वाटतें; कारण, दर्शानंतरच

सन्निकृष्टमुख्येनैवकार्यमितिमिताक्षरादयः अन्येतुसगोत्रोऽसगोत्रोवायःसमंत्रकदाहकर्तास एवदशाहंकुर्यादित्याहुः पत्न्याःकर्तृत्वेरजोदर्शनेजातेसातदंतेकुर्यात् कर्तुरस्वास्थ्येन्येनसर्वाः क्रियाःपुनःकार्याः पिंडद्रव्येषुतंडुलामुख्याः तदभावेफलंमूलशाकतिलमिश्रसक्तवोपि प्रेतश्राद्धेषुपितृशब्दस्वधाशब्दानुशब्दाःपुष्पधूपदीपदानादौमंत्राश्चनवाच्याः त्र्यहाशौचेपर्णशरदाहादौप्रथमेदिनेएकः पिंडःद्वितीयेचत्वारः तृतीयेपंचेतिक्रमोबोध्यः पुत्रेणपर्णशरदाहेकृतेतस्यदशाहाशौचात्तेनत्र्यहमध्येपिंडसमाप्तिर्नकार्या शिरस्त्वाद्येनपिंडेनप्रेतस्यक्रियतेसदा द्वितीयेनतुकर्णाक्षिनासिकाः तृतीयेनकंठस्कंधभुजवक्षांसि चतुर्थेननाभिलिंगगुदानि पंचमेन जानुजंघपादं षष्ठेनमर्माणि सप्तमेननाड्यः अष्टमेनदंतलोमानि नवमेनवीर्यं दशमेनतुपूर्णत्वंतृप्तताक्षुद्विपर्ययः जलंदशाहमाकाशेस्थाप्यंक्षीरंचमृन्मये प्रेतात्रस्नाहीत्युदकं इदंपिबेतिच क्षीरं इदंचकृताकृतं ततः प्रेतोपकृतयेदशरात्रमखंडितं कुर्यात्प्रदीपंतैलेनवारिपात्रंचमार्तिकं भोज्यान्नोजनकालेतुभक्तमुष्टिंचनिर्वपेत् नामगोत्रेणसंबुद्ध्याधरित्र्यांपितृयज्ञवत् भूर्लोकात्प्रेतलोकंतुगंतुंश्राद्धंसमाचरेत् तत्पाथेयंहिभवतिमृतस्यमनुजस्यच ॥

दहनाचे दिवसाला आरंभ करून दहा पिंड, दहा दिवसांमध्यें, दर्भांनीं आस्तीर्ण केलेल्या भूमीवर अमंत्रक द्यावे. क्षत्रियादिकांनीं नऊ पिंड नऊ दिवसपर्यंत द्यावे, दहावा पिंड तर, आशौचाचे शेवटचे दिवसीं द्यावा. पहिल्या दिवसीं जो देश, ( स्थल ), जो कर्ता, जें तांदुळ इत्यादि द्रव्य, जी उत्तरी, जो अश्मा आणि जें पाक करण्याचें पात्र इत्यादि तींच दहा दिवसपर्यंत ग्रहण करावीं. यांतून एकाद्याचा विपर्यास झाला असतां ज्या दिवसापासून विपर्यास झाला त्या दिवसापासून पुनरावृत्ति करावी. अश्म्याचा जरी विपर्यास झाला तथापि घट फोडणें इत्यादिकाची आवृत्ति करूं नये असें सांगितलें आहे; यास्तव लौकिक अश्मा ग्रहण करावा. त्यावरून पिंडदान, तिलांजलि इत्यादिक कर्मांचीच आवृत्ति करावी, दहनाची करूं नये असें होतें. कोणी ग्रंथकार, आचार्याचा (क्रिया सांगणाराचा ) विपर्यास झाला असतांहि आवृत्ति करावी असें ह्मणतात. ज्या कालीं पुत्रादिक मुख्य कर्ता समीप नसल्यामुळें अमुख्य अधिकाऱ्यानें पिंडदानक्रिया आरंभिली असेल त्या कालीं मध्यें पुत्रादिकाचें सन्निधान झालें तथापि अमुख्य कर्त्यानेंच दहा दिवसपर्यंतची क्रिया समाप्त करावी. अकराव्या दिवसाची इत्यादिक क्रिया तर, पुत्रादिक मुख्यानेंच करावी. समंत्रक दहन मात्र दुसऱ्यानें केलें असेल तर, पिंडदानादिक दहा दिवसांची क्रिया समीपस्थ मुख्य असेल त्यानेंच करावी असें मिताक्षरादिक ग्रंथ ह्मणतात. दुसरे ग्रंथ तर, सगोत्र अथवा असगोत्र जो समंत्रक दहन करणारा त्यानेंच दहा दिवसपर्यंत करावी असें ह्मणतात. पत्नी क्रिया करणारी असून ती रजस्वला झाली असतां रजोदर्शनशुद्धीनंतर तिणें क्रिया करावी. कर्त्यास अस्वास्थ्य (शरीरीं अस्वस्थपणा ) असेल तर अन्यानें सर्व क्रिया पुनः कराव्या. पिंडाचीं जीं द्रव्यें त्यामध्यें तांदूळ हे मुख्य होत; तांदूळ नसतील तर फल, मूल, शाक अथवा तिलमिश्र असें भाजलेल्या यवांचें पीठहि घ्यावें. प्रेतश्राद्धाचे ठायीं पितृशब्द, स्वधाशब्द आणि अनुशब्द व पुष्प, धूप, दीपदान इत्यादिकांविषयीं मंत्र ह्मणूं नयेत. तीन दिवसांचे आशौचांत, पालाशविधीनें दहनादिक झालें असेल तर, पहिल्या दिवसीं एक पिंड, दुसऱ्या दिवसीं चार पिंड, तिसऱ्या दिवसीं पांच

असा क्रम जाणावा. पुत्रानें पालाशविधीकरून दहन केलें असतां त्यास दहा दिवस आशौच आहे याकरितां तीन दिवसांमध्यें पिंडांची समाप्ति करूं नये. "प्रथम पिंडेंकरून प्रेतास शिर सार्वकाल प्राप्त होतें." दुसऱ्या पिंडानें कर्ण, नेत्र, नासिका; तिसऱ्या पिंडानें कंठ, स्कंध, भुज, वक्षस्थल; चवथ्या पिंडानें नाभि, लिंग, गुद; पांचव्या पिंडेंकरून गुडघे, मांड्या, पाय; सहाव्या पिंडेंकरून मर्मस्थानें; सातव्या पिंडेंकरून नाडी; आठव्या पिंडेंकरून दांत, लोम; नवव्या पिंडानें वीर्य; दहाव्या पिंडेंकरून तर पूर्णपणा, तृप्तता, क्षुधेचा विपर्यास याप्रमाणें होतात. मृन्मयपात्रांत उदक व दूध घालून दहा दिवस आकाशांत (अंतराल) ठेवावें. "प्रेतात्रस्नाहि" असें ह्मणून उदक ठेवावें. "इदं पिब" असें ह्मणून दूध ठेवावें. हें कृताकृत (करावें न करावें असें) आहे. तदनंतर "प्रेतावर उपकार होण्यासाठीं दहा रात्रींपर्यंत तेलाचा अखंड दीप लावावा, आणि मृन्मय पात्र उदकानें भरून ठेवावें. भोजनसमयीं भक्षण करण्याचे अन्नांतून भाताची मुष्टि घेऊन संबुद्धिविभक्तीनें नामगोत्रांचा उच्चार करून ती पितृयज्ञाप्रमाणें भूमीवर द्यावी. "भूलोकापासून प्रेतलोकाप्रत जाण्याकरितां मृत मनुष्याचें जें श्राद्ध करावें, तें पाथेय श्राद्ध होय."

---

**अथदशाहमध्येदर्शपातेनिर्णयः पिंडदानादौप्रारब्धेयदिमध्येदर्शप्राप्तिस्तदामातापितृव्यतिरिक्तानांसर्वंदशाहकृत्यमाकृष्यदर्शएवसमापनीयं मातापितृविषयेतुत्र्यहमध्येदर्शपातेनापकर्षः त्रिरात्रात्परंदर्शपातेतुपित्रोरपिसर्वंदर्शएवसमापनीयमितिकेचित् अन्येतुत्रिरात्रोर्ध्वमपिदर्शपातेऔरसपुत्रेणपित्रोस्तंत्रसमाप्तिर्नकार्येत्याहुः अत्रदेशाचाराद्व्यवस्थेतिसिंध्वादयः यदिदैवाद्दर्शात्पूर्वंपिंडदानादितंत्रंनारब्धंतदादाहमात्रेसमंत्रकेजातेपिनदर्शेतंत्रसमाप्तिनियमइतिभाति दर्शोत्तरमेवतंत्रारंभसमाप्तिसंभवेन द्विरैंदवेतुकुर्वाणःपुनःशावंसमश्नुतइत्युक्तदोषाप्रसक्तेः एवंदर्शेपकृष्यतंत्रसमाप्तावप्यग्निपिंडदातुर्दशाहमाशौचमस्त्येव पुत्रादेःसपिंडस्यतुसुतरां दशाहंप्रेतपिंडान्प्रदायास्नात्वाभुक्त्वावसपिंडस्यत्रिरात्रोपवासः सपिंडस्योपवासएकः मत्याद्विगुणं प्रेतकृत्यंकुर्वतास्थिसंचयनादर्वाक्स्त्रीसंगेकृतेचांद्रायणं ऊर्ध्वंकृच्छ्रत्रयं अन्येषामाशौचिनांसंचयनादर्वाक्त्रिरात्रं तदुत्तरमेकोपवासः ॥**

## यानंतर दहा दिवसांमध्यें दर्श प्राप्त असतां निर्णय सांगतों.

पिंडदान इत्यादिक कर्मांचा आरंभ केला असतां जर मध्यें दर्श प्राप्त झाला तर मातापिताव्यतिरिक्तांचें सर्व दहा दिवसांचें कृत्य अपकर्षेंकरून दर्शदिवसींच समाप्त करावें. मातापितरांविषयीं तर, तीन दिवसांमध्यें दर्श प्राप्त असतां अपकर्ष करूं नये. तीन दिवसांनंतर दर्श प्राप्त असेल तर, मातापितरांचेंहि सर्व कृत्य दर्शदिवसींच समाप्त करावें असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, तीन रात्रींनंतरहि दर्श प्राप्त असतां औरस पुत्रानें मातापितरांची तंत्रसमाप्ति करूं नये, ह्मणजे अपकर्षानें कृत्य समाप्त करूं नये असें ह्मणतात. याविषयीं देशाचारेंकरून व्यवस्था करावी असें निर्णयसिंधु इत्यादिक ग्रंथ ह्मणतात. जर दैववशेंकरून दर्शाचे पूर्वीं पिंडदानादि तंत्र आरंभलें नाहीं आणि दहनमात्र समंत्रक झालें असेल तथापि दर्शदिवसीं तंत्रसमाप्तीविषयीं नियम नाहीं असें वाटतें; कारण, दर्शानंतरच

तंत्राचा आरंभ व समाप्ति होणारीं असल्या कारणानें "दोन चंद्रांनीं युक्त अशा कालीं कर्म करणारास पुनः आशौच प्राप्त होतें" असा जो दोष सांगितला त्याची प्राप्ति नाहीं. याप्रमाणें दर्शदिवसीं अपकर्ष करून तंत्रसमाप्ति असतांहि अग्नि व पिंड देणारा यास दहा दिवस आशौच आहेच, पुत्रादिक सपिंडास तर निःसंशयच आहे. प्रेतास दहा दिवसपर्यंत पिंड देऊन स्नान न करितां भोजन केलें तर असपिंडानें त्रिरात्र उपवास करावा. सपिंडानें एक उपवास करावा. समजून स्नान न करितां भोजन केलें तर द्विगुण उपवास करावे. प्रेतकृत्य करणारानें अस्थिसंचयनाच्या पूर्वीं स्त्रीसंग केला असतां चांद्रायण करावें. अस्थिसंचयनानंतर ( स्त्रीसंग केला असतां ) तीन कृच्छ्र करावे, इतर आशौची यांस अस्थिसंचयनाचे पूर्वीं त्रिरात्र उपवास, त्यानंतर ( अस्थिसंचयनानंतर ) एक उपोषण जाणावें.

---

अथनवश्राद्धं प्रथमेन्हितृतीयेचपंचमेसप्तमेतथा नवमैकादशेचैवतन्नवश्राद्धमुच्यते नवश्राद्धानिपंचाहुराश्वलायनशाखिनः आपस्तंबाःषडित्याहुर्विभाषालितरेषुहि पंचपक्षेएकादशाहेनवश्राद्धंनकार्यं एतान्येवविषमश्राद्धानीत्युच्यंते नवश्राद्धानिदशाहांतर्नवमिश्रंतुवत्सरइत्यन्यत्र अकृत्वातुनवश्राद्धंप्रेतत्वान्नैवमुच्यते नवश्राद्धंत्रिपक्षंचषाण्मासिकंमासिकानिच नकरोतिसुतोयस्तुतस्याधःपितरोगताः अर्घ्यहीनमधूपंचगंधमाल्यविवर्जितं नवश्राद्धममंत्रं स्यादवनेजनवर्जितं आशिषोद्विगुणादर्भाजपाशीःस्वस्तिवाचनं पितृशब्दःस्वसंबंधःशर्मशब्दस्तथैवच पात्रालंभोवगाहश्च उल्मुकोल्लेखनादिकं तृप्तिप्रश्नश्चविकिरःशेषप्रश्नस्तथैवच प्रदक्षिणाविसर्गश्चसीमांतगमनंतथा अष्टादशपदार्थाश्चप्रेतश्राद्धेविवर्जयेत् तिलोसीतिमंत्रे स्वधानमःपितृशब्दानवाच्याः किंतुप्रेतशब्दोहेनतूष्णींवातिलावपनं तूष्णीमर्घ्यदानं अमुष्मैस्वाहेतिप्रेतनाम्नापाणिहोमः बह्वृचानांसर्वैकोद्दिष्टेष्वग्नौकरणमस्त्येव अन्यशाखिनांतुतन्निषेधः नाग्नौकःपिंडःनिनयनमंत्रेऊहः अनुमंत्रणादिकंत्वमंत्रकं अभिरम्यतामितिविसर्जनं एवंनवश्राद्धवर्ज्यैकोद्दिष्टेषु नवश्राद्धंत्वमंत्रकंसर्वमितिनारायणवृत्तिः उत्तानंस्थापयेत्पात्रमेकोद्दिष्टेसदाबुधः न्युब्जंतुपार्वणेकुर्यात्तस्योपरिकुशान्न्यसेत् सपिंडीकरणांतानिप्रेतश्राद्धानि लौकिकाग्नावित्याश्वलायनमतं नवश्राद्धानिसंभवेन्नेनकुर्यादन्यथामान्नेन ॥

## यानंतर नवश्राद्ध सांगतों.

"पहिला, तिसरा, पांचवा, सातवा, नववा आणि अकरावा या दिवसीं जें श्राद्ध तें नवश्राद्ध होय. आश्वलायनशाखी नवश्राद्धें पांच सांगतात. आपस्तंब सहा असें सांगतात. इतर शाखी यांविषयीं तर विकल्पच सांगतात." पांच ह्या पक्षीं अकराव्या दिवसीं नवश्राद्ध करूं नये. ह्या नवश्राद्धांसच विषमश्राद्धें असें ह्मणतात. "नवश्राद्धें दहा दिवसांचे आंत करावीं, व नवमिश्रश्राद्ध तर वर्षातीं करावें" असें दुसरीकडे सांगितलें आहे. "नवश्राद्ध न केलें तर प्रेतत्वापासून मुक्तच होत नाहीं. नवश्राद्ध, त्रिपक्ष ( त्रैपक्षिक ), षाण्मासिक, आणि मासिकें हीं श्राद्धें जो पुत्र करीत नाहीं त्याचे पितर अधोयोनीप्रत जातात. अर्घ्यविरहित, धूपरहित, गंधपुष्पविवर्जित, अमंत्रक, पाद्यरहित असें नवश्राद्ध जाणावें. आशीर्वाद, द्विगुण दर्भ, जप, आशीर्वाद, स्वस्तिवाचन, पितृशब्द, स्वसंबंध, शर्मशब्द, पात्रालंभ, अव-

गाह ( प्रवाहण ), उल्मुक, उल्लेखनादिक, तृप्तिप्रश्न, विकिर, शेषप्रश्न, प्रदक्षिणा, विसर्जन-सीमेपर्यंत जाणें हे अठरा पदार्थ प्रेतश्राद्धीं वर्ज्य करावे." "तिलोसि०" ह्या मंत्रामध्यें स्वधाशब्द, नमःशब्द आणि पितृशब्द यांचा उच्चार करूं नये, तर प्रेतशब्दाच्या ऊहानें अथवा अमंत्रक तिळ टाकावे. अर्घ्यदान अमंत्रक करावें. "अमुष्मैस्वाहा" ह्या मंत्रानें प्रेताचे नामेंकरून पाणिहोम करावा. ऋग्वेदी यांस सर्व एकोद्दिष्ट श्राद्धांमध्यें अग्नौकरण आहेच. अन्य शाखी यांस तर ( एकोद्दिष्टामध्यें अग्नौकरणाचा निषेध आहे. नामेंकरून एक पिंड द्यावा. निनयनमंत्र ह्मणजे उदक देण्याचे मंत्र यांचे ठायीं ऊह करावा. अनुमंत्रणादिक करणें तें अमंत्रक करावें. "अभिरम्यतां" या मंत्रेंकरून विसर्जन करावें. असें नवश्राद्ध वर्ज्य करून एकोद्दिष्ट श्राद्धांचे ठायीं जाणावें. नवश्राद्ध तर, सर्व अमंत्रक करावें असें नारायणवृत्तींत आहे. "ज्ञात्या पुरुषानें एकोद्दिष्ट श्राद्धाचे ठायीं पात्र उताणें मांडावें. पार्वणश्राद्धीं तर उपडें मांडून त्या पात्रावर कुश ठेवावे." सपिंडीकरणापर्यंत प्रेतश्राद्धें लौकिकाग्नीवर असें आश्वलायनाचें मत आहे. संभव असतां नवश्राद्धें अन्नानें करावीं. असंभव असतां आमान्नानें करावीं.

---

विघ्नेतु नवश्राद्धंमासिकंचयद्यदंतरितंभवेत् तत्तदुत्तरश्राद्धेनसहतंत्रेणकार्यं शावेआशौचांतरप्राप्तौनवश्राद्धानिकुर्यादेव सहगमनेतु नवश्राद्धानिसर्वाणिसपिंडीकरणंपृथक् एकएववृषोत्सर्गोगौरेकातत्रदीयते शूद्रस्यामंत्रकंसर्वंद्विजवन्नाम्नैवकार्यमितिस्मृत्यर्थसारः अत्रवयोधिकमरणेतत्कनिष्ठानांसपिंडानांदशमेहनिमुंडनंकेचिदाहुः मातापित्राचार्येषुमृतेषुनियमेनदशमेहनिमुंडनं एवंभर्तरिमृतेस्त्रियाअपिमुंडननियमः पुत्राणांसर्वेषांदाहकर्तुश्चदाहांगभूतंप्रथमदिनेदशमदिनेचमुंडनं अत्रदेशाचाराद्व्यवस्था अत्ररात्रिमृतस्यरात्रौदाहेपिप्रातरेवमुंडनमित्युक्तं ॥

विघ्न असेल तर नवश्राद्ध, मासिक असें जें जें श्राद्ध अंतरित ( अंतरलेलें ) असेल तें तें पुढच्या श्राद्धासह एकतंत्रेंकरून करावें. मृताशौचांत अन्य आशौच प्राप्त झालें असतां नवश्राद्धें करावींच. सहगमन असेल तर सर्व नवश्राद्धें करावीं, व सपिंडीकरण निरनिराळें करावें. वृषोत्सर्ग एकच ( पतीचा मात्र ) करावा आणि स्त्रीच्या वृषोत्सर्गस्थानीं एक गाय द्यावी. शूद्राचें सर्व कर्म अमंत्रक नाममंत्रानेंच, द्विजासारखें करावें असें स्मृत्यर्थसार ग्रंथ सांगतो. ह्या स्थलीं वयानें अधिक असा मृत असतां मृताच्या कनिष्ठ सपिंडांनीं दहाव्या दिवसीं मुंडन करावें असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. माता, पिता आणि आचार्य हे मृत असतां नियमेंकरून दहाव्या दिवसीं मुंडन करावें. याप्रमाणें भर्ता मृत असतां स्त्रियेनेंहि नियमेंकरून मुंडन करावें. सर्व पुत्रांनीं व दहनकर्त्यानें दहनाचें अंगभूत पहिल्या दिवसीं आणि दहाव्या दिवसीं मुंडन करावें; याविषयीं जसा देशाचार असेल त्याप्रमाणें व्यवस्था जाणावी. याविषयीं रात्रीं मृत झालेल्याचें दहन रात्रौ केलें तथापि मुंडन करणें तें दुसऱ्या दिवसीं प्रातःकालींच करावें असें सांगितलें.

---

ततोदशमेहनिपूर्ववद्ग्रामशुद्धिंगृहशुद्धिंचकृत्वा गौरसर्षपतिलकल्केनसशिरःस्नानंकृत्वानववस्त्रेपरिधायपरिहितवस्त्राणिप्रेतवस्त्राणिचांत्यजेभ्यआश्रितेभ्यश्चदत्वासुवर्णादीनिमंगलवस्तूनिस्पृष्ट्वागृहंप्रविशेत् ॥

तदनंतर दहाव्या दिवसीं पूर्ववस्त्रशुद्धि व गृहशुद्धि करून पांढरे शिरिस व तिळ यांच्या कल्कानें सशिरःस्नान ( डोकीवरून स्नान ) करून नवीं वस्त्रें परिधान करून पूर्वी धारण केलेलीं वस्त्रें व प्रेताचीं वस्त्रें अंत्यजांकारणें व आश्रितांकारणें देऊन सुवर्णादिक मंगल वस्तूंस स्पर्श करून गृहांत प्रवेश करावा.

---

**अथास्थिक्षेपविधिः तत्रादौसंचयनदिनेऽस्थिस्थापनप्रकारः प्रेतस्थानेबलिंदत्वाक्षीरेणाभ्युक्ष्यवाग्यतः प्रेतस्यास्थीनिगृण्हीयात्प्रधानांगोद्भवानिच पंचगव्येनसंस्नाप्यक्षौमवस्त्रेणवे**ष्टयच प्रक्षिप्यमृन्मयेभांडेनवेसाच्छादनेशुभे अरण्येवृक्षमूलेवाशुद्धेसंस्थापयेदथ सूक्ष्मान्यस्थीनितद्भस्मनीत्वातोयेविनिक्षिपेत् ततःसंमार्जनंभूमेःकर्तव्यंगोमयांबुभिः पूजांचपुष्पधूपाद्यैर्बलिभिःपूर्ववच्चरेत् तत्स्थानाच्छनकैर्नीत्वातीर्थेवाजान्हवीजले कश्चिच्चप्रक्षिपेत्पुत्रोदौहित्रोवासहोदरः मातुःकुलंपितृकुलंवर्जयित्वानराधमः अस्थीन्यन्यकुलस्थस्यनीत्वाचांद्रायणंचरेत् गंगातोयेषुयस्यास्थिक्षिप्यतेशुभकर्मणः नतस्यपुनरावृत्तिर्ब्रह्मलोकात्सनातनात् अस्तंगतेगुरौशुक्रेतथामासेमलिम्लुचे गंगायामस्थिनिक्षेपंनकुर्यादितिगौतमः दशाहांतरस्थिप्रक्षेपेतुनास्तादिदोषः दशाहाभ्यंतरेयस्यगंगातोयेस्थिमज्जति गंगायांमरणंयादृक्तादृक्फलमवाप्नुयात् ॥

## यानंतर अस्थि ठेवण्याचा विधि सांगतों.

त्यामध्यें प्रथम अस्थिसंचयनाचे दिवसीं अस्थि ठेवण्याचा प्रकार—" मौनी होत्साता प्रेताचे स्थानीं बलि देऊन दुधानें चितास्थानीं प्रोक्षण करून प्रेताच्या मुख्य अंगाच्या अस्थि घ्याव्या व त्यांस पंचगव्यानें स्नान घालून क्षौम ( पाटाव ) वस्त्रानें बांधून मृत्तिकेच्या नूतन चांगल्या भांड्यांत घालून वरती झांकण घालून अरण्यांत अथवा शुद्ध वृक्षाच्या मूळांत पुरून ठेवाव्या. नंतर सूक्ष्म अस्थि व ती रक्षा नेऊन उदकांत टाकावी. तदनंतर गोमययुक्त उदकानें भूमीचें संमार्जन करावें व पुष्प, धूप इत्यादिक व बलि यांहींकरून पूर्वीप्रमाणें पूजा करावी. " नंतर पुत्र, दौहित्र अथवा सख्खा भ्राता यांतून कोणीहि युक्तीनें त्या स्थानापासून अस्थि नेऊन तीर्थांत अथवा जान्हवीच्या उदकांत टाकाव्या. मातेचें कुल, व पितृकुल यांवांचून अन्य कुळांतील मनुष्याच्या अस्थि नेल्या असतां तो नराधम होय व त्यानें चांद्रायण करावें. ज्या पुण्यवंताच्या अस्थि गंगेच्या उदकांत पडल्या त्याची, शाश्वत अशा ब्रह्मलोकापासून पुनरावृत्ति होत नाहीं. गुरुशुक्रांचें अस्त, मलमास हीं असतां गंगेंत अस्थि टाकूं नयेत असें गौतम सांगतो. " दहा दिवसांचे आंत अस्थि टाकण्याविषयीं तर अस्तादि दोष नाहीं. " दहा दिवसांचे आंत ज्याच्या अस्थि गंगेंत टाकल्या त्यास, गंगेचे ठायीं मरण प्राप्त होऊन जसें फळ मिळतें तसें प्राप्त होईल."

---

**अथतीर्थेस्थिक्षेपंकर्तुंतत्पूर्वांगविधिः यत्रास्थीनिनिखातानितांभूमिंसचैलस्नानपूर्वकंपृथग्गोमूत्रादिभिःप्रोक्षयेत् तत्रगायत्र्यागोमूत्रेण गंधद्वारामितिगोमयेन आप्यायस्वेतिक्षीरेण दधिक्राव्णइतिदध्ना घृतंमिमिक्षइतिघृतेन उपसर्पेतिचतसृणामृचांशंखःपितरस्त्रिष्टुप् भूप्रार्थनखननमृदुद्धरणास्थिग्रहणेषुक्रमेणविनियोगः ताभिर्ऋग्भिःक्रमेणास्थिग्रहणांतानिकर्माणिकृत्वास्वयंजलाद्ययेगृह्योक्तविधिनास्नायात् ततोस्थिशुद्धिंकुर्यात् सायथा अस्थीनिस्पृष्ट्वै**

तोन्विंद्रमितितृचावृत्त्यापंचगव्यैःस्नात्वास्पृष्ट्वैवदशस्नानानिकुर्यात् तत्रगायत्र्यादिपंचमंत्रैर्गोमूत्रगोमयक्षीरदधिसर्पिःस्नानानिकृत्वादेवस्यत्वेतिकुशोदकेन मानस्तोकेतिभस्मना अश्वक्रांतेरथक्रांतेइतिमृदामधुवाताइतिमधुना आपोहिष्ठेतिशुद्धोदकेन चस्नायात् एवंदशस्नानानिकृत्वाऽस्थ्नांकुशैर्मार्जनंकुर्यात् तत्रमंत्रः अतोदेवाइत्यृक् अथसप्तसूक्तानि एतोन्विंद्रं० १ शुचीवो० १ नतमंहोन० ८ इतिवाइति० १३ स्वादिष्ठया० १० ममाग्नेवर्चो० ९ कद्रुद्रायप्र० ९ ततोयदीयान्यस्थीनितस्यकृतसपिंडीकरणस्यपार्वणविधिनाश्राद्धमस्थिक्षेपांगभूतंहिरण्येनकुर्यात् सक्तुनाचपिंडदानं दशाहांतरस्थिक्षेपकरणेएकोद्दिष्टविधिनाश्राद्धं ततस्तिलतर्पणंकृत्वापुनःपंचगव्यपंचामृतशुद्धोदकैरस्थीनिप्रक्षाल्ययक्षकर्दमेनालिप्यपुष्पैः प्रपूज्याऽजिनकंबलदर्भभूर्जपत्रशाणभूर्जपत्रताडपत्राणांक्रमेणसप्तधासंवेष्ट्यताम्रसंपुटेस्थापयेत् तत्रयक्षकर्दमलक्षणं द्वादशकर्षचंदनंकुंकुमंचषट्कर्षःकर्पूरश्चतुःकर्षाकस्तूरीचैतेषांमेलनाद्यक्षकर्दमः ततोस्थिषुहेमरौप्यखंडानिमौक्तिकप्रवालनीलमणींश्चप्रक्षिप्यस्वसूत्रोक्तविधिनास्थंडिलाग्निप्रतिष्ठादिकृत्वाष्टोत्तरशतंतिलाज्याहुतीर्जुहुयात् उदीरतांशंखःपितरस्त्रिष्टुप् अस्थिप्रक्षेपांगतिलाज्यहोमेविनियोगः उदीरतामितिसूक्तस्यचतुर्दशऋग्भिःप्रत्यृचमाहुतिरित्येवंसूक्तस्यसप्तावृत्तिभिरवशिष्टदशाहुतीःप्रथमऋगावृत्त्येत्येवमष्टोत्तरशतं तिलाहुतीरष्टोत्तरशतमाज्याहुतीश्चजुहुयात् सवेष्टनास्थिसमुच्चययुतंताम्रसंपुटमादायतीर्थंगच्छेत् तत्रनियमाः मूत्रपुरीषोत्सर्गकालेआचमनकालेचनास्थीनिधारयेत् शूद्रयवनांत्यजादिकांस्वहीनजातिमस्थिधारणकालेनस्पृशेदितिकाशीखंडे ततस्तीर्थंप्राप्यतीर्थप्राप्तिनिमित्तकंस्नानादिविधायास्थीनिस्नापयित्वामुकगोत्रस्यामुकशर्मणोब्रह्मलोकादिप्राप्तयेमुकतीर्थेस्थिप्रक्षेपमहं करिष्येइतिसंकल्प्य पलाशपर्णपुटेपंचगव्येनास्थीन्यासिच्यहिरण्यशकलमाल्यघृततिलमिश्रितास्थीनिमृत्पिंडेनिधायदक्षिणांदिशमवेक्षमाणोनमोस्तुधर्मायेतिवदंस्तीर्थेप्रविश्य नाभिमात्रजलेस्थित्वासमेप्रीतोस्त्वित्युक्त्वातीर्थेक्षिपेत् ततःस्नात्वाजलाद्बहिरागत्यसूर्यंदृष्ट्वाहरिंस्मृत्वा विप्राययथाशक्तिरजतंदक्षिणांदद्यात् अमुकस्यास्थिक्षेपःकृतस्तत्सांगतार्थंरजतमिदंतुभ्यंसंप्रददेइति इत्यस्थिक्षेपप्रकारः ॥

## यानंतर तीर्थामध्यें अस्थि टाकण्याकरितां त्याचे पूर्वांगाचा विधि सांगतों.

पूर्वी सवस्त्र स्नान करून जेथें अस्थि पुरून ठेविल्या असतील ती भूमि निरनिराळ्या गोमूत्रादिकांनीं प्रोक्षित करावी. त्याविषयीं गायत्रीमंत्रानें गोमूत्रेंकरून प्रोक्षण, "गंधद्वारां०" ह्या मंत्रानें गोमयेंकरून प्रोक्षण, "आप्यायस्व०" ह्या मंत्रानें दुग्धेंकरून, "दधिक्राव्णो०" ह्या मंत्रेंकरून दधीनें, "घृतंमिमिक्षे०" ह्या मंत्रानें घृतेंकरून, याप्रमाणें प्रोक्षण करावें. नंतर "उपसर्पेतिचतसृणामृचांशंखः पितरस्त्रिष्टुप् ॥ भूप्रार्थनखननमृदुद्धरणा-

[1] ह्या चार ऋचांपैकीं पहिल्या ऋचेनें भूमीची प्रार्थना, दुसऱ्या ऋचेनें भूमि खणावी, तिसऱ्या ऋचेनें माती एकीकडे करावी व चवथ्या ऋचेनें अस्थि काढून घ्याव्या. याप्रमाणें चार ऋचांनीं कर्म करावें.

स्थिग्रहणेषुक्रमेण विनियोगः" ह्या चार ऋचांनीं क्रमेंकरून अस्थि काढून घेणें एथपर्यंत कर्मे करून कर्त्यानें जलाशयांत गृह्योक्तविधीकरून स्नान करावें. तदनंतर अस्थींची शुद्धि करावी. ती अशी—अस्थींस स्पर्श करून "एतोन्विंद्रं०" ह्या तीन ऋचांचे आवृत्तीनें पंचगव्येंकरून स्नान करून स्पर्श करूनच दहा स्नानें करावीं. त्याविषयीं गायत्री इत्यादि (वर सांगितलेल्या) पांच मंत्रेंकरून गोमूत्र, गोमय, दूध, दधि, घृत, यांहींकरून स्नानें करून "देवस्यत्वा०" ह्या मंत्रानें कुशोदकानें स्नान; "मानस्तोके०" ह्या मंत्रानें भस्मेंकरून स्नान; "अश्वक्रांतेरथक्रांते०" ह्या मंत्रानें मृत्तिकास्नान; "मधुवाता०" ह्या मंत्रानें मधुस्नान; आणि "आपोहिष्ठा०" ह्या मंत्रानें शुद्धोदकेंकरून स्नान करावें. याप्रमाणें दहा स्नानें करून अस्थींवर कुशांनीं मार्जन करावें. मार्जनाविषयीं मंत्र—"अतोदेवा०" ही एक ऋचा, यानंतर सात सूक्तें तीं असीं—"एतोन्विंद्रं० १, शुचीवो० १, नतमंहो० ८, इतिवाइति० १३, स्वादिष्ठया० १०, ममाग्नेवर्चो० ९, कद्रुद्रायप्र०९." तदनंतर ज्याच्या अस्थि असतील त्याचें (सपिंडीकरण झालें असल्यास) पार्वणविधीकरून अस्थिक्षेपाचें (अस्थि टाकण्याचें) अंगभूत श्राद्ध हिरण्येंकरून करावें, व पिठाचे पिंड द्यावे. दहा दिवसांचे आंत अस्थि टाकणें असल्यास एकोद्दिष्टविधीकरून श्राद्ध करावें. तदनंतर तिलतर्पण करून पुनः पंचगव्य, पंचामृत, व शुद्धोदक यांहींकरून अस्थि धुवून यक्षकर्दमानें लिप्त करून पुष्पेंकरून पूजा करून कृष्णाजिन, कंबल, दर्भ, भूर्जपत्र, तागाचें वस्त्र, भूर्जपत्र, आणि ताडपत्र यांचीं क्रमानें सात वेळ वेष्टनें देऊन तांब्याचे करंड्यांत ठेवाव्या. त्यामध्यें यक्षकर्दमाचें लक्षण सांगतों—चंदन बारा तोळे, केशर बारा तोळे, कापूर सहा तोळे आणि कस्तूरी चार तोळे हे पदार्थ एके ठिकाणीं मिळवून केलेला तो यक्षकर्दम होय. तदनंतर अस्थींचे ठायीं सुवर्ण, रुपें यांचे तुकडे; मोतीं; पोवळें नीलमणि हीं टाकून आपल्या सूत्रांत सांगितल्या विधीनें स्थंडिलावर अग्नि स्थापन इत्यादि करून अष्टोत्तरशत तिल व आज्य यांच्या आहुतींनीं होम करावा. होमाचे मंत्र—"उदीरतांशंखःपितरस्त्रिष्टुप् ॥ अस्थिप्रक्षेपांगतिलाज्यहोमेविनियोगः" "उदीरतां०" ह्या सूक्तांच्या चवदा ऋचांनीं प्रत्येक ऋचेस एक आहुति याप्रमाणें सूक्ताच्या सात आवृत्ति करून व शेष दहा आहुति पहिल्या ऋचेचे आवृत्तीनें, याप्रमाणें अष्टोत्तरशत तिलाहुति आणि अष्टोत्तरशत आज्याहुति होम करावा. वेष्टनासहित, अस्थींनीं युक्त असा तो तांब्याचा करंडा घेऊन तीर्थाप्रत गमन करावें. त्याविषयीं नियम—मूत्रपुरीषोत्सर्गकालीं व आचमनकालीं अस्थि धारण करूं नयेत. अस्थि धारण केल्या असतील त्या कालीं शूद्र, यवन, अंत्यज इत्यादिक व आपणाहून हीन जाति यांस स्पर्श करूं नये असें काशीखंडांत आहे. तदनंतर तीर्थाप्रत जाऊन तीर्थप्राप्तिनिमित्तक स्नानादिक करून अस्थींस स्नान घालून "अमुकगोत्रस्यामुकशर्मणोब्रह्मलोकादिप्राप्तयेमुकतीर्थेअस्थिप्रक्षेपमहंकरिष्ये," असा संकल्प करून पळसाचे द्रोणांत पंचगव्यानें अस्थींस सिंचन करून सुवर्णाचीं शकलें, पुष्पें, घृत आणि तिल यांहींकरून मिश्रित अशा अस्थि मृत्तिकेच्या पिंडावर ठेवून दक्षिण दिशेस पहात होत्साता "नमोस्तुधर्माय" असें ह्मणून तीर्थांत प्रवेश करून नाभिप्रमाण उदकांत उभा राहून "समेप्रीतोस्तु" असें ह्मणून तीर्थांत अस्थि टाकाव्या. तदनंतर स्नान करून उद-

कांतून बाहेर येऊन सूर्याचें दर्शन घेऊन हरीचें स्मरण करून ब्राह्मणाकारणें यथाशक्ति रौप्य-दक्षिणा द्यावी. दक्षिणा देण्याचें वाक्य– "अमुकस्यास्थिक्षेपःकृतस्तत्सांगतार्थंरजतमिदंतु-भ्यंसंप्रददे" असें ह्मणावें. याप्रमाणें अस्थि टाकण्याचा प्रकार सांगितला.

---

अथैकादशाहकृत्यं अथैकादशाहेप्रातरुत्थायगृहानुलेपनंकृत्वास्पृष्टसर्ववस्त्रप्रक्षालनपूर्वकं सर्वसपिंडानांसचैलस्नानांतेसंध्यापंचमहायज्ञादिकर्मणिशुद्धिः एकादशाहेसंगवकालेस्नाना च्छुद्धिरितिकेचित् एकादशाहेपुत्रादेःकर्तुरपिपंचमहायज्ञाद्यधिकारः सपिंडानांदर्शवार्षिक श्राद्धेष्वधिकारः नांदीश्राद्धमात्रंचतुःपुरुषसपिंडैःसपिंडीकरणात्प्राकूनकार्यं ॥

## यानंतर अकराव्या दिवसाचें कृत्य सांगतों.

यानंतर अकराव्या दिवसीं प्रातःकालीं उठून घराचें सारवण करून आशौचांत स्पर्श केलेल्या सर्व वस्त्रांचें प्रक्षालन करून सवस्त्र स्नान केल्यानंतर संध्या, पंचमहायज्ञादि कर्माविषयीं सर्व सपिंडांची शुद्धि होते. अकराव्या दिवसीं संगवकालीं स्नानेंकरून शुद्धि होते असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. अकराव्या दिवसीं पुत्रादिक कर्त्यासहि पंचमहायज्ञादि कर्माचा अधिकार होतो. सपिंडांस दर्श, वार्षिक या श्राद्धांविषयीं अधिकार होतो. चार पुरुषांपर्यंत सपिंडांनीं नांदीश्राद्ध मात्र सपिंडीकरणाचे पूर्वी करूं नये.

---

ततोदशाहकर्मकारीअमुख्यःकर्ता मुख्योवापुत्रादिःकर्ता वृषोत्सर्गाद्येकादशाहिकंसर्व कर्मकुर्यात् एकादशाहेप्रेतस्ययस्यनोत्सृज्यतेवृषः प्रेतत्वंसुस्थिरंतस्यदत्तैःश्राद्धशतैरपि अत्र स्वयमेवसर्वंकुर्यान्नतुकाम्यवृषोत्सर्गवदाचार्यवरणं अयंगृहेनकार्यः अयंद्वादशाहेप्युक्तः क्व चिन्मृताहेप्युक्तः विषुवद्वितयेचैवमृताहेबांधवस्यचेति वत्सराभ्यंतरेपित्रोर्वृषस्योत्सर्गकर्मणि वृद्धिश्राद्धंनकुर्वीततदन्यत्रसमारभेत् ॥

तदनंतर दहा दिवसांचें कर्म करणारा अमुख्य कर्ता अथवा मुख्य पुत्रादिक कर्ता यानें अकराव्या दिवसाचें वृषोत्सर्गादिक सर्व कर्म करावें. "अकराव्या दिवसीं ज्या प्रेताच्या उद्देशेंकरून वृषोत्सर्ग केला नाहीं आणि शतशः श्राद्धें केलीं तत्रापि त्याचें प्रेतत्व राहतें." ह्या वृषोत्सर्गाचे ठायीं सर्व कर्म स्वतांच करावें, काम्य वृषोत्सर्गाप्रमाणें आचार्यवरण करूं नये. हा वृषोत्सर्ग घरीं करूं नये, हा बाराव्या दिवसींहि सांगितला आहे. क्वचित् ग्रंथांत मृतदिवसींहि सांगितला आहे. "तुळा व मेष या संक्रांतिदिवसीं अथवा बांधवाचे मृत दिवसीं करावा." "एक वर्षाचे आंत मातापितरांचे वृषोत्सर्गकर्माचे ठायीं वृद्धिश्राद्ध करूं नये, एक वर्षानंतर करावें."

---

वृषलक्षणंतु लोहितोयस्तुवर्णेनमुखेपुच्छेचपांडुरः श्वेतःखुरविषाणाभ्यांसनीलोवृषउच्यते अथवाश्वेतवर्णस्यमुखपुच्छादिश्यामत्वेनीलवृषत्वं यद्वासर्वश्यामस्यमुखादिश्वेतत्वेनीलवृषत्वं केचित्वृषाभावेमृद्भिःपिष्टैर्वावृषंकृत्वाहोमादिविधिनावृषोत्सर्गइत्याहुः यथोक्तालाभेयथाला भोद्विवर्षएकवर्षोवावृषोवर्षाधिकाश्चतस्रएकावावत्सतरीस्यात् प्रयोगस्तुस्वसूत्रानुसारीग्रा

**द्य: सव्येनपाणिनापुच्छंसमादायवृषस्यतु दक्षिणेनापआदायसतिला:सकुशास्ततः प्रेतगोत्रं समुच्चार्यामुकस्मैवृषएषमयादत्तस्तंतारयत्वितिवदन्सहेमजलंभूमावुत्सृजेत् विधारयेन्नतंक** श्चिन्नचकश्चनवाहयेत् नदोहयेच्चतांधेनुंनचकश्चनबंधयेत् पतिपुत्रवत्या:सुवासिन्यानवृषोत्सर्गः तत्स्थानेएकापयस्विनीगौर्देया पतिपुत्रयोरन्यतराभावेतुस्त्रीणामपिवृषोत्सर्गः सहगमनेतुस्त्रीणांवृषोत्सर्गस्थानेगौरेव वृषोत्सर्गसांगतार्थंतिलोदकुंभधेनुवस्त्रहिरण्येतिपंचदानानि आशौचांतरंचेदेकादशाहेप्राप्नोतितदावृषोत्सर्गादिकमाद्यमासिकंशय्यादिदानानिचकुर्यादेव एवंकृतेवृषोत्सर्गेफलंवाजिमखोदितं यमुद्दिश्योत्सृजेन्नीलंसलभेतपरांगतिं वृषोत्सर्ग:पुनात्ये **वदशातीतान्दशापरान् इतिवृषोत्सर्गः ॥**

**वृषाचें लक्षण सांगतों.**—“ वर्णानें आरक्त असून मुख व पुच्छ यांचे ठायीं पांडुरवर्ण, खुर व शृंगें ज्याचीं श्वेतवर्ण असा जो तो नीलवृष ह्मणावा. ” अथवा वर्णानें श्वेत असून मुख व पुच्छ हीं श्यामवर्ण तो नीलवृष होय. अथवा सर्व अंग श्यामवर्ण असून मुख, पुच्छ हीं श्वेतवर्ण तो नीलवृष होय. कोणी ग्रंथकार, वृषाचा अभाव असतां मृत्तिकेचा किंवा पिठाचा वृष करून होमादि विधीकरून वृषोत्सर्ग करावा असें ह्मणतात. यथोक्त न मिळेल तर जसा मिळेल तसा दोन वर्षांचा, एक वर्षाचा वृष; एक वर्षाहून अधिक वयाच्या चार वत्सतरी अथवा एक असावी. याविषयीं प्रयोग तर आपापल्या सूत्राप्रमाणें घ्यावा. “ डाव्या हस्तानें वृषाचें पुच्छ धरून उजव्या हस्तानें तिल व कुश यांसहित उदक घेऊन ” प्रेताचे गोत्राचा उच्चार करून “ अमुकस्मैवृषएषमयादत्तस्तं तारयतु ” असें ह्मणत होत्साता सुवर्णासहित उदक भूमीवर सोडावें. “ त्या वृषास कोणी धरूं नये, व कोणी त्यास वाहूं नये. त्या गाईचें दोहन करूं नये व कोणी बांधूं नये. पति असून पुत्रानें युक्त अशा सुवासिनीचा वृषोत्सर्ग करूं नये. वृषोत्सर्गस्थानीं एक दूध देणारी गाई द्यावी. पति व पुत्र यांतून एक नसेल तर स्त्रियांचाहि वृषोत्सर्ग करावा. सहगमन असेल तर, स्त्रियांचे वृषोत्सर्गस्थानीं गाईच द्यावी. वृषोत्सर्गसांगतेकरितां तिळ, उदकुंभ, गाय, वस्त्र आणि हिरण्य हीं पांच दानें करावीं. जर अकराव्या दिवसीं अन्य आशौच प्राप्त झालें तर वृषोत्सर्गादिक, आद्यमासिक आणि शय्यादिक दानें करावींच. “ याप्रमाणें वृषोत्सर्ग केला असतां अश्वमेधयज्ञाचें फल मिळतें, व ज्याचे उद्देशेंकरून नीलवृषाचा उत्सर्ग केला तो उत्तम गतीप्रत पावतो. वृषोत्सर्ग दहा मागचे, व दहा पुढचे अशा पुरुषांस पवित्र करितो. ” याप्रमाणें वृषोत्सर्ग सांगितला.

---

**अथैकादशाहेमहैकोद्दिष्टं इदंचमहैकोद्दिष्टंषोडशश्राद्धेभ्योभिन्नमेव अतएवेदंकरिष्यमाणसर्वैकोद्दिष्टप्रकृतिभूतमित्युच्यते इदंचपाकेनैव अत्रसतिसंभवेविप्रोभोजयितव्यः असंभवेग्नौहोमः ब्राह्मणंभोजयेदाद्येहोतव्यमनलेथवेत्युक्तेः श्मश्रुकर्मतुकर्तव्यंनखच्छेदस्तथैवच स्नपनाभ्यंजनेदद्याद्विप्रायविधिपूर्वकं ततःक्षणपाद्यार्घ्यासनगंधपुष्पाच्छादनान्येवदद्यात् नाग्नधूपदीपौ एकोद्दिष्टंदेवहीनमित्युक्तेरेकएवविप्रः द्विवैवचनिमंत्रणं एकमर्घ्यपात्रं स्वधाश्चदनमःशब्दपितृशब्दानसंति तेनप्रस्त:प्रेतइमांल्लोकान्प्रीणयाहिनइतिमंत्रोहोर्घ्यपात्रे नाभि**

श्रवणं सर्वंप्राचीनावीतिनैवकार्यं देवकार्याभावात् अग्नौकरणविकल्पः तत्रचपाणिहोमेपिन तस्यभक्षणंकिंत्वग्नौप्रक्षेपः एकएवपिंडः अनुमंत्रणादिसर्वममंत्रकं स्वदितमितितृप्तिप्रश्नःका त्यायनानां अक्षय्यस्थानेउपतिष्ठतामितिवदेत् अभिरम्यतामितिविसर्जनं अभिरताःस्मेतिवि प्रप्रतिवचनं श्राद्धशेषभोजनंनास्ति अंतेस्नानं नवश्राद्धैकोद्दिष्टेतुसर्वममंत्रकमित्युक्तं विप्रा भावेत्वग्नावेकोद्दिष्टंयथा अग्नौपायसंश्रपयित्वाज्यभागांतेऽग्नेरग्रेश्राद्धप्रयोगंकृत्वाग्नौप्रेतमावा ह्यगंधाद्यैःसंपूज्य पृथिवीतेपात्रमित्यादिनान्नंसंकल्प्योदीरतामवरइत्यष्टाभिश्चतुरावृत्ताभिर्ऋ ग्भिर्द्वात्रिंशदाहुतीर्हुत्वापिंडदानादिश्राद्धंसमापयेदिति एवमेतदेकोद्दिष्टंस्त्रीणामपि ॥

## यानंतर अकराव्या दिवसीं महैकोद्दिष्ट सांगतों.

हें महैकोद्दिष्ट श्राद्ध षोडशश्राद्धांहून निराळेंच आहे, याकरितांच पुढें करावयाचीं जीं सर्व एकोद्दिष्टश्राद्धें त्यांचें प्रकृतिभूत हें ( महैकोद्दिष्ट ) असें ह्मटलें आहे. हें पाकेंकरूनच करावें. या श्राद्धीं संभव असतां ब्राह्मण भोजनास सांगावा. संभव नसेल तर अग्नींत होम करावा. कारण, आद्यमासिकीं ब्राह्मणास भोजन घालावें, अथवा अग्नींत होम करावा असें वचन आहे. " ब्राह्मणाकारणें विधिपूर्वक श्मश्रुकर्म, नखछेद हीं करावीं; स्नान, अभ्यंग हीं द्यावीं;" तदनंतर क्षण, पाद्य, अर्घ्य, आसन, गंध, पुष्प, आच्छादन इतकेंच उपचार द्यावे, ह्या श्राद्धीं धूप, दीप देऊं नयेत. " एकोद्दिष्ट देवहीन करावें " असें वचन आहे यास्तव एकच ब्राह्मण सांगावा. दिवसासच निमंत्रण करावें. अर्घ्यपात्र एक मांडावें. स्वधाशब्द, नमःशब्द, पितृशब्द हे नाहींत, त्यावरून "प्रत्तःप्रेतइमांल्लोकान्प्रीणयाहिनः " याप्रमाणें अर्घ्यपात्राविषयीं मंत्रांत ऊह करावा. अभिश्रवण नाहीं. सर्व कर्म प्राचीनावीतीकरूनच करावें; कारण, देवकार्याचा अभाव आहे. अग्नौकरणाविषयीं विकल्प आहे. या श्राद्धांत पाणिहोम केला असतांहि तें भक्षण करूं नये, तर अग्नीमध्यें टाकावें. एकच पिंड द्यावा. अनुमंत्रणादि सर्व अमंत्रक करावें. " स्वदितं " असा तृप्तिप्रश्न कात्यायनांस उक्त आहे. अक्षय्यस्थानीं " उपतिष्ठतां " असें ह्मणावें. " अभिरम्यतां " या मंत्रानें विसर्जन करावें. " अभिरताःस्म " असें ब्राह्मणानें प्रतिवचन द्यावें. श्राद्धशेषभोजन नाहीं. अंतीं स्नान करावें. नवश्राद्धसंबंधी एकोद्दिष्टाचे ठायीं तर, सर्व कर्म अमंत्रक करावें असें सांगितलें आहे. ब्राह्मणाचा अभाव असेल तर अग्नींत एकोद्दिष्ट करणें तें असें—अग्नीचे ठायीं पायस शिजवून आज्यभागपर्यंत कर्म केल्यानंतर अग्नीचे अग्रभागीं श्राद्धप्रयोग करून अग्नीचे ठायीं प्रेताचें आवाहन करून गंधादिक उपचारांनीं पूजा करून " पृथिवीतेपात्रं० " इत्यादिक मंत्रानें अन्नाचा संकल्प करून " उदीरतामवर० " याप्रमाणें, चार आवृत्तींनीं युक्त अशा आठ ऋचांनीं बत्तीस आहुतींनीं हवन करून पिंडदानादि श्राद्ध समाप्त करावें. याप्रमाणें हें एकोद्दिष्ट स्त्रियांचेंहि करावें.

---

अथाद्यमासिकं तस्यमासादौमासिकंकार्यमितिवचनान्मृताहोमुख्यःकालः सचाशौचप्रति बंधादतिक्रांतइतितदंतेएकादशेन्हितत्कार्यं अतएवब्राह्मणंभोजयेदाद्येहोतव्यमनलेथवा पुन श्चभोजयेद्विप्रंद्विरावृत्तिर्भवेदिहेतिप्रथममासिकार्थंद्वितीयावृत्तिरुक्ता अत्रचद्विरावृत्तिर्भवे

दिहेत्युक्तिः षोडशमासिकानांसपिंड्यधिकारार्थमपकृष्यकर्तव्यानांद्वादशाहादौकरणपक्षेयो ज्या तेषामेकादशाहएवकरणपक्षेतुषोडशमासिकानांषोडशावृत्तयएकंमहैकोद्दिष्टमितिसप्त दशावृत्त्यापत्त्याद्विरावृत्तिर्भवेदिहेत्युक्तेरसंगतेः तथाचसपिंड्यधिकारार्थापकृष्याणांमासि कानांद्वादशाहेकरणेएकादशाहेमहैकोद्दिष्टोत्तरमतिक्रांतमाद्यमासिकंकरिष्यइति संकल्प्या **द्यमासिकमात्रमन्नेनामेनवाविप्रेदर्भबटौवाप्रेतमावाह्यकार्यं नत्वाद्यमासिकस्याग्नौहोमः पुनश्च भोजयेद्विप्रमितिवि**शेषवचनात् इत्थंचमहैकोद्दिष्टमेकमाद्यमासिकमेकमित्येकोद्दिष्टस्यद्वि **रावृत्तिःस्पष्टैव** येत्वाद्यमासिकातिरेकेणमहैकोद्दिष्टस्यैवद्विरावृत्तिंवदंतितेभ्रांताः अत्रके **चिदाद्याब्दिकस्यापिमृताहएवकालइतितस्याप्यतिक्रांतत्वादेकादशाहेआद्यमासिकमाद्याब्दि** कंचतंत्रेणकरिष्ये इतिसंकल्प्यद्वयमपितंत्रेणकार्यमित्याहुः अन्येतुमासादौमासिकंकार्यमा- ब्दिकंवत्सरेगतेइतिवचनात्द्वितीयवर्षारंभेप्रथमाब्दिकमितिनाब्दिकस्यैकादशाहेनुष्ठानमि त्याहुः एवंत्रिपक्षेसपिंडीकरणपक्षेएकादशाहेआद्यमासिकमूनमासेऊनमासिकंद्वितीयमा **सारंभेद्वितीयमासिकं पक्षत्रयेत्रैपक्षिकंचैकोद्दिष्टविधिनाकृत्वावशिष्टद्वादशमासिकान्यप कृष्यतथैवकृत्वासपिंडीकरणं एवंपक्षांतरेषूह्यं ॥**

## यानंतर आद्यमासिक सांगतों.

"मासाचे प्रथम दिवसीं मासिक करावें" असें वचन आहे यास्तव मृतदिवस हा आद्य-मासिकाचा मुख्य काल, परंतु तो आशौचाचे प्रतिबंधामुळें अंतरतो याकरितां आशौच गेल्या-नंतर अकराव्या दिवसीं तें करावें; याकरितांच "आद्यमासिकश्राद्धीं ब्राह्मणास भोजन घालावें; अथवा अग्नींत होम करावा; पुनः ब्राह्मणास भोजन घालावें असी या श्राद्धीं द्विरावृत्ति होईल;" याप्रकारें प्रथम मासिकाकरितां द्विरावृत्ति सांगितली; ह्या वचनांत "द्विरावृत्ति एथें होईल" असें जें सांगितलें तें सपिंड्यधिकारार्थ अपकर्ष करून कर्तव्य जीं षोडश मासिकें तीं बारावा इत्यादिक दिवसीं करण्याचा पक्ष असतां त्याविषयीं योजावें. तीं ( षोडशमासिकें ) अकराव्या दिवसींच करण्याचा पक्ष असेल तर सोळा मासिकांच्या सोळा आवृत्ति आणि एक महैकोद्दिष्ट मिळून सतरा आवृत्ति प्राप्त झाल्यानें "ह्या स्थलीं द्विरावृत्ति होईल असें जें वचन त्याची संगति होणार नाहीं. आणि तसीं सपिंड्यधिकारार्थ अपकर्षेंकरून करावयाचीं मासिकें बारा-व्या दिवसीं करणें असतील तर अकराव्या दिवसीं महैकोद्दिष्ट केल्यानंतर "अतिक्रांतमा-द्यमासिकं करिष्ये" असा संकल्प करून आद्यमासिक मात्र ब्राह्मण किंवा दर्भबटु याजवर प्रेताचें आवाहन करून अन्नानें अथवा आमान्नानें करावें, आद्यमासिकाचा अग्नीमध्यें होम करूं नये; कारण, "पुनः ब्राह्मणास भोजन घालावें असें विशेष वचन आहे." एवंच महै-कोद्दिष्ट एक व आद्यमासिक एक याप्रमाणें एकोद्दिष्टाची द्विरावृत्ति स्पष्टच आहे. आद्यमासि-कावांचून महैकोद्दिष्टाचीच द्विरावृत्ति करावी असें जे ह्मणतात ते भ्रांत होत. याविषयीं कोणी ग्रंथकार, प्रथमाब्दिकाचाहि मृत दिवसच काल असल्यामुळें तोहि अतिक्रांत होतो यास्तव अकराव्या दिवसीं "**आद्यमासिकमाद्याब्दिकं च तंत्रेण करिष्ये**" असा संकल्प करून दोनहि तंत्रेंकरून करावीं असें ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, "मासाचे प्रथम दिवसीं मासिक

करावें, व वार्षिक संवत्सर गत झाल्यानंतर करावें," असें वचन आहे यास्तव दुसऱ्या वर्षाचे आरंभीं प्रथमाब्दिक करावें, अकराव्या दिवसीं प्रथमाब्दिक करूं नये असें ह्मणतात. याप्रमाणें तिसऱ्या पक्षांत सपिंडी करण्याचा पक्ष असतां अकराव्या दिवसीं आद्यमासिक, ऊनमासीं ऊनमासिक, दुसऱ्या मासाच्या आरंभीं द्वितीय मासिक, आणि पक्षत्रयाचे ठायीं त्रैपक्षिक हीं एकोद्दिष्टविधीनें करून अवशिष्ट बारा मासिकें अपकर्षेंकरून तसींच करून सपिंडी करावी. याप्रमाणें दुसऱ्या पक्षांविषयीं जाणावें.

---

**एकादशाहेतंत्रेणषोडशमासिकापकर्षपक्षेमहैकोद्दिष्टोत्तरं देशकालौसंकीर्त्यातिक्रांतमाद्यमासिकंसपिंड्यधिकारार्थमपकृष्योनमासिकादीन्यूनाब्दिकांतानि पंचदशमासिकानिच तंत्रेणैकोद्दिष्टेनविधिनाकरिष्यइतिसंकल्प्य तंत्रेणषोडशापिकुर्यात् केचिन्मतेत्वतिक्रांतेआद्यमासिकाद्याब्दिकेऊनादिमासिकादीनिचेत्यादिसंकल्पः ॥**

अकराव्या दिवसीं तंत्रेंकरून षोडशमासिकांचा अपकर्ष करून करण्याचा पक्ष असतां महैकोद्दिष्ट केल्यानंतर देशकालांचें कीर्तन करून "अतिक्रांतमाद्यमासिकं सपिंड्यधिकारार्थमपकृष्योनमासिकादीन्यूनाब्दिकांतानि पंचदश मासिकानिच तंत्रेणैकोद्दिष्टविधिना करिष्ये," असा संकल्प करून तंत्रेंकरून सोळाहि मासिकें करावीं. केचिन्मतीं आद्यमासिक, आद्याब्दिक अतिक्रांत असतां "ऊनादिमासिकादीनिच" इत्यादि संकल्प करावा.

---

**मासिकानितु आद्यमासिकं १ ऊनमासिकं २ द्वितीयमासिकं ३ त्रैपक्षिकं ४ तृतीयमासिकं ५ चतुर्थमासिकं ६ पंचममासिकं ७ षष्ठं ८ ऊनषाण्मासिकं ९ सप्तममासिकं १० अष्टमं ११ नवमं १२ दशमं १३ एकादशं १४ द्वादशं १५ ऊनाब्दिकं १६ चेतिक्रमेणज्ञेयानि ॥**

मासिकें सांगतों.–आद्यमासिक १, ऊनमासिक २, द्वितीयमासिक ३, त्रैपक्षिक ४, तृतीय मासिक ५, चतुर्थमासिक ६, पंचममासिक ७, षष्ठमासिक ८, ऊनषाण्मासिक ९, सप्तममासिक १०, अष्टम ११, नवम १२, दशम १३, एकादश १४, द्वादश १५, ऊनाब्दिक १६ याप्रमाणें क्रमेंकरून जाणावीं.

---

**अथैकादशाहेरुद्रगणश्राद्धं तच्चैकादशरुद्रोद्देशेनरुद्ररूपप्रेतोद्देशेनवा रुद्रोद्देशपक्षेसव्येन तद्रूपप्रेतोद्देशपक्षेपसव्येन वीरभद्रः १ शंभुः २ गिरीशः ३ अजैकपात् ४ अहिर्बुध्न्यः ५ पिनाकी ६ अपराजितः ७ भुवनाधीश्वरः ८ कपाली ९ स्थाणुः १० भगः ११ इत्येकादशरुद्राः अत्रशक्तेनैकैकरुद्रनाम्नैकोविप्रइत्येकादशविप्राभोज्याः अशक्तेनतुसर्वोद्देशेनैकएवविप्रोभोज्यः आमान्नान्येकादशैकंवामान्नंदेयं अत्रश्राद्धेपिंडदानार्घ्याग्नौकरणविकिराणामभावः एवमेवाष्टवसुश्राद्धं एतच्चकृताकृतं वसुनामान्यप्यन्यत्र एतदेकादशाहकृत्यंत्र्यहाशौचेचतुर्थदिनेकर्तव्यं द्वितीयदिनेप्रथमदिनेवास्थिसंचयनंकार्यं पंचमदिनेसपिंडीकरणं॥**

## यानंतर अकराव्या दिवसीं रुद्रगणश्राद्ध सांगतों.

तें रुद्रगणश्राद्ध एकादश रुद्रांचे उद्देशेंकरून अथवा रुद्ररूप प्रेताचे उद्देशेंकरून करावें. रुद्रांचे उद्देशानें करण्याचा पक्ष असतां सव्यानें करावें. रुद्ररूप प्रेताच्या उद्देशानें कर्तव्य पक्ष

असतां अपसव्यानें करावें. **वीरभद्र १, शंभु २, गिरीश ३, अजैकपात् ४, अहिर्बुध्न्य५, पिनाकी ६, अपराजित ७, भुवनाधीश्वर ८, कपाली ९, स्थाणु १०, भग ११.** याप्रमाणें अकरा रुद्र जाणावे. ह्या श्राद्धीं शक्तानें एकेक रुद्राचे नामेंकरून एक ब्राह्मण असे अकरा ब्राह्मण भोजनास सांगावे. अशक्तानें तर सर्वांचे उद्देशेंकरून एकच ब्राह्मण भोजनास सांगावा. आमान्नें देणें असतां अकरा किंवा एक द्यावें. ह्या श्राद्धीं पिंडदान, अर्घ्य, अग्नौकरण आणि विकिर इतकीं करूं नयेत. अष्टवसुश्राद्धहि असेंच करावें. हें अष्टवसुश्राद्ध कृताकृत आहे. अष्टवसूंचीं नांवेंहि दुसऱ्या ग्रंथीं पहावीं. हें अकराव्या दिवसाचें कृत्य तीन दिवसांचें आशौच असतां चवथ्या दिवसीं करावें. दुसऱ्या दिवसीं अथवा पहिल्या दिवसीं अस्थिसंचयन करावें. पांचव्या दिवसीं सपिंडी करावी.

---

**अत्रैकादशाहेद्वादशाहेवापददानानिकार्याणितेनप्रेतस्यमार्गेसुखगतिः आसनोपानहच्छत्रंमुद्रिकाचकमंडलुः यज्ञोपवीताज्यवस्त्रंभोजनंचान्नभाजनं दशकंपदमेतत्स्यात्पदान्येवंत्रयोदश देयानिवायथाशक्तितेनासौप्रीणितोभवेत् अन्नंचैवोदकुंभंचोपानहौचकमंडलुः छत्रंवस्त्रंतथायष्टिंलोहदंडंचदापयेत् अग्निष्टिकांप्रदीपंचतिलांस्तांबूलमेवच चंदनंपुष्पमालांचोपदानानिचतुर्दश वैतरणीधेनूत्क्रांतिधेनुमोक्षधेन्वादिदानानिगोभूम्यादिदशदानानितिलपात्रदानादीनिमरणकालेनकृतानिचेदेकादशाहादौपुत्रादिभिः प्रेतोद्देशेनकार्याणि अश्वंरथंगजंधेनुंमहिषींशिबिकादिकं शालग्रामंपुस्तकंचकस्तूरीकुंकुमादिकं दासींरत्नंभूषणादिशय्यांछत्रंचचामरं दद्याद्वित्तानुसारेणप्रेतस्तत्तत्सुखंलभेत् ॥**

ह्या अकराव्या दिवसीं अथवा बाराव्या दिवसीं पददानें करावीं, तेणेंकरून प्रेताचें मार्गी सुखकारक गमन होतें. “ आसन, उपानह, छत्री, आंगठी, तांब्या, यज्ञोपवीत, घृत, वस्त्र, अन्न, अन्नपात्र हे दहा पदार्थ मिळून पददान होतें. याप्रमाणें तेरा पददानें द्यावीं, अथवा यथाशक्ति द्यावीं, तेणेंकरून मृत सुखी होतो. अन्न, उदकुंभ, उपानह, कमंडलु, छत्री, वस्त्र, काठी, लोहदंड, शेगडी, दीप, तिळ, तांबूल, चंदन, पुष्पमाला हीं चवदा उपदानें द्यावीं. वैतरणीधेनु, उत्क्रांतिधेनु, मोक्षधेनु इत्यादिक दानें व गाई, भूमि इत्यादिक दश दानें आणि तिलपात्रदानादिक हीं मरणसमयीं केलीं नसतील तर अकरावा इत्यादिक दिवसीं पुत्रादिकांनीं प्रेताचे उद्देशेंकरून करावीं. अश्व, रथ, हत्ती, गाई, महिषी, पालखी इत्यादिक, शालग्राम, पुस्तक, कस्तूरी, केशर इत्यादिक, दासी, रत्नें, भूषणें इत्यादिक, शय्या, छत्री, चवरी हीं दानें जसें द्रव्य असेल तदनुसार द्यावीं, तेणेंकरून प्रेतास तें तें सुख प्राप्त होतें.

---

**अथशय्यादानं एकादशाहेशय्यायादानेएषविधिःस्मृतः तेनोपभुक्तंयत्किंचिद्वस्त्रवाहनभाजनं यद्यदिष्टंचतस्यासीत्तत्सर्वंपरिकल्पयेत् प्रेतंचपुरुषंहैमंतस्यांसंस्थापयेत्तदा पूजयित्वाप्रदातव्यामृतशय्यायथोदिता तस्माच्छय्यांसमासाद्यसारदारुमयींदृढां दंतपत्रचितांरम्यांहेमपट्टैरलंकृताम् हंसतूलिप्रतिच्छन्नांशुभगंडोपधानिकां प्रच्छादनपटीयुक्तांगंधधूपादिवासितां उच्छीर्षकेघृतभृतंकलशंपरिकल्पयेत् तांबूलकुंकुमक्षोदकर्पूरागरुचंदनं दीपिकोपानहच्छत्र**

चामरासनभाजनं पार्श्वेषुस्थापयेद्गृहस्यासप्तधान्यानिचैवहि शयनस्थस्यभवतियदन्यदुपकारकं भृंगारकरकाद्यंततपंचवर्णवितानकं संपूज्यद्विजदांपत्यंनानाभरणभूषितं उपवेश्यतुशय्यायांमधुपर्कंततोवदेत् दानमंत्रस्तु यथानकृष्णशयनंशून्यंसागरजातया शय्यातस्याप्यशून्यास्तुतथाजन्मनिजन्मनि तस्मादशून्यशयनंकेशवस्यशिवस्यच शय्यातस्याप्यशून्यास्तुतथा जन्मनिजन्मनि दत्वैवंतस्यसकलंप्रणिपत्यविसर्जयेत् पाद्मेतु अस्थिलालाटकंगृह्यसूक्ष्मंकृत्वा सपायसं भोजयेत्द्विजदांपत्यंविधिरेषःसनातनइत्युक्तं नैतन्महाराष्ट्रदेशादिशिष्टैराद्रियते यद्देशेतदाचारस्तत्रास्तु स्वर्गेपुरंदरपुरेलोकपालालयेतथा सुखंवसत्यसौजंतुःशय्यादानप्रभावतः आभूतसंप्लवंयावत्तिष्ठत्यातंकवर्जितः प्रेतशय्याप्रतिग्राहीनभूयःपुरुषोभवेत् गृहीतायांतुतस्यांवैपुनःसंस्कारमर्हति ॥

## यानंतर शय्यादान सांगतों.

" अकराव्या दिवसीं शय्यादानाविषयीं हा ( पुढें सांगावयाचा ) विधि करण्याविषयीं सांगितलें आहे. तो असा—मृतानें उपभुक्त जीं वस्त्रें, वाहनें, भाजनें तीं; आणि त्या मृतास ज्या ज्या इष्ट वस्तु असतील त्या सर्व सिद्ध कराव्या. सुवर्णाचा प्रेतपुरुष करून शय्यादान-कालीं त्या शय्येवर स्थापन करावा; नंतर पूजा करून मृतशय्येचें यथाविधि दान करावें. नारूप काष्ठाची; दृढ; हस्तिदंतांच्या पट्टयांनीं युक्त; सुशोभित; सुवर्णाच्या वस्त्रांनीं ( भरजरी किनखाप इत्या० ) अलंकृत; परांच्या गादीनें आच्छादिलेली; उत्तम प्रकारच्या गालउशा, गिरद्या यांहीं युक्त; पलंगपोसानें युक्त; गंध, धूप, इत्यादि पदार्थांनीं सुवासित असी शय्या करावी. व उशाकडचे प्रदेशीं घृतानें भरलेला कलश ठेवावा. तांबूल; केशर, बुका, अर्गजा इत्यादिक सुगंधि चूर्णें; कापूर; कृष्णागरु; चंदन; समयी; चर्मी जोडा; छत्री; चवरी; आसन; पात्र; सप्तधान्यें हे पदार्थ भक्तीकरून पार्श्वभागीं स्थापन करावे. शय्येवर रहाणारास जे दुसरे उपकारक पदार्थ तेहि समीप ठेवावे. झारी, कमंडलु इत्यादि द्यावे; आणि पंचरंगांनीं युक्त असा चांदवा उपरिभागीं बांधावा. नंतर नानाविध आभरणांनीं भूषित असें द्विजदांपत्य ( स्त्रीपुरुष ) त्या शय्येवर बसवून त्या स्त्रीपुरुषांची पूजा करून मधुपर्क करावा. " दानाचा मंत्र—" यथा न कृष्णशयनं शून्यं सागरजातया ॥ शय्यातस्याप्यशून्यास्तु तथा जन्मनि जन्मनि ॥ तस्मादशून्यशयनं केशवस्य शिवस्य च ॥ शय्या तस्याप्यशून्यास्तु तथा जन्मनि जन्मनि, " याप्रमाणें त्या द्विजदांपत्यास ते सर्व पदार्थ देऊन नमस्कार करून विसर्जन करावें. पद्मपुराणामध्यें तर, " ललाटसंबंधी अस्थि घेऊन त्याचें चूर्ण करून पायसासहित त्याचें द्विजदंपतीस भोजन घालावें, हा विधि सनातन ( प्राचीन ) आहे " असें सांगितलें; परंतु महाराष्ट्रदेशादिकांतील शिष्ट हें स्वीकारीत नाहींत, त्यापेक्षां ज्या देशीं त्याचा आचार असेल त्या देशीं असो. " हा मृत झालेला प्राणी स्वर्ग, इंद्रपुरी, लोकपालांचीं स्थानें यांचे-ठायीं निर्भय होत्साता पृथ्वीवर प्राणी आहेत तावत्पर्यंत शय्यादानप्रभावेंकरून सुखी रहातो. प्रेतशय्येचा प्रतिग्रह करणारा पुनः पुरुष होत नाहीं, यास्तव ती शय्या दान घेतली असतां पुनः संस्कारास पात्र होतो. "

अथोदकुंभः एकादशाहात्प्रभृतिघटस्तोयान्नसंयुतः दिनेदिनेप्रदातव्योयावत्संवत्सरंसुतैः यस्यसंवत्सरादर्वाक्सपिंडीकरणंभवेत् मासिकंचोदकुंभंचदेयंतस्यापिवत्सरं अपिश्राद्धशतैर्दत्तैरुदकुंभंविनानराः दरिद्रादुःखिनस्तातभ्रमंतिचभवार्णवे यावदब्दंचयोदद्यादुदकुंभंविमत्सरः प्रेतायान्नसमायुक्तंसोश्वमेधफलंलभेत् इदंचोदकुंभश्राद्धंसपिंडीकरणात्प्रागेकोद्दिष्टविधिना सपिंडयुत्तरंतुपार्वणविधिना इदंत्रयोदशदिनादारभ्यकर्तव्यमितिभट्टाः अत्रपिंडदानं कृताकृतं देवहीनंचैतत् अदैवंपार्वणश्राद्धंसोदकुंभमधर्मकं कुर्यात्प्रत्याब्दिकाच्छ्राद्धात्संकल्पविधिनान्वहमितिवचनात् प्रायश्चित्तांगविष्णुश्राद्धवदत्रश्राद्धेसर्वेश्राद्धधर्मानसंतिकिंतुवाचनिकमात्राः तेनसंकल्पविधिनासंकल्पक्षणपाद्यासनगंधाच्छादनांतपूजनान्नपरिवेषणांतेपृथिवीतेपात्रमित्याद्युक्त्वा एषउदकुंभइदमन्नंदत्तंचेत्यादित्यागविधिः अंतेतांबूलदक्षिणादि नात्रब्रह्मचर्यपुनर्भोजनादिनियमाः वृद्धिनिमित्तेनमासिकापकर्षेउदकुंभश्राद्धानामप्यपकर्षः प्रेतश्राद्धत्वात् प्रत्यहंसोदकुंभान्नदानाशक्तेनाप्येकस्मिन्दिने तावद्भिरामान्नैरुदकुंभैश्चतावदामान्नोदकुंभनिष्क्रयेणवापकृष्योदकुंभश्राद्धानिकार्याणि अब्दमध्येप्रत्यहमुदकुंभश्राद्धंकुर्वतोमध्ये आशौचप्राप्तौतावच्छ्राद्धानां लोपएवदर्शादिवत् आशौचोत्तरंप्रतिबंधादकरणेतदुत्तरोदकुंभेनसहतंत्रतयातिक्रांतोदकुंभानांप्रयोगः अतिक्रांतोदकुंभश्राद्धान्यद्यतनोदकुंभश्राद्धंचतंत्रेणकरिष्येइतिसंकल्पः ॥

## यानंतर उदकुंभश्राद्ध सांगतो.

" अकराव्या दिवसापासून उदक व अन्न यांसहित कुंभ प्रत्यहीं वर्षपर्यंत पुत्रांनीं द्यावा. ज्याची सपिंडी वर्षाचे पूर्वी होईल त्याचेंहि मासिकश्राद्ध व उदकुंभ हीं वर्षभर करावीं. शतशः श्राद्धें केलीं आणि उदकुंभश्राद्ध न केलें तर ते मनुष्य दरिद्री, दुःखी असे ह्या भवार्णवांत भ्रमण करितात. जो मनुष्य विमत्सर होत्साता प्रेताकारणें वर्षपर्यंत अन्नयुक्त उदकुंभाचें दान करील त्यास अश्वमेधफल मिळेल. " हें उदकुंभश्राद्ध सपिंडीकरणाचे पूर्वी एकोद्दिष्टविधीकरून करावें, सपिंडीनंतर तर, पार्वणविधीकरून करावें. हें उदकुंभश्राद्ध तेराव्या दिवसापासून करावें असें भट्ट ह्मणतात. ह्या श्राद्धाचे ठायीं पिंडदान कृताकृत आहे, व हें देवहीनहि आहे; कारण, " हें पार्वणश्राद्ध, उदकुंभयुक्त, देवहीन, श्राद्धधर्मविरहित, प्रत्याब्दिक श्राद्धापर्यंत प्रतिदिवसीं सांकल्पविधीकरून करावें " असें वचन आहे. प्रायश्चित्ताच्या अंगभूत विष्णुश्राद्धासारखें ह्या श्राद्धीं सर्व श्राद्धधर्म नाहींत; तर वाचनिक मात्र आहेत. यावरून सांकल्पविधीनें संकल्प, क्षण, पाद्य, आसन, गंध, आच्छादन, एथपर्यंत पूजा झाल्यानंतर अन्न वाढण्यापर्यंत कर्म झाल्यावर " पृथिवीतेपात्रं० " इत्यादिक ह्मणून " एषउदकुंभइदमन्नंदत्तंच " इत्यादिक अन्नत्यागविधी करावा. अंतीं तांबूल, दक्षिणा इत्यादिक द्यावीं. ह्या श्राद्धीं ब्रह्मचर्य, पुनर्भोजन इत्यादिक नियम नाहींत. वृद्धिश्राद्धाचे निमित्तानें मासिकांचा अपकर्ष करणें असल्यास उदकुंभश्राद्धांचाहि अपकर्ष करावा, कारण, तीं प्रेतश्राद्धें आहेत. प्रत्यहीं उदकुंभासहित अन्नदान करण्याविषयीं जो अशक्त असेल त्यानेंहि एक दिवसीं तितकीं आमान्नें व तितके उदकुंभ अथवा तितक्या आमान्नाचा व उदकुंभाचा निष्क्रय ( द्रव्य ) करून अपकर्षेक-

रून उदकुंभश्राद्धें करावीं. वर्षपर्यंत प्रत्यहीं उदकुंभश्राद्ध करणारास मध्यें आशौच प्राप्त झालें असतां तितक्या श्राद्धांचा लोपच दर्शादि श्राद्धांप्रमाणें करावा. आशौचानंतर प्रतिबंधास्तव न केलें असतां त्याच्या पुढील जें उदकुंभश्राद्ध त्यासहवर्तमान एकतंत्रेंकरून अतिक्रांत ( अंतरलेल्या ) उदकुंभाचा प्रयोग करावा. " **अतिक्रांतोदकुंभश्राद्धान्यद्यतनोदकुंभश्राद्धं चतंत्रेणकरिष्ये,** " याप्रमाणें संकल्प करावा.

---

**तथाप्रथमाब्देदीपदानमुक्तं प्रत्यहंदीपकोदेयोमार्गेतुविषमेनरैः यावत्संवत्सरंवापिप्रेतस्य सुखलिप्सया प्राङ्मुखोदङ्मुखंदीपंदेवागारेद्विजालये कुर्याद्याम्यमुखंपित्रेअद्भिःसंकल्प्य सुस्थिरमिति ॥**

तसेंच प्रथम वर्षी दीपदान करण्याविषयीं सांगितलें आहे. " मनुष्यांनीं विषम मार्गाचे ठायीं प्रेतास सुख व्हावें अशा इच्छेनें वर्षपर्यंत प्रतिदिवसीं दीप द्यावा. देव, ब्राह्मण यांचे मंदिरांत पूर्वाभिमुख किंवा उत्तराभिमुख दीप लावावा. पित्याचे उद्देशानें लावणें तो उदकानें संकल्प करून दक्षिणामुख सुस्थिर असा लावावा."

---

**अथषोडशमासिकानि द्वादशप्रतिमास्यानिऊनमासंत्रिपक्षकं ऊनषाण्मासिकंचोनाब्दिकंचापीतिषोडश अत्रमतांतराणिसिंधौ अथैषांकालाः मासादौमासिकंकार्यमाद्यंत्वेकादशेहनि एकद्वित्रिदिनैरूनेत्रिभागेनोनएववा ऊनमासिकमूनाब्दमूनषाण्मासिकंचरेत् त्रैपक्षिकंत्रिपक्षेचोनमास्यंद्वादशेह्निवा तत्रोनमासिकोनषाण्मासिकोनाब्दिकानामेकदिनेनोनपक्षे पंचम्यांमृतस्यतृतीयायांद्वाभ्यामूनत्वपक्षेद्वितीयायां त्रिभिर्न्यूनेप्रतिपदायामनुष्ठानमितिकेचित् माधवस्तूनषाण्मासिकमूनाब्दिकंचमृताहात्पूर्वेद्युःकार्यमित्याह त्रैपक्षिकंत्रिपक्षेतीतेमृताहे कार्यं ॥**

## यानंतर सोळा मासिकें सांगतों.

" प्रत्येक मासाचें एक याप्रमाणें बारा मासांचीं बारा, ऊनमास, त्रैपक्षिक ( पंचेचाळीस दिवसांनीं कर्तव्य ), ऊनषाण्मासिक आणि ऊनाब्दिक मिळून सोळा मासिकें जाणावीं. " यांविषयीं दुसरीं मतें निर्णयसिंधूंत सांगितलीं आहेत. **यानंतर यांचे काल सांगतों**–" मासाचे प्रथम दिवसीं मासिक करावें. आद्यमासिक तर, अकराव्या दिवसीं करावें. एक, दोन, अथवा तीन दिवसांनीं ऊन ( कमी ) अथवा तिसऱ्या भागानें कमी अशा कालीं ऊनमासिक, ऊनाब्दिक व ऊनषाण्मासिक करावीं. त्रैपक्षिक तीन पक्षांनीं करावें, अथवा ऊनमासिक बाराव्या दिवसीं करावें. त्यांमध्यें ऊनमासिक, ऊनषाण्मासिक आणि ऊनाब्दिक या मासिकांचा ' एक दिवसानें कमी ' अशा दिवसीं करण्याचा पक्ष असेल तर पंचमीचे ठायीं मृत झालेल्याचें तृतीयेस; ' दोन दिवसांनीं कमी ' असा पक्ष असेल तर द्वितीयेस; ' तीन दिवसांनीं कमी ' असा पक्ष असेल तर प्रतिपदेस करावें असें कोणीं ग्रंथकार ह्मणतात. माधव तर, ऊनषाण्मासिक आणि ऊनाब्दिक, हीं मृतदिवसाचे पूर्व दिवसीं करावीं असें सांगतो. त्रैपक्षिक करणें तें तीन पक्ष अतिक्रांत झाल्यानंतर मृतदिवसीं करावें.

---

अत्राहिताग्नेर्विशेषः त्रैपक्षिकपर्यंतानिसंस्कारतिथौततःपराणिप्रत्याब्दिकंचमृततिथौतेना ग्नेर्दाहादेकादशेह्नित्रिमासादूर्ध्वसंस्कारेत्वेवंभाति त्रिपक्षपर्यंतानिदाहतिथौकृत्वापराण्यतिक्रां तानिमृततिथौप्राप्तमासिकेनसहकार्याणीति ॥

**ह्याविषयीं आहिताग्नीचा विशेष प्रकार.**–त्रैपक्षिकापर्यंत मासिकें ( आद्यमासिक, ऊन-मासिक, द्वितीयमासिक, त्रैपक्षिक हीं ) अग्निसंस्कार ज्या तिथीचे ठायीं झाला त्या तिथीस करावीं, त्यांच्या पुढचीं मासिकें व प्रत्याब्दिक मृततिथीचे ठायीं करावीं असा विशेष आहे, त्यावरून तीन मासांनंतर अग्निसंस्कार असेल तर आद्यमासिक दहनदिवसापासून अकराव्या दिवशीं करावें असें वाटतें. त्रिपक्षपर्यंत मासिकें ( चार ) दहनतिथीचे ठायीं करून त्यांचे पुढचीं अंतरलेलीं मासिकें, मृततिथीचे ठायीं प्राप्त झालेल्या मासिकासह करावीं.

---

ऊनश्राद्धेषुवर्ज्यानि त्रिपुष्करेषुनंदासुसिनीवाल्यांभृगोर्दिने चतुर्दश्यांचनोनानिकृत्तिका सुद्विपुष्करे त्रिपुष्करद्विपुष्करयोगयोर्लक्षणंप्रागुक्तं आद्यमासिकमाद्याब्दिकंचैकादशेह्नी त्येकंमतं आद्यमासिकमेवैकादशेन्हिप्रथमाब्दिकंतुद्वितीयवर्षारंभएवेत्यपरमतमित्युक्तं ॥

**ऊनमासिक, ऊनषाण्मासिक व ऊनाब्दिक या श्राद्धांचे ठायीं वर्ज्य दिवस सांगतों.**–त्रिपुष्कर, नंदातिथि ( १।६।११ ), अमावास्या, शुक्रवार, चतुर्दशी, कृत्तिकानक्षत्र आणि द्विपुष्कर यांचे ठायीं ऊनश्राद्धें करूं नयेत. त्रिपुष्कर व द्विपुष्कर यांचें लक्षण पूर्वी सांगितलें आहे. आद्यमासिक व प्रथमाब्दिक हीं अकराव्या दिवशीं करावीं असें एक मत; आद्य-मासिकच अकराव्या दिवशीं करावें व प्रथमाब्दिक तर दुसऱ्या वर्षाचे आरंभींच करावें असें दुसरें मत असें पूर्वी सांगितलें.

---

एतानिषोडशश्राद्धानिवर्षांतसपिंडनपक्षेउक्तेषुस्वस्वकालेप्येकोद्दिष्टविधिनाकार्याणिद्वा दशाहादिकालेषुसपिंडनापकर्षपक्षेएकदिनेएवापकृष्ययुगपदेकोद्दिष्टविधिनाकार्याणिश्राद्धा निषोडशादत्वानतुकुर्यात्सपिंडनमितिषोडशश्राद्धैर्विनासपिंडनेधिकाराभावबोधनात् एतां निपक्कान्नेनामान्नेनवाकार्याणि पाकपक्षेयुगपत्करणेसर्वेषामेकएवपाकोविप्राअर्घ्याःपिंडाश्च षोडश एतानिद्वादशाहादौसपिंडनात्पूर्वंकृतान्यपिपुनःसपिंड्युत्तरंस्वस्वकालेपार्वणविधिना कार्याणि यस्यसंवत्सरादर्वाक्विहितातुसपिंडता विधिवत्तानिकुर्वीतपुनःश्राद्धानिषोडश अ र्वाक्संवत्सराद्यस्यसपिंडीकरणंकृतं षोडशानांद्विरावृत्तिंकुर्यादित्याहगौतमइत्यादिवचनात् षोडशानांद्विरावृत्तित्वंचैकादशाहसपिंडनपक्षेज्ञेयं तत्राद्यमासिकस्यकालसत्त्वात् द्वादशा हेसपिंडनपक्षेतुपंचदशानांद्विरावृत्तिः त्रिपक्षेसपिंडनपक्षेआद्यमासिकोनमासिकद्वितीयमा सिकानांस्वकालेकृतत्वादपकृष्यकृतानामेवपुनरावृत्तिविधानात्तेषांकालाभावात्त्रयोदशाना मेवपुनरावृत्तिः एवमन्यपक्षेष्वपियथासंभवमूह्यं ॥

हीं सोळा मासिकश्राद्धें, वर्षांतीं सपिंडी करण्याचा पक्ष असतां उक्त जे आपापले काल त्या कालींच एकोद्दिष्टविधीकरून करावीं. बारावा दिवस इत्यादिक कालीं सपिंडीचा अपक-र्षपक्ष असेल तर एक दिवशींच अपकर्ष करून एक कालीं एकोद्दिष्टविधीनें करावीं; कारण, "षो-

डशश्राद्धें केल्यावांचून सपिंडी करूं नये," या वचनेंकरून षोडश श्राद्धें केल्यावांचून सपिंडीविषयीं अधिकार नाहीं असें बोधन होतें. हीं मासिकें पक्वान्नानें अथवा आमान्नानें करावीं. पाकानें करण्याच्या पक्षीं एक कालीं करणें असल्यास सर्वांचा एकच पाक करून ब्राह्मण, अर्घ्यें व पिंड हे सोळा सोळा करावे. हीं बारावा इत्यादिक दिवसीं सपिंडी करण्याचे पूर्वीं केलीं असलीं तथापि सपिंडीनंतर पुनः स्वस्वकालीं पार्वणविधीकरून करावीं; कारण, "ज्याची सपिंडी वर्षाचे पूर्वीं केली त्याचीं षोडशश्राद्धें पुनः यथाविधि करावीं, ज्याची सपिंडी वर्षाचे पूर्वीं केली त्याच्या षोडशमासिक श्राद्धांची द्विरावृत्ति करावी" असें गौतम सांगतो इत्यादिक वचन आहे; यास्तव षोडशश्राद्धांची द्विरावृत्ति करावी असें जें सांगितलें तें अकराव्या दिवसीं सपिंडी करण्याच्या पक्षीं जाणावें, कारण, तो अकरावा दिवस आद्यमासिकाचा काल आहे. बाराव्या दिवसीं सपिंडी करण्याच्या पक्षीं पंधरा मासिकांची द्विरावृत्ति करावी. तिसऱ्या पक्षाचे ठायीं ( पंचेचाळीसावे दिवसीं ) सपिंडी करण्याच्या पक्षीं आद्यमासिक, ऊनमासिक आणि द्वितीयमासिक हीं स्वस्वकालीं केलीं असल्यामुळें अपकर्ष करून जीं केलीं त्यांचीच पुनरावृत्ति करावी असा विधि आहे आणि त्यांच्या स्वकीय कालाचा अभाव आहे याकरितां तेरा मासिकश्राद्धांचीच पुनरावृत्ति करावी. याप्रमाणें इतर पक्षांविषयींहि जसा संभव असेल तदनुसार जाणावें.

---

येतुद्वादशाहेसपिंडनंकृत्वात्रयोदशाहादावाद्यमासिकसहितानांषोडशानांपुनरावृत्तिंकुर्वतितेभ्रांताः यदामरणादारभ्यद्वादशमासमध्येकश्चिदधिकमासःपतेत्तदातन्मासस्थंमासिकश्राद्धमधिकेशुद्धेमासेचेतिद्विवारंकार्यमितिसप्तदशश्राद्धानिभवंति मलमासेमृतस्यतुएकादशाहेआद्यमासिकंकृत्वाद्वितीयमासमृततिथौतत्पुनःकृत्वाकिंचिदूनेद्वितीयमासे ऊनमासिकंतृतीयमासारंभेद्वितीयमासिकंसार्धद्विमासांतेत्रैपक्षिकं सपिंड्युत्तराण्यवशिष्टमासिकानि स्वस्वकालेएवकार्याणि चतुःपुरुषमध्येसपिंडेषुनांदीश्राद्धप्राप्तौतुतत्प्राप्तिमासेएवैकस्मिन्नेवदिनेसर्वाण्यपकृष्यकार्याणि प्रेतश्राद्धानिसर्वाणिसपिंडीकरणंतथा अपकृष्यापिकुर्वीतकर्तुंनांदीमुखंद्विजइत्युक्तेः तत्रैकःपाकःषोडशश्राद्धपक्षेषोडशब्राह्मणाअष्टचत्वारिंशत्पिंडाःपुरूरवाद्रवविश्वेदेवार्थमेकोविप्रइतिसर्वेषामनुष्ठानं एवंपक्षांतरेषुश्राद्धसंख्यानुसारेणविप्राद्यूह्यं केचित्पाकभेदमाहुः उदकुंभश्राद्धानामप्यनुमासिकवत्प्रेतोद्देश्यकश्राद्धत्वात्तेषामप्यपकर्षइत्युक्तं वृद्धिंविनानुमासिकापकर्षेतुदोषमाहोशनाः वृद्धिश्राद्धविहीनस्तुप्रेतश्राद्धानियश्चरेत् सश्राद्धीनरकेघोरेपितृभिःसहमज्जतीति चतुःपुरुषसपिंडेष्वाधानादिप्राप्तिनिमित्तोप्यपकर्षःकार्यः अत्रविशेषःपूर्वार्धेउक्तः यद्यन्मासिकंसूतकादिनातिक्रांतंभवेत्तत्तदुत्तरमासिकेनसहतंत्रेण कार्यमित्युक्तं ॥

जे तर, बाराव्या दिवसीं सपिंडी करून तेरावा इत्यादिक दिवसीं आद्यमासिकसहित सोळा मासिकांची पुनरावृत्ति करितात ते भ्रांत होत. ज्या कालीं मरणापासून आरंभ करून बारा महिन्यांमध्यें कोणी एक अधिकमास प्राप्त होईल त्या कालीं त्या अधिक माससंबंधी मासिकश्राद्ध अधिक व शुद्ध या दोन मासांत दोन वेळ करावें; असीं सतरा श्राद्धें होतात. मलमासांत मृत झाला त्याचें तर अकराव्या दिवसीं आद्यमासिक करून दुसऱ्या मासाचे मृततिथीचे

ठायीं तें पुनः करून किंचिन्न्यून अशा दुसऱ्या मासांत ऊनमासिक व तिसऱ्या मासाचे आरंभीं द्वितीयमासिक आणि अडीच महिन्यांचे अंतीं त्रैपक्षिक याप्रमाणें करावीं. सपिंडीचे नंतरचीं अवशिष्ट मासिकें स्वस्वकालींच करावीं. सपिंडांचे ठायीं चार पुरुषांमध्यें नांदीश्राद्ध प्राप्त झालें तर तें नांदीश्राद्ध ज्या मासांत प्राप्त झालें त्याच मासांत एक दिवसींच अपकर्ष करून सर्व मासिकें करावीं; कारण, द्विजानें नांदीमुख ( नांदीश्राद्ध ) करण्यासाठीं सर्व प्रेतश्राद्धें, सपिंडी हीं अपकर्ष करूनहि करावीं असें वचन आहे. त्याविषयीं षोडशश्राद्धांचा पक्ष असतां एक पाक, सोळा ब्राह्मण, अठ्ठेचाळीस पिंड, पुरूरवार्द्रव विश्वेदेव यांसाठीं एक ब्राह्मण याप्रमाणें सर्वांचें अनुष्ठान करावें. याप्रमाणें अन्य पक्षांचे ठायीं जसी श्राद्धसंख्या असेल तदनुसार ब्राह्मणादिक जाणावे. कोणी ग्रंथकार, पाक निराळा करावा असें ह्मणतात. उदकुंभश्राद्धेंहि अनुमासिकासारखीं प्रेतोद्देश्यक श्राद्धें आहेत यास्तव त्यांचाहि अपकर्ष करावा असें सांगितलें. वृद्धिश्राद्धावांचून अनुमासिकाचा अपकर्ष असेल तर उशनाऋषि दोष सांगतो— " जो मनुष्य वृद्धिश्राद्धहीन होत्साता अपकर्ष करून प्रेतश्राद्धें करील तो श्राद्धकर्ता पितरांसहित घोरनरकाचे ठायीं बुडतो. " चतुःपुरुष सपिंडांमध्यें आधानादिप्राप्तिनिमित्तकहि अपकर्ष करावा; याविषयीं विशेष प्रकार पूर्वार्धांत सांगितला. जें जें मासिक श्राद्ध सूतकादिकानें अतिक्रांत होईल तें तें पुढच्या मासिकासह एकतंत्रानें करावें असें सांगितलें.

---

अथसपिंडीकरणविचारः तत्रसपिंडनकालः नासपिंड्याग्निमान्पुत्रःपितृयज्ञंसमाचरेदितिवचनात् पित्रादीनांमात्रादीनांत्रितयमध्येन्यतममरणेसाग्निकोद्वादशाहेसपिंडनंकूलागामिदर्शेपिंडपितृयज्ञादिकंकुर्यात् अत्रस्मार्ताग्निमानपिसाग्निकोग्राह्यइतिभाति तस्यापिपिंडपितृयज्ञावश्यकत्वात् साग्नेःप्रेतस्यतुत्रिपक्षेएव प्रेतश्चेदाहिताग्निःस्यात्कर्तानग्निर्यदाभवेत् सपिंडीकरणंतस्यकुर्यात्पक्षेतृतीयकेइत्युक्तेः अत्रसाग्निःश्रौताग्निमानेव द्वयोःसाग्नित्वेद्वादशाहएव साग्निकस्तुयदाकर्ताप्रेतोवाप्यग्निमान्भवेत् द्वादशाहेतदाकुर्यात्सपिंडीकरणंपितुरित्युक्तेः द्वयोरप्यनग्नित्वेलनेकेकालाः सपिंडीकरणंकुर्याद्यजमानस्त्वनग्निमान् अनाहिताग्नेःप्रेतस्यपूर्णेसंवत्सरेथवा एकादशेमासिषष्ठेत्रिमासेवात्रिपक्षके मासांतेद्वादशेवान्हिकुर्याद्वैकादशेहनि यदहर्वृद्धिरापन्नातदहर्वेतिनिश्चितं अत्रवृद्धिनिमित्तापकर्षोनिरग्नेरेवोक्तस्तथापि साग्नेरपिसंभवेयोज्यः अत्रवृद्धिपदंचूडोपनयनविवाहमात्रपरंसीमंतादिसंस्कारेषुवृद्धिश्राद्धस्यलोपएवकार्योनतुतदर्थंसपिंडनापकर्षइतिकेचित् अन्येतुगर्भाधानपुंसवनादिष्वन्नप्राशनांतेषुसंस्कारेष्वकरणेदोषोक्तेरावश्यकेषुवृद्धिश्राद्धस्याप्यावश्यकत्वात्सपिंडनापकर्षःकार्यएव तथाचचतुःपुरुषसपिंडेषुसपिंडीकरणाभावेगर्भाधानादिकमपिनकार्यमित्याहुः तेनपितामहमरणेपौत्रस्यवृद्धौप्राप्तायामप्यपकर्षःसपिंडीकरणानुमासिकादीनांसिद्धः एवमावश्यकवृद्धियुतकर्मप्राप्तौकनिष्ठःपुत्रोवाभ्रातावाभ्रातृपुत्रोवान्यःसपिंडोवाशिष्योवागौणकर्तापिकुलप्राप्तवृद्धिसिद्ध्यर्थंसपिंडनाद्यपकर्षंकुर्यात्तत्रचकृतेमुख्यस्यपुत्रादेर्नपुनःकरणं वृद्धिनिमित्तापकर्षेपुनःकरणाभावात् येवाभद्रंदूषयंतिस्वधाभिरितिदोषश्रुतेः वृद्धिंविनागौणाधिकारिणासपिंड्यादिकरणेतुमुख्याधिकारिणापुत्रादिनापुनरावर्तनीयं एकादशाहांतकर्मणस्तुनपुनरावृत्ति

रित्युक्तंतत्रावश्यकपदेनानन्यगतिकंवृद्धिकर्मग्राह्यं तेनसगतिकेष्टापूर्तादौसगतिकोपनयन विवाहादौचनापकर्षः अगतिकेचविवाहादावप्यपकर्षइतिव्यवस्थायोज्या आनंत्यात्कुलध र्माणांपुंसांचैवायुषःक्षयात् अस्थिरत्वाच्छरीरस्यद्वादशाहःप्रशस्यते अत्रकुलधर्मपदेनवृद्धि श्राद्धयुतंकर्मग्राह्यं नतुपंचमहायज्ञदेवपूजाश्राद्धादि अस्यवर्णधर्मत्वेननित्यत्वात्सपिंडीकरण निमित्तकप्रतिबंधायोगात् सपिंडीकरणात्पूर्वंपंचमहायज्ञादिधर्मोनकार्यइतिक्वापिस्मृतिवचने नुपलंभाच्च एतेनसपिंडीकरणाभावेसपिंडेषुदेवपूजाश्राद्धादिधर्मलोपंवदंतोनिर्मूलत्वादुपेक्ष्याः अत्रद्वादशाहपदेनाशौचसमाप्त्युत्तरदिनंग्राह्यं तेनत्रिदिनाशौचेपंचमदिनेसपिंडीकरणंद्वाद शाहादिकालेषुप्रमादादनुष्ठितं सपिंडीकरणंकुर्यात्कालेषूत्तरभाविषु इदमुत्तरकालविधानं साग्निनिरग्निसाधारणं सपिंडीकरणश्राद्धमुक्तकालेकृतंनचेत् हस्तार्द्रारोहिणीमेवानुराधायां चतच्चरेत् इदमपिसाधारणं स्मृत्यर्थसारेवर्षांतसपिंडनपक्षेवर्षांत्यदिनेपूर्वसंवत्सरविमोक्षश्रा द्धंकृत्वासपिंडनंचकृत्वापरेद्युर्मृताहेवार्षिकंकार्यमित्युक्तं इतिकालविचारः ॥

## यानंतर सपिंडीकरणाचा विचार सांगतों.

त्यामध्यें सपिंडीचा काल.—“ साग्निक पुत्रानें सपिंडी केल्यावांचून पितृयज्ञ ( पिंड-पितृयज्ञ ) इत्यादिक करूं नये, ” असें वचन आहे यास्तव पित्रादिक त्रयी व मात्रादिक त्रयी या त्रयींतून कोणी मृत असतां साग्निकानें बाराव्या दिवसीं सपिंडी करून पुढें येणाऱ्या अमावास्येचे ठायीं पिंडपितृयज्ञादिक करावे. त्याविषयीं साग्निक स्मार्ताग्निमानहि घ्यावा असें वाटतें; कारण, त्यासाहि पिंडपितृयज्ञ आवश्यक आहे. साग्निक मृताची तर सपिंडी तिसऱ्या पक्षाचे ठायींच करावी; कारण, “ मृत झालेला जर आहिताग्नि ( साग्निक ) असून कर्ता अनग्निक आहे तर त्याची सपिंडी तिसऱ्या पक्षाचे ठायीं करावी ” असें वचन आहे. ह्या स्थलीं साग्निक ह्मणजे श्रौताग्निमानच समजावा. मृत व कर्ता हे दोघे साग्निक असतां बाराव्या दिवसींच करावी; कारण, ज्या कालीं कर्ता साग्निक व मृतहि साग्निक असेल त्या कालीं पित्याची सपिंडी बाराव्या दिवसीं करावी असें वचन आहे. दोघेहि अनग्निक ( अग्निरहित ) असतां अनेक काल सांगितले आहेत. “ अनग्निमान् कर्ता यानें अनाहिताग्नि मृत झालेल्याची सपिंडी पूर्ण वर्षांतीं, किंवा अकराव्या मासीं, सहाव्या मासीं, तिसऱ्या मासीं अथवा तिसऱ्या पक्षीं, अथवा मासांतीं, बाराव्या दिवसीं किंवा अकराव्या दिवसीं अथवा ज्या दिवसीं वृद्धि ( नांदीश्राद्ध ) प्राप्त होईल त्या दिवसीं करावी, असें निश्चित समजावें. ह्या स्थलीं वृद्धि ( नांदीश्राद्ध ) निमित्तक अपकर्ष निरग्निकासच सांगितला तथापि साग्निकासहि संभव असतां योजावा. ह्या वचनांत ‘ वृद्धि ’ असें जें पद तें चूडा ( चौलसंस्कार ), उपनयन आणि विवाह एतन्मात्रपर आहे सीमंतादि संस्कारांचे ठायीं वृद्धिश्राद्धाचा लोपच करावा, त्याचे साठीं ( वृद्धिश्राद्धासाठीं ) सपिंडीचा अपकर्ष करूं नये असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, गर्भाधान, पुंसवन इत्यादि अन्नप्राशनपर्यंत संस्कार न केले असतां दोषोक्ति आहे यास्तव आवश्यक संस्काराचे ठायीं वृद्धिश्राद्धासहि आवश्यकत्व असल्यामुळें सपि-

डीचा अपकर्ष करावाच. तसेंच, सपिंडीकरण झालें नसतां चतुःपुरुष सपिंडांमध्यें गर्भाधानादिकहि करूं नये असें ह्मणतात. त्यावरून पितामह (पितृपिता) मृत असतां पौत्रास वृद्धिश्राद्ध प्राप्त असतांच सपिंडीकरण, अनुमासिक इत्यादिकांचाहि अपकर्ष सिद्ध होतो. याप्रमाणें आवश्यक असें वृद्धिश्राद्धयुक्त कर्म प्राप्त झालें असतां कनिष्ठ पुत्र, अथवा भ्राता, किंवा भ्रातृपुत्र, अथवा अन्य सपिंड किंवा शिष्य असा गौण कर्ता त्यानेंहि कुलांत प्राप्त झालेल्या वृद्धिश्राद्धाची सिद्धि होण्याकरितां सपिंडी इत्यादिकाचा अपकर्ष करावा. तो केला असतां पुत्रादिक मुख्य कर्त्यानें पुनः करूं नये; कारण, वृद्धिनिमित्तानें अपकर्ष असतां पुनः करण्याचा अभाव आहे; कारण, "जे स्वधाशब्दांनीं मंगल दूषित करितात" असें या मंत्रांत दोषश्रवण आहे. वृद्धिश्राद्धावांचून गौण अधिकाऱ्यानें सपिंडी इत्यादि केली तर मुख्य अधिकारी पुत्रादिक यानें पुनः करावी. अकराव्या दिवसपर्यंतचे कर्माची पुनरावृत्ति करूं नये असें सांगितलें. त्यामध्यें आवश्यकपदेंकरून अनन्यगतिक (जेव्हांचे तेव्हांच करावयाचें कृत्य) असें वृद्धिकर्म ग्रहण करावें. त्यावरून सगतिक असें इष्टापूर्त्तादिक (वापीकूपाद्युत्सर्गादिक) व सगतिक, उपनयनविवाहादिक असतां अपकर्ष करूं नये, आणि अगतिक असें विवाहादिक असतां त्याविषयींहि अपकर्ष करावा असी व्यवस्था योजावी. "कुलधर्म अपार आहेत, व पुरुषांचे आयुष्याचा क्षय आहे आणि शरीरास अस्थिरत्व आहे यास्तव बारावा दिवस प्रशस्त होय." ह्या वाक्यांत 'कुलधर्म' या पदेंकरून वृद्धिश्राद्धयुक्त कर्म घ्यावें; पंचमहायज्ञ, देवपूजा, श्राद्ध इत्यादिक घेऊं नये; कारण ह्यास (पंचमहायज्ञ, देवपूजा, श्राद्ध इत्यादिकास) वर्णधर्मत्वेंकरून नित्यत्व आहे ह्मणजे अकरणीं प्रत्यवाय असल्यामुळें नित्य कर्तव्य आहे ह्मणून सपिंडीनिमित्तक प्रतिबंधाचा योग नाहीं, कारण सपिंडी करण्याचे पूर्वी पंचमहायज्ञादिक धर्म करूं नये असें स्मृतिवचनांत कोठेंहि उपलब्ध नाहीं. येणेंकरून सपिंडीकरण न झालें असतां सपिंडामध्यें देवपूजा, श्राद्धादिक या धर्माचा लोप करावा असें ह्मणणारे मूळ नसल्यामुळें उपेक्ष्य होत. ह्या वचनांतील 'द्वादशाह' ह्या पदेंकरून, आशौचसमाप्ति ज्या दिवसीं होईल त्याच्या पुढचा दिवस घ्यावा. यावरून तीन दिवसांचें आशौच असतां पांचव्या दिवसीं सपिंडी करावी. "प्रमादेंकरून बारावा दिवस इत्यादि कालीं सपिंडी करण्याची राहिली असतां पुढें येणाऱ्या कालीं करावी." हें उत्तरकालाचें विधान साग्निक निरग्निक साधारण आहे. "सपिंडीश्राद्ध" उक्तकालीं न केलें असतां हस्त, आर्द्रा, रोहिणी, अथवा अनुराधा या नक्षत्रीं तें करावें, व हेंहि साधारण होय. स्मृत्यर्थसारग्रंथीं वर्षांतीं सपिंडी करण्याचा पक्ष असतां वर्षाचे शेवटचे दिवसीं पूर्वी अब्दपूर्त्तिश्राद्ध करून व सपिंडी करून दुसऱ्या दिवसीं मृत दिवसीं वार्षिक करावें असें सांगितलें आहे. याप्रमाणें सपिंडीकालाचा विचार सांगितला.

---

तत्रसपिंडनंपुत्रेविदेशस्थेपिसतिनान्यःकुर्यात् एवंज्येष्ठपुत्रेविदेशस्थेपिनकनिष्ठःकुर्यात् षोडशश्राद्धानितुज्येष्ठासन्निधानेकनिष्ठेनकार्याणि पुनर्ज्येष्ठेननकार्याणि आहिताग्निःकनिष्ठोपिसपिंडनंकुर्यादेव वृद्धिनिमित्तेतुकनिष्ठादिभिरपिसपिंडनंकार्यमित्युक्तं वृद्धिंविनाकनिष्ठ

पुत्रेणकृतेपिसपिंडनेज्येष्ठपुत्रेणपुनःकार्यम् आहिताग्निनापितृयज्ञार्थकृतेसपिंडनेपिज्येष्ठेन पुनःकार्यमितिभाति तत्रपुनःकरणेप्रेतशब्दोनवाच्यःदेशांतरस्थपुत्राणांश्रुत्वातुवपनंभवेत् दशाहंसूतकंचैवतदंतेचसपिंडनं ॥

ती सपिंडी, पुत्र देशांतरस्थ असतांहि अन्यानें करूं नये. याप्रमाणें ज्येष्ठ पुत्र देशांतरस्थ असतांहि कनिष्ठानें करूं नये. षोडशश्राद्धें तर, ज्येष्ठ समीप नसतां कनिष्ठानें करावीं, पुनः ज्येष्ठानें करूं नयेत. आहिताग्नि अशा कनिष्ठानेंहि सपिंडी करावीच. वृद्धिनिमित्त असेल तर कनिष्ठादिकांनींहि सपिंडी करावी असें सांगितलें. वृद्धीवांचून कनिष्ठ पुत्रानें सपिंडी केली असतांहि ज्येष्ठ पुत्रानें पुनः करावी. आहिताग्नि अशा कनिष्ठानें पिंडपितृयज्ञासाठीं सपिंडी केली असतांहि ज्येष्ठानें पुनः करावी असें वाटतें. त्या पुनः सपिंडीकरणांत प्रेतशब्द उच्चारूं नये. " देशांतरीं राहणारे पुत्रांनीं तर, श्रवण केल्यानंतर वपन करावें. दहा दिवस आशौच धरून आशौचाचे अंतीं सपिंडी करावी.

---

अथव्युत्क्रममृतौ मृतेपितरियस्याथविद्यतेचपितामहः तेनदेयास्त्रयःपिंडाःप्रपितामहपूर्वकाः तेभ्यश्चपैतृकःपिंडोनियोक्तव्यस्तुपूर्ववत् मातर्यथमृतायांतुविद्यतेचपितामही प्रपितामहीपूर्वस्तुकार्यस्तत्राप्ययंविधिः एवंप्रपितामहजीवनेतत्पित्रादिभिःकार्यः यत्तुव्युत्क्रमात्तुप्रमीतानांनैवकार्यासपिंडनेतितन्मातापितृभर्तृभिन्नविषयं प्रपितामहादिभिःपितुःसपिंडनेकृतेपश्चात्पितामहमरणेपिपुनःपितामहेनसहपितुःसपिंडनंकार्यं यदातुपितुःसपिंडनात्प्राक्पितामहोमृतस्तदापितामहसपिंडनंकृत्वा पितामहादिभिःसहपितृसपिंडनंकार्यं यदाचपितुर्मरणोत्तरंपितामहःप्रपितामहोवामृतस्तयोश्चपुत्रांतरंसपिंडनाधिकारीदेशांतरेतिष्ठतितदादाह्याद्येकादशाहांतमात्रंकर्मकृत्वा सपिंडनहीनाभ्यामपिपितामहप्रपितामहाभ्यांसहपितुःसपिंडनंकुर्यात् पितामहप्रपितामहयोःपुत्रांतराभावेतुपौत्रःप्रपौत्रोवातयोःसपिंडनंकृत्वैवपितुःसपिंडनंकुर्यात् पितामहस्यपुत्रांतराभावेगौत्रेगसपिंडनषोडशानुमासिकांतमेवकर्मकार्यं पितामहवार्षिकादिकंतुनावश्यकं इच्छयापितामहवार्षिकादिकरणेतुफलातिशयः ॥

## यानंतर व्युत्क्रममरण असतां सांगतों.

" ज्याचा पिता मृत असून पितामह विद्यमान आहे त्यानें प्रपितामहपूर्वक असे तीन पिंड द्यावे, व त्या तीन पिंडांचे ठायीं पित्याचे पिंडाचें संयोजन पूर्वीप्रमाणें करावें. ज्याची माता मृत असून पितामही विद्यमान आहे तेथेंहि प्रपितामहीपूर्वक हा विधि करावा, ह्मणजे प्रपितामहीपूर्वक असे तीन पिंड देऊन त्या तीन पिंडांत मातृपिंडाचें संयोजन करावें." याप्रमाणें प्रपितामह जीवंत असतां त्याचें ( प्रपितामहाचें ) पित्रादिकांसह संयोजन करावें. " व्युत्क्रमेंकरून जे मृत झाले त्यांची सपिंडी तर करूं नये, " असें जें तें तर माता, पिता, भर्ता यांहून जे भिन्न तद्विषयक होय. प्रपितामहादिकांसह पित्याची सपिंडी केली असून नंतर पितामह मृत झाला असतांहि पुनः पितामहासह पित्याची सपिंडी करावी. ज्या कालीं पित्याची सपिंडी करण्याचे पूर्वी पितामह मृत होईल त्या कालीं पितामहाची सपिंडी करून पितामहादिकांसह पित्याची सपिंडी करावी. ज्या कालीं पिता मृत झाल्यानंतर पितामह अथवा

प्रपितामह मृत होईल व त्यांचा दुसरा पुत्र सपिंडी करण्याचा अधिकारी देशांतरीं राहतो त्या कालीं दहनापासून अकराव्या दिवसाचे कृत्यापर्यंत कर्म मात्र करून, सपिंडीहीन असे जरी पितामह व प्रपितामह आहेत तथापि त्यांसह पित्याची सपिंडी करावी. पितामह व प्रपितामह यांस दुसरा पुत्र नसेल तर पौत्र अथवा प्रपौत्र यानें त्याची सपिंडी करूनच पित्याची सपिंडी करावी. पितामहास दुसरा पुत्र नसतां पौत्रानें सपिंडी, षोडशानुमासिकांतच कर्म करावें, पितामहाचें वार्षिकादिक तर आवश्यक नाहीं. इच्छेंकरून पितामहाचें वार्षिकादिक केलें तर फलातिशय आहे.

---

पितृदशाहंकुर्वन्यदिपुत्रोमृतस्तदातत्पुत्रःस्वपितुरौर्ध्वदेहिकंकृत्वापितामहौर्ध्वदेहिकंपुनः सर्वमावर्तयेत् अतीतेदशाहेतुनपुनरावृत्तिः पुत्रांतराभावेपितामहसपिंडनोत्तरंपितृसपिंडन मित्युक्तं अशक्तिवशात्पित्रानुज्ञातेनपौत्रेणपितामहदशाहकर्मण्यारब्धेपश्चात्पितृमृतौपित्रा शौचंवहन्नेवपौत्रःपितामहौर्ध्वदेहिकंकुर्यात् प्रक्रांतत्वात्पितृदशाहादिकर्मापिकुर्यात्प्राप्तत्वात्॥

पित्याचें दहा दिवसांचें कर्म करीत असतां जर पुत्र मृत झाला तर त्या कालीं त्याचे पुत्रानें आपल्या पित्याचें अंत्यकर्म करून पितामहाचें अंत्यकर्म सर्व पुनः करावें. दहावा दिवस अतीत असेल तर पुनरावृत्ति करूं नये. दुसरा पुत्र नसतां पितामहाची सपिंडी केल्यानंतर पित्याची सपिंडी करावी असें सांगितलें. असामर्थ्य असल्यामुळें पित्यानें अनुज्ञात ( आज्ञा केलेला ) अशा पौत्रानें पितामहाचें दहा दिवसांचें कर्म आरंभिलें असतां नंतर पिता मृत झाला तर पित्याचें आशौच धरीत होत्साताच पौत्रानें पितामहाचें अंत्यकर्म करावें; कारण, त्याचा आरंभ झालेला आहे. पित्याचें दहा दिवसांचें इत्यादिक कर्महि करावें; कारण, तें प्राप्त झालेलें आहे.

---

अथस्त्रीषूच्यते पितामह्यादिभिःसार्धमातरंतुसपिंडयेत् केचित्पितृमरणोत्तरंमातृमरणे पित्रैवसहमातृसपिंडनमाहुः दौहित्रःसपिंडनकर्ताचेन्मातामहेनसहसपिंडनमित्यपरेसह गमनेतुभर्त्रैवसहसपिंडनं येनकेनापिसपिंडनेप्यन्वष्टक्यप्रतिवार्षिकादिश्राद्धेषुपितामह्यादि भिःसहैवमातुःपार्वणंकार्यं अत्रकेचित्स्वपुत्रसपत्नीपुत्रयोःपत्युश्चाभावेस्त्रीणांसपिंडनंनास्ती त्याहुः अत्रान्वारोहणेभर्त्रासहपत्नीसंयोजनमितिपक्षेमतद्वयं पितृपिंडस्यपितामहादिषुत्रिषु संयोजनंप्रथमंकृत्वापश्चान्मातृपिंडंपितामह्यादिषुसंयोजयेदित्येकः प्रथमंमातृपिंडंपित्रैवसंयो न्यमातृपिंडेनैकीकृतंपितृपिंडंपितामहादिषुसंयोजयेदित्यपरःपक्षः अत्रद्वितीयपक्षएवयुक्तः॥

## यानंतर स्त्रियांविषयीं सांगतों.

" मातेची सपिंडी पितामही इत्यादिकांसह करावी. " कोणी ग्रंथकार पिता मृत झाल्यानंतर माता मृत असतांहि पित्यासहच मातेची सपिंडी करावी असें ह्मणतात. जर कन्येचा पुत्र सपिंडीकर्ता आहे तर मातामहासह सपिंडी करावी असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात. सहगमन असेल तर भर्त्यासहवर्तमानच सपिंडी करावी. ज्या कोणाशीहि सपिंडी असली तथापि अन्वष्टक्य, प्रतिसांवत्सरिक इत्यादि श्राद्धांचे ठायीं पितामही इत्यादिकांसहच मातेचें पार्वण

करावें. ह्या स्थलीं कोणी ग्रंथकार, स्वपुत्र, सपत्नीपुत्र, पति यांतून कोणीहि नसल्यास स्त्रियांस सपिंडी नाहीं असें ह्मणतात. ह्या स्थलीं अन्वारोहण ( सहगमन ) असतां 'भर्त्या-सह पत्नीचें संयोजन' असा जो पक्ष त्याविषयीं दोन मतें—पित्याचे पिंडाचें, पितामहादि तिघांचे ठायीं प्रथम संयोजन करून पश्चात् मातेच्या पिंडाचें पितामहादिकांचे ठायीं संयोजन करावें असा एक. पहिल्यानें मातेचा पिंड पित्याशींच संयुक्त करून मातेच्या पिंडानें एकत्र केलेला असा पित्याचा पिंड पितामहादिकांचे ठायीं संयुक्त करावा असा दुसरा पक्ष. या दोहोंमध्यें दुसराच पक्ष योग्य आहे.

---

**केचित्सहगमनेएकदिनमरणेवास्त्रियाःसपिंडनंनास्तिभर्तुःकृतेसपिंडनेभार्यायाअपिकृतं भवतीतिमतांतरमाहुःसर्वाभावेस्वयंपत्न्यःस्वभर्तृणाममंत्रकं सपिंडीकरणंकुर्युस्ततःपार्वणमेवच ब्रह्मचारिणामनपत्यानांचव्युत्क्रममृतानांचसपिंडनंनकार्यमितिमतांतरं अत्रसर्वत्रसपिंडनाभावपक्षोनशिष्टाचारेदृश्यते यतीनांसपिंडीकरणंनास्तिकिंतुतत्स्थानेएकादशेन्हिपार्वणंकार्यं इदंसपिंडीकरणश्राद्धंपार्वणैकोद्दिष्टरूपंतेनपितामहादित्रयार्थंत्रयोविप्राअर्घ्याःपिंडाश्चत्रयः प्रेतार्थमेकोविप्रःपिंडोर्घ्यश्च देवार्थंद्वौ यद्वापार्वणेएकःप्रेतेएकःदेवार्थमेकोविप्रः अत्रकामकालौविश्वेदेवौ प्रेतस्यपित्रादेरर्घ्यपात्रंपितामहार्घ्यपात्रत्रयेसंयोज्यंएवंप्रेतपिंडोपिपितामहादिपिंडत्रयेसंयोज्यः पितृविप्रकरेहोमःसाग्नेरपिभवेदिह सपिंडीकरणश्राद्धमन्नेनैवकार्यंनत्वामादिना अनुमासिकान्यप्यन्नेनैवकार्याणि ॥**

कोणी ग्रंथकार, सहगमन असतां अथवा एक दिवसीं दंपती मृत असतां स्त्रियेची सपिंडी करूं नये, भर्त्याची सपिंडी केली असतां स्त्रियेचीहि सपिंडी केली असें होतें, याप्रकारें दुसरें मत सांगतात. "सर्वांचा[1] अभाव असतां आपण स्त्रियांनीं आपल्या पतींची सपिंडी अमंत्रक करावी, सपिंडीनंतर पार्वणच श्राद्ध करावें." ब्रह्मचारी, अपत्यरहित आणि व्युत्क्रममृत ( पुत्रानंतर पिता मृत इत्यादि ) यांची सपिंडी करूं नये असें दुसरें मत आहे. ह्या स्थलीं सर्वत्र सपिंडी न करण्याचा पक्ष शिष्टाचारामध्यें दिसत नाहीं. संन्यासी यांचें सपिंडीकरण नाहीं, तर सपिंडीस्थानीं अकराव्या दिवसीं पार्वण श्राद्ध करावें. हें सपिंडीश्राद्ध पार्वण व एकोद्दिष्ट असें दोन प्रकारचें आहे त्यावरून पितामहादि तिघांकरितां तीन ब्राह्मण आणि अर्घ्यें, पिंड हेहि तीन होत. प्रेताकरितां एक ब्राह्मण, एक पिंड व एक अर्घ्य. देवांकरितां दोन ब्राह्मण असावे. अथवा पार्वणाविषयीं एक, प्रेताविषयीं एक आणि देवांकरितां एक ब्राह्मण याप्रमाणें सांगावे. ह्या सपिंडीश्राद्धामध्यें कामकाल विश्वेदेव घ्यावे. पित्रादिक प्रेताचें अर्घ्यपात्र पितामहादिकांचे तीन अर्घ्यपात्रांत संयोजन ( मिळवणें ) करावें. याप्रमाणें प्रेताचा पिंडहि पितामहादिकांच्या तीन पिंडांत मिळवावा. "ह्या सपिंडीश्राद्धीं पितृस्थानीं जो ब्राह्मण त्याचे हातावर साग्निकानेंहि होम करावा." सपिंडीश्राद्ध अन्नानेंच करावें, आमान्नादिकानें करूं नये. अनुमासिक श्राद्धेंहि अन्नानेंच करावीं.

---

१ औरस, दत्तक, पौत्र आणि प्रपौत्र हे नसतां.

प्रेत:सपिंडनादूर्ध्वंपितृलोकंसगच्छति कुर्यात्तस्यचपाथेयंद्वितीयेन्हिसपिंडनादितिवचनात्त्रयोदशेन्हिपाथेयश्राद्धंकृत्वापुण्याहवाचनादिकंकृत्वावर्षपर्यंतंप्रत्यहमुदकुंभश्राद्धंकुर्यात् अशक्तौमासिकश्राद्धेष्वेकोदकुंभोदेयः सपिंडनोत्तरानुमासिकानांपार्वणविधिनानुष्ठानंवृद्धिप्राप्तौतेषामप्यपकर्षः सचचतु:पुरुषसपिंडेष्वेवेत्युक्तं एवंवर्षपर्यंतंकृत्वावर्षांत्यदिनेसंवत्सरविमोक्षश्राद्धंपार्वणविधिनाकार्यं इदमेवाब्दपूर्तिश्राद्धमित्यप्युच्यते वृद्धिश्राद्धेसपिंड्यांचप्रेतश्राद्धानुमासिके संवत्सरविमोकेचनकुर्यात्तिलतर्पणं इदमूनाब्दिकांतषोडशश्राद्धेभ्योभिन्नमेव अतएवास्यप्रेतश्राद्धत्वाभावाद्वृद्धिप्राप्तावपिनापकर्षः ततोवर्षांत्यदिनेशक्त्याभूरिब्राह्मणभोजनंचकार्यमित्यंत्येष्टिपद्धतौभट्टाः युक्तंचैतत् जीवतोवाक्यकरणात्प्रत्यब्दंभूरिभोजनात् गयायांपिंडदानाच्चत्रिभि:पुत्रस्यपुत्रतेपिवाक्येनभूरिभोजनपदेनप्रत्याब्दिकश्राद्धातिरिक्तस्यैवबहुविप्रभोजनस्यविहितत्वात् श्राद्धेकुर्यान्नविस्तरमितिनिषेधाच्छ्राद्धस्यभूरिभोजनपदाभिधेयत्वासंभवात् ॥

"मृत झालेला तो सपिंडी झाल्यानंतर पितृलोकाप्रत जातो; यास्तव सपिंडीचे दुसऱ्या दिवसीं त्याचें पाथेयश्राद्ध करावें;" असें वचन आहे याकरितां तेराव्या दिवसीं पाथेयश्राद्ध करून पुण्याहवाचनादिक करावें. नंतर वर्षपर्यंत प्रतिदिवसीं उदकुंभश्राद्ध करावें. प्रत्यहीं करण्यास असामर्थ्य असतां मासिक श्राद्धाचे ठायीं एक उदकुंभ द्यावा. सपिंडी झाल्यानंतर अनुमासिकश्राद्धें पार्वणविधीकरून करावीं, व वृद्धिश्राद्ध प्राप्त असतां त्यांचाहि अपकर्ष करावा. तो अपकर्ष, चार पुरुषपर्यंत जे सपिंड त्यांविषयींच असें सांगितलें. याप्रमाणें वर्षपर्यंत करून वर्षाचे शेवटचे दिवसीं संवत्सरविमोक्षश्राद्ध पार्वणविधीकरून करावें. संवत्सरविमोक्ष हेंच अब्द-पूर्तिश्राद्ध असेंहि ह्मणतात. वृद्धिश्राद्ध, सपिंडी, प्रेतश्राद्ध, अनुमासिक आणि संवत्सरविमोक यांचे ठायीं तिलतर्पण करूं नये. हें ( अब्दपूर्तिश्राद्ध ) ऊनाब्दिकापर्यंत जीं षोडश श्राद्धें त्यांहून निराळेंच आहे या कारणास्तवच हें प्रेतश्राद्ध नसल्यामुळें, वृद्धि प्राप्त असतांहि या अब्दपूर्तिश्राद्धाचा अपकर्ष करूं नये. तदनंतर वर्षाचे शेवटचे दिवसीं शक्त्यनुसार भूरि ( बहुत ) ब्राह्मणभोजनहि घालावें असें अंत्येष्टिपद्धतींत भट्ट सांगतात, आणि हें योग्य आहे; कारण, "पिता जीवंत असतां त्याची आज्ञा मानणें, प्रत्यब्दश्राद्धीं भूरिभोजन करणें, आणि गयेंत पिंडदान करणें ह्या तीन कृत्यांनीं पुत्रास पुत्रपणा येतो," ह्या वाक्येंकरून 'भूरिभोजन' ह्या पदानें प्रत्याब्दिकश्राद्धाव्यतिरिक्तच बहुत ब्राह्मणांस भोजन घालणें उक्त आहे. कारण, "श्राद्धांत विस्तर करूं नये," असा निषेध आहे यास्तव श्राद्धास भूरिभो-जनपदाभिधेयत्वाचा संभव नाहीं.

---

अथप्रथमाब्देनिषिद्धानि मातापित्रोर्मरणेवर्षपर्यंतंपरान्नंगंधमाल्यादिभोगंमैथुनमभ्यंगस्नानंचवर्जयेत् ऋतौभार्यामुपेयादेव आर्त्विज्यंलक्षहोममहादानादिकाम्यकर्माणितीर्थयात्राविवाहादिवृद्धिश्राद्धयुतंकर्ममात्रंशिवपूजांचवर्जयेत् संध्योपासनदेवपूजापंचमहायज्ञातिरिक्तकर्ममात्रंवर्ज्यं प्रमीतौपितरौयस्यदेहस्तस्याशुचिर्भवेत् नदैवंनापिवापित्र्यंयावत्पूर्णोनवत्सर इतिकेचित् महातीर्थस्यगमनमुपवासव्रतानिच सपिंडीश्राद्धमन्येषांवर्जयेद्वत्सरंबुधः अस्या

पवादः पत्नीपुत्रस्तथापौत्रोभ्राताततनयःस्नुषा मातापितृव्यश्चैतेषांमहागुरुनिपातने कुर्यात्सपिंडनंश्राद्धंनान्येषांतुकदाचन एकादशाहपर्यंतंप्रेतश्राद्धंचरेत्सदा पित्रोर्मृतौचनान्येषां कुर्याच्छ्राद्धंतुपार्वणं गयाश्राद्धंमृतानांतुपूर्णेत्वब्देप्रशस्यते गारुडे तीर्थश्राद्धंगयाश्राद्धंश्राद्धमन्यच्चपैतृकं अब्दमध्येनकुर्वीतमहागुरुविपत्तिषु केचिद्वर्षांतसपिंडनपक्षेएवैतेसर्वेनिषेधानतुद्वादशाहसपिंडनपक्षइत्याहुः अपरेतुद्वादशाहसपिंडनपक्षेपिसर्वेएतेनिषेधाइत्याहुः अत्रैवंव्यवस्थावृद्धिप्राप्तिंविनाऽर्वाक्सपिंडनापकर्षेपिप्रेतस्यपितृत्वप्राप्तिर्वर्षांतएवकृतेसपिंडीकरणेनरःसंवत्सरात्परं प्रेतदेहंपरित्यज्यभोगदेहंप्रपद्यतइत्यादिवचनात् तेनसपिंडीकरणसत्त्वेपि वृद्धिदैवपित्र्येष्वनधिकारःवृद्धिनिमित्तापकर्षेतुवृद्ध्यादावधिकारइति अतएवकालतत्त्वनिर्णये संकटादौमृतपितृकापत्यानांसंस्काराभ्युदयिकंमृतमातापितृकेणपुत्रेणस्वापत्यसंस्कारादिकंचप्रथमाब्देपिकार्यमित्युक्तंदर्शमहालयादिश्राद्धस्यनित्यतर्पणस्यचाप्येवंमेवव्यवस्थाज्ञेया ॥

## यानंतर प्रथमवर्षी निषिद्धें सांगतों.

माता, पिता हे मृत असतां वर्षपर्यंत परान्न, गंधमाल्यादि भोग, मैथुन, अभ्यंगस्नान हीं वर्ज्य करावीं. ऋतुकालीं स्त्रीगमन करावेंच. ऋत्विक्कर्म, लक्षहोम, महादानें इत्यादि काम्य कर्में; तीर्थयात्रा; विवाहादिक वृद्धिश्राद्धयुक्त सर्व कर्में; शिवपूजा हीं वर्ज्य करावीं. संध्या, उपासन ( सायंप्रातरौपासन ), देवपूजा, पंचमहायज्ञ यांवांचून इतर सर्व कर्में वर्ज्य करावीं. “ ज्याचे माता, पिता मृत झाले त्याचा देह वर्षपर्यंत अशुचि होतो यास्तव त्यानें कोणतेंहि देवकर्म व पित्र्यकर्म करूं नये ” असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. “ महातीर्थाची यात्रा, उपवास, व्रतें, अन्याचें सपिंडी श्राद्ध हीं ज्ञात्या पुरुषानें वर्षपर्यंत वर्ज्य करावीं. ” याचा अपवाद–“ माता, पिता मृत असतां पत्नी, पुत्र, पौत्र, भ्राता, भ्रातृपुत्र, सून, माता आणि पितृव्य ह्यांची सपिंडी करावी, इतरांची कदापि करूं नये. अकराव्या दिवसपर्यंतचीं प्रेतश्राद्धें सार्वकाल करावीं. माता, पिता मृत असतां इतरांचें पार्वणश्राद्ध तर करूं नये. मृत झालेल्यांचें गयाश्राद्ध पूर्ण वर्षानंतर प्रशस्त होय. गरुडपुराणांत–तीर्थश्राद्ध, गयाश्राद्ध, अन्य पितृश्राद्ध हीं महागुरुविपत्ति ( माता पिता मृत ) असतां वर्षामध्यें करूं नयेत. वर्षांतीं सपिंडी करण्याचा पक्ष असतांच हे सर्व निषेध होत, बाराव्या दिवसीं सपिंडी करण्याचे पक्षीं नाहींत असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार तर, बाराव्या दिवसीं सपिंडी करण्याचे पक्षींहि हे सर्व निषेध आहेत असें ह्मणतात. याविषयीं अशी व्यवस्था–वृद्धिप्राप्तीवांचून पूर्वी सपिंडीचा अपकर्ष केला तथापि प्रेतास पितृत्वाची प्राप्ति होणें ती वर्षांतींच होते; कारण, “सपिंडी केली असतां मनुष्य वर्षानंतर प्रेतदेह टाकून भोगदेहाप्रत पावतो ” इत्यादिक वचन आहे, त्यावरून, सपिंडी केली असतांहि वृद्धिसंज्ञक दैवकर्म व पित्र्यकर्म यांविषयीं अधिकार नाहीं. वृद्धिनिमित्तानें अपकर्ष केला असेल तर वृद्धि इत्यादि कर्मांविषयीं अधिकार आहे. याकरितांच कालतत्त्वनिर्णयांत, संकटादिक असतां मृतपितृक अशा अपत्यांचें संस्काररूप मंगलकार्य व मृतमातापितृक ( मातापिता ज्याचे मृत तो ) पुत्रानें आपल्या अपत्याचें

१ वृद्धिनिमित्तापकर्षेदर्शादिकमाभ्युदयिकंचकार्य इच्छयासपिंड्यपकर्षेदर्शादिकंवर्षांतेकार्यमितिव्यवस्थेत्यर्थः

संस्कारादिक प्रथम वर्षींहि करावें असें सांगितलें. दर्श, महालय इत्यादि श्राद्ध व नित्यतर्पण यांचीहि असीच व्यवस्था जाणावी.

---

**अथविधानानि तत्रपंचकमृतौ पंचकंनामधनिष्ठोत्तरार्धमारभ्यरेवत्यंतंसार्धनक्षत्रचतुष्टयं तत्रदाहनिषेधाद्दर्भमयपुत्तलैर्यवपिष्टानुलिप्तैः पंचोर्णासूत्रवेष्टितैःसहशवंदहेत् तत्रतिथ्यादिसंकीर्त्यामुकस्यधनिष्ठापंचकादिमरणसूचितवंशारिष्टविनाशार्थंपंचकविधिंकरिष्य इतिसं**कल्प्योक्तविधाःप्रतिमानक्षत्रमंत्रैरभिमंत्र्यगंधपुष्पैःसंपूज्यदाहसमयेप्रेतोपरिन्यसेत् प्रथमां शिरसि द्वितीयांनेत्रयोः तृतीयांवामकुक्षौ चतुर्थींनाभौ पंचमींपादयोः तदुपरिनाममंत्रैर्घृताहुतीर्जुहुयात् तत्रनामानिक्रमेण प्रेतवाहःप्रेतसखःप्रेतपःप्रेतभूमिपः प्रेतहर्ताचेति ततउदकंदत्वायमायसोमंत्र्यंबकमितिमंत्राभ्यांप्रत्येकंप्रतिमास्वाज्याहुतीर्जुहुयात्ततःप्रेतमुखेपंचरत्नंदत्वापुत्तलैःसहप्रेतंदहेत् सूतकांतेतिलहेमघृतानिदत्वाकांस्यपात्रेतैलंप्रक्षिप्यतत्रात्मप्रतिबिं**बंवीक्ष्यविप्रायदद्यात् शांतिंचकुर्यात् ॥**

## यानंतर विधानें सांगतों.

**त्यामध्यें पंचकांत मरण असतां कर्तव्य** विधि.—पंचक ह्मणजे धनिष्ठाचे उत्तरार्धास आरंभ करून रेवतीच्या अंतापर्यंत असीं साडेचार नक्षत्रें तें; त्या पंचकाचे ठायीं दहनाचा निषेध आहे यास्तव दर्भमय पुतळे करून यवांचे पिठानें ते लिप्त करावे व पांच ऊर्णासूत्रानें त्यांस वेष्टन करून त्यांसहित शवाचें दहन करावें. त्याविषयीं तिथि इत्यादिकांचें संकीर्तन करून "**अमुकस्य धनिष्ठापंचकादिमरणसूचित वंशारिष्टविनाशार्थं पंचकविधिं करिष्ये,**" असा संकल्प करून उक्तप्रकारच्या नक्षत्रमंत्रांनीं अभिमंत्रण करून गंधपुष्पांनीं पूजा करून दहनकालीं त्या, प्रेतावर ठेवाव्या. पहिली मस्तकावर, दुसरी नेत्रांवर, तिसरी वामकुक्षीवर, चवथी नाभीवर, पांचवी पायांवर याप्रमाणें ठेवून त्या प्रतिमांवर नाममंत्रांनीं घृताच्या आहुति हवन कराव्या. **त्याविषयीं नामें क्रमानें—"प्रेतवाहः, प्रेतसखः, प्रेतपः, प्रेतभूमिपः, प्रेतहर्ता"** याप्रमाणें जाणावीं. तदनंतर उदक देऊन "**यमायसोमं० त्र्यंबकं०**" ह्या दोन मंत्रांनीं प्रत्येक प्रतिमेवर घृताच्या आहुतींनीं हवन करावें. तदनंतर प्रेताचे मुखांत पंचरत्नें घालून पुतळ्यांसहित प्रेताचें दहन करावें. सूतकाच्या अंतीं तिल, सुवर्ण, घृत यांचीं दानें करून कांस्यपात्रांत तेल घालून त्यांत आपलें प्रतिबिंब पाहून ब्राह्मणाकारणें त्याचें दान करावें, आणि शांतिहि करावी.

**अत्रायंविशेषः नक्षत्रांतरेमृतस्यपंचकेदाहप्राप्तौपुत्तलविधिरेवनशांतिकं पंचकमृतस्याश्विन्यांदाहप्राप्तौशांतिकमेवनपुत्तलविधिः शांतिश्चलक्षहोमरुद्रजपान्यतररूपायथाविभवं** कार्या अथवाकुंभेयमप्रतिमांसंपूज्यस्वगृह्योक्तविधिनाग्निप्रतिष्ठापनान्वाधानादिचरुश्रपणांतं कृत्वाज्यभागांतेनामभिश्चतुर्दशचर्वाहुतीर्जुहुयात् यमायस्वाहा १ धर्मराजाय० २ मृत्यवे० **३ अंतकाय० ४ वैवस्वताय० ५ कालाय० ६ सर्वभूतक्षयाय० ७ औदुंबराय० ८**

---

१ वृद्धिनिमित्तानें अपकर्ष केला असतां दर्शादिक, आभ्युदयिक ( नांदीश्राद्ध ) हीं श्राद्धें करावीं. स्वेच्छेनें सपिंडीचा अपकर्ष केला असेल तर दर्शादिक वर्षांतीं करावें असी व्यवस्था असा अर्थ जाणावा.

दध्नाय० ९ नीलाय० १० परमेष्ठिने० ११ वृकोदराय० १२ चित्राय० १३ चित्रगुप्ताय० १४ एवंहुत्वाहोमशेषंसमाप्य कृष्णांगांकृष्णवत्सांचहेमनिष्कसमन्वितां दद्याद्विप्रायशांताययमोमेप्रीयतामिति ॥

**याविषयीं हा विशेष.**—अन्य नक्षत्रीं मृत झालेल्याचा दाह पंचकांत प्राप्त झाला असतां पुत्तलविधि करावा, शांति करूं नये. पंचकांत मृत झालेल्याचा दाह अश्विनी नक्षत्रीं प्राप्त असतां शांतिच करावी, पुत्तलविधि करूं नये. शांति करणें ती लक्षहोम अथवा रुद्रजप यांतून कोणती एक यथाशक्ति करावी. अथवा कलशावर यमाचे प्रतिमेची पूजा करून आपल्या गृह्यसूत्रांत सांगितल्या विधीनें अग्निस्थापन, अन्वाधान, चरु शिजविणें एथपर्यंत कर्म करून आज्यभागांत कर्म केल्यावर नाममंत्रांनीं चरूच्या चवदा आहुतींनीं होम करावा. **नाममंत्र— "यमायस्वाहा० १, धर्मराजाय० २, मृत्यवे० ३, अंतकाय० ४, वैवस्वताय० ५, कालाय० ६, सर्वभूतक्षयाय० ७, औदुंबराय० ८, दध्नाय० ९, नीलाय० १०, परमेष्ठिने० ११, वृकोदराय० १२, चित्राय० १३, चित्रगुप्ताय० १४,"** याप्रमाणें होम करून होमशेष समाप्त करून गोदान करावें. **गोदानाचा मंत्र—"कृष्णां गां कृष्णवत्सां च हेमनिष्कसमन्वितां ॥ दद्याद्विप्राय शांताय यमो मे प्रीयतामिति"**

---

**त्रिपादृक्षेप्येतदेवशांतिकंयदिभद्रातिथीनांस्याद्भानुभौमशनैश्चरैः त्रिपादृक्षैश्चसंयोगस्तदा योगस्त्रिपुष्करः द्विपुष्करोद्वयोर्योगेथवायंस्यात्द्विपादभैः द्विपादनक्षत्राणितु पुनर्वसूत्तराषाढाकृत्तिकोत्तरफल्गुनी पूर्वभाद्राविशाखाचज्ञेयमेतत्त्रिपादभं मृगचित्राधनिष्ठाचज्ञेयमेतत् द्विपादभं त्रिपुष्करयोगेद्विपुष्करयोगेचमृतौकृच्छ्रत्रयंप्रायश्चित्तंकृत्वायवपिष्टमयपुरुषत्रयेणसहप्रेतदाहः पुरुषत्रयस्यप्रेतेन्यासआज्याहुतयश्चपूर्ववत् कनकहीरकनीलपद्मरागमौक्तिकेति पंचरत्नस्यमुखेप्रक्षेपोपि रत्नाभावेकर्षार्धस्वर्णं स्वर्णाभावेघृतं एवंपूर्वत्रापि दहनेमरणेत्रिद्विपुष्करेत्रिगुणंफलं द्विगुणंखननेप्येवमेतद्दोषोपशांतये सुवर्णदक्षिणांदद्यात्कृष्णवत्समथापिवा शांतिंकुर्यात्सूतकांतेपूर्वोक्तांतेनमंगलं ॥**

त्रिपादनक्षत्रींहि हीच शांति करावी. " जर भद्रातिथींचा ( द्वितीया, सप्तमी, द्वादशी ), रवि, भौम, शनि हे वार; आणि त्रिपाद नक्षत्रें ह्यांच्याशीं योग असेल तर तो त्रिपुष्करयोग होतो. दोहोंचा योग असतां द्विपुष्कर योग, अथवा द्विपाद नक्षत्राच्या योगानें द्विपुष्कर होतो." **त्रिपाद नक्षत्रें तर**—पुनर्वसु, उत्तराषाढा, कृत्तिका, उत्तरा, पूर्वाभाद्रपदा, विशाखा हीं त्रिपाद नक्षत्रें होत. मृग, चित्रा, धनिष्ठा हीं द्विपाद नक्षत्रें होत. त्रिपुष्कर योग व द्विपुष्कर योग यांवर मरण प्राप्त असतां तीन कृच्छ्रें प्रायश्चित्त करून यवांचे पिठाचे तीन पुरुष करून त्यांसहित प्रेताचें दहन करावें. तीन पुतळे प्रेतावर ठेवणें व आज्याच्या आहुति देणें पूर्वींप्रमाणें करावें. सुवर्ण, हिरा, नीलमणि, माणिक, मौक्तिक हीं पंचरत्नें मुखामध्यें टाकावीं. रत्नांचा अभाव असतां अर्ध तोळा सुवर्ण, सुवर्णाच्या अभावीं घृत घालावें. याप्रमाणें पूर्वींहि करावें. " त्रिपुष्कर, द्विपुष्कर योगांवर दहन, मरण असतां त्रिगुण, द्विगुण फल होतें व खनन असतांहि असेंच फल होतें. या दोषाची शांति होण्याकरितां सुवर्णदक्षिणा द्यावी,

अथवा काळें वस्त्र दान करावें. सूतकांतीं, पूर्वीं सांगितलेली शांति करावी, तेणेंकरून मंगल होतें.

मृतस्यस्मशानेनयनोत्तरंपुनर्जीवनेसतियस्यगृहेसप्रविशतितस्यमरणं तत्रसक्षीरघृताक्तौदुंबरसमिधांसावित्र्यष्टसहस्रेणहोमः अंतेकपिलादानंतिलपूर्णकांस्यपात्रदानंच एकाशीतिपलंकांस्यंतदर्धंवातदर्धकं नवषट्त्रिपलंवापिदद्याद्विप्रायशक्तितः ॥

मृतास स्मशानांत नेल्यानंतर तो पुनः जीवंत झाला असतां ज्याच्या घरांत प्रवेश करितो त्यास मरण प्राप्त होईल. त्याविषयीं दुग्धयुक्त घृतांत भिजवलेल्या उंबराच्या समिधांचा सावित्रीमंत्रानें आठ सहस्र होम करावा. शेवटीं कपिला गाईचें दान व तिलपूर्ण कांस्यपात्राचें दान हीं करावीं. एक्यायशीं पळें, अथवा साडेचाळीस, अथवा सवा वीस, नऊ, सहा किंवा तीन पळें असें यथाशक्ति कांस्यपात्र ब्राह्मणाकारणें द्यावें.

अथब्रह्मचारिमृतौ ब्रह्मचारिमरणेद्वादशषट्त्रीणिवाब्दानिशक्त्याप्रायश्चित्तंकृत्वादेशकालौस्मृत्वामुकगोत्रनाम्नोब्रह्मचारिणोमृतस्यव्रतविसर्गंकरिष्ये तदंगंनांदीश्राद्धंकरिष्यइत्युक्त्वा हिरण्येननांदीश्राद्धंकृत्वाग्निप्रतिष्ठापनाद्याघारांते चतसृभिर्व्याहृतिभिराज्यंहुत्वाग्नयेव्रतपतये स्वाहा अग्नयेव्रतानुष्ठानफलसंपादनायस्वाहा विश्वेभ्योदेवेभ्यःस्वाहेतितिस्रआज्याहुतीर्हुत्वास्विष्टकृदादिसमाप्यं ॥

## यानंतर ब्रह्मचारी मृत असतां सांगतों.

ब्रह्मचारी मृत असतां द्वादश, षट् अथवा तीन अब्दें यथाशक्तीकरून प्रायश्चित्त करून देशकालांचें स्मरण करून " अमुकगोत्रनाम्नो ब्रह्मचारिणो मृतस्य व्रतविसर्गं करिष्ये ॥ तदंगं नांदीश्राद्धं करिष्ये " याप्रमाणें ह्मणून हिरण्येंकरून नांदीश्राद्ध करून अग्निस्थापनापासून आघारांत कर्म झाल्यावर चार व्याहृतिमंत्रांनीं घृताचा होम करून " अग्नये व्रतपतये स्वाहा, अग्नये व्रतानुष्ठानफलसंपादनाय स्वाहा, विश्वेभ्यो देवेभ्यः स्वाहा " याप्रमाणें घृताच्या तीन आहुतींनीं हवन करून स्विष्टकृदादि कर्म समाप्त करावें.

पुनर्देशकालौस्मृत्वामुकस्यौर्ध्वदेहिकाधिकारार्थमर्कविवाहंकरिष्येइत्यादिहिरण्येननांदीश्राद्धांतेर्कसमीपेनीत्वार्कशाखांवागृहीत्वार्कब्रह्मचारिणौहरिद्रयानुलिप्यपीतसूत्रेणसंवेष्ट्यवस्त्रयुग्मेनाच्छाद्याग्निप्रतिष्ठाद्याघारांतेआज्यहोमः अग्नयेस्वाहा १ बृहस्पतये० २ विवाहविधियोजकाय० ३ यस्मैत्वाकामकामायवयंसम्राड्यजामहे तमस्मभ्यंकामंदत्वाथेदंत्वंघृतंपिबस्वाहा कामायेदं० ततोव्यस्तसमस्तव्याहृतिहोमः एवमष्टाहुत्यंतेस्विष्टकृदादिकृत्वार्कशाखांब्रह्मचारिशवंचतुषाग्निनाविधिवद्दहेत् स्नातकमरणेप्येवमितिकेचित् एतन्निर्मूलमित्यन्ये सूतकांतेत्रिंशद्ब्रह्मचारिभ्यःकौपीनकृष्णाजिनकर्णभूषणादिपादुकाछत्रगोपीचंदनमाल्यमणिविद्रुममालायज्ञोपवीतादियथासंभवंदद्यात् ॥

पुनः देशकालांचें स्मरण करून " अमुकस्य और्ध्वदेहिकाधिकारार्थं अर्कविवाहं करिष्ये " इत्यादि संकल्प करून हिरण्यानें नांदीश्राद्धांत कर्म केल्यानंतर अर्कवृक्षाचे ( रुईचे )

जवळ नेऊन अथवा अर्कवृक्षाची खांदी घेऊन अर्क व ब्रह्मचारी यांस हळदी लावून पिंवळ्या सूत्रानें वेष्टित करून दोन वस्त्रांनीं आच्छादित करून अग्निस्थापनादि आघारांत कर्म झाल्यानंतर आज्यहोम करावा. तो असा–**अग्नये स्वाहा १, बृहस्पतये० २, विवाहविधियोजकाय० ३, यस्मै त्वा कामकामाय वयं सम्राड्यजामहे ॥ तमस्मभ्यं कामं दत्वाथेदं त्वं घृतं पिब स्वाहा कामायेदं०** " तदनंतर व्यस्तसमस्तव्याहृतिमंत्रांनीं होम करावा. याप्रमाणें आठ आहुति दिल्यानंतर स्विष्टकृदादिक कर्म करून अर्कशाखा व ब्रह्मचाऱ्याचें शव हीं तुषाग्नीनें यथाविधि दहन करावीं. स्नातकमरणींहि असाच विधि करावा असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. हें निर्मूल आहे असें अन्य ग्रंथकार ह्मणतात. सूतकाचे अंतीं तीस ब्रह्मचाऱ्यांस कौपीनें, कृष्णाजिनें, कर्णभूषणादिक, पादुका, छत्री, गोपीचंदन, माळा, मणि, पोवळ्यांच्या माळा, यज्ञोपवीत इत्यादि यथासंभव द्यावीं.

---

**अथकुष्ठिमृतौ मृतस्यकुष्ठिनोदेहंतीर्थेवाभुविवाक्षिपेत् नदाहंनोदकंपिंडंनचदानंक्रियांचरेत् यदिस्नेहाच्चरेद्दाहंयतिचांद्रायणंचरेत् तथाचशक्त्यनुसारेणषडब्दादिप्रायश्चित्तंकृत्वाकुष्ठादिमहारोगमृतस्यदाहादिक्रियांकुर्यान्नान्यथेति ॥**

## यानंतर कुष्ठी मृत असतां सांगतों.

" कुष्ठ ज्यास आहे तो मृत असतां त्याचा देह तीर्थांत टाकावा, किंवा भूमींत पुरावा. त्याचीं दहन, उदक, पिंडदान, दानें आणि क्रिया हीं करूं नयेत. जर स्नेहास्तव दहन करील तर यतिचांद्रायण करावें. " तसेंच, कुष्ठादिक महारोगानें मृत झालेल्याचें शक्त्यनुसार षडब्दादि प्रायश्चित्त करून दहनादि क्रिया करावी, अन्यथा करूं नये.

---

**अथरजस्वलादिमरणे रजस्वलायाःप्रेतायाःसंस्कारादीनिनाचरेत् ऊर्ध्वंत्रिरात्रात्स्नातांतांशवधर्मेणदाहयेत् अथवारजस्वलांसूतिकांचमलंप्रक्षाल्यस्नापयित्वाकाष्ठवदमंत्रकंदग्ध्वास्थीनिमंत्राग्निनादहेत् उभयत्रचांद्रायणत्रयंप्रायश्चित्तमस्त्येव तदैवमंत्रवद्दाहकरणेच्छायांतु अद्येत्याद्यमुकगोत्रायारजस्वलावस्थामरणनिमित्तप्रत्यवायपरिहारार्थमौर्ध्वदेहिकयोग्यत्वार्थं च चांद्रायणत्रयप्रायश्चित्तपूर्वकं शूर्पेणाष्टोत्तरशतस्नानानिकारयिष्येइतिसंकल्प्यचांद्रायणत्रयंप्रत्याम्नायेनकृत्वायवपिष्टेनप्रेतमनुलिप्यस्वयंस्नात्वाशूर्पोदकैरष्टोत्तरशतवारंस्नापयेत् ततोभस्मगोमयमृत्तिकाकुशोदकैःपंचगव्यैः शुद्धोदकैश्चसंस्नाप्ययदंतियच्चदूरकइत्यादिपावमानीभिरापोहिष्ठेतितृचेनकयानइत्यादिभिश्चसंस्नाप्यपूर्ववस्त्रंपरित्यज्यान्यवस्त्रेणसंवेष्ट्यदहेत् सूतिकायामप्येवं ॥**

## यानंतर रजस्वलादिक मरण असतां सांगतों.

" रजस्वला असतां मृत झाली तिचीं संस्कारादिक करूं नयेत. तीन रात्रींनंतर तिला स्नान घालून शवधर्मेंकरून तिचें दहन करावें." अथवा रजस्वला आणि सूतिका ( बाळंतीण ) यांचा मल प्रक्षालन करून त्यांना स्नान घालून काष्ठाप्रमाणें अमंत्रक दहन करून अस्थींचें मंत्राग्नीनें दहन करावें. उभयत्र ( अमंत्रक दहन व अस्थिदहन या दोहोंकडे ) तीन चांद्रा-

यणें प्रायश्चित्त आहेच. मरणकालींच समंत्रक दहन करण्याची इच्छा असेल तर "अद्ये-त्यादि अमुक गोत्राया रजस्वलावस्था मरणनिमित्त प्रत्यवाय परिहारार्थमौर्ध्वदेहिकयोग्यत्वार्थं च चांद्रायणत्रयप्रायश्चित्तपूर्वकं शूर्पेणाष्टोत्तरशतस्नानानि कारयिष्ये," असा संकल्प करून तीन चांद्रायणें प्रत्याम्नायानें करून यवांचे पिठानें प्रेत लिप्त करून आपण स्नान करून सुपांतील उदकांनीं अष्टोत्तरशत ( १०८ ) वार स्नान घालावें. तदनंतर भस्म, गोमय, मृत्तिका, कुशोदक, पंचगव्यें आणि शुद्धोदकें यांहींकरून स्नान घालवून "यदंतियच्चदूरके०" इत्यादिक पावमानी, "आपोहिष्ठा०" ह्या तीन ऋचा, आणि "कयान०" इत्यादिक यांहींकरून स्नान घालवून पूर्वीचें वस्त्र टाकून दुसऱ्या वस्त्रानें वेष्टित करून दहन करावें. सूतिकेविषयींहि असाच विधि करावा.

---

**सूतिकायाआद्यत्र्यहमरणेत्र्यब्दंप्रायश्चित्तं द्वितीयत्र्यहेद्व्यब्दं तृतीयत्र्यहेएकाब्दं दशमदिनेतुकृच्छ्रत्रयमितिविशेषःक्वचिदुक्तःमासपर्यंतमपिकृच्छ्रत्रयमित्यन्ये मिताक्षरायांतुकुंभेजलमादायपंचगव्यंक्षिप्त्वापुण्यमंत्रैरापोहिष्ठावामदेव्यवारुणादिभिरभिमंत्र्यपूर्वोक्तमंत्रैः संस्नाप्यविधिनासूतिकांदहेदितिविशेषउक्तः इतिरजस्वलासूतिकयोर्विधिः ॥**

सूतिका पहिल्या तीन दिवसांत मृत असतां त्र्यब्द प्रायश्चित्त, दुसऱ्या तीन दिवसांत मृत असतां द्व्यब्द, तिसऱ्या तीन दिवसांत मृत असतां एकाब्द, दहाव्या दिवसीं असेल तर तीन कृच्छ्र याप्रमाणें विशेष क्वचित् ग्रंथांत सांगितला आहे. मासपर्यंत मृत असतांहि तीन कृच्छ्रें करावीं असें दुसरे ग्रंथकार ह्मणतात. मिताक्षरेमध्यें तर, कुंभांत उदक घेऊन पंचगव्य घालून पुण्यमंत्र जे "आपोहिष्ठा०, वामदेव्य०, वारुण०" इत्यादिक त्यांहींकरून अभिमंत्रण करून पूर्वी सांगितलेल्या मंत्रांनीं स्नान घालून विधीकरून सूतिकेचें दहन करावें असा विशेष सांगितला आहे. याप्रमाणें रजस्वला व सूतिका यांचा विधि सांगितला आहे.

---

**अथगर्भिणीमरणे गर्भिण्यामृतायाः शुद्ध्यर्थंत्रयस्त्रिंशत्कृच्छ्राणिकृत्वागांभूमिंसुवर्णंचदत्वागर्भंपृथक्कृत्यतांदहेत् सगर्भदहनेतत्तद्वधप्रायश्चित्तं सगर्भायादाहेकर्तुरब्दत्रयंप्रायश्चित्तं॥**

## यानंतर गर्भिणी मृत असतां सांगतों.

गर्भिणी मृत झाली असतां तिच्या शुद्धीसाठीं तेहतीस कृच्छ्र प्रायश्चित्त करून गाई, भूमि, सुवर्ण यांचीं दानें देऊन गर्भ निराळा करून तिचें दहन करावें. गर्भासहित दहन केलें असतां त्या त्या वधाचें प्रायश्चित्त आहे. सगर्भेचें दहन केलें असतां कर्त्यास तीन अब्द प्रायश्चित्त.

---

**अथान्वारोहणंस्त्रीणामात्मनोर्भर्तुरेवच सर्वपापक्षयकरंनिरयोत्तारणायच अनेकस्वर्गफलदंमुक्तिदंचतथैवच जन्मांतरेचसौभाग्यंधनपुत्रादिवृद्धिदं तिस्रःकोट्योर्धकोटीचयावंत्यंगरुहाणिवै तावंत्यब्दसहस्राणिस्वर्गेलोकेमहीयते मातृकंपैतृकंचैवयत्रकन्याप्रदीयते कुलत्रयंपुनात्येषाभर्तारंयानुगच्छतीत्यादिमहिमविस्तरोमिताक्षरादौज्ञेयः अत्रनिष्कामत्वेमुक्तिःसकामत्वेस्वर्गादिफलानीतिव्यवस्था ॥**

यानंतर अन्वारोहण ( सतीजाणें ) सांगतों—" स्त्रियांचें अन्वारोहण आपलें व भर्त्याचें सर्व पाप दूर करणारें असून नरकोद्धारार्थ आहे; व अनेक स्वर्गफल देणारें; मुक्ति देणारें; जन्मांतरीं सौभाग्य, धन, पुत्रादिक यांची वृद्धि करणारें होतें. जी स्त्री भर्त्याप्रत अनुगमन करिते ती, आपलें मातृकुल, पितृकुल आणि ज्या कुलांत तिचें दान झालें असें भर्तृकुल या तीन कुलांस पावन करून साडेतीन कोटी जितके केश अंगावर आहेत तितकीं वर्षसहस्रेंपर्यंत स्वर्गलोकीं राहते " इत्यादिक महिमाविस्तार मिताक्षरादिक ग्रंथीं पाहावा. ह्या अन्वारोहणीं निष्कामत्व असतां मुक्ति व सकामत्व असतां स्वर्गादिक फलें प्राप्त होतात, याप्रमाणें व्यवस्था जाणावी.

---

अथप्रयोगः देशकालौस्मृत्वामातृपितृश्वशुरादिकुलपूतत्वब्रह्महत्यादिदोषदूषितपतिपूतत्वपत्यवियोगारुंधतीसमाचारत्वसार्धकोटित्रयसहस्रसंवत्सरस्वर्महीयमानत्वादिपुराणोक्तानेकफलप्राप्तयेश्रीलक्ष्मीनारायणप्रीतिद्वाराविमुक्तिप्राप्तयेंवापतिचितान्वारोहणंकरिष्ये इतिसंकल्प्यहरिद्राकुंकुमवस्त्रफलादियुतानिशूर्पाणिसुवासिनीभ्योदद्यात् तत्रमंत्रः लक्ष्मीनारायणो देवोबलसत्त्वगुणाश्रयः गाढंसत्त्वंचमेदेयाद्वायनैःपरितोषितः सोपस्कराणिशूर्पाणिवायनैः संयुतानिच लक्ष्मीनारायणप्रीत्यैसत्त्वकामाददाम्यहं अनेनसोपस्करशूर्पदानेनलक्ष्मीनारायणौप्रीयेतां ततोंचलेपंचरत्नंनीलांजनंचबध्वामुखेमौक्तिकंन्यस्याग्निसमीपंगत्वाग्निप्रार्थनं कुर्यात् स्वाहासंश्लेषनिर्विण्णशर्वगोत्रहुताशन सत्त्वमार्गप्रदानेननयमांपत्युरंतिकमिति अथाग्नावाज्येनजुहुयात् अग्नयेतेजोधिपतयेस्वाहा १ विष्णवेसत्त्वाधिपतयेस्वाहा २ कालायधर्माधिपतये० ३ पृथिव्यैलोकाधिष्ठात्र्यै० ४ अद्भ्योरसाधिष्ठात्रीभ्यः० ५ वायवेबलाधिपतये० ६ आकाशायसर्वाधिपतये० ७ कालायधर्माधिष्ठात्रे० ८ अद्भ्यःसर्वसाक्षिणीभ्यः० ९ ब्रह्मणेवेदाधिपतये० १० रुद्रायस्मशानाधिपतयेस्वाहेत्येकादशाहुतीर्हुत्वाग्निं प्रदक्षिणीकृत्यदृषदमुपलांसंपूज्यपुष्पांजलिंगृहीत्वाग्निंप्रार्थयेत् त्वमग्नेसर्वभूतानामंतश्चरसि साक्षिवत् त्वमेवदेवजानीषेनविदुर्यानिमानुषाः अनुगच्छामिभर्तारंवैधव्यभयपीडिता सत्त्वमार्गप्रदानेननयमांभर्तुरंतिकं मंत्रमुच्चार्यैशनकैःप्रविशेच्चहुताशनं विप्रश्चइमानारीरविधवाइत्यृचं इमाःपतिव्रताःपुण्याःस्त्रियोयायाःसुशोभनाः सहभर्तृशरीरेणसंविशंतुविभावसुमितिचपठेत् कातरांतुप्रेतोत्तरतःसुप्तांदेवरःशिष्योवाउदीर्ष्वेतिमंत्राभ्यामुत्थापयेत् अनुव्रजतिभर्तारंस्मशानंयागृहान्मुदा पदेपदेश्वमेधस्यफलंप्राप्नोतिसाध्रुवं यत्तु यास्त्रीब्राह्मणजातीया मृतंपतिमनुव्रजेत् सास्वर्गमात्मघातेननात्मानंनपतिंनयेदित्यादिब्राह्मण्यानिषेधवचनजातंतत्पृथक्चितिपरं भर्तुर्मंत्राग्निदाहोत्तरमनुगमनंपृथक्चितिः मंत्राग्निदाहात्पूर्वमस्थिभिःपर्णशरेणवासहगमनमेकचितिरेव अस्थ्यादेःपतिस्थानापत्त्यापतिशरीरतुल्यत्वात् इयमेकचितिः सर्ववर्णानां पृथक्चितिस्तुक्षत्रियवैश्यशूद्रादेरेव नतुब्राह्मणीनां पृथक्चितिविधिस्तु देशांतरमृतेपत्यौसाध्वीतत्पादुकाद्वयं निधायोरसिसंशुद्धाप्रविशेज्जातवेदसमिति ॥

## यानंतर प्रयोग सांगतों.

देशकालांचें स्मरण करून " मातृपितृश्वशुरादि कुलपूतत्व ब्रह्महत्यादिदोषदूषितपति

पूतत्व पत्यवियोगारुंधतीसमाचारत्वसार्धकोटित्रयसहस्रसंवत्सर स्वर्महीयमानत्वादि पुराणोक्तानेकफलप्राप्तये श्रीलक्ष्मीनारायणप्रीतिद्वारा विमुक्तिप्राप्तयेवा पतिचितान्वारोहणं करिष्ये," असा संकल्प करून हळद, कुंकुम, वस्त्र, फल इत्यादिकांनीं युक्त सुपें सुवासिनींकारणें द्यावीं. दानाचा मंत्र—"लक्ष्मीनारायणो देवो बलसत्त्वगुणाश्रयः ॥ गाढंसत्त्वंच मे देयाद्वायनैः परितोषितः ॥ सोपस्कराणि शूर्पाणि वायनैः संयुतानि च ॥ लक्ष्मीनारायणप्रीत्यै सत्त्वकामा ददाम्यहं ॥ अनेन सोपस्करशूर्पदानेन लक्ष्मीनारायणौ प्रीयेतां." तदनंतर वस्त्रांत पंचरत्नें, नीलांजन बांधून मुखांत मौक्तिक घालून अग्नीचे सन्निध जाऊन अग्नीची प्रार्थना करावी. प्रार्थनामंत्र—"स्वाहा संश्लेषनिर्विण्ण शर्वगोत्र हुताशन ॥ सत्त्वमार्गप्रदानेन नय मां पत्युरंतिकं." नंतर अग्नींत आज्याचा होम करावा. होमाचे मंत्र—"अग्नये तेजोधिपतये स्वाहा १, विष्णवे सत्त्वाधिपतये स्वाहा २, कालाय धर्माधिपतये० ३, पृथिव्यै लोकाधिष्ठात्र्यै० ४, अद्भ्यो रसाधिष्ठात्रीभ्यः० ५, वायवे बलाधिपतये० ६, आकाशाय सर्वाधिपतये० ७, कालाय धर्माधिष्ठात्रे० ८, अद्भ्यः सर्वसाक्षिणीभ्यः० ९, ब्रह्मणे वेदाधिपतये० १०, रुद्राय स्मशानाधिपतये स्वाहा" याप्रमाणें अकरा आहुतींनीं होम करून अग्नीस प्रदक्षिणा करून दृषद् व उपल ( पाटा वरवंटा ) यांची पूजा करून हातांत पुष्पांजलि घेऊन अग्नीची प्रार्थना करावी. प्रार्थनामंत्र— "त्वमग्ने सर्वभूतानामंतश्चरसि साक्षिवत् ॥ त्वमेव देव जानीषे न विदुर्यानि मानुषाः ॥ अनुगच्छामि भर्तारं वैधव्यभयपीडिता ॥ सत्त्वमार्गप्रदानेननयमांभर्तुरंतिकं" याप्रमाणें मंत्र हळुहळू ह्मणून अग्नीप्रत प्रवेश करावा. नंतर ब्राह्मणानें "इमानारीरविधवा०" ही ऋचा व "इमाःपतिव्रताः पुण्याःस्त्रियोयायाः सुशोभनाः ॥ सहभर्तृशरीरेणसंविशंतु विभावसुम्" ह्या मंत्राचा पाठ करावा. सभयचंचल असेल तर प्रेताच्या उत्तर प्रदेशीं निजलेली तिला दिरानें किंवा शिष्यानें "उदीर्ष्वा०" ह्या दोन मंत्रांनीं उठवावी. "गृहापासून जी स्त्री आनंदानें भर्त्याच्या पाठीमागून स्मशानाप्रत जाते तिला पदोपदीं अश्वमेधाचें फल निश्चयें प्राप्त होतें." "ब्राह्मणी स्त्री मृत अशा पतीच्या पाठीमागून जाईल ती आत्महत्येच्या योगानें आपणास व पतीस स्वर्गाप्रत नेणार नाहीं" इत्यादिक ब्राह्मणीस निषेध करणारीं जीं वचनें तीं पृथक्चितिपर होत. भर्त्याचें मंत्राग्नीनें दहन झाल्यानंतर पाठीमागून जें सतीजाणें ती पृथक्चिति होय. मंत्राग्नीनें दहन होण्याचे पूर्वीं अस्थींकरून अथवा पालाशविधीकरून जें सहगमन ती एकचितिच होय. कारण, अस्थी इत्यादिक पतिस्थानापन्न असल्यामुळें त्यांस पतिशरीराची साम्यता आहे. ही एकचिति सर्व वर्णांस उक्त आहे. पृथक्चिति तर क्षत्रिय, वैश्य, शूद्रादिक यांसच उक्त आहे; ब्राह्मणी स्त्रियांस उक्त नाहीं. पृथक्चितीचा विधि तर "देशांतरीं पति मृत असतां साध्वी स्त्रियेनें त्याच्या दोन पादुका वक्षस्थलीं धारण करून उत्तम प्रकारानें शुद्ध होत्साती अग्नीप्रत प्रवेश करावा," याप्रमाणें जाणावा.

---

पतितेनप्रायश्चित्तार्थंमृतेनवाभर्त्रासहान्वारोहणंनभवति यत्तुब्रह्मघ्नोवाकृतघ्नोवामित्रघ्नो वाभवेत्पतिः पुनात्यविधवानारीइत्यादिवाक्यंतज्जन्मांतरीयब्रह्महत्यादिपापशोधनपरं दिनै

कगम्यदेशस्थासाध्वीचेत्कृतनिश्चया नदहेत्स्वामिनंतस्यायावदागमनंभवेत् तृतीयेन्हिउदक्यायामृतेभर्तरिवैद्विजाः तस्याःसहगमार्थतंस्थापयेदेकरात्रकं रजस्वलायाः प्रथमद्वितीयदिनेपतिमृतौलौकिकाग्निभिरमंत्रकंतंदग्ध्वापंचमेन्हि अस्थिभिःसहान्वारोहणं यदिरजस्वलादेशकालवशादिनातदैवानुगंतुमिच्छतिनशुद्धिंप्रतीक्षतेतदासैकद्रोणमितव्रीहीन्मुसलैरवहत्यतदाघातैःसर्वरजोनिवृत्तौपंचमृत्तिकाभिःशौचंकृत्वा दिनक्रमेणत्रिंशद्विंशतिर्दशवाधेनूर्दत्वाविप्रवचनाच्छुद्धिंलब्ध्वासहगमनंकुर्यात् अत्रावहननेनरजोनिवृत्तिरतींद्रियेतीदंयुगांतरपरंयोज्यमितिभाति जननमृताशौचयोस्तुसहगमनंनेतिकेचित् कालतत्त्वविवेचनेतुपूर्वप्रवृत्ताशौचमध्येभर्तृमरणेआशौचवतीनामपिभार्याणांसहगमनंभवति सूतिकोदक्ययोस्तुनेत्युक्तं इदमेवयुक्तंभाति इदंचसहगमनंगर्भिणीबालापत्यासूतिकाभिरदृष्टरजोभिःपतिताभिर्व्यभिचारिणीभिर्भर्तृदुष्टभावाभिश्चनकार्यं केचिदत्रपतिव्रतानामेवाधिकारः वर्ततेयाश्चसततंभर्तृणांप्रतिकूलतः कामात्क्रोधाद्भयान्मोहात्सर्वाःपूताभवंतिताइत्यादितुवाक्यमर्थवादइत्याहुः तत्रपृथक्चित्यारोहणेभर्त्राशौचमध्येतदूर्ध्वंवाकृतेत्रिरात्रमाशौचंपिंडाश्च सहगमनेतु तस्याःपिंडादिकंशौचंपतिपिंडादितःक्रमात् अन्वारोहेतुनारीणांपत्युश्चैकोदकक्रिया पिंडदानक्रियातद्वच्छ्राद्धंप्रत्याब्दिकंतथा अन्वारोहेकृतेपत्न्याःपृथक्पिंडांस्तिलांजलीन् पृथक्शिलेनकुर्वीतदद्यादेकशिलेतथा तत्रावयवपिंडार्थपाकैक्यंभिन्नपिंडता नवश्राद्धानिभिन्नानिसपिंडीकरणंपृथक् एकएववृषोत्सर्गोगौरेकातत्रदीयते सपिंडीकरणंतुनकार्यं अथवाभर्त्रैवसहकार्यं यद्वाभर्त्रादिभिस्त्रिभिःसहकार्यमित्यादिपक्षाउक्ताः मासिकसांवत्सरिकादौपाकैक्यकालैक्यादिव्यवस्थापिश्राद्धप्रकरणेउक्ता इतिसहगमनेनिर्णयः ॥

पतित अथवा प्रायश्चित्ताकरितां मृत झालेला अशा भर्त्यासहवर्तमान अन्वारोहण होत नाहीं. "ब्रह्महत्या करणारा, कृतघ्न (केलेले उपकार न जाणणारा), मित्रघ्न असा जरी पति असेल तथापि त्यास सौभाग्यवती स्त्री पावन करिते" इत्यादि जें वाक्य तें अन्यजन्मार्जित जीं ब्रह्महत्यादि पातकें त्यांच्या शुद्धीविषयीं आहे. "एक दिवसांत पोंचण्यास योग्य अशा देशीं राहणारी साध्वी सहगमनाविषयीं कृतनिश्चय असेल तर ती येईपर्यंत पतीचें दहन करूं नये. रजस्वलेच्या तिसऱ्या दिवशीं पति मृत असतां हे द्विजहो, तिच्या सहगमनाकरितां प्रेत एक रात्र ठेवावें." रजस्वलेच्या पहिल्या व दुसऱ्या दिवशीं पति मृत झाला असतां लौकिकाग्नींनीं त्याचें अमंत्रक दहन करून पांचव्या दिवशीं अस्थींसहवर्तमान अनुगमन करावें. जर रजस्वला देश व काल इत्यादिकांच्या अनुकूलतेमुळें तत्कालींच सहगमनाची इच्छा करिते व शुद्धीची प्रतीक्षा करीत नाहीं, त्या कालीं त्या स्त्रियेनें एक द्रोण (८ पायल्या) परिमित भात मुसळानें कांडून त्याच्या आघातांनीं सर्व रजोनिवृत्ति झाली असतां पंचमृत्तिकांनीं शुद्धता करून दिवसाच्या क्रमानें ह्मणजे पहिल्या दिवशीं तीस, दुसऱ्या दिवशीं वीस, तिसऱ्या दिवशीं दहा गोप्रदानें करून ब्राह्मणाच्या वचनेंकरून शुद्धि ग्रहण करून सहगमन करावें. ह्या स्थलीं, भाताच्या आघातानें जी रजोनिवृत्ति ती अतींद्रिय ह्मणजे इंद्रियांस अगोचर आहे याकरितां हा निर्णय युगांतराविषयीं योजावा असें वाटतें. जननाशौच व मृताशौच असेल तर

सहगमन करूं नये असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. कालतत्त्वविवेचनग्रंथीं तर, पूर्वी प्राप्त झा-लेल्या आशौचामध्यें भर्ता मृत असतां आशौचयुक्त स्त्रियांनींहि सहगमन करावें. बाळंतीण अथवा रजस्वला असतां करूं नये, व हेंच योग्य असें वाटतें. हें सहगमन गर्भिणी, बालपत्या ( जिचीं बालकें लहान आहेत ती ), बाळंतीण, रजोदर्शन न झालेल्या, बाटलेल्या, व्यभि-चारिणी, पतीशीं दुष्टभाव करणाऱ्या यांनीं करूं नये. कोणी ग्रंथकार, या सहगमनाविषयीं पतिव्रतांसच अधिकार आहे; "ज्या स्त्रिया काम, क्रोध, भय आणि मोह यांहींकरून भर्त्याचे ठिकाणीं निरंतर प्रतिकूलवृत्तीनें जरी आचरण करीत असतील तथापि त्या सर्व पवित्र होतात," इत्यादिक जें वाक्य तें तर अर्थवाद आहे असें ह्मणतात. त्यामध्यें पृथक्चित्यारोहण भर्त्याच्या आशौचामध्यें अथवा आशौचानंतर केलें असतां त्रिरात्र आशौच व पिंड. सहगमन असेल तर "त्या स्त्रीचें आशौच व पिंडादिकक्रिया पतीच्या पिंडादिक्रमानें जाणावी." अन्वारोहण असेल तर स्त्रियेची व पतीची एक उदकक्रिया, पिंडदानक्रिया व प्रतिसांवत्सरिकश्राद्ध हीं एकच करावीं. अन्वारोहण केलें असतां स्त्रीस निराळे पिंड देऊं नयेत व तिळांजलि निराळ्या अश्म्यावर देऊं नयेत; एक अश्म्यावर द्याव्या. त्यामध्यें अवयवपिंडांकरितां पाक करावयाचा तो दोघांचा एक करून पिंड निरनिराळे द्यावे. नवश्राद्धें निराळीं करावीं, व सपिंडीहि निराळी करावी. त्या सहगमनाच्या ठायीं वृषोत्सर्ग एकच करावा. आणि स्त्रीच्या वृषोत्सर्गस्थानीं एक गाय द्यावी. सपिंडी तर करूं नये अथवा भर्त्यासहवर्तमानच करावी. अथवा भर्ता इत्यादि तिघांसह करावी इत्यादि पक्ष पूर्वी सांगितले आहेत. मासिक व सांवत्सरिक इत्यादि श्राद्धां-विषयीं एक पाक व एक काल इत्यादिक व्यवस्थाहि श्राद्धप्रकरणीं सांगितली आहे. याप्रमाणें सहगमनाविषयीं निर्णय सांगितला.

---

**काशीनाथउपाध्यायइत्थमंत्यक्रियाविधिं निर्णीयभगवत्पादेचार्पयत्तद्विशुद्धये इत्यंत्येष्टि निर्णयः ॥**

याप्रमाणें काशीनाथोपाध्याय यांनीं अंत्यक्रियाविधीचा निर्णय करून तो निर्णय शुद्ध होण्याकरितां भगवच्चरणीं अर्पण केला. याप्रकारें अंत्येष्टिनिर्णय सांगितला.

---

**अथविधवाधर्माः पत्यौमृतेतुभार्याणांविधाद्वयमुदीरितं वैधव्यंपालयेत्सम्यक्सहाग्निगम नंतुवा पत्यौमृतेचयायोषिद्वैधव्यंपालयेत्सदा सापुनःप्राप्यभर्तारंस्वर्गलोकंसमश्नुते विधवापा लयेच्छीलंशीलभंगात्पतत्यधः तद्वैगुण्यादपिस्वर्गात्पतिःपततिसर्वथा तस्याःपिताचमाताचभ्रा तृवर्गस्तथैवच विधवाकबरीबंधोभर्तृबंधायजायते शिरसोवपनंतस्मात्कार्यंविधवयासदा एकवारंसदाभुक्तिरुपवासव्रतानिच पर्यंकशयनानारीविधवापातयेत्पतिं नैवांगोद्वर्तनंकार्यंगं धद्रव्यस्यसेवनं नाधिरोहेदनड्वाहंप्राणैःकंठगतैरपि कंचुकंनपरिदध्याद्वासोनविकृतंवसेत् वै शाखेकार्तिकेमाघेविशेषनियमंचरेत् तांबूलाभ्यंजनेचैवकांस्यपात्रेचभोजनं यतिश्चविधवा चैववर्जयेच्चंदनादिकं अपुत्राविधवाभर्त्रादित्रयमुद्दिश्यप्रत्यहंतिलकुशोदकैस्तर्पणंकुर्यात् श्राद्धा दौतुप्रागुक्तं ॥**

## यानंतर विधवाधर्म सांगतों.

"पति मृत झाला असतां स्त्रियांस दोन प्रकार सांगितले आहेत. ते असेः–उत्तम प्रकारें-करून वैधव्य पालन करावें अथवा सहगमन करावें. जी स्त्री पति मृत झाला असतां निरंतर वैधव्य रक्षण करील ती पुनः भर्त्याप्रत प्राप्त होऊन स्वर्गलोकाप्रत वास करिते. विधवा स्त्रीनें स्वकीय सदाचरण पाळावें. सदाचरणाच्या भंगानें अधोयोनीप्रत प्राप्त होते त्यामध्यें वैगुण्य झाल्यानेंहि स्वर्गलोकापासून पति सर्वथा पतन पावतो. आणि तिचा पिता, माता व भ्रातृवर्ग हेहि पतन पावतात. विधवेचा कबरीबंध ( केशांचा बुचडा ) पतीच्या बंधनाकारणें होतो त्या हेतूस्तव विधवेनें सार्वकाल केशांचें वपन करावें. सार्वकाल एकवार भोजन, उपवास, व्रतें हीं आचरण करावीं. पलंगावर निद्रा करणारी विधवा स्त्री आपल्या पतीस अधोयोनीप्रत पाडिते. अंगास तैलादि लावणें व सुगंधी द्रव्याचें सेवन हीं करूं नयेत. कंठगत प्राण झाले तथापि वृषभावर बसूं नये. कंचुकी धारण करूं नये, चित्रविचित्र रंगाचें वस्त्र परिधान करूं नये. वैशाख, कार्तिक, माघ या मासांत विशेष नियम आचरण करावे. तांबूल, काजळ, कांस्यपात्रांत भोजन आणि चंदनादिक हीं यति व विधवा यांणीं वर्ज्य करावीं." पुत्ररहित विधवा स्त्रीनें भर्ता इत्यादिक त्रयीच्या उद्देशानें प्रत्यहीं तिलकुशोदकेंकरून तर्पण करावें. श्राद्धादिकाविषयीं तर पूर्वीं सांगितलें आहे.

---

**अथसंन्यासः तत्रब्रह्मचर्यंकृत्वासमावर्तनांतेकृतदारःपुत्रानुत्पाद्ययज्ञैरिष्ट्वावानप्रस्थाश्रमं चकृत्वासंन्यसेदित्याश्रमसमुच्चयपक्षः ब्रह्मचर्यादेवप्रव्रजेत्गृहाद्वावनाद्वाअथपुनरव्रतीवाव्र तीवास्नातकोवाऽस्नातकोवोत्सन्नाग्निरनग्निकोवा यदहरेवविरजेत्तदहरेवप्रव्रजेदित्याश्रमवि कल्पपक्षः प्रव्रजेद्ब्रह्मचर्याद्वाप्रव्रजेच्चगृहादपि वनाद्वाप्रव्रजेद्विद्वानातुरोवाथदुःखितइतिवा क्येआतुरोमुमूर्षुः दुःखितश्चोरव्याघ्रादिभीतइत्यर्थः आतुराणांचसंन्यासेनविधिर्नैवचक्रिया प्रेषमात्रंसमुच्चार्यसंन्यासंतत्रकारयेत् संन्यासेदंडग्रहणादिरूपेविविदिषाख्येविप्रस्यैवाधिका-रः विद्वत्संन्यासेतुक्षत्रियवैश्ययोरपि कलियुगेसंन्यासनिषेधस्त्रिदंडिसंन्यासपरइतिप्राञ्चः ॥**

## यानंतर संन्यास सांगतों.

त्याविषयीं ब्रह्मचर्य करून समावर्तन झाल्यानंतर स्त्रीपरिग्रह केला होत्साता पुत्रांतें उत्पन्न करून, यज्ञांनीं यजन करून व वानप्रस्थाश्रम स्वीकारून संन्यास आश्रम ग्रहण करावा. याप्रमाणें आश्रमांचा समुच्चयपक्ष आहे. ब्रह्मचर्यापासूनच; अथवा गृहापासून ( गृहस्थाश्रमापासून), किंवा वनापासून ( वानप्रस्थाश्रमापासून ) संन्यास घ्यावा. यानंतर पुनः अव्रती अथवा व्रती; स्नातक अथवा अस्नातक; विच्छिन्नाग्नि किंवा अनग्निक असा असतां ज्या दिवसीं निश्चित विरक्ति उत्पन्न होईल त्याच दिवसीं संन्यास ग्रहण करावा, याप्रमाणें आश्रमाचा विकल्पपक्ष सांगितला आहे. "विद्वान् होत्साता ब्रह्मचर्यापासून संन्यास घ्यावा अथवा गृहस्थाश्रमापासून संन्यास घ्यावा किंवा वानप्रस्थाश्रमापासून संन्यास घ्यावा अथवा आतुर अथवा दुःखित असतां संन्यासाश्रम स्वीकारावा." या वाक्यामध्यें आतुर ह्मणजे मुमूर्षु व दुःखित ह्मणजे चोर, व्याघ्र

इत्यादिकांपासून भ्यालेला असा अर्थ. "आतुरांच्या संन्यासाविषयीं विधि नाहीं व क्रिया ह्मणजे कर्मकांडहि नाहीं, तर त्याविषयीं प्रेषमात्र उच्चारून संन्यास करवावा." दंडग्रहणादिरूप विविदिषाख्य संन्यासाविषयीं ब्राह्मणासच अधिकार आहे. विद्वत्संन्यासाविषयीं तर, क्षत्रिय व वैश्य यांसहि अधिकार आहे. कलियुगामध्यें जो संन्यासाचा निषेध सांगितला तो त्रिदंडिसंन्यासपर आहे, असें प्राचीन ह्मणतात.

---

सचसंन्यासश्चतुर्धा कुटीचकोबहूदकोहंसःपरमहंसश्चेति अत्रोत्तरोत्तरःश्रेष्ठः बहिःकुट्यांगृहेवावसन्काषायवासास्त्रिदंडी शिखायज्ञोपवीतवान्बंधुषुगृहेवाभुंजानआत्मनिष्ठोभवेत्सकुटीचकः पुत्रादीन्हित्वासप्तागाराणिभैक्षंचरन्पूर्वोक्तकाषायवस्त्रादिवेषवान्बहूदकः हंसस्तुपूर्वोक्तवेषोप्येकदंडः परमहंसस्तुशिखायज्ञोपवीतहीनएकदंडीस्यात् काषायवस्त्रंचतुर्णामपि हंसपरमहंसयोःशिखायज्ञोपवीतसत्त्वासत्त्वाभ्यांभेदः एकदंडस्तुद्वयोरपि परमहंसस्यदंडधारणंविविदिषादशायांनित्यं विद्वत्तादशायांतुकृताकृतं नदंडंनशिखांनाच्छादनंचरतिपरमहंसइतिश्रवणात् वैराग्यंविनाजीवनाद्यर्थंसंन्यासेतुनरकाः एकदंडंसमाश्रित्यजीवंतिबहवोनराः नरकेरौरवेघोरेकर्मत्यागात्पतंतिते काष्ठदंडोधृतोयेनसर्वाशीज्ञानवर्जितः सयातिनरकान्घोरानित्यादिस्मरणात् ॥

तो संन्यास चार प्रकारचा--कुटीचक, बहूदक, हंस आणि परमहंस याप्रमाणें जाणावा. हे जे चार प्रकार सांगितले यांमध्यें उत्तरोत्तर श्रेष्ठ होय. बाहेर पर्णकुटीमध्यें अथवा गृहामध्यें राहत होत्साता भगवीं वस्त्रें धारण करणारा, त्रिदंडी, शिखा व यज्ञोपवीत यांहीं युक्त असून बांधवांचेठायीं अथवा गृहाचेठायीं भोजन करणारा असून आत्मनिष्ठ असा असेल तो कुटीचक होय. पुत्रादिकांचा परित्याग करून सात घरीं भिक्षाचरण व पूर्वीं सांगितलेलीं भगवीं वस्त्रें इत्यादि वेषधारण करणारा तो बहूदक होय. हंस तर पूर्वोक्त वेष धारण करणारा असूनहि एकदंडी होय. परमहंस तर शिखायज्ञोपवीत यांहींकरून विरहित असा एकदंडी होय. भगवें वस्त्र चारहि संन्यासांविषयीं आहे. हंस व परमहंस यांचा भेद शिखा व यज्ञोपवीत असणें व नसणें यांहींकरून आहे ह्मणजे शिखायज्ञोपवीतसहित तो हंस व शिखायज्ञोपवीतरहित तो परमहंस असा आहे. एक दंड तर, उभयतांस आहे. परमहंसास दंड धारण करणें विविदिषादशेमध्यें नित्य आहे. विद्वत्तादशेमध्यें तर कृताकृत आहे. कारण, दंड, शिखा, आच्छादन (वस्त्र) हीं परमहंस धारण करीत नाहीं असें श्रुत आहे. वैराग्यावांचून उपजीविका इत्यादिकांसाठीं संन्यास ग्रहण केला तर नरकप्राप्ति होते; कारण, एकदंडाचा आश्रय करून जे बहुत मनुष्य उपजीविका करितात ते कर्मत्यागेंकरून घोर रौरवनरकामध्यें पडतात आणि ज्ञानशून्य असतां ज्याणें काष्ठदंड धारण केला व सर्वाशी (भक्ष्याभक्ष्यविचार न करितां खाणारा) तो घोर नरकाप्रत जातो इत्यादिक स्मृति आहे.

---

अथसंन्यासग्रहणविधिः तत्रोत्तरायणंप्रशस्तं आतुरस्यतुदक्षिणायनमपि तत्रादौ गृह्याभिमंतंतादृशविधुरंप्रतिचप्रयोगः तत्रशांत्यादिलक्षणंगुरुंसंशोध्यतन्निकटेत्रिमासंयतिधर्मा

न्संवीक्ष्यगायत्रीजपरुद्रजपकूष्मांडहोमादिभिःशुद्धिंलब्ध्वारिक्तातिथौदेशकालौस्मृत्वामुकस्यममकरिष्यमाणसंन्यासेधिकारार्थंचतुःकृच्छ्रात्मकं प्रायश्चित्तंप्रतिकृच्छ्रंतत्प्रत्याम्नायैकैकगोनिष्क्रयद्वाराहमाचरिष्ये कृच्छ्रप्रत्याम्नायगोनिष्क्रयंद्रव्यंविप्रेभ्योदातुमुत्सृजे इतिसंकल्पपूर्वकंरजतनिष्कतदर्धतदर्धान्यतमंप्रतिधेनुंदद्यात् एकादश्यांद्वादश्यांवायथाब्रह्मरात्रिःस्यात्तथाश्राद्धान्यारभेत् अत्रानाश्रमिणश्चतुःकृच्छ्रमन्यस्यतप्तकृच्छ्रमितिसिंधुः स्वस्यनवश्राद्धस्थषोडशश्राद्धसपिंडीकरणानिसाग्निःपार्वणविधिनानिरग्निरेकोद्दिष्टविधिनाकुर्यादितिकेचित् नेत्यन्ये ॥

## यानंतर संन्यासग्रहणाचा विधि सांगतों.

संन्यासग्रहणाविषयीं उत्तरायण प्रशस्त होय. आतुरास तर दक्षिणायनहि प्रशस्त आहे. त्यामध्यें गृह्याग्निमंत आणि गृह्याग्नीनें विधुर यांचा प्रयोग सांगतों. त्याविषयीं शांत्यादिलक्षणांनीं युक्त असा उत्तम गुरु पाहून त्याच्या सन्निध तीन मासपर्यंत सर्व यतिधर्म सम्यक् अवलोकन करून गायत्रीजप, रुद्रजप आणि कूष्मांडहोम इत्यादिकांनीं देहशुद्धि करून रिक्तातिथीचे ठायीं देशकालांचें स्मरण करून “ अमुकस्य ममकरिष्यमाणसंन्यासेधिकारार्थं चतुःकृच्छ्रात्मकप्रायश्चित्तं प्रतिकृच्छ्रंतत्प्रत्याम्नायैकैकगोनिष्क्रयद्वाराहमाचरिष्ये ॥ कृच्छ्रप्रत्याम्नायगोनिष्क्रयं द्रव्यं विप्रेभ्योदातुमुत्सृजे ” याप्रमाणें संकल्पपूर्वक रुप्याचा निष्क, अर्धा निष्क, अथवा पाव निष्क यांतून कोणत्याहि एक प्रमाणाचें प्रत्येक गोनिष्क्रय द्यावें. एकादशीचे दिवसीं किंवा द्वादशीचे दिवसीं जसी ब्रह्मरात्रि प्राप्त होईल तसीं श्राद्धें आरंभावीं. ह्या स्थलीं अनाश्रमी असतां चार कृच्छ्रें व इतरास तप्तकृच्छ्र असें निर्णयसिंधु सांगतो. आपल्या नवश्राद्धांमध्यें षोडशश्राद्धें व सपिंडीकरण हीं साग्निकानें पार्वणविधीकरून व निरग्निकानें एकोद्दिष्टविधीकरून करावीं असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार करूं नयेत असें ह्मणतात.

---

अथाष्टौश्राद्धानि तत्रापस्तंबहिरण्यकेशीयादीनामग्नौकरणपिंडादिरहितः सांकल्पिकप्रयोगः आश्वलायनादीनांसपिंडकःपार्वणप्रयोगः तत्रादौसव्येनसयवजलेनश्राद्धांगतर्पणं ब्रह्माणंतर्पयामि विष्णुंत० महेश्वरंत० देवर्षीन्० ब्रह्मर्षीन्० क्षत्रर्षीन्० वसून्० रुद्रान्० आदित्यान्० सनकं० सनंदनं० सनातनं० पंचमहाभूतानि० चक्षुरादिकरणानि० भूतग्रामं० पितरं० पितामहं० प्रपितामहं० मातरं० पितामहीं० प्रपितामहीं० आत्मानं० पितरं० पितामहं० इतिनद्यादौकृत्वागृहमागत्यदेशकालौस्मृत्वाकरिष्यमाणसंन्यासांगत्वेनाष्टौश्राद्धानिपार्वणविधिनाम्नेनामेनवाकरिष्येइतिसंकल्प्यक्षणंदद्यात् अत्रसर्वंनांदीश्राद्धवत् तेननापसव्यं तिलस्थानेयवाः युग्माविप्राः तथाचदेवस्थानेविप्रौद्वौश्राद्धाष्टकेषोडशेत्यष्टादशविप्राः तत्रसत्यवसुसंज्ञकाविश्वेदेवानांदीमुखाःस्थानेक्षणःकर्तव्यः इत्येकंवृत्वाद्वितीयंवृणुयात् एवमग्रेपि प्रथमेदेवश्राद्धेब्रह्मविष्णुमहेश्वरानांदीमुखाःस्थानेक्षणः० १ द्वितीयेऋषिश्राद्धेदेवर्षिब्रह्मर्षिक्षत्रर्षयःनांदी० २ दिव्यश्राद्धेवसुरुद्रादित्या नांदी० ३ मनुष्यश्राद्धेसनकसनंदनसनातना नां

इत्यादिकांपासून झालेला असा अर्थ. “ आतुरांच्या संन्यासाविषयीं विधि नाहीं व क्रिया ह्मणजे कर्मकांडहि नाहीं, तर त्याविषयीं प्रेषमात्र उच्चारून संन्यास करवावा. ” दंडग्रहणादिरूप विविदिषाख्य संन्यासाविषयीं ब्राह्मणासच अधिकार आहे. विद्वत्संन्यासाविषयीं तर, क्षत्रिय व वैश्य यांसहि अधिकार आहे. कलियुगामध्यें जो संन्यासाचा निषेध सांगितला तो त्रिदंडिसंन्यासपर आहे, असें प्राचीन ह्मणतात.

---

सचसंन्यासश्चतुर्धा कुटीचकोबहूदकोहंसःपरमहंसश्चेति अत्रोत्तरोत्तरःश्रेष्ठः बहिःकुट्यांगृहेवावसन्काषायवासास्त्रिदंडी शिखायज्ञोपवीतवान्बंधुषुगृहेवाभुंजानआत्मनिष्ठोभवेत्सकुटीचकः पुत्रादीन्हित्वासप्तागाराणिभैक्षंचरन्पूर्वोक्तकाषायवस्त्रादिवेषवान्बहूदकः हंसस्तुपूर्वोक्तवेषोप्येकदंडः परमहंसस्तुशिखायज्ञोपवीतहीनएकदंडीस्यात् काषायवस्त्रं चतुर्णामपि हंसपरमहंसयोःशिखायज्ञोपवीतसत्त्वासत्त्वाभ्यांभेदः एकदंडस्तुद्वयोरपि परमहंसस्यदंडधारणंविविदिषादशायांनित्यं विद्वत्तादशायांतुकृताकृतं नदंडंनशिखांनाच्छादनंचरतिपरमहंसइतिश्रवणात् वैराग्यंविनाजीवनाद्यर्थंसंन्यासेतुनरकाः एकदंडंसमाश्रित्यजीवंतिबहवोनराः नरकेरौरवेघोरेकर्मत्यागात्पतंतिते काष्ठदंडोधृतोयनसर्वाशीज्ञानवर्जितः सयातिनरकान्घोरानित्यादिस्मरणात् ॥

तो संन्यास चार प्रकारचा—कुटीचक, बहूदक, हंस आणि परमहंस याप्रमाणें जाणावा. हे जे चार प्रकार सांगितले यांमध्यें उत्तरोत्तर श्रेष्ठ होय. बाहेर पर्णकुटीमध्यें अथवा गृहामध्यें राहत होत्साता भगवीं वस्त्रें धारण करणारा, त्रिदंडी, शिखा व यज्ञोपवीत यांहीं युक्त असून बांधवांचेठायीं अथवा गृहाचेठायीं भोजन करणारा असून आत्मनिष्ठ असा असेल तो कुटीचक होय. पुत्रादिकांचा परित्याग करून सात घरीं भिक्षाचरण व पूर्वीं सांगितलेलीं भगवीं वस्त्रें इत्यादि वेषधारण करणारा तो बहूदक होय. हंस तर पूर्वोक्त वेष धारण करणारा असूनहि एकदंडी होय. परमहंस तर शिखायज्ञोपवीत यांहींकरून विरहित असा एकदंडी होय. भगवें वस्त्र चारहि संन्यासांविषयीं आहे. हंस व परमहंस यांचा भेद शिखा व यज्ञोपवीत असणें व नसणें यांहींकरून आहे ह्मणजे शिखायज्ञोपवीतसहित तो हंस व शिखायज्ञोपवीतरहित तो परमहंस असा आहे. एक दंड तर, उभयतांस आहे. परमहंसास दंड धारण करणें विविदिषादशेमध्यें नित्य आहे. विद्वत्तादशेमध्यें तर कृताकृत आहे. कारण, दंड, शिखा, आच्छादन ( वस्त्र ) हीं परमहंस धारण करीत नाहीं असें श्रुत आहे. वैराग्यावांचून उपजीविका इत्यादिकांसांठीं संन्यास ग्रहण केला तर नरकप्राप्ति होते; कारण, एकदंडाचा आश्रय करून जे बहुत मनुष्य उपजीविका करितात ते कर्मत्यागेंकरून घोर रौरवनरकामध्यें पडतात आणि ज्ञानशून्य असतां ज्याणें काष्ठदंड धारण केला व सर्वाशी ( भक्ष्याभक्ष्यविचार न करितां खाणारा ) तो घोर नरकाप्रत जातो इत्यादिक स्मृति आहे.

---

अथसंन्यासग्रहणविधिः तत्रोत्तरायणंप्रशस्तं आतुरस्यतुदक्षिणायनमपि तत्रादौ गृह्याग्निमंतंतादृशविधुरंप्रतिचप्रयोगः तत्रशांत्यादिलक्षणंगुरुंसंशोध्यतन्निकटेत्रिमासंयतिधर्मा

न्संवीक्ष्यगायत्रीजपरुद्रजपकूष्मांडहोमादिभिःशुद्धिंलब्ध्वारिक्तातिथौदेशकालौस्मृत्वामुकस्यममकरिष्यमाणसंन्यासेधिकारार्थंचतुःकृच्छ्रात्मकं प्रायश्चित्तंप्रतिकृच्छ्रंतत्प्रत्याम्नायैकैकगोनिष्क्रयद्वाराहमाचरिष्ये कृच्छ्रप्रत्याम्नायगोनिष्क्रयंद्रव्यंविप्रेभ्योदातुमुत्सृजे इतिसंकल्पपूर्वकंरजतनिष्कतदर्धतदर्धान्यतमंप्रतिधेनुंदद्यात् एकादश्यांद्वादश्यांवायथाब्रह्मरात्रिःस्यात्तथाश्राद्धान्यारभेत् अत्रानाश्रमिणश्चतुःकृच्छ्रमन्यस्यतप्तकृच्छ्रमितिसिंधुः स्वस्यनवश्राद्धस्य षोडशश्राद्धसपिंडीकरणानिसाग्निःपार्वणविधिनानिरग्निरेकोद्दिष्टविधिनाकुर्यादितिकेचित् नेत्यन्ये ॥

## यानंतर संन्यासग्रहणाचा विधि सांगतों.

संन्यासग्रहणाविषयीं उत्तरायण प्रशस्त होय. आतुरास तर दक्षिणायनहि प्रशस्त आहे. त्यामध्यें गृह्याग्निमंत आणि गृह्याग्नीनें विधुर यांचा प्रयोग सांगतों. त्याविषयीं शांत्यादिलक्षणांनीं युक्त असा उत्तम गुरु पाहून त्याच्या सन्निध तीन मासपर्यंत सर्व यतिधर्म सम्यक् अवलोकन करून गायत्रीजप, रुद्रजप आणि कूष्मांडहोम इत्यादिकांनीं देहशुद्धि करून रिक्तातिथीचे ठायीं देशकालांचें स्मरण करून "अमुकस्य ममकरिष्यमाणसंन्यासेधिकारार्थं चतुःकृच्छ्रात्मकप्रायश्चित्तं प्रतिकृच्छ्रंतत्प्रत्याम्नायैकैकगोनिष्क्रयद्वाराहमाचरिष्ये ॥ कृच्छ्रप्रत्याम्नायगोनिष्क्रयं द्रव्यं विप्रेभ्योदातुमुत्सृजे" याप्रमाणें संकल्पपूर्वक रुप्याचा निष्क, अर्धा निष्क, अथवा पाव निष्क यांतून कोणत्याहि एक प्रमाणाचें प्रत्येक गोनिष्क्रय द्यावें. एकादशीचे दिवसीं किंवा द्वादशीचे दिवसीं जसी ब्रह्मरात्रि प्राप्त होईल तसीं श्राद्धें आरंभावीं. ह्या स्थलीं अनाश्रमी असतां चार कृच्छ्रें व इतरास तप्तकृच्छ्र असें निर्णयसिंधु सांगतो. आपल्या नवश्राद्धांमध्यें षोडशश्राद्धें व सपिंडीकरण हीं साग्निकानें पार्वणविधीकरून व निरग्निकानें एकोद्दिष्टविधीकरून करावीं असें कितीएक ग्रंथकार ह्मणतात. दुसरे ग्रंथकार करूं नयेत असें ह्मणतात.

---

अथाष्टौश्राद्धानि तत्रापस्तंबहिरण्यकेशीयादीनामग्नौकरणपिंडादिरहितः सांकल्पिकप्रयोगः आश्वलायनादीनांसपिंडकःपार्वणप्रयोगः तत्रादौसव्येनसयवजलेनश्राद्धांगतर्पणं ब्रह्माणंतर्पयामि विष्णुंत० महेश्वरंत० देवर्षीन्० ब्रह्मर्षीन्० क्षत्रर्षीन्० वसून्० रुद्रान्० आदित्यान्० सनकं० सनंदनं० सनातनं० पंचमहाभूतानि० चक्षुरादिकरणानि० भूतग्रामं० पितरं० पितामहं० प्रपितामहं० मातरं० पितामहीं० प्रपितामहीं० आत्मानं० पितरं० पितामहं० इतिनद्यादौकृत्वागृहमागत्यदेशकालौस्मृत्वाकरिष्यमाणसंन्यासांगत्वेनाष्टौश्राद्धानिपार्वणविधिनाग्नेनामेनवाकरिष्येइतिसंकल्प्यक्षणंदद्यात् अत्रसर्वंनांदीश्राद्धवत् तेननापसव्यं तिलस्थानेयवाः युग्माविप्राः तथाचदेवस्थानेविप्रौद्वौश्राद्धाष्टकेषोडशेत्यष्टादशविप्राः तत्रसत्यवसुसंज्ञकाविश्वेदेवानांदीमुखाःस्थानेक्षणःकर्तव्यः इत्येकंवृत्वाद्वितीयंवृणुयात् एवमग्रेपि प्रथमेदेवश्राद्धेब्रह्मविष्णुमहेश्वरानांदीमुखाःस्थानेक्षणः० १ द्वितीयेऋषिश्राद्धेदेवर्षिब्रह्मर्षिक्षत्रर्षयःनांदी० २ दिव्यश्राद्धेवसुरुद्रादित्या नांदी० ३ मनुष्यश्राद्धेसनकसनंदनसनातना नां

दी० ४ पंचमेभूतश्राद्धेपृथिव्यादिपंचमहाभूतान्येकादशचक्षुरादिकरणादिचतुर्विधभूतग्रामा नां० ५ षष्ठेपितृश्राद्धेपितृपितामहप्रपितामहा नांदी० ६ मातृश्राद्धेमातृपितामहीप्रपिताम ह्योनां० ७ अष्टमेआत्मश्राद्धेआत्मपितृपितामहानांदी० ८ आत्मांतरात्मापरमात्मेतिकेचित् इतिद्वौद्वौविप्रौवृणुयात् सर्वत्रनांदीमुखत्वंविशेषणं युग्माविप्राः सत्यवसूदक्षक्रतूवादेवौ ततःसर्वेषांपाद्यंदत्वाप्राङ्मुखानुदक्संस्थानुपवेश्यप्रार्थयेत् संन्यासर्थामहंश्राद्धंकुर्वेब्रूतद्विजो त्तमाः अनुज्ञांप्राप्ययुष्माकंसिद्धिंप्राप्स्यामिशाश्वतीं कुरुइतिप्रत्युक्तःसयवऋजुदूर्वादियुग्मेना ऽदानपूर्वकंसंबुद्ध्यंतेइदमासनमित्यष्टादशस्वासनंदद्यात् ततआश्वलायनानामर्घ्यपात्रासादनं आपस्तंबादीनांसांकल्पिकत्वान्नार्घ्यं देवार्थमेकंपार्वणाष्टकार्थमष्टावित्येवंनवपत्राणि सर्वत्र पवित्रद्वयांतर्हितेषुशन्नोदेवीरित्यपआसिच्यविश्वेदेवपात्रेयवोसीतियवाः अष्टपात्रेषुतिलो सीतिमंत्रस्योहेनयवानोप्यगंधादिपूजनं ऊहस्तु यवोसिसोमदेवत्योगोसवेदेवनिर्मितः प्रत्न वद्भिःप्रत्तःपुष्टथानांदीमुखान्देवान्प्रीणयाहिनःस्वाहानमः इतिप्रथमपात्रे द्वितीयेनांदीमुखा नृषीन्० तृतीयेनांदीमुखान्दिव्यान्प्री० चतुर्थेनांदीमुखान्मनुष्यान्प्रीण० पंचमेनांदीमुखा निभूतानिप्री० षष्ठसप्तमाष्टमेषुनांदी० पितॄन्प्रीणयेत्यादि० एकैकंपात्रंद्विधाविभज्यसर्वत्रया दिव्याइतिमंत्रांतेविश्वेदेवानांदीमुखाइदंवोर्घ्यमितिदत्वाब्रह्मविष्णुमहेश्वरानांदीमुखाइदंवोर्घ्यं स्वाहानमइत्यादिनायथायथंषोडशविप्रहस्तेषुदद्यात् यादिव्याइतिस्रवदनुमंत्रणं पात्रंन्युब्जी कृत्यगंधाद्याच्छादनांतपूजा तत्रसर्वत्रसंबुद्ध्यंतोनांदीमुखविशेषणयुक्तउच्चारः भोजनपात्रा ण्यासाद्यब्रह्मादिषोडशविप्रकरेष्वग्नयेकव्यवाहनायस्वाहासोमायपितृमतेस्वाहेतिमंत्राभ्यामा हुतिद्वयंदद्यात् नेदमापस्तंबादीनां उपस्तीर्यान्नंपरिविष्यान्नाभावेआमंतन्निष्क्रयंवाप्रोक्ष्यपृथ्वी तेपात्रमित्यादिनायथादैवतमन्नस्यामादेर्वात्यागः येदेवास० प्रजापतेन० ब्रह्मार्पणंब्रह्म० अनेना ष्टश्राद्धेननांदीमुखादेवादयःप्रीयंतां आपोशनदानांतेबलिदानवर्ज्यंभुंजीयुः तृप्तेषूपास्मै० अक्ष न्नमी० संपन्नमितिपृष्टेरुचिरमितिसर्वेब्रूयुः नेदमामान्नेआचांतेषुयवलाजदधिबदरियुतान्नेना ष्टचत्वारिंशत्पिंडान्कृत्वाप्रागायताउदक्संस्थाअष्टौरेखाःकृत्वाभ्युक्ष्य कुशान्दूर्वावास्तीर्यपिंड स्थानेषुचतुर्विंशतौजलंसिंचेत् तद्यथा शुंधंतांब्रह्मणोनांदीमुखाः शुंधंतांविष्णवोनांदी०शुंधंतां महेश्वरानां०इतिप्रथमरेखायां तदुत्तररेखासुशुंधंतांदेवर्षयोनां०शुंधंतांब्रह्मर्षयोनां०इत्याद्यूहो ज्ञेयः ततोब्रह्मणेनांदीमुखायस्वाहेत्येकंपिंडंदत्वाद्वितीयएवमेवदेयस्तूष्णींवेतिप्रतिदैवतंपिंडद्वयं एवमग्रेपिविष्णवेनांदीमुखायस्वाहेत्यादयःस्वाहांताःपिंडदानमंत्राऊह्याःअत्रपितरोमादयध्व मित्यादिपुनःशुंधंतांतंत्रमंजनमभ्यंजनंचकृताकृतं पिंडान्गंधादिनासंपूज्यनत्वोपसंपन्नमिति विसृज्यविप्रेभ्योदक्षिणादितंत्रं नेदंपिंडदानाद्यापस्तंबादीनांकात्यायनानामाश्वलायनवत् ॥

यानंतर आठ श्राद्धें सांगतों.—त्यामध्यें आपस्तंब, हिरण्यकेशीय इत्यादिकांचा, अग्नौक- रणपिंडादिक एतद्विरहित सांकल्पिकप्रयोग आहे. आश्वलायन इत्यादिकांचा सपिंडक असा पार्वणप्रयोग आहे. त्यामध्यें प्रथम सव्येंकरून यवसहित उदकानें श्राद्धांगतर्पण करावें. त्या तर्पणाच्या देवता अशा—" ब्रह्माणं तर्पयामि विष्णुंत० महेश्वरंत० देवर्षीन्० ब्रह्मर्षीन्० क्षत्रर्षीन्० वसून्० रुद्रान्० आदित्यान्० सनकं० सनंदनं० सनातनं० पंचमहाभू-

तानि० चक्षुरादिकरणानि० भूतग्रामं० पितरं० पितामहं० प्रपितामहं० मातरं० पितामहीं० प्रपितामहीं० आत्मानं० पितरं० पितामहं०" याप्रमाणें नदी इत्यादि तिर्थी तर्पण करून गृहाप्रत येऊन देशकालांचें स्मरण करून "करिष्यमाणसंन्यासांगत्वेनाष्टौश्राद्धानि पार्वणविधिनाऽन्नेनामेनवा करिष्ये," असा संकल्प करून क्षण द्यावा. ह्या श्राद्धीं सर्व कर्म नांदीश्राद्धाप्रमाणें करावें. त्यास्तव अपसव्य नाहीं. तिलस्थानीं यव. समसंख्य ब्राह्मण. ते सांगतों. देवस्थानीं दोन ब्राह्मण आणि आठ श्राद्धांचे ठायीं सोळा मिळून अठरा ब्राह्मण सांगावे. त्याविषयीं–"सत्यवसुसंज्ञकाविश्वेदेवानांदीमुखाःस्थानेक्षणःकर्तव्यः" असें ह्मणून एक ब्राह्मणास वरून दुसऱ्या ब्राह्मणास वरावें व याप्रमाणें पुढेंहि जाणावें. पहिल्या देवश्राद्धीं "ब्रह्मविष्णुमहेश्वरानांदीमुखाः स्थानेक्षणः० १" दुसऱ्या ऋषिश्राद्धीं "देवर्षिब्रह्मर्षिक्षत्रर्षयःनांदी० २" तिसऱ्या दिव्यश्राद्धीं "वसुरुद्रादित्यानांदी० ३" मनुष्यश्राद्धीं "सनकसनंदनसनातनानांदी०४" पांचव्या भूतश्राद्धीं "पृथिव्यादिपंचमहाभूतान्येकादशचक्षुरादिकरणादिचतुर्विधभूतग्रामानां०५" सहाव्या पितृश्राद्धीं "पितृपितामहप्रपितामहानांदी० ६" मातृश्राद्धीं "मातृपितामहीप्रपितामह्योनां० ७" आठव्या आत्मश्राद्धीं "आत्मपितृपितामहानांदी० ८" 'पितृपितामह' या स्थानीं 'आत्मांतरात्मापरमात्मा' असा उच्चार करावा असें कोणी ह्मणतात. याप्रमाणें दोन दोन ब्राह्मण वरावे. सर्वत्र ठिकाणीं 'नांदीमुख' या विशेषणाची योजना करावी. समसंख्य ब्राह्मण असावे. व देव सत्यवसु अथवा दक्षक्रतु घ्यावे. तदनंतर सर्व ब्राह्मणांस पाद्य देऊन पूर्वाभिमुख आणि उत्तरसंस्थ बसवून त्यांची प्रार्थना करावी. प्रार्थनेचा मंत्र–"संन्यासार्थमहं श्राद्धं कुर्वे ब्रूत द्विजोत्तमाः॥ अनुज्ञां प्राप्य युष्माकं सिद्धिं प्राप्स्यामि शाश्वतीं" याप्रमाणें प्रार्थना करून "कुरु" असें प्रतिवचन दिल्हें होत्साता यवांसहित, सरळ दोन दूर्वा इत्यादिक घेऊन उदकदानपूर्वक संबुद्ध्यंत उच्चार केल्यानंतर "इदमासनं" असें ह्मणून अठरा ब्राह्मणांस आसन द्यावें. तदनंतर आश्वलायनांनीं अर्घ्यपात्रें मांडावीं. आपस्तंबादिकांचा सांकल्पिकविधि असल्यामुळें अर्घ्य नाहीं. देवांकरितां एक व आठ पार्वणांकरितां आठ मिळून नऊ पात्रें मांडावीं. सर्वत्र दोन दोन पवित्रकांनीं आच्छादित अशा पात्रामध्यें "शन्नोदेवी०" या मंत्रानें उदक घालून विश्वेदेवपात्रामध्यें "यवोसि०" या मंत्रानें यव टाकावे. आठ पात्रांमध्यें "तिलोसि०" ह्या मंत्राच्या ऊहानें यव टाकून गंधादिकानें पूजा करावी. तो ऊह तर असा–"यवोसिसोमदेवत्यो गोसवेदेवनिर्मितः॥ प्रत्नवद्भिः प्रत्तः पुष्ट्यानांदीमुखान्देवान्प्रीणयाहिनः स्वाहा नमः" अशा मंत्रानें प्रथम पात्रांत. दुसऱ्या पात्रांत "नांदीमुखानृषीन्०;" तिसऱ्यांत "नांदीमुखान्दिव्यान्प्री०;" चवथ्यांत "नांदीमुखान्मनुष्यान्प्री०;" पांचव्यांत "नांदीमुखानिभूतानिप्री०;" सहाव्यांत, सातव्यांत व आठव्यांत "नांदी० पितॄन्प्रीणय०" इत्यादिक जाणावा. एकेक पात्र दोन वेळ वांटून सर्वत्र "यादिव्या०" हा मंत्र ह्मटल्यानंतर "विश्वेदेवानांदीमुखाइदंवोर्घ्यं" असें ह्मणून अर्घ्य देऊन "ब्रह्मविष्णुमहेश्वरानांदीमुखाइदंवोर्घ्यं स्वाहा नमः" इत्यादि प्रकारेंकरून यथायोग्य सोळा ब्राह्मणांचे हातावर अर्घ्य द्यावें. नंतर "यादिव्या०" ह्या मंत्रानें, स्रवणाऱ्या उदकाचें अनुमंत्रण करावें. नंतर

पात्र उपडें करून गंधादिकापासून आच्छादनपर्यंत पूजा करावी. त्या पूजेविषयीं सर्वत्र ठिकाणीं संबुद्ध्यंत नांदीमुख या विशेषणानें युक्त असा उच्चार करावा. भोजनपात्रें मांडून ब्रह्मादिक सोळा ब्राह्मणांचे हातांवर "**अग्नयेकव्यवाहनाय स्वाहा, सोमायपितृमते स्वाहा,**" ह्या दोन मंत्रांनीं दोन आहुति द्याव्या. आपस्तंब इत्यादिकांस हें ( अग्नौकरण ) नाहीं. पात्रांला तूप लावून अन्न वाढून, अन्न नसेल तर आमान्न किंवा त्याचा निष्क्रय ( द्रव्य ) प्रोक्षण करून "**पृथिवीतेपात्रं०** " इत्यादि मंत्रेंकरून जसें दैवत असेल तदनुसार अन्नाचा किंवा आमान्नाचा त्याग करावा. नंतर "**येदेवास० प्रजापतेन० ब्रह्मार्पणं ब्रह्म० अनेनाष्टश्राद्धेन नांदीमुखादेवादयः प्रीयंतां** " असें ह्मणून उदक सोडावें. आपोशन दिल्यानंतर चित्राहुति वर्ज्य करून ब्राह्मणांनीं भोजन करावें. तृप्त झाले असतां "**उपास्मै०, अक्षन्नमी० संपन्नं**" असें विचारल्यानंतर "**रुचिरं**" असें सर्व ब्राह्मणांनीं बोलावें. आमान्नाविषयीं हें ( संपन्न इत्यादि ) नाहीं. आंचवल्यानंतर यव, लाह्या, दहीं, बोरें यांहीं युक्त अन्नाचे अठ्ठेचाळीस पिंड करून प्रागायत ( पश्चिमेकडून पूर्वेकडे काढलेल्या ) व उदक्संस्थ ( उत्तरेकडे समाप्त केलेल्या ) अशा आठ रेषा काढून त्यांवर उदक सिंचन करून कुश किंवा दूर्वा पसरून चोवीस पिंडस्थानीं उदक सिंचन करावें. तें असें—"**शुंधंतांब्रह्माणोनांदीमुखाः शुंधंतांविष्णवोनांदीमुखाः शुंधंतांमहेश्वरा नां०** " याप्रमाणें प्रथम रेषेवर. त्याच्या उत्तर रेखांवर "**शुंधंतां देवर्षयो नां० शुंधंतां ब्रह्मर्षयो नां०**" इत्यादि ऊह जाणावा. तदनंतर "**ब्रह्मणेनांदीमुखाय स्वाहा** " असें ह्मणून एक पिंड देऊन दुसरा असाच द्यावा, अथवा मंत्ररहित द्यावा. याप्रमाणें प्रत्येक देवतेस दोन पिंड द्यावे, व असेंच पुढेंहि "**विष्णवेनांदीमुखाय स्वाहा** " इत्यादिक स्वाहांत पिंड देण्याचे मंत्र जाणावे. "**अत्रपितरोमादयध्वं**" इत्यादिकापासून पुनः शुंधंतां एथपर्यंत तंत्र, अंजन, अभ्यंजन हीं कृताकृत होत. पिंडांची गंधादिकानें पूजा करून नमस्कार करून "**उपसंपन्नं** " असें वाक्य ह्मणून विसर्जन करून ब्राह्मणांकारणें दक्षिणा देणें इत्यादि तंत्र करावें. हें पिंडदानादिक आपस्तंबादिकांस नाहीं. कात्यायनशाखी यांस आश्वलायनाप्रमाणें पिंडदानादिक आहे.

---

**अष्टश्राद्धोत्तरंतद्दिनेद्वितीयेवाषट्शिखाकेशान्स्थापयित्वा कक्षोपस्थवर्जंकेशश्मश्रुनखादिवापयित्वास्नात्वा कौपीनाच्छादनादिहोमद्रव्यंचविनान्यद्धनादिविप्रादिभ्यःपुत्रादिभ्यश्चत्यजेत् कौपीनादिकंगैरिकरंजितंकृत्वावैणवंदंडंसत्वचंशिरोभ्रूललाटान्यतमप्रमाणंसमूलमंगुलिस्थूलंविप्रानीतमेकादशनवचतुःसप्तान्यतमपर्वे**कंपर्वग्रंथियुतं मुद्रायुतंसंपाद्यशंखोदकेनप्रणवपु**रुषसूक्तकेशवादिनामभिरभिषिच्यस्थापयेत्** ततःकमंडलुकौपीनाच्छादनकंथापादुकाःस्थाप**येत् शिक्यपात्रादिकमपिकेचित् ॥**

अष्टश्राद्धें झाल्यानंतर त्या दिवशीं अथवा दुसऱ्या दिवशीं शिखेचे सहा केश ठेवून कक्षोपस्थवर्ज्य असें केश, श्मश्रु, नखें, इत्यादिकांचें वपन करवून स्नान करून कौपीन, आच्छादनादि आणि होमद्रव्य यांवांचून इतर सर्व द्रव्यादिक ब्राह्मण व पुत्र यांकारणें द्यावें. कौपीन, छाट्या इत्यादिक कावेनें रंगवून वांबूचा दंड त्वचायुक्त व शिर, भृकुटि, ललाट यां-

तून कोणत्याहि एक प्रमाण उंचीचा; समूल असून अंगुलपरिमित जाड; ब्राह्मणानें आणलेला; अकरा, नऊ, चार, सात यांतून कोणत्याहि परिमित पेरांचा; पेरांच्या गांठींनीं युक्त; मुद्रायुक्त असा मिळवून प्रणव, पुरुषसूक्त, केशवादि नामें यांहींकरून शंखोदकानें स्नान घालून ठेवावा. तदनंतर कमंडलु, कौपीन, आच्छादन, कंथा आणि पादुका ठेवाव्या. शिंकें, पात्रादिक हीं ठेवावीं असें कोणी ह्मणतात.

---

**देशकालौसंकीर्त्याशेषदुःखनिवृत्तिनिरतिशयानंदप्राप्तिपरमपुरुषार्थप्राप्तये परमहंसाख्य संन्यासग्रहणंकरिष्ये तदंगतयागणपतिपूजनपुण्याहवाचनमातृकापूजननांदीश्राद्धानिकरिष्ये तानिकृत्वाजपेत् ब्रह्मणेनमः विष्णवे० रुद्राय० सूर्याय० सोमाय० आत्मने० अंतरात्मने० परमात्मने अग्निमीळेऋक् इषेत्वोर्जेत्वा० अग्नआयाहिऋक् शन्नोदेवीऋक् जपित्वासक्तुपिष्टंमुष्टित्रयंप्रणवेनत्रिःप्राश्यनाभिमालभेत् आत्मनेस्वाहा अंतरात्मने० परमात्मनेस्वा० प्रजापतयेस्वाहेति मंत्रैः ततःपयोदधिमिश्रमाज्यंजलमेववात्रिवृदसीतिप्रथमंप्राश्यप्रवृदसीतिद्वितीयं विवृदसीतितृतीयंप्राश्यापःपुनंत्वितिजलंप्राश्याचम्योपवासंकरिष्येइतिसंकल्पयेत्॥**

देशकालांचें संकीर्तन करून "**अशेषदुःखनिवृत्तिनिरतिशयानंदप्राप्तिपरमपुरुषार्थप्राप्तये परमहंसाख्यसंन्यासग्रहणं करिष्ये॥ तदंगतया गणपतिपूजनपुण्याहवाचनमातृकापूजननांदीश्राद्धानि करिष्ये**" असा संकल्प करून तीं करून जप करावा. तो असा– "**ब्रह्मणेनमः विष्णवे० रुद्राय० सूर्याय० सोमाय० आत्मने० अंतरात्मने० परमात्मने० अग्निमीळे० ऋक्, इषेत्वोर्जेत्वा० अग्नआयाहि० ऋक्, शन्नोदेवी० ऋक्**" याप्रमाणें जप करून सातूंचें पीठ तीन मुठी प्रणवमंत्रानें त्रिवार प्राशन करून नाभीस स्पर्श करावा. **नाभिस्पर्शाचे मंत्र–"आत्मनेस्वाहाअंतरात्मने० परमात्मने स्वाहा प्रजापतये स्वाहा."** नंतर दूध, दहीं यांहींकरून मिश्रित घृत अथवा उदकच, "**त्रिवृदसि**" या मंत्रानें प्रथम प्राशन करून, "**प्रवृदसि**" या मंत्रानें दुसऱ्यानें प्राशन करून "**विवृदसि**" या मंत्रानें तिसऱ्यानें प्राशन करून, "**आपःपुनंतु**" या मंत्रानें उदक प्राशन करून आचमन करून, "**उपवासं करिष्ये**" असा संकल्प करावा.

---

**अथसावित्रीप्रवेशः ॐभूःसावित्रींप्रविशामि ॐतत्सवितुर्वरेण्यं ॐभुवःसावित्रींप्र० भर्गोदेवस्य०ॐस्वःसावित्रीं० धियोयो० ॥ ॐभूर्भुवःस्वःसावित्रींप्र० तत्सवितुर्वरेण्यं० ऋक् ततोस्तात्प्राक्गृह्याग्निंसमिध्यविच्छिन्नश्चेत्पुनःसंधानविधिनानिरग्निर्वाविधुरादिर्वापृष्टोदिविविधानेनाग्निंसंपादयेत् पृष्टोदिविविधानंचकात्यायनवैश्वदेवप्रसंगेपूर्वार्धेउक्तं ॥**

यानंतर सावित्रीप्रवेश सांगतों.–"**ॐभूःसावित्रीं प्रविशामि ॐतत्सवितुर्वरेण्यं ॐ भुवः सावित्रींप्र० भर्गो देवस्य० ॐस्वःसावित्रीं० धियोयो० ॐभूर्भुवःस्वःसावित्रीं प्र० तत्सवितुर्वरेण्यं० ऋक्.**" तदनंतर सूर्यास्ताच्या पूर्वीं गृह्याग्नि प्रदीप्त करून विच्छिन्न असेल तर पुनःसंधानविधी करून निरग्नि अथवा विधुरादिक असेल तर पृष्टोदिविविधानेंकरून अग्नि उत्पन्न करावा. पृष्टोदिवि विधान, कात्यायनाच्या वैश्वदेवप्रसंगीं पूर्वार्धांत सांगितलें आहे.

---

अथास्तात्पूर्वंब्रह्मान्वाधानं संन्यासंकर्तुंब्रह्मान्वाधानंकरिष्येइतिसंकल्प्याग्निध्यानाद्याज्यं संस्कृत्यस्रुक्स्रुवौसंमृज्यस्रुचिचतुराज्यंगृहीत्वोंस्वाहेतिहुत्वापरमात्मनइदं० परिषेचनादि इतिब्रह्मान्वाधानं ॥

यानंतर सूर्यास्ताच्या पूर्वी ब्रह्मान्वाधान करावें तें असें.–" संन्यासं कर्तुं ब्रह्मान्वाधानं करिष्ये " असा संकल्प करून अग्नीचें ध्यान इत्यादिक कर्म करावें. नंतर आज्यसंस्कार करून स्रुचि व स्रुवा या पात्रांचा संस्कार करून स्रुचिपात्रांत चार वेळ तूप घेऊन " ॐस्वाहा " या मंत्रानें आहुति देऊन " परमात्मनइदं० " ( असा त्याग करावा ). नंतर उदकसिंचनादिक कर्म करावें. याप्रमाणें ब्रह्मान्वाधान सांगितलें.

---

ततःसायंसंध्याहोमवैश्वदेवान्कृत्वाग्निसमीपेजागरंकुर्यात् ॥
तदनंतर सायंसंध्या, होम, वैश्वदेव हीं करून अग्निसन्निध जागरण करावें.

---

प्रातर्नित्यहोमांतेवैश्वदेवादिकंकृत्वाग्नेयंवैश्वानरंवास्थालीपाकंकुर्यात् तत्रकरिष्यमाणसंन्यासपूर्वांगभूतमाग्नेयस्थालीपाकंकरिष्यइतिसंकल्पः ध्यात्वाचक्षुषीआज्येनेत्यंतेत्रप्रधानमग्निंचरुणाशेषेणेत्यादि अग्नयेत्वाजुष्टंनिर्वपामीत्यादिनाम्नानिर्वापादि नाम्नैवप्रधानहोमः एवं वैश्वानरपक्षेप्यूह्यं ततस्तरत्समंदीतिजपित्वाकुशहेमरूप्यजलैःस्नात्वादेशादिस्मृत्वासंन्यासांगभूतंप्राणादिहोमंपुरुषसूक्तहोमंविरजाहोमंचतंत्रेणकरिष्ये इतिसंकल्प्यान्वाधानेआज्येनेत्यंतेप्राणादिपंचदेवताःसमिच्चर्वाज्यैःपुरुषंपुरुषसूक्तेनप्रत्यृचंषोडशवारंसमिच्चर्वाज्यैःप्राणाद्येकोनविंशतिदेवताविरजामंत्रैः प्रतिद्रव्यमेकैकसंख्यसमिच्चर्वाज्याहुतिभिःप्रजापतिंसकृदाज्येन शेषेणेत्यादि षष्ट्युत्तरशतवारंतूष्णींनिरूप्यतथैवप्रोक्ष्यश्रपयित्वाज्यभागांतेप्राणायस्वाहेत्यादिपंचमंत्रैर्द्रव्यत्रयंसकृत्सकृद्धुत्वायथादैवंत्यक्त्वा सहस्रशीर्षेतिषोडशर्चेनप्रत्यृचंपृथक्पृथक् द्रव्यत्रयंहुत्वापुरुषायेदंनममेतिसर्वत्रत्यजेत् ॥

प्रातःकालीं नित्यहोम दिल्यानंतर वैश्वदेवादिक करून आग्नेय अथवा वैश्वानर स्थालीपाक करावा. त्याविषयीं संकल्प.–" करिष्यमाणसंन्यासपूर्वांगभूतमाग्नेयस्थालीपाकं करिष्ये" याप्रमाणें संकल्प करावा. ध्यान करून " चक्षुषी आज्येनेत्यंतेत्रप्रधानमग्निंचरुणा शेषेण० " इत्यादिक अन्वाधान करावें. नंतर " अग्नयेत्वा जुष्टं निर्वपामि " इत्यादि नामेंकरून निर्वापादिक करावें. नाममंत्रानेंच प्रधानहोम करावा. याप्रमाणें वैश्वानरस्थालीपाकपक्षींहि जाणावें. तदनंतर " तरत्समंदी० " या मंत्राचा जप करून कुश, सुवर्ण, रौप्य यांहींयुक्त अशा उदकांनीं स्नान करून देशकालांचें स्मरण करून " संन्यासांगभूतंप्राणादिहोमंपुरुषसूक्तहोमंविरजाहोमंचतंत्रेणकरिष्ये" असा संकल्प करून अन्वाधानामध्यें " आज्येनेत्यंतेप्राणादि० पंचदेवताःसमिच्चर्वाज्यैःपुरुषंपुरुषसूक्तेनप्रत्यृचंषोडशवारंसमिच्चर्वाज्यैःप्राणाद्येकोनविंशतिदेवताविरजामंत्रैः प्रतिद्रव्यमेकैकसंख्यसमिच्चर्वाज्याहुतिभिः प्रजापतिंसकृदाज्येनशेषेणइत्यादि." एकशें साठ वेळ मंत्ररहित निर्वाप करून तसेंच(मंत्ररहित)

प्रोक्षण करून चरु शिजवून आज्यभागांत कर्म केल्यानंतर "प्राणाय स्वाहा" इत्यादि पांच मंत्रांनीं तीन (समिधा, चरु, आज्य) द्रव्यांचा एकेक वेळ होम करून जशी देवता असेल तदनुसार त्याग ह्मणून "सहस्रशीर्षा०" ह्या सोळा ऋचांनीं प्रत्येक ऋचेनें निरनिराळा तीन द्रव्यांचा होम करून "पुरुषायेदं न मम" असा सर्वत्र त्याग ह्मणावा.

---

अथविरजाहोमः प्राणापानव्यानोदानसमानामेशुध्यंतांज्योतिरहंविरजाविपाप्माभूयासं स्वाहा प्राणादिभ्यइदं०वाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिव्हाघ्राणरेतोबुद्ध्याकूतिसंकल्पामेशुद्ध्यंतांज्यो ति० वागादिभ्यइदं० त्वक्चर्ममांसरुधिरमेदोमज्जास्नायवोस्थीनिमेशुद्ध्यंतां० त्वगादिभ्य इदं० शिरःपाणिपादपार्श्वपृष्ठोरूदरजंघाशिश्नोपस्थपायवोमेशुद्ध्यं० शिरआदिभ्य० उत्ति ष्ठपुरुषहरितपिंगललोहिताक्षदेहिदेहिददापयितामेशुद्ध्यं० पुरुषादिभ्य० पृथिव्यापस्तेजो वायुराकाशोमेशुद्ध्यं० पृथिव्यादिभ्य० शब्दस्पर्शरूपरसगंधामेशुद्ध्यं० शब्दादिभ्य० म नोवाक्कायकर्माणिमेशुद्ध्यंतां० मनआदिकर्मभ्य० अव्यक्तभावैरहंकारैर्ज्योतिरहं० अव्य क्तादिभ्य० आत्मामेशुद्ध्यतांज्यो० आत्मन० अंतरात्मामे० अंतरात्मन० परमात्मामे० परमात्मन० क्षुधेस्वाहा क्षुधइदं० क्षुत्पिपासायस्वाहा क्षुत्पिपासायेदं० विविट्यैस्वा० विवि ट्या० ऋग्विधानाय० कर्षोत्कायस्वा० क्षुत्पिपासामलाज्येष्ठामलक्ष्मींनाशयाम्यहं अभूति मसमृद्धिंचसर्वांनिर्णुदमेपाप्मानंस्वाहाअग्नयइदं० अन्नमयप्राणमयमनोमयविज्ञानमयमानंद मयमात्मामेशुद्ध्यंतां० अन्नमयादिभ्य० एवंसमिच्चर्वाज्यैःप्रतिद्रव्यंचत्वारिंशदाहुतीर्हुत्वा य दिष्टंयच्चपूर्तंयच्चापद्यनापदि प्रजापतौतन्मनसिजुहोमि विमुक्तोहंदेवकिल्बिषात्स्वाहेत्याज्यंहु त्वाप्रजापतयइदमितित्यजेत् ततःपुरुषसूक्तंअग्निमीळेइत्यादिचतुर्वेदादींश्चजपित्वास्विष्टकृदा दिहोमशेषंसमाप्य ब्रह्मचार्यादिभ्योगोहिरण्यवस्त्रादिदत्वासंमासिंचंतुमरुतइतिमंत्रेणगृ ह्याग्निमुपस्थायतत्रदारुपात्राणिदहेत्तैजसानिगुरवेदद्यात् ततआत्मन्यग्निसमारोपंअयंतेयो निरित्यृचायातेअग्नेयज्ञियातनूस्तयेह्यारोहात्मात्मानमित्यादियजुषाचत्रिरुक्तेनाग्नेर्ज्वालांप्राश्न न्कुर्यात् कृष्णाजिनमादायगृहान्निष्क्रम्य सर्वेभवंतुवेदाढ्याःसर्वेभवंतुसोमपाः सर्वेपुत्रमु खंदृष्ट्वासर्वेभवंतुभिक्षुकाइतिपुत्रादिभ्यआशिषंदत्वानमेकश्चिन्नाहंकस्यचित् पुत्रादीनुक्त्वावि सृजेत् जलाशयंगत्वांजलिनाजलमादायाशुःशिशानइतिसूक्तेनाभिमंत्र्यसर्वाभ्योदेवताभ्यः स्वाहेतित्यजेत्तिथ्यादिस्मृत्वाऽपरोक्षब्रह्मावाप्तयेसंन्यासंकरोमीतिसंकल्प्यजलांजलिंगृहीत्वा ॐएषहवाअग्निःसूर्यःप्राणंगच्छस्वाहाॐस्वांयोनिंगच्छस्वाहा ॐआपोवैगच्छस्वाहेतिमंत्र त्रयेणजलेष्वंजलित्रयंदद्यात् पुत्रेषणावित्तेषणालोकेषणासर्वेषणामयापरित्यक्ताअभयंसर्व भूतेभ्योमत्तःस्वाहाइत्यंजलिंजलेक्षिपेत् पुनरेवमभयंदत्वावदेत् यत्किंचिद्बंधनंकर्मकृतमज्ञान तोमया प्रमादालस्यदोषोत्थंतत्सर्वंसंत्यजाम्यहं त्यक्तसर्वोविशुद्धात्मागतस्नेहशुभाशुभः एषत्य जाम्यहंसर्वकामभोगसुखादिकं रोषंतोषंविवादंचगंधमाल्यानुलेपनं भूषणंनर्तनंगेयंदानमा दानमेवच नमस्कारंजपंहोमंयाश्चनित्याःक्रियामम नित्यंनैमित्तिकंकाम्यंवर्णधर्माश्रमाश्रये स र्वमेवपरित्यज्यददाम्यभयदक्षिणां पद्भ्यांकराभ्यांविहरन्नाहंवाक्कायमानसैःकरिष्येप्राणिनां

पीडांप्राणिनःसंतुनिर्भयाः सूर्यादिदेवान्विप्रांश्चसाक्षित्वेनध्यात्वानाभिमात्रेजलेप्राङ्मुखःसावित्रीप्रवेशंपूर्ववत्कृत्वातरत्समंदीतिसूक्तंपठित्वापुत्रेषणायावित्तेषणायालोकेषणायाश्चव्युत्थितोहंभिक्षाचर्यंचरामीतिजलेजलंजुहुयात् ॥

यानंतर विरजाहोम सांगतों—तो असा—" प्राणापानव्यानोदानसमानामेशुद्ध्यंतांज्योतिरहंविरजाविपाप्माभूयासं स्वाहा प्राणादिभ्य इदं० वाङ्मनश्चक्षुःश्रोत्रजिव्हाघ्राणरेतोबुद्ध्याकूतिसंकल्पा मेशुद्ध्यंतां ज्योति० वागादिभ्यइदं० त्वक्चर्ममांसरुधिरमेदोमज्जास्नायवोस्थीनि मे शुद्ध्यंतां त्वगादिभ्य इदं० शिरःपाणिपादपार्श्वपृष्ठोरूदरजंघाशिश्नोपस्थपायवो मेशुद्ध्यं० शिरआदिभ्य० उत्तिष्ठपुरुषहरितपिंगललोहिताक्षदेहिदेहिददापयिता मेशुद्ध्यं० पुरुषादिभ्य० पृथिव्यापस्तेजोवायुराकाशोमेशुद्ध्यं० पृथिव्यादिभ्य० शब्दस्पर्शरूपरसगंधामेशुद्ध्यं० शब्दादिभ्य० मनोवाक्कायकर्माणिमेशुद्ध्यंतां० मनआदिकर्मभ्य० अव्यक्तभावैरहंकारैर्ज्योतिरहं० अव्यक्तादिभ्य० आत्मामेशुद्ध्यंतांज्यो० आत्मन० अंतरात्मामे० अंतरात्मन० परमात्मामे० परत्मात्मन० क्षुधेस्वाहा क्षुधइदं० क्षुत्पिपासायस्वाहा क्षुत्पिपासायेदं० विविद्यैस्वा० विविद्या० ऋग्विधानाय० कर्षोत्कायस्वा० क्षुत्पिपासामलाज्येष्ठामलक्ष्मींनाशयाम्यहं अभूतिमसमृद्धिंचसर्वान्निर्णुदमेपाप्मानंस्वाहा अग्नयइदं० अन्नमय प्राणमय मनोमय विज्ञानमयमानंदमयमात्मा मे शुद्ध्यंतां अन्नमयादिभ्य० " याप्रमाणें समिधा, चरु, आज्य यांहींकरून प्रत्येक द्रव्याच्या चाळीस आहुतींनीं होम करून " यदिष्टंयच्चपूर्तंयच्चापद्यनापदि ॥ प्रजापतौतन्मनसिजुहोमि ॥ विमुक्तोहंदेवकिल्बिषात्स्वाहा " या मंत्रानें आज्याची आहुति देऊन " प्रजापतयइदं० " असा त्याग ह्मणावा. तदनंतर पुरुषसूक्त, " अग्निमीळे० " इत्यादि चार वेदादिक यांचा जप करून स्विष्टकृदादि होमशेष समाप्त करून ब्रह्मचारी इत्यादिकांस गाई, हिरण्य, वस्त्रादिक देऊन " संमासिंचंतुमरुत० " या मंत्रेंकरून गृह्याग्नीचें उपस्थान करून त्या अग्नीमध्यें काष्ठपात्रें दहन करावीं. व धातूचीं पात्रें असतील तीं गुरुकारणें द्यावीं. " आयंतेयोनि० " ही ऋचा आणि " यातेअग्नेयज्ञियातनूस्तये ह्यारोहात्मात्मानं०" इत्यादि यजुर्मंत्र तीन वेळ ह्मणून अग्नीची ज्वाला प्राशन करीत होत्साता अग्निसमारोप आपले ठिकाणीं करावा. नंतर कृष्णाजिन घेऊन घरांतून निघून "सर्वे भवंतु वेदाढ्याःसर्वे भवंतु सोमपाः ॥ सर्वेपुत्रमुखं दृष्ट्वा सर्वे भवंतु भिक्षुकाः " या मंत्रानें पुत्रादिकांस आशीर्वाद देऊन " नमेकश्चित्नाहंकस्यचित् " (माझा कोणी नाहीं व मी कोणाचा नाहीं) असें पुत्रांदिकांला सांगून विसर्जन करावें. नंतर जलाशयाप्रत जाऊन अंजलीनें उदक घेऊन " आशुःशिशान०" ह्या सूक्तानें अभिमंत्रण करून "सर्वाभ्यो देवताभ्यः स्वाहा" असें ह्मणून उदक सोडावें. तिथ्यादिकांचें स्मरण करून " अपरोक्षब्रह्मावाप्तयेसंन्यासंकरोमि" असा संकल्प करून उदकाची अंजलि घेउन "ॐएष ह्वाअग्निःसूर्यः प्राणंगच्छस्वाहा ॐस्वांयोनिंगच्छस्वाहा ॐआपोवैगच्छस्वाहा" या तीन मंत्रांनीं उदकामध्यें तीन अंजलि द्याव्या. "पुत्रेषणा वित्तेषणा लोकेषणा सर्वेषणा मया परित्यक्ता अभयं सर्वभूतेभ्यो मत्तः स्वाहा" ह्या मंत्रानें उदकाचा अंजलि उदकांत टाकावा.

पुनः याप्रमाणें अभय देऊन पुढें सांगतों तें ह्मणावें.—"यत्किंचिद्बंधनं कर्म कृतमज्ञानतो-मया ॥ प्रमादालस्यदोषोत्थं तत्सर्वं संत्यजाम्यहं ॥ त्यक्तसर्वो विशुद्धात्मा गतस्नेहशुभा-शुभः ॥ एषत्यजाम्यहं सर्वं कामभोगसुखादिकं ॥ रोषंतोषंविवादंच गंधमाल्यानुलेपनं॥ भूषणंनर्तनंगेयंदानमादानमेवच ॥ नमस्कारं जपं होमं याश्च नित्याःक्रियामम ॥ नित्यं नैमित्तिकं काम्यं वर्णधर्माश्रमाश्रये ॥ सर्वमेवपरित्यज्य ददाम्यभयदक्षिणां ॥ पद्भ्यां-कराभ्यांविहरन्नाहंवाक्कायमानसैः ॥ करिष्ये प्राणिनां पीडां प्राणिनःसंतुनिर्भयाः" नंतर सूर्यादि देव व ब्राह्मण यांचे साक्षित्वानें ध्यान करून नाभिमात्र उदकामध्यें पूर्वाभिमुख उभा राहून सावित्रीप्रवेश पूर्वीप्रमाणें करून "तरत्समंदी०" या सूक्ताचा पाठ करून "पुत्रेष-णाया वित्तेषणाया लोकेषणायाश्च व्युत्थितोहं भिक्षाचर्यं चरामि" असें वाक्य ह्मणून उदकांत जलाची आहुति द्यावी.

---

अथप्रेषोच्चारः ॐभूःसंन्यस्तंमयाॐभुवःसंन्यस्तं० ॐस्वःसंन्यस्तं० ॐभूर्भुवःस्वःसंन्य स्तंमयेतित्रिर्मिदमध्योच्चस्वरेणोक्त्वाऽभयंसर्वभूतेभ्योमत्तःस्वाहेति जलंजलेक्षिपेत् शिखामु त्पाट्ययज्ञोपवीतमुद्धृत्यकरेगृहीत्वा आपोवैसर्वादेवताःसर्वाभ्योदेवताभ्योजुहोमिस्वाहाॐभूः स्वाहेतिजलेजलैःसहहुत्वाप्रार्थयेत् त्राहिमांसर्वलोकेशवासुदेवसनातन संन्यस्तंमेजगद्यो नेपुंडरीकाक्षमोक्षद युष्मच्छरणमापन्नंत्राहिमांपुरुषोत्तम ततोदिगंबरःपंचपदान्युदङ्मुखो गच्छेत् विविदिषुश्चेत्तस्मैआचार्योनत्वाकाषायकौपीनाच्छादनेदत्वादंडंदद्यात् सचकौपी नंवासश्चपरिधायॐइंद्रस्यवज्रोसिसखेमांगोपायेतिदंडंगृण्हीयात् वार्त्रघ्नःशर्ममेभवयत्पापंत न्निवारय प्रणवेनगायत्र्यावाकमंडलुं इदंविष्णुरित्यासनं ततःसमित्पाणिर्गुरुंनत्वागरुडास नोपविष्टोगुरुंवदेत् त्रायस्वभोजगन्नाथगुरोसंसारवन्हिना दग्धंमांकालदष्टंचत्वामहंशरणा गतः योब्रह्माणंविदधातिपूर्वंयोवैवेदांश्चप्रहिणोतितस्मै तंहदेवमात्मबुद्धिप्रकाशंमुमुक्षुर्वैशरण महंप्रपद्येइतिगुरुमुपस्थाय दक्षिणंजान्वाच्यपादावुपसंगृह्यअधीहिभगवोंब्रह्मेतिवदेत् गुरु रात्मानंब्रह्मरूपंध्यात्वाजलपूर्णशंखंद्वादशप्रणवैरभिमंत्र्यतेनशिष्यमभिषिच्य शन्नोमित्रइति शांतिंपठित्वातच्छिरसिहस्तंदत्वापुरुषसूक्तंजपित्वाशिष्यहृदयेहस्तंकृत्वा ममव्रतेहृदयंतेदधा मीत्यादिमंत्रंजप्त्वादक्षिणकर्णेप्रणवमुपदिश्यतदर्थंचपंचीकरणाद्यवबोध्य प्रज्ञानंब्रह्मअयमा त्माब्रह्मतत्त्वमसि अहंब्रह्मास्मीतिऋग्वेदादिमहावाक्येष्वन्यतमंशिष्यशाखानुसारेणोपदिश्य तदर्थंबोधयेत् ततस्तीर्थाश्रमादिसंप्रदायानुसारेणनामदद्यात् ततःपर्यंकशौचंकारयित्वायोग पट्टंदद्यात् ॥

यानंतर प्रेषोच्चार सांगतों. तो असा—"ॐभूःसंन्यस्तंमया ॐभुवःसंन्यस्तं० ॐस्वः संन्यस्तं० ॐभूर्भुवःस्वःसंन्यस्तंमया" याप्रमाणें त्रिवार मंद, मध्य आणि उच्च अशा स्वरानें ह्मणून "अभयं सर्वभूतेभ्यो मत्तः स्वाहा" या मंत्रानें उदक उदकांत टाकावें. शिखा उपटून यज्ञोपवीत हातीं घेऊन "आपो वै सर्वा देवताः सर्वाभ्यो देवताभ्यो जु-होमि स्वाहा ॐभूः स्वाहा" ह्या मंत्रानें उदकांत उदकासह हवन करून प्रार्थना करावी.

प्रार्थनेचे मंत्र—" त्राहिमांसर्वलोकेश वासुदेवसनातन ॥ संन्यस्तंमेजगद्योने पुंडरीकाक्ष मोक्षद ॥ युष्मच्छरणमापन्नं त्राहिमांपुरुषोत्तम ॥ " तदनंतर दिगंबर ( नग्न ) होत्साता पांच पावलें उत्तराभिमुख जावें; विविदिषु असेल तर त्याकारणें आचार्यानें नमस्कार करून भगवें कौपीन, आच्छादन देऊन दंड द्यावा. नंतर त्यानें कौपीन व वस्त्र परिधान करून, "ॐ" इंद्रस्य वज्रोसि सखेमांगोपाय" ह्या मंत्रानें दंड ग्रहण करावा. नंतर "वार्त्रघ्नः शर्म मे भव यत्पापंतन्निवारय " हा मंत्र ह्मणून प्रणवानें अथवा गायत्रीमंत्रानें कमंडलु घ्यावा. " इदंविष्णु० " या मंत्रानें आसन घ्यावें. तदनंतर समित्पाणि होत्साता गुरूला नमस्कार करून गरुडासनानें उपविष्ट होत्साता गुरुप्रत बोलावें. तें असें—" त्रायस्वभोजगन्नाथ गुरोसंसारवन्हिना ॥ दग्धंमांकालदष्टंच त्वामहंशरणागतः ॥ योब्रह्माणंविदधातिपूर्वं योवैवेदांश्चप्रहिणोतितस्मै ॥ तंहदेवमात्मबुद्धिप्रकाशं मुमुक्षुर्वैशरणमहंप्रपद्ये " या मंत्रानें गुरूची प्रार्थना करून दक्षिणजानु भूमिस्थ करून गुरूचे पाय धरून " अधीहिभगवोब्रह्म" असें बोलावें. गुरूनें आपण ब्रह्मरूप आहों असें ध्यान करून जलानें भरलेल्या शंखाचें बारा प्रणवमंत्रांनीं अभिमंत्रण करून त्या उदकानें शिष्याप्रत अभिषेक करून "शन्नोमित्र०" या मंत्रेंकरून शांतिपठन करून शिष्याच्या मस्तकावर हस्त ठेवून पुरुषसूक्ताचा जप करून त्द्दयावर हस्त ठेवून "मम व्रते हृदयं ते दधामि०" इत्यादि मंत्राचा जप करून उजव्या कानांत प्रणवाचा उपदेश करून प्रणवाचा अर्थ व पंचीकरणादिक हीं बोधित करून " प्रज्ञानं ब्रह्म अयमात्माब्रह्म तत्त्वमसि अहंब्रह्मास्मि" अशीं ऋग्वेदादिक जीं महावाक्यें त्यांतून कोणतेंहि एक शिष्याची जी शाखा असेल तदनुसार उपदेशून त्या वाक्याच्या अर्थाचा बोध करावा. तदनंतर तीर्थाश्रमादि संप्रदायाप्रमाणें नांव ठेवावें. त्यानंतर पर्यंकशौच (शुद्धता ) करवून योगपट्ट द्यावें.

---

अथपर्यंकशौचप्रयोगः कस्मिंश्चित्पुण्यदिनेकश्चिद्गृहस्थःस्वाग्रेपीठादौयतिमुपवेश्यगुर्वनुज्ञातोयतयेपर्यंकशौचंकरिष्येइतिसंकल्प्य वामभागेप्राक्संस्थान्पंचमृद्भागान्दक्षिणभागेपितथैवपंचसंस्थाप्योभयत्रशुद्धोदकंचसंस्थाप्यवामप्रथममृद्भागेनपंचवारंमृज्जलाभ्यांयतिजानुद्वयंकराभ्यांयुगपत्क्षालयेत् चरमक्षालनेमृद्भागसमाप्तिः एवमग्रेपि ततोदक्षिणभागस्थप्रथमभागार्धेनस्ववामकरंमृज्जलाभ्यांदशवारंप्रक्षाल्यापरार्धेनतेनैवजलेनोभौकरौसप्तवारं क्षालयेत् एवमग्रेपियोज्यं संख्यायांविशेषस्तूच्यते वामद्वितीयभागेनचतुर्वारंजंघाद्वयंयुगपत्प्रक्षाल्यदक्षिणद्वितीयभागार्धेनसप्तवारंवामकरमर्धांतरेणचतुर्वारमुभौचकरौक्षालयेत् वामतृतीयेनयतिगुल्फौत्रिवारंदक्षिणभागार्धेनवामकरंषड्वारमुभौचतुर्वारं वामचतुर्थेनयतिपादपृष्ठौद्विवारंदक्षिणार्धेनस्ववामंकरंचतुर्वारभूमौद्विवारमवशिष्टार्धेनवामपंचमेनयतिपादतलेसकृद्दक्षिणपंचमार्धेनवामस्यद्विवारमुभयोश्चापरार्धेनसकृत्क्षालनमिति ॥

## यानंतर पर्यंकशौचप्रयोग सांगतों.

कोणत्याहि पुण्यदिवसीं कोणी एक गृहस्थानें आपल्या अग्रभागीं आसनादिकावर संन्यासी याला बसवून " गुर्वनुज्ञातोयतयेपर्यंकशौचं करिष्ये " असा संकल्प करून वामभागीं प्राक्संस्थ असे पांच मृत्तिकाभाग व दक्षिणभागींहि तसेच पांच मृत्तिकाभाग स्थापन

करून व वामदक्षिणभागीं शुद्ध उदक स्थापन करून डाव्या बाजूच्या प्रथमभागानें पांच वेळ मृत्तिका व उदक यांहींकरून यतीचे दोन जानु दोन हस्तांनीं एककालींच प्रक्षालन करावे. शेवटच्या प्रक्षालनाचे ठायीं मृत्तिकाभागाची समाप्ति करावी. याप्रमाणें पुढेंहि जाणावें. तदनंतर दक्षिणबाजूच्या प्रथमभागांतल्या अर्ध्या मृत्तिकेनें आपला डावा हस्त मृत्तिका व उदक यांहींकरून दहा वेळ प्रक्षालन करून दुसऱ्या अर्ध्या भागानें त्याच उदकेंकरून दोन हस्त सात वेळ प्रक्षालन करावे. याप्रमाणें पुढेंहि योजना करावी. संख्येविषयीं विशेष प्रकार तर सांगतों. डाव्या बाजूच्या दुसऱ्या भागानें चार वेळ दोन जंघा एककालीं प्रक्षालन करून दक्षिणेकडच्या दुसऱ्या अर्ध्या भागानें सात वेळ डावा हस्त प्रक्षालन करून दुसऱ्या अर्ध्या भागानें चार वेळ हस्त प्रक्षालन करावे. डाव्या बाजूच्या तिसऱ्या भागानें यतीचे गुल्फ तीन वेळ प्रक्षालन करून दक्षिणेकडच्या अर्ध्या भागानें, डावा हस्त साहा वेळ आणि दोन हस्त चार वेळ प्रक्षालन करावे. डाव्या बाजूच्या चवथ्या भागानें यतीचें पादपृष्ठ दोन वेळ व दक्षिणेकडच्या अर्धभागानें आपला वामहस्त चार वेळ आणि दोन हस्त दोन वेळ अवशिष्ट अर्ध्या भागानें प्रक्षालन करावे. डाव्या बाजूच्या पांचव्या भागानें यतीचीं पादतलें एक वेळ व उजव्या बाजूच्या पांचव्या अर्ध्या भागानें डाव्या पायाचें दोन वेळ आणि अवशिष्ट अर्ध्या भागानें दोन पायांचें एक वेळ प्रक्षालन करावें.

---

अथयोगपट्टः कारितपर्यंकशौचोयतिःकटिशौचंकृत्वाकटिसूत्रकौपीनेधृत्वावस्त्रेणावगुंठ्य गुर्वनुज्ञयोच्चासनेउपविश्यसभ्यैःसहवेदांतेकिंचिदुपन्यसेत् गुरुर्यतिःशिष्यंयतिंशिरसि शंखेनपुरुषसूक्तेनाभिषिच्यवस्त्रगंधपुष्पधूपदीपनैवेद्यैःसंपूज्यवस्त्रमुपरिधृत्वायतिभिः सहविश्वरूपाध्यायंपश्यामिदेवानित्यारभ्यभुंक्ष्वराज्यंसमृद्धमित्यंतंपठित्वा पूर्वकल्पितंनामदद्यात् ततःशिष्यंवदेत् इतःपरंत्वयासंन्यासाधिकारिणेसंन्यासोदेयोदीक्षायोगपट्टादिकंचकार्यं ज्येष्ठयतयोनमस्कार्याः ततोगुरुःकटिसूत्रंपंचमुद्रालंकृतंपूर्वदंडंचशिष्यायदत्वाशिष्यंयथासंप्रदायंनमस्कुर्यात् अन्येयतयोगृहिणश्चनमस्कुर्युः शिष्योनारायणेत्युक्त्वोच्चासनादुत्थायतत्रगुरुमुपवेश्ययथाविधिनत्वान्ययतीन्नमेत् इतिगृह्याग्निमतोविधुरादेश्चविविदिषासंन्यासप्रयोगः॥

## यानंतर योगपट्ट सांगतों.

पर्यंकशौच करविलेला यति यानें कटीची शुद्धता करून कटिसूत्र, कौपीन हीं धारण करून वस्त्रानें कटि गुंडाळून गुरूच्या आज्ञेनें उंच आसनावर बसून सभ्यांसहवर्तमान वेदांताविषयीं किंचित् उपन्यास करावा. गुरु जो यति त्यानें शिष्य जो यति त्याचे मस्तकावर शंखेंकरून पुरुषसूक्तानें अभिषेक करून वस्त्र, गंध, पुष्प, धूप, दीप, नैवेद्य, या उपचारांनीं पूजा करून वर वस्त्र धरून यतींसहवर्तमान विश्वरूप अध्याय "पश्यामि देवान्" एथपासून "भुंक्ष्वराज्यंसमृद्धम्" एथपर्यंत पठण करून पूर्वी कल्पना केलेलें नांव ठेवावें. नंतर शिष्याप्रत सांगावें; याउपर संन्यासाविषयीं जो अधिकारी त्यास त्वां संन्यासदीक्षा द्यावी, आणि योगपट्टादिक करावें. ज्येष्ठ यतींला नमस्कार करावा. तदनंतर गुरूनें कटिसूत्र व

पंचमुद्रांनीं अलंकृत असा पूर्वीचा दंड शिष्याकारणें देऊन यथासंप्रदाय त्यास नमस्कार करावा. नंतर इतर संन्यासी व गृहस्थाश्रमी यांनीं नमस्कार करावा. शिष्यानें "नारायण" असें ह्मणून उंच आसनावरून उठून त्यावर गुरूला बसवून यथाविधि नमस्कार करून अन्य यतींस नमन करावें. याप्रमाणें गृह्याग्निमान् व विधुरादिक यांचा विविदिषासंन्यासप्रयोग सांगितला.

---

अथाग्निहोत्रिणोविशेषः तत्रश्रौताग्नयोविच्छिन्नाश्चेत्पुनराधानंपावमानेष्ट्यंतंपूर्णाहुत्यंतं वाकृत्वाप्रायश्चित्तादिसावित्रीप्रवेशांतंपूर्ववत्कुर्यात् ॥

## यानंतर अग्निहोत्र्याचा विशेष सांगतों.

त्यामध्यें श्रौताग्नि विच्छिन्न असतील तर पुनराधान पावमानेष्टीपर्यंत, अथवा पूर्णाहुतीपर्यंत करून प्रायश्चित्तादि सावित्रीप्रवेशापर्यंत कर्म पूर्वीप्रमाणें करावें.

---

अथब्रह्मान्वाधानं अग्नित्रयंसमिध्यसंस्कृतमाज्यंस्रुचिचतुर्वारंगृहीत्वाहवनीयेपूर्णाहुतिं ॐस्वाहापरमात्मनइदमितिकुर्यात् सायंसंध्याग्निहोत्रहोमांतेउत्तरेणगार्हपत्यंद्वंद्वशःपात्राण्यासाद्याहवनीयदक्षिणतःकौपीनदंडाद्यासादयेत् रात्रिजागरांतेप्रातर्होमादिकृत्वापौर्णमास्यांब्रह्मान्वाधानंचेत्पौर्णमासेष्टिंकृत्वादर्शेष्टिमपिपक्षहोमापकर्षपूर्वकमपकृष्यतदैवकुर्यात् दर्शेचेद्दर्शेष्टिरेव ॥

यानंतर ब्रह्मान्वाधान सांगतों.—तीन अग्नि प्रदीप्त करून संस्कार केलेलें आज्य स्रुचिपात्रांत चार वेळ घेऊन आहवनीय अग्नीमध्यें "ॐस्वाहा परमात्मन इदं०" असें ह्मणून पूर्णाहुति करावी. सायंसंध्या व अग्निहोत्रहोम हीं झाल्यानंतर गार्हपत्य अग्नीच्या उत्तरप्रदेशीं दोन दोन पात्रें मांडून आहवनीय अग्नीच्या दक्षिणप्रदेशीं कौपीन, दंड इत्यादिक स्थापन करावीं. रात्रीं जागरण केल्यानंतर प्रातःकालीं होमादिक करून पौर्णिमेचे ठायीं ब्रह्मान्वाधान केलें असेल तर पौर्णमासेष्टि करून दर्शेष्टिहि, पक्षहोमापकर्षपूर्वक अपकर्ष करून त्या कालींच करावी. दर्शाचे ठायीं ( ब्रह्मान्वाधान ) असेल तर दर्शेष्टिच करावी.

---

अथपूर्णमास्यांदर्शेवादेशकालौस्मृत्वा संन्यासपूर्वांगभूतयाप्राजापत्येष्ट्यावैश्वानर्येष्ट्याच समानतंत्रयायक्ष्ये इतिसंकल्प्यसमुच्चयेनेष्टिद्वयं अत्रवैश्वानरोद्वादशकपालःपुरोडाशःप्राजापत्यश्चरुर्वैष्णवोनवकपालःपुरोडाशः अथवाकेवलप्राजापत्येष्टिः अत्रप्रयोगःस्वस्वसूत्रानुसारेणोह्यः बौधायनसूत्रानुसारेणकिंचिदुच्यते पवनपावमपुण्याहवाचनादिपूर्वांगांतेकेवलवैश्वानरेष्ट्याःकेवलप्राजापत्यावासंकल्पःव्रीहिमयःपुरोडाशोद्रव्यं पंचप्रयाजाः अग्निर्वैश्वानरः प्रजापतिर्वादेवता पंचदशसामिधेन्यः व्रतग्रहणांतेध्वर्युराज्यंसंस्कृत्यस्रुचिचतुर्गृहीतंगृहीत्वा पृथिवीहोतेत्यादिचतुर्होतृहोमंकूष्मांडहोमसारस्वतहोमौचकृत्वानिर्वापादिः वैश्वानरोद्वादशकपालःपुरोडाशःप्राजापत्यश्चरुः वैश्वानरायप्रतिवेदयामइतिपुरोनुवाक्यावैश्वानरःपवमानःपवित्रैरितियाज्या प्राजापत्यायांप्रधानमुपांशुधर्मकं सुभूःस्वयंभूरित्याद्यनुवाक्याः प्रजापतेनत्वदेतामितियाज्या अथस्रुवेणाष्टावुपहोमावुभयत्र वैश्वानरोनऊतयआप्रयातुपरावतः अग्निरुक्थेनवाहसास्वाहा वैश्वानरायेदमितित्यागः सर्वत्र ऋतावानंवैश्वानरमृतस्यज्योतिषस्पतिं

अजस्रंघर्ममीमहेस्वाहा २ वैश्वानरस्यदस० ३ पृष्टोदिविपृष्टोअग्निः० ४ जातोयदग्ने० ५ त्वमग्नेशोचिषा० ६ अस्माकमग्ने० ७ वैश्वानरस्यसुमतौ० ८ अथैनमुपतिष्ठेतसहस्रशीर्षेतिसूक्तेन ततःस्विष्टकृदादिशेषंसमापयेत् सर्वोवैरुद्रः विश्वंभूतमितिद्वाभ्यामग्न्युत्सर्गः आयुर्दाअग्नेइतिमंत्रेणदर्भस्तंबस्थयजमानभागात्किंचिदादाय सहस्रशीर्षेत्यनुवाकेनप्राश्य ओमितिब्रह्म ओमितीदंसर्वमित्यनुवाकेनहुतशेषमाहवनीयेप्रक्षिपेत् एवंवैश्वानर्याद्यन्यतरामिष्टिंकृत्वौपासनाग्नौसर्वाधानेदक्षिणाग्नौप्राणादिहोमादिविरजाहोमांतंकार्यं अन्यत्प्राग्वत् आहवनीयेअरणीमुसलोलूखलातिरिक्तदारुपात्राणांदाहः ततआत्मन्याहवनीयाग्निसमारोपःपूर्ववत् अरणीद्वयंगार्हपत्येप्रक्षिप्यतत्समारोपंकृत्वादक्षिणाग्नौमुसलोलूखलेहुत्वादक्षिणाग्नेरपि समारोपः ततऔपासनाग्नेःसमारोपः इतिक्रमः अत्रविशेषोन्यत्रज्ञातव्यः इतिसाग्निकप्रयोगः स्नातकं प्रतिग्रह्मान्वाधानविरजाहोमादिरहितोवाप्रयोगोऽग्न्यभावात् ॥

यानंतर पौर्णिमेच्या दिवशीं अथवा दर्शाचे दिवशीं देशकालांचें स्मरण करून "संन्यासपूर्वांगभूतयाप्राजापत्येष्ट्यावैश्वानर्येष्ट्याचसमानतंत्रयायक्ष्ये," असा संकल्प करून समुच्चयेंकरून दोन इष्टि कराव्या. ह्या स्थलीं वैश्वानराच्या उद्देशानें द्वादशकपाल पुरोडाश करावा. प्राजापत्य चरु, विष्णुदेवत्माक नवकपाल पुरोडाश करावा. अथवा केवल प्राजापत्येष्टि करावी. याविषयीं प्रयोग आपापल्या सूत्रानुसार जाणावा. बौधायनसूत्राच्या अनुसारेंकरून किंचित् सांगतों.—पवन, पावन, पुण्याहवाचन इत्यादि पूर्वांग झाल्यानंतर केवल वैश्वानरेष्टीचा अथवा केवल प्राजापत्येष्टीचा संकल्प करावा. व्रीहिमय पुरोडाश हें द्रव्य, पांच प्रयाज, अग्निवैश्वानर अथवा प्रजापति देवता, पंधरा सामिधेनी. व्रतग्रहणानंतर अध्वर्यूनें आज्यसंस्कार करून स्रुचिपात्रांत चार वेळ घेतलेलें तूप घेऊन "पृथिवीहोता" इत्यादि चतुर्होतृहोम, कूष्मांडहोम आणि सारस्वतहोम हे करून निर्वापादिक करावा. वैश्वानर द्वादशकपाल पुरोडाश, प्राजापत्य चरु, "वैश्वानरायप्रतिवेदयाम०" ही पुरोनुवाक्या, "वैश्वानरः पवमानः पवित्रैः०" ही याज्या. प्राजापत्यइष्टीमध्यें प्रधान कर्म उपांशुधर्मक ( हळू उच्चार ), "सुभूःस्वयंभूः" इत्यादि अनुवाक्या जाणाव्या. "प्रजापतेनत्वदेतां०" ही याज्या. यानंतर स्रुवापात्रेंकरून आठ उपहोम दोहों ठिकाणीं करावे. त्यांचे मंत्र.—"वैश्वानरोनऊतयआप्रयातुपरावतः अग्निरुकथेनवाहसास्वाहा वैश्वानरायेदं०" असा सर्वत्र त्याग ह्मणावा. "ऋतावानंवैश्वानरमृतस्यज्योतिषस्पतिं ॥ अजस्रंघर्ममीमहेस्वाहा २ वैश्वानरस्यदस० ३ पृष्टोदिविपृष्टोअग्निः० ४ जातोयदग्ने० ५ त्वमग्नेशोचिषा० ६ अस्माकमग्ने० ७ वैश्वानरस्यसुमतौ० ८" यानंतर "सहस्रशीर्षा०" या सूक्तेंकरून देवतेचें उपस्थान ( प्रार्थना ) करावें. नंतर स्विष्टकृदादि होमशेषाची समाप्ति करावी. तदनंतर "सर्वोवैरुद्रः० विश्वंभूतं०" ह्या दोन मंत्रांनीं अग्नीचा उत्सर्ग करावा. "आयुर्दा अग्ने०" या मंत्रेंकरून, दर्भाच्या स्तंबावर ठेवलेला जो यजमानाचा भाग त्यापासून किंचित् घेऊन "सहस्रशीर्षा०" ह्या अनुवाकेंकरून प्राशन करून "ओमितिब्रह्मओमितीदंसर्वं" ह्या अनुवाकेंकरून हुतशेष ( होम करून शेष राहिलेलें द्रव्य ) आहवनीयअग्नीमध्यें टाकावें. याप्रमाणें वैश्वानर इत्यादि दोन इष्टींतून एक इष्टि करून औपासनाग्नीमध्यें, सर्वाधानपक्ष असेल तर दक्षिणाग्नीमध्यें प्राणादिहोमापासून विरजाहोमापर्यंत

कर्म करावें. इतर पूर्वीप्रमाणें जाणावें. अरणी, मुसळ, उलूखल ( उखळ ), यांवांचून अन्य काष्ठपात्रें आहवनीय अग्नीमध्यें दहन करावीं. तदनंतर आपले ठिकाणीं आहवनीय अग्नीचा समारोप पूर्वीप्रमाणें करावा. दोन अरणी गार्हपत्यामध्यें टाकून त्या गार्हपत्याचा समारोप करून दक्षिणाग्नीमध्यें मुसळ, उलूखल यांचें हवन करून दक्षिणाग्नीचाहि समारोप करावा. तदनंतर औपासनाग्नीचा समारोप असा क्रम जाणावा. याविषयीं विशेष प्रकार ग्रंथांतरीं पहावा. याप्रमाणें साग्निकाविषयीं प्रयोग सांगितला. स्नातकाविषयीं ब्रह्मान्वाधान व विराजा-होमादिक याहीं रहितच प्रयोग जाणावा; कारण, त्यास अग्नि नाहीं.

---

**अथातुरसंन्यासः आतुरसंन्यासेसंकल्पप्रैषोच्चाराभयदानेतित्रयंप्रधानमवश्यकंकार्यं अष्टश्राद्धादिदंडग्रहणांतमंगभूतंयथासंभवंकार्यं ॥**

## यानंतर आतुरसंन्यास सांगतों.

आतुरसंन्यासाविषयीं संकल्प, प्रैषोच्चार, आणि अभयदान हीं तीन प्रधानकर्मे अवश्य करावीं, व अष्टश्राद्धांपासून दंडग्रहणापर्यंत अंगभूत कर्म यथासंभव करावें.

---

**तत्प्रयोगः मंत्रस्नानंकृत्वाशुद्धवस्त्रंधृत्वाज्ञानप्राप्तिद्वारामोक्षसिद्ध्यर्थमातुरविधिनासंन्यासमहंकरिष्ये पंचकेशानवशेष्यवपनंकृत्वास्नात्वासंध्याद्यौपासनहोमांतंयथासंभवंसंपाद्यात्मनिसमारोपंकुर्यात् अग्निहोत्रीतुप्राजापत्यादिस्थानेपूर्णाहुतिंकृत्वाश्रौताग्निमात्मनिसमारोपयेत् उच्छिन्नाग्नीनांपुनराधानसंभवेसमारोपोन्यथातुनसमारोपः विधुरादीनामग्न्यभावादेवसमारोपोनावश्यकः ततस्तोयमादायाप्सुजुहोति एषहवाअग्नेर्योनिर्यःप्राणःप्राणंगच्छस्वाहा १ आपोवैसर्वादेवताःसर्वाभ्योदेवताभ्योजुहोमिस्वाहा २ भूःस्वाहेतिजलेजलैर्हुत्वाहुतशेषंजलमाशुःशिशानइत्यनुवाकेनाभिमंत्र्य पुत्रेषणावित्तेषणालोकेषणामयात्यक्ताःस्वाहेतिकिंचित्पिबेत् अभयंसर्वभूतेभ्योमत्तःस्वाहेतिद्वितीयंपिबेत् संन्यस्तंमयेतिनिःशेषंतृतीयं ततःपूर्ववत्सावित्रीप्रवेशः ततःप्राङ्मुखऊर्ध्वबाहुःप्रैषोच्चारंपूर्ववत्कुर्यात् अभयंसर्वभूतेभ्योमत्तःस्वाहेतिप्राच्यांजलंक्षिपेत् शिखामुत्पाट्ययज्ञोपवीतंछित्वाभूःस्वाहेत्यप्सुहुत्वापुत्रगृहेनतिष्ठेत् अत्यंतमातुरश्चेत्प्रैषमात्रंवावदेत् जीवतिचेत्स्वस्थःसन्महावाक्योपदेशदंडग्रहणादि सर्वंकुर्यात् एवमातुरविधिनासंन्यासेमृतस्ययतिवत्संस्कारः ॥**

त्याचा प्रयोग.—मंत्रस्नान करून शुद्ध वस्त्र परिधान करून "**ज्ञानप्राप्तिद्वारा मोक्षसिद्ध्यर्थमातुरविधिनासंन्यासमहं करिष्ये.**" पांच केश अवशेष ठेवून वपन करून स्नानसंध्यादि औपासनहोमापर्यंत यथासंभव कर्म करून आपले ठायीं समारोप करावा. अग्निहोत्री असेल तर त्यानें प्राजापत्यादि स्थानीं पूर्णाहुति करून आपले ठायीं श्रौताग्नीचा समारोप करावा. उच्छिन्न झालेल्या अग्नींचा समारोप पुनराधानाचा संभव असतां करावा. तसें नसेल तर समारोप करूं नये. विधुर इत्यादिकांस अग्नि नसल्यामुळेंच समारोप आवश्यक नाहीं. तदनंतर उदक घेऊन उदकामध्यें हवन करावें. त्याचे मंत्र—"**एषहवाअग्नेर्योनिर्यःप्राणः प्राणंगच्छस्वाहा १ आपोवैसर्वादेवताः सर्वाभ्यो जुहोमिस्वाहा २ भूःस्वाहा**" या-

प्रमाणें जलामध्यें जलानें हवन करून हुतशेष जल " आशु:शिशान० " या अनुवाकानें अभिमंत्रण करून " पुत्रेषणावित्तेषणा लोकेषणामयात्यक्ता:स्वाहा " या मंत्रानें थोडें उदक प्राशन करावें. " अभयं सर्वभूतेभ्यो मत्त:स्वाहा " या मंत्रानें दुसऱ्या वेळीं प्राशन करावें. " संन्यस्तं मया " ह्या मंत्रानें तिसऱ्या वेळीं सर्व प्राशन करावें. तदनंतर पूर्वीप्रमाणें सावित्रीप्रवेश करावा. नंतर पूर्वाभिमुख ऊर्ध्वबाहु होत्साता पूर्वीप्रमाणें प्रेषोच्चार करावा. " अभयं सर्वभूतेभ्यो मत्त:स्वाहा " या मंत्रानें पूर्वदिशेस उदक टाकावें. शिखा उपटून, यज्ञोपवीत तोडून " भू:स्वाहा " या मंत्रानें उदकांत आहुति द्यावी. पुत्राचे घरीं राहूं नये. अथवा अत्यंत आतुर असेल तर प्रेषमात्र उच्चार करावा. वांचेल तर स्वस्थ होत्साता महावाक्यांचा उपदेश, दंडग्रहण इत्यादि सर्व विधि करावा. याप्रमाणें आतुरविधीनें जो संन्यास त्यांत मृत झालेल्याचा यतीसारखा संस्कार करावा.

---

अथमृतयतिसंस्कार: पुत्र:शिष्योवास्नात्वावपनंकृच्छ्रत्रयंचाधिकारार्थंकुर्यात् पुत्रातिरिक्तस्यपवनंकृताकृतं देशकालौस्मृत्वाब्रह्मीभूतस्ययते:शौनकोक्तविधिनासंस्कारंकरिष्ये नवंकलशंतीर्थेनापूर्य गंगेचयमुने० नारायण:परंब्रह्म० यच्चकिंचिज्जगत्सर्वं० इतिमंत्रैरभिमंत्र्य रुद्रसूक्तविष्णुसूक्तापोहिष्ठादिभिर्यते:स्नानंविधाय चंदनादिभि:कलेवरंसंपूज्यमाल्यादिभिरलंकृत्यवाद्यघोषादिभि:शुद्धदेशंनयेत् जलेस्थलेवासमाहितंकुर्यात् स्थलपक्षेगर्तंव्याहृतिप्रोक्षितभुविदंडप्रमाणंकृत्वा मध्येसूक्ष्मगर्तंसार्धहस्तंकृत्वा सप्तव्याहृतिभि: पंचगव्येन त्रि:प्रोक्ष्य जलपक्षेनद्यांपंचगव्यंप्रक्षिप्यकुशानास्तीर्यसावित्र्यादेहंप्रोक्ष्य शंखोदकेनपुरुषसूक्तेनाष्टोत्तरशतावृत्तप्रणवैश्चसंस्नाप्याष्टाक्षरेणषोडशोपचारै:संपूज्य तुलसीमालाद्यैरलंकृत्यविष्णोहव्यंरक्षस्वेतिदेहंगर्तेनद्यांवाक्षिपेत् इदंविष्णुरितिदंडंत्रेधाभग्नंदक्षिणहस्तेस्थापयेत् हंस:शुचिषदितिपरेणनाकंनिहितंगुहायांविभ्राजदेतद्यतयोविशंति वेदांतविज्ञानसुनिश्चितार्था:संन्यासयोगाद्यतय:शुद्धसत्वा: इतिहृदयेजपेत् पुरुषसूक्तंभ्रुवोर्मध्येजपेत् ब्रह्मजज्ञानमितिमूर्धनि मूर्धानंभूर्भुव:स्वश्चेत्युक्त्वाशंखेनभेदयेत् अथवा भूमिर्भूमिमगान्मातामातरमप्यगात् भूयास्मपुत्रै:पशुभिर्योनोद्वेष्टिसभिद्यतामितिमंत्रेणपरश्वादिनाभेदयेत् शिरोभेत्तुमशक्त: शिरस्थापितंगुडपिंडादिकंभिद्यात् गर्तंपुरुषसूक्तेनलवणेनप्रपूरयेत् सृगालश्वादिरक्षार्थंसिकतादिभि: प्रपूरयेत् नद्यादौशिरोभेदनोत्तरंदर्भैराच्छाद्यव्याहृतिभिरभिमंत्र्यपाषाणंबध्वा ॐस्वाहेति ह्रदेन्यसेत् ततोग्निनाग्नि:स० त्वंह्यग्नेअग्निना० तंमर्जयंतसुक्रतुं० यज्ञेनयज्ञं० इत्यृक्चतुष्टयेनचित्ति:स्रुगित्यादिभिर्दशहोत्रादिसंज्ञकयजुर्मंत्रैश्चाभिमंत्रयेत् अतोदेवाइतिजपित्वापापैर्मुक्ताअश्वमेधादिफलभागिनोवयमितिभावयंतोवभृथबुद्ध्या सर्वेनुगामिन:स्नात्वा गंधादिधृत्वासोत्सवागृहंगच्छेयु: अत्रपरमहंसस्यस्थलेसमाधिर्मुख्य: जलेमध्यम: कुटीचकंतुप्रदहेत्पूरयेद्वबहूदकं हंसोजलेतुनिक्षेप्य:परमहंसंप्रपूरयेदितिवचनात् अत्रपरमहंसंप्रकीरयेदिति क्वचित्पाठ: एकोद्दिष्टंजलंपिंडमाशौचंप्रेतसत्क्रियां नकुर्याद्वार्षिकादन्यद्ब्रह्मीभूतायभिक्षवे कुटीचकातिरेकेणनदहेद्यतिनंक्वचित् ॥

# यानंतर मृतयतीचा संस्कार सांगतों.

पुत्र अथवा शिष्य यानें स्नान करून वपन व अधिकारार्थ तीन कृच्छ्र प्रायश्चित्त करावें. पुत्रभिन्नास वपन कृताकृत आहे. देशकालांचें स्मरण करून "ब्रह्मीभूतस्ययतेः शौनकोक्तविधिना संस्कारं करिष्ये." नूतन कलश तीर्थानें भरून "गंगेचयमुने०, नारायणःपरंब्रह्म०, यच्चकिंचिज्जगत्सर्वं०" या मंत्रांनीं अभिमंत्रण करून रुद्रसूक्त, विष्णुसूक्त व "आपोहिष्ठादि" ऋचा यांहींकरून यतीस स्नान घालून चंदनादि उपचारांनीं कलेवराची पूजा करून माला इत्यादिकांनीं अलंकृत करून वाद्यघोषादिकांनीं शुद्ध देशाप्रत न्यावें. नंतर जलामध्यें किंवा स्थलामध्यें स्थापित करावें. स्थलपक्षीं खाडा करणें तो व्याहृतिमंत्रानें भूमिप्रोक्षण करून तेथें दंडप्रमाण खाडा करून त्या खाड्याचे मध्यभागीं लहान, दीड हात खाडा करून सात व्याहृतिमंत्रांनीं पंचगव्येंकरून तीन वेळ प्रोक्षण करून जलपक्षीं नदींत पंचगव्य टाकून कुशविस्तृत करून सावित्रीमंत्रानें देह प्रोक्षण करून शंखोदकानें पुरुषसूक्त व अष्टोत्तरशत प्रणवमंत्र यांहींकरून स्नान घालून अष्टाक्षरमंत्रानें षोडशोपचारांनीं पूजा करून तुलसीमाला इत्यादिकांनीं अलंकृत करून "विष्णो हव्यं रक्षस्व" या मंत्रानें देह खाड्यांत अथवा नदींत प्रक्षेपित करावा. "इदंविष्णु०" या मंत्रानें तीन ठिकाणीं मोडलेला दंड उजव्या हस्तावर ठेवावा. "हंसःशुचिषत्०" व "परेणनाकंनिहितंगुहायांविभ्राजदेतद्यतयोविशंति ॥ वेदांतविज्ञानसुनिश्चितार्थाःसंन्यासयोगाद्यतयःशुद्धसत्वाः" हे मंत्र हृदयाचे ठायीं जपावे. भ्रुकुटीच्या मध्यभागीं पुरुषसूक्ताचा जप करावा. "ब्रह्मजज्ञानं०" या मंत्राचा जप मस्तकाचे ठायीं करावा. "भूर्भुवःस्वाहा" हा मंत्र ह्मणून शंखानें मस्तक फोडावें. अथवा भूमिर्भूमिमगान्मातामातरमप्यगात् ॥ भूयास्मपुत्रैःपशुभिर्योनोद्वेष्टिसभिद्यताम्" या मंत्रेंकरून परशु इत्यादिकानें मस्तक फोडावें. मस्तक फोडण्याविषयीं असमर्थ असेल तर मस्तकावर गुळाची ढेप इत्यादिक ठेवून ती फोडावी. "पुरुषसूक्त ह्मणून लवणानें खाडा भरावा." कोल्हे, कुत्रे इत्यादिकांपासून रक्षण होण्याकरितां वाळू इत्यादिकेंकरून खाडा भरावा. नदी इत्यादिकांत देह ठेवणें तर मस्तकाचा भेद केल्यानंतर दर्भानीं आच्छादन करून व्याहृतिमंत्रांनीं अभिमंत्रण करून पाषाण बांधून "ॐस्वाहा" या मंत्रानें डोहांत स्थापना करावी. तदनंतर "अग्निनाग्निःस० त्वंह्यग्नेअग्निना० तंमर्जयंतसुक्रतुं० यज्ञेनयज्ञं०" ह्या चार ऋचांनीं व "चित्तिःस्रुक्०" इत्यादिक दशहोत्रादिसंज्ञक यजुर्मंत्रांनीं अभिमंत्रण करावें. "अतोदेवा०" या मंत्राचा जप करून 'पापांपासून मुक्त व अश्वमेधादि फलभागी आह्मीं झालों' असी भावना करीत होत्साते सर्व पाठीमागून जाणाऱ्यांनीं अवभृथबुद्धीनें स्नान करून गंधादिक धारण करून उत्सवयुक्त होत्साते घरीं जावें. या स्थलीं परमहंसाचा समाधि, स्थलामध्यें मुख्य होय; जलामध्यें मध्यम; कारण, "कुटीचकाचें दहन करावें; बहूदकास पुरावें; हंसास उदकामध्यें समाधि; आणि परमहंसाचें स्थलामध्यें प्रपूरण करावें;" असें वचन आहे. ह्या वचनांत 'प्रपूरयेत्' ह्या स्थानीं 'प्रकीरयेत्' असा क्वचित् पाठ आहे. "ब्रह्मीभूत जो भिक्षु त्याकारणें वार्षिकश्राद्धाहून इतर

एकोद्दिष्ट, उदक, पिंड, आशौच, प्रेतक्रिया करूं नये. कुटीचकावांचून अन्य यतीचें कधींहि दहन करूं नये.

---

ततःकर्तास्नात्वाचम्य सिद्धिंगतस्यब्रह्मीभूतभिक्षोस्तृप्त्यर्थंतर्पणंकरिष्येइतिसंकल्प्यसव्येन देवतीर्थेनैवात्मानमंतरात्मानंपरमात्मानमितिचतुश्चतुस्तर्पयित्वा शुक्लपक्षेमृतस्यकेशवादिद्वादशनामभिः कृष्णपक्षेमृतस्यसंकर्षणादिद्वादशनामभिःकेशवंतर्पयामीत्येवंद्वितीयांतैःकुर्यात् इदंक्षीरेणेतिकेचित् ततःसिद्धिंगतस्यभिक्षोस्तृप्त्यर्थंनारायणपूजनंबलिंदानंघृतदीपदानंचकरिष्येइतिसंकल्प्य देवयजनोपरितीरेवामृन्मयलिंगंकृत्वापुरुषसूक्तेनाष्टाक्षरेणचषोडशोपचारपूजांकृत्वाघृतमिश्रपायसबलिंदत्वा घृतदीपंचसमर्प्यपायसबलिंजलेक्षिपेत् ततःॐनमोब्रह्मणेनमइतिशंखेनाष्टार्घ्यान्दत्वागृहंव्रजेदितिप्रथमदिनकृत्यं एवंदशदिनांतंप्रत्यहंतर्पणंलिंगपूजनंपायसबलिदीपदानानिकुर्यात् ॥

तदनंतर कर्त्यानें स्नान करून आचमन करून “ सिद्धिंगतस्य ब्रह्मीभूतभिक्षोस्तृप्त्यर्थं तर्पणं करिष्ये ” असा संकल्प करून सव्यानें देवतीर्थेंकरूनच “ आत्मानमंतरात्मानंपरमात्मानं ” असें वाक्य ह्मणून चार चार वेळ तर्पण करून शुक्लपक्षामध्यें मृत झालेल्याचें केशवादि द्वादश नामांनीं व कृष्णपक्षांत मृत झालेल्याचें संकर्षणादि द्वादशनामांनीं “ केशवं त० ” असें द्वितीयाविभक्त्यंतेंकरून तर्पण करावें. हें तर्पण दुग्धानें करावें असें कोणी ह्मणतात. तदनंतर “ सिद्धिंगतस्य भिक्षोस्तृप्त्यर्थं नारायणपूजनं बलिदानं घृतदीपदानं च करिष्ये ” असा संकल्प करून देवयज्ञभूमीवर अथवा तीरावर मृन्मयलिंग करून पुरुषसूक्तानें व अष्टाक्षरमंत्रानें षोडशोपचारपूजा करून घृतमिश्र पायसाचा बलि देऊन घृतदीप समर्पण करून पायसाचा बलि उदकांत टाकावा. तदनंतर “ ओंनमोब्रह्मणेनमः० ” या मंत्रानें शंखानें आठ अर्घ्यें देऊन गृहाप्रत जावें. याप्रमाणें पहिल्या दिवसाचें कृत्य सांगितलें. याप्रमाणें दहा दिवसपर्यंत प्रत्यहीं तर्पण, लिंगपूजन, पायसबलि आणि दीपदान हीं करावीं.

---

अथैकादशेहनिपार्वणश्राद्धं तत्रमध्यान्हेनद्यादौश्राद्धांगतिलतर्पणंकृत्वादेशकालौस्मृत्वा प्राचीनावीती अमुकगोत्रस्यामुकशर्मणोब्रह्मीभूतस्यास्मत्पितुःकरिष्यमाणदर्शादिसर्वश्राद्धाधिकारार्थमाद्यपार्वणश्राद्धंकरिष्येइतिपुत्रादिःसंकल्पयेत् शिष्यस्तुब्रह्मीभूतगुरोः प्रत्यब्दादिश्राद्धाधिकारार्थंतत्पितृसंबंधिनामगोत्रोद्देश्यतासिद्ध्यर्थंचपार्वणश्राद्धमितिसंकल्पयेत् अन्यत्समानं पुरूरवार्द्रवसंज्ञकाविश्वेदेवाःपितृपितामहप्रपितामहानांनामगोत्रादिसहितानामुच्चारः सर्वत्रपितुर्ब्रह्मीभूतइतिविशेषणमात्रमधिकं शेषंप्रत्यब्दश्राद्धवत् केचिच्छिष्यःकर्ताचेदात्मांतरात्मपरमात्मनउद्दिश्य साधुरुरुसंज्ञकदेवयुतंसव्येनदेवधर्मेकंनांदीश्राद्धवदेकादशाहेपार्वणश्राद्धंकुर्यादित्याहुः अत्रसर्वत्रविस्तरस्तोरोक्तसंन्यासपद्धतौद्रष्टव्यः ॥

यानंतर अकरावे दिवसीं पार्वणश्राद्ध करावें.—त्या दिवसीं मध्यान्हकालीं नद्यादिकीं श्राद्धांगतिलतर्पण करून देशकालांचें स्मरण करून प्राचीनावीती होत्साता “ अमुकगोत्रस्यामुकशर्मणो ब्रह्मीभूतस्यास्मत्पितुः करिष्यमाणदर्शादिसर्वश्राद्धाधिकारार्थमाद्यपार्वणश्राद्धं

करिष्ये " याप्रमाणें पुत्रादिकानें संकल्प करावा. श्राद्धकर्ता शिष्य असेल तर त्यानें " ब्रह्मीभूतगुरोः प्रत्यब्दादिश्राद्धाधिकारार्थं तत्पितृसंबंधिनामगोत्रोद्देश्यतासिद्ध्यर्थं च पार्वणश्राद्धम्० " असा संकल्प करावा. इतर सर्व सारखेंच. पुरूरवार्द्रवसंज्ञक विश्वेदेव ध्यावे. नामगोत्रादिसहित पिता, पितामह, प्रपितामह यांचा उच्चार करावा. सर्वत्र ठिकाणीं पित्यास 'ब्रह्मीभूत' असें विशेषण मात्र अधिक योजावें. शेष कर्म प्रतिसांवत्सरिक श्राद्धाप्रमाणें जाणावें. कोणी ग्रंथकार, शिष्य कर्ता असेल तर, आत्मा, अंतरात्मा आणि परमात्मा यांच्या उद्देशेंकरून साधुरुरुसंज्ञक देवयुक्त असें सव्येंकरून देवधर्मक ( देवधर्मयुक्त ) नांदीश्राद्धाप्रमाणें, अकराव्या दिवसीं पार्वणश्राद्ध करावें असें ह्मणतात. या श्राद्धाविषयीं सर्वत्र ठिकाणीं विस्तार तोरोक्त संन्यासपद्धति ग्रंथांत पाहावा.

---

अथद्वादशाहेनारायणबलिः देशादिस्मृत्वासिद्धिंगतस्यभिक्षोःसंभावितसर्वपापक्षयपूर्वकं विष्णुलोकावाप्तिद्वाराश्रीनारायणप्रीत्यर्थंनारायणबलिंकरिष्ये इतिसंकल्प्यत्रयोदशयतीन्विप्रान्वानिमंत्र्यशुक्लपक्षेकेशवरूपिगुर्वर्थेत्वयाक्षणःकर्तव्यइत्येवं दामोदरांतकेशवादिद्वादशनामभिःक्षणोदेयः कृष्णेतुसंकर्षणादिद्वादशनामभिः त्रयोदशंविप्रंविष्ण्वर्थेत्वयाक्षणःकर्तव्य इतिनिर्मंत्र्यपादान्प्रक्षाल्यप्राङ्मुखानुपवेशयेत् विप्राग्रेस्थंडिलेग्निप्रतिष्ठापनादि अन्वाधानेच क्षुष्याज्येनेत्यंतेग्निंवायुंसूर्यंप्रजापतिंचव्यस्तसमस्तव्याहृतिभिरेकैकपायसाहुत्या विष्णुमतोदेवाइतिषड्भिः प्रत्यृचमेकैकपायसाहुत्यानारायणंपुरुषसूक्तेनप्रत्यृचमेकैकपायसाहुत्याशुक्ले केशवादिद्वादशदेवताः कृष्णेसंकर्षणादिद्वादशदेवताः एकैकपायसाहुत्याशेषेणेत्यादिद्विपंचाशदधिकशतमुष्टीन्निरूप्यबलिपर्याप्ततंडुलानोप्याष्टत्रिंशदाहुतिपर्याप्तं पुरुषाहारमितविष्णुनैवेद्यपर्याप्तंचक्षीरेश्रपयित्वाज्यभागांतेग्निपूर्वतः शालग्रामेविष्णुंसूक्तेनाष्टाक्षरेणचषोडशोपचारैःसंपूज्य स्रुचाहस्तेनवान्वाधानानुसारेणहोमत्यागौविदध्यात् एवंशुक्लकृष्णभेदेनकेशवादिद्वादशांताः संकर्षणाद्यंतावाष्टत्रिंशदाहुतीर्हुत्वास्विष्टकृदादिशेषंसमाप्यपुनः शालग्रामंसंपूज्यविष्णुगायत्र्याविष्णवेर्घ्यंदत्वाहुतशेषपायसेनविष्णवेबलिंदत्वा निमंत्रितत्रयोदशविप्रान्केशवादिक्रमेणकेशवरूपिगुरवेनमइदमासनमित्यादिनासनगंधपुष्पधूपदीपाच्छादनानिदत्वा त्रयोदशेविप्रेपुरुषसूक्तेनप्रत्यृचांते विष्णवेनमइत्येवमादिनाविष्णुंदीपांतोपचारैःपूजयेत्चतुरस्रमंडलेषुत्रयोदशभोजनपात्राण्यासाद्योपस्तीर्यान्नंपरिषिच्यपृथिवीतेपात्रमित्यादिनाकेशवादिद्वादशोद्देशेनविष्णूद्देशेनचान्नंत्यक्त्वाअतोदेवा० ॐतद्ब्रह्म ॐतद्वायुर्ब्रह्मार्पणमित्याद्यापोशनादिप्राणाहुत्यंतेनारायणाद्युपनिषद्भागान्पठेत् तृप्तिप्रश्नांतेआचांतेषुप्रागग्रान्दर्भानास्तीर्याष्टाक्षरेणाक्षतोदकंदत्वाकेशवरूपिणेगुरवेऽयंपिंडःस्वाहाममम इत्येवंद्वादशपिंडान्दद्यात् कृष्णेतुसंकर्षणादिनामभिरितिसर्वत्र पिंडेषुविष्णुंसंपूज्यपुरुषसूक्तेनस्तुत्वाविसर्जयेत् विप्रेभ्यस्तांबूलदक्षिणादिदत्वात्रयोदशायविप्रायनाभ्याआसीदित्यादृक्त्रयेणफलतांबूलदक्षिणांदत्वानमस्कृत्यतांशालग्राममूर्तिमाचार्यायदद्यात् इतिनारायणबलिविधिः ॥

यानंतर बाराव्या दिवसीं नारायणबलि सांगतों.—देशकालांचें स्मरण करून " सिद्धिंगतस्य भिक्षोः संभावितसर्वपापक्षयपूर्वकं विष्णुलोकावाप्तिद्वारा श्रीनारायणप्रीत्यर्थं नारा-

यणबलिं करिष्ये" असा संकल्प करून तेरा संन्यासी किंवा ब्राह्मण यांना निमंत्रण करून शुक्लपक्षामध्यें "केशवरूपिगुर्वर्थे त्वया क्षणः कर्तव्यः" याप्रमाणें दामोदर नामपर्यंत केशवादि द्वादशनामेंकरून क्षण द्यावा. कृष्णपक्षामध्यें तर संकर्षणादि द्वादशनामेंकरून क्षण द्यावा. तेराव्या ब्राह्मणास "विष्ण्वर्थे त्वया क्षणः कर्तव्यः" असें निमंत्रण करून पादप्रक्षालन करून ब्राह्मणास पूर्वाभिमुख बसवावें. ब्राह्मणाच्या पुढें स्थंडिलावर अग्निस्थापन इत्यादि करावें. अन्वाधानांत "चक्षुषीआज्येनेत्यंतेग्निं वायुं सूर्यं प्रजापतिं च व्यस्तसमस्तव्याहृतिभिरेकैकपायसाहुत्या विष्णुमतोदेवाइतिषड्भिः प्रत्यृचमेकैकपायसाहुत्या नारायणं पुरुषसूक्तेन प्रत्यृचमेकैकपायसाहुत्या शुक्ले केशवादिद्वादशदेवताः कृष्णेसंकर्षणादिद्वादशदेवताः एकैकपायसाहुत्या शेषेणेत्यादि०" याप्रमाणें अन्वाधान करून एकशेंबावन्न मुष्टि निर्वाप करून ( तांदुळ घेऊन ) बलीची पूर्तता होईल इतके तांदुळ घेऊन अडतीस आहुति होतील इतका व पुरुषाहारपरिमित विष्णुनैवेद्य पर्याप्त होईल इतका चरु दुधांत शिजवून आज्यभागांत कर्म झाल्यानंतर अग्नीच्या पूर्वप्रदेशीं शालग्रामावर विष्णूची पुरुषसूक्तानें व अष्टाक्षरमंत्रानें षोडशोपचारांनीं पूजा करून स्रुचीनें अथवा हस्तानें अन्वाधानांत सांगितल्याप्रमाणें होम व त्याग करावे. याप्रमाणें शुक्लकृष्णभेदेंकरून केशवादिक बारा अथवा संकर्षणादिक बारा अशा अडतीस आहुतींनीं होम करून स्विष्टकृदादि होमशेष समाप्त करून पुनः शालग्रामाची पूजा करून विष्णुगायत्रीनें विष्णूकारणें अर्घ्य देऊन होम करून शेष राहिल्या पायसानें विष्णूकारणें बलि द्यावा. निमंत्रण केलेल्या तेरा ब्राह्मणांस केशवादि क्रमेंकरून "केशवरूपीगुरवे नम इदमासनं" इत्यादि वाक्येंकरून आसन, गंध, पुष्प, धूप, दीप, आच्छादन हे उपचार देऊन तेराव्या ब्राह्मणाचे ठायीं पुरुषसूक्ताचे प्रत्येक ऋचेच्या अंतीं "विष्णवे नमः" इत्यादि प्रकारानें दीपपर्यंत उपचारांनीं विष्णूची पूजा करावी. चतुष्कोणमंडलांचे ठायीं तेरा भोजनपात्रें मांडून त्यांस घृत लावून अन्न वाढून "पृथिवीते पात्रं०" इत्यादि वाक्येंकरून केशवादि द्वादश देवतांच्या उद्देशानें व विष्णूच्या उद्देशानें अन्नाचा त्याग करून "अतोदेवा०, ॐतद्ब्रह्म, ॐतद्वायुः, ब्रह्मार्पणं०" इत्यादि वाक्यांनीं आपोशनापासून प्राणाहुतींपर्यंत कर्म झाल्यानंतर नारायणादिक उपनिषद्भाग पठण करावे. तृप्तिप्रश्नापर्यंत कर्म करून ब्राह्मणांचें आचवण झाल्यानंतर पूर्वेस अग्रें होतील असे दर्भ विस्तृत करून अष्टाक्षरमंत्रानें अक्षता, उदक देऊन "केशवरूपिणे गुरवेऽयं पिंडः स्वाहा नमम" याप्रमाणें बारा पिंड द्यावे. कृष्णपक्षांत तर, संकर्षणादि नामेंकरून द्यावे असें सर्वत्र जाणावें. पिंडाचे ठायीं विष्णूची पूजा करून पुरुषसूक्तानें स्तुति करून विसर्जन करावें. ब्राह्मणांकारणें तांबूल, दक्षिणा इत्यादिक देऊन तेराव्या ब्राह्मणास "नाभ्याआसी०" ह्या तीन ऋचांनीं फल, तांबूल, दक्षिणा देऊन नमस्कार करून ती शालग्राममूर्ति आचार्याकारणें द्यावी. याप्रमाणें नारायणबलि सांगितला.

---

अथद्वादशाहेत्रयोदशाहेवायथाचारमाराधनं तत्रप्रयोगः देशकालौस्मृत्वाश्रीनारायणप्रीत्यर्थमाराधनंकरिष्यइतिसंकल्प्य गुर्वर्थेक्षणःकर्तव्यः एवंपरमगुर्वर्थेपरमेष्ठिगुर्वर्थेपरात्पर

गुर्वर्थे एवंविप्रचतुष्टयंनिमंत्र्य शुक्लेकेशवादिनामभिः कृष्णेसंकर्षणादिनामभिः द्वादशविप्रान्निमंत्रयेत् एवंषोडशविप्राःयतयोवा अशक्तोयथाशक्तिविप्रान्निमंत्र्ययथायथंषोडशक्षणादेयाः षोडशानांपादक्षालनंकृत्वाचम्यपादक्षालनोदकंपात्रांतरेगृहीत्वागंधपुष्पादिभिःपूजयेत् विप्रान्प्राङ्मुखानुदङ्मुखान्वोपवेश्यषोडशोपचारैर्गंधादिपंचोपचारैर्वासंपूज्य सपरिकरमन्नंपरिविष्यगायत्र्याप्रोक्ष्यगुरवेइदमन्नंपरिविष्टंपरिवेक्ष्यमाणंचातृप्तेःस्वाहाहव्यंनमम एवंपरमगुर्वादिभ्यःपंचदशभ्योन्नत्यागंकृत्वाब्रह्मार्पणमित्यादि भुक्तेष्वाचांतेषुतेषुतांबूलदक्षिणावस्त्रादिभिःपूजयेत् अत्रकेचित्पूर्वस्थापितपादोदकतीर्थपूजांकुर्वंति तद्यथा तीर्थपात्रंतंडुलादिकृतमंडलेसंस्थाप्यपुरुषसूक्तेनतीर्थराजायनमइतिषोडशोपचारैः संपूज्यतत्पात्रंशिरसिधृत्वा बंधुभिःसहविप्रान्प्रदक्षिणीकृत्यगुरुर्ब्रह्मागुरुर्विष्णुरितिनत्वाप्रथमविप्रहस्तात्तत्तीर्थंपिबेत् तत्रमंत्रः अविद्यामूलशमनंसर्वपापप्रणाशनं पिबामिगुरुपत्तीर्थंपुत्रपौत्रप्रवर्धनमिति कर्मेश्वरार्पणंकृत्वासुहृद्युतोभुंजीत वर्षपर्यंतंप्रतिमासंमृततिथावेवमेवाराधनंकार्यंनतुप्रतिमासिकश्राद्धंप्रत्यब्दंतुपार्वणश्राद्धं कृत्वाराधनमपिकार्यं ततोदर्शमहालयादिश्राद्धान्यपिसर्वसाधारण्येनकार्याणि नतत्रविशेषः इत्याराधनविधिः ॥

## यानंतर बाराव्या दिवसीं अथवा तेराव्या दिवसीं जसा आचार असेल त्याप्रमाणें आराधन करावें.

**त्याविषयीं प्रयोग.**—देशकालांचें स्मरण करून "श्रीनारायणप्रीत्यर्थमाराधनं करिष्ये" असा संकल्प करून "गुर्वर्थेक्षणःकर्तव्यः" याप्रमाणें "परमगुर्वर्थे०, परमेष्ठिगुर्वर्थे० परात्परगुर्वर्थे०" असें चार ब्राह्मणांस निमंत्रण करून शुक्लपक्षीं केशवादि नामेंकरून व कृष्णपक्षीं संकर्षणादि नामेंकरून बारा ब्राह्मणांस निमंत्रण करावें. याप्रमाणें सोळा ब्राह्मण अथवा संन्यासी सांगावे. अशक्त असेल त्यानें यथाशक्ति ब्राह्मणांस निमंत्रण करून यथायोग्य सोळा क्षण द्यावे. सोळा ब्राह्मणांचें पादप्रक्षालन करून आचमन करून पादप्रक्षालनाचें उदक दुसऱ्या पात्रांत घेऊन त्याची गंध, पुष्प इत्यादिकांनीं पूजा करावी. ब्राह्मणांस पूर्वाभिमुख अथवा उत्तराभिमुख बसवून सोळा उपचारांनीं किंवा गंधादिक पांच उपचारांनीं पूजा करून सोपस्कर अन्न वाढून तें गायत्रीमंत्रानें प्रोक्षण करून "गुरवेइदमन्नंपरिविष्टं परिवेक्ष्यमाणंचातृप्तेःस्वाहा हव्यंनमम" याप्रमाणें परमगुर्वादिक पंधरा ब्राह्मणांस अन्नत्याग करून "ब्रह्मार्पणं०" इत्यादि कर्म करावें. ते ब्राह्मण, भोजन करून आचवल्यानंतर त्यांची तांबूल, वस्त्र, दक्षिणा इत्यादिकेंकरून पूजा करावी. ह्या स्थलीं कित्येक शिष्ट पूर्वी स्थापन करून ठेवलेलें जें पादोदकतीर्थ त्याची पूजा करितात. ती असी.—तीर्थपात्र, तंडुलादिकांनीं केलेल्या मंडलावर स्थापन करून पुरुषसूक्तानें व "तीर्थराजाय नमः" या मंत्रानें त्याची षोडशोपचारांनीं पूजा करून तें पात्र मस्तकावर धारण करून बंधूंसहवर्तमान ब्राह्मणांस प्रदक्षिणा करून "गुरुर्ब्रह्मागुरुर्विष्णु०" या मंत्रानें नमस्कार करून पहिल्या ब्राह्मणाचे हातून तें तीर्थ प्राशन करावें. प्राशनाचा मंत्र.—"अविद्यामूलशमनं सर्वपापप्रणाशनं ॥ पिबामिगुरुपत्तीर्थं पुत्रपौत्रप्रवर्धनम्." कर्म ईश्वरास समर्पण करून आप्तवर्गासह भोजन

करावें. याप्रमाणें वर्षपर्यंत प्रतिमासाचे ठायीं मृततिथीचे दिवसीं असीच आराधना करावी; प्रतिमासिक श्राद्ध करूं नये. प्रतिवर्षी तर पार्वणश्राद्ध करून आराधनाहि करावी. तदनंतर दर्श, महालयादि श्राद्धेंहि सर्व साधारण्यानें करावीं; त्याविषयीं विशेष नाहीं. याप्रमाणें आराधनविधि सांगितला.

---

**अत्रनारायणबलिपार्वणश्राद्धयोरेकदिनानुष्ठानपक्षेएकादशेवादिनेपूर्वंनारायणबलिंकृत्वा ततःपार्वणश्राद्धंकार्यं दिनद्वयेकरणपक्षेत्वेकादशेपार्वणंद्वादशेनारायणबलिः द्वादशेत्रयोदशेवादिनेआराधनं ऊनमासिकादिकालेष्वप्याराधनमितिकेचित् प्रतिमासमाराधनमित्यन्ये पार्वणश्राद्धंत्वेकादशाहप्रत्यब्दयोरेव तच्चपुत्रादीनामेवनियतं शिष्यादीनांतुनावश्यकं अपुत्रयतेस्तुशिष्येणापिप्रत्यब्दंपार्वणश्राद्धंकार्यं तदर्थंचनामगोत्रोल्लेखाधिकारार्थमेकादशेशिष्येण पार्वणश्राद्धंकार्यं ॥**

ह्याविषयीं नारायणबलि व पार्वणश्राद्ध हीं दोन एका दिवसीं करण्याचा पक्ष असेल तर अकराव्या किंवा बाराव्या दिवसीं पूर्वी नारायणबलि करून नंतर पार्वणश्राद्ध करावें. दोन दिवसीं करण्याचा पक्ष असेल तर अकराव्या दिवसीं पार्वणश्राद्ध व बाराव्या दिवसीं नारायणबलि करावा. बाराव्या अथवा तेराव्या दिवसीं आराधन करावें. ऊनमासिकादिकांच्या कालींहि आराधन करावें असें कोणी ग्रंथकार ह्मणतात. प्रत्येक महिन्यास आराधन करावें, असें दुसरे ह्मणतात. पार्वणश्राद्ध तर अकरावा दिवस व प्रतिवार्षिक यांच्या ठायींच करावें. आणि तें पुत्रादिकांसच आवश्यक आहे; शिष्यादिकांस तर आवश्यक नाहीं. पुत्ररहित यतीचें तर शिष्यानेंहि प्रतिवर्षी पार्वणश्राद्ध करावें. त्याकरितां आणि नामगोत्राच्या उल्लेखाचा अधिकार प्राप्त होण्यासाठीं अकराव्या दिवसींहि शिष्यानें पार्वणश्राद्ध करावें.

---

**नारायणबल्यादेर्द्वादशाहादावसंभवे शुक्लपक्षस्थद्वादशीश्रवणपंचम्यःपूर्णिमामावास्याचेतिगौणकालाःअत्रपूर्वपूर्वःश्रेयान्भार्याकन्यास्नुषादेःस्त्रियाःयतिसंस्कारकर्तृत्वेतुविधवायाःवपनपूर्वकंकृच्छ्रत्रयाचरणं सधवायास्तुकृच्छ्राचरणमेव ॥**

बारावा इत्यादि दिवसीं नारायणबलि इत्यादिकांचा असंभव असेल तर शुक्लपक्षांतील द्वादशी, श्रवणनक्षत्र, पंचमी, अथवा पौर्णिमा, अमावास्या हे गौणकाल आहेत. यांमध्यें पहिला पहिला काल प्रशस्त होय. भार्या, कन्या, सून इत्यादिक स्त्रिया यतिसंस्कार करणाऱ्या असतील तर विधवा असतां तिणें वपनपूर्वक तीन कृच्छ्रें प्रायश्चित्त करावें. सौभाग्यवती असेल तर तिणें एक कृच्छ्रच प्रायश्चित्त करावें.

---

**देशांतरस्थपुत्रःपितुर्यतेःसिद्धिवार्तांश्रुत्वा वपनपूर्वकंस्नात्वाक्षीरतर्पणपूजनादिदशाहांतंकृत्वैकादशाहादौपार्वणनारायणबल्यादिसर्वमविकृतंकुर्यात् सन्निहितेनज्येष्ठेनकृतंचेत्कनिष्ठोनकुर्यात् ॥**

देशांतरीं रहाणाऱ्या पुत्रानें पिता जो यति त्याची सिद्धिवार्ता ऐकून वपनपूर्वक स्नान करून दुग्धतर्पण, पूजा इत्यादिक दशाहांत कर्म करून अकरावा इत्यादि दिवसीं पार्वणश्राद्ध,

नारायणबलि इत्यादि सर्व यथाविधि कर्म करावें. समीपस्थ ज्येष्ठ पुत्रानें केलें असेल तर कनिष्ठानें करूं नये.

---

शुक्लकृष्णादिभेदेनकेशवादिनामानिमृततिथ्यनुरोधेनैवग्राह्याणि नतुवार्ताश्रवणतिथ्यनुरोधेन मृततिथ्यज्ञानेतुवार्ताश्रवणानुरोधेनैवयतिसंस्कारकरणेश्वमेधसहस्रादिफलं असंस्कृतंविशीर्येतयतेर्यत्रकलेवरं धर्मलोपोभवेत्तत्रदुर्भिक्षंमरणंतथा दिवंगतेगुरौशिष्यउपवासंतदाचरेत् नस्नानमाचरेद्भिक्षुःपुत्रादिनिधनेश्रुते पितृमातृक्षयंश्रुत्वास्नानाच्छुद्ध्यतिसांबरात्॥

शुक्लकृष्णादि भेदानें केशवादि नामें मृततिथीच्या अनुरोधानेंच घ्यावीं. वार्ताश्रवण तिथीच्या अनुरोधानें घेऊं नयेत. मृततिथीचें अज्ञान असेल तर वार्ताश्रवणाच्या अनुरोधानेंच घ्यावीं. यतीचा संस्कार केला असतां अश्वमेधाच्या सहस्रादिकांचें फल आहे. " ज्या प्रदेशीं संन्यासी याचें शरीर संस्कारविरहित असें पडलें जाईल त्या प्रदेशीं धर्मलोप, दुर्भिक्ष, मरण हीं प्राप्त होतील. गुरु स्वर्गस्थ झाला असतां त्या कालीं शिष्यानें उपवास करावा. पुत्रादिकांचें मरण श्रुत झालें असतां यतीनें स्नान करूं नये. मातापितरांचें मरण श्रवण केलें असतां सचैल स्नानानें शुद्ध होतो. "

---

अथप्रसंगाद्यतिधर्माः प्रातरुत्थायब्रह्मणस्पतइतिजपित्वादंडादीनिमृदंचादायमूत्रपुरीषयोर्गृहस्थचतुर्गुणंशौचंकृत्वाचम्यपर्वद्वादशीवर्ज्यंप्रणवेनदंतधावनंकृत्वा मृदाबहिःकटिंप्रक्षाल्यजलतर्पणवर्ज्यंस्नात्वापुनर्जंघेप्रक्षाल्यवस्त्रादीनिगृहीत्वाप्रणवेनप्राणायाममार्जनादिकृत्वाकेशवादिनमोंतनामभिस्तर्पयित्वा भूस्तर्पयामीत्यादिव्यस्तसमस्तव्याहृतिभिर्महर्जनस्तर्पयामीति तर्पयेत् अत्रविशेषोमाधवादौविश्वेश्वर्यादौचज्ञेयः सूर्योपस्थानादिकंत्रिकालविष्णुपूजादिकंचसिंधौज्ञेयं विधूमेसन्नमुसलेव्यंगारेभुक्तवज्जने कालेपराण्हेभूयिष्ठेनित्यंभिक्षांयतिश्चरेत् अत्रभिक्षाभेदाःग्रंथांतरेज्ञेयाः अत्रविविदिषोर्दंडिनःमाधुकरीमुख्या दंडवस्त्रादिपरिग्रहणरहितस्यतुकरपात्रंमुख्यं अन्येपक्षाः अशक्तविषयाः तत्रमाधुकरीपक्षेदंडादिगृहीत्वापंचभ्यःसप्तभ्योवागृहेभ्यो भिक्षांयाचित्वान्नंप्रोक्ष्य भूःस्वधानमइत्यादिव्यस्तसमस्तव्याहृतिभिः सूर्यादिदेवेभ्योभूतेभ्यश्चभूमौक्षिप्त्वाशेषमन्नंविष्णुनिवेदितंभुंजीत चंडीविनायकादिनैवेद्यंनभुंजीत भुक्त्वाचम्यषोडशप्राणायामान्कुर्यादितिसंक्षेपः ॥

## यानंतर प्रसंगेंकरून यतीचे धर्म सांगतों.

प्रातःकालीं उठून " ब्रह्मणस्पते० " या मंत्राचा जप करून; दंडादिक व मृत्तिका घेऊन मूत्रपुरीषनिमित्तक शुद्धि गृहस्थाच्या चतुर्गुणित करून; आचमन करून; पर्व व द्वादशी वर्ज्य करून; प्रणवानें दंतधावन करून; मृत्तिकेनें बाहेरचा कटिप्रदेश प्रक्षालन करून; जलतर्पण वर्ज्य असें स्नान करून पुनः जंघा प्रक्षालन करून; वस्त्रादि ग्रहण करून; प्रणवमंत्रानें प्राणायाम, मार्जन इत्यादि करून; केशवादि नमोंतनाममंत्रांनीं तर्पण करून " भूस्तर्पयामि " इत्यादि व्यस्तसमस्तव्याहृतिमंत्रांनीं " महर्जनस्तर्पयामि " असें तर्पण करावें; ह्याविषयीं विशेष प्रकार माधवादिक व विश्वेश्वर्यादिक ग्रंथीं पाहावा. सूर्याचें उपस्थान इत्यादिक व

त्रिकाल विष्णुपूजा इत्यादिक निर्णयसिंधूंत पाहावें. धूमरहित, मुसलाचे आघातविरहित, अग्नि-विरहित व जनाचें भोजन झालेलें अशा फार अपराण्हकालीं यतीनें नित्य भिक्षा करावी. ह्याविषयीं भिक्षेचे भेद ग्रंथांतरीं पाहावे. ह्या भिक्षांमध्यें विविदिषु संन्यासी यास माधुकरी भिक्षा मुख्य होय. दंडवस्त्र इत्यादिकांचा स्वीकार न करणाऱ्या यतीस तर करपात्र मुख्य होय. इतर भिक्षेचे पक्ष अशक्तविषयक आहेत. त्यामध्यें माधुकरीपक्ष असतां दंडादिक घेऊन पांच अथवा सात घरीं भिक्षा मागून त्या अन्नाचें प्रोक्षण करून "भूः स्वधानमः" इत्यादि व्यस्तसमस्तव्याहृतिमंत्रांनीं सूर्यादि देवतांला व भूतांला भूमीचे ठिकाणीं अन्न देऊन शेष अन्न विष्णूस निवेदित केलेलें भक्षण करावें. चंडी व विनायक इत्यादि देवतांचा नैवेद्य भक्षण करूं नये. भोजन करून आचमन् करून सोळा प्राणायाम करावे. याप्रमाणें संक्षेप जाणावा.

---

यतिहस्तेजलंदद्याद्भिक्षांदद्यात्पुनर्जलं भैक्ष्यंपर्वतमात्रंस्यात्तज्जलंसागरोपमं एकरात्रंवसेत्ग्रामेनगरेपंचरात्रकम् वर्षाभ्योन्यत्रवर्षासुमासांश्चचतुरोवसेत् अष्टौमासान्विहारःस्याद्यतीनांसंयतात्मनां महाक्षेत्रप्रविष्टानांविहारस्तुनविद्यते भिक्षाटनंजपःस्नानंध्यानंशौचंसुरार्चनं कर्तव्यानिषडेतानिसर्वथानृपदंडवत् मंचकंशुक्लवस्त्रंचस्त्रीकथालौल्यमेवच दिवास्वापश्चयानंचयतीनांपतनानिषट् वृथाजल्पंपात्रलोभंसंचयंशिष्यसंग्रहं हव्यंकव्यंतथान्नंचवर्जयेच्च सदायतिः यतिपात्राणिमृद्वेणुदार्वलाबुमयानिच नतीर्थवासीनित्यंस्यान्नोपवासपरोयतिः न चाध्ययनशीलःस्यान्नव्याख्यानपरोभवेत् एतद्वेदार्थभिन्नपरं एतेसंक्षेपतोयतिधर्माः अन्येपि माधवीयमिताक्षरादौज्ञेयाः ॥

यतीचे हातावर उदक घालून भिक्षा देऊन पुनः उदक घालावें. तें भिक्षान्न पर्वततुल्य होतें व तें उदक सागरोपम होतें. वर्षाकालावांचून अन्यकालीं यतीनें ग्रामांत एकरात्र राहावें, नगरांत पांच रात्रि राहावें, वर्षाकालामध्यें चार महिने राहावें. मनाचें नियमन करणाऱ्या यतींनीं आठ मास विहार ( भ्रमण ) करावा. महाक्षेत्रांत राहणारे यांनीं विहार करूं नये. भिक्षाटन, जप, स्नान, ध्यान, शुचिर्भूतपणा, देवपूजन हीं सहा अवश्य राजदंडाप्रमाणें करावीं. मंचक, श्वेतवस्त्र, स्त्रियांच्या गोष्टी, चंचलपणा, दिवसास निद्रा आणि वाहन हीं सहा यतींस पतन करणारीं ( अधोगति देणारीं ) होत. वृथा भाषण, पात्रलोभ, संचय, शिष्यसंग्रह, हव्य, कव्य असें अन्न, हीं यतीनें वर्ज्य करावीं. यतीचीं पात्रें मृत्तिका, वेणु, काष्ठ, भोंपळा यांचीं होत. तीर्थवासी, उपवासतत्पर असें संन्यासी यानें नित्य असूं नये. अध्ययन करणें, व्याख्यान देणें हीं संन्यासी यानें करूं नयेत. अध्ययन व व्याख्यान यांचा जो निषेध सांगितला तो वेदार्थाहून भिन्नविषयक आहे. असे हे संक्षेपेंकरून यतिधर्म जाणावे. दुसरेहि यतिधर्म माधव व मिताक्षरा इत्यादि ग्रंथीं पाहावे.

---

प्रथमेत्रपरिच्छेदेकालसामान्यनिर्णयः द्वितीयेथपरिच्छेदेविशेषात्कालनिर्णयः ॥ १ ॥

या धर्मांब्धिसार ग्रंथांत प्रथम परिच्छेदामध्यें कालाचा सामान्य निर्णय सांगितला. नंतर दुसऱ्या परिच्छेदांत विशेषेंकरून कालनिर्णय सांगितला.

---

तृतीयस्यचपूर्वार्धेगर्भाधानादिसंक्रियाः आन्हिकंचप्रकीर्णार्थाआधानाद्याःसविस्तराः ॥ २ ॥
देवप्रतिष्ठाशांत्यादिनित्यंनैमित्तिकंतथा तार्तीयकोत्तरार्धेस्मिन्जीवत्पितृकनिर्णयः ॥ ३ ॥
श्राद्धाधिकारकालादेर्निर्णयःश्राद्धपद्धतिः सूतकादेर्निर्णयश्चनिर्णयोदुर्मृतावपि ॥ ४ ॥
अंत्येष्टिसंस्कारविधिःसंन्यासःसहविस्तरः प्रायश्चित्तंव्यवहृतिंसर्वदानविधिंविना ॥ ५ ॥
कृत्स्नोपिधर्मशास्त्रार्थःसंक्षेपेणात्रनिर्मितः विबुधानांचबालानांतुष्ट्यैकष्टहानये ॥ ६ ॥

तिसऱ्या परिच्छेदाच्या पूर्वार्धांत गर्भाधानादि संस्कार; आन्हिक; आधान इत्यादिक सविस्तर मिश्रविषय; देवप्रतिष्ठा; शांत्यादिक, नित्यनैमित्तिक कर्में इतके विषय सांगितले. तिसऱ्या परिच्छेदाच्या उत्तरार्धांत जीवत्पितृकाचा निर्णय; श्राद्धाधिकार, काल इत्यादिकांचा निर्णय; श्राद्धपद्धति; सूतकादिकांचा निर्णय; दुर्मरण असतांहि निर्णय; अंत्येष्टिसंस्काराचा विधि; विस्तारसहित संन्यास याप्रमाणें विषय सांगितले. प्रायश्चित्त, व्यवहार, सर्व दानांचा विधि, यांवांचून सर्वहि धर्मशास्त्रार्थ, विद्वानांच्या संतोषार्थ आणि शास्त्रीय व्युत्पत्ति ज्यांना नाहीं त्यांचे शास्त्राज्ञानरूप कष्ट दूर होण्याकरितां या ग्रंथांत संक्षेपेंकरून सांगितला आहे.

---

मूलभूतानिपद्यानि विकृतानिक्वचित्क्वचित् ॥
निर्विकाराण्यपिनवान्यप्युक्तान्यत्रकानिचित् ॥ ७ ॥

मूळचे श्लोक क्वचित् क्वचित् अशुद्ध असल्यामुळें या ग्रंथांत कितीएक नवेहि श्लोक शुद्ध करून लिहिले आहेत.

---

मीमांसाधर्मशास्त्रज्ञाःसुधियोनलसाबुधाः कृतकार्याःप्राङ्निबंधैस्तदर्थंनायमुद्यमः ॥ ८ ॥

## ग्रंथकार हा ग्रंथ करण्याचें प्रयोजन काय तें सांगतात.

मीमांसा, धर्मशास्त्र यांतें जाणणारे व बुद्धिमान्, आलस्यरहित असे जे पंडित ते महाविद्वानांनीं केलेले पूर्वींचे ग्रंथ पाहून त्यांवरून कृतकार्य होतात; ह्मणजे प्राप्त झालेलीं कार्यें करितात, यास्तव माझा हा ग्रंथ करण्याचा उद्योग त्यांच्याकरितां नाहीं.

---

येपुनर्मंदमतयोलसाअज्ञाश्चनिर्णयं धर्मेवेदितुमिच्छंतिरचितस्तदपेक्षया ॥ ९ ॥
निबंधोयंधर्मसिंधुसारनामासुबोधनः अमुनाप्रीयतांश्रीमद्विठ्ठलोभक्तवत्सलः ॥ १० ॥

तर जे मंदबुद्धि, आळसी, अविद्वान् असे असून धर्माविषयीं निर्णय जाणण्याची इच्छा करितात त्यांच्या करितां धर्मसिंधुसार नांवाचा असा हा सुबोध ग्रंथ मी केला आहे. या ग्रंथेंकरून भक्तवत्सल असा श्रीमद्विठ्ठल संतुष्ट असो.

---

प्रेम्णासद्भिर्ग्रंथः सेव्यःशब्दार्थतःसदोषोपि ॥
संशोध्यवापिहरिणा सुदाममुनिसतुषपृथुकमुष्टिरिव ॥ ११ ॥

हा माझा ग्रंथ क्वचित् स्थलीं शब्दार्थांनें जरी सदोष असेल तथापि विद्वानांनीं विचारपूर्वक शोधून ग्रहण करण्यास योग्य आहे. याला दृष्टांत सांगतात.—सुदाम ब्राह्मणाचे पोहे कों-

ह्यानें युक्त असे जरी होते तथापि हरीनें त्यांतील कोंडा इत्यादि टाकून चांगले शुद्ध करून ते जसे भक्षण केले तद्वत् विद्वानांनीं ह्या माझ्या ग्रंथाचा स्वीकार करावा.

---

श्रीकाश्युपाध्यायवरोमहात्मा बभूवविद्वद्द्विजराजराजः ॥
तस्मादुपाध्यायकुलावतंसो यज्ञेश्वरोनंतइमावभूतां ॥ १२ ॥

विद्वान् ब्राह्मणांमध्यें केवळ सार्वभौम असे महात्मे श्रीकाश्युपाध्याय होते झाले. त्यांपासून उपाध्यायकुलावतंस असे यज्ञेश्वरोपाध्याय व अनंतोपाध्याय हे दोन पुत्र झाले.

---

यज्ञेश्वरोयज्ञविधानदक्षो दैवज्ञवेदांगसुशास्त्रशिक्षः ॥
भक्तोत्तमोनंतगुणैकधामानंताव्हयोनंतकलावतारः ॥ १३ ॥

त्यांमध्यें श्रौतमार्गांत निष्णात, ज्योतिषी, वेदाचें अंग जें उत्तमशास्त्र व्याकरण, त्यांत सुशिक्ष असे यज्ञेश्वरोपाध्याय होते. भक्तांमध्यें श्रेष्ठ असून अनंताचा अंशभूत अवतार असल्या-मुळें अनंत गुणांचें वसतिस्थान असे अनंतोपाध्याय होते.

---

एषोत्यजज्जन्मभुवंस्वकीयां तांकोंकणाख्यांसुविरक्तिशाली ॥
श्रीपांडुरंगेवसतिंविधाय भीमातटेमुक्तिमगात्सुभक्त्या ॥ १४ ॥

हे अनंतोपाध्याय वैराग्यशाली होत्साते त्यांनीं आपली कोंकणनामक जन्मभूमि सोडून श्रीपंढरीक्षेत्रांत श्रीपांडुरंगाच्या सन्निध वास्तव्य करून पांडुरंगाच्या भक्तीकरून भीमानदीच्या तटाकीं मुक्तीप्रत पावते झाले.

---

तस्यानंताभिधानस्योपाध्यायस्यसुतःकृती ॥
काशीनाथाभिधोधर्मसिंधुसारंसमातनोत् ॥ १५ ॥

त्या अनंतोपाध्यायांचा पुत्र, विद्वान्, असा काशीनाथनामक या धर्मसिंधुसार नामक ग्रंथातें करिता झाला.

---

इतिश्रीमत्काश्युपाध्यायसूरिसूनुयज्ञेश्वरोपाध्यायानुजानंतोपाध्यायसुतकाशीनाथोपाध्यायविरचितेधर्मसिंधुसारेतृतीयपरिच्छेदोत्तरार्धसमाप्तम् ॥ श्रीगुरुपांडुरंगार्पणमस्तु ॥



# धर्मसिंधूंतील एकादशीनिर्णयाचा पट.

श्रीकाशिनाथोपाध्यायैरेकादश्याविनिर्णयः ॥
कृतोष्टादशभेदात्मा स्मार्तवैष्णवयोः पृथक् ॥ १ ॥

धर्मसिंधुग्रंथकर्ते काशीनाथोपाध्याय यांनीं एकादशीच्या अष्टादश भेदांचा निर्णय स्मार्त आणि वैष्णव यांचा निरनिराळा केला आहे.

संलक्ष्योदाहृतेः सिद्धिं संशोध्य ग्रंथपट्टयोः ॥
विभाव्यैक्यं च पट्टेऽस्मिन् सयथामति लिख्यते ॥ २ ॥

उदाहरणांची उपपत्ति उत्तम प्रकारें मनांत आणून व शोधून ग्रंथ ( धर्मसिंधु ) आणि पट यांची एकवाक्यता करून या पटाचे ठायीं तो निर्णय यथामति लिहितों.

श्रीरामचंद्रनामा नामप्रागर्धघृष्टजिव्हाग्रः ॥
सब्रह्मवित्पितामे जयतितरामेष जानकीजानिः ॥ ३ ॥

रामचंद्रनामा या नामाचें जें पूर्वार्ध ह्मणजे 'रामचंद्र' यांतलें जें पूर्व अर्ध 'राम' तेणेंकरून घर्षित आहे जिव्हाग्र ज्यांचें असा ब्रह्मवेत्त्यांसहवर्तमान आणि जानकी आहे जाया ज्याची असा हा माझा पिता, सर्वोत्कर्षेंकरून राहतो.

नामस्मृत्या यस्य च विबोधितो धर्मशास्त्रदुर्बोधं ॥
निर्णयमेकादश्या निःसंदिग्धं सुखेन विलिखामि ॥ ४ ॥

ज्या पित्याचे नामस्मरणेंकरून विबोधित होत्साता मी धर्मशास्त्रांत दुर्बोध असा हा एकादशीचा निर्णय निःसंशय सुखें करून लिहितों.

अत्रसमत्वंसूर्योदयाद्यक्षणाव्यवहितपूर्वक्षणांततिथिसत्त्वंषष्टिघटिकारूपं न्यूनत्वंतुकिंचिन्न्यूनषष्टिघटिकावधिशुद्धाविद्धाभेदेषु तिथिक्षयवृद्धिभ्यांविलक्षणं यथावैष्णवशुद्धैकादशी प्रथमभेदे दश० ५५।५९ एका० ४९।५९ द्वाद० ४३।५९ एवंपरमक्षयेपलोनचतुश्चत्वारिंशत्घटीमितंन्यूनत्वं एवमेवस्मार्तवैष्णवयोःशुद्धाविद्धाभेदैर्विलक्षणत्वमूह्यं ॥

एथें समत्व ह्मणजे सूर्योदयाचे प्रथम क्षणाचे जवळचा जो पूर्वीचा क्षण त्याचे अंतापर्यंत तिथीचें असणें ह्मणजे पूर्ण साठ घटिका. न्यूनत्व तर, किंचित् न्यून साठ घटिकापर्यंत तिथि असणें तें, शुद्धाविद्धा भेदांचे ठायीं तिथीचा क्षय व वृद्धि यांहींकरून विलक्षण होतें. जसें, वैष्णवांचे शुद्धैकादशीचे प्रथमभेदीं दशमी ५५।५९ एका० ४९।५९ द्वादशी ४३।५९ याप्रमाणें परमावधि क्षयाचे ठायीं पलमात्रानें कमी असें ४४ घटिकापरिमित न्यूनत्व होतें. याप्रमाणेंच स्मार्त व वैष्णव यांच्या शुद्धाविद्धाभेदांनीं विलक्षणत्व जाणावें.

एतेवैष्णवानामेकादश्याःशुद्धाभेदाः अत्रारुणोदयवेधरहिताशुद्धासाचतुर्विधा स्वाचोदाहरणेषुप्रदर्श्यते.

## हे वैष्णवांचे शुद्धैकादशीचे भेद ९.

एथें अरुणोदयवेधरहित जी एकादशी ती शुद्धा. ती चार प्रकारची. तीच उदाहरणांचे ठायीं दाखवितों.—

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. | |
| शुद्धन्यूनान्यूनद्वादशिका. | ५५ | ५९ | ५८ | ० | ५९ | ५९ | इयमनुभयाऽधिक्यवतीशुद्धा अत्रस्मार्तानांवैष्णवानांचैकादश्यामेवोपवासः भेदः १.<br>ही एकादशी अनुभयाधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं, स्मार्त व वैष्णव यांनीं एकादशीचे ठायींच उपोषण करावें. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५५ | ० | ५७ | ० | ५८ | ० | |
| शुद्धन्यूनासमद्वादशिका. | ५५ | ५९ | ५८ | ० | ६० | ० | इयमप्यनुभयाऽधिक्यवतीशुद्धा अत्रापिस्मार्तानांवैष्णवानांचैकादश्यामेवोपवासः भे० २.<br>हीहि एकादशी अनुभयाधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणींहि स्मार्त व वैष्णव यांनीं एकादशीचे ठायींच उपोषण करावें. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५५ | ० | ५७ | ० | ५८ | ० | |
| शुद्धन्यूनाऽधिकद्वादशिका. | ५५ | ५९ | ५८ | ० | ६० | १ | इयंद्वादशीमात्राऽधिक्यवतीशुद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यांवैष्णवानांद्वादश्यामेवोपवासइति माधवमतं सर्वेषांद्वादश्यामेवेतिहेमाद्रिमतं. भे० ३.<br>ही एकादशी द्वादशीमात्राधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं, स्मार्तांनीं एकादशीचे ठायीं व वैष्णवांनीं द्वादशीचे ठायींच उपवास करावा असें माधवाचें मत. सर्वांनीं द्वादशीचे ठायींच उपवास करावा असें हेमाद्रीचें मत. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५० | ० | ५८ | ० | ६० | १ | |
| शुद्धसमान्यूनद्वादशिका. | ५५ | ५९ | ६० | ० | ५९ | ५९ | इयमनुभयाऽधिक्यवतीशुद्धा अत्रस्मार्तानांवैष्णवानांचैकादश्यामेवोपवासः<br>इदमुदाहरणंविचार्यं भे० ४.<br>ही एकादशी अनुभयाधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं, स्मार्त व वैष्णव यांनीं एकादशीचे ठायींच उपवास करावा. हें उदाहरण विचारणीय आहे. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५५ | ० | ५७ | ० | ५८ | ० | |
| शुद्धसमासमद्वादशिका. | ५५ | ५९ | ६० | ० | ६० | ० | इयमप्यनुभयाऽधिक्यवतीशुद्धा अत्रस्मार्तानांवैष्णवानांचैकादश्यामेवोपवासः भे० ५.<br>हीहि एकादशी अनुभयाधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं, स्मार्त व वैष्णव या उभयतांनींहि एकादशीचे ठायींच उपवास करावा. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५५ | ० | ५७ | ० | ५८ | ० | |

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | |
|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ | प. |
| शुद्धसमाऽधिकद्वादशिका. | ५५ | ५९ | ६० | ० | ६०<br>३ | ०<br>१ |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५५ | ० | ५८ | ० | ६० | १ |

इयंद्वादशीमात्राऽधिक्यवतीशुद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यांवैष्णवानांद्वादश्यामेवोपवासः इतिमाधवमतं सर्वेषांद्वादश्यामेवोपवासइतिहेमाद्रिमतं. भे० ६.

ही एकादशी द्वादशीमात्राधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्तांनीं एकादशीचे ठायीं आणि वैष्णवांनीं द्वादशीचे ठायींच उपवास करावा असें माधवाचें मत. सर्वांनीं द्वादशीचे ठायींच उपवास करावा असें हेमाद्रीचें मत.

| | दशमी घ. | दशमी प. | एकाद. घ. | एकाद. प. | द्वादशी घ | द्वादशी प. |
|---|---|---|---|---|---|---|
| शुद्धाऽधिकान्यूनद्वादशिका. | ५५ | ५९ | ६०<br>० | ०<br>१ | ५९<br>क्ष | ५८<br>य |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५५ | ० | ६० | १ | ५८<br>क्ष | ०<br>य |

इयमेकादशीमात्राऽधिक्यवतीशुद्धा अत्रस्मार्तगृहस्थानांपूर्वैकादश्यांयतीनांवैष्णवानां चोर्वरितैकादश्यामेवोपवासइतिमाधवमतं कामाद्वा अकामाद्वा वैष्णवोद्वयमुपवसेदितिहेमाद्रिमतं. इदमुदाहरणंविचार्यं. भे०७.

ही एकादशी एकादशीमात्राधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्त गृहस्थांनीं पूर्व एकादशीचे ठायीं, आणि संन्यासी, वैष्णव यांनीं उर्वरित एकादशीचे ठायीं उपवास करावा असें माधवाचें मत. सकाम, अथवा निष्काम वैष्णवानें दोन दिवस उपवास करावा असें हेमाद्रीचें मत. हें उदाहरण विचारणीय आहे.

| | दशमी घ. | दशमी प. | एकाद. घ. | एकाद. प. | द्वादशी घ | द्वादशी प. |
|---|---|---|---|---|---|---|
| शुद्धाऽधिकासमद्वादशिका. | ५५ | ५९ | ६०<br>० | ०<br>१ | ५९<br>क्ष | ५९<br>य |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५५ | ० | ६० | १ | ५८<br>क्ष | ०<br>य |

इयमप्येकादशीमात्राऽधिक्यवतीशुद्धा अत्रापि स्मार्तगृहस्थानांपूर्वैकादश्यांयतीनांवैष्णवानां चावशिष्टैकादश्यामेवोपवासइतिमाधवमतं कामाद्वाअकामाद्वावैष्णवोद्वयमुपवसेदितिहेमाद्रिमतं. भे०८.

हीहि एकादशी एकादशीमात्राधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणींहि स्मार्त गृहस्थांनीं पूर्व एकादशीचे ठायीं आणि यती व वैष्णव यांनीं अवशिष्ट एकादशीचे ठायीं उपवास करावा असें माधवाचें मत. सकाम अथवा निष्काम वैष्णवानें दोन दिवस उपवास करावा असें हेमाद्रीचें मत.

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. | |
| शुद्धाऽधिकाऽधिकद्वादशिका. | ५५ | ५९ | ६० | १ | ३ | ५५ | इयमुभयाऽधिक्यवतीशुद्धा अत्रस्मार्तैर्वैष्णवैश्चपरैवैकादश्युपोष्येत्युभयमतं. भे० ९.<br>ही एकादशी उभयाधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं, स्मार्त व वैष्णव या उभयतांनींहि दुसऱ्या दिवसाचीच उपोषणाला ग्रहण करावी असें दोघांचें ( माधव, हेमाद्रि यांचें ) मत आहे. |
| धर्मोब्धिस्थमुदाहरणं. | ५५ | ० | ६० | १ | ५ | ० | |

एतेवैष्णवानांविद्धैकादश्याभेदाः अत्रविद्धत्वमरुणोदयेदशमीसत्त्वंअरुणोदयस्तुसूर्योदयात्प्राक्चतुर्घटिकात्मकः

## हे वैष्णवांचे विद्धैकादशीचे भेद ९.

**एथें विद्धत्व ह्मणजे अरुणोदयीं दशमी तिथि असणें तें. अरुणोदय तर, सूर्योदयाचे पूर्वी चार घटिकात्मक जो काल तो होय.**

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. | |
| विद्धन्यूनान्यूनद्वादशिका. | ५६ | १ | ५८ | ० | ५९ | ५९ | इयमनुभयाऽधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामेवोपवासोवैष्णवानांविद्धत्वात्द्वादश्यामुपवासः भेदः १.<br>ही एकादशी अनुभयाधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्तांचा एकादशीचे ठायींच उपवास. ही विद्धा आहे याकरितां वैष्णवांचा द्वादशीचे ठायीं उपवास. |
| धर्मोब्धिस्थमुदाहरणं. | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० | |
| विद्धन्यूनासमद्वादशिका. | ५६ | १ | ५८ | ० | ६० | ० | इयमप्यनुभयाऽधिक्यवतीविद्धा अत्रापिस्मार्तानामेकादश्यामेवोपवासोवैष्णवानांविद्धत्वात्द्वादश्यामुपवासः भे० २.<br>ही एकादशीहि अनुभयाधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणींहि स्मार्तांनीं एकादशीचे ठायीं, ही विद्धा आहे यास्तव वैष्णवांनीं द्वादशीचे ठायीं उपवास करावा. |
| धर्मोब्धिस्थमुदाहरणं. | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० | |
| विद्धन्यूनाऽधिकद्वादशिका. | ५६ | १ | ५८ | १ | ६०<br>१ | ०<br>१ | द्वादशीमात्राऽधिक्यवतीविद्धेयं अत्रस्मार्तैरेकादश्युपोष्यावैष्णवैर्द्वादश्युपोष्या हेमाद्रिमतेतुसर्वैर्द्वादश्येवोपोष्या. भे० ३.<br>ही एकादशी द्वादशीमात्राधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्तांनीं एकादशीचे ठायीं आणि वैष्णवांनीं द्वादशीचे ठायीं उपवास करावा. हेमाद्रीच्या मतीं तर, सर्वांनीं द्वादशीचे ठायींच उपवास करावा. |
| धर्मोब्धिस्थमुदाहरणं. | ५८ | ० | ५९ | ० | ६० | १ | |

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. | |
| विद्धसमान्यून द्वादशिका. | ५८ | ५९ | ६० | ० | ५९ | ५९ | इयमनुभयाऽधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामेवोपवासोवैष्णवानांविद्धत्वात् द्वादश्यामुपवासः भे० ४. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० | ही एकादशी अनुभयाधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्तांनीं एकादशीचे ठायींच उपवास करावा. विद्धा आहे यास्तव वैष्णवांनीं द्वादशीचे ठायीं उपवास करावा. |
| विद्धसमासम द्वादशिका. | ५९ | १ | ६० | ० | ६० | ० | इयमप्यनुभयाऽधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामेवोपवासोवैष्णवानांविद्धत्वात् द्वादश्यामुपवासः भे०५. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० | हीहि एकादशी अनुभयाधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्तांनीं एकादशीचे ठायींच उपवास करावा. विद्धा आहे याकरितां वैष्णवांनीं द्वादशीचे ठायीं उपवास करावा. |
| विद्धसमाधिकद्वादशिका. | ५७ | १ | ६० | ० | ६०<br>१ | ०<br>० | इयंद्वादशीमात्राऽधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तैरेकादश्युपोष्यावैष्णवैर्द्वादश्युपोष्या हेमाद्रिमतेतुसर्वैर्द्वादश्येवोपोष्या. भे० ६. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५८ | ० | ५९ | ० | ६० | १ | ही एकादशी द्वादशीमात्राधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्तांनीं एकादशीचे ठायीं उपवास करावा. वैष्णवांनीं द्वादशीचे ठायीं उपवास करावा. हेमाद्रीचे मतीं सर्वांनीं द्वादशीचे ठायींच उपोषण करावें. |
| विद्धाऽधिकान्यूनद्वादशिका. | ५९ | १ | ६०<br>० | ०<br>१ | ५९<br>क्ष | ५८<br>य | इयमेकादशीमात्राऽधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तैर्गृहस्थैः पूर्वैकादश्युपोष्यायतिभिर्निष्कामगृहिभिर्वनस्थैर्विधवाभिर्वैष्णवैश्चपरैवोपोष्या विष्णुप्रीतिकामैःस्मार्तैरुपवासद्वयंकार्यमितिकेचित्. भे० ७. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५८ | ० | ६० | १ | ५८<br>क्ष | ०<br>य | ही एकादशी एकादशीमात्राधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्त गृहस्थांनीं पूर्व एकादशीचे ठायीं उपवास करावा. संन्यासी, निष्काम गृहस्थाश्रमी, वानप्रस्थाश्रमी, विधवा आणि वैष्णव या सर्वांनीं दुसरीच उपोषणाला ग्रहण करावी. विष्णुप्रीति इच्छिणाऱ्या स्मार्तांनीं दोन उपवास करावे. असें कित्येक ग्रंथकार ह्मणतात. |

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | |
|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. |
| विद्धाधिकासमद्वादशिका. | ५९ | १ | ६० | ० | ५९ क्ष | ५९ य |
| | | | ० | १ | | |
| धर्माब्धिस्थमुदाणहरणं. | ५८ | ० | ६० | १ | ५८ क्ष | ० य |

इयमप्येकादशीमात्राऽधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तैर्गृहस्थैःपूर्वैकादश्युपोष्या यतिभिर्निष्कामगृहिभिर्वनस्थैर्विधवाभिर्वैष्णवैश्चपरैवोपोष्या विष्णुप्रीतिकामैःस्मार्तैरुपवासद्वयंकार्यमितिकेचित्. भे० ८.

हीहि एकादशी एकादशीमात्राधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्त गृहस्थांनीं पूर्व दिवसाची एकादशी उपोषणास घ्यावी. संन्यासी, निष्कामगृहस्थाश्रमी, वानप्रस्थ, विधवा आणि वैष्णव या सर्वांनीं दुसऱ्या दिवसाचीच उपोषणास ग्रहण करावी. विष्णुप्रीति इच्छिणाऱ्या स्मार्तांनीं दोन उपोषणें करावीं असें केचित् ह्मणतात.

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | |
|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. |
| विद्धाधिकाऽधिकद्वादशिका. | ५६ | १ | ६० | ० | ५ | ० |
| | | | १ | ० | | |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५८ | ० | ६० | १ | ४ | ० |

इयमुभयाऽधिक्यवतीविद्धा अत्रसर्वैःस्मार्तैर्वैष्णवैश्चावशिष्टापरैवैकादश्युपोष्या. भे० ९.

ही एकादशी उभयाधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं सर्व स्मार्त व वैष्णव या उभयतांनींहि अवशिष्ट असी दुसऱ्या दिवसाचीच एकादशी उपोषणास घ्यावी.

इमेस्मार्तानांशुद्धैकादशीभेदाः ॥ शुद्धत्वंनामसूर्योदयेदशम्यसत्त्वं साचतुर्विधा साचोदाहरणैःप्रदर्श्यते.

## यानंतर स्मार्तांचा एकादशीनिर्णय सांगतों.

**हे स्मार्तांचे शुद्धैकादशीचे भेद. शुद्धत्व ह्मणजे सूर्योदयीं दशमी तिथि नसणें ते. ती शुद्धैकादशी चार प्रकारची, तेच चार प्रकार उदाहरणांनीं दाखवितों.**

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | |
|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. |
| शुद्धन्यूनान्यूनद्वादशिका. | ५९ | ५९ | ५९ | ० | ५९ | ० |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० |

इयमनुभयाऽधिक्यवतीशुद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यां वैष्णवानांतुविद्धत्वात् द्वादश्यामुपवासः भेदः १.

ही एकादशी अनुभयाधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्तांनीं एकादशीचे ठायींच उपवास करावा, द्वादशीचे ठायीं करूं नये. विद्धा आहे यास्तव वैष्णवांनीं द्वादशीचे ठायीं उपवास करावा.

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. | |
| शुद्धन्यूनासम द्वादशिका. | ५९ | ५९ | ५९ | ४५ | ६० | ० | इयमप्यनुभयाऽधिक्यवतीशुद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यां वैष्णवानांतुविद्धत्वात्द्वादश्यामुपवासः भे० २.<br>हीहि एकादशी अनुभयाधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्तांनीं एकादशीचे ठायींच उपवास करावा, द्वादशीचे ठायीं करूं नये. विद्धा असल्यामुळें वैष्णवांनीं द्वादशीचे ठायीं उपवास करावा. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० | |
| शुद्धान्यूनाऽधिकद्वादशिका. | ५९ | ५९ | ५९ | ५९ | ६०<br>१ | ०<br>० | इयंद्वादशीमात्राऽधिक्यवतीशुद्धा अत्रशुद्धत्वात् स्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यामितिमाधवमतंहेमाद्रिमतेतुसर्वैर्द्वादश्येवोपोष्या केचित्तुमुमुक्षुभिः स्मार्तैःपरोपोष्येत्याहुः भे० ३.<br>ही एकादशी द्वादशीमात्राधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं, शुद्धा आहे यास्तव स्मार्तांनीं एकादशीचे ठायींच उपवास करावा. द्वादशीचे ठायीं करूं नये असें माधवमत. हेमाद्रीचे मतीं तर सर्वांनीं द्वादशीचे ठायींच उपवास करावा. केचित् ग्रंथकार तर, मुमुक्षुस्मार्तांनीं दुसरी उपोषणास घ्यावी असें ह्मणतात. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५८ | ० | ५९ | ० | ६०<br>० | ०<br>१ | |
| शुद्धसमान्यून द्वादशिका. | ५८ | ५९ | ६० | ० | ५९ | ५९ | इयमनुभयाऽधिक्यवतीशुद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यां वैष्णवानांतुविद्धत्वात् द्वादश्यामेवोपवासः भे० ४.<br>हीहि एकादशी अनुभयाधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्तांनीं एकादशीचे ठायींच उपवास करावा, द्वादशीचे ठायीं करूं नये. विद्धा आहे यास्तव वैष्णवांनीं उपवास द्वादशीचे ठायींच करावा. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० | |
| शुद्धसमासम द्वादशिका. | ५८ | ५९ | ६० | ० | ६० | ० | इयमप्यनुभयाऽधिक्यवतीशुद्धा अत्रापिस्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यांवैष्णवानांतु विद्धत्वात्द्वादश्यामेवोपवासः भे० ५.<br>ही एकादशीहि अनुभयाधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणींहि स्मार्तांनीं एकादशीचे ठायींच उपवास करावा, द्वादशीचे ठायीं करूं नये. विद्धा आहे यास्तव वैष्णवांनीं द्वादशीचे ठायींच उपवास करावा. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५७ | ० | ५८ | ० | ५९ | ० | |

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प | घ. | प. | |
| शुद्धसमाऽधिकद्वादशिका. | ५९ | ५९ | ६० | ० | ६०<br>१ | ०<br>० | इयंद्वादशीमात्राऽधिक्यवतीशुद्धा अत्रशुद्धत्वात्स्मार्तानामेकादश्यामेवोपवासोनद्वादश्यामिति माधवमतंहेमाद्रिमतेतुसर्वैःपराद्वादश्येवोपोष्याकेचित्तुमुमुक्षुभिःस्मार्तैःपरोपोष्येत्याहुः भे० ६.<br>ही एकादशी द्वादशीमात्राधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं, शुद्धा असल्यामुळें स्मार्तांनीं एकादशीचे ठायींच उपवास करावा, द्वादशीचे ठायीं करूं नये असें माधवमत. हेमाद्रीच्या मतीं तर, सर्वांनीं दुसऱ्या दिवसाची द्वादशीच उपोषणास घ्यावी. केचित् ग्रंथकार, मुमुक्षु स्मार्तांनीं दुसरी उपोषणास घ्यावी असें ह्मणतात. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५८ | ० | ५९ | ० | ६०<br>० | ०<br>१ | |
| शुद्धाऽधिकान्यूनद्वादशिका. | ५९ | ५९ | ६०<br>१ | ०<br>० | ५८<br>क्ष | ५९<br>य | इयमेकादशीमात्राऽधिक्यवतीशुद्धा अत्रस्मार्तैर्गृहिभिःपूर्वैकादश्युपोष्या यतिभिर्निष्कामगृहिभिर्वनस्थैर्विधवाभिर्वैष्णवैश्चपरैवोपोष्या विष्णुप्रीतिकामैरुपवासद्वयंकार्यमितिकेचित्. भे० ७.<br>ही एकादशी एकादशीमात्राधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्त गृहस्थांनीं पूर्व दिवसाची एकादशी उपोषणास घ्यावी. संन्यासी, निष्कामगृहस्थाश्रमी, वानप्रस्थ, विधवा आणि वैष्णव या सर्वांनीं दुसऱ्या दिवसाचीच उपोषणास घ्यावी. विष्णुप्रीति इच्छिणाऱ्यांनीं दोन उपोषणें करावीं असें केचित् ह्मणतात. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५८ | ० | ६० | १ | ५८<br>क्ष | ०<br>य | |
| शुद्धाधिकासमद्वादशिका. | ५९ | ५९ | ६०<br>१ | ०<br>० | ५९<br>क्ष | ०<br>य | इयमप्येकादशीमात्राऽधिक्यवतीशुद्धा अत्रस्मार्तैर्गृहिभिः पूर्वैकादश्युपोष्या यतिभिर्निष्कामगृहिभिर्वनस्थैर्विधवाभिर्वैष्णवैश्चपरैवोपोष्या विष्णुप्रीतिकामैरुपवासद्वयंकार्यमितिकेचित्. भे० ८<br>हीहि एकादशी एकादशीमात्राधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणींहि स्मार्त गृहस्थाश्रमींनीं पूर्व दिवसाची एकादशी उपोषणास घ्यावी. संन्यासी, निष्काम गृहस्थाश्रमी, वानप्रस्थ, विधवा आणि वैष्णव या सर्वांनीं दुसऱ्या दिवसाचीच उपोषणास घ्यावी. विष्णुप्रीति इच्छिणाऱ्यांनीं दोन उपोषणें करावीं. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५८ | ६० | ६० | १ | ५८<br>क्ष | ०<br>य | |

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | |
|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. |
| शुद्धाधिकाधिकद्वादशिका. | ५९ | ५९ | ६०<br>१ | ०<br>● | ३ | ० |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ५८ | ० | ६०<br>१ | ०<br>० | ४ | ० |

इयमुभयाऽधिक्यवतीशुद्धा अत्रसर्वैःस्मार्तैर्वैष्णवैश्चावशिष्टापरैवैकादश्युपोष्या. भे० ९.

ही एकादशी उभयाधिक्यवती शुद्धा आहे. या उदाहरणीं, सर्व स्मार्त व वैष्णव यांनीं अवशिष्ट असी दुसऱ्या दिवसाचीच एकादशी उपोषणास घ्यावी.

इमेस्मार्तानांविद्धैकादशीभेदाः अत्रविद्धत्वंसूर्योदयेदशमीसत्त्वं सूर्योदयस्तुषष्टिघटिकात्यक्षणाव्यवहितोत्तरक्षणलवादिकालावच्छिन्नः इयमपि विद्धा चतुर्विधा साचोदाहरणेषुप्रदर्श्यंते ॥

## हे स्मार्तांचे विद्धैकादशीचे भेद.

एथें विद्धत्व ह्मणजे सूर्योदयकालीं दशमी तिथि असणें तें. सूर्योदय तर, साठ घटिकांचे शेवटचा जो क्षण त्याचे सन्निहित असा जो पुढचा क्षणलवादिकाल त्यास व्यापून राहणारा तो. ही विद्धा एकादशीहि चार प्रकारची आहे. ते चार प्रकार उदाहरणांनीं दाखवितों.

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | |
|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. |
| विद्धन्यूनान्यूनद्वादशिका. | २ | ० | ५७<br>क्ष | ५९<br>य | ५७ | ० |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | २ | ० | ५६<br>क्ष | ०<br>य | ५५ | ० |

इयमनुभयाऽधिक्यवती विद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामुपवासः वैष्णवानां द्वादश्यामुपवासः भेदः १.

ही एकादशी अनुभयाधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्तांनीं एकादशीचे ठायीं उपवास करावा. वैष्णवांनीं द्वादशीचे ठायीं करावा.

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | |
|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. |
| विद्धन्यूनासमद्वादशिका. | २ | ० | ५७<br>क्ष | ५९<br>य | ६० | ० |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | २ | ० | ५६<br>क्ष | ०<br>य | ५५ | ० |

इयमप्यनुभयाऽधिक्यवती विद्धा अत्रापिस्मार्तानामेकादश्यामुपवासः वैष्णवानां द्वादश्यामुपवासः भेदः २.

हीहि एकादशी अनुभयाधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्तांनीं एकादशीचे ठायीं उपवास करावा. वैष्णवांनीं द्वादशीचे ठायीं उपवास करावा.

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. | |
| विद्धन्यूनाधिकद्वादशिका. | १ | ० | ५८ | ५९ | ६०<br>१ | ०<br>० | इयंद्वादशीमात्राऽधिक्यवती विद्धा अत्रैकादश्या विद्धत्वात् द्वादश्यामेवस्मार्तानामप्युपवासः तत्रकिमुवक्तव्यं वैष्णवानामिति एवंचोभयाधिक्ये द्वादशीमात्राधिक्येच स्मार्तानां विद्धायास्त्यागोनान्यत्र. भे० ३. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | १ | ० | ५८ | ० | ६०<br>० | ०<br>१ | ही एकादशी द्वादशीमात्राधिक्यवती विद्धा आहे. ही एकादशी विद्धा आहे यास्तव द्वादशीचे ठायींच स्मार्तांनींहि उपवास करावा. द्वादशीचे ठायीं वैष्णवांनीं करावा याविषयीं सांगणें नको. याप्रमाणें उभयाधिक्य व द्वादशीमात्राधिक्य असतां स्मार्तांनीं विद्धैकादशी टाकावी, अन्यत्र टाकूं नये. |
| विद्धसमान्यूनद्वादशिका. | २ | ० | ५८<br>क्ष | ०<br>य | ५८ | ५९ | इयमनुभयाऽधिक्यवती विद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामुपवासः वैष्णवानां द्वादश्यामुपवासः भेदः ४. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | २ | ० | ५६<br>क्ष | ०<br>य | ५५ | ० | ही एकादशी अनुभयाधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्तांनीं एकादशीचे ठायीं उपवास करावा. वैष्णवांनीं द्वादशीचे ठायीं उपवास करावा. |
| विद्धसमासमद्वादशिका. | २ | ० | ५८<br>क्ष | ०<br>य | ६० | ० | इयमप्यनुभयाऽधिक्यवतीविद्धा अत्रस्मार्तानामेकादश्यामुपवासः वैष्णवानां द्वादश्यामुपवासः भे०५. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | २ | ० | ५६<br>क्ष | ०<br>य | ५५ | ० | ही एकादशी अनुभयाधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्तांनीं एकादशीचे ठायीं उपवास करावा. वैष्णवांनीं द्वादशीचे ठायीं उपवास करावा. |
| विद्धसमाऽधिकद्वादशिका. | २ | ० | ५८<br>क्ष | ०<br>य | ६०<br>१ | ०<br>० | इयंद्वादशीमात्राऽधिक्यवती विद्धा अत्रैकादश्या विद्धत्वात् द्वादश्यामेव स्मार्तानामप्युपवासः तत्रकिमुवक्तव्यंवैष्णवानामिति पूर्ववदत्रस्मार्तानां विद्धायास्त्यागः भे० ६. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | १ | ० | ५८<br>क्ष | ०<br>य | ६०<br>० | ०<br>१ | ही एकादशी द्वादशीमात्राधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं, एकादशी विद्धा आहे याकरितां स्मार्तांनींहि द्वादशीचे ठायींच उपवास करावा. वैष्णवांनीं द्वादशीचे ठायीं करावा याविषयीं सांगणें नको. तिसऱ्या भेदांत सांगितल्याप्रमाणें ह्या स्थलीं स्मार्तांनीं विद्धेचा त्याग करावा. |

| | दशमी. | | एकाद. | | द्वादशी. | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | घ. | प. | घ. | प. | घ. | प. | |
| विद्धाधिकान्यूनद्वादशिका. | ७ | ० | २ | ० | ५५<br>क्ष | ०<br>य | इयमेकादशीमात्राऽधिक्यवती विद्धा अत्रस्मार्तैर्गृहिभिः पूर्वैकादश्युपोष्या यतिभिर्निष्कामगृहिभिर्वनस्थैर्विधवाभिर्वैष्णवैश्चपरैवोपोष्या विष्णुप्रीतिकामैः स्मार्तैरुपवासद्वयंकार्यमिति केचित्. भे० ७ |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ४ | ० | २ | ० | ५८<br>क्ष | ०<br>य | ही एकादशी एकादशीमात्राधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्त गृहस्थांनीं पूर्वदिवसाची एकादशी उपोषणास घ्यावी. संन्यासी, निष्काम गृहस्थाश्रमी, वानप्रस्थ, विधवा आणि वैष्णव या सर्वांनीं दुसऱ्या दिवसाचीच उपोषणास घ्यावी. विष्णुप्रीतिकाम स्मार्तांनीं दोन उपोषणें करावीं असें केचित् ह्मणतात. |
| विद्धाऽधिकासमद्वादशिका. | ५ | ० | २ | ० | ५८<br>क्ष | ०<br>य | इयमप्येकादशीमात्राऽधिक्यवती विद्धा अत्रस्मार्तैर्गृहिभिः पूर्वोपोष्या यतिभिर्निष्कामगृहिभिर्वनस्थैर्विधवाभिर्वैष्णवैश्चपरैवोपोष्या विष्णुप्रीतिकामैः स्मार्तैरुपवासद्वयंकार्यमिति केचित्. भे० ८. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | ४ | ० | २ | ० | ५८<br>क्ष | ०<br>य | ही एकादशीहि एकादशीमात्राधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं स्मार्त गृहस्थाश्रमी यांनीं पूर्व दिवसाची उपोषणास घ्यावी. संन्यासी, निष्काम गृहस्थाश्रमी, वानप्रस्थ, विधवा आणि वैष्णव या सर्वांनीं दुसऱ्या दिवसाचीच उपोषणास घ्यावी. विष्णुप्रीतिकाम स्मार्तांनीं दोन उपोषणें करावीं असें केचित् ह्मणतात. |
| विद्धाधिकाऽधिकद्वादशिका. | ७ | ० | ४ | ० | ३ | ० | इयमुभयाधिऽक्यवतीविद्धा अत्रसर्वैःस्मार्तैर्वैष्णवैश्चावशिष्टापरैवैकादश्युपोष्या एतदुदाहरणेपिस्मार्तानांविद्धायास्त्यागः भे० ९. |
| धर्माब्धिस्थमुदाहरणं. | २ | ० | ३ | ० | ४ | ० | ही एकादशी उभयाधिक्यवती विद्धा आहे. या उदाहरणीं सर्व स्मार्त व वैष्णव यांनीं अवशिष्ट असी दुसऱ्या दिवसाचीच उपोषणास घ्यावी. या उदाहरणींहि स्मार्तांनीं विद्धेचा त्याग करावा. |

धर्मसिंधूंतील एकादशीनिर्णयाचा पट.

रामचंद्रतनूजेन वासुदेवेन विन्मुदे ॥
धर्माब्धिशेषपट्टोयमशोध्येकादशीभिदां ॥ १ ॥

रामचंद्रोपाध्यायांचे पुत्र वासुदेवोपाध्याय यांनीं धर्माब्धीचा शेषभूत एकादशीचे भेदांचा हा पट विद्वत्संतोषाकरितां शोधिला आहे.

रसांकसप्तभूशके तपस्यविघ्नराट्तिथौ ॥
गुरौसमापितो मया पटः करोतु शं सतां ॥ २ ॥

शके १७९६ या वर्षी फाल्गुन शुद्ध चतुर्थी, गुरुवार या दिवशीं मी समाप्त केलेला हा पट सज्जनांला सुख करो.

